॥ श्री ॥

सुप्रसिद्ध सांप्रदायिक ब्रह्मीभूत श्रीनानामहाराज साखरेप्रणीत

श्रीमद्भगवद्गीताश्लोकपदच्छेदान्वयार्थासह

# सार्थ-ज्ञानेश्वरी.

[ सटीक. ]

लेखक

सुप्रसिद्ध सांप्रदायिक

श्रीनानामहाराज जोशी साखरे

यांचे चिरंजीव

विनायक नारायण जोशी साखरे.

मुद्रक व प्रकाशक

त्र्यंबक हरी आवटे.

पुणें येथें सदाशिव पेठेंत "इंदिरा" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

सुधारलेली आवृत्ति चौथी.

मिति फाल्गुन वद्य २ शके १८४६.

किंमत ६ रुपये.

हा ग्रंथ त्र्यंबक हरी आवटे यांनीं पुणें पेठ सदाशिव येथील आपल्या
'इंदिरा' छापखान्यांत छापून पुणें पेठ सदाशिव
घर नंबर २७० येथें प्रसिद्ध केला.

# प्रकाशकाचें आत्मनिवेदन.

पाहा हो देवा कैसे जन । भिन्न भिन्न संचितें ॥ १ ॥
एक नाहीं एका ऐसें । दावी कैसें शुद्ध हीन ॥ २ ॥
पंचभूतें एकी राशी । सर्वें कैशी खेळवी ॥ ३ ॥
तुका म्हणे जो जे जाती । तैशी स्थिति येतसे ॥ ४ ॥

श्रीतुकाराममहाराज.

महान् भगवद्भक्त श्रीतुकाराममहाराज यांनीं वरील अभंगांत वर्णन केल्याप्रमाणें वास्तविक जगांतील प्राणिमात्राची स्थिति आहे. सर्व प्राणिमात्राचे देह पंचभूतांनीं बनलेले असतां, व सर्वांच्या देहाच्या सांगाड्यांत हाडें, मांस इत्यादिकांची एकच रास असतांही प्रत्येक प्राण्याची रचना व वृत्ति-स्वभाव निरनिराळ्या प्रकारचे दिसतात. एक चांगला तर एक वाईट, एक श्रीमंत तर एक गरीब, एखाद्यास अन्नाच्छादनाची भरपूर सोय तर एखादा चतकोर तुकड्यास व फाटक्या चिरगुटासही महाग! अशी जगाची स्थिति उघड दिसते. याचें कारण पूर्वजन्मांतील पापपुण्यविभागानें सांठलेलें संचित होय. संचिताप्रमाणें जगांतील सुखदुःखें प्राणिमात्रास भोगावीं लागतात ज्याचें जसें पापपुण्य असेल, त्याप्रमाणें त्यांच्या संचिताचा जमाखर्च होऊन प्राणिमात्रास निरनिराळ्या जातींत जन्मास यावें लागतें व त्या जातीची स्थिति भोगावी लागते. हें जगांतील प्राणिमात्राचें जन्ममरणरूपी रहाटगाडगें सारखें अबाधित चालूं आहे. यासच भवसागर-संसार म्हणतात. हा जन्ममरणरूपी संसार सुखकर व्हावा, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटून अक्षय्य सुखाची प्राप्ति व्हावी, म्हणून जगतांतील अनेक भावनेनें भरलेल्या लोकांची सारखी धडपड चाललेली असते. परंतु जन्मजन्मांतरींच्या पुण्याईवांचून जन्ममरणाच्या फचाट्यांतून सुटण्यास प्राणिमात्रास मार्ग नसतो. तो वेदप्रणीत मार्ग कृत, त्रेता व द्वापार युगीं अनेक ऋषी-मुनी आणि प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण यांनीं श्रीमद्भगवद्गीता-भागवतादि ग्रंथरूपानें जगास दाखविला. तोच वेदप्रणीत मार्ग या कलियुगांत वैदिक धर्मग्लानीच्या काळीं जैन, बौद्ध इत्यादि मतांचा गलबला झाला असतां श्रीशंकराचा अवतार आद्य शंकराचार्य यांनीं या भरतभूमींतील जडमूढ जीवांच्या उद्धारार्थ सोज्वलपणानें दाखविला.

भाग्यवंता हेंचि काम । मापी नाम वैखरी ॥ १ ॥
आनंदाची पुष्टी अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥ २ ॥
पिकलें तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥ ३ ॥
तुका करी प्रणिपात । दंडवत आचारिया ॥ ४ ॥

श्रीतुकाराममहाराज.

महा भाग्यवान श्रीमत् आद्य शंकराचार्य यांनीं वेदप्रणीत वैदिक धर्माचें अर्थात् अध्यात्मिक विद्येचें-जन्ममरणानिवृत्तीचें-संसार सुखरूप करण्याचें रहस्य आपल्या वेदांतप्रस्थानत्रयी इत्यादि ग्रंथमहोदधींत आणून अनेक मतवाद्यांचा पाडाव करून वैदिक धर्माचें रक्षण केलें. त्यांनीं आपल्या मायभाषेंत-संस्कृत भाषेंत हें वेदरहस्य आणलें नसतें, तर आम्हां भारतियांचा अनादि कालापासून चालत आलेला वैदिक धर्म या भरतखंडांत नामशेष होण्याची वेळ आली होती. एवढेंच नव्हे तर जगताची आदि जननी जी गीर्वाण-संस्कृत भाषा तीहि पण या जगतितलावरून नाहींशी झाली असती. एवढा उपकार आमच्या जगद्गुरु आदि शंकराचार्यांच्या ग्रंथमहोदधींनी जगतावर करून ठेविला; आणि त्यामुळेंच आम्हां भारतियांचें धार्मिक वैशिष्ट्य या महीमंडलावर अबाधित-अखंड कायम राहिलें आहे.

कालगतीनें सर्वगुणसंपन्न भरतखंडाची लालसा विदेशियास उत्पन्न होऊन त्यांनीं आपलें पाऊल भरतखंडांत आसुरी मायेनें शिरकविलें, त्यामुळें संस्कृत भाषेचा अभ्यास कायम ठेवण्यास अवसर सांपडला नाहीं. भरतखंडासारख्या अफाट राष्ट्रांत अनेक मोठमोठे वेदविहित धर्माचे छपन्न देश असल्यामुळें देशपरत्वें भाषेची योजना रूढ झाली. परंतु त्याही देशपरत्वें झालेल्या भाषेंत आध्यात्मिक ज्ञानाचें रहस्य वेदविहित संस्कृत भाषेंतूनच अनेक विभूतींनीं संग्रहीत करून जडमूढ जनांच्या उद्धाराचा मार्ग सरळ करून ठेविला. त्यांत विशेषतः महाराष्ट्रीय संतांनीं अर्थात् निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई या अवतारी विभूतींनीं वेदविहित मार्गास अनुसरून, श्रीमदाद्य शंकराचार्य यांच्या ग्रंथमहोदधीचा मागोवा घेऊन वेदविहित वैदिकधर्मांत भागवत धर्माचा पुरस्कार महाराष्ट्रीय देशभाषेंत-मराठी भाषेंत- गीता, ज्ञानेश्वरी, भागवत व गाथा

इत्यादि ग्रंथद्वारां ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकोबाराय, निळोबाराय इत्यादि संतांनीं केला.

श्रीमदाद्य शंकराचार्यांचें अद्वैत साध्य श्रीज्ञानदेव तुकारामादि संतांनीं आपल्या अधिकारवाणीनें ज्याचा जसा अधिकार असेल त्याप्रमाणें अनेक प्रकारच्या वचनांनीं भक्तिभावमाहात्म्यानें सिद्ध करून दाखविण्याचा सोप साधनमार्ग जगांतील जडमूढ जनाच्या उद्धारार्थ मोकळा केला. तोच भागवतधर्म–वारकरी संप्रदाय–महाराष्ट्रांत प्रमुखत्वानें सांप्रत चालु आहे. या वारकरी सांप्रदायाचा सोहोळा अर्थात् भगवन्नामसंकीर्तन अखंड चालू रहावें म्हणून वैभवशाली क्षत्रियकुलावतंस श्रीशिवाजी छत्रपती महाराज, शिंदे सरकार, सरदार हैबतराव बाबा, सरदार शितोळे वगैरे भागवतधर्मानुयायी मराठ्यांनीच अनेक प्रकारच्या देणग्या देऊन व ठिकठिकाणच्या क्षेत्रांचा जीर्णोद्धार करून वाढविला. त्या भगवन्नामसंकीर्तनाचा लाभ षट्कर्माधिकारी आचार्यानुगामी ब्राह्मणादि जनता व क्षत्रियमराठादि सर्व महाराष्ट्रीय जनता मोठ्या श्रद्धेनें प्रेमयुक्त अंतःकरणानें घेत आहे. असा हा आचार्यानुगामी महाराष्ट्रीय श्रीसंतांच्या वचनांचा प्रभाव आहे, हें आम्हां महाराष्ट्रीय जनतेचें देवदत्त भाग्य !!

या नश्वर जगांतील प्रवृत्तिमार्गांत राहूनही निवृत्तिमार्गाचा अक्षय सुखाचा शांतिसुखाचा उपभोग घेण्याचा अद्वैतज्ञान आणि भक्तिज्ञान जगास दाखविण्याचा सांप्रदाय प्रत्यक्ष शिवावतारी आद्य शंकराचार्य, विष्णु अवतारी श्रीज्ञानेश्वरमहाराज आणि महान् भगवद्भक्त उद्धवावतारी नामदेव–तुकाराममहाराज यांनीं आपल्या ब्रह्मविद्या ग्रंथरत्नमाला–वेदान्तप्रस्थानत्रयादि व श्रीसंतग्रंथरत्नमाला अर्थात् भागवतधर्मी वेदान्तरहस्यप्रस्थानत्रयादि ग्रंथांत मोठ्या अधिकारवाणीनें दाखविला. या पूज्य व धार्मिक ग्रंथमहोदधीकडे सांप्रत आमच्या आंग्लविद्याप्रवृत्त विचक्षण विद्वानांचें जावें तसें लक्ष जात नाहीं. इतकेंच नव्हे तर आमची जी मायभाषा–संस्कृत ती भाषा सांप्रतचें सरकार व त्यास अनुमोदन देणारे त्यांचेच अधिकारी भारतीय नोकर हे ट्रेनिंग कॉलेजांतून शिकविणेंच बंद करीत आहेत. मग महाराष्ट्रीय श्रीसंतग्रंथ अर्थात् टाळकुटयांचे ग्रंथ नुसते शाळेंत ठेवण्याची गोष्ट कशास पाहिजे ! एकंदरींत या उभय ग्रंथमहोदधीची कोणीही विशेष पर्वा करीत नाहींत. त्या ग्रंथांचें रहस्य भावी भारतीयांच्या अर्भकांच्या हृदयांत ओतण्याचा प्रयत्न करण्याचा कोणीही शिक्षित गृहस्थ अट्टाहास करावा तसा करीत नाहींत. सांप्रतच्या परिस्थितींत अप्रत्यक्षपणें सर्वतोपरी पूर्ण परवशतेच्या काळांतही आमच्या आंग्लविभूषित विद्वान् पुढाऱ्यांचें लक्ष आमच्या महाराष्ट्रीय संतांची स्वदेशहितप्रेरित वाङ्मय कामगिरी किती नीतिधर्मानुगामी मुत्सद्दीपणाची आहे, ह्यांकडे जाऊं नये, हीं मोठी शोचनीय स्थिति आहे. मात्र कित्येक द्रव्यहीन, धार्मिक, श्रद्धाळु ब्राह्मण–मराठा या जातींतील लोक सांप्रतच्या परवशतेच्या विकट काळांतही उभय ग्रंथांचा आपापल्या बुद्धिशक्तिसामर्थ्यानुरूप पुरस्कार करीत आहेत, म्हणूनच आज आम्हांस भारतीय म्हणवून घेण्यांत भूषण वाटत आहे व तीच साध्य आज पृथ्वीतलावरील सर्व राष्ट्रांस पटून चुकली असून तीच भारतीयांचे ग्रंथ भारतीयांची साम्राज्यसुखाची–इहपरसुखाची लालसा कालांतरानें तरी पूर्ण करतील अशी सर्वांची खात्री आहे.

एकंदरींत श्रीमदाद्य शंकराचार्यांच्या ग्रंथमहोदधीचा अर्थात् वेदान्तप्रस्थानत्रयीचें अध्ययन पूर्वपद्धतीप्रमाणें गुरुगृहीं वास करून ब्रह्मचारी आश्रमांत सतत बारा वर्षे व्हावयास पाहिजे. तसेंच श्रीज्ञानदेव–तुकारामादि संतांच्या ग्रंथमहोदधीचा अर्थात् वेदान्तरहस्यप्रस्थानत्रयीचा म्हणजे गीता ज्ञानेश्वरी, भागवत, गाथा यांचें पारायण, अध्ययन ब्रह्मचारी आश्रमांत सतत बारा वर्षे व्हावयास पाहिजे. असें वळण आमच्या महाराष्ट्रीय ब्राह्मणांस व मराठ्यांस आणि अधिकारी जनतेस लागणें अत्यंत जरूर आहे. श्रीसंतांच्या ग्रंथांची नुसतीं पारायणें जरी केलीं व तीही कोणताही व्यवसाय न करितां सतत बारा वर्षे ब्रह्मचारी आश्रमांत वयाच्या १५ व्या वर्षापासून केलीं, तर त्याचा परिणाम अभ्यास करणारास फलदायक होईल. शिवाय राष्ट्रासही तो हितकारक झाल्यावांचून राहणार नाहीं. संस्कृत शिक्षणाकरितां कांहीं कांहीं ठिकाणीं ब्राह्मणांनीं पाठशाळा, वैदिकाश्रम काढलेले दिसतात. परंतु त्यांत वरील प्रकारें विशेष सोय व्हावयास पाहिजे. अर्धवट शिकून विद्यार्थी बाहेर पडतात, यामुळें व्हावा तसा उपयोग होत नाहीं. अकरा विद्यार्थी कां होईनात, परंतु त्यांची अन्नाच्छादनाची, राहण्याची व शिकवण्याची सोय बारा वर्षे पावेतों कायम व्हावयास पाहिजे. हें कार्य महाराष्ट्रीय ब्राह्मण समाजाच्या एकजुटीनें अथवा एखाद्या धनिकाच्या उदारबुद्धीनें नियमबद्ध रचना करून सहज होणारें आहे.

परंतु श्रीसंतग्रंथाध्ययन-पारायणाची संघटित सोय अद्याप मराठादि भागवतधर्मी मंडळाकरितां कोठेंही झालेली दिसत नाहीं. सांप्रत काली संतग्रंथाध्ययन-पारायणाच्या सोयींची विशेष जरूर आहे. कर्मठ समाजाचा काल गेला. त्यामुळें कर्मठ समाजानेंही आपल्या पंचमहायज्ञादि कर्मठ क्रिया संभाळून श्रीसंतग्रंथांच्या भगवन्नामसंकीर्तनाची पारायणें करण्यानें दुधांत साखरच पडणारी आहे. पुढें मागें त्या समाजास परिस्थितीनुरूप श्रीसंतांच्या भागवतधर्मी संप्रदायांतूनच आपल्या उद्धाराचा मार्ग शोधण्याचा प्रसंग येणार आहे. करितां आचार्यग्रंथाध्ययन व श्रीसंतग्रंथाध्ययन-पारायण या उभय संप्रदायांची निरनिराळ्या परंतु जवळ जवळच परस्परावलंबी संस्थांची विशेष जरूर आहे. श्रीआचार्यग्रंथाध्ययनमंदिर व श्रीसंतग्रंथाध्ययन-पारायणमंदिर या नांवाची संस्था स्थापून तेथें आचार्यग्रंथाचें अध्ययन व श्रीसंतग्रंथाचें अध्ययन-पारायण करण्यास योग्य अशी उभय संप्रदायानुयायी विद्यार्थी मंडळी कांहीं तूर्त पांच पांच का होईनात ठेवण्यांत यावी. तेथें उभय संप्रदायांच्या ग्रंथांचा संग्रह करण्यांत यावा. उभय संप्रदायांप्रमाणें नियमबद्ध सुसंघटित व्यवस्था करण्यांत यावी.

अशा प्रकारचें आचार्य-संत-ग्रंथाध्ययनमंदिर पुण्यासारख्या शहरीं असावें असें माझ्या मनांत केवळ श्रीसंतग्रंथप्रकाशनाचें व मुद्रणाचें काम करीत असतां आलें; परंतु हें कार्य मजसारख्या सर्वथा असमर्थाकडून होणें अशक्य ! नुसती इच्छा असून उपयोग काय ! त्याला द्रव्यसाहाय्य मुबलक पाहिजे. जनतेची मदत पाहिजे. त्यांपैकीं मजजवळ कांहींच नसल्यामुळें ती माझी इच्छा मनांतल्या मनांतच वावरत राहिली. प्राप्तकाळ घडी आल्यास निदान आचार्य-संत ग्रंथाध्ययनमंदिराचा उपक्रम कोणाच्या तरी हातून पूर्णतेस नेण्यास श्रीसंतकृपाच समर्थ होईल, अशी आशा बाळगून समाधान मानणें भाग आहे. असो.

आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्ट विजयें । होआवें जी ॥

या संतोक्तीस अनुसरून सुप्रसिद्ध सांप्रदायिक ब्रह्मीभूत श्रीगुरू नानामहाराज साखरे यांच्या कृपेनें शके १८१७ चैत्र शुद्ध १ (१८९५) इंदिरा छापखान्याची स्थापना केली सुरवातीपासून कै. हरी कृष्ण दामले यांची शालोपयोगी ग्रंथमाला, रा. सा. नारायण भवानराव पावगी यांची भारतीय साम्राज्यमाला, आणि रा. रा. वासुदेव गणेश जोशी चित्रशाळेचे मालक यांची विविधग्रंथमाला छापण्यास मिळाली. रा. रा. गोपाळ महादेव विद्वांस यांची श्रीगुरुलीलामृत अथवा अक्कलकोट स्वामीचें चरित्र, भक्तीपर गणपतीची पदें १८९६. कै. चिंतामण गंगाधर गोगटे यांची ऐतिहासिक ग्रंथमाला १८९७. कै. गोपाळ कृष्ण गोखले यांची अंकगणितमाला १८९८. प्रा. चिंतामण गंगाधर भानु यांची श्रीमद्भगवद्गीता १८९९. कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचीं कामें १८९९. रा. रा. शिवराम गणपत पवार यांची पुस्तकें १८९९. रा. ब. काशिनाथ नारायन साने यांचे ऐतिहासिक ग्रंथ १९००. ब्रह्मीभूत केशव शास्त्री दामले यांचे पारमार्थिक ग्रंथ १९००. रा. रा. आप्पाजी विनायक जोशी यांची औषधी पुस्तकें १९००. कै. केरू नाना छत्रे यांचें अंकगणित १९०१. रा. रा. गणेश बळवंत लिमये यांची अंकगणितमाला १९०३. कै. गणेश विष्णु चिपळूणकर यांची भारत, भागवत रामायणादि ग्रंथमाला १९०३-१९०४. प्रो. लेले शास्त्री यांची अलंकारप्रकाशादि ग्रंथमाला १९०५. कै० पारखी शास्त्रीकृत पुस्तकें १९०५. कै० रामचंद्र भिकाजी दातार यांची पुस्तकें १९०५. रा. सा. नाटेकर कृत पुस्तकमाला. १९०६. रा. सा. गणपत बाळाजी बोरवणकर यांची पुस्तकमाला १९०९. रा. रा. एकनाथ गोविंद गोसावी यांची पुस्तकमाला १९०९. कै० निळकंठराव सुबंध यांची नामदेव-मासिकमाला १९०९. डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेटर सोसायटीचे ग्रंथ १९११. प्रिन्सिपाल ट्रेनिंग कालेज नाडकर्णी यांचें मराठी शिक्षक १९११. रा. रा. लक्ष्मण नारायण गोडबोले यांची शालोपयोगी पुस्तकमाला १९१५. वे. शा. स. बाळकृष्ण बचाजी जोशीकृत वाक्यवृत्ति १९१४. त्र. शा. सं. हेरम्बराज बाळशास्त्री शर्मा यांचें गाणपत्य स्मृतीचें अंकुश मासिक १९२०. इत्यादि इत्यादि लेखक व प्रकाशक यांचे लहानमोठे सुमारें ६५०।७०० अधीक ग्रंथ इंदिरा छापखान्यानें आज तीस वर्षांत मुद्रित केले. याबद्दल त्या त्या लेखकांचे व प्रकाशकांचे आभार मानणें माझें कर्तव्य आहे.

त्यांत विशेषतः ब्रह्मीभूत श्रीगुरू नानामहाराज साखरे-प्रणीत श्रीसंतग्रंथरत्नमाला अर्थात् सार्थ ज्ञानेश्वरी. गाथापंचक इत्यादि ग्रंथाचें प्रकाशन १९०५ पासून १९२५ चैत्र शु. १ शके १८४७ पर्यंत व पुढेंही सारखें चालू आहे. याचप्रमाणें श्रीमदाद्य शंकराचार्य यांचे ग्रंथ ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला अर्थात् दशोपनिषद्भाष्यार्थ, गीताभाष्यार्थ, ब्रह्म-

सूत्रशारीरभाष्यार्थ, दर्शनें इत्यादि ग्रंथ १९१४ पासून १९२५ सालांतही अद्याप चालूच आहेत. श्रीसंतग्रंथरत्न-माला व ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला या उभय प्रकाशनानें इंदिरा छापखान्यास कायमचें ऋणी करून ठेविलें आहे. या कामीं ह. भ. प. विनायकबोवा साखरे व वे. शा. सं. आचार्यभक्त विष्णु वामन बापटशास्त्री यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

श्रीसंतग्रंथरत्नमालेंतील पहिलें रत्न, शके १८४४ ची "सार्थ ज्ञानेश्वरी तिसरी आवृत्ति अवघ्या दोन वर्षांतच संपल्यामुळें सांप्रत ही चौथी आवृत्ति तिसऱ्या आवृत्ति प्रमाणेंच कानामात्रा दुरुस्त करून प्रकाशित केली आहे. तसेंच मालेंतील तिसरें रत्न-"गाथापंचक अर्थात् सकलसंतगाथा"--सुधारून वाढविलेली आवृत्ति दुसरी मुक्तीच सन १९२४ सालीं प्रकाशित केली आहे. मालेंतील तिसरें रत्न "**नाथभागवतसारामृत**" मूळासह प्रकाशित करणार होतों, परंतु सांप्रत जरेचा अंमल विशेष बसत चालल्यामुळें व नेत्रासही बराच कमीपणा येत असल्यामुळें काल समीप दिसूं लागला आहे. तेव्हां दुसरें रत्न प्रकाशनाचें काम माझ्याकडून खात्रीपूर्वक होईल असें वाटत नाहीं. शिवाय इंदिरा छापखान्याची व्यवस्थाही चि. शंकर आवटे अगर योग्य चालक यांजकडे लवकरच जाणार आहे. याउपर यदृच्छेनें काय घडेल तें घडो! प्राप्तकाळ घडी यावयाची असल्यास वे. शा. सं. विष्णु वामन बापटशास्त्री यांजकरवीं नाथभागवतसारामृताचा सुरू केलेला उपक्रम-त्यांचें ब्रह्मसूत्र शारीरभाष्य भाग २ रा छापून प्रसिद्ध झाल्यानंतर-त्यांनीं पूर्णतेस नेल्यास पुढील चालकच दुसरें रत्न प्रकाशित करतील असें कळविणें मला प्राप्त आहे. याउपर परमेश्वरकृपा अगाध आहे!!

सांप्रताच्या ज्ञानेश्वरीच्या चवथ्या आवृत्तींत कठीण शब्दांवर भरपूर टीपा दिल्या आहेत. टीपांच्या कामीं कै० कुंटे व इतर ज्ञानेश्वरींतील टीपा यांचा उपयोग केला आहे, यावद्दल त्या त्या ग्रंथकारांचा मी फार आभारी आहें. वे. शा. सं. विष्णु वामन बापटशास्त्री यांनीं केलेल्या "श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थ" या ग्रंथांतून भगवद्गीतेच्या श्लोकांचा अन्वयार्थ घेतला आहे. यामुळें श्लोकान्वयपद-च्छेदार्थ समजण्यास फारच सोपें झालें आहे, यावद्दल त्यांचाही मी फार फार आभारी आहें.

शेवटीं आज तीस वर्षें इंदिरा छापखान्याच्या योगानें श्री-मदाद्य शंकराचार्य यांची प्रस्थानत्रयी व श्रीज्ञानदेव-तुका-रामादि संतांची वेदांतरहस्यप्रस्थानत्रयींतील दोन ग्रंथांची मुद्रणप्रकाशनसेवा ज्या श्रीगुरू नानामहाराज साखरे यांच्या कृपेनें घडली व घडत आहे यावद्दल त्यांच्याच चरणीं लीन होऊन हें आत्मनिवेदन पुरें करितों.

करविली तैशी केली फटफट ।
वांकडी की नीट देव जाणे ॥ १ ॥
कोणा कारणें हें आलेसें निर्माण ।
देवाचें कारण देव जाणे ॥ २ ॥
तुका म्हणे मी या अभिमाना वेगळा ।
घालूनि गोपाळा भार असें ॥ ३ ॥

फाल्गुन वद्य २
शके १८४६.

त्र्यंबक हरी आवटे.

# प्रस्तावना.

सर्व जगतांत दुःखसंबंधरहित संपूर्ण सुखांच्या ऐश्वर्यानें मंडित असा कोण आहे, असें जर आपण सूक्ष्म रीतीनें विचार करून पाहूं लागलों, तर तशा प्रकारचा प्राणी फार विरळा, किंबहुना नाहींच म्हटलें तरी चालेल. प्रत्येकाचे पाठीमागें कांहींना कांहीं तरी दुःख आहेच. कोणास पुत्र नाहीं, कोणाची बायको कुरूप, कोणाजवळ द्रव्य नाहीं अशा प्रकारें कोणत्याना कोणत्या तरी कारणामुळें दुःख हें आहेच. एतावता, दुःखसंबंधरहित केवळ परमानंदाचा अनुभव कोणी घेत आहे असें सामान्य रीतीनें पाहणारास दिसत नाहीं; पण प्रत्येक प्राण्याची इच्छा तर तशी स्थिति आपणास असावी अशी आहे, व ती प्राप्त होण्याकरितां आपआपल्या बुद्धीनें ते लौकिक उपायही करीत असतात; परंतु लौकिक उपायेंकरून अत्यंत दुःखनाश होत नाहीं, व परमानंदाचा लाभही मिळत नाहीं. त्यास आचार्यद्वारां शास्त्रेकशरण होणें हाच उपाय आहे, ह्यावांचून दुसरा उपायच नाहीं. ही गोष्ट श्रुतीमध्यें अनेक ठिकाणीं सिद्ध केलेली आहे. पण त्या श्रुतीचे ठिकाणीं सर्व प्राण्यांस अधिकार नाहीं. कारण केवळ श्रुतिवाक्यावरूनच श्रुत्यर्थ ध्यानांत येण्याची योग्यता सर्वांचे ठिकाणीं नाहीं. जसा शूद्र किंवा स्त्रिया ह्यांचे ठिकाणीं अज्ञानाधिक्य असल्यामुळें त्यांस श्रुतीचे ठिकाणीं अधिकार नाहीं, तसाच स्मृतिवाक्यांचे ठिकाणींही नाहीं; ही जरी गोष्ट खरी आहे, तरी शूद्रांस किंवा स्त्रियांस दुःखाचे अत्यंत निवृत्तीची आणि परमानंदप्राप्तीरूप मोक्षाची इच्छा नाहीं, असें मात्र नाहीं. सर्वांसच मोक्षाची इच्छा आहे. अशा सर्व जीवांची भगवान् व्यास यांना करुणा येऊन सर्व वेदांचें सार अशी भगवद्गीता भारताच्या भीष्मपर्वामध्यें त्यांनीं ग्रथित केली. भारत हा ग्रंथ म्हणजे फार प्राचीन काळचा इतिहास आहे. त्यांत जागोजागीं भगवद्वर्णन केलेलें आहे, म्हणून पुण्यरूप आहे. फार काय सांगावें! वेदामध्यें जितका अर्थ प्रतिपादित आहे, तितका सर्व अर्थ व्यासांनीं या इतिहासांत प्रतिपादन केला आहे, म्हणून यास पांचवा वेद असें श्रेष्ठांनीं म्हटलें आहे. ह्या इतिहासाचें श्रवण करण्यास सर्वांस अधिकार आहे. त्याच्या श्रवणापासून वर लिहिलेल्या स्वरूपाचें मोक्षरूप फल श्रवण करणारास अथवा चिंतन करणारास प्राप्त होतें. त्यांतही भाषेच्या अडचणीमुळें सर्वांचाच प्रवेश होत नाहीं, व थोडेंसें संस्कृत भाषेचें ज्ञान असलें तर त्यापासून उत्तान अर्थ कळेल, परंतु त्यांतील रहस्य कळणार नाहीं; ह्याकरितां भगवान् विष्णूंनीं ज्ञानेश्वराचा अवतार धारण करून सर्व अनाथ जीवांचा उद्धार करण्याकरितां त्यावर श्रीभावार्थदीपिका (ज्ञानेश्वरी) नांवाचा टीकारूप ग्रंथ केला. प्राकृत भाषेंत भगवन्मनोगत व्यक्त करून दाखविणारा ज्ञानेश्वरीशिवाय दुसरा ग्रंथच नाहीं, असें म्हणण्यास कांहींएक धास्ती वाटत नाहीं. हें खुद्द श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपले ज्ञानेश्वरीचे १५ व्या अध्यायांत अश्वत्थपदाचें व्याख्यान करतेवेळीं लिहिलें आहे. तसें तेराव्या अध्यायांतही महाराजांनीं स्पष्ट सांगितलें आहे. असो; संस्कृत जाणणारांसही ज्याप्रमाणें शंकराचार्यांचें भाष्य समजून घेण्यास परंपरागत सांप्रदायिकांकडे जावें लागतें; त्यावांचून स्वबुद्धीनें भाष्य पाहूं म्हटलें तर कांहींएक समजत नाहीं, त्याचप्रमाणें हाही ग्रंथ परंपरागत सांप्रदायिकांस शरण जाऊन त्यांचेपासून समजून घेतला पाहिजे, अथवा साक्षात् श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं तरी एकाद्यावर अनुग्रह केला पाहिजे. त्यांपैकीं दुसरी गोष्ट अत्युत्कट पुण्याईवांचून होणार नाहीं; असे पुण्यसंपत्तिमान् पुरुष फार थोडे, अशा भाग्यवान् पुरुषांपैकींच **श्रीनानामहाराज साखरे** हे होत. ह्यांची परंपरा खालीलप्रमाणें आहे.

सुमारें १५५ वर्षांपूर्वी श्रीज्ञानेश्वरमहाराज ह्यांचे कृपेस पुणें येथील केसकर ह्यांचे वंशांतील श्रीअच्युत महाराज नांवाचे पुरुष पात्र झाले. जन्मांतरींच्या बहुत पुण्याईनें ह्या भाग्यवान पुरुषास अशी इच्छा झाली कीं, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्यावर कृपा करून ज्ञानेश्वरी ग्रंथ समजून द्यावा! ही इच्छा पूर्ण व्हावी म्हणून त्या थोर पुरुषानें श्रीक्षेत्र आळंदी येथें उपोषित राहून महाराजांचे समाधीपुढें ज्ञानेश्वरीचें पारायण करण्यास आरंभ करून असा निश्चय केला कीं, ज्या दिवशीं महाराजांचा अनुग्रह होईल त्याच दिवशीं महाराजांस नैवेद्य समर्पण करून पारणा करावयाची; नाहींपेक्षां अनुष्ठान करीत करीत प्राणत्याग करावयाचा। निश्चयाचें बळ। तुका म्हणे तेंचि फळ।। श्रीअच्युतमहाराज ह्यांचा हा तीव्र निश्चय पाहून

२७ वे दिवशीं रात्रीं श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं स्वप्नामध्यें दर्शन देऊन मस्तकावर वरदहस्त ठेविला, आणि सांगितलें कीं, आजपासून तूं जो ज्ञानेश्वरीचा अर्थ सांगशील तोच बरोबर असेल. अशा रीतीनें श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे कृपेस पात्र झालेले श्रीअच्युतमहाराज परमानंदाचा अनुभव घेत घेत शेवटीं परमानंदरूप झाले. त्यांस एक कनिष्ठ बंधु शामराज महाराज म्हणून होते, त्यांजवर त्यांनी अनुग्रह केला अशा जीवन्मुक्तिसुखाचा अनुभव घेत असतां अनंत जीवांवर त्यांनीं अनुग्रह केला. त्यांतच पुणे येथील राहणार व चिमाजीआप्पा ( पेशव्यांचे बंधु ) यांचे खासगी कारभारी **रामचंद्रपंत जोशी** यांजवरही त्यांनीं अनुग्रह केला, तो प्रकार असाः—

एके दिवशीं रात्रीं रामचंद्रपंत घोड्यावर बसून हिंडावयास निघाले असतां, येथील बुधवारांतील पासोड्या मारुतीचे देवळांत श्रीअच्युतमहाराज यांचें कीर्तन चालू होतें. तेथें क्षणभर उभे राहिले. श्रीअच्युतमहाराज यांची ज्ञानपूर्वक भक्ति, व निष्कपट वैराग्य पाहून, आणि अप्रतिम वक्तृत्व ऐकून दैवयोगानें त्यांस उपरति झाली. त्यांचे जवळ २१ लाख रुपये रोख होते. पोटीं पुत्रसंतान वगैरे कांहीं नव्हतें. अशा स्थितीत त्यांची अशी खात्री झाली कीं, ह्यांचेशिवाय आपलें संसारदुःख कोणी निवारण करणार नाहीं. ते दुसरे दिवशीं सकाळीच येथील सदाशिव पेठेंतील हौदापलीकडे श्रीअच्युतमहाराज यांजकडे गेले, आणि हात जोडून म्हणाले कीं, माझेवर अनुग्रह व्हावा, मी आपला शिष्य असून आपणास शरण आलों आहे. तेव्हां अच्युतमहाराजांनीं सांगितलें कीं, "बाबा, तूं श्रीमंत आहेस, आम्ही गरीब आहों, अशा स्थितीत तुझें व आमचें जमावें कसें ? परमार्थाला द्रव्य फार प्रतिबंधक आहे ?" असें श्रीअच्युतमहाराजांचे मुखांतील वाक्य श्रवण करितांच त्यांनीं लागलींच २१ लाख रुपयांवर त्यांचे समक्ष उदक सोडलें, आणि बुधवारांतून मोरोबादादांचे हौदाचें पाणी आपल्या खांद्यावर कावडीनें त्यांचे येथें भरलें. तेव्हां, श्रीअच्युतमहाराज यांचें अंतःकरण सुप्रसन्न होऊन त्यांनीं त्यांस उपदेश देऊन त्यांचेकडून श्रीज्ञानेश्वरी ग्रंथ अध्ययन करविला. तसेंच २१ लाख रुपये ब्राह्मणभोजनांत खर्च कर म्हणून सांगितलें त्याप्रमाणें त्यांनीं ब्राह्मणभोजनांत त्या द्रव्याचा व्यय केला. हें ब्राह्मणभोजन करतेवेळीं पुणें येथें व श्रीक्षेत्र आळंदी येथें अशी स्थिति झाली कीं, गांवांत व्यापाऱ्यांचे दुकानांत तूप व साखर मिळेनाशी झाली. तेव्हांपासून लोकांत त्यांचें नांव **साखरेबोवा** असें पडलें. साखरेबोवा हे पुणें येथें शनवारांतील मारुतीचे देवळासमोर आंबे यांचा वाडा आहे तेथें रहात असत. त्यांनीं गोपालकृष्णाची मूर्ति व गोपालकृष्ण महाराजांच्या पादुका यांची स्थापना ज्येष्ठ शु० १३ रोजीं केली. ते असतांना वाढदिवसाचा उत्साह ज्येष्ठ शु० १३ पासून १५ पावेतों तीन दिवस करीत. तसेंच श्रावणमासांत श्रावण वद्य १ पासून वद्य १० पावेतों गोकुळ अष्टमीचा मोठा उत्साह करीत असत. पुढें पुण्यांतील त्यांचे भाऊबंदांपैकीं गोविंदपंत जोशी यांचे चार पुत्र केशवराव, हरीपंततात्या, विनायकराव व पंढरीनाथआबा हे चौघेही त्यांचे शिष्य झाले. पंढरीनाथ आबा ( हे जन्मभर ब्रह्मचारी होते ) ह्या चौघांची गृहस्थिति फार गरीबीची होती, तथापि त्यांची साखरेबुवांच्या ठिकाणीं असलेली गुरुभक्ती मोठी अप्रतिम होती. ज्यावेळीं साखरेबोवांच्या मनांत संन्यास करावयाचें आलें, त्या वेळीं हें संस्थान कोणाचे स्वाधीन करावें. असा प्रश्न सहजच त्यांच्या व त्यांचे हजारबारांशें शिष्य होते त्यांच्या मनांत आला. त्या मंडळींत श्रीमान् लोक बरेच होते. त्यांनीं त्यांचे जवळ संस्थान आमचेकडे द्यावें म्हणून प्रार्थना केली, परंतु आम्ही सर्वांचे म्हणण्याचा विचार करून काय करावयाचें तें करूं, असें ते सांगत असत. शेवटीं त्यांनीं सर्वांस बोलावून असें सांगितलें कीं, जरी आमचेजवळ श्रीमान् लोकांनीं देवस्थानची मागणी केली तरी आमचे मनोगताप्रमाणें देवस्थान चालविण्याचें हरीपंततात्या व पंढरीनाथआबा ह्यांचे शिवाय दुसऱ्याचे हातून होणार नाहीं; जरी ते गरीब आहेत, तरी भगवद्भक्ति म्हणजे काय हें त्यांसच माहीत आहे, असें सर्वांसमक्ष सांगून देवस्थान त्यांचे स्वाधीन केलें. तेव्हांपासून त्या जोशांचे घराण्यास **साखरे** असें नांव पडलें, तें अद्याप चालू आहे. पुढें ते संन्यस्थ झाले त्या वेळीं त्या आश्रमांतील त्यांचें नांव ब्रह्मानंद स्वामी असें होतें.

ते पुणें येथें समाधिस्थ झाले, तेव्हां त्यांचे पट्टशिष्य जे चौघे जोशी त्यांनीं त्यांचे इच्छेप्रमाणें व विधिप्रमाणें त्यांची समाधि श्रीक्षेत्र आळंदी येथें सिद्ध बेटांत त्यांस पुण्याहून नेऊन दिली, व पुढें ते त्यांची पुण्यतिथी करूं लागले ह्या बंधुचतुष्टयांची आपले गुरूंवर इतकी श्रद्धा असे कीं, आपले गुरु ज्या ठिकाणीं रहात असत,

त्या ठिकाणचा कोणी गडी, मोलकरीण, माणूस, कारकून कोणीही त्यांचेकडे येवो, हे सर्व बंधु त्यास वंदन करीत असत. इतकेंच नव्हे, तर साखरेबोवा समाधिस्त झाल्यास सुमारें १२५ वर्षें झालीं व त्यांचे संस्थानचा उत्साह अद्याप श्रीनानामहाराज जोशी साखरे यांचे वंशाकडे चालू आहे, तरीही पण आम्हे त्यांच्या वाड्यांतील जानवी काढण्यास बसणारे तेलंगी त्यांना पंढरीनाथ महाराजांनी त्याही असें नांव दिलें; त्याचप्रमाणें श्रावणमासाचा उत्साह सुरू झाला कीं, पहिले दिवशी त्यांना भोजनास आमंत्रण करावयाचें, ही गोष्ट अद्यापपावेतों साखरे यांचें घरी चालू आहे. जोशी बंधुचतुष्टय यांचा "देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ अन्न आच्छादन । हे तो प्रारब्धाधीन " इत्यादि वचनांवर पूर्ण निश्चय असल्यामुळें उपजीविकेच्या साधनांत कोणीच प्रवृत्त झालें नाही. त्या चौघांपैकीं हरीपंततात्यांस तीन पुत्र व चार कन्या असा परिवार होता. तथापि ते प्रपंचाकडे कधीं ढुंकून देखील बघत नसत. उपरामस्थितींत ते नेहमीं असत, कोणी अंतरंगी पुरुष आलाच, तर त्याच्याशीं अध्यात्मज्ञानाचीच गोष्ट बोलावयाची त्यामुळें त्यांचे ठिकाणीं सर्व बंधूंची गुरुबुद्धी असे. त्यांच्या परिवाराचें संगोपनाची खटपट आपण स्वतः ब्रह्मचारी असतां सुद्द पंढरीनाथआबाच करीत असत. ही मुलें लहान असतांच हरीपंततात्या हे वारले; पुढें पंढरीनाथ आबा यांनी त्या मुलांचा सांभाळ करून गुरूंकडून भाग्यानें प्राप्त झालेले श्रीगोपालकृष्णाचें संस्थान व गुरूंची कार्तिक शुद्ध ९ ची साखरेबुवांची पुण्यतिथि ही कृत्यें ते त्यांचे हातून करवूं लागले. त्याचप्रमाणें श्रीज्ञानेश्वरी व अमृतानुभव ह्या ग्रंथांचेंही त्यांनी त्यांचेकडून अध्ययन करविलें. श्रीहरीपंततात्यांचे मुलांपैकीं **रामभाऊ** व **नाना** हेच काय ते अध्ययन करण्याचे वयांत होते.; आणि ते त्यांचे शिष्य होते. तिसरे **दामुअण्णा** हे त्या वेळीं लहान होते. त्यांपैकीं पंढरीनाथ महाराजांचे मनाप्रमाणें ज्ञानेश्वरीचें अध्ययन **श्रीनानामहाराज** त्यांनीं केलें. साखरेबोवांचे देवस्थानचे संबंधानें गुरुवारी व एकादशीस रात्रौ जागर व पद्वादेस पंचपदी असा क्रम आहे. जागरास साखरेबोवांचे शिष्य व पुढें जोशी ह्यांचे झालेले शिष्य येत असत. त्यांचेपुढें पंढरीनाथ महाराजांनीं **श्रीनानामहाराज** त्यांचेकडून ज्ञानेश्वरी सांगवावी; अशा रीतीनें **श्रीनानामहाराज** ह्यांचा सुमारें बारापंधरा वर्षें श्रीज्ञानेश्वरी ग्रंथावर असा कांहीं अभ्यास झाला कीं, सर्व ज्ञानेश्वरी ग्रंथ त्यांस मुखोद्गत झाला. ते स्वप्नांत जरी बरळले तरी ज्ञानेश्वरीच्या ओंवीचा अर्थच बरळत. इतकी त्यांची त्या ग्रंथांत तयारी झाली. गुरुकृपेनें त्यांचे वक्तृत्वास इतका कांहीं मोहकपणा आला होता कीं, कोणीही सहज जरी **श्रीनानामहाराजांचे** मुखांतून ज्ञानेश्वरीच्या चार ओंव्या ऐकिल्या तरी त्याची चित्तवृत्ति रंगून गेल्याशिवाय रहात नसे. ह्या अप्रतीम गुणामुळें वडील व चुलते वारल्यानंतर ह्या संस्थानचें पारमार्थिक कृत्याचा सर्व भार **श्रीनानामहाराजां**वरच पडला. पूर्वी वडिलांनीं कीर्ति संपादन केली होतीच, त्यांतही **श्रीनानामहाराजांचे** अंगचे गुणानें ही सर्व कृत्यें मोठ्या व्यवस्थेनें चाललीं. **श्रीनानामहाराज** यांनीं आपलें सर्व आयुष्य श्रीज्ञानेश्वरीच्या अध्ययनांत व अध्यापनांत घालविलें. कोणी कोणत्याही वेळीं कोणतेही जातीचा कोणत्याही अधिकाराचा मनुष्य त्यांच्याकडे जावो, त्याला आतां मी सांगत नाही, असें त्यांनीं कधींही कोणास म्हटलें नाहीं. ते असत तोंपर्यंत त्यांचे घरीं रोज ज्ञानेश्वरीचा पाठ व त्यावर प्रवचन चालत असे.

श्रीज्ञानेश्वरीवर होत असलेल्या **श्रीनानामहाराज साखरे** यांच्या प्रवचनाचा लाभ मुमुक्षुजनास करून देऊन, वडिलांची सेवा करावी म्हणून मी **श्रीनानामहाराज साखरे** यांनी सांगितलेल्या अर्थाचा 'सार्थ ज्ञानेश्वरी' नांवाचा ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला होता. त्याचा श्रद्धाळु भाविक मुमुक्षुजनांत वारंवार प्रसार व्हावा याकरितां **श्रीनानामहाराज साखरे** यांच्या ठिकाणीं त्र्यंबक हरी आवटे, इंदिरा छापखान्याचे मालक, यांची आज ३०-३२ वर्षें असलेली भक्तिश्रद्धा व अध्यात्मिक ग्रंथप्रकाशनाची त्यांची आवड पाहून त्यांस तो प्रेमानें वारंवार प्रकाशनास दिला. त्यांनीं मोठ्या उत्साहानें सदरहू ग्रंथास अनेक सद्भक्तांच्या सूचनेवरून मोठा टाईप घातला आहे. त्यामुळें ज्ञानेश्वरीचा पाठ करणाऱ्या आबालवृद्धांच्या दृष्टीस कोणत्याही प्रकारचा त्रास न होतां पाठास सुलभ झालें आहे. ही सोय केल्यामुळें ग्रंथाचीं २०० पृष्ठें अधीक वाढलीं असूनही भाविक मुमुक्षु ग्राहकांस सोयीवार पडेल अशीच सवलतीची किंमत ठेविली आहे. त्यांच्या प्रकाशनास वारंवार यश मिळो. असो; या ग्रंथांत दोष झाले नसतील असें मी म्हणत नाहीं. तथापि विद्वान लोक ते दोष मला कळवून गुण मात्र ग्रहण करोत अशी सर्व जीवांना बुद्धिदात्या नारायणाची प्रार्थना करून ही प्रस्तावना संपवितों.

आषाढ शुद्ध १ शके १८३७. } **विनायक नारायण जोशी, साखरे.**

# अनुक्रमणिका.



## ज्ञानेश्वरीची सप्ताहपद्धति.

श्रावण वद्य १ ते वद्य ८.

| दिवस | अध्याय. | सकाळी. गीताश्लोक. | चवथेप्रहरीं. ओंव्या. |
|---|---|---|---|
| १ | ५ | | |
| २ | ६, ७ | ,, | ,, |
| ३ | ८, ९, १० | ,, | ,, |
| ४ | ११, १२ | ,, | ,, |
| ५ | १३, १४ | ,, | ,, |
| ६ | १५, १६, १७ | ,, | ,, |
| ७ | १८ | ,, | ,, |
| ८ | ... | ... | सर्व गीता वाचणें. |

# गीतामहात्म्य.

गीतेचें महिमान ऐकावें श्रवणीं । सावधान सज्जनीं व्हावें आतां ॥ १ ॥
जयाचे अंतरीं वसे नित्य गीता । पावन तत्त्वतां ब्रह्मरूप ॥ २ ॥
गीता म्हणतां ऐसे दोन्हीच अक्षरें । पाप तें निर्धारें दिशा लंघी ॥ ३ ॥
भगवद्गीता पठण सर्वकाळ ज्यासी । मोक्षाची तो रासी मूर्तिमंत ॥ ४ ॥
गीता म्हणतां त्यासी काय पुण्य आहे । इतिहास पाहे पुराणींचा ॥ ५ ॥
पार्वतीयेप्रती शिवें सांगितलें । आध्यात्म बोलिले ब्रह्मविद्या ॥ ६ ॥
ब्रह्मरूप त्याचें स्वयें चित्त झालें । बोलणें खुंटलें आहे नाहीं ॥ ७ ॥
नित्य म्हणतां गीता वाचेसी स्मरण । केलिया पठण पुण्य काय ॥ ८ ॥
दोषाचे पर्वत भस्म होती तेणें । गीतेचें पठण केलियानें ॥ ९ ॥
श्रवण पठण गीतेचें पूजन । सर्वही साधन कलियुगीं ॥ १० ॥
पद्मपुराणींचें सांगितलें सार । गीता आहे थोर ब्रह्मविद्या ॥ ११ ॥
सर्वही पातकें जळोनियां जाती । अर्जुना श्रीपती बोलियेला ॥ १२ ॥
गीता अभ्यासितां कळे सारासार । महिमा आहे थोर पठणाचा ॥ १३ ॥
गीता म्हणतां आहे पापा प्रायश्चित्त । मुक्ति सायुज्यता वरी त्यांसी ॥ १४ ॥
गीता म्हणतां जाण भागिरथी स्नान । पृथ्वीची दान दिधली तेणें ॥ १५ ॥
गीता ध्याई नर सर्वदा तो सुखी । सर्वही तीर्थांची महिमा तेथें ॥ १६ ॥
तीर्थक्षेत्रयात्रा देवाचें पूजन । यज्ञयाग दान उद्यापन ॥ १७ ॥
धरणीं पारणीं नित्य उपोषण । पृथ्वीचें भ्रमण निराहारी ॥ १८ ॥
जपतपव्रत नित्य अनुष्ठान । कर्म आचरण उपासना ॥ १९ ॥
पुराण श्रवण वेदशास्त्रीं जाण । सर्वही साधन घडे त्यासी ॥ २० ॥
ब्रह्मविद्या गीता सर्वांचें साधन । करी जो पठण नित्यकाळीं ॥ २१ ॥
एकाजनार्दनीं नित्य हेंचि ध्यान । पूर्ण समाधान घडे तेणें ॥ २२ ॥

# श्रीज्ञानदेवमहिमा.

ज्ञानदेव चतुराक्षरी जप हा करितु सर्वज्ञा । ज्ञानाज्ञानविरहित ब्रह्मप्राप्तीची संज्ञा ।
ज्ञाता ज्ञेय जागे होय ऐसी प्रतिज्ञा । ज्ञानाग्नीनें पापें जळती हे ज्याची आज्ञा॥ ॥१॥
ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणतां ज्ञान देव देतो । वासुदेव होतो अखंड वदनीं वदे तो ॥ध्रु०॥
नररूपें विष्णु अवतरला हा भगवान । नदी नद वापी कूप पहातां उदक नव्हे भिन्न ।
नवल हेंचि पशु म्हैसा करितो वेदाध्ययन। नमन करुनी सद्भावें जपतां होय विज्ञान ॥२॥
देवाधीश देव भक्ताप्रति वर दे । देतां वर ब्रह्मांडीं ब्रह्मा आनंद कोंदे ।
देशिकराज दयानिधि अलंकापुरीं जो नांदे । देशभाषा ज्ञानदेवी गीतार्थ वदे ॥ ३ ॥
वक्ता श्रोता श्रवणेंपठनें पावती समभाव । वर्णूं जातां अघटित महिमा होतो जीवशिव ।
वंदुनी अनन्य एकाजनार्दनीं धरीं दृढ भाव । वर्षती निर्जर ज्ञानदेवनामें पुष्पांचा वर्षाव॥४॥

---

# ज्ञानेश्वरीमहात्म्य.

ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणें निगमवल्लि प्रगट केली ॥ १ ॥
गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ॥ २ ॥
अध्यात्मविद्येचें दाविलेंसें रूप । चैतन्याचा दीप उजळिला ॥ ३ ॥
छपन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नाव उभारिली ॥ ४ ॥
श्रवणाचे मिषें वैसावें येउनी । सामराज्य भुवनीं सुखी नांदे ॥ ५ ॥
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओंवी अनुभवावी ॥ ६ ॥



॥ श्री ॥

सुप्रसिद्ध सांप्रदायिक ब्रह्मीभूत श्रीनानामहाराज साखरेप्रणीत

श्रीमद्भगवद्गीताश्लोकपदच्छेदान्वयार्थासह

# सार्थ ज्ञानेश्वरी.

[ सटीप ]

## श्रीनानामहाराज साखरे



जन्मशक १६५०.　　　　समाधिशक १८२५.

बालोद्यान प्रेस, पुणें.

॥ श्री ॥

सुप्रसिद्ध सांप्रदायिक ब्रह्मीभूत श्रीनानामहाराज साखरेप्रणीत

श्रीमद्भगवद्गीताश्लोकपदच्छेदान्वयार्थासह

# सार्थ ज्ञानेश्वरी.

[ सटीप ]



## नमः परमात्मने ।



### अथ ध्यानम्.

पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं
व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम् ।
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनी–
मम्ब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥

**अन्वयार्थ**—( अम्ब भगवद्गीते )–हे माते भगवद्गीते !–( भगवता नारायणेन स्वयं )–भगवान् नारायणांनीं स्वतः–( पार्थाय प्रतिबोधितां )–अर्जुनाला उपदेशिलेली–( पुराणमुनिना व्यासेन )–प्राचीन मुनी व्यासांनीं–( मध्येमहाभारतं ग्रथितां )–महाभारतामध्यें ग्रथित केलेली,–( अद्वैतामृतवर्षिणीं )–अद्वैतरूप अमृताचा वर्षाव करणारी–( भवद्वेषिणीं )–संसाराचा द्वेष–उच्छेद करणारी व–( अष्टादश-अध्यायिनीं भगवतीं )–जिचे अठरा अध्याय आहेत, अशी जी पूज्य गीता–( त्वां अनुसंदधामि )–त्या तुज गीतेचें मी चिंतन–स्मरण करितों. १.

नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे फुल्लारविन्दायतपत्रनेत्र ।
येन त्वया भारततैलपूर्णः प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥ २ ॥

**अन्वयार्थ**—( फुल्लारविन्द–आयतपत्रनेत्र विशालबुद्धे व्यास )–फुललेल्या कमलपत्रासारखे ज्यांचे आकर्ण नेत्र आहेत, ज्यांची बुद्धि विशाल आहे, अशा हे व्यासमुने !

–( येन त्वया भारततैलपूर्णः ज्ञानमयः प्रदीपः प्रज्वालितः )–ज्या तुम्ही भारतरूपी तेलानें भरलेला ज्ञानप्रचुर दीप प्रदीप्त केलात,–( ते नमः अस्तु )–त्या तुम्हाला नमस्कार असो. २.

प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ।
ज्ञानमुद्रायकृष्णाय गीतामृत दुहे नमः ॥ ३ ॥

अन्वयार्थ—( प्रपन्नपारिजाताय )–शरणागतास कल्पवृक्षाप्रमाणें असलेल्या –( तोत्रवेत्रैकपाणये )–ज्याच्या एका हातांत चाबकाची काठी आहे–( ज्ञानमुद्राय )–ज्यानें ज्ञानाची मुद्रा धारण केली आहे अशा–( गीतामृतदुहे )–गीतामृताचें दोहन करणाऱ्या–( कृष्णाय )–श्रीकृष्णाला–( नमः )–नमस्कार असो. ३.

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः ।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ४ ॥

अन्वयार्थ—( सर्वोपनिषदः गावः )–सर्व उपनिषदें याच गायी–( गोपाल: नन्दनः दोग्धा )–नंद गोपालाचा पुत्र हा दोहन करणारा–गवळी–( भोक्ता सुधीः पार्थः वत्सः )–व गीतामृताचें प्राशन करणारा भोक्ता–जीव बुद्धिमान् पार्थ हेंच वासरूं असून त्याच्यासाठीं–( महत् गीतामृतं दुग्धं )–मोक्षासारखें श्रेष्ठ फल देणाऱ्या गीतामृताचें दोहन केलें, [ उपनिषद्रूपी गायींपासून पार्थरूपी जीवासाठीं अन्तर्यामी नारायणानें गीतारूपी अमृताचें दोहन केलें. ] ४.

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ॥
देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥ ५ ॥

अन्वयार्थ—( वसुदेवसुतं )–वसुदेवाचा पुत्र–( कंसचाणूरमर्दनं देवं )–कंस व चाणूर यांना मारणारा देव–( देवकीपरमानन्दं )–देवकीचा परम आनंद अशा–( जगद्गुरुं कृष्णं )–सर्व जगताच्या धर्मोपदेशक श्रीकृष्णाला–( वन्दे )–मी वंदन करितों. ५.

भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गान्धारनीलोपला
शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला ।
अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी
सोत्तीर्णा खलु पाण्डवै रणनदी कैवर्तकः केशवः ॥ ६ ॥

अन्वयार्थ—( भीष्मद्रोणतटा )–भीष्म व द्रोण हे ज्या रणनदीचे दोन तीर आहेत,–( जयद्रथजला )–जयद्रथ हें जिच्यांतील जल आहे,–( गान्धारनीलोपला )–शकुनि हेच ज्यांतील काळे दगड आहेत,–( शल्यग्राहवती )–जी शल्य या सुसरीनें युक्त आहे,–( कृपेण वहनी )–कृपाचार्य याच प्रवाहानें जी वहात आहे,–( कर्णेन वेलाकुला )–कर्णाच्या योगानें जी दोन्ही तीरांवर क्षुब्ध झाली आहे,–( अश्वत्थामविकर्णघोरमकरा )–अश्वत्थामा व विकर्ण हेच जिच्यांतील भयंकर नक्र आहेत,–(दुर्यो-

धनावर्तिनी )–दुर्योधन हा जिच्यांतील मोठा भोंवरा आहे अशी–( सा रणनदी )–ती रणरूपी नदी–( पाण्डवैः खलु उत्तीर्णा )–पांडवांनीं खरोखर उल्लंघिली, कारण– कैवर्तकः केशवः )–त्यांचा नावाडी–त्यांना त्या रणनदींतून पार करणारा साक्षात् भगवान् केशव होता. ६.

पाराशर्यवचः सरोजममलं गीतार्थगन्धोत्कटं
नानाख्यानककेसरं हरिकथासद्वासनावासितम्।
लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा
भूयाद्भारतपङ्कजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥ ७ ॥

**अन्वयार्थ**—( पाराशर्यवचः सरोजं )–पराशरपुत्र भगवान् व्यास यांच्या वचनरूपी सरोवरांत उत्पन्न झालेलें–( अमलं )–निर्मल–शुद्ध–धर्म्य–( गीतार्थगन्धोत्कटं )–गीतार्थ हाच ज्याचा उत्कृष्ट सुवास आहे,–( नानाख्यानककेसरं )–नानाप्रकारचीं आख्यानें हेंच ज्यांतील केसर आहे,–( हरिकथासद्वासनावासितम् )–हरीकथारूप सद्वासनेनें जें सुवासित झालें आहे–( लोके सज्जनषट्पदैः अहरहः मुदा पेपीयमानं )–या लोकीं धार्मिक संतजन याच भ्रमरांकडून जें प्रत्यही मोठ्या आनंदानें वारंवार सेवन केलें जात आहे–( कलिमलप्रध्वंसि )–असें कलीचा मल घालविणारें–पातकांचा नाश करणारें–( भारतपंकजं )–भारतरूपी कमल–( नः श्रेयसे भूयात् )–आमच्या कल्याणास कारण होवो आमचें कल्याण करणारें होवो. ७.

मूकं करोति वाचालं पङ्गुं लङ्घयते गिरिम्।
यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम् ॥ ८ ॥

**अन्वयार्थ**—( यत्कृपा )–ज्यांची कृपा–( मूकं वाचालं करोति )–मुक्याला वाचाळ करिते–( पंगुं गिरिं लंघयते )–पांगळ्याकडून पर्वताचें उलंघन करविते–( तं परमानंदमाधवं )–त्या परमानंदरूप माधवाला–( अहं वन्दे )–मी वंदन करितों. ८.

यं ब्रह्मा वरुणेन्द्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैः स्तवै-
र्वेदैः साङ्गपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः।
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो
यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः ॥ ९ ॥

**अन्वयार्थ**—( ब्रह्मा वरुणेन्द्ररुद्रमरुतः यं दिव्यैः स्तवैः स्तुवन्ति )–ब्रह्मदेव, वरुण, इंद्र, रुद्र व मरुद्गण ज्याला दिव्य स्तुतींनीं स्तवितात.–( सामगाः सांगपदक्रमोपनिषदैः वेदैः यं गायन्ति )–साम गायन करणारे वैदिक व्याकरणादि अंगें, पदें, क्रम व उपनिषदें यांसह वेदांनीं ज्याचें गान–वर्णन करितात,–( योगिनः यं ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति )–योगी ज्याला ध्यानानें स्थिर केलेल्या आत्मनिष्ठ मनानें पाहतात,–( सुरासुरगणाः यस्य अन्तं न विदुः )–देव व दानव यांचे समूह ज्याचा अंत जाणत नाहींत–( तस्मै देवाय नमः )–त्या परमात्म्याला, स्वयंप्रकाश देवाला नमस्कार असो. ९

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय पहिला.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा १
देवा तूंचि गणेशु । सकलार्थमतिप्रकाशु । म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी २
हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष । तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ३
स्मृति तेचि अवयव । देखा अंगीक भाव । तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ४
अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें । पदपद्धती खेवणें । प्रमेयरत्नांचीं ५
पदबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर । जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचें ६
देखा काव्यनाटका । जें निर्धारितां सकौतुका । त्याचि रुणझुणती क्षुद्रघं-
टिका । अर्थध्वनि ७ नाना प्रमेयांची परी । निपुणपणें पाहतां कुसरी । दि-
सती उचितें पदें माझारीं । रत्नें भलीं ८ तेथ व्यासादिकांच्या मतीं । तेचि
मेखळा मिरवती । चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ९ देखा षड्दर्शनें
म्हणिपती । तेचि भुजांची आकृती । म्हणऊनि विसंवादें धरिती । आयुधें
हातीं १० तरी तर्कु तोचि परशु । नीतिभेदु अंकुशु । वेदान्तु तो महारसु ।
मोदकु मिरवे ११ एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु । तो बौद्धमतसंकेतु ।
वार्तिकांचा १२ मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु । धर्मप्रतिष्ठा तो
सिध्दु । अभयहस्तु १३ देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु ।
जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा १४ तरी संवादु तोचि दशनु । जो स-
मता शुभ्रवर्णु । देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु १५ मज अवगमलिया दोनी ।
मीमांसा श्रवणस्थानीं । बोधमदामृत मुनी । अली सेविती १६ प्रमेयप्रवाल
सुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ । सरिसेपणें एकवटत इभ-।-मस्तकावरी १७
उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें ।
शोभतीं भाळीं १८ अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल । मकार महा-

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय पहिला.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

हे निर्गुणब्रह्म आत्मरूपा, तूं सर्वांचा आदि असून
तुझें वेदांनीं वर्णन केलेलें आहे व तुझ्या स्वरूपास जाण-
णारा तूं ( स्वयंप्रकाश ) स्वतःच आहेस. तुला माझा
नमस्कार असो; आणि तुझा जयजयकार होवो. १ श्री-
निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतातः–देवा, सकळ जगाच्या
बुद्धीला ज्ञानाचा प्रकाश देणारा जो गणपति, तो तूंच
आहेस; कसा म्हणाल तर, ऐका महाराजः–२ स्वर व
व्यंजनें हीं ज्या रूपाची सुंदर कांति आहे, तें शब्दमात्र
म्हणजे संपूर्ण वेद हीच तुझी उत्तम गणेशमूर्ति होय:
३ असें पहा कीं, मन्वादिकांच्या स्मृति हेंच त्या शरी-
राचे अवयव असून त्यांची अंगलोट अवर्णनीय आहे;
व त्यांतील अर्थ ही सौंदर्याची खाण आहे. ४ अठरा
पुराणें हींच रत्नखचित भूषणें होत, व त्यांतील पद-
योजना हा रत्नांचा थाट असून त्यांतील गर्भित अर्थ हींच
कोंदणें होतः ५ उत्तम पदरचना हेंच रंगविलेलें वस्त्र
होय, व त्या पदांतील अलंकार हेच लकलकीत जरीचे
वाण होतः ६ काव्यें आणि नाटकें पहा! त्यांची कौतु-
कानें योजना करूं म्हटलें, तर क्षुद्रघंटिकांच्या घागऱ्यां-
च्या ठिकाणीं होत, आणि त्यांतील अर्थ हा त्या घाग-
ऱ्यांचा मंजुळ ध्वनि होतोः ७ सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें
म्हणजे त्यांतील श्लेषांच्या पर्यायांची उत्तम स्थळें हींच
कोणी त्या घागऱ्यांमधील रत्नें दिसतातः ८ व्यासादि-
कांची बुद्धि हीच त्यांवरील मेखलेच्या ( कमरेच्या शे-
ल्याच्या ) ठिकाणीं शोभते; व त्या बुद्धींचा सरळपणा
मेखलेच्या जरतारी पदराच्या सोग्याप्रमाणें झळकतोः ९
असें पहा कीं, सहा शास्त्रें हेच गणपतीचे सहा हात होतः
आणि म्हणूनच त्यांतील भिन्नभिन्न अभिप्राय हीं त्या
त्या हातांतील निरनिराळीं शस्त्रें होत; १० तरी त्यांतील
तर्कशास्त्र हा परशु, न्यायशास्त्र हा अंकुश, आणि वेदान्त-
शास्त्र हें गोड व रसाळ मोदकाच्या ठिकाणीं शोभतें; ११
वार्तिककारांच्या व्याख्यानानें स्वभावतःच खंडित झालेलें
बौद्धमत हें, एका हातांत असणाऱ्या मोडक्या दांताच्या
ठिकाणीं शोभतें; १२ मग, कल्याणकारक व वरदायक
असा जो हस्त, तो, सत्कारवाद म्हणजे ब्रह्मविषयक वाद
होय; धर्माची स्थापना करणारा तो स्वभावसिद्ध अभय-
हस्त होयः १३ ज्या ठिकाणीं महासुखाचा परमानंद
आहे, तो अति निर्मळ विचार हाच सरळ सोंडेचा सोट
होय; १४ तसाच उत्तम संवाद हा सरळ व शुभ्र दांताच्या
ठिकाणीं असून, ज्ञानदृष्टि म्हणजे त्या विघ्नराजाचे सूक्ष्म
नेत्र होत; १५ पूर्व व उत्तर ह्या मीमांसा मला कानांच्या
ठिकाणीं भासल्या. बोधामृत हा गंडस्थळांतून निघणारा
मद, व त्याचें सेवन करणारे मुनि हेच भ्रमर होत; १६
त्यांतील प्रमेयें ( सिद्धांत ) हींच गंडस्थळावरील मनोज्ञ
पोवळ्यांच्या ठिकाणीं असून, द्वैत व अद्वैत सिद्धांत हे
गंडस्थळाच्या ठिकाणीं सारख्या प्रमाणानें शोभतात; १७
त्या गंडस्थळाच्या मुकुटावरील शोभणारीं सुगंधि फुलें
म्हणजे ज्ञानमकरंदानें परिपूर्ण असलेलीं दशोपनिषदें
होत; १८ ॐकारांतील अकार हा दोन्ही चरणांचे

१ उत्पत्तिविनाशरहित निर्गुण ब्रह्म. २ सर्वांचा आदि. ३ उपनिषदांनीं सांगितला. ४ स्वतःस स्वतःच जाणणाऱ्या. ५ सर्व विषयज्ञानाला प्रकाश करणारा. ६ श्रवण करा. ७ वेद. ८ संपूर्ण. ९ सुशोभित. १० अकारादिक वर्णरूप शरीर. ११ मन्वादि स्मृति. १२ शरीराचे. १३ अंगलट, ठेवण. १४ कोंदणें. १५ तत्त्वार्थांचीं. १६ पदलालित्य. १७ उत्तम. १८ रंगविलेलें. १९ वस्त्र. २० अलंकार[illegible]. २१ प्रकार. २२ चकाक. २३ प्रकाशमान. २४ योजना केली असतां. २५ महान लहान घंटा–घागऱ्या. २६ सिद्धांताचे प्रकार. २७ नीटसपणानें. २८ कुशलतेनें. २९ सोरस. ३० कमरेचा शेला. ३१ स्वच्छपणानें. ३२ शेल्याचे खालीं सोडलेल्या पदरांचे अग्रभाग. ३३ पातंजल, सांख्य, वैशेषिक, न्याय, मीमांसा आणि वेदान्त हीं सहा दर्शनें. ३४ म्हणूनी [illegible]. ३५ मतांतें. ३६ न्यायशास्त्र. ३७ अर्थशास्त्र. ३८ रसाळ. ३९ शोभे. ४० तुटलेला. ४१ व्यास मुखावरील भाष्याचें व्याख्यान. ४२ सरळ विचार. ४३ कमलाप्रमाणें हात. ४४ धर्माची स्थापना. ४५ भय-रहित. ४६ लागणारा विचारयुक्त. ४७ अति निर्मळ. ४८ दांत. ४९ ज्ञानरूप सूक्ष्म दृष्टीचा. ५० [illegible]. ५१ धर्ममीमांसा व ब्रह्ममीमांसा. ५२ ज्ञानमकरंदपद. ५३ भ्रमर. ५४ तत्त्वार्थरूप पोवळें. ५५ पाणीदार. ५६ गंडस्थळ. ५७ हता. ५८ उत्तम ज्ञानरूपी पुष्पांचा मद. ५९ दोन्ही पाय.

मंडल । मस्तकाकारें १९ हे तीन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळले । तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज २० आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी । ते शारदाविश्वमोहिनी । नमिली मियां २१ मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपुरु । म्हणउनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी २२ जैसें डोळयां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे । मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी २३ कां चिंतामणि आलियां हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं । तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो म्हणे २४ म्हणोनि जाणतेन गुरु भाजिजे । तेणें कृतकार्य होईजे । जैसें मूळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती २५ कां तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं । ना तरी अमृतरसास्वादनीं । रस सकळ २६ तैसा पुढत-पुढती तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि । जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो २७ आतां अवधारा कथा गहन । जे सकळां कौतुकां जन्मस्थान । कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें २८ ना तरी सर्व सुखाचि आदि । जे प्रमेयमहानिधि । नाना नवरसंसुधाब्धि । परिपूर्ण हे २९ कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ । शास्त्रजातां विशिष्ट । अशेषांचें ३० ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार । लावण्यरत्नभांडार । शारदेचें ३१ नाना कथारूपें भारती । प्रकटली असे त्रिजगतीं । आविष्करोनि महामतीं । व्यासा-चिये ३२ म्हणोनि हा काव्यांरावो । ग्रंथ गुरुवतीचा ठावो । एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ३३ तेवींचि आइका आणिक एक । एथूनि शब्द-श्री सच्छास्त्रिक । आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ३४ एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेय रुचीस आलें । आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ३५ माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता । रूढपण उचितां । दिसे भलें ३६ एथ कळा-विदपण कळा । पुण्यासि प्रतापु आगळा । म्हणऊनि जनमेजयाचे अव-लीळा । दोष हरले ३७ आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळीक । गुणां सगुणपणाचें बिक । बहुवस एथ ३८ भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें । तैसें व्यासमति कवळिलें । मिरवे विश्व ३९ कां सु-क्षेत्रीं बीज घातलें । तें आपुलियापरी विस्तारलें । तैसें भारतीं सुरवाडलें ।

ठिकाणीं, उकार हा विशाल उदराचे ठिकाणीं, मकार हा सर्व अवयवांत श्रेष्ठ अशा मस्तकाचे ठिकाणीं आहेः १९ अकार, उकार व मकार हे ज्या वेळेस एकत्र झाले त्या वेळेस त्यांत शब्दब्रह्माचा ( वेदाचा ) समावेश होऊन ॐकार हें रूप बनलें. त्या आदि-बीजाला मी श्रीगुरु निवृत्तिनाथांच्या कृपेनें नमस्कार करितों. २० आतां अपूर्व अशा वाणीचे ठिकाणीं विलास करणारी, चातुर्य, अर्थ व कला यांची स्वामिणी, आणि विश्वाला मोहित करणारी अशी जी श्री सरस्वती, तिला मी नमस्कार करितों. २१ माझ्या हृदयांत वास करणारे जे सद्गुरु, त्यांच्या कृपेनें संसारमहापुरांतून मी पार पडलोंः म्हणून विचारावर माझी विशेष प्रीति जडली. २२ ज्याप्रमाणें ( पायाळूच्या ) डोळ्यांत अंजन घातलें म्हणजे त्याच्या दृष्टीस विशेष सामर्थ्य येऊन तो जिकडे पाहील तिकडे त्यास भूमिगत द्रव्याचा ठेवा दिसूं लागतो, २३ किंवा चिंतामणी हातीं आल्यावर ज्याप्रमाणें, मनांतील हेतु सर्वकाळ पूर्ण होतात, त्याप्रमाणें, ज्ञानदेव म्हणतात कीं, श्रीगुरु निवृत्तींच्या कृपेनें माझे सर्व हेतु तडीस जातात. २४ म्हणून, जे सूज्ञ आहेत त्यांनीं श्रीगुरूंची सेवा करून कृतकृत्य व्हावें. कसें म्हणाल तर–ज्याप्रमाणें झाडाच्या मुळाशीं पाणी घातलें म्हणजे फांद्या व पानें आपोआप टवटवीत होतात, २५ किंवा त्रिभुवनांत जितकीं तीर्थें आहेत तितक्या सर्वांचें श्रेय एका समुद्रांत स्नान केल्यानें मिळतें, अथवा अमृत रसाचें सेवन केलें असतां सर्व रस सेवन केल्याप्रमाणें होतें; २६ त्याचप्रमाणें, इच्छित कामना पूर्ण करणारे जे श्रीगुरु त्यांसच मी पुनः पुनः नमस्कार करितों. २७ आतां, यापुढें सर्व कौतुक उत्पन्न करणारी, अथवा विचाररूप वृक्षांची अपूर्व बागच अशी गहन कथा ऐका. २८ किंवा जी सर्व सुखाचें कारण व सर्व सिद्धांतानें आगर अथवा नवरसांनीं पूर्ण भरलेला असा अमृतसिंधुच आहेः २९ किंवा मोक्षाचें उघड स्थान, अथवा सर्व विद्यांचें आदिस्थान किंबहुना ती ( कथा ) सर्व शास्त्रांचा आधार आहे. ३० ही सर्व धर्मांचें माहेर, किंवा सज्जनांचें हृदय, अथवा सरस्वतीच्या लावण्यरूपी रत्नांचा ठेवाच आहे. ३१ किंवा ही श्रीव्यासांच्या महामतींत प्रवेश करून भारतांत कथा-मिषानें या त्रिजगतांत प्रकट झाली आहे. ३२ म्हणून ही कथा सर्व काव्यांचा राजा असून, सर्व ग्रंथांच्या थोरपणाचें ठिकाण आहे, व येथून शृंगारादिक नवरसांना रसाळपणाचा विशेष टोल आला आहे. ३३ तसेंच आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेवा कीं, या कथेपासूनच शब्दरूपी लक्ष्मीस सच्छास्त्रीयपणा येऊन आत्मबोधाला विशेष शोभा आलीः ३४ या कथेपासूनच चातुर्य शहाणें झालें, तत्त्वार्थाला जास्तच गोडी आली, आणि या कथेपासूनच सुखाच्या सौभाग्याची वृद्धि झाली. ३५ माधुर्याला मधुरपणा, शृंगाराला सुरेखपणा व योग्य वस्तूस श्रेष्ठपणा येऊन त्या सर्व उत्तम रीतीनें शोभूं लागल्या. ३६ या कथेपासूनच कलांना कौशल्य प्राप्त झालें, व पुण्याचा प्रताप फार वाढलाः म्हणूनच ( अठरा दिवसांत भारताचीं अठरा पर्वें ऐकल्यामुळें ) जनमेजयाचे ब्रह्महत्येचे दोष सहज नाहींसे झाले. ३७ आणि क्षणभर पाहूं लागलें असतां शृंगारादिक रसांत विशेष सुरेखपणा आला, व गुणाला चांगुलपणाचें भरतें या कथेनें आलें. ३८ ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्याबरोबर त्रैलोक्य प्रकाशित होतें, त्याप्रमाणें व्यासांच्या बुद्धीतून ही कथा निघाल्यामुळें सर्व जगत् प्रकाशयुक्त होऊन शोभूं लागलें. ३९ किंवा चांगल्या शेतांत बी पेरलें असतां त्याचा जसा सहज विस्तार होतो, तसें या भारतांत सर्व विषय

१ वेद. २ कवटाळिलें. ३ ॐकाररूपी ब्रह्म. ४ अपूर्व. ५ सरस्वती. ६ चौदा विद्या व चौसष्ट कला यांत प्रवीण. ७ अधिक प्रीति जडली. ८ पार, मार्ग. ९ मोठा ठेवा. १० चिंतिलेलें प्राप्त करून देणारी वस्तुविशेष. ११ तृप्त. १२ मुळाला पाणी घालणें, शिंपणें. १३ समुद्रस्नानानें. १४ वारंवार. १५ नमिला. १६ इच्छित १७ श्रवण करा. १८ सखोल, गंभीर. १९ अपूर्व. २० बाग. २१ महासिद्धांतांचा ठेवा. २२ अथवा. २३ शृंगारादि नवरसरूपी अमृताचा समुद्र. २४ परब्रह्म वस्तु. २५ उघड. २६ सर्व शास्त्रांना. २७ आश्रय. २८ सर्वांचें. २९ हृदय. ३० सरस्वती. ३१ प्रवेश करून, प्रगट होऊन. ३२ राजा. ३३ थोरपणाचा. ३४ आकार. ३५ शब्दशोभा. ३६ उत्तम, शास्त्रयुक्त. ३७ आत्मबोधांत. ३८ कोमलता. ३९ तत्त्वार्थ. ४० पोसलें. ४१ श्रेष्ठता, प्रधान. ४२ योग्य. ४३ कुशलता. ४४ अधिक. ४५ सहज, लीलेनें. ४६ क्षणभर. ४७ तेज, सामर्थ्य. ४८ पुष्कळ. ४९ शोभे. ५० चांगल्या शेतांत. ५१ मुसावलें, शोभिवंत झालें.

अर्थजात ४० ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागर[२]चि होईजे । तैसें व्या-
सोक्तीतेजें । धवळत सकळ ४१ कीं प्रथम वयसा[३]काळीं । लावण्याची[४] नव्हा[५]-
ळी । प्रगटे जैसी आंगळी[६] । अंगना[७]अंगीं ४२ ना तरी उद्यानीं माधवी घडे ।
तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिला[८]पासोनि अंपाडें[९] । जियापरी ४३ नाना
घनीभूत[११] सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अळंकारीं बरवेपण । निर्वाडु[१२]
दावी ४४ तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडे तें बरवेपण पांतलें[१३] । तें जाणोनि
काय आश्रायिलें । इतिहासीं ४५ नाना पुरे[१४]तिये प्रतिष्ठेलागीं । सोनिव[१५] धरूनि
आंगीं । पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ४६ म्हणऊनि महाभारतीं
नाहीं । तें नोहेचि लोकीं तिहीं । येणें कारणें म्हणिपे[१६] पाहीं । व्यासोच्छिष्ट जग-
त्रय ४७ ऐसी जगीं सुरस कथा । जे जन्मभूमि परमार्था । मुनि[१७] सांगे नृप-
नाथा । जनमेजया ४८ जें अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरुपम[१८] । परम मंगळे[१९]-
धाम । अवधारिजो ४९ आतां भारतकमळ[२०]परागु । गीताख्यु प्रसंगु । जो संवा-
दला श्रीरंगु । अर्जुनेंसीं ५० ना तरी शब्द[२१]ब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धि ।
निवडिलें[२२] निरवंधि[२३] । नवनीत हें[२४] ५१ मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडासिलें[२५]नि विवेकें ।
पद[२६] आलें परिपाकें[२७] । आमोदा[२८]सी ५२ जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे
संतीं । सोहंभावें[२९] पारंगतीं । रमिजे जेथ ५३ जें आकर्णि[३०]जे भक्तीं । जें आदिवंद्य
त्रिजगतीं । जें भीष्मपर्वीं संगती । म्हणितली कथा ५४ जें भगवद्गीता म्हणिजे ।
जें ब्रह्मेशां[३१]नीं प्रशंसिजे । जें सनकादिकीं सेविजे । आदरेंसी ५५ जैसे शारदी[३२]येचें
चंद्र[३३]कळे-।-माजीं अमृतकण कोंवळे । ते वेंचिती[३४] मनें मवाळें[३५] । चकोरतलगें[३६] ५६
तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा । अति हळुवार[३७]पण चित्ता । आणूनियां
५७ हे[३८] शब्देंवीण संवादी[३९]जे । इंद्रियां नेणतां भोगिजे । बोलाआदि झोंबिजे[४०] ।
प्रमेयासी ५८ जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें[४२] नेणती । तैसी पैरी[४३] आहे
सेविती । ग्रंथीं इये ५९ कां आपुला ठावो न सांडितां । आलिंगिजे चंद्रु प्रक-
टतां । हा अनुरागु[४५] भोगितां । कुमुदिनी[४६] जाणे ६० ऐसेनि गंभीरपणें । स्थि-
रावलें[४७]नि अंतःकरणें । आंथिला[४८] तोचि जाणे । मौनू[४९] इये ६१ अहो अर्जुनाचिये
पांती[५०] जे परिसणें[५१]या योग्य होती । तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान[५२] द्यावें
६२ हें सलगी[५३] म्यां म्हणितलें । चरणां लागोनि विनविलें । प्रभू सखोल हृदय
आपुलें । म्हणऊनियां ६३ जैसा स्वभावो मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी

शोभिवंत झाले आहेत. ४० अथवा, नगरांत राहिल्यावर ज्याप्रमाणें मनुष्य शाहणा होतो. त्याप्रमाणें व्यासांच्या वाणीच्या तेजामुळें सर्व जग स्वच्छ ( ज्ञानमय ) झालें. ४१ तसेंच, तारुण्यदशेंत सौंदर्याची शोभा स्त्रियांच्या अंगीं जशी विशेष दृष्टीस पडते, ४२ ज्याप्रमाणें वसंत ऋतु लागला असतां सर्व लहानथोर वृक्षांस वनश्रीची विशेष शोभा येते, ४३ अथवा सोन्याच्या लगडी पाहिल्या असतां दिसण्यांत साधारण दिसतात, पण त्यांचेच दागिने बनविले म्हणजे त्यांची शोभा कांहीं निराळीच दिसते. ४४ व्यासांनीं अलंकृत केलेल्या वाटेल त्या कथेला पवित्रपणा आला, तें जाणूनच कीं काय इतिहासांनीं आपण होऊनच त्या कथेचा आश्रय केला, ४५ किंवा जगांत पूर्ण प्रतिष्ठा प्राप्त होईल म्हणून अंगीं नम्रता धरून सर्व पुराणें आख्यानरूपानें भारतांत आलीं. ४६ म्हणून, भारतांत जी कथा नाहीं ती त्रैलोक्यांतहि नाहीं. यावरून, सर्व जगांत ज्या कथा आहेत त्या व्यासांच्या उष्टया आहेत असें म्हणतात. ४७ सर्व जगांत गोड व परमार्थाच्या उत्पत्तीचें स्थानच अशी कथा वैशंपायन हे जनमेजय राजास सांगतात. ४८ जी कथा अद्वितीय, उत्तम, पावन करणारी, उपमारहित आणि मोक्षाचें माहेरघरच अशी आहे, ती ऐका. ४९ आतां भारत हेंच कोणी कमळ, व भगवंतांनीं स्वतः अर्जुनास सांगितलेला गीताविषय हाच त्यांतील पुष्पपराग होय. ५० अथवा, व्यासांनीं वेदरूप समुद्र बुद्धिरूप रवीनें घुसळून त्यांतून शेवटीं हें गीतारूप अनुपमेय नवनीत काढिलें; ५१ त्यास ज्ञानरूपी अग्नीची आंच देऊन विचाररूप कढ आल्यावर गीता हें पक्वरूपी साजूक तूप झालें. ५२ ज्याची वैराग्यवान् इच्छा करितात, संत नेहमीं अनुभव घेतात व ब्रह्मात्मैक्यभावानें निष्णात झालेले ब्रह्मनिष्ठ ज्या ठिकाणीं रममाण होतात. ५३ जें भक्तांनीं ऐकण्याला योग्य व त्रैलोक्यांत परमपूज्य आहे, तें भीष्मपर्वामध्यें सांगितलें आहे. ५४ जिला ' भगवद्गीता ' असें म्हणतात; ब्रह्मा व शंकर हे जिची स्तुति करितात; व सनकादिक अति आदरानें जिचें सेवन करितात. ५५ ज्याप्रमाणें शरदृतूंतील पौर्णिमेच्या चांदण्याचे अति सूक्ष्म अमृत-कण चकोर पक्ष्यांचीं पिलें कोमल मनानें ( कुशलतेनें ) प्राशन करितात, ५६ त्याचप्रमाणें श्रोत्यांनीं निष्काम व कुशाग्रबुद्धीनें या भगवद्गीतेचा अनुभव घ्यावा, [ कारण गीतेंतील परमतत्त्व शब्दातीत असल्यामुळें समजण्यास कठीण आहे. ] ५७ या गीतेंतील कथेचा बोलल्याशिवाय विचार करावा, इंद्रियांना न कळत अनुभव घ्यावा, आणि ती ऐकण्याचे पूर्वी तिच्यांतील रहस्य जाणून घ्यावें. ५८ ज्याप्रमाणें भ्रमर कमलदलाला न समजूं देतां त्यांतील पुष्परेणु सेवन करतात, त्याप्रमाणें हा ग्रंथ समजून घेण्याची पद्धत आहे. ५९ किंवा चंद्रप्रकाश होण्याबरोबर चंद्रविकासि कमलिनी उमलून आपली जागा न सोडतां ज्याप्रमाणें चंद्राला प्रीतीनें आलिंगन देण्याचें सौख्य जाणते, ६० त्याप्रमाणें, शमदमांनीं ज्याचें अंतःकरण स्थिर झालें आहे, तोच या कथेचें रहस्य जाणील; असें आम्ही समजतों. ६१ [ त्याप्रमाणें अर्जुन अधिकारी होता, म्हणून महाराज संतांची प्रार्थना करितात.-] अहो, अर्जुनाच्या योग्यतेचे जे श्रवण करणारे असतील, त्या संतांनीं कृपा करून इकडे लक्ष द्यावें. [ हें बोलणें जरा अधिक झालें म्हणून परिहार देतात.-] ६२ प्रभो, आपलें हृदय फार गंभीर आहे, म्हणून माझी आपल्या चरणांपाशीं ही लडिवाळपणाची विनंति आहे. ६३ ज्याप्रमाणें आपलें मूल बोबडें बोललें तरी आईबापांना त्याचा स्वभावतःच अधिक

१ ज्ञानमात्र, सर्व अर्थ. २ चांगला, शहाणा. ३ तारुण्यदशेंत. ४ सौंदर्याची. ५ शोभा, टुकटुकीतपणा. ६ विशेष. ७ स्त्री. ८ वसंतशोभा. ९ पहिल्यापेक्षां. १० विशेष. ११ लगडीनें. १२ निरनिराळेपणा. १३ प्राप्त झालें. १४ पूर्ण. १५ लघुत्व, नम्रता. १६ म्हटलें जातें. १७ वैशंपायन. १८ उपमारहित. १९ कल्याणाचें स्थान. २० भारतरूपी कमळांतील रेणू. २१ वेदरूप समुद्र. २२ काढलें. २३ अधार. २४ गीता. २५ कढविलें. २६ स्वरूप. २७ पक्वतेनें. २८ सुवासाला. २९ तत्त्वार्थाला पावलेले. ३० ऐकिली जाते ३१ ब्रह्मा व शंकर यांनीं. ३२ शरदृतूंतील. ३३ पौर्णिमेच्या चंद्राच्या तेजामध्यें ३४ प्राशन करितात. ३५ कोंवळ्या. ३६ चकोर पक्षांनीं पिलें. ३७ मऊपणा. ३८ गीता. ३९ बोलावें. ४० ज्ञानें. ४१ पुष्परेणु. ४२ कमळाच्या पाकळ्या. ४३ भ्रमर. ४४ ठिकाण. ४५ प्रीति. ४६ चंद्रविकासी कमलिनी. ४७ स्थिर केलेल्या. ४८ संपन्न. ४९ रहस्य. ५० पंक्तीला, योग्यतेला. ५१ श्रवणाला. ५२ लक्ष. ५३ लडिवाळपणानें.

वाचा । तरी अधिकचि तयाचा । संतोष ओंवी ६४ तैसा तुम्हीं मी अंगि-
कारिला । सज्जनीं आपुला म्हणितला । तरी उणें सहजें उपसाहला । प्रार्थूं
कायी ६५ परी अपराधु तो आणिक आहे । जें मी गीतार्थु कवळूं पाहें । ते
अवधारा विनवूं लाहें । म्हणऊनियां ६६ हें अनावर न विचारितां । वायांचि
धिंवसा उपनला चित्ता । येऱ्हवीं भानुतेजीं काय खद्योता । शोभा आथी ६७
कीं टिटिभू चांचुवरी । माप सूये सागरीं । मी नेणतु त्यापरी । प्रवर्ते येथ ६८
आयका आकाश गिंवसावें[११] । तरी आणीक त्याहूनि थोर होआवें । म्हणऊनि
अपाडु[१२] हें आंधवें[१३] । निर्धारितां ६९ तया गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी[१४] ।
जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारोनी ७० तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसें
कां स्वरूप तुझें । तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ७१ हा वेदार्थ
सागरु । जया निद्रिताचा घोरु[१५] । तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला[१६] ७२ ऐसें
जें अगाध । जेथ वेडावती वेद । तेथ अल्प मी मतिमंद । काय होय ७३ हें
अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें । गगन मुठीं सुवावें ।
मशकें केवीं ७४ परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोलें मी सधरु[२१] । जैं
सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ७५ येऱ्हवीं तरी मी मूर्खु । जरी जाहला
अविवेकु । तरी संतकृपादीपकु । सोज्वळु[२२] असे ७६ लोहाचें कनक होये । हें
सामर्थ्य परिसींच आहे । कीं मृतही जीवित लाहे[२३] । अमृतसिद्धि ७७ जरी प्रकटे
सिद्धसरस्वती । तरी मुकया आथी भारती[२४] । एथ वस्तुसामर्थ्यशक्ती[२५] । नवल
कायी ७८ जयातें कामधेनु माय । तयासी अप्राप्य[२६] कांहीं आहे । म्हणऊनि
मी प्रवर्तों लाहें[२७] । ग्रंथीं इये ७९ तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें[२८] । करूनि
घेयावें हें तुमतें[२९] । विनवितु असें ८० आतां देइजो अवधान[३०] । तुम्हीं बोल-
विल्या मी बोलेन । जैसें चेष्टे[३१] सूत्राधीन[३२] । दारुयंत्र[३३] ८१ तैसा मी अनुग्रहीतु ।
साधूंचा निरूपितु[३४] । ते आपुलियापरी अलंकारितु । भलतयापरी ८२ तंव श्रीगुरु
म्हणती राहीं । हें तुज बोलावें नलगे कांहीं । आतां ग्रंथा चित्त देईं । झडकरी
वेगां ८३ या बोला निवृत्तिदासु । पावूनि परम उल्हासु । म्हणे परियसा मना
अवकाशु[३५] । देऊनियां ८४

संतोष वाटतो, ६४ त्याप्रमाणें माझा तुम्हीं सज्जनांनीं अंगीकार केला असून, ज्याअर्थी मला आपला म्हटला आहे, त्या अर्थी माझें जें कांहीं उणें असेल तें तुम्ही सहज सहन कराल! त्याबद्दल मला आपली प्रार्थना केली पाहिजे असें नाहीं! ६५ परंतु जो अपराध म्हणून माझ्या हातून घडत आहे, तो निराळाच आहे; तो हा कीं, गीतेचा अर्थ मी स्पष्ट करूं पहात आहें, आणि इकडे लक्ष द्या, अशी आपल्यासारख्यांना विनंति करीत आहें. ६६ हें गीतार्थाचें काम फार कठीण आहे, याचा विचार मनांत न करतां, तो स्पष्ट करण्याविषयीं माझ्या चित्तांत व्यर्थ धैर्य उत्पन्न झालें आहे; बाकी सूर्याच्या तेजापुढें काजव्याचें तेज काय पडणार? ६७ किंवा [ आपलीं पिलें समुद्रानें वाहून नेलीं म्हणून त्याचा सूड उगविण्याकरतां ] ज्याप्रमाणें समुद्र कोरडा करण्यासाठीं टिटवीनें आपल्या चोंचीनें पाणी उपसण्याचा प्रयत्न केला, त्याप्रमाणें माझा अधिकार नसतां मी गीतेचा अर्थ करण्यास प्रवृत्त झालों आहें. ६८ असें पहा, आकाशाचें आकलन करावयाचें म्हटलें म्हणजे ज्याप्रमाणें त्याहून मोठें झालें पाहिजे, त्याप्रमाणें वास्तविक पाहतां गीतेचें व्याख्यान करण्यास माझ्यापेक्षां अधिक योग्य पुरुष पाहिजे होता; कारण, हें कृत्य माझ्या शक्तीच्या बाहेर आहे. ६९ कारण या गीतार्थाची थोरवी एवढी आहे कीं, स्वतः शंकर त्याची चर्चा करीत असतां भवानीला चमत्कार वाटून तिनें शंकराला प्रश्न केला ७० असतां शंकर म्हणाले, हे पार्वती, तुझें स्वरूप नित्य नूतन असल्यामुळें जसा त्याचा पार लागत नाहीं, त्याप्रमाणें गीतातत्त्व नित्य नूतन आहे म्हणून तेंहि जाणलें जात नाहीं. ७१ कारण, ज्या सर्वेश्वराच्या घोरण्यापासून सहज वेद उत्पन्न झाले, त्या जगदीश्वरानें प्रत्यक्ष स्वमुखानें हें गीताशास्त्र अर्जुनाला सांगितलें. ७२ असें हें गीताशास्त्र गहन असून याच्या ठिकाणीं वेदांची देखील मति गुंग होऊन जाते. तेव्हां अशा ठिकाणीं अल्प व मतिमंद असा जो मी, त्या माझी काय कथा! ७३ हें अपार गीतातत्त्व कोणत्या उपायानें समजून घ्यावें! सूर्याच्या तेजाला कोणीं उजळा द्यावा! व चिलटानें आपल्या मुठींत आकाश कसें धरावें! ७४ परंतु ज्ञानदेव म्हणतात, ज्या अर्थी श्रीगुरु मला अनुकूल आहेत, त्या अर्थी एवढें महत्कृत्य करण्याला त्यांचाच एक आधार आहे, व याचमुळें मला धीर आला आहे. ७५ एरवीं जरी मी अज्ञानी व अविवेकी असलों तरी संतांच्या कृपारूपी-दीपानें सोज्वळ ( योग्य ) झालों आहें. ७६ परिसाच्या सामर्थ्यानें लोखंडाचें सोनें होतें; किंवा मेलेल्या मनुष्यास अमृत पाजिलें असतां तो जिवंत होतो; ७७ अथवा सरस्वतीच प्रसन्न झाली तर मुक्याला देखील वाचा फुटते; तेव्हां यांत नवल नसून हें केवळ वस्तुमाहात्म्य आहे. ७८ कामधेनुच ज्याची आई, त्याला दुर्लभ असें काय आहे? म्हणून मी हा ग्रंथ करण्यास प्रवृत्त झालों; ७९ तरी यांत कमी असेल तें पुरें करून घेऊन अधिक असेल तें सोडून द्या. एवढी माझी आपणांस विनंति आहे. ८० महाराज, आतां आपण इकडे लक्ष द्यावें; कारण, जर आपण मला बोलवाल तर मी बोलेन. ज्याप्रमाणें कळसूत्री लांकडाची बाहुली दोऱ्याचे आधारानें नाचते, ८१ त्याप्रमाणें तुम्हीं मजवर अनुग्रह केला आहे, आणि साधूंनीं आज्ञा केली आहे. करितां, आतां आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें मला सुशोभित करा; मजकडून बोलवा. ८२ तेव्हां श्रीगुरु म्हणतात पुरे! हें तूं आम्हांला सांगावेंस असें नाहीं; आतां गीतार्थ सांगण्याकडे लवकर लक्ष लाव. ८३ अशी श्रीगुरूंची आज्ञा झालेली पाहून निवृत्तिदास ज्ञानदेव मनांत अति संतुष्ट होऊन म्हणतात कीं, मी बोलतों तें स्वस्थ मनानें ऐका. ८४

---

१ आहे. २ क्षमा करण्याला. ३ आकलन करूं पाहतों, स्पष्ट करूं पाहतों. ४ आवरण्यास कठीण. ५ धैर्य. ६ उपजला. ७ काजव्याला. ८ टिटवी. ९ चोंचीनें. १० घालों. ११ कवटाळावें. १२ अक्षय. १३ सर्व. १४ चर्चा; विवरण करी, सांगे. १५ घोरणें. १६ बोलला. १७ खोल.

१८ उजळावें. १९ धरावें. २० चिलटानें. २१ आधारानें. २२ स्वच्छतेंत. २३ पावतो. २४ वाणी. २५ वस्तुमहिमा. २६ दुर्लभ. २७ इच्छितो. २८ योग्य करून घ्या, सोडून द्या. २९ तुम्हांला. ३० लक्ष. ३१ नाचे. ३२ सुताच्या स्वाधीन. ३३ कळसूत्री बाहुली. ३४ आज्ञाधारक. ३५ स्वस्थपणा.

धृतराष्ट्र उवाचः—

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः । मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

तरी पुत्रस्नेहें मोहितु । धृतराष्ट्र असे पुसतु । म्हणे संजया सांगें मातु । कुरुक्षेत्रींची ८५ जें धर्मालय म्हणिजे । तेथ पांडव आणि माझे । गेले असती व्याजें । झुंझाचेनि ८६ तरी तेचि येतुला अवसरीं । काय किजत असे येरयेरीं । तें झडकरी कथन करी । मजप्रती ८७

संजय उवाचः—

दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा । आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

राजोवाचः—

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् । व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शीष्येण धीमता ॥ ३ ॥

तिये वेळीं तो संजय बोले । म्हणे पांडवसैन्य उचललें । जैसें महाप्रळयीं पसरलें । कृतांतमुख ८८ तैसें तें घनदाट । उठावलें एकवाट । जैसें उसळलें कालकूट । धरी कवण ८९ नातरी वडवानलु सांदुकला । प्रलयवातें पोखला । सागरु शोषूनि उधवला । अंबरासी ९० तैसें दळ दुर्धर । नानाव्यूहीं परिकर । अवगमलें भयासुर । तिये काळीं ९१ तें देखोनियां दुर्योधनें । अव्हेरिलें कवणे मानें । जैसें न गणिजे पंचाननें । गजघटांतें ९२ मग द्रोणापासीं आला । तयातें म्हणे हा देखिला । कैसा दळभारु उचलला । पांडवांचा ९३ गिरिदुर्ग जैसे चालते । तैसे विविध व्यूह सैभंवते । रचिले आथि बुद्धिमंतें । द्रुपदकुमरें ९४ जो का तुम्हीं शिक्षापिला । विद्या देऊनि कुरुठा केला । तेणें हा सैन्यसिंधु पाखरिला । देख देख ९५

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि । युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

आणीकही असाधारण । जे शस्त्रास्त्रीं प्रवीण । क्षात्रधर्मीं निपुण । वीर आहाती ९६ जे बळें प्रौढीं पौरुषें । भीमार्जुनांसारिखे । ते सांगेन कौतुकें । प्रसंगेंची ९७ एथ युयुधानु सुभटु । आला असे विराटु । महारथी श्रेष्ठु । द्रुपद वीरु ९८

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् । पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥
युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् । सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

चेकितान धृष्टकेतु । काशिराज वीर विक्रांतु । उत्तमौजा नृपनाथु । शैब्य देख ९९ हा कुंतिभोज पाहें । एथ युधामन्यु आला आहे । आणि पुरुजितादि राय हे । सकळ देख १०० हा सुभद्राहृदयनंदनु । जो अपरु नवार्जुनु । तो

**अन्वयार्थ**—(संजय)-'अरे संजया!-(धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे) -धर्मोत्पत्तीचें स्थान—धर्म उत्पन्न होण्याची जागा अशा कुरुक्षेत्रांत-(समवेता युयुत्सवः मामकाः च एव पाण्डवाः) -जमलेले युद्धाची इच्छा करणारे माझे पुत्र आणि पंडूचे पुत्र-(किं अकुर्वत)-काय करते झाले?'

पुत्राच्या प्रेमानें मोहित झालेला धृतराष्ट्र राजा संजयास म्हणाला, "संजया, कुरुक्षेत्राची काय हकीकत आहे, ती मला सांग. ८५ ज्या कुरुक्षेत्राला धर्माचें ठिकाण असें म्हणतात, तेथें माझे व पंडूचे पुत्र युद्ध करण्याच्या निमित्तानें गेले आहेत, ८६ तर ते परस्परांत एवढा वेळपर्यंत काय करीत आहेत तें मला लवकर सांग." ८७

**अन्वयार्थ**-(तु)-पण-(तदा)-त्यावेळी-(राजा दुर्योधनः)-राजा दुर्योधन-(पांडवानीकं व्यूढं दृष्ट्वा)-पांडवांचें सैन्य व्यूहरचना करून उभें आहे असें पाहून-(आचार्य उपसंगम्य)-द्रोणाचार्यांपाशीं जाऊन-(इदं-वचनं)-असें वचन -(अब्रवीत्)-बोलला. २ अहो द्रोणाचार्य!-(तव)-तुमच्या -(धीमता शिष्येण)-बुद्धिमान् शिष्यानें म्हणजे-(द्रुपदपुत्रेण) -द्रुपदाच्या पुत्रानें-धृष्टद्युम्नानें-(व्यूढां एतां पाण्डुपुत्राणां महतीं चमूं)-रचलेल्या-व्यूहाच्या आकारानें उभ्या केलेल्या या पांडवांच्या मोठ्या सेनेस-(पश्य)-पहा. ३

तेव्हां संजय म्हणालाः—ज्याप्रमाणें महाप्रलयाचे वेळीं काळाचें तोंड पसरलेलें असतें, त्याप्रमाणें पांडवांचें सैन्य खवळलें. ८८ सर्व पांडवसैन्य एकत्र जमून एका रोखानें सज्ज झालें, तेव्हां त्याला कोण आवरणार? ज्याप्रमाणें कालकूट विष उसळलें असतां त्याचें शमन कोणाच्यानें करवत नाहीं, ८९ किंवा वडवानल पेटून तो प्रलयवातानें भडकल्यावर ज्याप्रमाणें समुद्रांतील पाण्याचें शोषण करून आकाशापर्यंत प्रदीप्त होतो, ९० त्याप्रमाणें पांडवांचें भयंकर सैन्य नानाप्रकारच्या व्यूहरचनेनें तयार केलेलें असल्यामुळें त्या वेळेस अति भेसूर असें दिसलें, ९१ परंतु ज्याप्रमाणें हत्तींचे कळप पाहून सिंह त्यांना कःपदार्थ मानतो, त्याप्रमाणें दुर्योधनानें पांडवांचें तें सैन्य पाहून त्यास तुच्छ मानलें. ९२ मग द्रोणाचार्यांजवळ त्यांचें मन कलुषित करण्याकरितां येऊन त्यांस म्हणाला, पांडवांचें हें सैन्य कसें उसळलें आहे पाहिलेंना? ९३ बुद्धिमान असा जो द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न, त्यानें या सैन्याची अशी चमत्कारिक रचना केली आहे कीं, तें चालत्या डोंगरीकिल्ल्याप्रमाणेंच दिसत आहे. ९४ ज्या धृष्टद्युम्नाला तुम्हीं पढवून विद्येचा निधि केला, त्यानें हा सेनासमुद्र चहूंकडे पसरविला आहे तो पहा. ९५

**अन्वयार्थ**—(अत्र)-या सैन्यांत-(शूराः)-शूर,-(महेष्वासाः)-ज्यांचीं इष्वास म्ह० धनुष्यें मोठमोठीं आहेत असे, -(युधि भीमार्जुनसमाः)-युद्धांत भीम व अर्जुन यांच्या तोडीचे, [असे लोक आहेत, त्यांतील कित्येकांचीं नांवेंहि दुर्योधन सांगतो]-(युयुधानः)-सात्यकि-(विराटः च)-व विराट राजा-(महारथः द्रुपदः)-महारथी द्रुपद. ४

याशिवाय आणखी शस्त्रास्त्रांत प्रवीण व क्षात्रधर्मांत निपुण असे महान् महान् योद्धे आहेत. ९६ जे बलानें, योग्यतेनें व पुरुषार्थानें भीमार्जुनांसारखे आहेतः यांचा सहज प्रसंगानें नामनिर्देश वर्णन करितों. ९७ या ठिकाणीं महायोद्धा युयुधान राजा, विराट राजा, आणि श्रेष्ठ महारथी द्रुपद राजा हे आले आहेत. ९८

**अन्वयार्थ**—(वीर्यवान् धृष्टकेतुः चेकितानः काशिराजः) -वीर्यवान्-पराक्रमी धृष्टकेतु, चेकितान व काशिराजा,-(नरपुंगवः पुरुजित् च कुंतिभोजः च शैब्यः)-नरश्रेष्ठ पुरुजित कुंतिभोज, व शैब्य, ५-(विक्रान्तः युधामन्युः)-पराक्रमी युधामन्यु-(च वीर्यवान् उत्तमौजाः)-व वीर्यवान् उत्तमौजा-(सौभद्रः)-सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु-(च द्रौपदेयाः)-आणि द्रौपदीचे पांच पांडवांपासून झालेले पांच पुत्र-(सर्वे एव महारथाः) -हे सर्वच महारथी आहेत. ६

"चेकितान, धृष्टकेतु, पराक्रमी असा काशिराजा, नृपश्रेष्ठ उत्तमौजा व शैब्य राजा यांकडे पहा, ९९ हा कुंतिभोज पहाः तसाच येथें हा युधामन्यु आलेला आहे, आणि पुरुजित् आदिकरून सर्व राजे आले आहेत ते पहा." १०० दुर्योधन म्हणतोः—अहो द्रोणाचार्य, हा पहा सुभद्रेच्या अंतःकरणाला आल्हाद देणारा तिचा

१ धर्माचें घर. २ निमित्तानें. ३ युद्धाच्या. ४ लवकर. ५ परस्परांशीं. ६ खवळलें. ७ काळाचें तोंड. ८ एकदम. ९ भडकला. १० पेटलेला. ११ उसळला. १२ आकाशापर्यंत. १३ नाना प्रकारच्या सैन्यरचनेनें. १४ तयार. १५ भासलें. १६ तिरस्कारिलें. १७ सिंहानें. १८ हत्तींच्या कळपाला. १९ सेनासमूह. २० डोंगरी किल्ले. २१ सैन्यरचना. २२ सभोंवार. २३ आहेत. २४ धृष्टद्युम्नानें. २५ पढविला. २६ घर. २७ पसरिला. २८ महान्. २९ प्रौढीनें. ३० पुरुषार्थानें. ३१ महायोद्धा. ३२ पराक्रमी. ३३ प्रति अर्जुनच.

अभिमन्यु म्हणे दुर्योधनु । देखें द्रोणा १ आणीकही द्रौपदीकुमरु । हे सकळही महारथी वीरु । मिती[1] नेणिजे परी अपारु । मीनले[2] असती २

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम । नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥७॥
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः । अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

आतां आमुच्या दळीं नायक । जे रूढ[3]वीर सैनिक । ते प्रसंगें आइक । सांगिजैती ३ उद्देशें[4] एक दोनी । जायिजैती[5] बोलोनी । तुम्ही आदिकरूनी । मुख्य जे जे ४ हा भीष्म गंगानंदनु । जो प्रतापतेजस्वी भानु । रिपुगजपंचाँननु । कर्णवीरु ५ या एकेकाचेनि मनोर्व्यापारें । हें विश्व होय संहरे । हा कृपाचार्यु न पुरे । एकलाचि ६ एथ विकर्ण वीरु आहे । हा आश्वत्थामा पैल पाहें । याचा आडदरु सदां वाहे । कृतांतु मनीं ७ समितिंजयो सौमदत्ति ।

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः । नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

ऐसे आणीकही बहुत आहाती । जयांचिया बळा मिती । धातांही नेणे ८ जे शस्त्रविद्यापारंगत[11] । मंत्रावतार मूर्त[12] । हो कां जें अस्त्रजात[13] । एथूनि रूढ[14] ९ हे अप्रतिमल्ल[15] जगीं । पुरता प्रतापु अंगीं । परी सर्व प्राणे मजचिलागी । आंरायिले[16] असती १० पतिव्रतेचें हृदय जैसें । पतीवांचूनि न स्पर्शे । मी सर्वस्व यां तैसें । सुभटांसी[17] ११ आमुचिया कार्जाचेनि[18] पाडें[19] । देखती आपुलें जीवित थोकडें[20] । ऐसें निरवधि[21] चोखडे[22] । स्वामिभक्त १२ झुंजती कुळकणी[23] जाणती । केळे[24] कीर्तीसी जिती[25] । हे बहु असो क्षात्रनीती[26] । एथोनियां १३ ऐसे सर्वांपरि पुरते[27] । वीर दळीं अमुते[28] । आतां काय गणूं यातें । अपार हे १४

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् । पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

वरी क्षत्रियांमाजीं श्रेष्ठु । जो जगजेठी[29] जगीं सुभटु[30] । तया दळवैपणाचा[31] पाटु[32] । भीष्मासि पैं १५ आतां याचेनि बळें गवसलें[33] । हें[34] दुर्ग[35] जैसें पन्नासिलें[36] । येणें पाडें[37] थेंकुलें[38] । लोकत्रय १६ आधींच समुद्र पाहीं । तेथ दुवांडेपण[39] कवणा नाहीं । मग वडवानळु तैसेयाही । विरंजा[40] जैसा १७ ना तरी प्रलयवन्हि महावातु । या दोघां जैसा सांघातु[41] । तैसा हा गंगासुतु[42] । सेनापति १८ आतां येणेंसि कवण भिडे[43] । हें पांडव सैन्य कीर[44] थोकडें[45] । परि वरचिलेनि पाडें[46] । दिसत असे १९ वरी भी-

मुलगा प्रतिअर्जुन असा अभिमन्यु. १ तसेंच आणखी हे द्रौपदीचे मुलगे व सर्व महारथी ज्यांची गणती करितां येत नाहीं असे असंख्य वीर या ठिकाणीं जमले आहेत. २.

**अन्वयार्थ**—( तु )–पण–( अस्माकं )–आम्हांमध्यें–( ये विशिष्टाः )–जे श्रेष्ठ आहेत–( च )–व–( ये )–जे–( मम सैन्यस्य नायकाः )–माझ्या सैन्याचे नेते आहेत–(तान्)–त्यांना ( निबोध )–तूं ऐक–( द्विजोत्तम )–अहो श्रेष्ठ द्विज !–( ते संज्ञार्थं )–तुम्हांला कळण्यासाठीं–आपल्याकडे कसे कसे श्रेष्ठ लोक आहेत हें आपल्या ध्यानांत यावें म्हणून–( तान् )–त्यांचीं [ कांहीं ] नांवें–( ब्रवीमि )–मी सांगतों. ७–( भवान् )–आपण स्वतः [ आम्हां सर्वांचे गुरु ]–( च भीष्मः )–व भीष्म [ आम्हां कौरव-पांडवांचे पितामह ]–( च कर्णः )–व [ माझा मित्र ] कर्ण,–(च समितिंजयः कृपः )–आणि युद्धास जिंकणारा–विजयी कृपाचार्य [ आमचे प्राचीन गुरु व तुमचे श्यालक ],–( अश्वत्थामा)–तुमचा पुत्र अश्वत्थामा–( च विकर्णः )–व माझा भाऊ विकर्ण,–( तथा एव च सौमदत्तिः )–व तसाच सौमदत्ति–भूरिश्रवा ८. –

आतां, आमच्या सैन्यांत प्रमुख असे महावीर कोण-कोण आहेत तें प्रसंगानुरोधानें सांगतों ऐका. ३ आपण व इतर वीर जे आहेत, त्यांपैकीं कांहीं मुख्यमुख्यांचीं नांवें दिग्दर्शनार्थ सांगतों, ऐका. ४ शौर्यानें व बलानें केवळ प्रतिसूर्यच असे हे गंगानंदन भीष्माचार्य, शत्रुरूपी हत्तीला केवळ सिंहासारखा भासणारा असा हा पराक्रमी कर्ण; ५ यांतील एकेकाच्या केवळ संकल्पानें ह्या विश्वाचा संहार होईल., फार काय पण एकटे कृपाचार्य देखील पुरे आहेत. ६ हा या ठिकाणीं विकर्ण वीर आहे, तसाच तो पलीकडे अश्वत्थामा पहा; प्रत्यक्ष काळाला देखील त्याची भीति वाटते ! ७ युद्धामध्यें सदैव विजयी असणारा हा सौमदत्ति ( भूरिश्रवा ):

**अन्वयार्थ**—( च अन्ये )–आणि तसेच दुसरे–( बहवः शूराः )–पुष्कळ शूर–( मदर्थे त्यक्तजीविताः )–माझ्यासाठीं ज्यांनीं आपलें जीवित सोडण्याचा–मरण्याचा निश्चय केला आहे असे,–( नानाशस्त्रप्रहरणाः )–अनेक प्रकारचीं शस्त्रें हींच ज्यांचीं शत्रूवर प्रहार करण्याचीं साधनें आहेत असे व–(सर्वे युद्धविशारदाः )–ते सर्व युद्धामध्यें कुशल, असे आहेत. ९ त्याचप्रमाणें ज्यांच्या शौर्याचा अंत प्रत्यक्ष महादेवालाहि लागत नाहीं असे आणखी कितीतरी वीर आहेत, ८ कीं जे शस्त्रविद्येंत निपुण असून, अस्त्रविद्येचे तर साक्षात् अवतार आहेत. फार कशाला, यांच्यापासून अस्त्रविद्या जगांत प्रसिद्धीस आली ! ९ हे जरी अति बलवान् आहेत, व जगांत जरी यांच्या तोडीचे दुसरे योद्धे नाहींत, तरी ते जीवाभावानें मलाच अनुसरले आहेत. ११० ज्याप्रमाणें पतिव्रतेचें मन पतीवांचून दुसरे ठिकाणीं जात नाहीं; केवळ पतीच्याच ठिकाणीं असतें, त्याप्रमाणें या वीरांना मी जीव कीं प्राण आहें. ११ आमच्या कामापुढें ते आपले प्राणही तुच्छ समजतात इतके ते पराकाष्ठेचे स्वामिभक्त आहेत. १२ हे युद्धकलेमध्यें निष्णात असून चातुर्यानें कीर्ति संपादन करितात, फार काय सांगावें, क्षत्रियांचा धर्म यांच्यापासूनच प्रसिद्धीस आला ! १३ याप्रमाणें आमच्या सैन्यांत सर्वतोपरी पराक्रमी असे अपार वीर आहेत: त्यांची किती म्हणून गणती करावी ! १४

**अन्वयार्थ**—( तत् )–अशा प्रकारचें–( अस्माकं )–आमचें–( भीष्माभिरक्षितं बलं )–भीष्मांनीं ज्याचें सर्व प्रकारें रक्षण केलें आहे, असें सैन्य–(अपर्याप्तं)–अपरिमित–फार मोठें आहे.–(तु)–परंतु–(एतेषां)–या पांडवांचें–( भीमाभिरक्षितं )–भीमानें ज्याचें सर्वतः रक्षण केलें आहे असें–( इदं बलं )–हें सैन्य–( पर्याप्तं )–परिमित–थोडें आहे. १०

तशांत, सर्व क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ आणि जगांतील सर्व योद्ध्यांमध्यें प्रतापी असे जे भीष्माचार्य, त्यांच्याकडे या सर्व सैन्याचें आधिपत्य दिलेलें आहे. १५ त्यांनीं हें सर्व सैन्य आवरून अशा बेतानें रचिलें आहे कीं, जणुं-काय हे किल्लेच बांधले आहेत; त्यांच्या शौर्यापुढें त्रिभुवन देखील तुच्छ आहे. १६ विचार केला असतां ज्याप्रमाणें सर्व प्रकारें समुद्र दुस्तर असून आणखी त्यास वडवानलानें साह्य व्हावें, १७ किंवा प्रलयकालच्या अग्नीला महावाताचें साहाय्य मिळून त्या उभयतांचा जसा संयोग व्हावा, तसें आमच्या या अफाट सैन्यास भीष्म हे सेनापति मिळाले आहेत. १८ तेव्हां या आमच्या सैन्याबरोबर कोण युद्ध करील ? पांडवांचें सैन्य वर सांगितलेल्या आमच्या सैन्याच्या तुलनेनें अगदीं थोडें दिसत आहे. १९ शिवाय त्याचें सैनापत्य दांडग्या भीमसेनानें स्वी-

१ गणती. २ एकत्र झाले. ३ प्रसिद्ध योद्धे. ४ सांगतों. ५ माहितीकरितां. ६ जातो. ७ अत्युरूपी हत्तीच्या नाशक सिंह. ८ संकल्पमात्रानें. ९ भाग. १० मना. ११ शस्त्रविद्येंत निपुण. १२ साक्षात्. १३ समग्र अशी. १४ प्रचलित. १५ विनगोट. १६ अनुसरले. १७ योद्ध्यांना. १८ कार्याच्या. १९ योग्यतेनें २० उणें, कमी. २१ निस्सीम. २२ उत्तम. २३. चातुर्य. २४ कुशलतेनें. २५ जिंकितात. २६ क्षत्रियांचा धर्म. २७ पराक्रमी. २८ आमच्या बाजूला. २९ मोठा योद्धा. ३० चांगला योद्धा. ३१ सेनापतीपणा-चा. ३२ अधिकार. ३३ आश्रित झाले. ३४ सेनाचक्र. ३५ किल्ल्याप्रमाणें. ३६ रचिलें. ३७ योग्यतेपुढें, तुलनेनें. ३८ थोडें. ३९ दुस्तरता: ४० साह्यकर्ता. ४१ संयोग. ४२ भीष्म. ४३ झगटे. ४४ निश्चयेंकरून, खरोखर. ४५ थोडें. ४६ वर निर्दिष्ट केलेल्या आमच्या सैन्याच्या तुलनेनें.

मसेन बेथु । तो जाहला असे सेनानाथु । ऐसें बोलोनियां मातु[2] । सांडिली[3] तेणें १२०

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः । भीष्ममेवाभिरक्षंतु भवंतः सर्व एव हि ॥ ११ ॥

मग पुनरपि काय बोले । सकळ सैनिकांतें म्हणितलें । आतां दळभार आपुलाले । सैरसे[4] करा २१ जया जिया अक्षौहिणी[5] । तेणें तिया आयणी[6] । वरगण[7] कवणकवणी । महारथीया[8] २२ तेणें तिया आवारिजे । भीष्मातळीं[9] राहिजे । द्रोणातें म्हणे पांहिजे[10] । तुम्ही सकळ २३ हाचि एकु रक्षावा । मी तैसा हा देखावा । येणें दळभारु आघवा[11] । सांचु[12] आमुचा २४

संजय उवाच:—

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः । सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

या राजाचिया बोला । सेनापति[13] संतोषला । मग तेणें केला । सिंहनादु[14] २५ तो गाजत असे अद्भुतु । दोन्ही सैन्यांआंतु । प्रतिध्वनि न समातु[15] । उपजत असे २६ तयाचि तुलगासवें[16] । वीरवृत्तीचेनि थावें[17] । दिव्य शंख भीष्मदेवें । आस्फुरिला[18] २७ ते दोन्ही नाद मीनले[19] । तेथ त्रैलोक्य बधिरीभूत[20] जाहलें । जैसें आकाश कां पडिलें । तुटोनियां २८ धडधडीत अंबर । उचंबळत सागर । क्षोभैलें[21] चराचर[22] । कांपत असे २९ तेणें महाघोषगजरें । दुमदुमिताती गिरिकंदरें[23] । तंव दळामाजि रणतुरें[24] । आस्फुरिलीं[25] १३०

ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः । सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥

उदंड सैंघ[26] वाजतें । भयानकें खाखातें[27] । महाप्रळयो जेथें । धाकडांसी[28] ३१ भेरी[29] निशाण[30] मांदळ[31] । शंख काहळा[32] भोंगळे[33] । आणि भयासुर रणकोल्हाळ[34] । सुभटांचे[35] ३२ आवेशें भुजा त्राहाटिती[36] । विसणेले[37] हांका देती । जेथ महामद भद्रजाती[38] । आवरतीना ३३ तेथ भेडांची[39] कवण मातु । कांचया[40] केरे[41] फिटतु[42] । जेणें दचकला कृतांतु । आंग[43] नेघे ३४ एकां उभयांचि[44] प्राण गेले । चांगांचे[45] दांत बैसले । बिरुदाचे[46] दादुले । हिंवताती[47] ३५ ऐसा अद्भुत तुरबंबाळु[48] । ऐकोनि ब्रह्मा व्याकुळु । देव म्हणती प्रळयकाळु । वोढवला आजी ३६

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ । माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥
पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः । पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः । नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

कारलें आहे. इतकें सांगून दुर्योधन स्तब्ध राहिला. १२०

**अन्वयार्थ**--( भवन्तः सर्वे एव हि )-आपण सर्वही-(सर्वेषु अयनेषु)-आपापल्या नियत स्थानांत-(यथाभागं)-आपला भाग न सोडतां-( अवस्थिताः )-राहून-स्थित होऊन-( भीष्मं एव)-केवळ भीष्मांचेंच-( अभिरक्षन्तु)-सर्व बाजूंनीं रक्षण करा.

मग फिरून सर्व सेनापतींस म्हणालाः---अहो आतां आपआपलें सैन्य सज्ज करा. २१ ज्यांच्या ताब्यांत सैन्याच्या ज्या अक्षौहिणी आहेत, त्यांतील श्रेष्ठ महारथ्यांनीं आपआपल्या अक्षौहिणींपुढें जाऊन उभें रहावें. २२ व त्यांनीं त्या त्या अक्षौहिणी संभाळून भीष्मांच्या आज्ञेंत वागावें. नंतर तो द्रोणाचार्यांस म्हणाला, " तुम्ही सर्व सैन्यावर देखरेख ठेवावी, २३ आणि भीष्मांस मजप्रमाणेंच समजून त्यांचें रक्षण करावें; कारण, आमच्या सर्व सैन्याची भिस्त त्यांच्यावरच आहे. " २४

**अन्वयार्थ**—(तस्य)-त्या दुर्योधनाच्या-(हर्षं)-हर्ष-(संजनयन् प्रतापवान् कुरुवृद्धः पितामहः)-उत्पन्न करणारा प्रतापी कुरुवंशांतील वृद्ध पितामह भीष्म-(उच्चैः सिंहनादं विनद्य)-मोठ्या ओरानें आरोळी ठोकून-सिंहाच्या गर्जनेसारखी मोठी गर्जना करून-(शंखं)-शंखाला-(दध्मौ)-वाजविता झाला. १२

राजा दुर्योधनाचें हें भाषण ऐकून भीष्मांस फार संतोष झाला, आणि त्यांनीं सिंहनाद केला. २५ तो नाद दोन्ही सैन्यांत इतका दुमदुमून गेला की, त्याचा प्रतिध्वनि आकाशांत देखील मावेना. २६ तो प्रतिध्वनि होत आहे, तोंच वीरवृत्तीच्या बळानें भीष्मांनीं आपला दिव्य शंख वाजविला. २७ ते दोन्ही नाद एकत्र झाले असतां त्रैलोक्य बधीर झालें, त्यावेळीं आकाशच कोसळून पडत आहे कीं काय असा भास झाला! २८ त्या वेळीं आकाश गडगडूं लागलें, समुद्र उसळूं लागला, हें स्थावरजंगम विश्व घाबरून जाऊन थरथर कांपूं लागलें; २९ आणि त्या महानादाच्या घोषानें पर्वतांच्या गुहांमधून देखील प्रतिध्वनि उठले;इतक्यांत दोन्ही सैन्यांमध्यें रणवाद्यें वाजूं लागलीं. १३०

**अन्वयार्थ**—( ततः )-भीष्मांनीं शंख वाजवितांच-( शंखाः )-शंख,-( च भेर्यः )-नगारे,-( पणवानकगोमुखाः )-ढोल, खंजिऱ्या, मृदंग-( सहसा एव )-एकाएकींच-( अभ्यहन्यन्त )-वाजविले गेले-( सः शब्दः )-तो शब्द-( तुमुलः )-फार मोठा-( अभवत् )-झाला. १३

त्या नानाप्रकारच्या रणवाद्यांचा ध्वनि इतका कर्कश आणि भयंकर होता कीं, मोठ्या धैर्यवानांना देखील तो महाप्रलय वाटला! ३१ नौबद, निशाण, मांदळ ( एक प्रकारचें रणवाद्य) शंख, झांज, तुतारी इत्यादि अनेक रणवाद्यांचा गजर, आणि वीरांच्या मोठमोठ्या गर्जना सुरू झाल्या. ३२ कोणी आवेशानें दंड ठोकूं लागले, कोणी चवताळून मोठमोठ्यानें हांका मारूं लागले, आणि हत्ती बेफाम होऊन आवरतनासे झाले, ३३ त्या ठिकाणीं भित्र्यांची काय कथा! जे कचरले ते तर कसपटाप्रमाणें उडूनच गेले; यमास सुद्धां दहशत बसून तो इकडे तोंड देखील करीनासा झाला! ३४ कित्येकांचे उभ्या उभ्याच जीव गेले; जे धैर्यवान होते, त्यांची दांतखिळी बसली; आणि जे नामांकित योद्धे होते, त्यांच्या अंगास कांपरें सुटलें! ३५ अशा प्रकारचा तो भयंकर वाद्यध्वनि ऐकून ब्रह्मदेव देखील व्याकुळ झाला आणि इंद्रादि देव तर, 'आज हा प्रलयकालच ओढवला कीं काय ' असें म्हणूं लागले. ३६

**अन्वयार्थ**—(ततः)-त्यानंतर-(श्वेतैः हयैः युक्ते)-पांढऱ्या घोड्यांनीं युक्त असलेल्या-(महति स्यंदने)-मोठ्या रथावर-(स्थितौ)-बसलेले-(माधवः च एव पांडवः)-श्रीकृष्ण व अर्जुन-(दिव्यौ शंखौ,-दिव्य)-देवलोकांतील शंख-(प्रदध्मतुः)-मोठ्यानें वाजविते झाले.१४(हृषीकेशः)-श्रीकृष्ण-(पांचजन्यं)-पांचजन्यनांवाच्या शंखास,-( धनंजयः देवदत्तं )-अर्जुन देवदत्त नांवाच्या शंखास-( भीमकर्मा वृकोदरः )-ज्याचीं कर्में भयंकर आहेत, असा भीम-(पौंड्रं महाशंखं)-पौंड्रनांवाच्या मोठ्या शंखास-(दध्मौ)-वाजविता झाला. १५-(कुंतीपुत्रः राजा युधिष्ठिरः )-कुंतीचा पुत्र राजा युधिष्ठिर-(अनन्तविजयं)-अनन्तविजय या नांवाच्या शंखाला वाजवूं लागला.-(नकुलः)-नकुल-(च)-व-(सहदेवः)-सहदेव [ हे दोघे माद्रीचे पुत्र]-(सुघोषमणिपुष्पकौ)-सुघोष व मणिपुष्पक या नांवाचे शंख क्रमानें वाजविते झाले. १६.

१ दांडगा. २ गोष्ट. ३ टाकिली. ४ एकत्र, राज. ५ एका अक्षौहिणींत-२१८७० रथ, २१८७० हत्ती, ६५६१० घोडे, व १०९३५० पायदळ इतकें सैन्य. ६ युद्धस्थानीं. ७ भांडणी. ८ दहा हजार योद्ध्यांशीं एकटा युद्ध करणारा. ९ भीष्माच्या आज्ञेखालीं. १० देखरेख ठेवा. ११ सर्व. १२ वास्तविक, खरा, भिस्त. १३ भीष्म. १४ सिंहासारखी गर्जना. १५ मावत नाहीं. १६ प्रतिध्वनीबरोबर. १७ बळानें. १८ वाजविला. १९ एकत्र झालें. २० बहिऱ्यासारखें. २१ भ्यालेलें, २२ स्थावर, जंगम. २३ पर्वताच्या गुहा. २४ रणवाद्यें. २५ फुंकिली. २६ पुष्कळ प्रकारचीं वाद्यें. २७ कर्कश. २८ बळवानांस, धडधाकटांस, २९ नौबत. ३० वाद्यविशेष. ३१ रणवाद्यविशेष. ३२ झांजा. ३३ तुतारी. ३४ रणांतील भयंकर शब्द. ३५ मोठमोठ्या योद्ध्यांचे ३६ थोपटतात. ३७ आवेश आलेले. ३८ हत्ती. ३९ भित्र्यांचा. ४० अधीर, कचरणारे. ४१ कसपट. ४२उडालें. ४३ तोंड करीना. ४४ उभ्याउभ्याच. ४५ धैर्यवानांचे ४६ पूर्वी विजयी झालेले वीर. ४७ कांपूं लागलें. ४८ वाद्यध्वनि.

ऐसी स्वर्गीं मातु । देखोनि तो आकांतु । तंव पांडवदळाआंतु । वर्तलें
कायी ३७ हो कां निजसार[1] विजयाचें । कीं तें भांडार महातेजाचें । जेथ गरु-
डाचिये जौवाळियेचे[2] । कांतिले[3] चाऱ्ही ३८ कीं पाखांचा[4] मेरु जैसा । रहंवरु[5]
मिरवतसे तैसा । तेजें कोंदाटलिया[6] दिशा । जयाचेनि ३९ जेथ अश्ववाहकु[7]
आपण । वैकुंठींचा राणा जाण । तया रथाचे गुण । काय वर्णूं[8] १४० ध्वज-
स्तंभावरी वानरु । तो मूर्तिमंत शंकरु । सारथी शार्ङ्गधरु । अर्जुनेंसीं ४१ देखा
नवल[9] तया प्रभूचें । अद्भूत प्रेम भक्ताचें । जें सारथ्यपण पार्थाचें । करितु
असे ४२ पाइंकु[10] पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला । तेणें पांचजन्यु
आस्फुरिला[11] । आवलीळाचि[12] ४३ परी तो महाघोषु थोरु । गर्जतु असे गंहिरु[13] ।
जैसा उदेला लोपी दिनकरु । नक्षत्रांतें ४४ तैसें तूरबंबोळु[14] भंवते । कौरवदळीं
गाजत होते । ते हारपोनि नेणों केउते[15] । गेले तेथ ४५ तैसाचि देखे येरें[16] ।
निनादें[17] अति गजरें । देवदत्त धनुर्धरें[18] । आस्फुरिला ४६ ते दोनी शब्द अचाट[19] ।
मीनले[20] एकवट[21] । तेथ ब्रह्मकटाह[22] शतकूट[23] । हों पाहत असे ४७ तंव भीमसेनु
विसणैलों[24] । जैसा महाकाळु खवळला । तेणें पौंड्र आस्फुरिला । महाशंखु ४८
तो महाप्रलयजलधरु[25] । जैसा घडघडिला गंहिरु[26] । तंव अनंतविजयो युधि-
ष्ठिरु । आस्फुरित असे ४९ नकुळें सुघोषु । सहदेवें मणिपुष्पकु । जेणें नादें
अंतकु[27] । गजबजला[28] ठाके १५०

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः । धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते । सौभद्रस्य महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥
स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् । नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९॥

तेथ भूपती होते अनेक । द्रुपद द्रौपदेयादिक[29] । हा काशीपती देख । म-
हाबाहू ५१ तेथ अर्जुनाचा[30] सुतु । सात्यकि अपराजितु । धृष्टद्युम्नु नृपनाथु ।
शिखंडी हेन[31] ५२ विराटादि नृपवर । जे सैनिक मुख्य वीर । तिहीं नानाशंख
निरंतर । आस्फुरिले ५३ तेणें महाघोषनिर्घातें[32] । शेष कूर्म अवचितें[33] । गजब-
जोनि भूभारातें । सांडूं पाहती ५४ तेथ तिन्ही लोक डळमळित । मेरु मां-
दार आंदोळित[34] । समुद्रजळ उसळत । कैलासवेरी ५५ पृथ्वीतळ उलथों पहात ।
आकाश असे आसुडत[35] । तेथ सैंडा[36] होत । नक्षत्रांचा ५६ सृष्टि गेली रे गेली ।
देवां मोकळवादी[37] जाहली । ऐशी एक टाळी पिटली । सत्यलोकीं[38] ५७ दिहाचि[39]

याप्रमाणें स्वर्गलोकांत दाणादाण उडून गेली असतां, इकडे पांडवसैन्यांत काय झालें पहा. ३७ जो रथ विजयाचें प्रत्यक्ष माहेरघर असून तेजाचें केवळ भांडारच, व ज्यास गरुडाप्रमाणें वेगवान असे चार घोडे जुंपलेले असून ३८ जो पक्षयुक्त मेरुपर्वताप्रमाणें दिसत होता, तो श्रेष्ठ रथ तेथें शोभूं लागला. त्याच्या तेजानें दाही दिशा लखलखीत दिसत होत्या, ३९ ज्या रथावर प्रत्यक्ष वैकुंठाधिपति श्रीकृष्ण सारथी होते, त्या रथाचे गुण कोठवर वर्णन करावे? १४० साक्षात् शंकराचा अवतार जो मारुति, तो त्याच्या ध्वजस्तंभावर असून, शार्ङ्गधनुष्य धारण करणारे भगवान श्रीकृष्ण अर्जुनाचे सारथी होते. ४१ पहा त्या प्रभूचें केवढें नवल आहे! त्याला भक्ताचें आश्चर्यकारक प्रेम आहे, त्यामुळें तो पार्थाचें सारथ्य करूं लागला. ४२ त्यानें आपल्या सेवकाला पाठीशीं घातलें, स्वतः पुढें उभा राहिला आणि आपला पांचजन्य नांवाचा शंख सहज लीलेनें वाजविला; ४३ त्याचा फार मोठा आवाज झाला, त्यामुळें सूर्याचा उदय झाला असतां ज्याप्रमाणें नक्षत्रें लोपतात, त्याप्रमाणें त्या शंखाच्या महानादानें ४४ कौरवांच्या सैन्यामध्यें होत असलेला वाद्यगजर त्या आवाजांत लोपून गेला. ४५ त्याचप्रमाणें अर्जुनानेंही आपला देवदत्त नांवाचा गंभीर नादाचा शंख आवेशानें वाजविला. ४६ त्या वेळीं त्या दोन्ही शंखांचा अद्भुत ध्वनि एकत्र झाल्यामुळें ब्रह्मांडाचे शतशः तुकडे होतात कीं काय असें वाटूं लागलें! ४७ इतक्यांत भीमसेनालाही आवेश आला, आणि महाकाळाप्रमाणें खवळून त्यानें आपला पौण्ड्र नांवाचा महाशंख वाजविला. ४८ त्या शंखाचा भयंकर ध्वनि महाप्रलयकाळच्या मेघगर्जनेप्रमाणें जो होत आहे, तो धर्मराजानें अनंतविजय नामक शंख वाजविला. ४९ नकुलानें सुघोष नांवाचा, आणि सहदेवानें मणिपुष्पक नांवाचा शंख वाजविला. त्या नादानें प्रत्यक्ष यमाचेंही धाबें दणाणून गेलें! १५०

**अन्वयार्थ**—[ हे पृथिवीपते ]–अहो धृतराष्ट्र महाराज! –( च परमेष्वासः काश्यः )–आणि ज्याचें इष्वास-धनुष्य मोठें आहे असा महाधनुर्धर काशिराजा–( च महारथः शिखंडी )–व महारथी शिखंडी,–( धृष्टद्युम्नः च विराटः )–धृष्टद्युम्न व विराट,–(अपराजितः सात्यकिः)–पराभव न पावणारा सात्यकि,–(द्रुपदः च द्रौपदेयाः)–द्रुपद आणि द्रौपदीचे पांच पुत्र,–( च महाबाहुः सौभद्रः )–व ज्याचे बाहू मोठे–पराक्रमी आहेत असा सुभद्रापुत्र–अभिमन्यु–( सर्वशः )–या सर्वांनी–( पृथक् पृथक् )–निरनिराळे–(शंखान् दध्मुः)– शंख वाजविले. १७-१८–(नभः)–अंतरिक्ष–(च)–व–(पृथिवीं)–पृथिवी, यांना –(व्यनुनादयन्)–भरून सोडणारा–[त्यांना दुमदुमून टाकणारा] –(सः तुमुलः घोषः)–तो भयंकर नाद–( धार्तराष्ट्राणां )–धृतराष्ट्रपुत्रांचीं–कौरवांचीं–( हृदयानि )–हृदयें–( व्यदारयत् )–फाडून टाकता झाला. १९

द्रुपद राजा, महावीर काशिराजा, द्रौपदीचे पुत्र इत्यादि अनेक राजे व वीर, त्या ठिकाणीं जमले होते; ५१ त्याचप्रमाणें अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु, अजिंक्य असा सात्यकि, नृपश्रेष्ठ धृष्टद्युम्न, शिखंडी, ५२ त्याचप्रमाणें विराट व इतर जे जे सेनानायक होते, तेही आपापले निरनिराळ्या तऱ्हेचे शंख एकसारखे वाजवूं लागले. ५३ त्या शंखांच्या महाध्वनींच्या आघातानें शेष व कूर्म हे एकदम दचकले, आणि पृथ्वीचा भार टाकून देण्यास तयार झाले. ५४ त्या योगानें त्रैलोक्य डळमळूं लागलें. मेरु व मांदार हे हालूं लागले, समुद्राचें पाणी कैलासापर्यंत उसळलें, ५५ पृथ्वी पालथी होते कीं काय व आकाश कोसळून पडतें कीं काय असें वाटूं लागलें. आणि उल्कापात होऊं लागला! ५६ सत्यलोकीं, 'सृष्टि बुडाली रे बुडाली, आतां देव निराधार झाले' अशी एकच हाकाटी झाली; ५७ सूर्य दिवसाच थांबला; आणि प्रलयकाळचे वेळेप्रमाणें तिन्ही लोकांत हाहाकार उडून

१ माहेरघर. २ वरोवरांचे. ३ जोडले. ४ पंखांनीं युक्त. ५ उत्तम रथ. ६ भरल्या. ७ सारथी. ८ गारुनी. ९ कौतुक. १० सेवक. ११ वाजविला. १२ सहज, लीलेनें. १३ गंभीर. १४ वाद्यगजर. १५ कोठें. १६ दुसरा. १७ ध्वनी. १८ अर्जुनानें. १९ अद्भुत. २० मिळाले. २१ एकत्र. २२ ब्रह्मांड. २३ शंकडों तुकडे. २४ आवेश आलेला. २५ प्रलयकाळचा मेघ. २६ गंभीर. २७ यम. २८ घाबरून गेला. २९ द्रौपदीचे पुत्र, प्रतिविंध्यादि. ३० अभिमन्यु. ३१ आणखी. ३२ भयंकर आवाजाच्या धक्क्यानें. ३३ एकाएकीं. ३४ झोंके घेतात. ३५ तुटून पडते. ३६ वर्षाव. ३७ निराधार. ३८ महलोकीं. ३९ दिवसासच.

दिन थोकेला । जैसा प्रळयकाळ मांडला । तैसा हाहाकारु जाहला । तिहीं लोकीं ५८ तें देखोनि आदिपुरुष विस्मितु । म्हणे झणें होय पां अंतु । मग लोपिला अद्भुतु । संभ्रमु तो ५९ म्हणोनि विश्वें सांवरलें । एऱ्हवीं युगान्त होतें वोडवलें । जैं महाशंख आस्फुरिले । कृष्णादिकीं १६० तो घोष तरी उपसंहरला । परी पडिसाद होता राहिला । तेणें दळभार विध्वंसिला । कौरवांचा ६१ जैसा गजघटाआंतु । सिंह लीलां विदारितु । तैसा हृदयातें भेदितु । कौरवांचिया ६२ तो गाजित[12] जंव आइकती । तंव उभेचि हिये[13] घालिती । एकमेकांतें म्हणती । सावधरे सावध६३

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः । प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥

तेथ वेळीं प्रौढीपुरते । महारथी वीर होते । तिहीं पुनरपि दळातें । आवरिलें६४ मग सरिसेपणें उठावले । दुणवटोनि उचलले । तया दंडीं[16] क्षोभलें । लोकत्रय६५ तेथ बाणवरी धनुर्धर । वर्षताती निरंतर । जैसे प्रळयांत जलधर । अनिवार कां ६६ ते देखलिया अर्जुनें । संतोष घेऊनि मनें । मग संभ्रमें दिठी[22] सेने । घालीतसे६७ तंव संग्रामीं सज्ज जाहले । सकळ कौरव देखिले । तंव लीलाधनुष्य उचलिलें । पंडुकुमरें६८

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते । अ. उ.—सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥२१॥
यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् । कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥
योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः । धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा । आतां झडकरी रथु पेलावा । नेऊनि मध्यें घालावा । दोहीं दळां ६९ जंव मी नावेक । हे सकळ वीर सैनिकें । न्याहाळीन अशेख । झुंजते जे १७० एथ आले असती आघवे । परी कवणेसीं म्यां झुंजावें । हें रणीं लागे पहावें । म्हणऊनियां ७१ बहुतकरूनि कौरव । हे आतुर दुःस्वभाव । वांटिवेवीण[32] हांवें[33] । बांधिती झुंजीं ७२ झुंजाची आवडी धरिती । परी संग्रामीं धीरें[34] नव्हती । हें सांगोनि रायाप्रती । काय बोले ७३

संजय उवाचः—

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत । सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥
भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् । उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥
तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् । आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा २६
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि । तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥
कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

आइका अर्जुन इतुकें बोलिला । तंव श्रीकृष्णें रथु पेलिला । दोहीं सैन्यांमाजी केला । उभा तेणें ७४ जेथ भीष्मद्रोणादिक । जवळिकेचि सन्मुख । पृथिवीपति

गेला. ५८ तें पाहून भगवान श्रीकृष्ण फार विस्मित झाले, आणि कदाचित् सृष्टीचा अंत होईल असें जाणून, त्यांनीं तो अद्भुत शंखनाद बंद केला, ५९ म्हणूनच हें जग वांचलें, नाहीं तर कृष्णादिकांनीं जेव्हां शंख वाजविले, तेव्हांच त्याचा अंत होण्याची वेळ आली होती. १६० तो शंखनाद बंद झाला, तथापि त्याचा जो प्रतिध्वनि घुमत होता, त्या योगानें कौरवसैन्याची दाणादाण झाली. ६१ ज्याप्रमाणें सिंह सहज हत्तीच्या समुदायाचें विदारण करितो, त्याप्रमाणें त्या प्रतिध्वनीनें कौरवांचीं हृदयें विदीर्ण केलीं. ६२ तो ध्वनि ऐकून उभ्याउभ्याच सर्वांचें धैर्य सुटलें आणि एकमेकांस सावधरे सावध असें म्हणूं लागले ६३

**अन्वयार्थ**—(अथ)-नंतर अहो महाराज!-(कपिध्वजः) -ज्याच्या ध्वजावर वानराचें चिह्न आहे असा-(पाण्डवः)-पंडूचा पुत्र अर्जुन-(धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा)-धृतराष्ट्रपुत्र दुर्योधनादिक युद्ध करण्यासाठीं सज्ज होऊन उभे आहेत असें पाहून-(तदा)-त्यावेळीं-(शस्त्रसंपाते प्रवृत्ते [सति]-शस्त्रें चालू होण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां-(धनुः उद्यम्य)-आपलें गांडीव धनुष्य वर उचलून २०

त्या ठिकाणीं, बलानें व पुरुषार्थानें युक्त असे जे महारथी होते, त्यांनीं सैन्याला पुनः धीर देऊन सांवरिलें. ६४ मग ते मोठ्या तयारीनें पुढें सरसावले, व त्यांनीं दुप्पट आवेशानें चाल केली. तेव्हां त्या आवेशयुक्त सैन्याच्या योगानें त्रिभुवन अगदीं त्रस्त होऊन गेलें. ६५ ज्याप्रमाणें प्रलयकालचे दुर्धर मेघ एकसारखी वृष्टि करितात, त्याप्रमाणें तेथें धनुर्धर तीक्ष्ण बाणांची वृष्टि करूं लागले. ६६ तें पाहून अर्जुनाच्या मनाला फार संतोष झाला, व त्यानें मोठ्या आवेशानें सैन्यावर दृष्टि फेंकली. ६७ तेव्हां सर्व कौरव युद्धास सिद्ध आलेले पाहून पंडुपुत्रानें सहज लीलेनें धनुष्य उचललें. ६८.

**अन्वयार्थ**—(हृषीकेशं)-श्रीकृष्णाला-(इदं वाक्यं)-हें वाक्य-(आह)-बोलला. [हे निर्विकार श्रीकृष्णा]-(यावत्)-जों पर-(अहं)-मी-(योद्धुकामान् अवस्थितान् एतान्)-युद्धाची इच्छा असलेल्या व सन्मुख उभ्या राहिलेल्या यांस-(निरीक्षे) -पाहीन-(तावत्)-तोंवर-(मे रथं) माझा रथ-(उभयोः सेनयोः मध्ये)-दोन्ही सैन्यांच्या मध्यमागीं-(स्थापय)-उभा कर.-(अस्मिन् रणसमुद्यमे)-या रणाच्या उद्योगांत-या युद्धांत-(मया)-मी (कैः सह)-कोणाबरोबर-(योद्धव्यं)-युद्ध करावें-मला कोणाशीं लढावयाचें आहे. हें पाहण्याची प्रबळ इच्छा झाली आहे.२१-२२.-(दुर्बुद्धेः धार्तराष्ट्रस्य)-ज्याची बुद्धि अधर्मनिष्ठ आहे,त्यामुळें ज्याला आपलें हित कळत नाहीं,अशा दुष्ट दुर्योधनाचें-(युद्धे)-युद्धांत-[युद्ध करून]-(प्रियचिकीर्षवः)-प्रिय करण्याची इच्छा करणारे-(ये एते)-जे हे-(अत्र)-येथें-(समागताः)-आलेले आहेत-(तान् योत्स्यमानान्)-त्या युद्ध करणाऱ्या सर्वांस-(अहं)-मी-(अवेक्षे)-पहातों.

मग अर्जुन म्हणाला, "देवा, आतां आपला रथ लौकर चालवा आणि दोन्हीं सैन्यांचे मध्यें नेऊन उभा करा. ६९ म्हणजे तेथें युद्ध करण्याकरितां आलेल्या वीरांस मी क्षणभर न्याहाळून पाहीन. १७० कारण, येथें जरी सर्व वीर जमले आहेत, तरी समरांगणीं मला कोणाशीं युद्ध करावयाचें आहे तें पाहिलें पाहिजे. ७१ हे बहुतेक उतावळे व दुष्टबुद्धि कौरव अंगांत पराक्रम नसतां युद्धाची हाव धरीत आहेत. ७२ यांना युद्धाची हौस आहे खरी, परंतु यांच्याच्यानें रणभूमीवर धैर्य धरवत नाहीं." इतकें राजाप्रत सांगून संजय पुढें म्हणाला:—७३

**अन्वयार्थ**—(हे भारत)-हे महाराज धृतराष्ट्रा!-(गुडाकेशेन)-अर्जुनाकडून-(एवं उक्तः हृषीकेशः)-असें बोलला गेलेला श्रीकृष्ण-(उभयोः सेनयोः मध्ये)-दोन्ही सैन्यांच्या मध्यमार्गी-(भीष्मद्रोणप्रमुखतः)-भीष्म व द्रोण यांच्या समोर-(च सर्वेषां महीक्षितां [प्रमुखतः]-व इतर सर्व राजांच्या समोर-(रथोत्तमं)-उत्तम रथ-(स्थापयित्वा)-उभा करून;-(हे पार्थः)-अर्जुना!-(एतान् समवेतान् कुरून्) या जमलेल्या सर्व कौरवांना-(पश्य)-पहा.-(इति)-असें-(उवाच)-बोलला. २४-२५-(तत्र)-याप्रमाणें श्रीकृष्णानें सांगितलें असतां-(पार्थः)-अर्जुन (उभयोः अपि सेनयोः)-दोन्हीं सैन्यांमध्यें-(स्थितान्)-असलेल्या-(पितॄन्)-भूरिश्रवाप्रभृति चुलत्यांस,-(अथ पितामहान्)-व भीष्मादि पितामहांस,-(आचार्यान्)-द्रोणाचार्यादि आचार्यांस,-(मातुलान्)-शल्यादि मामांस,-(भ्रातॄन्)-भीम दुर्योधनादि भावांस,-(पुत्रान्)-अभिमन्यु-लक्ष्मणादि-पुत्रांस,-(पौत्रान्)-नातवांस २६-(तथा) -त्याचप्रमाणें-(सखीन्)-अश्वत्थामाप्रभृति मित्रांस-(श्वशुरान्) -द्रुपदादि सासऱ्यांस-(च सुहृदः)-आणि कृतवर्मा, भगदत्त व इतर निरपेक्ष उपकार करणारे स्नेही यांस-(अपश्यत्)-पाहता झाला,-(तान् सर्वान् अवस्थितान् बन्धून्)-त्या सर्व सन्मुख उभ्या असलेल्या बंधूंस-आप्तांस-(समीक्ष्य)-पाहून २७-(परया कृपया आविष्टः)-परम कृपेनें प्रवेश केलेला-ज्याच्या चित्तांत परम कृपा आपोआप उत्पन्न झाली आहे असा-(सः कौन्तेयः)-तो कुंतीचा पुत्र अर्जुन-(विषीदन्)-विषाद-खेद करीत होत्साता-(इदं)-हें असें-(अब्रवीत्)-बोलला.

राजा ऐक, अर्जुनाचें हें भाषण श्रवण करतांच श्रीकृष्णानीं रथ चालविला व दोन्हीं सैन्यांच्यामध्यें नेऊन उभा केला.७४

---

१ शांत झाला, थांबला. २ श्रीकृष्ण. ३ कदाचित्. ४ आदिन. ५ जगत्. ६ प्रलय. ७ नाहींसा झाला. ८ प्रतिध्वनी. ९ हत्तींच्या कळपांत. १० सहज. ११ फाडतो. १२ घुमत. १३ धैर्य. १४ यत्नानें, पूर्ण. १५ दहा हजारांशीं एकटा युद्ध करणारा. १६ दोहोंकडून सरल्या तयारीनें. १७ दुप्पट आवेशानें. १८ सैन्याच्या योगानें. १९ बाणांवर बाण. २० मेघ. २१ आवेशानें. २२ दृष्टि. २३ युद्धांत. २४ सिद्ध; तयार. २५ न्याहाळ. २६ क्षणभर. २७ योद्धे. २८ पाहीन. २९ संपूर्ण. ३० सर्व ३१ उतावळे. ३२ पराक्रमावांचून. ३३ हौस, सोस. ३४ धैर्य धरवत नाहीं. ३५ नेत्र. ३६ नानाविधा. ३७ रथ.

आणिक । बहुत ओहाती ७५ तेथ स्थिर करूनियां रथु । अर्जुन असे पाहातु । तो दळभार[२] समस्तु । संभ्रमेंसीं[३] ७६ मग देवा म्हणे देख देख । हे गोत्रगुरु अशेख[४] । तंव कृष्णमनीं नावेक[५] । विस्मो जाहला ७७ तो आपणयां आपण म्हणे । एथ कायी कवण जाणे । हें मनीं धरिलें येणें । पारि कांहीं आश्चर्य असे ७८ ऐसी पुढील से[७] घेतु । तो सहज जाणे हृदयस्थु । पारि उगा असे निवांतु । तिये वेळीं ७९ तंव तेथ पार्थ सकळ । पितृ पितामह केवळ । गुरु बंधु मातुळ । देखता जाहला १८० इष्ट मित्र आपुले । कुमरजन देखिले । हे सकळ असती आले । तयांमाजीं ८१ सुहृज्जन[११] सासरे । आणीकही सखे सोइरे । कुमर पौत्र धनुर्धरें । देखिले तेथ ८२ जयां उपकार होते केले । कीं आपदीं[१२] जे रक्षिले । हे असो वडील धाकुले[१३] । आदिकरूनि ८३ ऐसें गोत्राचि दोहीं दळीं । उदित[१४] जालें असे कैळीं[१५] । हें अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें ८४ तेथ मनीं गजबज[१६] जाहाली । आणि आपैसी[१७] कृपा आली । तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ८५ जिया[१८] उत्तम कुळींचिया होती । आणि गुणलावण्य[१९] आथी[२०] । तियां[२१] आणिकीतें न साहती । सुतेजपणें[२२] ८६ नावियें[२३] आवडीचेनि भरें । कामुक[२४] निजें[२५] वनिता विसरे । मग पाडेंवीणें[२६] अनुसरे । भ्रमला जैसा ८७ कीं तपोबळें[२७] ऋद्धी[२८] । पातलिया[२९] भ्रंशे[३०] बुद्धी । मग तया विरक्तता[३१] सिद्धी । आठवेना ८८ तसें अर्जुना तेथ जाहलें । असतें[३२] पुरुषत्व गेलें । जें अंतःकरण दिधलें । कारुण्यासी[३३] ८९ देखा मंत्रज्ञु बरळे[३४] जाय । मग तेथ का जैसा संचारु[३५] होय । तैसा तो धनुर्धर महामोहें । आकळिला[३६] १९० म्हणऊनि असतां धीरु गेला । हृदया द्रावो[३७] आला । जैसा चंद्रकळीं[३८] शिवतला[३९] । सोमकांतु[४०] ९१ तयापरी पार्थु । अतिस्नेहें मोहितु । मग सखेद असे बोलतु । श्रीअच्युतेंसीं[४१] ९२

अर्जुन उवाचः—दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥

सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति । वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥

गांडीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते । न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥३०॥

तो म्हणे अवधारीं[४३] देवा । म्यां पाहिला हा मेळावा । तंव गोत्रवर्गु आंघवा । देखिला एथ ९३ हे संग्रामीं उदित[४६] । जहाले असती कीर[४७] समस्त । पण आर्पणपेयां उचित । केवीं होय ९४ येणें नांवेंचि[४९] नेणों कायी । मज आपणपें सर्वथा नाहीं । मन बुद्धी ठायीं । स्थिर नोहे ९५ देखे देह कांपत । तोंड असे कोरडें होत । विकळता[५१] उपजत । गात्रांसीही[५२] ९६ सर्वांगा कांटाळा[५३] आला ।

ज्या ठिकाणीं भीष्मद्रोणादिक आप्तसंबंधी व अनेक राजे गमीर उभे आहेत, ७५ त्या ठिकाणीं रथ उभा केला असतां अर्जुन त्या सेनेकडे उत्सुकतेनें पाहूं लागला. ७६ मग म्हणाला, "देवा, पहा, पहा, हे तर सर्व आमचे आप्तवर्ग व गुरु आहेत !" हें ऐकून श्रीकृष्णास क्षणभर आश्चर्य वाटलें. ७७ ते आपल्या मनांत म्हणतात, अर्जुनानें हें मनांत काय आणलें कोण जाणे; परंतु ज्याअर्थी तो असें म्हणत आहे त्याअर्थी त्यांत कांहीं तरी विशेष आहे. ७८ पण भगवान् दुसऱ्यांचें मनोगत सहज जाणणारे असल्यामुळें त्यांनीं पुढील भविष्य ताडलें; परंतु त्या वेळेस कांहींच न बोलतां ते स्तब्ध राहिले. ७९ तेव्हां अर्जुनानें आपलें सर्व वडील, आजे, गुरु, बंधु व मामा असे पाहिले. १८० आपले इष्टमित्र व मुलगे हे सर्व त्या ठिकाणीं आलेले पाहिले. ८१ तसेंच त्यानें आपले जिवलग मित्र, सासरे, आप्तवर्ग व नातू हेहि त्या ठिकाणीं अवलोकन केले. ८२ ज्यांनीं आपल्यावर उपकार केले होते, व संकटसमयीं ज्यांनीं आपलें रक्षण केलें होतें, ते व इतर लहानमोठे इत्यादि ८३ हे सर्व आपलेच गोत्रज दोन्हीं सैन्यांमध्यें युद्धाला सज्ज झाले आहेत असें अर्जुनानें त्या वेळीं पाहिलें. ८४ त्या वेळीं तो मनांत व्याकुळ झाला, आणि आपोआप करुणा उत्पन्न झाली, त्यामुळें वीरवृत्तीचा अपमान झाला व ती वीरवृत्ति अर्जुनास सोडून निघाली. ८५ ज्या स्त्रिया उत्तम कुळांतल्या असून गुणी व लावण्यवती असतात, त्यांना आपल्या मानीपणामुळें दुसऱ्या स्त्रियांचें वर्चस्व सहन होत नाहीं. ८६ ज्याप्रमाणें नवीन स्त्रीच्या आवडीचे भरांत विषयी पुरुष आपल्या स्त्रीस विसरून भ्रम झालेल्या मनुष्याप्रमाणें योग्यतेवांचून तिच्या नादीं लागतो, ८७ किंवा तपश्चर्येच्या योगानें ऋद्धिसिद्धी प्राप्त झाल्या असतां वैराग्यशील पुरुषाचे बुद्धीस भ्रम पडून त्याला ज्याप्रमाणें वैराग्याची आठवण राहात नाहीं, ८८ त्याप्रमाणें, अर्जुनानें आपल्या अंतःकरणांत करुणेस थारा दिल्यामुळें त्याचा असलेला पुरुषार्थहि नाहींसा झाला. ८९ असें पहा की, मांत्रिक मंत्रोच्चार करण्यांत चुकूं लागला म्हणजे त्यालाच भूतबाधा होते, त्याप्रमाणें अर्जुनाला महामोहानें ग्रासलें. १९० त्यामुळें त्याचें स्वाभाविक धैर्य नष्ट झालें, त्याच्या हृदयांत दयेचा पाझर फुटला ! ज्याप्रमाणें चंद्रकिरणांचा स्पर्श होण्याबरोबर चंद्रकांतमण्यास पाझर फुटतो, ९१ त्याप्रमाणें अर्जुन अतिस्नेहानें मोहित झाला व खेदयुक्त अंतःकरणानें श्रीकृष्णाशीं बोलूं लागला. ९२.

**अन्वयार्थ**—(कृष्ण) हे कृष्णा !-(युयुत्सुं)-युद्धाची इच्छा करणाऱ्या व-(समुपस्थितं)-रणभूमींत प्राप्त झालेल्या-(इमं स्वजनं)-या बंधुवर्गास-(दृष्ट्वा)-पाहून-(मम गात्राणि)-माझीं गात्रें-अवयव-(सीदन्ति)-व्यथा पावतात-(च मुखं)-व तोंड-(परिशुष्यति)-सर्व बाजूंनीं कोरडें पडतें-(मे शरीरे) माझ्या शरीरांत-(वेपथुः)-कंप [ सुटतो ]-(च)-आणि-(रोमहर्षः)-अंगावर रोमांच -(जायते) उभा राहतो. २८-२९. -(हस्तात्) -माझ्या हातांतून-(गाण्डीवं)-गाण्डीव धनुष्य-(स्रंसते)-गळतें-(च) आणि-(त्वक्)-त्वचा -(परिदह्यते)-सभोंवार जाळली जाते -सर्व शरीरांत दाह उत्पन्न झाला आहे (अहं)-मी-(अवस्थातुं) -स्थिर उभा राहण्यास-(न शक्नोमि)-समर्थ नाहीं;-(मे मनः) -माझें मन-(भ्रमति इव)-जणूंकाय भ्रमण करीत आहे. ३०

अर्जुन, म्हणाला, "देवा हें पहा-मीं हा सर्व सैन्यसमुदाय पाहिला, तों येथें सर्व सारे गोत्रजच माझ्या दृष्टीस पडले.९३ हे सर्व युद्ध करण्याकरितां तयार झाले आहेत खरें; परंतु यांच्या बरोबर युद्ध करणें आपल्यास कसें उचित होईल,९४ यांच्याशीं युद्ध करण्याची गोष्ट काढतांच मला कांहींच सुचेनासें झालें आणि मन व बुद्धि हीं देखील आपल्या जागीं स्थिर राहात नाहींत. ९५ हा पहा, माझ्या सर्व अंगास कंपहि सुटला आहे, तोंडास कोरड पडली आहे, व गात्रेंहि शिथिल झालीं आहेत. ९६ सर्वांगावर कांटा उभा राहिला आहे, शरिराचा भडका

१ आहेत. २ मना. ३ रथानें. ४ स्वकुलांतील श्रेष्ठ. ५ सर्व. ६ क्षणभर. ७ आश्चर्यचकित. ८ आपणांशीं. ९ मूळ-ना, स्मृति, आठवण. १० हृदयांत वास करणारा, अंतरात्मा. ११ मित्र, स्नेही. १२ संकटसमयीं. १३ धावले. १४ उत्सुक, तयार १५ युद्धाला. १६ गडबड. १७ आपोआप. १८ त्या. १९ सद्‌गुणी व सौन्दर्यसंपन्न. २० आहेत. २१ त्या. २२ आपल्या अंगच्या उत्तम तेजानें. २३ नव्या. २४ विषयी. २५ आपली स्त्री. २६ योग्यतेवांचून. २७ तपश्चर्येच्या जोरानें. २८ संपत्ति, ऐश्वर्य. २९ प्राप्त झाली असतां.

३० भ्रष्ट होते. ३१ वैराग्य. ३२ असलेलें. ३३ दयेला. ३४ मंत्रोच्चारांत चुकतो. ३५ भ्रम, भूतबाधा. ३६ स्वाधीन केला. ३७ दयेचा पाझर. ३८ चंद्राच्या किरणांनीं. ३९ स्पर्शिला. ४० चंद्रकांतमणी. ४१ दुःखयुक्त. ४२ श्रीकृष्णाशीं. ४३ इकडे लक्ष द्या. ४४ समुदाय. ४५ सर्व. ४६ उत्सुक. ४७ खरें, निश्चयानें. ४८ आपणाला. ४९ गोत्रजांबरोबर युद्ध करणें हें म्हटल्याबरोबर. ५० आपल्या जागीं. ५१ व्याकुळपणा. ५२ अवयवांना. ५३ कांटा.

अति संतापु उपनला । तेथ बेंबळ हातु गेला । गांडिवाचा ९७ तें न धरताचि निष्टलें । पारी नेणेंचि हातोनि पडिलें । ऐसें हृदय असे व्यापिलें । मोहें येणें ९८ जें वज्रापासोनि कठिण । दुर्धर अतिदारुण । तयाहून असाधारण । हें स्नेह नवल ९९ जेणें संग्रामीं हरु जिंतिलीं । निवातकवचांचा ठावो फेडिली । तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं २०० जैसा भ्रमर भेदी कोडें । भलतैसें काष्ठ कोरडें । पारि कळिकेमाजीं सांपडे । कोंवाळिये १ तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । पारि तें कमळदळ चिरूं नेणें । तैसें कठिण कोवळेंपणें । स्नेहें देखा २ हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मेयाही नयेचि आया । म्हणवूनि भुलविला ऐके रायां । संजयो म्हणे ३ अवधारी मग तो अर्जुनु । देखोनि सकळ स्वजनु । विसरला अभिमानु । संग्रामींचा ४ कैसी नेणों सदयता । उपनली तेथें चित्ता । मग म्हणे कृष्णा आतां । नसिजे एथ ५ माझें अतिशय मन व्याकुळ । हो-तसे वाचा बरळ । जे वधावे हे सकळ । येणें नांवें ६

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव । न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

या कौरवां जरी वधावें । तरी युधिष्ठिरादिकां कां न वधावें । हे येरयेर आघवे । गोत्रज आमुचे ७ म्हणोनि जळो हें झुंजें । प्रलया नये मज । एणें काय काज । महापापें ८ देवा बहुतापरी पाहतां । एथ वोखटें होईल झुंजतां । वर कांहीं चुकवितां । लाभु आथी ९

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च । किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥३२॥
येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च । त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ३३
आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः । मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ३४

तया विजयवृत्ती कांहीं । मज सर्वथा काज नाहीं । एथ राज्य तरी कायी । हें पाहुनियां २१० या सकळांतें वधावें । मग जे भोग भोगावे । ते जळोत आघवे । पार्थु म्हणे ११ तेणें सुखेंविण होईल । तें भलतैसें साहिजेल । वरी जीवितही वेंचि-जेल । याचिलागीं १२ परी यांसी घातु कीजे । मग आपण राज्यसुख भोगिजे । हें स्वप्नींही मन माझें । करूं न शके १३ तरी आम्हीं कां जन्मावें । कवणालागीं जियावें । जरी वडिलां यां चिंतावें । विरुद्ध मनें १४ पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायि हेंचि फळ । जे निर्दळिजे केवळ । गोत्र आपुलें १५ हें मनींचि केवीं धरिजे । आपण वज्राचेंया होईजे । वरी घडे तरी कीजे । भलें ईयां १६ आम्हीं

झाला व गांडीव धनुष्य धरणाऱ्या हात ढिला पडला; १७ त्यामुळें तें माझ्या हातून केव्हां गळून पडलें हें देखील मला समजलें नाहीं, इतकें माझें अंतःकरण या आप्तवर्गाच्या मोहानें व्यापिलें आहे! १८ त्यामुळें तें बरोबर धरलें गेलें नाहीं. जें माझें अंतःकरण वज्रापेक्षांहि कठीण असून कोणत्याहि प्रतिकूल अवस्थेस दाद न देणारें व अति निष्ठुर आहे, तें आप्तवर्गाविषयीं इतकें मोहित व्हावें हें मोठें आश्चर्य आहे." १९ ज्यानें युद्धांत शंकरासहि जिंकिलें, व निवातकवच राक्षसांना नामशेष केलें त्या अर्जुनाला मोहानें एका क्षणांत ग्रासून टाकिलें! २०० भुंगा हा पाहिजे त्या वाळलेल्या लांकडास सहज भोंक पाडतो, परंतु कोंवळ्या कमळाच्या कळीमध्यें तो मिटल्यावर अडकून पडतो; १ तो त्या ठिकाणीं प्राणासहि सोडील, परंतु तें कमलदल फाडून बाहेर कसें निघावें हें त्याला कळत नाहीं. त्याप्रमाणेंच आप्तवर्गाचा मोह कोमल असला तरी तोडण्यास कठीण आहे. २ संजय म्हणतोः—राजा धृतराष्ट्रा, हा मोह म्हणजे परमेश्वराची माया आहे. ही महादेवालाही आवरत नाहीं, म्हणून अर्जुनास तिनें व्याकुळ केलें. ३ राजा, ऐकः मग आपले सर्व आप्तवर्ग पाहून अर्जुनाचा युद्धाविषयींचा सर्व अभिमान पार मावळून गेला. ४ त्या ठिकाणीं त्याचे मनांत करुणा कशी उद्भवली हें कळत नाहीं. मग तो श्रीकृष्णास म्हणाला, देवा, मला वाटतें, आतां येथें राहूं नये. ५ या सर्वांस मारावयाचें ही गोष्ट मनांत आल्याबरोबर माझें मन अति व्याकुळ होऊन तोंडांतून शब्द उमटेनासा झाला आहे. ६

**अन्वयार्थ**—(केशव)–हे केशवा,–(विपरीतानि निमित्तानि)–अशुभ निमित्तें–अरिष्टसूचक चिन्हें–(पश्यामि)–मी पहात आहें;–(च)–आणि–(आहवे)–लढाईंत–(स्वजनं)–स्वजनांना–(हत्वा)–मारून–(श्रेयः)–परम हित–(न अनुपश्यामि)–मी मागून पहात नाहीं;–स्वजनांना मारल्यावर परिणामीं हित होईल असें मला वाटत नाहीं. ३१

या कौरवांना जर मारावयाचें, तर मग धर्मराजादिकांना कां मारूं नये? कारण, हे दोन्ही माझे गोत्रजच आहेत, ७ म्हणून, देवा, पुरे हें, मला कांहीं तें पसंत नाहीं. या महापातकापासून आमचें काय सोळवलें आहे! ८ देवा, अनेक प्रकारें विचार करून पाहतां युद्ध केल्यास त्याचा परिणाम वाईटच होईल असें वाटतें; जर तें टाळलें तर मात्र कांहीं तरी कल्याण होईल. ९

**अन्वयार्थ**—(कृष्ण)–हे कृष्णा! –(अहं)–मी–(विजयं)–विजय–(न काङ्क्षे)–इच्छीत नाहीं.–(राज्यं च [न काङ्क्षे]–राज्यही मी इच्छीत नाहीं;–(सुखानि च [न काङ्क्षे]–व सुखेंही इच्छीत नाहीं)–(गोविंद)–हे गोविंदा! –(नः राज्येन किं)–आम्हांला राज्याला काय करावयाचें आहे? आमचें राज्यानें काय होणार?–(भोगैः किं)–भोगांनीं काय होणार? [भोगांना तरी आम्हांला काय उपयोग?]–(जीवितेन वा किं)–अथवा जीविताला तरी घेऊन काय करावयाचें आहे! ३२–(येषां अर्थे)–ज्यांच्यासाठीं–(नः)–आम्हांला–(राज्यं)–राज्य–(काङ्क्षितं)–इष्ट आहे;–(भोगाः [काङ्क्षिताः]–भोग इष्ट आहेत–(च सुखानि [काङ्क्षितानि]–आणि सुखें इष्ट आहेत–(ते इमे)–ते हे आमचे–(आचार्याः पितरः)–आचार्य, चुलते, पुत्र, तसेच; आजे, मामा, सासरे, नातु, मेव्हणे, तसेच संबंधी–(प्राणान्)–प्राण म्ह० प्राणांची आशा–(च धनानि)–व धन म्ह० धनाची आशा यांस–(त्यक्त्वा)–सोडून–(युद्धे)–युद्धाकरितां–(अवस्थिताः)–येथें उभे राहिले आहेत ३३-३४

अशा रीतीनें जय मिळविण्याची मला मुळींच गरज नाहीं, व असलें राज्य मिळवून तरी काय करावयाचें आहे! २१० अर्जुन म्हणाला, या सर्वांचा वध करून जे राजभोग भोगावयाचे ते सर्व तुच्छ होत. ११ हें राज्यसुख सोडल्यामुळें वाटेल ती दुःखद अवस्था जरी प्राप्त झाली तरी ती आम्ही सहन करूं. फार काय पण या भिष्मादिकांसाठीं आम्ही आपले प्राण देखील देऊं. १२ परंतु यांचा घात करून आपण राज्यसुख भोगावें ही गोष्ट कधीं स्वप्नांतही माझ्या मनांत येणार नाहीं. १३ जर आम्ही आमच्या या वडिलांचें मनानें अहित चिंतलें तर मग आम्हीं जन्मास तरी यावयाचें कशाकरितां व जगावयाचें तरी कोणासाठीं! १४ कुळांत पुत्रप्राप्तीची इच्छा करितात, त्याचें हेंच कां फळ! कीं पुत्रानें आपल्या गोत्रजांचा संहार करावा! १५ आपलें मन त्यांजविषयीं वज्राप्रमाणें कठोर करण्याचें मनांत तरी कसें आणावें? त्यांचें आपल्या हातून होईल तेवढें बरेंच करावें. १६

१ ढिला. २ गांडीव नांवाच्या धनुष्याचा. ३ निसटलें. ४ समजलें नाहीं. ५ हृदय. ६ वज्रापेक्षां. ७ फार भयंकर. ८ विशेष मोठें. ९ युद्धांत. १० शंकर. ११ जिंकिला. १२ निवात व कवच या नांवाचे राक्षस. १३ ठिकाण. १४ नाहींसा केला. १५ ग्रासला. १६ भुंगा. १७ सहज, कौतुकानें. १८ कोणतेंही. १९ कळींत. २० मुकणें. २१ ममता. २२ महादेवालाही. २३ आटोक्यांत, स्वाधीन. २४ धृतराष्ट्रा. २५ आप्त. २६ दयाळूपणा. २७ उपजली. २८ राहूं नये. २९ शेवटी. ३० यांना वधावें या शब्दानें. ३१ धर्मादिकांना. ३२ एकमेक. ३३ सर्व. ३४ युद्ध. ३५ अनुभवाला. ३६ वाईट. ३७ आहे. ३८ जयाकांक्षा. ३९ जरूर, काम. ४० राजोपचार. ४१ वाटेल तें. ४२ सहन केलें जाईल. ४३ जीवही खर्चिला जाईल. ४४ जागावें. ४५ वांकटें. ४६ नाश करावें. ४७ वज्रासारखें कठोर. ४८ यांना.

जें जें जोडावें । तें समस्तीं इहीं भोगावें । हें जीवितही उपकारावें । काजीं यांच्या १७ आम्ही दिगंतीचे भूपाळ । विभांडूंनि सकळ । मग संतोषविजे कुळ । आपुलें जें १८ तेंचि हे समस्त । परी कैसें कर्म विपरीत । जे जाहले असती उद्यत । झुंजावया १९ अंतोरियां कुमरें । सांडोनियां भांडारें । शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी २० ऐसियांतें कैसोनि मारूं । कवणावरी शस्त्र धरूं । निजहृदया करूं । घातु केवीं २१ हें नेणसी तूं कवण । परी पैलें भीष्म द्रोण । जयांचे उपकार असाधारण । आम्हां बहूत २२ एथ शालक सासरे मातुळ । आणि बंधु कीं हे सकळ । पुत्र नातू केवळ । इष्टही असती २३ अवधारीं अति जवळिकेचे । हे सकळही सोयरे आमुचे । म्हणोनि दोष आंथी वाचे । बोलतांचि २४

एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन । अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥३५॥

हे वैरी भलतें करितु । आतांचि येथें मारितु । परि आपण मनें घातु । न चिंतावा २५ त्रैलोक्यींचें अनेंकळित । जरी राज्य होईल प्राप्त । तरी हें अनुचित । नोंचरें मी २६ जरी आजि एथ ऐसें कीजे । तरी कवणाच्या मनीं उरिजे । सांगें मुख केवीं पाहिजे । तुझें कृष्णा २७

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन । पापमेवाऽऽश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

जरी वधु करूनि गोत्रजांचा । तरी वसौटा होऊनि दोषांचा । मज जोडिलासि तूं हातींचा । दूरी होसी २८ कुळहरणीं पातकें । तिये आंगीं जडती अशेखें । तये वेळीं तूं कवणें कें । देखावासी २९ जैसा उद्यानींमाजीं अनेंळु । संचरला देखोनि प्रबळु । मग क्षणभरी कोकिळु । स्थिर नोहे ३० का सकर्दम सरोवरु । अवलोकूनि चकोरु । न सेवितु अव्हेरु । करूनि निघे ३१ तयापरी तूं देवा । मज झकऊं न येसी मावा । जरी पुण्याचा वोलावा । नाशिजैल ३२

तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् । स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥३७॥

म्हणोनि मी हें न करीं । इये संग्रामीं शस्त्र न धरीं । हें किडाळ बहुतीं परी । दिसतसे ३३ तुजसीं अंतराय होईल । मग सांगें आमचें काय उरेल । तेणें दुःखें हियें फुटेल । तुजवीण कृष्णा ३४ म्हणऊनि कौरव हे वधिजेती । मग आम्ही भोग भोगिजती । हे असो मात आघडती । अर्जुन म्हणे ३५

यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः । कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकं ॥ ३८ ॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् । कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

हे अभिमानेंमदें भुलले । जरी पां संग्रामा आले । तऱ्ही आम्हीं हित आपुलें ।

आम्हां जें जें मिळवावें, त्या सर्वांचा त्यांनीं उपभोग घ्यावा; इतकेंच नव्हे, तर त्यांच्याकरितां आम्हीं आपलें जीवितही अर्पण करावें. १७ आम्हीं देशोदेशींचे राजे जिंकावे, व त्यायोगें आपल्या कुळास संतोषित करावें. १८ पण कर्माची किती विपरीत गति आहे, कीं तेच हे आमचे सर्व गोत्रज आह्मांबरोबर युद्ध करण्यास उद्युक्त झाले आहेत! १९ बायका, मुलें व धन ह्या सर्वांस सोडून तरवारीच्या धारेवर ज्यांनीं आपले जीव ठेविले आहेत, २२० अशांना मी कसें मारूं, कोणावर शस्त्र धरूं, आणि मी आपल्याच जिवलगांचा कसा घात करूं? २१ हे कोण आहेत हें तुला माहीत नाहीं काय? ते पहा पलीकडे भीष्म व द्रोण आहेत. त्यांचे आमच्यावर असंख्य व असाधारण उपकार झाले आहेत. २२ या ठिकाणीं मेहुणे, सासरे, मामा आणि बंधु, तसेच हे सर्व पुत्र, नातू व आप्तही आहेत. २३ हें पहा-हे सर्व आमचे फार जवळचे नातेवाईक आहेत, तेव्हां यांना मारण्याची गोष्ट नुसती तोंडानें बोलणें तरी देखील पाप आहे. २४

अन्वयार्थ--(हे मधुसूदन)-हे मधुसूदना!-(त्रैलोक्यराज्यस्य हेतोः अपि)-त्रैलोक्याच्या राज्यासाठीं ही-(घ्नतः अपि एतान्)-मला मारणाऱ्याही-मजवर शस्त्रांचे प्रहार करणाऱ्याही या दुर्योधनादिकांस-(अहं)-मी-(हन्तुं न इच्छामि)-मारण्याची इच्छा धरीत नाहीं.-(महीकृते किं नु)-तेव्हां मी नुसत्या पृथ्वीच्या राज्यासाठीं त्यांचा प्राण कसा घेईन? ३५ कारण-

उलटपक्षीं ह्यांनीं वाटेल तें जरी केलें, किंवा आह्मांला येथेंच जरी मारिलें, तथापि आपण त्यांचा घात करण्याचें मनांत आणूं नये. २५ त्रिभुवनाचें निष्कंटक राज्य जरी प्राप्त झालें, तरी मुद्दां हें अनुचित कर्म मी करणार नाहीं. २६ कृष्णा, आज जर या ठिकाणीं आम्हीं आप्तांच्या वधासारखें हें असलें घोर कृत्य केलें, तर कोणाच्या मनांत आमच्याविषयीं आदर राहील? आणि तूंच सांग कीं, मग आम्हीं तुझें मुख तरी कसें पहावें? २७

अन्वयार्थ--(हे जनार्दन)-हे वासुदेवा!-(धार्तराष्ट्रान्) धृतराष्ट्राच्या पुत्रांना-(निहत्य)-मारुन-(नः)-आमची-(का प्रीतिः स्यात्)-कोणती प्रीति होणार? [काय प्रिय होणार?]-(एतान् आततायिनः)-या पाप्यांना-(हत्वा)-मारुन-(अस्मान्)-आम्हांला-(पापं एव)-पापच-(आश्रयेत्)-लागेल. ३६

कारण, जर मी गोत्रजांचा वध केला, तर मी दोषास पात्र होऊन मला अनायासानें सांपडलेला तूं हातचा दूर होशील. २८ कुलक्षय केला असतां अनंत पातकें लागतात; अशा प्रसंगीं तुह्मांला कोणीं आणि कोठें शोधावें? २९ ज्याप्रमाणें बागेंत अग्नीचा मोठा भडका झाला असतां कोकिळ पक्षी एक क्षणभरही तेथें रहात नाहीं; २३० किंवा एखादें सरोवर चिखलानें भरलें आहे असें पाहून चकोर पक्षी येथें रहात नाहीं, तर त्याचा तिरस्कार करून निघून जातो. ३१ त्याप्रमाणें देवा, माझ्या पुण्याचा लेश नाहींसा होऊन तूं मला आपल्या मायेनें फसवून दुरावशील. ३२

अन्वयार्थ--(तस्मात्)-म्हणून-(वयं)-आम्ही-पांडव-(स्वबांधवान् धार्तराष्ट्रान्)-आपले बांधव जे धृतराष्ट्राचे पुत्र त्यांस-(हन्तुं)-मारण्यास-(न अर्हाः)-योग्य नाहीं. [ त्यांना मारणें आम्हांला उचित नाहीं]-(हि)-कारण-(हे माधव)-हे माधवा !-(स्वजनं हत्वा)-स्वजनांना मारुन-(सुखिनः)-आम्हीं सुखी-(कथं)-कसें-(स्याम)-होऊं? ३७

म्हणून ही गोष्ट कधीं करणार नाहीं, व या समरांगणांत हातांत शस्त्रही धरणार नाहीं: कारण, हें कृत्य अनेक प्रकारें निंद्य आहे असें मला वाटतें. ३३ कृष्णा, तुझ्याशीं आमचा वियोग होईल, मग आमचें मह·व काय रहाणार! तुझ्यावांचून आम्हांला जें दुःख होईल त्यानें आमचें हृदय विदीर्ण होईल. ३४ म्हणून देवा, ह्या कौरवांचा वध करावा आणि मग आम्हीं राज्याचा उपभोग घ्यावा, या न घडणाऱ्या गोष्टीचें तर नांवच घेऊं नका, असें अर्जुन म्हणाला. ३५

अन्वयार्थ--(यद्यपि)-जरी (लोभोपहतचेतसः एते)-ज्यांचें चित्त लोभानें विवेकशून्य झालें आहे असे हे दुर्योधनादिक-(कुलक्षयकृतं दोषं)-कुलाचा क्षय झाल्यामुळें होणारा दोष-(च मित्रद्रोहे पातकं)-व मित्रांचा द्रोह केल्यामुळें लागणारें पाप यांस-(न पश्यन्ति)-जाणत नसले-त्यांची त्याकडे दृष्टि जात नसली-(तथापि)-तरी हे जनार्दना !-(कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः अस्माभिः)-कुलक्षयामुळें होणाऱ्या दोषाला-कुलक्षयामुळें होणाऱ्या परिणामाला पाहणाऱ्या-जाणणाऱ्या आम्हीं-(अस्मात् पापात् निवर्तितुं)-या पापापासून निवृत्त होण्यास-(कथं न ज्ञेयं)-कसें न जाणावें? ३८-३९

हे कौरव अभिमानानें उन्मत्त होऊन जरी युद्ध करण्यास आले आहेत, तरी आम्हांला आपलें हित पाहिलें

१ उपयोगीं लागावें. २ दूरदूरच्या देशाचे. ३ राजे. ४ जिंकून. ५ सिध्द, तयार. ६ अंतःपुरांतील स्त्रिया. ७ मुलें. ८ सांजिन. ९ अंतःकरणें, आपले जीव. १० ठेऊन. ११ स्वतःच्या प्राणासारखेच जे मला प्रिय आहेत त्यांच्या. १२ पलीकडे. १३ सामान्य नव्हेत. १४ मेहुणा. १५ मामा. १६ एक. १७ आहे. १८ उलटपक्षीं. १९ करोत. २० निष्कंटक, शत्रुरहित. २१ करणार नाहीं. २२ उरावें. २३ आश्रयस्थान. २४ सांपडलेला. २५ कुळाच्या घातानें. २६ सर्व. २७ कोठें. २८ बागेंत. २९ अग्नि. ३० पेटलेला. ३१ अत्यंत. ३२ चिखलानें युक्त. ३३ तिरस्कार. ३४ टाकून. ३५ मायेनें. ३६ ओल. ३७ नासेल. ३८ सदोष, पापयुक्त, निंद्यकर्म. ३९ वियोग. ४० हृदय. ४१ मारले जातील. ४२ न घडणारी. ४३ उन्मत्तपणानें. ४४ गुंतला.

जाणावें लागे ३६ हें ऐसें कैसें करावें । जे आपुले आपण मारावे । जाणेंत जाणतांचि सेवावें । काळेंकूट ३७ हां जी मार्गीं चालतां । पुढां सिंह जाहला अवचिता । तो तंव चुकवितां । लाभु आथी ३८ असता प्रकाशु सांडावा । मग अंधकूप आश्रावा । तरी तेथ कवणु देवा । लाभु सांगें ३९ कां समोर अग्नि देखोनी । जरी नं वंचिजे वोसंडोनी[10] । तरी क्षणीं एका कवळूनी । जाळूं सके ४० तैसे दोष हे मूर्त । अंगीं वाजों असती पहात । हें जाणतांही केवीं[14] एथ । प्रवर्तावें ४१ ऐसें पार्थ तिये अवसरीं । म्हणे देवा अवधारीं । या कल्मषांची थोरी । सांगेन तुज ४२

कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः । धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

जैसें काष्ठें काष्ठ मथिजे । तेथ वन्हि[17] एक उपजे । तेणें काष्ठजात जाळिजे । प्रज्वळलेनि ४३ तैसा गोत्रींची परस्परें । जरी वधु घडे मत्सरें । तरी तेणें महादोषें घोरें । कुळचि नाशे ४४ म्हणवूनि येणें पापें । वंशजधर्मु लोपे । मग अधर्मुचि आरोपे । कुळामाजी ४५

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः । स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

एथ सारासार विचारावें । कवणें काय आचरावें । आणि विधिनिषेध आघवे । पारुषती ४६ असता दीपु दवडिजे । मग अंधकारीं राहाटिजे । तरी उजूंचि कां आडळिजे । जयापरी ४७ तैसा कुळीं कुळक्षयो होय । तये वेळीं तो आद्यधर्मु जाय । मग आन कांहीं आहे । पापावांचुनी ४८ जैं यमनियम ठाकती । तेथ इंद्रियें सैरीं राहाटती । म्हणऊनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियांसी ४९ उत्तम अधमीं संचरती । ऐसे वर्णावर्ण मिसळती । तेथ समूळ उपडती । जातिधर्म २५० जैसी चोहटांचिये बळी । पाविजे सैरा कावळीं । तैसीं महापापें कुळीं । संचरती ५१

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च । पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥

मग कुळा तया अशेखीं । आणि कुळघातकां । येरयेरां[42] नरका । जाणें आथी ५२ देखे वंशवृद्धि समस्त । यापरी होय पतित । मग वोत्रांडितां स्वर्गस्थ । पूर्वपुरुष ५३ जेथ नित्यादि क्रिया ठाके । आणि नैमित्तिक क्रिया पारुखे । तेथ कवणा तिळोदकें । कवण अर्पी ५४ तरी पितर काय करिती । कैसेनि स्वर्गीं वसती । म्हणोनि तेही येती । कुळापासीं ५५ जैसा नखाग्रीं व्याळु लागे । तो शिखांत व्यापी वेगें । तेवीं आब्रह्म कुळ अवघें । आप्लविजे ५६

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः । उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥

पाहिजे. ३६ आपले आप्त आपणच मारावे अशी गोष्ट
कशी करावी? असें पहा कीं, समजून उमजून कालकूट
विष कसें प्यावें? ३७ अहो, वाट चालत असतांना जर
अकस्मात् आपल्या समोर सिंह आला, तर त्याला चुक-
वून जाणें हेंच श्रेयस्कर आहे. ३८ असलेला प्रकाश
सोडावा, आणि मुद्दाम अंधारकोठडींत जाऊन बसावें
यांत कोणता लाभ आहे, तें देवा सांगा बरें. ३९ किंवा
समोर अग्नि पेटला आहे असें पाहून जर आपण त्यास
सोडून दूर न झालों, तर एका क्षणांत तो आपल्यास
भोंवार वेढून जाऊं शकेल. २४० त्याप्रमाणें, हे दोष
आम्हांला प्रत्यक्ष लागूं पहात आहेत, असें कळल्यावरही
आम्हीं हें काम करण्यास कसें प्रवृत्त व्हावें? ४१ त्या
वेळीं इतकें बोलून अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, देवा, हें
पातक केवढें मोठें आहे तें मी तुला सांगतों, ऐक. ४२

**अन्वयार्थ**—(कुलक्षये)–कुलाचा क्षय झाला असतां–
(सनातनाः कुलधर्माः)–वंशपरंपरेनें चालत आलेले कुलधर्म
(प्रणश्यन्ति)–सर्वथा नाश पावतात.–(धर्मे नष्टे)–धर्म नाश
पावला असतां–(अधर्मः)–अधर्म–(कृत्स्नं उत कुलं)–सर्वच
कुला–(अभिभवति)–व्यापतो. ४०

ज्याप्रकारें लांकडावर लांकूड घांसलें असतां त्यापासून
अग्नि उत्पन्न होतो, आणि त्याचा भडका झाला म्हणजे
सर्व लांकडें जळून जातात, ४३ त्याप्रमाणें कुलांतील लो-
क मत्सरानें एकमेकांचा जर वध केला तर त्या भयं-
कर महादोषामुळें सर्व कुलाचा क्षय होईल. ४४ म्हणून
कुलक्षयाच्या पापापासून कुलधर्माचा लोप होतो,
व मग त्या कुलांत अधर्माचा प्रवेश होतो. ४५.

**अन्वयार्थ**—(हे कृष्ण)–हे कृष्णा!–(अधर्माभिभवात्)
अधर्म सर्व कुलांत पसरल्यामुळें–(कुलस्त्रियः)–कुलांतील स्त्रिया
(प्रदुष्यन्ति)–अतिशय दूषित होतात, दुराचरणी होतात.–
(वार्ष्णेय)–हे वृष्णिकुलोत्पन्ना!–(स्त्रीषु दुष्टासु)–स्त्री
दूषित झाल्या असतां–(वर्णसंकरः)–ब्राह्मणादि वर्णांचा
संकर–(जायते)–होतो. ४१.

असें झाल्यावर मग सारासारविचार, योग्यायोग्य आ-
णि कर्तव्याकर्तव्य वगैरे नष्ट होतात. ४६ असलेला
प्रकाश टाळून अंधारांत फिरूं लागलें म्हणजे ज्याप्रमाणें
सहजच मनुष्य सरळ वाटेंतही ठेंचाळतो, ४७ त्याप्रमाणें
कुलाचा कुलक्षय होतो त्या वेळीं सनातन कुलधर्म नाहींसा
होतो, मग त्या कुलांत पापावांचून दुसरें काय रहाणार?
४८ त्या वेळीं मन व इंद्रियें यांचें नियमन होत नाहीं,
इंद्रियें स्वैर वर्तन करूं लागतात, त्यामुळें कुलस्त्रियांच्या
हातून पापाचरण घडतें, ४९ आणि उत्तम स्त्रिया अधम
पुरुषाशीं संगत होतात, त्यामुळें वर्णांचा परस्पर संकर
होतो, व सर्व ज्ञातिधर्म समूळ नाहींसे होतात. २५०
कावळे जसे चव्हाट्यावर ठेवलेल्या बळीवर चोहोंकडून
झडप घालतात, त्याप्रमाणें, अशा कुलामध्यें महापातकें
संचार करूं लागतात. ५१

**अन्वयार्थ**—(च संकरः)–आणि वर्णसंकर–(कुलघ्नानां
च कुलस्य)–कुलाचा घात करणारे लोक व तें कुल या
दोघांच्याही–(नरकाय एव)–नरकालाच कारण होतो.–(हि)–
कारण–(एषां)–या कुलघ्नांचे व कुलाचे–(पितरः)–पितर–(लुप्त-
पिंडोदकक्रियाः सन्तः)–ज्यांची पिंडक्रिया व उदकक्रिया लुप्त
झाली आहे असे होत्साते म्ह० श्राद्ध व तर्पण करणारे पुत्रादि-
कच नाहींसे झाल्यामुळें ज्यांचीं श्राद्धें व तर्पण होत नाहींत
असे ते पितर–(पतन्ति)–नरकांत पडतात. ४२

मग त्या कुलास आणि त्या कुलांचा नाश करणारे
अशा दोघांसही नरकप्राप्ति होते. ५२ [मग] हें पहा–
याप्रमाणें सर्व वंशाची वृद्धि कुंठित होऊन त्यांतील स्वर्गस्थ
पूर्वज आपोआप पतन पावतात. ५३ ज्या कुलांत नित्य
व नैमित्तिक कर्में घडत नाहींत, त्या ठिकाणीं पितरांना
तिलोदक कोण अर्पण करणार? ५४ अशी स्थिति झा-
ल्यावर त्या पितरांनीं काय करावें? व स्वर्गांत कसें
राहावें? म्हणून तेहि आपल्या कुलापाशीं येतात. ५५
ज्याप्रमाणें पायाच्या बोटास साप चावला असतां त्याचें
विष मस्तकापर्यंत सत्वर सर्वांग व्यापतें, त्याप्रमाणें आप्त-
वर्गाचा वध करण्यापासून उत्पन्न होणारें पाप सत्यलोकां-
पर्यंत गेलेल्या सर्व पूर्वजांना पतित करतें. ५६

**अन्वयार्थ**—(कुलघ्नानां)–कुलाचा घात करणाऱ्या दु-
ष्टांच्या–(एतैः वर्णसंकरकारकैः दोषैः)–या वर्णसंकर करविणाऱ्या
दोषांनीं–(शाश्वताः)–परंपराप्राप्त–(जातिधर्माः)–क्षत्रियत्वादि-
कांमुळें प्राप्त होणारे धर्म–(च कुलधर्माः)–व कुलधर्म–(उत्सा-
द्यन्ते)–विनाश पावतात. ४३.

---

समजून उमजून. २ भयंकर हलाहल विष. ३ अहो.
..५ अकस्मात्. ६ आहे. ७ अंधःकारयुक्त खोल
८ स्वीकारावा. ९ न जावे. १० बाजूस टाकून.
चोहोंकडून वेढून. १२ प्रत्यक्ष. १३ लागूं, चिकटूं.
. १५ पातकाची. १६ घांसावें. १७ अग्नि. १८ स-
टें. १९ पेटला असतां. २० कुलांत. २१ कुलधर्म.
तो. २३ खरेखोटें. २४ कर्तव्याकर्तव्य. २५ सर्व.
होतात, खुंटतात. २७ घालवावा. २८ फिरावें.
वाट जाग्यांत. ३० अनादि धर्म. ३१ दुसरें.
=मनाचें आकलन, नियम=इंद्रियांचें आकलन,
३३ बंद पडतात. ३४ स्वेच्छ, हवोंतशी. ३५ वागूं लाग-
तात. ३६ पापाचरण. ३७ ब्राह्मण शूद्रादि परस्पर. ३८ उ-
च्छेद, नाश पावतात. ३९ चार वाटा जेथें एकत्र होतात
तो चव्हाटा, त्यावर ठेवलेला बळी. ४० कावळ्यास.
४१ सर्व. ४२ दोघांसही. ४३ आहे. ४४ दूषित. ४५ प-
डतात. ४६ नित्य स्नानसंध्यादि पंचमहायज्ञ. ४७ बंद रा-
हते. ४८ पर्वणी वगैरे उद्देशून करण्याचें कर्म. ४९ बंद होते.
५० पितरांना देण्याचें उदक. ५१ सर्प. ५२ मस्तकापर्यंत,
शेंडोपर्यंत. ५३ सत्य लोकापर्यंत गेलेले पूर्वज. ५४ बुडवावें

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन । नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥
अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् । यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

देवा अवधारीं आणीक एक । एथ घडे महापातक । जे संगदोषें हा लौकिक । भ्रंशु पावे ५७ जैसा घरीं आपुला । वानिवसें अग्नि लागला । तो आणिकांहीं प्रज्वळिला । जाळूनि घाली ५८ तैसिया तया कुळसंगती । जे जे लोक वर्तती । तेही बाधा पावती । निमित्तें येणें ५९ तैसें नाना दोषें सकळ । अर्जुन म्हणे तें कुळ । मग महाघोर केवळ । निरयँ भोगी २६० पडिलिया तिये ठायीं । मग कल्पांतींही उकेलु नाहीं । येसणें पतन कुळक्षयीं । अर्जुन म्हणे ६१ देवा हें विविधें कानीं ऐकिजे । परी अझुनिवरी त्रासु नुपेंजे । हृदय वज्राचें हें काय कीजे । अवधारीं पां ६२ अपेक्षिजे राज्यसुख । जयालागीं तें तंव क्षणिक । ऐसें जाणतांही दोखें । अव्हेरूं ना ६३ जे हे वडिल सकळ आपुले । वधावया दिठी सूदले । सांग पां काय थेंकुलें । घडलें आम्हां ६४

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः । धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

आतां यावरी जें जियावें । तयापासूनि हें बरवें । जे शस्त्र सांडूनि साहावे । बाण यांचे ६५ तयावरी होय जितुकें । तें मरणही वरी निकें । परी येणें कल्मषें । चाँड नाहीं ६६ ऐसें देखून सकळ । अर्जुनें आपुलें कुळ । मग म्हणे राज्य तें केवळ । निरयभोगु ६७

संजय उवाचः--

एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् । विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥४७॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

ऐसें तिये अवसरीं । अर्जुन बोलिला समरीं । संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ६८ मग अत्यंत उद्वेगला । न धरत गहिंवरु आला । तेथ उडी घातली खालां । रथौनियां ६९ जैसा राजकुमरु पदच्युतु । सर्वथा होय उपहतु । कां रवि राहुग्रस्तु । प्रभाहीनु २७० नातरी महासिद्धिसंभ्रमें । जितला तापसु भ्रमें । मग आकळूनि कामें । दीनु कीजे ७१ तैसा तो धनुर्धरु । अत्यंत दुःखें जर्जरु । दिसे जेथ रहंवरु । त्यजिला तेणें ७२ मग धनुष्य बाण सांडिले । न धरत अश्रुपात आले । ऐसें ऐक राया वर्तलें । संजयो म्हणे ७३ आतां यावरी तो वैकुंठनाथु । देखोनि सखेद पार्थु । कवणेपरी परमार्थु । निरूपील ७४ ते सविस्तर पुढारी कथा । अति सकौतुक ऐकतां । ज्ञानदेव म्हणे आतां । निवृत्तिदासु २७५

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ श्लोक ४७, ओंव्या २७५.

**अन्वयार्थ**-(जनार्दन)-हे कृष्णा !-(उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां)-ज्यांचे कुलधर्म नाश पावले आहेत, अशा मनुष्यांचा-(नरके)-नरकांत-(नियतं)-निश्चयानें-(वासः)-वास-(भवति)-होतो; (इति)-असें-(अनुशुश्रुम) महर्षींच्या वचनांवरून-आचार्यांच्या तोंडून ऐकिलें आहे. ४४.-(अहो)-काय चमत्कार आहे !-(बत)-अरेरे-(वयं)-आम्हीं-(यत्)-जें-(राज्यसुखलोभेन)-राज्यसुखाच्या लोभानें-(स्वजनं)-स्वजनांना-(हन्तुं)-मारण्यास-(उद्यताः)-तयार झालों-(तत् एतत्)-तें हें-(महत्पापं)-मोठें पाप-(कर्तुं)-करण्यास-(व्यवसिताः)-सज्ज झालों आहों.

कृष्णा, या ठिकाणीं आणखी एक महापातक घडतें तें कोणतें म्हणाल तर, या दोषापासून लोकाचार नाहींसे होतात. ५७ ज्याप्रमाणें आपल्या घराला दुर्दैवानें अग्नि लागला तर तो भडकलेला अग्नि शेजारचीं दुसरींही घरें जाळून टाकतो, ५८ त्याप्रमाणें त्या कुलाशीं संबंध ठेवून जे जे लोक वागतात तेही या निमित्तानें दूषित होतात. ५९ अर्जुन म्हणतोः-देवा, त्याप्रमाणेंच, त्या कुलांत नाना प्रकारचे दोष घडून आले म्हणजे मग तें कुल भयंकर नरकवास मात्र भोगतें. २६० अर्जुन आणखी म्हणतो, त्या नरकांत पडल्यावर मग कल्पांतींही तेथून त्याची सुटका होत नाहीं, इतका या कुलक्षयापासून अधःपात होतो. ६१ देवा, हें सर्व आम्हीं आपल्या कानांनी ऐकावें तरी सुद्धां मनांत अजून या पापाला भिऊं नये, उलट तें करण्यासाठीं हें आपलें हृदय वज्राचें बनवावें कीं काय याचा आपणच विचार करा. ६२ असें पहा कीं, कुलक्षय करून ज्याच्याकरितां राज्यसुखाची इच्छा करावयाची, तें शरीर तर क्षणिक आहे असें जाणूनही आम्ही कुलक्षयाचे दोष करण्याचें सोडूं नये काय ? ६३ आमचे जे हे सर्व पूज्य वडील त्यांच्याकडे त्यांना मारण्याच्या उद्देशानें आम्हीं त्यांना पाहिलें, हें काय आम्हांकडून लहान सहान पातक घडलें ? मांगा बरें. ६४

**अन्वयार्थ**--(यदि)-जर-(अप्रतीकारं अशस्त्रं मां)-शत्रूंचा प्रतीकार न करणाऱ्या व शस्त्र सोडून बसलेल्या मला-(शस्त्रपाणयः धार्तराष्ट्राः)-ज्यांच्या हातांत शस्त्रें आहेत असे दुर्योधनादि धृतराष्ट्रपुत्र-(रणे)-रणांगणांत-(हन्युः)-मारतील तर-(तत्)-तें-(मे)-मला-(क्षेमतरं)-अतिशय क्षेम-कल्याणकार-(भवेत्)-होईल. ४६

तर आतां या उपर जिवंत राहण्यापेक्षां आपलीं शस्त्रें टाकून देऊन त्यांचे बाण सहन करणेंच फार उत्तम. ६५ असें केल्यामुळें जरी मरण प्राप्त झालें, तरी तें चांगलें, परंतु यांचा वध करून पाप जोडण्याची माझी इच्छा नाहीं. ६६ याप्रमाणें अर्जुनानें आपलें सर्व कुल पाहून म्हटलें कीं, यांचा क्षय करून राज्य मिळविणें म्हणजे केवळ नरकाची जोड करणें होय. ६७

**अन्वयार्थ**--(अर्जुनः)-अर्जुन-(एवं उक्त्वा)-असें बोलून-(संख्ये)-संग्रामांत-रणमैदानांत-(सशरं चापं)-बाणासह धनुष्य-(विसृज्य)-टाकून-(शोकसंविग्नमानसः)-शोकानें ज्याचें मन अतिशय उद्विग्न झालें आहे असा होत्साता-(रथोपस्थे)-रथाच्या आंत-रथाच्या एका विशिष्ट भागीं-(उपाविशत्)-बसला. ४७

संजय म्हणालाः-राजा धृतराष्ट्रा, ऐक, त्या समरांगणांत अर्जुन असें बोलला; ६८ आणि मग अत्यंत उदसीन झाला, व अनिवार गहिंवर येऊन त्यानें रथांतील युद्धस्थान सोडून उडी टाकली. ६९ ज्याप्रमाणें एखादा राजकुमर पदच्युत झाला म्हणजे तो जसा सर्वथा निस्तेज होतो, किंवा राहूच्या योगानें सूर्यास ग्रहण लागलें म्हणजे तो कलाहिन होतो, २७० आपल्याला अणिमादि महासिद्धि मिळाव्या या मोहानें परवश झालेला तपस्वी भ्रम पावतो, व त्या सिद्धींविषयाची इच्छा त्याच्या अंतःकरणाला व्यापून दीन करून सोडिते, ७१ त्याप्रमाणें तो धनुर्धर अर्जुन रथस्थानावरून खालीं उतरला, त्यावेळीं तो दुःखानें अतिशय व्याकुळ झालेला दिसूं लागला. ७२ संजय म्हणतो, राजा, आणखी असें झालें कीं, त्यानें धनुष्यबाण टाकून दिले, व त्याच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या. ७३ आतां यापुढें अर्जुनास दुःख झालेलें पाहून वैकुंठनाथ श्रीकृष्ण त्यास कशा रीतीनें तत्त्वज्ञानाचा बोध करतील, ७४ तो पुढें येणारी सविस्तर कथा उत्सुकतेनें ऐका, असें निवृत्तिनाथांचे दास श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणाले. २७५

१ दुःसंगतें, २ लोकाचार. ३ नाश. ४ दैववशात्, सहज. ५ पीडा. ६ भयंकर. ७ नरक. ८ कल्पाचे अंतापर्यंत सुद्धां. ९ सुटका. १० पवढें. ११ नरकवास, पाप. १२ नाना प्रकारें. १३ उपजत नाहीं. १४ इच्छावें. १५ क्षणांत नाश पावणारें. १६ दोष. १७ आम्ही टाकीत नाहीं. १८ दृष्टीपुढें. १९ घातलें. २० थोटे-थोटकें (पाप). २१ जगावें. २२ त्याहून. २३ टाकून. २४ सोसावे. २५ चांगलें. २६ पापाची. २७ गरज. २८ नरकवास. २९ समयीं. ३० समरांगणांत. ३१ उदास झाला. ३२ आवरण्यास कठीण. ३३ हुंदका. ३४ रथांतून. ३५ स्थानभ्रष्ट. ३६ भानरहित. ३७ निस्तेज. ३८ अणिमादि सिद्धींच्या मोहानें. ३९ जिंकलेला. ४० तपस्वी. ४१ इच्छेनें. ४२ रथ. ४३ अनावर. ४४ दुःखयुक्त. ४५ तत्त्वज्ञान. ४६ पुढील.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय दुसरा.

संजय उवाचः—

तं तथा कृपयाऽऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् । विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

मग संजयो म्हणे रायातें । आइके तो पार्थु तेथें । शोकाकुल रुदनातें । करीतु[2] असे १ तें कुळ देखोनि समस्त । स्नेह उपनलें[3] अद्भुत[4] । तेणें द्रवलें[5] असे चित्त । कवणेपरी[6] २ जैसें लवण[7] जळें झळंबलें[8] । ना तरी अभ्र[9] वातें[10] हाले । तैसें सधीर[11] परी विरमलें[12] । हृदय तयाचें ३ म्हणोनी कृपा[13] आकळिला । दिसतसे अति कोमाइला[14] । जैसा कर्दमीं[15] रुपला । राजहंस ४ तयापरी तो पांडुकुमरु । महामोहें अति जर्जरु[16] । देखोनीं श्रीशार्ङ्गधरु[17] । काय बोले ५

श्रीभगवानुवाचः—

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् । अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

म्हणे अर्जुना आदि पाहीं । हें उचित काय ईये[18] ठायीं । तूं कवण हें कायी । करीत आहासी[19] ६ तुज सांगें काय जाहलें । कवण उणें[20] आलें । करितां काय ठेलें[21] । खेदु कायिसा[22] ७ तूं अनुचिता[23] चित्त नेदिसी[24] । धीरु कहीं न संडिसी[25] । तुझेनि नामें अपयशीं[26] । दिशा लंघिजे[27] ८ तूं शूरवृत्तीचा ठावो[28] । क्षत्रियांमाजी रावो । तुझिया लाठेपणाचा[29] आवो[30] । तिहीं लोकीं ९ तुवां संग्रामीं हेरु[31] जिंकिला । निवातकवचांचा ठावो[32] फेडिला । पवाडा[33] तुवां केला । गंधर्वांसीं १० पाहतां तुझेनि पांडें[34] । दिसे त्रैलोक्यही थोकडें[35] । ऐसें पुरुषत्व चोखडें[36] । पार्था तुझें ११ तो तूं कीं आजि एथें । सांडूनियां वीरवृत्तीतें । अधोमुख[37] रुदनातें । करितु आहासी १२ विचारीं[38] तूं अर्जुनु । कीं कारुण्यें[39] किजसी[40] दीनु । सांग पां अंधकारें भानु । ग्रासिला आंधी[41] १३ ना तरी पवनु[42] मेघासी बिहे[43] । कीं अमृतासी मरण आहे । पाहें पां इंधनचि[44] गिळोनि जाये । पावकातें[45] १४ कीं लवणेंचि जळ विरे । संसर्गें काळकूट मरे । सांग पां महाफणी[46] दर्दुरें[47] । गिळिजे कायी १५ सिंहासी झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु[48] आथि कें[49] जाहला । परी तो त्वां सांच[50] केला । आजि एथ १६ म्हणोनी अझुनी अर्जुना । झणें चित्त[51] देसी या

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय दुसरा.

**अन्वयार्थ**-(मधुसूदनः)-श्रीकृष्ण-(तथा)-वर वर्णन केल्याप्रमाणें-(कृपया आविष्टं)-कृपेनें युक्त झालेल्या-(अश्रुपूर्णाकुलेक्षणं)-ज्याचे नेत्र अश्रूंनीं भरले आहेत व त्यामुळें आकुल झाले आहेत अशा-(विषीदन्तं)-खेद करणाऱ्या-(तं)-त्या अर्जुनाला-(इदं वाक्यं)-हें वाक्य-(उवाच)-बोलला. १

मग संजय धृतराष्ट्र राजास म्हणालाः-महाराज, ऐका. अर्जुन त्या ठिकाणीं शोकानें व्याकूळ होऊन रुदन करूं लागला. १ तें आपलें सर्व कूळ पाहून त्याच्या मनांत विलक्षण मोह उत्पन्न झाला, आणि त्यायोगानें त्याचें चित्त द्रवलें; कसें म्हणाल तर, २ पाण्यानें ज्याप्रमाणें मीठ विरघळतें, अथवा वाऱ्यानें ज्याप्रमाणें ढग नाहींतसे होतात, त्याप्रमाणें, तो मोठा धैर्यवान होता तरी त्याच्या हृदयास [illegible] आला! ३ जसा राजहंस पक्षी चिखलांत रुतल्यावर म्लान दिसतो, तसा तो ममतेनें व्याकुळ होऊन अगदीं म्लान दिसूं लागला. ४ त्याप्रमाणें तो अर्जुन महामोहानें ग्रस्त झालेला पाहून भगवान श्रीकृष्ण म्हणालेः—५

**अन्वयार्थ**—(अर्जुन)-हे अर्जुना!-(इदं अनार्यजुष्टं अस्वर्ग्यं अकीर्तिकरं कश्मलं)-हें श्रेष्ठांनी न अंगिकारलेलें, स्वर्ग न देणारें व अकीर्ति करणारें पाप-(त्वा)-तुला-(विषमे)-या कठीण प्रसंगीं-(कुतः)-कोठून-(समुपस्थितम्)-प्राप्त झालें? २

अर्जुना, अरे तूं अगोदर असें पहा कीं, या प्रसंगीं तुला हें शोभतें काय? तूं कोण आहेस व हें काय करीत आहेस याचा अगोदर विचार कर. ६ तुला काय झालें? सांग बरें कोणतें कमी पडलें? काय करण्याचें राहिलें? आणि दुःख कशाकरितां झालें? ७ तूं अनुचित गोष्टीकडे कधीं लक्ष देत नाहींस, व कधींही धीर सोडीत नाहींस. तुझें केवळ नांव ऐकूनच अपयश दिगंतीं पळून जातें. ८ तूं शौर्याचा केवळ निधि व क्षत्रियांचा मुकुटमणि आहेस, व तुझ्या शौर्याचा डंका त्रैलोक्यांत गाजत आहे. ९ तूं युद्धांत शंकरास जिंकिलेंस; साडेतीन कोटी निवातकवच दैत्यांचा समूळ उच्छेद केलास; आणि चित्ररथगंधर्वादिकांशीं सामना करून त्यांना आपलें यश गावयास लाविलेंस. १० अर्जुना, तुझ्याशीं तुलना करून पाहिल्यास हें त्रैलोक्यहि अल्प दिसूं लागतें. तुझा पराक्रम इतका उत्कृष्ट आहे. ११ तोच तूं आज वीरवृत्ति सोडून खालीं तोंड घालून रडत बसला आहेस! १२ अर्जुना, तूं विचारी आहेस, तथापि करुणेनें तूं दीन होतोस! पण अरे, अंधकारानें सूर्याला कधीं गिळून टाकलें आहे कां सांग बरें? १३ किंवा वाऱ्यास मेघाचें भय कधीं वाटलें आहे? अथवा अमृतास कधीं मरण आहे? किंवा लांकडानें कधीं अग्नि गिळला आहे? १४ अथवा मिठानें पाणी कधीं विरलें आहे? किंवा कालकूट विष हें दुसऱ्याच्या संसर्गानें मेलें आहे? अथवा मोठ्या भुजंगाला कधीं बेडकानें गिळलें आहे? १५ बरें, कधीं कोल्ह्यानें सिंहाबरोबर झोंबी केली आहे? अशा विलक्षण गोष्टी कधीं तरी घडल्या आहेत कां? पण त्या तूं येथें आज खऱ्या करून दाखविल्यास! १६ म्हणून अर्जुना, तूं या मोहाला आपल्या ठिकाणीं थारा देऊं नकोस. मनास सत्वर

---

१ शोकानें व्याप्त. २ करिता झाला. ३ उपजलें. ४ अपूर्व. ५ विरघळलें. ६ कशा रीतीनें. ७ मीठ. ८ विरघळतें. ९ ढग. १० वाऱ्यानें. ११ धैर्ययुक्त. १२ विरघळलें १३ ममतेनें. १४ म्लान झालेला. १५ चिखलांत १६ ग्रस्त. १७ श्रीकृष्ण. १८ ह्या जागीं (युद्धभागीं). १९ आहेस. २० कमी. २१ राहिलें. २२ कशाकरितां. २३ अयोग्य गोष्टीला. २४ देत नाहींस. २५ सोडीत नाहींस. २६ अपयशानें, अपेशानें २७ उलंगावीं. २८ स्थळ, ठिकाण. २९ शौर्याचा. ३० प्रतिष्ठा. ३१ शंकर. ३२ नाहींसा केला. ३३ गाण्याचा विषय, डंका. ३४ बरोबरीनें, तुळणेनें. ३५ लहान. ३६ चांगलें ३७ खालीं तोंड घालून. ३८ विचार कर. ३९ करुणेनें. ४० दीन केला गेलास. ४१ आहे काय? ४२ वारा. ४३ भितो. ४४ सर्पण. ४५ असंगा. ४६ मोठा भुजंग. ४७ बेडकानें. ४८ विलक्षण प्रसंग. ४९ कोठें. ५० खरा. ५१ चित्त देऊं नकोस.

हींना । वेगीं धीर करूनियां मना । सावधु होईं १७ सांडीं हें मूर्खपण । उठी घे धनुष्यबाण । संग्रामीं हें कवण । कारुण्य तुझें १८ हां गा तूं जाणता । तरी न विचारिसी कां आतां । सांगे झुंझावेळे सदयता । उचित कायी १९ हे असतिये कीर्तीसी नाशु । आणि पारत्रिकासि अपभ्रंशु । म्हणे जगन्निवासु । अर्जुनातें २०

क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते । क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

म्हणोनि शोकु न करीं । तूं पुरता धीरु धरीं । हे शोच्यता अव्हेरीं । पंडुकुमरा २१ तुज नव्हे हें उचित । येणें नासेल जोडलें बहुत । तूं अझुनि वरी हित । विचारीं पां २२ येणें संग्रामाचेनि अवसरें । एथ कृपाळूपण नुपकरे । हे आतांचि काय सोयरे । जाहले तुज २३ तूं आधींचि काय नेणसी । कीं हे गोत्रज नोळखसी । वायांचि काय करिसी । अतिशो आतां २४ आजिचें हें झुंज । काय जन्मा नवल तुज । हें परस्परें तुम्हां व्याज । सदांचि आंथी २५ तरी आतां काय जाहलें । कायि स्नेह उपनलें । हें नेणिजे परी कुडें केलें । अर्जुना तुवां २६ मोह धरलिया ऐसें होईल । जे असती प्रतिष्ठा जाईल । आणि परलोकही अंतरलें । ऐहिकेंसी २७ हृदयाचें ढिलेपण । एथ निकर्यासि नव्हे कारण । हें संग्रामीं पतन जाण । क्षात्रियांसीं २८ ऐसेनि तो कृपावंतु । नानापरी असे शिकवितु । हें ऐकोनि पंडुसुतु । काय बोले २९

अर्जुन उवाचः—

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन । इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

देवा हें येतुलेवरी । बोलावें नलगे अवधारीं । आधीं तूंचि विचारीं । संग्रामु हा ३० हें झुंज नव्हे प्रमादु । एथ प्रवर्तलिया दिसतसे बांधु । हा उघड लिंगभेदु । वोढवेला आम्हां ३१ देखे मातापितरें अर्चिजती । सर्वस्वें तोष पावविजती । तियें पांठीं केवीं वधिजती । आपुलिया हातीं ३२ देवा संतवृंद नमस्कारिजे । कां घडे तरी पूजिजे । हें वांचूनि केवीं निंदिजे । स्वयें वाचा ३३ तैसे गोत्रगुरु आमुचे । हे पूजनीय आम्हां नियमाचे । मज बहुत भीष्मद्रोणांचें । द्वैततसे ३४ जयांलागीं मनें विरूं । आम्ही स्वप्नींही न शकों धरूं । तयां प्रत्यक्ष केवीं करूं । घातु देवा ३५ वैरी जळो हें जियालें । एथ आघवेयांसि हेंचि काय जाहलें । जे यांच्या वधीं अभ्यासिलें । मिरविजे आम्हीं ३६ मी पार्थु द्रोणाचा केला । येणें धनुर्वेदु मज दिधला । तेणें उपकारें काय

धीर देऊन सावध हो. १७ हा वेडेपणा टाकून दे, ऊठ व धनुष्यबाण हातीं घे, कारण, या रणभूमीवर तुझ्या या करुणेचा काय उपयोग ? १८ अर्जुना, अरे तूं ज्ञाता ना? या वेळीं विचार कसा करीत नाहींस ? अरे, युद्धाचे प्रसंगीं दया असणें योग्य आहे को, सांग बरें ? १९ हें तुझें वर्तन आजपर्यंत संपादन केलेल्या कीर्तीचा नाश करणारें व परलोकप्राप्तीस अडथळा आणणारें आहे! असें श्रीकृष्ण अर्जुनास म्हणाले. २०

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)–हे पार्था !–(क्लैब्यं)–अशा दुर्बलपणास–(मा स्म गमः)–प्राप्त होऊं नकोस.–(एतत्)–हें मानसिक दौर्बल्य–(त्वयि)–तुझ्या ठिकाणीं–(न उपपद्यते)–उचित दिसत नाहीं.–(हे परंतप)–शत्रूंना संताप देणाऱ्या हे अर्जुना ! –(क्षुद्रं हृदयदौर्बल्यं)–हृदयाचें हें क्षुद्र दुर्बलत्व–(त्यक्त्वा)–टाकून–(उत्तिष्ठ)–ऊठ. ३.

म्हणून, अर्जुना, तूं शोक करूं नको, पूर्ण धीर धर आणि आशाविपर्यीच्या हा विषाद सोडून दे. २१ तुला असा खेद करणें शोभत नाहीं. तूं आजपर्यंत जें कांहीं यश संपादन केलें आहेस, त्याचा या योगानें नाश होईल; म्हणून तूं अजून तरी आपलें हित कशांत आहे याचा विचार कर. २२ हे कौरव काय आतांच तुझे नातलग झाले आहेत? २३ अरे, ही गोष्ट तुला पूर्वी माहीत नव्हती का ? किंवा हे नातेवाईक आहेत हें तूं ओळखीत नव्हतास काय ? मग आतांच व्यर्थ खेद कां करतोस ! २४ काय सांगावें, आजचा हा युद्धप्रसंग तुझ्या जन्मांत अपूर्व म्हणजे नवीन आहे की काय ? अरे ! तुम्हां परस्परांतील कलहाचें निमित्त नेहमींचेंच आहे. २५ मग आतांच काय झालें ? हा मोह तुला कसा उत्पन्न झाला कोण जाणे ! पण, अर्जुना, तूं हें फार वाईट केलेंस. २६ जर तूं ह्या मोहांत पडलास तर त्याचा परिणाम असा होईल की, आजपर्यंत मिळविलेला लौकिक जाऊन इहपरलोकांसही अंतरशील. २७ तुझ्या अंतःकरणाची ही दुर्बलता या प्रसंगीं तुझ्या कल्याणाला कारण होणार नाहीं. ती दुर्बलता म्हणजे क्षत्रियांचा संग्रामांतील अधःपातच आहे. २८ याप्रमाणें दयाळु भगवान अर्जुनाची परोपरीनें समजूत घालीत होता, तथापि त्यांवर अर्जुन काय बोलला, तें ऐका. २९

**अन्वयार्थ**—(मधुसूदन)–हे मधुसूदना !–(अहं)–मी–(संख्ये)–संग्रामांत–लढाईंत–(भीष्मं च द्रोणं)–भीष्म व द्रोण यांच्याशीं–(इषुभिः)–बाणांनीं–(कथं)—कसा बरें–(प्रतियोत्स्यामि)–लढाई करूं? कारण–(हे अरिसूदन)–हे शत्रुनाशका ! –(तौ)–ते दोघेही (पूजार्हौ) पूजा करण्यास योग्य आहेत. ४.

देवा, हें इतकें कांहीं बोलावयाला नको आहे, माझें काय म्हणणें आहे, तें ऐका. ह्या युद्धाविषयीं आधीं आपणच विचार करा. ३० हें युद्ध नसून आमचे हातून मोठा दोष घडत आहे; त्यांत प्रवृत्त झाल्यास मोठी हानी होईल असें दिसतें आम्हांवर पूज्यजनांचा उच्छेद करण्याचा मोठा अवघड प्रसंग ओढवला आहे. ३१ असें पहा की, मातापितरांची सेवा करावी, त्यांना सर्व प्रकारें संतुष्ट ठेवावें असा धर्म आहे. असें असतां उलट त्यांचाच आपण आपल्या हातानें वध कसा करावा ? ३२ देवा, साधुसंतांना नमस्कार करावा, घडेल तर त्यांची पूजा करावी, पण हें सोडून आपण आपल्याच मुखानें त्यांची निंदा कशी करावी ? ३३ त्याचप्रमाणें हे आमचे कुलगुरु असून आम्हांला सर्वदा पूज्य आहेत. त्यांतल्यात्यांत भीष्म व द्रोण यांविषयीं तर माझें मन अतिशयच कळवळत आहे. ३४ देवा, ज्यांच्याविषयीं आम्ही स्वप्नांत देखील वैर धरूं शकत नाहीं, त्यांचा प्रत्यक्ष घात कसा करावा बरें ? ३५ त्यापेक्षां आमचें हें जिणें व्यर्थ आहे. आम्ही आजपर्यंत जी विद्या संपादन केली आहे, तिचा उपयोग या सर्वांना मारण्याकडे करून आम्ही प्रतिष्ठा मिरवावी, हेंच कां आमचें कर्तव्य ! ३६ मी-अर्जुन द्रोणाचार्यांचा शिष्य; त्यांनींच मला धनुर्विद्या शिकविली; त्या उपकारानें आभारी झालेल्या मी त्यांना

१ अयोग्य गोष्टीला. २ माया. ३ अगा. ४ ज्ञाता. ५ विचार करीत नाहींस. ६ योग्य. ७ असलेल्या. ८ परलोकगतीला. ९ हानि. १० खेद. ११ टाकून दे. १२ प्रसंगीं. १३ उपयोगी नाहीं. १४ पाल्हाळ. १५ कौरव-पांडवांना. १६ निमित्त. १७ आहे. १८ उत्पन्न झालें. १९ मला समजत नाहीं. २० वाईट. २१ असलेली. २२ मुकेल. २३ इहलोकांसह. २४ दुर्बळपणा. २५ चांगलेपणाला. २६ अधःपात. २७ श्रीकृष्ण. २८ इतकें. २९ ऐक. ३० चूक. ३१ दोष. ३२ थोरांचा उच्छेद. ३३ प्राप्त झाला. ३४ पूजिली जातात. ३५ पावतात. ३६ मग, नंतर. ३७ साधुसमुदाय ३८ हें सोडून. ३९ कुलगुरु. ४० पूज्य. ४१ नित्यनेमानें ४२ फार कण. ४३ आहे. ४४ वैर, वांकडें. ४५ कोणत्या प्रकारें. ४६ यापेक्षां ४७ जीवित, जगणें. ४८ ह्या सर्वांना. ४९ यांना मारण्यांतच आम्हीं आपली विद्या व कौशल्य मिरवावें. ५० तयार केलेला शिष्य.

आभारलों । वधी तयातें ३७ जेथींचिया कृपा[२] लाहिजे[३] वरु । तेथेंचि मनें व्यभि[४]-चारु । तरी काय मी भस्मासुरु । अर्जुन म्हणे ३८

गुरूनहत्वा हि महानुभावाञ्श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वाऽर्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

देवा समुद्र गंभीर आइकिजे । वरि तोही आहाच[५] देखिजे । परी क्षोभु मनीं नेणिजे । द्रोणाचिये ३९ हें अपार जें गगन[६] । वरी तयाही होईल मान[७] । परी अगाध[८] भलें गहन । हृदय याचें ४० वरी अमृतही विटे[९] । कीं काळें[१०]वशें वज्रही फुटे । परी मनोधर्मु न[११] लोटे । विकर[१२]विलाही ४१ स्नेहालागीं माये[१३] । म्हणिपे[१४] तें कीरु[१५] होये । परी कृपा ते मूर्त[१६] आहे । द्रोणीं इये[१७] ४२ हा कारुण्याची आदि[१८] । सकल गुणांचा निधि[१९] । विद्या[२०]सिंधु निरवधि[२१] । अर्जुन म्हणे ४३ हा येणें[२२] मानें महंतु । वरी आम्हांलागीं कृपावंतु । आतां सांग पां येथ घातु । चिंतूं येईल ४४ ऐसे हे रणीं वधावे । मग आपण राज्यसुख भोगावें । तें मना नये आघवें[२३] । जीवितेसीं[२४] ४५ हें येणें[२५] मानें दुर्धर[२६] । जे याहीहुनी भोग[२७] सधर[२८] । ते असतु[२९] येथ-वर । भिक्षा मागतां भली ४६ ना तरी देशत्यागें जाइजे । कां गिरिकंदर[३०] सेविजे । परी शस्त्र आतां न धरिजे । इयांवरी[३१] ४७ देवा नवनिशितीं[३२] शरीं । वोंबरोनी[३३] यांच्या जिव्हारीं[३४] । भोग गिवसावे[३५] रुधिरीं[३६] । बुडाले जे ४८ ते काढूनि काय कीजती[३७] । लिप्तें[३८] केवीं सेविजती । मज नये हे उपपत्ती[३९] । याचिलागीं[४०] ४९ ऐसें अर्जुन तिये अवसरीं[४१] । म्हणे श्रीकृष्णा अवधारीं । पारि तें मना नयेचि मुरारी[४२] । आइकोनियां ५० हें जाणोनि पार्थु बिहाला । मग पुनरपि बोलों लागला । म्हणे देवो कां च्त्ति या बोला । देतीचिना[४३] ५१

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ॥
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

येन्हवीं माझ्या चित्तीं जें होतें । तें मी विचारूनि[४४] बोलिलों एथें । परी निकें[४५] काय यांपरौतें[४६] । तें तुम्ही जाणा ५२ पैं विरु[४७] जयांसी ऐकिजे । आणि या बोलींचि[४८] प्राणु सांडिजे । ते एथ संग्रामें[४९]व्याजें । उभे आहांती[५०] ५३ आतां ऐसे-यांतें[५१] वधावें । कीं अव्हेरूनियां[५२] निघावें । या दोहोंमाजीं बरवें । तें नेणों आम्ही ५४

कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ॥
यच्छ्रेयःस्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥

आम्हां काय उचितें[५३] । तें पाहतां न[५४] स्मरे एथ । जे[५५] मोहें येणें चित्त । व्याकुळ

मारावें काय? ३७ अर्जुन म्हणतोः– ज्यांच्या कृपेनें आम्ही वरप्राप्ति करून घ्यावी, त्यांच्याशींच कृतघ्नपणा करावा! तर मग काय मी भस्मासूर आहे? ३८

**अन्वयार्थ**—(हि)–कारण–(महानुभावान्)–अति प्रभावशाली–(गुरून्)–गुरूंना–(अहत्वा)–न मारून–(इह लोके)–या इहलोकीं–(भैक्ष्यं अपि)–भिक्षावरही–(भोक्तुं)–खाणें–(श्रेयः)–श्रेयस्कर आहे.–(तु)–पण तेंच–(गुरून्)–या गुरूंस–(हत्वा)–मारून–(इह एव)–या लोकींच–(रुधिरप्रदिग्धान्)–रक्तानें माखलेल्याप्रमाणें निंद्य असलेल्या–(अर्थकामान् भोगान्)–अर्थ व काम यांच भोगांस–(भुञ्जीय)–मी भोगीन. ५ शिवाय—

देवा, समुद्र गंभीर आहे असें ऐकतों, पण त्याच्या उलट तो मुद्दां क्षुब्ध झालेला प्रत्यक्ष दिसतो. परंतु द्रोणाचार्यांच्या मनांत क्षोभ उत्पन्न झालेला आम्हांला स्वप्नांत देखील ठाऊक नाही. ३९ आकाशाचा अंत नाही, पण त्याचेंहि माप करतां येईल, परंतु द्रोणाचार्यांचें अंतःकरण इतकें खोल आहे कीं, त्याचें प्रमाण कोणालाहि कळत नाहीं. ४० कदाचित् अमृतही अंबेल, किंवा कालगतीनें वज्रहि फुटेल पण द्रोणाचार्यांस क्रोध आणण्याचा प्रयत्न केला तरी देखील तो येत नाही. ४१ स्नेहाविषयीं नेहमी आईचें उदाहरण देतात, व तें खरेंहि आहे. पण या द्रोणाचार्यांच्या ठिकाणी दया मूर्तिमंत वसत आहे. ४२ अर्जुन म्हणतोः–हे आचार्य म्हणजे दयेचा उगम, सर्व गुणांची खाण, व विद्येचे अमर्याद सागरच आहेत. ४३ अशा प्रकारें हे सर्वश्रेष्ठ असून आम्हांविषयीं तर पूर्ण कृपावंत आहेत, तेव्हां यांचा घात करण्याचें मनांत येईल तरी का? ४४ अशांना रणांत मारून मग आपण राज्यसुख भोगावें ही गोष्ट माझ्या मनांत जीव गेला तरी येणार नाहीः ४५ इतकें हें कृत्य कठीण आहे. याच्यापेक्षां राज्योपभोग श्रेष्ठ असतील तर असोत बिचारे! पण त्यापेक्षां भिक्षा मागणेंच बरें! ४६ नाहीपेक्षां देशत्याग करावा, अथवा गिरिकंदरांत जाऊन राहावें, परंतु यांजवर आतां शस्त्र म्हणून धरूं नये. ४७ देवा, नवीन पाजळलेल्या बाणांनीं यांच्या मर्मस्थानीं प्रहार करून त्यांच्या रक्तांत बुडालेले भोग आम्हीं शोधीत बसावें काय. ४८ ते प्राप्त करून ते रक्तांत बुडालेले भोग बाहेर काढून काय करावयाचे आहे! रक्तानें माखलेल्या त्या भोगांचें सेवन आम्हीं कसें करावें! म्हणूनच ही गोष्ट माझ्या मनास पटत नाहीं. ४९ अर्जुन त्या वेळेस श्रीकृष्णास म्हणाला "देवा, आपण या गोष्टीचा विचार करा" पण अर्जुनाचें हें भाषण ऐकून श्रीकृष्णास बरें वाटलें नाहीं. ( त्यांना तें आवडलें नाहीं.) ५० असें पाहून अर्जुन आपल्या मनांत भिऊन पुनः म्हणालाः– देवा, माझ्या बोलण्याकडे आपण लक्ष कां देत नाहीं ? ५१

**अन्वयार्थ**—(नः)–आम्हां पांडवांना युद्ध करणें व भिक्षा खाणें या दोहोंतील–(कतरत्)–कोणतें एक–(गरीयः)–अधिक चांगलें आहे–(एतत्)–हें–(न विद्मः)–आम्ही जाणत नाहीं.–(यत् वा) किंवा–(जयेम)–आम्ही यांना जिंकूं–(यदि वा)–अथवा–(नः)–आम्हांला–(जयेयुः)–हे कौरव जिंकतील–(एतत् न विद्मः–हें जाणत नाहीं–(यान् एव)–ज्या दुर्योधनादि बंधूंनाच–(हत्वा)–मारून–(न जिजीविषामः)–आम्ही जिवंत राहण्याची इच्छा करणार नाहीं–(ते धार्तराष्ट्राः)–ते धृतराष्ट्राचे पुत्र–(प्रमुखे)–आमच्या सन्मुख–(अवस्थिताः)–उभे राहिले आहेत. ६

याकीं माझ्या मनांत जें होतें, तें मी एथें सविस्तर सांगितलें. परंतु यापेक्षां खरें काय तें तुम्हांसच माहीत; ५२ हें पहा–ज्यांच्याशीं आमचें वैर आहे हीं अक्षरें ऐकल्याबरोबर आम्हीं प्राण सोडावे, तेच रणभूमीवर संग्राम करण्याकरितां उभे आहेत, ५३ तर यांना मारावें किंवा सोडून निघून जावें, या दोहोंमध्यें चांगली गोष्ट कोणती हें आम्हांला समजत नाहीं. ५४

**अन्वयार्थ**—(कार्पण्य–दोष–उपहत–स्वभावः )–कार्पण्य म्हणजे कृपणता, दैन्य, आत्म्याचें स्वरूप न जाणणें, या दोषामुळें ज्याचा स्वभाव–क्षात्रधर्म उपहत–निरस्कृत–नष्ट झाला आहे व त्यामुळेंच–(धर्मसंमूढचेताः)–स्वधर्माविषयीं–परमात्म्याविषयीं ज्याचें चित्त मूढ झालें आहे, असा–(अहं)–मी–(त्वां)–तुला–(पृच्छामि)–विचारतों.–(यत् निश्चितं श्रेयः स्यात्)–जें निश्चित श्रेय असेल, ज्याच्यापासून परमपुरुषार्थरूप अव्यभिचारी फल प्राप्त होईल–(तत्)–तें–(मे) मला–(ब्रूहि)–सांग.–(अहं)–मी–(ते)–तुझा–(शिष्यः)–शिष्य आहें.–(त्वां प्रपन्नं मां)–तुला शरण आलेल्या मला–(शाधि)–तूं उपदेश कर. ७

आम्हांस कोणती गोष्ट करणें योग्य आहे, हें विचार करून–

१ आभारी झालेला. २ कृपेनें. ३ मिळवावा. ४ बुद्धिभेद, वांकडेपणा. ५ वरवरच. ६ आकाश. ७ माप. ८ खोल. ९ विघटेल. १० कालपरत्वें. ११ पालटत नाहीं. १२ क्षोभविला १३ आई. १४ म्हणावी. १५ निश्चयानें. १६ मूर्तिमंत. १७ खा. १८ मूळ. १९ ठेवा, खाण. २० विद्यांचा समुद्र. २१ मर्यादारहित. २२ याप्रमाणें. २३ सर्व. २४ अंत करणापासून. २५ (ह्याच्यापेक्षां राज्यादिभोग चांगले ) ही कल्पना भयंकर आहे. २६ कठीण. २७ राज्यसुख. २८ महत्त्वाचें, चांगलें. २९ असोत. ३० पर्वताची गुहा. ३१ यांवर. ३२ ताजी धार लावलेल्या बाणांनीं. ३३ प्रहार करून. ३४ मर्मस्थानीं. ३५ शोधावें. ३६ रक्तांत. ३७ करावेत. ३८ रक्तानें माखलेले. ३९ युक्ति. ४० म्हणून. ४१ त्या वेळीं. ४२ कृष्णाच्या. ४३ देत नाहीं. ४४ स्पष्ट करून. ४५ खरें. ४६ यापलीकडे. ४७ वैर. ४८ असें बोलतांच. ४९ युध्दाच्या निमित्तानें. ५० आहेत. ५१ याला. ५२ टाकून. ५३ योग्य. ५४ सुचत नाहीं. ५५ कारण.

माझें ५५ तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे । मग पा[2]सींच असतां न दिसे । व[3]स्तुजात ५६ देवा मज तैसें जाहलें । जें[4] मन हें भ्रांती ग्रासिलें । आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ५७ तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें । निकें[6] तें आम्हां सांगावें । जे सखा सर्वस्व आँघवें । आम्हांसि तूं ५८ तूं गुरु बंधु पिता । तूं आमची इष्ट देवता । तूंचि सदा रक्षिता । आपदीं आमुतें ५९ जैसा शिष्यांतें गुरू । सर्वथा नेणें अव्हेरूं । कीं सरितांतें सागरू । त्यजी केवीं ६० नातरी आ[11]पत्यातें माये । सांडूनि जरी जाये । तरी तें कैसेंनि जिये[12] । ऐकें कृष्णा ६१ तैसा सर्वांपरी आम्हांसी । देवा तूंचि एक ओ[13]हासी । आणि बोलिलें जरी नें[14] मनिसी । मागील माझें ६२ तरी उचित काय आम्हां । जें [15]व्यभिचरेना धर्मा । तें झडकरी पुरुषोत्तमा । सांगें आतां ६३

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणां ॥
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाऽऽधिपत्यम् ॥ ८ ॥

हें सकळ कुं[16]ळ देखोनि । जो शोकु उपनलासे मनीं । तो तुझिया वाक्या-वांचुनी । न जाय आणिकें ६४ एथ पृथ्वीतळें आपु होईल । हें महेंद्रपं[20]दही पाविजेल । परि मोह हा न फिटेल । मानसींचा ६५ जैसीं बीजें[21] सर्वथा आ-[22]हाळलीं । तीं सु[23]क्षेत्रीं जर्‍ही पेरिलीं । तरी न विरू[24]ढती सिं[25]चैलीं । आँ[26]वडे तै-सीं ६६ ना तरी आयुष्य पुरें[27]लें आहे । तरी औषधें कांहीं नोहे । एथ एकचि उपे[28]गों जाये । परमा[29]मृत ६७ तैसे राज्यभोगसमृद्धि । उज्जी[30]वन नोहे इये बु[31]द्धि । एथ जिव्हा[31]ळा कृपानिधि । कारुण्य तुझें ६८ ऐसें अर्जुन तेथ बोलिला । जंव क्षणएक भ्रां[32]ती सांडिला । मग पुनरपि व्यापिला । ऊ[33]र्मी तेणें ६९ कीं मज[34] पाहतां उर्मी नोहे । हें अ[35]नारिसें गर्म[36]त आहे । तो ग्रासिला महामोहें । काळसर्पें ७० सर्व[37]मे हृदय[38]कल्हारीं । तेथ कारुण्यवेळेच्या भरीं । लागला म्हणोनि लै[39]ह-री । भां[40]जेचिना ७१ हें जाणोनि ऐसी [41]प्रौढी । जो दृष्टिसर्वांचि विष [42]फेडी । तो धां[43]वैया श्रीहरी गारुडी । पातला कीं ७२ तैसिया पंडुकुमरा व्याकुळा । मि-रवतसे श्रीकृष्णा जवळा । तो कृपावशें अवलीळा । रक्षील आतां ७३ म्हणो-नि तो पार्थु । मोहफणिग्रस्तु । म्यां म्हणितला हा हेतु । जाणोनियां ७४ मग देखा तेथ फाल्गुनु । घेतला असे भ्रांती [illegible] । जै[illegible] [illegible]ीं भानु । आ-च्छादिजे ७५ तयापरी तो धनुर्धरु । [illegible] । ग्रीष्मकाळीं

हि या प्रसंगी आह्मांस सुचत नाहीं; कारण, या मोहानें चित्त व्याकुळ झालें आहे. ५५ तिमिररोगानें नेत्राची शक्ति जशी क्षीण होते, आणि मग जवळ असलेलाहि कोणताच पदार्थ दिसत नाहीं. ५६ त्याप्रमाणें, देवा, माझी स्थिति झाली आहे. माझें मन भ्रांतीनें ग्रासून गेलें असून, आपलें हित कशांत आहे तेंहि मला यावेळीं समजत नाहीं. ५७ तर श्रीकृष्णा, आपण विचार करून खरें असेल तें आह्मांला सांगा; कारण, आमचे इष्टमित्र वगैरे सर्वस्व आपण आहां. ५८ आमचे गुरु, बंधु, बाप, कुलदैवत आणि नेहमीं संकटसमयीं रक्षण करणारे आपणच आहां. ५९ ज्याप्रमाणें गुरु शिष्याचा सर्वथा अव्हेर करीत नाहीं, किंवा समुद्र नद्यांचा अव्हेर कसा करील ? ६० अथवा, देवा, आपणच विचार करा कीं, आई मुलास सोडून गेली तर तें कसें वांचेल ? ६१ त्याचप्रमाणें, सर्वतोपरी आम्हांस आपणच आहां व इतका वेळपर्यंत जें मी आपल्याला बोललों तें जर तुम्हांस पटत नसेल तर, ६२ पुरुषोत्तमा, जी गोष्ट आम्हांस उचित असून धर्मविरुद्ध नसेल, ती लवकर सांगा. ६३

**अन्वयार्थ**—(भूमौ)-या भूलोकीं-(असपत्नं)-शत्रुरहित -(ऋद्धं)-समृद्ध-(राज्यं)-राज्य-(च)-व-(सुराणां अपि)-देवांचेंहि-(आधिपत्यं)-राज्य-(अवाप्य)-प्राप्त करून-(यत्)-जें-(मम इंद्रियाणां उच्छोषणं शोकं)-माझ्या इंद्रियांना सुकविणाऱ्या शोकाला-(अपनुद्यात्)-घालवील-(तत्)-तें साधन-तो उपाय-(न हि प्रपश्यामि)-मला दिसतच नाहीं. ८

हे सर्व गोत्रज पाहून माझ्या मनांत जो शोक उत्पन्न झाला आहे, तो आपल्या उपदेशावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें नाहींसा होणार नाहीं. ६४ या ठिकाणी पृथ्वीचें राज्य मिळालें किंवा इंद्रपद प्राप्त झालें, तरी देखील माझ्या अंतःकरणांत उत्पन्न झालेला हा मोह दूर होणार नाहीं. ६५ ज्याप्रमाणें भाजलेलें बीं कितीही उत्तम जमीनींत पेरलें व त्यास मनसुराद पाणी घातलें तरी उगवत नाहीं, ६६ किंवा जेथें आयुष्य संपलें आहे तेथें एका परमामृताशिवाय इतर औषधांचा कांहीं उपयोग होत नाहीं, ६७ त्याप्रमाणें मला सर्व राज्यभोग व संपत्ति प्राप्त झाली तरी या मोहांतून पार पडण्यास त्यांचा बिलकूल उपयोग होणार नाहीं; तर, हे कृपानिधे, तुझ्या कृपेचा जिव्हाळाच उपयोगी पडेल. ६८ याप्रमाणें, क्षणभर भ्रांति दूर झाल्यामुळें अर्जुन त्या ठिकाणी बोलला. परंतु त्याला पुनः मोहानें झपाटलें. ६९-त्या अर्जुनाच्या स्थितीवर महाराज असें रूपक करितात कीं,-त्याला मोहाची लहर नसून हा कांहीं निराळाच प्रकार असावासें मला वाटतें; तो कोणता म्हणाल तर, महामोहरूपी काळसर्पानें अर्जुनास ग्रासलें; ७० आणि हृदयकमलांत कारुण्याची उसळी आली आहे अशी संधि साधून मर्मस्थानीं दंश केला असतां, त्यास लहरींवर लहरी येऊन झेंडू फुटणार नाहीं काय ? ७१ असा प्रसंग पाहून, ज्याच्या कृपादृष्टीनें विष नाहींसें होतें असें ज्याचें ऐश्वर्य तो श्रीकृष्णरूपी गारुडी त्याचें रक्षण करण्याकरितां धांवून आला. ७२ तेव्हां अर्जुन श्रीकृष्णाजवळ मोहानें व्याप्त झालेल्या स्थितींत शोभूं लागला. त्याचें तो श्रीकृष्ण आपल्या कृपेनें आतां सहज रक्षण करील. ७३ म्हणून, मोह हाच कोणी सर्प व त्यानें पार्थाला ग्रासलें आहे हा हेतु मनांत धरून मी एथें हें रूपक केलें. ७४ ज्याप्रमाणें मेघपटलांनीं सूर्य आच्छादित व्हावा त्याप्रमाणें अर्जुन त्या वेळीं भ्रांतीनें आच्छादित झाला. ७५ जसा उन्हाळ्यांत डोंगराला वणवा लागतो

१ अंधारानें वेष्टित. २ जवळ. ३ पदार्थमात्र. ४ कारण. ५ संशयांनें. ६ खरें, निश्चयात्मक. ७ सर्व. ८ आपत्तिकाळीं, संकटांत. ९ त्याग. १० नद्यांना. ११ मुलाला. १२ वांचेल. १३ आहेस. १४ तुला मान्य नसेल. १५ विरुद्ध नसेल. १६ गोतावळा. १७ उपजला आहे. १८ सार्वभौम राज्य. १९ प्राप्त. २० इंद्रपद. २१ धान्याचें बीं. २२ भाजलेलीं. २३ चांगल्या शेतांत. २४ उगवत नाहींत. २५ सिंपलीं. २६ हवी तशीं, मनाजोगीं. २७ सरलें. २८ उपयोगीं येतें. २९ भगवत्कृपामृत. ३० या युद्धाला उत्तेजनपर होत नाहीं. ३१ जीवन देणारें तत्त्व, आश्रय. ३२ भ्रांती=मोहानें सांडिला=सोडला, शुद्धिवर आला. ३३ वेग, लहर. ३४ मला वाटतें. ३५ वेगळेंच. ३६ वाटतें. ३७ मर्मयुक्त. ३८ हृदयकमळीं. ३९ वेग. ४० आटपेना. ४१ मोठा प्रसंग ४२ नाहींसे करितो. ४३ हांकेसरसा. ४४ सहज. ४५ मोहरूपी सर्पानें ग्रासलेला. ४६ अर्जुन ४७ वेगाहून. ४८ ढगांच्या पटलांनीं. ४९ झांकावा. ५० व्याकुळ. ५१ उन्हाळ्यांत.

**अन्वयार्थ**—(च हे पार्थ)–आणि हे अर्जुना !–(यदृच्छया)–न मागतां–(उपपन्नं)–प्राप्त झालेलें–(अपावृतं)–उघडलेलें –(स्वर्गद्वारं)–स्वर्गाचें द्वारच–(ईदृशं)–अशा प्रकारचें हें–(युद्धं) –युद्ध–(सुखिनः क्षत्रियः लभन्ते)–मोठ्या भाग्यशाली क्षत्रियांना प्राप्त होतें. ३२

अर्जुना, हें युद्ध म्हणजे तुमचें पूर्वजन्माचें भाग्यच समजा ! अथवा सर्व धर्मांचा ठेवाच प्रगट झाला असें म्हणा !. १९१ अरे, याला काय युद्ध म्हणावें, हा तर तुमच्या प्रतापानें मूर्तिमंत स्वर्गच तुम्हांपुढें युद्धरूपानें उभा केला आहे. १९२ किंवा तुझ्या गुणांचा लौकिक ऐकून तुजवर अतिशय असक्त झाल्यामुळें ही कीर्तिरूप स्त्रीच तुला वरण्यास आली आहे. १९३ अरे, क्षत्रियानें पुष्कळ पुण्य करावें, तेंव्हां त्याला हा असला युद्धप्रसंग प्राप्त होतो. ज्याप्रमाणें एकाद्याला मार्गानें जातांना इच्छित फल देणारा चिंतामणि अकस्मात् सांपडावा, १९४ किंवा जांभईनें तोंड पसरलें असतां त्यांत अकस्मात् अमृत पडावें, त्याप्रमाणें हा युद्धप्रसंग तुम्हांला प्राप्त झाला आहे, असें तूं समज. १९५

**अन्वयार्थ**—(अथ)–आतां–(त्वं)–तूं–(इमं धर्म्यं संग्रामं) –या धर्मरूप–विहित संग्रामास–(न करिष्यासि चेत्)–जर न करशील, हें शास्त्रविहित युद्धही न करशील–(ततः)– तर–(स्वधर्मं च कीर्तिं)–स्वधर्म व कीर्ति या दोघांनाहि– (हित्वा)–सोडून–या दोघांनाही मुकून–(पापं)–पापाला–(अवाप्स्यसि)–जोडशील–तुला पाप लागेल. ३३

आतां असला हा संग्राम टाकून भलत्या गोष्टींचा शोक करीत बसलास, तर आपली आपणच हानि करून घेतल्यासारखें होईल. १९६ ह्या रणाचें ठिकाणीं जर तूं आज शस्त्र टाकून दिलेंस, तर पूर्वजांनीं जोडून ठेवलेली कीर्ति घालविलीस असें होईल; १९७ इतकेंच नव्हे, तर तुझ्या असलेल्या कीर्तीचाहि नाश होईल, व सर्व जग तुझी निंदा करील; आणि अनेक मोठाले दोष तुला शोधीत येतील. १९८ ज्याप्रमाणें पतिविरहित स्त्री पदोपदीं अपमान पावते त्याप्रमाणेंच स्वधर्मावांचून जीविताची दशा होते; १९९ अथवा रणांत प्रेत पडलें म्हणजे ज्याप्रमाणें चोहोंकडून त्याला गिधाडें फाडतात, त्याप्रमाणें स्वधर्महीन मनुष्याला महादोष व्यापून टाकतात. २००

**अन्वयार्थ**—(भूतानि)–सर्व लोक–(ते)–तुझी–(अव्ययां अकीर्तिं च अपि)–अक्षय अपकीर्तिही–(कथयिष्यन्ति)–सांगतील,–(च)–आणि–(संभावितस्य)–एखाद्या संभावित–मान्य पुरुषाची–(अकीर्तिः)–अपकीर्ति–(मरणात्)–मरणाहून–(अतिरिच्यते)–अधिक आहे. ३४

एवढ्याकरितां जर तूं प्रस्तुत प्राप्त झालेल्या क्षत्रियधर्माचा त्याग करशील, तर तुला पाप लागेल आणि कल्पांतापर्यंतही अपयशाचा डाग नाहींसा होणार नाहीं. १ जोंपर्यंत अपकीर्ति झाली नाहीं तोंपर्यंत शहाण्यानें जगावें; असें असतां तूंच सांग कीं, आतां या संग्रामांतून कसें परत जावें ? २ या संग्रामांतून तूं सदय अंतःकरणानें व मत्सररहित माघारा फिरशील खरा, परंतु ह्या सर्वांना कांहीं ती गोष्ट खरी वाटणार नाहीं. ३ हे कौरव तुला चोहींकडून घेरतील व तुजवर बाणांचा मारा करतील; पार्था; मग त्या प्रसंगीं ह्या तुझ्या कनवाळूपणानें कांहीं तुझी सुटका होणार नाहीं. ४ इतकेंही करून जर कदाचित् मोठ्या कष्टानें येथून तुझी त्यांतून सुटका झाली, तरी तें वांचणें मरणापेक्षांही वाईट आहे. ५

**अन्वयार्थ**—(महारथाः)–दुर्योधनादिक वीर–(त्वां)–तुला –(रणात्)–रणांतून–(भयात्)–भयानें–(उपरतं)–परतला असें –(मस्यन्ते)–समजतील–(च)–आणि–(येषां)–ज्यांना–(त्वं)– तूं पूर्वी–(बहुमतः [अभूः तेषां तव तादृशः] भूत्वा)–बहुमत मोठा शूर योद्धा–खरा क्षत्रिय म्हणून अतिशय मान्य झाला होतास, त्याच भीष्मादिकांस तसा मान्य होऊन–(लाघवं यास्यसि) लघुत्वास–हल्केपणास–साक्षात् तिरस्कारास पात्र होशील. ३५

आणखी एक गोष्टीचा तूं विचार केला नाहींस; तूं ह्या ठिकाणीं मोठ्या थाटानें युद्धास आला असून जर दयार्द्र होऊन माघारा जाण्यास निघालास, ६ तर, अर्जुना, तूंच सांग कीं, तुझें तें दयाळूपण हे तुझे दुर्जन वैरी कौरव ह्यांना खरें वाटेल कां ? ७

**अन्वयार्थ**—(च)–व–(तव)–तुझ्या–(सामर्थ्यं)–सामर्थ्यास–(निन्दन्तः)–निंदणारे–(तव)–तुझे–(अहिताः)–शत्रु–(बहून् अवाच्यवादान्)–अनेक अवाच्य शब्द–(वदिष्यन्ति)–बोलतील–(ततः)–त्याहून–(दुःखतरं)–अधिक दुःखकर–(किं नु)– काय बरें ? ३६

हे म्हणतील, "गेला रे गेला ! अर्जुन आम्हांला भिऊन पळून गेला." अरे, असा हा तुझ्यावर आलेला लोकापवाद चांगला कां ? ८ धनुर्धरा, पाहिजे तितके

१ ठेवा. २ म्हणावा. ३ मूर्तिमंत. ४ संग्राम. ५ अनुभवानें, प्रतीतीनें. ६ प्रीतीच्या. ७ आसक्तीनें, आधिक्यानें. ८ प्राप्त व्हावें. ९ अकस्मात् आढळावें. १० इच्छिन फल देणाऱ्या मण्याला. ११ जांभईनें. १२ अकस्मात्. १३ अमृत. १४ टाकावा. १५ नसतें. १६ हानि करणारा. १७ स्वतः आपणाला. १८ गमाविलें. १९ ह्या. २० असलेली. २१ निंदा. २२ शोधित. २३ पतिविरहित. २४ स्त्री. २५ तिरस्कार. २६ प्रेत. २७ चोहोंकडून. २८ गिधाडांनीं. २९ महादोष जिंकतात. ३० प्राप्त. ३१ दूर होणार नाहीं. ३२ प्रलयकालपर्यंत. ३३ शहाण्यानें. ३४ जगावें. ३५ पावत नाहीं. ३६ कसें. ३७ निघावें. ३८ मत्सररहित. ३९ कनवाळूपणानें. ४० निश्चयें. ४१ माघारा. ४२ गोष्ट. ४३ न मानेल, अवडणार नाहीं. ४४ ह्यांना. ४५ घेरतील. ४६ तीक्ष्ण बाणांनीं मारा करतील. ४७ जिवावर प्रसंग येऊन. ४८ कदाचित्, ४९ वांचणें. ५० वाईट. ५१ आवेशानें, तयारीनें. ५२ ममताळूपणानें. ५३ माघारा. ५४ दयाळुत्व. ५५ अनुभवाला. ५६ त्याला. ५७ चांगला. ५८ खचितात.

परी वाढविती कीर्तीतें । धनुर्धरा ९ ते तुज अनायासें । अनकळित[1] जोडिली असे । हें अद्वितीय जैसें । गगन[2] आहे २१० तैसी कीर्ती निःसीम[3] । तुझ्या ठायीं निरुपम[4] । तुझे गुण उत्तम । तिहीं लोकीं ११ दिगंतीचे[5] भूपति । भाट[6] होऊनि वाखाणिती । जे ऐकिलिया दचकती[7] । कृतांतादिक[8] १२ ऐसी महिमा घनवट[9] । गंगा जैसी चोखट[10] । जया[11] देखीं जगीं सुभेट[12] । वाट[13] जाहली १३ तें पौरुष[14] तुझें अद्भुत । आइकोनियां हे समस्त । जाहले आथि विरक्त । जीवितेंसी १४ जैसा सिंहाचिया हांका । युगांतु[15] होय मर्दमुखा[16] । तैसा कौरवां अशेखां[17] । धाकु तुझा १५ जैसे पर्वत वज्रातें । ना तरी सर्प गरुडातें । तैसे अर्जुना हे तूंतें । मानिती सदा १६ तें अगाधपण[18] जाईल । मग हीणावो[19] अंगा येईल । जरी मागुता निघसील । न झुंजतचि १७ आणि हे पळतां पळों नेदिती । धरूनि अवकळा[20] करिती । न गणित कुटी[21] बोलती । आइकतां तुज १८ मग ते वेळीं[22] हियें फुटावें । आतां लोंठेपणें[23] कां न झुंजावें । हें जिंतलें[24] तरी भोगावें । महीतळ[25] १९

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् । तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥३७॥

ना तरी रणीं एथ । झुंजतां वेंचलें[26] जीवित । तरी स्वर्गसुख अनकळित[27] । पावसील २२० म्हणोनि ये गोठी । विचारु न करी किरीटी[28] । आतां धनुष्य घेऊनि उठी । झुंज वेगीं २१ देखें स्वधर्मु हा आचरतां । दोषु नाशे असतां[29] । तुज भ्रांति हे कवण चित्ता । पातकाची २२ सांगें प्लवेंचि[30] काय बुडिजे । कां मार्गी[31] जातां आडळिजे[32] । परी विपायें[33] चालों नेणिजे । तरी तेंही घडे २३ अमृतें[34] तरीचि मरिजे । जरी विखेंसीं[35] सेविजे । तैसा स्वधर्मी दोषु पाविजे । हेतुकेंपणें[36] २४ म्हणोनियां पार्था । हेतू सांडोनि सर्वथा । तुज क्षात्रवृत्ति[37] झुंजतां । पाप नाहीं २५

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ । ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥

सुखीं संतोषा न यावें । दुःखीं विषादा[38] न भजावें[39] । आणि लाभालाभ न धरावे । मनामाजीं २६ ऐथ[40] विजयपण होईल । कीं सर्वथा देह जाईल । हे आधींचि कांहीं पुढील । चिंतावेंना[41] २७ आपणियां[42] उचिता । स्वधर्में राहाटतां[43] । जें पावे तें निवांतीं । साहोनि जावें २८ ऐसेया[44] मनें होआवें[45] । तरी दोषु न घडे स्वभावें । म्हणोनि आतां झुंजावें । निभ्रांत तुवां २९

एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां श्रृणु । बुद्धया युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥३९॥

सायास करून, किंवा प्रसंगीं प्राणही खर्ची घालून लोक ज्या कीर्तीचें संपादन करितात ९ ती गगनाप्रमाणें अनुपमेय व निष्प्रतिबंध कीर्ति संपादण्याचा प्रसंग अनायासानें तुला आला आहे. २१० तुझी कीर्ति अमर्याद असून तुझे गुणही उपमारहित आहेत, अशी तिन्ही लोकांत ख्याति आहे. ११ देशांतरींचे राजेरजवाडे स्तुतिपाठक होऊन तुझी कीर्ति गातात, ती ऐकून यमादिक देखील तुला भितात! १२ त्या कीर्तीचा महिमा गंगेच्या पाण्याप्रमाणें निर्मल व गहन आहे, आणि तो ऐकून जगांतील मोठमोठ्या योद्ध्यांना कीर्ति संपादन करण्याचा मार्ग झाला आहे. १३ असा तुझ्या अद्भुत शौर्याचा महिमा ऐकून हे सर्व कौरव आपल्या प्राणांवर उदार झाले आहेत. १४ ज्याप्रमाणें सिंहाची गर्जना ऐकल्याबरोबर उन्मत्त हत्तीलाही प्रलयकाळच ओढवला असें वाटतें, त्याप्रमाणें ह्या सर्व कौरवांस तुझा धाक वाटतो. १५ ज्याप्रमाणें पर्वत वज्राला किंवा सर्प गरुडाला समजतात, त्याप्रमाणें हे कौरव तुला नेहमीं समजत आहेत. १६ तेव्हां आतां युद्ध न करितां जर माघारा फिरशील, तर ही तुझी थोरवी नाहींशी होऊन तुला हीनत्व प्राप्त होईल. १७ बरें, पळून जाऊं म्हणशील, तर हे तुला जाऊं देणार नाहींत; तुला धरून आणून तुझी फजिती करतील, आणि तुझ्या तोंडावर तुझी अतिशय निंदा करतील. १८ ते मर्मभेदक शब्द ऐकून मग अंतःकरण विदीर्ण होण्यापेक्षां आतां शौर्यानें कां युद्ध करूं नये? जर ह्यांना तूं जिंकलेंस तर पृथ्वीचें राज्य भोगशील. १९

**अन्वयार्थ**—(हतः वा)–युद्धांत शत्रुकडून मारला गेलास तर–(स्वर्गं)–स्वर्गाला–(प्राप्स्यसि)–प्राप्त होशील–(जित्वा वा)–किंवा शत्रूंना तूं जर जिंकलेंस, तर–(महीं भोक्ष्यसे)–पृथ्वीचा उपभोग घेशील.–(तस्मात्)–यास्तव–(हे कौन्तेय)–हे कुंतीपुत्रा!–(कृतनिश्चयः)–मी शत्रूंना मारीन किंवा मरेन असा निश्चय करून–(युद्धा)–युद्ध करावयास–(उत्तिष्ठ)–ऊठ.

अथवा ह्या रणामध्यें युद्ध करतांना तूं मेलास, तर सहज स्वर्गसुख भोगशील; २२० म्हणून अर्जुना, ह्याबद्दल आतां विचार करीत बसूं नको; तर ऊठ आणि हातांत धनुष्य घेऊन लवकर युद्धास आरंभ कर. २१ हें पहा–स्वधर्माचें आचरण केलें तर असलेले दोष नाश पावतात, असें असून त्याच्यापासून पातक लागेल हा भ्रम तुझ्या मनांत कोठून उत्पन्न झाला? २२ तूंच सांग, की नावच कधीं बुडेल कां? त्याचप्रमाणें चांगल्या रस्त्यानें जाणारा कधीं ठेंच लागून पडेल का? परंतु ज्याला चालतां येत नाहीं, तो मात्र कदाचित् ठेंच लागून पडण्याचा संभव आहे; २३ दूध प्याल्यानें मरण येणार नाहीं; परंतु तें विषाबरोबर सेवन केल्यास तो सेवन करणारा मरेल; त्याचप्रमाणें फलाच्या आशेनें स्वधर्माचें आचरण केल्यास मात्र दोष लागतील. २४ म्हणून, अर्जुना, निष्काम होऊन क्षत्रियधर्मानें युद्ध कर, म्हणजे पातकाचा लेशही तुला लागणार नाहीं. २५

**अन्वयार्थ**—(सुखदुःखे)–सुख व दुःख यांना–(समे)–तुल्य–एकसारखें–(कृत्वा)–करून–मानून म्ह० सुखाविषयीं आसक्ति–राग व दुःखाविषयीं द्वेष न करितां,–(लाभालाभौ च जयाजयौ समे कृत्वा)–त्याचप्रमाणें लाभ व अलाभ, जय व पराजय यांनाही तुल्य समजून–(ततः)–मग (युद्धाय)–युद्ध करावयास–(युज्यस्व) तयार हो.–(एवं)–अशा भावनेनें युद्ध करूं लागलास म्हणजे–(पापं न अवाप्स्यसि)–तुला पाप लागणार नाहीं. ३८

सुख प्राप्त झालें असतां संतोष मानूं नये, दुःख प्राप्त झालें असतां खेद मानूं नये, आणि मनांत लाभालाभ धरूं नये. २६ ह्या समरांगणीं आपल्याला जय मिळेल किंवा आपण मरूं, ह्या पुढील गोष्टीचा अगोदरच विचार करीत बसूं नये. २७ आपल्याला विहित अशा स्वधर्मानें वागत असतांना जें बरें वाईट प्राप्त होईल, तें निमुटपणानें सहन करावें. २८ अशा रीतीनें मनाचा निश्चय केला म्हणजे सहज दोष घडत नाहींत; म्हणून तूं निश्चयानें आतां युद्धास आरंभ कर. २९

**अन्वयार्थ**—(एषा)–ही–(ते)–तुला–(सांख्ये)–परमार्थ वस्तूच्या विवेकाविषयीं–(बुद्धिः)–ज्ञान–(अभिहिता)–सांगितलें,–(तु)–पण आतां–(योगे)–त्याच्या प्राप्तीच्या उपायाविषयींची–(इमां)–ही बुद्धि–(शृणु)–तूं ऐक–(पार्थ)–हे अर्जुना!–(यया बुद्ध्या युक्तः) [त्वं]–ज्या योगबुद्धीनें–उपायबुद्धीनें युक्त झालेला तूं–(कर्मबन्धं]–कर्मरूप बंधाला–(प्रहास्यसि)–टाकशील. ३९

१ अक्लेश, सहज. २ आकाश. ३ अतिशय. ४ उपमारहित. ५ देशांतरींचे. ६ स्तुतीपाठ करणारे. ७ भितात. ८ यमादिक. ९ गहन. १० निर्मळ. ११ जिला पाहातां. १२ महा योद्धे. १३ तटस्थ, स्तब्ध. १४ शौर्य. १५ प्रलयकाळ. १६ उन्मत्त हत्तीला. १७ सर्वांना. १८ मोठेपण, थोरवी. १९ नीचपणा, कमीपणा. २० फजिती. २१ कुचेष्टा, निंदा. २२ हृदय. २३ शौर्यानें. २४ जिंकीलें. २५ पृथ्वी. २६ सुचलें, संपलें. २७ उपद्रवरहित. २८ अर्जुना. २९ असलेला. ३० नौकेनें. ३१ रस्त्यानें, वाटेनें. ३२ अडखळावें, आपटावें. ३३ कदाचित्. ३४ दुधानें. ३५ विषाबरोबर, विषमिश्रित. ३६ सकामतेनें ३७ क्षत्रियधर्मानें. ३८ खेदाला. ३९ मानावें. ४० समरांगणांत. ४१ चिंतूं नये. ४२ आपल्याला. ४३ व्यवहार करीत असतां. ४४ स्वस्थपणें, निमूटपणें, मुकाट्यानें. ४५ असें दृढ. ४६ व्हावें.

हे सांख्यस्थिति मुकुलित । सांगितली तुज येथ । आतां बुद्धियोगु निश्चित । अवधारी पां २३० जया बुद्धियुक्ता । जाहलिया पार्था । कर्मबंधु सर्वथा । बाधूं न पवे ३१ जैसें वज्रकवच लेइजे । मग शस्त्रांचा वर्षावो साहिजे । परी जैतेंसीं उरिजे । अचुंबित ३२

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते । स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥

तैसें ऐहिकें तरी न नाशे । आणि मोक्षु तो उरला असे । जेथ पूर्वानुक्रमु दिसे । चोखाळत ३३ कर्माधारें राहाटिजे । परी कर्मफळ न निरीक्षिजे । जैसा मंत्रज्ञु न बाधिजे । भूतबाधा ३४ तियापरी जे सुबुद्धि । आपुलालिया निरवधि । हा असतांचि उपाधि । आकळूं न सके ३५ जेथ न संचरे पुण्यपाप । जें सूक्ष्म अति निष्कंप । गुणत्रयादि लेप । न लगती जेथ ३६ अर्जुना तें पुण्यवशें । जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे । तरी अशेषही नाशे । संसारभय ३७

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन । बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

जैसी दीपकळिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रगटी । तैसी सद्बुद्धि हे थेकुटी । म्हणों नये ३८ पार्था बहुतीं परी । हे अपेक्षिजे विचारशूरीं । जे दुर्लभ चराचरीं । सद्वासना ३९ आणिकांसारिखा बहुवसु । जैसा न जोडे परिसु । कां अमृताचा लेशु । दैवगुणें २४० तैसी दुर्लभ जे सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधि । जैसा गंगेसी उदधि । निरंतर ४१ तैसें ईश्वरावांचुनि कांहीं । जिये आणीक ठाणी नाहीं । ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ४२ येर ते दुर्मति । जे बहुधा असे विकरति । तेथ निरंतर रमती । अविवेकिये ४३ म्हणोनि तयां पार्था । स्वर्ग संसार नरकावस्था । आत्मसुख सर्वथा । दृष्ट नाहीं ४४

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः । वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥
कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् । क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥
भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् । व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिती । परी कर्मफळीं आसक्ती । धरूनियां ४५ म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे । मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ४६ एथ हें वांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं । ऐसें अर्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि ते ४७ देखें कामनाअभिभूत । होऊनि कर्में आचरत । ते केवळ भोगीं चित्त । देऊनियां ४८ क्रियाविशेषें बहुतें । न लोपिती विधीतें ।

एथपर्यंत हा ज्ञानयोग तुला संक्षिप्तपणें सांगितला; आतां बुद्धियोग सांगतों, ऐक. २३० अर्जुना, पुरुष बुद्धियोगाला प्राप्त झाला असतां त्याला कर्मबंधाची मुळींच बाधा होत नाहीं. ३१ ज्याप्रमाणें अंगांत वज्रकवच घातलें म्हणजे शस्त्रांची वृष्टि सहन करून विजय त्याच्यानें मिळतो. ३२

**अन्वयार्थ**—(इह)–या मोक्षमार्गरूप कर्मयोगांत–(अभिक्रमनाशः)–आरंभिलेल्या कर्माचा नाश–(न अस्ति)–होत नाहीं. त्यांत–(प्रत्यवायः न विद्यते)–दोष नाहीं.–(अस्य धर्मस्य)–या योगरूप धर्माचें–(स्वल्पं अपि)–थोडेसेंहि अनुष्ठान–(महतः भयात्)–संसाररूप मोठ्या भयापासून–(त्रायते)–रक्षितें.

त्याप्रमाणें इहलोकचें सुख नाहींसें न होतां मोक्ष अंतरत नाहीं. ज्या बुद्धियोगांत पूर्वी केलेलें धर्मानुष्ठान पुढें खंड पडला तरी नासत नाहीं. ३३ कर्माच्या आधारानें वागणूक ठेवावी, परंतु त्या कर्मापासून होणाऱ्या फलाची इच्छा धरूं नये; जसा पंचाक्षरी भूतापासून बाधा पावत नाहीं, ३४ त्याचप्रमाणें, [कर्मफलाच्या ठिकाणीं आसक्ति न ठेवतां निरभिमानबुद्धीनें कर्म करण्याची] सद्बुद्धि ज्याला प्राप्त झाली आहे, त्याला जन्ममरणाची उपाधि–बाधा करीत नाहीं. ३५ ज्या बुद्धीला पापपुण्याची बाधा होत नाहीं; जी अतिशय सूक्ष्म असून निश्चल आहे; आणि सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण जिच्यांत प्रवेश करीत नाहींत; ३६ अर्जुना, अशी जी सुबुद्धि ती पुण्याईनें थोडीशी जरी एकाद्याला प्राप्त झाली तरी ती सर्व संसारभयाचा नाश करिते. ३७

**अन्वयार्थ**—(हे कुरुनंदन)–हे कुरुवंशजा अर्जुना!–(इह)–या मोक्षमार्गांत–(व्यवसायात्मिका बुद्धिः)–ही निश्चयस्वभावाची बुद्धि–(एका)–एकच आहे.–(अव्यवसायिनां)–अनिश्चयी पुरुषांच्या–(बुध्दयः)–बुद्धि–(बहुशाखाः)–अनेक प्रकारच्या–(च)–व–(अनन्ताः हि)–अनन्त आहेत, हें प्रसिध्द आहे.

ज्याप्रमाणें दिव्याची ज्योत लहान असूनही तिचा प्रकाश मोठा पडतो, त्याप्रमाणें, सद्बुद्धि अल्प जरी असली तरी तिला लहान समजूं नये. २३८ अर्जुना, जे ज्ञानी आहेत ते अनेक प्रकारें हिची इच्छा करतात. परंतु ती सद्बुद्धि जगतांत फार दुर्लभ आहे. ३९ ज्याप्रमाणें इतर दगडांसारखे परीस कांहीं पुष्कळ सांपडत नाहींत, अथवा लेशमात्र अमृत प्राप्त होण्यास देखील दैवयोगच लागतो, २४० त्याप्रमाणें, परमेश्वरप्राप्तीतच जिचें पर्यवसान होतें अशी ही सद्बुद्धि फार दुर्लभ आहे. ज्याप्रमाणें गंगेचें पर्यवसान निरंतर समुद्रच आहे. ४१ त्याप्रमाणें अर्जुना, जिला ईश्वरप्राप्तीवांचून दुसरी कांहीं प्राप्ति नाहीं, अशी जगतामध्यें एकच बुद्धि आहे. ४२ इजशिवाय इतर बुद्धि त्या दुर्बुद्धि होत; त्यांचें ठिकाणीं विकार उत्पन्न होतात व तेथें अविचारी लोक नेहमीं रमतात. ४३ म्हणून अर्जुना, त्या लोकांना स्वर्ग, संसार आणि नरकावस्था प्राप्त होते; परंतु आत्मसुख कधीं माहीतच नाहीं. ४४

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)–हे अर्जुना!–(वेदवादरताः)–वेदांचे अर्थवादांतच आसक्त झालेले–(अन्यत् न अस्ति इति वादिनः)–स्वर्गादि फल देणाऱ्या कर्माहून दुसरें साधन नाहीं, असें बोलणारे–(कामात्मानः)–कामस्वभाव–विषयमय झालेले,–(स्वर्गपराः)–स्वर्गालाच श्रेष्ठ पुरुषार्थ समजणारे, असे–(अविपश्चितः)–अविवेकी लोक–(यां इमां पुष्पितां)–ज्या या फुललेल्या वृक्षाप्रमाणें वाटणाऱ्या–(जन्मकर्मफलप्रदां)–जन्म हेंच कर्माचें फल देणाऱ्या,–(भोगैश्वर्यगतिं प्रति क्रियाविशेषबहुलां)–भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं जिच्यामध्यें अनेक प्रकारचीं कर्में सांगितलीं आहेत, अशा–(वाचं)–वाणीला–(प्रवदन्ति)–बोलतात–(तया)–त्या वाणीनें–(अपहृतचेतसां)–ज्यांचें चित्त हरण केलें आहे अशा–(भोगैश्वर्यप्रसक्तानां)–भोग व ऐश्वर्य यांत अत्यंत आसक्त झालेल्या–(तेषां)–त्या अविवेक्यांच्या–(समाधौ)–अंतःकरणांत–(व्यवसायात्मिका बुद्धिः)–निश्चयस्वभाव–सांख्ययोगबुद्धि–(न विधीयते)–होत नाहीं. ४२–४४

ते वेदाचे आधारानें बोलून कर्ममार्गाचें श्रेष्ठत्व स्थापन करतात, परंतु त्या कर्माचे फलावर लोभ ठेवतात. ४५ त्यांचें असें म्हणणें असतें कीं, मृत्युलोकीं जन्म घेऊन यज्ञादिक कर्में आचरावीं, व आल्हाददायक असें स्वर्गसुख भोगावें. ४६ अर्जुना, ते दुर्बुद्धि नेहमीं असें म्हणतात कीं, एथें या स्वर्गसुखावांचून आणखी दुसरें सुखच नाहीं. ४७ हें पहा—ते केवळ भोगाच्या इच्छेनें आसक्त झाल्यामुळें कर्मफलावर दृष्टि देऊनच सकाम कर्में करतात, ४८ व अनेक प्रकारचीं अनुष्ठानें

१ ज्ञानयोग ( सांख्य, म्हणजे आत्मतत्त्वज्ञान ). २ संक्षिप्त. ३ कर्मयोग ( ज्यांत बुद्धीला स्वरूपाचा प्रत्यक्ष अनुभव. ). ४ ऐक. ५ बुद्धियोग प्राप्त झालेला. ६ न शके. ७ वज्राचें चिलखत. ८ वृष्टि. ९ विजयरूप. १० अबाधित. ११ इहलोक. १२ नासे. १३ राखून ठेवलेला. १४ कर्माच्या आधारानें. १५ वर्तावें. १६ कर्मापासून होणाऱ्या फळाला. १७ न पहावें. १८ मंत्र जाणणारा पंचाक्षरी. १९ झपाटला जात नाहीं. २०. ईश्वरार्पण बुद्धि. २१ निःशेष. २२ जन्ममरणाची. २३ शिरत नाहीं. २४ निश्चल. २५ लागत नाहींत. २६ सुबुद्धि, आत्मज्ञान, ईश्वरप्रसाद प्राप्ति. २७ पुण्याईनें. २८ दिव्याची ज्योत. २९ लहान. ३० प्रकाशाला. ३१ अल्प. ३२ इच्छावी. ३३ श्रेष्ठ विचारी पुरुषांनीं. ३४ इतर दगडादिकांप्रमाणें. ३५ पुष्कळ. ३६ मिळत नाहीं. ३७ थेंब. ३८ नशिबानें. ३९ शेवट. ४० समुद्र. ४१ जिला. ४२ प्राप्यस्थान. ४३ याशिवाय दुसरी. ४४ विकार करणारी. ४५ अविचारी. ४६ स्वरूपानंद. ४७ स्थापितात. ४८ लोभ. ४९ मनाला हरण करणारे. ५० कामाच्या स्वाधीन. ५१ इच्छेप्रमाणें सुखोपभोग. ५२ अनेक प्रकारचीं विधियुक्त अनुष्ठानें ५३ टाकिती. ५४ कर्तव्य, प्रयोगादिकाल.

निपुंण[1] होऊन धर्मातें । अनुष्ठिती[2] ४९ परी एकचि कुंडें[3] करिती । जे स्वर्गकामु[4] मनीं धरिती । यज्ञपुरुषा[5] चुकती । भोक्ता जो २५० जैसा कर्पूराचा राशि कीजे । मग अग्नि लाऊन दीजे । कां मिष्टान्नीं संचरविजे[6] । काळकूट[7] ५१ दैवें अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला । तैसा नासिती धर्मु[8] निपर्जला । हेतुंक[9]-पणें ५२ सायांसें[10] पुण्य अर्चिजे[11] । मग संसारु कां अपेक्षिजे[12] । परी नेणती ते काय कीजे । अप्रीस[13] देखें ५३ जैसी रांधवणी[14] रससोय[15] निकी[16] । करूनियां मोलें विकी । तैसा भोगासाठीं अविवेकी[17] । धांडिती[18] धर्मु ५४ म्हणोनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा । तयां वेदवादरतां[19] । मनीं वसे ५५

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन । निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥४५॥

तिहीं गुणीं आवृत्त[20] । हे वेद जाण निभ्रांत । म्हणोनि उपनिषदादि समस्त । सात्त्विक ते ५६ येरें[21] रजतमात्मक । जेथ निरूपिजे कर्मादिक । जे केवळ स्वर्गसूचक । धनुर्धरा ५७ म्हणोनि तूं जाण । हे सुखदुःखांसीच कारण । एथ झणें[22] अंतःकरण । रिगों देसी[22] ५८ तूं गुणत्रयातें अव्हेरीं[23] । मी[24] माझें हें न करीं । एक आत्मसुख अंतरीं[25] । विसंब झणीं[26] ५९

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके । तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

जरी वेदें बहुत बोलिलें । विविधें[27] भेद सूचिले[28] । तऱ्ही आपण हित आपुलें । तेंचि घेपें[29] २६० जैसा प्रगटलिया गभस्ती[30] । अशेषही मार्ग दिसती । तरी तेतुलेही[31] काय चालिजेती[32] । सांगें मज ६१ कां उदकमय[33] सकळ । जऱ्ही जाहलें असे महीतळ । तरी आपण घेपें[29] केवळ । आर्तीचजोगें[34] ६२ तैसे ज्ञानी जे होती । ते वेदार्थातें विवरिती[35] । मग अपेक्षित[36] तें स्वीकारिती । शाश्वत[37] जें ६३

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन । मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥

म्हणोनि आइकें पार्था । याचिपरी पाहतां । तुज उचित होय आतां । स्वकर्म हें ६४ आम्हीं समस्तही विचारिलें[38] । तंव ऐसेंचि हें मना आलें । जे न सांडिजे तुवां आपुलें । विहित[39] कर्म ६५ परी कर्मफळीं[40] आस न करावी । आणि कुकर्मी[41] संगति न व्हावी । हे सत्क्रियाचि[42] आचरावी । हेतूविणें ६६

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय । सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥४८॥

विधियुक्त करून तीं देवद्वारास नेण्याकरितां फार दक्षतेनें धर्माचरण करतात. ४९ परंतु, अर्जुना, ते एकच गोष्ट फार वाईट करतात. ती ही की, ते मनामध्यें स्वर्गाची इच्छा धारण करतात; आणि यज्ञभोक्ता जो ईश्वर त्याला विसरतात. २५० ज्याप्रमाणें कापुराचा ढीग करावा, आणि त्याला आग लावून द्यावी, अथवा मिष्टान्नांत काळकूट विष मिसळावें, ५१ किंवा दैवयोगानें मिळालेल्या अमृताचा कुंभ पायानें लवंडून द्यावा, त्याप्रमाणें संपादन केलेल्या धर्मे फलप्राप्तीचे इच्छेनें वांया घालवितात. ५२ असें पहा कीं, मोठ्या श्रमानें पुण्य संपादन करावें मग संसाराची इच्छा कां करावी? परंतु काय करावें, हें त्या अज्ञानी लोकांना समजत नाहीं. ५३ ज्याप्रमाणें उत्तम स्वयंपाकीण नानातऱ्हेचा चांगला स्वयंपाक तयार करून तो मोल घेऊन विकते, त्याप्रमाणें अविचारी लोक सुखोपभोगासाठीं धर्म गमावितात. ५४ म्हणून, पार्था, वेदांतील अर्थवादांत मग्न झालेल्या लोकांच्या मनांत सर्व प्रकारें दुर्बुद्धीच वास करिते, हें लक्षांत असूं दे. ५५

**अन्वयार्थ**—(हे अर्जुन)–हे अर्जुना!–(वेदाः त्रैगुण्यविषयाः)–वेदाचा विषय त्रैगुण्य म्ह० संसार आहे.–(त्वं)–तूं–(निस्त्रैगुण्यः)–निष्काम,–(निर्द्वंद्वः)–शीतोष्ण–सुखदुःख–लाभालाभ इत्यादि द्वंद्वांनीं रहित,–(नित्यसत्त्वस्थः)–नेहमीं सत्त्वगुणीं–(निर्योगक्षेमः)–योगक्षेमाची चिंता न करणारा व–(आत्मवान्)–आत्मस्वरूपाविषयीं सावधान–(भव)–हो. ४५

तूं निश्चयानें असें समज कीं, वेद हे तीन गुणांनीं (सत्त्व, रज, तम ह्यांनीं) भरलेले आहेत; म्हणून सर्व उपनिषदांची सत्त्वगुणामध्यें गणना केली जाते. ५६ धनुर्धरा, बाकी ज्यामध्यें, कर्म, उपासना इत्यादिकांचें निरूपण केलेलें आहे, ते सर्व रज व तम ह्या गुणांनीं युक्त असून केवळ स्वर्गसूचक आहेत. ५७ म्हणून, तूं असें पक्कें समज कीं, हे सुखदुःखांनाच कारण आहेत; व ह्याकरितां, तूं आपलें मन कदाचित् तेथें शिरूं देशील हो! तर तसें करूं नको. ५८ तूं ह्या त्रिगुणांना टाकून दे; व अहंममता सोडून अंतःकरणांत आत्मसुखाचा विसर पडूं देऊं नको हो! ५९

**अन्वयार्थ**–(उदपाने)–विहीर, आड, तळें, इत्यादि अनेक लहान लहान जलाशयांत–(यावान्)–जेवढा–(अर्थः)–कार्यभाग होतो–[सः सर्वः–तो सर्व]–(सर्वतः संप्लुतोदके)–चोहोंबाजूंनीं पाण्यानें भरलेल्या समुद्रादिकांत–(तावान्)–[एव]–तेवढाच होतो. त्याच न्यायानें–(सर्वेषु वेदेषु)–सर्वकर्मकांडरूप वेदांत–[यः अर्थः]–जो अर्थ–जें फळ मिळतें–(सः सर्वः)–तो सर्व अर्थ–ती सर्व फलनिष्पत्ति–(विजानतः ब्राह्मणस्य)–[फले]–विद्वान् ब्राह्मणाच्या फलांत–[तावान् एव]–अंतर्भूत होते. ४६

जरी वेदांत पुष्कळ गोष्टी सांगितल्या आहेत व अनेक मार्ग सुचविले आहेत, तरी त्यांतील आपलें ज्यांत हित असेल तेंच घ्यावें. २६० ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर अनेक रस्ते दृष्टीस पडतात, परंतु त्या सर्वच रस्त्यांनीं का मनुष्य चालतो, सांग बरें? ६१ अथवा, सर्व भूतल जरी जलमय झालें, तरी आपण आपल्या गरजेपुरतेंच त्यांतील पाणी घेतों. ६२ त्याप्रमाणें ज्ञानी जे आहेत, ते वेदार्थाचा विचार करून अपेक्षित अशा शाश्वत ब्रह्माचा तेवढा स्वीकार करतात. ६३

**अन्वयार्थ**—(ते)–तुझा–(अधिकारः)–अधिकार–(कर्मणि एव)–कर्मांतच आहे–[ज्ञानामध्यें नाहीं.]–कर्म करीत असतां–नाहिं–(फलेषु)–फलांविषयीं–(कदाचन)–केव्हांही–(मा)–तुझा अधिकार–तुझी तृष्णा नसो त्याचप्रमाणें तूं–(कर्मफलहेतुः मा भूः)–कर्मफलाची इच्छा करून त्या फलाचें कारण–निमित्त होऊं नकोस.–(ते संगः)–तुझी प्रीति–(अकर्मणि)–कर्मच न करणें, या गोष्टींत–(मा अस्तु)–न होवो. ४७

म्हणून, पार्था, ऐक. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून पाहातां तुला स्वकर्मच उचित आहे. ६४ आम्हीं सर्व गोष्टींचा विचार करून पाहिला, तों आमचे मनास असें आलें कीं, आपलें कर्तव्यकर्म सोडूं नये. ६५ पण कर्मफलाची इच्छा न ठेवतां, आणि निषिद्ध कर्मांचा अंगीकार न करतां सत्कर्माचेंच निष्काम आचरण करावें. ६६

**अन्वयार्थ**—(हे धनंजय)–हे धनंजया!–(योगस्थः)–तूं योगांत स्थित होऊन–(संगं त्यक्त्वा)–कर्मफलविषयींची आसक्ति सोडून–(सिद्ध्यसिद्ध्योः समः भूत्वा)–सिद्धि व असिद्धि यांविषयीं सम होऊन–(कर्माणि)–विहित कर्में–(कुरु)–कर–(समत्वं)–सिद्धि व असिद्धि यांना समान मानणें, हाच–(योगः उच्यते)–योग म्हटला जातो. ४८.

१ निष्णात. २ आचरतात. ३ वाईट. ४ स्वर्गेच्छा. ५ ईश्वराला. ६ मिसळावें. ७ हालाहल नांवाचें विष. ८ उत्पन्न झालेला. ९ सकामपणानें. १० श्रमानें. ११ संपादावें. १२ इच्छावा. १३ अज्ञानी. १४ स्वयंपाक करणारी. १५ पाकनिष्पत्ति. १६ चांगलो. १७ अविचारी. १८ गमावतात. १९ वेदांतील अर्थवादांत मग्न झालेल्यांच्या. २० वेष्टित. २१ अन्य. २२ कदाचित् मन आईल, पण अगदीं जाऊं देऊं नको. २३ टाक. २४ अहंममता. २५ अंतःकरणांत. २६ विसरूं नको. २७ अनेक. २८ सुचविले. २९ घ्यावें. ३० सूर्य. ३१ तितकेही. ३२ चालले जातात. ३३ जलमय. ३४ इच्छेपुरतें. ३५ विचार करितात. ३६ इच्छित. ३७ नाश न पावणारें. ३८ विचार केला. ३९ कर्तव्यकर्म. ४० कर्मजन्य फलाविषयीं. ४१ आवडी. ४२ निषिद्धकर्मीं, काम्यकर्मीं. ४३ सत्कर्म. ४४ कारणाविण, निष्काम.

तूं योगयुक्त होउनी । फळाचा संगु टाकुनी । मग अर्जुना चित्त देउनी । करीं कर्में ६७ परी आदरिलें कर्म दैवें । जरी समाप्तीतें पावे । तरी विशेषें तेथ तोषावें । हेंही नको ६८ कीं निमित्तें कोणे एके । तें सिद्धी न वचेत ठाके । तरी तेथिंचेनि अपरितोखें । क्षोभावें ना ६९ आचरतां सिद्धी गेलें । तरी कांजाची कीरें आलें । परी ठेलियांही सगुण जहालें । ऐसेंचि मानीं २७० देखें जेतुलालें कर्म निपजे । तेतुलें आदिपुरुषीं अर्पिजे । तरी परिपूर्ण सहजें । जहालें जाणें ७१ देखें सतासतकर्मीं । हें जें सरिसेंपण मनोधर्मीं । तेंचि योगस्थिति उत्तमीं । प्रशंसिजे ७२

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥
बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते । तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०॥

अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें । जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ७३ तो बुद्धियोग विचारितां । बहुतें पाडें पार्था । दिसे हा अरौता । कर्मयोगु ७४ परी तेंचि कर्म आचारिजे । तरींच हा योगु पाविजे । जें कर्मशेष सहजें । योगस्थिति ७५ म्हणोनि बुद्धियोगु सधरु । तेथ अर्जुना होईं स्थिरु । मनें करीं अव्हेरु । फळहेतूचा ७६ जे बुद्धियोगा योजिले । तेचि पारंगत जाहले । ईहीं उभयबंधीं सांडिले । पापपुण्यीं ७७

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः । जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ ५१ ॥

ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती । आणि यातायाति लोपती । अर्जुना तयां ७८ मग निरामयभरित । पावती पद अच्युत । ते बुद्धियोगयुक्त । धनुर्धरा ७९

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति । तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

तूं ऐसा तैं होसी । जैं मोहातें येया सांडिसी । आणि वैराग्य मानसीं । संचरेल २८० मग निष्कळंक गहन । उपजेल आत्मज्ञान । तेणें निचोड होईल मन । अपैसें तुझें ८१ तेथ आणिक कांहीं जाणावें । कां मागिलातें स्मरावें । हें अर्जुना आघवें । पारुषेल ८२

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला । समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

इंद्रियांचिया संगति । जियें पसरु होतसे मति । ते स्थिर होईल मागुति । आत्मस्वरूपीं ८३ समाधिसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ । तैं पावसी तूं सकळ । योगस्थिति ८४

अर्जुना, तूं योगयुक्त होऊन फलाची इच्छा टाकून मन लावून कर्म कर. ६७ परंतु आरंभिलेलें कर्म दैवयोगानें पूर्ण झालें तरी त्याचा संतोष मानूं नको; ६८ किंवा कोणत्याही कारणानें तें कर्म सिद्धीस न जातां तसेंच राहिलें, तरी त्याबद्दल मनांत असंतोष मानून आसूं नको. ६९ कर्म करतांना जर शेवटास गेलें, तर तें खरोखर उपयोगालाच आलें; परंतु कदाचित् विघ्न येऊन अपुरें राहिलें, तरीही बरेंच झालें, असें समज. २७० कारण, असें पहा–जेवढें कर्म घडेल तेवढें ईश्वराला अर्पण करावें, म्हणजे सहजरीत्या पूर्ण झालें असें समज. ७१ आणखी असें पहा कीं, चांगल्या व वाईट कर्मांचे ठिकाणी मनोधर्म सारखा राहणें हीच योगस्थिति, असें उत्तम लोक म्हणतात. ७२

**अन्वयार्थ**—(हे धनंजय)–हे धनंजया !–(बुद्धियोगात्)–या समत्वबुद्धियुक्त कर्माहून किंवा ज्ञानयोगाहून–(कर्म)–फलाच्या इच्छेनें केलेलें कर्म–(दूरेण हि)–फारच–(अवरं)–निकृष्ट आहे.–(अतः)–यास्तव–(बुद्धौ)–बुद्धींत–ज्ञानांत–(शरणं अन्विच्छ)–आश्रय मिळविण्याची इच्छा कर, परमार्थज्ञान–शरण हो. कारण–(फलहेतवः)–फलाच्या तृष्णेनें कर्मफलाचे हेतु होणारे कर्मठ–(कृपणाः)–कृपण–अज्ञ आहेत.–(बुद्धियुक्तः)–ज्ञानयुक्त पुरुष–ज्ञानी–(इह)–या लोकीं–(सुकृतदुष्कृते उभे–) पुण्य व पाप हीं दोन्हीं–(जहाति)–सोडतो.–(तस्मात्)–म्हणून–(योगाय)–समत्वरूप योगाला–(युज्यस्व)–तूं तयार हो. समत्वरूप योगामध्यें स्थित होऊन, ज्ञानप्राप्तीसाठीं कर्मे कर, कारण–(योगः)–सिद्धि व असिद्धि यांना सम मानणें, हा योग–(कर्मसु)–कर्मांतील–(कौशलं)–कुशलता आहे. ४९–५०

अर्जुना, चित्ताची जी समता तेंच योगाचें सार आहे असें तूं समज. ज्या समतेंत मन ( क्रिया ) व बुद्धि ( ज्ञान ) यांचें ऐक्य असतें, ७३ पार्था, त्या बुद्धियोगाविषयीं विचार करूं लागलें असतां हा कर्मयोग पुष्कळ प्रमाणानें कमी योग्यतेचा दिसतो. ७४ परंतु त्या कर्माचेंच आचरण केलें, तरच हा बुद्धियोग साध्य होतो; कारण कर्माची जी उत्तरावस्था तीच स्वाभाविक योगस्थिति होय. ७५ म्हणून, अर्जुना, बुद्धियोगच श्रेष्ठ आहे, आणि त्याचेंच ठिकाणीं तूं निश्चल हो; परंतु मनांत फलप्राप्तीची आशा करूं नको. ७६ ज्यांची बुद्धियोगाकडे प्रवृत्ति झाली, तेच पार पडतात; आणि पाप व पुण्य या दोहोंच्या बंधनांतून सुटतात. ७७

**अन्वयार्थ**—(हि)–कारण–(बुद्धियुक्ताः मनीषिणः)–ज्ञानानें युक्त असलेले विद्वान्–(कर्मजं फलं त्यक्त्वा)–कर्मापासून उत्पन्न होणारें सुख-दुःखस्वरूप फल टाकून–(जन्मबन्धविनिर्मुक्ताः) [सन्तः]–जन्मरूप बंधापासून सर्वथा मुक्त होत्साते–(अनामयं पदं)–सर्व उपद्रवरहित पदाला–विष्णूच्या परम पदाला–(गच्छन्ति)–प्राप्त होतात. ५१.

अर्जुना, त्यांनी जरी कर्मे केलीं, तरी ते कर्मांच्या फलांची इच्छा धरीत नाहींत, म्हणून त्यांच्या जन्ममरणाच्या यातायाती संपतात, म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडत नाहींत. ७८ धनुर्धरा, मग बुद्धियोगयुक्त होऊन ब्रह्मानंदानें भरलेलें अविनाशी असें पद ते पावतात. ७९

**अन्वयार्थ**—(यदा)–ज्यावेळीं–(ते बुद्धिः)–तुझी बुद्धि–(मोहकलिलं)–मोहरूपी मलास–(व्यतितरिष्यति)–उल्लंघन करील–(तदा)–त्या वेळीं–(श्रोतव्यस्य च श्रुतस्य)–श्रवण करण्यास योग्य व श्रवण केलेलें शास्त्रादिक यांच्या–(निर्वेदं)–वैराग्यास–(गन्तासि)–प्राप्त होशील. ५२

जेव्हां तूं ह्या मोहाचा त्याग करशील, आणि तुझ्या मनांत वैराग्य संचार करील, तेव्हां तूं बुद्धियोगयुक्त होशील. २८० त्या योगानें निर्दोष आणि गहन असें आत्मज्ञान उत्पन्न होऊन तुझें अंतःकरण सर्व प्रकारें निरिच्छ होईल. ८१ त्या अवस्थेंत आणखी कांहीं ज्ञान मिळवावें, किंवा पूर्वी झालेलें ज्ञान आठवावें, हें सर्व थांबेल. ८२

**अन्वयार्थ**—( श्रुतिविप्रतिपन्ना )–अनेक सांध्य-साधन-संबंध दाखविणाऱ्या श्रवणांनीं विक्षिप्त झालेली–(ते बुद्धिः)–तुझी बुद्धि–(यदा निश्चला सती)–जेव्हां विक्षेपरहित होऊन व–(अचला)–त्यांतूनही विकल्परहित होऊन–(समाधौ)–आत्म्यामध्यें–(स्थास्यति)–स्थिर होईल–(तदा)–त्यावेळीं–(योगं)–खऱ्या–मुख्य योगाला–(अवाप्स्यसि)–तूं प्राप्त होशील. ५३.

इंद्रियांच्या संगतीनें जी बुद्धि चंचल होत असते ती मग आत्मस्वरूपीं स्थिर होईल. ८३ समाधिसुखाचे ठिकाणीं जेव्हां तुझी बुद्धि स्थिर होईल, तेव्हांच तुला सर्व योगस्थिति साधेल. ८४

१ आशा. २ आरंभिलेलें. ३ संतोषावें. ४ जातां. ५ राहे. ६ असंतोषानें. ७ त्रासूं नये. ८ कार्यास, उपयोगास. ९ निश्चयेंकरून. १० राहिलें असतांहि. ११ सफल. १२ जेवढें. १३ उत्पन्न होतें. १४ तेवढें. १५ ईश्वरा. १६ बरें वाईट. १७ सारखेपणा. १८ समता. १९ आहे. २० विचार करितां. २१ पुष्कळ मानानें. २२ कमी योग्यतेचा. २३ बुद्धियोग. २४ कर्माचा शेवट, कर्मोत्तरस्थिति. २५ चखट, श्रेष्ठ. २६ निरसकार. २७ उक्त झाले. २८ पार. २९ यांनीं. ३० शिवत. नाहींत, ३१ जन्ममरणादि येरझारा, ३२ ब्रह्मानंदभरित. ३३ अविनाशी. ३४ तेव्हां. ३५ ह्या. ३६ शिरेल. ३७ निर्दोष. ३८ खोल. ३९ निरिच्छ. ४० आपोआप. ४१ सर्व. ४२ राहील, थांबेल. ४३ जी. ४४ विस्तार होतो. ४५ पुन्हां.

अर्जुन उवाचः—

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव । स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥

तेथ अर्जुन म्हणे देवा । हाचि अभिप्रावो आघवा । मी पुसेन आतां सांगावा । कृपानिधी ८५ मग अच्युत म्हणे सुखें । जें किरीटी तुज निकें[1] । तें पूस पां उन्मेखें[2] । मनाचेनि ८६ या बोला पार्थे । म्हणितलें सांग पां श्रीकृष्णातें । काय म्हणिपे[3] स्थितप्रज्ञातें[4] । बोळखों केवीं ८७ आणि स्थिरबुद्धि जो म्हणिजे[5] । तो कैसिया[6] चिन्हीं जाणिजे । जो समाधिसुख भुंजे[7] । अखंडित ८८ तो कवणें स्थिती असे । कैसेनि रूपीं विलसे[8] । देवा सांगावें हें ऐसें । लक्ष्मीपती ८९ तंव परब्रह्म अवतरणु । जो षड्गुणाधिकारणु[9] । तो काय तेथ नारायणु । बोलतु असे ९०

श्रीभगवानुवाचः—

प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् । आत्मन्येवाऽऽत्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥

म्हणे अर्जुना परियेसीं[10] । जो हा अभिलाषु[11] प्रौढ[12] मानसीं । तो अंतराय[13] स्वसुखेंसी[14] । करीत असे ९१ जो सर्वदा नित्यतृप्तु । अंतःकरण भरितु । परी विषयामाजि पतितु । जेणें संगें कीजे ९२ तो कामु[15] सर्वथा जाये । जयाचें आत्मतोषीं मन राहे । तोचि स्थितप्रज्ञु होये । पुरुष जाणे ९३

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥

नाना दुःखीं प्राप्ती[16] । जयासी उद्वेगु[17] नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया आर्ती[18] । अंडपेना[19] ९४ अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोधु सहजें नाहीं । आणि भयातें नेणें कैंहीं[20] । परिपूर्णु तो ९५ ऐसा जो निरवधि[21] । तो जाण पां स्थिरबुद्धि । जो निरसूनि[22] उपाधि[23] । भेदरहितु ९६

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् । नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥

जो सर्वत्र सदा सरिसा[24] । परिपूर्ण चंद्रु कां जैसा । अधमोत्तम[25] प्रकाशा- । माजीं न म्हणे[25] ९७ ऐसी अनवच्छिन्न[26] समता । भूतमात्रीं[27] सदयता । आणि पालटु नाहीं चित्ता । कवणे वेळे ९८ गोमटें[28] कांहीं पावे । तरी संतोषें तेणें नाभिभवे[29] । जो ओखटेनि[30] नागवे[31] । विषादासी[32] ९९ ऐसा हरिखशोकरहितु[33] । जो आत्मबोधभरितु । तो जाण पां प्रज्ञायुक्तु[34] । धनुर्धरा ३००

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः । इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

कां कूर्मांचियेपरी[35] । उवाइला[36] अवेव[37] पसरी । ना तरी इच्छावशें आवरी । आपुले आपण १ तैसीं इंद्रियें आपैतीं[38] होतीं । जयाचें म्हणितलें[39] करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिति । पातली असे २

**अन्वयार्थ**–(हे केशव)–हे केशवा!–(समाधिस्थस्य स्थित-प्रज्ञस्य)–समाधिस्त–आत्मनिष्ठ स्थितप्रज्ञाचें–(भाषा)–लक्षण–(का)–काय आहे ?–(स्थितधीः)–स्थितप्रज्ञ–(किं प्रभाषेत)–काय बोलतो,–(किं आसीत)–तो कसा राहतो ?–(किं व्रजेत)–व व्यवहार कसा करितो? ५४

त्या वेळीं अर्जुन म्हणाला––श्रीकृष्णा, कृपानिधे, ह्याजबद्दलचा खुलासा मी जो विचारीन, तो कृपा करून मला सांगा. ८५ मग श्रीकृष्ण म्हणतात––"अर्जुना जें तुला संतोषित मनानें योग्य वाटेल तें खुशाल विचार." ८६ असें म्हटल्यावर अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, " स्थितप्रज्ञ (ज्यांची बुद्धि स्थिर आहे तो ) कोणाला म्हणावें, व तो ओळखावा कसा, हें उघड करून सांगा. ८७ ज्याला स्थिरबुद्धि म्हणतात, व जो निरंतर समाधिसुख भोगतो, तो कोणत्या चिन्हांनीं ओळखावा ? ८८ देवा, लक्ष्मीपते, तो कोणत्या स्थितींत असतो, व कोणत्या रूपानें वर्तन करतो, हें कृपा करून मला सांगा." ८९ तेव्हां षड्गुणैश्वर्यसंपन्न, सर्व गुणांचें अधिष्ठान व परब्रह्मावतार असे भगवान् श्रीकृष्ण बोलूं लागले. ९०

**अन्वयार्थ**––(हे पार्थ)–हे पार्था !–(यदा)–जेव्हां–(मनोगतान् सर्वान् कामान्)–मनांतील सर्व कामांस–(प्रजहाति)–सर्वथा सोडतो, आणि–(आत्मनि एव)–आत्म्यामध्येंच–(आत्मना तुष्टः)–आत्मस्वरूपानेंच संतुष्ट झालेला असतो–(तदा)–त्यावेळीं–(स्थितप्रज्ञः)–तो स्थितप्रज्ञ–(उच्यते)–म्हटला जातो.

श्रीभगवान म्हणतातः––अर्जुना,एक. मनांतील जी बलवत्तर तृष्णा, ती आत्मसुखाला विघ्न करीत असते. ९१ जो सर्वदा तृप्त असून ज्याचें अंतःकरण आत्मज्ञानानें भरलेलें आहे; पण ज्याच्या संगतीनें पुरुष विषयासक्त होतो, ९२ त्या कामाची ज्याच्या मनांतून पूर्ण निवृत्ति होऊन ज्याचें मन आत्मसंतोषांत म्हणजे स्वानंदांत रममाण असतें, तोच पुरुष स्थितप्रज्ञ–स्थिरबुद्धी असें जाणावें. ९३

**अन्वयार्थ**––( दुःखेषु अनुद्विग्नमनाः )–अध्यात्मिकादि दुःखें प्राप्त झालीं असतां ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं,–(सुखेषु)–नानाप्रकारचीं सुखें प्राप्त झालीं असतां–(विगतस्पृहः)–त्यांविषयींची ज्याची इच्छा गेलेली आहे म्ह०त्याविषयीं जो निरिच्छ असतो,–(वीतरागभयक्रोधः)–ज्याचे राग–प्रीति, भय व क्रोध निवृत्त झालेले असतात तो–(स्थितधीः)–स्थितप्रज्ञ–(मुनिः)–मुनि–(उच्यते)–म्हटला जातो. ५६

नानाप्रकारचीं दुःखें प्राप्त झालीं असतां ज्याच्या मनांत त्रास उत्पन्न होत नाहीं, आणि जो सुखाच्या इच्छेमध्यें अडकून रहात नाहीं; ९४ अर्जुना, त्या सत्पुरुषाचें अंतःकरणांतून कामक्रोध सहज नाहींतसे झालेले असतात, व त्या पूर्णावस्थेस पोहोंचलेल्या पुरुषास भयाचें नांव देखील माहीत नसतें; ९५ अशा प्रकारें संसार सोडून देऊन जो केवळ भेदरहित झालेला असतो तोच पुरुष केवळ स्थिरबुद्धि असें समजावें. ९६

**अन्वयार्थ**––(यः)–जो–(सर्वत्र)–देहजीवितादिकोंविषयींही–(अनभिस्नेहः)–प्रीति नसलेला,–(तत् तत् शुभाशुभं प्राप्य)–तें तें शुभ व अशुभ यांस प्राप्त होऊन–(न अभिनन्दति न द्वेष्टि)–अभिनंदन करीत नाहीं व द्वेष करीत नाहीं–(तस्य प्रज्ञा)–त्याची प्रज्ञा–त्याची बुद्धि–(प्रतिष्ठिता)–प्रतिष्ठित आहे. ५७

पौर्णिमेचा चंद्र जसा चांगल्या किंवा वाईट लोकांस सारखा प्रकाश देतो, तसा जो सर्वांशीं सदैव सारखें वर्तन ठेवितो;९७त्याप्रमाणेंच अखंड समता आणि प्राणिमात्राविषयीं सदयता असून ज्याच्या चित्ताची स्थिति कधींही पालटत नाहीं, ९८ कांहीं चांगलें प्राप्त झालें तरी त्याच्या संतोषानें ज्याला गर्व होत नाहीं व वाईट गोष्टीपासून ज्याला दुःख होत नाहीं, ९९ असा जो हर्षशोकरहित असून नेहमीं आत्मविचारांत निमग्न असतो, तोच, अर्जुना स्थिरबुद्धी असें जाण. २००

**अन्वयार्थ**––(कूर्मः)–कांसव–(अंगानि इव)–आपले अवयव जसे एकदम आवरून घेतो तसा–(अयं)–हा पुरुष–(यदा)–जेव्हां–(इन्द्रियार्थेभ्यः)–विषयांपासून–( इंद्रियाणि )–इंद्रियें–(सर्वशः)–सर्व प्रकारें–(संहरते)–परतवून घेतो–(तदा)–तेव्हां–(तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता)–त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित झाली आहे. ५८

किंवा, कांसव आनंदांत असतां आपले हातपाय पसरतें अथवा वाटेल तेव्हां आपले आपण आंवरून धरतें; १ त्याप्रमाणें, ज्याचीं इंद्रियें स्वाधीन होऊन त्याच्या इच्छेप्रमाणें वागतात त्याची बुद्धि स्थिरता पावली असें समज. २

---

१ चांगलें. २ संतोषानें. ३ वर्णावें, म्हणावें. ४ स्थीर बुध्दी. ५ म्हटला जातो, म्हणावा. ६ भोगतो. ७ शोभतो, वर्ततो. ८ परब्रह्माचा अवतार. ९ यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, आणि ऐश्वर्य ह्या सहा गुणांचें स्थान. १० एक. ११ इच्छा. १२ प्रबल, मोठा. १३ विघ्न. १४ आत्मसुखाला, १५ इच्छा. १६ प्राप्त झाली असतां. १७ त्रास १८ अडकला. १९ अडचणींत पडत नाहीं, गुंतत नाहीं २० कधीं. २१ केवळ. २२ सोडून. २३ उपसर्ग, संसार. २४ सारखा. २५ प्रकाश देण्यांत उच्चनीचांना सारखेंच गणतो. २६ अखंड. २७ प्राणीमात्रावर. २८ चांगलें, २९ बेहोष होत नाहीं. ३० वाईटानें. ३१ सांपडत–पावत नाहीं. ३२ दुःखाला. ३३ हर्षशोकरहित. ३४ स्थिरबुध्दीला. ३५ कांसव. ३६ आखडलेला. ३७ अवयव. ३८ स्वाधीन. ३९ म्हटलेलें.

विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः । रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

अर्जुना आणिकही एक । सांगेन ऐकें कवतिक[१] । या विषयांतें साधक[२] । त्यजिती नियमें[३] ३ श्रोत्रादि इंद्रियें आवरिती । परि रसनें[४] नियमु न करिती । ते सहस्रधा[५] कवळिजती[६] । विषयीं इहीं ४ जैसी वरिवरी पालवी खुडीजे । आणि मुळीं उदक घालिजे । तरी कैसेनि नाशु निपजे । तया वृक्षा ५ तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा आडवेनि आंगें फांके । तैसा मानसीं विषो पोखे । रसनाद्वारें[९] ६ येरां[१०] इंद्रियां विषय तुटे । तैसा नियमू[११] न ये रसें[१२] हटे[१३] । जें जीवनें[१४] हें न घटे[१५] । येणेंविण ७ मग अर्जुना स्वभावें । ऐसिही नियमातें पावे । जैं परब्रह्म अनुभवें । होऊनि जाइजे ८ तैं शरीरभाव[१६] नासती । इंद्रियें विषय विसरती । जैं सोहंभा[१७]वप्रतीति । प्रगट होय ९

यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः । इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥

येऱ्हवीं तरी अर्जुना । हें आया[१८] नये साधना । जे राहटताती[१९] जतना[२०] । निरंतर ३१० जयातें अभ्यासाची धेरटी[२१] । यमनियमांची[२२] तांटी[२३] । जे मनातें सदां मुठी । धरूनि आहाती[२४] ११ तेही[२५] किजती[२६] कासाविसी[२७] । या इंद्रियांची प्रौढी[२८] ऐसी । जैसी मंत्रज्ञातें विवसी[२९] । भुलवी कां १२ देखें विषय हे तैसे । पावती ऋद्धिसिद्धीचेनि मिषें । मग आकळिती स्पर्शें । इंद्रियांचेनी १३ तिये संधी मन जाये । मग अभ्यासीं ठोटावलें[३०] ठाये[३१] । ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें १४

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः । वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

म्हणोनि आइकें पार्था । यांतें निर्दळी जो सर्वथा । सर्व विषयीं आस्था । सांडूनियां १५ तोचि तूं जाण । योगनिष्ठेसी कारण । जयाचें विषयसुखें अंतःकरण । झकवेना[३२] १६ जो आत्मबोधयुक्तु । होऊनि असे सततु । जो मातें हृदयाआंतु । विसंबेना[३३] १७ एऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं । परी मानसीं होईल जरी कांयी । तरी साद्यंतुंचि[३४] पाहीं । संसारु असे १८ जैसा कां विषाचा लेशु[३५] । घेतलिया होय बहुवसु । मग निभ्रांत करी नाशु । जीवितासि १९ तैसी विषयाची शंका । मनीं वसती देखा । घातु करी अशेखा[३६] । विवेकजाता[३७] ३२०

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥

जरी हृदयीं विषय स्मरती । तरी निसंगाही आपजे[३८] संगती । संगें प्रगटे मूर्ति । अभिलाषाची[३९] २१ जेथ कामु उपजला । तेथ क्रोधु आधींचि आला ।

**अन्वयार्थ**–(निराहारस्य)–जो विषयांनीं हरण करूं शकत नाहीं, अनुभव घेऊं शकत नाहीं, अशा उपाशी किंवा अशक्त–(देहिनः)–प्राण्यापासूनहीं–(विषयाः)–शब्द-स्पर्शादि विषय–(रसवर्जं)–प्रीतीवांचून–(विनिवर्तन्ते)–निवृत्त होतात. [विषयासक्तीसह निवृत्त होत नाहीत.]–(अस्य)–या स्थितप्रज्ञाचा–(रसः अपि)–तो विषयासक्तीरूप रसहीं–(परं दृष्ट्वा)–परमार्थतत्त्वाचा अनुभव घेऊन–(निवर्तते)–निवृत्त होतो. ५९

अर्जुना, आणखी एक मौजेची गोष्ट तुला सांगतों, ऐक. जे साधक या विषयांचा नियमानें त्याग करितात, ३ श्रोत्रादि इंद्रियांचें आकलन करितात, परंतु जिव्हेचा मात्र निग्रह करीत नाहींत, ते ह्या विषयांकडून अनेक प्रकारें वेढले जातात. ४ एखाद्या वृक्षाचे वरचे वरचे शेंडे खुडले आणि मुळाशीं पाणी घातलें तर त्या वृक्षाचा नाश कसा होईल? ५ तो जसा उदकाच्या बळानें अधिकच आडवा फुटतो, त्याप्रमाणें ह्या रसनेच्या द्वारें अंतःकरणांत विषय अधिकाधिकच पुष्ट होतात, ६ इतर विषयांचे विषय कमी केले असतां कमी होतात; पण त्याच प्रमाणानें जिव्हेचा विषय हट्टानें कमी करतां येत नाहीं; कारण, यावांचून शरीर जिवंतच राहूं शकत नाहीं. ७ परंतु, अर्जुना, जेव्हां साधक स्वानुभवानें परब्रह्म होऊन जातो, तेव्हां रसनेचेंही (रसना शब्दानें उपलक्षित वासना) सहज नियमन होऊं शकतें. ८ ज्या वेळीं, आपण ब्रह्म आहों असा मनुष्यास अनुभव येतो, त्या वेळीं शरीराचे व्यवहार बाधित (दृढ मिथ्यात्वनिश्चय) होऊन इंद्रियें विषयांना विसरून जातात. ९

**अन्वयार्थ**–(हि)–कारण–(हे कौन्तेय)–हे कुंतिपुत्रा!–(यततःअपि)–यत्न करणाऱ्याही–(विपश्चितः पुरुषस्य)–बुद्धिमान् पुरुषाचें–(प्रमाथीनि इन्द्रियाणि)–व्याकुळ करणारीं इंद्रियें –(मनः)–त्याच्या मनाला–(प्रसभं)–बलात्कारानें–(हरन्ति)–हरण करितात. ६०

एरवीं, अर्जुना, इंद्रियांना जिंकल्यावद्दल जे निरंतर यत्न करतात, त्यांच्या देखील हीं आधीन होत नाहींत. २१० जो आपल्या भोंवती अभ्यासाचें धरणें करून नियमांची तटी करितो, आणि मन सदा मुठींत वाळगतो, ११ त्याला मुद्दां हीं इंद्रियें व्याकुळ करून टाकतात, असा या इंद्रियांचा प्रताप आहे. ज्याप्रमाणें मांत्रिकाला जखीण भुलवून टाकते, १२ त्याप्रमाणें हे विषय ऋद्धिसिद्धींच्या रूपानें योग्याला प्राप्त होऊन इंद्रियद्वारां योग्याचें मन भ्रष्ट करतात. १३ अशा संधींत जर मन सांपडलें तर अभ्यास जागच्या जागीं राहतो, अशी ह्या इंद्रियांची मोठी शक्ति आहे! १४

**अन्वयार्थ**–(तानि सर्वाणि)–त्या सर्व इंद्रियांचें–(संयम्य)–संयमन करून–त्यांना आपल्या वश ठेऊन–(युक्तः)–शांतचित्त व–(मत्परः)–मीच ज्याला श्रेष्ठ आहें, दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं, असें होऊन–(आसीत)–रहावें.–(हि)–कारण–(इन्द्रियाणी)–इंद्रियें–(यस्य)–ज्याच्या–(वशे)–अधीन असतात–(तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता)–त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित असते. ६१

म्हणून, पार्था, सर्व विषयांची इच्छा सोडून इंद्रियांना जो स्वाधीन ठेवतो, १५ व ज्याचें अंतःकरण विषयाच्या सुखानें भुलून जात नाहीं, तोच योगनिष्ठा प्राप्त होण्यास योग्य आहे, असें जाण. १६ कारण, तो नेहमीं आत्मबोधानें युक्त होऊन राहतो, व अंतःकरणांत मला कधीं विसरत नाहीं. १७ एरवीं, शब्दादि विषयांचा स्वीकार तर करीत नाहीं, पण मनांत जर विषयांची थोडीशीही वासना असेल तर त्याला आरंभापासून शेवटपर्यंत सर्व संसार आहे असें समज. १८ विष हें सेवन करतेवेळीं जरी थोडें असलें तरी तें शरीरांत पसरून जीवाचा निःसंशय नाश करितें, १९ त्याप्रमाणें मनांत विषयाची थोडी जरी इच्छा राहिली, तरी ती सर्व विचारसमूहाचा घात करिते! २२०

**अन्वयार्थ**––(विषयान् ध्यायतः पुंसः)–विषयांचें ध्यान–चिंतन करणाऱ्या पुरुषाचें–(तेषु)–त्या विषयांचे ठिकाणीं –(सङ्गः)–प्रीति–आसक्ति–(उपजायते)–उत्पन्न होते.–(सङ्गात्)–आसक्तीमुळें–(कामः)–विषयाविषयींची इच्छा–(सञ्जायते)–उत्पन्न होते.–(कामात्)–विषयेच्छेपासून–(क्रोधः)–क्रोध–(अभिजायते)–उत्पन्न होतो–(क्रोधात्)–क्रोधापासून–(सम्मोहः) –अविवेक–(भवति)–होतो–(सम्मोहात्)–कार्य व अकार्य यांच्या अविवेकामुळे–(स्मृतिविभ्रमः)–स्मृतिभ्रंश होतो. शास्त्रादिकांच्या उपदेशाची आठवण नाहींशी होते.–(स्मृतिभ्रंशात्)–आठवणच नाहींशी झाल्यामुळें–(बुद्धिनाशः)–बुद्धीचा नाश होतो. व–(बुद्धिनाशात्)–बुद्धीचा नाश झाल्यामुळें–(प्रणश्यति)–पुरुष नाश पावतो. तो पुरुषार्थाला योग्य होत नाहीं.

अंतःकरणांत विषयांची नुसती आठवण झाली तरी विरक्तालाही त्याच्या प्राप्तीविषयीं मूर्तिमंत इच्छा म्हणजे काम उत्पन्न होतो. २१ जेथें काम उत्पन्न झाला तेथें त्यापूर्वीं आधीं क्रोधही पण आलाच, व क्रोधामध्यें

१ नवल, कौतुक. २ योगसाधन करणारे मुमुक्षु. ३ नियमन करून, दमन करून. ४ जिभेचा. ५ हजारों प्रकारांनीं. ६ वेढले जातात. ७ खुडावी, छेदावी. ८ विस्तारतो. ९ जिव्हेच्या द्वारें. १० इतर. ११ निग्रह होत नाहीं. १२ अन्नरस. १३ आग्रहानें, हट्टानें. १४ जीवित. १५ घडत नाहीं. १६ व्यवहार बंद होतात. १७ आपणच ब्रह्म आहों असा अनुभव. १८ स्वाधीन होत नाहीं; आटोक्यांत येत नाहीं. १९ वागतात, यत्न करितात. २० जतन करण्यास. २१ झोपडी, पर्णकुटिका. २२ अंतःकरण व इंद्रियें यांचें शमन. २३ सोपवाला केलेल्या, दाराचें झांकण, ताटी. २४ आहेत. २५ योगाभ्यासीही. २६ केले जातात. २७ व्याकुळ. २८ महत्व, बळ. २९ भूत, पिशाच, जखीण. ३० निर्बल होऊन रहातें, स्तब्ध रहातें. ३१ संहारी. ३२ फसत नाहीं. ३३ विसरत नाहीं. ३४ आरंभापासून शेवटपर्यंत सर्व. ३५ अल्पस्वल्प कण. ३६ निःशेष. ३७ विचारसमूह. ३८ उपजे, उत्पन्न होणें. ३९ धन मिळविण्याची इच्छा.

क्रोधीं असे ठेविला । संमोहें जाणें २२ संमोहा जालिया व्यक्ति । तरी नाशु पावे स्मृति । चंडवातें ज्योति । आहत जैसी २३ कां अस्तमानीं निशीं । जैसा सूर्य तेजातें ग्रासी । तैसी दशा स्मृतिभ्रंशीं । प्राणियासी २४ मग अज्ञानांध केवळ । तेणें आप्लविजे सकळ । तेथ बुद्धि होय व्याकुळ । हृदयामाजीं २५ जैसें जात्यंधा पळणीं पावे । मग तें काकुळती सैरीं धांवे । तैसें बुद्धीसि होती भंवे । धनुर्धरा २६ ऐसा स्मृतिभ्रंशु घडे । मग सर्वथा बुद्धि अवघडे । तेथ समूळ हें उपडे । ज्ञानजात २७ चैतन्याच्या भ्रंशीं । शरिरा दशा जैशी । तैसें पुरुषा बुद्धिनाशीं । होय देखें २८ म्हणोनि आइकें अर्जुना । जैसा विस्फुलिंग लागे इंधनां । मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना । पुरों शके २९ तैसें विषयांचें ध्यान । जरी विपायें वाहे मन । तरी येसणें हें पतन । गिंवसित पावे ३३०

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् । आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे । मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ३१ पार्था आणिकही एक । जरी नाशले रागद्वेष । तरी इंद्रियां विषयीं बाधक । रमतां नाहीं ३२ जैसा सूर्य आकाशगतु । रश्मिकरें जगातें स्पर्शतु । तरी संगदोषें काय लिंपेतु । तेथिचेनि ३३ तैसा इंद्रियार्थीं उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न । जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ३४ तरी विषयांतही कांहीं । आपणपेंवांचूनि नाहीं । मग विषय कवण कायी । बाधितील कवणा ३५ जरी उदकीं उदक बुडिजे । कां अग्नि आगी पोळिजे । तरी विषयसंगें आप्लविजे । परिपूर्णु तो ३६ ऐसा आपणचि केवळु । होऊनि असे निखळु । तयाचि प्रज्ञा अचळु । निभ्रांत मानीं ३७

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते । प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता । तेथ रिगणें नाहीं समस्तां । संसारदुःखां ३८ जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु । तया क्षुधेतृषेचा अडदरु । कहींचि नाहीं ३९ तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें कें आहे । तेथ आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ३४० जैसा निर्वातींचा दीपु । सर्वथा नेणें कंपु । तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु । योगयुक्तु ४१

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चाऽयुक्तस्य भावना । न चाभावयतः शांतिरशान्तस्य कुतः सुखम् ॥६६॥

ये युक्तीचि । कडसणी । नाहीं जयाच्या अंतःकरणीं । तो आकळिला जाण

अविचार आपला ठेविलेलाच आहे असें जाण ! ३२२ ज्याप्रमाणें दिव्याची ज्योत प्रचंड वाऱ्यानें नाहींशी होते, त्याचप्रमाणें अविचारामुळें स्मृति म्हणजे आत्मज्ञान नाश पावतें. २३ संध्याकाळ होतांच रात्र जशी सूर्यतेजाला गिळून टाकते, त्याप्रमाणें स्मृतीचा भ्रंश झाल्यावर मनुष्यांची तशी दशा होते. २४ मग अज्ञानामुळें त्याची बुद्धि केवळ आंधळी होऊन तो सर्व गोष्टींस आंचवतो, आणि त्याला कांहीं सुचेनासें होतें. २५ जन्मांधाला पळण्याचा प्रसंग आल्यावर तो जसा दीन होऊन सैरावैरा धावूं लागतो, त्याप्रमाणें अर्जुना, बुद्धीला भ्रमण होतें. २६ अशा रीतीनें बुद्धीला भ्रंश झाला म्हणजे बुद्धि घोंटाळ्यांत पडते, आणि मग सर्व ज्ञान नष्ट होतें. २७ शरीरांतील प्राण निघून गेला म्हणजे जसा देह प्रेतरूपी होतो, त्याप्रमाणें बुद्धि नष्ट झाल्यावर जीवाची स्थिति होते असें जाण. २८ म्हणून, अर्जुना, एकः–इंधनाला ठिणगी लागून ती भडकली म्हणजे जशी त्रिभुवनाला देखील पुरेल, २९ त्याप्रमाणें अंतःकरणांत यत्किंचित् जरी विषयांचें स्मरण झालें, तरी एवढा हा अनर्थ ओढवतो ! ३३०

**अन्वयार्थ**—(तु)–परंतु–(रागद्वेषवियुक्तैः)–राग-द्वेषरहित–(आत्मवश्यैः)–व आपल्या वश असलेल्या–(इन्द्रियैः)–इंद्रियांनीं–(विषयान्)–विषयांचा–(चरन्)–अनुभव घेणारा–(विधेयात्मा)–ज्याच्या इच्छेप्रमाणें चालणारें अन्तःकरण असतें असा–(प्रसादं)–चित्ताच्या स्वास्थ्यास–(अधिगच्छति)–प्राप्त होतो.

म्हणून, मनांतून सर्व विषय काढून टाकावे, म्हणजे राग, प्रीति आणि द्वेष [अप्रीति] हे आपोआप नाहींतसे होतात. ३१ पार्था, आणखी तुला सांगतों की, राग व द्वेष नाहींतसे झाल्यावर जरी इंद्रियें विषयांचे ठिकाणीं रममाण झालीं, तरी ते विषय बाधक होत नाहींत. ३२ ज्याप्रमाणें, आकाशांतून सूर्य हा आपल्या किरणरूपी हातांनीं जगतांतील वस्तूंना स्पर्श करितो, परंतु त्यांच्या संसर्गदोषानें लिप्त होतो की काय ? [ नाहीं ! ] ३३ त्याप्रमाणें जो विषयाचे ठिकाणीं उदासीन, आत्मस्वरूपाचे ठिकाणीं निमग्न व कामक्रोधापासून अलिप्त असतो, ३४ आणि, अर्जुना, जो विषयामध्यें आपल्या स्वरूपाशिवाय दुसरें कांहींच पहात नाहीं, त्याला विषय कसले ? आणि बाधणार तरी कोणाला ? ३५ जर पाण्यांत पाणी बुडेल, किंवा अग्नीनें अग्नि जळेल, तर मात्र तो परिपूर्णत्वास पावलेला पुरुष विषयांचे संगतीनें बुडेल. ३६ अशा प्रकारें जो आपण स्वतःच सर्वरूप होऊन राहतो, तोच अचलप्रज्ञ ( स्थिरबुद्धि ) असें निभ्रांत समज. ३७

**अन्वयार्थ**—(प्रसादे)–चित्तप्रसाद झाला असतां–चित्त स्वस्थ झालें असतां–(अस्य)–याच्या–(सर्वदुःखानां)–सर्व–आध्यात्मिकादि त्रिविध दुःखांची–(हानिः)–हानि–नाश–(उपजायते)–होतो व–(हि)–ज्या अर्थी–(प्रसन्नचेतसः)–ज्याचें चित्त प्रसन्न झालें आहे त्याची–(बुद्धिः)–चित्त–मन–(आशु)–सत्वर–(पर्यवतिष्ठते)–सर्व बाजूंनीं स्थिर होतें त्याअर्थी रागद्वेषरहित इंद्रियांनीं अनिषिद्ध व अगदी अवश्य तितक्याच विषयांचा अनुभव घ्यावा. ६५

असें पहा की, ज्या ठिकाणीं मनाची पूर्ण शांति आहे, तेथें ह्या सर्व संसारदुःखांचा प्रवेश होत नाहीं. ३८ ज्याचें उदरांतच अमृताचा झरा उत्पन्न झाला आहे, त्याला जशी तहानभुकेची कधींच पीडा होत नाहीं, ३९ त्याप्रमाणें, ज्याचें हृदय प्रसन्न आहे, त्याला दुःख कसलें ! आणि तें होणार तरी कोठून ! त्याची बुद्धि आपोआप परमात्मस्वरूपी जडून राहते; ३४० ज्याप्रमाणें, निवाऱ्यांतील दिव्याची ज्योत मुळींच कधींही हालत नाहीं; त्याप्रमाणें जो स्थिरबुद्धि आहे, तो आत्मस्वरूप समाधीमध्यें निश्चलपणें रत असतो. ३४१

**अन्वयार्थ**—(अयुक्तस्य)–ज्याचें चित्त स्थिर झालेलें नसतें त्याला–(बुद्धिः)–आत्म्याविषयींची बुद्धि–(न अस्ति)–नसते,–(च)–व–(अयुक्तस्य)–ज्याचें चित्त स्थिर नसतें त्याला–(भावना)–आत्मज्ञानाविषयींचा अभिमान नसतो. सतत आत्मानुसंधान, 'मीच ब्रह्म' ही बुद्धि नसते.–(च)–आणि–(अभावयतः)–तशी भावना न करणाराला–(शान्तिः)–शांति–चित्ताची स्वस्थता–(नास्ति)–नसते–(अशान्तस्य)–आणि ज्याचें चित्त शांत–स्वस्थ झालेलें नाहीं, त्याला–(सुखं)–सुख–(कुतः)–कोठचें ? ६६

हा योगबुद्धीचा विचार ज्याचे अंतःकरणांत नाहीं, त्याला शब्दादिक विषय आपले पाशांत गोंवून

१ अविचार. २ प्रचंड वाऱ्यानें. ३ नाहींशी होते. ४ रात्र. ५ स्मरण नाहींसें झाल्यावर, विस्मरणानें. ६ बुडवावें, बुडतें. ७ घाबरी, कासावीस. ८ जन्मांधाला. ९ धांवाधांव. १० दीनतेनें. ११ कसें तरी, इवे तिकडे. १२ भ्रमण. १३ घोटाळ्यांत पडते. १४ नाहींसें होतें. १५ जीवाच्या नाशानें. १६ जीवाला. १७ विस्तवाची ठिणगी. १८ जळणाला, लांकडाला. १९ कदाचित्. २० एवढें, अशा प्रकारचें. २१ ग्रासीत येतें, शोधित येतें. २२ मनांतून, मनापासून. २३ इंद्रियाला. २४ किरणरूपी हातांनीं. २५ लिप्त होतो. २६ इंद्रियांनीं ग्राह्य विषयांचे ठायीं. २७ महारस. २८ स्थिरावलेला, स्तब्ध केलेला, परिपूर्ण. २९ कामक्रोधरहित. ३० आपणाशिवाय. ३१ बुडविला जाईल. ३२ सर्व. ३३ बुद्धि. ३४ आहे. ३५ प्रवेश करणें. ३६ झरा. ३७ उदर. ३८ भय. ३९ कोठें. ४० आपोआप. ४१ निवाऱ्यांतला. ४२ आत्मरूप समाधानानें युक्त. ४३ योगयुक्तांची. ४४ विचार.

गुणीं । विषयादिकीं[२] ४२ तया स्थिरबुद्धि पार्था । कहीं[३] नाहीं सर्वथा । आणि स्थैर्याची आस्था । तेही नुपजे ४३ निश्चळत्वाची[४] भावना । जरी नव्हेचि देखें मना । तरी शांति केवीं[५] अर्जुना । आपु[६] होय ४४ जेथ शांतीचा जिव्हाळा[७] नाहीं । तेथ सुख विसरोनि न रिगे कहीं । जैसा पापियाच्या ठायीं । मोक्षु न वसे ४५ देखें अग्निमाजीं घांपती[८] । तियें बीजें जरी विरूढती[९] । तरी अशांता[१०] सुखप्राप्ती । घडों शके ४६ म्हणोनि अयुक्तपण[११] मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें । या कारणें इंद्रियांचें । दमन[१२] निकें ४७

इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते । तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥

इंद्रियें जें जें म्हणती । तें तेंचि जे पुरुष करिती । ते तरलेचि न तरती । विषयसिंधु ४८ जैसी नाव थडिये[१३] ठाकितां । जरी वरपडी[१४] होय दुर्वाता[१५] । तरी चुकलाही मागौतीं[१६] । अपावो[१७] पावे ४९ तैसी प्रांसेंही[१८] पुरुषें । इंद्रियें लाळिलीं[१९] जरी कौतुकें । तरी आक्रमिला[२०] जाण दुःखें । संसारिकें[२१] ३५०

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः । इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६८॥

म्हणोनि आपुलीं आपणपया[२२] । जरी इंद्रियें येती आया[२३] । तरी अधिक कांहीं धनंजया । सार्थक असे ५१ देखें कूर्म जियापरी । उवाइला[२४] अवयव पसरी । ना तरी इच्छावशें आवरी । आपणपेंचि[२५] ५२ तैसीं इंद्रियें अपैतीं[२६] होती । जयाचें म्हणितलें करिती । तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पावली असे ५३ आतां आणिक एक गहन[२७] । पूर्णाचें[२८] चिन्ह । अर्जुना तुज सांगेन । परिसपां ५४

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी । यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥

देखें भूतजात[२९] निदेलें[३०] । तेथेंचि[३१] जया पाहलें[३२] । आणि जीव जेथें[३३] चेइलें[३४] । तेथ निद्रितु जो ५५ तोचि तो निरुपाधि । अर्जुना तो स्थिरबुद्धि । तोचि जाणें निरवधि[३५] । मुनीश्वर ५६

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥७० ॥

पार्था आणीकही परी । तो[३६] जाणों येईल अवधारीं । जैसी अक्षोभता[३७] सागरीं । अखंडित ५७ जऱ्ही सरितोघ[३८] समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत । तऱ्ही अधिक नोहे ईषत्[३९] । मर्यादा न संडी ५८ ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता । परी न्यून नव्हे पार्था । समुद्र जैसा ५९ तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धि । तयासि क्षोभु[४०] नाहीं बुद्धि । आणि न पर्वतां[४१] न बाधी । अधृति[४२] तयातें ३६० सांगें.

तात. ३४२ पार्था, त्याच्या बुद्धीला कधींही स्थि-
ता नसते, व तिचे प्राप्तीविषयीं त्याचे अंतःकरणांत इ-
छाही उत्पन्न होत नाहीं. ४३ अर्जुना, स्थिरपणाची
वना त्याचे अंतःकरणांत मुळींच जर उत्पन्न होत नाही,
र त्याला शांति कशाची प्राप्त होणार ? ४४ पाप्याकडे
क्ष जसा ढुंकूनही पहात नाहीं, त्याप्रमाणें जेथें शांतीचा
ाही नाहीं तेथें सुख हें चुकून देखील जात नाहीं. ४५
पहा, जर विस्तवांत घातलेली धान्याचीं वीजें उगवलीं
च शांतिहीन मनुष्याला सुखप्राप्ती घडूं शकेल. ४६
ून मनाचें नियमन न करणें हेंच दुःखाचें कारण आहे;
करितां इंद्रियनिग्रह अवश्य करावा. ४७

**अन्वयार्थ**—(हि)—कारण—(चरतां इन्द्रियाणां)—आपा-
ा विषयामध्यें प्रवृत्त होणाऱ्या इंद्रियांच्या—(अनु)—मागो-
—( यत् मनः)—जें मन—(विधीयते)—जातें—(तत्)—तें मन-
य)—या साधकाच्या—(प्रज्ञां)—प्रज्ञेला—आत्मा व अनात्मा
ा विवेकापासून उत्पन्न झालेल्या बुध्दीला—(अम्भसि)—
ांत—(वायुः)—वारा—(नावं इव)—नावेला जसा अमार्गानें
 त्याप्रमाणें—(हरति)—हरण करतें. ६७

ा पुरुष इंद्रियांचे इच्छेप्रमाणें वागतात, ते ह्या विषय-
सागरांतून आपण तरलों आहों असें समजत असले
खरेंखर तरत नाहींत, ४८ ज्याप्रमाणें एकादी नाव
ावळ टेंकते न टेंकते तोंच जर वादळ उत्पन्न झालें तर
ून आलेल्या अपायांत फिरुन सांपडते, ४९ त्याप्र-
सिद्ध म्हणजे कृतार्थ होण्याच्या बेतांत आलेल्या पुरु-
तरी कौतुकानें इंद्रियाचें लालन केलें, तरी तो संसार-
नीं व्यापिला जातो असें समज. ३५०

**न्वयार्थ**—(तस्मात्)—म्हणून—(हे महाबाहो)—हे महा-
ी अर्जुना!—(यस्य)—ज्याची—(इन्द्रियाणि)—इंद्रियें—(इ-
र्थेभ्यः)—विषयांपासून—(सर्वशः)—सर्व प्रकारें—(निग्रही-
—निग्रह करून ठेवलेलीं—आंवरून धरलेली असतात—
—त्याची—(प्रज्ञा)—आत्मानात्मविवेकापासून उत्पन्न झा-
ध्दि—(प्रतिष्ठिता)—प्रतिष्ठित झालेली असते. ६८

ून धनंजया, आपलीं इंद्रियें आपल्या आधीन
म्हणजे मग ह्यापेक्षां अधिक साधक तें काय आहे ?
ा की—ज्याप्रमाणें कांसव आपले पसरलेलें अवयव
 स्वतःच आंवरतें, ५२ त्याप्रमाणें, ज्यांचीं इंद्रियें
स्वाधीन असून तो म्हणेल त्याप्रमाणें करतात, त्याचीच
बुद्धि स्थिरत्वाप्रत पावली असें समज. ५३ अर्जुना, आतां
ज्ञान्यास ओळखण्याची आणखी एक सूक्ष्म खूण तुला
सांगतों. ती ऐक. ५४.

**अन्वयार्थ**—(सर्व भूतानां)—सर्वभूतांची—(या)—जी—
(निशा)—रात्र म्ह०परमार्थदर्शन—(तस्यां)—तिच्यामध्यें—(संय-
मी)—संयमवान्—जितेंद्रीय योगी—स्थितप्रज्ञ—(जागर्ति)—जागतो.
—(यस्यां)—व जिच्यामध्यें म्ह०ज्या व्यवहारावरथेंत—(भूतानि)—
भूतें—जाग्रति जागतात—(सा)—ती—(पश्यतः मुनेः)—ज्ञानी
मुनीची—(निशा)—रात्र आहे. ६९

सर्व प्राण्यांत अज्ञात असलेल्या आत्मस्वरूपाविषयीं ज्याला पूर्ण ज्ञान आहे, आणि ज्या व्यावहारिक विषयाच्या प्राप्ती-विषयीं प्राणीमात्र जागे आहेत, त्या विषयसुखाचे ठिकाणीं जो निजलेला आहे, ५५ तोच अर्जुना, उपाधिरहित, स्थिर-बुद्धि, गंभीर आणि मुनींमध्यें म्हणजे मनन करणारांमध्यें श्रेष्ठ आहे असें समज. ५६

**अन्वयार्थ**—(यद्वत्)—ज्याप्रमाणें—(आपः)—पाणी—(आपूर्यमाणं)—पाण्यानें चोहोंबाजूंनीं भरल्या जाणाऱ्या—(अचलप्रतिष्ठं)—तथापि ज्याची मर्यादा थोडीसुध्दां न्यूनाधिक होत नाहीं, —ज्याच्यामध्यें कांहीं फरक पडत नाहीं अशा—(समुद्रं)—समुद्रास—समुद्रामध्यें—(प्रविशन्ति)—शिरतें—(तद्वत्)—त्याचप्रमाणें—(सर्वे कामाः)—सर्व इच्छा—(यं प्रविशन्ति)—ज्या पुरुषामध्यें त्याला विकारयुक्त न करितां प्रवेश करितात—(सः)—तो—(शान्ति)—शांतीला—(आप्नोति)—प्राप्त होतो—(न कामकामी)—विषयांची इच्छा करणारा शांतीला प्राप्त होत नाहीं. ७०

पार्था, आणखी एका प्रकारानें तो स्थितप्रज्ञ मनुष्य ओळखतां येतो, तो प्रकार कोणता तो ऐक. समुद्राचे ठिकाणीं जशी निरंतर शांतता असते तशी ह्या पुरुषाचे ठिकाणीं असते. ५७ जरी समुद्रास पावसाळ्यांत नद्यांचे प्रवाह तुडूंब भरून मिळतात, तरी तो किंचित्‌ही फुगत नाहीं व आपल्या मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं; ५८ किंवा अर्जुना, उन्हाळ्यांत सर्व नद्यांचें पाणी जरी आटलें तरी तो समुद्र ज्याप्रमाणें यत्किंचित्‌सुद्धां कमी होत नाहीं, ५९ त्याप्रमाणें ऋद्धिसिद्धि प्राप्त झाल्यानें तो पुरुष उल्हास पावत नाहीं आणि प्राप्त न झाल्या तरी असंतुष्ट होत नाहीं. ३६० पहा कीं, सूर्याचे घरीं

ाशांनीं. २ शब्दादिक विषयांनीं. ३ कधीं. ४ स्थि-
. ५ कशी. ६ प्राप्त. ७ उद्भव, पाझर, लेश. ८ घा-
भाजलेलीं. ९ उगवतील. १० शांति नसणाऱ्यास,
स. ११ अनियमीतपणें. १२ निग्रह. १३ तरिला.
ा होणें, सांपडणें. १५ वादळांत. १६ पुनः. १७ अपाय.
र्थ. १९ लालन केलीं गेलीं असतां. २० व्यापिला. २१
धीं. २२ आपणाला. २३ आटोक्यांत, ताब्यांत,
स्वाधीन. २४ प्रसन्न, शांत, स्वेच्छ, सुखावलेला, आनंदांत असलेला, २५ स्वतःच्याच. २६ वश. २७ खोल, गूढ. २८ ज्ञान्याचे. २९ प्राणिमात्र. ३० निजलेलें. ३१ त्या आत्मस्वरूपाचे ठायां. ३२ उजाडलें. ३३ ज्या लौकिकव्यवहारांत. ३४ जागे झालें. ३५ गंभीर, निरंतर. ३६ स्थितप्रज्ञ. ३७ शांतता. ३८ नद्यांचे प्रवाह. ३९ किंचित्‌ही. ४० उल्हास. ४१ प्राप्त होतां ४२ अस्थिरता, अधिरपणा, असंतुष्टपणा.

सूर्याच्या घरीं । प्रकाशु काय वातीवेरी । कां न लेविजे[3] तरी अंधारीं । कोंडेल तो ६१ देखें ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से[4] न करी । तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ६२ जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें[5] म्हणे । तो केवीं रंजे पालिवणें[6] । भिल्लांचेनि ६३ जो अमृतासी ठीं[7] ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ६४ पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं । तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता होती ६५

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः । निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥

ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला । तोचि स्थिरप्रज्ञु[11] भला । वोळख तूं ६६ तो अहंकारातें दंडुनी । सकळ कामु सांडोनी । विचरे[12] विश्व होऊनि । विश्वाची मार्जी ६७

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । स्थित्वाऽस्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥७२॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २॥

हे ब्रह्मस्थिति निःसीमें[13] । जया अनुभविता निष्काम । ते पावले परब्रह्म । अनायासें ६८ जे चिद्रुपीं[14] मिळतां । देहांतीचि व्याकुळता । आड ठाकों[15] न संके[15] चित्तीं[16] । प्रज्ञा[17] जैया[18] ६९ तेचि हे स्थिति । स्वमुखें श्रीपति । सांगत अर्जुनाप्रति । संजयो म्हणे ३७० ऐसें कृष्णवाक्य ऐकिलें । तेथ अर्जुनें मनीं म्हणितलें । आतां आमुचिया काजा कीर आलें । उपपत्ति[19] इया ७१ जें कर्मजात[20] आघवें । एथ निराकारिलें[21] देवें । तरी पारुषलें[22] म्यां झुंजावें । म्हणूनियां ७२ ऐसा श्रीअच्युताचिया बोला । चित्तीं धनुर्धर उबायिला[23] । आतां प्रश्नु करील भला । आशंकोनी ७३ तो प्रसंगु असे नागरु[24] । जो सकळ धर्मासि आगरु[25] । कीं विवेकामृतसागरु । प्रांतहीनु[26] ७४ जो आपण सर्वज्ञनाथु । निरूपिता होईल श्रीअनंतु । ज्ञानदेवो सांगेल मातु[27] । निवृत्तिदासु ३७५

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ श्लोक ७२. ओंव्या ३७५.

दिव्याचे ज्योतीचा प्रकाश केला तरच उजेड पडतो, किंवा तो न लावला तर तो अंधारांत कोंडला जातो काय? ६१ त्याप्रमाणें, त्या पुरुषाच्या घरीं ऋद्धिसिद्धि आल्या काय व गेल्या काय, त्यांची आठवणसुद्धां त्याला होत नाहीं. कारण, त्याचें अंतःकरण महासुखांत म्हणजे परमात्मसुखाचे ठिकाणीं निमग्न असतें. ६२ जो आपल्या घराच्या सौंदर्यापुढें इंद्रभुवनालासुद्धां तुच्छ मानतो, त्याला भिल्लाच्या पालापासून कसें समाधान होणार? ६३ जो अमृताला देखील नांवें ठेवितो तो जसा कांजी पीत नाहीं, तसा आत्मानंदाचा अनुभव घेणारा पुरुष क्षुद्रक ऋद्धिसिद्धींचा उपभोग घेत नाहीं. ६४ अर्जुना, काय चमत्कार आहे पहा—ज्या पुरुषाला स्वर्गसुखाचीही पर्वा नाहीं, त्याला सामान्य ऋद्धिसिद्धीची कथा काय! ६५

**अन्वयार्थ**—(यः)-जो-(पुमान्)-पुरुष-(सर्वान् कामान् विहाय)-सर्व कमांस टाकून, सर्व कामनांचा त्याग करून-(निःस्पृहः)-निरिच्छ-(निर्ममः)-ममतारहित-(निरहंकारः)-अहंकाररहित होऊन-(चरति)-पर्यटन करतो,-(सः)-तो-(शान्ति)-शांतीला-(अधिगच्छति)-प्राप्त होतो. ७१

ह्याप्रमाणें जो आत्मबोधानें संतोष पावला आणि परमानंदांत निमग्न झाला तोच खरा स्थिरबुद्धि असें तूं समज. ६६ तो मीपणा दवडून, सर्व विषय सोडून, जगदाकार होऊन जगांत संचार करितो. ६७

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)-हे अर्जुना!-(एषा)-ही वर सांगितलेली-(ब्राह्मी)-ब्रह्मांतील,-ब्रह्मासंबंधीं-(स्थितिः)-स्थिति आहे.-(एनां)-या स्थितीस-(प्राप्य)-प्राप्त होऊन-(न विमुह्यति)-मनुष्य मोहित होत नाहीं.-(अस्यां)-या स्थितींत-(अन्तकाले अपि स्थित्वा)-अन्त्य वयामध्येंही स्थित होऊन तो-(ब्रह्मनिर्वाणं)-मोक्षास-(ऋच्छति)-प्राप्त होतो. ७२

जे निष्काम पुरुष निःसीम ब्रह्मस्थितीचा अनुभव घेतात ते अनायासेंच परब्रह्मास (आत्मस्वरूपास) पावले आहेत. ६८ जे ज्ञानस्वरूपीं मिळाले असतां त्या स्थितप्रज्ञाच्या चित्ताला मरणकालची व्याकुळता प्रतिबंध करूं शकत नाहीं. ६९ संजय धृतराष्ट्रास म्हणतो, राजा, तीच ही स्थिति श्रीकृष्णांनीं स्वतः अर्जुनास सांगितली. ३७० असें श्रीकृष्णांचें बोलणें ऐकल्यावर अर्जुन मनांत म्हणाला कीं, ही युक्ति आतां आमच्या घरी पथ्यावर पडली! ७१ कारण येथें श्रीकृष्णानें सर्व कर्मांचा निषेध केला खरा, तरी पण मी युद्ध करावें म्हणून सांगतातच. ७२ ह्याप्रमाणें श्रीकृष्णांचें भाषण ऐकून अर्जुन आपले मनांत फार हर्षित झाला. आतां तो शंका घेऊन पुढें गहन प्रश्न करील. ७३ तो प्रसंग फार सुरस असून सर्व धर्मांचें उत्पत्तिस्थान अथवा अमर्याद विचारामृतसमुद्रच आहे. ७४ त्या संवादाचें निरूपण जगदीश्वर स्वतः करतील, व ती गोष्ट निवृत्तिदास जे ज्ञानदेव ते सांगतील. ७५

१ वात लावून दिव्यानें. २ लाविला. ३ आठवण. ४ आपल्या घराच्या सौंदर्यानें, शोभेनें. ५ तुच्छ, हलकें. ६ पर्णकुटीनें, पालानें. ७ नाव, दोष, खोटी. ८ परवा, गणना, जुमानणें. ९ अल्प, सामान्य, कवडीमोल. १० पोसला, पुष्ट झाला. ११ स्थिरबुद्धि. १२ फिरे. १३ सीमारहित पूर्ण. १४ ज्ञानस्वरूपांत. १५ प्रतिबंध करूं शकत नाहीं. १६ मनाच्या. १७ स्थितप्रज्ञाला, स्थिरबुद्धियुक्ताला, ज्ञान्याला. १८ ज्या ब्रह्मस्थितीनें. १९ ही विचारसरणी, कल्पना, युक्ति. २० सर्व कर्मे. २१ निषेधिलें. २२ राहिलें बंद झालें. २३ हर्ष पावला, हर्षित झाला. २४ सुंदर. २५ उत्पत्तिस्थान. २६ अमर्याद, पाररहित. २७ गोष्ट.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय तिसरा.

अर्जुन उवाचः---

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन। तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १॥

मग आइका अर्जुनें म्हणितलें। देवा तुम्हीं जें वाक्य बोलिलें। तें निकें म्यां परिसलें। कमळापती १ तेथें कर्म आणि कर्ता। उरेचिना पाहतां। ऐसें मत तुझें श्रीअनंता। निश्चित जरी २ तरी मातें केवीं श्रीहरी। म्हणसी पार्था संग्रामु करीं। ईये लाजसीना महाघोरीं। कर्मी सुतां ३ हां गा कर्म तूंचि अशेष। निराकरिसी निःशेष। तरी मजकरवीं हें हिंसक। कां करविसी ४ तरी हेंचि विचारीं श्रीहृषीकेशा। तूं मानु देसी कर्मलेशा। आणि येसणी हे हिंसा। करवीत आहासी ५

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे। तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २॥

देवा तुवांचि ऐसें बोलावें। तरी आम्हीं नेणतीं काय करावें। आतां संपलें[12] म्हणों पां आघवें। विवेकाचें[13] ६ हां गा उपदेशु जरी ऐसा। तरी अपभ्रंशु[14] तो कैसा। आतां पुरलों[15] आम्हां धिंवसा[16]। आत्मबोधाचा ७ वैद्यु पथ्य वारूनि[17] जाये। मग जरी आपणचि विष सुये। तरी रोगिया कैसेनि जिये[19]। सांगें मज ८ जैसें आंधळें सुंइजे[20] ओल्हांटा[21]। कां माजवण[22] दीजे मर्कटां[23]। तैसा उपदेशु हा गोमटा[24]। वोढवलों[25] आम्हां ९ मी आधींचि कांहीं नेणें। वरी कैवळिलों[26] मोहें[27] येणें। श्रीकृष्णा विवेकु[28] या कारणें। पुसिला तुज १० तंव तुझी एकेक नवांई[29]। एथ उपदेशामाजिं गोवांई[30]। तरी अनुसरलिया[31] काई। ऐसें[31] कीजे ११ आम्हीं तनु[32]-मनुजीवें। तुझिया बोला वोटंगावें[33]। आणि तुवांचि ऐसें करावें। तरी सरलें म्हणें १२ आतां ऐसियापरी बोधिसी। तरी निकें[34] आम्हां करिसी। एथ ज्ञानाची आंस[35] कायसी। अर्जुन म्हणे १३ तरी ये जाणिवेचें[36] कीर[37] सरलें। परी आणीक एक असे जाहलें। जें[38] थितें हें डहुळलें[39]। मानस माझें १४ तेवींचि श्रीकृष्णा हें तुझें। चरित्र कांहीं नेणिजे। जरी चित्त पाहसी माझें। येणें[40] मिषें १५ ना

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय तिसरा.

**अन्वयार्थ**—(हे जनार्दन)—हे कृष्णा—(कर्मणः)—कर्माहून—(बुद्धिः)—ज्ञान—(ते)—तुला—(ज्यायसी)—श्रेष्ठ—(चेत्)—जर—(मता)—संमत आहे—(तत्)—तर मग—(केशव)—हे केशवा—(घोरे कर्मणि)—घोर कर्मांत—(मां)—मला—(किं)—कां बरें—(नियोजयसि)—नियुक्त करतोस ? १

ज्ञानोबाराय म्हणतात—कोणत्या प्रकारानें अर्जुनानें शंका केली तें ऐका—मग अर्जुन म्हणतोः—देवा कृपासागरा, तुम्ही जें बोललां, तें मी लक्ष्यपूर्वक ऐकिलें. १ आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं कर्म आणि कर्ता हीं विचार करून पाहतां उरतच नाहींत. श्रीअनंता, हेंच जर आपलें निश्चित मत असेल, २ तर मग, हृषीकेशा, 'पार्था, तूं संग्राम कर' असें मला कां सांगतां ? ह्या भयंकर कर्मांत मला घालतांना तुम्हांला संकोच कसा वाटत नाहीं ? ३ हें पहा—सर्व कर्मांचा तुम्हीं निषेध करतां, तर मग माझ्या हातून असलें हिंसात्मक कर्म कां करवितां ? ४ तर, हृषीकेशा, ह्याचा आपणच विचार करा कीं, आपण कर्ममार्गाला मान देऊन माझ्या हातून ही एवढी भयंकर हिंसा करवीत आहां ! ५

**अन्वयार्थ**—(व्यामिश्रेण इव)—जणुं काय अत्यंत घोटाळ्याच्या—(वाक्येन)—वाक्यानें—(मे बुद्धिं)—माझ्या बुद्धीला—(मोहयसि इव)—तूं मोहच पाडीत आहेस. मला जणुं काय भ्रमांत पाडीत आहेस.—(तत्)—वास्तव—(येन)—ज्याच्या योगानें—(अहं)—मी—(श्रेयः)—कल्याणास—(आप्नुयाम्)—प्राप्त होईन—(तत्)—तें—(एकं)—एक (निश्चित्य)—ठरवून—(वद)—मला सांग. २

देवा, तुम्हींच जर असें बोलूं लागलां, तर आम्हीं अज्ञान्यांनीं काय करावें ? तर आतांच सर्व विचार संपला असें म्हणण्याची पाळी आली. ६ अज्ञान घालविण्याकरितां जर असा संदिग्ध उपदेश कराल, तर ह्याहून भ्रम निराळा तो कोणता ? आतां आमची आपणापासून आत्मबोध करून घेण्याची इच्छा पूर्ण झाली म्हणावयाची ! ७ मला सांगा कीं, वैद्य हा रोग्याची प्रकृति पाहून त्यावर पथ्याची योजना करून गेल्यावर जर आपण होऊनच औषधांत विष घालील, तर रोग्यानें जगावें कसें ? ८ ज्याप्रमाणें आंधळ्यास आडवाटेला लावावें, किंवा माकडाला मद्य पाजावें, तसा आपला हा उत्तम उपदेश आह्मांस चांगलाच फळला ! ९ देवा, असें पहा, मला आधींच कांहीं समजत नाहीं, त्यांतून मी त्या मोहानें ग्रस्त झालों आहे, म्हणून तुम्हांला विचाराची गोष्ट पुसली; १० तों तुमचें आपलें एकेक नवलच ! तुमच्या उपदेशांत साराच घोटाळा ! तर शरणांगताशीं असें कां वागावयाचें ! ११ आम्हीं कायावाचामनेंकरून आपल्या बोलण्यावर भरंवसा ठेवावा, आणि तुम्हींच जर असें करूं लागलां, तर मग आटोपलेंच म्हणावयाचें ! १२ अर्जुन म्हणतोः—"आतां अशाप्रकारें जर आपण बोध करीत असलां, तर मग आमचें चांगलेंच करीत आहां ! १३ मग येथें ज्ञानाची आशा कशाला पाहिजे ? ज्ञान संपादन करण्याची हौस संपली; परंतु उलटें एक असें झालें कीं, माझ्या मनाची स्थिरता जाऊन तें जास्त घोंटाळ्यांत मात्र पडलें ! १४ त्याचप्रमाणें, श्रीकृष्णा, तुमची लीला आम्ही कांहीं जाणूं शकत नाहीं. ह्या उपदेशाच्या मिषानें जर आपण माझें मन पहात असाल तर कोण जाणें ! १५ किंवा

---

१ त्यावरून पाहतां. २ मनोगत, अभिप्राय. ३ युद्ध. ४ ह्या. ५ घालितां. ६ सर्व. ७ निषेधिसी. ८ हिंसा उत्पन्न करणारें ९ कर्ममार्गास. १० एवढी. ११ अज्ञान्यांनीं. १२ आटपलें काय ? १३ विचाराचें. १४ भ्रमपणा. १५ पूर्ण झाला. १६ मनोरथ, हौस, हांव. १७ सांगून. १८ घालील. १९ वांचेल, जगेल. २० पाडावें, घालावें. २१ आडमार्गी. २२ मद्यादि कैफी पदार्थ. २३ माकडाला. २४ सुरेस, गोड, हितकर. २५ ग्रास झाला. २६ ग्रस्त झालों. २७ आर्तीनें. २८ विचार. २९ नवल, मौज. ३० घोंटाळा, गुंतागुंत. ३१ शरणांगताला अशा रीतीनें गोंधळांत पाडावें काय ? ३२ कायेनें, मनानें, आणि जीवानें. ३३ आश्रय करावा. ३४ कल्याण, घोंटाळा. ३५ इच्छा. ३६ ज्ञानाचें. ३७ निश्चयें. ३८ स्थिर (स्वस्थ) असलेलें. ३९ गहल—भ्रांत झालें. ४० या निमित्तानें.

तरी [१]झकवीतु आहासी मातें । कीं [२]तत्त्वचि कथिसी [३]ध्वनितें । हें [४]अवगमितां
[५]निरुतें । जाणवेना १६ म्हणोनि आइकें देवा। हा [६]भावार्थु आतां न बोलावा।
मज [७]विवेकु सांगावा । [८]म्हाटा जी १७ मी अत्यंत [९]जेंड असें । परी ऐसाही
[१०]निकें परीयसें।श्रीकृष्णा बोलावें तुवां तैसें। [११]ऐकनिष्ठ १८ देखें रोगातें [१२]जिर्णावें।
औषध तरी [१३]देयावें । परी तें अति [१४]रुच्य व्हावें । मधुर जैसें १९ तैसें सकळा-
र्थभरित । तत्त्व सांगावें [१५]उचितें । परी [१६]बोधें माझें चित्त । जयापरी २० देवा
तुजऐसा निजगुरु । आजि [१७]आर्तीधणी कां न करूं। एथ [१८]भीड कवणाची धरूं।
तूं माय आमुचि २१ हां गा कामधेनूचें [१९]दुभतें। दैवें जाहलें जरी [२०]आपैतें।
तरी कामनेची कां तेथें। [२१]वौनी कीजे २२ जरी चिंतामणी हातां चढे । तरी
वांछेचें कवण [२२]सांकडें । कां आपुलेनि [२३]सुरवाडें । इच्छावें ना २३ देखा अमृत-
सिंधूतें [२४]ठाकावें। मग [२५]ताहानाचि जरी [२६]फुटावें । तरी [२७]सायासु कां करावे ।
मागील ते २४ तैसा जन्मांतरीं बहुतीं । उपासितां श्रीलक्ष्मीपती । तूं दैवें आजि
हातीं । जाहलाली जरी २५ तरी [२७]आपुलिया [२८]सवेशीं। कां न मागावासि [२९]परेशीं।
देवा [३०]सुकाळु हा मानसा । [३१]पाहला असे २६ देखें [३२]सकळार्तीचें [३३]जियालें । आजि
पुण्य [३४]यशासि आलें। हे मनोरथ जाहाले। [३५]विजयी माझे २७ जी जी [३६]परममंग-
ळधामा। सकळ देवदेवोत्तमा। तूं स्वाधीन आजि आह्मां । म्हणऊनियां २८ जैसें
मातेच्या ठायीं । अपत्या [३७]अनवसरू नाहीं। [३८]स्तन्यालागूनि पाहीं। जियापरी २९
तैसें देवा तूतें। पूसिजतसे आवडतें । आपुलेनि [३९]औतें । कृपानिधी ३० तरी पार-
त्रिकीं [४०]हित। आणि आचारितां तरी उचित। तें सांगें एक निश्चित । पार्थु ह्मणे ३१

श्रीभगवानुवाचः—

लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ। ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥३॥

या बोला श्रीअच्युतु । ह्मणतसे [४१]विस्मितु । अर्जुना हा [४२]ध्वनितु । अभिप्रावो
३२ जे [४३]बुद्धियोगु सांगतां । [४४]सांख्यमतसंस्था । प्रकटिली स्वभावता । प्रसंगें
आम्हीं ३३ तो [४५]उद्देशु तूं नेणसीचि । ह्मणोनि [४६]क्षोभलासि वायांचि । तरी आतां
जाणें स्यांचि। [४७]उक्त दोन्ही [४८] ३४ अवधारीं वीरश्रेष्ठा । ये लोकीं या दोन्ही [४९]निष्ठा ।
मजचिपासूनि प्रगटा । [५०]अनादिसिद्धा ३५ एक ज्ञानयोगु म्हणिजे । जो सांख्यीं
[५१]अनुष्ठिजे । जेथ वोळखीसवें पाविजे । [५२]त[illegible] ३६ [illegible] जाण । जेथ
साधक[५३]जन [५४]निपुण होऊनियां निर्वाण[५५] [illegible] मार्गु तरी दोनी ।

मला फसवीत आहां, का गूढार्थानें ब्रह्मस्वरूप सांगत आहां, ह्याचें अनुमान करतां, खरें कांहींच कळत नाहीं. १६ म्हणून, देवा, ऐका. हा गूढार्थ न सांगतां, जो कांहीं आपला विचार असेल तो आडाण्यालाही समजेल अशा प्रकारें स्पष्ट सांगा. १७ श्रीकृष्णा, मी अतिशय मंदबुद्धि आहें; तेव्हां अशा मलाही चांगलें समजेल, असें एक निश्चयात्मक बोलणें आपण बोला. १८ असें पहा–औषध देऊन रोग तर नाहींसा व्हावा, परंतु तें औषध मधुर व रुचकर असावें; १९ त्याचप्रमाणें, सर्व अर्थानें परिपूर्ण व [ आचरण्यास ] योग्य असें तत्त्व आपण सांगा; पण ज्या रीतीनें माझ्या मनाला त्याचा पूर्ण बोध होईल, त्या रीतीनें सांगा. २० देवा, तुमच्यासारखा गुरु मला मिळाला असतां आज मी आपल्या मनाची इच्छा कां न तृप्त करून घ्यावी ? ह्या ठिकाणीं मी भीड कोणाची धरावी ? तूं माझी माऊली आहेस ! २१ असें पहा कीं, दैवयोगानें कामधेनूचें दुभतें प्राप्त झाल्यावर इच्छित मागण्यास कां कमी करावें ? २२ किंवा चिंतामणि हातीं आल्यावर मग इच्छित वस्तु मागण्याचें संकट कां पडावें ? आपल्याला जें अपेक्षित असेल तें कां न मागावें ? २३ पहा कीं, अमृत सिंधूचे कांठीं उभें राहून अमृत न पितां जर तहानेनें तरफडावें तर मग अमृतसिंधूजवळ येण्याचे श्रम तरी कां घ्यावे ? २४ त्याचप्रमाणें, हे कमलापते, तुझी जन्मोजन्मीं उपासना करितां करितां दैवयोगानें आज जर तूं लाधला आहेस, २५ तर मग परमेश्वरा, आपल्याच इच्छेनें तुमच्यापाशीं आम्ही वाटेल तें कां मागूं नये ? देवा, आज मनांतील हेतु पूर्ण होण्याचा दिवस उगवला आहे ! २६ हें पहा– आज माझ्या सर्व इच्छा परिपूर्ण होऊन व माझें पूर्वपुण्य फळास येऊन सर्व मनोरथ सिद्धीस गेले; २७ कारण, कल्याणाचें आदिपीठ व सर्व देवांचे देव, जे तुम्ही ते आज आमच्या आधीन झालां आहां. २८ आईचें स्तनपान करण्यास मुलाला जशी वेळ अवेळ ह्यांची अडचण नसते, २९ त्याप्रमाणें, देवा कृपानिधे, मी तुम्हांला माझे इच्छेनुरूप वाटेल तें विचारीत आहें." ३० अर्जुन म्हणतो, "म्हणून, देवा, इहलोकीं आचरण्यास योग्य व परलोकीं हितकारक अशी एक निश्चित गोष्ट सांगा." ३१

**अन्वयार्थ**--(हे अनघ)–हे निष्पाप अर्जुना !–(मया)–मीं –(अस्मिन् लोके)–या लोकीं–(द्विविधा निष्ठा)–दोन प्रकारची स्थिति–अनुष्ठानतत्परता–(पुरा)–पुर्वी–वैदिक संप्रदाय सुरू केला त्यावेळीं–सृष्टीच्या आरंभीं–(प्रोक्ता)–सांगितली.–(सांख्यानां)–स्थितप्रज्ञ संन्याशांची–(ज्ञानयोगेन)–ज्ञानमार्गानें–सांख्ययोगानें व–(योगिनां)–अज्ञ कर्माधिकाऱ्यांची–(कर्मयोगेन)–कर्मयोगानें स्थिति सांगितली. ३.

हें बोलणें ऐकून श्रीकृष्ण आश्चर्यानें म्हणतात:-- "अर्जुना, तुला जो अभिप्राय सांगितला तो गर्भितार्थ आहे. ३२ ईश्वरार्पण कर्ममार्ग सांगतांना प्रसंगानुसार जो ज्ञानमार्गाचा महिमा आम्ही सांगून गेलों, ३३ तो आमचा हेतु तूं जाणत नाहींस, म्हणून व्यर्थ क्षोभलास; तेव्हां आतां हें ध्यानांत ठेव कीं, ज्ञानयोग आणि कर्मयोग हे दोन्ही मार्ग मींच सांगितलेले आहेत, ३४ वीरश्रेष्ठा, ऐक; ह्या पृथ्वीवर हे दोन्ही संप्रदाय माझ्यापासूनच पूर्वापार प्रकट झाले आहेत, ३५ जड चैतन्याचा विचार करणारे ज्याचें आचरण करतात, व ज्यायोगानें ब्रह्मरूपाची ओळख होतांक्षणींच ते तद्रूप होऊन जातात, त्या एका संप्रदायाला ज्ञानयोग म्हणतात, ३६ दुसऱ्यास कर्मयोग म्हणतात. त्या योगांत तत्पर असे मुमुक्षुजन अवकाशानें ( ज्ञानोत्तरकालीं ) मोक्षास पावतात. ३७ तयार असलेल्या व तयार

१ फसवीत आहेत. २ ब्रह्मरूप ३ संक्षेपानें, गूढार्थानें ४ अनुमान करतां. ५ खरें, निश्चित ६ गूढार्थ. ७ विचार. ८ स्पष्ट, प्राकृत ९ मंदमति १० चांगलें ऐकून ( मला स्पष्ट समजेल अशा रीतीनें ) ११ ठामपणाचें, निश्चयात्मक. १२ जिंकावें. १३ द्यावें. १४ स्वादिष्ट, रुचिकर. १५ योग्य. १६ समज घेईल. १७ इच्छेची तृप्ति. १८ मर्यादा. १९ दूध वगैरे गोरस. २० प्राप्त. २१ कमनरता, उणीव. २२ संकट. २३ सुखें, आवडेल तसें. २४ उभें रहावें. २५ तहानेनें तडफडावें. २६ अमृतसिंधूपाशीं येण्याचें आयास. २७ आपल्या. २८ स्वेच्छेनें २९ परमेश्वरा. ३० समृद्धि. ३१ उजाडला, उदयकाल आला आहे. ३२ सर्व इच्छेचें. ३३ जीवीत साफल्य; जिणें. ३४ फळास. ३५ जयशाली, फलप्रद. ३६ पूर्ण कल्याणाचें स्थान ३७ अवेळ. ३८ स्तनपान करण्याला, दुग्धपानाला. ३९ इच्छेनें. ४० परलोकीं. ४१ साश्चर्य. ४२ संक्षिप्त. ४३ ज्ञानयोग. ४४ आत्मानात्म विचार, ज्ञानयोग. ४५ हेतु, मतलब. ४६ भ्रमलास. ४७ सांगितलें. ४८ ज्ञानयोग व कर्मयोग. ४९ संप्रदाय. ५० पूर्वापार. ५१ आचरावा. ५२ ब्रह्मरूपत्व. ५२ मुमुक्षु. ५४ तत्पर, कुशल. ५५ मोक्ष. ५६ ज्ञानोत्तर कालीं.

परी एकवटती निदानीं । जैसी सिद्धसाध्यभोजनीं । तृप्ती एक ३८ कां पूर्वापर सरिता । भिन्न दिसती पाहतां । मग सिंधुमिळणीं ऐक्यता । पावती शेखीं ३९ तैसीं दोनीही मतें । सूचिती एका कारणातें । परी उपास्ति ते योग्यते । आधीन असे ४० देखें उत्प्लवनासरिसा । पक्षी फळासि झोंबे जैसा । सांगें नरु केवीं तैसा । पावे वेगा ४१ तो हळू हळू ढाळेंढाळें । केतुलेनि एके वेळे । तया मार्गाचेनि बळें । निश्चित ठाकी ४२ तैसें देख पां विहंगममतें । अधिष्ठूनि ज्ञानातें । सांख्य सद्य मोक्षातें । आकळिसी ४३ येरें योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें । पूर्णता अवसरें । पावते होती ४४

न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते । न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥

वांचोनि कर्मारंभ उचित । न करितां सिद्धवत । कर्महीना निश्चित । होईना ४५ कीं प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होइजे । हें अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ४६ सांगें पैलतीरा जावें । ऐसें व्यसन कां जेथ पावे । तेथ नावेतें त्यजावें । घडे केवीं ४७ ना तरी तृप्ति इच्छिजे । तरी कैसोनि पाकु न कीजे । कीं सिध्दुही न सेविजे । केवीं सांगें ४८ जंव निरार्तता नाहीं । तंव व्यापारु असे पाहीं । मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजें ४९ म्हणोनि आइकें पार्था । जयां नैष्कर्म्यपदीं आस्था । तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ५० आणि आपुलिये चाडे । आपादिलें हें मांडे । कीं त्यजिलें कर्म सांडे । ऐसें आहे ५१ हें वायांचि सैरीं बोलिजे । उकलु तरी देखोनि पाहिजे । परी त्यजितां कर्म न त्यजे । निभ्रांत मानीं ५२

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् । कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥५॥

जंव प्रकृतीचें अधिष्ठान । तंव सांडी मांडी हें अज्ञान । जे चेष्टा ते गुणाधीन । आपैसी असे ५३ देखें विहित कर्म जेतुलें । तें सगळें जरी वोसंडिलें । तरी स्वभाव काय निमालें । इंद्रियांचे ५४ सांगें श्रवणीं ऐकावें ठेलें । कीं नेत्रींचें तेज गेलें । हें नासारंध्र बुझालें । परिमळु नेघे ५५ ना तरी प्राणापानगति । कीं निर्विकल्प जाहली मती । कीं क्षुधातृषादि आर्ति । खुंटलिया ५६ हे स्वप्नावबोधु ठेले । चरण चालों विसरले । हें असो काय निमालें । जन्ममृत्यू ५७ हें न ठकेचि जरी कांहीं । तरी सांडिलें तें कायी । म्हणोनि कर्मत्यागु नाहीं । प्रकृतिमंता ५८ कर्म पराधीनपणें । निपजतसे प्रकृतिगुणें । येरीं

करून घेतलेल्या अन्नाच्या भोजनापासून जशी सारखीच तृप्ति होते, तसे हे मार्ग तर दोन आहेत, पण ते परिणामीं एकरूप होतात. ३८ किंवा पूर्व पश्चिम दिशांकडे जाणाऱ्या नद्या पाहिल्या तर भिन्न दिसतात, परंतु समुद्रांत मिळण्याचे वेळीं अखेरीस त्या जशा एकत्र होतात, ३९ तशीं हीं दोन्हीं मतें एकच तत्त्वाचीं सूचक आहेत; परंतु त्यांची उपासना उपासकाच्या योग्यतेवर अवलंबून आहे. ४० असें पहा-पक्षी एका उड्डाणावरोबर झाडाच्या फळास धरतो; पण त्याच वेगानें मनुष्यास तें फळ कसें प्राप्त करून घेतां येईल, सांग बरें? ४१ तो हळू हळू फांदीफांदीवरून तो मार्ग क्रमितां क्रमितां कांहीं वेळानें फळाजवळ खरोखर जाऊन पोहोंचेल; ४२ त्याचप्रमाणें, ज्ञानमार्गाचें जे आचरण करितात, ते ज्ञानी विहंगम मार्गानें तत्काल मोक्ष प्राप्त करून घेतात, ४३ इतर योगी कर्ममार्गानें ( पिपीलिकामार्गानें ) विहित वर्णाश्रमधर्मानें आचरण करून परंपरेनें [ ज्ञानोत्तरकालीं ] मोक्ष प्राप्त करून घेतात. ४४

**अन्वयार्थ**—(पुरुषः)—अधिकारी पुरुष-(कर्मणां)—विहित कर्मांच्या-(अनारम्भात्)—आरंभावांचून-कर्मानुष्ठानाला आरंभ केल्यावांचून-(नैष्कर्म्यं)—ज्ञानयोगनिष्ठेला-(न अश्नुते)—प्राप्त होत नाहीं.-(संन्यसनात् एव)—केवळ ज्ञानरहित संन्यासानेंच-(सिद्धिं)—ज्ञानयोगनिष्ठेला-(न च समधिगच्छति)—तो पुरुष प्राप्त होत नाहीं. ४

विहित कर्मांचा आरंभ केल्यावांचून कर्महीन पुरुषाला एखाद्या सिद्धाप्रमाणें निश्चयानें ज्ञाननिष्ठ होतां येत नाहीं, ४५ अर्जुना, जीं ज्याला विहित कर्में करावयाचीं, तीं टाकल्यानें तो कृतार्थ होईल असें म्हणणें हा निव्वळ मूर्खपणा होय. ४६ नदी दुथडी भरली आहे, व ती उतरून पलीकडे जाण्याची जेथें अवश्यकता आहे तेथें नावेशिवाय, जाऊं म्हटलें तर कसें जाता येईल, सांग बरें? ४७ किंवा भोजनापासून जी तृप्तीची इच्छा करतो, त्याला स्वयंपाक न करतां अथवा तयार असलेलें अन्न न खातां ती कशी प्राप्त होईल? ४८ जोंपर्यंत निरिच्छता प्राप्त झाली नाहीं, तोंपर्यंत खटपट ही आहेच; तीच प्राप्त झाली, म्हणजे आत्मसंतोष होऊन खटपट साहजिकच थांबते. ४९ म्हणून, पार्था, ज्याला परमात्मप्राप्तीची इच्छा आहे त्यालो विहित कर्माचरण कधींही सोडतां येत नाहीं; ५० आणि दुसरें असें कीं, आपल्या इच्छेनेंच कर्माचा स्वीकार व त्याग करूं म्हटल्यानें तो होईल काय? ५१ हें बोलणें व्यर्थ बडबडल्यासारखें आहे. ह्यावा नीट विचार करून पाहिला तर नुसतें कर्म टाकल्यानें कर्माचा त्याग होत नाहीं असें पक्कें समज. ५२

**अन्वयार्थ**—(हि)—कारण-(कश्चित्)—कोणीही-(क्षणं अपि)—एक क्षणभर सुद्धां-(अकर्मकृत्)—कर्म न करणारा असा, कर्म सोडून-(जातु)—केव्हांही-(न तिष्ठति)—रहात नाहीं.-(हि)—कारण-(अवशः [एव] सर्वः)—कर्मांच्या अधीन असलेलाच प्रत्येक प्राणी-प्रकृतिपराधीन असलेला हरएक जीव-(प्रकृतिजैः गुणैः)—ईश्वराच्या अचिन्त्य शक्तीपासून झालेल्या सत्त्वरजस्तमोगुणांकडून-(कर्म)—कर्म-(कार्यते)—करविला जातो. [ गुण प्रत्येक अज्ञ जीवाकडून कर्म करवितात. ५ ]

जोंपर्यंत मायेचा आश्रय आहे तोंपर्यंत मायेच्या सत्त्वादि गुणाच्या आधीन सर्व व्यापार असतात, म्हणून कर्म स्वीकारणें, अगर टाकणें हें बोलणें अज्ञानपणाचें आहे. ५३ असें पहा कीं, विहित कर्माचा आरंभ कर्त्याचे इच्छेवर अवलंबून आहे, म्हणून द्वेषानें किंवा त्रासानें जरी त्याग केला तरी स्वाभाविक कर्म उत्पन्न करण्याचे इंद्रियांचे धर्म नष्ट होतील काय? ५४ सांग पाहूं; विहित कर्मत्याग केला म्हणून कानांचें ऐकणें बंद झालें? कीं डोळ्यांची दृष्टि गेली? कीं नाकाचीं भोंकें बुजून जाऊन वास येईनासा झाला? ५५ किंवा प्राणापानवायूंची गति बंद झाली? कीं मन हें कल्पनारहित झालें? अथवा भूकतहान ह्यांची इच्छा नाहींशी झाली? ५६ कीं स्वप्न व जागृति अवस्था बंद झाल्या? किंवा पाय चालणें विसरले? इतकेंच नव्हे, तर जन्ममरण चुकलें आहे काय? ५७ मग हे इंद्रियांचे व्यापार जर बंद रहात नाहींत, तर मग सोडलें तें काय? म्हणून, देहाभिमान्याकडून कर्मत्याग कधींही होणार नाहीं. ५८ कर्म हें पराधीनपणानें प्रकृतीच्या गुणांमुळें होत

१ एकत्र होतात. २ शेवटीं. ३ तयार असलेल्या व तयार करण्याच्या अन्नांत. ४ किंवा. ५ पूर्व पश्चिम नद्या. ६ समुद्रांत मिळाल्यानें. ७ अखेरीस, शेवटीं. ८ सुचवितात. ९ तत्त्वाला १० उपासना. ११ उड्डाणावरोबर. १२ या डहाळीवरून त्या डहाळीवर. १३ कांहीं. १४ पोंचतो. १५ ज्ञानमार्गानें, पक्षिपद्धतीनें. १६ आश्रय करून. १७ ज्ञानी. १८ लागलेंच, तत्काळ. १९ पिपीलिकामार्ग, कर्ममार्ग. २० वर्णाश्रमधर्मानें. २१ वेदविहित. २२ स्वधर्माचरणानें. २३ अवकाशानें. २४ सिद्धिनकर्म. २५ एवढ्यानें. २६ कर्मविनिर्मुक्तस्थिति, कर्मांपासून अलिप्तता. २७ संकट. २८ नौकेला. २९ स्वयंपाक. ३० निरिच्छपणा. ३१ परमहंसस्थितीची, मोक्षपदाची. ३२ गरजेकरितां. ३३ संपादिलें. ३४ घडेल. ३५ स्वच्छंद, अद्वातद्वा. ३६ निर्णय. ३७ मर्यादेनें. ३८ पारतंत्र्य. ३९ त्याग व ग्रहण. ४० वर्तन. ४१ आपोआप. ४२ शास्त्रोक्त. ४३ जितकें. ४४ टाकिलें. ४५ लय पावलें. ४६ बंद झालें. ४७ नाकाचें भोंक. ४८ वास. ४९ हृदयस्थ व गुदस्थ वायूंची गति. ५० संकल्पविकल्परहित. ५१ मन. ५२ इच्छा. ५३ स्वप्न व जागृति, निजणें व जागणें. ५४ नाहींसें झालें. ५५ बंद रहात नाहीं. ५६ देहाभिमान्याला, मायाधीनाला. ५७ जीवानें.

धरीं मोकेलीं अंतःकरणें । वाहिजे वायां ५९ देखें रथीं आरूढिजे । मग जरी
निश्चळु बैसिजे । तरी चळु होऊनि हिंडिजे । परतंत्रा ६० कां उचलिलें वायु-
वशें । चळे शुष्क पत्र जैसें । निचेष्ट आकाशें । परिभ्रमे ६१ तैसें प्रकृति-
आधारें । कर्मेंद्रियविकारें । नैष्कर्मही[६] व्यापारें । निरंतर ६२ म्हणऊनि संगु जंव
प्रकृतीचा । तंववरी त्यागु न घडे कर्मांचा । ऐसियांहि करूं म्हणती तयांचा ।
आग्रहोचि उरे ६३

कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इंद्रियार्थान्विमुढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥६॥

जे उचित कर्म सांडिती । मग नैष्कर्म्य होऊं पाहती । परी कर्मेंद्रियप्रवृत्ती ।
निरोधुनी ६४ तयां कर्मत्यागु न घडे । जें कर्तव्य मनीं सांपडे । वरी नटती तें फुडें ।
दारिद्रें जाण ६५ ऐसे ते पार्था । विषयासक्त सर्वथा । ओळखावे तत्त्वता । भ्रांति नाहीं
६६ आतां देईं अवधान । प्रसंगें तुज सांगेन । या नैरास्याचें चिन्ह । धनुर्धरा ६७

यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन । कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

जो अंतरीं दृढ । परमात्मरूपीं गूढ । बाह्य भागू तरी रूढ । लौकिक जैसा
६८ जो इंद्रियां आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी । प्राप्त कर्म नोव्हेरी ।
उचित जें जें ६९ तो कर्मेंद्रियें कर्मीं । राहटतां तरी न नियमी । परी तेथि-
चेनि ऊर्मीं । झांकोळेना ७० तो कामनामात्रें न घेपे । मोहमळें न लिंपे । जैसें
जळीं जळें न शिंपे । पद्मपत्र ७१ तैसा संसर्गामाजि असे । सकळांसारिखा दिसे ।
जैसें तोयसंगें आभासे । भानुबिंब ७२ तैसा सामान्यत्वें पाहिजे । तरी साधार-
णुचि देखिजे । येरवीं निर्धारितां नेणिजे । सोयें जयाची ७३ ऐशा चिन्हीं चि-
न्हितु । देखसी तोचि मुक्तु । आशापाशरहितु । वोळख पां ७४ अर्जुना तोचि
योगी । विशेषिजे[३१] जो जगीं । म्हणोनि ऐसा होय यालागीं । म्हणिपे तूतें ७५ तूं
मानसा नियमु करीं । निश्चळु होय अंतरीं । मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्ततु सुखें ७६

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः । शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥८॥

म्हणोनि नैष्कर्म्य होआवें । तरी एथ तें न संभवे । आणि निषिद्ध केवीं राहा-
टावें । विचारीं पां ७७ म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त । तें
कर्म हेतुरहित । आचरें तूं ७८ पार्था आणीकही एक । नेणसी तूं हें कवतिक ।
जें ऐसें कर्ममोचक आपैसें असे ७९ देखें अनुक्रमाधारें । स्वधर्मु जो आचरे ।
तो मोक्षु तेणें व्यापारें । निश्चित पावे ८०

असतें म्हणून मी कर्म करीन अगर सोडीन असें समजणें व्यर्थ होय. ५९ पहा कीं, रथांत बसल्यावर मग जरी स्तब्ध बसून राहिलें, तरी तो रथाच्या आधीन असल्यामुळें रथाचें फिरणें म्हणजे ह्याचेंच फिरणें असें होतें; ६० किंवा झाडाचें वाळलेलें पान निश्चेष्ट असतांही ज्याप्रमाणें, वायूच्या वेगानें उडून आकाशांत भ्रमण करितें, ६१ त्याप्रमाणें, मायेच्या आश्रयानें व कर्मेंद्रियाच्या विकारानें नैष्कर्म्यस्थितीला पोंचलेला पुरुषही नेहमीं शारीरिक कर्म करितो, ६२ म्हणून, जोंपर्यंत मायेचा संबंध आहे, तोंपर्यंत कर्माचा त्याग घडणार नाहीं; असें असूनहि जे कर्माचा त्याग करूं म्हणतात, त्यांचा तो रिकामा आग्रह मात्र उरतो. ६३

**अन्वयार्थ**—(यः विमूढात्मा)–जो अत्यंत मूढबुद्धि पुरुष–(कर्मेंद्रियाणि)–कर्मेंद्रियांचें–(संयम्य)–संयमन करून–(इंद्रियार्थान्)–विषयांचें–(मनसा)–मनानें–(स्मरन्)–स्मरण करीत–(आस्ते)–राहतो–(सः)–तो–(मिथ्याचारः)–ढोंगी–(उच्यते)–म्हटला जातो. ६

विहित कर्माचा त्याग करून व कर्मेंद्रियांचा निग्रह करून एवढ्यानेंच जे पुरुष कर्मातीत होऊं इच्छितात, ६४ त्यांना कर्मत्याग घडत नाहीं. कारण, त्यांच्या मनामध्यें कर्तव्य शेष राहून कर्मातीत झाल्याचें वरवर दाखवितात, तें निव्वळ दरिद्र आहे, ६५ पार्था, असे हे प्राणी नेहमीं विषयासक्त असतात, असें निःसंशय जाण. ६६ आतां, अर्जुना, प्रसंगानुसार तुला खऱ्या निरिच्छ मनुष्याचीं लक्षणें सांगतों, तीं लक्षपूर्वक ऐक. ६७

**अन्वयार्थ**—(हे अर्जुन)–हे अर्जुना!–(तु)–पण–(यः)–जो–(इंद्रियाणि)–ज्ञानेंद्रियांचा–(मनसा)–मनानें–(नियम्य)–निग्रह करून–(असक्तः [सन्])–कर्मफलामध्यें आसक्त न होतां–(कर्मेन्द्रियैः)–कर्मेंद्रियांनीं–(कर्मयोगं)–कर्मयोगाचा–(आरभते)–आरंभ करतो–(सः)–तो–(विशिष्यते)–चांगला श्रेष्ठ होय. ७.

जो अंतर्यामीं निश्चल व परमात्म्याचे ठिकाणीं तल्लीन, तथापि बाह्यात्कारीं लोकाचाराप्रमाणें वागणारास, ६८ तसाच जो इंद्रियांना आज्ञा करीत नाहीं, विषयांची भीति बाळगीत नाहीं, आणि ज्या ज्या वेळेस जीं जीं कर्में करावयाचीं तीं कर्में टाकीत नाहीं; ६९ कर्मेंद्रियांकडून कर्में होत असतांना तो त्यांना आवरीत नाहीं, ७० पण त्यांच्या विकारांच्या आधिन होत नाहीं. तो वासनेनें आकळला जात नाहीं; व त्याच्या मनाला मोहाची बाधा होत नाहीं. कमळाचें पान जसें रात्रंदिवस पाण्यांत असून पाण्यानें भिजत नाहीं. ७१ त्याप्रमाणें, संसारामध्यें राहून तो इतर जनासारखा दिसतो. ज्याप्रमाणें, पाण्याच्या संगतीनें सूर्यबिंब पाण्यांत दिसतें. ७२ त्याप्रमाणें, वरकांती पाहातां तो मनुष्य साधारणसा दिसतो; बाकी निश्चयानें त्याची आत्मस्थिति ओळखतां येत नाहीं. ७३ अशा गुणांनीं जो युक्त असेल, व जो निरिच्छ असेल, तोच योगी, तोच मुक्त असें तूं समज, ७४ अर्जुना, तोच योगी व तोच जगांत स्तुतीस पात्र असतो, म्हणून तूं असा हो, असें मी तुला म्हणतों. ७५ तूं आपल्या मनाला आंवरून धर, व अंतर्यामीं स्थिर बुद्धि हो.(मग)कर्मेंद्रियें खुशाल आपापले व्यापार करोत. ७६

**अन्वयार्थ**—(त्वं)–तूं–(नियतं कर्म)–नित्य कर्म–(कुरु)–कर–(हि)–कारण–(अकर्मणः)–कर्म मुळींच न करण्यापेक्षां–(कर्म)–कर्म (ज्यायः)–श्रेष्ठ आहे.–(च)–व–(ते)–तुझी–(शरीरयात्रा अपि)–शरीरस्थितिही–(अकर्मणः)–कर्म न करण्यानें–(न प्रसिद्ध्येत)–उत्तम प्रकारें–शास्त्रविहित [illegible] होणार नाहीं. ८

म्हणून, कर्मरहित होणें हें ह्या मनाला [illegible] आहे; मग शास्त्रविरुद्ध आचरण कां करावें, ह्याचा विचार कर. ७७ म्हणून, जें जें योग्य व [illegible] कर्म असेल, तें तें तूं निष्कामबुद्धीनें कर. ७८ अर्जुना, आणखी एक कौतुक तुला माहित [illegible] तें हें कीं, निष्कामबुद्धीनें केलेलें हें कर्म [illegible] संसारांतून सोडविणारें होतें. ७९ [illegible] स्वधर्माचें जो आचरण करतो, तो [illegible] मोक्ष पावतो. ८०

१ धरणें. २ सोडणें. ३ समजणें. ४ वाळलेलें. ५ चैतन्यरहित. ६ ज्ञानी, निष्काम. ७ इतक्यावरही. ८ कर्मविमुक्त. ९ आंसडून, आवरून. १० खरोखर. ११ विटंबना. १२ लक्ष. १३ निरिच्छपणाचें. १४ बाह्यात्कारी. १५ आचरणारा, वागणारा. १६ जनाचार, लोकाचार. १७ न टाकी. १८ वागत असतां. १९ आवरित नाहीं. २० विकारानें, वेगानें. २१ आच्छादत नाहीं, स्वाधीन होत नाहीं. २२ आकळला जात नाहीं. २३. भिजत नाहीं. २४ [illegible] २५ [illegible] २६ पाण्याच्या संगतीनें. २७ [illegible] २८ [illegible] २९ [illegible], आत्मस्थिति. ३० [illegible] ३१ [illegible] ३२ [illegible] ३३ [illegible] ३४ [illegible] ३५ [illegible] ३६ [illegible] ३७ [illegible] ३८ [illegible] ३९ [illegible] ४० [illegible]

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः । तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥

स्वधर्मु जो बापा । तोचि नित्ययज्ञु जाण पां । म्हणोनि वर्ततां तेथ पापा। संचारु नाहीं ८१ हा निजधर्मु जैं सांडे । आणि कुकर्मी रति घडे । तैंचि बंधु पडे । संसारिक ८२ म्हणोनि स्वधर्मानुष्ठान । तें अखंड यज्ञ याजन । जो करी तया बंधन । कहींचें न घडे ८३ हा लोकु कर्में बांधिला । जो परतंत्रीभूत झाला । तो नित्य यज्ञातें चुकला । म्हणोनियां ८४ आतां येचिविशीं पार्था । तुज सांगेन एक मी कथा । जैं सृष्ट्यादि संस्था । ब्रह्मेनें केली ८५

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः । अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥१०॥

तैं नित्ययागसहितें । सृजिलीं भूतें समस्तें । परी नेणतीचि तियें यज्ञातें । सूक्ष्म म्हणऊनी ८६ ते वेळीं प्रजीं विनविलीं ब्रह्मा । देवा काय आश्रयो एथ आम्हां । तंव म्हणे तो कमळजन्मा । भूतांप्रति ८७ तुम्हां वर्णविशेषवशें । आम्हीं हा स्वधर्मुचि विहिलों असे । यातें उपासा मग आपैसे । पुरती काम ८८ तुम्हीं व्रत नियमु न करावे । शरीरातें न पीडावें । दुरी केंही न वचावें । तीर्थासी गा ८९ योगादिकें साधनें । साकांक्ष आराधनें । मंत्रयंत्रविधानें । झणीं करा ९० देवतांतरा न भजावें । हें सर्वथा कांहीं न करावें । तुम्हीं स्वधर्म-यज्ञीं यजावें । अनायासें ९१ अहेतुकें चित्तें । अनुष्ठा पां ययातें । पतिव्रता पतीतें । जियापरी ९२ तैसा स्वधर्मरूप मखु । हाचि सेव्यु तुम्हां एकु । ऐसें सत्यलोकनायकु । बोलता जाहला ९३ देखा स्वधर्मातें भजाल । तरी कामधेनु हा होईल । मग प्रजाहो न संडील । तुमतें कदा ९४

देवान्भावयतानेन ते देवा भावयंतु वः । परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

जैं येणेंकरूनि समस्तां । परितोषु होईल देवतां । मग ते तुम्हां ईप्सितां । अर्थातें देती ९५ या स्वधर्मपूजा पूजितां । देवतागणां समस्तां । योगक्षेमु निश्चिता । करिती तुमचा ९६ तुम्हीं देवांतें भजाल । देव तुम्हां तुष्टतील । ऐसी परस्परें घडेल । प्रीति जेथ ९७ तेथ तुम्हीं जें करूं म्हणाल । तें आपैसें सिद्धि जाईल । वांच्छितही पुरेल । मानसींचे ९८ वाचासिद्धी पावाल । आज्ञापक होआल । म्हणिये तुमतें मागतील । महाऋद्धि ९९ जैसें ऋतुपतीचें द्वार । वनश्री निरंतर । वोळंगे फळभार । लावण्येंसी १००

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः । तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥

**अन्वयार्थ**—(अयं लोकः)–हा अधिकारी कर्मठ मनुष्य –(यज्ञार्थात् कर्मणः)–ईश्वरार्थ केलेल्या कर्माहून–(अन्यत्र)–अन्य कर्मानें–(कर्मबन्धनः)—कर्मबद्ध होतो. ईश्वरासाठीं केलेल्या कर्माहून बाकीचें सर्व कर्म त्याला बंधनकारक होतें. म्हणून –(कौन्तेय)–हे अर्जुना !–(मुक्तसङ्गः)—कर्मफलाविषयींची आसक्ति सोडून–(तदर्थं)–ईश्वरासाठीं–(कर्म)–कर्म–(समाचर) –कर. ९

बाबारे ! आपल्या धर्माप्रमाणें आचरण करणें हाच नित्ययज्ञ असें समज; म्हणून त्याप्रमाणें वर्तन केल्यावर त्यांत पापाचा रिघाव होत नाहीं. ८१ प्राणी जेव्हां हा स्वधर्म टाकतात आणि वाईट कर्मांच्या ठिकाणीं प्रवृत्त होतात, तेव्हांच जन्ममरणाचे फेऱ्यांत पडतात. ८२ म्हणून स्वधर्माप्रमाणें आचरण करणें हाच अखंड यज्ञ असें समज; आणि जो पुरुष हा यज्ञ करतो, त्याला कांहींसुद्धां बंधन होत नाहीं. ८३ हें सर्व जग कर्मानें बांधलें जाऊन तें स्वकर्माला चुकलें म्हणूनच मायेचे पाशांत गुंतलें आहे. ८४ पार्था, आतां तुला मी त्याविषयीं एक कथा सांगतों. ज्या वेळेस ब्रह्मदेवानें सृष्टि निर्माण केली, ८५

**अन्वयार्थ**—(प्रजापतिः)–स्रष्टा ब्रह्मदेव–(पुरा)–सृष्टीच्या आरंभीं–(सहयज्ञाः)–यज्ञासहवर्तन––(प्रजाः)—तीन वर्णांना –(सृष्ट्वा)–उत्पन्न करून–(अनेन)–या यज्ञानें–(प्रसविष्यध्वं) –प्रसव–वृद्धि करा, आपली वाढ करून घ्या.–(एषः)–हा यज्ञ–(वः)–तुम्हांस–(इष्टकामधुक्)—इष्ट भोग–फल देणारा–(अस्तु)–होवो.–(इति)–असें–(उवाच)–म्हणाला. १०

त्यावेळेस प्राणी व त्यांनीं नित्य आचरण्याचे धर्म हीं दोन्हीं बरोबर उत्पन्न केलीं; परंतु ते गहन असल्यामुळें प्राण्यांना समजले नाहींत; ८६ तेव्हां त्यांनीं ब्रह्मदेवाची प्रार्थना केली कीं, "देवा, ह्या ठिकाणीं आम्हांला काय तरणोपाय आहे ?" तेव्हां तो भगवानाच्या नाभिकमला-पासून उत्पन्न झालेला ब्रह्मदेव त्यांना म्हणालाः—८७ "तुमच्या वर्णाश्रमाप्रमाणें आम्हीं पूर्वींच धर्म नियमित केले आहेत, त्याप्रमाणें तुम्ही आचरण करा म्हणजे तुमचे हेतु सहज पूर्ण होतील. ८८ तुम्हीं व्रतवैकल्यें करूं नका. उपासतापास करून शरिरास कष्ट देऊं नका, व तीर्थ-यात्रेकरितां दूर जाण्याचे श्रम करूं नका. ८९ योगादिक साधनें, तसेंच कामनिक आराधना व मंत्रतंत्रादि अनुष्ठानें कदाचित् करण्याच्या नादीं लागाल हो ! तसेंच ९० इतर देवांस भजूं नका व ह्या गोष्टी करूं नका, तर तुम्ही आपल्या वर्णाश्रमाप्रमाणें जो धर्म सांगितला आहे, त्याचें सुखानें आचरण करा. ९१ ज्याप्रमाणें पतिव्रता आपल्या पतीची सेवा निष्कामबुद्धीनें करते, त्याप्रमाणें तुम्ही आपल्या स्व-धर्माचें निष्कामबुद्धीनें आचरण करा." ९२ ब्रह्मदेव म्हणाले, "स्वधर्माचें आचरण हाच एक तुमचा यज्ञ होय, म्हणून तोच एक तुम्हाला आचरण करण्यास योग्य आहे." ९३ "जनहो, असें पहा कीं, तुम्ही जर स्वधर्मानें वागाल तर तो कामधेनूसारखा फलद्रूप होऊन तुम्हांला कधींहि अंतर देणार नाहीं." ९४

**अन्वयार्थ**—(अनेन)–या यज्ञाच्या योगानें–(देवान्)–इंद्रादि देवांची–(भावयत)–तुम्ही वृद्धि करा.–(ते देवाः)–ते देव–(वः)–तुमची–(भावयन्तु)–वृद्धि करोत. याप्रमाणें–(परस्परं भावयन्तः)–एकमेकांची वृद्धि करणारे असे होत्साते तुम्ही सर्व–(परं श्रेयः)–ज्ञानप्राप्तीच्या द्वारा परम श्रेयास–(अवाप्स्यथ) –प्राप्त व्हाल. ११

ह्या स्वधर्माच्या आचरणानें सर्व देवता संतोष पाव-तील, आणि मग त्या तुम्हांला, इच्छित फल देतील. ९५ अशा रीतीनें स्वधर्माचरणरूप पूजेनें सर्व देवतांगणांचें पूजन केलें असतां त्या तुम्हांला अप्राप्य वस्तूची प्राप्ति करून देऊन प्राप्त वस्तूचें संरक्षण निःसंशय करतील. ९६ तुम्ही देवांना भजाल तर देवही तुम्हांवर संतुष्ट होतील; आणि अशा प्रकारें एकमेकांचें एकमेकांवर जेव्हां प्रेम जडेल, ९७ तेव्हां तुम्ही जें करूं म्हणाल तें सहज सिद्धीस जाईल; आणि तुमच्या मनांतील सर्व वासना पूर्ण होतील. ९८ वाणीनें बोलाल तें सिद्ध होईल, आणि तुम्ही दुसऱ्यांना आज्ञा करणारे व्हाल, व महाऋद्धि नेहमीं तुमच्या आज्ञेंत राहून 'सेवा घ्या' असें म्हणतील. ९९ वसंत ऋतूचे द्वारांत ज्याप्रमाणें वनशोभा ही आपल्या फलपुष्पभाराच्या लावण्यानें निरंतर वास करिते, १००

**अन्वयार्थ**—(यज्ञभाविताः देवाः)–यज्ञानें संतुष्ट केले गेले-ले देव–(वः)–तुम्हांस–(इष्टान् भोगान् हि)–इष्ट असलेले भोगच –(दास्यन्ते)–देतील.–(तैः)–त्या देवांनीं–(दत्तान्)–दिलेले भोग–(एभ्यः)–त्या देवांस–(अप्रदाय)–न देतां–(यः)–जो–(भुङ्क्ते)–भोगतो–(सः)–तो–(स्तेनः एव)–चोरच होय. १२

१ शिरकाव, रिघ. २ प्रवृत्ति, आवड. ३ कर्थांहि. ४ मंकुतीला, मायेला. ५ जगत् (सृष्टि) इत्यादिकांची व्यवस्था. ६ ब्रह्मदेवानें. ७ उत्पन्न केलीं. ८ त्या. ९ नित्य आचरण करण्याच्या धर्मांना. १० गूढ, गहन. ११ प्रार्थिला. १२ ब्रह्मा. १३ ब्राह्मणादि जातिपरत्वें, आचारपरत्वें. १४ हा नित्य यज्ञ. १५ नियमित केला. १६ भजा. १७ आपोआप. १८ कोठेंहि. १९ जावें. २० सकाम, कामनिक. २१ तांत्रिक अनुष्ठानें. २२ करूं नका. २३ इतर देवतांला. २४ स्वधर्मरूप व वर्णधर्म-रूप यज्ञानें. २५ निष्काम. २६ आचरा, भजा. २७ यज्ञ. २८ आदरणीय. २९ ब्रह्मा. ३० इच्छिलेलें देणाऱ्या कामधेनूसारखा, हेतु पुरविणारा. ३१ सोडील. ३२ संतोष. ३३ इच्छिलेल्या. ३४ अप्राप्त वस्तूची प्राप्ति. ३५ प्राप्तवस्तूचें पालन. ३६ आपोआप. ३७ इच्छिलेल्या. ३८ आज्ञा करते. ३९ हुकुम, आज्ञा. ४० वसंत-ऋतूनें. ४१ अरण्यशोभा. ४२ आश्रय करी.

तैसें सर्व सुखेंसहित । दैवचि मूर्तिमंत । येईल देखा काढत । तुम्हांपाठीं १
ऐसें समस्त भोगभरित । होआल तुम्ही अनार्त । जरी स्वधर्मनिरत । वर्ताल
बापा २ कां जालिया सकल संपदा । जो अनुसरेल इंद्रियमदा । लुब्ध होऊ-
नियां स्वादा । विषयांचिया ३ तिहीं यज्ञभाविकीं सुरीं । जे हे संपत्ति दिधली पुरी ।
तयां स्वधर्मी सर्वेश्वरीं । न भजेल जो ४ अग्निमुखीं हवन । न करील देवता-
पूजन । प्रांप्तवेळे भोजन । ब्राह्मणाचें ५ विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील
अतिथी । संतोष नेदील ज्ञाती । आपुलिये ६ ऐसा स्वधर्मक्रियारहितु । आंथिलेपणें
प्रमत्तु । केवल भोगासक्तु । होईल जो ७ तया मग अपावो थोर आहे । जेणें
तें हातींचें सकळ जाये । देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं ८ जैसें गतायुषी
शरीरीं । चैतन्य वासु न करी । कां निदैवाच्या घरीं । न राहे लक्ष्मी ९ तैसा
स्वधर्मु जरी लोपला । तरी सर्व सुखांचा थारा मोडला । जैसा दीपासवें हर-
पला । प्रकाशु जाय ११० तैसी निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वस्ती न
घडे । आइका प्रजाहो फुडें । विरंचि म्हणे ११ म्हणऊनि स्वधर्मु जो सांडील ।
तयातें कालु दंडील । चोरु म्हणूनि हरील । सर्वस्व तयाचें १२ मग सकळ
दोषु भंवते । गिंवसोनि घेती तयातें रात्रिसमयीं स्मशानातें । भूतें जैसी १३
तैसीं त्रिभुवनींचीं दुःखें । आणि नानाविधें पातकें । दैन्यजात तितुकें । येथेंचि
वसे १४ ऐसें होय तया उन्मत्ता । मग न सुटे बापा रुदतां । कल्पांतींही
सर्वथा । प्राणिगणहो १५ म्हणऊनि निजवृत्ती हे न संडावी । इंद्रियें बरळों नेदावी ।
ऐसें प्रजांतें शिकवी । चतुराननु १६ जैसें जळचरा जळ सांडे । मग तत्क्षणीं
मरण मांडे । हा स्वधर्मु तेणें पाडें । विसंबों नये १७ म्हणोनि तुम्हीं समस्तीं ।
आपुलालिया कर्मी उचितीं । निरत व्हावें पुढतपुढती । म्हणिपत असें १८

यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः । भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥

देखा विहित क्रियाविधि । निहेतुका बुद्धि । जो असंतिये समृद्धि । विनियोगुं
करी १९ गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरे भजे द्विजीं । निमित्तादिकीं यजी । पि-
तरोद्देशें १२० या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करितां । हुतशेष स्वभावतः ।
उरे जें जें २१ तें सुखें आपुले घरीं । कुटुंबेसीं भोजन करी । कीं भोग्यचि तें
निवारी । कल्मषातें २२ तें यज्ञावशिष्ट भोगी । म्हणोनि सांडिजे तो अघीं । ज-
यापरी महारोगी । अमृतसिद्धि २३ कीं तत्त्वनिष्ठु जैसा । नागवे भ्रांतिलेशा ।

. त्याप्रमाणें, तुम्ही जेथें असाल तेथें सर्व सुखांसह मूर्तिमंत देवच तुमचा शोध करीत मागोमाग येईल. १ बावांनो ! जर तुम्ही एकनिष्ठेनें स्वधर्माचें आचरण कराल, तर तुम्ही ऐश्वर्ययुक्त होऊन तुम्हांला कसलीही इच्छा राहणार नाही. २ सकल संपत्ति प्राप्त झाली असतां विषयसेवनाच्या गोडीला लंपट होऊन इंद्रियांच्या स्वैरवर्तनास अनुमोदन देईल, ३ यज्ञानें संतुष्ट झालेल्या देवांनी जी ही आपल्यास पूर्ण संपत्ति दिली आहे, त्या संपत्तीनें व स्वधर्माचरणानें जो ईश्वरास भजणार नाहीं, ४ जो अग्नीत आहुती देणार नाहीं, देवतापूजन करणार नाहीं, यथाकालीं ब्राह्मणास भोजन घालणार नाहीं, ५ अथवा गुरुभक्तीला जो कंटाळेल, अतिथींचा आदरसत्कार करणार नाहीं व आपल्या ज्ञातीस संतोष देणार नाहीं, ६ असा जो स्वधर्माचें आचरण न करणारा, श्रीमंतीचा ज्याला ताठा भरला आहे आणि जो केवळ विषयासक्त झाला आहे, ७ त्याला महत्संकटें येतात. त्या योगानें जवळ असलेलें ऐश्वर्य नाहींसें होतें, आणि असलेले भोग सुद्धां भोगवत नाहीत. ८ ज्याप्रमाणें, आयुष्य संपलेल्या शरीरांत जीव वास करीत नाहीं किंवा करंट्याचे घरीं लक्ष्मी रहात नाहीं, ९ त्याप्रमाणें, स्वधर्माचा लोप झाला म्हणजे सुखाचें आश्रयस्थान नष्ट झालें म्हणून समजावें. दीप मालवतां क्षणींच जसा प्रकाश नाहींसा होतो, ११० त्याप्रमाणें, ब्रह्मदेव म्हणतो, "प्रजाजनहो ! जो आपापाल्या वर्णाश्रमधर्माचें आचरण सोडतो, त्याचें स्वातंत्र्य खरोखर नष्ट होतें. ११ म्हणून, स्वधर्माचा जो त्याग करील, त्याला काळ शिक्षा करील, आणि हा चोर आहे असें समजून त्याच्या सर्वस्वाचें हरण करील. १२ मग, रात्र झाल्यावर स्मशानाला जशीं भूतें वेढतात, तशीं सर्व संकटें त्याच्याजवळ येऊन त्याला वेढतात. १३ तसेंच, त्रिभुवनांतील सर्व दुःखें आणि हजारों प्रकारचीं पातकें, आणि झाडून सर्व दारिद्र्य हीं त्याचे ठिकाणीं वास करितात. १४ जनहो, ह्याप्रमाणें त्या उन्मत्त मनुष्याची स्थिति होते, आणि अशा दुःखांत प्राणी रडूं लागले तरी त्यांना कल्पांतींही दुःखें सोडीत नाहींत." १५ ब्रह्मदेव प्रजेला असा बोध करतात कीं, "म्हणून आपला स्वधर्म सोडूं नका, आणि इंद्रियांना स्वैर वर्तन करूं देऊं नका. १६ ज्याप्रमाणें माशाला पाण्यांतून बाहेर काढण्याबरोबर लागलीच मृत्यु येतो, त्याप्रमाणें तुमची स्थिति होईल, म्हणून तुम्ही स्वधर्म विसरूं नका." १७ ब्रह्मदेव म्हणतोः— म्हणून तुम्ही सर्वांनीं आपापलें उचित कर्म आचरण्याविषयीं नेहमीं तत्पर रहावें. १८

**अन्वयार्थ**—(यज्ञशिष्टाशिनः)–देवयज्ञादिक करून अवशिष्ट राहिलेलें अन्न खाणारे–(सन्तः)–शिष्ट–(सर्वकिल्बिषैः)–सर्व पापांकडून–(मुच्यन्ते)–मुक्त केले जातात–(तु)–परंतु–(ये)–जे–(आत्मकारणात्)–आपलेंच पोट भरण्यासाठीं–(पचन्ति)–अन्न शिजवितात–(ते पापाः)–ते पापी लोक–(अघं)–पाप–(भुञ्जते)–खातात. १३

हें पहा–जो विहित कर्माचें निष्काम बुद्धीनें आचरण करण्यासच्यें असलेल्या संपत्तीचा विनियोग करतो, १९ आपले गुरु, आप्त व अग्नि यांची पूजा करतो, आणि यथाकालीं ब्राह्मणांची सेवा करतो, व आपल्या पितरांच्या उद्देशानें जो पर्वकाळीं त्यांचें पूजन करितो, १२० आणि ह्याप्रमाणें विहित कर्माचरण व पंचमहायज्ञादि करून जें यज्ञशेष बाकी राहील, २१ तें सुखानें आपण कुटुंबासह सेवन करतो, त्याच्या सर्व पातकांचा त्या यज्ञशेषसेवनानेंच नाश होतो. २२ अमृताचें सेवन केल्यापासून ज्याप्रमाणें महारोगाचा नाश होतो, त्याप्रमाणें यज्ञावशिष्ट अन्नाचें सेवन केल्यानें पातकें त्याला सोडून जातात, २३ ज्याप्रमाणें ब्रह्मनिष्ठाला यत्किंचितही भ्रांति

१ शोध करीत, पाठीस लागत. २ सुखी, निरामय, पूर्णकाम. ३ एकनिष्ठ. ४ इंद्रियांच्या उन्मत्तपणाला. ५ गोडीस. ६ यज्ञानें संतुष्ट झालेल्या देवांनीं. ७ आलेल्या वेळीं, यथाकालीं. ८ अन्नदान. ९ कंटाळेल. १० न देईल. ११ संपन्नतेनें. १२ दुःख, अपाय. १३ न लाभे, लाभत नाहीं. १४ आयुष्य सरलेल्या. १५ जीवात्मा. १६ करंट्याच्या. १७ आत्मयज्ञ. १८ आश्रय, स्थान. १९ आत्मधर्म. २० खरें. २१ ब्रह्मा. २२ सोडील. २३ शिक्षा करील. २४ आसपास. २५ वेढून. २६ सर्व दुःखें, दुःखमात्र. २७ रडल्यानें. २८ आत्मधर्म, आत्मयज्ञ. २९ पाहिजे तसें वागूं देऊं नये. ३० ब्रह्मा. ३१ आत्मयज्ञ. ३२ त्याप्रमाणें. ३३ विसरूं नये. ३४ योग्य. ३५ तत्पर. ३६ वारंवार. ३७ म्हणत, सांगत. ३८ कर्मानुष्ठान. ३९ निरिच्छ. ४० यथाशक्ति. ४१ खर्च, उपयोग. ४२ यथाकालीं. ४३ पर्वकालीं. ४४ अग्नीत. ४५ हवनद्रव्यांतील अवशेष. ४६ पापाला. ४७ यज्ञशेष. ४८ दुःखें, पापें. ४९ ब्रह्मनिष्ठ. ५० सांपडत नाही.

तो शेषभोगी तैसा । नोंकळे दोषा २४ म्हणोनि स्वधर्मे जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे । मग उरे तें भोगिजे । संतोषेसीं २५ हें वांचूनि पार्था । राहाटों नये अन्यथा। ऐसी आद्य हे कथा। श्रीमुरारी सांगे२६जे देहचि आपणपें मानिती। आणि विषयांतें भोग्य म्हणती । यापरतें न स्मरती । आणिक कांहीं २७ हें यज्ञोपकरण सकळ । नेणतसा ते बरळ । अहंबुद्धि केवळ । भोगूं पाहती २८ इंद्रियरुचीसारखें । करविती पाक निकें । ते पापिये पातकें । सेविती जाण २९ हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें । मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं १३० हें सांडोनियां मूर्ख । आपणपेयालागीं देख । निपजविती पाक । नानाविध ३१ जिहीं यज्ञु सिद्धी जाये । परेशा तोषु होये । तें हें सामान्य अन्न न होये । म्हणोनियां ३२ हें न म्हणावें साधारण । अन्न ब्रह्मरूप जाण । हें जीवनहेतु कारण । विश्वा यया ३३

अन्नाभ्दवन्तिभूतानि पर्जन्यादन्नसंभवः । यज्ञाभ्दवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुभ्दवः ॥ १४ ॥
कर्म ब्रह्मोभ्दवं विद्धि ब्रह्माक्षरसमुभ्दवं । तमात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

अन्नास्तव भूतें । प्ररोह पावती समस्तें । मग पर्जन्यु या अन्नातें । सर्वत्र प्रसवे ३४ तया पर्जन्या यज्ञीं जन्म । यज्ञातें प्रगटी कर्म । कर्मासि आदि ब्रह्म । वेदरूप ३५ तया वेदातें परात्पर । प्रसवतसे अक्षर । म्हणऊनि हें चराचर । ब्रह्मबद्ध ३६ परी कर्माचिये मूर्ति । यज्ञीं अधिवासु श्रुति । ऐकें सुभद्रापति । अखंड गा ३७

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः । अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

ऐशी हे आदि परंपरा । संक्षेपें तुज धनुर्धरा । सांगितली या अध्वरा- । लागूनियां ३८ म्हणूनि समूळ हा उचितु । स्वधर्मरूप क्रतु । नानुष्ठी जो मत्तु । लोकीं इये ३९ तो पातकांची राशी । जाण भार भूमीसी । जो कुकर्में इंद्रियांसी । उपेगा गेला १४० ते जन्मकर्म सकळ । अर्जुना अति निष्फळ । जैसें कां अभ्रपटळ । अकाळींचें ४१ कां गळां स्तन अजेचे । तैसें जियालें देखें तयाचें । जया अनुष्ठान स्वधर्माचें । घडेचिना ४२ म्हणोनि ऐकें पांडवा । हा स्वधर्मु कवणें न संडावा । सर्वभावें भजावा । हाचि एकु ४३ हां गा शरीर जरी जाहलें । तरी कर्तव्य वोघें आलें । मग उचित कां आपुलें । वोसंडावें ४४ परिसें पां सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची । खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ४५

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः । आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥

होत नाहीं, त्याप्रमाणें यज्ञ करून शेष राहिलेल्या अन्नाचें सेवन करणाऱ्याला दोष लागत नाहींत. २४ म्हणून, स्वधर्मानें संपादन केलेलें द्रव्य स्वधर्मानेंच खर्चावें आणि बाकी राहील त्याचा संतोषानें उपभोग घ्यावा. २५ भगवान श्रीकृष्ण सांगतातः—पार्था, अशी ही आद्यस्थिति आहे; त्याशिवाय मनुष्यानें अन्य मार्गानें वागूं नये. २६ जे पुरुष आपल्या शरीरासच आत्मा असें मानतात, विषयांचें सेवन हींच भोग्यवस्तु असें मानून त्याशिवाय दुसरें कांहीं जाणत नाहींत, २७ हें सर्व साहित्य यज्ञसंबंधी आहे, हें न जाणून जे भ्रांतींत असतात आणि अहंकारबुद्धीनें फक्त विषयोपभोगावरच ज्यांची दृष्टि असते, २८ जे आपणांस आवडणारीं उत्तम पक्वान्नें तयार करून आपणच त्यांचें सेवन करतात, ते पापी असून पातकांचेंच सेवन करतात असें जाण. २९ ही सर्व संपत्ति स्वधर्मरूप यज्ञाचें हवनद्रव्य आहे, असें समजून ती स्वधर्मयज्ञानेंच परमेश्वरास अर्पण करावी. १३० हें सर्व सोडून, मूर्ख लोक आपल्या करितांच नानाप्रकारचे पदार्थ तयार करवितात. ३१ ज्या अन्नापासून यज्ञाची सिद्धि होते, आणि ईश्वर संतुष्ट होतो, तें हें अन्न सामान्य नाहीं; म्हणून, ३२ ह्या अन्नाला साधारण असें न समजतां तें ब्रह्मरूप आहे, असें समज. कारण सर्व जगाचें हें जीवित होय. ३३

**अन्वयार्थ**–(अन्नात्)–खाल्लेल्या अन्नापासून–(भूतानि)–प्राण्यांचीं शरीरें–(भवन्ति)–होतात.–(पर्जन्यात्)–पर्जन्यापासून –(अन्नसम्भवः)–तांदूळ, गहूं इत्यादि अन्नाची उत्पत्ति होते.–(यज्ञात्)–यज्ञापासून–(पर्जन्यः)–पाऊस–(भवति)–होतो –(यज्ञः)–तो धर्म–अपूर्व नांवाचा यज्ञ–(कर्मसमुद्भवः)–यजमान, ऋत्विक् इत्यादिकांच्या कर्मापासून त्यांच्या हालचालींनें होणारा आहे. १४–(कर्म)–यजमानादिकांचें तें कर्म –(ब्रह्मोद्भवं)–वेदापासून उद्भवलेलें आहे. वेद हें कर्माचें कारण –प्रमाण आहे, असें–(विद्धि)–तूं जाण–(ब्रह्म)–तो वेद–(अक्षरसमुद्भवं)–परमात्म्यापासून श्वासोच्छ्वासाप्रमाणें प्रकट झालेला आहे.–(तस्मात्)—परमात्म्यापासून प्रकट झालेला असल्यामुळें–(ब्रह्म)–वेद–(सर्वगतं)–सर्वप्रकाशक असूनही—(नित्यं)–सर्वदा–(यज्ञे)–यज्ञांत–(प्रतिष्ठितं)–प्रतिष्ठित आहे. १५

अन्नापासून प्राणिमात्राची उत्पत्ति होते, आणि पर्जन्यापासून सर्व ठिकाणीं अन्न उत्पन्न होतें; ३४ त्या पर्जन्याची उत्पत्ति यज्ञापासून, आणि यज्ञाची कर्मापासून होते. कर्माची उत्पत्ति वेदरूप ब्रह्मापासून ३५ आणि त्या वेदाची उत्पत्ति परमात्म्यापासून होते; म्हणून हें सर्व जगत् ब्रह्माधीन आहे. ३६ पण, हे सुभद्रापते, ऐक; कर्माची मूर्ति जो यज्ञ, त्यांत वेदरूपी ब्रह्म निरंतर वास करितें. ३७

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)–हे अर्जुना !–(एवं)–वर वर्णन केल्याप्रमाणें ईश्वरानें–(प्रवर्तितं)–प्रवृत्त केलेलें–(चक्रं)–जगचक्र–(इह)–या लोकीं–(यः)–जो कर्माधिकारी–(न अनुवर्तयति)–तसेंच पुढें चालवीत नाहीं.–(सः)–तो–(अघायुः)–पापी आहे. त्याचें जिणें पापरूप आहे. (इंद्रियारामः)—त्याची सर्व क्रिडा इंद्रियांच्या योगानें विषयांमध्यें होते. तो— (मोघं)–वृथा–फुकट–(जीवति)–जिवंत राहतो. १६

ह्याप्रमाणें, धनुर्धरा, ह्या स्वधर्मरूप यज्ञाची मूळ पीठिका तुला संक्षेपानें सांगितली. ३८ म्हणून, जो उन्मत्त पुरुष सर्व प्रकारें उचित अशा ह्या स्वधर्मरूप यज्ञाचें ह्या लोकीं आचरण करीत नाहीं, ३९ तसेंच, जो दुराचरणानें इंद्रियांना विषय पुरविण्यांत काळ घालवितो, तो पापराशी भूमीला केवळ भारभूत आहे असें समज. १४० ज्याप्रमाणें अकालीं आकाशांत आलेले ढग निरुपयोगी असतात, त्याप्रमाणें, अर्जुना, त्या उन्मत्त मनुष्याची सर्व जन्मांतील कर्में निष्फल होत. ४१ ज्याला स्वधर्माचें अनुष्ठान घडत नाहीं, त्याचें जिणें शेळीच्या गळ्यांतील स्तनाप्रमाणें व्यर्थ होय. ४२ म्हणून पांडवा, ऐकः– ह्या स्वधर्म कोणी सोडूं नये, तर सर्वभावानें ह्याचेंच आचरण करावें. ४३ पहा कीं, शरीर जरी प्राप्त झालें आहे, तरी पूर्वकर्तव्यकर्म हें ओघानें आलेंच. असें जर आहे तर आपलें उचित कर्म कां सोडावें? ४४ हे सव्यसाची, ह्या मनुष्यदेह प्राप्त झाला असतां उचित कर्म करण्याची ज्यांना खंती येते, ते मूर्ख असें समज. ४५

**अन्वयार्थ**–(तु)–पण याच्या उलट–(यः मानवः)–जो मनुष्य अर्थात् सांख्य–आत्मज्ञाननिष्ठ–(आत्मरतिः एव स्यात्)–आत्मरतिच असतो म्ह० त्याची रति आत्म्यामध्येंच असते, –(च)–व–(आत्मतृप्तः)–आत्मस्वरूपांतच तृप्त असतो–(च)–आणि–(आत्मनि एव संतुष्टः)–आत्म्यामध्येंच संतुष्ट असतो –(तस्य)–त्याला–(कार्यं)–कांहीं शास्त्रविहित कर्तव्य–(न विद्यते)–नसतें. १७

१ यज्ञावशिष्ट भक्षण करणारा. २ सांपडत नाहीं. ३ मिळतें. ४ खर्चावें. ५ आत्मा. ६ आपलीकडे. ७ यज्ञसामुग्री ८ न जाणून, अज्ञ होत्साते. ९ भ्रांत. १० अहंकारानें. ११ चांगला स्वयंपाक. १२ सर्व संपत्ति. १३ परमेश्वरीं. १४ त्यागून. १५ आपल्या स्वतःकरितां. १६ परमेश्वराला. १७ जगताला. १८ अन्नापासून. १९ वाढ, वृद्धि. २० निपजविती. २१ सगळ्यांमध्यें श्रेष्ठ २२ अविनाशी ब्रह्म. २३ ब्रह्माधीन.

२४ कर्मांची मूर्ति जो यज्ञ त्यांत श्रुतीचा अधिवास ( रहाणें ) आहे. २५ मालिका. २६ स्वधर्मयज्ञ, यज्ञासंबंधी. २७ यज्ञ. २८ उन्मत्त. २९ वाईट कर्मानें. ३० उपयोग करूं लागला. ३१ ढग. ३२ शेळीचे. ३३ जिणें, जीवित. ३४ सहाजिक, सरळ मार्गानेंच. ३५ सोडावें, टाकावें. ३६ ऐक. ३७ दोन्हीं हातांनीं बाण सोडणाऱ्या अर्जुना. ३८ प्राप्त होऊन. ३९ अडाणी.

देखें असतेनि देहधर्मे । एथ तोचि एकु न लिंपे कर्मे । जो अखंडित रमे । आपणपांचि ४६ जे तो आत्मबोधें तोषला । तरी कृतकार्यु देखें जाहला । म्हणोनि सहजें सांडवेला । कर्मसंगा ४७

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन । न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

तृप्ति जालिया जैसी । साधनें सरती आपैसीं । देखें आत्मतुष्टीं तैसीं । कर्मे नाहीं ४८ जंववरी अर्जुना । तो बोधु भेटेना मना । तंवचि यया साधना । भजावें लागे ४९

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर । असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥

म्हणऊनि तूं नियतु । सकळ कामरहितु । होऊनियां उचितु । स्वधर्मे रहाटें १५० जे स्वधर्मे निष्कामता । अनुसरले पार्था । ते कैवल्यपद तत्त्वता । पावले जगीं ५१

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः । लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

देख पां जनकादिक । कर्मजात अशेख । न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ५२ याकारणें पार्था । होआवी कर्मी आस्था । हे आणिकाही एका अर्था । उपकारेल ५३ जे आचरतां आपणपयां । देखी लागेल लोका यया । तरी चुकेल अपाया । प्रसंगेंचि ५४ देखें प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले । तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ५५ मार्गी अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा । अज्ञाना प्रकटावा धर्मु तैसा । आचरोनि ५६ हां गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे । तिहीं कवणेपरी जाणिजे । मार्गातें या ५७

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः । स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

एथ वडील जें जें करिती । तया नाम धर्मु ठेविती । तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ५८ हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें । विशेषें आचरावें । लागे संतीं ५९

न मे पार्थाऽस्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन । नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥२२॥

आतां आणिकांचिया गोठी । कायशा सांगों किरीटी । देखें मीच इये राहाटी । वर्तत असें १६० काय सांकडें कांहीं मातें । कीं कवणें एकें आर्ते । आचरें मी धर्मातें । म्हणसी जरी ६१ तरी पुरतेपणालागीं । आणिकु दुसरा नाहीं जगीं । ऐसी सामग्री माझ्या अंगीं । जाणसी तूं ६२ मृत गुरुपुत्र आणिला । तो तुवां पवाडा देखिला । तोही मी उगेला । कर्मी वर्ते ६३

हें पहा, जो पुरुष आत्मस्वरूपामध्यें निमग्न आहे, तो मात्र देहधर्मांत असूनही कर्मानें लिप्त होत नाहीं. ४६ कारण, तो आत्मबोधानें संतोष पावलेला असल्यामुळें कृतकार्यच झालेला असतो, असें समज. म्हणून सहजींच कर्मसंगापासून मुक्त होतो. ४७

**अन्वयार्थ**—(इह)–या लोकीं–(तस्य)–त्याच्या–(कृतेन)–केलेल्या कर्मानें–(अर्थः)–कांहीं फल–(न एव [अस्ति])–नाहींच. त्याचप्रमाणें त्याच्या–(अकृतेन)–न केलेल्या कर्मानें–(कश्चन)–कोणत्याही प्रकारचा–(अर्थः)–प्रत्यवाय–(न)–नाहीं. –(च)–आणि–(अस्य)–या सांख्याचा–(सर्वभूतेषु)–ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्वभूतांतील–(कश्चित्)–कोणीही –(अर्थव्यपाश्रयः)–प्रयोजनाचा आश्रय–(न अस्ति)–नाहीं. १८

ज्याप्रमाणें तृप्ति झाल्यावर तिचीं साधनेंही आपोआप संपतात त्याप्रमाणें स्वस्वरूपानंदांत निमग्न झाल्यावर कर्मेंही उरत नाहींत. ४८ अर्जुना, जोंपर्यंत अशा प्रकारचें आत्मज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत ह्या साधनाचें आचरण करावें लागतें. ४९

**अन्वयार्थ**—(तस्मात्)–त्याअर्थीं–(असक्तः)–आसक्तिरहित होऊन–(सततं)–सर्वदा-नेहमीं–(कार्यं कर्म)–अवश्य कर्तव्य असलेलें जें वर्णाश्रमविहित नित्यकर्म तें–(समाचर)–तूं कर.–(हि)–कारण तूं–(असक्तः)–फलामध्यें आसक्त न होतां–(कर्म)–कर्म–(आचरन्)–करणारा–ईश्वरार्पणबुद्धीनें कर्म करणारा –(पूरुषः)–पुरुष चित्तशुद्धीच्या द्वारा–(परं)–मोक्षास–(आप्नोति)–प्राप्त होतो. १९

म्हणून नेहमीं फलाची आशा सोडून देऊन तूं उचित अशा आपल्या धर्माचें आचरण कर. १५० पार्था, ह्या जगांत खरोखर ज्यांनीं स्वधर्माचें आचरण निष्कामबुद्धीनें केलें ते मोक्षपदास गेले. ५१

**अन्वयार्थ**—(हि)–कारण–(जनकादयः)–जनक-अश्वपति वगैरे विद्वान् क्षत्रिय–(कर्मणा एव)–कर्माचरणानेंच-कर्मानुष्ठान करूनच–(संसिद्धिं)–मोक्षास–(आस्थिताः)–प्राप्त होण्यास तयार झाले. कर्मानुष्ठानानेंच मोक्ष मिळण्याचा यत्न करूं लागले.–(लोकसंग्रहं एव अपि)–लोकांनीं उन्मार्गी होऊं नये, याच गोष्टीकडेही––(संपश्यन्)––लक्ष्य ठेवणारा––[त्वं]–तूं–(कर्तुं अर्हसि)–कर्म करण्यासच योग्य आहेस. २०

हें पहा––कर्माचा मुळींच त्याग न करितां जनकादिक मोक्षपदास गेले. ५२ ह्याकरितां, पार्था, कर्माचें ठिकाणीं तूं आस्था ठेव. कारण त्यापासून आणखीही एक उपयोग होणार आहे; ५३ त्या कर्माचें आपल्याकडून तसें आचरण झालें असतां ह्या लोकांना वळण लागेल, आणि त्यामुळें त्यांचीं दुःखें अनयासें नाहींतशीं होतील. ५४ असें पहा कीं, जे कृतार्थ होऊन निष्काम झाले आहेत, त्यांनाही लोकांवर उपकार करण्याचें कर्तव्य राहिलेंच आहे. ५५ अंधळ्यांच्या रांगेंतील पुढारी डोळस मनुष्य जसा त्यांच्याप्रमाणेंच मार्ग चालतो, त्याचप्रमाणें ज्ञान्यांनीं स्वतः धर्माचें आचरण करून अज्ञानी जनांस धर्माचें मार्गास लावावें. ५६ अरे, जर ज्ञान्यांनीं अशा प्रकारचें वर्तन केलें नाहीं, तर अज्ञानी लोकांस कसें कळेल ? आणि त्यांना हा मार्ग कोणच्या उपायानें समजेल ? ५७

**अन्वयार्थ**—(श्रेष्ठः)–प्रधान-मुख्य पुरुष–(यत् यत्)–जें जें–(आचरति)–करतो (तत् तत् एव)–तें तेंच कर्म–(इतरः जनः)–इतर जन त्याचा अनुयायि वर्ग करतो.–(सः)–तो, श्रेष्ठ पुरुष–(यत्)–ज्या लौकिक किंवा वैदिक कर्माला वगैरे –(प्रमाणं)–प्रमाण–(कुरुते)–करतो–(लोकः)–लोक–(तत्)–त्यालाच––(अनुवर्तते)–अनुसरतो. २१

ह्या लोकीं श्रेष्ठ लोक जें आचरण करतात, त्यालाच धर्म असें नांव ठेवून इतर सर्व लोक त्याचेच आचरण करितात. ५८ स्वभावतःच हें असें आहे, म्हणून कर्माचा त्याग करूं नये; आणि साधुसंतांना तर कर्माचें आचरण विशेषेंकरून करावें लागतें. ५९

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)–हे अर्जुना !–(मे)–मला–(त्रिषु लोकेषु)–या तीन लोकांत–(किंचन)–कांहींहि–(कर्तव्यं)–कर्तव्य कर्म–(न अस्ति)–नाहीं, कारण–(अनवाप्तं)–मला न मिळालेलें असें कांहीं नसून,–(अवाप्तव्यं)–मिळवावयास योग्य असें कांहीं–(न अस्ति)–नाहीं. तरी सुद्धां मी–(कर्मणि)–कर्मामध्यें–(वर्ते एव)–राहतोंच म्ह० कर्म करतोंच. २२

अर्जुना, आतां फार लांब दुसऱ्याच्या गोष्टी कशाला सांगत बसूं, मीच या धर्माचरणांत वागत आहें. १६० आतां, मला कांहीतरी एकादें संकट पडलें असेल किंवा कोणती तरी इच्छा असेल, म्हणून मी स्वधर्माचें आचरण करितों असें जर तूं म्हणशील, ६१ तर या जगांत माझ्याइतका गुण व ऐश्वर्य यांनीं संपन्न दुसरा कोणी नाहीं, हें माझें सामर्थ्य तुला माहीत आहेच; ६२ सांदिपनी गुरूचा मेलेलाही मुलगा आणून दिला, तो पराक्रम तूं पाहिलास; पण असाही जो निरिच्छ तो सुद्धां कर्ममार्गाचें मुकाट्यानें आचरण करीत आहे. ६३

१ असतांना. २ देहाचा व्यापार. ३ आत्मस्वरूपीं. ४ कारण. ५ सुकला, मुक्त झाला. ६ आपोआप. ७ आत्मस्वरूपीं, आनंदमग्न झालेल्यांच्या ठायीं. ८ ज्ञान. ९ आचरावें. १० नियमानें, सदोदित. ११ स्वधर्मानें. १२ मोक्षपद, स्वरूपप्रतिष्ठा, अद्वितीयब्रह्मभाव. १३ संपूर्ण १४ म्हणजे, असावी. १५ उपयोगी पडेल. १६ स्वतः. १७ मार्ग, वळण, चाल. १८ हा लोक दुःखापासून दूर राहील. १९ कृतार्थ, २० डोळसही. २१ समजेल. २२ श्रेष्ठ, वृद्ध. २३ मुख्यत्वेंकरून. २४ दुसऱ्याच्या. २५ गोष्टी. २६ संकट. २७ इच्छेनें. २८ पूर्णपणानें. २९ सामर्थ्य, साहित्य. ३० सांदिपनीचा पुत्र. ३१ पराक्रम, महत्त्व, थोरपण. ३२ उगाच, निरिच्छपणें.

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः । मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥

परी स्वधर्मी वर्ते कैसा । साकांक्षु कां होय जैसा । तयाची एका उद्देशा-। लागोनियां ६४ जे भूतजात सकळ । असे आम्हांचि आधीन केवळ। तरी न व्हावें बरैळ । म्हणोनियां ६५

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् । संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥२४॥

आम्ही पूर्णकाम होउनी। जरी आत्मस्थिति राहुनी । तरी प्रजा हे कैसेनि । निस्तरेल ६६ इहीं आमुची वाँस पाहावी । मग वर्तती परी जाणावी । ते लोकस्थिति आघवी । नासिली होईल ६७ म्हणोनि समर्थु जो येथें । आथिला सर्वज्ञते । तेणें सविशेषें कर्मातें । त्यजावें ना ६८

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत । कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥२५॥

देखें फळाचिया आशा। आचरे कामुकु जैसा। कर्मी भेरू होआवा तैसा। निराशाही ६९ जे पुढतपुढतीं पार्था। हे सकळ लोकसंस्था। रक्षणीय सर्वथा। म्हणऊनियां १७० मार्गाधारें वर्तावें। विश्व हें मोहरे लावावें। अलौलिका नोहावें। लोकांप्रति ७१

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् । जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥२६॥

जें सायासें स्तन्य सेवी । तें पक्वान्नें केवीं जेवी । म्हणोनि बाळका जैशीं नेदावीं । धनुर्धरा ७२ तैशीं कर्मी जयां अयोग्यता । तयांप्रति नैष्कर्म्यता । न प्रगटावी खेळतां । आदिकरूनी ७३ तेथें सत्क्रियाचि लावावी । तेचि एकी प्रशंसावी । नैष्कर्मीही दावावी । आचरोनि ७४ तया लोकसंग्रहालागीं । वर्ततां कर्मसंगीं । तो कर्मबंधु आंगीं । वाजेलना ७५ जैसी बहुरुपियांची रावो राणी। स्त्रीपुरुषभावो नाहीं मनीं । परी लोकसंपादणी । तैशीच करिती ७६

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः । अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥२७॥

देखें पुढिलांचें वोझें । जरी आपुला माथां घेइजे । तरी सांगें कां न दाटिजे । धनुर्धरा ७७ तैशीं शुभाशुभें कर्मे । जियें निपजती प्रकृतिधर्मे। तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता म्हणे ७८ ऐसा अहंकारादि रूढ । एकदेशी मूढ । तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ७९ हें असो प्रस्तुत । सांगिजेल तुज हित । तें अर्जुना देऊनि चित्त । अवधारीं पां १८०

**अन्वयार्थ**—(हि)–कारण–(यदि)–जर–(अहं)–मी–(अतन्द्रितः सन्)–तन्द्रा सोडलेला असा होऊन, आळस सोडून–(कर्मणि)–कर्मामध्यें–सदाचरणांत–(जातु)–कदाचित्–(न वर्तेय)–न वागलों तर–(पार्थ)–हे अर्जुना !–(मनुष्यः)–मनुष्य–(सर्वशः)–सर्व प्रकारें–(मम)–माझ्या–(वर्त्म)–मार्गास–(अनुवर्तन्ते)–अनुसरतील. २३

परंतु त्या एका लोककल्याणाच्या उद्देशानेंच एकादा सकाम पुरुषानें जसें धर्माचरण करावें तसाच मी स्वधर्माचें आचरण करितों. ६४ कारण, सर्व प्राणी आमच्यावर अवलंबून आहेत, तेव्हां त्यांनी कर्मभ्रष्ट होऊं नये. ६५.

**अन्वयार्थ**—(अहं)–मी–(कर्म)–कर्म–सदाचरण–(न कुर्यां चेत्)–जर न करीन तर–(इमे लोकाः)–हे सर्व लोक–(उत्सीदेयुः)–नाश पावतील–(च)–व मी–(संकरस्य)–वर्णसंकराचा–(कर्ता स्याम्)–कर्ता–वर्णसंकराचें निमित्त होईन व त्यामुळें–(इमाः प्रजाः)–या सर्व लोकांना–(उपहन्याम्)–मी मारीन–त्यांचा जणुं काय घातच करीन. २४

आम्हीं निष्काम होऊन आत्मानंदामध्येंच राहिलों आणि धर्माचरण न केलें, तर प्रजेचा तरणोपाय कसा होईल ? ६६ वास्तविक संप्रदाय असा की, लोकांनी आमच्या वर्तनाकडे पाहून धर्माच्या वागणुकीचे प्रकार समजून घ्यावे, ही जी लोकांची रहाटी आहे, ती आम्हीं धर्माचरण न केलें तर बिघडून जाईल. ६७ म्हणून, जो समर्थ व सर्वज्ञानसंपन्न असेल, त्यानें विशेषेंकरून कर्माचा त्याग कधींही करूं नये. ६८

**अन्वयार्थ**—(हे भारत)–हे अर्जुना !–(कर्मणि सक्ताः) या कर्मांचा मी कर्ता आहें, मला याचें फल अवश्य मिळेल, असा अभिमानानें कर्मांमध्यें आसक्त झालेले–( अविद्वांसः)–अविद्वान्–आत्मज्ञानशून्य लोक–(यथा)–जसें–(कुर्वन्ति)–कर्म करितात–(तथा)–त्याप्रमाणें–(लोकसंग्रहं)–लोकसंग्रह–लोकानुग्रह–(चिकीर्षुः)–करण्याची इच्छा करणाऱ्या–(विद्वान्)–विद्वानानें–(असक्तः सन्)–आसक्त न राहून–मी याचा कर्ता व भोक्ता असा अभिनिवेश न करितां कर्म–(कुर्यात्)–करावें. २५

फलाची इच्छा करणारा पुरुष ज्याप्रमाणें कर्माचरण करितो, त्याप्रमाणें ज्ञानवानानेंही कर्माचरणांवर विशेष भर दिला पाहिजे. ६९ कारण, पार्था, पुढें होणाऱ्या लोकसमुदायाचें रक्षण करणें अवश्य आहे, म्हणून १७० थोरांनीं स्वतः सन्मार्गानें वागून लोकांनाहि धर्माच्या मार्गास लावावें. परंतु सामान्य जनाला आपण कोणी अलौकिक पुरुष आहोंत असें भासवूं नये. ७१

**अन्वयार्थ**—(कर्मसंगीनां अज्ञानां)–कर्म व त्याचें फल यांत आसक्ति ठेवणाऱ्या अज्ञांचा–(बुद्धिभेदं)–बुद्धिभेद–(न जनयेत्)–करूं नये, त्यांची कर्मांवरील श्रद्धा ढळवूं नये, तर–(विद्वान्)–विद्वानानें–आत्मज्ञानी श्रेष्ठ पुरुषानें–(युक्तः)–समाहितचित्त राहून–(समाचरन्)–कर्मानुष्ठान करीत त्यांच्याकडून–(सर्वकर्माणि)–सर्व कर्में–(जोषयेत्)–करवावीं. २६

त्याचप्रमाणें कर्माचरणेंकरून चित्तशुद्धि होण्याचे पूर्वीं त्यांना नैष्कर्म्य ब्रह्मस्थितीचेंही ज्ञान सांगूं नये. कारण, –धनुर्धरा, जें मूल स्तनपान देखील मोठ्या आयासानें करितें, तें पक्वान्नें कसें बरें खाणार? म्हणून त्याला ज्याप्रमाणें तीं देऊं नयेत, ७२ त्याप्रमाणें कर्माचरण करण्यासही जो अनधिकारी आहे, त्याला ज्ञानमार्गाची थोरवी थट्टेत सुद्धां सांगूं नये. ७३ त्याला सत्कर्माचेंच आचरण करण्यास लावावें, सत्कर्माचीच प्रशंसा करावी, आणि निष्काम झालेल्या पुरुषांनीही सत्कर्म आचरण करून दाखवावें. ७४ वर्णाश्रमधर्मरक्षणाकरितां कर्ममार्गाचें आचरण करीत असतां त्यांना कर्मबंध भोगावा लागणार नाहीं. ७५ बहुरूप्यांनीं जरी राजाराणीचीं सोंगें घेतली तरी त्यांच्या मनांत स्त्रीपुरुषभाव मुळींच नसतो: पण लोकांना दाखविण्याकरितां ते तसेच वागतात. ७६

**अन्वयार्थ**—(अहंकारविमूढात्मा)–ज्याचा आत्मा–चित्त अहंकारानें–शरीरालाच मी–असें मानल्यानें विमूढ–विवेकहीन झालें आहे असा अज्ञ–(प्रकृतेः)–प्रकृतीच्या–(गुणैः)–विकारांनीं–शरीर–इंद्रियरूप परिणामाकडून–(सर्वशः)–सर्व प्रकारें–(क्रियमाणानि)–केलीं जाणारीं–(कर्माणि)–कर्में–(अहं कर्ता)–मीच करतों–(इति)–असें–(मन्यते)–मानतो. २६

आतां तींच कर्में अज्ञान्यास कशीं बाधक होतात. असें म्हणशील तर–अर्जुना, असें पहा कीं, दुसऱ्याचें ओझें आपल्या डोक्यावर जर घेतलें, तर आपली मान अवघडणार नाहीं कां सांग बरें? ७७ त्याचप्रमाणें प्रकृतीच्या गुणांमुळें जीं बरीवाईट कर्में उत्पन्न होतात, त्यांचा कर्ता मीच आहे असें अज्ञ मनुष्य भ्रमानें म्हणतो. ७८ अशा रीतीनें साडेतीन हात देहाचाच अभिमान धारण करणाऱ्या पुरुषाला हा नैष्कर्म्य स्थितीचा परमार्थ प्रकट करूं नये. ७९ ( कारण त्याला अनधिकारामुळें परमार्थ तत्त्व कळणार नाहीं आणि तो कर्मापासूनही भ्रष्ट होईल) असो. अर्जुना, हें राहूं दे. प्रस्तुत तुझें हीत कशांत आहे, तें तुला सांगतों, लक्ष देऊन ऐक. १८०

---

१ साभिलाष. २ इतुकारितां. ३ अमर्याद, भ्रष्ट. ४ वासनातृप्त. ५ ब्रह्मस्थितीनें. ६ पार पडेल. ७ वर्तन, वाट. ८ वर्तनक्रम. ९ जनरहाटी. १० संपन्न. ११ फलेच्छु. १२ आवड. १३ निरिच्छ पुरुषास देखील. १४ वारंवार. १५ पाळलीं पाहिजे. १६ योग्य मार्गास. १७ अलौकिक. १८ न व्हावें. १९ देऊं नयेत. २० अनधिकार. २१ कर्माचा त्याग. २२ थट्टेनें. २३ देखील. २४ सदाचरण. २५ वाखाणावी. २६ नैष्कर्म्य स्थितींतील जनांनीं सुद्धां. २७ वर्णाश्रमधर्मसंरक्षणासाठीं. २८ आदळणार नाहीं. २९ राजा. ३० लोकांची समजूत. ३१ दुसऱ्याचें. ३२ ओझ्याखालीं दमून जाणें. ३३ उत्पन्न होतात. ४३ मायेचे गुणांमुळें. ६५ देहात्मबुद्धीच्या अधीन झालेला. ३६ देहापुरती व्याप्ति मानणारा. ३७ गहन. ६८ सांप्रत.

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः । गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

जे तत्त्वज्ञानियांच्या ठायीं । तो प्रकृतिभावो नाहीं । जेथ कर्मजा[2]त पाहीं । निपजत असे ८१ ते देहाभिमानु[3] सांडुनि । गुणकर्में[4] वोलांडुनि । साक्षिभूत[5] होउनी । वर्तती देहीं ८२ म्हणूनि शरीरी जरी होती । तरी कर्मबंधा ना[6]तळती । जैसा कां भूतँचेष्टा गभस्ती । घेपवेना ८३

प्रकृतेर्गुणसंमूढः सज्जंते गुणकर्मसु । तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥

एथ कर्मी तोचि लिंपे । जो गुणसंभ्रमें[9] घेपे । प्रकृतीचेनि[10] आटोपें । वर्ततु असे ८४ इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें । तें परकर्म बलात्कारें । आ[11]पादी जो ८५

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा । निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥३०॥

तरी [12]उचितें कर्मे आघवीं । तुवां आचरोनी मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति [13]न्यासावी । आत्मरूपीं ८६ आणि हें कर्म मी कर्ता । कां आचरेन या[14] अर्था । ऐसा अभिमानु [15]झणें चित्ता । रिगों देसीं ८७ तुवां शरीरपँरा[16] नोहावें । कामँनाजात[17] सांडावे । मग अवँसरोचित[18] भोगावे । भोग सकळ ८८ आतां कोदंड[19] घेऊनि हातीं । आरूढ पां इयें रथीं । देईं आलिंगन वीरवृत्ती[20] । समाधानें ८९ जगीं कीर्ति रूढवीं[21] । स्वधर्माचा मानु वाढवीं । इयें[22] भारापासोनि सोडवीं । मेदिनी[23] हे १९० आतां पार्था निःशंकु होईं । या संग्रामा चित्त देईं । एथ हेंवांचूनि कांहीं । बोलों नये ९१

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः । श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥३१॥

हें अनु[24]परोध मत माझें । जिहीं परमादरें स्वीकारिजे । श्रद्धापूर्वक अनु[25]ष्ठिजे । धनुर्धरा ९२ तेही सकळ कर्मी वर्ततु । जाण पां कर्मरहितु । म्हणोनि हें निश्चितु । क[26]रणीय गा ९३

ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् । सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

नातरी प्रकृतिमंतु[27] होउनी । इंद्रियां लळा[28] देउनी । जे हें माझें मत अव्हे[29]रुनी । [30]ओसंडिती ९४ जे सामान्यत्वें लेखिती[31] । अवज्ञा करूनि देखिती । कां हा अर्थवादु[32] म्हणती । वाचाळपणें ९५ ते मोह[33]मदिरा भुलले । विषयविखें[34] घोंरले । अज्ञा[35]नपंकीं बुडाले । निभ्रांत मानीं ९६ देखें शवांच्या[36] हातीं दिधलें । जैसें कां रत्न वायां गेलें । नातरी जात्यंधा[37] पाहलें[38] । प्रमाण नोहे ९७ कां चंद्राचा उदयो जैसा । उपयोगा नव्हे[39] वायसा । मूर्खा विवेकु[40] हा तैसा । रुचेल ना ९८ तैसे जे पार्था । विमुख या परमार्थी । तयांसीं संभाषणही सर्वथा । करा-

**अन्वयार्थ**—(तु)–पण याच्या उलट–(हे महाबाहो)–हे महापराक्रमी अर्जुना!–(गुणकर्मविभागयोः)–गुणविभाग व कर्मविभाग यांचें–(तत्त्ववित्)–तत्त्व जाणणारा–(गुणाः)–इंद्रियात्मक गुण–(गुणेषु)–विषयात्मक गुणांमध्यें–(वर्तन्ते)–प्रवृत्त होतात–(इति)–असें–(मत्वा)–मानून–( न सज्जते )–आसक्त होत नाहीं. २८.

ज्यामुळें सर्व कर्म उत्पन्न होतें, तो देहाभिमान तत्त्वज्ञान्याचे ठिकाणीं मुळींच नसतो. ८१ ते ज्ञानी देहाचा अभिमान सोडून व गुणकर्मातीत होऊन देहांत फक्त साक्षित्वानें वागतात. ८२ म्हणून सूर्य ज्याप्रमाणें जगतावर प्रकाश पाडीत असून जगाच्या कर्मांनीं लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें, ते जरी देह धारण करितात, तरी देहकर्मांनीं बद्ध होत नाहींत.

**अन्वयार्थ**—(प्रकृतेः)–मायेच्या–(गुणसंमूढाः)–शरीरेंद्रियविकारांनीं अत्यंत मूढ झालेले [illegible]–(गुणकर्मसु)–शरीरेंद्रियांच्या कर्मांमध्यें–हालचालींमध्यें–(सज्जन्ते)–आसक्त होतात–ती हालचाल–चेष्टा आम्हीच फलासाठीं करतों, असा अभिनिवेश धरितात.–(कृत्स्नवित्)–सर्वज्ञ–आत्मवित्–आत्मज्ञ ज्ञानी पुरुषानें–(तान्)–त्या–(अकृत्स्नविदः)–असर्वज्ञ–अनात्मज्ञ–(मंदान्)–मंद पुरुषांस–(न विचालयेत्)–श्रद्धेपासून ढळवूं नये. त्यांचा बुद्धिभेद करूं नये. २९

प्रकृतीच्या आधीन होऊन जो वागतो, व गुणांच्या सपाट्यांत सांपडतो, तोच कर्मानें लिप्त होतो. ८४ इंद्रियें गुणांच्या अधीन होऊन आपापल्या व्यापारांत वर्तत असतां, तें दुसऱ्याचें कर्म 'मीच करतों' असें तो मुद्दाम अंगावर घेतो. ८५

**अन्वयार्थ**—(सर्वाणि कर्माणि)–नित्य नैमित्तिकादि कर्में–(अध्यात्मचेतसा)–विवेकबुद्धीनें–मी कर्ता–जीव अन्तर्यामीसाठीं चाकराप्रमाणें हीं करीत आहें–अशा भावनेनें–(मयि)–माझ्या ठिकाणीं–मज सर्वज्ञ परमेश्वराचे ठिकाणीं–(संन्यस्य)–टाकून–मला अर्पण करून त्याचप्रमाणें–(निराशीः)–फलाशारहित व (निर्ममः)–देह–पुत्रादिकांविषयींच्या ममतेनें रहित–(भूत्वा)–होऊन–आशारहित व ममतारहित होऊन–(विगतज्वरः)–शोकरहित होऊन–(युध्यस्व)–युद्ध कर. ३०

म्हणून, सर्व विहित कर्मांचें आचरण करून त्यां तीं मला अर्पण करावीं, पण चित्तवृत्ति मात्र सदैव आत्मस्वरूपीं ठेवावी. ८६ ह्या कर्मांचा मी कर्ता आहें आणि अमुक फलासाठीं हें मी करीत आहें, असा अभिमान तूं आपल्या चित्तांत उत्पन्न होऊं देशील हो, ८७ तूं शरीराच्या स्वाधीन न होतां 'सर्व इच्छा सोडून' दे, आणि मग सकल भोग यथाकालीं भोग, ८८ एवढ्याकरितां आतां हातांत धनुष्य घेऊन ह्या रथावर बैस, आणि आनंदानें वीरवृत्तीचा स्वीकार कर. ८९ जगांत तूं आपली कीर्ति वाढीव, स्वधर्माचा महिमा वाढीव; आणि दुर्योधनादि दुष्टांच्या भारापासून ह्या पृथ्वीला सोडीव, १९० पार्था, आतां तूं निःशंक होऊन ह्या युद्धाचे ठिकाणीं लक्ष दे; ह्याशिवाय दुसरें कांहीं बोलूं नको.

**अन्वयार्थ**—(ये)–जे–(श्रद्धावन्तः)–श्रद्धाळू व–(अनसूयन्तः)–असूया न करणारे–(मानवाः)–मनुष्य–(मे)–माझें–(इदं)–हें–(मतं)–मत–(नित्यं)–नित्य–(अनुतिष्ठन्ति)–अनुष्ठितात–माझ्या सांगण्याप्रमाणें आचरण करितात–(ते)–ते–(अपि)–सुद्धां–(कर्मभिः)–पुण्य-पापांकडून–(मुच्यन्ते)–मुक्त केले जातात.

अर्जुना, ह्या माझ्या अबाधित मताचा जे मोठ्या आदरानें स्वीकार करून त्याचें श्रद्धापूर्वक आचरण करतील, ९२ ते सकळ कर्मांचें आचरण करून कर्मरहित आहेत असें जाण. म्हणून, हें माझें मत निश्चयानें आचरण्यास योग्य आहे. ९३

**अन्वयार्थ**—(तु)–पण याच्या उलट–(ये)–जे–(अभ्यसूयन्तः)–असूया करणारे–(एतत्)–हें–(मे मतं)–माझें मत–(न अनुतिष्ठन्ति)–आचरीत नाहींत–त्याप्रमाणें आचरण करीत नाहींत–(तान्)–त्यांना–(सर्वज्ञानविमूढान्)–सर्व ज्ञानाविषयीं अनेक प्रकारें मूढ–(अचेतसः)–अविवेकी व–(नष्टान्)–नष्ट झालेले–(विद्धि)–समज. ३२

नाहीं तर देहाचे पाशांत गुंतून व इंद्रियांचे लाड पुरवून जे माझे मताचा तिरस्कार करून, टाकून देतात, ९४ जे त्याला सामान्य समजतात, त्याची थट्टा करितात, किंवा वाचाळपणें ती व्याजस्तुति आहे असे म्हणतात, ९५ ते मोहरूपी मद्यपान करून भुललेले व विषयरूप विषानें व्यापलेले आणि अज्ञानरूपी चिखलांत रुतलेले आहेत असें निःसंशय समज. ९६ पहा कीं, प्रेताच्या हातीं दिलेलें रत्न जसें वायां जातें, किंवा जन्मांधाला उजाडलें तरी त्या प्रकाशाचा त्याला जसा कांहीं उपयोग होत नाहीं. ९७ अथवा चंद्रप्रकाश ज्याप्रमाणें कावळ्याच्या उपयोगीं पडत नाहीं, त्याचप्रमाणें, जे मूर्ख आहेत त्यांना ह्या विचार रुचत नाहीं. ९८ तसेंच, पार्था, जे जन ह्या परमार्थापासून पराङ्मुख आहेत, त्यां-

१ देहभाव. २ कर्मसमूह. ३ देहबुद्धि टाकून. ४ त्रिगुण व त्यांचीं कर्में. ५ केवळ प्रकृतीचा द्रष्टा ही स्थिति पाहून. ६ सांपडत नाहींत. ७ प्राणीमात्रांचीं कर्में. ८ घेत नाहीं. ९ गुणांचे सपाट्यांत सांपडतो. १० संधानानें, तंत्रानें. ११ स्वीकारतो, घेतो. १२ विहित, योग्य. १३ ठेवावी, योजावी. १४ या फलासाठीं. १५ मात्र शिवूं देऊं नको. १६ देहाधीन. १७ सर्व हेतु. १८ समयोचित. १९ धनुष्य. २० शौर्यता. २१ वाढीव. २२ या दुर्योधनादिकांच्या. २३ पृथ्वी. २४ निश्चित, अबाधित. २५ आचरावें. २६ करण्यास योग्य. २७ प्रकृतिकार्य आपणावर आरोपून, देहाभिमानी होऊन, मायेच्या आधीन. २८ इच्छित, लाड. २९ तिरस्कारून. ३० टाकून देतात ३१ गणतात, मानतात. ३२ प्ररोचना वाक्य, मतभेद. ३३ मोह हेंच कोणी एक मद्य, त्यानें. ३४ व्यापलें, घेरलें. ३५ अज्ञानरूपी चिखलांत. ३६ प्रेताच्या. ३७ जन्मांधाला. ३८ उजाडलें. ३९ न पडे. ४० कावळ्याला. ४१ विचार. ४२ कंटाळलेले.

वेना ९९ म्हणोनि ते न मानिती । आणि निंदाही करूं लागती । सांगें पतंगु काय सोहती[2] । प्रकाशातें २०० पतंगा दीपीं आलिंगन । तेथ त्यासी अचुक मरण । तेवीं विषयाचरण । आत्मघाता[3] १

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥

म्हणोनि इंद्रियें एकें । जाणतेनि पुरुखें । लाळावीं[6] ना कौतुकें । आदिकरुनी २ हां गा सर्पेसीं खेळों येईल । कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धि जाईल । सांगें हाळाहाळ जिरेल । सेविलिया काई ३ देखें खेळतां अग्नि लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला । तैसा इंद्रियां ळळा दिधला । भला नोहे ४ एऱ्हवीं तरी अर्जुना । या शरीरा पराधीना । कां नाना भोगरचना । मेळवावी ५ आपण सायासेंकरूनि बहुतें । सकळही समृद्धिजातें । उदोअस्तु[11] या देहातें । प्रतिपाळावें कां ६ सर्वस्वें शिणोनि[12] एथें । अर्जवीवीं[13] संपत्तिजातें । तेणें स्वधर्मु सांडूनि देहातें । पोखावें काई ७ मग हें तंव पांचमेळावा[15] । शेखीं अनुसरेल पंचत्वा[16] । ते वेळीं केला कैं[17] गिवसावा । शीणु आपुला ८ म्हणूनि केवळ देहंभरण । ते जाणें उघडी नागवण[18] । यालागीं एथ अंतःकरण । देयावेंनां[19] ९

इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ । तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

एऱ्हवीं इंद्रियांचियां[21] अर्थां-[22] । सारिखा विषयो पोखितां[23] । संतोषु[24] कीर चित्ता आपेजेल[25] २१० परी तो संवचोराचा[26] सांगातु । जैसा नावेकें[27] स्वस्थु । जंव नगराचा प्रांतु । सांडिजेना ११ बापा विषाची मधुरता । झणें[28] आवडी उपजे चित्ता । परी तो परिणामु विचारितां । प्राणु हरी १२ देखें इंद्रियीं कामु असे । तो लावी सुखदुराशे[29] । जैसा गळीं मीनु[30] आमिषें[31] । भुलविजे गा १३ परी तयामाजीं गळु[32] आहे । जो प्राणातें घेऊनि जाये । तो जैसा ठाउवा[33] नोहे । झांकलेपणें १४ तैसें अभिलाषें येणें कीजेल । विषयांची आशा धरिजेल । तरी वरपडा[34] होईजेल । क्रोधानळा[35] १५ जैसा कवळोनियां पारधी । घातेचिये[36] संधी । आणि मृगातें बुद्धी । साधावया[37] १६ एथ तैसीचि[38] परी आहे । म्हणूनि संगु हा तुज नोहे । पार्था दोन्ही कामक्रोध हे । घातकु जाणें १७ म्हणऊनि हा आश्रोचि न करावा । मनेंहि आठवो न धरावा । एकु निजवृत्तीचा[39] वोळावा[40] । नासों[41] नेदी १८

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥

अगा स्वधर्मु हा आपुला । जरी कां कठिणु जाहला । तरी हाचि अनुष्ठिला[42] । भला देखें १९ येरु[43] आचारु जो परावा । तो देखतां कीर बरवा । परी

त्याशीं भाषण सुद्धां करूं नये. ९९ कारण ज्याप्रमाणें पतंग दिव्याचा मत्सर करितात, त्याप्रमाणें ते जन त्या विचारावर भरवंसा न ठेवितां उलट त्यांची निंदा करतात. २०० पतंगानें दिव्याला अलिंगन दिलें असतां तेथेंच त्याचें जसें बिनचूक मरण आहे, तसें विषयाचरण करण्यांतच आत्मघात आहे. १

**अन्वयार्थ**—(ज्ञानवान् अपि)–शहाणा मनुष्यही–(स्वस्याः)–आपल्या–(प्रकृतेः सदृशं)–प्रारब्ध कर्माप्रमाणें–स्वभावाप्रमाणें–(चेष्टते)–व्यवहार करतो.–(भूतानि)–सर्व प्राणी –(प्रकृतिं)–आपल्या स्वभावावर–(यान्ति)–जातात –(निग्रहः) –त्याला माझा किंवा दुसऱ्या कोणा राजादिकोंचा निग्रह–(किं)–काय–(करिष्यति)–करणार ? ३३

म्हणून, कोणी विचारवान् मनुष्यानें ह्या इंद्रियांचें कौतुकानें देखील लाड पुरवूं नयेत. २ अरे, असें पहा—सर्पावरोबर खेळतां येईल कां ? किंवा वाघाचा सहवास सिद्धीस जाईल कां ? अथवा हलाहल विष प्राशन केलें तर तें जिरेल कां सांग पाहूं ? ३ हें पहा–बुद्धिपूर्वक नव्हे, परंतु सहज खेळतांना जरी अग्नि लागला, तरी तो जसा भडकल्यावर आवरत नाहीं, तसें कौतुकानें इंद्रियांचें लाड पुरविणें चांगलें नाहीं. ४ अर्जुना, वास्तविक पाहतां हें शरीर पराधीन ( गुणाधीन ) जर आहे, तर त्याच्याकरितां यत्नानें विषयोपभोग मिळविण्याची खटपट कां करावी ? ५ पुष्कळ यत्न करून आणि सर्व गोष्टी संपादन करून ह्या देहाचें अहोरात्र लालन कां करावें ? ६ ह्या ठिकाणीं सर्व परिश्रम करून, पुष्कळ संपत्ति मिळवून, व स्वधर्माचा त्याग करून केवळ देहाचें पोषण करावें कां ? ७ मग हें पंचतत्त्वांचें झालेलें शरीर शेवटीं पंचतत्त्वांतच जाऊन मिळाल्यावर त्या वेळीं आपण केलेली खटपट कोठें शोधीत बसावें ? ८ म्हणून केवळ शरीरपोषण करणें म्हणजे प्रत्यक्ष हानि आहे असें समज. त्याकरितां, त्याच विचारांत सर्व लक्ष ठेवूं नये. ९

**अन्वयार्थ**—(इन्द्रियस्य इन्द्रियस्य)–प्रत्येक इन्द्रियाच्या –(अर्थे)–शब्दादि विषयांत–(रागद्वेषौ)–राग व द्वेष—(व्यवस्थितौ)–अवश्य होणारे आहेत.–(तयोः)–त्या राग–द्वेषांच्या–(वशं)–अधीन–(न आगच्छेत्)–होऊं नये, त्यांच्या ताब्यांत जाऊं नये.–(हि)–कारण–(तौ)–ते दोन राग-द्वेष–(अस्य)–या पुरुषाला–(परिपन्थिनौ)–विघ्न करणारे आहेत. ३४

विषय सेवनापासून प्रत्यक्ष सुख प्राप्त होत असतां; त्यांत सुख नाहीं, हें म्हणणें सयुक्तिक नाहीं असें तुला वाटल्यास, सहज विचार केला असतां, इंद्रियांना आवडेल त्याच विषयांचें सेवन केलें, तर चित्ताला समाधान होईल हें खरें; २१० परंतु तें समाधान म्हणजे संभावित चोराची गांठ पडल्यावर तो जसा नगरसीमा ओलांडीपर्यंत क्षणभर स्वस्थ असतो, ( आणि मग घोर वनांत गेल्यावर जसा सर्वस्वी नाश करितो, ) तसें होय. ११ बाबारे, वचनाग ( विषाची कांडी ) प्रथम खातांना गोड लागतो खरा, परंतु त्याच्या परिणामाचा विचार केला असतां तो प्राणनाशक असतो, त्याप्रमाणें १२ इंद्रियांचे ठिकाणीं असणारा जो काम तो विषयसुखांच्या दुराशेला लावतो. ज्याप्रमाणें मासा गळाला लावलेल्या आमिषाला भुलतो, १३ परंतु आमिषाचे आंत गळ झांकलेला आहे, तो आपला प्राण घेईल, हें त्याला कळत नाहीं, १४ त्याप्रमाणें विषयसुखाच्या अभिलाषानें जो विषयाची इच्छा करील, तो क्रोधाग्नींत पडेल. १५ ज्याप्रमाणें पारधी मृगाला धरण्याकरितां चारी बाजूंनीं मारण्याची संधि साधून वळवून आणितात, १६ त्याप्रमाणें ह्या विषयसुखाची तऱ्हा आहे; म्हणून, पार्था, कामक्रोध हे घातक समजून त्यांचा संग तूं करूं नको; १७ आणि ह्या विषयांना थारा न देतां मनाला त्यांची आठवण देखील होऊं देऊं नको, तसेंच आत्मज्ञानाचा ओलावा नाहींसा होऊं देऊं नको. १८

**अन्वयार्थ**—(स्वनुष्ठितात्)–[सु–अनुष्ठितात्]—उत्तम प्रकारें अनुष्ठान केलेल्या-सर्वगुणसंपन्न–(परधर्मात्)–परधर्माहून (विगुणः)—गुण-रहित-दोषयुक्त–(स्वधर्मः)—स्वधर्म–(श्रेयान्) –अधिक चांगला.–(स्वधर्मे–)–स्वधर्मांत राहिलेल्या पुरुषाला–(निधनं)–मरण जरी आलें तरी तें–(श्रेयः)–श्रेयस्कर आहे. कारण–(परधर्मः)–दुसऱ्या वर्णाच्या किंवा आश्रमाचा धर्म—(भयावहः)–नरकादि भय देणारा आहे. ३५.

अरे आपला धर्म जरी आचरण्यास कठिण असला, तरी त्याचेंच आचरण करणें उत्तम होय असें तूं समज. १९ दुसऱ्याचा धर्म खरोखर दिसण्यांत जरी चांगला

१ पतंगाला. २ सहन होईल. ३ स्वरूपापासून पतनास, स्वनाशास. ४ पुरुषानें. ५ लाड करूं नयेत. ६ देखील. ७ वाघाचा सहवास. ८ कालकूट विष. ९ भडकला. १० विषयभोग. ११ अहोरात्र. १२ यमून. १३ मिळवावी. १४ पोसावें. १५ पांचांचा समुदाय, मेळा. १६ पांचतत्त्वास, मरणास. १७ कोठें शोधावा. १८ शरीरपोषण. १९ हानि, नुकसान. २० देऊं नये. २१ इंद्रियांना योग्य, आवडता. २२ इच्छा. २३ सेवितां २४ निश्चयेंकरून, खरोखर. २५ उत्पन्न होईल. २६ साधासारख्या वाटणाऱ्या व स्नेहभावानें वाटणाऱ्या चोरांची सोबत. २७ क्षणभर. २८ आरंभीं. २९ सुखासारखी वाटणारी दुराशा. ३० मासा. ३१ मासानें. ३२ गळ. ३३ ठाऊक. ३४ स्वाधीन. ३५ क्रोधाग्नीला. ३६ मारण्याची संधी साधून. ३७ मारण्याकरितां. ३८ प्रकार. ३९ आत्मबोधाचा. ४० जिव्हाळा. ४१ बिघडवूं नको. ४२ आचरिला ४३ अन्य. ४४ दुसऱ्याचा.

आचरतेनि आचरावा । आपुलाचि २२० सांगें शूद्र घरीं आघवीं । पक्कान्नें आहाति बरवीं । तीं द्विजें केवीं सेवावीं । दुर्बळु जरी जाहला २१ हें अनुचित कैसेनि कीजे । अग्राह्य केवीं इच्छिजे । अथवा इच्छिलेंही पैं पाविजे । विचारीं पां २२ तरी लोकांचीं धवळारें । देखोनियां मनोहरें । असतीं आपुलीं तणारें । मोडावीं केवीं २३ हें असो वनिता आपुली । कुरूप जरी जाहली । तऱ्ही भोगितां तेचि भली । जियापरी २४ तेवीं आंवडे तैसा सांकडु । आचरतां जरी दुवाडु । तऱ्ही स्वधर्मुचि सुरवाडु । परत्रींचा २५ हां गा साकर आणि दूध । हें गौल्य कीर प्रसिद्ध । परी कृमिदोषीं विरुद्ध । घेपे केवीं २६ ऐसेनिही जरी सेविजेल । तरी ते अळुंकीचि उरेल । जे तें परिणामीं पथ्य नव्हेल । धनुर्धरा २७ म्हणोनि आणिकांसी जें विहित । आणि आपणपेयां अनुचित । तें नाचरावें जरी हित । विचारिजे २८ या स्वधर्मातें अनुष्ठितां । वेचु होईल जीविता । तोहि निका वैरु उभयतां । दिसत असे २९ ऐसें समस्त सुरशिरोमणी । बोलिले जेथ श्रीशार्ङ्गपाणी । तेथ अर्जुन म्हणे विनवणी । असे देवा २३० हें जें तुम्हीं सांगितलें । तें सकळ कीर म्यां परिसिलें । तरी आतां पुसेन कांहीं आपुलें । अपेक्षित ३१

अर्जुन उवाच:—

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः । अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥

तरी देवा हें ऐसें कैसें । जे ज्ञानियांही स्थिति भ्रंशे । मार्गु सांडुनी अनारिसे । चालत देखों ३२ सर्वज्ञुही जे होती । हेयोपादेयही जाणती । तेही परधर्में व्यभिचरति । कवणें गुणें ३३ बीजा आणि भुसा । अंधु निवाडु नेणे जैसा । नावेक देखणाही तैसा । बरळे कां पां ३४ जे असता संगु सांडिती । तेचि संसर्गु करितां न धाती । वनवासीही सेविती । जनपदातें ३५ आपण तरी लपती । सर्वस्वें पाप चुकविती । परी बळात्कारें सुइजेती । तयाचि माजी ३६ जयाची जीवें घेती विवसी । तेचि जडोनि ठाके जीवेंसीं । चुकवितां ते गिंवसी । तयातेंचि ३७ ऐसा बलात्कारु एकु दिसे । तो कवणाचा एथ आग्रहो असे । हें बोलावें हृषीकेशें । पार्थु म्हणे ३८

श्रीभगवानुवाच:—

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः । महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥

तंव हृदयकमळआरामु । जो योगियांचा निष्कामकामु । तो ह्मणतसे पुरु-

असला तरी आचरण करणारांनीं आपल्याच धर्माचें आचरण केलें पाहिजे. २२० ब्राह्मण जरी दरिद्री झाला, तरी त्यानें शूद्राच्या घरचीं उत्तम पक्वान्नें कशीं सेवावीं सांग पां? २१ असें हें अनुचित कर्म कसें करावें? आणि जी गोष्ट घेण्यास योग्य नाहीं, तिची इच्छा कशी करावी? अथवा जरी इच्छित प्राप्त झालें, तरी तें घ्यावें कां? हा या विचार कर. २२ तसेंच, लोकांचे मोठमोठे सुंदर वाडे पाहून आपल्या असलेल्या गवती झोंपड्या मोडाव्या कां? २३ हें असो; आपली स्त्री कुरूप असली तरी तीच आपल्यास भोगण्यास ज्याप्रमाणें योग्य होय, २४ त्याप्रमाणें, वाटेल तसा कठिण आणि आचरण्यास दुर्घट असा स्वधर्म असला, तरी तोच परलोकाचा सखा होय. २५ असें पहा कीं, दूध आणि साखर हे दोन पदार्थ गोड आहेत, म्हणून प्रसिद्ध आहे; पण ज्यांना जंत झाले आहेत, त्यांना ते कुपथ्य आहेत, त्यांनीं ते कसे सेवन करावे? २६ अर्जुना, इतक्यावरही जर रोग्यानें तें सेवन केलें तर त्याचा तो हट्टवादीपणाच आहे. कारण, परिणामीं ते त्यास हितकर होणार नाहींत. २७ म्हणून, आम्हांला हित विचारशील तर जें दुसऱ्यास उचित असून आपल्यास अनुचित आहे, त्याचें आचरण करूं नये. २८ स्वधर्माचें आचरण करीत असतांना जरी आपला जीव खर्ची पडला, तरी तो दोन्ही लोकीं खरोखर श्रेष्ठ असा मानला जातो. २९ देवाधिदेव श्रीशारङ्गपाणी यांचें हें भाषण ऐकून अर्जुन म्हणालाः—देवा, माझी एक विनंति आहेः २३० आपण जें मला आतां सांगितलें, तें मीं सर्व नीट ऐकिलें; तर आतां मला जें कांहीं पाहिजे आहे तें मी विचारतों. ३१

**अन्वयार्थ**—(हे वार्ष्णेय)-हे कृष्णा!-(अथ)-आतां-(केन)-कोणाकडून-(प्रयुक्तः)-प्रेरणा केला गेलेला-(अयं पूरुषः)-हा पुरुष-(अनिच्छन् अपि)-पाप करण्याची इच्छा करीत नसतां-नाहीं-(बलात्)-बलात्कारानें-(नियोजितः इव)-करावयास लावल्याप्रमाणेंच जणुं काय-(पापं)-पाप-(चरति)-करतो.

देवा, ज्ञान्यांची सुद्धां स्थिति भ्रष्ट होऊन ते भलत्याच मार्गानें जातात हें कसें? ३२ ते सर्वज्ञहि असतात. व त्यांना त्याज्य काय व ग्राह्य काय हें माहीत असतें, तथापि ते परधर्मानें आचरण कोणत्या कारणानें करितात? ३३ जसे आंधळ्या मनुष्यास धान्य आणि कोंडा निराळे करतां येत नाहींत; तसें क्षणभर टोळगासही कां व्हावें? ३४ जे असलेला संग साडतात, ते पुनः संग करूनही तृप्त होत नाहींत; व वनवासांत असलेलेहि व्यावहारिक लोकांत येऊन राहतात. ३५ वास्तविक ते पापापासून अलिप्त असावे, व पाप आपल्या हातून होऊं नये, अशी इच्छा करितात; परंतु त्यांना बलात्कारानें पापांत कोणी तरी घातल्याची प्रतीति येते. ३६ ज्या विषयांचा ते मनापासून किळस बाळगतात, तेच विषय त्यांच्या जिवाशीं जडून राहतात. ते चुकवायाचा प्रयत्न केला तरी ते पुनः त्यांतच गुरफटतात. ३७ अशा रीतीनें ज्ञानवानांच्या विषय सेवनांत बलात्कार दिसतो, तो बलात्कार करण्याचा आग्रह कोणाचा आहे, हें आपण कृपा करून सांगावें, असें अर्जुन म्हणाला. ३८

**अन्वयार्थ**—(एषः कामः)-पुरुषाला पापांत प्रवृत्त करणारा हा काम आहे.—(एषः क्रोधः)-हाच क्रोध आहे.—(रजोगुणसमुद्भवः)-तो काम रजोगुणापासून उत्पन्न होतो.—(महाशनः)- मोठा खादाड आहे. म्हणूनच तो—(महापाप्मा)—महापापी आहे.—(इह)-या संसारांत-(एनं)-या कामाला-(वैरिणं)-वैरी-(विद्धि)-समज. ३७

तेव्हां हृदयास रमविणारा, आणि योगिजन ज्याची निष्कामबुद्धीनें इच्छा करतात, असा जो पुरुषोत्तम

१ आचरणांनीं. २ सर्व. ३ दरिद्री, गरीब. ४ मिळाले, प्राप्त करून घ्यावें. ५ चुनेगची घरें. ६ सुंदर ७ गवताची झोंपडी. ८ स्त्री. ९ वाटेल. १० कठीण. ११ दुर्घट. १२ सखा, सुखकर. १३ परलोकींचा. १४ गोडीनें. १५ जंतांच्या व्याधितांनीं. १६ घ्यावें. १७ इच्छा, क्षुधा, आसक्ति. १८ हितकर होणार नाहीं. १९ दुसऱ्यांस. २० आपणाला २१ खर्चे. २२ खरोखर. २३ श्रेष्ठ. २४ दोन्ही लोकीं. २५ इच्छित. २६ विघडते. २७ वेगळे, मळते. २८ स्वकीय धर्म सोडून परकीय धर्म आचरतात. २९ पृथकपणा, वेगळे करणें. ३० घडीदेवेळीं, क्षणभर. ३१ टोळस, चांगल्या दृष्टीचा. ३२ चुकतो. ३३ तृप्त होत नाहींत. ३४ गावांतील लोकांत—वस्तींत मिसळतात. ३५ घातले जातात. ३६ किळस. ३७ शोधिते, धरते. ३८ हृदयाला रमविणारा. ३९ योगी विषयाचे ठिकाणीं निष्काम, परंतु ज्याचेबद्दल मात्र सकाम असा.

पोत्तसु । सांगेन आइक ३९ तरी हे काम क्रोधु पाहीं । जयांतें कृपेची सांठ-
वण नाहीं । हे [२]कृतांताच्या ठायीं । मानिजती २४० हे [३]ज्ञाननिधीचे भुजंग ।
[४]विषयदरीचे वाघ । भजनमार्गींचे मांग । [५]मारक जे ४१ हे देहदुर्गींचे [६]धोंड ।
इंद्रियग्रामींचें [७]कोंड । यांचें व्यामोहादिक [९]दबड । जगावरी ४२ हे [१०]रजोगुण
मानसींचे । समूळ [११]आसुरियेचे । [१२]धालेपण ययांचें । [१३]अविद्या केलें ४३ हे र-
[१४]जांचे कीर जाहले । परी तमासी [१५]पढियंते भले । तेणें निज[१६]पद यां दिधलें ।
[१७]प्रमादमोहो ४४ हे मृत्यूच्या नगरीं । मानिजती [१८]निकियापरी । जे जीविताचे
वैरी । म्हणऊनियां ४५ जयांसि भुकेलियां [१९]आमिषा । हें विश्व न पुरेचि घांसा ।
[२०]कुळवाडियांचिया आशा । [२१]चौळीत असे ४६ [२२]कौतुकें कवळितां मुठी । जिये
चवदा भुवनें [२३]थेंकुटीं । तिये[२४] भ्रांतिही धाकुटी । [२५]वोल्हीढुल्ही ४७ जे लोकत्र-
याचें [२६]भातुकें । खेळतांचि खाय [२७]कौतिकें । तिच्या दासीपणाचेनि [२८]बिकें । [२९]तृष्णा
जिये[३०] ४८ हें असो मोहें मानिजे । यांतें अहंकारें घेपे [३१]दीजे । जेणें जग आपु-
लेनि [३२]भोजें । नाचवीत असे ४९ जेणें सत्याचा [३३]भोकसा काढिला । मग अ-
कृत्य [३४]तृणकुटा भरिला । तो दंभु रूढविला । जगीं इहीं २५० [३५]साध्वी शांति
नागविली । मग माया मांगी श्रृंगारिली । तियेकरवीं विटाळविलीं । [३६]साधुवृंदें
५१ इहीं विवेकाची [३७]त्राय फेडिली । वैराग्याची [३८]साल काढिली । [३९]जितया मान
मोडिली । [४०]उपशमाची ५२ इहीं संतोषवन [४१]खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिले । आनं-
दरोप सांडिलें । उपडूनियां ५३ इहीं बोधाचीं रोपें [४२]लुंचिलीं । सुखाची [४३]लिपि
पुसिली । [४४]जिव्हारीं आगी [४५]सूदली । [४६]तापत्रयाची ५४ हे आंगा तंव घडले ।
जीवींचि [४७]आंथी जडले । परी [४८]नातुडती गिंवसिले । ब्रह्मादिकां ५५ हे [४९]चैतं-
न्याचे शेजारीं । वसती ज्ञानाच्या एका हारीं । म्हणोनि प्रवर्तले महामारी ।
सांवरती ना ५६ हे जळेंवीण बुडविती । आगीवीण जाळिती । न बोलतां
कवळिती । प्राणियांतें ५७ हे शस्त्रेंवीण [५०]सांधिती । दोरेंवीण बांधिती । ज्ञानि-
यासी तरी वधिती । पैज घेउनी ५८ हे चिखलेंवीण रोंविती । [५१]पाशिकेंवीण
गोंविती । हे कवणाजोगे न होती । आंतौटेपणें[५२] ५९

धूमेनाऽऽव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च । यथोल्वेनाऽऽवृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

जैसी चंदनाची मुळी । [५३]गिंवसोनि [५४]घेपे [५५]व्याळीं । नातरी [५६]उल्बाची खोळी
गर्भस्थासी २६० कां प्रभावीण भानु । धूमेंवीण हुताशनु । जैसा दर्पण मळ-

तो म्हणाला:-सांगतों ऐक. ३९ हृदयामध्यें वास करणारे हे काम आणि क्रोध हेच पुरुषास पापामध्यें प्रवृत्त करणारे आहेत; कारण ज्या कामक्रोधांच्या ठिकाणीं दया ह्मणून बिलकूल नाहीं, फार काय सांगावें, दुसऱ्याचा नाश करण्याविषयीं यमाप्रमाणें यांचें सामर्थ्य आहे, २४० काय सांगू, हे कामक्रोध ज्ञानरूप धनाच्या ठेवीवरचे नाग, व विषयसोऱ्यांतील वाघ आणि भजनमार्गाचे मारेकरी मांग आहेत. ४१ देहरूप किल्ल्यावरील मेठे दगड व इंद्रियरूप गांवांतील कोंडवाडे आहेत, आणि भ्रांति वगैरे उत्पन्न करण्याचा ह्यांचा जगावर दपटशा आहे. ४२ हे मनाच्या ठिकाणीं भासणारे मुळापासून असुरी संपत्तींतील असून रजोगुणाचें कार्य आहेत. ह्यांची तृप्ती अविवेकडून होते. ४३ हे रजोगुणापासून झालेले आहेत खरे, परंतु तमोगुणाचे फार आवडते आहेत; म्हणून तमोगुणानें आपलें सर्वस्व–माजूरपणा व अज्ञान–ह्यांस दिलें आहे. ४४ हे जीविताचे शत्रु आहेत, म्हणून मृत्यूचे नगरांत ह्यांना चांगल्या प्रकारचा मान मिळतो. ४५ काय चमत्कार सांगावा, ह्यांच्या नुसत्या भुकेच्या इच्छेला हें विश्व एक घांसाला देखील पुरत नाहीं, आणि आशा ही ह्यांच्या व्यापाराची वृद्धि करिते. ४६ जिनें सहज आपल्या मुठी वळल्या असतां त्यांत मावण्याला चौदा भुवनेंही कमीच; अशा तऱ्हेची जी भ्रांति ती आशेची धाकटी बहीण आहे. ४७ जी ही भ्रांति केवळ भातुकली खेळतां खेळतां सहज तिन्ही लोक खाऊन टाकते; आणि तृष्णा जी पुष्ट होते, ती हिच्या दास्यबळावरच! ४८ हें असो; पण ह्या कामक्रोधांना मोहाच्या घरीं प्रतिष्ठा आहे; आणि ज्या अहंकारानें सर्व जगाला नाचवून सोडलें आहे, त्या अहंकाराची ह्यांशीं देवघेव आहे. ४९ ज्या दंभानें सत्याचा कोथळा फोडून त्यांत दुष्ट कृत्यांचा पेंढा भरला, त्या दंभाला ह्यांनीच जगांत प्रसिद्धीला आणलें. २५० ह्यांनीं पतिव्रतारूप शांतीला लुबाडून घेऊन मायारूप मांगिणीला सजविलें आणि तिच्याकडून साधूंचे समुदाय भ्रष्ट करविले! ५१ ह्यांनीं विवेकाचा ठिकाण नाहींसा केला; वैराग्याची खोड मोडली आणि जिवंत उपशमाची मान तोडली! ५२ ह्यांनीं संतोषरूपी वन तोडून टाकिलें, धैर्यरूपी किल्ला जमीनदोस्त केला आणि आनंदरूपी रोपडें उपटून टाकिलें. ५३ ह्यांनीं ज्ञानाची रोपें उपटून टाकलीं सुखाचें नांवसुद्धां पुसून टाकलें, आणि प्राणिमात्रांच्या हृदयांत त्रिविध तापांची आग उत्पन्न केली. ५४ हे शरीराबरोबर उत्पन्न झालेले असून जिवांतच जडून राहिले आहेत; परंतु शोध करायाला गेलें असतां ब्रह्मादिकांसहि सांपडत नाहात. ५५ हे ब्रह्मस्वरूपाच्या शेजारीं आणि ज्ञानाच्या पंक्तीला बसतात, म्हणून जगताचा महाप्रलय करण्यास प्रवृत्त होऊन कोणाला आवरत नाहींत. ५६ हे कामक्रोध पाण्याशिवाय बुडवितात, अग्नीशिवाय जाळतात आणि प्राण्याला न कळतां ग्रासतात. ५७ हे शस्त्राशिवाय मारतात, दोराशिवाय बंधन करतात, आणि तत्ववेत्त्यांना तर पैजेनें आपल्या अधीन करून घेतात. ५८ हे चिखलाशिवाय रोंवतात, पाशाशिवाय लोकांना बांधून ठेवितात, आणि शरिराच्या इतक्या अंतर्यामीं पोंहोंचल्यामुळें ह्यांच्या बरोबरीचे दुसरे कोणी नाहींत. ५९

**अन्वयार्थ**—(यथा)–ज्याप्रमाणें–(धूमेन)–धुराकडून–(वह्निः)–अग्नि–(आव्रियते)–आच्छादित केला जातो–(च)–व–(मलेन)–मळानें–(आदर्शः)–आरसा–[आव्रियते झांकला जातो]–(यथा)–ज्याप्रमाणें–(उल्बेन)–वारेनें–(गर्भः)–गर्भ–(आवृतः)–आच्छादित झालेला असतो–(तथा)–त्याप्रमाणें–(तेन)–त्या कामानें–(इदं)–हें–(आवृतं)–झांकलेलें आहे. ३८

अर्जुना, फार काय सांगावें, जेथें ज्ञान आहे तेथें हे काम क्रोध आहेतच–जसा साप चंदनाच्या मुळाला वेढून राहतो, किंवा वेटेनें गर्भ जसा आच्छादित असतो; २६० अथवा प्रभेशिवाय सूर्य, धुराशिवाय अग्नि, किंवा पाण्याशिवाय आरसा ही ज्याप्रमाणें सांपडावयाची

१ लवलेश. २ काळाच्या. ३ ज्ञानरूप ठेव्यावरचे. ४ विषयरूपी खोऱ्यांतील, घळींतील. ५ मारेकरी. ६ दगड. ७ गांवकुसं. ८ अज्ञानादिक. ९ ओझें १० राजसी मनाचे. ११ आसुरी संपत्तीचे. १२ तृप्ति. १३ मायेनें. १४ रजोगुणाचें. १५ आवडते. १६ सर्वस्व. १७ अज्ञान, मार्जारीपणा. १८ मित्राप्रमाणें मोठे श्रेष्ठ. १९ भुकेच्या इच्छेला. २० कुणबीक उद्दीम व्यापार. २१ उलटापालट करिते, व्यवहार पहाते. २२ सहज. २३ अल्प, तुच्छ. २४ ज्यांना. २५ फार प्रिय, जिवलग. २६ मुलांचे खाद्य, भातुकली. २७ कौतुकानें. २८ वळें, २९ वासना. ३० जिवंत रहाते. ३१ देवघेव होते. ३२ ह्यीसेनें. ३३ पोटळा. ३४ गवताचा पेंढा. ३५ पतिव्रता. ३६ साधूंचे समूह. ३७ आश्रय ३८ कातडी. ३९ जिवंत. ४० इंद्रियनिग्रहाची ४१ तोडिलें ४२ खुंटलीं, उपटलीं. ४३ नांव, लेश. ४४ अंतःकरणांत. ४५ घातली. ४६ त्रिविधतापांची. ४७ आहेत. ४८ सांपडत नाहींत. ४९ ब्रह्मरूपाचे ५० मारितात. ५१ पाशावांचून ५२ आंत असल्यामुळें. ५३ कांटाळून, शोधून ५४ घेतली जाते. ५५ सर्पांनीं. ५६ गर्भवेष्टनाची.

हींनु । कहींच नसे ६१ तैसें इहींवीण एकलें । आम्हीं ज्ञान नाहीं देखिलें । जैसें कोंडेनि पां गुंतलें । बीज निपजे ६२

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा । कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

तैसें ज्ञान तरी शुद्ध । परी इहीं असे प्ररुद्ध । म्हणोनि तें अगाध । होऊनि ठेलें ६३ आधीं यांतें जिणावें । मग तें ज्ञान पावावें । तंव पराभवो न संभवे । रागद्वेषां ६४ यांतें साधावयालागीं । जें बळ वाणिजे आंगीं । तें इंधनें जैसीं आगी । सांवावो होय ६५

इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते । एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

तैसे उपाय कीजती जे जे । ते यांसीचि होती विरजे । म्हणोनि हटियांतें जिणिजे । इहींचि जगीं ६६ ऐसियांही सांकडां बोला । एक उपायो आहे भला । तो करितां जरी आंगवला । तरी सांगेन तुज ६७

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ । पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

यांचा पहिला कुरुठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये । आधीं निर्दळूनि घालीं तियें । सर्वथैव ६८

इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः । मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥

मग मनाची धांव पारुषेल । आणि बुद्धीची सोडवण होईल । इतुकेनि थारा मोडेल । या पापियांचा ६९

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना । जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥४३ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगोनाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

हे अंतरींहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले । जैसें रश्मीवीण उरलें । मृगजळ नाहीं २७० तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें । मग तो भोगी सुख आपुलें । आपणाचि ७१ ते गुरुशिष्याची गोठी । पदपिंडांची गांठी । तेथ स्थिर राहोनि नुठीं । कवणे काळीं ७२ ऐसें सकळ सिद्धांचा रावो । देवी लक्ष्मीयेचा नाहो । राया ऐकें देवदेवो । बोलता जाहला ७३ आतां पुनरपि तो अनंतु । आद्य एकी मातु । सांगेल तेथ पंडुसुतु । प्रश्नु करील ७४ तया बोलाचा हैन पाडु । कीं रसवृत्तीचा निवाडु । येणें श्रोतयां होईल सुरवाडु । श्रवणसुखाचा ७५ ज्ञानदेवो म्हणे निवृत्तीचा । चांग उठावा करूनि उन्मेषाचा । मग संवादु श्रीहरिपार्थाचा । भोगावा बापा २७६

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ श्लोक ४३. ओंव्या २७६.

नाहींत, ६१ ज्याप्रमाणें बीज कोंड्यानें आच्छादिलेलेंच उत्पन्न होतें, त्याप्रमाणें कामक्रोधाशिवाय शुद्ध ज्ञान आमच्या दृष्टीस कधीं पडलें नाहीं. ६२

**अन्वयार्थ**—(हे कौंतेय)–हे अर्जुना !–(ज्ञानिनः)–ज्ञानी पुरुषाचा–(नित्यवैरिणा)–नित्यवैरी–(दुष्पूरेण)–ज्याची भरती कधींच होत नाहीं,–(च)–व–(अनलेन)–ज्याला 'पुरे' असें कधीं वाटत नाहीं अशा–(एतेन कामरूपेण)–या इच्छारूप शत्रूनें–(ज्ञानं)–ज्ञान–(आवृतं)–आच्छादित केलें आहे. ३९

तसें ज्ञान हें स्वतः जरी शुद्ध आहे, तरी कामक्रोधांनीं आच्छादित असतें, म्हणूनच तें गहन होऊन बसलें आहे. ६३ अगोदर कामक्रोधांस जिंकावें, मग ज्ञान प्राप्त होणार, पण त्या कामक्रोधास जिंकणें अगोदर कठीण ! ६४ कारण, त्यांना जिंकण्याकरितां जें जें अवसान आणावें तें तें उलट त्यांनाच साह्यकारी होतें. जसें अग्नी विझविण्याकरितां लांकडें टाकलीं असतां तीं त्यालाच साह्य करितात. ६५

**अन्वयार्थ**—(इंद्रियाणि)–इंद्रियें,–(मनः)–मन–(बुद्धिः) व बुद्धि हें –(अस्य)–या कामाचें–(अधिष्ठानं)–आश्रयस्थान—(उच्यते)–सांगितलें जातें—(एषः)–हा काम–(एतैः)–या इंद्रियादिकांच्या योगानें–(ज्ञानं)–ज्ञानाला–(आवृत्य)–आच्छादित करून–(देहिनं)–देहवान्–देहाभिमानी आत्म्याला–(विमोहयति)–नानाप्रकारें मोहित करतो. ४०

त्याप्रमाणें, जे जे उपाय करावे ते ते ह्यांनाच साह्यकारी होतात; म्हणून या जगामध्यें हठयोग्यांना देखील हेच जिंकितात. ६६ मग हे काम, क्रोध अजिंक्यच झाले असें तुला वाटेल, तर तसें मात्र नाहीं. अर्जुना, अशाही संकटांतून पार पडण्यास एक उत्तम उपाय आहे; तो तुला साधेल तर सांगतों. ६७

**अन्वयार्थ**—(हे भरतर्षभ)–हे अर्जुना !–(तस्मात्)–म्हणून–(त्वं)–तूं–(आदौ)–अगोदर–(इन्द्रियाणि)–आपलीं इंद्रियें (नियम्य)–नियमित करून–इंद्रियांचें नियमन करून–(ज्ञानविज्ञाननाशनं एनं)–शास्त्रज्ञान व आत्मसाक्षात्काररूप ज्ञान यांचा नाश करणाऱ्या या–(पाप्मानं)–पाप्याला–(प्रजहिहि)–सोड. त्याचा परित्याग कर. ४१

ह्यांचें मूळ वास्तव्य इंद्रियांचे ठिकाणीं आहे, आणि इंद्रियांपासून कर्मांची प्रवृत्ति होते, म्हणून त्या इंद्रियांना अगोदर सर्वथैव जिंक. ६८

**अन्वयार्थ**—(इन्द्रियाणि)–श्रोत्रादि पांच इंद्रियें [बाह्य स्थूल देहाच्या अपेक्षेनें]–(पराणि)–उत्कृष्ट आहेत, असें—(आहुः)–पंडित सांगतात.–(इन्द्रियेभ्यः)–इंद्रियांहून–(मनः)–मन–(परं)–श्रेष्ठ आहे–(तु)–व–(मनसः)–मनाहून–(बुद्धिः)–बुद्धि–(परा)–श्रेष्ठ आहे.–(यः)–जो–(बुद्धेः)–बुद्धीहून–(परतः)–पलीकडे असलेला साक्षी–(सः तु)–तोच प्रसिद्ध आत्मा आहे. ४२

असें झालें म्हणजे मनाची धांव कुंठित होऊन बुद्धीची सोडवणूक होईल, आणि मग तेथून ह्या दुष्टांचें बिऱ्हाड मोडेल. ६९

**अन्वयार्थ**—(हे महाबाहो)–हे पराक्रमी अर्जुना !—(एवं)–याप्रमाणें–(बुद्धेः परं आत्मानं)–बुद्धीच्या पलीकडे असलेल्या आत्म्याला–(बुद्ध्वा)—जाणून–(आत्मना)–स्वतः सुसंस्कृत मनानेंच त्याचें–(संस्तभ्य)–उत्तमप्रकारें स्तंभन करून (दुरासदं)–जो हातीं लागणें फार कठिण आहे, अशा–(कामरूपं शत्रुं)–या कामरूप शत्रूला–(जहि)–तूं टाक. ४३

ह्याप्रमाणें ह्यांची अंतःकरणांतून वस्ती मोडली म्हणजे हे खास मेले असें समज. ज्याप्रमाणें सूर्यकिरणांशिवाय मृगजळ दृष्टीस पडावयाचें नाहीं, २७० त्याप्रमाणें, राग आणि द्वेष जर नाश पावले, तर ब्रह्मरूपी स्वराज्यच हातीं आलें असें समज. मग तो स्वतःच निजसुख भोगतो. ७१ हीच गुरुशिष्यांची गुह्य गोष्ट; हेंच जीवब्रह्माचें ऐक्य. तूं येथें स्थिर होऊन येथून कधींही हालूं नको. ७२ संजय म्हणतोः–राजा, ऐक; सकलसिद्धमुकुटमणि लक्ष्मीपति श्रीकृष्ण ह्याप्रमाणें बोलले. आतां ह्यापुढें भगवान श्रीकृष्ण एक पुरातन कथा सांगतील, ती ऐकून अर्जुन प्रश्न करील. ७३–७४ त्या कथेची योग्यता व रसिकपणा ही ऐकून श्रोत्यांना श्रवणसुखाचा सुकाळ होईल. ७५ निवृत्तीचे दास जे ज्ञानदेव, ते म्हणतात, " बापांनो, आत्मज्ञानप्राप्तीच्या चांगल्या तयारीनें तुम्ही कृष्णार्जुनसंवाद ऐका. " २७६.

१ पाचावांचून. २ आच्छादिलेलें. ३ रोधलेलें, आच्छादिलेलें. ४ खोल, शोधण्यास कठीण. ५ रागद्वेषांना पराभव होत नाहीं. ६ मारण्यास. ७ साह्य. ८ साहाय. ९ हठयोग्यांना. १० संकट. ११ मानवला, अनुकूल झाला. १२ घरटें. १३ मसेव. १४ जिंक, इंद्रियांचीं द्वारें बंद कर. १५ कुंठित होईल. १६ आश्रय. १७ मेले. १८ सूर्यकिरणांशिवाय. १९ नाश पावले. २० जीवब्रह्माची. २१ गोष्ट. २२ पहिली, पुरातन. २३ समुच्चयार्थक अव्यय. २४ योग्यता. २५ रसिकपणाचा. २६ सुकाळ. २७ चांगला. २८ ज्ञानाचा.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय चवथा.

आजि श्रवणेंद्रिया पाहलें । जें येणें गीतानिधान देखिलें । आतां स्वप्नचि हें तुकलें । साचांसरिसें १ आधींचि विवेकाँची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी । आणि भक्तराजु किरीटी । परिसत असे २ जैसा पंचमालापु सुगंधु । कीं परिमळुं आणि सुस्वादु । तैसा भला जाहला विनोदु । कथेचा इये ३ कैसी आंगळिक दैवाची । जे गंगा जोडली अमृताची । हो कां जपतपें श्रोतयांचीं । फळा आलीं ४ आतां इंद्रियजात आघवें । तिहीं श्रवणाचें घर रिघावें । मग संवादसुख भोगावें । गीताख्य हें ५ हा अैतिसो अतिप्रसंगें । सांडूनि कथाचि ते सांगें । जे कृष्णार्जुनु दोघे । बोलत होते ६ ते वेळीं संजयो रायातें म्हणे । अर्जुनु अधिष्ठिलीं दैवगुणें । जे अतिप्रीति श्रीनारायणें । बोलतु असे ७ जें न संगेचि पितया वसुदेवासी । जें न संगेचि माते देवकीसी । जें न संगेचि बंधु बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत ८ देवी लक्ष्मीयेवढी जवळिक । परी तेंही न देखे या प्रेमाचें सुख । आजि कृष्णस्नेहाचें बिकें । यातेंचि आथी ९ सनकादिकांचिया आशा । वाढीनल्या होतिया कीर बहुवसा । परी त्याही येणें मानें यशा । येतीचिना १० या जगदीश्वराचें प्रेम । एथ दिसतसें निरुपम । कैसें पार्थें येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ११ हो कां जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती । मज एकैवंकी याची स्थिती । आवडतु असे १२ एऱ्हवीं हा योगियां नाडेळे । वेदार्थासी नाकळे । जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना १३ तो हा निजस्वरूप । अनादि निष्कंप । परी कवणें मानें सकंप । जाहला आहे १४ हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी । कैसा याचिये आवडी । आवरला असे १५

श्रीभगवानुवाचः—

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् । विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥

मग देव म्हणे पंडुसुता । हाचि योगु आम्हीं विवस्वंता । कथिला परी ते

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय चवथा.

गीताशास्त्राच्या प्रथम तीन अध्यायांचें व्याख्यान केल्यानंतर आपल्या श्रोत्रेंद्रियांनें भाग्य वर्णन करण्याचे मिषानें मुमुक्षूंस ग्रंथामध्यें रुची उत्पन्न होण्याकरितां महाराज अवतरण देतातः—

आज कानांना उजाडलें म्हणजे त्यांचा भाग्योदय झाला; कारण, यथार्थ गीता श्रवण होणें बहुतेक स्वप्नवत् आहे! असा गीतेचा ठेवा आज त्यांनीं पाहिला. आतां जागृत झाल्यावर स्वप्नांतील गोष्ट खोटीशी भासते; पण ती आज खरी झाली! १ आधींच आत्मविचाराची गोष्ट, त्यांत श्रीकृष्ण जगजेठी प्रतिपादन करणारा, आणि भक्तशिरोमणि अर्जुन ऐकणारा. २ पंचम स्वर आणि त्यांतच उत्तम सुवास व गोडी या तिहींचा ऐक्यभाव असतां जसा आनंद होईल तसा प्रकार या गीतारूपी कथामृताचा आहे; म्हणजे यांत सर्व इंद्रियांना आनंद होईल अशी गोडी आहे. ३ दैवाची थोरवी काय वर्णावी, की जिच्यामुळें श्रोत्यांची जपतपें फळास येऊन अमृतरूप गंगाच त्यांना प्राप्त झाली. ४ म्हणून, सर्व इंद्रियांनीं आपआपलीं कामें सोडून श्रवणाचे ठिकाणीं वास करून कृष्णार्जुनसंवादरूप गीतेचें सुख घ्यावें. ५ तेव्हां संतमंडळी ज्ञानेश्वरास म्हणाली कीं, आतां तुझा अप्रासंगिक पाल्हाळ पुरे करून कृष्णार्जुन जें बोलत होते ती कथा आम्हांला सांग. ६ त्या वेळेस संजय धृतराष्ट्रास म्हणालाः—दैवीसंपत्तीनें युक्त असलेल्या अर्जुनास श्रीकृष्ण अति प्रेमानें म्हणालेः—अति प्रेमानें कशावरून म्हणशील तर—७ जें गुह्य श्रीकृष्णांनीं आपला पिता वसुदेव, माता देवकी व बंधु बलराम ह्यांसही सांगितलें नाहीं, तें अर्जुनास सांगितलें. ८ लक्ष्मीदेवी इतकी नेहमीं सन्निध राहणारी पण तिलाही ज्या प्रेमसुखाचा अनुभव लाभला नाहीं, त्या कृष्णप्रेमाचें पात्र आज अर्जुन झाला आहे. काय चमत्कार सांगावा—९ सनकादिक त्याची बहुत दिवसांपासून इच्छा करीत होते, पण त्यांनाहीं इतक्या योग्यतेचें तें प्रेम प्राप्त झालें नाहीं. १० त्याचे ठिकाणीं जगदीश्वराचें अनुपमेय प्रेम दृष्टीस पडतें, यावरून या अर्जुनानें किती सर्वोत्कृष्ट पुण्य केलें असावें! ११ पहा कीं, ज्याच्या प्रीतीकरितां निराकार साकार झाला, ह्यावरून मला तर असें वाटतें कीं, ह्या दोघांची स्थिती (देह) जरी भिन्न आहे, तरी दोघे एकरूपच आहेत. १२ एऱ्हवीं हा भगवान योग्यांना आढळत नाहीं, वेदार्थालाहि ज्याचें आकलन होत नाहीं, व ज्याचे ठिकाणीं ध्यानाची दृष्टि पोहोंचत नाहीं. १३ असा जो आत्मस्वरूप, अनादि, अविक्रिय भगवान् तो अर्जुनावर किती कृपावंत झाला आहे! १४ हा त्रैलोक्यरूप वस्त्राच्या संकोचविस्तारांचें अधिष्ठान आहे. (त्रैलोक्य हे याचें रूप असून त्याची घडी करून हा अवतार घेऊन आला आहे,) आणि आकाराच्या पलीकडला म्हणजे निराकार असून हा अर्जुनाला इतक्या प्रेमानें कसा स्वाधीन झाला मकळे! १५

**अन्वयार्थ**—(अहं)—मी—(इमं अव्ययं योगं)—हा अक्षय फल देणारा ज्ञानयोग—(विवस्वते)—आदित्याला—(प्रोक्तवान्)—सांगता झालों—(विवस्वान्)—आदित्य—(मनवे)—मनूला—(प्राह)—सांगता झाला—(मनुः)—मनु—(इक्ष्वाकवे)—इक्ष्वाकु नांवाच्या आदिराजाला—आपल्या पुत्राला—(अब्रवीत्)—सांगता झाला. १.

मग श्रीकृष्ण अर्जुनास म्हणालेः— कर्मयोग ज्याचा उपाय आहे असा हा ज्ञानयोग आम्हीं पूर्वी विवस्वानाला—सूर्याला—सांगितला; परंतु त्या गोष्टीला

१ कानाला. २ उजाडलें. ३ गीतारूप ठेवा. ४ जग. ५ मासलें. ६ खरें पटल्यावरोवर. ७ विचारानी. ८ गोष्ट. ९ समस्वरांतील पांचवा स्वर. १० सुवास. ११ माधुर्य. १२ कौतुक, करमणूक. १३ थोरवी, अपूर्वाई. १४ इंद्रियसमूह. १५ कृष्णार्जुनांच्या भाषणाचें सुख. १६ पाल्हाळ. १७ युक्त झालेला. १८ सत्वगुणानें. १९ सन्निध असणारी. २० लाभ. २१ अतिशय. २२ विदेही. २३ एकरूपी. २४ वाटत असे. २५ हातीं लागत नाहीं. २६ अचल. २७ दयाळु. २८ त्रैलोक्यरूपी वस्त्राची. २९ पलीकडचा कांठ. ३० स्वाधीन झाला ३१ निष्काम कर्मयोग. ३२ सूर्याला.

वार्ता । बहुतां दिवसांची १६ मग तेणें विवस्वतें रवी । हे योगस्थिति आंघवी । निरूपिली बरवी । मनूप्रती १७ मनूनें आपण अनुष्ठिली । मग इक्ष्वाकुवा उपदेशिली । ऐसी परंपरा विस्तारिली । आंध हे गा १८

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः । स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

मग आणिकही या योगातें । राजर्षि जाहले जाणते । पारि तेथोनि आतां सांप्रतें । नेणिजे कोण्ही १९ जे प्राणियां कामीं भरु । देहाचिवरी आदरु । म्हणोनि पडिला विसरु । आत्मबोधाचा २० अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखचि परमावधि । जीवु तैसा उपाधि । आवडे लोकां २१ एन्हवीं तरी खवणेयांच्या गांवीं । पाटौउवें काय करावीं । सांगें जात्यंधा रवी । काय अथी २२ कां बहिरयांच्या आस्थानीं । कवण गीतातें मानी । कीं कोल्हेया चांदणीं । आवडी उपजे २३ पैं चंद्रोदया आंरौतें । जयांचे डोळे फुटती असते । ते काउळे केवीं चंद्रातें । वोळखती २४ तैसी वैराग्याची शिंव न देखती । जे विवेकाची भाष नेणती । ते मूर्ख केवीं पावती । मज ईश्वरातें २५ कैसा नेणों मोहो वाढीनला । तेणें बहुतेक काळु व्यर्थ गेला । म्हणोनि योगु हा लोपला । लोकीं इये २६

स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः । भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥३॥

तोचि हा आजि आतां । तुजप्रती कुंतीसुता । सांगितला आम्हीं तत्त्वता । भ्रांति न करीं २७ हें जीवींचें निज गुज । परी केवीं राखों तुज । जे पैढियेसी तूं मज । म्हणऊनियां २८ तूं प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा । मैत्रियेचि चित्कळा । धनुर्धरा २९ तूं अनुसंगाचा ठावो । आतां तुज काय वंचूं जावों । जऱ्ही संग्रामरूढ आहों । जाहलों आम्ही ३० तरी नावेक हें सहावें । गांजाबज्यही न धरावें । परी तुझें अज्ञानत्व हरावें । लागे आधीं ३१

अर्जुन उवाचः—

अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः । कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

तंव अर्जुन म्हणे श्रीहरी । माय आपुलेयांचा स्नेहो करी । एथ विस्मयो काय अवधारीं । कृपानिधि ३२ तूं संसारश्रांतांची साउली । अनाथ जीवांची माउली । आमुतें कीर प्रसवली । तुझीच कृपा ३३ देवा पांगुळ एकादें विजे । तरी जन्मौनि जोजारु साहिजे । हें बोलों काय तुझें । तुजचि पुढां ३४ आतां पुसेन जें मी कांहीं । तेथ निकें चित्त देईं । तेवींचि देवें कोपावें ना कांहीं । बोला एका ३५ तरी मागील जे वार्ता । तुवां सांगितली होती अनंता । ते

पुष्कळ दिवस झाले. १६ सूर्यानें हा सर्व योग वैवस्वत मनूला सांगितला; १७ आणि मनूनें त्याचें आचरण करून इक्ष्वाकु नामक आपल्या पुत्रास त्याचा उपदेश केला, अशी ही मुळापासून परंपरा चालत आली आहे. १८

**अन्वयार्थ**--(एवं)-याप्रमाणें-( परंपराप्राप्तं )-क्षत्रियांच्या परंपरेनें प्राप्त झालेल्या-(इमं)-या योगास-(राजर्षयः)-राजर्षी-(विदुः)-जाणते झाले. त्यांनीं या योगाचें अनुष्ठान केलें-(हे परंतप)-हे अर्जुना-(महता कालेन)-पण मध्यें पुष्कळ काल निघून गेल्यामुळें-(सः योगः)-तो योग-(इह)-यावेळीं -(नष्टः)-संप्रदायरहित झाला आहे. २

पुढें आणखीही कांहीं राजर्षींना हा योग माहीत होता, परंतु आतां अलीकडे तो फारसा कोणी जाणत नाहीं. १९ कारण, प्राणिमात्राची आवड विषयसेवनाविषयीं असून, देहावरच विशेष प्रेम असल्यामुळें त्यांना आत्मबोधाचा विसर पडला. २० आस्तिकबुद्धि आडमार्गानें गेल्यामुळें विषयसुख म्हणजेच इतिकर्तव्यता असें लोकांना वाटून, ते जीवाप्रमाणेंच विषयरूप उपाधीवर प्रेम करूं लागले ! २१ असें पहा, दिगंबरांच्या गांवांत उंची वस्त्रांची चाड काय असणार ? किंवा जन्मांधाला सूर्याचा काय उपयोग सांग बरें ? २२ किंवा बहिऱ्यांच्या सभेत गाण्याला कोण मान देईल ? अथवा कोल्ह्याला चांदण्यापासून कसा आनंद होईल ? २३ तसेंच, चंद्रोदयापूर्वीं ज्यांचे डोळे फुटतात-मिटतात-ते कावळे चंद्रास कसें ओळखतील ? २४ त्याचप्रमाणें ज्यांनीं वैराग्याची शींवसुद्धां पाहिली नाहीं, आणि ज्यांना विचाराचें नांव देखील माहीत नाहीं, त्या मूर्खांना मज परमेश्वराचा लाभ कसा होईल ? २५ हा मोह इतका कसा वाढला कोण जाणे; पण त्यामुळें बहुतेक काळ व्यर्थ गेला; आणि म्हणून हा लोकीं हा योग बुडाला. २६

**अन्वयार्थ**--(सः एव अयं)-तोच हा-(पुरातनः)-प्राचीन-(योगः)-योग-(मया)-मीं-(ते) तुला-(अद्य)-आज (प्रोक्तः)-सांगितला,[ते कां ? तर]-तूं (मे)-माझा-(भक्तः)-भक्त-(असि)-आहेस-(च)-व-(सखा)सखा-(असि)-आहेस,-(इति)-म्हणून सांगितला.-(हि)-कारण-(एतत्)-हें-(उत्तम)-उत्तम-(रहस्यं)-ज्ञान आहे. ३

हे कुंतीसुता, खरोखर तोच हा योग तुला आज आम्हीं सांगितला आहे. तूं कांहींसुद्धां शंका धरूं नको. २७ हा योग म्हणजे माझा जीव की प्राण आहे, परंतु तुजपासून तो लपवून कसा ठेवावा ? कारण, तूं माझा फार आवडता भक्त आहेस. २८ धनुर्धरा, तूं केवळ प्रेमाची मूर्ति असून भक्तीचा जिव्हाळा, जिवलग मित्रत्वाचें तर केवळ जीवनः २९ आणि तूं माझ्या विश्वासाचें पात्र आहेस, तेव्हां तुझ्याशीं मी काय प्रतारणा करूं ? म्हणून आपण जरी युद्धास सिद्ध झालों आहों तरी ३० युद्धाची गडबड चालली असतांहि ती क्षणभर एके बाजूस ठेवून त्यास न जुमानतां प्रथम तुझें अज्ञान आम्हांस दूर केलें पाहिजे. ३१

**अन्वयार्थ**—(भवतः)-आपला-(जन्म)-जन्म-(अपरं) -अलीकडचा-कांहीं वर्षांपूर्वी झालेला-(विवस्वतः जन्म)-सूर्याचा जन्म-(परं)-सृष्टीचा आरंभीं फार प्राचीनकाळीं झालेला. तेव्हां-(त्वं)-तूं-(आदौ)-आरंभीं-(प्रोक्तवान्)-हा योग सूर्याला सांगितलास-(इति एतत्)-अशा प्रकारचें हें सांगणें-(कथं)-मी कसें-(विजानीयां)-खरें मानावें ? ४

त्या वेळेस अर्जुन म्हणतो, "हे कृपानिधे, श्रीहरि ! आईनें आपल्या लेंकरावर प्रेम केलें तर त्यांत आश्चर्य तें कोणतें ? ३२ तूं संसारानें तापलेल्या लोकांची सावली व दीन जनांची माउली आहेस; आणि खरोखर आमचा जन्म तुमच्याच कृपेपासून झाला आहे. ३३ देवा, आईला पांगळें मूल झालें तर त्याच्या जन्मापासून तिला त्रास सोसावा लागतो, हें सर्व तुम्हीं जाणतां; तर आम्हीं तुमच्यापुढें तुमचें महत्व काय बोलावें ? ३४ आतां मी जें कांहीं विचारणार आहें, त्याकडे चांगलें लक्ष्य द्यावें व त्या गोष्टीचा राग मनांत आणूं नये. ३५ हे अनंता, तुम्हीं जी मागील गोष्ट म्हणून सांगितली, ( सूर्याला हा कर्मयोग मीं सांगितला त्याची ) ती माझ्या मनाला

---

१ गर्व. २ चौदा मनूंतील सातवा वैवस्वत मनू. ३ आचरण केलें. ४ इक्ष्वाकु नामक पुत्रास. ५ पुरातन. ६ विषयसेवनाविषयीं आवड. ७ प्रीति. ८ आडमार्गानें गेल्यास. ९ मार्मिक. १० दिगंबराच्या. ११ उंची वस्त्रें. १२ जन्मांधाला. १३ उपयोगी आहे. १४ सभेंत. १५ अंगारक. १६ जिवलग, आवडता. १७ जीव. १८ तुज्याशीं, विश्वासाचा. १९ युद्धास सज्ज. २० क्षणभर. २१ गडबड. २२ बाळकाचा. २३ संसारानें श्रमलेल्यांची. २४ फार्या भार्या. २५ द्यावें. २६ जन्मापासून. २७ त्रास, जंजाळ.

सत्सुखें विश्व कोंदे[2] । धर्मेचि जगीं नांदे । भक्तां निघतीं दोंदें । सात्त्वि[3]
काचीं ५५ तैं पापांचा अँचळु फिटे । पुण्याची पहांट फुटे । जैं मूर्ति माझी
प्रगटे । पंडुकुमरा ५६ ऐसेया काजालागीं । अवतरें मी युगीं युगीं । पारि हेंचि
वोळखें जो जगीं । तो विवेकियां ५७

जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः । त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥९॥

माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें । हें अविकार जो जाणे
तो परममुक्त ५८ तो चालिला संगें न चळे । देहींचा देहा नाकळे । मग पं-
चत्वीं तंव मिळे । माझ्याचि रूपीं ५९

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः । बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥

एऱ्हवीं परापर न शोचिती । जे कामनाशून्य होती । वाटा कें वेळीं न
वचती[12] । क्रोधाचिया ६० सदा मियांचि ओथिले[13] । माझिया सेवा जियाले । कीं
आत्मबोधें तोषले । वीतरागे[14] जे ६१ जे तपोतेजाचिया राशी । कीं एकायतन[15]
ज्ञानासी । जे पवित्रता तीर्थांसी । तीर्थरूप ६२ ते मद्भावा[16] सहजें आले । मी
तेचि ते होऊनि ठेले । जे मज तयां उरले । पदर[17] नाहीं ६३ सांगें पितळेची
गंधिकाळिक । जैं फिटली होय निःशेख । तैं सुवर्ण काई आणिक । जोडूं
जाइजे ६४ तैसे यमनियमीं कडसले । जे तपोज्ञानें चोखाळले । मी तेचि ते
जाहले । एथ संशयो कायसा ६५

ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् । मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

एऱ्हवीं तरी पाहीं । जे जैसे माझ्या ठायीं । भजती तयां मीही । तैसाचि
भजें ६६ देखें मनुष्यजात सकळ । हें स्वभावता भजनशील । जाहलें असे के-
वळ । माझ्याचि ठायीं ६७ परी ज्ञानेंवीण नाशिले । जे बुद्धिभेदासी आले ।
तेणेंचि त्या कल्पिलें । अनेकत्व ६८ म्हणऊनि अभेदीं भेदु देखती । यया
अनाम्या[21] नामें ठेविती । देवी देवो म्हणती । अचर्चातें[22] ६९ जे सर्वत्र सदा
सम । तेथ विभाग[23] अधमोत्तम । मतिवशें संभ्रम[24] । विवंचिती[25] ७०

कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः । क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

मग नानाहेतुप्रकारें । यथोचितें उपचारें[26] । मानीलीं देवतांतरें[27] । उपासिती ७१
तेथ जें जें अपेक्षित । तें तैसेंचि पावती समस्त । परी तें कर्मफळ निश्चित । वो-
ळख तूं ७२ वांचून देतें घेतें आणिकें[29] । निभ्रांत नाहीं सम्यक[30] । एथ कर्मीचि

मग सत्सुखानें सर्व विश्व भरून जातें, जिकडे तिकडे लोक धर्माचें आचरण करितात, आणि भक्तजन सत्वगुणानें परिपूर्ण होतात. ५५ अर्जुना, ज्या वेळीं माझा अवतार प्रकट होतो, त्या वेळीं पापांचे पर्वत नाहींतसे होतात, व पुण्याचा उदय होतो ५६ अशा कामाकरितां मी युगायुगांचे ठायीं अवतार धारण करितों, परंतु असें जो ओळखतो तोच जगांत विचारवान् होय. ५७

**अन्वयार्थ**--(यः)-जो-(मे)-माझा-(एवं)-वर सांगितलेल्या प्रकारचा-(दिव्यं)-अलौकिक-(जन्म च कर्म)-जन्म व कर्म-(तत्वतः)-अगदीं बरोबर-(वेत्ति)-जाणतो तो-(देहं)-देहाला-(त्यक्त्वा)-टाकून-(पुनर्जन्म)-पुनर्जन्मास-(न एति)-प्राप्त होत नाहीं, तर-(हे अर्जुन)-हे अर्जुना-(सः)-तो-(मां)-मला-(एति)-प्राप्त होतो. ९

माझें अजत्व कायम असून जन्म घेणें, व अकर्तृत्व कायम असून कर्म करणें असें जें माझें निर्विकार स्वरूप, तें जो निःशंक जाणतो, तोच परममुक्त होय. ५८ असें जाणणारा देहाच्या संबंधानें जरी चालतोसा दिसला तरी तो चालत नाहीं; आणि त्यानें देह धारण केला, तरी तो देहभावानें आकळिला जात नाहीं; मग मेल्यावर माझ्या स्वरूपांत येऊन मिळतो. ५९

**अन्वयार्थ**--(वीतरागभयक्रोधाः)-विषयासक्ति, भय व क्रोध ज्यांच्यापासून निघून गेले आहेत असे-(मन्मया)-ईश्वरमय झालेले, ईश्वराहून मी भिन्न आहें, असें न समजणारे-(मां उपाश्रिताः)-माझाच पूर्ण आश्रय केलेले-केवळ ज्ञाननिष्ठ असे-(बहवः)-अनेक लोक आजवर-(ज्ञानतपसा)-ईश्वराचें ज्ञान याच तपानें-(पूताः)-पवित्र झालेले-(मद्भावं)-माझ्या भावास-माझ्या स्वरूपास-मोक्षास-(आगताः)-प्राप्त झाले आहेत. १०

एरव्हीं, मागील व पुढील गोष्टींचा जे शोक करीत नाहींत, आणि जे वासनारहित असतात, ते कोणत्याही वेळेस क्रोधाच्या मार्गाला जात नाहींत. ६० जे विषयप्रीतिरहित आहेत, जे नेहमीं माझ्या स्वरूपाच्या प्राप्तीमुळें आपल्यास धन्य मानतात, आणि माझ्याच सेवेमुळें जे वांचले आहेत, किंवा जे ज्ञानाच्या बोधानें संतोष पावतात, ६१ जे तपाच्या, तेजाच्या राशी किंवा ज्ञानाचें घरच अथवा जे तीर्थालाही पवित्र करणारे तीर्थरूप आहेत, ६२ ते माझ्या स्वरूपास सहज येऊन मिळतात, आणि मद्रूपच होतात; त्यांच्यांत व माझ्यांत भिन्नभाव नसतो. ६३ सांग कीं, पितळेचा कळकटपणा व रंग अजिबात नाहींसा झाला तर मग सोनें संपादन करावयास दुसरीकडे गेलें पाहिजे काय? तेंच सोनें. ६४ त्याचप्रमाणें जे यमनियमादि अष्टांग योगांत पारंगत होऊन तपानें व ज्ञानानें शुद्ध झाले आहेत ते मद्रूप झाले त्याविषयीं संशय कशाला पाहिजे! ६५

**अन्वयार्थ**--(ये)-जे लोक-(मां)-मला-(यथा)-ज्याप्रकारें-(प्रपद्यन्ते)-भजतात-(तान्)-त्यांस-(तथा एव)-तसाच-(अहं)-मी-(भजामि)-भजतों, तसाच त्यांवर अनुग्रह करतों,-(हि)-(पार्थ)-हे अर्जुना!-(मनुष्याः)-मानव-(सर्वशः)-सर्वप्रकारें-(मम)-माझ्या-(वर्त्म)-मार्गास-(अनुवर्तन्ते)-अनुसरतात.

सहज पाहिलें तर जे ज्या ज्या भावानें मला भजतात, त्या त्या भावानें मीही त्यांना तसाच भजतों. ६६ हे पहा:-मनुष्यमात्राची स्वभावतःच माझें भजन करण्याकडे प्रवृत्ति आहे. ६७ परंतु ज्ञानाच्या अभावानें म्हणजे आपण परमात्मारूपच आहोंत हें न समजल्यामुळें बुद्धीचे ठिकाणीं भेद उत्पन्न होऊन, मी जो एक आहें, त्या माझे ठिकाणीं ते अनेकत्व कल्पितात, ६८ म्हणून सर्व भूतमात्रांशीं अभिन्न असतां माझ्या ठिकाणीं भेद कल्पितात, मी नामरहित असून मला अनेक नांवें देतात, आणि ज्या ज्या विषयीं चर्चा करतां येणें शक्य नाहीं, असा मला कोणी देव, कोणी देवी असें म्हणतात. ६९ आपआपल्या बुद्धीप्रमाणें जो मी नेहमीं सर्व ठिकाणीं सारखा आहे, त्या माझ्या ठिकाणीं ते भ्रांतीनें 'वाईट, चांगला' असा भेद मानतात. ७०

**अन्वयार्थ**--(कर्मणां)-कर्मांच्या-(सिद्धिं)-सिद्धीची-(कांक्षन्तः)-आकांक्षा-इच्छा करणारे अधिकारी पुरुष-(इह)-या लोकीं-(देवताः)-इंद्र, अग्नि इत्यादि देवतांची-(यजन्ते)-पूजा करितात-(हि)-कारण-(मानुषे लोके)-या मनुष्य लोकांत-(कर्मजा सिद्धिः)-कर्मापासून होणारी सिद्धि-कर्मफलें-(क्षिप्रं)-सत्वर-(भवति)-होते-कर्मफलें सत्वर मिळतात. १२

मग मनांत नाना हेतु धारण करून, अनेक देव मानून त्यांचीं अनुरूप उपचारांनीं उपासना करतात. ७१ या उपासनेंत, ज्यांचें जें इच्छित असतें, तें त्यांना तसेंच प्राप्त होतें; परंतु ते सर्व त्यांच्या उपासनेचेंच फळ आहे असें तूं निश्चयानें समज. ७२ खरोखर पाहतां देणारा किंवा घेणारा कर्मांशिवाय निःसंशय दुसरा कोणी नसून त्या

१ आत्मसुखानें. २ भरे. ३ सात्त्विक भावांची. ४ पर्वत. ५ उषःकाल. ६ ठायीं. ७ निःशंक. ८ स्वाधीन होत नाहीं. ९ मरणकाळीं. १० मागील पुढील. ११ मार्गाला. १२ जात नाहींत. १३ संपन्न, युक्त. १४ निरिच्छ, विषयप्रीतिरहित. १५ एक ठिकाण, घर. १६ माझ्या स्वरूपाला. १७ अंतर, पडदा. १८ कलंक, कीट. १९ पारंगत झाले. २० निर्मळ झाले. २१ नामरहिताला. २२ चर्चा करण्याला अशक्य. २३ भेद. २४ भ्रांत चित्तानें. २५ मानितात. २६ उपायांनीं. २७ दुसरे देव, अग्नि, इंद्र इत्यादि. २८ इच्छित. २९ दुसरें. ३० खरें पहातां.

फळसूचक[1] । मनुष्यलोकीं ७३ जैसें क्षेत्रीं जें पेरिजे । तेंवांचूनि आन न निपजे । कां पाहिजे तेंचि देखिजे । दर्पणाधारें ७४ नातरी कडेयांतळवटीं[2] । जैसा आपुलाचि बोलु किरीटी । पडिसादु[3] होऊनि उठी । निमित्तयोगें ७५ तैसा समस्तां यां भजना । मी साक्षिभूतु पैं अर्जुना । एथ प्रतिफळें भावना । आपुलाली ७६

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः । तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥१३॥

आतां याचिपरी जाण । चाऱ्ही हे वर्ण । सृजिलें[5] म्यां गुण- । कर्मविभागें[6] ७७ जे प्रकृतीचेनि आधारें । गुणाचेनि व्यभिचारें । कर्मे तदनुसारें । विवंचिलीं ७८ एथ एकाचि हे धनुष्यपाणी । परी जाहले गा चहूं वर्णीं । ऐसी गुणकर्म[7]-कडसणी । केली सहजें ७९ म्हणोनि आइकें पार्था । हे वर्णभेद[8]संस्था । मी कर्ता नव्हे सर्वथा । याचिलागीं ८०

न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा । इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥१४॥

हें मजचिस्तव जाहलें । परी म्यां नाहीं केलें । ऐसें जेणें जाणितलें । तो सुटला गा

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः । कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥१५॥

मागील मुमुक्षु[11] जे होते । तिहीं ऐशिया जाणोनि मातें । कर्मे केलीं समस्तें । धनुर्धरा ८२ परि तें बीजें जैसीं दग्धलीं[12] । नुगवतीचि पेरिलीं । तैशीं कर्मेंचि परि तयां जाहलीं । मोक्षहेतु[13] ८३ एथ आणिकही एक अर्जुना । हे कर्माकर्म[14]विवंचना । आपुलिये चोंडें[15] सज्ञाना । योग्यु नोहे ८४

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः । तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१६॥

कर्म म्हणिपे तें कवण । अथवा अकर्मा काय लक्षण । ऐसें विचारितां विचक्षण[16] । गुंफोनि[17] ठेले ८५ जैसें कां कुडें नाणें । खऱ्याचेनि सारखेपणें । डोळ्यांचेंहि[19] देखणें । संशयीं घाली ८६ तैसें नैष्कर्म्यतेचेनि भ्रमें । गिवसिजेत[20] आहाती कर्मे । जे दुजी सृष्टि मनोधर्में[21] । करूं सकती ८७ वांचूनि[22] मूर्खांची गोठी । कायसी । एथ मोहले गा क्रांतदर्शी[23] । म्हणोनि आतां तेंचि परियेसीं । सांगेन तुज ८८

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः । अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥१७॥

तरी कर्म म्हणजे स्वभावें । जेणें विश्वाकारु[24] संभवे । तें सम्यक[25] आधीं जाणावें । लागे एथ ८९ मग वर्णाश्रमासि उचित । जें विशेष कर्म विहित । तेंही वोळखावें निश्चित । उपयोगेंसी[26] ९० पोटीं[27] जें निषिद्ध म्हणिपे । तेंही बुझावें[28]

मनुष्यलोकीं कर्मापासूनच फलप्राप्ति होते. ७३ जसें जमिनींत जें धान्य पेरावें त्यावांचून दुसरें उत्पन्न व्हावयाचें नाहीं, किंवा आरशांत जें पहावें तेंच दृष्टीस पडतें, ७४ किंवा अर्जुना, डोंगराच्या कड्याखालीं ज्याप्रमाणें आपलाच शब्द कारणवशांत प्रतिध्वनीच्या रुपानें उमटतो, ७५ त्याचप्रमाणें, अर्जुना, या सर्व उपासनांचा मीच साक्षीभूत आहें. या उपासनेंत ज्याची त्याची भावना फलद्रूप होते.७६

**अन्वयार्थ**--(मया)-मीं-( गुण-कर्मविभागशः)-गुणांचा विभाग व कर्मांचा विभाग करून, त्याच्या अनुरोधानें-(चातुर्वर्ण्यं)-चार वर्ण-(सृष्टं)-उत्पन्न केले आहेत.--(तस्य कर्तारं अपि मां)-मायिक व्यवहारदृष्ट्या मी जरी त्यांचा कर्ता आहें, तरी-(अकर्तारं)-अकर्ता आहें व त्यामुळेंच-(अव्ययं)-असंसारी आहें,-(विद्धि)-असें जाण. १३.

आतां ह्याचप्रमाणें हे जे चार वर्ण आहेत, तेही गुण व कर्म यांच्या विभागानें मींच उत्पन्न केले आहेत असें तूं समज. ७७ आणि त्या चान्ही वर्णांच्या कर्मांची आपापल्या प्रकृतिधर्मानें आणि गुणांच्या तारतम्यानें व्यवस्था केली आहे. ७८ अर्जुना, हे सर्व लोक एकच असून चतुर्वर्णात्मक झाले. गुण व कर्म ह्यांच्या योगानें त्यांच्या चार वर्णांची व्यवस्था सहज झाली. ७९ गुणकर्मानुरूपच वर्णभेदाची व्यवस्था झाली आहे. म्हणून, पार्था; या वर्णभेदाच्या स्थापनेचा मी मुळींच कर्ता नाहीं. ८०

**अन्वयार्थ**-(मां)-मला-(कर्माणि)-कर्में-(न लिम्पन्ति)-पुण्यपापानें लिप्त करीत नाहींत.--(कर्मफले)-कर्मांच्या फलाविषयीं-(मे –माझी-(स्पृहा)-इच्छा- (न) [अस्ति]-नाहीं.-(इति)-याप्रमाणें-(मां)-मला-आत्म्याला- (यः)-जो-(अभिजानाति)-सर्वप्रकारें जाणतो-(सः)-तो-(कर्मभिः)-कर्मांनीं-(न बध्यते)-बद्ध केला जात नाहीं. १४

हा वर्णभेद जरी माझ्यापासून झाला आहे म्हणजे माझ्या सत्तेनें झाला आहे, तरी तो मीं केला नाहीं असें जो जाणतो तोच कर्मातीत झाला. ८१

**अन्वयार्थ**--(पूर्वैः अपि मुमुक्षुभिः)-पूर्वीच्याही मुमुक्षूंनीं-(एवं)-असें-(ज्ञात्वा)-जाणून-(कर्म)-कर्म-(कृतं)-केलें-(तस्मात्)-म्हणून-(त्वं)-तूं-(पूर्वैः)-पूर्वीच्या मुमुक्षूंनीं-(पूर्वतरं)-त्यांच्याही -पूर्वीचें -(कृतं) -केलेलें-(कर्म एव) -कर्मच -(कुरु)-कर. १५.

अर्जुना, पूर्वीचे जे मुमुक्षु झाले, त्यांनीं अशा प्रकारेंच मला जाणून सर्व कर्में केलीं; ८२ परंतु ज्याप्रमाणें भाजलेलें बीं पेरलें असतां मुळींच उगवत नाहीं, त्याप्रमाणें त्यांचीं निष्काम कर्मेंच त्यांना मोक्षप्राप्तीस कारणीभूत झालीं, ८३ आणि अर्जुना, त्यांत आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, हें कर्म आहे कीं अकर्म आहे ह्याचा विचार आपल्याच मतानें ठरविणें बुद्धिमानासुद्धां कठीण आहे. ८४

**अन्वयार्थ**—(कर्म किं)-कर्म काय व-(अकर्म किं)-अकर्म काय-(इति अत्र)-याविषयीं-(कवयः अपि)-मोठे मोठे बुद्धिमान्‌ही-(मोहिताः)-मोहित झालेले आहेत.-(तत्)-म्हणून-(ते)-तुला-(कर्म)-कर्म-अकर्म वगैरे काय आहे, तें-(प्रवक्ष्यामि)-मी सांगतों.-(यत्) जें कर्माकर्मादि-(ज्ञात्वा)-जाणून-(अशुभात्)-संसारापासून-(मोक्ष्यसे)-मुक्त केला जाशील-मुक्त होशील. १६

कर्म म्हणतात तें कोणतें, व अकर्माचें लक्षण काय ह्या विचार करतां करतां शहाणे देखील घोटाळ्यांत पडले. ८५ जसें खोटें नाणें खऱ्यासारखें हुबेहूब दिसल्यामुळें आपली दृष्टीच आपल्याला संशयांत घालते, ८६ तसें संकल्पमात्रेंकरून प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्यांना आहे, ते ज्याला भ्रमानें नैष्कर्म्य असें समजतात तें वास्तविक कर्म असून ते कर्माचे पाशांत सांपडतात. ८७ कर्माकर्म विचारामध्यें मोठमोठ्या सर्वज्ञांची त्रेधा उडते मग मूर्खांची-अज्ञान्यांची गोष्ट कशाला पाहिजे ? म्हणून, तीच गोष्ट सांगतों ती ऐक. ८८

**अन्वयार्थ**—(हि)-कारण-(कर्मणः अपि)-शास्त्रविहित कर्माचेंही तत्त्व-(बोद्धव्यं)-[अस्ति]-जाणणें उचित आहे. -(च)-व-(विकर्मणः)-प्रतिषिद्ध-शास्त्रनिषिद्ध कर्मांचेंही तत्त्व -(बोद्धव्यं) [अस्ति]-जाणण्यास योग्य आहे-(च)-आणि -(अकर्मणः)-सर्व कर्म टाकून मुकाट्यानें बसणें, या अवस्थेचेंही तत्त्व-(बोद्धव्यं) [अस्ति]-समजून घेण्यासारखें आहे. कारण- (कर्मणः) -कर्माचें-(गतिः)-यथार्थस्वरूप-(गहना)-गहन आहे. १७.

ज्यापासून या जगाची उत्पत्ति होते, तें कर्म होय. या लोकीं प्रथम त्याचें यथार्थ स्वरूप समजून घेतलें पाहिजे. ८९ मग जें कर्म वर्णाश्रमास योग्य व वेदांत सांगितलेलें आहे, त्याचीही अनुष्ठान, प्रकार व फल यासुद्धां ओळख करून घेतली पाहिजे. ९० आतां ज्याच्या ठिकाणीं सर्व कर्मांचा निषेध सांगितलेला आहे, असा जो परमात्मा, तो आपलें स्वरूपच आहे अशा रीतीनें

१ फल देणारे. २ डोंगराच्या कड्याखालीं, गिरिकंदरांत ३ प्रतिध्वनी. ४ फलद्रूप होतो; सिद्धीस जाते. ५ उत्पन्न केलें. ६ सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांच्या योगानें; आणि शम, दम, शौर्य, तेज, कृषि, वाणिज्य; सेवा इत्यादि कर्मांच्या योगानें; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असा कर्मविभाग. ७ मिश्रणानें. ८ व्यवस्था केली. ९ गुणकर्मांचा विवेक, विचार. १० ब्राह्मणक्षत्रियादि वर्णभेद, स्थापना. ११ मोक्षाची इच्छा करणारे. १२ भाजलेली. १३ मुक्तीला कारण. १४ कर्माकर्मांचा विचार. १५ इच्छेप्रमाणें. १५ विचारी शहाणे. १७ गोंधळून राहिले, गोत्यांत पडले. १८ खोटें. १९ खऱ्याच्या डोळ्यांना. २० गुंततात. २१ मनांत आणलें तर, संकल्पमात्रेंकरून. २२ यापुढें, मग. २३ दूर हटोने, सर्वज्ञ. २४ विश्वरचना, २५ यथार्थ. २६ फलासह. २७ यां उलट, शिवाय. २८ जाणावें.

स्वरूपें । येतुलेनि कांहीं न गुंफे । आपैसेंचि ९१ एऱ्हवीं जग हें कर्माधीन । ऐसी याची व्याप्ती गहन । परी तें असो आइकें चिन्ह । प्राप्तांचें गा ९२

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः । स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥१८॥

जो सकळकर्मीं वर्ततां । देखे आपुली नैष्कर्म्यता । कर्मसंगें निराशता । फळाचिया ९३ आणि कर्तव्यतेलागीं । जया दुसरें नाहीं जगीं । ऐसिया नैष्कर्म्यता तरी चांगी । बोधला असे ९४ तरी क्रियाकलापु आघवा । आचरतु दिसे बरवा । तोचि तो ये चिन्हीं जाणावा । ज्ञानिया गा ९५ जैसा कां जळापाशीं उभा ठाके । तो जरी आपणपें जळामाजि देखे । तरी तो निभ्रांत वोळखे । म्हणे मी वेगळा आहें ९६ अथवा नावें हृन जो रिगे । तो थडियेचें रुंख जातां देखे वेगें । तेंचि साचोकारें जों पाहों लागे । तंव रुख म्हणे अचळ ९७ तैसें सर्व कर्मीं असणें । तें फुडें मानूनि वायाँणें । मग आपणया जो जाणे । नैष्कर्म्य ऐसा ९८ आणि उदो अस्ताचेनि प्रमाणें । तैसें न चालतां सूर्याचें चालणें । तैसें नैष्कर्म्यत्व जाणे । कर्मीचि असतां ९९ तो मनुष्यासारिखा तरी आवडे । परी मनुष्यत्व तया न घडे । जैसें जळामाजीं न बुडे । भानुबिंब १०० तेणें न पाहतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें । न भोगितां भोगिलें । भोग्यजात १ एकेचि ठायीं बैसला । परि सर्वत्र तोचि गेला । हें असो विश्व जाहला । आंगेंचि तो २

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः । ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥

जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी खेदु नाहीं । परी फळापेक्षा कहीं । संचरेना ३ आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें सिध्दी नेईन । येणें संकल्पें जयाचें मन । विटाळेना ४ ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्में अशेखें । तो परब्रह्मचि मनुष्यवेखें । वोळख तूं ५

त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः । कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥२०॥

जो शरीरीं उदासु । फळभोगीं निरासु । नित्यता उल्हासु । होऊनि असे ६ जो संतोषाचा गाभारा । आत्मबोधाचिये वोगेरा । [illegible] न म्हणेचि धनुर्धरा । औरोगितां ७

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः [illegible] किल्बिषम् ॥ २१ ॥

यथार्थ दृढनिश्चय झाला असतां, पुरुष कर्मामध्यें सहजच गुंतणार नाहीं, ९१ अशा विचाराचा जर अभाव असला, तर सर्व जग आपल्या ताब्यांत ठेवील, अशी कर्माची व्याप्ति फार जबर आहे. परंतु, प्रस्तुत हें असो. आतां वर सांगितल्याप्रमाणें कर्माकर्माचें यथार्थ ज्ञान झालेल्या पुरुषाचें लक्षण सांगतों; ऐक. ९२

**अन्वयार्थ**—(यः)–जो विवेकी मनुष्य–(कर्माणि)–शरीर–इंद्रियें–प्राण यांच्या प्रत्येक व्यापारामध्यें–यांच्या प्रत्येक हालचालींत–(अकर्म)–अकर्म–आत्म्याचें अकर्तृत्व–(पश्येत्)–पाहतो–(च)–व–(यः)–जो–(अकर्मणि)–अकर्मांत–मुकाट्यानें बसणें या अवस्थेंत–(कर्म)–कर्तृत्व–(पश्येत्)–पाहतो–(सः)–तो–(मनुष्येषु)–सर्व मनुष्यांमध्यें–(बुद्धिमान्)–मोठा बुद्धिमान–ज्ञानी–(सः)–तो–(युक्तः)–योगी–(सः)–तो–(कृत्स्नकर्मकृत्)–समस्त कर्म करणारा. १८.

फळाची आशा न धरितां जो कर्माचें आचरण करितो, पण तें कर्म आपण करितों असें मानीत नाहीं, ९३ आणि त्याला अशा प्रकारें कर्मातीतपणा इतका चांगला समजला असतो कीं, त्याला आत्मस्वरूपाशिवाय जगांत दुसरें कांहीं उरलें नाहीं म्हणून कर्तव्य नाहींसें झालें. ९४ तथापि लोकदृष्ट्या तो सगळीं कर्में नीट रीतीनें आचरीत आहे असें दिसलें तरी वरच्या लक्षणानें युक्त तोच ज्ञानी आहे, ९५ ज्याप्रमाणें एखादा मनुष्य नदीच्या कांठीं उभा राहिल्यावर आपलें प्रतिबिंब पाण्यांत पाहात असला तरी 'पाण्याहून मी वेगळा आहें' असें तो निःसंशय समजतो, ९६ अथवा नावेंत बसून जाणाऱ्या मनुष्यास नदीच्या कांठावरील झाडें धांवतात असें दिसतें, परंतु तोच खरें पाहूं लागला म्हणजे त्याला तीं झाडें अचल आहेत असें समजतें. ९७ त्याप्रमाणें, सर्व कर्में करीत असतां आपल्या ठिकाणीं कर्म प्रतीतीला येतें तें अगदीं खोटें असून मी कर्मकर्ता नाहीं, असें जो जाणतो; ९८ आणि सूर्य उगवतो व मावळतो एवढ्याच प्रमाणावरून तो चालतो असें आपल्यास दिसतें. तसें कर्म आचरीत असतां तें आपण करीत नाहीं असें जो जाणतो; ९९ तो मनुष्यासारखा जरी दिसतो, तरी तो मनुष्य नसून परब्रह्मच आहे असें समजावें. ज्याप्रमाणें सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें तरी सूर्य त्यांत नसतो, १०० असा जो पुरुष, त्यानें कांहीं पाहिलें नाहीं, तरी सर्व विश्व पाहिलें, कांहीं केलें नाहीं, तरी सर्व केलें, कांहीं भोगिलें नाहीं. तरी यच्चयावत् भोग भोगिले. १ तो एकाच ठिकाणीं जरी बसला, तरी सर्वत्र गमन त्यानेंच केलें. हें असो, फार काय सांगावें, सर्व विश्वरूप तो बनला आहे. २

**अन्वयार्थ**–(यस्य)–ज्या पूर्वोक्त विवेकी पुरुषाचे–(सर्वे)–समस्त–(समारंभाः)–कर्में–(कामसंकल्पवर्जिताः)–काम–विषयेच्छा व त्याचें कारण संकल्प यांनीं रहित असतात.—(तं)–त्या–(ज्ञानाग्निदग्धकर्माणं)–वरील ज्ञानरूप अग्नीनें ज्याचीं कर्में जळालीं आहेत, अशा त्याला–(बुधाः)–ब्रह्मवेत्ते (पण्डितं)–खरा पंडित–(आहुः)–म्हणतात. १९.

ज्या पुरुषाला कर्माचरणाविषयीं खेद होत नाहीं, परंतु कर्मफळाची इच्छा ज्याचे मनांत मुळींच उद्भवत नाहीं, ३ आणि अमुक एक कर्म मी करीन अथवा अमुक कर्म सुरू केलेलें शेवटास नेईन, असा संकल्प देखील ज्याचे मनास स्पर्श करीत नाहीं, ४ कां ? तर–ज्ञानरूप अग्नीचे मुखांत ज्यानें आपलीं सर्व कर्में जाळून टाकलीं आहेत, असा तो पुरुष म्हणजे मनुष्यरूपानें परब्रह्मच अवतरला आहे. असें समज. ५

**अन्वयार्थ**—(यः)–जो—(कर्मफलासङ्गं)—कर्माविषयीं अभिमान व फलाविषयीं आसक्ति–(त्यक्त्वा)–सोडून–(नित्यतृप्तः)–सतत तृप्त–विषयांविषयीं आकांक्षा न करणारा व–(निराश्रयः)–आश्रयरहित असतो–(सः)–तो–(कर्मणि)–कर्मामध्यें–(अभिप्रवृत्तः अपि)–सर्वप्रकारें जरी प्रवृत्त झाला असला तरी–(किञ्चित्)–कांहीं—(न करोति एव)–करीत नाहींच. २०

जो शरीराविषयीं उदासीन असतो, आणि कर्मापासून होणाऱ्या फलप्राप्तीविषयीं निरिच्छ असतो, व जो नेहमीं आनंदस्वरूपांत निमग्न असतो ६ पार्था, जो संतोषाच्या गाभाऱ्यामध्यें बसून आत्मबोधाचें पक्वान्न जेवीत असतां तो पुरे म्हणत नाहीं. ७

**अन्वयार्थ**—(निराशीः)–तृष्णाशून्य–(यतचित्तात्मा)–चित्त व बाह्य शरीरेंद्रियसंघात यांचा ज्यानें निग्रह केला आहे असा–(त्यक्तसर्वपरिग्रहः)–ज्यानें सर्वपरिग्रहाचा त्याग केला आहे असा ध्याननिष्ठ यति–(केवलं शारीरं कर्म)–नुसतें शरीरस्थितीला कारण होणारें कर्म–(कुर्वन् अपि)–जरी करीत असला, तरी–(किल्बिषं)–पापाला–दोषाला–(न आप्नोति)–प्राप्त होत नाहीं. त्याला दोष लागत नाहीं. २१

१ एवढ्यानें. २ गुंतत नाहीं. ३ व्यापकपणा. ४ ब्रह्मनिष्ठाचें. ५ निरिच्छपणा. ६ चांगली. ७ समजला असे. ८ कर्मसमुदाय. ९ नौकेंत. १० वृक्ष. ११ खरोखर. १२ स्थिर. १३ स्पष्ट, निवळ. १४ खोटें. १५ भोगण्याचे सर्व विषय. १६ स्वतःच. १७ विषाद, खिन्नता. १८ शेवटीं. १९ मनुष्यरूपानें. २० निरिच्छ. २१ मध्यगृहांत, २२ वाढप, जेवण, वाढण्याला. २३ भोजन करितांना.

यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः । समः सिद्धावसिद्धौ च कृत्वाऽपि न निबध्यते ॥२२॥

कैसी अधिकाधिक आवडी । घेत महासुखाची गोडी । सांडोनियां आशा कुरोंडी । अहंभावेंसीं[2] ८ म्हणोनि अवसरें[3] जें जें पावें । तेणेंचि तो सुखावें । जया आपुलें आणि परावें[4] । दोन्ही नाहीं ९ तो दिठीं जें पाहे । तें आपणचि होऊनि जाये । आइके तें आहे । तोचि जाहाला ११० चरणीं हन चाले । मुखें जें जें बोले । ऐसें चेष्टजातें[5] तेतुलें । आपणची जो ११ हें असो विश्व पाहीं । जयासि आपणपेंवांचूनि नाहीं । आतां कवण तें कर्म कायी । बाधी तयातें १२ हा मत्सरु जेथ उपजे । तेतुलें नुरेचि जया दुजें । तो निर्मत्सरु काइ म्हणिजे । बोलवरी[6] १३ म्हणोनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मुचि कर्मरहितु । सगुण परि गुणातीतु[7] । एथ भ्रांति नाहीं १४

गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः । यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥२३॥

तो देहसंगें[8] तरी असे । परि चैतन्या[9]सारिखा दिसे । पाहतां परब्रह्माचेनि कैसें[10] । चोखाळु[11] भला १५ ऐसाहि परी कौतुकें । जरी कर्में करी यज्ञादिकें । तरी तियें लया जाती[12] निःशेखें । तयाच्याचि ठायीं १६ अकाळींची अभ्रें जैशीं । उर्मीवीण[13] आकाशीं । हारपती आपैशीं । उदयलीं सैंतीं[14] १७ तैशीं विधिविधानें[15] । विहितें । जरी आचरे तो समस्तें । तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें । पावतीची गा १८

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥२४॥

हें हवन मी होतां[16] । कां इये यज्ञीं हा भोक्ता । ऐसिया बुद्धीसि नाहीं भिन्नता । म्हणऊनियां १९ जें इष्टयज्ञ यजावे । तें हविर्मंत्रादि[17] आघवें । तो देखतसे अविनाशभावें । आत्मबुद्धि १२० म्हणऊनि ब्रत तेंचि कर्म । ऐसें बोधा आलें जया सम । तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा २१ आतां अविवेकु कुमारत्वा[18] मुकले[19] । जयां विरक्तीचें[20] पाणिग्रहण[21] जाहलें । मग उपासन[22] जिहीं आणिलें । योगाग्नीचें २२

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते । ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

जे यचनशील अहर्निशीं । जिहीं अविद्या होविली[23] मनेंसी । गुरुवाक्य[24]हुताशीं । हवन केलें २३ तिहीं योगाग्निकीं[25] याजिजे । तो दैवयज्ञु म्हणिजे । जेणें आत्मसुख कामिजे[26] । पंडुकुमरा २४ आतां अवधारीं सांगेन आणिक । जे ब्रह्माग्नी सांग्निक[27] । तयांतें यज्ञचि यज्ञु देख । उपासिजे २५

**अन्वयार्थ**—(यदृच्छालाभसंतुष्टः)-यदृच्छेनें-न मागतां जें मिळेल त्यांत संतुष्ट राहणारा,-(द्वन्द्वातीतः)-शीत उष्ण, सुख-दुःख इत्यादि द्वंद्वांनीं हर्ष-विषादयुक्त न होणारा,-(विमत्सरः)-कोणाचाही मत्सर न करणारा-निर्वैरबुद्धि,-(च)-व-(सिद्धौ)-शरीरस्थितीला अवश्य असलेल्या अन्नादिकांचा लाभ झाला असतां-(असिद्धौ)-त्यांचा लाभ न झाला असतांहि-(समः)-एकसारखाच राहणारा-हर्षविषाद न मानणारा असा संन्यासी-(कृत्वा अपि)-शरीरस्थितीला अवश्य तेवढेंच भिक्षाटनादि कर्म करूनहि-(न निबध्यते)-बद्ध होत नाहीं. २२

जो अहंकारासुद्धां आशेची ओंवाळणी करून अधिकाधिक प्रेमानें ब्रह्मसुखाची गोडी घेतो, ८ म्हणून ज्या ज्या वेळेस जें जें मिळेल त्यांतच तो सुख मानतो, आणि ज्याला आपलें आणि दुसऱ्याचें असा भेद नाहीं, ९ तो आपल्या दृष्टीनें जें पाहतो तें तो आपणच होतो; आणि जें एकतो तेंहि तोच झाला आहे. ११० पायांनें चालतो, तोंडानें बोलतो, व त्याचप्रमाणें शरीरानें जितके व्यापार करतो. ते सर्व आपणच बनतो; ११ हें असो; फार काय सांगावें-जगतांत पाहिलें असतां आत्मस्वरूपावांचून ज्याला दुसरें कांहीं दिसत नाहीं, त्याला कोणत्या कर्मापासून कसली बाधा होणार? १२ हा मत्सर ज्या द्वैताच्या ठिकाणीं उत्पन्न होतो, तितकें सुद्धां द्वैत ज्याला दिसत नाहीं तो निर्मत्सर आहे, हें काय शब्दानें सांगितलें पाहिजे! १३ तो सर्व प्रकारें मुक्त आहे, तो सर्व कर्में करीत असतांही कर्मरहित आहे, तो सगुण दिसतो, पण गुणातीत असतो यांत संशय नाहीं. १४

**अन्वयार्थ**—(गतसङ्गस्य)-ज्याची कर्म व फल यांविषयींची आसक्ति निवृत्त झाली आहे, ज्याची त्यांत आसक्ति राहिलेली नाहीं,-(मुक्तस्य)-त्यामुळेंच जो धर्माधर्मादि बंधनापासून सुटला आहे,-(ज्ञानावस्थितचेतसः)-ज्याचें चित्त ज्ञानांतच अवस्थित आहे, अशा-(यज्ञाय)-यज्ञासाठींच-(आचरतः)-कर्म करणाऱ्या पुरुषाचें-(कर्म)-तें कर्म-(समग्रं)-फलासह-(प्रविलीयते)-विनाश पावतें. २३

तो देहधारी असतो पण चैतन्यासारखा दिसतो, आणि ब्रह्माच्या कसाला लावून पाहिला तर त्याच्यासारखा शुद्ध दिसतो; १५ असा जरी तो केवळ मुक्त आहे, तरी एखादे वेळेस कौतुकानें यथाविधि यज्ञादिक कर्माचें आचरण करितो, तरी तीं संपूर्ण कर्में त्याच्याच ठिकाणीं लयाला जातात. १६ ज्याप्रमाणें आकाशांत अकालीं उत्पन्न झालेले पोकळ ढग वृष्टि केल्यावांचून आपोआप लयाला जातात, १७ त्याप्रमाणें, तो जरी वेदविहित कर्में यथाविधि आचरीत असला, तरी त्या कर्मांच्या ठिकाणीं त्याचा दुजाभाव नसल्यामुळें तीं त्याचेच ठायीं लय पावतात. १८

**अन्वयार्थ**—(अर्पणं)-ज्या मंत्रानें किंवा-जुहु-स्त्रुक् इत्यादि साधनानें ब्रह्मविद् हवि अर्थात अर्पण करितो, तो मंत्र किंवा 'जुहु' वगैरे साधन-(ब्रह्म)-ब्रह्म,-(हविः)-तूप, भात वगैरे अग्नींत होमावयाचा पदार्थहि ब्रह्म-(ब्रह्माग्नौ)-ज्यांत होम करावयाचा तो अग्नि ब्रह्म-(ब्रह्मणा)-हवन करणारा यजमान ब्रह्म व-(हुतं)-प्रत्यक्ष होमक्रियाहि ब्रह्मच. ब्रह्मरूप अग्नींत ब्रह्मरूप यजमानाकडून ब्रह्मरूप होम केला जातो.-(ब्रह्मकर्मसमाधिना)-ब्रह्मच कर्म, त्यांत ज्याच्या चित्ताची समाधि-स्थिरता आहे अशा-(तेन)-त्या ज्ञानी पुरुषाकडून-(ब्रह्म एव)-ब्रह्मच-(गन्तव्यं)-प्राप्तव्य फल आहे. त्याला इष्ट असलेलें फलहि ब्रह्मच आहे. २४

हें एक हवन, त्याचा मी एक कर्ता किंवा ह्या यज्ञाचा भोक्ता अमुक, अशा प्रकारें त्याच्या बुद्धीचा भिन्नभाव नाहीं; म्हणून, १९ जे जे इष्ट यज्ञ करतो, त्यांतील होमद्रव्यें व मंत्र हीं सर्व आत्मस्वरूप म्हणजे ब्रह्मस्वरूपच आहेत असें तो आत्मज्ञ समजतो. १२० म्हणून, अर्जुना, ब्रह्म तेंच कर्म अशी समबुद्धि ज्याच्या अंतःकरणांत बाणली त्यानें कर्म केलें तरी तें नैष्कर्म्यच होय. २१ ज्याची अविचाररूप बाल्यावस्था गेल्यावर विरक्तीशीं लग्न लागलें, (कारण लग्न झाल्यावांचून अग्निसेवा करितां येत नाहीं) मग जीवब्रह्मैक्यरूप जो योगाग्नि त्याची उपासना ज्यांनीं आरंभिली, २२

**अन्वयार्थ**—(अपरे)-कांहीं-(योगिनः)-योगी म्ह० कर्मठ लोक-(दैवं एव यज्ञं)-दैवच यज्ञ-इंद्र-अग्नि इत्यादि देव ज्यांत पुजले जातात असा यज्ञ-(पर्युपासते)-करितात.-(अपरे)-दुसरे कांहीं ब्रह्मवेत्ते-ज्ञाननिष्ठ-(यज्ञं)-आत्म्याला-बुद्ध्यादि उपाधियुक्त जीवाला-(ब्रह्माग्नौ)-ब्रह्मरूप अग्नींत-(यज्ञेन एव)-निरुपाधिक परब्रह्मस्वरूपानेंच-(उपजुह्वति)-हवन करितात. २५

आणि रात्रंदिवस यज्ञ करणारे आहेत त्यांनीं गुरुवाक्यरूप अग्नींत मनासह अज्ञानाचें हवन केलें. २३ अर्जुना, ज्याला आत्मसुखाची इच्छा असेल त्यांनींच या योगाग्नीचें यजन करावें, व त्यालाच दैवयज्ञ असें म्हणतात. २४ आतां, जे ब्रह्मार्पणें अग्निहोत्री स्वकर्मानें ईश्वराराधन करतात, त्यांजविषयीं वर्णन करितों, तें एक. २५

१ ओंवाळणी. २ अहंकारासह. ३ समयानुसार. ४ दुसऱ्याचें. ५ सर्व क्रिया, व्यापार. ६ शब्दांनीं बोलून. ७ गुणापलीकडचा, ब्रह्मस्वरूपी. ८ शरीरधारी. ९ ब्रह्मस्वरूपासारखा. १० कसोटीनें. ११ शुद्ध. १२ निखालस, संपूर्ण. १३ वृष्टिवांचून. १४ लागलीच. १५ यज्ञादि कर्में. १६ यज्ञ करणारा, आचार्य. १७ होमाचे मंत्र, द्रव्य इत्यादि. १८ बाळपणास. १९ अंतरलें. २० वैराग्यानें. २१ लग्न, परिग्रह. २२ पूजन, सेवा. २३ हवन केलीं. २४ गुरुवाक्यरूप अर्थात. २५ योगाग्नि मन धारण करणाऱ्यांनीं, योगाग्निहोत्र्यांनीं. २६ इच्छावें. २७ अग्निहोत्री.

श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति । शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

एक संयमाग्निहोत्री । ते युक्तित्रयाच्या मंत्रीं । यजन करिती पवित्रीं । इंद्रि-
यद्रव्यीं २६ एकां वैराग्य रवि विवळे । तंव संयती विहार केले । तेथ अपावृत्त
जाहले । इंद्रियानळ २७ तिहीं विरक्तीचि ज्वाळा घेतली । तंव विकारांचीं
इंधनें पलिपलीं । तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचंही कुंडें २८ मग वाक्यविधी-
चिया निरवडी । विषय आहुती उदंडीं । हवन केलें कुंडीं । इंद्रियाग्नीच्या २९

सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे । आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

एकीं ययापरी पार्था । दोषु क्षाळिले सर्वथा । आणिकीं हृदयारणीं मंथा ।
विवेकु केला १३० तो उपशमें निहटिलाँ । धैर्यभारें दाटिलाँ । गुरुवाक्यें का-
ढिला । बळकटपणें ३१ ऐसें समरसें मथन केलें । तेथ झडकरी काजा आलें ।
जे उज्जीवन जहालें । ज्ञानाग्नीचें ३२ पहिला ऋद्धिसिद्धींचा संभ्रमु । तो निव-
र्तोनि गेला धूमु । मग प्रगटला सूक्ष्मु । विस्फुलिंगु ३३ तया मनाचें मोकळें ।
तेंचि पेटवण घातलें । जें यमनियमीं हळुवारलें । आइतें होतें ३४ तेणें साटुकपणें
ज्वाळा समृद्धा । मग वासनांतराचिया समिधा । स्नेहेंसीं नानाविधा । जाळि-
लिया ३५ तेथ सोहंमंत्रें दीक्षितीं । इंद्रियकर्मांचिया आहुती । तिये ज्ञानानळीं
प्रदीप्तीं । दिधलिया ३६ पाठीं प्राणक्रियेचिये स्रुवेनिशीं । पूर्णाहुती पडली हु-
ताशीं । तेथ अवभृथ समरसीं । सहजें जहालें ३७ मग आत्मबोधींचें सुख ।
जें संयमाग्नीचें हुतशेष । तोचि पुरोडाशु देख । घेतला तिहीं ३८ एक ऐशिया
इहीं यजनीं । मुक्त ते जाहले त्रिभुवनीं । या यज्ञक्रिया तरी आनानीं । परि
प्राप्य तें एक ३९

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे । स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

एक द्रव्ययज्ञु म्हणिपती । एक तपसामग्रिया निपजविती । एस योगयागुही
आहाती । जे सांगितले १४० एकीं शब्दीं शब्दु यजिजे । तो वाग्यज्ञु म्हणिजे ।
ज्ञानें ज्ञेय गमिजे । तो ज्ञानयज्ञु ४१ हें अर्जुना सकळ कुवांडें । जे अनुष्ठितां
अतिसांकडें । परी जितेंद्रियांसीचि घडे । योग्यतावशें ४२ ते प्रवीण तेथ भले ।
आणि योगसमृद्धि आथिले । म्हणोनि आपणपां तिहीं केलें । आत्महवन ४३

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे । प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

**अन्वयार्थ**—(अन्ये)–दुसरे योगी–श्रेयःसाधनांचें अनुष्ठान करणारे–(श्रोत्रादीनि इन्द्रियाणि)–श्रोत्रादिक इंद्रियें –(संयमाग्निषु)–पांच इंद्रियांचा पांच प्रकारचा संयम–निग्रह हेच अग्नि, त्यांत–(जुह्वति)–होमितात. इंद्रियांचा संयमाग्नींत होम करितात.–(अन्ये)–दुसरे कांहीं योगी–(शब्दादीन् विषयान्)–शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध, या पूर्वोक्त श्रोत्रादि ज्ञानेंद्रियांच्या विषयांस–(इन्द्रियाग्निषु)—इंद्रियरूप अग्नींत–(जुह्वति)–होमितात. २६

कोणी आत्मसंयमरूप अग्नीमध्यें होम करणार ते कायिक, वाचिक व मानसिक या तीन युक्तिमंत्रांनीं पवित्र इंद्रियरूप द्रव्यानें हवन करितात.; २६ कोणी वैराग्यरूपी सूर्य उगवल्यावर संयमाग्नीचें उद्धरण करून तो प्रज्वलित झाल्यावर इंद्रियरूप अग्नी ज्ञानानें पेटवितात; २७ त्या इंद्रियाग्नीनें वैराग्यरूप ज्वाला घेतली तेव्हां लागलीच विषयविकाररूप लांकडें पेटलीं; तेव्हां ज्ञानेंद्रियांच्या पांच विषयांच्या कुंडांचा आशारूप धूरानें त्याग केला. २८ मग वेदांत सांगितलेल्या विधींच्या योगानें इंद्रियरूप अग्नि पेटलेल्या कुंडांत विषयांच्या मोठ्या आहुति दिल्या. २९

**अन्वयार्थ**– (अपरे)–दुसरे कांहीं साधक (सर्वाणि इन्द्रियकर्माणि)–सर्व इंद्रियांचीं कर्में–(च)-व–(प्राणकर्माणि)–प्राणापानादि वायूंचीं धर्म–(ज्ञानदीपिते)–विवेकज्ञानानें प्रदीप्त–झालेल्या- (आत्मसंयमयोगाग्नौ)–-आत्मसंयमरूप योगाग्नींत (जुह्वति)–होमितात २७

पार्था, अशा प्रकारें कोणी आपल्या सर्व दोषांचें क्षालन केलें; कोणी हृदयरूप अरणीवर विचाररूप मंथा केला; व १३० तो धैर्यरूप भारानें दाबून आणि शांतिरूप रज्जूनें घुसळून, गुरुवाक्यरूप मंत्रानें मंथन केला. ३१ अशा प्रकारें सर्व वृत्तींचें ऐक्य करून मंथन केल्यानें तेथें तत्काळ कार्य झालें. ( तें कोणतें ? ) तर ज्ञानाग्नि प्रज्वलित झाला ! ३२ तेव्हां प्रथम ऋद्धिसिद्धींचा मोह हाच उत्पन्न झालेला धूर नाहींसा होऊन मग सूक्ष्म असी अग्नीची ठिणगी उत्पन्न झाली. ३३ यमदमांनीं शुष्क ( वाळलेले ) झालेलें जें निर्दोष मन, त्याचें अग्नीला पेटवण घातलें. ३४ त्याच्या साहाय्यानें मोठी ज्वाला उत्पन्न झाली. नंतर वासनारूप समिधांना अनेक प्रकारचा मोह हें घृत लावून त्या जाळल्या; ३५ नंतर जीवरूप दीक्षितानें ज्ञानरूपी प्रदीप्त केलेल्या अग्नींत इंद्रियकर्मांची आहुति दिली. ३६ शेवटीं, प्राणकर्म हाच स्रुवा नांवाच्या यज्ञपात्रासह अग्नीमध्यें पूर्ण आहुति दिल्यावर, ऐक्यबोध हें [ यज्ञाच्या शेवटचें ] अवभृथस्नान सहज घडलें, ३७ आणि संयमाग्नींत इंद्रियादिक होमद्रव्यांचें हवन करून बाकी राहिलेलें जें आत्मसुख, तेंच पुरोडाश म्हणून घेतलें ३८ कोणी अशा रीतीनें यज्ञ करून त्रिभुवनांत मुक्त झाले; म्हणून या यज्ञक्रिया जरी नानाप्रकारच्या आहेत, तरी त्यांची अखेर फलप्राप्ति एकच आहे. ३९

**अन्वयार्थ**—(द्रव्ययज्ञाः)–सत्पात्रीं द्रव्याचा विनियोग यज्ञाच्या भावनेनें जे करितात, ते द्रव्ययज्ञ होत–(तपोयज्ञाः) जे तपश्चर्या करितात, ते तपोयज्ञ;—(तथा अपरे योगयज्ञाः)–तसेच जे दुसरे योगांगांचा अभ्यास करितात, ते योगयज्ञ;–(स्वाध्याययज्ञाः)–जे ऋग्वेदादिकांचें यथाविधि अध्ययन-अभ्यास-आवृत्ति करितात, ते स्वाध्याययज्ञ-(ज्ञानयज्ञाः) -जे शास्त्रार्थांचा अभ्यास करून शास्त्रार्थज्ञान संपादन करितात, ते ज्ञानयज्ञ;–(संशितव्रताः यतयः)–व ज्यांनीं व्रतें अतिशय तीक्ष्ण केलीं आहेत, असे यती–संन्यासी हे व्रतयज्ञ होत. २८

हे जे योग सांगितले, त्यांपैकीं एकाला ‘ द्रव्ययज्ञ ’ म्हणतात, एकाला ( तपःसामर्थ्यानें केलेला ) ‘ तपोयज्ञ ’ म्हणतात, एकाला ( अष्टांगसाधनानें साधलेला ) ‘ योगयज्ञ ’ म्हणतात. १४० ज्यामध्यें शब्दानें शब्दाचा होम केला जातो, त्याला ‘ वाग्यज्ञ ’ म्हणतात; आणि ज्या यज्ञांत ज्ञानानें ब्रह्म मिळतें, त्याला ‘ ज्ञानयज्ञ ’ म्हणतात. ४१ अर्जुना, हे सर्व यज्ञ फार विकट असून यांचें आचरण करणें फार दुर्घट आहे; परंतु ज्यांनें इंद्रियें जिंकलीं आहेत, त्यास मात्र ते अधिकारपरत्वें करितां येतील. ४२ योगसमृद्धीनें सुसंपन्न असलेले पुरुषच हे यज्ञ करूं शकतील; कारण त्यांनीं आपल्या जीवाचें, आत्म्याचे ठिकाणीं हवन केलेलें असतें. ४३

**अन्वयार्थ**—(अपरे)–दुसरे कांहीं मुमुक्षु–(अपाने)–अपान वायूंत–(प्राणं)-प्राणाला-(तथा)–त्याचप्रमाणें–(प्राणे) -प्राणवायूंत–(अपानं)–अपानाला–(जुह्वति)-होमितात. –(प्राणापानगती)–प्राण व अपान यांच्या गती–(रुद्ध्वा)–बंद करून (प्राणायामपरायणाः)–प्राणायामांत परायण होतात. २९

---

१ आत्मसंयमनरूप अग्नीमध्यें होम करणारे. २ वज्रासन, जालंधर, ओडियाण, अथवा आहार, विहार, चेष्टा, निद्रा व बोध हीं परिमित असणें हें युक्तित्रय. ३ प्रकट, प्रकाशित. ४ इंद्रियनिग्रह. ५ स्थळ. ६ उघडे केलें. ७ इंद्रियरूपी अग्नि. ८ पेटली. ९ तृष्णारूपी धुरानें. १० पांच ज्ञानेंद्रियें. ११ वेदाच्या. १२ कौशल्यानें. १३ मोठी, समग्र. १४ हृदयरूपी अरणी. १५ रवी. १६ शांतीनें १७ नेटानें बांधला. १८ दाबला. १९ घुसळला. २० सर्व वृत्तींच्या ऐक्यानें. २१ कार्य झालें. २२ प्रदीपन, उद्दीपन. २३ ठिणगी. २४ निर्दोष. २५ वाळून हलके झालेलें. २६ सांझानें. २७ ममतारूप तुपासहित. २८ होमांत घृताहुती घालण्याचें यज्ञपात्र त्यासह. २९ अग्नींत. ३० यज्ञाच्या शेवटचें स्नान. ३१ आत्मस्वरूपीं. ३२ होम करून बाकी राहिलेलें द्रव्य. ३३ यज्ञसंबंधीचरू, यज्ञशेष. ३४ भिन्नभिन्न, ३५ तपसाहित्य. ३६ अष्टांग योगरूप यज्ञ. ३७ होम करितात. ३८ जाणण्याची वस्तु, ब्रह्म. ३९ पाविजे. ४० विकट. ४१ इंद्रियें स्वाधीन असणाराला. ४२ आपल्याच ठायीं.

तो संशयरूप हुताशीं[1] । पडिला जाण ९५ जे अमृतही परि नावडे । ऐसें सावियांचीं[2] आरोचकु[3] जैं पडे । तैं मरण आलें असे फुडें । जाणों एकीं ९६ तैसा विषयसुखें रंजे । जो ज्ञानेसींचि मांजे । तो संशयें अंगिकारिजे[5] । एथ भ्रांति नाहीं ९७ मग संशयीं जरि पडिला । तरी निभ्रांत जाणें नासला । तो ऐहिक[6]परत्रा मुकला । सुखासि गा ९८ जया काळज्वरु आंगीं बाणे । तो शीतोष्णें जैशीं नेणे । आंगी[7] आणि चांदिणें । सारिसेंचि मानी ९९ तैसें साच आणि लटिकें । विरुद्ध आणि निकें[9] । संशयीं तो नोळखे । हिताहित २०० हा रात्रिदिवसु पाहीं । जैसा जात्यंधा ठाउंवा[10] नाहीं । तैसें संशयीं असतां कांहीं । मनीं[11] नये १

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् । आत्मवंतं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥

म्हणऊनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर । हा विनाशाची वांगुर[12] । प्राणियांसी २ येणें कारणें तुवां त्यजावा । आधीं हाचि एकु जिणांवा[13] । जो ज्ञानाचिया अभावा-[14] । मांजि[15] असे ३ जैं अज्ञानाचें गडद[16] पडे । तैं हा बहुवस[17] मनीं वाढे । म्हणोनि सर्वथा मार्गु मोडे । विश्वासाचा ४ हृदयीं हांचि न समाये । बुद्धीतें गिंवसूनि[19] ठाये । तेथ संशयात्मक होये । लोकत्रय ५

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः । छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानकर्मसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

ऐसा जरी थोरांवे[20] । तरी उपायें एकें आंगवे[21] । जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग[22] ६ तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें[23] । निखळू[24] हा निवटे[25] । मग निःशेष[26]खेता फिटे । मानसींचा ७ याकारणें पार्था । उठीं वेगीं वरौतां[27] । नाशु करोनि हृदयस्था । संशयांसी ८ ऐसें सर्वज्ञाचा बापु । जो श्रीकृष्णु ज्ञानदीपु । तो म्हणतसे सकृपु । ऐकें राया ९ तंव या पूर्वापर बोलाचा । विचारूनि कुमरु पंडूचा । कैसा प्रश्नु अवसरींचा[28] । करिता होईल २१० ते कथेची संगति[29] । भावाची[30] संपत्ति[31] । रसाची उन्नति[32] । म्हणिपेल पुढां ११ जयाचिया बरवेपणीं । कीजे आठां रसांची वोवाळणी । जो सज्जनाचिये आयणी[33] । विसांवा जगीं १२ तो शांतुचि अभिनवेल[34] । ते परियसा मऱ्हाठे बोल । जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित १३ जैसें बिंब[35] तरी बचकेंचि एवढें । परि प्रकाशासि त्रैलोक्य थोकडें ।

असें समज. ९५ कां कीं, अमृतही आवडत नाहीं, अशी अरुचि जेव्हां सहज उत्पन्न होते, तेव्हां त्या मनुष्याचें मरण ओढवलें आहे असें जाणावें. ९६ त्याचप्रमाणें विषयसुखांतच जो आनंद मानतो, आणि ज्ञानप्राप्तीविषयीं बेपर्वा असतो, त्याला संशयानें ग्रासलें यांत संशय नाहीं. ९७ अशा रीतीनें जो संशयांत पडला, त्याचा निःसंशय नाश झाला असें समज. म्हणून तो इहलोकच्या व परलोकच्या सुखांस आंचवला ! ९८ ज्याला सन्निपात ज्वर झाला आहे, त्याला ज्याप्रमाणें शीत, उष्ण कळत नाहीं, आणि तो ऊन व चांदणें सारखेंच मानतो, ९९ त्याचप्रमाणें खरें व खोटें, अनुकूल व प्रतिकूल, हित व अहित हीं संशयी पुरुषाला कळत नाहीं, २०० ज्याप्रमाणें जन्मांधास रात्र व दिवस ठाऊक नसतात, त्याचप्रमाणें संशयी पुरुषाला कशा-चीच ओळख नसते. १

**अन्वयार्थ**-(हे धनंजय)-हे अर्जुना !-(ज्ञानसंछिन्नसंशयं)-आत्मा व ईश्वर यांच्या एकत्वदर्शनरूप ज्ञानानें ज्याचा संशय पार नाहींसा झाला आहे व त्यामुळें-(योगसंन्यस्तकर्माणं)-परमार्थदर्शनरूप योगानें म्ह० ज्ञानयोगानें ज्या परमार्थदर्शी पुरुषानें-ज्ञानी पुरुषानें धर्म व अधर्म या नांवाचीं कर्में सोडलीं आहेत अशा-(आत्मवन्तं)-सावधान पुरुषाला-(कर्माणि)-धर्माधर्माख्य कर्में-(न निबध्नन्ति)-बद्ध करीत नाहींत. ४१

म्हणून संशयापेक्षां दुसरें भयंकर पाप कोणतेंच नाहीं. प्राण्यांचा नाश करण्याचें हें एक जाळें आहे, २ याकरितां तूं त्याचा संग सोडून आधीं त्याला जिंक. याचें वास्तव्य ज्ञानाच्या अभावीं असतें. ३ जेव्हां अज्ञानाचा निबिड काळोख असतो, तेव्हां हा संशय मनांत जास्त वाढतो, म्हणून श्रद्धेचा मार्ग सर्वथा नाहींसा होतो. ४ हा अंतःकरणांतच भरून राहतो असें नाहीं, तर हा बुद्धिलाही ग्रासून टाकितो, आणि मग त्या मनुष्याला तिन्ही लोक संशयात्मकच दिसूं लागतात. ५

**अन्वयार्थ**-(तस्मात्)-त्याअर्थी-(अज्ञानसम्भूतं)-अज्ञानापासून-अविवेकामुळें उत्पन्न झालेल्या-(हृत्स्थं)-बुद्धींत असलेल्या-(आत्मनः)-आत्म्याविषयींच्या-(एनं संशयं)-या संशयास-(ज्ञानासिना)-शोकमोहादि दोषांना घालविणाऱ्या यथार्थज्ञानरूप तरवारीनें-(छित्वा)-तोडून-(योगं)-ज्ञानसाधनभूत कर्मानुष्ठान-(आतिष्ठ)-कर-(हे भारत)-हे अर्जुना ! आतां अगोदर-(उत्तिष्ठ)-युद्धाला ऊठ. ४२

पण इतका जरी तो वाढला, तरी त्याला स्वाधीन करून घेण्याला एक उपाय आहे; तीक्ष्ण ज्ञानखड्ग जर हातीं असेल ६ तर त्या तिखट शस्त्राच्या योगानें हा सर्व नाहींसा होतो; आणि मग त्याचा मनांतून समूळ नाश होतो. ७ म्हणून, पार्था, आपल्या मनांतील संशय नाहींसा करून लवकर ऊठ. ८ संजय धृतराष्ट्र राजास म्हणतो:—राजा ऐक, ज्ञानीजनांचे जनक जे ज्ञानदीप भगवान् श्रीकृष्ण ते अशा रीतीनें मोठ्या कृपेनें अर्जुनास म्हणाले, ९ तेव्हां, या सर्व पूर्वापार कथेचा विचार करून तो अर्जुन समयोचित असा प्रश्न करील. २१० त्या कथेची जुळणी, अभिप्रायाची शोभा व रसाची गोडी पुढें सांगण्यांत येईल. ११ ज्याच्या बोलाच्या चांगलेपणावरून आठही रस ओंवाळून टाकावे, आणि जो सज्जनांच्या बुद्धीला या जगतांमध्यें विश्रांतीचें स्थान होय, १२ ज्या मराठी बोलापासून शांतरसच प्रगटेल, व जो समुद्रापेक्षां गंभीर असून अर्थभरित आहे, तो बोल ऐका. १३ जसें सूर्यबिंब हें वचकेंत मावण्याएवढेंच दिसतें, परंतु त्याचे प्रकाशाला त्रिभुवनसुद्धां पुरत नाहीं, तशी या

१ अर्थात. २ सहजच. ३ अरुचि. ४ मरत होतो. ५ संशयानें अंगिकारला म्हणजे संशयांत पडला. ६ इहपरलोकांस. ७ ऊन. ८ प्रतिकूल. ९ अनुकूल. १० ठाऊक. ११ ओळख नसते. १२ जाळें. १३ जिंकावा. १४ लोप. १५ आंत. १६ काळोख, निबिड अंधःकार. १७ अत्यंत. १८ सामावत नाहीं. १९ आच्छादून, ग्रासून. २० माजला, वाढला. २१ स्वाधीन होतो. २२ ज्ञानरूप तरवार. २३ तीक्ष्ण. २४ अगदीं, संपूर्ण. २५ नाहींसा होतो. २६ दुःख, क्षत. २७ वर. २८ प्रसंगाचा, समयोचित. २९ जुळणी. ३० अभिप्रायाची. ३१ शोभा. ३२ वाढ उत्कर्ष. ३३ बुद्धीला, तत्वनिर्णयेच्छेला. ३४ अपूर्व प्रकटेल. ३५ मुठीचें मंडल.

शब्दाची[1] व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी १४ नातरी कामितयाचिया इच्छा । फळे कल्पवृक्षु जैसा । बोलु व्यापकु होय तैसा । तरी अवधान द्यावें १५ हें असो काय म्हणावें । सर्वज्ञु जाणती स्वभावें । तरी निकें चित्त द्यावें । हें विनंती माझी १६ जेथ साहित्य[2] आणि शांति । हे रेखा[3] दिसे बोलती । जैसी लावण्यगुणकुळवती । आणि पतिव्रता १७ आधींच साखर आवडे । तेंचि जरी ओखर्दी जोडे । तरी सेवावी ना कां कोडें[5] । नावानावा[6] १८ सहजें मलयानिळु मंदु सुगंधु । तया अमृताचा होय स्वादु । आणि तेथेंचि जोडे नोंदु[10] । जरी दैवगत्या १९ तरी स्पर्शें सर्वांग निववी । स्वादें जिव्हेतें नाचवी । तेवींची कानांकरवीं । म्हणवीं बांपु माझा २२० तैसें कथेचें इये ऐकणें । एक श्रवणासि होय पारणें । आणि संसारदुःख मूळवणें[11] । विकृतीविणें[12] २१ जरी मंत्रेंचि वैरी मरे । तरी वायां कां बांधावीं कटारें[13] । रोग जाय दूधसाखरें । तरी निंब कां पियावा २२ तैसा मनाचा मारुं[14] न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां । एथ मोक्षु असे आयता । श्रवणाचिमाजि २३ म्हणोनि आथिलिया[15] आराणुका[16] । गीतार्थु हा निका । ज्ञानदेवो म्हणे आइका । निवृत्तिदासु २२४

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ श्लोक ४२, ओंव्या २२४.

शब्दार्थांची व्याप्ति आहे असें अनुभवावें; १४ किंवा कल्पवृक्ष जसा कामीजनांच्या इच्छा पूर्ण करतो, तसे हे बोल सर्व इच्छा पूर्ण करणारे आहेत. म्हणून त्यांच्याकडे लक्ष पुरवावें. १५ श्रोतेहो, तुम्हांला आणखी काय सांगावें ? तुम्ही जाणतेच आहां, तेव्हां नीट लक्ष द्यावें एवढीच माझी विनंति आहे. १६ ज्याप्रमाणें एकादी स्त्री सुंदर, गुणी आणि कुलशीलवती असून पतिव्रता असते, त्याप्रमाणें, या बोलण्यानें पद्धतीवरून, या बोलामध्यें सर्व अलंकार व शांति हीं स्पष्ट दिसतात. १७ अगोदर साखरेची आवड असून, ती जर औषधाच्या अनुपानांत दिली, तर ती आनंदानें वरचेवर कां न खावी ? १८ साहजिकपणें मैलागिरी पर्वतावरील सुगंध व मंद असा वारा वहात असून त्याला जर अमृताची गोडी आली, आणि दैवयोगानें तेथें जर पंचमसुरासारखा नाद कानीं आला, १९ तर त्या वाऱ्याच्या स्पर्शानें जसें सर्व अंग गार होईल, आणि गोडीनें जिव्हेला समाधान होईल, तसेंच मधूर सूर ऐकल्यावर कान वाहवा म्हणतील, २२० त्याचप्रमाणें, हीच कथा ऐकल्यानें कानांचें पारणें फिटेल, आणि संसारदुःखापासून कांहींएक विकार न होतां तें आपोआप नाहींसें होईल. २१ जर मंत्रानेंच शत्रूचा नाश होईल तर मग कंबरेला कट्यार कां बांधावी ? तसें दुधसाखरेनें जर रोग नाहींतसे होतील, तर कडुनिंबानें सेवन कां करावें ? २२ त्याचप्रमाणें मनाला न जिंकतां व इंद्रियांना दुःख न देतां या श्रवणामध्येंच आयताच मोक्ष आहे; २३ म्हणून, निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात, " तुमच्या मनांत जितकी उत्कंठा असेल, तितक्या उत्कंठेनें हा गीतेचा अर्थ ऐका. " २२४.

१ अर्थाची. २ अलंकार वगैरे. ३ पद्धत, कवित्वरचना. ४ औषधांत. ५ आनंदानें. ६ वारंवार. ७ मलयपर्वतावरील वारा. ८ पूट. ९ मधुर गान, स्वर. १० वाहवा, वाहवा; शाबास, शाबास. ११ पारणें. १२ विकाराशिवाय. १३ कट्यार. १४ जय. १५ असलेल्या. १६ उत्कंठेला.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय पांचवा.

अर्जुन उवाचः—

संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि। यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥

मग पार्थु श्रीकृष्णातें म्हणे। हां हो हें कैसें तुमचें बोलणें। एक होय तरी अंतःकरणें। विचारूंये १ मागां सकळ कर्मांचा संन्यासु। तुम्हींचि निरोपिला होता बहुवसु[1]। तरी कर्मयोगीं केवीं अतिरसु[2]। पोखीतसां[3] पुढती[4] २ ऐसें द्व्यर्थ[5] हें बोलतां। आम्हां नेणतयांच्या चित्ता। आपुलिये चौंडे[6] श्रीअनंता। उमँजु[7] नोहे ३ ऐकें एकसारातें[8] बोधिजे। तरी एकनिष्ठचि बोलिजे। हें आणिकीं काय सांगिजे। तुम्हांप्रति ४ तरी याचिलागीं तुमतें। म्यां राउळासि[9] विनविलें होतें। जे[10] हा परमार्थु ध्वनितें[11]। न बोलावा ५ परी मागील असो देवा। आतां प्रस्तुतीं उकलु देखावा[12]। सांगें दोहींमाजि बरवा। मार्गु कवण ६ जो परिणामींचा[13] निर्वाळा[14]। अचुंबितु[15] ये फळा। आणि अनुष्ठितां प्रांजळा[16]। सावियाचि[17] ७ जैसें निद्रेचें सुख न मोडे। आणि मार्गु तरी बहुसाळ[18] सौंडे[19]। तैसें सोहोकासन[20] सौंगडें[21]। सोहपें होय ८ येणें अर्जुनाचेनि बोलें। देवो मनीं रिझले[22]। मग होईल ऐकें म्हणितलें। संतोषोनियां ९ देखा कामधेनुऐसी माये। सदैवा जया होये। तो चंद्रुही परी लाहे[23]। खेळावया १० पाहें पां श्रीशंभूची प्रसन्नता। तया उपमन्यूचिया आर्ता। काय क्षीराब्धि[24] दूधभाता। देइजेचिना ११ तैसा औदार्याचा कुरुठा[25]। श्रीकृष्ण आपु[26] जाहलिया सुभटा[27]। कां सर्व सुखांचा वसौटा[28]। तोचि नोहावा[29] १२ एथ चमत्कारु कायसा। गोसावी[30] श्रीलक्ष्मीकांताऐसा। आतां आपुलिया सवेसौं[31]। मागावा कीं १३ म्हणोनि अर्जुनें म्हणितलें। तें हांसोनि येरें दिधलें। तेंचि सांगेन बोलिलें। काय कृष्णें १४

श्रीभगवानुवाचः—

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ। तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥

तो म्हणे गा कुंतीसुता। हे संन्यासयोगु[32] विचारितां। मोक्षकरु[33] तत्त्वता।

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय पांचवा.

**अन्वयार्थ**—(हे कृष्ण)–हे कृष्णा–(कर्मणां संन्यासं)–कर्मांचा संन्यास [एकदा सांगतोस]–(च पुनः)–आणि पुनरपि–(कर्मणां योगं)–शास्त्रोक्त कर्मांचें अनुष्ठान करावयास–(शंससि)–सांगतोस [यास्तव]–(एतयोः)–या दोहोंतील–(यत् एकं)–जें एक –(श्रेयः)–अधिक चांगलें श्रेयःसाधन असेल–(तत्)–तें–(मे)–मला–(सुनिश्चितं)–अगदीं निश्चयानें–(ब्रूहि)–सांग. १

मग अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, "अहो, असलें कसलें हें तुमचें [दुटप्पी] बोलणें? तुम्ही एक कांहीं तरी सांगाल तर त्याचा मनामध्यें विचार करतां येईल. १ सर्व कर्मांचा त्याग करावा, असें परोपरीनें पूर्वी तुम्हींच निरूपण केलें; आणि आतां कर्म करण्याविषयीं पुनः आग्रह कां वाढवितां? २ हे अनंता, असें तुमचें बर्धा बोलणें आमच्यासारख्या अज्ञान जनांच्या मनाला, आमच्या इच्छेप्रमाणें उमजत नाहीं. ३ हें पहा देवा, एक तत्त्वाचा बोध करणें असेल, तर एकच मार्ग सांगावा, हें दुसऱ्यांनी कां आपल्याला सांगावयास पाहिजे! ४ तरी याचकरितां मीं पूर्वीं तुम्हां पूज्यांची विनवणी केली होती कीं, हा परमार्थ गूढ अर्थानें सांगूं नका; ५ पण, देवा, ती मागील गोष्ट राहूं द्या, प्रस्तुत दोन्ही मार्गांपैकीं उत्तम मार्ग कोणता हें स्पष्ट करून सांगा. ६ जो अखेरचा निवाडा असून बिनचुक फल देईल, व अनुष्टान करण्यास सुलभ असेल असा असावा. ७ ज्याप्रमाणें सोपें व सुखावह वाहन असलें म्हणजे झोंप न मोडतां पुष्कळ मार्ग क्रमिला जातो, त्याप्रमाणें तुम्ही मला सुलभ साधन सांगा." ८ याप्रमाणें अर्जुनाचें बोलणें ऐकल्यावर देव मनांत फार प्रसन्न झाले, आणि परम उल्हासानें अर्जुनास म्हणाले, "तूं म्हणतोस त्याप्रमाणें होईल, ऐक. ९ ज्ञानेश्वर म्हणतात–पहा, ज्या प्रारब्धवान् पुरुषाला कामधेनूसारखी आई मिळाली आहे, त्याला खेळण्यास चंद्र देखील मिळेल. १० आणखी असें पहा कीं, उपमन्यूला श्रीशंकर प्रसन्न झाल्यावर त्याचे इच्छेप्रमाणें दूधभाताचे ऐवजीं त्याला त्यांनी क्षीरसमुद्र दिला नाहीं का? ११ त्याचप्रमाणें औदार्याचें भांडार असा जो श्रीकृष्ण परमात्मा, तो अर्जुनास प्राप्त झाला असतां सुखाचें वसतिस्थान त्यांनी कां न व्हावें? अर्थात् झालेंच पाहिजे. १२ किंवा, श्रीलक्ष्मीकांतासारखा ज्याचा धनी, त्यानें आपले इच्छेप्रमाणें मागावें यांत चमत्कार तो कोणता? १३ म्हणून अर्जुनानें जें जें मागितलें, तें तें त्याला सुप्रसन्न वदनानें श्रीकृष्णांनी दिलें, तें काय तें आतां सांगतों. १४

**अन्वयार्थ**—(संन्यासः)–अज्ञ मुमुक्षूनें केलेला कर्मांचा परित्याग–(च)–व त्यानें केलेलें–(कर्मयोगः)–कर्मानुष्ठान–(उभौ) हीं दोन्हीं साधनें–(निः–श्रेयसकरौ)–मोक्ष देणारीं आहेत–(तु)–परंतु–(तयोः)–त्या दोन साधनांतील–(कर्मसंन्यासात्)–अनारभ्भाच्या कर्मत्यागाहून–(कर्मयोगः)–त्याचें कर्मानुष्ठान–(विशिष्यते)–अधिक चांगलें आहे. २

भगवान् म्हणालेः—हे कुंतिसुता, खरोखर विचार केला असतां, कर्मयोग आणि कर्मत्याग हे दोन्हीही

१ परोपरीनें. २ आग्रह. ३ पोसतां, वाढवितां. ४ पुढें, पुनः. ५ दोन अर्थांचें, दुटप्पी. ६ इच्छेप्रमाणें. ७ समजूत. ८ एक तत्त्वाचा. ९ पूज्य, श्रेष्ठ, गुरुराजास. १० कीं. ११ गूढार्थानें, संक्षेपानें. १२ दाखवा. १३ शेवटपर्यंतचा. १४ सोबत, जामीन. १५ बिनचूक, परिपूर्ण. १६ सुलभ. १७ सहज. १८ पुष्कळ. १९ क्रमिला जाईल. २० पालखीसारखें वाहन. २१ बरोबरीचें. २२ संतोषलें. २३ मिळवील. २४ दुधाचा समुद्र. २५ घर. २६ प्राप्त. २७ योद्धयाला, अर्जुनाला. २८ आश्रय, वसतिस्थान. २९ होऊं नये. ३० धनी. ३१ इच्छेप्रमाणें, ३२ कर्मसंन्यास व कर्मयोग. ३३ मोक्ष देणारें.

दोनीही होती १५ तरी जाणांनेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा । जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणी १६ तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे । येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें १७ आतां याचिलागीं सांगेन । तुज संन्यासियाचें चिन्ह । मग सहजें हे अभिन्न । जाणसी तूं १८

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति । निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥

तरी गेलियाची से न करी । न पवतां चाड न धरी । जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा १९ आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर २० जो मनें ऐसा जाहला । संगीं तोचि सांडिला । म्हणोनि सुखें सुख पावला । अखंडित २१ आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें । जें घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणऊनि २२ देखें अग्नि विझोनि जाये । मग जे राखोंडी केवळु होये । तैं ते कापुसें गिंवसूंये । जियापरी २३ तैसा असतेनि उपाधी । नाकळिजे तो कर्मबंधीं । जयाचिये बुद्धी । संकल्पु नाहीं २४ म्हणोनि कल्पना जैं सांडे । तैंचि गा संन्यासु घडे । इयें कारणें दोनी सांगडे । संन्यासयोगु २५

सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पंडिताः । एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥ ४ ॥

एऱ्हवीं तरी पार्था । जे मूर्ख होती सर्वथा । ते सांख्ययोगसंस्था । जाणती केवीं २६ सहजें ते अज्ञान । म्हणोनि म्हणती ते भिन्न । एऱ्हवीं दीपाप्रति काई आनान । प्रकाशु आहाती २७ पैं सम्यक एणें अनुभवें । जिहीं देखिलें तत्त्व आघवें । तें दोहींतेंही ऐक्यभावें । मानिती गा २८

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते । एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥५॥

आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे । म्हणोनि ऐक्य दोहींतें सहजें । इयापरी २९ देखें आकाशा आणि अवकाशा । भेदु नाहीं जैसा । तैसें ऐक्य योगसंन्यासा । वोळखे जो ३० तयासीचि जगीं पाहलें । आपणपें तेणेंचि देखिलें । जया सांख्ययोग जाणवले । भेदेंविण ३१

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः । योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाऽधिगच्छति ॥ ६ ॥

जो युक्तिपंथें पार्था । चढे मोक्षपर्वता । तो महासुखाचा निमथा । वहिलां पावे ३२ येरा योगस्थिति जया सांडे । तो वायांचि गा हव्यासीं पडे । परि प्राप्ति कहीं न घडे । संन्यासाची ३३

मोक्षदायकच आहेत. १५ तथापि, नांव जशी वायकांना व मुलांना उदक तरून जाण्यास सोपी आहे, तसा जाणत्याला व नेणत्याला संसाररूपी समुद्र तरून जाण्यास हा कर्मयोग खरोखर सुलभ आहे. १६ सारासारविचार करितां हाच योग सोपा आहे आणि ह्याचें आचरण केलें असतां अनायासानें कर्मत्यागाचेंही फल मिळतें. १७ याच कारणाकीरतां तुला संन्याशाचें लक्षण सांगतों, म्हणजे कर्मयोग आणि संन्यासयोग हे दोन्ही एकच आहेत अशी तुझी सहज खातरी होईल. १८

**अन्वयार्थ**–(यः)–जो–(न द्वेष्टि)–द्वेष करीत नाहीं–(न कांक्षति–व आकांक्षा करीत नाहीं–(सः)–तो–(नित्यसंन्यासी)–नित्य संन्यासीच–(ज्ञेयः)–जाणावा.–(हि)–कारण–(हे महाबाहो)–हे महापराक्रमी अर्जुना–(निर्द्वंद्वः)–द्वंद्वरहित पुरुष–(बन्धात्)–बंधापासून–(सुखं)–अनायासानें–(प्रमुच्यते)–सर्वथा मुक्त होतो. ३

जो गेल्या वस्तूची आठवण करीत नाहीं, आणि एकादी वस्तु मिळाली नाही तर तिची इच्छा करीत नाहीं; जो मेरुपर्वताप्रमाणें अंतर्यामीं स्थिर असतो; १९ आणि पार्था, ज्याचे अंतःकरणांत मी आणि माझें अशी आठवण देखील होत नाहीं; तो नित्य संन्यासी असें जाण. २० ज्याच्या मनाची अशी स्थिति झाली आहे, त्यालाच विषयेच्छा सोडून गेल्यामुळें, जो निःसंग झाला आहे, त्यालाच अखंड सुखाची प्राप्ती होते. २१ अशा मनुष्याला गृहादिक वगैरे कांहींएक सोडावें लागत नाहीं, कारण त्यांचा माझा कांहींएक संबंध नाही, असें त्याच्या मनानें स्वभावतःच घेतलेलें असतें. २२ विस्तव विझाल्यावर मग त्याची झाकिली नुसती राख जशी; पिंजलेल्या कापसांत ठेवतां येते, २३ त्याचप्रमाणें त्याच्या बुद्धींत मी कर्ता आहें, इत्यादि अभिमान नसतो. तो शरीरेंद्रियादि उपाधि असतांहि कर्मबंधांत सांपडत नाहीं. २४ म्हणून, जेव्हां मनांतील मी व माझें या भावना नाहींतशा होतात, तेव्हांच संन्यास घडतो, आणि याच कारणामुळें कर्मत्याग आणि कर्मयोग हे दोन्ही सारखे आहेत. २५

**अन्वयार्थ**–(बालाः)–अज्ञ जन–(सांख्ययोगौ)–संन्यास योग–(पृथक्)–निरनिराळें फल देणारे आहेत, असें–(प्रवदन्ति)–सांगतात–(पण्डिताः न)–पण पंडित–तत्त्ववेत्ते तसें सांगत नाहींत.–(एकं अपि)–त्या दोहोंतील एका साधनाचाहि–(सम्यक्)–उत्तम प्रकारें–(आस्थितः)–आश्रय केलेला पुरुष–(उभयोः)–त्या दोहोंच्या–(फलं)–फलास–(विन्दते)–संपादन करतो. ४

याशिवाय पार्था, जे सर्वस्वी अज्ञानी आहेत, त्यांना ज्ञानयोग व कर्मयोग यांची व्यवस्था कशी समजेल? २६ त्यांच्या स्वाभाविक अज्ञानामुळें, हे दोन्ही योग भिन्न आहेत असें ते म्हणतात; परंतु पहा की, अनेक दिव्यांचे प्रकाश भिन्नभिन्न असतात कीं काय? २७ तथापि ज्यानीं सम्यक् ज्ञानांनीं परब्रह्मरूपाचें तत्त्व जाणलें आहे, ते, हे दोही योग एकच आहेत असें मानतात. २८

**अन्वयार्थ**–(यत् स्थानं)–जें स्थान–(सांख्यैः)–सांख्यांकडून–(प्राप्यते)–प्राप्त केलें जातें–(तत्)–तें–(योगैः अपि)–योग्यांकडूनहि–(गम्यते)–क्रमानें प्राप्त केलें जातें वास्तव–(यः)–जो–(सांख्यं च योगं च)–सांख्य–ज्ञानलक्षण संन्यास–ज्ञाननिष्ठा व योग–त्याचा उपाय–निष्काम ईश्वरार्थ कर्मानुष्ठान–(एकं)–एकच आहे असें–(पश्यति)–पाहतो–(सः)–तो यथार्थ–(पश्यति)–पाहतो–जाणतो. ५

आणि ज्ञानयोगापासून जी प्राप्ति होते, तीच कर्मयोगापासूनही होते; म्हणून अशा प्रकारें या दोहोंमध्यें सहजींच ऐक्य आहे. २९ हें पहा–आकाश आणि पोकळी यांत जसा भेद नाहीं, तसा ज्ञानयोग आणि कर्मयोग यांत भेद नाहीं हें जो जाणतो, ३० ज्यानें ज्ञानयोग आणि कर्मयोग यांत भिन्नभाव नाहीं हें जाणलें, त्यालाच ह्या जगतामध्यें उजाडलें; [ ज्ञानप्राप्ति झाली ] व त्यानेंच आत्मस्वरूप पाहिलें. ३१

**अन्वयार्थ**—(हे महाबाहो)–हे पराक्रमी अर्जुना!–(तु)–पण–(संन्यासः)–खरा संन्यास–परमार्थ संन्यास म्ह० सांख्य–(अयोगतः)–योगावांचून–(आप्तुं)–प्राप्त होणें–(दुःखं)–कठिण आहे.–(योगयुक्तः)–वैदिक कर्मानुष्ठानानें युक्त असलेला–(मुनिः)–ईश्वराचें मनन करणारा मुनि––(ब्रह्म)–परमार्थ संन्यासाला–(न चिरेण)–लवकरच–(अधिगच्छति)–प्राप्त होतो. ६

पार्था, जो कर्ममार्गानें मोक्षरूप पर्वतावर चढतो, तो, त्या पर्वताच्या ब्रह्मरूपी शिखरावर लवकरच पोहोंचतो. ३२ एऱ्हवीं जे कर्ममार्गाचें आचरण करीत नाहीं, ते ज्ञानप्राप्तीविषयीं व्यर्थ हव्यास करतात, परंतु त्यांना तें कधीं प्राप्त होत नाहीं. ३३

१ जाणत्यानेणत्यांना. २ सरळ, सोपा. ३ तरून जाण्याला. ४ मिळावें. ५ कर्मयोग व संन्यासयोग. ६ आठवण. ७ इच्छा. ८ अति. स्थिर, शांत. ९ संसारानें, विषयसंगानें. १० झांकतां येते. ११ बांधला जात नाहीं. १२ सारखे. १३ ज्ञानयोग व कर्मयोग यांची व्यवस्था. १४ निरनिराळे. १५ चालले. १६ परब्रह्मस्वरूप. १७ ज्ञानयोगानें. १८ कर्मयोगानें १९ प्राप्त होईल. २० पोकळीला. २१ उजाडलें, उघड झालें, ज्ञानप्राप्ति झाली. २२ कर्मयोगानें. २३ ब्रह्मसुखाचा. २४ माथा, शिखर. २५ सत्वर. २६ कर्मयोग. २७ छंदांत. २८ ज्ञानयोगानीं.

योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः । सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७॥

जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें । मग आत्मस्वरूपीं घातलें । हारौनियां ३४ जैसें समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें अल्प आवेडे[३] । मग होय सिंधूचि एवढें । मिळे तेव्हां ३५ तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें । तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ३६ आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें[५] तया स्वभावें[६] । आणि करी जऱ्ही आघवें । तऱ्ही अकर्ता तो ३७

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्वविद् । पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥८॥
प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि । इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥ ९ ॥

जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठऊ नाहीं । तरी कर्तृत्व कैंचें काई । उरे सांगें ३८ ऐसें तनुत्यागेंवीण । अमूर्ताचे गुण । दिसती संपूर्ण । योगयुक्तां ३९ एऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरी । अशेषाही व्यापारीं । वर्ततु दिसे ४० तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकतु आहे । परि तेथींचा सर्वथा नोहे । नवल देखें ४१ स्पर्शासि तरी जाणे । परिमळु सेवी घ्राणें । अवसरोचित बोलणें । तयाहि आथी ४२ आहारातें स्वीकारी । त्यजावें तें[१२] परिहरी । निद्रेचिया अवसरीं । निदिजे[१३] सुखें ४३ आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालतु दिसे । पैं सकळ कर्म ऐसें । राहाटे कीर ४४ हें सांगों काई एकैक । देखें श्वासोच्छ्वासादिक । आणि निमिषोन्मिषें । आदिकरूनि ४५ पार्था तयाचे ठायीं । हें आघवेंचि आथि पाहीं । परी तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें[१५] ४६ जैं भ्रांति सेजे सुतला[१६] । तैं स्वप्नसुखें भुतला[१७] । मग तो ज्ञानोदयीं चेईला । म्हणोनियां ४७

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः । लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ॥१०॥

आतां अधिष्ठानसंगती । अशेषाही इंद्रियवृत्ती । आपुलालिया अर्थीं[२०] । वर्तत आहाती ४८ दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे । देहीं कर्मजात तैसें । योगयुक्ता ४९ तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे । जैसें न सिंपे[२२] जळीं जळें । पद्मपत्र ५०

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि । योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥११॥

देखें बुद्धीची भाषे[२३] नेणिजे । मनाचा अंकुर नुंदैजे[२४] । ऐसा व्यापारु तो बोलिजे । शारीर[२५] गा ५१ हेंचि मराठे[२६] परियेसीं । तरी बाळकाची चेष्टा जैशी ।

**अन्वयार्थ**—(योगयुक्तः)–जो वर सांगितलेल्या निष्कामकर्मानुष्ठानानें युक्त आहे, त्यामुळें–( विशुद्धात्मा )–ज्याचें चित्त अतिशय शुद्ध झालें आहे, त्यामुळेंच–(विजितात्मा)–ज्यानें आपल्या देहाला आपल्या वश ठेविलें आहे व–(जितेन्द्रियः)–ज्यानें इंद्रियांनाहि जिंकिलें आहे तो–(सर्वभूतात्मभूतात्मा)–ज्याचा आत्मा सर्व भूतांच्या आत्मरूप झाला आहे, असा ज्ञानी होतो–(कुर्वन् अपि)–तो कर्म जरी करीत असला तरी–(न लिप्यते)–त्यानें बद्ध होत नाहीं. ७

ज्यानें आपलें मन भ्रांतीपासून सोडवून व गुरुवाक्यानें शुद्ध करून आत्मस्वरूपाचे ठिकाणी लीन केलें; ३४ जोंपर्यंत समुद्रांत मीठ घातलें नाहीं, तोंपर्यंत तें जसें समुद्रापासून वेगळें असून लहान दिसतें, व तेंच समुद्रांत घातलें म्हणजे समुद्रभर पसरतें; ३५ त्याचप्रमाणें, ज्याचें मन संकल्पापासून काढल्यावर ब्रह्मरूपीं मिळालें आहे, त्याचें मन दिसण्यांत एकदेशीय खरें; पण त्यानें त्रिभुवन व्यापिलें! ३६ मग त्याला 'मी एक कर्ता' 'हें एक कर्म' व 'असुक एक क्रिया करावयाची' या गोष्टी स्वभावतांच नाहींतशा होतातः आणि लोकदृष्ट्या त्यानें जरी सर्व कर्मे केलीं, तरी तीं वास्तविक न केल्यासारखींच आहेत. ३७

**अन्वयार्थ**–( तत्त्ववित् )–तत्त्वज्ञ–(पश्यन्)-डोळ्यांनीं पहात–(शृण्वन्)–कानांनीं ऐकत–(स्पृशन्)–त्वगिंद्रियानें स्पर्श करीत–(जिघ्रन्)–नाकानें वास घेत–(अश्नन्)–जिभेनें रस चाखीत–(गच्छन्)–पायानें चालत–(स्वपन्)–मन लीन झाल्यामुळें झोंप घेत–(श्वसन्)–श्वासोच्छ्वास करीत–(प्रलपन्)–वागिंद्रियानें बोलत–(विसृजन्)–पायु इंद्रियानें विष्ठेचा त्याग करीत–(गृह्णन्)–हातांनीं ग्रहण करीत–(उन्मिषन्)–पापण्या उघडीत व–(निमिषन् अपि)–पापण्या झांकीत असतांनाही–(इन्द्रियाणि)–इंद्रियें–(इन्द्रियार्थेषु) –विषयांमध्यें– (वर्तन्ते)–प्रवृत्त होत आहेत [ मी नव्हे ]–(इति)–असें–(धारयन्)–मनांत धरून–समजून–(किंचित्)–कांहीं-कोणत्याही क्रिया–(न एव करोमि)–मी स्वतः करीत नाहींच–(इति)–असें–(युक्तः)–आत्म्यामध्यें चित्ताला स्थिर ठेवून–(मन्येत)–चिंतितो. तत्त्ववेत्त्यानें असें चिंतन करावें. ८–९.

कारण, पार्था, त्याला देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धीचीच आठवण नसल्यावर मग त्याच्या ठिकाणीं 'मी कर्ता' हा अभिमान कोठून उरणार, सांग बरें! ३८ याप्रमाणें शरीराचा त्याग न करितां त्या योगयुक्त पुरुषाचे अंगीं निराकार ब्रह्माचे सर्व गुण दृष्टीस पडतात. ३९ बाकी इतर लोकांप्रमाणें तोहि शरीरधारी असून सर्व व्यापार करतो असें दिसतें; ४० तो नेत्रांनं पाहतो, कानानें ऐकतो, तरी शरीराच्या भावांत तो लिप्त होत नाहीं, हें नवल पहा! ४१ त्याला स्पर्श झालेला समजतो, तो नाकानें वास घेतो, आणि त्याला समयोचित भाषणही करतां येतें; ४२ तो जेवतो, टाकावयाची वस्तु टाकतो, झोंपेच्या वेळीं सुखानें झोंप घेतो, ४३ आपले इच्छेप्रमाणें तो चालतो, व त्याचप्रमाणें, ज्या ज्या वेळेस जीं जीं कर्मे करावयाचीं तीं सर्व करतो; ४४ हें आणखी एक एक काय सांगूं? हें पहा –श्वासोच्छ्वास करणें, तसेंच डोळे मिटणें व उघडणें इत्यादि ४५ सर्व कांहीं गोष्टी त्याचे ठिकाणीं दृष्टीस पडतात; परंतु पार्था, आत्मानुभवाचे बळानें तो त्या गोष्टींचा कर्ता नव्हे. ४६ जेव्हां तो भ्रांतीरूप बिछान्यावर निजला होता, तेव्हां स्वप्नसुखानें भुलला होता; परंतु आतां त्याला ब्रह्मज्ञानाची जागृति झाली, म्हणून तो कर्ता नव्हे, ४७

**अन्वयार्थ**—(यः)–जो–(कर्माणि)–शास्त्रीय कर्में–(ब्रह्मणि)–ब्रह्मामध्यें–ईश्वरामध्यें–(आधाय)–अर्पण करून–(संगं)–फलाची आसक्ति–(त्यक्त्वा)–सोडून–(करोति)–करतो–(सः)–तो–( अम्भसा )–पाण्यानें–(पद्मपत्रं इव)–कमळाचें पान किंवा पाकळी जशी, त्याप्रमाणें–( पापेन )–पापानें–(न लिप्यते)–लिप्त होत नाहीं. १०

आतां, आत्म्याच्या आश्रयानें सर्व इंद्रियांच्या वृत्ति आपल्या विषयांत राहाटत असतात; ४८ दिव्याच्या उजेडानें ज्याप्रमाणें घरांतील सर्व व्यवहार चालतात; ( पण स्वतः दिवा त्यांपासून अगदीं अलिप्त असतो; ) त्याप्रमाणें, ज्ञान्यांकडून कर्में होत असतात; [ पण ] ४९ कमळाचें पान जसें पाण्यांत असूनही भिजत नाहीं, तसा तो ज्ञानी सर्व कर्में करीत असतांही कर्मबंधनानें आकळिला जात नाहीं. ५०

**अन्वयार्थ**—( योगिनः )–कर्माधिकारी गृहस्थ–[केवलेन] (कायेन)–केवळ शरीरानें–[केवलेन] (मनसा)–केवळ मनानें–[ केवलया ] ( बुद्ध्या )–केवळ बुद्धीनें–( केवलैः इंद्रियैः अपि)–केवळ–नुसत्या इंद्रियांनीही–(संगं)–फलविषयींची आसक्ति–(त्यक्त्वा)–सोडून–(आत्मशुद्धये)–चित्तशुद्धीसाठीं –(कर्म)–नित्य व नैमित्तिक कर्में–(कुर्वन्ति)–करितात. ११

ज्यांत बुद्धीची खूण दिसत नाहीं, व मनाचा अंकुर उगवत नाहीं; त्या व्यापाराला 'देहव्यापार' म्हणावें. ५१ यापेक्षां जास्त स्पष्ट करून सांगतों ऐक. जसे लहान मुलाचे व्यापार मन किंवा बुद्धी यांना

१ हिरावून घेतलें, माघारें वळविलें. २ आंत शिरवून, खोंचून. ३ वाटतें, दिसतें. ४ ब्रह्मरूप. ५ नाहींसें झालें, राहिलें. ६ आपोआप. ७ शरीरधारी असतांही. ८ निराकार ब्रह्माचे. ९ सुगंध. १० नाकानें. ११ समयोचित. १२ टाकतो. १३ निजतो. १४ डोळे मिटणें व उघडणें. १५ अनुभवाच्या जोरावर. १६ निजला. १७ भुलला, गुंगला; १८ जागा झाला. १९ आत्मा. २० विषयामध्यें. २१ सर्व कर्में. २२ भिजे. २३ भाषा, वार्ता, खूण, चिन्ह. २४ उगवत नाहीं. २५ देहाचा. २६ स्पष्ट रीतीनें, सुलभ रीतीनें.

योगिये कर्में करिती तैशीं । केवळा तनु ५२ मग पांचभौतिक संचलें[2] । जेव्हां शरीर असे निदेलें[3] । तेथ मनाचि राहाटे एकलें । स्वप्नीं जेवीं ५३ नवल ऐकें धनुर्धरा । कैसा वासनेचा पसारा । देहा होऊं नेदी उर्जेगरा । परी सुखदुःखें भोगी ५४ इंद्रियांच्या गांवीं नेणिजे । ऐसा व्यापारु जो निपजे । तो केवळु गा म्हणिजे । मानसाचा[5] ५५ योगिये तोही करिती । परी कर्में ते न[6] बांधिजती । जे[7] सांडिली आहे संगती । अहंभावाची ५६ आतां जाहालिया भ्रमहत । जैसें पिशाचाचें चित्त । मग इंद्रियांचें चेष्टित । विकळु दिसे ५७ स्वरूप तरी देखे । आळंचिलें आइके । शब्दु बोले मुखें । परी ज्ञान नाहीं ५८ हें असो कौजें[11]-विण । जें जें कांहीं कारण । तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें ५९ मग सर्वत्र जें जाणतें । तें बुद्धीचें कर्म निरुतें[12] । वोळख अर्जुनातें । म्हणे हरी ६० ते बुद्धि धुरे[13] करुनी । कर्म करिती चित्त देऊनी । परी ते नैष्कर्म्यापासुनी । मुक्त दिसती ६१ जे बुद्धीचिये ठेवूनि[14] देहीं[15] । तयां अहंकाराची सोचि नाहीं । म्हणोनि कर्म करितां पाहीं । चोखाळले[16] ६२ अगा करितेनेंविण[17] कर्म । तेंचि तें नैष्कर्म्य । हें जाणती सुवर्म[18] । गुरुगम्य[19] जें ६३ आतां शांतरसाचें भरितें[20] । सांडीत आहे पात्रातें । जें बोलणें बोलौपरौतें[21] । बोलवलें ६४ एथ इंद्रियांचा पांगु[22] । जया फिटला आहे चांगु[23] । तयासीचि आथि लागु[24] । परिसावया ६५ हा असो अतिप्रसंगु[25] । न संडीं पां कथालागु[26] । होईल श्लोकसंगति भंगु । म्हणऊनियां ६६ जें मना आकळितां कुवाडें[27] । घांधुसितां[28] बुद्धी नौतुडे[29] । तें दैवाचेनि सुरवाडें[30] । सांगवलें तुज ६७ जें शब्दातीत[31] स्वभावें । तें बोलीं‍चि जरी फावे[32] । तरी आणिकें काय करावें । कथा सांगें ६८ हा औतिविशेषु[33] श्रोतयांचा । जाणोनि दास निवृत्तीचा । म्हणे संवादु दोघांचा । परिसोनि परिसा ६९ मग श्रीकृष्ण म्हणे पार्थातें । आतां प्रांताचें[34] चिन्ह पुरतें । सांगेन तुज निरुतें । चित्त देईं ७०

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् । अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥१२॥

तरी आत्मयोगें[35] आथिला[36] । जो कर्मफळाशीं विटला । तो घर रिघोनि वरिला । शांती जगीं ७१ येरुँ कर्मबंधें किरीटी । अभिलाषाचिया[37] गांठी । कळौसला[39] खुंटी । फळभोगाच्या ७२

सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽऽस्ते सुखं वशी । नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

जैसा फळाचिये हांवें । तैसें कर्म करी आघवें । मग न कीजेचि येणें भावें

सोडून होतात, तसे योगी लोक हे केवळ देहानें कर्म करितात. ५२ अशा प्रकारें पांच तत्त्वांनी बनलेलें हें शरीर जेव्हां निजलें असतें, तेव्हां स्वप्नाप्रमाणें मन हें एकटेंच व्यापार करीत असतें. ५३ अर्जुना, हें एक नवल ऐक; वासनेचा असा पसारा आहे कीं, तो देहाला कळूं न देतां त्यांजकडून सुखदुःखें भोगवितो, ५४ इंद्रियांना ज्याची वार्ताहि नाहीं असा जो व्यापार होतो, त्यालाच केवळ मनाचा व्यापार असें म्हणावें. ५५ योगी लोक त्याही मनोव्यापाराचें आचरण करितात, परंतु ते कर्मानें बांधलें जात नाहींत; कारण, त्यांनी अहंकाराचा त्याग केलेला असतो. ५६ ज्या वेळेस एकाद्या मनुष्याचें मन भ्रमिष्ट झालेलें असतें, किंवा जसें पिशाचाची बाधा झालेल्याचें चित्त असतें त्या वेळेस इंद्रियांचे सर्व व्यापार अव्यवस्थित दिसतात; (मनाला आणि बुद्धीला ते धरून नसतात, कारण भ्रम नाहींसा झाल्यावर त्यांची त्याला आठवण नसते.) ५७ समोर मनुष्य आलें असतां त्याला दिसतें; कोणी हांक मारली असतां ऐकूं येते व तो स्वतः बोलतो; परंतु त्या त्या क्रियेचें त्याला भान नसतें. (चित्त जाग्यावर नसतें.) ५८ असो; तत्त्वार्थ काय कीं, निष्कारण जें कांही करणें, तें फल इंद्रियांचेंच कर्म होय असें समज. ५९ श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतातः–ह्या व्यतिरिक्त, सर्व जाणून जें कर्म करणें, तें बुद्धीचें कर्म असें समज. ६० ते योगी बुद्धीला पुढें करून मनापासून कर्माचें आचरण करतात, परंतु ते कर्मातीत ब्रह्मभावाच्याहि पलीकडे असून मुक्त आहेत. ६१ कारण, बुद्धीपासून देहापर्यंत त्यांना अहंकाराची आठवण मुद्दां होत नाहीं. म्हणून ते कर्म करीत असले तरी शुद्ध होत. ६२ 'कर्म करणारा मी आहें' असा भाव न ठेवितां जें कर्म करणें, तेंच नैष्कर्म्य होय, हें गुरूपासून कळणारें तत्त्व ते जाणतात. ६३ आम्हां आतां जें शब्दांनी प्रतिपादन करतां येणार नाहीं तें बोललों, म्हणून शांतिरस इतका अधिक झाला कीं, तो ज्या पात्रांत भरला आहे, तें पात्र भरून तो खाली सांडत आहे! ६४ ज्यांच्या इंद्रियांचें दैन्य पार नाहींसें झालें आहे, त्यालाच हें तात्त्विक भाषण ऐकण्याचा अधिकार आहे. ६५ [मग श्रोते ज्ञानेश्वरास म्हणतात.] "अहो, हें विषयांतर पुरे करा; कथेचा संबंध सोडूं नका; कारण श्लोकांच्या संगतीचा विघाड होईल. ६६ जें मनानें समजण्यास अवघड, व विचार करूनही बुद्धीला न सांपडणारें, तें देवाच्या अनुकूलतेनें तुम्हांला सांगतां आलें, ६७ जें मुळींच बोलतां येत नाहीं, तें जर बोलण्यांत सांपडलें, तर आणखी उपाय कशास पाहिजेत! परंतु, हें असो; आतां कथा सांगा." ६८ ऐकणारांची ही उत्कट इच्छा जाणून निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणाले दोघांचा संवाद जो एवढा वेळ ऐकिला, त्याचें मनन करून पुढें तोच ऐका. ६९ मग श्रीकृष्ण पार्थाला म्हणालेः–पूर्ण ब्रह्मनिष्ठाला ओळखण्याचें खरें चिन्ह कोणतें तें मी सांगतों, चांगलें लक्ष दे. ७०

**अन्वयार्थ**—(युक्तः)–हीं कर्में ईश्वरासाठीं आहेत, माझ्या फलासाठीं नव्हेत, असें समजून मनांत शांत असलेला मुमुक्षु–(कर्मफलं)–कर्माच्या फलाला–(त्यक्त्वा)–सोडून–(नैष्ठिकीं)–निष्ठांच्या क्रमानें प्राप्त होणाऱ्या–(शान्तिं)–मोक्षरूप शांतीस–(आप्नोति)–प्राप्त होतो.–(अयुक्तः)–पण जो मनांत असमाहित–अशान्त असतो, तो–(कामकारेण)–कामाच्या योगानें प्रेरित झाल्यामुळें–(फले सक्तः)–फलामध्यें आसक्त झालेला असा होत्साता–(निबध्यते)–अत्यंत बद्ध होतो. १२

हें पहा–आत्मज्ञानानें जो पूर्ण भरला, व ज्याला कर्मफलाचा अगदी वीट आला, त्याला या जगामध्यें घरीं बसल्याच शांति येऊन वरते. (प्राप्त होते.) ७१ अर्जुना, दुसरा जो संसारी, तो कर्मबंधानें बांधला जाऊन अभिलाषाच्या गाठीनें फलभोगाच्या खुंटयाला बळकट बांधला जातो. ७२

**अन्वयार्थ**—(वशी)–जितेंद्रिय–(देही)–देहवान् आत्मा–मुमुक्षु–(सर्वकर्माणि)–नित्यादि सर्व कर्में–(मनसा)–मनानें–(संन्यस्य)–सोडून–(नवद्वारे पुरे)–नऊ द्वारांनीं युक्त अशा पुरांत–शरीरांत–(न कुर्वन्)–कांहींएक न करीत व–(न एव कारयन्)–कांहीं न करवीत–(सुखं)–सुखानें–(आस्ते)–राहतो. १३

फलेच्छेनें कर्माचरण करणाऱ्याप्रमाणें जो सर्व कर्में यथासांग करतो, परंतु त्या कर्मांचा मी कर्ता नव्हें, असें समजून कर्मांचा त्याग करितो. त्या पुरुषाची काय

१ पंचतत्त्वांनी. २ बनलेलें, घटित. ३ निजलेलें. ४ कळणें. ५ मनाचा. ६ बांधले जात नाहींत. ७ कारण. ८ भ्रमिष्ट. ९ अव्यवस्थित. १० हाक मारलेली. ११ निष्कारण. १२ खरें. १३ पुढें, प्रमुख. १४ स्थानापासून, आंत शिरून. १५ देहांचे व्यापार. १६ शुद्ध झाले. १७ कर्तृत्वाच्या अभिमानावांचून. १८ तत्त्व. १९ गुरुकृपेनेंच समजणारे. २० पूर. २१ शब्दाच्या पलीकडचें बोलणें. २२ दैन्य. २३ उत्तम. २४ अधिकार. २५ विषयांतर. २६ कथेचा संबंध. २७ कठीण, अवघड. २८ शोधितां, धडपट करूनही. २९ सांपडत नाहीं. ३० अनुकूलतेनें. ३१ बोलण्यापलीकडचें. ३२ स्पष्ट करितां येतें. ३३ उत्कट इच्छा. ३४ योग्यानें. ३५ आत्मज्ञानानें. ३६ संपन्न झाला. ३७ दुसरा. ३८ कर्मफलाची इच्छा. ३९ खिळला, अडकला. ४० आग्रहानें.

उपेक्षी[1] जो ७३ तो जयाकडे वासु[2] पाहे । तेउती सुखाची सृष्टि होये । तो म्हणे तेथ राहे । महाबोधु[3] ७४ नवद्वारें देहीं । तो असतुचि पारि नाहीं । करितुचि न करी कांहीं । फलत्यागी ७५

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः । न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥

जैसा का सर्वेश्वरु । पैं[4]हिजे तंव निर्व्यापारु[5] । पारि तोचि रची विस्तारु । त्रिभुवनाचा ७६ आणि कर्ता ऐसें म्हणिपे । तरी कवणें कर्मी न शिंपे[6] । जे हातुपावो न लिंपे[7] । उदासवृत्तीचा ७७ योगनिद्रा तरी न मोडे । अकर्तेपणा सळु न पडे । पारि महाभूतांचें दळवाडें[8] । उभारी भले ७८ जगाच्या जीवीं आहे । परी कवणाचा कहीं नोहे । जगचि हें होय जाये । तो शुद्धीही नेणे ७९

नाऽऽदत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः । अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥१५॥

पापपुण्यें अशेषें । पैंसींचि असतु न देखें । आणि साक्षीही होऊं न ठेके[12] । येरी गोठी कायसी ८० पैं मूर्तींचेनि[13] मेळें । तो मूर्तिंचि[14] होऊनि खेळे । पारि अमूर्तपण[15] न मैळे[16] । तया दार्दुलयाचें[17] ८१ जो सृजी पाळी संहारी । ऐसें बोलती जे चराचरीं । तें अज्ञान गा अवधारीं । पंडुकुमरा ८२

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः । तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥१६॥

तें अज्ञान जैं समूळ तुटे । तैं भ्रांतीचें मैसेरें[18] फिटे । मग अकर्तृत्व प्रगटे । मज ईश्वराचें ८३ एथ ईश्वरु एक अकर्ता । ऐसें मानलें जरी चित्ता । तरी तोचि मी हें स्वभावता । आदीचि आहे ८४ ऐसेनि विवेकें उँदो[19] चित्तीं । त-यासी भेदु कैंचा त्रिजगतीं । देखे आपुलिया प्रतीति[20] । जगचि मुक्त ८५ जैशी पूर्वदिशेच्या राउळीं[21] । उदया येतांचि सूर्य दिवाळी[22] । कीं येरीही दिशां तियेचि काळीं । कालिमा[23] नाहीं ८६

तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः । गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥

बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी[24] आपणा आपण । ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । तत्परायण[25] अहर्निशीं[26] ८७ ऐसें व्यापक ज्ञान भलें । जयांचिया हृदया गिंवसित आलें । तयांचि समता दृष्टि बोलें । विशेपूं काई ८८ एक आपणपांचि जैसें । ते देखती विश्व तैसें । हें बोलणें कायसें । नवलु एथ ८९ परी दैवें[27] जैसें कवतिकें[28] । कहींचि दैन्यें[29] न देखे । कां विवेकु हा नोळखे । भ्रांतीतें जेवीं ९० नातरी अंधकाराची वानी[30] । जैसा सूर्यो न देखे स्वप्नीं । अमृत नायके कानीं ।

योग्यता सांगावी.--७३ तो पुरुष जिकडे जिकडे पाहतो, तिकडे तिकडे सुखमय सृष्टि होते; आणि तो म्हणेल तेथें महास्थान उभें राहतें. ७४ एक फलाची इच्छा धरली नाहीं, म्हणजे तो नवद्वारांच्या देहांत असूनही नसल्यासारखा आहे; आणि सर्व कर्मे करूनही त्यानें तीं न केल्याप्रमाणें आहेत. ७५

**अन्वयार्थ**--(प्रभुः)--आत्मा--(लोकस्य)--लोकांचें--(कर्तृत्वं)--कर्तृत्व--तूं अमुक कर असें म्हणून--(न सृजति)--निर्मीत नाहीं.--(कर्माणि)--रथ, घट, मोठा वाडा इत्यादि कर्त्याला अतिशय इष्ट असलेले पदार्थ--(न) [सृजति]--उत्पन्न करीत नाहीं--(च)--आणि--(कर्मफलसंयोगं)--रथादि पदार्थ करणाऱ्या कर्त्याला त्याच्या फलांशीं संयुक्त--(न) [ सृजति ]--करीत नाहीं-(तु)--तर-(स्वभावः)--अविद्यारूप मायाप्रकृति--(प्रवर्तते)--प्रवृत्त होते. १४

जसा ईश्वर पाहिला असतां अकर्ता आहे परंतु ( मायोपाधीचा आरोप त्याजवर केला म्हणजे ) या त्रिभुवनाचा विस्तार तोच करतो ( असें दिसतें;) ७६ आणि तो कर्ता आहे असें म्हटलें तर तो कोणत्याही कर्मानें लिप्त होत नाहीं. कारण त्याची उदासीन वृत्ति असल्याकारणानें कोणतेंही कर्म त्याला स्पर्श करीत नाहीं. ७७ त्याच्या योगनिद्रेचा मुळींच भंग होत नाहीं; व त्याच्या अकर्तेपणालाही घडी लागत नाहीं, म्हणजे अकर्तेपणा मोडत नाहीं. पण तो महाभूतांच्या समुदायांची उत्तम उभारणी करितो ! ७८ पहायला लागलें तर ह्या जगांत प्राणिमात्राच्या ठायीं हा आहे, परंतु केव्हांही कोणाचा नसतो; आणि हें जगत् उत्पन्न होतें व लयास जातें, याची त्याला वार्ता देखील नसते ! ७९

**अन्वयार्थ**--(विभुः)--सर्वव्यापी आत्मा--(कस्यचित्)--कोणाचें--(पापं)--पाप--(न आदत्ते)--स्वतः घेत नाहीं--(च)--आणि--(सुकृतं)--कोणाचें पुण्यहि--(न एव)[आदत्ते]--घेत नाहींच--(ज्ञानं)--विवेकविज्ञानाला--(अज्ञानेन)--अज्ञानानें--(आवृतं)--आच्छादित केलें आहे,--(तेन)--त्यामुळें--(जन्तवः)--जीव--(मुह्यन्ति)--मोहित होतात. १५

पापपुण्य सर्व त्याच्या जवळ असूनही तो पहात नाहीं इतकेंच नव्हे, तर त्याला साक्षिभूत सुद्धां नसतो; मग दुसऱ्या गोष्टीबद्दल कशाला विचारावें ? ८० तथापि मूर्ति धारण करून तो देहाच्या बरोबर खेळतो, ( अवतार घेऊन जगामध्यें वावरतो, ) परंतु त्या प्रभूचें निराकारपण मोडत नाहीं. ८१ असें असतां अर्जुना, तो चराचर सृष्टि उत्पन्न करतो, पालन करतो, आणि संहार करतो, असें जे लोक म्हणतात, ते सर्व अज्ञानामुळें म्हणतात असें समज. ८२.

**अन्वयार्थ**--(तु)--पण--(येषां)--ज्यांचें--(तत् आत्मनः अज्ञानं)--तें आत्म्याविषयींचें अज्ञान--(ज्ञानेन)--आत्म्याच्या ज्ञानानें--(नाशितं)--नष्ट केलें आहे--(तेषां)--त्यांचें--(तत्)--तें--(ज्ञानं)--ज्ञान--(आदित्यवत्)--सूर्याप्रमाणें--(परं)--परमात्म्याला--(प्रकाशयति)--प्रकाशित करतें. १६

तें अज्ञान जेव्हां समूळ नाहींसें होतें, तेव्हां भ्रांतिरूप काळोखी नाहींशी होते; असें झालें म्हणजे मग ईश्वराचें अकर्तेपण स्पष्ट समजून येतें. ८३ अशा प्रकारें ईश्वर हा अकर्ता आहे अशी जर मनाची खात्री झाली, तर तोच मी आहें हें पूर्वीपासून सिद्धच आहे; ( तेव्हां अर्थात् मीही अकर्ता आहें हें सिद्धच झालें ! ) ८४ याप्रमाणें विवेकानें ज्याचे चित्तांत उजेड पडतो, त्याला या त्रिजगतांत भेद कोठला ? आपले अनुभवावरून सर्व जग मुक्तच आहे असें तो समजतो. ८५ कसा ? तर--पूर्वेस सूर्य उगवतांच प्रकाश पडतो त्या वेळेस दुसऱ्याही दिशांचा अंधार नाहींसा होतो त्याप्रमाणें. ८६

**अन्वयार्थ**--(तद्बुद्धयः)--परमार्थ तत्त्वामध्यच ज्यांची बुद्धि आहे,--(तदात्मानः]--जे तद्रूप झालेले आहेत,--(तन्निष्ठाः) --त्यांतच ज्यांची निष्ठा आहे--(तत्परायणाः)--तें तत्त्व हीच ज्यांची परा गति आहे, ते--(ज्ञाननिर्धूतकल्मषाः) [सन्तः] ज्ञानानें ज्यांचें पाप पार नाहींसें झालें आहे, असे होत्साते--(अपुनरावृत्तिं )--पुनर्जन्मराहित्यास --मोक्षास-- ( गच्छन्ति )--प्राप्त होतात. १७

ज्याच्या बुद्धीचा निश्चय आत्मज्ञानाविषयीं आहे, व जो आपण आपल्याला ब्रह्मरूप मानतो, आणि रात्रंदिवस ब्रह्मपरायण होऊन आपली ब्रह्मस्थिति पूर्णपणें राखतो; ८७ असें सर्वव्यापक ज्ञान ज्यांना शोधीत आलें, त्यांची समदृष्टि होते हें विशेषेंकरून शब्दानें (बोलून) काय दाखवावें ? ८८ जसें ते आपणास सच्चिदानंद ब्रह्मरूप आहोंत असें समजतात, त्याप्रमाणें ते सर्व विश्वाला मानतात, यांत आश्चर्य तें काय ! ८९ ज्याप्रमाणें भाग्य हें कौतुकानें देखील दारिद्र्याचा अनुभव घेत नाहीं, किंवा विचाराला जशी भ्रांतीची ओळख देखील नसते, ९० अथवा सूर्य जसा स्वप्नांत देखील अंधकाराचें स्वरूप पहात नाहीं,

---

१ सोडतो. २ वाट. ३ महाज्ञान. ४ पहावा. ५ अकर्ता. ६ लिप्त होत नाहीं. ७ संसर्ग होत नाहीं. ८ दोष, रेषा. ९ समुदाय. १० जवळ असतांही. ११ द्रष्टा, पहाणारा. १२ शकत नाहीं. १३ देहाच्या संगतीनें. १४ देह धारण करून. १५ निराकारपण. १६ विघडत नाहीं. १७ प्रभूचें. १८ काजळी, अंधकार. १९ उजेड. २० अनुभवानें. २१ घरीं. २२ लखलखाट, आनंद. २३ अंधःकार. २४ मानितो. २५ ब्रह्मपरायण. २६ रात्रंदिवस. २७ भाग्य. २८ कौतुकानें. २९ दारिद्र्य. ३० स्वरूप.

मृत्युकथा ९१ हें असो संतोषु कैसा । चंद्रु न स्मरे जैसा । भूतीं भेदु नेणत
तैसा । ज्ञानिये ते ९२

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥

मग हा मशकु[2] हा गजु[3] । कीं हा श्वपचु[4] हा द्विजु । पैलें[5] इतरु हा आत्मजु[6]
हें उरेल कें[7] ९३ ना तरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन । हें असो कैं
स्वप्न । जागतया[10] ९४ एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव[11] उरल
होआवा[12] । तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषमु[13] काई ९५

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः । निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥१९

म्हणोनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म । हें संपूर्ण जाणें वर्म
समदृष्टीचें ९६ जिहीं विषयसंगु न सांडितां । इंद्रियांतें न दंडितां । पारि भो
गिली निसंगता । कामनेविण ९७ जिहीं लोकांचेनि आधारें । लौकिकेंचि[14] व्या
पारें । पारि सांडिलें निदसुरें[15] । लौकिकु हें ९८ जैसा जनामाजि खेचरु[16] । अस
तुचि जना नोहे गोचरु[17] । तैसा शरीरीं पारि संसारु । नोळखे तयांतें ९९ ह
असो पवनाचेनि[18] मेळें । जैसें जळींचि जळ लोळे । तें आणिकें म्हणती वेगळें
कल्लोळ[20] हे १०० तैसें नाम रूप तयाचें । एऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें[21] । मन सा[22]
म्या आलें जयाचें । सर्वत्र गा १ ऐसेनि समदृष्टी जो होये । तया पुरुष
लक्षणही आहे । अर्जुना संक्षेपें सांगेन पाहें । अच्युत म्हणे २

न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् । स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥२०॥

तरी मृगजळाचेनि पूरें । जैसें न लोटिजे कां गिरिवरें[23] । तैसा शुभाशुभीं न
विकरे[24] । पातलिया[25] जो ३ तोचि तो निरुता[26] । समदृष्टी तत्त्वता[27] । हरि म्हणे
पंडुसुता । तोचि ब्रह्म ४

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् । स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥२१॥

जो अर्पणपें[28] सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी[29] येणेंचि नाहीं । तो विषय
न सेवी हें काई । विचित्र[30] येथ ५ सहजें स्वसुखाचेनि अपारें[31] । सुरवाडलेनि[32]
अंतरें[33] । रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घली ६ सांगें कुमुददळाचेनि[34]
ताटें । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें । तो चकोरु काई वाळुवंटें । चुंबितु
असे ७ तैसें आत्मसुख उपाइलें[35] । जयासि आपणपेंचि फावलें[36] । तया विषयो
सहज सांडवले । म्हणों काई ८ एऱ्हवीं तरी कौतुकें । विचारूनि पाहें पां
निकें । या विषयांचेनि सुखें । झकविजेती[37] कवण ९

किंवा अमृत कानावर मृत्यूची वार्ता ऐकत नाहीं ? ९१ हें असो, परंतु ज्याप्रमाणें चंद्र हा उष्मा कसा आहे तें जाणत नाहीं, त्याचप्रमाणें, ज्ञानी जे आहेत, त्यांना प्राणिमात्रांत भेद दिसत नाहीं. ९२

**अन्वयार्थ**—(विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे)—विद्या व विनय यांनी संपन्न असलेल्या ब्राह्मणाचे ठिकाणीं—(गवि)—गायींमध्यें किंवा बैलामध्यें—(हस्तिनि)—हत्तीमध्यें—(शुनि)—कुत्र्यामध्यें—(च श्वपाके)—व चांडालामध्यें—(पण्डिताः)—ब्रह्मज्ञानी—ब्रह्मनिष्ठ—(समदर्शिनः)—समब्रह्म पाहणारे असतात. १८

मग हें मशक किंवा हा हत्ती, तसाच हा अंत्यज किंवा हा ब्राह्मण, तसेंच हा माझा मुलगा किंवा दुसऱ्याचा हें त्यांच्यापाशीं कोठून उरणार ? ९३ ही गाय अथवा हा कुत्रा, एक थोर, एक लहान, अशा तऱ्हेचें द्वैतभावाचें स्वप्न अद्वैतबोधाचे ठिकाणीं जागृत असलेल्या पुरुषांना कोठून पडणार ? ९४ जेथें मीपणा उरला असेल तेथेंच भेद दृष्टीस पडेल; परंतु तो जेथें अजीबात नाहींसा झाला असेल, तेथें भिन्नपणा कोठून असणार ? ९५

**अन्वयार्थ**—(येषां मनः)—ज्यांचें अंतःकरण—(साम्ये)—सर्व भूतांतील साम्यामध्यें—(स्थितं)—स्थित असतें—(तैः)—त्यांनीं—(इह एव)—या शरीरांत असतांनाच—जिवंतपणींच—(सर्गः)—पुढील-जन्म—(जितः)—जिंकला आहे—(हि)—कारण—(ब्रह्म)—अक्षर आत्मतत्त्व—(निर्दोषं)—सर्वदोषशून्य व—(समं)—सर्वत्र सम आहे—(तस्मात्)—म्हणून—(ते)—ते सर्व—(ब्रह्मणि)—ब्रह्मामध्यें—(स्थिताः)—स्थित असतात. १९

म्हणून, ज्याची नेहमीं सर्वत्र सारखी दृष्टि आहे, तो स्वतःच अद्वितीय ब्रह्म आहे; ही समदृष्टीची पूर्ण खूण आहे असें समज. ९६ ज्यानें विषयसंग तर सोडला नाहीं आणि इंद्रियांना दंडही केला नाहीं, असें असून संपूर्ण भोग भोगीत असतांही वासना नसल्यामुळें अकर्तेपणाचा अनुभव घेतला आहे; ९७ ज्यानें लोकांच्या आश्रयानें वागून, आणि सर्व व्यावहारिक व्यापार करूनही लौकिकांत असलेलें अज्ञान सोडून दिलें आहे; ९८ पिशाच्च ज्याप्रमाणें सर्व लोकांत असूनही दिसत नाहीं, त्याप्रमाणें तो पुरुष शरीरधारी असूनही संसार त्याला ओळखीत नाहीं. ९९ हें असो; वाऱ्यामुळें पाण्यांत पाणी उसळतें; पण त्याला ज्याप्रमाणें इतर लोक पाण्याहून वेगळ्या 'लाटा' असें म्हणतात, १०० त्याप्रमाणें, ज्याचें मन सर्व ठिकाणीं-समतेला पावलें आहे. त्याचें शरीर आणि नांव हीं जरी जगाप्रमाणेंच आहेत, तथापि तो साक्षात् ब्रह्मच आहे; १ भगवान् म्हणतातः—अर्जुना, अशी ज्याची समदृष्टि झालेली आहे, त्या पुरुषाचें लक्षणही आहे. तें संक्षेपानें तुला सांगतों; ऐक. २

**अन्वयार्थ**—(प्रियं)—इष्ट वस्तूला किंवा परिस्थितीला—(प्राप्य)—प्राप्त होऊन—(न प्रहृष्येत्)—अतिशय हृष्ट होऊं नये—(च)—आणि तसेंच—(अप्रियं)—अनिष्ट वस्तूला किंवा अवस्थेला—(प्राप्य)—प्राप्त होऊन—(न उद्विजेत्)—उद्विग्न होऊं नये.—(स्थिरबुद्धिः—) ज्याची बुद्धि स्थिर आहे, ब्रह्म निर्दोष व सम आहे, याविषयीं ज्याला संशय नाहीं—(असंमूढः—) त्यामुळें ज्याला संमोह झालेला नाहीं, असा (ब्रह्मवित्)—ब्रह्मवेत्ता—(ब्रह्मणि-ब्रह्मामध्यें—(स्थितः—) अवस्थित असतो. २०

ज्याप्रमाणें मृगजलाच्या पुरानें डोंगर वाहून जात नाहींत त्याचप्रमाणें, जो चांगली किंवा वाईट गोष्ट प्राप्त झाली असतां तिच्यापासून विकार पावत नाहीं, ३ तोच खरा. श्रीहरि म्हणतातः—अर्जुना, त्यानेंच समदृष्टीचें तत्त्व जाणलें; आणि तोच स्वयमेव ब्रह्म होय. ४

**अन्वयार्थ**—(बाह्यस्पर्शेषु)—शब्दादि बाह्यविषयांमध्यें—(असक्तात्मा)—ज्याचें अन्तःकरण सक्त—आसक्त झालेलें नसतें, तो—(आत्मनि)—प्रत्यगात्म्यामध्यें—(यत्)—जें—(सुखं)—स्वरूपभूत सुख असतें—[तत्]—तें—(विन्दति)—अनुभवितो—(सः)—तो—(ब्रह्मयोगयुक्तात्मा:)—ब्रह्मामध्यें जो योग म्ह० चित्ताची स्थिरता—चित्तसमाधान, त्यानें ज्याचें चित्त युक्त आहे असा तो—(अक्षय्यं सुखं)—क्षय न पावणारें—नित्य सुख—(अश्नुते)—अनुभवितो. २१

जो आत्मस्वरूपाला सोडून कधींही इंद्रियाधीन होत नाहीं, तो विषयांचें सेवन करीत नाहीं यांत नवल तें कोणतें ? ५ आत्मसुखाच्या पूर्णतेनें त्याचें अंतःकरण स्वाभाविकतांच संतुष्ट झालेलें असतें, म्हणून तो बाहेर पाऊल घालीत नाहीं. (इंद्रियांकडे त्याचें मन वळत नाहीं.) ६ ज्या चकोर पक्ष्यानें चंद्रविकासी कमलांच्या पानांत उत्तम किरणांचें भोजन केलें आहे, तो वाळवंटांत वाळू विखरीत बसेल काय ? ७ ज्याला आपल्याच ठिकाणीं आत्मस्वरूप प्राप्त झालें आहे, त्याला विषयांचा सहज त्याग झाला हें म्हटलें पाहिजे का ? ८ बाकी या विषयांच्या सुखानें कोण फसले जातात, याचा कौतुकानें आपल्याशीं सहज-चांगला विचार करून पहा ! ९

१ उष्मा. २ माशी, मुरकूट. ३ हत्ती. ४ अंत्यज, चांडाल. ५ परकाकडचा. ६ आपला मुलगा. ७ कोठून. ८ थोर. ९ लहान. १० जागृताला, जागणाराला. ११ मीपणा. १२ असावा, व्हावा. १३ भिन्नपणा, विरुद्धपणा. १४ व्यावहारिक. १५ अज्ञान, मूढता. १६ भूत, समंध. १७ असूनही १८ दृष्टीस पडणें. १९ वाऱ्याच्या. २० तरंग, लाटा. २१ साक्षात्, खरें. २२ समतेला. २३ डोंगरानें. २४ विकार पावणें. २५ प्राप्त झाली असतां. २६ खरा. २७ तत्त्व जाणणारा. २८ आत्मस्वरूपाला. २९ इंद्रियसमुदायाला, इंद्रियाधीनतेला. ३० चमत्कारिक. ३१ अमर्याद. ३२ सुख पावलेल्या. ३३ मनानें. ३४ चंद्रविकासी कमलांच्या. ३५ उत्सुक होऊन. ३६ प्राप्त झालें. ३७ फसवले जातात.

ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते । आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥

जिहीं आपणपें नाहीं देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले । जैसें रंकु कां ऑळुकैलें । तुषांतें सेवी ११० नातरी मृगें तृषापीडितें । संभ्रमें विसरोनि जळांतें । मग तोयबुद्धी बरँडीतें । ठाकूनि येती ११ तैसें आपणपें नाहीं दिठें । जयातें स्वसुखाचे सदा खरांटे । तयासीचि विषय हे गोमटे । आवडती १२ एऱ्हवीं विषयीं सुख आहे । हें बोलणेंचि सारिखें नोहे । तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे । जगामाजी १३ सांगें वातें वर्ष आतपु धरे । ऐसे अभ्रच्छायाचि जरी सरे । तरी त्रिमाळिकें धवळारें । करावीं कां १४ म्हणोनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणतां गा वायां जल्पिजे । जैसें महूर कां म्हणिजे । विषकंदातें १५ नातरी भौमा नाम मंगळु । रोहिणीतें म्हणती जळु । तैसा सुखप्रवादु बरळु । विषयिकु हा १६ हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली । ते शीतल होईल केतुली । मूषकासी १७ जैसा आमिषकवळु पांडवा । मीनु न सेवी तंवचि बरवा । तैसा विषयसंगु हा आघवा । निभ्रांत जाणें १८ हे विरक्तांचिये दिठी । जैं न्याहाळिजे किरीटी । तैं पांडुरोगाचिये पुष्टी- । सारिखें दिसे १९ म्हणोनि विषयभोगीं जें सुख । तें सांघंतचि जाण दुःख । पारि काय कीजे मूर्ख । न सेविता न सरे १२० तें अंतर नेणती बापुडे । म्हणोनि अगत्य सेवणें घडे । सांगें पूयपंकींचे किडे । काय चिळसी घेती २१ तयां दुःखियां दुःखाचि जिव्हार । ते विषयकर्दमींचे दर्दुर । ते भोगजळींचे जलचर । सांडिती केवीं २२ आणि दुःखयोनि जिया आहाती । तिया निरर्थका तरी नव्हती । जरी विषयांवरी विरक्ती । धरिती जीव २३ नातरी गर्भवासादि संकट । कां जन्ममरणींचे कष्ट । हे विसांवेवीण वाट । वाहेवी कवणें २४ जरी विषयीं विषयो सांडिजेल । तरी महादोषीं कें वसिजेल । आणि संसारु हा शब्दु नव्हेल । लटिका जगीं २५ म्हणोनि अविद्याजात नाथिलें । तें तिहींचि साच दाविलें । जिहीं सुखबुद्धी घेतलें । विषयदुःख २६ याकारणें गा सुभटा । हा विचारितां विषय वोखटा । तूं झणें कहीं या वाटा । विसरोनि जाशी २७ पैं यातें विरक्त पुरुष । त्यजिती कां जैसें विष । निराशा तयां दुःख । दाविलें नावडे २८

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् । कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

ज्ञानियांच्या हन ठायीं । याची मातुही कीर नाहीं । देहीं देहभावो जिहीं ।

**अन्वयार्थ**—(हि)–कारण–(ये)–जे–(संस्पर्शजाः–) इंद्रियें व विषय यांच्या संबंधापासून होणारे–(भोगाः)–भोगसुखानुभव–(ते)–ते सर्व–(दुःखयोनयः एव)–दुःखाची बीजेंच आहेत–तसेंच ते–(आद्यन्तवन्तः)–उत्पत्ति व नाश यांनीं युक्त आहेत.–(कौन्तेय)–हे अर्जुना !–(बुधः)–पंडित–तत्त्वज्ञ (तेषु) त्या विषयांमध्यें–(न रमते)–रममाण होत नाहीं. २२

ज्याप्रमाणें दरिद्री भुकेनें व्याकुळ झाल्यावर कोंडा देखील खातो, त्याप्रमाणें, ज्यांनीं आत्मस्वरूपाचा अनुभव घेतला नाहीं, तेच ह्या इंद्रियापासून होणाऱ्या विषयसुखांत रममाण होतात ! ११० किंवा तहानेनें व्याकूळ झालेलीं हरणें भ्रमानें खऱ्या पाण्याला विसरून माळ जमिनीवर उत्पन्न होणाऱ्या उन्हाच्या झळ्यांनाच पाणी असें समजून धावून येतात, ११ त्याप्रमाणें, ज्यांनीं आत्मसुखाचा अनुभव घेतला नाहीं, ज्यांना स्वात्मसुखाचा सदोदित तोटा असतो, त्यांनाच हें विषयसुख चांगलें असें वाटतें ! १२ सहज पाहिलें असतां विषयांत सुख आहे हें म्हणणेंच योग्य नाहीं; तथापि सुख आहे असें धरून चाललें तर मग विजेच्या चमकण्यापासून पडणाऱ्या उजेडांत जगांतील व्यापार कां न व्हावे ? १३ तूं हें सांग की, वारा, पाऊस आणि ऊन यांचें निवारण जर अभ्रांच्या छायेपासून होईल, तर तीन मजली घरें बांधण्याचें कारण तरी काय ? १४ म्हणून, विषाच्या कांद्याला (बचनागाला) ज्याप्रमाणें अज्ञानपणानें गोड म्हणतात, त्याप्रमाणें, विषयांचे ठिकाणीं सुख आहे हें व्यर्थ बडबडणें आहे. १५ किंवा भौम ह्या ग्रहास जसें मंगल हें नांव आहे, परंतु त्याचा अनुभव तसा नाहीं; किंवा मृगजलाला जल म्हणतात, तसें विषयसेवनांत सुख आहे हें म्हणणें व्यर्थ आहे, १६ हें सर्व बोलणें राहूं द्या. परंतु तूं असें सांग की, नागाच्या फणीची छाया उंदराला कितपत सुखावह होईल बरें ? १७ अर्जुना, गळाला लावलेल्या मांसाला मासा तोंड लावीत नाहीं तोंपर्यंतच चांगलें; त्याचप्रमाणें, विषयसंगाचा जोंपर्यंत अनुभव घेतला नाहीं, तोंपर्यंतच तें चांगलें आहे असें वाटतें! १८ हे किरीटी, जेव्हां विरक्ताच्या दृष्टीनें हे विषय पहावे तेव्हां ते पंडुरोग्याच्या पुष्टीसारखे [ निःशक्त असून ] लठ्ठ दिसतात. १९ म्हणून, भोगापासून होणारें जें सुख तें मुळापासून अखेरपर्यंत दुःखच आहे असें समज. परंतु मूर्ख जन काय करतील ? कारण त्याचें सेवन केल्यावांचून त्यांना दुसरी गतीच नाहीं ! १२० त्यांना त्याचें वर्म न समजल्यामुळें त्याचें सेवन करणें भाग पडतें. पूंवांत असणाऱ्या किड्यांना पूंवाची किळस कधीं तरी आली आहे का, सांग बरें ! २१ त्या दुःखितांना दुःखच प्रीय (जीवन) असतें; कारण, ते विषयरूप चिखलांतले बेडूक व विषयोपभोगरूप जलांतील मासे असल्यानें विषयांचें सेवन कसें सोडतील ? २२ जर विषयांचे ठिकाणीं जीवमात्र विरक्ति धरतील, तर जितक्या दुःखदायक योनी आहेत, तितक्या व्यर्थ होणार नाहींत का ? २३ किंवा गर्भवासांत होणारीं दुःखें अथवा जन्ममरणाचे कष्ट यांचे अविश्रांतपणें चालावे लागणारे मार्ग कोणी चालावे ? २४ जर विषयासक्त जनांनीं विषयोपभोग सोडले, तर महादोषांनीं कोठें वस्ती करावी ? आणि मग 'संसार' हा शब्द जगांत खोटा नाहीं का होणार ? २५ म्हणून, जे विषयांच्या भोगांपासून होणाऱ्या दुःखालाच सुख मानतात, ते, 'लटकें' असें जें सर्व अज्ञान तें खरें आहे असें त्यांनीं लोकांस दाखविलें. २६ याकरितां, अर्जुना, विचार करून पाहतां हे विषय फार वाईट आहेत, म्हणून तूं कदाचित् चुकून या मार्गाला जाशील हो ! २७ कारण, जे विरक्त पुरुष आहेत ते या विषयसुखाला विषाप्रमाणें मानून त्याचा त्याग करतातः आणि ते निरिच्छ असल्यामुळें विषयांनीं दाखविलेलें सुखरूपी दुःख त्यांना आवडत नाहीं, २८

**अन्वयार्थ**—(यः)–जो–(इह एव)–जिवंतपणीच–(प्राक् शरीरविमोक्षणात्)–शरीराचा नाश होईपर्यंत–(कामक्रोधोद्भवं वेगं)–काम व क्रोध यांपासून उत्पन्न होणारा वेग—(सोढुं)–सहन करण्यास–(शक्नोति)–समर्थ होतो–(सः)–तो–(युक्तः)–योगी व–(सः)–तो–(सुखी)–सुखी–(नरः)–पुरुष आहे. २३

ज्ञान्यांच्या ठिकाणीं तर निश्चयानें विषयांची वार्ता मुद्दां नसते. कारण ज्यांनीं देहामध्यें असूनही

१ सुखावलें. २ भुकेलेलें. ३ कोंड्याला ४ तहानेलीं. ५ भ्रमानें. ६ पाणी असें मानून. ७ माळ जमिनीवर. ८ अनुभविलें, पाहिलें. ९ तोटा, वाण. १० सुंदर. ११ विजेच्या चमकण्यानें. १२ वारा, पाऊस, ऊन यांचें निवारण. १३ तीन मजली. १४ घरें. १५ बडबडावें. १६ मधूर. १७ बचनागाला. १८ मंगळग्रहाला. १९ मृगजलाला. २० सुख आहे हें, बोलणें. २१ व्यर्थ. २२ उंदराला. २३ मांसाचा घांस. २४ मासा. २५ पंडुरोगाच्या. २६ मुळापासून अखेरपर्यंत. २७ वर्म. २८ पूंवाच्या चिखलांतील. २९ किळस. ३० प्रिय, जिव्हाळा. ३१ विषयरूपी चिखलांतलें. ३२ बेडूक. ३३ वीट. ३४ विश्रांतीवांचून. ३५ चालावी. ३६ सर्व अज्ञान. ३७ लटकें. ३८ वाईट. ३९ जाऊं मात्र नकोस. ४० वार्ता. ४१ देहांतील विकार.

स्ववेश केले २९ जयांतें वाह्योंची भाष। नेणिजेचि निःशेष। अंतरीं सुख।
एक आथि १३० परि तें वेगळेपणें भोगिजे। जैसें पक्षियें फळ चुंबिजे। तैसें
नव्हे तेथ विसरिजे। भोगितेपणेंही ३१ भोगीं अवस्था एक उठी। ते अहंकाराचा
अंचलु लोटी। मग सुखेंसिं घे आंटी। गाढेपणें ३२ तिये आलिंगनमेळीं। होय
आपेंआप कवळी। तेथ जळ जैसें जळीं। वेगळें न दिसे ३३ कां आकाशीं
वायु हारपे। तेथ दोन्ही हे भाष लोपे। तैसें सुखचि उरे स्वरूपें।
सुरतीं तिये ३४ ऐशी द्वैताची भाष जाय। मग म्हणों जरी एकचि होय। तरी
तेथ साक्षी कवणु आहे। जाणते जें ३५

*योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः। स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥२४॥*
*लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः। छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥*

म्हणोनि असो हें आघवें। एथ न बोलणें काय बोलावें। ते खुणाचि
पावले स्वभावें। आत्माराम ३६ जे ऐसेनि सुखें मातले। आपणपांचि आपण
गुंतले। ते मी जाणें निखिळें वोतले। सामरस्याचे ३७ ते आनंदाचे अनुकार।
सुखाचे अंकुर। कीं महाबोधें विकार। केले जैसे ३८ ते विवेकाचे गांव। कीं
परब्रह्मींचे स्वभाव। नातरी अळंकारले अवयव। ब्रह्मविद्येचे ३९ ते सत्त्वाचे
सात्त्विक। कीं चैतन्यींचे आंगिकें। हें बहु असो एकैक। वानिसी काई १४०
तूं संतस्तवनीं रतसी। तरी कथेची से न करिसी। कीं निरोळीं बोल देखसी।
सनोंगर ४१ पारि तो रसातिशयो मुकुळीं। मग ग्रंथार्थदीपु उजळीं। करी
साधुहृदयरोउळीं। मंगळउखा ४२ ऐसा श्रीगुरूचा उवायिला। निवृत्तीदा-
सासी पातला। मग तो म्हणे श्रीकृष्ण बोलिला। तेंचि आइका ४३ अर्जुना
अनंत सुखाच्या डोहीं। एकसरा तळुचि घेतला जिहीं। मग स्थिराउनि तेही।
तेंचि जाहले ४४ अथवा आत्मप्रकाशें चोखे। जो आपणपेंचि विश्व देखे। तो
देहेंचि परब्रह्म सुखें। मानूं येईल ४५ जें सांचोकारें परम। ना तें अक्षर
निःसीम। जिये गांवींचे निष्काम। अधिकारिये ४६ जें महर्षी वाढलें। विरक्तां
भागा फिटलें। जें निःसंशया पिकलें। निरंतर ४७

*कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम्। अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥*

जिहीं विषयांपासोनि हिरतलें। चित्त आपुलें आपण जिंतिलें। ते निश्चित
जेथ सुतले। चेतीचिनों ४८ तें परब्रह्म निर्वाणें। जें आत्मविदांचें कारण।

हृधर्म आपल्या ताब्यांत ठेविले आहेत. २९ ज्यांना तर्यामीं आत्मसुखाचा लाभ झाला आहे, ते विषयांची ष्ट देखील जाणत नाहींत. १३० परंतु त्या आत्मसुखाचा उपभोग घेण्याची रीत निराळी आहे. कशी? तर से पक्षी फळाची रुची घेत असतां त्या ठिकाणीं भोक्ता, भोग्यवस्तु आणि भोग ही त्रिपुटी असते, तशी नसून, त्या ठिकाणीं ते भोक्तेपणही विसरतात. ३१ आत्मसुखाचा भोग घेण्याकरितां जी एक वृत्ति उत्पन्न होते, ती अहंकाराचा नाश करिते, व मग दृढपणानें सुखाला आलिंगन देते; (आपण सुखरूप बनते;). ३२ आणि त्या आलिंगनाचे भरांत आपोआप एकरूपता होऊन जाते. ज्याप्रमाणें पाणी पाण्यांत मिसळल्यावर वेगळें दिसत नाहीं; ३३ किंवा आकाशांतील वायु नाहींसा झाल्यावर त्या ठिकाणीं आकाश आणि वायु हा भेद नाहींसा होतो, त्याप्रमाणें वृत्ति व आत्मा यांच्या ऐक्यांत फक्त सुखच उरतें. ३४ याप्रमाणें ज्या वेळेस दुजेपणा नाहींसा होऊन एकत्व प्राप्त होतें त्यावेळी एकत्वाला जाणणारा तरी दुसरा साक्षी कोण आहे? ३५

**अन्वयार्थ**—(यः)–जो–(अंतःसुखः)–अन्तरात्म्यामध्येंच ज्यानें सुख आहे, असा व–(अन्तरारामः)–आत्म्यामध्येंच ज्याचा आराम–आक्रीडा–करमणूक आहे–(तथा)–त्याचप्रमाणें–(यः)–जो–(अन्तर्ज्योतिः एव)–आत्मा हीच ज्याची ज्योति–प्रकाश आहे–(सः)–तो–(योगी)–आत्मनिष्ठ–(ब्रह्मभूतः) [सन्]ब्रह्मरूप होऊन–(ब्रह्मनिर्वाणं)–ब्रह्मामध्यें निर्वाणास–मोक्षास–(अधिगच्छति)–प्राप्त होतो. २४–(क्षीणकल्मषाः)–ज्यांचे पापादि दोष क्षीण झाले आहेत–(छिन्नद्वैधाः)–ज्यांचें सर्व संशय तुटले आहेत–(यतात्मानः)–ज्यांनीं इंद्रियांचें नियमन केलें आहे व जे–(सर्वभूतहिते रताः)–सर्व प्राण्यांच्या हितामध्यें रत आहेत, असे–(ऋषयः)–ज्ञानी–तत्त्ववेत्ते–संन्यासी–(ब्रह्मनिर्वाणं)–ब्रह्मामध्यें निर्वाण–(लभन्ते)–पावतात. २५

म्हणून, हें सर्व राहूं द्या. कारण, येथें (अनुभवाशिवाय) न बोलतां येणारी गोष्ट ती नुसती बोलून काय उपयोग? जो स्वतः आत्मस्वरूपी झाला, त्यालाच त्याची खूण सहज समजेल; ३६ अशा सुखानें जे परिपूर्ण झाले, आणि स्वस्वरूपांत जे निमग्न होऊन राहिले, ते तद्रूप होऊन ब्रह्मानंदाचे निखालस पुतळेच ओतले आहेत, असें मी समजतों; ३७ ते आनंदाचे पुतळे, स्वरूपसुखाचे अंकूर, किंवा आत्मबोधाचें क्रीडास्थानच होत. ३८ ते विचाराचें गांव, परब्रह्माचे स्वभाव, इतकेंच नव्हे, तर ते ब्रह्मविद्येनें सुशोभित केलेलें अवयवच होत. ३९ ते सत्त्वाचेही सात्त्विक किंवा चैतन्याचेंच रूप आहेत. असें महाराज त्यांचें वर्णन करण्याच्या भरांत असतां, श्रीगुरु निवृत्तिनाथ म्हणतात, हें असूं दे, त्या पुरुषांचें किती वर्णन करशील? १४० तूं साधुजनांची स्तुति करूं लागलास म्हणजे तुला कथेची आठवणसुद्धां रहात नाहीं. व तूं निर्गुण ब्रह्माचें रसाळ वर्णन करण्याकडे लक्ष देतोस. ४१ परंतु आतां ती स्तुति पुरे कर, आणि गीतार्थरूपी दीप उजळून साधुजनांच्या हृदयमंदिरांत मंगलदायक ज्ञानाचा प्रकाश पाड. ४२ याप्रमाणें निवृत्तिदासाला गुरूंचा इषारा मिळाल्यावर मग ते म्हणाले कीं, कृष्ण काय बोलले तेंच ऐका. ४३ अर्जुना, आत्मसुखाच्या डोहांत ज्यांनीं एकदम तळाशींच बुडी दिली आहे, ते तेथेंच स्थिर होऊन आत्मस्वरूपच बनले; ४४ किंवा आत्म्याच्या निर्मळ प्रकाशानें जो आपल्या ठिकाणींच विश्व पाहतो, तो देहामध्यें असूनही परब्रह्म झाला असें खुशाल मानतां येईल. ४५ जें खरोखर अति उत्तम, अविनाशी व अमर्याद असें ब्रह्मसुख, त्याचे निरिच्छ पुरुषच अधिकारी होत ४६ तें सुख महर्षींकरितांच राखून ठेविलें; विरक्तांच्याच वांटणीस आलें: आणि तें निसंदेह जीवांकरितांच निरंतर पिकलें आहे. ४७

**अन्वयार्थ**—(कामक्रोधवियुक्तानां)—काम व क्रोध यांनीं रहित असलेल्या–(यतचेतसां)–चित्ताचें संयमन केलेल्या–(विदितात्मनां)–आत्म्याला साक्षात् जाणलेल्या–(यतीनां)–संन्याश्यांना–(ब्रह्मनिर्वाणं)–मोक्ष–(अभितः)–जिवंतपणीं व मेल्यावरही–(वर्तते)–असतो. २६

ज्यांनीं आपलें मन विषयांपासून माघारें घेऊन जिंकलें आहे, ते जेथें निजले तेथून निश्चयानें जागे होत नाहींत (ते ब्रह्माकार होऊन देहभानावर येत नाहींत.) ४८ हे पंडुकुमरा, ते पुरुष म्हणजे, आत्मज्ञान्याचें कारण

---

१ आपल्या स्वाधीन. २ बाहेरील. ३ आंत. ४ मी भोक्ता हैंही. ५ इच्छा, वृत्ति. ६ पदर, पडदा. ७ आलिंगन. ८ दृढतेनें. ९ एकरूपता. १० ऐक्यांत. ११ आत्मवेत्ता पुरुष. १२ परिपूर्ण झाले. १३ स्वस्वरूपानें. १४ निखालस, सर्व. १५ ब्रह्मानंदाचे. १६ स्वरूप, प्रतिमा. १७ आत्मज्ञानाचे. १८ जीवात्म्याचे. १९ अंगचे शरीरावयव, ठसे. २० वर्णन करितोस. २१ निराकार स्वरूप. २२ अति चांगलें. २३ स्तुति. २४ पुरे करा, आटोपा. २५ सत्पुरुषांच्या हृदयमंदिरांत. २६ कल्याणकारक पहांट. २७ अभिप्राय. २८ एकदम. २९ स्थिर होऊन. ३० खरोखर. ३१ अविनाशी. ३२ निरिच्छ. ३३ हिरावून घेतलें. ३४ निजलें. ३५ जागे होतच नाहींत. ३६ मोक्षपद. ३७ आत्मज्ञान्यांचें.

तेंचि ते पुरुष जाण। पंडुकुमरा ४९ ते ऐसे कैसेनि जहाले। जे देहींचि ब्रह्मत्वा आले। हें पुससी तरी भलें। संक्षेपें सांगों १५०

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः। प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥ २७॥
यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः। विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥

तरी वैराग्याचेनि आधारें। जिहीं विषय दवडूनि बाहिरें। शरीरीं एकंदरें। केलें मन ५१ सहजें तिहीं[१] संधी भेटी[२]। जेथ भ्रूपल्लवा[३] पडे गांठी। तेथ पाठिमोरी दिठी। पारुखोनियां[४] ५२ सांडूनि दक्षिण[५] वाम। प्राणापानसम। चित्तेसीं व्योम[६]-। गामिये करिती ५३ तेथ जैसीं रथ्योदकें सकळें। घेऊनि गंगा समुद्रीं मिळे। मग एकेक वेगळें। निवडूं नये ५४ तैसी वासनांतराची विवंचना। मग आपैसी पारुखे अर्जुना। जे वेळीं गगनीं[१२] लयो मना। पवनें कीजे ५५ जेथ हें संसारचित्र उमटे। तो मनोरूप पैठु[१३] फाटे। जैसें सरोवर आटे। मग प्रतिभी[१४] नाहीं ५६ तैसें मन एथ मुद्दल जाय। मग अहंभावादिक कें आहे। म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये। अनुभवी तो ५७

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्। सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥ २९ ॥
इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे संन्यासयोगो नाम पञ्चमोऽध्यायः ५

आंम्हीं मागां हन सांगितलें। जे देहींचि ब्रह्मत्व पावले। ते येणें मार्गें आले। म्हणऊनियां ५८ आणि यमनियमांचे[१५] डोंगर। अभ्यासाचे सागर। क्रमोनि हें पार। पातले ते ५९ तिहीं आपणपें करूनि निर्लेप[१६]। प्रपंचाचें घेतलें मोप। मग साचाचेंचि रूप। होऊनि ठेले १६० ऐसा योगयुक्तीचा उद्देशु[१७]। जेथ बोलिला हृषीकेशु। तेथ अर्जुनु सुदर्शु[१८]। म्हणोनि चमत्कारला[१९] ६१ तें देखिलिया कृष्णें जाणितलें। मग हांसोनि पार्थातें म्हणितलें। काइ पां चित्त उवाइलें[२०]। इये बोलीं तुझें ६२ तंव अर्जुन म्हणे देवो। परचित्तलक्षणांचा[२१] रावो। भला जाणितला जी भावो। मानसु माझा ६३ म्यां जें कांहीं विवरूनि[२२] पुसावें। तें आधींचि जाणितलें देवें। तरी बोलिलें तेंचि सांगावें। विवळ[२३] करूनि ६४ एऱ्हवीं तरी अवधारा। जो दाविला तुम्हीं अनुसारा[२४]। तो पव्हण्याहूनि[२५] पायउतारा। सोहपा जैसा ६५ तैसा सांख्याहूनि[२६] प्रांजळा[२७]। आम्हांसारिखियां अभोळीं[२८]। एथ आहाति परि कांहीं काळा। तो साहों ये वर ६६ म्हणोनि एक वेळ देवा। तोचि पडतोळा[२९] घेयावा। विस्तरेल तरी सांगावा। सायंतुचि ६७ तंव

जें कैवल्य परब्रह्म तेंच होत. ४९ ते असे कशानें झाले आणि देहांत असतां ब्रह्मत्वास कशानें पावले, हें तूं विचारशील, तर तुला संक्षेपानें सांगतों; ऐक. १५०

**अन्वयार्थ**--(यः मुनिः)-जो मुनि-संन्यासी-( बाह्यान् स्पर्शान्)-शब्दस्पर्शादि बाह्य विषयांस-(बहिः एव कृत्वा)-बाहेरच करून-(च)-आणि-( चक्षुः )-चक्षुरिन्द्रिय-(भ्रुवोः अन्तरे कृत्वा)-दोन्ही भुवयांच्या मध्यें करून-(नासाभ्यन्तरचारिणौ )-नासिका व कंठादि आभ्यंतरभाग यांत संचार करणारे-(प्राणापानौ)-प्राण व अपान हे वायु-(समौ)-सम-तुल्य (कृत्वा)-करून-(यतेंद्रियमनोबुद्धिः)-ज्यानें इंद्रियें, मन व बुद्धि यांना नियमित केलें आहे, त्यांचा निरोध केला आहे -(मोक्षपरायणः )-जो मोक्षपरायण झाला आहे-(विगतेच्छाभयक्रोधः)-इच्छा, भय व क्रोध ज्याच्यापासून निघून गेले आहेत-(सः)-असा तो-( सदा )-सर्वदा-(मुक्तः एव)-मुक्तच आहे. २७-२८

तर वैराग्याच्या आधारानें विषयांना बाहेर घालवून जे शरीराचे ठिकाणीं आपलें मन एकनिष्ठ करतात, ५१ इडापिंगला सोडून व सुषुम्नेमध्यें प्राण नेऊन, ललाटचंक्रामध्यें स्वरूपाकडे दृष्टि माघारी फिरवून स्थिर करतात; ५२ डावी आणि उजवी नाकपुडी सोडून प्राण व अपान या वायूंस एक करून चित्ताला चिदाकाशांत नेतात, ५३ मग रस्त्यावरील ( बरें वाईट ) सर्व प्रकारचें उदक घेऊन गंगा समुद्रास मिळाल्यावर ज्याप्रमाणें त्यांतून रस्त्यावरील उदक वगैरे वेगळें निवडितां येत नाहीं, ५४ त्याप्रमाणें; अर्जुना, ज्या वेळेस चिदाकाशांत मनाचा प्राणाच्या निरोधानें लय होतो, त्या वेळीं वासनांचा विचार आपोआप नाहींसा होतो. ५५ ज्या मनोरूप पटावर हें संसाररूपी चित्र उमटलेलें असतें, तो पट आपोआप फाटतो. ज्याप्रमाणें सरोवर आटल्यावर त्यांत प्रतिबिंब दिसत नाहीं, ५६ त्याप्रमाणें, जेथें मुद्दल मनच नाहींसें होतें तेथें अहंकार इत्यादि कोठून राहणार ? म्हणूनच, ब्रह्मस्वरूपाचा अनुभव घेणारा तो शरीरानेंच ब्रह्म होतो. ५७

**अन्वयार्थ**--(यज्ञतपसां)-यज्ञ व तपश्चर्या यांच्या-(भोक्तारं)-भोक्त्यास-(सर्वलोकमहेश्वरं)-सर्व लोकांच्या महान् ईश्वरास-(सर्वभूतानां सुहृदं)-सर्व भूतांच्या निरपेक्ष उपकारकास-(मां)-मला-(ज्ञात्वा)-जाणून-(शान्ति)-सर्व संसाराच्या शांतीस-(ऋच्छति)-प्राप्त होतो. २९

जिवंतपणीच कांहीं लोक ब्रह्म झाले म्हणून आम्ही पूर्वी तुला सांगितलें, ते तरी या योगमार्गानें आले म्हणूनच; ५८ आणि म्हणूनच ते यमनियमरूपी योगमार्गाचे डोंगर व योगाभ्यासरूप सागर ओलांडून पार झाले; ( ब्रह्मत्व पावले; ) ५९ आणि त्यांनींच आपल्या स्वतःला उपाधिरहित करून प्रपंच आजमावला, म्हणून ते स्वतः खऱ्या ब्रह्माचें स्वस्वरूप बनून राहिले. १६० याप्रमाणें जेव्हां श्रीकृष्णांनीं योगयुक्तीचा अभिप्राय प्रदर्शित केला, तेव्हां, अर्जुन मार्मिक होता म्हणून त्याला मोठा चमत्कार वाटला. ६१ हें पाहून कृष्ण त्याच्या मनांतील उद्देश जाणून हास्यवदनानें पार्थास म्हणाले, " मी जें सांगितलें, त्यामुळें तुझें मन कां बरें प्रसन्न झालें ? " ६२ तेव्हां अर्जुन म्हणतो, " देवा, दुसऱ्याच्या मनांतील अभिप्राय जाणणारांचे तुम्ही राजे आहां, यामुळें माझ्या मनांतील भाव तुम्ही चांगला जाणला. ६३ देवा, मी जें कांहीं तुम्हांस विचारपूर्वक पुसावें, तें तुम्ही आधींच जाणलें; तर तुम्ही जें कांहीं म्हणतां, तें अधिक स्पष्ट करून सांगा. ६४ बाकी योगशास्त्राचा जो मार्ग तुम्ही सांगितला, तो कसा आहे म्हणाल तर, खोल पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां पायउतार जसा सोपा असतो तसा आहे. ६५ त्याचप्रमाणें, ज्ञानयोगापेक्षां अष्टांगयोग आमच्यासारख्या निर्बळांना सुगम आहे; परंतु तो कांहीं काळाच्या अवधीनें साध्य होणारा असला तरी चालेल. ६६ म्हणून, देवा, तो योग आणखी एक वेळ सांगावा. आतां अज्ञानें विस्तार होईल खरा; पण तो सांयंत सांगाव. " ६७ तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले—" असें का ? तुला हा

१ एकनिष्ठ, एकत्र, एकाग्र. २ इडा, पिंगला व सुषुम्ना या तिहींची जेथें भेट होते तेथें. ३ भिवयांच्या टोकांची. ४ माघारी फिरवून. ५ उजवी व डावी नाकपुटीचे मार्ग. ६ ब्रह्मांड, चिदाकाश. ७ जाणारे. ८ रस्त्यावरील उदकें. ९ इतर वासनांची. १० विचार. ११ नाहींशी होते. १२ चिदाकाशांत. १३ वस्त्र. १४ प्रतिबिंब. १५ यम, नियम, आसन, धारणा इत्यादि योगमार्गाचे. १६ उपाधिरहित. १७ अभिप्राय. १८ मार्मिक, ज्ञाता. १९ चमत्कार वाटला. २० प्रसन्न झालें. २१ दुसऱ्याच्या मनोगताचा जाणता. २२ विचार करून. २३ स्पष्ट. २४ मार्ग. २५ खोल पाण्यांतून पोहून जाण्यापेक्षां. २६ ज्ञानयोगापेक्षां. ( अष्टांगयोग ) २७ सुगम, सोपा. २८ निर्बळाला. २९ अनुभव, पर्यायानें सांगणें.

श्रीकृष्ण म्हणती हो कां । तुज हा मार्गु गमला निको । तरी काय [२]जाहलें आइकी जो कां । सुखें बोलों ६८ अर्जुना तूं परिससी । परिसोनि [३]अनुष्ठिसी । तरी आम्हांसीचि वोंनी कायसी । सांगावयाची ६९ आर्धींचि चित्त मायेचें । वरी [५]मिषें जाहलें [६]पढियंतयांचें । आतां तें अद्भुतपण स्नेहाचें । कवण जाणे १७० तें म्हणों कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवँया स्नेहाची सृष्टि । हें असो नेणिजे दृष्टी । हरीची वानूं ७१ जे अमृताची वोतली । कीं प्रेमचि पिऊन मातली । म्हणोनि अर्जुनमोहें गुंतली । निघों नेणे ७२ हें बहु जें जें जल्पिजेल । तेथें कथेसि फांकुं होईल । पारि तें स्नेहरूपा न येल । [११]बोलवेंरी ७३ म्हणोनि [१२]विसुरों काय येणें । तो ईश्वरु [१३]कवेंळावा कवणें । जो आपुलें [१४]मोंन नेणें । आपणचि ७४ तरी मागील [१५]ध्वनींआंतु । मज गमला [१६]सावियांची मोहितु । जे बलात्कारें असे म्हणतु । परिस बापा ७५ अर्जुना जेणें जेणें भेदें । तुझें कां चित्त बोधें । तैसें तैसें विनोदें । निरूपिजेल ७६ तो [१७]काईसया नाम योगु । तयाचा कवण उपेगु । अथवा अधिकारप्रसंगु । कवणा येथ ७७ ऐसें जें जें कांहीं । [१९]उक्त असे इये ठाईं । तें आघवेंचि पाहीं । सांगेन आतां ७८ तूं चित्त देऊनि अवधारीं । ऐसें म्हणोनि श्रीहरी । बोलिजेल ते पुढारी । कथा आहे ७९ श्रीकृष्ण अर्जुनासी [२०]संगुं । न [२१]सांडोनि सांगेल योगु । तो [२२]व्यक्त करूं प्रसंगु । म्हणे निवृत्तिदासु १८०

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ श्लोक २९. ओंव्या १८०.

---

योगमार्ग चांगला आवडला असला तर सांगायला आमचें काय जातें, आम्ही आनंदानें सांगूं, खुशाल ऐक. ६८ अर्जुना, तूं जर ऐकत असशील आणि त्याप्रमाणें आचरणहि करशील, तर आम्हीं तुला सांगण्याची कमतरता कां करावी?" ६९ या श्रीकृष्णार्जुनांच्या बोलण्यावर ज्ञानेश्वर महाराज उत्प्रेक्षा करितात-अगोदर आईचें चित्त, आणि त्यांत आवडत्या मुलाचें निमित्त झालें, तर त्या ठिकाणच्या स्नेहाचा अद्भुतपणा कोण जाणील! १७० त्या स्नेहाला कारुण्यरसाची वृष्टि झाली, किंवा अद्भुत स्नेहाची सृष्टीच निर्माण झाली असें म्हटलें तरी चालेल; परंतु हें असो, भगवंताच्या कृपादृष्टीचें कोणीं वर्णन करावें! ७१ ती दृष्टि अमृताच्या मुशींतच ओतली किंवा प्रेम पिऊन उन्मत्त झाली, म्हणून अर्जुनाच्या मोहांत गुंतून तिला बाहेर निघतां येईना. ७२ हिच्याबद्दल जों जों जास्त बोलावें, तों तों कथेचें विषयांतर होईल; तथापि श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या स्नेहाचें वर्णन शब्दानें करतां येणार नाहीं. ७३ ज्या ईश्वराला स्वतः आपलें माप करतां येत नाहीं त्या ईश्वराला कोणीं जाणावें? म्हणून हा विचार करीत बसण्यांत काय अर्थ आहे! ७४ परंतु मागें सांगितलेल्या अभिप्रायावरून मला असें वाटतें कीं, प्रस्तुत तो अर्जुनाविषयीं फार मोहित झाला आहे; कारण अर्जुनाला आग्रह करून, ऐक असें म्हणत आहे. ७५ अर्जुना, ज्या ज्या प्रकारानें तुझ्या मनाला बोध होईल, त्या त्या प्रकारानें तुला कौतुकानें आम्हीं हा योगमार्ग सांगूं. ७६ त्या योगाला काय म्हणतात, त्याचा उपयोग कोणता, आणि तो आचरण्यास अधिकारी कोण, ७७ असें जें जें, कांहीं या संबंधानें योग्य असेल, तें सर्व आतां तुला आम्ही सांगतों, ७८ म्हणून तूं चित्त देऊन ऐक. असें बोलून श्रीहरींनी जें कांहीं सांगितलें, ती कथा पुढें (पुढील अध्यायांत) आहे. ७९ निवृत्तिदास ज्ञानेश्वर महाराज म्हणतात कीं, द्वैत कायम ठेवून श्रीकृष्णांनीं अर्जुनाला जो योग सांगितला, तो आम्ही स्पष्ट करून सांगतों. १८०

१ चांगला. २ कां घाबरलास. ३ आचरशील. ४ न्यूनता, उणीव. ५ निमित्त. ६ आवडत्या मुलाचें. ७ अद्भुत. ८ वर्णन करूं. ९ जास्त बोलावें. १० विषयांतर. ११ शब्दानें. १२ विचार. १३ जाणावा. १४ प्रमाण. १५ सूचित अभिप्राय. १६ सहज. १७ कोणत्या. १८ उपयोग. १९ योग्य, सांगण्याजोगें. २० सहवास, संबंध. २१ द्वैत कायम ठेवून. २२ स्पष्ट.

---

पुढील अध्यायांतील सकल संसारदुःख निवृत्त करणारा ब्रह्मविद्यायोग भाग्यवानावांचून प्राप्त होत नाहीं. अशी स्थिति असतां, व्यासांच्या अनुग्रहानें युद्धांत होणारी हकीकत संजयास कळून तो धृतराष्ट्रास सांगत असतां, व ब्रह्मविद्या सांगण्याच्या उद्देशानें श्रीकृष्णार्जुन युद्धामध्यें गेले नसतां, आणि श्रीकृष्णार्जुन या उभयतांचा निकट संबंध असतांही अर्जुनास ब्रह्मविद्येचें उपोषण होतें, म्हणून अर्जुनास मोह उत्पन्न होऊन तो श्रीकृष्णास शरण गेला, तेव्हां त्याच्या मोहनिवृत्तीकरितां ब्रह्मविद्या सांगण्याचा श्रीकृष्णास सहजच प्रसंग आला; त्यामुळें अर्जुनाचें ब्रह्मविद्याउपोषणाचें पारणें फिटलें; तेव्हां तो ब्रह्मविद्याश्रवणाचा लाभ संजय व धृतराष्ट्र यांस पाहुण्याप्रमाणें अनायास प्राप्त झाला.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सहावा.

मग रायाते म्हणे संजयो । तोचि अभिप्रावो अवधारिजो । कृष्ण सांगती आतां जो । योगरूप १ सहजें ब्रह्मरसाचें[२] पारणें । केलें अर्जुनालागीं नारायणें । कीं तेंचि अवसरीं[३] पाहुणे । पातलों आम्ही २ कैसी दैवाची आगळिक नेणिजे । जैसें तान्हेलिया तोयें[४] सेविजे । कीं तेंचि चवी[५] करूनि पाहिजे । तंव अमृत आहे ३ तैसें आम्हां तुम्हां जाहलें । जें आंडमुठीं[६] तत्त्व[७] फावलें । तंव धृतराष्ट्रें[८] म्हणितलें । हें न पुसों तूतें ४ तया संजया येणें बोलें । रायाचें हृदय चोजवलें[१०] । जें अवसरीं आहे घेतलें । कुमरांचिया ५ हें जाणोनि मनीं हांसिला । म्हणे म्हातारा मोहें[११] नाशिला । एऱ्हवीं बोलु[१२] तरी भला जाहला । अवसरीं इये ६ परि तें तैसें कैसेनि होईल । जात्यंधु[१३] कैसें पाहेल[१४] । तेवींचि ये रुसे[१५] घेईल । म्हणोनि बिहे ७ पारी आपण चित्तीं आपुला । निकियेंपरी[१६] संतोषला । जे तो संवादु[१७] फावला । कृष्णार्जुनांचा ८ तेणें आनंदाचेनि धौलेपणें । साभिप्राय[१९] अंतःकरणें । आतां आंदरेंसीं[२०] बोलणें । घडेल तया ९ तो गीतेमाजि षष्ठींचें[२१] । प्रसंगु असे आयणीचा[२२] । जैसा क्षीरार्णवीं[२३] अमृताचा । निवाडु जाहला १० तैसें गीतार्थाचें सार । जें विवेकसिंधूचे पार । नाना योगविभवें[२४]भांडार । उघडलें कां ११ जें आदिप्रकृतीचें[२५] विसंवणें[२६] । जें शब्दब्रह्मासि[२७] न बोलणें । जेथूनि गीतावल्लीचें[२८] ठाणें[२९] । प्ररोहो[३०] पावे १२ तो अध्याय सहावा । वारि साहित्याचिया[३१] बरवा । सांगिजेल म्हणोनि परिसावा । चित्त देउनी १३ माझा मराठाचि[३२] बोलु कौतुकें । पारि अमृतातेंही पैजां[३३] जिंके । ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन १४ जिये कोंवळिकेचेनि[३४] पाडें । दिसती नादींचे[३५] रंगें[३६] थोडे । वेधें परिमळाचें[३७] बीकें[३८] मोडे । जयाचेनि १५ ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होति जिभा । बोलें इंद्रियां लागे कळंभा[३९] । एकमेकां १६ सहजें शब्दु तरी विषो[४०] श्रवणाचा । पारि रसना म्हणे हा रसु आमुचा । घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल १७ नवल बोलतीये रेखेची[४१] वाहणी[४२] ।

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सहावा.

मग संजय धृतराष्ट्रास म्हणाला, "राजा, आतां भगवान् योगाबद्दल जो आपला अभिप्राय सांगतील तोच ऐक. १ संजय ब्रह्मविद्येची व आपल्या भाग्याची थोरवी धृतराष्ट्राजवळ अतीव आंध्यांत वर्णन करितो. नारायणांनीं अर्जुनाला सहज ज्ञानरसाचें पारणें केलें तों तेच वेळीं आम्ही तेथें पाहुणे म्हणून गेलों होतों. २ दैवाची थोरवी काय वर्णावी ! तहान लागलेल्या मनुष्यानें पाणी पिण्याकरितां म्हणून पाण्याचें भांडें तोंडीं लावावें, व तें चाखून जों पाहातो तों तें अमृतच असावें, ३ त्याचप्रमाणें राजा, एकादी आडगिन्हाइकीं मूल्यवान् वस्तु थोडक्यांत प्राप्त होते, त्याप्रमाणें मला व तुला परमात्मतत्त्व प्राप्त झालें." परंतु धृतराष्ट्र संजयाला म्हणाला कीं, "तुला ब्रह्मरसाबद्दल मी कांहीं विचारीत नाहीं !" ४ ह्या बोलण्यावरून धृतराष्ट्र राजाचें मन पुत्रांची हकीकत ऐकण्याविषयीं उत्कंठित झालें आहे असें संजयानें जाणलें; ५ हें जाणून तो मनांत विस्मय पावला आणि म्हणाला; अरे ! अरे ! " हा वृद्ध धृतराष्ट्र पुत्रवात्सल्यानें अगदीं वेडावला आहे; एऱ्हवीं येथपर्यंतचा कृष्णार्जुनांचा संवाद अति उत्तम झाला. ६ परंतु या संवादाची गोडी याला कोठून लागणार ? कारण जो जन्मांध आहे त्याला कसें दिसेल ? परंतु याला असें स्पष्ट बोलावें, तर राग येईल, म्हणून संजय भीतीनें स्पष्ट बोलला नाहीं. ७ तथापि श्रीकृष्णार्जुनांच्या परस्पर संवादापासून तो आपल्या मनांत उत्तम प्रकारें संतोषित झाला. ८ ह्या आनंदाच्या तृप्तीनें व प्रफुल्लित अंतःकरणानें तो आतां मोठ्या आदरानें धृतराष्ट्राला अभिप्राय सांगेल. ९ क्षीरसागराचें मंथन करतांना जशी अमृताची प्राप्ति झाली त्याचप्रमाणें गीतेमध्यें सहाव्या अध्यायाचा प्रसंग उत्तम असून तो बुद्धीनें जाणावयाचा आहे. १० तो अध्याय गीतार्थाचें सार होय, व आत्मानात्मविचाररूपी समुद्राची पैलथडी होय; अथवा जणुंकाय योगसंपत्तीचा जामदारखानाच उघडला आहे. ११ जें आदिमायेचें विश्रांतिस्थान, व ज्याठिकाणीं वेदांनाही मौन धारण करावें लागतें, आणि ज्यापासून गीतारूप वेलीला अंकूर फुटला. १२ तो हा सहावा अध्याय सर्व अलंकारादि साहित्यांनीं परिपूर्ण असा सांगेन, तो चित्त देऊन ऐका. अशी महाराज संतांना विनंति करितात. १३ माझे बोल शुद्ध प्राकृत आहेत खरे; परंतु ते प्रतिज्ञेनें सहज अमृतालाही जिंकतील अशा गोड अक्षरांनीं मी सांगेन. १४ त्या बोलांच्या मृदुपणानें सप्तस्वरांपासून होणारा आनंदही कमी असा भासेल, किंवा त्यांच्या छंदानें सुवासही कमीपणा पावेल. १५ पहा कीं, गोडीच्या आशेनें कानालाच जिव्हा फुटतील, व इंद्रियें आपापसांत कलह करूं लागतील. कां कलह करतील तर—१६ शब्दविषय, सहज पाहिलें तर कानाचा आहे; परंतु जीभ, हा रस आमचा आहे असें म्हणेल, व नाकालाही हा आमचा गंध विषय आहे, असा भास होण्याला कारण, हा शब्दविषयच होईल. १७ यापेक्षां आणखी नवल कोणतें,

---

१ धृतराष्ट्राला. २ आत्मानात्मज्ञानरसाचें. ३ समर्या ४ पाणी. ५ चाखून. ६ आडगिन्हाइकी. ७ ब्रह्म. ८ प्राप्त झालें. ९ जाणवलें, समजलें. १० पुत्रांची चांगली हकीकत. ११ पुत्रवात्सल्यानें. १२ संवाद. १३ जन्मांधाला. १४ उजाडेल, उजाडावें. १५ रुष्ट होईल. १६ उत्तम प्रकारें, चांगल्या रीतीनें. १७ परस्परें प्रश्नोत्तररूप संभाषणाचा लाभ झाला. १८ वृत्तीनें १९ प्रसन्नांतरच्या अर्थासह. २० आदरानें. २१ सहाव्या अध्यायाचा. २२ चतुरपणाचा. २३ क्षीरसागराचें मंथन करतांना. २४ योगसंपत्तीचा जामदारखाना. २५ आदिमायेचें २६ विश्रांतिस्थान. २७ वेदाला. २८ गीतारूप वेलीचें. २९ स्वरूप. ३० अंकूर. ३१ सर्व कौशल्याच्या उपसंहारासहित. ३२ प्राकृत, साधा. ३३ प्रतिज्ञेनें. ३४ मृदुतेच्या. ३५ सप्तसुरांचे. ३६ आनंद. ३७ सुवासाचें. ३८ बळ. ३९ कलह. ४० विषय. ४१ कवित्वाचा. ४२ पद्धत, सरणी.

देखतां डोळा पुरों लागे धणी । ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे १८
जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवें बाहिरें । बोलु भुजाही आविष्करें ।
आलिंगावया १९ ऐशीं इंद्रियें आपुलालिया भावीं । झोंबती परि तो सरिसे-
पणेंचि बुझावी । जैसा एकला जग चेववी । सहस्रकरु २० तैसें शब्दाचें व्याप-
कपण । देखिजे असाधारण । पाहातयां भावज्ञां फावती गुण । चिंतामणीचे
२१ हें असो तया बोलांचीं ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरिलीं । ही प्रति-
पत्ति मियां केली । निष्कामासी २२ आतां आत्मप्रभा निच नवी । तेचि क-
रूनि ठाणदिवी । जो इंद्रियांतें चोरूनि जेवी । तयासीचि फावे २३ येथ
श्रवणाचेनि पांगें-। वीण श्रोतयां होवावें लागे । हे मनाचेनि निजांगें । भोगिजे
गा २४ आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचियाचि आंगा घे-
डिजे । मग सुखेंसीं सुरवाडिजे । सुखाचिमाजि २५ ऐसें हळुवारपण जरी ये-
ईल । तरीच हें उपेगा जाईल । एरव्हीं आघवी गोठी होईल । मुकया बहि-
रयाची २६ परी तें असो आतां आघवें । नलगे श्रोतयांतें कडसावें । जे अ-
धिकारिये एथ स्वभावें । निष्कामकामु २७ जिहीं आत्मबोधाचिया आवडी ।
केली स्वर्गसंसाराची कुरोंडी । तेवांचूनि एथींची गोडी । नेणती आणिक २८
जैसा वायसीं चंद्र नोळखिजे । तैसा प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे । आणि तो हि-
मांशुचि जेविं खाजें । चकोराचें २९ तैसा सज्ञानासी तरी हा ठावो । आणि
अज्ञानासी आन गांवो । म्हणोनि बोलावया विषय पहाहो । विशेषु नाहीं ३०
परि अनुवादलों मी प्रसंगें । तें सज्जनीं उपहासावें लागे । आतां सांगेन काय
श्रीरंगें । निरोपिलें जें ३१ तें बुद्धीही आकळितां सांकडें । म्हणऊनि बोलीं
विपायें सांपडे । परि श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखेन मी ३२ जें दिठीही
न पविजे । तें दिठीविणें देखिजे । जरी अतींद्रियें लाहिजे । ज्ञानबळ ३३ ना
तरी जें धातुर्वादांही न जोडे । तें लोहींचि पंधरें सांपडे । जरी दैवयोगें चढे ।
परिसु हाता ३४ तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे । म्हण-
ऊनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ३५ तेणें कारणें मी बोलेन । बोलीं
अरूपाचें रूप दावीन । अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियांकरवीं ३६ आइका यश
श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य । हे साही गुणवर्य । वसती जेथ ३७ म्हणोनि
तो भगवंतु । जो निःसंगाचा सांगातु । तो म्हणे पार्था दत्तचित्तु । होईं आतां ३८

कीं बोलण्याची नुसती सरणी पाहून डोळे तृप्त होतील; आणि त्यांना असें वाटूं लागेल कीं, हे बोल नसून ही प्रत्यक्ष रूपाची खाणच निर्माण झाली आहे ! १८ जेव्हां शब्द जुळून संपूर्ण वाक्य बाहेर पडेल, तेव्हां इंद्रियांना मागें टाकून मनच बाहेर निघेल; आणि आपले बाहु उभारून त्या वाक्याला आलिंगन देण्याला धांवेल. १९ याप्रमाणें सर्व इंद्रियें आपापल्या धर्माप्रमाणें त्या बोलाला झोंबतील, परंतु तो शब्दही सगळ्यांना सारखेपणानें शांत करील. ज्याप्रमाणें एकटा सूर्य सर्व जगाच्या व्यवहाराला प्रवृत्त करितो. २० त्याप्रमाणें शब्दांचा व्यापकपणा अलौकिक आहे असें समजा; आणि जो त्यांचा अर्थ जाणणारा आहे, त्याला त्यांचे ठिकाणीं चिंतामणीसारखे गुण आढळून येतात. २१ हें असो; त्या बोलांचीं मोठालीं ताटें बनवून त्यांत मोक्षरस वाढून, निष्कामी जनांना ही ग्रंथरूपी मेजवानीच केली आहे. २२ या मेजवानींत उजेडाकरितां नित्य नवी अशी आत्मज्योतीची ठाणवई करून, त्या उजेडांत जो इंद्रियांना न कळत मेजवानीचें सेवन करील, त्यालाच तिची प्राप्ति होईल. २३ या ठिकाणीं श्रवणाचें साधन जे कान ते टाकून देऊन श्रोत्यांनी मनानेंच उपभोग घ्यावा. २४ बोलरूपी साल अगोदर काढून टाकून बोलाचें लक्ष जें ब्रह्म तेथें तद्रूप होऊन मग सुखानेंच. सुखाची गोडी घ्यावी. २५ इतक्या तऱ्हेचें सूक्ष्म मन जर होईल, तरच त्याचा उपयोग होईल; नाहींतर सर्व गोष्टी मुक्यानें बोलून बहिऱ्यानें ऐकल्याप्रमाणें होतील. २६ परंतु तें प्रतिपादन आतां असो ! श्रोत्यांची चिकित्सा करण्याची ही वेळ नव्हे, सामान्यतः जे निष्काम पुरुष असतील तेच या मेजवानीचे अधिकारी आहेत. २७ ते निष्काम कसे म्हणशील तर—ज्यांनी ब्रह्मज्ञानाच्या आवडीनें स्वर्ग आणि संसार यांच्या प्राप्तीची ओंवाळणी केली आहे, त्यांच्याशिवाय इतरांना या बोलाची गोडी कळणार नाहीं. २८ कावळ्याला जशी चंद्राची ओळख नाहीं. तशी या गीता ग्रंथाची प्राकृत जनांना ओळख नाहीं. परंतु तोच चंद्र जसा चकोरांचें खाद्य आहे, [ तद्वत् कर्माच्या फलांची ज्यांना आशा नाहीं, त्यानांच या गीता ग्रंथाची ओळख आहे. ] २९ तसेंच, जे ज्ञानी आहेत, त्यांना हा ग्रंथ म्हणजे विश्रांतीचें ठिकाण आहे, आणि जे अज्ञानी आहेत, त्यांना परक्या गांवाप्रमाणें आहे. म्हणून या विषयाबद्दल विशेष बोलण्याचें कारण नाहीं. ३० परंतु प्रसंगानुसार मी जें बोललों, त्याची सज्जनांनीं मला क्षमा करावी. यापुढें, श्रीरंगानीं जें काय सांगितलें आहे तें मी सांगेन. ३१ तें बोलणें बुद्धीलाही कळण्याला कठिण आहे, म्हणून शब्दांमध्यें तें कदाचित् व्यक्त होईल. परंतु श्रीगुरु निवृत्ति महाराजांच्या कृपारूप दीपाच्या उजेडानें मी तें जाणून बोलेन. ३२ गुरुकृपेचें काय ऐश्वर्य सांगावें—इंद्रियातीत असें जें ब्रह्मज्ञान, तें जर प्राप्त झालें, तर जी गोष्ट दृष्टीस न पडणारी ती दृष्टीशिवाय दिसेल. ३३ जर दैवयोगानें हातास परीस लागला, तर किमयागारासही जें न मिळणारें तें उत्तम सोनें लोखंडांत सांपडतें; ३४ तसें, जर सद्गुरूची कृपा होईल, तर प्रयत्न केला असतां काय प्राप्त होणार नाहीं ? म्हणून, ज्ञानदेव म्हणतात, अशी जी सद्गुरुकृपा, ती मजवर पूर्ण आहे. ३५ त्या योगानें मी बोलेन, माझ्या बोलण्यांत निराकार वस्तु सर्वांस दाखवीन, आणि जी वस्तु इंद्रियातीत आहे, ती इंद्रियांकडून भोगवीन. ३६ पहा—यश, लक्ष्मी, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य हे सहा श्रेष्ठ गुण ज्या श्रीकृष्णाचे ठिकाणीं वास करतात. ३७ म्हणून त्याला भगवान् असें म्हणतात; व ज्यांनीं सर्वसंगपरित्याग केला आहे त्यांचा जो मित्र, तो पार्थास असें म्हणाला कीं, आतां सावधान हो. ३८

---

१ तृप्ति. २ अर्थावबोधक शब्द अथवा वाक्य. ३ प्रकटे. ४ स्वभावानें, धर्मानें. ५ सारखेपणानें. ६ बोध करितो. ७ जागा करी. ८ सृष्टि. ९ भावनेनें प्राणु इच्छिणारास. १० आढळतात. ११ मोक्षरसानें. १२ वाढलीं. १३ मेजवानी, ग्रंथरचना. १४ आत्मज्योति. १५ दिवा, ठाणवी. १६ इंद्रियांना न कळूं देता. १७ सारे. १८ गरजेवांचून, संबंधाशिवाय. १९ मनापासून. २० उगीच. २१ आच्छादन. २२ न्हावें. २३ सुख भोगावें. २४ सूक्ष्मता, नाजुकपणा. २५ सर्व. २६ सावध करावें. २७ कर्मफलाविषयीं निरिच्छ. २८ ओंवाळणी. २९ कावळ्यांनीं. ३० चंद्रकिरणें. ३१ खाऊ. ३२ अन्य. ३३ क्षमा करावी. ३४ कठिण. ३५ कचित्, कदाचित्. ३६ दृष्टीवांचून. ३७ इंद्रियातीत. ३८ लाभेल, मिळेल. ३९ ब्रह्मज्ञान. ४० किमया करणाराला. ४१ प्राप्त. ४२ निराकाराचें. ४३ श्रेष्ठ गुण. ४४ इष्ट दिलेला.

श्रीभगवानुवाचः—

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः । स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥१॥

आइकें योगी आणि संन्यासी जनीं । हे एकचि सिनानें झणीं मानीं । एऱ्हवीं विचारिजती जंव दोन्ही । तंव एकचि ते ३९ सांडिजे दुजया नामाचा आभासु । तरी योगु तोचि संन्यासु । पाहतां ब्रह्मीं नाहीं अवकाशु । दोहीं-माजीं ४० जैसें नामाचेनि अनारिसेपणें । एका पुरुषातें बोलावणें । कां दोहीं-मार्गीं जाणें । एकाचि ठाया ४१ नातरी एकचि उदक सहजें । पारि सिनाँना वँढीं भरिजे । तैसें भिन्नत्व जाणिजे । योगसंन्यासांचें ४२ आइकें सकळ सं-मतें जगीं । अर्जुना गा तोचि योगी । जो कर्मे करूनि रागी । नोहेचि फळीं ४३ जैसी मही हे उद्भिजें । जनी अहंबुद्धीवीण सहजें । आणि तेथिंचीं तियें बीजें । अपेक्षीना ४४ तैसा अन्वयाचेनि आधारें । जातीचेनि अनुकारें । जें जेणें अव-सरें । करणें पावे ४५ तें तैसेंचि उचित करी । परी साटोपु नोहे शरीरीं । आणि बुद्धीही करोनि फळवेरी । जायेचिना ४६ ऐसा तोचि संन्यासी । पार्था गा पारियेसीं । तोचि भरंवसेनिसीं । योगीश्वरु ४७ वांचूनि उचित कर्म प्रासंगिक । तयातें म्हणे हें सांडावें बद्धक । तरी टांकोटांकीं आणिक । मांडीचि तो ४८ जैसा क्षाळूनियां लेपु एकु । सवेंचि लाविजे आणिकु । तैसेनि आग्रहाचा पाइकु । विचंबे वायां ४९ गृहस्थाश्रमाचें वोझें । कपाळीं आधींचि आहे सहजें । कीं तेंचि संन्याससवा ठेविजे । सरिसें पुढती ५० म्हणूनि अग्निसेवा न सांडितां । कर्माची रेखा नोलांडितां । आहे योगसुख स्वभावता । आपणपांचि ५१

यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव । न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥

ऐकें संन्यासी तोचि योगी । ऐसी एकवाक्यतेची जगीं । गुढी उभविली अनेगीं । शास्त्रांतरीं ५२ जेथ संन्यासिलां संकल्पु तुटे । तेथचि योगाचें सार भेटे । ऐसें हें अनुभवाचेनि धेंटें । साचें जया ५३

आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते । योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥

आतां योगाचळाचा निमथा । जरी ठाकावा आथि पार्था । तरी सोपाना या कर्मपथा । चुका झणीं ५४ येणें यमनियमांचेनि तळवटें । रिगे आसना-चिये पाउलवाटें । येई प्राणायामाचेनि आडकंठें । वरौतें गा ५५ मग प्रत्याहा-राचा अधाडा । जो बुद्धीचियाही पायां निसरडा । जेथ हटिये सांडिती होडा । कडेलग ५६ तरी अभ्यासाचेनि बळें । प्रत्याहारीं निराळें । नखीं लागेल ढाळें-

**अन्वयार्थ**—(कर्मफलं अनाश्रितः)–कर्मांच्या फलाचा आश्रय न केलेला–(यः)–जो गृहस्थ–(कार्यं कर्म)–अवश्य कर्तव्य कर्म म्ह० नियत कर्म–नित्य अग्निहोत्रादि कर्म–(करोति)–करतो –(सः)–तो–( संन्यासी )–संन्यासी आहे–(च)–व–( योगी )–योगी आहे. केवल–(निरग्निः न)–अग्निरहित नव्हे–(च अक्रियः) –[न]–व क्रियारहित नव्हे. अग्निरहित व क्रियारहित पुरुषच संन्यासी व योगी आहे, असें मानूं नये. १

श्रीकृष्ण म्हणतातः—पार्था, हें पहा–योगी आणि संन्यासी हे या जगांत एकच आहेत. तें वेगळे आहेत असें मानशील हो; कारण, त्या दोहोंचा सहज विचार केला तर ते एकच आहेत. ३९ त्यांच्यावर दोन नांवांचा आरोप मात्र आहे, तो सोड. कारण, ब्रह्मदृष्टीनें पाहूं गेलें असतां या दोहोंत भेद नाहीं, म्हणून योग तोच संन्यास होय. ४० जसें नांवाच्या वेगळेपणानें एकाच पुरुषाला हांका मारणें किंवा एकाच ठिकाणाला दोन मार्गानें जाणें; ४१ किंवा एकच उदक भांड्यांत भरल्यावर पाण्याला जसा दुजा भाव नाहीं, तसा योग आणि संन्यास यांत भेद नाहीं असें जाण. ४२ अर्जुना, जो कर्में करून त्यांच्या फलांची इच्छा धरीत नाहीं, तोच, या जगतांत सर्वांच्या बुद्धीनें योगी असा समजला जातो. ४३ पृथ्वी ही वृक्षादिकांना उत्पन्न करून त्यांच्या उत्पत्तीबद्दल कांहीं अहंकारबुद्धि दाखवीत नाहीं; आणि त्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या फलांचीही ज्याप्रमाणें इच्छा करीत नाहीं, ४४ त्याचप्रमाणें, आत्मबोधाच्या आधारानें आणि जातीस अनुरूप असें जें कर्म ज्या कालीं करण्याचा प्रसंग येईल, ४५ तें सर्व यथाविधि करून तो आपल्या शरीरांत अहंकार उत्पन्न होऊं देत नाहीं, आणि बुद्धीला फलाच्या आशेकडे जाऊं देत नाहीं. ४६ पार्था–ऐक. असा जो पुरुष, तोच संन्यासी, आणि तोच निःसंशय योगीश्वर होय. ४७ या हातोटीशिवाय, जो कोणी, नित्यनैमित्तिक कर्में बद्धक आहेत असें समजून त्यांचा त्याग करतो, आणि लागलीच दुसरीं कर्में करण्यास प्रवृत्त होतो, ४८ जसा कोणी एक लेप धुवून टाकून दुसरा लेप लावण्याचे खटपटींत पडतो, त्याप्रमाणें उचित कर्मत्याग करून दुसरें कर्में करण्याच्या आग्रहांत पडून व्यर्थ त्रास सोसतो. ४९ गृहस्थाश्रमाचें ओझें सर्वांच्या कपाळीं अगोदर सहजांच लागलें आहे; परंतु गृहस्थाश्रमाचें आचरण यथाविधि न करितां संन्यास घेऊन पहिलें ओझें टाकून लगेच दुसरें ओझें डोक्यावर घेतो. ५० म्हणून श्रौतस्मार्तहोमादिक कर्मांचें यथाविधि आचरण न टाकतां कर्मांची मर्यादा ओलांडली नाहीं, तर आपल्याजवळ. सहजानुसार योगसुख आहे. ५१

**अन्वयार्थ**—(पांडव)–हे अर्जुना, श्रुतिस्मृतिवेत्ते–(यं) –ज्याला–(संन्यासं इति)–खरा संन्यास असें–(प्राहुः)–म्हणतात –(तं)–त्याला–(योगं)–(विद्धि)–योग–जाण–(हि)–कारण–(असंन्यस्तसंकल्पः)–ज्यानें संकल्प टाकलेला नाहीं असा–(कश्चन)–कोणी–(योगी)–योगी–(न भवति)–होत नाहीं. २

ऐकः ' संन्यासी तोच योगी ' असा एकवाक्यतेचा ध्वज अनेक शास्त्रांनीं या जगांत उभारला आहे. ५२ ज्या पुरुषाच्या ठिकाणीं त्याग झाल्यामुळें संकल्प नष्ट झाला, त्याच ठिकाणीं, योगाचें सार जें ब्रह्म त्याची भेट होते, असें स्वानुभव प्रमाणानें ज्याचें ठरलें आहे; ५३

**अन्वयार्थ**—(योगं)–ध्यानयोगावर–( आरुरुक्षोः मुनेः ) –आरूढ होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षु गृहस्थाला–(कर्म) –फलनिरपेक्ष कर्मानुष्ठान हें–(कारणं)–साधन–(उच्यते)–सांगितलें जातें.–(तस्य एव योगारूढस्य )–पण तोच मुनि कर्माभ्यासानें योगारूढ झाला असतां, त्याला–(शमः)–उपशम– सर्व कर्मांपासून उपराम पावणें, हें–(कारणं)–साधन–(उच्यते) –सांगितलें जातें. ३

पार्था, अशा प्रकारें योगरूप पर्वताच्या माथ्यावर ज्याला जाण्याची इच्छा असेल, त्यानें कर्ममार्गरूपी जिना चढण्यास चुकूं नये हो ! ५४ या कर्ममार्गानें जाययास लागलें, म्हणजे पहिल्यानें या पर्वताचा यमनियमरूपी तळ लागतो; नंतर आसनांच्या पाऊलवाटेनें प्राणायामरूप कड्यानें वर जावें लागतें, ५५ नंतर, प्रत्याहार हाच कोणी अर्धा तुटलेला कडा लागतो. त्याच्यावरून बुद्धीचेही पाय निसरतात; आणि तो तुटलेल्या कड्याचा मार्ग ओलांडताना कडेलोट होईल म्हणून हठयोग्यांच्यासुद्धां प्रतिज्ञा शेवटास जात नाहींत. ५६ तथापि अभ्यासाच्या बळानें प्रत्याहाररूप दुर्ल्यासारख्या कठीण मार्गांत फक्त वै-

---

१ फलेच्छा नसून कर्माचरण करणारे. २ सर्वसंगपरित्यागी, सर्वथैव कर्मत्याग करणारा. ३ वेगळे वेगळे. ४ आरोप. ५ अंतर, भेद. ६ हाक मारणें. ७ वेगळे वेगळे गांड्यांत. ८ इच्छायुक्त, आसक्त. ९ उत्पन्न करितें. १० इच्छा करीत नाहीं. ११ आत्मज्ञानाच्या. १२ अनुरूप. १३ अहंकारयुक्त. १४ फलाच्या आशेपर्यंत. १५ याशिवाय. १६ नैमित्तिक. १७ जन्ममरण देणारे. १८ लागल्याच. १९ धुवून. २० नोकर. २१ घोटाळतो, गुरफटतो. २२ पुनः. २३ श्रौतस्मार्तहोमादि. २४ मर्यादा. २५ न टाकतां.

२६ ध्वजा, पताका. २७ बहुतांनीं. २८ सोडलेला. २९ निश्चयानें. ३० कर्मरूपपर्वताला. ३१ माथा. ३२ प्राप्त करून घ्यावा. ३३ जिन्याला. ३४ चुकूं नको. ३५ कर्ममार्गानें. ३६ तळाकडून. ३७ योगांतील अनेकविध आसनांच्या. ३८ पायवाटेनें. ३९ आटमार्गानें. ४० वर. ४१ प्रत्याहार=विषयांपासून इंद्रियें खेंचणें. ४२ धक्का. ४३ घसरण्याजोगा. ४४ हठयोगी. ४५ प्रतिज्ञा, पैज. ४६ कडेलोट होईल म्हणून. ४७ निराळंबी, निर्गुणी. ४८ प्रवेश. ४९ दडदड.

ढाळें । वैराग्याची ५७ ऐसा पवनाचेनि पाठारें[1]। येतां धोरणेचेनि[2] पैसारें[3]। क्रमी[4] ध्यानाचें चवरें[5]। सांपडे तंव ५८ मग तया मार्गाची धांव[6]। पुरेल प्रवृत्तीची हांवँ[7]। जेथ साध्यसाधना खेंव[8]। समरसें[9] होय ५९ जेथ पुढील पैसु[10] पारुखे। मागील स्मरावें तें ठाके। ऐसिये सरिसीये[11] भूमिके। समाधि[12] राहे ६० येणें उपायें योगारूढु। जो निरवधि[13] जाहला प्रौढु[14]। तयाचिया चिन्हांचा निवाडु। सांगेन आइकें ६१

यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते । सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा। नाहीं विषयांचिया येरझारा। जो आत्मबोधाचिया वोवरां[15]। पहुडला[16] असे ६२ जयाचें सुखदुःखाचेनि आंगें। झगटलें मानस चेवो[17] नेघे। विषय पासींही[18] आलियां से न रिघे। हें काय म्हणऊनि ६३ इंद्रियें कर्माच्या ठायीं। वाढीनलीं पारि कहीं। फळहेतूची चाड नाहीं। अंतःकरणीं ६४ असैतेनि[19] देहें एतुला। जो चेतुंचि[20] दिसे निदेलों[21]। तोचि योगारूढु भला। वोळख तूं ६५ तेथ अर्जुन म्हणे अनंता। हें मज विस्मो बहु आइकतां। सांगें तया ऐसी योग्यता। कवणें दीजे ६६

उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् । आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५॥

तंव हांसोनि श्रीकृष्ण म्हणे। तुझें नवल ना हें बोलणें। कवणासि काय दिजेल कवणें। अद्वैतीं इये ६७ पैं व्यामोहाचिये[22] शेजे। बळियें[23] अविद्या[24] निद्रितु होईजे। ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे। जन्ममृत्यूंचा ६८ पाठीं[25] अवसांत[26] ये चेवो[27]। तैं तें अवघेंचि होय वांवो[28]। ऐसा उपजे नित्य सद्भावो। तोहि आपणपांचि ६९ म्हणऊनि आपणचि आपणयां। घातु कीजतु असे धनंजया। चित्त देऊनि नाथिलिया[29]। देहाभिमाना ७०

बन्धुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः । अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

हा विचारूनि अहंकारु सांडिजे। मग असतीचि वस्तु होइजे। तरी आपली स्वास्ति सहजें। आपण केली ७१ एऱ्हवीं कोशकीटकाचिया[30] परी। तो आपणया आपण वैरी। जो आत्मबुद्धि शरीरीं। चारुस्थळीं[31] ७२ कैसे प्राप्तीचिये वेळे। निदैवा[32] अंधळेपणाचे डोहळे[33]। कीं असते आपुले डोळे। आपण झांकी ७३ कां कवण एकु भ्रमलेपणें। मी तो नव्हे गा चोरलों[34] म्हणे। ऐसा नाथिलें[35] छंदु अंतःकरणें। घेऊनि ठाके ७४ एऱ्हवीं होय तें तोचि आहे। पारि काई कीजे बुद्धि तैसी नोहे। देखा स्वप्नींचेनि घायें[36]। कीं मरे साचें ७५ जैसी ते शुकांचेनि[37]

राग्यच हळू हळू चढूं शकतें. ५७ अशा रीतीनें वायुरूप घोड्याच्या पाठीवर बसून मार्ग क्रमीत असतां चित्त स्थिर करण्याचा विस्तृत जाग्यावर आल्यानंतर ध्यानाचा शेवट स्वाधीन होईपर्यंत मार्ग क्रमण करितो. ५८ मग ज्या ठिकाणीं साध्य व साधन एक होतात, त्या ठिकाणीं मार्गाची धाव व प्रवृत्तीची हाव संपते. ५९ आणि ज्या ठिकाणीं पुढील पाऊल टाकणें बंद होऊन मागीलही आठवण राहत नाहीं, अशा समान भूमिकारूप समाधीवर तो पुरुष राहतो. ६० या उपायानें जो योगारूढ होतो, तो निःसंशय परिपूर्ण झाला. आतां त्याच्या चिन्हांचा निर्णय तुला सांगतों, तो ऐक. ६१

**अन्वयार्थ**—(यदा हि)–जेव्हां योगी–(इंद्रियार्थेषु)–विषयांमध्यें–(न अनुषज्जते)–आसक्त होत नाहीं, त्याचप्रमाणें –(कर्मसु)–नित्यनैमित्तिकादि कर्मांमध्यें–[न अनुषज्जते]–आसक्त होत नाहीं.–(सर्वसंकल्पसंन्यासी)–सर्व संकल्पाचा संन्यास करतो–(तदा)–तेव्हां–(योगारूढः)–योगारूढ–(उच्यते) –म्हटला जातो. ४

हें पहा–जो आत्मबोधाच्या तळघरांत निजलेला असतो, म्हणजे ज्याला आत्मज्ञान झालेलें असतें, त्याच्या इंद्रियांच्या घरीं विषयांचें येणें जाणें बंद होतें. ६२ सुखदुःखाशीं झगडतांना त्याचें मन जागें होत नाहीं. तसेंच त्याच्याजवळ जरी विषय मूर्तिमंत येऊन उभे राहिले, तरी ते कोण आहेत त्याबद्दल याला भानही नसतें. ६३ कदाचित् इंद्रियें कर्में करण्याला प्रवृत्त झालीं, तरी त्याला अंतःकरणांत फलाच्या हेतूची केव्हांहि इच्छा नसते. ६४ एवढे देहाचे व्यापार चाललेले असतांना जो झोपेंतल्या स्थितीप्रमाणें उदासीन दिसतो, त्यालाच खरा योग साध्य झाला असें तूं समज. ६५ अशी योग्याची स्थिति ऐकून अर्जुन देवास म्हणतोः हे अनंता, तुम्ही जें सांगतां, तें ऐकून मला नवल वाटतें; तर त्या योग्याला अशी योग्यता कोण देतो हें मला सांगा. ६६

**अन्वयार्थ**—(आत्मना)–आत्म्यानें–(आत्मानं)–आत्म्याला–(उद्धरेत्)–उद्धरावें, संसारसागरांतून वर काढावें–(आत्मानं)–आत्म्याला–(न अवसादयेत्)–अधोगतीस पोंचवूं नये.–(हि)–कारण–(आत्मा एव)–स्वतः–आत्माच–(आत्मनः) आपला–आत्म्याचा–(बन्धुः)–बंधु आहे व–(आत्मा एव)–आत्माच–आपणच–(आत्मनः)–आत्म्याचा–आपला–(रिपुः)–शत्रु आहे. ५

त्या वेळेस श्रीकृष्ण हंसून म्हणतातः– तुझ्या बोलण्याचें मला नवल वाटतें. कारण अशा अद्वैत स्थितींत कोणाला कोण काय देणार? ६७ मनुष्य भ्रांतिरूप शय्येवर गाढ अज्ञानानें जेव्हां निजलेला असतो, त्या वेळेस जन्ममृत्यूंचीं दुष्ट स्वप्नें भोगतो. ६८ नंतर अकस्मात् जागा झाल्यावर तीं जन्ममरणरूप सर्व स्वप्नें व्यर्थ होतात; अमर आहों असा त्याचा आपल्या ठिकाणीच निश्चय होतो. ६९ म्हणून, हे धनंजया, खोट्या देहाचा अभिमान धरून मनुष्य आपणच आपल्या घातास प्रवृत्त होतो. ७०

**अन्वयार्थ**—(येन)–ज्या पुरुषानें–(आत्मा एव)–शरीरेंद्रियसमुदायच–(आत्मना)–स्वतः–(जितः)–जिंकलेला असतो –(तस्य आत्मनः)–त्याचा म्हणजे स्वतःचा–(आत्मा)–आत्मा –(बंधुः)–हितकर्ता आहे–(तु)–परंतु–(अनात्मनः)–ज्यानें शरीरेंद्रियांना जिंकलेलें नसतें, त्या अनात्म्याचा–(आत्मा एव)–आत्माच–(शत्रुवत्)–शत्रूप्रमाणें–(शत्रुत्वे)–शत्रुत्व करण्यामध्यें–(वर्तेत)–तत्पर राहतो. ६

विचार करून हा अहंकार सोडला म्हणजे नित्यसिद्ध ब्रह्मवस्तुच हा होतो. असें झालें म्हणजे आपण आपलें कल्याण केलें असें सहज होतें. ७१ नाहींतर जो सुशोभित अशा शरीराचे ठिकाणीं लुब्ध होऊन आत्मस्वरूप विसरतो व आपलेपणा मानितो, तो कोशकिड्याप्रमाणें आपला आपण वैरी होतो. ७२ काय सांगावें, लाभाची वेळ आली असतां हतभागी मनुष्याला अंधळेपणाचे डोहळे आठवून तो जसे आपले डोळे झांकून वस्तुलाभाला अंतरतो; ७३ किंवा एकादा मनुष्य भ्रमानें माझा मीच हरवलों असें म्हणतो, आणि अंतःकरणांत तोच खोटा भाव धरून बसतो. ७४ एऱ्हवीं या भ्रमाशिवाय पाहूं गेलें असतां तो स्वतःच ब्रह्मरूप आहे; परंतु कांहीं केल्यानें त्याचे बुद्धीला मी ब्रह्मरूप आहें असें भान न होतां, मी दुःखी आहें असा भास होतो. परंतु तेव्हांही त्याची ब्रह्मरूपता नष्ट होत नाहीं. पहा कीं–स्वप्नांतील तरवारीचे वारानें कोणी खरोखर मरतो काय? ७५ राघूला धरण्याकरितां

१ पाऊलवाटेनें, वाहनानें. २ साधनयुक्त मनाचे स्थितीच्या विस्तृत प्रदेशाला. ३ मार्गानें. ४ उलंघी. ५ शेवट. ६ चालणें. ७ इच्छा. ८ भेट, आलिंगन. ९ महानंदाचे ऐक्यांत १० पाऊल बंद होतें, चालणें संपतें. ११ अशा समान–सपाट, सारख्या स्थळीं. १२ ध्येय वस्तूच्या ठिकाणीं मनाची एकाग्रस्थिति. १३ अत्यंत. १४ परिपूर्ण. १५ खोलींत. १६ निजला. १७ जागें होत नाहीं. १८ जवळ. १९ विद्यमान. २० जागा असतांही. २१ निजलेला. २२ भ्रांतीच्या. २३ बलवान. २४ अज्ञानानें. २५ नंतर. २६ अकस्मात्. २७ जागृति. २८ व्यर्थ. २९ खोट्या. ३० आपल्या अंगाभोंवतीं काड्यांचें घर बांधणारा किडा. ३१ सुशोभित. ३२ हतभाग्याला. ३३ हौस. ३४ हरवलों. ३५ लटिका. ३६ तरवारीच्या वारानें. ३७ राघूच्या मारानें.

आंगभारें । नळिका भोंविन्नली[2] एरी मोहरें । तेणें उडावें पारि न पुरे । मनशंका
७६ वायांचि मान पिळी । अंटुवें[3] हियें[4] आंवळी । टिटांतु[5] नळी । धरूनि ठाके
७७ म्हणे बांधला मी फुंडा[6] । ऐसिया भावनेचिया पडे खोडां[7] । कीं मोकळिया
पायांचा चवडा । गोंवी अधिकें ७८ ऐसा काजेंवीण[8] आंतुडला[9] । तो सांग पां
काय आणिकें बांधिला । मग न सोडीच जऱ्ही मेला । तोडूनि अर्धा[10] ७९ म्हण-
ऊनि आपणयां आपणचि रिपु । जेणें वाढविला हा संकल्पु । येर स्वयंबुद्धी[11]
म्हणे बापु । जो नाथिलें[12] नेघे ८०

जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः । शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥
ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः । युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः ॥ ८ ॥

तया स्वांतःकरणजिता[13] । सकळकामोपशांता[14] । परमात्मा परौता[15] । दुरी नाहीं ८१
जैसा किडाळाचा[16] दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व
आहे । संकल्पलोपीं[17] ८२ हा घटाकारु जैसा । निमालिया[18] तया अवकाशा ।
नलगे मिळों जाणें आकाशा । आना[19] ठाया ८३ तैसा देहाहंकारु नाथिला[20] ।
हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला[21] । आधींचि आहे ८४
आतां शीतोष्णाचिया वाहणी । तेथ सुखदुःखाची कडसणी[22] । इयें नसमाती[23]
कांहीं बोलणीं । मानापमानांचीं ८५ जे जिये वाटा सूर्यु जाये । तेउतें[24] तेजाचें
विश्व होये । तैसें तया पावे तें आहे । तोचि म्हणउनी ८६ देखें मेघौनि[25] सु-
टती धारा । तिया न रुपती[26] जैसिया सागरा । तैशीं शुभाशुभें योगीश्वरा ।
नव्हती आनें[27] ८७ जो हा विज्ञानात्मकु[28] भावो । तया विचारितां[29] जाहला वावो[30] ।
मग लागला जंव पाहों । तंव ज्ञान तें तोचि ८८ आतां व्यापकु कीं एकदेशी[31] ।
हे ऊहापोही[32] जे ऐसी । ते करावी ठेली[33] आपैशी । दुजेनवीण ८९ ऐसा शरी-
रीचि परि कौतुकें । परब्रह्माचेनि पाडें तुके । जेणें जिंतिलीं[34] एके । इंद्रियें गा
९० तो जितेंद्रियु सहजें । तोचि योगयुक्तु म्हणिजे । जेणें सानें थोर नेणिजे ।
कवणें काळीं ९१ देखें सोनयाचें निखळ[35] । मेरुयेसणें[36] ढिसाळ[37] । आणि माति-
येचें डिखळ[38] । सरिसेंचि मानी ९२ पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य[39]
रत्न चोखडें । देखे दगडाचेनि पाडें । निचाडु[40] ऐसा ९३

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु । साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

तेथ सुहृद[41] आणि शत्रु । कां उदासु[42] आणि मित्रु । हा भावभेदु[43] विचित्रु ।

टांगलेली झाडावरील नळी त्याच्या अंगभारानें उलट फिरली असतां, तो उडून न जातां आपणच फिरलों अशी मनांत शंका येऊन, ती जशी सोडीत नाहीं, ७६ व्यर्थ मान हालवतो, आणि छातीनें व चवड्यानें ती नळी आवळून चोंचीनें धरून ओरडतो, आणि म्हणतो कीं, ७७ मी खरोखर बांधला गेलों; अशाच समजुतीनें खोड्यांत पडतो, आणि मोकळ्या पायांचे चवड्यानें नळी अधिक बळकट धरतो. ७८ अशा स्थितींत त्याला अर्धा तोडून जरी नेला तरी तो ती नळी सोडीत नाहीं; असा जो निरर्थक सांपडला, त्याला कोणी दुसरें बांधावयास आलें होतें कां सांग बरें ? ७९ म्हणून, ज्यानें मनांतील मी व माझें हा संकल्प वाढविला आहे, तो आपणच आपला शत्रु होय. श्रीकृष्ण म्हणतात पण जो पुरुष आत्मानुभवी आहे तो खोटा अभिमान धरीत नाहीं. ८०

**अन्वयार्थ**—(जितात्मनः)—ज्यानें शरीरेंद्रियसमूहाला जिंकलें आहे व त्यामुळें—(प्रशान्तस्य)—ज्याचें अंतःकरण अत्यंत प्रसन्न झालें आहे अशा परमार्थ संन्याशाचा—(परमात्मा)—साक्षी—चिद्रूप आत्मा—(समाहितः)—साक्षात् आत्मभावानें राहतो. त्याचप्रमाणें—(शीतोष्णसुखदुःखेषु)—शीत-उष्ण सुख-दुःख इत्यादि द्वंद्वांच्या वेळीं—(तथा)—तसेंच—(मानापमानयोः)—मान व अपमान झाल्यावेळीं तो सम असतो. ७ (ज्ञानविज्ञानतृप्तात्मा)—शास्त्रोक्त पदार्थांच्या अर्थांचें ज्ञान व त्यांचा तसाच अनुभव घेणें, हें विज्ञान, यांच्यायोगानें ज्याचें चित्त—अंतःकरण तृप्त झालें आहे, त्यामुळें जो—(कूटस्थः)—अप्रकम्प्य-मनांत न डगमगणारा व—(विजितेन्द्रियः)—जितेंद्रिय होतो—(समलोष्टाश्मकाञ्चनः)—ज्याला मातीचें ढेंकूळ, दगड व सोनें हीं सम झालीं आहेत अशा—(योगी)—योग्याला—विरक्ताला—(युक्तः)—योगारूढ—समाहित—(इति)—असें—(उच्यते)—म्हटलें जातें. ८

ज्यानें आपलें मन जिंकिलें आहे, व ज्याच्या सर्व वासना शांत झाल्या आहेत, त्याला इतरांप्रमाणें परमात्मा लांब नाहीं. ८१ सोन्याचा हिणकटपणा तावून नाहींसा झाल्यावर तेंच जसें उत्तम सोनें होतें, तद्वत् मनांतील संकल्प नाहींसे होतांच जीवाचें ब्रह्मत्व सहज सिद्धच आहे. ८२ घटांतील आकाशाला, घटाचा नाश झाल्यावर जसें महाकाशाला मिळण्याकरितां दुसरे ठिकाणीं जावें लागत नाहीं ८३ तसा ज्याच्या देहांतील खोट्या अहंकाराचा समूळ नाश झाला तो पुरुष मुळचाच परमात्मा आहे. ८४ अशा स्थितींत शीत किंवा उष्ण, सुख किंवा दुःख, मान किंवा अपमान प्राप्त झाले असतांही ज्याचे ठिकाणीं त्याचा विचार संभवत नाहीं. ८५ कारण ज्या वाटेनें सूर्य जातो, त्या वाटेंतील तेवढेंच विश्व प्रकाशित होतें. त्याप्रमाणें, जो परमात्म्याला प्राप्त होतो, तो परमात्माच असल्यामुळें साक्षात् ब्रह्मच आहे. ८६ पहा कीं, मेघांपासून सुटणाऱ्या पावसाच्या धारा ज्याप्रमाणें समुद्राला खुपत नाहींत, त्याचप्रमाणें, जो ब्रह्मरूप बनला आहे त्याला शुभाशुभ कर्में हीं आपल्या रूपाहून भिन्न वाटत नाहींत. ८७ हा जो प्रत्यक्ष अनुभवास येणारा संसारिकभाव, त्याचा विचार करूं लागलें असतां तो व्यर्थ झाला, ( मिथ्या ठरला ) नंतर पुनः जों पाहूं लागला तों जें अनुभवात्मक ज्ञान तें स्वतः तोच बनला. ८८ असा निश्चय झाल्यानंतर, मी व्यापक आहें किंवा अव्यापक आहें अशी वाटाघाट करूं लागल्यास, ती द्वैतबुद्धीच्या अभावीं जागच्या जागींच राहते; ८९ अर्जुना, ज्यानें फक्त आपलीं इंद्रियें जिंकलीं आहेत, तो ज्ञानी देहधारी जरी असला तरी परब्रह्माच्या बरोबरीचा समजला जातो. ९० तोच सहज जितेंद्रिय आणि तोच योगी होय. कारण, त्याला लहान आणि थोर हा भेद कधीं नसतो. ९१ किती अभेदबुद्धि म्हणून सांगावी ? असें पहा कीं, शुद्ध सोन्याचा मेरूएवढा पर्वत व मातीचें ढेंकूळ हीं दोन्हीं जो सारखींच मानतो, ९२ ज्याचें मोल पाहूं गेलें असतां त्यापुढें पृथ्वीचेंही मोल थोडें आहे, अशा रत्नाला केवळ दगडाप्रमाणें मानण्याइतका जो निरिच्छ असतो. ९३

**अन्वयार्थ**—( सुहृत्—मित्र—अरि—उदासीन—मध्यस्थ—द्वेष्य—बन्धुषु )—प्रत्युपकाराची अपेक्षा न करणारा सुहृद्, स्नेही, शत्रु, कोणत्याहि पक्षाचा अभिनिवेश न धरणारा उदासीन, दोन्ही परस्पर विरुद्ध पक्षांचें हित इच्छिणारा मध्यस्थ, अप्रिय असलेला, व संबंधी या सर्वांतील—( साधुषु )—शास्त्रानुसार वर्तन करणारे—( अपि च )—आणि त्याचप्रमाणें—( पापेषु )—शास्त्रनिषिद्ध आचरण करणारे यांमध्यें—(समबुद्धिः)—समान बुद्धि ठेवणारा, त्या सर्वांकडे समान दृष्टीनें पाहणारा—(विशिष्यते)—उत्तम होय. ९

त्याचे ठिकाणीं आप्त आणि शत्रु अथवा उदासीन आणि मित्र अशा चित्रविचित्र कल्पना कोठून

१ फिरलेली. २ उलट गिरकी खाते. ३ मवटे. ४ छातीनें. ५ चोंचीत. ६ इतभाग्याला. ७ खोड्यांत. ८ गुंतवी. ९ निरर्थक. १० सांपडला. ११ मी आत्मा आहें असा ज्याचे बुद्धीला अनुभव आला तो. १२ खोटें. १३ आपलें मन जिंकणाराला. १४ सर्व इच्छा तृप्त झालेल्याला. १५ इतरांप्रमाणें. १६ हिनकसाचा. १७ संकल्प नाश पावल्यानें. १८ नाश पावल्यावर. १९ अन्यस्थळीं. २० खोटा. २१ सर्वत्र सांठलेला. २२ विचार. २३ सहन न होणें. २४ तितकें. २५ मेघापासून. २६ खुपती. २७ भिन्न. २८ संसारिक ज्ञान. २९ विचार करूं लागतां. ३० व्यर्थ. ३१ अव्यापक; परिच्छिन्न. ३२ तर्कवितर्क, वाटाघाट. ३३ आपोआप बंद राहिली. ३४ जिंकिती. ३५ गोळा. ३६ मेरुपर्वतायेवढें. ३७ मोठें. ३८ ढेंकूळ. ३९ अमोल. ४० निष्काम, निरिच्छ. ४१ त्रिवस्त्र. ४२ निन्दाहंत. ४३ मित्रभाव.

कल्पू कैंचा ९४ तया बंधु कोण काह्यांचा। द्वेषिया कवणु तयाचा। मीचि विश्व ऐसा जयाचा। बोधु जाहला ९५ मग तयाचिये दिठी। अधमोत्तम असे किरीटी। काय परिसाचिये कसवटी। वानियां कीजे ९६ ते जैशी निर्वाणें वर्णुचि करी। तैशी जयाचि बुध्दी चराचरीं। होय साम्याची उर्जेरी। निरंतर ९७ जे ते विश्वाळंकाराचें विसुरे। जरी आहाती आनांने आकारें। तरी घडले एकचि भांगारें। परब्रह्में ९८ ऐसें जाणणें जें वरवें। तें फावलें तया आघवें। म्हणोनि आहाचवोहाचे न[10] झकवे। येणें आकारचित्रें ९९ घोपें पटामाजि दृष्टी। दिसे तंतूंची सैंघ सृष्टी। परी तो एकवांचूनि गोठी। दुजी नाहीं १०० ऐसेनि प्रतीती हें गंवसे। ऐसा अनुभव जयातें असे। तोचि समबुध्दी हें अनारिसें। नव्हे जाण १ जयातें नांव तीर्थरावो। दर्शनें प्रशस्तीसि ठावो। जयाचेनि संगें ब्रह्मभावो। भ्रांतासही २ जयाचेनि बोले धर्मु जिये। दिठी महासिध्दीतें विये। देखें स्वर्गसुखादि इयें। खेलु जयाचा ३ विपर्यें जरी आठवला चित्ता। तरी दे आपुली योग्यता। हें असो तयातें प्रशंसितां। लाभु आथि ४

योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः। एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

पुढती अस्तवेना ऐसें। जया पाहिलें अद्वैतदिवसें। मग आपणपांचि आपणु असे। अखंडीत ५ ऐसिया दृष्टी जो विवेकी। पार्था तो एकाकी। सहजें अपरिग्रही जो तिहीं लोकीं। तोचि म्हणऊनि ६ ऐसियें असाधारणें। निष्पन्नाचीं लक्षणें। आपुलेनि[27] बहुवसपणें। श्रीकृष्ण बोले ७ जो ज्ञानियांचा बापु। देखणेयाचे दिठीचा दीपु। जया दादुलयाचा संकल्पु। विश्व रची ८ प्रणवाचिये पेठे[31]। जाहलें शब्दब्रह्म मोंजिठें। तें जयाचिया यशा धाकुटें। वेढूं न पुरे ९ जयाचेनि आंगिकें तेजें। आंवो रविशशीचिये वणिजे। म्हणऊनि जग हें वेंसजे। वीण असे तया ११० हां गा नामचि एक जयाचें। पाहतां गगनही दिसे टांचें। गुण एकैक काय तयाचे। आकळसील तूं ११ म्हणोनि असो हें वानणें। सांगों नेणों कवणाचीं लक्षणें। दावावीं मिषें येणें। कां बोलिलों ते १२ ऐकें द्वैताचा ठावोचि फेडी[39]। ते ब्रह्मविद्या किजेल उघडी। तरी अर्जुना पढिये हे गोडी। नासेल हन १३ म्हणोनि तें तैसें बोलणें। नव्हे सपाईतळ आड लावणें। केलें मनचि वेंगळवाणें। भोगावया १४ जया सोहंभावि अटकु। मोक्षसुखालागोनि रंकु। तयाचिये दिठीचा झणें कळंकु। लागेल तुझिया प्रेमा

येणार? ९४ मीच जग आहें, असा ज्याच्या मनांत बोध झाला आहे, त्याला बंधु कोण आणि द्वेषी कशाचा? ९५ मग, अर्जुना, त्याच्या दृष्टीला ल्हान आणि थोर असा कोठून भास होणार? असें पहा कीं, परिसाच्या कसोटीस लागल्यावर निरनिराळे कस लागतील काय? ९६ ती कसोटी सर्व धातूंना उत्तम सोनेंच करिते, तशी त्याची बुद्धि नेहमीं चराचरांचे ठिकाणीं केवळ एकत्वच जाणते. ९७ कां म्हणशील तर-विश्वरूप अलंकारांचे ठसे जरी पुष्कळ आकारांचे आहेत, तरी ते एकाच परब्रह्मरूपी सुवर्णाचे घडलेले आहेत; ९८ असें शुद्ध व खरें तत्त्व ज्याला पूर्णपणें समजलें आहे, तो चित्रविचित्र रचनेनें वरचेवर फसला जात नाहीं. ९९ वस्त्राकडे पाहिलें असतां जसें तें सर्व तंतुमय दिसतें तसें त्याला ब्रह्मावांचून जगतांत दुसरें कांहीं दिसत नाहीं. १०० अशा रीतीनें सर्व जग भरलेलें आहे असा ज्याला अनुभव येतो, तोच समबुद्धि होय, हें खोटें नाहीं असें पक्कें समज. १ ज्याचें नांव तीर्थराज होय, ज्याचें दर्शन घेतलें असतां अंतःकरणाला समाधान होतें, आणि ज्याच्या संगतीनें अहंकारानें भ्रमित झालेल्या पुरुषांची भ्रांति जाऊन तो ब्रह्मस्वरूप होतो, २ ज्याचें बोलणें हें धर्माचें जीवन, आणि दृष्टि ही महासिद्धि उत्पन्न करणारी होय, व स्वर्गादि सुखें हे ज्याचे खेळ आहेत, ३ अशा मनुष्याची जरी चित्तांत सहज आठवण झाली तरी ती आपली योग्यता देतो. फार काय सांगावें, त्याची स्तुति केली असतां महान् लाभच आहे. ४

**अन्वयार्थ**—(योगी)-ध्यानाचा अभ्यास करणारा योगी-(रहसि स्थितः)-एकांतांत बसलेला-(एकाकी)-एकटाच-(यतचित्तात्मा)-ज्यानें आपलें चित्त व देह, यांचें नियमन केलें आहे असा-(निराशीः)-तृष्णाशून्य-(अपरिग्रहः)-व सर्व परिग्रहरहित-[सन्-असा होत्साता त्यानें]-(आत्मानं)-अन्तःकरणाला-(सततं)-निरंतर-(युञ्जीत)-समाहित करावें. त्यानें चित्ताला शांत-स्थिर करावें. १०

जो कधींही मावळत नाहीं असा ज्ञानसूर्य ज्याचें हृदयांत उदय पावला आहे, तो आपण आपल्या ठिकाणींच सदोदित ब्रह्मानंदांत असतो. ५ पार्था, अशा दृष्टीनें जो विचार करितो, तोच अद्वितीय व तोच तिन्ही लोकीं संग्रह न करणारा असें जाण. ६ अशा प्रकारें आपल्या स्वतांच्यापेक्षां विशेष गौरवानें श्रीकृष्णांनीं साधूंचीं मुख्य लक्षणें सांगितलीं. ७ जो सर्व ज्ञानी लोकांत श्रेष्ठ, व सर्व पाहणारांच्या दृष्टीचा प्रकाशक, आणि ज्या समर्थाच्या केवळ संकल्पानें विश्वाची रचना होते, ८ ॐकाराच्या बाजारांत जें शब्दब्रह्मरूप उत्तम वस्त्र निघालें, तें ज्याच्या यशास आच्छादन करण्यास पुरत नाहीं; म्हणजे श्रीकृष्णाचें तर नाहींच परंतु त्याच्या यशाचेंही वेद वर्णन करूं शकत नाहींत; ९ ज्याच्या अंगाच्या तेजानें सूर्य आणि चंद्र यांच्या व्यापारास प्रतिष्ठा येते, तेव्हां हें जग त्याच्या आधाराशिवाय आहे काय? ११० पहा कीं, ज्याच्या नुसत्या नांवापुढें गगन तुच्छ दिसतें, असे याचे किती गुण तूं जाणशील? ११ म्हणून ही प्रशंसा आतां पुरे; कारण अशा लक्षणांनीं युक्त जो श्रीकृष्ण भगवान् तो ज्या साधूंचें वर्णन करितो, त्यांचीं लक्षणें आम्ही सांगूं शकत नाहीं; परंतु कांहीं सांगावीं म्हणून सांगितलीं. १२ जी ब्रह्मविद्या द्वैताचा नाश करते, ती जर स्पष्ट केली, तर आपला प्रियकर असा जो अर्जुन, त्याची प्रीति नाहींशी होईल, १३ म्हणून ब्रह्मज्ञानविषयीं स्पष्ट न बोलतां पडद्यानें बोलून अर्जुनाचें मन त्याच्या व आपल्या प्रेमाचा उपभोग घेण्याकरितां वेगळें ठेविलें. १४ जे अहंब्रह्म त्या स्फुरणांतच अडकून मोक्षसुखाच्या प्राप्तीकरितां, दीन झाले आहेत, त्यांच्या दृष्टीचा कलंक कदाचित् तुझ्या ब्रह्मविद्येविषयींच्या

१ कशाचा. २ अंतर. ३ शुद्ध, निर्दोष. ४ स्वच्छ, निर्मळ. ५ विस्तार, पसारा. ६ निरनिराळ्या. ७ सोन्यानें. ८ समजलें. ९ वरवरच्या. १० फसला जात नाहीं. ११ चित्रविचित्र विश्वरचनेनें. १२ मातल्यानें. १३ केवळ, सर्व. १४ प्राप्त होतें, सांपडतें. १५ वेगळें. १६ प्रयाग. १७ पूज्यतेला. १८ सहज. १९ स्तुति केली असतां. २० मावळेना, लोपेना. २१ प्रातःकाल झाला; उदय झाला. २२ ज्ञानसूर्यानें. २३ अद्वितीय. २४ परिवार नसणारा. २५ असामान्य. २६ सिद्धाची. २७ आपल्या स्वतःपेक्षांही यांचा जास्त गौरव करून. २८ पाहणाराच्या. २९ समर्थाच्या. ३० ॐकाराच्या. ३१ बाजारांत. ३२ उत्तम वस्त्र. ३३ आंगच्या. ३४ प्रतिष्ठा. ३५ वाणिज्यास. ३६ आधाराशिवाय. ३७ ल्हान, तोकडे. ३८ जाणशील. ३९ नाहींसा करणारी. ४० पडदा. ४१ मित्र. ४२ अहंब्रह्म. ४३ थबथबा.

१५ विपायें अहंभावो ययाचा जाईल । मी तोंचि हा जरी होईल । तरि मग
काय कीजेल । एकलेया १६ दिठीचि पाहतां निविजे । कां तोंड भरोनि बोलिजे ।
नातरी दाटूनी खेंवें दीजे । ऐसें कवण आहे १७ आपुलिया मना ब्रवी ।
असेंमाई गोठी जीवीं । ते कवणेंसि चावेळावी । जरी ऐक्य जाहलें १८ इया
काकुळती जनार्दनें । अन्योपदेशाचेनि हातीशनें । बोलामाजि मन मनें ।
आलिंगूं सरलें १९ हें परिसतां जरी कोनडें । तरी जाण पां पार्थ उघडें । कृष्ण-
सुखाचेंचि रूपडें । वोतलें गा १२० हें असो वयसेचिये शेवटीं । जैसें एकाचि
विये वांझोटी । मग ते मोहांची त्रिपुटी । नाचों लागे २१ तैसें जाहलें श्रीअनंता ।
ऐसें तरि मी न म्हणतां । जरी तयाचा न देखतां । अतिशैयो एथ २२ पाहा
पां नवल कैसें चोज । कें उपदेशु केउतें झुंज । परी पुढें वालेभाचें भोजें ।
नाचत असे २३ आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी । पिसें आणि
न भुलवी । तरी तेंचि काई २४ म्हणऊनि भावार्थु तो ऐसा । अर्जुन मैत्रि-
येचा कुवांसा । कीं सुखें शृंगारलिया मानसा । दर्पणु तो २५ यापरी बापं पुण्य-
पवित्र । जगीं भक्तिबीजासि सुक्षेत्र । तो श्रीकृष्णकृपे पात्र । याचिलागीं २६
हो कां आत्मनिवेदनीतळींची । जे पीठिका होय सख्याची । पार्थु अधिष्ठात्री
तेथिंची । मातृका गा २७ पोसींचि गोसांवी न वर्णिजे । मग पाईकांचा गुण
घेईजे । ऐसा अर्जुन तो सहजें । पढिये हरी २८ पाहा पां अनुरागें भजे । जे
प्रियोत्तमें मानिजे । ते पतीहूनि काय न वानिजे । पतिव्रता २९ तैसा अर्जु-
नचि विशेषें स्तवावा । ऐसें आवडलें मज जीवा । जे तो त्रिभुवनींचिया दैवा ।
एकायतनु जाहला १३० जयाचिया आवडीचेनि पांगें । अमूर्तुही मूर्ति आं-
वेगें । पूर्णोहि परि लागे । अवस्था जयाची ३१ तंव श्रोते म्हणती दैव । कैशी
बोलाची हवावें । काय नादातें हन बैरव । जिणोनि आली ३२ हांहो नवल
नोहे देशी । मऱ्हाटी बोलिजे तरी ऐशी । वाणें उमटताहे आकाशीं । साहित्यें
रंगाचीं ३३ कैसें उन्मेखचांदिणें तारें । आणि भावार्थु पडे गार । हेंचि श्लोकार्थ
कुमुदिनी फांर । सावियां होती ३४ चौडचि निचोडां करी । ऐसी मनोरथीं
ये थोरी । तेणें विवळले अंतरीं । तेथ डोलुं आला ३५ तें निवृत्तिदासें जाणि-
तलें । मग अवधान द्या म्हणितलें । नवल पांडवकुळीं पाहलें । कृष्णादिवसें
३६ देवकीया उदरीं वाहिला । यशोदा सायासें पाळिला । शेखीं उपेगीं

प्रेमाला लागेल हो ! १५ कदाचित् अर्जुनाचा मीपणा जाऊन ' मी तोच हा ' असें जर होईल, तर मग मी एकट्यानें काय करावयाचें आहे ! १६ पाहिल्याबरोबर डोळे शांत होण्यास, व तोंड भरून बोलण्यास, किंवा आनंदानें दृढ आलिंगन देण्याला दुसरें कोण आहे ? १७ जर अर्जुनाचें आणि माझें ऐक्य झालें, तर आपल्या मनांत न मावणारी अशी उत्तम गोष्ट ती कोणाजवळ बोलावी ? १८ अशा आडचणीमुळें श्रीकृष्णांनीं बोलण्यांत साधूंचीं लक्षणें सांगून उपदेश केला व त्याचें मन वळविलें. १९ हें ऐकणाराला जरी अशक्य वाटेल, तरी पार्थ हा खरोखर श्रीकृष्णाच्या सुखाचीच ओतीव मूर्ति आहे, असें पक्कें समजा. १२० हें असो; एकाद्या वांझ स्त्रीला, तिचें वय होऊन, गेल्यानंतर, एकच मूल झालें म्हणजे ती जशी त्याच्यावरील प्रेमाची प्रत्यक्ष पुतळी होऊन नाचूं लागते, २१ तशी श्रीकृष्णांची गोष्ट झाली आहे ! त्यांचें अर्जुनावरील अतिशय प्रेम जर दृष्टांतपत्तीस न येतें, तर मी असें बोललों नसतों. २२ पहा पहा, हें काय नवल व कोण आवड ! कीं कसला युद्धप्रसंग, आणि त्यांत हा काय ब्रह्मज्ञानाचा उपदेश ! परंतु अशा ठिकाणीं भगवंताच्या प्रीतीचें चित्र जो अर्जुन, त्याच्यापुढें प्रेमाचें कौतुक नाचत आहे ! २३ आवडी असून लाज वाटत असेल, व्यसन असून शीण वाटत असेल, वेड लागून जर बुद्धि भ्रष्ट होत नसेल, तर तीं आहेत असें म्हणण्यांत अर्थ काय ? २४ या गोष्टीचें सार इतकेंच कीं, अर्जुन हा श्रीकृष्णांच्या मैत्रीचें घर होय, किंवा सुखानें शृंगारलेलें श्रीकृष्णाचें मन पाहण्याचा आरसाच होय. २५ अशा प्रकारें अर्जुन हा धन्य, पुण्यपवित्र आणि भक्तिरूप बीज पेरण्याचें उत्तम शेत असल्यामुळेंच श्रीकृष्णकृपेस पात्र झाला ! २६ श्रवणापासून आत्मनिवेदनापर्यंत जी नऊ प्रकारची भक्ति आहे त्यांपैकीं आत्मनिवेदनाच्या अलीकडची जी सख्य नांवाची आठवी भक्ति, त्या ठिकाणची अर्जुन ही मुख्य देवता आहे. २७ मालक ( भगवान् ) श्रेष्ठ शेजारी असतां त्याचें वर्णन न करितां सेवकाच्या गुणांचें वर्णन केलें असतां मालकाला आवडावें अशा योग्यतेचा अर्जुन हा भगवंताचा आवडता आहे. २८ जी पतिव्रता आपल्या पतीची प्रीतीनें सेवा करिते आणि पतीस मान्य होते, त्या पतिव्रतेची पतीपेक्षां वाखाणणी करीत नाहींत काय ? २९ त्याचप्रमाणें, अर्जुनाचीच विशेष स्तुति करावी असें माझ्या मनास वाटलें. कारण, तो त्रिभुवनाच्या सर्व भाग्याला एकटाच पात्र झाला आहे ! १३० ज्याच्या आवडीच्या वेडानें निराकार अशा ब्रह्माला देखील अवतार घेणें भाग पडलें; आणि त्याची सर्व इच्छा पूर्ण असूनही अर्जुनाच्या सख्याची त्याला उत्कंठा उत्पन्न झाली ! ३१ तेव्हां श्रोते म्हणाले:—दैवाची गति काय विचित्र आहे ! आणि तशीच वर्णन करण्याची शैली तरी काय आहे कीं, जिच्या सुंदरपणानें नादब्रह्मालाही जिंकलें आहे ! ३२ शुद्ध मराठी भाषेंत जर अशा रीतीचें वर्णन करितां येतें कीं, ज्याच्यापासून हृदयावर शृंगारादि नवरसांचे निरनिराळे ठसे उमटतात, तर हें अतिशय नवल नव्हे काय ? ३३ ज्ञानेश्वरांचें हें बोलणें कसें आहे म्हणाल तर—ज्ञानरूप चंद्राच्या चांदण्याप्रमाणें स्वच्छ असून, त्याच्या भावार्थापासून मनाला आनंद होतो; म्हणून गीतेच्या श्लोकांचा अर्थ चंद्रविकासी कमलाप्रमाणें सहज उमलला आहे ! ३४ त्या बोलण्याची अशी योग्यता आहे कीं, ब्रह्मविद्या ऐकणाराची इच्छा याच्या श्रवणापासून तृप्त होते; अशा या बोलपासून श्रोते अंतर्यामीं प्रसन्न होऊन डोलूं लागले. ३५ असा श्रोत्यांच्या मनांतील भाव निवृत्तिदास ज्ञानदेव यांनीं जाणून, मग, ' श्रोतेहो, इकडे लक्ष द्या ' असें ते म्हणाले. कृष्णरूप सूर्यानें पांडवकुलावर प्रकाश केला. ( श्रीकृष्णांनीं पांडवांवर कृपा केली. ३६ [ तो कृष्ण कसा आहे म्हणाल, तर ] ज्याला देवकीनें आपल्या उदरांत नऊ महिने वागविलें, यशोदेनें अति कष्टानें ज्याला लहानाचें मोठें

१ कदाचित् २ वडवडून. ३ आलिंगन. ४ सामावत नाहीं अशी. ५ बोलावी. ६ अडचण. ७ योगशास्त्राचे. ८ युक्तीनें, हातवटीनें. ९ अवघड. १० म्हातारपणीं. ११ ममतेनें. १२ पुतळी. १३ अतिशय प्रेम. १४ प्रीतींतल्याचें १५ चित्र, पुतळा. १६ आश्रय. १७ धन्य. १८ चांगलें शेत. १९ नवव्या भक्तीच्या मागची सख्य -भक्ति. २० आसन. २१ आश्रयभूत, अध्यक्ष. २२ देवता. २३ जवळच. २४ भगवान. २५ सेवकाचा. २६ अति प्रिय. २७ प्रीतीनें. २८ एकत्व अधिष्ठान, आश्रय. २९ वदातेनें, अधीनतेनें. ३० स्वीकारतो. ३१ उत्कंठा. ३२ आवड, शोभा. ३३ नादब्रह्माला. ३४ सौंदर्य. ३५ जिंकून. ३६ ठसे. ३७ हृदयां. ३८ श्रवणसुखाचे नवरस. ३९ ज्ञानरूपी चांदणें. ४० चकचकीत. ४१ प्रसृत होण्यास, उमलण्यास. ४२ सर्वथा, सहज. ४३ इच्छा. ४४ निष्कामांना. ४५ प्रकाशले. ४६ आनंदानें डोलूं लागले. ४७ उजाडलें, ४८ उपयोगी.

गेला। पांडवांसी ३७ म्हणऊनि बहुदिवस वोळगावा। कां अवसरु पाहोनि विन-
वावा । हाही सोसु[2] तया सदैवा[3] । पडेचिना ३८ हें असो कथा सांगें वेगीं ।
मग अर्जुन म्हणे सलगी । देवा इयें संतचिन्हें आंगीं । न ठकती माझ्या ३९
एऱ्हवीं या लक्षणांचिया निजसारा । मी अपाडें कीर अपुरा । परि तुमचेनि
बोलें अवधारा । थोरावें जरी १४० जी तुम्ही चित्त देयाल । तरी ब्रह्म मियां
होइजेल । काय जहालें अभ्यासिजेल । सांगाल जें ४१ हांहो नेणों कवणाची
काँहाणी । आइकोनि श्लाघिजत असों अंतःकरणीं । ऐसी जाहलेपणाची शिर-
याणी । कायसी देवा ४२ हें आंगें म्यां होइजो का । येतुले गोसावी आपुलें-
पणें कीजो का । तंव हांसोनि श्रीकृष्ण हो का । करूं म्हणती ४३ देखा सं-
तोषु एक न जोडे । तंवचि सुखाचें सैंघ सांकडें। मग जोडलिया कवणीकडे ।
अपुरें असे ४४ तैसा सर्वेश्वरु बळिया सेवकें[11] । म्हणोनि ब्रह्महीं होय तो कौ-
तुकें । परि कैसा भारें आतला[12] पिकें । दैवाचेनि ४५ जो जन्मसहस्रांचिया-
साठीं । इंद्रादिकांही महाँगु[13] भेटी । तो आधीनु केतुला किरीटी । जे बोलुही
न साहे ४६ मग ऐका जें पांडवें । म्हणितलें म्यां ब्रह्म होआवें । तें अशेषही
देवें । अवधारिलें ४७ तेथ ऐसेंचि एक विचारिलें । जे या ब्रह्मत्वाचे डोहळे
जाहले । परि उदरा वैराग्य आहे आलें । बुद्धीचिया ४८ एऱ्हवीं दिवस तरी
अँपुरे[14] । परी वैराग्यवसंताचेनि भरें । जे सोहंभाव मँहुरें[15] । मोडोनि[16] आला ४९
म्हणोनि प्राप्तिफळीं[17] फळतां । ययासि वेळु न लगेल आतां । होय विरक्तु
ऐसा अनंता । भरंवसा जाहला १५० म्हणे जें जें हा अधिष्ठील[18] । तें आरंभींच
यया फळेल । म्हणोनि सांगितला न[19] वचेल । अभ्यासु वायां ५१ ऐसें विवरो-
नियां श्रीहरी । म्हणितलें तिये अवसरीं । अर्जुना हा अवधारीं । पंथराजु[20] ५२
तेथ प्रवृत्तितरूच्या[21] बुंडीं[22] । दिसती निवृत्तिफळांचिया[23] कोडी[24] । जिये मार्गीचा
कापडी[25] । महेशु[26] आझुनी ५३ पैल योगवृंदें वहिलीं[27] । औडवीं आकाशीं[28] नि-
घालीं । कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं । धोरणु[30] पडिला ५४ तिहीं आत्मबोधा-
चेनि उजुकारें[31] । धांव घेतली एकसरें[32]। कीं येर सकळ मार्ग निदसुरे[33] । सांडूनियां
५५ पाठीं[34] महर्षी येणें आले। साधकांचे सिद्ध जाहाले। आत्मविद[35] थोरावले[36]।
येणेंचि पंथें ५६ हा मार्गु जैं देखिजे । तैं तहान भूक विसरिजे । रात्रिदिवसु
नेणिजे । वाटे इये ५७ चालतां पाउल जेथ पडे । तेथ अपवर्गाची[37] खाणी

केलें, तो शेवटीं पांडवांच्या उपयोगी पडला ! ३७ म्हणून, पुष्कळ दिवस त्याची सेवा करावी, किंवा समय पाहून त्याची विनवणी करावी, इतका देखील प्रयास त्या दैववान् अर्जुनाला पडला नाहीं ! ३८ श्रोते म्हणतात, "हें असो. आतां पुढें कथाभाग लवकर सांगा." तेव्हां ज्ञानेश्वर म्हणतातः—अर्जुन लडिवाळपणानें म्हणतो कीं, "देवा, तुम्हीं हीं जीं संतांचीं चिन्हें सांगितलीं तीं माझ्या अंगीं वसत नाहींत, ३९ एऱ्हवीं या लक्षणांचें तात्पर्य जाणण्यास मी खरोखर अयोग्य आणि अपुरा असा आहें; परंतु तुमच्या सांगण्यानें जर मला योग्यता आली तर येईल. १४० जर तुम्ही मनांत आणलें, तर मी ब्रह्म सुद्धां होईन ! तुम्ही ज्याचा मला अभ्यास करावयास सांगाल, तो करण्याला मला काय अशक्य आहे ? ४१ ही तुम्ही कोणाची गोष्ट सांगितली हें मला कांहीं कळत नाहीं; परंतु ती ऐकल्यापासून तिची स्तुति करावी असें अंतःकरणांत वाटतें; तर ही योग्यता ज्याच्या अंगांत असेल, त्याच्या आनंदास पारावारच नाहीं ! ४२ प्रभो, याचप्रमाणें माझे अंगीं योग्यता येईल एवढें आपण कराल काय ? " तेव्हां श्रीकृष्ण हंसून म्हणाले कीं, "हो, तुला आम्ही ब्रह्मरूपी करूं. ४३ असें पहा कीं, जर एक संतोष प्राप्त न झाला तर चोहींकडे सुखाची उणीव असते; परंतु तो एकदां प्राप्त झाला म्हणजे मग जिकडे तिकडे सुखच सुख; ( सुखाची कोठेंच उणीव नाहीं. ) ४४ त्याचप्रमाणें, जो सर्वेश्वराचा पूर्ण सेवक बनला आहे, तो सहज ब्रह्मरूपी होऊं शकेल; पण अर्जुन सुदैवाच्या पिकाच्या भारानें किती लवला आहे पहा: ४५ जो ईश्वर हजारों जन्मांनीं इच्छेला सुद्धां भेटण्यास दुर्मिळ आहे, तो अर्जुनाच्या इतका आधीन झाला आहे कीं, त्याचा शब्दही खालीं पडूं देत नाहीं. ४६ तेव्हां ऐका कीं, अर्जुनानें मी ब्रह्म व्हावें असें जें म्हटलें तें देवांनीं सर्व ऐकिलें. ४७ त्या वेळेस देवाच्या मनांत असा विचार उत्पन्न झाला कीं, अर्जुनाला ब्रह्म होण्याविषयींचे डोहाळे लागले आहेत, यावरून त्याच्या बुद्धीच्या उदरांत वैराग्याचा गर्भ राहिला आहे. ४८ अथवा, अर्जुन हा नूतन झाड असूनही वैराग्यरूप वसंताच्या भरानें अहंब्रह्मरूप मोहरानें ओथंबला आहे ? ४९ म्हणून याला मोक्षरूप फळाची प्राप्ति अगदीं लवकर होईल; कारण हा विरक्त झाला आहे, अशी श्रीकृष्णाचीही खातरी झाली. १५० श्रीकृष्ण म्हणतातः—आतां हा अर्जुन जें अनुष्ठान करील, त्याचें त्याला लागलीच फळ मिळेल; म्हणून, त्याला जर हा अभ्यास करावयास सांगितला तर तो वायां जाणार नाहीं. ५१ अशा प्रकारें त्यावेळीं श्रीहरींनीं मनांत विचार करून म्हटलें:—अर्जुना, आम्ही जो तुला योगमार्ग सांगणार आहों, तो सर्व मार्गांचा राजा आहे; तो तूं ऐक. ५२ तो योग असा आहे कीं, ज्याच्या प्रवृत्तिरूपी वृक्षाखालीं कोट्यावधि मोक्षफलें दृष्टीस पडतात; ( ज्याचें आचरण करूं लागलें असतां मोक्षप्राप्ति होते; ) त्या या मार्गाची श्रीशंकर हे अद्यापपावेतों यात्रा करीत आहेत ! ५३ दुसरे योगीजनही, प्रथम हृदयाकाशांत आडमार्गानें चालूं लागले, पण शेवटीं अनुभवाच्या पाऊलांनीं चालतां चालतां त्यांना हमरस्ता सांपडला. ५४ आणि मग त्यांनीं इतर अज्ञानरूप सर्व मार्ग सोडून त्या योग्यांनीं आत्मबोधाच्या सरळ मार्गानें एकदम धाव घेतली. ५५ पूर्वीचे महर्षि याच मार्गानें आले, आणि ते साधकांचे सिद्ध बनले, याचप्रमाणें तत्त्वज्ञानी हे याच पंथानें श्रेष्ठत्वास पावले. ५६ जेव्हां हा मार्ग दृष्टीस पडतो, तेव्हां तहान व भूक हीं हारपतात. या वाटेनें जात असतां रात्र व दिवस यांचें भान राहात नाहीं, ५७ या मार्गाचें आक्रमण करीत असतां, ज्या ठिकाणीं मनुष्य पाऊल टाकील त्या ठिकाणीं मोक्षाची खाणच उत्पन्न होते; व कदाचित् तो आडमार्गानें

१ सेवावा. २ प्रयास, आवड. ३ दैववानाला. ४ लडिवाळपणानें. ५ अपरिमित, अतिशय. ६ मला महत्त्व येईल. ७ गोष्ट. ८ स्तुति करीत राहूं. ९ फार. १० संकट. ११ ज्या सेवकाचा धनी सर्वेश्वर समर्थ आहे अशानें. १२ दडपलेला. १३ दुर्मिळ. १४ अपुरते. १५ मोहोरानें. १६ वाढला. १७ मोक्षप्राप्ति. १८ ग्रहण करील, आचरील. १९ जाणार नाहीं. २० राजमार्ग, राजयोग. २१ संसारवृक्ष. २२ खालीं. २३ मोक्षफळाच्या. २४ कोटी २५ यात्रेकरू. २६ शंकर. २७ प्रथम. २८ आडव्यातिडव्या मार्गानें. २९ हृदयाकाशीं. ३० हमरस्ता. ३१ सरळ मार्गानें. ३२ एकसारखीं. ३३ अज्ञानांतील. ३४ नंतर. ३५ तत्त्वज्ञानी. ३६ श्रेष्ठ झाले. ३७ मोक्षाची.

उघडे । आंहांटलिया तरी जोडे । स्वर्गसुख ५८ निगिजे पूर्वीलियां मोहरा । कीं येइजे पश्चिमेचिया घरा । निश्चळपणें धनुर्धरा । चालणें एथिचें ५९ येणें मार्गें जया ठाया जाइजे । तो गांवो आपणचि होइजे । हें सांगों काय सहजें । जाणसी तूं १६० तेथ पार्थे म्हणितलें देवा । तरि तेंचि मग केव्हां । कां आर्तिसमुद्रोनि न काढावा । बुडतु जी मी ६१ तंव श्रीकृष्ण म्हणती ऐसें । हें उँत्सुंखळ बोलणें कायसें । आम्हीं सांगतसों आपैसें । वरि पुशिलें तुवां ६२

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः । नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥११॥

तरी विशेषें आतां बोलिजेल । पारि तें अनुभवें उपेगा जाईल । म्हणोनि तैसें एक लागेल । स्थान पाहावें ६३ जेथ आरोगुकेचेनि कोडें । बैसलिया उठों नावडे । वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया जें ६४ जो संतीं वसविला ठावो । संतोषासि सावावो । मना होय उत्सावो । धैर्याचा ६५ अभ्यासुचि आपणयातें करी । हृदयातें अनुभव वरी । ऐसी रम्यपणाची थोरी । अखंड जेथ ६६ जया आंड जातां पार्था । तपश्चर्या मनोरथा । पाखांडियाही आस्था । समूळ होय ६७ स्वभावें वाटे येतां । जरी वरपँडा जाहला अवचितां । तरी सकामुही परि मोघौता । निघों विसरे । ६८ ऐसेनि न राहतयातें राहवी । भ्रमतयातें बैसवी । थापटूनि चेववी । विरक्तीतें ६९ हें राज्य वरें सांडिजे । मग निवांता एथेंचि असिजे । ऐसें शृंगारियांहि उपजे । देखतखेंवो १७० जें येणेंमानें बरवंट । आणि तैसेंचि अति चोखट । जेथ अधिष्ठानें प्रगट । डोळां दिसे ७१ आणिकही एक पहावें । जें साधकीं वसतें होआवें । आणि जनाचेनि पायरवें । रुळेचिना ७२ जेथ अमृताचेनि पांडें । मुळाहीसकट गोडें । जोडती दाटें झाडें । सदा फळतीं ७३ पाउला पाउला उदकें । वर्षाकाळेंही अतिचोखें । निर्झरें कां विशेखें । सुलभें जेथ ७४ हा आतपुही अळुमाळु । जाणिजे तरी शीतळु । पवनु अति निश्चळु । मंद झुळके ७५ बहुतकरूनि निःशब्द । दाट न रिगे श्वापद । शुकें हंन षट्पद । तेउतें नाहीं ७६ पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें । कवणें एके वेळे बैसे । तरी कोकिळही हो ७७ निरंतर नाहीं । तरि आलीं गेलीं कांहीं । होतु कां मयूरेंही । आम्ही ना न म्हणों ७८ पारि अवश्यक पांडवा । ऐसा ठावो जोडावा । तेथ निगूढ मठ होआवा । कां शिवालय ७९ दोहींमाजि आवडे तें । जें मानलें होय

गेला तरी स्वर्गसुख मिळतें. ५८ तो पूर्वेच्या वाटेनें निघून म्हणजे प्रवृत्तीची वाट सोडून ( इंद्रियांचें आकलन करून ) पश्चिमेस येतो, ( निवृत्तीच्या वाटेला लागतो. ) हे धनुर्धरा, या ठिकाणचें चालणें कोणतें म्हणशील तर निश्चळपणें बसणें हें होय. ५९ या मार्गानें ज्या ठिकाणाला जातो, तें स्थानच ( गांव ) तो स्वतः बनतो, हें निराळें काय सांगावें? तूं तें आपोआप जाणशील. १६० तेव्हां पार्थ म्हणाला, "देवा तर तुम्ही हें योगशास्त्र मला केव्हां सांगाल? कारण, उत्कंठारूप समुद्रांत बुडालेला जो मी, त्या मला वर कां न काढावा?" ६१ तेव्हां कृष्ण म्हणाले:--आम्ही होऊन तुला सांगत असतांना मग प्रश्न करण्याचा इतका उतावळेपणा कां करतोस? ६२

**अन्वयार्थ**--(शुचौ देशे)-पवित्र स्थानीं-(आत्मनः)-स्वतःचें-(नात्युच्छ्रितं)-फार उंच नाहीं व-(नातिनीचं)-फार सखल नाहीं, असें व-(चैलाजिनकुशोत्तरं)-खालीं दर्भ, त्यावर हरिणाचें किंवा व्याघ्राचें कातडें व त्यावर मऊ वस्त्र असें-(आसनं)-आसन-(स्थिरं)-स्थिर, अचल-(प्रतिष्ठाप्य)-स्थापून मांडून, ११

तर आतां आम्ही तुला स्पष्टपणें सांगतों, पण त्याचा अभ्यास केल्यावर उपयोग पडेल, म्हणून तशा रीतीच्या योगाभ्यासाकरितां एक जागा शोधून काढावी. ६३ ती जागा अशी असावी कीं, ज्या ठिकाणीं करमणुकीची हौस पुरी होत असल्यामुळें, बसल्यावर उठूं नये, असें वाटावें; आणि जी पाहतांक्षणींच वैराग्य दुप्पट वाढवें. ६४ ती जागा पूर्वी सत्पुरुषांनीं वसविलेली असावी, व तिच्यापासून मनाच्या संतोषाला साहाय्य व्हावें, व धैर्याचा उत्कर्ष व्हावा. ६५ त्या जागेंत अभ्यास करण्यास उत्तेजन यावें आणि मनाला अनुभवानें माळ घालावी, अशी त्या जागेची रम्यपणाबद्दल नेहमीं योग्यता असावी. ६६ पार्था, त्या जागेच्या जवळून गेलें असतां पाखांड्याचेही मनांत तपश्चर्या करण्याबद्दल आस्था उत्पन्न व्हावी. ६७ एखादा मनुष्य सहज वाट चालत असतां जर अवचित त्या ठिकाणीं येईल, तर, जरी तो कामेच्छु असून आपल्या घरीं जात असला, तरी तें ठिकाण सोडून जाऊं नये, असें त्याला वाटावें. ६८ अशा रीतीनें ज्याला त्या ठिकाणीं राहण्याची इच्छा नाहीं, त्यालाही ती जागा राहवून घेते, आणि फिरणारास बसवून घेते, व वैराग्यास हालवून जागें करिते. ६९ एखादा राजा, किंवा विलासी पुरुष जरी असला, तरी त्यालाही ती जागा पाहतांक्षणींच असें वाटावें कीं, आपलें राज्य सोडून या ठिकाणीं एकांतवासांत राहावें. १७० अशा प्रकारानें जें स्थान उत्तम, आणि त्याचप्रमाणें अति शुद्ध, त्या ठिकाणीं ब्रह्मानंद प्रत्यक्ष अनुभवास येतो. ७१ आणखी एक गोष्ट साधकानें पहावी; ती ही कीं, त्या ठिकाणीं साधकांची वस्ती असून इतर मनुष्यांची वर्दळ लागणार नाहीं. ७२ त्या ठिकाणीं अमृतासारखी मुळांसुद्धां गोड व नेहमीं फळांनीं युक्त अशीं दाट झाडें असावीं; ७३ तेथें पावलापावलावर पाण्याचे झरे असावे; ते असे कीं, ज्यांचे पाणी पावसाळ्यांतही निर्मळ असतें; व तें पुष्कळ असून, उतरण्यास किंवा पाणी काढण्यास सोपें असावें. ७४ त्या ठिकाणीं सूर्याचें ऊन सौम्य असावें, आणि कदाचित् ऊन स्वच्छ पडलें तर त्यापासून ताप उत्पन्न होऊं नये. तसाच वारा मंद व शीतल वाहत असावा. ७५ तेथें बहुतकरून गडबड नसावी, व श्वापदांची गर्दी नसावी; परंतु राघू आणि भ्रमर हे तुजशीं असावेत. ७६ त्या ठिकाणीं बदकें, हंस, दोन चार चक्रवाक पक्षी, तसेंच एखादे वेळेस कोकिळ पक्षी येऊन बसला तरी चालेल. ७७ नेहमीं नव्हत, पण येऊन जाऊन मोर असले तरी आम्ही त्यांना नको म्हणणार नाहीं; ७८ परंतु हे पांडवा, अवश्यमेव अशा तऱ्हेची एक जागा पहावी आणि त्या ठिकाणीं गुप्त गुहा किंवा शिवालय असावें; ७९ आणि दोहोंतून जें आपणास आवडेल किंवा आपल्या

१ आडमार्गानें गेल्यास. २ निघावें. ३ प्रवृत्तीच्या. ४ वाटेस. ५ निवृत्तीच्या. ६ उत्कंठारूप सागरांतून. ७ उतावळीचें. ८ आपण होऊन. ९ पुनः. १० अभ्यासानें. ११ उपयोगी. १२ समाधान व्हावें या इच्छेनें. १३ दुप्पटपणा, दृढपणा. १४ साहाय्य, अधीकपणा. १५ हर्ष, प्रोत्साहन. १६ जवळून गेलें असतां. १७ प्राप्त. १८ एकाएकी, सहज. १९ माघारा. २० फिरणाराला. २१ उठवी, जागें करी. २२ चांगलें २३ पाहतांच. २४ उत्तम. २५ शुद्ध. २६ ब्रह्मस्वरूप. २७ वस्ती केलेली. २८ वर्दळीनें. २९ मिळेना. ३० तुलनेनें. ३१ सांपडतात. ३२ फळांनीं युक्त असणारीं. ३३ पावसाळ्यावांचून. ३४ झरे. ३५ ऊन. ३६ थोडा. ३७ शब्दरहित. ३८ जनावर. ३९ पोपट. ४० अथवा. ४१ भ्रमर. ४२ तेथें. ४३ चक्रवाक पक्षी. ४४ असोत. ४५ गुप्त निवासस्थान.

चित्तें । बहुतकरूनि एकांतें । बैसिजे गा १८० म्हणोनि तैसें तें जाणावें । मन राहतें पांहावें । राहील तेथ रचावें । आसन ऐसें ८१ वरी चोखट मृगसेवडी । माजी धूतवस्त्राची घडी । तळवटीं अमोडी । कुशांकूर ८२ सकोमळ सरिसे । सुबद्ध राहती आपैसे । एकपाडें तैसें । वोजों घालीं ८३ परि सावियांचि उंच । होईल । तरि आंग हन डोलेल । नीच तरी पावेल । भूमिदोषु ८४ म्हणोनि तैसें न करावें । समभावें धरावें । हें बहु असो होआवें । आसन ऐसें ८५

तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः । उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥

मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण । करूनि सद्गुरुस्मरण । अनुभविजे ८६ जेथ स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे । जंव काठिण्य विरे । अहंभावाचें ८७ विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे । मनाची घडीघडे । हृदयामाजीं ८८ ऐसें ऐक्य हें सहजें । फावे तंव राहिजे । मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ८९ आतां आंगातें आंग वरी । पवनातें पवनु धरी । ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे १९० प्रवृत्ति माघौति मोहरे । समाधि ऐलाडी उतरे । आघवें अभ्यासु सरे । बैसतखेवों ९१ मुद्रेची प्रौढी ऐशी । तेचि सांगिजेल आतां पारियेसीं । तरी ऊरु या जघनासी । जडोनि घालीं ९२ चरणतळें देव्हडीं । आधारद्रुमाच्या बुडीं । सुघटितें गाढीं । संचेरीं पां ९३ सव्य तो तळीं ठेविजे । तेणें सिवणीमध्यें पीडिजे[22] । वरी बैसे तो सहजें । वाम चरणु ९४ गुद मेढ्रांआंतौतीं । चारी अंगुळें निगुतीं । तेथ सांधे साधें प्रांतीं । सांडूनियां ९५ माजि अंगुळ एक निगे । तेथ टाचेचेनि उत्तरभागें । नेहेटिजे[28] वारि आंगें । पेलेलेनि ९६ उचलिलें कां नेणिजे । तैसें पृष्ठांत उचलिजे । गुल्फद्वय धरिजे । तेणेंचि मानें ९७ मग शरीर संचु पार्था । अशेषही सर्वथा । पार्ष्णींचा माथा । स्वयंभु होय ९८ अर्जुना हें जाण । मुळबंधाचें लक्षण । वज्रासन गौण । नाम यासी ९९ ऐसी आधारीं मुद्रा पडे । आणि आधींचा मार्गु मोडे । तेथ अपानु आंतुलेकडे । वोहोटों लागे २००

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः । संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥

तंव करसंपुट आपैसें । वाम चरणीं बैसे । तंव बाहुमूळीं दिसे । थोरीव आली १ माजि उभारलेनि[40] दंडें । शिरकमळ होय गाढें । नेत्रद्वारींचीं कवाडें । लागूं पाहती २ वरचिलें पातीं ढळती । तळींचीं तळीं पुंजाळती । तेथ अर्धो-

चित्तास पसंत पडेल, त्या ठिकाणीं बहुतकरून एकांतवासांत बसावें; १८० म्हणून अशी सर्व सोय पाहून त्या ठिकाणीं मन स्थिर होतें किंवा नाहीं पहावें; आणि स्थिर झाल्यास तेथें आसन घालावें; त्याचा प्रकार असा; ८१ वर धूतवस्त्राची घडी असून त्याच्या खालीं कृष्णाजिन व त्याच्याखालीं साग्र दर्भ असावे. ८२ ते दर्भ कोमल, सारखे आणि आपोआप एके ठिकाणीं राहतील अशा चांगल्या व्यवस्थेनें जोडलेले असावे. ८३ परंतु तें आसन कदाचित् उंच झालें तर आंग डोलेल, आणि अगदीं सखल झालें तर भूमीचा गारवा अगर घाळवी इत्यादिकांपासून इजा होईल, ८४ म्हणून तसें न करितां तें समभाग धरावें. अशा रीतीनें आसनाची योजना करावी. ८५

**अन्वयार्थ**—(तत्र आसने)–त्या आसनावर–(उपविश्य)–बसून–(यतचित्तेंद्रियक्रियः)–चित्त व इंद्रियें यांच्या क्रिया ज्यानें नियमित केल्या आहेत असा होऊन–(मनः एकाग्रं कृत्वा)–मनाला एकाग्र करून–(आत्मविशुद्धये)–चित्तशुद्धीसाठीं–(योगं)–ध्यान–(युञ्ज्यात्)–करावें. १२

मग त्या ठिकाणीं मनाची एकाग्रता करून सद्गुरूचें स्मरण करून आत्मसुखाचा अनुभव घ्यावा. ८६ त्या ठिकाणीं, अहंभाव नाहींसा होऊन अष्टसात्विकभाव अंतर्बाह्य उत्पन्न होत तोंपर्यंत सद्गुरूचें आदरानें स्मरण करावें. ८७ जेथें विषयांची आठवण देखील राहणार नाहीं, इंद्रियांची विषयांवरील इच्छा नाहींशी होईल, आणि मनाची हांव मोडून हृदयांत घडी बनेल, ८८ अशा रीतीनें सहज ऐक्य होईपर्यंत त्या ठिकाणीं रहावें; आणि मग त्याच्च बोधानें युक्त होऊन आसनावर बसावें. ८९ नंतर अंगानें अंग सावरावें व प्राणापानवायूनें प्राणापानाला आंवरावें; अशा रीतीनें अनुभव स्पष्ट येऊं लागतो. १९० त्या ठिकाणीं प्रवृत्ति मागें फिरून समाधि सहज साध्य होतो. मग आसनावर बसल्याबरोबर सर्व अभ्यास आपोआप पूर्ण होतात. ९१ मुद्रेची जी थोरवी आहे, तिचें आतां वर्णन करितों, तें ऐक. पोटऱ्या मांड्यांस लावून आसन घालावें. ९२ एका पायावर दुसरा पाय वांकडा ठेवून गुदस्थानच्या बुडाशीं टांच स्थिर आणि बळकट लावावी. ९३ उजवा पाय खालीं ठेवून, त्यानें वृषणापासून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा मध्यें दाबावी. नंतर डावा पाय उजव्या पायावर सहज ठेवावा. ९४ अपानद्वार आणि शिश्न यांमध्यें जी चार बोटें जागा आहे, ती मागेंपुढें दीड दीड बोट सोडून ९५ मध्यें जी एक बोट जागा राहते, तीं, शरीर तोलून धरून टांचेच्या वरच्या भागानें दाबावी. ९६ शरीर उचललेलें आहे असें समजूं न देतां पाठीच्या कण्याचा शेवटला भाग उचलावा आणि त्याचप्रमाणें दोन्ही पायांचे घोटे सरळ धरावे. ९७ मग, पार्था, हें सर्व शरीर घोट्याच्या माथ्यावर आधाराशिवाय स्वतःसिद्ध राहतें. ९८ अर्जुना हें मूळबंध नामक आसनाचें लक्षण होय. यालाच वज्रासन असें एक गौण नांव आहे. ९९ अशा रीतीनें मूळबंधाचें आसन केलें, म्हणजे खालचा रस्ता बंद होतो; आणि मग अपानवायु आंतल्या आंत वर जाऊं लागतो. २००

**अन्वयार्थ**—(कायशिरोग्रीवं)–शरीराचा मध्यभाग, शिर व मान यांना–(समं)–सरळ व–(अचलं)–निश्चल–(धारयन्)–धारण करणारा व–(स्थिरः)–स्थिर होऊन—(स्वं नासिकाग्रं)–आपल्या नासिकेचें अग्र–(संप्रेक्ष्य) [इव]–जणुं काय चांगल्या प्रकारें पहात असल्याप्रमाणें राहून–(च दिशः)–व इकडेतिकडे–(अनवलोकयन्)–न पहाणारा १३

नंतर डाव्या पायावर सहज दोन्ही हात द्रोणाकार करून ठेवावे, म्हणजे अर्थात् बाहुटे उंच होतात. १ नंतर शरीर स्थिर राहिल्यानें शिरकमल हें आंत गढतें, आणि त्यामुळें डोळ्यांच्या पापण्या मिटूं लागतात. २ वरची पापणी खालीं येते व खालची पापणी प्रफुल्लित झाल्यामुळें मोठी होते. असें झालें म्हणजे डोळ्यांची अर्धी उघडलेली

१ मृगचर्म. २ धुतलेल्या वस्त्राची. ३ साग्र, न मोडलेले. ४ दर्भ. ५ चांगलें, व्यवस्थित. ६ कदाचित्. ७ कासाविशी, चळवळ. ८ संभाळी. ९ उत्कर्ष, स्वच्छता. १० माघारी फिरे. ११ बसल्याबरोबर. १२ बाहुपासून वरच्या अंगाची जी ठेवण होते ती. १३ मांडी. १४ पोटरीला. १५ एकापायावर दुसरा पाय वांकडा ठेवणें. १६ गुदस्थानच्या. १७ सुस्थिर. १८ बळकट. १९ शिरकवावी, लावावी. २० उजवी टांच. २१ वृषणावरून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा. २२ दाबावी. २३ अपान द्वार. २४ शिश्नामधील.

२५ नुसती. २६ दीड दीड अंगुळ. २७ वरचे भागानें. २८ दाबावें. २९ तोलून धरून. ३० पाठीच्या कण्याचा शेवटचा भाग. ३१ घोटे. ३२ शरीररूपी इमारत. ३३ घोट्याच्या. ३४ अपानवायु ऊर्ध्वगतीस नेणें. ३५ मूलाधार चक्रांत. ३६ आंतल्या बाजूस. ३७ संकोचूं लागतो. ३८ द्रोणाकार हात. ३९ उंचपणा. ४० देह उभे राहिल्यानें. ४१ आंत गेल्यासारखें. ४२ पापण्या. ४३ वरची. ४४ पसरतात. ४५ अर्धी मिटलेली व अर्धी उघडलेली.

न्मीलित स्थिती । उपजे तया ३ दिठी राहोनि आंतुलेकडे । बाहेर पाऊल
घाली कोडें[1] । ते ठायीं ठावो पडे । नासाग्रपीठीं[2] ४ ऐसें आंतुच्या आंतुचि
रचे । बाहेरी मागुतें न वचे । म्हणोनि राहणें आधिये दिठीचें। तेथेंचि होय ५
आतां दिशांची भेटी घ्यावी । कां रूपाची वास पहावी । हे चाड सरे आघवी ।
आपैसया ६ मग कंठनाळ[3] आटे । हनुवटी हडतीं[4] दाटे । ते गाढी होऊनि ने-
हटे[5] । वक्षःस्थळीं ७ माजि घांटिका[6] लोपे । वरी बंधु[7] जो आरोपे । तो जालंधरु
म्हणिपे । पंडुकुमरा ८ नाभी[9] वरी पोखे । उदर हें थोके । अंतरीं फांके । हृद[10]-
यकोशु ९ स्वाधिष्ठाना[11]वरिचिले कांठीं । नाभिस्थानातळवटीं । बंधु पडे किरीटी ।
वोढियाणा[12] तो २१० ऐसी शरीराबाहेरलीकडे । अभ्यासाची पाखर[13] पडे ।

प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः । मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥१४॥

तंव आंतु त्रींथ[14] मोडे । मनोधर्माची ११ कल्पना निमे । प्रवृत्ती शमे । आंग
मन विरमे[15] । सावियांचि[16] १२ क्षुधा काय जाहाली । निद्रा केउती गेली । हे
आठवणही हारपली । न दिसे वेगां १३ जो मूळबंधें कोंडला । अपानु मा-
घौता मुरडला । तो सवेंचि वरी सांकडला[17] । धरी फुगूं १४ क्षोभलेपणें माजे ।
उवाइला[18] ठायीं गाजे । मणिपूरेंसीं[19] झुंजे । राहोनियां १५ मग थोंवलिये[20] वोह-
टुळी[21] । सैंघें[22] घेऊनि घर डहुळी । बाळपणींची कुहीटुळी[23] । बाहेर घाली १६ भी-
तरीं वैळी[24] न धरे । कोठ्यामाजी संचरे । कफपित्ताचे थारे । उरों नेदी १७ धा-
तूंचे समुद्र उलंडी । मेदाचे पर्वत फोडी । आंतली मज्जा काढी । अस्थिगतें[25]
१८ नाडीतें[26] सोडवी । गात्रांतें विघडवी । साधकातें भेडसावी । परि बिहावें
ना १९ व्याधीतें दावी । सवेंचि हरवी । आप पृथ्वी कालवी । एकवाट २२०
तंव येरीकडे धनुर्धरा । आसनाचा उबारा[27] । शक्ति करी उजगरा[28] । कुंडलि[29]-
नीतें २१ नागिणीचें पिलें । कुंकुमें नाहलें । वळण[30] घेऊनि आलें । सेजे जैसें
२२ तैशी ते कुंडलिनी । मोटकी[31] औटे[32] वळणी । अधोमुख सर्पिणी । निदेली
असे २३ विद्युल्लतेची विडी[33] । वन्हिज्वाळांची घडी । पंधरेयाची चोखडी । घों-
टीव जैशी २४ तैशी सुबंध[34] आटली । पुटीं[35] होती दाटली । तें वज्रासनें चिमु[36]-
टली । सांवधु होय २५ तेथ नक्षत्र जैसें उलंडलें । कीं सूर्याचें आसन मोडलें ।
तेजाचें बीज विरूढलें[37] । अंकुरेंशीं २६ तैशी वेढियातें सोडिती । कवतिकें[38] आंग
मोडिती । कंदावरी[39] शक्ती[40] । उठली दिसे २७ सहजें बहुतां दिवसांची भूक ।

व अर्धी मिटलेली दृष्टि होते. ३ अशा रीतीनें दृष्टि आंतल्या आंत राहून कौतुकानें फार बाहेर आलीच तर नाकाच्या शेंड्यापर्यंत येते. ४ अशी आंतल्या आंत दृष्टि कायम होऊन पुनः बाहेर येत नाहीं, म्हणून दृष्टीचें नाकाच्या शेंड्यावर राहणें कायम होतें. ५ यामुळें, इतर दिशांकडे पहावें किंवा स्वरूप दृष्टीस पडेल म्हणून वाट पाहावी ही इच्छा आपोआप नाहींशी होते. ६ मग गळ्याची नळी आंत झांकली जाते आणि हनुवटी गळ्याखालच्या खळगीला लागते व उरावर दृढ होऊन दाबून राहते. ७ पंडुकुमरा, नंतर कंठमणि दिसेनासा होतो. अशा रीतीनें जी मुद्रा बनते, तिला जालंधरबंध असें म्हणतात. ८ बेंबी वर फुगते, पोट सपाट होतें व हृदयकोश अंतर्यामीं पसरतो. ९ अर्जुना, गुदद्वारावरच्या भागावर आणि बेंबीच्या खालच्या भागामध्यें जी मुद्रा बनते तिला ओढियाणाबंध असें म्हणतात. २१० अशा रीतीनें शरिराच्या बाहेरील भागानें अभ्यासक्रम सुरू झाला,

**अन्वयार्थ**—(प्रशान्तात्मा)—ज्याचें अंतःकरण अतिशय शांत आहे,—(विगतभीः)—भयरहित—(ब्रह्मचारिव्रते स्थितः)—ब्रह्मचारिव्रतामध्यें स्थित, असा होऊन—(मनः)—मनाचें—(संयम्य)—संयमन करून—(मच्चित्तः)—मजमध्यें ज्याचें चित्त आहे असा—(युक्तः)—समाहित—(मत्परः)—मत्पर होऊन (आसीत)—रहावें. १४

म्हणजे आंत मनाच्या धर्मांचें बळ नाहींसें होतें. ११ (ते मनोधर्म कोणते तें ऐक.) कल्पना खुंटते, मनाची हांव कमी होते, आणि मनोविकार आपोआप बंद पडतात. १२ भूक काय झाली व झोंप कोणीकडे गेली त्यांची आठवण नाहींशी होऊन त्यांचा पत्ता देखील लागत नाहीं. १३ मूळबंधानें कोंडलेला अपानवायु माघारी फिरला म्हणजे सहज वर अडकून फुगा धरतो. १४ तो क्षोभून बलवत्तर होतो, ३ अडकलेल्या जागीं गुरगुरतो, आणि राहून राहून लिंगचकाशीं धडका मारितो. १५ मग अशा रीतीनें माजलेली वावटळ चोहोंकडे पोटांत फिरून ढवळाढवळ करिते, आणि बाळपणापासून सांचलेली कुजकी घाण बाहेर काढण्याचा प्रयत्न करिते. १६ तो वायु पोटांत तळाशीं न मुरडतां कोठ्यांत शिरतो, आणि कफपित्तांचा नाश करतो. १७ सप्त धातूंचीं स्थानें ओलांडतो, मेदाचे डोंगर फोडतो, आणि हाडांतील रस बाहेर काढतो, १८ नाड्या सोडवतो, अवयवांना शिथिल करतो, आणि योगसाधन करणाराला भीति घालतो; परंतु त्यानें भिऊं नये. १९ तो व्याधि उत्पन्न करतो, आणि लागलीच नाहींशी करतो, व कफ वगैरे ओलसर पदार्थ आणि मांस वगैरे जड पदार्थ एकत्र करतो; २२० अर्जुना, दुसरीकडे काय प्रकार होतो म्हणशील, तर आसनाच्या उष्णतेनें कुंडलिनी नांवाची शक्ति जागी होते. २१ नागिणीचें पिलूं कुंकवानें न्हालेलें जसें वेटोळें करून निजतें, २२ त्याप्रमाणें ती कुंडलिनी लहानसे साडेतीन वेढे घालून खालीं तोंड करून सर्पाप्रमाणें निजलेली असते. २३ ती विजेच्या कंकणाप्रमाणें, किंवा अग्निज्वालेच्या घडीप्रमाणें अथवा घोटून चकचकीत केलेल्या सोन्याच्या वेढ्याप्रमाणें, २४ नाभिस्कंदांत जी दाटून बसलेली असते, ती मूळबंधाच्या चिमट्यानें जागी होते. २५ तेव्हां, नक्षत्र तुटून पडतेवेळीं जसें चकाकतें, किंवा सूर्याचें आसन ढळावें अथवा तेजाचें बीं पेरून त्याला जसा अंकुर यावा, २६ त्याप्रमाणें ती कुंडलिनी आपले वेढे सोडून कौतुकानें आळस देऊन नाभीवर उभी राहिलेली दिसते. २७ सहजच फार दिवसांची भुकेलेली, त्यांत तिला जागें केल्याचें निमित्त

१ कौतुकानें. २ नाकाच्या शेंड्यावर. ३ गळ्याची नळी. ४ गळ्याखालच्या खळगीला लागे. ५ दाबून राहते. ६ कंठमणि. ७ मुद्रा. ८ या नांवाचा कंठस्थानांतील बंध. ९ बेंबी. १० हृदयाकाश. ११ हें द्वितीय पद्म अथवा चक्र लिंगमूलांत आहे, हें रक्तवर्ण सहा दलांचें आहे. १२ सुषुम्ना मार्गानें नाभीचे वरचे भागानें उजवीकडे वर वायु जातो तो बंध. १३ दया. १४ आश्रय. १५ बंद होतें. १६ सहज. १७ संकुचित झालेला. १८ प्रशस्त स्थळीं. १९ नाभिस्थळांतील तृतीय चक्र हें हेमवर्ण दशदलात्मक आहे. २० शांत झालेली. २१ वायुबळीनें. २२ सर्व. २३ कुजकी घाण. २४ वेढा. २५ हाडांतील. २६ वायू मांगास. २७ उष्णतेनें. २८ जागृति. २९ कुंडलिनी नामक शक्ति. ३० वेटाळें. ३१ लहान. ३२ साडेतीन. ३३ कडें, कंकण. ३४ उत्तम, बंधयुक्त. ३५ अकुंचित स्थळीं. ३६ चिमटा घेतलेली. ३७ उगवलें. ३८ कौतुकानें. ३९ नाभीवर. ४० कुंडलिनी.

तैसा आहाचवरि कोरडा । त्वचेचा असे पातोडा । तो झडोनि जाय कोंडा ।
जैसा होय ५२ मग काश्मीरीचे स्वयंभ । कां रत्नबीजा निघाले कोंभ । अवय-
वकांतीची भांबे । तैसी दिसे ५३ नातरी संध्यारागींचे रंग । काढूनि वळिलें
तें आंग । कीं अंतर्ज्योतीचें लिंग । निर्वाळिलें ५४ कुंकुमाचें भरींव । सिद्ध-
रसाचें वोतींव । मज पाहतां सांवेव । शांतिचि ते ५५ तें आनंदचित्रींचे लेपें ।
नातरी महासुखाचें रूप । कीं संतोषतरूचें रोप । थांवलें जैसें ५६ तो कनक-
चंपकाचा कळा । कीं अमृताचा पुतळा । नाना सासिनला मळा । कोंवळि-
केचा ५७ हो कां जे शारदियेचेनि वोलें । चंद्रबिंब पाल्हेलें । कां तेजचि मूर्त
बैसलें । आसनावरी ५८ तैसें शरीर होये। जे वेळीं कुंडलिनी चंद्र पीये ।
मग देहाकृति बिहे । कृतांतु गा ५९ वार्धक्य तरी बेहुडे । तारुण्याची गांठी
विघडे । लोपली उघडे । बाळदशा २६० वयसा तरी येतुलेवरी । एऱ्हवीं बा-
ळाचा बळार्थु करी । धैर्याची थोरी । निरूपमु ६१ कनकद्रुमाच्या पालवीं । रत्न-
कळिका नित्य नवी । नखें तैसीं बरवीं । नवीं निघती ६२ दांतही आन होती।
परी अपाडें सानेजती । जैसी दुबाहीं बैसे पांती । हिरेयांची ६३ माणिकुलि-
यांचिया कणिया । सावियांचि अनुमानिया । तैसिया सर्वांगीं उधवती अणिया ।
रोमांचियां ६४ करचरणतळें । जैसीं कां रातोत्पलें । पारखोळींव होती डोळे ।
काय सांगो ६५ निडारांचेनि कोंदाटे । भोतिये नावरती संपुटें । मग शिवणी
जैशी उतटे । शुक्तिपल्लवांची ६६ तैशी पातियांचिये केंवळिये न संमाये। दिठी
जाकळोनि निघों पाहे । आधिलीचि परी होये । गगना कवळिती ६७ आइकें
देह होय सोनियाचें । परि लाघव ये वायूचें । जे आप आणि पृथ्वीचें ।
अंशु नाहीं ६८ मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा आलोचु आइके । मनो-
गत वोळखे । मुंगियेचें ६९ पवनाचा वारिकां वळघे । चाले तरी उदकीं पाउल
न लागे । येणें येणें प्रसंगें । येती बहुता सिद्धि २७० आइकें प्राणाचा हातु
धरूनी । गगनाची पाउटी करूनी । मध्यमेचेनि दादराहुनी । हृदया आली ७१
ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा । जया विश्वबीजाचिया
कोंभा । साउली केली ७२ जे शून्यलिंगाची पिंडी । जे परमात्मया शिवाची
करंडी । जे प्रणवाची उघडी । जन्मभूमी ७३ हें असो ते कुंडलिनीबाळी । हृदयाआंतु
आली । तंव अनुहताचा बोली । चावळे ते ७४ शक्तीचिया आंगा लागलें । बु-

त्वचेचा जो उगाच पापुद्रा असतो, कोंड्याप्रमाणें निघून जातो, ५२ मग केशराच्या स्वयमेव रंगासारखी, अथवा रत्नरूप बीजाला निघालेल्या कोंबासारखी त्या अवयव कांतीची झांक दिसते. ५३ नाहींतर संध्याकाळच्या आकाशाच्या रंगाची लाली काढून तें अंग बनविलें असावें, अथवा आत्मचैतन्याच्या तेजाचें लिंग केलें असावें, ५४ किंवा तें कुंकुमानें भरलेलें आणि आत्मरसानें ओतलेलें, अथवा ती मूर्तिमंत शांतिच असावी असें मला वाटतें. ५५ तें आनंदरूपी चित्राचा रंग, किंवा परब्रह्म सुखाचें रूप, अथवा संतोषरूपी वृक्षाचें रोप आहे असें भासतें. ५६ तो सोनचाफ्याचा कळा किंवा अमृताचा पुतळा, अथवा नाजुकपणाचा भर आलेला असा मळाच. ५७ शरदृतूच्या पौर्णिमेच्या ओलाव्यानें चंद्रबिंब शोभावें, किंवा जणुं काय मूर्तिमंत तेजच आसनावर बसावें, ५८ त्याप्रमाणें, कुंडलिनी चंद्रामृताच्या तळ्यांतील अमृत प्याल्यावर शरीर दिसूं लागतें; मग त्या शरिराला यम देखील भितो ! ५९ वृद्धपणा मागें फिरतो, तारुण्याची उंबारी मोडते आणि गेलेली बाल्यावस्था पुनः प्राप्त होते. २६० वयानें पाहिलें तरी एवढासाच दिसतो; परंतु, अतिशय पराक्रम करतो; व त्याचें धैर्य अनुपम असतें. ६१ सुवर्णवृक्षाच्या पालवींतून रत्नांची कळी शतत नवी निघावी, त्याप्रमाणें नवीं नखें निघून सतेज दिसतात. ६२ दांतही दुसरे होतात, परंतु अतिशय बारीक बनतात–जणुंकाय दोहीं बाजूंला हिऱ्यांच्या पंक्तीच मांडल्या आहेत ! ६३ सर्व अंगावरील रोमांची अग्रें माणकांच्या कण्याप्रमाणें लहानें अशी सतेज उद्भवतात. ६४ हातपायांचे तळवे कमळाप्रमाणें लाल बनतात; आणि डोळे स्वच्छ होतात. आणखी काय सांगावें ? ६५ मोत्यें परिपक्वदशेस येऊन फुगल्याप्रमाणें शिंपांत मावत नाहींत म्हणून शिंपांचा सांधा उकलतो, ६६ त्याप्रमाणें दृष्टि पापण्यांच्या कवळींत न मावतां लांबवर पोहोंचून बाहेर येऊं पाहते. ती दृष्टि पहिलीच खरी, परंतु सगळ्या गगनाला व्यापते. ६७ अर्जुना, ऐक:—देहाची सुवर्णासारखी कांति होते, परंतु तो सर्व वायुमय असतो, त्यांत आप आणि पृथ्वी यांचा अंशही नसतो. ६८ मग त्याला समुद्रापलीकडीलही वस्तु दिसतात. स्वर्गांतील मसलती समजतात व मुंगीच्याही मनांतील भाव ओळखता येतात. ६९ तो वाऱ्याच्या घोड्यावर स्वार होतो, पाण्यावर चालतांना पाण्याला पाय लागत नाहीत. अशा प्रकारें प्रसंगानुसार त्याला पुष्कळ सिद्धी प्राप्त होतात. २७० ऐका की, प्राणवायूचा हात धरून व हृदयाकाशाच्या पायऱ्या करून सुषुम्नेच्या जिन्यानें हृदयांत आलेली, ७१ व जीवात्म्याला शोभा देणारी जी कुंडलिनी जगदंबा, ती जगद्बीजाचा कोंब (गाभा) जो जीव त्याच्यावर सावली करते. ७२ जी निराकार ब्रह्माची साकारमूर्ति, जी परमात्म्या शिवाची संबळी, जी ॐकाराची केवळ जन्मभूमीच ७३ आणखी काय सांगावें ! ती कुंडलिनी जेव्हां हृदयांत आली म्हणजे अखंड ॐकाराचा ध्वनि होऊं लागतो. ७४ त्या कुंडलिनीच्या जवळ बुद्धि असल्यामुळें तिच्या कानावर किंचित ॐकाराचा

१ वरवरचा, उगाच. २ पापुद्रा. ३ केशर. ४ शोभा, झांक. ५ संध्याकाळचे प्रकाशांतील. ६ आंतल्या प्रकाशाचें. ७ स्वच्छ केलें. ८ अमृत. ९ मला वाटतें. १० मूर्तिमंत. ११ रंग, प्रतिमा. १२ स्थिर झाली, बळावली. १३ सोनचांफ्याचा. १४ भरास आला. १५ नाजुकपणाचा. १६ शरदृतूच्या. १७ पालवलें, पसरलें. १८ अमृत. १९ मागें फिरे. २० सेवनर, पुनरपि. २१ पराक्रम. २२ सुवर्ण वृक्षाच्या. २३ अपूर्व, फार. २४ लहान होतात. २५ दोन्ही बाजूंनी. २६ पंक्ति. २७ माणिकांच्या. २८ सहज. २९ उद्भवनी. ३० अग्रें. ३१ लाल कमळें. ३२ स्वच्छ, प्रक्षालन केलेले, धुतलेले. ३३ परिपक्वदशेमुळें पोसल्यामुळें. ३४ शिंपल्यांच्या जोडांत. ३५ सांधा. ३६ उकलतो. ३७ शिंप. ३८ पापण्यांत. ३९ बेंगेत, कव्यांत. ४० मावे. ४१ व्यापून. ४२ अर्धोन्मीलित. ४३ सुवर्णगारी. ४४ वाद, मंद भाषण, मसलत. ४५ घोड्यावर. ४६ चढे. ४७ हृदयाकाश. ४८ पायरी. ४९ सुषुम्नेनें. ५० जिन्यांवरून. ५१ आत्मस्वरूपाजवळ. ५२ जीवात्म्याची. ५३ विश्वबीज=जगद्बीज, ॐकार. ५४ जीव. ५५ निराकार ब्रह्माची. ५६ साकारमूर्ति. ५७ सांबळी, संपुट. ५८ ॐकाराची. ५९ कोमल. ६० अखंड ॐकाराचा ध्वनि. ६१ बोलूं लागे.

ध्दीचें चैतन्य होतें जाहलें। तें तेणें आइकिलें। अलुमाळु ७५ घोषाच्या कुंडीं। नादचित्रांचीं रूपडीं। प्रणवाचिया मोडी। रेखिलीं ऐसीं ७६ हेंचि कल्पावें तरी जाणिजे। परी कल्पितें कैचें आणिजे। तरी नेणों काय गाँजे। तिये ठायीं ७७ विसरोनि गेलों अर्जुना। जंव नाशु नाहीं पवना। तंव वाचा आथी गगना। म्हणऊनि धुमे ७८ तया अनाहताचेनि मेघें। आकाश दुमदुमों लागे। तंव ब्रह्मस्थानींचें वेगें। सहज फिटे ७९ आइकें कमळगर्भाकारें। जें महदाकाश दुसरें। जेथ चैतन्यें आधांतुरें। करूनि असिजे २८० तया हृदयाच्या परिवरीं। कुंडलिनिया परमेश्वरी। तेजाची शिदोरी[१२]। विनियोगिली[१३] ८१ बुद्धीचेनि शाकें। हातबोनें निकें। द्वैत तेथ न देखे। तैसें केलें ८२ निजकांती हारविली। मग प्राणुचि केवळ जाहाली। ते वेळीं कैसी गमली। म्हणावी पां ८३ हो कां जे पवनाची पुतळी। पांघुरली होती सोनसळी। ते फेडूनियां वेगळी। ठेविली तिया ८४ नातरी वायूचेनि आंगें झगटली। दीपाची दिठी निर्वटली। कां लखलखोनि हारपली। वीजु गगनीं ८५ तैशी हृदयकमळवेन्हीं। दिजे जैशी सोनियाची सरी। नातरी प्रकाशजळाची झरी। वाहत आली ८६ मग ते हृदयभूमी पोकळे। जिराली कां एके वेळे। तैसें शक्तीचें रूप मावळे। शक्तीचिमाजी ८७ तेव्हां तरी शक्तीचि म्हणिजे। एऱ्हवीं तो प्राणु केवळ जाणिजे। आतां नादबिंदु नेणिजे। कळाज्योती ८८ मनाचा हन मारु। कां पवनाचा आधारु। ध्यानाचा आदरु। नाहीं परी ८९ हे कल्पना घे सांडी। ते नाहीं इये परवडी। हे महाभूतांची फुंडी। आटणी देखां २९० पिंडें पिंडाचा ग्रासु। तो हा नाथसंकेतींचा दंशु। परि दाऊनि गेला उद्देशु। महाविष्णु ९१ तया ध्वनिताचें केणें सोडुनी। यथार्थाची घडी झाडुनी। उपलविली म्यां जाणुनी। ग्राहीक श्रोते ९२

युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः। शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति॥१५॥

ऐकें शक्तीचें तेज जेव्हां लोपे। तेथ देहाचें रूप हारपे। मग तो डोळ्यांमाजि लपे। जगाचिया ९३ एऱ्हवीं आधिलीचि[३१] ऐसें। सावयव[३२] तरी दिसे। परी वायूचें कां जैसें। वळिलें होय ९४ नातरी कर्दळीचा[३३] गाभा। बुंथी[३४] सांडोनी उभा। कां अवयवचि नभा। उदयला तो ९५ तैसें होय शरीर। तैं तें म्हणिजे खेचर। हें पद होतां चमत्कार। पिंडजनीं ९६ देखें साधकु निघोनि जाये। मागां पाउलांची वोळ राहे। तेथ ठायीं ठायीं होये। अणिमादिक ९७

ध्वनि जातो. ७५ घोषाच्या कुंडांत ध्वनि व नाद-रूपी ॐकाराच्या आकाराची रेखलेली अशी रूपें उमटतात. ७६ या गोष्टी कल्पनेनेंच जाणतां येतात, परंतु कल्पना करणारा कोठून आणावा ? ( कारण, त्याचें जीवात्म्याशी ऐक्य झालें असतें. ) म्हणून त्या हृदयाकाशांत कसली गर्जना होते ती कांहीं समजत नाहीं. ७७ अर्जुना, मी तुला एक गोष्ट सांगण्याची विसरलों. ती कोणती तर, जोंपर्यंत प्राण, अपान वगैरे वायूंचा नाश होत नाहीं, तोंपर्यंत हृदयाकाशाला वाचा असते, आणि म्हणूनच शब्द उत्पन्न होतो. ७८ त्या अखंड ॐकाराच्या मेघासारख्या ध्वनीनें हृदयाकाश दुमदुमूं लागतें, तेव्हां ब्रह्मरंध्राची खिडकी सहज उघडते. ७९ पहा कीं, कमळांतील पोकळीप्रमाणें हृदयाकाशांत जी पोकळ जागा असते, तेथें चैतन्य हें अधांतरी वास करितें. ( पूर्ण असतें. ) २८० त्या आत्म्याच्या घरीं कुंडलिनी परमेश्वरी पाहुणी आल्यावर तेजरूपांची मेजवानी दिली; ८१ त्या वेळेस बुद्धिरूप भाजीसह-ताट वाढून---कीं ज्यांत द्वैताचा भास देखील होऊं नये---अशी मेजवानी दिली. ८२ कुंडलिनी आपली तेजरूप कांति टाकून वायुरूप बनली, त्या वेळीं कशी दिसली म्हणाल तर, प्रत्यक्ष वाऱ्याची पुतळी जी सोनसळी होती, तें ( वस्त्र ) फेडून तिनें एका बाजूस ठेवल्याप्रमाणें दिसली. ८३-८४ किंवा, दिव्याची ज्योति वारा लागल्यानें ज्याप्रमाणें मालवते, अथवा वीज चमकून गगनांत नाहींशी होते, ८५ त्याप्रमाणें हृदयकमळापर्यंत जाऊन ती सोन्याच्या जाड कांबीसारखी सतेज, किंवा तेजरूप पाण्याच्या झऱ्याप्रमाणें वाहात आलेली दिसते. ८६ मग ती हृदयरूप भुसभुशीत भूमींत एकाएकीं जिरते, तेव्हां कुंडलिनीशक्तीचें रूप शक्तींतच लय पावतें. ८७ अशी स्थिति झाल्यावर हिला शक्तिच म्हणावयाचें; एऱ्हवीं ती खरोखर प्राणच होय. परंतु त्या वेळेस ध्वनि, कळा, ज्योति ही नाहींतशीं होतात. ८८ नंतर मन जिंकणें, वायूचें अधर राहणें, किंवा ध्यान करणें, हींही नाहींतशीं होतात. ८९ आणि कल्पना घेणें व सोडणें ही खटपट नाहींशी होते. असे व्यापार बंद होतात. म्हणून कुंडलिनी ही केवळ पंचमहाभूतें आटण्याची मूस होय. २९० शरीरानें शरीर नाहींसें करणें, हा, योगशास्त्राचे नाथ जे शंकर, त्यांनीं केलेल्या सिद्धांताचा अभिप्राय होय; त्याचा श्रीमहाविष्णूंनीं हेतु दर्शित केला. ९१ [ ज्ञानेश्वरमहाराज म्हणतातः—] त्या महाविष्णूंच्या संकेताचें गाठोडें सोडून व यथार्थरूप वस्त्राची घडी झाडून श्रोते हेच या मालाचे गिऱ्हाईक आहेत असें जाणून मी ती त्यांच्यापुढें मांडून ठेविली. ९२

**अन्वयार्थ**--(एवं)-याप्रमाणें-(आत्मानं)-मनाला-(सदा युञ्जन्)-सतत समाधानयुक्त करणारा-सर्वदा मनाला समाहित करणारा-(योगी)-ध्यानी पुरुष-योगाभ्यासी-(नियतमानसः)-संयतचित्त होऊन-(निर्वाणपरमां)-मोक्ष हीच जिची निष्ठा आहे अशा व--(मत्संस्थां)-माझ्या अधीन असलेल्या-मद्रूप-(शान्तिं)-शांतीला-(अधिगच्छति)-प्राप्त होतो. १५

पहा की, ज्या वेळेस शक्तीचें तेज नाहींसें होतें, त्यावेळेस देहाचें रूप नाहींसें होतें, आणि तो योगी इतकें सूक्ष्म रूप धारण करितो कीं, तो लोकांस दिसेनासा होतो. ९३ एऱ्हवीं तें शरीर पूर्वीप्रमाणेंच सावयव असतें, परंतु अणुकाय केवळ वायूचेंच बनलेलें असतें. ९४ किंवा केळीची सोपटें काढून त्याचा गाभा उभा केला म्हणजे जसें कांहीच उरत नाहीं, किंवा आकाशालाच जसे अवयव फुटावे, तसे त्याचे अवयव असून नसल्याप्रमाणें असतात. ९५ जेव्हां त्याचें तसें शरीर बनतें तेव्हां त्याला आकाशांत संचार करणारा असें म्हणतात. ही सिद्धि प्राप्त झाल्यावर शरीरधारी लोकांस तो मोठा चमत्कार वाटतो. ९६ पहा, योग साध्य करणारा साधक चालून गेल्यावर पाठीमागें पावलें उमटतात, त्या प्रत्येक पावलाच्या ठिकाणीं अणिमादिक सिद्धि हात जोडून उभ्या असतात. ९७ परंतु,

१ किंचित. २ योग धारणेनें दहा नादांचा ध्वनि ऐकूं येतो. त्याच्या आधारचक्रीं घोषाकार परा नादाची पहिली वाचा आहे. ३ नादरूपी वाटोळ्यांशीं. ४. ॐकाराच्या. ५ आकारानें. ६ कल्पना करणारे. ७ गर्जे. ८ शब्द करी. ९ खिडकी. १० अधांतरी. ११ पाहुणी, घरीं. १२ न्याहारी. १३ अर्पण केली. १४ नैवेद्य. १५ वायु. १६ पीतांबर. १७ लागली. १८ झांकली. १९ हृदयकमळापर्यंत. २० झरा. २१ पोकळीमध्यें. २२ मध्यमा वाचा. २३ स्पष्ट. २४ क्लेश, दुर्दशा. २५ नाथसांप्रदायाचा. २६ गूढाभिप्राय, मर्म. २७ हेतु. २८ मालाचा गठ्ठा. २९ सोडून दाखविली. ३० गिऱ्हाईक. ३१ पूर्वीच्या सारखेंच. ३२ साकार. ३३ केळीचा. ३४ आच्छादन, सोपट. ३५ आकाशास. ३६ आकाश संचारी. ३७ स्वरूप. ३८ शरीरधारी लोकांस. ३९ योगधारणादि करणारा. ४० अणिमा, महिमा, चैन, लघिमा, गरिमा, इत्यादि.

जें आनंदाचें केवळ । चैतन्य गा २१ जें आकाराचा प्रांतु । जें मोक्षाचा एकांतु[२] ।
जेथ आदि आणि अंतु । विरोनि[३] गेले २२ जें महाभूतांचें बीज । जें महाते-
जाचें तेज । एवं[५] पार्था जें निज । स्वरूप माझें २३ तें हे चतुर्भुज कोंभेली[६] ।
जयाचि शोभा रूपासि आली । देखोनि नास्तिकीं नोकिली । भक्तवृंदें[८] २४ तें
आनिर्वाच्य महासुख । पैं आपणचि जाहले जे पुरुष । जयांचे कां निष्कर्षें[९] ।
प्रांसिवेरीं २५ आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरीं जिहीं केलें । ते
आमुचेनि पौंडें[११] आले । निर्वाळलेया[१२] २६ परब्रह्माचेनि रसें । देहाकृतीचिये
मुसें । वोतींव जाहले तैसे । दिसती आंगें २७ जरि हे प्रतीति[१३] हन अंतरीं फांके ।
तरी विश्वचि हें अवघें झांके । तंव अर्जुन म्हणे निकें । साचेंचि[१४] जी हें २८
कां जे आपण आतां देवो । हा बोलिले जो उपावो । तो प्राप्तीचा ठावो । म्हणोनि
घडे[१५] २९ इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरवसेंनि ब्रह्मत्वा येती । हें सांग-
तियाची[१६] रीती । कळलें मज ३० देवा गोठीचि[१७] हे ऐकतां । बोधु[१८] उपजतसे
चित्ता । मी[१९] अनुभवें तल्लीनता[२०] । नोहेलें[२१] केवीं ३१ म्हणऊनि एथ कांहीं । अना-[२२]
रिसें नाहीं । परी नांवभरी[२३] चित्त देईं । बोला एका ३२ आतां कृष्णा तुवां सांगि-
तला योगु । तो मना तरी आला चांगु[२४] । परि न शकें करूं पांगु[२५] । योग्यतेचा
३३ सहजें आंगिकें[२६] जेतुलें आहे । तेतुलियाची जरी सिद्धि जाये । तरी हांचि
मार्गु सुखोपायें । अभ्यासीन ३४ नातरी देवो जैसें सांगतील । तैसें आपणपें
जरी न[२७] ठकेल । तरी योग्यतेवीण होईल । तेंचि पुसों[२८] ३५ जीवींचिये ऐसी धो-[२९]
रण । म्हणोनि पुसावया जाहलें कारण । मग म्हणे तरी आपण । चित्त दे-
ईंजो[३०] २६ हांहो जी अवधारिलें । जें हें साधन तुम्हीं निरूपिलें । तें आवड-[३१]
तयाहि अभ्यासिलें । फावों[३२] शके ३७ कीं योग्यतेवीण नाहीं । ऐसें हन आहे
कांहीं । तेथ श्रीकृष्ण म्हणती काई । धनुर्धरा ३८ हें काज कीर निर्वाणें[३३] । परि
आणिकही जें कांहीं साधारण । तेंही अधिकाराचे वोडवेविणें[३४] । काय सिद्धी
जाय ३९ पैं योग्यता जे म्हणिजे । ते प्राप्तीची अधीन जाणिजे । कां जे योग्य
होऊनि कीजे । तें आरंभिलें फळे ४० तरी तैसी एथ कांहीं । सावियांचि[३५] केणी[३६]
नाहीं । आणि योग्यतेची काई । खाणी असे ४१ नावेकें[३७] विरक्तु । जाहला
देहधर्मीं[३८] नियतु[३९] । तरि तोचि नव्हे व्यवस्थितु । अधिकारिया ४२ येतुलालिये
आंयणीमाजिवडें । योग्यपण तूतेंही जोडे । ऐसें प्रसंगें । सांकडें । फोडिलें तयाचें ४३

आनंदाचें केवळ जीवन होय. ३१ तेथें आकाशाचा शेवट होतो; तें म्हणजे मोक्षाची केवळ स्थिति असून त्या ठिकाणीं आदि आणि अंत यांचा लय झाला आहे. ३२ तें ब्रह्म पंचमहाभूतांचें मूळकारण व महातेजाचें तेज होय. सारांश, पार्था, तें ब्रह्म माझें मूळस्वरूप होय. ३३ साधुवृंदांचा नास्तिकांनीं जेव्हां छळ केला, तेव्हां हीच चतुर्भुज मूर्ति या स्वरूपापासून आकाराला आली. ३४ (अर्जुना,) असें हें महासुख अवर्णनीयच; परंतु याची प्राप्ति होईपर्यंत ज्या पुरुषांचे प्रयत्न अव्याहत चालले, ते पुरुष स्वयमेव सुखरूप झाले. ३५ आम्हीं हें जें अष्टांगयोगाचें साधन सांगितलें, तें स्वतः शरीरानें जे करितात, ते योगानें तयार झाल्यामुळें माझ्याच योग्यतेस येतात. ३६ त्या योग्यांची शरीरें परब्रह्माच्या रसानें देहाकृतीच्या मुशींत ओतल्यासारखीं सतेज दिसतात. ३७ जर हा अनुभव अंतर्यामीं प्राप्त झाला, तर हें सर्व विश्व त्याला मावळतें; तेव्हां अर्जुन म्हणाला, "देवा, आपण बोललां तें सत्य आहे. ३८ देवा, आपण आतां जो हा उपाय सांगितला तो ब्रह्मप्राप्तीचें ठिकाण आहे, म्हणूनच त्या ठिकाणीं ब्रह्मसाक्षात्कार होतो. ३९ आपण जो हा मार्ग सांगितला, त्याचा दृढ अभ्यास करणारे खरोखर ब्रह्मपदाला पावतात, हें आपल्या सांगण्यावरून मला समजलें. ३४० देवा, आपण सांगितलेली गोष्ट ऐकतांनाच चित्तांत ज्ञान उत्पन्न होतें, तर मग तिचा अनुभव घेणाराला तद्रूपता कशी घरें प्राप्त होणार नाहीं? ४१ म्हणून, हें जें आपण सांगितलें, यांत कांहीं संशय नाहीं. परंतु क्षणभर मी जी विनंति करतों, तिकडे लक्ष द्यावें. ४२ कृष्णा, आतां तुम्ही जो मला योग सांगितला, तो माझ्या मनाला फार आवडला; परंतु माझी योग्यता कमी असल्या कारणानें माझ्या हातून कांहीं तो होणार नाहीं. ४३ माझ्या अंगांत जेवढी शक्ति आहे, तेवढी खर्च करूनही जरी हा शेवटाला जाईल, तरी देखील मी मोठ्या समाधानानें याचा अभ्यास करीन. ४४ किंवा देवा, तुम्ही जसें सांगतां तसें माझ्यानें जर न करवेल, तर, आपल्या योग्यतेच्या मानानें आपल्या हातून जें होईल तेंच आपण विचारावें, ४५ अशी माझ्या मनांत इच्छा उत्पन्न झाल्यामुळें आपल्याला विचारण्याचें कारण पडलें." अर्जुन म्हणतो, "तर मग देवा, आपण इकडे लक्ष द्यावें. ४६ महाराज, आपण हें जें योगसाधन सांगितलें तें ऐकलें; परंतु वाटेल त्यानें याचा अभ्यास केला तर या योगाची प्राप्ति होईल काय? ४७ किंवा हें योग्यतेशिवाय होणारच नाहीं असें आहे की काय?" तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, "अर्जुना, हें तूं काय विचारतोस? ४८ हा योगाभ्यास जर म्हणशील तर खरोखर मोक्ष देणारा आहे; पण याशिवाय दुसरी साधारण जरी गोष्ट असली, तरी ती सुद्धां अधिकाराच्या योग्यतेशिवाय सिद्धीस जाईल काय? ४९ परंतु योग्यता म्हणून जिला म्हणतात, ती प्राप्तीचे पूर्वी समजत नाहीं. कारण, अधिकारी होऊन आरंभिलेलें काम तत्काळ फलद्रूप होतें. ३४० तरी या ठिकाणीं खरोखर तशी कांहीं अडचण नाहीं, आणि दुसरें असें पहा कीं, योग्यतेची एकादी खाण आहे की काय? ४१ जो थोडासा विरक्त होऊन देहाच्या धर्मांचें व्यवस्थित नियमन करणारा असेल तो सुद्धां अधिकारी होणार नाहीं काय? ४२ अशा युक्तीनें इतकी योग्यता तुझे ठिकाणीही आहे." याप्रमाणें अर्जुनाचें त्या समयाला संकट फेडलें. ४३ मग श्रीकृष्ण म्हणाले:—

१ शेवट. २ केवळस्थिति. ३ लय पावले. ४ मूळकारण. ५ हा प्रकारचें. ६ आकाराला आली. ७ जेव्हां भक्तवृंदें नास्तिकांनीं नोकिलीं, छळिलीं तेव्हां ही चतुर्भुज मूर्ति मी धारण केली. ८ बोलण्यास कठीण. ९ शेवट, सार, मथितार्थ. १० मोक्षापर्यंत. ११ बरोबरीनें. १२ तयार झाल्यामुळें. १३ अनुभव. १४ सतेज. १५ ब्रह्मसाक्षात्कार होतो. १६ आपल्या सांगण्यावरून. १७ गोष्ट. १८ ज्ञान. १९ मग. २० तद्रूपता. २१ कशी होणार नाहीं? २२ मिथ्या. २३ क्षणभर. २४ चांगला. २५ माझ्या अंगीं योग्यतेचा हीनपणा आहे, माझी तितकी लायकी नाहीं. २६ खर्चून. २७ प्राप्त न होईल. २८ विचारूं. २९ धारणा, इच्छा. ३० द्यावें. ३१ वाटेलत्यालाही. ३२ प्राप्त होईल काय? ३३ मोक्षानें. ३४ योग्यतेवांचून, साधावांचून. ३५ सर्वथा खरोखर. ३६ (अडचणीचा) पदार्थ, प्रकार. ३७ क्षणभर. ३८ विहितधर्मांत. ३९ नेमाचा. ४० युक्तीनें. ४१ संकट.

मग म्हणे पार्था । तें हें ऐसी व्यवस्था । अनियतासि सर्वथा । योग्यता नाहीं ४४

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः । न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥१६॥

जो रसनेंद्रियाचा अंकिला । कां निद्रेसी जीवें विकला । तो नाहीं एथ म्हणितला । अधिकारिया ४५ अथवा आग्रहाचिये बांदोडी । क्षुधा तृषा कोंडी । आहारातें तोडी । मारूनियां ४६ निद्रेचिया वाटा नवचे । ऐसा दुंढिवेचेनि अवतरणें नाचे । तें शरीरचि नव्हे तयाचें । मा योगु कवणाचा ४७ म्हणोनि अतिशयें विषयो सेवावा । तैसा विरोधु नोहावा । कां सर्वथा निरोधावा । हेंही नको ४८

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

आहार तरी सेविजे । परी युक्तीचेनि मापें मविजे । क्रियाजात आचरिजे । तयाचि स्थिती । ४९ मितलीं बोली बोलिजे । मितलियां पाउलीं चालिजे । निद्रेही मानु दीजे । अवसरें एकें ३५० जागणें जरी जाहलें । तरी व्हावें तें मितलें । येतुलेनि धातुसाम्य संचलें । असेल सहजें ५१ ऐसें युक्तीचेनि हातें । जें इंद्रियां वोपिजे भातें । तैं संतोषासी वाढतें । मनाचि करी ५२

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते । निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥

बाहेर युक्तीची मुद्रा पडे । तंव आंत आंत सुख वाढे । तेथें सहजेंचि योगु घडे । नाभ्यासितां ५३ जैसें भाग्याचिया भेंडसें । उद्यमाचेनि मिसें । मग समृद्धिजात आपैसें । घर रिघे ५४ तैसा युक्तिमंतु कौतुकें । अभ्यासाचिया मोहरा ठाके । आणि आत्मसिद्धीचि पिके । अनुभवु तयाचा ५५ म्हणोनि युक्ति हे पांडवा । घडे जया सदैवा । तो अपवर्गींचिये राणिवां । अळंकारिजे ५६

यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता । योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मनः ॥१९॥

युक्ति योगाचें आंग पावे । ऐसें प्रयाग जेथ होय बरवें । तेथ क्षेत्रसंन्यासें स्थिरावे । मानस जयाचें ५७ तयातें योगयुक्त तूं म्हण । हेंही प्रसंगें जाण । तें दीपाचें उपलक्षण । निवातींचियां ५८ आतां तुझें मनोगत जाणोनी । कांहीं एक आम्ही म्हणोनि । तें निकें चित्त देउनी । परिसावें गा ५९ तूं प्राप्तीची चाड वाहसी । परि अभ्यासीं दक्षु न होसी । तें सांग पां काय बिहसी । दुवाडपणा ३६० तरी पार्था हें झणें । सायास घेशीं हो मनें । वायां बागूल इये

पार्था, या योगप्राप्तीची अशी व्यवस्था आहे; परंतु अव्यवस्थित मनुष्याला त्याची प्राप्ति होण्याचा कधींही संभव नाहीं. ४४

**अन्वयार्थ**--(तु)-पण-(अत्यश्नतः)-जितकें हवें त्याहून अधिक अन्न खाणाऱ्या पुरुषाला-(योगः)-ध्यान-चित्तवृत्तीचा निरोध-योगभ्यास--( न अस्ति )-होत नाहीं.-( च एकान्तं)-व अगदीं मुळींच-(अनश्नतः)-अन्न न खाणाऱ्या पुरुषालाहि-[योगः] (न) [अस्ति]-योग करतां येत नाहीं.-(अतिस्वप्नशीलस्य)-फार निजण्याचें ज्याचें शील आहे त्याला-(न च)-योगाभ्यास करतां येत नाहीं, व (अर्जुन)-हे अर्जुना!-(जाग्रतः न एव)-अतिशय जागणाऱ्या पुरुषालाहि योग घडत नाहीं. १६

जो जिव्हेच्या अंकित झाला, किंवा सर्वथैव झोंपेच्या अधीन झाला, तो या योगाच्या अधिकारी म्हटला जात नाहीं. ४५ अथवा दुराग्रहाच्या आवेशांत जो भूक आणि तहान मारतो, आणि जेवण कमी करतो, ४६ आणि झोंपेचें नांव देखील न घेतां बळकट अभिमान धरतो, त्याचें शरीरसुद्धां त्याच्या अधीन रहात नाहीं, मग त्याला योग कोठून साध्य होणार? ४७ म्हणून विषयांचें अति सेवन करण्याची, किंवा त्यांचा अगदींच त्याग करण्याची, इच्छा करूं नये; सर्व गोष्टी नियमित असाव्या. ४८

**अन्वयार्थ**--( युक्ताहारविहारस्य )-ज्याच्या आहार-अन्नाचें परिमाण व विहार जाणें-येणें वगैरे परिमित असतें, त्याचा-(कर्मसु)-कर्मांमध्यें-(युक्तचेष्टस्य)-परिमित चेष्टा करणाऱ्या योग्याचा-(युक्तस्वप्नावबोधस्य)-झोंप व जागणें हीं दोन्हीं ज्याचीं परिमित आहेत, त्याचा-(योगः)-योग दुःखहा)-सर्व संसारदुःखांचा घात करणारा-(भवति)-होतो. १७

अन्न ग्रहण तर करावें, पण तें युक्तियुक्तीनें परिमित करावें; त्याचप्रमाणें; जीं जीं कामें करावयाचीं तींही सर्व युक्तीनेंच प्रमाणांत आणावीं. ४९ भाषण परिमित असावें; त्याचप्रमाणें व्यायामही माफक करावा; व झोंपही नेमलेल्या वेळींच घ्यावी. ३५० जागरण जरी करावयाचें झालें तरी तें नियमित वेळेपर्यंत करावें. अशा नियमित रीतीनें आचरण केल्यावर शरीरांतील रक्तादिक सप्तधातु समतोल आपोआप राहतील. ५१ अशा प्रकारें वेतावातानें इंद्रियांची तृप्ति केली, म्हणजे आपलें मनच संतोषाची वृद्धि करितें. ५२

**अन्वयार्थ**--(यदा)-ज्यावेळीं-(विनियतं चित्तं)-विशेषतः नियत केलेलें म्ह० एकाग्रतेस प्राप्त झालेलें चित्त-(आत्मनि एव) आत्म्यामध्येंच-(अवतिष्ठते)-अवस्थित होतें व ज्या अवस्थेंत योगी-(सर्वकामेभ्यः)-सर्व कामांपासून-दृष्ट व अदृष्ट विषयांपासून-(निःस्पृहः)-निःस्पृह झालेला-ऐहिक व पारलौकिक सर्व विषयांविषयांची तृष्णा सोडलेला असा होतो-(तदा)-तेव्हां-(युक्तः)-समाहित-(इति)-असें-(उच्यते) -तो म्हटला जातो. १८

याप्रमाणें बाहेरील इंद्रियांची स्थिति नियमांत ठेविली तर अंतर्यामीं सुख उत्पन्न होऊन, त्या मनुष्याला अभ्यास न करितां योग सहज घडतो. ५३ ज्याप्रमाणें भाग्योदय झाला असतां उद्योगाचे निमित्तानें सर्व संपत्ति आपोआप घरीं चालून येते, ५४ त्याप्रमाणें, जो नियमशील आहे, तो कौतुकानें जरी योगाभ्यासाकडे वळला, तरी त्याला आत्मस्थितीचा अनुभव येतोच. ५५ म्हणून अर्जुना, ज्या दैववान् पुरुषाला युक्तीचें साह्य असतें, तो मोक्षाच्या राज्यावर शोभिवंत होतो. ५६

**अन्वयार्थ**--(यथा)-ज्याप्रमाणें-(निवातस्थः दीपः)-वायुरहित प्रदेशांत असलेला दीप-दीपाची ज्योति-(न इंगते)-हालत नाहीं तर निश्चल तेवत असते-(सा उपमा)-ती उपमा-ती दीपज्योतीची उपमा दृष्टान्त-( आत्मनः योगं युंजतः)-आत्म्याच्या योगाचें-समाधीचें अनुष्ठान करणाऱ्या-(योगिनः)-योग्याच्या-(यतचित्तस्य)-संयतचित्ताला-(स्मृता)-सांगितलेली आहे. १९

नियमित वागणाराला जर योगाभ्यास करण्याची इच्छा झाली, तर तो योग गंगा आणि यमुना यांचा संगम झालेल्या प्रयाग तीर्थाप्रमाणें होय. त्या आत्मस्वरूपी प्रयागाचे ठिकाणीं ज्या मनुष्याचें मन क्षेत्रसंन्यासाप्रमाणें कायम राहतें, ५७ त्याच मनुष्याला तूं योगी म्हण; आणि प्रसंगानुरोधानें हेंही पण लक्षांत ठेव कीं, त्याच्या चित्ताला निवाऱ्यांतील दिव्याची उपमा लागू पडते. ५८ आतां तुझ्या मनांतील भाव जाणून आम्ही तुला कांहीं गोष्ट सांगतों, ती चित्त देऊन ऐक. ५९ तूं योगप्राप्तीची इच्छा मनांत बाळगतोस, परंतु अभ्यासाकडे तुझें लक्ष नाहीं; तर तो अभ्यास कठीण आहे, अशी तुझ्या मनांत भीति वाटते कीं काय, तें सांग. ३६० पार्था, कदाचित् तूं ही भीति मनांत बाळगशील; पण तसें करूं नको हो! कारण हीं दुर्जन इंद्रियें त्या अभ्यासाचा उगीच बागुलबोवा करून भीति

१ अव्यवस्थिताला. २ जिव्हेचा. ३ स्वाधीन झाला. ४ मनानें, सर्वथैव. ५ बंधनानें. ६ जात नाहीं. ७ हट्टाच्या, हट्टाच्या. ८ अभिमानानें. ९ बंद करावा. १० भोजावा. ११ सर्व कर्में. १२ भोजन. १३ परिमित. १४ कफ, वात पित्त यांची योगस्थिति. १५ दिलें जातें. १६ पोटाला. १७ वृद्धि. १८ चर्या, स्थिति. १९ पुरानें, भरानें. २० उद्योगाच्या मिषानें, निमित्तानें. २१ सर्व संपत्ति. २२ आपोआप. २३ अभिमुख, समोर, मागोस. २४ दैववानाला. २५ मोक्षाच्या. २६ राज्यानें. २७ शोभला जातो. २८ ज्या स्थळीं कायम राहण्याचा नियम केला तें स्थळ शरीरपर्यंत न सोडणें. २९ उपमा. ३० वारा नसलेल्या ठिकाणच्या, निवाऱ्यांतल्या. ३१ सावध. ३२ कठीण, दुर्घट-म्हणून. ३३ भास, भासतो. ३४ भय, मुलांस दाखविण्याचा खोटा बागुलबुवा.

दुर्जनें । इंद्रियें करिती ६१ पाहें पां आयुष्यातें अढेळ करी । जें संरतें जीवित वारी । तया औषधातें वैरी । काय जिव्हा न म्हणे ६२ ऐसें हितासि जें जें निकें । तें सदाचि या इंद्रियां दुःखें । एऱ्हवीं सोपें योगासारिखें । कांहीं आहे ६३

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया । यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥
सुखमात्यन्तिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् । वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥२१॥

म्हणोनि आसनाचिया गाढिका । जो आम्हीं अभ्यासु सांगितला निका । तेणें होईल तरी हो कां । निरोधुं यथा ६४ एऱ्हवीं तरी येणें योगें । जैं इंद्रियां विंदाण लागे । तैं चित्त भेटों रिगे । आपणपेयां ६५ परतोनि पाठिमोरें ठाके । आणि आपणियांतें आपण देखे । देखतखेंवो वोळखे । म्हणे तत्त्व हें मी ६६ तिये ओळखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे । मग आपणपां संमरसें । विरोनि[11] जाय ६७ जयापरतें आणिक नाहीं । जयातें इंद्रियें नेणती कहीं । तें आपणचि आपुलिया ठायीं । होऊनि ठाके ६८

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥२२॥

मग मेरूपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां पडिभरें । चित्त न दटे ६९ कां शस्त्रें वरी तोडिलिया । देह अग्निमाजि पडलिया । चित्त महासुखीं पहुडलियां[13] । चेवोचि[14] नये ३७० ऐसें आपणपां रिगोनि ठाये । मग देहाची वांसु न पाहे । आणिकचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ७१

तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् । स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥२३॥

जया सुखाचिया गोडी । मन आंतौंचि सेचि[18] सोडी । संसाराचिया तोंडीं । गुंतलें जे ७२ जें योगाची वरव । संतोषाची रांणिव । ज्ञानाची जाणिव । जयालागीं ७३ तें अभ्यासिलेनि योगें । सावयव देखावें लागे । देखिलें तरी आंगें[21] । होईजेल[23] गा ७४

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः । मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः ॥ २४ ॥

तरि तोचि योगु बापा । एके परी आहे सोपा । जरी पुत्रशोकु संकल्पा । दाखविजे ७५ हां विषयातें निमालिया आइके । इंद्रियें नेमाचिया धारणीं देखे । तरी हियें घालूनि मुके । जीवित्वासी ७६ ऐसें वैराग्य हें करी । तरी संकल्पाची सरे वारी । सुखें धृतीचिये धवळारीं । बुद्धि नांदे ७७

शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया । आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् ॥२५॥
यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् । ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥

दाखवितात ! ६१ पहा–जें आयुष्य स्थिर करतें ( वाढवितें ), आणि संपणाऱ्या जीविताला मागें आणतें ( मृत्यु टाळते ), त्या औषधाला देखील जिव्हा शत्रु समजत नाहीं का ? ६२ त्याचप्रमाणें, पारलौकिक हितास जें चांगलें, तें नेहमीं या इंद्रियांना दुःखदायक वाटतें; एऱ्हवीं या योगसाधनाइतकें दुसरें कांहीं सोपें साधन आहे का ? ६३

**अन्वयार्थ**––(यत्र)–जेव्हां–(योगसेवया)– योगाभ्यासानें –(निरुद्धं)–सर्व बाजूंनीं आवरून धरलेलें, कोठेंहि प्रचार होऊं न दिलेलें–(चित्तं)–चित्त–(उपरमते)–उपरतीस प्राप्त होतें,–(च)–आणि–(यत्र)–ज्यावेळीं–(आत्मना)–समाधीनें अत्यंत शुद्ध झालेल्या अन्तःकरणानें–(आत्मानं)–चैतन्यज्योतिःस्वरूप परमात्म्यास–(पश्यन्)–पाहणारा–त्याचा अनुभव घेणारा योगी –(आत्मनि)–स्वरूपांत–(तुष्यति)–संतुष्ट होतो; २०–(यत्र)–ज्या वेळीं–(यत्)–जें–(आत्यन्तिकं)–अनन्त–(बुद्धिग्राह्यं)–केवल बुद्धीनेंच ग्रहण करण्यास योग्य–(अतीन्द्रियं)–इंद्रियांचा विषय न होणारें–(सुखं)–सुख–(तत्)–तें–(वेत्ति)–तो अनुभवितो–(यत्र)– ज्यावेळीं–(अयं)–हा ज्ञानी–(स्थितः)–आत्मस्वरूपांत स्थित झाला असतां–(तत्त्वतः)–त्या तत्त्वापासून–(न एव चलति)–च्युत होतच नाहीं [तेव्हां योगसिद्धि होते.] २१

म्हणून आसनाच्या बळानें जो आम्हीं खरा अभ्यास सांगितला, त्या योगानेंच या इंद्रियांचा झाला तर निग्रह होईल. ६४ एऱ्हवीं या योगसाधनानें जेव्हां इंद्रियांनाच वेढ लागतो; तेव्हां आपल्या आपणच चित्त हें आत्म्याची भेट घेण्याकरितां जातें. ६५ चित्ताची धांव नेहमीं पुढें असते; ती मागें फिरून ज्या वेळेस चित्ताला आत्मदर्शन होतें, त्या वेळेस त्याला आत्मतत्त्वच मी आहें अशी ओळख पटते. ६६ ती ओळख झाल्याबरोबर तें सुखाच्या राज्यावर बसतें, आणि मग आत्मानंदांतच लय पावतें; ६७ आणि ज्यापेक्षां दुसरें अधिक कांहीं नाहीं, व ज्याला इंद्रियें कधी जाणत नाहींत असें जें आत्मस्वरूप म्हणजे ब्रह्मरूप तें स्वतःच होऊन राहतें. ६८

**अन्वयार्थ**––( च )–आणि–( यं )–ज्या आत्मलाभाला–(लब्ध्वा)–प्राप्त होऊन–(अपरं लाभं)–दुसऱ्या लाभाला–(ततः)–त्याहून–( अधिकं )–अधिक–(न मन्यते)–मानीत नाहीं,–(यस्मिन्)–ज्या आत्मस्वरूपांत–( स्थितः )–स्थित झालेला हा–(गुरुणा अपि दुःखेन)–फार मोठ्या दुःखानेंहि–(न विचाल्यते)–मोठ्या दुःखाकडूनही चंचल केला जात नाहीं. २२

मग अशी स्थिति झाल्यावर, मेरुपर्वतापेक्षांही मोठ्या दुःखाच्या भारानें देह दडपला असतां त्याच्या चित्ताला दुःख होत नाहीं; ६९ किंवा शस्त्रानें जरी देह तोडला, अथवा अग्नींत जरी पडला, तरी महासुखांत निमग्न झालेलें त्याचें चित्त जागृत होत नाहीं. ३७० याप्रमाणें आत्मसुखांत निमग्न झाल्यावर तो देहाची आठवण विसरतो; आणि असें अनिर्वाच्य ब्रह्मसुख प्राप्त झाल्यामुळें इतर गोष्टींचा त्याला विसर पडतो. ७१

**अन्वयार्थ**––(तं दुःखसंयोगवियोगं)–त्या दुःखसंयोगाच्या वियोगाला–(योगसंज्ञितं)–योगसंज्ञित–योग ही संज्ञा ज्याला प्राप्त झाली आहे, असा–(विद्यात्)–जाणावें.–(सः योगः)–तो योग–(निश्चयेन)–निश्चयानें–( अनिर्विण्णचेतसा )–अखिन्न चित्तानें–(योक्तव्यः)–करावा. २३

ज्या ब्रह्मसुखाच्या गोडीनें संसारांत गुंतलेलें मन इच्छेची आठवणच सोडतें, ७२ जे योगाची शोभा, संतोषाचें केवळ राज्य, आणि ज्याच्याकरितां ज्ञानाची आवश्यकता, ७३ तें ब्रह्मसुख अभ्यासाचे योगानें मूर्तिमंत दिसूं लागतें; आणि तें सुख पाहणारा तद्रूपच बनतो. ७४

**अन्वयार्थ**––(संकल्पप्रभवान्)–संकल्प हाच ज्याचा प्रभव–उत्पत्ति–कारण आहे अशा–( सर्वान् कामान् )–सर्व कामांना–( अशेषतः )–समूळ–कांहीं बाकी न ठेवतां–(त्यक्त्वा)–टाकून–( मनसा एव )–विवेकयुक्त मनानेंच–( इंद्रियग्रामं )–इंद्रियसमुदायास–(समंततः)–सर्व बाजूंनीं–(विनियम्य)–नियमित करून–त्याचें सर्वतः नियमन करून २४

तथापि, अर्जुना, एकापरी हा योग सोपा आहे; संकल्पाचे पुत्र जे कामक्रोधादिक, त्यांचा नाश केल्यामुळें त्या संकल्पाला जेव्हां पुत्रशोक होईल, तेव्हांच तो साध्य होतो। ७५ विषय लय पावले असें या संकल्पानें ऐकिलें, व इंद्रियें नियमितपणानें वागतात असें पाहिलें, म्हणजे याची छाती फुटून जाऊन हा जिवाला मुकतो. ७६ अशा रीतीनें वैराग्य प्राप्त झाल्यावर संकल्पाच्या यात्रा संपतात. आणि धैर्याच्या मंदिरांत बुद्धि ही सुखानें वास करते. ७७

**अन्वयार्थ**––( धृतिगृहीतया )–धैर्यानें युक्त अशा–(बुद्ध्या)–बुद्धीनें–(शनैः शनैः)–हळू हळू–( उपरमेत् )–उपरति करावी.–( मनः )–मनाला–( आत्मसंस्थं कृत्वा)–आत्म्यामध्यें–संस्थित करून–(किंचित् अपि न चिन्तयेत्)–कशाचेंहि चिंतन करूं नये.–(मनः)–अन्तःकरण–(चंचलं)–रागादि स्वभावदोषामुळें चंचल व म्हणूनच–(अस्थिरं)–अस्थिर होऊन–(यतः यतः)–ज्या ज्या शब्दादि विषयाच्या निमित्तानें–(निश्चरति)–बाहेर निघतें–आत्म्यापासून दूर होतें–( ततः ततः )–त्या त्या शब्दादि विषयापासून–(एतत्)–त्याला–(नियम्य)–नियमित करून–(आत्मनि एव )–आत्म्यामध्येंच–(वशं)–वश–(नयेत्)–न्यावें, त्याला आत्मवश करावें. २५–२६

---

१ स्थिर. २ संपणाऱ्या जिविताला मागें आणतें. ३ पारलौकिक हितास. ४ दृढतेनें, बळकटपणानें. ५ अटक. ६ इंद्रियांना. ७ निग्रह. ८ पाहतांच, तत्क्षणीं. ९ बरोबर. १० ऐक्यतेनें. ११ लय पावतें. १२ दडपला जावो. १३ निगलें असतां. १४ जागें होत नाहीं. १५ आशा, आठवण,वाट, १६ अनिर्वाच्य. १७ इच्छेची, सुखाची. १८ आठवणच. १९ शोभा. २० राज्य. २१ ज्ञान, ज्ञातेपणा. २२ मूर्तिमंत. २३ आपणच तन्मय सुखरूप होईल. २४ संकल्प. २५ लय पावलेले. २६ स्थितींत. २७ हृदय फुटून. २८ यात्रा. २९ धैर्याच्या, ३० चुनेगची महालांत.

बुद्धी धैर्या होय वसौटा[1] । तरी मनातें अनु[2]भवाचिया वाटा । हळु हळु करी प्रतिष्ठा[3] । आत्मभुवनीं ७८ याही एके परी । प्राप्ति आहे विचारीं । हें न[4] ठके तरी सोपा[5]री । आणिक ऐकें ७९ आतां नियमुचि हा एकला । जीवें[6] करावा आपुला । जैसा कृतनिश्चयाचिया बोला । बाहे[7]रा नोहे ३८० जरी येतुलेनि चित्त स्थिरावें । तरी काजा आलें स्वभावें । नाहीं तरी घा[9]लावें । मोकलुनी ८१ मग मोकलिलें[10] जेथ जाईल । तेथूनि नियमूचि घेऊनि येईल । ऐसेनि स्थैर्यचि होईल । सावियाँ[11]चि कीं ८२

प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् । उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥

पाठीं केतुलेनि एके वेळे । तया स्थैर्याचेनि मेळें[12] । आत्मस्वरूपाजवळें । येईल सहजें ८३ तयातें देखोनि आंगा[13] घडेल । तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल । आणि ऐ[14]क्यतेजें उघडेल । त्रैलोक्य हें[14] ८४ आकाशीं दिसे दुसरें । तें अभ्र[15] जैं विरे । तैं गगनचि कां भरे । विश्व जैसें ८५ तैसें चित्त लया जाये । आणि [16]चैतन्यचि आघवें होये । ऐसी प्राप्ति सुखोपायें । आहे येणें ८६

युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः । सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ॥ २८ ॥

या सोपियाँ[17] योगास्थिती । उकलु[18] देखिला गा बहुतीं । संकल्पाचिया संपत्ती । रुसोनियां ८७ तें सुखाचेनि सांगा[19]तें । आलें परब्रह्म आंतौतें[20] । तेथ लवण जैसें जळातें । सांडूं नेणे ८८ तैसें होय तिये मेळीं । मग सामरस्या[21]चिया राउळीं[21] । महासुखाची दिवा[22]ळी । जैगोसिं[23] दिसे ८९ जैसें आपुले पायावरी[24] । चालिजे आपुले पाठीवरी[25] । हें पार्था नागवे[26] तरी । आन ऐकें ३९०

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्रसमदर्शनः ॥ २९ ॥
यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति । तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

तरि मी तंव सकळ देहीं । असे एथ विचारु[27] नाहीं । आणि तैसेंचि माझ्या ठायीं । सकळ असे ९१ हें ऐसेंचि संचलें[28] । परस्परें मिसळलें । बुद्धी[29] घेपे एतुलें । होआवें[29] गा ९२ एऱ्हवीं तरी अर्जुना । जो एकवटलिया[30] भावना । सर्वभूतीं अभिन्ना । मातें भजे ९३ भूतांचेनि अनेकपणें । अनेक नोहे अंतःकरणें । केवळ एकत्वचि माझें जाणें । सर्वत्र जो ९४ मग तो एक हा मियां । बोलतां दिसतसे वायां । एऱ्हवीं न बोलिजे तरि धनंजया । तो मीचि आहें ९५ दीपा आणि प्रकाशा । एकवंकीचा[31] पाडु[32] जैसा । तो माझ्या ठायीं तैसा । मी तयामाजीं ९६ जैसा उदकाचेनि आयुष्यें रसु[33] । कां गगनाचेनि मानें अवकाशु[34] । तैसा माझेनि रूपें रूपसु[35] । पुरुषु तो गा ९७

बुद्धीला धैर्याचा आश्रय मिळाला, म्हणजे मग ती मनाला हळू हळू ब्रह्मानुभावाच्या वाटेला लावून त्याची ब्रह्मस्वरूपीं स्थापना करते. ७८ या एका मार्गानें ब्रह्मप्राप्ति होते, आणि हेंही घडत नसल्यास याहीपेक्षां सुलभ असा दुसरा एक मार्ग सांगतों, तो ऐक. ७९ साधकानें आपला असा एक नियम करावा कीं, एकदा केलेला निश्चय कधींही टाळावयाचा नाहीं. ३८० अशा निश्चयानें जर चित्त स्थिर झालें, तर अनायासेंच काम झालें; पण असें जर न होईल, तर त्या चित्ताला खुशाल स्वैर वर्तूं द्यावें. ८१ मग तें मोकळें सुटल्यावर जेथें जाईल तेथून निश्चय त्याला परत घेऊन येईल; आणि अशा रीतीनें तें तत्काल स्थिर होऊन राहील. ८२

**अन्वयार्थ**—(प्रशान्तमनसं)-ज्यानें मन अत्यंत शांत झालें आहे-( शांतरजसं )-ज्याच्यांतील मोहादि क्लेशरूप मळ शांत झाले आहेत,-( ब्रह्मभूतं )-ब्रह्म झालेल्या-जीवन्मुक्त-(अकल्मषं)-अधर्मादिरहित-(एनं योगिनं हि)-अशा या प्रसिद्ध योग्याला-(उत्तमं सुखं)-निरतिशय सुख-(उपैति)-प्राप्त होतें. २७

नंतर अशा प्रकारें अनेक वेळां स्थिर राहण्यानें तें सहज आत्मस्वरूपाजवळ येईल; ८३ आणि त्या आत्मस्वरूपाला पाहून स्वतः तद्रूप होईल. मग अद्वैतामध्यें द्वैत हें बुडून जाईल, आणि ऐक्याच्या तेजानें हें त्रैलोक्य प्रकाशित होईल. ( त्रैलोक्यभर ब्रह्मपद दिसूं लागेल. ) ८४ आकाशांत त्याहून वेगळीं दिसणारीं अभ्रें ज्या वेळेस नाहींतशीं होतात, त्या वेळेस जिकडे तिकडे शुद्ध आकाशच दिसतें; ८५ त्याचप्रमाणें, चित्त लयाला गेलें कीं सर्व ब्रह्मच होतें, या योगरूप सुखकर उपायानें असा मोठा लाभ होतो. ८६

**अन्वयार्थ**—(एवं)-या क्रमानें-(सदा)-सर्वदा-(आत्मानं युञ्जन् )-चित्ताला समाहित करणारा, त्यामुळें-(विगतकल्मषः)-ज्याचें पाप अगदीं नाहींसें झालें आहे असा-(योगी)-निर्विघ्नपणें योगाभ्यास करणारा पुरुष-(ब्रह्मसंस्पर्शं)-परब्रह्माशीं ज्याचा निकट संबंध आहे, ब्रह्मस्वरूप-(अत्यन्तं)-निरतिशय-अन्तरहित-नित्य-(सुखं)-सुखाला-(सुखेन )-अनायासानें-(अश्नुते)-व्यापतो-अनुभवितो. २८

मनांतील संकल्पविकल्प सोडून जे या सोप्या योगस्थितीचा पुष्कळ अनुभव घेऊन सुखी झाले, ८७ ते त्या सुखाच्या संगतीनें परब्रह्मपदास येऊन पोहोंचले. मीठ पाण्यांत मिळाल्यावर ज्याप्रमाणें पाण्याला सोडूं शकत नाहीं, ८८ त्याप्रमाणें, जीव आणि ब्रह्म यांचें ऐक्य झाल्यावर त्यांची स्थिति होते; आणि नंतर ब्रह्मानंदाच्या मंदिरांत महासुखाची दिवाळी, ती सर्व जगास झाली आहे असें पाहतो. ८९ याप्रमाणें आपलेच पाय घेऊन आपले पाठीवर योगी चालतो. असा अवघड जो योग तो तुला घडत नसेल तर तुला आणखी दुसरा उपाय सांगतों. ३९०

**अन्वयार्थ**—(योगयुक्तात्मा)-ज्याचें अन्तःकरण योगानें युक्त म्ह. समाहित आहे-(सर्वत्रसमदर्शनः)-आणि ज्याचें ज्ञान सर्व भूतांमध्यें सम आहे, तो-(आत्मानं)-स्वात्म्याला-(सर्वभूतस्थं)-सर्व भूतांमध्यें स्थित-(च सर्वभूतानि)-व सर्वभूतांना -(आत्मनि)-आत्म्यामध्यें स्थित-(ईक्षते)-पाहतो.-(यः)-जो-(मां)-मला-(सर्वत्र )-सर्वभूतांमध्यें-(पश्यति)-पाहतो-(च)-व-( सर्वं )-सर्व भूतवर्गास-( मयि )-माझ्यामध्यें-( पश्यति )-पाहतो-(तस्य)-त्याला-(अहं)-मी-(न प्रणश्यामि)-नाहींसा होत नाहीं-(च)-व-(सः)-तो-(मे)-मला-(न प्रणश्यति)-नाहींसा होत नाहीं. २९-३०

मी सर्वांच्या देहांत आहें, आणि माझ्या ठिकाणीं सर्व आहे याविषयीं तर वाद नाहींच. ९१ अशा रीतीनें जग व ईश्वर हीं एकमेकांत मिसळलीं आहेत. परंतु त्याप्रमाणें साधकाच्या बुद्धीनें तसें पत्करलें पाहिजे एवढेंच. ९२ अर्जुना, एऱ्हवीं तरी, जो एकत्वभावनेनें सर्व भूतांचे ठिकाणीं मी व्यापक आहें असें मानून भजतो, ९३ व्यक्तिमात्राच्या अनेकत्वानें ज्याचें अंतःकरणांत अनेकत्व उत्पन्न होत नाहीं, आणि जो केवळ सर्व ठिकाणीं मीच व्यापक आहें असें जाणतो, ९४ तो आणि मी एक असें बोलणेंच व्यर्थ होय; एऱ्हवीं धनंजया, बोलून दाखविलें नाहीं, तरी त्याचें व माझें रूप एकच आहे. ९५ ज्याप्रमाणें दिवा आणि प्रकाश यांच्यामध्यें एकत्वाची योग्यता असते, त्याप्रमाणें तो माझ्या ठिकाणीं व मी त्याचे ठिकाणीं आहें. ९६ जसें पाण्याचे योगानें गोडी किंवा गगनाच्या योगानें पोकळी यांचें अस्तित्व असतें, तसा माझ्याच रूपानें तो योगी रूपवान दिसतो. ९७

१ आश्रय. २ ब्रह्मानुभावाच्या. ३ स्थापना. ४ हें घडत नसल्यास. ५-सुलभ. ६ साधकानें. ७ केलेल्या निश्चयाच्या. ८ अन्यथा. ९ मोकळें सोडावें. १० मोकळें सोडलेलें. ११ तत्काल. १२ योगानें. १३ स्वतः आत्मस्वरूपाशीं मिसळून जाईल. १४ सर्व त्रैलोक्यांत ऐक्याचा प्रकाश होईल. १५ ढग, १६ ब्रह्मरूप. १७ सुलभ. १८ सुटका, अनुभव. १९ संगतीनें. २० आंत. २१ ब्रह्मानंदाच्या मंदिरांत. २२ उत्साह. २३ जगासह. २४ पायांनीं. २५ पाठीच्या मणक्यांतून जो मार्ग आहे त्यानें, उलटें. २६ होत नाहीं, घडत नाहीं. २७ ठावा. २८ मरतेलें, स्थिरावलेलें. २९ बुद्धीला येतां येईल इतकें मात्र घडलें पाहिजे. ३० एकत्व भावनेनें. ३१ ऐक्यतेचा. ३२ योग्यता. ३३ गोडी. ३४ पोकळी. ३५ रूपवान.

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः । सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥३१॥

जेणें ऐक्याचिये दिठी । सर्वत्र मातेंचि किरिटी । देखिला जैसा पटीं[२] । तंतु एकु ९८ कां स्वरूपें[३] तरी बहुतें आहाती । परी तैसीं सोनें[४] बहुवें न होती । ऐसी ऐक्यांचळाची[५] स्थिती । केली जेणें ९९ नातरी वृक्षांचीं पानें जेतुलीं । तेतुलीं रोपें नाहीं लाविलीं । ऐसी अद्वैतदिवसें पाहली[६] । रांत्री[७] जया ४०० तो पंचात्मकीं सांपडे । तरी मग सांग पां कैसेनि अंडे । जो प्रतीतीचेनि पाडें । मजसीं तुके[११] १ माझें व्यापकपण आघवें । गवसलें[१२] तयाचेनि अनुभवें । तरी न म्हणतां स्वभावें । व्यापकु जाहला २ आतां शरीरीं तरी आहे । परी शरीराचा तो नोहे । ऐसें बोलवेरी[१३] होये । तें करूं काई ३

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन । सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥३२॥

म्हणोनि असो तें विशेषें । आपणपेंयासारिखें । जो चराचर देखे । अखंडित ४ सुखदुःखादि वर्में । कां शुभाशुभें कर्में । दोन्हीं ऐसीं मनोधर्में । नेणेचि जो ५ हें समविषम भाव । आणिकही विचित्र जें सर्व । तें मानी जैसे अवयव । आपुले होती ६ हें एकैक काय सांगावें । जया त्रैलोक्यचि । आघवें । मी ऐसें स्वभावें । बोधीं आलें ७ तयाही देह एकु कीर आथी । लौकिकीं[१५] सुखदुःखी तयातें म्हणती । परी आम्हांतें ऐसी प्रतीती । परब्रह्मचि हा ८ म्हणोनि आपणपें[१६] विश्व देखिजे । आणि आपण विश्व होइजे । ऐसें साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ९ हें तूतें बहुतीं प्रसंगीं । आम्ही म्हणों याचिलागीं । जे साम्यांपरौती[१७] जगीं । प्राप्ति नाहीं ४१०

अर्जुन उवाचः—

योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन । एतस्याहं न पश्यामि चञ्चलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥३३॥
चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

तंव अर्जुन म्हणे देवा । तुम्ही सांगा कीर आमुचा[१८] कणवा । परी न पुरों[१९] जी स्वभावा । मनाचिया ११ हें मन कैसें केवढें । ऐसें पाहों म्हणों तरी न सांपडे । एऱ्हवीं राहटावया[२०] थोडें । त्रैलोक्य यया १२ म्हणोनि ऐसें कैसें घडेल । जे मर्कट समाधी येईल । कां राहा म्हणतलिया राहेल । महावातु[२१] १३ जें बुद्धीतें सैंळी[२२] । निश्चयातें टाळी । धैर्येंसीं हातफळी[२३] । मिळऊनि जाय १४ जें विवेकातें भुलवी । संतोषासी चौंड[२४] लावी । बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा १५ जें निरोधलें घे[२५] उवावो । जया संयमुचि[२६] होय सांवावो[२७] । तें मन आपुला स्वभावो । सांडील काई १६ म्हणोनि मन एक निश्चळ[२८] राहेल । मग आम्हांसि साम्य होईल । हें विशेषेंही न घडेल । याचिलागीं १७

**अन्वयार्थ**—(एकत्वं आस्थितः यः)–एकत्वास पूर्णपणें प्राप्त झालेला जो–(सर्वभूतस्थितं मां)–सर्वभूतांमध्यें स्थित असलेल्या मला–(भजति)–भजतो–(सः योगी)–तो योगी–(सर्वथा वर्तमानः अपि)–कोणत्याहि प्रकारें जरी वागत असला तरी–(मयि)–माझ्या ठिकाणीं–परम पदीं–(वर्तते)–राहतो. ३१

अर्जुना, ज्याप्रमाणें वस्त्रांत केवळ तंतुच पाहतात, त्यावांचून दुसरें कांहींच पहात नाहींत, त्याचप्रमाणें ज्यानें ऐक्याचे दृष्टीनें सर्व ठिकाणीं माझी व्याप्ति आहे असें जाणलें, ९८ किंवा अलंकाराचे आकार जरी पुष्कळ असले तरी सोनें जसें पुष्कळ प्रकारचें होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्यानें ऐक्यरूप पर्वताची स्थिति बनविली आहे, ९९ अथवा जितकीं झाडाचीं पानें तितकीं रोपें लाविलेलीं नसतात, अशा अद्वैतप्रकाशानें ज्याची अज्ञानरात्र उजाडली आहे, ४०० तो पंचमहाभूतात्मक शरीरांत जरी सांपडला, तरी तो स्वस्वरूपास येण्याला कसा बरें प्रतिबंध पावेल? कारण, अनुभवाच्या योगानें तो ज्याशीं ऐक्य पावतो, १ त्याच्या अनुभवानें माझें सर्व ठिकाणीं व्यापकत्व आहे असें जाणलें आहे; मग 'तो सर्व व्यापक झाला' असें म्हटलेंच पाहिजे असें नाहीं, २ हें पहा–स्यानें जरी शरीर धारण केलें आहे तरी तो शरीराचा नाहीं. ही गोष्ट बोलून दाखवितां येण्यासारखी नव्हे; तेव्हां तिचें वर्णन करितां येईल काय? ३

**अन्वयार्थ**—(हे अर्जुन)–हे अर्जुना!–(यः)–जो–(सर्वत्र)–सर्व ठिकाणीं–सर्वभूतांमध्यें–(आत्मौपम्येन)–आपल्या उपमेनें–(सुखं वा यदि वा दुःखं)–सुख किंवा दुःख–(समं)–सम–(पश्यति)–पाहतो–(सः)–तो–(परमः योगी)–श्रेष्ठ योगी–(मतः)–मानलेला आहे. ३२

अर्थात् या विषयाबद्दल जास्त सांगणें नको. जो सदोदित आपल्यासारखेंच सर्व जग पाहतो; ४ जो सुख आणि दुःख यांचे विकार अथवा शुभ व अशुभ कर्मे हीं दोन आहेत असें आपल्या मनांत समजत नाहीं; ५ हे समविषम पदार्थ आणि दुसरेही जे जे कांहीं विचित्र आहेत, ते सर्व आपले अवयवच आहेत असें तो मानतो; ६ यापेक्षां आणखी काय काय गोष्टी सांगाव्या? ज्याला सर्व त्रैलोक्य मीच आहें असें अनुभवानें समजलें आहे; ७ त्याला शरीर आहे ही गोष्ट खरी, आणि तो सुखदुःख भोगतो असें लोक देखील म्हणतात; तथापि आमच्या अनुभवानें तो परब्रह्मच आहे; ८ म्हणून अर्जुना, याच्या योगानें आपल्याच ठिकाणीं सर्व विश्व पाहतां येईल, आणि आपण स्वतःसच विश्वरूप होतां येईल, त्या समदृष्टीची तूं उपासना कर. ९ आम्हीं तुला पुष्कळ प्रसंगीं याच कारणाकरितां असें सांगितलें आहे कीं, समदृष्टीपेक्षां या जगतांत दुसरी अधिक प्राप्तिच नाहीं. ४१०

**अन्वयार्थ**—(मधुसूदन)–हे मधुसूदना!–(त्वया)–तूं–(यः अयं योगः)–जो हा योग–(साम्येन)–साम्यानें–(प्रोक्तः)–सांगितलास–(एतस्य)–या योगाची–(स्थिरां स्थितिं)–अचल–स्थिति–(चंचलत्वात्)–मनाच्या चंचलपणामुळें–(अहं)–मी–(न पश्यामि)–पहात नाहीं.–(कृष्ण)–[कारण] हे कृष्णा!–(मनः चंचलं)–मन चंचल–(प्रमाथि)–शरीर व इंद्रियें यांना परवश–व्याकुळ करणारें,–(बलवत्)–अतिशय दुर्निवार व–(दृढं)–अच्छेद्य आहे–(हि)–हें प्रसिद्ध आहे–(अहं)–मी–(तस्य)–त्याचा–(निग्रहं)–निग्रह–(वायोः इव)–वायूच्या निग्रहाप्रमाणें–(सुदुष्करं)–अति दुष्कर–(मन्ये)–समजतों. ३३–३४.

मग अर्जुन श्रीकृष्णास म्हणतो, "देवा, तुम्हीं आमची दया मनांत आणून हा समतेचा मार्ग सांगितला, परंतु मनाच्या चंचल स्वभावापुढें आमचा टिकाव लागत नाहीं. ११ हें मन कसें आणि केवढें आहे असें पाहूं म्हटलें तर तें सांपडत नाहीं. एरव्हीं त्याला फिरण्याला त्रैलोक्यही पुरें होत नाहीं. १२ म्हणून, माकडाला समाधि लागणें किंवा मोठ्या वाऱ्याला स्थिर हो म्हणतांच तो थांबणें ह्या गोष्टी कशा घडतील? १३ जें मन बुद्धीला छळतें, निश्चय मोडतें, आणि धैर्याचे हातावर हां हां म्हणतां तुरी देऊन निघून जातें, १४ जें विचाराला चकवितें, संतोषाला नादी लावतें. आणि मनुष्य एके ठिकाणीं बसला तरी त्याला दशदिशा हिंडवितें, १५ ज्याला कोंडलें असतां तें उसळून बाहेर येतें आणि निग्रह केला तर तो उलटा त्याला साह्य करतो, असें हें मन आपला स्वभाव सोडील कां? १६ म्हणून एक मन जर स्थिर राहील, तर मग आम्हांस [illegible] वस्था प्राप्त होईल, परंतु मनाची अशीच [illegible] असल्यामुळें ती प्राप्त होणें दुर्घट आहे. १७"

१ ऐक्य दृष्टीनें. २ वस्त्रांत. ३ आकार, अलंकार. ४ सुवर्ण ५ ऐक्यरूप पर्वताची. ६ उजाडली. ७ अज्ञानरूप रात्र. ८ पंचभूतात्मक शरीरांत. ९ प्रतिबंध पावे. १० अनुभवाच्या. ११ तोलला जातो. १२ सांपडलें. १३ शब्दानें सांगण्यासारखें. १४ अनुभवाला. १५ लोकव्यवहारांत. १६ आपले ठिकाणीं. १७ समदृष्टि पलीकडे. १८ [illegible] आणून. १९ पुरें पडणार नाहीं. २० [illegible] फिरण्यास. २१ मोठा वारा. २२ छळें. २३ हां हां म्हणतां. हातावर तुरी देऊन. २४ [illegible]. २५ [illegible] घेते. २६ निग्रह. २७ [illegible]. २८ स्थिर.

श्रीभगवानुवाच—

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम्। अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

तंव कृष्ण म्हणती साचचि। बोलत आहासि तें तैसेंचि। यया मनाचा कीर च-
पळचि। स्वभावो गा १८ परि वैराग्याचेनि आधारें। जरि लाविलें अभ्यासाचिये मो-
हरें। तरि केतुलेनि एके अवसरें। स्थिरावेल १९ कां जें यया मनाचें एक निकें। जें दे-
खिले गोडीचिया ठाया सोंके। म्हणोनि अनुभवसुखाचि कवतिकें। दावीत जाइजे २०

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः। वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥३६॥

एऱ्हवीं विरक्ति जयांसि नाहीं। जे अभ्यासीं न रिघती कहीं। तयां नाँकळे
हें आम्हीही। न मनूं कायी २१ परि नियमांचिया वाटा न वंचिजे।
कहीं वैराग्याची से न करिजे। केवळ विषयजळीं ठाकिजे। बुडी देउनी २२
यया जौलिया मानसा कहीं। युक्तीची कांबी लागली नाहीं। तरी निश्चळ हो-
ईल काई। कैसेनि सांगें २३ म्हणोनि मनाचा निग्रहो होये। ऐसा उपाय जो
आहे। तो आरंभी मग नोहे। कैसा पाहों २४ तरी योगसाधन जितुकें। तें
अवघोंचि काय लटिकें। परि आपणयां अभ्यासूं न ठके। हेंचि म्हणे २५
आंगीं योगाचें होय बळ। तरि मन केतुलें चपळ। काय महदादि हें सकळ। आपु
नोहे २६ तेथ अर्जुन म्हणे निकें। देवो बोलती तें न चुके। साचचि योगब-
ळेंसीं न तुके। मनोबळ २७ तरि तोचि योगु कैसा केवीं जाणों। आम्ही येतुले
दिवस याची मातुही नेणों। म्हणोनि मनातें जी म्हणों। अनोवर २८ हा आतां आघ-
वेया जन्मा। तुझेनि प्रसादें पुरुषोत्तमा। योगपरिचयो आम्हां। जाहला आजी २९

अर्जुन उवाच—

अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलित मानसः। अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥३७॥
कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति। अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥
एतन्मे संशयं कृष्ण च्छेत्तुमर्हस्यशेषतः। त्वदन्यः संशयस्यास्य च्छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

परि आणिक एक गोसांविया। मज संशयो असे सावियां। तो तूंवांचूनि
फेडावया। समर्थु नाहीं ४३० म्हणोनि सांगें श्रीगोविंदा। कवण एकु मोक्ष-
पदा। झोंबत होता श्रद्धा। उपायेंविण ३१ इंद्रियग्रामोनि निघाला। आस्थे-
चिया वाटे लागला। आत्मसिद्धीचिया पुढिला। नगरा यावया ३२ तंव आ-
त्मसिद्धि न ठकेचि। आणि मागुतें न येववेचि। ऐसा अस्तु गेला माझा-
रींचि। आयुष्यभानु ३३ जैसें अकाळीं आभाळ। अळुमाळु सपातळ। विपायें
आलें केवळ। वसें ना वर्षे ३४ तैसीं दोन्ही दुरावलीं। जे प्राप्ती तंव अलग

**अन्वयार्थ**—(महाबाहो)—हे अर्जुना !—(मनः)—मन—(दुर्निग्रहं)—निग्रह करतां येण्याजोगें नाहीं व-(चलं)—चंचल आहे. यांत—(असंशयं)—कांहीं संशय नाहीं.—(तु कौन्तेय)—पण हे कुंतीपुत्रा !—(अभ्यासेन)—अभ्यासानें—(च)—व—(वैराग्येण)—वैराग्यानें—(गृह्यते)—त्याचा निरोध केला जातो. ३५

तेव्हां श्रीकृष्ण म्हणतात:—तूं जें बोललास, तें खरोखर तसेंच आहे. या मनाचा स्वभाव खरोखरी चंचल आहे. १८ परंतु याला वैराग्याच्या आधारानें अभ्यासाच्या रस्त्याला लावलें, तर कांहीं कालानें हें स्थिर होईल. १९ कारण, या मनाच्या ठिकाणीं एक चांगला गुण आहे. ज्याची याला चटक लागेल त्याच ठिकाणीं रहावयास हें सोकावतें ! म्हणून याला कौतुकानें आत्मसुख दाखवीत रहावें. ४२०

**अन्वयार्थ**—(असंयतात्मना)—ज्यानें चित्त अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें अनिरुद्ध असतें त्याच्याकडून—(योगः)—योग—(दुष्प्रापः)—मोठ्या कष्टानें संपादिला जातो—(इति)—अशी—(मे)—माझी—(मतिः)—मति आहे.—(तु)—पण—(वश्यात्मना)—ज्यानें आपलें अन्तःकरण अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें स्वाधीन करून घेतलें आहे व—(यतता)—आणखी जो यत्न करीत आहे, त्याच्याकडून—(उपायतः)—पूर्वोक्त उपायानें योग—(अवाप्तुं शक्यः)—संपादन करणें शक्य आहे. ३६

एऱ्हवीं ज्याला वैराग्य नाहीं, व जो कधीं अभ्यासही करीत नाहीं, त्याला हें मन आवरणार नाहीं असें आम्हीं तरी कोठें मानीत नाहीं ! २१ परंतु जो यम, नियम, प्राणायाम वगैरेंचा अभ्यास करीत नाहीं, ज्याला वैराग्याची कधीं आठवण होत नाहीं, आणि जो केवळ विषयरूप जलांत माशासारखी बुडी देऊन राहिला आहे, २२ आणि अशाप्रकारें विषयलंपट झालेल्या त्याच्या मनाला युक्तीची चिमट कधीं लागली नाहीं, त्याचें मन निश्चल कसें होईल सांग बरें ? २३ म्हणून, मनाचा निग्रह होईल असा जो उपाय आहे, त्याला तूं आरंभ कर. मग तें कसें निश्चल होत नाहीं तें पाहूं ! २४ तर योगसाधनें म्हणून जेवढीं आहेत तेवढीं सर्व काय खोटीं आहेत ? परंतु आपल्याला अभ्यास होत नाहीं असें म्हण; २५ जर योगसाधनांचें बळ अंगांत असलें तर मनाच्या चंचलतेची कथा काय ? योगबलानें महत्तत्त्वादिक स्वाधीन होत नाहींत का ? २६ तेव्हां अर्जुन म्हणतो, "देवा, आपण जें म्हणतां तें खरें आहे; खरोखर योगबलापुढें मनाचें बळ टिकणार नाहीं; २७ तरी तो योग कसा आहे व कशा रीतीनें जाणावा त्याची आजवर आम्हांस वार्ताही नव्हती. म्हणून देवा, मन अनावर आहे असें आम्हीं म्हणत होतों. २८ हे पुरुषोत्तमा, तुमच्या प्रसादानें आमच्या सगळ्या जन्मांत आज योगाचा परिचय आम्हांस झाला ! २९

**अन्वयार्थ**—(कृष्ण)—हे कृष्णा—(अयतिः)—प्रयत्न न करणारा,—(श्रद्धया उपेतः)—योगमार्गाविषयींच्या श्रद्धेनें युक्त आहे, पण—(योगात् चलितमानसः)—अंतकाळीं योगापासून ज्याचें मन चलित झालें आहे, ज्याला योगाचें विस्मरण झालें आहे, तो—(योगसंसिद्धिं)—योगाच्या फलाला—(अप्राप्य)—प्राप्त न होऊन—(कां गतिं)—कोणत्या गतीस—(गच्छति)—प्राप्त होतो ?—(हे महाबाहो !)—हे महापराक्रमी कृष्णा !—(उभयविभ्रष्टः)—कर्ममार्ग व योगमार्ग या दोन्हीं मार्गांपासून विभ्रष्ट झालेला—भ्रंश पावलेला, त्यामुळें—(अप्रतिष्ठः)—निराधार झालेला—(ब्रह्मणः पथि)—ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत—(विमूढः)—अत्यंत मूढ झालेला तो—(छिन्नाभ्रं इव)—आपल्या आधारापासून तुटून निराळ्या झालेल्या अभ्राप्रमाणें—(न नश्यति कच्चित्)—नाश तर पावत नाहींना ?—(कृष्ण)—कारण हे कृष्णा !—(मे एतं संशयं)—माझ्या या संशयास—(अशेषतः)पूर्णपणें—(छेत्तुं)—तोडण्यास—संशय घालविण्यास—(अर्हसि)—तूं योग्य आहेस—(अस्य संशयस्य छेत्ता)—या संशयाचा छेद करणारा—(त्वत् अन्यः)—तुजवांचून दुसरा कोणी—(न हि उपपद्यते)—संभवत नाहीं. ३७–३९

"परंतु, हे प्रभो, आणखी एक संशय सहज उत्पन्न झाला आहे, तो फेडण्यास आपल्याशिवाय दुसरा कोणीही समर्थ नाहीं. ४३० म्हणून, गोविंदा, मला सांगा कीं, कोणीएक मनुष्य मोक्षप्राप्तीकरितां भक्तियुक्त अंतःकरणानें उपायाशिवाय इच्छा करीत होता; ३१ इंद्रियरूपी गांवाहून निघून मोक्षरूपी गांवास जाण्याकरितां तो भक्तिरूप मार्गाला लागला, ३२ तो मोक्ष प्राप्त होत नाहीं, आणि परतही येववत नाहीं, अशा स्थितींत त्याचा आयुष्यरूपी सूर्य मध्येंच मावळला; ३३ सहज अकालीं आलेला लहान पातळ ढग ज्याप्रमाणें टिकत नाही व वृष्टीही करीत नाहीं, ३४ त्याप्रमाणें, ज्याला दोन्ही अंतरलीं, म्हणजे मोक्षप्राप्ति तर दूरच राहिली, आणि श्रद्धे-

१ रस्त्याला. २ अवकाशानें. ३ ठिकाणास. ४ चटक लागून रहाते. ५ आत्मसुख. ६ कौतुकानें ७ आकळलें जात नाहीं. ८ मानीत नाहीं. ९ कां ? १० जाणें. ११ विषयलंपट. १२ जन्मादारभ्य. १३ मनुष्य, कोण. १४ प्रतिबंध. १५ आरंभ कर. १६ आपणांला अभ्यास होत नाहीं असें म्हण. १७ महत्तत्त्वादि. १८ प्राप्त. १९ योग सामर्थ्यानीं.

२० बरोबरी पावत नाहीं. २१ गोष्टही. २२ अजिबात. २३ साऱ्या जन्मांत. २४ हे स्वामी. २५ साहजिक. २६ विश्रासानें. २७ इंद्रियांच्या गांवाहून. २८ मार्गाला. २९ प्राप्त झाली नाहीं. ३० मागारें. ३१ मावळला. ३२ मध्येंच. ३३ किंचित. ३४ पडव्यासारखे पातळ. ३५ सहज. ३६ रहात नाहीं, किंवा वर्षाव करीत नाहीं. ३७ मोक्षमार्गात. ३८ दूर.

ठेली । आणि अप्राप्तिही सांडवली । श्रद्धा तया ३५ ऐसा दोंलीं अंतरेला कां जी । जो श्रद्धेच्या समोजीं । बुडला तया होजी । कवण गति ३६.

श्रीभगवानुवाचः—

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते । न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥४०॥

तंव कृष्ण म्हणती पार्था । जया मोक्षसुखीं आस्था । तया मोक्षावांचूनि अन्यथा । गती आहे गा ३७ परि एतुलें हेंचि एक घडे । जें माझारीं विसावावें पडे । तेंही परी ऐसेनि सुरवाडें । जो देवा नाहीं ३८ एऱ्हवीं अभ्यासाचा उचलता । पाउलीं जरी चालता । तरि दिवसाआधीं ठाकिता । सोहंसिद्धीतें ३९ परि तेतुला वेगु नव्हेचि । म्हणऊनि विसावा तरी निकाचि । पाठीं मोक्षु तंव तैसाचि । ठेविला असे ४४०

प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः । शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥४१॥

ऐकें कवतिक हें कैसें । जे शतमखा लोक सायासें । ते तो पावे अनायासें । कैवल्यकामु ४१ मग तेथिंचे जे अमोघ । अलौकिक भोग । भोगितांही सांग । कांटाळे मन ४२ हा अंतरायो अवचितां । कां वोढवेला श्रीभगवंता । ऐसा दिविभोगीं भोगितां । अनुतापु नित्य ४३ पाठीं जन्मे संसारीं । परी सकळ धर्मांचिया मोहरीं । लांबी उगवे आगरीं । विभवश्रियेचा ४४ जयातें नीतिपंथें चालिजे । सत्यपूत बोलिजे । देखावें तें देखिजे । शास्त्रदृष्टी ४५ वेद तो जागेश्वरु । जया व्यवसाय निजाचारु । सारासार विचारु । मंत्री जया ४६ जयाच्या कुळीं चिंता । जाली ईश्वराची पतिव्रता । जयातें गृहदेवता । आदि ऋद्धि ४७ ऐसी निजपुण्याची जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळवाडी । तिये जन्मे तो सुरवाडी । योगच्युतु ४८

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् । एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥
तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् । यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन ॥ ४३ ॥

अथवा ज्ञानाग्निहोत्री । जे परब्रह्मण्यश्रोत्री । महासुखक्षेत्रीं । आदिवंत ४९ जे सिद्धांताचिया सिंहासनीं । राज्य करिती त्रिभुवनीं । जे कूजंती कोकिल वनीं । संतोषाच्या ५० जे विवेकद्रुमाचे मुळीं । बैसले आहाति नित्य फळीं । तया योगियांचिया कुळीं । जन्म पावे ५१ मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पाहांट फुटे । सूर्यापुढें प्रगटे । प्रकाशु जैसा ५२ तैसी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां । बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ५३ तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनाचि सारस्वतें दुभे । मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ५४ ऐसें जे जन्म । जयालागीं देव सकाम । स्वर्गीं ठेले जप होम । करिती सदा ५५ अमरीं भाट

मुळें सोडलेल्या संसारासही तो मुकला, ३५ असा दोन्ही गोष्टींना जो मुकला, परंतु भक्तींत निमग्न झाला, त्याला कोणती गति प्राप्त होते हें सांगा. " ३६

**अन्वयार्थ**--(हे पार्थ !)-हे अर्जुना !-(तस्य)-त्याचा-(विनाशः)-विनाश-(इह)-या लोकीं-(न एव)-नाहींच व-(अमुत्र)-परलोकींहि-(न विद्यते)-होत नाहीं.-(हि)-कारण-(हे तात !)-अरे बाबा !-(कश्चित्)-कोणीहि-(कल्याणकृत्)-शुभाचरण करणारा-(दुर्गतिं)दुर्गतीला-(न गच्छति)-जात नाहींच.

तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले:--पार्था, ज्याला मोक्षप्राप्तीची इच्छा आहे, त्याला मोक्षावांचून दुसरी गति आहे काय ? ३७ परंतु त्याला मध्यंतरी विश्रांति घ्यावी लागते एवढेंच काय तें ! पण त्या विश्रांतींत त्याला जें सुख होतें तें देवांनासुद्धां मिळत नाहीं ! ३८ एऱ्हवीं, जर त्यानें अभ्यासाची पावलें जोरानें टाकिलीं असतीं म्हणजे झपाट्यानें अभ्यास केला असता तर दिवस (आयुष्य) मावळण्याच्या पूर्वींच हा मोक्षप्राप्तीच्या गांवाला पोहोंचला असता ! ३९ परंतु तितका त्याचा वेग नसल्यामुळें विसावा घेणें भाग पडलें, तथापि मागाहून तरी मोक्षप्राप्ती ही ठेविलीच आहे. ४४०

**अन्वयार्थ**-(योगभ्रष्टः)-योगमार्गापासून भ्रष्ट झालेला संन्यासी-( पुण्यकृतां)-पुण्याचरण करणाऱ्या लोकांच्या-(लोकान्)-लोकांस-(प्राप्य)-प्राप्त होऊन-(शाश्वतीः समाः)-हजारों वर्षें-(उषित्वा)-त्या लोकीं राहून-(शुचीनां श्रीमतां गेहे)-शास्त्रोक्त आचरण करणाऱ्या श्रीमंतांच्या घरीं-(अभिजायते)-उत्पन्न होतो. ४१

अरे, हें कौतुक पहा--ज्या लोकांची प्राप्ति व्हावयास शंभर यज्ञ करणाऱ्या इंद्रालाही सायास पडतात, ते या मोक्षेच्छु पुरुषाला अनायासें प्राप्त होतात. ४१ मग तेथील निष्फळ न होणारे व अप्रतिम असे भोग भोगतां भोगतां त्याच्या मनाला कंटाळा येतो ! ४२ ते दिव्य भोग भोगीत असतां तेथें त्यास सुख होत नाहीं; व 'हे भगवंता, हें भोगाचें विघ्न माझ्यामागें कां लागलें ?' असा तो निरंतर पश्चात्ताप करीत असतो. ४३ नंतर तो फिरून मृत्युलोकीं जन्म पावतो, पण सर्व धर्मांचें माहेरघर अशा कुळांत जन्म पावतो; आणि शेत कापल्यावर पडलेल्या भातगोट्यांचें शेत जसें जोरानें फोंफावतें, तशी त्याच्या ऐश्वर्याची वृद्धि होते. ४४ जें कुल नीतिमार्गानें चालणारें, सत्य आणि पवित्र भाषण करणारें, आणि शास्त्ररीतीनें वागणारें, ४५ ज्या कुळांत वेद नित्य जागृत असतो, व स्वधर्माचें आचरण हा ज्याच्या कुलाचा व्यवसाय आणि सारासार विचार हाच मंत्री, ४६ ज्या कुळांत चिंतेनें ईश्वरास वरिलें, ( ज्या कुळांत ईश्वरावाचून दुसऱ्या कशाचेंही चिंतन होत नाहीं. ) आणि ज्याला आदिऋद्धि ( संपत्ति ) हीच गृहदेवता आहे, ४७ असें ज्या कुलानें पुण्य जोडलें आहे, व जेथें सर्व सुखाची समृद्धि आहे, अशा कुळांत तो योगभ्रष्ट पुरुष सुखानें जन्म घेतो. ४८

**अन्वयार्थ**--(अथवा)-किंवा तो योगभ्रष्ट-(धीमतां योगिनां एव कुले)-बुद्धिमान् दरिद्रयांच्याच कुळांत-(भवति)-उत्पन्न होतो-(लोके हि)-या लोकीं-(यत् ईदृशं जन्म)-जें हें अशाप्रकारचें जन्म-दरिद्री योग्यांच्या घरीं झालेलें जन्म-(एतत्)-तें-(दुर्लभतरं)-अतिशय दुर्लभ आहे. ४२-( तत्र )-त्या दरिद्री योग्यांच्या कुळांत-(तं)-त्या-(पौर्वदेहिकं)-पूर्वदेहांतील-(बुद्धिसंयोगं)-बुद्धिसंयोगास-( लभते )--तो योगभ्रष्ट प्राप्त होतो-( च कुरुनंदन)-आणि हे कुरुनंदना-(संसिद्धौ)-योगसिद्धीसाठीं-(ततः)-पूर्वजन्मांतील अभ्यासाच्या संस्कारामुळें, किंवा त्याहून-(भूयः)-अधिकच-(यतते)-यत्न करतो. ४३

अथवा ज्ञानरूप अग्नीमध्यें हवन करणारे, व अध्यात्मसिद्धांतांत निष्णात, आणि परब्रह्मरूप गांवचे वतनदार, ४९ जे एकमेवाद्वितीय या सिद्धांताच्या सिंहासनावर बसून त्रिभुवनाचें राज्य करतात, आणि संतोषरूप वनांत कोकिळासारखा मधुर ध्वनि करतात, ४५० आणि जे विचारवृक्षाच्या मुळापाशीं बसून ब्रह्मरूप नित्य फळाचें सेवन करतात, अशा योग्यांच्या कुळांत तो योगभ्रष्ट पुरुष जन्म घेतो. ५१ जन्म घेतल्यावर लहान वयांतच त्याच्या ठिकाणीं आत्मज्ञानाचा उजेड पडतो; व ज्याप्रमाणें सूर्य उगवण्याच्या अगोदर चहूंकडे प्रभा फांकते, ५२ त्याप्रमाणें, प्रौढ वयाची वाट न पाहतां ज्ञान हें त्याला बालपणींच वरतें; ५३ पूर्वजन्मीं सिद्ध झालेल्या बुद्धीच्या योगानें सर्व विद्या त्याला प्राप्त होतात व त्याच्या मुखांतून सर्व शास्त्रें स्वयमेव निघूं लागतात. ५४ असें जें उत्तम कुलीं जन्म, तें प्राप्त होण्याकरितां स्वर्गवासी देव देखील मनांत हेतु धरून नेहमीं जप होम करीत असतात. ५५ पार्था, देवांनीं स्तुतिपाठक

१ दोहींला. २ मुकला. ३ समुदायांत. ४ विश्रांति घ्यावी लागते. ५ सुखानें. ६ विसांवा. ७ इंद्राला. ८ मोक्ष इच्छिणारा. ९ निष्फल न होणारे. १० अप्रतिम. ११ प्राप्त झाला. १२ स्वर्गींचे भोग. १३ पश्चात्तापी. १४ फिरून. १५ विश्रांतिस्थानीं. १६ शेत कापल्यावर पडलेल्या धान्यापासून उगवणारें, किंवा कापलेल्या बुडख्यांतून पुनः उगवतें तें रोप. १७ १७ ऐश्वर्याच्या. १८ पवित्र. १९ जागती ज्योत, आराध्यदैवत. २० व्यवहार. २१ स्वधर्म. २२ संपत्ति. २३ उदीम व्यापार. २४ सुखांत. २५ योगभ्रष्ट. २६ ज्ञानरूप अग्नीमध्यें हवन करणारे. २७ परब्रह्मरूपी यज्ञ करणारे. २८ मूळचे रहिवासी, वतनदार. २९ आत्मप्राप्तीच्या. ३० शब्द करितात. ३१ विचारवृक्षाच्या. ३२ मोजकी. ३३ उजाडे. ३४ प्रौढ अवस्थेची. ३५ प्रौढ वयाच्या. ३६ वरिते, माळ घालते. ३७ बुद्धिदेवतेच्या प्राप्तीनें. ३८ सर्व विद्या दुमदुमतात, येतात. ३९ हेतु धरणारे. ४० राहणारे. ४१ स्तुतिपाठक.

होऊन मृत्यु लोकाचें वर्णन करावें असें जें उत्तम कुलीं जन्म, तें तो योगभ्रष्ट पुरुष पावतो. ५६

**अन्वयार्थ**—(हि)-कारण-(तेन एव पूर्वाभ्यासेन)-त्याच पूर्वजन्मी केलेल्या अभ्यासानें-(अवशः अपि सः)-तो अवश असलेलाहि योगभ्रष्ट-(ह्रियते)-हरण केला जातो-(योगस्य जिज्ञासुः अपि)-योगाचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणाराहि-(शब्दब्रह्म)-शब्द ब्रह्माचें-वेदोक्तकर्मानुष्ठानफलाचें-(अतिवर्तते)-उल्लंघन करून जातो. ४४

आणि ज्या पूर्वजन्मांत आयुष्याचा शेवट झाला होता त्या वेळची सद्बुद्धि त्याला पुनः प्राप्त होते. ५७ त्यासमयीं आधींच दैववान्, पायाळू आणखी वर डोळ्यांत दिव्यांजन घातलेल्या पुरुषास जसें भूमींतील धन सहज दृष्टीस पडतें, ५८ त्याप्रमाणें, गुरुमुखाशिवाय न कळणाऱ्या कठीण अशा अभिप्रायाच्या ठिकाणीं त्याची बुद्धि अनायासें जाऊन पोहोंचते. ५९ इंद्रियें हीं आपण होऊन मनाच्या अधीन होतात, मन प्राणवायूंत ऐक्य पावतें, व तो प्राणवायु चिदाकाशांत मिळतो. ४६० आणखी काय गोष्टी असतील त्या असोत, परंतु योगाभ्यासही त्याला आपोआप प्राप्त होतो, आणि समाधिही त्याच्या मनाचें घर विचारीत येतो. ६१ जगाला आरंभ करणारी जी रंभा म्हणजे पार्वती तिचा गौरव करणारा योगपीठीचा भैरवच की काय किंवा वैराग्यरूप सिद्धीचा मूर्तिमंत अनुभवच प्रकट झाला आहे की काय! ६२ किंवा हें संसार मोजण्याचें मापच, अथवा अष्टांगयोगसाहित्याचें बेटच होय. सुगंधानेंच ज्याप्रमाणें चंदनाचें रूप धारण करावें, ६३ त्याचप्रमाणें, साधकदशेच्या योगानें हा इतका योगसंयुक्त झालेला असतो की, संतोषाचा पुतळा बनविल्यासारखा किंवा सिद्धीच्या भांडारांतून काढल्यासारखा दिसतो. ६४

**अन्वयार्थ**—(तु)-आणि-(प्रयत्नात् यतमानः)-अधिक यत्न करणारा-(योगी)-विद्वान्-(संशुद्धकिल्बिषः)-ज्याचें पाप संशुद्ध-अत्यंत शुद्ध झालें आहे असा, होऊन-(अनेकजन्मसंसिद्धः)-[भवति]-अनेक जन्मांतील थोड्या थोड्या अभ्यासानें संसिद्ध होतो.-(ततः)-नंतर योगसंसिद्धीमुळें तो-(परां गतिं)-मोक्ष नांवाच्या श्रेष्ठ गतीस-(याति)-प्राप्त होतो. ४५

कारण, कोट्यवधि वर्षांनीं हजारों जन्मांचा प्रतिबंध दूर करून तो आत्मसिद्धीच्या किनाऱ्यावर येऊन पोहोंचलेला असतो. ६५ म्हणून सर्व साधनें त्याला येऊन स्वभावतःच प्राप्त होतात; आणि मग सहजच तो विचाराच्या गादीवर बसतो. ६६ नंतर, विचार करण्यामध्यें प्रबल असा विवेकही मागें राहतो; आणि अविचारणीय असें जें ब्रह्म, तें तो स्वतांच होतो. ६७ त्या ठिकाणीं मनाचे लय नाहींतसे होतात; प्राणवायूचें हालणें बंद होतें; व आकाशही आपल्या ठिकाणीं लीन होतें. ६८ ॐकाराच्या अर्थ बिंदूंत प्रणव नाहींसा होतो. अशा रीतीनें त्याला अवर्णनीय सुख प्राप्त होतें, म्हणून त्याविषयीं बोलणेंच बंद होतें. ६९ मग सगळ्या गतींना गति देणारी जी ब्रह्मस्थिति, त्या निराकार स्थितीचें स्वरूपच तो बनून राहतो. ४७० त्यानें मागल्या अनेक जन्मांत, प्रतिबंध हाच कोणी पाण्यावरील मळ झाडून टाकलेला असतो, म्हणून त्याची लगघटका त्याचा जन्म होतांच बुटते, ७१ आणि तद्रूपतेशीं शुभलग्न होऊन तो अभिन्नत्व पावतो. अभ्रें नाहींतशीं झालीं म्हणजे ज्याप्रमाणें आकाशरूपच होऊन राहतात, ७२ त्याप्रमाणें (विक्षेपादि विघ्नें नाहींतशीं झालीं म्हणजे,) ज्यापासून विश्वाची उत्पत्ति होते व ज्या ठिकाणीं तें पुनः लय पावते, तें ब्रह्म तो या विद्यमान देहांत असतांनाच बनतो. ७३

**अन्वयार्थ**—(तपस्विभ्यः)-कृच्छ्रचांद्रायणादि तप करणाऱ्या तपस्व्यांहून-(योगी)-वर सांगितल्याप्रमाणें योगाभ्यास करणारा-(अधिकः)-अधिक आहे-(ज्ञानिभ्यः अपि)-ज्ञानी पुरुषांहूनहि-शास्त्रपांडित्यवानांहूनहि योगी-(अधिकः मतः)-अधिक-श्रेष्ठ मानलेला आहे.-(योगी)-योगी-योगाभ्यासी-(कर्मिभ्यः च)-अग्निहोत्रादि कर्मे करणारांहून-(अधिकः)-श्रेष्ठ आहे.-(अर्जुन)-हे अर्जुना!-(तस्मात्)-म्हणून तूं-(योगी)-योगी-(भव)-हो. ४६

ज्या लाभाच्या आशेनें कर्मनिष्ठ पुरुष आपल्या बाहुबलाच्या भरंवशावर कर्ममार्गाच्या प्रवाहांत उडी घालतात, ७४ किंवा ज्या एका वस्तूसाठीं ज्ञानी पुरुष हे ज्ञानरूप कवच धारण करून समरांगणांत प्रपंचाशीं झगडतात, ७५ अथवा ज्याच्या प्राप्ती-

१ आयुष्याला. २ शेवट. ३ त्र्सेच. ४ दैववानाला. ५ पायाळु मनुष्याला. ६ एक प्रकारचें लोकोत्तर काजळ, तें डोळ्यांत घातलें असतां भूमिगत द्रव्य दिसतें. ७ सहज, खोलेनें. ८ कठीण. ९ गुरुपासूनच प्राप्त होणारें. १० मनकल्पावांचून, अचुक. ११ वश होती. १२ योगस्थानावरचा. १३ अधिदेवता ( शंकर ) १४ मोठेपणाचा, आरंभस्तंभांचा. १५ मोजणारें. १६ अष्टांगयोगसाहित्याचें. १७ बेट. १८ सिद्धीच्या खजिन्यांतून. १९ साधक असून सिद्धासारखा दिसतो. २० बाढला, उत्पन्न झाला. २१ कोटि. २२ प्रतिबंध. २३ सर्व साधनें. २४ तयार असलेला. २५ राज्यावर. २६ विचार करण्याला जो वेग त्यानें. २७ विचार जेथें पोंचत नाही असें ब्रह्म. २८ वेग. २९ लय पावतें. ३० लीन होतो. ३१ ॐकाराच्या. ३२ बोलण्यास अशक्य. ३३ बंद होतो. ३४ निराकाराची. ३५ एका रूपावर दुसरें रूप भासणें, आत्म्यावर जग भासणें. ३६ पाण्यांतील मळ. ३७ उत्पन्न होतांच. ३८ बुद्धिरूप लग्नघटिका. ३९ संयोग. ४० यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह हीं षट्कर्में. ४१ प्रवाहांत. ४२ घालून. ४३ दृढ कवच. ४४ युद्ध भूमींत. ४५ निराधार.

होइजे । मग मृत्युलोकातें वानिजे । ऐसें जन्म पार्था गा जे । ते तो पावे ५६

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः । जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

आणि मागील जे सद्बुद्धि । जेथ जीवित्वा जाहाली होती अवधि । मग तेचि पुढती निरवधि । नवी लाहे ५७ तेथ सदैवा आणि पायाळा । वरि दिव्यांजन होय डोळां । मग देखे जैसीं अवलीळा । पाताळधनें ५८ तैसे दुर्भेद जे अभिप्राय । कां गुरुगम्य हन ठाय । तेथ सौरसेवीण जाय । बुद्धि तयाची ५९ बळियें इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना । पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ४६० ऐसें नेणों काय अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें । समाधि घर पुसे । मानसाचें ६१ जाणिजे योगपीठींचा भैरवु । काय हा आरंभरंभेचा गौरवु । कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु । रूपा आला ६२ हा संसारु उमाणितें माप । कां अष्टांगसामग्रीचें द्वीप । जैसें परिमळेंचि धरिजे रूप । चंदनाचें ६३ तैसा संतोषाचा काय घडिला । कीं सिद्धिभांडारींहूनि काढिला । दिसे तेणें मानें रूढला । साधकदशे ६४

प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः । अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥

जे वर्षेतांचिया कोडी । जन्मसहस्रांचिया आडी । लंघितां पातला थडी । आत्मसिद्धीची ६५ म्हणोनि साधनेंजात आघवें । अनुसरे तया स्वभावें । मग आँयितिये बैसे राणिवे । विवेकाचिये ६६ पाठीं विचारितया वेगां । तो विवेंकुही ठाके मागां । मग अविचारणीय तें आंगा । घडोनि जाय ६७ तेथ मनाचें मेहुडें विरे । पवनाचें पवनपण सरे । आपणपां आपण मुरे । आकाशही ६८ प्रणवाचा माथा बुडे । येतुलेनि अनिर्वाच्य सुख जोडे । म्हणोनि आधींचि बोलु बहुडे । तयालागीं ६९ ऐसी ब्रह्मींची स्थिती । जे सकळां गतींसी गती । तया अमूर्तांची मूर्ति । होऊनि ठाके ४७० तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं । विक्षेपांचीं पाणिवळें झाडिलीं । म्हणोनि उपजतखेंवो बुडाली । लग्नघटिका ७१ आणि तद्रूपतेसीं लग्न । लागोनि ठेलें अभिन्न । जैसें लोपलें अभ्रें गगन । होऊनि ठाके ७२ तैसें विश्व जेथ होये । मागौतें जेथ लया जाये । तें विद्यमानेंचि देहें । जाहला तो गा ७३

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः । कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥

जया लाभाचिया आशा । करूनि धैर्यबाहूचा भरंवसा । घालीत पट्कर्मांचा धांरसां । कर्मनिष्ठ ७४ कां जिये एक वस्तूलागीं । वाणोनि ज्ञानाची ज्ञांगी । झुंजत प्रपंचेंशीं समरंगीं । ज्ञानिये गा ७५ अथवा निलागें निसरड

होऊन मृत्यु लोकाचें वर्णन करावें असें जें उत्तम कुलीं जन्म, तें तो योगभ्रष्ट पुरुष पावतो. ५६

**अन्वयार्थ**—(हि)-कारण-(तेन एव पूर्वाभ्यासेन)-त्याच पूर्वजन्मीं केलेल्या अभ्यासानें-(अवशः अपि सः)-तो अवश असलेलाहि योगभ्रष्ट-(ह्रियते)-हरण केला जातो-(योगस्य जिज्ञासुः अपि)-योगाचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणाराहि-(शब्दब्रह्म)-शब्द ब्रह्मानें-वेदोक्तकर्मानुष्ठान-फलाचें-(अतिवर्तते)-उल्लंघन करून जातो. ४४

आणि ज्या पूर्वजन्मांत आयुष्याचा शेवट झाला होता त्या वेळची सद्बुद्धि त्याला पुनः प्राप्त होते. ५७ त्या-समयीं आधींच दैववान्, पायाळू आणखी वर डोळ्यांत दिव्यांजन घातलेल्या पुरुषास जसें भूमींतील धन सहज दृष्टीस पडतें, ५८ त्याप्रमाणें, गुरुमुखाशिवाय न कळ-णाऱ्या कठीण अशा अभिप्रायाच्या ठिकाणीं त्याची बुद्धि अनायासें जाऊन पोहोंचते. ५९ इंद्रियें हीं आपण होऊन मनाच्या अधीन होतात, मन प्राणवायूंत ऐक्य पावतें, व तो प्राणवायु चिदाकाशांत मिळतो. ४६० आणखी काय गोष्टी असतील त्या असोत, परंतु योगाभ्यासही त्याला आपोआप प्राप्त होतो, आणि समाधिही त्याच्या मनाचें घर विचारीत येतो. ६१ जगाला आरंभ करणारी जी रंभा म्हणजे पार्वती तिचा गौरव करणारा योगपीठीचा शंकरच की काय किंवा वैराग्यरूप सिद्धीचा मूर्तिमंत अनुभवच प्रकट झाला आहे की काय! ६२ किंवा हें संसार मोजण्याचें मापच, अथवा अष्टांगयोगसाहित्याचें बेटच होय. सुगंधानेंच ज्याप्रमाणें चंदनाचें रूप धारण करावें, ६३ त्याचप्रमाणें, साधकदशेच्या योगानें हा इतका योग धैर्ययुक्त झालेला असतो की, संतोषाचा पुतळा घनविल्यासार-खा किंवा सिद्धीच्या भांडारांतून काढल्यासारखा दिसतो. ६४

**अन्वयार्थ**—(तु)-आणि-(प्रयत्नात् यतमानः)-अधिक यत्न करणारा-(योगी)-विद्वान्-(संशुद्धकिल्बिषः)-ज्याचें पाप संशुद्ध-अत्यंत शुद्ध झालें आहे असा, होऊन-(अनेकजन्म-संसिद्धः)-[भवति]-अनेक जन्मांतील थोड्या थोड्या अभ्या-सानें संसिद्ध होतो.-(ततः)-नंतर योगसंसिद्धीमुळें तो-(परां गतिं)-मोक्ष नांवाच्या श्रेष्ठ गतीस-(याति)-प्राप्त होतो. ४५

कारण, कोट्यवधि वर्षांनीं हजारों जन्मांचा प्रतिबंध दूर करून तो आत्मसिद्धीच्या किनाऱ्यावर येऊन पोहों-चलेला असतो. ६५ म्हणून सर्व साधनें त्याला येऊन स्वभाव-तःच प्राप्त होतात; आणि मग सहजच तो विचाराच्या गादीवर बसतो. ६६ नंतर, विचार करण्यामध्यें प्रबल असा विवेकही मागें राहतो; आणि अविचारणीय असें जें ब्रह्म, तें तो स्वतांच होतो. ६७ त्या ठिकाणीं मनाचे ढग नाहींतसे होतात; प्राणवायूचें हालणें बंद होतें; व आकाशही आपल्या ठिकाणीं लीन होतें. ६८ ॐकाराच्या अर्ध बिंदूंत प्रणव नाहींसा होतो. अशा रीतीनें त्याला अवर्णनीय सुख प्राप्त होतें, म्हणून त्याविषयीं बोलणेंच बंद होतें. ६९ मग सगळ्या गतींना गति देणारी जी ब्रह्मस्थिति, त्या निराकार स्थितीचें स्वरूपच तो बनून राहतो. ४७० त्यानें मागल्या अनेक जन्मांत, प्रतिबंध हाच कोणी पाण्यावरील मळ झाडून टाकलेला असतो, म्हणून त्याची लग्नघटका त्यावा जन्म होतांच बुडते, ७१ आणि तद्रूपतेशीं शुभलग्न होऊन तो अभिन्नत्व पावतो. अभ्रें नाहींतशीं झालीं म्हणजे ज्याप्रमाणें आकाशरूपच होऊन राहतात, ७२ त्याप्रमाणें (विक्षेपादि विघ्नें नाहीं-तशीं झालीं म्हणजे,) ज्यापासून विश्वाची उत्पत्ति होते व ज्या ठिकाणीं तें पुनः लय पावतें, तें ब्रह्म तो या विद्यमान देहांत असतांनाच बनतो. ७३

**अन्वयार्थ**—(तपस्विभ्यः)-कृच्छ्रचांद्रायणादि तप करणाऱ्या तपस्व्यांहून-(योगी)-वर सांगितल्याप्रमाणें योगा-भ्यास करणारा-(अधिकः)-अधिक आहे-(ज्ञानिभ्यः अपि)-ज्ञानी पुरुषांहूनहि-शास्त्रपांडित्यवानांहूनहि योगी-(अधिकः मतः)-अधिक-श्रेष्ठ मानलेला आहे.-(योगी)-योगी-योगा-भ्यासी-(कर्मिभ्यः च)-अग्निहोत्रादि कर्में करणारांहून-(अधिकः)-श्रेष्ठ आहे.-(अर्जुन)-हे अर्जुना!-(तस्मात्)-म्हणून तूं-(योगी)-योगी-(भव)-हो. ४६

ज्या लाभाच्या आशेनें कर्मनिष्ठ पुरुष आपल्या बाहुबलाच्या भरंवशावर कर्ममार्गाच्या प्रवाहांत उडी घालतात, ७४ किंवा ज्या एका वस्तुसाठीं ज्ञानी पुरुष हे ज्ञानरूप कवच धारण करून समरांगणांत प्रपंचशत्रूंशीं झगडतात, ७५ अथवा ज्याच्या प्राप्ती-

---

१ आयुष्याला. २ शेवट. ३ लगेच. ४ दैववानाला. ५ पायाळु मनुष्याला. ६ एक प्रकारचें लोकोत्तर काजळ, तें डोळ्यांत घातलें असतां भूमिगत द्रव्य दिसतें. ७ सहज, लीलेनें. ८ कठीण. ९ गुरूपासूनच प्राप्त होणारें. १० मट-कल्यावांचून, अचुक. ११ वश होती. १२ योगस्थानावरचा. १३ अधिदेवता (शंकर) १४ मोठेपणाचा, आरंभ-स्तंभीचा. १५ मोजणारें. १६ अष्टांगयोगसाहित्याचें. १७ बेट. १८ सिद्धीच्या खजिन्यांतून. १९ साधक असून सिद्धा-सारखा दिसतो. २० वाढला, उत्पन्न झाला. २१ कोटि. २२ प्रतिबंध. २३ सर्व साधनें. २४ तयार असलेला. २५ राज्यावर. २६ विचार करण्याला जो वेग त्यानें. २७ विचार जेथें पोंचत नाहीं असें ब्रह्म. २८ मेघ. २९ लय पावतें. ३० लीन होतो. ३१ ॐकाराच्या. ३२ बोलण्यास अशक्य. ३३ बंद होतो. ३४ निराकाराची. ३५ एका रूपा-वर दुसरें रूप भासणें, आत्म्यावर जग भासणें. ३६ पाण्यां-तील मळ. ३७ उत्पन्न होतांच. ३८ बुद्धिरूप. लग्नघ-टिका. ३९ संयोग. ४० यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह हीं षट्कर्में. ४१ प्रवाहांत. ४२ घालून. ४३ दृढ कवच. ४४ युद्ध भूमींत. ४५ निराधार.

तपोदुर्गांचा आडेकडा । झोंबती तपिये चाडा । जयाचिया ७६ जें भजतियां भज्य । याज्ञिकांचें याज्य । एवं जें पूज्य । सकळां सदा ७७ तेंचि तो आपण। स्वयें जाहला निर्वाण । जें साधकांचें कारण। सिद्ध तत्त्व ७८ म्हणोनि कर्मनिष्ठा वंद्यु । तो ज्ञानियांसि वेद्यु । तापसांचा आद्यु । तपोनाथु ७९ पैं जीवपरमात्मसंगमा । जयाचें येणें जाहलें मनोधर्मा । तो शरीरीचि परी महिमा । ऐशी पावे ४८० म्हणोनि याकारणें । तूतें मी सदा म्हणें।योगी होईं अंतःकरणें । पंडुकुमरा ८१

योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना । श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ध्यानयोगो अभ्यासयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥६॥

अगा योगी जो म्हणिजे । तो देवाचा देव जाणिजे । आणि सुख सर्वस्व माझें । चैतन्य तो ८२ तेथ भजेता भजन भजावें । हें भक्तिसाधन जें आघवें। तो मीचि जाहलों अनुभवें । अखंडित ८३ मग तैया आम्हां प्रीतीचें । स्वरूपें बोलीं निर्वचे[12] । ऐसें नव्हे[13] गा तो साचें । सुभद्रापती ८४ तया एकवटलिया प्रेमा । जरी पैंडें पाहिजे उपमा । तरी मी देह तो आत्मा । हेचि होय ८५ ऐसें भक्तचकोरचंद्रें । त्रिभुवनैकनरेंद्रें । बोलिलें गुणसमुद्रें । संजयो म्हणे ८६ तेथ आदिलापासूनि पार्था । ऐकिजे ऐसीचि आस्था । दुणावली हें यदुनाथा । भावों[15] सरलें ८७ कीं सावियेंचि मनीं संतोषला । जे बोला आरिसा जोडला । तेणें[17] हरिखें आतां उपलॅवला। निरूपील ८८ तो प्रसंगु आहे फुडा । जेथ शांतु दिसेल उघडा । तो पोलविजेल मुंडा । प्रमेयबीजांचा ८९ जे सात्त्विकाचेनि वडपें । गेलें आध्यात्मिक खेरपें । सहजें निडारले वाफे । चतुरचित्ताचे ४९० वरी अवधानाचा वाफसा । लाधला सोनयाऐसा । म्हणोनि पेरावया धिंवसा । श्रीनिवृत्तीसी ९१ ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्गुरूंनीं केलें कोडें[30] । माथां हात ठेविला तें फुडें । बीजेंचि वोइलें ९२ म्हणऊनि येणें मुखें जें जें निगे । तें संतांच्या हृदयीं साचचि लागे । हें असो सांगों श्रीरंगें । बोलिलें जें ९३ परी तें मनाच्या कानीं ऐकावें । बोल बुद्धीच्या डोळां देखावे । हे सांटोवाटीं घ्यावे । चित्ताचियां ९४ अवधानाचेनि हातें । नेयांपां हृदयाआंतौते । हे रिझवितील आयणीतें । सज्जनांचिये ९५ हे स्वहितातें निववितील । पारिणामातें जीववितील[42] । सुखाची वाहवितील । लाखोली जीवां ९६ आतां अर्जुनेंसीं श्रीमुकुंदें । नागर बोलिजेल विनोदें । तें वोवियेचेनि प्रबंधें । सांगेन मी ४९७

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ श्लोक ४७, ओंव्या ४९७.

साठीं तपस्वी लोक हे निराधार व निसरडें झालेल्या अशा तपोरूप पर्वताच्या कड्यावरून प्रवास करितात, ७६ जें भजन करणारांच्या भजनाचें अधिष्ठान, अशा प्रकारें सर्वांस पूज्य, ७७ आणि जें साधकांचें सिद्धतत्त्व, तें निर्वाण परब्रह्म तो स्वतांच बनतो. ७८ म्हणून तो कर्मनिष्ठांना वंद्य व ज्ञान्यांना विचारणीय आणि तपस्व्यांचा मूळ तपोनाथ होय. ७९ हें पहा–जीव व परमात्मा यांच्या संगमाच्या ठिकाणीं त्याच्या मनाचें ऐक्य झाल्याकारणानें, तो देही असूनही अशा योग्यतेस पावतो. ४८० म्हणून, अर्जुना, याच कारणास्तव, 'तूं योगी हो' असें मनापासून तुला मी नेहमीं सांगत असतों. ८१

**अन्वयार्थ**—(सर्वेषां योगिनां अपि)–रुद्र–आदित्यादिकांचें ध्यान करणाऱ्या दुसऱ्या सर्व योग्यांमध्येंहि–(यः श्रद्धावान्)–जो श्रद्धावान्–योगी–ध्यानी–(मद्गतेन अन्तरात्मना)–माझ्या ठिकाणीं स्थिर केलेल्या अन्तःकरणानें–(मां भजते)–मला भजतो–(सः मे युक्ततमः)–तो मला अतिशय योगी म्हणून–(मतः)–मान्य आहे. ४७

अरे, योगी म्हणजे देवांचा देव, माझें सर्व सुखाचें आगर आणि केवळ माझा प्राण असें समज. ८२ त्याच्या ठिकाणीं भजन करणारा, भजनक्रिया व भजयवस्तु ही भक्तीची त्रिपुटी त्याच्या अनुभवानें मीच झालों आहें. ८३ हे सुभद्रापते, मग त्याच्या आणि माझ्या प्रीतीचें स्वरूप वर्णन करितां येत नाहीं. तर असें समज कीं, तो म्हणजे प्रत्यक्ष मीच. ८४ अशा रीतीनें जें प्रेमाचें ऐक्य झालेलें असतें, त्याच्या तुलनेला उपमा पाहिजे असली तर मी देह व तो आत्मा याशिवाय दुसरी उपमा नाहीं! ८५ संजय म्हणतोः–राजा, भक्तरूप चकोराचा चंद्र किंवा सर्व त्रिभुवनाचा राजा व गुणाचा समुद्र जो श्रीकृष्ण परमात्मा, असें बोलला असतां ८६ तेथें पार्थाला पूर्वीपासून योगाचें ऐश्वर्य ऐकण्याची आस्था होतीच, ती पुनः दुप्पट झाली असें यदुनाथानें मनांत जाणलें; ८७ आणि तें पाहून श्रीकृष्णाच्या मनांत सहज आनंद झाला कीं, मी जें सांगतों, तें प्रत्यक्ष पाहण्याचा अर्जुन हा आरसाच होय. तेव्हां आतां या आनंदाचे भरांत ते पुढील कथा सांगतील. ८८ तो प्रसंग पुढें असून त्यांत शांतिरस स्पष्ट दिसेल, व ज्ञानरूप बीजाचा मुडा उघडा होईल. ८९ जें ज्ञानबीज पेरण्याकरितां सत्त्वगुणाची वृष्टि होऊन, व अध्यात्मिक तापांचे ढुंलडे वाहून जाऊन, चतुर श्रोत्यांच्या चित्ताचे वाफे सहज तयार झाले, ४९० त्यावर सोन्यासारखी अवधानाची घात साधल्यामुळें श्रीनिवृत्तिनाथांना तें ज्ञानरूप बीज पेरण्याची उत्कंठा उत्पन्न झाली. ९१ महाराज म्हणतातः–तें बीज पेरण्याकरितां सद्गुरूंनीं माझी मोठ्या यौतुकानें चाड्याच्या ठिकाणीं योजना केली, व माझ्या मस्तकावर हात ठेवला, तो हात ठेवला असें नव्हे, तर चाड्यांत बीजच घातलें. ९२ म्हणून, माझ्या मुखांतून जें जें कांहीं निघेल, तें संतांच्या मनाला खरेंच वाटतें. हें असो. आतां श्रीरंग जें कांहीं बोलले, तें मी पुढें सांगतों. ९३ परंतु ते बोल मनाच्या कानानें ऐका, बुद्धीच्या डोळ्यानें बघा, आणि त्याचा उहापोह चित्तानें करा, ९४ श्रवणाच्या हातानें हृदयांत सांठवा, म्हणजे ते सज्जनांच्या मनाला रमविणारे होतील ९५ हे बोल स्वहित साधून देतील, परिणामाला सजीव करतील व जीवाला सुखाची लाखोली वाहतील ९६ आतां, श्रीमुकुंद अर्जुनाला विनोदानें जें कांहीं सर्वोत्कृष्ट ज्ञान सांगतील, तें मी ओंवीरूपानें तुम्हांला सांगेन. ४९७

---

१ तपोरूप किल्ल्याचा. २ अर्धा तुटलेला कडा. ३ इच्छेनें. ४ ज्या आत्म्याच्या. ५ भजन करावयास योग्य. ६ यजन करावयास योग्य. ७ शेवट, परब्रह्म. ८ जाणण्यास योग्य. ९ मूळ. १० जीव. ११ भजन करणारा, भजन करणें व भजन करण्याचा देव ही त्रिपुटी. १२ त्याच्या व आमच्या प्रेमाचें रूप. १३ सांगतां येत नाहीं असें नाहीं. १४ बरोबरीनें. १५ समजून चुकलें. १६ सहज, सर्वथा. १७ हर्षानें. १८ आनंदाचे भरांत विस्तारानें सांगेल. १९ शांतिरस. २० पेरला जाईल. २१ तांदूळ इत्यादि भरून केलेला पेंढ्याचा गठ्ठा. २२ ज्ञानरूपी बीजाचा. २३ वृष्टीनें. २४ मातीचें ढेंकूळ; रूक्षपणा; निरसण २५ भरून आले, परिपक्व झाले. २६ श्रद्धाण्यांच्या अंतःकरणाचे २७ पेरण्याजोगी कब, पिकण्याजोगा काल. २८ धैर्य. २९ पेरणीच्या कुरीवरचें मोकाचें लांकूड. ३० कौतुकानें. ३१ पेरण्याकरितां निराळे ठेविलेलें धान्य बीं. ३२ घातलें. ३३ ऐकिलेले बोल बुद्धीच्या डोळ्यांनीं पहावें. ३४ आदलाबदलीनें–चित्त देऊन त्याच्या मोबदला बोल घ्यावें. ३५ लक्ष्यपूर्वक श्रवणाच्या. ३६ न्यावें. ३७ अंत. ३८ रमवील. ३९ चौकसबुद्धीला, इच्छेला, आवडीला. ४० निववितील. ४१ नाशापत. ४२ मुक्त करितात. ४३ सर्वोत्कृष्ट, संभ्रम, सुंदर. ४४ कवितेनें.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सातवा.

श्रीभगवानुवाचः—

मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः । असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥
ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः । यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

आइका मग तो श्रीअनंतु । पार्थातें असे म्हणतु । पैं[1] गा तूं योगयुक्तु[2] । जालासि आतां १ मज समग्रातें[3] जाणसी ऐसें । आपुलिया तळहातींचें रत्न जैसें । तुज ज्ञान[4] सांगेन तैसें । विज्ञानेंसीं[5] २ एथ विज्ञानें काय करावें । ऐसें घेसी[6] जरी मनोभावें । तरी पैं आधीं जाणावें । तेंचि लागे ३ मग ज्ञानाचिये वेळे । झांकती जाणिवेचे[7] डोळे । जैसी तीरीं नाव[8] न ढळे । टेकलीसांती[9] ४ तैसी जाणीव जेथ नें[10] रिघे । विचार मागुता[11] पाउलीं निघे । तर्कु आयणी[12] नेघे । आंगीं जयांच्या[13] ५ अर्जुना तया नांव ज्ञान । येर प्रपंचु हें विज्ञान[14] । तेथें[15] सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंही जाण ६ आतां अज्ञान अवघें हरपे । विज्ञान निःशेष करपे । आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाइजे ७ जेणें सांगतयाचें बोलणें खुंटे । ऐकतयाचें व्यसन[16] तुटे । हें जाणणें सानें[17] मोठें । उरों नेदी ८ ऐसें वर्म जें गूढ[18] । तें किजेल वाक्यारूढ[19] । जेणें थोडेन पुरे कोडें[20] । बहुत मनींचें ९

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये । यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥३॥

पैं गा मनुष्यांचिया सहस्रशां- । माजि विपाइले[21] याचिये धिंवसा[22] । तैसें या धिंवसेकरां[23] बहुवसां । माजि विरळा[24] जोणे[25] १० जैसा भरलेया त्रिभुवना- । आंतु एकएकु चांगु[26] अर्जुना । निवडूनि कीजे सेना । लक्षवरी[27] ११ कीं तैया[28]-ही पाठीं । जे वेळीं लोहें[29] मांसातें[30] घांटी[31] । ते वेळीं विजयश्रियेच्या[32] पाटीं[33] । एकुचि बैसे १२ तैसे आस्थेच्या महापुरीं । रिघताती कोटिवरी[34] । परी प्रांसीच्या[35] पैलतीरीं । विपाइला[36] निगे १३ म्हणऊनि सामान्य गा नोहे । हें सांगतां वडिलें[37] गोठि आहे । परी तें बोलों येईल पाहें । आतां प्रस्तुत ऐकें १४

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च । अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

तरी अवधारीं गा धनंजया । हे महदादिक[38] माझी माया । जैसी प्रतिबिंबे[39]

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सातवा.

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)-हे अर्जुना!-(मयि)-माझ्यामध्यें
सक्तमनाः)-ज्याचें मन आसक्त झालें आहे,-(मदा-
ः)-माझाच ज्यानें आश्रय केला आहे व-(योगं युञ्जन्)-
ाभ्यास करणारा-मनः समाधान करणारा असा तूं-
मग्रं मां)-विभूति-बल-ऐश्वर्य इत्यादि समस्त गुणांनीं
अशा मला-(यथा)-ज्या प्रकारें-(असंशयं)-निःसंशय-
स्यसि)-जाणशील-(तत् शृणु)-तें ऐक. १ (अहं)-मी-(ते)
-(इदं)-हें (सविज्ञानं ज्ञानं)-साक्षात्कारासह-अनुभवा-
ज्ञान-(अशेषतः)-संपूर्णपणें-(वक्ष्यामि)-सांगेन.-(यत्)-
ान-(ज्ञात्वा)-जाणून-(इह)-येथें-(भूयः)-पुनः-(अन्यत्)-
-(ज्ञातव्यं)-जाणण्यास योग्य असें कांहीं-(न अवशि-
)-रहात नाहीं. १२

श्रोतेहो, ऐका. मग श्रीअनंत पार्थाला म्हणालेः-अरे,
निश्चयेंकरून योगसंपन्न झालास. १ आतां मी तुला
ज्ञान प्रपंचज्ञानासह अशा रीतीनें सांगेन कीं, ज्या
तूं आपल्या तळहातावरील रत्नाप्रमाणें मला पूर्णपणें
णशील. २ या ठिकाणीं प्रपंचज्ञानाशीं काय करावयाचें
? असा जर तुझ्या मनाचा ग्रह होईल, तर आधीं
सर तेंच समजून घेतलें पाहिजे. ३ मग ज्ञानाच्या
त्काराच्या वेळीं बुद्धीची नजर कुंठित होते. ज्याप्र-
तीराला टेकलेली नाव हालत नाहीं, ४ त्याचप्रमाणें,
ठिकाणीं बुद्धीचा शिरकाव होत नाहीं, विचार माग-
पाउली परततो, आणि तर्काचा हुरूप मोडतो; ५,
च ज्ञान असें म्हणतात; अर्जुना, बाकीच्या सर्व
ानें त्याला विज्ञान असें म्हणतात; आणि तो
खरा मानणें हें अज्ञान होय असें समज. ६ आतां
अज्ञान नाहींसें होईल, विज्ञान समूळ जळून जाईल
मूर्तिमंत ज्ञान प्रकट होईल; ७ ज्याच्या योगानें
ाराचें बोलणें खुंटतें, ऐकणाराची इच्छा तृप्त होते
अमुक मोठें व अमुक लहान असा भेद रहात
नाहीं ८ व जें थोडेंच नाहीं तर मनांतील पुष्कळ हेतू
पूर्ण होतील, तें गुह्यतत्त्व मी शब्दानें तुला सांगतो. ९

**अन्वयार्थ**—(मनुष्याणां सहस्रेषु कश्चित्)-हजारों म-
नुष्यांतील कोणी एखादाच-(सिद्धये)-ज्ञानप्राप्तीसाठीं-(यत-
ति)-यत्न करतो,-(यततां अपि सिद्धानां)-यत्न करणाऱ्यांहि
सिद्धांतील-(कश्चित्)-कोणी एखादाच-(मां)-मला-(तत्त्वतः)
-वस्तुतः-खरोखर-यथार्थपणें-(वेत्ति)-जाणतो. ३

अरे, खरोखर हजारों मनुष्यांत एकाद्यालाच या
ज्ञानाची इच्छा होते, आणि तशा ज्ञानाची इच्छा उत्पन्न
झालेल्या पुष्कळांत मला जाणणारा क्वचितच सांपडतो.
१० अर्जुना, ज्याप्रमाणें मनुष्यांनीं भरलेल्या त्रिभुवनांत
फौजेमध्यें ठेवण्याकरितां एकेक चांगला शूर निवडून
लक्षावधि फौज तयार करतात, ११ आणि त्यांतूनहीं,
ज्या वेळेस तरवारीचे घाव शरिरावर बसतात त्या वेळेस
एकादाच विजयश्रीचा अधिकारी होतो, १२ त्याप्रमाणें
माझ्या ज्ञानप्राप्तीच्या आस्थेच्या पुरांत कोट्यावधि लोक
उड्या टाकतात; परंतु एकादाच तिच्या पैलथडीस जातो.
(एकाद्यालाच माझी प्राप्ति होते.) १३ म्हणून, ही सामान्य
गोष्ट नसून मोठी श्रेष्ठ आहे; परंतु ती पुढें सांगतां येईल;
प्रस्तुत (तुला विज्ञानाचें रूप सांगतों) तें ऐक. १४

**अन्वयार्थ**—(भूमिः)-गंधतन्मात्र,-(आपः)-रसतन्मात्र,
-(अनलः)-रूपतन्मात्र-(वायुः)-स्पर्शतन्मात्र-(खं)-शब्दतन्मात्र
-(मनः)-मनाचें कारण अहंकार,-(च बुद्धिः एव)-आणि
अहंकाराचें कारण महत्तत्त्व,-(अहंकारः)-अहंकाराच्या वास-
नेनें युक्त असलेलें अव्यक्त-(इति)-अशी-(इयं)-ही-(मे प्रकृ-
तिः-माझी प्रकृति-मायाशक्ति-(अष्टधा)-आठ प्रकारें-(भिन्ना)
-भेदाला प्राप्त झाली आहे. ४

हे धनंजया ऐक. आपल्या अंगाची पडछाया असते,
त्याचप्रमाणें ही महदादि तत्त्वें ही कार्यरूपानें माझी

---

निश्चयेंकरून. २ योगी. ३ सर्व प्रकारें, सर्वत्रव्यापि.
ज्ञान. ५ प्रपंचज्ञान, विपरीतज्ञान, व्यवहारज्ञान, यां
. ६ असा ग्रह होईल. ७ जाणतेपणाचें. ८ नौका.
मिनीवर टेंकली असतां. १० शिरत नाहीं. ११ माग-
यीं, आला तसाच मोग. १२ हुरूप. ईर्षा. १३ ज्या-
(ग्रहाच्या) १४ प्रपंचज्ञान. १५ प्रपंचाचे ठिकाणीं.
कट, चर, दुःख. १७ लहान, मोठें. १८ सखोल;
गुप्त. १९ बोलण्यांत आणीन, सांगेन. २० आवड, इच्छा.
२१ विरळा, एखाद्याला. २२ धैर्य, छंद. २३ बहुतेक धैर्यवं-
तांमध्यें. २४ क्वचित्. २५ जाणतो. २६ चांगला, शूर. २७
लक्षावधि. २८ त्यानंतर. २९ शस्त्र. ३० शरिरांतील मां-
साला. ३१ कापो. ३२ जय लक्ष्मीच्या. ३३ पर्वा. ३४
कोट्यवधि. ३५ आत्मप्राप्तींच्या. ३६ कचित्. ३७ मोठी.
३८ महत्तत्त्वादि. ३९ पडछाया फिरते.

छाया । निजांगाची १५ आणि इयेतें प्रकृति म्हणिजे । जे अष्टधा भिन्न जाणिजे । लोकत्रय निपजे । इयेस्तंव १६ हे अष्टधा भिन्न कैसी । ऐसा ध्वनि धरिसी जरी मानसीं । तरी तेचि गा आतां परियेसीं । विवंचना १७ आप तेज गगेन । महीं मारुत मन । बुद्धि अहंकारु हे भिन्न । आठै भाग १८

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् । जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥५॥

या आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था । तिये नाम व्यवस्था । जीव ऐसी १९ जे जडातें जीववी । चेतनेतें चेतवी । मनाकरवीं मानवी । शोक मोहो २० पैं बुद्धीच्या अंगीं जाणणें । तें जिये जैवळिकेचें करणें । जिया अहंकाराचें विंदाणें । जगचि धरिजे २१

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय । अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥

ते सूक्ष्म प्रकृति कोडें । जैं स्थूळाचिया आंगा घडे । तैं भूतसृष्टीची पडे । टांकसाळ २२ चतुर्विध ठसा । उमटों लागे आपैसा । मोलें तरी सरिसा । परि थैरचि आनान २३ होती चौऱ्यांशीं लक्ष थरा । येरा मिती नेणिजे भांडारा । भरे आदिशून्याचा गाभारा । नाणेयांसी २४ ऐसें एकैतुकें पांचभौतिक । पडती बहुवस टांकें । मग तिये समृद्धीचे लेखें । प्रकृतीचि धरी २५ जे आंखूनि नाणें विस्तारी । पाठी तयाची आटणी करी । माजी कर्माकर्माचिया व्यवहारीं । प्रवर्तु दावी २६ हें रूपक परी असो । सांगों उघड जैसें परियेसों । तरी नामरूपाचा अतिसो । प्रकृतीच कीजे २७ आणि प्रकृति तंव माझ्या ठायीं । बिंबे[४२] येथ आन नाहीं । म्हणोनि आदि मध्य अवसान पाहीं । जगासि मी २८

मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय । मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

हें रोहिणीचें[४३] जळ । तयाचें पाहातां येइजे मूळ । तैं रश्मि नव्हती केवळ । होय तें भानु २९ तयाचिपरी किरीटी । इया प्रकृती जालिये सृष्टी । जैं उपसंहरूनि कीजेल ठी[४८] । तैं मीचि आहें ३० ऐसें होय दिसे न दिसे । हें मजचि माजीं असे । मियां विश्व धरिजे जैसें । सूत्रें मणि ३१ सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले । तैसें म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं ३२

रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः । प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥
पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ । जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥

म्हणोनि उदकीं रसु । कां पवनीं जो स्पर्शु । शशिसूर्यीं जो प्रकाशु । तो

माया होय; १५ हिलाच प्रकृति असें म्हणावें; व हिचे आठ निरनिराळे प्रकार आहेत असें समजावें; आणि हिच्यापासून हें त्रैलोक्य उत्पन्न होतें. १६ ही आठ प्रकारांनीं कशी निराळी आहे अशी शंका जर तूं मनांत आणशील, तर तोच विचार सांगतों, ऐक. १७ उदक, तेज, आकाश, पृथ्वी, वायु, मन, बुद्धि आणि अहंकार हे तिचे निरनिराळे आठ-प्रकार आहेत. १८

**अन्वयार्थ**—(इयं अपरा)–ही अपरा–निकृष्ट प्रकृति आहे –(तु)–पण–(महाबाहो)–हे पराक्रमी अर्जुना!–(इतः)–या अपरा प्रकृतीहून–(अन्यां)–दुसऱ्या प्रकारच्या–(जीवभूतां)–क्षेत्रज्ञरूप–(मे)–माझ्या–(प्रकृतिं)–प्रकृतीला तूं–(परां)–परा प्रकृति–(विद्धि)–समज.–(यया)–ज्या परा–प्रकृतीकडून–(इदं जगत्)–हें जगत्–(धार्यते)–धारण केलें जातें. ५

पार्था, ह्या आठ भागांची साम्यस्थिति म्हणजे (एकीकरण) ती माझी परमप्रकृति होय, आणि तीच परमात्म्याचे ठिकाणीं जीवभाव उत्पन्न करिते, म्हणून तिला जीवभूता ही संज्ञा आहे. १९ ही अचेतन (शरिरादिकांचें) जीवन करते, ज्ञानाला चेतना देते, आणि मनाला शोक व मोह मानण्यास लाविते. २० हें पहा–हिच्या सान्निध्यानें बुद्धीच्या अंगीं ज्ञान उत्पन्न होतें व ही अहंकाराच्या कुशलतेनें जगाला धारण करिते. २१

**अन्वयार्थ**—(सर्वाणि भूतानि)–सर्व भूतें–(एतद्योनीनि) –या दोन प्रकृतींपासून उत्पन्न झालेलीं आहेत, या दोन प्रकृति सर्वभूतांचें कारण आहे,–(इति)–असें–(उपधारय)–जाण –(अहं कृत्स्नस्य जगतः)–मी सर्व जगाची–(प्रभवः)–उत्पत्ति–(तथा)–त्याचप्रमाणें–(प्रलयः)–विनाश आहें. ६

ही सूक्ष्म (परा) प्रकृति जेव्हां स्वेच्छेनें स्थूल प्रकृतीशी संयुक्त होते, तेव्हां सृष्टींतील प्राण्यांची टांकसाळ सुरू होते. २२ त्या टांकसाळींत आपोआप चार प्रकारांचे ठसे उमटूं लागतात. त्यांतील पंचमहाभूतांची योग्यता सारखीच असते, परंतु जाति भिन्न असतात. २३ त्याच्या चौऱ्यांशी लक्ष जाति असून, त्या जातींत आणखी किती पोट जाति आहेत त्यांची गणती नाहीं. अशा पुष्कळ नाण्यांनीं (जातींनीं) निराकारशून्य म्हणजे अव्यक्ताचा (मायेचा) गाभारा भरून जातो. २४ याप्रमाणें पंचमहाभूतांचे एकसारखे पुष्कळ ठसे बनतात, व त्यांच्या बाहीची गणती प्रकृति (माया) हीच ठेवते. २५ ती नाण्यांवर खुणा करून त्यांचाच विस्तार करिते, व मागाहून त्यांची आटणी करिते; अशा प्रकारें कर्माकर्मांप्रमाणें घडामोड करण्याची मायेची प्रवृत्ति आहे. २६ हें रूपक असो; तुला समजेल अशा उघड रीतीनें सांगावयाचें. म्हटलें तर ही प्रकृतीच प्राण्यांच्या नामरूपांचा विस्तार करते, २७ आणि प्रकृति तर निःसंशय माझ्याच ठायीं खोटी भासते. ती माझ्याहून निराळी नाहीं; म्हणून जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय यांस मीच कारण आहें. २८

**अन्वयार्थ**—(हे धनंजय,)–अर्जुना!–(मत्तः)–मजहून –(परतरं अन्यत्)–अधिक श्रेष्ठ असें दुसरें–(किंचित् न अस्ति)–कांहींएक नाही.–(सूत्रे मणिगणाः इव)–दोऱ्यांत जसे मणिगण–पुष्कळ मणी त्याप्रमाणें–(मयि इदं सर्वं प्रोतं)–माझ्या ठिकाणीं हें सर्व ओंवलेलें आहे. ७.

हें दृश्य विश्व मृगजळासारखें आहे! मृगजळाचें मूळ पाहूं गेलें असतां तें केवळ सूर्यकिरण नसून सूर्यच होय; २९ त्याचप्रमाणें, अर्जुना, ज्या प्रकृतीपासून ही सृष्टि झाली आहे, तिचा निरास (उपसंहार) करून तिच्या मुळाशीं जों यावें तों अवशिष्ट तत्त्व मीच आहें. ३० अशा प्रकारें जें उत्पन्न होऊन दिसतें व नाहींसें होतें, तें माझ्याच ठिकाणीं होतें. ज्याप्रमाणें दोऱ्यानें मणि धरलेले असतात, त्याचप्रमाणें मी हें विश्व धरलें आहें. ३१ सोन्याचे मणि करून ते सोन्याच्याच तारेंत ओंवावे, त्याप्रमाणें हें सर्व जग अंतर्बाह्य मीच व्यापलें आहे. ३२

**अन्वयार्थ**—(कौन्तेय)–हे अर्जुना!–(अहं)–मी–(अप्सु) –जलांत–(रसः)–रस–(अस्मि)–आहें.–(शशिसूर्ययोः)–चंद्र व सूर्य यांमध्यें–(प्रभा)–तेज–[अस्मि]–आहें.–(सर्ववेदेषु)–सर्व वेदांमध्यें–(प्रणवः)–[अस्मि]–मी ओंकार आहें.–(खे)–आकाशांत–(शब्दः)–मी शब्द आहें व–(नृषु)–पुरुषांमध्यें मी–(पौरुषं)–पुरुषत्व आहें. ८–(च)–आणि–(पृथिव्यां)–पृथिवीमध्यें –(पुण्यः गन्धः)–पुण्यगंध–सुवास–(च)–आणि–(विभावसौ)–अग्नीमध्यें–(तेजः)–दीप्ति–(अस्मि)–मी आहें–(सर्वभूतेषु)–सर्व भूतांमध्यें–(जीवनं)–जीवनशक्ति–(च तपस्विषु)–व तपस्व्यांमध्यें–(तपः)–तप–[अहं]–(अस्मि)–मी आहें. ९.

म्हणून, पाण्यांत जो रस आहे, किंवा वाऱ्यांत जो स्पर्श आहे, आणि चंद्र व सूर्य यांच्यांत जो

१ माया. २ आठ प्रकारें. ३ उत्पन्न होतें. ४ इच्यापासून. ५ शंका, संशय. ६ विचार. ७ उदक. ८ उजेड, प्रकाश, अग्नि. ९ आकाश. १० पृथ्वी. ११ वायु. १२ ऐक्यावस्था, मिश्रस्थिति. १३ श्रेष्ठ. १४ अचेतनाला. १५ चेतना उत्पन्न करिते. १६ सान्निध्यपणानें. १७ कौशल्यानें, विधानानें, कलसूत्रानें. १८ आवडीनें. १९ महाभूतांच्या. २० प्राण्यांच्या उत्पत्तीची. २१ जरायुज, अंडज, स्वेदज, आणि उद्भिज, या चारहींचा. २२ किंमतीला, योग्यतेला. २३ सारखा. २४ जाति. २५ वेगळाल्या. २६ गणना. २७ जातीभाग. २८ आकाशाचा. २९ नाण्यांनीं. ३० एकसारखे. ३१ पंचमहाभूतांची. ३२ नाणें, ठसे. ३३ जमाखर्च. ३४ मायाची. ३५ रेखाटून, आकारून. ३६ मग, नंतर. ३७ गाळणी. ३८ प्रवृत्ति. ३९ सादृश्याचें उदाहरण. ४० श्रवण कर. ४१ समजण्याजोगें, अतिशय. ४२ भासते. ४३ मृगजळ. ४४ किरण. ४५ उत्पन्न होतें. ४६ सूर्य. ४७ नाहींसें करून. ४८ पर्यवसान, शेवट. ४९ दोऱ्यानें. ५० अंतर्बाह्य, आंत, बाहेर. ५१ स्वाद. ५२ वायूंत.

छाया । निजांगाची १५ आणि इयेतें प्रकृति[1] म्हणिजे । जे अष्टधा[2] भिन्न जाणिजे । लोकत्रय निपजे[3] । इयेस्तंव[4] १६ हे अष्टधा भिन्न कैसी । ऐसा ध्वनि[5] धरिसी जरी मानसीं । तरी तेंचि गा आतां परियेसीं । विवंचना[6] १७ आप[7] तेज[8] गगन[9] । मही[10] मारुत[11] मन । बुद्धि अहंकारु हे भिन्न । आठै भाग १८

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् । जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥५॥

या आठांची जे साम्यावस्था[12] । ते माझी परम[13] प्रकृति पार्था । तिये नाम व्यवस्था । जीव ऐसी १९ जे जडातें[14] जीववी । चेतनेतें[15] चेतवी । मनाकरवीं मानवी । शोक मोहो २० पैं बुद्धीच्या अंगीं जाणणें । तें जिये जेवळिकेचें[16] करणें । जिया अहंकाराचें विंदाणें[17] । जगचि धरिजे २१

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय । अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥

ते सूक्ष्म प्रकृति कोडें[18] । जैं स्थूळाचिया[19] आंगा घडे । तैं भूतसृष्टीची[20] पडे । टांकसाळ २२ चतुर्विध[21] ठसा । उमटों लागे आपैसा । मोलें[22] तरी सरिसा[23] । परि थरचि[24] आनान[25] २३ होती चौऱ्यांशीं लक्ष थरा । येरा मिती[26] नेणिजे भांडारा[27] । भरे आदिशून्याचा[28] गाभारा । नाणेयांसी[29] २४ ऐसें एकतुकें[30] पांचभौतिक[31] । पडती बहुवस टांके[32] । मग तिये समृद्धीचे लेखे[33] । प्रकृतीचि[34] धरी २५ जे आंखूनि[35] नाणें विस्तारी । पाठी[36] तयाची आटणी[37] करी । माजी कर्माकर्मांचिया व्यवहारीं । प्रवर्तु[38] दावी २६ हें रूपक[39] परी असो । सांगों उघड जैसें परियेसों[40] । तरी नामरूपाचा अतिसो[41] । प्रकृतीच कीजे २७ आणि प्रकृति तंव माझ्या ठायीं । विंबे[42] येथ आन नाहीं । म्हणोनि आदि मध्य अवसान पाहीं । जगासि मी २८

मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय । मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

हें रोहिणीचें[43] जळ । तयाचें पाहातां येइजे मूळ । तैं रश्मि[44] नव्हती केवळ । होय[45] तें भानु[46] २९ तयाचिपरी किरीटी । इया प्रकृती जालिये सृष्टी । जैं उपसंहरूनि[47] कीजेल ठी[48] । तैं मीचि आहें ३० ऐसें होय दिसे न दिसे । हें मजचि माजीं असे । मियां विश्व धरिजे जैसें । सूत्रें[49] मणि ३१ सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले । तैसें म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं[50] ३२

रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः । प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥
पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ । जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥

म्हणोनि उदकीं रसु[51] । कां पवनीं[52] जो स्पर्शु । शशिसूर्यी जो प्रकाशु । तो

प्रकाश आहे; तो मीच आहें असें समज. ३३ त्याच-प्रमाणें, पृथ्वीच्या ठिकाणी स्वभावतः असणारा जो सुवास तो मी; आकाशांत शब्द म्हणून जो आहे तो मी; तसेंच वेदांत ॐकार म्हणून जो आहे, तो मी. ३४ मनुष्याच्या ठिकाणी असणारा मनुष्यपणा—जो अहंभावाचें सत्त्व आहे—तें पौरुष मी, हें तत्त्व तुला सांगून ठेवतों. ३५ तेजाला अग्नि या नांवाचें जें उगीच पांघरूण आहे, तें दूर केलें असतां त्याचें खरें स्वरूप तें मी; ३६ आणि या त्रिभुवनांत प्राणी पुष्कळ प्रकारच्या जातींत जन्म घेऊन आपआपल्या जातीच्या अनुरोधानें अन्नादि जीवनानें जगतात; ३७ कोणी वारा पिऊन असतात कोणी गवतावर उपजीविका करतात, कोणी अन्नावर राहतात आणि कोणी पाण्यावर आपलें उपजीवन करतात; ३८ असें प्रत्येक प्राण्याचें त्याच्या प्रकृतीच्या मानानें जें निरनिराळें जीवन दिसतें तें सर्व मीच आहें. ३९

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)–हे अर्जुना ! –(मां)–मला)–(सर्व भूतानां)–सर्व भूतांचें–(सनातनं बीजं)–अनादि–नित्य बीज –(विद्धि)–तूं जाण.–( बुद्धिमतां बुद्धिः )–बुद्धिमान् लोकांची बुद्धि–विवेकशक्ति–(अस्मि)–मी आहें.–(तेजस्विनां)–तेजस्वी लोकांतील–(तेजः)–तेज–प्रगल्भता–(अहं) [अस्मि]– मी आहें, –(बलवतां)–बलवान् लोकांचें–(कामरागविवर्जितं)–तृष्णा व आसक्ति यांनीं रहित असें–(बलं)–बल–(अस्मि)–मी आहें.– (हे भरतर्षभ)–हे अर्जुना !–(भूतेषु)–भूतांतील–(धर्माविरुद्धः)– –धर्माशी–शास्त्राच्या अर्थाशीं विरुद्ध नसलेली–(कामः)— अवश्य वस्तूविषयींची इच्छा–(अस्मि)–मी आहें. १०-११

. खरोखर, उत्पत्तीचे वेळीं जें आकाशाच्या अंकुरानें विस्तार पावतें आणि जें अंतकाळीं ॐकाराचीं अक्षरें गिळून टाकतें; ४० जोंपर्यंत या जगाला आकार आहे तोंपर्यंत जें त्याच्यासारखेंच दिसतें, परंतु महाप्रलयाचे वेळेस तें कोणत्याहि आकाराचें नसतें; ४१ असें जें हा जगाचें अनादि व स्वतःसिद्ध बीज तें मी आहें; तें आज अगदीं तुझ्या हातांत देत आहें. ४२ मग अर्जुना, तें समजून घेऊन जर तूं त्याचा विचार करशील तर त्याचा किती चांगला उपयोग आहे तें पहाशील. ४३ परंतु आतां हें अप्रासंगिक बोलणें बाजूला राहूं दे. तुला मी थोडक्यांत सांगतों, हें पहा—तपस्व्यांचे ठायीं तप म्हणून जें आहे, तें माझें रूप होय. ४४ बलवानांत बल म्हणून जें आहे, तें मी असें निःसंशय समज; आणि बुद्धिमतांत बुद्धि म्हणून जी आहे ती मी. ४५ श्रीकृष्ण म्हणतातः– ज्याच्या आचरणापासून धर्म व अर्थ हे पुरुषार्थ साध्य होतात, तो प्राणिमात्रांचे ठिकाणीं असणारा काम मी. ४६ एऱ्हवीं, विकाराच्या वाढीमुळें इंद्रियांच्या इच्छेप्रमाणें जरी आचरण केलें, तरी तो काम धर्माविरुद्ध जाऊं देत नाहीं. ४७ तो काम निषेधाची आडवाट सोडून विधीच्या वाटेनें नीट जातो; आणि त्याचप्रमाणें त्याच्या बरोबर नियमरूप मशाल पेटलेली असते. ४८ अशा रीतीनें हा काम चालतो, म्हणून धर्माचें आचरण पूर्ण होतें; व त्यामुळें संसारांत राहणाराला मोक्षरूपी तीर्थांत मुक्ति प्राप्त होते. ४९ तो काम वेदांनीं गौरव केलेल्या कर्मरूपी मांडवावर कर्मफलांची पानें मोक्षाला लागत तोंपर्यंत आपला वेल वाढवितो. ५० योग्यांचे जनक श्रीकृष्ण म्हणतातः–अशा नियमानें राहणारा व प्राणिमात्रास बीजभूत असा काम, तो मी आहें, ५१ हें एकेक तुला कोठवर सांगावें ! तर वस्तुमात्र म्हणून जें कांहीं आहे, तें सर्व माझ्यापासून विस्तार पावलें आहे असें समज. ५२

**अन्वयार्थ**—(च)–आणि–(ये)–जे–(सात्त्विकाः भावाः)– सात्त्विक पदार्थ आहेत–(ये)–जे–(राजसाः च तामसाः एव भावाः )–राजस व तामस भाव आहेत–( तान् मत्तः एव)–त्यांना माझ्यापासूनच झालेले–[इति] (विद्धि)–असें तूं जाण.–(तु अहं)–पण मी–(तेषु न)–त्यांच्यामध्यें नाहीं–त्यांच्या अधीन नाहीं.–(ते मयि)–ते माझ्या अधीन आहेत. १२

जे सात्त्विक किंवा राजसतामसादि विकार आहेत, ते सर्व माझ्या रूपापासूनच उत्पन्न झाले आहेत, असें समज, ५३ ते जरी माझ्यापासून झाले आहेत तरी मी त्यांच्यांत नाहीं. ज्याप्रमाणें स्वप्नांच्या डोहांत

१ स्वाभाविक. २ सुवास. ३ ॐकार. ४ मीपणा. ५ बळ. ६ पराक्रम. ७ खरें स्वरूप. ८ प्रकाश. ९ आवरण. १० खरें तेज, ११ प्राणिमात्र. १२ उपजीविकेंत, अन्नानें. १३ वारांच पितात. १४ गवतावर उपजीविका करितात. १५ प्रत्येक प्राण्याला. १६ निरनिराळें. १७ अन्न. १८ सर्व ठिकाणीं, १९ प्रसंगीं, उत्पत्तिसमयीं. २० वाढतें. २१ ॐकाराचीं अक्षरें. २२ स्वतःसिद्ध. २३ जगाचें आदिकारण. २४ मुठींत, हातांत. २५ आत्मानात्म विचाराच्या. २६ उपयोग. २७ प्रसंगास अयोग्य. २८ बोल. २९ असू दे. ३० तपस्व्यांच्या. ३१ हेतु, वासना. ३२ स्वरूपांत रममाण होणारा. ३३ ज्या हेस्तुस्तव. ३४ पैसपणानें, प्रसारानें. ३५ विरुद्ध. ३६ जो काम. ३७ निषेधाचा. ३८ आडमार्ग. ३९ कर्तव्यकर्माच्या ४० मशाल. ४१ रीतीनें. ४२ पूर्ण. ४३ संसार भोगणारे मुक्त होतात. ४४ वेदमहत्त्वाच्या. ४५ विध्युक्त विवाह करून वंशविस्तार करितो. ४६ मोक्षापर्यंत. ४७ नियमानें वागणारा. ४८ काम. ४९ कारणभूत. ५० सर्व दृश्य पदार्थ. ५१ विस्तार पावले. ५२ विकार. ५३ माझ्या रूपापासून उत्पन्न झालेले.

मीचि जाण ३३ तैसाचि नैसर्गिकु शुध्दु । मी पृथ्वीच्या ठायीं गंधु । गगनीं मी शब्दु । वेदीं प्रणवु ३४ नराच्या ठायीं नरत्व । जें अहंभाविये सत्त्व । तें पौरुषें मी हें तत्त्व । बोलिजत असे ३५ अग्नि ऐसें आहाच । तेज नामाचें आहे कवच । तें परतें केलिया साच । निजतेज तें मी ३६ आणि नानाविध योनी । जन्मोनि भूतें त्रिभुवनीं । वर्तत आहाति जीवनीं । आपुलाल्या ३७ एकें पवनेंचि पिती । एकें तृणास्तव जिती । एकें अन्नाधारें राहती । जळें एकें ३८ ऐसें भूतप्राति आनान । जें प्रकृतिवशें दिसे जीवन । तें आघवां ठायीं अभिन्न । मीचि एक ३९

बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् । बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥
बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् । धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥

पैं आदिचेनि अवसरें । विरूढें गगनाचेनि अंकुरें । जें अंतीं गिळी अक्षरें । प्रणवपीठींचीं ४० जंव हा विश्वाकारु असे । तंव जें विश्वाचिसारिखें दिसे । मग महाप्रळयदशे । कांहींच नव्हे ४१ ऐसें अनादि जें सहज । तें मी गा विश्वबीज । हें हातींतळीं तुज । देइजत असें ४२ मग उघड करूनि पांडवा । जैं हें आणिसील सांख्यांचिया गांवा । तैं ययाचा उपेगु बरवा । देखशील ४३ परी हे अप्रासंगिक आलाप । आतां असेतु न बोलों संक्षेप । जाण तपियांच्या ठायीं तप । तें रूप माझें ४४ बळियांमाजि बळ । तें मी जाणें अढळ । बुद्धिमंतीं केवळ । बुद्धि ते मी ४५ भूतांच्या ठायीं कामु । तो मी म्हणे आत्मारामु । जेणें अर्थास्तव धर्मु । थोरु होय ४६ एऱ्हवीं विकाराचेनि पैसें । करी कीर इंद्रियांचि ऐसें । परी धर्मासि वेव्हासें । जावों नेदी ४७ जो अप्रवृत्तीचा अव्हांटा । सांडूनि विधीचियां निघे वाटा । तेवींचि नियमाचा दिवटा । सवें चाले ४८ कामु ऐशिया वोजीं प्रवर्ते । म्हणोनि धर्मासि होय पुरतें । मोक्षतीर्थींचे मुक्तें । संसार भोगी ४९ जो श्रुतिगौरवाच्या मांडवीं । कामी सृष्टीचा वेलु वाढवी । जंव कर्मफळेंसि पालवी । अपवर्गीं टेंके ५० ऐसा नियंतु कां कंदर्पु । जो भूतां यां बीजरूपु । तो मी म्हणे बापु । योगियांचा ५१ हें एकेक किती सांगावें । आतां वस्तुजातचि आघवें । मजपासूनि जाणावें । विकारलें असे ५२

ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये । मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥१२॥

जे सात्त्विक हन भाव । कां रजतमादि सर्व । ते ममरूपसंभव । वोळखें तूं ५३ हे जाले तरी माझ्या ठायीं । परी तयामाजीं मी नाहीं । जैसी स्वप्नीं-

जागृति बुडंत नाहीं; ५४ [किंवा] ज्याप्रमाणें बीं (दाणा) रसानें पूर्ण भरलेलें असतें; व त्याचेपासून अंकुर फुटून लांकूड बनतें; ५५ मग त्या लांकडाचे ठिकाणीं बीज असतें का सांग बरें! त्याचप्रमाणें सात्त्विकादि सर्व विकार जरी माझ्याचपासून उत्पन्न झाले आहेत, तरी त्यांमध्यें मी नाहीं. ५६ खरोखर, आकाशांत जे ढग उत्पन्न होतात, त्यांत शुद्ध आकाश नसतें; किंवा ढगांत जें पाणी असतें, त्या पाण्यांत ढग नसतात; ५७ नंतर त्या पाण्याच्या घर्षणानें उत्पन्न होणारें तेज (वीज) जें चकचकीत दिसतें, त्या विजेमध्यें पाणी असतें काय? ५८ अग्नीपासून जो धूर उत्पन्न होतो, त्या धुरांत अग्नि आहे का सांग बरें? त्याचप्रमाणें, सात्त्विकादि सर्व विकार जरी माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत, तरी त्यांत मी नाहीं. ५९

**अन्वयार्थ**—(इदं जगत्)–हें जगत्–(एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः)–या तीन गुणमय–गुणविकाररूप पदार्थांनीं–राग-द्वेष-मोह इत्यादि प्रकारांनीं–(मोहितं सत्)–मोहित होत्सातें–अविवेकावस्थेस प्राप्त झालेलें जगत्–(एभ्यः परं अव्ययं मां)–या गुणांहून व्यतिरिक्त–अगदीं विलक्षण व अविनाशी अशा मला–(न अभिजानाति)–जाणत नाहीं. १३

तथापि, जसें पाण्यापासून उत्पन्न झालेलें गोंडाळ पाण्याला झाकून टाकतें, किंवा ढगाच्या योगानें आकाश व्यर्थ लोपलें जातें; ६० असें पहा कीं, स्वप्न हें खोटें आहे, परंतु ज्यावेळीं निद्रेच्या योगानें तें खरें भासतें, त्या वेळेस तें आपली आपल्याला आठवण होऊं देतें का? ६१ अथवा डोळ्यांतील पाण्यानें उत्पन्न झालेला वडस दृष्टि बंद करीत नाहीं का? ६२ त्याचप्रमाणें माझ्याच ठिकाणीं भासलेली सत्त्व, रज व तम या गुणांनीं युक्त अशी माझी सावली (माया) पडद्याप्रमाणें माझ्याच स्वरूपाच्या आड आली, ६३ म्हणून प्राणी मला जाणत नाहींत, आणि माझ्याच पासून उत्पन्न झालेले असून मद्रूप होत नाहींत. ज्याप्रमाणें पाण्यापासूनच उत्पन्न झालेलीं मोत्यें पाण्यांत वितळून जात नाहींत, ६४ अथवा मातीचा घट करून तो कच्चेपणीं मातीस मिळविला असतां मिळतो–परंतु तोच विस्तवांत भाजल्यावर मिळत नाहीं, ६५ त्याचप्रमाणें, सर्व प्राणी हे माझेच अवयव आहेत; परंतु मायेच्या योगानें जीवपणाला पावले, ६६ म्हणून माझ्यापासून झाले असून मद्रूप होत नाहींत. माझेच असून मला ओळखीत नाहींत, व 'मी' आणि 'माझें' या भ्रांतीनें विषयांध झालेले आहेत. ६७

**अन्वयार्थ**—(हि)–कारण–(एषा मम दैवी गुणमयी माया)–ही माझी अलौकिक सत्त्वादि गुणरूप शक्ति–(दुरत्यया) [अस्ति]–जिचें उल्लंघन मोठ्या कष्टानेंच करतां येतें, अशी आहे,–(ये)–जे लोक–(मां एव)–मलाच–(प्रपद्यन्ते)–शरण येतात,–(ते)–ते–(एतां मायां)–या मायेला–(तरन्ति)–तरून जातात. १४

तेव्हां आतां धनंजया, ही महत्तत्त्वादि माझी माया तरून मद्रूप व्हावें, हा गोष्टीचा अनुभव कसा यावा? ६८ [कारण] जी मायानदी निर्मळ ब्रह्मरूपी पर्वताच्या त्या तुटलेला कड्यांत असतांनाच प्रथम तिच्या ठिकाणीं संकल्परूप जलाचा उगम होऊन पंचमहाभूतांचा लहानसा बुडबुडा आला; ६९ जी सृष्टीच्या विस्ताररूपी ओघानें व कालगतीच्या वेगानें कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांचे उंच कांठ (तीर) ओलांडून चालली आहे; ७० जी सत्त्वादि गुणरूपी मेघांच्या वृष्टीनें भरून भ्रांतिरूप महापुरानें यम-नियमरूपी शहरें वाहून नेत आहे; ७१ जिच्यांत द्वेषरूपी भोंवरे असून जी मत्सररूप वळणानें वहात आहे; जिच्यांत उन्मत्तपणा इत्यादि मोठाले मासे तळपत आहेत; ७२ जिच्यांत प्रपंचरूपी बेटांचा वळणें असून कर्माकर्म

१ केवळ रसाचीच. २ चांगली बनलेली. ३ बीं, दाणा. ४ पद्ध. ५ तिजपासून. ६ पाणी. ७ घर्षणानें. ८ विजेंत. ९ धूर. १० स्वभाव. ११ शेवाळ. १२ आच्छादी. १३ अनुभवास येतें, सत्य भासतें. १४ पडदा. १५ दृष्टि. १६ प्रतिबिंबित झाली. १७ प्राप्त झाली. १८ पडदा. १९ प्राणी. २० मद्रूप. २१ होत नाहींत. २२ विरघळत नाहींत. २३ मोत्यें. २४ मातीचा. २५ भाजला असतां. २६ जीवपणाला. २७ मी व माझें या भ्रांतीनें. २८ महत्त्व आदि. २९ पार पडून, अतिक्रमून. ३० समजुतीस, अनुभवास. ३१ ब्रह्म हाच कोणी एक पर्वत–त्याच्या. ३२ अर्धे कड्यांत. ३३ लोंढा. ३४ लहानसा. ३५ जीवोत्पत्तीच्या, विस्ताराच्या ओघानें. ३६ कालगतीच्या. ३७ कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांची. ३८ उंच. ३९ तीर, डगरी. ४० सत्त्वादि गुण हेच कोणी मेघ त्यांच्या. ४१ भ्रांतीच्या. ४२ यम=मनोनिग्रह नियम=इंद्रियनिग्रह. ४३ भोंवऱ्यांत. ४४ वळणें. ४५ उन्मत्तपणा वगैरे. ४६ चमकतात. ४७ मोठे मासे. ४८ वळसे, वांकणें.

च्या डोहीं । जागृति न बुडे ५४ जैसी रसाचीच सुघेट । बीजकणिका घन-
वट । परी तियेस्तव होय काष्ठ । अंकुरद्वारें ५५ मग तया काष्ठाच्या ठायीं ।
सांग पां बीजपण असे काई । तैसा मी विकारीं नाहीं । जरी विकारला दिसें
५६ पैं गगनीं उपजे आभाळ । परी तेथ गगन नाहीं केवळ । अथवा आ-
भाळीं होय सलिल । तेथ अभ्र नाहीं ५७ मग त्या उदकाचेनि आँवेशें । प्रग-
टलें तेज जें लखलखीत दिसे । तिये विजूमाजीं असे । सलिल कायी ५८ सांगें
अग्नीस्तव धूम होये । तिये धूमीं काय अग्नी आहे । तैसा विकारु हा मी
नोहें । जरी विकारला असें ५९

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् । मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥१३॥

परी उदकीं जाली बाबुळी । ते उदकातें जैसी झांकोळी । कां वायांचि
आभाळीं । आकाश लोपे ६० हां गा स्वप्न लटिकें म्हणों ये । पारी निद्रावशें
बाणलें होये । तंव आठवु काय देत आहे । आपणपेयां ६१ हें असो डोळयांचें ।
डोळांचि पडळ रचे । तेणें देखणेंपण डोळयांचे । न गिळिजे कायि ६२ तैसी हे
माझीच बिंबली । त्रिगुणात्मक साउली । कीं मजचि आड वोडवली । जंव-
निका जैसी ६३ म्हणऊनि भूतें मातें नेणती । माझींच परी मी नव्हती । जैसीं
जळींचीं जळीं न विरती । मुक्ताफळें ६४ पैं पृथ्वीयेचा घटु कीजे । सवेंचि
पृथ्वीसि मिळे तरी मेळविजे । एऱ्हवीं तोचि अग्निसंगें सिजे । तरी वेगळा होय
६५ तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव । पारी मायायोगें जीव- । दशे
आले ६६ म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती । अहंमम-
ताभ्रांती । विषयांध जाले ६७

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया । मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ १४ ॥

आतां महदादि हे माझी माया । उतरोनियां धनंजया । मी होइजे हें
आँया । कैसेनि ये ६८ जिये ब्रह्माचळाचा आँधाडा । पहिलिया संकल्पज-
ळाचा उभडा । सवेंचि महाभूतांचा बुडबुडा । । सांना आला ६९ जे सृष्टिवि-
स्ताराचेनि वोघें । चढत काळकळनेचेनि वेगें । प्रवृत्तिनिवृत्तीचीं तुंगें । तटें
सांडी ७० जे गुणघनाचेनि वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापूरें । घेऊनि जात
नगरें । यमनियमांचीं ७१ जे द्वेषाच्या आँवर्तीं दाटत । मत्सराचे वळसे पडत ।
माजि प्रमादादि तळपत । महामीन ७२ जेथ प्रपंचाचीं वळणें । कर्माकर्मांचीं

जागृति बुडत नाहीं; ५४ [ किंवा ] ज्याप्रमाणें बीं ( दाणा ) रसानें पूर्ण भरलेलें असतें; व त्याचेपासून अंकुर फुटून लांकूड बनतें; ५५ मग त्या लांकडाचे ठिकाणीं बीज असतें का सांग बरें ! त्याचप्रमाणें सात्विकादि सर्व विकार जरी माझ्याचपासून उत्पन्न झाले आहेत, तरी त्यांमध्यें मी नाहीं. ५६ खरोखर, आकाशांत जे ढग उत्पन्न होतात, त्यांत शुद्ध आकाश नसतें; किंवा ढगांत जें पाणी असतें, त्या पाण्यांत ढग नसतात; ५७ नंतर त्या पाण्याच्या घर्षणानें उत्पन्न होणारें तेज ( वीज ) जें चकचकीत दिसतें, त्या विजेमध्यें पाणी असतें काय ? ५८ अग्नीपासून जो धूर उत्पन्न होतो, त्या धुरांत अग्नि आहे का, सांग बरें ? त्याचप्रमाणें, सात्विकादि सर्व विकार जरी माझ्यापासून उत्पन्न झाले आहेत, तरी त्यांत मी नाहीं. ५९

**अन्वयार्थ**—(इदं जगत्)–हें जगत्–(एभिः त्रिभिः गुणमयैः भावैः)–या तीन गुणमय–गुणविकाररूप पदार्थांनीं–राग-द्वेष-मोह इत्यादि प्रकारांनीं–(मोहितं सत्)–मोहित होत्सातें–अविवेकावस्थेस प्राप्त झालेलें जगत्–(एभ्यः परं अव्ययं मां)–या गुणांहून व्यतिरिक्त–अगदीं विलक्षण व अविनाशी अशा मला–(न अभिजानाति)–जाणत नाहीं. १३

तथापि, जसें पाण्यापासून उत्पन्न झालेलें गोंडाळ पाण्याला झांकून टाकतें, किंवा ढगाच्या योगानें आकाश व्यर्थ लोपलें जातें; ६० असें पहा कीं, स्वप्न हें खोटें आहे, परंतु ज्यावेळीं निद्रेच्या योगानें तें खरें भासतें, त्या वेळेस तें आपली आपल्याला आठवण होऊं देतें का ? ६१ अथवा डोळ्यांतील पाण्यानें उत्पन्न झालेला पडस दृष्टि बंद करीत नाहीं का ? ६२ त्याचप्रमाणें माझ्याच ठिकाणीं भासलेली सत्त्व, रज व तम या गुणांनीं युक्त अशी माझी सावली ( माया ) पडद्याप्रमाणें माझ्याच स्वरूपाच्या आड आली, ६३ म्हणून प्राणी मला जाणत नाहींत, आणि माझ्याच पासून उत्पन्न झालेले असून मद्रूप होत नाहींत. ज्याप्रमाणें पाण्यापासूनच उत्पन्न झालेली मोत्यें पाण्यांत विरघळून जात नाहींत, ६४ अथवा मातीचा घट करून तो कचेपणीं मातीस मिळविला असतां मिळतो–परंतु तोच विस्तवांत भाजल्यावर मिळत नाहीं, ६५ त्याचप्रमाणें, सर्व प्राणी हे माझेच अवयव आहेत; परंतु मायेच्या योगानें जीवपणाला पावले, ६६ म्हणून माझ्यापासून झाले असून मद्रूप होत नाहींत. माझेच असून मला ओळखीत नाहींत, व ' मी ' आणि ' माझें ' या भ्रांतीनें विषयांध झालेले आहेत. ६७

**अन्वयार्थ**—(हि)–कारण–(एषा मम दैवी गुणमयी माया)–ही माझी अलौकिक सत्त्वादि गुणरूप शक्ति–(दुरत्यया) [अस्ति]–जिचें उल्लंघन मोठ्या कष्टानेंच करतां येतें, अशी आहे.–(ये)–जे लोक–(मां एव)–मलाच–(प्रपद्यन्ते)–शरण येतात,–(ते)–ते–(एतां मायां)–या मायेला–(तरन्ति)–तरून जातात. १४

तेव्हां आतां धनंजया, ही महतत्त्वादि माझी माया तरून मद्रूप व्हावें, ह्या गोष्टीचा अनुभव कसा यावा ? ६८ [ कारण ] जी मायानदी निर्मळ ब्रह्मरूपी पर्वताच्या त्या तुटलेला कड्यांत असतांनाच प्रथम तिच्या ठिकाणीं संकल्परूप जलाचा उगम होऊन पंचमहाभूतांचा लहानसा बुडबुडा आला; ६९ जी सृष्टीच्या विस्ताररूपी ओघानें व कालगतीच्या वेगानें कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांचे उंच कांठ ( तीर ) ओलांडून चालली आहे; ७० जी सत्त्वादि गुणरूपी मेघांच्या वृद्धीनें भरून भ्रांतिरूप महापुरानें यम-नियमरूपी शहरें वाहून नेत आहे; ७१ जिच्यांत द्वेषरूपी भोंवरे असून जी मत्सररूप वळणानें वहात आहे; जिच्यांत उन्मत्तपणा इत्यादि मोठाले मासे तळपत आहेत; ७२ जिच्यांत प्रपंचरूपी वेटांचा वळणें असून कर्माकर्म

---

१ केवळ रसाचीच. २ चांगली बनलेली. ३ बी, दाणा. ४ घट्ट. ५ तिजपासून. ६ पाणी. ७ घर्षणानें. ८ विजेंत. ९ धूर. १० स्वभाव. ११ शेवाळ. १२ आच्छादी. १३ अनुभवास येतें, सत्य भासतें. १४ पडदा. १५ दृष्टि. १६ प्रतिबिंबित झाली. १७ प्राप्त झाली. १८ पडदा. १९ प्राणी. २० मद्रूप. २१ होत नाहींत. २२ विरघळत नाहींत. २३ मोत्यें. २४ मातीचा. २५ भाजला असतां. २६ जीवपणाला. २७ मी व माझें या भ्रांतीनें. २८ महत्त्व आदि. २९ पार पडून, अतिक्रमून. ३० समजुतीस, अनुभवास. ३१ ब्रह्म हाच कोणी एक पर्वत–त्याच्या. ३२ अर्ध कड्यांत. ३३ लोंढा. ३४ लहानसा. ३५ जीवोत्पत्तीच्या, विस्ताराच्या ओघानें. ३६ कालगतीच्या. ३७ कर्ममार्ग व मोक्षमार्ग यांची. ३८ उंच. ३९ तीरें, दरडी. ४० सत्त्वादि गुण हेच कोणी मेघ त्यांच्या. ४१ भ्रांतीच्या. ४२ यम=मनोनिग्रह नियम=इंद्रियनिग्रह. ४३ भोंवऱ्यांत. ४४ वळणें. ४५ उन्मत्तपणा वगैरे. ४६ चमकतात. ४७ मोठे मासे. ४८ वळसे, वांकणें.

वोभाणें[१] । वरी तैतांती[२] वोसांणें[३] । सुखदुःखांचीं ७३ रैतीचिया[४] वेटा । आदळती कामाचिया लाटा । जेथ जीवफेन[५] संघटा । सैंघ[६] दिसे ७४ अहंकाराचिया चं[७]-ळिया । वारि मदत्रयाचिया उकळिया[८] । जेथ विषयोर्मीच्या[९] आंकळिया[१०] । उल्लोळ[११] घेती ७५ उदयास्ताचे लोंढे[१२] । पाडीत जन्ममरणाचे चोंढे[१३] । जेथ पांचैंभौतिक[१४] बुड-बुडे । होती जाती ७६ सम्मोह[१५] विभ्रमु[१६] मासे । गिळिताती धैर्याचीं आंविसें[१७] । तेथ दोव्हडे[१८] भोंवत वळसे[१९] । अज्ञानाचे ७७ भ्रांतीचेनि खडुळें[२०] । रेवलें[२१] आस्थेचेनि गोळें[२२] । रजोगुणाचेनि खेळाळें[२३] । स्वर्गु गाजे ७८ तमाचे धारसे[२४] वोड[२५] । सत्त्वाचें स्थिरपण जाड । किंबहुना हे दुवोंड[२६] । मायानदी ७९ पैं पुनरावृत्तीचेनि उभडें[२७] । झेंळंबती[२८] सत्य-लोकींचे हुंडे[२९] । थांयें[३०] गडबडती धोंडे । ब्रह्मगोळकांचे[३१] ८० तया पाणियाचेनि वहिलेपणें[३२] । अझुनी न[३३] धरिती वोभाणें[३३] । ऐसा मायापूर हा कवणें । तरिजेल गा ८१ येथ एक नवैलावो[३४] । जो जो कीजे तरणोपावो[३५] । तो तो अपावो[३६] । होय तें ऐक ८२ एक स्वयंबुद्धीच्या[३७] बांहीं[३८] । रिगाले तयांची शुद्धीचि[३९] नाहीं । एक जांणिवेचे[४०] डोहीं । गवैंचि[४१] गिळिले ८३ एकीं वेदत्रयाचिया सांगडी । घेतल्या अहंभावाचिया[४२] धोंडी । ते मैंदमीनाच्या[४३] तोंडीं । सगळेचि गेले ८४ एकीं वैय-सेचें जौंड[४४] बांधले[४५] । मग मन्मथाचिये[४६] कांसे लागले । ते विषयमगरीं[४७] सांडिले । चघळूनियां ८५ आतां वार्धक्याचा तरंगा- । माजि मतिभ्रंशांचा[४८] जरंगीं[४९] । तेणें कवळिजंताती[५०] पैं गा । चहूंकडे ८६ आणि शोकाचा कडा उपडत[५१] । क्रोधाच्या आवर्ती[५२] दाटत । आपदागिधीं[५३] चुंबिजंत[५४] । उधवला[५५] ठायीं ८७ मग दुःखाचेनि बेरटें[५६] बोंबले[५७] । पाठीं मरणाचिये रेवे[५८] रेवले[५९] । ऐसे कामाचे कांसे लागले । ते गेले वायां ८८ एकीं यजनक्रियेची[६०] पेटी । बांधोनि घातली पोटीं । ते स्वर्ग-सुखाच्या कपाटीं[६१] । शिरकोनि[६२] ठेले ८९ एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला कर्मबाह्यांचा[६३] भरंवसा । पारि ते पडिले वळसां[६४] । विधिनिषेधांच्या[६५] ९० जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा[६६] न लगे । वारि कांहीं तरों ये योगें । तरी विपाय[६७] तो ९१ ऐसें तरी जीवाचिये आगिवणें[६८] । इये मायानदीचें तरणें । हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पां ९२ जरी अपथ्यशीळा[६९] व्याधी । कळे साधूसी दुर्जनाची बुद्धी । कीं रांगी सांडी रिद्धी । आली सांती[७०] ९३ जरी चोरां सभा दाटे[७२] । अथवा मीनां[७३] गळु घोटे । ना तरी भेडी उलटे । विवसी जरी ९४ पांडैस[७५] वागुर[७६] करांडी । कां मुंगी मेरु वोलांडी । तरी मायेची पैलथडी[७७] ।

सुखदुःखरूपी केरकचरा तरंगत येऊन कडेला लागत आहे; ७३ जी मधील विषयसुखरूपी बेटावर कामरूपी लाटा आदळून त्या ठिकाणीं जीवसमुदायरूपी फेंस एकत्र झालेला दिसत आहे; ७४ अहंकाररूपी ओघानें, व विद्या, धन, आणि सामर्थ्य या तीन मदांच्या उकळ्यांना ज्या ठिकाणीं विषयतरंगाच्या लाटा उसळत आहेत; ७५ उदय आणि अस्त यांच्या पुरानें जन्ममरणांचे धोंडे पडून त्या ठिकाणीं शरीररूप बुडबुडे उत्पन्न होतात व लय पावतात; ७६ जिच्यांत मोह व भ्रांति हे मासे धैर्य धरून मांस गिळून टाकतात; त्या ठिकाणीं अज्ञानरूपी मोठे भोंवरे फिरत असतात; ७७ भ्रांतिरूप गढूळ पाण्यानें आस्थारूप गाळांत रुतून रजोगुणाच्या खळखळाटानें स्वर्गप्राप्तीची गर्जना होत असते; ७८ त्याचप्रमाणें तमोरूपी प्रवाह, व सत्वरूपी स्थीर पाण्याचा डोह तरून जाण्यास अवघड आहे; फार काय सांगावें, ही मायानदी फार घातुक आहे. ७९ खरोखर हीमधील जन्ममृत्यूंच्या पुराच्या लोंढ्यांत सत्यलोकचे किल्ले वाहून जातात, आणि ब्रह्मांडरूप धोंडे तेव्हांच गडबडत जातात. ८० त्या पुराचा प्रवाह अजून ओसरत नाहीं! अरे, असा हा मायापूर कोणाच्यानें तरून जाववेल? ८१ आणखी एथें एक मोठेंच नवल आहे! ही नदी तरून जाण्याला जे जे उपाय करावे, ते ते अपायकारकच होतात! ८२ कोणी शहाणपणाच्या बळावर [ हीमधून तरून जावें म्हणून ] हिजमध्यें उडी टाकली, त्यांचा पत्ताच नाहीं; कोणाला ज्ञानरूपी डोहांत गर्वानें पार गिळून टाकलें, ८३ कोणी वेदत्रयीच्या सांगडीवर बसून तिला मीपणाचे धोंडे बांधून तरून जाण्यास निघाले; ते मदरूपी माशाच्या तोंडांत सबंधच नाहींतसे झाले; ८४ कोणी तारुण्याच्या बळानें कमर कसून मदनाच्या कासेला लागले, तों त्यांना विषयरूप सुसरीनेंच चघळून टाकिलें; ८५ मग ते वार्धक्यरूप लाटांमध्यें तरंगत जात असतां मतिभ्रंशरूप जाळ्यांत सांपडतात, व त्यायोगें चहूंकडून जखडले जाऊन ८६ शोकरूप कड्यावर आदळतात; व पुढें क्रोधरूपी भोंवऱ्यांत सांपडले असतां कोठें वर डोकें करावयास लागले कीं, आपत्तिरूप गिधाडें त्यांस टोंचटोंचून खाऊं लागतात; ८७ आणि मग ते दुःखरूप चिखलानें माखून मरणरूप वाळूंत रुतले जातात! अशा प्रकारें जे विषयाच्या मागें लागले, ते फुकट जातात. ( त्यांचें जिणें व्यर्थ होतें. ) ८८ कोणी यज्ञादिक क्रियारूपी पेटा बांधून पोटाखालीं घेतात, ते स्वर्गसुखरूपी कपारींत अडकून राहतात. ८९ कोणी मोक्षप्राप्तीच्या आशेनें कर्मरूप बाहुबलावर भरवसा ठेवतात, परंतु कर्तव्याकर्तव्यांच्या भोंवऱ्यांत पडतात ९० ज्या नदीमध्यें वैराग्यरूप नाव चालत नाहीं, आणि जिला विचाराचा दोर लागत नाहीं, तथापि योगानें कांहींशी तरून जातां येते, पण असें क्वचित्च घडतें. ९१ परंतु जीवाच्या अंगबळानें ह्या मायारूप नदींतून तरून जातां येतें, हें म्हणणें कशासारखें आहे म्हणावें, तें सांगतों. ९२ जर पथ्य न करणाराची व्याधि टळेल, साधूला दुर्जनाची बुद्धि फळेल, किंवा विषयासक्त पुरुष ऐश्वर्य प्राप्त झालें असतां त्याला सोडील ९३ जर चोरांची सभा भरेल, अथवा माशाला गळ गिळितां येईल, किंवा भित्रा पिशाच्याला फिरवील ९४ जर हरणाचें पाडस जाळें कुरतडील किंवा मुंगी मेरुपर्वत ओलांडील तरच जीवांना [ आपल्या स्वतांच्या शहाणपणानें ] मायानदी तरून पली-

१ पूर. २ तरंगतात. ३ पुरांतील लाकडें, केरकचरा इत्यादि. ४ विषयसुखाच्या. ५ जीव हेच कोणी फेंस, त्यांचा समुदाय. ६ पुष्कळ. ७ लाटा. ८ विद्या, धन व सामर्थ्य हे तीन मद. ९ विषयतरंगांच्या. १० लाटा. ११ उसळतात. १२ पूर. १३ धरण, धोंडे. १४ शरीरें. १५ अत्यंत मोह. १६ भ्रांति. १७ मासे. १८ वांकडे, मोठे. १९ भोंवरे. २० गढूळ पाणी. २१ रुतलें. २२ दलदल. २३ खळखळ वाहणारे ओढे, प्रवाह. २४ प्रवाह. २५ मोठे. २६ कठीण, द्वाड. २७ पुरानें. २८ खचतात. २९ बुरूज. ३० आघातानें. ३१ ब्रह्मांडगोलाचे. ३२ वाहणीनें, प्रवाहानें. ३३ पूर थांबत नाहीं. ३४ आश्चर्य. ३५ तरण्याचा उपाय. ३६ अपाय. ३७ आंतबुद्धीच्या, अभिमानाच्या. ३८ बाहुबळानें. ३९ मांग. ४० ज्ञानाच्या. ४१ ऋक्, यजु व साम. ४२ मीपणाच्या. ४३ गर्वरूप माशाच्या. ४४ वयाचें. ४५ बळ धरिलें, कंबर बांधली. ४६ मदनाच्या ४७ विषयरूप सुसरींनीं. ४८ बुद्धिभ्रंशाचा. ४९ आळें. ५० कचाटलेलें जातात. ५१ आदळतो. ५२ भोंवऱ्यांत. ५३ आपत्तिरूप गिधाडांनीं ५४ टोंचले जातात. ५५ वर डोकें काढतांच. ५६ चिखलांत. ५७ माखले. ५८ वाळूंत ५९ रुतले. ६० यज्ञादिकांचा. ६१ कपारींत, भगदाडांत. ६२ आडकून. ६३ कर्मरूप बाहूंचा. ६४ बळणांत, भोंवऱ्यांत. ६५ कर्तव्याकर्तव्याचा. ६६ टिकाव. ६७ क्वचित. ६८ शक्तीनें. ६९ पथ्य न करण्याची. ७० विषयासक्त. ७१ प्राप्त झालें असतां. ७२ भय पावे. ७३ मत्स्याला. ७४ भित्र्या. ७५ पिशाच. ७६ हरणाचें पोर. ७७ जाळें. ७८ कुरतडील, तोडी. ७९ परतीर.

देखती जीव ९५ म्हणऊन गा पंडुसुता। जैसी सकामा न जिणवेचि वनिता। तेवीं मायामय हे सरिता। न तरवे जीवां ९६ येथ एकचि लीळा तरले। जे सर्वभावें मज भजले। तयां ऐलीच थडी सरलें। मायाजाळ ९७ जयां सद्गुरुतारु फुडें। जे अनुभवाचे कांसे गाँढे। जयां आत्मनिवेदन तरांडें। आंकळलें ९८ जे अहंभावाचें वोझें सांडुनी। विकल्पाचियां झुळका चुकाउनी। अनुरागाचा निरुता होउनी। पाणिढाळु ९९ जया ऐक्याचिया उतारा। बोधाचा जोडला तारा। मग निवृत्तीचिया पैल तीरा। झेंपावले जे १०० ते उपरतीच्या वांवीं सेलेंत। सोहंभावाचेनि थावें पेलेंत। मग निघाले अनेकाळित। निवृत्तितटीं १ येणें उपायें मज भजले। ते हे माझी माया तरले। पारि ऐसे भक्त विपाइले। बहुवस नाहीं २

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः। माययाऽपहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥१५॥
चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन। आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥१६॥

जे बहुतां एका अव्हांतरु। अहंकाराचा भूतसंचारु। जाहला म्हणोनि विसरु। आत्मबोधाचा ३ ते वेळीं नियमाचें वस्त्र नाठवे। पुढील अधोगतीची लाज नेणवे। आणि करितात जें न करावें। वेदु म्हणे ४ पाहें पां शरीराचिया गांवा। जयालागीं आलें पांडवा। तो कार्यार्थु आंधवा। सांडूनियां ५ इंद्रियग्रामींचे राजबिदीं। अहंममतेचिया जल्पवादीं। विकारांतरांची मांदी। मेळवूनियां ६ दुःखशोकांच्या घाईं। मारिलियाची सेचि नाहीं। हें सांगावया कारण काई। जे ग्रासिले माया ७ म्हणोनि ते मातें चुकले। ऐका चतुर्विध मज भजले। जिहीं आत्महित केलें। वाढतें गा ८ तो पहिला आर्तु म्हणिजे। दुसरा जिज्ञासु बोलिजे। तिजा अर्थार्थी जाणिजे। ज्ञानिया चौथा ९

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते। प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥१७॥

तेथ आर्तु तो आर्तीचेनि व्याजें। जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे। तिजेनि तेणें इच्छिजे। अर्थसिद्धि ११० मग चौथियाच्या ठायीं। कांहींचि करणें नाहीं। म्हणोनि भक्तु एकु पाहीं। ज्ञानिया जो ११ जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें। फिटले भेदाभेदांचें कडवसें। मग मीचि जाहाला समरसें। आणि भक्तुही तेवींचि १२ परि आणिकांचिये दिठी नावेक। जैसा स्फटिकुचि आभासे उदक। तैसा ज्ञानी नव्हे कौतुक। सांगता तो १३ जैसा वारा कां गगनीं थिरे।

कडल्या तीरीं जातां येईल ! ९५ म्हणून, हे पांडुसुता, ज्याप्रमाणें विषयी पुरुषाला स्त्री जिंकवत नाहीं, त्याप्रमाणें ही मायारूप नदी जीवाला तरवत नाहीं. ९६ परंतु जे मला अनन्यभावानें शरण येतात, ते ह्या दुस्तर नदींतून सहज तरून जातात. इतकेंच नव्हे, तर ते अलीकडच्या कांठीं असतांनाच मायारूप जल पार नाहींसें होतें. ९७ ज्यांना सद्गुरु हाच नावाडी असून ज्यांनी ब्रह्मसाक्षात्काराची कांस बळकट धरली आहे, व ज्यांना आत्मनिवेदन हेंच तारू सांपडलें आहे; ९८ जे अहंभावाचें ओझें टाकून, विकल्परूपी वारा चुकवून, आणि बायकामुलांच्यावरील प्रेमरूपी पाण्याची धार टाळून ९९ जीवात्म्याचें ऐक्य हाच उतार त्या उतारानें बोधरूपी सांगडीच्या आश्रयानें निवृत्तीच्या पलीकडील कांठाला जे उड्या मारीत निघाले, १०० ते वैराग्यरूप हात टाकीत 'अहं ब्रह्म' ह्या भावाच्या बळावर पोहून मुक्तिरूपावर अचुक निघतात. १ या उपायानें जे मला भजतात, तेच ह्या मायारूप नदींतून तरून जातात; परंतु असे भक्त फार नाहींत, अगदीं विरळा ? २

**अन्वयार्थ**—(दुष्कृतिनः)-दुराचरण करणारे-(मूढाः)-अविवेकी-(मायया अपहृतज्ञानाः)-मायेनें ज्यांच्या ज्ञानाचा अपहार केला आहे असे-( आसुरं भावं आश्रिताः )-आसुरभावाचा आश्रय केलेले-(नराधमाः)-अधम लोक-(मां)--मला-(न प्रपद्यन्ते)-शरण येत नाहींत. १५ (अर्जुन)-हे अर्जुना !-(चतुर्विधाः सुकृतिनः जनाः)-चार प्रकारचे पुण्यवान् जन-(मां)-मला-(भजन्ते)-भजतात-( भरतर्षभ )-हे भरतश्रेष्ठा ! एक-(आर्तः)-पीडा होत असलेला-(जिज्ञासुः)-भगवानाचें तत्त्व जाणण्याची इच्छा करणारा-( अर्थार्थी )-धनाची इच्छा असलेला-(च ज्ञानी)-व भगवत्तत्त्व जाणणारा.१६

कारण, त्या एकाशिवाय इतर सर्व प्राण्यांना अनादि कालापासून अहंकाररूप भूताचा संचार झाल्यामुळें आत्मस्वरूपाचा विसर पडतो. ३ त्यावेळीं त्यांस नियमरूपी वस्त्राचें मान रहात नाहीं, अधोगतीची लाज वाटत नाहीं आणि वेद जे करूं नये म्हणून सांगतो ते करितात. ४ अर्जुना, असें पहा कीं, या शरीररूप गांवांत ज्या कार्याकरितां आलें तो सर्व कार्यभाग सोडून देऊन, ५ या इंद्रियसमुदायरूप राजमार्गावर अहंममतेची वडवड करण्याकरितां कामक्रोधादिक विकारांचा समुदाय गोळा करितात. ६ आणि दुःख व शोक यांचे घाव पडत असतांही त्यांना त्यांची आठवण मुळीं नसते. हें सांगावयाचें कारण काय म्हणशील तर, ते मायेनें ग्रासलेले असतात. ७ म्हणून ते मला मुकतात. परंतु फक्त चौघांनींच माझें भजन करून आत्महित वृद्धिंगत केलें. ८ त्या चौघांपैकीं पहिल्याला आर्त, दुसऱ्याला जिज्ञासु, तिसऱ्याला अर्थार्थी व चौथ्याला ज्ञानी असें म्हणतात. ९

**अन्वयार्थ**—(तेषां)-त्या चार प्रकारच्या भक्तांपैकीं-(ज्ञानी)-ज्ञानी-तत्त्ववेत्ता-( नित्ययुक्तः )-सतत भगवानामध्यें ज्याचें चित्त स्थिर झालेलें असतें व-(एकभक्तिः)-एका भगवानामध्येंच ज्याची भक्ति आहे असा ज्ञानी-(विशिष्यते)-सर्वांत अधिक आहे.-(हि)-कारण-(अहं)-मी-(ज्ञानिनः)-आत्मतत्त्वज्ञाला-( अत्यर्थं )-अतिशय-( प्रियः )-प्रिय असतों-(च)-व-(सः)-तो-(मम)-मला-(प्रियः)-प्रिय असतो. १७

आर्त हा दुःखनिवारणासाठीं मला भजतो; मुमुक्षु ज्ञानप्राप्तीकरितां भजतो; आणि तिसरा जो अर्थार्थी तो द्रव्यादिप्राप्तीचे इच्छेनें मला भजतो. ११० परंतु चौथा जो असतो, त्याला कांहींच कर्तव्य नसतांही तो मला भजतो, म्हणून तो एक ज्ञानी पुरुषच माझा भक्त होय, हें ध्यानांत ठेव. ११ कारण, त्याचा ज्ञानाच्या प्रकाशानें भेदाभेदरूप अंधकार नाहींसा होतो; मग त्याचें माझ्याशीं ऐक्य होऊन तो मद्रूप होऊन बसतो, व त्याची भक्तीही तशीच कायम असते. १२ परंतु स्फटिक मणि जसा उदकमय दिसतो, तसा हा ज्ञानी पुरुष इतरांच्या दृष्टीला दिसतो. याचें कौतुक कांहीं सांगतां येत नाहीं. १३ ज्याप्रमाणें वारा हा गगनांत शांत झाल्यावर मग त्याचें वारे-

१ विषयीं पुरुषास स्त्री जिंकवत नाहीं. २ नदी. ३ सहज. ४ अलीकडच्याच कांठीं. ५ नावाडी तारणारा. ६ ब्रह्माच्या. ७ बळकट. ८ आत्मस्वरूप जाणणें. ९ तराफा, ताफा. १० सांपडलें. ११ प्रेमाचा, भक्तीचा. १२ चुकवून. १३ पाय उतार. १४ जीवब्रह्माचें ऐक्य. १५ सांगड. १६ पावलें, झेंप, उडी मारीत गेले. १७ वैराग्याच्या. १८ हातांनीं. १९ सरळ्या मारीत. २० मीच ईश्वर अशा भावाच्या. २१ बळें. २२ पोहत. २३ अक्लेश. २४ मुक्तीच्या कांठावर. २५, विरळा, क्वचित्. २६ पुष्कळ. २७ अन्य. २८ आत्मज्ञानाचा. २९ सर्व. ३० इंद्रियरूपी गांवाच्या. ३१ राजमार्गांत. ३२ वडवडीनें. ३३ कामक्रोधादिकांची. ३४ समुदाय. ३५ आठवण. ३६ चार प्रकारचे लोक मात्र. ३७ संसारपीडित, रोगी. ३८ ज्ञानप्राप्ति इच्छिणारा, ३९ धनादिकांची इच्छा करणारा. ४० ज्ञानी, जाणता. ४१ निमित्तानें. ४२ तिसऱ्या अर्थार्थ्यानें. ४३ द्रव्यप्राप्ति. ४४ अंधार. ४५ एकरूप होऊन, ऐक्यानें. ४६ लोकदृष्ट्या. ४७ क्षणभर. ४८ शांत होतो.

मग वारेपण वेगळें नुरे। तरी भक्त हे पैजे न सरे। जरी ऐक्या आला १४ जरी पवनु हालवूनि पाहिजे। तरी गगनावेगळा देखिजे। एऱ्हवीं गगन तों सहजें। असे जैसें १५ तैसें शरीरीं हन कर्में। तो भक्तु ऐसा गमे। परी अंतरप्रेतीतिधर्में। मीचि जाहला १६ आणि ज्ञानाचेनि उजौंडलेपणें। मी आत्मा ऐसें तो जाणें। म्हणऊनि मीही तैसेंचि म्हणें। उचंबळला सांता १७ हा गां जीवापैलीकडिलीयें खुणे। जो पावोनि वावरों जाणें। तो देहाचेनि वेगळेपणें। काय वेगळा होय १८

उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्। आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥१८॥

म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें। मज आवडे तोही भक्त झोंबे। परी मीचि करी वाॅलभें। ऐसा ज्ञानिया एकु १९ पाहें पां दुभतयाचिया आशा। जगचि धेनूसि करीतसे फांसा। पारि दोरेंवीण कैसा। वत्सा चाबळी १२० कां जे तनुमनुप्राणें। तें आणिक कांहींचि नेणे। देखे तयातें म्हणे। हे माय माझी २१ तें येणें मानें अनन्यगती। म्हणूनि धेनुही तैसीचि प्रीती। यालागीं लक्ष्मीपती। बोलिले साचें २२ हें असो मग म्हणितलें। जे कां तुज सांगितलें। तेही भक्त भले। पैंढियंते आम्हां २३ पारि जाणोनियां मातें। जे पाहों विसरले मींगौतें। जैसें सागरा येऊनि सोरितें। मुरडावें ठेलें २४ तैसी अंतःकरणकुँहरीं जन्मली। जयाची प्रतीतिगंगा मज मीनली। तो मी हे बोली। फार काय करूं २५ एऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे। तो चैतन्याचि केवळ माझें। हें न म्हणावें पारि काय कीजे। न बोलणें बोलों २६

बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते। वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९॥

जे तो विषयाची दाट झाडी। माजि कामक्रोधांचीं सांकेडीं। चुकावूनि आला पौंडीं। सद्वासनेचिया २७ मग साधुसंगें सुभटा। उजू सत्कर्माचिया वाटा। अप्रवृत्तीचा अव्हांटा। डावलूनि २८ आणि जन्मशतांचा वाहतवणा। तेविंची आशेचिया न लेचि वाहणा। तेथ फलहेतूचा उगौणा। कवणु चाळी २९ ऐसा शरीरसंयोगाचिये रातीं। माजि धांवतां सडियाँ आयती। तंव कर्मक्षयाची पाहौती। पौहांट जाली १३० तैसीच गुरुकृपा उँखा उजळली। ज्ञानाची वोतपेंळी पडली। तेथ साम्याची ऋद्धि उघडली। तयाचिये दिठी ३१ ते वेळीं जयाकडे वांस पाहे। तेउता मीचि तया एकु आहे। अथवा निवांत जरी राहे। तऱ्ही मीचि तया ३२ हें असो आणिक कांहीं। तया सर्वत्र मी-

पण वेगळें उरत नाहीं, त्याप्रमाणें हा जरी मद्रूप झाला, तरी त्याचा भक्ताचा बाणा जात नाहीं. १४ जर वारा हालवून पाहिला तर तो गगनाहून वेगळा भासतो. एऱ्हवीं गगन आणि तो ज्याप्रमाणें एकच, १५ त्याचप्रमाणें, शरिरासंबंधी सर्व कर्मांच्या आचरणानें तो माझा भक्त असा वाटतो; परंतु स्वानुभवाच्या योगानें तो मद्रूपच असतो; १६ आणि ज्ञानप्राप्तीच्या उजेडानें मीच त्याचा आत्मा आहें असें तो जाणतो, म्हणून मीही संतोष पावून त्याला आपला आत्मा असें म्हणतों. १७ जो जीवपणाच्या पलीकडील ( आत्मस्वरूपाची खूण समजून घेऊन व्यवहारांत वागतो, तो देह धारण केल्यामुळें माझ्यापासून वेगळा होईल का, पहा बरें ? १८

**अन्वयार्थ**—(सर्वे एव एते उदाराः)–हे सर्वच उत्कृष्ट आहेत;–(तु)–पण–( ज्ञानी )–आत्मवेत्ता–(मे)–माझा–(आत्मा एव)–आत्माच–(मतं)–मानलेला आहे.–(हि)–कारण–(सः)–तो–(युक्तात्मा )–समाहितचित्त होऊन–( मां एव )–मलाच–(अनुत्तमां गतिं)–उत्तम गतीला–(आस्थितः)–येऊन पोंचण्यास प्रवृत्त झाला आहे. १८

म्हणून, आपल्या हिताकरितां हवा तो मनुष्य माझी भक्ति करतो, परंतु मी ज्याच्यावर प्रीति करतों असा एक भक्त ज्ञानीच होय. १९ हें पहा, दुधाच्या आशेनें सर्व लोक गाईला भाला घालीत आहेतच, परंतु आपल्या वासराला ती भाल्याशिवाय दूध पिऊं देते, १२० कां तर, त्याला दुसरी कांहीं एक गोष्ट माहित नसून आपल्या तनमनप्राणानें तें आईलाच ओळखीत असतें; आणि जी वस्तु पाहील ती माझी आई आहे असें समजतें. २१ अशा प्रकारें, तें वांसरू अनन्यभक्त असतें, म्हणून त्याच्यावर गायही तशीच प्रीति करते. यास्तव लक्ष्मीपति ( भगवान् श्रीकृष्ण ) जे बोलले तें अगदीं खरें. २२ हें असो. मग म्हणतात:–ज्ञान्याशिवाय जे तुला इतर भक्त सांगितले, तेही माझे आवडते आहेत. २३ त्यांना माझें ज्ञान झालें म्हणजे, मग ते पुनः संसाराकडे पहात नाहींत. ज्याप्रमाणें नदी सागराला मिळाल्यावर तिचें माघारी फिरणें खुंटतें, २४ त्याचप्रमाणें ज्याच्या अंतःकरणरूपी दरींतून अनुभवरूप गंगा निघून मला मिळाली, तो मद्रूप झाला हें वर्णन किती करूं ? २५ एऱ्हवीं ज्ञानी ज्याला म्हणतात तो केवळ माझा जीव कीं प्राण होय, हें सांगूं नये, पण काय करावें ही न बोलण्याची गोष्ट तुला प्रसंगोपात सांगितली. २६

**अन्वयार्थ**––(बहूनां जन्मनां अन्ते)–अनेक जन्मांच्या शेवटीं–(ज्ञानवान्)–ज्याचें ज्ञान परिपक्व झालें आहे असा ज्ञानी–(वासुदेवः सर्वं इति)–वासुदेवच हें सर्व आहे, असा –(मां प्रपद्यते)–मला प्राप्त होतो.–(सः महात्मा)–तो ज्ञानी–(सुदुर्लभः)–अत्यंत दुर्लभ आहे. १९

जो विषयरूप दाट झाडींतून कामक्रोधादिक संकटें टाळून व सद्वासनेच्या पहाडावर चढून आला; २७ नंतर, हे वीरश्रेष्ठा अर्जुना, साधूंच्या संगतीनें, सत्कर्मांच्या सरळ वाटेनें, दुराचरणाच्या आडमार्गाला डावलून २८ आणि फलाशेच्या वाहणा पायांत न घालतां शेंकडों जन्म भक्तीची वाट चालणारा जो ज्ञानी भक्त, तो फलाच्या हेतूचा का हिशेब करील ? २९ याप्रमाणें शरीरसंबंधी अज्ञानरूप रात्रींत उपाधिरहित एकटा वाट चालत असतां, सहज कर्मक्षय होऊन ज्ञानोदयाची पहाट होते. १३० त्याच वेळेस गुरुकृपारूप उषःकाल होतो. आणि मग ज्ञानरूप सूर्याची कोंवळी किरणें पडून समदृष्टीचें ऐश्वर्य त्याच्या दृष्टीस पडतें. ३१ त्या वेळीं तो जिकडे जिकडे पाहतो तिकडे तिकडे त्याला माझ्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं; अथवा तो जरी स्वस्थ बसला, तरी त्याला मीच दिसतों. ३२ फार काय सांगावें ? त्याला सर्व ठिकाणीं माझ्यावाचून दुसरें कांहीं दिसत नाहीं. ज्याप्रमाणें पाण्यांत बुडालेल्या

१ प्रतिज्ञा, बाणा. २ स्वानुभवानें. ३ उदयानें. ४ हर्षयुक्त होऊन, सांता–होस्साता, होऊन. ५ व्यवहार करण्याला जाणतो. ६ वाटेल तो. ७ प्रिय, जिवलग. ८ भाला, आडी घालणें. ९ वासराचा. १० या प्रकारें. ११ अन्य आधाररहित. १२ गाईलाही. १३ आवडते. १४ माघारें. १५ नदीला. १६ माघारें उलटणें राहिलें. १७ अंतःकरणरूपी गुहेंत. १८ अनुभवरूपी गंगा. १९ मिळाली. २० जीव. २१ संकटें, अडचणी. २२ पहाडावर. २३ वीरश्रेष्ठा अर्जुना. २४ नीट. २५ दुराचरणाचा. २६ आडमार्ग. २७ डावीकडे टाकून. २८ वाटसरू, प्रवासी. २९ न घालतां. ३० वाहाणा, पादुका. ३१ हिशेब, गणना. ३२ कोण चालतो. ३३ रात्रीमध्यें. ३४ सदा, संगरहित, एकटा. ३५ उजेडाची. ३६ ज्ञानोदयाची वेळ. ३७ उषःकाल. ३८ कोंवळें ऊन, तिरीप. ३९ ऐश्वर्य. ४० वाट, मार्ग. ४१ तेथें.

वांचूनि नाहीं। जैसें सबाह्य[1] जळ डोहीं। बुडालिया घटा २३ तैसा तो मज-भीतरीं। मी तया आंतुबाहेरी। हें सांगिजेल बोलेंवरी[2]। तैसें नव्हे २४ म्हणोनि असो हें इयापरी। तो देखे ज्ञानाची वाखांरी[3]। तेणें संसरेंलेनि[4] करी। आंपु विश्व २५ हें समस्तही श्रीवासुदेवो। ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो। म्हणोनि भक्तांमाजीं रावो। आणि ज्ञानिया तोचि २६ जयाचिये प्रतीतीचा वाखारां[5]। पवाडु[6] होय चराचरा। तो महात्मा धनुर्धरा। दुर्लभु[7] आथी २७ येर बहुत जोडती किरीटी। जयांचीं भजनें भोगासाठीं। जे आशा[8]तिमिरें दृष्टी। विषयांध जाले २८

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः। तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया॥ २०॥

आणि फळाचिया हांवा। हृदयीं कामा जाला रिगावा। कीं तयाचिये घसणी[9] दिवा। ज्ञानाचा गेला २९ ऐसे उभयतां[10] आंधारीं पडिले। म्हणोनि पांसींचि[11] मातें चुकले। मग सर्वभावें अनुसरले[12]। देवतांतरां १४० आधींच प्रकृतीचे पाइकें[13]। वरी भोगालागीं तंव रंक। मग तेणें लोलुपत्वें[14] कौतुक। कैसेनि भजती ४१ कवणी[15] तिया नियमबुद्धि। कैसिया हन उपचारें[16]समृद्धि। कां अर्पण यथाविधि। विहित करणें ४२

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति। तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्॥२१॥

पैं जो[17] जिये देवतांतरीं। भजावया चाड करी। तयाची ते चाड पुरी। पुरविता मी ४३ देवोदेवीं मीचि पाहीं। हाही निश्चयो त्यासि नाहीं। भावो ते ते ठायीं। वेगळा धरिती ४४

स तया श्रद्धया युक्तस्तस्या राधनमीहते। लभते च ततः कामान् मयैव विहितान्हि तान्॥ २२॥

मग तियां[19] श्रद्धायुक्त। तेथिंचें आराधन[20] जें उचित। तें सिद्धीवेरी[21] समस्त। वर्तों[22] लागे ४५ ऐसें जेणें जें भाविजे[23]। तें फळ तेणें पाविजे। परी तेंही सकळ निपजे। मजचिस्तव[24] ४६

अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम्। देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि॥ २३॥

परी ते भक्त मातें नेणती। जे कल्पनेबाहेरी न निघती। म्हणोनि कल्पितें[25] फळ पावती। अंतवंतें[26] ४७ किंबहुना ऐसें जें भजन। तें संसाराचेंचि साधन। येर फळभोग तो स्वप्न। नावेंभरी[27] दिसे ४८ हें असो परौतें[28]। मगं हो कां आवडतें[29]। परि यजी[30] जो देवतांतें। तो देवत्वासीचि ये ४९ येर तनुमनुप्राणीं। जे अनुसरले माझेयाचि वाहणीं[31]। ते देहाच्या निर्वाणीं[32]। मीचि होती १५०

घटाच्या आंत व बाहेर पाणीच असतें; ३३ त्याप्रमाणें तो माझ्या आंत व मी त्याच्या अंतर्बाह्य आहें हें बोलून दाखविण्यासारखें नाहीं. ३४ म्हणून तें असो. याप्रमाणें त्याला ज्ञानाची वखारच दृष्टीस पडते; आणि तो ज्ञानानें सावरल्यावर जिकडे जिकडे संचार करितो, तिकडे तिकडे त्याला आपणच विश्व आहों असें भासतें. ३५ या सर्व विश्वांत वासुदेव भरला आहे असा त्याचा पूर्ण अनुभव असतो, म्हणून भक्तांमध्यें तोच सर्व श्रेष्ठ आणि तोच ज्ञानी होय. ३६ धनुर्धरा, ज्याच्या अनुभवाच्या वखारींत सर्व चराचर विश्व सांठविलेलें आहे, असा हा महात्मा फार दुर्लभ आहे. ३७ याच्याशिवाय, अर्जुना, पुष्कळ मला भजतात, पण त्यांची भक्ति फक्त विषयसुखाकरितां असते. कारण, आशातिमिरानें त्यांची दृष्टि विपर्यांध झालेली असते. ३८

**अन्वयार्थ**—(तैः तैः कामैः)–त्या त्या पुत्र-पशु-स्वर्गादिकांच्या कामांनीं–(हृतज्ञानाः)–ज्यांचें विवेकज्ञान हरण केलें आहे, ते–(स्वया प्रकृत्या)–आपल्या प्रकृतीकडून–(नियताः)–नियमित होत्साते–(तं तं नियमं)–त्या त्या नियमाचा–(आस्थाय)–आश्रय करून–(अन्यदेवताः)–दुसऱ्या देवतांना–(प्रपद्यन्ते)–शरण जातात. २०

आणि फळाच्या इच्छेनें त्यांच्या हृदयांत कामाचा रिघाव झाल्यामुळें त्याच्या संसर्गानें ज्ञानरूपी दिवा मालवतो. ३९ अशा रीतीनें त्यांना अंतर्बाह्य अंधार होतो, म्हणून मी त्यांच्याजवळ असूनही ते मला अंतरतात; आणि मग सर्वभावानें इतर देवांना भजूं लागतात. १४० अंगोदर ते मायेच्या अधीन झालेले, आणि त्यांत फलप्राप्तीकरितां दीन झालेले, मग काय! ते, मोठ्या कौतुकानें लंपट होऊन देवांची कशी भक्ति करितात पण! ४१ कोणत्या नियमानें व उपचारद्रव्यानें, तसेंच यथाविधि त्याला काय वस्तु अर्पण केल्या पाहिजेत इकडे लक्ष देऊन जे जे उपचार त्याला आवडत असतील ते ते करतात! ४२

१ आंतबाहेर, सर्वत्र. २ वाचेनें, शब्दांनीं. ३ वखार, कोठी. ४ या ज्ञानाचें भांडवलावर सर्व विश्व खरेदी केलें. (आपलेंसें केलें). ५ वखार, कोठी. ६ विस्तार. ७ इच्छारूप, अंधःकारानें. ८ इच्छेनें, ९ संघट्टनानें, धपाट्यानें. १० आंत व बाहेर, आशारूपी अंधार व आंतील ज्ञानदिवा गेला म्हणून दोन्ही ठिकाणीं अंधार झाला. ११ जवळ असून. १२ आराधूं लागले. १३ दास. १४ लंपटपणानें. १५ कोणत्या.

परंतु जो जो ज्या ज्या देवतेची फलाकरितां उपासना करितो, त्याची ती इच्छा मीच पुरवितों. ४३ हें पहा–देव–देवी मीच आहें; परंतु त्याचा तसाही निश्चय नसतो, म्हणून त्या त्या देवतांचे ठिकाणीं त्याचा निरनिराळा भाव असतो. ४४.

**अन्वयार्थ**—(यः यः भक्तः)–जो जो कामी भक्त–(यां यां तनुं)–ज्या ज्या देवतेच्या तनुची–(श्रध्दया अर्चितुं)–श्रद्धेनें पूजा करण्याची–(इच्छति)–इच्छा करतो–(तस्य तस्य)––त्याच्या त्याच्या–(तां एव श्रद्धां)–त्याच श्रध्देला–(अहं अचलां)–मी अचल–स्थिर–(विदधामि)–करतों. २१

मग त्यांना ज्या ज्या देवतेची श्रद्धा असेल त्या त्या देवतेचें, आपली कार्यसिद्धि होईपर्यंत, ते यथाविधि पूजन करितात. ४५ याप्रमाणें ज्यानें जें फल इच्छावें तें त्याला प्राप्त होतें; परंतु तें सर्व माझ्यापासूनच मिळतें. ४६.

**अन्वयार्थ**—(सः)–तो देवतापूजक–(तया श्रध्दया युक्तः)–त्या श्रध्देनें युक्त होऊन–(तस्याः)–त्या देवतेचें–(राधनं ईहते)–आराधन करितो–(च)–आणि–(ततः)–त्या देवतेपासून–(मया एव हि)–मीच–(विहितान्)–निर्मिलेल्या–(तान् कामान्)–त्या कामांस–(लभते)–तो प्राप्त होतो. २२.

परंतु ते भक्त मला जाणत नाहींत; कारण ते आशापाशांतून मुक्त होत नाहींत, [ त्यांतच घोटाळतात; ] आणि म्हणूनच, नाशवंत अशीं इच्छित फलें त्यांना प्राप्त होतात. ४७ किंबहुना अशा प्रकारचें हें भजन म्हणजे संसाराचें साधनच होय. बाकी त्याचा फलभोग म्हणजे स्वप्नांतील क्षणिक सुखाप्रमाणेंच होय. ४८. हें एकीकडे राहूं द्या, त्याचें आवडतें दैवत कां असेना, त्यानें त्या देवतांचें पूजन केलें म्हणजे तो दैवतच पावतो. ४९ बाकी तनमन अर्पण करून जे माझ्या भक्तिमार्गाला लागले, ते देहांतीं मद्रूप होतात. १५०

**अन्वयार्थ**—(तु)–पण–(तेषां अल्पमेधसां)–त्या मतिमंदांचें–(तत् फलं)–तें फल–(अन्तवत्)–विनाशी–(भवति)–असतें.–(देवयजः)–देवांची पूजा करणारे–(देवान्)–देवांस–(यान्ति)–प्राप्त होतात.–(मद्भक्ताः)–माझे भक्त–(मां अपि)–मलाहि–(यान्ति)–प्राप्त होतात. २३

१६ पूजासामुग्री. १७ ज्या ज्या. १८ इच्छा. १९ त्या त्या. २० पूजन. २१ कार्यसिद्धि होईपर्यंत. २२ करूं लागतो. २३ इच्छानें. २४ मजपासून. २५ इच्छिलेल्या. २६ नाश पावणारे. २७ क्षणभर. २८ एकीकडे. २९ त्याचें. आवडतें दैवत कां असेना. ३० पूजनादि करतो. ३१ मार्गाला. ३२ अवर्धी, देहान्तीं.

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः । परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥

परी तैसें न करिती प्राणिये । वांयां आपुलिया हितीं वाणिये । जे पोंहताती पाणियें । तळहातींचेनि ५१ नाना अमृताच्या सागरीं बुडिजे । मग तोंडा कां वज्रमिठी पाडिजे । आणि मनीं तरी आठविजे । थिल्लरोदकातें ५२ हें ऐसें कासया करावें । जें अमृतींही रिगोनि मरावें । तें सुखें अमृत होऊनि कां नसावें । अमृतामाजीं ५३ तैसा फळहेतूचा पांजरा । सांडूनियां धनुर्धरा । कां प्रतीतिपाखीं चिदंबरा । गोसाविया नोहावें ५४ जेथ उंचावलेनि पवाडें । सुखाचा पैसारु जोडे । आपुलेनि सुरवाडें । उडों ये ऐसा ५५ तया उमपा माप कां सुवावें । मज अव्यक्ता व्यक्त कां मानावें । सिद्ध असतां कां निमावें । साधनवरी ५६ परि हा बोल आघवा । जरी विचारिजंतसे पांडवा । तरी विशेषें या जीवां । न चोजवे गा ५७

नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः । मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥२५॥

कां जे योगमायापडळें । हे जाले आहाती आंधळे । म्हणोनि प्रकाशाचेनि देहबळें । न देखती मातें ५८ एऱ्हवीं मी नसें ऐसें । काय वस्तुजात असे । पाहें पां लवण जळरसें- । रहित आहे ५९ पवन कवणातें न शिवेचि । आकाश कें न समायेचि । हें असो एक मीचि । विश्वीं आहें १६०

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन । भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥

येथें भूतें जियें अतीतलीं । तियें मीचि होऊनि ठेलीं । आणि वर्तत आहाति जेतुलीं । तींही मीचि ६१ कां भविष्यमाणें जियें हीं । तींही मजवेगळीं नाहीं । हा बोलचि एऱ्हवीं कांहीं । होय ना जाय ६२ दोराचिया सापासी । डोंबीं बडियां ना गव्हाळा ऐसी । संख्या न करवे कोण्हासी । तेवीं भूतांसि मिथ्यत्वें ६३ ऐसा मी पंडुसुता । अनुस्यूतु सदा असतां । या संसार जो भूतां । तो आनें बोलें ६४ तरि तेचि आतां थोडीसी । गोठी सांगिजेल परियेसीं । जैं अहंकारा तनूसी । वाळंभ पडिलें ६५

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत । सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ॥ २७ ॥

तेथ इच्छा हें कुमारी जाली । मग ते कामाचिया तारुण्या आली । तेथ द्वेषेंसीं मांडिली । वराडिक ६६ तया दोघांस्तव जन्मला । ऐसा द्वंद्वमोहो जाला । मग तो आजेयानें वाढविला । अहंकारें ६७ जो धृतीसि सदां प्रतिकूळ । नियमाही नागवे सैळ । आशारसें दोंदिलु । जाला सांतां ६८ असंतुष्टीचिया

**अन्वयार्थ**--(अबुद्धयः)-अविवेकी जन-(मम)-माझ्या -(अव्ययं अनुत्तमं परं भावं)-अक्षय उत्कृष्ट परम स्वरूपास -(अजानन्तः)-न जाणणारे-(अव्यक्तं मां)-पूर्वी अव्यक्त-अप्रकट असलेल्या मला-(व्यक्तिं आपन्नं)-आतां व्यक्त-प्रकट झालेला-(मन्यन्ते)-समजतात. २४

पण प्राणी तसें करीत नाहींत; आणि फुकट आपल्या हिताचें नुकसान करून घेऊन [ इतर देवतांच्या पूजनानें अल्प फलप्राप्ती करून घेऊन ] तळहातावरच्या पाण्यांत पोहल्याप्रमाणें करतात ! ५१ किंवा अमृताच्या समुद्रांत बुडाला असतां मग तोंड दाबून कां धरावें ? आणि मनामध्यें डबक्यांतील पाण्याची आठवण कां करावी ? ५२ अमृतांत शिरून देखील मरावयाचें, हें असें तरी कां करावें ? अमृतांत सुखानें अमृतरूप होऊन कां राहूं नये ? ५३ त्याचप्रमाणें, धनुर्धरा, फलाशारूप पिंजरा टाकून देऊन अनुभवरूप पंखांनी ( संचार करून ) चिदाकाशाचे ( भगत्स्वरूपाचे ) धनी कां न व्हावें ? ५४ त्या चिदाकाशांत, आपण कितीही उंच उडण्याचें मनांत आणलें तरी, त्यांत आपल्या इच्छेप्रमाणें अनायासानें सुखानें उडण्यास अवकाश आहे. ५५ त्या मला न मोजतां येणाऱ्याला मापांत कां घालावें ? मज निराकाराला साकार कां मानावें ? मी सिद्ध असतां माझ्या प्राप्तीकरितां साधनानें कां शिणावें ? ५६ पण, अर्जुना, खरोखर विचार केला तर हें माझें वरील बोलणें जीवांना बहुतकरून आवडत नाहीं. ५७

**अन्वयार्थ**--(योगमायासमावृतः अहं)-योगमायेनें आच्छादित झालेला मी-(सर्वस्य)-सर्व लोकांना-(प्रकाशः न)-प्रकट होत नाहीं. सर्व लोकांना प्रत्यक्ष दिसत नाहीं.-(अयं मूढः लोकः)-हा मूढ झालेला लोक-(अजं अव्ययं मां)-अज व अव्यय अशा मला (न अभिजानाति)-सर्व प्रकारें जाणत नाहीं. २५

कां कीं, योगमायेच्या पडद्यानें जे आंधळे झालेले असतात, म्हणून, देहबुद्धीच्या बळानें, प्रकाशरूप जो मी त्या मला पहात नाहींत. ५८ एऱ्हवीं मी नाहीं, अशी एक तरी वस्तु आहे का ? पहा कीं, कोणतेंही पाणी रसविरहित आहे कां ? ५९ वारा कोणाला स्पर्श करीत नाहीं ? आकाश कोठें समावत नाहीं ? हें असो; अवघ्या विश्वांत मीच भरलेला आहें. १६०

**अन्वयार्थ**--(अर्जुन)-हे अर्जुना !-(अहं)-मी-(समतीतानि)-भूतकालांतील-(च वर्तमानानि)-व वर्तमानकालांतील -(च भविष्याणि)-व भविष्यत्कालांतील-(भूतानि)-भूतांना -(वेद)-जाणतों-(तु)-पण-(मां)-मला-(कश्चन)-कोणी-(न वेद)-जाणत नाहीं. २६

ह्या जगांत जितके प्राणी होऊन गेले, त्यांचें ठिकाणीं मीच होतों, आणि हल्लीं आहेत, त्यांतही मीच आहें. ६१ किंवा पुढें होणार आहेत, तेही मजपासून भिन्न नाहींत; परंतु हें फक्त बोलणें आहे. बाकी कांहीं होत नाहीं, आणि कांहीं जात नाहीं. ६२ ज्याप्रमाणें दोरीच्या सापाविषयीं तो काळा, कवड्या, गव्हाळा वगैरे कांहींच कल्पना करतां येत नाहीं, त्याप्रमाणें प्राणिमात्र मिथ्या असल्यामुळें तत्संबंधी कोणतीच कल्पना करतां येत नाहीं. ६३ हें पांडुसुता, अशा प्रकारें मी सदा अखंड व्याप्त आहें. प्राणिमात्रांच्या मागें जो संसार लागला आहे, त्याचें कारण निराळें आहे. ६४ म्हणून त्याविषयीं थोडीशी गोष्ट सांगतों ती ऐक; अभिमान व तनु (शरीर) या दोहोंची प्रीति जडली. ६५

**अन्वयार्थ**--(परंतप, भारत)-हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना !-(सर्वभूतानि)-सर्व प्राणी-(सर्गे)-उत्पत्तीच्या वेळीं -(इच्छाद्वेषसमुत्थेन)-राग व द्वेष यांपासून उत्पन्न झालेल्या-(द्वंद्वमोहेन)-शीतोष्ण सुखदुःखादि द्वंद्वमोहानें-(संमोहं)-अविवेकास-(यान्ति)-प्राप्त होतात. २७

त्या दोघांच्या प्रीतिपासून इच्छारूप कन्या उत्पन्न झाली व ती आपल्या कामाच्या पूर्ण तारुण्यांत आल्यावर तिचें द्वेषाशीं लग्न लागलें. ६६ त्या दोघांपासून ( सुखदुःखरूप ) द्वंद्वमोह हा पुत्र झाला. नंतर त्यांच्या अहंकार आजोबांनीं त्याला वाढविलें. ६७ जो द्वंद्वमोह नेहमीं धैर्याला प्रतिकूल व इंद्रियदमनाला द्वेषामुळें आकलन होत नाहीं; कारण तो आशारूप दुधानें पुष्ट झालेला आहे. ६८ हे

१ कल्याणाविषयीं. २ तोटा, नुकसान करून घेतात. ३ अथवा. ४ घट्ट मिटून धरणें. ५ डबक्यांतील पाण्यास. ६ कशाकरितां. ७ अमर. ८ न राहावें. ९ पिंजरा ( शरीर ). १० अनुभवरूप पंखानें. ११ चिदाकाशाचा. १२ धनी कां होऊं नये ? १३ मानानें. १४ विस्तार, फैलावा. १५ सुखानें, इच्छेनुरूप. १६ मापाच्या पलिकडच्याला. १७ घालावें, १८ निराकाराला. १९ साधन करीत कां मरावें. २० विचार करितां. २१ रुचत नाहीं. २२ आदिमायेच्या पडद्यानें. २३ दिवसाच्या बळानें. २४ वायु. २५ कोठें. २६ सामावत नाहीं. २७ होऊन गेलेले. २८ राहिली. २९ पुढें होणारा. ३० हें फक्त बोलावयाचेंच. ३१ काळा. ३२ कवडा. ३३ खोटेपणानें. ३४ अखंड. ३५ या भूतांला जो संसार म्हणून आहे तो आनें बोलें म्हणजे निराळ्याच शब्दानें. ३६ गोष्ट. ३७ अभिमान व शरीर यांस. ३८ प्रीति, सख्य. ३९ अप्राप्त वस्तुविषयीं प्रथम जो विचार मनांत येतो ती इच्छा. ४० मुलगी. ४१ ती इच्छा वाढावली म्हणजे तिला काम म्हणतात. ४२ वऱ्हाड, लग्नसोहळा. ४३ दोघांपासून. ४४ आजोबानें. ४५ धैर्यास. ४६ विरुद्ध. ४७ इंद्रिय दमनासही. ४८ सांपडत नाहीं. ४९ दांडगा. ५० आशारूपी दुधानें पुष्ट होऊन.

मदिरा । मत्त होवोनि धनुर्धरा । विषयाचे वोवरीं । विकृतीविण ६९ तेणें भावशुद्धीचिये वाटे । विखुरले विकल्पाचे कांटे । मग चिरिले अव्हांटे । अप्रवृत्तीचे १७० तेणें भूतें भांबावलीं । म्हणोनि संसाराचिया आडवामाजि पडिलीं । मग महादुःखाच्या घेतलीं । दांडे वरी ७१

येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् । ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ २८ ॥

ऐसे विकल्पाचे वांयाणे । कांटे देखोनि सणाणे । जे मतिभ्रमाचें पांसावणें । घेतीचिना ७२ उजूं एकनिष्ठेच्या पाउलीं । रगडूनि विकल्पाचिया भालीं । महापातकांची सांडिली । अटवी जिहीं ७३ मग पुण्याचे धांवा घेतले । आणि माझी जवळीक पातले । किंबहुना ते चुकले । वाटवधेयां ७४

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये । ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥२९॥

एऱ्हवीं तरी पार्था । जन्ममरणाची निमे कथा । ऐसिया प्रयत्नातें आस्था । विये जयांची ७५ तयां तो प्रयत्नुचि एके वेळे । मग समग्र परब्रह्में फळे । जया पिकलेया रसु गळे । पूर्णतेचा ७६ ते वेळीं कृतकृत्यता जग भरे । तेथ अध्यात्माचें नवलेंपण पुरे । कर्माचें काम सरे । विरमे मन ७७ ऐसा अध्यात्मलाभु तया । होय गा धनंजया । भांडवल जया । उद्यमीं मी ७८ तयातें साम्याचिये वाढी । ऐक्याची सोंदे कुळवाडी । तेथ भेदाचिया दुबळवाडी । नेणिजे तया ७९

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः । प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥३०॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥७॥

जिहीं साधिभूता मातें । प्रतीतीचेनि हातें । धरूनि अधिदैवातें । शिवतले गा १८० जया जाणिवेचेनि वेगें । मी अधियज्ञुही दृष्टी रिगे । ते तनूचेनि वियोगें । विव्हंये नव्हती ८१ एऱ्हवीं आयुष्याचें सूत्र विघडतां । भूतांची उमटे खडबडता । काय न मरतयाहि चित्ता । युगांतु नोहे ८२ परी नेणों कैसें पैं गा । जे जडोनि गेले माझिया आंगा । ते प्रयाणींचिया लगबगा । न सांडितीच मातें ८३ एऱ्हवीं तरी जाण । ऐसे जे निपुण । तेचि अंतःकरण- । युक्त योगी ८४ तंव इये शब्दकुपिकेतळीं । नोडवेचि अवधानाची अंजुळी । जे नावेक अर्जुन तये वेळीं । मागांचि होता ८५ जेथ तद्ब्रह्मवाक्यफळें । जिये नानार्थरसें रसाळें । बहकताती परिमळें । भावांचेनि ८६ सहज कृपामंदानिळें । कृष्णद्रुमाचीं वचनफळें । अर्जुनश्रवणाचिये खोळे । अवचित पडिलीं ८७ तियें प्रमेयांची हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकळिलीं । मग तैसींचि का घोळिलीं । परमानंदें ८८ तेणें बरवेपणें निर्मळें । अर्जुना उन्मेषाचे

धनुर्धरा, असंतोषरूप मद्यानें उन्मत्त झाल्यामुळें तो विषयांच्या उपभोगाला विटत नाहीं. ६९ त्यानें शुद्ध भक्तीच्या वाटेवर विकल्पाचे कांटे पसरून मग कुमार्गाच्या धाडवाटा काढिल्या आहेत. १७० त्यायोगानें प्राणिमात्र भ्रम पावून संसाररूप अरण्यांत पडतात व त्यांना महादुःखाचे सपाटे सोसावे लागतात. ७१

**अन्वयार्थ**—(तु)-पण-(येषां पुण्यकर्मणां जनानां)-ज्या पुण्यकर्म करणाऱ्या जनांचें-(पापं)-पाप-(अन्तगतं)-क्षीण झालेलें असतें-(ते)-ते पुण्यवान् लोक-(द्वंद्वमोहनिर्मुक्ताः)-द्वंद्वमोहापासून सर्वथा मुक्त व-(दृढव्रताः)-दृढव्रत होऊन-(मां)-मला-(भजन्ते)-भजतात. २८

याप्रमाणें विकल्पाचे तीक्ष्ण परंतु निष्फळ कांटे पाहून ज्यांपासून मतिभ्रमाचे पाश उत्पन्न होतात त्यांना जे मानीत नाहींत; ७२ भक्तीच्या एकनिष्ठेच्या पावलांनीं जे नीट जातांना विकल्पाचे भाल्यासारखे कांटे चिरडून टाकतात; ते महापातकांचें अरण्य टाकून सरळ मार्गानें जातात; ७३ नंतर पुण्याच्या मार्गानें धूम ठोकून माझें सान्निध्य पावतात, आणि अशा रीतीनें वाटमाऱ्यांच्या (कामक्रोधादिकांच्या ) हातून सुटतात ! ७४

**अन्वयार्थ**—(ये)-जे-(जरामरणमोक्षाय)-वृद्धपणा व मरण यांपासून मुक्त होण्यासाठीं-(मां)-माझा-(आश्रित्य)-आश्रय करून-(यतन्ति)-यत्न करितात-(ते)-ते भक्त-(तत् ब्रह्म)-त्या परब्रह्माला-(विदुः)-जाणतात.-(कृत्स्नं)-समग्र-(अध्यात्मं)-प्रत्यगात्म वस्तु-(च अखिलं कर्म)-व सर्व कर्म [ यांस ]-(विदुः)-जाणतात. २९

एऱ्हवीं, पार्था, जन्ममरणांच्या फेऱ्यांतून सुटावें असें जें साधन आहे, त्याच्या प्राप्तीची ज्यांना इच्छा उत्पन्न होते, ७५ त्यांना त्यांचा तो प्रयत्न केव्हां तरी फलद्रूप होऊन ब्रह्मप्राप्ति होते, व पिकलेल्या फळांच्या रसाप्रमाणें ते पूर्णतेस पावतात. ७६ त्या वेळीं, आम्ही धन्य आहों, असें त्यांना वाटून सर्व जगभर आनंद भरलेला दिसतो. नंतर आत्मज्ञानाची हौस पुरी होऊन व कर्में जागच्यां जागीं राहून त्यांचे मन शांत होतें. ७७ हे धनंजया, अशा रीतीनें त्यांना आत्मज्ञानाचा लाभ होतो. कारण, त्यांच्या या परमार्थरूप व्यापारांत मांडवल मीच आहें. ७८ त्यांना समदृष्टि हेंच व्याज मिळून ऐक्यरूप संपत्तीची समृद्धि होते, यामुळें भेदरूप दैन्याची ओळखही रहात नाहीं. ७९

**अन्वयार्थ**—(ये)-जे-(साधिभूताधिदैवं)-अधिभूत व अधिदैव यांसह-(साधियज्ञं च)-आणि अधियज्ञासह-(मां)-मला-(विदुः)-जाणतात-(ते युक्तचेतसः)-ते समाहितचित्त झालेले-शांतचित्त भक्त-(प्रयाणकाले अपि च)-मरणाच्या वेळींही-(मां)-मला-(विदुः)-जाणतात. ३०

ज्यांनीं अनुभवाच्या हातांनीं मायावश जीवाला धरून पांचभौतिकासह मला स्पर्श केला, १८० ज्यांनीं ज्ञानाच्या बळानें मला अधियज्ञ ( परमात्मा ) या दृष्टीनें पाहिलें, त्यांना शरिराच्या वियोगानें ( मरणसमयीं ) दुःख होत नाहीं. ८१ एऱ्हवीं, आयुष्याची दोरी तुटावयाचे वेळांत आली असतां प्राण्याची जी खळबळ उडून जाते ती पाहून न मरणारांच्या चित्ताला सुद्धां युगांत ( प्रलयकाळ ) ओढवल्यासारखें नाहीं का होत ? ८२ परंतु ते माझ्या ठिकाणीं कसें व किती ऐक्यदशेला पावले आहेत, हें वर्णन करणें अशक्य आहे. कारण ते मरणाच्या कठीण प्रसंगींही मला विसंबत नाहींत. ८३ एऱ्हवीं असें पक्कें समज कीं, जे अशा प्रकारें पूर्ण ज्ञानी आहेत, तेच अंतःकरणानें माझें ऐक्य पावले आहेत. ८४ हें तत्त्व सांगतेवेळीं श्रीकृष्णाच्या मुखांतील शब्दरूप कुपीच्या खालीं अर्जुनाची अवधानरूप ओंजळ नव्हती, कारण त्याचें चित्त मागील एकोणतिसाव्या श्लोकार्थाच्या चिंतनांत गुंतलें होतें. ८५ त्या ठिकाणीं तीं ब्रह्मप्रतिपादक वाक्यें हींच फळें पुष्कळ अर्थरूपी रसानें भरलेलीं होतीं, व त्याचा भक्तिरूप सुवास चोहींकडे पसरला होता. ८६ त्यावेळीं कृष्णकृपारूप मंद वाऱ्याच्या योगानें श्रीकृष्णरूप वृक्षापासून वचनरूप फळें अर्जुनाच्या श्रवणरूप ओटींत सहज येऊन पडलीं ! ८७ तीं फळें वेदांतसिद्धांतांचीच बनलेलीं, ब्रह्मरसाच्या सागरांत बुचकळलेलीं व तशीच परमानंदरूप साखरेंत घोळलेलीं, होतीं. ८८ अशा रीतीनें बनलेलीं जीं निर्मळ फळें, त्यांच्या अर्थरूपी गर्भाचा ( ज्ञानाचा ) लाभ

१ खोलीमध्यें. २ शुद्ध भावनेच्या. ३ पसरले. ४ संशयात्मक बुद्धीचे. ५ काढले, फोडिले. ६ आडमार्ग. ७ कुमार्गाचें. ८ भ्रमली, ९ अरण्यांत. १० स्वाधीन झाली. ११ दडपणाखालीं. १२ निष्फळ, व्यर्थ. १३ तीक्ष्ण. १४ संशय, जवळ होणें. १५ मानीत नाहींत. १६ नीट, सरळ. १७ टोंके. १८ अरण्य. १९ मदत घेतली, पळत सुटले. २० सान्निध्य. २१ वाटमाऱ्यांनीं. २२ सफलतेनें. २३ आत्मज्ञानाचें. २४ कौतुक. २५ शांत होतें. २६ व्यापारांत. २७ व्याज. २८ वाक्यें, भरते. २९ व्यवहार. ३० दैन्य. ३१ साकाराला. ३२ अनुभवरूपी हातांनीं. ३३ परमात्मा. ३४ दुःखी. ३५ खळबळ. ३६ प्रलय. ३७ शब्दरूप शिशीच्या खालीं. ३८ पुढें करवत नाहीं. ३९ लक्ष्यांची. ४० ओंजळ. ४१ ब्रह्मप्रतिपादक वाक्यरूपी फळें. ४२ पसरलेली. ४३ इच्छेच्या. ४४ कृपारूपी मंद वाऱ्यानें. ४५ श्रीकृष्णरूपी वृक्षाचीं. ४६ ओटींत, झोळींत, ४७ सिद्धांताचीं, ४८ ब्रह्माचे.

डोहळे । घेताति गळाले । विस्मयामृताचे ८९ तिया सुखसंपत्ति जोडलिया । मग स्वर्गा वोती वांकुलिया । हृदयाच्या जीवीं गुतेंकुलिया । होत आहाती १९० ऐसें वरचिलीचि बरवा । सुख जावों लागलें फांवा । तंव रसस्वादाचिया हांवा । लाहो केला ९१ झडकरी अनुमानाचेनि करतळें । घेऊनि तियें वाक्यफळें । प्रतीतिमुखीं एके वेळे । घालूं पाहे ९२ तंव विचाराचिया रसना न दाटती । परी हेतूच्या दशनीं न फुटती । ऐसें जाणोनि सुभद्रापती । चुंबीचिनी ९३ मग चमत्कारला म्हणे । इयें जळींचीं मी तारांगणें । कैसा झकविलों असलगपणें । अक्षरांचेनि ९४ इयें पदें नव्हती फुडियों । गगनाचिया घडिया । येथ आमुची मति बुडालिया । थांवो न निघे ९५ वांचूनि जाणावयाची के गोठी । ऐसें जीवीं कल्पूनि किरीटी । तिया पुनरपि केली दृष्टी । यादवेंद्रा ९६ मग विनविलें सुभटें । हां हो जी ये एकवांटे । सातही पदें अनुच्छिष्टें । नवलें आहाती ९७ एऱ्हवीं अवधानाचेनि वहिलेपणें । नाना प्रमेयांचे उगीणें । काय श्रवणाचेनि आंगवणें । बोलों लाहाती ९८ पारी तैसें हें नोहेचि देवा । देखिला अक्षरांचा मेळावा । आणि विस्मयाचिया जीवा । विस्मयो जाला ९९ कानाचेनि गवाक्षद्वारें । बोलाचे रश्मी अभ्यंतरें । पाहेना तंव चमत्कारें । अवधान ठेलें २०० तेवींचि अर्थाची चाड मज आहे । ते सांगतांही वेळु न साहे । म्हणूनि निरूपण लवलाहें । कीजो देवा १ असा मागील पडताळा घेऊनी । पुढां अभिप्राय दृष्टी सूनी । तेवींचि माजि शिरउनी । आर्ती आपुली २ कैसी पुसती पाहे पां जाणिव । भिडेंचि तरी लंघों नेदी शिंवें । एऱ्हवीं श्रीकृष्णहृदयासि खेंवें । देवों सरला ३ अहो श्रीगुरूतें जैं पुसावें । तें येणें मानें सावध होआवें । हें एकचि जाणें आघवें । सव्यसाची ४ आतां तयाचें तें प्रश्न करणें । वरी सर्वज्ञ श्रीहरीचें बोलणें । हें संजयो आवडलेपणें । सांगेल कैसें ५ तिये अवधान द्यावें गोठी । बोलिजेल नीट मऱ्हाटी । जैसी कानाचे आधीं दिठी । उपेगा जाये ६ बुद्धीचिया जिभा । बोलाचा न चाखतां गाभा । अक्षरांचिया भांबा । इंद्रियें जिती ७ पहातां मालतीचे कळे । घ्राणासि कीर वाटले परिमळें । पारी वरचिली बरवा काइ डोळे । सुखिये नव्हती ८ तैसें देशियेचिया हवावा । इंद्रियें करिती राणिवा । मग प्रमेयांचिया गांवा । लैसा जाइजे ९ ऐसेनि नागरपणें । बोलूं निमे तें बोलणें । ऐकां ज्ञानदेवो म्हणे । निवृत्तीचा २१०

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ श्लोक ३०, ओंव्या २१०.

व्हावा अशी अर्जुनास इच्छा उत्पन्न होऊन तो विस्मयरूप अमृताचे घोट घेऊं लागला ८९ अशा रीतीनें सुखसंपत्तीच्या लाभामुळें अर्जुनाच्या अंतःकरणांत आनंदाच्या इतक्या गुदगुल्या होऊं लागल्या कीं, तो स्वर्गसुख भोगणारासही टुकटुक माकड करूं लागला, म्हणजे तुच्छ मानूं लागला. १९० याप्रमाणें त्या फलांचें बाहेरील स्वरूप पाहून त्याचा आनंद वाढूं लागला, त्या वेळेस त्या फलांची चव घेण्याची जिभेला उत्कट इच्छा उत्पन्न झाली. ९१ म्हणून लवकर अनुमानरूप हस्तावरतीं श्रीकृष्ण वाक्यरूप फलें घेऊन तीं तो अनुभवरूप मुखांत एकदम घालूं लागला. ९२ त्या वेळीं विचाररूप जिभेनें तीं धेतां येईनात व हेतुरूप दांतांनीं फुटेनात असें जाणून, सुभद्रापति जो अर्जुन तो त्यांना तोंड लावीना. ९३ मग चमत्कार घाटून असें म्हणतो कीं, " अहो, पाण्यांत दिसणाऱ्या नक्षत्राप्रमाणें या अक्षरांच्या सुंदरपणानें अक्षरांना फल समजून मी कसा फसलों ! ९४ हीं अक्षरांचीं पदें नसून केवळ आकाशाच्या घड्या आहेत, व ह्यांत आमच्या बुद्धीनें किती जरी बुड्या मारल्या, तरी कांहीं थांग लागावयाचा नाहीं. " ९५ तेव्हां हीं फलें घेतां येत नाहींत, तर ) मग तीं जाणतां कशीं येतील ? असें अर्जुनानें मनांत आणून पुनः यादवेंद्र श्रीकृष्णाकडे पाहिलें. ९६ मग अर्जुनानें देवाची विनंति केली कीं, " देवा, हीं जी एकवटलेलीं सात पदें, त्यांचा कधींही कोणी स्वाद घेतला नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे, ९७ एऱ्हवीं, लक्षपूर्वक ऐकत नसतां केवळ श्रवणाच्या जोरावर ( लक्ष नसतां श्रवण केलेलें असेल तर ) अनेक साधारण सिद्धांतांचे तात्पर्यार्थ तरी बोलून दाखवितां येतील का ? ९८ नाहीं. आणि त्यांतूनही, देवा, आपलें हें बोलणें कांहीं साधारण नव्हे. हीं अक्षरें नुसतीं पाहिल्यावर विस्मयाला देखील मोठें आश्चर्य वाटेल. ९९ कानाच्या झरोक्यांतून बोलरूपी किरण आंत शिरले नाहींत, तोंच चमत्कार वाटून माझें लक्ष खुंटलें. ( मति चालेना. ) २०० त्या शब्दांचा अर्थ समजण्याची मला फार इच्छा आहे असें म्हणण्यांत जो वेळ चालला आहे, तोही मला सहन होत नाहीं. म्हणून, देवा, लवकर सांगा. " १ याप्रमाणें, मागील प्रलंतर घेऊन, पुढल्या अभिप्रायावर दृष्टि ठेवून व मध्येंच आपली ऐकण्याची इच्छा दर्शवून अर्जुनानें विचारलें. २ अर्जुनाची प्रश्न करण्याची काय शैली आहे पहा, कीं मर्यादेचें उल्लंघन न करितां श्रीकृष्णांच्या हृदयाला प्रेमालिंगन देण्यास तो तयार झाला ! ३ अहो, श्रीगुरुंना ज्या वेळेस पुसावयाचें त्या वेळेस अशाच मर्यादेनें पुसावें लागतें. त्यांची मर्यादा कायम ठेवून कसें पुसावें हें फक्त एक सव्यसाची अर्जुनच जाणतो. ४ आतां त्याचें ते प्रश्न करणें, आणि त्यावर सर्वज्ञ श्रीहरीचें उत्तर देणें, हें संजय कशा प्रेमानें सांगेल तें पहा. ५ जी गोष्ट सरळ मराठी भाषेंत सांगितली जाईल तिच्याकडे नीट लक्ष द्या. असें कीं, ज्या योगानें कानाच्या अगोदर दृष्टीला अर्थ दिसेल, ६ बुद्धिरूप जिभेनें त्या शब्दांचा रस न चाखतां अक्षरांच्या शोभेनें इंद्रियें तटस्थ व्हावीं. ७ पहा कीं, मालती पुष्पाच्या कळ्यांचा स्वाद नाकाला खरोखर येईल, परंतु त्याच्या बाहेरील सुरेखपणानें डोळ्यांना सुख होणार नाहीं काय? ८ त्याचप्रमाणें, मराठी भाषेच्या शोभेनें इंद्रियें सुखाचें राज्य करतील, व मग त्वरित सिद्धांतांच्या गांवाला जातील. ९ अशा सुंदरपणानें जें बोलणें ऐकल्यापासून बोलणें बंद होतें, तें ऐका, असें निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात. २१०

१ घोट. २ दाखवितो. ३ वेडावणें. ४ गुदगुल्या. ५ बाह्य सौंदर्यानें. ६ आनंद वाढूं लागला. ७ इच्छा. ८ प्रारंभ. ९ दडपत नाहींत. १० दांतांनीं. ११ ओंठास लावीना. १२ कीं. १३ फसलों. १४ सुगमपणानें. १५ घड्या. १६ अंत, थांग. १७ एकत्र. १८ ब्रह्म, अध्यात्म इत्यादि सात शब्द. १९ स्वाद न घेतलेलीं. २० वेगानें. २१ अनुभव; द्विशेष, २२ बळानें. २३ बोलतां येणार नाहींत. २४ जमाव. २५ झरोक्यांतून. २६ किरण. २७ प्रकाशले नाहीं तोंपर्यंत. २८ लवकर. २९ प्रलंतर. ३० शिरखून, घालून. ३१ इच्छा, ३२ ज्ञान. ३३ सीमा, मर्यादा. ३४ आलिंगन. ३५ प्रेमानें, आवडीनें. ३६ सार. ३७ शोभेनें. ३८ मोगरीचे. ३९ नाकाला. ४० बाहेरच्या. ४१ मराठी भाषेच्या. ४२ शोभेनें. ४३ राज्य. ४४ सिद्धांताच्या. ४५ त्वरित. ४६ चांगुलपणानें. ४७ जेथें वाचा पोहचत नाहीं तें शब्दांत ऐकून घ्या.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय आठवा.

अर्जुन उवाचः—

किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम । अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥

मग अर्जुनें म्हणितलें । हां हो जी अवधारिलें । जें म्यां पुसिलें । तें निरूपिजे १ सांगा कवण तें ब्रह्म । कायसया नाम कर्म । अथवा अध्यात्म । काय म्हणिपे २ अधिभूत तें कैसें । एथ अधिदैव तें कवण असे । हें उघड मी परियेसें । ऐसें बोला ३

अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन । प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥

देवा अधियज्ञ तो काई । कवण पां इये देहीं । हें अनुमानासि कांहीं । दिठी न भरे ४ आणि नियंता अंतःकरणीं । तूं जाणिजसी देहप्रयाणीं । तें कैसेनि हे शार्ङ्गपाणी । पारिसवा मातें ५ देखा धवळारीं [६] चिंतामणीचा । जरी पहुडला होय दैवाचा । तरी वोसणतांही बोलु तयाचा । सोपु न वचे ६ तैसें अर्जुनाचिया बोलासवें । आलें तेंचि म्हणितलें देवें । तें परियेसें गा बरवें । जें पुसिलें तुवां ७ किरीटी कामधेनूचा पाडा । वरी कल्पतरूचा आहे मांडोडा । म्हणोनि मनोरथसिद्धीचिया चाडा । तो नवल नोहे ८ कृष्ण कोपोनि ज्यासी मारी । तो पावे ब्रह्मसाक्षात्कारीं । मा कृपेनें उपदेशु करी । तो कैसापरी न पवेल ९ जैं कृष्णचि होइजे आपण । तैं कृष्ण होय आपुलें अंतःकरण । मग संकल्पाचें आंगण । वोळंगती सिद्धी १० परि ऐसें जें प्रेम । तें अर्जुनींचि आथि निस्सीम । म्हणऊनि तयाचे कांम । सदां सफळ ११ या कारणें श्रीअनंतें । तें मनोगत तयाचें पुसतें । होईल जाणूनि आइतें । वोगरूनि ठेविलें १२ जें अर्पत्य थानीं निगे [१६] । तयाची भूक ते मातेसीचि लागे । एऱ्हवीं तें शब्दें काय सांगे । मग स्तन्य दे येरी [१८] १३ म्हणोनि कृपाळुवा गुरूचिया ठायीं । हें नवल नोहे कांहीं । पारि तें असो आइका काई । जें देव बोलते जाहले १४

श्रीभगवानुवाचः—

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते । भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय आठवा.

**अन्वयार्थ**—(हे पुरुषोत्तम)–हे पुरुषोत्तमा कृष्णा–(तत् ब्रह्म किं)–तें ब्रह्म काय आहे, सोपाधिक आहे की निरुपाधिक?–(अध्यात्मं किं)–या शरीरांत राहणारें अध्यात्म काय आहे?–(कर्म किं)–कर्म काय आहे?–(च)–आणि–(अधिभूतं)–अधिभूत म्ह० भूतांतील तत्व–(किं प्रोक्तं)–काय सांगितलें आहे?–(अधिदैवं किं उच्यते)–अधिदैव कशाला म्हणतात? १

मग अर्जुन म्हणाला, " अहो देवा! ऐकलें कां? मी जें विचारलें तें मला विस्तार करून सांगा. १ ब्रह्म कोणतें, कर्म कशाचें नांव अथवा अध्यात्म कशाला म्हणतात, २ अधिभूत कसें, आणि या जगांत अधिदैवत कोण आहे, हें मला नीट समजेल असें सांगा. ३

**अन्वयार्थ**—(मधुसूदन)–हे मधुसूदना!–(अत्र)–यांतील–(अधियज्ञः)–अधियज्ञ–(कः)–कोणता?–(कथं)–त्याचें चिंतन कसें करावें?–(अस्मिन् देहे)–तो या देहांत आहे कीं कोठें?–(च)–आणि–(प्रयाणकाले)–मरणाच्या वेळीं–(नियतात्मभिः)–शांतचित्त पुरुषांकडून–(कथं ज्ञेयः असि)–तूं कसा जाणण्यास योग्य आहेस? २

देवा, अधियज्ञ तो काय व तो या देहांत कोणता, हें अनुमानानें नीट लक्षांत येत नाहीं. ४ हे शार्ङ्गपाणि ज्यांनीं अंतःकरण स्वाधीन करून घेतलें आहे, त्यांना अंतकाळीं तुम्हांला कसें ओळखतां येतें, हें मला चांगल्या-रीतीनें समजवा, " ५ ( ज्ञानेश्वर म्हणतात, ) पहा की चिंतामणीच्या मंदिरांत एकादा दैववान् मनुष्य जर निजला तर तो जरी झोंपेंत बरळला तरी त्याचें बरळणें व्यर्थ जात नाहीं. ६ त्याचप्रमाणें, मला तें सांगा असें अर्जुन म्हणाल्यावरोबर देव म्हणाले, " तूं जें कांहीं पुसलेंस तें नीट ऐक, " ७ किरीटी हें कामधेनूचें वासरूं असून त्याच्यावर कल्पतरूच्या मांडव आहे, अर्थात् त्याच्या मनांतील सर्व हेतु सिद्धीस जातात यांत नवल तें काय ? ८ श्रीकृष्ण ज्याला रागावून मारतात, तो देखील ब्रह्मरूपाला पावतो; मग ज्याला कृपादृष्टीनें उपदेश करतील, त्याला काय प्राप्त होणार नाहीं? ९ ज्या वेळेस कृष्ण मीच आहें असा निश्चय होतो, त्या वेळीं आपलें अंतःकरणही कृष्णरूप बनतें; मग संकल्परूप आंगणांत ( आपल्या मनांत जे जे संकल्प येतील, ते ते पूर्ण करण्याकरितां ) ऋद्धि-सिद्धि राबत असतात. १० परंतु अशा प्रकारचें जें निस्सीम प्रेम, तें एक अर्जुनाच्या ठिकाणींच आहे. म्हणून त्याच्या इच्छा नेहमीं पूर्ण होतात. ११ म्हणूनच अर्जुन, हा आतां आपल्या मनांतील गोष्ट मला विचारील, असें जाणून श्रीकृष्णांनीं आयतेंच उत्तराचें ताट वाढून ठेविलें. १२ स्तनपान करणाऱ्या तान्ह्या मुलाची भूक त्याच्या मातेलाच लागत असते, (आईला आपोआपच कळते ) एऱ्हवीं त्यानें मागितल्यावर मग का ती त्याला दूध पाजते? १३ अर्थात् कृपाळू अशा सद्गुरुचे ठिकाणीं ( आपल्या शिष्यासंबंधीं) असलें हें प्रेम असणें म्हणजे कांहीं नवल नव्हे. पण हें असो; देव जें कांहीं बोलले, तें ऐका. १४.

**अन्वयार्थ**—(परमं अक्षरं)–जें निरतिशय अविनाशी तत्व तेंच–(ब्रह्म)–ब्रह्म आहे.–(स्वभावः)–त्या परम अक्षर ब्रह्माचाच प्रत्येक देहांतील प्रत्यगात्मभाव हेंच–(अध्यात्मं)–अध्यात्म तत्व आहे–( भूतभावोद्भवकरः )–भूतांचा सद्भाव उत्पन्न करणारा–(विसर्गः)–देवतांना उद्देशून चरु–पुरोडाशादि द्रव्यांचा जो त्याग–(कर्मसंज्ञितः)–त्यालाच कर्म ही संज्ञा आहे. ३

---

१ कशाला. २ डोळ्यांत भरत नाहीं. ३ स्वाधीन. ४ समजला जाशील. ५ अंतकाळीं. ६ इच्छिलेले देणाऱ्या मण्याच्या मंदिरांत. ७ निजला. ८ झोंपेंत बरळतां. ९ व्यर्थ.

१० खोंड, वोन्हा. ११ मंडप. १२ मग. १३ राबतात. १४ इच्छा. १५ वाढून. १६ जें बालक स्तनपान करीत असतें. १७ दूध. १८ ती आई.

मग म्हणितलें सर्वेश्वरें। जें आकारीं इयें खोंकरें। कोंदलें असत न खिरे। कवणे काळीं १५ एऱ्हवीं सपूरपण तयाचें पहावें। तरि शून्याचि नव्हे स्वभावें। वारि गगनाचेनि पालवें। गाळूनि घेतलें १६ जें ऐसेंही पारि विरुळें। इये विज्ञानाचिये खोळे। हालवलेंही न गळे। तें परब्रह्म १७ आणि आकाराचेनि जालेपणें। जन्मधर्मातें नेणें। आकारलोपीं निमणें। नाहीं कहीं १८ ऐशिया आपुलियाची सहज स्थिती। जया ब्रह्माची नित्यता असती। तया नाम सुभद्रापती। अध्यात्म गा १९ मग गगनीं जेविं निर्मळें। नेणों कैचीं एके वेळे। उठतीं घनपटळें। नानावर्णें २० तैसें अमूर्तीं तियें विशुद्धें। महदादि भूतभेदें। ब्रह्मांडाचे बांधे। होंचि लागती २१ पैं निर्विकल्पाचिये बरडीं। फुटे आदिसंकल्पाची विरुढी। आणि [24]ते सर्वेचि मोडोनि [25]ये ढोंढी[26]। ब्रह्मगोळकांचा २२ तया एकैकाचा भीतरीं पाहिजे। तंव बीजाचाचि भरिला देखिजे। माजी होतिया जातिया नेणिजे। लेखं जीवा २३ मग तया ब्रह्मगोळकांचे अंशांश। प्रसवती आदिसंकल्प असमसहास। हे असो ऐसी बहुवस। सृष्टी वाढे २४ पारि दुजेनविण एकला। परब्रह्मींचि संचला। अनेकत्वाचा आला। पूर जैसा २५ तैसें समविषमत्व नेणों कैचें। वांयांचि चराचर रचे। पाहातां प्रसवतिया योनीचे। लक्ष दिसती २६ येरी जीवभावाचिये पालविये। कांहीं मर्यादा करूं नये। पाहिजे कवण हें आघवें विये। तंव मूळ तें शून्य २७ म्हणूनि कर्ता मुदल न दिसे। आणि [34]सेखीं कारणही कांहीं नसे। माजि कार्यचि आपैसें। वाढों लागे २८ ऐसा करितेनवीण गोचरु। अव्यक्तीं हा आकारु। निपजे जो व्यापारु। तया नाम कर्म २९

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम्। अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर॥ ४॥

आतां अधिभूत जें म्हणिपे। तेंहि सांगों संक्षेपें। तरी होय आणि हारपे। अभ्र जैसें ३० तैसें असतेपण आहेच। नाहीं होईजे हें साच। जयातें रूपा आणिती पांचैपांच। मिळोनियां ३१ भूतांतें अधिकरूनि असे। आणि भूतसंयोगें तरि दिसे। जें वियोगावेळे भ्रंशे। नामरूपादिक ३२ तयातें अधिभूत म्हणिजे। मग अधिदैवत पुरुष जाणिजे। जेणें प्रकृतीचें भोगिजे। उपार्जिलें ३३ जो चेतनेचा चक्षु। जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु। जो देहास्तमानीं वृक्षु। संकल्प विहंगमाचा ३४ जो परमात्माचि [46]पैरि दुसरा। [47]जो अहंकारनिद्रा निदसुरा।

मग सर्वेश्वर म्हणालेः—जे या फुटक्या आकारांत (देहांत) ओतप्रोत भरलेलें असून कोणत्याही वेळीं नाश पावत नाहीं; १५ बरें, त्याचा सूक्ष्मपणा पहावा, तर शून्यच आहे असें वाटेल, परंतु तसें नव्हे, तें किती सूक्ष्म आहे म्हणाल तर आकाशाच्या पदरांतूनही गाळून घेतलें आहे. १६ अशा प्रकारचें जें विरल आहे व जें प्रापंचिक ज्ञानाच्या मोटेंतून ( शरीरांतून ) हालवलें असतांही गळत नाहीं, त्याला 'परब्रह्म' असें म्हणतात; १७ आणि आकार म्हणजे शरीर, हें जन्मास आल्यानें परब्रह्म जन्म घेणें या धर्माचा अनुभव घेत नाहीं. (जन्मत नाहीं.) व तें शरीर नाश पावल्यावरही जे कधीं नाश पावत नाहीं. १८ हे सुभद्रापति, अशा रीतीनें ज्या ब्रह्माची आपल्याच ठिकाणीं निरंतर सहज स्थिति असते, त्याला "अध्यात्म" असें म्हणतात. १९ मग, निर्मळ आकाशांत नानारंगांचे ढग एकदम कसे उत्पन्न होतात हें, ज्याप्रमाणें कळत नाहीं, २० त्याचप्रमाणें त्या निराकार शुद्ध ब्रह्मांत प्रकृति–अहंकारादि भेदांनीं ब्रह्मांडाचे आकार होऊं लागतात. २१ परंतु कल्पनातीत शुद्ध ब्रह्माच्या माळ जमिनींत, मी बहुत प्रकारचा होईन अशा संकल्पाचा अंकुर उत्पन्न होऊन, त्याला लागलीच ब्रह्मांडाचे पुष्कळ घोंडे (आकार) उत्पन्न होतात. २२ प्रत्येक आकारांत पाहूं लागलें म्हणजे तो त्या बीजानें म्हणजे ब्रह्मानेंच भरला आहे असें दिसतें; आणि त्या प्रत्येकांत किती जीव होतात व जातात याची गणना करतां येत नाहीं. २३ मग त्या ब्रह्मांडाच्या गोलाचे प्रत्येक अंगापासून असंख्यात आदिसंकल्प उत्पन्न होतात. असो; अशा रीतीनें सृष्टीचा विस्तार होतो. २४ परंतु दुसऱ्या कोणाशिवाय एकटेंच परब्रह्म सर्वत्र भरलें असून अनेक रूपानें नटून पूर आल्याप्रमाणें भासतें. २५ त्याचप्रमाणें, स्थावरजंगम विश्वाची रचना कारण नसतां उगीच होऊन त्यांत अधिकउणेपणा कसा होतो, हें समजत नाहीं. परंतु पाहूं गेलें असतां लक्षावधि जाति उत्पन्न झालेल्या दिसतात. २६ या व्यतिरिक्त, नानाप्रकारच्या जीवांच्या विस्ताराची मर्यादा करतां येत नाहीं, ह्यांची कोणापासून उत्पत्ति होते हें पाहूं गेलें तर त्यांचें मूळ मायाच आहे. २७ म्हणून, मुळांत कर्त्याचा ठिकाण नसून आणि शेवटीं कांहीं कारणहीं नसतां मध्येंच कार्याची आपोआप वृद्धि होते. २८ अशाप्रकारें, अव्यक्ताच्या ठिकाणीं कर्त्यावांचून प्रत्यक्ष दिसणारा आकार उत्पन्न करण्याचा जो व्यापार, त्याला कर्म असें म्हणतात; २९

**अन्वयार्थ**—(क्षरः भावः)–विनाशी भाव हेंच–(अधिभूतं)–सर्व भूतांतील–प्राण्यांतील तत्त्व आहे.–(च)–आणि–(पुरुषः)–सर्वांच्या शरीरांत राहणारा पुरुष, हेंच–(अधिदैवतं)–अधिदैवत–देवांतील तत्त्व आहे.–( हे देहभृतां वर )–हे देहधारण करणारांतील श्रेष्ठ अर्जुना !–( अत्र देहे )–या देहांत –(अधियज्ञः)–अधियज्ञ–यज्ञाभिमानी देवता–(अहं एव)–मीच आहें. ४

आतां 'अधिभूत' ज्याला म्हणतात तें संक्षेपानें सांगतों–ज्याप्रमाणें ढग उत्पन्न होतात आणि लय पावतात, ३० त्याप्रमाणें, ज्याचें अस्तित्व लटकें असून खरोखर पाहूं गेलें असतां जें होत नाहीं व ज्याला पंचमहाभूतें एकत्र होऊन रूपाला आणतात, ३१ जें पंचमहाभूतांच्या आश्रयानें असतें, त्यांच्याच संयोगानें दृष्टीस पडतें. व विनाशकालीं लय पावतें, असें जें नांवरूप ३२ त्याला "अधिभूत" असें म्हणतात. मग अधिदैवत म्हणजे जीव असें समजावें. तो प्रकृतीनें उत्पन्न केलेल्या भोगांचा उपभोग घेतो. ३३ जो बुद्धीचा द्रष्टा, इंद्रियरूप देशाचा अधिपति व शरीराच्या अंतकालीं मनोरथरूप पक्ष्यांचा विसांवा घेण्याचा वृक्ष; ३४ जो प्रत्यक्ष दुसरा परमात्माच आहे, परंतु अहंकाररूप निद्रेंत

१ मोडकें–भोंकाचें शरीर. २ दाट भरलेलें. ३ गळत नाहीं. ४ बारिकपण. ५ पदरानें. ६ विरळ, सूक्ष्म. ७ अपंचाचें. ८ झोळींत. ९ जन्मलेपणें. १० आकाराच्या नाशानंतर. ११ नाश पावणें, मरणें. १२ निरंतर. १३ असणारी. १४ अर्जुना. १५ देहांतर्गत ब्रह्म (कूटस्थ किंवा प्रत्यगात्मा.) १६ गरद ढगांचा पडदा. १७ निराकार शुद्ध ब्रह्मांत. १८ प्रकृति अहंकारादिकांच्या. १९ आकार. २० कल्पनातीत शुद्ध ब्रह्माच्या. २१ माळजमिनींत. २२ मी बहुत प्रकारचा होईन या संकल्पाच्या. २३ अंकुर, वाढ. २४ ओंकार. २५ भरून लावतात. २६ घोंडे (आकार.) २७ ब्रह्मांड. २८ आंत पहावें तों. २९ भरलेला. ३० गणना. ३१ असंख्यात. ३२ स्थावरजंगम विश्व. ३३ उत्पन्न होणाऱ्या लाखों जाति दिसतात. ३४ शेवटीं. ३५ दिसणारा. ३६ नाशवंत. ३७ नाहींसें होतें. ३८ लटकें. ३९ पंचमहाभूतें परस्परांत आपापल्या अष्टमांश मिळाल्यानें (पंचीकरण होऊन पंचात्मक झालेलें). ४० आश्रय करून. ४१ जीव. ४२ उत्पन्न केलेलें. ४३ बुद्धीचा द्रष्टा. ४४ शरीराच्या अंतीं. ४५ मनोरथरूप पक्ष्यांच्या. ४६ परंतु. ४७ कारण, ४८ निजलेला.

म्हणोनि स्वप्नाचिया वोरबारा। संतोषें शिणे ३५ जीव येणें नांवें । जयातें आळे-
विजे स्वभावें । तें अधिदैवत जाणावें । पंचायतनींचें ३६ आतां इयेचि शरी-
रग्रामीं । जो शरीरभावातें उपशमी । तो अधियज्ञु एथ गा मी । पंडुकुमरा ३७
येर अधिदैवाधिभूत । तेहि मीचि कीर समस्त । पारि पंधरें किडाळा मिळत ।
तें काय सांकें नोहे ३८ तारि तें पंधरेपण न मैळे । आणि किडाळाचियाही
अंशा न मिळे । पारि जंव असे तयाचेनि मेळें । तंव सांकेंचि म्हणिजे ३९ तैसें
अधिभूतादि आघवें । हें अविद्येचेनि पाँलवें । झांकलें तंव मानावें । वेगळें ऐसें
४० तेचि अविद्येची जँवनिका फिटे । आणि भेदभावाची अँवधी तुटे । मग
म्हणों एक होऊनि जरी आटे । तरी काय दोनी होती ४१ पैं केशांचा गुंडाळा ।
वारि ठेविली स्फटिकशिळा । ते वारि पाहिजे डोळां । तंव भेदली [१] गमती ४२
पाठीं केश पँरौते नेले । आणि भेदलेपण काय नेणों जाहालें । तारि डांक दे-
ऊनि सांदिलें । शिळेतें काई ४३ ना ते अखंडचि आयँती । पारि संगें भिन्न
गमली होती । ते सारिलिया मागौती । जैसी कां तैसी ४४ तेवींचि अहंभावो
जाये । तरी ऐक्य तें आधींचि आहे । हेंचि साचें जेथ होये । तो अधियज्ञु
मी ४५ पैं गा आम्हीं तुज । सकळ यज्ञ कर्मज । सांगितलें का जें काज । मनीं
धरूनि ४६ तो हा सकळ जीवांचा विसांवा । नैष्कर्म्यसुखाचा ठेवा । पारि उ-
घड करूनि पांडवा । दाविजत असे ४७ पहिलिया वैराग्यइंधन परिपूर्ती । इंद्रि-
यानँळां प्रदीप्तीं । विषयद्रव्याचिया आहुती । देऊनियां ४८ मग वज्रासँन तेचि
उँर्वी । शोधूनि आधारमुद्रा बरवी । वेदिका रचे मांडवीं । शरीराच्या ४९ तेथ
संयमाग्नीचीं कुंडें । इंद्रियद्रव्याचेनि पँवाडें । यजिजती उदंडें । युक्तिघोषें ५०
मग मनप्राणसंयमु । हाचि हवनसंपदेचा संभ्रमु । येणें संतोषविजे निर्धूमु ।
ज्ञानानँळु ५१ ऐसेनि हें सकळ ज्ञानीं सँमर्पे । मग ज्ञान तें ज्ञेयीं हारपे । पाठीं
ज्ञेयाचि स्वरूपें । निखिल उरे ५२ तया नांव गा अधियँज्ञु । ऐसें बोलला जंव
सर्वज्ञु । तंव अर्जुन अतिप्राज्ञु । तया पातलें तें ५३ हें जाणोनि म्हणितलें देवें ।
पार्था परिसतु आहासि बरवें । या कृष्णाचिया बोलासवें । येरु सुखाचा जा-
हला ५४ देखा बालकाचिया धणी धाइजे । कां शिष्याचेनि जाहलेपणें हो-
इजे । हे सद्गुरूंचि एकलेनि जाणिजे । कां प्रसवंतिया ५५ म्हणोनि सात्त्विका-
भावांची मांदी । कृष्णाआंगीं अर्जुनाआधीं । न समातसे परी बुद्धी । सांव-

निजल्यामुळें ज्याला स्वप्नाच्या खटपटीनें संतोष व शीणही होतो; ३५ आणि ज्याला सहजच जीव असें म्हणतात व जो पंचभूतात्मक शरीराची मुख्य देवता आहे त्यास "अधिदैवत" म्हणतात. ३६ आतां, पांडुकुमरा, याच शरीररूप गांवांत जो शारीरिक उपाधीचा लय करितो, तो "अधियज्ञ" मी होय. ३७ एऱ्हवीं, अधिदैव व अधिभूत हें सर्व खरोखर मीच आहें; परंतु उत्तम कसाचें सोनें हिणकटाला मिळविल्यावर तें डागलग होत नाहीं का? ३८ तथापि त्याचा उत्तमपणा कमी होत नाही व तें हिणकटही होत नाहीं; परंतु जोंपर्यंत त्याच्याशीं एकत्र असतें, तोंपर्यंत त्याला डाकलगच म्हणतात; ३९ त्याचप्रमाणें, अधिभूतादि सर्व हे अज्ञानाच्या पदरानें जोंपर्यंत झांकलें आहेत, तोंपर्यंत वेगळे मानले पाहिजेत. ४० तोच अज्ञानाचा पदर गेल्यामुळें भेदभाव नष्ट झाला, मग त्यांची आटणी करूं म्हटलें तर ती मूळची काय दोन होती? ४१ असें पहा कीं, केंसांची गुंडाळी करून सांजवर स्फटिकाची शिळा ठेवल्यावर ती वरच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां जशी भंगलेली दिसते; ४२ पाठीमागून ते केंस एके बाजूस केल्यावर तिच्या चिरा कोणीकडे गेल्या हें समजत नाहीं; म्हणून ती शिळा डांक लावून जोडली आहे का? ४३ नाहीं; तर ती मूळची अखंडितच होती, परंतु केंसांच्या संगतीनें भंगलेली भासत होती, नंतर ते केंस एके बाजूस केल्यावर ती शिळा जशी होती तशीच दिसते. ४४ त्याचप्रमाणें. अहंभाव नाहींसा झाला म्हणजे ऐक्य हें मूळचेंच आहे व हें ऐक्य जेथें प्रत्ययास येतें तो अधियज्ञ मीच. ४५ हें पहा जो हेतु मनांत धरून, 'सर्व यज्ञ कर्मापासून झालेले आहेत' म्हणून आम्ही पूर्वी (चौथ्या अध्यायांत) तुला सांगितलें, तोच हा अधियज्ञ होय. ४६ हा सर्व जिवांचा विसावा असून ब्रह्मसुखाचा ठेवा आहे. पण, अर्जुना तुला तो स्पष्ट करून सांगतों. ४७ प्रथम वैराग्यरूप इंधनाच्या पूर्णतेनें इंद्रियरूप अग्नि पेटवून त्यांत विषयरूप द्रव्याची आहुति देतात; ४८ मग वज्रासन हीच भूमिका शुद्ध करून शरीररूपी मांडवामध्यें मूळबंधमुद्रेचा ओटा करतात, ४९ त्या ठिकाणीं इंद्रियनिग्रहरूप अग्नीच्या कुंडांत इंद्रियरूप होमद्रव्यें घालून योगमंत्रानें हवन करतात, ५० मग मन व प्राण यांचा निग्रह हीच होमाच्या द्रव्याची तयारी, इनें धुराशिवाय निर्दोष जो ज्ञानाग्नि त्याचा संतोष करितात. ५१ याप्रमाणें हें साहित्य ज्ञानांत अर्पण करून मग तें ज्ञान ब्रह्मांत लय पावतें; नंतर निव्वळ जें ब्रह्म, तेंच एकटें उरतें. ५२ त्यालाच अधियज्ञ म्हणजे ब्रह्म म्हणावें, असें ज्या वेळेस सर्वज्ञ श्रीकृष्ण बोलतात, तोंच महाबुद्धिवान अंसा अर्जुनाच्या ध्यानांत आलें. ५३ अर्जुनाला ब्रह्म समजलें असें देवांनीं जाणून ते म्हणाले 'तूं फार उत्तम प्रकारें ऐकतो आहेस.' असें श्रीकृष्ण बोलल्यावर अर्जुन संतोषित झाला. ५४ पहा कीं; तान्ह्या मुलाच्या तृप्तीनें आपण तृप्त व्हावें किंवा शिष्याच्या कृतार्थपणानें आपण कृतार्थ व्हावें, हें एक आई किंवा सद्गुरुच जाणतात. ५५ म्हणून अर्जुनाच्या पूर्वीच श्रीकृष्णाच्या अंगीं अष्टसात्त्विक भाव उत्पन्न होऊन मावेनातसे झाले; परंतु देवांनीं बुद्धि

१ खटपटींत. २ हाक मारावी, म्हणावें. ३ या पंचमहाभूतात्मक स्थानांतील (शरीरांतील). ४ लयातें पाववी. ५ कर्माप्रतानें. ६ पदरानें. ७ पडदा. ८ अंतर, मर्यादा. ९ फुटलीशी दिसते. १० एके बाजूस. ११ स्वाभाविक, मूळची १२ कर्मापासून झालेलें. १३ ब्रह्मसुखाचा. १४ वैराग्यरूपी जळणाच्या पुरवठ्यानें १५ पेटलेल्या इंद्रियरूपी अग्नींत. १६ शब्दस्पर्शादिकांच्या. १७ आधार, बंध. १८ पृथ्वी. १९ मूळबंधमुद्रा. २० यज्ञकुंडावरील ओटा. २१ इंद्रियनिग्रहरूप अग्नीची. २२ विस्तारानें, महत्त्वानें २३ योगमंत्रानें. २४ मन व प्राण यांचा निग्रह. २५ समारंभ. २६ धुराविरहित. २७ ज्ञानाग्नि. २८ अर्पण होतें. २९ जाणावयाचें जें ब्रह्म त्यामध्यें. ३० ब्रह्म. ३१ महाबुद्धिमान. ३२ समजलें, पटलें. ३३ तृप्तीनें तृप्त व्हावें. ३४ कृतार्थपणानें. ३५ मतीनें, ३६ समुदाय. ३७ मावत नाहीं.

रूनि देवें ५६ मग पिकलिया सुखाचा परिमळु । कीं निवालिया अमृताचा कल्लोळु । तैसा कोंवळा आणि सरळु । बोलु बोलिला ५७ म्हणे परिसणेयांचिया राया । आइकें बापा धनंजया । ऐसी जळों सरलिया माया । तेथ जौळितें तेंही जळे ५८

अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् । यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥५॥

जें आतांचि सांगितलें होतें । अगा अधियज्ञ म्हणितला जयातें । जे आदींचि तया मातें । जाणोनि अंतीं ५९ ते देह झोलें ऐसें मानुनी । ठेले आपणपें आपण होउनी । जैसा मठ गगना भरुनी । गगनींचि असे ६० ये प्रतीतीचिया माजघरीं । तया निश्चयाची वोवरी । आली म्हणोनि बाहेरी । नव्हेचि से ६१ ऐसें सबाह्य ऐक्य सचलें । मीचि होऊनि असतां रचिलें । बाहेरि भूतांचीं पांचही खवलें । नेणतांचि पडिलीं ६२ आतां उभयां उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गहन कवण तयाचें । म्हणोनि प्रतीतीचिये पोटींचें । पाणी न हाले ६३ ते ऐक्याची आहे वोतिली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली । जैसी सामरसेंसमुद्रीं धुतली । रुळेचिना ६४ पैं अथावीं घट बुडाला । तो आंतबाहेरी उदकें भरला । पाठीं दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे ६५ नातरी सर्पें कवंच सांडिलें । कां उबारेनें वस्त्र फेडिलें । तरी सांग पां काय मोडलें । अवेवांमाजीं ६६ तैसा आकारु हा आहाच भ्रंशे । वांचूनी वस्तु ते सांचलीचि असे । तेचि बुद्धि जालिया विसंकुसे । कैसेनि आतां ६७ म्हणोनि यापरी मातें । अंतकाळीं जाणतसाते । जे मोकलिती देहातें । ते मीचि होती ६८ एऱ्हवीं तरी साधारण । उरीं आदळलिया मरण । जो आठवु धरी अंतःकरण । तेंचि होइजे ६९ जैसा कवणु एकु काकुळती । पळतां पवनगती । दुपाउलीं अवचितीं । कुहांमाजि पडियेला ७० आतां तया पडणयाआरौतें । पडण चुकवावया पैरौतें । नाहीं म्हणोनि तेथें । पडावेंचि पैंडे ७१ तेविं मृत्यूचेनि अवसरें एकें । जें येऊनि जीवासमोर ठाके । तें होणें मग न चुके । भलतैयापरी ७२ आणि जागता जंव असिजे । तंव जेणें ध्यानें भावना भाविजे । डोळां लागतखेंवो देखिजे । तेंचि स्वप्नीं ७३

यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् । तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥६॥

तेविं जितेनि अवसरें । जें आवडोनि जीवीं उरे । तेंचि मरणाचिये मेरें । फार हों लागे ७४ आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे ।

आवरली व ५६ पूर्णतेस पावलेल्या सुखाच्या सुगंधाप्रमाणें किंवा शांत झालेल्या अमृताच्या लाटांप्रमाणें कोमल आणि सरळ असे बोल ते बोलूं लागले. ५७ मग म्हणतातः-श्रवण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ अशा अर्जुना, ऐक. बाबारे, माया जळून गेली म्हणजे मग तिला जाळणारें ज्ञानही जळून जातें. ५८

**अन्वयार्थ**—(च)-आणि-(अन्तकाले)-मरणसमयीं-(मां एव स्मरन्)-माझेंच स्मरण करणारा असा होत्साता-(कलेवरं मुक्त्वा)-शरीराचा त्याग करून-(यः)-जो-(प्रयाति)-जातो-(सः)-तो-(मद्भावं)-मद्भावास-वैष्णवतत्त्वास-(याति)-प्राप्त होतो,-(अत्र)-यांत-(संशयः)-संशय-(न अस्ति)-नाहीं. ५

अरे! आतांच मी ज्याला अधियज्ञ म्हणून सांगितलें होतें, त्या मला, जे अगोदर व प्राणांत समयींही जाणतात, ५९ ते देहाला मिथ्या मानून स्वतांचे ठिकाणींच ब्रह्मरूप होतात. ज्याप्रमाणें एकादें घर आकाशानें भरून आकाशांतच असतें, ६० त्याप्रमाण, अनुभवरूप माजघरांत त्याची निश्चयरूप खोली असते, म्हणून त्याला ब्रह्माशिवाय देहादिकांचें स्मरण नसतें. ६१ अशा प्रकारें जो अंतर्बाह्य ऐक्यतेमुळें मद्रूपच होऊन राहिला आहे, तो, बाहेरील पंचमहाभूतांचीं पांच कवचें (शरीर) हीं त्यास न कळतांच पडून जातात. ६२ जें शरीर जिवंत असतांही त्याची जो पर्वा बाळगीत नाहीं, तें पडल्यावर त्याचें दुःख कोणाला होणार? म्हणून अनुभवाच्या पोटांतलें पाणी हालत नाहीं. (अंतकालीं त्याचा ब्रह्मविषयींचा अनुभव ढळत नाहीं.) ६३ तो अनुभव केवळ ऐक्यभावानें ओतून अविनाशीपणाच्या हृदयांत घातला आहे, आणि तसाच पूर्णानंदसमुद्रांत धुतला आहे; म्हणून कामादिक मळांनीं तो मळत नाहीं. ६४ हें पहा-खोल पाण्यांत घट बुडाला असतां त्याच्या आंत व बाहेर पाणी असतें; पण दैवगत्या जर तो मागाहून फुटला, तर उदक फुटलें असें होतें का? ६५ किंवा सर्पानें कात टाकली, अथवा उष्णतेमुळें वस्त्र फेडून टाकलें, तर अवयवांत कांहीं बिघाड होतो का सांग बरें? ६६ त्याचप्रमाणें, वरवर दिसणारें मिथ्या शरीर जरी नाश पावलें, तरी ब्रह्म हें सर्वत्र भरलेलेंच आहे. आणि तें ब्रह्मच जर बुद्धि झाली तर मग तिला आतां कासाविशी कशाची? ६७ म्हणून अशा रीतीनें अंतकालीं माझें स्मरण ठेवून जे देह सोडतात, ते मद्रूप होतात. ६८ एऱ्हवीं साधारण नियम असा आहे कीं, मरण प्राप्त झालें असतां अंतःकरणांत ज्याचें स्मरण असतें, त्याप्रत तो पावतो. ६९ ज्याप्रमाणें एकादा भयभीत मनुष्य वाऱ्यासारखा पळत असतां मार्गांत अवचित विहिरींत पडतो; ७० त्या स्थितींत त्याला पडण्याच्या अगोदर पळण्याचा वेग आंवरून धरून पडणें चुकवितां येत नाहीं; म्हणून विहिरींत पडणें भाग पडतें. ७१ त्याचप्रमाणें, मृत्युसमयीं जीवासमोर जी वस्तु उभी राहते तद्रूपच (मरणानंतर) त्यास व्हावें लागतें. तें कोणत्याही उपायानें चुकत नाहीं; ७२ आणि मनुष्य जागा असतां त्याच्या मनांत ज्या कल्पना येतात, त्याच कल्पना झोंप लागल्यावर स्वप्नांत दिसूं लागतात. ७३

**अन्वयार्थ**—(वा कौन्तेय)-अथवा हे अर्जुना!-(यं यं अपि भावं)-ज्या ज्या पदार्थाचें-(स्मरन्)-स्मरण करीत-(अन्ते)-अंतसमयीं-(कलेवरं)-शरीराला-(त्यजति)-सोडतो,-(तं तं एव)-त्या त्या पदार्थालाच-(सदा)-सर्वदा-(तद्भावभावितः)-त्या पदार्थाच्या वासनेचा अभ्यास केलेला पुरुष-(एति)-प्राप्त होतो. ६.

त्याचप्रमाणें, जिवंत असतांना अंतःकरणांत ज्याची आवड असते, त्याविषयींचीच आवड अंतकालचे समयीं वृद्धिंगत होते; ७४ आणि मरणाच्या समयीं ज्या गोष्टीची आठवण असते, त्याच गतीला तो (मरणानंतर) पावतो.

---

१ लाट. २ श्रोत्यांमध्यें श्रेष्ठ. ३ जाळणारें (ज्ञान.) ४ मिथ्या. ५ देऊळ, घर. ६ कोठडी, खोली. ७ आंत बाहेर. ८ भरलें. ९ कवचें. १० उभें असलेल्यांस ११ संकट, कठीण. १२ पूर्णानंद समुद्रांत. १३ मळेना. १४ खोल पाण्यांत. १५ कात. १६ उष्णतेमुळें. १७ अवयवांमध्यें. १८ वरवरचा, मिथ्या. १९ ब्रह्म. २० बुद्धीनें जाणिलें असतां. २१ तत्पर. २२ जाणत असतां. २३ सोडितात. २४ दीनतेनें. २५ दोन पावलांत. २६ विहिरींत. २७ पडण्याच्या अगोदर. २८ दुसरें. २९ लागे. ३० कोणाच्याही तऱ्हेनें. ३१ कल्पना. ३२ लागतांच. ३३ जिवंत असतेसमयीं. ३४ हृदयांत. ३५ वेळीं. ३६ वृद्धिंगत.

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च । मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७ ॥

म्हणोनि सदां स्मरावें । मातेंचि तुवां ७५ डोळां जें देखावें । कां कानीं हन ऐकावें । मनीं जें भावावें । बोलावें वाचें ७६ तें आंत बाहेरी आघवें । मीचि करूनि घालावें । मग सर्वां काळीं स्वभावें । मीचि आहें ७७ अर्जुना ऐसें[2] जाहालिया । मग न[3] मरिजे देह गेलियां[4] । मा संग्रामु केलिया । भय काय तुज ७८ तूं मन बुद्धि सांचेंसीं । जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी । तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक[5] ७९ हेंच कायिसया[6] वरी होये । ऐसा जरी संदेहो वर्तता आहे । तरी अभ्यासूनि आदि पाहें । मग नव्हे तरी कोपें ८०

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना । परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥८॥

येणेंचि अभ्यासेंसीं योगु । चित्तासि करीं पां चांगु । अगा उपायबळें पंगु[7] । पहाड[8] ठाकी ८१ तेविं सदभ्यासें[9] निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर[10] । लावीं मग शरीर । राहो अथवा जावो ८२ जें नानागतीतें पाववितें । तें चित्त[11] वरील आत्मयातें । मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे ८३ पैं सरितेचेनि ओघें । सिंधुजळा मीनलें घोघें[12] । तें काय वर्तत आहे मागें । म्हणोनि पाहों येती ८४ ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेविं चित्ताचें चैतन्य[13] जाहालें । जेथ यातायात निमालें । घनानंद जें ८५

कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥

जयाचें आकारावीण असणें । जया जन्म ना निर्मणें[14] । जें आघवेंचि आघवेंपणें । देखत असे ८६ जें गगनाहून जुनें । जें परमाणुहूनि सानें[15] । जयाचेनि सन्निधानें[16] । विश्व चळे[17] ८७ जें सर्वांतें यया विये । विश्व सर्व जेणें[18] जिये । हेतु[19] जया बिहे[20] । अचिंत्य जें ८८ देखें वोळंबी[21] इंगळु न चरे । तेजीं तिमिर न शिरे । जें देहींचें[22] अंधारें । चर्मचक्षूसीं[23] ८९ सुसैंडा[24] सूर्यकणांच्या राशी । जो नित्य उदो ज्ञानियांसी । अस्तमानाचें जयासी । आडनांव नाहीं ९०

प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥

तया अव्यंगवाणेया[25] ब्रह्मातें । प्रयाणकाले[26] प्राप्ते । जो स्थिरावलेनि चित्तें । जाणोनि स्मरे ९१ बाहेरी पद्मासन[27] रचुनी । उत्तराभिमुख बैसोनि । जीवीं सुख सूनि[28] । क्रमयोगाचें ९२ आंतु मीनलेनि[29] मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें । आपेंआप

**अन्वयार्थ**—(तस्मात्)–त्याअर्थी–(सर्वेषु कालेषु)–सर्वकाळीं–अहोरात्र–(मां)–मला–(अनुस्मर)–आठव–माझें स्मरण कर–(च)–आणि–(युध्य)–युद्ध कर.–(मयि अर्पितमनोबुद्धिः)–माझ्या ठिकाणीं ज्यानें आपलें मन व बुद्धि अर्पिलीं आहेत असा तूं–(मां एव)–मलाच–(एष्यसि)–प्राप्त होशील–(असंशयः)–यांत संशय नाहीं. ॥

म्हणून तूं नेहमीं मलाच स्मरत जा. ७५ डोळ्यांनीं जें पहावें, किंवा कानांनीं जें ऐकावें, मनानें जें चिंतावें अथवा वाचेनें जें बोलावें, ७६ तें हृदयांत भासणारें व बाह्यदृष्टीला दिसणारें सर्व मीच आहें असें समजावें. मग सर्वत्र मीच आहें असें सहज तुला दिसेल. ७७ अर्जुना, याप्रमाणें सर्व गोष्टी मद्रूप आहेत, असें तुझ्या मनानें घेतलें, म्हणजे देह गेला तरी तूं मरणार नाहींस. मग युद्ध केलें असतां तुला भय कसलें आहे ? ७८ तूं मन आणि बुद्धि हीं खरोखर माझ्या स्वरूपास अर्पण करशील; तर मद्रूप होशील हें प्रतिज्ञापूर्वक तुला मी सांगतों. ७९ हें कशानें होईल, असा जर तुझ्या मनांत संशय येत असेल, तर अगोदरच याचा अभ्यास करून अनुभव घे, आणि जर मी म्हणतों त्याचप्रमाणें न होईल तर मग माझ्यावर रागाव. ८०

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)–हे अर्जुना–(अभ्यासयोगयुक्तेन)–चित्ताला माझ्या ठिकाणीं स्थिर करण्याचा वारंवार प्रयत्न करणें, याच अभ्यासरूप योगानें–उपायानें युक्त असलेल्या व–(नान्यगामिना)–मला सोडून दुसऱ्या कोणत्याहि विषयाकडे न जाणाऱ्या अशा–(चेतसा)–चित्तानें–(अनुचिन्तयन्)–पुरुषाचें ध्यान करणारा भक्त–(परमं दिव्यं पुरुषं)–निरतिशय, सूर्यमंडलांत व्यक्त होणाऱ्या पुरुषाला–(याति)–प्राप्त होतो. ८

याकरितां चांगल्या रीतीनें चित्ताची आणि अभ्यासाची गांठ घातली ( मनःपूर्वक अभ्यास केला ) तर, ज्याप्रमाणें लंगडा उद्योगबलानें पर्वतही चढूं शकतो, ८१ त्याप्रमाणें नेहमीं ब्रह्मविचाराचा अभ्यास करून चित्ताला आत्म्याचा छंद लाव, मग शरीर राहो अथवा जावो. ८२ नानागति पावविणारें असें चित्त जर आत्म्याला वरील, तर मग देह गेला की आहे याची आठवण कोण करील ? ८३ हें पहा–पाणी नदीच्या ओघानें घो घो करीत समुद्रास मिळण्यास चाललें म्हणजे मागें काय होत आहे हें पाहण्याकरितां परततें का ? ८४ नाहीं. तें समुद्रांत मिळाल्यावर समुद्रच होतें, त्याचप्रमाणें चित्त हें आत्मरूप झालें, म्हणजे जन्ममरणांच्या यातायाती चुकतात. कारण त्या ठिकाणीं परमानंदच भरलेला आहे. ८५

**अन्वयार्थ**—(यः) जो कोणी–(कविं)–सर्वज्ञ,–(पुराणं)–नित्य,–(अनुशासितारं)–सर्व जगाचा शास्ता,–(अणोः अणीयांसं)–सूक्ष्माहून अति सूक्ष्म–(सर्वस्य धातारं)–सर्व प्राण्यांना कर्मांचें फळ देणारा,–(अचिंत्यरूपं)–ज्याचें रूप अचिंत्य आहे,–(आदित्यवर्णं)–सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें ज्याचा नित्य चैतन्यप्रकाश आहे व जो–(तमसः परस्तात्)–अज्ञानलक्षण मोहान्धकाराच्या पलीकडे आहे, अशा माझें–ईश्वराचें मरणसमयीं–(अनुस्मरेत्)–ध्यान करितो तो त्यालाच प्राप्त होतो. ९

ज्याचें निराकार अस्तित्व, ज्याला जन्ममरण नाहीं, व जें सर्वव्यापकपणानें सर्वांस पाहतें; ८६ जें आकाशाच्या आधींचें, जें परमाणुहूनही सूक्ष्म, ज्याच्या सान्निध्यानें विश्वाचे व्यापार चालतात, ८७ ज्याच्यापासून ह्या सर्वांची उत्पत्ति होते, सर्व विश्व जगतें, व ज्याचें अनुमान करतां येत नाहीं; कारण तें अचिंत्य आहे. ८८ पहा–वाळवी कधीं इंगळ ( विस्तव ) खात नाहीं; तेजामध्यें अंधार शिरत नाहीं, व देहाविपर्यांचें अज्ञान ज्याच्या चर्मचक्षूंना दिसत नाहीं, ८९ जें निर्मळ अशा सूर्यरूप कणांच्या राशीसारखें आहे, व ज्ञान्याला नित्य उजेड करणारें आहे, व ज्याच्या ठिकाणीं अस्त असें अडनांवही नाहीं, ९०

**अन्वयार्थ**—(प्रयाणकाले)–मरणसमयीं–(भक्त्या)–भक्तीनें–(च)–व–(योगबलेन एव)–चित्ताचें समाधान, याच बळानें–(युक्तः)–युक्त होऊन–(भ्रुवोः मध्ये)–भुवयांच्या मध्यें–(प्राणं)–प्राणाला–(सम्यक्)–सावधानपणानें–(आवेश्य)–स्थापून–[यः–जो]–(अचलेन मनसा)–अचल मनानें–[अनुस्मरेत–अनुचिंतन करतो,]–(सः)–तो–(तं परं दिव्यं पुरुषं)–त्या श्रेष्ठ दिव्य पुरुषाला–(उपैति)–प्राप्त होतो. १०

त्या अव्यंग अशा ब्रह्माला जाणून, मरणकाल समीप आला असतां जो एकाग्र चित्तानें त्याचें स्मरण करितो; ९१ शरीराच्या ठिकाणीं पद्मासन घालून, उत्तरेस तोंड करून बसून आणि योगाभ्यासाच्या क्रमांत प्राप्त झालेलें सुख अंतःकरणांत सांठवून; ९२ अंतर्यामीं एकाग्र चित्तानें, स्वरूपप्राप्तीच्या प्रेमानें आपोआप ब्रह्मास

१ चिंतावें. २ आत्मानात्मविचारानें सर्व मद्रूप आहे असा निश्चय झाल्यावर. ३ देह गेला तरी अविनाशी आत्मा मरत नाहीं. ४ खरेपणानें. ५ प्रतिज्ञापूर्वक वचन. ६ कशानें. ७ लंगडा. ८ पर्वतावर चढतो. ९ सत्=चांगला किंवा ब्रह्मविचार, याचा अभ्यास. १० वळण, छंद, मार्ग. ११ अंगिकारील. १२ घों घों करीत. १३ ज्ञानस्वरूप, ज्ञानकला. १४ मरणें. १५ सूक्ष्म कणापेक्षां सूक्ष्म. १६ जवळ राहण्यानें. १७ व्यापार चालतात. १८ जगतें. १९ न्यायशास्त्राचें अनुमान. २० भितो. २१ वाळवी सर्व खाते, परंतु इंगळ खाऊं शकत नाहीं. २२ दिवसाढवळ्यां. २३ बाह्यदृष्टीला. २४ निर्मळ, स्वच्छ. २५ परिपूर्ण. २६ मरणसमय समीप आला असतां. २७ योगांतील पद्म या नांवाचें आसन. २८ घेऊनि. २९ एकवटलेल्या.

संभ्रमें मिळावया ९३ आकळलेनि योगें । मध्यमा मध्य मार्गें । अग्निस्थानौनि निगे । ब्रह्मरंध्रा ९४ तेथ अचेत चित्ताचा सांगातु । आहाचवाणा दिसे मांडतु । जेथ प्राणु गगनाआंतु । संचरे कां ९५ परी मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरला । योगबळें आवरला । सज्ज होऊनि ९६ तो जडाजडातें विरवितु । भ्रूलतामाजीं संचरतु । जैसा घंटानाद लयस्तु । घंटेसिच होय ९७ कां झांकलिया घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हां । या रीती जो पांडवा । देह ठेवी ९८ तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम । तें माझें निजधाम । होऊनि ठाके ९९

यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

सकळां जाणणेयां जे लोणी । तिये जाणिवेची जे खाणी । तयां ज्ञानियांचिये आयणी । जयातें अक्षरु म्हणिपे १०० चंडवातेंही न मोडे । तें गगनचि कीं फुडें । वांचूनि जरी होईल मेहुडें । तरी उरेल कैंचें १ तेविं जाणणेया जें आकळिलें । तें जाणिवलेपणेंचि उमाणलें । मग नेणवेचि तया म्हणितलें । अक्षर सहजें २ म्हणोनि वेदविद नर । म्हणती जयातें अक्षर । जें प्रकृतीसी पर । परमात्मरूप ३ आणि विषयांचें विष उलंडूनि । जे सर्वेंद्रिया प्रायश्चित्त देऊनि । आहाति देहाचिया बैसोनि । झाडातळीं ४ यापरी विरक्त । जयाची निरंतर वाट पाहात । निष्कामासि अभिप्रेत । सर्वदा जें ५ जयाचिया आवडी । न गणिती ब्रह्मचर्याची सांकडी । निष्ठुर होऊनि बापुडीं । इंद्रियें करिती ६ ऐसें जें पद । दुर्लभ आणि अगाध । जयाचिये थडिये वेद । चुबुकळिले ठेले ७ तें ते पुरुष होती । जे यापरी लया जाती । तरी पार्था हेंचि स्थिती । एक वेळ सांगों ८ तेथ अर्जुनें म्हणितलें स्वामी । हेंचि म्हणावया होतों पां मी । तंव सहजें कृपा केली तुम्हीं । तरी बोलिजो कां ९ परि बोलावें तें अति सोहोपें । तेथें म्हणितलें त्रिभुवनदीपें । तुज काय नेणों संक्षेपें । सांगेन ऐक ११० तरी मना या बाहेरिलीकडे । यावयाची सवयि सवे मोडे । हें हृदयाचिया डोहीं बुडे । तैसें कीजे ११

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च । मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥१२॥

परी हे तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें । सर्वद्वारीं कवाडें । कळासती १२

त्वरित मिळण्याकरितां, ९३ संपादिलेल्यां योगाच्या द्वारें सुषुम्नानाडीच्या मध्यमार्गानें अग्निस्थानापासून ब्रह्मरंध्रांत जाण्याकरितां निघतो; ९४ प्राण व चित्त यांची संगति आहे असें उगीच बाह्यात्कारी दिसतें; आणि प्राणाचा लय आकाशांत होतो, ९५ परंतु मनाच्या स्थिरतेनें जो बांधला गेला व ज्याचें अंतःकरण भक्तियुक्त झालें आहे, व जो योगाचे बळानें तयार होऊन मन आपल्या ताब्यांत ठेवितो, ९६ तो योगी चित्त व प्राण यांना भ्रुकुटीमध्यें आंवरून धरून, ज्याप्रमाणें घंटेचा नाद घंटेंतच लय पावतो, त्याप्रमाणें दोघांचा लय करतो. ९७ किंवा मडक्याखालील झांकलेला दिवा केव्हां नाहींसा होतो हें ज्याप्रमाणें समजत नाहीं, त्याप्रमाणें, अर्जुना, जो आपला देह ठेवतो, ( ब्रह्माकाशांत प्राणवायु नेऊन तो आत्मस्वरूपी केव्हां लीन होतो, हें समजूं न देतां आपला देह ठेवतो; ) ९८ तो केवळ परब्रह्म ज्याला परमपुरुष असें नांव आहे तो माझ्या निजस्वरूपाप्रत जाऊन मिळतो. ९९

**अन्वयार्थ**—(वेदविदः)–वेदार्थ जाणणारे–(यत्)–ज्याला –(अक्षरं)–अविनाशी–(वदन्ति)–म्हणतात–( वीतरागाः यतयः) ज्यांचा राग-आसक्ति नाहींशी झाली आहे, असे विरक्त यति –(यत् विशन्ति)–ज्यांत प्रवेश करितात–(यत् इच्छन्तः)– ज्याला जाणण्याची इच्छा करणारे–(ब्रह्मचर्यं)–ब्रह्मचर्यव्रत [गुरूपाशीं राहून]–(चरन्ति)–पाळतात–(तत् पदं)–तें अक्षरसंज्ञक पद–(ते)–तुला–(संग्रहेण)–संक्षेपानें–(प्रवक्ष्ये)–मी सांगेन.

जें ज्ञान म्हणजे सर्व ज्ञानांचा शेवट, व सगळ्या ज्ञानाची खाण, अशा बुद्धिमान् ज्ञानी पुरुषांनींही ज्याला ' अक्षर ' असें म्हटलें आहे. १०० प्रलयवातानें न मोडणारें असें एक खरोखर गगनच आहे; त्याच्याशिवाय, त्या वाऱ्यापुढें ढग आले असतां कसे टिकतील ? १ त्याचप्रमाणें, ज्ञान्याला जें समजलें तें ज्ञानाच्या मापांत आलें म्हणून तें क्षर (नाशवंत) होय; मग, जें जाणण्यास अशक्य, त्याला सहज अक्षर ( अविनाशी) असें म्हणतात. २ म्हणून वेदपारंगत पुरुष ज्याला अक्षर ( ब्रह्म ) असें म्हणतात, व जें मायेच्या पलीकडील असून सच्चिदानंदरूप आहे; ३ आणि विषयांचें विष ढवंडून ( इच्छा टाकून ) व सर्व इंद्रियांचें दमन करून देहरूपी झाडाच्या तळीं उदासीनवृत्तीनें बसलेले ४ विरक्त पुरुषही ज्याची नेहमीं वाट पहात असतात व जें नेहमीं निरिच्छ लोकांना आवडतें. ५ ज्याच्या आवडीकरितां योगिजन ब्रह्मचर्यादि संकटें जुमानीत नाहींत व निष्ठुरपणानें इंद्रियनिग्रह करितात, ६ असें जें दुर्लभ पद–ज्याचा अंत नाहीं व जें वेदालाही जाणतां आलें नाहीं; ७ मी सांगितल्याप्रमाणें जे देह ठेवितात, ते त्या पदाला प्राप्त होतात. म्हणून, पार्था, त्याजबद्दल आणखी एकवार तुला सांगतों. ८ त्यावेळेस अर्जुन म्हणतो, ' हे गुरो, मी आपल्यास आतां हेंच विचारणार होतों, तों आपण मजवर सहजच कृपा केली, तर आतां सांगण्यास सुरवात करावी; ९ परंतु काय सांगावयाचें तें अगदीं सोप्या रीतीनें मात्र सांगा. ' त्यावेळीं, त्रिभुवनदीप जे श्रीकृष्ण ते म्हणाले:–तुला कां आम्ही ओळखीत नाहीं ? तुला संक्षेपानें सांगतों. ११० तर मग, मनाची बाहेर हिंडण्याची स्वाभाविक संवय मोडून, तें हृदयडोहांत निमग्न होऊन राहील असें कर. ११

**अन्वयार्थ**—(सर्वद्वाराणि)–ज्ञानाच्या सर्व द्वारांचा–(संयम्य)–संयमन करून–(च)–आणि–(मनः)–मनाला–(हृदि)–हृदयकमलांत–(निरुध्य)–अडकवून, त्याला हृदयांतच अडवून धरून–(आत्मनः प्राणं)–आपल्या प्राणवायूलाहि सुषुम्नानाडीच्या द्वारा–( मूर्ध्नि )–मस्तकांत–(आधाय)–स्थापून–(योगधारणां)– योगधारणा धरण्यास–(आस्थितः)–प्रवृत्त झालेला [जो पुरुष,] तशीच धारणा धरीत असतांना,. १२

परंतु ज्या वेळेस इंद्रियांचीं द्वारें निग्रहानें बंद असतात, तेव्हांच ही गोष्ट घडते. १२ असें झालें

१ त्वरेनें मिळण्याकरितां. २ संपादन केलेल्या. ३ सुषुम्ना. ४ अग्निचक्रापासून ब्रह्मरंध्राकडे निघते. ५ देह व चैतन्य यांची संगत. ६ उगाच बाहेरून आहे असें दिसतें. ७ व्यापला. ८ तो प्राणवायु. ९ अचेतनाला व सचेतनाला. १० लीन करितो. ११ भ्रुकुटीमध्यें. १२ लीन होतो. १३ शेवट. १४ निर्णयानें, बुद्धीनें. १५ ब्रह्म, अविनाशी. १६ मोठ्या वाऱ्यानें. १७ खरें, स्पष्ट. १८ मेघ. १९ समजलें, २० मोजलें, अटकळींत आलें. २१ ब्रह्म, अविनाशी. २२ वेदार्थ पारंगत. २३ मायातीत. २४ ल्वंडून, ; पालथें करून. २५ आहेत. २६ इष्ट. २७ संकटें. २८ दुःख. २९ तीरीं. ३० लीन होऊन. ३१ दुर्लभ पद. ३२ सोपें. ३३ श्रीकृष्णानें. ३४ सहज. ३५ संवय. ३६ इंद्रियनिग्रहाचीं. ३७ खिळतात, बंद होतात.

यारि आपुलिया स्मरणाची उवाइली । हींवे ऐसी करीं साउली । ऐसेनि नित्य बुद्धि संचली । मी आणीं तयातें ३३ म्हणोनि देहांतींचें सांकडें । माझिया कहींचि न पडे । मी आपुलियातें आपुलीकडे । सुखेंचि आणीं ३४ वरचील देहाची गंवसणी फेडुनी । आहाच अहंकाराचे रजें झाडुनी । शुद्ध वासना निवडुनी । आपणपां मेळवी ३५ आणि भक्तां तरी देहीं । विशेष एकवंकीचा ठावो नाहीं । म्हणऊनि अंव्हेरु करितां कांहीं । वियोगु ऐसा न वाटे ३६ नातरी देहांतींचि मिया यावें । मग आपणपें यातें न्यावें । हेंही नाहीं स्वभावें । जे आधींचि मज मीनले ३७ । येरी शरीराचिया सैंलिलीं । असतेंपण हे साउली । वांचूनि चंद्रिका ते ठेली । चंद्रींच आहे ३८ ऐसे जे नित्ययुक्त । तयांसि सुलभ मी सतत । म्हणऊनि देहांतीं निश्चित । मीचि होती ३९ मग क्लेशतरूची वाडी । जे तापत्रयाग्नीची सेंगडी । जे मृत्युकाकासी कुरोंडी । सांडिली आहे १४० जें दैन्याचें दुभतें । जें महाभयातें वाढवितें । जें सकळ दुःखाचें पुरतें । भांडवल ४१ जें दुर्मतीचें मूळ । जें कुकर्माचें फळ । जें व्यामोहाचें केवळ । स्वरूपचि ४२ जें संसाराचें बैसणें । जें विकाराचें उद्यानें । जें सकळ रोगांचें भोणें । वाढिलें आहे ४३ जें काळाचा खिचु उशिटा । जें आशेचा आंगवठा । जन्ममरणाचा वोलिंवटा । स्वभावें जें ४४ जें भुलीचें भरिव । जें विकल्पाचें वोतिंव । किंबहुना पेंव । विंचुवांचें ४५ जें व्याघ्राचें क्षेत्र । जें पेण्यांगनाचे मित्र । जें विषयविज्ञानयंत्र । सुपूजित ४६ जें लांवेचा कळवळा । निवालिया विषोदकाचा गळाळा । जें विश्वासु आंगवळा । संवचोरांचा ४७ जें कोढियाचें खेंवें । जें काळसर्पाचें मार्दव । गोरियेचे स्वभाव । गायन जें ४८ जें वैरियाचा पाहुणेरु । जें दुर्जनाचा आदरु । हें असो जें सागरु । अनर्थाचा ४९ जें स्वप्नीं देखिलें स्वप्न । जें मृगजळें सांसिन्नले वन । जें धूम्ररजांचें गगन । ओतलें आहे १५० ऐसें जें हें शरीर । तें ते न पवतीचि पुढती नर । जे होऊनि ठेले अपार । स्वरूप माझें ५१

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन । मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ॥१६॥

एऱ्हवीं ब्रह्मपणाचिये भेंडसे । न चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे । पारि निर्वटलियाचें जैसें । पोट न दुखे ५२ नातरी चेइलियानंतरें । न बुडिजे स्वप्नींचेनि महापूरें । तेवीं मातें पावले ते संसारें । लिंपतीचि ना ५३ एऱ्हवीं जगदाकाराचे सिरें । जें चिरस्थायीयांचे धुरे । ब्रह्मभुवन गा चंवरें । लोकाचळाचें

त्यावर माझ्या स्मरणाची आल्हाददारक व थंडगार अशी सावली करतों; आणि अशा प्रकारें, ज्यांची बुद्धि नेहमीं मजकडे स्थिर असते, त्यांना मी आपल्या स्वरूपीं आणितों. ३३ म्हणून, देहाच्या अंतःकाळचें दुःख माझ्या भक्तास कधींही होत नाहीं, व माझा जो भक्त आहे त्याला मी सुखानें आपल्याकडे आणतों. ३४ आत्म्यावरील देहरूप गवसणी काढून व मिथ्या (खोटा) अहंकाराचा धुराळा झाडून केवळ भगवत्प्राप्तीच्या वासनेनें त्याला मद्रूप करतों; ३५ आणि भक्तालाही देहाचे ठिकाणीं ऐक्य वाटत नसल्यामुळें (प्रेम नसल्यामुळें) त्याचा त्याग करतांना, त्याची व आपली ताटातूट होते, असें वाटत नाहीं. ३६ कारण, देहाच्या अंतसमयीं भगवंतांनीं पावावें आणि आपलेजवळ न्यावें, असेंही त्यांच्या मनांत येत नाहीं; कां कीं, ते पूर्वीच मद्रूप झालेले असतात; ३७ याशिवाय, त्यांच्या त्या शरीररूप पाण्यांत आत्मा आहे असें दिसतें खरें; परंतु तो प्रतिबिंबाप्रमाणें मिथ्या आहे. ज्याप्रमाणें चांदणें जरी बाहेर पसरलेलें दिसतें, तरी खरोखर पाहूं गेलें असतां चंद्राचेंच ठिकाणीं तें असतें. ३८ अशा बोधानें माझ्याशीं जे युक्त झालेले आहेत, त्यांना मी नेहमीं जवळच आहें, म्हणून ते मरणानंतर निश्चयानें मद्रूप होतात. ३९ मग, जें (शरीर) क्लेशरूप झाडांचें वन, जें तापत्रयरूप अग्नीची शेगडी, जें मृत्युरूप कावळ्यास बळी दिलें आहे, १४० जें दरिद्र वाढविणारें, जें मृत्यूचें भय वाढविणारें, जें सर्व दुःखांचें पूर्ण भांडवल, ४१ जें वाईट बुद्धीचें मूळ, जें पूर्वजन्मींच्या वाईट कर्मांचें फळ, जें भ्रांतीचें केवळ स्वरूपच, ४२ जें संसाराची बसण्याची जागा, जें अहंकारादि विकारांची बाग, जें सर्वव्याधींचें वाढलेलें ताटच ४३ होय; जें काळानें चघळून टाकलेला उष्टा खिचडा, जें आशेचें आंगबळ, जें स्वभावतः जन्ममरणाला ओल देणारें, १४४ जें भ्रांतीनें भरलेलें, जें वाईट कल्पनांचें ओतलेलें, किंबहुना विंचवांचें पेवच होय; ४५ जें वाघांची जाळी, जें वेश्यांचे मित्र म्हणजे मनाला वेश्यांप्रमाणें मोह घालणारें, जें विषय जाणण्याचें उत्तम यंत्रच होय; ४६ जें जखिणीच्या दयेचें ठिकाण व विषयरूपी थंड पाण्याचा घोंट, जें स्नेहभावानें वागणाऱ्या चोराच्या बळकट विश्वासाप्रमाणें होय; ४७ जें कोडानें ग्रस्त झालेल्या मनुष्याचें आलिंगन, जें महाविषारी सर्पाच्या अंगाप्रमाणें मऊ, पण, जें पारध्याच्या साहजिक गायनाप्रमाणें मधुर, ४८ जें वैऱ्याच्या पाहूणचाराची मेजवानी, जें दुर्जनांनीं केलेलें आगतस्वागत; फार काय सांगावें! जें अनर्थाचा समुद्रच होय, ४९ जें स्वप्नांत पडलेलें स्वप्न, जें मृगजळाचें तयार झालेलें वन, व जें धुराच्या रजांनीं भरलेलें आकाश, १५० तें हें शरीर, मद्रूप होऊन राहिलेल्या पुरुषांना पुनः प्राप्त होत नाहीं. ५१

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)-हे अर्जुना! -(आब्रह्मभुवनात् लोकाः)—ब्रह्मलोकापर्यंत-ब्रह्मलोकासह सर्वलोक-(पुनरावर्तिनः) —पुनः आवर्तन पावणारे-पुनरावृत्ति-पुनर्जन्म घेणारे—पुनः उत्पन्न होणारे आहेत.-(तु)-परंतु-(कौंतेय)-हे कुंतिपुत्रा-(मां)-मला-(उपेत्य)-प्राप्त होऊन-(पुनर्जन्म)-पुनः जन्म -(न विद्यते)—नाहीं. १६.

एऱ्हवीं ब्रह्मपणाची घमेंड असणाऱ्यांना सुद्धां (ब्रह्मदेवाला सुद्धां) पुनर्जन्माचे फेरे चुकत नाहींत, परंतु मेलेल्या मनुष्याचें जसें पोट दुखत नाहीं, ५२ किंवा जागृत झाल्यावर जसें स्वप्नांतल्या महापुरांत कोणी बुडत नाहीं; त्याप्रमाणें, जे माझ्याप्रत पावले, ते संसारानें लिप्त होत नाहींत. ५३ एऱ्हवीं, चौदा भुवनांचें जें शिखर, जें सप्तचिरंजीवांमध्यें अग्रभागीं असणारें व त्रैलोक्यरूप पर्वताचें मस्तक जें ब्रह्म-

१ शांत, सुखकर. २ गार, सौम्य. ३ स्थिर. ४ माझ्या भक्तांना. ५ मिथ्या. ६ धुरळा. ७ भगवत्प्राप्तीची वासना. ८ देहाशीं तादात्म्याचा. ९ तिरस्कार. १० उदकांत. ११ सत्ता. १२ प्रतिबिंब. १३ चांदणें. १४ मद्रूप. १५ वाग. १६ अध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हाच अग्नि. १७ शेगडी. १८ मृत्युरूप कावळ्याला. १९ बळी. २० मृत्युभयाला. २१ जेवणाचें ताट. २२ उष्टी, खिचडी. २३ शरीरबांधा. २४ वहाती वाट. २५ शेत. २६ बाजारबसव्या वेश्यांचें. २७ विषय जाणण्याचें यंत्र. २८ उत्तम.

२९ जखिणीचा. ३० दयेचें ठिकाण. ३१ घोंट. ३२ भरंवशाचा. ३३ सहवास. ३४ स्नेहभावानें वागणाऱ्या चोराचा. ३५ कोडानें ग्रस्त झालेल्याचें. ३६ आलिंगन. ३७ मऊपणा. ३८ फासे पारध्याचें. ३९ सहाजिक. ४० पाहूणचार. ४१ तयार झालेलें. ४२ धुराच्या कणाचें. ४३ मोठेपणानें. ४४ भोंवरे. ४५ मेलेल्याचें. ४६ जागें झाल्यावर. ४७ लिप्त होत नाहींत. ४८ चौदा भुवनांचें. ४९ मस्तक. ५० (सप्त) चिरंजीवांचें. ५१ अग्रस्थानीं. ५२ डोक्टमाथा. ५३ त्रैलोक्यरूप पर्वताचें.

जिये गांवींचा पहार दिवोवरी । एका अमरेंद्राचें आयुष्य न धरी ।
ोनि पाँतीं उठी एकसरी । चवदाजणांची ५५

सहस्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदुः । रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥

जैं चौकडिया सहस्र जाये । तैं ठाये ठावो विळेचि होये । आणि तैसेंचि सहस्र-
ये पाहें । रात्री जेथ ५६ येवढे अहोरात्र जेथिंचें । तेणें न लोटती जे भाग्याचे ।
ती ते स्वर्गींचे । चिरंजीवें ५७ येरां सुरगणांची नवाई । विशेष सांगावी येथ काई ।
ल इंद्राचीचि दशा पाही । जे दिहाँचे चौदा ५८ परि ब्रह्मयाच्याहि आठां पाहा-
ं । आपुलिया डोळां देखते । जे आहाति गा तयांतें । अहोरात्रविद म्हणिपे ५९

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे । रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥
भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते । रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

तये ब्रह्मभुवनीं दिवसें पाहे । ते वेळीं गणना केंही न समाये । ऐसें अ-
क्ताचें होये । व्यक्त विश्व १६० पुढती दिहांची चौपाहारी फिटे । आणि हा
कारसमुद्र आटे । पाठीं तैसाचि मग पाहांटे । भरों लागे ६१ शारदीये-
ये प्रवेशीं । अभ्रें जिरती आकाशीं । मग ग्रीष्मांतीं जैशी । निगती पुढती
२ तैशी ब्रह्मदिनाचिये आदी । हे भूतसृष्टीची मांदी । मिळे जंव सहस्रा-
धीं । निमित्त पुरे ६३ पाठीं रात्रींचा अवसरु होये । आणि विश्व अव्यक्तीं
या जाये । तोही युगसहस्र मोटका पाहे । आणि तैसेंचि रचे ६४ हें सांगा-
या काय उपपत्ती । जे जगाची प्रळयो आणि संभूती । इये ब्रह्मभुवनींचिया
ोती । अहोरात्रामाजीं ६५ कैसें थोरियेचें मान पाहें पां । जो सृष्टिबीजाचा
टोपा । परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहाली ६६ एऱ्हवीं त्रैलोक्य हें
नुर्धरा । तिये गांवींचा गा पसारा । तो हा दिनोदयीं एकसरा । मांडत असे
७ पाठीं रात्रींचा समो पावे । आणि अपैसाचि सांठवे । म्हणिये जेथिंचें तेथ
वभावें । साम्यासि ये ६८ जैसें वृक्षपण बीजासि आलें । कीं मेघ हें गगन
जाहालें । तैसें अनेकत्व जेथ सामावलें । तें साम्य म्हणिपे ६९

परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः । यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥

तेथ समविषम न दिसे कांहीं । म्हणोनि भूतें हे भाष नाहीं । जेविं दूधचि
जाहालिया दहीं । नामरूप जाय १७० तेविं आकारलोपासरिसें । जगाचें ज-
गपण भ्रंशे । परि जेथें जाहालें तें जैसें । तैसेंचि असे ७१ तैं तया नांव स-
हज अव्यक्त । आणि आकारा वेळीं तेंचि व्यक्त । हें एकास्तव एक सूचित ।

भुवन, ५४ ज्या ब्रह्मलोकाच्या एक प्रहर दिवसापर्यंत एका इंद्राचें आयुष्य टिकत नाहीं, व एका दिवसांत एकदम चौदा इंद्रांचा निकाल लागतो; ५५

**अन्वयार्थ**—(ते अहोरात्रविदः जनाः)–दिवस व रात्र यांना जाणणारे ते प्रसिद्ध जन–(यत् ब्रह्मणः अहः)–जो ब्रह्मदेवाचा दिवस–[तत्] (सहस्रयुगपर्यन्तं)–तो एक सहस्र युगांनीं संपणारा–(च)–व–(रात्रिं)–रात्र–(युगसहस्रान्तां)–सहस्र युगांनीं संपणारी आहे, असें–(विदुः)–जाणतात. १७

चार युगें हजार वेळां जातील, तेव्हां ब्रह्मदेवाचा खरो-खर पुरा एक दिवस होतो; आणि तशीच हजार चौकड्यांची जेथें रात्र आहे, ५६ एवढा दिवस व रात्र जेथें आहे, तेथें जे भाग्यवान् पुरुष आहेत, ते मरत नाहींत व त्या दिवस-रात्री पाहतात, ते स्वर्गलोकचे चिरंजीव होत. ५७ एऱ्हवीं, जेथें मूळ इंद्राचीच दशा अशी आहे, कीं, एका दिवसांत चौदा इंद्र होतात, तेथें देवगणांची काय प्रतिष्ठा वर्णन करावी ? ५८ परंतु ब्रह्मदेवाच्याही आठ प्रहराला जे आपल्या डोळ्यांनीं पहातात, त्यांना ( ब्रह्मदेवाचे ) दिवस व रात्र जाणणारे असें म्हणतात. ५९

**अन्वयार्थ**—(अहरागमे)–ब्रह्मदेवाचा दिवस उगवला असतां,–( अव्यक्तात् )–ब्रह्मदेवाच्या स्वापावस्थेपासून–(सर्वाः व्यक्तयः)–स्थावर-जंगमरूप सर्व प्रजा–(प्रभवन्ति)–अभिव्यक्त होतात.–(रात्र्यागमे)–ब्रह्मदेवाची रात्र झाली असतां,–(तत्र एव अव्यक्तसंज्ञके)–त्याच अव्यक्त नांवाच्या स्वापावस्थेंत–(प्रलीयन्ते) –प्रलीन होतात. (हे पार्थ)–हे अर्जुना !–(सः एव अयं भूतग्रामः)–तोच हा भूतसमुदाय–प्राण्यांचा समूह–(भूत्वा भूत्वा) –पुनः पुनः उत्पन्न होऊन–(रात्र्यागमे)–ब्रह्मदेवाची रात्र झाली असतां–(अवशः)–परतंत्र होऊन–कर्माधीन होऊन–(प्रलीयते)–प्रलीन होतो व ब्रह्मदेवाचा–(अहरागमे)–दिवस उगवला असतां–प्रजापति जागा झाला असतां, कर्माधीन होऊनच ती प्राणिसमूह–(प्रभवति)–उत्पन्न होतो. १८–१९

त्या ब्रह्मलोकीं दिवस ज्यावेळेस उगवतो त्यावेळेस निराकाराचें साकार विश्व अशा रीतीनें उत्पन्न होतें कीं, त्याची मोजदाद करवत नाहीं. १६० पुढें त्या दिवसाचे चार प्रहर संपल्यावर हें विश्व नाहींसें होतें; आणि पुनः पहाट झाली म्हणजे पहिल्याप्रमाणें भरूं लागतें. ६१ शरत्कालाच्या आरंभीं अभ्रें आकाशांत नाहींतशीं होतात, आणि तीच ग्रीष्मऋतूचे शेवटीं पुनः उत्पन्न होतात, ६२ त्याचप्रमाणें, ब्रह्मदेवाच्या दिवसाचे आरंभीं ह्या भूतसृष्टीचा समुदाय एकत्र होतो, व तो चार युगें हजार वेळ जात तोंपर्यंत असतो. ६३ मागाहून ब्रह्मदेवाचे रात्रीचा समय आला असतां हें विश्व निराकारांत लय पावतें, तेंही पूर्वोक्त काल गेल्यावर उदयकालीं पूर्ववत् होतें. ६४ अशा रीतीनें विश्वाची रचना होते, हें सांगण्याचा कोणता उद्देश म्हणशील, तर या ब्रह्मदेवाच्या दिवसांत आणि रात्रींत जगाची उत्पत्ति आणि लय होतो. ६५ त्याच्या थोरपणाची योग्यता कशी आहे म्हणून पाहूं गेलें तर, तो ब्रह्मदेव सृष्टीच्या बीजाचें भांडार आहे पण तोही जन्ममरणांच्या मापाचा कळस झाला आहे. ६६ हे धनुर्धरा, एऱ्हवीं ही त्रैलोक्यसृष्टि सत्यलोकचा पसारा असून, ब्रह्मदेवाचा दिवस उगवल्याबरोबर हा एकसारखा मांडला जातो, ६७ मागाहून रात्रीचा समय झाला असतां तो आपोआप अव्यक्तांत लय पावतो; व हें पंचभूतादिक ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें सहज जेथल्या तेथें लय पावतें. ६८ ज्याप्रमाणें झाड हें बीजरूपांत सामावतें, किंवा मेघ हे आकाशांत लीन होतात, त्याप्रमाणें, ज्या ठिकाणीं प्रकृतीच्या ठिकाणीं पुष्कळ वस्तूंचा समावेश होतो, त्याला 'साम्य' असें म्हणतात. ६९

**अन्वयार्थ**—(तु)–परंतु–(तस्मात् अव्यक्तात्)–त्या अव्यक्ताहून–(परः)–निराळा–(अन्यः)–अगदीं विलक्षण–(अव्यक्तः) –इंद्रियांचा विषय न होणारा व–(सनातनः)–नित्य असा– (यः भावः)–जो भाव आहे–(सः)–तो–(सर्वेषु भूतेषु नश्यत्सु) –सर्व भूतें नाश पावत असतांहि–(न विनश्यति)–स्वतः नाश पावत नाहीं. २०

त्या साम्यांत न्यूनाधिक कांहीं दिसत नाहीं म्हणून तें भूत हें नांव पावत नाहीं. ज्याप्रमाणें दुधाचें दहीं झाल्यावर त्याचें (दुधाचें) नांव व रूप हीं नाहींतशीं होतात, १७० त्याप्रमाणें आकाराचा नाश झाल्याबरोबर जगाचें जगपण नाहींसें होतें; परंतु ज्यापासून हें झालें आहे, तें तसेंच्या तसेंच असतें, ७१ तेव्हांच त्याला 'अव्यक्त' असें म्हणतात; आणि साकार होतें त्यावेळीं त्यालाच व्यक्त म्हणतात, हीं एकाला एक दाखविणारी

१ ब्रह्मलोकरूप गांवांचा. २ प्रहर. ३ एक दिवस. ४ इंद्राचें. ५ टिकत नाहीं. ६ एका दिवसांत. ७ पंक्ति. ८ एकदम. ९ चार युगांची चौकडी. १० खरोखर, वास्तविक. ११ ब्रह्मदेवाचा दिवस होतो. १२ तशाच हजार चौकड्यांपर्यंतची. १३ दिवस व रात्र. १४ मरत नाहींत. १५ बहुत काळ जगणारे. १६ प्रतिष्ठा. १७ एका दिवसाचे. १८ ब्रह्मदेवाचे दिवस व रात्र जाणणारे. १९ स्पष्ट, साकार. २० दिवसांची. २१ चार प्रहर. २२ अपार, चराचर दृश्यमान जग. २३ शरत्काळाचे. २४ ग्रीष्म ऋतूच्या शेवटीं. २५ समुदाय. २६ समय. २७ निराकारीं. २८ लहान. २९ उद्देश. ३० उत्पत्ति. ३१ थोरपणाचें. ३२ योग्यता. ३३ कोठार, सांठवण. ३४ सत्यलोकींचा. ३५ रचला जातो. ३६ समय. ३७ मूळ स्वरूपांत लीन होतें. ३८ मूळ स्वरूपास येणें. ३९ न्यूनाधिक. ४० मोठी. ४१ आकृती नाशाबरोबर. ४२ नाहींसें होतें.

एऱ्हवीं दोनी नाहीं ७२ जैसें आटलिया रुपें । आटलेपण ते [1]खोटी म्हणिपे । पुढती तो [2]घनाकारु हारपे । जे वेळीं अळंकार होती ७३ हीं दोन्ही जैशीं होणीं । एकीं साक्षिभूत [3]सुवर्णीं । तैसी [4]व्यक्ताव्यक्ताची [5]कडसणी । [6]वस्तूंच्या ठायीं ७४ तें तरी व्यक्त ना अव्यक्त । नित्य ना नाशवंत । या दोहीं [7]भावाअतीत अनादिसिद्ध ७५ जें हें विश्वचि होऊनि असे । पारि विश्वपण नासिलेनि न नासे । अक्षरें पुसिल्या न पुसे । अर्थु जैसा ७६ पाहें पां तरंग तरी होत जात । पारि तेथ उदक तें अखंड असत । तेवीं भूतांभावीं न [8]नाशत । अविनाश जें ७७ नातरी आटलिये अळंकारीं । [9]नाटतें [10]कनक असे जयापरी । तेवीं मरतिये जीवाकारीं । अमर जें आहे ७८

अव्यक्तोऽक्षरं इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् । यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥
पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया । यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥२२॥

जयातें अव्यक्त म्हणों ये [11]कोडें । म्हणतां स्तुति हे ऐसें [12]नावडे । जें मन-बुद्धि न सांपडे । म्हणऊनियां ७९ आणि आकारा आलिया जयाचें । निराकारपण न [13]वचे । आकार लोपें न विसंचे[14] । नित्यता गा १८० म्हणोनि [15]अक्षर जें म्हणिजे । तेवींचि म्हणतां बोधुहि उपजे । जयापरौता [16]पैसु न देखिजे । या नाम [17]परमगती ८१ पारि आघवा इहीं देहपुरीं । आहे निजेलियाचे परी । जे व्यापारु करवी न करी । म्हणऊनियां ८२ एऱ्हवीं जे [18]शरीरचेष्टा । त्यांमाजी एकही न [19]ठके गा सुभटा । दाहीं इंद्रियांचिया वाटा । [20]वाहतचि आहाती ८३ [21]उकलूनि विषयांचा [22]पेटा । होत मनाचा [23]चोहटा । तो सुखदुःखाचा [24]राजवांटा । [25]भीतराहि पावे ८४ पारि रावो [26]पहुडलिया सुखें । जैसा देशींचा व्यापारु न [27]ठके । प्रजा आपुलालेनि [28]अभिलाखें । करितचि असती ८५ तैसें बुद्धीचे हन जाणणें । कां मनाचें घेणें देणें । इंद्रियांचें करणें । [29]स्फुरण [30]वायूंचें ८६ हे [31]देह-क्रिया आघवी । न करितां होय बरवी । जैसा न [32]चेलवितेनि रवी । लोकु चाले ८७ अर्जुना तया परी । [33]सुतला ऐसा आहे शरीरीं । म्हणोनि [34]पुरुषु गा अवधारीं । म्हाणिपे जयातें ८८ आणि [35]प्रकृति पतिव्रते । पडिला एकपत्नीव्रतें । येणेंहि कारणें जयातें । पुरुषु म्हणों ये ८९ पैं वेदाचें [36]बहुवसपण । देखेचिना जयाचें आंगण । हें गगनाचें [37]पांघरूण । होय देखा १९० ऐसें जाणूनि योगीश्वर । जयातें म्हणती [38]परात्पर । जें [39]अनन्यगतीचें घर । [40]गिंवसीत ये ९१ जे तनू वाचा चित्तें[41] । नाइकती दुजिये गोष्टीतें । तयां एकनिष्ठेचें पिकतें । सुक्षेत्र

आहेत, परंतु पाहूं गेलें असतां दोन्ही नाहींत. ७२ ज्याप्रमाणें रुपें आटल्यावर त्या आकाराला लगड म्हणतात, पुढें त्याचे दागिने बनल्यावर ती लगड नाहींशी होते; ७३ हीं दोन्हीं रूपांतरें जशी एका रुप्यावर किंवा सोन्यावर होतात, त्याचप्रमाणें, व्यक्त व अव्यक्त हे दोन्ही विचार ब्रह्माच्याच ठिकाणीं होतात. ७४ तें ब्रह्म तर व्यक्त नाहीं आणि अव्यक्तही नाहीं, नित्य नाहीं आणि अनित्यही नाहीं; या दोन्ही स्थितींच्या पलीकडलें अनादिसिद्ध असें आहे. ७५ तें ब्रह्म विश्वाकार होऊन राहतें, परंतु विश्वपण त्याला गेलें तरी तें लय पावत नाहीं. ज्याप्रमाणें अक्षरें पुसून टाकली तरी त्यांचा अर्थ पुसला जात नाहीं, ७६ पहा की, उदकावर तरंग येतात व जातात, परंतु उदक हें कायमच असतें, त्याप्रमाणें, भूतें नाहींतशीं झालीं असतां अविनाशी परब्रह्म नाश पावत नाहीं. ७७ किंवा अलंकार आटल्यावर सोनें जसें आटलें जात नाहीं, त्याचप्रमाणें मृत्यु पावणारे शरीरांत जें अमर आहे; ७८

**अन्वयार्थ**—(यः अव्यक्तः अक्षरः इति उक्तः)–जो हा अव्यक्त व अक्षर म्हणून म्हटलेला भाव–(तं)–त्यालाच–(परमां गतिं)–परमा गति–(आहुः)–म्हणतात–(यं)–ज्या भावाला –(प्राप्य)–प्राप्त होऊन–(न निवर्तन्ते)–पुनःसंसारमार्गांत परत येत नाहींत–(तत् मम परमं धाम)–तें माझें परम स्थान –परम पद आहे.–(हे पार्थ)–हे अर्जुना !–(यस्य अन्तःस्थानि भूतानि)–ज्याच्या आंत हीं सर्व भूतें आहेत व–(येन इदं सर्वं ततं)–ज्यानें हें सर्व व्यापलें आहे–(सः परः पुरुषः)–तो परम पुरुष–(अनन्यया भक्त्या तु)–अनन्य भक्तीनेंच–(लभ्यः)–प्राप्त होण्याजोगा आहे. २१–२२

ज्याला कौतुकानें अव्यक्त म्हटलें असतां त्याची स्तुति केली असें वाटत नाहीं; कारण जें मन व बुद्धि यांना सांपडत नाहीं; ७९ जें आकाराला आलें असतांही ज्याचें निराकारपण जात नाहीं, व आकाराचा नाश झाला असतां त्याची नित्यता बिघडत नाहीं, १८० म्हणून ज्याला 'अक्षर' नाश न पावणारें म्हणतात, त्याचा अक्षर म्हणण्यांतच बोध उत्पन्न होतो; याच्या पलीकडे कशाचाही विस्तार दिसत नाहीं, आणि याचेंच नांव परमगति. ८१ परंतु तें या शरीरांत व्यापून राहिलेलें असून निजल्याप्रमाणें आहे. कां की, तें व्यापार करवीत नाहीं व करीतही नाहीं. ८२ हे महावीरा अर्जुना, एऱ्हवीं शरीराच्या सर्व व्यापारांत एकही व्यापार रहात नाहीं; दहाही इंद्रियांचे व्यापार चालूच आहेत. ८३ विषयरूप बाजार उघडून मनाच्या चव्हाट्यावर व्यापार सुरू झाल्यावर, त्यापासून होणाऱ्या सुखदुःखांचा मुख्य हिस्सा अंतर्यामी अंतःकरणालाही प्राप्त होतो; ८४ परंतु राजा सुखानें निजला असतां ज्याप्रमाणें त्याच्या राज्यांतील व्यापार रहात नाहींत, प्रजा आपल्या प्रीतीच्या इच्छेनें व्यापार करीतच असते, ८५ त्याप्रमाणें, बुद्धीचें जाणणें किंवा मनाचें घेणेंदेणें, इंद्रियांचें करणें, व प्राणवायूचें स्फुरण पावणें, ८६ हे सर्व देहव्यापार त्यानें न करवितां आपोआपच होतात. ज्याप्रमाणें सूर्यानें न चालवितां त्याच्या प्रकाशानें लोकत्रय चालतें, ८७ त्याप्रमाणें, अर्जुना, तो शरीरांत निजल्यासारखा स्वस्थ आहे, म्हणून त्याला पुरुष म्हणतात असें समज. ८८ आणि मायारूप पतिव्रतेच्या एकपत्नीव्रतांत पडल्यामुळेंही हा पुरुष हें नांव पावला आहे. ८९ परंतु वेदानें पुष्कळ तऱ्हेनें विचार केला तरी ज्याचें आंगणही दृष्टीस पडत नाहीं, व ज्याच्यांत आकाशाचा समावेश झाला आहे, १९० असें जाणूनच योगीजन त्याला जीव व प्रकृति यांच्या पलीकडचा म्हणतात, तो एकनिष्ठ भक्तांचा शोध करीत त्यांचे घरीं येतो. ९१ जो एकनिष्ठ भक्त कायावाचामनेंकरून दुसरें कांहीं जाणत नाहीं, त्याच्या एकनिष्ठेचें

१ लगड. २ गोळा, लगड. ३ रुप्यांत (सु=चांगला वर्ण, ज्याचा). ४ साकारनिराकाराचा. ५ विचार. ६ ब्रह्माच्या ठिकाणीं. ७ स्थितींच्या पलीकडचें. ८ भूतें नाहींशीं झालीं असतां. ९ न आटणारें. १० सुवर्ण. ११ कौतुकानें. १२ न वाटे. १३ जात नाहीं. १४ बिघडे. १५ नाश न पावणारें. १६ विस्तार, ठिकाण. १७ ब्रह्मप्राप्ति. १८ देहव्यापार. १९ बंद रहात नाहीं. २० चालतच. २१ उघडून. २२ बाजार, पेठारा. २३ चव्हाटा. २४ राजाहिस्सा. २५ आंत राहणाऱ्याचें ठिकाणीं (जीवाला.) २६ निजला असतां. २७ बंद रहात नाहीं. २८ इच्छेनें. २९ चलन. ३० प्राणवायूचें. ३१ देहव्यापार. ३२ चालवितां. ३३ निजला. ३४ पुरि=शरीरांत, शेते=निजतो. ३५ माया. ३६ व्यापकबुद्धि. ३७ व्यापक. ३८ जीव व प्रकृति यांचे पलीकडला. ३९ एकनिष्ठतेचें. ४० शोधीत. ४१ कायावाचामनेंकरून. ४२ उत्तम शेत.

जें ९२ हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तमु । ऐसा साच जयाचा मनोधर्मु। तया आस्तिकाचा आश्रमु । पांडवा गा ९३ जें निगर्वाचें गौरव । जें निर्गुणाची जाणिव । जें सुखाची रोणिव । निराशांसी ९४ जें संतोषियां वाढिलें ताट। जें अचिंता अनाथाचें मायपोट । भक्तीसी उजू वाट । जया गांवा ९५ हें एकैक सांगोनि वायां । काय फार करूं धनंजया । पैं गेलिया जया ठाया। तो ठांवोचि होइजे ९६ हिंवाचिया झुळुका । जैसें हिंवचि पडे उष्णोदका । कां समोर जालिया अंर्का । तमचि प्रकाशु होय ९७ तैसा संसारु जया गांवा । गेला सांता पांडवा । होऊनि ठाके आघवा । मोक्षाचाचि ९९ तरि अग्नीमाजि आलें । जैसें इंधनचि अग्नि जहालें । पाठीं न निवडेचि कांहीं केलें । काष्ठपण ९८ नातरी साखरेचा मांघौता । बुद्धिमंतपणेंही करितां । पारि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी २०० लोहाचें कनक जहालें । हें एकें परिसेंचि केलें । आतां आणिक कैंचें तें गेलें । लोहत्व आणी १ म्हणोनि तूप होऊनि माघौतें । जेवीं दूधपणा न येचि निरुतें । तेविं पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं २ तें माझें परम । सांचोकारें निजधाम । हें अंतुवेंट तुज वर्म । दाविजत असे ३

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः । प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥२३॥

तेवींचि आणिकेंही एके प्रकारें । हें जाणतां आहे सोपारें । तरि देह सांडितेनि अवसरें । जेथ मिळती योगी ४ अथवा अवचटें ऐसें घडे । जे अनवसरें देह सांडे । तरि माघौतें येणें घडे । देहासीचि ५ म्हणोनि काळेशुद्धी जरी देह ठेविती । तरी ठेवितखेवो ब्रह्मचि होती । एऱ्हवीं अकाळीं तरी येती । संसारा पुढती ६ तैसें आयुंष्य आणि पुनरावृत्ती । या दोन्ही अवसरा आधीन आहाती । तोचि अवसरु तुजप्रती । प्रसंगें सांगों ७ तरि ऐकें गा सुभटा । पातलिया मरणाचा माजिवटा । पांचै आपुलालिया वाटा । निघती अंतीं ८ ऐसा वरिपडिलां प्रयाणकाळीं । बुद्धीतें भ्रमु न गिळी । स्मृति नव्हे आंधळी । न मरे मन ९ हा चेतना वर्गु आघवा । मरणीं दिसे टवटवा । परि अनुभविलिया ब्रह्मभावा । गंवसणी होऊनि २१० ऐसा सावध हा समवावो । आणि निर्याणवेऱ्हीं निर्वाहो । हें तरीच घडे सावावो । अग्नीचा आथी ११ पाहां पां वारेनें कां उदकें । जैं दिवियाचें दिवेपण झांके । तैं असतीच काय देखे । दिठी आपुली १२ तैसें देहांतींचेनि विषमवातें । देह आंत बाहेरी श्लेष्मांआंतें । तैं विझोनि जाय उजितें । अग्नीचें तें १३ ते वेळीं प्राणासि प्राणु नाहीं । तेथ

दीक देणारें तें उत्तम स्थान होय. ९२ हे पांडवा, हें त्रैलोक्य भगवद्रूप आहे असा खरोखर ज्यांचा मनोभाव आहे, त्या आस्तिक भक्तांचा हा आश्रमच होय. ९३ जें निरभिमान्यांचें वैभव, जें गुणातीतांचें ज्ञान व जें निस्पृहांचें सुखोपभोग घेण्याचें स्थान (राज्य) ९४ जें संतोषीजनांचें जेवण, जें संसाराची चिंता न करणाऱ्या शरणांगतांचें मायपोट; व जें भक्तीनें चालणाराला मोक्षरूपी गांवांची सरळ वाट. ९५ धनंजया, असें एकेक सांगून उगीच किती वर्णन करूं? परंतु ज्या ठिकाणीं गेलें असतां मनुष्य तद्रूपतेला पावतो. ९६ थंडीच्या झुळुकेनें जसें ऊन पाणी थंड होतें, किंवा सूर्य उगवल्यावर अंधारच प्रकाशरूप होतो, ९७ त्याप्रमाणें, पांडवा, अज्ञान व त्याचें कार्य जग ज्या परमात्मरूपी गांवाला गेलें असतां जें आपणच मोक्ष होऊन रहातें. ९८ तसेंच, लांकूड विस्तवांत घातलें असतां विस्तवच होऊन रहातें, व मागून निवडूं गेलें असतां त्याचें लांकूडपण दृष्टीस पडत नाहीं; ९९ किंवा, पांडुसुता, ज्याप्रमाणें साखर झाल्यावर पुनः चातुर्यानेंही तिचा ऊंस करितां येत नाहीं. २०० लोखंडाचें एक वेळ परिसानें सोनें केलें, नंतर कोणता दुसरा असा पदार्थ आहे कीं, त्याचें गेलेलें लोखंडपण परत आणील? १ म्हणून तुपाचें ज्याप्रमाणें पुनः खरोखर दूध होत नाहीं, त्याप्रमाणें, ज्याप्रत गेलें असतां पुनः जन्म नाहीं. २ तेंच माझें खरोखर उत्तम ठिकाण होय. हें गुह्य वर्म तुला स्पष्ट करून सांगितलें आहे. ३

**अन्वयार्थ**—(तु भरतर्षभ)—पण हे अर्जुना !–(योगिनः) –योगी व कर्मी–(यत्र काले)–ज्या वेळीं–(प्रयाताः)–मरून गेले असतां–(अनावृत्तिं)–मोक्षाला–(च एव)–आणि–(आवृत्तिं) –पुनर्जन्माला–(यान्ति)–प्राप्त होतात–(तं कालं)–तो काल मी तुला–(वक्ष्यामि)–सांगेन.-२३

त्याचप्रमाणें, देहावसानानंतर ज्या स्वरूपाला योगी प्राप्त होतात, तें गुह्य वर्म आणखी एक प्रकारानें समजण्याला सोपें आहे. ४ अथवा अकस्मात् असें घडतें कीं, जे योगी अकालीं देह सोडतात, त्यांना पुनः देह धारण करावा लागतो; ५ म्हणून, शास्त्रोक्त शुद्ध कालीं जर देहाचें अवसान झालें, तर तत्क्षणीं ते योगी ब्रह्म होतात. एऱ्हवीं अकालीं देहावसान झाल्यावर पुनः जन्मास येतात. ६ त्याचप्रमाणें मोक्ष व पुनर्जन्म हीं दोन्हीं कालाच्या स्वाधीन आहेत, असा जो काल तो प्रसंगानुसार तुला सांगतों. ७ तर, हे महावीरा अर्जुना, ऐक. मरणकाल समीप आला असतां शेवटीं पंचमहाभूतें आपापल्या रस्त्यानें जातात. ८ असा मरणकाल प्राप्त झाला असतां बुद्धीला भ्रांति मिळीत नाहीं, स्मरणशक्ति अंधळी होत नाहीं, व मनही मरत नाहीं. ९ असा हा सर्व ज्ञानसमुदाय टवटवीत असून अनुभविलेल्या ब्रह्मभावाचाच बोध असतो. २१० अशा रीतीनें हा समुदाय सावध असतो; व ज्याला मरेपर्यंत इंद्रियांची मदत असते, असें बाह्य जठराग्नि प्रदीप्त असला म्हणजेच मिळतें. ११ पहा कीं, वाऱ्यानें किंवा पाण्यानें ज्या वेळेस दिव्याचा प्रकाश नाहींसा होतो त्या वेळेस आपले डोळे चांगले असतांही त्यांना कांहीं दिसतें का? १२ त्याचप्रमाणें देहावसानाच्या वेळेचा वात वाढल्यानें शरीर आंतबाहेर कफानें व्याप्त होऊन जठराग्नीचें तेज विझून जातें. १३ त्या वेळेस प्राणाला अवसान नसतें, मग बुद्धि असूनही काय

१ भगवद्रूप. २ महत्त्व. ३ ज्ञान. ४ राज्य. ५ निस्पृहांचा. ६ चितारहित. ७ शरणागतांचें. ८ ठिकाणच. ९ थंडीच्या. १० सूर्य. ११ अंधार. १२ अज्ञान व त्याचें कार्य जग. १३ गेला असतां. १४ जळण. १५ निवडतां येत नाहीं. १६ पुनः १७ कोणता दुसरा. १८ निश्चयेंकरून. १९ पुनः संसार, जन्म. २० खरोखर. २१ अंतरंगांतील. २२ सोपें. २३ अकस्मात्. २४ अकालीं. २५ शास्त्रोक्त शुद्धकालीं. २६ ठेवल्याबरोबर. २७ मह्याशीं ऐक्य. २८ समय आहेत. २९ माजुम, कैफ. ३० पंचमहाभूतें. ३१ प्राप्त झालेल्या. ३२ भ्रांती. ३३ प्राणसमुदाय. ३४ टवटवीत. ३५ ब्रह्मभास संरक्षण. ३६ ऐक्यभाव. ३७ मरेपर्यंत. ३८ मदत. ३९ सहाय्य. ४० जठराग्नीचा. ४१ विद्यमान. ४२ वायु प्रकोपानें. ४३ कफव्याप्त. ४४ तेज.

बुद्धि असोनि करील काई । म्हणोनि अग्नीविण देहीं । चेतना न थरे १४ अगा देहींचा अग्नि जरी गेला । तरी देह नव्हे[२] चिखलु वोला । वायां आयुष्यवेळु आपुला । आंधारें गिंवसी १५ आणि मागील स्मरण आघवें । तें तेणें अवसरें सांभाळावें । मग देह त्यजूनि मिळावें । स्वरूपीं कीं १६ तंव तया देह श्लेष्माचे चिखलीं । चेतनाचि बुडोनि गेली । तेथ मागिली पुढिली हे ठेली । आठवण सहजें १७ म्हणोनि आधीं अभ्यासु जो केला । तो मरण न येतांचि निमोनि[३] गेला । जैसें ठेवणें न दिसतां मालवला । दीपु हातींचा १८ आतां असो हें सकळ । जाण पां ज्ञानासि अग्नि मूळ । तया अग्नीचें प्रयाणीं बळ । संपूर्ण आथी १९

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् । तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥२४॥

आंत अग्निज्योतीचा प्रकाशु । बाहेरी शुक्लपक्षु आणि दिवसु । आणि सा[४]मासांमाजि मासु । उत्तरायण २२० ऐशिया सम[५]योगाची निरुती[६] । लाहोनि[७] जे देह ठेविती । ते ब्रह्मचि होती । ब्रह्मविद[८] २१ अवधारीं गा धनुर्धरा । येथवरी सामर्थ्य यया अवसरा[९] । तेवींचि हा उजू मार्ग स्वपुरा[१०] । यावया पैं २२ एथ अग्नी हें पहिलें पायतरें । ज्योतिर्मय[११] हें दुसरें । दिवस जाणें तिसरें । चौथें शुक्लपक्ष २३ आणि सामास उत्तरायण । तें वरचील[१२] गा सोपान[१३] । येणें सायु[१४]ज्यसिद्धिसदन । पावती योगी २४ हा उत्तम काळु जाणिजे । यातें अर्चिरादि[१५] मार्गु म्हणिजे । आतां अकाळु[१६] तोही सहजें । सांगेन आईक २५

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् । तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥२५॥

तरि प्रयाणाचिये[१७] अवसरें । वातश्लेष्मां[१८] सुभरें[१९] । तेणें अंतःकरणीं आंधारें । कोंदलें[२०] ठाके २६ सर्वेंद्रियां लांकुड[२१] पडे । स्मृति भ्रमामाजि बुडे । मन होय वेडें । कोंडे प्राण २७ अग्नीचें अग्निपण जाये । मग तो धूमचि अवघा होये । तेणें चेतना[२२] गिंवसिली[२३] ठाये । शरीरींची २८ जैसें चंद्राआड आभाळ । सदट[२४] दाटे सजळ[२५] । मग गडद[२६] ना उजाळ[२७] । ऐसें झांवळें[२८] होय २९ कां मरे ना सावध । ऐसें जीवितासि पडे स्तब्ध । आयुष्य मरणाची मर्याद । वेळु ठाकी २३० ऐसी मनबुद्धिकरणीं[२९] । सभोंवतीं धूमाकुळाची[३०] कोंडणी । तेथ जन्मे जोडलिये वाहणी । युगाचि बुडे ३१ हां गा हातींचें जे वेळीं जाये । ते वेळीं आणिका लाभाची गोठी कें आहे । म्हणऊनि प्रयाणीं तंव होये । येतुली दशा ३२ ऐसी देहाआंतु स्थिती । बाहेरि कृष्णपक्षु वरि राती । आणि

करणार ? म्हणून अग्नीशिवाय देहांत चेतना रहात नाहीं. १४ हें पहा-शरीरांतील जठराग्नि जर नाहींसा झाला, तर तो देह नसून ओला चिखलच होय. अशा वेळेस साधक आपल्या आयुष्याची वेळ अंधेरांत चांचपटल्यासारखी घालवीत असतो. १५ अशा स्थितींत मागील अभ्यासाचें स्मरण ठेवून देह टाकून स्वरूपाच्या ठिकाणी मिळावें हें घडावें कसें ? १६ त्यावेळेस तर त्या देहांतील कफाच्या चिखलांत चेतना बुडून गेल्यामुळें मागील व पुढील गोष्टींचें स्मरण नाहींसें होतें. १७ म्हणून पूर्वी जो योगाभ्यास केला तो मरण येण्याच्या आधींच नाश पावतो; आपण अंधारांत ठेविलेली वस्तु सांपडण्यापूर्वी जसा दिवा जावा त्याप्रमाणें होतें. १८ आतां या सर्व गोष्टी राहूं दे; ज्ञानाला जठराग्नि हा मूळ कारण आहे, आणि त्या जठराग्नीची मरणसमयीं ज्याला पूर्ण साह्यता आहे. १९

**अन्वयार्थ**—(अग्निः)-'अग्नि' या नांवाची कालाभिमानिनी देवता-(ज्योतिः)-'ज्योति' या नांवाची कालाभिमानिनी देवता-(अहः)-दिवसाची अभिमानिनी देवता-(शुक्लः)-शुक्लपक्षाभिमानिनी देवता-( षण्मासाः उत्तरायणं )-उत्तरायणाच्या सहा महिन्यांची देवता, या देवता ज्यांत आहेत -(तत्र)-त्या मार्गांत-(प्रयाताः)-शरीर सोडलेले-मेलेले-(ब्रह्मविदः जनाः)-ब्रह्मोपासक-ब्रह्माचें ध्यान करणारे जन क्रमानें-(ब्रह्म)-ब्रह्माला-(गच्छन्ति)-प्राप्त होतात. २४

शरीराच्या आंत जठराग्नीच्या ज्योतीचा प्रकाश आणि बाहेर उत्तरायणापैकीं कोणत्याही महिन्यांचा शुद्ध पक्षाचा दिवस. ( रात्र नव्हे. ) २२० अशा प्रकारें सर्व चांगले योग असतां जे ब्रह्माभ्यासी पुरुष आपला देह ठेवितात, ते ब्रह्मस्वरूपी मिळतात. २१ धनुर्धरा, ऐक. या वेळेच्या योगाचें ( तत्कालाभिमानी देवतांचें ) असें विलक्षण सामर्थ्य आहे, म्हणून मोक्षप्राप्तीकरितां, स्वस्वरूपीं येण्यास हा सरळ मार्ग आहे. २२ या मार्गांत जठराग्नि ही पहिली पायरी होय; अग्नीचें सतेजपण ही दुसरी पायरी; दिवस ही तिसरी पायरी; शुक्लपक्ष ही चौथी पायरी; २३ आणि उत्तरायणांतील सहा महिन्यांपैकीं एक महिना ही जिन्याची वरची पायरी, अशा क्रमानें गेल्यावर योगी मोक्षसिद्धिरूप घराला पावतो. २४ हा उत्तर काल असें समज, आणि यालाच अर्चिरादि मार्ग असें शास्त्रांत म्हणतात. आतां, मरण्यास योगीसाधकांना अयोग्यकाल कोणता, तो प्रसंगानुसार तुला सांगतों, ऐक. २५

**अन्वयार्थ**—(धूमः)-धूमाभिमानिनी देवता-(रात्रिः)-रात्रीची देवता-( तथा )-त्याचप्रमाणें-( कृष्णः )-कृष्णपक्षाची देवता-(षट् मासाः दक्षिणायनं)-दक्षिणायनाच्या सहा महिन्यांची देवता-(तत्र)-या देवता ज्या मार्गांतील चिन्हें आहेत त्या मार्गांत-[प्रयातः] (योगी)-मरून गेलेला कर्मठ-(चांद्रमसं ज्योतिः)-चंद्रांतील ज्योतीला-कर्मफलाला-(प्राप्य)-प्राप्त होऊन त्याचा भोगानें क्षय होतांच-(निवर्तते)-तेथून परत येतो. २५

मरणसमयीं कफवातादि दोषांच्या अति भरानें अंतःकरणांत अंधार होऊन जातो. २६ सर्व इंद्रियांची गति कुंठित होते; स्मृतीला भ्रम उत्पन्न होतो; मन वेडावून प्राण घोंटाळतो; २७ जठराग्नि विझून जातो, व त्याचा धूर चोंहीकडे होतो, त्यामुळें शरीरांतील ज्ञान आच्छादित होतें. २८ ज्याप्रमाणें चंद्राच्या आड दाट व पाण्यानें भरलेलें ढग आल्यावर धड अंधार ना प्रकाश असें सांवळें सांवळें होतें; २९ त्याचप्रमाणें तो मरतही नाहीं व सावधही नसतो. अशा रीतीनें जीविताची स्थिति झालेली असते, व आयुष्य हें मरणाची वेळ पहात असतें. २३० अशा प्रकारें मन, बुद्धि, व इंद्रियें यांच्या सभोंवती धूर अतिशय कोंडतो, त्या वेळेस जन्मभर मिळविलेले सर्व लाभ नाश पावतात. ३१ हें पहा ज्या वेळेला हातांत असलेलें जातें त्या वेळीं दुसरीकडून आणखी लाभ होईल, याची गोष्टच कशाला ! म्हणून मरणसमयीं अशी दशा प्राप्त होते. ३२ याप्रमाणें देहाच्या आंतील स्थिति असून बाहेर कृष्णपक्षाचा पंधरवडा असतो, व त्यांत रात्र आणि दक्षिणायनांतील सहा महिन्यांपैकीं एक महिना

१ जीवकळा. २ गतायुष्यांतील. ३ नाश पावला. ४ उत्तरायणांतील सहा महिन्यांपैकीं कोणता तरी एक महिना. ५ सर्व गोष्टींची. ६ सिद्धी, सिद्धता. ७ प्राप्त करून घेऊन. ८ ब्रह्मवेत्ते, ज्ञानी. ९ समयाला. १० मोक्षास. ११ पायरी. १२ तेजःपुंज. १३ सर्वांच्या वरचा जिना. १४ सायुज्यमुक्ति, चौथी मुक्ति, मोक्ष. १५ सूर्यकिरणद्वारा जाण्याचा जो ऊर्ध्वगतिक मार्ग तो. १६ अयोग्य काळ. १७ मरणकाळीं. १८ कफवातादि दोषांच्या. १९ भरानें. २० भरून. २१ लांकडासारखी दशा येते, काष्टवत् पडतात. २२ ज्ञान, जीवकला. २३ प्रगट होण्याची, भासण्याची बंद होते. २४ भरगच्च. २५ पाण्यानें युक्त. २६ अंधार. २७ प्रकाश, उजेड. २८ धुंधुक. २९ मन, बुद्धि व इंद्रियें यांच्या सभोंवती. ३० अति धुराची.

सामासही वोढवती । दक्षिणायन ३३ इये पुनरावृत्तीचीं घरोणीं । आघवीं एकवटती जयाचिया प्रयाणीं । तो स्वरूपसिद्धीची कोंहाणी । कैसेनि आइके ३४ ऐसा जयाचा देह पडे । तया योगी म्हणोनि चंद्रवरी जाणें घडे । मग तेथूनि मागुता बहुडे । संसारा ये ३५ आम्हीं अकाळु जो पांडवा । म्हणितला तो हा जाणावा । आणि हाचि धूम्रमार्गु गांवा । पुनरावृत्तीचिया ३६ येर तो अर्चिरादि मार्गु । तो वसंता आणि असेलगु । सावियां स्वस्त चांगु । निवृत्तीवरी ३७

शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते । एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः ॥ २६ ॥

ऐशिया अनादिया दोन्ही वाटा । एकी उँजू एकी अव्हांटा । म्हणऊनि बुद्धिपूर्वक सुभटा । दाविलिया तुज ३८ कां जे मार्गामार्ग देखावे । साच लटिकें वोळखावें । हिताहित जाणावें । हिताचिलागीं ३९ पाहें पां नाव देखतां बरवी । कोणी औंड घाली काय अथावीं । कां सुपंथ जाणोनिया अडवीं । रिगवत असे २४० जो विष अमृत वोळखे । तो अमृत काय सांडूं शके । तेविं जो उजू वाट देखे । तो अव्हांटा न वचे ४१ म्हणोनि फुडें । पारखावें खरें कुडें । पारखिलें तरी न पडे । अवसरें कहीं ४२ एऱ्हवीं देहांतीं थोर विषम । या मार्गाचें आहे संभ्रम । जन्में अभ्यासिलियाचें हन काम । जाईल वायां ४३ जरी अर्चिरादि मार्गु चुकलिया । अवचटें धूम्रपंथें पडलिया । तरी संसारपांथीं जुंतलिया । भंवतचि असावें ४४ हे सायास देखोनि मोठे । आतां कैसेनि पां एकवेळ फिटे । म्हणोनि योगमार्गु गोमटे । शोधिले दोन्ही ४५ तंव एकें ब्रह्मत्वा जाइजे । आणि एकें पुनरावृत्ती येइजे । पारि दैवगत्या जो लाहिजे । देहांतीं जेणें ४६

नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन । तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥

ते वेळीं म्हणितलें हें नव्हे । वायां अवचटें काय पावे । देह त्यजूनि वस्तु होआवें । मार्गेंचि कीं ४७ तरी आतां देह असो अथवा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों । कां जे दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनी ४८ मज तरंगपण असे कीं नसे । ऐसें हें उदकासी कांहीं प्रतिभासे । तें भलतेव्हां जैसें तैसें । उदकचि कीं ४९ तरंगाकारें न जन्मेचि । ना तरंगलोपें न निमेचि । तेविं देहीं जे देहेंचि । वस्तु जाहले २५० आतां शरीराचें तयाचिया ठाईं । आडनांवही उरलें नाहीं । तरी कोणें काळें काई । निमे तें पाहें पां ५१ मग मार्गातें कासया शोधावें । कोणें कोठूनि कें जावें । जरी देशकालादि आघवें । आपणचि असे ५२ आणि हां गा घटु जे वेळीं

ही प्राप्त होतात. ३३ हें सर्व जन्ममरणाच्या फेऱ्यांत पाडणारे सर्व योग ज्यांच्या मरणसमयीं एकेठिकाणीं येतात, त्यांच्या कानीं मोक्षप्राप्तीची गोष्ट कोठून पडणार ? ३४ अशा वेळेवर ज्याचें देहावसान होतें, त्याला, तो योगी असल्यामुळें चंद्रलोकापर्यंत जातां येतें; मग तेथून माघारी फिरून जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो. ३५ हे पांडवा, आम्हीं मरणास अयोग्य काल म्हणून जो म्हटला, तो हाच असें समज. जन्ममरणांच्या गांवास नेणारा धूम्रमार्ग हाच. ३६ याच्याशिवाय दुसरा जो अर्चिरादि मार्ग तो भरवस्तीचा, सोपा, अति उत्तम व अगदीं सुलभ असून मोक्षापर्यंत गेलेला आहे. ३७

**अन्वयार्थ**—(जगतः)—ज्ञान-कर्माधिकृत जनांच्या-(हि एते)-या दोन-(शुक्ल कृष्णे)-प्रकाश-अप्रकाशरूप-(गती)-गती-मार्ग-(शाश्वते मते)-नित्य मानलेल्या आहेत-(एकया)-यांतील एका गतीनें योगी-ध्यानी-(अनावृत्ति)-क्रममुक्तीला-(याति)-प्राप्त होतो व-(अन्यया)-दुसऱ्या गतीनें कर्मी-पुनः (आवर्तते)-पुनः परत येतो. २६

एक सरळ आणि दुसरा वांकडा असे हे दोन मार्ग अनादि कालापासून चालत आलेले आहेत. म्हणून, हे महावीरा, ते तुला बुद्धिपुरस्सर दाखविले. ३८ कां कीं, त्या मार्गांपैकीं चांगला कोणता व वाईट कोणता हें तुला दिसावें; आणि खरें खोटें ओळखून, आपलें हित साधून घेण्याकरितां (त्वां) हित व अहित यांचाही विचार करावा. ३९ हें पहा-उत्तम अशी नाव पाहिल्यावरही खोल डोहांत कोणी उडी घालील काय ! किंवा राजमार्ग टाकून आडमार्गाला जाईल काय ? २४० जो विष आणि अमृत हीं दोन्हीं ओळखतो, तो अमृत टाकील कां ? त्याचप्रमाणें जो सरळमार्ग पाहतो तो आडमार्गाला जाणार नाहीं. ४१ म्हणून प्रथम खऱ्याखोट्यांची पारख करावी. ती पारख झाली म्हणजे मग तो केव्हांही संकटांत पडत नाहीं. ४२ बाकी मरणसमयीं ह्या मार्गाची प्राप्ति होण्याला मोठी भीतीच आहे. कारण, हा काल जर प्राप्त झाला नाहीं, तर जन्मभर अभ्यास केलेला व्यर्थ जातो. ४३ जर अर्चिरादि मार्ग चुकला, आणि तो योगी अकस्मात् धूम्रमार्गांत पडला, तर जन्ममरणांच्या फेऱ्यांत गुंतून फिरत रहावें ! ४४ अशीं हीं मोठालीं संकटें पाहून, तीं एकदां कशानें दूर होतील, म्हणून दोन्हीं योगमार्गांचें चांगलें स्पष्टीकरण केलें. ४५ एका मार्गानें योगी मोक्षाला जातो आणि दुसऱ्या मार्गानें जन्ममरणांच्या फेऱ्यांत पडतो; परंतु देहावसानाच्या वेळेस प्राक्तनानुसार ज्याला जो प्राप्त होईल तो खरा. ४६

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)-हे अर्जुना !-(एते सती)-हे दोन मार्ग-(जानन्)-जाणणारा-(कश्चन् योगी)-कोणीही योगी-(न मुह्यति)-मोहित होत नाहीं-(तस्मात्)-म्हणून-(हे अर्जुन)-हे पार्था !-सर्वेषु कालेषु)-सर्व कालीं-(योगयुक्तः)-तूं समाहितचित्त-(भव)-हो. २७

अकस्मात् कोणत्या वेळेस काय प्राप्त होईल याचा कांहीं नेम आहे ? म्हणून ही गोष्ट राहूं दे; तर देहांती ब्रह्मप्राप्ति करून घेण्यास मार्गच कशाला हवा ? ४७ तर मग देह राहो अथवा जावो आम्हीं केवळ ब्रह्मच आहों, असें ज्ञानी समजतात. कारण, दोरीवरील सर्पाचा भास जसा तिचें सत्यत्व भासल्यावर तिच्या ज्ञानासह व्यर्थ होतो; ४८ आपल्यावर लाटा येतात किंवा नाहींतशा होतात, याचा पाण्याला कधीं भास होतो काय ? कारण, तें केव्हांही पाहिलें तरी पाणीच्या पाणीच कायम असतें; ४९ तें पाणी लाटा उत्पन्न झाल्यामुळें जन्म पावत नाहीं; किंवा लाटा नाहींतशा झाल्यावर तें नाश पावत नाहीं. त्याप्रमाणें, देहांत राहून जे देहासुद्धां ब्रह्म झाले; २५० ते देहासकट ब्रह्म झाल्यावर त्यांच्या ठिकाणीं देहाचें आडनांव सुद्धां रहात नाहीं. मग असें पहा कीं, कोणच्या वेळेस कशाचा लय होतो ? ५१ जर देश काल इत्यादि गोष्टी आपणच होऊन राहिला आहे तर मग ब्रह्मप्राप्तीच्या मार्गाचा शोध कां करावा व कोणीकडून कसें जावें ? ५२ आणि ज्या वेळेस घट फुटतो, त्या वेळेस त्यांतील आकाश नीट मार्गाला

१ प्राप्त होतात. २. साधनें, योग. ३ गोष्ट. ४ योगी होता म्हणून. ५ चंद्रलोकापर्यंत. ६ परत. ७. फिरतो. ८ जन्ममरणाच्या. ९ सूर्यकिरणद्वारा जाण्याचा जो ऊर्ध्वगतिक मार्ग तो. १० वस्ती असलेला. ११ सोपा. १२ सर्वथा. १३ मोक्षापर्यंत. १४ सरळ. १५ वांकडी. १६ मुद्दाम. १७ उडी. १८ तळ न लागणाऱ्या खोल पाण्यांत. १९ आडमार्गांत, अरण्यांत. २० ओळखावें. २१ खोटें. २२ अवेळीं. २३ संकट. २४ भ्रांति. २५ संसाराच्या पंक्तीला, जोडीला जुंपलेल्यांनीं. २६ जन्ममरणाच्या रहाटांत फिरत असावें. २७ स्पष्टीकरण केलें. २८ एकाएकीं, सहज. २९ ब्रह्मरूप. ३० खोटें, व्यर्थ. ३१ लाट. ३२ समजतें काय ? ३३ केव्हांहि, पाहिजे त्यावेळीं.

फुटे। ते वेळीं तेथिंचें आकाश लागे नीट वाटे। वाटा लागे तरी गगना भेटे। एऱ्हवीं चुके ५३ पाहें पां ऐसें हन आहे। कीं तो आकाशाचि जाये। येर गगनतें गगनींचि आहे। घटत्वाहि आधीं ५४ ऐसिया बोधांचेनि सुरवाडे। मार्गामार्गांचें सांकडें। तया सोहंसिद्धां न पडे। योगियांसि ५५ याकारणें पंडुसुता। तुवां होआवें योगयुक्ता। येतुलेनि सर्वकाळीं साम्यता। आपैसेया होईल ५६ मग भलतेथ भलतेव्हां। देह असो अथवा जावा। पारि अबंधा नित्य ब्रह्मभावा। विघडु नाहीं ५७ तो कल्पादि जन्मा नाँगवे। कल्पांतीं मरणें नाप्लवे। माजि स्वर्गसंसाराचेनि लोघवें। झंकवेना ५८ येणें बोधें जो योगी होये। तयासीचि या बोधाचें नीटपणें आहे। कां जे भोगातें पेलूनि पायें। निजरूपा ये ५९ पै गा इंद्रादिकां देवां। जयां सर्वस्वें गाजती राणिवा। तें सांडेणें मानूनि पांडवा। डावेली जो २६०

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम्।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ २८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगोनाम अष्टमोऽध्यायः ८

जरी वेदाध्ययनाचें जालें। अथवा यज्ञाचें शेतचि पिकलें। कीं तपोदानाचें जोडलें। सर्वस्व हन जें ६१ तया आघवया पुण्याचा मळा। भार आंतौनि जया ये फळा। तें परब्रह्म निर्मळा। सांटि न सरे ६२ जें नित्यानंदाचेनि मानें। उपमेचा कांटोळा न दिसे सोनें। पाहा पां वेदयज्ञादि साधनें। जया सुखा ६३ जें विटे ना सरे। भोगी तयाचेनि पैवाडें पुरे। पुढती महासुखाचें सोयरें। भावंडाचि ६४ ऐसें दृष्टीचेनि सुखपणें। जयासी अदृष्टाचें बैसणें। जें शतमखाही आंगवणें। नोहेचि एका ६५ तयातें योगीश्वर अलौकिकें। दिठीचेनि हाततुकें। अनुमानती कौतुकें। तंव हळुवार आवडे ६६ मग तया सुखाची किरीटी। करूनियां गा पाउठी। परब्रह्माचिये पाठीं। आरूढती ६७ ऐसें चराचरैकभाग्य। जें ब्रह्मेशां आराधने योग्य। योगियांचें भोग्य। भोगधन जें ६८ जो सकळ कळांची कळा। जो परमानंदाचा पुतळा। जो जिवाचा जिव्हाळा। विश्वाचिया ६९ जो सर्वज्ञाचा वोलावा। जो यादवकुळींचा कुळदिवा। तो श्रीकृष्णजी पांडवा। प्रती बोलिला २७० ऐसा कुरुक्षेत्रींचा वृत्तांतु। संजयो रायासी असे सांगतु। तेंचि परियेसा पुढारी मातु। ज्ञानदेव म्हणे २७१

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥ श्लोक २८, ओंव्या २७१.

लागल्यावरच आकाशाला भेटतें, नाहीं तर चुकतें की काय ? ५३ पहा–खरी गोष्ट अशी आहे की, त्या घटाच्या आकाराचाच नाश होतो; एऱ्हवीं घटाकाश हें घट निर्माण होण्याचे पूर्वीपासून मूळचेंच आकाशरूपी आहे. ५४ अशा ज्ञानाच्या परिपूर्णतेनें आपण ब्रह्मच आहों, असा अनुभव आलेल्या योग्यास चांगल्या व वाईट मार्गांचें संकट पडत नाहीं. ५५ यास्तव, हे पांडुसुता, तूं योगयुक्त हो. त्या योगानें तुला नेहमीं आपोआप ब्रह्मस्वरूपता प्राप्त होईल. ५६ मग घडेल त्या ठिकाणीं व घडेल तेव्हां देह असो वा जावो; परंतु निष्प्रतिबंध व नित्य अशा परब्रह्मस्वरूपाला अंतर पडणार नाहीं. ५७ तो सृष्टीच्या आरंभीं जन्माला येत नाहीं, सृष्टीच्या अंतीं मरण पावत नाहीं, व सृष्टीच्या स्थितींत स्वर्ग व संसारसुख यांच्या मोहानें कधीं फसत नाहीं, ५८ या बोधानेंच जो योगी सावध असतो, त्यालाच या बोधाची फलप्राप्ति होते. कारण, तो विषयोपभोगाला ओलांडून ब्रह्मरूपाला मिळतो. ५९ हें पहा अर्जुना, इंद्रादिक देवांना स्वर्गांत नेहमीं सर्व प्रकारचे सुखांचा उपभोग मिळतो, तें सुख ओंवाळून टाकलेल्या पदार्थाप्रमाणें त्याज्य मानून तो दूर लोटतो ६०

**अन्वयार्थ**––(योगी)–ध्यान–उपासना करणारा पुरुष–(इदं विदित्वा)–या अध्यायांत सात प्रश्नांचा निर्णय करून जें कांहीं सांगितलें आहे तें जाणून–(वेदेषु)–वेदाध्ययनांत–(यज्ञेषु)–यज्ञानुष्ठानांत–(तपःसु)–तपश्चर्येत–(च एव)–आणि–(दानेषु)–दानांत–(यत् पुण्यफलं प्रदिष्टं)–जें पुण्यफल सांगितलें आहे–(तत् सर्वं)–तें सर्व–(अत्येति)–उल्लंघन करून जातो–(च)–आणि–(आद्यं परं स्थानं)–अगदीं मूळ कारणरूप ब्रह्मपदाला–(उपैति)–प्राप्त होतो. २८

जरी वेदांचें अध्ययन करून वैदिक झाला, अथवा यज्ञ करून पुण्याचें शेत पिकविलें किंवा तप आणि दान करून सर्व पुण्य जोडलें, ६१ अशा प्रकारच्या सर्व पुण्यांचा मळा जरी फळाच्या भारानें व्यापून गेला, तरी त्या निर्मळ ब्रह्माची बरोबरी कोणाच्यानेंही करवत नाहीं. ६२ जें निजानंदाच्या तुलनेनें ताजव्यांत घातलें असतां लहान दिसतें, व ज्याच्या प्राप्तीकरितां वेदयज्ञादि साधनें करावीं लागतात; ६३ जें स्वर्गसुख विटत नाहीं व संपतही नाहीं; भोगणाराच्या इच्छा पूर्ण करतें, व जें महासुखाचें (ब्रह्मसुखाचें) धाकटें भावंडच होय, ६४ अशाप्रमाणें वरकांती दिसणारे तें सुख व जें मरणानंतरच प्राप्त होतें, आणि जें शंभर यज्ञ करूनही साध्य होत नाहीं, ६५ तें स्वर्गसुख, योगीश्वर दिव्यदृष्टीच्या अटकळीनें व कौतुकानें पाहूं गेले असतां त्यांना ब्रह्मसुखाच्यापुढें वजनाला हलकें वाटतें. ६६ मग अर्जुना, त्या स्वर्गादि सुखाची पायरी करून म्हणजे त्या सुखाची पायमल्ली करून ते ब्रह्मपदावर चढतात. ६७ याप्रमाणें स्थावरजंगमाचें मुख्य भाग्य; जें ब्रह्मदेव व शंकर यांनीं आराधना करण्यास योग्य व जी योग्याची उपभोग घेण्याची वस्तु, ६८ जो आद्यज्ञानस्वरूप, जो परमानंदाची केवळ मूर्ति, जो सर्व विश्वांतील प्राणिमात्रांचें जीवन, ६९ जो सर्व शास्त्रांचा जिव्हाळा व यादवकुळांचा कुलदीपक असा जो श्रीकृष्ण, तो अर्जुनाला बोलला, २७० असा कुरुक्षेत्रांतील कथाभाग संजय धृतराष्ट्राला सांगता झाला; ज्ञानदेव म्हणतात, ती कथा पुढें ऐका. २७१

१ सोयीनें, सुखानें. २ संकट. ३ आपण ब्रह्मच आहों असा अनुभव झालेल्यास. ४ ब्रह्मरूपता. ५ आपोआप. ६ बंधरहिताला. ७ न सांपडे. ८ न बुडे. ९ मोहें. १० फसत नाहीं. ११ फलप्राप्ति. १२ तोलून. १३ राजसेनें गाजलें जातें. १४ त्याज्य. १५ दूर लोटी. १६ व्यापून. १७ निर्मळ ब्रह्माचे प्राप्तीपुढें कांहींच नाहीं. १८ बरोबरी. १९ ताजव्यांत, उपमेच्या बरोबरीनें. २० लहान. २१ इच्छेनें. २२ धुसत्या दृष्टीच्या सुखानें. २३ मरणानंतर. २४ इंद्रालाही. २५ साध्य. २६ दिव्य. २७ अटकळीनें. २८ हलक्या प्रतीचें वाटतें. २९ पायरी. ३० स्थावर जंगमाचें मुख्य भाग्य. ३१ ब्रह्मदेव व शंकर यांना. ३२ मूर्ति. ३३ जीवन. ३४ जिव्हाळा. ३५ गोष्ट.

# ज्ञा ने श्व री.

## अध्याय नववा.

तरी अवधान एकलें दीजे । मग सर्व सुखासि पात्र होइजे । हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड ऐका १ परी प्रौढी[3] न बोलों हो जी । तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं । देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची २ कां जे लळेयाचे लळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती । जरी माहेरें श्रीमंतें होतीं । तुम्हांऐसीं ३ तुमचे या दिठिवेयाचिये[7] वोलें । सासिन्नले प्रसन्नतेचे मळे । ते साउली देखोनि लोळें । श्रांतु जी मी ४ प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणोनि आम्हीं आपुलिया स्वेच्छा बोलावो लाहों । येथही जरी सलगी करूं[10] बिहों । तरी निवों[11] कें पां ५ नातरी बालक बोबडां बोलीं । का वांकुडा विचुकें[12] पाउलीं । ते चोजें[13] करूनि माउली । रिझे[14] जेवीं ६ तेवीं तुम्हां संतांचा पढियेवो[15] । कैसेनि तरी आम्हांवरी हो । या बहुवा ओळुकिया[16] जी आहों । सलगी करित ७ वांचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ भवोद्दश[17] श्रोते । काय घर्डेया[18]वरी सारस्वतें[19] । पढों सिकिजे ८ अवधारा आवडे तेसणा[20] धुंधुरु[21] । पारि महातेजी न मिरवे काय करूं । अमृताचिया ताटीं वोगरूं[22] । ऐसी रससोय[23] कैंची ९ हां हो हिमकरासी[24] विंजणें[25] । कीं नादापुढें आइकवणें । लेणियासी लेणें । हें कहीं[26] आथी १० सांगा परिमळें काय तुरंबावें[27] । सागरें कवणें ठायीं नाहावें । हें गगनचि ओंडे[28] आघवें । ऐसा पवाडु[29] कैंचा ११ तैसें तुमचें अवधान धाये[30] । आणि तुम्ही म्हणा हें होये । ऐसें वक्तृत्व कवणा आहे । जेणें रिझा तुम्ही १२ तरी विश्वप्रगटितिया[31] गभस्ती । काय होतिवेन[32] न कीजे आरती । कां चुळोदकें[33] आपांपती[34] । अर्घ्यु नेदिजे १३ प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मी दुबळा अर्चितुसें भक्ती । म्हणोनि बोल जऱ्ही गंगावती[35] । तऱ्ही स्वीकाराल कीं १४ बाळक बापाचिये ताटीं रिगे । आणि बापातेंचि जेवऊं लागे । कीं तो संतोषलेनि वेगें[36] । मुखचि वोढवी १५ तैसा मीं जरी तुम्हांप्रती । चावटी करी-

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय नववा.

श्रीज्ञानेश्वर म्हणतात, "श्रोतेहो, ऐका. मी प्रतिज्ञापूर्वक हें स्पष्ट सांगतों कीं, तुम्ही एक लक्ष इकडे दिलें तर सर्व सुखाला पात्र व्हाल. १ पण तुम्हां सर्वज्ञांच्या सभेपुढें मी हें आढ्यतेनें बोलत नाहीं हो! 'तुम्ही लक्ष द्या' ही माझी तुम्हाला लडिवाळपणाची विनंति आहे. २ कारण तुम्हांसारखीं संपन्न माहेरघरें असल्यावर, आवड म्हणून जी एक वृत्ति आहे तिची देखील आवड पूर्ण होते; आणि मनोरथाची देखील इच्छा तृप्त होते! ३ तुमच्या कृपादृष्टीच्या ओलाव्यानें भरास आलेल्या प्रसन्नतेच्या मळ्याची थंडगार सावली पाहून, श्रमलेला असा जो मी तो त्या ठिकाणीं विश्रांति घेतो. ४ महाराज, तुम्ही सुखामृताचे डोहच आहां; म्हणून आम्ही आपले इच्छेप्रमाणें त्यांत बागडून थंडावा मिळवूं असें म्हणतों. तेथेंही जर तसें करून घेण्यास तुमच्याशीं सलगी करण्यास भिऊं लागलों, तर आम्ही तृप्त तरी व्हावें कोठें? ५ किंवा बालकाच्या बोबड्या बोलांनीं व वेड्यावांकड्या चालण्यानें ज्याप्रमाणें कौतुक मानून आई आनंद पावते, ६ त्याप्रमाणें तुम्हां संतजनांची प्रीति कोणत्या तरी रीतीनें मजवर व्हावी, या पूर्ण उत्कट इच्छेनें मी तुमच्याशीं सलगी करीत आहें. ७ नाहींतर तुमच्यासारख्या सर्वज्ञ श्रोत्यांस माझ्या बोलण्यापासून नवीन कांहीं समजून घ्यावयाचें आहे काय? सरस्वतीपुत्राला घडे पाठ करून विद्या शिकावी लागते काय? ८ पहा कीं, पाहिजे तेवढा मोठा जरी काजवा असला, तरी सूर्यप्रकाशापुढें त्याचें तेज पडेल काय? तसेंच अमृतरूप ताटांत वाढण्याजोगी पाकनिष्पत्ति कोणती आहे? ९ अहो, ज्याचे थंड किरण आहेत, अशा चंद्राला पंख्यानें वारा घालणें, किंवा सुस्वराला गायन ऐकविणें, तसेंच दागिन्याला अलंकार घालणें असें कोठें होईल का? १० परिमळानें कशाचा वास घ्यावा? समुद्रानें कशांत नाहावें? आणि हें आकाश ज्यांत मावेल अशी मोठी वस्तु कोणती आहे सांगा बरें? ११ त्याचप्रमाणें, तुमचें अवधान तृप्त होईल, आणि तुम्ही असें म्हणालें कीं, 'वा! उत्तम व्याख्यान झालें!' असें तुम्हाला तृप्त करण्याजोगें वक्तृत्व कोणाचें आहे? १२–तथापि, असा जरी न्याय आहे तरी भक्तीनें अशा गोष्टी घडतात असे दृष्टांतपूर्वक महाराज सांगतात–म्हणून, सर्व जग प्रकाशमय करणाऱ्या सूर्याला काडवातीनें आरती करूं नये की काय? किंवा समुद्राला चुळकाभर पाण्यानें आर्घ्य देऊं नये का? १३ महाराज तुम्ही केवळ शंकराची मूर्ति आहां, आणि मी गरीब तुमची भक्तीनें पूजा करीत आहें, म्हणून बोलाच्या ऐवजी माझ्या बोलरूपी निर्गुडीचाही तुम्ही स्वीकार कराल! १४ लहान मूल बापाच्या ताटांत जेवायाला बसून आपली योग्यता नसतांनाही प्रेमानें बापालाच घांस देऊं लागतें, तेव्हां तो संतोषभरानें आपलें तोंड घांस घेण्याकरितां पुढें करतोच; १५ त्याचप्रमाणें, मी जरी तुमच्याशीं बालकाप्रमाणें विनोदानें वर्तन करितों, तरी

१ अनुसंधान, लक्ष्य. २ योग्य. ३ आढ्यतेनें. ४ पावें. ५ लडिवाळपणाची. ६ आवड म्हणून जी वृत्ति आहे तिचे. ७ कृपादृष्टीच्या ओलाव्यानें. ८ भरास आलें. ९ श्रमलेला. १० भीति पावूं. ११ कोठें शांतता होईल. १२ अव्यवस्थित, वांकडातिकडा. १३ कौतुक. १४ आनंद पावतो. १५ प्रीति. १६ इच्छेनें, बुद्धीनें, आवडीनें. १७ आपणासारिखें. १८ घडे पाठ करून. १९ सरस्वतीपुत्रानें. २० तेवढा. २१ काजवा. २२ वाढूं. २३ पाकनिष्पत्ति. २४ हिम=गार आहेत कर=किरण ज्याचे असा जो तो चंद्र त्याला. २५ पंख्यानें वारा घालणें. २६ कोठें आहे? २७ हुंगावें. २८ सांठवेल. २९ विस्तार, ठाव, ठिकाण. ३० तृप्त होय. ३१ सर्व जगाला प्रकाशमय करणाऱ्या सूर्याला. ३२ काडवातीनें. ३३ चूळभर पाण्यानें. ३४ समुद्राला. ३५ एक वनस्पति. (निर्गुडी). ३६ भरानें. ३७ पुढें करी. ३८ विनोद.

तसें बाळमती । तरी तुम्ही संतोषिजे ऐसी जाती । प्रेमाची असे १६ आणि
तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्ही संत घेतले असा बहुवें । म्हणोनि केलिये
सलगीचा नोहे । आभारु तुम्हां १७ अहो तान्हयाचें लागतां झटें । तेणें अ-
धिकचि पान्हा फुटे । रोषें प्रेम दुणवटे । पढियंतयाचेनि १८ म्हणऊनि मज
लेंकुरवाचेनि बोलें । तुमचें कृपाळूपण निदैलें । तें चेइलें ऐसें जी जाणवलें ।
यालागीं बोलिलों मी १९ एऱ्हवीं चांदिणें पिकविजत आहे चेपणीं । कीं वा-
रया घापैत आहे वाहणी । हांहो गगनासि गंवसणी । घालिजे केवीं २० आ-
इका पाणी बोथिजावें न लगे । नवनीतीं माथुला न रिगे । तेविं लाजिलें
व्याख्यान निगे । देखोनि जयातें २१ हें असो शब्दब्रह्म जिये बीजे । शब्द
मावळलेया निवांतु निजे । तो गीतार्थु मऱ्हाठिया बोलिजे । हा पाडु काई २२
पारि ऐसियाही मज धिंवसा । तो पुढतियाचि येकी आशा । जे धिटिवें क-
रूनि भवोद्देशां । पढियंतया होआवें २३ तारे आतां चंद्रापासोनि निवविते ।
जें अमृताहूनि जीवविते । तेणें अवधानें कीजो वाढते । मनोरथां माझिया २४
कां जैं दिठिवों तुमचा वरुषे । तैं सकळार्थ सिद्धिमती पिके । एऱ्हवीं कोंभेलों
उन्मेषु सुके । जरी उदास तुम्ही २५ सहजें तरी अवधारा । वक्तृत्वा अवधा-
नाचा होय चारा । तरी दोंदें पेलैंती अक्षरां । प्रमेयाचीं २६ अर्थ बोलाची
वाट पाहे । तेथ अभिप्रावोचि अभिप्रायातें विये । भावांचा फुलौरा होत जाये ।
मतिवरी २७ म्हणोनि संवादाचा सुवावो ढळे । तऱ्ही हृदयाकाश सारस्वतें वोळे ।
आणि श्रोता दुश्चिता तारि वितुळे । मांडला रसु २८ अहो चंद्रकांतु द्रवता
कीर होये । पारि ते हातवटी चंद्रीं कीं आहे । म्हणऊनि वक्ता तो वक्ता नोहे ।
श्रोतेनिविण २९ पारि आतां आमुतें गोड करावें । ऐसें तांदुळीं कासया विन-
वावें । साईखडियानें काइ प्रार्थावें । सूत्रधारातें ३० तो काय बाहुलियांचिया
काजा नाचवी । कीं आपुलिये जाणिवेचि कळा वाढवी । म्हणऊनि आम्हां
या ठेवांठेवी । काय काज ३१ तंव श्रीगुरु म्हणती काइ जाहलें । हें समस्तही
आम्हां पावलें । आतां सांगें जें निरोपिलें । नारायणें ३२ येथ संतोषोनि निवृत्ति
दासें । जी जी म्हणऊनि उल्हासें । अवधारा श्रीकृष्ण ऐसें । बोलते जाहले ३३

श्रीभगवानुवाच:—

इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे । ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥

तुम्हांला त्या माझ्या वर्तनापासून आनंदच झाला पाहिजे, असा प्रेमाचा गुण आहे; १६ आणि त्या आपलेपणाच्या अभिमानानें तुम्ही संतजनांनीं बहुत प्रकारांनीं मला 'आपला' असें म्हटलें आहे. म्हणून माझ्या या सलगीचा आपणास विषाद (ओझें) होणार नाहीं. १७ अहो, वासरानें ढुसण्या दिल्यावर गाईला ज्याप्रमाणें अधिकच पान्हा फुटतो, त्याप्रमाणें, अत्यंत प्रिय जो मनुष्य असतो; त्याच्या रागावण्यानें प्रेम दुप्पट होतें. १८ म्हणून मज लेंकराच्या बोबड्या बोलांनीं तुमचें निजलेलें कृपाळूपण जागें होईल असें जाणून मी बोललों. १९ एन्हवीं चंद्राचें चांदणें कोणी आढीत घालून पिकविलेलें आहे काय? किंवा वाऱ्याला वाहण्याकरितां कोणी गति दिली आहे का? तसेंच आकाशाला कोणी गवसणी घातली आहे का? २० ऐका, पाण्याला पातळ करावें लागत नाहीं; आणि लोणी तयार झाल्यावर तें रवीनें कोणी घुसळीत नाहीं; त्याचप्रमाणें, ज्याला (गीतार्थाला) पाहून माझें व्याख्यान लाजल्यामुळें माघारी येतें. २१ हें असो, ज्यापुढें वेदांचे शब्द कुंठित झाल्यामुळें तेही ज्याच्या शय्येवर गाढ निद्रा घेतात, (ज्यापुढें वेदांची मति कुंठित झाल्यामुळें तेहि स्तब्ध राहतात.) तो गीतार्थ मी मराठी भाषेंत वर्णन करावा असा माझा अधिकार आहे का? २२ परंतु अशी स्थिति असतांही मला पुढच्या अशिवर इच्छा उत्पन्न झाली ती ही कीं; कसें तरी धिटाईनें बोलून तुमच्यासारख्यांची प्रीति संपादन करावी. २३ तर आतां चंद्रापेक्षांही थंड करणाऱ्या व अमृताहूनही जीवन देणाऱ्या अशा अवधानानें माझ्या मनोरथाला पुष्टि द्या. २४ कारण, जर तुमची कृपादृष्टिरूप वृष्टि मजवर पूर्ण होईल, तर माझ्या बुद्धिरूप भूमींत सकलार्थरूप धान्य पिकेल, एन्हवीं जर तुम्ही उदास असाल तर अंकुर आलेलें ज्ञान सुकून जाईल. २५ वक्तृत्वरूप पांखराला अवधानरूप चारा मिळाल्यावर त्याच्या प्रत्येक अक्षररूपी अवयवाला अर्थरूपी पुष्टि येईल. २६ अर्थ हा शब्द बाहेर पडण्याची वाट पहात असतो; शब्द बाहेर पडल्यावर त्यांतून अर्थावर अर्थ निघतात; आणि बुद्धीला नानाप्रकारचे अभिप्राय सुचूं लागतात. २७ म्हणून संवादरूपी अनुकूल वारा सुटला असतां वक्त्याच्या हृदयाकाशांत शास्त्रसिद्धांतरूपी मेघ भरून येतात, आणि जर ऐकणाराचें दुर्लक्ष असलें, तर वक्तृत्वाला आलेला रस वितळून जातो. २८ अहो, चंद्रकांत मण्याला पाझर सुटतो ही गोष्ट खरी आहे; परंतु ही शक्ति एक चंद्राचेच ठिकाणी आहे. म्हणून बोलणारास श्रोत्यांशिवाय किंमत नाहीं; २९ परंतु आम्हांला गोड करून घ्या अशी तांदुळांना जेवणाराची विनंति करावी लागते का? तसेंच कळसूत्री बाहुल्यांना 'आम्हांला चांगलें नाचवा' म्हणून सूत्रधाराची विनंति करावी लागते का? ३० तो सूत्रधार काय बाहुल्यांच्या कामाकरितां त्यांना नाचवितो? नाहीं; तर तो आपली कुशलता दाखविण्याकरितांच त्यांना नाचवितो; त्याप्रमाणें मी बाहुलें आहें, आपण जसें बोलवाल तसें मी बोलणार! म्हणून मला असें बोलवा तसें बोलवा वगैरे प्रार्थना करण्याची उठाठेव कशाला? ३१ त्या वेळीं श्रीगुरु निवृत्तिराज म्हणतात, "तुला इतकें व्याख्यान कशाला करायाला पाहिजे, तुझा सर्व अभिप्राय आम्हांला कळला. तर आतां श्रीकृष्णांनीं जें अर्जुनास सांगितलें, तें श्रोत्यांना सांग." ३२ तेव्हां निवृत्तिदास ज्ञानदेव संतोष पावून मोठ्या उल्हासानें म्हणाले, होय महाराज, ऐका. श्रीकृष्ण असें म्हणाले. ३३

अन्वयार्थ—(तु)—आतां—(इदं गुह्यतमं विज्ञानसहितं ज्ञानं)—हें अतिशय गुह्य अनुभवासह आत्मज्ञान—(अनसूयवे)—माझ्या गुणांमध्यें दोषदृष्टि न ठेवणाऱ्या —(ते)—तुला—(प्रवक्ष्यामि)—सांगेन—(यत्)—जें ज्ञान—(ज्ञात्वा)—जाणून—झालें असतां—(अशुभात्)—अशुभ संसारापासून—(मोक्ष्यसे)—तूं मुक्त होशील. १

१ अभिमानानें. २ बहुत, फार प्रकारांनीं. ३ लडिवाळपणाचा. ४ उपकार, भार, जड. ५ वासरानें. ६ स्तनामुखाची भेट. ७ रागावण्यानें. ८ दुणावतें. ९ अत्यंत प्रियाचें. १० निजलेलें. ११ जागृत जाहलें. १२ आढींत. १३ दिलो आहे. १४ गति, मार्ग. १५ पातळ करावें. १६ रवी. १७ माघारी येतें. १८ वेद. १९ बाजेवर, पलंगावर. २० इच्छा. २१ धीटपणा. २२ आपणासारख्यांला. २३ आवडतें, प्रीतिपात्र. २४ मानविणारें. २५ कृपादृष्टि. २६ कोंभ फुटून वाढीस लागलेलें ज्ञान. २७ पुढें येतील. २८ सिद्धांताची. २९ श्रोत्यांवांचा. ३० पुष्पवृष्टि. ३१ अनुकूल वारा. ३२ वाहे. ३३ विंवा, वक्तृत्व मास होतें. ३४ कसब, कर्तबगारी. ३५ कळसूत्री बाहुलीनें. ३६ ज्ञानाची. ३७ खटपटीशीं, उठाठेवीशीं.

नातरि अर्जुना हें बीजें। पुढती सांगिजेल तुज । जें हें अंतःकरणींचें गुज। जिवाचिये ३४ येणें मानें जीवाचें हिये[२] फोडावें । मग गुज कां पां मज सांगावें। ऐसें कांहीं स्वभावें । कल्पिशी जरी ३५ तरीं पारियेसी गा प्राज्ञा । तूं आस्थेचीच संज्ञा[३] । बोलिलिये गोष्टीची अवज्ञा । नेणसी करूं ३६ म्हणोनि गूढपण आपुलें मोडो । वरि न बोलणेंही बोलावें घडो । परि आमुचिये जीवींचें पडो । तुझ्या जीवीं ३७ अगा थानीं कीर दूध गूढें । परि थानासीचि नव्हे कीं गोड । म्हणोनि सरों कां सेवितयाची चाड । जरी अनन्य मिळे ३८ मुडांहूनि बीज काढिलें । मग निर्वाळलिये भूमीं पेरिलें । तरि तें सांडीविखुरीं गेलें। म्हणों ये कायी ३९ यालागीं सुमनु आणि शुद्धमती । जो अनिंदकु अनन्यगती । पैं गा गौप्यही परी तयाप्रती । चौंवाळिजे सुखें ४० तरि प्रस्तुत आतां गुणीं इहीं । तूंवांचून आणिक नाहीं । म्हणोनि गुज तरी तुझ्या ठायीं । लपऊं नये ४१ आतां किती नावानावा गूज । म्हणतां कानडें वाटेल तुज । तरि ज्ञान सांगेन सहज । विज्ञानेंसीं ४२ परि तेंचि ऐसेनि निवाडें । जैसें भेसळलें खरें कुडें । मग काढिजे फोडोवाडें । पारखूनियां ४३ कां चांचूचेनि सांडसें । खांडिजे पय पाणी राजहंसें । तुज ज्ञान विज्ञान तैसें । वांटूनि देऊं ४४ मग वारयाचिया धारसा । पडिन्नला कोंडा कां नुरेंचि जैसा । आणि कणांचा आपैसा । राशिवा जोडे ४५ तैसें जें जाणितलेयासाठीं । संसार संसाराचिये गांठीं । लाऊनि बैसवी पाटीं । मोक्षश्रियेच्या ४६

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् । प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम्॥ २॥

जे जाणणेया आघवेयाच्या गांवीं। गुरुत्वाची आचार्यपदवी। जें सकळ गुह्यांचा गोसावी । पवित्रां रावो ४७ आणि धर्माचें निजधाम। तेवींचि उत्तमाचें उत्तम । पैं जेया येतां नाहीं काम । जन्मांतराचें ४८ मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे । प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपैसयाचि ४९ तेवींचि गा सुखाच्या पाउटीं। चढतां येइजे जयाच्या भेटी। मग भेटल्या कीर मिठी । भोगणें यांहि पडे ५० परि भोगाचिये ऐलीकडिलिये मेरे । चित्त उभें ठेलें सुखा भरे। ऐसें सुलभ आणि सोपारें। वरि परब्रह्म ५१ पैं गा आणिकही एक याचें । जें हातां आलिया तरी न वचे । आणि अनुभवितां कांहीं न वेचे । परि विटेहि ना ५२ येथ जरी तूं तार्किका । ऐसी हन घेसी शंका ।

अर्जुना, माझ्या अंतःकरणांतील अति गुह्य असें जें ज्ञानाचें आदिकारण, तें तुला पुनः सांगतों ३४ आतां, अशा प्रकारें हें जीवींचें गुह्य फोडून तें तुला मी कां सांगतों अशी जर कदाचित् तुझ्या मनांत शंका येईल, ३५ तर, बाबारे, ऐक. तूं समजदार असून केवळ आस्थेची मूर्ति आहेस; आणि आम्ही जें तुला सांगतों, त्याची हेळ-सांड करीत नाहींस. ३६ म्हणून आमची गुह्य गोष्ट बाहेर पडली तरी पडो आणि न बोलावयाची गोष्ट बोलावी लागली तरी लागो, पण आमच्या हृदयांतील गुह्य गोष्ट तुझ्या हृदयांत पडो. ३७ अरे, स्तनांत जरी दूध सांठ-विलेलें असलें तरी त्याची गोडी स्तनाला नसते, ते आपल्या स्तनांतील दूध सरलें तरी हरकत नाहीं, परंतु अनन्यभावानें सेवन करणाऱ्या वत्साची मातेला इच्छा असते. ३८ मुड्यांतून बीं काढून तें तयार केलेल्या जमि-नींत पेरलें, तर तें सांडलवंडीवारी गेलें असें म्हणतां येईल का ?. ३९ याकरितां प्रशस्त अंतःकरणाचा, शुद्ध बुद्धीचा, निंदा न करणारा व एकनिष्ठ असा जर भक्त असेल, तर त्याला आपली मनांतील गुप्त गोष्टही आनं-दानें सांगावी, ४० तर ह्या गुणांनीं संपन्न असा सांप्रत तुजवांचून कोणी नाहीं, म्हणून गुप्त अशी ही गोष्ट तुझ्या पासून चोरून ठेवणें योग्य नाहीं. ४१ आतां वारंवार गुप्त गुप्त म्हणून वाखाणणी करण्याचा तुला कंटाळा येईल, म्हणून तें गुह्य प्रापंचिक ज्ञानासह ब्रह्मज्ञान सांगतों. ४२ परंतु खरें किंवा खोटें नाणें एके ठिकाणीं मिसळल्यावर ज्याप्र-माणें फाडी लावून निराळें करतात, त्याप्रमाणें ज्ञान व विज्ञान निराळें करून दाखवितों. ४३ किंवा राजहंस आपल्या चोंचीची सांडस करून दूध व पाणी निरनिराळें करतो, त्याप्रमाणें हें ज्ञान आणि विज्ञान तुला स्पष्ट विभाग करून सांगतों. ४४ म्हणजे मग, कोंडा व धान्य उपणण्याकरितां वाऱ्यावर धरलें असतां धान्याची खालीं सहज रास होऊन कोंडा निराळा होतो, ४५ त्याप्रमाणें तें जाणल्याबरोबर शरीराची व जन्ममरणाची गांठ घालून मुमुक्षूस आत्मस्वरूपमोक्षैश्वर्याच्या पट्टावर नेऊन बसवितें. ४६

**अन्वयार्थ**—(राजविद्या)–[हें ज्ञान] विद्यांचा राजा,–(राजगुह्यं)–गुह्यांचा राजा,–(पवित्रं)–अत्यंत पावन–(इदं उत्तमं)–असें हें उत्तम ज्ञान आहे.–(प्रत्यक्षावगमं)–याचें ज्ञान–अनुभव प्रत्यक्ष येतो–(धर्म्यं)–हें धर्माला धरून आहे.–(कर्तुं सुसुखं)–हें संपादन करण्यास सुलभ व–(अव्ययं)–अव्यय आहे. कर्मांच्या फलाप्रमाणें याचें फल क्षीण होत नाहीं. २

ज्याला सर्व ज्ञानाच्या ठिकाणीं मुख्य असें आचार्यांनीं स्थान मिळतें; जें सर्व गुह्यांचा स्वामी, पवित्र वस्तूंचा राजा ४७ आणि धर्माचें अधिष्ठान; तसेंच उत्तमांत उत्तम व ज्या ज्ञानाची प्राप्ति झाली असतां दुसरा पुनः जन्म घेण्याचें कारण रहात नाहीं; ४८ जें ब्रह्मज्ञान गुरूच्या मुखानें वाक्यद्वारां उत्पन्न होतें न होतें तोंच, शिष्याच्या हृदयांत स्वयमेव असलेलें [ ब्रह्म ] त्यास सहजच प्रत्यक्ष होतें, ४९ त्याचप्रमाणें, सुखाच्या पायरीनें चढत गेलें असतां ज्याची भेट होते; आणि मग भेट झाल्यावर, भेटीपासून होणाऱ्या सुखाचा ज्याच्या ठिकाणीं लय होतो; ५० परंतु, ज्याच्या प्राप्तीच्या सुखाच्या अली-कडील कांठावर उभें असतांही चित्त आनंदयुक्त होतें, असें सुलभ आणि सोपें असून जें परब्रह्म होय. ५१ खरोखर या ज्ञानांत आणखीही गुण आहेत; ते हे कीं, हें प्राप्त झालें असतां नाहींसें होत नाहीं; हें अनुभव घेतल्यानें कमी होत नाहीं; आणि विटतही नाहीं. ५२ हे चतुर अर्जुना, आतां तूं जर अशी शंका घेशील कीं, एवढी अप्रतिम वस्तु असतां, लोकांच्या हातून कशी राहिली ?

१ ज्ञानाचें आदिकारण. २ गुह्य. ३ मूर्ति. ४ गुप्त. ५ पूर्ण होवो. ६ अन्य आश्रय न करणारा, एकनिष्ठ. ७ मुड्यां-तून. ८ तयार केलेल्या, साफ केलेल्या. ९ सांडी-लवंडी-वारी गेले. १० प्रसन्न अंतःकरणाचा. ११ सांगावें. १२ वारंवार. १३ कंटाळवाणें. १४ ब्रह्मज्ञान. १५ प्रापंचिक ज्ञानासह. १६ मिसळलें. १७ खोटें. १८ स्पष्ट करून, फाडी लावून. १९ चोंचीनें. २० निरनिराळें करावें. २१ प्रवाहांत. २२ ढीग, रास. २३ जाणल्याबरोबर. २४ जन्ममरण. २५ संसार संसाराच्या हवालीं करून. २६ सिंहासनावर. २७ ज्या ज्ञानाला. २८ महत्त्वाची. २९ स्वामी. ३० ज्या ज्ञानाला ३१ कारण. ३२ थोडें. ३३ उदयास येते. ३४ प्राप्त होतें. ३५ पायरीनें. ३६ रचित. ३७ ज्याची भेट झाली असतां भोगणाराही उरत नाहीं. ३८ सीमेवर. ३९ सुखानें भरलेलें. ४० सोपें, सुगम. ४१ अनायासें, मिळण्याजोगें. ४२ आणखी. ४३ कल्पना चालविणाऱ्या. ४४ कदाचित्, जर.

ना येवढी वस्तु हे लोकां । उरली[१] केविं पां ५२ जे एकोत्तरेयांचिया[२] वाढी । जळतिये आगीं घालिती उडी । तें अनायासें स्वगोडी । सांडिती केविं ५३ तरि पवित्र आणि रम्य । तेवींचि सुखोपायें[३] गम्य । आणि स्वसुख परम धर्म्य । वरि आपणपां जोडे ५५ ऐसा अवघाचि हा सुरवाडु[६] आहे । तरी जनाहातीं केविं उरों लाहे । हा शंकेचा ठाव कीर होये । परि न धरावी तुवां ५६

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप । अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

पाहे पां दूध पवित्र आणि गोड । पांसीं त्वचेचिया पदराआड । परि तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्ध काय न सेविती ५७ कां कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकोचि घरीं । परि परागु सेविजे भ्रमरीं । येरां[११] चिखलुचि उरे ५८ नातरी निदैवाच्या[१२] पेरिवरीं । लोह्यां[१३] रुतलिया आहाति सहस्रवरी । पारि तेथ बैसोनि उपवासु करी । कां दरिद्रें[१४] जिये ५९ तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्वसुखाचा आरामु[१५] । कीं भ्रांतासी कामु । विषयावरी ६० बहु मृगजळ देखोनी डोळां । थुंकिजे अमृताचा गिळितां गळाळा[१६] । तोडिला परिसु बांधिला गळां । शुक्तिकालाभें[१७] ६१ तैसी अहंममतेचिये लवडसवडी । मातें न पवतीचि बापुडीं । म्हणोनि जन्ममरणाचि दुथडीं । डेंहुळितें[२०] ठेलीं ६२ एऱ्हवीं मी तरी कैसा । मुखाप्रति भानु कां जैसा । कहीं दिसे न दिसे ऐसा । वाणीचा[२१] नोहे ६३

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना । मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥

माझेया विस्तारलेपणा[२२] नांवें । हें जगचि[२३] नोहे आघवें । जैसें दूध मुरालें[२४] स्वभावें । तरि तेंचि दहीं ६४ कां बीजचि जाहलें तरु । अथवा भांगारचि[२५] अळंकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हें जग ६५ हें अव्यक्तपणें[२६] थिजलें । तेंचि मग विश्वाकारें वोथिजलें[२७] । तैसें अमूर्तमूर्ति[२८] मियां विस्तारलें । त्रैलोक्य जाणें ६६ महदादि[२९] देहांतें । इयें अंशेषेंही[३०] भूतें । परी माझ्या ठायीं बिंबतें[३१] । जैसें जळीं फेण ६७ पारि तया फेणांआंतु पाहतां । जेवीं जळ न दिसे पंडुसुता । नातरी स्वप्नींची अनेकता । चेइलिया[३२] नोहिजे ६८ तैसीं भूतें इयें माझ्या ठायीं । बिंबती तयांमाजि मी नाहीं । इया उपपत्ती[३३] तुज पाहीं । सांगितलिया मागां[३४] ६९ म्हणऊनि बोलिलियां[३५] बोलाचा अंतिसो[३६] । न कीजे यालागीं हें असो । पारि मजआंत पैसो[३७] । दिठी[३८] तुझी ७०

न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् । भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

म्हणजे इतक्या उत्तम वस्तूकडे लोक कां बघत नाहींत ? ५३ कारण, जे लोक एकोत्रा व्याजाकरितां ठगास पैसे देण्याच्या आशेनेही उडी घालण्यास मागेंपुढें पहात नाहींत, ते सहज आपल्या ठिकाणींच असलेली गोडी कशी टाकून देतील ? ५४ तरी पवित्र आणि रमणीय, तसेंच सुख देणारें, जाणण्यास सुलभ, अति सुखकारक, धर्माला पूर्ण अनुकूल व आपले ठिकाणींच प्राप्त होणारें; ५५ अर्जुना, याप्रमाणें सर्व गोष्टी अनुकूल असतांही, लोकांच्या हातीं लागल्याशिवाय हें कसें राहिलें ? ही शंका घेण्यास जागा आहे खरी; परंतु तूं अशी शंका घेऊं नको. ५६

**अन्वयार्थ**—(परंतप)–हे अर्जुना !–(अस्य धर्मस्य अश्रद्धानाः)–या आत्मज्ञानरूप धर्मावर श्रद्धा न ठेवणारे–(पुरुषाः)–पुरुष–(मां)–मला–(अप्राप्य)–प्राप्त न होऊन–(मृत्युसंसारवर्त्मनि)–मृत्युयुक्त संसारमार्गात–(निवर्तन्ते)–निश्चय होतात. संसारमार्गांत फिरून येतात. ३

. हें पहा, गाईचें दूध हें पवित्र असून गोड आहे; तसेंच अगदीं जवळ–त्वचेच्या पडद्याच्या आंतच–आहे; परंतु त्याचा त्याग करून गोचीड रक्तच सेवन करीत नाहींत का ? ५७ किंवा कमळाचा कांदा व बेडूक हे एकेच ठिकाणीं वास्तव्य करितात, परंतु कमळांतील मकरंदाचें सेवन भ्रमर करितात व बेडकांच्या वांटणीला चिखलच रहातो ! ५८ अथवा दुर्दैव्याच्या घरीं मोहरा वगैरे द्रव्यांनीं भरलेल्या हजारों कढया पुरलेल्या असूनही तो तेथें बसून उपास काढून दरिद्रावस्था भोगतो. ५९ त्याचप्रमाणें, प्राणिमात्राच्या सर्व सुखांचें विश्रांतिस्थान असा मी " राम " प्राण्यांच्या हृदयांत असतां त्या अज्ञानी जीवाची विषयांवर वासना असते. ६० पुष्कळसें मृगजल डोळ्यांनीं पाहून तोंडांत असलेला अमृताचा घोट थुंकून टाकावा, किंवा शिंप मिळाली असतां गळ्यांत बांधलेला परीस तोडून टाकावा; ६१ त्याप्रमाणें, ज्यांचें मनावर अहंमतेचा पगडा बसलेला आहे, ते बिचारे मला प्राप्त होत नाहींत; म्हणून जन्ममरणांच्या दोन्ही तीरांच्या मध्येंच घुचकळ्या खात बसतात। ६२ एऱ्हवीं मी कसा आहें म्हणशील, तर सूर्य ज्याप्रमाणें चोहेंकडून पाहणाराला आपल्या तोंडासमोर दिसतो, तथापि त्याच्यामध्यें केव्हां दिसणें व केव्हां न दिसणें ही जी उणीव आहे, ती माझ्या ठिकाणीं नाहीं. ६३

**अन्वयार्थ**—(मया अव्यक्तमूर्तिना)–ज्याचें स्वरूप व्यक्त नाहीं अशा मी–(इदं सर्वं जगत्)–हें सर्व जगत्–(ततं)–व्यापलें आहे–(सर्वभूतानि)–सर्व भूतें–(मत्स्थानि)–माझ्यामध्यें स्थित आहेत.–( च )–पण–( अहं )–मी–( तेषु )–त्या भूतांमध्यें–(न अवस्थितः)–अवस्थित नाहीं. मी त्या भूतांत राहिलों नाहीं. ४

माझ्या निर्गुण स्वरूपाचा विस्तार हें सर्व जगच नव्हे का ? ज्याप्रमाणें, दूध सहज जरी थिजलें तरी तेंच दहीं; ६४ किंवा बीजाचाच वृक्ष होतो, अथवा सुवर्णाचे अलंकार होतात, त्याचप्रमाणें, निर्गुण असा जो एकटा मी, त्या माझा जो विस्तार, तेंच हें जग होय. ६५ माझें हें स्वरूप अव्यक्त असतें तेव्हां निराकार असतें; तेंच मग सृष्टीच्या रूपानें विस्तार पावून आकाराला येतें. याप्रमाणें निर्गुण असून साकार झालेला जो मी, त्यानेंच हें त्रैलोक्य मांडलें, असें जाण, ६६ महत्तत्त्वापासून देहापर्यंत हीं सर्वही भूतें खरोखर माझ्याच सत्तेवर भासतात, ज्याप्रमाणें पाण्याच्या ठिकाणीं फेंस भासतो. ६७ परंतु त्या फेंसाच्या आंत पाहूं गेलें असतां पाणी दिसत नाहीं; किंवा, अर्जुना, स्वप्नांत जीवाचें अनेक रूपें धारण करणें, ज्याप्रमाणें जागें झाल्यावर नाहींसें होतें; ६८ त्याचप्रमाणें हीं भूतें जरी माझ्या ठिकाणीं भासलीं, तरी त्यांचे ठिकाणीं मी नाहीं हें उपपादन तुला मागें ( अ. ७ श्लोक १२ ) सांगितलेंच आहे. ६९ म्हणून बोललेल्या गोष्टीचा पाल्हाळ करूं नये, तेव्हां तें राहूं दे. परंतु तुझ्या दृष्टीचा प्रवेश माझ्या यथार्थ स्वरूपाचे ठिकाणीं होऊं दे. ७०

**अन्वयार्थ**—(भूतानि)–सर्व प्राणी–(मत्स्थानि)–वस्तुतः माझ्यामध्यें–( न च )–नाहींत–(मे)–माझें–(ऐश्वरं)–ईश्वरसंबंधीं–(योगं)–स्वरूप–(पश्य)–पहा–(भूतभृत्)–मी सर्व भूतांचे धारण–पोषण करणारा आहें.–(च)–पण–(भूतस्थः न)–भूतांत राहिलेलों नाहीं,–(मम आत्मा)–माझें स्वरूप–(भूतभावनः)–सर्व भूतांना उत्पन्न करणारें आहे.५

१ मिळाल्याशिवाय कशी राहील ? २ शंकडा एक रुपयांच्या व्याजाकरितां. ३ सोप्या उपायानें जाणलें जाणारें. ४ अति सुखकारक. ५ उत्कृष्ट, धर्मयुक्त. ६ अनुकूलता, आनंद. ७ जवळ. ८ रक्तच. ९ बेडकांना. १० पुष्परज. ११ बेडकांना. १२ घरीं. १३ मोहरा, सुवर्ण इत्यादिकांनीं भरून पुरलेल्या कढया. १४ दारिद्र्यानें जिंकला जातो. १५ वास, विश्रांतिस्थान. १६ घोट. १७ शिंपी मिळाल्यानें. १८ लगबगीनें. १९ दोन्ही तिरांच्या मध्यें. २० बुचकळत, बुचकळ्या खात. २१ तोटयाचा, न्यूनतेचा. २२ म्हणशील तर. २३ नव्हे काय? २४ थिजलें. २५ सुवर्णच. २६ अस्पष्टपणानें. २७ पातळ झालें. २८ निराकारच साकार झाले तोच हा जगदाकार. २९ महत्तत्त्वापासून देहापर्यंत. ३० सर्व. ३१ प्रतिबिंबित झालेली. ३२ जागे झाल्यावर. ३३ उपपादन. ३४ सप्तमाध्यायाच्या बाराव्या श्लोकांत. ३५ सप्तमाध्यायाच्या बाविसाव्या श्लोकांत बोललेल्या. ३६ पाल्हाळ. ३७ राहो. ३८ दृष्टि.

आमुचा प्रकृतीपैलीकडील भावो । जरी कल्पनेवीण लागसी पाहों । तरी
मजमाजि भूतें हेंही वावो । जें मी सर्व म्हणउनी ७१ एऱ्हवीं संकल्पाचिये
सांजवेळे । नावेकं तिमिरेजती बुद्धीचे डोळे । म्हणोनि अखंडितचि परि झां-
वळें । भूतभिन्न ऐसें देखे ७२ तेचि संकल्पाची सांज जैं लोपे । तैं अखंडि-
तचि आहे स्वरूपें । जैसें शंका जातखेंवो लोपे । सापपण माळेचें ७३ एऱ्हवीं
तरी भूमीआंतूनि स्वयंभ । काय घडेयागाडगेयाचे निघती कोंभ । परि ते कुं-
लालमतीचे गर्भ । उमटले कीं ७४ नातरी सागरींच्या पाणी । काय तरंगा-
चिया आहाती खाणी । ते अवांतर करणी । वारयाची नव्हे ७५ पाहें पां का-
पसाच्या पोटीं । काय कापडाची होती पेटी । तो वेढितयांचिया दिठी । का-
पड जाहला ७६ जरी सोनें लेणें होउनी घडे । तरी तयाचें सोनेंपण न मोडे ।
येर अळंकार हे वरिचिलीकडे । लेतयांचेनि भावें ७७ सांगें पडिसादाची प्रत्यु-
त्तरें । कां आरिसां जें आविर्ष्करें । तें आपलें कीं सांचोकारें । तेथेंचि होतें ७८
तैसी इये निर्मळ माझ्या स्वरूपीं । जो भूतभावना आरोपी । तयासि तयाच्या
संकल्पीं । भूतभासु असे ७९ तेचि कल्पिती प्रकृती पुरे । तरि भूताभासु आ-
धींचि सरे । मग स्वरूप उरे एकसरें । निखळ माझें ८० हें असो आंगीं भर-
लिया भवंडी । जैशा भोंवत दिसती अरडीदरडी । तैशी आपुलिया कल्पना
अखंडीं । गमती भूतें ८१ तेचि कल्पना सांडूनि पाहीं । तरि मी भूतीं भूतें
माझिया ठायीं । हें स्वप्नींही परि नाहीं । कल्पावयाजोगें ८२ अतां मीच एक
भूतातें धर्ता । अथवा भूतांमाजि मी असता । या संकल्पसन्निपाता- । आंतु-
लिया बोलियां ८३ म्हणोनि परियेसीं गा प्रियोत्तमा । यापरी मी विश्वेंसीं वि-
श्वात्मा । जो इया लटकिया भूतग्रामा । भाव्यु सदा ८४ रश्मीचेनि आधारें
जैसें । नव्हे तेंचि मृगजळ आभासे । माझ्या ठायीं भूतजात तैसें । आणि मा-
तेंही भावीं ८५ मी ये परीचा भूतभावनु । परि सर्व भूतांसि अभिन्नु । जैसी
प्रभा आणि भानु । एकचि ते ८६ हा आमुचा ऐश्वर्ययोगु । तुवां देखिला कीं चांगु ।
आतां सांगें कांहीं एथ लागु । भूतभेदाचा असे ८७ यालागीं मजपासूनि भूतें ।
आनें नव्हती हें निरुतें । आणि भूतांवेगळिया मातें । कहींच न मनीं हो ८८

यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् । भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥६॥

पैं गगन जेवढें जैसें । पवनुहि ... जें हालविलिया

मयेच्या पलीकडील माझें जें स्वरूप, तें जर तूं आपल्या कल्पनेशिवाय पाहूं लागलास, तर माझे ठिकाणीं सर्व भूतें आहेत, असें जें तुला सांगितलें तें सर्व मिथ्या आहे, असें तुला भासेल; कारण सर्व मीच आहें. ७१ एऱ्हवीं, संकल्परूप संध्याकाळचे वेळेस ज्ञानरूप डोळे अज्ञानरूप अंधकारानें कांहीं वेळ झांकले जातात; म्हणून त्या झांजडींत, मी अखंड असतां भूतें मजहून निराळीं दृष्टीस पडतात. ७२ ज्याप्रमाणें माळेवरील सापाची भ्रांति गेल्याबरोबर माळ शिल्लक राहते, त्याप्रमाणें त्याच संकल्पाची संध्याकाळची वेळ नाहींशी झाल्याबरोबर, माझें अखंडीत स्वरूपच अवशेष राहतें. ७३ भूतभेदाच्या प्रतीतीला पाहणाराचा संकल्पच कारण आहे, ह्यास दृष्टांत-घागर, मडकी वगैरेंचे जमिनीतून काय कोंम निघतात? नाहीं! परंतु कुंभाराच्या बुद्धीनें ते सर्व तयार होतात. ७४ किंवा समुद्राच्या पाण्यांत लाटांच्या काय खाणी आहेत? तर तें कृत्य वाऱ्याचें नाहीं का? ७५ हें महाकापसाच्या पोटांत कापडाचे गठ्ठे आहेत का? वापरणाराच्या समजुतीनें तो कापूस कापड बनला आहे! ७६ जर सोन्याचे दागिने बनविले, तर सोनेंपण नाहींसें होत नाहीं; बाकी स्थूलदृष्टीनें वापरणाराच्या कल्पनेनें ते दागिने दिसतात; ७७ आपल्या शब्दाचा जो प्रतिध्वनि ऐकूं येतो, किंवा आरशांत जें आपलें स्वरूप आपण पाहतों, तो खरोखर आपल्या बोलण्याचा किंवा पाहण्याचा परिणाम आहे, किंवा आपल्या पूर्वीच तें तेथें खरेपणानें होतें का सांग बरें! ७८ त्याप्रमाणें, ह्या माझ्या निरूपाधिक स्वरूपावर जो भूतांच्या कल्पनेचा आरोप करतो, त्याला त्याच्या कल्पनेमुळें माझ्या ठिकाणीं भूतांचा भास होतो. ७९ तीच कल्पना करणारी माया संपली, म्हणजे माझ्या ठिकाणचा भूतांचा भास अगोदरच नसतो; मग माझें निरुपाधिक असें जें शुद्ध स्वरूप, तेंच निखालस उरतें. ८० हें असो; आपल्या भोंवतीं गरगर फिरतांना भोंवंड आल्यावर ज्याप्रमाणें डोंगर वगैरे फिरतातसे दिसतात, त्याप्रमाणें आपल्या मनांत कल्पना उत्पन्न झाल्यावर अखंड ब्रह्मस्वरूपांत भूतांचा भास होतो; ८१ तीच कल्पना सोडून जर पाहिलें, तर मी भूतांच्या ठिकाणीं व भूतें माझ्या ठिकाणीं आहेत, अशी स्वप्नांत देखील कल्पना करण्यासारखी गोष्ट नाहीं. ८२ आतां, 'मीच एक भूतांचा धारण करणारा अथवा भूतांत असणारा' या सर्व गोष्टी संकल्परूप सन्निपात वायूच्या लहरींतील बडबडी आहेत. ८३ म्हणून, हे प्रियोत्तमा, ऐक कीं, अशा प्रकारें मी सृष्टीचा विश्वात्मा किंवा खोट्या सृष्टीचा आधार, ह्या कल्पना मिथ्या आहेत. ८४ ज्याप्रमाणें सूर्याच्या किरणावर वास्तविक नसून मृगजळ आहेसें दिसतें, त्याप्रमाणें माझ्या निर्गुणस्वरूपाचे ठिकाणीं सर्व भूतें आहेत अशी भावना करितात; इतकेंच नव्हे तर, मीही एक त्यांच्यामध्यें आहे अशी भावना करितात. ८५ ह्याप्रकारें कल्पून मी भूतांची उत्पत्ति करितों असें म्हणतात. परंतु वास्तविक भूतें आणि मी एकच. ज्याप्रमाणें सूर्य व सूर्याची प्रभा हीं दोन्ही एक असतात. ८६ हा आमचा ऐश्वर्ययोग तुला चांगला समजला ना? तर आतां सांग बरें कीं, मी व प्राणिमात्र यांच्यांत कांहींतरी भेदाचा संबंध आहे काय? ८७ याकरितां, माझ्याहून सर्व प्राणिमात्र खरोखर वेगळे नाहींत; आणि मीही त्यांच्यापासून वेगळा आहें असें कधींच समजूं नको हो! ८८

**अन्वयार्थ**—(यथा)—ज्याप्रमाणें—(सर्वत्रगः)—सर्व जागीं जाणारा—(महान्)—मोठा—(वायुः)—वायु—(नित्यं)—नेहमीं—हमेष —(आकाशस्थितः)—आकाशांत स्थित असतो.—(तथा)—त्याप्रमाणें—(सर्वाणि भूतानि)—सर्व भूतें—(मत्स्थानि)—माझ्यामध्यें स्थित आहेत—(इति)—असा—(उपधारय)—निश्चय कर. ६.

१ स्वरूप, सत्ता. २ मिथ्या. ३ संध्याकाळीं. ४ कांहीं वेळ. ५ अंधुक होतात. ६ झांजडांत, काळोखांत. ७ वेगवेगळीं भूतें. ८ जाताक्षणीं. ९ घडांव हांड्यामडक्यांचे. १० कुंभाराच्या बुद्धीचें. ११ तीं वाऱ्याचीच स्वतंत्र कृति नव्हे काय? १२ गठ्ठा. १३ कोष्ट्याच्या, वापरणाराच्या. १४ वरवर पहातां. १५ लेणाराच्या, घालणाराच्या. १६ प्रतिध्वनीची. १७ आरशांत. १८ प्रगट होतें. १९ खरेपणानें. २० भूतांची कल्पना. २१ स्थापन करितो. २२ कल्पना करणारी. २३ माया संपली, नाहींशी झाली. २४ नाहींसा होतो. २५ शुद्ध, निव्वळ. २६ भोंवळ भोवंडी. २७ भोंवतालचें गिरिकंदर. २८ ब्रह्मीं. २९ धारण करणारा. ३० असणारा. ३१ संकल्परूप सन्निपाताच्या वायूच्या लहरींत. ३२ गोष्टी. ३३ सृष्टीला. ३४ भावना करण्याजोगा. ३५ सूर्य किरणांच्या. ३६ प्राणिमात्र. ३७ कल्पी. ३८ भूतांना उत्पन्न करणारा. ३९ एकरूप, निराळा नव्हे. ४० अद्भुतशक्ति. ४१ संबंध. ४२ वेगळी. ४३ खरें.

वेगळा दिसे । एऱ्हवीं गगन तेंचि तो ८९ तैसें भूतजात माझ्या ठायीं । क-
ल्पिजे तरी आभासे[१] कांहीं । निर्विकल्पीं[२] तरि नाहीं । येथ मीचि मी आघवें ९०
म्हणऊनि नाहीं आणि असे । हें कल्पनेचोनि सौरसें[३] । जें कल्पनालोपें भ्रंशे ।
आणि कल्पनेसवें होय ९१ तेंचि कल्पितें[४] मुद्दल जाये । तैं असे नाहीं हें कें
आहे । म्हणऊनि पुढती तूं पाहे । हा ऐश्वर्ययोगु ९२ ऐसिया प्रतीतिबोधसागरीं[५] ।
तूं आपणेंयातें कल्लोळु[६] एक करीं । मग जंव पाहासी चराचरीं । तंव तूंचि आ-
हासी ९३ या जाणणेयाचा[७] चेवो । तुज आला ना म्हणती देवो । तरी आतां
द्वैत स्वप्न वावो[८] । जालें कीं ना ९४ तरी पुढती जरी विपायें[९] । बुद्धीसि कल्प-
नेची झोंप ये । तरी अभेदबोधु जाये । जैं स्वप्नीं पडिजे ९५ म्हणोनि ये नि-
द्रेची वाट मोडे । निखिळें उद्बोधींचेंचि[११] आपणपें घडे । ऐसें वर्म जें आहे
फुडें[१२] । तें दावों आतां ९६ तरी धनुर्धर धैर्या[१३] । निकें अवधान देईं बा धनं-
जया । पैं सर्व भूतांतें माया । करी[१४] हरी गा ९७

सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् । कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥७॥

जिये नांव गा प्रकृती । जे द्विविधा सांगितली तुजप्रती । एकीं अष्टधा[१५]
भेदव्यक्ती । दुजी जीवरूपा ९८ हा प्रकृतीविखो[१६] आघवा । तुवां मागां परि-
सिलासे पांडवा । म्हणोनि असो काई सांगावा । पुढतपुढती ९९ तरी ये मा-
झिये प्रकृती । महाकल्पाच्या अंतीं । सर्व भूतें अव्यक्तीं[१७] । ऐक्यासि येती १००
ग्रीष्माच्या अतिरसीं[१८] । सबीजें[१९] तृणें जैसीं । मागुती भूमीसी । सुलीनें[२०] होती १ कां
वार्षियें[२१] ढेंढें[२२] फिटे[२३] । जेव्हां शारदीयेचा[२४] अनुघडु[२५] फुटे[२६] । तेव्हां घनजात[२७] आटे ।
गगनींचे गगनीं २ नातरी आकाशाचे खोपें[२८] । वायु निवांतुचि लोपे । कां तरं-
गता हारपे । जळीं जेवीं ३ अथवा जागिनलिये[३०] वेळे । स्वप्न मनींचें मनीं
मावळे । तैसें प्राकृत[३१] प्रकृतीं मिळे । कल्पक्षयीं ४ मग कल्पादीं[३२] पुढती ।
मीचि सृजीं ऐसी वदती[३३] । तरी इयेविषयीं निरुती[३४] । उपपत्ती[३५] आइक ५

प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः । भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥८॥

तरी हेचि प्रकृती किरीटी । मी स्वकीया सहजें अधिष्टीं[३६] । तेथ तंतुसमवाय[३७]
पटीं[३८] । जेविं विणावणी[३९] दिसे ६ मग तिये विणावणीचेनि आधारें । लहाना
चौकडिया पटत्व भरे । तैसी पंचात्मकें[४०] आकारें । प्रकृतीचि होय ७ जैसें वि-
रजणियाचेनि संगें । दूधचि आटेजों[४१] लागे । तैसी प्रकृती आंगा रिगे । सृष्टी-

आकाशाचा जेवढा विस्तार आहे, तेवढा वारा भरून राहिलेला आहे; परंतु तो सहज हालवला, तर आकाशापासून निराळा भासतो. एऱ्हवीं आकाश तेंच तो आहे, ८९ त्याप्रमाणें, प्राणी माझ्या ठिकाणीं आहेत अशी मनांत कल्पना आली, तर माझ्या ठिकाणीं भूतें आहेत, असें भासतें, तेंच कल्पनेच्या अभावीं पाहूं गेलें असतां सर्वत्र मी एकच आहें. ९० म्हणून भूतांचें नसणें आणि असणें हें कल्पनेच्या संबंधानें भासतें; व जें कल्पना नाहींशी झाल्यावर भासत नाहीं आणि कल्पनेबरोबर भासतें, ९१ तेंच कल्पना उत्पन्न करणारें अज्ञान, समूळ नाहींसें झाल्यावर, भूतांचें असणें व नसणें हें कोठून भासणार? म्हणून यापुढें माझी अद्भुत कृति तुला सांगतों, ती पहा. ९२ अशा या अनुभवरूपी समुद्रांत तूं स्वतः एक लाट बनून रहा; मग तूं या चराचराकडे पाहूं लागलास, म्हणजे सर्वत्र तूंच भरला आहेस असें तुझ्या दृष्टीस पडेल! ९३ देव म्हणालेः–अर्जुना! हें जें मीं तुला ज्ञान सांगितलें, त्याचा तुझ्या मनांत कांहीं प्रकाश पडला का? आतां तरी तुला जें मी व विश्व हीं दोन आहेत असें स्वप्न पडलें होतें, तें खोटें ठरलेंना? ९४ परंतु तुझ्या बुद्धीला पुनः जर कल्पनारूपी झोंप लागली, तर भेदरूपी स्वप्नांत पडशील व अभेदबोध ( जागृति ) नष्ट होऊन जाईल; ९५ म्हणून या कल्पनारूप निद्रेचीच वाट मोडून, शुद्ध बोधरूप आपणच आहोंत अशा ज्ञानाचें जें एक वर्म आहे तें तुला आतां पुढें सांगतों. ९६ तर, हे धैर्यवान् धनुर्धरा धनंजया, तूं नीट लक्ष दे, कीं प्राणिमात्राची उत्पत्ति, स्थिति व लय यांस एक मायाच कारण आहे. ९७

**अन्वयार्थ**—(कौन्तेय)–हे कुंतिपुत्रा अर्जुना!–(कल्पक्षये)–कल्पाचा क्षय झाला असतां,–(सर्वभूतानि)–सर्व भूतें–(मामिकां प्रकृतिं)–माझ्या अपरा प्रकृतीला–(यान्ति)–प्राप्त होतात.–(पुनः)–पण पुनः–(कल्पादौ)–कल्पाच्या आरंभीं–(अहं) –मी–(तानि)–त्याच भूतांना–(विसृजामि)–उत्पन्न करतों. ७

त्या मायेला प्रकृति असें म्हणतात, व ती दोन प्रकारची आहे; म्हणून तुला पूर्वी [ मागें अध्याय ७ श्लोक ४।५ सांगितलेंच ] आहे. पैकीं एक आठ प्रकारच्या रूपानें भिन्न आहे व दुसरी जीवरूप अशी आहे. ९८ हे पांडवा, हा प्रकृतीचा सर्व विषय तूं पूर्वी ऐकलाच आहेस, म्हणून त्याबद्दल पुनः पुनः सांगण्याचें कारण नाहीं. ९९ तरी महाकल्पाच्या शेवटीं हीं सर्व भूतें माझ्या प्रकृतिरूप अव्यक्त स्वरूपांत लय पावतात. १०० ग्रीष्मऋतूच्या शेवटीं ज्याप्रमाणें गवत बीजासह पुनः जमिनींत जिरून जातें; १ किंवा वर्षाकाळच्या मेघांचें अवडंबर संपल्यावर शरदृतूचा अंकुर फुटतो, तेव्हां सर्व आकाशांतील ढग आकाशांतच जिरून जातात; २ अथवा आकाशाच्या पोकळींत ज्याप्रमाणें वायु नाहींसा होतो, किंवा पाण्यांत उत्पन्न झालेल्या लाटा पाण्यांतच नाहींतशा होतात, ३ किंवा जागें झाल्यावर मनांतलें स्वप्न मनांतच मावळतें, त्याप्रमाणें महाकल्पाच्या शेवटीं प्रकृतीपासून उत्पन्न झालेलीं सर्व भूतें प्रकृतींतच मिळतात; ४ मग सृष्टीच्या आरंभीं पुनः तीं मीच निर्माण करितों अशी जी शास्त्रांत बोलवा आहे, तीविषयींची खरी स्थिति तुला सांगतों, ती ऐक. ५

**अन्वयार्थ**—(स्वां प्रकृतिं)–आपल्या प्रकृतीला–(अवष्टभ्य)–स्वाधीन करून–(प्रकृतेः वशात् अवशं)–स्वभाववशात् परतंत्र झालेल्या–(इमं कृत्स्नं भूतग्रामं)–या सर्व भूतसमूहास–(पुनः पुनः)–पुनः पुनः–(विसृजामि)–मी उत्पन्न करतों.

तर, अर्जुना, त्याच माझ्या प्रकृतीचा मी जेव्हां सहज अंगीकार करतो, तेव्हां वस्त्राच्या विणीमध्यें तंतूंचा जसा संबंध दिसतो, ६ आणि मग त्या विणकरीच्या आधारानें जसें लहान लहान चौकड्यांनीं वस्त्र बनतें, त्याप्रमाणें पंचमहाभूतांच्या आकारानें प्रकृतीच बनते. ७ ज्याप्रमाणें विरजणाच्या संगतीनें ( संबंधानें ) दूधच आळूं लागतें (घट्ट होऊं लागतें), त्याप्रमाणें प्रकृति सृष्टीच्या आकारानें परिणाम पावूं लागते, स्वतः प्रकृतीच सृष्टी बनूं लागते.

१ भासतें. २ कल्पनेच्या अभावीं. ३ संबंधानें. ४ कल्पिणारें. ५ अनुभवानें. ६ तरंग. ७ ज्ञानाचा प्रकाश. ८ व्यर्थ. ९ कदाचित्. १० शुद्ध. ११ मद्धज्ञानाचें. १२ खरें. १३ धैर्याच्या पुतळ्या. १४ उत्पत्ति व संहार करिते. १५ आठ प्रकारच्या रूपानें. १६ मायेचा विषय. १७ अस्पष्ट, जीवप्रकृतींत=अव्यक्त जी प्रकृति तींत. १८ कडक उन्हांत. १९ बीजासहित. २० गुप्त होतात. २१ वर्षाकाळचें. २२ अवडंबर. २३ मावळतें. २४ शरदृतूचा. २५ अंकूर. २६ प्रगटे. २७ मेघसमूह. २८ पोकळींत. २९ जागें झाल्यावर. ३० प्रकृतीपासून झालेलें. ३१ महा प्रलयाच्या शेवटीं. ३२ सृष्टीच्या आरंभीं. ३३ बोलवा, वार्ता. ३४ खरी. ३५ विचारपद्धति, व्याख्या. ३६ आश्रय करितो. ३७ तंतूंचा समुदाय–संबंध. ३८ वस्त्रामध्यें. ३९ विणकर. ४० पंचमहाभूतात्मक. ४१ विरजूं लागतें.

पणाचिया ८ बीज जळाची जवळीक लाहे । आणि तेंचि शाखोपशाखीं होये । तैसें मज करणें आहे । भूतांचें हें ९ अगा नगर हें रायें केलें । या म्हणणया साचपण कीर आलें । पारि निरुतें पाहतां काय सिणले । रायाचे हात ११० आणि मी प्रकृती अधिष्ठीं तें कैसें । जैसा स्वप्नीं जो असे । मग तोचि प्रवेशे । जागृतावस्थे ११ तरि स्वप्नौनि जागृती येतां । काय पाय दुखती पंडुसुता । कीं स्वप्नामाजि असतां । प्रवासु होय १२ या आघवियाचा अभिप्रावो कायी । जे हें भूतसृष्टीचें कांहीं । मज एकही करणें नाहीं । ऐसाचि अर्थु १३ जैसी रायें अधिष्ठिली प्रजा । व्यापारे आपुलालिया काजा । तैसा प्रकृतिसंगु हा माझा । येर करणें तें इयेचें १४ पाहे पां पूर्णचंद्राचिये भेटी । समुद्रीं अपार भरतें दाटी । तेथ चंद्रासि काय किरीटी । उँपखा पडे १५ जड पारि जवळिका । लोह चळे तरी चळो कां । तरि कवणु शीणु भ्रामका । सन्निधानाचा १६ किंबहुना यापरी । मी निजप्रकृती अंगिकारीं । आणि भूतसृष्टी एकसरी । प्रसवोंचि[11] लागे १७ जो हा भूतग्रामु आघवा । असे प्रकृतीअधीन पांडवा । जैसी बीजाचिया वेलपालवा । समर्थ भूमि १८ नातरी बाळादिकां वयसां । गोसांवी देहसंगु जैसा । अथवा घनावळी आकाशा । वांर्षिये जेवीं १९ कां स्वप्नासि कारण निद्रा । तैसी प्रकृती हे नरेंद्रा । या अशेषाहि भूतसमुद्रा । गोसांविणी गा १२० स्थावरा आणि जंगमा । स्थूळा अथवा सूक्ष्मा । हे असो भूतग्रामा । प्रकृतिचि मूळ २१ म्हणोनि भूतें हन सृजावीं । कां सृजिलीं प्रतिपाळावीं । इयें करणीं न येती आघवीं । आमुचिया आंगा २२ जळीं चंद्रकेचियें पसरती वेली । ते वाढी चंद्रें नाहीं वाढविली । तेविं मातें पावोनि ठेलीं[23] । दूरी कर्में २३

न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय । उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥

आंगें सुटलिया सिंधुजळाचा लोटु । न शके धरूं सैंधवांचा घाटु । तेविं सकळ कर्मां मीच शेवटु । तीं काय बांधती मातें २४ धूम्ररजांची पिंजेरीं । वाजतिया वायूतें जरी होकारी । कां सूर्यबिंबामाझारीं आंधारें शिरे २५ हें असो पर्वताचिये हृदयीचें । जेविं पर्जन्यधारास्तव न[28] खोंचे । तेविं कर्मजात प्रकृतीचें । न लगे मज २६ एऱ्हवीं इये प्रकृतिविकारीं । एकु मीचि असे अवधारीं । पारि उदासीनाचिया परी । करीं ना करवीं २७ जैसा दीपु ठेविला परिवरीं । कवणातें नियमी ना निवारी । आणि कवण कवणिये व्यापारीं ।

(पाणी हें जसें निमित्त आहे) ८ ज्याप्रमाणें, पाण्याच्या सान्निध्यानें बीजाला फांद्या वगैरे फुटून त्याचें झाड होतें, त्याप्रमाणें प्रकृतीचा पसारा माझ्यामुळें होतो. (तसाच मी सृष्टीचें निमित्त आहें.) ९ अरे, एकादें शहर राजानें वसविलें ह्या म्हणण्यांत जरी खरेपणा असला तरी खरोखर पाहूं गेलें असतां राजाच्या हाताला कांहीं शीण पडतो का? ११० आणि मी प्रकृतीचा स्वीकार करतों, तो कसा म्हणशील तर जसा स्वप्नावस्थेंत असलेला मनुष्य जागृदावस्थेंत येतो तसा. ११ तर, हे पांडुसुता, स्वप्नावस्थेंतून जागृदावस्थेंत येतांना त्या मनुष्याचे पाय दुखतात का? किंवा स्वप्नांत असतांना त्याला खरोखर फिरण्याचे श्रम तरी होतात का? १२ या सर्वांचा अभिप्राय काय म्हणशील, तर ही भूतसृष्टि निर्माण करण्याला मला कांहींएक करावें लागत नाहीं, हाच अर्थ आहे. १३ ज्याप्रमाणें राजानें आज्ञेंत ठेविलेली प्रजा आपआपल्या कामाकरितां व्यापार करते, त्याप्रमाणें, प्रकृतीचा व माझा संबंध मात्र आहे. एऱ्हवीं उत्पत्ति, स्थिति व लय हे सर्व व्यापार तिचेच आहेत. १४ हें पहा, पौर्णिमेचा चंद्राची भेट होतांच समुद्राला अपार भरती येते, पण, अर्जुना, एथें चंद्राला कांहीं श्रम पडतात का? १५ लोखंड जड असूनही लोहचुंबक जवळ असल्यानें जरी हालतें, तरी लोहचुंबकाला लोखंडाच्या जवळ असण्यांत श्रम का आहेत! १६ किंबहुना, याप्रमाणें मी स्वकीय प्रकृतीचा अंगीकार केला म्हणजे एकदम प्राणिमात्राची उत्पत्ति होऊं लागते. १७ हे पांडवा, हा सर्व प्राणिसमुदाय प्रकृतीच्या अधीन आहे. ज्याप्रमाणें बीजाला वेली, पानें वगैरे उत्पन्न करण्यास भूमि समर्थ आहे, १८ अथवा बालपण, तारुण्य व वृद्धपण या अवस्थांना ज्याप्रमाणें देहसंग हें मुख्य कारण आहे, किंवा आकाशांत मेघपंक्ति उत्पन्न होण्यास जसा वर्षाकाल कारण आहे, १९ किंवा स्वप्नाला जशी निद्रा कारण आहे, त्याचप्रमाणें, हे नरेंद्रा, या सर्व प्राणिसमुदायाला प्रकृति मुख्य कारण होय; १२० स्थावर-जंगमाला, स्थूलसूक्ष्माला, फार काय सांगावें, या सर्व जगाला प्रकृतीच मूळ कारण होय. २१ म्हणून, प्राणी उत्पन्न करावे किंवा उत्पन्न झालेल्यांचा प्रतिपाल करावा, या सर्व कर्तांचें कर्तृत्व मजकडे येत नाहीं. २२ पाण्यांत चंद्राचा प्रकाश वेल पसरल्याप्रमाणें दिसतो, त्याची उत्पत्ति चंद्रानें केली नाहीं, त्याप्रमाणें हीं कर्में मजपासून उत्पन्न झालेलीं असूनही मजपासून दूरच असतात. २३

**अन्वयार्थ**—(च)—आणि—(धनंजय)—हे अर्जुना!—(तानि कर्माणि)—तीं कर्में—(उदासीनवत् आसीनं)—उदासीनाप्रमाणें असणाऱ्या—(तेषु कर्मसु असक्तं)—त्या कर्मांच्या फलांची इच्छा न ठेवणाऱ्या—(मां)—मला—(न निबध्नन्ति)—बद्ध करीत नाहींत. ९

ज्याप्रमाणें, समुद्राच्या पाण्याचा लोट वाहूं लागल्यावर त्याला मिठाच्या बांध आडवूं शकत नाहीं, त्याप्रमाणें, माझ्यांत लय पावणारीं सर्व कर्में मला कशीं बांधूं शकतील? २४ धुराचा लोट जर वाहणाऱ्या वायूस हांक मारून अडथळा करील, किंवा सूर्यबिंबांत अंधार शिरेल, २५ फार काय सांगावें! ज्याप्रमाणें पर्वताच्या पोटांतील द्रव्यांना पर्जन्याच्या अतिवृष्टीनेंही कांहीं बाधा होत नाहीं; त्याप्रमाणें, प्रकृतीच्या कर्मांपासून मला कांहींएक बाधा होत नाहीं. २६ एऱ्हवीं त्या प्रकृतीच्या कार्याला मीच एक कारण आहें असें समज; परंतु उदासीनाप्रमाणें मी कांहीं करीत नाहीं, व करवीतही नाहीं. २७ ज्याप्रमाणें, घरांत ठेवलेला दिवा अमुक कर किंवा करूं नको असें कोणाला सांगत नाहीं, आणि कोण

१ लाहे=सान्निध्य. २ तें बीजच. ३ खरेपणानें. ४ स्वप्नांतून. ५ आज्ञेंत ठेविलेली. ६ करिते. ७ श्रम. ८ लोहचुंबकाला. ९ हालवून जवळ आणण्याना. १० एकदम. ११ उत्पन्न होऊं लागते. १२ प्राणिसमुदाय. १३ वेलिपल्लवांला. १४ अवस्थांना. १५ प्रभु, स्वामी. १६ मेघपंक्ति. १७ पर्जन्यकाळीं आकाशांत मेघ उत्पन्न होण्यास वर्षाकाळ कारण. १८ स्वामिनी. १९ उत्पन्न करावी. २० ह्या कृती. २१ चांदण्याच्या. २२ शुद्धि. २३ राहिलीं. २४ मिठाचा. २५ धुराच्या. २६ कणांना. २६ पिंगरा, छन. २७ थांबवी, उभे करी. २८ मोसकले जात नाहीं. २९ प्रकृतिकार्यांत. ३० घरांत.

राहाटे तेंहि नेणें २८ तो जैसा कां साक्षिभूतु[2] । गृह[3]व्यापारप्रवृत्तिहेतु । तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असें २९ हा एकचि अभिप्रावो पुढतपुढती । काय सांगों बहुतां उपपत्ती । येथ एकहेळां सुभद्रापती । येतुलें जाण पां १३०

मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् । हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥

जे लोक[6]चेष्टां समस्तां । जैसा निमित्तमात्र कां सविता । तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता । हेतु मी जाणें ३१ कां जें मियां अधिष्ठिलिया प्रकृती । होती चराचराचिया संभूती । म्हणोनि मी हेतु हे उपपत्ती । घडे येया ३२ आतां येणें उजिवेडें निरुतें । न्याहाळीं पां ऐश्वर्ययोगातें । जे माझ्या ठायीं भूतें । परी भूतीं मी नसें ३३ अथवा भूतें ना माझ्या ठायीं । आणि भूतांमाजि मी नाहीं । या खुणा तूं कहीं । चुकों नको ३४ हें सर्वस्व आमुचें गूढ । पारी दाविलें तुज उघड । आतां इंद्रियीं देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ३५ हा दंशु जंव नये हातां । तंव माझें सांचोकारेपण पार्था । न संपडे गा सर्वथा । जेविं तुंषीं कणु ३६ एऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें[18] । आवडे कीर कळलें ऐसें । पारि मृगजळाचेनि वोलांशें । काय भूमि तिमे[21] ३७ जें जाळ जळीं पांगिलें । तेथ चंद्रबिंब दिसे आंतुडलें । पारि थडिये काढूनि झाडिलें । तेव्हां बिंब कें सांगें ३८ तैसें बोलेंवरी वाचाबळें । वायांचि झकविजती प्रतीतीचे डोळे । मग सांचोकारें बोधावेळे । आथि ना होइजे ३९

अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् । परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥

किंबहुना भवां बिहाया । आणि साचें चाड आथि जरी मियां । तरि तूं गा उपपत्ती[32] इया । जतन कीजे १४० एऱ्हवीं दिठी वेधली कैवळें । तैं चांदणियातें म्हणे पिंवळें । तेविं माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखती दोष ४१ नातरी ज्वरें विटाळलें मुख । तें दुधातें म्हणे कडू विख । तेविं अमानुषा मानुष । मानिती मातें ४२ म्हणऊनि पुढतपुढती धनंजया । झणें विसंबसी या अभिप्राया । जे यिया स्थूलदृष्टी वायां । जाइजेल गा ४३ पैं स्थूलदृष्टी देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें । जैसें स्वप्नींचेनि अमृतें । अमरा नोहिजे ४४ एऱ्हवीं स्थूलदृष्टी मूढ । मातें जाणती कीर दृढ । पारि तें जाणणेंचि जाणणेया आड । रिगोनि ठाके ४५ जैसा नक्षत्राचिया आभासा- । साठीं घातु झाला तया हंसा । माजीं रत्नबुद्धीचिया आशा । रिगोनियां ४६ सांगें गंगा या बुद्धी

काय व्यापार करतो हेंही जाणीत नाहीं, २८ तो साक्षिभूत असून गृहकृत्यांची प्रवृत्ति होण्यास कारणीभूत होतो; त्याप्रमाणें मी भूतांच्या कर्मांमध्यें उदासीन असाच भूतांमध्यें असतों. २९ हा एकच अभिप्राय खरा आहे. पुनः पुनः पुष्कळ पर्यायांनीं काय सांगूं ? तर, हे सुभद्रापति एकदां एव्हढेंच लक्षांत ठेव. १३०

**अन्वयार्थ**––(मया अध्यक्षेण)–केवल ज्ञानस्वरूप अशा मज अध्यक्षामुळें–माझ्या निमित्तानें–(प्रकृतिः)–माझी त्रिगुणात्मिका माया–(सचराचरं)–सचराचर जगाला–(सूयते)–उत्पन्न करते.–(कौन्तेय)–हे कुंतीपुत्रा !–(अनेन हेतुना)–या अध्यक्षत्वाच्या निमित्तानें–(जगत्)–सर्व सृष्टि–(विपरिवर्तते)–प्रवृत्त होते. १०

अर्जुना, सर्व सृष्टींतील लोकांच्या व्यापारास ज्याप्रमाणें सूर्य हा केवळ कारणीभूत आहे, त्याप्रमाणें, जगाच्या उत्पत्तीला मी कारण आहें असें जाण. ३१ का कीं, ज्यावेळीं मी मायेचा अंगिकार करतों, त्यावेळीं तिच्या योगानें प्राणिमात्राची उत्पत्ति होते; म्हणून या जगाच्या उत्पत्तीचें कारण मी, अशी लोकांची समजूत आहे. ३२ तेव्हां माझ्यापासून भूतांची उत्पत्ति जरी होते, तरी भूतांत मी नाहीं, ही माझी अद्भुत करणी या ज्ञानाच्या उजेडानें नीट न्याहाळून पहा. ३३ अथवा प्राणी माझ्या ठिकाणीं नाहींत, व मी त्यांच्या ठिकाणीं नाहीं हें मुख्य वर्म तूं कधींही विसरूं नको. ३४ हें माझें मुख्य वर्म तुला उघड करून दाखविलें आहे, तर आतां तूं आपल्या इंद्रियांचीं दारें बंद करून म्हणजे विषयभोग बंद करून त्यांना कळूं न देतां आपल्या हृदयांत याचा उपभोग घे. ३५ पार्था, हें वेदांतसिद्धांतांचें वर्म जोंपर्यंत हातीं लागलें नाहीं, तोंपर्यंत माझें खरें स्वरूप कधींही कळणार नाहीं, ज्याप्रमाणें, कोंडयांत शोधूं लागलें असतां दाण्याचा एक कण सुद्धां सांपडत नाहीं; ३६ एव्हढीं अनुमानाच्या जोरावर जीवांना परमात्मज्ञान झालें आहे, असें वाटतें खरें, परंतु तें व्यर्थ ! कारण, मृगजलाच्या ओलाव्यानें जमीन कधीं भिजली आहे का ? नाहीं. ३७ माशाला धरण्याकरितां जें जाळें पाण्यांत पसरतात, त्यांत चंद्राचें बिंब सांपडल्यासारखें दिसतें, परंतु तें जाळें नदीच्या कांठावर काढून झाडल्यावर चंद्रबिंब कोठें असतें, सांग बरें ? ३८ त्याचप्रमाणें, 'आम्हांला अनुभव आला' असें शब्दांच्या च वाणीच्या योगानें कित्येक लोक वरकरणी दाखवितात; पण मग खऱ्या बोधाच्या परीक्षेची वेळ आली म्हणजे त्या वेळेस खरोखर त्यांना असलेलें वाचाळज्ञान निरुपयोगी होतें. ३९

**अन्वयार्थ**––( मूढाः )–अविवेकी लोक–( भूतमहेश्वरं मम परं भावं )–सर्व भूतांचा महान् ईश्वर अशा माझ्या श्रेष्ठ भावास–(अजानन्तः)–न जाणणारे असे होऊन–(मानुषीं तनुं आश्रितं मां)–मनुष्याची तनु धारण केलेल्या मला–(अवजानन्ति)–तुच्छ लेखितात, माझी अवज्ञा करितात. ११"

किंबहुना, या संसाराला भिऊन माझ्या प्राप्तीची जर खरी इच्छा असली तर तुला हें जें मी वर्म सांगितलें, तें आपल्या लक्षांत पूर्ण बाणीव. १४० एव्हवीं काविळीच्या योगानें दृष्टि दूषित झाल्यावर तो मनुष्य चांदण्याला पिवळें म्हणतो, त्याप्रमाणें निर्दोष असें जें माझें शुद्ध स्वरूप, त्या स्वरूपाच्या ठिकाणीं त्याला दोष दिसतात. ४१ किंवा तापानें कडू तोंड झाल्यावर त्याला ज्याप्रमाणें दूध विषासारखें कडू लागतें, त्याप्रमाणें मी मनुष्य नसूनही मनुष्य आहें असें मला मानतात. ४२ म्हणून हे धनंजया, वारंवार सांगतों कीं, या अभिप्रायाला कदाचित् विसरशील हो ! कारण, जर नुसत्या स्थूल दृष्टीनें पाहूं लागलास, तर तुझें पाहणें व्यर्थ होईल. ४३ ज्याप्रमाणें स्वप्नांतील अमृतानें कोणी अमर होत नाहीं, त्याप्रमाणें जे मला स्थूलदृष्टीनें पहातात ते खरोखर मला पहात नाहींत. ४४ एव्हवीं अज्ञानी लोक स्थूलदृष्टीनें मला जाणलें असें म्हणतात, परंतु त्यांचें स्थूलदृष्टीचें जाणणेंच यथार्थ ज्ञानाच्या आड येतें. ४५ ज्याप्रमाणें नक्षत्राचें प्रतिबिंब पाण्यांत पाहून तें मोतीच आहे असें समजून तें प्राप्त करून घेण्याकरितां हंसपक्षी आकाशांतून उडी टाकून प्राणास मुकतो; ४६ गंगा आहे असें

१ व्यवहार करितो, २ द्रष्टा, साक्षी. ३ गृहकृत्यांची प्रवृत्ति होण्यास कारण. ४ सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय या कर्मांत. ५ उदासीन. ६ लोकांच्या व्यापारास. ७ जगाच्या उत्पत्तीला. ८ आश्रय केला. ९ उत्पत्ति. १० विचारपद्धति. ११ जगाला. १२ ज्ञानाच्या प्रकाशानें. १३ वर्म. १४ इंद्रियांचें दार लावून. १५ मर्म. १६ खरेंपण. १७ कोंड्यांत. १८ मार्गानें, साधनानें. १९ वाटे. २० ओलाव्यानें. २१ भिजे. २२ जाळें. २३ पसरलें. २४ सांपडलें. २५ तीरावर. २६ शब्दांना. २७ फसविले जातो. २८ अनुभवाचे. २९ खरेंपण. ३० संसारास. ३१ भिऊन. ३२ ह्या युक्ति. ३३ काविळीनें. ३४ दूषित झालें. ३५ अमानुष–अलौकिकाला, मनुष्य नसून. ३६ प्रतिबिंबामुळें.

मृगजळ । ठाकोनि आलियाचें कवण फळ । काय सुरतरु म्हणोनि बाबुळ । सेविली कैरी ४७ हार निळयोंचाचि दुसरा । या बुद्धी हातु घातला विखौरा । कां रत्नें म्हणोनि गारा । वेंचि जेवीं ४८ अथवा निधान हें प्रगटलें । म्हणोनि खदिरांगौर खोंळे भरिले । कां साउली नेणतां घातलें । कुंहां सिंहें ४९ तेवीं मी म्हणोनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिघली कृतनिश्चयाची । तिहीं चंद्रासाठीं जेवीं जळींची । प्रतिभा धरिली १५० तैसा कृतनिश्चय वांया गेला । जैसा कोण्ही एकु कांजी प्याला । मग परिणाम पाहों लागला । अमृताचा ५१ तैसें स्थूलाकारी नाशिवंतें । भरंवसा बांधोनि चित्तें । पाहती मज अविनाशातें । तरी कैंचा दिसे ५२ अगा काई पश्चिमसमुद्राचिया तटा । निघिजेत आहे पूर्विलियें याटा । कां कोंडा कांडतां सुभटा । कणु आतुडे ५३ तैसें विकारलें हें स्थूळ । जाणितलेया मी जाणवतसें केवळ । काई फेणें पितां जळ । सेविलें होय ५४ म्हणोनि मोहिलेंनि मनोधर्में । हेंचि मी मानूनि संभ्रमें । मग येथिचीं जियें जन्मकर्में । तियें मजचि म्हणती ५५ येतुलेनि अनामा नाम । मज अक्रियासि कर्म । विदेहासि देहधर्म । आरोपिती ५६ मज आकारशून्या आकारु । निरुपाधिका उपचारु । मज विधिवर्जिता व्यवहारु । आचारादिक । ५७ मज वर्णहीना वर्णु । गुणातीतासि गुणु । मज अचरणा चरणु । अपाणिया पाणी ५८ मज अमेया मान । सर्वगतासी स्थान । जैसें सेजेमाजीं वन । निदेलीं देखे ५९ तैसें अश्रवणा श्रोत्र । मज अचक्षूसी नेत्र । अगोत्रा गोत्र । अरूपा रूप १६० मज अव्यक्तासि व्यक्ती । अनार्तासी आर्ती । स्वयंतृप्ता तृप्ती । भाविती गा ६१ मज अनावरणा प्रावरण । भूषणातीतासि भूषण । मज सकळ कारणा कारण । देखती ते ६२ मज सहजातें करिती । स्वयंभातें प्रतिष्ठिती । निरंतरातें आव्हानिती । विसर्जिती गा ६३ मी सर्वदा स्वतःसिध्दु । तो कीं बाळ तरुण वृध्दु । मज एकरूपा संबंधु । जाणती ऐसे ६४ मज अद्वैतासि दुजें । मज अकर्तयासि काजें । मी अभोक्ता कीं भुंजे । ऐसें म्हणती ६५ मज अकुळाचें कुळ वानिती । मज नित्याचे निधनें शिणती । मज सर्वांतरातें कल्पिती । अरि मित्र गा ६६ मी स्वानंदाभिरामु । तया मज अनेकसुखांचा कामु । आघवाचि मी असें समु । कीं म्हणती एकदेशी ६७ मी आत्मा एक चराचरीं । म्हणती एकाचा कैपक्ष करीं । आणि कोपोनि एकातें मारीं । हेंचि वाढविती ६८ किंबहुना ऐसे स-

समजून मृगजळाजवळ जर कोणी गेला, तर त्याला त्या ठिकाणीं काय प्राप्त होईल सांग बरें ? त्याचप्रमाणें, कल्पवृक्ष समजून बाभूळ हातीं धरल्यावर त्याचा काय उपयोग होणार ? ४७ नीलमण्याचा दोन सरांचा हार समजून जर कवडया सर्पाला हातीं धरलें, किंवा रत्न समजून गारा वेंचून घेतल्या, ४८ अथवा द्रव्याचा ठेवा जमिनीतून वर येऊन उजेड पडला आहे असें समजून खैराचे निखारे पदरांत घेतले, अथवा आपलीच पडछाया पाण्यांत पडली आहे, असें न जाणतां सिंह विहिरींत उडी टाकून ज्याप्रमाणें प्राणास मुकतो, ४९ त्याप्रमाणें प्रपंचांत मी साकार दिसतो तसाच आहें, अशा कृतनिश्चयानें जे वागतात ते, चंद्राच्या ऐवजी त्याचें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब धरण्याकरितां प्रयत्न करणाऱ्याप्रमाणें फसतात; १५० त्याचप्रमाणें, संसारांत मी आहें, असा जो त्यांचा कृतनिश्चय तो वायां जातो. जसा कोणी एकादा कांजी पिऊन अमृतापासून होणाऱ्या सुखाचा लाभ इच्छितो; ५१ त्याप्रमाणें अंतःकरणपूर्वक भरंवशानें नाशवंत अशा स्थूलाकारालाच अविनाशी अशा बुद्धीनें मला पहातात, तर मी त्यांना कसा दिसेन ? ५२ हें पहा; कोणी पश्चिमसमुद्राच्या तटाला जाण्याच्या हेतूनें पूर्व दिशेच्या समुद्राच्या वाटेला जाऊं लागला, तर त्याला पश्चिम समुद्र प्राप्त होईल का ? किंवा हे महावीरा, कोंडा कांडूं लागलें असतां त्यांत धान्य प्राप्त होईल का ? ५३ त्याचप्रमाणें हें विस्तार पावलेलें जग जाणल्यानें, निर्दोष अशा मला जाणतां येईल का ? फेंस प्याल्यानें पाणी प्याल्याप्रमाणें होतें का ? ५४ म्हणून मायामोहित मनोवृत्तीनें संसारांतच मी आहें असें भ्रांतीनें मानून, तेथील जन्ममरणादि सर्वस्थिति मलाही आहेत असें समजतात. ५५ याप्रमाणें नामरहित, क्रियारहित व देहरहित असा जो मी त्या मला नामधारी, कर्मकारी व देहधर्मांनीं युक्त असणारा असें समजतात. ५६ मला निराकाराला आकार, निरुपाधिकाला उपचार, विधिनिषेधादिक अशा मला आचारादिक व्यवहार, ५७ मला जातिरहिताला जात, गुणातीताला गुण, चरणरहिताला चरण, हस्तरहिताला हस्त, ५८ मज परिमाणातीताला परिमाण, सर्वव्यापकाला ठिकाण; ज्याप्रमाणें अंथरुणांत निजलेला वनाची शोभा स्वप्नांत पहातो, ५९ त्याप्रमाणें कर्णरहिताला कान, नेत्ररहिताला नेत्र गोत्ररहिताला गोत्र, निराकाराला रूप, १६० अव्यक्त असा जो मी त्या मला व्यक्ति, निरिच्छास इच्छा, व जो मी स्वयमेव तृप्त आहे त्यास तृप्ति, अशा कल्पना करतात. ६१ मी वस्त्ररहित म्हणजे सर्व जगाला पांघरूण घालणारा त्या मला पांघरूण घालतात; भूषणातीत म्हणजे निराकार असा जो मी, त्या मला दागिने घालतात, मी सर्व जगाचा उत्पन्न करणारा असून, मला दुसऱ्यांनीं उत्पन्न केला आहे असें मानतात. ६२ मी स्वयमेव असून माझ्या मूर्ति करतात. मी स्वतःसिद्ध असून माझी प्राणप्रतिष्ठा करितात; व मी नित्य सर्वत्र असतां माझें आव्हान विसर्जन करतात. ६३ मी नेहमीं स्वयमेव व निराकारसिद्ध असून मला बाल्य, तारुण्य व वृद्ध अशा प्रकारचे संबंध ( अवस्था ) मला लावतात. ६४ मी अद्वैत असून माझ्या ठिकाणीं द्वैत मानतात. मी कांहींएक न करणारा असून कर्मे कर्ता व कांहीं न खाणारा असून खातों, असें म्हणतात, ६५ मला कुळ-गोत नसून माझ्या कुळाचें वर्णन करतात, मी नित्य असून मी मरतों असें मानून माझ्या मरणानें शोक करतात. तसेंच मी सर्वांच्या अंतर्यामीं रहाणारा असून अमक्याचा शत्रु, व अमक्याचा मित्र, अशी माझ्या ठिकाणीं कल्पना करतात. ६६ मी निजानंदांत निमग्न असणारा, त्या मला इतर सुखांची इच्छा करणारा असें मानतात, व सर्व ठिकाणीं माझी व्याप्ति समान असून मला एकदेशी म्हणजे एका स्थळीं राहणारा असें म्हणतात. ६७ मी सर्व स्थावरजंगमाचा आत्मा असून एकाचा कैवारी व एकावर रागावून त्यास मारणरा अशी माझी सर्वत्र प्रसिद्धि करतात. ६८ किंबहुना अशा

१ येऊन पोंहचण्याचें. २ काय करील ? उपयोग होईल ? ३ नील मण्यांचा दुपदरी हार. ४ सर्पाला. ५ द्रव्याचा ठेवा. ६ खैराचे निखारे. ७ पदरांत. ८ प्रतिबिंब. ९ उडी घातली. १० आडामध्यें. ११ पेज. १२ पूर्व दिशेच्या मार्गानें. १३ धान्य. १४ विस्तारलेलें. १५ जग. १६ निर्दोष. १७ फेंस. १८ भ्रांतीनें. १९ नामशून्याला. २० क्रियारहिताला. २१ देहरहिताला. २२ उत्पन्न होणें, वाढणें, लय पावणें इत्यादि. २३ सुखसाधनें, सुखसाहित्य. २४ कर्तव्याकर्तव्यरहिताला. २५ जातिरहिताला. २६ चरणरहिताला. २७ हस्तरहिताला २८ परिमाणातीताला. २९ परिमाण. ३० सर्व व्यापकाला. ३१ निजलेला. ३२ कान नसलेल्याला कान. ३३ नेत्ररहिताला. ३४ गोत्ररहिताला. ३५ निराकाराला. ३६ दुःखरहिताला. ३७ दुःख, पीडा. ३८ सर्व जगाला पांघरूण घालणारा. ३९ आच्छादन, पांघरूण. ४० सर्व उत्पन्न करणाराला. ४१ आपोआप झालेल्याला. ४२ मूर्ति करितात. ४३ स्वतःसिद्धाला. ४४ प्राणप्रतिष्ठा करितात. ४५ ओतप्रोत भरलेल्याला. ४६ आवाहन करितात. ४७ विसर्जन करितात, पोंहचवितात. ४८ अवस्था. ४९ द्वैत. ५० खातो, भोगतो. ५१ मरणानें. ५२ सर्वांचे अंतर्यामीं राहणाराला. ५३ शत्रु. ५४ निजानंदांत निमग्न. ५५ इच्छा. ५६ पक्षपात, कैवार. ५७ प्रसिद्धीस आणितात.

मस्त । जे हे मानुषधर्मे प्राकृत । तयाचि नांव मी ऐसें विपरीत । ज्ञान तयाचें ६९ जंव आकारु एक पुढां देखती । तंव हा देव येणें भावें भजती । मग तोचि विघडालिया टाकिती । नाहीं म्हणोनि १७० मातें येणें येणें प्रकारें । जाणती मनुष्य ऐसेनि आकारें । म्हणऊनि ज्ञानचि तें आंधारें । ज्ञानासि करी ७१

मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः । राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥१२॥

यालागीं जन्मलेंचि ते मोघ । जैसें वार्षियेवीणें मेघ । कां मृगजळाचे तरंग । दुरूनीचि पाहावे ७२ अथवा कोल्हेरीचे असिवार । नातरी वोडंबरीचे अळंकार । कीं गंधर्वनगरीचे आवार । अभासती कां ७३ सांबरी वाढिन्नल्या सरळा । वरी फळ ना आंतु पोकळा । कां स्तन जाले गळां । शेळिये जैसें ७४ तैसें मूर्खांचें तया जियालें । आणि धिग कर्म तयांचें निपजलें । जैसें साबरी फळ आलें । घेपे ना दीजे ७५ मग जें कांहीं ते पढिन्नले । तें मर्कटें नारेळ तोडिले । कां आंधळ्या हातीं पडिलें । मोतीं जैसें ७६ किंबहुना तयांचीं शास्त्रें । जैशीं कुमारीं हातीं दिधलीं शस्त्रें । कां अशौच्या मंत्रें । वीजें कथिलीं ७७ तैसें ज्ञानजात तयां । आणि जें कांहीं आचरलें गा धनंजया । तें आघवेंचि गेलें वायां । जे चित्तहीन ७८ पैं तमोगुणाची राक्षसी । जे सद्बुद्धीतें ग्रासी । विवेकाचा ठावोचि पुसी । निशाचरी जे ७९ तिये प्रकृती वरपडे जाले । म्हणऊनि चिंतेचेनि कर्पाटें गेले । वरि तामसीयेचिये पडिले । मुखामाजीं १८० जेथ आशेचिये लाळे । आंतु हिंसा जीभ लोळे । तेवींचि असंतोषाचे चोंकळे । अखंड चघळी ८१ जे अनर्थाचे कानचेरी । आवाळुवें चाटीत निघे बाहेरी । जे प्रमादपर्वतींची दरी । सदाचि मातली ८२ जेथ द्वेषाचिया दाढा । खसखसां ज्ञानाचा करिती रगडा । जे अगस्ती गवसणी मूढां । स्थूलबुद्धि ८३ ऐसे आसुरिये प्रकृतीचे तोंडीं । जे जाले गा भूतोंडीं । ते बुडोनि गेले कुंडीं । व्यामोहाच्या ८४ एवं तमाचिये पडिले गर्ते । न पविजतीचि विचाराचेनि हातें । हें असो ते गेले जेथें । ते शुद्धीचि नाहीं ८५ म्हणोनि असोतु इयें वायांणीं । कायसीं मूर्खांचीं बोलणीं । वायां वाढवितां वाणी । शिणेल हन ८६ ऐसें बोलिलें देवें । तेथ जी जी म्हणितलें पांडवें । आइकें जेथ वाचा विसंवे । ते साधुकथा ८७

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः । भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥१३॥

तरी जयाचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी । जया

प्रकारचे सर्व क्षुद्र मनुष्यधर्म, ते सर्व मला लागू आहेत असें त्यांचें विपरीत ज्ञान असतें. ६९ ज्या वेळेस ते दृष्टी-समोर एखादी मूर्ति पाहतात, त्या वेळेस ती देवच आहे या भावानें तिला भजतात; मग तीच भंगल्यावर तिच्यांतील देवपण नाहींसें झालें असें मानून तिचा त्याग करतात. १७० मला या प्रकारानें मनुष्यच आहे असें समजतात, म्हणून त्यांचें ज्ञानच खऱ्या ज्ञानाच्या आड येतें. ७१

**अन्वयार्थ**—(मोघाशाः)-त्यांच्या सर्व आशा व्यर्थ होतात;-(मोघकर्माणः)-त्यांचीं सर्व कर्मेंहि व्यर्थ होतात-(मोघज्ञानाः) त्यांचें ज्ञानहि निष्फल असतें-(विचेतसः)-ते विवेकशून्य होतात-(च एव)-आणि ते-(राक्षसीं)-राक्षसांच्या व -(आसुरीं)-आसुरांच्या-(मोहिनीं) मोह पाडणाऱ्या-(प्रकृतिं) प्रकृतीचा-(श्रिताः)-आश्रय केलेले असतात. १२

सारांश, ज्यांची मजविषयीं अशा प्रकारची समजूत असते त्यांचा जन्म व्यर्थच होय. ज्याप्रमाणें, पर्जन्यकालावांचून मेघ व्यर्थ आहेत, किंवा मृगजलाच्या लाटा जशा दुरूनच पाहण्यास योग्य होत, ७२ अथवा मातीच्या चित्रांतले घोडेस्वार, मांत्रिकानें केलेले अलंकार, किंवा संध्याकाळीं ढगांत दृष्टीस पडणारें नगर जसें भासतें; ७३ शेर जरी सरळ वाढला, तरी तो जसा आंत पोकळ असून वर फळही येत नाहीं, किंवा शेळीच्या गळ्याला उत्पन्न झालेल्या स्तनांतून जसें दूध निघत नाहीं, ७४ किंवा सांवरीच्या झाडाला फळ आलें असतां तें जसें कोणाला घेतां येत नाहीं व देतांही येत नाहीं, त्या प्रमाणें, त्या मूर्खांचें जिणें होय; आणि त्यांच्या केलेल्या धर्मालाही धिःकार असो ! ७५ मग त्या मूर्खांनीं जें कांहीं शास्त्राध्ययन केलें असेल, तें म्हणजे माकडानें नारळ तोडल्याप्रमाणें किंवा अंधळ्याला मोती सांपडावें त्याप्रमाणे होय. ७६ किंबहुना त्यांनीं अध्ययन केलेलीं शास्त्रें, लहान मुलींच्या हातांत दिलेल्या शस्त्रांप्रमाणें अथवा अशुचिर्भूताला बीजांसह शिकविलेल्या मंत्राप्रमाणें अनर्थकर होत. ७७ धनंजया, त्याचप्रमाणें, ज्यांचें चित्त त्यांच्या स्वाधीन नाहीं, त्यांचे वांकीचें सर्व ज्ञान व आचरण हीं व्यर्थ होत. ७८ याप्रमाणें तमोगुणरूप राक्षसी सद्बुद्धीला ग्रासून ज्ञानाचा ठाव ठिकाण नाहींसा करणारी जखीण आहे. ७९ त्या प्रकृतीनें जे ग्रस्त होतात, ते सदोदीत चिंताक्रांत असून शिवाय तामस प्रकृतीच्या आयतेच घशांत उतरतात. १८० जी राक्षसी प्रकृति आशारूप लाळेंत हिंसारूप जीभ लोळवून असंतोषरूप मांसाचे गोळे निरंतर चघळते; ८१ जी अनर्थरूप कानापर्यंत ओंठ चावीत बाहेर निघते; जी प्रमादरूपी म्हणजे चूकरूपी पर्वताची मोठी माजलेली दरी आहे; ८२ जिच्या द्वेषरूप दाढा खस खसा चावून ज्ञानाचा चुराडा करतात, व जी आगस्ति ऋषीला असलेल्या कुंभाच्या आवरणाप्रमाणें स्थूलबुद्धि लोकांना आसुरी मायेची गवसणी आहे; ८३ अशा प्रकारच्या त्या राक्षसी प्रकृतीच्या तोंडात जे बळी होऊन पडतात, ते भ्रांतिरूप कुंडांत बुडून जातात. ८४ याप्रमाणें जे अज्ञानाच्या खळग्यांत पडतात, त्यांना विचाररूपी हाताचें साह्य मिळत नाहीं, इतकेंच नव्हे, तर ते कोठें जातात त्याचा देखील पत्ता लागत नाहीं. ८५ म्हणून ही निष्फळ कथा राहूं दे. कारण मूर्खांचें व्यर्थ वर्णन केलें असतां वाणीला शीण मात्र होईल. ८६ असें श्रीकृष्ण बोलल्यावर अर्जुन 'हो हो खरें !' असें म्हणाला. नंतर भगवान फिरून म्हणतातः— जिचें वर्णन केलें असतां वाणीला सुख होतें, ती साधूंची कथा ऐक. ८७

**अन्वयार्थ**—(तु)-पण-(पार्थ)-हे अर्जुना !-(दैवीं प्रकृतिं आश्रिताः)-दैवी प्रकृतीचा आश्रय केलेले-(महात्मानः)-महात्मे-(मां)-मला-(अव्ययं भूतादिं)-नित्य, भूतांचें कारण -(ज्ञात्वा)-जाणून-(अनन्यमनसः)-अनन्यचित्त होऊन-(भजन्ति)-भजतात. १३

ज्या साधूंच्या निर्मळ अंतःकरणांत मी क्षेत्रसंन्यासी [ आजन्म एकाच पवित्र क्षेत्रांत राहण्याचा संकल्प करणारा ] होऊन वास करितों, व जे निजले

१ मनुष्याचे धर्म. २ काळोख, अज्ञान. ३ व्यर्थ. ४ पर्जन्यकाळावांचून. ५ मातीच्या चित्रांचे. ६ स्वार. ७ जादुगिरीचे. ८ आकाशांत नगराप्रमाणें दिसणारा ढगांचा क्षणिक देखावा. ९ गांवकुसें. १० भासतात. ११ शेर, हुरा. १२ शेळीचे. १३ अशुचिर्भूतास. १४ चित्त स्वाधीन नसणारे. १५ नाहींसा करी. १६ जखीण. १७ स्वाधीन झाले, ग्रस्त झाले. १८ दरींत, गुहेंत. १९ मांसगोळे. २० कानापर्यंत. २१ ओठांचा भाग. २२ जी माया सदोदीत मस्त असून प्रमाद (भूल) रूप पर्वताची गुहा आहे. २३ ज्या मूर्खांना चर्म व हाडें यांचें वेष्टण आहे व जे वरवर पहाणारे आहेत. २४ राक्षसी. २५ भूतबळी. २६ भ्रांतीच्या. २७ अज्ञानाच्या. २८ खळग्यांत. २९ सांपडत नाहींत, पोंचत नाहींत. ३० त्याचा पत्ताच लागत नाहीं म्हणून ह्या निष्फळ कथा राहूं दे. ३१ वर्णनें. ३२ विश्रांति पावे. ३३ जीवितावधि एकाच क्षेत्रीं वास्तव्याचा संकल्प केलेला.

मस्त । जे हे मानुषधर्म प्राकृत । तयाचि नांव मी ऐसें विपरीत । ज्ञान तयाचें
६९ जंव आकारु एक पुढां देखती । तंव हा देव येणें भावें भजती । मग तोचि
विघडालिया टाकिती । नाहीं म्हणोनि १७० मातें येणें येणें प्रकारें । जाणती
मनुष्य ऐसेनि आकारें । म्हणऊनि ज्ञानचि तें आंधारें । ज्ञानासि करी ७१

मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः । राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥१२॥

यालागीं जन्मलेचि ते मोघ । जैसें वार्षियेवीण मेघ । कां मृगजळाचे तरंग ।
दुरूनीचि पाहावे ७२ अथवा कोल्हेरीचे असिवार । नातरी वोडंबरीचे अळंकार ।
कीं गंधर्वनगरीचे आवार । अभासती कां ७३ सांबरी वाढिन्नल्या सरळा । वरी
फळ ना आंतु पोकळा । कां स्तन जाले गळां । शेळिये जैसें ७४ तैसें मूर्खांचें तया
जियालें । आणि धिग कर्म तयांचें निपजलें । जैसें साबरी फळ आलें । घेपे ना
दीजे ७५ मग जें कांहीं ते पढिन्नले । तें मर्कटें नारेळ तोडिले । कां आंधळ्या
हातीं पडिलें । मोतीं जैसें ७६ किंबहुना तयांचीं शास्त्रें । जैशीं कुमारीं हातीं दि-
धलीं शस्त्रें । कां अशौच्या मंत्रें । बीजें कथिलीं ७७ तैसें ज्ञानजात तयां । आणि
जें कांहीं आचरलें गा धनंजया । तें आघवेंचि गेलें वायां । जे चित्तहीन ७८ पैं
तमोगुणाची राक्षसी । जे सद्‌बुद्धीतें ग्रासी । विवेकाचा ठावोचि पुंसी । निशा-
चरी जे ७९ तिये प्रकृती वरपडे[१७] जाले । म्हणऊनि चिंतेचेनि कपाटें गेले । वरि
तामसीयेचिये पडिले । मुखामाजीं १८० जेथ आशेचिये लाळे । आंतु हिंसा
जीभ लोळे । तेवींचि असंतोषाचे चोकळे । अखंड चघळी ८१ जे अनर्थाचे
कोंनचेरी । आवाळुवें चाटीत निघे बाहेरी । जे प्रमादपर्वतींची[२२] दरी । सदाचि
मातली ८२ जेथ द्वेषाचिया दाढा । खसखसां ज्ञानाचा करिती रगडा । जे
अगस्ती गवसणी मूढां । स्थूलबुद्धि ८३ ऐसे आसुरिये प्रकृतीचे तोंडीं । जे
जाले गा भूतोंडीं । ते बुडोनि गेले कुंडीं । व्यामोहाच्या ८४ एवं तमाचिये
पडिले गर्तें । न [२९] पविजतीचि विचाराचेनि हातें । हें असो ते गेले जेथें । ते
शुद्धीचि नाहीं ८५ म्हणोनि असोतु इयें वायांणीं । कायशीं मूर्खांचीं बोलणीं ।
वायां वाढविता वाणी । शिणेल हन ८६ ऐसें बोलिलें देवें । तेथ जी जी
म्हणितलें पांडवें । आइकें जेथ वाचा विसंवे । ते साधुकथा ८७

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः । भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥१३॥

तरी जयाचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी । जया

असतांही वैराग्य ज्यांची सेवा करितें, (त्यामुळें त्यांना स्वप्नांतही विषयवासना होत नाहीं.) ८८ ज्यांच्या परमात्मप्राप्तीच्या उत्कट इच्छेंत धर्म राज्य करतो, व ज्यांचें मन नेहमी सद्विचारालाच पुष्टि देतें; ८९ जे ज्ञानरूप गंगेंत स्नान करून अंतर्बाह्य शुद्ध झाले; पूर्णब्रह्मस्वरूपाच्या प्राप्तीनें तृप्त झाले व ज्यांचें शरीरच शांतीला नवीन पालवी फुटल्याप्रमाणें झालें. १९० तसेंच ज्यांचें शरीर जणूं काय ब्रह्माचे कोंमच किंवा धैर्यरूप मंडपाचे खांबच होत; त्याचप्रमाणें जे आनंदसमुद्रांत बुडवून काढलेल्या कुंभाप्रमाणें ओतप्रोत भरलेले असून ९१ ज्यांना भक्तीची इतकी प्राप्ती झाली आहे की, जे मोक्षालाही मार्गें सर असें म्हणतात; व ज्यांच्या सहज लीलेंतही नीति जन्मली असें दिसतें; ९२ ज्यांनीं आपल्या सर्व अवयवांत शांतीरूप अलंकार घातले आहेत, व ज्यांनीं आपल्या चित्ताची मज सर्वव्यापकाला गवराणी केली आहे; ९३ असे जे महात्मे, ते भगवद्भक्तीला अनुकूल असणाऱ्या सात्त्विक प्रकृतीचें भाग्यच होत. दिसणाऱ्या सर्व वस्तु माझेंच रूप आहे असें जाणून, ९४ मग वाढत्या प्रेमानें ते महात्मे मला भजतात; पण त्यांच्या मनोधर्मानें द्वैताला स्पर्श सुद्धां केलेला नसतो. ९५ अर्जुना, अशा प्रकारें जे मद्रूप होऊन माझी सेवा करतात. त्या सेवेची आश्चर्यकारकच गोष्ट सांगावयाची राहिली आहे ती ऐक. ९६

**अन्वयार्थ**—(सततं)–अहोरात्र–(मां कीर्तयन्तः)–माझें कीर्तन–नामस्मरण करणारे–(च)–आणि–(यतन्तः)–इंद्रियनिग्रह, शम-दम इत्यादि धर्मांनीं यत्न करणारे,–(दृढव्रताः)–ज्यांचें अचांचल्य हेंच व्रत आहे, किंवा ज्यांचें ब्रह्मचर्यादि व शमादि व्रत दृढ आहे ते दृढव्रत–(च)–आणि–(मां)–मला–(नमस्यन्तः)–नमस्कार करणारे,–(भक्त्या)–परम प्रेमानें–(नित्ययुक्ताः)–नित्ययुक्त होऊन–(उपासते)–उपासना करितात. १४

तरी हरिकीर्तनाच्या प्रेमानें ते नटतात व नाचतात, त्यामुळें प्रायश्चित्ताचे सर्व व्यापार नाश पावले आहेत, व ज्या कीर्तनानें पापाचें नांव देखील राहूं दिलें नाहीं असें केलें. ९७ यम म्हणजे मनोनिग्रह व दम म्हणजे इंद्रियनिग्रह यांना निकृष्टदशा आणिली, तीर्थें आपआपल्या जागांवरून उठवून लावलीं, व यमलोकचे सर्व व्यापार बंद पाडले. ९८ यम ह्मणूं लागला कीं, 'कोणाचें नियमन करावें? दम म्हणाला कोणाला जिंकावें? व तीर्थें म्हणूं लागलीं "आम्ही कशाचें क्षालन करावें? कारण दोष औषधासही उरला नाहीं!" ९९ याप्रमाणें माझ्या नामघोषानें जगांतील सर्व प्राण्यांचीं दुःखें नाहींतशीं करतात, व सर्व जग ब्रह्मसुखानें दुमदुमून जातें. २०० ते साधु पहांट झाल्याशिवाय जीवांना प्रकाश म्हणजे आत्मज्ञान करून देतात; अमृताशिवाय प्राण्यांच्या जिवांचें रक्षण करतात व योगसाधनाशिवाय घडघडीत डोळ्यांसमोर मोक्ष दाखवितात. १ परंतु राजांत व रंकांत अंतर मानीत नाहींत व लहान थोर जाणीत नाहींत. याप्रमाणें जगाला सरसकट आनंदाचें माहेरघर होतात. २ वैकुंठास जाणारा क्वचित् आढळतो; परंतु ह्या साधूंनीं सर्व जगच वैकुंठ करून टाकलें; अशा माझ्या नामभजनाच्या योग्यतेनें सर्व पवित्र केलें. ३ त्या साधूंचें तेज सूर्याप्रमाणें निर्मळ आहे परंतु त्या सूर्यातही, तो अस्तास जातो, हा दोष आहे. चंद्रासारखे म्हणावें, तर तो एकादे वेळेसच पूर्ण असतो; परंतु हे साधु नेहमीच पूर्ण असतात. ४ यांचें औदार्य मेघाप्रमाणें म्हणावें, तर तो ओसरतो, म्हणून उपमा देण्यास योग्य होत नाहीं; तर हे साधु निःशंकपणें पंख असणाऱ्या सिंहाप्रमाणें होत. ५ ज्या माझ्या नांवाचा मुखानें एकदा यथार्थ उच्चार होण्याकरितां सहस्र जन्म माझी सेवा करावी लागते, तें माझें नांव ज्यांच्या वाचेपुढें कौतुकानें नाचत असतें. ६ (ज्या माझ्या नांवाचा असा महिमा आहे,) तो मी वैकुंठलोकींही नसतों; सूर्यमंडळांतही दिसत नाहीं; इतकेंच नव्हे, तर योग्यांच्याही मनांचें उल्लंघन करून जातों; ७ परंतु, हे पांडवा, जरी मी कोठें सांपडलों नाहीं, तरी जे माझ्या नांवाचा सतत घोष करितात, त्यांच्याजवळ सांपडायाचाच. ८ ते माझ्या गुणांनीं इतके तृप्त झालेले असतात कीं, ते देशकालाला विसरून मन्नामसंकीर्तनाच्या योगें

१ सेवा करी. २ राज्य. ३ पूर्ण ब्रह्मस्वरूपता. ४ तृप्त झाले. ५ पालवी. ६ ब्रह्माच्या रूपांतराचा. ७ बुडवून. ८ पचडी. ९ प्रतिष्ठा, योग्यता. १० मोक्षाला. ११ सजीव. १२ इंद्रियांचे ठायीं. १३ खोळ, आच्छादन. १४ महात्मे. १५ भगवद्भक्तीला अनुकूल असणाऱ्या सात्त्विक स्वभावाचे. १६ भाग्य. १७ आश्चर्य. १८ हरिगुणानुवाद गाण्यांत. १९ प्रेमानें उड्या मारणें. २० पापक्षालनाचे उपाय. २१ यम=मनोनिग्रह, दम=इंद्रियनिग्रह. २२ निकृष्टदशा. २३ नियमावें, निग्रह करावा. २४ जिंकावें. २५ उजाडवितात, प्रकाश देतात. २६ परवा. २७ विचार. २८ स्थान. २९ प्रकाशित केलें, पवित्र केलें. ३० निर्मळ. ३१ दोष, हीनपणा. ३२ रिकामा होतो, सरतो. ३३ कृपायुक्त, सकृप. ३४ हे सिंहासारखे असूनही सदय आहेत, पंचानन=सिंह. ३५ नटाप्रमाणें नाचते, भोज=नट, सोंग. ३६ सेवा करावी. ३७ सूर्यमंडळांत. ३८ उल्लंघून. ३९ हरवल्यास. ४० सांपडावा. ४१ तृप्त झाले.

निजेलियातें उपासी । वैराग्य गा ८८ जयाचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा । जयाचें मन ओलावा । विवेकासी ८९ जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले । जे शांतीसि आले । पालवें नवे १९० जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ । जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुंबकळोनि भरिले ९१ जयां भक्तीची येतुली प्रौढी । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती । जयांचिये लीळेमाजीं नीति । जियाली दिसे ९२ जे आघवांचि करणीं । लेइले शांतीचीं लेणीं । जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ९३ ऐसें जे महानुभाव । दैविये प्रकृतीचें दैव । जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ९४ मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे । परि दुजेपण मनोधर्में । शिवतलें नाहीं ९५ ऐसें मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा । परि नवलावो तो सांगावा । असे आइक ९६

सततं कीर्तयंतो मां यतन्तश्च दृढव्रताः । नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥

तरी कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे । जें नामचि नाहीं पापाचें । ऐसें केलें ९७ यमदमा अवकळा आणिली । तीर्थें ठायावरूनि उठविलीं । यमलोकींची खुंटिली । राहटी आघवी ९८ यमु म्हणे काय यमावें । दमु म्हणे कवणातें दमावें । तीर्थें म्हणतीं काय खावें । दोष ओखधासि नाहीं ९९ ऐसें माझेनि नामघोषें । नाहींचि करिती विश्वाचीं दुःखें । अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें २०० जे पाहांटेवीण पाहावित । अमृतेंवीण जीववित । योगेंवीण दावित । कैवल्य डोळां १ परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं । एकसरें आनंदाचें आवारु । होत जगा २ कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें । ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व ३ तेजें सूर्य तैसें सोज्वळ । परि तोहि अस्तवे हें किडाळ । चंद्र संपूर्ण एखादे वेळ । हे सदा पुरते ४ मेघ उदार परी वोसरे । म्हणऊनि उपमेसी न पुरे । हे निःशंकपणें सपांखरे । पंचानन ५ जयांचे वाचेपुढां भोजें । नाम नाचत असे माझें । जें जन्मसहस्रीं वोळगिजे । एकवेळ यावया ६ तो मी वैकुंठीं नसें । वेळ एक भानुबिंबींही न दिसें । वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि जाय ७ परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा । जेथ नामघोषु बरवा । करिती माझा ८ कैसे माझ्या गुणीं धाले ।

[भ]गवन कधी पुरे असें म्हणवतें का ? " २३० तेव्हां अर्जु[न]ाचें हें बोलणें ऐकून, त्याची श्रवणाची आतुरता पाहून [भ]गवान् सुखानें डोलूं लागले. ३१ आणि म्हणाले, "पार्था, [भ]ले शाबास! थाकी सांगितलेली गोष्ट पुनः सांगणें हें [य]ा युद्धाच्या वेळीं अनुचित आहे, पण तुझी ऐकण्याची [उ]त्कंठा पाहून मला सांगणें भाग पडतें." ३२ तेव्हां [अ]र्जुन म्हणतो, हें काय? चकोराशिवाय चांदण्याचा [उ]पयोग नाहींच की काय? जगालाही शांत करणें हा [त्य]ाचा स्वभावच आहे. ३३ चकोरपक्ष्यानें मात्र आपल्या [त]ृप्तीकरितां ज्याप्रमाणें चंद्राकडे चोंच करावी, त्याचप्रमाणें [आ]म्हीं आपली विनंति करावी हें थोडेंच, [त]ुं जगाचें कल्याण करण्याविषयीं आपण कृपासिंधू [झ]ाहांत. ३४ मेघ आपल्या थोरपणानें जगाची अडचण [नि]वारण करतो त्या त्याच्या मोठ्या वर्षावाच्या मानानें [पा]हिलें असतां चातकाची तहान ती केवढी असणार? [३]५ परंतु एक जरी चूळ भरण्याची इच्छा झाली तरी ज्या[प्र]माणें गंगेकडे जावें लागतें, त्याप्रमाणें आमची इच्छा थोडी [अ]सो की फार असो, तरी ती देवांनीं पूर्ण केलीच पाहिजे. [३६] तेव्हां देव म्हणालेः-अर्जुना, आतां तुझें बोलणें राहूं दे, [आ]म्हांला जो सांगण्याविषयीं संतोष झाला आहे, त्याला [स्तु]तीची आवश्यकता उरली नाहीं. ३७ परंतु तूं ज्याप्रमाणें [लक्ष] देऊन एवढा वेळ ऐकलेंस, तसेंच लक्ष देऊन आम[्हांस] बोलण्यास मेजवानी कर, (पुढेंही तसेंच ऐक.) [अश]ा रीतीनें श्रीहरीनीं अर्जुनास मान देऊन बोलण्यास [सुरु]वात केली. ३८

**अन्वयार्थ**—(च अपि)—पण—(अन्ये)—कांहीं उत्तम [अधि]कारी—(ज्ञानयज्ञेन)—भगवानाविषयींचें ज्ञान हाच यज्ञ [त्य]ा—(यजन्तः)—पूजा करणारे—(मां)—मला—(एकत्वेन)—एकच [आ]हा आहे, अशा ज्ञानानें—(उपासते)—उपासितात. कोणी—[(पृथक्]त्वेन)—सूर्य, चंद्र इत्यादि भेदानें माझी उपासना करि[तात] व कोणी—(विश्वतोमुखं)—तोच भगवान् सर्वतोमुख आहे, [विश्वरू]प आहे, असें समजून त्या विश्वरूपाला—(बहुधा)—अनेक [प्रका]रांनीं उपासितात. १५

[ज्ञ]ानयज्ञाचें लक्षण कोणतें म्हणशील, तर ज्या ठिकाणी [...]ें बहुत प्रकारचें होणें' म्हणजे आदिसंकल्प हाच यज्ञस्तंभ; पंचमहाभूतें हा यज्ञमंडप; जीव व ईश्वर यांचा भिन्नपणा हाच पशु; ३९ मग पंचमहाभूतांचे जे विशेष गुण ते, अथवा पांच इंद्रियें आणि पंचप्राण, हेंच यज्ञाचें साहित्य व ब्रह्माविषयीं जें अज्ञान तेंच तूप; २४० हे अर्जुना, त्या यज्ञांत मन व बुद्धि हीं दोन कुंडें असून या दोन कुंडांत ज्ञानरूप अग्नि प्रदीप्त केला जातो; सुख व दुःख यांचे ठिकाणीं जी समता तीच चळकट वेदिका म्हणजे यज्ञकुंडाचा ओटा आहे असें तूं समज. ४१ आत्मानात्मविचार करण्याविषयीं जी बुद्धीची कुशलता, तेच यज्ञांतील मंत्र होत; विद्येचें महत्व ही स्रुक् व शांति ही स्रुवा (स्रुक् व स्रुवा हीं दोन हवन साधनें) व जीव हा यज्ञ करणारा यजमान होय. ४२ तो यज्ञ करणारा जीव अनुभवरूप पात्रांनीं, ब्रह्माच्या विचाररूप महामंत्रांनीं, ज्ञानरूप अग्निहोत्री कर्मानें, जीव व ईश्वर यांच्या भिन्नपणाची आहुति देऊन तो भेद नाहींसा करतो. ४३ त्या वेळेस अज्ञान नाहींसें होऊन यज्ञ करणारा व यज्ञक्रिया ही आगचे जागींच रहातात, नंतर आत्मऐक्यरसांत जीवरूपी यजमानाचें जेव्हां अवभृतस्नान होतें, ४४ तेव्हां पंचमहाभूतें, शब्दस्पर्श इत्यादि विषय व इंद्रियें हीं वेगळालीं आहेत असें म्हणत नाहीं, व ब्रह्माशीं तादात्म्य झाल्यामुळें सर्व एक आहे असें तो ज्ञानी जाणतो. ४५ अर्जुना, ज्याप्रमाणें झोंपेंतून जागा झालेला मनुष्य म्हणतो की, स्वप्नांत पाहिलेली चित्रविचित्र सेना झोंप लागल्यामुळें मीच झालों होतों ना? ४६ आतां जी सेना पाहिली होती, ती सेना नव्हती, ती मीच झालों होतों; अर्जुना, अशा प्रकारें त्या पुरुषाला जग एकरूप भासतें; ४७ मग तो मी जीव आहे, असा व्यवहार करीत नाहीं. व ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत आत्माच भरलेला आहे असें मानतो. अशा प्रकारें ज्ञानयज्ञानें ऐक्य पावून कितीएक मला भजतात. ४८ कितीएक अनादि असलेल्या विश्वामध्यें एकासारखें दुसरें परंतु भिन्न, व त्यांचीं नांवें व रूपें हीं निरनिराळीं आहेत, ४९ म्हणून विश्वामध्यें भेद दिसला तरी त्याच्या ज्ञानांत भेद होत नाहीं. ज्याप्रमाणें अवयवांत भेद असला तरी देहांत भेद होत नाहीं. २५० किंवा फांद्या जरी लहान मोठ्या असल्या तरी त्या एकाच झाडाच्या असतात, अथवा

[...] करणारा, कार्यसाधु, उत्सुक. २ उत्कंठा. [३ ...] ४ गरजेसाठीं. ५ चोंच. ६ थोरपणानें, ७ [...] ९ इच्छा. १० लक्ष देऊन. ११ तें [...] मदत. १३ आधीं बोलून. १४ मुरु[...] इच्छा, माया. १६ यज्ञस्तंभ, १७ [...] १९ मन व बुद्धि या दोन कुंडांत. [...] २२ कुंडावरील ओटा. २३ विवेकयुक्त बुद्धीची कुशलता. २४ विद्यागौरव स्रुक् व शांति स्रुवा. २५ हवनपात्रें. २६ यज्ञ करणारा. २७ अनुभवाच्या. २८ जागच्या जागींच रहातें. २९ आत्मानंद रसांत, ३० यज्ञाच्या शेवटचें स्नान, त्यांत. ३१ शब्द स्पर्श आदिक. ३२ इंद्रियें. ३३ जागृत झालेला. ३४ वाटतें. ३५ ज्ञानयज्ञानें ३६ एकाला एक निराळें. ३७ निरनिराळे, भिन्नभिन्न.

पुरे म्हणवे २३० या बोला श्रीअनंतें। [१]लागेटा देखिलें तयांतें। कीं सुखावलेनि चित्तें। डोलतु असे ३१ म्हणे भलें केलें पार्थां। एऱ्हवीं हा अनवसरु सर्वथा। पारि बोलवीतसे [२]ओस्था। तुझी मातें ३२ तंव अर्जुन म्हणे हे कायी। चकोरेंवीण चांदिणेंचि नाहीं। जगचि [३]निर्वविजे हा तयाच्या ठायीं। स्वभावो कीं जी ३३ येरें चकोरें तिये आपुलिये [४]चाडे। चांचूं कारिती चंद्राकडे। तेवीं आम्ही विनवूं तें थोकडें। देवो कृपासिंधु ३४ जी मेघु आपुलिये [६]प्रौढी। जगाची [७]आर्ती दवडी। वांचूनि चातकाची ताहान केवढी। तो वर्षावो पाहुनी ३५ परि चुळा एकाचिया चाडे। जेवीं गंगेतेंचि [८]ठाकणें पडे। तेवीं [९]आर्त बहु कां थोडे। तरी सांगावें देवें ३६ तेथें देवें म्हणितलें राहें। जो संतोषु आम्हां जाहला आहे। तयावरी स्तुती साहे। ऐसें उरलें नाहीं ३७ पैं पारिसतु आहासि [१०]निकियांपरी। तेंचि[११] वक्तृत्वा [१२]वऱ्हाडीक करी। ऐसें [१३]पुरस्कारोनि श्रीहरी। [१४]आदरिलें बोलों ३८

ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते। एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥

तरी तो ज्ञानयज्ञु एवं रूपु। तेथ आदि[१५]संकल्पु हा [१६]यूपु। महाभूतें मंडपु। [१७]भेदु तो पशु ३९ मग पांचांचे जे विशेष गुण। अथवा इंद्रियें आणि प्राण। हेचि यज्ञो[१८]पचारभरण। अज्ञान घृत २४० तेथ मन[१९]बुद्धीचिया कुंडा। आंतु ज्ञानाग्नि [२०]धडफुंडा। साम्य तेचि [२१]सुहाडी। [२२]वेदिका जाणें ४१ सविवेक[२३]मतिपाटव। तेचि मंत्र [२४]विद्यागौरव। शांति [२५]स्रुक्स्रुव। जीवु [२६]यज्वा ४२ तो [२७]प्रतीतीचेनि पात्रें। विवेकमहामंत्रें। ज्ञानाग्निहोत्रें। भेदु नाशी ४३ तेथ अज्ञान सरोनि जाये। आणि यजिता यजन हें [२८]ठाये। [२९]आत्मसमरसीं न्हाये। [३०]अवभृथीं जेव्हां ४४ तेव्हां भूतें [३१]विषयें [३२]करणें। हें वेगळालें कांहीं न म्हणे। आघवें एकचि ऐसें जाणें। आत्मबुद्धि ४५ जैसा [३३]चेइला तो अर्जुना। म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना। मीचि जाहालों होतों ना। निद्रावशें ४६ आतां सेना ते सेना नव्हे। हें मीच एक आघवें। ऐसें एकत्वें [३४]मानवे। विश्व तयां ४७ मग तो जीवु हे भाष सरे। आब्रह्म परमात्मबोधें भरें। ऐसे भजती [३५]ज्ञानाध्वरें। एकत्वें येणें ४८ अथवा अनादि हें अनेक। जें [३६]आनासारिखें एका [३६]एक। आणि नामरूपादिक। तेंही [३७]विषमें ४९ म्हणोनि विश्व भिन्न भिन्न। पारि न भेदे तयाचें ज्ञान। जैसे अवयव तरी आन आन। पारि एकेचि देहींचे २५० कां शाखा सानिया थोरा। पारि आ

पुष्कळ किरणें दृष्टीस पडलीं तरी तीं जशीं एकाच सूर्याची असतात, ५१ त्याप्रमाणें अनेक व्यक्ति असून जरी त्यांचीं नांवें व स्वभाव भिन्न आहेत तरी भिन्नभिन्न भूतांमध्यें अभिन्न जो मी त्या मलाच जाणतात. ५२ हे पांडवा, अशा रीतीनें सर्व भूतें वेगळीं आहेत असें जाणून जे उत्तम असा ज्ञानयज्ञ करतात, व जे जाणते असल्यामुळें त्यांच्या ज्ञानाच्या ठिकाणीं भिन्नभाव उरत नाहीं; ५३ किंवा जेव्हां व ज्या ठिकाणीं ते जी जी वस्तु पाहतात, त्यांत माझ्यावांचून दुसरें कांहीं नाहीं असा ज्याच्या मनाचा निश्चय असतो; ५४ हें पहा-पाण्यावरील बुडबुडा जिकडे जातो तिकडे त्याला एक पाणीच आहे मग तो नाहींसा झाला अथवा राहिला तरी तो पाण्यांतच असतो; ५५ किंवा वाऱ्यानें मातीचे कण उंच उडाले तरी त्यांना कांहीं पृथ्वीपणाहून वेगळें केलें नाहीं; आणि पुनः जरी ते खालीं पडले तरी ते पृथ्वीवरच पडतात. ५६ त्याचप्रमाणें, पाहिजे तेथें पाहिजे त्या भावनेनें पाहिजेल ते होवो अथवा न होवो, परंतु, तें सर्व 'मीच आहें' अशी ज्यांचे मनाची वृत्ति होऊन गेली आहे; ५७ अर्जुना माझ्या स्वरूपाची जितकी व्यापकता आहे, तेवढाच त्यांचा बोध आहे; म्हणून बहुप्रकारानें जग दिसलें, तरी बहुरूपानें मीच आहें असा ते व्यवहार करतात. ५८ ज्याप्रमाणें सूर्यबिंब सर्वांना आपल्यासमोर सारखेंच दिसतें, त्याप्रमाणें ते सर्व विश्वाला बोधानें व्यापक असल्यामुळें सन्मुखच असतात. ५९ अर्जुना, त्यांच्या ज्ञानाला आंतबाहेर असा भेद नाहीं. ज्याप्रमाणें वायू हा आकाशांत सर्वत्र भरलेला आहे, २६० त्याप्रमाणें मी जेवढा संपूर्ण आहें, तेवढाच त्यांचा अस्तित्वभाव आहे, म्हणजे दोघांचें माप सारखें आहे; असा ज्याचा बोध आहे, त्यानें भजन जरी न केलें तरी तें सहजच घडतें. ६१ एऱ्हवीं तरी मी सर्वत्र भरलेला आहें, माझी कोण उपासना करीत नाहींत? सर्वांची सर्व ठिकाणीं सहजच उपासना चालली आहे असें असूनही ज्यांना मी अप्राप्त आहें, त्यांची उपासना माझें यथार्थ ज्ञान नाहीं म्हणून थांबल्यासारखी झाली आहे. ६२ परंतु हें असो; या योग्य ज्ञानयज्ञानें यज्ञ करून जे माझी उपासना करतात, ते भक्त तुला सांगितले. ६३ सदासर्वकाळीं जीं जीं कर्में होतात, तीं सर्व वाजूनें मला सहज पावतात; परंतु हें मूर्खांना समजत नसल्यामुळें मी त्यांना प्राप्त होत नाहीं. ६४

**अन्वयार्थ**—(अहं क्रतुः)-मी क्रतु-यज्ञ म्हणजे एक प्रकारचें वेदोक्त कर्म आहें.-(अहं यज्ञः)-मी वैश्वदेवादि स्मार्त धर्म आहें.-(अहं स्वधा)-मी पितरांना दिलेलें अन्न आहे.-(अहं औषधं)-तांदुळ, गहूं, इत्यादि धान्य ज्यांपासून होतें, त्या औषधी मी आहें-(मन्त्रः अहं)-मंत्र मी आहें.-(अहं एव आज्यं)-मीच आज्य म्ह० घृतादि हवि आहें.-(अहं अग्निः)-मीच अग्नि आहें-(अहं हुतं)-मीच हवनकर्म आहें. १६

त्याच ज्ञानाचा उदय झाला असतां, मुख्य वेद मीच आहें; त्यांत विधि-अनुष्ठान जें सांगितलें आहे तो क्रतुही (यज्ञ) मीच; ६५ मग, हे पांडवा, त्या कर्मांपासून प्रकट होणारा जो यथाविधि यज्ञ, तोहि मीच आहें; ६६ देवांस हवि देण्याचा मंत्र मी, पितरांसही हवी देण्याचा मंत्र मी; सोमवल्ली वगैरे नानाप्रकारच्या औषधि मी, घृत मी, समिधा मी, मंत्र मी, होमद्रव्य मी, ६७ ऋत्विज मी, ज्यांत हवन करावयाचें तो अग्निही माझें स्वरूप आहे आणि अग्नींत हवन करण्याच्या ज्या ज्या वस्तु, त्याही मीच आहें, ६८

**अन्वयार्थ**—(अहं अस्य जगतः)-मी या जगाचा-(पिता)-जनक आहें-(माता)-जननी आहें.-(धाता)-प्राण्यांना कर्मफल देणारा आहें.-(पितामहः) पित्याचा पिता आहें.-(वेद्यं)-ब्रह्मादि ज्ञेय वस्तु मी आहें.-(पवित्रं)-पावन करणारें यज्ञयागादि पुण्यकर्म मी आहें.-(ओंकारः)-प्रणव मी आहें.-(ऋक्)-ऋग्वेद.-(साम)-सामवेद,-(च यजुः एव)-आणि यजुर्वेद मी आहें. १७

हें पहा-ज्याच्या अंगसंगानें अष्टांग प्रकृति ही जगास प्रसवते, तो जगत्पिता मी, ६९ अर्धनारी नटेश्वर स्वरूपांत ज्याप्रमाणें पुरुष तोच स्त्री व स्त्री तोच पुरुष असतो, त्याप्रमाणें स्थावरजंगमाची माता ही मी; २७० आणि उत्पन्न झालेलें जग ज्या

---

१ किरण. २ निरनिराळ्या. ३ स्वभाव. ४ भिन्न भूतांमध्यें. ५ ज्ञानाला. ६ जिकडे. ७ तिकडे. ८ बारिक कण. ९ कोठें गेलें तरी पृथ्वीपण गेलें नाहीं. १० पुनः. ११ पाहिजे तेथें पाहिजे त्या भावनेनें. १२ न व्हावें. १३ अनुभव. १४ पुष्कळ व्यक्तींत. १५ पाहिजे त्यास. १६ आंतबाहेर असा भेद. १७ तोल, प्रमाण. १८ पूर्ण ज्ञानावांचून. १९ यजन करीत असतां. २० निरंतर. २१ पावतात. २२ ज्ञानाचा. २३ विधि अनुष्ठानाला. २४ यज्ञकर्म यज्ञही. २५ यज्ञविधान. २६ यथाविधि. २७ देवास हवि देण्याचा मंत्र. २८ पितरांस हवि देण्याचा मंत्र. २९ सोमवल्ली. ३० देवांचें तूप. ३१ होमद्रव्य. ३२ ऋत्विज. ३३ होमद्रव्य. ३४ स्थावरजंगमांत.

हाति एकाचिया तरुवरा । बहु रश्मि[१] पारे दिनकरा । एकाचे जेवीं ५१ तेवीं नानाविधा व्यक्ती । आनानें[२] नामें आनाना वृत्ती[३] । ऐसें जाणती भेदलां[४] भूतीं । अभेदा मातें ५२ येणें वेगळालेपणें पांडवा । करिती ज्ञानयज्ञु बरवा । जे न भेदती जाणिवा । जाणते म्हणउनी ५३ ना तरी जेधवां जिये ठायीं । देखती कां जें जें कांहीं । तें मीवांचूनि नाहीं । ऐसाचि बोधु ५४ पाहें पां बुडबुडा जेउंता[५] जाये । तेउंतें जळचि एक तया आहे । मग विरे अथवा राहे । तऱ्ही जळाचिमाजी ५५ कां पवनें परमाणु उचलले । ते पृथ्वीपणावेगळे नाहीं केले । आणि मांघौते जरी पडले । तरी पृथ्वीचिवरी ५६ तैसें भलेंतेथ भलतेणें भावें । भलतेंही हो अथवा नोहावें[१२] । पारे तें मी ऐसें आघवें । होऊनि ठेले ५७ अगा हे जेव्हडी माझी व्याप्ती । तेव्हडीचि तयांची प्रतीती[१३] । ऐसे बहुधांकारी वर्तती । बहुचि होउनी ५८ हें भानुबिंब आवडे[१५] तया । सन्मुख जैसें धनंजया । तैसे ते विश्वा या । समोर सदा ५९ अगा तयांचिया ज्ञाना । पाठीं[१६] पोट नाहीं अर्जुना । वायु जैसा गगना । सर्वांगीं असे २६० तैसा मी जेतुला आघवा । तेंचितुक[१७] तयांचिया सद्भावा । तरी न करितां पांडवा । भजन जहालें ६१ एऱ्हवीं तरी सकळ मीचि आहें । तरी कवणीं कें उपासिला नोहें । एथ एके जाणणेवीण ठाये । अप्राप्तासी ६२ पारे तें असो येणें उचितें । ज्ञानयज्ञें यजितसांते । उपासिती मातें । ते सांगितले ६३ अखंड सकळ हें सकळां मुखीं । सहज अर्पित असे मज एकीं । कीं नेणणें यासाठीं मूर्खीं । न पविजेचि मातें ६४

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाऽहमहमौषधम् । मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

तोचि जाणिवेचा[२२] जरी उदय होये । तरी मुद्दल वेदु मीचि आहें । आणि तो विधानातें[२३] जया विये । तो क्रतुही[२४] मीचि ६५ मग तया कर्मापासूनि[२५] बरवा । जो सांगोपांगु[२६] आघवा । यज्ञु प्रगटे पांडवा । तोही मी गा ६६ स्वाहा[२७] मी स्वधा । सोमादि[२९] औषधी विविधा । आज्य[३०] मी समिधा । मंत्रु मी हवि[३१] ६७ होता[३२] मी हवन कीजे । तेथ अग्नी तो स्वरूप माझें । आणि हुतकें[३३] वस्तु जें जें । तेंही मीचि ६८

पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः । वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥

पैं जयाचेनि अंगसंगें । इये प्रकृतीस्तव अष्टांगें । जन्म पाविजत असे जगें । तो पिता मी गा ६९ अर्धनारीनटेश्वरीं । जो पुरुष तोचि नारी । तेवीं मी चराचरीं[३४] । माताही होय २७० आणि जाहालें जग जेथ राहे । जेणें जी-

पुष्कळ किरणें दृष्टीस पडलीं तरी तीं जशीं एकाच सूर्याची असतात, ५१ त्याप्रमाणें अनेक व्यक्ति असून जरी त्यांचीं नांवें व स्वभाव भिन्न आहेत तरी भिन्नभिन्न भूतांमध्यें अभिन्न जो मी त्या मलाच जाणतात. ५२ हे पांडवा, अशा रीतीनें सर्व भूतें वेगळीं आहेत असें जाणून जे उत्तम असा ज्ञानयज्ञ करतात, व जे जाणते असल्यामुळें त्यांच्या ज्ञानाच्या ठिकाणीं भिन्नभाव उरत नाहीं; ५३ किंवा जेव्हां व ज्या ठिकाणी ते जी जी वस्तु पाहतात, त्यांत माझ्यावांचून दुसरें कांहीं नाहीं असा ज्याच्या मनाचा निश्चय असतो; ५४ हें पहा–पाण्यावरील बुडबुडा जिकडे जातो तिकडे त्याला एक पाणीच आहे मग तो नाहींसा झाला अथवा राहिला तरी तो पाण्यांतच असतो; ५५ किंवा वाऱ्यानें मातीचे कण उंच उडाले तरी त्यांना कांहीं पृथ्वीपणाहून वेगळें केलें नाहीं; आणि पुनः जरी ते खालीं पडले तरी ते पृथ्वीवरच पडतात. ५६ त्याचप्रमाणें, पाहिजे तेथें पाहिजे त्या भावनेनें पाहिजेल ते होवो अथवा न होवो, परंतु, तें सर्व 'मीच आहें' अशी ज्यांचे मनाची वृत्ति होऊन गेली आहे; ५७ अर्जुना माझ्या स्वरूपाची जितकी व्यापकता आहे, तेवढाच त्यांचा बोध आहे; म्हणून बहुप्रकारानें जग दिसलें, तरी बहुरूपानें मीच आहें असा ते व्यवहार करतात. ५८ ज्याप्रमाणें सूर्यबिंब सर्वांना आपल्यासमोर सारखेंच दिसतें, त्याप्रमाणें ते सर्व विश्वाला बोधानें व्यापक असल्यामुळें सन्मुखच असतात. ५९ अर्जुना, त्यांच्या ज्ञानाला आंतबाहेर असा भेद नाहीं. ज्याप्रमाणें वायू हा आकाशांत सर्वत्र भरलेला आहे, २६० त्याप्रमाणें मी जेवढा संपूर्ण आहें, तेवढाच त्यांचा अस्तित्वभाव आहे, म्हणजे दोघांचें माप सारखें आहे; असा ज्याचा बोध आहे, त्यानें भजन जरी न केलें तरी तें सहजच घडतें. ६१ एऱ्हवीं तरी मी सर्वत्र भरलेला आहें, माझी कोण उपासना करीत नाहींत ? सर्वांची सर्व ठिकाणीं सहजच उपासना चालली आहे असें असूनही ज्यांना मी अप्राप्त आहें, त्यांची उपासना माझें यथार्थ ज्ञान नाहीं म्हणून थांबल्यासारखी झाली आहे. ६२ परंतु हें असो; या योग्य ज्ञानयज्ञानें यज्ञ करून जे माझी उपासना करतात, ते भक्त तुला सांगितले. ६३ सदासर्वकाळीं जीं जीं कर्में होतात, तीं सर्व वाजून मला सहज पावतात; परंतु हें मूर्खांना समजत नसल्यामुळें मी त्यांना प्राप्त होत नाहीं. ६४

**अन्वयार्थ**—(अहं क्रतुः)–मी क्रतु–यज्ञ म्हणजे एक प्रकारचें वेदोक्त कर्म आहे.–(अहं यज्ञः)–मी वैश्वदेवादि स्मार्त कर्म आहें.–(अहं स्वधा)–मी पितरांना दिलेलें अन्न आहे.–( अहं औषधं )–तांदुळ, गहूं, इत्यादि धान्य ज्यांपासून होतें, त्या औषधी मी आहें–(मन्त्रः अहं)–मंत्र मी आहें.–(अहं एव आज्यं)– मीच आज्य म्ह० घृतादि हवि आहें.–(अहं अग्निः)–मीच अग्नि आहें–(अहं हुतं)–मीच हवनकर्म आहें. १६

त्याच ज्ञानाचा उदय झाला असतां, मुख्य वेद मीच आहें; त्यांत विधि–अनुष्ठान जें सांगितलें आहे तो क्रतुही (यज्ञ) मीच; ६५ मग, हे पांडवा, त्या कर्मापासून प्रकट होणारा जो यथाविधि यज्ञ, तोहि मीच आहें; ६६ देवांस हवि देण्याचा मंत्र मी, पितरांसही हवी देण्याचा मंत्र मी; सोमवल्ली वगैरे नानाप्रकारच्या औषधि मी, घृत मी, समिधा मी, मंत्र मी, होमद्रव्य मी, ६७ ऋत्विज मी, ज्यांत हवन करावयाचें तो अग्निही माझें स्वरुप आहे आणि अग्नींत हवन करण्याच्या ज्या ज्या वस्तु, त्याही मीच आहें, ६८

**अन्वयार्थ**—(अहं अस्य जगतः)–मी या जगाचा–(पिता)–जनक आहें–(माता)–जननी आहें.–(धाता)–प्राण्यांना कर्मफळ देणारा आहें.–(पितामहः) पित्याचा पिता आहें. –( वेद्यं )–ब्रह्मादि ज्ञेय वस्तु मी आहें.–(पवित्रं)–पावन करणारें यज्ञयागादि पुण्यकर्म मी आहें.–(ओंकारः)–प्रणव मी आहें.–(ऋक्)-ऋग्वेद.–(साम)–सामवेद,–(च यजुः एव)–आणि यजुर्वेद मी आहें. १७

हें पहा–ज्याच्या अंगसंगानें अष्टांग प्रकृति ही जगास प्रसवते, तो जगपिता मी, ६९ अर्धनारी नटेश्वर स्वरूपांत ज्याप्रमाणें पुरुष तोच स्त्री व स्त्री तोच पुरुष असतो, त्याप्रमाणें स्थावरजंगमाची माता ही मी; २७० आणि उत्पन्न झालेलें जग ज्या

१ किरण. २ निरनिराळया. ३ स्वभाव. ४ भिन्न भूतांमध्यें. ५ ज्ञानाला. ६ जिकडे. ७ तिकडे. ८ वारिक कण. ९ कोठें गेलें तरी पृथ्वीपण गेलें नाहीं. १० पुनः. ११ पाहिजे तेथें पाहिजे त्या भावनेनें. १२ न व्हावें. १३ अनुभव. १४ पुष्कळ व्यक्तींत. १५ पाहिजे त्यास. १६ आंतबाहेर असा भेद. १७ तोल, प्रमाण. १८ पूर्ण ज्ञानावांचून. १९ यजन करीत असतां. २० निरंतर. २१ पावतात. २२ ज्ञानाचा. २३ विधि अनुष्ठानाला. २४ यज्ञकर्म यज्ञही. २५ यज्ञविधान. २६ यथाविधि. २७ देवास हवि देण्याचा मंत्र. २८ पितरांस हवि देण्याचा मंत्र. २९ सोमवल्ली. ३० दोहींचें तूप. ३१ होमद्रव्य. ३२ ऋत्विज. ३३ होमद्रव्य. ३४ स्थावरजंगमांत.

वित वाढत आहे । तें मी वांचूनि नोहे । आन निरुतें ७१ इयें प्रकृतिपुरुषें दोन्हीं । उपजलीं जयाचिया अमनेमनीं । तो पितामह त्रिभुवनीं । विश्वाचा मी ७२ आणि आघवेया जाणणेयाचिया वाटा । जया गांवा येती गा सुभटा । वेदांचिया चोहटां । वेद्य जें म्हणिजे ७३ जेथ नानामतां बुझावणी जाहाली । एकमेकां शास्त्रांची अनोळखी फिटली । चुकलीं ज्ञानें जेथ मिळों आलीं । जें पवित्र म्हणिजे ७४ पैं ब्रह्मबीजा जाहला अंकुरु । घोषध्वनीनादाकारु । तयाचें गा भुवन जो ॐकारु । तोही मी गा ७५ जया ॐकाराचिये कुशीं । अक्षरें होती अउमकारेंसीं । जियें उपजत वेदेंसीं । उठलीं तिन्हीं ७६ म्हणोनि ऋग्यजुःसामु । हे तीन्ही म्हणे मी आत्मारामु । एवं मीचि कुळक्रमु । शब्दब्रह्माचा ७७

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् । प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥१८॥

हें चराचर आघवें । जिये प्रकृतीआंत सांठवे । ते शिणली जेथ विसंवे । ते परम गती मी ७८ आणि जयाचेनि प्रकृती जिये । जेणें अधिष्ठिली विश्व विये । जो येऊनि प्रकृती इये । गुणातें भोगी ७९ तो विश्वश्रियेचा भर्ता । मीचि गा एथ पंडुसुता । मी गोसावी असे समस्ता । त्रैलोक्याचा २८० आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नावभरी उगें नसावें । पावकें दाहावें । वर्षावें जळें ८१ पर्वतीं बैसका न संडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी । पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ८२ म्यां बोलविल्या वेदु बोले । म्यां चालविल्या सूर्यु चाले । म्यां हालविल्या प्राणु हाले । जो जगातें चाळिता ८३ मियांचि नियमिलेंसांता । काळु ग्रासितसे भूतां । इयें म्हणियेंगतें पांडुसुता । सकळें जयाचीं ८४ जो ऐसा समर्थु । तो मी जगाचा नाथु । आणि गगनाऐसा साक्षिभूतु तोही मीचि ८५ इहीं नामरूपीं आघवा । जो भरला असे पांडवा । आणि नामरूपांचाही वोल्हावा । आपणचि जो ८६ जैसे जळाचे कल्लोळ । आणि कल्लोळीं आथी जळ । ऐसेनि वसवीतसे सकळ । तो निवासु मी ८७ जो मज होय अनन्य शरण । त्याचें निवारी मी जन्ममरण । यालागीं शरणागता शरण्य । मीचि एकु ८८ मीचि एक अनेकपणें । वेगळालेनि प्रकृतीगुणें । जीतें जगाचेनि प्राणें । वर्तत असें ८९ जैसा समुद्र थिल्लर न म्हणतां । भलतेथ बिंबे सविता । तैसा ब्रह्मादि सर्वा भूतां । सुहृद तो मी २९० मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासि वोलावा । सृष्टिक्षयप्रभवा । मूळ तें मी ९१ बीज शाखांतें प्रसवे । मग तें रूख-

ठिकाणीं राहतें, व ज्याच्या योगानें प्राणिमात्रांचें रक्षण होतें, तें निःसंशय माझ्याशिवाय दुसरें कोणी नाही. ७१ प्रकृति व पुरुष हीं दोन्ही ज्याच्या अंतःकरणोपाधिरहि स्वरूपांत म्हणजे निर्गुणस्वरूपांत उत्पन्न होतात, तो या त्रिभुवनांत विश्वाचा आजा मीच. ७२ अर्जुना, सर्व ज्ञानाच्या वाटा ज्या गांवांत येऊन मिळतात, व चारी वेदाच्या चव्हाट्यावर ज्याला वेद्य असें म्हणतात; ७३ ज्या ठिकाणीं पुष्कळ प्रकारचीं मतें ऐक्यतेस आलीं; शास्त्रांची एकमेकाची ओळख झाली; व चुकलेलीं ज्ञानें जेथें एकत्र मिळालीं; असें जें स्थान त्याला पवित्र असें म्हणतात. ७४ हें पहा-ब्रह्मबीजाला परा, पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी या चार वाचा हेच अंकुर फुटल्यावर, त्यांचें मंदिर जो ॐकार तोही मीच होय. ७५ ज्या ॐकाराच्या पोटीं अ, उ व म् ( अकार उकार व मकार ) अशीं अक्षरें उत्पन्न होतात, व जीं उपजल्याबरोबर तीन वेद उत्पन्न झाले, ७६ म्हणून ऋक्, यजु व साम हे तिन्ही वेदही मीच, याप्रमाणें वेदांची वंशपरंपराही मीच होय, असें श्रीकृष्ण म्हणाले. ७७

**अन्वयार्थ**—(गतिः )-कर्माचें फल मी आहें.-(भर्ता)-कर्मफल देऊन पोषण करणारा मी आहें.-(प्रभुः)-सर्वांचा स्वामी मी आहें.-(साक्षी)-प्राण्यांनीं केलेलें व न केलेलें पुण्यपापादि पाहणारा मी आहें.-(निवासः )-सर्व प्राण्यांचें निवासस्थान मी आहें.-(शरणं)-रोगादिकांच्या योगानें आर्त होऊन शरण आलेल्या भक्तांची आर्ति-पीडा नाहींशी करणारा मी आहें.-(सुहृत्)-उलट उपकाराची अपेक्षा न करितां उपकार करणारा मी आहें.-( प्रभवः )-जगाचा उत्पादक, -(प्रलयः)-जगाचा संहार करणारा,-(स्थानं)-जगाची स्थिति करणारा-(निधानं)-कर्मफलांचा निधि; व-(अव्ययं बीजं)-जगाचें अक्षय बीज मी आहें. १८

हें सर्व स्थावरजंगम विश्व ज्या प्रकृतीच्या आंत भरलेलें आहे ती प्रकृति श्रमली असतां ज्या ठिकाणीं विश्रांति पावते, तें उत्तम स्थान मी; ७८ आणि ज्याच्यामुळें ही प्रकृति वाचते, ज्याच्या आश्रयानें विश्व प्रसवते, व जो प्रकृतीच्या स्वाधीन होऊन सत्त्व, रज व तम या गुणांचा उपभोग घेतो, ७९ तो विश्वलक्ष्मीचा पति मीच; आणि अर्जुना, सर्व त्रैलोक्याचा स्वामीही मीच. २८० आकाशानें सर्व ठिकाणीं असावें, वायूनें क्षणभर देखील स्वस्थ राहूं नये, अग्नीनें जाळावें, मेघानें वृष्टि करावी, ८१ पर्वतांनी आपली जागा सोडूं नये, समुद्रानें आपली मर्यादा ओलांडूं नये, व पृथ्वीनें सर्व भूतांचा भार वहावा ही आज्ञा माझी आहे. ८२ मी बोलविल्यानें वेद बोलतात, मी चालविल्यानें सूर्य चालतो, सर्व जगाचा चालक जो प्राण तोही मी हालविल्यानें हालतो; ८३ आणि मीच आज्ञा दिली असतां भूतांना काळ ग्रासतो. अर्जुना, याप्रमाणें हीं सर्व ज्याचीं आज्ञाधारक असून आपापलीं कामें करतात, ८४ असा जो समर्थ, तो जगाचा नाथ मी; व आकाशाप्रमाणें सर्व ठिकाणीं असून साक्षिभूत असणारा तोही मीच. ८५ हे पांडवा, याप्रमाणें या नामरूपांत जो सर्वत्र भरलेला आहे, आणि जो आपणच नामरूपांचाही जिव्हाळा आहे. ८६ ज्याप्रमाणें लाटा पाण्यांतच उत्पन्न होतात, आणि लाटांतही पाणी असतें, त्याप्रमाणें जग माझ्यांत व मी जगांत आहें, अशाप्रकारें जगताचें वसतिस्थान मी. ८७ जो मला एकनिष्ठपणें शरण येतो, त्याला जन्ममरणापासून मी मुक्त करतों, म्हणून शरणागताचें रक्षण करणारा एकटा मीच आहें. ८८ प्रकृतीच्या वेगळाल्या गुणांनी, मी एक असून अनेकपणानें जगांतील प्राणिमात्रांत प्राणरूपानें जीवंत असतों. ८९ ज्याप्रमाणें हा समुद्र किंवा डबकें असें न म्हणतां सूर्य वाटेल तेथें प्रतिबिंबित होतो, त्याप्रमाणें ब्रह्मदेवापासून चिलटापर्यंत प्राणिमात्राला आवडता म्हणून जो आहे तो मीच. २९० हे पांडवा, या त्रिभुवनाचें जीवन मीच, आणि उत्पत्ति, स्थिति व लय ह्या तिन्ही अवस्थांस कारणही मीच. ९१ बीजापासून वृक्ष व शाखा उत्पन्न होतात,

---

१ अंतःकरणोपाधिरहित स्वरूपांत, निर्गुणांत. २ चारी वेद एकत्र मिळण्याचें ( स्थान ) चोहटा-चवाठा त्यांत ज्याला वेद्य म्हणतात. ३ समजूत. ४ सरली. ५ मूळ ब्रह्माला. ६ कोंब. ७ परा, पश्यंती मध्यमा आणि वैखरीरूप चतुर्विध वाचा. ८ मंदिर. ९ पोटीं. १० अकार, उकार, मकारासह. ११ वंशपरंपरा. १२ वेदाचा. १३ विश्रांति पावे. १४ आश्रयिली. १५ क्षणभर. १६ अग्नीनें प्रकाशावें. १७ वृष्टि करावी. १८ मेघानें. १९ बैठक. २० मर्यादरेषा. २१ धारण करावीं. २२ आज्ञापिला असतां. २३ आज्ञाधारक. २४ तरंग. २५ वसतिस्थान. २६ शरण जाण्यास योग्य, आश्रयस्थान. २७ स्वभावानुसार. २८ जिवंत. २९ डबकें. ३० सूर्य. ३१ आवडता. ३२ सृष्टीच्या नाशाला व उत्पत्तीला. ३३ वृक्षरूप.

पण बीजीं सामावे । तैसें संकल्पें होय आघवें । पाठीं संकल्पीं मिळे ९२ ऐसें जगाचें बीज जो संकल्पु । अव्यक्त वासनारूपु । तया कल्पांतीं जेथ निक्षेपु । होय तें स्थान मी ९३ इयें नामरूपें लोटती । वर्णव्यक्ती आटती । जातीचे भेद फिटती । जैं आकारू नाहीं ९४ तैं संकल्पवासनासंस्कार । मागौतें रचावया चराचर । जेथ राहोनि असती अमर । तें निधान मी ९५

तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च । अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

मी सूर्याचेनि वेषें । तपें तैं हें शोषे । पाठीं इंद्र होऊनि वर्षे । तैं पुढती भरे ९६ अग्नि काष्ठें खाये । तें काष्ठचि अग्नि होये । तैसें मरतें मारितें पाहें । स्वरूप माझें ९७ यालागीं मृत्यूच्या भागीं जें जें । तेंही पैं रूप माझें । आणि न मरतें तंव सहजें । मीचि आहें ९८ आतां बहु बोलोनि सांगावें । तें एकिहेळां घे पां आघवें । तरी सतासंतही जाणावें । मीचि पैं गा ९९ म्हणोनि अर्जुना मी नसें । ऐसा कवणु ठाव असे । परि प्राणियांचें दैव कैसें । जे न देखती मातें ३०० तरंग पाणियेवीण सुकती । रश्मि वातीवीण न देखती । तैसे मीचि ते मी नव्हती । विस्मो देखे १ हें आंतबाहेर मियां कोंदलें । जग निखिल माझेंचि वोतिलें । कीं कैसें कर्म तयां आड आलें । जें मीचि नाहीं म्हणती २ परि अमृतकुहां पडिजे । कां आपणपयांतें काडिये काढिजे । ऐसे अर्थीं काय कीजे । अप्राप्तासी ३ ग्रासा एका अन्नासाठीं । अंधु धांवताहे किरीटी । आडळला चिंतामणि पायें लोटी । आंधळेपणें ४ तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये । तैं ऐसी हे दशा आहे । म्हणोनि कीजे तें केलें नोहे । ज्ञानेंवीण ५ आंधळेया गरुडाचे पांखें आहाती । ते कवणा उपेगा जाती । तैसें सत्कर्माचे उपखे ठाती । ज्ञानेंवीण ६

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नंति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥

देख पां गा किरीटी । आश्रमधर्मांचिया राहाटी । विधिमार्गी कसवटी । जे आपणचि होती ७ यजन करितां कौतुकें । तिहीं वेदांचा माथा तुके । क्रियां फळेंसि उभी ठाके । पुढां जयां ८ ऐसे दीक्षित जे सोमपें । जें आपणचि यज्ञाचें स्वरूप । तींहीं तया पुण्याचेनि [illegible] । जोडिलें देखें ९ जे श्रुतित्रयांतें जाणोनी । शतवरी यज्ञ [illegible] । स्वर्गा वारिती ३१० जैसें कल्पतरूतळवटीं । [illegible] । मग निदैव

पुढें तीं झाडेंच बीजांत समावेश पावतात; त्याप्रमाणें आदिसंकल्पापासून सर्व जगाची उत्पत्ति होऊन पुनः तें जग आदिसंकल्पांतच लय पावतें. ९२ असें अव्यक्त वासनारूप जगाचें बीज जो संकल्प, त्याचा कल्पांतीं जेथें लय होतो तें स्थान मीच. ९३ जेव्हां निराकार स्वरूप प्रगट होतें तेव्हां हीं सर्व नाना रूपें लय पावतात. वर्ण व्यक्ति नाहींतशा होतात, व जातीचे भेदही रहात नाहींत; ९४ तेव्हां पुनः जग निर्माण करण्याकरितां संस्काररूप वासनाशक्ति धारण करून ज्या ठिकाणीं देव राहतात तें ठिकाणही मीच. ९५

**अन्वयार्थ**—(अहं)—मी सूर्यरूपानें—(तपामि)—ताप देतों तापतों,—(अहं वर्षं निगृह्णामि)—मी पावसाचा निग्रह करतों.—(च)—व—(उत्सृजामि)—मीच वृष्टि—पाऊस पाडतों.—(अर्जुन)—हे अर्जुना !—(अहं)—मी—(अमृतं)—देवांचें अमृत—(च एव—व—(मृत्युः)—मर्त्यांचा मृत्यु आहें—(च)—आणि—(सत्)—कार्य—नामरूपांनीं—व्यक्त होणारें सर्व—(च)—व—(असत्)—कारण—नाम रूपांनीं व्यक्त न होणारें मी आहें. १९.

मी सूर्याच्या रूपानें ज्या वेळेस तापतो त्या वेळेस हें जग कोरडें होतें; आणि पुनः इंद्राच्या रूपानें पाऊस पाडतो, तेव्हां पुनः समृद्धि होते. ९६ ज्याप्रमाणें अग्नीनें काष्ठें भक्षण केल्यावर तें काष्ठच अग्निरूप होतें, त्याप्रमाणें मरणारें व मारणारें स्वरूप माझेंच आहे. ९७ याकरितां मृत्यूच्या वांट्याला आलेलीं जीं जीं रूपें आहेत तीं तीं माझीच आहेत, आणि न मरणारें तर सहज माझेंच रूप आहे. ९८ आतां फार बोलून काय सांगावें ? सर्व तुला एकदांच सांगतों कीं, सत् व असत् म्हणजे खरी व खोटी अशीं दोन्ही रूपें माझीच आहेत असें जाण. ९९ म्हणून अर्जुना, मी नाहीं असें कोणतें तरी ठिकाण आहे का ? परंतु प्राण्यांचें दैव काय चमत्कारिक आहे कीं, ते मला पहात नाहींत. ३०० ज्याप्रमाणें लाटा पाण्याशिवाय सुकाव्या किंवा सूर्यकिरण दिव्याच्या उजेडाशिवाय दिसूं नयेत, त्याप्रमाणें, सर्व जीव मीच बनलेला असून, ते मला ओळखीत नाहींत, हें केवढें आश्चर्य आहे पहा. १ ह्या सकळ विश्वांत अंतर्बाह्य मीच भरलेला आहें, व हें जग मद्रूपच आहे, परंतु जीवांचें कर्म कसें आड आलें आहे, कीं, ते मीच 'नाहीं' असें म्हणतात. २ परंतु अमृताच्या कूपांत पडल्यावर ज्याप्रमाणें एखादा मनुष्य आपण बाहेर निघण्याचा प्रयत्न करितो; तेव्हां तशा त्या अभाग्याला काय म्हणावें ? ३ हे किरीटी, अन्नाच्या एका घासासाठीं धांवणाऱ्या अंधळ्याच्या पायाला चिंतामणि लागला असतां, दृष्टि नसल्यामुळें तो जसा त्याला पायानें लोटून देतो; ४ त्याप्रमाणें यथार्थ ज्ञान प्राप्त नसेल तर वरील अंधळ्याप्रमाणें स्थिति होते, म्हणून ज्ञानाशिवाय जीं जीं कर्में करावीं तीं न केल्यासारखीं आहेत. ५ अंधळ्या गरुडाला पंख जरी असले, तरी त्यांचा त्याला काय उपयोग होणार ? जसा उपयोग नाहीं, त्याप्रमाणें यथार्थ ज्ञानावांचून सत्कर्माचे श्रम व्यर्थ आहेत. ६ केवढालीं सत्कर्में म्हणशील तर—

**अन्वयार्थ**—(त्रैविद्याः)—ऋग्वेद, यजुर्वेद, व सामवेद या तीन वेदांचें अध्ययन करणारें, त्यांत सांगितलेलीं कर्में करणारे—(सोमपाः)—सोमपान करणारे व त्यामुळें—(पूतपापाः)—निष्पाप झालेले—( मां )—मला—( यज्ञैः )—यज्ञांच्या योगानें—( इष्ट्वा )—पुजून—( स्वर्गतिं )—स्वर्गगतीची—(प्रार्थयन्ते)—प्रार्थना करितात.—( ते )—ते—त्रैविद्य—( पुण्यं सुरेन्द्रलोकं )—पवित्र इंद्रलोकास—(आसाद्य)—प्राप्त होऊन—(दिवि)—स्वर्गांत—(दिव्यान् देवभोगान्)—अलौकिक देवभोगांस—(अश्नन्ति)—उपभोगितात. २०

अरे अर्जुना, हें पहा—वर्णविहित धर्माचें आचरण करून जे आपणच विधिमार्गाची कसोटी बनतात (वेदांत सांगितल्याप्रमाणें यथाविधि आचरण करतात,) ७ ते यज्ञ करूं लागले म्हणजे तिन्ही वेद संतोष पावून मान डोलवितात, व त्यांच्यापुढें क्रियाहि फलप्राप्तीसह उभी राहते. ८ याप्रमाणें यज्ञांतील सोमपान करणारे यज्ञकर्ते (दीक्षित) जे आपणच यज्ञस्वरूप होतात, त्यांनीं त्या पुण्याच्या नांवानें पापच जोडलें असें समज. ९ यज्ञ करून पापाची जोड कशी केली म्हणशील तर—ते ऋक्, यजु व साम या तिन्ही वेदांस जाणून शेंकडों यज्ञांनीं माझें यजन करितात; परंतु माझ्या प्राप्तीची इच्छा सोडून क्षुद्र स्वर्गप्राप्तीची इच्छा करतात. ३१० अर्जुना, ज्याप्रमाणें एखादा

१ पुनः. २ गुप्त. ३ ठेवणें. ४ नामरूपादि लय पावतात. ५ रंग आणि आकार नाहींसे होतात. ६ संस्काररूप वासनाशक्ति. ७ पुनः ८ देव. ९ फक्तमी. १० व्यक्त व अव्यक्त. ११ स्थळ. १२ आटतात. १३ सूर्यकिरण. १४ मी होत नाहींत. १५ आश्चर्य. १६ भरलें, व्यापिलें. १७ अमृताच्या कूपांत, विहिरींत. १८ असें इच्छितो त्यास. १९ अभाग्यास. २० पायाला अडखळलेला. २१ पंख. २२ श्रम व्यर्थ होतात. २३ वर्णविहित धर्मानें. २४ राहणीनें, वागणुकीनें. २५ कसोटी, सोन्या रुप्याचा कस पाहण्याचा दगड. २६ डोलें. २७ कर्म. २८ यज्ञांतील सोमपान करणारे. २९ ऋक्, यजु व साम. ३० शेंकडों. ३१ हतभागी.

निघे किरीटी । दैन्याचि[1] करूं ११ तैसे शतक्रतु[2] यजिलें मातें । कीं ईप्सितीति[3] स्वर्गसुखातें । आतां पुण्य कीं हें निरुतें[4] । पाप नोहे १२ म्हणोनि मजवीण पाविजे स्वर्गु। तो अज्ञानाचा पुण्यमार्गु । ज्ञानिये तयातें उपसर्गु[5] । हानि म्हणती १३ एऱ्हवीं तरी नरकींचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख । वांचूनि नित्यानंद गा निर्दोष । तें स्वरूप माझें १४ मज येतां पैं सुभटा । या द्विविधां[6] गा अव्हांटा[7] । स्वर्गु नरकु या वाटा। चोरांचिया १५ स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे । मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य १६ आणि मजचिमाजीं असतां । जेणें मी दुऱ्हावें पांडुसुता । तें पुण्य ऐसें म्हणतां । जीभ न तुटे काई १७ पारि हें असो आतां प्रस्तुत । ऐकें यापरी ते दीक्षित । यजूनि मातें यांचित । स्वर्गभोगु १८ मग मी न पाविजे ऐसें । जें पापरूप पुण्य असे । तेणें लांधलेनि सौरसें[11] स्वर्गा येती १९ जेथ अमरत्व हें सिंहासन । ऐरावतासारिखें वाहन । राजधानी भुवन । अमरावती २२० जेथ महासिद्धींचीं भांडारें । अमृताचीं कोठारें । जिये गांवीं [12]खिल्लारें । कामधेनूंचीं २१ जेथ वोळंगे[13] देवा पाईका[14] । सैंघ[15] चिंतामणीचिया भूमिका । विनोदवन[16]वाटिका । सुरतरूंचिया[17] २२ गंधर्व गात गाणीं । जेथ रंभेऐसिया नाचणी[18] । उर्वशी मुख्य विलासिनी । अंतौरियों[19] २३ मदन वोळंगे[20] शेजारें[21] । जेथ चंद्र शिंपे [22]सांवरें । पवनाऐसे म्हणियारे[23]। धांवणें जेथ २४ पैं बृहस्पती मुख्य आपण। ऐसे स्वस्तीश्रियेचे ब्राह्मण। ताटिये[24] सुरगण । बहुवस जेथं २५ लोकपाळें[25] रांगेचे । राउत जिये पदवीचे । उच्चैःश्रवा[26] खांचे[27] । खोलेंणिये[28] २६ हे असो बहु ऐसे । भोग इंद्रसुखासरिसे। ते भोगिजती जंव असे। पुण्यलेशु २७

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।
एवं त्रैधर्म्यमनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥ २१ ॥

मग तया पुण्याची पाउटी[29] सरे । सवेंचि इंद्रपणाची उटी[30] उतरे । आणि येऊं लागती माघारे। मृत्युलोका २८ जैसा वेश्याभोगी कवडा वेंचे । मग दारही चेपूं नये तियेचें । तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगों २९ एवं थितियां[31] मातें चुकले । जींहीं पुण्यें स्वर्ग कां[32]मिलें । तयां अमरपण तें वांवों[33] जालें । अंतीं मृत्युलोकु । २३० मातेचिया उदरकुहेरीं[34]। पचूंनि[35] विष्ठेच्या दाथरीं[36]। उकडूनि नवमासवरी। जन्मजन्मो मरती ३१ अगा स्वप्नीं निधान[37] फावे । पारि

मागी मनुष्य कल्पतरूचे खालीं बसून झोळीच्या पदरास गांठी मारतो, आणि मग भिक्षा मागण्यास निघतो. ११ त्याप्रमाणें शेंकडों यज्ञांनीं माझें यजन करून ते स्वर्गसुखाची इच्छा करतात, तेव्हां हें पुण्य नसून खरोखर पाप नव्हे का ? १२ म्हणून, माझ्या प्राप्तीची इच्छा सोडून जे स्वर्गाला जातात, त्यांना अज्ञानी लोक पुण्यमार्ग म्हणोत; परंतु ज्ञानी जे आहेत, ते तो जन्ममरणरूप फेऱ्यांत पडून त्याची हानि झाली असें म्हणतात. १३ सहज विचार केला तरी, नरकांतील दुःखाच्या मानानें स्वर्गप्राप्तीला सुख म्हणतां येईल; परंतु या दोहोंशिवाय अखंड, आनंददायक व निर्दोष असें जें सुख, तें माझें स्वरूप होय. १४ हे महावीरा अर्जुना, माझ्या प्राप्तीला स्वर्ग व नरक हे दोन आडमार्ग असून चोरांच्या वाटा आहेत. १५ स्वर्गप्राप्ति पुण्यात्मक पापानें होते, व नरकप्राप्ति पापात्मक पापानें होते; पण ज्या योगानें माझी प्राप्ति होते, तें शुद्ध पुण्य समज. १६ हे पांडुसुता, माझाच अंश असून ज्या कर्मामुळें मी अंतरतों, त्याला पुण्य असें जर म्हटलें तर जीभ तुटणार नाहीं काय ? १७ परंतु हें आतां राहूं दे. याप्रमाणें ते दीक्षित माझें यजन करून स्वर्गभोगांची इच्छा करतात. १८ मग ज्या पुण्यानें मी पावणार नाहीं असें पापरूप पुण्य प्राप्त करून हौसेनें स्वर्गी जातात. १९ जेथें अमरत्व हेंच सिंहासन, ऐरावतासारखें वाहन, अमरावती हें राजधानीचें शहर; ३२० जेथें अष्टमहासिद्धींचीं भांडारें आहेत, अमृताचीं कोठारें आहेत, व ज्या गांवांत कामधेनूंचीं खिल्लारें आहेत, २१ जेथें देवांच्या चाकरांना वागण्याकरितां सर्वत्र चिंतामणीच्या वाटा आहेत, व करमणुकीच्या लहान लहान बागा कल्पतरूच्या आहेत, २२ जेथें गंधर्व गायन करताहेत, रंभेसारख्या नृत्य करणाऱ्या आहेत, व विलासिनी स्त्रियांत जेथें उर्वशी मुख्य आहे, २३ ज्या ठिकाणीं मदन सेजघरांत चाकरी करतो आहे, चंद्र सडासंमार्जन करतो आहे, व वायूसारखे म्हटल्याबरोबर धांवणारे चाकर आहेत, २४ जेथें इंद्राला आशीर्वाद देणारांत बृहस्पतीसारखे मुख्य ब्राह्मण आहेत व जेथें स्तुतिपाठक हजारों देव आहेत, २५ ज्यांच्या समोंवतीं लोकपालांसारखे राजे चालत असून, जय मिळविलेले पदवीधर सरदार आहेत, व उच्चैःश्रवा नामक खाजगी कोतवाल घोडा आहे, २६ हें असो; याप्रमाणें, जोंपर्यंत पुण्याचा अंश आहे, तोंपर्यंत ते, इंद्राच्या सुखासारखे पुष्कळ भोग भोगतात. २७

**अन्वयार्थ**—(ते)–ते सर्व वैदिक कर्मी–(तं विशालं स्वर्गलोकं)—त्या विस्तीर्ण स्वर्गलोकास–(भुक्त्वा)–भोगून–(पुण्ये क्षीणे)–पुण्य क्षीण झालें असतां–(मर्त्यलोकं)–मर्त्यलोकांत–(विशन्ति)–शिरतात–(एवं)–याप्रमाणें–(त्रैधर्म्यं)–वैदिक कर्ममार्गास–(अनुप्रपन्नाः)–अनुसरणारे–(कामकामाः)–विषयांची कामना करणारे–सकाम पुरुष–(गतागतं)–जा–ये या अवस्थेस–(लभन्ते)–प्राप्त होतात. २१

मग त्यांच्या पुण्याची पुंजी संपतांक्षणींच इंद्रपणाच्या ऐश्वर्यावरून उतरून पुनः ते मृत्युलोकीं माघारे येतात. २८ ज्याप्रमाणें वेश्येच्या पायीं एकायानें आपलें सर्व द्रव्य खर्च केल्यानंतर त्याला तिच्या दाराला बोट देखील लावण्याची सत्ता नसते. त्याप्रमाणें या यज्ञकर्त्यांची स्थिति फार लाजिरवाणी होते, ती तुला काय सांगूं ? २९ याप्रमाणें, ज्या वेळेस जपावयाचें, त्या वेळेस मला चुकून ज्यांनीं पुण्यमार्गाच्या आचरणानें स्वर्गप्राप्ति करून घेतली, त्यांचें अमरत्व वायां जाऊन शेवटीं ते मृत्युलोकांत परत येतात. ३३० नंतर मातेच्या उदररूप गुहेंत विष्टेच्या घरांत नऊ महिनेपर्यंत उकडून पक्वदशेंत येतात आणि पुनः पुनः जन्माला येऊन मरण पावतात. ३१ अरे, स्वप्नांत प्राप्त झालेला ठेवा जसा जागृत झाल्यानंतर

१ भिक्षा मागायाला. २ शंभर यज्ञांनीं. ३ इच्छितात. ४ खरोखर. ५ जन्ममरण, उपद्रव, नाश, विघ्न. ६ दोन प्रकारच्या ७ आडवाटा. ८ पुण्यरूपी पाप. ९ इच्छा करितात. १० प्राप्त झाल्यामुळें. ११ हौसेनें. १२ कळप. १३ रावतात. १४ चाकर. १५ अनेक, पुष्कळ. १६ उपवनें, बगीचे. १७ कल्पतरूंच्या. १८ नृत्य करणाऱ्या. १९ स्त्रिया. २० सेवा करितो. २१ शेजघरांत, निद्रागृहांत. २२ सडासंमार्जन. २३ चाकर. २४ पराक्रमाचे स्तुतिपाठक. २५ लोकपाळांच्या माळकेंतलें. २६ इंद्राचा घोडा. २७ कमी पडतो. २८ कोतवाल घोड्यापुढें. २९ पुंजी. ३० तेज, रंग. ३१ सर्वदा असणाऱ्या. ३२ इच्छिले. ३३ व्यर्थ, वायां. ३४ उदररूप गुहेंत. ३५ शिजून. ३६ उकाड्यांत. ३७ ठेवा प्राप्त होतो.

चेइलिया हारपे आघवें । तैसें स्वर्गसुख जाणावें । वेदज्ञांचें[३] ३२ अर्जुना वेदे-
विद जऱ्ही जाहला । तरी मातें नेणता वायां गेला । कणु[४] सडूनि उपणिला[५] ।
कोंडा जैसा ३३ म्हणऊनि मज एकेंविण । हे त्रयीधर्म[६] अकारण[७] । आतां मातें
जाणोनि कांहीं नेण । तूं सुखिया होसी ३४

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥

पैं सर्वभावेंसीं उरवितें । जे वोपिले[१०] मज चित्तें । जैसा गर्भगोळु उदर्मातें[११] ।
कोणाही नेणे ३५ तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि[१२] नाहीं । मैंजाचि[१३]
नाम पाहीं । जिणेंयां[१३] ठेविलें ३६ ऐसे अनन्यगतिकें[१४] चित्तें । चिंतितसांते[१५] मातें ।
जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ३७ ते एकवटूनि[१६] जिये क्षणीं । अनुसरले
गा माझिये वाहाणीं[१७] । तेव्हांचि तयांची चिंतवणी[१८] । मजचि पडली ३८ मग
तींहीं जें जें करावें । तें मजचि पडिलें आघवें । जैसी अजातपक्षाचेनि जीवें[२०] ।
पक्षिणी जिये[२१] ३९ आपुली तहान भूक नेणें । तान्हया निकें तें माउलीसीचि
करणें । तैसे अनुसरले जे मज प्राणें । तयांचें सर्व मी करीं ३४० तया मा-
झिया सायुज्यांची[२२] चाड । तरि तेंचि पुरवीं कोडें[२३] । कां सेवा म्हणती तरी ओढ[२४] ।
प्रेम सूयें[२५] ४१ ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो तो पुढां पुढां लागे तयां
देवों । आणि दिधलियाचा निर्वाहो[२६] । तोही मीचि करीं ४२ हा योगक्षेमु[२७] आघवा ।
तयांचा मजचि पडिला पांडवा । जयांचिया सर्वभावा । आश्रयो मी ४३

येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः । तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥२३॥

आतां आणिकही संप्रदायें । परी मातें नेणती समवायें । जे अग्निइंद्रसूर्य-
सोमायें । म्हणऊनि यजिती ४४ तेही कीर मातेंचि होये । कां जें हें आघवें
मीचि आहें । पारि ते भजती[२८] उजरी नव्हे । विषम[३०] पडे ४५ पाहें पां शाखा प-
ल्लव रुखांचे[३१] । हे काय नव्हती एकाचि बीजाचे । परी पाणी घेणें मुळाचें । तें
मुळींचि घेपे[३२] ४६ कां दहाही इंद्रियें आहाती । इयें जरी एकेचि देहींचीं होती ।
आणि इहीं सेविले विषयो जाती । एकाचि ठायां ४७ तारि करोनि रससोय[३३]
बरवी । कानीं केवीं भरावी । फुलें आणोनी बांधावीं । डोळां केवीं ४८ तेथ रसु
तो मुखेंचि सेवावा । परिमळु तो घ्राणेंचि घ्यावा । तैसा मी तो यजावा[३४] ।
मीचि म्हणोनि ४९ येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि गा आनेंआन[३५] ।
म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें[३६] ३५०

सर्व नाहींसा होतो, त्याप्रमाणें यज्ञकर्त्याचें सुख आहे असें समज. ३२ अर्जुना, ज्याप्रमाणें धान्य काढून घेतलेला कोंडा उफणला असतां व्यर्थ होतो, त्याप्रमाणें, वेदार्थज्ञानी जरी झाला, तरी मला जाणल्याशिवाय त्याचा जन्म व्यर्थ होय. ३३ म्हणून माझ्या एकट्याशिवाय हे तिन्ही वेदोक्त धर्म व्यर्थ आहेत; तेव्हां आतां मलाच जाण, दुसरें कांहीं मनांत आणूं नको, म्हणजे सुखी होशील. ३४

**अन्वयार्थ**—(अनन्याः चिन्तयन्तः)–परम देव जो नारायण, त्याच्याशीं एकरूप होऊन चिंतन करणारे–(ये)–जे–(जनाः)–लोक–(मां)–मला–(पर्युपासते)–सर्व प्रकारें उपासितात–(तेषां नित्याभियुक्तानां)–त्या सतत ध्यान करीत असलेल्या विरक्तांचा–(योगक्षेमं)–योगक्षेम–(अहं)–मी–(वहामि)–वहातों. २२.

हें पहा–ज्यांनीं आपलें चित्त सर्वभावें करून माझ्याच ठिकाणीं उर्के विकलें आहे; ज्याप्रमाणें गर्भांतील गोळा कोणताही उद्योग करावयाचें जाणत नाहीं. ३५ त्याप्रमाणें ज्यांना माझ्यावांचून दुसरें कांहींच चांगलें दिसत नाहीं, व ज्यांनीं माझ्याकरितां आपला जीव ठेवला आहे; ३६ अशा प्रकारें एकनिष्ठ अंतःकरणानें जे माझें चिंतन करून माझी सेवा करितात, त्यांची सेवा मीच करितों. ३७ ते ऐक्यतेस पावून ज्या वेळेस माझ्याच भजनीं लागले, त्याच वेळेस त्यांची चिंता मला पडली. ३८ मग जें जें कांहीं करण्याचें ते मनांत आणतात, तें सर्व मला करावें लागतें. ज्याप्रमाणें पंख न फुटलेल्या जीवनाकरितां पक्षीणच सारखी तडफड करीत असते, ३९ किंवा आपली तहानभूक न जाणतां, आपल्या तान्ह्या लेंकरास जें सुखकारक तेंच आईला करावें लागतें, त्याचप्रमाणें, ज्यांनी मनापासून सर्व भाव मजवर टाकला आहे, त्यांचें सर्व इच्छित मीच करितों. ३४० त्यांना माझ्या ऐक्याची इच्छा झाली, तर मी त्यांचें तेंच कौतुक पुरवितों; किंवा माझी सेवाच करावी असें ते म्हणतील, तर त्यांच्या व माझ्यामध्यें प्रेमभाव उत्पन्न करतो. ४१ याप्रमाणें ते आपल्या मनांत जी जी इच्छा करतात, ती ती वारंवार मला पुरवावी लागते; आणि जें त्यांना दिलेलें असतें, त्याचें रक्षणही मीच करतों. ४२ हे पांडवा, ज्याचा सर्व भाव मजवरच असतो, त्यांचा योगक्षेम मजवरच पडतो. ४३

**अन्वयार्थ**—(ये)–जे–(अन्यदेवताभक्ताः अपि)–जे दुसऱ्या देवतांचे भक्तहि–(श्रद्धया)–श्रद्धेनें–(अन्विताः)–युक्त होऊन–(यजन्ते)–त्या अन्य देवतांची पूजा करितात,–(ते अपि)–ते सुद्धां–(कौन्तेय)–हे कुंतिपुत्रा!–(मां एव)–माझेंच–(अविधिपूर्वकं)–अज्ञानानें–(यजन्ति)–पूजन करितात. २३

आतां, आणखीही संप्रदाय आहेत, पण ते मला सर्वव्यापकरूपानें जाणत नाहींत, म्हणून ते अग्नि, इंद्र, सूर्य, चंद्र यांना भजतात; ४४ तें त्यांचें पूजन खरोखर माझेंच होय, कारण या सर्व जगांत मीच भरून राहिलेला आहें; परंतु तें त्यांचें भजन पद्धतशीर नसून चुकलेलें असतें. ४५ हें पहा–वृक्षांच्या शाखा, पानें वगैरे एकाच बीजापासून उत्पन्न झालेली नव्हत का? परंतु पाणी जें घालावयाचें तें मुळाशींच घातलें पाहिजे; ४६ किंवा दहा इंद्रियें जरी एकाच देहाचीं आहेत आणि त्यांनीं सेवन केलेले विषय जरी एकाच ठिकाणीं जातात, ४७ तरी उत्तम स्वयंपाक करून तो कानांत कसा घालावा? आणि फुलें आणून त्यांचा डोळ्यांनीं कसा वास घ्यावा? ४८ तर अन्न हें तोंडानेंच सेवन केलें पाहिजे, आणि सुवास हा नाकानेंच घेतला पाहिजे; त्याचप्रमाणें, माझी पूजा करणें ती माझी भावना करूनच केली पाहिजे. ४९ एऱ्हवीं, मला न जाणतां जें भजन करणें तें कांहीं तरी असून व्यर्थ होय. म्हणून, कर्म आचरण्यास ज्ञान ही दृष्टी आहे, तर तें ज्ञान निर्दोष असें झालें पाहिजे. ३५०

१ आर्त झाल्यावर. २ वेदार्थ जाणल्यानें. ३ वेद जाणणारा ४ धान्य. ५ पाखडला, वाऱ्यावर धरिला. ६ वेदोक्त धर्म. ७ व्यर्थ. ८ जाणूं नको. ९ एकंदर, संपूर्ण. १० जे पुरुष आपले मनोभावानें मला विकले (अर्पण झाले.) ११ उद्योग. १२ चांगलें. १३ जीवानें, जीवितानें नांव मी असें त्यानें ठेविलें. १४ एकनिष्ठ. १५ चिंतित असतां. १६ ऐक्यतेस पावून. १७ मार्गांमध्ये, भजनीं. १८ चिंता. १९ पंख न फुटलेल्या पक्षाच्या. २० जीवनार्थ. २१ तडफड करिते. २२ ऐक्याची. २३ कौतुक. २४ मध्यें. २५ घालतों, उत्पन्न करितो. २६ व्यवस्था, रक्षण. २७ योग=अप्राप्ताची प्राप्ती, क्षेम=प्राप्तीचें संरक्षण. २८ समष्टिरूपानें, सर्वव्यापकरूपानें. २९ भजनाची सरळ पद्धत. ३० वांकडी, चुकलेली. ३१ वृक्षाचे. ३२ घातले जाते. ३३ स्वयंपाक. ३४ पुरवावा. ३५ कांहीं तरी. ३६ असलें पाहिजे.

अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च । न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥

एऱ्हवीं पाहे पां पंडुसुता । या यज्ञोपहारां समस्तां । मीवांचूनि भोक्ता । कवणु आहे ५१ मी सकळां यज्ञांचा आदि । आणि यजना या मीचि अवधि । कीं मातें चुकोनि दुर्बुद्धि । देवां भजले ५२ गंगेचें उदक गंगे जैसें । अर्पिजे देवपितरोद्देशें । माझें मज देती तैसें । परि आनानीं भावी ५३ म्हणऊनि ते पार्था । मातें न पवतीचि सर्वथा । मग मनीं वाहिली जे आस्था । तेथ आले ५४

यांति देवव्रता देवान् पितॄन्यान्ति पितृव्रताः । भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् २५

मनें वाचा करणीं । जयांचीं भजनें देवांचिया वाहणीं । ते शरीर जातियेक्षणीं । देवचि जाले ५५ अथवा पितरांचीं व्रतें । वाहती जयांचीं चित्तें । जीवित सरलिया तयांतें । पितृत्व वरी ५६ कां क्षुद्रदेवतादि भूतें । तियेचि जयांचीं परमदैवतें । जींहीं अभिचारिकीं तयांतें । उपासिलें ५७ तयां देहाची जवनिका फिटली । आणि भूतत्वाची प्राप्ति जाहली । एवं संकल्पवशें फळलीं । कर्में तयां ५८ मग मीचि डोळां देखिला । जींहीं कानीं मीचि ऐकिला । मीचि मनीं भाविलों । वानिलों वाचा ५९ सर्वांगीं सर्वांठायीं । मीचि नमस्कारिला जींहीं । दानपुण्यादिकें जें कांहीं । तें माझियाचि मोहरां ३६० जींहीं मातेंचि अध्ययन केलें । जे आंतबाहेरि मियांचि धाले । जयांचें जीवित्व जोडलें । मजचिलागीं ६१ जे अहंकारु वाहत आंगीं । आम्ही हरीचे भूषावयालागीं । जे लोभिये एकचि जगीं । माझेनि लोभें ६२ जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भूली सभ्रम । नेणती लोक ६३ जयांचीं जाणती मजचि शास्त्रें । मी जोडें जयांचेनि मंत्रें । ऐसे जे चेष्टामात्रें । भजले मज ६४ ते मरणाऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे । मग मरणीं आणिकीकडे । जातील केवीं ६५ म्हणोनि मद्याजी जे जाहाले । ते माझियाचि सायुज्या आले । जींहीं उपचारमिषें दिधलें । आपणपें मज ६६ पैं अर्जुना माझे ठायीं । आपणपेंवीण सौरसु नाहीं । मी उपचारें कवणाही । नाकळें गा ६७ एथ जाणीव करी तोचि नेणें । आथिलेंपण मिरवी तेंचि उणें । आम्ही जाहलों ऐसें जो म्हणे । तो कांहींचि नव्हे [illegible] ७० [illegible]ज्ञानादि किरीटी । कां तपे हन जे हुटहुटी । ते तृणा ऐका [illegible] ६९ पाहें पां जाणिवेचेनि बळें ।

**अन्वयार्थ**—(हि)-कारण-(अहं)-मी-(सर्वयज्ञानां)-सर्व यज्ञांचा-(भोक्ता)-देवतारूपानें भोक्ता-(च)-व-(प्रभुः एव च) प्रभुच आहें.-(तु)-पण-(ते)-अन्य देवतांचे भक्त-(मां)-मला -(तत्त्वेन)-अशा तात्विक रूपानें-(न अभिजानन्ति)-जाणत नाहींत-(अतः)-म्हणून-(च्यवन्ति)-मुख्य फलापासून च्युत होतात. २४

अर्जुना, एऱ्हवीं असें पहा कीं, या सर्व यज्ञोपचारांचा माझ्यावांचून दुसरा कोण भोक्ता आहे ? ५१ मी सर्व यज्ञांचा आदि आहें व यजनाचा शेवटही मीच आहें; परंतु दुर्बुद्धि जे असतात, ते मला सोडून इंद्रादि देवांस भजतात. ५२ ज्याप्रमाणें गंगेचें पाणी देव व पितर यांच्या नांवानें गंगेंतच अर्पण करतात, त्याप्रमाणें ते माझें मलाच देतात. पण निराळ्या भावानें ! ५३ म्हणून पार्था, ते कधींही मला पावत नाहींत; व मनांत जी इच्छा धारण करतात, त्या ठिकाणीं जातात. ५४

**अन्वयार्थ**—(देवव्रताः)-देवांमध्यें ज्यांचें व्रत, नियम किंवा भक्ति असते-देवांची जे भक्ति करितात, ते-(देवान्)-देवांस-(यान्ति)-प्राप्त होतात.-(पितृव्रताः)-पितृभक्त-(पितॄन्) -पितरांस-(यान्ति)-प्राप्त होतात.-(भूतेज्याः)-भूतांची पूजा करणारे-(भूतानि)-विनायक, मातृगण इत्यादि भूतगणांस-(यान्ति)-प्राप्त होतात.-(मद्याजिनः अपि)-व माझी पूजा करणारेहि-(मां)-मला-(यान्ति)-प्राप्त होतात. २५

मन, वाचा व इंद्रियें यांच्या योगानें जे इंद्रादि देवांचें ( देवतोद्देशानें ) भजन करतात, ते शरीर जातांक्षणींच देवरूप होतात; ५५ अथवा ज्यांच्या मनानें पितरांचीं व्रतें करण्याचें घेतलें आहे, त्यांना मरणोत्तर पितृलोक प्राप्त होतो; ५६ किंवा वेताळादि पिशाच्च व क्षुद्र देव हीं ज्यांचीं परम दैवतें आहेत, व ज्यांनीं घातक अशा जारणमारण साधण्याकरितां त्यांची उपासना केली आहे, ५७ त्यांना देहाचा पडदा पडतांच ( मेल्यावर ) पिशाच्चयोनींची प्राप्ति होते. अशा प्रकारें त्यांच्या संकल्पाप्रमाणें त्यांचीं कर्में त्यांना फळतात ! ५८ मग जे दृष्टीनें मलाच पहातात, कानांनीं माझ्या नांवाचेंच श्रवण करतात, मनानें माझेंच ध्यान करतात व वाचेनें माझेंच वर्णन करतात, ५९ सर्वांगानें व सर्व ठिकाणीं मलाच नमस्कार करतात, दानें, पुष्प वगैरे सर्व कांहीं माझ्याच उद्देशानें करतात, ३६० ज्यांनीं माझें स्वरूप यथार्थ कळणाऱ्या शास्त्रांचेंच अध्ययन केलें आहे, जे माझ्याच योगानें अंतर्बाह्य तृप्त झाले आहेत, ज्यांनीं आपलें आयुष्य माझ्याकडेच खर्च केलें आहे, ६१ ज्यांना माझ्याशिवाय दुसऱ्या कसल्याही प्राप्तीची इच्छा नाहीं, आम्ही हरीची कीर्ति वाढविणारे आहों असा जे अहंकार बाळगतात, ६२ माझ्याच इच्छेनें जे सकाम आहेत, त्यांना जर कशाची इच्छा असली तर ती माझीच, जे माझ्याच प्रेमानें सप्रेम आहेत, जे माझ्या ठिकाणीं भुलून गेल्यामुळें लौकिक त्यांना दिसतही नाहीं; ६३ मलाच जाणणें हींच ज्यांचीं शास्त्रें आहेत, आणि ज्यांच्या गुरुमंत्रानें माझी प्राप्ति इतरांना होते, व अशा प्रकारें जे सर्व व्यवहारांत माझ्या शिवाय इतर कोणाचेंच भजन करीत नाहींत, ६४ मरणाच्या अगोदर मद्रूप होऊन जातात; मग मरणानंतर माझ्या शिवाय दुसरीकडे कसे जातील ? ६५ म्हणून, माझें यजन करणारे मद्रूप होतात. कारण त्यांनीं सेवेच्या निमित्तानें आपलेपणा मला अर्पण केला आहे. ६६ अर्जुना, माझ्या ठिकाणीं आत्मत्व समर्पण केल्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपचारानें लाग लागणार नाहीं. ६७ मजविषयीं ज्ञान झालें असा ज्यास गर्व असेल त्यालाच कांहीं समजलें नाहीं, मी कृतार्थ झालों असें जो दाखवितो, तोच त्याच्या कृतार्थतेंत उणेपणा; मी मुक्त झालों असें जो म्हणतो, तो मुक्त झालाच नाही असें समजावें. ६८ अथवा, हे किरीटी, आम्हीं यज्ञ केले, आम्हीं धर्म केला किंवा आम्हीं तप केलें, अशी जे घमेंडी बाळगतात, त्यांना माझ्या प्राप्तीच्या मानानें पाहिलें असतां काडीइतकीही योग्यता नसते. ६९ हें पहा-ज्ञानबलांत वेदाहून कोणी अधिक जाणता आहे काय ? किंवा हजारमुखांच्या शेषापेक्षां बोलणारा कोणी अधिक

१ यज्ञांतील उपचारांना. २ परिणाम, शेवट. ३ भिन्न-भिन्न, वेगवेगळ्या. ४ धरिली. ५ इंद्रियांनीं. ६ ओघ, मार्ग, कारणें, निमित्तें. ७ धरिती. ८ गोंधळ, क्षुद्र देव. ९ जारण-मारण कर्मांनीं. १० पडदा दूर झाला. ११ ध्यान केलें. १२ वर्णिला. १३ उद्देशानें, प्रीत्यर्थ. १४ तृप्त झाले. १५ खर्च केलें. १६ गुण-कीर्ति वाढविण्यासाठीं. १७ वेदावून जातात. १८ पर्वा करीत नाहींत. १९ सर्व व्यवहारांत २० स्पष्ट, पूर्वींच. २१ दुसरीकडे. २२ माझें यजन करणारे. २३ ऐक्याला. २४ सेवेच्या हेतूनें. २५ आपलेपणा. २६ गोडी. २७ ज्ञान झालें असें म्हणणें. २८ थोरपण, कृतार्थता. २९ कृतकृत्य. ३० प्रतिष्ठा दाखविणें. ३१ तिला (हुटहुटीला.) ३२ गवताच्या एका काडी इतकीही. ३३ सर, योग्यता नसते, पाड नसतो. ३४ ज्ञानाच्या. ३५ वेदापेक्षां. ३६ अधिक.

३७० तोही आंथरुणातळवटीं दडे । येरु[२] नेति नेति म्हणोनि वहुडे[३] । एथ सनकादिक वेडे । पिसे जाहले ७१ करितां तापसांची कडसणी । कवणु जवळां[६] ठेविजे शूळपाणी । तोहि अभिमानु सांडूनि पायवणी । माथां वाहे ७२ नातरी आथिलेपणें सरिशी । कवणी आहे लक्ष्मियेऐसी । श्रियेसारिखिया दासी । घरीं जियेतें ७३ तियें[१२] खेळतां करिती घरकुलीं । तयां नामें अमरपुरें[१३] जरि ठेविलीं । तरि न होती काय बाहुलीं । इंद्रादिक तयांचीं ७४ तिया नावडोनि जेव्हां मोडती । तेव्हां महेंद्राचे रंक होती । तियां झाडा जेउते पाहती । ते कल्पवृक्ष ७५ ऐसिया जियेचिया जवळिका । सामर्थ्ये घरींचिया पाईका । ते लक्ष्मी मुख्यनायका । न मनेचि एथ ७६ मग सर्वस्वें करूनि सेवा । अभिमानु सांडूनि पांडवा । ते पाय धुवावयाचिया दैवां[१५] । पात्र जाहाली ७७ म्हणोनि थोरपण पर्‍हां[१६] सांडिजे । एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे । जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ७८ अगा सहस्रकिरणाचिये दिठी- । पुढां चंद्रही लोपे किरीटी । तेथ खद्योत[२०] का हुटहुटी[२१] । आपुलेनि तेजें ७९ तैसें लक्ष्मियेचें थोरपण न सरे । जेथ शंभूचेंही तप न पुरे । तेथ येर प्राकृत[२२] हेंदरें[२३] । केवीं जाणों लाहे[२४] ३८० यालागीं शरीरसांडोवा[२५] कीजे । सकळगुणांचें लोण उतरिजे । संपत्तिमदु सांडिजे । कुरवंडी करूनी ८१

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

मग निःसीमभाव[२६] उल्हासें । मज अर्पावयाचेनि मिसें । फळ एक आवडे तैसें । भलतयाचें हो ८२ भक्तु माझियाकडे दावी । आणि मीं दोन्ही हात वोडवीं[२७] । मग देठु न फेडितां सेवीं । आदरेंशीं ८३ पैं गा भक्तीचेनि नांवें । फूल एक मज द्यावें । तें लेखें[२९] तरि म्यां तुरंबावें[३०] । परि मुखींचि घालीं ८४ हें असो कायसीं फुलें । पानचि[३१] एक आवडतें जाहलें । तें साजुकही न हो सुकलें । भलतैसें ८५ परि सर्व भावें भरलें देखें । आणि भुकेला अमृतें[३२] तोखे । तैसें पत्रचि परि तेणें सुखें । आरोगूं[३३] लागें ८६ अथवा ऐसेंही एक घडे । जे पालाही परी न जोडे । तरि उदकाचें तंव सांकडें । नव्हेल कीं ८७ तें भलतेथ[३४] निमोलें । न जोडितां आहे जोडलें । तेंचि सर्वस्वें[३५] करूनि अर्पिलें । जेणें मज ८८ तेणें वैकुंठापासोनि विशाळें[३६] । मजलागीं केलीं राउळें[३७] । कौस्तुभाहोनि निर्मळें । लेणीं[३८] दिधलीं ८९ क्षीराब्धी ऐसीं मनोहरें । मजलागीं

आहे काय ? ३७० पण तो शेषही ज्याच्या अंथरुणाखाली दडतो, म्हणजे तो शेवटी परमात्म्याचें अंथरूण होतो, वेदही "नेति नेति" म्हणजे "ही वस्तु परमात्मा नव्हे, ही वस्तु परमात्मा नव्हे" इतकेंच म्हणून स्वस्त रहातो. तसेंच सनकादिक परमात्मस्वरूपनिर्धाराविषयीं भांबावून गेले आहेत, ७१ तपस्व्यांविषयीं विचार करूं लागले तर महादेवाच्या योग्यतेला दुसरा कोण लागेल ? परंतु त्यांनेंही अभिमान सोडून ज्याचें पादोदक म्हणजे भागीरथी आपले मस्तकावर धारण केली आहे. ७२ किंवा संपन्नपणांत लक्ष्मीपेक्षां कोणी अधिक आहे का ? तिच्या घरीं सिद्धीसारख्या दासी आहेत, ७३ त्या दासी आपल्या खेळांत जीं घरकुलीं करतात त्यांचें नांव जर अमरपुरी ठेविलें, तर इंद्रादिक देव हे त्यांच्या घरकुल्यांतील बाहुली होणार नाहींत काय? ७४ पुढें त्या दासींना तीं घरकुली न आवडून जेव्हां तीं मोडतात तेव्हां इंद्राचे रंक बनतात, व त्या ज्या झाडांकडे पहातात तीं झाडें कल्पवृक्ष होतात; ७५ असें जिच्या घरांतील दासींचें सामर्थ्य आहे, त्या पट्टराणी श्रीलक्ष्मीचीही या ठिकाणी प्रतिष्ठा नाहीं. ७६ मग, अर्जुना, मनोभावानें सेवा करून व सर्व अभिमान टाकून ती पाय धुण्याच्या अधिकारास पात्र झाली ! ७७ म्हणून, थोरपणा एकीकडे ठेवून व सर्व शास्त्रीय ज्ञानाचा अभिमान विसरून, जेव्हां जगतांत नम्रपणानें यावें, तेव्हांच माझी प्राप्ति होते. ७८ हे किरीटी, ज्या ठिकाणी सूर्याच्या तेजापुढें चंद्रही लोपून जातो, तेथें काजव्यानें आपल्या तेजाबद्दल कां घमेंड मारावी ? ७९ त्याचप्रमाणें, ज्या ठिकाणीं लक्ष्मीचेंही ऐश्वर्य व शंभूचें तप ही सरतीं होत नाहींत, त्या ठिकाणीं अज्ञानी व हेंदरा मला कसा जाणूं शकेल ? ३८० याकरितां सर्व शरीरअभिमान टाकून, सर्व गुणांचें लिंबलोण उतरून आणि संपत्तीचा मद सोडून आपला देह मजवर ओंवाळून टाकला पाहिजे. ८१

अन्वयार्थ—(यः)-जो-(मे)-मला-( पत्रं )-पान-पत्र, (पुष्पं)-फूल-पुष्प-( फलं )-फल-( तोयं )-जल,-(भक्त्या)-भक्तीनें-(प्रयच्छति)-देतो-[तस्य]-(प्रयतात्मनः)-त्या शुद्धचित्त पुरुषानें-(भक्त्युपहृतं)-भक्तीनें अर्पण केलेलें-(तत् )-तें पत्र-पुष्पादि-(अहं)-मी-(अश्नामि)-स्वीकारतों. त्याचा मी स्वीकार करतों. २६

नंतर दृढभक्तीनें, मला अर्पण करण्याच्या निमित्तानें हव्या त्या झाडाचें हवें तें फळ ८२ भक्तानें माझ्यापुढें केलें न केलें इतक्यांत मी आपण होऊनच ते दोन्ही हात पुढें करून घेतों, व त्याचें देंठ न तोडतां तें आदरानें सेवन करतों, इतकी मला घाई होते. ८३ हें पहा-भक्तिभावानें जर मला कोणी एखादें फूल दिलें तर वास्तविक पाहतां तें हुंगावयाचें; पण तें सोडून देऊन प्रेमाच्या भरांत मी तोंडांतच घालतों ! ८४ फार काय सांगावें ! फुलेंचरीं काय, परंतु मला एक झाडाचें पानही प्रिय आहे-मग तें कोणत्याही झाडाचें आणि ताजें किंवा सुकलेलें-कसेंही असो. ८५ पण तें भक्तिभावानें परिपूर्ण आहे असें पाहतांच, ज्याप्रमाणें एकादा क्षुधित मनुष्य अमृतानें तृप्त होतो, त्याप्रमाणें भक्तिभावानें परिपूर्ण असलेलें पान अमृततुल्य मानून मी खाऊं लागतों. ८६ अथवा एकाद्या वेळेस असा प्रसंग आला की, झाडाला कोठेंच पाला नाही, पण पाणी मिळण्याचें तर संकट पडणार नाहींना ? ८७ तें वाटेल त्या ठिकाणी फुकट मेहनतीशिवाय मिळतें. तेंच मला मनोभावानें अर्पण करतो, ८८ त्यानें माझ्याकरितां वैकुंठाहूनही मोठीं देवळें बांधल्याप्रमाणें व कौस्तुभमण्याहूनही तेजस्वी असे दागिने दिल्याप्रमाणें होतें. ८९ त्यानें दुधासारखी, स्वच्छ व क्षीरसमुद्राप्रमाणें मनोहर अशीं अगणित

१ वेद. २ हें नव्हे, तें नव्हे इत्यादि निषेध मुखानें. ३ मागे सरे. ४ सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार, हे ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र, सदोदित पांच वर्षांचे व नग्न असून पूर्ण ब्रह्मज्ञानी आहेत. ५ विचार, गणती, मोजणी. ६ योग्यतेला पुरले ? ७ महादेवाच्या. ८ चरणतीर्थ, गंगा. ९ संपन्नपणांत. १० सारखी, बरोबरीची. ११ श्रीसारख्या. १२ त्या दासींनीं. १३ देवांचीं नगरें. १४ सेवकाला. १५ अधिकारास. १६ दूर, पलीकडे. १७ नम्र. १८ सान्निध्य. १९ सूर्याच्या. २० काजवा. २१ प्रतिष्ठा दाखविणें. २२ अज्ञानी. २३ बेंडगळ. २४ शकेल. २५ देहाभिमानाची ओंवाळणी; २६ अत्यंत प्रेमोल्हासानें. २७ पुढें करी. २८ तोडितां. २९ हिशोबानें, वास्तविक पाहिलें. ३० हुंगावें. ३१ (द्रौपदीचें) शाकपत्र. ३२ अमृततुल्य मानून. ३३ खाऊं लागतो. ३४ किंमती वांचून, फुकट. ३५ मनोभावानें. ३६ मोठें. ३७ देवळें. ३८ अलंकार. ३९ दुधासारखी स्वच्छ. ४० शय्यास्थानें.

अपारें । सृजिलीं तेणें ३९० कर्पूर चंदन अगरु । ऐसेया सुगंधाचा महामेरु । मज हातिंवा लाविला दिनकरु । दीपमाळे ९१ गरुडासारिखीं वाहनें । मज सुरतरूचीं उद्यानें । कामधेनूचीं गोधनें । अर्पिलीं तेणें ९२ मज अमृताहूनि सुरसें । बोनीं वोगँरिलीं बहुवसें। ऐसा भक्तांचेनि उदकलेशें । परितोषें गा ९३ हें सांगावें काय किरीटी । तुवांचि देखिलें आपुलिया दिठी । मी सुदामयाचिया सोडीं गांठी । पव्हयांसाठीं ९४ पैं भक्ति एकी मी जाणें । तेथ सोनें थोर न म्हणे । आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ९५ येर पत्र पुष्प फळ । हें भजावया मिसें केवळ । वांचूंनि आमुचा लाग निष्फळ । भक्तितत्त्व ९६ म्हणोनि अर्जुना अवधारीं। तूं बुद्धी एकी सोपारी करीं। तरी सहजें आपुलिया मनोमंदिरीं । न [१४] विसंबें मातें ९७

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥

जे जे कांहीं व्यापार करिसी । कां भोग हन भोगिसी । अथवा यज्ञीं याजिसी । नानाविधीं ९८ नातरी पात्रविशेषें दानें । कां सेवकां देसी जीवनें । तपादि हन साधनें । व्रतें करिसी ९९ तें क्रियाजात आघवें । जें जैसें निपजेल स्वभावें । तें भावना करोनि करावें । माझिया मोहरा ४०० पारि सर्वथा आपुले जीवीं । केलियाची से कांहींचि नुरवीं । ऐसीं धुवोनि कर्में द्यावीं । माझिया हातीं १

शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः । संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥

मग अग्निकुंडीं बीजें घातलीं । तियें अंकुरदशे । जेवी मुकलीं । तेवीं न फळतीचि मज अर्पिलीं । शुभाशुभें २ अगा कर्में जैं उरावें । तैं तिहीं सुखदुःखीं फळावें । आणि तैयातें भोगावया यावें । देहा एका ३ तें उगाणिलें मज कर्में । तेव्हांचि पुसिलें मरण जन्म । जन्मासवें श्रम । वैंरचिलही गेले ४ म्हणऊनि अर्जुना यापरी । पाहेंचां वेळु नव्हेल भारी । हे संन्यासयुक्ति सोपारी। दिधली तुज ५ या देहाचिया बांदोडीं न पडिजे । सुखदुःखांचिया सागरीं न बुडिजे । सुखें सुखरूपा घेंडिजे । माझियाचि आंगा ६

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः । ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥२९॥

तो मी पुससी कैसा । तरि जो सर्वभूतीं सदा सरिसा । जेथ आपपरु ऐसा। भागु नाहीं ७ जे ऐसिया मातें जाणोनि । अहंकाराचा कुरुंठा मोडोनि जे जिवें [२९] कर्में करूनि । मातें भजले ८ ते वर्तत दिसती देहीं । परि ते देहीं ना

दाम्याम्यानें माझ्याकरितां निर्माण केल्याप्रमाणें आहेत. ३९० कापूर, चंदन, कृष्णागरु अशा सुगंधाच्या महामेरूएवढाल्या दिगांनीं माझ्यापुढें काडवाती लावून सूर्याची दिपमाळ पाजळल्याप्रमाणें आहे; ९१ त्यानें गरुडासारखी वाहनें, कल्पतरूच्या बागा, व कामधेनूंचीं खिल्लारें मला अर्पण केल्याप्रमाणें आहेत. ९२ मला अमृताहूनही गोड अशीं पुष्कळ पक्वान्नें वाढून जो संतोष होतो, तो अशा भक्तियुक्त अंतःकरणानें अर्पण केलेल्या पाण्याच्या थेंबापासून होतो. ९३ हे किरीटी, फार काय सांगूं ! मला अर्पण करण्याच्या उद्देशानें आपली गरीबी जाणून पोह्यांच्या कणांची गाठोडी सुदामर्जानें प्रीतीनें बगलेंत मारून आणिली, तिच्या गांठी मी लगबगीनें सोडल्या, त्या तूं आपल्या डोळ्यानें पाहिल्या नाहींस कों ? ९४ म्हणून मी फक्त एक भक्ति ओळखतों; त्या ठिकाणीं लहानथोर हे मनांत आणीत नाहीं; आणि वाटेल त्याच्या ठिकाणीं माझ्याविषयीं अनन्यभाव असला म्हणजे त्याच्या घरचे आम्ही पाहुणेच आहोंत. ९५ एरव्हीं पत्रें, पुष्पें, फळें हीं आमची भक्ति करण्याकरितां केवळ निमित्तमात्र आहेत; खरोखर निष्कलंक भक्ति हें माझ्या प्राप्तीचें मुख्य साधन आहे, याशिवाय भक्तितत्त्वाखेरीज इतर सर्व सामुग्री आम्ही व्यर्थ समजतों; ९६ म्हणून, अर्जुना, ऐक. तूं आपली बुद्धि स्वाधीन करून घेऊन नेहमीं आपल्या मनोरूप मंदिरांत माझा विसर पडूं देऊं नको. ९७

**अन्वयार्थ**—(कौन्तेय)–हे अर्जुना !–(यत्)–तूं जें (करोषि)–करतोस–(यत् अश्नासि)–जें खातोस,–(यत् जुहोषि)–जें हवन करतोस–(यत् ददासि)–जें दान देतोस,–(यत् तपस्यसि)–जें तप करतोस–(तत्)–तें सर्व–(मदर्पणं)–मला समर्पण –(कुरुष्व)–कर. २७

येवढ्याकरितां तूं जे जे कांहीं व्यापार करशील, किंवा ज्या वस्तूंचा उपभोग घेशील. अथवा ज्या पुष्कळ प्रकारच्या यज्ञांनीं माझें यजन करशील, ९८ किंवा सत्पात्रीं जीं जीं दानें करशील अथवा चाकरमाणसास जीं जीं वेतनें देशील आणि जीं जीं तपादि सर्व साधनें व व्रतें करशील, ९९ तीं तुझ्या हातून सहजगत्या होणारीं सर्व कर्मे तूं माझ्या उद्देशानें भक्तिपुरःसर कर. ४०० परंतु तीं केल्याबद्दलची आपल्या मनांत आठवणही राहूं नये, इतक्या निरहंकारानें व निष्कामबुद्धीनें केलेलीं अशीं स्वच्छ कर्मे मला अर्पण कर. १

**अन्वयार्थ**—(एवं)–याप्रमाणें तूं करूं लागलास म्हणजे–(शुभाशुभफलैः)–शुभ व अशुभ फळें देणाऱ्या–(कर्मबंधनैः)–कर्मरूप बंधनांकडून–(मोक्ष्यसे)–मुक्त केला जाशील व–(संन्यासयोगयुक्तात्मा)–ज्यानें अन्तःकरण संन्यास व योग यांनीं युक्त आहे असा तूं–(विमुक्तः)–अगदीं मुक्त होऊन–(मां)–मला–(उपैष्यसि)–प्राप्त होशील. २८

मग ज्याप्रमाणें अग्नींत भाजलेल्या बीजाला अंकुर येत नाहींत त्याप्रमाणें मला अर्पण केलेल्या शुभाशुभ कर्मांची फलप्राप्ति तुला होणार नाहीं. २ अरे, अगोदर कर्म उरलें असलें, तर कर्मांनीं सुखदुःखाच्या रूपांनीं फलद्रूप व्हावें व तीं सुखदुःखें भोगण्याकरितां जन्म घ्यावा. ३ अशी रीत आहे; परंतु तेंच कर्म ज्या वेळीं मला अर्पण केलें, त्याच वेळीं मरण व जन्म चुकले; आणि जन्मानंतर येणारीं जीं दुःखें तींही आपोआप गेलीं. ४ म्हणून अर्जुना, ही सांगितलेली सोप्या संन्यासाची युक्ति 'पाहूं आतां' 'करूं आतां' असें म्हणून वेळ गमावण्यासारखी नाहीं. ५ या युक्तीनें देहाच्या बंधनांत न पडतां व सुखदुःखाच्या सागरांत न बुडतां अनायासानें, सुखरूप जो मी त्या माझ्या स्वरूपांत निमग्न होऊन जा. ६

**अन्वयार्थ**—(अहं सर्वभूतेषु)–मी सर्वभूतांमध्यें–(समः)–सम आहें.–(मे द्वेष्यः न अस्ति)–माझा कोणी द्वेष्य-द्वेषपात्र-शत्रु नाहीं व–(प्रियः)–प्रिय–(न)–नाहीं.–(तु)–पण–(ये)–जे–(मां)–मला–(भक्त्या)–भक्तीनें–(भजन्ति)–भजतात–(ते)–ते–(मयि)–माझ्यामध्यें-मजपाशीं स्वभावतःच असतात–(च)–आणि–(अहं अपि)–मीहि–(तेषु)–त्यांच्यामध्यें स्वभावतःच असतों. २९

तो मी कसा आहें म्हणून विचारशील, तर सर्व भूतांचे ठिकाणीं नेहमीं सारखा असून, माझ्या ठिकाणीं 'माझें' व 'तुझें' असा भेद नाहीं. ७ जे अशा माझ्या स्वरूपाला जाणतात, व अहंकाराचा चोमोड करून कायावाचामनानें मला भजतात. ८ ते जगांत देहानें व्यवहार

१ निर्माण केलीं. २ काडवात. ३ सर्व. ४ बागा. ५ खिल्लारें. ६ पकान्नें. ७ वाढिलीं. ८ पोह्यासाठीं. ९ लहान. १० निमित्त. ११ परवां, बाकी. १२ निष्कलंक, अव्यभिचारी. १३ सोपीं–स्वाधीन–करून घे. १४ विसरूं नको. १५ सत्पात्रीं. १६ वेतन, पगार. १७ मत्प्रीत्यर्थ. १८ कर्मफळाला. १९ अर्पण केलें. २० वरील, पुढील. २१ उद्यांचा, पुढचा. २२ फार लांब नाहीं. २३ कर्मफळाचा त्याग करण्याची युक्ति. २४ बंधनांत. २५ अनायासें. २६ मिसळून जा. २७ सम, सारिखा. २८ घरटा. २९ काया, वाचा, मनानें.

माझ्या ठायीं । आणि मी तयांच्या हृदयीं । समग्र असें ९ सविस्तर वटत्व जैसें । बीजकणिकेमाजि असे । आणि बीजकणु वसे । वटीं जेवीं ४१० तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेर नामाचींचि अंतरें । वांचूनि आंतुवेट वस्तुविचारें । मी तेंचि ते ११ आतां जायांचें जैसें लेणें । आंगावरी आहाचवाणें । तैसें देहधरणें । उदास तयांचें १२ परिमळु निघालिया पवनापाठीं । मागें वोस फूल राहे देंठीं । तैसें आयुष्याचिये मुठीं । केवळ देह १३ येर अँवष्टंभु जो आघवा । तो आरूढोनि मद्भावा । मजचि आंतु पांडवा । पैठा जाहला १४

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥३०॥

ऐसें भजतेनि प्रेमभावें । जयां शरीरही पाठीं न पवे। तेणें भलतया व्हावें। जातीचिया १५ आणि आचरण पाहातां सुभटा । तो दुष्कृताचा कीर सेलें वांटा । परि जीवित वेंचिलें चोहटां। भक्तीचिया कीं १६ अगा अंतींचिया मती । साचपण पुढिले गती । म्हणोनि जीवित जेणें भक्ती । दिधलें शेखीं [14] १७ तो आधीं जरी दुराचारी । तरी सर्वोत्तमुचि अवधारीं । जैसा बुडाला महापुरीं । न मरतु निघाला १८ तयाचें जीवित ऐलथडिये आलें । म्हणोनि बुडालेंपण जेवीं वायां गेलें । तेवीं नुरेचि पाप केलें । शेवटलिये भक्ती १९ यालागीं दुष्कृती जऱ्ही जाहाला । तरि अनुतापतीर्थीं न्हाला । न्हाऊनि मजआंतु आला । सर्वभावें ४२० तरि आतां पवित्र तयाचेंचि कुळ । आभिजात्य तेणेंचि निर्मळ । जन्मलेयाचें फळ । तयासीच जोडलें २१ तो सकळही पढिन्नला । तपें तोचि तपिन्नला । अष्टांग अभ्यासिला । योगु तेणें २२ हें असो बहुत पार्था । तो उतरेला कर्मे सर्वथा । जयाची अखंड गा आस्था । मजचिलागीं २३ अवघिया मनोबुद्धीचिया राहटी । भरोनि एकनिष्ठेची पेटी । मजमाजि किरीटी । निक्षेपिली [23] जेणें २४

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति । कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥३१॥

तो आतां अवसरें मजसारिखा होईल । ऐसा हन भाव तुज जाईल । हां गा अमृताआंत राहील । तया मरण कैचें २५ पैं सूर्यु जो वेळु नुदैजे । तया वेळा कीं रात्रि म्हणिजे । तेवीं माझिये भक्तीविण जें कीजे । तें महापाप नोहे २६ म्हणोनि तयाचिया चित्ता । माझी जैवाळिक पांडुसुता । तेव्हांचि तो तत्त्वता । स्वरूप माझें २७ जैसा दीपें दीपु लाविजे । तेथ आदील कोण हें नोळखिजे । तैसा सर्वस्वें जो मज भजे । तो मीचि होऊनि ठाके २८ मग

करितात खरे, तथापि देहांत नसून त्यांचें चित्त माझे ठिकाणीं असतें, आणि मीही संपूर्ण त्यांच्या हृदयांत असतों. ९ ज्याप्रमाणें वडाचें मोठें झाड वडाच्या बीजांतच असतें, व बीज त्या झाडांतच असतें, ४१० त्याप्रमाणें माझ्यांत व त्यांच्यांत केवळ नांवाचेंच अंतर असतें, बाकी अंतःस्थितीचा विचार करून पाहतां ते व मी हे एकच आहों. ११ आतां, लोकांचे मागून आणलेले दागिने अंगावर घालणें जसें व्यर्थ, त्याचप्रमाणें त्यांचें देहधारण करणें उदासीनपणाचें असतें. १२ वाऱ्याबरोबर ज्याप्रमाणें फुलाचा वास त्याचे मागोमाग जातो व देंठापाशीं फूल जसें वासरहित राहतें, त्याप्रमाणें, आयुष्याची मुदत संपण्यापुरताच त्यांचा देह असतो. १३ हे पांडवा, जो अभिमान म्हणून आहे, तो सर्व माझी भक्ति पावून माझ्या स्वरूपांतच मिळाला. १४

**अन्वयार्थ**––(अपि चेत्)–जरी कदाचित्–(सुदुराचारः)–अतिशय निंद्य आचरण करणारा एकादा–(अनन्यभाक्)–अनन्य भक्त होऊन–(मां)–मला–(भजते)–भजूं लागला तरी–(सः)–तो–(साधुःएव)–सदाचरणसंपन्नच आहे असें–(मन्तव्यः)–मानावें–(हि)–कारण–(सः)–तो–(सम्यक्)–चांगल्या प्रकारें–(व्यवसितः)–निश्चित झालेला असतो. ३०

अशा प्रेमभावानें जे मला भजतात, व ज्यांना हें शरीर पुनः प्राप्त होत नाहीं, ते हव्या त्या जातीचे असले तरी असोत; १५ आणि हे महावीरा, त्यांचें आचरण जरी पाप करणाऱ्यांत पहिल्या प्रतीचें असलें, तरी ज्यांनी आपल्या आयुष्याचा शेवट भक्तिमार्गांत केला आहे; १६ अरे, अंतकालीं जी मनाला बुद्धि होते, तीच गति खरोखर पुढील जन्मीं प्राप्त होते; म्हणून आपल्या आयुष्याच्या शेवटच्या काळ जो माझ्या भक्तींत घालवितो, १७ तो पूर्ववयांत जरी दुराचरण करणारा असला, तरी तो सर्वोत्तमच आहे, असें समज. एकाद्या मनुष्यानें महापुरांत उडी घातली व सर्व मनुष्यांस तो मेला असें वाटलें, परंतु तो न मरतां निघाला, १८ तो जगून अलिकडच्या काठावर आला, त्यामुळें त्याचें बुडणें व्यर्थ गेलें, त्याचप्रमाणें, पूर्ववयांत केलेलें पाप उत्तरवयांतील ज्ञानोत्तर भक्तीनें नाहींसें होतें. १९ याकरितां, पापाचरण करणारा जरी असला, तरी तो पश्चात्तापरूप तीर्थांत न्हाऊन जर सर्वभावानें मला शरण आला, ४२० तर त्याचें आतां कुल पवित्रच झालें, त्याला निर्मल कुलिनता प्राप्त झाली, आणि त्याच्याच जन्माचें सार्थक झालें. २१ त्याला सर्व शास्त्रें वगैरे अवगत झालीं. त्याला तपाचेंही आचरण केल्याचें श्रेय आलें व त्यानें अष्टांगयोगअभ्यास केला. २२ पार्था फार काय सांगावें! एकनिष्ठारूप पेटींत मनोबुद्धीचे सर्व व्यापार भरून तो माझ्याच ठिकाणीं जो ठेवितो, अशा प्रकारें ज्याचें अखंड प्रेम माझ्याच ठिकाणीं असतें, तोच निश्चयेंकरून सर्व कर्मापासून उत्तीर्ण झाला. २३।२४

**अन्वयार्थ**––[सः–तो]–(क्षिप्रं)–लवकर–(धर्मात्मा)–धर्मात्मा–धार्मिक–(भवति)–होतो आणि–(शश्वत्)–नित्य–(शान्तिं)–शांतीला–(निगच्छति)–प्राप्त होतो.–(कौन्तेय)–हे अर्जुना!–(मे भक्तः)–माझा भक्त–(न प्रणश्यति)–कधींहि नाश पावत नाहीं, असी तूं–(प्रतिजानीहि)–प्रतिज्ञा कर. ३१

तो कांहीं अवकाशानें ( मरणोत्तर ) मजसारखा होईल असा तुझा कदाचित् समज होईल, पण, जो अमृतांतच वास करितो, त्याला मरण कोठून प्राप्त होणार? २५ हें बघ–ज्या वेळीं सूर्य उदय पावत नाहीं, त्याच वेळेला रात्र असें म्हणतात; त्याचप्रमाणें माझ्या भक्तीशिवाय जें करणें तें महापाप नव्हे काय? २६ हे पांडुसुता, त्याच्या चित्ताला जेव्हां माझा योग होतो, त्याचें चित्त मद्रूप होतें, तेव्हांच खरोखर तो माझ्या स्वरूपाला पावतो. २७ ज्याप्रमाणें एका दिव्यानें दुसरा दिवा लावला असतां त्यांत पहिला कोणता हें ओळखतां येत नाहीं, त्याप्रमाणें जो सर्वभावानें मला भजतो, तो मद्रूपच होऊन राहतो. २८ मग त्याला माझी स्थिति,

१ वडाचें झाड. २ अंतर्यामांतील. ३ दुसऱ्याचे वस्त्रें आणलेलें, केव्हांतरी जाणारें. ४ वरवरच, व्यर्थ ५ वाऱ्यामागून. ६ मुदतीपर्यंत. ७ अहंकार. ८ मिळाला. ९ पुनः. १० पापाचा. ११ पहिल्या प्रतीचा, दोलका वांटा. १२ मार्गांत 'आर्तो जिज्ञासुरर्थार्थीज्ञानीच' इत्यादि चार प्रकारच्या भक्तियोग चतुष्पथ=चव्हाटा. १३ मरणसमयींची अन्ते मतिः सा गतिः. १४ शेवटीं. १५ शेवटच्या ज्ञानोत्तर भक्तीनें. १६ पापी. १७ पश्चात्तापरूप तीर्थांत. १८ कुलीनपणा. १९ फळ जी भक्ति. २० अष्टांगयोग साधनांची सिद्धि. २१ सर्व कर्मांतून पार पडला. २२ व्यापार. २३ ठेविली. २४ अवकाशानें. २५ ज्यावेळीं उदय पावत नाहीं. २६ सान्निध्य. २७ पहिला.

भक्तीचेनि आथिलेपणें । दैत्यीं देवां आणिलें उणें । माझें नृसिंहत्व[२] लेणें । जयाचिये महिमे ४५० तो प्रल्हादु गा मजसाठीं । घेतां बहुतें संकटें सदा किरीटी। कां जें मियां द्यावें ते गोष्टी । तयाचिया जोडे ५१ एऱ्हवीं दैत्यकुळ साचोकारे । परि इंद्रही सरी न लाहे उपरें । म्हणोनि भक्ति गा एथ सरे। जाति अप्रमाण ५२ राजाज्ञेचीं अक्षरें आहाती । तियें चामा एका जया पडती । तया चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ५३ वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाचि समर्थ आहे। तेंचि चाम एक जैं लाहे । तेणें विकेती आघवीं ५४ तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे। जैं मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ५५ म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण। एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक ५६ तेंचि भलतेणें भावें । मन मज आंतु येतें होआवें । आलें तरी आघवें । मागील वावो ५७ जैसे तंवचि वहाळ[१९] वोहळ । जंव न पवती गंगाजळ । मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ५८ कां खैर चंदन काष्ठें । हे विवंचना तंवचि घटे । जंव न[१८] घापती एकवटे । अग्नीमाजीं ५९ तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया। कां शूद्र अंत्यजादि इया । जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ४६० मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें । जेव्हां भावें होती मज मीनलें । जैसे लवणकण घातले । सागरामाजी ६१ तंववरी नदानदींचीं नांवें । तंवचि पूर्वपश्चिमेचे[२२] यावे । जंव न येती आघवे । समुद्रामाजी ६२ हेंचि कवणें एके मिसें । चित्त माझे ठायीं प्रवेशे । येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे ६३ अगा वरी फोडावयां लागीं । लोहो मिळो कां पारिसाचे आंगीं । कां जे मिळेतिये प्रसंगीं । सोनेंचि होईल ६४ पाहें पां वाल्लभाचेनि व्याजें । तिया व्रजांगनांचीं निजें[२८] । मज मीनलिया काय माझें । स्वरूप नव्हती ६५ नातरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें । कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं ६६ अगा सोयरेपणेंचि पांडवा । माझें सायुज्य यादवां । कीं ममत्वें वसुदेवादिकां सकळां ६७ नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा । इयां भक्ती मी धनुर्धरा । प्राप्यु जैसा ६८ तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भयसंभ्रमें। येरां घातकां मनोधर्में। शिशुपालादिकां ६९ अगा मी एकुलौणीचें खागें। मज येवो पां भलतेनि मार्गें । भक्ती कां विषयविरागें । अथवा वैरें ४७० म्हणोनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझ्या ठायीं । उपायांची नाहीं । वाणी एथ

पहा की, भक्तीच्या महत्वानें दैत्यांनी देवांनाही मागें टाकलें, व त्या प्रल्हादाच्या भक्तीच्या महिम्याकरितां मला नरसिंह अवतार घ्यावा लागला. ४५० हे किरीटी, ज्या प्रल्हादानें माझ्या प्राप्तीकरितां नेहमीं अनंत संकटें सोसिली, त्या प्रल्हादानें चरित्र जर वर्णन केलें, तर माझ्या प्रसन्नतेपासून जी प्राप्ति होते, तीच त्या चरित्र-वर्णनापासून होते. ५१ वाकी वास्तविक पाहतां त्यानें दैत्यकुळांत जन्म घेतलेला, पण त्याच्यापेक्षां अधिक मोठेपणा इंद्रालाही प्राप्त झालेला नाहीं; म्हणून माझी प्राप्ति करून घेण्याला एक भक्तिच पुरे आहे; जात वगैरेची कांहीं एक चाड नाहीं. ५२ राजाज्ञेचीं अक्षरें एका कातड्याचे तुकड्यावर जरी पडलीं, तरी त्या कातड्यापासून सर्व वस्तु प्राप्त होतात. ५३ त्या अक्षरांवांचून सोन्यारुप्याला किंमत नाहीं; तर तेथें राजाज्ञा हीच मुख्य होय, व त्याच राजशिक्क्याच्या कातड्यानें सर्व वस्तु विकत मिळतात. ५४ त्याचप्रमाणें, जेव्हां मन व बुद्धि हीं माझ्याच प्रेमानें युक्त होतात, तेव्हांच मोठेपणा व सर्वज्ञपणा यांचा उपयोग होतो. ५५ म्हणून कूळ, जात व वर्ण हे सर्वच निष्कारण आहेत; तर अर्जुना, फक्त माझी भक्ति केली असतां सार्थक होतें. ५६ ती माझी भक्ति वाटेल त्यानें मनोभावानें केली असतां, तो पूर्वी कोणत्याही वर्णांतला असला तरी चिंता नाही. ५७ ओढे जोंपर्यंत गंगेस मिळाले नाहींत, तोंपर्यंतच त्यांस ओहोळ, व्हाळ वगैरे म्हणतात; पण ते गंगेस मिळाल्यावर जसें गंगारूपच होतात; ५८ किंवा लांकडें जोंपर्यंत अग्नींत घातली नाहींत, तोंपर्यंतच त्यांस खैर, चंदन अशीं नांवें असतात, ५९ त्याचप्रमाणें; जोंपर्यंत मद्रूपता प्राप्त झाली नाहीं, तोंपर्यंतच क्षत्रिय, वैश्य, स्त्री, शूद्र, अंत्यज इत्यादि जाति वेगळाल्या असतात. ४६० ज्याप्रमाणें समुद्रांत मीठ घातल्यावर एकरूप होऊन जातें, त्याप्रमाणे, मनोभावानें मला शरण आल्यावर जाति, व्यक्ति वगैरे भेद नाहींसा होतो. ६१ जोंपर्यंत समुद्राला येऊन मिळाले नाहींत, तोंपर्यंत नद, नदी, पूर्ववाहिनी, पश्चिमवाहिनी, वगैरे भेद असतो, ६२ त्याचप्रमाणें कोणत्याही निमित्तानें माझ्याकडे चित्त लागलें म्हणजे पुरे, मग सहजच मद्रूपत्व प्राप्त होतें. ६३ अरे, परिसाला फोडण्याकरितां कां होईना, जरी लोखंडानें स्पर्श केला, तरी स्पर्शाबरोबर त्याचें लागलीच सोनें होतें. ६४ हें पहा, गोपींनीं विषयाच्या प्रीतीनें माझे ठिकाणीं आपलें चित्त ठेवल्यामुळें त्या मद्रूप झाल्या नाहींत. कां ? ६५ किंवा भीतीच्या योगानें कंस मद्रूप झाला नाहीं कां ? किंवा माझ्याशीं अखंड वैर केल्यानें शिशुपालादिक मद्रूप झाले नाहींत कां ? ६६ अरे, तसेंच पांडव व यादव यांस सोयरिकीच्या नात्यानें व वसुदेवादिक यांना ममत्वानें माझें सायुज्य मिळालें नाहीं कां ? ६७ हे धनुर्धरा, नारद, ध्रुव, अक्रूर, शुक आणि सनत्कुमार यांना जसा मी भक्तीनें प्राप्त झालों आहें. ६८ तसाच गोपींना विषयबुद्धीनें, कंसाला भीतीनें व शिशुपालादिकांना वैरबुद्धीनें मी प्राप्त झालों आहें. ६९ अरे मी निर्वाणीचें स्थान आहें, म्हणून मला वाटेल त्या मार्गानें भक्तीनें, विषयबुद्धीनें, विरक्ततेनें, अथवा वैरानें—कोणीही प्राप्त झाला असतां हरकत नाहीं. ४७० म्हणून, पार्था हें पहा कीं, मला येऊन मिळण्याकरतां एथें उपायाची उणीव

१ महत्त्वानें, अस्तित्वानें २ अवतार धारण करणें. ३ मोठेपणासाठीं. ४ खरेपणानें. ५ बरोबरी. ६ अधिकपणानें. ७ पुरे होते, शोभते. ८ चामडें, कातडें. ९ विकत मिळतात. १० शोभते. ११ निष्फळ. १२ भक्तपणा. १३ कोणत्याहि. १४ पूर्वीचे. १५ व्यर्थ. १६ लहान ओढे. १७ विचार. १८ घातली जात नाहींत. १९ शून्य. २० मिळाले. २१ मिठाचे खडे. २२ ओहोळ, ओढे. २३ परिसाला फोडण्याकरितां. २४ स्पर्शमात्रानें. २५ प्रियाच्या. २६ निमित्तानें. २७ गोपस्त्रियांची. २८ अंतःकरणें. २९ शिशुपालादिकांनीं. ३० भक्तीस्तव. ३१ विषयबुद्धीनें. ३२ निर्वाणीचें स्थान. ३३ विरक्ततेनें. ३४ उणीव.

७१ आणि भलतिया जातीं जन्मावें । मग भजिजे कां विरोधावें । परि भक्त
कां वैरिया व्हावें । माझियाची ७२ अगा कवणें एके बोलें । माझेपण जऱ्ही
जाहालें । तरी मी होणें आलें । हाता निरुतें ७३ यालागीं पापयोनीही अ-
र्जुना । कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ७४

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा । अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥३३॥

मग वर्णांमाजि छत्रचामर[3] । स्वर्ग जयाचें अग्रहार[4] । मंत्रविद्येसि माहेर ।
ब्राह्मण जे ७५ जे पृथ्वीतळींचे देव । जे तपोवतार[5] सावयव[6] । सकळ तीर्थांसि
दैव । उदयलें जें ७६ जेथ अखंड वसिजे यॉगीं । जे वेदांची वज्रांगी । जयां-
चिये दिठीचिया[9] उत्संगीं । मंगळ वाढे ७७ जयांचिये आस्थेचेनि बोलें[11] । स-
त्कर्म पाल्हाळीं[12] गेलें । संकल्पें सत्य जियालें । जयांचेनि ७८ जयांचेनि गा
बोलें । अग्नीसि आयुष्य जाहालें । म्हणोनि समुद्रें पाणी आपुलें । दिधलें यां-
चिप्रीती[13] ७९ मियां लक्ष्मी डोवॅलोनि[14] केली परौती । फेडोनि[15] कौस्तुभ घेतला
हातीं । मग वोढविली[16] वक्ष्यस्थळाची[17] वोखती । चरणरजां ४८० आझूनि पा-
उलाची मुद्रा[19] । मी हृदयीं वाहें गा सुभद्रा । जे आपुलिया दैवसमुद्रा । जत-
नेलागीं ८१ जयांचा कोप सुभटा । काळाग्नि रुद्रांचा वसौटा[20] । जयांचे प्रसादीं
फुकटा । जोडती सिद्धी ८२ ऐसे पुण्यपूज्य जे ब्राह्मण । आणि माझ्या ठायीं
अतिनिपुण । आतां मातें पावती हे कवण । समर्थावें[21] ८३ पाहें पां चंदना-
चेनि अंगानिळें[22] । शिवतिले[23] निंब होते जे जवळें । तींहीं निर्जिवींहीं[24] देवांचीं
निडळें[25] । बैसणीं[26] केलीं ८४ मग तो चंदनु तेथ न पवे । ऐसें मनीं कैसेनि ध-
रावें । अथवा पातला हें समर्थावें । तेव्हां कायि साच ८५ जेथ निववील ऐ-
शिया आशा । हरें चंद्रमा आंधा[27] ऐसा । वाहिजत असे शिरसा[28] । निरंतर ८६
तेथ निवविता आणि सगळा । परिमळें चंद्राहून आगळा । तो चंदनु केवीं
अवलीळा[29] । सर्वांगीं न बैसे ८७ कां रथ्योदकें[30] जियेचिये कासे । लागलिया
समुद्र जालीं अनायासें । तिये गंगेसि काय अनारिसें[31] । गत्यंतर असे ८८
म्हणोनि राजर्षि कां ब्राह्मण । जयां गति मति मीचि शरण्य[32] । तयां त्रिशुद्धी[33]
मीच निर्वाणें[34] । स्थितीही[35] मीचि ८९ यालागीं शतजर्जर[36] नावे । रिगोनि केवीं
निश्चिंतें[37] होआवें । कैसेनि उघडिया असावें । शस्त्रवर्षीं[38] ४९० आंगावरी पडतां

नाहीं; ७१ आणि वाटेल त्या जातींत जन्म होवो आणि माझी भक्ति करो अथवा वैर करो; परंतु भक्ति किंवा वैर जें करावयाचें, तें माझेंच करावें, ७२ अरे, कोणत्याही निमित्तानें जर मला कोणी शरण आला, तर मद्रूप होणें हें अगदीं त्याच्या हातचें आहे. ७३ यास्तव, हे अर्जुना, पापयोनींत जन्म घेतलेले, किंवा वैश्य, शूद्र, स्त्रिया यांनीं माझी भक्ति केली असतां ती माझ्या स्वरूपाप्रत प्राप्त होतात. ७४

**अन्वयार्थ**—(पुनः)—मग—(पुण्याः ब्राह्मणाः)—पुण्य योनींत जन्मलेले ब्राह्मण—(तथा)—त्याचप्रमाणें—(भक्ताः राजर्षयः)—भक्त राजर्षि—ज्ञानी क्षत्रिय श्रेष्ठ गतीला जातील हें—(किं)—काय सांगावें ? यास्तव—(इमं अनित्यं असुखं लोकं)—या अनित्य व सुखरहित लोकास—(प्राप्य)—प्राप्त होऊन—(मां भजस्व)—मला भज. ३३

मग, स्वर्गलोक म्हणजे ज्यांचें केवळ इनामगांवच; आणि जे मंत्रविद्येचें माहेरघरच; जे सर्व वर्णांमध्यें श्रेष्ठ ब्राह्मण; ७५ जे पृथ्वीवरील देवच, जे तपश्चर्येचे मूर्तिमंत अवतार, ज्यांच्या योगानें सर्व तीर्थांचें दैव उदय पावलें आहे; ७६ ज्यांच्या ठिकाणीं यज्ञांचा अखंड वास, जे वेदांची बळकट कवचें, व ज्यांच्या दृष्टीच्या संबंधानें सर्व ठिकाणीं मंगलाची वृद्धि होते; ७७ ज्यांच्या आस्थारूप ओलाव्यानें सत्कर्मांचा प्रसाद झाला, व ज्यांच्या निश्चयानें सत्य जिवंत राहिलें; ७८ ज्यांच्या आशीर्वादानें अग्नीचें आयुष्य वाढलें; म्हणून त्यांच्या प्रीतीस्तव अग्नीला समुद्रानें आपल्या ठिकाणीं आश्रय दिला; ७९ मी लक्ष्मीला ढकलून पलीकडे केली, व कौस्तुभमणि गळ्यांतून काढून हातांत घेतला; आणि मग ज्यांच्या चरणरजांच्या प्राप्तीकरितां मी आपल्या उराची खळगी म्हणजे छाती पुढें केली. ४८० हे नरेंद्रा, माझा शांतपणाचा लौकिक कायम राहण्याकरितां ज्यांच्या पावलाची खूण मी अजून आपल्या हृदयावर बाळगली आहे. ८१ हे महावीरा, ज्यांचा कोप म्हणजे काळ, अग्नि व रुद्र यांचें वसतिस्थान होय, व जे प्रसन्न झाले असतां फुकट सिद्धि प्राप्त होतात; ८२ असे पुण्यपूज्य जे ब्राह्मण, आणि त्यांतून माझ्या ठिकाणीं पूर्ण भक्ति करितात, ते मद्रूप होतात. ह्याचें निराळें काय समर्थन करायाला पाहिजे! ८३ हें पहा—चंदनाच्या अंगवायूनें स्पर्श केलेल्या जवळच्या कमी किंमतीच्या लिंबासही जर देवाच्या मस्तकावर स्थान मिळतें, ८४ तर मग चंदनाचें वास्तव्य तेथें घडणार नाहीं, अशी मनांत शंका कशी धरावी ? अथवा त्या ठिकाणीं त्याचें वास्तव्य घडलें असें सांगितलें तरच तें खरें, नाहीं तर तें खोटें असें होईल की काय ? ८५ शंकरांनीं विष प्राशन केल्यानें त्यापासून होणाऱ्या दाहाचें शमन होईल, अशा आशेनें जर मस्तकावर निरंतर अर्धचंद्र धारण केला; ८६ तर दाहाचें शमन करणारा, व पूर्ण आणि चंद्राहून सुवासानें अधिक असा जो चंदन, तो सर्वांगावर सहजच कां धारण केला जाणार नाहीं! ८७ किंवा रस्त्यावरील उदकें जिच्यांत मिळाल्यामुळें समुद्रांत सहज जाऊन मिळतात, त्या गंगेला समुद्राशिवाय दुसरी गति आहे काय? ८८ म्हणून, ज्यांना गति व ज्ञान देणारा आणि ज्यांचें रक्षण करणारा निश्चयेंकरून मीच आहें, त्या राजर्षींना व ब्राह्मणांना भक्ति व मुक्तीचें स्थान मीच आहें, ८९ यास्तव शतावधि छिद्रांच्या नावेंत बसून आपण बुडणार नाहीं अशा भरंवशानें निष्काळजी कसें रहावें? तसेंच, शस्त्रांचा वर्षाव चालला असतां आपल्यास दुखापत होणार नाहीं अशा भरंवशानें उघड्या अंगानें कसें फिरावें? ४९० अंगावर दगड पडत

१ विरोध करावा. २ निमित्तानें. ३ श्रेष्ठ राजे. ४ इनाम गांव. ५ तपाचे अवतार. ६ मूर्तिमान. ७ यज्ञांनीं. ८ वज्र, कवच. ९ कृपादृष्टीच्या मांडीवर. १० इच्छा. ११ ओलाव्यानें. १२ विस्तारलें. १३ ब्राह्मणांच्या प्रीतिस्तव. १४ दूर सारून. १५ काढून. १६ पुढें केली. १७ उराची. १८ खळगी. १९ ठसा, खूण. २० वसतिस्थान. २१ प्रतिदानें. २२ अंगवायूच्या योगानें. २३ स्पर्शलें. २४ कमी किंमतीच्या. २५ मस्तकें, कपाळें. २६ वसविण्याची स्थानें. २७ अर्धा. २८ मस्तकावर. २९ सहज. ३० रस्त्यावरील पाणी. ३१ निराळें, भिन्न. ३२ रक्षण करणारा. ३३ सर्वथैव, सरोखर. ३४ शेवट, मुक्ति. ३५ मुक्ति. ३६ शतावधी भोंकांच्या फुटक्या नावेंत. ३७ निष्काळजी. ३८ शस्त्रवृष्टींत.

पाषाण । न सुवावें केवीं वोडेण । रोगें दाटलां आणि उदासपण । वोखदेंसी
९१ जेथ चहूंकडे जळत वणवा । तेथूनि न निगिजे केवीं पांडवा । तेवीं
लोंका येऊनि सोपद्रवां । केवीं न भजिजे मातें ९२ अगा मातें न भजावया-
लागीं । कवण बळ पां आपुलिया आंगीं । काई घरीं कीं भोगीं । निश्चिंती
केली ९३ नातरी विद्या कीं वयसा । यया प्राणियांसि हा ऐसा । मज न
भजतां भरंवसा । सुखाचा कोण ९४ तरी भोग्यजात जेतुलें । तें एका देहा-
चिया निकिया लागलें । आणि एथ देह तंव असे पडिलें । काळाचिये तोंडीं
९५ बाप दुःखाचें केणें सुटलें । जेथ मरणाचे भरे लोटले । तिये मृत्युलोकींचें
शेवटिलें । येणें जाहालें हाटवेळे ९६ आतां सुखेंसि जीविता । कैंची ऐहिकी
किजेल पांडुसुता । काय राखोंडी फुंकितां । दीपु लागे ९७ अगा विषाचे
कांदे वाटुनी । जो रसु घेइजे पिळुनी । तया नाम अमृत ठेवुनी । जैसें अ-
मर होणें ९८ तेवीं विषयांचें जें सुख । तें केवळ परम दुःख । परि काय कीजे
मूर्ख । न सेवितां न सरे ९९ कां शीस खांडूनि आपुलें । पायींच्या खतीं
बांधिलें । तैसें मृत्युलोकींचें भलें । आहे आघवें ५०० म्हणोनि मृत्युलोकीं
सुखाची काहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं । कैंची सुखनिद्रा आंथरुणीं ।
इंगळांच्या १ जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तालागीं ।
दुःख लेऊनि सुखाची आंगीं । साळिते जगातें २ जेथ मंगळाचिया अंकुरीं ।
सवेंचि अमंगळाची पडे पोहेरी । मृत्यु उदराचिया परिवरीं । गर्भु गिंवसी ३
जें नाहीं तयातें चिंतवी । तंव तेंचि नेइजे गंधर्वीं । गेलियाची कवणें गांवीं ।
शुद्धी न लगे ४ अगा गिंवसितां आघविया वाटीं । परतलें पाउलचि नाहीं
किरीटी । सैंघ निमालियांचिया गोठी । तियें पुराणें जेथिंची ५ जेथींचिये अ-
नित्यतेची थोरी । करितया ब्रह्मयाचे आयुष्यवेरी । कैसें नाहीं होणें अवधारीं ।
निपटूनिया ६ ऐसी लोकींची जिये नांदणूक । तेथ जन्मले आथि जे लोक ।
तयांचिये निश्चितीचें कौतुक । दिसत असे ७ पैं दृष्टादृष्टाचिये जोडी- । लागीं
भांडवल न सुटे कवडी । जेथ सर्वस्वें हानि तेथ कोडी । वेंचिती गा ८ जो
बहुवें विषयविलासें गुंफे । तो म्हणती उंवाई पडिला सोंपे । जो अभिलाषं-
भारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती ९ जयाचें आयुष्य धाकुटें होय । वळ

असतां ढाल कां न पुढें करावी? रोगानें ग्रस्त असतां औषध घेण्याविषयीं कसें उदासीन असावें? ९१ हे अर्जुना, चोहोंकडून वणवा लागल्यावर तेथून बाहेर कसें पडूं नये? याचप्रमाणें, अनेक दुःखांनीं भरलेल्या मृत्युलोकास प्राप्त झाल्यावर माझें भजन कां न करावें? ९२ अरे मला न भजावें असें मनुष्याच्या अंगीं कोणतें सामर्थ्य आहे? त्यांच्या घरीं अशी कोणती भोग्य वस्तूंची समृद्धि आहे कीं, त्यांनीं निष्काळजी रहावें? ९३ किंवा मला न भजतां विद्या, तारुण्य यांपासून सुखप्राप्ति होईल, असा त्यांना कोणता भरंवसा आहे? ९४ तर बाबारे, जितक्या म्हणून भोग्य वस्तु आहेत, तितक्या एका देहाच्या सुखाकरितां आहेत; आणि तो देह तर ह्या मृत्युलोकीं काळाच्या तोंडांत पडलेला आहे! ९५ अरे! या मृत्युलोकच्या शेवटच्या मनुष्यरूपी बाजारांत दुःखरूपी माल भरलेला असून मरणरूपी माप चाललें आहे. त्या ठिकाणीं मनुष्यरूपानें येणें झालें आहे. ९६ तर हे पांडुसुता अशा दुःखरूपी बाजारांत जीवाला सुख होईल अशी कोणती वस्तु खरेदी करतां येईल? हें पहा–वित्तव विझून गेल्यावर राहिलेली राख फुंकीत बसलें तर त्यापासून दिवा लागेल का? ९७ अरे, विषाचे कांदे वांटून ते पिळावयाचे, व त्यांचा रस काढल्यावर त्याला अमृत असें म्हणावयाचें, व तें पिऊन ज्याप्रमाणें अमर होण्याची इच्छा करावयाची, ९८ त्याप्रमाणें या विषयापासून होणारें जें सुख, तें केवळ महत् दुःख आहे. परंतु जे अज्ञानी आहेत त्यांना त्यांचें सेवन केल्याशिवाय रहावत नाहीं. ९९ किंवा पायाला झालेल्या जखमेवर आपलें डोकें तोडून बांधणें जितकें चांगलें, तितक्याच या मृत्युलोकांतील गोष्टी चांगल्या आहेत. ५०० म्हणून, या मृत्युलोकीं सुखाच्या गोष्टी कोणाचे कान ऐकत असतील ते ऐकोत! विस्तवाच्या अंथरुणावर निजलें असतां गाढ झोंप कशी लागणार? १ अरे, ज्या मृत्युलोकचा चंद्र क्षयरोगी आहे, जेथें उदयच मुळीं अस्ताकरितां होतो, व जेथें दुःख हें सुखाचें पांघरूण घेऊन जगाला छळतें; २ जेथें कल्याणाचा अंकुर फुटतो न फुटतो तोंच त्यावर अकल्याणाचें आच्छादन पडतें, व मृत्यु हा उदरांतील गर्भाला देखील शोधीत येतो. ३ जी चिंतन करण्यायोग्य नाहीं तिचें चिंतन करतो न करतो तोंच त्याला यमदूत घेऊन जातात; व कोणत्या गांवीं घेऊन जातात याचा पत्ता लागत नाहीं; ४ अरे, सर्व वाटा शोधल्या असतांही जेथें माघारी येण्याची गोष्टच नाहीं व ज्या ठिकाणीं मृत्यु पावलेल्या लोकांच्या गोष्टी हींच पुराणें ५ तेथील अशाश्वततेचा लौकिक सृष्टि उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या आयुष्यापर्यंत जरी वाखाणिला तरी संपणार नाहीं! ६ अशी ज्या मृत्युलोकाची स्थिति, तेथें जन्म घेणाऱ्या लोकांचा स्वस्थपणा पाहून मोठें नवल वाटतें ७ हें पहाः–प्रत्यक्ष अथवा परलोकीं होणाऱ्या लाभाच्या प्राप्तीकरितां जे एक कवडीही खर्च करीत नाहींत, ते सर्व प्रकारें हानि होणाऱ्या ठिकाणीं कोट्यावधि द्रव्य खर्च करतात! ८ जो प्रस्तुत कालीं पुष्कळ विषयसुखांत गुंततो, त्याला सुखी असें मानतात, व लोभग्रस्त आहे त्याला ज्ञानी असें म्हणतात. ९ ज्याचें आयुष्य थोडें राहिलें आहे व ज्याची शक्ति व बुद्धि कमी झाली

१ पुढें न करावें. २ ढाल. ३ व्यापला. ४ दुःखरूप मृत्युलोकीं. ५ भोग्यवस्तूंची. ६ समृद्धि. ७ तारुण्य. ८ सर्व उपभोग्य वस्तु. ९ सुखाकरितां. १० माल, मालाच्या गठ्ठयाची दोरी. ११ पायल्या=भरा. १२ मनुष्यरूपानें शेवटचें जन्म. १३ बाजाराच्या समयीं. १४ सवदा, खरेदी. १५ क्षतावर. १६ गोष्ट. १७ कानांनीं. १८ आंगरखा. १९ छळितें. २० कल्याणाचा. २१ आच्छादन. २२ परवर म्हणजे घरांतील जमीन. २३ यमदूतांनीं. २४ वार्ता, शोध. २५ शोधितां. २६ सर्व, बहुत. २७ मेलेल्या लोकांच्या. २८ सृष्टि उत्पन्न करणारा. २९ आयुष्यापर्यंत (ब्रह्मासुद्धां अनित्य आहे). ३० सर्वथैव. ३१ ऐहिक व पारलौकिक सुखाकरितां. ३२ कोट्यवधि द्रव्य. ३३ अडके, गुंते. ३४ सुखामध्यें. ३५ प्रस्तुत, सांप्रत. ३६ लोभानें. ३७ उणें, कमी.

प्रज्ञा जिरौनि जाय । तयाचे नमस्कारिती पाय । वडील म्हणुनी ५१० जंव
जंव बाळ बळिया वाढे । तंव तंव भोजें नाचती कोडें । आयुष्य निमोलें आं-
तुलियेकडे । ते ग्लांनीचि नाहीं ११ जन्मलिया दिवसादिवसें । हों लागे का-
ळाँचेंचि ऐसें । कीं वाढती करिती उल्हासें । उभविती गुढिया १२ अगा मर
हा बोलु न साहती । आणि मेलिया तरी रडती । पारि असतें जात नं ग-
णिती । गाहिंसपणें १३ दर्दुर सापें गिळिजतु आहे उभा । कीं तो मासिया
वेटाळी जिभा । तैसे प्राणिये कवणा लाभा । वाढविती तृष्णा १४ अहा कैट-
कटा हें वोखटें । इये मृत्युलोकींचें उफराटें । एथ अर्जुना जरी अवचटें । ज-
न्मलासी तूं १५ तरि झडझडोनि वेहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग ।
जियें पावसी अव्यंग । निजधाम माझें १६

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु । मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥९॥

तूं मन हें मीचि करीं । माझिया भजनीं प्रेम धरीं । सर्वत्र नमस्कारीं ।
मज एकातें १७ माझेनि अनुसंधानें देख । संकल्पु जाळणें निःशेख । मद्याजी
चोखें । याचि नांव १८ ऐसा मियां आथिला होसी । तेथ माझियाचि स्वरूपा
पावसी । हें अंतःकरणींचें तुजपासीं । बोलिजत असें १९ अगा अवघिया चो-
रिया आपुलें । जें सर्वस्व आम्हीं असें ठेविलें । तें पावोनि सुख संचलें । हो-
ऊनि ठासी ५२० ऐसें सांवळेनि परब्रह्में । भक्तकामकल्पद्रुमें । बोलिलें आत्मा-
रामें । संजयो म्हणे २१ अहो ऐकिजत असे कीं अवधारा । तंव इया बोला
निवांत म्हातारा । जैसा म्हैसा नुठी कां पुरा । तैसा उगाचि असे २२ तेथ
संजयें माथा तुकिला । अहा अमृताचा पाऊस वर्षला । कीं हा एथ असतुचि
गेला । सेजियां गांवा २३ तऱ्ही दातारु हा आमुचा । म्हणोनि हें बोलतां मै-
ळेल वाचा । काय कीजे ययाचा । स्वभावोचि ऐसा २४ पारि बाप भाग्य
माझें । जे वृत्तांतु सांगावयाचेनि व्याजें । कैसा रक्षिलों मुनिराजें । श्रीव्या-
सदेवें २५ येतुलें हें वोडें सायासें । जंव बोलत असे दृढमानसें । तंव न ध-
रवेचि आपुलिया ऐसें । सात्त्विकें केलें २६ चित्त चाकाटलें आटु घेत । वाचा
पांगुळली जेथिंची तेथ । आपादकंचुकित । रोमांच आले २७ अर्धोन्मीलित

आहे, त्याला ' वडील, श्रेष्ठ आजोबा ' म्हणून पायां पडतात. ५१० लहान मूल जों जों मोठें होतें, तों तों संतोष मानून कौतुकानें नाचतात; परंतु त्याचें आयुष्य उलट कमी झाल्याबद्दल त्यांना दुःख होत नाहीं. ११ जन्मापासून दिवसानुदिवस काळाच्याच स्वाधीन होत असतो; परंतु आनंदानें वाढदिवस करून गुढ्या उभारतात. १२ अरे, ' मर ' हा शब्द देखील सहन होत नाहीं आणि मेल्यावर तर रडतातच ! परंतु असलेलें आयुष्य संपत चाललें आहे याची मूर्खपणानें खिजगणतीही करीत नाहींत. १३ काय चमत्कार सांगावा; बेडकाला साप गिळीत असतां सुद्धां मरणाची कल्पना मनांत न आणतां तो पुनः जिभेनें माशा धरून गिळीत असतो; त्याप्रमाणें हे प्राणी कोणत्या लाभाकरितां आपली इच्छा वाढवीत असतात कोण जाणे ! १४ अरे अरे, अंगावर कांटा येतो ! ! ज्या मृत्युलोकचा व्यवहार अगदीं उलटा असून वाईट आहे म्हणून किती सांगावें ! अर्जुना, अशा मृत्युलोकांत तूं अकल्पित जन्म पावला आहेस, किती ही वाईट गोष्ट ! या मृत्युलोकीं सर्वच गोष्टी उलट्या घडतात ! तर अर्जुना, तूं जरी एथें यदृच्छेनें जन्मला आहेस १५ तर झटकर अंग झाडून वेगळा हो; आणि ज्या योगानें माझ्या अविनाशी पदाला प्राप्त होशील, त्या भक्तिमार्गाला लवकर लाग. १६

**अन्वयार्थ**--(मन्मना: भव)-माझ्या ठिकाणींच ज्याचें मन आहे, असा तूं हो.-(मद्भक्तः)-[भव]-माझाच भक्त हो.-(मद्याजी) [भव]-माझीच पूजा करण्याचें ज्याचें शील आहे, असा हो.-(मां नमस्कुरु)-मला नमस्कार कर.-(एवं)-याप्रमाणें भगवानांचे ठिकाणीं चित्ताला-(युक्त्वा)-समाहित करून शांत-स्थिर करून-(मत्परायणः)-मत्परायण झालेला तूं-(आत्मानं) [मां एव]-सर्वांचा आत्मा असा जो मी-ईश्वर त्याला-(एष्यसि)-प्राप्त होशील. ३४

१ वृद्धि. २ सोंगें, नाचें. ३ आवडीनें. ४ कमी झालें. ५ आंतून, ६ दुःखच. ७ काळाच्या स्वाधीन. ८ वाढदिवस. ९ सोडीत नाहींत. १० मूर्खपणानें. ११ हायहाय. १२ दैववशात्. १३ वेगळा. १४ ज्या भक्तीनें. १५ लक्ष्य लावल्यानें. १६ माझें यजन करणारा. १७ निर्मळ. १८ माझ्या योगानें संपन्न. १९ चोरून ठेवलेलें. २० रहाशील.

तूं आपलें मन मद्रूपीं करून माझें भजन करण्याविषयीं प्रेम धर, आणि सर्व ठिकाणीं मीच आहें असें समजून नमस्कार कर. १७ हें पहा, मनांतील सर्व संकल्प नाहींतसे करून जो माझ्याकडे लक्ष ठेवितो, तोच माझें यजन करणारा असें नांव पावतो. १८ असा माझ्या योगानें संपन्न होशील, त्याच वेळेस माझ्या स्वरूपाला पावशील. ही माझ्या अंतःकरणांतील गुह्य गोष्ट तुला मी सांगितली आहे. १९ अरे, सर्वांना चोरून ठेविलेली अशी आमची गुप्त गोष्ट ती प्राप्त करून घेऊन सुखरूप होऊन राहशील. ५२० संजय म्हणतोः-' श्यामवर्ण परमात्मा व भक्तांची इच्छा पूर्ण करणारे कल्पवृक्ष श्रीकृष्ण, ते याप्रमाणें बोलले. ' २१ अहो श्रोतेहो, ऐका. रेडा ज्याप्रमाणें महापुराला न जुमानतां पाण्यांतच बसतो, त्याप्रमाणें हा कृष्णार्जुनसंवाद ऐकूनही वृद्ध धृतराष्ट्र स्वस्थ बसला ! २२ त्या वेळीं संजय मान डोलावून म्हणालाः- अहाहा ! ! आज अमृताचा वर्षाव झाला, परंतु हा येथें असून शेजारच्या गांवास गेल्यासारखें झालें. २३ तथापि हा आमचा धनी असल्यामुळें अशा रीतीनें बोललों असतां आमची वाणी दूषित होईल; पण काय करावें, याचा स्वभावच असा आहे. २४ परंतु मुनिश्रेष्ठ व्यास ऋषींनीं श्रीकृष्णार्जुनांचा संवाद धृतराष्ट्रास सांगण्यास माझी योजना केल्यामुळें माझें भाग्य धन्य होय ! २५ इतका मनाचा निश्चय करून मोठ्या सायासांनीं बोलत असतां संजयास असा अष्टसात्त्विकभाव उत्पन्न झाला कीं, तो त्यास आवरेना. २६ त्या कृष्णार्जुनसंवादामध्यें चित्त गढून गेल्यामुळें स्थिर होऊन वाणी जागच्या जागींच स्तब्ध राहिली, आणि नखशिखांत रोमांच उभे राहिले, २७ डोळे अर्धवट उघडे राहून, त्यांतून

२१ श्यामवर्ण. २२ स्वरूपीं रममाण होणाऱ्या श्रीकृष्णानें. २३ स्वस्थ. २४ टोणगा, रेडा. २५ नदीच्या पुरांतून. २६ डोलविला. २७ असलहि. २८ शेजारच्या, निराळ्या. २९ धनी. ३० दूषित होईल. ३१ निमित्तानें. ३२ मोठें. ३३ चकित झालें, गढून गेलें. ३४ संकोच, आटणी. ३५ नखशिखांत आच्छादनासारखे, ३६ अर्धे उघडलेले.

डोळे । वर्षताति आनंदजळें । आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरी कांपे २८ पैं आघवाचि रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळीं । लेइला मोतियांची कडियाळीं[2] । औंवडे[3] तैसा २९ ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ आटणी हों पाहे जीवदशे । तेथ निरोपिलें[4] व्यासें । तें नेदीचि[5] हो ५३० आणिक श्रीकृष्णाचें बोलणें । घो[6]करी आलें श्रवणें । कीं देहस्मृतीचा तेणें । वापसा केला ३१ तेव्हां नेत्रींचें जळ विसर्जीं । सर्वांगींचा स्वेदु परिमार्जीं । तेवींचि अवधारा म्हणे होजी । धृतराष्ट्रातें ३२ आतां श्रीकृष्णवाक्यबीजा निवाडु । आणि संजय सात्त्विकाचा बिवंडु[11] । म्हणोनि श्रोतयां होईल सुरवाडु[12] । प्रमेय[13] पिकाचा ३३ अहो अळुमाळ[14] अवधान देयावें । येतुलेनि आनंदाचे राशीवरी बैसावें । बाप श्रवणेंद्रिया दैवें । घातली माळ ३४ म्हणोनि विभूतींचा[15] ठावो । अर्जुना दावील सिद्धांचा रावो । तो ऐका म्हणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ५३५

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां नवमोऽध्यायः ॥ ९ ॥ श्लोक ३४, ओंव्या ५३५.

आनंदाश्रु वाहूं लागले; व अंतर्यामी सुखाच्या लाटा आल्यामुळें बाहेरून अंगास कंप सुटला. २८ सर्व रोमरंध्रांतून निर्मळ घामाचे बारीक कण उद्भवल्यामुळें, मोत्यांची जाळीच घातली आहे की काय असें वाटलें. २९ या महासुखाच्या प्रेमानें जीवदशा नाहींशी झाल्यामुळें, व्यासांनीं सोंपविलेलें काम करिनासा झाला. ५३० इतक्यांत श्रीकृष्णार्जुनांचा संवाद घों घों करीत येऊन कानीं पडतांच त्या घोंगण्यानें संजयाचे देहस्थितीचा वाफसा केला. [ तो भानावर येऊन आपलेकडे सोंपविलेलें काम करण्यास तयार झाला. ] ३१ मग लागलींच डोळ्यांचें पाणी व सर्वांगाचा घाम पुसून धृतराष्ट्राला म्हणाला, 'महाराज, ऐका.' ३२ आतां श्रीकृष्णवाक्यरूप उत्तम बीजास संजयाच्या सात्विकतेचा विवड [ पहिलें पीक काढल्यानंतर दुसऱ्या पिकास तयार होणाऱ्या जमिनीस विवड म्हणतात. ] म्हणजे, पूर्वार्धाच्या ज्ञानाचें पीक संजयाचे अंतःकरणांत आलेंच आहे, आतां उत्तरार्धांतील ज्ञानाचें पीक होण्यास संजयाचे अंतःकरणाची तयारी आहे, व त्यामुळें श्रोत्यांनाही सिद्धांतरूप पिकाचा सुकाळ होईल. ३३ अहो, किंचित् अवधान द्याल, तर आनंदरूप राशीवर बसाल; कारण, श्रवणेंद्रियांस दैवानें माळ घातली आहे, ३४ म्हणून ईश्वर विभूतींचीं जीं स्थळें आहेत तीं सर्व. सिद्धांचे राजे भगवान् श्रीकृष्ण, हे अर्जुनास दाखवितील. निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतातः—ती कथा ऐका. ५३५

१ घामाचे बारीक कण. २ जाळी, माळ. ३ वाटलें, दिसलें. ४ सोंपविलें. ५ करीना. ६ आवाज करीत. ७ वाफ आलेली भूमि. ८ पुसी; टाकी. ९ पुसी. १० श्रीकृष्णवाक्य हेंच निवडक बी. ११ सतावलेली जमीन. १२ सुकाळ. १३ सिद्धांतरूपी पिकाचा. १४ किंचित्. १५ ईश्वरमूर्तीचें स्थान.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय दहावा.

नमो विशदबोधविदग्दा । विद्यारविंद[2]प्रबोधा । पराप्रमेयप्रमदा । विलासिया
१ नमो संसारतमसूर्या । अपरिमितपरमवीर्या । तरुणतररतूर्या । लालनलीला २
नमो जगदखिलपालना । मंगळमणिनिधाना । सज्जनवनचंदना । आराध्यलिंगा
३ नमो चतुरचित्तचकोरचंद्रा । आत्मानुभवनरेंद्रा । श्रुतिसारसमुद्रा । मन्मथ-
मन्मथा ४ नमो सुभावभजनभाजना । भवेभकुंभभंजना । विश्वोद्भवभुवना ।
श्रीगुरुराया ५ तुमचा अनुग्रहो गणेशु । जैं दे आपुला सौरसु[13] । तैं सारस्वतीं
प्रवेशु । बाळकाही आथी ६ जी दैविकीं[14] उदार वाचा । जैं उद्देशु दे नाभि-
काराचा । तैं नवरससुधाब्धीचा । थावो[16] लाभे ७ जी आपुलिया स्नेहांचीं
वांगेश्वरी । जरी मुकेयातें अंगिकारी । तो वाचस्पतीशीं करी । प्रबंधुहोडा ८ हें
असो दिठी[20] जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पोरुखे । तो जीवचि परि
तुके । महेशेंसीं ९ एवढें जिये महेमेचें करणें । तें वाचाबळें वानूं मी कवणें ।
कां सूर्याचिया आंगा उटणें । लागत असे १० केउतौं कल्पतरूवरी फुलौरा ।
कायसेनि पाहुणेरु क्षीरसागरा । कवणें वासीं कापुरा । सुवासु देवों ११ चंद-
नातें कायसेनि चर्चावें । अमृतातें केउतें रांधावें । गगनावरी उभवावें । घडे
केवीं १२ तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळितें कें[31] असे साधन । हें जाणोनि
मियां नमन । निवांतें केलें १३ जरी प्रज्ञेचेनि आथिलेपणें । श्रीगुरुसामर्थ्या
रूप करूं म्हणे । तरि तें मोतियां भिंग[36] देणें । जैसें होईल १४ कां सांडे-
पंधरया रजतवणी । तैशी स्तुतीचीं बोलणीं । उगियाचि माथा ठेविजे चरणीं
हेंचि भलें १५ मग म्हणितलें जी स्वामी । भलेनि ममत्वें देखिलें तुम्ही
म्हणोनि कृष्णार्जुनसंगमीं । प्रयागवटु[40] जाहलों १६ मागां दूध दे म्हणतलिया
साठीं । आघविया क्षीराब्धीची करूनि वाटी । उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविल
जैसी १७ ना तरी वैकुंठपीठनायकें । रुसला ध्रुव कवतिकें । बुझाविला दे

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय दहावा.

[ हे गुरो, ] निर्मल अशा ब्रह्मज्ञानाचा बोध करण्यांत चतुर, विद्यारूप कमलाला विकसित करणारा, आणि पराख्य ज्ञानवाणीचा जो प्रमेय म्हणजे अर्थ हेंच कोणी एक प्रमदा म्हणजे तरुण स्त्री हिशीं विलास करणारा असा जो तूं, त्या तुला नमस्कार असो ! १ संसाररूप अंधकाराच्या अज्ञानाचा नाश करण्यांत सूर्याप्रमाणें अतिसामर्थ्यवान व तारुण्यभरांत असणाऱ्या तूर्यावस्थेशीं विलास करणारा असा जो तूं, त्या तुला नमस्कार असो ! २ सर्व जगाचें पालन करणारा, कल्याणरूप रत्नांचा ठेवा, सज्जनरूप वनांत चंदनासारखा श्रेष्ठ, आणि ज्याचें स्वरूप आराधन करण्यास योग्य, असा जो तूं, त्या तुला नमस्कार असो ! ३ भक्तांच्या चित्तरूप चकोर पक्ष्यास चंद्रासारखा, ब्रह्मानंदरूप अनुभवाचा राजा, श्रुतीच्या ज्ञानाचा समुद्र, आणि मदनाचा नाश करणारा असा जो तूं, त्या तुला नमस्कार असो ! ४ भावयुक्त ज्ञान्याच्या भजनास पात्र, संसाररूप हत्तीनें गंडस्थळ फोडणारा व जगाच्या उत्पत्तीचें स्थान अशा हे श्रीगुरुराया, तुजप्रत नमस्कार असो ! ५ तुमच्या कृपारूप गणेशाचा जेव्हां प्रसाद होतो, तेव्हां लहान मुलालाही शास्त्रांच्या गुह्य सिद्धांतांचें ज्ञान होतें. ६ गुरूच्या उदार वाचेनें जेव्हां अभयवचन मिळतें, तेव्हां नऊ रस ही नऊ खंडें यांचा थांग लागतो. ७ जेव्हां आपली प्रेमरूप सरस्वती मुक्याचाही अंगीकार करते, तेव्हां ग्रंथ करण्याची तो बृहस्पतीशीं सुद्धां पैज मारूं शकतो. ८ फार तर काय; परंतु ज्यावर आपली कृपादृष्टि होते, किंवा ज्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त पडतो, तो जीव असूनही ईश्वराची साम्यता पावतो. ९ असा ज्या गुरुकृपेचा महिमा आहे, तिचें वर्णन मी कोणत्या वाचेच्या बळानें करूं शकेन ? कारण, सूर्याच्या अंगाला घासून स्वच्छ करणें संभवनीय आहे कां ? १० कल्पतरूला फुलें येण्याची इच्छा करणें व्यर्थ आहे; (कारण तो सर्वदा फलद्रूपच आहे, ) क्षीरसागराला कशाची मेजवानी करावी ? कापराला दुसऱ्या कशाचा सुवास देतां येईल ? ११ चंदनाला कशाची उटी लावावी ? अमृताला कसें शिजवावें गगनापेक्षां (कांहीं) उंच करावें हें कसें घडून येणार ? १२ त्याचप्रमाणें, श्रीगुरूंचा महिमा जाणण्याचें साधन कोठें आहे ? हें समजूनच मी गुरूंना मुकाट्यानें स्वस्थ राहून नमस्कार केला. १३ जर बुद्धीच्या जोरावर श्रीगुरूंच्या सामर्थ्याचें वर्णन करूं म्हटलें तर तें मोत्याला अभ्रकाचें पुट देण्यासारखें होईल. १४ किंवा उत्तम सोन्यावर रुप्याचा मुलामा ज्याप्रमाणें व्यर्थ आहे, त्याचप्रमाणें श्रीगुरूंची स्तुति करूं लागलें असतां व्यर्थ होईल; म्हणून गुरुचरणीं लीन होऊन त्यांच्या पदीं मस्तक ठेवणें हेंच बरें होईल. १५ मग ज्ञानेश्वरमहाराज म्हणालेः-" हे स्वामी, तुम्ही माझ्यावर ममतेनें कृपादृष्टि केल्यामुळें कृष्णार्जुनसंवादरूपी संगमांत मी प्रयाग येथील वटवृक्षाप्रमाणें झालों ! आपण कृपादृष्टीनें काय करणार नाही ! १६ पूर्वी, ' मला दूध हवें ' असें उपमन्यूनें म्हटल्यावरून शंकरांनी ज्याप्रमाणें सर्व क्षीरसमुद्राची वाटी करून त्यापुढें ठेवली, १७ किंवा ध्रुव रुसला असतां त्याला अढळपदाचा खाऊ देऊन श्रीविष्णूंनीं त्याची समजूत केली

---

१ स्पष्ट बोध करण्याविषयीं कुशल. २ विद्या हेंच कोणी कमळ त्याला विकासविणारा. ३ परा=वाणी, प्रमेय=अर्थ, प्रमदा=स्त्री परावाणीच्या अर्थरूप स्त्रीशीं विलास करण्याविषयीं कुशल. ४ सामर्थ्यवंता. ५ अत्यंत तरुण तूर्येचें लालन हीच ज्याची लीला. ६ कल्याणरूप रत्न. ७ राजा. ८ मदनाचा गर्व हरण करणारा. ९ संसाररूप गजाचें गंडस्थळ फोडणारा. १० जगदुत्पत्तीस्थान. ११ कृपा. १२ प्रसाद. १३ सर्व विषांत. १४ गुरूची. १५ अभय वचनाचा. १६ थांग. १७ प्रेमाची. १८ सरस्वती. १९ ग्रंथ करण्याची प्रतिज्ञा, पैज. २० कृपादृष्टि. २१ पडतो, ठेविला जातो. २२ साम्य पावतो. २३ ईश्वराशीं २४ लेप, रंग. २५ कोठून. २६ फुलांचा भर. २७ पक्वान्न, पाहुण्याकरितां मेजवानी. २८ लेप करावा, उटी चावी. २९ मंडप घालावे, उभारावे. ३० जाणणारें. ३१ कोठें. ३२ नुसतें. ३३ बुद्धीच्या. ३४ संपन्नतेनें. ३५ वर्णन. ३६ अभ्रकानें पुटें देणें. ३७ उत्तम सोन्याला. ३८ रुप्याचें पाणी, मुलामा. ३९ मुकाट्यानें. ४० कृष्णार्जुन संवाद हाच प्रयाग त्यांतील वड झालों. ४१ शंकरानें. ४२ समजाविला.

ऊनि भौतुकें । ध्रुवपदाचें १८ तैसी जे ब्रह्मविद्यारावो । सकळ शास्त्रांचा विसं-वता ठावो । ते भगवद्गीता वोंविये गावों । ऐसें केलें १९ जे बोलणियांचे रानीं हिंडतां । नायकिजे फळलिया अक्षराची वार्ता । पारि ते वाचाचि केली कल्प-लता । विवेकाची २० होती देहबुद्धी एकसरी । ते आनंदभांडारा केली वो-वँरी । मन गीतार्थसागरीं । जळशयन जालें २१ ऐसें एकेक देवांचें करणें। तें अपार बोलों केवीं मी जाणें । तन्ही अनुवादलों धीटपणें । तें उपसाहिजो जी २२ आतां आपुलेनि कृपाप्रसादें । मियां भगवद्गीता वोंवीप्रबंधें । पूर्वखंडें वि-नोदें । वाखाणिलें २३ प्रथमीं अर्जुनाचा विषादु । दुजीं बोलला योगु विशदु । परि सांख्यबुद्धीसि भेदु । दाऊनियां २४ तिजीं केवळ कर्म प्रतिष्ठिलें । तेंचि चतुर्थीं ज्ञानेंशीं प्रगटिलें । पंचमीं गव्हरिलें । योगतत्त्व २५ तेंचि षष्ठामाजि प्रगट । आसनालागोनि स्पष्ट । जीवात्मभाव एकवट । होती जेणें २६ तैसी जे योगस्थिती । आणि योगभ्रष्टां जे गती । ते अघवीचि उपपत्ती । सांगि-तली षष्ठीं २७ तयावरी सप्तमीं । प्रकृतिपरिहारें उपक्रमीं । करूनि भजती जे पुरुषोतमीं । ते बोलिले चौन्हीं २८ पाठीं सप्तप्रश्नावधि । बोलोनि प्रयाणसम-यसिद्धी । एवं सकळ वाक्यावाध । अष्टमाध्यायीं २९ मग शब्दब्रह्मीं असंख्याकें । जेतुला कांहीं अभिप्राय पिके । तेतुला महाभारतें एकें । लक्षें जोडे ३० तिये आघवांचि जें महाभारतीं । तें लाभे कृष्णार्जुनवाचोक्तीं । आणि जो अभिप्रावो सातेंशतीं । तो एकलाचि नवमीं ३१ म्हणोनि नवमींचिया अभिप्राया । सहसा मुद्रा लावावया । बिहाला मग मी वायां । गर्व कां करूं ३२ अहो गूळसा-खरे मालैयाचे । हे बांधे तरी एकाचि रसाचे । पारि स्वाद गोडियेचे । आन-आन जैसे ३३ एक जाणोनियां बोलती । एक ठायें ठाय जाणविती । एक जाणों ज्ञातां हारपती । ज्ञाणते गुणेंशीं ३४ हे ऐसे अध्याय गीतेचे । पारि अ-निर्वाच्यपण नवमाचें । तो अनुवादलों हें तुमचें । सामर्थ्य प्रभू ३५ अहो ए-काचि शाटी तपिन्नली । ऐंकीं सृष्टीवरी सृष्टी केली । ऐंकीं पाषाणीं वाऊनि उतर-लीं । समुद्रीं कैंटकें ३६ ऐंकीं आकाशीं सूर्यातें धरिलें । ऐंकीं चुळींचि सागरातें भरिलें । तैसें मज मुकयाकरवीं बोलविलें । अनिर्वाच्य तुम्हीं ३७ पारि हें असो एथ ऐसें । राम रावण झुंजिन्नले कैसे । राम रावण जैसे । मीनले समरीं ३८ तैसें नवमीं कृष्णाचें बोलणें । तें नवमीचियाचि ऐसें मी म्हणें । या निवाडा

१८ त्याचप्रमाणें; ब्रह्मविद्येमध्यें श्रेष्ठ व सकलशास्त्रांचें विश्रांतिस्थान अशी जी अध्यात्मविद्यारूप भगवद्गीता ती मी ओंवीरूपानें वर्णन करावी अशी मला शक्ति दिली! १९ ज्या भाषणांच्या रानांत हिंडत असतां फलद्रूप म्हणजे फलप्राप्ति करून देणारें असें एकही अक्षर ऐकूं येत नाहीं, अशा फलद्रूप विचारयुक्त माझ्या वाणीचा कल्पवृक्षच आपण केला. २० ज्या माझ्या बुद्धीची गति देहापलीकडे गेली नव्हती, ती बुद्धि हल्लीं ब्रह्मानंदरूपी भांडाराची खोलीच बनविली आहे; आणि माझ्या मनाला गीतार्थरूपी क्षीरसागरांत जलमंदिर बांधून दिलें आहे. २१ याप्रमाणें श्रीगुरूंची एकेक करणी अगाध असल्यामुळें, मला त्यांच्या अपार सामर्थ्याचें कसें वर्णन करितां येईल! तेव्हां, महाराज, जें कांहीं मी धिटाईनें बोललों आहें, त्याची मला क्षमा असावी. २२ आतांपर्यंत आपल्या कृपाप्रसादानें मी भगवद्गीतेच्या पूर्वखंडाचें ओंवीबद्ध वर्णन सहज लीलेनें केलें, २३ पहिल्या अध्यायांत आप्तस्वकीयांबरोबर युद्ध करणें अयोग्य आहे, असें वाटल्यामुळें अर्जुनास खेद उत्पन्न झाला, दुसऱ्यांत योग स्पष्ट सांगितला आहे, परंतु त्यांत ज्ञानयोग व कर्मयोग असे भेद दाखविले आहेत. २४ तिसऱ्यांत केवल कर्मच प्रतिपादन केलें आहे; तेंच कर्म चौथ्यांत ज्ञानासह प्रकट केलें आहे; व पांचव्यांत योगतत्त्व सूचित केलें आहे २५ तेंच योगतत्त्व सहाव्या अध्यायांत आसनविधीपासून जीवाचें ऐक्य होईपर्यंत स्पष्ट सांगितलें आहे. २६ त्याच प्रमाणें, अष्टांगयोग स्थिती व योगभ्रष्टांस मिळणारी गति यांविषयीं सर्व सिद्धांत सहाव्यांत सांगितले आहेत. २७ नंतर, सातव्यांत आरंभीं प्रकृतीचा उपक्रम व परिहार सांगून, नंतर ईश्वराचें भजन करणाऱ्या चार प्रकारच्या भक्तांचें म्हणजे आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी यांचें वर्णन केलें आहे. २८ पुढें प्रश्नसमकांचें स्पष्टीकरण करून मरणकालीं कालानुरोधानें कोणची स्थिति प्राप्त होते, हें सर्व आठव्या अध्यायाच्या शेवटापर्यंत सांगितलें. २९ मग अगाध वेदांत जेवढा म्हणून अभिप्राय आहे, तेवढा एक लक्ष महाभारत ग्रंथांत आणिला आहे; ३० व महाभारतांत सांगितलेला सर्व अभिप्राय कृष्णार्जुनांच्या संवादरूपी गीतेच्या सातशें श्लोकांत आहे; तोच एका नवव्या अध्ययांत आणिलेला आहे. ३१ म्हणून नवव्या अध्यायाचा अभिप्राय स्पष्ट समजण्यास जेथें अर्जुनाचीही शक्ति झाली नाहीं, तो स्पष्ट करून सांगण्याबद्दल मी व्यर्थ गर्व कशाला वाहूं? ३२ अहो, गूळ आणि साखर यांच्या ढेपा जरी एका रसाच्या तयार केलेल्या असतात तरी त्यांच्या गोडीची चव निरनिराळी असते. ३३ [त्याचप्रमाणें गीतेच्या सर्व अध्यायांत जरी ब्रह्मतत्त्वाचें वर्णन केलें आहे तरी] कांहीं अध्याय ब्रह्म जाणून त्याचें प्रतिपादन करतात, कांहीं ब्रह्माचें ठिकाण दर्शवितात, व कांहीं ब्रह्म जाणण्यास गेले असतां आपल्या जाणत्या गुणासह ब्रह्मरूपच होतात. ३४ याप्रमाणें गीतेचें अध्याय आहेत; परंतु नववा अध्याय असा आहे कीं, त्याचें वर्णन करतां येत नाहीं. प्रभो, तो मी वर्णन केला, हें तुमचेंच सामर्थ्य होय. ३५ अहो, एका ऋषीच्या (वसिष्ठाच्या) छाटीनें सूर्यासारखा प्रकाश पाडला; एकानें (विश्वामित्रानें) प्रतिसृष्टि निर्माण केली; एकांनीं (रामचंद्रांनीं) समुद्रावर दगडाचा सेतु बांधून सर्व सैन्य पार उतरविलें; ३६ एकानें (मारुतीनें) जन्मतांच आकाशांत उड्डाण करून सूर्याला फळ म्हणून हातांत धरलें, आणि एकांनीं (अगस्ती ऋषींनीं) एकच आचमनानें समुद्र प्राशन केला; त्याचप्रमाणें, मज मुक्याकडून वाणीला अगम्य असें ब्रह्म तुम्हीं बोलविलें. ३७ परंतु तें तितकेंच राहूं द्या; कारण, रामरावणांचें युद्ध रामरावणांच्या युद्धाप्रमाणेंच झालें म्हणून म्हणावयाचें, (त्याप्रमाणेंच तें अनुपमेय होय.) ३८ त्याचप्रमाणें, श्रीकृष्णाचें नवव्या अध्यायांतील बोलणें हें नवव्या अध्यायासारखेंच आहे, असें मी म्हणतों. ज्या तत्त्वज्ञान्यांना गीतेचें खरें रहस्य

१ त्याऊ. २ गीता. ३ विश्रांतिस्थान. ४ शब्दाच्या; ५ वृक्ष. ६ एकदस. ७ शांतिस्थान. ८ गुरूचें. ९ क्षमा करावी. १० पूर्वार्ध. ११ स्पष्ट. १२ ज्ञानकर्म. १३ गौरविलें, वर्णिलें, आरंभिलें. १४ प्रतिपादन. १५ नाश. १६ आरंभीं. १७ 'आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ' या श्लोकांत. १८ वेदांमध्यें. १९ लक्षग्रंथानें. २० स्पष्ट सांगण्याला. २१ म्याला. २२ ढेपीचे. २३ भिन्नभिन्न. २४ कांहीं ब्रह्मस्वरूप जाणून. २५ जेथल्या तेथें. २६ वसिष्ठांचें मस्त्र. २७ विश्वामित्रानें. २८ श्रीरामचंद्रांनीं. २९ सैन्यें, वानरसमूह. ३० मारुतीनें. ३१ अगस्तीनें. ३२ वाणीला अगम्य, ब्रह्म.

तत्त्वज्ञु जाणे । जया गीतार्थु हातीं ३९ एवं नवही अध्याय पहिले । मियां मतीसारिखे वाखाणिले । आतां उत्तरखंड उवाइलें । ग्रंथाचें ऐका ४० जेथ विभूती प्रतिविभूती[3] । प्रस्तुत अर्जुना सांगिजती । ते विदग्धा रसवृत्ती । म्हणिपैल कथा ४१ देशियेचेनि नागरपणें । शांतु शृंगारातें जिणे[6] । तरि वोंविया होती लेणें । साहित्यासि ४२ मूळग्रंथींचिया संस्कृता । वारि मऱ्हाटी नीट पढतां । अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हें न चोजवे ४३ जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें । तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ४४ तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ४५ उठावलिया भावा रूप । करितां रसवृत्तीचें लागे वडप । चातुर्य म्हणे पडप । जोडलें आम्हां ४६ तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि आणिलें तारुण्य । मग रचिलें अगण्य । गीतातत्त्व ४७ जो चराचर परम गुरु । चतुरचित्तचमत्कारु । तो ऐका यादवेश्वरु । बोलता जाहला ४८ ज्ञानदेव निवृत्तीचा म्हणे । ऐसें बोलिलें श्रीहरी तेणें । अर्जुना आघवियाची मातू अंतःकरणें । घडौतीं आहासि ४९

श्रीभगवानुवाच:—

भूय एव महाबाहो शृणु मे परमं वच: । यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥

आम्हीं मागील जें निरूपण केलें । तें तुझें अवधानचि पाहिलें । तंव[16] टांचें नव्हे भलें । पुरतें आहे ५० घटीं थोडेसें उदक घालिजे । तेणें न गळे तरी वरिता भरिजे । ऐसा परिसौनि पाहिलासि तंव परिसविजे । ऐसेंचि होतसे ५१ अर्वाचीतयावरी[17] सर्वस्व सांडिजे । मग चोख तरी तोचि भांडारी कीजे । तैसा किरीटी तूं आतां माझें । निजधाम कीं ५२ ऐसें अर्जुना येउतें सर्वेश्वरें । पाहोनि बोलिलें अत्यादरें । गिरी देखोनि सुंभरे[18] । मेघु जैसा ५३ तैसा कृपाळुवांचा रावो । म्हणे आइकें गा महाबाहो । सांगितलाची अभिप्रावो । सांगेन पुढती ५४ पैं प्रतिवर्षीं क्षेत्रें[19] पेरिजे । पिकाची जंव जंव वाढी[20] देखिजे । यालागीं नुबगिजे[21] । वोहो[22] करितां ५५ ढतें[23] पुढती पुटें देतां । जोडे वोनियेची[24] अधिकता । म्हणोनि सोनें पांडुसुता । शोधूंचि[25] आवडे ५६ तैसें एथ पार्था । तुज आभार[26] नाहीं सर्वथा । आम्ही [illegible] । बोलों पुढती ५७ जैसें बाळका लेवविजे[27] लेणें । तें [illegible] । पारि ते सुखाचे

समजलें आहे, तेच याचा निवाडा जाणतील. ३९ अशा प्रकारें पहिलें नऊ अध्याय मीं यथामति वर्णन केले आहेत; आतां येथून उत्तरखंडांस आरंभ झाला आहे, तें ऐका. ४० त्या उत्तरखंडांत आरंभीच्या अध्यायांत श्रीकृष्ण हे अर्जुनास आपल्या मुख्य व गौण विभूति सांगतील, ती उत्तम रसभरित कथा तुम्हांला मी सांगतों. ४१ देशी भाषेच्या सुंदरपणानें शांतरसही शृंगाररसाला जिंकील; त्या योगानें मराठी ओंव्याच अलंकारशास्त्राला भूषणासारख्या शोभतील. ४२ मूळ संस्कृत ग्रंथ व त्यावरील मराठी टीका वाचून जर खरा अर्थ मनांत उतरेल, तर त्यांतील मूळ ग्रंथ कोणता हें समजणार नाहीं. ४३ ज्याप्रमाणें शरीराच्या सौंदर्यानें शरीरच दागिन्यांना शोभवितें, त्या ठिकाणीं कोणी कोणाला शोभा आणली आहे, याचा निवाडा करतां येत नाहीं; ४४ त्याप्रमाणें देशी आणि संस्कृत भाषा एकाच ग्रंथाचा (गीतेचा) भावार्थ वर्णन करून एका जागीं कशा शोभतात, तें शुद्ध निर्मळ बुद्धीनें ऐका. ४५ कोणताही अभिप्राय प्रकट करतांना शृंगारादि रसांची वृष्टि होते, तेव्हां चातुर्याला शोभा येते; ४६ त्याचप्रमाणें, देशी भाषेचें सौंदर्य व तारुण्य लुटून त्या योगानें अगणित अशा गीतातत्त्वाची रचना केली. ४७ जो स्थावरजंगमाचा परम गुरु, व चतुर जनांच्या चित्तास आनंद देणारा, तो यादवेश्वर श्रीकृष्ण काय बोलला तें ऐका. ४८ "अर्जुना, सर्व प्रकारानें श्रवण करण्याविषयीं तुझें अंतःकरण सर्व प्रकारें तत्पर आहेना ? भगवान असें बोलल्याचें ज्ञानेश्वर महाराज सांगतात. ४९

**अन्वयार्थ**-(महाबाहो,)-हे शूर अर्जुना!-(भूयः एव)-पुनरपि-(मे)-माझें-(परमं वचः)-श्रेष्ठ वचन-(शृणु)-ऐक-(यत्)-जें-(अहं)-मी-(प्रीयमाणाय ते)-ऐकून संतुष्ट होणाऱ्या तुला-(हितकाम्यया)-तुझें हित व्हावें, या इच्छेनें-(वक्ष्यामि)-सांगत आहें. १

" आम्ही मागें [ नऊ अध्यायांत ] जें कांहीं सांगितलें, त्यांत, आमच्या बोलण्याकडे तुझें लक्ष कितपत होतें हें पाहिलें, तों तें अपुरें नाहीं-पूर्ण आहे,-अशी आमची खातरी झाली. ५० ज्याप्रमाणें मडक्यांत थोडें पाणी घालून तें गळत नाहीं अशी खातरी झाल्यावर तें पूर्ण भरतात, त्याप्रमाणें तुला आम्ही थोडें ऐकविलें, तों तें तुझ्या लक्षांत आहे अशी आमची खातरी झाल्यावरून तुला जास्तच ऐकवावें, असें आम्हांस वाटूं लागलें. ५१ ज्याप्रमाणें एखादा नवीन चाकर ठेवल्यावर त्याची कसोटी पाहण्याकरितां त्याच्या जाण्यायेण्याच्या वाटेंत थैली तें टाकतात, व तें त्यानें आपल्याजवळ न ठेवतां मालकाच्या स्वाधीन केल्यावर त्याची जामदारखान्यावर नेमणूक करतात, त्याचप्रमाणें, अर्जुना, तूं आमच्या कसोटीस उतरल्यामुळें, तूं माझ्या ज्ञानाच्या जामदारखान्याचा मालक झालास. ५२ असें भाषण, अर्जुनाला पाहून सर्वेश्वर श्रीकृष्ण अत्यादरानें बोलले; आणि ज्याप्रमाणें डोंगर पाहून मेघ भरून येतो, ५३ त्याप्रमाणें तो कृपासागर श्रीकृष्ण म्हणालाः-अर्जुना, पूर्वी सांगितलेलाच अभिप्राय तुला पुनः सांगतों. ५४ हें पहा-दर वर्षास शेत पेरीत असतां जसजसें पीक जास्ती येऊं लागतें, तसतसें त्याची पुनः लागवड करतांना कंटाळा येत नाहीं, ५५ अथवा, हे पांडुसुता, ज्याप्रमाणें वरचेवर ताव दिल्यानें सोन्याचा कस वाढतो, म्हणून सोनार तें जास्तीच शुद्ध करतो, ५६ त्याप्रमाणें, पार्था हा अभिप्राय सांगण्यांत आम्ही तुझ्यावर मुळींच उपकार करीत नसून आपल्या स्वार्थाकरितां पुढील भाग तुला सांगत आहों, ५७ ज्याप्रमाणें बालकाला दागिने घातले असतां त्याचें सुख त्यास असतें काय ? परंतु त्या सुखाचा उपभोग

१ यथामति. २ आरंभिलें. ३ गौण. ४ सुंदर. ५ सुंदरपणानें. ६ जिंकील. ७ अलंकारशास्त्राला. ८ मूळग्रंथ. ९ सांगवत नाहीं. १० आवडीनें. ११ अभिप्राय. १२ वृष्टी. १३ प्रतिष्ठा. १४ गुरु चार प्रकारचे-गुरु, परमगुरु, परमेष्टिगुरु, व परात्परगुरु. १५ घट, मडक्यांत पात्र. १६ अल्प, अपुरें. १७ नव्या चाकरावर, अपरिचितावर. १८ भरून येतो. १९ शेत. २० वृद्धि. २१ न कंटाळावें. २२ मेहनत, लागवड. २३ वरचेवर, २४ कांतीची, कसाची. २५ शुद्ध करावेसें वाटतें. २६ उपकार, २७ अलंकार घालावा.

सोहळे भोगणें । माउलिये दिठी ५८ तैसें तुझें हित आघवें । जंव जंव कां तुज फावे । तंव तंव आमुचें सुख दुणावे । ऐसें आहे ५९ आतां अर्जुना असो हे विकडी । मज उघड तुझी आवडी । म्हणोनि तृप्तीची सवडी । बोलतां न पडे ६० आम्हां येतुलियाचि कारणें । तेंचि तें तुजशीं बोलणें । परि असो हें अंतःकरणें । अवधान देईं ६१ तरी ऐकें ऐकें गा सुवर्म । वाक्य माझें परम । जें अक्षरें लेऊनि परब्रह्म । तुज खेंवासि आलें ६२ परी किरीटी तूं मातें । नेणसी ना निरुतें । तरि तो गा जो मी एथें । तें विश्वचि हें ६३

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः । अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २॥

एथें वेद मुके जाहाले । मन पवन पांगुळले । रातीविण मावळले । रविशशी जेथ ६४ अगा उदरींचा गर्भु जैसा । न देखे आपुलिये मातेची वयसा । मी आघवेया देवां तैसा । नेणवे कांहीं ६५ आणि जळचरां उदधीचें मान । मशकां नोलांडवेचि गगन । तेवीं महर्षीचें ज्ञान । न देखेचि मातें ६६ मी कवण पां केतुला । कवणाचा कैं जाहला । या निरुती करितां बोलों । कल्प गेले ६७ कां जे महर्षी आणि या देवां । येरां भूतजातां सर्वां । मी आदि म्हणोनि पांडवा । अवघड जाणतां ६८ उतरलें उदक पर्वत वेंळघे । जरी झाड वाढत मुळीं लागे । तरी मियां जालेनि जगें । जाणिजे मातें ६९ कां गाभेवनें वडु गिवसेवे । जरी तरंगीं सागरू सांठवे । कां परमाणूमाजीं सामावे । भूगोलु हा ७० तरी मियां जालिया जीवां । महर्षी अथवा देवां । मातें जाणावया होआवा । अवकाशु गा ७१ ऐसाही जरी विपायें । सांडूनि पुढीलें पाये । सर्वेंद्रियांसि होये । पाठिमोरा जो ७२ प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडूनि मागिलीकडे । महाभूतांचिया चढे । माथयावरी ७३

यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् । असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३॥

तेथ राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखें । अजत्व माझें देखे । आपुलिया डोळां ७४ मी आदीसि पैरु । सकळलोकमहेश्वरु । ऐसिया मातें जो नरु । यापरी जाणे ७५ तो पाषाणामाजि परिसु । जैसा रसाआंतु सिद्धरसु । तैसा मनुष्यांआंत तो अंशु । माझाचि जाण ७६ तें चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ । येर माणुसपण तें भांब । लौकिक भागु ७७ अगा अवचिता कापुरा- । माजीं सांपडला हिरा । वरि पडिलिया नीरा । न निगे

आईसच होतो, ५८ त्याप्रमाणें जों जों तुला तुझें हित प्राप्त होत जाईल, तों तों आमचेंच सुख दुप्पट वाढत आहे. ५९ अर्जुना, आतां हें अलंकारिक बोलणें राहूं दे. खरोखर माझें तुझ्यावर फार प्रेम आहे; म्हणून, मी तुझ्याशीं किती जरी बोललों तरी माझ्या तृप्तीचा शेवट होत नाहीं. ६० म्हणूनच आम्हांला तींच ती गोष्ट तुझ्याशीं बोलावी लागते, तर आमच्या बोलण्याकडे अंतःकरणपूर्वक लक्ष दे. ६१ हे मार्मिक अर्जुना, अत्युत्तम असें जें माझें वाक्य तें ऐक; तें वाक्य नसून अक्षररूपानें प्रत्यक्ष परब्रह्मच तुला आलिंगन देण्यास आलें आहे. ६२ परंतु हे किरीटी, तूं खरोखर मला जाणत नाहींस ना ? तर जो मी तुला एथें दिसतों आहें तोच हें सर्व विश्व आहे. ६३

**अन्वयार्थ**—(मे)–माझ्या–(प्रभवं)–प्रभावाला किंवा उत्पत्तीला–(सुरगणाः)–महादेवादि देवांचे गण–(न विदुः)–जाणत नाहींत.–(महर्षयः न)–भृगु इत्यादि महर्षिहि माझ्या प्रभावाला किंवा उत्पत्तीला जाणत नाहींत.–(हि)–कारण–(अहं)–मी–(देवानां च महर्षीणां)–देवांचें व महर्षींचें–(सर्वशः)–सर्व प्रकारें–(आदिः)–कारण आहें. २

हें माझें स्वरूप जाणण्याविषयीं वेदांची वाणी कुंठित झाली; मन व प्राण यांची गति खुंटली; व माझ्या तेजापुढें रात्र झाल्याशिवाय सूर्य व चंद्र हे मावळले, ६४ अरे, ज्याप्रमाणें उदरांतील गर्भ आपल्या मातेचें वय जाणण्यास असमर्थ असतो, त्याप्रमाणें, माझ्यापासून उत्पन्न झालेले देव हे मला जाणण्यास समर्थ नाहींत; ६५ आणि जलचरांना ज्याप्रमाणें समुद्राचा अंत नसतो किंवा मशकाला आकाश ओलांडितां येत नाहीं, त्याप्रमाणें महर्षींचें ज्ञान मला ओळखूं शकत नाहीं. ६६ मी कोण, केवढा, कोणाचा कोठें झालों या गोष्टींचा निश्चय करतां करतां युगांची युगें लोटलीं. ६७ कारण, अर्जुना, हे सर्व महर्षि देव व इतर प्राणी या सर्वांचें मूळ मी असल्यामुळें, मला जाणणें त्यांना कठीण पडतें. ६८ जर पर्वतावरून खालीं आलेलें पाणी पुनः वर चढेल, अथवा झाड वाढत असतांना मुळाला लागेल, तर माझ्यापासून झालेलें जग मला जाणील. ६९ किंवा जर झाडांतील गाभा, झाड व वन यांना कवटाळील, अथवा लाटांत समुद्र सांठवेल, तसेंच परमाणूंमध्यें जगाचा समावेश होईल, ७० तर माझ्यापासून झालेल्या जीवांस, महर्षी किंवा देवांस मला जाणतां येईल. ७१ याप्रमाणें जरी मी जाणण्यास कठीण आहें, तरी सहज चुकून जो कोणी प्रवृत्तीची वाट सोडून इंद्रियांना पाठमोरा होतो ( इंद्रियें जिंकतो ) ७२ अशा रीतीनें मागें फिरल्यावर देह मागें सोडून ( देहभाव सोडून ) जो पंचमहाभूतांच्या पलीकडे जातो; ७३

**अन्वयार्थ**—(यः)–जो–(मां)–मला–(अजं)–जन्मरहित–(अनादिं)–कारणरहित–(च)–व–(लोकमहेश्वरं)–सर्व लोकांचा महेश्वर–(वेत्ति)–जाणतो–(सः)–तो–(मर्त्येषु)–मर्त्यांमध्यें–मनुष्यांमध्यें–(असंमूढः)–मोहित न झालेला–(सर्वपापैः)–सर्व पापांपासून–(प्रमुच्यते)–सर्वथा मुक्त होतो. ३

अशी मनाची स्थिति कायम झाल्यावर, निर्मळ आत्मप्रकाशानें त्याच्या डोळ्यांसमोर, उत्पत्तिरहित असें जें माझें स्वरूप, तें त्याला दिसतें. ७४ मी सर्वांच्या आरंभाच्याही पलीकडचा आणि सर्व लोकांत श्रेष्ठ आहें; अशा मला जो मनुष्य याप्रमाणें जाणील, ७५ तो दगडांत जसा परीस, किंवा रसांत जसें अमृत, तसा सर्व मनुष्यांत माझा अंश आहे असें समज. ७६ तो चालता बोलता ज्ञानाची केवळ मूर्ति व त्याचे अवयव म्हणजे सुखाचे अंकुर, एऱ्हवीं लौकिकदृष्ट्या त्याचें जें मनुष्यपण तो केवळ भ्रम होय. ७७ अरे, कापुरांत अवचित हिरा सांपडला, आणि त्याच्यावर जरी पाणी पडलें

१ समजेल. २ अलंकारिक भाषण. ३ शेवट. ४ अत्यंत मार्मिक. ५ आलिंगन देण्याला. ६ खरेपणानें. ७ माझ्या स्वरूपाचें ठिकाणीं, ८ प्राण वायु. ९ वय, तारुण्य. १० माशीला. ११ केवढा. १२ निश्चय. १३ चढेल. १४ मुळास पोंचेल. १५ सांपडेल. १६ क्वचित्. १७ बाह्य प्रवृत्ति. १८ अंतर्मुख. १९ मागें फिरे. २० निवृत्तीकडे. २१ ठाकठीक. २२ आत्मप्रकाशानें. २३ उत्तम, निर्मळ. २४ पलीकडील. २५ सर्व लोकांचा स्वामी. २६ अमृत. २७ भ्रम.

केवीं ७८ तैसा मनुष्यलोकाआंतु । तो जरी जाहला प्राकृतु । तऱ्ही प्रकृतिदोषाचीं मातु । नेणेचि कीं ७९ तो आपैसयेंचि सांडिजे पापीं । जैसा जळत चंदनु सर्पीं । तेवीं मातें जाणे तो संकल्पीं । वर्जूनि घापे ८० तेंचि आमुतें कैसें जाणिजे । ऐसें कल्पी जरी चित्त तुझें । तरी मी ऐसा हे माझे । भाव ऐकें ८१ जे वेगळालिया भूतीं । सारिखे होऊनि प्रकृती । विखुरले आहेति त्रिजगतीं । आघवियें ८२

बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः । सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥४॥
अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः । भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥५॥

तेथ प्रथम जाण बुद्धी । मग ज्ञान जें निरवधी । असंमोह सहनसिद्धी । क्षमा सत्य ८३ मग शम दम दोन्ही । सुखदुःख वर्ते जे जनीं । अर्जुना भावाभाव मानीं । भावाचिमाजी ८४ पैं भय आणि निर्भयता । अहिंसा आणि समता । तुष्टि तप पांडुसुता । दान जे गा ८५ अगा यश अपकीर्ती । हे जे भाव सर्वत्र दिसती । ते मजाचि पासूनि होती । भूतांचिया ठायीं ८६ जैसीं भूतें आहाती सिनानीं । तैसेचि हेही वेगळाले मानीं । एक उपजती माझ्या ज्ञानीं । एक नेणती मातें ८७ प्रकाश आणि कडवसें । हें सूर्याचिस्तव जैसें । प्रकाश उदयीं दिसे । तम अस्तुसीं ८८ आणि माझें जाणणें नेणणें । तें तंव भूतांचिया दैवाचें करणें । म्हणोनि भूतीं भावाचें होणें । विषम पडे ८९ यापरी माझिया भावीं । हे जीवसृष्टि आहे आघवी । गुंतली असे जाणावी । पंडुकुमरा ९० आतां इये सृष्टीचे पालक । जयां आधीन वर्तती लोक । ते अकरा भाव आणिक । सांगेन तुज ९१

महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा । मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥६॥

तरी आघवाचि [16] गुणीं वृद्ध । जे महर्षींमाजि प्रबुद्ध [17] । कश्यपादि प्रसिद्ध । सप्तर्षी ९२ आणिकही सांगिजतील । जे कां चौदांआंतुल मुद्दल । स्वायंभू मुख्य वडील । चारी [20] मनु ९३ ऐसे हे अकरा । माझ्या [21] मनीं जाहाले धनुर्धरा । सृष्टीचिया व्यापारा- [22] । लागोनियां ९४ जैं लोकांची व्यवस्था न [23] पडे । जैं या त्रिभुवनाचें कांहीं न [24] मांडे । तैं महाभूतांचें दळवाडें । अचुंबित [25] असे ९५ तैंचि हे जाहाले । मग इहीं लोक केले । तेथ अध्यक्ष रचूनि ठेविले । इहीं जन ९६ म्हणोनि अकराही हे राजा । मग येर जग यांचिया प्रजा । एवं विश्वविस्तारु हा माझा । ऐसोंचि जाण ९७ पाहें पां आरंभीं बीज एकलें । मग तेंचि

तरी हिरा फापराप्रमाणें विरघळत नाहीं. ७८ त्याप्रमाणें, तो जरी मनुष्यलोकांत साधारण मनुष्याप्रमाणें राहात असला, तरी तो मायेची बाधा ओळखीतच नाहीं. ७९ कारण, आपलाच नाश होईल या भीतीनें त्याला पाप सोडतें, आपलें राहण्याचें स्थान जें चंदनाचें झाड, तें जर जळत असलें, तर सर्प त्याचा त्याग करितो, त्याप्रमाणें जो मला जाणतो त्याला सर्व संकल्प सोडतात. ८० तेंच मला कसें जाणावें, असें जर तुझ्या मनांत येईल, तर मी कसा आहें व माझे विकार कोणते आहेत, ते ऐक, ८१ हे विकार निरनिराळ्या प्राण्यांत त्यांच्या त्यांच्या प्रकृतीसारखे बनून सर्व त्रिभुवनांत पसरले आहेत. ८२

**अन्वयार्थ**—(बुद्धिः)—अंतःकरणांतील सूक्ष्म विषय जाणण्याचें सामर्थ्य,—(ज्ञानं)—आत्मा, प्रकृति इत्यादि शब्दांच्या अर्थाचा बोध,—(असंमोहः)—ज्ञातव्य व कर्तव्य पदार्थांमध्यें विवेकपूर्वक प्रवृत्ति,—(क्षमा)—कोणी शिव्या दिल्या किंवा ताडन केलें असतांहि चित्ताला विकार होऊं न देणें, (सत्यं)—जसें कळलें असेल तसेंच दुसऱ्याला सांगणें,—(दमः)—बाह्य इंद्रियांचा उपशम,—(शमः)—अंतःकरणाचा उपशम,—(सुखं)—आल्हाद,—(दुःखं)—संताप—(भवः)—उद्भव,—(अभावः)—नाश,—(च भयं)—आणि भीति,—(च अभयं एव)—अभयच,—(अहिंसा)—प्राण्यांना पीडा न करणें,—(समता)—समचित्तत्व,—(तुष्टिः)—संतोष,—(तपः)—इंद्रियांचा संयम करून शरीराला पीडणें—(दानं)—द्रव्यादिकं यथाशक्ति सत्पात्रीं देणें,—(यशः)—धर्मसंबंधी कीर्ति,—(अयशः)—अधर्मसंबंधी अपकीर्ति इत्यादि—(भूतानां पृथग्विधाः भावाः मत्तः एव भवन्ति)—प्राण्यांचे नाना प्रकारचे भाव माझ्यापासूनच होतात. ४-५

त्या विकारांत पहिली बुद्धि असें समज. मग अमर्याद ज्ञान, मोह न होणें, सहनशीलपणा, क्षमा व सत्य; ८३ मग मनोनिग्रह व इंद्रियनिग्रह हे दोन्ही, आणखी अर्जुना, जगांतील सुखदुःख व जन्ममरण हे भावरूप परमात्मा जो मी त्याचे ठिकाणीं आहेत. ८४ पांडुसुता, भीति, निर्भयपणा, अहिंसा, समता, संतोष, तप आणि दान, ८५ अरे, तसेंच सर्व भूतांच्या ठिकाणीं यश, अपकीर्ति हे जे भाव दृष्टीस पडतात, ते माझ्याचपासून भूतांचे ठिकाणीं उत्पन्न होतात. ८६ जशीं भूतें निरनिराळीं आहेत, तसे हे विकारही वेगळाले आहेत असें समज; त्यांपैकीं कांहींना माझें ज्ञान होतें, व कांहींना होत नाहीं. ८७ ज्याप्रमाणें प्रकाश व अंधार हीं सूर्यापासूनच उत्पन्न होतात; प्रकाश उदयाबरोबर व अंधार अस्ताबरोबर दृष्टीस पडतो; ८८ त्याप्रमाणें, माझें ज्ञान होणें अगर न होणें, हें प्राण्यांच्या कर्मांचें फळ आहे; म्हणूनच त्यांच्या ठिकाणीं निरनिराळे विकार प्राप्त होतात. ८९ याप्रमाणें, अर्जुना, ही सर्व जीवसृष्टी माझ्याच ठिकाणीं भरलेली आहे असें समज. ९० आतां, जे या सृष्टीचे पालक आहेत, आणि ज्यांच्या आज्ञेनें सर्व लोक वर्तन करतात, असे आणखी अकरा भाव आहेत, ते तुला सांगतों. ९१

**अन्वयार्थ**—(पूर्वे)—पूर्वींचे—(सप्त)—सात—(महर्षयः)—भृगु वगैरे महर्षी—(तथा)—तसेच—(चत्वारः)—चार—(मनवः)—सावर्ण मनु हे सर्व—(मद्भावाः)—माझ्यामध्येंच भावना ठेवणारे असून,—(मानसाः जाताः)—मीं मनानेंच उत्पन्न केलेले असें झाले आहेत,—(येषां)—ज्यांच्या—(लोके)—या लोकांत—(इमाः प्रजाः)—या सर्व प्रजा आहेत. ६

तर सर्व गुणांनीं युक्त व महर्षींत ज्ञाते असे जे कश्यपादि प्रख्यात सात ऋषि आहेत, ९२ व आणखी जे चौदा मनु आहेत, त्यांतील स्वायंभुवादि मुख्य जे चार ते तुला सांगतों. ९३ हे धनुर्धरा, असे हे अकरा भाव सृष्टीच्या उत्पत्तीकरितां माझ्या मनापासून उत्पन्न झालेले आहेत. ९४ जेव्हां लोकांची व्यवस्था लागली नव्हती, व त्रिभुवनाची रचना झाली नव्हती, तेव्हां पंचमहाभूतांचे समुदाय कार्य केल्याशिवाय जागचे जागींच स्तब्ध होते. ९५ तेव्हां हे सात ऋषि व चार मनु उत्पन्न झाले व त्यांनीं अष्टलोकपाल उत्पन्न करून त्यांना सर्व जगतांत मुख्य करून ठेवलें. ९६ म्हणून हे अकराजण राजाप्रमाणें असून इतर सर्व जग त्यांची प्रजा आहे; अशा प्रकारें हा विश्वविस्तार माझाच आहे असें समज. ९७ हें पहा:—पहिल्या प्रथम बीज एकटेंच असतें; मग तेंच

१ स्वतः मिळून. २ संकल्पांनां, कल्पनांनीं. ३ पातला जातो. ४ धर्म. ५ पसरले. ६ निःसीम. ७ मोह नसणें, ८ जन्म व नाश. ९ संतोष. १० निरनिराळीं. ११ उत्पन्न होतात. १२ अंधार. १३ सूर्यापासूनच. १४ अस्तमानीं. १५ कठीण. १६ सर्व गुणी. १७ ज्ञाते. १८ कश्यप, अत्रि, भारद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि आणि वसिष्ठ. १९ चौदा मनूंतील स्वायंभूवादि मुख्य चार मनु. २० स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस. २१ माझ्या मनापासून. २२ उत्पत्तीकरितां. २३ लागली नव्हती. २४ रचना झाली नव्हती. २५ समुदाय. २६ अस्पष्ट, विस्तारहीन. २७ इंद्रादिक. २८ अग्र.

वे[1]रूढलिया बुड जाहालें । बुडीं कोंभ निघाले । खांदियांचे ९८ खांदियांपा-
सूनि अनेका । फुटलिया नाना शाखा । शाखांस्तव देखा । पल्लव पानें ९९
पल्लवीं फूल फळ। एवं वृक्षत्व जाहालें सकळ । तें निर्धारितां[2]केवळ । बीजचि
आघवें १०० तैसें मी एकचि पहिलें। मग मी तेंचि[3]मनातें व्यालें । तेथ सप्त
ऋषि आणि जाहाले। चारी मनु १ इहीं लोकपाळ केले । लोकपाळीं विविध
लोक सृजिले । लोकांपासूनि निपजले । प्रजाजात २ ऐसेनि हें विश्व येथें।
मीन्चि विस्तारिलेंसें निरुतें । परी भावाचेनि हातें । मा[6]नें जया ३

एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः । सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥७॥

यालागीं सुभद्रापती । हे भाँव इया माझिया विभूती । आणि यांचिया
व्याप्ती । व्यापिलें जग ४ म्हणोनि गा यापरी । ब्रह्मादिपिपीलिकोवरी । मीवां-
चूनि दुसरी । गोठी नाहीं ५ ऐसें जाणे जो साचें ।तया चेयिरें[10] जाहालें ज्ञा-
नाचें । म्हणोनि उत्तमाधम भेदाचें । दुःस्वप्न न देखे ६ मी माझिया विभूती ।
विभूतीं अधिष्ठिलिया व्यक्ती। हें आघवें योगप्रतीती। एकचि मानी ७ म्हणोनि
निःशंकें येणें मह[12]योगें। मज[13]मीनलें मनाचेनि[14]आंगें। एथ संशय करणें न लगे ।
तो त्रिशु[15]द्धी जाहला ८ कां जे ऐसें किरीटी। मातें भजे जो अभेदा दिठी ।
तयाचिये भजनाचे नों[16]टीं । सूती मज ९ म्हणऊनि अभेदें जो भक्तियोगु । तेथ
शंका नाहीं नये [17]खंगु। करितां ठेला तरी चांगु । तें सांगितलें षष्ठीं ११० तोचि
अभेदु कैसा । हें जाणावया मानसा । सौंद जाली तरी परियेसा । बोलिजेल ११

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते । इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥८॥

तरि मीन्चि एक सर्वां। या जगा जन्म पांडवा । आणि मजचिपासूनि
आघवा । निर्वाहो यांचा १२ कल्लोळ[20]माळा अनेगा । जन्म जळींचि पैं गा ।आणि
तयां जळचि आश्रयो तरंगा । जीवनही जळ १३ ऐसें आघवाचि ठायीं । तया
जळचि जेवीं पाहीं। तैसा मीवांचूनि नाहीं । विश्वीं इये १४ ऐसिया व्यापका
मातें । मानूनि जे भजती भलतेथें । पारि सौं[21]चोकारें उदितें । प्रेमभावें १५
देश काळ वर्तमान । आघवें मजसीं करूनि अभिन्न । जैसा वायु होऊनि ग-
गन । गगनींचि विचरे[22] १६ ऐसेनि[23] जे निजज्ञानी । खेळत सुखें त्रिभुवनीं।
जगद्रूपा मनीं । सांठऊनि मातें १७ जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भग-
वंत । हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा १८

वाढल्यावर त्याचें थूड बनतें व बुडाला कोंब निघू लागून त्याच्या खांद्या होतात. ९८ खांद्यापासून पुष्कळ फांटे फुटून त्यांना कोमल पल्लव येतात. ९९ आणि पानें फुटल्यावर फुलें व फळें येतात. याप्रमाणें सर्व झाड बनल्यावर तें कारणदृष्टीनें पाहूं लागल्यास सर्व बीजच आहे असें सिद्ध होतें; १०० त्याचप्रमाणें मूळारंभीं मी एकटाच होतों, नंतर मजपासून मन उत्पन्न झालें व त्या मनापासून सात ऋषि आणि चार मनु उत्पन्न झाले. १ त्यांच्यापासून इंद्रादि अष्टलोकपाल उत्पन्न झाले, व लोकपालांनीं पुष्कळ प्रकारचे लोक उत्पन्न केले. आणि त्या लोकापासून सर्व प्राणी उत्पन्न झाले. २ याप्रमाणें खरोखर सर्व विश्वाचा विस्तार मीच झालों आहें; परंतु हें ज्याला श्रद्धेनें मान्य होईल त्यालाच समजणार आहे. ३

**अन्वयार्थ**—(यः)–जो–(मम)–माझ्या–(एतां विभूतिं)–या विभूतीला–(च)–व–(योगं)–घटनेला–(तत्त्वतः)–तत्त्वतः–(वेत्ति)–जाणतो–(सः)–तो–(अविकंपेन योगेन)–निश्चल योगानें–सम्यग्दर्शनाच्या स्थैर्यरूप योगानें–(युज्यते)–युक्त होतो–(अत्र)–यांत–(संशयः न)–कांहीं संशय नाहीं. ७

वास्तव, हे सुभद्रापते, हे माझे ( बांस ) भाव व ( अकरा ) विभूति यांनीं सर्व जग व्यापलें आहे. ४ म्हणून, ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत याप्रमाणें माझ्याशिवाय दुसरी गोष्टच नाहीं, ५ अशा रीतीनें माझ्या सत्यस्वरूपाला जो जाणतो त्यालाच खऱ्या ज्ञानाची जागृति झाली आहे आणि म्हणूनच उत्तम व वाईट अशा प्राण्यांतील भेदाचें त्याला स्वप्नही पडत नाहीं. ६ मी, माझ्या विभूति व माझ्या विभूतींनीं युक्त असलेले प्राणी हें सर्व अनुभवानें एकच आहे असें समज. ७ म्हणून खरोखर जो या ज्ञानयोगानें मनोभावेंकरून तद्रूप झाला, तो कृतार्थ झाला यांत संशय नाहीं. ८ कारण, अर्जुना, अभेददृष्टीनें जो मला भजतो, त्याच्या भजनाच्या छंदानें मी त्याच्या पाशांत पडतों, ९ म्हणून जो माझ्या ठिकाणीं अभेदबोधानें भक्ति करतो, त्याला माझ्या प्राप्तीमध्यें खरोखर व्यत्यय येत नाहीं व अशी भक्ति करीत असतां जरी तो मरण पावला तरी तेंही उत्तमच आहे. हें सहाव्या अध्यायांत पूर्णपणें सांगितलेंच आहे. ११० ती अभेदभक्ति कशी असते हें जाणण्याची जर तुझ्या मनांत इच्छा झाली असेल, तर सांगतों, ऐक. ११

**अन्वयार्थ**—(अहं)–मी वासुदेवसंज्ञक परब्रह्म–(सर्वस्य)–सर्व जगाची–(प्रभवः)–उत्पत्ति आहें–(मत्तः)–मजपासून–(सर्वं)–सर्व जगत्–(प्रवर्तते)–प्रवृत्त होतें–(इति)–असें–(मत्वा)–समजून–(भावसमन्विताः)–परमार्थतत्त्वाविषयींच्या भावनेनें युक्त असलेले–(बुधाः)–तत्त्ववेत्ते–(मां)–मला–(भजन्ते)–भजतात–माझी भक्ति–सेवा करितात. ८

अर्जुना, या सर्व जगाचा उत्पन्नकर्ता व पालनकर्ताही मीच एक आहें. १२ अरे ज्याप्रमाणें अनेक लाटांचा जन्म पाण्यांतच होतो, त्यांना आश्रय पाण्याचाच असतो, त्यांचें जीवनही पाणीच असते, १३ आणि याप्रमाणें त्यांना जसें सर्व ठिकाणीं पाणीच आहे त्याप्रमाणें या सर्व विश्वांत माझ्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. १४ अशा प्रकारें मी सर्व व्यापक आहें असें जाणून जे खऱ्या उत्कंठेनें व प्रेमभावानें वाटेल त्या ठिकाणीं मला भजतात; १५ देशकालवर्तमान या सर्वांपासून मी भिन्न नाहीं ( असें जे जाणतात ), ज्याप्रमाणें वायु हा आकाशरूप होऊन आकाशांतच संचार करतो, १६ त्याप्रमाणें, जे आत्मज्ञानी, सर्वव्यापक असा जो मी, त्या मला मनांत आठवून सुखानें त्रिभुवनांत कालक्रमणा करतात; १७ आणि जो जो प्राणी दृष्टीस पडेल, त्याला त्याला ईश्वर समजणें, हा माझा खरा 'भक्तियोग' आहे असें समज १८

१ वाढल्यावर, अंकुर आल्यावर. २ कारणदृष्टीनें विचार करून पाहतां. ३ बहुत प्रकारचें व्हावें ही इच्छा. ४ उत्पन्न केलें. ५ भावाच्या योगानें. ६ मानतें. ७ वीस विकार. ८ अकरा विभूति. ९ ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत. १० जागृति. ११ अनुभव. १२ ज्ञानयोगानें. १३ मला मिळाले. १४ मनाच्या योगानें. १५ सिद्ध, कृतार्थ. १६ ठिकाणीं, पल्यावर. १७ व्यत्यय. १८ बंद पडला. १९ ध्वनि. इच्छा. २० लाटा. २१ खऱ्या उत्कंठेनें. २२ संचार करितो. २३ या प्रकारें. २४ आत्मज्ञानी.

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम्। कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥९॥

चित्तें मीचि जाहाले । मियांचि प्राणें धाले । जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ११९ मग तया बोधाचेनि माजें । नाचती संवादसुखाचीं भोजें । आतां एकमेकां घेपे दीजे । बोधचि वरी १२० जैशीं जवळिकेचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें । मग तरंगासि धर्वेळारें । तरंगचि होती २१ तैसी येरयेरांचिये मिळणी । पडत आनंदकल्लोळांची वेणी । तेथ बोध बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी २२ जैसें सूर्यें सूर्यातें वोंवाळिलें । कीं चंद्रें चंद्रम्या क्षेमें दिधलें । ना तरी सरिसेनि पाडें मीनलें । दोनी वोघ २३ तैसें प्रयाग होत सामरस्याचें । वरी वोसींण तरत सात्त्विकाचें । तें संवादचैतुष्पथींचे । गणेश जाहले २४ तेव्हां तया महासुखाचेनि भरें । धांवोनि देहाचिये गांवाबाहेरें । मियां धाले तेणें उद्गारें । लागती गाजों २५ पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं । जे अक्षरा एकाची वदंती । ते मेघाचियापरी त्रिजगतीं । गर्जती सैंधं २६ जैसी कमळकळिका जालेपणें । हृदयींचिया मकरंदातें राखों नेणें । दे राया रंका पारणें । आमोदाचें २७ तैसेंचि मातें विश्वीं कथित । कथितेनि तोषें कथूं विसरत । मग तया विसरामाजि विरत । आंगें जीवें २८ ऐसें प्रेमाचेनि बहुवेसपणें । नाहीं राती दिवो जाणणें । केलें माझें सुख अन्यंगेंवाणें । आपणपेयां जिहीं २९

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्। ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥१०॥

तयां मग जें आम्ही कांहीं । द्यावें अर्जुना पाहीं । ते ठायींचीच तिहीं । घेतली सेल १३० कां जे ते जिया वाटा । निगाले गा सुभटा । ते सोय पाहोनि अव्हांटा । स्वर्गापवर्ग ३१ म्हणोनि तिहीं जें प्रेम धरिलें । तेंचि आमुचें देणें उपाइलें । पारि आम्हीं देयावें हेंहि केलें । तिहींची म्हणिपे ३२ आतां यावरी येतुलें घडे । जें तेंचि सुख आगळें वाढे । आणि काळाची दृष्टि न पडे । हें आम्हां करणें ३३ लळेयांचिया बाळका किरीटी । गवसणी करूनि स्नेहाचिया दिठी । जैसी खेळत पाठोपाठीं । माउली धांवे ३४ तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनयांचा करूनि ठेवी । तैसी उपास्तीची पदवी । पोषित मी जायें ३५ जिये पदवीचेनि पोषकें । ते मातें पावती यथासुखें । हे पाळती मज विशेखें । आवडे करूं ३६ पैं गा भक्तांसि माझें कोडें । मज तयाचें अन-

**अन्वयार्थ**—[ते]–ते माझे भक्त-तत्त्ववेत्ते–(मच्चित्ताः) –ज्यांचें चित्त मज–वासुदेवामध्यें आहे असे,–(मद्गतप्राणाः) माझ्यामध्येंच ज्यांचीं सर्व इंद्रियें आहेत असे होत्साते –(परस्परं बोधयन्तः)-शिष्य आचार्यांपासून ऐकलेलें भगवत्तत्त्व आपापसांत समजावून देत असतात–(च)–व–(मां)–मला–(नित्यं) –सतत–(कथयन्तः)–ज्ञान-बल-वीर्यादिकांच्या योगानें विशिष्ट म्हणून सांगतात,-(च)–आणि त्यामुळें–(तुष्यन्ति)–संतोष पावतात–(च)–व–(रमन्ति)–रममाण होतात. ९

जे चित्तानें मद्रूपच झाले व माझ्याच योगानें ज्यांचे प्राण तृप्त आहेत, व जे ज्ञानाच्या नादांत जिवंतपणाचें किंवा मरणाचें त्यांना भान नाहीं. ११९ नंतर बोधाच्या जोरावर ते कौतुकानें संवादसुखांत नाचूं लागतात. अशा स्थितींत एकमेकांमधील देण्याघेण्याचा व्यवहार ज्ञानाचाच होतो. १२० ज्याप्रमाणें, जवळ जवळ असलेले तलाव पाण्यानें भरून गेल्यावर त्यांचें पाणी एकमेकांत मिसळतें, आणि मग लाटांना लाटाच आश्रयभूत होतात, २१ त्याप्रमाणें, ज्ञानी एके ठिकाणीं मिळाल्यावर ब्रह्मानंदरूपी लाटा एकांत एक मिसळतात, त्याठिकाणीं आत्मबोध हा आत्मबोधाला आत्मबोधाचाच अलंकार घालून मिरवतो ! २२ ज्याप्रमाणें सूर्यानें सूर्यालाच ओंवाळावें, किंवा चंद्रानें चंद्रालाच आलिंगन द्यावें, अथवा दोन ओघ सारख्या योग्यतेचे म्हणजे एकरूप होतात; २३ त्याप्रमाणें ब्रह्मैक्याचा संगम होतो. त्यांत अष्टसात्त्विकभावरूपी केरकचरा तरंगून आला, म्हणजे ते ज्ञाते संवादरूप चव्हाट्यावरील अधिपति बनतात. २४ तेव्हां त्या ब्रह्मानंदाच्या भरांत देहरूप गांवाच्या बाहेर धांवूं लागून माझ्या प्राप्तीमुळें संतोष झाला अशी मोठ्यानें गर्जना करूं लागतात, २५ गुरुशिष्यांच्या एकांतांत जो एकाक्षरी मंत्र सांगावयाचा, तो सर्वजण मेघाप्रमाणें तिन्ही लोकांत गर्जना करून सांगतात. २६ ज्याप्रमाणें कमळाची कळी विकसित झाल्यावर आपल्यांतील मकरंद झांकूं शकत नाहीं, आणि राजापासून रंकापर्यंत सर्वांना आपल्या वासाची मेजवानी करते, २७ त्याप्रमाणें, जगतांत माझे गुण गाऊन गाण्याच्या भरांत ते स्तब्ध राहतात, देहभाव रहात नाहीं व त्या स्थितींत त्यांचा जीवभाव व देवभाव हे दोन्ही हारपतातः २८ आणि अशा प्रेमभरांत ते रात्र व दिवस जाणत नाहींत. अशा प्रकारें जे आत्मत्वानें माझें सुख परिपूर्ण घेतात. २९

**अन्वयार्थ**—(सततयुक्तानां)–सतत माझ्यामध्यें चित्ताला स्थिर केलेल्या–(प्रीतिपूर्वकं)–प्रीतिपूर्वक–मोठ्या प्रेमानें–(भजतां तेषां)–मला भजणाऱ्या त्यांना मी–(तं बुद्धियोगं) –तो बुद्धियोग–ज्ञानयोग–(ददामि)–देतों कीं–(येन)–ज्याच्या योगानें–(ते)–ते–(मां) मला–(उपयान्ति)–प्राप्त होतात. १०

त्यांना, अर्जुना, आम्ही जें कांहीं द्यावयाचें, त्या ठिकाणाचा शेलकाच वांटा ते घेतात. १३० कारण, अर्जुना ते ज्या मार्गानें माझ्याकडे येण्यास निघाले, त्या मार्गाच्या दृष्टीनें स्वर्ग व मोक्ष ह्या आडवाटा असें वाटतें. ३१ म्हणून त्यांनीं माझ्या ठिकाणीं जी भक्ति केली, त्या भक्तीमुळें त्यांना कांहीं द्यावें असें मला वाटलें; परंतु मी जें कांहीं त्यांस द्यावयाचें तें त्या भक्तांनीं आपण होऊनच आपल्या आधीन करून घेतलें. ३२ आतां माझ्या भक्तीचें जें प्रेमसुख तें जास्त वाढवावें व अशा माझ्या भक्तांवर काळाची दृष्टि न पडावी, याविषयीं मला जपलें पाहिजे, एवढेंच माझें कर्तव्य आहे. ३३, हे किरीटी ज्याप्रमाणें, लाडकें लेंकरूं खेळत असतां आई त्याजवर प्रेमदृष्टि ठेवून त्याच्या मागोमाग धांवते, ३४ व तें जो जो एक एक नवीन खेळ मागेल त्याप्रमाणें त्याला सोन्यासारखे पदार्थ करून ठेवते, त्याप्रमाणें माझ्या भक्तांच्या उपासनेचे संप्रदाय मला पोषण करावे लागतात. ३५ जे संप्रदाय वाढविल्यानें माझे भक्त मला सहज येऊन मिळतात, ते संप्रदाय राखावे ( विशेषेंकरून वाढवावे ) हेंच मला आवडतें, ३६ भक्तांना माझी आवड असते,

१ संतोषातें पावलें. २ कौतुकानें. ३ मिसळतात. ४ घरें. ५ आलिंगन. ६ सारख्या योग्यतेनें. ७ एकत्वाचें. ८ पुरांतील लाकडें, केरकचरा. ९ संवादरूप चार वाटांचे, चव्हाट्यांतले. १० पुष्कळ. ११ विकसित झाल्यावर. १२ सुवासें. १३ विरघळतात, रममाण होतात. १४ आधिक्यानें. १५ पूर्ण. १६ उत्पन्न झालें. १७ आधारक. १८ आधिक. १९ लाडक्या. २० सोनुल्याचा. २१ उपासनेचा मार्ग. २२ सहज, सुखानें. २३ राखण. २४ आवड, प्रेम.

न्यगतीची चाड । कां जे प्रेमळांचें सांकड । आमुचिया घरीं ३७ पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले[3] । दोन्ही मार्ग तयाचिये वाहणी[3] केले । आम्हीं आंगही शेखीं[4] वेंचिलें । लक्ष्मियेसीं[5] ३८ परि आपणपेंवीण जें एक । तें तैसेंचि सुख साजुक । सप्रेमळालागीं देख । ठेविलें जतन ३९ हा ठायवरी किरीटी । आम्ही प्रेमळु घेवों आपणयासाठीं । या बोलीं बोलिजत गोष्टी । तैसिया नव्हती गा १४०

तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः । नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥११॥

म्हणोनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो । एक मीवांचूनि वावो । येर मानिलें जिहीं ४१ तयां तत्त्वज्ञां चोखटां । दिवी[10] पोतासाची सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें ४२ अज्ञानाचिये राती- । माजि तमाचि मिळणी[12] दाटती । ते नाशूनि घालीं पैरौती । तयां करीं नित्योदयो ४३ ऐसें प्रेमळाचेनि प्रियोत्तमें । बोलिलें जेथ पुरुषोत्तमें । तेथ अर्जुन मनोधर्में । निवालों[13] म्हणतसे ४४ हां हो जी अवधारा । भला केरु फेडिला संसारा । जाहलों जननींजठरजोहरा- । वेगळा प्रभू ४५ जी जन्मलेपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें । जीवित हातां चढलें । आवडे- तसें ४६ आजि आयुष्या उजवणें जाहली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्यकृपा लाधली । दैविकेनि[16] मुखें ४७ आतां येणें वचन तेजाकारें । फिटलें आंतील बाहेरील आंधारें । म्हणोनि देखतसें साचोकारें । स्वरूप तुझें ४८

अर्जुन उवाचः—

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् । पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥

तरी होसी गा तूं परब्रह्म । जें या महाभूतां विसवतें धाम । पवित्र तूं परम । जगन्नाथा ४९ तूं परम दैवत तिहीं[21] देवां । तूं पुरुष जी पंचविसावा[22] । दिव्य तूं प्रकृतिभावा-[23] । पैलीकडील १५० अनादिसिद्ध तूं स्वामी । जो नाकळिजसी[24] जन्मधर्मीं । तो तूं हें आम्ही । जाणितलें आतां ५१ तूं या कालत्रयासि[25] सूत्रीं[26] । तूं जीवकळेची अधिष्ठात्री[27] । तूं ब्रह्मकटाहधात्री[28] । हें कळलें फुडें[29] ५२

आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा । असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥१३॥

पैं आणिकही एके परी । इये प्रतीतीची येतसे थोरी । जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूंतें ५३ परि तया सांगितलियाचें साचपण । हें आतां माझें देखतसे अंतःकरण । जे कृपा केली आपण । म्हणोनि देवा ५४ एऱ्हवीं नारदु अखंड जवळां ये । तोही ऐसेंचि वचनीं गाये । परि अर्थ न बुजोनि

म्हणून मलाही त्यांच्या अनन्यभावाची आवड असते; कारण माझ्या घरी प्रेमळ भक्तांची फार उणीव आहे. १३७ हें पहा: बरवर भक्ति करणारासाठी स्वर्ग व मोक्ष असे दोन मार्ग उत्पन्न केले आहेत आणि लक्ष्मीसह मी आपलें शरीर शेषाचें स्वाधीन केलें आहे; १३८ परंतु बाह्य शरीराव्यतिरिक्त जें एक अत्युत्कृष्ट सुख—आत्मसुख—तें प्रेमळ भक्तांकरितां तसेंच राखून ठेविलें आहे. १३९ अर्जुना, इतकें आम्ही प्रेमळ भक्तांना आपल्या जवळ करितों; ह्या गोष्टी बोलून दाखविण्यासारख्या नाहींत, तर अनुभवानें समजणाऱ्या आहेत. १४०

**अन्वयार्थ**—(अहं)—मी—(तेषां एव अनुकंपार्थं)—त्यांच्यावरच दया करण्यासाठीं—( आत्मभावस्थः )—[ सन् ]—त्यांच्या अंतःकरणांत स्थित होऊन,—(भास्वता ज्ञानदीपेन)—तेजस्वी—दीप्यमान ज्ञानदीपानें—( अज्ञानजं तमः )—अज्ञानामुळें उत्पन्न झालेला अविवेक—(नाशयामि)—घालवितों. ११.

म्हणून, आत्मा जो मी, त्या माझी भक्ति हेंच आपल्या जगण्यास कारण करून ज्यांनीं माझ्याशिवाय इतर सर्व वस्तु व्यर्थ मानल्या; १४१ त्या शुद्ध आत्मज्ञान्यांकरितां मी कापराची मशाल पाजळून मशालजी बनून त्यांच्या पुढें पुढें चालतों. १४२ कारण कीं,—अज्ञानरूप रात्रींत जमलेल्या गर्द अंधाराचा नाश करून त्या भक्तांकरितां मी नेहमी ज्ञानरूपी सूर्योदय करतों. १४३ प्रेमळ भक्तांना प्रिय असा पुरुषोत्तम जेव्हां याप्रमाणें बोलला; तेव्हां अर्जुन म्हणाला—"देवा, माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले. १४४ हें पहा महाराज, आपण माझ्यावरील संसाररूपी मळ घालवून टाकला; आणि प्रभो, त्यामुळें मी जन्ममरणापासून मुक्त झालों! १४५ अहो; माझें जन्म मी आपल्या डोळ्यांनीं पाहिलें, व माझें जीवित आज माझ्या हाती आलें, असें मला वाटतें. १४६ प्रभो, आपल्या मुखांतील हें बोलणें ऐकून माझ्या आयुष्याचें सार्थक झालें आणि माझ्या दैवाचा भाग्योदय झाला! १४७ आतां या वचनरूप सूर्यानें माझ्या अंतर्बाह्य अज्ञानांधकाराचा नाश झाला; म्हणून प्रभो, तुमचें यथार्थ स्वरूप मला दिसूं लागलें. १४८

**अन्वयार्थ**—(सर्वे ऋषयः)—सर्व ऋषि—(त्वां)—तुला—(भवान्)—आपण—(परं ब्रह्म)—परमात्मा आहां—(परं धाम)—परम तेज आहां—(परमं पवित्रं)—परम पावन आहां—(पुरुषं)—पुरुष—(शाश्वतं)—शाश्वत—(दिव्यं)—दिव्य—( आदिदेवं)—सर्वांच्या अगोदर झालेला देव,—( अजं )—अज—( विभुं )—प्रभु आहां,—असें—(आहुः)—म्हणतात. १२

"तरी कृष्णा आपण परब्रह्म आहां व सर्व महाभूतांचें विश्रांतिस्थान असून पवित्र आणि सर्व जगाचें पालनकर्ते आहां १४९ तूं ब्रह्मा, विष्णु व महेश या तिघांचें आदिदैवत आहेस. देवा, पंचविसावें तत्त्व जो पुरुष तें तूंच आहेस, आणि मायेच्या पलीकडील जो दिव्य भाव, तोही तूंच. १५० हे स्वामी तुम्ही अनादिसिद्ध असून तुम्हांला जन्मादि धर्म नाहींत; असें तुम्ही आहां असें मला आतां समजलें. १५१ तुम्ही तीन कालांचे चालक आहां; तुम्हीं जीवकलेची मुख्य देवता आहां; व तुम्ही ब्रह्मांडास आश्रयभूत आहां असें आतां मला स्पष्ट कळलें. १५२

**अन्वयार्थ**—(तथा)—त्याचप्रमाणें—(देवर्षिः नारदः)—देवर्षि नारद,—(असितः देवलः)—असित देवल व—(व्यासः)—व्यास तुला तसेंच म्हणतात—( च )—आणि—( स्वयं एव )—तूं स्वतःच—(मे)—मला—(ब्रवीषि)—तसें सांगतोस. १३

"हें पहा, आणखी दुसऱ्याही एका तऱ्हेनें त्या गोष्टीच्या खरेपणाविषयीं अनुभव येतो; तो असा कीं, पूर्वी तुमच्याविषयीं अशाच गोष्टी पुष्कळ ऋषींनीं सांगितल्या आहेत. १५३ परंतु त्यांनीं सांगितल्याचा खरेपणा आज मला कळून आला; पण तें सुद्धां तुम्हीं कृपा केली म्हणूनच! १५४ एऱ्हवीं नारदमुनि आमच्या घरीं नेहमी येतात ते सुद्धां हेंच गात असतात; पण त्यांचा अर्थ न समजतां

१ उणीव, दुष्काळ. २ उत्पन्न झाले. ३ स्वाधीन. ४ शेषा, मर; शेषाला वेचिलें=शेषाला दिलें. ५ लक्ष्मीसह. ६ माझ्याशिवाय. ( माझ्या देहाशिवाय. ) ७ येथपर्यंत. प्रेमळ भक्तांला येतो. ९ व्यर्थ. १० कापुरांची मशाल. ११ समुदाय. १२ पलीकडे. १३ शांत झालों. १४ हर्ष. १५ साफल्य. १६ देवांच्या मुखानें. १७ वचनरूपी सूर्यानें. १८ काळोख. १९ यथार्थ. २० विश्रांतिस्थान. २१ ब्रह्मा, विष्णु व महेश यांना. २२ चोवीस तत्त्वापलीकडचा. २३ मायेच्या पलीकडचा, विकार. २४ आकळिला जात नाहींस, सांपडत नाहींस. २५ कालरूप यंत्राचा. २६ चालवणार, चालक. २७ मुख्य देवता. २८ ब्रह्मांडाला आश्रयभूत, कडदे. २९ स्पष्ट. ३० अनुभवाची.

न्यगतीची चाड । कां जे प्रेमळांचें सांकड । आमुचिया घरीं ३७ पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले । दोन्ही मार्ग तयाचिये वाहणी केले । आम्हीं आंगही शेखीं वेंचिलें । लक्ष्मियेसीं ३८ पारि आपणपेंवीण जें एक । तें तैसेंचि सुख साजुक । सप्रेमळालागीं देख । ठेविलें जतन ३९ हा ठायवरी किरीटी । आम्ही प्रेमळु घेवों आपणयासाठीं । या बोलीं बोलिजत गोष्टी । तैसिया नव्हती गा १४०

तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः । नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥११॥

म्हणोनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो । एक मीवांचूनि वावो । येर मानिलें जिहीं ४१ तयां तत्त्वज्ञां चोखटां । दिवी पोतासाची सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें ४२ अज्ञानाचिये राती- । माजि तमाचि मिळणी दाटती । ते नाशूनि घालीं पैरौती । तयां करीं नित्योदयो ४३ ऐसें प्रेमळाचेनि प्रियोत्तमें । बोलिलें जेथ पुरुषोत्तमें । तेथ अर्जुन मनोधर्में । निवालों म्हणतसे ४४ हां हो जी अवधारा । भला केरु फेडिला संसारा । जाहलों जननीजठरजोहरा- । वेगळा प्रभू ४५ जी जन्मलेपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें । जीवित हातां चढलें । आवडेतसें ४६ आजि आयुष्या उजवणें जाहली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्यकृपा लाधली । दैविकेनि मुखें ४७ आतां येणें वचन तेजाकारें । फिटलें आंतील बाहेरील आंधारें । म्हणोनि देखतसें साचोकारें । स्वरूप तुझें ४८

अर्जुन उवाचः—

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् । पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥

तरी होसी गा तूं परब्रह्म । जें या महाभूतां विसवतें धाम । पवित्र तूं परम । जगन्नाथा ४९ तूं परम दैवत तिहीं देवां । तूं पुरुष जी पंचविसावा । दिव्य तूं प्रकृतिभावा- । पैलीकडील १५० अनादिसिद्ध तूं स्वामी । जो नाकळिजसी जन्मधर्मीं । तो तूं हें आम्ही । जाणितलें आतां ५१ तूं या कालत्रयासि सूत्रीं । तूं जीवकळेची अधिष्ठात्री । तूं ब्रह्मकटाहधात्री । हें कळलें फुडें ५२

आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा । असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥१३॥

पैं आणिकही एके परी । इये प्रतीतीची येतसे थोरी । जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूंतें ५३ पारि तया सांगितलियाचें साचपण । हें आतां माझें देखतसे अंतःकरण । जे कृपा केली आपण । म्हणोनि देवा ५४ एऱ्हवीं नारदु अखंड जवळां ये । तोही ऐसेंचि वचनीं गाये । पारि अर्थ न बुजोनि

म्हणून मलाही त्यांच्या अनन्यभावाची आवड असते; कारण माझ्या घरी प्रेमळ भक्तांची फार उणीव आहे. ३७ हें पहा: वरवर भक्ति करणारासाठीं स्वर्ग व मोक्ष असे दोन मार्ग उत्पन्न केले आहेत आणि लक्ष्मीसह मी आपलें शरीर शेषाचें स्वाधीन केलें आहे; ३८ परंतु त्या शरीराव्यतिरिक्त जें एक अत्युत्कृष्ट सुख—आत्मसुख—तें प्रेमळ भक्तांकरितां तसेंच राखून ठेविलें आहे. ३९ अर्जुना, इतकें आम्ही प्रेमळ भक्तांना आपल्या जवळ करितों; ह्या गोष्टी बोलून दाखविण्यासारख्या नाहींत, तर अनुभवानें समजणाऱ्या आहेत. १४०

**अन्वयार्थ**—(अहं)—मी—(तेषां एव अनुकंपार्थं)—त्यांच्यावरच दया करण्यासाठीं—( आत्मभावस्थः )—[ सन् ]—त्यांच्या अंतःकरणांत स्थित होऊन,—(भास्वता ज्ञानदीपेन)—तेजस्वी—देदीप्यमान ज्ञानदीपानें—( अज्ञानजं तमः )—अज्ञानामुळें उत्पन्न झालेला अविवेक—(नाशयामि)—घालवितों. ११.

म्हणून, आत्मा जो मी, त्या माझी भक्ति हेंच आपल्या जगण्यास कारण करून ज्यांनीं माझ्याशिवाय इतर सर्व वस्तु व्यर्थ मानल्या; ४१ त्या शुद्ध आत्मज्ञान्यांकरितां मी कापराची मशाल पाजळून मशालजी बनून त्यांच्या पुढें पुढें चालतों. ४२ कारण कीं,—अज्ञानरूप रात्रींत जमलेल्या गर्द अंधाराचा नाश करून त्या भक्तांकरितां मी नेहमीं ज्ञानरूपी सूर्योदय करतों. ४३ प्रेमळ भक्तांना प्रिय असा पुरुषोत्तम जेव्हां याप्रमाणें बोलला, तेव्हां अर्जुन म्हणाला—"देवा, माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले! ४४ हें पहा महाराज, आपण माझ्यावरील संसाररूपी फेरा त्यागलेला झाडून टाकला; आणि प्रभो, त्यामुळें मी पुनर्जन्मापासून मुक्त झालों! ४५ अहो, माझा जन्म मी आपल्या डोळ्यांनीं पाहिले, व माझें जीवित आज माझ्या हातीं आलें, असें मला वाटतें. ४६ प्रभो, आपल्या मुखांतून हें बोलणें ऐकून माझ्या आयुष्याचें सार्थक झालें आणि माझ्या दैवाचा भाग्योदय झाला! ४७ आतां या वचनरूप सूर्यानें माझ्या अंतर्बाह्य अज्ञानांधकाराचा नाश झाला; म्हणून प्रभो, तुमचें यथार्थ स्वरूप मला दिसूं लागलें. ४८

**अन्वयार्थ**—(सर्वे ऋषयः)—सर्व ऋषि—(त्वां)—तुला—(भवान्)—आपण—(परं ब्रह्म)—परमात्मा आहां—(परं धाम)—परम तेज आहां—(परमं पवित्रं)—परम पावन आहां—(पुरुषं)—पुरुष—(शाश्वतं)—शाश्वत—(दिव्यं)—दिव्य—( आदिदेवं)—सर्वांच्या अगोदर झालेला देव,—( अजं )—अज—( विभुं )—प्रभु आहां, असें—(आहुः)—म्हणतात. १२

"तरी कृष्णा आपण परब्रह्म आहां व सर्व महाभूतांचें विश्रांतिस्थान असून पवित्र आणि सर्व जगाचे पालनकर्ते आहां ४९ तूं ब्रह्मा, विष्णु व महेश या तिघांचें आदिदैवत आहेस. देवा, पंचविसावें तत्त्व जो पुरुष तें तूंच आहेस, आणि मायेच्या पलीकडील जो दिव्य भाव, तोही तूंच. १५० हे स्वामी तुम्ही अनादिसिद्ध असून तुम्हांला जन्मादि धर्म नाहींत; असे तुम्ही आहां असें मला आतां समजलें. ५१ तुम्ही तीन कालांचे चालक आहां; तुम्ही जीवकलेची मुख्य देवता आहां, व तुम्ही ब्रह्मांडास आश्रयभूत आहां असें आतां मला स्पष्ट कळलें. ५२

**अन्वयार्थ**—(तथा)—त्याचप्रमाणें—(देवर्षिः नारदः)—देवर्षि नारद,—(असितः देवलः)—असित देवल व—(व्यासः)—व्यास तुला तसेंच म्हणतात—( च )—आणि—( स्वयं एव )—तूं स्वतःच—(मे)—मला—(ब्रवीषि)—तसें सांगतोस. १३

"हें पहा; आणखी दुसऱ्याही एका तऱ्हेनें त्या गोष्टींच्या खरेपणाविषयीं अनुभव येतो; तो असा कीं, पूर्वी तुमच्याविषयीं अशाच गोष्टी पुष्कळ ऋषींनीं सांगितल्या आहेत; ५३ परंतु त्यांनीं सांगितल्याचा खरेपणा आज सत्य करून आला, पण तेसुद्धां तुम्हीं कृपा केली म्हणूनच! ५४ एऱ्हवीं नारदमुनि आमच्या घरीं नेहमीं येतात ते सुद्धां हेंच गात असतात; पण त्याचा अर्थ न समजतां

१ उणीव, दुष्काळ. २ उत्पन्न झाले. ३ स्वाधीन. ४ शेषा, शेषावर; शेषीं वेचिलें=शेषाला दिलें. ५ लक्ष्मीसह. ६ आपल्याशिवाय. (माझ्या देहाशिवाय.) ७ येथपर्यंत. ८ प्रेमळ भक्ताला घेतो. ९ व्यर्थ. १० कापुराची मशाल. ११ समुदाय. १२ पलीकडे. १३ शांत झालों. १४ हवें तसें. १५ साफल्य. १६ देवाच्या मुखानें. १७ वचनरूपी सूर्यानें. १८ काळोख. १९ यथार्थ. २० विश्रांतिस्थान. २१ ब्रह्मा, विष्णु व महेश यांना. २२ चोवीस तत्त्वांपलीकडचा. २३ मायेच्या पलीकडचा, विकार. २४ आकळिला जात नाहींस, सांपडत नाहींस. २५ कालरूप यंत्राचा. २६ सूत्रधार, चालक. २७ मुख्य देवता. २८ ब्रह्मांडाला आश्रयभूत, कडें. २९ स्पष्ट. ३० अनुभवाची.

न्यगतीची चाड । कां जे प्रेमळांचें सांकड । आमुचिया घरीं ३७ पाहें पां स्वर्ग मोक्ष उपायिले । दोन्ही मार्ग तयाचिये वाहणी केले । आम्हीं आंगही शेखीं वेंचिलें । लक्ष्मियेसीं ३८ परि आपणपेंवीण जें एक । तें तैसेंचि सुख साजुक । सप्रेमळालागीं देख । ठेविलें जतन ३९ हा ठायवरी किरीटी । आम्ही प्रेमळु घेवों आपणयासाठीं । या बोलीं बोलिजत गोष्टी । तैसिया नव्हती गा १४०

तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः । नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥११॥

म्हणोनि मज आत्मयाचा भावो । जिहीं जियावया केला ठावो । एक मीवांचूनि वावो । येर मानिलें जिहीं ४१ तयां तत्त्वज्ञां चोखटां । दिवी पोतासाची सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें ४२ अज्ञानाचिये राती- । माजि तमाचि मिळेणी दाटती । ते नाशूनि घालीं परौती । तयां करीं नित्योदयो ४३ ऐसें प्रेमळाचेनि प्रियोत्तमें । बोलिलें जेथ पुरुषोत्तमें । तेथ अर्जुन मनोधर्में । निवालों म्हणतसे ४४ हां हो जी अवधारा । भला केरु फेडिला संसारा । जाहलों जननींजठरजोहरा- । वेगळा प्रभू ४५ जी जन्मलेपण आपुलें । हें आजि मियां डोळां देखिलें । जीवित हातां चढलें । आवडे-तसें ४६ आजि आयुष्या उजवणें जाहली । माझिया दैवा दशा उदयली । जे वाक्यकृपा लाधली । दैविकेनि मुखें ४७ आतां येणें वचन तेजाकारें । फिटलें आंतील बाहेरील आंधारें । म्हणोनि देखतसें साचोकारें । स्वरूप तुझें ४८

अर्जुन उवाच:—

*परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् । पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥*

तरी होसी गा तूं परब्रह्म । जें या महाभूतां विसवतें धाम । पवित्र तूं परम । जगन्नाथा ४९ तूं परम दैवत तिहीं देवां । तूं पुरुष जी पंचविसावा । दिव्य तूं प्रकृतिभावा- । पैलीकडील १५० अनादिसिद्ध तूं स्वामी । जो नाकळिजसी जन्मधर्मी । तो तूं हें आम्ही । जाणितलें आतां ५१ तूं या काळत्रयासि सूत्रीं । तूं जीवकळेची अधिष्ठात्री । तूं ब्रह्मकटाहधात्री । हें कळलें फुडें ५२

आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा । असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥१३॥

पैं आणिकही एके परी । इये प्रतीतीची येतसे थोरी । जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूतें ५३ परि तया सांगितलियाचें साचपण । हें आतां माझें देखतसे अंतःकरण । जे कृपा केली आपण । म्हणोनि देवा ५४ एऱ्हवीं नारदु अखंड जवळां ये । तोही ऐसेंचि वचनीं गाये । परि अर्थ न बुजोनि

म्हणून मलाही त्यांच्या अनन्यभावाची आवड असते; कारण माझ्या घरीं प्रेमळ भक्तांची फार उणीव आहे. ३७ हें पहा: वरवर भक्ति करणारासाठीं स्वर्ग व मोक्ष असे दोन मार्ग उत्पन्न केले आहेत आणि लक्ष्मीसह मी आपलें शरीर शेषाचे स्वाधीन केलें आहे; ३८ परंतु बाह्य शरीराव्यतिरिक्त जें एक अत्युत्कृष्ट सुख–आत्मसुख–तें प्रेमळ भक्तांकरितां तसेंच राखून ठेविलें आहे, ३९ अर्जुना, इतकें आम्ही प्रेमळ भक्तांना आपल्या जवळ करितों; ह्या गोष्टी बोलून दाखविण्यासारख्या नाहींत, तर अनुभवानें समजण्याच्या आहेत. १४०

**अन्वयार्थ**—(अहं)–मी–(तेषां एव अनुकंपार्थं)–त्यांच्यावरच दया करण्यासाठीं–( आत्मभावस्थः )–[ सन् ]–त्यांच्या अंतःकरणांत स्थित होऊन,–(भास्वता ज्ञानदीपेन)–तेजस्वी–देदीप्यमान ज्ञानदीपानें–( अज्ञानजं तमः )–अज्ञानामुळें उत्पन्न झालेला अविवेक–(नाशयामि)–घालवितों. ११.

म्हणून, आत्मा जो मी, त्या माझी भक्ति हेंच आपल्या जगण्यास कारण करून ज्यांनीं माझ्याशिवाय इतर सर्व वस्तु व्यर्थ मानल्या; ४१ त्या शुद्ध आत्मज्ञान्यांकरितां मी कापराची मशाल पाजळून मशालजी बनून त्यांच्या पुढें पुढें चालतों. ४२ कारण की,–अज्ञानरूप रात्रींत जमलेल्या गर्द अंधाराचा नाश करून त्या भक्तांकरितां मी नेहमीं ज्ञानरूपी सूर्योदय करतों, ४३ प्रेमळ भक्तांना प्रिय असा पुरुषोत्तम जेव्हां त्याप्रमाणें बोलला; तेव्हां अर्जुन म्हणाला–"देवा, माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले ! ४४ हें पहा महाराज, आपण माझ्यावरील संसाररूपी केर चांगला झाडून टाकला; आणि प्रभो, त्यामुळें मी पुनर्जन्मापासून मुक्त झालों ! ४५ अहो, माझे जन्म मी आपल्या डोळ्यांनीं पाहिले, व माझें जीवित आज माझ्या हातीं आलें, असें मला वाटतें. ४६ प्रभो, आपल्या मुखांतून हें बोलणें ऐकून माझ्या आयुष्याचें सार्थक झालें आणि माझ्या दैवाचा भाग्योदय झाला ! ४७ आतां या वचनरूप सूर्यानें माझ्या अंतर्बाह्य अज्ञानांधकाराचा नाश झाला; म्हणून प्रभो, तुमचें यथार्थ स्वरूप मला दिसूं लागलें. ४८

**अन्वयार्थ**—(सर्वे ऋषयः)–सर्व ऋषि–(त्वां)–तुला–(भवान्)–आपण–(परं ब्रह्म)–परमात्मा आहां–(परं धाम)–परम तेज आहां–(परमं पवित्रं)–परम पावन आहां–(पुरुषं)–पुरुष–(शाश्वतं)–शाश्वत–(दिव्यं)–दिव्य–( आदिदेवं)–सर्वांच्या अगोदर झालेला देव,–(अजं)–अज–(विभुं)–प्रभु आहां,–असें–(आहुः)–म्हणतात. १२

"तरी कृष्णा आपण परब्रह्म आहां व सर्व महाभूतांचें विश्रांतिस्थान असून पवित्र आणि सर्व जगाचें पालनकर्ते आहां. ४९ तूं ब्रह्मा, विष्णु व महेश या तिघांचें आदिदैवत आहेस. देवा, पंचविसावें तत्त्व जो पुरुष तें तूंच आहेस, आणि मायेच्या पलीकडील जो दिव्य भाव, तोही तूंच. १५० हे स्वामी तुम्ही अनादिसिद्ध असून तुम्हांला जन्मादि धर्म नाहींत; असे तुम्ही आहां असें मला आतां समजलें. ५१ तुम्ही तीन काळांचे चालक आहां; तुम्ही जीवकळेची मुख्य देवता आहां, व तुम्ही ब्रह्मांडास आश्रयभूत आहां असें आतां मला स्पष्ट कळलें. ५२

**अन्वयार्थ**—(तथा)–त्याचप्रमाणें–( देवर्षिः नारदः )–देवर्षि नारद,–(असितः देवलः)–असित देवल व–(व्यासः)–व्यास तुला तसेंच म्हणतात–( च )–आणि–( स्वयं एव )–तूं स्वतःच–(मे)–मला–(ब्रवीषि)–तसें सांगतोस. १३.

"हें पहा; आणखी दुसऱ्याही एका तऱ्हेनें त्या गोष्टीच्या खरेपणाविषयीं अनुभव येतो; तो असा कीं, पूर्वीं तुमच्याविषयीं अशाच गोष्टी पुष्कळ ऋषींनीं सांगितल्या आहेत. ५३ परंतु त्यांनीं सांगितल्याचा खरेपणा आज मला कळून आला, पण तेंसुद्धां तुम्हीं कृपा केली म्हणूनच ! ५४ एऱ्हवीं नारदमुनि आमच्या घरीं नेहमीं येतात ते सुद्धां हेंच गात असतात; पण त्याचा अर्थ न समजतां

१ उणीव, दुष्काळ. २ उत्पन्न झाले. ३ स्वाधीन. ४ शेषीं, शेषावर; शेषीं वेचिलें=शेषाला दिलें. ५ लक्ष्मीसह. ६ आपल्याशिवाय. ( माझ्या देहाशिवाय. ) ७ येथपर्यंत. ८ प्रेमळ भक्ताला घेतो. ९ व्यर्थ. १० कापुरांची मशाल. ११ समुदाय. १२ पलीकडे. १३ शांत झालों. १४ एवंतसें. १५ साफल्य. १६ देवाच्या मुखानें. १७ वचनरूपी सूर्यानें. १८ काळोख. १९ यथार्थ. २० विश्रांतिस्थान. २१ ब्रह्मा, विष्णु व महेश यांना. २२ चोवीस तत्त्वापलीकडचा. २३ मायेच्या पलीकडचा, विकार. २४ मापिला जात नाहीस, सांपडत नाहीस. २५ काळरूप यंत्राचा. २६ सूत्रधार, चालक. २७ मुख्य देवता. २८ ब्रह्मांडाला आश्रयभूत, कडें. २९ स्पष्ट. ३० अनुभवाची.

ठाये । गीतसुखचि ऐकों ५५ जी आंधळेयांच्या गांवीं । आपणपें प्रगटलें रवी। तरि तिहीं वोतपैलीचि घ्यावी । वांचूनि प्रकाशु कैंचा ५६ परि देवर्षि अध्यात्म गातां । आर्हांच रागांगेंसीं जे मधुरता । तेचि फांवे येर चित्ता । नलगेचि कांहीं ५७ पैं असिता देवलाचोनि मुखें । मी एवंविधा तूंतें आइकें। परी तैं बुद्धि विषयविखें । घारिली होती ५८ विषयविषाचा पडिपाडू । गोड परमार्थु लागे कडू । कडू विषय तो गोडू । जीवासी जाहला ५९ आणि हें आणि-कांचें काय सांगावें । राउळा आपणचि येऊनि व्यासदेवें । तुझें स्वरूप आ-घवें । सर्वदा सांगिजे १६० परि तो अंधारीं चिंतामणि देखिला । जेवीं नव्हे या बुद्धी उपेक्षिलों । पाठीं दिनोदयीं वोळखिला । होय म्हणोनि ६१ तैसीं व्यासादिकांचीं बोलणीं । तिया मजपाशीं चिद्रत्नांचिया खाणी । परि उपे-क्षिल्या जात होतिया तरणी । तुजवीण कृष्णा ६२

सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव । न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥१४॥

ते आतां वाक्यसूर्यकर तुझे फाकले । आणि ऋषीं मार्ग होते जे कथिले । तयां आघवयांचेंचि फिटलें । अनोळखैपण ६३ जी ज्ञानाचें बीज तयांचे बोल। माजि हृदयभूमिके पडिले सैंखोल । वरि इये कृपेची जाहाली वोल। म्हणोनि संवाद फळेंशीं उठले ६४ अहो नारदादिकां संतां । त्यांचिया उक्तिरूप सरितां। मी महोदधी जाहलों अनंता । संवादसुखाचा ६५ प्रभु आघवेनि येणें जन्में । जियें पुण्यें केलीं मियां उत्तमें । तयांचीं न ठकतीचि अंगीं कामें । सद्गुरु तुवां ६६ एऱ्हवीं वडिलवडिलांचेनि मुखें । मी सदां तूंतें कानीं आइकें । परि कृपा न किजेचि तुवां एकें । तंव नेणवेचि कांहीं ६७ म्हणोनि भाग्य जैं सानु-कूळ । जालिया केले उद्यम सदां सफळ । तैसें श्रुतांधीत सकळ । गुरुकृपा साच ६८ जी बनकेरु झाडें सिंपी जीवेंसाटीं । पाडूनि जन्में काढी आंटी । पारि फळेंसीं तैंचि भेटी । जैं वसंतु पावे ६९ अहो विषमा जैं वोहट पडे । तैं मधुर तें मधुर आवडे । पैं रसायनें तैं गोडें । जैं आरोग्य देहीं १७० कां इंद्रियें वाचा प्राण । यां जालियांचें तैंचि सार्थकपण । जैं चैतन्य येऊनि आपण । संचरे माजीं ७१ तैसें शब्दजात आलोडिलें । अथवा योगादिक जें अभ्यासिलें । तें तैंचि म्हणों ये आपुलें । जैं सानुकूल श्रीगुरु ७२ ऐसिये जालिये प्रतीतीचेनि माजें । अर्जुन निश्चयाचें नाचतुसे भोजें । तेवींचि म्हणे

आम्हीं गायनसुखच अनुभवीत होतों. ५५ महाराज! अंधळ्याच्या गांवीं सूर्य जरी स्वतः प्रकट झाला, तरी त्यानें फक्त कोंवळ्या उन्हाचेंच सुख घ्यावें, बाकी त्याला प्रकाश कसा दिसणार? ५६ त्याचप्रमाणें, नारद हे अध्यात्मगायन करीत असतां मला त्यांच्या रागरागिणींचें माधुर्य वरचेवर तेवढें समजत असे, दुसरें कांहीं नाहीं. ५७ त्याचप्रमाणें, असित व देवल यांच्या तोंडूनही तुमचे याच प्रकारचे गुणानुवाद मी ऐकत असें? परंतु त्या वेळेस माझी बुद्धि विषयरूप विषानें व्यापली होती. ५८ विषयरूप विषाचा महिमा असा आहे कीं, परमार्थ गोड असून तो जीवास कडू लागतो, व विषय कडू असून ते गोड लागतात. ५९ आणखी दुसऱ्याविषयी काय सांगूं! परंतु सर्वश्रेष्ठ जे व्यास ते मुनि, ते देखील स्वतः आमच्या राजवाड्यांत येऊन तुमच्या स्वरूपाचें असें वर्णन करीत असत. १६० परंतु एकाद्याला अंधारांत चिंतामणि सांपडून, तो चिंतामणि नव्हे, या बुद्धीनें तो टाकून देतो, आणि दिवस उगवल्यावर तोच चिंतामणि आहे असें ओळखतो, ६१ त्याचप्रमाणें कृष्णा, व्यासादिक मुनींचीं भाषणें ज्ञानरूप रत्नांच्या खाणीप्रमाणें असून, तुमच्या उपदेशरूप सूर्याशिवाय त्या मी टाकून दिल्या होत्या! ६२

**अन्वयार्थ**—(केशव,)—हे केशवा! (यत्)—जें—(मां)—मला—(वदसि)—तूं सांगत आहेस,—(एतत् सर्वं)—हें सर्व—(ऋतं)—खरें—(मन्ये)—मी समजतों.—(भगवन्)—हे भगवन्,—(ते व्यक्तिं)—तुझ्या निरुपाधिक स्वरूपाला—(देवाः न विदुः)—देव जाणत नाहींत व—(दानवाः न)—[विदुः]—दानव जाणत नाहींत. १४

१ राहे. २ कोंवळें ऊन. ३ आत्मज्ञान. ४ वरवरच. ५ समजे. ६ या प्रकारच्या. ७ व्यापिली. ८ थोरीव. ९ तरीं. १० टाकून दिली. ११ तत्त्वज्ञान रूप रत्नांच्या. १२ वाक्यरूपी सूर्यकिरण. १३ अज्ञानपण. १४ फार सोल, १५ एकवाक्यतारूपी फळ. १६ नद्यांना. १७ जीं जीं.

"ते आतां तुमचे वाक्यरूपी किरण माझ्या हृदयांत सर्वत्र फांकून, ऋषींनीं सांगितलेल्या त्या मार्गाविषयीं अज्ञान पार नाहींसें झालें. ६३ महाराज, त्यांचे शब्द म्हणजे ज्ञानाचें बीज; तें माझ्या हृदयरूपी खोल जमिनींत पडलें होतें, पण आतां त्याला तुमच्या कृपारूप ओलीनें संवादरूप फळें आलीं. ६४ अहो अनंता, नारदादिक संतांच्या भाषणरूपी नद्यांस, तुमचा व माझा जो संवाद त्या संवादरूपी सुखाचा मी समुद्र झालों. ६५ हे प्रभो सद्गुरो, मीं जन्मजन्मांतरीं जीं जीं उत्तम पुण्यें केलीं, त्यांनीं तुमची प्राप्ति करून देऊन तीं माझ्या ऋणांतून मुक्त झालीं. ६६ एऱ्हवीं, वाडवडिलांच्या मुखांतून तुमचे गुणानुवाद माझ्या कानीं पडत असत; परंतु तुम्हीं कृपा केली नव्हती, तोंपर्यंत मी कांहींच ओळखलें नव्हतें. ६७ म्हणून, 'नशीब जेव्हां अनुकूल होतें तेव्हां सर्व केलेले उद्योग सफळ होतात; त्याप्रमाणें, गुरुकृपा झाली म्हणजे ऐकलेलें व अध्ययन केलेलें सर्व खरें आहे, असें अनुभवास येतें. ६८ माळी ज्या झाडांना पाणी घालून आपल्या जीवापाड जन्मभर मेहनत करतो, त्यांना ज्याप्रमाणें वसंत ऋतूशिवाय फळें नाहींत; ६९ अहो, जेव्हां विषमज्वराला उतार पडतो, तेव्हांच गोड पदार्थ गोड लागतो; हें पहा—औषध हें आरोग्य झाल्याशिवाय चांगलें म्हणतां येत नाहीं; १७० किंवा इंद्रियें, वाचा व प्राण यांत जेव्हां चैतन्य येऊन संचार करतें, तेव्हांच त्यांचें सार्थक होतें; ७१ त्याचप्रमाणें, वेदशास्त्रांचा अथवा योगादिकांचा अभ्यास करूनही, जेव्हां गुरूंची कृपा होते, तेव्हांच त्यांचें सार्थक होतें. ७२ याप्रमाणें अनुभव आल्यामुळें अर्जुन निश्चयपूर्वक संतोषानें नाचूं लागला व देवास म्हणाला कीं,

१८ तुझे गुणानुवाद. १९ उद्योग. २० ऐकिलेलें व अध्ययन केलेलें. २१ गुरुकृपेनें. २२ माळी. २३ जीवापाड. २४ श्रम. २५ विषमज्वराला. २६ उतार. २७ वेदशास्त्रादि. २८ अभ्यासिलें. २९ सोनें.

देवा तुझें । वाक्य मज मानलें ७३ तरि सांचचि हें कैवल्यपती । मज त्रिशुद्धी आली प्रतीती । जे तूं देवदानवांचिये मती । जोगा नव्हसी ७४ तुझें वाक्य व्यक्ती न येतां देवा । जो आपुलिया जाणे जाणिवा । तो कहींचि नोहे हें मद्‌भावा । भरंवसेनि आलें ७५

स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम । भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥

एथ आपुलें वाढपण जैसें । आपणचि जाणिजे आकाशें । कां मी येतुली घनवट ऐसें । पृथ्वीचि जाणे ७६ तैसा आपुलिये सर्वशक्ती । तुज तूंचि जाणसी लक्ष्मीपती । येर वेदादिक मती । मिरवती वायां ७७ हां गा मनातें मागां सांडावें । पवनातें धावीं सवावें । आदिशून्य तरोनि जावें । केउतें बाहीं ७८ तैसें हें तुझें जाणणें आहे । म्हणोनि कोणाही ठावकें नोहे । आतां तुझें ज्ञान होये । तुजचिजोगें ७९ जी आपणयातें तूंचि जाणसी । आणिकातें सांगावयाही समर्थ होसी । तरि आतां एक वेळ धाम पुसीं । औतींचिये निडळींचा १८० हें आइकिलें कीं भूतभावना । त्रिभवनगजपंचानना । सकळदेवदेवतार्चना । जगन्नायका ८१ जरी थोरी तुझी पाहत आहों । तरी पांसीं उभे ठाकावयाही योग्य नोहों । या शोच्यंता जरी विनवूं विहों । तरी आन उपायो नाहीं ८२ भरले समुद्र सरिता चहूंकडे । पारि ते चापियांसि कोरडे । कां जैं मेघौनि थेंबुटा पडे । तैं पाणी कीं तया ८३ तैसे श्रीगुरु सर्वत्र आथी । पारि कृष्णा आम्हां तूंचि गती । हें असो मजप्रती । विभूती सांगें ८४

वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः । याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥१६॥

जी तुझिया विभूती आघविया । पारि व्यापिती शक्ति दिव्या जिया । तिया आपुलिया दावाविया । आपण मज ८५ जिहीं विभूतीं ययां समस्तां । लोकांतें व्यापूनि आहासी अनंता । तिया प्रधाना नामांकिता । प्रगट करीं ८६

कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् । केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥१७॥

जी कैसें मियां तूतें जाणावें । काय जाणोनि सदा चिंतावें । जरी तूंचि म्हणों आघवें । तरि चिंतनचि न घडे ८७ म्हणोनि मागां भाव जैसे । आपुले सांगितले तुवां उद्देशें । आतां विस्तारोनि तैसे । एक वेळ बोलें ८८ जया जया भावाचिया ठायीं । तूतें चिंतितां मज सायासु नाहीं । तो विवळ करूनि देईं । योगु आपुला ८९

" तुमचें बोलणें माझ्या प्रत्ययास आलें. ७३ तेव्हां, हे मुक्तिदात्या श्रीकृष्णा, मला खरोखर असा अनुभव आला कीं, तुम्हीं देव व राक्षस यांच्या बुद्धींना जाणण्याजोगें नाहीं! ७४ देवा, तुमच्या बोलण्याचा अनुभव न येतां जो आपल्या ज्ञानानें तुम्हाला जाणलें असें म्हणतो, त्याला तुमचें ज्ञान होत नाही, असें माझ्या पक्कें अनुभवाला आलें आहे. ७५

**अन्वयार्थ**—(हे पुरुषोत्तम)–हे पुरुषोत्तमा–(भूतभावन)–हे भूतांना उत्पन्न करणाऱ्या,–(भूतेश)–हे भूतांच्या नियामका,–(देवदेव)–हे देवांच्याहि देवा,–(जगत्पते)–हे जगत्पालका–(त्वं)–तूं–(स्वयं एव)–स्वतःच–(आत्मना)–ज्ञानस्वरूपानें–(आत्मानं)–निरतिशय ज्ञानैश्वर्यसंपन्न अशा स्वतःला–(वेत्थ)–जाणतोस. १५

" ज्याप्रमाणें आकाशाचें मोठेपण आकाशालाच समजतें किंवा पृथ्वीचें वजन पृथ्वीलाच समजतें, ७६ त्याप्रमाणें हे लक्ष्मीपते; तुमची सर्व शक्ति तुम्हीच जाणतां. एऱ्हवी तुमची शक्ति आम्हांला कळली, असा वेदादिक व्यर्थ गर्व वाहातात. ७७ अहो, मनाच्या गतीला कसें मागें टाकावें? वाऱ्याला वावेंत कसें धरावें? आणि वांहूनी माया कशी तरुन जावी! ७८ त्याचप्रमाणें, तुमचें ज्ञान होणें फार दुस्तर आहे, म्हणून तें कोणाला होत नाहीं तर तुमचें तुम्हांलाच समजतें. ७९ महाराज, तुमचें ज्ञान तुम्हांलाच आहे व तें आपण दुसऱ्यांनाही समजून देण्यास समर्थ आहां; तर एकदा आमच्या हौसेच्या कपाळाचा घाम पुसून टाका बरें! (आमची ऐकण्याची हौस पुरी करा!) १८० अहो प्राणिमात्राचे उत्पादका, अहो संसाररूपी गजाचा नाश करणाऱ्या पंचानना! अहो सर्व देवांना पूज्य जगदाधिपते, आपण ऐकलें का? ८१ तुमच्या मोठेपणाचा विचार केला तर तुमच्याजवळ उभें राहण्यासही आम्ही योग्य नाहीं; अशी शंका येऊन जर आम्ही तुमची विनंति केली नाहीं, तर आमच्या मनाच्या समाधनाला दुसरा उपायच नाहीं. ८२ चोंहीकडे समुद्र व नद्या जरी पाण्यानें भरलेल्या आहेत, तरी त्यांचा चातकांस काय उपयोग? कारण, त्याला तें कोरडेच! जेव्हां मेघांचे थेंब पडतील तेव्हांच त्याला पाणी पिण्यास मिळेल, ८३ त्याचप्रमाणें कृष्णा, जगतांत जरी चोंहीकडे गुरू आहेत, तरी आम्हाला तुमच्यावांचून गुरू नाहीं. हें असो; आतां तुमच्या विभूति सांगा. ८४

**अन्वयार्थ**—(याभिः विभूतिभिः)–ज्या विभूतींनीं–(त्वं)–तूं–(इमान् लोकान्)–या लोकांस–(व्याप्य)–व्यापून–(तिष्ठसि)–राहतोस–[ताः] (दिव्याः आत्मविभूतयः हि)–त्या आपल्या दिव्य विभूति–(अशेषेण)–संपूर्णपणें–(वक्तुं अर्हसि)–सांगण्यास तूं योग्य आहेस. १६

" महाराज आपल्या ज्या कांहीं विभूति असतील, त्यांतून जेवढ्या व्यापक, शक्तिमान् व सतेज आहेत, तेवढ्या तुम्ही मला दाखवा. ८५ हे अनंता, ज्या तुमच्या विभूति तिन्ही लोकांना व्यापून आहेत, त्यांतील मुख्य मुख्य नावाजलेल्या असतील त्या सांगा. ८६

**अन्वयार्थ**—(योगिन्)–हे योगिन्–(त्वां) तुहें–(सदा परिचिन्तयन् अहं)–सर्वदा चिंतन करणाऱ्या मी–(त्वां)–तुला–(कथं)–कसें बरें–(विद्याम्)–जाणावें–(भगवन्) हे भगवन्!–(केषु केषु च भावेषु)–कोणकोणत्या भावामध्यें–पदार्थांमध्यें–(मया)–मजकडून–(चिन्त्यः असि)–[तूं] चिन्त्य–चिंतन करण्यास योग्य आहेस. १७

" महाराज मी तुम्हांला कसें जाणावें? व नेहमीं कशाचें चिंतन करावें? जर सर्व तुम्हीच आहां असें म्हणावें तर माझ्या हातून तुमचें चिंतन होणार नाहीं; ८७ म्हणून पूर्वी (४।५ व ६ श्लोकांत) ज्या संक्षेपानें आपल्या विभूति सांगितल्या, त्यांच्या विस्तार करून एक वेळ सांगा. ८८ ज्या ज्या विभूतींच्या ठिकाणीं तुम्ही आहां असें समजून चिंतन केलें असतां मला श्रम पडणार नाहींत, असा तुमच्या प्राप्तीचा जो उपाय तो स्पष्ट करून सांगा. ८९

१ खरेंच. २ मुक्तिदात्या श्रीकृष्णा. ३ बुद्धीनें जाणण्याजोगा. ४ अनुभवाला. ५ ज्ञानानें. ६ माझ्या अनुभवाला. ७ मोठेपणा. ८ इतकी निबिड भरलेली. ९ गर्व वहातात. १० वावांनीं मोजावें; ११ माया, अव्यक्त. १२ वाहूनी. १३ श्रमलेल्या. १४ कपाळाचा. १५ जग उत्पन्न करणाऱ्या. १६ संसाररूपी हत्तीला मारणाऱ्या सिंहा. १७ ओळखतो. १८ जवळ. १९ उभे राहण्यास. २० दीनतेनें, संकटानें. २१ भिडे. २२ दुसरा. २३ चातकाला. २४ अवतार, मूर्ति. २५ श्रेष्ठ, मुख्य. २६ धर्म. २७ स्पष्ट. २८ प्राप्तीचा योग, युक्ति.

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन । भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥१८॥

आणि पुसलिया जिया विभूती । त्याही बोलाविया भूतपती । एथ म्हणसी जरी पुढतीं । काय सांगों १९० तरी हा भाव मना । झणें जाय हो जनार्दना । पैं प्राकृताही अमृतपाना । ना न म्हणवे जेवीं ९१ जे काळकूटाचें सेंहोदर । जें मृत्यूभेणें प्याले अमर । तरि दिहाँचे पुरंदर । चौदा जाती ९२ ऐसा कवण एक क्षीराब्धीचा रसु । जया वायांचि अमृतपणाचा आभासु । तयाचाही मीठांशु । जे पुरे म्हणों नेदी ९३ तया पाबळेयाही येतुलेवरी । गोडियेची आथि थोरी । मग हें तंव अवधारीं । परमामृत साचें ९४ जें मंदराचलु न ढाळितां । क्षीरसागरु न डहुळतां । अनादि स्वभावता । आइतें आहे ९५ जें द्रवे ना नव्हे बद्ध । जेथ नेणिजती रस गंध । जें भलतयांही सिद्ध । आठवलेंचि फावे ९६ जयाची गोठीचि ऐकतेंखेंवो । आघवा संसारु होय वावो । बळियें नित्यता लागे येवों । आपणपेयां ९७ जन्ममृत्यूची भोंख । हारपोनि जाय निःशेख । आंत बाहेरी महासुख । वाढोंचि लागे ९८ मग दैवगत्या जरी सेविजे । तरी तें आपणचि होऊनि ठाकिजे । तें तुज देतां चित्त माझें । पुरें म्हणों न शके ९९ तुझें नामचि आम्हां आवडे । वारि भेटी होय आणि जवेळिक जोडे । पाठीं गोठी सांगसी सुरवाडें । आनंदाचेनी २०० आतां हें सुख कायिसयासारिखें । कांहीं निर्वचेनीं मज परितोखें । तरि येतुलें जाणें । जे येणें मुखें । पुनरुक्तही हो १ हां गा सूर्य काय शिळा । अग्नि म्हणों येत आहे वोंविळा । कां नित्य वाहातया गंगाजळा । पारसेपण असे २ तुवां स्वमुखें जें बोलिलें । हें आम्हीं नादासि रूप देखिलें । आजि चंदनतरूचीं फुलें । तुरंबीत आहों मा ३ तया पार्थाचिया बोला । सर्वांगें श्रीकृष्ण डोलला । म्हणे भक्तिज्ञानासि जाहला । आगरु हा ४ ऐसा पतिकरोंचिया तोषा आंतु । प्रेमाचा वेगु उचंबळतु । तो सायासें सांवरूनि अनंतु । काय बोले ५

श्रीभगवानुवाच—

हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः । प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥१९॥

मी पितामहाचा पिता । हें आठवितांही नाठवे चित्ता । कीं म्हणतसे बा पांडुसुता । भलें केलें ६ अर्जुनातें बा म्हणे एथ कांहीं । आम्हां विस्मो करावया कारण नाहीं । आंगें तो लेंकरूं काई । नव्हेचि नंदाचें ७ पारि प्रस्तुत

**अन्वयार्थ**—(जनार्दन)–हे जनार्दना !–(आत्मनः)–तुझें –आत्म्याचें–(योगं)–विस्तार विशेष प्रकारचें योगैश्वर्य–(च)–व–(विभूतिं)–ध्यानास योग्य असलेल्या पदार्थांचा विस्तार–(विस्तरेण)–सविस्तर–(भूयः)–पुनरपि–(कथय)–सांग.–(हि)–कारण –(अमृतं शृण्वतः मे)–तुझें वाक्यामृत ऐकणाऱ्या माझी–(तृप्तिः)–तृप्ति–(नास्ति)–होत नाहीं–१८

"हे भूपते, मीं ज्या विभूतींबद्दल तुम्हांला विचारलें, आहे त्या सांगा. त्याच त्या पुनः काय सांगावयाच्या आहेत असें जर कदाचि॒ म्हणाल, १९० तर हे जनार्दना, अशी शंका मनांत येऊं देऊं नका. कारण, जगांतील साधारण जें अमृतपान त्यालाही पुरे असें कोणाच्यानें म्हणवत नाहीं. ९१ जें अमृत काळकूट विषाचें सख्खें भावंड आहे, तें मरणाच्या भीतीनें देवांनीं प्राशन केलें असतांही, ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत चौदा इंद्र लय पावतात ! ९२ क्षीराब्धीचा असा एक रस आहे कीं, त्याला व्यर्थ अमृत हें नांव प्राप्त झालें आहे. पण त्याची ही गोडी पुरी झाली असें कोणाच्यानें म्हणवत नाहीं. ९३ त्या तुच्छ अमृताच्या गोडीचा जर एवढा महिमा आहे, तर मग असें पहा कीं, हें तुमचें बोलणें तर खरोखर परमामृत आहे. ९४ हें तर मंदराचल न हालवितां, क्षीरसागर न घुसळितां अनादि असून स्वभावतः स्वयमेव आहे. ९५ शिवाय जें पाझरत नाहीं, जें पातळ नाहीं व घट्टही नाहीं; व ज्याच्या ठिकाणीं गोडी व सुवास नाहींत, व हे आठवण करण्याबरोबर वाटेल त्याला प्राप्त होतें. ९६ याची गोष्ट ऐकतांक्षणींच सर्व संसार मिथ्या वाटूं लागतो, व यामुळें बलात्कारेंकरून नित्यता आपल्याच ठिकाणीं येते. ९७ याच्या योगानें जन्ममृत्यूंची वार्ता समूळ नाहींशी होते, व अंतर्बाह्य महासुखाची वृद्धि होते. ९८ मग दैवयोगानें जर तें सेवन केलें तर तें आत्मरूपी करून टाकतें. अशा प्रकारचें जें तुमचें परमामृत, तें तुम्ही मला पाजीत असतां माझें चित्त पुरे म्हणूं शकत नाहीं. ९९ आधीं तुमचें नांव मला आवडतें, त्यांत तुमची भेट होऊन सहवास घडला, व नंतर आनंदयुक्त होऊन तुम्ही गोष्टी सांगत आहां, २०० तेव्हां तें सुख कशासारखें आहे हें माझ्यानें सांगवत नाहीं; परंतु मला फार संतोष होत आहे. तथापि मला असें वाटतें कीं, तुमच्या मुखानें पुनः एक वेळ ऐकावें मग त्यांत विभूति सांगण्याची पुनरुक्ति झाली तरी हरकत नाहीं. १ कदाचित् तुमच्या मनांत शंका येईल कीं, एकवार सांगितलेलें पुनः कसें सांगावें ? तर महाराज ! असें पहा सूर्याच्या नित्य प्रकाशाला शिळा म्हणतां येईल काय ? अग्नीला ओंवाळा म्हणतां येईल काय ? किंवा अखंड वाहणाऱ्या गंगोदकास पारोसेंपण आहे काय ? २ तुम्ही आपल्या मुखानें जें ज्ञान सांगितलें, तें ऐकून आम्हांला असें वाटलें कीं, नादब्रह्म मूर्तिमंत आमच्या पुढें उभें आहे; तसेंच दुर्मिळ अशा चंदनाच्या फुलांचा आम्ही आज सुवास घेत आहों !" ३ अर्जुनाचें हें भाषण ऐकून श्रीकृष्ण सर्वांगानें डोलूं लागले, आणि म्हणालेः–हा पार्थ भक्ति व ज्ञान यांचें आगरच झाला आहे. ४ याप्रमाणें आपला भक्त अर्जुन याला जो आनंद झाला, तो पाहून, देवांनाही प्रेमाचा वेग आला, परंतु तो आंवरून धरून श्रीअनंत बोलूं लागले. ५

**अन्वयार्थ**—(हन्त)–बरें आहे, आतां मी–(ते)–तुला–(दिव्याः आत्मविभूतयः)–दिव्य आत्मविभूति–(प्राधान्यतः)–मुख्यमुख्यच–(कथयिष्यामि)–सांगेन–(हि)–कारण–(हे कुरुश्रेष्ठ)–हे कुरुकुलांतील श्रेष्ठा–(मे विस्तरस्य)–माझ्या विस्ताराचा–(अन्तः)–अन्त–(नास्ति)–नाहीं. १९

मी ब्रह्मदेवाचा बाप हें माहीत असूनही त्याची आठवण न राहतां भगवान म्हणाले, "बापा अर्जुना, फार चांगलें केलें." ६ आतां भगवंतांनीं अर्जुनाला 'बापा' म्हटलें म्हणून आपणांस आश्चर्य करण्याचें कारण नाहीं; कां कीं, भगवान स्वतः नंदपुत्र होऊन खेळ खेळले नाहींत का ? असें ज्ञानेश्वर महाराज म्हणतात. ७ पण संद्व्यां तें असो;

१ येऊं देऊं नका. २ भावंड. ३ देव. ४ दिवसाचे. ५ इंद्र. ६ तुच्छालाही, नाशवंतालाही. ७ ज्ञानामृत. ८ खरें. ९ न हालवितां. १० न घुसळतां. ११ पातळ होत नाहीं. १२ घट्ट. १३ पाहिजे त्याला. १४ प्राप्त होतें. १५ ऐकतांक्षणींच. १६ मिथ्या. १७ बलात्कार. १७ अविनाशपण. १९ वार्ता, भाषा, बोली. २० तूं समर्थ देत असतां. २१ सहवास, सान्निध्य. २२ आनंदानें, सुखानें. २३ बोलवेना. २४ संतोषानें. २५ पुनः बोललेलें होईल. २६ शिळेपणा. २७ जें ज्ञान. २८ नादब्रह्माचें. २९ दुर्गंध. ३० मळा, स्थान. ३१ अनुभवाच्या. ३२ ब्रह्मदेवाचा. ३३ आश्चर्य.

ऐसें असो । हें करवी आवडीचा अतिसो । मग म्हणे आइकें सांगतसों । धनुर्धरा ८ तरि तुवां पुसलिया विभूती । तयांचें अपारपण सुभद्रापती । ज्या माझियाचि पारें माझिये मती । आकळती ना ९ आंगींचिया रोमा किती । जयाचिया तयासि न गणवती । तैसिया माझिया विभूती । असंख्य मज २१० एऱ्हवीं तरी मी कैसा केवढा । म्हणोनि आपणपयांही नव्हेचि फुडा । यालागीं प्रधाना जिया रूढा । तिया आइकें ११ जिया जाणतलियासाठीं । आघवीया जाणवतील किरीटी । जैसें बीज आलिया मुठीं । तरूचि आला होय १२ कां उद्यान हाता चाढिन्नलें । तरी आपैसीं सांपडलीं फळें फुलें । तेवीं देखिलिया जिया देखवलें । विश्व सकळ १३ एऱ्हवीं साचाचि गा धनुर्धरा । नाहीं शेवटु माझिया विस्तारा । पैं गगना ऐसिया अपारा । मजमाजि लपणें १४

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः । अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥२०॥

आइकें कुटिलालकमस्तका । धनुर्वेदत्र्यंबका । मी आत्मा असें एकैका । भूतमात्राच्या ठायीं १५ आंतुलीकडे मीचि यांचे अंतःकरणीं । भूतांबाहेरी माझीच गंवसणी । आदि मी निर्वाणीं । मध्यही मीचि १६ जैसें मेघां या तळीं वरी । एक आकाशचि आंत बाहेरी । आणि आकाशींचि जाले अवधारीं । असणेंही आकाशीं १७ पाठीं लया जे वेळीं जाती । ते वेळीं आकाशचि होऊनि ठाती । तेवीं आदि स्थिती गती । भूतांसि मी १८ ऐसें बहुवस आणि व्यापकपण । माझें विभूतियोगें जाण । तरी जीवचि करूनि श्रवण । आइकोनि आईक १९ याहीवरी त्या विभूती । सांगणें ठेलें सुभद्रापती । सांगेन म्हणितलें तुजप्रती । त्या प्रधाना आइकें २२०

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् । मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥२१॥

हें बोलोनि तो कृपावंतु । म्हणे विष्णु मी आदित्यांआंतु । रवी मी रश्मिवंतु । सुप्रभांमाजीं २१ मरुद्गणांच्या वर्गीं । मरीचि म्हणे मी शार्ङ्गी । चंद्रु मी गगनरंगीं । तारांमाजीं २२

वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः । इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥२२॥

वेदांआंत सामवेदु । तो मी म्हणे गोविंदु । देवांमाजि मरुद्बंधु । महेंद्रु तो मी २३ इंद्रियांमाजि अकरावें । मन तें मी हें जाणावें । भूतांमाजि स्वभावें । चेतना ते मी २४

रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् । वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥२३॥

हें सर्व आवडीच्या पराकोष्ठेनें घडतें. मग भगवान म्हणाले:– हे धनुर्धरा, मी सांगतों तें ऐक–८ हे सुभद्रापते, तूं ज्या–माझ्या विभूतींबद्दल विचारलेंस, त्या अगणित असून जरी माझ्याच आहेत तरी माझ्याही बुद्धीनें त्यांची गणना करतां येत नाहीं. ९ ज्याप्रमाणें आपल्या अंगावरील लव ज्याचें त्यासही मोजतां येत नाहीं, त्याप्रमाणें माझ्या विभूति मला मोजतां येत नाहींत. २१० एव्हढें देखील, मी कसा व केवढा आहें, हें माझें मलाच खरें कळत नाहीं. याकरितां माझ्या मुख्य मुख्य विभूति ज्या प्रसिद्ध आहेत, त्या ऐक. ११ हे किरीटी, त्या जाणल्या असतां इतर सर्व विभूति जाणतां येतील. ज्याप्रमाणें झाडाचें बी हातीं आलें असतां झाडच हातीं आल्याप्रमाणें होतें. १२ किंवा बाग हातीं आल्यावर आपोआप फळें व फुलें हातीं लागतात, त्याप्रमाणें त्या विभूति पाहिल्या असतां सर्व विश्व पाहिल्याप्रमाणें होतें. १३ हे धनुर्धरा, बाकी खरेखर माझ्या विस्ताराचा अंत नाहीं; हें पहा, आकाशासारखे मोठमोठे पदार्थही माझ्या ठिकाणीं लपून जातात. १४

**अन्वयार्थ**––(गुडाकेश)–हे अर्जुना–(अहं)–मी–(सर्वभूताशयस्थितः)–सर्व प्राण्यांच्या हृदयांत स्थित असलेला–(आत्मा)–आत्मा आहें.–(अहं)–मी–(भूतानां)–सर्व भूतांचा–(आदिः)–आदि म्ह० कारण–(च मध्यं)–व मध्य म्ह० स्थिति–(च अन्तः एव)–व अन्त म्ह० प्रलय आहें. २०

कुरळे केश मस्तकीं धारण करणाऱ्या, व धनुर्विद्येंत शिवाप्रमाणें प्रवीण अशा अर्जुना, ऐक. प्रत्येक प्राण्याच्या ठिकाणीं जो आत्मा आहे तो मी. १५ शरीराच्या आंतील भागाच्या अंतःकरणांत मीच आहें; प्राणिमात्राच्या बाहेरच्या बाजूसही माझेंच आच्छादन आहे; आणि प्राणिमात्राच्या आरंभीं, अंतीं व मध्येंही मीच आहें. १६ ज्याप्रमाणें मेघाच्या खालीं, वर, आंत व बाहेर सर्वत्र आकाशच असतें, आणि ते आकाशांत उत्पन्न होऊन आकाशांतच असतात; १७ आणि मग ज्या वेळेस ते मेघ लय पावतात, त्या वेळेसही आकाशच होऊन राहतात, त्याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति व लय या तिन्ही गति प्राणिमात्राच्या मीच आहें. १८ याप्रमाणें माझें अनंतत्त्व आणि व्यापकपण हें माझ्या विभूतींच्या योगानें समजतें; तरी जीवालाच कान करून (अंतःकरणपूर्वक) पूर्वी ऐकलेल्या गोष्टींवर अनुसंधान ठेवून पुढें ऐक. १९ हे सुभद्रापते, यापुढें तुला सांगावयाच्या राहिलेल्या विभूति ज्या तुला सांगतों म्हणून म्हटलें होतें, त्यांतील मुख्य मुख्य ऐक. २२०

**अन्वयार्थ**––(अहं)–मी–(आदित्यानां)–आदित्यांतील–(विष्णुः)–विष्णु आहें–(ज्योतिषां)–ज्योतींतील–(अंशुमान्)–किरणवान्–(रविः)–सूर्य आहें–(मरुतां)–मरुत या नांवाच्या देवांतील मी–(मरीचिः)–मरीचि–(अस्मि)–आहें,–(अहं)–मी–(नक्षत्राणां)–नक्षत्रांतील–(शशी)–चंद्र आहें. २१

इतकें बोलल्यावर कृपावंत श्रीकृष्ण म्हणाले, "बारा आदित्यांत विष्णु मी; तेजस्वी वस्तूंत किरणयुक्त सूर्य तो मी" २१ श्रीकृष्ण म्हणतात, "एकुणपन्नास मरुद्गणांत मरीचि मी; व आकाशांतील नक्षत्रांत चंद्र मी." २२.

**अन्वयार्थ**––(वेदानां सामवेदः अस्मि)–वेदांतील सामवेद मी आहें–(देवानां वासवः अस्मि)–देवांतील इंद्र मी आहें.–(च इंद्रियाणां अहं मनः अस्मि)–आणि इंद्रियांतील मन मी आहें.–(भूतानां चेतना अस्मि,–भूतांची चेतना मी आहें. २२

श्रीगोविंद म्हणाले, "वेदांत सामवेद मी; देवांत मरुद्बंधु जो इंद्र तो मी; २३ आणि इंद्रियांत अकरावें जें मन तें मी असें जाण. तसेंच प्राणिमात्रांत जी मूळ जीवकळा ती मी." २४

**अन्वयार्थ**––[अहं] (रुद्राणां शंकरः च अस्मि)–मी अकरा रुद्रांतील शंकर आहें.–(यक्ष–रक्षसां वित्तेशः)–यक्ष–राक्षस यांतील कुबेर मी आहें.–(वसूनां पावकः च अस्मि)–आठ वसूंतील पावक–अग्नि या नांवाचा वसु मी आहें.–(अहं शिखरिणां मेरुः)–मी शिखरयुक्त पर्वतांतील मेरु आहें. २३

१ आधिक्य. २ गणना करतां येत नाहीं. ३ स्पष्ट, प्रकट. ४ मुख्य. ५ प्रसिद्ध. ६ जाणल्या असतां. ७ बाग. ८ आपोआप. ९ ज्या विभूति. १० काळे कुरळे केस मस्तकीं धारण करणाऱ्या. ११ धनुर्वेदाविषयीं केवळ शिवच असा. १२ आच्छादन. १३ शेवटीं, अंतीं. १४ खालीं. १५ पुनः, मग. १६ राहतात. १७ देवांत, बारा आदित्यांत=सूर्यांत. १८ किरणवान्. १९ तेजस्वी पदार्थांमध्यें. २० एकुणपन्नास मरुद्गणांत. २१ शार्ङ्ग नांवाचें धनुष्य धारण करणारा श्रीकृष्ण. २२ आकाशांत. २३ इंद्र. २४ जीवकला, चैतन्य.

अशेषांही रुद्रांमाझारीं । शंकर जो मदनारी । तो मी येथ न धरीं । भ्रांति
कांहीं २५ यक्षरक्षोगणांआंतु । शंभूचा सखा जो धनवंतु । तो कुबेरु मी हें
अनंतु । म्हणता जाहला २६ मग आठांही वसूंमाझारीं । पावकु तो मी अव-
धारीं । शिखरांथिलियां सर्वोपरी । मेरु तो मी २७

पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् । सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥२४॥
महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् । यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥२५॥

जो स्वर्गसिंहासना सांवावो । सर्वज्ञते आदिचा ठावो । तो पुरोहितांमाजि
रावो । बृहस्पती मी २८ त्रिभुवनींचिया सेनापतीं- । आंत स्कंदु तो मी महा-
मती । जो हरवीर्यें अग्निसंगतीं । कृत्तिकाआंतु जाहला २९ सकळिकां सरो-
वरांसी । माजि समुद्र तो मी जळराशी । महर्षींआंतु तपोराशी । भृगु तो मी
२३० अशेषांही वाचा- । माजी नटनाच सत्याचा । तें अक्षर एक मी वैकुं-
ठींचा । वेल्हाळु म्हणे ३१ समस्तांही यज्ञांच्या पैकीं । जपयज्ञु तो मी ये
लोकीं । जो कर्मत्यागें प्रणवादिकीं । निफजविजे ३२ नामजपयज्ञु तो परम ।
बाधूं न शके स्नानादि कर्म । नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थें ३३
स्थावरां गिरींआंतु । पुण्यपुंज जो हिमवंतु । तो मी म्हणे कांतु । लक्ष्मियेचा ३४

अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः । गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥२६॥
उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् । ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम् ॥२७॥

कल्पद्रुम हे न पारिजातु । गुणें चंदनुही वाड विख्यातु । तरि यया वृक्षजातां-
आंतु । अश्वत्थु तो मी ३५ देवऋषींआंतु पांडवा । नारदु तो मी जाणावा । चित्ररथु
मी गंधर्वां । सकळिकांमाजी ३६ यया अशेषांही सिद्धां- । माजि कपिलाचार्यु मी
प्रबुद्धा । तुरंगजातां प्रसिद्धां- । आंत उच्चैःश्रवा मी ३७ राजभूषण गजांआंतु । अर्जुना
मी गा ऐरावतु । पयोराशी सुरमथितु । अमृतांशु तो मी ३८ यया नरांमाजि राजा ।
तो विभूतिविशेष माझा । जयातें सकळ लोक प्रजा । होऊनि सेविती ३९

आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् । प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥२८॥
अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् । पितृणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥२९॥

पैं आघवेयां हातियेरां- । आंत वज्र तें मी धनुर्धरा । जें शतमखोत्तीर्ण-
करा । आरूढोनि असे ४० धेनूंमध्यें कामधेनु । तें मी म्हणे विष्वक्सेनु ।
जन्मवितैयांआंत मदनु । तो मी जाणें ४१ सर्पकुळांआंत अधिष्ठाता । वासुकी
गा मी कुंतीसुता । नागांमाजि समस्तां । अनंतु तो मी ४२ अगा यादसां-

" सगळ्या रुद्रांमध्यें मदनाचा शत्रु जो शंकर तो मी आहें यावद्दल मनांत शंका घरूं नको. " २५ श्रीअनंत म्हणतात, " यक्षराक्षसांत, शंकराचा मित्र जो धनवान् कुबेर, तो मी; २६ अष्टवसूंमध्यें अग्नि तो मी; व सर्व शिखर धारण करणाऱ्या पर्वतांत उंच असा मेरुपर्वत तो मी; " २७

**अन्वयार्थ**—(पार्थ)-हे पार्था ! -(मां पुरोधसां मुख्यं बृहस्पतिं विद्धि)-मी पुरोहितांतील मुख्य बृहस्पति आहें असें तूं जाण.-(अहं सेनानीनां स्कन्दः)-मी सेनापतींतील स्कंद आहें-(अहं सरसां सागरः अस्मि)-मी देवानिर्मित सरोवरांतील सागर आहें. २४-(अहं महर्षीणां भृगुः)-मी महर्षींतील भृगु आहें.- अहं गिरां एकं अक्षरं अस्मि)-मी पदरूप वाणींतील ओंकार हें एकाक्षर आहें-(अहं यज्ञानां जपयज्ञः अस्मि)-मी यज्ञांतील जपयज्ञ आहें.-(अहं स्थावराणां हिमालयः)-मी स्थावरांतील हिमालय आहें. २५

" जो इंद्राचा सचिव, व सर्व ज्ञानाचें आदिपीठ; व पुरोहितांमध्यें श्रेष्ठ, तो बृहस्पति मी. २८ अर्जुना, जो शंकराच्या वीर्यापासून अग्नीच्या संगानें कृत्तिकांच्या उदरीं उत्पन्न झाला, तो त्रिभुवनांतील सेनापतींत मुख्य असा कार्तिकस्वामी मी. २९ सर्व सरोवरांत जलनिधि जो समुद्र तो मी, व महर्षींत तपोराशी जो भृगु, तो मी." २३० वैकुंठवासी श्रीविष्णु म्हणाले, " सर्व बोलण्यांतच ज्या सत्यानें व्यवहार होतो, ते सत्य अक्षर ॐकार मी; ३१ सर्व यज्ञांमध्यें, कर्मत्याग करून ॐकारादिकांनीं उत्पन्न होणारा जो जपयज्ञ, तो मी. ३२ जो नामजपयज्ञ श्रेष्ठ असून स्नानादिक नित्य कर्मामध्यें व्यत्यय आणूं शकत नाहीं, ज्याच्या नांवानें धर्म व अधर्म पवित्र होतात, व वेदांत ज्याला परब्रह्म म्हणतात तो मी." ३३ श्रीलक्ष्मीपति म्हणाले, " स्थावर पर्वतांमध्यें पुण्यराशी जो हिमालय पर्वत, तो मी आहें. " ३४

**अन्वयार्थ**—( सर्ववृक्षाणां अश्वत्थः )-सर्व वृक्षांतील-वनस्पतींतील मी अश्वत्थ-पिंपळ आहें.-(च देवर्षीणां नारदः)-आणि देवर्षींतील मी नारद आहें.-(गंधर्वाणां चित्ररथः)-गंधर्वांतील मी चित्ररथ आहें.-(सिद्धानां कपिलः मुनिः)-सिद्धांतील कपिल मुनि मी आहें.-(मां)-मला-(अश्वानां)-अश्वांतील-(अमृतोद्भवं)-अमृतासाठीं केलेल्या क्षीरसागराच्या मंथनांतून उत्पन्न झालेला-(उच्चैःश्रवसं)-उच्चैःश्रवा अश्व-(विद्धि)-जाण-(गजेंद्राणां ऐरावतं)-मी गजेंद्रांतील ऐरावत आहें-(च)-व-(नराणां नराधिपं)-मनुष्यांतील राजा मी आहें.-२६-२७

" कल्पवृक्ष व पारिजात, तसाच चंदन हे गुणानें मोठे प्रसिद्ध आहेत, तरी या सर्व वृक्षांत पिंपळ म्हणून जो वृक्ष आहे, तो मी; ३५ हे पांडवा, सर्व देवर्षींत नारद ऋषि, तो मी असें जाण; आणि सर्व गंधर्वांत चित्ररथ म्हणून जो गंधर्व आहे, तो मी. ३६ हे ज्ञानवंता, या सर्व सिद्धांतांमध्यें कपिलाचार्य मी; प्रख्यात अशा सर्व घोड्यांत उच्चैःश्रवा नांवाचा घोडा, तो मी; ३७ हे अर्जुना; राजाचें भूषण असे जे हत्ती त्यांत देव अमृतासाठीं समुद्रमंथन करीत असत त्यांतून उत्पन्न झालेला जो ऐरावत नांवाचा हत्ती, तो मी ३८ सर्व लोक आज्ञाधारक होऊन ज्याची सेवा करतात, त्या लोकांमध्यें राजा माझी विशेष विभूति आहे." ३९

**अन्वयार्थ**—(अहं आयुधानां वज्रं)-मी आयुधांतील वज्र आहें.-[अहं] (धेनूनां कामधुक् अस्मि)-मी धेनूंतील कामधेनु आहें.-( प्रजनः कंदर्पः अस्मि )-मी प्रजोत्पादनाचें कारण कंदर्प-काम-आहें.-(अहं सर्पाणां वासुकिः अस्मि)-मी सर्पांतील वासुकि आहें.-[अहं] (नागानां अनन्तः अस्मि)-मी नागांतील अनन्त आहें.-(अहं यादसां वरुणः)-मी जलदेवतांतील वरुण आहें-(च पितृणां अर्यमा अस्मि)-आणि पितरांतील मी 'अर्यमा' नांवाचा पितृराज आहें.-(अहं संयमतां यमः) -मी संयमन करणारांतील यम आहें. २८-२९

" हें पहा-अर्जुना, शंभर यज्ञ परिपूर्ण केलेल्या इंद्राच्या हातांत असणारें आयुधांमध्यें श्रेष्ठ असें वज्र मी. " २४० ( आसमंतात् ज्याची सेना आहे असे ) श्रीविष्णु म्हणाले, " सर्व गाईंत कामधेनु नांवाची गाय ती मी; आणि उत्पन्न करणारांमध्यें मदन म्हणून जो आहे, तो मी. ४१ हे कुंतीसुता, सर्पकुलांचा नायक वासुकि तो मी; व सर्व नागांमध्यें श्रेष्ठ जो अनंत ( शेष ) तो मी; ४२ श्रीकृष्ण

---

१ अग्नि. २ शिखरें आहेत अशा पर्वतांत. ३ इंद्राच्या सिंहासनाला. ४ सहाय, सचीव. ५ कार्तिकस्वामी. ६ व्यवहार. ७ विलासी. ८ ॐकारादिकांनीं. ९ पर्वतामध्यें. १० पुण्यराशी. ११ हिमालय. १२ कल्पवृक्ष. १३ आणि. १४ सुरतरूंच्या पांच जाति आहेत.—त्या—मंदार, पारिजात, संतान कल्पवृक्ष व हरिचंदन. १५ मोठा. १६ पिंपळ. १७ ज्ञानवंता. १८ सर्व घोड्यांत. १९ इंद्राचा घोडा. २० समुद्र. २१ देवांनीं घुसळलेला क्षीरसागर. २२ हत्तींत. २३ शंभर यज्ञ करून कृतार्थ झालेल्या इंद्राच्या हातांत. २४ आसमंतात् ज्याची सेना आहे असा श्रीकृष्ण. २५ उत्पन्न करणारांत. २६ नायक. २७ शेष. २८ जलचरांत.

आंतु । जो पश्चिमे प्रमदेचा कांतु । तो वरुण मी हें अनंतु । सांगत असे ४३ आणि पितृगणां समस्तां- । माजि अर्यमा जो पितृदेवता । तो मी हें तत्त्वता । बोलत आहें ४४ जगाचीं शुभाशुभें लिहिती । प्राणियांच्या मानसांचा झाडा घेती । मग केलियानुरूप होती । भोगानियम जे ४५ तयां निर्यमितयांमाजि यमु । जो कर्मसाक्षी धर्मु । तो मी म्हणे आत्मारामु । रमापती ४६

प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् । मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥३०॥

अगा दैत्यांचिया कुळीं । प्रल्हादु तो मी न्याहाळीं । म्हणोनि दैत्यभावादि मेळीं । लिंपेचिना ४७ पैं कळितयांमाजि महाकाळु । तो मी म्हणे गोपाळु । श्वापदांमाजि शार्दूळु । तो मी जाण ४८ पक्षिजातिमाझारीं । गरुड तो मी अवधारीं । यालागीं जो पाठीवरी । वाहों शके मातें ४९

पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् । झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥३१॥

पृथ्वीचिया पैसारा- । माजी घडी न लगतां धनुर्धरा । एकेचि उड्डाणें सातांहि सागरां । प्रदक्षिणा कीजे २५० तयां वहिलियां गतिमंतां- । आंत पवनु तो मी पांडुसुता । शस्त्रधरां समस्तां- । माजि श्रीराम तो मी ५१ जेणें सांकडलिया धर्माचे कैवारें । आर्पणपयां धनुष्य करूनि दुसरें । विजयलक्ष्मियें एक मोहरें । केलें त्रेतीं ५२ पाठीं उभें ठाकूनि सुवेळीं । प्रतापलंकेश्वराची सिसाळीं । गगनीं उदो म्हणतया हस्तबळी । दिधली भूतां ५३ जेणें देवांचा मानु गिंवासिला । धर्मासि जीर्णोद्धारु केला । सूर्यवंशी उदेला । सूर्य जो कां ५४ तो हातियेरुपैरंजितयाआंतु । रामचंद्र मी सीताकांतु । मकर मी पुच्छवंतु । जळचरांमाजी ५५ पैं समस्तांही वोघां- । मध्यें जे भगीरथें आणितां गंगा । जन्हूनें गिळिली मग जंघा । फाडूनि दिधली ५६ ते त्रिभुवनैकसरिता । जान्हवी मी पांडुसुता । जळप्रवाहां समस्तां- । माझारीं जाणें ५७ ऐसेनि वेगळालां सृष्टीपैकीं । विभूती नाम सुतां एकेकीं । सगळेन जन्मसहस्रें अवलोकीं । अर्ध्या नव्हती ५८

सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन । अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥३२॥
अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च । अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥३३॥

जैसीं अवघींचि नक्षत्रें वेंचावीं । ऐसी चाड उपजेल जैं जीवीं । तैं गगनाची बांधावी । लोथें जेवीं ५९ कां पृथ्वीये परमाणूंचा उगाणा घ्यावा । तरि भूगोलुचि काखे सुवावा । तैसा विस्तारु माझा पहावा । तरि जाणावें मातें २६० जैसें शाखांसी फूल फळ । एकिहेळां वेटाळूं म्हणिजे सकळ । तरी उप-

सांगतात:–सर्व-जलदेवतांत पश्चिम[1] दिशेचा पति जो वरुण, तो मी, ४३ सर्व पितृगणांत पितृदेवता जो अर्यमा, तो मी असें खरोखर (तात्त्विकदृष्टया) सांगतों. ४४ जे जगाचीं शुभाशुभ कर्मे लिहितात, प्राण्यांच्या मनाच्या व शरीराच्या कर्मांची झडती घेतात, व कर्मानुसार भोगाचें फळ देतात, ४५ त्या नियमन[2] करणारांत, प्राण्यांच्या कर्मांचा साक्षिभूत जो यमधर्म, तो मी," असें रमापति आत्माराम म्हणाले. ४६

अन्वयार्थ—(च [अहं] दैत्यानां प्रह्लादः अस्मि)–व मी दैत्यांतील प्रह्लाद आहें,–(अहं कलयतां कालः)–मी गणना करणारांतील काल आहें.–(च अहं मृगाणां मृगेंद्रः)––आणि मी मृगांतील–पशूंतील सिंह किंवा वाघ आहें.–(च पक्षिणां वैनतेयः)–व पक्ष्यांतील गरुड आहें. ३०

"अरे, दैत्यकुलांत जन्मलेला प्रल्हाद म्हणून जो दैत्य तो मी असें समज; आणि म्हणूनच तो दैत्यांच्या स्वभावानें[3] लिप्त झाला–नाहीं[4] ४७ श्रीगोपालकृष्ण म्हणतात:–नाश करणारांत[5] जो महाकाळ, तो मी; व सर्व जनावरांत वाघ[6] किंवा सिंह, तो मी असें समज. ४८ अर्जुना, एक सर्व पक्ष्यांत गरुड पक्षी, तो मी; म्हणूनच तो मला आपले पाठीवर वाहूं शकतो." ४९

अन्वयार्थ—(पवतां पवनः अस्मि)–पावन करणारांतील मी वायु आहें.–(अहं शस्त्रभृतां रामः)–मी शस्त्र धारण करणारांतील दाशरथि राम आहें;–[अहं]–(झषाणां मकरः अस्मि)–मी मासे, कासव इत्यादि जलचर प्राण्यांतील सुसर–मगर आहें.–[अहं] (स्रोतसां जाह्नवी अस्मि)–मी प्रवाहांतील गंगा आहें. ३१

"हे धनुर्धरा, या पृथ्वीच्या सभोंवतीं एक घटका[7] न लागतां जो फिरतो; व एक उडीबरोबर सातही समुद्रांना प्रदक्षिणा करतो. २५० असा वेगवानांमध्यें[8] श्रेष्ठ जो वायु, तो मी; आणि अर्जुना, सर्व शस्त्रधरांत श्रीराम तो मी; ५१ ज्या रामानें त्रेतायुगीं संकटांत पडलेल्या धर्माच्या कैवारानें आपल्या[9] रूपाचेंच दुसरें धनुष्य बनवून, विजयश्रीला आपल्याशिवाय दुसरा मार्गच ठेविला नाहीं; ५२ नंतर सुवेलाचलावर उभें राहून लंकाधीश रावणाच्या मस्तकाच्या पंक्ति गगनांत उदो उदो म्हणणाऱ्या भूतांना बळी दिल्या; ५३ ज्या रामानें देवांना मान प्राप्त करून दिला; धर्माचा जीर्णोद्धार केला, व जो सूर्यवंशांत केवळ प्रतिसूर्यच उदयास आला; ५४ तो शस्त्र-धारण करणाऱ्यांत सीतापति रामचंद्र मी; व पुच्छवंत जलचरांत मकर तो मी; ५५ सर्व वाहणाऱ्या नद्यांमध्यें, ज्या गंगेला भगीरथ आणीत असतां जन्हूनें गिळून पुनः मांडी फोडून जिला वाट दिली, ५६ ती सर्व त्रैलोक्यांतील नद्यांत मुख्य नदी जान्हवी मी," असें अर्जुना, तूं जाण." ५७ हें पहा, याप्रमाणें सृष्टींतील माझ्या एकएक निरनिराळ्या विभूतीचेंही वर्णन करूं लागलें तर; हजार जन्मांत अर्ध्या विभूतीचेंही वर्णन होणार नाहीं. ५८

अन्वयार्थ—(अर्जुन)–हे पार्था–(अहं)–मी–(सर्गाणां)–सृष्टीचा–(आदिः च अन्तः च मध्यं एव)–आदि-उत्पत्ति, स्थिति व लय आहें.–(विद्यानां)–विद्यांतील–(अहं)–मी–(अध्यात्मविद्या)–आत्मविद्या आहें.–(अहं प्रवदतां वादः)–मी वाद-जल्प-वितंडा यांतील वाद आहें. कारण वाद अर्थाच्या निर्णयाला कारण होतो.–[अहं] (अक्षराणां अकारः अस्मि)–मी अक्षरांतील अकार हें अक्षर आहें.–(च सामासिकस्य द्वंद्वः)–व सामासांच्या समूहांतील द्वंद्वसमास मी आहें. [कारण त्यांतील सर्व पदें अर्थामध्यें येतात].–(अक्षयः कालः अहं एव)–अक्षय काल मीच आहें.–(अहं विश्वतोमुखः धाता अस्मि)–मी सर्व जगाच्या कर्मांचें फल देणारा सर्वतोमुख धाता आहें. ३२-३३

ज्याप्रमाणें; सर्व नक्षत्रें वेंचून घ्यावीं अशी मनांत इच्छा उत्पन्न झाली असतां आकाशाची मोट बांधिली म्हणजे तीं सर्व हातीं येतील; ५९ किंवा पृथ्वीच्या परमाणूंचा झाडा घ्यावयाचा असल्यास भूगोलच काखेंत मारला पाहिजे, त्याप्रमाणें, माझा विस्तार पहावयाचा असल्यास मलाच जाणलें पाहिजे; [म्हणजे तें सर्व दृष्टीस पडेल.] २६० खांद्या व फळें फुलें हीं सर्व एकदम गुंडाळून घ्यावीं असें वाटल्यास ज्याप्रमाणें झाड मुळासकट उपटून

१ पश्चिम-दिशेचा. २ शासन करणारांत ३ दैत्यस्वभावानें. ४ लिप्त होत नाहीं. ५ हरण करणारांत. ६ वाघ. ७ विस्तार. ८ सर्व वेगवानांत. ९ वारा. १० आपल्या रूपानें. ११ एकमार्गी. १२ सुवेलाचलान्. १३ मस्तकपंक्ति. १४ हातामध्यें बळी. १५ शोधून दिला. १६ शस्त्रधारण करणारांत. १७ मांडी. १८ त्रैलोक्यांतील मुख्य नदी. १९ अर्ध्याचें वर्णन होणार नाहीं. २० इच्छा. २१ मोट. २२ झाडा, शोध, गणना. २३ पोलावा. २४ एकदम.

डूनियां मूळ । जेवीं हातीं घेपे ६१ तेवीं माझे विभूतिविशेष । जरी जाणों पाहिजेत अशेष । तरी स्वरूप एक निर्दोष । जाणिजे माझें ६२ एऱ्हवीं वेगळालिया विभूती । कायिएक परिससी किती । म्हणोनि एकिहेळां महामती । सर्व मी जाण ६३ मी आघवियेचि सृष्टी । आदिं मध्यांतीं किरीटी । ओतप्रोत पटीं । तंतु जेवीं ६४ ऐसेया व्यापका मातें जैं जाणावें । तैं विभूतिभेदें काय करावें । पारि हे तुझी योग्यता नव्हे । म्हणोनि असो ६५ कां जे तुवां पुसिलिया विभूती । म्हणोनि तिया आईक सुभद्रापती । तरी विद्यांमाजि प्रस्तुती । अध्यात्मविद्या ते मी ६६ अगा बोलतयांचिया ठायीं । वादु तो मी पाहीं । जो सकलशास्त्रसंमतें कहीं । सरेचिना ६७ जो निर्वचूं जातां वाढे । आइकतयां उत्प्रेक्षे सळु चढे । जयावरी बोलतयांचीं गोडें । बोलणीं होतीं ६८ ऐसा प्रतिपादनामाजि वादु । तो मी म्हणे गोविंदु । अक्षरांमाजि विशदु । अकारु तो मी ६९ पैं गा समासांमाझारीं । द्वंद्व तो मी अवधारीं । मशकालागोनि ब्रह्मावेरीं । ग्रासिता तो मी २७० मेरुमंदरादिकीं सर्वीं । सहित पृथ्वीतें विरवी । जो एकार्णवातेंही जिरवी । जेथिंचा तेथें ७१ जो प्रळयतेजा देत मिठी । सगळिया पवनातें गिळी किरीटी । आकाश जयाचिया पोटीं । सामावलें ७२ ऐसा अपार जो काळु । तो मी म्हणे लक्ष्मीलीळु । मग पुढती सृष्टीचा मेळु । सृजिता तो मी ७३

मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् । कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥३४॥

आणि सृजिलिया भूतांतें मीचि धरीं । सकळां जीवनही मीचि अवधारीं । शेखीं सर्वांतें या संहारीं । तेव्हां मृत्युही मीचि ७४ आतां स्त्रीगणांच्या पैकीं । माझिया विभूती सात आणिकी । तिया ऐक कवतिकीं । सांगिजतील ७५ तरी नित्य नवी जे कीर्ति । अर्जुना ते माझी मूर्ती । आणि औदार्येंसीं जे संपत्ती । तेही मीचि जाणें ७६ आणि ते गा मीचि वाचा । जे सुखासनीं न्यायाचा । आरूढोनि विवेकाचा । मार्गीं चाले ७७ देखिलेनि पदार्थें । जे आठवूनि दे मातें । ते स्मृतिही एथें । त्रिशुद्धी मी ७८ पैं स्वहिता अनुयायिनी । मेधा ते गा मी इये जनीं । धृती मी त्रिभुवनीं । क्षमा ते मी ७९ एवं नारींमाझारीं । या सातही शक्ति मी अवधारीं । ऐसें संसारगजकेसरी । म्हणता जाहला २८०

बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् । मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥३५॥

वेदराशीचिया सामा- । आंत बृहत्साम जें प्रियोत्तमा । तें मी म्हणे रमा- ।

घ्यावें लागतें, ६१ त्याप्रमाणें, माझ्या सर्व विभूति समजाव्या अशी इच्छा झाल्यास माझें निर्दोष ( उपाधिरहित ) असें स्वरूप जाणून घ्यावें. ( म्हणजे त्या सहज समजतील.) ६२ एऱ्हवीं, अर्जुना, माझ्या वेगळाल्या विभूति किती म्हणून ऐकशील? म्हणून, एकदां सर्व ठिकाणीं मीच भरलेला आहें, असें जाण. ६३ हे किरीटी, मी सर्व सृष्टीचा आदि, मध्य आणि अंत आहें. ज्याप्रमाणें वस्त्रांत तंतु उभे व आडवे भरलेले असतात, ६४ त्याप्रमाणें, जो मी सर्वव्यापक आहें असें जाणल्यानंतर माझ्या विभूति जाणून काय करावयाच्या आहेत? परंतु तसें करण्याची तुझी योग्यता नाहीं म्हणून तें असूं दे. ६५ हे सुभद्रापते, तूं माझ्या विभूति कोणत्या म्हणून विचारलेंस, तर त्या ऐक. सर्व विद्यांत ( आत्मज्ञान होणारी ) वेदांतविद्या, ती मी आहें. ६६ अरे, बोलणाराच्या ठिकाणीं जो सर्व शास्त्रांच्या संमतीनें कधीं संपत नाहीं, तो वाद मी. ६७ विचार करूं लागलें असतां जो उलट वाढतो, व ऐकणारांच्या तर्कास बळ येतें, आणि त्या तर्कावर बोलणाराची गोड भाषणें होतात; ६८ श्रीगोविंद म्हणालेः–अशा वादाघाटींत जो वाद चालतो, तो मी; आणि अक्षरांत स्पष्ट असा जो अकार, तो मी. ६९ समासांत द्वंद समास, तो मी असें समज. आणि मशकापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांना ग्रासणारा काल तो मी. २७० मेरुमंदरादिकांसह जो पृथ्वीचा नाश करतो, व प्रलयकालीं जलमय झालेल्या जगास जो जागचे जागीं जिरवितो; ७१ हे किरीटी, प्रलयकालच्या तेजाला जो मिठी मारतो, सर्व वाऱ्याला गिळून टाकतो, व ज्याच्या पोटांत आकाश मावतें, ७२ असा अपरिमित काल तो मी, असें लक्ष्मीशीं विलास करणारे श्रीकृष्ण म्हणाले. मग, पुनः म्हणतातः–सृष्टीचा जो उत्पन्नकर्ता, तो मी. ७३

**अन्वयार्थ**—(अहं सर्वहरः मृत्युः अस्मि)–मी सर्वांच्या धनादिकांचें व प्राणांचें हरण करणारा मृत्यु आहें.–(च भविष्यतां उद्भवः)–व पुढें होणाऱ्या उत्कर्षाचा उत्कर्ष–पुढील अभ्युदयाचा हेतु मी आहें.–(च नारीणां)–आणि स्त्रियांतील उत्तम स्त्रिया अशा–(कीर्तिः श्रीः वाक् स्मृतिः मेधा धृतिः क्षमा)–कीर्ति, श्री, वाक्, स्मृति, मेधा–धारणाशक्ति, धृति व क्षमा या देवता मी आहें. ३४

उत्पन्न झालेल्या प्राणिमात्रांचें धारण करणारा, तो मीच; सर्वांचें जीवनही मीच; शेवटीं सर्वांचा संहार करतों, म्हणून मृत्युही मीच असें समज. ७४ आतां, स्त्रीजातीपैकीं माझ्या आणखी सात विभूति आहेत, त्यांचें मी कौतुकानें वर्णन करतों, तें ऐक. ७५ अर्जुना, नित्य नवी कीर्ति ती माझीच मूर्ति; औदार्ययुक्त जी संपत्ति तीही मीच असें जाण; ७६ आणि न्यायाच्या सिंहासनावर बसून विचाराच्या मार्गानें चालणारी जी वाणी, तीही मी. ७७ पदार्थ पाहिल्यानें जिच्या योगानें माझी आठवण होते, ती स्मरणशक्ति मी असें पक्कें समज. ७८ इहलोकीं स्वहिताला अनुकूल असणारी जी बुद्धि ती मी, व या त्रिभुवनांत धृति, ती मी, आणि क्षमाही मी. ७९ संसार गजेंद्राचा नाश करण्यामध्यें केवळ सिंहच असे भगवान् श्रीकृष्ण म्हणालेः–याप्रमाणें स्त्रीजातींत ज्या सात शक्ति आहेत, त्या सर्व मी आहें असें समज. २८०

**अन्वयार्थ**—(तथा साम्नां बृहत्साम) [अहं अस्मि]–त्याचप्रमाणें सामांतील 'बृहत्साम' या नांवाचें साम मी आहें.–(अहं छन्दसां गायत्री)–मी छंदांतील गायत्री छंद आहें.–कारण गायत्री द्विजांच्या दुसऱ्या जन्माची जननी आहे. (अहं मासानां मार्गशीर्षः)–मी चैत्रादि बारा महिन्यांतील मार्गशीर्ष मास आहें, कारण तो महिना परिपक्व धान्यानें युक्त असतो व–(ऋतूनां कुसुमाकरः)–वसंतादि ऋतूंतील मी वसंत आहें. ३५.

श्रीरमापति म्हणतातः–हे मित्रश्रेष्ठा, वेदांमध्यें असलेल्या सामवेदांत बृहत्साम आहे तें मी.

१ घ्यावें. २ एकदम. ३ कालत्रयीं. ४ सर्वत्र सारखा असलेला. ५ वेदान्त, ब्रह्मविद्या. ६ सकळ शास्त्रांची एकवाक्यता होऊन. ७ निश्चित करतां, मर्यादित करतां. ८ तर्कास. ९ बळ. १० माशीपासून तों ब्रह्मदेवापर्यंत. ११ विरघळवी, नाशी. १२ प्रलयीं सर्व समुद्रमय झालेल्या स्थितीस. १३ लक्ष्मीशीं लीला करणारा श्रीकृष्ण. १४ उत्पन्नकर्ता. १५ कौतुकानें. १६ सिंहासनीं. १७ स्मरणशक्ति. १८ अपाय न करणारी. १९ बुद्धि, धारणाशक्ति. २० धैर्य. २१ संसाररूप हत्तीला मारणारा सिंह–श्रीकृष्ण. २२ सर्व वेदांमधील. २३ स्तोत्र–यांत ईश्वराची स्तुति आहे.

प्राणेश्वरु। ८१ गायत्रीछंद जे म्हणिजे। तें सकळां छंदांमाजि माझें। स्वरूप हें जाणिजे। निभ्रांत तुवां ८२ मासांआंत मार्गशीरु। तो मी म्हणे शार्ङ्गधरु। ऋतूंमाजि कुसुमाकरु। वसंतु तो मी ८३

द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्। जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम्॥३६॥
वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः। मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः॥३७॥

छळितयां विंदाणा-। माजि जूं तें मी विचक्षणा। म्हणोनि चोहटां चोरी पारि कवणा। निवारूं न ये ८४ अगा अशेषांही तेजसां-। आंत तेज तें मी भरंवसा। विजयो मी कार्योद्देशां। सकळांमाजी ८५ जेणें चोखाळँत दिसे न्याय। तो व्यवसायांत व्यवसाय। माझें स्वरूप हें राय। सुरांचा म्हणे ८६ सत्त्वाथिलियांआंतु। सत्त्व मी म्हणे अनंतु। यादवांमाजि श्रीमंतु। तोचि तो मी ८७ जो देवकी वसुदेवास्तव जाहला। कुमारीसाठीं गोकुळीं गेला। तो मी प्राणासकट पियाला। पूतनेतें ८८ नुघडतां बाळपणाची फुंली। जेणें मियां अदानवीं सृष्टि केली। करीं गिरि धरूनि उमाणिली। महेंद्रमहिमा ८९ कालिंदीचें हृदयशल्य फेडिलें। जेणें मियां जळत गोकुळ राखिलें। वासरुवां-साठीं लाविलें। विरंचीसें पिसें २९० प्रथसदशेचिये पहांटे-। माजि कंसाऐशीं अचाटें। महाधेंडीं अवचटें। लीळाचि नासिलीं ९१ हें काय कितीएक सां-गावें। तुवांही देखिलें ऐकिलें असे आघवें। तरि यादवांमाजि जाणावें। हेंचि स्वरूप माझें ९२ आणि सोमवंशीं तुम्हां पांडवां-। माजि अर्जुन तो मी जाणावा। म्हणोनि एकमेकांचिया प्रेमभावा। बिघडु न पडे ९३ संन्यासी तुवां होऊनि जनीं। चोरूनि नेली माझी भगिनी। तऱ्ही विकल्पु नुपजे मनीं। मी तूं दोन्ही स्वरूप एक ९४ मुनीआंत व्यासदेवो। तो मी म्हणे यादवरावो। कवीश्वरांमाजि धैर्या ठावो। उशनाचार्य तो मी ९५

दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम्। मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम्॥३८॥

अगा दमितयांमाझारी। अनिवार दंडु तो मी अवधारीं। जो मुंगियेलागोनि ब्रह्मावेरीं। नियमित पावे ९६ पैं सारासार निर्धारितयां। धर्मज्ञानाचा पक्षु धरितयां। सकळ शास्त्रांमाजि ययां। नीतिशास्त्र तें मी ९७ आघवियाचि गूढां-। माजि मौन तें मी सुहाडा। म्हणोनि न बोलतयां पुढां। स्रष्टाही नेणें होय ९८ अगा ज्ञानियांचिया ठायीं। ज्ञान तें मी पाहीं। आतां असो हें येयां कांहीं। पार न देखों ९९

यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन। न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम्॥३९॥

८१ सर्व छंदांत गायत्री म्हणून जो छंद आहे, तें माझें स्वरूप आहे, असें तूं निःसंशय जाण. ८२ श्रीकृष्ण म्हणतातः–सर्व महिन्यांमध्यें मार्गशीर्ष मास तो मी; व ऋतूंमध्यें पुष्पांची वृद्धि करणारा जो वसंत, तो मी. ८३

**अन्वयार्थ**—(अहं छलयतां द्यूतं अस्मि)–मी फसविणाऱ्या वस्तूंतील–फांशांनीं खेळणें–द्यूत आहें.–(अहं–तेजस्विनां तेजः)–मी तेजस्वी लोकांतील तेज आहें.–[अहं] (जयः अस्मि)–मी विजयीजनांचा जय आहें.–(व्यवसायः) [अस्मि]–व्यवसायी जनांचा मी व्यवसाय आहें.–(सत्त्ववतां सत्त्वं अहं) [अस्मि]–सात्त्विक लोकांचें सत्त्व मी आहें.–(अहं वृष्णीनां वासुदेवः अस्मि)–मी वृष्णींच्या मध्यें वासुदेव आहें.–(पांडवानां धनंजयः)–पांडवांमध्यें धनंजय आहें–(अहं मुनीनां अपि व्यासः)–मुनींमध्येंहि मी व्यास आहें.–(कवीनां उशना कविः)–[अस्मि]–सर्वज्ञ विद्वानांतील शुक्राचार्य या नांवाचा कवि–सर्वज्ञ मी आहें. ३६–३७

हे शहाण्या अर्जुना, दुसऱ्यास फसविण्याचे जे प्रकार आहेत, त्यांत जुगार म्हणून जी विद्या आहे, ती माझी विभूति. म्हणूनच, चोहोटयावर जुगाररूप चोरी चालली असतां कोणाला निवारण करितां येत नाहीं. ८४ अरे, सर्व सतेज पदार्थांत तेज म्हणून जी वस्तु आहे, तीं मी असें पक्कें समज; आणि सर्व आरंभिलेल्या कार्यांत ज्याची इच्छा असते, तो जय मी. ८५ देवश्रेष्ठ श्रीकृष्ण म्हणालेः–नीति न सोडतां सर्व उद्योगांत जो उद्योग तें माझें स्वरूप आहे. ८६ सत्त्वधीरांत सत्त्व मी, व यादवांत जो श्रीमंत तो मी असें श्रीअनंत म्हणाले. ८७ जो देवकी वसुदेवांकरितां जन्म घेऊन यशोदेच्या मुलीकरितां गोकुळांत गेला; व ज्यानें स्तनपान करण्याच्या निमित्तानें पूतना राक्षसीचें प्राणहरण केलें, तो मी. ८८ बाळपणाची कळी उमललीं नाहीं तोंच ज्यानें दैत्यरहित पृथ्वी केली, व हातांवर गोवर्धन पर्वत धारण करून इंद्राचा गर्व हरण केला, ८९ ज्यानें यमुनेंतील कालिय सर्पाचें मर्दन करून तिचे हृदयांतील दुःख निवारण केलें; [कालियमर्दनाच्या समयीं सर्व लोक गोकुल सोडून यमुनेच्या कांठीं आले असतां त्यांस जाळणारा अग्नि भक्षण करून ज्यानें त्यांचें संरक्षण केलें;] आणि ब्रह्मदेवानें गोपबालकें व वासरें यांचें हरण करून नेल्यावर, तीं सर्व दुसरीं उत्पन्न करून त्यास ज्यानें वेड लावलें; २९० बालदशेच्या आरंभीं कंसचाणूरादिक मोठमोठीं धेंडें ज्यानें सहज मारलीं, ९१ अशा तुला किती गोष्टी सांगूं? तूं सुद्धां असल्या गोष्टी पुष्कळ ऐकल्या व पाहिल्या आहेस. म्हणून यादवांत अशी ज्याची कृति आहे, तेंच स्वरूप माझें होय; ९२ आणि सोमवंशांत तुमच्या पांडवांत जो अर्जुन, तो मी असें समज; म्हणूनच तुझ्या व माझ्या प्रेमभावांत अंतर पडत नाहीं. ९३ तूं (लोकदृष्टया) संन्यासी होऊन माझी भगिनी सुभद्रा हिला हरण करून नेलेंस, तरी तुझ्याबद्दल माझ्या मनांत संशय उत्पन्न झाला नाहीं. कारण, तुझें व माझें स्वरूप एकच आहे. ९४ सर्व मुनींत श्रेष्ठ असे जे व्यास मुनी, ते मी; व सर्व कवींत श्रेष्ठ जे उशनाचार्य ते मी, असें यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण म्हणाले. ९५

**अन्वयार्थ**—[अहं] (दमयतां दण्डः अस्मि)–मी दमन करणारांतील दंड आहें.–(जिगीषतां नीतिः अस्मि)–जयाची इच्छा करणांमध्यें मी नीति आहें.–(गुह्यानां च एव मौनं अस्मि)–आणि गुह्यांतील मौन मी आहें.–(ज्ञानवतां ज्ञानं अहं) [अस्मि]–ज्ञानवानांतील ज्ञान मी आहें. ३८

अरे, शिक्षेंत जी मोठी शिक्षा, जी मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांस सारखें शासन करते, ती मी असें समज. ९६ सारासार विचार करून ज्या शास्त्रांत धर्मज्ञानाचें अनुकरण केलेलें असतें, तें सकल शास्त्रांतील नीतिशास्त्र मी. ९७ हे बलवान् अर्जुना, सर्व गुह्य गोष्टींत मौन तें मी. म्हणून मौन धारण करणारापुढें ब्रह्मदेव देखील अज्ञानी ठरतो. ९८ अरे, ज्ञान्यांच्या ठिकाणीं जें ज्ञान आहे, तें मी असें समज. आतां विभूतिविस्तार राहूं दे; कारण, कांहीं केलें तरी या विभूतींचा अंत लागणार नाहीं. ९९

**अन्वयार्थ**—(अर्जुन)–हे अर्जुना!–(अपि च)–याशिवाय–(यत् सर्वभूतानां बीजं)–जें सर्व भूतांचें बीज–(तत्)–तें–(अहं) [अस्मि]–मी आहें.–(यत् चराचरं भूतं)–जें चर किंवा स्थिर भूत–प्राणी–(मया विना स्यात्)–माझ्यावांचून असेल–(तत्)–तें–(न अस्ति)–नाहींच. ३९

१ पुष्पांची खाण. २ फसवण्याच्या. ३ प्रकारांत. ४ जुगार. ५ चवाटयावर. ६ तेजस्वी पदार्थांमध्यें. ७ निर्मळ. ८ उद्योग, व्यापार. ९ सात्त्विकामध्यें. १० कळी, मुद्रा. ११ दैत्यरहित. १२ मोजली. १३ इंद्राची शक्ति. १४ यमुनेचें. १५ अंतःकरणांतील दुःख, कालिया सर्प. १६ ब्रह्मदेवास. १७ अगदीच बालदशेंत. १८ सहज. १९ भेद. २० शुक्राचार्य. २१ ब्रह्मदेवापर्यंत. २२ अनुक, वेळच्या वेळीं. २३ बलवंता, अर्जुना. २४ ब्रह्मदेव. २५ अज्ञानी. २६ विभूतींना.

नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप । एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥

पैं पर्जन्याचिया धारां। वरी लेखं करवेल धनुर्धरा। कां पृथ्वीचिया तृणांकुरां। होईल ठी ३०० पैं महोदधीचिया तरंगां। व्यवस्था धरूं नये जेवीं गा। तेवीं माझिया विशेषलिंगां। नाहीं मिती १ ऐशियाही सातपांच प्रधाना। विभूती सांगितलिया तुज अर्जुना। तो हा उद्देशु जो गा मना। आहाचि गमला २ येरां विभूतिविस्तारांसि कांहीं। एथ सर्वथा लेखं नाहीं। म्हणोनि परिससीं तूं काई। आम्ही सांगों किती ३ यालागीं एकिहेळां तुज। दाऊं आतां वर्म निज। तरी सर्वभूतांकुरें बीज। विरूढत असे तें मी ४ म्हणोनि सानें थोर न म्हणावें। उंच नीच भाव सांडावे। एक मीचि ऐसें मानावें। वस्तुजातातें ५ तरी यावरी साधारण। आईक पां आणिकही खूण। तरी अर्जुना ते तूं जाण। विभूति माझी ६

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंशसंभवम् ॥४१॥

जेथ जेथ संपत्ति आणि दया। दोन्ही वसती आलिया ठाया। ते ते जाण धनंजया। विभूति माझी ७

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन। विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥४२॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥१०॥

अथवा एकलें एक बिंब गगनीं। परी प्रभा फांके त्रिभुवनीं। तेवीं एकाकियाची सकळ जनीं। आज्ञा पाळिजे ८ तयातें एकलें झणी[११] म्हण। तो निर्धन या भाषा नेण। काय कामधेनूसवें सर्वस्व हनें[१२]। चालत असे ९ तियेतें जे जेधवां जो मागे। तें ते[१३] एकसरेंचि प्रसवों लागे। तेवीं विश्वविभवतया आंगें। होऊनि असती ३१० तयातें वोळखावया हेचि संज्ञा। जे जगें नमस्कारिजे आज्ञा। ऐसें आथि ते जाण प्राज्ञा। अवतार माझे ११ आणि सामान्य विशेष। हें जाणणें एथ महादोष। कां जे मीचि एक अशेष। विश्व हें म्हणोनि १२ तरी आतां साधारण आणि चांगु। ऐसा कैसेनि पां कल्पावा विभागु। वायां आपुलिये मती वंगु। भेदाचा लावावा १३ एऱ्हवीं तूप कासया घुसळावें। अमृत कां रांधूनि अर्धे करावें। हां गा वायूसि काय पां डावें। उजवें आंग आहे १४ पैं सूर्यबिंबासि पोट पाठीं। पाहतां नासेल आपुली दिठी[१८]। तेवीं माझ्या स्वरूपीं गोठी[१९]। सामान्यविशेषाची नाहीं १५ आणि सिनोंना इहीं विभूतीं। मज अपारातें मविसीलें किती। म्हणोनि किंबहुना सुभद्रापती। असो हें जाणणें १६ आतां पैं माझेनि एकें अंशें। हें जग व्या-

अन्वयार्थ—(परंतप)-अर्जुना-(मम)-माझ्या-(दिव्यानां विभूतीनां)-दिव्य-अलौकिक विभूतींचा-विस्तारांचा-(अन्तः) -अन्त-सीमा-(न अस्ति)-नाही-(तु)-परंतु-(एषः)-हा-(विभूतेः विस्तरः)-विभूतीचा विस्तार-(मया)-मीं-(उद्देशतः) -संक्षेपानें-थोडासा-(प्रोक्तः)-सांगितला आहे. ४०

हें पहा अर्जुना, पावसाच्या धारांची गणना करितां येणें शक्य आहे का? नाही. किंवा पृथ्वीवरील गवतांच्या काड्यांची संख्या करता येईल का? तेंही नाहीं. ३०० आणि शिवाय असें कीं, समुद्राच्या वरील लाटांची मात्र केव्हांही गणती करतां येणार नाहीं, त्याप्रमाणें माझ्या गुणविशेष विभूतींची गणती करतां येणार नाहीं. १ अर्जुना, असें असतांही तुला माझ्या पंचाहत्तर मुख्य मुख्य विभूति सांगितल्या. परंतु ही जी माझ्या विभूति समजण्याविषयीं तुला इच्छा उत्पन्न झाली, ती सामान्य अशी मला वाटली. २ कारण, माझ्या इतर विभूतींचा केवढा विस्तार आहे, याचा पत्ता नाहीं. म्हणून त्या तूं ऐकणार काय? व मी सांगणार तरी किती? ३ याकरितां तुला एकवार आम्ही आपलें मर्म सांगतों कीं, ज्या बीजापासून भूतांचे अंकुर फुटतात, तें बीज मी आहें. ४ म्हणून, लहानमोठें असें कांहीं न मानतां उचनीच हे सर्व भाव टाकून सर्व वस्तूंच्या ठिकाणीं मीच आहें, असें मान. ५ अर्जुना, यापेक्षांही सर्वसाधारण अशी एक खूण तुला सांगतों, ती ऐक. तिच्या योगानें माझ्या विभूति तुला ओळखतां येतील. ६

अन्वयार्थ—(यत् यत्)-जें जें-(विभूतिमत्)-ऐश्वर्ययुक्त -(श्रीमत्)-समृद्धि किंवा कांति यांनीं युक्त-(वा)-किंवा-(ऊर्जितं) -बलाढ्य-(सत्त्वं)-[अस्ति]-सत्त्व-वस्तु-मात्र आहे-(तत् तत् एव)-तें तेंच-(त्वं)-तूं-(मम तेजोंऽशसंभवं)-माझ्या तेजाच्या अंशापासून झालेलें-(अवगच्छ)-जाण. ४१

धनंजया, ज्या ज्या ठिकाणीं संपत्ति आणि दया यांचें वास्तव्य आहे, त्या त्या ठिकाणीं माझा अंश आहे असें समज. ७

अन्वयार्थ (अथवा)-किंवा-(अर्जुन)-हे पार्था!- (बहुना एतेन ज्ञातेन)-हें असें पुष्कळ जरी तूं जाणलेंस, तरी- (तव किं)-तुला काय लाभ होणार?-(अहं)-मी-(इदं कृत्स्नं जगत्)-हें सर्व जगत्-(एकांशेन)-आपल्या एका अंशानें- (विष्टभ्य)-दृढ धारण करून-(स्थितः)-[अस्मि]-राहिलों आहें. ४२

अथवा आकाशांत सूर्याचें बिंब एकच असून त्याची ज्याप्रमाणें त्रिभुवनांत प्रभा फांकते, त्याप्रमाणें, ज्या एकट्याची सर्व जन आज्ञा पाळतात; ८ त्या महानुभावाला एकटा असें म्हणूं नको, व निर्धन असेंही म्हणूं नको; हें पहा-दुसऱ्याची इच्छा तृप्त करण्याकरितां कामधेनूला आपल्या बरोबर कांहीं सामग्री का घ्यावी लागते? ९ तिला ज्या वेळेस कोणी जें कांहीं मागेल, तें ती एकदम देते; त्याप्रमाणें माझ्या विभूतींच्या अंगांत सर्व ऐश्वर्य भरलेलें आहे. ३१० त्यांना माझी हीच विभूति ओळखण्याची खूण आहे असें जाण. अर्जुना, ज्यांच्या आज्ञा सर्व लोक शिरसा मान्य करतात असें तुझ्या दृष्टीस पडेल, त्या विभूति म्हणजे माझे अवतार आहेत असें समज. ११ हें सामान्य, हें विशेष असा भेद मानणें महादोष आहे. कारण, या सर्व विश्वांत मीच एकटा भरलेला आहे. १२ तर असें असतां सामान्य आणि विशेषच असा भेद कल्पून उगीच आपल्या बुद्धीस कलंक कां लावून घ्यावा? १३ तूप व्यर्थ कां घुसळावें? अमृताला शिजवून निमें कां आटवावें? तसेंच वायूला उजवें व डावें अंग आहे का? १४ सूर्यबिंबाचा पुढील व पाठीमागील भाग पाहूं लागलें असतां ज्याप्रमाणें आपली दृष्टि मात्र नाहींशी होईल, (तो सर्व प्रकाशमयच असल्यामुळें त्याला पुढें व मागें असा बाजू नाहींत; व त्याकडे पाहूं लागलें म्हणजे आपलेच डोळे मात्र अंधळे होतील!) त्याप्रमाणें माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं साधारण व विशेष असा भेद नाहीं; १५ आणि हे सुभद्रापते, माझ्या ज्या अनंत वेगळाल्या विभूति आहेत त्या तूं किती मोजशील? म्हणून माझ्या विभूति जाणण्याची तुझी इच्छा पुरे कर. १६ आतां हे पहा, माझ्या एका अंशानें हें जग सर्व भरलेलें आहे, म्हणून अभेदबुद्धीनें सर्वत्र

१ गणना. २ निश्चय, गणना. ३ मोठमोठ्या विभूतींना. ४ मोठ्यांशा, सातावर पांच पंचाहात्तर. ५ व्यर्थ, उगीच. ६ इतरां. ७ गणती. ८ एकदम. ९ जगदंकूर. १० लहान

११ मात्र म्हणूं नको. १२ सामुग्री. १३ ती=कामधेनु. १४ एकदम. १५ खूण. १६ उत्तम. १७ कलंक. १८ दृष्टि. १९ विचार, गोष्ट. २० वेगळाल्या. २१ मोजशील.

पिलें असे । यालागीं भेदु सांडुनि सारिसें । साम्ये भज १७ ऐसें विबुधवन-
वसंतें । तेणें विरक्तांचेनि एकांतें । बोलिलें जेथ श्रीमंतें । श्रीकृष्णदेवें १८ तेथ अ-
र्जुन म्हणे स्वामी । येतुलें हें राभॅस्य बोलिलें तुम्हीं । जे भेदु एक आणि आम्हीं ।
सांडावा एकीं १९ हां हो सूर्य म्हणे काय जगातें । अंधारें दवडा कां परौतें ।
तेवीं धसाळ म्हणों देवा तूंतें । तरी अधिक हा बोलु २२० तुझें नामचि एक
कोण्ही वेळे । जयांचिये मुखासि कां कानां मिळे । तयांचिया हृदयातें सांडूनि
पळे । भेदु जी साच २१ तो तूं परब्रह्मचि अंसकें । मज दैवें दिधलासि हस्तो-
दकें । तरी आतां भेदु कायसा कें । देखावा कवणें २२ जी चंद्रबिंबाचा गा-
भारां । रिगालियाँवरीही उबारा । पारि राणेपणें शार्ङ्गधरा । बोला हें तुम्हीं २३
तेथ सावियेचि परितोषेनि देवें । अर्जुनातें आलिंगिलें जीवें[10] । मग म्हणे तुवां
न कोपावें । आमुचिया बोला २४ आम्हीं तुज भेदाचिया वोंहाणीं । सांग-
तली जे विभूतींची कहाणी । ते अभेदें काय अंतःकरणीं । मानिली कीं न
मनें २५ हेंचि पहावयालागीं । नैवेक बोलिलों बाहेरिसवडिया भंगीं[14] । तंव
विभूती तुज चांगी । आलिया बोधा २६ तेथ अर्जुन म्हणे देवें । हें आपुलें
आपण जाणावें । पारि देखतसें विश्व आंघवें । तुवां भरलें २७ पैं राया तो
पांडुसुतु । ऐसिये प्रतीतीसि जाहला वरितु । या संजयाचिया बोला निवांतु ।
धृतराष्ट्र राहे २८ कीं संजयो दुखवलेनि अंतःकरणें । म्हणतसे नवल नव्हे
दैव दवडणें । हा जीवें धार्डसा आहे मी म्हणें । तंव आंतुही आंधळा २९ पारि
असो हे तो अर्जुनु । स्वहिताचा वाढवितसे मानु । कीं याहीवरी तया आनु ।
धिंवसा उपनला २३० म्हणे हेंचि हृदयाआंतुली प्रतीती । बाहेरी अवतरो कां
डोळ्यांप्रती । इये आर्तीचियें पाउलीं मती । उठती जाहली ३१ सियां इ-
हींच दोहीं डोळां । झोंबावें विश्वरूपा सकळा । एवढी हांव तो दैवाआगळा ।
म्हणऊनि करी ३२ आजि तो कल्पतरूची शाखा । म्हणोनि वांझोळें न ल-
गती देखा । जें जें येईल तयाचिया मुखा । तें तें साचचि करीतसे येरें ३३
जो प्रऱ्हादाचिया बोला । विषाही सकट आपणचि जाहला । तो सद्गुरु असे
जोडला । किरीटीसीं ३४ म्हणोनि विश्वरूप पुसावयालागीं । पार्थ रिगतां हो-
ईल कवणें भंगीं[27] । तें सांगेन पुढिलिये प्रसंगीं । ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचा ३३५

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां दशमोऽध्यायः ॥ १० ॥ श्लोक ४२, ओंव्या ३३५.

मीच आहें असें समजून मला भज. ३१७ ज्ञानरूप वनास वसंतऋतुप्रमाणें आनंद देणारा, व विरक्तांना एकांतांत सोबत देणारा असा सकलैश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण परमात्मा याप्रमाणें बोलता झाला; ३१८ तेव्हां अर्जुन म्हणाला, “ प्रभो, ‘ माझ्या विभूतींचे ठिकाणी भेद मानूं नको ’ म्हणून जें तुम्हीं सांगितलें, तें आपल्या थोरपणाला शोभलेंच आहे! कारण, मग भेद निराळा आणि त्याचा त्याग करणारे आम्ही निराळे असें झालें! ३१९ हें पहा सूर्य उगवण्याचे पूर्वी जगाला असें म्हणतो काय, कीं, अंधाराला एका बाजूला घालवून द्या. ( कारण ‘ सूर्य उगवल्याबरोबर अंधकाराचा आपोआप नाश होतो. त्याप्रमाणें, ईश्वरमय सर्व जगत् आहे असें ज्ञान उत्पन्न होण्याबरोबर ईश्वरास जाणणाराही तद्रूपच होतो.) पण देवा, या बाबतींत तुम्हाला अविचारी असें म्हणावें तर अधिक प्रसंग होईल. ३२० प्रभो, तुमचें फक्त नांव जर एक वेळ कोणीं तोंडानें उच्चारलें, किंवा कानांनीं ऐकलें, तर त्याच्या मनांतून खरोखर भेद नाहीसा होतो. ३२१ ते तुम्ही प्रत्यक्ष ब्रह्मच जर माझ्या सुदैवानें माझ्या हातीं आलां आहां, तर तुम्हां आम्हांत भेद म्हणतां तो कोठून असेल व तो कोणी कोठें पहावा? ३२२ हें पहा–एकादानें चंद्रबिंबाच्या गाभाऱ्यांत प्रवेश केल्यावरही त्याला उकाडा व्हायास लागलें, असें जर कोणी म्हटलें तर त्यांत वेडेपणा आहे, पण श्रीकृष्णा, आपण मोठे आहां, तेव्हां ... तसें बोला!” ३२३ हें बोलणें ऐकतांच श्रीकृष्णास अतिशय संतोष झाला, व त्यांनीं अर्जुनाला अंतःकरणपूर्वक आलिंगन देऊन म्हटलें, “ आमच्या बोलण्याचा राग मानूं नको. ३२४ भेद सांगण्याच्या ओघांत आम्ही विभूतींविषयी जे प्रकार सांगितले, ते अभेदरूपानें तुझ्या मनांत ठसले कीं नाहीं, ३२५ हें समजण्याकरितां क्षणभर साक्षात्कारी तसें बोललों, तों माझ्या विभूतीबद्दल तुला चांगला बोध झाला आहे असें दिसलें!” ३२६ तेव्हां अर्जुन म्हणाला, “ देवा, हें आपलें आपणच काय तें पाहून घ्या; पण या विश्वांत सर्वत्र तुम्ही भरलेले आहां असें मला दिसतें.” ३२७ अशा रीतीनें अर्जुन योग्यतेस आला असें संजय सांगत असतां धृतराष्ट्र राजा स्तब्ध बसला होता. ३२८ तेव्हां संजयाच्या मनाला खेद वाटून तो म्हणालाः–सहज लाभ होत असतां तो दवडणें हें नवल नव्हे का? धृतराष्ट्र राजाची ज्ञानदृष्टि शाबूत आहे असें मी समजत होतों; परंतु तसा प्रकार नसून हा बाह्यदृष्टीप्रमाणें ज्ञानदृष्टीनेंही अंधळा आहे. ३२९ परंतु धृतराष्ट्राची गोष्ट असूं द्या. अर्जुन मात्र आपल्या स्वहिताची योग्यता वाढवीत आहे. कां कीं, या गोष्टीपेक्षांही दुसऱ्या एका गोष्टीविषयीं त्याच्या मनांत उत्कंठा उत्पन्न झाली. ३३० व तो म्हणाला, “ सर्व जग ईश्वरमय आहे असा जो माझ्या अंतःकरणांत अनुभव आला आहे, तो माझ्या डोळ्यांसमोर प्रगट व्हावा.” या इच्छेच्या पावलांनीं बुद्धि चालूं लागली. ३३१ तो अधिक दैववान् असल्यामुळें अशी इच्छा करूं लागला कीं, “ याच दोन्ही डोळ्यांनीं मी सकल विश्वरूप पहावें.” ३३२ आज अर्जुन म्हणजे कल्पतरूची केवळ शाखाच आहे; म्हणून त्याला वांझ फुलें कधींही यावयाचीं नाहींत. कारण, त्याच्या तोंडून ज्या ज्या गोष्टी निघतील, त्या श्रीकृष्ण खऱ्या करीत आहेत. ३३३ जो श्रीकृष्ण परमात्मा प्रल्हादाच्या बोलाप्रमाणें विषसुद्धां आपणच बनला, तो सद्गुरु अर्जुनास प्राप्त झाला आहे. ३३४ म्हणून निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतातः–विश्वरूप पुसण्याकरितां पार्थ कशा रीतीनें आरंभ करील, ती कथा आतां पुढील प्रसंगीं सांगेन. ३३५

१ सारिखें, बरोबर. २ ज्ञानी हेंच कोणी वन, त्यास ...रूप अशा श्रीकृष्णानें. ३ थोरपणा. ४ अविचारी. ५ सर्व, ... ६ हातावर उदक घालून. ७ प्रवेश केल्यावरही. ८ ...पणानें, प्रमुखानें. ९ तात्काळ. १० मनानें. ११ मार्गीं ...हीं. १२ क्षणभर. १३ साक्षात्कारी. १४ रीतीनें, प्रकारानें. १५ सर्व. १६ अनुभवाला. १७ योग्यतेस आला. १८ डोळस. १९ उत्कंठा, धैर्य. २० उत्पन्न झाला. २१ प्रगट होवो. २२ इच्छेच्या. २३ बिलगावें, आलिंगन द्यावें. ( पहावें ). २४ मोठ्या दैवाचा. २५ श्रीकृष्ण. २६ पुढें सरेल, आरंभ करील. २७ रीतीनें. २८ अध्यायांत.

# ज्ञानेश्वरी

## अध्याय अकरावा.

आतां यावरी एकादशीं । कथा आहे दोन्ही[1] रसीं । येथ पार्थी विश्वरूपेंसीं । होईल भेटी १ जेथ शांतां[2]चिया घरा । अद्‍भुत आला आहे पाहुणेरा[3] । आणि येरांही रसां पांतिकरां[5] । जाहला मानु २ अहो वधुवरांचिये मिळणीं[6] । जैशीं वराडियांही लुगडीं लेणीं । तैसे देशियेच्या सुखासनीं । मिरवले रस ३ पारि शांताद्‍भुत बरवे । जे डोळियांच्या अंजळीं[11] घ्यावे । जैसे हरिहर प्रेमभावें । आले खेंवों[12] ४ नातरी अंवसेच्या दिवशीं । भेटलीं बिंबें[13] दोनी जैशीं । तेवीं एकवळा[14] रसीं । केला एथ ५ मीनले[15] गंगेयमुनेचे ओघ । तैसें रसां जाहलें प्रयाग । म्हणोनि सुस्नात[16] होत जग । आघवें एथ ६ माजीं गीता सरस्वती गुप्त । आणि दोनी रस ते ओघ मूर्त । यालागीं त्रिवेणी हे उचित । फावली बापा ७ एथ श्रवणा[17]चेनि द्वारें । तीर्थी रिघतां सोपारें । ज्ञानदेव म्हणे दातारें[18] । माझेनि केलें ८ तीरें संस्कृताचीं गहनें[19] । तोडोनि मऱ्हाठिया शब्द[20]सोपानें । रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ९ म्हणोनि भलतेणें एथ सद्भावें नाहावें । प्रयागमाधव विश्वरूप पहावें । येतुलेनि संसारासि द्यावें । तिळोदक[22] १० हें असो ऐसें सावयव[23] । एथ सासिन्नले[24] आथी[25] रसभाव । तेथ श्रवणसुखाची रौं[26]णीव । जोडली जगा ११ जेथ शांताद्‍भुत रोकडे । आणि येरां रसां पडिप[27] जोडे । हें अल्पचि परी उघडें । कैवल्य[28] येथ १२ तो हा अकरावा अध्यावो । जो देवाचा आपणपें विसंवता[29] ठावो । परि अर्जुन सदैवांचा[30] रावो । जे एथही पातला १३ एथ अर्जुनाचि काय म्हणों पातला । आजि आवडतयाही[31] सुकाळु जाहला । जे गीतार्थु हा आला । मऱ्हाठिये १४ याचिलागीं माझें । विनविलें आइकिजे । तरी अवधान दीजे । सज्जनीं तुम्हीं १५ तेवींचि तुम्हां संतांचिये सभे । ऐसी सलगी कीर करूं नलभे[32] । पारि मानावें जी तुम्हीं लोभें । अपत्या मज १६ अहो पुंसौं[33] आपणचि पढविजे । मग पढे तरी माथा तुकिजे[34] ।

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय अकरावा.

आतां ह्यापुढें अकराव्या अध्यायांत जो कथाभाग आहे, तो शांत व अद्‌भुत या दोन रसांनीं भरलेला आहे; आणि या ठिकाणीं भगवंताचें विश्वरूप अर्जुनाच्या दृष्टीस पडेल. १ या ठिकाणीं शांतरसाच्या घरीं अद्‌भुतरस हा पाहुणा आलेला असून, त्याच्याबरोबर इतर रसांनाही पंक्तीचा लाभ मिळाला. २ वधुवरांच्या लग्नांत ज्याप्रमाणें वऱ्हाड्यांनाही वस्त्रालंकारांनीं भूषित होऊन मिरवावयास सांपडतें, त्याप्रमाणें देशी भाषेच्या सुखासनावर सर्व रसांस मिरवणुकीचा लाभ मिळाला आहे. ३ परंतु त्या सर्वांत शांतरस व अद्‌भुत हे असे शोभले कीं, डोळ्यांनीं प्रत्यक्ष पहावें, अशा प्रकारें कीं जणुंकाय शंकर व विष्णु हे प्रेमभावानें एकमेकांस आलिंगन देण्याकरितांच आले आहेत. ४ किंवा आमावास्येच्या दिवशीं ज्याप्रमाणें सूर्य व चंद्र यांचीं दोन्हीं बिंबें एके समयीं भेटावीं; त्याप्रमाणें शांत व अद्‌भुत यांचें ऐक्य झालें आहे. ५ किंवा ज्याप्रमाणें गंगा व यमुना या दोन नद्यांचे ओघ प्रयागास मिळाले आहेत, त्याप्रमाणें शांत व अद्‌भुत हे दोन्ही रस एकत्र मिळून अकरावा अध्याय हा प्रयागच बनला आहे; म्हणून हा अध्याय ऐकल्यानें सर्व जगांतील मुमुक्षु जन पवित्र होतात. ६ या दोन रसांच्या संगमांत गीतारूप तिसरी सरस्वती नदी गुप्त आहे; शांत आणि अद्‌भुत हे दोन्ही रस गंगायमुनांच्या ओघांप्रमाणें मूर्तिमंत आहेत; म्हणून, बाबांनो, अकरावा अध्याय हा त्रिवेणीसंगमाचा योग आला आहे, असें समजा. ७ या ठिकाणीं श्रवणेंद्रियाच्या द्वारानें या तीर्थांत शिरणें फार सोपें आहे. [त्रिवेणीसंगमाप्रमाणें येथें बुडण्याची भीति नाहीं.] ज्ञानदेव म्हणतातः हा इतका सोपा मार्ग—आमचे गुरु जे निवृत्तिनाथ त्यांनीं केला आहे; ८ या गीतारूप तीर्थाचें संस्कृत भाषारूप तीर कठीण असल्यामुळें, तें तोडून व तेथें मराठी भाषारूप पायऱ्यांचे सोपे घाट करून श्रीनिवृत्तिदेवांनीं केवळ धर्माच्या ठेवीच केल्या आहेत. ९ म्हणून, वाटेल त्यानें या तीर्थांत भक्तिभावानें स्नान करावें; व ज्याप्रमाणें प्रयागास माधवाचें दर्शन होतें त्याप्रमाणें एथें श्रीभगवंताच्या विश्वरूपाचें दर्शन घ्यावें, आणि जन्ममरणरूप संसाराला तिलांजळी द्यावी. १० फार काय सांगावें! या अकराव्या अध्यायांत सर्व रस मूर्तिमंत उभे आहेत, व त्या ठिकाणीं जगाला श्रवणसुखाची रेलचेल झाली आहे. ११ या ठिकाणीं शांत व अद्‌भुत रस हे प्रत्यक्ष दिसत असून इतर रसांचीही शोभा दृष्टीस पडत आहे, पण ही उपमा देखील हलकीच आहे; तर या ठिकाणीं उघड उघड मोक्षसुखच प्राप्त होतें. १२ तो हा अकरावा अध्याय स्वतः देवांचें विश्रांतिस्थान आहे; पण अर्जुन हा भाग्यवानांचा मुगुटमणिच आहे. कारण, तो या अशा ठिकाणीं देखील येऊन पोहोंचला आहे. १३ या ठिकाणीं अर्जुनच आला म्हणून कशाला म्हणावें? तर गीतेचा अर्थ मराठींत झाल्यामुळें वाटेल त्या मनुष्यास येथील सुखाचा सुकाळ झाला आहे. १४ याजकरितां माझी विनंति ऐका कीं, तुम्हीं सज्जनांनी इकडे लक्ष द्यावें. १५ तुम्हां संतांच्या सभेपुढें मी इतक्या सलगीनें बोलणें योग्य नाहीं; परंतु तुम्हीं मला प्रेमानें आपल्या लेंकराप्रमाणें मानावें. १६

---

१ शांत व अद्‌भुत या दोन्ही रसांत. २ शांतरसाच्या. ३ मेजवानीस, पाहुणचारास. ४ इतरहि. ५ पंक्तीस आलेल्यांस. ६ लग्नसमारंभांत. ७ अलंकार. ८ मराठी भाषेच्या. ९ पालखींत. १० शोभले. ११ ओंजळींत. १२ आलिंगनास. १३ सूर्यचंद्र बिंबें. १४ एकोपा. १५ मिळाले. १६ पवित्र. १७ कर्णेंद्रियद्वारां. १८ निवृत्तिनाथानें, दात्यानें. १९ कठीण. २० शब्दरूपी घाट, जिना. २१ कोणींहि. २२ तिलांजळी, फांटा. २३ मूर्तिमंत. २४ भरास आले. २५ आहेत. २६ राज्य. २७ महत्त्व. २८ मोक्षसुख. २९ विश्रांतिस्थान. ३० भाग्यवानाचा. ३१ वाटेल त्याला. ३२ योग्य नाहीं. ३३ रापूला. ३४ डोलवावा.

कां करविलेनि चोजें न रिझे। बाळका माय १७ तेवीं मी जें जें बोलें। तें प्रभु तुमचेंचि शिकविलें। म्हणोनि अवधारिजो आपुलें। आपण देवा १८ हें सारस्वताचें गोड। तुम्हींच लाविलें जी झाड। तरी आतां अवधानामृतें वाड। सिंपोनि कीजे १९ मग हें रसभाव फुलीं फुलेल। नानार्थ फळभारें फळा येईल। तुमचेनि धर्में होईल। सुरवाडु जगा २० या बोला संत रिझले। म्हणती तोषलों गा भलें केलें। आतां सांगें जें बोलिले। अर्जुनें तेथ २१ तंव निवृत्तिदास म्हणे। जी कृष्णार्जुनांचें बोलणें। मी प्राकृत काय सांगों जाणें। परि सांगवा तुम्ही २२ अहो रानींचिया पालेखाइरा। नेवोंणें करविले लंकेश्वरा। एकला अर्जुन परी अक्षौहिणी अकरा। न जिणेची[12] काई २३ म्हणोनि समर्थ जें जें करी। तें न हो[13] न ये चराचरीं। तुम्ही संत तयापरी। बोलवा मातें २४ आतां बोलिजतसें आइका। हा गीताभाव निका। जो श्रीवैकुंठनायका-। मुखौनि निघाला २५ बाप[15] बाप ग्रंथ गीता। जो वेदीं प्रतिपाद्य देवता। तो श्रीकृष्ण वक्ता। जिये ग्रंथीं २६ तेथिंचें गौरव कैसें वानावें। जें श्रीशंभूचिये मती[17] नागवे। तें आतां नमस्कारिजे जिवेंभावें। हेंचि भलें २७ मग आइका तो किरीटी। घालूनि विश्वरूपीं दिठी। पहिली कैसी गोठी। करिता जाहला २८ हें सर्वही सर्वेश्वरु। ऐसा प्रतीतिगर्त जो पतिकरु। तो बाहेरी होआवा गोचरु। लोचनांसी २९ हे जिवाआंतुली चाड। परि देवासि सांगतां सांकड। कां जें विश्वरूप गूढ। कैसेनि पुसावें ३० म्हणे मागां कवणीं कहीं। जें पढियंतेनें पुसिलें नाहीं। तें सहसा कैसें काई। सांगा म्हणों ३१ मी जरी सलगीचा चांगु। तरी काय आईसीहूनि अंतरंगु। परि तेही हा प्रसंगु। बिहाली पुसों ३२ माझी आवडे तैसी सेवा जाहली। तरि काय होईल गरुडाचिया येतुली। परि तोंही हे बोली। करीचिना ३३ मी काय सनकादिकांहूनि जवळां। परि तयांही नागवेचि हा चाळा। मी आवडेन काय प्रेमळां[28]। गोकुळींचिया ऐसा ३४ तयांतेंही लेंकुरपणें झकविलें। एकाचे गर्भवासही साहिले। परि विश्वरूप हें रांहविलें। न दावीच कवणा ३५ हा ठायवरी गुंज। याचिये अंतरींचें हें निज। केवीं उरराउरी मज। पुसों ये पां ३६ आणि न पुसेंचि जरी म्हणें। तरी विश्वरूप देखिलियाविणें। सुख नोहेचि परि जिणें[35]। तेंही विपायें ३७ म्हणोनि आतां पुसों अळुमाळसें। मग करूं देवा आवडे तैसें। येणें

अहो, राघूस आपणच पढवितों आणि तोच आपण पढविलेलें बोलल्यावर आपल्यास मान डोलवावी लागते; किंवा आई आपल्या लेंकराकडून कौतुक करवून तें पाहून रिझत नाहीं का ? १७ त्याचप्रमाणें, प्रभो, मी जें जें कांहीं बोलेन, तें तुम्हींच मला शिकविलें आहे, म्हणून, देवा, आपलें बोलणें आपणच श्रवण करावें. १८ माझें भाषण म्हणजे तुम्हींच लावलेलें गोड असें एक ज्ञानाचें झाड आहे. तर याला एकाग्र अंतःकरणरूप पाण्यानें शिंपून वाढवावें. १९ मग या झाडाला नवरसादि फुलें येऊन तें फुलेल; पुष्कळ प्रकारच्या अर्थरूप फलभारानें लवेल; व तुमच्या या धर्मानें सर्व जगास सुखप्राप्ति होईल. २० असें बोलल्यावर संतजन प्रसन्न होऊन म्हणाले, "आम्ही तुझ्या बोलण्यानें संतोष पावलों, आतां अर्जुन काय बोलला तेवढें सांगा." २१ तेव्हां निवृत्तीचे दास ज्ञानदेव म्हणालेः–कृष्णार्जुनांचा संवाद मला प्राकृताला कसा सांगतां येईल ? पण तुम्ही मला शक्ति दिली, तर मी सांगेन. २२ अहो रानावनांतील पाला खाणाऱ्या वानरांकडून लंकाधीश रावणाचाही पराभव करविला, त्याचप्रमाणें एकट्या अर्जुनाकडून कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य जिंकविलें नाहीं काय ? २३ जगतामध्यें समर्थ जें करावयाचें मनांत आणतील तें होणार नाहीं असें नाहीं; त्याचप्रमाणें आपणही समर्थ आहां, तर माझ्याकडून गीतार्थ बोलवाल. २४ आतां वैकुंठनायक श्रीकृष्णाच्या मुखांतून जो गीतेचा खरा भावार्थ निघाला, तो मी तुम्हांला सांगतों, इकडे लक्ष असूं द्या. २५ धन्य धन्य तो गीता ग्रंथ ! कारण वेद ज्या परमात्म्याचें प्रतिपादन करितात; तो परमात्मा या गीतेचा वक्ता आहे. २६ ज्या गीताशास्त्राचें महत्त्व शंकराच्या बुद्धीलाही आकलन होत नाहीं, त्या गीताशास्त्राचें महत्त्व मी कसें वर्णन करावें; म्हणून तें गीताशास्त्र जीवाभावानें वंदन करावें हेंच चांगलें. २७ असो. पुढें त्या अर्जुनानें विश्वरूप पाहण्याची मनांतील इच्छा तृप्त करून घेण्याकरितां श्रीकृष्णावरोबर चतुराईनें बोलण्याचा कसा उपक्रम केला, तें ऐका. २८ हें सर्व जग ईश्वररूप आहे अशा प्रतीतीला पोंचलेला जो सेवक अर्जुन त्यास बाहेरच्या दृष्टीलाही तशी ईश्वरप्रतीति यावी, २९ अशी त्याच्या मनांतील इच्छा ! परंतु तसें स्पष्ट देवास सांगण्याचें त्यास संकट पडलें. कारण तें देवाचें गुह्य विश्वरूप आपण दाखवितां कां असें एकदम कसें विचारावें ? ३० तो मनांत म्हणतोः–पूर्वी कोणत्याही आवडत्या भक्तानें जें कधींही पुसलें नाहीं, तें विश्वरूप मला दाखवा असें एकाएकी कसें म्हणावें ! ३१ मी जरी देवांच्या विशेष सलगींतला असलों, तरी आईपेक्षां जास्त अंतरंग होईन का ! पण ती देखील हें विचारावयास भ्याली ! ३२ मी जरी यांची हवी तेवढी सेवा केली असली, तरी माझ्यानें गरुडाची बरोबरी करवेल का ? पण त्या गरुडानेंही या विश्वरूपाचें नांव काढलें नाहीं. ३३ मी सनकादिकांपेक्षां का देवांच्या सान्निध वास करणारा आहें ? पण त्यांना देखील हा चाळा सुचला नाहीं. तसेंच, मी गोकुळींच्या भाविक गोपगोपींपेक्षां देवाला जास्ती आवडता आहें काय ? ३४ पण त्या गोकुळांतील लोकांनाही यांनीं आपण लेंकरूं आहों, अशा समजुतीनें फसविलें, व अंबरूपादिकांकरितां गर्भवास भोगला; पण आपलें विश्वरूप कोणासही न दाखवितां गुप्त ठेविलें. ३५ एवढी श्रीकृष्णाच्या अंतर्यामींची गुह्य गोष्ट मला एकदम कशी पुसतां येईल ! ३६ बरें, पुसूं नये, तर विश्वरूप पाहिल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर मी जिवंत राहीन किंवा नाहीं हा संशयच आहे. ३७ म्हणून आतां थोडीशी विचारण्यास सुरवात करावी. मग देवांच्या इच्छेस येईल तसें करूं. असा विचार करून

१ कौतुकानें. २ संतोषत नाहीं. ३ श्रवण करावें. ४ ४ विद्येचें. ५ एकाग्र लक्षरूपी अमृतानें. ६ मोठें. ७ अनेकविध अर्थ. ८ सुख, सुकाळ. ९ प्रसन्न झाले. १० पाला खाणाऱ्या वानराकरवीं. ११ पराभव. १२ जिंकणारा नाहीं काय ? १३ होणार नाहीं असें नाहीं. १४ श्रीकृष्णाच्या मुखांतून. १५ धन्य धन्य. १६ वर्णावें. १७ बुद्धीला आकळत नाहीं. १८ अनुभवजन्य. १९ प्रकार. २० प्रत्यक्ष, स्पष्ट. २१ अवघड, जड, संकट. २२ गुह्य. २३ आवडत्यानें. २४ चांगल्या स्नेहांतला. २५ यशोदा मातेपेक्षां. २६ जिवलग. २७ भ्याली. २८ गोकुळांतील प्रेमळ जनांसारिखा. २९ फसविलें. ३० अंबरिषाचे. ३१ राखून ठेविलें. ३२ अशा तऱ्हेचें. ३३ गुह्य. ३४ झडकर. ३५ वांचणें, जीवित्व. ३६ कचित. ३७ थोडथोडें.

प्रवर्तला सौध्वसें । पार्थु बोलों ३८ परि तेंचि ऐसेनि भावें । जें एका दों उत्तरांसवें । दावी विश्वरूप आघवें । झाडा देउनी ३९ अहो वांसरूं देखिलियाचि साठीं । धेनु खडबडोनि मोहें उठी । मग स्तनामुखाचिये भेटी । काय पान्हा[2] धरे ४० पाहा पां तया पांडवाचेनि नांवें । जो कृष्ण रानींही प्रतिपाळूं धांवे । तयातें अर्जुनें जंव पुसावें । तंव साहील[3] काई ४१ तो सहजेंचि स्नेहाचें अवतरण । आणि येरू स्नेहा घातलें आहे माजवण । ऐसिये मिळवणीं वेगळेपण । उरे हेंचि वेहु ४२ म्हणोनि अर्जुनाचिया बोलासरिसा । देव विश्वरूप होईल आपैसा । तोचि पहिला प्रसंगु ऐसा । ऐकिजे तरी ४३

अर्जुन उवाचः—

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् । यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥

मग पार्थु देवातें म्हणे । जी तुम्हीं मजकारणें । वाच्य केलें जें न बोलणें । कृपानिधे ४४ जैं महाभूतें ब्रह्मीं ओटती । जीव महदादींचें ठाय फिटती । तैं जें देव होऊनि ठाकती । तें विसवणें शेषींचें[11] ४५ होतें हृदयाचिये परिवरीं[12] । रोंविलें कृपणाचिये परी । शब्दब्रह्मासिही[13] चोरी । जयाची केली ४६ तें तुम्हीं आजि आपुलें । मजपुढां हियें[14] फोडिलें । जैया अध्यात्मा वोवाळिलें । ऐश्वर्य[15] हरें ४७ ते वस्तु मज स्वामी । एकिहेळां[16] दिधली तुम्हीं । हें बोलों तरि आम्ही । तुज पावोनि कैंचे ४८ पारि साचचि महामोहाचिये पुरीं । बुडिलिया देखोनि सींसवरी[17] । तुवां आपणपें घालोनि श्रीहरी । मग काढिलें मातें ४९ एक तूंवाचूनि कांहीं । विश्वीं दुजियाची मोंथ[18] नाहीं । कीं आमुचें कर्म पाहीं । जे आम्ही आंथी[19] म्हणों ५० मी जगीं एक अर्जुनु । ऐसा देहीं वाहे अभिमानु । आणि कौरवांतें इया स्वजनु । आपुला म्हणें ५१ याहीवरी यांतें मी मारीन । म्हणें तेणें पापें रिगेन । ऐसें देखत होतों दुःस्वप्न । तों चेवविलों[20] प्रभु ५२ देवा गंधर्वनगरीची[21] वस्ती । सोडुनि निघाला लक्ष्मीपती । होतों उदकाचिया आर्ती[22] । रोहिणी[23] पीत ५३ जी किरडूं तरी कापडाचें । परी लहरी येत होतिया साचें । ऐसें वायां मरतया जीवाचें । श्रेयें[24] तुवां घेतलें ५४ आपुलें प्रतिबिंब[25] नेणता । सिंह कुंहां[26] घालील देखोनि आतां । ऐसा धरिजे तेवीं अनंता । राखिलें मातें ५५ एऱ्हवीं माझा तरी येतुलेवरी । एथ निश्चय होता अवधारीं । जे आतांचि सातांही सागरीं । एकत्र मिळिजे ५६ हें जगचि आघवें बुडावें । वारें आका-

अर्जुन भीत भीत बोलूं लागला. ३८ परंतु तो अशा खुबीनें बोलला कीं, देवांनीं एक दोन प्रश्नोत्तरांत आपलें विश्वरूपच त्यास झाडून सर्व दाखवावें. ३९ असें अर्जुनाकरितां देवांनीं करावें यांत आश्चर्य काय ? अहो, वांसराला पाहिल्यावरोबर गाय प्रेमानें गडबडून उठते, व पुढें वांसराच्या तोंडाची व स्तनाची गांठ पडल्यावर तिच्यानें पान्हा चोरवेल काय ? ४० असें पहा, ज्या पांडवांचें संरक्षण करण्याकरितां श्रीकृष्ण भगवान् रानांवनांतही धांवले, त्यांना अर्जुन जें विचारील तें सांगतांना राहवेल का ? ४१ श्रीकृष्ण भगवान हे मूर्तिमंत स्नेहच होत. त्यांना अर्जुनरूपी भक्ष्य मिळाल्यानें या दोघांच्या ऐक्यभावांत यांच्या दोन वेगळाल्या मूर्ति दिसतात हाच चमत्कार होय. ४२ म्हणून, अर्जुनानें विचारल्यावरोबर ते आपोआप विश्वरूप धारण करतील; तरी आतां आरंभींचा तो प्रसंग ऐकावा; ४३

**अन्वयार्थ**—[हे भगवन्-हे कृष्णा! ]-(मदनुग्रहाय)-माझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं-(परमं गुह्यं अध्यात्मसंज्ञितं)-अत्यंत गुह्य 'अध्यात्म' या नांवाचें-(यत् वचः)-जें वचन (त्वया)-तूं-( उक्तं )-सांगितलेंस-( तेन )-त्याच्या योगानें (मम)-माझा-(अयं )-हा-(मोहः)-मोह-अविवेक-(विगतः) पार निघून गेला आहे. १

मग पार्थ देवाला म्हणाला, " हे कृपानिधे, तुम्ही ...त्याकरितां, शब्दातील जें गुह्य तें बोलून दाखविलें ... जेव्हां पंचमहाभूतें ब्रह्मामध्यें लीन होतात, आणि ... व माया लय पावतात, त्या वेळेस परमात्मा जें रूप ...ण करून रहातात, तें शेवटचें स्वरूप ४५ कृपणाच्या-...खें हृदयांत सांठवलेलें असून वेदांनाही चोरून ठेवि-... होतें, ४६ तें आज माझ्यापुढें हृदय फोडून उघडें ... व ज्या आध्यात्मज्ञानासाठीं शंकरांनीं ऐश्वर्य सोडून स्मशानवास केला, ४७ तें ज्ञान, प्रभो, तुम्हीं मला एकदम दिलें आहे. पण असें जर म्हणावें, तर तुमच्याशीं ऐक्य झाल्याचा काय उपयोग ? ( ऐक्य झाल्यावर देणें घेणें कोठून उरणार ? ) ४८ परंतु खरोखर मोहरूप पुरांत मी डोक्यापर्यंत बुडालों असें पाहून आपण स्वतः उडी घालून मला बाहेर काढलें आहे. ४९ फक्त तुमच्यावांचून या जगांत दुसरी वस्तु नाहीं; परंतु आमचें कर्म पहा कसें ओढवलें, कीं आम्ही ' देहच मी ' या फेऱ्यांत पडून तुमच्याहून भिन्न आहों, असें उघड म्हणत आहों. ५० मी या जगांत कोणीएक अर्जुन आहें, असा या देहाचा मी अभिमान बाळगीत होतों, व या कौरवांना आप्त म्हणत होतों; ५१ आणखी, यांना मी मारीन व त्यापासून होणाऱ्या पापाबद्दल मला काय शासन होईल, अशा प्रकारचें वाईट स्वप्न पहात होतों तों, प्रभो, तुम्ही मला जागृत केलें. ५२ देवा, हे लक्ष्मीपते, काल्पनिक नगराची वस्ती सोडून निघालों आणि पाणी पिण्याच्या इच्छेनें मृगजळ पीत होतों. ५३ अहो, कापडाचा केलेला साप असतांना हा खरा साप मला डसला अशा भावनेनें मला खऱ्या लहरी येत होत्या, याप्रमाणें मी मरणभयाच्या दुःखांत बुडत असतांना त्यांतून वर काढण्याचें श्रेय आपण घेतलें. ५४ विहिरींत आपलें प्रतिबिंब पडलें आहे हें न समजतां सिंह आंत उडी घालतो आहे, हें पाहून कोणी एकाद्यानें त्यास धरून रक्षण करावें, त्याप्रमाणें, अनंता, मी अज्ञानसागरांत बुडत असतां मला आंवरून आपण माझें रक्षण केलें. ५५ बाकी असें पहा कीं, माझा तर हा वेळपर्यंत निश्चयच होता कीं, आतांच जरी सप्तसमुद्र एकत्र झाले, ५६ अथवा हें सर्व जग बुडून गेलें; किंवा आकाशही तुटून पडलें ( तरी चिंता नाहीं ), पण

१ मिळून. २ पान्हा चोरवे. ३ सोसवेल काय ? ४ मूर्ति-...फ. ६ पुष्कळ चमत्कार. ७ आपोआप, सहज. ८ ...पावतात. ९ प्रकृतीचें; अविद्येचें. १० राहतात. ११ ...चें. १२ मंदिरांत, घरांत. १३ वेदांसहि. १४ अंतःकरण. ... ज्या अध्यात्म प्राप्तीसाठीं शिवानें ऐश्वर्य सोडून स्मशान वास केला. १६ एकदम. १७ डोक्यापर्यंत. १८ बोली, नांव. १९ आहे म्हणतों. २० जागा केला. २१ आकाशांतील ढगांवर कल्पित नगरीचें. २२ इच्छेनें. २३ मृगजळ. २४ पुण्य. २५ पडछाया. २६ विहिरींत. २७ वेधपावेतों.

शही तुटोनि पडावें। परि झुंजणें न घडावें। गोत्रजेशीं मज ५७ ऐसिया अहं-
काराचिये वोढीं[1]। मियां आग्रहजळीं दिधली होती बुडी। चांगचि तूं जवळां
एऱ्हवीं काढी। कवणु मातें ५८ [2]नाथिलें आपणपां एक मानिलें। आणि न[3]व्ह-
तया नाम गोत्र ठेविलें। थोर पिसें होतें लागलें। परि राखिलें तुम्हीं ५९
मागां जळत काढिलें जोहरीं। तैं तें देहासीच भय अवधारीं। आतां हे जोखा-
हर दुसरी। चैतन्यासकट ६० दुराग्रह हिरण्याक्षें। माझी बुद्धि वसुंधरा सू[6]दली
काखे। मग मोहार्णव गवांक्षें। रिघोनि ठेला ६१ तेथ तुझेनि गोसांवीपणें। एक-
वेळ बुद्धीचिया ठाया येणें। हें दुसरें वराह होणें। पडिलें तुज ६२ ऐसें अपार
तुझें केलें। एकी वाचा काय मी बोलें। परि पांचही[7] पालव मोकलिलें। मज-
प्रती ६३ तें कांहीं न वचेचि वांयां। भलें यश फा[8]वलें देवराया। जे सांचत
माया। निरसिली माझी ६४ आजी आनंदसरोवरींचीं कमळें। तैसे हे तुझे
डोळे। आपुलिया प्रसादाचीं रा[12]उळें। जयालागीं कारिती ६५ हां हो तयाही
आणि मोहाची भेटी। हे कायसी पा[13]र्बळी गोठी। के[14]उती मृगजळाची वृष्टी।
वडवानळेंसी ६६ आणि मी तंव दातारा। ये कृपेचिये रिघोनि गाभारां। घेत
आहें चा[15]रा। ब्रह्मरसाचा ६७ तेणें माझा जी मोह जाये। एथ विस्मो[16] कांहीं
आहे। तरी उद्धरलों कीं तुझे पाये। शिवतले आहाती ६८

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया। त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम्॥२॥

पैं कम[17]ळायतडोळसा। सूर्यकोटितेजसा। मियां तुजपासोनि महे[18]शा। परि-
सिलें आजी ६९ इयें भूतें जयापरी होती।। अथवा लया हन जैसेनि जाती। तें मज-
पुढां प्रकृती। विवंचिली[19] देवें ७० आणि प्र[20]कृती कीर उ[21]गोंणा दिधला। वरि
पुरु[22]षांचाही ठावो दाविला। जयाचा महिमा पांघरोनि जाहला। [23]धेंडौता वेदु
७१ जी शब्द[24]राशी वाढे जिये। कां धर्माऐशिया रत्नांतें विये। तें एथिंचे प्र-
भेचे पाये। वोळें[25]गे म्हणोनि ७२ ऐसें अगाध माहात्म्य। जें सकळ[26]मार्गैकगम्य।
जें स्वात्मानुभवरम्य। तें इयापरी दाविलें ७३ जैसा के[27]रूं फिटलिया आभाळीं।
दिठी रिगे सूर्यमंडळीं। कां हातें सारूनि बा[28]वुंळी। जळ देखिजे ७४ नातरी उक-
लता या सापाचे वेढे। जैसें चंदना खेंवं[29] देणें घडे। अथवा वि[30]वैंसी पळे मग
चढे। निधा[31]न हातां ७५ तैसी प्रकृति हे आड होती। ते देवेंचि सारोनि परौती।
मग पर[32]तत्त्व[33] माझिये मती। शेजार केलें[34] ७६ म्हणोनि इयेविषयींचा मज देवा।

गोत्रजांबरोबर मला युद्ध करण्याचा प्रसंग न येवो. ५७ अशा अहंकाराच्या योगानें मीं आग्रहरूपी जलांत बुडी मारली होती; परंतु तुम्ही जवळ होतां म्हणून बरें झालें. एऱ्हवीं त्यांतून मला कोणी बाहेर काढलें असतें ? ५८ वास्तविक मी नसून, कोणी आहे असें मानलें, व नाहींत त्यांना नांव ठेवून, गोत्रज म्हटलें, अशा प्रकारचें मला जबर वेड लागलें होतें, पण त्यापासून तुम्हीं माझें रक्षण केलें. ५९ पूर्वी लाक्षागृहांत जळत असतांना त्यांतून बाहेर काढून आपण रक्षण केलें खरें, पण त्या वेळीं फक्त देहाचेंच भय वाटत होतें. आतां हें दुसरें लाक्षागृह असून यांत माझें चैतन्यही नाश पावत होतें, त्यांतून तुम्हीं मला बाहेर काढलें. ६० दुराग्रहरूपी हिरण्याक्ष दैत्य माझी बुद्धिरूपी पृथ्वी काखेंत मारून मोहरूपी समुद्राच्या खोल पाण्यांत घेऊन गेला, ६१ तेव्हां तुमच्या बोधाच्या सामर्थ्यानें मी एकदम शुद्धीवर आलों; हा तुम्हांला दुसरा वराहाचा अवतारच घेणें पडलें ! ६२ याप्रमाणें मचीं अपार महत्कृत्यें आहेत, तीं माझ्या एकट्या णीनें कशीं वर्णन करवतील ? फार काय सांगावें; तुम्ही पले पंचप्राण मला अर्पण केले आहेत, ६३ त्यामुळें श्राया, तुमचे श्रम कांहीं व्यर्थ न जातां यशप्राप्ती ली; ती ही कीं, माझ्या अज्ञानाचा समूळ नाश झाला. ४ महाराज, आनंदसरोवरांतील कमलांप्रमाणें असलेले पले हे नेत्र ज्याकरितां आपल्या कृपाप्रसादाचीं मंदिरें ार करितात, ( ज्याच्यावर आपली कृपादृष्टि होते, ) त्याची आणि मोहाची भेट होतें हें म्हणणें किती छ ! महाराज, मृगजलाची वृष्टि वडवानळाला काय णार ? ६६ आणि हे दातारा, मी तर त्या तुझ्या मंदिराच्या गाभाऱ्यांत शिरून आत्मज्ञानाचा पूर्ण अनुभव घेत आहें; ६७ तेव्हां आतां माझा मोह नाहींसा झाला यांत आश्चर्य काय ? खरोखर तुझ्याच पायाची शपथ वाहून सांगतों की, मी उद्धरलों ! ६८

**अन्वयार्थ**—(कमलपत्राक्ष)–हे कमलनयना !–(मया) मीं–(भूतानां भवाप्ययौ)–सर्व भूतांची उत्पत्ति व लय तुझ्यापासून होतात हें–(त्वत्तः)–तुझ्या तोंडून–(विस्तरशः)–सविस्तर–(श्रुतौ)–ऐकलें–(च)–व–(अव्ययं)–अव्यय–(माहात्म्यं अपि) महात्म्यही–(श्रुतं)–ऐकिलें. २

अहो कमलनयना, कोटिसूर्यतेजसा, महेशा, आज तुम्हांकडून मी असें ऐकलें; ६९ हीं सर्व भूतें जिच्यापासून उत्पन्न होतात व लय पावतात अशी जी माया ती मला देवांनीं विस्तारपूर्वक सांगितली आहे; ७० त्या मायेचा झाडा देऊन परमात्म्याचेंही मूळस्थान दाखविलें; ज्याचें यश पांघरून, वेद वस्त्रयुक्त झाले ; ज्या परमात्म्याचें यश वेद गातात. ) ७१ जे वेद उत्पन्न होऊन अस्तित्वांत आहेत, व ज्याच्यापासून धर्मासारखीं रत्नें निपजतात. ह्या सर्व गोष्टी, ते आपल्याच पायांचा आश्रय करतात, म्हणून हे प्रभो, घडून येतात ! ७२ त्याप्रमाणें, देवा, तुमचे जें अगाध महात्म्य, जें सर्व मार्गांनीं एकच जाणण्यास योग्य, व आत्मानुभवानें परिपूर्ण, तें तुम्हीं मला दाखविलें. ७३ ज्याप्रमाणें अभ्रें नाहींतशीं झाल्यावर आकाशांत सूर्यमंडळ दृष्टीस पडतें; किंवा हातानें गोंडाळ बाजूला सारल्यावर स्वच्छ उदक दृष्टीस पडतें; ७४ किंवा चंदनाच्या झाडाला सापानें दिलेले वेढे निघाल्यावर त्याला आलिंगन देतां येतें, अथवा पिशाच नाहींसें झाल्यावर द्रव्य हातीं लागतें, ७५ त्याप्रमाणें, ज्ञानाच्या आड जी माया होती, ती देवांनीं पलीकडे सारल्यामुळें माझ्या बुद्धीला महत्तत्त्व भेटलें. ७६ म्हणून देवा, तुमच्या अगाध शक्तीचा माझ्या जीवाला पूर्ण भरंवसा आला आहे;

१ आधिक्यानें. २ नसतें, लटकें. ३ नसणाऱ्याला. ४ गृहांतून. ५ अग्नीपीडा. ६ घातली. ७ गवाक्षांत, गुवा- ८ स्वामीपणानें; तुझ्या सामर्थ्यानें. ९ पंचप्राण. १० न केले, अर्पण केले. ११ जोडिलें, साधिलें. १२ , मंदिरें. १३ तुच्छ. १४ कोणीकडे. १५ अनुभव. नवल, आश्चर्य. १७ कमलपत्राप्रमाणें विस्तीर्ण आहेत ज्याचे अक्ष. १८ देवाधिदेवा. १९ विचारपूर्वक सांगितली. २० मायेचा. २१ झाडा, २२ परमात्म्याचा. २३ वस्त्रयुक्त. २४ शब्दसमूह, वेद. २५ आश्रय करिते. २६ सर्व मार्गांनी एकच जाणण्यास योग्य. २७ कचरा, अभ्रें. २८ गोंडाळ, शेवाळ. २९ आलिंगन. ३० पिशाच. ३१ ठेवा. ३२ महातत्त्व. ३३ माझे मतीस परतत्त्व हें शेजारनिद्रास्थान केलें ( मति तत्त्वनिष्ठ केली. )

भरंवसा कीर जाहला जीवा । पारि आणीक एक हेवा । उपेनला असे ७७ तो भिडां जरी म्हणों राहों । तरी आंना कवणा पुसों जावों । काय तुजवांचोनि ठावो । जाणत आहों आम्ही ७८ जळचरु जळाचा आभारु धरी । बाळक स्तनपानीं उपरोधु करी । तरी तया जिणया श्रीहरी । आन उपायो असे ७९ म्हणोनि भीड सांकडी न धरवे । जीवा आवडे तेंही तुजपुढां बोलावें । तंव राहें म्हणितलें देवें । चांड सांगें ८०

एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर । द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥

मग बोलिला तो किरीटी । म्हणे तुम्हीं केली जे गोठी । तिया प्रतीतीची दिठी । निवाली माझी ८१ आतां जयाचेनि संकल्पें । हे लोकपरंपरा होय हारपे । जया ठायातें आपणपें । मी ऐसें म्हणसी ८२ तें मुद्दल रूप तुझें । जेथूनि इयें द्विभुजें हन चतुर्भुजें । सुरकार्याचेनि व्याजें । घेवोंघेवों येसी ८३ पैं जळशयनाचिया अवगणिया । कां मत्स्य कूर्म इया मिरवणिया । खेळु सरलिया तूं गुणिया । सांठविसी जेथ ८४ उपनिषदें जें गाती । योगियें हृदयीं रिगोनि पाहाती । जयातें सनकादिक आहाती । पोटाळुनियां ८५ ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे । तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ८६ देवें फेडूनियां सांकड । लोभें पुसिली जरी चाड । तारि हेंचि एकी वाड । आर्ती जी मज ८७ तुझें विश्वरूप आघवें । माझिये दिठीसि गोचर होआवें । ऐशी थोर आस जीवें । बांधोनि आहें ८८

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो । योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥४॥

परि आणीक एक एथ शार्ङ्गी । तुज विश्वरूपातें देखावयालागीं । पैं योग्यता माझिया आंगीं । असे कीं नाहीं ८९ हें आपलें आपण मी नेणें । तें कां नेणसी जरी देव म्हणे । तरी सरोगु काय जाणे । निदान रोगाचें ९० आणि जी आर्तीचेनि पडिभरें । आर्तु आपुली ठाकी पैं विसरे । जैसा तान्हेला म्हणे न पुरे । समुद्र मज ९१ ऐशा सचाडपणाचिये भुली । न सांभाळावे समर्स्था आपुली । यालागीं योग्यता जेवीं माउली । बाळकाची जाणे ९२ तयापरी श्रीजनार्दना । विचारिजो माझी संभावना । मग विश्वरूपदर्शना । उपक्रम कीजे ९३ तारि ऐसी ते कृपा करा । एऱ्हवीं नव्हे हें म्हणा अवधारा । वायां पंचमालापें बधिरा । सुख केउतें देणें ९४ एऱ्हवीं येकले बापियांचे तृषे । मेघ जगा-

परंतु मला आणखी एक इच्छा उत्पन्न झाली आहे. ७७ भीड धरून जर मी ती तुम्हांला विचारली नाहीं, तर दुसऱ्या कोणास विचारावयास जावें ? कारण, तुमच्यावांचून दुसरें आझांस ठिकाण माहीत आहे का ? ७८ माशांनीं जळाचा आभार मानून त्यास तसदी न देतां बाहेर रहावें असें जर मनांत आणलें, किंवा बालकानें आईजवळ वरचेवर स्तनपान मागण्याची भीड धरली, तर श्रीहरी, त्यांना वांचण्याला दुसरा उपाय आहे का ? ७९ म्हणून, संकोच न करितां मनास येईल ती गोष्ट तुम्हाला विचारावी इतकें अर्जुन म्हणतो आहे, तोंच देव म्हणाले कीं, तुझें हें बोलणें राहूं दे, तुला कसली इच्छा उत्पन्न झाली आहे ती सांग. ८०

**अन्वयार्थ**—(परमेश्वर)–हे परमेश्वरा !–( त्वं ) तूं–( आत्मानं )आपल्याला–(यथा)–ज्याप्रकारें–(आत्थ)–सांगतोस–(एवं एतत्)–तसेंच तें आहे.–(पुरुषोत्तम)–हे पुरुषोत्तमा !–( ते ऐश्वरं रूपं)–तुझें वैष्णवरूप–(द्रष्टुं)–पाहण्यास–(इच्छामि)–मी इच्छितों. ३

मग अर्जुन म्हणालाः—देवा, तुम्ही ज्या गोष्टी सांगितल्या, त्यांच्या अनुभवानें माझी दृष्टि शांत झाली ८१ आतां, ज्याच्या इच्छेनें हें सर्व जग उत्पन्न होतें व लय पावतें, आणि ज्या ठिकाणाला तुम्ही हें माझें स्वरूप आहे असें म्हणवितां, ८२ तें तुमचें मुख्य स्वरूप, जेथून देवांचीं संकटें निवारण करण्याच्या निमित्तानें द्विभुज, चतुर्भुज अशीं रूपें घेऊन तुम्ही येतां; ८३ क्षीराब्धींतील दोषशमनाच्या आरंभापासून मत्स्यकूर्मादि अवतार घेऊन सर्व अवतारकृत्य संपल्यावर, हे गारोड्या श्रीकृष्णा, ज्या ठिकाणीं तुम्ही पुन्हां जातां, ८४ उपनिषदें ज्याचे गुणानुवाद वर्णन करतात, योगीजन हृदयांत आठवून ध्यान करतात व ज्याला सनकादिक आलिंगन देऊन राहतात, ८५ असें जें तुमचें अगम्य विश्वरूप, ज्याचा लौकिक आम्ही ऐकतों; तें पाहण्याकरितां, देवा, माझें चित्त फार उतावळें झालें आहे. ८६ तुम्ही मनांतील संकोच टाकून प्रेमानें माझी इच्छा काय आहे म्हणून विचारलें, तर हीच एक माझी बलवत्तर इच्छा आहे. ८७ आपलें, सर्व विश्वरूप मी दृष्टीनें पाहावें असा माझ्या मनानें ध्यास घेतलेला आहे. ८८

**अन्वयार्थ**–(प्रभो)–हे स्वामिन् !–(यदि)–जर–(मया तत् द्रष्टुं शक्यं)–मी तें पाहणें शक्य आहे–(इति मन्यसे)–असें तूं समजत असशील–( ततः )–तर मग,–(योगेश्वर)–हे योगेश्वरा !–(त्वं)–तूं–(मे)–मला–( अव्ययं आत्मानं )–आपलें अव्यय स्वरूप–(दर्शय)–दाखीव. ४

परंतु, हे शार्ङ्गधरा, आणखी एक मला अशी शंका आहे कीं, तुमचें विश्वरूप पहाण्याची माझ्या अंगांत योग्यता आहे किंवा नाहीं, ८९ हें माझें मला कांहीं समजत नाहीं; व तें कां समजत नाहीं म्हणून म्हणाल, तर हें पहा–रोग्याला आपल्या रोगाचें निदान समजतें का ? ९० आणखी, महाराज, इच्छेची आसक्ति प्रबळ असल्यामुळें इच्छा करणारा मनुष्य जशी आपली योग्यता विसरतो किंवा ज्यास तहान लागली आहे, त्यास जसें समुद्रही आपली तहान भागविण्यास पुरा पडणार नाहीं असें वाटतें, ९१ तशाच प्रबल इच्छेनें मला भूल पडली असल्यामुळें, माझी इच्छा मला आंवरून ठेवत नाहीं. याकरितां आई ज्याप्रमाणें आपल्या मुलाची योग्यता जाणून त्याची इच्छा पुरी करिते, ९२ त्याप्रमाणें, हे जनार्दना, माझ्या अधिकाराचा विचार करून मग तुम्ही आपलें विश्वरूप दाखविण्यास आरंभ करा. ९३ माझा अधिकार असेल तर ही कृपा करा. एऱ्हवीं असें पहा कीं, माझा अधिकार नसेल तर नाहीं म्हणून सांगा; हो–पंचमस्वरांतील उत्तम गाणें ऐकून बहिऱ्याला कसें सुख होणार ? ९४ बाकी मेघ हा एकट्या चात-

१ हेतु, इच्छा. २ उत्पन्न झाला. ३ मर्यादेनें. ४ दुसऱ्याला. ५ तसदी देण्याचा संकोच. ६ भीड. ७ वांचण्याला. ८ संकोच. ९ इच्छा. १० आपण स्वतः ११ आरंभापासून. १२ अवतार १३ गुणी, कसबी, हुन्नरवाला. १४ आठवण करून. १५ आलिंगून. १६ संकोच. १७ मोठी. १८ इच्छा. १९ स्वरूप, परीक्षा. २० आसक्तीनें. २१ योग्यता, अधिकार. २२ इच्छा. २३ योग्यता, अधिकार. २४ प्रारंभ. २५ पंचमस्वरानें. २६ कसें, कोठून. २७ चातकाचे.

पुरतें काय न वर्षे । परी जहालीही वृष्टि उपखे । जऱ्हीं खडकीं होय ९५ चकोरा चंद्रामृत फावलें । येरां आण वाहूनि काय वारिलें । परि डोळ्यांवीण पांहलें । वांयां जाय ९६ म्हणोनि विश्वरूप तूं सहसा । दाविसी कीर हा भरंवसा । कां जे कडोंडां आणि गहिंसा । माजि नित्य नवा तूं कीं ९७ तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र । पैं कैवल्य ऐसें पवित्र । जें वैरियांही दिधलें ९८ मोक्षु दुराराध्यु कीर होय । परि तोही आराधी तुझे पाय । म्हणोनि धाडिसी तेथ जाय । पाईकु जैसा ९९ तुवां सनकादिकांचेनि मानें । सायुज्यीं सौरसु दिधला पूतने । जे विषाचेनि स्तनपानें । मारूं आली १०० हां गा राजसूय यागाचिया सभासदीं । देखतां त्रिभुवनाची मांदी । कैसा शतधा दुर्वाक्य शब्दीं । निस्तेजिलासी १ ऐशिया अपराधियां शिशुपाळा । आपणपें ठावो दिधला गोपाळा । आणि उत्तानचरणाचिया बाळा । काय ध्रुवपदीं चाड २ तो वना आला याचिलागीं । जे बैसावें पितयाचिया उत्संगीं । कीं तो चंद्रसूर्यादिकांपरिस जगीं । श्लाघ्यु केला ३ ऐसा वनवासिया सकळां । देता एकचि तूं घसाळा । पुत्रा आळवितां अजामिळा । आपणपें देसी ४ जेणें उरीं हाणितलासि पांपरा । तयाचा चरणु वाहासी दातारा । अझुनी वैरियांचिया कलेवरां । विसंबैसीना ५ ऐसा अपकारियां तुझा उपकारु । तूं अपात्रींही परि उदारु । दे दान म्हणोनि दारवंटेकरु । जाहलासी बळीचा ६ तूंतें आराधीना आयकें । होती पुसों बोलावित कौतुकें । तिये वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाडु केला ७ ऐसीं पाहूनि वायांणीं मिषें । आपणपें देवों लागसी वोनिवसें । तो तूं कां अनारिसें । मजलागीं करिसी ८ हां गा दुभतयाचेनि पवाडें । जे जगाचें फेडी सांकडें । तिये कामधेनूचें पाडे । काय भुकेले ठाती ९ म्हणोनि मियां जें विनविलें कांहीं । तें देव न दाखविती हें कीर नाहीं । परि देखावयालागीं देईं । पात्रता मज ११० तुझें विश्वरूप आंकळे । ऐसें जरी जाणसी माझे डोळे । तरि आर्तीचे डोहळे । पुरवीं देवा ११ ऐसी ठायेंठावो विनंती । जंव करूं सरला सुभद्रापती । तंव तया षड्गुणचक्रवर्ती । साहवेचिना १२ तो कृपापीयूषसजळु । आणि येरु जवळां आला वर्षाकाळु । नांना श्रीकृष्ण कोकिळु । अर्जुन वसंतु १३ नातरी चंद्रबिंब वाटोळें । देखोनि क्षीरसागर उचंबळे । तैसा दुणेंही प्रेमबळें । उल्लसितु जाहला १४ मग तिये प्रस-

काकरितांच वर्षाव करतो, आणि जगाकरितां करीत नाहीं, असें कांहीं नाहीं; परंतु तोच पाऊस खडकावर पडला तर व्यर्थ जातो. ९५ चंद्रप्रकाशापासून चकोराला अमृत प्राप्त होतें, आणि दुसऱ्याला शपथ का घातली आहे? पण [प्राशन करण्याची युक्ति चकोराप्रमाणें इतरांना माहीत नसल्यामुळें त्यांना ज्याप्रमाणें त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं त्याप्रमाणें] दृष्टीशिवाय प्रकाश व्यर्थ आहे; ९६ म्हणून तुम्ही बहुतकरून मला विश्वरूप दाखवाल असा माझा पूर्ण भरंवसा आहे. कारण, भयंकर अथवा सुंदर रूप दाखविण्याची आपली अलौकिक शक्ति आहे. ९७ कारण, तुमचें औदार्य स्वतंत्र आहे व तुमच्या मनांत एकादी गोष्ट देण्याचें आलें असतां पात्र किंवा अपात्र हा भेद तुम्ही मानीत नाहीं. असें पहा—मोक्षासारखें पवित्र ठिकाण तुह्मी आपल्या शत्रूंसही दिलें आहे. ९८ खरोखर मोक्ष जरी दुष्प्राप्य आहे, तरी तोही तुमच्या पायांची सेवा करतो; म्हणून तुह्मी त्यास जिकडे जाण्याची आज्ञा कराल तिकडे तो जाऊन चाकराप्रमाणें तुमची आज्ञा पाळतो. ९९ आपल्या स्तनांत विष घालून तुह्माला मारण्याच्या हेतूनें स्तनपान देण्याकरितां पूतना राक्षसी आली होती, तिलाही तुह्मी सनकादिकांच्या बरोबरीनें सायुज्य मुक्ति दिली. १०० महाराज! धर्मराज्याच्या राजसूय यज्ञांत त्रिभुवनांतील देव, ऋषि व राजे जमले असतां त्या ठिकाणीं ज्यानें आपणांस दुर्वाक्यें बोलून आपला अपमान केला, १ त्या महदपराधी शिशुपालालाही तुह्मी सरूपता मुक्ति दिली; आणखी, गोपालकृष्णा, उत्तानपाद राजाचा मुलगा जो ध्रुव, त्याची अढळपदीं बैसण्याची योग्यता होती काय? २ बापाचे मांडीवर बसावयास मिळावें एवढ्याचकरितां तो वनांत आला होता; पण त्याला तुह्मी चंद्रसूर्यादिकांपेक्षांही श्रेष्ठ स्थानीं नेऊन बसविलें! ३ याप्रमाणें दुःखितांना उदारपणें देणारे एक तुह्मीच. हें पहा—अजामिलानें मृत्युसमयीं पुत्रमिषानें नारायण नामाचा उच्चार केल्यामुळें त्याला मुक्ति दिली; ४ प्रभो, ज्या भृगु ऋषीनें तुमच्या हृदयावर लाथ मारली होती, त्याचें श्रीवत्सलांछन चिन्ह तुम्ही आपल्या हृदयावर भूषण मानून बाळगिलें आहे; तुमचा वैरी जो शंखासुर, त्याचें शरीर तुम्हीं हातांत धारण केलें आहे. ५ याप्रमाणें अपकार करणारावरही तुम्ही उपकार करिता. आणि अपात्र मनुष्यांस तुम्हीं औदार्यानें दान करिता; बळीपाशीं आपण दान मागावयास जाऊन त्याचे द्वारपाळ झालां! ६ तुमची आराधना न करतां व तुमचे गुणानुवाद न ऐकतां राघूला तुमच्या नांवानें हाक मारीत असतां गणिकेला तुम्हीं वैकुंठसुखाची प्राप्ति करून दिली; ७ अशा क्षुल्लक कारणानेंही अकस्मात् तुम्ही स्वस्वरूप प्राप्त करून देणारे, ते तुम्ही मला वेगळी प्राप्ती कशी करून द्याल? ८ अहो, दुभत्याच्या अधिकपणानें जी कामधेनु जगाचें संकट निवारण करते, तिची वासरें उपाशी रहातील काय? ९ म्हणून, मी ज्याबद्दल विनंति केली आहे, तें विश्वरूप देव मला दाखवणार नाहींत असें कधींही होणार नाहीं; परंतु तें पाहण्याची मला योग्यता द्या. ११० तुमचें विश्वरूप माझ्या डोळ्यांनीं पहावेल अशी जर तुमची खात्री असेल, तर देवा, माझे विश्वरूप पहाण्याचे डोहाळे पुरवा. ११ अशी अर्जुन विनंति करतो न करतो इतक्यांत षड्गुणैश्वर्याचा राजा जो श्रीकृष्ण, त्याला ती सहन झाली नाहीं.—कां सहन होईना म्हणाल तर—१२ अर्जुन हा वर्षाकाळाप्रमाणें व श्रीकृष्ण वर्षाकाळीं उत्पन्न होणाऱ्या कृपामृतयुक्त मेघाप्रमाणें दिसूं लागले. अथवा, अर्जुन हा वसंत ऋतु व त्यांत कृष्ण हे मंजुळ शब्द करणारे कोकिळ असे भासले. १३ किंवा पूर्णचंद्रबिंब पाहून ज्याप्रमाणें क्षीरसागराला भरती येते, त्याप्रमाणें त्या समुद्राच्या दुपटीपेक्षांही अधिक प्रेमानें श्रीकृष्ण उचंबळले. १४ मग कृपावंत

१ व्यर्थ जातो. २ प्राप्त झालें. ३ उजाडलें. ४ पटिकाला, जाणत्याला. ५ अनधीतांला, नेणत्याला. ६ मोक्षासारिखें. ७ खरेंपणानें, निश्चयानें. ८ चाकर. ९ सायुज्यमुक्तीची गोडी. १० जमाव. ११ अपमानिला गेलास. १२ उत्तानपादाच्या. १३ अढळपदीं. १४ मांडीवर. १५ स्थुल, श्रेष्ठ. १६ आपन्नांला, दुःखितांना. १७ मागें पुढें न पहाणारा, आवेदी. १८ पुत्रमिषानें, नारायणनामोच्चार घडलेल्या अजामिळाला. १९ मुक्ति, धामपद. २० लाथेनें. २१ मत्स्यावतारातील शत्रु शंखासुर. २२ शरीराला, शंखाला. २३ विसरत नाहींस, दूर करीत नाहींस. २४ द्वारपाळ. २५ राघूला. २६ सुख. २७ व्यर्थ. २८ निमित्तें २९ स्वेच्छेनें, कौतुकानें, सहज. ३० वेगळें. ३१ महत्त्वानें. ३२ संकट. ३३ गोन्हे, खोंड. ३४ योग्यता. ३५ जाणतां येईल. ३६ इच्छेनें. ३७ यथायोग्य, बरोबर. ३८ ज्ञान, वैराग्य, यश, श्री, ऐश्वर्य व धर्म यांचा सार्वभौम राजा. ३९ कृपामृतयुक्त. ४० अथवा. ४१ पूर्ण चंद्र. ४२ दुपटीपेक्षां अधिक. ४३ उचलून.

न्नतेचेनि ओंटोपें । गाजोनि[2] म्हणितलें सकृपें । पार्थी देख देख अमुपें[3] । स्वरूपें माझीं १५ एक विश्वरूप देखावें । ऐसा मनोरथु केला पांडवें । कीं विश्वरूपमय आघवें । करूनि घातलें १६ बाप उदार देवो अपरिमितु । याचक स्वेच्छा सदोदितु । असे सहस्रवरी देतु । सर्वस्व[4] आपुलें १७ अहो शेषाचेहि डोळे चोरिले । वेद जयालागीं झकविले[5] । लक्ष्मीयेही राहविलें । जिव्हारें जें १८ तें आतां प्रगटुनी अनेकधा । करीत विश्वरूपदर्शनाचा धांदा[6] । बाप भाग्या अगाधा । पार्थाचिया १९ जो जागता स्वप्नावस्थे जाये । तो जेवीं स्वप्नींचें आघवें होये । तेवीं अनंत ब्रह्मकटाह[7] आहे । आपणचि जाहला १२० ते सहसा[8] मुद्रा[9] सोडिली[10] । आणि स्थूळदृष्टीची[11] जवनिका[12] फेडिली । किंबहुना उघडिली । योगऋद्धी २१ पारि हा हें देखेल कीं नाहीं । ऐसी सेचि[13] न करी कांहीं । एकसरां[14] म्हणतसे पाहीं । स्नेहातुरें[15] २२

श्रीभगवानुवाचः—

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः । नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥

अर्जुना तुवां एक दावा म्हणितलें । आणि तेंचि दावूं तरि काय दाविलें । आतां देखें आघवें भरिलें । माझ्याचि रूपीं २३ एकें कृशें एकें स्थूळें । एकें ऱ्हस्वें[16] एकें विशाळें । पृथुतरें[17] सरळें । अप्रांतें[18] एकें २४ एकें अनावरें[19] प्रांजळें[20] । सव्यापारें[21] एकें निश्चळें । उदासीनें स्नेहाळें । तीव्रें एकें २५ एकें घूर्णितें[22] सावधें । असलगें[23] एकें अगाधें । एकें उदारें अतिबद्धें[24] । क्रुद्धें एकें २६ एकें शांतें[25] सन्मदें । स्तब्धें एकें सानंदें । गर्जितें निःशब्दें[26] । सौम्यें एकें २७ एकें साभिलाषें विरक्तें । उन्निद्रितें[27] एकें निद्रितें । परितुष्टें एकें आर्तें[28] । प्रसन्नें एकें २८ एकें अशस्त्रें सशस्त्रें । एकें रौद्रें[29] अति मित्रें । भयानकें एकें विचित्रें । लयस्थें[30] एकें २९ एकें जनलीला[31]विलासें । एकें पालनशीलें लालसें[32] । एकें संहारकें सावेशें[33] । साक्षिभूतें एकें १३० एवं नानाविधें पारि बहुवसें । आणि दिव्यतेजप्रकाशें । तेवींचि एकएकाऐसे । वर्णही नव्हे ३१ एकें तातलें[34] सांडेपंधरें[35] । तैसीं कपिलवर्णें[36] अपारें । एकें सर्वांगीं जैसें सेंदुरें । डवरलें[37] नभ ३२ एकें सावियांचि[38] चुळुकीं[39] । जैसें ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं । एकें अरुणोदयासारिखीं । कुंकुमवर्णें ३३ एकें शुद्धस्फटिक[40]सोज्वळें । एकें इंद्रनीळसुनीळें एकें अंजन[41]वर्णें सकाळें । रक्तवर्णें एकें ३४ एकें लसत्कांचन[42]सम पिंवळीं । एकें नवजलद[43]श्यामळीं । एकें

श्रीकृष्ण प्रसन्नपणाच्या भरांत मोठ्यानें म्हणाले, " पार्था, माझीं अगणित रूपें पहा. " १५ अर्जुनाच्या मनांत देवाचें एक विश्वरूप पहावें असा हेतु होता, परंतु श्रीकृष्णांनी सर्व जग विश्वरूप आहे असें दाखविलें. १६ धन्य आहे प्रभूचें औदार्य ! तें अपरिमित असल्यामुळें मागणाराच्या इच्छेच्या हजारोंपट आपलें रूप ते नेहमीं देतात. १७ अहो, जें आपलें गुह्य असें विश्वरूप शेषाच्या दोन हजार डोळ्यांसही दाखविलें नाहीं, वेदांनाही ज्याच्याविषयीं फसविलें, व लक्ष्मीपासूनही जें गुप्त ठेवलें, १८ तें विश्वरूप आतां अनेक प्रकारें प्रकट करून प्रभू दाखवीत आहेत. धन्य भाग्य त्या अर्जुनाचें ! १९ कोणी एकादा जागृत अवस्थेंतून स्वप्नावस्थेंत गेल्यावर ज्याप्रमाणें स्वप्नांत दृष्टीस पडणारे सर्व पदार्थ आपणच बनतो, त्याप्रमाणें श्रीकृष्ण आपणच ब्रह्मांड झाले ! १२० प्रभूंनीं श्रीकृष्णरूप सोडून ज्या अज्ञानदृष्टीच्या पडद्यानें ते लोकांस मनुष्यरूप भासत होते, तो पडदा काढून घेऊन, आपलें सर्व योगबल कट केलें. २१ परंतु अर्जुनाच्यानें हें रूप पहावेल किंवा नाहीं याची आठवण सुद्धां नाहींशी होऊन, प्रेमभरांत एकदम ' माझें रूप पहा ' असें म्हणूं लागले. २२ '

**अन्वयार्थ**—(पार्थ)–हे अर्जुना !–(मे)–माझीं–(नानाविधानि दिव्यानि)–अनेक प्रकारचीं दिव्य–अलौकिक–(च)–व–(नानावर्णाकृतीनि)–नाना वर्णांचीं व नाना आकृतींचीं–(रूपाणि)–रूपें–(शतशः अथ सहस्रशः)–शेंकडों व हजारों प्रकारें म्ह० अनेकशः–(पश्य)–पहा. ५

अर्जुना, तूं माझें एकच विश्वरूप दाखवा असें म्हटलेंस, आणि तें एकच तुला दाखविलें, तर यांत नवल तें काय ? म्हणून आतां माझ्या स्वरूपांतच सर्व जग भरलें आहे असें पहा. २३ माझीं रूपें कशीं आहेत म्हणशील तर तीं पहा–कांहीं रोडकीं, कांहीं लठ्ठ, कांहीं ठेंगणीं, कांहीं उंच, कांहीं जाड, कांहीं सडपातळ, आणि कांहीं अमर्यादा; २४ कांहीं न आवरणारीं, कांहीं निष्कपटी, कांहीं उद्योग करणारीं, कांहीं स्वस्थ बसणारीं, कांहीं उदासीन, कांहीं प्रेमयुक्त आणि कांहीं तीव्र बुद्धीचीं; २५ कांहीं बेसावध, कांहीं सावध, कांहीं सुंदर, कांहीं गंभीर, कांहीं उदार, कांहीं कृपण, कांहीं रागीट, २६ कांहीं शांत, कांहीं चांगल्या मदानें युक्त, कांहीं निरुपयोगी, कांहीं आनंदयुक्त, कांहीं ओरडणारीं, कांहीं न बोलणारीं, कांहीं सौम्य, २७ कांहीं लोभी, कांहीं विरक्त, कांहीं जागृत कांहीं निजणारीं, कांहीं संतोषी, कांहीं दुःखी, व कांहीं प्रसन्न, २८ कांहीं निःशस्त्र, कांहीं शस्त्रधारी, कांहीं उग्र, कांहीं स्नेहाळू, कांहीं भयंकर, कांहीं चित्रविचित्र, कांहीं समाधिस्थ, २९ कांहीं जनांच्या लीलेंत निमग्न, कांहीं प्रीतीनें पालन करणारीं, कांहीं क्रोधानें संहार करणारीं, व कांहीं साक्षिभूत, १३० त्याप्रमाणें नानाप्रकारचीं पुष्कळ आणि तेजस्वी व त्याचप्रमाणें निरनिराळ्या वर्णांचीं आहेत. ३१ कांहीं तावलेल्या सोन्याप्रमाणें, त्याचप्रमाणें शेंकडों पिंगट वर्णांचीं, आकाश अस्तमानसमयीं सुशोभित दिसतें त्याप्रमाणें, कांहीं कांहीं तांबड्या रंगाचीं, ३२ कांहीं तोरमल्ल्याप्रमाणें लहान–जसें कांहीं सर्व ब्रह्मांड माणकांनीं भरलेलें आहे अशीं शोभणारीं –कांहीं अरुणोदयाप्रमाणें तांबड्या वर्णांचीं, ३३ कांहीं शुद्ध स्फटिकाप्रमाणें स्वच्छ पांढरीं, कांहीं इंद्रनीलमण्याप्रमाणें निळीं, कांहीं काजळासारखीं काळीं, कांहीं रक्ताप्रमाणें लाल, ३४ कांहीं ताव दिलेल्या सोन्याप्रमाणें पिंवळीं, कांहीं नव्या मेघाप्रमाणें श्यामवर्णाचीं,

१ आवेशानें, भरानें. २ गर्जना करून ३ बहुत. ४ फसविलें. ५ जीवांतलें गुह्य. ६ धंदा. ७ ब्रह्मांड. ८ त्वरेनें, एकदम. ९ स्वरूप. १० प्रगट केली, उघडली. ११ अज्ञान दृष्टीची, मनुष्यदृष्टीची. १२ आड येणारा पडदा. १३ आठवणच. १४ एकदम. १५ प्रेमव्याप्त. १६ ठेंगणीं. १७ रुंद, पसरट. १८ अपार, अमर्याद. १९ न अवरणारीं. २० सुलभ, सरळ. २१ उद्योग करणारीं. २२ धुंद. २३ सुगम, सोपीं. २४ कृपण. २५ गंभीर, चांगल्या मदानें युक्त. २६ शब्दरहित. २७ जागृत. २८ दुःखीं २९ उग्र. ३० समाधिस्थ. ३१ उत्पत्तिकर्मांत गिमग्न. ३२ प्रीतियुक्त. ३३ क्रोधयुक्त. ३४ तापलेलें. ३५ निर्मळ सोनें. ३६ पिंगट. ३७ माखलें. ३८ सहज. ३९ सुंदर. ४० स्वच्छ. ४१ काजळासारखीं. ४२ दिव्य सुवर्णवर्णसम. ४३ नव्या मेघाप्रमाणें श्यामवर्णाचीं.

चांपेगौरीं केवळीं । हे[२]रितें एकें ३५ एकें तसतौ[३]म्रतांबडीं । एकें श्वेतचंद्र चोखडीं । ऐसीं नानावर्णें रूपडीं । देखें माझीं ३६ हे जैसे कां आनान वर्ण । तैसें आकृतींही अनारिसेपण । लाजा कंदर्प[४] रिघाला शरण । तैसीं सुंदरें एकें ३७ एकें अतिलावण्यसाकारें । एकें स्निग्धवपु मनोहरें । शृंगारश्रियेचीं भांडारें । उघडिलीं जैसीं ३८ एकें पीनावयवमांसाळें । एकें शुष्कें अतिविक्राळें । एकें दीर्घकंठें विषाळे । विकटें एकें ३९ एवं नानाविधाकृती । इयां पाहतां पारु नाहीं सुभद्रापती । ययांच्या एकेकीं अंगप्रांतीं । देख पां जग १४०

पश्याऽऽदित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा । बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥

जेथ उन्मीलन होत आहे दिठी । तेथ पसरती आदित्यांचिया सृष्टी । पुढती निमीलनीं मिठी[१५] । देत आहाती ४१ वदनींचिया वाफेसवें । होत ज्वाळामय आघवें । जेथ पावकादिक पावे । समूह[१६] वसूंचा ४२ आणि भ्रूलतांचे शेवट । कोपें मिळों पाहती एकवट । तेथ रुद्रगणांचे संघाट । अवतरत देखें ४३ पैं सौम्यतेचा वोलावा । मिती[२०] नेणिजे अश्विनौदेवां । श्रोतीं[२१] होती पांडवा । अनेक वायु ४४ यापरी एकेकाचिये लीळे । जन्मती सुरसिद्धांचीं कुळें । ऐसीं अपारें आणि विशाळें । रूपें इयें पाहीं ४५ जयातें सांगावया वेद बोबडे । पहावया काळाचेंही आयुष्य थोकडें[२२] । धातेयाही पारि न सांपडे । ठाव जयांचा ४६ जयांतें वेदत्रयी कधीं नायके । तियें इयें प्रत्यक्ष देख अनेकें । भोगीं आश्चर्यांचीं कवतिकें । महासिद्धी ४७

इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् । मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥

इया मूर्तीचिया किरीटी । रोममूळीं देखें पां सृष्टी । सुरतरूतळवटीं । तृणांकुर जैसे ४८ चंडवाताचेनि[२४] प्रकाशें । उडत परमाणु दिसती जैसे । भ्रमत ब्रह्मकटाह तसे । अवयवसंधीं ४९ एथ एकैकाचिया प्रदेशीं[२५] । विश्व देख विस्तारेंशीं । आणि विश्वाही परौतें मानसीं । जरी देखावें वर्ते १५० तरी इयेही विषयींचें कांहीं । एथ सर्वथा सांकडें[२६] नाहीं । सुखें आवडे तें माझिया देहीं । देखसी तूं ५१ ऐसें विश्वमूर्ती तेणें । बोलिलें कारुण्यपूर्णें । तंव देखत आहे कीं नाहीं न म्हणे । निवांतुचि ये[२७] ५२ एथ कां पां हा उगला । म्हणोनि श्रीकृष्णें जंव पाहिला । तंव आंतीचें लेणें लेइला । तैसाचि आहे ५३

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा । दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥

कांहीं निव्वळ सोनचाफ्यांप्रमाणें पिवळीं, कांहीं हिरवींगार, ३५ कांहीं तापलेल्या तांब्याप्रमाणें लाल, आणि कांहीं चंद्राप्रमाणें अति शुभ्र, याप्रमाणें माझीं नानावर्णांचीं रूपें पहा. ३६ हे जसे भिन्न रंग आहेत, त्याप्रमाणें भिन्न भिन्न आकृतीही आहेत, कीं ज्या आकृतींच्या सौंदर्यापुढें मदनही लाजून शरण आला. ३७ कांहीं यांधेसूत, कांहीं तेजःपुंज, कांहीं मनोहर,—जणुंकाय शृंगार-लक्ष्मीचे जामदारखानेच उघडले आहेत—३८ कांहीं गोंडस, कांहीं किडाकिडीत, कांहीं अतिविक्राळ, कांहीं उंच मानेचीं, आणि कांहीं मोठया डोक्याचीं भयंकर; ४९ हे सुभद्रापते, याप्रमाणें माझ्या रूपाच्या शेंकडों आकृति आहेत, व त्या पाहूं गेलें असतां त्यांचा पार लागणारा नसून; या एक एक रूपाच्या एक एक अवयवावर सर्व जग भरलेलें आहे, तें पहा. १४०

**अन्वयार्थ**—(आदित्यान्)—बारा आदित्यांस—(वसून्)—आठ वसूंस,—(रुद्रान्)—अकरा रुद्रांस—(अश्विनौ)—दोन अश्विनीकुमारांस—(तथा)—त्याचप्रमाणें—(मरुतः) एकुणपन्नास मरुतांना—(पश्य)—पहा.—(भारत)—हे भरतकुलांतील श्रेष्ठ अर्जुना—(बहूनि)—पुष्कळ—(अदृष्टपूर्वाणि आश्चर्याणि)—पूर्वी कधीं न पाहिलेलीं आश्चर्यें—(पश्य)—पहा. ६

माझी दृष्टि उघडण्याबरोबर आदित्यादि देवांची उत्पत्ति होते, व पुढें तीच दृष्टि मिटल्याबरोबर सर्व देव लय पावतात. ४१ माझ्या मुखांतील श्वासोच्छ्वासाबरोबर सर्व ज्वालामय होऊन ज्वालांपासून अष्टवसूंचा समुदाय उत्पन्न होतो; ४२ आणि माझ्या भिंवयाचीं टोंकें रागानें एके ठिकाणीं मिळतात. असें दिसूं लागलें म्हणजे अकरा रुद्रगण उत्पन्न झालेले दृष्टीस पडतात. ४३ माझ्या सौम्य मुद्रेवरून असंख्य अश्विनीकुमार उत्पन्न होतात. आणि हे पांडवा, कानांतून अनेक वायु उत्पन्न होतात. ४४ याप्रमाणें माझ्या एकेक अवयवाच्या लीलेपासून देव व सिद्ध यांचीं कुळें उत्पन्न होतात. अशीं अपार आणि विशाळ रूपें या ठिकाणीं पहा. ४५ ज्या रूपाचें वर्णन करण्यास वेदांचीही वाणी कुंठित झाली; व जीं रूपें पहावयास काळा-चेंही आयुष्य पुरलें नाहीं; व ज्या रूपांचा ब्रह्मदेवासही अंत लागला नाहीं; ४६ आणि ज्यांचें नांव तीन वेदांनींही कधी ऐकलें नाहीं, तीं माझीं अनेक रूपें या ठिकाणीं प्रत्यक्ष पहा; व तीं पाहिल्यापासून आश्चर्यकारक लीलेचा व महा सिद्धीचा उपभोग घे. ४७.

**अन्वयार्थ**—(अद्य)—आज—(हे गुडाकेश)—हे निद्रेला स्वाधीन ठेवणाऱ्या अर्जुना!—(इह मम देहे)—या माझ्या देहांत—(एकस्थं)—एकाच अवयवांत असलेलें—(कृत्स्नं जगत्) सर्व जगत्—(सचराचरं)—चराचर प्राण्यांसह—(पश्य)—पहा—(च)—आणि—(यत्)—जें—(अन्यत्)—दुसरें कांहीं—(द्रष्टुं इच्छसि)—पाहण्यास इच्छीत असशील तेंहि पहा. ७

हे किरीटी, या रूपाच्या रोमाच्या मुळाशीं सृष्टि आहे, ती पहा. जसें कांहीं कल्पतरूच्या बुडाजवळ कोंवळें गवतच उगवलेलें आहे. ४८ ज्याप्रमाणें झरोक्यांतून घरांत पडलेल्या कवडशांत बारीक बारीक परमाणू तरंगत असलेले दिसतात, त्याप्रमाणें या रूपांच्या प्रत्येक अवयवांच्या सांध्यांतून ब्रह्मांडाचे थवेचे थवे भ्रमण करीत आहेत, असें दिसत आहे. ४९ या एकेक स्वरूपाच्या अवयवांच्या ठिकाणीं सर्व ब्रह्मांड भरलेलें आहे तें पहा; आणि जर तुला कदाचित् विश्वापलीकडेही आणखी पहावेंसें वाटलें, १५० तर त्याबद्दलही कांहीं संकट पडण्याचें कारण नाहीं. या माझ्या शरीरांत जें तुला आवडेल, तें सुखानें पाहून घे. ५१ याप्रमाणें तें विश्वरूप श्रीकृष्ण पूर्ण प्रेमानें बोलल्यावर, अर्जुन आपलें रूप पहात आहे किंवा नाहीं म्हणून पाहूं लागले, तों तो स्वस्थ बसलेला त्यांच्या दृष्टीस पडला! ५२ तेव्हां हा कां स्वस्थ बसला म्हणून जों भगवान पाहूं लागले, तों हा आपला विश्वरूप पाहण्याच्या आशेंत जसा गुंगलेला होता तसाच दृष्टीस पडला! ५३

**अन्वयार्थ**—(तु)—पण—[त्वं-तूं]—(मां)—मला—(अनेन एव)—याच—(स्वचक्षुषा)—आपल्या नेत्रांनीं—(द्रष्टुं)—पाहण्यास—(न शक्यसे)—समर्थ होणार नाहींस. मी—(ते)—तुला—(दिव्यं चक्षुः)—दिव्य दृष्टि—(ददामि)—देतों.—(मे)—माझा—(ऐश्वरं योगं)—ईश्वरसंबंधीं योग—(पश्य)—पहा. ८

१ चांफ्याच्या फुलाप्रमाणें गोरी. २ हिरव्या रंगाचीं. ३ तापलेल्या तांब्यासारखीं लाल. ४ शुभ्रचंद्र. ५ भिन्न-भिन्न. ६ लाजेनें. ७ मदन. ८ तेजःपुंज शरीरें. ९ गोंडस, पुष्ट. १० मोठ्या डोक्यांचीं. ११ भयंकर. १२ अंगप्रदेशीं. १३ उघडणें. १४ मिटल्यावर. १५ लय. १६ अष्ट वसूंचा समुदाय. १७ भिंवयांचे. १८ समुदाय. १९ उपजता. २० संख्या, २१ कानांत. २२ अल्प. २३ ब्रह्मदेवालाही. २४ गवाक्षांतून पडलेल्या किरणांत. २५ अवयवभागांत. २६ उणीव, संकट. २७ विश्वरूपी श्रीकृष्णानें. २८ अर्जुन. २९ स्तब्ध. ३० उत्कंठेचें.

मग म्हणे उत्कंठे वोहट न पडे । अझुनी सुखाची सोयें[2] न सांपडे । पारि दाविलें तें फुडें[3] । नोंकळेचि यया ५४ हें बोलोनि देवो हांसिले । हांसोनि देखणियां[5] तें म्हाणितलें । आम्हीं विश्वरूप तरी दाविलें । पारि न देखसीच तूं ५५ यया बोला येर विचक्षणें[6] । म्हणितलें हां जी कवँणासि[7] तें उँणें[8] । तुम्ही बर्काकरवीं चांदिणें । चरऊं पहा[9] मा ५६ हां हो उँटोनियां[10] आरिसा । आंधळिया दाऊं बैसा । बहिरियापुढें हृषीकेशा । गौणीव[11] करा ५७ मकरंदकेणाचा[12] चारा । जाणतां घालूनि दर्दुरा[13] । वायां धोंडा[14] शार्ङ्गधरा । कोपा कवणा ५८ जें अतींद्रिय[15] म्हणोनि व्यवस्थिलें[16] । केवळ ज्ञानदृष्टीचिया भागा फिटलें[17] । तें तुम्ही चर्मचक्षूंपुढें सूदलें[18] । मी कैसेनि देखें ५९ पारि हें तुमचें उणें न बोलावें । मीचि सोहें[19] तेंचि बरवें । एथ आँथि म्हणितलें देवें । मौनूं[20] बापा १६० साच विश्वरूप जारि आम्हीं दावावें । तरी आधीं देखावया सामर्थ्य कीं द्यावें । पारि बोलत बोलत प्रेमभावें । धसाळ[21] गेलों ६१ काय जाहलें न[22] वाहतां भुईं पेरिजे । तरी तो वेलु विलया जाइजे । तरी आतां माझें निजरूप देखिजे । ते दृष्टी देवों तुज ६२ मग तिया दृष्टी पांडवा । आमुचा ऐश्वर्ययोगु आघवा । देखोनियां अनुभवा । माजिवडा[23] करीं ६३ ऐसें तेणें वेदांतवेद्यें[24] । सकळलोकआद्यें[25] । बोलिलें आराध्यें[26] । जगाचेनी ६४

संजय उवाच:—

एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः । दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥९॥

पैं कौरवकुळचक्रवर्ती । मज हाचि विस्मयो पुढतपुढती । जे श्रियेहूनि त्रिजगतीं । सदैव असे कवणी ६५ ना तरी खुणेचें वानावयालागीं[27] । श्रुतीवांचूनि दावा पां जगीं । ना सेवकपण तरी आंगीं । शेषाच्याचि आथी ६६ हां हो जयाचेनि सोसें[28] । शिणत आठही पाहोर[29] योगी जैसे । अनुसरले गरुडाऐसें[30] । कवण आहे ६७ पारि तें आघवेंचि एकीकडे ठेलें । सौंपें कृष्णसुख एकंदरें जाहलें । जिये दिवूनि जन्मले । पांडव हे ६८ पारि पांचांही आंतु अर्जुना । श्रीकृष्ण सावियांचि[31] जाहला अधीना । कामुक कां जैसा अंगना[32] । आपैतों[33] कीजे ६९ पढविलें पौखिरूं[34] ऐसें न बोले । यापरी क्रीडामृगही तैसा न चले । कैसें दैव एथें सुरवाडलें[35] । तें जाणों[36] न ये १७० आजि परब्रह्म हें सगळें । भोगावया सदैव याचेचि डोळे । कैसे वाचेनि हन लळे । पाळीत असे ७१ हा

मग मनांत म्हणतातः–याची उत्कंठा अजून कमी झाली नाहीं, व याला [ विश्वरूपदर्शनानें ] आनंदही झालेला नाहीं. मी ह्याला विश्वरूप दाखविलें, पण याला तें दिसलें नाहीं. ५४ असें म्हणून देव हंसले, आणि हंसून पहाणाऱ्या अर्जुनास म्हणाले, " आम्ही तुला विश्वरूप दाखविलें परंतु तूं तर तें पहातच नाहींस ! " ५५ हें बोलणें ऐकून तो बुद्धिमान् अर्जुन म्हणाला, " महाराज, हा दोष कोणाचा आहे ? तुम्ही बगळ्याकडून चंद्रामृत पिवविण्याचा प्रयत्न करीत आहां ! [ आणि चांदण्याचे भोक्ते आहेत चकोरपक्षी; बगळे नाहींत. ] ५६ अहो महाराज, आरसा स्वच्छ पुसून आपण तो अंधळ्यास दाखविण्याची खटपट करीत आहां; आणि हे हृषीकेशा, बहिऱ्यापुढें गायन करीत आहां. ५७ हे शार्ङ्गधरा, आपण जाणूनबुजून पुष्पपरागाचा चारा भ्रमरास न घालतां बेडकास घालीत आहां, आणि मग तो वायां गेला म्हणून कोणावर रागावतां ? ५८ जें विश्वरूप इंद्रियांस अगोचर आहे असें शास्त्रांनीही वर्णन केलें आहे, व जें केवळ ज्ञानदृष्टीलाच पहातां येतें, तें जर तुम्ही माझ्या चर्मचक्षूंपुढें ठेविलें, तर माझ्यानें कसें पहावेल ! ५९ परंतु तुमच्या या चुकीचा उच्चार न करितां आपण आपलें स्वस्थ बसावें हेंच बरें. अर्जुनाचें हें भाषण ऐकून देव म्हणाले: " बा अर्जुना, तुझें बोलणें मला मान्य आहे. १६० जर तुला विश्वरूप दाखवावयाचें, तर खरोखर तें पहाण्यास अगोदर आम्हीं तुला सामर्थ्य द्यावयास पाहिजे होतें; परंतु प्रेमाच्या भरांत न बोलतां तुला दृष्टि देण्याचें विस्मरण झालें. ६१ नांगरल्याशिवाय जमिनींत पेरल्यामुळें तो बेळ ज्याप्रमाणें वायां जातो, त्याप्रमाणें तुला विश्वरूप दाखविण्याविषयींची माझी खटपट व्यर्थ गेली, तर आतां अशी दृष्टि देतों कीं, जिच्या योगानें तुला माझें विश्वरूप पहातां येईल ६२ मग हे पांडवा, त्या दृष्टीनें माझा सर्व [ अघटित घटनारूप ] ऐश्वर्ययोग पाहून तो आपल्या पूर्ण अनुभवास आणून घे. " ६३ जो वेदांनींच जाणण्यास योग्य व सकल लोकांचा आदिपुरुष, व सर्व जगास परमपूज्य तो श्रीकृष्ण परमात्मा याप्रमाणें बोलला. ६४

अन्वयार्थ—(ततः)–त्यानंतर–(राजन्)–हे राजा धृतराष्ट्रा,–(एवं उक्त्वा)–असें बोलून–(महायोगेश्वरः हरिः)–महायोगेश्वर हरि–(पार्थाय)–पार्थाला–(परमं ऐश्वरं रूपं)–परम ईश्वरसंबंधीं रूप-(दर्शयामास)–दाखविता झाला. ९

संजय म्हणाला, " हे कौरवकुळांतील चक्रवर्ती धृतराष्ट्रराजा, मला वारंवार हेंच आश्चर्य वाटतें कीं, या तिन्ही लोकांत लक्ष्मीपेक्षां कोणी अधिक दैववान् आहे कां ? ६५ किंवा या जगांत श्रुतीशिवाय कोणी गुणें वर्णन करणारा दुसरा आहे का ?. किंवा दास्यत्व म्हणून जें म्हणतात तें एक शेषाच्याच अंगीं आहे. ६६ अहो भगवंताच्या प्राप्तीसाठीं योग्यासारखी आठही प्रहर सेवा करणारा गरुडासारखा दुसरा कोणी आहे कां ! ६७ परंतु तें सर्व एकीकडे राहून, ज्या दिवशीं पांडव जन्मास आले, त्या दिवसापासून हलीं त्यांचे ठिकाणीं कृष्णसुख एकवटलें आहे. ६८ तथापि पांचही पांडवांत, ज्याप्रमाणें कामातुर पुरुषाला एकादी स्त्री आपल्या अधीन करून घेते, त्याप्रमाणें श्रीकृष्ण अर्जुनाच्या सहज अधीन झाले आहेत, ६९ इतके कीं, पढविलेला पोपटही तसा बोलणार नाहीं, किंवा खेळण्याकरितां बाळगलेला पशुही इतका आज्ञेंत चालणार नाहीं ! अर्जुनाला कसें दैव अनुकूल झालें असेल तें न कळे ! १७० आज पूर्णब्रह्म जे श्रीकृष्ण परमात्मा, त्यांचें ऐश्वर्य भोगण्यास भाग्यवान् अर्जुन याचेच डोळे योग्य आहेत, म्हणूनच त्यांचें बोलणें श्रीकृष्ण असे झेलताहेत; ७१ अर्जुन

१ कमीपणा. २ मार्ग. ३ स्पष्ट. ४ ध्यानांत येईना, घेतां येईना. ५ पहाणाऱ्या अर्जुनास. ६ बुद्धिवानानें. ७ हा दोष कोणाकडे. ८ बगळ्याकडून. ९ पाहूं नका. १० स्वच्छ पुसून, घांसून. ११ गायन. १२ पुष्परसाचा, फुलांतील मधाचा. १३ बेडकाला. १४ घालवितां. १५ इंद्रियांस अगोचर. १६ शास्त्रानें सांगितलें. १७ प्राप्त झालें. १८ ठेवलें. १९ उगी, स्वस्थ रहावें. २० होय, कबूल करूं. २१ विसरून गेलों. २२ न नांगरतां २३ मध्यें, अनुभवांतर्गत. २४ महाविद्येनें जाणण्यास योग्य अशा कृष्णानें. २५ सर्वांच्या मूळ पुरुषानें. २६ पूज्य. २७ वर्णन करावयाकरितां. २८ इच्छेनें, हव्यासानें. २९ प्रहर, योग्याप्रमाणें आठही प्रहर शिणणाऱ्या ( सेवा करणाऱ्या ) गरुडासारखें कोण आहेत ? ३० सांप्रत. ३१ सहजच. ३२ स्त्रियेनें. ३३ स्वाधीन. ३४ पक्षी. ३५ अनुकूल झालें. ३६ जाणतां येत नाहीं.

कोपे कीं निवांतु साहे । हा रुसे तरी बुझावीत जाये । नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ७२ एऱ्हवीं विषय जिणोनि[३] जन्मले । जे शुकादिक दां[३]-दुले । ते विषयींचि वानितां जाहले । भाट[६] ययाचें ७३ हा योगियांचें समाधि-धन । कीं होऊन ठेलें पार्थाअधीन । यालागीं विस्मयो माझें मन । करीतसे राया ७४ तेवींचि संजय म्हणे कायसा । विस्मयो एथें कौरवेशा । श्रीकृष्णें स्वी-कारिजे तया ऐसा । भाग्योदय होय ७५ म्हणोनि तो देवांचा रावो । म्हणे पा-र्थातें तुज दृष्टि देवों । जया विश्वरूपाचा ठावो । देखसी तूं ७६ ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें । निघती ना जंव एकसरें । तंव अविद्येचें आंधारें । जावोंचि लागे ७७ तीं अक्षरें नव्हती देखा । ब्रह्मसाम्राज्यदीपिका । अर्जुनालागीं चित्[१२]कळिका । उजळलिया श्रीकृष्णें ७८ मग दिव्यचक्षुप्रकाशु प्रगटला । तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला । ययापरी दाविता जाहला । ऐश्वर्य आपुलें ७९ हे अवतार जे सकळ । ते जिये समुद्रींचें कां कल्लोळ । विश्व हें मृगजळ । जया रश्मीस्तव[१३] दिसे १८० जिये अनादिभूमिके निटें[१४] । चराचर हें चित्र उमटे । आपणपें[१५] श्रीवैकुंठें[१६] । दाविलें तया ८१ मागां बाळपणीं येणें श्रीपती । जैं एकवेळ खादिली होती माती । तैं को-पोनियां हातीं । यशोदां धरिला ८२ मग भेणें[१७] भेणें जैसें । मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें । चवदाही भुवनें सावकाशें । दाविलीं तिये ८३ ना तरी मधुवनीं ध्रुवासि[१८] केलें । जैसें कपोलें[१९] शंखें शिवतलें[२०] । आणि वेदांचियेही[२१] मतीं ठेलें[२१] । तें लागला बोलों ८४ तैसा अनुग्रहो पैं राया । श्रीहरी केला धनंजया । आतां कवणेकडेही माया । ऐसी भाष नेणोंचि तो ८५ एकसरें ऐश्वर्यतेजें पोहलें[२२] । तया चमत्काराचें एकार्णव[२३] जाहलें । चित्त समाजीं बुडोनि ठेलें । विस्मयाचिया ८६ जैसा औं[२४]-ब्रह्म पूर्णोदकीं । पैं[२५]ऱ्हे मार्कंडेय एकाकी । तैसा विश्वरूप कौतुकीं । पार्थु लोळे ८७ म्हणे केवढें गगन एथ होतें । तें कवणें नेलें पां केउतें[२६] । तीं चरा-चरें महाभूतें । काय जाहलीं ८८ दिशांचे ठावही हारपले । अधोर्ध्व काय नेणों जाहलें । चेइलियाँ[२७] स्वप्न तैसे गेले । लोकाकार ८९ नानां[२८] सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारांगणें[२९] जैसें लोपे । तैसीं गिळिलीं विश्वरूपें । प्रपंचरचना १९० तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सांवरे । इंद्रियांचे रश्मी[३०] माघारे । हृदयवरी भरले ९१ तेथ ताटस्थ्या[३१] ताटस्थ्य पडिलें । टकौसी[३२] टक लागलें । जैसें मोह-नास्त्र घातलें । विचारजातां[३३] ९२ तैसा विस्मितु पाहे कोडें[३४] । तंव पुढां होतें

रागावला तर देव स्वस्थपणें सहन करतात; आणि तो रुसला तर त्याला समजावितात. काय आश्चर्य ! काय देवाला अर्जुनाचें वेड लागलें आहे ! ७२ अर्जुनाची गोष्ट सोडून दिली तर श्रीकृष्णाची योग्यता काय वर्णन करावी ! ज्या समर्थ शुकादिकांनीं जन्मतःच विषयाला जिंकलें म्हणजे जे जितेंद्रिय होऊनच जन्माला आले ते भगवानाच्या रासक्रिडेचें वर्णन करून त्यांचे स्तुतिपाठक बनले. ७३ राजा, श्रीकृष्ण परमात्मा योग्यांच्या समाधीचें अधिदैवत, तें पार्थाच्या स्वाधीन झालें; म्हणून माझ्या मनाला मोठा चमत्कार वाटतो ! ७४ इतकें बोलून संजय पुनः धृतराष्ट्राला म्हणाला राजा, पण यांत चमत्कार तरी कसला श्रीकृष्ण ज्याचा अंगिकार करतील त्याचा असा भाग्योदय व्हावयाचाच. ७५ म्हणून ते देवाधिदेव पार्थाला म्हणाले कीं, मी तुला दिव्यदृष्टि देतों, तिच्या योगानें अखंड विश्वरूप तुला पाहतां येईल. ७६ श्रीकृष्णाच्या मुखांतून हीं अक्षरें निघालीं नाहींत तोंच एकदम अर्जुनाचें अज्ञान नाहींसें होऊं लागलें. ७७ ज्ञानेश्वर म्हणतातः-" तुला दिव्य दृष्टि देतों " हीं अक्षरें नसून ब्रह्माचें ऐश्वर्य दाखविणाऱ्या ज्ञानरूपी मशालीच श्रीकृष्णांनीं अर्जुनाकरितां लावल्या ७८ मग दिव्य दृष्टीचा उजेड पडल्यावरोबर अर्जुनाची ज्ञानदृष्टि चहूंकडे फांकली. याप्रमाणें आपलें ऐश्वर्य श्रीकृष्णानें त्याला दाखविलें. ७९ भगवंताचे सर्व अवतार ज्या विश्वरूप समुद्राच्या लाटा आहेत, किंवा ज्याच्या तेजरूपी सूर्य किरणामुळें हें सर्व जग मृगजलाप्रमाणें भासतें, १८० ज्याच्या अनादिसिद्ध सत्स्वरूप भूमिकेवर स्थावरजंगमरूप चित्रें उमटतात तें आपलें मूळ स्वरूप श्रीकृष्णांनीं अर्जुनास दाखविलें. ८१ पूर्वी लहानपणीं या श्रीकृष्णांनीं जेव्हां एकदां माती खाल्ली होती, तेव्हां यशोदेनें रागावून हातीं धरल्यावर ८२ भीत भीत " मीं माती खाल्ली नाहीं " म्हणून तोंडाचा झाडा देण्याच्या निमित्तानें कीं काय तें उघडून यशोदेला त्यांत चौदाही भुवनें सावकाशपणें दाखविलीं; ८३ किंवा मधुवनांत ध्रुव बाळ दर्शनास गेल्यावर देवाची स्तुति करावी अशी मनाची उत्कट इच्छा असून ती कशी करावी, हें माहीत नसल्यामुळें त्याच्या गालास देवांनीं आपला शंख लावल्यावरोबर ती जसा, वेदांनाही स्तुति करतां आली नाहीं ती करूं लागला, ८४ त्याप्रमाणें, राजा, श्रीहरींनीं धनंजयाला उपदेश केल्यावर माया कोणीकडे गेली, तिचा पत्ताही लागला नाहीं. ८५ एकदम ऐश्वर्यतेजाचा उजेड पडून त्याला सर्वच चमत्कारमय दिसूं लागलें, व त्याचें चित्त आश्चर्यानें निमग्न झालें. ८६ नदीचे कांठीं मार्कंडेय ऋषि संध्या करीत असतां भगवंतास ' आश्चर्य दाखवा ' अशी विनंति केल्यावर ज्याप्रमाणें पृथ्वीपासून आकाशापर्यंत सर्वत्र पाणी होऊन त्यांत तो एकटा पोहूं लागला; त्याप्रमाणें विश्वरूपाच्या कौतुकांत पार्थ निमग्न झाला. ८७ तो म्हणाला, " या ठिकाणीं केवढें आकाश दृष्टीस पडत होतें, तें कोणीं कोणीकडे नेलें, तसेंच ही स्थावरजंगम महाभूतें काय झालीं ! ८८ दिशांचा पत्ता नाहींसा झाला, आकाश व पाताळ कोणीकडे गेलें हें समजेना; आणि जागृत झालेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें स्वप्नांत पाहिलेले पदार्थ दृष्टीस पडत नाहीत, त्याप्रमाणें एवढा वेळ दृष्टीस पडणारी सृष्टी नाहींशी झाली, ८९ अथवा सूर्याच्या तेजानें जसे चंद्र व तारे नाहींतसे होतात, त्याप्रमाणें सृष्टीची सर्व रचना विश्वरूपानें नाहींशी केली."१९० त्या वेळेस त्याच्या मनाची मनाला आठवण नाहींशी होऊन बुद्धि आपली आपणास आवरेना व इंद्रियांच्या वृत्ति सर्व माघाऱ्या फिरून हृदयांत सांठवल्या, ९१ तेव्हां स्तब्धपणाला स्तब्धता प्राप्त झाली, एकाग्रतेस एकाग्रता आली, जणूंकाय सर्व ज्ञानाला मोहनीअस्त्रच घातलें आहे. ९२ त्याप्रमाणें तो आश्चर्ययुक्त कौतुकानें चहूंकडे पाहूं लागला, तों त्याच्यापुढें जी

१ समजावीत. २ जिंकून. ३ समर्थ. ४ रासक्रिडेचें. ५ वर्णन करितां. ६ यांचे स्तुतीपाठक बनले. ७ समाधीचे ध्येय, समाधीचा आवडता विषय. ८ धृतराष्ट्राच्या. ९ श्रीकृष्णाच्या मुखांतून. १० एकदम. ११ ब्रह्माचें ऐश्वर्य दाखविणाऱ्या मशाला, दिवट्या. १२ ज्ञानदीप. १३ किरणाच्या योगानें. १४ नीट, स्वच्छ. १५ आपलें मूळ स्वरूप. १६ श्रीकृष्णानें. १७ भीतभीत. १८ स्तुति करूं इच्छिणाऱ्या ध्रुवाला. १९ गाल. २० स्पर्शिलें. २१ जें वेदांनाही बोलतां येत नाहीं तें. २२ उजाडलें. २३ एकवटलेला समुद्रच. २४ ब्रह्मलोकापर्यंत. २५ पोहतो. २६ कोणीकडे. २७ जागा झालेल्याला. २८ अथवा. २९ नक्षत्रसमूह. ३० किरण. ३१ स्तब्धतेला- ३२ तटस्थेला, एकाग्रतेला. ३३ सर्व विचारांना. ३४ आवडीनें.

चतुर्भुज रूपडें । तेंचि नानारूप चहूंकडे । मांडोनि ठेलें ९३ जैसे वर्षाका-
ळींचें मेघौडे । कां महाप्रळयींचें तेज वाढे । तैसें आपणावीण कवणीकडे ।
नेदीचि उरों ९४ प्रथम स्वरूपसमाधान । पावोनि ठेला अर्जुन । सवेंचि उ-
घडी लोचन । तंव विश्वरूप देखे ९५ ईहींचि दोहीं डोळां । पाहावें विश्व-
रूपा सकळा । तो श्रीकृष्णें सोहळा । पुरविला ऐसा ९६

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् । अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥

मग तेथ सैंधें देखे वदनें । जैसीं रमानायकाचीं राजभुवनें । नाना प्रग-
टलीं निधानें । लावण्यश्रियेचीं ९७ कीं आनंदाचीं वनें सासिन्नलीं । जैसी
सौंदर्या राणीव जोडली । तैसीं मनोहरें देखिलीं । हरीचीं वक्त्रें ९८ तयांही-
माजि एकैकें । साविंयाचि भयानकें । काळरात्रीचीं कटकें । उठावलीं जैसीं ९९
कीं मृत्यूसीचि मुखें जाहलीं । हो कां जे भयाचीं दुर्गें पन्नासिलीं । कीं महा-
कुंडें उघडलीं । प्रळयानळाचीं २०० तैसीं अद्भुतें भयासुरें । तेथ वदनें देखि-
लीं वीरें । आणिकें असाधारणें साळंकारें । सौम्यें बहुतें १ पैं ज्ञानदृष्टीचेनि अव-
लोकें । परि वदनांचा शेवटु[१३] नें टेके । मग लोचन ते कवतिकें । लागला पाहों २
तंव नानावर्णें कमळवनें । विकासिलीं तैसें अर्जुनें । नेत्र देखिले पालिंगेनें ।
आदित्यांचीं ३ तेथेंचि कृष्णमेघांचिया दाटी- । माजि कल्पांत विजूंचिया
सैंफुटी । तैसिया वन्हि[१५] पिंगळा दिठी । भ्रूभंगांतळीं ४ हें एकैक आश्चर्य पा-
हतां । तिये एकेचि रूपीं पांडुसुता । दर्शनाची अनेकता । प्रतिफळली ५ मग
म्हणे चरण ते कवणेकडे । केउते मुकुट कें दोर्दंडें[१९] । ऐसी वाढविताहे कोडें[२०] ।
चाड देखावयाची ६ तेथ भाग्यनिधि पार्था । कां विफलत्व होईल मनोरथा ।
काय पिनाकपाणीचिया[२१] भाता । वायेकांडीं[२२] आहाती ७ ना तरी चतुराननाचियें[२३]
वाचे । काय आहाती लटिकिया अक्षरांचे सांचे । म्हणोनि साद्यंतपण अपा-
रांचें । देखिलें तेणें ८ जयाची सोयें वेदां नोकळे[२५] । तयाचे सकळावयव एकेचि
वेळे । अर्जुनाचे दोन्ही डोळे । भोगिते जाहले ९ चरणौनि[२६] मुकुटवरी । दे-
खत विश्वरूपाची थोरी । जे नाना रत्न अलंकारीं । मिरवत असे २१० पर-
ब्रह्म आपुलेनि आंगें । ल्यावया आपणचि जाहला अनेगें[२७] । तिये लेणीं[२८] मी
सांगें । काइसयासारिखीं[२९] ११ जिये प्रभेचिये झळाळा[३०] । उजाळू[३१] चंद्रादित्यमं-
डळां । जे[३२] महातेजाचा जिव्हाळा । जेणें विश्व प्रगटे १२ तो दिव्यतेज

चतुर्भुज लहान मूर्ति होती, ती वाढून पुष्कळ रूपानें चहूंकडे पसरली असें दिसलें. ९३ ज्याप्रमाणें पावसाळ्यांतील मेघ किंवा महाप्रळयकाळचें सूर्याचें तेज एकदम चहूंकडे पसरतें; त्याप्रमाणें भगवंतानें आपल्याशिवाय कोणीकडेही दुसरें कांही उरूं दिलें नाहीं. ९४ पहिल्या प्रथम अर्जुनास श्रीकृष्णाचें स्वरूप पाहून समाधान वाटलें व लागलीच डोळे उघडून पाहतो तों विश्वरूप दृष्टीस पडलें. ९५ अशा रीतीनें या दोन्ही डोळ्यांनीं सर्व विश्वरूप पहावें अशी त्याची इच्छा होती, तो सर्व लळा श्रीकृष्णांनीं पुरविला. ९६

**अन्वयार्थ**—('अनेकवक्त्रनयनं')—अनेक मुखें व नेत्र ज्याला आहेत असें विश्वरूप,—(अनेकाद्भुतदर्शनं)—ज्यांत अनेक विस्मयकारक दर्शनें आहेत असें—(अनेकदिव्याभरणं)—ज्यांत अनेक दिव्य आभरणें आहेत असें,—(दिव्यानेकोद्यतायुधम्)—ज्यांत अनेक दिव्य आयुधें उचललेलीं आहेत. १०

मग पुष्कळ तोंडें पाहिलीं, ती केवळ श्रीविष्णूच्या राजवाड्यांप्रमाणें सुशोभित दिसलीं, अथवा लावण्यश्रियेचीं भांडारेंच उघडलीं. ९७ किंवा आनंदरूपी वनेंच भरास आलीं आहेत की काय! ज्याप्रमाणें सौंदर्याला राज्याधिकार मिळावा, त्याप्रमाणें आल्हादकारक अशीं श्रीहरीचीं मुखें अर्जुनानें पाहिलीं. ९८ आणि त्याचप्रमाणें त्या तोंडांत कांहीं भयंकर जणूं काळरात्रीचीं सैन्येंच उठलीं आहेत अशींही दिसलीं. ९९ किंवा मृत्युलाच तोंडें उत्पन्न व्हावीं, भयाचे किल्लेच उभारावे, अथवा प्रळयाग्नीचीं महाकुंडेंच पेटवावीं, २०० त्याप्रमाणें अद्भुत व भयंकर अशीं तोंडें अर्जुनानें त्या ठिकाणीं पाहिलीं. आणि पुष्कळ सौम्य अलंकार घातलेलीं चमत्कारिक अशींही पाहिलीं. १ त्याच्या ज्ञानदृष्टीच्याही पाहण्यानें त्या मुखांचा अंत त्याला लागेनाच, म्हणून ते सोडून देव डोळे कोठें आहेत तें तो कौतुकानें पाहूं लागला. २ तेव्हां नाना रंगांचीं कमलवनेंच विकासित झालीं आहेत अशा सूर्यतेजाप्रमाणें चमकणाऱ्या डोळ्यांच्या पंक्ति त्या अर्जुनाच्या दृष्टीस पडल्या. ३ त्यांतच,काळ्या कुळकुळीत मेघांच्या गर्दींत कल्पांताचें वेळीं विजा चमकतात, त्याप्रमाणें भिवयांखालीं अग्नीप्रमाणें पिंगट असे नेत्र चमकत होते; ४ त्या एकच रूपावर एक एक आश्चर्य पाहून, विश्वरूपांत अनेक गोष्टी भरल्या आहेत असें त्याच्या अनुभवास आलें. ५ मग, या विश्वरूपाचे पाय कोणीकडे आहेत, मुकुट कोणीकडे आहे व बाहुदंड कोणीकडे आहेत हें पाहण्याची त्याची कौतुकानें इच्छा वाढत चालली. ६ मग भाग्यवान् असा जो पार्थ, त्याचे मनोरथ विफल होतील काय? हें महा-शंकराच्या भात्यांत कधीं वायबाण सांपडतील कां? ७ किंवा ब्रह्मदेवाच्या वाचेंत लटक्या अक्षरांचे ठसे असूं शकतील कां? नाहीं; म्हणून, अपार असें जें विश्वरूप, त्याचा आदि व अंत हे अर्जुनानें पाहिले. ८ ज्या रूपाचा थांग वेदासही लागला नाहीं, त्याचे सर्व अवयव एकदम अर्जुनानें दोन्ही डोळ्यांनीं पाहिले. ९ जें नानारत्नांच्या अलंकारांनीं शोभायमान होतें त्या विश्वरूपाच्या चरणापासून मुकुटापर्यंत महिमा पाहिला. २१० परब्रह्मानें आपण स्वतः स्वरूप धारण करून त्याजवर परब्रह्मरूपीच अलंकार घातल्यावर ते अलंकार कशासारखे शोभतात म्हणून मी सांगूं? ११ ज्या तेजानें चंद्र व सूर्य यांचीं मंडळें प्रकाशित होतात, व ज्या महातेजानें विश्व प्रकाशित होतें, त्याचें जें जीवन. १२ तें ब्रह्म, ब्रह्मरूपी अलंकार घातल्यावर.

१ मेघ. २ ज्ञानदृष्टीच्याही डोळ्यांनीं. ३ पुष्कळ. ४ भांडारें. ५ भरास आलीं, ६ सहजच. ७ सैन्यें. ८ किल्ले. ९ पसरली, रचलीं. १० प्रलयाग्नीचीं. ११ पहाण्यानें. १२ न लागे. १३ पंक्ति, समुदाय. १४ चमकणें, चमक. १५ अग्नीप्रमाणें पिंगट. १६ भिंवयांखालीं. १७ अनुभवास आली. १८ कोणीकडे. १९ बाहू. २० आवडीनें. २१ महादेवाच्या भात्यांत. २२ वायबाण. २३ ब्रह्मदेवाच्या. २४ मार्ग, अंत, थांग. २५ न सांपडे, कळली नाहीं, लागली नाहीं. २६ चरणांपासून. २७ पुष्कळ, अनेक. २८ अलंकार. २९ कशासारखी. ३० प्रकाशानें. ३१ तेज, प्रकाश. ३२ प्रभा.

शृंगारु । कोणाचिये मतीसी होय गोचरु । देव आपणपेंचि लेइले ऐसें वीरु ।
देखत असे १३ मग तेथेंचि ज्ञानाचिया डोळां । पहात करपेल्लवां जंव सरला ।
तंव तोडित कल्पांतींचिया ज्वाळा । तैसीं शस्त्रें झळकत देखे १४ आपण आंग
आपण अलंकार । आपण हात आपण हतियार । आपण जीव आपण शरीर ।
देखे चराचर कोंदलें देवें १५ जयाचिया किरणांचे निखरैपणें । नक्षत्रांचे होत
फुटाणे । तेजें खिरडला वन्हि म्हणे । समुद्रीं रिघों १६ मग काळकूटकल्लोळीं कव-
ळिलें । नाना महाविजूंचें दांग उमटले । तैसें अपार कर देखिले । उदितायुधीं १७

दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् । सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

कीं भेणें तेथूनि काढिली दिठी । मग कंठमुगुट पहातसे किरीटी । तंव
सुरतरूंची सृष्टी । जयांपासोनि कां जाहली १८ जिये महासिद्धींचीं मूळपीठें ।
शिणली कमळा जेथ वांवटे । तैसीं कुसुमें अति चोखटें । तुरंबिलीं[11] देखिलीं १९
मुगुटावरी स्तबक । ठायीं ठायीं पूजाबंध अनेक । कंठीं रुळताति अलौकिक ।
माळादंड २२० स्वर्गें सूर्यतेज वेढिलें । जैसें पंधरेनें मेरूतें मढिलें । तैसें नितं-
बांवरी । गौंढिलें । पीतांबरु झळके २१ श्रीमहादेवो कापुरें उटिला । कां कैलासु
पारजें डवरिला । नाना क्षीरोदकें पांघरविला । क्षीरार्णवो जैसा २२ जैसी
चंद्रमयांची घडी उपलविली । मग गगनाकरवीं बुंथी घेवविली । तैसी चंदन-
पिंजरी देखिली । सर्वांगीं तेणें २३ जेणें स्वप्रकाशा कांती चढे । ब्रह्मानंदाचा
निदाघु मोडे । जयाचेनि सौरम्यें जीवित जोडे । वेदवेंतीये २४ जयाचे नि-
लेंपें अनुलेपु करी । जे अनंगुही सर्वांगीं धरी । तया सुगंधाची थोरी । क-
वण वानी २५ ऐसी एकैक शृंगारशोभा । पाहतां अर्जुन जातसे क्षोभा । तेवींचि
देवो बैसला कीं उभा । कासया तूंहि हें नेणवे २६ बाहेर दिठी उघडोनि पाहे ।
तंव आघवें मूर्तिमय देखत आहे । मग आतां न पाहें म्हणोनि उगा राहे ।
तरी आंतुही तैसेंचि २७ अनावर मुखें समोर देखे । तयाभेणें पाठीमोरा जंव
ठाके । तंव तयाहीकडे श्रीमुखें । करचरण तैसेचि २८ अहो पाहतां कीर प्र-
तिभासे । एथ नवलावो काय असे । परि न पाहतांचि दिसे । चोज आइका
२९ कैसें अनुग्रहाचें करणें । पार्थाचें पाहणें आणि न पाहणें । तयाही सकट
नारायणें । व्यापूनि घेतलें २३० म्हणोनि आश्चर्याच्या पुरीं एकीं । पडिला
ठायेंठांव थडी ठाकी । तंव चमत्काराचिया आणिकीं । महार्णवीं पडे ३१ ऐसा

जाणण्याची कोणाची शक्ति होणार ? तर अर्जुनाला त्या महानें, प्रह्मच अलंकार घातले आहेत असें दृष्टीस पडलें. ११ मग ज्ञानदृष्टीनें विश्वरूपाचे हात पाहूं लागला, तों ते सरळ असून त्यांत कल्पांतीच्या ज्वाळा तोडणारी शस्त्रें चमकत आहेत असें दृष्टीस पडलें. १४ आपणच आंग, आपणच त्यावर घातलेले अलंकार, आपणच हात, आपणच हत्यारें, आपणच जीव, व शरीरही आपणच; फार तर काय, चराचर विश्व देवानें व्यापून सोडलें आहे असें अर्जुन पाहता झाला. १५ त्याच्या किरणांच्या प्रखरपणानें नक्षत्रांचे फुटाणे होऊन, त्या तेजानें अग्नीही पोळत्यामुळें त्यास समुद्रांत शिरण्याची इच्छा झाली. १६ मग जणूंकाय काळकूट विषाच्या लाटाच उसळल्या आहेत, किंवा महाविजांचें अरण्यच उद्भवलें आहे, अशीं आयुधें हातांत घेऊन दुसऱ्यांस मारण्याकरितां उगारल्यासारखे अपरिमित हात अर्जुनानें पाहिले. १७

**अन्वयार्थ** (दिव्यमाल्याम्बरधरम्)–दिव्य पुष्पें व वस्त्रें धारण करणारें,–(दिव्यगंधानुलेपनं)-दिव्य गंधाचें ज्याला अनुलेपन केलें आहे,–(सर्वाश्चर्यमयं)-सर्व आश्चर्यमय–(देवं)–प्रकाशमय,–(अनन्तं)–अन्तरहित-(विश्वतोमुखं)–व सर्वतोमुख असें विश्वरूप भगवानानें त्याला दाखविलें. ११

त्या हातांतील असंख्य शस्त्रांच्या भयानें अर्जुनानें आपली दृष्टि फिरवून, मग तो कंठ व मुकुट यांजकडे पाहूं लागला, तेव्हां त्याला असें वाटलें की, कल्पतरूंची उत्पत्ति याजपासूनच झाली आहे की काय ? १८ महासिद्धींचें अधिष्ठान जी लक्ष्मी, ती दिणली असतां जेथें विश्रांति घेते, अशी जीं अति उत्कृष्ट कमळें त्यांचा वास भगवान् घेत आहेत असें पाहिलें. १९ मुकुटावर अनुक्रमानें फुलांचे गुच्छ एकावर एक लावलेले असून कंठांत अवर्णनीय अशा पुष्पमाळा लोळत होत्या. २२० ज्याप्रमाणें स्वर्ग सूर्यतेजानें भरलेला किंवा मेरु पर्वत सोन्यानें मढविलेला आहे, त्याप्रमाणें कंबरे-सभोंवती नेसलेला पिवळा पितांबर झळकत होता. २१ ज्याप्रमाणें श्रीमहादेवास कापुराची उटी लावावी, किंवा कैलास पर्वत पाऱ्यानें लिंपावा, क्षीरसमुद्राला पांढऱ्या स्वच्छ उदकानें आच्छादावा, २२ ज्याप्रमाणें चंद्राची घडी उकलून तिचा आकाशाला बुर्खा घालावा, त्याप्रमाणें सर्वांगावर पांढरी शुभ्र चंदनाची उटी दिसली. २३ ज्याच्या योगानें स्वयंप्रकाश वस्तुलाही तेज चढतें, 'ब्रह्मानंद' जो आत्माच अति थंड आहे, त्याचाही ज्यानें दाह नाहींसा होतो, व ज्याच्या सुगंधानें स्वभावतःच गंधयुक्त असलेली पृथ्वी सुगंधीत होते, २४ निर्लेप असा जो परमात्मा तोही ज्या गंधाचा अनुलेप करितो, व मदनही ज्याची उटी सर्वांगाला लावतो, त्या सुगंधाची थोरवी कोण वर्णन करील ? २५ याप्रमाणें एक एक अलंकाराची शोभा पाहून अर्जुन भांबावला; तशांत, देव बसले आहेत किंवा उभे आहेत, किंवा निजलेले आहेत अथवा कशावर आहेत हें त्यास समजेना. २६ डोळे उघडून बाहेर इकडे तिकडे पाहतो, तों सर्व विश्वरूपानें भरलें आहे असें दिसलें, म्हणून त्याकडे न पाहतां डोळे झांकून स्वस्थ बसावें, असें मनांत आणून डोळे झांकतो, तों अंतर्यामींही तसेंच विश्वरूप दिसूं लागलें. २७ समोर भयंकर तोंडें दिसतात, म्हणून त्याच्या भीतीनें पाठीमागें जों पाहूं लागला, तों तिकडेही विश्वरूपाचीं तोंडें, हात पाय तसेंच दिसूं लागले. २८ अहो, दृष्टि उघडून पाहिल्यावर सर्वत्र विश्वरूपाचा भास होतो यांत आश्चर्य तें कसलें ! परंतु डोळे मिटल्यावर तें दिसतें हें नवल ऐका. २९ प्रभूच्या कृपेची करणी कशी आहे ती पहा, की पार्थाच्या पाहाण्यांत श्रीकृष्णाची व्याप्ति आहे, इतकेंच नव्हे तर, न पाहाण्यांतही श्रीकृष्णाचीच व्याप्ति आहे. २३० म्हणून, एका आश्चर्यरूपी पुरांत पडल्यावर तात्काळ कांठावर जाऊन जो रहातो आहे, तों दुसऱ्या चमत्काररूपी महासमुद्रांत पडला. ३१ याप्रमाणें आपल्या [ विश्वरूप ] दर्श-

१ समजणार, कळणार. २ हातांना. ३ तीव्रपणानें. ४ मागें हटलेला. ५ विषोर्मीत. ६ समुदाय, अरण्य. ७ उचललेल्या आयुधासहित. ८ आवस्थानें ९ लक्ष्मी. १० विश्रांति पावे. ११ धारण केली. १२ घोस. १३ फुलांच्या जाळ्या, वेण्या इत्यादि. १४ लोळतात. १५ पुष्पमाला. १६ सोन्यानें. १७ कटिप्रदेशाच्या भागावर. १८ नेसलेलें. १९ पाऱ्यानें. २० लिंपला. २१ पांढऱ्या वस्त्रानें. २२ चांदण्याची. २३ उकलिली. २४ खोळ, बुरखा. २५ चंदनाची उटी. २६ दाह. २७ सुगंधानें. २८ पृथ्वीस. २९ निर्मळ. ३० निस्तेज. ३१ ब्रह्म. ३२ शरीररहितहि. ३३ वर्णन करी. ३४ भांबावून गेला, वेडावला. ३५ अगणित. ३६ आश्चर्य. ३७ नवल. ३८ कृपेचें. ३९ पुरांत, प्रवाहांत ४० तत्काळ. ४१ कांठावर, तीरावर.

अर्जुनु असाधारणें । आपुलिया दर्शनाचेनि विंदाणें । कवळूनि घेतला तेणें । अनंतरूपें ३२ तो विश्वतोमुख स्वभावें । आणि तेचि दावावयालागीं पांडवें । प्रार्थिला आतां आघवें । होऊनि ठेला ३३ आणि दीपें कां सूर्यें प्रगटे । अथवा निमुंटलिया देखावेंचि खुंटे । तैसी दिठी नव्हे जे वैकुंठें । दिधली आहे ३४ म्हणोनि किरीटीसि दोहीं परी । तें देखणें देखे आंधारीं । हे संजयो हस्तिनापुरीं । सांगतसे राया ३५ म्हणे किंबहुना अवधारिलें । पार्थें विश्वरूप देखिलें । नाना आभरणीं भरलें । विश्वतोमुख ३६

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता । यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥१२॥

तिये अंगप्रभेचा देवा । नवलावो । काइंसया ऐसा सांगावा । कल्पांतीं एकुचि मेळावा । द्वादशादित्यांचा होय ३७ तैसे ते दिव्यसूर्य सहस्रवरी । जरी उदयजती कां एकेचि अवसरीं । तऱ्ही तया तेजाची थोरी । उपमूं नये ३८ आघवयाचि विजूंचा मेळावा कीजे । आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे । तेवींचि दशकुही मेळविजे । महातेजांचा ३९ तऱ्ही तिये अंगप्रभेचेनि पाडें । हें तेज कांहीं होईल थोडें । आणि तयाऐसें कीर चोखडें । त्रिशुद्धी नोहे २४० ऐसें माहात्म्य या श्रीहरीचें सहज । फांकतसे सर्वांगींचें तेज । तें मुनिकृपा जी मज । दृश्य जाहलें ४१

तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा । अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तथा ॥ १३ ॥

आणि तिये विश्वरूपीं एकीकडे । जग आघवें आपुलेनि पर्वाडें । जैसे महोदधीमाजि बुडबुडे । सिनाने दिसती ४२ कां आकाशीं गंधर्वनगर । भूतळीं पिपीलिकां बांधे घर । नाना मेरूवरी सपुर । परमाणु बैसले ४३ विश्व आघवेंचि परी । तया देवचक्रवर्तीचिया शरीरीं । अर्जुन तिये अवसरीं । देखता जाहला ४४

ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः । प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥ १४ ॥

तेथ एक विश्व एक आपण । ऐसें अळुमाळ होतें जें दुजेपण । तेंही आटोनि गेलें अंतःकरण । विरालें सहसा ४५ आंतु आनंदा चेइरें जाहलें । बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें । अपाद पां गुंतलें । पुलकांचलें ४६ वोंपिये प्रथमदशें । वोहळलेया शैलांचें सर्वांग जैसें । विरूढे कोमलांकुरीं तैसे । रोमांच जाहले ४७ शिवतला चंद्रकरीं । सोमकांतु द्रावो धरी । तैसिया स्वेदकणिका शरीरीं । दाटलिया ४८ माजि सांपडलेनि अलिकुळें । जळावरी

नाचा वेध लागलेल्या अर्जुनास कौशल्यानें श्रीकृष्णांनीं अनंतरूपें दाखवून व्यापून टाकलें. ३२ तो सर्वव्यापि व स्वभावतःच सर्वतोमुख असल्यामुळें आणि तशांत अर्जुनानें विश्वरूप दाखवा अशी प्रार्थना केल्यामुळें आपणच सर्व रूपें घेऊन नटला. ३३ अर्जुनाला श्रीकृष्णांनीं जी दिव्य दृष्टि दिली होती, ती दिव्याचा किंवा सूर्याचा प्रकाश असला तरच दिसावें किंवा मिटली असतां पहाणेंच बंद व्हावें अशांतली नव्हती, ३४ म्हणून अर्जुनास डोळे उघडे ठेवून किंवा झांकून आणि अंधकारांत सुद्धां त्या दिव्यदृष्टीनें दिसत होतें, असें हस्तिनापुरांत संजयानें धृतराष्ट्र राजास सांगितलें, ३५ व म्हटलें कीं, " राजा, ऐकलेंस का ? नाना अलंकारांनीं भरलेलें व ज्याला सर्व बाजूंनीं डोळे आहेत असें विश्वरूप पार्थानें पाहिलें. ३६

**अन्वयार्थ**--(यदि)-जर-(दिवि)-द्युलोकांत-आकाशांत-(सूर्यसहस्रस्य भाः)-सहस्र सूर्यांची प्रभा-(युगपत्)-एकाच वेळीं-(उत्थिता भवेत्)-उत्थित-उत्पन्न होईल तर-(सा)-ती प्रभा-(तस्य महात्मनः)-त्या महात्म्याच्या-(भासः सदृशी)-प्रभेच्या सारखी-(स्यात्)-होईल. १२

राजा, त्या विश्वरूपाचें तेज कशासारखें होतें म्हणून सांगूं ! प्रलयकालीं जसे द्वादशसूर्य एकत्र मिळतात, ३७ तसे सहस्रावधि सूर्य जरी एकाच वेळेला उदय पावले, तरी त्यांच्यानेंही त्या विश्वरूपाच्या तेजाची बरोबरी करवणार नाहीं. ३८ सर्व विजा एकत्र करून व प्रलयकाळच्या अग्नीचीं सर्व साहित्यें जमवून व त्यांत उदकापेक्षां दसपट असें महातेज जर मिळविलें, ३९ तर त्या विश्वरूपाच्या आंगच्या तेजाची कांहीं थोडी बरोबरी होईल, परंतु त्यांची अगदीं बरोबरी तर खास होणार नाहीं. २४० असा श्रीहरीचा सहज महिमा आहे, त्याच्या विश्वरूपाचें तेज सर्वत्र पसरलें होतें तें व्यासाच्या कृपेनें माझे दृष्टीस पडलें. ४१

**अन्वयार्थ**--(तदा)-त्या वेळीं-(पांडवः)-अर्जुन-(तत्र देवदेवस्य शरीरे)-त्या देवाधिदेवाच्या शरीरांत-(एकस्थं)-एकाच अवयवांत स्थित असलेलें-(कृत्स्नं जगत्)-सर्व जगत्-(अनेकधा)-अनेक प्रकारें-(प्रविभक्तं)-अत्यंत विभागलेलें-(अपश्यत्)-पाहता झाला. १३

आणखी, त्या विश्वरूपावर सर्व जग एका बाजूस दिसत होतें ज्याप्रमाणें समुद्राच्या पाण्यावर निरनिराळे बुडबुडे दृष्टीस पडतात, ४२ किंवा आकाशांत ढगांवर जसें गंधर्वनगर, पृथ्वीवर मुंग्यांचें वारूळ, किंवा डोंगरावर बारीक मातीचे कण असतात, ४३ त्याप्रमाणें त्या वेळीं त्या देवाधिदेव श्रीकृष्णाच्या शरीरावर अर्जुनानें हें सर्व जग पाहिलें. ४४

**अन्वयार्थ**--( ततः )-त्यानंतर-( सः धनंजयः )-तो अर्जुन-(विस्मयाविष्टः)-विस्मयानें युक्त व-(हृष्टरोमा)-ज्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले आहेत, असा होऊन-(शिरसा)-मस्तकानें-(देवं)-देवाला-(प्रणम्य)-प्रणाम करून-(कृतांजलिः)-ज्यानें आपले हात जोडले आहेत असा तो-(अभाषत)-त्याला बोलला. १४

तेव्हां, विश्व वेगळें व आपण वेगळे असें जें थोडें द्वैत होतें तेंही नाहींसें होऊन अर्जुनाचें मनही सहज विरून गेलें. ४५ अंतर्यामीं आनंद उत्पन्न होऊन बाहेरील गात्रें ढिली पडलीं, आणि पायापासून मस्तकापर्यंत रोमांच उभे राहिले. ४६ पावसाळ्याच्या सुरवातीस पर्वतावरील सर्व मळ वाहून गेल्यावर जसें गवत उगवतें, त्याप्रमाणें अर्जुनाच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले, ४७ चंद्रकिरणांचा स्पर्श झाल्यावर ज्याप्रमाणें चंद्रकांत मण्यास पाझर सुटतो, त्याप्रमाणें अर्जुनाच्या शरीरावर घामाचे बिंदु आले, ४८ कमळाच्या कळींत

१ विश्लक्षण. २ चलेनें, कौशल्यानें. ३ व्यापून. ४ सर्वव्यापी ईश्वर. ५ झांकली असतां. ६ कृष्णानें. ६ पहावें लागतें. ९ हे राजन्. ९ कौतुक. १० कशासारखा. ११ दशसंख्यारूप आवरणाग्नि, महातेजांची दसकडी. १२ योग्यतेनें. १३ व्यासाच्या कृपेनें. १४ विस्तारानें. १५ निरनिराळे. १६ मेघ समुदायाचें कल्पित नगर. १७ मुंगी. १७ यथास्थित. १९ कांहींसें. २० उसाळी आली, जागृति आली. २१ नखशिखांत. २२ आच्छादिलें. २३ रोमांचांनीं. २४ पावसाळ्याचे. २५ पाणी वाहून गेल्यावर. २६ पर्वतांचें. २७ घामाचे बिंदु. २८ भ्रमरसमुदाय.

कमळकळिका जेवीं आंदोळे । तेवीं आतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे
४९ कर्पूरकर्दळीचीं गर्भपुटें । उकलतां कापुराचेनि कोंदाटें । पुलिकां गळती
तेवीं थेंबुटें । नेत्रौंनि पडती २५० उदयलेनि सुधाकरें । जैसा भरलाचि समुद्र
भरे । तैसा वेळोवेळां ऊर्मिभरें । उचंबळत असे ५१ ऐसा सात्त्विकांही आठां
भावां । परस्परें वर्ततसे हेवा । तेथ ब्रह्मनंदाची जीवा । राणीव[१०] फावली ५२
तैसाचि तया सुखानुभवापाठीं । केला द्वैताचा सांभाळु दिठी । मग उसासौनि[११]
किरीटी । वास [१२] पाहिली ५३ तेथ बैसला होता जिया सवा । तियाचियाकडे
मस्तक खालविला देवा । मग जोडूनि करसंपुट बरवा । बोलतु असे ५४

अर्जुन उवाचः—

पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।
ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥

म्हणे जयजयाजी स्वामी । नवल कृपा केली तुम्हीं । जें हें विश्वरूप कीं
आम्हीं । प्राकृत देखों ५५ परि साचाचि भलें केलें गोसाविया । मज पॅरितोषु
जाहला सावियाँ । जी देखलासि जो इया । सृष्टीसी तूं आश्रयो ५६ देवा
मंदराचेनि अँगेलगें । ठायीं ठायीं श्वापदांचीं दाँगें । तैसीं इयें तुझ्या देहीं अनेगें
देखतसें भुवनें ५७ अहो आकाशाचिये खोळे । दिसती ग्रहगणांची
कुळें । कां महावृक्षीं अविसाळें । पक्षिजातीचीं ५८ तयापरी श्रीहरी । तुझिय
विश्वात्मकीं इये शरीरीं । स्वर्गु देखतसें अवधारीं । सुरगणेंसीं ५९ प्रभु मह
भूतांचें पंचक । येथ देखत आहे अनेक । आणि भूतग्राम एकेक । भूतसृष्टी
२६० जी सत्यलोकु तुजमाजि आहे । देखिला चतुरानन्नु हा नोहे । आणि ये
कडे जंव पाहें । तंव कैलासुही दिसे ६१ श्रीमहादेव भवानियेशीं । तुझ्या
सतसे एके अंशीं । आणि तूंतेंही गा हृषीकेशी । तुजमाजि देखें ६२ पैं क
पादि ऋषिकुळें । इयें तुझिया स्वरूपीं सकळें । देखतसें पाताळें । पन्नगें
६३ किंबहुना त्रैलोक्यपती । तुझिया एकेकाचि अवयवाचिये भिंती । इये च
देशभुवनें चित्राकृती । अंकुरलीं जाणों ६४ आणि तेथिंचे जे जे लोक
चित्ररचना जी अनेक । ऐसें देखतसें अलोलिक । गांभीर्य[२९] तुझें ६५

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।
नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥ १६ ॥

दिव्यचक्षूंचेनि पैसें[३०] । चहूंकडे जंव पाहत असें । तंव दोर्दंडिकां[३१]

भुंगा सांपडला म्हणजे ती हेलकावते, त्याप्रमाणें अंतर्यामीच्या सुखाच्या लहरीनें अर्जुनाचें शरीर कापूं लागलें; ४९ कापूर दाटल्यावर ज्याप्रमाणें कापूरकेळीचीं सोपटें उकलून कापुराचे कण बाहेर पडूं लागतात, त्याप्रमाणें डोळ्यांवाटें आनंदाश्रूंचे थेंब पडूं लागले; २५० चंद्रोदय झाल्यावर ज्याप्रमाणें समुद्र भरलेला असूनही त्यास भरती येते, त्याप्रमाणें अंतर्यामीच्या सुखाच्या लाटांनीं तो वरचेवर डोलूं लागला. ५१ याप्रमाणें अष्टसात्त्विक भावांची एकमेकांत चढाओढ लागून, अर्जुनास ब्रह्मानंदाची राज्यप्राप्ति झाली. ५२ त्याचप्रमाणें, ब्रह्मानंदसुखाच्या मागोमाग देव व मी असें द्वैत कायम राहिल्यामुळें अर्जुन श्वासोच्छ्वास टाकून दृष्टीनें पाहूं लागला; ५३ आणि ज्या बाजूला देव बसले होते, त्या बाजूला वळून, मस्तक लववून व हात जोडून प्रार्थना करूं लागला. ५४

अन्वयार्थ—(देव)–हे श्रीकृष्णा !–[अहं]–मी–(तव देहे)–तुझ्या देहांत–(सर्वान् देवान्)–सर्व देवांना–(तथा)–त्याचप्रमाणें–(भूतविशेषसंघान्)–निरनिराळ्या जातींच्या स्थावर-जंगम प्राण्यांच्या समूहांस–(पश्यामि)–पाहतों–(ईशं कमलासनस्थं ब्रह्माणं)–सर्व प्रजांचें नियमन करणारा, पृथ्वीकमलाच्या मेरुकर्णिकेत स्थित असलेला जो चतुर्मुख ब्रह्मदेव त्याला,–(च)–व–(सर्वान् ऋषीन्)–वसिष्ठादि सर्व ऋषींना–(च)–आणि–(दिव्यान् उरगान्)–वासुकिप्रभृति दिव्य सर्पांना मी पहातों. १५

अर्जुन म्हणाला, "प्रभो, आपला जयजयकार असो. आपली आम्हांवर मोठी कृपा झाली, की, आम्ही सामान्य जीवही विश्वरूप पहातों. ५५ भगवन्, आपण ही गोष्ट फार चांगली केली, व तिच्या योगानें स्वभावतःच मला फार आनंद झाला; ती ही की, सर्व सृष्टीला तुमचा आश्रय आहे असें मी आज आपल्या दृष्टीनें पाहिलें. ५६ देवा, पर्वतावर जसे जागोजाग, दर्‍यांतून श्वापदांचे समुदाय असतात, त्याप्रमाणें या तुमच्या शरीरावर शेंकडों इंद्रचंद्रादि लोक माझ्या दृष्टीस पडले. ५७ अहो, आकाशावर ज्याप्रमाणें ग्रहांचे समुदाय दिसतात, किंवा थोरल्या वृक्षांवर जशीं पक्ष्यांचीं घरटीं दृष्टीस पडतात, ५८ त्याप्रमाणें, श्रीहरी, तुमच्या विश्वरूपी शरिरांत देवगणांसह स्वर्ग दिसत आहे. ५९ हे प्रभो, या तुमच्या शरिरांत महाभूतांची अनेक पंचकें व भूतसृष्टीचे–भूतापासून उत्पन्न झालेल्या–निरनिराळ्या प्राण्यांचे समुदाय पहात आहें. २६० तसाच या तुमच्या शरिरावर सत्यलोकही आहे, व तेथील ब्रह्मदेव तो हाच नव्हे काय ? दुसरीकडे जों पहावें तों कैलासही दिसत आहे. ६१ पार्वतीसह श्रीशंकर हे तुमच्या शरिराच्या एका भागावर दिसत आहेत. हे हृषीकेशा, तुम्हालाही तुमच्या या शरिरावर मी पाहतों आहें. ६२ कश्यपादि ऋषींचीं सर्व कुळें व सर्पांसह पाताळही तुमच्या विश्वरूपावर दिसत आहे. ६३ किंबहुना, हे त्रैलोक्यपते, तुमच्या या एक एक अवयवरूपी भिंतीवर चौदा भुवनांच्या चित्रांकृतीच काढल्या आहेत की काय असें वाटतें; ६४ आणि त्या भुवनांतील जे जे लोक, तीच अनेक प्रकारची चित्ररचना आहे, असें तुमचें अलौकिक मोठेपण दृष्टीस पडतें. ६५

अन्वयार्थ—(विश्वेश्वर विश्वरूप)–हे विश्वेश्वरा ! हे विश्वरूप कृष्णा !–[ अहं ]–मी–( त्वा )–तुला–(अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं)–अनेक हात, उदरें, तोंडें व नेत्र यांनीं युक्त असलेला असा–(सर्वतः अनन्तरूपं)–सर्व बाजूंनीं अनन्तरूपांनीं युक्त असलेला असा–(पश्यामि)–पाहतों–[अहं]–मी–(तव)–तुझा–(आदिं)–आरंभ–(न पश्यामि)–पहात नाहीं,–(मध्यं न)–[पश्यामि]–मध्य पहात नाहीं–(पुनः)–आणि पुनः–(अन्तं)–तुझा अंत पहात नाहीं. १६

तुम्ही दिलेल्या दिव्य चक्षूंच्या बळानें चहूंकडे पाहूं लागलों, तों तुमच्या बाहुदंडांचे ठिकाणीं आकाशाचे कोंब आले आहेत कीं काय, असें

१ हालते. २ कापूर केळींची. ३ केळींचीं सोपें, सोपटें. ४ दाट भरणीनें, दाटल्यानें, दाटल्यावर. ५ शितोडे, कण. ६ थेंब. ७ डोळ्यांवाटे. ८ चंद्रानें. ९ आनंदाच्या लहरींनीं. १० राज्य प्राप्त झालें. ११ उच्छ्वास टाकून, उसासा टाकून. १२ भोंवताली नजर टाकली, पाहूं लागला. १३ सामान्य. १४ संतोष. १५ सहज. १६ अंगावर, समागमें, संबंधानें. १७ समुदाय, कळप. १८ अनेक. १९ डेर्‍यांत, पोटांत. २० समुदाय. २१ घरटीं. २२ देवांसह. २३ प्राणिसमुदाय. २४ ब्रह्मदेव. २५ पार्वतीसह. २६ सर्पांसह. २७ चितारली. २८ अलौकिक. २९ अगाधपण, मोठेपण. ३० योगानें, बळानें. ३१ बाहुदंडांनीं.

आकाश कोंभैलें ६६ तैसें एकचि निरंतर । देवा देखत असें तुझे कर । करीत
आघवेचि व्यापार । एकेचि काळीं ६७ मग महाशून्याचेनि[13] पैसारें । उघडलीं
ब्रह्मकटाहाचीं भांडारें । तैसीं देखतसे अपारें । उदरें तुझीं ६८ जी सहस्रशी-
र्षयाचें देखिलें । कोडीवरी होताति एकिवेळे । कीं परब्रह्मचि वदनफळें । मो-
डोनि आलें ६९ तैसीं वक्त्रें जेउतीं तेउतीं । तुझीं देखतसें विश्वमूर्तीं । आणि
तयाचिपरीं नेत्रपंक्ती । अनेकां सैंघ २७० हें असो स्वर्ग पाताळ । कीं भूमी
दिशा अंतराळ । हे विवक्षा ठेली सकळ । मूर्तिमय देखतसें ७१ तुजवीण
एकादियाकडे । परमाणूहि एतुला कोडें । अवकाशु पाहतसे परि न सांपडे ।
ऐसें व्यापिलें तुवां ७२ इये नानापरी अपारिमितें । जेतुलीं सांठविलीं होतीं
महाभूतें । तेतुलाही पवाडु तुवां अनंतें । कोंदलें देखतसें ७३ ऐसा कवणे
ठायाहूनि तूं आलासी । एथ बैसलासि कीं उभा आहासी । आणि कवणिये
मायेचिये पोटीं होतासी । तुझें ठाणें केवढें ७४ तुझें रूप वय कैसें । तुजपै-
लीकडे काय असे । तूं काइसयावरी आहासि ऐसें । पाहिलें मियां ७५ तंव
देखिलें जी आघवेंचि । तरि आतां तुझा ठावो तूंचि । तूं कवणाचा नव्हेसि
ऐसाचि । अनादि[14] आयता ७६ तूं उभा ना बैठा । दिर्घडु ना खुजटा । तुज
तळीं वरी वैकुंठा । तूंचि आहासी ७७ तूं रूपें आपणयांचि ऐसा । देवा तुझी
तूंचि वयसा । पाठी पोट परेशा । तुझें तूं गा ७८ किंबहुना आतां । तुझें
तूंचि आघवें अनंता । हें पुढत पुढती पाहतां । देखिलें मियां ७९ परि या
तुझिया रूपाआंतु । जी उणीव एक असे देखतु । जे आदि मध्य अंतु । तिन्ही
नाहीं २८० एऱ्हवीं गिवसिलें[19] आघवा ठायीं । परि सोयें न लाहोचि कहीं ।
म्हणोनि त्रिशुद्धि हे नाहीं । तीन्ही एथ ८१ एवं आदिमध्यांतरहिता । तूं वि-
श्वेश्वरा अपारिमिता । देखिलासि जी तत्त्वता । विश्वरूपा ८२ तुज महामूर्ती-
चिया आंगीं । उमटलिया पृथक् मूर्ती अनेगी । लेइलासी वानेपरीचीं आंगीं ।
ऐसा आवडतु[23] आहासी ८३ नाना पृथक् मूर्ती तिया द्रुमवल्ली । तुझिया स्व-
रूपमहाचळीं । दिव्यालंकार फुलीं फळीं । सासिन्नलिया ८४ हो कां जे महो-
दधीं तूं देवा । जाहलासि तरंगमूर्ती हेलावा । कीं तूं एक वृक्ष बरवा । मूर्ति-
फळीं फळलासी ८५ जी भूतीं भूतळ मांडिलें । जैसें नक्षत्रीं गगन गूढलें । तैसें
मूर्तिमय भरलें । देखतसें तुझें रूप ८६ जी एकेकीच्या अंगप्रांतीं । होय जाय

वाटतें; ६६ त्याचप्रमाणें, देवा, तुमच्या हातांनीं एकाच वेळीं सर्व व्यापार होत आहेत असें दृष्टीस पडलें; ६७ व आकाशांत जशी जगाचीं भांडारें उत्पन्न होतात, त्याप्रमाणें तुमच्या शरिरावर अपार उदरें दिसत आहेत. ६८ तुमच्या हजार मस्तकांची कोट्यावधि मुखें जणूंकाय परब्रह्मरूपी वृक्ष वदनरूपी फळांनीं लवून आल्याप्रमाणें दिसत आहेत. ६९ त्याचप्रमाणें, तुमच्या विश्वमूर्तीवर जिकडे तिकडे तोंडें दिसत आहेत, व नेत्रांच्याही अनेक रांगा दिसताहेत. २७० इतकेंच नव्हे, तर स्वर्ग, पाताळ, भूमि, दिशा किंवा आकाश हा सर्व भेद नाहींसा होऊन हें सर्व विश्व मूर्तिमय दिसत आहे. ७१ तुमच्याशिवाय एकाद्या बाजूसही परमाणुइतकी जागा कौतुकानें पाहूं गेलें असतां सांपडत नाहीं; याप्रमाणें सर्व तुम्ही व्यापिलें आहे. ७२ नानाप्रकारच्या अपरिमित महाभूतांनीं जें सर्व व्यापलें होतें, तो सर्व विस्तार हे अनंता, तुम्हीं व्यापिला आहे असें दिसतें. ७३ असे तुम्ही कोठून आलां, या ठिकाणीं बसले आहां किंवा उभे आहां, कोणत्या आईच्या पोटांत होतां, व तुमची केवढी आकृति आहे, ७४ तुमचें रूप आणि वय कसें आहे, तुमच्या पलीकडे काय आहे, व तुमचें अधिष्ठान कोणतें हें जों मी पाहूं लागलों, ७५ तों मीं सर्वत्र पाहिलें; आणि तुमचें अधिष्ठान तुम्ही आहां, तुम्ही कोणापासून उत्पन्न झाला नाहीं, जन्मरहित व असेच स्वयमेव आहां, ७६ देवा, तुम्ही उभे नाहीं व बसलेले नाहीं, ओणवे नाहीं व ठेंगणे नाहीं, तुमच्या वर व खालीं तुम्हींच आहां ७७ देवा, तुमचें रूप कशाप्रमाणें म्हणाल, तर तुमच्यासारखेंच आहे; व तुमचें वयही तुमच्यासारखेंच आहे. हे देवाधिदेवा, तुमची पाठ व पोट हीं तुमची तुम्हीच आहां; ७८ फार तर काय हे अनंता, मी जों आणखी पाहूं लागलों, तों तुमच्यासारखें तुम्हीच आहां असें माझ्या दृष्टीस पडलें. ७९ पण तुमच्या विश्वरूपांत मला एक कमीपणा दिसतो; तो हा कीं, त्याला आदि, मध्य व अंत हीं तिन्हीं नाहींत. २८० बाकी मी सर्व ठिकाणीं शोधून पाहिलें, परंतु मला पत्ता लागला नाहीं; म्हणून आदि, मध्य व अंत हीं तिन्हीं तुमच्या रूपाला नाहींतच यांत संशय नाहीं. ८१ हे आदिमध्यांतरहिता, हे अपरिमिता जगदीशा, खरोखर, याप्रमाणें मीं तुमचें विश्वरूप पाहिलें. ८२ तुमच्या विश्वरूपावर शेंकडों निरनिराळ्या मूर्ति उमटलेल्या आहेत, त्यामुळें तुमच्या अंगांत नानाप्रकारच्या रंगांचा आंगरखाच घातला आहे असे तुम्ही दिसतां आहां. ८३ तुमच्या विश्वरूपी पर्वतावर ज्या तऱ्हेतऱ्हेच्या निरनिराळ्या मूर्ति आहेत, त्या वृक्ष व वेली याप्रमाणें शोभत असून, मूर्तीवरचे जे अलंकार ते फुलें व फळें आहेत. ८४ हे देवा, तुम्ही महासमुद्र असून मूर्तिरूप लाटांनीं उसळलेले दिसतां; किंवा तुम्ही एक उत्तम वृक्ष असून मूर्तिरूप फळांनीं भरलेले दिसतां. ८५ पृथ्वी जशी भूतांनीं भरलेली आहे, किंवा आकाश जसें नक्षत्रांनीं व्यापिलें आहे, तसें तुमचें विश्वरूप मूर्तींनीं भरलेलें आहे असें दिसतें. ८६ ज्या एकेक मूर्तीच्या अंगावर त्रैलोक्य उत्पन्न होतें व लय

१ अंकुर फुटले. २ अव्यक्त ब्रह्माचे. ३ विस्तारानें. ४ ब्रह्मांडाची. ५ आवृत्त्या. ६ भरभराटून आले. ७ पुष्कळ. ८ वोळी, विचार. ९ एवढा. १० जागा. ११ विस्तार. १२ व्यापिला. १३ स्थान, आकृति. १४ ज्याचा आदि ( मूळ प्रारंभ ) कळत नाहीं असा स्वयंभू. १५ उंच. १६ ठेंगणा. १७ देवा. १८ देवाधिदेवा. १९ सर्व ठिकाणीं शोधिलें. २० पत्ता लागत नाहीं. २१ निःसंशय. २२ अनेक प्रकारच्या रंगांची. २३ भासतो आहेस. २४ रूपें. २५ वृक्ष व वेली. २६ पसरल्या, बहरास आल्या. २७ मनुष्यांनीं. २८ पृथ्वी. २९ आच्छादिलें व्यापिलें. ३० अंगप्रदेशांत, अंगासभोंवतीं.

हे त्रिजगती । एवढियाही तुझ्या आंगीं मूर्ती । कीं रोमा [२] जालिया ८७ ऐसा पवाडु मांडूनि विश्वाचा । तूं कवण पां एथ कोणाचा । हें पाहिलें तंव आमुचा । सारथी तोचि तूं ८८ तरी मज पाहतां मुकुंदा । तूं ऐसाचि व्यापकु सर्वदा । मग भक्तानुग्रहें तया मुग्धा । रूपातें घरिसी ८९ कैसें चहूं भुजांचें सांवळें । पाहतां चोल्हावती मन डोळे । खेंवें देऊं जाइजे तरि आंकळे । दोहींचि बाहीं २९० ऐसी मूर्ति कोडिसवाणी कृपा । करूनि होसीं ना विश्वरूपा । कीं आमुचियाचि दिठी सलेपा । जें सामान्यत्वें देखती ९१ तरि आतां दिठीचा विटाळु गेला । तुवां सहजें दिव्यचक्षू केला । म्हणोनि यथारूपें देखवला । महिमा तुझा ९२ पारि मकरतुंडामागिलेकडे । होतासि तोचि तूं एवढें । रूप जाहालासि हें फुडें । वोळखिलें मियां ९३

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥

नोहे तोचि हा शिरीं । मुकुट लेइलासी श्रीहरी । पारि आतांचें तेज आणि थोरी । नवल कीं बहु हें ९४ तेंचि हें वरिलियेचि हातीं । चक्र पारिजितैया आयती । सांवरितासि विश्वमूर्ती । ते न मोडे खूण ९५ येरीकडे तेंचि हे नोहे गदा । आणि तळिलिया दोनी भुजा निरायुधा । वाँगोरे सांवरावया गोविंदा । संसेरिलिया ९६ आणि तेणेंचि वेगें सहसा । माझिया मनोरथासरिसा । ज़ाहलासि विश्वरूपा विश्वेशा । म्हणोनि जाणें ९७ पारि कायसें बा हें चोजें । विस्मयो करावयाहि पाँडू नाहीं मज । चित्त होऊनि जातसें निर्बुजें । आश्चर्यें येणें ९८ हें एथ आथि कां येथ नाहीं । ऐसें श्वसोंही [२०] नये कांहीं । नवल अंगप्रभेची नवाई । कैसी कोंदली सैंघें ९९ एथ अग्नीचीही दिठी करपत । सूर्य खद्योतु तैसा हारपत । ऐसें तीव्रपण अद्‌भुत । तेजाचें यया [illegible] कां महातेजाचिया महार्णवीं । बुडोनि गेली सृष्टि [illegible] । कीं यु[illegible] । पोलवीं । [illegible] झांकलें गगन १ ना तरी संहारतेजा[illegible] । [illegible] अंतराळां । आतां दिव्य ज्ञा[illegible] [illegible]ना [illegible] धिक बहुवसु । धडौडीत आहे [illegible]ति [illegible] दि [illegible] हाळितां २ हो कां जे महाप्रळयींचा [illegible] गूंढ । तो तृतीयनयनाचा मैंदू । [illegible]

पावते, तेवढाल्या मूर्ति तुमच्या अंगावरील एका रोमाच्या ठिकाणी आहेत. ८७ असा या जगाचा विस्तार करणारे जे तुम्ही, ते तुम्ही कोण व कोणाचे, हें जों मी पाहूं लागलों, तों आमचे जे सारथि तेच तुम्हा आहां. ८८ तर हे मुकुंदा, तुम्ही सर्वदा असेच सर्वव्यापक आहां, परंतु भक्तांवर अनुग्रह करण्याकरितांच सगुण रूप धारण करतां असें मला वाटतें ८९ तुमची ती चतुर्भुज सांवळी मूर्ति पाहिल्यावर मन व डोळे कसे तृप्त होतात! तिला आलिंगन देऊं लागलें तर ती दोन्ही हातांत सुद्धां धरतां येते! २९० हे विश्वधारण करणाऱ्या देवा, असें गोजिरवाणें रूप तुम्ही भक्तावर कृपा करण्याकरितां घेत नाहीं का? तर घेतां; पण आमच्या दूषित दृष्टीनें तें तुमचें रूप सामान्य मनुष्याप्रमाणें आम्ही मानतों. ९१ तुम्ही सहज दिव्यचक्षु दिल्यामुळें माझ्या दृष्टीचा दोष नाहींसा होऊन तुमचा महिमा यथार्थ दृष्टीस पडला. ९२ परंतु, रथाच्या मकरावर जुंवाच्या मागल्या बाजूला जे तुम्ही बसला होतां त्याच तुम्ही एवढें विश्वरूप धारण केलें आहे एवढें मी पक्कें ओळखलें. ९३

**अन्वयार्थ**—[अहं]–मी–(त्वां)–तुला–(किरीटिनं)–ज्याच्या मस्तकावर किरीट आहे असा,–(गदिनं)–ज्याच्या हातांत गदा आहे असा,–(च)–व–(चक्रिणं)–ज्याच्या हातांत चक्र आहे असा,–(तेजोराशिं)–तेजःपुंज,–(सर्वतः दीप्तिमन्तं)–सर्व बाजूंनीं दीप्तिमान्–प्रकाशवान्, त्यामुळें-(समन्तात् दुर्निरीक्ष्यं)–सर्व बाजूंनी ज्याच्याकडे पहातां येत नाहीं असा–(दीप्तानलार्कद्युतिं)–प्रदीप्त अग्नि व सूर्य यांप्रमाणें ज्याची द्युति म्ह० कांति आहे असा व–(अप्रमेयम्)–कोणत्याही प्रमाणाचा विषय न होणारा, असा–(पश्यामि)–पहातों, १७

हे श्रीहरी, तुम्ही जो डोक्यावर मुकुट धारण केला होता, तोच हा नव्हे का? पण हल्लींचें त्याचें तेज व आकार विशेष आहे, हेंच मोठें आश्चर्य आहे, ९४ वरच्या हातांतील फिरत असलेलें चक्र हेंच नव्हे का? कारण, हे विश्वमूर्ते, तें तुम्ही सांवरून हातांत धरीत आहां, ही खूण कायम आहे. ९५ दुसऱ्या हातांत तीच ही गदा नव्हे काय? हे गोविंदा, खालचे दोन हात घोडे सावरण्याकरितां तयार असलेले निःशस्त्र नाहींत का? ९६ आणि हे विश्वेशा, माझी विश्वरूप पाहण्याची इच्छा पूर्ण करण्याच्या हेतूनेंच तुम्ही हें एकदम विश्वरूप धारण केलें, हें मी जाणतों आहें; ९७ परंतु, देवा, ह्या तुमच्या रूपाचें आश्चर्य मानण्याचीही माझी योग्यता नाहीं; या आश्चर्यानें माझें मन थक्क होऊन गेलें आहे यांत नवल तें काय? ९८ हें तुमचें विश्वरूप येथें आहे किंवा नाहीं, असा विचार करण्यासही अवकाश नाहीं. त्या रूपाच्या तेजाचा चमत्कार असा आहे की, तें सर्वत्र भरलेलें दिसतें. ९९ या रूपाच्या तेजाची अशी अलौकिक तीव्रता आहे की, त्याच्यापुढें अग्नीचीही दृष्टि करपून जाते व सूर्यही काजव्याप्रमाणें दिपून जातो! ३०० असें वाटतें की, सर्व सृष्टि महातेजाच्या मोठ्या समुद्रांत बुडाली आहे; किंवा कल्पांतीच्या वेळेच्या विजांनी सर्व आकाश झांकून टाकलें आहे की काय? १ अथवा प्रलयकाळच्या तेजाच्या ज्वाला तोडून त्याचा अंतराळी उंच मेढीवर जणूंकाय माळाच बांधला आहे; त्यामुळें माझ्या दिव्य दृष्टीनेंही त्याकडे पहावत नाहीं. २ तें तेज अधिक प्रखर होऊन शरीरास अति दाह होत आहे; त्याजकडेस पाहून माझ्या दिव्य चक्षूंसही त्रास होत आहे. ३ अहो महाराज, प्रलयकालचा अग्नि जो कालाग्निरुद्राच्या ठिकाणी गुप्त असतो त्या प्रलयरुद्राची जणुं कळीच उमलली आहे असें भासतें; ४ तसेंच तुमच्या पसरलेल्या विश्वरूपाच्या तेजाच्या वळशांत

१ त्रैलोक्य. २ केसांत झाल्या, त्या मूर्तींच रोम झाल्या. ३ विस्तार. ४ गोजिरवाणें, सगुण. ५ निवतात. ६ आलिंगन. ७ सांपडे. ८ सुंदर, गोजिरवाणी. ९ मलिन, दूषित. १० साधारणपणानें, सामान्य–साधारण मनुष्याप्रमाणें. ११ यथार्थ. १२ मगराच्या तोंडाच्या जुंवाच्या मागच्या बाजूला. १३ खरें, पक्कें, स्पष्ट. १४ फेंकण्याची तयारी. १५ घोड्यांचे वाग्दोर, लगाम. १६ सरसावल्या, पुढें केल्या. १८ नवल, कौतुक. १८ योग्यता. १९ थक्क, मोहित. २० विचार करण्यास अवकाश. २१ चमत्कार. २२ व्यापलेली, भरलेली. २३ बहुत, सर्वत्र. २४ काजव्याप्रमाणें. २५ पदरांनीं. २६ माळा, अंतराळीं उंच मेढीवर बांधलेलें घर. २७ भडकत. २८ अत्यंत दाहक, डोळे दिपविणारा. २९ भडभडाट. ३० गुप्त. ३१ कलिका, कळा. ३२ फुलला, उमलला.

पांचवनिया ज्वाळांचे वळेसे । पडतां ब्रह्मकटाह कोळिसे । होत आहाती ५ ऐसा अद्भुत तेजोराशी । जन्मा नवल म्यां देखिलासी । नाहीं व्यासि आणि कांतीसी । पारु जी तुझिये ६

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

देवा तूं अक्षर । औटाविये मात्रेसि पर । श्रुती जयाचें घर । गिंवसीत आहाती ७ जें आकाराचें आयतन । जे विश्वनिक्षेपैकनिधान । तें अव्यय तूं गहन । अविनाश जी ८ तूं धर्माचा वोलावा । अनादिसिद्ध तूं नित्य नवा । जाणें मी सदतिसावा । पुरुष विशेष तूं ९

अनादिमध्यान्तमनन्तवीर्यमनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् १९

तूं आदिमध्यांतरहितु । स्वसामर्थ्यें तूं अनंतु । विश्वबाहु अपरिमितु । विश्वचरण तूं ३१० पैं चंद्र चंडांशु डोळां । दावितासि कोपप्रसाद लीळा । एकां रूसैसी तमाचिया डोळां । एकां पाळितोसि कृपादृष्टी ११ जी एवंविधा तूंतें । मी देखतसें हें निरुतें । पेटलें प्रळयाग्नीचें उंजितें । तैसें वक्त्र हें तुझें १२ वणिवेनि पेटले पर्वत । कवळूनि ज्वाळांचे उभंड उठत । तैसी चाटीत दाढा दांत । जीभ लोळे १३ इये वदनींचिया उंबा । आणि जी सर्वांगकांतीचिया प्रभा । विश्व तातलें अति क्षोभा । जात आहे १४

द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाऽद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥

कां ज़े द्यौलोकें आणि पाताळ । पृथिवी आणि अंतराळ । अथवा दशदिशा समाकुळ । दिशाचक्र १५ हें आघवेंचि तुवां एकें । भरलें देखत आहें कौतुकें । परि गगनाहीसकट भयानकें । आप्लविजे जेवीं १६ ना तरी अद्भुत रसाचिया कल्लोळीं । जाहली चवदाही भुवनांसि कडियाळी । तैसें आश्चर्यंचि मग मी आकळीं । काय एक १७ नावरे व्यासी हे असाधारण । न साहवे रूपाचें उग्रपण । सुख दूरी गेलें परि प्राण । विपायें धरीजे १८ देवा ऐसें देखोनि तूंतें । नेणों कैसें आलें भयाचें भारितें । आतां दुःखकल्लोळीं झळंबतें । तिन्हीं भुवनें १९ एऱ्हवीं तुज महात्मयाचें देखणें । तरि भयदुःखासि कां मेळवणें । परि हें सुख नव्हेचि जेणें गुणें । तें जाणेंत आहे मज ३२० जंव तुझें

पंचमहाभूतात्मक शरीरें जळून महाकष्टाचे कोळसे होत आहेत. ५ ज्या तुमच्या रूपाच्या व्याप्तीला व तेजाला अंत नाहीं, असें हें अद्‌भुत रूप मी यावज्जन्मांत पाहिलें नाहीं. ६

**अन्वयार्थ**-(त्वं)-तूं-(परमं अक्षरं)-परब्रह्म आहेस असें -(वेदितव्यं)-जाणावें.-(त्वं)-तूं-(अस्य विश्वस्य) या जगाचें-(परं निधानं)-परम आश्रयस्थान आहेस.-(त्वं)-तूं-(अव्ययः)-क्षय न पावणारा आहेस.-(शाश्वतधर्मगोप्ता)-शाश्वत धर्मांचें रक्षण करणारा आहेस.-(त्वं)-तूं-(सनातनः पुरुषः)-चिरंतन पुरुष आहेस, असा तूं-(मे)-मला-(मतः)-मान्य झालेला आहेस. १८

देवा, तुम्ही परब्रह्म असून साडेतीन मात्रांचा जो ॐकार, त्याच्याही पलीकडील आहां; व तुमचें स्थान श्रुति शोधीत असतांही त्यांत सांपडत नाहीं. ७ तुमच्या ठिकाणीं प्राणिमात्र लय पावतात, व तुम्ही विश्व सांठविण्याचें स्थान असून गहन, अव्यय आणि अविनाशी असें आहां. ८ तुम्ही धर्माचें जीवन आहां; अनादिसिद्ध असून नित्य नवे आहां; व छत्तीस तत्वांच्याही पलीकडील सदतिसावे पुरुष असून, या जगाचे ईश्वर आहां. ९

**अन्वयार्थ**-(त्वां)-तुला मी-(अनादिमध्यान्तं)-आदिमध्य-अन्तरहित,-(अनन्तवीर्यं)-ज्याचें वीर्य अनन्तरहित-अनन्त आहे.-(अनन्तबाहुं)-ज्याचे बाहु अनन्त आहेत-(शशि-सूर्यनेत्रं)-चंद्र व सूर्य हे ज्याचे नेत्र आहेत,-(दीप्तहुताशवक्त्रं)-प्रदीप्त अग्नि हेंच ज्याचें मुख आहे, व-(स्व-तेजसा इदं विश्वं)-आपल्या तेजानें ह्या विश्वाला-(तपन्तं)-ताप देणारा, असा-(पश्यामि)-पहातों. १९

तुम्ही आदिमध्यांतरहित असून स्वतःच्या पराक्रमानें अपार आहां; तुम्हांला चहूं बाजूंनीं असंख्य हात व पाय आहेत; ३१० चंद्र व सूर्य हे तुमचे डोळे असून, ते शांति व कोप यांची लीला दाखवितात. तुम्ही तमोरूप डोळ्यानें एकाला शासन करतां व कृपारूप डोळ्यानें एकाचें पालन करतां. ११ खरोखर अशा अनेक प्रकारांनीं तुम्ही माझ्या दृष्टीला दिसत आहां. ज्याप्रमाणें प्रळयाग्नि पेटल्यावर चहूंकडे उजेड पडतो, त्याप्रमाणें तुमचें तोंड महाप्रखर दिसत आहे. १२ वणव्यानें पर्वत पेटल्यावर ज्याप्रमाणें पर्वतावरील सर्व पदार्थ पेटून ज्वाळा भडकत असतात, त्याप्रमाणें तुमची जीभ दाढा चाटीत दांतांमध्यें लोळत आहे असें दिसतें. १३ तुमच्या या तोंडांतील अग्नीच्या उष्णतेनें तुमच्या विश्वरूपाच्या तेजानें सर्व करपून जाऊन नाश पावत आहे. १४

**अन्वयार्थ**-(त्वया एकेन)-तूं एकट्यानें-(द्यावापृथिव्योः इदं अन्तरं हि)-आकाश व पृथिवी यांच्यामधील हें अंतर-(व्याप्तं)-व्यापिलें आहेस-(च)-व-(सर्वाः दिशः)-सर्व दिशा-(व्याप्ताः-व्यापिल्या आहेस)-(महात्मन्)-हे महात्म्या!-(तव)-तुझें-(इदं अद्‌भुतं उग्रं रूपं)-तुझें हें अद्‌भुत उग्र रूप-(दृष्ट्वा)-पाहून-(लोकत्रयं)-त्रिभुवन-(प्रव्यथितं)-अतिशय व्यथित-भयभीत झालें आहे. २०

किंवा स्वर्ग, पाताळ, पृथ्वी आणि अंतरिक्ष तशाच दहा दिशा व सर्व दिशाचक्र, १५ हें सर्व तुमच्या एकरूपानें व्यापून गेलें आहे, असें कौतुकानें मी पाहतों. परंतु आकाशासकट तुमच्या भेसूर रूपांत जणूंकाय सर्व बुडत आहे, १६ किंवा तुमच्या अद्‌भुत रूपाच्या रसाच्या लाटांत चौदाही भुवनें सांपडली आहेत, असें तुमचें रूप आश्चर्यकारक आहे तें मला एकट्याला कसें पहावेल? १७ तुमच्या भव्य रूपाच्या थोरीची कल्पना करवत नाहीं, तुमच्या रूपाचें तेज सहन करवत नाहीं व या तुमच्या रूपाच्या दर्शनापासून जगाला सुख प्राप्त होण्याचें एकीकडे राहून उलट जग कष्टानें प्राण धरीत आहे. १८ देवा, असें तुमचें अद्‌भुत रूप पाहून भीतीचें भरतें कसें आलें हें समजत नाहीं. कारण, तीपासून होणाऱ्या दुःखाच्या लाटांत त्रैलोक्य बुडत आहे. १९ एऱ्हवीं तुम्हां महात्म्यांच्या दर्शनापासून भय व दुःख यांची का प्राप्ति व्हावी? परंतु या तुमच्या रूपापासून सुख होणारच नाहीं असें मला भासत आहे. ३२० जोंपर्यंत

१ हे पंचाग्नि=प्रलयानल, विद्युदनल, वडवानल, शिवनेत्रानल, व द्वादशादित्यानल. २ वेडे. ३ ब्रह्मांड. ४ अविनाशी, नाशरहित, अभंग. ५ साडेतीन मात्रांच्या (ओंकाराच्या) पलीकडे. ६ शोधितातः ७ घर, स्थान. ८ जग सांठविण्याचें स्थान-जागा, विश्व ठेवण्याची एक जागा. ९ छत्तीस तत्वांच्या पलीकडचा, सदतिसावा पुरुष. १० असें. ११ शासन करितोस. १२ या प्रकारांनीं. १३ खरें, खरोखर. १४ लखलखाट, उजेड. १५ उमाळे. १६ उबाऱ्यानें. १७ पोळलें, तापलेलें. १८ नाशास. १९ स्वर्ग. २० अंतरिक्ष. २१ सर्व, सगळें. २२ भेसुररूप. २३ बुडवावें. २४ लाटांत. २५ वेष्टण, माळ, ओळी. २६ पहातों. २७ कष्टानें. २८ बुडतात, विरघळतात. २९ भासत.

रूप नोहे दिठे[1] । तंव जगासि संसारिक[2] गोमटें। आतां देखिलासि तरी विषयविटें । उपनला त्रासु २१ तेवींचि तुज देखिलियासाठीं । काय सहसा तुज देवों येईल मिठी । आणि नेदीं तरी शोकसंकटीं । राहों केवीं २२ म्हणोनि मागां सरों तंव संसारु । आडवीत येतसे आनिवारु । आणि पुढां तूं तंव अनावरु । नयेसि घेवों २३ ऐसा माझांरिलिया सांकडां । बापुड्या त्रैलोक्याचा होतसे हुरडा । ऐसा हा ध्वनी जी फुडा । चोजवला मज २४ जैसा आंरबळला आगीं । तो समुद्रा ये निवावयालागीं। तंव कल्लोळपाणियांचिया तरंगीं । आगळा[11] बिहे २५ तैसें या जगासि जाहलें । तूंतें देखोनि तळमळित ठेलें ।

अमी हि त्वां सुरसंघा विशन्ति केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥२१॥

यामाजि पैलें भले । ज्ञानसूरांचे मेळावे २६ हे तुझेनि आंगिकें तेजें । जाळूनि सर्व कर्मांचीं बीजें । मिळत तुज आंतु सहजें । सद्भावेंसी २७ आणिक एक सावियांचि भयभीरु । सर्वस्वें धरूनि तुझी मोहरु । तुज प्रार्थिताति करु । जोडोनियां २८ देवा अविद्यार्णवीं पडिलों । जी विषयवागुरें आंतुडलों । स्वर्गसंसाराचिया सांकडलों । दोहीं भागीं २९ ऐसें आमुचें सोडवणें । तुजवांचोनि कीजेल कवणें । तुज शरण गा सर्वप्राणें । म्हणत देवा ३३० आणि महर्षी अथवा सिद्ध । विद्याधरसमूह विविध । हे बोलत तुज स्वस्तिवाद । करिती स्तवनें ३१

रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

हे रुद्रादित्यांचे मेळावे । वसु हन साध्य आघवे । अश्विनौ देव विश्वेदेव विभवें । वायुही हे जी ३२ अवधारा पितर हन गंधर्व। पैल यक्षरक्षोगण सर्व। जी महेंद्रमुख्य देव । कां सिद्धादिक ३३ हें आघवेचि आपुलालिया लोकीं । सोत्कंठित अवलोकीं । हे महामूर्ती दैविकी । पाहत आहाती ३४ मग पाहात पाहात प्रतिक्षणीं। विस्मित होऊनि अंतःकरणीं। करित निजमुकुटीं वोवाळणी । प्रभुजी तुज ३५ ते जयजय घोष कलिरवें । स्वर्ग गाजविताती आघवे। ठेवित ललाटावरी बरवे । करसंपुट ३६ तिये विनयद्रुमाचिये आंरवीं । सुरवाडली सात्विकांची माधवी । म्हणोनि करसंपुटपल्लवीं । तूं होतासि फळ ३७

तुमचें रूप दृष्टीस पडलें नव्हतें; तोंपर्यंत जगाला संसारसुखच उत्तम वाटत होतें, परंतु तुमचें रूप पाहिल्यामुळें विषयवासनाही विटून गेल्या आणि त्रासही उत्पन्न झाला. २१ तसेंच तुमच्या ह्या भयंकर रूपास पाहून त्याला एकाएकी मिठी मारतां येईल काय? आणि मिठी न मारली तर ह्या तुमच्या भयंकर विश्वरूपदर्शनाच्या दुःखांत कसें रहावें? २२ म्हणून, मागें सरावें तर अनिवार जन्ममरणरूप संसार प्रतिबंध करितो; (दुःख देतो) आणि पुढें सरावें तर हें प्रचंड विश्वरूप धारण केल्यामुळें तुम्हांला आलिंगन देतां येत नाहीं. २३ अशा रीतीनें दोन संकटांच्या कचाटींत सांपडून बिचारें त्रैलोक्य होरपळून जात आहे; अशी माझी तुमचें विश्वरूप पाहण्याची खरी हौस माझ्या अनुभवास आली आहे. २४ ज्याप्रमाणें एकादा मनुष्य अग्नींत पोळल्यामुळें आपला दाह शमन होण्याकरितां समुद्राकडे धांव घेतो, तों समुद्राच्या लाटा पाहून त्याला जास्तच भीति वाटते, २५ त्याप्रमाणें या जगाची स्थिति झाली आहे. तुम्हांला पाहून तें तळमळत आहे.

**अन्वयार्थ**—(अमी हि सुरसंघाः)–हे भूलोकीं अवतीर्ण झालेले देवांचे संघ–(त्वां)–तुला–तुझ्यामध्यें–(विशन्ति)–प्रवेश करीत आहेत.–(केचित् भीताः)–त्यांतील कांहीं भ्यालेले–(प्राञ्जलयः)–हात जोडलेले असे होऊन–हात जोडून–(गृणन्ति)–तुझी स्तुति करितात.–(महर्षिसिद्धसंघाः)–मोठमोठे ऋषि व सिद्ध यांचे संघ–(स्वस्ति इति उक्त्वा)–'स्वस्ति असो,' असें बोलून–(त्वां)–तुला–(पुष्कलाभिः स्तुतिभिः)–पुष्कळ स्तुतींनीं–(स्तुवन्ति)–स्तवीत आहेत. २१.

आतां त्या पलीकडील ज्ञानी पुरुषांच्या समुदायाची झालेली स्थिति पहा. २६ तुमच्या अंगच्या तेजानें हे पुरुष सर्व कर्मांचीं बीजें जाळून सद्भावानें तुमच्या ठिकाणीं लीन होत आहेत; २७ आणखी कांहीं सहजच तुमच्या रूपास पाहून भयभीत झालेले, तुमच्याच ठिकाणीं सर्वस्व विश्वास ठेवून तुमच्यासमोर उभे राहून हात जोडून तुमची प्रार्थना करीत आहेत. २८ देवा, अज्ञान-समुद्रांत पडून विषयांच्या जाळ्यांत आम्ही सांपडलों आहों, व स्वर्गसुख आणि संसार या दोहोंच्या कचाटयांत पडलों आहों, २९ अशा संकटांतून तुमच्यावांचून आम्हांस कोण सोडवील? म्हणून देवा, आम्ही सर्व भावानें तुला शरण आलों आहों, असें म्हणताहेत तें पहा. ३० आणखी कश्यपादि महर्षि व कपिलादि सिद्ध व विद्याधर आदिकरून गंधर्वांचे मेळे हे "तुमचे कल्याण होवो" असें म्हणत असून तुमची प्रार्थना करीत आहेत. ३१

**अन्वयार्थ**—(रुद्रादित्याः)–अकरा रुद्र व बारा आदित्य,–(वसवः)–आठ वसु–(ये च साध्याः)–व जे साध्य–(विश्वे)–विश्वेदेव,–(अश्विनौ)–अश्विनीकुमार–(मरुतः)–मरुद्गण–(च)–व–(ऊष्मपाः)–पितर–(च)–व–(गन्धर्वयक्षासुरसिद्धसंघाः)–व गंधर्व, यक्ष, असुर सिद्ध यांचे संघ–(सर्वे)–हे सर्व–(विस्मिताः एव)–विस्मित होऊनच–(त्वां)–तुला–(वीक्षन्ते)–पाहतात. २२

हे अकरा रुद्र, बारा आदित्य, आठ वसू, व साध्य नामक सर्व देव, अश्विनीकुमार व एकुणपन्नास मरुद्गण हे सर्व आपल्या वैभवानें, ३२ व तसेच पितर, गंधर्व, यक्ष, व सर्व राक्षसगण, इंद्रादिक मुख्य देव व सर्व सिद्ध ३३ हे सर्व आपआपल्या लोकांतून मोठ्या उत्कंठेनें तुमचें विश्वरूप पहात आहेत तें पहा, ३४ आणि प्रभो, तुम्हांला पहातांना क्षणोक्षणीं मनांत आश्चर्य मानून तुमच्या पुढें आपलें मस्तक लववीत आहेत, ३५ ते सर्व मंजुळ शब्दानें स्वर्गांत तुमचा जयजयकार करीत आहेत व जोडलेले हात मस्तकावर ठेवून तुम्हांला नमस्कार करीत आहेत. ३६ त्या देवांच्या नम्रतारूपी वृक्षांच्या बागेंत अष्टसात्त्विकभावरूप वसंत प्राप्त होऊन त्या वृक्षांस करसंपुटरूपी पालवी फुटून तुमची प्राप्ति त्यांना फलरूपी झाली! ३७

१ दृष्टिगोचर. २ संसारिक सुख. ३ जन्ममरण. ४ मध्यल्या कचाटींत, दोन संकटांमध्यें. ५ भाजणी, होरपळणी. ६ आक्षेप, मुख्यार्थ. ७ स्पष्ट. ८ वाटला. ९ पोळला. १० उसळणाऱ्या पाण्याच्या लाटांनीं. ११ जास्ती भितो. १२ पलीकडे. १३ समुदाय. १४ आंगच्या. १५ सहजच. १६ भयभीत. १७ मार्ग, बाजू, दिशा. १८ अज्ञान समुद्रांत. १९ विषयरूपी जाळ्यांत. २० सांपडलों. २१ पेंचांत पडलों. २२ कल्याणकारक भाषण. २३ स्तुति. २४ वैभवानें. २५ राक्षस. २६ इंद्र ज्यांत प्रमुख आहे असे. २७ प्रभूची महामूर्ति. २८ मस्तक लववितो. २९ मंजुळ शब्दानें. ३० बद्ध हस्त, जोडलेले हात. ३१ नम्रतारूप वृक्षाच्या. ३२ बागेंत, अरण्यांत. ३३ प्राप्त झाली. ३४ वसंतकाळ. ३५ दोन हातांनीं.

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाऽहम् ॥ २३ ॥

जी लोचनां भाग्य उदेलें । मना सुखाचें सुयाणें पाहिलें । जे अगाध तुझें
देखिलें । विश्वरूप इहीं ३८ हें लोकत्रयव्यापक रूपडें । पाहतां देवांही वचके
पडे । याचें सन्मुखपण जोडे । भलतयाकडुनी ३९ ऐसें एकचि परि विचित्रें ।
आणि भयानकें वक्त्रें । बहुलोचन हे सशस्त्रें । अनंतभुजा ३४० अनंत ऊरु
बाहु चरण । बहूदर आणि नानावर्ण । कैसें प्रतिवदनीं मातलेपण । आवे-
शाचें ४१ हो कां महाकल्पाचिया अंतीं । तवकलेनि यमें जेउतलेउतीं । प्रळया-
ग्नीचीं उजितीं । ओंबुखिलीं जैसीं ४२ ना तरी संहारत्रिपुरारीचीं यंत्रें । कीं प्र-
ळयभैरवाचीं क्षेत्रें[११] । नाना युगांतशक्तीचीं[१२] पात्रें[१३] । भूतखिचा[१४] बोढवलीं[१५] ४३
तैसीं जियेतियेकडे । तुझीं वक्त्रें जीं प्रचंडें । न[१६] समाती दरीमाजि सिंहाडें[१७] ।
तैसे दर्शनें दिसती रागीट ४४ जैसें काळरात्रीचेनि अंधारें । उल्हासत निघती
संहारखेचरें[१८] । तैसिया वदनीं प्रळयरुधिरें[१९] । कोंटलिया[२०] दाढा ४५ हें असो काळें
अवंतिलें[२२] रण । कां सर्व संहारें मातलें[२३] मरण । तैसें अतिभिंगुळवाणेंपण[२४] । वदनीं
तुझिये ४६ हे बापडी लोकसृष्टी । मोटकीये विपाइली दिठी । आणि दुःख-
कालिंदीचिया तटीं । झाड होऊनि ठेली ४७ तुज महामृत्यूचिया सागरीं ।
आतां हे त्रैलोक्यजीविताची तरी[२५] । शोकदुर्वातलहरी[२६] । आंदोळत[२७] असे ४८
एथ कोपोनि जरी वैकुंठें[२८] । ऐसें हन म्हणिपैल अवेचटें[२९] । जे तुज लोकांचें
काइ वाटे । तूं ध्यानसुख हें भोगीं ४९ तरी जी लोकांचें कीर साधारण ।
वायां आड[३०] सूतसें वोडीण[३१] । केवीं सहसा म्हणें प्राण । माझेचि कांपती ३५०
ज्या मज संहाररुद्र वोसिपे[३२] । ज्या मजभेणें मृत्यु लपे । तो मी एथें अहोळ[३३]-
बाहळीं कांपें । ऐसें तुवां केलें ५१ परि नवल बापा हे महामारी । इया नाम
विश्वरूप जरी । हे भ्यासुरपणें हौरी[३४] । भयासि आणी ५२

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा धृतिं न विन्दामि शमं च विष्णो ॥ २४ ॥

ठेलीं[३५] महाकाळेंसि हटतटें[३६] । तैसीं कितीएकें मुखें रागिटें । इहीं वोढोनियां
धाकुटें । आकाश केलें ५३ गगनाचेनि वाडपणें नाकळे[३७] । त्रिभुवनींचियाही
वारिया न[३९] वेटाळे । ययाचेनि वाफां आगी जळे । कैसें धडाडीत असे ५४
तेवींची एकासारिखें एक नोहे । एथ वर्णावर्णाचा भेदु आहे । हो कां जे प्र-

**अन्वयार्थ**—(महाबाहो)–हे महापराक्रमी कृष्णा!–(ते)–तुझें–(रूपं)–हें रूप–(महत्)–फार मोठें–[अस्ति–आहे.]–(बहुवक्त्रनेत्रं)–याला पुष्कळ मुखें व नेत्र आहेत.–(बहुबाहूरुपादं)–पुष्कळ बाहु, मांड्या व पाय आहेत.–(बहूदरं)–याला पुष्कळ उदरें आहेत.–(बहुदंष्ट्राकरालं)–हें अनेक दाढांनीं विकराल झालें आहे. अशा या रूपाला–(दृष्ट्वा)–पाहून–(लोकाः)–हे सर्व लोक–(प्रव्यथिताः)–अतिशय व्यथा पावले आहेत–(तथा)–त्याचप्रमाणें–(अहं)–मी–(प्रव्यथितः)–अतिशय व्यथित झालों आहें. २३

जणुंकाय त्यांच्या नेत्रांचें भाग्यच उदयास आलें व तुमचें हें अगाध विश्वरूप पाहून त्यांच्या मनाला आज सुखाचा सुदिन उगवला. ३८ ते तीन लोक व्यापणारें तुमचें स्वरूप पाहून देवही चकीत झाले. कारण, हें स्वरूप वाटेल तिकडून पाहिलें असतां प्रत्येक पहाणाराला आपल्या समोर आहे असें दिसतें. ३९ याप्रमाणें हें एकच असून विचित्र आहे, व याला भेसूर तोंडें व पुष्कळ नेत्र आहेत व शस्त्रें धारण केलेले अनंत हात आहेत. १४० तसेंच अनंत उत्तम बाहु, पाय, उदर आणि नानावर्ण इतकीं असून प्रत्येक मुख खावयाला उठलें आहे असें दिसतें; ४१ ज्याप्रमाणें महाकल्पाच्या अंतीं रागावलेला यम जिकडे तिकडे प्रळयाग्नीच्या होळ्या पसरतो, ४२ किंवा शंकराची संहार करण्याची यंत्रेंच अथवा पात्रें, प्रळय भैरवाचे जमाव, किंवा अंत करणाऱ्या जगदंबेची विभूति संहार करण्याकरितां यावी की काय, ४३ त्याप्रमाणें जिकडे तिकडे तुमचीं प्रचंड तोंडें दिसतात, आणि दरींमध्यें ज्याप्रमाणें सिंह मावत नाहींत, त्याप्रमाणें तुमचे दांत तोंडांत न मावतां भयंकर दिसतात. ४४ प्रळयरात्रीच्या अंधारामध्यें जशीं नाश करणारीं पिशाच्चें निघतात, त्याप्रमाणें प्रळयकाळच्या संहाराच्या रक्तानें तुमच्या दाढा किटलेल्या दिसतात. ४५ फार काय सांगावें! काळानें जसें युद्धाला आमंत्रण द्यावें, किंवा सर्व संहारांत जिवाचा नाश व्हावा, त्याप्रमाणें तुमच्या मुखांमध्यें अत्यंत भयंकरपणा दिसतो. ४६ काय सांगूं! हें सर्व जग अत्यंत दीन दिसतें. कारण, जगाकडे किंचित् नजर टाकून पाहील, त्याला, तें दुःखरूप यमुना नदीच्या कांठच्या झाडाप्रमाणें उभें राहिलेलें आहे असें दिसेल. ४७ तुमच्या या महामृत्युरूपी सागरांत जगताचें आयुष्य हीच कोणी नांव शोकरूपी तुफानानें हेलकावे खात आहे. ४८ देवा, कदाचित् तुम्ही असें म्हणाल कीं, तुला लोकांच्या भीतीबद्दल वाटाघाट करण्याचें काय कारण आहे? तर तसें न करतां, जें हल्लीं विश्वरूप पाहिलें आहेस, त्याचें मनांत ध्यान करून सुखाचा उपभोग घे. ४९ तर, लोकांच्या भीतीचा फक्त आडपडदा असून खरें म्हणाल तर भीतीनें माझीच पांचांवर धारण बसली आहे. ३५० ज्या मला प्रळयकाळचा रुद्र भितो, व माझ्या भीतीनें मृत्यु लपतो, तो मी अंतर्बाह्य तुमचें स्वरूप पाहून कांपत आहें, अशी तुम्हीं माझी अवस्था करून टाकिली. ५१ परंतु, हे प्रभो, या तुमच्या अतिभयंकर रूपाला–जें आपल्या उग्र तेजानें भयालाही जिंकून टाकतें त्याला–विश्वरूप म्हणणें हें नवल नव्हे का? तर ही महामारी होय. ५२

**अन्वयार्थ**—(विष्णो)–हे व्यापक देवा!–(नभःस्पृशं)–आकाशाला स्पर्श करणाऱ्या–(दीप्तं)–प्रदीप्त झालेल्या–(अनेकवर्णं)–ज्यांत नाना प्रकारचे वर्ण–रंग आहेत अशा,–(व्यात्ताननं)–ज्यांत उघडलेलीं–पसरलेलीं तोंडें अनेक आहेत अशा–(दीप्तविशालनेत्रं)–आणि ज्याचे नेत्र दीप्त–प्रदीप्त व विशाल आहेत अशा भयंकर स्वरूपानें युक्त असलेल्या–(त्वां)–तुला–(दृष्ट्वा हि)–पाहूनच–(प्रव्यथितान्तरात्मा)–ज्याचा अन्तरात्मा–अन्तःकरण अतिशय पीडित झालें आहे, ज्याचें मन भ्यालें आहे असा मी–(धृतिं)–धैर्याला–(च)–व–(शमं)–मनःसमाधानाला–(न विंदामि)–प्राप्त होत नाहीं. २४

कित्येक रागीट मुखें जणुंकाय महाकाळाबरोबर पैजेनें रुंदताहेत, व त्यांनीं आपल्या मोठेपणानें आकाशास मागें टाकलें आहे. ५३ तीं आकाशाच्याही मोठेपणानें आकळलीं जात नाहींत; व त्रिभुवनाच्या वाऱ्यानें ज्यांचें वेष्टन होत नाहीं, उलट तीं आपल्या वाफांनीं अग्नीला जाळून सर्वत्र भडका करीत आहेत! ५४ त्याचप्रमाणें, तीं एकासारखीं एक नसून प्रत्येकांत रंगारूपाचा भेद आहे, व प्रळयकालाचा अग्नि ज्या वेळेस उत्पन्न होतो,

१ डोळ्यांचें. २ सुकाळ. ३ उजाडलें. ४ थाक. ५ भयं-र. ६ मांड्या. ७ उन्मत्तपण, मस्ती. ८ रागावलेल्या. ९ ागळ्या पसरल्या. १० शंकर. ११ जमाव. १२ युगाचा त करणारी जी जगदंबा तिची. १३ मांडी. १४ भूतरूपी ाचण्डीकरितां. १५ पुढें केली, प्राप्त झाली, पुढें आली. ६ मावत नाहीं. १७ सिंह. १८ दांत. १९ नाश कर-री पिशाच्चें. २० प्रलय काळच्या संहाराच्या रक्तानें. १ लिप्त झाल्या, किटल्या. २२ आमंत्रिलें. २३ भालें. २४ अति भयंकरपणा. २५ नौका. २६ शोकरूपी वादळांतील लाटांनीं. २७ आदळत, डळमळत, हेलकावे खात. २८ कृष्णानें. २९ कदाचित्, सहज. ३० पुढें कारितों, आडवें घालतों. ३१ ढाल, मिमित्त. ३२ भय पावे, भितो. ३३ आंत व बाहेर. ३४ पराजय, हटविणारी. ३५ रुंदताहेत. ३६ भांडून, जिंकून. ३७ मोठेपणानें. ३८ आकळेना. ३९ न वेष्टवे. ४० वाफेनें. ४१ अग्नि.

ळयीं सावाँवो लाहे । वन्ही यमाचा ५५ जयाचिये आंगींची दीप्ती[२] येवढी ।
जे त्रैलोक्य कीजे राखोंडी । कीं तयाही तोंडें आणि तोंडीं । दांत दाढा ५६
कैसा वारया धनुर्वात चढला । समुद्र कीं महापुरीं पडिला । विषाग्नि मारौं[३]
प्रवर्तला । वडवानळासी ५७ हळाहळ आगी पियालें । नवल मरण मारा प्रव-
र्तलें । तैसें संहारतेजा या जाहालें । वदन देखा ५८ परी कोणें मानें विशाळ ।
जैसें तुटलिया अंतराळ । आकाशासि कव्हळें[४] । पडोनि ठेलें ५९ नातरी काखे
सूनि वसुंधरी । जैं हिरण्याक्षु रिगाला विवरीं । तैं उघडलें हाटकेश्वरीं । जेवीं
पाताळकुहर ३६० तैसा वक्त्रांचा विकाशु[१२] । माजि जिव्हांचा आगळींचि[१३] आ-
वेशु । विश्व न पुरे म्हणोनि घांसु । न भरीचि कोंडें ६१ आणि पाताळव्यों-
ळांचिया फूत्कारीं[१५] । गरळज्वाळा[१६] लागती अंबरीं । तैसी पसरलिये वदनदरी- ।
माजि हे जिव्हा ६२ काढूनि प्रळयविजूचीं जुंबाडें[१८] । जैसे पन्नासिलें[१९] गगनाचे
हुडे[२०] । तैसे आवाळुवांवरी[२१] आंकडे । धगधगीत[२२] दाढांचें ६३ आणि ललाटपटा-[२३]
चियें खोळे । जैसे भयातें भेडविताती डोळे । हो कां जे महामृत्यूचे उमाळे ।
कडवसा[२५] राहिले ६४ ऐसें वाऊनि[२६] भयाचें भोजें । एथ काय निपजवूं पाहतोसि
काज । तें नेणों परी मज । मरणभय आलें ६५ देवा विश्वरूप पहावयाचे ।
डोहळे । केले तियें पावलों प्रतिफळें । बापा देखिलासि आतां डोळे । निवाले
तैसे निवाले ६६ अहो देहो पार्थिव कीर जाये । यमाची कांकुळती[२८] कवणा आहे ।
पारि आतां चैतन्य[३०] माझें विपायें[३१] । वांचे कीं न वांचे ६७ एऱ्हवीं भयास्तव आंग
कांपे । नावेक[३२] आगळें तरी मन तापे । अथवा बुद्धीही वासिपे[३३] । अभिमानु विसरिजे
६८ परी येतुलियाही वेगळा । जो केवळ आनंदैककळा[३४] । तया अंतरात्मयाही
निश्चळा । शियारी[३५] आली ६९ बापं[३६] साक्षात्काराचा वेधु । कैसा देशधडी[३७] केला
बोधु[३८] । हा गुरुशिष्यसंबंधु । विपायें[३९] नांदे ३७० देवा तुझ्या ये दर्शनीं । जें
वैकल्य[४०] उपजलें आहे अंतःकरणीं । तें सांवरावयालागीं गंवसणी[४१] । धैर्याची
करितसें ७१ तंव माझेनि नामें धैर्य हारपलें । कीं तयाहीवरी विश्वरूपदर्शन
जाहलें । हें असो परि मज भलें अतुंडविलें । उपदेशा इया ७२ जीव [४३]विसं-
वावयाचिया चाडा । सैंघ धांवाधांवी करितसे बापुडा । पारि सोयही कव-
णेकडां । न लभे एथ ७३ ऐसें विश्वरूपाचिया महामारी । जीवित्व गेलें आहे
चराचरीं । जी न बोलें तारे काय करीं । कैसेनि राहें ७४

त्या वेळेस तो यांच्याच साहाय्यानें पृथ्वीचा प्रळय करतो की काय कोण जाणे ! ५५ यांच्या अंगचें एवढें तेज आहे की ज्यानें त्रैलोक्याची राखुंडी होते, त्यांतही तोंडें आहेत आणि तोंडांत दांत व दाढा आहेत ! ५६ काय वाऱ्याला धनुर्वात झाला ? किंवा समुद्राला महापूर येऊन तो मर्यादा सोडून वाढूं लागला ? अथवा वडवानळाच्या साहाय्यानें विश्वरूप अग्नि मारण्यास प्रवर्तला आहे की काय ? ५७ काळकूट विष अग्नीनें घ्यावें, अथवा मरण हेंच मारण्यास उद्युक्त व्हावें, त्याप्रमाणें या विश्वरूपाचें तेज प्रखर असून त्याला आणखी तोंडेंही आहेत. ५८ परंतु तीं तोंडें केवढी मोठीं आहेत म्हणाल, तर आकाश मध्येंच तुटून त्याला जशी खिंड पडावी त्याप्रमाणें; ५९ किंवा हिरण्याक्ष राक्षस पृथ्वी काखेंत मारून, ज्या वेळेस पाताळास जावयास निघाला त्या वेळेस हाटकेश्वरानें [ सप्तपाताळाखालील महादेवाच्या अवतारानें ] जसें पाताळाचें विवर उघडलें, ३६० त्याप्रमाणें हीं तुमचीं तोंडें पसरलेलीं असून, त्यांत जिव्हा आवेशानें लडवडताहेत; आपल्या एके घासासही विश्व पुरणार नाहीं म्हणून कौतुकानें देखील तें खाऊन टाकीत नाहींत; ६१ आणि पाताळांतील नागांच्या फुस्कान्यानें जशा विषाच्या ज्वाळा आकाशास लागतात, त्याप्रमाणें ह्या तोंडांच्या दरींत जिव्हा भासतात ! ६२ प्रळयकाळच्या विजांचे समुदाय एकत्र करून जसे गगनाचे किल्ले शृंगारावे, त्याप्रमाणें ओंठाच्या दोन्ही बाजूंस दाढांचे आंकडे प्रखर दिसतात; ६३ आणि कपाळाच्या भागांतील खळग्यांत भयाला भिवविणारे असे डोळे दिसत असून, ते महामृत्यूचे प्रवाह अंधारांत दडून बसल्यासारखे दिसताहेत. ६४ याप्रमाणें भीतीचें कौतुक करून या ठिकाणीं तुम्हीं कसल्या प्राप्तीची आशा करतां हें मला समजत नाहीं; परंतु मला मात्र मरण्याची भीति उत्पन्न झाली आहे. ६५ देवा, मला जें विश्वरूप पाहण्याविषयीं डोहाळे झाले होते, ते माझे मलाच फळले, व तें रूप पाहून जशा रीतीनें डोळ्यांची शांति व्हावयाला पाहिजे होती, त्याप्रमाणें झाली आहे. ६६ देवा, शरीर हें तर मातीचें असून तें नाहींसें झालें असतां त्याची कोण पर्वा करील ? परंतु माझें चैतन्य हेंही कदाचित् राहील की नाहीं याचा भरंवसा नाहीं, ६७ थोडा बहुत मनालाही ताप उत्पन्न होत आहे व बुद्धीला भीति उत्पन्न होऊन अभिमानाचाही विसर पडला आहे. ६८ इतकेंच नव्हे तर इंद्रियांहून निराळा असा जो आनंदस्वरूपी निश्चळ आत्मा, त्यालाही शिसारी आली आहे. ६९ देवा विश्वरूपाचा साक्षात्कार काय सांगावा, की ज्याच्या दर्शनानें माझें ज्ञानच देशोधडीस लागलें आणि माझा व तुमचा जो गुरुशिष्याचा संबंध, तो या जगांत उरेल की नाहीं याचा मला संशय आहे. ३७० देवा, तुमच्या विश्वरूपाच्या दर्शनानें माझें व्याकूळ झालेलें अंतःकरण सांवरून धरण्याकरितां त्याला मी धीर देण्याची खटपट करीत आहें; ७१ अगोदर माझें नांव ऐकतांच धैर्य मला सोडून गेलें होतें त्यांतूनही मला विश्वरूप दर्शन झालें. हें असो, आपल्या उपदेशानें तुम्ही मला चांगलेंच घोटाळ्यांत घातलें. ७२ माझा जीवात्मा विसांवा घेण्याच्या निमित्तानें बिचारा चहूंकडे धांव घेत आहे. परंतु त्याला कोठेंही थारा मिळत नाहीं. ७३ याप्रमाणें तुमच्या या विश्वरूपी महामारीच्या दर्शनानें स्थावरजंगमादि सृष्टींतील सर्वांचें जीवित्व नाहींसें झालें आहे. पण जर तुम्हांला शरण न आलों तर मी जिवंत तरी कसा राहीन ? ७४

१ साहाय्य. २ तेज. ३ मारण्याला. ४ वडवानळाच्या साह्यानें. ५ विष. ६ वेढा, ग्रास. ७ पाळून. ८ पृथ्वी. ९ विश्रांत, पाताळांत. १० पाताळांतील महादेवानें ११ विवर. १२ पसरणें. १३ अधिक, विशेष. १४ नागांच्या. १५ फुस्कान्यानें. १६ विष. १७ आकाशीं. १८ समुदाय. १९ शृंगारिलें. २० बुरूज. २१ ओंठाबाहेर. २२ प्रखर. २३ कपाळाचे भागांतील खळग्यांत. २४ प्रवाह, लोट. २५ अंधारांत. २६ स्वीकारून, घेऊन. २७ रूप, सोंग. २८ पृथ्वीचा, मातीचा. २९ पर्वा. ३० जीव. ३१ कदाचित्. ३२ क्षणभर; ३३ भिते, भय पावे. ३४ स्वरूप. ३५ कांटा, कंप, शिसारी. ३६ मोठें बल, थोर प्रताप. ३७ देशपार. ३८ दान. ३९ संकटानें, क्वचित्व. ४० विकलता, व्याकुळता. ४१ खटपट. ४२ गुरफटिलें, गुंतविलें. ४३ विसांवा घेण्याकरितां. ४४ पुष्कळ. ४५ थारा.

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥

पैं अखंड डोळ्यांपुढें । फुटलें जैसें महाभयाचें भांडें । तैशीं तुझीं मुखें वेतंडें । पसरलीं देखें ७५ असो दांतदाढांची दाटी । न झांकवे मा दोहीं गोठीं । सैंघ प्रळयशस्त्रांचिया दाट कांटी । लागलिया जैशा ७६ जैसें तक्षका वेष भरलें । हो कां जे काळरात्रीं भूत संचरलें । कीं अग्नेयास्त्र परजिलें । वज्राग्नि जैसें ७७ तैशीं तुझीं वक्त्रें प्रचंडें । वरि आवेश हा बाहेरी वोसंडे । आले मरणरसाचे लोंढे । आम्हांवरी ७८ संहारसमयींचा चंडानिळु । आणि महाकल्पांत प्रळयानळु । या दोहीं जैं होय मेळु । तैं काय एक न जळे ७९ तैसीं संहारकें तुझीं मुखें । देखोनि धीरु कां आम्हां पारुखे । आतां भुललों मी दिशा न देखें । आपणपें नेणें ३८० मोटकें विश्वरूप डोळां देखिलें । आणि सुखाचें अवर्षण पडिलें । आतां जापाणीं जापाणीं आपुलें । अस्ताव्यस्त हें ८१ ऐसें करिसी म्हणोनि जरि जाणें । तरि हे गोष्टि सांगावी कां मी म्हणें । आतां एक वेळ वांचवीं जी प्राणें । या स्वरूपप्रळयापासोनि ८२ जरि तूं गोसांवी आमुचा अनंता । तरि सुंई वोडण माझिया जीविता । सांटवीं पसारा हा मागुता । महामारीचा ८३ आइकें सकळ देवांचिया परदेवते । तुवां चैतन्यें गा विश्व वसतें । तें विसरलासि हें उपरतें । संहारूं आदरिलें ८४ म्हणोनि वेगीं प्रसन्न होईं देवराया । संहरीं संहरीं आपुली माया । काढीं मातें महाभया- । पासोनियां ८५ हा ठायवरी पुढतपुढतीं । तूतें म्हणिजे बहुवा काकुळती । ऐसा मी विश्वमूर्ती । भेडका जाहलों ८६ जैं अमरावतीये आला धाडा । तैं म्यां एकलेनि केला उवेडा । जो मी काळाचियाही तोंडा । वासिपें न धरीं ८७ परि तैंयां धांतुल नव्हे हें देवा । एथ मृत्यूसही करूनि चढावा । तुवां आमुचाचि घोटु भरावा । या सकळ विश्वेंसीं ८८ कैसा नव्हता प्रळयाचा वेळु । गोसांवा तूंचि मिनलासि काळु । बापुडा हा त्रिभुवन गोळु । अल्पायु जाहला ८९ अहा भाग्या विपरीता । विघ्न उठिलें शांत करितां । कटकटा विश्व गेलें आतां । तूं लागलासि ग्रासूं ३९० हें नव्हे मा रोकडें । सैंघ पसरूनियां तोंडें । कवळितासि चहूंकडे । सैन्यें इयें ९१

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसङ्घैः ।
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥

**अन्वयार्थ**—(च)-आणि-(ते)-तुझीं-(दंष्ट्राकरालानि)-दाढांनीं विकराल झालेलीं-(कालानलसंनिभानि)-प्रलयकालच्या अग्नीसारखीं-(मुखानि)-मुखें-(दृष्ट्वा एव)-पाहूनच-(दिशः)-दिशांना-(न जाने)- मी जाणत नाहीं-(च)-व-[मला]-(शर्म)-सुख-(न लभे)-होत नाहीं.-( देवेश )-हे देवांच्या ईश्वरा,-(जगन्निवास)-हे जगाच्या आश्रयभूत देवा,-(प्रसीद)-प्रसन्न हो. २५

जसें महाभयाचें सबंध भांडें फुटून आपल्या डोळ्यांपुढें उघड दिसावें; त्याप्रमाणें तुमचीं आक्राळविक्राळ मोठीं तोंडें पसरलेलीं दिसतात, ७५ आणि आंतील दांत व दाढा यांची इतकी गर्दी झालेली आहे कीं, त्या दोन्ही ओठांच्या आंत मावत नाहींत; त्यायोगानें चहूंकडे प्रलयकालच्या शस्त्रांचें दाट कुंपण लावलें आहे कीं काय असें वाटतें. ७६ तक्षक हा पूर्ण विषारी असून त्याच्या तोंडांत जशी विषाचीच भर घालावी, किंवा अमावास्येच्या रात्रीं भूतांचा संचार व्हावा; अथवा प्रळयाग्नीनें आग्नेयास्त्र परजावें, ७७ त्याप्रमाणें तुमचीं विशाळ तोंडें असून त्यांतून आवेश बाहेर उचंबळत आहे, व त्या योगानें आमच्यावर मरणरूपी पाण्याचे लोंढेच आले आहेत कीं काय असें वाटतें. ७८ सर्व ब्रह्मांडाचा नाश करणारा प्रळयाग्नि उद्भवला; व त्याला प्रळयकाळचा प्रचंड वारा सहाय्य झाला, तर तो काय जाळणार नाहीं ? ७९ त्याप्रमाणें संहार करणारीं अशीं हीं तुमचीं तोंडें पाहून माझा धीर अगदीं खचला, व मी वेडावून जाऊन मला दिशांचीही भूल पडली व माझा मलाच विसर पडला ! १८० तुमचें विश्वरूप मी डोळ्यांनीं पाहिलें नाहीं, तोंच त्यापासून होणारें सुख नाहींसें झालें. म्हणून,हें तुमचें अवाढव्य स्वरूप आतां झांका झांका महाराज. ८१ तुम्ही अशा रीतीनें मला भिववाल असें जर माहीत असतें, तर मला विश्वरूप दाखवा असें तुम्हांला कां म्हटलें असतें? तर आतां ह्या आपल्या विश्वरूप प्रळयाग्नीपासून एक वेळ माझे प्राण वांचवा. ८२ हे अनंता, तुम्ही जर आमचे खरोखर धनी आहां, तर माझ्या मरणाच्या आड कांहीं तरी घालून मग हा महामारीरूपी तुमच्या विश्वरूपाचा पसारा आंवरा. ८३ हे देवाधिदेवा, सर्व विश्वाचें वसतिस्थान असे जे तुम्ही, ते सर्व जगाचें पालन करण्याचें विसरून त्याचा उलट संहार करूं पाहातां काय! ८४ म्हणून हे देवराया, लवकर प्रसन्न होऊन आपली माया आंवरा आंवरा, आणि मला या मोठ्या भयापासून सोडवा. ८५ एवढा वेळपर्यंत पुष्कळ काकुळतीस येऊन तुमची जी वारंवार विनवणी करीत आहें, त्याचें कारण या विश्वरूपाला पाहून इतका मी भिन्ना झालों ! ८६ ज्या वेळेस अमरावतीवर राक्षसांची धाड आली होती, त्यावेळेस त्यांचा पराभव मी एकट्यानें केला. मी काळाच्याही तोंडांत जाण्यास भिणारा नव्हे; ८७ परंतु देवा, हें आपलें विश्वरूप या गोष्टींपैकीं नव्हे; या ठिकाणीं मृत्युवरही ताण करून सकल विश्वासहित आमचा घोट घ्यावा, या हेतूनें तुम्ही प्राप्त झाला आहां. ८८ हें पहा प्रलयकालाचा समय नसूनही प्रस्तुत तुम्ही रक्षणकर्तेच काळरूपानें प्राप्त झाल्यामुळें या बिचाऱ्या त्रिभुवनगोलाचीं शंभर वर्षें आजच भरलीं आहेत ! ८९ अहारे देवा ! तुझी गति किती विपरीत आहे ! विश्वरूपाच्या दर्शनापासून शांति होईल अशा समजुतीनें मी देवास 'विश्वरूप दाखवा ' म्हणून म्हटलें, तर तें सुख न होतां उलट विघ्न वोढवलें. अरेरे ! देवा, आतां मात्र हें विश्व बुडालें; कारण, तूंच त्याला ग्रासूं लागलास ! १९० देवा, अहो, आपण अनेक मुखें पसरून या सर्व सैन्याला चहूंकडून भक्षण करीत आहां, हें प्रत्यक्ष माझ्या दृष्टीस पडत नाहीं का ? ९१

**अन्वयार्थ**—(अवनिपालसंघैः सह एव)-पृथ्वीपालांच्या संघासहवर्तमानच-(अमी सर्वे)-हे सर्व-(धृतराष्ट्रस्य पुत्राः)-धृतराष्ट्राचे पुत्र-(च भीष्मः)-पितामह भीष्माचार्य,-(द्रोणः)-आचार्य द्रोणाचार्य,-(तथा)-त्याचप्रमाणें-(अस्मदीयैः अपि)-आमच्याहि-( योधमुख्यैः सह)-धृष्टद्युम्नादि मुख्य योद्ध्यांसह-(असौ सूतपुत्रः)-हा सूतपुत्र-कर्ण इत्यादि सर्व. २६

१ मोठीं. २ मग. ३ कांट्यांचें कुंपण. ४ पेरिलें, फूट दिलें, फूट चढविलें. ५ प्रळयाग्नीनें, विजेनें. ६ वाहवतो. ७ प्रलयकाळाचा. ८ प्रचंड वारा, झंझावात. ९ प्रळयाग्नी. १० नष्ट होतों, खचतो, पारखा होतो. ११ थोडकें. १२ आटप आटप. १३ धनी. १४ आड घाल. १५ ढाल, आडोसा. १६ आवर. १७ उलटें. १८ आवरून घे. १९ येथपर्यंत, एवढा वेळपर्यंत. २० पुनः पुनः २१ विश्वमूर्तीमुळें. २२ भिन्ना. २३ छापा. २४ पराभव, उलगडा. २५ भय. २६ त्यांपैकीं. २७ चढाई, ताण. २८ मध्येंच. २९ प्राप्त झालास. ३० अरे, अरे. ३१ काय. ३२ प्रत्यक्ष.

नोहेति हे कौरवकुळींचे वीर । आंधाळिया धृतराष्ट्राचे कुमर । हे गेले गेले सहपरिवार । तुझिया वदनीं ९२ आणि जे जे यांचेनि सांवायें । आले देशोदेशींचे राये । तयांचें सांगावया जावों न लाहे । ऐसें सरकटित आहासी ९३ मदमुखाचिया संघटा । घेत आहासि घटघटां । औरणीं हन थाटा । देतोसि मिठी ९४ जंत्रांवरिचील मार । पदातींचे मोगर । मुखाआंत भार । हारपताति मा ९५ कृतांताचिया जावळी । जें एकचि विश्वातें गिळी । तियें कोटीवरी सगळीं । गिळितासि शस्त्रें ९६ चतुरंगा पारिवारा । संजोडियां रहंवरां । दांत न लाविसी मा परमेश्वरा । कैसा तुष्टलासि बरवा ९७ हां गा भीष्माऐसा कवणु । सत्यशौर्यनिपुणु । तोही आणि ब्राह्मण द्रोणु । ग्रासिलासि कटकटा ९८ अहा सहस्रकराचा कुमरु । एथ गेला गेला कर्णवीरु । आणि आमुचिया आघवयांचा केरु । फेडिला देखें ९९ कटकटा धातया । कैसें जाहलें अनुग्रहा यया । मियां प्रार्थूनि जगा बापुडिया । आणिलें मरण ४०० मागां थोडिया बहुवा उपपत्ती । येणें सांगितली या विभूती । तैसा नसेचि मा पुढती । बैसलों पुसों १ म्हणोनि भोग्य तें त्रिशुद्धी न चुके । आणि बुद्धिही होणारासारिखी ठाके । माझ्या कपाळीं पिटावें लोकें । तें लोटलें कांह्यां २ पूर्वीं अमृतही हातां आलें । पारि देव नसतीचि उगले । मग काळकूट उठविलें । शेवटीं जैसें ३ पारि तें एकबगीं थोडें । केलिया प्रतिकारामाजिवडें । आणि तियें अवसरींचें तें सांकडें । निस्तरविलें शंभू ४ आतां हा जळता वारा कें वेंटोळें । कोणाहे विषा भरलें गगन गिळे । महाकाळेंसि कें खेळें । आंगवत असे ५ ऐसा अर्जुन दुःखें शिणतु । शोचितें असे जीवाआंतु । पारि न देखे तो प्रस्तुतु । अभिप्राय देवाचा ६ जे मी मारिता हे कौरव मरते । ऐसेंनि वेंटाळिला होता मोहें बहुतें । तो फेडावयालागीं अनंतें । हें दाखविलें निज ७ अरे कोण्ही कोणातें न मारी । एथ मीचि हो सर्व संहारीं । हें विश्वरूपव्याजें हरी । प्रकटित असे ८ पारि वायांचि व्याकुलता । तें न चोजवेचि पंडुसुता । मग अहा कंपु नव्हता । वाढवित असे ९

वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥

तेथ म्हणे पाहा हो एके वेळे । सासिकवचेंसिं दोन्ही दळें । वदनीं गेलीं आभाळें । गगनीं कां जैसीं ४१० कां महाकल्पाचिया शेवटीं । जैं कृतांतु कोपला होय सृष्टी । तैं एकविसां ही स्वर्गां मिठी । पाताळासकट दे ११ नातरी उदासीनें

अहो, कौरवकुलांतील वीर आणि आंधळ्या धृतराष्ट्राचे मुलगे हेच नव्हत का ! अहाहा ! गेले, गेले ! सहपरिवार तुमच्या मुखांत गेले. ९२ आणखी जे देशोदेशींचे राजे यांचें साह्य करण्याकरितां आले होते, त्यांचा निरोप माघारा सांगण्याकरितां देखील कोणी मनुष्य उरला नाही. अशा रीतीनें तुम्ही सर्वांना गिळीत आहां. ९३ या रणांत मोठ्या थाटानें हत्तींच्या समुदायांचे देखील घटघटा घांस करीत आहां. ९४ बंदुकी, तोफा यांचा मारा करणारे आणि पायदळांचे समुदाय यांच्या झुंडींच्या झुंडी तुमच्या मुखांत की हो नाहींतशा होत आहेत ! ९५ कृतांताच्या तोडीचीं अशीं अस्त्रें की, ज्यांतील एक देखील सर्व विश्वाचा नाश करील, अशीं कोट्यवधि तुम्ही गिळून टाकीत आहां ! ९६ चतुरंग सेना, सिच घोडे जोडलेले रथ या सर्वांना दांत न लावतां द करीत आहां; तर देवा, यांपासून तुम्हांला कसा तोष वाटतो ? ९७ अहो, भीष्मासारखा सत्यवादी व र्यनिपुण असा दुसरा कोण आहे ? याला, आणि हा ण ब्राह्मण असून त्याला देखील आपण ग्रासून टाकना ! ९८ अरेरे ! अहो सूर्यपुत्र जो महावीर कर्ण, ही गेला; आणि आतां आमच्याकडील योद्ध्यांची ळी येऊन, त्यांची अडचण नाहींशी केली ! ९९ रें ब्रह्मदेवाः—या प्रभूच्या प्रसादापासून ही काय अनत गोष्ट घडत आहे की, मी प्रभूंची प्रार्थना करून ाऱ्या जगाला मारण्यास मात्र कारण झालों ! ४०० थोड्या बहुत प्रकारांनी प्रभूंनी आपल्या विभूति गितल्या; त्यावर समाधान मानावें, पण त्याप्रमाणें न तां विश्वरूप दाखवा म्हणून मी हट धरून बसलों. १ न, भोक्तव्य चुकत नाही म्हणतात ती गोष्ट अगदी आहे; आणि बुद्धीही त्याप्रमाणेंच होते हेंही खरें . लोकांनी आपल्या मरणाचें खापर माझ्या डोक्याफोडावें ही गोष्ट कशी चुकणार ? २ पूर्वी समुद्रमंथा वेळी अमृत हाताला आलें असूनही देवांनी मंथन बंद न करतां ज्यास्ती इच्छा केली, तेव्हां शेवटीं त्यांच्या हातीं काळकूट विष आलें ! ३ परंतु तेंही एका प्रकारें कमीच; शिवाय, त्याचें निराकरण करण्यासारखें होतें; आणि त्या वेळचें तें संकट शंकरांनी दूरही केलें. ४ पण हल्लींचा जो हा विश्वरूपाचा प्रकार–हा अग्नीस मदत करणारा वारा नसून, प्रत्यक्ष पेटलेला वाराच आहे, तर त्याला कोण आंवरील ? तसेंच, सर्व गगनांत जें विष पसरलें आहे, तें कोण गिळील ? व महाकाळाबरोबर खेळण्याचें कोणाचें सामर्थ्य आहे? ५ ज्ञानेश्वर म्हणतातः—याप्रमाणें अर्जुन दुःखानें शिणून मनांतल्या मनांत शोक करूं लागला. परंतु असें विश्वरूप दाखविण्यांतील देवाचा आशय काय आहे याचा विचार करीना. ६ कारण मी मारणारा व हे कौरव मरणारे अशा ज्या उलट मोहानें तो व्यापून गेला होता, तो त्याचा मोह नाहींसा करण्याकरितांच श्रीअनंतानें आपलें हें विश्वरूप दाखविलें. ७ अरे बाळा, कोणी कोणास मारीत नाहीं; तर या ठिकाणीं सर्वांचा संहार करणारा मीच आहें, हें त्यांनी विश्वरूपाच्या निमित्तानें व्यक्त केलें. ८ परंतु अर्जुनास हें न समजतां तो व्यर्थ व्याकूळ झाला व उगीच मनांत भीति धरूं लागला. ९

अन्वयार्थ—(त्वरमाणाः)—त्वरा करणारे असे होत्सातें—मोठ्या त्वरेनें—( ते )—तुझ्या—( दंष्ट्राकरालानि )—दाढांनीं निकराळ दिसणाऱ्या—( भयानकानि )—भयानक—(वक्त्राणि )—मुखांत—(त्वां विशन्ति)—तुजमध्यें प्रवेश करितात.—(केचित् )—त्यांतील कांहीं—( चूर्णितैः उत्तमाङ्गैः )—चूर्ण झालेल्या मस्तकांनीं—( दशनान्तरेषु विलग्नाः )—दांतांच्या फटींत अडकून राहिलेले—( संदृश्यन्ते )—दिसतात. २७

त्या वेळेस तो पुनः म्हणाला, "अहो, हें पहा ! आकाशांत ज्याप्रमाणें अभ्रें नाहींतशीं होतात त्याप्रमाणें शिरस्त्राणें व कवचें यांसकट ही दोहींकडची सैन्यें एकदम तुमच्या तोंडांत नाहींतशीं झालीं. ४१० किंवा महाप्रळयाच्या वेळीं यम कोपल्यावर, जसा एकवीस स्वर्गांना पाताळासह गिळून टाकतो, ११ अथवा दैव प्रतिकूळ झाल्यावर संग्रह करणाराचें,

हे नव्हते काय ? २ साहाय्यार्थ. ३ रहात. ४ गिळीत. ...ींचा समुदाय. ६ माहातांच्या समुदायांस. ७ तोफा, वगैरेंची. ८ पायदळाचे. ९ निवडक लोक. १० ...या झुंडी. ११ नाहींशा होतात. १२ मावंद १३ हत्ती, रथ व पायदळ यांस. १४ घोडे जोडलेल्या रथांस. ...ायदाय. १६ सर्वांचा. १७ हे ब्रह्मदेवा. १८ प्रसाद, १९ थोड्याबहुत युक्तीनें. २० ईश्वरमूर्ति. २१ भोक्तृत्व, प्रारब्ध. २२ खास. २३ खापर फोडावें. २४ चुकेल कशानें ? २५ उगे राहिले, तृप्त झाले. २६ एक प्रकारें, एक पक्षीं. २७ अनुभवानें पाहिलें असतां. २८ संकट. २९ आवरेल. ३० महाकाळाशीं, बरोबर. ३१ सामर्थ्य. ३२ शोक करीत. ३३ आसिला. ३४ निमित्तानें. ३५ न समजे. ३६ उगाच, व्यर्थ. ३७ तरवारी व कवचासकट. ३८ यम. ३९ एकवीस. ४० प्रतिकूल.

ज्ञा...४८

दैवें । संचकांचीं वैभवें । जेथींचीं तेथ स्वभावें । विलया जाती १२ तैसीं सासिन्नलीं सैन्यें एकवटें । इयें मुखीं जाहलीं प्रविष्टें । पारि एकही तोंडौनि न सुटे । कैसें कर्म देखा १३ अशोकाचे अंगवसे । चघाळिले कन्हेनि जैसें । लोक वक्त्रांमाजि तैसे । वायां गेले १४ पारि सिसाळें मुकुटेंसीं । पडिलीं दाढांचे सांडसीं । पीठ होत कैसीं । दिसत आहाती १५ तियें रत्नें दांतांचियें सवडीं । कूट लागलें जिभेच्या बुडीं । कांहीं कांहीं आगेरडीं । दंष्ट्रांचीं माखलीं १६ हो कां जे विश्वरूपें काळें । ग्रासिलीं लोकांचीं शरीरें बळें । पारि जीवित्व देहींचीं सिसाळें । अवश्य कीं राखिलीं १७ तैसीं शरीरामाजि चोखडीं । इयें उत्तमांगें होतीं फुडीं । म्हणोनि महाकाळाचियाहि तोंडीं । पारि उरलीं शेखीं १८ मग म्हणे हें काई । जन्मलेयां आन[१७] मोहराचि नाहीं । जग आपैसेंचि वदनडोहीं । संचारताहे १९ यया आपैआप आघविया सृष्टी । लागलिया आहाति वदनाचिया वाटीं । आणि हा जेथिंचिया तेथ मिठी । देतसे उगला ४२० ब्रह्मादिक समस्त । उंचा मुखामाजि धांवत । येर सामान्य हे भरत । ऐलीच वदनीं २१ आणीकही भूतजात । तें उपजलेचि ठायीं ग्रासित । परि याचिया मुखा निभ्रांत । न सुटेचि कांहीं २२

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥ २८ ॥

जैसे महानदीचे वोघ । वहिले[२०] ठाकिती समुद्राचें आंग । तैसें आघवाचिकडूनि जग । प्रवेशत मुखीं २३ आयुष्यपंथें प्राणिगणीं । करोनि अहोरात्रांचीं मोवणी । वेगें वक्त्राग्निळणीं । साधिजत आहाती २४

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥

जळतया गिरीच्यों[२३] गवांखा[२४] । माजि घोंपती[२५] पतंगाचिया झांका[२६] । तैसे समग्र लोक देखा । इये वदनीं पडती २५ पारि जेतुलें येथ प्रवेशले । तें ततलिया[२७] लोहें पाणीचि पां गिळिलें । वहिर्वटींहि पुसिलें । नामरूप तयांचें २६

लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥

आणि येतुलाही आरोगणें । करितां भुके नाहीं उणेपण । कैसें दीपन असाधारण । उदयलें यया २७ जैसा रोगिया ज्वराहूनि उठिला । कां भणग

ऐश्वर्ये जागचे जागी आपल्या आपणच नाहीसें होतें, १२ त्याप्रमाणें ही कर्माची गति कशी विलक्षण आहे तें पहा, कीं हीं जमलेली सैन्यें एकदम या मुखांत शिरून त्यांतून एकही बाहेर पडत नाहीं! १३ उंटाच्या तोंडांत अशोक वृक्षाचे डहाळे जसे चघळतांना दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें हे सर्व लोक या तोंडांत लयास गेले! १४ परंतु मुकुटांसह मस्तकें दाढांच्या चिमटपांत सांपडून त्यांचें जणुंकाय पीठ होत आहे असें दिसतें १५ त्या मुकुटावरील रत्नें दांतांच्या फटींत अडकून राहून, त्यांचा चुरा जिभेच्या तळाशी सांचला आहे. दाढांचीं अग्रें (टोंकें) थोडी थोडी रक्तानें माखली आहेत. १६ या विश्वरूप काळानें ज्या बळकट लोकांचीं शरीरें ग्रासली आहेत, त्यांच्या देहांचे सांगाडे जीवित्व नाहींसें करून सुद्दाम राखून ठेवले आहेत. १७ त्याप्रमाणें, शरीरांतील उत्तम भाग जें मस्तक, तें जरी महाकाळाच्या तोंडांत सांपडलें होतें, तरी तीं सुद्दाम शेवटीं राखून ठेविलीं आहेत! १८ मग अर्जुन पुनः म्हणतो, काय चमत्कार आहे! या जगांत जन्माला आलेल्यास मृत्युमुखांत जाऊन पडावें याशिवाय दुसरा मार्गच नाहीं, म्हणून सर्व जग या वदनरूपी डोहांत आपोआप येऊन बुडत आहे. १९ ही सर्व सृष्टि आपोआप या मुखाच्या वाटेला लागली आहे, आणि हा परमात्मा जागच्या जागीं स्वस्थ राहून सर्व जगाला सहज गिळीत आहे; ४२० ब्रह्मदेवासारखी मोठमोठाली मंडळी, या विश्वरूपाचें जें सर्वांत अति उंच तोंड, यांत धांव घेत आहेत; एऱ्हवीं इतर मंडळी अलीकडच्याच मुखांत शिरताहेत; २१ व इतर प्राणिमात्र हे उपजल्या ठिकाणीच नाहींतसे होत आहेत, परंतु या विश्वरूपाच्या मुखांच्या सपाटयांतून निःसंशय कांहींच सुटत नाहीं. २२

**अन्वयार्थ**—(यथा)–ज्याप्रमाणें–(नदीनां)–नद्यांचे–(बहवः)–पुष्कळ–(अम्बुवेगाः)–जलप्रवाह–(समुद्रं एव अभिमुखाः)–समुद्राच्याच बाजूला वहात जाऊन त्यांतच–(द्रवन्ति)–शिरतात–(तथा)–त्याप्रमाणें–(अमी)–हे–(नरलोकवीराः)–मनुष्यलोकांतील वीर–(तव)–तुझ्या–(अभिविज्वलन्ति वक्त्राणि)–सर्व बाजूंनीं प्रकाशमान होणाऱ्या मुखांत–(विशन्ति)–प्रवेश करितात. २८

ज्याप्रमाणें महानद्यांचे प्रवाह सहज समुद्राकडे वळतात, त्याप्रमाणें सर्व जग चोहोंकडून येऊन तुमच्या मुखांत प्रवेश करीत आहे; २३ व सर्व प्राणी आयुष्यरूपी मार्गांत दिवसरात्रीच्या मापानें त्वरेनें तुमच्या मुखांत येऊन मिळण्याचा योग साधीत आहेत. २४

**अन्वयार्थ**—(यथा)–ज्याप्रमाणें–(पतङ्गाः)–पतंग–(समृद्धवेगाः)–ज्यांच्यामध्यें मोठा वेग उत्पन्न झाला आहे असे होत्साते–(प्रदीप्तं ज्वलनं)–प्रदीप्त अग्नींत–(नाशाय)–नाशासाठीं–(विशन्ति)–प्रवेश करितात–(तथा एव)–त्याचप्रमाणें–(लोकाः अपि समृद्धवेगाः सन्तः)–हे सर्व लोकहि ज्यांचा वेग अतिशय वाढला आहे असे होत्साते–(तव वक्त्राणि)–तुझ्या मुखांमध्यें–(नाशाय)–नाश पावण्यासाठीं–(विशन्ति)–प्रवेश करितात. २९

ज्याप्रमाणें वणवा लागलेल्या डोंगराच्या दरींत पतंग उड्या घालतात, त्याप्रमाणें सर्व लोक तुमच्या मुखांत येऊन पडत आहेत; २५ परंतु ज्याप्रमाणें तापलेल्या तव्यावर पाणी पडलें असतां जळून खाक होतें, त्याप्रमाणें ज्यांनीं ज्यांनीं तुमच्या मुखांत प्रवेश केला, त्यांचें नांवरूप वहिवाटींतून देखील अजीबात पुसून टाकलें. (त्यांच्या नांवारूपांचा पत्ता देखील लागत नाहीं.) २६

**अन्वयार्थ**—(हे विष्णो)–हे व्यापक देवा!–[त्वं]–तूं–(समन्तात्)–सर्व बाजूंनीं–(समग्रान् लोकान्)–सर्व लोकांना–(ज्वलद्भिः वदनैः)–जळत असलेल्या तोंडांनीं–(ग्रसमानः)–ग्रासणारा–गिळणारा असा होत्साता–(लेलिह्यसे)–त्यांचा स्वाद घेतोस.–(तव)–तुझ्या–(उग्राः भासः)–उग्र कांति–(समग्रं जगत्)–समग्र जगाला–(तेजोभिः)–तेजांनीं–(आपूर्य)–भरून सोडून–(प्रतपन्ति)–अतिशय ताप देतात. ३०

"आणि याप्रमाणें सर्व जगाचें भक्षण करूनही तुमची भूक कमी होत नाहीं, तर तुमचा जठराग्नि इतका प्रदीप्त तरी झाला कसा? २७ ज्याप्रमाणें एखादा रोगी तापांतून बरा झाल्यावर त्याला खा खा सुटते, किंवा एकादा भिकारी

१ संग्रह करणारांची. २ ऐश्वर्यें. ३ लयास. ४ पसलीं, तयार झालेलीं. ५ तोंडांतून. ६ अग्रभाग, कोंवारें, ळे. ७ उंटाचें. ८ मस्तकें. ९ चिमट्यांत. १० पूड, चुरा, ठ. ११ टोंकें, अग्रें. १२ दाढांची. १३ सांगाडे. १४ ांगली, उत्तम. १५ मस्तकें. १६ जन्मलेल्या प्राण्याळीं. १७ दुसरा मार्गच. १८ निरिच्छ, उगा राहून, स्वस्थ राहून, १९ प्राणिमात्र. २० सत्वर. २१ प्राणिसमुदायांनीं. २२ मापानें, पायऱ्या. २३ डोंगराच्या. २४ छिद्रामध्यें, गुहेंत, दरींत. २५ पडतात, घातल्या जातात. २६ उड्या. २७ तापलेल्या लोखंडावर. २८ वहिवाटींतून. २९ मोजन. ३० तीव्र क्षुधा, जठराग्नीचें प्रदीप्तपण.

दैवें । संचकाचीं वैभवें[२] । जेथींचीं तेथ स्वभावें । विलयां[३] जाती १२ तैसीं
सासिन्नलीं[४] सैन्यें एकवटें । इयें मुखीं जाहलीं प्रविष्टें । परि एकही तोंडौनि[५]
न सुटे । कैसें कर्म देखा १३ अशोकाचे अंगवसे[६] । चघाळिले कन्हेनि[७] जैसें ।
लोक वक्त्रांमाजि तैसे । वायां गेले १४ परि सिसाळें मुकुटेंसीं । पडिलीं दा-
ढांचे सांडसीं[८] । पीठ होत कैसीं । दिसत आहाती १५ तियें रत्नें दांतांचिये
सवडीं । कूंट[१०] लागलें जिभेच्या बुडीं । कांहीं कांहीं आगेरडीं[११] । दंष्ट्रांचीं[१२] मा-
खलीं १६ हो कां जे विश्वरूपें काळें । ग्रासिलीं लोकांचीं शरीरें बळें । परि
जीवित्व देहींचीं सिसाळें[१३] । अवश्य कीं राखिलीं १७ तैसीं शरीरामाजि चोखंडीं ।
इयें उत्तमांगें[१४] होतीं फुडीं । म्हणोनि महाकाळाचियाहि तोंडीं । परि उरलीं शेखीं
१८ मग म्हणे हें काई । जन्मलेयां[१६] आन[१७] मोहराचि नाहीं । जग आपैसेंचि
वदनडोहीं । संचारताहे १९ यया आपेंआप आघविया सृष्टी । लागलिया आ-
हाति वदनाचिया वाटीं । आणि हा जेथिंचिया तेथ मिठी । देतसे उगला
४२० ब्रह्मादिक समस्त । उंचा मुखामाजि धांवत । येर सामान्य हे भरत ।
ऐलीच वदनीं २१ आणीकही भूतजात[१८] । तें उपजलेंचि ठायीं ग्रासित । परि
याचिया मुखा निभ्रांत । न सुटेचि कांहीं २२

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥ २८ ॥

जैसे महानदीचे वोघ । वहिले[२०] ठाकिती समुद्राचें आंग । तैसें आयवाचि-
कडूनि जग । प्रवेशत मुखीं २३ आयुष्यपंथें प्राणिगणीं[२१] । करोनि अहोरात्रांचीं
मोवणी[२२] । वेगें वक्त्रामिळणीं । साधिजत आहाती २४

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥

जळतया गिरीच्या[२३] गवांखा[२४] । माजि घापती[२५] पतंगाचिया झोंका[२६] । तैसे समग्र
लोक देखा । इये वदनीं पडती २५ परि जेतुलें येथ प्रवेशले । तें तात-
लिया[२७] लोहें पाणीचि पां गिळिलें । वहिवटीहि[२८] पुसिलें । नामरूप तयांचें २६

लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥

आणि येतुलाही आरोगणें[२९] । करितां भुके नाहीं उणेपण । कैसें दीपन[३०]
असाधारण । उदयलें यया २७ जैसा रोगिया ज्वराहूनि उठिला । कां भणगा

ऐश्वर्य जागचे, जागी आपल्या आपणच नाहींसें होतें, ११२ त्याप्रमाणें ही कर्माची गति कशी विलक्षण आहे तें पहा, की ही जमलेली सैन्यें एकदम या मुखांत शिरून त्यांतून एकही बाहेर पडत नाहीं! १३ उंटाच्या तोंडांत अशोक वृक्षाचे डहाळे जसे चघळतांना दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें हे सर्व लोक या तोंडांत लयास गेले! १४ परंतु मुकुटांसह मस्तकें दाढांच्या चिमटपांत सांपडून त्यांचें जणुंकाय पीठ होत आहे असें दिसतें १५ त्या मुकुटावरील रत्नें दांतांच्या फटींत अडकून राहून, त्यांचा चुरा जिभेच्या तळाशी सांचला आहे. दाढांचीं अग्रें (टोंकें) थोडी थोडी रक्तानें माखली आहेत. १६ या विश्वरूप काळानें ज्या बळकट लोकांचीं शरीरें ग्रासली आहेत, त्यांच्या देहांचे सांगाडे जीवित नाहींसें करून, मुद्दाम राखून ठेवले आहेत. १७ त्याप्रमाणें, शरीरांतील उत्तम भाग जें मस्तक, तें जरी महाकाळाच्या तोंडांत सांपडलें होतें, तरी तीं मुद्दाम शेवटीं राखून ठेविली आहेत! १८ मग अर्जुन पुनः म्हणतो, काय चमत्कार आहे! या जगांत जन्माला आलेल्यास मृत्युमुखांत जाऊन पडावें याशिवाय दुसरा मार्गच नाहीं, म्हणून सर्व जग या वदनरूपी डोहांत आपोआप येऊन बुडत आहे. १९ ही सर्व सृष्टि आपोआप या मुखाच्या वाटेला लागली आहे, आणि हा परमात्मा जागच्या जागी स्वस्थ राहून सर्व जगाला सहज गिळीत आहे; ४२० ब्रह्मदेवासारखी मोठमोठाली मंडळी, या विश्वरूपाचें जें सर्वांत अति उंच तोंड, यांत धांव घेत आहेत; एऱ्हवीं इतर मंडळी अलीकडच्याच मुखांत शिरताहेत; २१ व इतर प्राणिमात्र हे उपजल्या ठिकाणीच नाहींतसे होत आहेत, परंतु या विश्वरूपाच्या मुखांच्या सपाटयांतून निःसंशय कांहींच सुटत नाहीं. २२

**अन्वयार्थ**—(यथा)–ज्याप्रमाणें–( नदीनां )–नद्यांचे–(बहवः)–पुष्कळ–(अम्बुवेगाः)–जलप्रवाह–(समुद्रं एव अभिमुखाः)–समुद्राच्याच बाजूला वहात जाऊन त्यांतच–(द्रवन्ति)–शिरतात–(तथा)–त्याप्रमाणें–( अमी )–हे–(नरलोकवीराः)–मनुष्यलोकांतील वीर–(तव)–तुझ्या–(अभिविज्वलन्ति वक्त्राणि)–सर्व बाजूंनीं प्रकाशमान होणाऱ्या मुखांत–(विशन्ति)–प्रवेश करितात. २८

ज्याप्रमाणें महानद्यांचे प्रवाह सहज समुद्राकडे वळतात, त्याप्रमाणें सर्व जग चोहींकडून येऊन तुमच्या मुखांत प्रवेश करीत आहे; २३ व सर्व प्राणी आयुष्यरूपी मार्गांत दिवसरात्रीच्या मापानें त्वरेनें तुमच्या मुखांत येऊन मिळण्याचा योग साधीत आहेत. २४

**अन्वयार्थ**—(यथा)–ज्याप्रमाणें–(पतङ्गाः)–पतंग–(समृद्धवेगाः)–ज्यांच्यामध्यें मोठा वेग उत्पन्न झाला आहे असे होत्साते–(प्रदीप्तं ज्वलनं)–प्रदीप्त अग्नींत–(नाशाय)–नाशासाठीं–(विशन्ति)–प्रवेश करितात–(तथा एव)–त्याचप्रमाणें–(लोकाः अपि समृद्धवेगाः सन्तः)–हे सर्व लोकहि ज्यांचा वेग अतिशय वाढला आहे असे होत्साते–(तव वक्त्राणि)–तुझ्या मुखांमध्यें–(नाशाय)–नाश पावण्यासाठीं–(विशन्ति)–प्रवेश करितात. २९

ज्याप्रमाणें वणवा लागलेल्या डोंगराच्या दरींत पतंग उड्या घालतात, त्याप्रमाणें सर्व लोक तुमच्या मुखांत येऊन पडत आहेत; २५ परंतु ज्याप्रमाणें तापलेल्या तव्यावर पाणी पडलें असतां जळून खाक होतें, त्याप्रमाणें ज्यांनीं ज्यांनीं तुमच्या मुखांत प्रवेश केला, त्यांचें नांवरूप वहिवाटींतून देखील अजीबात पुसून टाकलें. (त्यांच्या नांवारूपांचा पत्ता देखील लागत नाहीं.) २६

**अन्वयार्थ**—(हे विष्णो)–हे व्यापक देवा!–[त्वं]–तूं–(समन्तात्)–सर्व बाजूंनीं–(समग्रान् लोकान्)–सर्व लोकांना–(ज्वलद्भिः वदनैः)–जळत असलेल्या तोंडांनीं–(ग्रसमानः)–ग्रासणारा–गिळणारा असा होत्साता–( लेलिह्यसे )–त्यांचा स्वाद घेतोस.–(तव)–तुझ्या–( उग्राः भासः )–उग्र कांति–(समग्रं जगत्)–समग्र जगाला–(तेजोभिः)–तेजांनीं–(आपूर्य)–भरून सोडून–(प्रतपन्ति)–अतिशय ताप देतात. ३०

"आणि याप्रमाणें सर्व जगाचें भक्षण करूनही तुमची भूक कमी होत नाहीं, तर तुमचा जठराग्नि इतका प्रदीप्त तरी झाला कसा? २७ ज्याप्रमाणें एखादा रोगी तापांतून वरा झाल्यावर त्याला खा खा सुटते, किंवा एकादा भिकारी

१ संग्रह करणारांची. २ ऐश्वर्य. ३ लयास. ४ पसरलीं, तयार झालेलीं. ५ तोंडांतून. ६ अग्रभाग, कोंवारें, टाळे. ७ उंटानें. ८ मस्तकें. ९ चिमटयांत. १० पूड, चुरा, पीठ. ११ टोंकें, अग्रें. १२ दाढांचीं. १३ सांगाडे. १४ चांगली, उत्तम. १५ मस्तकें. १६ जन्मलेल्या प्राण्यालीं. १७ दुसरा मार्गच. १८ निरिच्छ, उगा राहून, स्वस्थ राहून, १९ प्राणिमात्र. २० सत्वर. २१ प्राणिसमुदायांनीं. २२ मापानें, पायऱ्या. २३ डोंगराच्या. २४ छिद्रामध्यें, गुहेंत, दरींत. २५ पडतात, घातल्या जातात. २६ उड्या. २७ तापलेल्या लोखंडावर. २८ वहिवाटींतून. २९ भोजन. ३० तीव्र क्षुधा, जठराग्नीचें प्रदीप्तपण.

काळु पाहला । तैसा जिभांचा लळलळाटु देखिला । आवाळुवें चाटितां २८
ें आहाराचे नांवें कांहीं । तोंडापासूनि उरलेंचि नाहीं । कैसी समसमीत
ाई । भुकेलेपणाची २९ काय सागराचा घोंटु भरावा । कीं पर्वताचा घांसु
रावा । ब्रह्मकटाहो घालावा । आघवाचि दाढे ४३० दिशा सगळियाचि गि-
ाविया । चांदिणिया चाटूनि घ्याविया । ऐसें वर्तत आहे सावियां । लोलुप्य
ा तुझें ३१ जैसा भोगीं कामु वाढे । कां इंधनें आगीसि हांकाक चढे । तैसीं
ालखातांचि तोंडें । खांखातें ठेलीं ३२ कैसें एकचि केवढें पसरलें । त्रिभु-
न जिव्हाग्रीं आहे टेकलें । जैसें कां कैवीठ घातलें । वडवानळीं ३३ ऐसीं
अपार वदनें । आतां येतुलीं कैंचीं त्रिभुवनें । कां आहारु न मिळतां येणें
मानें । वाढविली सैंघ ३४ अगा हा लोकु बापुडा । जाहला वदनज्वाळां वेर-
पडा । जैसी वणवेयाचिया वेढां । सांपडती मृगें ३५ आतां तैसें या विश्वा जा-
हालें । देव नव्हे हें कर्म आलें । कां जगचळचरां पांगिलें[१३] । काळजाळें ३६
आतां इये अंगप्रभेचिये वांगुरे । कोणीकडूनि निगिजैलें चराचरें । हीं वक्त्रें
नोहेति जोहरें[१६] । वोडवलीं जगा ३७ आगी आपुलेनि दाहकपणें । कैसेनि पो-
ळिजे ते नेणें । पारि जया लागे तया प्राणें । सुटिकाचि नाहीं ३८ नातरी मा-
झेनि तिखटपणें । कैसें निवटे[१७] हें शस्त्र कायि जाणे । कां आपुलियां मार
नेणें । विष जैसें ३९ तैसी तुज कांहीं । आपुलिया उग्रपणाची सेचि नाहीं ।
पारि ऐलीकडिले मुखीं खाई । हों[१९] सरली जगाची ४४० अगा आत्मा तूं एकु ।
सकळ विश्वव्यापकु । तरी कां आम्हां अंतकु । तैसा वोडवलासी ४१ तरि
मियां सांडिली जीवित्वाची चाड । आणि तुवांही न धरावी भीड । मनीं आहे
तें उघड । बोल पां सुखें ४२ किती वाढविसी या उग्ररूपा । आंगींचें भग-
वंतपण आठवीं बापा । नाहीं तारि कृपा । मजपुरती पाही ४३

आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥

तारि एक वेळ वेदवेद्या । जी त्रिभुवनैकआद्या । विनवणी विश्ववंद्या । आ-
इकें माझी ४४ ऐसें बोलोनि वीरें । चरण नमस्कारिलें शिरें । मग म्हणे तरि
सर्वेश्वरें । अवधारिजो ४५ मियां होआवया समाधान । जी पुसिलें विश्वरूप-
ध्यान । आणि एकेचि काळें त्रिभुवन । गिळितुचि उठिलासि ४६ तारि तूं कोण

दुष्काळांत पडावा, त्याप्रमाणें सर्व जगाचा लय करूनही अजून तुम्ही जिभल्या चाटीत आहां! २८ त्याप्रमाणें या तुमच्या तोंडापुढें खाण्याचा जिन्नस म्हणाल तर एकही उरला नाहीं, तेव्हां आपल्या क्षमंग भुकेचा महिमा काय वर्णन करावा? २९ का समुद्राचा एक घोट करावा, का पर्वताचा एक घांस करावा, का हा सर्व ब्रह्मगोल दाढेखालीं चिरडावा; ४३० सर्व दिशा गिळून टाकाव्या, चटसाऱ्या चांदण्या चाटून टाकाव्या. अशा प्रकारचा तुमचा हावरेपणा नजरेस येत आहे! ३१ ज्याप्रमाणें भोग जास्ती घेऊं लागले असतां काम वाढतो, किंवा विस्तवाला जों जों लांकडें लावावीं तों तों तो जास्ती भडकतो, त्याप्रमाणें सर्व जगाला खात असतांही तुमची तोंडें खा खा करीत उठलीं आहेत. ३२ ज्याप्रमाणें वणव्यांत कवठ टाकलें असतां तें त्याला पुरत नाहीं, त्याप्रमाणें आपलें हें एकच तोंड केवढें पसरलें आहे, पहा कीं त्याच्या जिभेच्या अग्रावरच हें सर्व त्रिभुवन राहिलें आहे. ३३ तेव्हां एका तोंडाची जर ही वाट, तर तुमच्या या अगणित तोंडांना इतकीं त्रिभुवनें कोठून आणावी? तेव्हां त्यांना पुरेसा आहार मिळत नसल्यामुळें त्यानें ही इतकी त्रिभुवनें निर्माण केलीं आहेत. ३४ ज्याप्रमाणें चोहोंकडून वणवा लागून मध्यें हरणें सांपडावीं, त्याप्रमाणें सर्व जग तुमच्या या वदनरूपी ज्वालाच्या मध्यें सांपडलें आहे; ३५ या विश्वाची स्थिति अशी झाली आहे की, तुम्ही देव नसून या विश्वरूपानें त्यांचे कर्मच ओढवलें आहे; किंवा जगरूपी जळचरांना तुमचें वदनरूपी काळजाळेंच पसरलें आहे. ३६ म्हणून तुमच्या विश्वरूपाच्या तेजरूपी जाळ्यांतून स्थावरजंगम वस्तूंनी कोणीकडून बाहेर पडावें? ही तुमची तोंडें नसून जगाला लाक्षागृहेंच झोडवलीं आहेत! ३७ आपल्या प्रखर तेजानें प्राणिमात्रांचीं अंगें कशीं पोळतात हें अग्नीला समजत नाहीं, परंतु ज्याला स्पर्श होतो, त्याचा प्राण गेल्याशिवाय रहात नाहीं ३८ किंवा आपल्या तीक्ष्ण धारेनें दुसऱ्याला कसें मरण येतें हें जसें शस्त्राला माहित नसतें, अथवा आपल्या सेवनानें लोकांचे प्राण कसे हरण होतात हें जसें विषाला समजत नाहीं, ३९ त्याप्रमाणें, तुमच्या मुखांच्या प्रखरपणाचें तुम्हांला भानच नाहीं; परंतु तुमच्या या अलीकडील मुखांतच सर्व जगाची होळी होत आहे. ४४० देवा, आत्मा म्हणून ज्याला म्हणतात, तो तुम्ही एकच असून सर्व विश्वाचे व्यापकही आहां, मग आमचा नाश करण्यास कां प्रवृत्त झालां? ४१ मीं तर आपल्या जिवाची आशा सोडली आहे, आणि तुम्हीही भीड न धरतां तुमच्या मनांत जें काय असेल तें खुशाल उघडपणें सांगा. ४२ तुम्ही आपल्या विश्वाचें उग्रपण किती वाढवणार! देवा, तुमच्या अंगीं जो जगाचा पालनकर्तेपणा आहे, त्याची तरी आठवण करा; निदान माझ्यावर तरी कृपा करा. ४३

**अन्वयार्थ** – (उग्ररूपः भवान् कः)–भयंकर रूप घेतलेले आपण कोण आहां, तें–(मे)–मला (आख्याहि)–सांगा.–(ते नमः अस्तु)–हे देवा, तुला नमस्कार असो.–(हे देववर)–हे देवांतील श्रेष्ठ देवा!–(प्रसीद)–मजवर प्रसन्न हो.–(भवन्तं आद्यं)–आपण–जे जगाचे आदिकारण, त्या तुम्हांला–(विज्ञातुं इच्छामि)–मी जाणण्याची इच्छा करतों.–(हि)–कारण–(तव प्रवृत्तिं)–तुझ्या या चेष्टेला–(न प्रजानामि)–मी जाणूं शकत नाहीं. ११

"अहो वेदवंद्य त्रिभुवनैकआद्य विश्ववंद्य महाराज, माझी एवढी एकवेळ विनंति ऐकावी." ४४ याप्रमाणें बोलून अर्जुनानें भगवंताच्या चरणांवर मस्तक ठेविलें, आणि म्हटलें, "देवाधिदेवा, माझी विनंति ऐका. ४५ मला समाधान व्हावें म्हणून 'विश्वरूप दाखवा' असें मी म्हटलें, तों तुम्ही एकदम त्रिभुवनाला गिळण्याच्या हेतूनें मोठें भयंकर रूप धारण केलें; ४६ तर तुम्ही कोण आहां, अशी

१ ओठांमें. २ चमचमीत, खरोखर. ३ महिमा. ४ सर्वथा. ५ हावरेपणा, उत्कंठा. ६ सर्पणानें. ७ भडका. ८ खाखावलेली. ९ कंवठीचें फळ. १० पुष्कळ, ११ सांपडला. १२ वेष्टला गेला, स्वाधीन झालास. १३ पसरलें, लावलें. १४ जाळ्यांतून. १५ बाहेर पडवेल. १६ लाक्षागृहें. १७ मरें. १८ पेटलेला खंदक, ज्वर. १९ होऊं लागली, झाली. २० प्रवृत्त झालास.

कां येतुलीं । इयें भ्यासुरें मुखें कां मेळविलीं । अवघियाचि करीं परीजिलीं । शस्त्रें कांह्यां ४७ जी जंव तंव रागीटपणें । वाढोनि गगना आणितोसि उणें । कां डोळे करूनि भिंगुळवाणें । भेडसावीत आहासी ४८ एथ कृतांतेंसीं देवा । कासया किजतसे हेवा । हा आपुला तुवां सांगावा । अभिप्राय मज ४९ या बोला म्हणे अनंतु । मी कोण हें आहासी पुसतु । आणि कायिसयालागीं असे वाढतु । उग्रतेसी ४५०

श्रीभगवानुवाचः--

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥३२॥

तरि मी कालु गा हें फुंडें । लोक सहारावयालागीं वाढें । सैंघ पसरिलीं आहाती तोंडें । आतां ग्रासीन हें आघवें ५१ एथ अर्जुन म्हणे कटकटा । उबगिलों मागिल्या संकटा । म्हणोनि ओळविला तंव वोखटा । उवाईला हा ५२ तेवींचि कठिण बोलें आर्सेतुटी । अर्जुन होईल हिंपुटी । म्हणोनि सवेंचि म्हणे किरीटी । परि आन एक असे ५३ तरि आतांचिये संहारवाहिरे । तुम्ही पांडव असा बौहिरे । तेथ जातजातां धनुर्धरें । सांवरिले प्राण ५४ होतां मरणमहामारीं गेला । तो मागुता सावधु जाहला । मग लागला बोला । चित्त देऊं ५५ ऐसें म्हणिजत आहे देवें । अर्जुना तुम्ही माझें हें जाणावें । येर जाण मी आघवें । सैरलों ग्रासूं ५६ वज्रानळीं प्रचंडीं । जैसी धांपे लोणियाची उंडी । तैसें जग हें माझिया तोंडीं । तुवां देखिलें जें ५७ तारि तयामाझारीं कांहीं । भरंवसेनि उणें नाहीं । इयें वायांचि सैन्यें पाहीं । बरळैत आहाती ५८ ऐशा चतुरंगाचिया संपदा । करित महाकाळेंसीं स्पर्धा । वांटिवेचियो मदा । वेंकंघले जे ५९ हे जे मिळोनियां मेळे । कुंथती वीरवृत्तीचेनि बळें । जयावरी जगदळें । वाखाणिजताती ४६० म्हणती सृष्टीवरी सृष्टी करूं । आण वाहूनि मृत्यूतें मारूं । आणि जगाचा भरूं । घोंटु यया ६१ पृथ्वी सगळीचि गिळूं । आकाश वरिच्यावरि जाळूं । कां बाणवरी खिळूं । वारयातें ६२ बोल हतियेरांहूनि तिखट । दिसती अग्निपरिस दासैंट । मारकपणें काळकूट । मैंहुर म्हणत ६३ तरि हे गंधर्वनगरींचें उमाळे । जाण पोकळीचे पेंडवळें । अगा चित्रीव फळे । वीर हे देखें ६४ हां गा मृगजळाचा पूर आला । दैळ नव्हे कापडाचा साप केला । इया शृंगारूनियां खोला । मांडिलिया पैं ६५

इतकी भयंकर तोंडें कां धारण केलीं, आणि त्याचप्रमाणें ह्या सर्व हातांत शस्त्रें कशाकरितां घेतली आहेत? ४७ वारंवार रागावून, गगनापेक्षां अधिक उंच होऊन व डोळे लाल करून भीति कां दाखवितां? ४८ देवा, या ठिकाणीं यमाचां हेवा कां करतां असें उग्र रूप धारण करण्याचा तुमचा काय हेतु आहे तो तरी मला सांगा." ४९ हें ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, " मी कोण आहें व कशाकरितां उग्र रूप धारण करून एवढा मोठा झालों आहें, हेंचना तुझें म्हणणें?" ४५०

**अन्वयार्थ**—[अहं]-मी-( लोकक्षयकृत् कालः )-लोकांचा क्षय करणारा काल-(प्रवृद्धः अस्मि)-अतिशय वृद्धि पावलों आहें.-(इह)-यायेळीं-(लोकान्)-लोकांना-(समाहर्तुं)-मारण्यास, त्यांचा संहार करण्यास-(प्रवृत्तः)-प्रवृत्त झालों आहें.-(प्रत्यनीकेषु ये योधाः अवस्थिताः )-शत्रूंच्या प्रत्येक सैन्यांत जे योद्धे स्थित आहेत-[ते] (सर्वे)-ते सर्व-(त्वां ऋते अपि)-तुझ्यावांचूनहि-(न भविष्यन्ति)-नाहींसे होतील. ३२

" तर खरोखर मी काळ आहें, व लोकांचा संहार करण्याकरितां मोठा वाढून चहूंकडे तोंडें पसरली आहेत, आणि आतां मी सर्व विश्वाला गिळून टाकीन." ५१ अर्जुन म्हणतो," अरेरे! मागिल्या संकटाला त्रासून याची प्रार्थना केली, तों हें उलट जास्तच भयंकर असें संकट प्राप्त झालें." ५२ आपल्या अशा कठोर भाषणानें अर्जुन खिन्न होईल म्हणून श्रीकृष्ण अर्जुनास पुनः म्हणाले, "पण एक सवड आहे. ५३ ती ही की, तुम्ही पांडव या संहाररूपी लाक्षागृहांतून निभावाल." एवढें ऐकतांच अर्जुनाच्या जिवांत जीव आला. ५४ तो मृत्युरूप महामारीच्या संकटांतच सांपडला होता, पण हे शब्द ऐकतांच पुनः सावध होऊन श्रीकृष्णांचे बोल लक्षपूर्वक ऐकूं लागला. ५५ देव म्हणाले:-अर्जुना, अरे तुम्ही पांडव हे माझे आहां, हें ध्यानांत ठेव; बाकी या सर्व जगाला मी गिळण्याकरितां प्रवृत्त झालों आहें. ५६ प्रळयकाळच्या प्रचंड अग्नींत लोण्याचा गोळा घातल्यावर जसा तो नाश पावतो, त्याप्रमाणें माझ्या तोंडांत सर्व जग गेलेलें तूं पाहिलेंच आहेस; ५७ तर त्या सर्व जगाचा नाश होईल. हें तूं निःसंशय समज. हें सर्व सैन्य व्यर्थ सिरवत आहे; ५८ अशा चतुरंग सेनेच्या संपत्तीच्या बळावर कृतांताबरोबरही जे स्पर्धा करितात, व पराक्रमाच्या गर्वानें जे चढून गेले आहेत. ५९ हें सर्व या ठिकाणीं मिळालेलें सैन्य वीरवृत्तीच्या बळावर मोठ्या डौलानें बोलत आहे की, यमही आमच्यापुढें तुच्छ आहे! ४६० ते म्हणतात की, आम्ही सृष्टीवर प्रतिसृष्टि निर्माण करूं, पैजेनें मृत्यूला मारूं, व जगाचा संहार करूं, ६१ सर्व पृथ्वी गिळून टाकूं, आकाश वरच्या वरच जाळून टाकूं, व वाणानें वाऱ्याला हलूं देणार नाहीं. ६२ शस्त्रापेक्षां ज्यांचे बोल अति तिखट आहेत, जे अग्नीपेक्षां दाहक आहेत, व मारण्याच्या कामांत काळकूट विषाला मधुर असें म्हणवितात ६३ तर जसे गंधर्वनगरीचे लोट किंवा पोकळीचे भेंडोळें अथवा चित्रांतील फळें असतात, त्याप्रमाणें हे वीर निर्जिव आहेत असें समज. ६४ अरे, जसा मृगजळाचा पूर यावा, तद्वत् हें सैन्य आहे; अथवा कापडाचा साप करावा, आणि अलंकार घालून बाहुली उभी करावी, तशी हीं सैन्यें होत. ६५

१ धनर्धीः २ भयंकर. ३ धारण केलीं. ४ कशाकरितां! ५ भयंकर, लाल. ६ मत्सर, स्पर्धा. ७ खरें. ८ मदुत. ९ अरे अरे. १० कंटाळलों. ११ मागितला. १२ वाईट. १३ प्रगट झाला. १४ निराश. १५ खिन्न, कष्टी. १६ लाक्षागृह, संहाररूपी संकटांतून, बाधेंतून. १७ बाहेर आहां. १८ प्रवर्तलों. १९ प्रलयाग्नींत. २० सांपडे. २१ बडबडत. २२ पराक्रमाच्या. २३ अहंकाराला. २४ वश झाले, वेधले. २५ शूर वृत्तीच्या. २६ शस्त्रापेक्षां २७ दाहक. २८ मधुर. २९ उंसंत्री, उद्भव. ३० भेंडोळें. ३१ सैन्य. ३२ रेखणी.

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम्।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥

येर चेष्टविते जें बळ । तें मागांचि मियां ग्रासिलें सकळ । आतां कोल्हारिचे वेतोंळ[2] । तैसे निर्जीव हे आहाती ६६ हालविती दोरी तुटलीं । तरि तियें खांबावरील बाहुलीं । भलतेणें लोटिलीं । उलथोनि पडती ६७ तैसा सैन्याचा यया बगा[3] । मोडतां वेळु न लगेल पैं गा । म्हणोनि उठीं उठीं वेगां । शाहाणा होईं ६८ तुवां गोग्रहणाचेनि अवसरें । घातलें मोहनास्त्र एकसरें । मग विराटाचेनि महाभेडें उत्तरें । आसेडूनि नागविलें ६९ आतां हें त्याहूनि निपटारें जाहलें । निवँटीं आथितें रण पडिलें । घेईं यश रिपु जिंतिले । एकलेनि अर्जुनें ४७० आणि कोरडें यशचि नोहे । समग्र राज्यही आलें आहे । तूं निमित्तमात्राचि होयें । सव्यसाची ७१

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युद्धयस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥

द्रोणाचा पाडु न करीं । भीष्माचें भय न धरीं । कैसेनि कर्णावरी । पंजू न म्हण ७२ कोण उपायो जयद्रथा कीजे । हें न चिंतू चित्त तुझें । आणिकही आथि जे जे । नावांनिगे वीर ७३ तेही एक एक आघवें । चित्रींचे सिंहाडे मानावे। जैसे बोलेनि[10] हातें घ्यावें । पुसोनियां ७४ यावरी पांडवा । कासया युद्धाचा मेळावा । हा आभासु[11] गा आघवा । येर ग्रासिलें मियां ७५ जेव्हां तुवां देखिलें । हे माझिया वदनीं पडिले । तेव्हांचि यांचें आयुष्य सरलें । आतां रितीं[12] सोपें[13] ७६ म्हणोनि वहिलों उठीं । मियां मारीले तूं निवँटीं[15] । न रिगे शोकसंकटीं । नाथिलियां[16] ७७ आपणचि ओंडखिळा कीजे । तो कौतुकें जैसा विंधोनि[18] पाडिजे । तैसें देखें गा तुझें । निमित्त आहे ७८ बापा विरुद्ध जें जाहलें । तें उपजतांचि वाघें नेलें । आतां राज्येंशीं संचलें । यश तूं भोगी ७९ सावियांचि[19] उतत[20] होते दायाद । आणि बळिये जगीं दुर्मद । ते वधिले विशदें[22] । सायासु न लागतां ४८० ऐसिया इया गोष्टी । विश्वाच्या वाक्पटीं[23] । लिहूनि घालीं किरीटी । विजयीं होईं ८१

संजय उवाचः—

एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी ।
[illegible] प्रणम्य ॥ ३५ ॥

अन्वयार्थ—(तस्मात्)-म्हणून-(त्वं)-तूं-(उत्तिष्ठ)-ऊठ. -(यशः लभस्व)-यश संपादन कर.-(शत्रून् जित्वा)-शत्रूंना जिंकून;-(समृद्धं राज्यं)-संपन्न राज्य-(भुंक्ष्व)-भोग.-(एते)-हे भीष्मादिक-(मया एव)-मींच-(पूर्वं)-पूर्वी-(निहताः)-मारले आहेत.-(सव्यसाचिन्)-हे अर्जुना !-(निमित्तमात्रं भव) -तूं नुसता निमित्त हो. ३३

एऱ्हवीं, ज्या वेळानें शरीराच्या चेष्टा चालतात, तें सर्व मीं पूर्वींच ग्रासून टाकलें आहे. आतां हें सर्व सैन्य कोल्हाटयांच्या खेळांतील बाहुल्याप्रमाणें निर्जिव आहे. ६६ त्या कळसूत्री बाहुल्यांना हालविणारी दोरी तुटल्यावर तीं वाटेल त्यांनी लोटली तरी उलथून पडतात. ६७ त्याप्रमाणें या सर्व सैन्याचा हा आकार मोडून टाकण्यास वेळ लागणार नाहीं. म्हणून, अर्जुना, लवकर ऊठ व शुद्धीवर ये. ६८ तूं उत्तरगोग्रहणाच्या वेळीं शत्रूंच्या सर्व सैन्यास मोहनास्त्र घालून, विराटाच्या भित्र्या उत्तराकडून त्यांचीं वस्त्रें हरण करविलींस; ६९ तेंच सैन्य आतां त्या वेळेपेक्षां निकृष्ट झालें आहे व आयतें रणांत आलेलें आहे, तर त्यांचा संहार कर व 'एकटया अर्जुनानें शत्रूंस जिंकलें' असें यश मिळीव. ४७० आणि तें कोरडें यशच नव्हे, तर त्यांच्या बरोबर समग्र राज्यही हातीं आलें आहे असें समज. हे सव्यसाचिन्, तूं निमित्तमात्र होऊन शत्रूंचा संहार कर. ७१

अन्वयार्थ—(द्रोणं)-द्रोणाला,-(च भीष्मं)-व भीष्माला -(च जयद्रथं)-व जयद्रथाला-(च कर्णं)-व कर्णाला-(तथा)-तसेंच-(अन्यान् अपि)-दुसऱ्याहि-(मया हतान्)-मीं मारलेल्या-(योधवीरान्)-वीर योद्ध्यांस-(त्वं)-तूं-(जहि)-मार.-(मा व्यथिष्ठाः)-अशी व्यथा पावूं नकोस. त्यांना भिऊं नकोस. -(युद्ध्यस्व)-युद्ध कर.-(रणे)-रणांत-(सपत्नान्) शत्रूंना -(जेतासि)-तूं जिंकशील. ३४

तूं द्रोणांची पर्वा करूं नको, भीष्माचें भय बाळगूं नको, व कर्णावर शस्त्र कसें धरूं असें म्हणूं नको; ७२ आणि जयद्रथाला मारण्याकरितां कशाची योजना करावी याजविषयीं विचार करूं नको. आणखीही इतर जे नामांकित वीर आहेत, ७३ ते सर्व भिंतीवरील चित्रांतल्या सिंहांप्रमाणें निर्जीव समज. त्यांना काय, पोतेऱ्यानें पुसून टाकावयाचें ! ७४ तेव्हां, अर्जुना, या युद्धाकरितां जमलेल्या वीरांची काय कथा आहे ? हा सर्व भास आहे. बाकी खरोखर त्यांना मीं ग्रासून टाकलेलें आहे ! ७५ जेव्हां तूं हे संगळे माझ्या तोंडांत गेलेले पाहिलेस, तेव्हांच यांचें आयुष्य संपलें ! हे आतां रिकाम्या शॉपटांप्रमाणें आहेत. ७६ म्हणून लवकर ऊठ, आणि मीं ज्यांना मारलेलें आहे त्यांचा तूं संहार कर. नसत्या शोकसंकटांत बुडूं नको ! ७७ आपणच एकादें निशाण धरून तें जसें कौतुकानें भेदून पाडावें, त्याप्रमाणें या सर्वांचा नाश करण्याकरितां तुला केवळ निमित्त केलें आहे. ७८ अरे, जे तुझ्याशीं वैर करीत होते, त्यांना उपजतांक्षणींच या विश्वरूपी वाघानें नेलें आहे. तर आतां राज्यासह यश संपादन करून त्याचा उपभोग घे. ७९ स्वभावतः उन्मत्त, सर्व जगांत बलवान् व दुष्ट, आणि विष घालणार असे जे भाऊबंद, ते वेळ न लागतां मारले, ४८० अशा प्रकारच्या या गोष्टी अर्जुना, जगाच्या वाक्पटावर लिहून ठेव, (लोकांच्या चर्चेस विषय करून ठेव.) आणि विजयी हो. ८१

अन्वयार्थ—(केशवस्य)-केशवाचें-श्रीकृष्णाचें-(एतत् वचनं)-हें वचन-(श्रुत्वा)-ऐकून-(कृतांजलिः)-ज्यानें हात जोडले आहेत असा-(वेपमानः)-कांपणारा-(किरीटी)-अर्जुन -(नमस्कृत्वा)-कृष्णाला नमस्कार करून-(भीतभीतः)-अतिशय भ्यालेला तो-(प्रणम्य)-अत्यंत नम्र होऊन-(भूयः एव) -पुनरपि-(कृष्णं)-कृष्णाला-(सगद्गदं)-कांपऱ्या आवाजानें-कंठ दाटल्यामुळें अडखळत-(आह)-म्हणाला. ३५

१ कुंभाराच्या घरचे. २ पुतळे. ३ आकार. ४ अतिभित्र्या. ५ (वस्त्रें) हिसकावून. ६ निकृष्ट, हीन. ७ संहारी. ८ शस्त्र धारण करूं. ९ नामांकित, प्रख्यात. १० पोतेऱ्यानें. ११ मिथ्या भास. १२ रिकामीं. १३ सोंपटें. १४ लवकर. १५ मार. १६ लटक्या. १७ लगोरी, निशाण. १८ छेदून. १९ स्वभावतः २० माजले होते. २१ भाऊबंद. २२ स्पष्ट. २३ वाणीरूपी वस्त्रावर.

ऐसी आघवीचि हे कथा । तया अपूर्ण मनोरथा । संजयो सांगे कुरुनाथा । ज्ञानदेवो म्हणे ८२ मग सत्यलोकौनि गंगाजळ । सुटालिया वाजत खळाळ । तैशी वाचा विशाळ । बोलतां तया ८३ नातरी महामेघांचे उमाळे । घडघडीत एके वेळे । कां घुमघुमिला मंदराचळें । क्षीराब्धी जैसा ८४ तैसें गंभीरें महानादें । हें वाक्य विश्वकंदें । बोलिलें अगाधें । अनंत रूपें ८५ तें अर्जुनें मोटकें ऐकिलें । आणि सुख कीं भय दुणावलें । हें नेणों पारि कांपिन्नलें । सर्वांग तयाचें ८६ सखोलपणें वळली मोट । आणि तैसेचि जोडले करसंपुट । आणि वेळोवेळां ललाट । चरणीं ठेवी ८७ तेवींचि कांहीं बोलों जाये । तंव गळा बुजेलाचि ठाये । हें सुख कीं भय होये । हें विचारा तुम्हीं ८८ पारि तेव्हां देवाचेनि बोलें । अर्जुना हें ऐसें जाहालें । मियां पदांवरूनि देखिलें । श्लोकाचिया ८९ मग तैसाचि भेणें-भेण । पुढती जोहारूनि चरण । मग म्हणे जी आपण । ऐसें बोलिलेती ४९०

अर्जुन उवाचः—

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।
रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसंघाः ॥ ३६ ॥

ना तरी अर्जुना मी काळु । आणि ग्रसिजे तो माझा खेळु । हा बोलु तुझा कीर अढळु । मानूं आम्ही ९१ पारि तुवां जी काळें । आजि स्थितीचिये वेळे । ग्रासिजे हें न मिळे । विचारासी ९२ कैसोनि आंगींचें तारुण्य काढावें । कैचें नव्हे तें वार्धक्य आणावें । म्हणोनि करूं म्हणसी तें नव्हे । बहुतकरुनी ९३ हां जी चौपांहारी न भरतां । कोणेही वेळे श्रीअनंता । काय माध्यान्हीं सविता । मावळतु आहे ९४ पैं तुज अखंडिता काळा । तिन्ही आहाती जी वेळा । त्या तिन्ही परी सबळा । आपुलालिया समयीं ९५ जे वेळीं हों लागे उत्पत्ती । ते वेळीं स्थिति[13] प्रळयो हारपती । आणि स्थितिकाळीं न मिरविती । उत्पत्ति प्रळयो ९६ पाठीं प्रळयाचिये वेळे । उत्पत्ति स्थिति मावळे । हें कॅय-सेनही न ढळे । अनादि ऐसें ९७ म्हणोनि आजि तंव भरें भोगें । स्थिति वर्तिजत आहे जगें । एथ ग्रासिसी तूं हें न लगे । माझ्या जीवीं ९८ तंव[15] संकेतें देव बोले । अगा या दोन्ही सैन्यांसींचि भरंण[16] पुरलें । तें प्रत्यक्षचि तुज दाविलें । येर यथाकाळें जाण ९९ हा संकेतु जंव अनंता । वेळु लागला बोलतां । तंव अर्जुनें लोकु मागुता । देखिला यथास्थिती ५०० मग म्हणतसे देवा । तूं सूत्रीं विश्वलाघवा । जग आला मा आघवा । पूर्वस्थिति पुढती १

ज्ञानदेव म्हणतातः--याप्रमाणें ही सर्व कथा संजयानें अपूर्णमनोरथ अशा धृतराष्ट्राला सांगितली. ८२ मग म्हणतो, "सत्य लोकांतून गंगेचा ओघ निघाल्यावर जसा खळखळ वाजतो, त्याप्रमाणें गंभीर वाणीनें श्रीकृष्ण बोलले. ८३ किंवा मेघाच्या पाण्याचे लोट जसे घडघडा एकदम वाजत सुटतात, अथवा समुद्रमंथनाच्या वेळीं क्षीराब्धि जसा मंदराचलाच्या रवीनें दणाणत होता, ८४ त्याप्रमाणें अनंतरूपी विश्वाचें मूळ असे श्रीकृष्ण गंभीर वाणीनें हें वाक्य बोलले, ८५ तें अर्जुनानें थोडेंसें ऐकलें, त्यामुळें त्याचें सुख वाढलें किंवा दुःख वाढलें हें कांहीं कळलें नाही. परंतु त्याचें सर्वांग कांपूं लागलें! ८६ तो अति नम्रपणानें लवून हात जोडून वरचेवर श्रीकृष्णाच्या चरणीं मस्तक ठेवूं लागला. ८७ आणि कांहीं बोलणार, तों कंठ भरून आला. श्रोतेहो, ही स्थिति सुखामुळें झाली, किंवा दुःखामुळें झाली, याचा तुम्हीच विचार करा! ८८ परंतु देवाच्या बोलण्यानें अर्जुनाची अशी स्थिति झाली हें श्लोकांतील शब्दांवरून मीं ताडलें. ८९ मग भीत भीत त्यानें भगवंताच्या चरणांवर पुनः मस्तक ठेविलें आणि तो म्हणाला, महाराज! आपण असेंच ना बोलला, ४९०

**अन्वयार्थ**—(हे हृषीकेश)-हे हृषीकेशा-इंद्रियांच्या ईश्वरा-इंद्रियप्रेरका!-(तव प्रकीर्त्या)-तुझें माहात्म्य ऐकून-(जगत्)-सर्व जगत्-(प्रहृष्यति)-अत्यंत हृष्ट होतें-(च)-व-(अनुरज्यते)-अनुरक्त होतें, तुझ्यावर प्रीति करतें.-(तव स्थाने)-तें योग्यच आहे.-(रक्षांसि भीतानि)-राक्षस भयभीत होऊन-(दिशः द्रवन्ति)-दशदिशांकडे पळतात व-(सर्वे सिद्धसंघाः)-सर्व सिद्धांचे संघ-(नमस्यन्ति)-नमस्कार करितात.-[तत् अपि-तेंहि-स्थाने-योग्य आहे.]-३६

कीं "अर्जुना, मी कालरूपी असून, ह्या सर्वांना मी ग्रासून टाकलें तो केवळ माझा खेळ आहे.' आम्हीं हें तुमचें बोलणें खरें मानलें असतें; ९१ परंतु तुम्ही कालरूपी परमेश्वरानें जगताचा प्रळय करण्याचा समय नसतां स्थितिकालांतच नाशाला प्रवृत्त झालांत, हें विचारानें बरोबर वाटत नाहीं. ९२ एकाद्याच्या अंगांतील तारुण्य काढून एकाएकीं म्हातारपण कसें घालतां येईल? म्हणून तुम्ही जें करूं म्हणतां तें बहुतकरून न होण्याजोगें आहे. ९३ हें पहा; अनंता, दिवसाचे चार प्रहर न भरतां कधीं तरी भर दुपारीच सूर्य मावळतो का? ९४ इतकेंच नव्हे, तर हें पहा-तुम्ही अखंडित असे जे काल, त्यालाही तीन स्थिति आहेत; आणि त्या प्रत्येक आपआपल्या वेळीं बलवान आहेत; ९५ ज्या वेळेस उत्पत्ति होऊं लागते, त्या वेळीं स्थिति व प्रळय ह्या नाहींतशा होतात, आणि स्थितीच्या वेळेस उत्पत्ति व प्रळय यांचें कांहीं चालत नाहीं; ९६ आणि मागाहून प्रळयाच्या वेळीं उत्पत्ति व स्थिति ह्या आपोआप नाहींतशा होतात. ह्या अवस्था अनादि असून कशानेंही टळत नाहींत. ९७ म्हणून, आज हें जग स्थितीचा उपभोग घेण्याच्या भरांत असतां त्याला ग्रासलें असें तुम्ही म्हणतां ही गोष्ट मला रुचत नाही." ९८ तेव्हां खुणेनें देव म्हणाले, "अरे, ह्या दोन्ही सैन्यांचें आयुष्य संपलें आहे, हें प्रत्यक्ष तुला दाखविलें; परंतु इतर लोक यथाकालींच मरण पावतील असें समज." ९९ इतकी गोष्ट श्रीकृष्ण भगवान् बोलताहेत, तोंच पूर्ववत् अर्जुनानें सर्व सैन्य जागचे जागीं आहे असें पाहिलें. ५०० मग तो म्हणतो, "देवा, आपण विश्वाचें चालन करणारे सूत्रधार आहां, त्या योगानें हें जग पूर्वस्थितीला पुनः प्राप्त झालें; १

१ खळखळ. २ लोट. ३ दणाणला. ४ थमकलें. ५ भरून आला. ६ भीतभीत. ७ नमस्कार करून. ८ स्वास्थ्याचें, पालनाचें. ९ रुचत नाहीं. १० दिवसाचे चार प्रहर. ११ सर्व. १२ बलयुक्त. १३ स्वास्थ्य, पालन. १४ कशानेंहि. १५ संक्षेपानें, खुणेनें. १६ पोषण, धीर. १७ पूर्ववत्. १८ सूत्रधार. १९ विश्वाचे हालचालीस.

पारि पडिलिया दुःखसागरीं । तूं काढिसी कां जयापरी । ते कीर्ति तुझी श्री-
हरी । आठवित असें २ कीर्ति आठवितां वेळोवेळां । भोगीतसें महासुखाचा
सोहळा । तेथ हर्षामृतकल्लोळा- । वारि लोळत आहें ३ देवा जियालेपणें जग ।
धरी तुझ्या ठायीं अनुराग । आणि दुष्टां तयां भंग । अधिकाधिक ४ पैं त्रिभु-
वनींचिया राक्षसां । महाभय तूं हृषीकेशा । म्हणोनि पळताती दाही दिशां ।
पैलीकडे ५ एथ सुर नर सिद्ध किन्नर । किंबहुना चराचर । ते तुज देखोनि
हर्षनिर्भरें । नमस्कारित असती ६

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।
अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥

एथ गा कवणा कारणा । राक्षस हे नारायणा । न लगतीचि चरणा । प-
ळते जाहले ७ आणि हें काय तूंतें पुसावें । येतुलें आम्हांसिही जाणवे । तरी
सूर्योदयीं राहावें । कैसेनि तमें ८ जी तूं प्रकाशाचा आगरु । आणि जाहला
आम्हांसि गोचरू । म्हणोनियां निशाचरां केरु । फिटला सहजें ९ हें येतुले
दिवस आम्हां । कांहीं नेणवेचि श्रीरामा । आतां देखतसें महिमा । गंभीर तुझा
५१० जेथूनि नाना सृष्टींचिया वोळी । पसरती भूतग्रामाचिया वेली । तया
महद्ब्रह्मातें व्याली । देविकी इच्छा ११ देवो निःसीम तत्त्व सदोदितु । देवो निः-
सीम गुण अनंतु । देवो निःसीम साम्य सततु । नरेंद्र देवांचा १२ जी तूं त्रिजगतिये
वोलावा । अक्षर तूं सदाशिवा । तूंचि सदसत् देवा । तयाही अतीत तें तूं १३

त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥ ३८ ॥

तूं प्रकृतिपुरुषांचिया आदी । जी महत्तत्त्वा तूंचि अवधी । स्वयें तूं अ-
नादी । पुरातनु १४ तूं सकळ विश्वजीवन । जीवांसि तूंचि निधान । भूतभ-
विष्याचें ज्ञान । तुझ्याचि हातीं १५ जी श्रुतीचिया लोचनां । स्वरूपसुख तूंचि
अभिन्ना । त्रिभुवनाचिया आयतना । आयतन तूं १६ म्हणोनि जी परम ।
तूंतें म्हणिजे महाधाम । कल्पांतीं महद्ब्रह्म । तुजमाजि रिगे १७ किंबहुना तुवां
देवें । विश्व विस्तारिलें आहे आघवें । तरि अनंतरूपा वानावें । कवणें तूंतें १८

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥
नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥

परंतु, हे श्रीहरी, दुःखसागरांत पडलेल्यांना तुम्ही बाहेर काढतां अशी तुमची कीर्ति आहे, याची आम्हांला पूर्ण आठवण आहे. २ तुमच्या कीर्तीचें वारंवार स्मरण होऊन महासुख भोगीत असून आनंदसमुद्राच्या लहरींत मी लोळत आहें, ३ देवा, हें जग जिवंत राहिल्यानें तुमच्या ठिकाणीं प्रीति धरून सुखानें राहतें व जे दुष्ट आहेत त्यांचा तुम्ही पुनः पुनः नाश करतां; ४ परंतु हे हृषीकेशा, त्रिभुवनांतल्या राक्षसांना तुमचें भय वाटतें, म्हणून तुमच्यापासून ते दाही दिशा दूर पळतात. ५ एऱ्हवीं देव, मनुष्य, सिद्ध, यक्ष, किंबहुना सर्व स्थावरजंगम हे तुम्हाला हर्षयुक्त होऊन वंदन करतात. ६

**अन्वयार्थ**--(हे महात्मन्)--हे महात्म्या !--(गरीयसे)--अतिशय गुरु व--(ब्रह्मणः अपि आदिकर्त्रे)--ब्रह्मदेवाचाहि आदिकर्ता असा--( ते )--तुला--( कस्मात् च )--कां बरें ते सिद्धादिक--(न नमेरन्)--नमस्कार करणार नाहींत !--(हे अनंत देवेश जगन्निवास)--हे अनन्ता, हे देवाधिदेवा, हे जगन्निवासा --(यत् सदसत्परं)--जें सत्, असत् व यांहून पर--विलक्षण--असलेलें--(अक्षरं)--अक्षर ब्रह्म--(तत् --तें--(त्वं) [ एव ]--तूंच आहेस. ३७

नारायणा, काय कारणास्तव राक्षस तुम्हाला नमस्कार न करतां दूर पळतात, ७ हें तुम्हाला विचारावें असें नाहीं; कारण आम्हाला इतकें कळत आहे. हें पहा, सूर्योदय झाल्यावर अंधार कसा राहील ? त्याप्रमाणें, तुमच्यापुढें राक्षस कसे उभे राहतील ? ८ तुम्ही स्वप्रकाशाचें मुख्य ठिकाण दृष्टीस पडल्यावर राक्षस सहज नाहींतसे झाले. ९ हे श्रीपते, इतके दिवस ही गोष्ट आम्हांला समजली नव्हती, परंतु आतां तुमचा हा अलौकिक महिमा आमच्या दृष्टीस पडत आहे. ५१० ज्या ठिकाणाहून अनेक सृष्टीच्या ओळी प्राणिमात्राच्या वेली जगभर पसरतात, त्या मायेला तुमची इच्छा ही आदिस्थान होय. ११ तुम्ही अगणित अशा सत्त्वानें नेहमीं भरलेले आहां, तुमच्यांत अनंत गुणांची परमावधि झाली आहे, तुमच्या भूतांतील साम्याला सीमा नाहीं, तुम्ही देवाचे देव आहां. १२ हे सदा मंगलरूप देवा, तुम्ही ह्या सकल ब्रह्मांडाचें राहण्याचें ठिकाण असून अविनाशी आहां; आणि देवा, तुम्हीच व्यक्त व अव्यक्त असून, त्यापलीकडील जाणतां येणारें जें तत्त्व तेंहि तुम्हीच आहां. १३

**अन्वयार्थ**--(त्वं)--तूं--(आदिदेवः)--आद्य देव--(पुराणः पुरुषः)--पुराण पुरुष आहेस--(त्वं)--तूं--(अस्य विश्वस्य)--या विश्वाचें--( परं निधानं )--परम निधान--आधार आहेस--(त्वं)--तूं--(वेत्ता वेद्यं च परं च धाम असि)--सर्वांना जाणणारा, जाणावयाची वस्तु, व परम पद आहेस.--(हे अनन्तरूप )--हे अनंतरूपा--(त्वया)--तूं--(विश्वं)--विश्वाला--( ततं )--व्यापिलें आहेस. ३८

तुम्ही शिव ( पुरुष ) व शक्ति ( प्रकृति ) यांच्या अगोदरचे असून मायेची मर्यादाही तुम्हीच आहां, व तुम्ही पुरातन असून तुमच्या पूर्वीचा असा दुसरा कोणी नाहीं. १४ तुम्ही सर्व विश्वाचे चालक व सर्व जीवांचें अधिष्ठान असून, भूत व भविष्याचें ज्ञान तुमच्याच स्वाधीन आहे. १५ श्रुतींच्या नेत्रांत ज्या स्वरूपापासून सुख होतें, तें, भेदरहित असे जे तुम्ही त्या तुमचेंच होय; व ज्या मायेनें हें सर्व जग व्यापलें आहे, तिला आश्रयही तुमचाच आहे. १६ म्हणून तुम्ही सर्व सृष्टीचें आश्रयस्थान असून परमश्रेष्ठ आहां. व ब्रह्मांडाच्या अंतकाळीं मायाही तुमचेच ठिकाणीं लय पावते, १७ किंबहुना देवा, हें सर्व जग तुम्हीच विस्तारलें आहे. तेव्हां अनंत रूप असे जे तुम्ही त्या तुमचें वर्णन कोण करूं शकेल ? १८

**अन्वयार्थ**--(त्वं)--तूं--(वायुः)--वायु--( यमः )--यम,--(अग्निः)अग्नि,--(वरुणः)--वरुण,--(शशांकः)--चंद्र,--(प्रजापतिः)--कश्यपादिक--( च )--व--( प्रपितामहः )--ब्रह्मदेवाचाहि पिता आहेस.--(ते)--तुला--(सहस्रकृत्वः)--हजार वेळां--(नमः नमः अस्तु)--नमस्कार नमस्कार असो.--(पुनः च)--आणि पुनरपि--(भूयः अपि)--आणखीहि--(ते) तुला--(नमःनमः अस्तु)--हजारों नमस्कार असोत.--(ते)--तुला--(पुरस्तात्)--पूर्व दिशेत नमस्कार असो--( अथ )--त्यानंतर--( पृष्ठतः नमः )--पश्चिम दिशेत तुला नमस्कार असो.--(हे सर्व सर्वतः एव ते)--हे सर्वा ! सर्व दिशांमध्ये स्थित असलेल्या तुला--(नमः अस्तु)--नमस्कार असो-- (अनंतवीर्यामितविक्रमः )--ज्याचें सामर्थ्य अनंत व पराक्रम अमर्याद आहे असा--(त्वं)--तूं--(सर्वं)--सर्व जगाला--(समाप्नोषि)--व्यापतोस--(ततः)--त्यामुळें तूं--(सर्वः)--सर्व--(असि)--आहेस. ३९--४०

१ आनंदसमुद्र. २ जिवंतपणें, जगल्यपणानें, जीवदान दिल्यानें. ३ प्रीति. ४ आनंदित. ५ अंधकारानें. ६ मुख्य ठिकाण. ७ ओळी, रांगा. ८ महत्तत्त्व नांवाच्या मायेस. ९ अगणित. १० समदृष्टि. ११ अविनाशत. १२ शिव शक्तीच्या. १३ गुणसाम्य मायेला. १४ शेवट. १५ ठेवा. १६ भेदरहित. १७ त्रिभुवनास जिचा आश्रय आहे त्या मायेनें. १८ आश्रयाला. १९ आश्रयस्थान. २० आश्चर्यस्थान. २१ लीन होतें, सामावतें. २२ वर्णावें.

जी काय एक तूं नव्हसी । कवणे ठायीं नससी । हें असो जैसा आहासी । तैसिया नमों १९ वायु तूं अनंता । यम तूं नियमिता । प्राणिगणीं वसता । अग्नि तो तूं ५२० वरुण तूं सोम। स्रष्टा तूं ब्रह्म। पितामहाचाही परम । आदि जनक तूं २१ आणीकही जें जें कांहीं । रूप आथि अथवा नाहीं । तया नमो तुज तैसयाही । जगन्नाथा २२ ऐसें सानुरागें चित्तें । नमन केलें पांडुसुतें । मग पढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो २३ पाठीं तिये सावंतें । न्याहाळी श्रीमूर्तीतें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो २४ पाहतां पाहातां प्रीतें। समाधान पावे चित्तें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो २५ इयें चराचरीं जीं भूतें । सर्वत्र देखे तयातें । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो २६ ऐसीं रूपें तियें अद्भुतें । आश्चर्यें स्फुरती अनंतें। तंव तंव नमस्ते । नमस्तेचि म्हणे २७ आणिक स्तुतिही नाठवे । आणि निवांतुही न बैसवे । नेणें कैसा प्रेमभावें । गाजोंचि लागे २८ किंबहुना इयापरी । नमन केलें सहस्रवरी । कीं पुढती म्हणे श्रीहरी । तुज सन्मुखा नमों २९ देवासि पाठी पोट आथि कीं नाहीं । येणें उपयोगु आम्हां काई । तरि तुज पाठिमोरेयाही । नमों स्वामी ५३० उभा माझिये पाठीसीं । म्हणोनि पाठिमोरें म्हणावें तुम्हांसी । सन्मुख विमुख जगेंसीं । न घडे तुज ३१ आतां वेगळालिया अवयवां । नेणें रूप करूं देवा । म्हणोनि नमों तुज सर्वां । सर्वात्मका ३२ जी अनंत बळसंभ्रमा । तुज नमों अमित विक्रमा । सकळकाळीं समा। सर्वरूपा ३३ आघाविया आकाशीं जैसें । आकाशचि होऊनि आकाश असे । तूं सर्वपणें तैसें । पातलासि सर्व ३४ किंबहुना केवळ । सर्व हें तूंचि निखिळ । परि क्षीरार्णवीं कल्लोळ । पयाचे जैसे ३५ म्हणोनियां देवा । तूं वेगळा नव्हसी सर्वां । हें आलें मज सद्भावा । आतां तूंचि सर्व ३६

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥

परि ऐसिया तूतें स्वामी । कहींच नेणोंजी आम्ही । म्हणोनि सोयरे संबंधधर्मी । राहाटलों तुजसीं ३७ अहा थोर वाउगें जाहलें । अमृतें संमार्जन म्यां केलें । वांरिकें घेऊनि दिधलें । कामधेनूतें ३८ परिसाचा खडवाचि जोडला । कीं फोडोनि आम्ही गांडोरा घातला । कल्पतरु तोडोनि केला । कूंप शेता

तुम्ही ज्यांत नाहीं अशी या जगांत कोणती वस्तु आहे! व तुम्ही नाहीं असें कोणतें ठिकाण आहे! तेव्हां तुम्ही जसे असाल, तसा तुम्हाला माझा नमस्कार असो. १९ श्रीअनंता, तुम्ही वायु आहां, शासन करणारा जो यम, तो तुम्ही आहां, प्राणिमात्रांच्या ठिकाणीं वास करणारा जो जठराग्नि तोही तुम्ही आहां, ५२० तुम्ही वरुण चंद्र व सृष्टि निर्माण करणारे ब्रह्मदेव आहां, व ब्रह्मदेवालाही जो उत्पन्न करणारा, तोही तुम्हीच आहां; २१ श्रीजगन्नाथा, ह्याशिवाय इतर म्हणून ज्या आपल्या विभूति आहेत, त्यांना आकार असो वा नसो, त्यांना माझा नमस्कार असो. २२ याप्रमाणें अर्जुनानें सप्रेम चित्तानें नमस्कार केला; व पुनः हे प्रभो, तुम्हांला नमस्कार असो, नमस्कार असो, असें तो म्हणूं लागला. २३ नंतर श्रीकृष्णाच्या मूर्तीकडे नीट न्याहाळून पाहिल्यावर, पुनः हे प्रभो, तुम्हांला नमस्कार असो, नमस्कार असो, असें म्हणूं लागला. २४ एकेक अवयवांकडे पाहून चित्तांत समाधान पावल्यानें, पुनः, हे प्रभो, तुम्हांला नमस्कार असो, नमस्कार असो, असें म्हणूं लागला. २५ स्थावरजंगम पदार्थ व प्राणी त्या रूपाचे ठिकाणीं पाहून, हे प्रभो, तुम्हांस नमस्कार असो, नमस्कार असो, असेंच म्हणूं लागला. २६ याप्रमाणें अद्भुत अशीं रूपें श्रीअनंताचे ठिकाणीं आश्चर्यानें पाहून, नमस्कार असो, नमस्कार असो, असें म्हणूं लागला. २७ यापेक्षां जास्त स्तुति कशी करावी हें आठवेना आणि स्वस्थही बसवेना, अशी अर्जुनाची स्थिति होऊन तो प्रेमभावानें जास्त स्तुतीच करूं लागला, ती सांगतां येत नाहीं. २८ याप्रमाणें त्यानें हजारों वेळां नमस्कार केले व तो पुनः श्रीहरीस म्हणाला, "तुम्ही माझ्यासमोर जे दिसत आहां, त्या तुम्हांला नमस्कार असो. २९ देवाला पाठपोट आहे कीं नाहीं याची चौकशी करून आम्हांला काय उपयोग होणार! तथापि, हे स्वामी, माझ्या पाठीमागें जे तुम्ही आहां, त्या तुम्हांला नमस्कार असो. ५३० तुम्ही माझ्या पाठीशीं उभे आहां म्हणून तुम्ही पाठीमागें आहां असें म्हणतां येतें, परंतु खरोखर तुम्ही जगाच्या पाठीमागें किंवा पुढें आहां असें कांहींच म्हणतां येत नाहीं. ३१ तुमच्या निरनिराळ्या अवयवांत गणती करतां येत नाहीं; म्हणून सर्वस्वरूपी असे जे तुम्ही त्या तुमच्या सर्व अंगाला नमस्कार असो. ३२ देवा, जे तुम्ही अनंत बळाचा सांठा आहां, तुम्ही अगणित पराक्रमी व सर्व रूपांस सर्वकाळीं सम आहां, त्या तुम्हांला नमस्कार असो. ३३ ज्याप्रमाणें सर्व आकाशांत आकाशमय होऊन आकाशच असतें, त्याप्रमाणें सर्व ठिकाणीं तुमची व्याप्ति असल्यामुळें तुम्ही सर्वांत आहां; ३४ किंबहुना सर्वत्र तुम्हीच केवळ भरलेले आहां. पण ज्याप्रमाणें क्षीरसमुद्रांत लाटाही दुधाच्याच येतात, [ त्याप्रमाणें. ] ३५ म्हणून देवा, तुम्ही सर्व पदार्थांपासून वेगळे नाहीं हें माझ्या प्रत्ययास आलें आहे; आतां सर्वत्र तुम्हीच भरलेले आहां. ३६

अन्वयार्थ--(तव)-तुझ्या-( महिमानं )-माहात्म्यास-(इदं)-या विश्वरूपास-(अजानता मया)-न जाणणाऱ्या मीं-(प्रमादात्)-अनवधानामुळें-(अपि वा प्रणयेन -किंवा प्रेमामुळें -(सखा इति मत्वा)-तूं माझ्या बरोबरीचा मित्र आहेस, असें जाणून-(हे कृष्ण, हे यादव, हे सखे, इति)-असें-(प्रसभं) -अनादरानें-(यत् उक्तं)-जें म्हटलें. ४१

परंतु, प्रभो, तुमचें असें ऐश्वर्य आहे असें मी यापूर्वी कधींच जाणत नव्हतों, म्हणून सोयरेपणाच्या नात्यानें तुमच्याशीं वागलों. ३७ अरेरे! माझ्या हातून फार वाईट गोष्ट घडली, की ज्यां अमृताचा उपयोग सडासंमार्जनाकडे केला, व कामधेनु देऊन तिच्या बदला शिंगरूं घेतलें! ३८ परिसाचा डोंगर मिळाला असतां तो फोडून त्याची आम्ही घराच्या पायांत भर घातली; तसेंच कल्पतरु

१ शासनकर्ता. २ सप्रेम. ३ पुनः. ४ बाजूनें. ५ गर्जना करूं लागला, स्तुति करूं लागला. ६ हजारों वेळा. ७ गणती. ८ सर्व स्वरूप. ९ अपरंपार बळाची समृद्धि ज्याचें ठिकाणीं आहे, असा. १० अगणित पराक्रमी. ११ पोकळी. १२ निष्कलंक, शुद्ध. १३ लाटा, तरंग. १४ प्रत्ययास. १५ सोयरेपणाच्या नात्यानें. १६ वागलों. १७ वाईट. १८ सडासारवण. १९ शिंगरूं, घोडें, कोंकरूं. २० राशि, पर्वत. २१ गडग्यांत, पायाभरणींत. २२ कृपण.

३९ चिंतामणीची खाणी लागली । तेणें करें वोंढाळें वोल्हांडिलीं । तैसी तुझी
जेवळिक धाडिली[२] । सांगातीपणें ५४० हें आजिचोंचि पाहें पां रोकडें[३] । कवण
झुंज हें केवढें । एथ परब्रह्म तूं उघडें । सारथी केलासी ४१ ययां कौरवांचिया
घरा । शिष्टाई धाडिलासि दातारा । ऐसा वणिजेसाठीं जगेश्वरा । विकलासि
आम्हीं ४२ तूं योगियांचे समाधिसुख । कैसा जाणोंचिना मी मूर्ख । उपरोधु[५]
जी सन्मुख । तुजसीं करूं ४३

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाऽप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

तूं या विश्वाची अनादि आदी । बैससी जिये सभासदीं । तेथें सोयरीकी-
चिया संबंधीं । रळीं[६] बोलों ४४ विपायें राउळा येवों[७] । तरि तुझेनि अंगें मानु
पावों । न मानिसी तरी जावों । रुसोनि सलगी ४५ पायां लागोनि बुझावणी ।
तुझ्या ठायीं शार्ङ्गपाणी । पाहिजे ऐशी करणी । बहु केली आम्हीं ४६ स्वजन-
पणाचिया वाटा । तुजपुढें बैसें उफराटा[११] । हा पाडु[१२] काय वैकुंठीं[१३] । परि चुकलों
आम्ही ४७ देवेंसि कोलकांठीं[१४] धरूं । अखंड[१५] झोंबीलोंबीं करूं । सारी[१६] खेळतां
आविष्करूं[१७] । निकरेंही भांडों ४८ चांग तें उरोउरी मागों । देवासि कीं बुद्धि
सांगों । तेवींचि म्हणों काय लागों । तुझें आम्ही ४९ ऐसा अपराधु हा आहे ।
जो त्रिभुवनीं न समाये । जी नेणतांचि कीं पाये । शिवतिले तुझे ५५० देवो
बोनयांच्या[१९] अवसरीं । लोभें कीर आठवण करी । परि माझा निसुग[२०] गर्व अव-
धारीं । जे फुगूनचि बैसें ५१ देवाचिया भोगायतनीं[२१] । खेळतां आशंकेना
मनीं । जी रिगोनियां शयनीं । सरिसा[२२] पहुडें ५२ कृष्णा म्हणोनि हाकारिजे[२३] ।
यादवपणें तूंतें लेखिजे । आपलीं आण घालिजे । जातां तुज ५३ मज एकासनीं
बैसणें । कां तुझा बोलु न मानणें । हें वोवटीचेनि[२४] दाटपणें । बहुत घडलें ५४
म्हणोनि काय काय आतां । निवेदिजेल अनंता । मी राशि आहें समस्तां । अ-
पराधांचि ५५ यालागीं पुढां अथवा पाठीं । जियें राहटलों बहुवें वोखटीं[२५] ।
तियें मायेचिया परी पोटीं । सामावीं प्रभो ५६ जी कोण्ही एके वेळे । सरिता[२६]
घेऊनि येती खडुळें[२७] । तियें सामाविजेति सिंधुजळें । आन उपायो नाहीं ५७
तैसीं प्रीती कां प्रमादें[२८] । देवेंसीं मज विरुद्धें । बोलविलीं तियें मुकुंदें । उप-
सावावीं जी ५८ आणि देवाचेनि क्षमत्वें[२९] क्षमा[३०] । आधारु जाली आहे या

तोडून त्यांचें शेतास कुंपण केलें; ३९ चिंतामणीची खाण लागली असून ते दगड गोफणीनें मारून ओढाळ गुरें हांकून लावलीं; त्याप्रमाणें तुमच्याशीं असलेल्या अति स्नेहाचा उपयोग करून न घेतां तुम्हांला दूर केलें. ५४० हें आज चेंच उघड उघड उदाहरण पहा कीं, हें युद्ध केवढें व काय किमतीचें, पण परब्रह्म जे तुम्ही त्या तुम्हांला आम्हीं आपले उघड उघड सारथि केले. ४१ हे कृपा-सागरा, दुष्ट अशा कौरवांकडे तुम्हांला शिष्टाई करण्या-करितां आम्हीं धाडलें; याप्रमाणें, हे जगदीश्वरा, आम्हीं आपल्या कामाकरितां तुमचा उपयोग करून घेतला. ४२ तुम्ही योग्याचें समाधिसुख असून म्यां मूर्खानें तुम्हांला जाणलें नाहीं, व तुमच्या बरोबर विनोदार्थी भाषणें केलीं. ४३

**अन्वयार्थ**—(च)-आणि (हे अच्युत अ=च्युता-(यत्)-ऽ-अवहासार्थं)- थट्टा करण्यासाठीं–( विहारशय्यासनभोजनेषु )-विहार करतांना, शय्येवर निजतांना, आसनावर बसतांना व जेवतांना–(एकः)–एकटा असतांना–(अथवा)–किंवा–( तत्समक्षं )–लोकांच्या देखत–(असत्कृतः असि)–असत्कार केला गेला आहेस– तत् )–ते सर्व (त्वां अप्रमेयं)–तुज अप्रमेय देवाला–(अहं) मी–(क्षामये) क्षमा करण्याची प्रार्थना करतों. ४२

तुम्ही विश्वाचे आदिपुरुष आहां, तुमच्या अगोदरचा दुसरा कोणी नाहीं. तें तुम्ही ज्या सभेंत बसत होतां, तेथें तुम्ही आमचे नातेवाईक या संबंधानें मी तुमच्याशी विनोदानें बोललों. ४४ कदाचित् तुमच्या घरीं आलों, तर तुमच्या बरोबरीनें मान घेत होतों आणि तो तुम्ही न दिला तर स्नेहाच्या नात्यानें आम्ही रुसून परत जात होतों. ४५ हे शार्ङ्गपाणी, तुम्हीं माझे पाय धरून समजूत करीत असां. याप्रमाणें ह्या त्या प्रकारानें आम्हीं तुमचा उपमर्द केला. ४६ शहाणपणाच्या घमेंडीवर आम्ही तुमच्या पुढें पाठमोरे देखील बसलों आहों; तर हे श्रीकृष्णा, अशी आमची योग्यता आहे का? परंतु आमची चूक झाली. ४७ देवा, तुमच्याबरोबर दांडपट्टा वगैरे खेळ तर खेळलों; आखाड्यांत कुस्ती तर केली, व सोंगट्या खेळतांना तुमचा तिरस्कार करून तुमच्याबरोबर निकरानें तर भांडलों, ४८ जी उत्तम वस्तु असेल, ती अगोदर आम्हांला या म्हणून मागितली; सर्वज्ञ असे जे तुम्हीं त्या तुम्हांला युक्तीच्या गोष्टी सांगितल्या, त्याचप्रमाणें तुमचें आम्ही काय लागत आहों! असें तुम्हांला म्हटलें. ४९ अशा रीतीनें, त्रिभुवनांत न मावतील असें आमचे हातून अप-राध घडले आहेत, परंतु तुमच्याच पायांची शपथ कीं, आम्ही तुम्हांला न ओळखतां तुमच्याशीं असें वर्तन केलें. ५५० देवांनी जेवणाचे वेळेस लोभानें खरोखर माझी आठवण करावी, परंतु मीं रिकामा गर्व करून रुसून बसावें, ५१ देवांच्या अंतःपुरांतही खेळतांना माझ्या मनांत शंका उत्पन्न होत नसे, व अंथरुणावर जाऊन मी शेजारी निजत असें. ५२ मी तुम्हांला 'कृष्णा' म्हणून हांक मारीत असून, इतर यादवांप्रमाणें तुम्हांला मानीत होतों, आणि म्ही जाऊं लागला म्हणजे मी आपली शपथ घालीत असें; ५३ माझें तुमच्याबरोबर एका आसनावर बसणें, किंवा तुमचा शब्द मोडणें, हे अति परिचयामुळें पुष्कळ वेळां घडलें आहे. ५४ म्हणून, हे अनंता, आणखी अशा अमर्यादेच्या तुम्हांला किती तरी गोष्टी सांगू! तर मी सर्व अपराधांची रासच आहे. ५५ याकरितां, प्रभो, तुमच्या समक्ष किंवा पश्चात् जितक्या म्हणून माझ्या हातून वाईट गोष्टी घडून आल्या असतील तितक्या आईप्रमाणें पोटांत घाला. ५६ एकादे वेळेस नदीचें पाणी गढूळ होऊन समुद्रास मिळण्यास गेलें असतां त्याचा अंगिकार केल्याशिवाय समुद्रास दुसरा उपाय नसतो, ५७ त्याप्रमाणें, प्रीतीनें म्हणा, अथवा चुकीनें म्हणा, देवा, तुम्हांला विरुद्ध अशी जी जी भाषणें मी बोललों, ती ती, हे मुकुंदा, पोटांत घाला, ५८ देवा, तुमच्या सहन करण्याच्या शक्तीनें ही पृथ्वी प्राणिमात्राचा भार सहन करण्यास समर्थ झाली आहे, म्हणून हे पुरुषोत्तमा, जितकी

१ सान्निध्य. २ गमाविली. ३ उघड. ४ आमचे कामा-करितां, वाणिज्यार्थ, व्यवहारार्थ. ५. थट्टा, उपमर्द. ६ विनोदानें ७ कधीं तुमच्या मंदिरीं ( घरीं ) आलों. ८ तुझ्या स्वतःकडून. ९ स्नेहाच्या नात्यानें. १० समजूत. ११ पाठमोरा. १२ योग्यता. १३ श्रीकृष्णा. १४ दांडपट्टा. १५ कुस्ती. १६ सोंगट्या. १७ तिरस्कार करूं. १८ निर्भि-डपणें, तावडतोब. १९ जेवणाच्या. २० रिकामा. २१ विलासगृहांत. २२ शेजारीं निजें. २३ हांक मारीं. २४ बहिवाटीच्या, बसणीच्या. २५ वाईटपणें, सोडसाळ-पणें. २६ नदी. २७ गढूळ उदकें. २८ गाफिलपणानें, दुर्ल-क्षानें, चुकीनें. २९ सहनशीलतेनें. ३० पृथ्वी.

शा... ५०

भूतग्रामा। म्हणोनि जी पुरुषोत्तमा। विनवूं तें थोडें ५९ तरि आतां अप्रमेया। मज शरणागता आपुलिया। क्षमा कीजो जी यया। अपराधांसि ५६०

पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूजश्च गुरुर्गरीयान्।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकःकुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥ ४३ ॥

जी जाणितलें मियां साचें। महिमान आतां देवाचें। जो देवो होय चराचरांचें। जन्मस्थान ६१ हरिहरादि समस्तां। देवा तूं परम देवता। वेदातेंही पढविता। आदि गुरु तूं ६२ गंभीर तूं श्रीरामा। नाना भूतैकसमा। सकळगुणीं अप्रतिमा। अद्वितिया ६३ तुजसीं नाहीं सरिसें। हें प्रतिपादनचि कायसे। तुवां जालेनि आकाशें। सामाविलें जग ६४ तया तुझेनि पाडें दुजें। ऐसें बोलतांचि लाजिजे। तेथ अधिकचि कीजे। गोठी केवीं ६५ म्हणोनि त्रिभुवनीं तूं एकु। तुजसारिखा ना अधिकु। तुझा महिमा अलौकिकु। नेणिजे वानूं ६६

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम्।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम्॥ ४४ ॥

ऐसें अर्जुनें म्हणितलें। मग पुढती दंडवत घातलें। तेथें सात्त्विकाचें आलें। भरतें तया ६७ मग म्हणतसे प्रसीद प्रसीद। वाचा होतसे सद्गद। काढीं जी अपराध-। समुद्रौनि मातें ६८ तुज विश्वसुहृदातें कहीं। सोयरेपणें न मनूंचि पाहीं। तुज विश्वेश्वराचिया ठायीं। आश्चर्य केलें ६९ तूं वर्णनीय परी लोभें। मातें वर्णिसी पां सभे। तरि मिया वल्गिजें क्षोभें। अधिकाधिक ५७० आतां ऐसिया अपराधां। मर्यादा नाहीं मुकुंदा। म्हणोनि रक्ष रक्ष प्रमादा-। पासोनियां ७१ जी हेंचि विनवावयालागीं। कैंची योग्यता माझिया आंगीं। परि अपत्य जैसें सलगी। बापेंसीं बोलें ७२ पुत्राचे अपराध। जरी जाहले अगाध। तरी पिता साहे निर्द्वंद्व। तैसें साहिजो जी ७३ सख्याचें उद्धत। सखा साहे निवांत। तैसें तुवां समस्त। साहिजो जी ७४ प्रियाचिया ठायीं सन्मान। प्रिय न पाहे सर्वथा जाण। तेवीं उच्छिष्ट काढिलें आपण। ते क्षमा कीजो जी ७५ नातरी प्राणाचें सोयरें भेटे। मग जीवें भूतेंलीं जियें संकटें। तियें निवेदितां न वाटे। संकोचु कांहीं ७६ कां उंखितें आंगें जीवें। आपणपें दिधलें जिया मनोभावें। तिया कांहीं मिनलियां न राहवे। हृदय जेवीं ७७ तयापरी जी मियां। हें विनविलें तुमतें गोसावियां। आणीक कांहीं एक म्हणावया। कारण असे ७८

तुमची विनंति करावी तितकी थोडी आहे. ५९ तर आतां हे अतर्क्या कृष्णा, तुमचा म्हणविलेला मी तुम्हांला शरण आलों आहें, तर माझ्या सर्व अपराधांची क्षमा करा. ५६०

**अन्वयार्थ**—(त्वं)–तूं–( अस्य चराचरस्य लोकस्य )–या चराचर लोकांचा–( पिता )–जनक–(च)–व–(पूज्यः)–पूज्य –(गरीयान्)–फार मोठा–( गुरुः )–गुरु आहेस –( अप्रतिम-प्रभाव )–ज्याचा प्रभाव अप्रतिम आहे, अशा हे श्रीकृष्णा ! –(लोकत्रये अपि )–या तिन्हीं लोकांत–(त्वत्समः अन्यः)–तुझ्या-सारखा दुसरा–( न अस्ति )–कोणी नाहीं. मग–( अभ्यधिकः कुतः)–तुझ्यापेक्षां अधिक कोठून असणार ? ४३

हे श्रीकृष्णा, तुमचा महिमा मी आतां यथार्थ जाणला आहे. देवा, तुम्ही या चराचराचें उत्पत्तिस्थान आहां. ६१ तुम्ही विष्णु, शंकर आदिकरून सर्व देवांचें परम-दैवत आहां; आणि वेद ज्याला पढविले आहेत, त्या ब्रह्म-देवाचेही मूळ गुरु तुम्ही आहां. ६२ हे श्रीपते, तुम्ही गंभीर असून सर्व भूतांचे ठिकाणीं तुमची समदृष्टि आहे. तुम्ही सर्व गुणांत अप्रतिम असून अद्वितीय आहां. ६३ तुमच्या बरोबरीचा दुसरा कोणी नाहीं, याचें प्रतिपादन तरी काय करावें ? कारण तुम्ही जें आकाश उत्पन्न केलें आहे, त्यांत सर्व जगाचा समावेश होतो. ६४ त्या तुमच्या बरोबरीचे दुसरे कोणी आहे असें म्हणणेंच लज्जास्पद होय. तुमच्यापेक्षां दुसरा कोणी अधिक आहे, ही गोष्टच बोलण्यास नको ! ६५ म्हणून सर्व त्रिभुवनांत, तुम्हीं एकच असून, तुमच्या बरोबरीचा किंवा तुमच्या-हून अधिक दुसरा कोणी नाहीं, व तुमचा महिमा अगाध असून तो वर्णन करण्यास आम्ही असमर्थ आहों. ६६

**अन्वयार्थ**—(तस्मात्)–म्हणून–(कायं प्रणिधाय)–शरीर भूमीवर दंडाप्रमाणें ठेवून–(प्रणम्य)–प्रणाम करून–( अहं )–मी–(ईशं ईड्यं त्वां)–सर्वांचा ईश्वर व स्तुतीला पात्र अशा तुला–(प्रसादये)–प्रसन्न करतों.–( देव पुत्रस्य पिता इव)–देवा ! पुत्राचा अपराध पिता जसा सहन करतो–(सख्युः सखा इव)–मित्राचा अपराध मित्र जसा सहन करतो,–( प्रियायाः प्रियः )–[ इव ]–प्रियेचा–पत्नीचा अपराध प्रिय–पति जसा सहन करतो, तसा–(त्वं)–तूं माझा अपराध–( सोढुं ) –सहन करण्यास–( अर्हसि ) योग्य आहेस. ४४

याप्रमाणें बोलून अर्जुनानें भगवंतास साष्टांग नमस्कार घातला. त्या वेळीं त्याला अष्टसात्त्विक भाव उत्पन्न झाले. ६७ मग गहिंवरून म्हणाला, " प्रसन्न व्हा व मला अपराधरूपी समुद्रांतून बाहेर काढा. ६८ तुम्ही आमचे नातेवाईक आहां, अशा समजुतीनें तुम्हां विश्वसुहृदाला कधींच मान दिला नाहीं; व तुम्ही सर्व विश्वाचे ईश्वर आहां, असें कोणीं म्हटलें, तर उलट आम्ही आश्चर्य करीत होतों. ६९ आम्हींच तुमचें वर्णन करणें योग्य असतांही, सभेमध्यें जों जों तुम्हीं प्रेमानें माझें वर्णन करावें, तों तों रागावून मी अधिक अधिक बडबड करावी. ५७० हे मुकुंदा, असे जे माझे हातून एक एक अपराध झाले आहेत, ते अमर्याद आहेत, म्हणून त्या अपराधांपासून माझें रक्षण करा. ७१ अहो, अशा प्रकारें तुमची प्रार्थना करण्याची देखील योग्यता माझ्या अंगीं नाहीं; पण लहान मूल जसें बापाशीं लडि-वाळपणानें बोलतें, ७२ त्याप्रमाणें, मी म्हणतों, प्रभो, पुत्राच्या हातून पुष्कळ अपराध घडले असले तरी पिता दुजा भाव सोडून जसे ते सहन करतो, तसे माझे सर्व अपराध तुम्हीं सहन करा. ७३ देवा, मित्राचा उद्धट-पणा जसा मित्र निवांतपणें सहन करतो, तसे माझे सर्व अपराध तुम्ही सहन करा. ७४ ज्याप्रमाणें आपल्या आवं-डत्या मित्राकडून आपला सन्मान व्हावा अशी कधीं कोणी अपेक्षा करीत नाहीं, त्याप्रमाणें [ राजसूय यज्ञांत ] तुम्हीं उष्टीं काढलीं त्याची क्षमा करा. ७५ किंवा आपला जिवलग स्नेही भेटल्यावर, आपण जितकीं संकटें अनुभ-विलीं असतील, तितकीं त्याला सांगण्याचा कधींही संकोच वाटत नाहीं. ७६ अथवा जिनें आपलें तन, मन व आत्मादि मनोभावानें आपलें पतीस अर्पण केलें आहे, अशा पतिव्रता स्त्रीस पतीची गांठ पडल्यावर जशी मनां-तील गोष्ट सांगितल्याशिवाय रहावत नाहीं, ७७ त्याप्र-माणें, प्रभो, माझे अपराध क्षमा करण्याबद्दल मी तुम्हांस विनंति केली, परंतु मला आणखी एक गोष्ट विचारावी असें वाटत आहे. ७८

१ अपरिमिता. २ पूर्ण, खरें. ३ उपमारहिता. ४ बरो-बरीचें, तुल्य. ५ आकारानें, पोकळीनें सामावण्याच्या मानानें. ६ सांठवलें. ७ बरोबरीनें. ८ तुझ्यापेक्षां थोर. ९ पूर्व. १० कृपा कर. ११ अपराधरूपी समुद्रांतून. १२ जगन्मित्राला. १३ बडबड करावी. १४ चुकीपासून. १५ लडिवाळपणानें. १६ दुजा भाव सोडून. १७ दांडगेपण. १८ अपेक्षा करीत नाहीं. १९ उष्टीं. २० अनुभवलेलीं, भोगलेलीं. २१ सर्वस्व. २२ अर्पण केलें. २३ नवरा. २४ भेटल्यावर.

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥

तरी देवेंसीं सलगी केली । जे विश्वरूपाची आळी घेतली । ते मायबापें पुरविली । स्नेहाळाचेनि ७९ सुरतरूचीं झाडें । आंगणीं दावावीं कोडें । देयावें कामधेनूचें पाडें । खेळावया ५८० मियां नक्षत्रीं डावं पाडावा । चंद्र चेंडुंवालागीं आणावा । हा छंदु सिद्धी नेला आघवा । माउलीये तुवां ८१ जिया अमृतलेशालागीं सायास । तयाचा पाऊस केला चारी मास । पृथ्वी वाहून चासेंचास । चिंतामणी पेरिले ८२ ऐसा कृतकृत्य केला स्वामी । बहुवें लळा पाळिला तुम्हीं । दाविलें जें हरब्रह्मीं । नायकिजे कानीं ८३ मा देखावयाची केउती गोठी । जयाची उपनिषदां नाहीं भेटी । ते जिव्हारींची गांठी । मजलागीं सोडिली ८४ जी कल्पादीलागोनी । आजिची घडी धरुनी । माझीं जेतुलीं होउनी । गेलीं जन्में ८५ तयां आघवियांचि आंतु । वैरडोळी घेऊनि असें पाहतु । परि ही देखिली ऐकिली मातु । आतुडेचिनां ८६ बुद्धीचें जाणणें । कांहीं नें वचेचि याचेनि आंगणें । हें सादेंही अंतःकरणें । करवेचिना ८७ तेथ डोळ्यां देखी होआवी । ही गोठीचि कायसया करावी । किंबहुना पूर्वीं । दृष्ट ना श्रुत ८८ तें हें विश्वरूप आ ुलें । तुम्हीं मज डोळां दाविलें । तरि माझें मन झालें । हृष्ट देवा ८९ परि आतां ऐसी चाड जीवीं । जे तुजसीं गोठी करावी । जवळीक हे भोगावी । आलिंगावासी ५९० ते याचि रूपीं करूं म्हणिजे । तरि कोणे एके मुखेंसि चावळिजे । आणि कवणा खेंवं देईजे । तुज लेखों नाहीं ९१ म्हणोनि वारियासवें धांवणें । नें ठके गगना खेंव देणें । जळकेली खेळणें । समुद्रीं केउतें ९२ यालागीं जी देवा । एथिचें भय उपजतसे जीवा । म्हणोनि येतुला लळा पाळावा । जे पुरे हें आतां ९३ पैं चराचर विनोदें पाहिजे । मग तेणें सुखें घरीं राहिजे । तैसें चतुर्भुज रूप तुझें । तो विसांवा आम्हां ९४ आम्हीं योगजात अभ्यासावें । तेणें याचि अनुभवा यावें । शास्त्रातें आलोडावें । परि सिद्धांतु तो हाचि ९५ आम्हीं यजनें किजती सकळें । परि तियें फळावीं येणेंचि फळें । तीर्थें होतु सकळें । याचिलागीं ९६ आणीकही कांहीं जें जें । दान पुण्य आम्हीं कीजे । तया फळीं फळ तुझें । चतुर्भुज रूप ९७ ऐसीं तेथिंची जीवा आवडी । ह्मणोनि तेंचि देखावया लेवड-

**अन्वयार्थ**—(अदृष्टपूर्वं)-यापूर्वी मीं किंवा दुसऱ्या कोणीं न पाहिलेलें हें-(रूपं दृष्ट्वा)-विश्वरूप पाहून-(हृषितः अस्मि)-मी हृष्ट झालों आहें.-(च)-व-(भयेन)-भयानें-(मे)-माझें-(मनः)-मन-(प्रव्यथितं)-अतिशय व्यथित झालें आहे. -(जगन्निवास)-हे जगन्निवासा-(देव)-हे देवा,-(देवेश)-हे देवेशा,-(प्रसीद)-प्रसन्न हो.-(तत् एव)-तेंच रूप-(मे)-मला -(दर्शय)-दाखीव. ४५

" श्रीकृष्णा, तुमच्याशीं सलगी करून ' विश्वरूप दाखवा' म्हणून जो छंद घेतला, तो अत्यंत दयाळूपणानें तुम्ही पुरविला. ७९ अंगणांत कल्पतरु लावण्याची व कामधेनूचें वांसरूं खेळावयास देण्याची माझी हौस पुरविली, ५८० मला फाशांच्या ऐवजी खेळण्यास नक्षत्रें द्यावीं, व चेंडूच्या ऐवजी चंद्र द्यावा ही माझी सर्व हौस तुम्हीं मातेप्रमाणें पूर्ण केली. ८१ जें अमृत थोडकें मिळविण्यासही श्रम पडतात, त्याचा चार महिने पाऊस पाडला; आणि जमीन उत्तम रीतीनें तयार करून तिच्या प्रत्येक वाफ्यांत चिंतामणि पेरले ! ८२ याप्रमाणें, प्रभो, सर्व गोष्टी मला देऊन माझे लाड पुरविल्यानें मी कृतकृत्य झालों; आणि जें तुम्ही मला प्रत्यक्ष दाखविलें, त्या विश्वरूपाची गोष्ट शंकर, ब्रह्मदेव यांनीं कानांनीं ऐकिलीहि नाहीं. ८३ मग तें त्यांच्या दृष्टीस कोठून पडणार ? हें पहा उपनिषदांसही ज्याची भेट झाली नाहीं तें आपलें अंतरंगांतील रूप तुम्ही माझ्याकरितां उघड करून दाखविलें. ८४ कल्पाच्या आरंभापासून आज घटकेपर्यंत जितके माझे जन्म होऊन गेले, ८५ त्या सर्व जन्मांत प्रत्येक जन्माचा झाडा घेऊन पाहतों, परंतु या रूपाची गोष्ट मीं कधीं ऐकिली आहे किंवा हें पाहिलें आहे, असें आढळून येत नाहीं. ८६ या विश्वरूपाच्या अंगणांत देखील बुद्धीची कल्पना गेली नाहीं, मग अंतःकरणांत त्याची आठवण कोठून होणार? ८७ अशा स्थितींत तें विश्वरूप डोळ्यांनीं पहावें, याजबद्दल गोष्ट बोलावयालाच नको. किंबहुना असें पूर्वी कधीं ऐकिलें नाहीं व पाहिलेंही नाहीं. ८८ देवा, तें हें तुमचें विश्वरूप तुम्ही मला दाखविल्यानें माझें मन चकित झालें. ८९ परंतु आतां अशी एक मनांत इच्छा उत्पन्न झाली आहे कीं, तुमच्या बरोबर गोष्टी सांगून तुमच्या स्नेहाचा उपभोग घ्यावा, व म्हांला आलिंगन द्यावें. ५९० तेव्हां तें या अशा स्थितींतच करूं म्हटलें, तर तुमच्या कोणत्या तोंडाबरोबर बोलावें? व कोणाला आलिंगन द्यावें? कारण तुमच्या रूपाला पार नाहीं. ९१ म्हणून, वाऱ्याबरोबर धांवणें अगर गगनाला आलिंगन देणें हें घडावयाचें नाहीं, तसेंच समुद्रांत जलक्रीडा कशी करितां येईल? ९२ याकरितां देवा, या विश्वरूपाचें मला भय वाटतें; म्हणून हें आटोपून घ्यावें, एवढाच माझी हौस पुरवावी. ९३ हें पहा या चराचराचें कौतुकानें अवलोकन करूनही जसें घरीच रहावेंसें वाटतें, त्याप्रमाणें तुमचें चतुर्भुज रूपच आमच्या विश्रांतीचें स्थान होय. ९४ आम्ही सर्व योगांचा अभ्यास केला, तरी त्या योगानें पहावयास मिळणार हेंच; आणि सर्व शास्त्रांचा जरी विचार केला तरी सिद्धांत तो हाच. ९५ आम्ही सर्व यज्ञ केले तरी त्यांची फलप्राप्ति हेंच रूप होय. व याच रूपाकरितां सर्व तीर्थें करावीं लागतात. ९६ आणखीही जें जें कांहीं पुण्य अथवा दान आम्ही करितों, त्याची फलप्राप्ति तुमचें चतुर्भुज रूपच होय. ९७ याप्रमाणें त्या चतुर्भुज रूपाची जीवास आवड उत्पन्न होऊन, तें पहाण्याकरितां माझी लगबग

१ रुडिवाळपणा, लाडीगोडी. २ छंद ३ अत्यंत दयाळूपणानें. ४ आवडीनें. ५ वांसरूं. ६ खेळावयास. मागावीं ७ चेंडूच्या ऐवजीं—साठीं. ८ वाफ्यावाफ्यानें. ९ मग. १० कोणीकडे, कोठून. ११ हृदयांतल्याची गाठ, गूढस्वरूप. १२ कल्पाच्या आरंभापासून. १३ जितकी १४ प्रत्येक घराचा झाडा. १५ सांपडेना. १६ पोंहचत नाहीं. १७ कल्पना. १८ दृष्टिगोचर, प्रत्यक्ष. १९ पाहिलें नाहीं, किंवा ऐकिलें नाहीं. २० आनंदित. २१ बोलावें. २२ आलिंगन. २३ गणना. २४ घडत नाहीं, टिकत नाहीं. २५ जलक्रीडा. २६ हौस. २७ यमनियमादि सर्व योग. २८ शिकावें, अध्ययन करावें, पारंगत व्हावें. २९ लगबग.

सवडी । वर्तत असे ते सांकडी । फेडिजे[2] वेगीं ९८ अगा जीवींचें जाणतेया । सकळ विश्वेवसवितेया । प्रसन्न होई पूजितया । देवांचिया देवा ९९

किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

कैसें नीलोत्पलातें रांवितें । आकाशाही रंगु लावित । तेजाची वोज[6] दावित । इंद्रनीळा ६०० जैसा परिमळें जाहला मरगजा । कां आनंदासि निघालिया भुजा । ज्याचे जानूवरी[10] मकरध्वजा[11] । जोडली बैरव[12] १ मस्तकीं मुगुटातें ठेविलें । कीं मुकुटा मुकुट मस्तक झालें । शृंगारालेणें[13] लेंधलें[14] । आंगाचेनि जया २ इंद्रधनुष्याचिये आडणी- । माजि मेघ गगनरंगणीं । तैसें आंवरिलें[15] शार्ङ्गपाणी । वैजयंतिया ३ आतां कवणी ते उदार गदा । असुरां देत कैवल्य[16] पदा । कैसें चक्र हन गोविंदा । सौम्यतेजें मिरवे ४ किंबहुना स्वामी । तें देखावया उत्कंठित पां मी । म्हणोनि आतां तुम्हीं । तैसया होआवें ५ हे विश्वरूपाचे सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे । आतां होताति आंधळे[17] । कृष्णमूर्तीलागीं ६ तें साकार कृष्णरूपडें । वांचूनि पाहों नावडे । तें न देखतां थोडें । मानिताती हे ७ आम्हां भोगमोक्षांचिया ठायीं । श्रीमूर्तीवांचूनि नाहीं । म्हणोनि तैसाचि साकारु होई । हें सांवरी[18] आतां ८

श्रीभगवानुवाचः—
मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

या अर्जुनाचिया बोला । विश्वरूपा विस्मयो जाहला । म्हणे ऐसा नाहीं देखिला । धेंसाळ[20] कोणी ९ कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोषु[21] न घेसी । मा भेणें काय नेणों बोलसी । हेकोंडु[22] ऐसा ६१० आम्ही सावियांचि[23] जैं प्रसन्न होणें । तैं आंगाचिवरी[24] म्हणें देणें । वांचोनि जीव असे वेंचणें । कवणासि गा ११ तें हें तुझिये चाडे । आजि जिवाचेंचि देंळवाडें[25] । कोमऊनियां[26] येवढें । रचिलें ध्यान १२ ऐसी काय नेणों तुझिये आवडी । जाहली प्रसन्नता आमुची वेडी । म्हणोनि गौप्याचीही[27] गुंढी[28] । उभविली जगीं १३ तें हें अपारांपार[29] । स्वरूप माझें परात्पर[30] । एथूनि ते अवतार । कृष्णादिक १४ हें ज्ञानतेजाचें निखिळें[31] । विश्वात्मक केवळ । अनंत हें अढळ । आद्य सकळां १५ हें तुजवांचोनि अर्जुना । पूर्वीं श्रुत दृष्ट नाहीं आना । जे जोगें नव्हे साधनां । म्हणोनियां १६

उडाली आहे; तर ही माझी अडचण लवकर दूर करा. ९८ अहो, दुसऱ्याच्या मनांतील गोष्ट जाणणारे जगन्निवासा, परमपूज्य देवाधिदेवा, प्रसन्न व्हा. ९९

**अन्वयार्थ**—(अहं)–मी–(किरीटिनं गदिनं चक्रहस्तं)–मस्तकास मुकुट घातलेल्या, गदा घेतलेल्या व हातांत चक्र असलेल्या–(त्वां)–तुला–(तथा एव)–पूर्वीप्रमाणेंच–(द्रष्टुं)–पाण्यास–(इच्छामि)–इच्छितों.–(सहस्रबाहो विश्वमूर्ते)–ज्याला सहस्रबाहु आहेत व सर्व विश्व हीच ज्याची मूर्ति आहे, अशा देवा !–(तेन एव)–त्याच पूर्वीच्या–(चतुर्भुजेन रूपेण)–चतुर्भुजरूपानें–(भव) तूं प्रकट हो. ४६

"देवा, तुमच्या अंगकांतीचें कोठवर वर्णन करावें ? ज्याच्या योगानें नीलकमलास व आकाशासही निळेपणा येतो, व इंद्रनील मण्याच्या तेजाची झांक पसरते; ६०० ज्याप्रमाणें पाचेला सुगंध सुटावा किंवा आनंदाला हात फुटावे, त्याप्रमाणें प्रभूचें गुडघ्यांपासून मदनाला शोभा येते; १ प्रभूंनीं मस्तकावर धारण केलेल्या मुगुटास मस्तकाच्या सौंदर्यानें जास्त शोभा येते, व अंगाच्या प्रभेनें शृंगारास शोभा येते; २ श्रीहरीनें गळ्यांत घातलेली वैजयंती माळ इंद्रधनुष्याच्या मधल्या भागांत आकाशांतील मेघाप्रमाणें शोभते; ३ आतां, राक्षसांनाही मोक्षपद देणारी प्रभूंच्या हातांतील उदार गदा व तसेंच हातांतील चक्र किती सौम्य दिसतें; ४ म्हणून, प्रभो, अशी तुमची सर्व शोभा पहावयास मी उत्सुक झालों आहें; तर तें रूप तुम्ही धारण करा. ५ विश्वरूप पहाण्याचे सोहाळे भोगून माझे डोळे निवाले आहेत, व ते आतां कृष्णमूर्ति पाहण्यास भुकेले आहेत, ६ तुमचें गोजिरवाणें कृष्णरूप पहाण्याशिवाय दुसरी कोणतीही इच्छा नाहीं. तें जर दृष्टीस न पडलें, तर त्याच्यापेक्षां विश्वरूपाची किंमत कमी मानतों. ७ आम्हांला तुमच्या मूर्तीवांचून मुक्ति व भुक्ति देणारें कांही नाहीं, म्हणून हें विश्वरूप आतां आंवरून चतुर्भुज गोजिरवाणें रूप धारण करा." ८

**अन्वयार्थ**—(अर्जुन)–हे अर्जुना !–(प्रसन्नेन मया)–प्रसन्न झालेल्या मीं–(आत्मयोगात्)–माझ्या योगसामर्थ्यामुळें–(तव)-तुला–(इदं)–हें–(मे)–माझें–(परं तेजोमयं)–श्रेष्ठ तेजोमय,–(विश्वं)–समस्त–(अनन्तं)–अमर्याद–(आद्यं)-अगदीं आरंभीचें-(रूपं)–विश्वरूप–(दर्शितं)–दाखविलें–(यत्)–कीं जें–(त्वदन्येन)–तुझ्यावांचून दुसऱ्या कोणी–(न दृष्टपूर्वं)–पूर्वी पाहिलेलें नाहीं. ४७

याप्रमाणें अर्जुनाचें बोलणें ऐकून श्रीकृष्णाला मोठें आश्चर्य वाटलें व ते म्हणाले, "तुझ्यासारखा अविचारी मनुष्य मीं पाहिला नाहीं. ९ अरे, तुला हा कसला लाभ झाला आहे, याचा संतोष न मानतां भीतीनें आडाण्यासारखा काय बोलतोस ? ६१० आम्ही कोणासही प्रसन्न झालों तर बाह्यात्कारींच होतों, परंतु मनापासून प्रसन्न कोणालाही होत नाहीं. ११ तें आमचें मनापासून प्रसन्न होणें तुझ्याचकरितां असून अंतःकरणांतील गुह्य कमावून एवढें मोठें ध्यान तयार केलें. १२ माझें मन तुझ्या प्रेमभक्तीनें कसें वेडावलें हें मला कळत नाहीं; म्हणून आमचें जें परम गुह्य विश्वरूप, त्याचा जगांत ध्वज उभारिला. १३ तें हें माझें अखंडच व अनादि स्वरूप असून याच्यापासून कृष्णादिक अवतार उत्पन्न होतात. १४ हें स्वरूप केवळ ज्ञानतेजानें भरलेलें, विश्वव्यापक, अनंत व दृढ असून सर्वांच्या आरंभीचें आहे. १५ अर्जुना, तुझ्यावांचून हें दुसऱ्या कोणी पूर्वी ऐकिलेलें व पाहिलेलें नाहीं. कारण, हें साधनानें प्राप्त होणारें नव्हे. १६

१ अडचण. २ काढा, दूर करा. ३ जग वसविणाऱ्या. ४ नीलकमलास. ५ रंगाचा मासला दाखवीत. ६ प्रभा, झांक. ७ सुगंध. ८ पाचूस, मरकतमण्यास. ९ हात. १० गुडघ्यावर. ११ मदनास. १२ शोभा. १३ शोभा. १४ आली. १५ धारण केलें. १६ मोक्षास. १७ अधीरे, हांवरे, हपापलेले, भुकेलेले. १८ मुक्ति व भुक्ति यांच्या. १९ आटोप, पुरे कर. २० अविचारी, अरसिक. २१ संतोष. २२ अडाणी, एककल्ली. २३ सहाजिक. २४ स्वतःच्या शरीरापर्यंत. २५ समुदाय, स्वरूप. २६ श्रमपूर्वक तयार करून. २७ गुह्यरूपाची. २८ ध्वजा. २९ अखंड. ३० मायेच्या पलीकडील. ३१ शुद्ध.

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥

यांची सोय[1] घातले । आणि वेदीं मौनचि घेतलें । याज्ञिकी माघौते आले। [2]स्वर्गौनियां १७ साधकीं देखिला आयासु[3] । म्हणोनि वोंळिला योगाभ्यासु । आणि अध्ययनें सौरसु । नाहीं एथ १८ सीगेचीं[6] सत्कर्में । धाविन्नलीं संभ्रमें । तिहीं बहुतेकीं श्रमें । सत्यलोकु ठाकिला १९ तपीं ऐश्वर्य देखिलें । आणि उग्रपण उभेयांचि[9] सांडिलें । एवं तपसाधन जें ठेलें[10] । अपैरांतरें[11] ६२० तें हें तुवां अनायासें । विश्वरूप देखिलें जैसें । इये मनुष्यलोकीं तैसें । न[12] फावेचि कवणा २१ आजि ध्यानसंपत्तीलागीं । तूंचि एकु आथिला[13] जगीं । हें परम भाग्य आंगीं । विरिंचिही[14] नाहीं २२

मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

म्हणोनि विश्वरूपलाभें श्लोंघ[15]। एथिंचें भय नेघें[16] नेघ । हें वांचूनि अन्य चांग। न मनीं कांहीं २३ हां गा समुद्र अमृतांचा भरला। आणि अवसांत[17] वरपेंडा[18] जाहला । मग कोणीही आथि वोसंडिलें[19] । बुडिजेल म्हणोनि २४ नातरी सोनयाचा डोंगरु । येसणा[20] न[21] चले हा थोरु । ऐसें म्हणोनि अव्हेरु । करणें घडे २५ दैवें चिंतामणि लेईजे । कीं हें ओझें म्हणोनि सांडिजे । कामधेनु दवडिजे । न पोसवे म्हणोनि २६ चंद्रमा आलिया घरा । म्हणे निगें[22] करितोसि उबारा[23] । [24]पडिसायि पाडितोसि दिनकरा । परता सर २७ तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज । कीं एथ तुज गजबज[25] । होआवी कां २८ परि नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा २९ हें नव्हे जो मी साचें । एथ मन करूनियां कोंचें[26] । प्रेम धरिसी अवगणियेचें[27] । चतुर्भुज जें ६३० तरि आझुनिवरी पार्था । सांडीं सांडीं हे व्यवस्था । इयेंविषयीं आस्था । करिसी[28] झणें ३१ हें रूप जरी घोर । विकृती[29] आणि थोर । तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं ३२ कृपण चित्तवृत्ति जैसी । रोवोनि घालीं ठेवयांपासीं[30] । मग नुसधेनि[31] देहेंसीं । आपण असे ३३ कां अजातपक्षिया[32] जवळा । जीव बैसवूनि अविसौळां[33] । पक्षिणी अंतरौळा[34] । माजि जाय ३४ ना[35] ना गाय चरे डोंगरीं । परि चित्त बांधिलें वत्सें घरीं । तैसें प्रेम एथिंचें करीं । स्थानपती ३५ येरें वारिचिलेंनि चित्तें । बाह्य सख्य सुखापुरतें । भोगिजो कां श्रीमूर्तीतें । चतु-

**अन्वयार्थ**—(कुरुप्रवीर)-हे अर्जुना !-(नृलोके)-या मनुष्यलोकीं-(त्वदन्येन)-तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाकडून-(अहं)-मी-(एवंरूपः)-अशा रूपाचा-(द्रष्टुं)-पाहण्यास-(वेदयज्ञाध्ययनैः)-वेद व यज्ञ यांच्या अध्ययनांनीं-(न शक्यः)-शक्य नाहीं-(दानैः न)-दानांनीं नाहीं-(क्रियाभिः न)-कर्मांनीं नाहीं-(च)-व-(उग्रैः तपोभिः)-[न शक्यः]-उग्र तपांनीं शक्य नाहीं. ४८

"या स्वरूपाचे ठिकाणापर्यंत येतांच वेदांनीं मौन धारण केलें; यज्ञ करणारे स्वर्गापर्यंत जाऊन मागें परतले; १७ साधकांनीं, योगाभ्यासाच्या ठिकाणी श्रम पडतात असें पाहून योगाभ्यासच सोडला; आणि अध्ययन करणारांसही ह्या स्वरूपापर्यंत येणें सुलभ नाहीं. १८ पूर्णत्वास आलेल्या नित्यनैमित्तिक कर्मांनी आपल्या मोठेपणाच्या श्रमानें धांव घेतली, तीं तरी मोठ्या श्रमानें सत्यलोकापर्यंत येतात; १९ तपस्व्यांनीं याचें ऐश्वर्य पाहून उभ्याउभ्याच आपला उग्रपणा टाकला, याप्रमाणें तपसाधन करणारेही यापासून दूर राहिले; ६२० तें हें विश्वरूप सहजीं जसें तुझ्या दृष्टीस पडलें, तसें या मनुष्यलोकांत कोणालाही प्राप्त झालें नाहीं २१ आज या जगांत ध्यानसंपत्तीला योग्य असा तूं एकटाच आहेस. ब्रह्मदेवाच्याही नशीबीं या विश्वरूपदर्शनाचा लाभ नाहीं. २२

**अन्वयार्थ**—(मम)-माझें-(इदं ईदृक् घोरं रूपं)-हें अशा प्रकारचें घोर रूप-(दृष्ट्वा)-पाहून-(ते)-तुला-(व्यथा)-पीडा-(मा)-[भूत्]-न होवो,-(च)-आणि-(विमूढभावः)-तुझ्या चित्ताचा अत्यंत मूढभाव-(मा)-[भूत्]-न होवो.-(त्वं)-तूं-(पुनः)-पुनरपि-(व्यपेतभीः)-निर्भय व-(प्रीतमनाः)-संतुष्टचित्त होऊन-(तत् एव)-तेंच-(इदं)-हें-(मे रूपं)-माझें रूप-(प्रपश्य)-पहा. ४९

"म्हणून विश्वरूपदर्शनाच्या लाभानें तूं आज धन्य झाला आहेस. बाबा रे! याचें भय मानूं नको, आणि यावांचून दुसरें कांहीं चांगलें आहे असें मनांत देखील आणूं नको. २३ अरे, अमृतानें भरलेला समुद्र जर अकस्मात् प्राप्त झाला, तर आपण त्यांत बुडून मरूं अशा भीतीनें तो कोणी सोडून देईल कां ? २४ किंवा सोन्याचा डोंगर दृष्टीस पडल्यावर हा एवढा मोठा कसा नेतां येईल असें म्हणून कोणी सोडून जाईल कां ? २५ दैवयोगानें चिंतामणि प्राप्त झाल्यावर तो अंगावर घालण्याचें सोडून ओझें होतें म्हणून कोणी टाकून देईल कां ? तसेंच, कामधेनु प्राप्त झाली असतां आपल्याला ती पोसवत नाहीं म्हणून तिला कोणी घालवून देईल कां ? २६ शीत उत्पन्न करणारा चंद्र जर घरांत आला, तर त्याच्यापासून उष्मा होतो, असें म्हणून त्याला बाहेर जा असें कोणी म्हणेल कां ? तूं सावली पाडतोस म्हणून पलीकडे जा असें कोणी सूर्याला म्हणेल काय ? २७ त्याचप्रमाणें, या विश्वरूपाचें ऐश्वर्य आज तुझ्या हातीं सहज लागलें असून तुझ्या अंगीं असा घाबरेपणा कां उत्पन्न व्हावा ? २८ पण अर्जुना, तूं अगदीं गांवढळ असून तुला कांहीं समजत नाहीं, तुला काय म्हणावें ? अरे, तूं अंग सोडून पडछायेला आलिंगन देतोस ! २९ तूं आपलें मन आधीर करून अलिकडील साकार चतुर्भुज रूपावर प्रीति करतोस, पण तें माझें खरें स्वरूप नव्हे. ६३० म्हणून पार्था, अजून तरी चतुर्भुज रूपाची आस्था सोड; व माझ्या विश्वरूपाची अनास्था करूं नको. ३१ हें विश्वरूप जरी भयंकर अवाढव्य आहे, तरी त्याच्या ठिकाणी तूं आपला पूर्ण निश्चय ठेव. ३२ ज्याप्रमाणें कृपण आपलें मन द्रव्याच्या ठेव्याजवळ ठेवून फक्त शरीरानें जगांत व्यापार करतो ३३ किंवा पंख फुटलें नाहींत अशा पिलांजवळ घरट्यांत आपला जीव ठेवून पक्षिणी आकाशांत भ्रमण करिते, ३४ अथवा गाय जरी डोंगरावर चरत असली तरी तिचें चित्त घरीं बांधलेल्या वांसराकडे असतें, तसें तुझें प्रेम या माझ्या विश्वरूपाचे ठिकाणीं कायम ठेव. ३५ बाकी मनाच्या समाधानाकरितां वरकांती माझ्या चतुर्भुज मूर्तीचें ध्यान

१ ठिकाण, मार्ग. २ स्वर्गाहून. ३ श्रम. ४ त्यागिला. ५ किंमत, गोडी, योग्यता. ६ पूर्णत्वास आलेलीं, अत्युत्तम, पूर्ण. ७ आपल्या मोठेपणानें. ८ प्राप्त करून घेतला. ९ उभ्याउभ्याच. १० दूर राहिलें. ११ फार दूर, तपसाधनाला जें अत्यंत दूर राहिलें. १२ दिसलें नाहीं, सांपडलें नाहीं. १३ संपन्न, थोर, योग्य. १४ ब्रह्मदेवालाही. १५ धन्यता मान, आनंद मानून घे. १६ घेऊं नको, मानूं नको. १७ अकस्मात्. १८ स्वाधीन झाला, प्राप्त झाला. १९ सोडून, टाकून दिला. २० एवढा २१ नेतां येत नाहीं. २२ नीघ, दूर हो. २३ उष्मा, तलखी. २४ पडछाया, सावली. २५ गडबड. २६ अधीर, भ्याड. २७ सोंगाचें, मिथ्या वस्तूचे. २८ करूं नको. २९ विकाळ. ३० द्रव्याच्या ठेव्याजवळ. ३१ केवळ. ३२ पंख फुटले नाहींत अशा पिलांजवळ. ३३ घरट्यांत. ३४ आकाशांत. ३५ अथवा.

भुंज ३६ पारि पुढतंपुढती पांडवा । हा एक बोलु न विसरावा । जे इये रूपीं- हूनि सद्भावा । नेदावें निघों ३७ हें कहीं नव्हतेंचि देखिलें । म्हणोनि भय जें तुज उपजलें । तें सांडीं एथ संचलें । असों दे प्रेम ३८ आतां करूं तुजयासा- रिखें । ऐसें म्हणितलें विश्वतोमुखें । तारि मागील रूप सुखें । न्याहाळीं पां तूं ३९

संजय उवाचः—

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं भूत्वाः पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

ऐसें वाक्य बोलतखेंवो । मागुता मनुष्य जाहला देवो । हें ना पारि नवलावो । आवडीचा तिये ६४० श्रीकृष्णाचि कैवल्य उघडें । वारि सर्वस्व विश्वरूपायेवढें । हातीं दिधलें कीं नावडे । अर्जुनासि ४१ वस्तु घेऊनि वाळिजे । जैसें रत्नासि दूषण ठेविजे । नातरी कन्या पाहूनियां म्हणिजे । मना नये हे ४२ तया विश्व- रूपायेवढी दशा । करितां प्रीतीचा वाढू कैसा । शेलें दिधलीसे उपदेशा । किरीटीसि देवें ४३ मोडोनि भांगाराचा रवा । लेणें घडिलें आपलिया सवा । मग नावडे जरी जीवा । तरी आटिजे पुढती ४४ तैसें शिष्याचिये प्रीती जाहलें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें । तें मना नयेचि मग आणिलें । कृष्णपण मा- गुतें ४५ हा ठाववरी शिष्याची निकैसी । सहातें गुरु आहाती कवणे देशीं । परी नेणिजे आवडी कैशी । संजयो म्हणे ४६ मग विश्व व्यापूनि भगवंतें । जें दिव्य तेज प्रगटलें होतें । तेंचि सामावलें मागुतें । कृष्णरूपीं तये ४७ जैसें त्वंपद हें आघवें । तत्पदीं सामावे । अथवा द्रुमाकारु सांठवे । बीजकणिके जेवीं ४८ नातरी स्वप्नसंभ्रमु जैसा । गिळी चेईली जीवदशा । श्रीकृष्णें योगु हा तैसा । संहरिला तो ४९ जैसी प्रभा हारपली बिंबीं । कीं जळदसंपत्ती नभीं । ना ना भरतें सिंधुगर्भी । रिगालें राया ६५० हो कां जे कृष्णाकृतीचिये मोडी । होती विश्वरूपपटाची घडी । ते अर्जुनाचिये आवडी । उकलूनि दाविली ५१ तव परिमाणु वा रंगु । तेणें देखिले साविया चांगु । तेथ ग्राहकीये नव्हेचि लागु । म्हणोनि घडी केली पुढती ५२ तैसें वाढीचेनि बहुवसपणें । रूपें विश्व जिं- तिलें जेणें । तें सौम्य कोडिसवाणें । साकार जाहलें ५३ किंबहुना अनंतें । धरिलें धाकुटपण मागुतें । परि आश्वासिलें पार्थातें । बिहालियांसी ५४ जो स्वप्नीं स्वर्गा गेला । तो अवसांत जैसा चेइला । तैसा विस्मयो जाहला । कि- रीटीसी ५५ नातरी गुरुकृपेसवें । वोसरलेया प्रपंचज्ञान आघवें । स्फुरे तत्त्व

कर. ३६ परंतु, हे पांडवा, वारंवार हें माझें वाक्य विसरूं नको; आणि या माझ्या स्वरूपापासून तूं आपला भाव दुसरीकडेस जाऊं देऊं नको. ३७ हें तूं पूर्वी कधीं पाहिलें नव्हतेंस, म्हणून तुला भीति उत्पन्न झाली आहे, ती सोडून दे; व या विश्वरूपाच्या ठिकाणीं तुझें प्रेम कायम राहूं दे." ३८ नंतर विश्वरूप धारण करणारे श्रीकृष्ण भगवान् म्हणाले "अर्जुना, तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी आतां आपलें पूर्वीचें चतुर्भुज रूप धारण करतों, तें तूं सुखानें पहा." ३९

अन्वयार्थ—(इति)—याप्रमाणें–(वासुदेवः)—वासुदेव–(अर्जुनं)—अर्जुनाला–(तथा)—असें वचन–(उक्त्वा)—बोलून–(भूयः)—पुनः–(स्वकं रूपं)—आपलें रूप–(दर्शयामास)—दाखविता झाला–(च)—आणि तो–(महात्मा)—महात्मा–(पुनः)—पुनरपि–(सौम्यवपुः)—सौम्य स्वरूपाचा–(भूत्वा)—होऊन–(भीतं एनं)—भ्यालेल्या त्याला–अर्जुनाला–(आश्वासयामास)—धीर देऊन त्याचें समाधान करिता झाला. ५०

एवढें वाक्य बोलून देवांनी पुनः लागलीच मनुष्यरूप धारण केलें. महाराज म्हणतातः—मनुष्य रूप धारण केलें यांत कांहीं विशेष नाहीं, हा देवभक्तांच्या आवडीचा चमत्कार आहे ! ६४० श्रीकृष्ण हे केवळ परब्रह्म, आणि त्यांनी विश्वरूपासारखें आपलें सर्वस्व अर्जुनाच्या हातीं दिलें, पण तें त्याला आवडलें नाहीं, ४१ आपणास एकादी वस्तु पाहिजे म्हणून मागून घेऊन ती टाकावी, अथवा रत्नाला दूषण ठेवावें, किंवा एखाद्या मुलीची चांगली विचारपूस केल्यावर 'मला ती आवडत नाहीं' असें म्हणावें, तसा हा प्रकार झाला. ४२ श्रीकृष्णांनीं अर्जुनास, उपदेशाचा शेलका वांटा जें विश्वरूप तें दाखविलें. यापेक्षां आणखी त्याजवर प्रीति तरी कशी करावयाची ! ४३ सोन्याची लगड मोडून आपल्या हौसेप्रमाणें दागिना घडल्यावर, तो जर आपल्या मनास न आला, तर आटवून जशी त्याची पुनः लगड करावी, ४४ त्याप्रमाणें, प्रथम कृष्णरूप होतें त्याचें अर्जुनाच्या आवडीकरितां विश्वरूप केलें, तें त्याच्या मनाला आवडलें नाहीं, म्हणून पुनः कृष्णरूप झालें. ४५ अशा प्रकारची शिष्याची जिकीर सहन करणारे गुरु कोणच्या तरी देशांत पाहिले आहेत का ? परंतु ह्यावरून देवाला भक्ताची किती आवड आहे हें सांगतां येत नाहीं; असें संजय म्हणाला. ४६ भगवंतांनीं विश्व व्यापून विश्वरूपाचें जें दिव्य तेज प्रकट केलें होतें, त्याचा पुनः त्याच कृष्णरूपांत समावेश केला. ४७ ज्याप्रमाणें परमात्मस्वरूपांत सर्व जीवस्वरूपाचा समावेश होतो, अथवा बीजांत वृक्षाकार सांठवला जातो, ४८ किंवा स्वप्नाचा विस्तार जागृत झाल्यावर नाहींसा होतो, त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं चतुर्भुज मूर्ति धारण करून विश्वरूपाचा योग नाहींसा केला. ४९ जशी सूर्याची प्रभा सूर्यांतच लय पावते, अथवा मेघ आकाशांत लय पावतात, किंवा समुद्राची भरती समुद्रांतच जिरते; ६५० असें पहा—अर्जुनाच्या आवडीकरितां कृष्णरूप आकृतींत जी विश्वरूपवस्त्राची घडी घातली होती, ती उघडून दाखविली, ५१ तेव्हां त्या वस्त्राची लांबी, रुंदी व रंग सर्व नीट पाहिल्यावर, गिऱ्हाईक जो अर्जुन त्यास तें वस्त्र घेण्याची आवड नसल्यामुळें पुनः त्याची घडी घातली. ५२ याप्रमाणें, ज्या विश्वरूपाच्या अति वाढण्यानें सर्व जग व्यापून टाकलें होतें, तेंच रूप चतुर्भुज गोजिरवाणें असें झालें. ५३ किंबहुना अनंतानेंच पुनः लहान स्वरूप धारण करून अर्जुन जो अगदीं भिऊन गेला होता त्याला आश्वासन दिलें. ५४ एकादा मनुष्य स्वप्नांत स्वर्गास गेला असतां जसा एकाएकीं जागा होऊन आश्चर्य पावतो, तसा अर्जुन चकित झाला; ५५ किंवा, गुरुकृपा होतांक्षणींच सर्व प्रपंचज्ञान लय पावून परमात्म साक्षात्कार होतो, त्याप्रमाणें श्रीकृष्ण

१ वारंवार. २ देऊं नये. ३ विश्वरूपी श्रीकृष्णानें. ४ बोलतांक्षणींच. ५ आश्चर्य. ६ परब्रह्म. ७ टाकावी. ८ उत्तम वांटा. ९ सोन्याची लगड. १० हौसेप्रमाणें. ११ किरकिर, जिकीर. १२ सहन करणारे. १३ जीवदशा, जगद्रूप. १४ ब्रह्मरूपीं. १५ वृक्ष. १६ बीजांत. १७ स्वप्नाचा विस्तार, पोटाळा. १८ जागृत झालेली. १९ मेघ. २० अथवा. २१ समुद्रांत. २२ जिरतें. २३ वळणांत, घोळांत २४ लांबी, रुंदी व पोत. २५ गिऱ्हाइकीचा. २६ गोजिरवाणें, सुंदर. २७ भ्यालेल्यास. २८ अकस्मात्. २९ लय पावल्यावर. ३० ब्रह्म.

तेवीं पांडवें । श्रीमूर्ति देखिली ५६ तया पांडवा ऐसें चित्तीं । आड विश्वरूपाची जवनिका होती । ते फिटोनि गेली परौती । हें भलें जाहलें ५७ काय काळातें जिणोनि आला । कीं महावातु मागां सांडिला । आपुलिया बाहीं उतरला । सातही सिंधु ५८ ऐसा संतोष बहु चित्तें । घेइजत असे पंडुसुतें । विश्वरूपापाठीं कृष्णातें । देखोनियां ५९ मग सूर्याचिया अस्तमानीं । मागुती तारा उगवती गगनीं । तैसा देखों लागला अवनीं । लोकांसहित ६६० पाहे तंव तेंचि कुरुक्षेत्र । तैसेंचि देखे दोहीं भागीं गोत्र । वीर वर्षताति शस्त्रास्त्र । संघाटवरी ६१ तया बाणांचिया मांडवाआंतु । तैसाचि रथु देखे निवांतु । धुरे बैसला लक्ष्मीकांतु । आपण तळीं ६२

अर्जुन उवाचः—

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन । इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

एवं मागितलें जैसें तैसें । तेणें देखिलें वीरविलासें । मग म्हणे जियालों ऐसें । जाहलें आतां ६३ बुद्धीतें सांडोनि ज्ञान । भेणें वळेघलें रान । अहंकारेंसीं मन । देशधडी जाहलें ६४ इंद्रियें प्रवृत्ती भुललीं । वांचा प्राणा चुकली । ऐसी औपांपरी[११] होती जाली । शरीरग्रामीं ६५ तियें आघवींचि मागुतीं । जिवंत भेटलीं प्रकृती[१२] । आतां जितीणें[१३] श्रीमूर्तीं । जाहलें यियां ६६ ऐसें सुख जीवीं घेतलें । मग श्रीकृष्णातें म्हणितलें । मियां तुमचें रूप देखिलें । मानुष हें ६७ हें रूप दाखवणें देवराया । कीं मज अपैल्या[१४] चुकलिया । बुझावोनि[१५] तुवां माया । स्तनपान दिधलें ६८ जी विश्वरूपाचिया सागरीं । होतों तरंग मवितें[१६] वांवेवरी । तो इये निजमूर्तीच्या तीरीं । निगालों आतां ६९ आइकें द्वारकापुरसुहाडा[१७] । मज सुकतियाजी झाडा । हे भेटी नव्हे वहुंडा । मेघाचा केला ६७० जी सावियांचि[१९] तृषा फुटला । तया मज अमृतसिंधु हा भेटला । आतां जिणयांचा[२०] जाहला । भरंवसा मज ७१ माझिया हृदयरंगणीं । होताहे हरिखलतांचीं लावणी । सुखेंसीं बुझावणी[२१] । जाहली मज ७२

श्रीभगवानुवाचः—

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम । देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः ॥ ५२ ॥

यया पार्थाचिया बोलासवें । हें काय म्हणितलें देवें । तुवां प्रेम ठेवूनि यावें । विश्वरूपीं कीं ७३ मग इये श्रीमूर्ती । भेटावें साडिया[२२] आयती । ते शिकवण सुभद्रापती । विसरलासि मा ७४ अगा आंधळिया अर्जुना । हाता

पाहून अर्जुनाची स्थिति झाली. ५६ अर्जुनाच्या मनाला असें वाटलें की, या चतुर्भुज मूर्तीच्या आड जो विश्वरूपाचा पडदा होता तो नाहींसा झाला, ही गोष्ट फार उत्तम झाली. ५७ जसें काळाला जिंकावें, किंवा भयंकर वाऱ्यांतून सुटून जावें, अथवा सातही समुद्र आपल्या हातांनीं तरून गेल्यावर ५८ जसा आनंद होतो, त्याप्रमाणें, विश्वरूप पाहून श्रीकृष्णरूप पाहिल्यावर अर्जुनाच्या चित्तांत फार समाधान झालें. ५९ मग सूर्य अस्तास गेल्यावर जशा आकाशांत चांदण्या पुनः चमकूं लागतात, त्याप्रमाणें विश्वरूप नाहींसें झाल्यावर अर्जुनास सर्व लोकसमुदायासह पृथ्वी दृष्टीस पडली; ६६० आणि पहातों तों तेंच कुरुक्षेत्र असून आपल्या व शत्रूंच्या सैन्यांत सर्व गोत्रज आहेत व एकमेकांवर शस्त्रास्त्रांचा वर्षाव करीत असून ६१ त्यांनीं टाकलेल्या बाणांच्या मंडपाखालीं आपला रथ जागच्या जागीं उभा आहे, व भगवान् लक्ष्मीपति धुऱ्यावर बसलेले असून आपण रथांत बसलेले आहों. ६२

**अन्वयार्थ**—(हे जनार्दन)-हे जनार्दना !-(तव)-तुझें-(इदं मानुषं सौम्यं रूपं)-हें मनुष्याकार सौम्य रूप-(दृष्ट्वा)-पाहून मी-(इदानीं)-आतां-(सचेताः)-प्रसन्नचित्त व-(प्रकृतिं गतः)-स्वभावास प्राप्त-(संवृत्तः)-झालों-(अस्मि)-आहें. ५१

याप्रमाणें वीरश्रेष्ठ अर्जुनानें जसें मागितलें, तसें प्रभूंचें पूर्ववत् स्वरूप पाहिल्यावर तो मग म्हणाला:-" महाराज ! खरोखर मी आतां वांचलों असें मला वाटतें. ६३ ज्ञान हें बुद्धीला सोडून भीतीनें रानांत शिरलें होतें, अहंकारासह मन हें देशोधडीस लागलें होतें, ६४ इंद्रियांचे व्यापार बंद झाले होते, वाचा, बोलणें विसरली होती, आणि याप्रमाणें शरीररूप गांवांत अव्यवस्था झाली होती. ६५ ही सर्व अव्यवस्था मोडून इंद्रियें आपआपला व्यापार करूं लागलीं. म्हणून श्रीकृष्णमूर्तीच्या दर्शनानें मी आतां खास वांचलों असें त्यास वाटलें. ६६ याप्रमाणें अंतर्यामीं सुख पावून अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला कीं " देवा, तुम्हीं हें जें मनुष्यरूप धारण केलें तें मी डोळे भरून पाहिलें. ६७ देवराया, आपण या रूपाचें दर्शन मला दिलें हें मज चुकलेल्या लेंकरास समजावून त्या मातेनें स्तनपान दिलें. ६८ विश्वरूप समुद्रांत जो मी हातांनीं लाटांचें पाणी तोडीत होतों, तो आतां या तुमच्या चतुर्भुज मूर्तिरूप तीराला येऊन लागलों. ६९ हे द्वारकावासी वीरश्रेष्ठा, आपण मला हें दर्शन दिलें असें नाहीं, तर मजसारख्या सुकून चाललेल्या वृक्षावर मेघवर्षाव केला ! ६७० महाराज, प्रस्तुत तहानेनें व्याकुळ झालेल्या मला हा अमृतसिंधूच भेटला; आतां माझ्या मनांत जीविताविषयीं जी शंका उत्पन्न झाली होती ती नाहींशी झाली. ७१ माझ्या हृदयरूप अंगणांत हर्षरूप वेलीची लावणी झाली आहे. आणि आतां अनायासानें माझी समजूत झाली आहे, म्हणजे मला आनंद झाला आहे. ७२

**अन्वयार्थ**—(यत् मम रूपं)-जें माझें रूप-(दृष्टवान् असि)-तूं पाहिलें आहेस-(इदं सुदुर्दर्शं अस्ति)-तें हें रूप दिसणें अतिशयच कठिण आहे.-(देवाः अपि)-देवसुद्धां-(नित्यं)-नेहमीं-(अस्य रूपस्य)-या रूपाच्या-(दर्शनकांक्षिणः) [सन्ति]-दर्शनाची आकांक्षा करणारे आहेत. ५२

हें अर्जुनाचें भाषण ऐकल्याबरोबर श्रीकृष्ण म्हणाले:- अरे हें काय ! खरोखर तूं विश्वरूपावरच प्रेम ठेवून त्यांतच येऊन मिळावेंस ! ७३ आणि मग या चतुर्भुज मूर्तीला भेटण्याकरितां फक्त शरीरानें ये, हें जें मी तुला पूर्वी शिकविलें, तें विसरलास का ! ७४ हा वेड्या अर्जुना, अंधळ्याच्या हातीं सोन्याचा जरी मेरुपर्वत लागला

१ पडदा. २ माहूनीं. ३ पृथ्वी. ४ शस्त्रास्त्रांचा. ५ समुदाय. ६ स्थिर, जागच्याजागी. ७ अर्जुनानें. ८ वांचलों. ९ घेपलें, शिरलें. १० बोलणें. ११ दुर्दशा, अव्यवस्था. १२ सांप्रत. १३ जीवंत. १४ भुकेला. १५ समजावून. १६ मोजीत.

१७ द्वारकेंतील सुहृद=सुहृद-मित्र. १८ वृष्टि, वद्दळा=मेहदक. १९ सहज. २० आयुष्याचा, जगण्याचा. २१ ज्ञान. २२ सत्यामार्गानें, निःसंगपणानें.

आलिया मेरुही होय सोंना । ऐसा आथी मना । चुकीचा भावो ७५ तारे वि-
श्वात्मक रूपडें । जें दाविलें आम्हीं तुजपुढें । तें शंभूही पारि न जोडे । तपें
करितां ७६ आणि अष्टांगादिसंकटीं । योगी शिणताति किरीटी । पारि अवसरु
नाहीं भेटी । जयाचिये ७७ तें विश्वरूप एकादे वेळ । कैसेनि देखों अळुमाळ ।
ऐसें स्मरतां काळ । जातसे देवो ७८ आशेचिया अंजुळी । ठेऊनि हृदयाचिया
निडळीं । चातक निरोळीं । लागले जैसे ७९ तैसे उत्कंठानिर्भर । होऊनियां
सुरवर । घोकीत आठही पाहार । भेटी जयाची ६८० पारि विश्वरूपासारिखें ।
स्वप्नींहि कोण्ही न देखे । तें प्रत्यक्ष तुवां सुखें । देखिलें हें ८१

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया । शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥

पैं उपायांसि वाटा । न वाहती एथ सुभटा । साहीसहित वोहटा । वाहिला
वेदीं ८२ मज विश्वरूपाचिया मोहरा । चालावया धनुर्धरा । तपांचियाही
संभारा । नव्हेचि लागु ८३ आणि दानादि कीर कोनडें । मी यज्ञाही तैसा
न सांपडें । जैसेनि कां सुरवाडें देखिला तुवां ८४ तैसा मी एकीचि परी ।
आंतुडें गा अवधारीं । जरी भक्ति येऊनि वरी । चित्तातें गा ८५

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन । ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥५४॥

पारि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी । धरौवांचूनि अनारिसी ।
गतीचि नेणें ८६ कां सकळ जळसंपत्ति । घेऊनि समुद्रातें गिंवसिती । गंगा
जैसी अनन्यगती । मिळालीचि मिळे ८७ तैसें सर्वभावसंभारें न धरत प्रेम
एकसरें । मजमाजि संचरे । मीचि होऊनी ८८ आणि तेवींचि मी ऐसा । थे-
डिये माझारीं सैरिसा । क्षीराब्धि कां जैसा । क्षीराचाचि ८९ तैसें मजलागुनी ।
मुंगीवरी । किंबहुना चराचरीं । भजनासि कां दुसरी । परीचि नाहीं ६९० त-
याचि क्षणासवें । एवंविध मीं जाणवें । जाणितला तरी स्वभावें । दृष्टही होय
९१ मग इंधनीं अग्नि उद्दीपे । आणि इंधन हे भाष हारपे । तें अग्निचि होऊनि
आरोपें । मूर्त जेवीं ९२ कां उदय न कीजे तेजाकारें । तंव गगनचि होऊनि
असे आंधारें । मग उदइलिया एकसरें । प्रकाशु होय ९३ तैसें माझिये साक्षा-
त्कारीं । सरे अहंकाराची वारी । अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय ९४ मग मी
तो हें आघवें । एक मीचि आथी स्वभावें । किंबहुना सामावे । समरसें तो ९५

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः । निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगोनाम एकादशोऽध्यायः॥११॥

तरी त्याला त्याचें ज्ञान नसल्यामुळें तो लहानच वाटतो, ही चूक मनाच्या भावनेची आहे; ७५ तर, बाबा आम्ही जें विश्वव्यापकरूप तुला दाखविलें तें असंख्य तपें करून शंकरासही प्राप्त होत नाहीं. ७६ आणि हे किरीटी, अष्टांगयोगसाधनांनी योगी जरी शिणले, तरी त्यांनाही जें विश्वरूप पहाण्याला सांपडत नाहीं, ७७ तें विश्वरूप एकदां तरी थोडेसें दृष्टीस पडावें असें घोकतां घोकतां देवांचेंही आयुष्य निघून जातें; ७८ आशारूप ओंजळ हृदयरूप कपाळावर ठेवून ( अतिशय आशाबद्ध होऊन ) चातक पक्षी जसा मेघाची वाट पहात आकाशाकडे बघत बसतो, ७९ त्याप्रमाणें उत्सुक होऊन देव, व मनुष्यें ज्यांच्या भेटीची आठही प्रहर इच्छा करितात, ६८० पण त्यांपैकी कोणीं स्वप्नांत देखील जें पाहिलें नाहीं तें विश्वरूप प्रत्यक्ष मोठ्या आनंदानें त्वां पाहिलेंस. ८१

**अन्वयार्थ**—(यथा)–ज्याप्रमाणें तूं–(मां)–मला–(दृष्टवान् असि)–पाहिलें आहेस–(एवंविधः अहं)–अशा प्रकारचा मी –(वेदैः)–वेदांनी–(न द्रष्टुं शक्यः)–दिसणें शक्य नाहीं.–(तपसा न)–तपानें नाहीं,–(दानेन न)–दानानें नाहीं,–(च इज्यया न)–व यज्ञानें किंवा पूजेनेंहि दिसण्यासारखा नाहीं. ५३

हें बघ अर्जुना, या विश्वरूपाचें दर्शन होण्यास कांहीं उपाय नाहींत म्हणून चारी वेदांनी सहा शास्त्रांसह माघार घेतली. ८२ हे धनुर्धरा, माझ्या विश्वरूपासमोर येण्यास पुष्कळ तपेंही समर्थ नाहींत. ८३ ज्याप्रमाणें तूं अनायासें माझें विश्वरूप पाहिलेंस त्याप्रमाणें तें दानें व यज्ञ करणाऱ्यांच्याही दृष्टीस पडणें कठीण आहे, ८४ असा जो मी, तो एकच उपायानें सांपडेन, ध्यानांत ठेव, तो उपाय हा की, जर अंतःकरण भक्तियुक्त होईल तरच माझ्या विश्वरूपाचें दर्शन होईल. ८५

**अन्वयार्थ**—(हे परंतप अर्जुन)–हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना !–(तु)–पण–(एवंविधः अहं)–अशा प्रकारचा मी (अनन्यया भक्त्या)–अनन्य भक्तीनें–(तत्त्वेन)–तत्त्वतः–(ज्ञातुं) –जाणण्यास–(द्रष्टुं)–पाहण्यास–(च)–व–(प्रवेष्टुं)–प्रवेश करण्यास–(शक्यः)–शक्य आहे. ५४

परंतु ती भक्ति, पावसाच्या धारा आकाशांतून सुटल्यावर त्यांना अशी पृथ्वीवर येऊन पडल्याशिवाय दुसरी गतिच नाहीं, त्याप्रमाणें जर एकनिष्ठ असेल; ८६ किंवा ज्याप्रमाणें गंगा आपल्यांत मिळालेले सर्व ओघ घेऊन समुद्रास मिळण्याकरितां जाते, तिला दुसरी गति नाहीं, म्हणून समुद्रांत मिळून पुनः सारखी मिळतच असतें; ८७ त्याप्रमाणें अष्टसात्त्विकभावांनीं जो सर्वत्र सारखें प्रेम धरतो तो मजप्रत प्राप्त होऊन मद्रूप होतो; ८८ आणि ज्याप्रमाणें क्षीरसमुद्र हा कांठाशीं व मध्यभागीं सारखाच गोड असतो, त्याप्रमाणें मी सर्वत्र सारखाच आहें, ८९ त्याचप्रमाणें माझ्यापासून मुंगीपर्यंत किंबहुना स्थावरजंगम प्राणिमात्राचे ठिकाणीं ज्यांना भजन करण्यास द्वैतभावच उरत नाहीं. ६९० अशी ज्या वेळेस चित्तवृत्ति होते, त्याच वेळेस माझ्या विश्वरूपाचें ज्ञान होतें, आणि ज्ञान झालें म्हणजे अर्थात् दर्शनही होतें, ९१ मग जसें लांकडापासून अग्नि उत्पन्न होऊन लांकूड पेटल्यावर लांकूड हें नांव नाहींसें होऊन तें अग्निरूप बनतें, ९२ किंवा जोंपर्यंत सूर्य व चंद्र हे उगवले नाहींत तोंपर्यंत गगन अंधकारानें भरलेलें असतें, मग तेच उगवल्यावर जसा सर्वत्र प्रकाश होतो, ९३ त्याप्रमाणें माझ्या विश्वरूपाचा प्रत्यय आल्यावर अहंकार नाहींसा होतो असें समज. ९४ मग मी तो, हे सर्व सहजगत्या मत्स्वरूपच आहेत; फार काय सांगावें, अशा बोधानें तो ऐक्यभावांत प्राप्त होतो. ९५

**अन्वयार्थ**—(पांडव)–हे अर्जुना !–(यः)–जो–(मत्कर्मकृत्)–माझ्यासाठीं कर्म करणारा,–(मत्परमः)–मीच ज्याची परम गति आहें,–(मद्भक्तः)–माझा भक्त,–(संगवर्जितः)–कोणामध्येंहि आसक्ति न ठेवणारा–(सर्वभूतेषु)–सर्व भूतांमध्यें –(निर्वैरः)–वैररहित असतो–(सः)–तो–(मां)–मला–(एति)–प्राप्त होतो. ५५

---

१ लहान. २ समय, वेळ. ३ किंचित्. ४ कपाळीं. ५ आकाशाकडे. ६ आशायुक्त, उत्सुक. ७ चार वेदांनीं सहा शास्त्रांसह वोहटा=माघार घेतली. ८ पुढें, समोर, मार्गानें. ९ कठिण, दुर्बोध. १० सुकाळपणानें, सुखानें. ११ सांपडतें. १२ धार, वृष्टि. १३ पृथ्वीशिवाय. १४ अन्य. १५ खंड न पडतां. १६ समुदाय. १७ प्रेम न सांवरत. १८ कांठाशीं आणि मध्यें सारखा. १९ दृष्टीस पडतो. २० जळवणांत, काष्ठांत. २१ उत्पन्न होतो. २२ राहतें. २३ सूर्य व चंद्र यांनीं. २४ यात्रा, फेरी.

जो मजाचि एकालागीं। कर्मे वाहातसे आंगीं। जया मजवांचोनि जगीं। गोमटें नाहीं ९६ दृष्टादृष्ट सकळ। जयाचें मीचि केवळ। जेणें जिणयाचें फळ। मजाचि नाम ठेविलें ९७ मग भूतें हें भाष विसरला। जे दिठी मीचि आहें सूदला। म्हणोनि निर्वैर जाहला। सर्वत्र भजे ९८ ऐसा जो भक्तु होये। तयाचें त्रिधातुक हें जैं जाये। तैं मीचि होऊनि ठायें। पांडवा गा ९९ ऐसें जगदुदरदोंदिलें। तेणें करुणारससरसाळें। संजयो म्हणे बोलिलें। श्रीकृष्णदेवें ७०० ययावरी तो पांडुकुमरु। जाहला आनंदसंपदा थोरु। आणि कृष्णचरणचतुरु। एक तो जगीं १ तेणें देवाचिया दोनही मूर्ती। निकिया न्याहाळिलिया चित्तीं। तंव विश्वरूपाहूनि कृष्णाकृतीं। देखिला लाभु २ परि तयाचिये जाणिवे। मानु न कीजेचि देवें। जे व्यापकाहूनि नव्हे। एकदेशी ३ होंचि समर्थावयांलागीं। एक दोन चांगी। उपपत्ती शार्ङ्गी। दाविता जाहला ४ तिया ऐकोनि सुभद्राकांतु। चित्तीं आहे ह्मणतु। तरि होय बरवें दोन्ही आंतु। तें पुढती पुसों ५ ऐसा आलोचु करूनि जीवीं। आतां पुसती वोजें बरवी। आदरील ते परिसावी। पुढें कथा ६ प्रांजेळ ओंवीप्रबंधें। गोष्टी सांगिजेल विनोदें। तें परिसा आनंदें। ज्ञानदेवो म्हणे ७ भरोनि सद्भावाची अंजुळी। मियां वोवियाफुलें मोकळीं। अर्पिलीं अंघ्रियुगुळीं। विश्वरूपाच्या ७०८

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥ श्लोक ५५, ओंव्या ७०८.

जो मलाच एकट्याला स्वतः केलेली कर्मे अर्पण करतो; व ज्याला जगांत माझ्यावांचून दुसरें कांहीं आवडत नाहीं, ९६ जो इह व पर या लोकांचें फल मीच असें समजतो; ज्यानें मलाच जीवनाचें फल असें मानलें आहे; ९७ जो प्राणिमात्र हें नांव विसरून मलाच सर्वत्र पाहतो म्हणून तो निर्वैर होऊन जगतांतील जी जी वस्तु दृष्टीस पडेल, तिला भजतो; ९८ हे पांडवा, याप्रमाणें ज्या भक्तीची वृत्ति बनते, आणि ज्या वेळेस त्याचें कफपित्तवातात्मक शरीर नाहींसें होतें, त्या वेळेस तो मद्रूप होतो. ९९ संजय म्हणतोः–हे धृतराष्ट्रा, ज्याच्या उदरांत सर्व जगत् भरून उदर मोठें झालें आहे असा त्या श्रीकृष्ण भगवानानें करुणारसयुक्त वाणीनें असें भाषण केलें. ७०० आनंदरूप संपत्तीनें श्रीमान् व या सर्व जगतांत कृष्णाची भक्ति करण्यांत चतुर असा जो अर्जुन, १ त्यानें देवांच्या दोन्ही मूर्ति नीट न्याहाळून पाहिल्या; परंतु त्यांत विश्वरूपापेक्षां कृष्णमूर्तीत विशेष लाभ आहे असें मानलें. २ पण अर्जुनाच्या या समजुतीस श्रीकृष्णांनीं मान दिला नाहीं. कारण व्यापकरूपापेक्षां एकदेशीरूप खरें नव्हे, ३ हेंच सिद्ध करण्याकरितां श्रीकृष्णांनीं एक दोन चांगले दाखले दिले. ४ ते ऐकून अर्जुन आपल्या मनांत असें म्हणूं लागला कीं, या दोन्ही रूपांत चांगलें रूप कोणतें आहे तें पुढें विचारावें. ५ याप्रमाणें मनांत विचार करून पुढें तो कशा रीतीनें श्रीकृष्णास प्रश्न करील ती कथा ऐका. ६ ज्ञानदेव म्हणतातः–जी गोष्ट ओंवीप्रबंधांत विनोदानें सांगितली जाईल, ती आनंदयुक्त अंतःकरणानें ऐका. ७ सद्भावाची ओंजळ भरून ओंवीरूप मोकळी फुलें विश्वरूपाच्या दोन्ही पायांवर मीं अर्पण केलीं. ७०८

---

१ इहपर. २ ज्यानें जीविताचें साफल्य माझेच माथीं-वर ठेविलें आहे. ३ भरलेला. ४ कफवातपित्तात्मक शरीर. ५ ज्याचे उदरांत सर्व जग भरून उदर मोठें झालें आहे त्यानें. ६ करुणारसयुक्त वाणीनें. ७ आनंदरूप संपत्तीनें श्रीमान्. ८ कृष्णाची भक्ति करण्यांत चतुर. ९ समजुतीस. १० सिद्ध करण्यास. ११ दाखले, उदाहरणें. १२ विचार करीत. १३ विचार. १४ ठेवण, पद्धत. १५ स्पष्ट, सुलभ. १६ दोन्ही पायांवर.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय बारावा.

जयजय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे । अनवरत आनंदें । वर्षतिये १ विषय-
व्याळें मिठी । दिधलिया नुठी तोंठी । ते तुझिया गुरुकृपादृष्टी । निर्विष होय २
तरि कवणातें तापु पोळी । कैसेनि वो शोकु जाळी । जरि प्रसादरस कल्लोळीं ।
पूरियेसि तूं ३ योगसुखाचे सोहळे । सेवकां तुझेनि स्नेहाळे । सोहंसिद्धीचे लळे ।
पाळिसी तूं ४ आधारशक्तीचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं । हृदयाकाशपल्लकीं ।
परिये देसी निजें ५ प्रत्यक्ज्योतीची वोवाळणी । करिसी मनपवनाचीं खेळणीं ।
आत्मसुखाचीं बाळलेणीं । लेवविसी ६ सत्तरावियेचें स्तन्य देसी । अनुहताचा
हल्लरु गासी । समाधिबोधें निजविसी । बुझाऊनि ७ म्हणोनी साधकां तूं मा-
उली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं । या कारणें मी साउली । न संडीं तुझी
८ अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी । तो सकळ वि-
द्यांचिये सृष्टी । धात्रा होय ९ म्हणोनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते । आज्ञापीं
मातें । ग्रंथनिरूपणीं १० नवरसीं भरवीं सागरु । करवीं उचित रत्नांचे आगरु ।
भावार्थाचे गिरिवरु । निफजवीं माये ११ साहित्यसोनियाचिया खाणी । उघ-
डवीं देशियेचियां अक्षौणी । विवेकवल्लीची लावणी । हों देईं सैंघ १२ संवा-
दफळनिधानें । प्रमेयांचीं उद्यानें । लावीं म्हणे गहनें । निरंतर १३ पाखांडाचे
दरकुटे । मोडीं वाग्वाद अव्हांटे । कुतर्कांचीं दुष्टें । सावजें फेडीं १४ श्री-
कृष्णगुणीं मातें । सर्वत्र करीं वो सरतें । राणिवे बैसवी श्रोते । श्रवणाचिये
१५ ये मऱ्हाठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं । घेणें देणें सुखेंचि-
वरी । हों देईं या जगा १६ तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सदैवें ।
तरि आतांचि हें आघवें । निर्मीन माये १७ इये विनवणीयेसाठीं । अवलोकिलें
गुरुकृपादृष्टी । म्हणे गीतार्थेंसीं उठीं । न बोलें बहु १८ तेथ जी जी महाप्रसादु ।
म्हणोनि साविया जाहला आनंदु । आतां निरोपीन प्रबंधु । अवधान दीजे १९

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय बारावा.

[ हे शुद्ध सद्गुरुमाउली, ] तुझा जयकार असो. तूं कशी आहेस ? तर निर्मल, उदार, निरंतर आनंदाचा वर्षाव करण्याविषयीं प्रसिद्ध आहेस. १ हे गुरुकृपादृष्टे, विषयरूप सर्पानें मिठी मारल्यावर मूर्च्छित झालेल्या मनुष्यांचें विष तुझ्या योगानें उतरतें. २ तुझ्या प्रसादरूपी लाटांचा पूर आला म्हणजे संसारतापापासून कोणाला त्रास होईल ? व शोकापासून कोण पीडा पावेल ? ३ हे स्नेहाळे, तुझ्यापासून सेवकाला योगसुखाचे चमत्कार प्राप्त होतात, व ' मी ब्रह्म व्हावें ' अशी जी सेवकाची हौस, तीही तूं पूर्ण करतेस. ४ [ भक्ताला ] तूं आपल्या आधारशक्तीच्या अंकावर कौतुकानें वाढवितेस आणि हृदयाकाशरूपी पाळण्यांतच आपल्या उपदेशानें निजवून झोंकि देतेस; ५ मन विषयापासून पराङ्मुख करवूनं व आत्मज्योतीची ओंवाळणी करून, मन व पवन यांची खेळणीं करतेस, आणि सेवकाकडून आत्मसुखाचीं वाळणीं लेववितेस; ६ जीवनकलेचें अमृतपान देऊन ' हंसः सोहं ' या अखंड ध्वनीचा हातांत खुळखुळा देऊन समाधिसुखाचा बोध करून निजवितेस; ७ म्हणून तूं साधकांची आई आहेस, व तुझे पाय धरल्यानें ज्ञानमात्राची प्राप्ति होते; याकरितां, मी तुझा आश्रय सोडीत नाहीं. ८ हे सद्गुरुकृपादृष्टे, तुझी ज्याच्यावर दया होते, तो सर्वविद्यारूप सृष्टीचा उत्पन्नकर्ताच होतो. ९ म्हणून हे श्रीमान् आये, तूं सेवकाच्या मनांतील इच्छा पूर्ण करणारी कल्पलताच आहेस. तर या गीतेचा अर्थ सांगण्याची मला आज्ञा दे. १० माते, या माझ्या ग्रंथांत नवरसांचे सागर, अलंकारांच्या खाणी व भावार्थांचे पर्वत निर्माण कर. ११ देश-भाषारूप जमीनींत अलंकाररूप सोन्याच्या खाणी उघडून विचाररूप वेलींची दाट लावणी कर. १२ त्यांत संवादरूप फळांचे ठेवे व मार्मिक-अर्थरूपी सतत राहणाऱ्या अशा पुष्कळ बागा लाव. १३ पाखंडरूपी दरी व वितंडवादरूपी आडवाटा मोडून, कुतर्करूपी दुष्ट हिंसक जनावरें नाहींतशीं कर. १४ मला श्रीकृष्णाचे गुण नेहमीं गाण्यास उद्युक्त कर, व श्रोत्यांना श्रवणरूपी राज्यावर बसीव. १५ मराठी भाषारूप नगरांत ब्रह्मविद्या स्वस्त कर, व सर्व लोकांनी सुखांच्या देण्याघेण्याचा व्यापार करावा असें कर. १६ हे गुरुकृपादृष्टे माये, तूं आपल्या कृपारूप पदरानें मला नेहमीं पांघरूण घालशील, तर याप्रमाणें ग्रंथनिरूपणादिक सर्व मी उत्पन्न करीन. १७ एवढी विनंति ऐकल्याबरोबर गुरुकृपादृष्टीनें ज्ञानेश्वराकडे अवलोकन करून असें भाषण केलें कीं, तूं आतां पाल्हाळ न लावतां गीतेचा अर्थ सांगण्यास सुरवात कर. १८ तेव्हां ज्ञानेश्वर महाराज मर्यादादर्शक 'जी जी' शब्द म्हणून हा माझ्यावर महाप्रसादच झाला आहे; त्यामुळें मला अतिशय आनंद झाला. आतां मी गीताग्रंथाचें निरूपण करितों, तिकडे लक्ष द्यावें, अशी त्यांनी श्रोत्यांची प्रार्थना केली. १९

१ निर्मळ. २ उदार (सद्गुरुमाउली). ३ निरंतर. ४ च्छों, तात्पर्य. ५ मानी. ६ पुरानें. ७ मूलाधार चक्री शक्तीच्या मांडीवर. ८ हृदयाकाशरूपी पाळण्यांत. ९ के. १० निजगुजानें, गुह्य उपदेशानें. ११ जीवात्मभाव ाळून टाकितेस. १२ जीवनकलेचें. १३ हंस=सोऽहं या ड ध्वनीचा. १४ गाणें. १५ समजावून. १६ विद्या. १७ य देई १८ उत्पन्नकर्ता, महादेव. १९ आपल्या सेवकाचें मनांतील इच्छा पूर्ण करणाऱ्या. २० उत्तम रत्नांचे. २१ खाण. २२ उत्पन्न करावें. २३ अलंकाररूप. २४ देशभाषारूप जमिनींत. २५ समुदाय. २६ पुष्कळ. २७ संभाषणफळरूपी ठेवा. २८ सिद्धांतांची. २९ गुहा. ३० वितंडवाद. ३१ श्वापदें. ३२ नाहींसीं कर. ३३ पोंचीव. ३४ राज्यपदावर. ३५ केवळ सुखाचेंच. ३६ कृपारूप पदरानें. ३७ विनंतीबरोबर. ३८ तत्काळ. ३९ ग्रंथ.

अर्जुन उवाचः—
एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते । ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥
तरी सकळवीराधिराजु । जो सोमवंशीं विजयध्वजु । तो बोलता जाहला
आत्मजु । पांडुनृपाचा २० कृष्णातें म्हणे अवधारिलें । आपण विश्वरूप मज
दाविलें । तें नवल म्हणोनि बिहालें । चित्त माझें २१ आणि इये कृष्णमूर्तीची
सवे । यालागीं सोयें धरिली जीवें । तंव नको म्हणोनि देवें । वारिलें
तरि व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत । भक्तीं पाविजे
व्यक्त योगें २३ या दोनी जी वाटा । तूतें पावावया वैकुंठा ।
दारवंठां । रिगिजे येथ २४ पैं जे वांनी इयातुका । तेचि
म्हणोनि एकदेशीया व्यापका । सारिसा पाडू २५ अमृताचिया सागरीं
सामर्थ्याची थोरी । तेचि दे अमृतलहरी । चुळी घेतालिया २६ हे
चित्तीं । प्रतीति आथि जी निरुती । पारि पुसणें योगपती । तें
जें देवा तुम्हीं नावेक । अंगिकारिलें व्यापकें । तें साचाचि कीं
जाणावया २८ तरि तुजलागीं कर्म । तूंचि जयाचें परम । भक्तीसी
विकोनि घातला २९ इत्यादि सर्वांपरी । जे भक्त तूतें श्रीहरी ।
व्हारीं । उपासिती ३० आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीयेसि जें
यिसयाहि सांगडें । नव्हेचि जें वस्तु ३१ तें अक्षरें जी अव्यक्त । निर्देश
शरहित । सोहंभावें उपासित । ज्ञानिये जें ३२ तयां आणि जी भक्तां ।
रांमाजि अनंता । कवणें योगु तत्त्वता । जाणितला सांगा ३३ इया किरी
चिया बोला । तो जगद्बंधु संतोषला । म्हणे हो प्रश्नु भला । जाणसी करूं

मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते । श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २
तरि अस्तुगिरीचिया उपकंठीं । रिगालिया रवि बिंबापाठीं । रश्मी
किरीटी । संचरती गा ३५ कां वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे
सुता । तैसी नीचें नवी भजतां । श्रद्धा दिसे ३६ पारि ठाकिलियांहि स
जैसा मागीलही यांवा अनिवारु । तिये गंगेचिये ऐसा पडिभरु ।
३७ तैसें सर्वेंद्रियांसहित । मजमाजि सूनि चित्त । जे रात्रिदिवस न
उपासिती ३८ इयापरी जे भक्त । आपणपें मज देत । तेचि मी
परम मानीं ३९

**अन्वयार्थ**—(एवं)–अकराव्या अध्यायाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें–(सततयुक्ताः)–अहोरात्र—भगवत्कर्मादिकांत युक्त होऊन–(ये भक्ताः)–जे मंद व मध्यम भक्त–(त्वां)–तुला–(पर्युपासते)–भजतात–तुझें ध्यान करितात–(अपि च)–आणि–(ये)–जे भक्त–(अव्यक्तं अक्षरं पर्युपासते)–अव्यक्त ब्रह्माची उपासना -भक्ति–ध्यान करितात–(तेषां)–त्या दोन प्रकारच्या भक्तांतील–( योगवित्तमाः के )–अधिक योगवेत्ते कोण ? त्यांतील अधिक श्रेष्ठ भक्त कोण ? १

…पकलवीर्यशिरोमणि, सोमवंशाचा विजयध्वज, व पंडु…चा मुलगा जो अर्जुन, तो म्हणाला–२० हे श्रीकृष्णा, …का ? तुम्हीं जें मला विश्वरूप दाखविलें, तें अद्भुत …ामुळें माझ्या चित्तास भीति उत्पन्न झाली; …ाणि तुमच्या या सगुण मूर्तीची संवय असल्या…ाझ्या मनानें तिचीच आवड घेतली; परंतु देवा, …ाझा निषेध केला. २२ तरी साकार व निराकार …ही रूपें निःसंशय तुमचींच आहेत. सगुण भक्तीनें …ाची व निर्गुण उपासनेनें निर्गुणरूपाची प्राप्ति …े हे वैकुंठनायका श्रीकृष्णा, तुमची प्राप्ति करून …तां या दोन वाटा असून त्यांतील साकार व …हे. दोन उंबरे आहेत. २४ हें पहा–शंभर भार …ा सोन्याच्या गटास जो कस लागतो, तोच कस …टांतील थोडें सोनें निराळें करून त्यास लाविला लागतो; म्हणून व्यापक अथवा एकदेशीय रूपाची …ता सारखीच आहे. २५ अमृताच्या सागरांतून …का भरून घेतल्यास ज्या सामर्थ्याची थोरवी प्राप्त होते …थोरवी अमृताच्या लाटेपासून प्राप्त होते. २६ …ि माझ्या मनाचा अनुभव खरोखर हाच आहे, पण …करितां मला तुम्हांला कांहीं विचारावयाचें आहे; २७ …तुम्हीं जें क्षणभर व्यापकरूप धारण केलें होतें, तेंच …खरें स्वरूप किंवा ती लीला आहे, हें समजण्याची …ी इच्छा आहे. २८ तर जो आपली सर्व कर्में तुम…चकर्ता करतो, ज्याला तुमच्याशिवाय श्रेष्ठ असें जगतांत दुसरें कांहीं नाहीं; व ज्यानें आपलें सर्व मनोधर्म तुमच्या भक्तीला विकले आहेत; २९ याप्रमाणें, हे श्रीहरी, जे भक्त सर्वतोपरी तुमची मूर्ति हृदयांत धरून उपासना करतात; ३० आणि जें तुमचें स्वरूप ॐकारापलीकडे असून वाणीनें वर्णन करण्यास अशक्य, व कोणच्याही वस्तूबरोबर ज्याची तुलना होत नाहीं; ३१ जें अविनाशी, निराकार, स्थलरहित नामरहित आहे; आणि ज्याची ज्ञानी लोक हे सोहंभावानें उपासना करितात, ३२ त्या ज्ञान्यामध्यें व भक्तामध्यें, हे श्रीअनंता, खरा योग कोणास समजला तें सांगा. ३३ अर्जुनाच्या या बोलण्यानें जगद्बंधु श्रीकृष्ण संतोष पावून म्हणालेः वाहवा ! प्रश्न करण्याची शैली तुला फार चांगली साधली आहे ! ३४

**अन्वयार्थ**—( ये ) जे–( मयि )–माझ्या ठिकाणीं–माझ्या सगुण स्वरूपांत–(मनः)–मन–(आवेश्य)–स्थिर करून–माझ्या-सगुण विश्वस्वरूपांत मन लावून–( नित्ययुक्ताः )–सतत–अहोरात्र युक्तचित्त होऊन व–( परया श्रद्धया उपेताः )–अत्यंत श्रद्धेनें युक्त होऊन–(मां)–माझी–(उपासते)–उपासना करितात –मला भजतात–(ते)–ते सगुण भक्त–(मे)–मला–(युक्ततमाः)–अतिशय उत्तम भक्त–श्रेष्ठ उपासक, असे–( मताः )–संमत आहेत. सगुण ईश्वराची उपासना करणारे श्रेष्ठ असें मी समजतों. २

हें पहा–अस्तमानाच्या समयीं सूर्यबिंब नाहींसें झाल्यावर ज्याप्रमाणें त्याच्या मागें किरण जातात; ३५ किंवा, अर्जुना पावसाळ्यांत नदी अधिक वाढते, त्याप्रमाणें माझी भक्ति करितांना ज्याच्या ठिकाणीं नित्य नवी श्रद्धा दृष्टीस पडते; ३६ अथवा समुद्रास मिळाल्यावरही जिच्या मध्यें मागून अनिवार लाटा येतच असतात त्या गंगेप्रमाणें ज्यांच्या ठिकाणीं पूर्ण प्रेमभाव उचंबळत असतो; ३७ तसेंच, दिवस व रात्र मनांत न आणितां कायावाचामनेंकरून माझ्याच ठिकाणीं चित्त ठेवून जे माझी उपासना करितात; ३८ आणि याप्रमाणें जे भक्त आपणा स्वतांला माझे ठिकाणीं वाहून घेतात, त्यांनाच मी ‘ परम योगयुक्त ’ असें समजतों; ३९

---

१ अद्भुत. २ भिऊन गेलें. ३ संवय, चटक. ४ आवड. …निवारण केलें. ६ सगुण. ७ निर्गुण. ८ भक्तीनें. ९ दर…ानें. १० कस. ११ शंभर भार वजनाच्या लगडीला. …विश्वरूप. १३ सारखी योग्यता. १४ अनुभव. १५ … १६ विराटरूप. १७ अंतःकरणीं. १८ अपरिचित, अवघड. १९ सारखें. २० अविनाशी. २१ ‘ तो मी ’ या भावानें. २२ समयीं. २३ नित्य. २४ प्राप्त झाली, मिळाली असतांहि. २५ लोट, प्रवाह. २६ भर, अधिकपण. २७ मालून.

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते । सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥
संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः । ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

आणि येर तेही पांडवा । जे आरूढोनि सोहंभावा । झोंबती निरवयवा । अक्षरासी ४० मनाची नेंखी[1] न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे । इंद्रियां कीर जोगें । कायि होईल ४१ परि ध्यानाही कुवाडें[2] । म्हणोनि एके ठायीं न संपडे । व्यक्तीसि[3] माजिवडें[4] कवणेंही नोहे ४२ जया सर्वत्र सर्वपणें[5] । सर्वांही काळीं असणें । जें पावूनि चिंतवणें[6] । हिंपुटी[7] जाहलें ४३ जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे । ऐसें म्हणोनि उपायें । उपजतीचिना ४४ जें चळे ना ढळे । सरे ना मैळे । तें आपुलेनीचि बळें । आंगविलें जिहीं ४५ पैं वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें । अधपलीं[10] तवकें[11] । इंद्रियें धरिलीं ४६ मग संयमाची[12] थाटी[13] । सूनि[14] मुरडिलीं उफराटीं । इंद्रियें कोंडिलीं कपाटीं[15] । हृदयाचिया ४७ अपानींचिया[16] कवाडा । लावोनि आसनमुद्रा सुहाडा[17] । मूळबंधाचा हुडा[18] । पन्नासिला[19] ४८ आशेचे लोंग[20] तोडिले । अधैर्याचे कडे[21] झाडिले । निद्रेचें शोधिलें[22] । काळवखें[23] ४९ वज्राग्नीचिया[24] ज्वाळीं । करूनि सप्तधातूंची होळी । व्याधींच्या सिसाळीं[25] । पूजिलीं[26] यंत्रें ५० मग कुंडलिनियेचा टेंभा[27] । आधारीं केला उभा । तया चोजवले[28] प्रभा । निमथावरी[29] ५१ नवद्वारांचिया चौचकीं[30] । बाणूनि[31] संयतीची[32] ओवडंकी[33] । उघडली खिडकी । ककारांतींची[34] ५२ प्राणशक्तिचामुंडे[35] । प्रहारूनि[36] संकल्प मेंढे । मनोमहिषांचेनि[37] मुंडें[38] । दिधली बळी ५३ चंद्रसूर्यां[39] बुझावणी । करूनि अनुहताची सुडावणी । सतरावियेचें पाणी । जिंतिलें वेगीं ५४ मग मध्यमा मध्य विवरें । तेणें कोरिवें दादरें । ठाकिलें चंवरें[45] । ब्रह्मरंध्र ५५ वरी मकारांत[46] सोपान । तें सांडोनियां गहन । काखेसूनियां गगन । भरलें ब्रह्मीं ५६ ऐसे जे समबुद्धी । गिळावया सोहंसिद्धी । आंगवितात निरवधी । योगदुर्गें[52] ५७ आपुलिया साटोवाटीं[53] । शून्य[54] घेती उठाउठी । तेही मातेंचि किरीटी । पावती गा ५८ वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे । ऐसें नाहीं आंगळें[55] । कष्टचि तयां ५९

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

जिहीं सकळभूतांचिया हितीं । निरालंबीं अव्यक्तीं । पसरलिया आसक्ती । भक्तीवीण ६० तयां महेंद्रादि पदें । करिताति वाटवघें[56] । आणि ऋद्धिसिद्धींचीं

**अन्वयार्थ**—( तु ) पण-( ये सर्वत्र समबुद्धयःसर्वभूतहिते रताः)-जे सर्व ठिकाणीं समबुद्धि-प्रत्येक वस्तुमध्यें ब्रह्मबुद्धि-ठेवणारे व सर्व प्राण्यांच्या हितामध्यें निमग्न असलेले निर्गुणोपासक-निर्गुण ब्रह्माची उपासना करणारे भक्त-(इन्द्रियग्रामं संनियम्य)-सर्व इंद्रियांचें संयमन करून-सर्व इंद्रियांना आपल्या ताब्यांत ठेवून-(अनिर्देश्यं)-ज्याचा नांवानें निर्देश करितां येत नाहीं,-(अव्यक्तं)-जे व्यक्त नाहीं,-(सर्वत्रगं)-सर्व सृष्टींत व्यापून राहणारें, (अचिंत्यं)-ज्याचें चिंतनहि करतां येत नाहीं-(कूटस्थं)-ज्याच्यामध्यें कोणताहि विकार होत नाहीं-(अचलं)-जे आपल्या अवस्थेपासून ढळत नाहीं,-(ध्रुवं)-म्हणूनच जें नित्य आहे अशा-(अक्षरं)-अक्षराची-ब्रह्माची-( पर्युपासते)-उपासना करितात-त्याचें अहोरात्र ध्यान करितात-(ते)-ते निर्गुण ब्रह्माची उपासना करणारे-(मां एव)-मलाच-(प्राप्नुवन्ति)-प्राप्त होतात. ते मलाच ६० निर्गुण ब्रह्माला प्राप्त होतात. ३-४

आणि अर्जुना, दुसरे माझे जे ज्ञानी भक्त आहेत, ते 'आपण ब्रह्म आहों' अशी वृत्ति धरून, निराकार जें ब्रह्म तें प्राप्त करून घेण्याची खटपट करितात, ४० जें मनाला अचिंत्य, व बुद्धीला न समजणारें, तें इंद्रियांना कसें समजेल ? ४१ परंतु ध्यानासही गूढ असल्यामुळें जें एके ठिकाणीं सांपडत नाहीं, व ज्याला कोणताही आकार नाहीं; ४२ जें सर्व ठिकाणीं सर्व रूपानें नेहमीं असतें; व ज्याची प्राप्ति झाली असतां चिंतन आपोआप थांबतें; ४३ जें कधीं झालेंही नाहीं, व होणारही नाहीं; तसेंच, जें आहे असेंही नाहीं, व नाहीं असेंही नाहीं म्हणजे ज्याच्या प्राप्तीविषयीं उपायच नाहीं, ४४ जें चालत नाहीं व हालतही नाहीं, जें संपत नाहीं व दूषितही होत नाहीं, तें ज्यांनीं आपल्या अंगबळानें स्वाधीन करून घेतलें आहे; ४५ वैराग्यरूप मोठ्या अग्नीनें विषयरूप सैन्य जाळून जे आपली होरपळलेली इंद्रियें मोठ्या कष्टानें धारण करतात; ४६ मग आत्मसंयमनाचे पाशानें उरफाटी करून हृदयाच्या गुहेंत, ती कोंडतात, ४७ अपानवायूच्या द्वाराला आसनाची बळकट मुद्रा लावून मुळबंधाचे बुरूज उभे करतात; ४८ आशेचे संबंध तोडून व अधीरपणाचे कडे दूर करून निद्रारूप अंधार नाहींसा करितात; ४९ मूळबंध आसनाच्या ज्वालाग्नीनें शरीरांतील सप्तधातूंची होळी करून व्याधींचीं शिरें षट्चक्रांस अर्पण करितात; ५० मग कुंडलिनीचा टेंभा आधारचक्रावर उभा करून त्या उजेडांत आनंदानें मस्तकापर्यंत जातात; ५१ नवद्वारांच्या चौकींत इंद्रियनिग्रहाचा अडसर घालून सुषुम्ना नाडीची वाट मोकळी करतात; ५२ प्राणशक्तिरूप चामुंडादेवीप्रीत्यर्थ संकल्परूपी मेंढें मारून मनोरूपी महिषासुराचें मस्तक बळी देतात; ५३ इडा व पिंगला या नाड्यांचें ऐक्य करून व अनुहतध्वनीचा गजर करून जीवनकलेच्या तलावापर्यंत जाऊन ठेपतात; ५४ मग सुषुम्ना नाडीच्या मध्य विवरांतील कोरींव दादरानें वर चढून मस्तकांतील ब्रह्मरंध्रापर्यंत मजल गांठतात; ५५ नंतर मकाराचा कठीण जिना चढून व माया खांकेंस मारून, ब्रह्मास मिळतात; ५६ याप्रमाणें सर्वत्र सारखी बुद्धि ठेवून ब्रह्मप्राप्ति करून घेण्याकरितां योगादिक कठीण मार्ग वेळ न लावतां स्वाधीन करून घेतात. ५७ अशा प्रकारें, अर्जुना, आपली अदलाबदल निरवयवाशीं करतात, तेही मलाच येऊन मिळतात. ५८ बाकी योगाच्या बळानें त्यांना अधिक कांहीं प्राप्ती होते असें नाहीं; उलट जास्त यातना मात्र सोसाव्या लागतात ! ५९

**अन्वयार्थ**—(अव्यक्तासक्तचेतसां तेषां)-अव्यक्त ब्रह्मामध्यें ज्यांचें मन आसक्त झालें आहे अशा त्यांना-(क्लेशः)-क्लेश-दुःख-( अधिकतरः )-सगुणोपासकांपेक्षां पुष्कळच अधिक होतें.-(हि)-कारण-( देहवद्भिः )-व्यक्त देहावर अभिमान ठेवणाऱ्यां-' हा देहच मी' असें समजणाऱ्या लोकांना -(अव्यक्ता गतिः)-अव्यक्त ब्रह्माची गति-(दुःखं)-मोठ्या कष्टानें-(अवाप्यते)-प्राप्त होते. म्हणून निर्गुणोपासकांपेक्षां सगुणोपासक चांगले. ५

प्राणिमात्राला प्रिय, अनाश्रित, व अव्यक्त असें जें ब्रह्म, तें भक्तिशिवाय प्राप्त करून घेण्याची जे इच्छा करितात, ६० त्यांना वाटमारी थशी जीं इंद्रादिक पदें, तीं माळ घालतात; आणि ऋद्धिसिद्धीची-

१ नख स्पर्शत नाहीं. २ गूढ. ३ आकारास. ४ मध्यें. ५ सारखें. ६ चिंतन, चिंतणें. ७ साध्य, कष्टी. ८ स्वाधीन केलें. ९ सैन्यें. १० तप्त झालेली. ११ धैर्यानें. १२ इंद्रियनिग्रहाची. १३ फांस. १४ घालून. १५ गुहेंत. १६ अपानवायूच्या. १७ दृढ, चांगली. १८ बुरूज. १९ झुगारिला. २० संबंध. २१ ढगार, अपात, २२ नाहींसे केलें. २३ काळोख. २४ मूळबंधोत्पन्न ज्वालाग्नीनें. २५ शिरांची पंक्ती. २६ सोफा, बंदुका, व्याधींची मस्तकें तोफेनें पूजिलीं ( व्याधींचा नाश केला. ) २७ पलिता. २८ आनंदानें गेले. २९ मस्तकापर्यंत ३० कवाडांत, दारांत. ३१ घालून. ३२ इंद्रियनिग्रहाची. ३३ खीळ. ३४ सुषुम्ना नाडीची. ३५ प्राणशक्तिरूप चामुंडा देवीला. ३६ मारून ३७ मन हाच रेडा त्यांच्या. ३८ डोकीं, मस्तकें. ३९ इडा व पिंगळा नाड्यांनीं ऐक्य. ४० 'अनाहत' नांवाच्या योगसाधनानें ऐकूं येणारा दश नादांचा ध्वनि आहे. ४१ गजर. ४२ जीवनकलेचें. ४३ सुषुम्नानाडीचें. ४४ प्राप्त केलें, मिळविलें. ४५ शेवटलें. ४६ दरामदार. ४७ जिना. ४८ मार्गी टाकून. ४९ कांखेस मारून. ५० मिळालें. ५१ स्वाधीन करून घेतात. ५२ योगाचे कठिण मार्ग. ( किल्ले ) ५३ मोबदल्यास. ५४ अव्यक्त ब्रह्म. ५५ विशेष. ५६ वाटमारेपणा.

द्वंद्वें । पडोनि ठाती ६१ कामक्रोधांचे विलग[1] । उठावती अनेग । आणि शून्येंसीं आंग । झुंजवावें कीं ६२ ताहानें ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी । अहोरात्र वांवीं[2] । मवांवा[3] वारा ६३ उंनें[4] दिहाचें पहुडणें[5] । निरोधाचें वेल्हांवणें[6] । झाडासि सांजणें[7] । चांळावें गा ६४ शीत वेढावें[8] । उष्ण पांघुरावें । वृष्टीचिया असावें । घराआंतु ६५ किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नीच नवा । भ्रतारेंवीण करावा । तो हा योगु ६६ एथ स्वामीचें काज । ना बांपिकें[10] व्यांज[11] । पारि मरणेंसीं झुंज । नित्य नवें ६७ ऐसें मृत्युहूनि तिख । कां घोंटे कढत विख । डोंगर गिळतां मुख । न फाटे काई ६८ म्हणोनि योगाचियां वाटा । जे निगाले गा सुभटा । तयां दुःखाचाचि वांटा । भागा आला ६९ पाहें पां लोहाचे चणे । जैं बोचरिया[12] पडती खाणें । तैं पोट भरणें कीं प्राणें । शुद्धी होय ७० म्हणोनि समुद्र बाहीं[13] । तरणें आथि केंहीं[14] । कां गगनामाजि पाईं । खोलिअंतु[15] असे ७१ वळघालिया[16] रणाची थांटी । आंगीं न लगतां कांठी[17] । सूर्याची[18] पाउटी । कां होये गा ७२ यालागीं पांगुळा हेवा[19] । नव्हे वायूसि पांडवा । तेवीं देहवंता जीवां । अव्यक्तीं गती ७३ ऐसाही जरी धिवंसा[20] । बांधोनियां आकाशा । झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ७४ म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा । जे कां भक्तिपंथा । वोटंगले[21] ७५

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः । अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥६॥

कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्में अशेखें[22] । जियें कां वर्णविशेखें[23] । भागा आलीं ७६ विधीतें[24] पाळित । निषेधातें गाळित । मज देऊनि जाळित । कर्मफळें ७७ ययापरी पाहीं । अर्जुना माझे ठाईं । संन्यासूनि नाहीं[25] । करिती कर्में ७८ आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव । तयां मीवांचूनि धांव[26] । आनौती[27] नाहीं ७९ ऐसे जे मत्पर[28] । उपासिती निरंतर । ध्यानमिषें घर । माझें झाले ८० जयांचिये आवडी । केली मजशीं कुळवाडी[29] । भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ८१ ऐसें अनन्ययोगें । विकलें जीवें मनें आंगें । तयांचें कायि एक सांगें । जें सर्व मी करीं ८२

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् । भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥

किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा । तो मातेचा सोयरा[30] । केतुला[31] पां ८३ तेवीं मी तयां । जैसे असती तैसियां । कळिकाळें[32] नोकोनियां[33] । घेतला

जोडी ब्रह्मप्राप्तीच्या आड येते. ६१ कामक्रोधादि पुष्कळ उपद्रव उत्पन्न होतात, व निराकार परब्रह्माची प्राप्ति करून घेण्याकरितां त्यांना शून्याशी ( आकाशाशी ) झगडावें लागतें. ६२ तहान लागली असतां तीच पिऊन तृप्त व्हावें लागतें. भूक लागली असतां तीच खाऊन समाधान करावें लागतें, व रात्रंदिवस हाताच्या वावांनी निराकाराच्या प्राप्तीकरितां वाराच मोजावा लागतो; ६३ दिवसा उन्हांत निजणें, स्वैर इंद्रियांचा निरोधरूपी उपभोग घेणें, व झाडांबरोबर मित्रभावानें खेळणें; ६४ थंडी नेसणें, ऊन पांघरणें, व पावसांत बसणें, ६५ किंबहुना अर्जुना, पतीशिवाय रोज सती जाणें, अशा प्रकारचा हा योग होय. ६६ या ठिकाणी पतीकरितां अग्निप्रवेश करण्याचें किंवा हव्यकव्याचें निमित्त नसूनही मृत्युबरोबर नित्य नवी लढाई करावी लागते. ६७ असें मृत्युहूनही तिखट व कडवट जें विष, तें गिळवेल का? अरे! डोंगर गिळतांना तोंड नाहीं का फाटणार? ६८ म्हणून, हे महावीरा, जे असे योगसाधन करण्यास निघाले त्यांच्या नशीबी दुःखाचा शेलकाच वांटा आला! ६९ हें पहा—लोखंडाचे चणे जेव्हां बोथऱ्याला खाण्याचा प्रसंग येतो, तेव्हां त्याचें पोट भरेल का प्राण जाईल हें कांहीं समजत नाहीं! ७० म्हणून, समुद्र कोणी बाहूंनी तरून गेला आहे का? किंवा आकाशांत कोणी पायांनी चालला आहे का? ७१ समरांगणात गेल्यावर अंगावर समोरून वार न होतां सूर्यलोक प्राप्त होईल का? ७२ वास्तव, अर्जुना ज्याप्रमाणें पांगळ्याला वायूबरोबर धांवण्याची पैज मारतां येणार नाहीं, त्याप्रमाणें देहाभिमानी जीवाला निराकाराची प्राप्ति होणार नाहीं. ७३ असें असूनही मनांत इच्छा धारण करून जे अव्यक्तप्राप्तीविषयी झटतात, ते क्लेशास पात्र होतात. ७४ म्हणून, पार्था, ज्यांनीं भक्तिमार्गाचा स्वीकार केला आहे, त्यांना असे कष्ट सोसावे लागत नाहींत. ७५

**अन्वयार्थ**—(तु)–पण–(पार्थ)–हे अर्जुना–(ये)–जे मत्परमभक्त–(मयि)–माझे ठिकाणीं–(सर्वाणि कर्माणि संन्यस्य)–सर्व कर्मांचा संन्यास करून–सर्व कर्में मला अर्पण करून–(मत्पराः)–मत्परायण होऊन–मीच ज्यांना श्रेष्ठ आहें, मजवांचून दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं, असें होऊन–(अनन्येन एव योगेन)–विश्वरूप परमेश्वर जो मी, त्या मला सोडून दुसऱ्या कोणाच्याहि ठिकाणीं ज्यांचें चित्त जात नाहीं, अशा अनन्य योगानेंच–केवळ माझ्याच ठिकाणीं चित्ताला स्थिर करून–(मां ध्यायन्तः)–माझें ध्यान करणारे [असे जे] भक्त–(उपासते)–माझी भक्ति करितात. ६

आपल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें जीं कर्में करावयाचीं, तीं सर्व कर्में इंद्रियें सुखानें आचरतात; ७६ सर्व कर्में यथाविधि मला अर्पण करून, व निषिद्ध कर्में टाकून कर्मांपासून होणारी फळें जाळून टाकतात; ७७ याप्रमाणें अर्जुना, सर्व कर्में मला अर्पण करून कर्मनाश करतात; ७८ आणखी कायिक, वाचिक, मानसिक जीं जीं कर्में करण्याची इच्छा ज्यांना असते, त्यांनाही माझ्याशिवाय दुसरी सोयच नसते. ७९ असे जे निरंतर माझी सेवा करून मत्पर होतात, ते माझ्या ध्यानाच्या निमित्तानें माझें राहण्याचें ठिकाण होतात. ८० यांची आवड माझ्याशीं व्यवहार करून बिचारी मुक्ति व भुक्ति हीं गरीब कुळें टाकून देते; ८१ याप्रमाणें अनन्यभावानें ज्यांनीं आपला जीव, मन व शरीर मला अर्पण केलें त्यांची एकादी गोष्ट मी करतों असें काय सांगूं? कारण, त्यांच्या सर्व इच्छा मलाच पूर्ण कराव्या लागतात. ८२

**अन्वयार्थ**—(मयि)–माझ्या ठिकाणीं–(आवेशितचेतसां तेषां)–ज्यांनीं आपलें चित्त स्थिर ठेवलें आहे, अशा त्यांचा–(अहं)–मी–(न चिरात्)–अगदीं लवकर–(मृत्युसंसारसागरात्)–मृत्यूनें युक्त अशा या संसारसागरापासून–(समुद्धर्ता)–उत्तमप्रकारें उद्धार करणारा–(भवामि)–होतों. ७

किंबहुना पार्था, जो आपल्या मातेच्या उदरीं जन्म घेतो, तो तिचा कितपत आवडता असतो हें सांगावयास नको. ८३ त्याचप्रमाणें, माझे भक्त कोणी व कसलेही असोत त्यांना मी आवडता आहें व तेही मला आवडते आहेत; आणि त्यांना जे त्रास देणारे असतील त्यांचा नाश करण्याचा

१ उपद्रव. २ हाताच्या वावांनीं. ३ मोजावा. ४ जागृतीचें. ५ निजणें. ६ विहार, क्रीडा करावी. ७ मित्रभावानें. ८ बोलावें. ९ नेसावें. १० कुळपरंपरागत. ११ निमित्त. १२ बोथऱ्याला, दांत पडलेल्याला. १३ बाहूबळानें. १४ कोठेंही. १५ मारतां येते काय? १६ शत्रूचे सैन्यावर तुटून पडल्यानंतर. १७ वार, प्रहार. १८ सर्व लोकाची पायरी मिळते का? १९ पैज. २० धैर्य. २१ आश्रम करून राहिले. २२ सर्व. २३ स्ववर्णानुसार. २४ कर्तव्यकर्मांतें. २५ नाहींतशी. २६ सोय. २७ अन्य, दुसरी. २८ माझ्याच ठिकाणीं, एकनिष्ठ. २९ व्यवहार. ३० आवडता. ३१ कितपत. ३२ त्रास देणारे. ३३ पराभवून, झांकून.

पट्टा ८४ एऱ्हवीं तरी माझिया भक्तां। आणि संसाराची चिंता। काय समर्थाची कांता। कोरान्न मागे ८५ तैसे ते माझे। कलत्र हें जाणिजे। कायिसेनिही न लाजे। तयांचेनि मी ८६ जन्ममृत्यूचिया लोटीं। झळंबती इया सृष्टी। तें देखोनियां पोटीं। ऐसें जाहलें ८७ भवसिंधूचेनि माजें। कवणासि धाकु नुपजे। तेथ जरी कीं माझे। बिहिती हन ८८ म्हणोनि गा पांडवा। मूर्तीचा मेळावा। करूनि त्यांचिया गांवा। धांवतु आलों ८९ नामाचिया सहस्रवरी। नावा इया अवधारीं। सजूनियां संसारीं। तारू जाहलों ९० सडे जे देखिले। ते ध्यानकांसे लाविले। परिग्रहीं घातले। तरियांवरी ९१ प्रेमाची पेटी। बांधली एकाचिया पोटीं। मग आणिले तटीं। सायुज्याचिया ९२ पारे भक्तांचेनि नांवें। चतुष्पदादि आघवे। वैकुंठींचिये राणिवे। योग्य केले ९३ म्हणोनि गा भक्तां। नाहीं एकही चिंता। तयांतें समुद्धर्ता। आथि मी सदा ९४ आणि जेव्हांचि कां भक्तीं। दिधली आपुली चित्तवृत्ती। तेव्हांचि मज सूती। त्यांचिये नाटीं ९५ याकारणें गा भक्तराया। हा मंत्र तुवां धनंजया। शिकिजे जैं यया। मार्गा भजिजे ९६

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय। निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः॥ ८॥

अगा मानस हें एक। माझ्या स्वरूपीं वृत्तिक। करूनि घाली निष्टंक। बुद्धि निश्चयेसीं ९७ इयें दोन्हीं सरिसीं। मजमाजि प्रेमेंसीं। रिगालीं तरी पावसी। मातें तूं गा ९८ जे मन बुद्धि इहीं। घर केलें माझ्या ठायीं। तरि सांगें मग काई। मी तूं ऐसें उरे ९९ म्हणोनि दीप पालवे। सवेंचि तेज मालवे। कां रविबिंबासवें। प्रकाशु जाय १०० उचललेया प्राणासरिसीं। इंद्रियेंही निगती जैसीं। तैसा मनोबुद्धिपाशीं। अहंकारु ये १ म्हणोनि माझिया स्वरूपीं। मन बुद्धि इयें निक्षेपीं। येतुलेनि सर्वव्यापी। मीचि होसी २ यया बोला कांहीं। अनारिसें नाहीं। आपली आण पाहीं। वाहतु असें गा ३

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्। अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय॥९॥

अथवा हें चित्त। मनबुद्धिसहीत। माझ्या हातीं अचुंबित। न शकसी देवों ४ तरि गा ऐसें करीं। यया आठां पाहारांमाझारीं। मोटकें निमिषभरी। देतु जाय ५ मग जें जें कां निमिखें। देखेल माझें सुख। तेतुलें अरोचक। विषयीं घेईल ६ जैसें शरत्कालु रिगे। आणि सरिता वोहटूं लागे। तैसें चित्त काढेल वेगें। प्रपंचौनी ७ मग पुनवेहूनि जैसें। शशिबिंब दिसेंदिसें। हारपत

मीं पतकरच घेतला आहे. ८४ बाकी माझ्या भक्तांना संसाराची चिंता कां असावी ? हें पहा-श्रीमंताच्या बायकोला कधीं कोराम मागण्याचा प्रसंग येईल का ? ८५ याचप्रमाणें, माझे भक्त माझ्या कुटुंबापैकींच आहेत असें मी समजतों; अर्थात् त्यांना कोणतेंही संकट आलें तर त्यांची लाज मला नाहीं का ? ८६ माझे भक्त या सृष्टींत जन्ममृत्यूच्या लाटांत बुडताहेत असें पाहून माझ्या मनांत असें आलें ८७ कीं, भवसागराच्या लाटांची कोणाला भीति वाटत नाहीं ! अर्थात् त्यांची माझ्या भक्तांनाही भीति वाटतेच; ८८ म्हणून, अर्जुना, रामकृष्णादि अवतार घेऊन या मृत्युलोकीं त्यांच्या गांवीं मी धांव घेतली; ८९ माझ्या सहस्रनामरूपी नावा तयार करून या संसाररूप सागरांत मी त्यांना तारक झालों, असें समज. ९० जे उपाधिरहित होते, त्यांना मी आपलें ध्यान करण्यास सांगितलें व जे परिवारासह आले त्यांना नावेवर बसण्यास सांगितलें [ त्यांना नामस्मरण करण्यास सांगितलें ] ९१ कांहीं भक्तांच्या पोटाला प्रेमरूपी सांगड बांधून त्यांना मुक्तिरूप तटाला आणलें ९२ परंतु ज्यांनी म्हणून आपल्यास माझे भक्त म्हणविलें मग ते चतुष्पाद का असेनात -त्यांना मी वैकुंठाच्या राज्यावर बसण्यास योग्य केलें. ९३ म्हणून, माझ्या भक्तांना कसलीही चिंता उत्पन्न होत नाहीं; कारण त्यांना तारणारा मी सदोदित उभा आहें, ९४ आणि ज्यावेळेस भक्त आपली चित्तवृत्ति माझ्या ठिकाणीं अर्पण करितात, त्याच वेळेस ते आपल्या छंदांत मला घालतात. ९५ त्याच कारणास्तव, हे भक्तराया धनंजया, जर तुला या भक्तिमार्गाला लागायचें असेल तर सर्व चित्तवृत्ति मला अर्पण करण्याचा हा मंत्र शिक. ९६

**अन्वयार्थ**--(मयि एव)-माझ्यामध्येंच-(मनः)-आपलें मन-( आधत्स्व )-स्थिर कर; तूं आपल्या मनाला माझ्या सगुण विश्वरूपांत स्थाप-(मयि बुद्धिं निवेशय)-माझ्यामध्यें निश्चय करणाऱ्या बुद्धीला प्रविष्ट कर. तिलाहि माझ्या स्वरूपांतच राहूं दे. तूं आपलें मन व बुद्धि या दोन्ही चित्तवृत्तींना माझ्याच ठिकाणीं स्थिर केलेंस म्हणजे-(अतः ऊर्ध्वं)-मेल्यावर-(मयि एव)-माझ्या ठिकाणींच-(निवसिष्यसि) -तूं राहशील-( न संशयः )-यांत कांहीं शंका नाहीं. ८

अरे, मन व बुद्धि हीं निश्चयानें माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं वतनदार करून ठेव. ९७ याप्रमाणें हीं दोन्हीं ( मन व बुद्धि ) प्रेमानें माझ्या स्वरूपांत बरोबर रीतीनें एकत्र होऊन माझ्या ठिकाणीं प्रविष्ट झालीं, म्हणजे तूं मलाच येऊन मिळशील. ९८ कारण, मन व बुद्धि यांनीं माझ्या ठिकाणीं वास्तव केल्यावर, तूं व मी अशा प्रकारचा दुजेपणा उरेल का सांग बरें ? ९९ म्हणून, दिवा मालवल्यावरोबर ज्याप्रमाणें त्याचें तेज नाहींसें होतें, किंवा सूर्यबिंब मावळल्याबरोबर प्रकाश नाहींसा होतो, १०० अथवा बाहेर निघूं पहाणाऱ्या प्राणाबरोबर सर्व इंद्रियें हीं जशीं बाहेर निघतात, त्याप्रमाणें मन व बुद्धि यांपाशीं अहंकार आपोआप येतो. १ म्हणून माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं मन बुद्धि हीं दोन्ही कायम ठेव; एवढ्यानेंच सर्वव्यापक असा जो मी तोच तूं होशील. २ अर्जुना, मी आपल्या गळ्याची शपथ वाहून सांगतों कीं, या माझ्या बोलण्यांत एक अक्षर देखील खोटें नाहीं. ३

**अन्वयार्थ**--(अथ)-आतां जर ( मीं वर सांगितल्याप्रमाणें )-(मयि)-माझ्या ठिकाणीं-(चित्तं)-आपल्या मनाला -(स्थिरं)-अचल-(समाधातुं)-स्थापावयास-(न शक्नोषि)-तूं समर्थ नसशील.-(ततः)-तर मग-हे धनंजय-हे अर्जुना ! -(मां)-मला-(अभ्यासयोगेन)-अभ्यासयोगानें-मनाला वारंवार आंवरून धरून माझ्याच ठिकाणीं तें स्थिर करण्याचा प्रयत्न करणें, या अभ्यासपूर्वक योगानें-(आप्तुं)-प्राप्त होण्याची -(इच्छ)-तूं इच्छा कर. ९

अथवा, जर मन व बुद्धि यांसहित तूं आपलें चित्त माझ्या ठिकाणीं पूर्णपणें अर्पण करण्यास समर्थ नसशील, ४ तर असें कर कीं, या आठ प्रहरांमध्यें कांहीं क्षण तरी मन व बुद्धि यांना माझ्याकडे लाव. ५ मग तुझ्या मनाला माझ्या समागमसुखाचा अनुभव येईल, तितका वेळपर्यंत त्याला विषयाची अरुचि उत्पन्न होईल. ६ मग, ज्याप्रमाणें शरदृतु सुरू झाला म्हणजे नद्यांचें पाणी कमी होऊं लागतें, त्याप्रमाणें, जसजसें माझ्या ठिकाणीं तुझें चित्त गुंतेल, तसतसें तें प्रपंचांतून बाहेर निघेल. ७ अथवा, ज्याप्रमाणें पौर्णिमेपासून चंद्रबिंब दिवसानुदिवस कमी होत जा-

१ अधिकार, पतकर. २ कोरडी भिक्षा. ३ लाटांनीं. ४ बुडतात. ५ भितात. ६ अवतार. ७ समुदाय. ८ तारक. ९ उपाधिरहित. १० गृहस्थ, सपरिवार, खटलेवाले. ११ नावावर. १२ सांगड. १३ मुक्तीच्या. १४ पशु वगैरे गजेंद्रादि. १५ राज्याला. १६ उद्धरणारा. १७ प्रवेश, संबंध. १८ खेळांत ( प्रपंचरूपी खेळ माझ्याशीं खेळतात. ) १९ वृत्तींसह. वतनदार. २० अव्याहत, सिद्धांतपूर्वक. २१ मालवतांच, पदर देतांच. २२ प्राण चालल्याबरोबर. २३ ठेव. २४ खोटें, अन्य, वेगळें. २५ समय. २६ प्रहरांमध्यें. २७ अल्प. २८ क्षणभर. २९ क्षण. ३० अरुचि, नावड. ३१ सुरू झाला. ३२ आटूं लागतें. ३३ प्रपंचांतून.

अंवसे । नाहींचि होय ८ तैसें भोगाआंतुनि निगतां । चित्त मजमाजि रिगतां । हळू हळू पांडुसुता । मीचि होईल ९ अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे । येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ११० पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गति अंतराळें । व्याघ्र सर्प प्रांजळे । केलें एकीं ११ विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं वाग्ब्रह्म थोकेंडें । अभ्यासें केलें १२ म्हणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं । यालागिं माझ्या ठायीं । अभ्यासें मीळ १३

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव । मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥

कां अभ्यासाही लागीं । कसु नाहीं तुझिया आंगीं । तरी आहासी जया भाँगीं । तैसाचि असें १४ इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं । अभिमानु न संडीं । स्वजातीचा १५ कुळधर्मु चाळीं । विधिनिषेध पाळीं । मग सुखें तुज सरेळी । दिधली आहे १६ परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये । तो मी करितु आहें । ऐसें न म्हण १७ करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे । विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि १८ उणयापुरेयाचें कांहीं । उरों नेदीं आपुलिया ठायीं । स्वजाती करूनि घेईं । जीवित्व आपुलें १९ माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें । तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा १२० म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती । इयें वोझीं नेघें मती । अखंड चित्तवृत्ती । माझ्या ठायीं २१ एऱ्हवीं तरी सुभटा । उजू कां अव्हांटा । रथु काई खटपटा । करितु असे २२ आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे । निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायीं २३ ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना । तूं सायुज्य सदना । माझिया येसी २४

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः । सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

ना तरी हेंही तुज । नेदवे कर्म मज । तरी गा तूं बुझ । पांडुकुमरा २५ बुद्धीचिये पाठीं पोटीं । कर्माआदि कां शेवटीं । मातें बांधणें किरीटी । दुवाड जरी २६ तरि हेंही असो । सांडीं माझा अतिसो । पारि संयतिसीं वसो । बुद्धि तुझी २७ आणि जेणें जेणें वेळे । घडतीं कर्में सकळें । तयांचीं तियें फळें । त्यजितु जाय २८ वृक्ष कां वेली । लोटेती फळें आलीं । तैसीं सांडीं निपजलीं । कर्में सिद्धें २९ परि मातें मनीं धरावें । कां मजउद्देशें करावें । हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्यीं १३० खडकीं जैसें वर्षलें । कां आगीमाजि पेरिलें । कर्म मानीं देखिलें । स्वप्न जैसें ३१ अगा आत्मजेच्या विषीं ।

ऊन आमावास्येला नाहींसें होतें, ८ त्याप्रमाणें, अर्जुना तें चित्त हळूं हळूं विषयोपभोगापासून निघून माझ्या ठिकाणीं लागतां लागतां शेवटीं मद्रूपच होऊन जाईल! ९ अरे, अभ्यासयोग ज्याला म्हणतात तो हाच एक असें समज. यापासून प्राप्त होणार नाहीं अशी कोणतीही वस्तु नाहीं! ११० अभ्यासाच्या बळानें कोणी अंतरिक्षांत फिरतात, कोणी वाघ, सर्प यांना देखील निर्वैर करतात. ११ विष सुद्धां पचनीं पडतें, समुद्रावरही पायवाट होते, व कोणी कोणी तर अभ्यासाच्या योगानें वेदांसही हस्तगत करून घेतलें आहे; १२ म्हणून, अभ्यास केला असतां कोणतीही वस्तु प्राप्त होणारी नाहीं असें नाहीं. याकरितां अभ्यासाच्या योगानें तूं मला येऊन मीळ. १३

**अन्वयार्थ**—(अभ्यासे अपि)-वर जसा सांगितला तसा अभ्यास करण्यासहि-[ चेत्-जर तूं ]-(असमर्थः)-असमर्थ-(असि)-असशील तर मग-(मत्कर्मपरमः भव)-माझ्यासाठीं कर्म करणें, हेंच एक काम कर. ईश्वरासाठीं कर्म करणें हेंच आपलें मुख्य कर्तव्य समज. कारण-(मदर्थं अपि)-माझ्यासाठींहि-(कर्माणि-कुर्वन्)-कर्मे करणारा असा तूं (सिद्धिं)-सिद्धीला-चित्तशुद्धि, योग-ज्ञानप्राप्ति या क्रमानें मोक्ष या सिद्धीस-(अवाप्स्यसि)-प्राप्त होशील. १०

किंवा अभ्यास करण्याची जर तुझ्या अंगांत शक्ति नसेल तर तुझ्या आचरणाचा जो क्रम असेल तो तसाच चालीव. १४ इंद्रियांना कोंडूं नको, उपभोग कमी करूं नको, आणि आपल्या स्वजांच्या जातीचा अभिमान सोडूं नको; १५ आपलें कुळधर्म कुळाचार यथाविधि कर; जीं कर्में करण्यास योग्य असतील तीं कर; व करण्यास अयोग्य असतील तीं करूं नको. याप्रमाणें सुखानें वागण्याची तुला मोकळीक दिली आहे. १६ परंतु कायावाचामनेंकरून जे व्यापार होतील, ते 'मी करतों' असें म्हणूं नको. १७ जो परमात्मा या विश्वाचा चालक आहे, तो कर्मांचा कर्ता कोण व कर्म न करणारा कोण हें सर्व जाणतो आहे. १८ अमुक कर्म कमी झालें व अमुक कर्म जास्ती झालें, याविषयीं आपल्या मनांत खेद मानूं नको, व तूं आपलें जीवित परमात्म्याशीं एकरूप करून टाक. १९ ज्याप्रमाणें, माळी नेईल तिकडे पाणी हें निवांतपणें जातें, त्याप्रमाणें मनांतील कर्तृत्वाभिमान टाकून आपणही व्हावें. १२० म्हणजे प्रवृत्तिनिवृत्तीचें ओझें बुद्धी आपल्यावर घेत नाहीं, कारण चित्तवृत्ति माझ्या ठायीं अखंड असते. २१ याकरितां अर्जुना, वाट सरळ आहे किंवा वांकडी आहे, याविषयीं रथाला कांहीं काळजी आहे का? जिकडे त्यास न्यावें तिकडे तो जातो; २२ त्याचप्रमाणें जें जें कर्म तूं करशील, तें थोडें किंवा पुष्कळ आहे असें न म्हणतां एकनिष्ठेनें मला अर्पण कर. २३ अर्जुना, अशा प्रकारें तूं सर्व कर्मांविषयीं माझ्याच ठिकाणीं भावना धरलीस, (सर्व कर्में मलाच अर्पण केलींस ) म्हणजे शरीरत्यागानंतर तूं मत्पदालाच येशील. २४

**अन्वयार्थ**—(अथ) [ चेत ]-आतां जर-(एतत् अपि)-हेंही-(कर्तुं)-करण्यास तूं-(अशक्तः)-असमर्थ-(असि)-असशील-(ततः)-तर मग-(मद्योगं)-सर्व कर्में मला अर्पण करून त्यांचें अनुष्ठान करणें या योगाचा-(आश्रितः)-आश्रय करून व-(यतात्मवान्)-आपल्या चित्ताचें संयमन करून-(सर्वकर्मफलत्यागं)-सर्व कर्मांच्या फलांचा त्याग-(कुरु)-कर. ११

किंवा हे पांडुकुमारा, जर तुझ्यानें मला कर्में अर्पण करवणार नाहींत, तर तूं असें समज; १५ कर्म करण्याला उद्युक्त करणारी जी बुद्धि तिच्या अगोदर किंवा पाठीमागून, अथवा कर्मांच्या अगोदर किंवा अंतीं माझी आठवण करणें तुला जर कठीण वाटलें, २६ तर माझी अर्चेवर आठवण करणें हेंही एका बाजूस राहूं दे; परंतु तूं आपल्या बुद्धीचा विनियोग इंद्रियनिग्रह करण्यांत कर, २७ आणि ज्या ज्या वेळीं जीं जीं कर्में घडतील त्यांच्या त्यांच्या फलांची आशा धरूं नको. २८ ज्याप्रमाणें वृक्ष किंवा वेली आपल्यास फळें आलीं असतां त्यांची आशा न धरतां तीं टाकून देतात, त्याप्रमाणें जीं जीं कर्में पूर्ण होतील त्यांच्या त्यांच्या फलांची आशा सोडून दे. २९ परंतु मला मनांत आठवून किंवा मला उद्देशून कोणतींही कर्में करावीं, ही खटपट न करितां सर्व निष्फळ होऊं दे. १३० ज्याप्रमाणेंच खडकावर पाऊस पडला असतां किंवा अग्नींत बीं पेरलें असतां निष्फळ होतें, त्याचप्रमाणें, जें जें कर्म तूं करशील, तें तें स्वप्नवत् मान. ३१ अरे, ज्याप्रमाणें

१ अमावास्येस. २ अंतरिक्षांत. ३ निर्वैर, निरुपद्रवी. ४ वेद, ...वदमदा, मायाज्ञान ५ स्वल्प, लहानसे. ६ बळ. ७ क्रमांत. ८ ...र. ९ मोकळीक. १० आपापले व्यापार करिते. ११ प्रपंच ...चांगलें कर्म करणें. १२ परमार्थ-वाईट कर्मापासून माघार ...ी. १३ मरणकाळीं. १४ अर्पण करवणार नाहीं. १५ कर्मांचें सेवन कर. १६ माझी. १७ आठवण धरणें, संबंध जोडणें. १८ कठिण, दाट. १९ महत्त्व, मोठेपणा, हव्यास. २० इंद्रियजाऊं दे. २१ त्यागिती. २२ माझ्या प्रीत्यर्थ. २३ इत्यांत निग्रहांत. २४ कन्येविषयी.

जिवु जैसा निरभिलाषी । तैसा कर्मी अशेषीं । निष्कामु होईं ३२ वन्हीची ज्वाळा जैशी । वायां जाय आकाशीं । क्रिया जिरों दे तैसी । शून्योमाजीं ३३ अर्जुना हा फलत्यागु । ओंवडे कीर असेलगु । पारि योगामाजि योगु । धुरेचा हा ३४ येणें फलत्यागें सांडे । तें तें कर्म न विरूढे । एकाचि वेळे वेळु झाडें । वांझें जैसीं ३५ तैसें येणेंचि शरीरें । शरीरा येणें सरे । किंबहुना येरझारें । चिरा पडे ३६ पैं अभ्यासाचिया पाँउटीं । ठाकिजे ज्ञान किरीटी । ज्ञानें येइजे भेटी । ध्यानाचिये ३७ मग ध्यानासि खेंव । देती आघवेचि भाव । तेव्हां कर्मजात सर्व । दूरी ठाके ३८ कर्म जेथ दुरावे । तेथ फलत्यागु संभवे । त्यागास्तव आंगवे । शांति सगळी ३९ म्हणोनि यावया शांति । हाचि अनुक्रमु सुभद्रापती । म्हणोनि अभ्यासुचि प्रस्तुतीं । करणें एथ १४०

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते । ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥१२॥

अभ्यासाहूनि गहन । पार्था मग ज्ञान । ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे ४१ मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासोनि चांगु । त्यागाहूनि भोगु । शांतिसुखाचा ४२ ऐसिया या वाटा । इहींचि पेणीं सुभटा । शांतीचा माजिवटा । ठाकिला जेणें ४३

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च । निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेंचि कहीं । आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ४४ उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे । हें कांहींच नेणिजे । वसुंधा जेवीं ४५ कां रायाचें देह चाळूं । रंका परौतें गाळूं । हें न म्हणेचि कृपाळू । प्राणु पैं गा ४६ गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं । ऐसें नेणेंचि कां करूं । तोयें जैसें ४७ तैसी आघवियांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री । कृपेसी धात्री । आपणचि जो ४८ आणि मी हें भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे । सुख दुःख जाणणें । नाहीं जया ४९ तेवींचि क्षमेलागीं । पृथ्वीसि पवाडु आंगीं । संतोषा उत्संगीं । दिधलें घर १५०

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः । मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१४॥

वार्षियें वीण सागरु । जैसा जळें नित्य निर्भरु । तैसा निरुपचारु । संतोषी जो ५१ वाहूनि आपुली आण । धरी जो अंतःकरण । निश्चया साचपण । जयाचेनि ५२ जीवु परमात्मा दोन्ही । बैसऊनि ऐक्यासनीं । जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ५३ ऐसा योगसमृद्धि । होऊनि जो निरवधि । अर्पी मनो-

पिता आपल्या कन्येविषयीं अभिलाष बाळगीत नाहीं, त्याप्रमाणें जीं जी कर्मे तूं करशील त्यांच्या फलप्राप्तीची इच्छा करूं नको. ३२ ज्याप्रमाणें अग्नीची ज्वाला आकाशांत व्यर्थ जाते, त्याप्रमाणें कर्मांपासून उत्पन्न होणारीं फळें व्यर्थ जाऊं दे. ३३ अर्जुना, कर्मे करून त्यांच्या फलांची इच्छा न करणें हा जरी सामान्य मार्ग वाटत आहे, तरी सर्व योगांत हा श्रेष्ठ योग आहे. ३४ याप्रमाणें कर्मे करून त्यांचा फलत्याग केला, म्हणजे तीं कर्मे पुनर्जन्मास कारणीभूत होत नाहींत. जसें वेळूचें झाड एक वेळ व्यालें म्हणजे पुनः वीत नाहीं, ३५ तसें या देहानें ( याच जन्मीं ) पुनः देह धारण करणें संपतें; किंबहुना जन्ममरणांच्या फेऱ्यांतून मुक्तता होते. ३६ परंतु अर्जुना, अभ्यासाच्या योगानें ज्ञान प्राप्त होतें, व ज्ञानप्राप्ति झाल्यावर ध्यान करतां येतें. ३७ नंतर सर्व मनोवृत्ति व धर्म ध्यानाला आलिंगन देतात; तेव्हां कर्म आपोआप दूर रहातें. ३८ जेव्हां कर्म आपोआप दूर रहातें, तेव्हां फलाची इच्छा नाहींशी होते. असें झाल्यावर सर्व शांति आपल्या अधीन होते. ३९ म्हणून हे सुभद्रापते, शांति उत्पन्न होण्याचा हाच एक मार्ग आहे; तेव्हां तुला अगोदर अभ्यासच केला पाहिजे. १४०

**अन्वयार्थ**—(अभ्यासात्)-वर सांगितलेल्या अभ्यासाहून-(ज्ञानं)-ज्ञान-(श्रेयः हि)-अधिक प्रशंसनीय आहे, हें तर प्रसिद्धच आहे. पण-(ज्ञानात्)-त्या ज्ञानाहूनहि-(ध्यानं) -ज्ञानासह केलेलें ध्यान-( विशिष्यते )-अधिक चांगलें आणि त्या तसल्या-(ध्यानात्)-ध्यानाहूनहि-(कर्मफलत्यागः)-ज्ञान--ध्यानयुक्त कर्मांच्या फलाचा त्याग अधिक चांगला आहे. कारण-( त्यागात् )-कर्मफलाचा त्याग केल्यानंतर-( अनन्तरं शान्तिः )-लागलीच संसाराची शांति होते. १२

पार्था, अभ्यासापेक्षां ज्ञान कठीण, ज्ञानापेक्षां ध्यान अधिक कठीण आहे. ४१ नंतर कर्मांच्या फलांची इच्छा सोडणें हें ध्यानापेक्षांही उत्तम आहे व त्यापेक्षांही ब्रह्मरूपप्राप्तीचें सुख विशेष आहे. ४२ हे महावीरा, याप्रमाणें हें ब्रह्मरूपप्राप्तीचे मार्ग असून याच टप्यानें जो शांतीची प्राप्ति करून घेतो; ४३

**अन्वयार्थ**—(सर्वभूतानां अद्वेष्टा-)कोणत्याहि प्राण्याचा द्वेष न करणारा-( मैत्रः )-सर्वांशीं मित्रत्वानें राहणारा.-(करुणः एव च )-दुःखी जीवांवर दया करणारा-(निर्ममः)-हा अमुक पदार्थ माझा आहे, असें त्याला कधीं वाटत नाहीं-(निरहंकारः)-'हा मी' हा अभिमान त्याच्या ठिकाणीं नसतो.-(समदुःखसुखः )-दुःख व सुख हीं दोन्ही त्याला एकसारखींच वाटतात.-(क्षमी)-क्षमावान्, कोणी शिव्या दिल्या किंवा मारलें तरी मनांत क्षुब्ध होत नाहीं तर अगदीं शांत असतो. १३

त्याच्या मनांत भूतमात्राविषयीं द्वेष म्हणून मुळींच वसत नाहीं. ( त्याची सर्वत्र समदृष्टि असते. ) चैतन्याला जसा आपपरभाव नाहीं; ४४ पृथ्वी ज्याप्रमाणें उत्तम मनुष्याचा भार सहन करावा व अधमाचा करूं नये असा भेद बाळगीत नाहीं; ४५ अथवा कृपावंत प्राणाला, ज्याप्रमाणें राजाचे देहांत रहावें व रंकाच्या देहांत राहूं नये असें वाटत नाहीं; ४६ किंवा पाणी ज्याप्रमाणें गाईची तहान भागवावी व वाघाला विषाप्रमाणें होऊन मारावें असें मनांत आणीत नाहीं, ४७ त्याप्रमाणें, प्राणिमात्राच्या ठिकाणीं ज्याची सारखी मैत्री असून जो कृपेला आपण आधारभूत होतो, ४८ आणि मी व माझें असें ज्याच्या मनांत उद्भवत नाहीं, व सुखदुःख हेंही ज्याचें मनांत येत नाहीं; ४९ त्याचप्रमाणें, क्षमेविषयीं ज्याची पृथ्वीसारखी योग्यता आहे व संतोषाला ज्यानें आपल्या मांडीवर रहाण्यास जागा दिली आहे; १५०

**अन्वयार्थ**—( सततं संतुष्टः )-सदा संतुष्ट-जिवंत राहण्यास अवश्य असलेल्या वस्तु मिळाल्या तरी ठीक, न मिळाल्या तरी ठीक,-[सततं] ( योगी )-सदोदित शांतचित्त असणारा, मनाला केव्हांही विक्षिप्त होऊं न देणारा,-( यतात्मा )-मनाच्या प्रत्येक स्वाभाविक वृत्तीचा निरोध करणारा, किंवा शरीरेंद्रिय-संघाताचें नियमन करणारा,-( दृढनिश्चयः )-आत्मतत्त्वाविषयीं ज्याचा निश्चय अतिशय दृढ झाला आहे.-( मयि अर्पितमनोबुद्धिः )-जो माझ्या ठिकाणीं आपलें मन व बुद्धि यांना स्थिर करून राहिला आहे-(यःमद्भक्तः)-असा जो माझा भक्त आहे, ज्या माझ्या भक्तामध्यें हे सर्व गुण आहेत-(सः मे प्रियः)-तो मला प्रिय आहे. १४

वर्षाऋतुशिवाय देखील जसा समुद्र नेहमीं पाण्यानें भरलेला असतो, तसा आनंदाचे उपचार केल्याशिवायही जो सहज आनंदांत निमग्न असतो; ५१ जो आपलें मन आपलीच शपथ घालून ताब्यांत ठेवतो, व ज्याच्या निश्चयाच्या बळानें निश्चयाला खरेपणा येतो; ५२ ज्याच्या हृदयमंदिरांत एकाच आसनावर बसून, जीव व परमात्मा हे दोन्ही विराजमान होतात; ५३ अशा योगसंपत्तीनें पूर्णत्वास पावला असून जो मन व बुद्धि माझ्या ठिकाणीं

---

१ निरिच्छ. २ शून्यांत जाऊं दे, निष्फळ होऊं दे. ३ निश्चयेंकरून सोपा वाटतो. ४ श्रेष्ठ. ५ वाढीस येत नाहीं. ६ दगड पडून वाट बंद होते, पायरीनें. ८ प्राप्त होते. ९ आलिंगन. १० स्वाधीन होते. ११ सांप्रत. १२ कर्मांच्या फलाची इच्छा सोडणें. १३ अशा मुक्कामांनीं. १४ माजघर. १५ मिळविला, प्राप्त करून घेतला. १६ पृथ्वी. १७ राहावें. १८ पलीकडे. १९ राहूं नये. २० पाणी. २१ आधारभूत. २२ बोली, वार्ता. २३ सहिष्णुतेविषयीं. २४ योग्यता, बरोबरी. २५ मांडीवर. २६ वर्षाकाळावांचून. २७ पूर्ण भरलेला.

बुद्धि । माझ्या ठायीं ५४ आंतु बाहेरि योगु । निर्वाळलेयाही चांगु । तरि
माझा अनुरागु । सप्रेम जया ५५ अर्जुना तो भक्तु । तोचि योगी तोचि
मुक्तु । तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये ५६ हें ना तो आवडे । मज जीवा-
चेनि पाडें । हेंही एथ थोकडें । रूप करणें ५७ तरी पढियंतयाची कहाणी ।
हे भुलीची भारणी । इयें तंव न बोलणीं । पारि बोलवी श्रद्धा ५८ म्हणोनि
गा आम्हां । वेगा आली उपमा । एऱ्हवीं काय प्रेमा । अनुवादु असे ५९ आतां असो
हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी । दुणी थांवे उठी । आवडी गा १६० तयाही वरी
विपायें । प्रेमळु संवादिया होये । तिये गोडीसी आहे । कांटाळें मग ६१ म्हणोनि
गा पांडुसुता । तूं प्रियु आणि तूंचि श्रोता । वरि प्रियाची वार्ता । प्रसंगें आली
६२ तरि आतां बोलों । भलें या सुखा मीनलों । ऐसें म्हणतखेंवीं डोलों । लागला
देवो ६३ मग म्हणे जाण । तया भक्ताचें लक्षण । जया मी अंतःकरण । बैसों घालीं ६४

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः । हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥१५॥

तारि सिंधूचेनि माजें । जळचरां भय नुपजे । आणि जळचरीं नुबगिजे ।
समुद्रु जैसा ६५ तेवीं उन्मत्तें जगें । जयासि खंती न लगे । आणि जयाचेनि
आंगें । न शिणे लोकु ६६ किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां । तैसा
नुबगे जीवां । जीवपणें जो ६७ जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें ।
हर्षामर्ष ठेले । दुजेनविण ६८ ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु । भयोद्वेगरहितु । याही वरि
भक्तु । माझ्या ठायीं ६९ तरि तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढि-
यावो । हें असो जीवें जीवों । माझेनि तो १७० जो निजानंदें धाला । परि-
णामु आयुष्या आला । पूर्णते जाहला । वल्लभु जो ७१

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः । सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

तयाचिया ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिगावा । सुखासि चढावा ।
जयाचें असणें ७२ मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर । परि वेंचे शरीर ।
तिये गांवीं ७२ हिमवंतु दोष खाये । परि जीविताची हानि होये । तैसें
शुचित्व नोहे । सज्जनांचें ७४ शुचित्वें शुचि गंगा होये । आणि पापतापही
जाये । परि तेथें आहे । बुडणें एक ७५ खोलिये पारु नेणिजे । तरी भक्ती न
बुडिजे । रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्षु ७६ संतांचेनि अंगलगें । पापातें
जिणणें गंगे । तेणें संतसंगें । शुचित्व कैसें ७७ म्हणोनि असो जो ऐसा । शु-

अर्पण करतो; ५४ आणि अंतर्यामी ध्यानयोगानें व बाहेरून अष्टांगयोगानें जरी सिद्ध झाला, तरी माझी प्रीति जो प्रेमानें करतो, ५५ अर्जुना, तोच भक्त, तोच योगी आणि तोच मुक्त. फार काय सांगावें! ५६ ती स्त्री व मी पति इतका मला तो आवडता आहे! छे, छे, असें नव्हे, तो मला माझ्या जिवापेक्षांही जास्त प्रियकर आहे; परंतु हांहीं दृष्टान्त या ठिकाणीं कमीच होय. ५७ तर, आवडत्याची गोष्ट ही केवळ भुरळ पाडणारी भूलच होय. ही बोलून दाखविण्यासारखी गोष्ट नाहीं. परंतु आवडच आमच्याकडून वदविते; ५८ आणि म्हणूनच आम्ही सहज अशी उपमा देऊन गेलों; बाकी प्रेमाचें वर्णन करतां आलें आहे का? ५९ अर्जुना, त्या सर्व गोष्टी बाजूस ठेव, कारण, आवडत्या मनुष्याविषयीं गोष्टी निघाल्या असतां आवड दुप्पट वाढते. १६० त्यांतूनही कदाचित् गोष्ट ऐकणाराही प्रेमळच भेटला, तर त्या गोडीला उपमा देतां येईल का? ६१ म्हणून, अर्जुना, तूंच माझा आवडता असून, तूंच आवडीच्या गोष्टी ऐकणारा आहेस; आणि त्यांतून माझ्या प्रिय भक्तांचीच गोष्ट तुझ्याजवळ बोलण्याचा प्रसंग आला, ६२ तर आतां काय होईल तें होवो, मी बोलतोंच; व बोलण्याचा प्रसंग आला हेंही आपलें भाग्यच समजतों. असें म्हणून देव डोलूं लागले. ६३ मग म्हणाले–ज्यांना मी आपल्या हृदयांत सांठवून ठेवितों त्यांचीं लक्षणें कोणतीं, तीं ऐक. ६४

**अन्वयार्थ**—(यस्मात्)–ज्या माझ्या भक्तापासून–(लोकः) –कोणताहि प्राणी–(न उद्विजते)–उद्विग्न होत नाहीं, ज्या भगवद्भक्तापासून कोणालाहि संताप–क्षोभ होत नाहीं,–(च)–त्याचप्रमाणें–(यः)–जो–(लोकात्)–कोणत्याहि प्राण्यापासून–(न उद्विजते)–उद्वेग पावत नाहीं–(च)–आणि–(यः)–जो–(हर्ष-अमर्ष-भय-उद्वेगैः)–हर्ष, क्रोध, भय व खेद यांनीं–(मुक्तः)–मुक्त असतो–(सः)–तो–(मे)–मला–(प्रियः)–प्रिय आहे. १५

ज्याप्रमाणें समुद्र क्षोभला असतां जलचरांना त्याची भीति वाटत नाहीं, व जलचरांचा पुष्कळ समुदाय वाढला असतां समुद्रही त्यांचा कंटाळा करीत नाहीं. ६५ त्याचप्रमाणें, उन्मत्त जगाचा ज्याला खेद वाटत नाहीं व ज्याच्या योगानें लोकांनाही त्रास होत नाहीं; ६६ फार काय सांगावें! शरीर ज्याप्रमाणें अवयवांना कंटाळत नाहीं; त्याप्रमाणें, आपण सर्वांचा जीव आहों असें मानून जो प्राणिमात्राला कंटाळत नाहीं; ६७ जग हेंच शरीर बनल्यामुळें ज्याला आवडती नावडती गोष्ट असा भेद रहात नाहीं, व अशा प्रकारें द्वैतभाव नाहींसा झाला म्हणजे ज्याच्या ठिकाणचे आनंद व क्रोध हे विकार नाहींतसे होतात. ६८ याप्रमाणें सुखदुःखांपासून ज्याला बाधा होत नाहीं, जो भय, उद्वेग इत्यादिकांनीं रहित असतो; आणि इतकी स्थिति प्राप्त झाली असूनही जर तो माझी भक्ति करीत असला, ६९ तर त्याची मला फार आवड असते; त्या प्रेमाचें मी काय वर्णन करूं? इतकेंच नव्हे, तर तो माझ्या प्राणाचा प्राण आहे. १७० जो आत्मानंदानें तृप्त झाला आहे, व रूपांतर घेऊन जो जन्मास आला आहे, तो पूर्णतारूप तरुण स्त्रीचा पतिच होय. ७१

**अन्वयार्थ**—(अनपेक्षः)–देहादिकांसाठीं ज्यांची अत्यंत अपेक्षा–गरज असते अशा अन्न-वस्त्रादिकांविषयींहि अनपेक्ष –(शुचिः)–बाह्य शरीरशुद्धि व आंतील मनाची शुद्धि यांनीं शुद्ध–पवित्र–(दक्षः)–अनेक कर्तव्यें प्राप्त झालीं असतां त्यांना बरोबर जाणण्यास समर्थ,–(उदासीनः)–मित्रादिकांचा पक्ष न घेणारा–निःपक्षपात–(गतव्यथः)–निर्भय–(सर्वारंभपरित्यागी)–या लोकच्या व परलोकच्या फलासाठीं केल्या जाणाऱ्या सर्व कर्मांचा त्याग करणारा–सर्व सकाम कर्में सोडणारा–(यः मद्भक्तः)–असा जो माझा भक्त–(सः मे प्रियः)–तो मला प्रिय आहे. १६

त्याच्या ठिकाणीं, अर्जुना, इच्छा अगदीं नसते व त्याच्या वृत्तींत सुखाची नेहमीं भर पडत असते. ७२ काशी क्षेत्र मोक्षप्राप्ति करून देण्याबद्दल प्रख्यात आहे, परंतु त्या ठिकाणीं शरीर ठेवल्याशिवाय मोक्ष मिळत नाहीं. ७३ हिमालय पर्वतावर गेलें असतां दोषांचें क्षालन होतें, परंतु तेथील हवा न मानवल्यामुळें जीवाची हानि होते; परंतु जे सज्जन आहेत, त्यांच्यापासून जीवाची हानि न होतां पवित्रता प्राप्त होते. ७४ पावन करणाऱ्या गंगेचें उदकही पवित्र आहे, त्यांत स्नान केल्यानें पाप व शरीराचा ताप हीं दूर होतात; परंतु त्यांत बुडण्याची भीति असते, ७५ तशी भक्तिरूप नदीची खोली अपार आहे, तरी जो मनुष्य तिच्या मार्गानें जाईल, तो न बुडतां व त्याची प्राणहानि न होतां त्याला अविच्छिन्न मोक्ष प्राप्त होतो. ७६ ज्या संतांच्या समागमानें गंगेचेंही पातक नाहींसें होतें, त्या संतसंगापासून पवित्रता प्राप्त होईल किंवा नाहीं हें कशास विचारावें? ७७ म्हणून, जो साधु

१ सिद्ध झाल्यावरहि. २ चांगला. ३ प्रीति. ४ आठवती स्त्री. ५ पति. ६ आवडता होय. ७ बोल्यतेनें. ८ गोष्ट. ९ भूल, भुरळ. १० बोलतां येईल काय? ११ दुप्पट. १२ बळ. १३ कचित्. १४ तुलना. १५ प्राप्त झालों. १६ म्हणतांक्षणींच. १७ सांठवून ठेवतो. १८ क्षोभानें, गाजल्यानें. १९ न कंटाळे. २० कंटाळा खेद, वीट. २१ साचित्यानें, सहवासानें. २२ त्रासत नाहीं. २३ कंटाळत नाहीं. २४ आपण जीव आहों असें मानून. २५ आनंद व क्रोध. २६ सुखदुःखादि द्वंद्वातीत. २७ भय, व त्रास यांनीं रहित. २८ प्रेमा. २९ प्राण. ३० तृप्त झाला. ३१ रूपांतर. ३२ इच्छेस. ३३ चढ, भरती. ३४ हिमालय. ३५ ताप नाहींसे करतो. ३६ समागमें, अंगस्पर्शें.

हे, तो आपल्या पवित्रपणानें तीर्थालाही आश्रयभूत ऊन मनाचे सर्व विकार दशदिशांच्या पलीकडे घालवितो. १७८ तो सूर्याप्रमाणें अंतर्बाह्य निर्मळ असून पायाळू मनुष्याला ज्याप्रमाणें द्रव्यदृष्टि असते, त्याचप्रमाणें त्याला ब्रह्मतत्त्व दिसतें. ७९ ज्याप्रमाणें आकाश हें सर्वव्यापक असून अलिप्त आहे, त्याप्रमाणें ज्याचें मन सर्वव्यापक असून कशानेंही लिप्त होत नाहीं; १८० ज्याप्रमाणें पारध्याचे हातून पक्षी सुटून गेल्यावर निर्भय होतो, त्याप्रमाणें जो संसाराच्या काळजींतून दूर होऊन निरिच्छ बनलेला असतो; ८१ मेलेल्या मनुष्यास आपलें अंग उघडें पडल्याबद्दल जशी लाज वाटत नाहीं, तसा नेहमी सुखी असतो त्याला कोणच्याही प्रकारचा त्रास होत नाहीं; ८२ आणि कोणतेंही कर्म आरंभण्याविषयीं त्याचे मनांत कर्तृत्वाभिमान बिलकुल नसतो. ज्याप्रमाणें अग्नि सर्पणाशिवाय आपोआप विझून जातो. ८३ त्याप्रमाणें मोक्षप्राप्तीकरितां सांगितलेल्या अंगांपैकी उपशम ( शांति ) ज्याच्या वांटयाला आलेला आहे; ८४ अर्जुना, आत्तांपर्यंत जो पुरुष आत्मस्वरूपानें ओतप्रोत भरलेला होता तो द्वैताच्या पलीकडील तीरावर निघून गेला. ८५ किंवा भक्तिपासून उत्पन्न होणाऱ्या सुखाकरितां आपणच पली दोन ठिकाणी वांटणी करून, एकाचें नांव ' सेवक ' ठेवितो; ८६ व सेवकाहून जो दुसरा त्याचें नांव व ' असें ठेवून, जो भक्ति न करणाऱ्या लोकांस भक्ति- आचरून दाखवितो; ८७ त्याचीच आम्हांला प्रीति, मचें निजध्यान होतो, किंबहुना तो मिळेल तेव्हांच न्हांस समाधान होतें. ८८ त्याच्याचकरितां मला हे तार घ्यावे लागतात; त्याच्याचकरितां मला या ठिकाणी न्म्य करावें लागतें; आणि त्याच्यावरून मी पंचप्राण ओवाळून टाकतों, इतका तो मला आवडता असतो ! ८९

अन्वयार्थ—(यः न हृष्यति)–जो इष्ट वस्तूची प्राप्ति ली असतां हृष्ट होत नाहीं, हर्ष मानीत नाहीं,–(न द्वेष्टि) जी अनिष्ट वस्तूची प्राप्ति झाली असतां द्वेष करीत नाहीं (न शोचति)–जो प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां शोक रीत नाहीं व–(न कांक्षति)–न मिळालेल्या वस्तूची इच्छा रीत नाहीं,–(शुभाशुभपरित्यागी)–शुभ व अशुभ कर्मांचा त्याग करणारा–( भक्तिमान् यः )–असा जो भक्तिमान् सतो–(सः मे प्रियः)–तो मला प्रिय आहे. १७

जो ब्रह्मप्राप्तीच्या लाभासारखें उत्तम असें दुसरें कांहींच मानीत नाहीं, त्याला कोणत्याही विशेष उपभोगापासून आनंद होत नाहीं. १९० जो आपणच विश्व झाला, त्यामुळें दुजाभाव सहज गेला, म्हणून ज्या पुरुषाचे मनांतून द्वेष नाहींसा होतो; ९१ जी खरोखर आपली वस्तु आहे, ती कल्पांतीही नाहींशी व्हावयाची नाहीं, असें मनांत पक्कें समजून जो गतगोष्टीचा शोक करीत नाहीं; ९२ ज्या स्वरूपापेक्षां उत्तम वस्तु या जगांत दुसरी कोणतीच नाहीं, ते जो आपल्या ठायीं स्वतांच होऊन राहिला, त्यामुळें तो कसल्याही गोष्टीची इच्छा करीत नाहीं. ९३ ज्याप्रमाणें सूर्याला रात्र व दिवस हा भेद मुळींच नसतो, त्याप्रमाणें वाईट अगर चांगलें हें कांहींच ज्याला वाटत नाहीं; ९४ याप्रमाणें जो केवळ ज्ञानस्वरूप होऊन शुद्ध असतो, आणि शिवाय माझ्या भजनांत आपला काळ घालवितो, ९५ त्या भक्ताप्रमाणें आम्हांस दुसरें आवडतें असें कोणी नाहीं हें तुझ्याच गळ्याशपथ मी खरोखर सांगतों ! ९६

अन्वयार्थ—(शत्रौ च मित्रे च समः)–शत्रु व मित्र या दोघांच्याही ठिकाणी एकसारखा व्यवहार करणारा–(तथा)–त्याचप्रमाणें–(मानापमानयोः)–मान व अपमान यांमध्यें सम–त्या दोहोंनाहीं एकसारखेंच मानणारा–(शीतोष्णसुखदुःखेषु समः)–शीत, उष्ण, सुख, दुःख यांमध्यें एकसारखीच भावना ठेवणारा,–(संगविवर्जितः)–कोठेंहि आसक्ति न ठेवणारा. १८

पार्था, ज्याच्या मनांत थांकडेपणाची गोष्टही नसते, आणि जो शत्रु व मित्र या दोघांनाही सारखेंच मानतो ९७ किंवा अर्जुना, आपल्या घरच्या लोकांनाच उजेड पाडावा, व परक्यांना अंधार पाडावा, हें ज्याप्रमाणें दिवा जाणत नाहीं; ९८ जो आपल्यावर तोडण्याकरितां घाव घालतो, किंवा जो आपल्यास लावतो, त्या दोघांनाही झाड सारखीच सावली करितें; ९९ किंवा ऊंस हा जो पाणी घालून वाढवितो त्यासच गोड, व जो चरकांत घालून गाळतो त्यास कडू असा कधींच लागत नाहीं, २०० त्याप्रमाणें, अर्जुना, शत्रुमित्रभाव ज्याच्या

१ आश्रय. २ देशोधडी केलें. ३ शुद्ध. ४ सत्वरूप धनाला पाहणारा पायाळू. ५ निरिच्छपणानें. ६ शोभला. ७ पक्षी. ८ त्रास, टोंचणी. ९ मेलेल्यास. १० लांकडावांचून. ११ शांतिच. १२ एथपर्यंत. १३ ओतप्रोत भरलेला. १४ निघोन गेला. १५ सेवकपणाचा बाणा बाळगतो. १६ दुसऱ्याला. १७ रीत. १८ कुरवंडी. १९ आवडता असतो. २० चांगलें. २१ संतोषेना. २२ नाहींसा झाला. २३ वाईट. २४ वाटत नाहीं. २५ भासत नाहीं. २६ पूर्ण शुद्ध. २७ आवडतें, जीवलग. २८ खरेपणानें. २९ थांकडेपणाची. ३० सारखेंच मानतो. ३१ परक्यांस. ३२ तोडण्यासाठीं.

पाहतों; व नेहमीं आमच्या हातांत असणाऱ्या लीला कमळानें त्यांचें पूजन करतों. २३ दोन हातांवर दुसरे दोन हात धारण करून त्यांना आलिंगन देण्याकरितां मी अवतरलों आहें ! २४ त्यांच्या संगतीच्या सुखातिशयानें, निराकार जो मी, त्या मला देह धारण करावा लागला ! फार काय सांगावें ! ते माझे जीव की प्राण आहेत ! २५ तेच एक आमचे परम मित्र आहेत असें म्हणण्यांत विशेष गोष्ट ती कोणती ? तर इतकेंच नव्हे, परंतु जे त्यांचें चरित्र ऐकतात, २६ व जे माझ्या भक्तांच्याच चरित्राची प्रशंसा करितात, तेही माझ्या प्राणाहून मला जास्त आवडतात. २७ अर्जुना, तुला जो हा पूर्ण रीतीनें योग सांगितला, तो भगवत्प्राप्तीच्या उपायानें भरलेला असा पूर्ण 'भक्तियोग' आहे. २८ ज्या योगाच्या स्थितीची एवढी थोरवी आहे कीं, ज्याच्यावर मी प्रीति करतों; आणि ज्याला आपल्या मनांत व मस्तकावर धारण करतों, २९

**अन्वयार्थ**—(तु)–पण–( ये श्रद्दधानाः मत्परमाः भक्ताः )–जे श्रद्धावान् मत्परम झालेले भक्त–माझे एकनिष्ठ भक्त–( इदं यथोक्तं धर्म्यामृतं )–हें वर सांगितलेलें धर्माला सोडून नसलेलें–धर्मरूप अमृत–मोक्षाचें साधन–( पर्युपासते ) करितात–वरील मोक्षसाधनाचें अनुष्ठान करितात–तसें आचरण करितात–(ते)–ते श्रेष्ठ भक्त–(मे)–मला–परमेश्वराला–(अतीव) अतिशयच–( प्रियाः )–प्रिय आहेत. २०

त्या ह्या योगाच्या रम्य अमृत वर्षाव करणाऱ्या व धर्मास अनुकूल अशा गोष्टी ऐकून जे त्यांचा अनुभव घेतात; २३० त्याचप्रमाणें, त्या योगाचे ठिकाणीं पूर्ण श्रद्धा ठेवून ज्यांच्या मनांत तो उत्तम रीतीनें ठसतो, व त्याजविषयीं आपले मनांत पूर्ण विचार करून जे त्याचें आचरण करतात; ३१ व ज्यांच्या मनाची खरोखर अशी स्थिति होते, त्यांना चांगल्या शेतांत पेरणी केली असतां जसें उत्तम पीक होतें, तसें उत्तम फळ प्राप्त होतें. ३२ परंतु मला परम श्रेष्ठ मानून व माझ्या ठिकाणीं प्रेम धरून, मी सर्व व्यापक आहें असें जे मानतात, ३३ तेच या जगतांत माझे भक्त व योगी होत; आणि म्हणूनच पार्था, त्यांच्याविषयीं मला अतिशय प्रेम असतें. ३४ ज्यांना भक्तिकथा अत्यंत आवडते, तेच या जगतांत आमचें तीर्थ; तेच क्षेत्र व तेच पवित्र पुरुष आहेत. ३५ त्यांचें आम्ही ध्यान करतों, तेच आमचें पूर्णदैवत व त्यांशिवाय आम्हांला दुसरी आवडती गोष्ट कोणतीही नाहीं ३६ त्यांचाच आम्हांला नाद लागतो, व तेच आमचा ठेवा होत; फार काय सांगावें ! ते जेव्हां आम्हांस भेटतात तेव्हांच आमचें समाधान होतें. ३७ हे पांडुसुता, माझ्या प्रेमळ भक्तांच्या गोष्टी जे सांगतील तीच आमची परमदेवता असें आम्ही मानूं. ३८ संजय म्हणतोः–सर्व जगास आनंद देणारा, व सर्व जगाचा उत्पन्न करणारा जो मुकुंद तो याप्रमाणें बोलला. ३९ राजा धृतराष्ट्रा, जो निर्मळ, निष्कलंक, लोकांवर कृपा करणारा, शरणागतांचें रक्षण करणारा, शरण जाण्यास योग्य, २४० देवांना साह्य करणें हेंच ज्याचें शील व लोकांचें लालन करणें हीच ज्याची लीला, व शरणागतांचें रक्षण करणें हाच ज्याचा खेळ आहे. ४१ जो धर्म व कीर्ति यांनीं स्वच्छ शोभणारा, दान करण्यांत ज्याचा अगाध सरळपणा आहे, व निरुपम बळवान् असून बळीच्या प्रेमबंधनानें बद्ध झाला आहे, ४२ जो भक्तजनांचा कनवाळू, प्रेमळ, जनाशीं मोकळ्या मनानें वागणारा, खऱ्या रीतीनें वागणाऱ्यांचा तारक, आणि चौदा विद्या व चौसष्ट कला यांचा निधि, ४३ तो भक्तांचा राजा वैकुंठनायक श्रीकृष्ण भगवान् देवसाली असा अर्जुनास सांगता झाला व त्यानें ऐकलें. ४४ संजय आणखी म्हणतोः–हे राजा धृतराष्ट्रा, यापुढें कथा सांगण्याचा जो प्रकार आहे तो ऐक. ४५ तीच रसभरीत गोष्ट मराठी भाषेंत आम्ही सांगूं, ती ऐका. ४६ ज्ञानदेव म्हणतातः–श्रोतेहो, तुम्हांसारख्या संतांना आम्ही शरण आवें, हेंच आम्हांस आमच्या गुरूंनीं–निवृत्तिनाथांनीं शिकविलें आहे ! २४७

---

१ सुखाकरितां. २ निराकाराला. ३ प्राणापलीकडे. ४ खरें. ५ धर्मास अनुकूल. ६ ठसतो. ७ विचार करून. ८ चांगल्या शेतांत. ९ अत्यंत श्रेष्ठ. १० ठेवा. ११ बोलता झाला. १२ सर्व जगाला आनंद देणाऱ्या. १३ जगाला उत्पन्न करणाऱ्या. १४ शुद्ध, कलंकरहित. १५ शरण जाण्यास योग्य. १६ देवांना सहाय्य करण्याचा स्वभाव आहे ज्याचा असा. १७ लोकांचें पालन करणें हीच ज्याची लीला आहे. १८ शरणागतरक्षक. १९ शोभणारा. २० निरुपम बळानें. २१ सप्रेम भक्तांना सुलभ. २२ खऱ्या रीतीनें वागणारांचा तारक. २३ सार्वभौम. २४ भक्तांचा. २५ पद्धत. २६ वाटेला, भाषेंत. २७ शरण जाऊन सेवावे.

२३ दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनी । आलिंगावयालागुनी । तयाचें आंग २४
तयासंगाचेनि सुखेंवाडें । मज विदेहा देह धरणें घडे । किंबहुना आवडे । निरुपमु
२५ तेणेंसीं आम्हां मैत्र । एथ कायसें विचित्र । परि तयाचें चारित्र । ऐकती जे
२६ तेही प्राणांपरौते । आवडती हें निरुतें । जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती २७ जो
हा अर्जुना साद्यंत । सांगितला प्रस्तुत । भक्तियोगु समस्त । योगरूप २८
जेणें मी प्रीति करी । कां मनीं शिरसा धरीं । येवढी थोरी । जया स्थितीये २९

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते । श्रद्दधानाः मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥

ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य । करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे
२३० तैसीचि श्रद्धेचेनि आदरें । जयांचे ठायीं विस्तरे । जीवीं जया थारे । जे
अनुष्ठिती ३१ परि निरूपिली जैसी । तैसीच स्थिति मानसीं । मग सुक्षेत्रीं
जैसी । पेरणी केली ३२ पारि मातें परम करूनि । इये अर्थीं प्रेम धरूनि । हेंचि
सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ३३ पार्था गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी ।
उत्कंठा तयांलागीं । अखंड मज ३४ ते तीर्थ ते क्षेत्र । जगीं तेचि पवित्र । भक्ति-
कथेसि मैत्र । जयां पुरुषां ३५ आम्ही तयांचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन ।
तेवांचूनि आन । गोमटें नाहीं ३६ तयांचें आम्हां व्यसन । ते आमुचें निधि-
निधान । किंबहुना समाधान । ते मिळती तैं ३७ पैं प्रेमळाची वार्ता । जे अनु-
वादती पांडुसुता । ते मानूं परमदेवता । आपुली आम्ही ३८ ऐसें निजजना-
नंदें । तेणें जगदादिकंदें । बोलिलें मुकुंदें । संजयो म्हणे ३९ राया जो निर्मळु ।
निष्कलंक लोककृपाळु । शरणागतां प्रतिपाळु । शरण्यु जो २४० पैं सुरसहा-
यशीळु । लोकलालनलीळु । प्रणतप्रतिपाळु । हा खेळ जयाचा ४१ जो धर्म-
कीर्ति धवळु । अगाध दातृत्वें सरळु । अतुळबळें प्रबळु । बळिबंधनु ४२ जो
भक्तजनवत्सलु । प्रेमळजन प्रांजळु । सत्यसेतु सकळु । कलानिधी ४३ तो
श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा । सांगें येरु दैवाचा । आइकतु असे ४४
आतां ययावरी । निरूपिती परि । संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ४५ तेचि
रसाळ कथा । मऱ्हाठिया प्रतिपंथा । आणिजेल आतां । अवधारिजो ४६ ज्ञानदेव
म्हणे तुम्ही । संत वोळगावेति आम्हीं । हें पढविलों जी स्वामी । निवृत्तिदेवीं २४७

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥ श्लोक २०, ओंव्या २४७.

पाहतों; व नेहमी आमच्या हातांत असणाऱ्या लीला-कमळानें त्यांचें पूजन करतों. २३ दोन हातांवर दुसरे दोन हात धारण करून त्यांना आलिंगन देण्याकरितां मी अवतरलों आहें ! २४ त्यांच्या संगतीच्या सुखातिशयानें, निराकार जो मी, त्या मला देह धारण करावा लागला ! फार काय सांगावें ! ते माझे जीव की प्राण आहेत ! २५ तेच एक आमचे परम मित्र आहेत असें म्हणण्यांत विशेष गोष्ट ती कोणती ? तर इतकेंच नव्हे, परंतु जे त्यांचें चरित्र ऐकतात, २६ व जे माझ्या भक्तांच्याच चरित्राची प्रशंसा करितात, तेही माझ्या प्राणांहून मला जास्त आवडतात. २७ अर्जुना, तुला जो हा पूर्ण रीतीनें योग सांगितला, तो भगवत्प्राप्तीच्या उपायानें भरलेला असा पूर्ण 'भक्तियोग' आहे. २८ ज्या योगाच्या स्थितीची एवढी थोरवी आहे की, ज्याच्यावर मी प्रीति करतों, आणि ज्याला आपल्या मनांत व मस्तकावर धारण करतों, २९

अन्वयार्थ—(तु)–पण–(ये श्रद्दधाना मत्परमाः भक्ताः)–जे श्रद्धावान् मत्परम झालेले भक्त–माझे एकनिष्ठ भक्त–( इदं यथोक्तं धर्म्यामृतं )–हें वर सांगितलेलें धर्माला सोडून नसलेलें–धर्मरूप अमृत–मोक्षाचें साधन–( पर्युपासते ) करितात–वरील मोक्षसाधनाचें अनुष्ठान करितात–तसें आचरण करितात–(ते)–ते श्रेष्ठ भक्त–(मे)–मला–परमेश्वराला–(अतीव) अतिशयच–( प्रियाः )–प्रिय आहेत. २०

त्या ह्या योगाच्या रम्य अमृत वर्णन करणाऱ्या व धर्मास अनुकूल अशा गोष्टी ऐकून जे त्यांचा अनुभव घेतात; २३० त्याचप्रमाणें, त्या योगाचे ठिकाणीं पूर्ण श्रद्धा ठेवून ज्यांच्या मनांत तो उत्तम रीतीनें ठसतो, व त्याजविषयीं आपले मनांत पूर्ण विचार करून जे त्याचें आचरण करतात; ३१ व ज्यांच्या मनाची खरोखर अशी स्थिति होते, त्यांना चांगल्या शेतांत पेरणी केली असतां जसें उत्तम पीक होतें, तसें उत्तम फळ प्राप्त होतें. ३२ परंतु मला परम श्रेष्ठ मानून व माझ्या ठिकाणीं प्रेम धरून, मी सर्व व्यापक आहें असें जे मानतात, ३३ तेच या जगतांत माझे भक्त व योगी होत; आणि म्हणूनच पार्था, त्यांच्याविषयीं मला अतिशय प्रेम असतें. ३४ ज्यांना भक्तिकथा अत्यंत आवडते, तेच या जगतांत आमचें तीर्थ; तेच क्षेत्र व तेच पवित्र पुरुष आहेत. ३५ त्यांचें आम्ही ध्यान करतों, तेच आमचें पूर्णदैवत व त्यांशिवाय आम्हांला दुसरी आवडती गोष्ट कोणतीही नाहीं ३६ त्यांचाच आम्हांला नाद लागतो, व तेच आमचा ठेवा होत; फार काय सांगावें ! ते जेव्हां आम्हांस भेटतात तेव्हांच आमचें समाधान होतें. ३७ हे पांडुसुता, माझ्या प्रेमळ भक्तांच्या गोष्टी जे सांगतील तीच आमची परमदेवता असें आम्ही मानूं. ३८ संजय म्हणतोः–सर्व जगास आनंद देणारा, व सर्व जगाचा उत्पन्न करणारा जो मुकुंद तो याप्रमाणें बोलला. ३९ राजा धृतराष्ट्रा, जो निर्मळ, निष्कलंक, लोकांवर कृपा करणारा, शरणागतांचें रक्षण करणारा, शरण जाण्यास योग्य, २४० देवांना साह्य करणें हेंच ज्याचें शील व लोकांचें लालन करणें हीच ज्याची लीला, व शरणागतांचें रक्षण करणें हाच ज्याचा खेळ आहे. ४१ जो धर्म व कीर्ति यांनीं स्वच्छ शोभणारा, दान करण्यांत ज्याचा अगाध सरळपणा आहे, व निरुपम बळवान् असून बळीच्या प्रेमबंधनानें बद्ध झाला आहे, ४२ जो भक्तजनांचा कनवाळू, प्रेमळ, जनाशीं मोकळ्या मनानें वागणारा, खऱ्या रीतीनें वागणाऱ्यांचा तारक, आणि चौदा विद्या व चौसष्ट कला यांचा निधि, ४३ तो भक्तांचा राजा वैकुंठनायक श्रीकृष्ण भगवान् देवशाली अशा अर्जुनास सांगता झाला व त्यानें ऐकलें. ४४ संजय आणखी म्हणतोः–हे राजा धृतराष्ट्रा, यापुढें कथा सांगण्याचा जो प्रकार आहे तो ऐक. ४५ तीच रसभरीत गोष्ट मराठी भाषेंत आम्ही सांगू, ती ऐका. ४६ ज्ञानदेव म्हणतातः–श्रोतेहो, तुम्हांसारख्या संतांना आम्हीं शरण जावें, हेंच आम्हांस आमच्या गुरूंनीं–निवृत्तिनाथांनीं शिकविलें आहे ! २४७

१ सुखाकरितां. २ निराकाराला. ३ प्राणापलीकडे. ४ खरें. ५ धर्मास अनुकूल. ६ ठसतो. ७ विचार करून. ८ चांगल्या शेतांत. ९ अत्यंत श्रेष्ठ. १० ठेवा. ११ बोलतात. १२ सर्व जगाला आनंद देणाऱ्या. १३ जगाला उत्पन्न करणाऱ्या. १४ शुद्ध, कलंकरहित. १५ शरण जाण्यास योग्य. १६ देवांना सहाय्य करण्याचा स्वभाव आहे ज्याचा असा. १७ लोकांचें पालन करणें हीच ज्याची लीला आहे. १८ शरणागतरक्षक. १९ शोभणारा. २० निरुपम बळानें. २१ सप्रेम भक्तांना सुलभ. २२ खऱ्या रीतीनें वागणारांचा तारक. २३ सार्वभौम. २४ भक्तांचा. २५ पद्धत. २६ वाटेला, भार्येत. २७ शरण जाऊन सेवावे.

परि कैसें अभिलाषाचें[१] बळ । जे घरोघरीं कपाळ[२] । पिटवीत असे १८ नास्तिका घावया तोंड । वेदांचें गाढें[३] बंड । तें देखोनि पाखांड[४] । आनचि वांजे[५] १९ म्हणती तुम्ही निर्मूळ । लटिकें हें वाग्जाळ[६] । ना म्हणसी तरी पोफळ[७] । घातलें आहे २० पाखांडाचे कडे । नागवीं[८] लुंचिती मुंडें[९] । नियोजिलीं[१०] वितंडें[११] । ताळासि येती २१ मृत्युबळाचेनि माजें । हें जाईल वीण[१२] काजें । तें देखोनियां व्याजें[१३] । निघाले योगी २२ मृत्यूसी आंधाधिले[१४] । तिहीं निरंजन[१५] सेविलें । यमनियमांचे केले । मेळावे पुरे २३ येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें ईशानें । गुंति जाणोनि स्मशानें । वासु केला २४ ऐसिया पैजा महेशा । पांघुरणें दाही दिशा । लांचकेरु[१६] म्हणोनि कोळसा । कांसु[१७] केला २५ पैं सत्यलोकनाथा । वदनें आलीं बळौथा[१८] । तरी तो सर्वथा । जाणेचिना २६

ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् । ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

ऐक[१९] म्हणती हें स्थळ । जीवाचेंचि समूळ । मग प्राण हें कूळ । तयाचें एथ २७ जया प्राणाचे घरीं । अंगें राबती भोंऊ[२०] चारी । आणि मना ऐसा आवरी । कुळवाडीकरु[२१] २८ तयातें इंद्रियबैलांची पेटी[२२] । न म्हणे अंवसीं पाहाटीं । विषयक्षेत्रीं[२३] आंटी[२४] । काढी भली २९ मग विधीची वाफ[२५] चुकवी । आणि अन्यायाचें बीज वोफवी[२६] । कुकर्माचा करवी । राबु जरी ३० तरी तयाचिसारिखें । असंभड पाप पिके । मग जन्मकोटी दुःखें । भोगी जीवु ३१ नातरी विधीचिये वाफे । सत्क्रिया बीज आरोपे । तरी जन्मशताचीं मापें । सुखाचि सैंवी[२७] ३२ तंव आणिकें[२८] म्हणती हें नव्हे । हें जिवाचेंचि न म्हणावें । आमुतें पुसा आघवें । क्षेत्राचें या ३३ अहो जीवु एथ उखितां[२९] । वस्तीकरु वाटे जातां । आणि प्राणु हा बैलौता[३०] । म्हणोनि जागे ३४ अनादि हे प्रकृती । सांख्य जियेतें गाती । क्षेत्र हे वृत्ती[३१] । तियेचि जाणा ३५ आणि तियेतेंचि आघवा । आथी घरमेळावा । म्हणोनि ते वोहिवा[३२] । घरीं वाहे ३६ वाद्यौंचिये[३३] रहाटी । जे कां मुद्दल तिघे[३४] सृष्टीं । ते इयेच्यांचि[३५] पोटीं । जहाले गुण ३७ रजोगुण पेरी । तेतुलें सत्त्व सकरी[३६] । मग एकलें तम करी[३७] । सर्वगुणी[३८] ३८ रचूनि महत्तत्त्वाचें[३९] खळें । मळी एके काळुगेनि पोळें[४०] । तेथ अव्यक्तांची[४१] मिळे । सांजें[४२] भली ३९ तंव ऐकीं[४३] मतिवंतीं[४४] । या बोलाचिया खंतीं[४५] । म्हणितलें या शैली[४६] । अर्वाचीना ४० हां हो परतत्त्वा[४७]आंतु । कें प्रकृतीची मातु । हा क्षेत्रवृत्तांतु । उगेंचि आइका ४१ शून्यसेजे[४८]

परि कैसें अभिलाषाचें बळ । जे घरोघरीं कपाळ[2] । पिटवीत असे १८ नास्तिका
घावया तोंड । वेदांचें गाढें[3] बंड । तें देखोनि पाखांड[4] । आनचि वाजे[5] १९
म्हणती तुम्ही निर्मूळ । लटिकें हें वाग्जाळ[6] । ना म्हणसी तरी पोफळ[7] । घा-
तलें आहे २० पाखांडाचे कडे । नागवीं[8] लुंचिती [9]मुंडें । नियोजिलीं[10] वितंडें[11] ।
ताळासि येती २१ मृत्युबळाचेनि माजें । हें जाईल वीण[12] काजें । तें देखो-
नियां व्याजें[13] । निघाले योगी २२ मृत्यूसी ओंधाधिले[14] । तिहीं निरंजन[15] से-
विलें । यमनियमांचे केले । मेळावे पुरे २३ येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें
ईशानें । गुंति जाणोनि स्मशानें । वासु केला २४ ऐसिया पैजा महेशा ।
पांघुरणें दाही दिशा । लांचकेंरु[16] म्हणोनि कोळसा । कांसु[17] केला २५ पैं सत्य-
लोकनाथा । वदनें आलीं बळींर्थीं[18] । तरी तो सर्वथा । जाणेचिना २६

ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् । ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

[19]ऐक म्हणती हें स्थळ । जीवाचेंचि समूळ । मग प्राण हें कूळ । तयाचें एथ
२७ जया प्राणाचे घरीं । अंगें राबती भोंऊ[20] चारी । आणि मना ऐसा आवरी ।
[21]कुळवाडीकरु २८ तयातें इंद्रियबैलांची पेटी[22] । न म्हणे अंवसीं पाहाटीं । [23]विष-
यक्षेत्रीं[24] आटी । काढी भली २९ मग विधीची[25] वाफ चुकवी । आणि अन्या-
याचें बीज वाफवी[26] । कुकर्माचा करवी । राबु जरी ३० तरी तयाचिसारिखें । अ-
संभड पाप पिके । मग जन्मकोटी दुःखें । भोगी जीवु ३१ नातरी विधीचिये
वाफे । सत्क्रिया बीज आरोपे । तरी जन्मशताचीं मापें । सुखचि मवी[27] ३२ तंव
आणिकें[28] म्हणती हें नव्हे । हें जिवाचेंचि न म्हणावें । आमुतें पुसा आघवें ।
क्षेत्राचें या ३३ अहो जीवु एथ उखितां[29] । वस्तीकरु वाटे जातां । आणि प्राणु
हा [30]बैलौता । म्हणोनि जागे ३४ अनादि हे प्रकृती । सांख्य जियेतें गाती । क्षेत्र
हे [31]वृत्ती । तियेचि जाणा ३५ आणि तियेतेंचि आघवा । आथी घरमेळावा ।
म्हणोनि ते वाहिवा[32] । घरीं वाहे ३६ वाह्यांचिये[33] रहाटी । जे कां मुद्दल तिघे इये
सृष्टीं । ते इयेच्याचि[35] पोटीं । जहाले गुण ३७ रजोगुण पेरी । तेतुलें सत्त्व सो-
[36]करी । मग एकलें तम करी[37] । संवंगणी[38] ३८ रचूनि महत्तत्त्वाचें[39] खळें । मळी एके
काळुगेनि पोळें । तेथ अव्यक्ताची[41] मिळे । सांजें[42] भली ३९ तंव ऐकीं[43] मतिवंतीं[44] ।
या बोलाचिया खंतीं[45] । म्हणितलें या [46]सैंसी । अर्वाचीना ४० हां हो परतत्त्वा-
आंतु । कें प्रकृतीची मातु । हा क्षेत्रवृत्तांतु । उगेंचि आइका ४१ शून्यसेजे

कोणी जाणत नाहीं, परंतु त्याच्या भीपणाबद्दलची काय थोरवी वर्णावी, कीं ज्याच्या योगानें घरोघर याचाच काथ्याकूट केला जातो! १८ नास्तिकांचें तोंड बंद करण्याविषयीं वेद महान् प्रबळ आहे हें पाहून पाखांड्यांची वेदाविषयीं तिसरीच बडबड सुरू झाली. १९ ते म्हणतातः-तुम्ही वेद निर्मूल असून व्यर्थ बडबड करणारे आहां, असें नाहीं म्हणाल तर, तसें सिद्ध करण्याकरितां प्रतिज्ञेची सुपारी ठेविली आहे. २० पाखांड्यांचे थवेच्या थवे-कोणी दिगंबर बनतात, कोणी मुंडक्यावरील केंस उपटून काढितात, तरी त्यांनीं ठरविलेले सर्व वितंडवाद आपोआप खालीं बसतात. २१ हें क्षेत्र मृत्यूच्या सपाट्यांत सांपडून निरर्थक जाईल म्हणून [ आत्मा ब्रह्मांटीं नेऊन त्याचें संरक्षण करण्याकरितां ] योगी पुढें सरसावतात. २२ जे मृत्यूला भितात, ते एकांतवास करून यमनियमांचें साधनसमुदाय जमवितात; २३ याच क्षेत्राच्या विचाराच्या अभिमानाकरितो श्रीशंकरांनीं राज्य सोडिलें आणि त्यापासून आपल्यास उपाधि लागूं नये, म्हणून ते स्मशानांत जाऊन राहिले. २४ या क्षेत्राचें ज्ञान करून घेणार अशी प्रतिज्ञा करून शंकरांनीं वनांत राहून दाही दिशा हेंच आपलें पांघरूण असें मानलें; व काम हा योगभ्रष्ट करणारा ( लांचखाऊ ) असें जाणून त्यास जाळून टाकलें; २५ ह्याच गोष्टीचा निश्चय करण्याकरितां ब्रह्मदेवाला जरी चार तोंडें उत्पन्न झालीं, तरी त्यालाही या क्षेत्राची ओळख पटली नाहीं. २६

**अन्वयार्थ**—(ऋषिभिः)-वसिष्ठादि ऋषींनीं-(बहुधा)-अनेक प्रकारांनीं-(गीतं)-गायलेलें-(विविधैः छन्दोभिः)-नाना प्रकारच्या वेदांनीं-(पृथक्)-[गीतं]-अगदीं विवेकतः गायलेलें-(च)-आणि-( हेतुमद्भिः )-युक्तियुक्त-( विनिश्चितैः )-अत्यंत निश्चित, अशा-(ब्रह्मसूत्रपदैः)-ब्रह्मसूत्रपदांनीं-(एव)-[बहुधा गीतं]-अनेक प्रकारें गायलेलें असें हें आहे. ४

जे कर्मवादी आहेत, ते असें म्हणतात कीं, हें सर्व क्षेत्र जीवाच्या ताब्यांत असून त्याची सर्व व्यवस्था प्राणाकडे सोंपविली आहे. २७ ज्या प्राणाच्या घरीं त्याचे चार भाऊ ( अपान, व्यान, समान व उदान ) हे अंगमेहनतीनें झटतात, व त्यांच्यावर मनासारखा देखरेख करणारा कुळवाडी आहे; २८ त्या जीवाजवळ पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें मिळून दहा इंद्रियरूप बैलांची जोडी असून, तो रात्र व दिवस कांहीं न म्हणतां शरीराच्या ठिकाणीं मेहनत करवून घेऊन विषयाचा राब काढतो; २९ मग कर्तव्याची वाफ चुकवून ( विहित कर्माचरणाची संधी दवडून ) व अन्यायाचें बीज पेरून त्याला वाईट कर्माचें खत घालतो; ३० त्या योगानें बीजाप्रमाणें अनन्वित पापें पिकून मग कोटयवधि जन्मपर्यंत जीव दुःखें भोगितो. ३१ किंवा विहित कर्माचरणरूपी वाफ साधून सत्क्रियेचें बीज पेरल्यावर कोटयवधि जन्मपर्यंत सुखच भोगितो. ३२ पण सांख्यमतवाद्यांचें असें म्हणणें नसून ते म्हणतात कीं, क्षेत्र हें जीवाच्या स्वाधीन नाहीं; तें कोणाच्या स्वाधीन आहे तें सर्व आम्हांस पुसा. ३३ अहो, जीव हा उपरा वाटसरू असून वाट चालत असतांना क्षेत्रांत नुसती वस्ती करितो; आणि प्राण हा बलुतेदार असल्यामुळें जागा रहातो. ३४ ज्या अनादिसिद्ध प्रकृतीची सांख्यमतवादी स्तुति करतात, त्या प्रकृतीची या क्षेत्राचे ठिकाणीं वृत्ति आहे असें समजा; ३५ आणि त्या प्रकृतीच्या घरचा सर्व जमाव असल्यामुळें, क्षेत्राची सर्व वहिवाट ती घरीं करते. ३६ त्या शेताची मूळ लागवड करणारे या सृष्टींत जे मुख्य तीन गुण, ते तिच्या पोटीं उत्पन्न झाले आहेत. ३७ रजोगुण हा पेरणी करतो, सत्त्वगुण हा राखतो, व मग एकटा तमोगुण सर्व पीक गोळा करतो. ३८ नंतर महत्तत्त्वाचें खळें करून काल नामक जबरदस्त पोळाकडून ती मळणी घालते; मग अव्यक्तरूपी ओयतीच संध्याकाळ होते. ३९ इतक्यांत बुद्धिमान् संकल्पवाद्यांना हें बोलणें न रुचून ते म्हणाले कीं, या तुमच्या कल्पना अगदीं अलीकडल्या आहेत! ४० अहो, ब्रह्मापुढें प्रकृतीची काय बाब! या क्षेत्राची हकीकत आम्ही सांगतों, ती ऐका तर खरी! ४१

---

१ लोभाचें, भीपणाचें. २ डोकेफोड-काथ्याकूट केली जाते. ३ मोठें. ४ पाखांडी. ५ बटबडे. ६ शब्दपांडित्य. ७ प्रतिज्ञा, सुपारी. ८ दिगंबरवादी. ९ डोक्याचें मुंडन करितात. १० ठरविली. ११ वितंडवादानें. १२ निरर्थक. १३ निमित्तानें. १४ भ्यालें. १५ निर=नाहीं, अंजन=अज्ञानमल ज्यांना ते, सत्पुरुष. १६ लांच देणारा. १७ मदन. १८ निश्चय करण्याकरितां. १९ कर्मवादी. २० अपान, व्यान, समान, उदान. २१ शेतकरी. २२ जोड्या. २३ शब्द, रस, गंध इत्यादि विषयरूप क्षेत्रांत. २४ मेहनत. २५ कर्तव्य=कर्माचा क्रम. २६ पेरी, वाफ्यांत घाली. २७ भोगतो, मिळवितो. २८ सांख्य. २९ पाहुणा, वाटसरू. ३० बलुतेदार. ३१ वतन. ३२ वहिवाट, लागवड. ३३ लागवडीच्या. ३४ सत्त्व, रज आणि तम. ३५ प्रकृतीच्या, मायेच्या. ३६ राखतो. ३७ सर्व पीक गोळा करतो. ३८ कापणी. ३९ गुणासाम्य मायेचें. ४० काळनामक बैलाकडून ४१ जीवाचा. ४२ रास, ढीग. ४३ मायावादी. ४४ बुद्धिवानांनीं. ४५ तिरस्कारानें. ४६ ज्ञान, कल्पना. ४७ ब्रह्मापुढें. ४८ अव्यक्त रूपी सेजगृहांत.

परि कैसें अभि[1]लाषाचें बळ । जे घरोघरीं कपोळ[2] । पिटवीत असे १८ नास्तिका द्यावया तोंड । वेदांचें गाढें[3] बंड । तें देखोनि पाँखांड[4] । आनचि वाजे[5] १९ म्हणती तुम्ही निर्मूळ । लटिकें हें वाग्जाळ[6] । ना म्हणसी तरी पोफळ[7] । घातलें आहे २० पाखांडाचे कडे । नागवीं[8] लुंचिती मुंडें[9] । नियोजिलीं[10] वितंडें[11] । ताळासि येती २१ मृत्युबळाचेनि माजें । हें जाईल वीण[12] काजें । तें देखोनियां व्याजें[13] । निघाले योगी २२ मृत्यूसी आंधाधिले[14] । तिहीं निरंजन[15] सेविलें । यमनियमांचे केले । मेळावे पुरे २३ येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें ईशानें । गुंति जाणोनि स्मशानें । वासु केला २४ ऐसिया पैजा महेशा । पांघुरणें दाही दिशा । लांचकरु[16] म्हणोनि कोळसा । कांमु[17] केला २५ पैं सत्यलोकनाथा । वदनें आलीं बळौथीं[18] । तरी तो सर्वथा । जाणेचिना २६

ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् । ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

ऐक[19] म्हणती हें स्थळ । जीवाचेंचि समूळ । मग प्राण हें कूळ । तयाचें एथ २७ जया प्राणाचे घरीं । अंगें राबती भांऊ[20] चारी । आणि मना ऐसा आवरी । कुळवाडीकरु[21] २८ तयातें इंद्रियबैलांची पेटी[22] । न म्हणे अंवसीं पाहाटीं । [23]विषयक्षेत्रीं आंटी[24] । काढी भली २९ मग विधीची[25] वाफ चुकवी । आणि अन्यायाचें बीज वांफवी[26] । कुकर्माचा करवी । राबु जरी ३० तरी तयाचिसारिखें । असंभड पाप पिके । मग जन्मकोटी दुःखें । भोगी जीवु ३१ नातरी विधीचिये वाफे । सत्क्रिया बीज आरोपे । तरी जन्मशताचीं मापें । सुखाचि मैवी[27] ३२ तंव आणिकें[28] म्हणती हें नव्हे । हें जिवाचेंचि न म्हणावें । आमुतें पुसा आघवें । क्षेत्राचें या ३३ अहो जीवु एथ उखितां[29] । वस्तीकरु वाटे जातां । आणि प्राणु हा बैलौता[30] । म्हणोनि जागे ३४ अनादि हे प्रकृती । सांख्य जियेतें गाती । क्षेत्र हे वृत्ती[31] । तियेचि जाणा ३५ आणि तियेतेंचि आघवा । आथी घरमेळावा । म्हणोनि ते वाहिवा[32] । घरीं वाहे ३६ वाह्यांचिये[33] रहाटी । जे कां मुद्दल तिथें[34] इये सृष्टीं । ते इयेच्याचि[35] पोटीं । जहाले गुण ३७ रजोगुण पेरी । तेतुलें सत्त्व सोकेरी[36] । मग एकलें तम केरी[37] । संवगणी[38] ३८ रचूनि महत्तत्त्वाचें[39] खळें । मळी एके काळुगेनि पोळें । तेथ अव्यक्ताची[41] मिळे । सांजे[42] भली ३९ तंव ऐकीं[43] मतिवंतीं[44] । या बोलाचिया खंतीं[45] । म्हणितलें या झेंसी[46] । अर्वाचीना ४० हां हो परतत्त्वा[47]आंतु । कें प्रकृतीची मातु । हा क्षेत्रवृत्तांतु । उगेंचि आइका ४१ शून्यसेजे[48]

कोणी जाणत नाही, परंतु त्याच्या मीपणाबद्दलची काय थोरवी वर्णावी, की ज्याच्या योगानें घरोघर याचाच काथ्याकूट केला जातो। १८ नास्तिकांचें तोंड बंद करण्याविषयीं वेद महान् प्रबळ आहे हें पाहून पाखांड्यांची वेदाविषयीं तिसरीच बडबड सुरू झाली. १९ ते म्हणतातः–तुम्ही वेद निर्मूल असून व्यर्थ बडबड करणारे आहां; असें नाहीं म्हणाल तर, तसें सिद्ध करण्याकरितां प्रतिज्ञेची सुपारी ठेविली आहे. २० पाखांड्यांचे थवेच्या थवे–कोणी दिगंबर बनतात, कोणी मुंडक्यावरील केंस उपटून काढितात, तरी त्यांनीं ठरविलेले सर्व वितंडवाद आपोआप खालीं बसतात. २१ हें क्षेत्र मृत्यूच्या सपाटयांत सांपडून निरर्थक जाईल म्हणून [ आत्मा ब्रह्मांडीं नेऊन त्याचें संरक्षण करण्याकरितां ] योगी पुढें सरसावतात. २२ जे मृत्यूला भितात, ते एकांतवास करून यमनियमांचें साधनसमुदाय जमवितात; २३ याच क्षेत्राच्या विचाराच्या अभिमानाकरितां श्रीशंकरांनीं राज्य सोडिलें आणि त्यापासून आपल्यास उपाधि लागूं नये, म्हणून ते स्मशानांत जाऊन राहिले. २४ या क्षेत्राचें ज्ञान करून घेणार अशी प्रतिज्ञा करून शंकरांनी वनांत राहून दाही दिशा हेंच आपलें पांघरुण असें मानलें; व काम हा योगभ्रष्ट करणारा ( लांचखाऊ ) असें जाणून त्यास जाळून टाकलें; २५ त्याच गोष्टीचा निश्चय करण्याकरितां ब्रह्मदेवाला जरी चार तोंडें उत्पन्न झालीं, तरी त्यालाही या क्षेत्राची ओळख पटली नाही. २६

**अन्वयार्थ**--(ऋषिभिः)–वसिष्ठादि ऋषींनीं–(बहुधा)–अनेक प्रकारांनीं–(गीतं)–गायलेलें–(विविधैः छन्दोभिः)–नाना प्रकारच्या वेदांनीं–(पृथक्)–[गीतं]–अगदीं विवेकतः गायलेलें–(च)–आणि–( हेतुमद्भिः )–युक्तियुक्त–( विनिश्चितैः )–अत्यंत निश्चित अशा–(ब्रह्मसूत्रपदैः)–ब्रह्मसूत्रपदांनीं–(एव)–[बहुधा गीतं]–अनेक प्रकारें गायलेलें असें हें आहे. ४

जे कर्मवादी आहेत, ते असें म्हणतात की, हें सर्व क्षेत्र जीवाच्या ताब्यांत असून त्याची सर्व व्यवस्था प्राणाकडे सोंपविली आहे. २७ ज्या प्राणाच्या घरीं त्याचे चार भाऊ ( अपान, व्यान, समान व उदान ) हे अंगमेहनतीनें झटतात, व त्यांच्यावर मनासारखा देखरेख करणारा कुळवाडी आहे; २८ त्या जीवाजवळ पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें मिळून दहा इंद्रियरूप बैलांची जोडी असून, तो रात्र व दिवस कांहीं न म्हणतां शरीराच्या ठिकाणीं मेहनत करून घेऊन विषयाचा राब काढतो; २९ मग कर्तव्याची वाफ चुकवून ( विहित कर्माचरणाची संधी दवडून ) व अन्यायाचें बीज पेरून त्याला वाईट कर्माचें खत घालतो; ३० त्या योगानें बीजाप्रमाणें अनन्वित पापें पिकून मग कोटयवधि जन्मपर्यंत जीव दुःखें भोगितो. ३१ किंवा विहित कर्माचरणरूपी वाफ साधून सत्क्रियेचें बीज पेरल्यावर कोटयवधि जन्मपर्यंत सुखच भोगितो. ३२ पण सांख्यमतवाद्यांचें असें म्हणणें नसून ते म्हणतात की, क्षेत्र हें जीवाच्या स्वाधीन नाहीं; तें कोणाच्या स्वाधीन आहे तें सर्व आम्हांस पुसा. ३३ अहो, जीव हा उपरा वाटसरू असून वाट चालत असतांना क्षेत्रांत तुसतीं वस्ती करितो; आणि प्राण हा बलुतेदार असल्यामुळें जागा रहातो. ३४ ज्या अनादिसिद्ध प्रकृतीची सांख्यमतवादी स्तुति करतात, त्या प्रकृतीची या क्षेत्राचे ठिकाणीं वृत्ति आहे असें समजा; ३५ आणि त्या प्रकृतीच्या घरचा सर्व जमाव असल्यामुळें, क्षेत्राची सर्व वहिवाट ती घरीं करते. ३६ त्या शेताची मूळ लागवड करणारे या सृष्टींत जे मुख्य तीन गुण, ते तिच्या पोटीं उत्पन्न झाले आहेत. ३७ रजोगुण हा पेरणी करतो, सत्वगुण हा राखतो, व मग एकटा तमोगुण सर्व पीक गोळा करतो. ३८ नंतर महत्तत्त्वाचें खळें करून काल नामक जबरदस्त पोळाकडून ती मळणी घालते; मग अव्यक्तरूपी आयतीच संध्याकाळ होते. ३९ इतक्यांत बुद्धिमान् संकल्पवाद्यांना हें बोलणें न रुचून ते म्हणाले कीं, या तुमच्या कल्पना अगदीं अलीकडल्या आहेत! ४० अहो, ब्रह्मापुढें प्रकृतीची काय बाब! या क्षेत्राची हकीकत आम्ही सांगतों, ती ऐका तर खरी! ४१

१ लोभाचें, मीपणाचें. २ डोकेफोड–काथ्याकूट केली जाते. ३ मोठें. ४ पाखांडी. ५ बटबटे. ६ शब्दपांडित्य. ७ प्रतिज्ञा, सुपारी. ८ दिगंबरवादी. ९ डोकीचें मुंडन करितात. १० ठरविलेले. ११ वितंडवादानें. १२ निरर्थक. १३ निमित्तानें. १४ भ्यालें. १५ निर=नाहीं, अंजन=अज्ञानमल ज्यांना ते, सत्पुरुष. १६ लांच देणारा. १७ मदन. १८ निश्चय करण्याकारितां. १९ कर्मवादी. २० अपान, व्यान, समान, उदान. २१ शेतकरी. २२ जोड्या. २३ शब्द, रस, गंध इत्यादि विषयरूप क्षेत्रांत. २४ मेहनत, २५ कर्तव्य=कर्माचा ऊब. २६ पेरी, वाफ्यांत घाली. २७ मोजतो, मिळवितो. २८ सांख्य. २९ पाहुणा, वाटसरू. ३० बलुतेदार. ३१ वतन. ३२ वहिवाट, लागवड. ३३ लागवडीच्या. ३४ सत्त्व, रज आणि तम. ३५ प्रकृतीच्या, मायेच्या. ३६ राखतो. ३७ सर्व पीक गोळा करतो. ३८ कापणी. ३९ गुणासाम्य मायेचें. ४० काळनामक बैलाकडून ४१ जीवाचा. ४२ रास, ढीग. ४३ मायावादी. ४४ बुद्धिवानांनां. ४५ तिरस्कारानें. ४६ ज्ञान, कल्पना. ४७ ब्रह्मापुढें, ४८ अव्यक्त रूपी सेजगृहांत.

शालिये । सुलीनतेचिये तुळिये । निद्रा केली होती बळियें । संकल्पें येणें ४२ तो अवसांत चेइला । उद्यमीं सदैव भला । म्हणोनि ठेवा जोडला । इच्छावशें ४३ निरालंबींची वाडी । होती त्रिभुवनायेवढी । हे तयाचिये जोडी । रूपा आली ४४ मग महाभूतांचें एकवाट । सैरां वेंटाळूनि भाटें । भूतग्रामांचे आघाटे । चिरिले चौरी ४५ यावरी आदी । पांचभूतिकांची बांधी । बांधली प्रभेदीं । पंचभूतिकीं ४६ कर्माकर्मांचे गुंडे । बांध घातले दोहींकडे । नपूंसकें बैरडें । रानें केलीं ४७ तेथ येरझारेलागीं । जन्ममृत्यूची सुरंगी । सुहाविली निलागी । संकल्पें येणें ४८ मग अहंकारासि एकलाधी । करूनि जीवितावधी । वेंहाविलें बुद्धी । चराचर ४९ यापरी निराळीं । वाढे संकल्पाची डाहाळी । म्हणोनि तो मुळीं । प्रपंचा यया ५० ययापरि मत्तसुगुतकीं । तेथ पडिघायिले आणिकीं । म्हणती हांहो विवेकी । कैसे तुम्ही ५१ परतंत्र्याचिया गांवीं । संकल्पसेज देखावी । तरि कां पां न मनावी । प्रकृति तयाची ५२ परि हें असो नव्हे । तुम्ही या न लगावें । आतांचि हें आघवें । सांगिजैल ५३ तरि आकाशीं कवणें । केलीं मेघाचीं भरणें । अंतरिक्ष तारागणें । धरी कवण ५४ गगनाचा तडावा । कोणें वोढिला केधवां । पवनु हिंडतु असावा । हें कवणाचें मत ५५ रोमां कवण पेरी । सिंधू कवण भरी । पर्जन्याचिया करी । धारा कवण ५६ तैसें क्षेत्र हें स्वभावें । हे वृत्ती कवणाची नव्हे । हें वाहे तया फावे । येरां तुटे ५७ तंव आणिकें एकें । क्षोभें म्हणितलें निकें । तरि भोगिजे एकें । काळें केवीं हें ५८ तरि ययाचा मारु । देखताति अनिवारु । परी स्वमतीं भरु । अभिमानियां ५९ हें जाणे मृत्यूचा रागिटा । सिंहाडयांचा दरकुटा । परी काय कीजे वांजटा । पूरीजेत असे ६० महाकल्पपरौती । कैवं घालूनि अवचितीं । सत्यलोकभद्र-जाती । आंगीं वाजे ६१ लोकपाळ नित्य नवे । दिग्गजांचे मेळावे । स्वर्गींचिये आडवे । रिगोनि मोडी ६२ येर ययाचेनि अंगवातें । जन्ममृत्यूचिये गर्तें । निर्जिवें होऊनि भ्रमतें । जीवमृगें ६३ न्याहाळीं पां केव्हडा । पसरलासे चवडा । करूनियां माजिवडा । आकारगजु ६४ म्हणोनि काळाची सत्ता । हाचि बोलु निरुता । ऐसे वाद पांडुसुता । क्षेत्रालागीं ६५ हे बहु उखिविखी । ऋषीं केली नैमिषीं । पुराणें इयेविषीं । मतपत्रिका ६६ अनुष्टुभादि छंदें । प्रबंधीं जे एवंविधें । तें पत्रावलंबन मदें । करिती अझुनी ६७ वेदांचें बृहत्सामसूत्र । जें

-लयरूपी पलंगावरील शून्यरूपी विछान्यावर बलवान् संकल्प निजला होता. ४२ तो अकस्मात् जागा झाला व तो आपल्या व्यापारांत नेहमीं तत्पर होता म्हणून त्याला त्याच्या इच्छेनुरूप ठेवा मिळाला; ४३ आणि त्या संकल्पाच्या निर्गुण स्वरूपाची त्रिभुवनाएवढी बाग त्याच्या खटपटीनें रंगारूपाला आली; ४४ नंतर निरनिराळीं पंचमहाभूतें एकत्र करून, भूतग्रामांचें जरायुज, स्वेदज, अंडज व उद्भिज्ज असे चार घाट रचिले; ४५ नंतर प्रथम पंचमहाभूतांचे निरनिराळे पोटभेद करून बांधे तयार केले; ४६ त्या घटांच्या दोन्ही बाजूस कर्म व अकर्म यांच्या ताली घातल्या, व त्यामधील नापीक जमिनीची म्हणजे पशुपक्षादिक हीं रानें बनविलीं; ४७ नंतर या संकल्पाच्या योगानें जन्ममृत्यूंच्या येरझारा करण्याकरितां सोपी व कधीं बंद न पडणारी अशी वाट तयार केली; ४८ मग संकल्पानें अहंकाराबरोबर ऐक्य करून, बुद्धीकडून चराचरांची वहिवाट करविली! ४९ याप्रमाणें चिदाकाशांत संकल्पाची डाळी वाढल्यामुळें प्रपंचाला तो मूळ कारण झाला. ५० याप्रमाणें संकल्पवाद्यांचीं मुक्ताफळें ऐकून, त्या ठिकाणीं जे दुसरे ( स्वभाववादी ) होते ते पुढें होऊन म्हणाले कीं, " आपण फार विद्वान् आहां, तरी आपलें मत आपले जवळच ठेवा. ५१ परब्रह्माच्या गांवांत जर संकल्पाचें विऱ्हाड आहे, असें मानावयाचें, तर मग सांख्याची प्रकृती कां मानूं नये? ५२ परंतु हें असो, तुम्ही या भानगडींत पडूं नका, हें काय प्रकरण आहे हें अस्मादिक सांगतील. ५३ तर आकाशांतील ढगांमध्यें पाण्याचा भरणा कोण करतो? व अंतरिक्षांतील चांदण्या खालीं पडत नाहींत त्यांना कोणाचा आधार आहे? ५४ आकाशाचें छत मध्यें खांब न घेतां जें सारखें ताणलेलें आहे, तें कोणी व केव्हां ताणलें? आणि वाऱ्यास नेहमीं वाहण्यास कोणी सांगितलें आहे? ५५ अंगावरील जी लव दिसते तिची पेरणी कोण करतो? व समुद्र कधींहि आटत नाहीं त्यांत पाणी कोण भरतो? आणि पावसाच्या धारा कोण उत्पन्न करतो? ५६ या गोष्टीप्रमाणें क्षेत्र हें स्वभावसिद्ध असून याचा कोणीही वतनदार नाहीं. जो यांत खपेल त्यास हें फलद्रूप होईल व खपणार नाहीं त्यास फलद्रूप होणार नाहीं." ५७ इतक्यांत दुसरे एक ( कालवादी ) रागावून म्हणाले कीं, " तुम्ही म्हणतां हें जर खरें आहे, तर या क्षेत्रावर कालाची सत्ता कां आहे? ५८ तथापि, त्या कालाचा अनिवार सपाटा आहे हें जाणूनही, जे अभिमानी आहेत ते त्यास न जुमानतां आपल्याच मताचें समर्थन करतात. ५९ सिंहाच्या दरीप्रमाणें मृत्यु हा भयंकर आहे, असें समजून जर तुम्ही या क्षेत्राबद्दल व्यर्थ बडबड केली, तर ती काय पुरी पडणार आहे? ६० हा काळ महाकल्पापलीकडेही मिठी घालून, ब्रह्मदेवाचें स्थान जो सत्यलोक त्यालाही जाऊन मिठी मारतो; ६१ स्वर्गाच्या अरण्यांत शिरून अष्टलोकपाळ नित्य नेत करतो, व आठ दिशांच्या आठ ऐरावतांचा संहार करतो; ६२ याच्या अंगवायूनें जीवरूप मृग जन्ममृत्यूंच्या खळग्यांत पडून निर्जीव होऊन भ्रमण करतात. ६३ या कालानें हाताचा पंजा केवढा मोठा पसरला आहे तो पहा कीं, जगदाकाररूपी जो हत्ती तो यानें आपल्या तळहातांत धरिला आहे. ६४ म्हणून, काळाची सत्ता आहे असें म्हणतात, हीच गोष्ट खरी आहे." याप्रमाणें; अर्जुना या क्षेत्राबद्दल मतभेद आहेत. ६५ अशी पुष्कळ भवति न भवति नैमिषारण्याचे ठिकाणीं ऋषींनीं केली, याबद्दल आपल्यास पुराणांचा आधार आहे. ६६ वेदांतील अनुष्टुभादि छंदांत याबद्दल पुष्कळ चर्चा केलीं असून, या क्षेत्राविषयीं गर्वानें अद्याप ग्रंथ तयार करतात. ६७ वेदांतील बृहत्सामसूत्र-जें ज्ञानदृष्टीनें अति पवित्र आहे, त्यालाही क्षेत्र म्हणजे काय हें

१ शाळा=मंदीर. २ लयरूपी विछान्यावर. ३ बलवान्. ४ यकस्मात्. ५ जागा झाला. ६ परब्रह्मोंची. ७ जमीन, बाग. ८ उद्योगानें, सहाय्यानें, खटपटीनें ९ ऐक्य, एकीकरण. १० यथेच्छ, चौहोंकडून. ११ भाट जमीन, पडित जमीन, उखर भूमि. १२ माग. १३ जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज अशी चार प्रकारांनीं सृष्टि पसरली; १४ पंचमहाभूतांच बंधन; बांधे. १५ वेगवेगळे. १६ नापीक जमीन. १७ सुयार. १८ सुशोभित तयार केली. १९ निरालंबापासून थाडोपर्यंत ( मृत्युलोकपर्यंत ). २० बुद्धीशीं अहंकाराचें ऐक्य. २१ अखेरपर्यंत. २२ वहिवाटविलें रावविलें. २३ चिदाकाशांत. २४ संकल्पवाद्यांनी. २५ पराभविलें. २६ स्वभाववाद्यांनी. २७ परब्रह्माच्या. २८ संकल्पाचें सेजघर. २९ नक्षत्रें. ३० इच्छा, हुकूम. ३१ वतन. ३२ खपेल, राबेल. ३३ फलद्रूप होईल. ३४ कालवाद्यानें. ३५ भयंकर. ३६ सिंहाचा. ३७ गुहा. ३८ बडबड. ३९ पुरी पडणार ४० मिठी. ४१ स्वाधीन करून घेतो. ४२ आठ दिशांचे आठ ऐरावत. ४३ अरण्यांत. ४४ पंजा. ४५ मध्यें. ४६ जगदाकार हत्ती. ४७ वादविवाद, भवति न भवति. ४८ अभिप्राय पत्रें. ४९ आठ अक्षरांचा चरण, बत्तीस अक्षरांचा छंद. ५० ग्रंथाश्रय.

देखणेपणें पवित्र । परी तयाही हें क्षेत्र । नेणवेचि ६८ आणीक आणिकींही बहुतीं । महाकवीं हेतुमंतीं । ययालागीं मती । वेंचिलिया ६९ परी ऐसें हें एवढें । कीं अमुकेयाचेंचि फुडें । हें कोणाही वरपडे । होयचिना ७० आतां यावरी जैसें । क्षेत्र हें असे । तुज सांगों तैसें । सायंतु गा ७१

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च । इंद्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः ॥ ५ ॥
इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः । एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

तरी महाभूतपंचकु । आणि अहंकारु एकु । बुद्धि अव्यक्त दशकु । इंद्रियांचा ७२ मन आणीकही एकु । विषयांचा दशकु । सुख दुःख द्वेषु । संघात इच्छा ७३ आणि चेतना धृती । एवं क्षेत्रव्यक्ती । सांगितली तुजप्रती । आघवीची ७४ आतां महाभूतें कवणें । कवण विषयो कैसीं करणें । हें वेगळालेपणें । एकैक सांगों ७५ तरी पृथ्वी आप तेज । वायु व्योम इयें तुज । सांगितलीं बुझ । महाभूतें पांचें ७६ आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असे । नातरी अंवसें । चंद्र गूढु ७७ ना ना अप्रौढबाळकीं । तारुण्य राहे थोकीं । कां न फुलतां केळिकीं[१२] । आमोदु[१३] जैसा ७८ किंबहुना काष्ठीं । वन्हि जेवीं किरीटी । तेवीं प्रकृतीचिया पोटीं । गोप्यु जो[१४] असे ७९ जैसा ज्वरु धातुगतु । अपथ्याचें मिष पहातु । मग जालिया आंतु- । बाहेरी व्यापी ८० तैसी पांचांही गांठी पडे । जैं देहाकारु उघडे । तैं नाचवी चहूंकडे । तो अहंकारु गा ८१ नवल अहंकाराची गोठी । विशेषें[१५] न लगे अज्ञानापाठीं । सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ८२ आतां बुद्धि जे म्हणिजे । ते ऐशिया चिन्हीं जाणिजे । बोलिलें यदुराजें । तें आइकें सांगों ८३ तरी कंदर्पाचेनि[१६] बळें । इंद्रियवृत्तीचेनि मेळें[१७] । विभांडूनि[१८] येती पौळे[१९] । विषयांचे ८४ तो सुखदुःखांचा नागोवा[२०] । जेथ उगाणों[२१] लागे जीवा । तेथ दोहींसी बरवा । पाडु जे धरी ८५ हें सुख हें दुःख । हें पुण्य हे दोष । कां हें मैळें[२२] हें चोख । ऐसें जे निवडी ८६ जिये अधमोत्तम सुझे[२३] । जिये सानें थोर बुझे[२४] । जिया दिठीं पारखिजे । विषो जिवें ८७ जे तेजतत्त्वांची[२५] औंदी[२६] । जे सत्त्वगुणाची वृद्धी । जे आत्मया जीवाची संधी । वसवीत असे जे ८८ अर्जुना ते गा जाण । बुद्धि तू संपूर्ण । आतां आइकें वोळखण । अव्यक्ताची ८९ पैं सांख्यांचिया सिद्धांतीं । प्रकृती जे महामती[२७] । तेचि एथें प्रस्तुतीं । अव्यक्त गा ९० आणि सांख्ययोगमतें । प्रकृती परिसविली तूंतें ।

समजलें नाहीं, ६८ आणखी पुष्कळ दूरदर्शी महाकवि या क्षेत्राबद्दल वादविवाद करून थकले; ६९ परंतु हें एवढें विकट आहे कीं, हें खरोखर कोणाचें आहे हें सांगतां येत नाहीं; व कोणाच्याही स्वाधीन होत नाहीं. ७० तर आतां क्षेत्र म्हणजे काय आहे याविषयीं सांगत विचार तुला मी सांगतों. ७१

**शब्दान्वयार्थ**--(महाभूतानि)-पृथिव्यादि पंच सूक्ष्म भूतें -(अहंकारः)-त्याचें कारण अहंकार,-(बुद्धिः)-त्याचें कारण निश्चयात्मिका बुद्धि,-(अव्यक्तं एव च)-आणि बुद्धीचें कारण अव्यक्त,-(दश [च] एकं च इन्द्रियाणि)-दहा व एक अशीं अकरा इंद्रियें-(च पंच इंद्रियगोचराः)-आणि पांच इंद्रियांचे विषय-(इच्छा)-सुखाला कारण झालेल्या पदार्थाला ग्रहण करण्याची इच्छा-(द्वेषः)-प्रतिकूल पदार्थाविषयीं द्वेष,-(सुखं)-अनुकूल असलेलें सुख,-(दुःखं)-अप्रिय वाटणारें दुःख -(संघातः)-शरीर व इंद्रियें यांचा समुदाय-(चेतना)-देहांत व्यक्त झालेली चिदाभासयुक्त अंतःकरणवृत्ति व-(धृतिः)-धैर्य,-(एतत् क्षेत्रं)-हें क्षेत्र-शरीर-(समासेन)-संक्षेपतः-(सविकारं)-विकारांसह-(उदाहृतम्)-सांगितलें आहे. ५-६

तर पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, प्रकृति, पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें मिळून दहा इंद्रियें, ७२ एक मन, ज्ञानेंद्रियांचे पांच व कर्मेंद्रियांचे पांच असे दहा विषय; सुख, दुःख, द्वेष, संघात, इच्छा, ७३ चेतना ( आत्मसत्ता ) आणि धृति याप्रमाणें या क्षेत्राचीं छत्तीस तत्त्वें आहेत, तीं तुला सर्व सांगितलीं. ७४ आतां, महाभूतें कोणतीं, विषय कोणते, इंद्रियें कोणतीं, हें प्रत्येकाचें वर्णन निरनिराळें करून तुला सांगतों. ७५ [ **महाभूतानि** ] हें पहा-पृथ्वी; आप्, तेज, वायु, व आकाश हीं पंचमहाभूतें आहेत असें, समज; ७६-अहंकाराचें रूप दृष्टांतपूर्वक सांगतात-[ **अहंकारः** ] आणि जागृदवस्थेंत जसें स्वप्न लुप्त होतें, किंवा अमावास्येच्या दिवशीं चंद्र जसा गुप्त असतो, ७७ अथवा लहान बालकाच्या ठिकाणीं तारुण्य जसें गुप्त असतें, किंवा फुलाची कळी उमलण्याच्या पूर्वी जसा तिच्यांत सुगंध गुप्त असतो; ७८ किंबहुना अर्जुना, लांकडांत ज्याप्रमाणें अग्नि गुप्त असतो, त्याप्रमाणें मायेच्या पोटांत जो गुप्त असतो; ७९ ज्याप्रमाणें हाडीज्वर हा कुपथ्याचें निमित्त होण्याची वाट पहात असतो, व तेंच झाल्यावर तो शरीराला अंतर्बाह्य व्यापून टाकतो, ८० त्याप्रमाणें पंचमहाभूतांची गांठ पडून ज्या वेळीं देहाचा आकार बनतो, त्या वेळीं त्या देहाला जो चहूंकडे नाचवितो, त्यालाच **अहंकार** असें म्हणतात. ८१ या अहंकाराची अशी गंमत आहे कीं, तो अज्ञानाच्या पाठीस न लागतां सज्ञानाची मानगुटी धरतो आणि त्याला नानाप्रकारच्या संकटांत घालतो. ८२ यदुराज श्रीकृष्ण म्हणतातः--अर्जुना! ऐक. [ **बुद्धिः** ] आतां बुद्धि जिला म्हणतात, ती खुणांनीं जाणावी. ८३ कामाचा जोर उत्पन्न झाल्यावर जी इंद्रियांच्या साहाय्यानें विषयांचे समुदाय जिंकून आणते; ८४ त्या सुखदुःखांच्या लुटीचा जेव्हां जीवास अनुभव घ्यावा लागतो, तेव्हां सुख व दुःख यांत जास्ती योग्यता कोणाची आहे हे जिच्या योगानें समजतें; ८५ हें सुख व हें दुःख, हें पुण्य व हें पाप, हें वाईट व हें चांगलें, असें जिच्या योगानें निवडतां येते; ८६ जिच्या योगानें उच्च-नीच हें समजतें, लहानमोठें कळतें, व जिच्या दृष्टीनें जीवांना विषय ओळखतां येतात. ८७ जी ज्ञानतत्त्वाचें मूळ, जी सत्त्वगुणाची वाढती दशा, आणि जी आत्मा व जीव यांचा संयोग झालेला दाखविते, ८८ अर्जुना, तीच **बुद्धि** आहे असें समज. आतां अव्यक्ताचीं सर्व लक्षणें तुला सांगतों, तीं ऐक. ८९ [ **अव्यक्तं एव च** ] हे महाबुद्धिमंता, सांख्यांच्या मतानें जिला प्रकृति हें नांव आहे, तेंच तूं, तेथील अव्यक्त असें समज. ९० आणि पूर्वी ( सातव्या अध्यायांत ) सांख्य व योग ह्यां मतांतील प्रकृतीचे दोन प्रकार पुष्कळ विस्तारानें तेथें वर्णिले

१ स्पष्ट, खरें. २ प्राप्त, स्वाधीन. ३ प्रकृति. ४ आत्मसत्ता. ५ तत्त्वें. ६ इंद्रियें. ७ आकाश. ८ समज. ९ अमावास्येला. १० लहान बालकाच्या ठायीं. ११ गुप्त, दबलेलें. १२ कळीत. १३ वास. १४ अहंकार. १५ विशेषकरून. १६ कामाचें. १७ समागमें. १८ मोडून. १९ टोळ्या, समुदाय. २० लूट. २१ अनुभव, हिशेब देणें. २२ मलिन. २३ समजे. २४ कळे. २५ ज्ञानेंद्रियांची. २६ मूळ. २७ बुद्धिमान अर्जुना.

ऐसी दोहीं परी जेथें। विवंचिली ९१ तेथ दुजी जे जीवदशा । तिये नांव वीरेशा । येथें अव्यक्त ऐसा । पर्यावो हा ९२ तऱ्ही पाहालिया रजनीं । तारा लोपती गगनीं । कां हारपे अस्तमानीं । भूतक्रिया ९३ नातरी देहो गेलिया पाठीं । देहादिक किरीटी । उपाधि लपे पोटीं । कृतकर्माच्या ९४ कां बीज-मुद्रेआंतु । थोके तरु समस्तु । कां वस्त्रपणें तंतु-। दशे राहे ९५ तैसें सांडूनियां स्थूळधर्म । महाभूतें भूतग्राम । लया जातीं सूक्ष्म । होऊनि जेथें ९६ अर्जुना तया नांवें । अव्यक्त हें जाणावें । आतां आइकें आघवें । इंद्रियभेद ९७ तरि श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन । इयें जाणें ज्ञान- । करणें पांचें ९८ इयें तत्त्वमेळापकीं । सुखदुःखांची उखिविखी । बुद्धि करिते मुखीं । पांचें इहीं ९९ मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार । पायू हे प्रकार । पांच आणिक १०० कर्मेंद्रियें म्हणिपती । तीं इयें जाणिजती। आइकें कैवल्यपती। सांगतसे १ पैं प्राणाची अंतौरी । क्रियाशक्ति जे शरीरीं। तियेची रिगिनिगी द्वारीं । पांचें इहीं २ एवं दाहाही करणें। सांगितलीं देवो म्हणे। परिस आतां फुडेपणें । मन तें ऐसें ३ जें इंद्रियां आणि बुद्धी । माझारिलिये संधीं । रजोगुणाच्या खांदीं । तरळेत असे ४ नीळिमा अंबरीं । कां मृगतृष्णालहरी । तैसें वायांचि फरारी। वावो जाहलें ५ आणि शुक्रशोणितांचा सांधा । मिळतां पांचांचा बांधा । वायु-तत्त्व दशधा। एकचि जाहलें ६ मग तिहीं दाहीभागीं । देहधर्माच्या खैवंगीं । अधिष्ठिलें आंगीं । आपुलाल्या ७ तेथ चांचल्य निखेळ । एकलें ठेलें निढोळ । म्हणोनि रजाचें बळ। धरिलें तेणें ८ तें बुद्धीसी बाहेरी । अहंकाराच्या उरावरी। ऐसा ठायीं माझारीं। बळियावलें ९ वायां मन हें नांव। एऱ्हवीं कल्पनाचि सों-वेव । जयाचेनि संगें जीव-। दशा वस्तु १० जें प्रवृत्तीसि मूळ । कामा जयाचें बळ। जें अखंड सूये छळ। अहंकारासी ११ जें इच्छेतें वाढवी । आशेतें चढवी। जें पाठी पुरवी। भयासि गा १२ द्वैत जेथ उठी। अविद्या जेणें लोठी। जें इंद्रियांतें लोटी । विषयांमाजी १३ संकल्पें सृष्टी घडी। सवेंचि विकल्पूनि मोडी। मनोरथांच्या उतरडी । उतरी रची १४ जें भुलीचें कुहेर । वायुतत्त्वाचें अंतर । बुद्धीचें द्वार । झांकविलें जेणें १५ तें गा किरीटी मन। या बोला नाहीं आन। आतां विषयाभिधान- । भेदु आइकें १६ तरी स्पर्शु आणि शब्दु । रूप रस गंधु। हा विषयो पंचविधु। ज्ञानेंद्रियांचा १७ इहीं पांचें द्वारीं। ज्ञानासि धांव

आहेत, ९१ त्यांतील दुसरी जी जीवदशा, तिलाच हे वीरश्रेष्ठ अर्जुना, अव्यक्त असें पर्यायानें म्हणत आहेत. ९२ पहांट झाल्यावर ज्याप्रमाणें आकाशांतील नक्षत्रें नाहींतशीं होतात, अथवा अस्तमान झाल्यावर प्राणिमात्राचे व्यापार बंद होतात, ९३ अथवा, अर्जुना, देह नाहींसा झाल्यावर देहापासून वासनेपर्यंत सर्व विकार केलेल्या कर्मांत गुप्त असतात; ९४ किंवा बीजाच्या आकारांत जसा वृक्ष अंतर्गत असतो, ९५ त्याप्रमाणें महाभूतें व महाभूतांचा समुदाय आपला स्थूल धर्म टाकून ज्या ठिकाणीं सूक्ष्म होऊन अंतर्धान पावतात, ९६ त्यालाच अर्जुना, अव्यक्त असें समज. आतां सर्व इंद्रियांचे भेद तुला सांगतों, ते ऐक. ९७ [ इंद्रियाणि दश ] कान, डोळे, त्वचा, नाक, व जिव्हा हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत. ९८ या पांच तत्त्वांचें ऐक्य झालें म्हणजे ह्यांच्याद्वारें बुद्धि ही सुखदुःखांचा विचार करते. ९९ वाचा, हात, पाय, गुद व शिश्न हे इंद्रियांचे आणखी पांच प्रकार आहेत. १०० श्रीकृष्ण म्हणतात, "अर्जुना, ज्यांना कर्मेंद्रियें म्हणतात तीं हीं होत. १ प्राणाची स्त्री क्रियाशक्ति, जी या शरिरांत वास करते, ती त्या पांच कर्मेंद्रियांच्या द्वारानें आंतबाहेर जाण्यायेण्याचा व्यापार करते. २ श्रीकृष्ण म्हणतातः—याप्रमाणें पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें सांगितलीं [ एकं च ] आतां मन म्हणजे काय तें तुला स्पष्टपणें सांगतों, तें ऐक. ३ जें इंद्रियें आणि बुद्धि या दोहोंच्या सांध्यामध्यें रजोगुणाच्या सांदीवर चमकत असतें; ४ ज्याप्रमाणें आकाशाचा नीलवर्ण अथवा मृगजलाच्या लाटा व्यर्थ भासतात; त्याप्रमाणें वायूचें जें व्यर्थ चमकणें, तेंच मन आहे; ५ आणि शुक्र व शोणित यांचें ऐक्य होऊन जेव्हां पंचतत्त्वांचा आकार बनतो, तेव्हां एका वायुतत्त्वाचे स्थानभेदानें पांच प्राण व पांच उपप्राण असे दहा प्रकार होतात. ६ मग दहा भाग आपल्या धर्माच्या बळानें देहांतील एक एक भागाच्या ठिकाणीं वस्ती करतात. ७ त्यांमध्यें निखालस चंचलपणा राहिल्यानें त्याचे अंगीं रजोगुणाचें बळ उत्पन्न होतें, ८ बुद्धीच्या बाहेर व अहंकाराच्या उरावर अशा मध्यभागांत बलाढ्य होतें. ९ त्याला मन हें व्यर्थ नांव आहे. एऱ्हवीं तें मूर्तिमंत कल्पनारूपच होय. ज्याच्या योगानें ब्रह्माला जीवदशा घ्यावी लागली, ११० जें कोणतीही गोष्ट करण्यास मूळ कारण आहे, ज्याच्या योगानें वासना उत्पन्न होते, व जें नेहमीं अहंकाराशीं स्पर्धा करतें, ११ ज्याच्या योगानें इच्छा वाढते, आशा प्रबळ होते, व ज्याच्या योगानें भयाला मदत होते; १२ ज्याच्या ठिकाणीं द्वैतभाव उत्पन्न होतो व अज्ञान ज्याच्या योगानें जोरावतें; जें इंद्रियांना विषयांत ढकलितें; १३ जें एका क्षणांत सृष्टि उत्पन्न करतें, व ती लागलीच मोडूनही टाकतें आणि मनोरथांच्या उतरंडी रचतें व उतरतें १४ जें भ्रमाचें कोठार व वायुतत्त्वाचा अर्क आहे, व जें बुद्धीचें कांहीं चालूं देत नाहीं म्हणजे तिला कोंडून टाकतें, १५ त्यालाच अर्जुना, मन म्हणतात, हें निःसंशय होय. आतां विषयांचे भेद ऐक. १६ [ पंच च ] शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच ज्ञानेंद्रियांचे पांच विषय आहेत. १७ ज्याप्रमाणें जनावर हिरव्या चाऱ्याकडे धांव घेतें, त्याप्र-

१ विस्तारानें सांगितली. २ अध्याय ७ श्लोक ५ यांत सांगितलेली. ३ उजाडल्यावर. ४ प्राणिमात्रांचे व्यापार. ५ बीजाचे आकारांत. ६ धांवून राहतो, असतो. ७ ज्ञानेंद्रियें. ८ विचार, वाटाघाट. ९ उपस्थ. १० गुदस्थान. ११ श्रीकृष्ण. १२ स्त्री, बायको. १३ जाणें येणें. १४ निश्चयानें. १५ लेखतें. १६ मृगजलाच्या लाटा. १७ व्यर्थ. १८ स्फुरण, भास. १९ वायु. २० स्त्रीपुंबीजांना. २१ ऐक्य, गांठ. २२ बळानें. २३ निव्वळ, निखालस. २४ केवळ. २५ मूर्तिमंत २६ परब्रह्म. २७ वासनेस. २८ टोंचणी लावते, आग्रह करिते. २९ उत्पन्न करिते. ३० अज्ञान. ३१ दांडगी. ३२ वाईट करून, नाकारून. ३३ उतरंडी. ३४ भ्रमाचें. ३५ कोठार. ३६ सार, गं.आ. ३७ विषय असें ज्यांचें नांव, आहे त्यांचे भेद ऐक.

ऐसी दोहीं परी जेथें। विवंचिली ९१ तेथ दुजी जे जीवदशा । तिये नांव
वीरेशा । येथें अव्यक्त ऐसा । पर्यावो हा ९२ तऱ्हीं [3]पाहाळेया रजनीं । तारा
लोपती गगनीं । कां हारपे अस्तमानीं । भूतक्रिया ९३ नातरी देहो गेलिया
पाठीं । देहादिक किरीटी । उपाधि लपे पोटीं । कृतकर्मांच्या ९४ कां बीज-
[5]मुद्रेआंतु । [6]थोंके तरु समस्तु। कां वस्त्रपणें तंतु-। दशे राहे ९५ तैसें सांडूनियां
स्थूळधर्म । महाभूतें भूतग्राम । लया जातीं सूक्ष्म । होऊनि जेथें ९६ अर्जुना
तया नांवें । अव्यक्त हें जाणावें । आतां आइकें आघवें । इंद्रियभेद ९७ तरि
श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन । इयें जाणें ज्ञान- । [7]करणें पांचें ९८ इयें
तत्त्वमेळापकीं । सुखदुःखांची उखिविखी । बुद्धि करिते मुखीं । पांचें इहीं ९९
मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार। [10]पांयू हे प्रकार। पांच आणिक
१०० कर्मेंद्रियें म्हणिपती । तीं इयें जाणिजती। आइकें [11]कैवल्यपती। सांगतसें १
पैं प्राणाची [13]अंतौरी । क्रियाशक्ति जे शरीरीं। तियेची रिगिनिगी[12] द्वारीं । पांचें
इहीं २ एवं दाहाही करणें। सांगितलीं देवो म्हणे। परिस आतां [14]फुडेपणें । मन
तें ऐसें ३ जें इंद्रियां आणि बुद्धी । माझारिलिये संधीं । रजोगुणाच्या खांदीं ।
[15]तरळेत असे ४ नीळिमा अंबरीं । कां [16]मृगतृष्णालहरी । तैसें [17]वांयांचि [18]फेरारी।
[19]वांवो जाहलें ५ आणि [20]शुक्रशोणितांचा सांधा । मिळतां पांचांचा [21]वांधा । वायु-
तत्त्व दशधा। एकचि जाहलें ६ मग तिहीं दाहीभागीं । देहधर्मांच्या [22]खेवंगीं ।
अधिष्ठिलें आंगीं । आपुलाल्या ७ तेथ चांचल्या [23]निखेळ । एकलें ठेलें [24]निढोळ ।
म्हणोनि रजाचें बळ। धरिलें तेणें ८ तें बुद्धीसी बाहेरी । अहंकाराच्या उरावरी ।
ऐसा ठायीं माझारीं। बळियावलें ९ वायां मन हें नांव। एऱ्हवीं [25]कल्पनाचि सों-
वेव । जयाचेनि संगें जीव-। दशा [26]वस्तु १० जें प्रवृत्तीसि मूळ । [27]कांमा जयाचें
बळ । जें अखंड सूये [28]छेळ। अहंकारासी ११ जें इच्छेतें वाढवी । आशेतें
चढवी । जें पाठी [29]पुरवी। भयासि गा १२ द्वैत जेथ उठी। [30]अविद्या जेणें [31]लाठी। जें
इंद्रियातें लोटी । विषयांमाजी १३ संकल्पें सृष्टी घडी। सवेंचि [32]विकल्पूनि मोडी।
मनोरथांच्या [33]उतरडी । उतरी रची १४ जें [34]भुलीचें [35]कुहेर । वायुतत्त्वाचें [36]अंतर ।
बुद्धीचें द्वार । झांकविलें जेणें १५ तें गा किरीटी मन। या बोला नाहीं आन ।
आतां [37]विषयाभिधान- । भेदु [38]आइकें १६ तरी स्पर्शु आणि शब्दु । रूप रस
गंधु। हा विषयो पंचविधु। ज्ञानेंद्रियांचा १७ इहीं पांचै द्वारीं। ज्ञानासि धांव

आहेत, ९१ त्यांतील दुसरी जी जीवदशा, तिलाच हे वीरश्रेष्ठ अर्जुना, अव्यक्त असें पर्यायानें म्हणत आहेत. ९२ पहांट झाल्यावर ज्याप्रमाणें आकाशांतील नक्षत्रें नाहींतशीं होतात, अथवा अस्तमान झाल्यावर प्राणिमात्राचे व्यापार बंद होतात, ९३ अथवा, अर्जुना, देह नाहींसा झाल्यावर देहापासून वासनेपर्यंत सर्व विकार केलेल्या कर्मांत गुप्त असतात; ९४ किंवा बीजाच्या आकारांत जसा वृक्ष अंतर्गत असतो, ९५ त्याप्रमाणें महाभूतें व महाभूतांचा समुदाय आपला स्थूल धर्म टाकून ज्या ठिकाणीं सूक्ष्म होऊन अंतर्धान पावतात, ९६ त्यालाच अर्जुना, अव्यक्त असें समज. आतां सर्व इंद्रियांचे भेद तुला सांगतों, ते ऐक. ९७ [ इंद्रियाणि दश ] कान, डोळे, त्वचा, नाक, व जिव्हा हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत. ९८ या पांच तत्वांचें ऐक्य झालें म्हणजे त्यांच्याद्वारें बुद्धि ही सुखदुःखांचा विचार करते. ९९ वाचा, हात, पाय, गुद व शिश्न हे इंद्रियांचे आणखी पांच प्रकार आहेत. १०० श्रीकृष्ण म्हणतात, "अर्जुना, ज्यांना कर्मेंद्रियें म्हणतात तीं हीं होत. १ प्राणाची जी क्रियाशक्ति, जी या शरिरांत वास करते, ती त्या पांच कर्मेंद्रियांच्या द्वारानें आंतबाहेर जाण्यायेण्याचा व्यापार करते. २ श्रीकृष्ण म्हणतातः—याप्रमाणें पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें सांगितलीं [ एकं च ] आतां मन म्हणजे काय तें तुला स्पष्टपणें सांगतों, तें ऐक. ३ जें इंद्रियें आणि बुद्धि या दोहोंच्या सांध्यामध्यें रजोगुणाच्या टोंकावर चमकत असतें; ४ ज्याप्रमाणें आकाशाचा नीलवर्ण अथवा मृगजलाच्या लाटा व्यर्थ भासतात; त्याप्रमाणें वायूचें जें व्यर्थ चमकणें, तेंच मन आहे; ५ आणि शुक्र व शोणित यांचें ऐक्य होऊन जेव्हां पंचतत्त्वांचा आकार बनतो, तेव्हां एका वायुतत्त्वाचे स्थानभेदानें पांच प्राण व पांच उपप्राण असे दहा प्रकार होतात. ६ मग दहा भाग आपल्या धर्माच्या बळानें देहांतील एक एक भागाच्या ठिकाणीं वस्ती करतात. ७ त्यांमध्यें निखालसें चंचलपणा राहिल्यानें त्याचे अंगीं रजोगुणाचें बळ उत्पन्न होतें, ८ बुद्धीच्या बाहेर व अहंकाराच्या उरावर अशा मध्यभागांत बलाढ्य होतें. ९ त्याला मन हें व्यर्थ नांव आहे. एऱ्हवीं तें मूर्तिमंत कल्पनारूपच होय. ज्याच्या योगानें ब्रह्माला जीवदशा ध्यावी लागली, ११० जें कोणतीही गोष्ट करण्यास मूळ कारण आहे, ज्याच्या योगानें वासना उत्पन्न होते, व जें नेहमी अहंकाराशीं स्पर्धा करतें, ११ ज्याच्या योगानें इच्छा वाढते, आशा प्रबळ होते, व ज्याच्या योगानें भयाला मदत होते; १२ ज्याच्या ठिकाणीं द्वैतभाव उत्पन्न होतो व अज्ञान ज्याच्या योगानें जोरावतें; जें इंद्रियांना विषयांत ढकलितें; १३ जें एका क्षणांत सृष्टि उत्पन्न करतें, व ती लागलीच मोडून टाकतें आणि मनोरथांच्या उतरंडी रचतें व उतरतें १४ जें भ्रमाचें कोठार व वायुतत्त्वाचा अर्क आहे, व जें बुद्धीचें कांहीं चालूं देत नाहीं म्हणजे तिला कोंडून टाकतें, १५ त्यालाच अर्जुना, मन म्हणतात, हें निःसंशय होय. आतां विषयांचे भेद ऐक. १६ [पंच च] शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच ज्ञानेंद्रियांचे पांच विषय आहेत. १७ ज्याप्रमाणें जनावर हिरव्या चाऱ्याकडे धांव घेतें, त्याप्र-

१ विस्तारानें सांगितली. २ अध्याय ७ श्लोक ५ यांत सांगितलेली. ३ उजाडल्यावर. ४ प्राणिमात्रांचे व्यापार. ५ बीजाचे आकारांत. ६ भांवून राहतो, असतो. ७ ज्ञानेंद्रियें. ८ विचार, वाटाघाट. ९ उपस्थ. १० गुदस्थान. ११ श्रीकृष्ण. १२ जी, वायवी. १३ जाणें येणें. १४ निश्चयानें. १५ सेवतें. १६ मृगजळाच्या लाटा. १७ व्यर्थ. १८ स्फुरण, भास. १९ वायु. २० सांधींमध्यें. २१ ऐक्य, गांठ. २२ बळानें. २३ निव्वळ, निखालस. २४ केवळ. २५ मूर्तिमंत २६ परब्रह्म. २७ वासनेस. २८ टोंचणी लावते, आग्रह करिते. २९ उत्पन्न करितें. ३० अज्ञान. ३१ दांडगी. ३२ वाईट करून, नाकारून. ३३ उतरंडी. ३४ भ्रमाचें. ३५ कोठार. ३६ सार, म.भा. ३७ विषय असें ज्याचें नांव आहे त्याचे भेद ऐक.

ऐसी दोहीं परी जेथें। विवंचिली ९१ तेथ दुजी जे जीवदशा । तिये नांव वीरेशा । येथें अव्यक्त ऐसा । पर्यावो हा ९२ तऱ्ही पाहालिया रजनीं । तारा लोपती गगनीं । कां हारपे अस्तमानीं । भूतक्रिया ९३ नातरी देहो गेलिया पाठीं । देहादिक किरीटी । उपाधि लपे पोटीं । कृतकर्माच्या ९४ कां बीज-मुद्रेआंतु । थोके तरु समस्तु । कां वस्त्रपणें तंतु-। दशे राहे ९५ तैसें सांडूनियां स्थूळधर्म । महाभूतें भूतग्राम । लया जातीं सूक्ष्म । होऊनि जेथें ९६ अर्जुना तया नांवें । अव्यक्त हें जाणावें । आतां आइकें आघवें । इंद्रियभेद ९७ तरि श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन । इयें जाणें ज्ञान- । करणें पांचें ९८ इयें तत्त्वमेळापकीं । सुखदुःखांची उखिविखी । बुद्धि करिते मुखीं । पांचें इहीं ९९ मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार । पांयू हे प्रकार । पांच आणिक १०० कर्मेंद्रियें म्हणिपती । तीं इयें जाणिजती । आइकें कैवल्यपती । सांगतसे १ पैं प्राणाची अंतौरी । क्रियाशक्ति जे शरीरीं । तियेची रिगिनिगी द्वारीं । पांचें इहीं २ एवं दाहाही करणें । सांगितलीं देवो म्हणे । परिस आतां फुडेपणें । मन तें ऐसें ३ जें इंद्रियां आणि बुद्धी । माझारिलिये संधीं । रजोगुणाच्या खांदीं । तरळेत असे ४ नीळिमा अंबरीं । कां मृगतृष्णालहरी । तैसें वांयांचि फरारी । वावो जाहलें ५ आणि शुक्रशोणितांचा सांधा । मिळतां पांचांचा बांधा । वायुतत्त्व दशधा । एकचि जाहलें ६ मग तिहीं दाहीभागीं । देहधर्माच्या खैवंगीं । अधिष्ठिलें आंगीं । आपुलाल्या ७ तेथ चांचल्या निखेळ । एकलें ठेलें निढोळ । म्हणोनि रजाचें बळ । धरिलें तेणें ८ तें बुद्धीसी बाहेरी । अहंकाराच्या उरावरी । ऐसा ठायीं माझारीं । बळियावलें ९ वायां मन हें नांव । एऱ्हवीं कल्पनाचि सोंवेव । जयाचेनि संगें जीव- । दशा वस्तु १० जें प्रवृत्तीसि मूळ । कामा जयाचें बळ । जें अखंड सूये छळ । अहंकारासी ११ जें इच्छेतें वाढवी । आशेतें चढवी । जें पाठी पुरवी । भयासि गा १२ द्वैत जेथ उठी । अविद्या जेणें लाठी । जें इंद्रियांतें लोटी । विषयांमाजी १३ संकल्पें सृष्टी घडी । सवेंचि विकल्पूनि मोडी । मनोरथांच्या उतरडी । उतरी रची १४ जें भुलीचें कुहर । वायुतत्त्वाचें अंतर । बुद्धीचें द्वार । झांकविलें जेणें १५ तें गा किरीटी मन । या बोला नाहीं आन । आतां विषयाभिधान- । भेदु आइकें १६ तरी स्पर्शु आणि शब्दु । रूप रस गंधु । हा विषयो पंचविधु । ज्ञानेंद्रियांचा १७ इहीं पांचैं द्वारीं । ज्ञानासि धांव

आहेत, ९१ त्यांतील दुसरी जी जीवदशा, तिलाच हे वीरश्रेष्ठ अर्जुना, अव्यक्त असें पर्यायानें म्हणत आहोंत. ९२ पहांट झाल्यावर ज्याप्रमाणें आकाशांतील नक्षत्रें नाहींतशीं होतात, अथवा अस्तमान झाल्यावर प्राणिमात्रांचे व्यापार बंद होतात, ९३ अथवा, अर्जुना, देह नाहींसा झाल्यावर देहापासून वासनेपर्यंत सर्व विकार केलेल्या कर्मांत गुप्त असतात; ९४ किंवा बीजाच्या आकारांत जसा वृक्ष अंतर्गत असतो, ९५ त्याप्रमाणें महाभूतें व महाभूतांचा समुदाय आपला स्थूल धर्म टाकून ज्या ठिकाणीं सूक्ष्म होऊन अंतर्धान पावतात, ९६ त्यालाच अर्जुना, अव्यक्त असें समज. आतां सर्व इंद्रियांचे भेद तुला सांगतों, ते ऐक. ९७ [ इंद्रियाणि दश ] कान, डोळे, त्वचा, नाक, व जिव्हा हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत. ९८ या पांच तत्त्वांचें ऐक्य झालें म्हणजे त्यांच्याद्वारें बुद्धि ही सुखदुःखांचा विचार करते. ९९ वाचा, हात, पाय, गुद व शिश्न हे इंद्रियांचे आणखी पांच प्रकार आहेत. १०० श्रीकृष्ण म्हणतात, "अर्जुना, ज्यांना कर्मेंद्रियें म्हणतात तीं हीं होत. १ प्राणाची स्त्री क्रियाशक्ति, जी या शरीरांत वास करते, ती त्या पांच कर्मेंद्रियांच्या द्वारानें आंतबाहेर जाण्यायेण्याचा व्यापार करते. २ श्रीकृष्ण म्हणतातः—याप्रमाणें पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें सांगितलीं [ एकं च ] आतां मन म्हणजे काय तें तुला स्पष्टपणें सांगतों, तें ऐक. ३ जें इंद्रियें आणि बुद्धि या दोहोंच्या सांध्यामध्यें रजोगुणाच्या धारेवर चमकत असतें; ४ ज्याप्रमाणें आकाशाचा नीलवर्ण अथवा मृगजलाच्या लाटा व्यर्थ भासतात; त्याप्रमाणें वायूचें जें व्यर्थ चमकणें, तेंच मन आहे; ५ आणि शुक्र व शोणित यांचें ऐक्य होऊन जेव्हां पंचतत्त्वांचा आकार बनतो, तेव्हां एका वायुतत्त्वाचे स्थानभेदानें पांच प्राण व पांच उपप्राण असे दहा प्रकार होतात. ६ मग दहा भाग आपल्या धर्माच्या बळानें देहांतील एक एक भागाच्या ठिकाणीं वस्ती करतात. ७ त्यांमध्यें निखालसें चंचलपणा राहिल्यानें त्याचे अंगीं रजोगुणाचें बळ उत्पन्न होतें, ८ बुद्धीच्या बाहेर व अहंकाराच्या उरावर अशा मध्यभागांत बलाढ्य होतें. ९ त्याला मन हें व्यर्थ नांव आहे. एऱ्हवीं तें मूर्तिमंत कल्पनारूपच होय. ज्याच्या योगानें ब्रह्माला जीवदशा घ्यावी लागली, ११० जें कोणतीही गोष्ट करण्यास मूळ कारण आहे, ज्याच्या योगानें वासना उत्पन्न होते, व जें नेहमीं अहंकाराशीं स्पर्धा करतें, ११ ज्याच्या योगानें इच्छा वाढते, आशा प्रबळ होते, व ज्याच्या योगानें भयाला मदत होते; १२ ज्याच्या ठिकाणीं द्वैतभाव उत्पन्न होतो व अज्ञान ज्याच्या योगानें जोरावतें; जें इंद्रियांना विषयांत ढकलितें; १३ जें एका क्षणांत सृष्टि उत्पन्न करतें, व ती लागलीच मोडून टाकतें आणि मनोरथांच्या उतरंडी रचतें व उतरतें १४ जें भ्रमाचें कोठार व वायुतत्त्वाचा अर्क आहे, व जें बुद्धीचें कांहीं चालूं देत नाहीं म्हणजे तिला कोंडून टाकतें, १५ त्यालाच अर्जुना, मन म्हणतात, हें निःसंशय होय. आतां विषयांचे भेद ऐक. १६ [पंच च] शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच ज्ञानेंद्रियांचे पांच विषय आहेत. १७ ज्याप्रमाणें जनावर हिरव्या चाऱ्याकडे धांव घेतें, त्याप्र-

१ विस्तारानें सांगितली. २ अध्याय ७ श्लोक ५ यांत सांगितलेली. ३ उजाडल्यावर. ४ प्राणिमात्रांचे व्यापार. ५ बीजाचे आकारांत. ६ थांबून राहतो, असतो. ७ ज्ञानेंद्रियें. ८ विस्तार, बाह्यघाट. ९ उपस्थ. १० गुदस्थान. ११ श्रीकृष्ण. १२ स्त्री, बायको. १३ जाणें येणें. १४ निश्चयानें. १५ खेळतें. १६ मृगजळाच्या लाटा. १७ व्यर्थ. १८ स्फुरण, भास. १९ वायु. २० स्त्रीपुंबीजांचा. २१ ऐक्य, गांठ. २२ बळानें. २३ निव्वळ, निखालस. २४ केवळ. २५ मूर्तिमंत २६ परब्रह्म. २७ वासनेस. २८ टोंचणी लावते, आग्रह करिते. २९ उत्पन्न करिते. ३० अज्ञान. ३१ दांडगी. ३२ वाईट करून, नाकारून. ३३ उतरंडी. ३४ भ्रमाचें. ३५ कोठार. ३६ सार, ग.भा. ३७ विषय असें ज्याचें नांव आहे त्याचे भेद ऐक.

बाहेरी । जैसा कां हिरवे चारीं । भांबावे पशु १८ मग स्वर वर्ण विसर्गु । अथवा स्वीकार त्यागु । संक्रमेण उत्सर्गु । विण्मूत्राचा १९ हे कर्मेंद्रियांचे पांच। विषय गा साच । जे बांधोनियां मोंच । क्रिया धांवे १२० ऐसे हे दाही। विषय गा इये देहीं । आतां इच्छा तेही । सांगिजैल २१ तरि भूतलें आठवे । कां बोलें कांन झांकवे । ऐसियावारि चेतवे । जे गा वृत्ती २२ इंद्रियविषयांचिये भेटी- । सरसीच जे गा उठी । कामाची बांहुटी । धरूनियां २३ जियेचेनि उठिलेपणें । मना सैंध धांवणें । न रिगावें तेथ करंणें । तोंडें सुती २४ जिये वृत्तीचिया आवडी । बुद्धी होय वेडी । विषयां जिया गोडी । ते गा इच्छा २५ आणि इच्छिलिया सांगडें । इंद्रियां आमिष न जोडे । तेथ ऐसा जो डावो पडे । तोचि द्वेषु २६ आतां यावरी सुख । तें एवंविध देख । जेणें एकेंचि अशेष । विसरे जीवु २७ मना वाचे काये । जें आपुली आण वाये । देहस्मृतीची त्रीये । मोडित जें ये २८ जयाचेनि जालेपणें । पांगुळा होइजे प्राणें । सात्त्विकासी दुणें- । वरीही लाभु २९ कां आघवियाचि इंद्रियवृत्ती । हृदयाचिया एकांतीं । थापटूनि सुषुप्ती । आणी जें गा १३० किंबहुना सोये । जीव आत्मयाची लाहे । तेथ जें होये । तया नाम सुख ३१ आणि ऐसी हे अवस्था । न जोडतां पार्था । जें जीजे तेंचि सर्वथा । दुःख जाणे ३२ तें मनोरथसंगें नव्हे । एऱ्हवीं सिद्धि गेलेंचि आहे । हे दोनीचि उपाये । सुखदुःखासीं ३३ आतां असंगा साक्षिभूता । देहीं चैतन्याची जे सत्ता । तिये नाम पांडुसुता । चेतना येथे ३४ जे नखौनि केशवरी । उभी जागे शरीरीं । जे तिहीं अवस्थांतरीं । पालटेना ३५ मनबुद्ध्यादि आघवीं । जियेचेनि टवटवी । प्रकृतिवनमाधवी । सदांचि जे ३६ जडाजडीं अंशीं । राहाटे जे सरिसी । ते चेतना गा तुजसीं । लटिकें नाहीं ३७ पैं रावो पारिवारु नेणे । आज्ञाचि परचक्र जिणे । कां चंद्राचेनि पूर्णपणें । सिंधू भरती ३८ ना ना भ्रामकाचें सन्निधान । लोहो करी सचेतन । कां सूर्यसंगु जन । चेष्टवी गा ३९ अगा मुख मेळेंविण । पिलियाचें पोषण । करी निरीक्षण । कूर्मी जेवीं १४० पार्था तियापरी । आत्मसंगती इये शरीरीं । सजीवत्वाचा करी । उपेगु जडा ४१ मग तियेतें चेतना । म्हणिपे पैं अर्जुना । आतां धृतिविवंचना- । भेदु आइक ४२ तरी तत्वां परस्परें । उघड जातिस्वभाववैरें । नव्हे पृथ्वीतें नीरें । न नाशिजे ४३ नीरातें आटी तेज ।

मार्गे पांच ज्ञानेंद्रियांच्या द्वारानें ज्ञान बाहेर धांव घेतें १८ मग स्वर व वर्ण यांचा उच्चार, वस्तु घेणें व टाकणें, चालणें व मलमूत्र विसर्जन करणें, १९ हे पांच कर्मेंद्रियांचे पांच विषय आहेत. ज्यांच्या आधारानें क्रिया बाहेर धांव घेते. १२० [ इंद्रियगोचराः ] असे हे ज्ञानेंद्रियांचे व कर्मेंद्रियांचे दहा विषय या देहांत आहेत. आतां इच्छा म्हणजे काय तें सांगतों २१ [ इच्छा ] पूर्वी ज्या पदार्थाचा उपभोग घेतला आहे, त्याची आठवण होणें; आणि कानावर शब्द पडण्याबरोबर जी प्रकाशित होणारी वृत्ति, २२ इंद्रियांची व विषयांची गांठ पडतांक्षणींच कामाचा टेका घेऊन जी लागलीच उत्पन्न होते, २३ ज्या वृत्तीच्या उद्भवण्यानें मन इकडे तिकडे धांवूं लागतें व जिकडे जाऊं नये अशा ठिकाणीं इंद्रियें तोंडें घालतात; २४ ज्या वृत्तीच्या संगतीनें बुद्धि वेडी होते व जिची विषयांवर आवड असते, त्या वृत्तीला इच्छा असें म्हणतात; २५ [ द्वेष ] आणि इच्छा उत्पन्न होण्याबरोबर इंद्रियांना विषय उपभोगास मिळाले नाहींत तर त्या वेळीं जी वृत्ति उत्पन्न होते, तिला द्वेष असें म्हणतात. २६ [ सुख ] आतां सुख हें या लक्षणांनीं जाणावें कीं, जें प्राप्त झालें असतां इतर सर्व वस्तूंचा जीवाला विसर पडतो. २७ जें काया, वाचा आणि मन यांना आपली शपथ घालून देहाच्या आठवणीचा नाश करतें; २८ जें प्राप्त झालें असतां प्राण लंगडा पडून सात्त्विक वृत्ति पूर्वीपेक्षां दुप्पट वाढते; २९ सगळ्या इंद्रियांच्या वृत्तींना हृदयाच्या एकांतांत थोपटून जें निद्रा घेण्यास लावतें; १३० फार काय सांगावें! जीवाला ज्या ठिकाणीं आत्म्याचा लाभ होतो, त्यालाच सुख असें म्हणतात; ३१ [ दुःख ] आणि पार्था अशी ही स्थिति न लाभतां जें जगणें तेंच खरोखर दुःख आहे असें समज. ३२ ज्या ठिकाणीं कल्पना उत्पन्न झाली, त्या ठिकाणीं सुख होत नाहीं. एऱ्हवीं, कल्पना नाहींशी झाल्यावर तें सहजानुसार प्राप्तच आहे, म्हणून, कल्पना नाहींशी होणें हेंच सुखदुःखाला कारण आहेत. ३३ [ चेतना ] आतां अर्जुना, अलिप्त व सर्वसाक्षिभूत अशा प्रकारची ( चैतन्याची ) जी देहांत सत्ता आहे, तिला चेतना असें म्हणतात. ३४ या शरीरांत जी नखशिखांत नेहमीं जागृत असते, व जागृति, स्वप्न, सुषुप्ति, या तिन्ही अवस्थांमध्यें जिच्यांत फरक पडत नाहीं; ३५ जिच्या योगानें मन, बुद्धि इत्यादिकांना टवटवी असते व जी मायारूप वनाला नेहमीं वसंत ऋतूप्रमाणें प्रफुल्लित ठेवते; ३६ आणि जड व चेतन वस्तूंत जिचा अंशरूपानें सारखा संचार असतो, तिला चेतना असें म्हणतात, यांत संशय नाहीं. ३७ हें पहा–राजा जसा आपल्या लवाजम्यास जाणत नसून, त्याच्या फक्त आज्ञेनेंच त्याची प्रजा परचक्रास जिंकिते; किंवा चंद्राच्या योगानें जशी समुद्रास भरती येते; ३८ अथवा लोहचुंबकाच्या सान्निध्यानें जसा लोखंडास चंचलपणा येतो; किंवा सूर्याचा प्रकाश जसा सर्व जीवांकडून व्यापार घडवितो; ३९ अथवा स्तनास तोंड लावल्याशिवाय कांसवी ज्याप्रमाणें केवळ नजरेनेंच आपल्या पिलांचें पोषण करते, १४० त्याप्रमाणें, अर्जुना या शरीरांत जी आत्म्याच्या संगतीनें जड वस्तूला सजीवपणा आणते, ४१ तिलाच वावोरे, चेतना हें नांव आहे. आतां धैर्याचे भेद कोणते आहेत ते ऐक. ४२ [ धृति ] पंचतत्त्वांचें एकमेकांशीं जातिस्वभावावरून उघड वैर असतें. पहा कीं, पाणी हें पृथ्वीचा नाश करीत नाहीं का? ४३ पाण्याचें शोषण तेज करतें,

---

१ व्यंजन. २ चालणें. ३ त्याग. ४ मलमूत्रांचा. ५ शिडी, पराची, अंतराळीं केलेला मार्ग. ६ मानलें. ७ कानावर शब्द पडतांच. ८ हात. ९ जिकडे तिकडे पुष्कळ. १० इंद्रियें. ११ तोंडें घालितात. १२ बरोबर. १३ संपूर्ण, निःशेष. १४ शपथ घालिसे. १५ आधार, बळ, आश्रय. १६ लंगडा. १७ दुप्पटीहूनहीं. १८ निद्रावस्था, गाढ झोंप. १९ आश्रय, २० वांचणें, २१ पायाच्या नखापासून डोकीच्या केंसापर्यंत. २२ जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तिहींत. २३ मायारूप वनाला वसंत. २४ जड व चेतन वस्तूंत. २५ संचार करते, वागते. २६ लवाजमा, खटला. २७ जिंकिते. २८ अथवा. २९ लोहचुंबकाचें. ३० चंचळपणा, चेतन. ३१ स्तनास तोंड लाविल्यावांचून. ३२ अवलोकन. ३३ धैर्याच्या विचाराचे. ३४ संहाराचें. ३५ उदकाला.

तेजा वायूसि झुंज। आणि गगन तंव सहज। वायू भक्षी ४४ तेवींचि कोणेही वेळे। आपण कायिसयांही न मिळे। आंत रिगोनि वेगळें। आकाश हें ४५ ऐसीं हीं पांचही भूतें। न साहती एकमेकांतें। कीं तियेंही ऐक्यातें। देहासी येती ४६ द्वंद्वांची उखिंविखी। सोडूनि वसती एकीं। एकेकातें पोखी। निजगुणें गा ४७ ऐसें न मिळे तयां सोजणें। चळे धैर्यें जेणें। तयां नांव म्हणें। धृती मी गा ४८ आणि जीवेंसी पांडवा। या छत्तिसांचा मेळावा। तो हा एथ जाणावा। संघातु पैं गा ४९ एवं छत्तीसही भेद। सांगितले तुज विशद। यया येतुलेयांतें प्रसिद्ध। क्षेत्र म्हणिजे १५० रथांगांचा मेळावा। जेवीं रथु म्हणिजे पांडवा। कां अधोर्ध्व अवेवां। नांव देहो ५१ करीतुरंगसमाजें। सेना नाम निफजे। कां वाक्यें म्हणिपती पुंजे। अक्षरांचे ५२ कां जळधरांचा मेळा। वाच्य होय आभाळा। नाना लोकां सकळां। नाम जग ५३ कां स्नेहसूत्रवन्ही। मेळु एकाचि स्थानीं। धरिजे तो जनीं। दीपु होय ५४ तैसीं छत्तीसही इयें तत्त्वें। मिळतीं जेणें एकत्वें। तेणें समूहपरत्वें। क्षेत्र म्हणिपे ५५ आणि वाहतेनि भौतिकें। पाप पुण्य येथे पिके। म्हणोनि आम्ही कौतुकें। क्षेत्र म्हणों ५६ आणि एकाचेनि मतें। देह म्हणती यातें। पारि असो हें अनंतें। नामें यया ५७ पैं परतत्त्वाऐरौतें। स्थावरांआंतौतें। जें कांहीं होतें जातें। तें क्षेत्रचि हें ५८ परि सुर नर उरगीं। घडत आहे योनिविभागीं। तें गुणकर्मसंगीं। पडिलें [१२] सातें ५९ हेंचि गुणविवंचना। पुढां म्हणिपैल अर्जुना। प्रस्तुत आतां तुज ज्ञाना। रूप दावूं १६० क्षेत्र तंव सविस्तर। सांगितलें साविकार। म्हणोनि आतां उदार। ज्ञान आइकें ६१ जया ज्ञानालागीं। गगन गिळिताती योगी। स्वर्गाची औडवंगी। [१६] उमरडोनि ६२ न करिती सिद्धीची चाड। न धरिती ऋद्धीची भीड। योगाऐसें दुवाड। हेळसिती [१७] ६३ तपोदुर्गें। वोलांडित। क्रतुकोटि वोवांडित। उलथूनि सांडित। [२०] कर्मवल्ली ६४ नाना [२१] भंजनमार्गीं। धांवत उघडिया आंगीं। एक रिगताति [२२] सुरंगीं। सुषुम्नेचिये ६५ ऐसी जिये ज्ञानी। मुनीश्वरांची [२३] उतान्ही। वेदतरूच्या पानोवानीं। हिंडताती ६६ देईल गुरुसेवा। इया बुद्धि पांडवा। जन्मशतांचा सांडोवा [२४]। टाकित जे ६७ जया ज्ञानाची [२५] रिगवणी। अविद्ये उणें आणी। जीवात्मया बुझावणी [२६]। मांडूनि दे ६८ जें इंद्रियांचीं द्वारें आंडी। प्रवृत्तीचे पाय मोडी। जें दैन्येंचि [२७] फेडी। मानसाचें ६९ द्वैताचा दुकाळु पाहे। साम्याचें [३०] सुयाणें होये। जया

तेज वायूबरोबर झगडतें, आणि आकाश हें वायूस सहज भक्षून टाकतें; ४४ त्याचप्रमाणें कधींही कशाबरोबर न मिळतां सर्वत्र ओतप्रोत भरलेलें असून आकाश वेगळें असतें; ४५ अशा प्रकारें पंचमहाभूतें एकमेकांशीं विरुद्ध असूनही देहामध्यें एकत्र रहातात. ४६ दुजेपणाचा वादविवाद सोडून एकत्र राहून जी आपल्या गुणांनीं एकमेकांचें पोषण करतात; ४७ याप्रमाणें न होणारी मैत्री जिच्या योगानें होते व धैर्य कायम रहातें, त्या वृत्तीला मी धृति असें म्हणतों. ४८ आणि हे पांडवा, जीवासह या छत्तीस तत्वांचें जें ऐक्य होतें, त्यालाच **संघात** असें म्हणतात. ४९ याप्रमाणें हे छत्तीस भेद तुला स्पष्ट रीतीनें सांगितले, व या सर्वांना मिळून क्षेत्र हें नांव प्राप्त झालें आहे. १५० या अर्जुना, रथाचे सर्व भाग मिळून जसें रथ हें नांव येतें; किंवा पायापासून डोक्यापर्यंत सर्व अवयव मिळून देह हें नांव येतें. ५१ अथवा हत्ती, घोडे, रथ व पायदळ या सर्वांना मिळून जसें सेना हें नांव येतें, किंवा अक्षरांच्या समुदायाला वाक्य असें म्हणतात; ५२ मेघांच्या सर्व समुदायाला जसें आभाळ म्हणतात; किंवा सर्व लोकांच्या समुदायाला ज्याप्रमाणें जग असें म्हणतात; ५३ अथवा तेल, वात व अग्नि ही एकत्र मिळाली म्हणजे ज्याप्रमाणें त्याला दिवा असें लोक म्हणतात, ५४ त्याचप्रमाणें, हीं छत्तीस तत्वें जेव्हां एके ठिकाणीं मिळतात, तेव्हां त्या सर्वांना मिळून क्षेत्र म्हणतात, ५५ आणि सर्व प्राणी जगतांत राहाहून जी पापाची किंवा पुण्याईची कमाई येथें करतात, तेंच पीक समजून त्यास आम्ही क्षेत्र (शेतें) असें कौतुकानें म्हटलें, ५६ आणि कोणी क्षेत्रास देह असें म्हणतात. पण तें असो, याला अनेक नांवें आहेत. ५७ हें पहा–ब्रह्माच्या अलीकडे महादेवापासून स्थावरजंगमापर्यंत जेवढें कांहीं निर्माण होतें व लय पावतें, तें क्षेत्रच होय. [ हेंच क्षेत्राचें मुख्य लक्षण होय. ] ५८ परंतु देव, मनुष्य, सर्प, असे निरनिराळ्या योनींत जे निर्माण होतात, ते सत्व, रज व तम या गुणांची संगति घडल्यानें उत्पन्न होतात. ५९ अर्जुना, त्या गुणांचा विचार पुढें [ चौदाव्या अध्यायांत ] सांगूं, सध्यां तुला ज्ञानाचें स्वरूप काय आहे तें सांगतों. १६० क्षेत्राचें सविस्तर स्वरूप विकारासह तुला सांगितलें. तर यापुढें ज्यापासून मोक्षप्राप्ति होते त्या उदार ज्ञानाविषयीं तुला सांगतों, तें ऐक. ६१ ज्या ज्ञानाकरितां योगी लोक स्वर्गाचा आडमार्ग ओलांडून ब्रह्मरंध्र आकाश गिळून टाकतात; ६२ सिद्धीची गरज बाळगीत नाहींत; ऋद्धीची भीड धरीत नाहींत, व कठीण असें जें योगसाधन त्याची हेलना करतात; ६३ तपोरूपी किल्ले ओलांडून, कोट्यवधि यज्ञ ओंवाळून टाकून कर्मकांडरूप वल्ली उपटून टाकतात; ६४ पुष्कळ प्रकारचे उपासनामार्ग स्वीकारून कोणी उघड्या अंगानेंच वागतात, व कोणी सुषुम्नेच्या गुप्त मार्गानें जातात; ६५ असें जें ज्ञान, त्याच्या प्राप्तीकरितां सर्व ऋषि उत्कट इच्छा मनांत धारण करून, वेदरूपी झाडाच्या पानांवरून हिंडतात. ( वेदांत सांगितलेल्या सर्व मार्गांचें शोधन करतात. ) ६६ हे पांडवा, गुरूची सेवा केली असतां त्यापासून ज्ञानप्राप्ति होईल, या बुद्धीनें पुढील येणाऱ्या अनेक जन्मांची गुरुसेवेवरून ओंवाळणी करतात, ६७ ज्या ज्ञानाची प्राप्ति झाली असतां अज्ञान नाहींसें होतें, व जीवाचें आणि आत्म्याचें ऐक्य होतें, ६८ जें ज्ञान इंद्रियांस विषयांची इच्छा होऊं देत नाहीं, कर्माची हात्र मोडून टाकितें, व मनाची काळजी दूर करितें; ६९ ज्या ज्ञानाचा लाभ झाला असतां द्वैताचा अभाव होतो,

१ वादविवाद. २ स्वभाववैरामुळें ज्यांचें न घडावयाचें त्यांचें ठिकाणीं मित्रत्व. ३ रथाचे सर्व भागांचा. ४ अभ्रास. ५ तेल, वात व अग्नि. ६ सर्वांना मिळून. ७ राबणाऱ्या, व्यापार करणाऱ्या. ८ शरीरानें. ९ अनेक. १० अलीकडे. ११ जडाच्या आंत. १२ पहलें असतां. १३ पुढें (चतुर्दशाध्यायांत). १४ उत्तर. १५ आडमार्ग. १६ ओलांडून. १७ तुच्छ मानितात. १८ तपरूपी किल्ले. १९ ओंवाळून टाकितात. २० कर्मरूपी वेल. २१ उपासनामार्गी. २२ सुयारांत, गुप्तमार्गांत. २३ उत्कृष्ट इच्छा. २४ ओंवाळणी. २५ शिरकाव, प्रवेश. २६ समजुत, ऐक्य. २७ बंद करी. २८ कर्माचे. २९ काळजी. ३० अद्वैताचा सुकाळ.

तेजा वायूसि झुंज । आणि गगन तंव सहज । वायू भक्षी ४४ तेवींचि कोणेही
वेळे । आपण कायिसयाही न मिळे । आंत रिगोनि वेगळें । आकाश हें
४५ ऐसीं हीं पांचही भूतें । न साहती एकमेकांतें । कीं तियेंही ऐक्यातें ।
देहासी येती ४६ द्वंद्वाची उखिविखी । सोडूनि वसती एकीं । एकेकातें पोखी ।
निजगुणें गा ४७ ऐसें न मिळे तयां सोंजणें । चळे धैर्यें जेणें । तयां नांव म्हणें ।
धृती मी गा ४८ आणि जीवेंसी पांडवा । या छत्तिसांचा मेळावा । तो हा एथ
जाणावा । संघातु पैं गा ४९ एवं छत्तीसही भेद । सांगितले तुज विशद । यया
येतुलेयातें प्रसिद्ध । क्षेत्र म्हणिजे १५० रथांगांचा मेळावा । जेवीं रथु म्हणिजे
पांडवा । कां अधोर्ध्व अवेवां । नांव देहो ५१ करीतुरंगसमाजें । सेना नाम नि-
फजे । कां वाक्यें म्हणिपती पुंजे । अक्षरांचे ५२ कां जळधरांचा मेळा । वाच्य
होय आभाळा । नाना लोकां सकळां । नाम जग ५३ कां स्नेहसूत्रवन्ही ।
मेळु एकचि स्थानीं । धरिजे तो जनीं । दीपु होय ५४ तैसीं छत्तिसही इयें तत्त्वें ।
मिळतीं जेणें एकत्वें । तेणें समूहपरत्वें । क्षेत्र म्हणिपे ५५ आणि वाहतेनि भौ-
तिकें । पाप पुण्य येथे पिके । म्हणोनि आम्ही कौतुकें । क्षेत्र म्हणों ५६ आणि
एकाचेनि मतें । देह म्हणती यातें । पारि असो हें अनंतें । नामें यया ५७
पैं परतत्त्वाऐरौतें । स्थावरांआंतौतें । जें कांहीं होतें जातें । तें क्षेत्रचि हें ५८
परि सुर नर उरगीं । घडत आहे योनिविभागीं । तें गुणकर्मसंगीं । पडिलें [१२] सातें ५९
हेचि गुणविवंचना । पुढां म्हणिपैल अर्जुना । प्रस्तुत आतां तुज ज्ञाना । रूप दावूं
१६० क्षेत्र तंव सविस्तर । सांगितलें सविकार । म्हणोनि आतां उदार । ज्ञान
आइकें ६१ जया ज्ञानालागीं । गगन गिळिताती योगी । स्वर्गाची औडवंगी ।
उमरडोनि ६२ न करिती सिद्धीची चाड । न धरिती ऋद्धीची भीड । योगाऐसें
दुवाड । हेळसिती [१७] ६३ तपोदुर्गें । वोलांडित । क्रतुकोटि वोवांडितें । उलथूनि
सांडित । कर्मवल्ली ६४ नाना भजनमार्गीं । धांवत उघडिया आंगीं । एक रिगताति
सुरंगीं । सुषुम्नेचिये ६५ ऐसी जिये ज्ञानी । मुनीश्वरांची उतान्ही । वेदतरूच्या पा-
नोवानी । हिंडताती ६६ देईल गुरुसेवा । इया बुद्धि पांडवा । जन्मशतांचा सांडोवा ।
टाकित जे ६७ जया ज्ञानाची रिगवणी । अविद्ये उणें आणी । जीवात्मया बुझो-
वणी । मांडूनि दे ६८ जें इंद्रियांचीं द्वारें औडी । प्रवृत्तीचे पाय मोडी । जें दैन्येंचि
फेडी । मानसाचें ६९ द्वैताचा दुकाळु पाहे । साम्याचें [३०] सुयाणें होये । जया

तेज वायूबरोबर झगडतें, आणि आकाश हें वायूस सहज भक्षून टाकतें; ४४ त्याचप्रमाणें कधींही कशाबरोबर न मिळतां सर्वत्र ओतप्रोत भरलेलें असून आकाश वेगळें असतें; ४५ अशा प्रकारें पंचमहाभूतें एकमेकांशीं विरुद्ध असूनही देहामध्यें एकत्र रहातात. ४६ दुजेपणाचा वादविवाद सोडून एकत्र राहून जीं आपल्या गुणांनीं एकमेकांचें पोषण करतात; ४७ याप्रमाणें न होणारी मैत्री जिच्या योगानें होते व धैर्य कायम रहातें, त्या वृत्तीला मी धृति असें म्हणतों. ४८ आणि हे पांडवा, जीवासह या छत्तीस तत्त्वांचें जें ऐक्य होतें, त्यालाच संघात असें म्हणतात. ४९ याप्रमाणें हें छत्तीस भेद तुला स्पष्ट रीतीनें सांगितले, व या सर्वांना मिळून क्षेत्र हें नांव प्राप्त झालें आहे. १५० बा अर्जुना, रथाचे सर्व भाग मिळून जसें रथ हें नांव येतें; किंवा पायापासून डोक्यापर्यंत सर्व अवयव मिळून देह हें नांव येतें. ५१ अथवा हत्ती, घोडे, रथ व पायदळ या सर्वांना मिळून जसें सेना हें नांव येतें, किंवा अक्षरांच्या समुदायाला वाक्य असें म्हणतात; ५२ मेघांच्या सर्व समुदायाला जसें आभाळ म्हणतात; किंवा सर्व लोकांच्या समुदायाला ज्याप्रमाणें जग असें म्हणतात; ५३ अथवा तेल, वात व अग्नि हीं एकत्र मिळालीं म्हणजे ज्याप्रमाणें त्याला दिवा असें लोक म्हणतात, ५४ त्याचप्रमाणें, हीं छत्तीस तत्त्वें जेव्हां एके ठिकाणीं मिळतात, तेव्हां त्या सर्वांना मिळून क्षेत्र म्हणतात, ५५ आणि सर्व प्राणी जगतांत राहाटून जी पापाची किंवा पुण्याईची कमाई येथें करतात, तेंच पीक समजून त्यास आम्ही क्षेत्र ( शेतें ) असें कौतुकानें म्हटलें, ५६ आणि कोणी क्षेत्रास देह असें म्हणतात. पण तें असो, याला अनेक नांवें आहेत. ५७ हें पद्म-ब्रह्माच्या अलीकडे महादेवापासून स्थावरजंगमापर्यंत जेवढें कांहीं निर्माण होतें व लय पावतें, तें क्षेत्रच होय. [ हेंच क्षेत्राचें मुख्य लक्षण होय. ] ५८ परंतु देव, मनुष्य, सर्प, असे निरनिराळ्या योनींत जे निर्माण होतात, ते सत्व, रज व तम या गुणांची संगति घडल्यानें उत्पन्न होतात. ५९ अर्जुना, ह्या गुणांचा विचार पुढें [ चौदाव्या अध्यायांत ] सांगूं, सध्यां तुला ज्ञानाचें स्वरूप काय आहे तें सांगतों. १६० क्षेत्राचें सविस्तर स्वरूप विकारासह तुला सांगितलें. तर यापुढें ज्यापासून मोक्षप्राप्ति होते त्या उदार ज्ञानाविषयीं तुला सांगतों, तें ऐक. ६१ ज्या ज्ञानाकरितां योगी लोक स्वर्गाचा आडमार्ग ओलांडून ब्रह्मारंभ आकाश गिळून टाकतात; ६२ सिद्धीची गरज बाळगीत नाहींत, ऋद्धींची भीड धरीत नाहींत, व कठीण असें जें योगसाधन त्याची हेलना करतात; ६३ तपोरूपी किल्ले ओलांडून, कोट्यवधि यज्ञ ओंवाळून टाकून कर्मकांडरूप वल्ली उपटून टाकतात; ६४ पुष्कळ प्रकारचे उपासनामार्ग स्वीकारून कोणी उघड्या अंगानेंच वागतात, व कोणी सुषुम्नेच्या गुप्त मार्गानें जातात; ६५ असें जें ज्ञान, त्याच्या प्राप्तीकरितां सर्व ऋषि उत्कट इच्छा मनांत धारण करून, वेदरूपी झाडाच्या पानांवरून हिंडतात. ( वेदांत सांगितलेल्या सर्व मार्गांचें शोधन करतात. ) ६६ हे पांडवा, गुरूची सेवा केली असतां त्यापासून ज्ञानप्राप्ति होईल, या बुद्धीनें पुढील येणाऱ्या अनेक जन्मांची गुरुसेवेवरून ओंवाळणी करतात, ६७ ज्या ज्ञानाची प्राप्ति झाली असतां अज्ञान नाहींसें होतें, व जीवाचें आणि आत्म्याचें ऐक्य होतें, ६८ जें ज्ञान इंद्रियांस विषयांची इच्छा होऊं देत नाहीं, कर्माची हाव मोडून टाकितें, व मनाची काळजी दूर करितें; ६९ ज्या ज्ञानाचा लाभ झाला असतां द्वैताचा अभाव होतो,

१ वादविवाद. २ स्वभाववैरामुळें ज्यांचे न पटावयाचें त्यांचे ठिकाणीं मित्रत्व. ३ रथाने सर्व भागांचा. ४ अभ्रास. ५ तेल, वात व अग्नि. ६ सर्वांना मिळून. ७ राबणाऱ्या, व्यापार करणाऱ्या. ८ शरीरानें. ९ अनेक. १० अलीकडे. ११ जडाच्या आंत. १२ घडलें असतां. १३ पुढें (चतुर्दशाध्यायांत). १४ उत्तर. १५ आडमार्ग. १६ ओलांडून. १७ तुच्छ मानितात. १८ तपरूपी किल्ले. १९ ओंवाळून टाकितात. २० कर्मरूपी वेल. २१ उपासनामार्गी. २२ भुयारांत, गुप्तमार्गांत. २३ उत्कृष्ट इच्छा. २४ ओंवाळणी. २५ शिरकाव, प्रवेश. २६ समजूत, ऐक्य. २७ बंद करी. २८ कर्माचे. २९ काळजी. ३० अद्वैताचा सुकाळ.

करावा, व आप्तवर्गांनी आपली संगती धरूं नये अशा प्रकारची ज्याच्या मनाला फार आवड असते, ९४ अंगांत नम्रपणा पूर्ण भरलेला असून हीनपणा हें आपलें भूषण होईल अशाच गोष्टी तो बहुतकरून करतो; ९५ आपण जीवंत आहों किंवा नाहीं असें लोकांस वाटावयाजोगें आपलें वर्तन असावें, अशी जो इच्छा करतो; ९६ हा आपल्या पायांनी चालत आहे किंवा वाऱ्यानें ढकलला जात आहे असें लोकांस वाटावें असें जो इच्छितो; ९७ प्राणिमात्राला माझ्यापासून कदाचित् भय वाटेल म्हणून माझ्या अस्तित्वाचा लोप होवो, माझें नांवरूप नाहींसें होवो, ९८ असें ज्याचे देशापाशी नवस असतात; जो नित्य एकांतवास करतो, व एकादी जागा निर्जन आहे असें ऐकल्यावरोबर आनंद पावतो; ९९ वायूच्या अनुरोधानें जो वागतो, व आकाशाबरोबर ज्याला बोलणें आवडतें, व ज्याला झाडेंच जीव की प्राण आहेत; २०० किंबहुना हीं लक्षणें ज्याच्या अंगांत आहेत असें दृष्टीस पडेल, तोच ज्ञानाच्या बिछान्यावर आहे म्हणजे त्यालाच ज्ञान हस्तगत झालें आहे असें समज. १ म्हणून [ अमानित्वं ] जो मनुष्य अभिमानरहित आहे, तो या लक्षणांनी ओळखावा. आतां अदांभिकत्व ओळखण्याचे अभिप्राय सांगतों: २ [ अदंभित्वं ] तर अदंभित्व असें असतें की, ज्याप्रमाणें कृपणाचें मन; त्याचा जीव गेला तरी तो आपल्या पुरून ठेवलेल्या पैशाचें ठिकाण कोणालाही सांगावयाचा नाहीं. ३ त्याप्रमाणें, अर्जुना आपल्या प्राणावर येऊन बेतली तरी तो आपलें सुकृत स्वतः बोलून दाखवीत नाहीं. ४ ज्याप्रमाणें खोटकर गाय आलेला पान्हा पळविते, किंवा वेश्या आपलें प्रौढ वय लपविते; ५ एकाद्या धनवान् मनुष्याला अरण्यांत चोरट्यांनी गांठलें असतां तो ज्याप्रमाणें आपली श्रीमंती प्रगट करीत नाहीं; किंवा कुलीन मुलगी आपले विशेष अवयव वस्त्रांनी आच्छादित करिते; ६ अथवा, धान्य पेरल्यावर त्याच्यावर कुळवानें माती ओढून शेतकरी ज्याप्रमाणें तें झांकून टाकतो, त्याप्रमाणें, आपण केलेलें दान व पुण्य जो कोणासही कळूं देत नाहीं; ७ आपल्या देहास सुशोभित करीत नाहीं, लोकांचें आर्जव करीत नाहीं, आणि आपल्या दानधर्माविषयीं आपणच डिमको वाजवीत नाहीं! ८ तसेंच, लोकांवर उपकार केलेले बोलून दाखवीत नाहीं, व आपल्यास येत असलेल्या विद्येची प्रौढी मिरवीत नाहीं; व प्रतिष्ठेसाठीं आपल्या विद्येचा विक्रय करीत नाहीं; ९ आपल्या शरीराच्या उपभोगाकरितां कृपणाप्रमाणें कांहीं खर्च करीत नाहीं; बाकी धर्माची बाब आली म्हणजे थोडा फार न म्हणतां हवा तेवढा खर्च करितो; २१० घरांत पाहिलें असतां सर्व प्रकारें अडचण असून स्वतःचें शरीर पाहूं गेलें असतां रोड असावयाचें; परंतु दान करण्याची वेळ आली म्हणजे कल्पवृक्षालाही मागें हटवितो; ११ फार काय सांगावें! स्वधर्माचें आचरण करण्यांत जो गंभीर असून प्रसंग आला असतां अति उदार असतो, आणि त्याप्रमाणें आत्मानात्मविचाराच्या गोष्टी निघाल्या असतां जो वादविवादांत महाचतुर असतो, बाकी इतर बाबतींत पाहूं लागलें असतां वेड्यासारखा दिसतो; १२ केळीचीं सोपटें हलकीं व पोकळ दिसलीं तरी त्यांचीं फळें मोठीं रसाळ असतात. १३ किंवा व मेघ ज्याप्रमाणें दिसण्यांत हलके असून सहज वाऱ्यानें जातील असें दिसतात, परंतु वर्षाव होऊं लागला म्हणजे ते भरींव आहेत असा निश्चय होतो. १४ त्याप्रमाणें, ज्याची पूर्णता पाहिली असतां बुद्धीला समाधान वाटतें व वाणीला वर्णन करण्यास ठिकाण तोच असतो; १५ हें असो; ह्या चिन्हांचा ज्याच्या ठिकाणीं सुकाळ दृष्टीस पडतो, त्याच्या हातीं ज्ञान आलें असें समज; १६ अदांभिकत्व ज्याला म्हणतात, तें हें होय. आतां अहिंसेचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. १७ [ अहिंसा ] हें पहा—अहिंसेचें पुष्कळ प्रकारच्या मतवाद्यांनी आपापल्या मताप्रमाणें वर्णन केलें आहे, तें ऐक. १८ परंतु ती अहिंसा इतकी चमत्कारिक आहे कीं, ज्याप्रमाणें झाडांच्या फांद्या तोडून त्या झाडाच्या बुंध्या-

१ आप्तांनी. २ चिता. ३ नम्रपण, लहानपण. ४ हीनपण हेंच भूषण. ५ चालत आहे किंवा नाहीं. ६ भिवो. ७ नवस. ८ निर्जन, ओसाड. ९ वागतो. १० प्रिय. ११ हस्तगत, शय्या. १२ सन्मानाची इच्छा नसणें १३ चिन्हांवरून. १४ अभिप्राय, रहस्य. १५ सांगत नाहीं, उघड करीत नाहीं. १६ आपल्या मुखानें, स्वतः. १७ खाष्ट, खोडाळ, पान्हा चोरणारी गाईला; १८ वेश्या. १९ धनवान. २० संकटांत पडतो. २१ अरण्यांत. २२ शेतकरी. २३ आच्छादी. २४ शब्दरूप वाजावर. २५ कीर्तीसाठीं, प्रतिष्ठेसाठीं. २६ वाटे. २७ टंचाई, दैन्य. २८ ठेवण, तयारी. २९ पैज. ३० वेळीं, प्रसंगीं. ३१ आत्मानात्मविचार करण्यांत. ३२ बांधा, आकार. ३३ घनवट, भरीव. ३४ हलकें. ३५ आड़े येत, थारा. ३६ इच्छा तृप्त होते. ३७ वर्णन करण्यास. ३८ व्यवहार, उत्कर्ष. ३९ तोडून. ४० बुंध्याला.

ज्ञाचि करावी । संबंधीं सोयेचि न धरावी । ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ९४ तळौटेपण बाणे । आंगीं हिणाव्रो खेवणें । तें तेंचि करणें । बहुतकरूनी ९५ हा जीतु ना नोहे । लोक कल्पी येणें भावें । तैसें जिणें होआवें । ऐसी आशा ९६ पैं चालतु कां नोहे । कां वारेनि जातु आहे । जना ऐसा भ्रमु जाये । तैसें होइजे ९७ माझें असतेपण लोपो । नामरूप हारपो । मज झणें वासिपो । भूतजात ९८ ऐसी जयाचीं नवसियें । जो नित्य एकांता जातु जाये । नामेंचि जो जिये । विजनाचेनी ९९ वायू आणि तया पडे । गगनेंसीं बोलों आवडे । जीवें प्राणें झाडें । पैंढियंतीं जया २०० किंबहुना ऐसीं । चिन्हें जया देखसी । जाण तया ज्ञानेंसीं । शेजे जाहली १ पैं अमानित्व पुरुषीं । तें जाणावें इहीं मिषीं । आतां अदंभाचिया बोलाखिसी । सौरसु देवों २ तरि अदंभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें । जीवु जावो पारे नुमसे । ठेविला ठावो ३ तयापरी किरीटी । पडिलाही प्राणसंकटीं । पारि सुकृत न प्रकटी । अंगें बोलें ४ खडौणे आला पान्हा । पळवी जेवीं अर्जुना । कां लपवी पर्ण्यांगना । वडिलपण ५ आढ्यु आंतुडे ओडवीं । मग आढ्यता जेवीं हारवी । नातरी कुळवधू लपवी । अवेवांतें ६ नाना कृषीवळु आपुलें । पांघुरवी पेरिलें । तैसें झांकी निपजलें । दानपुण्य ७ वरिवरी देहो न पूजी । लोकांतें न रंजी । स्वधर्मु वाग्ध्वजीं । बांधों नेणे ८ परोपकारु न बोले । न मिरवी अभ्यासिलें । न शके विकूं जोडलें । स्फीतीसाठीं ९ शरीरभोगाकडे । पहातां कृपणु आवडे । एऱ्हवीं धर्मविषयीं थोडें । बहु न म्हणे २१० घरीं दिसे सांकड । देहींची आयती रोड । पारे दानीं जया होड । सुरतरूसीं ११ किंबहुना स्वधर्मीं थोरु । अवसरीं उदारु । आत्मचर्चे चतुरु । एऱ्हवीं वेडा १२ केळींचें दळवाडें । हळू पोकळ आवडे । पारे फळोनियां गाढें । रसाळ जैसें १३ कां मेघाचें आंग झीलें । दिसे वारेनि जैसें जाईल । पारे वर्षती नवल । घनवट तें १४ तैसा जो पूर्णपणीं । पाहतां धाती आयणी । एऱ्हवीं तरी वाणी । तोचि ठावो १५ हें असो या चिन्हांचा । नैटनाचु ठायीं जयाच्या । जाण ज्ञान तयाच्या । हातां चढे १६ पैं गा अदंभपण । म्हणितलें तें हें जाण । आतां आइक खूण । अहिंसेची १७ तरि अहिंसा बहुतीं परी । बोलिली असे अवधारीं । आपुलालिया मतांतरीं । निरूपिली १८ परि ते ऐसी देखा । जैशा खांडुनियां शाखा । मग तयाचिया बुडुखा । कुंप

करावा; व आप्तवर्गांनी आपली संगती धरूं नये अशा प्रकारची ज्याच्या मनाला फार आवड असते, १९४ अंगांत नम्रपणा पूर्ण भरलेला असून हीनपणा हें आपलें भूषण होईल अशाच गोष्टी तो बहुतेकरून करतो; १९५ आपण जीवंत आहों किंवा नाहीं असें लोकांस वाटावयाजोगें आपलें वर्तन असावें, अशी जो इच्छा करतो; १९६ हा आपल्या पायांनी चालत आहे किंवा वाऱ्यानें ढकलला जात आहे असें लोकांस वाटावें असें जो इच्छितो; १९७ प्राणिमात्राला माझ्यापासून कदाचित् भय वाटेल म्हणून माझ्या अस्तित्वाचा लोप होवो, माझें नांवरूप नाहींसें होवो, १९८ असे ज्याचे देवापाशी नवस असतात; जो नित्य एकांतवास करतो, व एकादी जागा निर्जन आहे असें ऐकल्याबरोबर आनंद पावतो; १९९ वायूच्या अनुरोधानें जो वागतो, व आकाशाबरोबर ज्याला बोलणें आवडतें, व ज्याला झाडेंच जीव की प्राण आहेत; २०० किंबहुना हीं लक्षणें ज्याच्या अंगांत आहेत असें दृष्टीस पडेल, तोच ज्ञानाच्या बिछान्यावर आहे म्हणजे त्यालाच ज्ञान हस्तगत झालें आहे असें समज. १ म्हणून [ अमानित्वं ] जो मनुष्य अभिमानरहित आहे, तो या लक्षणांनी ओळखावा. आतां अदांभिकत्व ओळखण्याचे अभिप्राय सांगतों: २ [ अदंभित्वं ] तर अदंभित्व असें असतें की, ज्याप्रमाणें कृपणाचें मन; त्याचा जीव गेला तरी तो आपल्या पुरून ठेवलेल्या पैशाचें ठिकाण कोणालाही सांगावयाचा नाहीं. ३ त्याप्रमाणें, अर्जुना आपल्या प्राणावर बेतून बेतली तरी तो आपलें सुकृत स्वतः बोलून दाखवीत नाहीं. ४ ज्याप्रमाणें खोडकर गाय आलेला पान्हा पळविते, किंवा वेश्या आपलें प्रौढ वय लपविते; ५ एकाद्या धनवान् मनुष्याला अरण्यांत चोरट्यांनी गांठलें असतां तो ज्याप्रमाणें आपली श्रीमंती प्रगट करीत नाहीं; किंवा कुलीन मुलगी आपले विशेष अवयव वस्त्रांनी आच्छादित करिते; ६ अथवा, धान्य पेरल्यावर त्याच्यावर कुळवानें माती ओढून शेतकरी ज्याप्रमाणें तें झांकून टाकतो, त्याप्रमाणें, आपण केलेलें दान व पुण्य जो कोणासही कळूं देत नाहीं; ७ आपल्या देहास सुशोभित करीत नाहीं, लोकांचें आर्जव करीत नाहीं, आणि आपल्या दानधर्माविषयीं आपणच टिमकी वाजवीत नाहीं! ८ तसेंच, लोकांवर उपकार केलेले बोलून दाखवीत नाहीं, व आपल्यास येत असलेल्या विद्येची प्रौढी मिरवीत नाहीं; व प्रतिष्ठेसाठीं आपल्या विद्येचा विक्रय करीत नाहीं; ९ आपल्या शरीराच्या उपभोगाकरितां कृपणाप्रमाणें कांहीं खर्च करीत नाहीं; बाकी धर्माची बाब आली म्हणजे थोडा फार न म्हणतां हवा तेवढा खर्च करितो; २१० घरांत पाहिलें असतां सर्व प्रकारें अडचण असून स्वतःचें शरीर पाहूं गेलें असतां रोड असावयाचें; परंतु दान करण्याची वेळ आली म्हणजे कल्पवृक्षालाही मागें हटवितो; ११ फार काय सांगावें! स्वधर्माचें आचरण करण्यांत जो गंभीर असून प्रसंग आला असतां अति उदार असतो, आणि त्याप्रमाणें आत्मानात्मविचाराच्या गोष्टी निघाल्या असतां जो वादविवादांत महाचतुर असतो, बाकी इतर बाबतींत पाहूं लागलें असतां वेड्यासारखा दिसतो; १२ केळीचीं सोपटें हलकीं व पोकळ दिसलीं तरी त्यांचीं फळें मोठीं रसाळ असतात, १३ किंवा व मेघ ज्याप्रमाणें दिसण्यांत हलके असून सहज वाऱ्यानें जातील असें दिसतात, परंतु वर्षाव होऊं लागला म्हणजे ते भरीव आहेत असा निश्चय होतो. १४ त्याप्रमाणें, ज्याची पूर्णता पाहिली असतां बुद्धीला समाधान वाटतें व वाणीला वर्णन करण्यास ठिकाण तोच असतो. १५ हें असो; ह्या चिन्हांचा ज्याच्या ठिकाणीं धुमाकूळ दृष्टीस पडतो, त्याच्या हातीं ज्ञान आलें असें समज. १६ अदांभिकत्व ज्याला म्हणतात, तें हें होय. आतां अहिंसेचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. १७ [ अहिंसा ] हें पहा— अहिंसेचें पुष्कळ प्रकारच्या मतवाद्यांनी आपापल्या मताप्रमाणें वर्णन केलें आहे, तें ऐक. १८ परंतु ती अहिंसा इतकी चमत्कारिक आहे कीं, ज्याप्रमाणें झाडांच्या फांद्या तोडून त्या झाडाच्या बुंध्या-

१ आप्तांनी. २ चिंता. ३ नम्रपण, लहानपण. ४ हीनपण हेंच भूषण. ५ चालत आहे किंवा नाहीं. ६ भिवो. ७ नवस. ८ निर्जन, ओसाड. ९ वागतो. १० प्रिय. ११ हस्तगत, शय्या. १२ सन्मानाची इच्छा नसणें १३ चिन्हांवरून. १४ अभिप्राय, रहस्य. १५ सांगत नाहीं, उघड करीत नाहीं. १६ आपल्या मुखानें, स्वतः. १७ लाथाळ, ओढाळ, पान्हा चोरणाऱ्या गाईला. १८ वेश्या. १९ धनवान. २० संकटांत पडतो. २१ अरण्यांत. २२ शेतकरी. २३ आच्छादी. २४ शब्दरूप ध्वजापर. २५ कीर्तिसाठीं, प्रतिष्ठेसाठीं. २६ वाटे. २७ टंचाई, दैन्य. २८ ठेवण, तयारी. २९ पैज. ३० वेळीं, प्रसंगीं. ३१ आत्मानात्मविचार करण्यांत. ३२ बांधा, आकार. ३३ घनवट, भरीव. ३४ हलकें. ३५ जाडे थेंब, गारा. ३६ इच्छा तृप्त होते. ३७ वर्णन करण्यास. ३८ व्यवहार, उत्कर्ष. ३९ तोडून. ४० बुंध्याला.

कीजे १९ कां बाहु तोडोनि पचविजे । मग भुकेची पीडा राखिजे । ना ना देऊळ मोडूनि कीजे । पौळी देवा २२० तैसी हिंसाचि करूनि अहिंसा । निफजविजे हा ऐसा । पैं पूर्वमीमांसा । निर्णो केला २१ जे अवृष्टीचेनि उपद्रवें । गोंदलें विश्व आघवें । म्हणोनि पर्जन्येष्टी करावे । नाना याग २२ तंव तिये इष्टीचिया बुडीं । पशुहिंसा तंव रोकडी । मग अहिंसेची थडी । कैंची दिसे २३ पेरिजे नुसधी हिंसा । तेथ उगवेल काय अहिंसा । परी नवल बापा धिंवसा । या याज्ञिकांचा २४ आणि आयुर्वेदु आघवा । तो याच मोहोरा पांडवा । जो जीवाकारणें करावा । जीवघातु २५ नानारोगें अहोळलीं । लोळती भूतें देखिलीं । ते हिंसा निवारावया केली । चिकित्सा कां २६ तंव ते चिकित्से पहिलें । एकाचे कंद खणविले । एका उपडविलें । समूळीं सपत्रीं २७ एके आडे मोडविली । अजंगमांची खोल काढविली । एकें गर्भिणी उकडविली । पुटा-माजीं २८ अजातशत्रु तरुवरां । सर्वांगीं देवविल्या शिरा । ऐसे जीव घेऊनि धनुर्धरा । कोरडे केले २९ आणि जंगमांही हात । लाऊनि काढिलें पित्त । मग राखिले शिणतें । आणिक जीव २३० अहो वसतीं धवळारें । मोडूनि केलीं देव्हारें । नागवूनि वेव्हारें । गवांदी घातली ३१ मस्तक पांघुरविलें । तंव तळवटीं उघडें पडलें । घर मोडोनि केले । मांडव पुढें ३२ नाना पांघुरणें । जाळूनि जैसें तापणें । कां जालें आंगधुणें । कुंजराचें ३३ नातरी बैल विकूनि गोठा । पुंसा लावोनि बांधिजे गांठा । इया करणी कीं चेष्टा । काइ हंसों ३४ एकीं धर्माचिया वाहणी । गाळूं आदरिलें पाणी । तंव गाळितया आहाळणीं । जीव मेले ३५ एक न पचवितीचि कण । इये हिंसेचे भेण । तेथ कदर्थलें प्राण । तेचि हिंसा ३६ एवं हिंसाचि अहिंसा । कर्मकांडीं हा ऐसा । सिद्धांतु सुसनसा । वोळखें तूं ३७ पहिलें अहिंसेचें नांव । आम्हीं केलें जंव । तंव स्फूर्ति बांधली हांव । इये मती ३८ तरि कैसेनि ययातें गाळावें । म्हणोनि पाडिलें बोलावें । तेवींचि तुवां [illegible] । [illegible] ३९ बहुतकरूनि किरीटी । हाचि विषयो इये [illegible] कां [illegible] । धांविजेल २४० आणि स्वमताचिया [illegible] । [illegible] । निर्वेचु कीजे ४१ ऐसी [illegible] । [illegible] । मुख्य जें [illegible] गा ४२ तें स्वमत [illegible] आंतुल ।

भोंवतीं त्यांचेंच कुंपण घालणें, १९ किंवा आपले हात तोडून ते शिजवून आपली भूक शमन करणें, अथवा देऊळ मोडून त्याच सामानानें देवाभोंवतीं आवार बांधणें, २२० त्याप्रमाणें यज्ञादिकर्मांत हिंसा करून मग तिच्यापासून अहिंसा उत्पन्न करावयाची असा चमत्कारिक कर्मकांडकारांनीं चमत्कारिक निर्णय केला आहे. २१ कारण, पावसाच्या अवर्षणामुळें सर्व जग गांजून गेलें म्हणून पर्जन्याकरितां कारिरी इत्यादि याग करितात, २२ तों त्या यागाच्या मुळाशीं पाहूं गेलें असतां पशूची हिंसा ही स्पष्ट घडून येते; मग अहिंसेचा जो पलीकडील कांठ, तो त्या ठिकाणीं कसा दृष्टीस पडणार ? २३ जर केवळ हिंसाच पेरली, तर त्या ठिकाणीं अहिंसा उगवेल काय ? परंतु अर्जुना, या याज्ञिकांच्या हिंसेची कमाल आहे ! २४ मग पांडवा, सर्व वैद्यकग्रंथ असाच तऱ्हेचे आहेत कीं, एका जीवाचें रक्षण करण्याकरितां दुसऱ्या जीवाचा घात करावा ! २५ नानाप्रकारच्या रोगांनीं ग्रस्त होऊन पुष्कळ जीव लोळत आहेत. असें पाहून त्या घडत असलेल्या हिंसेच्या निवारणार्थ रोगाची परीक्षा करून औषधांची योजना करितात, २६ त्या औषधांच्या योजनेकरितां प्रथम एका झाडाचें मूळ खणून आणतात, व दुसऱ्या झुडपाला मुळासकट उपटून आणतात; २७ एक झाड मध्येंच मोडतात, एका मोठ्या झाडाची साल काढून आणतात, व गाभण असलेला जीव खाली घर आच्छादन घालून उकडून काढतात. २८ ज्याला शत्रुभाव मुळींच नाहीं अशा झाडाच्या सर्वांगावर घाव घालून त्यांतून निघणारा चीक काढून घेतात. याप्रमाणें, धनुर्धरा, सर्व वनस्पतींचें सत्व नाहींसें करून तीं झाडें सुकवितात; २९ आणि सजीवांच्या अंगांत हात घालून त्यांचे पोटांतील पित्त काढून घेतात, व त्यामुळें पीडित झालेल्या दुसऱ्या पुष्कळ जीवांचें रक्षण करितात. २३० अहो, नांदतीं घरें मोडून त्यांचे देव्हारे किंवा देऊळें केलीं, सावकार व्यापारांतून अन्नसत्रें घातलीं, ३१ डोक्याला वस्त्र गुंडाळल्यामुळें खालचें अंग उघडें पडलें, पुढील आंगण उघडें होतें त्यावर घर मोडून मांडव घातले; ३२ अथवा पांघरूण जाळून शेकोटी केली, तो जशी व्यर्थ, किंवा हत्तीला स्नान घालणें व्यर्थ, कारण हत्तीला स्नान घालून स्वच्छ धुऊन काढल्यावर पाण्यांतून वर येतांच पुनः तो सोंडेनें चिखल घेऊन आपलें अंग भरवितो; ३३ किंवा बैल विकून टाकून त्या पैशांचा गोठा बांधणें, अथवा राघू हांकून देऊन मग त्याच्याकरितां पिंजरा तयार करणें याचें नांव काय कीं चेष्टा ! आणि यास काय हंसावें कीं रडावें ! ३४ कोणी धर्मसंप्रदायाप्रमाणें पाणी गाळून पिऊं लागतात, तों चिरगुटांतील पाणी पिळून घेतेवेळीं जीव मरतात; ३५ कोणी हिंसा होईल या भीतीनें धान्य न शिजवितां उपाशींच रहातात, त्यामुळें त्यांचे प्राण व्याकूळ होतात हीही हिंसाच होते; ३६ याप्रमाणें, हे प्रसन्न मनाच्या अर्जुना, हिंसेलाच धर्मकांडांत अहिंसा मानून सिद्धांत केला आहे, तो नीट समजून घे. ३७ पहिल्या प्रथम अहिंसेचीं लक्षणें सांगावीं असें जेव्हां आम्हीं मनांत आणलें, तेव्हां आमच्या बुद्धीला असें वाटलें कीं, अगोदर ह्या अहिंसेचीं लक्षणें सांगावीं. ३८ परंतु वर वर्णन केलेल्या नांवाच्या मात्र अहिंसा, यांना कशा गाळाव्या, म्हणून त्यांचें वर्णन करावें लागलें, त्याचप्रमाणें तुलाही कळावें असा आमच्या अंतःकरणांत भाव होता. ३९ अर्जुना, मुख्यत्वेंकरून ह्याच हेतु मनांत येऊन आम्हीं तुला अहिंसेचीं लक्षणें सांगितलीं. बाकी आडमार्गानें कोणी उगीच धांवेल का ? ३४० आणि अर्जुना, आपलें मत स्थापन करण्याकरितां दुसऱ्यांच्या मतांविषयीं विचार करावा लागतो. ४१ ह्याप्रमाणें आपलें मत स्पष्ट सांगण्याची ही रीत आहे; तर आतां यापुढें आमचें जें मुख्य मत आहे, तें ऐक. ४२ तें आमचें मत स्पष्ट सांगून अहिंसेचीं लक्षणें सांगूं. जी अहिंसा अंतः–

१ शिजवावे. २ आवार, पोंवळ. ३ धर्मकांडामध्यें. ४ गांजलें. ५ केवळ. ६ धैर्य. ७ वैद्यक. ८ मार्गीचा. ९ पोळली. १० औषधाची योजना. ११ मध्यें मोडली. १२ वृक्षाचीं. १३ साल. १४ सालीवर झांकण घालून. १५ शत्रूरहित. १६ सत्व. १७ निःसत्व. १८ सजीवांसही. १९ पीडित झालेले. २० नांदतो. २१ व्यापारांत. २२ अन्नछत्र. २३ शेक घेणें. २४ हत्तीचें. २५ राघू घालवून देऊन. २६ पिंजरा. २७ धर्मसंप्रदायानें. २८ त्रासानें. २९ दुखावले, कासाविस झाले. ३० प्रसन्न मनाच्या (अर्जुना). ३१ निवड, विचार.

ज्ञान दिसे ४३ परि तें अधिष्ठिलेनि[1] आंगें । जाणिजे आचरतेनि बांगें[2] । जैसी कसवटी[3] सांगे । वानियातें ४४ तैसें ज्ञानामनाचिये भेटी । सरिसोंसि अहिंसेचें बिंब उठी । तेंचि ऐसें किरीटी । परिस आतां ४५ तारि तरंगु नोलांडितु । लहरी पायें न फोडितु । सांचलु न मोडतु । पाणियाचा ४६ वेगें आणि लेसा । दिठी घालूनि आंविसा[6] । जळीं बकु जैसा । पाउल सुये ४७ कां कमळावरी भ्रमर । पाय ठेविती हळुवार । कुचुंबैल केसर । इया शंका ४८ तैसें परमाणु पां गुंतले । जाणूनि जीव सानुले । तेथ कारुण्यामाजि पाउलें । लपवूनि चाले ४९ ते वाट कृपेची करितु । ते दिशाचि स्नेहभरितु । जीवातळीं आंथरितु । आपुला जीवु २५० ऐसिया जतना । चालणें[11] जया अर्जुना । हें अनिर्वाच्य परिमाणा । पुरिजेना ५१ पैं मोहाचेनि सांगडें[12] । लासी[13] पिलीं धरी तोंडें । तेथ दांतांचे आगरडे[14] । लागती जैसे ५२ कां स्नेहाळु माये । तान्हयाची वास[15] पाहे । तिये दिठी आहे । हळुवार जें ५३ ना ना कमळदळें । डोलेविजती[16] ढाळढाळें । तो जेणें पाडें बुबुळें । वारा घेपे ५४ तैसेनि मार्दवें पाय । भूमीवरी न्यसीतु[20] जाय । लागती तेथ होय । जीवां सुख ५५ ऐसिया लघिमा[21] चालतां । कृमि कीटक पांडुसुता । देखे तारि मागौता । हळूचि निघे ५६ म्हणे पावो धडफेडील[22] । तारि स्वामीची निद्रा मोडैल । रचैलेपणा[23] पडैल । ऐसी[24] हन ५७ इया काकुळती । वोहणी[25] घे मागौती । कोणेही व्यक्ती । न वचे[26] वरी ५८ जीवाचेनि नांवें । तृणातेंही नोलांडावे । मग न लेखितां जावें । हे कें गोठी ५९ मुंगिये मेरु नोलांडवे । मशका सिंधु न तरवे । तैसें भेटलियां न करवे । अतिक्रमु २६० ऐसी जयाची चाली । कृपाफळीं फळा आली । वाचिकी देखसी जियाली[30] । दया वाचे ६१ स्वयें श्वसणेंचि तें सुकुमार । मुख मोहाचें माहेर । माधुर्या जाहले अंकुर । दर्शन[32] तैसे ६२ पुढां स्नेह पाझरे । माघां चालती अक्षरें । शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ६३ तंव बोलणेंचि नाहीं । बोलों म्हणे जरी कांहीं । तारि बोल कोणाही । खुपेल[33] कां ६४ बोलतां अधिकुही निघे । तरी कोण्हाही वर्मी न लगे । आणि कोण्हासि न रिघे । शंका मनीं ६५ मांडिली गोठी हन मोडैल । वासिपैल[34] कोणी उडैल[35] । आइकोनि वोवांडिलें[36] । कोण्ही जरी ६६ तारि दुवाळी[37] कोणा नोहावी । भंवई कवणाची ठुचलावी । ऐसा भावो जीवीं । म्हणोनियां ६७ मग प्रार्थिला विपायें । जारि लोभें बोलों जाये । तारि परिसतयां[39] होये । माय-

करणांत उत्पन्न झाली असतां स्पष्ट ज्ञान दिसतें, ४३ परंतु ती अहिंसा ज्याच्या अंगावर पूर्ण बाणली आहे ती त्याच्या आचरणावरून समजून येते. ज्याप्रमाणें सोनें कसास लावलें म्हणजे त्याचा दर लावतां येतो, ४४ त्याप्रमाणें खरोखर ज्ञानामनाची भेट झाली तरच ( ज्ञान झालें तरच ) अहिंसेचा मनावर ठसा उमटतो; अर्जुना, तो ठसा कसा उमटतो तें ऐक. ४५ पाण्याच्या लाटा न विघडूं देतां व पाण्याचा स्थिरपणा न मोडतां ४६ वेगानें हळूच आपलें खाद्य जो मासा, त्यावर नजर ठेवून बगळा ज्याप्रमाणें पाण्यांत पाऊल टाकतो, ४७ किंवा आंतील केसर दुखावेल या भीतीनें भुंगा कमळावर हळूंच पाय ठेवतो, ४८ त्याप्रमाणें, परमाणूंत सुद्धां अति सूक्ष्म जीव भरलेले आहेत, असें जाणून ते न मरावे अशी मनांत करुणा उत्पन्न होऊन तो जमिनीवर बेतानें पावलें ठेवून चालतो; ४९ तो ज्या वाटेनें जातो तिकडे कृपादृष्टीनें पहात चालून व ज्या दिशेस जातो तिकडे स्नेहभाव भरून, कोणाही प्राण्यास उपद्रव होऊं नये म्हणून आपल्या जिवापेक्षां त्याच्या जिवाला जपतो; २५० अर्जुना, अशा रीतीनें जपून जे चालतात, त्यांच्या अहिंसेचें माप शब्दांनी करतां येत नाही. ५१ मायेच्या योगानें मांजरी आपल्या तोंडांत पिलास धरिते, त्या वेळेस ज्याप्रमाणें तिचे दांत त्यास लागत नाहीत, ५२ किंवा ज्याप्रमाणें ममताळू आईची आपल्या मुलाच्या वाटेकडे दृष्टि लागली असतां त्या दृष्टींत प्रेम असतें; ५३ अथवा कमळाच्या पानानें वारा घेऊं लागलें असतां ज्याप्रमाणें डोळ्यांच्या बुबुळांस समाधान होतें, ५४ त्याप्रमाणें तो जमिनीवर पाय हळूच टेंकून चालतो; व ते ज्या जीवांना लागतात त्यांना त्रास न होतां, जपून टाकल्यामुळें, उलट सुख होतें. ५५ अर्जुना, याप्रमाणें तो हळू चालत असतां जमिनीवर किडा किंवा मुंगी दृष्टीस पडली, तर तो हळूच माघारा फिरतो. ५६ जर आपण पाय आपटीत चाललों, तर स्वामींच्या निद्रेचा भंग होईल, व त्यांच्या प्रकृतीच्या स्वस्थपणास धक्का बसेल, ५७ अशी दया मनांत उत्पन्न होऊन, कोणच्याही प्राण्याचें उल्लंघन न करतां माघारा फिरतो; ५८ जीवाचा नाश होईल म्हणून गवतावरही पाय देऊन जात नाही, मग एकादा प्राणी दृष्टीस पडून त्याला न जुमानतां त्याची प्राणहानि होईल असें मनांत न आणितां तो वाट चालेल, ही गोष्ट त्याचे हातून कशी घडेल ? ५९ ज्याप्रमाणें मुंगीला मेरु पर्वत ओलांडून जातां येत नाही, अथवा चिलटाला समुद्र तरून जातां येत नाही, त्याप्रमाणें प्राण्याची गांठ पडली असतां ज्याच्यानें त्याचें उल्लंघन करवत नाही; २६० अशी ज्याची वागणूक कृपारूप फळांनी फळास येऊन वागीतही मूर्तिमंत दया जगली आहे; ६१ स्वतः श्वासोच्छ्वास टाकावयाचा तोही शेजारच्या मनुष्यास त्रास न होईल अशा बेतानें हळू टाकतो; व त्याचें मुख पाहिलें असतां केवळ प्रेमाचें माहेरघर असें दिसतें; तसेच त्याचे दांत माधुर्याला अंकुर फुटल्याप्रमाणें दिसतात; ६२ त्याच्या तोंडांतून अक्षरें बाहेर पडण्याचे अगोदर तोंडावर स्नेहभाव दृष्टीस पडूं लागतो; व पोटांत अगोदर दया उत्पन्न होऊन नंतर कृपेनें भरलेले असे शब्द बाहेर पडतात. ६३ तो होतां होईतोंपर्यंत कोणाशी बोलतच नाही; कदाचित् त्यानें बोलण्याचें मनांत आणलें, तर आपलें बोलणें कोणास लागेल की काय अशी त्यास भीति वाटते; ६४ बोलतांना जर आपल्या तोंडांतून कमीजास्त शब्द निघाले, तर ते कोणाच्या वर्मी न लागावे व त्यापासून कोणाच्याही मनांत शंका उत्पन्न होऊं नये; ६५ त्यापासून कोणाचा ठरलेला बेत मोडेल, कोणास भीति वाटेल, व कोणी दचकून जागे होईल: आणि जरी कोणी आपल्या बोलण्याचा तिरस्कार केला, ६६ तरी कोणाला पीडा होऊं नये व कोणी भिवया चढवून आपलेकडे पाहूं नये, असें मनांत आणून तो बोलत नाही; ६७ मग कदाचित् कोणी प्रार्थना केली व लोभानें जर बोलूं लागला तर ऐकणारास त्याचें बोलणें आईबापाप्रमाणें

१ अंगी बाणल्यानें. २ स्तुतीनें, मार्गानें. ३ सोन्याचे हीन मध्यम इत्यादि प्रकारांना, कसांना. ४ स्थिरपणा. ५ हळू. ६ आमिषार्थ. ७ ठेवी. ८ दुखेल. ९ अतिशय बारिक. १० जपून. ११ वागतात. १२ योगानें. १३ मादी, मांजरी. १४ अग्रें, टोकें. १५ वाट. १६ प्रेम: १७ पानानें. १८ वारा घेतात. १९ हळूहळू. २० ठेवीत. २१ हळू. २२ आपटेल. २३ स्वास्थ्यास. २४ धक्का. २५ मार्ग. २६ चाले. २७ जुमानतां. २८ उल्लंघन. २९ वागणूक. ३० जगून राहिली. ३१ प्रेमाचें. ३२ दांत. ३३ खोंचेल. ३४ प्रचलित, चालू. ३५ भिईल व दचकून परतेल. ३६ तिरस्कारील, ओलांडील. ३७ शंका, छेद. ३८ कदाचित्. ३९ ऐकणाराला.

वापु ६८ कां नादब्रह्माचि मुसे[1] आलें । कीं गंगा[2]पय असे[3]ळलें । पतिव्रते आलें ।
वार्धक्य जैसें ६९ तैसें साच आणि मवाळ । मित[4]ले आणि रसाळ । शब्द
जैसे कल्लोळ । अमृताचे २७० विरोधुवा[5]दुबळु । प्राणिता[6]पढाळु । उपहासु छळु ।
वर्मस्पर्शु ७१ आंटु[9] वेगुं[10] विंदाणु[11] । आशा शंका प्रतारणु[12] । हे संन्यैसिले[13] अव-
गुणु । जया वाचा ७२ आणि तयाचि परी किरीटी । थांउ[14] जयाचिये दिठी ।
सांडिलिया भ्रुकुटी[15] । मोकळिया ७३ कां जे भूतीं वस्तु[16] आहे । तिये रूपें[17] शके
विपायें । म्हणोनि वासु[18] न पाहे । बहुतकरूनी ७४ ऐसाही कोणे एके वेळे ।
भीतरले[19] कृपेचेनि बळें । उघडोनि डोळे । दृष्टी घाली ७५ तरी चंद्रबिंबौनि
धारा । निघतां नव्हती गोचरां[20] । परि एकसरें चकोरां । निघती दोंदें ७६
तैसें प्राणियांसि होये । जरी तो कहीं वासु पाहे । तया अवलोकनाची सोये ।
कूर्मीही[21] नेणें ७७ किंबहुना ऐसी । दिठी जयाची भूतांसी । करही देखसी ।
तैसेचि ते ७८ तरी होऊनियां कृतार्थ । राहिले सिद्धां[22]चे मनोरथ । तैसे
जयाचे हात । निर्व्यापार ७९ अक्षमें[23] आणि संन्यासिलें[24] । कां निरिंधन[25] आणि
विझालें । मुकेनि घेतलें । मौन जैसें २८० तयापरी कांहीं । जयां करां करणें
नाहीं । जे अकर्तयाच्या[26] ठायीं । बैसों येती ८१ आंसुडैल[27] वारा । नख लागेल
अंबरा[28] । इया बुद्धी करां । चळों[29] नेदी ८२ तेथ आंगावरिलीं उडवावीं । कां
डोळां रिगतें[30] झाडावीं । पशुपक्ष्यां दावावी । त्रासमुद्रा[31] ८३ इया केउतिया[32]
गोठी । नावडे दंडु काठी । मग शस्त्राचें किरीटी । बोलणें कें ८४ लीलाक-
मलें खेळणें । कां पुष्पमाळा झेलणें । न करी म्हणे गोफणें[33] । ऐसें होईल ८५
हालवतील रोमावळी । यालागीं आंग न कुरवाळी । नखांची गुंडाळी । बोटां-
वरी ८६ तंव करणेंयाचाचि अभावो । परि ऐसाही पडे[34] प्रस्तावो । तरि हातां
हाचि सरावो[35] । जे जोडिजती ८७ कां नाभिकारा[36] उचलिजे । हातु पडिलियां
देइजे । नातरि आंतातें[37] स्पर्शिजे । अलुमालु[38] ८८ हेंही उपरोधें करणें । तरी आ-
र्तभय हरणें । नेणती चंद्रकिरणें । जिव्हाळा तो ८९ पावोनि तो स्पर्शु । मळ-
यानिळु खरपुंसु[39] । येणें मानें पशु । कुरवाळणें २९० जे सदा रिते मोकळे ।
जैशीं चंदनांगें निसळें । न फळतांही निर्फळें । होतीचिना ९१ आतां असो

आनंददायक व्हावें; ६८ किंवा नादब्रह्म (वेद) हेंच मूर्तिमंत पुढें उभें राहिलें आहे, अथवा स्वच्छ गंगोदक उसळलें आहे, किंवा पतिव्रता स्त्रीला वृद्धपण प्राप्त झालें आहे. ६९ त्याप्रमाणें खरे आणि मऊ, परिमित व प्रेमळ असे अमृताच्या लाटांप्रमाणें त्याच्या तोंडांतून शब्द निघतात; २७० जे शब्द व्याजस्तुतीनें भरलेले आहेत, ज्यापासून वाद उत्पन्न होतो व दुसऱ्यास त्रास उत्पन्न होतो, तसेंच ज्यापासून निंदा व छळ होतो व जे दुसऱ्याच्या वर्मी लागतात; ७१ आणि ज्यांत अडखळणें, अति वेगानें बोलणें, अवसान, कपट, आशा, शंका व ठकवाजी ही ज्याच्या वाणींत नाहींत; ७२ त्याचप्रमाणें अर्जुना, ज्याची दृष्टि स्थिर असून भिंवया भोंवळ्या असतात; म्हणजे ज्याच्या कपाळावर आठ्या दृष्टीस पडत नाहींत; ७३ कारण, प्रत्येक प्राण्यांत ब्रह्म भरलेलें आहे, त्याला कदाचित् त्रास होईल म्हणून जो बहुतकरून कोणाकडेही पहात नाहीं, ७४ असें असतांही एकाद्या वेळीं आंतल्या कृपेच्या बळानें जर डोळे उघडून कोणाकडे पाहील, ७५ तर चंद्रबिंबांतून निघणाऱ्या अमृताच्या धारा जरी कोणाच्या दृष्टीस पडत नाहींत, तरी चकोरपक्ष्यांना त्या कळतात, म्हणजे त्यांना आनंद होतो; ७६ त्याप्रमाणें, ज्या प्राण्याकडे तो आपल्या दृष्टीनें पाहील, त्याला समाधान होतें; त्याच्या अवलोकनांत किती प्रेम आहे, हें कासवीलाही माहीत नाहीं. (कासवीच्या केवळ कृपादृष्टीनेंच तिचीं मुलें वाढतात असें तिच्या दृष्टींत प्रेम, पोसण्याचें सामर्थ्य आहे.) ७७ किंबहुना जो भूतमात्राकडे अशा प्रेमळ दृष्टीनें पहातो, त्याच्या हाताचे गुण पाहूं गेलें असतां तेही दृष्टीप्रमाणेंच आहेत. ७८ ज्याप्रमाणें ब्रह्मनिष्ठाचे मनोरथ पूर्ण झालेले असतात, त्याप्रमाणें, ज्याचे हातांस कांहीं एक करण्याची इच्छा नसून ते निर्व्यापार असतात; ७९ जन्मांधानें ज्याप्रमाणें पहाण्याची क्रिया सोडावी, किंवा अग्नीस पेटवण नसून तो जसा विझावा, अथवा मुक्या मनुष्यानें जसें मौनव्रत धारण करावें, २८० तसें ज्याच्या हातांना कांहींएक करावयाचें उरलें नसतें, व जे कांहींएक व्यापार न करतां स्वस्थ असतात; ८१ वाऱ्याला धक्का लागेल किंवा आकाशाला नख लागेल, असें वाटून जो आपले हात हालवीत नाहीं, ८२ तेथें आंगावर बसलेली माशी उडवावी, किंवा डोळ्यांत जाणारीं धुंगुरटीं एकीकडे करावीं अथवा पशुपक्ष्यांना डोळ्यांनीं भीति दाखवावी, ८३ या गोष्टी कोठून घडणार? हे किरीटी, त्याला हातांत दंड किंवा काठी घेणेंही जर आवडत नाहीं, तर मग शस्त्रांची गोष्ट कशाला पाहिजे! ८४ हातांत लीलेनें कमळ घेऊन फिरविल्यास अथवा फुलांचा हार झेलल्यास ते गोफणीप्रमाणें एकाद्या जीवास लागून त्यास इजा होईल अशा समजुतीनें हेही व्यापार जो हातानें करीत नाहीं; ८५ अंगावरील लवेस इजा होईल म्हणून जो अंगावरून हात फिरवीत नाहीं; व बोटाचीं नखें काढिलीं असतां हिंसा होईल म्हणून जो तीं वाढवितो; ८६ अगोदर कोणती गोष्ट हातानें करावयाचीच नाहीं, परंतु जर प्रसंग आलाच तर हात जोडण्याशिवाय दुसरा अभ्यासच ज्याला ठाऊक नाहीं; ८७ किंवा हातानें व्यापार केलाच तर दुसऱ्यास हात उचलून अभय वचन देणें किंवा एकादा कोणी पडत असल्यास त्यास हातानें सांवरणें, अथवा पीडित मनुष्याच्या अंगावरून हळूच हात फिरविणें, ८८ ह्या गोष्टी मोठ्या संकटानें जो करतो, तथापि पीडित मनुष्याची चिंता तो हस्तस्पर्शानें दूर करतो, या त्याच्या करण्यानें जो कृपेचा पाझर सुटतो, तसा चंद्रकिरणापासून सुटणें कठीण आहे. ८९ मलय पर्वतावरील वाऱ्यानें पीडित मनुष्यास जसा आनंद होतो, त्याप्रमाणेंच ज्याच्या हाताच्या कुरवाळण्यानें पशूस आनंद होतो. २९० जे हात नेहमीं मोकळे असतात, आणि चंदनाच्या झाडाचा कोणताही भाग थंडगार असतो, व त्याला फळें न येतांही तो निष्फळ आहे असें कोणास वाटत नाहीं; तसाच हा नेहमीं शीतल व सफल असतो. ९१ आतां हें वाक्पांडित्य राहूं दे; सज्जनाचें शील व

१ मूर्तिमान झालें. २ गंगोदक. ३ उसळलें. ४ वृद्ध. ५ परिमित. ६ विरुद्ध वादाचें वळ. ७ पाण्यास कासावीस करणें. ८ निंदा. ९ अट. १० अवसान, जोर. ११ खोंचदार बोलणें, कोटिक्रम, पेंच. १२ ठकवाजी, लबाडी. १३ सोडून दिले. १४ ठाव, हद्द, तळ. १५ भिंवया. १६ ब्रह्म. १७ खुपेल. १८ वाट. १९ आंतील. २० दृष्ट, स्पष्ट. २१ कासवीणही. २२ ब्रह्मनिष्ठांचे. २३ कर्म करण्यास अशक्त. २४ कर्मत्याग केला. २५ काष्ठरहित. २६ कांहीं एक न करणाराच्या. २७ धक्का बसेल. २८ आकाशास. २९ हालें देत नाहीं. ३० निरपारी. ३१ भय. ३२ कोणीकडे. ३३ गोफणीसारखें. ३४ प्रसंग पडेल. ३५ अभ्यास. ३६ अभय देण्यास. ३७ पांडितास. ३८ हळूच. ३९ संकटानें ४० पाझर. ४१ तीव्र, कठीण.

हें वाग्जाळ । जाणें तें करतळ । सज्जनांचें शीळ । स्वभाव जैसें ९२ आतां मन तयाचें । सांगों म्हणों जरी साचें । तरी सांगितले कोणाचे । विलास हे ९३ काइ शाखा नव्हे तरु । जळेंवीण असे सागरु । तेज आणि तेजाकारु । आन काई ९४ अवयव आणि शरीर । हे वेगळाले काय कीर । कीं रसु आणि नीर । सिनानीं आथी ९५ म्हणोनि हे जे सर्व । सांगितले बाह्यभाव । तें मनचि गा सावयव । ऐसें जाणें ९६ जें बीज भुईं खोंविलें । तेंचि वरी रूंख जाहलें । तैसें इंद्रियद्वारीं फांकलें । अंतरीचि कीं ९७ पैं मानसींचि जरी । अहिंसेची अवसरी । तरी कैंची बाहेरी । वोसंडैल ९८ आवडे ते वृत्ती किरीटी । आधीं मनीं-नींचि उठी । मग ते वाचे दिठी । करांसि ये ९९ वांचूनि मनींचि नाहीं । तें वाचेसि उसटेल काई । बीजेंवीण भुईं । अंकुर असे ३०० म्हणोनि मनपण जैं मोडे । तैं इंद्रिय आधींचि उंवडे । सूत्रधारेंवीण साईखडे । वावो जैसें १ उगमींचि वाळूनि जाये । तें वोघीं कैचें वाहे । जीवु गेलिया आहे । चेष्टा देहीं २ तैसें मन हें पांडवा । मूळ या इंद्रियभावां । हेंचि रांहटें आघवां । द्वारीं इहीं ३ परि जिये वेळीं जैसें । जें होऊनि आंतु असे । बाहेरि ये तैसें । व्यापाररूपें ४ यालागीं साचोकारें । मनीं अहिंसा थांवे थोरें । जैसी पिकली स्फुती ओंदरें । बोभात निघे ५ म्हणोनि इंद्रियें तेचि संपदा । वेचितां हीं उदावादा । अहिंसेचा धंदा । कारितें आहाती ६ समुद्रीं दाटे भरितें । तैं समुद्रचि भरी तारि-यांतें । तैसें स्वसंपत्ति चित्तें । इंद्रियां केलें ७ हें बहु असो पंडितु । धरूनि बाळकाचा हातु । वोळी लिही व्यक्तु । आपणची ८ तैसें दयालुत्व आपुलें । मनें हातापायां आणिलें । मग तेथ उपजविलें । अहिंसेतें ९ याकारणें किरीटी । इंद्रियांचिया गोठी । मनाचिये रांहाटी । रूप केलें ३१० ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडांचा । जाहला ठायीं जयाचा । देखशील ११ तो जाण वेल्हाळें । ज्ञानाचें वेळाउळें । हें असो निखिळें । ज्ञानचि तो १२ जे अ-हिंसा कानें ऐकिजे । ग्रंथाधारें निरूपिजे । ते पाहावी हें उपजे । तैं तोचि पाहावा १३ ऐसें म्हणितलें देवें । तें बोलें एकें सांगावें । परि फांकलों हें उप-साहावें । तुम्हीं मज १४ म्हणाल हिरवे चारीं गुरूं । विसरे मागील मोहरें धरूं । कां वारेलगें पाखिरूं । गगनीं भरे १५ तैसिया प्रेमाचिया स्फूर्ती । फांवलिया रसवृत्ती । वाहविला मतीं । आकळेना १६ तरि तैसें नोहे अवधारा । कारण

स्वभाव हीं जशीं असतात, तसेंच त्याच्या हातांचें आचरण असतें. ९२ आतां त्याचें मन कसें आहे म्हणून जर सांगावयाचें म्हटलें तर ह्या ज्या गोष्टी वर्णन केल्या, ती कृति कोणाची आहे ? ९३ झाडांच्या फांद्या म्हणजे झाडें नाहींत काय ? पाण्याशिवाय समुद्र आहे काय ? तेज आणि सूर्य हीं निराळीं आहेत का ? ९४ अवयव आणि शरीर हीं निराळीं आहेत का ? किंवा पाणी व पाण्याची गोडी हीं कांहीं निराळीं आहेत का ? ९५ म्हणून हे जे सर्व इंद्रियांचे बाह्य व्यापार सांगितले ते. मनाचेच आहेत असें समज. ९६ जें बीज जमीनींत पेरलें असतें, तेंच वर झाडाच्या रूपानें दृष्टीस पडतें; त्याचप्रमाणें, इंद्रियांकडून जे व्यापार घडतात, ते मनाच्याच प्रेरणेनें होतात. ९७ परंतु मनांत जर अहिंसेचा उदय झाला नसेल, तर इंद्रियांकडून ती बाहेर कशी पडेल ? ९८ अर्जुना, कोणतीही वृत्ति अगोदर मनाच्या ठिकाणींच उत्पन्न होते; आणि मग तीच वाचेनें, दृष्टीनें व हातांनीं घडते. ९९ बाकी जी गोष्ट मनांत येत नाहीं, ती तोंडानें बोलली जाईल का ? हें पहा–बीजाशिवाय जमिनींत अंकुर उत्पन्न होईल का ? १०० म्हणून, ज्याप्रमाणें सूत्रधाराशिवाय कळसूत्री बाहुली हालत नाहीं, त्याप्रमाणें, मन जेव्हां कोणचाही व्यापार करण्यास प्रवृत्त होत नाहीं तेव्हां इंद्रियें आपोआप निर्बल होतात. १ जें पाणी उगमापाशींच आटून जातें, तें नदीच्या ओघांत कोठून वाहणार ? हें पहा–प्राण गेल्याबरोबर देहाकडून कांहीं व्यापार घडतात का ? २ त्याप्रमाणें पार्था, मन हें या इंद्रियांच्या व्यापारास मूळ कारण आहे व हेंच सर्व इंद्रियांकडून व्यापार करवितें. ३ परंतु ज्यावेळीं मनांत जशी वासना उत्पन्न होते; तसे इंद्रियांकडून बाहेर व्यापार घडतात; ४ ह्याकरितां, ज्याप्रमाणें पिकलेल्या फळाचा वास आपोआप चोहोंकडे पसरतो, त्याप्रमाणें खरोखर मनांत अहिंसा स्थिर झाली म्हणजे इंद्रियांच्या व्यापारांतही अहिंसाच दृष्टीस पडते. ५ म्हणून, इंद्रियें ही अहिंसा हीच आपली संपत्ति असें पूर्णपणें मानून तिचीच देवघेव म्हणजे व्यापार करीत असतात. ६ ज्याप्रमाणें समुद्राला भरती आली म्हणजे समुद्राच्या पाण्यानें खाड्या भरतात; त्याप्रमाणें मनांत अहिंसेचें आलेलें भरतें इंद्रियांच्या व्यापारांतही दृष्टीस पडतें. ७ फार काय सांगावें ! पंतोजी ज्याप्रमाणें लहान मुलाचा हात धरून त्याजकडून आपणच सुरेख अक्षर लिहवितो, ८ त्याप्रमाणें, आपले ठिकाणीं पूर्णत्वास आलेली दया, हस्तपादादि इंद्रियांचे ठिकाणीं आणून मन हें त्या ठिकाणीं अहिंसा उत्पन्न करवितें ( त्या इंद्रियांकडून अहिंसेचें आचरण घडतें. ) ९ ह्याकरितां, अर्जुना, इंद्रियांकडून घडणाऱ्या अहिंसेच्या ज्या गोष्टी सांगितल्या त्या मनाच्याच आहेत असें समज. १० अशा प्रकारें ज्यानें कायावाचामनेंकरून हिंसेचा त्याग केला आहे असें तूं पहाशील, ११ तो पुरुष ज्ञानाचा विलासी व वसतिस्थान आहे असें समज. फार तर काय, तो मूर्तिमंत ज्ञानच आहे. १२ ज्या अहिंसेचें वर्णन आपण कानांनीं ऐकतों, व ग्रंथाच्या आधारानें जिचें निरूपण करितों, ती अहिंसा प्रत्यक्ष पहावीसें वाटल्यास त्याच पुरुषाचें दर्शन घ्यावें. १३ ज्ञानदेव म्हणतात:--असें जें श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें, तें मी तुह्मांला एका शब्दांत सांगावयास पाहिजे होतें; परंतु त्याचा फार विस्तार झाला, ह्याबद्दल तुम्ही मला क्षमा करा. १४ तुम्ही म्हणाल कीं, जनावर हिरवें गवत खाऊं लागलें म्हणजे खात खात पुढें जातां जातां मागील क्रम सोडतें; किंवा पक्षी आकाशांत उडूं लागल्यावर वाऱ्याच्या वेगानें पुढेंच भराऱ्या मारीत जातो, १५ त्याप्रमाणें प्रेमाच्या भरांत रसवृत्ति पसरून माझी बुद्धि मलाच आवरेनाशी झाली, १६ असें आपण संतजन म्हणाल, पण तशांतला कांहीं प्रकार

१ सूर्य. २ निरनिराळीं. ३ वृक्ष. ४ मनच. ५ अडचण, कसर, न्यूनता. ६ कशी बाहेर पडेल ? ७ निर्बल, पांगळे, विन्मुख. ८ कळसूत्री बाहुली. ९ व्यर्थ. १० व्यापार करवितें. ११ वासना. १२ स्थिरावे. १३ सुवास. १४ आपोआप. १५ सर्वत्र घमघमत पसरतो. १६ पूर्णपणें. १७ खाड्यांना. १८ पंतोजी. १९ अगदीं स्पष्ट. २० व्यापाराचें २१ हिंसेचा. २२ विलासी. २३ घर. २४ खोल, मूर्तिमंत. २५ विस्तारलें. २६ मार्ग. २७ वाऱ्याच्या वेगानें. २८ पसरल्या.

असे विस्तारा । एऱ्हवीं पद तरी अक्षरां । तिहींचेंचि १७ अहिंसा म्हणतां थोडी ।
परि ते तैंचि होय उघडी । जैं लोटिजेती कोडी । मतांचिया १८ येऱ्हवीं प्राप्तें
मतांतरें । थांतंबूनि आंगभरें । बोलिजैल तें न सरे । तुम्हांपाशीं १९ रत्नपार-
खियांच्या गांवीं । जाईल गंडकी तरि सोडावी । कांश्मीरीं न करावी । मिंड-
गण जेवीं ३२० काइसा वासु कापुरा । मंदें जेथ अवधारा । पिठाचा विकरा ।
तियेसीतें २१ म्हणोनि इये सभे । बोलकेपणाचेनि क्षोभें । लाग सरूं न लभे ।
बोला प्रभु २२ सामान्या आणि विशेषा । संकेळै कीजेल देखा । तरि काना-
चेया मुखा- । कडे न्याल ना तुम्ही २३ शंकेचेनि गदळें । जैं शुद्ध प्रमेय मैळे ।
तैं मागुतिया पाउलीं पळे । अवधान येतें २४ कां करूनि बाबुळियेची बुंथी ।
जळें जियें ठातीं । तयांची वास पाहाती । हंस काई २५ कां अभ्रपैलीकडे ।
जैं येत चांदिणें कोडें । तैं चकोरें चांचुवडें । उचलितीना २६ तैसें तुम्ही वास
न पाहाल । ग्रंथु नेघा वारि कोपाल । जरी निर्विवाद नव्हैल । निरूपण २७ न
बुझाविता मतें । न फिटे आक्षेपांचें लागतें । तें व्याख्यान जी तुमतें । जोडूनि
नेदी २८ आणि माझें तंव आघवें । ग्रंथैन येणेंचि भावें । जे तुम्ही संतीं हो-
आवें । सन्मुख सदां २९ एऱ्हवीं तरी साचोकारें । तुम्ही गीतार्थाचे सोइरे ।
जाणोनि गीता एकसरें । धरिली मियां ३३० जें आपुलें सर्वस्व घ्याल । मग
इयेतें सोडवूनि न्याल । म्हणोनि ग्रंथु नव्हे बोलैं । साचाचि हे ३१ कां सर्व-
स्वाचा लोभु धरा । बोलीचा अव्हेरु करा । तरि गीते मज अवधारा । एकचि
गती ३२ किंबहुना मज । तुमचिया कृपा काज । तियेलागीं व्याज । ग्रंथाचें
केलें ३३ तरि तुम्हां रसिकांजोगें । व्याख्यान शोधावें लागे । म्हणोनि जी मैं-
तांगें । बोलों गेलों ३४ तंव कथेसि पसरु जाहला । श्लोकार्थु दूरी गेला । कीजो
क्षमा यया बोला । अपत्या मज ३५ आणि घांसाआंतिल हरळु । फेडितां लागे
वेळु । तें दूषण नव्हे खडैंळु । सांडावा कीं ३६ कां संवचोरां चुकवितां । दि-
वस लागलिया माता । कोपावें कां जीवितों । जितांणें कीजे ३७ परि यावरील
हें नव्हे । तुम्हीं उपसाहिलें तेंचि बरवें । आतां अवधारिजो देवें । बोलिलें
ऐसें ३८ म्हणे उन्मेखैंसुलोचना । सावध होईं अर्जुना । करूं तुज ज्ञाना । वोळखी
आतां ३९ तरि ज्ञान गा एथें । वोळख तूं निरुतें । आंक्रोशेंवीण जेथें । क्षमा
असे ३४० अगाध सरोवरीं । कमळिणी जियापरी । कां सदैवाचिया घरीं ।

नसून, विस्तार करण्याला कारण आहे. बाकी अहिंसा शब्द तीनच अक्षरांचा आहे. १७ पाहूं गेलें तर अहिंसेचें वर्णन थोडक्यांत करतां येईल; परंतु ज्या वेळेस हिंसेलाच अहिंसा म्हणणाऱ्या बहुमतांचें खंडण करावें, तेव्हांच ती स्पष्ट करतां येईल. १८ बाकी अहिंसेसंबंधानें जीं मतें उपलब्ध आहेत, तीं जशींच्या तशींच ठेवून जर मी अहिंसा सांगितली, तर तुम्हांला माझें बोलणें आवडणार नाहीं. ३१९ रत्नपारख्यांच्या गांवांत शालिग्राम शिला जर विकल्या जातील, तरच त्यांचें गांठोडें सोडावें. सरस्वतीच्या पुढें जशी कोणाची वक्तृत्व करण्याची शक्ति नाहीं. ३२० ज्या ठिकाणीं पिठाचीच विक्री कसी होते, त्या ठिकाणीं कापराच्या वासाला कोण विचारतो ? २१ म्हणून श्रोतेहो, तुमच्या सभेमध्यें मी मोठा वक्ता आहे असा जर अभिमान बाळगला, तर माझें बोलणें तुम्हांस रुचणार नाहीं. २२ सामान्य व विशेष गोष्टी जर सरसकट करून सांगितल्या, तर त्या तुम्ही आपल्या कानाच्या मुखाकडे सुद्धां नेणार नाहीं. ( कानावरसुद्धां पडूं देणार नाहीं. ) २३ जर कोणत्याही वस्तूचें खरें स्वरूप सांगतांना शंकेस जागा राहील, तर तुम्ही जें मजकडे लक्ष देत आहां, तें मागच्या पावलांनीच नाहींसें होईल ! २४ ज्या पाण्यावर शेवाळ पसरलेलें असतें त्या पाण्याकडे हंसपक्षी जातात काय ? २५ किंवा अभ्राच्या पलीकडे जर सुंदर चांदणें पडलें असलें तर तें भक्षण करण्याकरितां चकोरपक्षी चोंच उघडीत नाहींत; २६ त्याप्रमाणें जर निरूपण निर्दोष झालें नाहीं, तर तुम्ही माझ्याकडे पाहणार नाहीं, ( ग्रंथ हातांत धरणार नाहीं. ) इतकेंच नाहीं तर उलट रागवाल. २७ अहिंसेवरील निरनिराळीं मतें समजून सांगतांना जर आक्षेपांचें निरसन होणार नाहीं, तर तें व्याख्यान मला तुमचा लाभ जोडूं देणार नाहीं; ( तुम्ही माझें व्याख्यान ऐकत बसणार नाहीं; ) २८ आणि माझें हें सर्व प्रतिपादन तरी तुम्ही संतजनांनी नेहमी प्रसन्न व्हावें याकरितांच आहे. २९ बाकी खरोखर पाहूं गेलें असतां तुम्ही गीतेच्या अर्थाचे भोक्ते आहां, असें समजून मी एकदम गीताच व्याख्यानास घेतली, म्हणजे गीताच धरून ठेविली. ३३० त्या गीतेकरितां तुम्ही आपली वाटेल ती हानी पत्कराल, परंतु गीता सोडवून घ्याल. म्हणून, हा ग्रंथ नव्हे, तर तुमच्या कृपेचा जामीनच आहे. ३१ इतक्यावरही सर्वस्वाचा लोभ धरून या गीताग्रंथरूपी जामिनाचा अव्हेर कराल, तर गीतेची जी गती तीच माझी गती असें समजा. ३२ तात्पर्य काय की, तुमच्या कृपाप्रसादाची मला जरूर असल्यामुळेंच मीं गीतेचा अर्थ सांगण्याचें निमित्त केलें आहे. ३३ तेव्हां तुमच्यासारख्या रसिक श्रोत्यांना रुचेल असें व्याख्यान केलें पाहिजे, म्हणून अहिंसेवरील वेगळीं वेगळीं मतें तुम्हांस सांगितली. ३४ त्यामुळें कथेचा विस्तार होऊन श्लोकाचा अर्थ बाजूला राहिला, त्याची मज लेंकराला आपण क्षमा करा. ३५ जेवतांना घांसांत खडा लागला, तर तो काढण्यास लागलेला वेळ व्यर्थ गेला हा दोष नव्हे, कारण, तो खडा काढून टाकलाच पाहिजे. ३६ आपला मुलगा गांवाहून येत असतांना जर चोरांना चुकवून येण्याकरितां त्यास वेळ लागला, तर आईनें त्याच्यावर रागवावें, का तो जिवंत घरीं आला म्हणून त्याच्यावरून लिंबलोण उतरून टाकावें ? ३७ परंतु हे दाखले देण्याचें कांहीं कारण नाहीं. माझ्या वाढलेल्या व्याख्यानाबद्दल मला क्षमा केलीत हें चांगलेंच झालें, म्हणून श्रीकृष्ण हे अर्जुनास काय म्हणाले तें ऐका ३८ भगवान् म्हणालेः—हे ज्ञानोत्तमनयना अर्जुना, सावध हो. तुला ज्ञानाची आतां चांगली ओळख करून देतों. ३९ [ क्षांतिः ] हें पहा—ज्ञान म्हणून जें आहे, तें ज्या ठिकाणीं खेदावांचून क्षमा वास करिते, त्याच ठिकाणीं खरोखर आहे असें समज. ३४० जल कितीही असलें तरी त्याच्यावर कमळें असतात, किंवा दैववानाच्या

१ 'अहिंसा' हा शब्द. २ खंडण केल्या जातात. ३ प्राप्त झालेलीं अन्य मतें. ४ जशींच्या तशींच ठेवून. ५ आगम्या जोरानें-बळावर ६ चालणार-पटणार नाहीं. ७ शालिग्राम, शिळा. ८ कांदिमरी दगडांनीं, स्फटिकांनी. ९ स्तुति. १० मूर्ख. ११ त्याच्याबरोबरीस. १२ अभिमानानें. १३ सरसकट, मिश्रण. १४ मुख्यार्थ. १५ लक्ष. १६ शेवाळांचें. १७ पांघरूण. १८ असतात. १९ चोंच, २० निर्दोष. २१ समजावून सांगतांना. २२ संशयाचें. २३ जोडूं देणार नाहीं. २४ प्रतिपादन. २५ प्रसन्न. २६ भोक्ते. २७ जीवाशीं २८ ध्यास घेतला. २९ गीतेला. ३० तारण, ओलीस, ३१ कृपेची जरूर. ३२ निमित्त. ३३ अन्यमतें. ३४ खडा. ३५ जीवितावरून. ३६ निंबलोण. ३७ ज्ञानोत्तम नयना ( ज्याला उत्तम ज्ञान स्पष्ट दिसलें आहे अशा अर्जुना ). ३८ आयासरहित, दुःखरहित.

संपत्ति जैसी ४१ पार्था तेणें पाडें । क्षमा जयातें वाढे । तेहीं लेखे तें फुडें ।
लक्षण सांगों ४२ तरि पेंढियतें लेणें । आंगीं भावें जेणें । धरिजे तेवीं साहणें ।
सर्वचि जया ४३ त्रिविध मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे । वारी पडिलिया ।
नव्हे । वांकुडा जो ४४ अपेक्षित पावे । तें जेणें तोपें मानावें । अनपेक्षिताही
करवे । मानु तोचि ४५ जो मानापमानातें साहे । सुखदुःख जेथ सामाये । निं-
दास्तुती नोहे । दुखडु जो ४६ उन्हाळेनि जो न तपे । हिमवंतीं न कांपे । का-
यसेनिही न[15] वासिपे । पातलेया ४७ स्वशिखरांचा भारु । नेणे जैसा मेरु । कीं
धरी यज्ञसूकरु । वोझें न म्हणे ४८ ना ना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे क्षिती[18] ।
तैसा नाना द्वंद्वीं[19] प्राप्तीं । धांमेजेना ४९ घेउनी जळाचे लोट । आलिया नदी-
नदांचे संघाट । करी वाडें पोट । समुद्र जेवीं ३५० तैसें जयाचिया ठायीं ।
न साहणें कांहींचि नाहीं । आणि साहतु असे ऐसेंही । स्मरण नुरे ५१ आंगा
जें पातलें । तें करूनि घालीं आपुलें । तेथ सोंहतेनि नवेलें । घेपिजेना ५२
हे अनाक्रोश क्षमा । जयापाशीं प्रियोत्तमा । जाण तेणें महिमा । ज्ञानासि गा
५३ तो पुरुषु पांडवा । ज्ञानाचा वोलावा । आतां परिस आर्जवा । रूप करूं
५४ तरि आर्जव तें ऐसें । प्राणाचें सौजन्य जैसें । आवडे[29] तयाही दोषें[30] । एकाचि
गा ५५ कां तोंड पाहूनि प्रकाशु । न करी जेवीं चंडांशु । जगा एकुचि अव-
काशु । आकाश जैसें ५६ तैसें जयाचें मन । माणुसाप्रती आन आन । नव्हे
आणि वर्तन । ऐसें पैं तें ५७ जें जगेंचि सेनोळख । जगेंसीं जुनाट सोयरिक ।
आपपर हे भाख । जाणणें नाहीं ५८ भलतेणेंसी मेळु । पाणिया ऐसा ढाळु ।
कवणेविखीं आडळु । नेघे चित्त ५९ वारियाची धांव । तैसे सरळ भाव । शंका
आणि हांव । नाहीं जया ३६० मायेपुढें बाळका । रिगतां न पडे शंका । तैसें
मन देतां लोकां । नालोची जो ६१ फांकलिया इंदीवरा । परिवारु नाहीं धनु-
र्धरा । तैसा कोनकोंपरा । नेणेचि जो ६२ चोखाळपण रत्नाचें । कां रत्नावरी
किरणाचें । तैसें पुढां मन जयाचें । करणें पाठीं ६३ आलोचूं जो नेणे । अनु-
भवचि जोगावणें । धरी मोकळी अंतःकरणें । नव्हेचि जया ६४ दिठी नोहे
मिणधी । बोलणें नाहीं संदिग्धीं । कवणेंसीं हीनबुद्धी । राहाटीजे ना ६५ दा-

घरीं लक्ष्मी वास करिते, ४१ त्याचप्रमाणें, पार्था ज्यांच्या योगानें क्षमा वृद्धिंगत होते, तीं लक्षणें सांगतों, म्हणजे तीं पूर्णपणें लक्षांत येतील. ४२ आवडत्या मुलाच्या अंगावर आईबापानें घातलेले दागिने तें मूल जसें उदासवृत्तीनें धारण करितें, त्याप्रमाणें सर्व भोग उदासवृत्तीनें धारण करितो. ४३ कितीही दुःखप्रसंग असले तरी त्याचे आध्यात्मिक, अधिदैविक आणि आधिभौतिक असे तीन भेद आहेत. तितकेही एकदम प्राप्त झाले तरी त्यांच्या भारानें जो थांकत नाहीं; ४४ अपेक्षित वस्तु प्राप्त झाली असतां ज्या मानानें संतोष होतो, तेंच प्रमाण अनिच्छित वस्तुविषयीं असतें. ४५ जो मानापमान सहन करतो, सुखदुःखांनाही जागा देतो, आणि निंदेनें किंवा स्तुतीनें मनाची समता भंगूं देत नाहीं; ४६ जो उन्हाच्या तापानें तप्त होत नाहीं, व थंडीनें कांपत नाहीं, म्हणजे शीतोष्ण सहन करितो, आणि कसलाही प्रसंग आला असतां भीत नाहीं, ४७ मेरु पर्वताला जसा आपल्या शिखरांचा भार होत नाहीं, किंवा यज्ञवराह दंताग्रीं धारण केलेली पृथ्वी जड आहे असें म्हणत नाहीं; ४८ अथवा स्थावरजंगम भूतांचें ज्याप्रमाणें पृथ्वीला ओझें होत नाहीं, त्याप्रमाणें, अनेक प्रकारची सुखदुःखें प्राप्त झालीं तरी ज्याचें अंतःकरण कष्टी होत नाहीं; ४९ नदी व नद हे पाण्याचे लोटच्या लोट घेऊन जरी आले तरी त्यांना कोठें ठेवावें अशी चिंता न करितां ज्याप्रमाणें समुद्र त्यांना आपल्या पोटांत सहज सामावून घेतो, ३५० त्याप्रमाणें ज्याला सहन होत नाहीं असें कांहींच नसून; आपण सर्व गोष्टी सहन करतों ही आठवण करण्याइतका अभिमानही नसतो. ५१ देहाला ज्या ज्या गोष्टी प्राप्त होतात, त्या सर्व आपणच आहों, म्हणून आपण सर्व गोष्टी सहन करतों असा ज्याला अभिमान उत्पन्न होत नाहीं; ५२ अशा प्रकारची खेदरहित क्षमा ज्या पुरुषापाशीं वास करिते, त्या पुरुषाच्या योगें अर्जुना, ज्ञानासही मोठेपणा येतो. ५३ हे पांडवा, असा जो पुरुष, तो ज्ञानाचा खरोखर जिव्हाळाच होय.

[ आर्जवं ] आतां आर्जव (सरळपणा) ह्याविषयींचें वर्णन करतों, तें ऐक. ५४ वाटेल त्या उद्देशानें जरी मनुष्यानें कांहींही आचरण केलें, तरी ज्याप्रमाणें त्याला प्राण अनुकूळ असतो, ५५ किंवा सूर्य जसा हा चांगला, हा वाईट अशी भेदबुद्धि न ठेवतां प्रकाश करितो, तोंडाकडे पाहून प्रकाश पाडीत नाहीं, किंवा आकाश हें ज्याप्रमाणें सर्व जगाला सारखाच अवकाश देतें, ५६ त्याप्रमाणें ज्याचें मन माणसागणिक निरनिराळें नसून त्याचें वर्तन असें असतें कीं, ५७ सर्व जग जसें ओळखीचेंच असून सर्व जगाबरोबर जसा कांहीं सोयरिकीचाच संबंध आहे. आणि ज्याला आपपरभावाची ओळखच नाहीं; ५८ ज्याची वाटेल त्याबरोबर मैत्री होते; म्हणजे ज्याची वर्तणूक पाण्यासारखी असते. (पाणी ज्यांत मिसळावें त्यासारखें होतें.) व कोणतीही गोष्ट करण्याविषयीं ज्याचें मन आड येत नाहीं. ५९ वाऱ्यांच्या वेगाप्रमाणें ज्याचे मनाचा सरळपणा आहे; आणि ज्याला शंका व इच्छा मुळींच नाहीं, ३६० ज्याप्रमाणें आईचे मांडीवर बसण्यास मुलाला शंका येत नाहीं, त्याप्रमाणें जो दुसऱ्यास आपलें मन देण्याविषयीं विचार करीत बसत नाहीं; ६१ हे धनुर्धरा, फुललेल्या कमळास ज्याप्रमाणें आपला सुवास दाबून ठेवतां येत नाहीं, त्याप्रमाणें आंत एक व बाहेर एक असे विचार ज्याचे मनांत नाहीत; ६२ ज्याप्रमाणें रत्नाचा सुरेखपणा दृष्टीस पडण्याच्या पूर्वी त्याचें तेज फांकतें, त्याप्रमाणें, कोणतीही गोष्ट करण्यास अगोदर ज्याच्या मनाची धांव पुढें असते; व व्यवहार पाठीमागून असतो. ६३ ज्याला चिंतन करणें हें माहीत नाहीं व सदोदित तृप्त असणें हाच ज्याचा अनुभव आहे, अमुक गोष्ट करावयाची व अमुक गोष्ट करावयाची नाहीं असा ज्याच्या अंतःकरणांत विचार नसतो, ६४ ज्याची दृष्टि ओशाळी (कपटी) नाहीं व ज्याचें बोलणें संदिग्ध नाहीं; आणि जो कोणाबरोबरही वाईट बुद्धीनें वागत नाहीं; ६५ ज्याची

१ त्याप्रमाणें. २ ती क्षमा. ३ लक्ष्यांत येईल. ४ स्पष्ट. ५ आवडतें. ६ ज्या भावनेनें. ७ आध्यात्मिक, आधिदैविक, व आधिभौतिक. ८ समुदाय, ९ प्राप्त झालें असतां. १० इच्छित. ११ अनिष्टास. १२ सामावेंसें. १३ मग्न, विभागलेला. १४ हिंवाळ्यानें. १५ भीत नाहीं. १६ पृथ्वी. १७ वराहावतारी भगवान्. १८ पृथ्वीला. १९ सुखदुःखादि द्वंद्वें आलीं असतां, २० श्रमी होत नाहीं. २१ समुदाय. २२ मोठें. २३ सहन करणाराला. २४ अभिमान उत्पन्न होत नाहीं. २५ दुःखरहित शांति. २६ जिव्हाळा. २७ सरळपणाचें. २८ अनुकूलता. २९ पाहिजे त्या प्राण्याच्या. ३० उद्देशानें. ३१ सूर्य. ३२ भरलेलें. ३३ ओळखीचें. ३४ भाषा, बोलणें. ३५ वर्तणूक, रीत. ३६ प्रतिबंध. ३७ न विचारी. ३८ फुललेल्या. ३९ कमळाला. ४० गुप्तपण, गुप्तस्थान, मुकुलित भाव. ४१ सुरेखपणा. ४२ विचार करणें. ४३ तृप्त असणें, निर्वाह करणें. ४४ सोडणें. ४५ ओशाळी, कपटी. ४६ संशयित. ४७ माहेर. ४८ वागों.

हाही इंद्रियें प्रांजळें । निःप्रपंचें निर्मळें । पांचही[3] पालव मोकळे । आठही पा-
हर ६६ अमृताची धार । तैसें उजू अंतरें । किंबहुना जो माहेर । या चिन्हांचें
६७ तो पुरुष सुभटा । आर्जवाचा आंगवेटा । जाण तेथेंचि घरटा । ज्ञानें केला
६८ आतां ययावरी । गुरुभक्तीची[5] परी । सांगो गा अवधारीं । चतुरनाथा ६९
आघवीयांची दैवां । जन्मभूमि हे सेवा । जे ब्रह्म करी जीवा । शौर्च्यातेंही ३७०
ते आचार्योपास्ती । प्रकटिजैल तुजप्रती । बैसो[10] दे ऐकपांती । अवधानाची ७१
तरि सकळ जळसमृद्धी । घेऊनि गंगा निघाली उदधी[12] । कीं श्रुति हे महापदीं[13] ।
पैठी[14] जाहाली ७२ ना ना वेंटाळूनि जीवितें । गुणागुण उखितें[15] । प्राणनाथा
उचितें[16] । दिघलें प्रिया ७३ तैसें सबाह्य आपुलें । जेणें गुरुकुळीं वोपिलें । आप-
णपें केलें । भक्तीचें घर ७४ गुरुगृह जये देशीं । तो देशुचि वसे मानसीं । विर-
हिणी कां जैसी । वल्लभातें ७५ तियेकडोनि येतसे वारा । देखोनि धांवे
सामोरा । आड[17] पडे म्हणे घरा । बीजें[18] कीजो ७६ साचा प्रेमाचिया भुली । तया
दिशेसीचि आवडे बोली । जीवु थानीपती करूनि घाली । गुरुगृहीं जो ७७ पारि
गुरुआज्ञा धरिलें । देह गांवीं असे एकलें । वांसरुवा लाविलें । दावें जैसें ७८
म्हणे कैं हें बिरडें[20] फिटेल । कैं तो स्वामी भेटेल । युगाहूनि वडिलें । [22]निमिष
मानी ७९ ऐसेया गुरुग्रामींचें आलें । कां स्वयें गुरूनींचि धाडिलें । तरी गता-
युष्या जोडले । आयुष्य जैसें ३८० कां सुकतया अंकुरा- । वरि पडिलिया
पीयूषधारा[23] । ना ना अल्पोदकींचा सागरा । आला मासा ८१ नातरी रंकें निधान
देखिलें । कां आंधळिया डोळे उघडले । भणंगीचिया आंगा आलें । इंद्रपद
८२ तैसें गुरुकुळाचेनि नांवें । महासुखें अति थोरावे । जे [25]कोडेंही पोटाळवे[26] ।
आकाश कां ८३ पैं गुरुकुळीं ऐसी । आवडी जया देखसी । जाण ज्ञान तया-
पासीं । पाइकी करी ८४ आणि अभ्यंतरीलियेकडे । प्रेमाचेनि[29] पवाडे । श्री-
गुरूचें रूपडें । उपांशी[30] ध्यानीं ८५ हृदयशुद्धीचिया आंवारीं[31] । आराध्यु तो
निश्चल ध्रुव[32] करी । मग सर्व भावेंसी परिवारीं[33] । आपण होय ८६ कां चैतन्या-
चिये पोवळीं[35]- । माजि आनंदाचिया राउळीं[36] । श्रीगुरुलिंगा ढाळी[37] । ध्यानामृत
८७ उदयिजतां बोधार्का[38] । बुद्धीची डाल[39] सात्त्विकीं । भरोनियां त्र्यंबकीं[40] ।
लाखोली वाहे ८८ काळशुद्धी त्रिकाळीं[42] । जीवदशा धूप जाळी । ज्ञानदीपें
वोंवाळी । निरंतर ८९ सामरस्याची[43] रसासोय[44] । अखंड अर्पितु जाय । आपण

दहा इंद्रियें व पंचप्राण सदासर्वदा निष्कपट बुद्धीनें वर्तन करीत असतात; ६६ अमृताच्या धारेप्रमाणें ज्याचें मन सरळ आहे; किंबहुना जो या चिन्हाचें माहेरघरच आहे; ६७ हे वीरा, तो पुरुष मूर्तिमंत आर्जवच होय; आणि त्याच्याच ठिकाणीं ज्ञानानें आपलें बिऱ्हाड ठेविलें आहे हें ध्यानांत असूं दे. ६८ [ आचार्योपासनं ] हे धनुर्धरश्रेष्ठा, आतां यापुढें तुला गुरुभक्तीचे पर्याय सांगतों, ते ऐक. ६९ ही गुरुसेवा म्हणजे सर्व भाग्यांची जन्मभूमि होय; कारण शोकानें ग्रस्त झालेल्या जीवास ही ब्रह्मस्वरूप करिते. १७० अशी ही जी गुरुसेवा, ती तुला समजून सांगतों, तिकडे तुझें पूर्ण लक्ष असूं दे. ७१ हें पहा—ज्याप्रमाणें आपलें सर्व उदक घेऊन गंगा समुद्रास मिळते किंवा सर्व अभिप्रायांसह श्रुति ब्रह्मपदीं प्रविष्ट होते; ७२ अथवा पतिव्रता स्त्री आपलें जीवित व गुणावगुण हे सर्व आपल्या प्रिय पतीस अर्पण करिते, ७३ त्याप्रमाणें ज्यानें आपलें सर्व कांहीं गुरुकुलाचे ठिकाणीं अर्पण केलें आहे; आणि आपलें शरीर म्हणजे गुरुभक्तीचें आगरच केलें आहे; ७४ [ नवविधाभक्तिः—स्मरणं ] कसें म्हणशील तर—ज्याप्रमाणें विरहिणी पतिव्रता नेहमी पतीचेंच चिंतन करिते, त्याप्रमाणें ज्या देशांत आपल्या गुरूंचें घर असेल तोच देश ज्याचे मनांत नेहमी घोळत असतो; ७५ त्या दिशेनें येणाऱ्या वाऱ्यासही सामोरा जाऊन त्यास जो साष्टांग नमस्कार घालतो; आणि माझ्या घरीं वस्तीला यावें अशी प्रार्थना करितो; ७६ खऱ्या प्रीतीनें वेडावून जाऊन, गुरु ज्या दिशेस रहातात त्या दिशेशींच ज्याला बोलणें आवडतें; व जो गुरूंच्या घरीं आपला जीव वतनदार करून ठेवतो; ७७ परंतु ज्याप्रमाणें वासराला दावें लावलें असल्यामुळें त्याचें सर्व लक्ष गाईकडे लागलेलें असतें तरी त्याचें शरीर गोठ्यांतच असतें, त्याप्रमाणें केवळ गुरूंच्या आज्ञेमुळेंच ज्याचा देह मात्र आपल्या गांवीं असून ७८ त्याला असें वाटत असतें कीं, आपल्या गळ्याचें हें गुर्वाज्ञारूप पेंडें केव्हां सुटेल, व गुरूंची भेट केव्हां होईल; अशा चिंतेंत त्याला एक एक क्षणही युगापेक्षां मोठा भासत असतो. ७९ तशांत जर आपलें गुरूंचे गांवाहून कोणी मनुष्य आला, किंवा स्वतः गुरूंनींच एकादा मनुष्य पाठविला, तर, गतायुषी माणसाला आणखी आयुष्य मिळावें, १८० किंवा वाळलेल्या अंकुरावर अमृताच्या धारा पडाव्या, अथवा डबक्यांतील मासा समुद्रांत यावा, ८१ नाहीं तर एकाद्या दरिद्र्यानें द्रव्याचा ठेवा पहावा, किंवा जन्मांधास एकाएकीं दृष्टि यावी, अथवा भिकाऱ्याच्या वांट्यास इंद्रपद यावें, ८२ त्याप्रमाणें गुरूंच्या कुळाचें नांव ऐकतांच तो महासुखानें अतिशय थोरावतो; इतका कीं, कौतुकानें आकाशही त्याला सहज कवटाळतां येईल. ८३ हें पहा—गुरुकुलाच्या ठिकाणीं ज्याची अशी प्रीति असलेली तुझ्या नजरेस येईल, त्यांच्याजवळ ज्ञान हें सेवा करीत राहिलेलें असतें, असें समज. ८४ [ आर्चनं ] आणि अंतःकरणांत अत्यंत प्रेमयुक्त होऊन, श्रीगुरूंच्या मूर्तीची जो ध्यानोपासना करतो; ८५ शुद्ध हृदय हेंच देवळाच्या तटाच्या भोंवतालचें आवार, व आपलें जें आराध्यदैवत श्रीगुरु, त्यांची त्या आवारांत स्थापना करून मग आपल्या भावनेनें आपणच पूजासाहित्य बनतो; ८६ अथवा ज्ञानरूपी तटांत आनंदरूप देऊळ बनवून, त्यांत श्रीगुरुरूप शिवलिंगाची स्थापना करून मग त्याच्यावर ध्यानरूपी अमृतानें अभिषेक करितो; ८७ बोधरूप सूर्य उगवल्यावर बुद्धीच्या परडींत अष्टसात्त्विक भावांचीं कमळें भरून शंकराला त्याची लाखोली वाहतो. ८८ उत्तम वेळ हेंच शिवाच्या पूजेचे तिन्ही काळ असें मानून, त्यांत देहाभिमानरूपी धूप जाळतो; व ज्ञानरूप दिव्यानें जो, नेहमीं गुरुरूपी श्रीशंकरास ओंवाळतो; ८९ गुरूंशीं ऐक्य हाच नैवेद्य गुरूंना नेहमीं अर्पण करून, आपण पुजारी बनून गुरूंस शंकराचे ठिकाणीं मानून स्तवन

१ भोंवळेपणानें. २ निष्कपटी. ३ पंचप्राण. ४ मन. ५ मूर्ति. ६ पर्याय. ७ भाग्योदय. ८ शोकग्रस्तालाही. ९ गुरुसेवा. १० पूर्ण लक्ष्य असूं दे. ११ पत्नीला. १२ समुद्राला. १३ ब्रह्मपदीं. १४ प्रविष्ट. १५ अवघे, उर्के, सर्व. १६ योग्यायोग्य. १७ साष्टांग नमस्कार घालतो. १८ आगमन करावें. १९ स्थानपति, वतनदार. २० पेंडें, गुरुसेवा. २१ मोठें. २२ क्षण. २३ अमृत. २४ भिकाऱ्याच्या. २५ आवडीनें. २६ आलिंगावें, वेंगाटावें. २७ सेवा चाकरी. २८ आंतल्याबाजूस, अंतःकरणांत. २९ मोठ्या प्रेमानें. ३० भजे, सेवी. ३१ कुसुमांत, तटबंदींत. ३२ ध्रुव, निश्चित. ३३ पूजासाहित्य. ३४ ज्ञानाच्या. ३५ चौथऱ्यांत, ओट्यांत. ३६ देवळांत. ३७ अभिषेकी. ३८ बोधरूपी सूर्य. ३९ परडी. ४० अष्टसात्त्विक भावांचीं कमळें. ४१ शिवगुरूला. ४२ तिन्ही काळीं. ४३ देहाभिमान. ४४ ऐक्याची. ४५ पाकसिद्धि.

भंराडा होय। गुरु तो लिंगें ३९० नातरी जीवाचिये सेजे। गुरु कांतु करूनि भुंजे। ऐसी प्रेमाचेनिं भोजें। बुद्धी वाहे ९१ कोणेएके अवसरीं। अनुरागु भरे अंतरीं। कीं तया नाम करी। क्षीराब्धी ९२ तेथ ध्येयध्यान बहु सुख। तेंचि शेषतुळिका निर्दोख। वारि जळशयनें देख। भावी गुरु ९३ मग वोळगती पाय। ते लक्ष्मी आपण होय। गरुड होऊनि उभा राहे। आपणची ९४ नाभीं आपण जन्मे। ऐसें गुरुमूर्तिप्रेमें। अनुभवी मनोधर्में। ध्यानसुख ९५ एकाधिये वेळे। गुरु माय करी भावबळें। मग स्तन्यसुखें लोळे। अंकावरी ९६ नातरी गा किरीटी। चैतन्यतरुतळवटीं। गुरु धेनु आपण पाठीं। वत्स होय ९७ गुरुकृपास्नेहसलिलीं[11]। आपण होय मासोळी। कोणे एके वेळीं। हेंचि भावीं ९८ गुरुकृपामृताचें वडप। आपण सेवावृत्तीचें होय रोप। ऐसेसे संकल्प। वियेमन ९९ चक्षुंपक्षेंवीण। पिलूं होय आपण। कैसें पैं अपारपण। आवडीचें ४०० गुरूतें पाक्षिणी करी। चारा घे चांचूंवरी। गुरु तारूं धरी। आपण कांस १ ऐसे प्रेमाचेनि थांवें। ध्यानाचि ध्यानातें प्रसवे। पूर्णसिंधू हेलावे। फुटती जैसे २ किंबहुना यापरी। श्रीगुरुमूर्ती अंतरीं। भोगी आतां अवधारीं। बाह्यसेवा ३ तरि जीवीं ऐसें आवांके। म्हणे दास्य करीन निकें। जैसेनि गुरु कौतुकें। मागं म्हणती ४ तैसिया साचा उपास्ती। गोसावी प्रसन्न होती। तेथ मी विनंती। ऐसी करीन ५ म्हणेन तुमचा देवा। परिवारु जो आघवा। येतुलें रूपें होआवा। मीचि एकु ६ आणि उपकरतीं आपुलीं। उपकरणें आथि जेतुलीं। माझीं रूपें तेतुलीं। होआवीं स्वामी ७ ऐसा मागेन वरु। तेथ हो म्हणती श्रीगुरु। मग तो परिवारु। मीचि होईन ८ उपकरणजात सकळिक। तें मीचि होईन एकैक। तेव्हां उपास्तीचें कौतुक। देखिजेल ९ गुरु बहुतांची माये। पारि एकलौति होऊनि ठाये। तैसें करूनि आण[24] वायें। कृपे तिये ४१० तया अनुरागा वेधुं लावीं। एकपत्नीव्रत घेववीं। क्षेत्रसंन्यासु करवीं। लोभाकरवीं ११ चतुर्दिक्षु वारा। न लाहे निघों बाहिरा। तैसा गुरुकृपे पांजिरा। मीचि होईन १२ आपुलिया गुणांचीं लेणीं। करीन गुरुसेवे स्वामिणी। हें असो होईन गंवसणी। मीचि भक्तीसि १३ गुरुस्नेहाचिये वृष्टी। मी पृथ्वी होईन तळवटीं। ऐसिया मनोरथांचिया सृष्टी। अनंता रची १४ म्हणे श्रीगुरूचें भुवन। आपण मी होईन। आणि दास होऊनि करीन। दास्य तेथिचें १५ निर्गमागमीं दौतारें। जें वोलां-

करतो; ३९० [ सख्यं ] अथवा आपल्या जीवाची शेज करून गुरु हे आपले पति आहेत असें समजून जो त्यांचा उपभोग घेतो; आणि अशा प्रकारें प्रेमाच्या योगानें जो आपल्या बुद्धींत अशी कौतुकें धारण करतो; ९१ एकादे वेळेस मनांत गुरुंविषयी प्रीतीचा उमाळा आला असतां त्यालाच क्षीराब्धि असें मानतो; ९२ त्या ठिकाणीं गुरूच्या ध्यानापासून होणाऱ्या बहुसुखरूप शेषशय्येवर गुरु हे भगवान् विष्णूच निजलेले आहेत असें मानतो; ९३ मग पाय रगडणारी जी लक्ष्मी, ती आपणच होतो आणि गरुडही आपणच होऊन पुढें हात जोडून उभा राहतो; ९४ नाभीपासून उत्पन्न होणारा जो ब्रह्मदेव तोही आपणच होऊन गुरुमूर्तीच्या प्रेमानें आपल्या मनांत ध्यानसुखाचा अनुभव घेतो; ९५ एखादे वेळेस भक्तीच्या प्रेमानें गुरूला आई असें कल्पून, स्तनपानापासून होणाऱ्या सुखाचा अनुभव घेत तिच्या अंगावर लोळतो, ९६ किंवा अर्जुना, ज्ञानरूप वृक्षाच्या खालीं गुरु हीच कोणी गाय असें मानून, आपण तिच्या पाठीमागून चाललेलें वांसरूं बनतो; ९७ गुरुकृपेच्या स्नेहरूप उदकांत आपण मासोळी झालों आहों, अशीच एकादे वेळीं भावना करतो; ९८ गुरुकृपा हीच अमृताची वृष्टि आणि आपण गुरुसेवावृत्तिरूप रोप आहों, असें निरनिराळे संकल्प त्याच्या मनांत उत्पन्न होतात; ९९ त्याच्या आवडीचें आपारपण कसें आहे तें पहा की, डोळे व पंख या शिवायच आपण पिलूं होतो; ४०० मग गुरूला पक्षिणी करून त्या पक्षिणीच्या चोंचीवरील चारा आपण घेतो; किंवा गुरु तारू आहेत असें समजून आपण त्यांच्या कासेस लागतो. १ अशा प्रकारें, ज्याप्रमाणें समुद्राला भरती आल्यावर लाटांपासून लाटा उत्पन्न होतात, त्याप्रमाणें प्रेमाच्या बळानें गुरुध्यानापासून अनेक ध्यानें उत्पन्न होतात. २ असे बहुत प्रकार किती सांगावे! तर याप्रमाणें गुरूंची मूर्ति अंतर्यामीं धारण करून तो ध्यानसुखाचा अनुभव घेतो. आतां तो श्रीगुरूंची बाह्यसेवा कशी करतो तें ऐक. ३ [ दास्यं ] तो मनांत असा निश्चय करतो कीं, मी गुरूंची इतकी उत्तम सेवा करीन कीं, गुरूंनीं संतोष पावून मला 'कांहीं तरी माग' असें म्हणावें. ४ अशा प्रकारच्या माझ्या शुद्ध सेवेनें गुरु प्रसन्न होतील, तेव्हां मी त्यांची प्रार्थना करून असें ५ म्हणेन कीं, "हे प्रभो, आपला जेवढा परिवार आहे, त्या सर्व परिवाराचीं रूपें मीच एकट्यानें घ्यावीं; ६ आणि आपल्या उपयोगी पडणारीं जितकीं उपकरणें आहेत तितक्या सर्वांचीं रूपें मीच एकट्यानें घ्यावीं." ७ याप्रमाणें मी वर मागितल्यावर श्रीगुरु म्हणतील 'हो', मग त्यांचा सर्व परिवार मीच होईन. ( मीच त्यांची सर्व प्रकारें सेवा करीन. ) ८ त्यांच्या उपयोगीं पडणाऱ्या जेवढ्या म्हणून वस्तु आहेत, त्यांपैकीं प्रत्येक वस्तु मीच होईन; त्या वेळेस माझ्या सेवेचा चमत्कार दृष्टीस पडेल. ९ गुरु हे जरी पुष्कळ भक्तांची माउली आहेत, तरी त्या गुरूंच्या कृपेस मी आपली शपथ घालून माझी एकट्याची माउली करून घेईन; ४१० गुरूंच्या प्रेमास आपलें वेड लावून, त्यांच्याकडून एकपत्नीव्रत आचरवीन; आणि गुरूंच्या लोभाकडून माझेच ठिकाणीं वास करण्याविषयीं क्षेत्रसंन्यास घेववीन; ११ वारा किती जरी वाहूं लागला तरी तो चारी दिशांच्या आंतच वाहतो; त्याप्रमाणें गुरूंच्या कृपेस सर्व बाजूंनीं मीच पिंजरा होईन. १२ माझी स्वामिनी जी गुरुसेवा, तिला मी आपल्या गुणांचीं लेणीं करीन. फार तर काय, पण गुरुभक्तीला मीच गंधर्सणी होईन; ( आपल्याशिवाय दुसऱ्या कोणासही गुरुसेवा करूं देणार नाहीं; ) १३ आणि गुरुस्नेहरूप वृष्टीखालीं मी पृथ्वी होईन. याप्रमाणें नानाप्रकारच्या कल्पना जो मनांत करतो; १४ आणि म्हणतो कीं, मी श्रीगुरूंचें राहण्याचें घर होईन आणि दारा होऊन त्यांची त्या ठिकाणीं सेवा करीत राहीन, १५ जातां येतां

१ भक्त. २ प्रतिमा. ३ भोगी. ४ संतोषानें. ५ प्रीति. ६ गुरुध्यान. ७ शेषशय्या. ८ विष्णु. ९ पादसेवा करणारी. १० ज्ञानरूपी वृक्ष. ११ पाण्यांत. १२ वृष्टि. १३ नेत्रांवांचून आणि पंखांवांचून. १४ चोंचीनें. १५ तारक. १६ स्थिर नें, बळानें. १७ तरंग लाटा. १८ अवसान धरतो. १९ भक्तीनें. २० लवाजमा. २१ उपयोगीं पडणारीं. २२ पूजापात्रें, साधनें. २३ एकट्याची. २४ शपथ घालून. २५ छंद. २६ चहूं दिशांकडून. २७ पिंजरा. २८ जाण्यायेण्याच्या वेळीं. २९ गुरूंनीं.

डिजती उंबरे । ते मी होईन आणि द्वारें । द्वारपाळु १६ पाउंवा मी होईन । तियां मीचि लेववीन । छत्र मी आणि करीन । बारीपणें १७ मी तळ उपैरु जाणविता । चंवरधैरु हातु देता । स्वामीपुढें खोलता । होईन मी १८ मीचि होईन सगळा । करूं सुईन गुरुळां । सांडिती तो नेर्पाळा । पडिघा मीची १९ हडेंप मी वोळेंगेन । मीचि उगाळु घेईन । उळिगें मी करीन । आंघोळीचें ४२० होईन गुरूचें आसन । अळंकार परिधान । चंदनादि होईन । उपचार ते २१ मीचि होईन सुआरु । वोगरीन उपहारु । आपैणपें श्रीगुरु । वोंवाळीन २२ जे वेळीं देवो आरोगिती । तेव्हां पांतीकरु मीचि पांतीं । मीचि होईन पुढती देईन विडा २३ ताट मी काढीन । सेंज मी झाडीन । चरणसंवाहन । मीचि करीन २४ सिंहासन होईन आपण । वारि गुरु करिती आरोहण । होईन पुरे-पण । वोळेंगेचें २५ श्रीगुरूचें मन । जया देईल अवधान । तो मी पुढां होईन । चमत्कारु २६ तया श्रवणाचें आंगणीं । होईन शब्दांचियां अक्षौहिणी । स्पर्शी होईन घसणी । आंगाचिया २७ श्रीगुरूचे डोळे । अवलोकनें स्नेहाळें । पाहाती तियें सकळें । होईन रूपें २८ तिये रसैंने जो जो रुचेल । तो तो रसुं म्यां होईजेल । गंधरूपें कीजेल । घ्राणसेवा २९ एवं बाह्यमनोगत । श्रीगुरु-सेवा समस्त । वेंटाळीन वस्तुजात । होऊनियां ४३० जंव देह हें असेल । तंव वोळेंगी ऐसी कीजेल । मग देहांतीं नवल । बुद्धि आहे ३१ इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षिती । जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूचे ३२ माझा स्वामी कवतिकें । स्पर्शीजति जियें उदकें । तेथ लया नेईन निकें । आंपीं आप ३३ श्रीगुरु वोंवाळिजती । कां भुवनीं जे उजळिजेती । तयां दीपांचिया दीप्तीं । ठेवीन तेज ३४ चंवरी हन विंजणा । तेथ लयो करीन प्राणा । मग आंगाचा वोळगणा । होईन मी ३५ जिये तिये अवकाशीं । श्रीगुरु असती परिवारेंसीं । आकाश लया आकाशीं । नेईन तिये ३६ पारि जीतु मेला न संडीं । निमेषु लोकां न धाडीं । ऐसेनि गणौंवया कोडी । कल्पांचिया ३७ येतुलेवरी धिंवसा । जया-चिया मानसा । आणि करूनियांहि तैसा । अपारु जो ३८ रात्र दिवस नेणे । थोडें वहु न म्हणे । म्हैणियाचेनि दाटैपणें । सांजा होय ३९ तो व्यापारु येणें । नांवें । गगनाहूनि थोरावे । एकला करी आघवें । एकेचि काळीं ४४० हृदय-वृत्ती पुढां । आंगाचि घे दवडा । काज करी होडा । मानसेंशीं ४१ एकादियां

जें उंबरे गुरु ओलांडतात; तें मीच होईन आणि दारेंही मीच होऊन, द्वारपाळही मीच होईन; १६ मी गुरूंच्या पादुका होऊन त्या पादुका गुरूंच्या पायीं मीच लेववीन आणि छत्रही मीच होऊन तें गुरूंवर धरीन. १७ या ठिकाणीं खोल खळगा आहे, या ठिकाणीं उंचवटा आहे अशी इशारत देणारा मी गुरूंचा चोपदार होईन; आणि गुरूंवर चवरी धरणारा, गुरूंस हात देणारा, व गुरूंपुढें पळणारा हुजऱ्याही मीच होईन; १८ गुरूंची झारी हातांत घेणारा शागिर्द मी होईन; व गुरूंला चूळ भरण्यास पाणीही मीच देईन; व चूळ टाकण्याचें निर्मळ तस्तही मीच होईन; १९ गुरूंची हसवी मी आपल्या खांद्यावर बाळगीन; व मी उटणें घेऊन गुरूंला स्नान घालण्याचें काम करीन, ४२० गुरूंचें आसन, अलंकार, वस्त्रचंदनादिक सर्व उपचार हे सर्व मीच होईन. २१ मीच आचारी होऊन गुरूंला फराळाचे पदार्थ वाढीन, आणि आरत्यानें श्रीगुरूंला ओंवाळीन. २२ ज्या वेळेस गुरुमहाराज भोजन करतील, त्या वेळेस त्यांचे पंक्तीचाही लाभ घेईन; आणि मीच पुढें होऊन त्यांस विडा देईन; २३ [**पादसेवनं**] गुरूंचें ताट मीच काढीन, गुरूंचा बिछाना मीच झाडीन; व गुरूंची पादसेवाही मीच करीन; २४ आणि गुरूंचें सिंहासनही मीच होईन; व मग त्यावर गुरु आरोहण करतील. याप्रमाणें सर्वप्रकारें गुरूंची सेवा करीन. २५ [**श्रवणं**] ज्या चमत्काराकडे श्रीगुरूंचें लक्ष लागेल, तो चमत्कारही मीच होईन; २६ गुरूंच्या श्रवणरूप अंगणांत शब्दांचे असंख्य समुदाय मीच होईन; आणि गुरूंचें ज्या ठिकाणीं अंग लागेल, तें ठिकाणही मीच होईन; २७ श्रीगुरूंचे डोळे प्रेमळपणानें अवलोकन करतील तीं सर्व रूपें मीच होईन; २८ त्यांच्या जिव्हेस जो जो पदार्थ आवडेल, तो तो मीच होईन; मीच सुवासरूप होऊन त्यांच्या घ्राणेंद्रियाची सेवा करीन. २९ याप्रमाणें गुरूंची बाह्यसेवा सर्व प्रकारें करून, गुरूंना लागणाऱ्या सर्व वस्तु मीच होऊन व्यापून टाकीन." ४३० महाराज म्हणतातः–जोंपर्यंत हा देह आहे, तोंपर्यंत गुरूंची अशीच सेवा करीन म्हणतो; [**आत्मनिवेदनं**] मग देह पडल्यावर त्याची बुद्धि सेवेविषयीं आस्था धरिते, तें नवल ऐका. ३१ तो म्हणतोः–"या शरिराची माती पृथ्वीच्या त्या भागांत मिळवीन कीं, ज्या ठिकाणीं श्रीगुरूंचे चरण उभे रहातील! ३२ मी आपल्या शरीरांतील उदकाचा भाग खरोखर त्या उदकाला नेऊन मिळवीन की, ज्या उदकाला माझे स्वामी कौतुकानें स्पर्श करतील! ३३ आपल्या देहांतील तेज त्या दिव्यांत नेऊन मिळवीन कीं, ज्या दिव्यांनीं लोक श्रीगुरूंना ओंवाळतील, अथवा जे दिवे श्रीगुरूंच्या मंदिरांत प्रकाश करीत असतील! ३४ मी आपल्या देहांतील प्राणवायूचा लय त्या ठिकाणीं करीन कीं, ज्या ठिकाणीं श्रीगुरूंना पंख्यानें व चवरीनें वारा घातला जात असेल! ३५ मी आपल्या शरीरांतील आकाशाचा भाग त्या त्या ठिकाणीं मिळवीन कीं, ज्या ज्या अवकाशांत (जागीं) श्रीगुरु आपल्या परिवारासह असतील! ३६ परंतु जिवंत असतांना व मेल्यावरही श्रीगुरूंची सेवा केल्याशिवाय रहाणार नाहीं; आणि एक पळभरही दुसऱ्यास गुरूंची सेवा करूं देणार नाहीं. याप्रमाणें कल्पाचे कल्प गुरुसेवा करीन." ३७ अशा प्रकारची पूर्ण इच्छा ज्याचे मनांत आहे; आणि त्या आपल्या इच्छेप्रमाणेंच अपार गुरुसेवा करूनही जो ३८ गुरु सेवेला रात्र व दिवस किंवा थोडी–फार म्हणत नाहीं; आणि तशांत जर गुरूंनी काम करण्याची आज्ञा केली, तर त्याला जास्त स्फुरण येतें; ३९ गुरूंची सेवा अशा प्रकारें करण्यास जो गगनाएवढा होतो, व तें काम एकटाच एकदम करतो; ४० मनाच्या धांवेपेक्षां याच्या अंगाची धांव पुढें असते; व याची काम करण्याची इच्छा मनाशीं पैज बांधिते; ४१ एकादे वेळेस श्रीगुरूच्या लीलांना,

१ पादुका. २ पाळीची चाकरी. ३ उंचवटा. ४ चवरी धरणारा. ५ दिवट्या, वाटाड्या. ६ झारी धरणारा. ७ गुळणी, पीक. ८ चूळ. ९ तस्त, पीकदाणी. १० पानदान. ११ बाळगीन. १२ पिंक, चावलेला विडा. १३ चाकरी, कार्य. १४ चंद्र, १५ आचारी. १६ वाढीन. १७ आरत्यानें. १८ भोजन करतील. १९ पंक्तीस बसलेला. २० पाय दाबणें, २१ सेवेचें. २२ असंख्य समुदाय. २३ प्रेमळपणानें. २४ जिव्हेला. २५ पदार्थ. २६ आरोपीन. २७ सेवा. २८ पृथ्वीला. २९ राहतील. ३० शरीरांतील उदकाचा भाग. ३१ उदक. ३२ प्रकाश पाडतील. ३३ सेवक, आश्रय करणारा. ३४ अशाच कल्पकोटि मोजाव्या, कल्पकोटिपर्यंत असेच करीन. ३५ धैर्य. ३६ आज्ञा केलेल्या कार्याच्या. ३७ नेटानें, दडपणानें. ३८ ताजा, टवटवित. ३९ धांव. ४० पैज.

वेळां । श्रीगुरूंचिया खेळा । लोण करी सकळा । जीविताचें ४२ जो गुरुदास्यें कृशु । जो गुरुप्रेमें सपोषु । जो गुरुआज्ञेनिवासु । आपणाचि जो ४३ जो गुरुकुळें सुकुलीनु । जो गुरुबंधुसौजन्यें सुजनु । जो गुरुसेवाव्यसनें सव्यसनु । निरंतर ४४ गुरुसंप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम । गुरुपरिचर्या नित्यकर्म । जयाचें गा ४५ गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता । जो गुरुसेवेपरौता । मार्गु नेणें ४६ श्रीगुरूचें द्वार । तें जयाचें सर्वस्व सार । गुरुसेवकां सहोदर । प्रेमें भजे ४७ जयाचें वक्त्र । वाहे गुरुनामाचे मंत्र । गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ४८ शिवतलें गुरुचरणीं । भलतैसें हो पाणी । तया सकळ तीर्थें आणी । त्रैलोक्यींचीं ४९ श्रीगुरूचें उँशिटें । लाहे जैं अवचटें । तैं तेणें लाभें विटे । समाधीसी ४५० कैवल्यसुखासाठीं । परमाणु घे किरीटी । उधळती पायांपाठीं । चालतां जे ५१ हें असो सांगावें किती । नाहीं पारु गुरुभक्ती । परी गा उत्क्रांतमती । कारण हें ५२ जया इये भक्तीची चाड । जया इये विषयींचें कोडें । जो हे सेवेवांचून गोड । न मनीं कांहीं ५३ तो तत्त्वज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेंचि आवो । हें असो तो देवो । ज्ञानभक्तु ५४ हें जाण पां साचोकारें । तेथ ज्ञान उघडेनि द्वारें । नांदत असे जगा पुरे । इया रीती ५५ जिये गुरुसेवेविखीं । माझा जीव अभिलाखी । म्हणोनि सोयचुकी । बोली केली ५६ एऱ्हवीं असता हातीं खुळा । भजनावधानीं आंधळा । परिचर्येलागीं पांगुळा- । पासूनि मंदु ५७ गुरुवर्णनीं मुका । आळशी पोशिजे फुका । परि मनीं आथी निका । सानुरागु ५८ तेणेंचि पैं कारणें । हें स्थूळ पोसणें । पडिलें मज म्हणे । ज्ञानदेवो ५९ पारि तो बोलु उपसाहावा । आणि वोळंगे अवसरु देयावा । आतां म्हणेन जी बरवा । ग्रंथार्थुची ४६० परिसा परिसा श्रीकृष्णु । जो भूतभारसहिष्णु । तो बोलतसे विष्णु । पार्थु ऐके ६१ म्हणे शुचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे । आंग मन जैसें । कापुराचें ६२ कां रत्नाचें दळवाडें । जैसें सबाह्य चोखडें । आंत बाहेरि एके पाडें । सूर्यु जैसा ६३ बाहेरीं कर्में क्षाळिला । भीतरीं ज्ञानें उजळला । इहीं दोहीं परी आला । पाखाळा एका ६४ मृत्तिका आणि जळें । बाह्य येणें मळें । निर्मळु होय वोलें । वेदाचेनी ६५ भलतेथ बुद्धी बळी । रंज आरिसा उजळी । सौंदणी फेडी थिगोळी । वस्त्रांचिया ६६ किंबहुना यियापरी । बाह्य चोख अवधारीं । आणि ज्ञानदीपु अंतरीं । म्हणौनि शुद्ध ६७ एऱ्हवीं तरी

आपल्या जीविताचें लिंबलोण करितो; ( त्यांच्या सीलांवरून आपलें जीवित उतरून ठेवितो; ) ४२ जो गुरूंच्या सेवेनें कृश असतो, व गुरूंच्या प्रेमानें पुष्ट असतो, आणि गुरूंच्या आज्ञेला आपणच स्थान असतो ४३ जो गुरुकुलाच्या योगें आपणास कुलीन असें मानतो; जो आपल्या गुरुबंधूंच्या बरोबर सौजन्यानें वागून सुजन असतो, व जो गुरुसेवारूप व्यसनानें निरंतर व्यसनी असतो; ४४ गुरूंचे परंपरा चालत आलेले धर्म तेच ज्याचे वर्णाश्रमधर्म होत; व गुरूंची सेवा करणें हेंच ज्याचें नित्यनैमित्तिक कर्म होय; ४५ ज्याचें गुरु हेंच क्षेत्र, गुरु हेंच दैवत, गुरूच आई व गुरूच बाप; आणि ज्याला गुरुसेवेशिवाय दुसरें कांहीं एक माहीत नाहीं; ४६ गुरूंचें जें द्वार तेंच ज्याचें सर्व धर्मांचें सार होय; आणि गुरुसेवकावर आपल्या सख्या भावाप्रमाणें जो प्रेम करितो. ४७ [कीर्तनं] ज्याच्या वाणींतून रात्रंदिवस गुरुनामाचा उच्चार चालत असतो; व जो गुरुवाक्यावांचून दुसरें कोणतेंही शास्त्र हातीं धरीत नाहीं; म्हणजे मानीत नाहीं. [ वंदनं ] ४८ ज्या पाण्यास गुरूंचे चरण लागले आहेत तें पाणी कसलेंही असलें तरी तें इतकें मोठें तीर्थ समजतो की, त्यांत त्रैलोक्यांतील सर्व तीर्थें तीर्थयात्रेकरितां आणतो. ४९ अकस्मात् श्रीगुरूंचा उच्छिष्ट प्रसाद मिळाला तर त्या लाभापुढें जो समाधिसुखालाही तुच्छ मानतो; ४५० गुरु चालत असतां मागें जे गुरूंचे पदरजःकण उडतात ते जो आपले मस्तकावर धारण करितो, व त्या लाभापुढें मोक्षसुख तुच्छ मानितो; ५१ हें असो; गुरुभक्तीचा महिमा किती म्हणून सांगावा ! कारण; त्याला पार नाहीं, परंतु माझ्या बुद्धीला गुरुभक्तीची उकळी फुटल्यामुळें सांगणें भाग पडलें ! ५२ ज्याला या गुरुभक्तीची इच्छा आहे, व ज्याला याच गुरुभक्तीचें कौतुक वाटतें, आणि ज्याला या गुरुसेवेवांचून दुसरें कांहींही गोड लागत नाहीं, ५३ तो अध्यात्मज्ञानाचें माहेरघर असून ज्ञानाला त्याच्याच योगानें शोभा येते; फार तर काय ! गुरूची सेवा करणारा देव व ज्ञान हें त्याचा भक्त बनतें. ५४ ( ज्ञान त्या गुरु उपासकाला देवासारखें मानतें, ) ज्याला खरोखर गुरुभक्तीची आवड आहे, त्याचे घरीं जगाला पुरून उरेल इतकें ज्ञान भरलेलें असतें ५५ महाराज म्हणतातः-गुरुसेवेविषयीं माझ्या मनांत खरी उत्कंठा आहे म्हणून मी त्या गुरुभक्तीचें अमर्याद असें वर्णन केलें. ५६ एऱ्हवीं मी हात असून थोटा, डोळे असून भजनाविषयीं आंधळा, व पाय असून गुरुसेवा करण्याविषयीं पांगळ्यापेक्षांही पांगळा; ५७. आणि गुरूंचें वर्णन करण्याविषयीं मुका व आळशी आहें; इतका अवगुण असूनही फुकट पोषण करीत आहें. परंतु तशी गुरुभक्ति होण्याविषयीं माझी उत्कट इच्छा आहे. ५८ महाराज म्हणतातः-एवढ्याच कारणाकरितां मला शरीराचें पोषण करणें भाग पडलें ५९ परंतु मी एवढें अमर्याद गुरुसेवेविषयीं वर्णन केलें, तें सहन करून मला तुमची सेवा करण्यास संधि द्या म्हणजे मी यथार्थ उत्तम रीतीनें सांगेन. ४६० साधुजनहो, ऐका ऐका, भूतांचा भार सहन करणारा विष्णूचा अवतार जो श्रीकृष्ण भगवान्, तो सांगत असून पार्थ ऐकतो आहे. ६१ [ शौचं ] कापूर अंतर्बाह्य शुद्ध असतो, तसें ज्याचें शुचित्व स्वच्छ दिसतें तेंच खरें शुचित्व होय; ६२ किंवा रत्नाचें खोड जसें अंतर्बाह्य चकचकीत असतें, अथवा सूर्य जसा आंत व बाहेर लकलकीत दिसतो; ६३ कर्मांच्या योगानें ज्याची बाह्यशुद्धि झाली असून ज्ञानाच्या योगानें अंतःशुद्धि झालेली आहे; आणि अशा दोन्ही प्रकारांनीं जो शुद्ध झाला आहे; ६४ वेदांत सांगितल्याप्रमाणें मंत्रोच्चार करून मृत्तिका व पाणी बाहेरून लाविलीं असतां जशी बाह्यशुद्धि होते; ६५ ज्याप्रमाणें वाटेल तेव्हां बुद्धीच्या योगानें आरसा धुळीनें स्वच्छ करतां येतो, किंवा परटाच्या सतेलांत वस्त्र धुतल्यानें त्याचा डाग नाहींसा होतो; ६६ फार काय सांगावें ! याप्रमाणें जो बाहेर निर्मळ झाला आहे, आणि अंतर्यामी ज्ञानाचा उजेड झाल्यामुळें खरोखर अंतर्बाह्य शुद्ध झाला आहे; ६७ बाकी, अर्जुना अंतर्यामी

१ ओंवाळणी. २ पुष्ट. ३ घर. ४ स्नेह. ५ गुरूची सेवा. ६ तोंड. ७ उष्टें अन्नादि. ८ गुरुपदरज. ९ विषयांतराला. १० आवड. ११ दौल, शोभा. १२ फार काय ! तो देव आणि ज्ञान हें त्याचा भक्त बनतें. १३ मार्ग सोडून; अमर्याद. १४ लुला. १५ सेवेकरितां १६ पांगळ्यापेक्षां १७ प्रेमळ, प्रीतियुक्त. १८ शरीर. १९ पोषण करावें लागलें; २० सेवेला. २१ सर्व प्राण्यांचा भार सहन करणारा. २२ स्वरूप, आकार. २३ धुतला गेला. २४ शुद्धतेला. २५ मंत्रानें. २६ धूळ. २७ परटाचें वस्त्रें धुण्याचें भांडें, सौंदणी. २८ डाग.

न लोटे जो ९२ दैन्यदुःखीं न तपे । भयशोकीं न कंपे । देहमृत्यु न वासिपे । पातलेनी ९३ आर्ति आशा पडिभरें । वय व्याधी गजरें । उजू असतां पाठिमोरें । नव्हे चित्त ९४ निंदा निस्तेज दंडी । कामलोभा वरपडी । परी रोमा नव्हे वांकुडी । मानसाची ९५ आकाश हें वोसंरो । पृथ्वी वारें विरो । परि नेणे मोहरों । चित्तवृत्ती ९६ हौती हाला फुलीं । पासवणा जेवीं न घाली । तैसा न लोटे दुर्वाक्यशेलीं । सलिलीं सांता ९७ क्षीरार्णवाचिया कल्लोळीं । कंपु नाहीं मंदराचळीं । आकाश न जळे जाळीं । वणावियाच्या ९८ तैशा आल्या गेल्या ऊर्मी । नव्हे गजबज मनोधर्मी । किंबहुना धैर्य क्षमी । कल्पांतींही ९९ पैं स्थैर्य ऐसी भाष । बोलिजे जे सविशेष । ते हे दशा गा देख । देखणेयां ५०० हें स्थैर्य निधेंडें । जेथ आंगें जीवें जोडे । तें ज्ञानाचें उघडें । निधान साचें १ आणि इसाळु जैसा घरीं । कां द्वंद्वी हतियेरा । न विसंबे भांडारा । बद्धकु जैसा २ कां एकलौतिया बाळका । वारें पडौनि ठाके अंबिका । मधुविषीं मधुमक्षिका । लोभिणी जैसी ३ अर्जुना जो यापरी । अंतःकरण जतन करी । नेदी उभें ठाकों द्वारीं । इंद्रियांच्या ४ म्हणे काम बागुल ऐकेल । हे आशा सियारी देखैल । तरी जीवा टेंकैल । म्हणोनि बिहे ५ बाहेरी धीटें जैसी । दाढुंगा पति कळासी । करी टेहणी तैसी । प्रवृत्तीसीं ६ सचेतनीं वांणेपणें । देहासकट आटणें । संयमावरी करणें । बुझूनि घाली ७ मनाचिया महाद्वारीं । प्रत्याहाराचिया ठाणांतरीं । जो यमदम शरीरीं । जागवी उभे ८ आधारीं नाभीं कंठीं । बंधत्रयाचीं घरटीं । चंद्रसूर्य संपुटीं । सूये चित्त ९ समाधीचे शेजेपासीं । बांधोनि घाली ध्यानासी । चित्त चैतन्य समरसीं । अतुरतें ५१० अगा अंतःकरणनिग्रहो जो । तो हा हें जाणिजो । हा आथी तेथ विजयो । ज्ञानाचा पैं ११ जयाची आज्ञा आपण । शिरीं वाहे अंतःकरण । मनुष्याकारें जाण । ज्ञानचि तो १२

इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च । जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥

आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी । पुरवणी मानसीं कीं । जिती आथी १३ वमिलिया अन्ना । लाळ न घोंटी जेवीं रसना । कां आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया १४ विष खाणें नागवे । जळत घरीं न रिगवे । व्याघ्रविवरां न वचवे । वस्ती जेवीं १५ धडाडीत लोहरसीं । उडी न घालवे जैसी । न करवे

नाहीं; ९२ दारिद्य व दुःख यांपासून जो पीडित होत नाहीं, भीति व शोक यांपासून जो व्याकुळ होत नाहीं, व देहास मृत्यु आला असतांही जो भीत नाहीं; ९३ एकाद्या वस्तूची बलवत्तर आशा, वार्धक्य, तशांत व्याधि यांचा भर अंगावर प्राप्त झाला असतां ज्याचें चित्त डग-मगत नाहीं. ९४ निंदा, अपमान, दंड, काम व लोभ यांचा भरपगडा झाला असतांही ज्याचे मनाचा केंस सुद्धां वांकडा होत नाहीं; ९५ आकाश तुटून पडलें किंवा पृथ्वी विरून गेली तरी ज्याची चित्तवृत्ति माघारी फिरत नाहीं; ९६ हत्तीला फुलानें मारिलें असतां त्याचा मार जसा त्याचे पासंगालाही नसतो, तसा सलण्यासारख्या शब्दाचा प्रहार केला असतांही ज्याला ते सलत नाहींत. ९७ क्षीराब्धीच्या लाटांनीं ज्याप्रमाणें मंदराचल हालत नाहीं किंवा वणव्याच्या ज्वालांनीं आकाश जळत नाहीं, ९८ त्याप्रमाणें इंद्रियांवर विषयविकारांच्या कितीहि लाटा आल्या किंवा गेल्या तरी ज्याचें मन गडबडत नाहीं, किंवा कल्पांतींही जो धैर्य सोडीत नाहीं, ९९ हे डोळसा अर्जुना, स्थैर्य म्हणून ज्याला म्हणतात; व जें या नांवानें प्रसिद्ध आहे, त्याचीं हीं अशीं लक्षणें आहेत. ५०० हेंच अविनाशी स्थैर्य ज्याच्या अंगीं अंतर्बाह्य बाणलें आहे तो ज्ञानाचा उघड उघड ठेवाच आहे. तेथून अंतः-करणनिग्रहाचें लक्षण दृष्टांतपूर्वक सांगतातः—१ [ आत्म-विनिग्रहः ] आणि साप जसें आपली खोडी करणाऱ्या मनुष्याचें घर, किंवा योद्धा आपलें हत्यार, अथवा कृपण आपला ठेवा विसरत नाहीं; २ किंवा ज्याप्रमाणें एकुलत्या एक मुलावर त्याची आई जीव कीं प्राण करून असते, अथवा मधमाशी मधावर आसक्त असते, ३ त्या-प्रमाणें, अर्जुना, जो आपलें अंतःकरण संभाळून ठेवतो, आणि त्याला इंद्रियांच्या दारांतहि उभें राहूं देत नाहीं; ४ तो म्हणतो, आपण अंतःकरण ताब्यांत ठेवलें हें कामरूप बागुलबोवा ऐकेल, व आशारूप डाकीण अंतः-करणाची स्थिति पाहील आणि मग आपल्या जिवावर बेतेल म्हणून तो फार भिऊन असतो. ५ ज्याप्रमाणें व्यभिचारिणी स्त्रीला तिचा दांडगा नवरा बाहेर फिरकूं न देतां घरांत कोंडून ठेवतो; त्याप्रमाणें आपल्या मनो-वृत्तीला जो इंद्रियाकडे जाऊं न देतां अंतर्यामीं कोंडून ठेवतो; ६ जिवंतपणीं देहाची पर्वा न करितां देह झिज-वून इंद्रियांचा निग्रह करितो, ७ मनाच्या महा दरवा-ज्यांत व प्रत्याहाराच्या जागेंत अनुक्रमें यम व दम हे मूर्तिमंत पहारेकरी रात्रंदिवस उभे करितो. ८ मूळबंध, ओढियाणाबंध व जालंधरबंध हे तिन्ही स्थिर करून इडा व पिंगळा यांच्यामध्यें असणाऱ्या सुषुम्नेंत चित्ताचा लय करितो, ९ समाधीच्या शेजेजवळ जो ध्यानाला बांधून टाकतो, आणि चित्त, चैतन्यांत ऐक्य होण्याविषयीं आतुर असतें. ५१० अशी जी चित्ताची स्थिति, त्याला अंतःकरणनिग्रह असें म्हणतात आणि असा अंतःकरणनिग्रह ज्याच्या ठिकाणीं आहे त्याच्या ठिकाणीं ज्ञानाचा विजय आहे असें समज. ११ ज्या साधकाची आज्ञा, त्याचें मन शिरसा वंद्य मानतें, तो जरी मनुष्याच्या आकाराचा दिसला, तरी तो मूर्तिमंत ज्ञानच आहे, असें जाण. १२

**अन्वयार्थ**—( इंद्रियार्थेषु वैराग्यं )—ऐहिक व पारलौ-किक विषयांविषयीं वैराग्य—( अनहंकारः एव च )—आणि गर्वरहित, मी अमुक अमुक अशा प्रकारचा आहें, असा गर्व—अभिमान केव्हांहि न वाहणें—( जन्ममृत्युजराव्याधि-दुःखदोषानुदर्शनं )—जन्म, मरण, म्हातारपण, रोग व दुःख; या प्रत्येकांतील दोषांचा विचार करणें किंवा जन्म-मरण-जरा-रोग यांतील असह्य दुःख, ह्याच दोषांचें चिंतन करणें. ८

[ वैराग्यं ] आणि विषयांविषयीं ज्याच्या मनांत वैरा-ग्याची जिवंत सदत आहे; १३ ओकलेलें अन्न फिरून खाण्याविषयीं जिव्हेला पाणी सुटत नाहीं; अथवा प्रेताला आलिंगन देण्याविषयीं इच्छा होत नाहीं; १४ विष खाणें आवडत नाहीं, जळत्या घरांत ज्याप्रमाणें फिरण्याचें धैर्य होत नाहीं, किंबहुना व्याघ्राच्या गुहेंत ज्याप्रमाणें वस्ती करवत नाहीं १५ सळसळीत लोखंडाचे रसांत उडी घालवत नाहीं किंवा अजगराची उशी कर-

१ दरिद्रि. २ पीडा पावत नाहीं. ३ व्याकुळ होत नाहीं. ४ भीत नाहीं. ५ पीडा. ६ भरानें, आसक्तीनें. ७ हलकल्लोळानें, गर्जनेनें. ८ अपमान. ९ सांपडला, स्वाधीन झाला. १० तुटून पडो. ११ विरून जावो. १२ मागें फिरो. १३ हत्तीला. १४ मारलें असतां. १५ मार्गे हटणें. १६ दुर्वाक्यरूपी शस्त्रानें. १७ छळिला असतां. १८ ज्वालांनीं. १९ लाटा. २० धैर्यानें संपन्न. २१ डोळसा. २२ बळवन्त, पराक्रमी. २३ सर्प, भूत, पिशाच, महाराक्षस, महापुरुष. २४ घर=झाड. २५ योद्धा. २६ कृपण. २७ एकु-लता एक. २८ जीव कीं प्राण करून. २९ आई. ३० ताब्यांत ठेवी. ३१ बागुलबुवा. ३२ डाकीण. ३३ भितो. ३४ व्यभिचारिणी. ३५ दांडगा नवरा घट्ट बांधून ( किंवा कोंडून ) ठेवितो. ३६ देखरेख, अटकाव. ३७ मनोगतीला. ३८ कमी झाला तरी. ३९ इंद्रियनिग्रही. ४० इंद्रियें. ४१ मनाला विषयांपासून पराङ्मुख करणें. ४२ चौकीवर, पहाऱ्याच्या जागेवर. ४३ मूलाधार चक्रीं. ४४ मणिपूर चक्रीं. ४५ विशुद्ध चक्रीं. ४६ वज्र, ओढियाण व जाळंधर. ४७ ग्रस्त. ४८ इडापिंगलाच्या संगमस्थानीं. ४९ घालतो, लावतो. ५० ऐक्य. ५१ आंत रत होतें, स्थिर होतें. ५२ जय. ५३ मदत. ५४ आवडत नाहीं. ५५ वाघाच्या गुहेंत. ५६ करवत नाहीं. ५७ सळसळणाऱ्या. ५८ तापलेलें, सळसळित.

उशीशीं । आजगराची १६ अर्जुना तेणें पाडें । जयासीं विषयवार्ता नावडे । नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहींच जावों १७ जयाचे मनीं आलस्य । देहीं अतिकार्श्य । शमदमीं । सौरस्य । जयासि गा १८ तपोव्रतांचा मेळावा । जयाचे ठायीं पांडवा । युगांतें जया गांवा-। आंतु येतां १९ बहु योगाभ्यासीं हांव । विजनाकडे धांव । न साहे जो नांव । संघातांचें ५२० नाराचांचीं आंथुरणें । पूयपंकीं लोळणें । तैसें लेखी भोगणें । ऐहिकींचें २१ आणि स्वर्गातें मानसें । ऐकोनि मानी ऐसें । कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें कां २२ तें हें विषयवैराग्य । जें आत्मलाभाचें सभाग्य । येणें ब्रह्मानंदा योग्य । जीव होती २३ ऐसा उभयभोगीं त्रासु । देखसी जेथ बहुवसु । तेथ जाण रहिवासु । ज्ञानाचा तूं २४ आणि सचाडाचिये परी । इष्टापूर्तें करी । परी केलेंपण शरीरीं । वसों नेदी २५ वर्णाश्रमपोषकें । कर्में नित्यनैमित्तिकें । यामाजि कांहीं न ठके । आचरतां २६ परि हें मियां केलें । कीं हें माझेनि सिद्धी गेलें । ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजी २७ जैसें अवचितपणें । वायूसि सर्वत्र विचरणें । कीं निरभिमान उदैजणें । सूर्याचें जैसें २८ कां श्रुति स्वभावता बोले । गंगा काजेंविण चाले । तैसें अवष्टंभहीन भलें । वर्तणें ज्याचें २९ ऋतुकाळीं तरी फळती । परी फळलों हें नेणती । तयां वृक्षांचिये ऐसी वृत्ती । कर्मीं सदा ५३० एवं मनीं कर्मीं बोलीं । जेथ अहंकारा उखी जाहली । एकावळीची काढिली । दोरी जैसी ३१ संबंधेंवीण जैसीं । अभ्रें असती आकाशीं । देहीं कर्में तैसीं । जयासि गा ३२ मद्यपा आंगींचें वस्त्र । कां लेपाहातींचें शस्त्र । बैलावरी शास्त्र । बांधलें आहे ३३ तया पाडें देहीं । जया मी आहें हे सेचि नाहीं । निरहंकारता पाहीं । तया नांव ३४ हें संपूर्ण जेथें दिसे । तेथेंचि ज्ञान असे । इयेविषीं अनारिसें । बोलों नये ३५ जन्ममृत्यु जरा दुःखें । व्याधिवार्धक्यकलुषें । तियें आंगा न येतां देखे । दुरूनि जो ३६ साधकु विवसियां । कां उपसर्गु योगिया । पावे उणेयापुरेया । वोथंबा जेवीं ३७ वैर जन्मांतरींचें । सर्पा मनौनि न वचे । तेवीं अतीतां जन्माचें । उणें जो वाहे ३८ डोळां हरळ न विरे । घाई कोंत न जिरे । तैसें कालींचें न विसरे । जन्मदुःख ३९ म्हणे पूयगर्तें रिगाला । अहा मूत्ररंध्रें नि-

व्रत नाहीं, १६ त्याप्रमाणें अर्जुना, ज्याला विषयांचें नांव घेतलेलें देखील खपत नाहीं; तो इंद्रियांची व विषयांची गांठ पडूं देत नाहीं. १७ ज्याच्या मनांत विषयसेवनाविषयीं आळस भरलेला आहे; ज्याच्या देहांत विषयसेवन करण्याचें सामर्थ्यच नाहीं व ज्याला शम व दम यांचें प्रेम आहे; १८ हे पांडवा, जो नेहमीं तपें व व्रतें एकसारखीं करतो; व ज्याला मनुष्याच्या वस्तींत येणें, म्हणजे प्रलयकाळाप्रमाणें दुःख होतें; १९ ज्याची योगाभ्यासाविषयीं फार इच्छा असते; व अरण्यांत रहाणें ज्याला फार आवडतें, आणि मंडळींत मिसळण्याचें नुसतें नांवही ज्याला सहन होत नाहीं. ५२० बाणांच्या शय्येवर निजणें, अथवा पूंवाच्या चिखलांत लोळणें, याप्रमाणें जो ऐहिक भोगांची योग्यता समजतो; २१ आणि स्वर्गप्राप्तीची गोष्ट काढल्यावर जो त्याला कुत्र्याच्या कुजलेल्या मांसाप्रमाणें मानतो; २२ ज्याला विषयवैराग्य असें म्हणतात तें हें होय; व हेंच आत्मप्राप्तीचें भाग्य असून त्याच्याच योगानें जीव ब्रह्मानंदाचें सुख भोगण्यास योग्य होतात. २३ याप्रमाणें, इहपरलोकींच्या सुखोपभोगांचा ज्याला पूर्ण कंटाळा आहे, तेथेंच ज्ञानाची वस्ती आहे, असें पक्कें समज. २४-[अनहंकारः] येथून निरभिमानाचें वर्णन दृष्टांतपूर्वक करितात.–आणि जो आस्थापूर्वक यज्ञ करणें व तलाव, बाग वगैरे बांधणें हीं कर्में करितो; परंतु कर्तृत्वाच्या अभिमानाचा लेश सुद्धां आपल्या आंगीं पडूं देत नाहीं; २५ वर्णाश्रमाचें पोषण करणारीं जीं नित्यनैमित्तिक कर्में तीं यथाविधि आचरण करितो, त्यांत थोडाही खंड पडूं देत नाहीं. २६ परंतु हें कर्म मी केलें किंवा मी केल्यामुळें सिद्धीस गेलें, असें मुळींच मनांत आणीत नाहीं; २७ ज्याप्रमाणें, वायु हा सहज सर्वत्र फिरतो, किंवा सूर्य निरभिमानानें सर्वत्र प्रकाश पाडतो; २८ अथवा श्रुतीही स्वभावतः सर्वांस इष्ट अशाच गोष्टींचें वर्णन करिते, किंवा गंगा अमुकच ठिकाणीं जाण्याचें मनांत न धरितां सहज ओघानें जाते, त्याप्रमाणें ज्याचें नेहमींचें वर्तन अभिमानशून्यतेचें आहे; २९ वृक्षास यथाकाळीं फळें येतात, परंतु त्यांची त्यास आठवणही नसते, त्या वृक्षांप्रमाणेंच कर्में करीत असतांना कर्मफलप्राप्तीविषयीं ज्याची वृत्ति उदासीन असते; ५३० ज्याप्रमाणें हारांतील दोरी काढून घेतल्यावर त्याचें ऐक्य नाहींसें होतें, त्याप्रमाणें मनांत, आचरणांत व बोलण्यांत ज्यानें अहंकाराचा नाश केला आहे; ३१ अभ्रांचा आकाशाशीं संबंध नसतांही ज्याप्रमाणें तीं आकाशांत आपल्या दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें जो देहानें कर्माचें आचरण करीत असतां त्यापासून अलिप्त रहातो; ३२ ज्याप्रमाणें मद्यप्याला आपल्या अंगावरील वस्त्राची आठवण नसते, किंवा चित्राच्या हातीं दिलेल्या शस्त्राचें त्याला भान नसतें, अथवा बैलावर बांधलेल्या शास्त्रांची जाणीव नसते, ३३ त्याप्रमाणें ज्याला मी देहांत आहें याचें भानच नसतें. त्यालाच निरहंकार असें म्हणतात. ३४ हें चिन्ह ज्याचे ठिकाणीं पूर्णपणें दृष्टीस पडतें, त्याचेच ठिकाणीं ज्ञान वास करितें, त्याजबद्दल बिलकुल शंका नाहीं. ३५ जो जन्म, मृत्यु, जरा, दुःखें, व्याधि, वार्धक्य व पातकें हीं येण्याचे पूर्वीं तीं दूर आहेत तोंच आतां प्राप्त झालीं आहेत अशी कल्पना करून जो सावध रहातो; ३६ ज्याप्रमाणें आपल्यास पिशाच बाधा होऊं नये, म्हणून मांत्रिक अगोदर व्यवस्था करतो अथवा आपल्यास दुसऱ्याचा उपसर्ग लागूं नये, म्हणून योगी अगोदर तजवीज करतो, किंवा गवंडीही भिंत बांधतेवेळीं ओळंबा लावून ती मागें पुढें जाऊं देत नाहीं–तेथून जन्मविषयींचा विचार दृष्टांतपूर्वक सांगतातः–३७ [जन्मः] सर्पाचें मनांतून ज्याप्रमाणें जन्मांतरींचेंही वैर नाहींसें होत नाहीं, त्याप्रमाणें जो पूर्वजन्मींचें दुःख आठवून पुनः जन्म न होऊं देण्याबद्दल उद्योग करतो; ३८ ज्याप्रमाणें डोळ्यांत खडा गेला असतां तो विरत नाहीं, किंवा शस्त्राच्या घावांत भाला सहन होत नाहीं. त्याप्रमाणें या जन्मीं रोज होणारीं दुःखें जो विसरत नाहीं, ३९ व म्हणतो कीं, अरेरे मी मूत्रद्वारांतून पूंवाच्या खाड्यांत गेलेल्या रेतापासून

---

१ रोडका. २ मनाचा व इंद्रियांचा निग्रह. ३ ऐक्य. ४ प्रलयकालाप्रमाणें दुःख. ५ अरण्याकडे. ६ समुदायाचें. ७ बाणांची. ८ पूंवाच्या चिखलांत. ९ कुजलेलें मांस. १० पूर्ण. ११ इहपर. १२ आस्थापूर्वक. १३ यज्ञ, तलाव, बाग वगैरे. १४ न्यून न पाडणें. १५ फिरणें. १६ अहंकारावांचून. १७ नाश, उचलबांगडी. १८ फेरी हाराची. १९ दारूबाज. २० चित्राचे हातचें. २१ मल, पाप. २२ प्राप्त होण्यापूर्वी. २३ मांत्रिक. २४ विवशीला. २५ उपद्रव. २६ ओळंबा, लंबक. २७ मागील. २८ दूषण, पाप. २९ खडा, रेती. ३० भाला, शल्य. ३१ जन्माचें. ३२ पूंवाच्या खाड्यांत. ३३ गेला. ३४ मूत्रमार्गें, मूत्रद्वारांतून.

घाला । कंटा रे मियां चाटिला । कुचस्वेदु ५४० ऐसऐसियां परी । जन्माचा कांटाळा धरी । म्हणे आतां तें मी न करीं । जेणें ऐसें होय ४१ हारीं उमँचावया । जुंवारी जैसा ये डाया । कीं वैरा बापाचेया । पुत्र जांचे ४२ मारिलियाचेनि रागें । पाठीचा जेवीं सूड मागे । तेणें आक्षेपें लागे । जन्मापाठीं ४३ परि जन्मती ते लाज । न सांडी जयाचें निर्जे । संभाविता निस्तेजें । न जिरे जेवीं ४४ आणि मृत्यु पुढां आहे । तोचि कल्पांतीं कां पाहे । पारि आजीचि होये । सावधु जो ४५ माजि अर्थांव म्हणतां । थडियेचि पांडुसुता । पोहणार आइता । कांसे जेवीं ४६ कां न पवतां रणाचा ठावो । सांभाळिजे जैसा आंवो । वोडण सुइजे घावो । न लागतांचि ४७ पांहेचा पेणों वाटवधा । तंव आजाचि होईजे सावधा । जीव न वचतां औषधा । धांविजे जेवीं ४८ एऱ्हवीं ऐसें घडे । जो जळत घरीं सांपडे । तो मग न पवाडे । कुंहा खणों ४९ चोंढिये पाथरु गेला । तैसेनि जो बुडाला । तो बोंबेहीसकट निमाला । कोण सांगे ५५० म्हणोनि समर्थेसीं वैर । जया पडिलें हाडखाइर । तो जैसा आठही पाहर । परजूनि असे ५१ नातरी केळवली नोवरी । कां संन्यासी जियापरी । तैसा न मरतां जो करी । मृत्युसूचना ५२ पैं गा जो ययापरी । जन्मेंचि जन्म निवारी । मरणें मृत्यु मारी । आपण उरे ५३ तया घरीं ज्ञानाचें । सांकडें नाहीं साचें । जया जन्ममृत्यूचें । निमालें शल्य ५४ आणि तयाचिपरी जरौ । न टेंकतां शरीरा । तारुण्याचिया भरा । माजि देखे ५५ म्हणे आजिच्या अवसरीं । पुष्टि जे शरीरीं । ते पाहे होईल कांचरी । वाळली जैसी ५६ निदैव्याचे व्यवसाय । तैसे ठाकती हातपाय । अमंत्री राजाची पैरी आहे । बळा यया ५७ फुलांचिया भोगा- । लागीं प्रेम टांगी । तें करेयांचा गुडघा । तैसें होईल ५८ वोढाळाच्या खुरीं । आखरुंआतें वुरीं । ते दशा माझ्या शिरीं । पावेल गा ५९ पद्मदळेसीं इसाळें । भांडताति हे डोळे । ते होती पडवळें । पिकलीं जैसीं ३६० भंवईचीं पेंडळें । वोमथती शिनेंसाळें । उरु कुंहिजेल जळें । आंसुवांचेनी ६१ जैसें बाभुळीचें खोड । गिरबडूनि जाती सरड । तैसें पिचंडीं तोंड । सरकटिजेल ६२ रांधवणी चुलीपुढें । पैन्हे उन्मांदती खांतवडे । तैसींचि यें नाकाडें । बिडबिडती ६३ तांबूलें वोंठ रांऊं । हांसतां दांत दाऊं । सनागर मिरऊं । बोल जेणें ६४ तयाचि पाहे या तोंडा । येईल जळंबटाचा लोंढा । इया उमळती दाढा । दांतांसहित ६५ कुळवाडी रिणें

जन्मलों आहें, व मातेचें स्तनपान करतेवेळीं माझें तोंडांत स्तनावरील घामही गेला आहे ! ५४० याप्रमाणें जो जन्माचा कंटाळा करतो; व असें म्हणतो कीं, ज्या योगानें मला असा जन्म पुनः प्राप्त होईल तें कर्म मी करणार नाहीं; ४१ ज्याप्रमाणें जुगारी हा डाव हारल्यावर तो फेडण्याकरितां पुनः सावधगिरीनें खेळतो; किंवा मुलगा आपल्या बापाचें वैर उगवतो; ४२ अथवा एकाद्यास कोणी मारिलें असतां त्याचा पाठिराखा जसा सूड उगवतो; तसा हा जन्म पुनः न यावा म्हणून जो काळजीनें त्याचे पाठीस लागून दक्ष असतो; ४३ ज्याप्रमाणें संभावितांला अपकीर्ति सहन होत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या मनांतून अशा अमंगल जन्माची लज्जा नाहींशी होत नाहीं.—येथून [ मृत्युः ] मृत्युविषयींचा विचार दृष्टांतपूर्वक सांगतात:- ४४ पुढें येणारा मृत्यु कल्पांतीं का असेना, पण त्याच्याविषयीं आजच सावध राहतो; ४५ अर्जुना, नदीच्या मध्यभागीं अतिशय खोल पाणी आहे, असें कोणी सांगितल्याबरोबर पोहणारा पुरुष कांठावर उभा असतांच सहजच कांस बांधतो ४६ किंवा रणांत जाण्याचे पूर्वींच तो आपलें अवसान संभाळून असतो किंवा जो घाव घालण्याचे पूर्वींच ढाल पुढें करतो; ४७ उद्यांच्या मुक्कामाला कांहीं दगा होईल असें समजल्यावर जो आजच सावध राहतो; अथवा प्राण जाण्याचे पूर्वींच औषधाची योजना करतो. ४८ नाहीं तर जळत्या घरांत सांपडल्यावर मग विहीर खणण्याचा प्रयत्न जसा व्यर्थ. ४९ अरे, डोहाचे तळाशीं जाणाऱ्या दगडाप्रमाणें जो या संसारसागरांत बुडतो, तो बोंबेसह बुडाला म्हणून कोण सांगणार ? ५५० म्हणून बलवंताबरोबर ज्याचें हाडवैर पडलें आहे, तो जसा रात्रंदिवस शस्त्र परजून असतो; ५१ किंवा उपवर झालेली नोवरी लवकरच दुसऱ्याच्या घरीं खास जाणार असल्यामुळें ती घरांत असूनही नाहीं असें तिचा बाप समजतो, अथवा संन्यास घेतल्यावर ज्याप्रमाणें तो मरणास तयार असतो, त्याप्रमाणें जो जिवंत असूनही आतांच मृत्यु प्राप्त झाला आहे अशाबद्दल विचार करतो ५२ जो जिवंत असतांनाच पुनर्जन्माचें निवारण करतो, या देहाच्या मृत्यूनें मृत्यूलाच मारून टाकून आपण ब्रह्मरूपानें उरतो. ५३ आणि अशा प्रकारें ज्याला जन्ममृत्यूचें दुःख राहिलें नाहीं; त्याला ज्ञानाची कधींही उणीव नसते. ५४ [ जरा ] आणि त्याचप्रमाणें शरीरास म्हातारपण आलें नाहीं, तोंच ऐन तारुण्याच्या भरांतच जो म्हातारपणचा विचार करतो, ५५ तो म्हणतो:—आजमितीस माझ्या शरीरांत जी शक्ति आहे; तें शरीर जरा प्राप्त झाल्यावर वाळलेल्या काचरीसारखें होईल; ५६ दैवहीनाच्या खटपटी व्यर्थ होतात, किंवा एकाद्या राजास प्रधान नसला म्हणजे त्याची जशी स्थिति होते, तसे माझे हातपाय चालेनातसे झाले म्हणजे या माझ्या शक्तीची स्थिति होईल; ५७ फुलांचा वास घेणारें नाक हें उंटाच्या गुडघ्याप्रमाणें बधिर होईल; ५८ आषाढ महिन्यांत पावसाच्या झडींत, ज्याप्रमाणें ओढाळ गुराचे पाय चिखलानें कुजतात त्याप्रमाणें माझें हें शरीर होईल; ५९ जे माझे डोळे सांप्रत कमलपत्राशीं स्पर्धा करीत आहेत, तेच पुढें पिकलेल्या पडवळाप्रमाणें निस्तेज होऊन खोल जातील; ५६० भुवया वाळलेल्या सालीप्रमाणें डोळ्यांवर लोंबतील. व डोळ्यांतून वाहणाऱ्या पाण्यामुळें ऊर कुजून जाईल; ६१ ज्याप्रमाणें सरडे हा बाभळीच्या खोडावरून खाली वर आल्यागेल्यामुळें तें डिकानें बुळबुळीत होतें, त्याप्रमाणें थुंकीनें तोंड भरून जाईल; ६२ स्वयंपाकाच्या चुलीपुढें खाणलेल्या घरांत ज्याप्रमाणें पाणी सांचून बुडबुडे येतात, त्याप्रमाणें नाक शेंबडानें बरबटून जाईल. ६३ ज्या ह्या तोंडाचे ओंठ मी तांबुलानें रंगवितों, हंसतांना दांत दाखवितों, व ज्याच्या योगानें मला उत्तम भाषण करतां येतें; ६४ त्याच या तोंडाला लाळेचा लोंढा येईल; व दांतांसकट दाढा पडतील, ६५ कर्जे झाल्यावर

१ हा हा दैवा, अरेरे. २ स्तनावरील घाम. ३ हरलेले डाव. ४ मिळविण्याकरितां ५ जाचतो. ६ पाठीराखा. ७ हट्टानें, आग्रहानें, काळजीनें, ८ मन. ९ अपकीर्ति. १० सोसवत नाहीं. ११ खोल पाणी. १२ कांस घालतो. १३ अवसान. १४ ढाल. १५ उद्याचा मुक्काम. १६ घाताचा, दग्याचा. १७ जाण्याच्या अगोदर. १८ प्रवर्तत नाहीं. १९ विहीर. २० डोहीं. २१ दगड. २२ नाहींसा झाला. २३ हाडास भेदणारें. २४ शस्त्र धारण करून, सज्ज. २५ वेळवण केलेली, उपवर झालेली. २६ मरणाचा विचार. २७ दुःख. २८ म्हातारपण. २९ वाळलेलीं भाजी; उसरी. ३० मासला, स्थिति. ३१ नाक. ३२ उंटाचा. ३३ खुरकुत नांवाचा रोग त्यानें. ३४ चिखल. ३५ शरीराला. ३६ स्पर्धेनें. ३७ पडदे. ३८ लोंबतात. ३९ जुन्या सालीप्रमाणें. ४० कुजेल. ४१ अश्रूंचा. ४२ चिकानें किंवा गोंदानें बरबटून ४३ थुंकयानें. ४४ भरेल. ४५ स्वयंपाकाच्या. ४६ मोरी, पाट. ४७ उमळतात, बुडबुड्यानें बुजबुजतात. ४८ पाणीच्या पाण्यानें. ४९ बरबटतील. ५० रंगवूं. ५१ चांगलें. ५२ लाळेचा, खांकऱ्याचा. ५३ पद्दती. ५४ शेतकी, व्यापार.

दाटलीं । कां वांकडियां ढोरें बैसलीं। तैसी मुठी कांहीं केली। जीभचि हे ६६ कुसळें कोरडीं । वारेनें जाती बरडीं । तैसी आपैदा तोंडीं । दाढियेसीं ६७ आषाढींचेनि जळें । जैसीं झिरपती शैलांचीं मौळें । तैसें खांडीहूनि लाळे । पडतीं पुँर ६८ वाचेसि अपवाडु । कानीं अनुघेडु । पिंड गरुवा माकडु । होईल हा ६९ तृणाचें बुझवणें । आंदोळे वारेनगुणें । तैसें येईल कांपणें । सर्वांगासी ५७० पायां पडती वेंगडी । हात वळती मुरकुंडी । बरवेपणीं बागेंडी । नाचविजैल ७१ मळमूत्रद्वारें । होऊनि ठाकती खोंकरें। नेवसियें होती इतरें। माझिया निधनीं ७२ देखोनि थुंकील जगु । मृत्यूचा पडैल पांगु । सोइरियां उबेगु । येईल माझा ७३ स्त्रिया म्हणती विवेंसी। बाळें जाती मूर्च्छेसी। किंबहुना चिळेंसी। पात्र होईन ७४ उमळीचा उजगरा । सेजारियां सोइलियों घरा । शिणवील म्हणती म्हातारा । बहुतांतें हा ७५ ऐसी वार्धक्याची सूचणी । आपणियां तरुणपणीं । देखे मग मनीं । विटे जो गा ७६ म्हणे पैं हे हें येईल । आणि आतांचें भोगितां जाईल । मग काय उरेल । हितालागीं ७७ म्हणोनि नाइकणें पावे। तंव आइकोनि घाली आघवें। पंगु न होतां जावें । तेथ जाय ७८ दृष्टी जंव आहे । तंव पाहावें तेतुलें पाहे । मूकत्वा आधी वाचा वाहे। सुभाषितें ७९ हात होती खुळे। हें पुढील मोटेंकें कळे । तंव करूनि घाली सकळें। दानादिकें ५८० ऐसी दशा येईल पुढें। तैं मन होईल वेडें। तंव चिंतूनि ठेवी चोखडें। आत्मज्ञान ८१ जैं चोर पैं हे झोंबती । तंव आजीचि रुसिजे संपत्ती । कां झांकाझांकीं वाती । न वचतां कीजे ८२ तसें वार्धक्य यावें । मग जें वायां जावें । तें आतांचि आघवें । सैंवतें करी ८३ आतां मोडूनि ठेलीं दुर्गें। कां वळितें धरिलें खगें। तेथ उपेक्षूनि जो निघे । तो नागवला कीं ८४ तैसें वृद्धाप्य होय । आलेपण तें वायां जाय। जे तो शतवृद्ध आहे। नेणों कैंचा ८५ झाडिलींचि कोळें झाडी। तया न फळे जेवीं बोंडीं । जाहला अग्नि तरी राखोंडी । जाळील काई ८६ म्हणोनि वार्धक्याचेनि आठवें । वार्धक्या जो नागवें । तयाच्या ठायीं जाणावें । ज्ञान आहे ८७ तैसेंचि नाना रोगें । पडिघाती ना जंव पुढां-

शेतकरी जसा बुडतो, किंवा पावसाच्या झडीत जनावरांना उठवत नाही, तशी जीभ कांहीं केल्यानें हालतच नाहीं; ६६ जशी वाळलेल्या गवतांची कुसळें वाऱ्यानें उडून जातात, तशी दशा दाढीचे केसांस येऊन लहान मुलें ती उपटावयास लागतील. ६७ आषाढ महिन्यांतील पावसाच्या झडीनें ज्याप्रमाणें पर्वतांचीं शिखरें पाझरतात; त्याप्रमाणें शरीरावरील सर्वदांतून पाण्याचे पूर लोटतात. ६८ तोंडांतून शब्दांचा उच्चार होणार नाहीं, व कानांनीं स्पष्ट ऐकूं येणार नाहीं, अशी या शरीराची वृद्ध माकडाप्रमाणें स्थिति होईल. ६९ शेतांतील पांखरांकरितां उभे केलेलें गवताचें बुजगावणें जसें वाऱ्यानें सहज हालतें, तसें सर्वांग सहज हालूं लागेल; ५७० पायांत पाय अडकतील व हात कांपूं लागतील, याप्रमाणें सर्व शरीराच्या चेष्टांचें सोंग होईल ! ७१ मलमूत्रद्वारेंही फुटक्या मडक्यासारखीं होऊन आपल्या अवसानाबाहेर जातील आणि माझा अंत केव्हां होईल म्हणून जवळची मंडळी देवास नवस करतील ! ७२ माझी अशी अवस्था पाहून जग माझा धिक्कार करील, मृत्यु लवकर येणार नाहीं, आणि सोयऱ्याधायऱ्यांना माझा कंटाळा येईल. ७३ बायका मला पिशाच म्हणतील, आणि तें ऐकून मुलांना माझी फार भीति वाटेल; फार काय सांगावें ! मी सर्व प्रकारें लोकांना किळस येण्यास पात्र होईन. ७४ खोकल्याची उमळ रात्रभर ऐकून शेजारच्या घरांतील निजलेली माणसें म्हणूं लागतील कीं, हा म्हातारा कितीकांना त्रास देईल न कळे ! ७५ याप्रमाणें म्हातारपणीं आपली स्थिति होईल, असें मनांत आणून जो तारुण्यांतच त्या स्थितीबद्दल मनांत खंती बाळगतो, ७६ व असें म्हणतो कीं, पुढें आपल्यास म्हातारपण येईल, आणि हल्लींचें तारुण्य विषयभोगांत नाहींसें होईल, मग आपलें हित होण्याकरितां आपल्या जवळ काय राहील ? ७७ [ व्याधिः ] म्हणून, कान बधिर झाले नाहींत, तोंपर्यंतच आत्मानात्मविचाराच्या सर्व गोष्टी ऐकून घेतो; आणि जोंपर्यंत शरीर स्वाधीन आहे; तोंपर्यंतच तीर्थयात्रा करून घेतो; ७८ दृष्टि शाबूद आहे, तोंपर्यंतच शास्त्रानें पाहण्यास योग्य म्हणून सांगितलें तें पाहून घेतो; आणि जोंपर्यंत वाणी कायम आहे, तोंपर्यंतच ईश्वराचे गुणानुवाद गाऊन घेतो; ७९ पुढें आपले हात लुले होतील हें ओळखून, ते शाबूत आहेत तोंच दानधर्म करून घेतो; ५८० त्याप्रमाणें पुढें दशा आल्यावर मन शुद्धीवर रहाणार नाहीं म्हणून अगोदरच शुद्ध आत्मज्ञानाचा पूर्ण विचार करून ठेवतो; ८१ उद्यां आपल्यास चोर लुटतील, असें समजून जो आजच आपले जवळील संपत्तीची व्यवस्था लावून अलिप्त राहतो, किंवा दिवा जाण्याच्यापूर्वी सर्व जिनसांची झांकाझांक करितो, ८२ त्याप्रमाणें म्हातारपण आल्यावर तारुण्यांत ज्ञानप्राप्ति न करून घेतल्यामुळें जे जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत पडून व्यर्थ जावें, त्यापेक्षां जन्ममृत्यु देणाऱ्या सर्व गोष्टी आपल्यापासून दूर कराव्या. ८३ ज्या वाटेंत पुष्कळ डोंगर, किल्ले, वगैरे आहेत असें समजून किंवा पक्षी आपापल्या घरट्यांकडे परत जात आहेत तेव्हां संध्याकाळ झाली असें समजून, जो आपल्याजवळ कांहींएक ऐवज न घेतां सडा जातो, त्यास चोर कसे लुटतील ? ८४ त्याप्रमाणें, वार्धक्य आल्यानंतर आत्मज्ञानावांचून फुकट जावें, असा विचार करून ज्यानें तारुण्यांतच आत्मचिंतन करून ठेवलें आहे, तो वृद्धापेक्षांही वृद्ध आहे असें कसें समजूं नये ? ८५ तिळाच्या झाडाचीं झाडलेलीं बोंडें पुनः झाडलीं तरी जसे तीळ सांपडावयाचे नाहींत; अथवा मोठा अग्नि जरी झाला तरी जी मूळच राखोंडी आहे तिला पोळील काय ? ८६ म्हणून वार्धक्याचा ज्यानें अगोदरच विचार केलेला आहे त्याची वार्धक्यापासून हानि होत नाहीं आणि त्याच्याच ठिकाणीं ज्ञान आहे असें समजावें. ८७—येथून रोगाविषयीं दृष्टांतपूर्वक सांगतात:—त्याचप्रमाणें, नाना प्रकारचे रोग जोंपर्यंत शरीरास जडले नाहींत, तोंपर्यंतच शरीराच्या आरोग्याचा आत्मज्ञा-

१ झडींत, थंडीच्या कडाक्यांत. २ उडून जातात. ३ दशा. ४ पर्वताचीं. ५ शिखरें. ६ तोंडांतून, दांतांच्या खिंडीतून. ७ पाझर. ८ अरपटतां. ९ दहे नसणें, ऐकूं न येणें. १० शरीर. ११ जरठ, अतिवृद्ध. १२ हालते. १३ वाऱ्याच्या योगानें. १४ पायांत पाय गुंतणें. १५ शरीराच्या चेष्टा. १६ सोंग, चेष्टा. १७ फुटकीं, अशक्त. १८ नवस करितील. १९ संतकाळीं. २० आशा, गरज. २१ कंटाळा. २२ भूत. २३ किळस. २४ खोकल्याची उमळ. २५ निजलेल्या. २६ उद्यां २७ बहिरेपण. २८ लुले, पंगु. २९ अल्प. ३० शुद्ध. ३१ प्रातःकाळीं, उदयीक. ३२ दूर करावी. ३३ गेला नाहीं तोंच. ३४ वेगळें करून निराळें व्हावें. ३५ माघार घेतली. ३६ पक्ष्यानें. ३७ सर्व बाजूस ठेवून. ३८ शतांशु. ३९ तिळांचीं बोंडें. ४० सांपडत नाहीं. ४१ रोगांनीं ग्रासिलें नाहीं, व्यापिलें नाहीं.

आंग । तंव आरोग्याचे उपेग । करूनि घाली ८८ सापाच्या तोंडीं । पडिली जे उंडी । ते लाऊनि सांडी । प्रबुध्दु जैसा ८९ तैसा वियोगें जेणें दुःखें । विपत्ति शोक पोखें । तें स्नेह सांडूनि सुखें । उदासु होय ५९० आणि जेणेंजेणें कडे । दोष सूतीलें तोंडें । तयां कर्मरंध्रीं गुंडे । नियमाचे दाटी ९१ ऐसऐसिया आँइती । जयाची परी असती । तोचि तो ज्ञानसंपत्ती । गोसावी गा ९२ आतां आणीकही एक । लक्षण अलौकिक । सांगेन आइक । धनंजया ९३

असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु । नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥

तरि जो या देहावरी । उदासु ऐसिया परी । उखितां जैसा बिढारीं । बैसला आहे ९४ कां वृक्षाची साउली । वाटे जातां मीनली । घरावरी तेतुली । आस्था नाहीं ९५ साउली सैरिसीच असे । परी असे हें नेणिजे जैसें । स्त्रियेचें तैसें । लोलुप्य नाहीं ९६ आणि प्रजा जे जाली । तियें वस्तीकरें आलीं । कां गोरुवें बैसलीं । रुखातळीं ९७ जो संपत्तीमाजि असतां । ऐसा गमे पांडुसुता । जैसा कां वाटे जातां । साक्षी ठेविला ९८ किंबहुना पूंसा । पांजरियामाजि जैसा । वेदाज्ञेसी तैसा । बिहूनि असे ९९ एऱ्हवीं दारागृहपुत्रीं । नाहीं जया मैत्री । तो जाण पां धात्री । ज्ञानासि गा ६०० महासिंधू जैसें । ग्रीष्मवर्षी सरिसे । इष्टानिष्टीं तैसें । जयाच्या ठायीं १ कां तिन्ही काळ होतां । त्रिधा नव्हे सविता । तैसा सुखदुःखीं चित्ता । भेदु नाहीं २ जेथ नभाचेनि पाडें । समत्वा उणें न पडे । तेथ ज्ञान रोकडें । वोळख तूं ३

मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी । विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥

आणि मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटें नाहीं । ऐसा निश्चयोचि तिहीं । जयाचा केला ४ शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोशें । एक मीवांचूनि वांस । न पाहती आन ५ किंबहुना निकट निजें । जयाचें जाहलें मज । तेणें आपणयां आम्हां सेज । एकी केली ६ रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जीवीं सांकडें । तिये कांतेचेनि पाडें । एकसरला जो ७ मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें । मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ८ सूर्याच्या होण्यां होइजे । कां सूर्यासवेंचि जाइजे । हें विकलेपण साजे । प्रभेसि जेवीं ९ पैं पाणियाचिये भूमिके । पाणी तळपे कौतुकें । ते लहरी म्हणती लौकिकें । एऱ्हवीं तें पाणी ६१० जो अनन्य यापरी । मी जाहलाही मातें वरी ।

नाकडे उपयोग करितो. ८८ ज्याप्रमाणें सापाच्या तोंडांतून पडलेली पिठाची उंडी शहाणा मनुष्य टाकून देतो, ८९ [ दुःखदोषानुदर्शनं ] त्याप्रमाणें, ज्या सुखाच्या वियोगापासून दुःख, विपत्ति व शोक प्राप्त होतात, त्यांच्यावरील प्रेम अगोदरच टाकून जो उदासीन वृत्तीत रहातो; ५९० आणि ज्या ज्या योगानें आपल्याला दोष लागतील, ती कर्में करीत नाहीं; व कर्मेंद्रियांच्या मार्गांनीं दोष आंत जाऊं नयेत म्हणून नियमरूपी धोंडे आड बसवून त्या वाटा बंद करतो. ९१ याप्रमाणें जो वागतो, तोच ज्ञानसंपन्न असें समज. ९२ आतां अर्जुना; तुला त्या ज्ञानवंताचें आणखी एक अलौकिक लक्षण सांगतों, तें ऐक. ९३

अन्वयार्थ—(असक्तिः)–विषयांवर प्रीति न ठेवणें,–(पुत्र-दार-गृहादिषु अनभिष्वंगः,–पुत्र, स्त्री, गृह इत्यादिकांमध्यें अत्यंत आसक्ति न ठेवणें,–(च)–आणि–(इष्टानिष्टोपपत्तिषु)-इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली असतां,–(नित्यं)–हमेश–नेहमीं–(समचित्तत्वं)–समचित्त ठेवणें, इष्टप्राप्तीनें हृष्ट न होणें व अनिष्टप्राप्तीनें खिन्न न होणें; हीं ज्ञानसाधनें आहेत. ९

[ असक्तिः ] हें पहा–जो आपल्या शरीराविषयीं उदास असतो; जसा एक वाटसरू दुसऱ्या वाटसरानें आपले स्वाधीन कांहीं वेळ केलेलें गाठोडें अभिलाष न धरितां तें वाटसरू परत येईपर्यंत जतन करितो; ९४ किंवा वाटेनें जातांना ऊन टाळण्याकरितां ज्याप्रमाणें एखादा मनुष्य झाडाचे सावलींत बसतो, तितकीसुद्धां आस्था ज्याची घराविषयीं नसते; [ अनभिष्वंगः ] ९५ ज्याप्रमाणें मनुष्याची पडछाया त्याचेबरोबर असूनही ती आहे हें त्याच्या गांवींही नसतें, त्याप्रमाणें नेहमीं सन्निध असणाऱ्या स्त्रीविषयीं ज्याला प्रेम वाटत नाहीं; ९६ बरें, संततीविषयीं म्हटलें तर ती संतति म्हणजे, ज्याप्रमाणें वाटसरू धर्मशाळेत वस्तीस राहतात, किंवा गुरें दोनप्रहरीं झाडाखालीं सांवलींत बसतात, त्याप्रमाणें मानतो; ९७ अर्जुना, जो श्रीमंत असतांनाही ज्याप्रमाणें कोणी मनुष्य वाटेनें जातांना रस्त्यांतील एखाद्या गोष्टीविषयीं केवळ साक्षिभूत असतो, त्याप्रमाणें संपत्तीविषयीं उदास असतो; ९८ किंवा पिंजऱ्यांतील राघू जसा पाळणाऱ्याच्या आज्ञेत वागतो, त्याप्रमाणें जो वेदाज्ञेचें उल्लंघन करीत नाहीं, ९९ बाकी स्त्री, पुत्र, घर यांजविषयीं जो प्रीति बाळगीत नाहीं; तो ज्ञानाचें अधिष्ठान आहे असें जाण. [ समचित्तत्वं ] ६०० समुद्र जसा ग्रीष्मकाळीं कमी होत नाहीं, व वर्षाकाळीं वाढतही नाहीं, तसा ज्याला लाभ व हानि यांपासून बाधा होत नाहीं, १ किंवा तिन्ही काळांत सूर्याचे ज्याप्रमाणें तीन प्रकार होत नाहींत, त्याप्रमाणें ज्याच्या मनाला सुखदुःखांपासून भेद होत नाहीं; २ आणि ज्याच्या ठिकाणीं आकाशाप्रमाणें समतेत कमीपणा पडत नाहीं, त्याचे ठिकाणीं ज्ञान प्रत्यक्ष वास करीत आहे असें समज. ३

अन्वयार्थ—( च मयि अनन्ययोगेन अव्यभिचारिणी भक्तिः)–आणि माझ्या ठिकाणीं अनन्ययोगानें म्ह० वासुदेवाहून श्रेष्ठ कोणी नाहीं, अशा चित्तसमाधानानें अढळ भक्ति,–(विविक्तदेशसेवित्वं )–एकान्त, निर्भय, पवित्र प्रदेशांत राहणें, अरण्य, नदीकांठ इत्यादि प्रदेशांचें सेवन करणें,–( जनसंसदि अरतिः )–सामान्य प्राकृत जनांच्या समूहांत मिसळण्याची आवड नसणें, हीं ज्ञानसाधनें आहेत. १०

[ मयि च अनन्ययोगेन ] ज्यानें कायावाचामनेंकरून असा निश्चय केला आहे कीं, परमात्म्यावांचून या जगतांत दुसरी चांगली वस्तु नाहींच. ४ ज्याच्या शरीरानें, वाचेनें व मनानें अशा कृतनिश्चयाची शपथ वाहिली आहे कीं, या जगतांत माझ्यावांचून दुसरें कांहीं पाहण्यासारखें नाहीं; ५ [ अव्यभिचारिणी भक्तिः ] फार काय सांगावें ! ज्यानें आपलें मन माझ्या स्वरूपीं लीन केलें, त्यानेंच आपलें व माझें ऐक्य करून, जणू काय माझ्या स्वरूपाचा बिछानाच केला. ६ ज्याप्रमाणें आपलें पतीशीं समागम करण्यास जातेवेळीं स्त्रीचे मनांत मुळींच शंका येत नाहीं, त्याप्रमाणें माझ्याबरोबर ऐक्य करण्यास ज्याला शंका येत नाहीं; ७ ज्याप्रमाणें गंगा समुद्रास एकदा मिळाल्यावरही त्यांतच मिळून असते, त्याप्रमाणेंच माझें ऐक्य पावल्यावरही जे सर्वभावेंकरून मलाच भजतात; ८ सूर्याचे प्रभेचा सूर्याबरोबर उदय होतो, व अस्ताबरोबर लय होतो, हें पारतंत्र्य जसें प्रभेसच शोभतें; ९ तसेंच वाऱ्यानें पाण्याच्या सपाटीवर जें पाणी उसळून वर येतें, त्यास लोक लाटा असें म्हणतात; परंतु पाहूं गेलें असतां तें खरोखर पाणीच असतें; ६१० याप्रमाणें एकरूप झाला असूनही जो माझी सेवा करतो, तोच

१ उपाय. २ शहाणा. ३ बाळगितो. ४ निरिच्छ. ५ ज्या ज्या बाजूनें दोष तोंड घालतील. ६ कर्मेंद्रियांच्या छिद्रांत. ७ मुकीनें, तपानें. ८ वाटसरू, पाहुणा. ९ सांपडली. १० पडछाया. ११ समागमें, बरोबरच. १२ प्रेम. १३ मुलेंबाळें. १४ वाटसरू. १५ गुरें. १६ वृक्षाखालीं. १७ पोपट. १८ जन्मभूमि, स्थान, ठिकाण. १९ ग्रीष्म ऋतु. २० वर्षा ऋतु. २१ लाभ व हानि. २२ आकाशाप्रमाणें. २३ चांगलें. २४ कायावाचामनानें. २५ तीर्थ, शपथ. २६ वाट. २७ मन. २८ अनुसरला. २९ होण्यानें. ३० अर्पणक्रिया, पारतंत्र्य. ३१ हालतें. ३२ एकनिष्ठ.

तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा ११ आणि तीर्थें धौतें तटें । तपोवनें चोखटें। आवडती कपाटें । वसवूं जया १२ शैलकक्षांचीं कुहरें । जळाशयें पारिसरें । अधिष्ठी जो आदरें । नगरा नये १३ बहु एकांतावरी प्रीती । जया जनपदाँची खंती । जाण मनुष्याकारें मूर्ती । ज्ञानाची तो १४ आणिकही पुढती । चिन्हें गा सुमती । ज्ञानाचिये निरुती- । लागीं सांगों १५

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् । एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥

तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे । तें जया दिसे । ज्ञानास्तव १६ तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें । तें अज्ञान ऐसा मनें । निश्चयो केला १७ स्वर्गा जाणें हें सांडी । भवविषयीं कान झाडी । दे अध्यात्मज्ञानीं बुडी । सद्भावाची १८ भंगालिये वाटे । शोधूनियां अव्हांटे । निघिजे जेवीं निटें । राजपंथें १९ तैसें ज्ञानजातां करी । आघवेंचि एकीकडे सारी । मग मन बुद्धि मोहरी । अध्यात्मज्ञानीं ६२० म्हणे एक हेंचि आथी । येर जाणणें ते भ्रांती । ऐसी निकुरेंसीं मती । मेरु होय २१ एवं निश्चयो जयाचा। द्वारीं आध्यात्मज्ञानाचा । ध्रुव देवो गगनींचा । तैसा राहिला २२ तयाचिया ठायीं ज्ञान । या बोला नाहीं आन । जे ज्ञानी बैसलें मन । तेव्हांचि ते तो मीं २३ तरि बैसलेपणें जें होये। तें बैसतांचि बोले न होये। तरि ज्ञाना तया आहे । सारिसा पाडु २४ आणि तत्त्वज्ञान निर्मळ । फळे जें एक फळ । तें ज्ञेयही वरी सरळ । दिठी जया २५ एऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें। जरी ज्ञेय न दिसेचि मनें। तरी ज्ञानलाभुही न मने । जाहला सांता २६ आंधळेनि हातीं दिवा । घेऊनि काय करावा । तैसा ज्ञाननिश्चयो आघवा । वायांचि जाय २७ जरि ज्ञानाचेनि प्रकाशें । परतत्त्वीं दिठी न पैसे। ते स्फूर्तीचि असे। अंध होउनी २८ म्हणोनि ज्ञान जेतुलें दावी। तेतुली ही वस्तुचि आघवी । तें देखे ऐसी व्हावी । बुद्धि चोख २९ यालागीं ज्ञानें निदोखें । दाविलें ज्ञेय देखे । तैसेनि उन्मेखें । आथिलीं जो ६३० जेवढी ज्ञानाची वृद्धी । तेवढीच जयाची बुद्धी । तो ज्ञान हे शब्दीं । करणें न लगे ३१ पैं ज्ञानाचिये प्रभेसवें । जयाची मती ज्ञेयीं पावे । तो हातें धराणिया शिवे । परतत्त्वातें ३२ तोचि ज्ञान हें बोलतां । विस्मयो कवण पांडुसुता । काय सवितयातें सविता । म्हणावें असे ३३ तंव श्रोते म्हणती असो। न सांगे तयाचा अतिसो। ग्रंथोक्ती तेथ आडँसो । घालि-

मूर्तिमंत ज्ञान होय. ११ [ विविक्त देशसेवित्वं ] अशा मनुष्यास पवित्र तीर्थें, उत्तम तपोवनें व गुहा या ठिकाणीं राहण्याची आवड असते. १२ पर्वताच्या गुहा व सरोवरांचीं तीरें या ठिकाणीं रहावयाची ज्याला विशेष आवड असते, व ज्यास शहरांत रहाण्याचें आवडत नाहीं; [ जनसंसदि अरतिः ] १३ ज्याला एकांतवासाची फार आवड असते, व मनुष्यवस्तींत राहण्याचा कंटाळा असतो, तो ज्ञानाची मनुष्यरूपी मूर्तिच होय. १४ हे सुबुद्धिमंता; तुला ज्ञानाच्या स्पष्टीकरणार्थ आणखी कांहीं लक्षणें पुढें सांगतों. १५

**अन्वयार्थ**—(अध्यात्मज्ञाननित्यत्वं)–आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानामध्यें सतत गढून जाणें व–(तत्त्वज्ञानार्थदर्शनं)–तत्त्वज्ञानाचा अर्थ–फल जो मोक्ष, त्याचें आलोचन करणें–(एतत् ज्ञानं)–हें सर्व ज्ञान म्हणजे ज्ञानाचें साधन आहे.–(इति)–असें–(प्रोक्तं)–सांगितलें आहे.–(यत् अतः अन्यथा [ तत् ] अज्ञानं)–जें याच्या उलट, तें अज्ञान होय. ११

[ अध्यात्मज्ञाननित्यत्वं ] हें पहा–परमात्मा म्हणून जी एक वस्तु आहे ती ज्या ज्ञानानें दिसते, १६ त्या एका ज्ञानाशिवाय, संसार व स्वर्ग ज्या ज्ञानापासून प्राप्त होतात तीं सर्व ज्ञानें अज्ञानच आहेत असें ज्याच्या मनानें पक्कें घेतलें आहे, १७ म्हणून तो स्वर्गास जाण्याची इच्छा सोडून देतो, संसाराविषयींची वार्ताही कानानें ऐकत नाहीं, व अध्यात्मज्ञानाचें ठिकाणीं सद्भावानें बुडी मारतो; १८ ज्याप्रमाणें एकादा वाटसरू ज्या ठिकाणीं अनेक वाटा फुटतात त्या ठिकाणीं नीट शोध करून आडमार्ग सोडून सरळ राजमार्गानें जातो, १९ त्याप्रमाणें ज्ञानमात्राविषयीं विचार करून इतर मार्ग टाकून देऊन आपलें मन व बुद्धि अध्यात्मज्ञानाकडेसच लावतो; ६२० त्याचप्रमाणें, इतर ज्ञान भ्रांतिमूलक आहे म्हणून जो आपली बुद्धि मेरुपर्वताप्रमाणें स्थिर करून अध्यात्मज्ञानाकडेसच लावतो; २१ ज्याप्रमाणें आकाशांतील नक्षत्रांप्रमाणें ध्रुव केव्हांही हालत नाहीं, त्याप्रमाणें अध्यात्मज्ञान संपादन करण्याविषयीं ज्याचा निश्चय ढळत नाहीं; २२ त्याच्याच ठिकाणीं ज्ञान वास करतें यांत शंका नाहीं आणि अशा प्रकारें त्याचें मनांत तें ज्ञान पूर्णपणें बिंबल्यावरोबर तो मद्रूप होतो. २३ ज्याप्रमाणें कोणी मनुष्य जेवणाकरितां पानावर बसला असतां, जेवण्यास सुरवात केल्याशिवाय तो जेवावयास बसला असें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें, ज्ञानाचे प्राप्तीची इच्छा झाल्यावर ज्ञान मिळाल्याशिवाय त्याला ज्ञानी असें नांव प्राप्त होत नाहीं; तरी त्याची त्यासारखीच योग्यता आहे. २४ [तत्त्वज्ञानार्थदर्शनं] आणि तत्त्वज्ञानापासून जें एक फळ प्राप्त होतें, तें ज्ञेय होय त्याच्यावरच त्याची सरळ दृष्टि जाते. २५ एऱ्हवीं ज्ञानाचा लाभ झाल्यावर जर ज्ञेय हातीं लागलें नाहीं तर ज्ञानाचा लाभ होऊनही न झाल्याप्रमाणेंच आहे, असें आम्ही समजूं. २६ अंधळ्यानें हातीं दिवा घेतला असतां त्याचा त्याला काय उपयोग आहे ? त्याप्रमाणें, ज्ञानाचा नुसता निश्चय करून जर आत्मदर्शन झालें नाहीं, तर तें व्यर्थ होय. २७ जर ज्ञानाचे प्रकाशानें परमात्म्याची प्राप्ति होत नाहीं, तर ती बुद्धि अंधळ्याप्रमाणें निरर्थक होय. २८ म्हणून, त्या ज्ञानानें जिकडे पहावें तिकडे परमात्माच दृष्टीस पडतो, अशी ज्याची बुद्धि स्वच्छ झाली आहे, २९ म्हणून त्या निर्दोष ज्ञानानें दाखविलेलें ज्ञेय जो पहातो, त्याच ज्ञानानें जो संपन्न झाला आहे; ६३० आणि ज्ञान जितकें मोठें आहे तितकीच ज्याची बुद्धिही मोठी आहे, तो ज्ञानसंपन्न आहे हें शब्दांनीं सांगावयास नको. ३१ ज्याची बुद्धि ज्ञानाचे प्रकाशावरोबर ज्ञेयास झोंबते, तो हातोहात परतत्त्वाची प्राप्ति करून घेतो. ३२ अर्जुना, तो ज्ञानरूप आहे असें म्हटलें असतां त्यांत आश्चर्य तें कोणतें ? हें पहा, सूर्याला सूर्य असें म्हणावें लागतें काय ? ३३ तेव्हां श्रोते म्हणूं लागले, " आतां ज्ञान्याविषयीं अतिशयोक्ति करून

१ मूर्तिमंत, साक्षात्. २ पवित्र. ३ गुहा. ४ पर्वतांच्या गुहा. ५ उदकाच्या जवळची स्थळें. ६ आश्रय करतो. ७ वस्तीची, लोकसमुदायाची. ८ निश्चयासाठीं. ९ संसार. १० संसाराविषयीं. ११ रस्त्याला, दुमार्गलेल्या वाटेला. १२ आडवाटेला. १३ वळवी. १४ निश्चयानें. १५ दृढ. १६ मत्स्वरूपी. १७ प्रसवे. १८ ज्ञेयापर्यंत. १९ समोर. २० झाला असतां. २१ परमात्म्याकडे. २२ पोंचत नाहीं. २३ बुद्धि. २४ ज्ञानानें. २५ संपन्न झाला. २६ प्रकाशाबरोबर. २७ हातोहात, हां हां म्हणतां. २८ अढळ.

तासी कां ३४ तुझा हाचि आम्हां थोरु । वक्तृत्वाचा पाहुणेरु । जे ज्ञानविषो फारु । निरोपिला ३५ रसु होआवा अतिमात्रु । हा घेतासि कविमंत्रु । तारि अं-वंतूनि शत्रु । करितोसि कां गा ३६ ठायीं बैसातिये वेळे । जे रससोय घेऊनि पळे । तियेचा येरु वोडव मिळे । कोणा अर्था ३७ आघवाचि विषयीं भांदी । पारि सांजवणी टेकों नेदी । ते खुरखोडी नुसधी । पोषी कवण ३८ तैसी ज्ञानीं मतीं न फांके । येर जल्पती नेणों केतुकें । पारि तें असो निकें । केलें तुवां ३९ जया ज्ञानलेशोद्देशें । किजती योगादि सायासें । तें धणीचें आणि तुझिया ऐसें । निरूपण ६४० अमृताची सोतवांकुडी । लागो कां अनुघडी । सुखाच्या दिवसकोडी । गणिजतु कां ४१ पूर्णचंद्रेंसीं राती । युग एक असोनि पांती । तारि काय न पाहत आहाती । चकोर ते ४२ तैसें ज्ञानाचें बोलणें । आणि येणें रसाळपणें । आतां पुरे कोण म्हणे । आंकर्णितां ४३ आणि सभाग्यु पाहुणा ये । सुभगाचि वाढती होये । तैं सरों नेणें रससोये । ऐसें आथी ४४ तैसा जा-हला प्रसंगु । जे ज्ञानीं आम्हांसि लागु । आणि तुजही अनुरागु । आथि तेथ ४५ म्हणोनि यया वाखोणा- । पासीं से आली चौगुणा । ना म्हणों नयेसि दे-खणा । होसी ज्ञानी ४६ तरी आतां ययावरी । प्रज्ञेचां माजेघरीं । पैदें साच करीं । निरूपणीं ४७ या संतवाक्यासरिसें । म्हणितलें निवृत्तिदासें । माझेंही जी ऐसें । मनोगत ४८ यावरी आतां तुम्हीं । आज्ञापिला स्वामी । तारि वांयां वाग्मी । वाढों नेदीं ४९ एवं इयें अवधारा । ज्ञानलक्षणें अठरा । श्रीकृष्णें धनुर्धरा । निरूपिलीं ६५० मग म्हणे या नांवें । ज्ञान एथ जाणावें । हें स्व-मत आणि आघवें । ज्ञानियेही म्हणती ५१ करतळावरी वाटोळा । डोलतु दे-खिजे आंवळा । तैसें ज्ञान आम्हीं डोळां । दाविलें तुज ५२ आतां धनंजया महामती । अज्ञान ऐसी वदंती । तेही सांगों व्यक्ती । लक्षणेंसीं ५३ एऱ्हवीं ज्ञान फुडें जालिया । अज्ञान जाणवे धनंजया । जें ज्ञान नव्हे तें अपैसया । अज्ञानची ५४ पाहें पां दिवसु आघवा सरे । मग रात्रीची वारी उरे । वांचूनि कांहीं तिसरें । नाहीं जेवीं ५५ तैसें ज्ञान जेथ नाहीं । तें अज्ञानचि पाहीं । तरी सांगों कांहीं कांहीं । चिन्हें तियें ५६ तारि संभावने जिये । जो मानाची वाट पाहे । सत्कारें होये । तोषु जया ५७ गर्वें पर्वताचीं शिखरें । तैसा महत्त्वाव-रूनि नुतरे । तयाचिया ठायीं पुरें । अज्ञान आहे ५८ आणि स्वधर्माची

चालू प्रकरणांत अडथळा का घालितोस? ३४ तूं अध्यात्मज्ञानाविषयी विस्तारें करून निरूपण केलेंस ह्याच तुझा आम्हांस वक्तृत्वाचा पाहुणचार आहे! ३५ इतर कवि कोणत्याही वस्तूचें वर्णन करूं लागले असतां, त्या वस्तुविषयीं वर्णन न करतां तिच्या उपांगांविषयी मोठ्या कौतुकानें फाजील वर्णन करितात, ह्या कवींचा मंत्र तूं आपले वर्तनांत आगंतुकाप्रमाणें कां घुसडतोस? ३६ एकाद्या स्त्रीनें जेवावयास बोलावून व पाटरांगोळ्यांचा थाट करून, मंडळी पानावर बसल्यावर जर तयार असलेलें अन्न त्या ठिकाणाहून लोटविलें, तर तिनें बोलाविलेल्या मंडळींचें आणखी कितीही आदरातिथ्य केलें तरी त्यांना त्याचा काय उपयोग? ३७ सर्व गुणांनीं युक्त असून जी गाय धार काढतेवेळीं कासेंत हात घालूं न देतां लाथा मारते, तिला फुकट कोण पोशील? ३८ त्याप्रमाणें, ज्ञानाविषयी न बोलतां इतर कवि हवें तेवढें वर्णन करितात; तसें तूं न करतां आम्हांस खऱ्या ज्ञानाची पूर्णपणें ओळख करून दिलीस हें चांगलें केलेंस. ३९ ज्या ज्ञानाच्या थोड्या प्राप्तीकरितां लोक योगादि साधनें मोठ्या कष्टानें करतात, अशा तऱ्हेच्या बुद्धीला तृप्त करून टाकणारें ज्ञान तुझ्यासारख्यानें वर्णन केलें. ६४० अशा तऱ्हेच्या अमृताच्या वृष्टीनें जरी सारखें सातरें लागलें तरी त्याला कोणी कंटाळेल काय? व सुखाचे कोट्यवधि जरी दिवस गेले, तरी ते मौजेंत बसून त्यांचा कोणी कंटाळा करतील काय? ४१ पौर्णिमेच्या चंद्राच्या रात्री, एक युगपर्यंत असल्या, तरी चकोर त्याच्याकडे पहात नाहींत काय? ४२ त्याप्रमाणें तुझ्यासारख्या रसाळ वक्त्याकडून ज्ञानाचें बोलणें चाललें असतां, तें ऐकतांना, 'आतां पुरे' असें कोण म्हणेल? ४३ आणि भाग्यवान् पाहुण्यांना, चतुर वाढणारीण असल्यावर, त्याच्या मनांत जसे पदार्थ सरूं नयेत, अशी इच्छा असते, ४४ त्याप्रमाणें आजचा हा प्रसंग आहे. कारण आम्हांला ज्ञानाविषयीं श्रवण करण्याची आवड असून तुलाही तें सांगण्याविषयी प्रेमच आहे. ४५ या कारणामुळें तुझ्या व्याख्यानास चौपट बळ आलें आहे, तर तुला आम्ही 'ज्ञानाविषयीं तूं परिपूर्ण आहेस' असें म्हटल्यावांचून कसें राहूं? ४६ तर आतां, यापुढें, बुद्धीचे माजघरांत, ज्ञानाच्या अठरा लक्षणांविरुद्ध जें अज्ञान त्याचें वर्णन कर." ४७ हें संतांचें भाषण ऐकल्यावर, निवृत्ति महाराजांचे दास ज्ञानदेव म्हणाले कीं, माझेंही मनांत अज्ञानाविषयींच वर्णन करावयाचें होतें. ४८ तशांत गुरो, तुम्ही मला आज्ञा केली; तेव्हां आतां मी व्यर्थ शब्द वाढूं देणार नाहीं. ४९ हें पहा—याप्रमाणें श्रीकृष्णांनीं अर्जुनास ज्ञानाचीं अठरा लक्षणें सांगितलीं ५५० मग देव म्हणाले, हीं लक्षणें, ज्याचे ठिकाणीं दृष्टीस पडतील, त्याचे ठिकाणीं ज्ञान वास करतें, हें माझें स्वतःचें मत असून सर्व ज्ञानीही असेंच म्हणतात. ५१ आवळा तळहातावर फिरतांना जसा पहावा, तसें आम्हीं तुला ज्ञान प्रत्यक्ष दाखविलें. ५२ हे महाबुद्धिमंता अर्जुना, आतां अज्ञान ज्याला म्हणतात तेंही त्याच्या लक्षणांसह स्पष्ट करून सांगतों. ५३ धनंजया, ज्ञान समजल्यावर अज्ञान सहज ओळखतां येतें. कारण, जें ज्ञान नव्हे तेंच अज्ञान होय. ५४ हें पहा—दिवस संपल्यावर मग रात्रीचीच पाळी उरते, कारण रात्र व दिवस या दोहोंवांचून तिसरा प्रकारच नाहीं; ५५ त्याप्रमाणें, ज्या ठिकाणी ज्ञान नाहीं, तेंच अज्ञान आहे असें समज. तथापि अज्ञानाचीं कांहीं लक्षणें तुला सांगतों. ५६ [मानित्वं] आपली प्रतिष्ठा व्हावी म्हणून लोक आपल्यास मान केव्हां देतील, याची जो वाट पहात असतो, व लोकांच्या सत्कारानें ज्याला संतोष होतो; ५७ व तसा मान मिळाला म्हणजे गर्वानें पर्वताचे शिखराइतका चढून जाऊन कधींही खालीं उतरत नाहीं; अशा पुरुषाचे ठिकाणीं पूर्ण अज्ञान वास करतें असें समज. ५८ [दंभित्वं] आणि

१ ज्ञानमंत्र, कवीची बुद्धि, कवीचा मंत्र. २ आमंत्रण करून. ३ अवगुण. ४ पात्रावर. ५ स्वयंपाक. ६ इतर आदर. ७ चांगली गाय. ८ धारेचे वेळीं. ९ लाथाळ गाय. १० वल्लाला करितात. ११ कितीतरी. १२ ज्ञानाच्या उद्देशानें. १३ तृप्तीचें. १४ सातें दिवसांची झड, सातेरें. १५ उघाडीवांचून, एकसारखी. १६ एकसारखी. १७ ऐकतां. १८ श्रीमान. १९ सुगुण, दैववती. २० अपेक्षा, आवड. २१ प्रीति. २२ व्याख्यानास. २३ चौपट. २४ बुद्धीच्या. २५ माजघरांत. २६ ज्ञानाचीं अठरा लक्षणें. २७ लोकनार्ती. २८ स्पष्ट करून. २९ अपोआप, सहज. ३० पाळी, फेरी. ३१ प्रतिष्ठेसाठीं.

मांगेळी । बांधे वाचेच्या पिंपळीं । उभिला जैसा देउळीं । जाणोनि कुंचा ५९ घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा । करी तेतुलें मोहरा । स्फीतीचियां ६६० आंग वारिवरी चर्ची । जनातें अभ्यर्चितां वंची । तो जाण पां अज्ञानाची । खाणी एथ ६१ आणि वन्ही वनीं विचरे । तेथ जळती जैसीं जंगमेंस्थावरें । तैसें जयाचेंनि आचारें । जगा दुःख ६२ कौतुकें जें जें जल्पे । तें सबळाहूनि तीखें रुपे[10] । विषाहूनि संकल्पें । मारकु जें ६३ तयातें बहु अज्ञान । तो अज्ञानाचें निधान । हिंसेसि आयतन । जयाचें जिणें ६४ आणि फुंके भाता फुगे । रेचिलियां सवेंचि उफगे । तैसा संयोगेंवियोगें । चढे वोहटे ६५ पडली वारयाचिया धांळेसां । धुळी चढे आकाशा । हरिखा वेंळेंधे तैसा । स्तुतीवेळे ६६ निंदा मोटकी आइके । आणि कपाळ धरूनि ठाके । थेंबें विरे[20] वारेनि शोखे । चिखलु जैसा ६७ तैसा मानापमानीं होये । जो कोण्हाची ऊर्मी न साहे । तयाच्या ठायीं आहे । अज्ञान पुरें ६८ आणि जयाचिया मनीं गांठीं । वारिवरी मोकळी वाचा दिठी । आंगें मिळे जीवें पाठी । भलतया दे ६९ व्याधाचें चारा घालणें । तैसें प्रांजेळ जोगावणें । चांगाचीं अंतःकरणें । विरु करी ६७० गार शेवाळें गुंडाळली । कां निंबोळी जैसी पिकली । तैसी जयाची भली । बाह्य क्रिया ७१ अज्ञान तयाचिया ठायीं । ठेविलें असे पाहीं । या बोला आन नाहीं । सत्य मानीं ७२ आणि गुरुकुळीं लाजे । जो गुरुभक्ती उभजे । विद्या घेऊनि माजे । गुरूसींचि जो ७३ तयाचें नाम घेणें । तें वाचे शूद्रान्न होणें । परि घडलें लक्षणें । बोलतां इयें ७४ आतां गुरुभक्तांचें नांव घेवों । तेणें वाचेसि प्रायश्चित देवों । गुरुसेवका नांव पावों । सूर्य जैसा ७५ येतुलेनि पांगु पापाचा । निस्तरेल हे वाचा । जो गुरुतल्पगाचा । नांमीं जाला ७६ हा ठायवरी । तया नामाचें भय हरी । मग म्हणे अवधारीं । आणिकें चिन्हें ७७ तरी आंगें कर्मीं ढिला । जो मनें विकल्पें भरला । अडवींचा अवगळला । कुहा जैसा ७८ तया तोंडीं कांटिवडे । आंतु नुसधीं हाडें । अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ७९ जैसें पोटालागीं सुणें । उघडें झांकलें न म्हणे । तैसें आपलें परावें नेणें । द्रव्यालागीं ६८० इया ग्रामसिंहाचिया ठायीं । जैसा मिळणी ठावो अठावो नाहीं । तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारीना ८१ कर्माचा वेळु चुके । कां नित्य नैमित्तिक

धर्माप्रमाणें कर्मे करण्याची वेळ चुकत आहे किंवा नित्य-नैमित्तिक कर्मे करावयाचीं तीं रहात आहेत, त्याच्याबद्दल ज्याचे मनांत खेद वाटत नाहीं, ८२ पापाचरणाबद्दल जो निर्लज्ज व पुण्यकर्माचें आचरण करावें अशी ज्याच्या मनांत कल्पनाही येत नसून, ज्याच्या मनांत अतिशय विकल्प येतात, ८३ आणि जो द्रव्यप्राप्तीविषयीं पापपुण्याची चाड बाळगीत नाहीं, तो केवळ अज्ञानाचा पुतळाच आहे असें समज. ८४ [ अस्थैर्य ] ज्याप्रमाणें गवताच्या काडीवर मुंगी चढली तरी ती गवताची काडी लवते, त्याप्रमाणें जो अल्प लाभाकरितांही बुद्धीच्या स्थिरपणापासून ढळतो; ८५ डबक्यांत पाय पडल्याबरोबर जसें त्यांतील पाणी गढूळ होतें, तसा जो भयाचें नांव ऐकल्याबरोबर घाबरा होतो; ८६ पुरांत पडलेला भोंपळा जसा, हवा तिकडे वहात जातो; तसा तो मनोरथाच्या पुरांत वाहात जातो; ८७ वाऱ्याचे साह्यानें धूर जसा गगनापर्यंत उंच जातो, तसा जो दुःखाची गोष्ट ऐकल्याबरोबर गडबडतो; ८८ वावटळ ज्याप्रमाणें कोठेंही स्थिर होत नाहीं, त्याप्रमाणें जो क्षेत्राचे, तीर्थाचे किंवा शहराचे ठिकाणीं कोठेंही कायम रहात नाहीं, ८९ किंवा माजलेल्या सरडास ज्याप्रमाणें वरून खालीं व खालून वर जाण्याचा व्यर्थ नाद लागतो; ६९० ज्याप्रमाणें पाण्याचा रांजण पुरल्याशिवाय जाग्यावर ठरत नाहीं, त्याप्रमाणें जो निद्रेशिवाय एके ठिकाणीं न रहातां चोहों-कडे हिंडतो; ९१ ज्याच्या ठिकाणीं अज्ञान पूर्णपणें वास करतें, व जो चांचल्यामध्यें माकडाचें सख्खें भावंडच असतो, ९२ [ आत्मविनिग्रहाभावः ] आणि अर्जुना ज्याचें अंतःकरणांत आत्मसंयमनाचा वाराही नसतो; ९३ ज्याप्रमाणें एखादें ओहोळास लोंढा आला म्हणजे तो वाळूच्या बांधास जुमानीत नाहीं, त्याप्रमाणें जो शास्त्रनिषिद्ध गोष्टीस भीत नाहीं; ९४ जो व्रतें पाळीत नाहीं, स्वधर्मास लाथेनें झुगारतो व शास्त्रानें घालून दिलेल्या नियमांविरुद्ध ज्याची क्रिया असते; ९५ ज्याला पापाचरणाचा कंटाळा नसतो, पुण्याचरणाचा लेशही माहीत नसतो, आणि जो लज्जेची सीमा खणून टाकतो; ९६ जो कुलधर्म ओळखीत नाहीं, वेदांतील आज्ञा मानीत नाहीं, व ज्याला बऱ्यावाईट गोष्टींची चाड नसते. ९७ ज्याप्रमाणें पोळ मोकळा सुटलेला असतो, किंवा वारा अफाट वाहतो, अथवा रानांतील फुटलेल्या पाटाचें पाणी वाटेल तिकडे जातें, ९८ आंधळा हत्ती माजावा, किंवा डोंगरास वणवा लागावा, याप्रमाणें ज्याचें मन विषयाविषयीं बहकलेलें असतें. ९९ हें पहा, उकिरड्यावर काय टाकीत नाहींत? पोळाला कोण आवरतो? आणि वेशीच्या उंबऱ्यावरून कोण जात नाहीं? ७०० ज्याप्रमाणें अन्नसत्रांत वाटेल त्यानें जेवावें, किंवा साधारण मनुष्यास अधिकार प्राप्त झाल्यावर त्यानें तो वाटेल तसा गाजवावा, अथवा वाण्याचे दुकानांत कोणीही जावें, १ त्याप्रमाणें, ज्याचें अंतःकरण चंचल आहे, त्याचे ठिकाणीं संपूर्ण अज्ञानाची वृद्धि होते असें समज. २ [ इंद्रियार्थेषु अवैराग्यं ] आणि जो, जिवंत असतांना व मेल्यावरही विषयांची इच्छा सोडीत नाहीं; व ज्या योगानें स्वर्गांतही विषयोपभोग प्राप्त होतील त्या मार्गाचें आचरण ह्या लोकीं करतो, ३ ज्याचे सर्व श्रम विषयोपभोगांचे प्राप्तीकरतां असतात, व ज्याला सकाम कर्माशिवाय इतर कर्मे आवडत नाहींत; आणि विरक्तांचें दर्शन झालें असतां जो सचैल स्नान करतो; ४ ज्याप्रमाणें कोड असलेल्या मनुष्यास आपल्या कुजक्या हातानें अन्न खाण्यास खंती वाटत नाहीं, त्याप्रमाणें ज्याचा विषयांस जरी कंटाळा आला तरी तो त्यांस कंटाळत नाहीं, व कर्मफलांविषयीं निरिच्छ होत नाहीं; ५ गाढवीच्या पाठीस गाढव लागल्यावर तिनें लाथा झाडून त्याचें नाक फोडलें तरी तो मागें न वळतां तिच्याच पाठीस लागतो, ६ त्याप्रमाणें, जो विषयाकरतां जळत्या आगींतही उडी घालण्यास मागेंपुढें पहात नाहीं, आणि आपलें व्यसन हें

१ निर्लज्ज. २ अत्यंत भ्रष्ट. ३ केवळ, शुद्ध. ४ द्रव्या-सकोला. ५ अल्पस्वल्प. ६ गवताची काडी. ७ ऐकल्याबरोबर. ८ डबकें. ९ घाबरतो. १० धारेबरोबर. ११ दुध्या-भोंपळा. १२ सहवासानें. १३ धूळ, धुकें. १४ वादळाप्रमाणें. १५ छंद, परिभ्रमण, उनाडकी. १६ स्थिर रहात नाहीं. १७ मोठें. १८ धुरबंध. १९ ओहळास. २० बांध. २१ मर्यादा. २२ सीमा, मर्यादा. २३ कुळधर्माला. २४ दूर. २५ निर्णय. २६ पोळ, देवाला सोडलेला बैल. २७ मोकार, मोकळा. २८ अरण्यांत. २९ हत्ती. ३० उकीरड्यावर. ३१ आवरत नाहीं. ३२ उंबरा. ३३ भेटलेला, सामान्य मनुष्याला ३४ तेज, मोठेपण, अधिकार. ३५ वाण्याचे दुकानांत. ३६ श्रम करितो, जपतो. ३७ विषयभोगाचें. ३८ सचैल स्नान करतो. ३९ कुजलेल्या. ४० कोड असलेला मनुष्य. ४१ गाढवी. ४२ लाथांनीं.

ठाके। तें जया न दुखे।जीवामाजी ८२ पापीं जो निसुगु। पुण्याविषयीं अति-निलागु। जयाचिया मनीं वेगु। विकल्पाचा ८३ तो जाण निखिळ। अज्ञानाचा पुतळा। जो बांधोनि असे डोळां वित्ताशेतें ८४ आणि स्वार्थे अळुमाळें। जो धैर्यापासोनी चळे।जैसें तृणबीज ढळे। मुंगियेचेनी ८५ पावो सूदलिया सवें। जैसें थिल्लर कालवे। तैसा भयाचेनि नांवें। गजबजे जो ८६ मनोरथांचिया धारेसा। वाहणें जयाचिया मानसा। पूरीं पडिला जैसा। दुधियां पाहीं। ८७ वायूचेनि सांवायें। धूं दिगंतरा जाये। दुःखवार्ता होये। तैसें जया ८८ वाउधणाचिया परी। जो आश्रो कहींचि न धरी। क्षेत्रीं तीर्थीं पुरीं। थारों नेणें ८९ कां मातलिया सरडा। पुढती बुडुख पुढती शेंडा। हिंडण वारा कोरडा। तैसा जया ६९० जैसा रोंविल्याविणें। रांजणु थारों नेणे। तैसा पडे तैं राहणें। एऱ्हवीं हिंडे ९१ तयाच्या ठायीं उदंड। अज्ञान असे वितंडें। जो चांचल्यें भावंड। मर्कटाचें ९२ आणि पैं गा धनुर्धरा। जयाचिया अंतरा। नाहीं चोढावीरा। संयमाचा ९३ लेंडिये आला लोंढा। न मनीं वाळुवेचा वेरवंडा। तैसा निषेधाचिया तोंडा। विहेना जो ९४ व्रतातें आड मोडी। स्वधर्मु पायें वोलांडी। नियमाची औंश तोडी। जयाची क्रिया ९५ नाहीं पापाचा कंटाळा। नेणे पुण्याचा जिव्हाळा। लाजेचा पेंडवळा। खाणोनि घाली ९६ कुळेंसीं जो पाठमोरा। वेदाज्ञेसीं दुऱ्हा। कृत्याकृत्यव्यापारा। निवांडु नेणे ९७ वेसू जैसा मोकाटु। वारा जैसा अफाटु। फुटला जैसा पाटु। निरर्जेनीं ९८ आंधळें हौतिरू मातलें। कां डोंगरीं जैसें पेटलें। तैसें विषयीं सुटलें। चित्त जयाचें ९९ पैं उबधेंडां काय न पडे। मोकाटु कोणा नातुडे। ग्रामद्वारींचें आडें। नोलांडी कोण ७०० जैसें सत्रीं अन्न जालें। कीं सामान्या बीक आलें। वाणसियेचें उभविलें। कोण न रिगे १ तैसें जयाचें अंतःकरण। तयाच्या ठायीं संपूर्ण। अज्ञानाची जाण। ऋद्धि आहे २ आणि विषयांची गोडी। जो जीतु मेला न संडी। स्वर्गींही खावया जोडी। एथूनिची ३ जो अखंड भोगा जेंचे। जया व्यसन काम्यक्रियेचें। मुख देखोनि विरक्ताचें। सचैल करी ४ विषो शिणोनि जाये। परि न शिणे सावधु नोहे। कुंहिला हातीं खाये। कोढी जैसा ५ खैरी टेंकों नेदी उडे। लौतौनि फोडी नाकाडें। तऱ्ही जेवीं न काढे। माघौता खरु ६ तैसा जो विषयांलागीं। उडी घाली जळतिये आगीं। व्यसनाची आंगीं।

धर्माप्रमाणें कर्म करण्याची वेळ चुकत आहे किंवा नित्य-नैमित्तिक कर्मे करावयाचीं तीं रहात आहेत, त्याच्या-बद्दल ज्याचे मनांत खेद वाटत नाहीं, ८२ पापाचरणा-बद्दल जो निर्लज्ज व पुण्यकर्माचें आचरण करावें अशी ज्याच्या मनांत कल्पनाही येत नसून, ज्याच्या मनांत अतिशय विकल्प येतात, ८३ आणि जो द्रव्यप्राप्तीविषयीं पापपुण्याची चाड बाळगीत नाहीं, तो केवळ अज्ञानाचा पुतळाच आहे असें समज. ८४ [ अस्थैर्य ] ज्याप्रमाणें गवताच्या काडीवर मुंगी चढली तरी ती गवताची काडी लवते, त्याप्रमाणें जो अल्प लाभाकरितांही बुद्धीच्या स्थिर-पणापासून ढळतो; ८५ डबक्यांत पाय पडल्याबरोबर जसें त्यांतील पाणी गढूळ होतें, तसा जो भयाचें नांव ऐकल्याबरोबर घाबरा होतो; ८६ पुरांत पडलेला भोपळा जसा हवा तिकडे वहात जातो; तसा तो मनोरथाच्या पुरांत वाहात जातो; ८७ वाऱ्याचे साह्यानें धूर जसा गगनापर्यंत उंच जातो; तसा जो दुःखाची गोष्ट ऐकल्याबरोबर गडबडतो; ८८ वावटळ ज्याप्रमाणें कोठेंही स्थिर होत नाहीं, त्याप्रमाणें जो क्षेत्राचे, तीर्थाचे किंवा शहराचे ठिकाणीं कोठेंही कायम रहात नाहीं; ८९ किंवा माजलेल्या सरडास ज्याप्रमाणें वरून खाली व खालून वर जाण्याचा व्यर्थ नाद लागतो; ६९० ज्याप्रमाणें पाण्याचा रांजण पुरल्याशिवाय जागेवर ठरत नाहीं, त्याप्रमाणें जो निद्रेशिवाय एके ठिकाणीं न रहातां चोहों-कडे हिंडतो; ९१ ज्याच्या ठिकाणीं अज्ञान पूर्णपणें वास करतें, व जो चांचल्यामध्यें माकडाचें सख्खें भावंडच असतो, ९२ [ आत्मविनिग्रहाभावः ] आणि अर्जुना ज्याचें अंतःकरणांत आत्मसंयमनाचा वाराही नसतो; ९३ ज्याप्रमाणें एखादे ओहोळास लोंढा आला म्हणजे तो बाकूच्या बांधास जुमानीत नाहीं, त्याप्रमाणें जो शास्त्रनिषिद्ध गोष्टीस भीत नाहीं; ९४ जो व्रत पाळीत नाहीं, स्वधर्मास लाथेनें झुगारतो व शास्त्रानें घालून दिलेल्या नियमांविरुद्ध ज्याची क्रिया असते; ९५ ज्याला पापाचरणाचा कंटाळा नसतो, पुण्याचरणाचा लेशही माहीत नसतो, आणि जो लज्जेची सीमा खणून टाकतो; ९६ जो कुलधर्म ओळखीत नाहीं, वेदांतील आज्ञा मानीत नाहीं, व ज्याला वाऱ्यावाईट गोष्टींची चाड नसते. ९७ ज्याप्रमाणें पोळ मोकळा सुटलेला असतो, किंवा वारा भरकटत वाहतो, अथवा रानांतील फुटलेल्या पाटाचें पाणी वाटेल तिकडे जातें. ९८ आंधळा हत्ती माजावा, किंवा डोंगरास वणवा लागावा, याप्रमाणें ज्याचें मन विषयाविषयीं बहकलेलें असतें. ९९ हें पहा, उकिर-ड्यावर काय टाकीत नाहींत? पोळाला कोण आवरतो? आणि वेशीच्या उंबऱ्यावरून कोण जात नाहीं? ७०० ज्याप्रमाणें अन्नसत्रांत वाटेल त्यानें जेवावें, किंवा साधा-रण मनुष्यास अधिकार प्राप्त झाल्यावर त्यानें तो वाटेल तसा गाजवावा, अथवा वाण्याचे दुकानांत कोणीही जावें, १ त्याप्रमाणें, ज्याचें अंतःकरण चंचल आहे, त्याचे ठिकाणीं संपूर्ण अज्ञानाची शुद्धि होते असें समज. २ [ इंद्रियार्थेषु अवैराग्यं ] आणि जो जिवंत असतांना व मेल्यावरही विषयांची इच्छा सोडीत नाहीं; व ज्या योगानें स्वर्गांतही विषयोपभोग प्राप्त होतील त्या मार्गाचें आचरण या लोकीं करतो, ३ ज्याचे सर्व श्रम विषयोपभोगाचे प्राप्तीकरतां असतात, व ज्याला सकाम कर्माशिवाय इतर कर्म आवडत नाहींत; आणि विरक्ताचें दर्शन झालें असतां जो सचैल स्नान करतो; ४ ज्याप्रमाणें कोड असलेल्या मनुष्यास आपल्या कुजक्या हातानें अन्न खाण्यास खंती वाटत नाहीं, त्याप्रमाणें ज्याला विषयांस जरी कंटाळा आला तरी तो त्यांस कंटाळत नाहीं, व कर्मफलांविषयीं निरिच्छ होत नाहीं; ५ गाढवीच्या पाठीस गाढव लागल्यावर तिनें लाथा मारून त्याचें नाक फोडलें तरी तो मागें न वळतां तिच्याच पाठीस लागतो, ६ त्याप्रमाणें, जो विषयाकरतां जळत्या आगींतही उडी घालण्यास मागेंपुढें पहात नाहीं, आणि आपलें व्यसन हें

१ निर्लज्ज. २ अत्यंत भ्रष्ट. ३ केवळ, शुद्ध. ४ द्रव्या-सकोला. ५ अल्परवत. ६ गवताची काडी. ७ ठेवल्याबरो-बर. ८ डबकें. ९ घाबरतो. १० भारेबरोबर. ११ दुध्या-भोपळा. १२ सहवासानें. १३ धूळ, धुकें. १४ वादळाप्रमाणें. १५ छंद, परिभ्रमण, उनाडकी. १६ स्थिर रहात नाहीं. १७ मोठें. १८ धुरंधर. १९ ओहळास. २० बांध. २१ मर्यादा. २२ सीमा, मर्यादा. २३ कुळधर्म. २४ दूर. २५ निर्णय. २६ पोळ, देवाला सोडलेला बैल. २७ मोकार, मोकळा. २८ अरण्यांत. २९ हत्ती. ३० उकीरड्यावर. ३१ आवरत नाहीं. ३२ उंबरा. ३३ वेदयेला, सामान्य मनुष्याला ३४ तेज, मोठेंपण, अधिकार. ३५ वाण्याचे दुकानांत. ३६ श्रम करितो, जपतो. ३७ विषयभोगाचें. ३८ सचैल स्नान करतो. ३९ कुजलेल्या. ४० कोड असलेला मनुष्य. ४१ गाढवी. ४२ लाथांनीं.

लेणीं मिरवी ७ फुटोनि पडे तंव । मृग वाढवी हांव । परि न म्हणे ते मौंव रोहिणीची ८ तैसा जन्मोनि मृत्यूवरी । विषयीं आसितां बहुतीं परी । तऱ्ही आसु नेघे धरी । आधिकें प्रेम ९ पाहिलिये बाळदशे । आई बा हेंचि पिसें । तें सरे मग स्त्रीमांसें । भुलोनि ठाके ७१० मग स्त्रीभोगितां थावो । वृद्धाप्य लागे येवों । तेव्हां तोचि प्रेमभावो । बाळकांसि आणी ११ आंधळे व्यालें जैसें । तैसा बाळे परिवसे । परी जीवें मरे तों न आसे । विषयांसि जो १२ जाण तयाच्या ठायीं । अज्ञानासि पारु नाहीं । आतां आणिक कांहीं । चिन्हें सांगों १३ तरि देह हाचि आत्मा । ऐसेया जो मनोधर्मा । वळघोनियां कर्मा । आरंभु करी १४ आणि उणें कां पुरे । जें जें कांहीं आचरे । तयाचेनि आविष्करें । कुंथों लागे १५ डोइये ठेविलेनि भोजें । देवंळविसें जेवीं फुंजे । तैसा विद्यावयसा माजे । उताणा चाले १६ म्हणे मीचि एकु अर्थी । माझ्याचि घरीं संपत्ती । माझी आचरती रिती । कोणा आहे १७ नाहीं माझेनि पाडें वाडु । मी सर्वज्ञु एकुचि रूढु । ऐसा सर्वतुष्टीगंडु । घेऊनि ठाके १८ व्याधि लागलिया माणुसा । नयेचि भोग दाऊं जैसा । निकें न साहे जो तैसा । पुंढिलांचें १९ पैं गुर्णु तेतुला खाय । स्नेहें कीं जाळितु जाय । जेथ ठेविजे तेथ होय । मैंसीऐसें ७२० जीवनें शिंपिला तिडेंपिडी । विजिला प्राण सांडी । लौंगला तरी काडी । उरों नेदी २१ अळुमाळ प्रकाशु करी । तेतुलेनीच उबारा धरी । तैसिया दीपाचिया परी । सुविद्यु जो २२ औषधाचेनि नांवें अमृतें । जैसा नवज्वरु आंबुथे । कां विषचि होऊनि परतें । सर्पा दूध २३ तैसा सद्गुणीं मत्सरु । व्युत्पत्ती अहंकारु । तपोज्ञानें अपारु । ताठा चढे २४ अंत्यजु राणिवे बैसविला । आरें धारेंणु गिळिला । तैसा गर्वें फुगला । देखसी जो २५ जो लाटणें ऐसा न लवे । पाथरु तेवीं न द्रवे । गुणियासि नागवे । फोडसें जैसें २६ किंबहुना तयापासीं । अज्ञान आहे वाढिसीं । हें निकें गा तुजसीं । बोलत असो २७ आणीकही धनंजया । जो गृहदेह सामग्रिया । न देखे कौंळचेया । जन्मातें गा २८ कृतघ्ना उपकारु केला । कां चोरा व्यवहारु दिधला । निसुगु स्तविला । विसरे जैसा २९ वोढाळितां लाविलें । तें तैसेंच कान पूंसे वोलें । कीं पुढती वोढाळूं आलें । सुणें जैसें ७३० बेडूक सापाचिया तोंडीं । जातसे सर्वुंडबुडी । तो मक्षिकांचिया कोडीं । स्मरेना कांहीं ३१ तैसी नवेही द्वारें स्रवती ।

दूषण नसून भूषणच आहे असें मानतो; ७ मृगजलाच्या लालसेनें धांवतां धांवतां जरी मृगाचा ऊर फुटला, तरी त्याची हांव कमी न होतां अधिकच वाढते, पण हें मिथ्या आहे असें तो मानीत नाहीं, ८ त्याप्रमाणें, जन्मापासून मरेपर्यंत विषयप्राप्तीकरतां सारखे श्रम करतो, तथापि त्याबद्दल त्यास तिटकारा न येतां उलटें अधिकच प्रेम सुटतें; ९ बालपणीं मातापितरांचें वेड असतें, व तें संपल्यावर तारुण्यदशेंत स्त्रीचें वेड लागतें; ७१० नंतर स्त्रीचा उपभोग पूर्ण झाल्यावर म्हातारपण येतें, तेव्हां तेंच प्रेम तो मुलांबाळांवर करूं लागतो. ११ आंधळी आपल्या पोराला जशी कुरवाळते त्याप्रमाणें तो मुलांबाळांना कुरवाळीत बसतो, पण ज्यास मरेपर्यंत विषयाचा तिटकारा येत नाहीं, १२ त्याचे ठिकाणीं अज्ञानास पार नाहीं असें समज. आतां अज्ञानाचीं आणखी कांहीं लक्षणें सांगतों. १३ [ अहंकारः ] हें पहा—जो आपले देहालाच आत्मा असें समजून कर्म करूं लागतो; १४ आणि जर एकादे कर्माचें आचरण कमी किंवा जास्त झालें तर अभिमानानें फुगून जाऊन डुंलूंही लागतो, १५ देवाचा प्रसाद डोक्यावर ठेवतांच जसा देवाचा भगत घुमूं लागतो, तसा जो विद्येच्या जोरावर व वयाचे मानावर अभिमानाचा ताठा धरून उताणा चालतो; १६ आणि सर्व जगांत काय तो मीच शहाणा, मीच श्रीमंत, माझेप्रमाणें चालरीत कोणाची आहे ? १७ माझे बरोबरीचा दुसरा कोणी नाहीं, मी सर्वज्ञ असून मी एकटाच या जगांत ज्ञाता आहें, याप्रमाणें सर्व गोष्टींबद्दल गर्व बाळगतो; १८ व्याधिग्रस्त माणसाला ज्याप्रमाणें कोणताही भोग सहन होत नाहीं. त्याप्रमाणें दुसऱ्यांचें चांगलें झालेलें ज्याला सहन होत नाहीं; १९ हें पहा—दिवा हा गुण ( वात ) तेवढाच खाऊन टाकून स्नेह ( तेल ) जाळून टाकतो; आणि ज्या जागीं ठेवावा ती जागा काळीकुट्ट करून टाकतो; ७२० पाण्याचा थेंब पडला तर तडतडतो, वाऱ्यानें विझतो, घरास लागला तर काडी देखील उरूं देत नाहीं, २१ आणि कोठें उगीच थोडासा प्रकाश करतो तर तेवढ्यानेंही उष्मा करावयास लागतो, हा त्याच्या अल्प गुणाप्रमाणें ज्याच्याजवळ विद्या अल्प व दोष बहुत आहेत ! २२ नवज्वर झालेल्या रोग्यास दूध हें औषध म्हणून जरी दिलें, तरी तें त्याचा ताप विकोपास नेतें; किंवा सापास दूध पाजलें असतां तें विष होऊन तो ओकतो, २३ त्याप्रमाणें, गुणवान मनुष्याचा जो मत्सर करतो, व्युत्पत्तीबद्दल अहंपणा बाळगतो, व तपाचरणानें ज्याचे अंगीं ताठा भरतो; २४ अंत्यजाला राज्यावर बसविलें असतां तो जसा अभिमानानें फुगतो, अथवा अजगरानें खांब गिळल्यावर तो जसा ताठतो, तसा ज्याच्या अंगीं गर्वाचा ताठा भरलेला पाहशील; २५ आणि जो लाटण्याप्रमाणें केव्हांही लवत नाहीं व दगडाप्रमाणें ज्याला घाम येत नाहीं आणि फुरसें जसें गारोड्याच्या मंत्रानेंही उतरत नाहीं, २६ फार काय सांगावें, अशी ज्याची स्थिति असते, त्याचे जवळ अज्ञान वाढीस लागलें आहे, हें तुला निश्चयानें सांगतों. २७ [ जन्मादिदर्शनं ] हे पहा धनंजया, जो आपलें घरदार, संपत्ति देह व आपला विद्यमान जन्म यांविषयीं कांहीं सुद्धां विचार करीत नाहीं; २८ कृतघ्नावर उपकार केला असतां, अथवा चोरास व्यापाराकरितां भांडवल दिलें असतां, किंवा निर्लज्ज मनुष्याची स्तुति केली असतां, ते ज्याप्रमाणें केलेले उपकार विसरतात; २९ द्वाड कुत्र्याचे कान आणि शेपूट कापून त्यास घरांतून हांकून लाविलें, तरी तें रक्त गळत असतांच जसें पुनः त्याच घरांत शिरतें; ७३० बेडकाला साप गिळीत असतां तो माशा गिळण्याची हांव धरतो परंतु आपली स्थिति काय होत आहे, याची आठवणही नसते; ३१ त्याप्रमाणें अंगांत रक्त भरून नवद्वारें वहात असतांही ज्याचे मनांत आ-

१ तोंड फुटून. २ कपट. ३ मृगजळांची. ४ शरीरास. ५ ठाव, ठिकाण. ६ स्पर्शितो, आलिंगितो. ७ ओलंघून, चढून. ८ आविर्भावानें. ९ डोईवर ठेवलेल्या देवाच्या मूर्तीनें. १० देवाचा पुजारी, भगत. ११ गर्वानें फुगतो, वाढूं लागतो. १२ धनवान. १३ बरोबरीचा. १४ प्रसिद्ध. १५ सर्व गोष्टींबद्दल गर्व. १६ मरें. १७ दुसऱ्याचें. १८ घात. १९ तेल. २० काजळाप्रमाणें. २१ पाण्यानें. २२ तडतडतो. २३ वारा घातला तर. २४ घराला स्पर्शला. २५ किंचित्. २६ ज्ञानी, गुणी. २७ दुधानें. २८ विकोपास जातो. २९ राज्यावर. ३० अजगरानें. ३१ खांब. ३२ गारुड्यास, विषवैद्यास. ३३ उतरत नाहीं. ३४ फुरसें. ३५ वाढतें दशेस. ३६ निश्चयानें. ३७ पुढें होणाऱ्या किंवा गत जन्मातें. ३८ व्यापारास भांडवल. ३९ निर्लज्ज. ४० चोंढाळपण करितां. ४१ शेंपूट. ४२. कुत्रें. ४३ मूळासहित, जीवासकट. ४४ कौतुकानें, आवडीनें. ४५ मुख, मलद्वार, मूत्रद्वार, डोळे दोन, कान दोन, आणि नाकपुड्या दोन मिळून नऊ द्वारें.

आंसीं देहाची लुती जिती । जेणें जाली तें चित्तीं । सलेना जया ३२ माते-च्या उदरकुहरीं । पचूनि विष्टेच्या दाथरीं । जठरीं नवमासवरी । उकडला जो ३३ तें गर्भींचीं जे व्यथा । कां जें जालें उपजतां । तें कांहींचि सर्वथा । नाठवी जो ३४ मलमूत्रपंकीं । जें लोळतें बाळ अंकीं । तें देखोनि जो न थुंकी । त्रासु नेघे ३५ कालाचि ना जन्म गेलें । पांहेच पुढती आलें । ऐसें हें कांहीं वाटलें । नाहीं जया ३६ आणि पैं तयाची परी । जीविताची फरारी । देखोनि जो न करी । मृत्युचिंता ३७ जिणेयाचेनि विश्वासें । मृत्यु एक एथ असे । हें जयाचेनि मानसें । मानिजेना ३८ अल्पोदकींचा मासा । हें नाटे ऐसिया आशा । न वचेचि कां तैसा । अगाध डोहां ३९ कां गोरीचियें भुली । मृग व्याधा दृष्टि न घाली । गळु न पाहतां गिळिली । उंडी मीनें ७४० दीपाचिया झगमगा । जाळील हें पतंगा । नेणवेचि पैं गा । जयापरी ४१ शर्व्हारु निद्रा-सुखें । घर जळत असे तें न देखे । नेणतां जेवीं विखें । रांधिलें अन्न ४२ तैसा जीवितांचेनि मिषें । हा मृत्युचि आला असे । हें नेणेचि राजसें । सुखें जो गा ४३ शरीरींचि वाढी । अहोरात्रांची जोडी । विषयसुखप्रौढी । साचचि मानी ४४ पारी बापुडा ऐसें नेणे । जें वेश्येचें सर्वस्व देणें । तेंचि तें नागवणें । रूप एथ ४५ संवचोरांचें साजणें । तेंचि तें प्राण घेणें । लेपीं स्नपन करणें । तोचि नाशु ४६ पांडुरोगें आंग सुटलें । तें तयाचि नांवें खुंटलें । तैसें नेणे भुललें । आहारनिद्रा ४७ सन्मुख शूळा । धांवतया पायें चपळा । प्रतिपदीं ये जवळा । मृत्यु जेवीं ४८ तेवीं देहा जंव जंव वाढु । जंव जंव दिवसांचा पवाडु । जंव जंव सुरवाडु । भोगांचा या ४९ तंव तंव अधिकाधिकें । मरण आयुष्यातें जिंके । मीठ जेवीं उदकें । घांसिजेत असे ७५० तैसें जीवित्व जाये । तयास्तव काळु पाहे । हें हातोहातींचें न होये । ठाऊकें जया ५१ किंबहुना पांडवा । हा आंगींचा मृत्यु नित्य नवा । न देखे जो मांवा । विषयांचिया ५२ तो अज्ञानदेशींचा रावो । या बोला महाबाहो । न पडे गा ठावो । आणिकांचा ५३ पैं जीवितांचेनि तोषें । जैसा कां मृत्यु न देखे । तैसाचि तारुण्यें तोखे । जरा न गणी ५४ कडेंाडीं लोटला गाडा । कां शिखरौनि सुटला धोंडा । तैसा न देखे जो पुढां । वार्धक्य आहे ५५ कां आडवोहळा पाणी आलें । कां जैसें म्हैसयांचें झुंज मातलें । तैसें तारुण्याचें चढलें । भुररें जया ५६ पुष्टि लागे विघरों ।

पली असी स्थिति होण्याचें कारण काय याचा खेद सुद्धां वाटत नाहीं; ३२ आईच्या गर्भाशयामध्यें विष्टेच्या घरांत नऊ महिनेपर्यंत जो उकडला जातो, ३३ तो त्या गर्भांतील दुःख किंवा उदरांतून बाहेर निघते समयींचें दुःख यांविषयीं कांहींच स्मरण बाळगीत नाहीं. ३४ मांडीवर घेतलेलें मूल मलमूत्रांच्या चिखलांत लोळत असतांना पाहूनही ज्याला चिळस न येऊन त्रासही उत्पन्न होत नाहीं; ३५ हल्लीं ज्या जन्मांत आपण आहों तो, व पुढें येणारा जन्म, यांविषयीं ज्याचे मनांत कांहींही विचार उत्पन्न होत नाहीं; ३६ [ मृत्योरदर्शनं ] आणि त्याचप्रमाणें आपले तारुण्याचे भरांत पुढें येणारें मृत्यूबद्दल जो कांहींही काळजी बाळगीत नाहीं. ३७ आपल्या जीवितावर पूर्ण विश्वास ठेवून या जगांत मृत्यु म्हणून कोणी एक आहे याबद्दल ज्याचे मनांत बिलकूल विचार नसतो; ३८ डबकें आटणार नाहीं अशा समजुतीनें जसा त्यांतील मासा मोठ्या डोहांत जात नाहीं; ३९ किंवा पारध्याच्या गाण्यास भुलून मृग जसा पारध्याकडे पहात नाहीं अथवा मासा हा गळास लावलेल्या आमिषाचे आंत गळ आहे असें न समजतां तें खाऊन मरतो; ७४० किंवा दिव्याच्या ज्योतीनें आपण जळून जाऊं असें न समजतो पतंग त्यावर झडप घालतो; ४१ घर जळत असतांही एकादा मूर्ख निद्रेच्या भरांत तिकडे लक्ष देत नाहीं; किंवा ज्या अन्नांत विष घातलें आहे तें अन्न न समजतां एकादा निर्धास्तपणानें खातो, ४२ त्याप्रमाणें, जीविताचे रूपानें हा मृत्यूच आला असें जो विषयसुखाचे भरांत जाणत नाहीं; ४३ आपल्या शरीराचा पुष्टपणा, रात्र व दिवस यांचा उपयोग, आणि विषयसुख हीं मोठ्या प्रौढीनें सत्य मानितो; ४४ परंतु बिचारा असें समजत नाहीं कीं, वेश्या आपल्यास तन मन अर्पण करिते, तें तिचें करणें वरकांती असून, उलट आपणास सुबाडण्याचाच तो मार्ग आहे! ४५ वाटेनें जातांना संवचोरांची गांठ पडल्यावर त्यानें आपल्यास वरकांती मैत्री दाखविणें म्हणजे ती खरोखर मैत्री नसून रानांत गेल्यावर आपला प्राण घेणेंच होय; व मातीचें चित्रास स्नान वगैरे घालून पूजन करणें म्हणजे त्याचा नाश करणेंच होय; ४६ पंडुरोगानें मनुष्य लठ्ठ झाला म्हणजे तो सशक्त नसून त्याचें आयुष्य संपलें असें समजावें; त्याप्रमाणें जो आहार व निद्रा यांत गर्क होऊन, त्यांपासून आपला नाश आहे असें समजत नाहीं; ४७ सुळी देण्याकरितां नेत असलेला मनुष्य समोर सूळ पाहिल्यावर त्याकडे धांवत जाऊं लागला म्हणजे तो आपल्या प्रत्येक पावलास मृत्यु जवळ करतो; ४८ त्याप्रमाणें देह जों जों वाढेल, आयुष्य जों जों वृद्धिंगत होईल व जों जों या विषयसुखांत निमग्न होईल ४९ तों तों मरण आयुष्यास जिंकील; आणि मीठ ज्याप्रमाणें पाण्यांत टाकल्यावर विरघळतें, ७५० त्याप्रमाणें जों जों आयुष्य वाढेल तों तों तें काळ जवळ आणील, व तो आपल्यास हातोहात घेऊन जाईल, हें ज्याला समजत नाहीं. ५१ अर्जुना, आयुष्याच्या वृद्धीपासून आपला मृत्यु रोज जवळ जवळ येत आहे हें ज्याला विषयांच्या भुलीनें समजत नाहीं, ५२ तो, हे महाबाहो अर्जुना, अज्ञानरूप देशाचा राजा या म्हणण्यांत कांहीं शंका नाहीं. ५३ [ जरादि अदर्शनं ] ज्याप्रमाणें तो आयुष्याच्या भरांत पुढें येणाऱ्या मृत्यूबद्दल विचार करीत नाहीं, त्याचप्रमाणें तारुण्याच्या भरांत पुढें येणाऱ्या म्हातारपणाबद्दलही काळजी करीत नाहीं. ५४ डोंगराच्या कड्यावरून गाडी लोटल्यावर किंवा पर्वताच्या शिखरावरून धोंडा सुटल्यावर त्याला ज्याप्रमाणें आपलें पुढें काय होईल हें माहीत नसतें त्याप्रमाणें जो आपल्यास वार्धक्य येऊन आपली काय स्थिति होईल याकडे लक्ष देत नाहीं. ५५ किंवा आडरानांतील ओढ्यास लोंढा आल्यावर त्यांतून पलीकडे जातां येत नाहीं; इतक्या जोरानें तो वाहतो अथवा रेड्यांची टक्कर लागल्यावर ते उन्मत्त होऊन दुसऱ्यास जवळ येऊं देत नाहीत, त्याप्रमाणें ज्याच्या अंगावर तारुण्याची धुंदी चढलेली असते; ५६ शरीरसंपत्ती कमी होते, अंगावरील

१ लत. २ गर्भगुहेंत. ३ दारुण्यांत, घरांत. ४ मांडीवर. ५ घृणा, शिसारी. ६ वमन, भरभराट, भर. ७ डबक्यांतला. ८ आटणार नाहीं. ९ जात नाहीं. १० पारध्याच्या गाण्याच्या. ११ मांसाचा गोळा. १२ माशानें. १३ प्रकाशाच्या, चकचकाटानें. १४ मूर्ख. १५ जेवतो. १६ आयुष्याच्या १७ रजोगुणी सुखानें. १८ तन, मन आणि धन अर्पण करणें. १९ ठगाची सोबत, संगती. २० मातीच्या चित्राला. २१ आंघोळ घालणें. २२ सुळाच्या. २३ विस्तार. २४ अनुकूलता. २५ विरघळतें. २६ यमाला. २७ भुलीनें, कपटें. २८ संतोषानें. २९ म्हातारपण. ३० डोंगराच्या कड्यावरून. ३१ आडरानांतल्या ओढ्यास ३२ रेड्यांचें. ३३ वेड, भुरळ, धुंदी. ३४ नाश पावूं, कमी होऊं लागते.

क्रांति पाहे निसरों । मस्तक आदरीं शिरे[2] । भागीं कंप ५७ दाढी साउळ[3] धरी । मान हालौनि वारी । तरी जो करी । प्रायेचां पैसु[4] ५८ पुढील उरीं आदळे । तंव न देखे जेवीं आंधळें । कां डोळ्यावरले निगळे[8] । आळशी तोषे ५९ तैसें तारुण्य आजिचें । भोगितां वृद्धाप्य पाँहेचें । न देखे तोचि साचें । अज्ञानु गा ७६० देखे अक्षमें कुब्जें । कीं विटांवू[10] लागे फुंजे[11] । पारि न म्हणे पौंहें[12] माझें । ऐसेंचि भवे ६१ आणि आंगीं वृद्धाप्यतेची[13] । संज्ञा ये मरणांची । पारि जया तारुण्याची । भुली[14] न फिटे ६२ तो अज्ञानाचें घर । हें साचचि घे उत्तर । तेवींचि परियेसीं थोर । चिन्हें आणिक ६३ तारि वाघाचिये अंडवे[15] । एक वेळ आला चरोनि दैवें । तेणें विश्वासें पुढती धांवें । वसूं[16] जैसा ६४ कां सर्पघरा[17]आंतु । अवचटें ठेवा आणिला स्वस्थु । येतुलियासाठीं निश्चितु । नास्तिकु होय ६५ तैसेंचि अवचटें हें । एकदोनी वेळां लाहे । एथ रोगें एक आहे । हें मानीना जो ६६ वैरिया नीद आली । आतां द्वंद्वें[19] साझीं सरलीं । हें मानी तो सेंपिलीं[20] । मुकला जेवीं ६७ तैसी आहारनिद्रेची उंजरी[21] । रोग निवांतु जोंवरी । तंव जो न करी । व्याधींची चिंता ६८ आणि स्त्रीपुत्रादिमेळें । संपत्ति जंव जंव फळे । तेणें रंजें[22] डोळे । जाती जयाचे ६९ सेवेंचि[23] वियोगु पडैल । [24]विळौनि विपत्ति येईल । हें दुःख पुढील । देखेना जो ७७० तो अज्ञान गा पांडवा । आणि तोहि तोचि जाणावा । जो इंद्रियें अव्हासवा[25] । चारी[26] एथ ७१ वयसे[27]चेनि उवायें[28] । संपत्तीचेनि सावायें[29] । सेव्यासेव्य जाये । सरकटितु[30] ७२ न करावें तें करी । असंभाव्य मनीं धरी । चिंतू नये तें विचारी । जयाची मती ७३ रिघे जेथ न रिघावें । मागें जें न घ्यावें । स्पर्शे जेथ न[31] लागावें । आंग मन ७४ न जावें तेथ जाये । न पाहावें तें जो पाहे । न खावें तें खाये । तेवींचि तोषे ७५ न धरावा तो संगु । न लगावें तेथ लागु । नाचरावा तो मार्गु । आचरे जो ७६ नायकावें तें आइके । न बोलावें तें बके[32] । पारि दोष होतील हें न देखे । प्रवर्तता ७७ अंगा मनासि रुचियावें । येतुलेनि कृत्याकृत्य नाठवे । जो करणेंयाचेनि नांवें । भलतेंचि करी ७८ पारि पाप मज होईल । कां नरकयातना येईल । हें कांहींचि पुढील । देखेना जो ७९ तयाचेनि आंगेंलगें[33] । अज्ञान जगीं दोंदुगें[34] । जें सज्ञानाहि संगें । झोंबों सके ७८० परी असो हें आइक । अज्ञान-

तेज लोपतें, व डोकें मानेबरोबर हालूं लागतें; ५७ दाढी पांढरी होऊन, मान नाहीं नाहीं म्हणण्याप्रमाणें उगीच हालतें, अशी स्थिति झाली असतांही जो आशा वाढवितो. ५८ अंधळ्याला ज्याप्रमाणें पुढें असलेला खांब उरावर आदळेपर्यंत समजत नाहीं, किंवा डोळ्याजवळ झाडावरून पडलेलें जांभुळ दुसऱ्यानें तोंडांत घातलें असतां जो आळशी संतोष पावतो, परंतु आपण खटपट करीत नाहीं, ५९ त्याप्रमाणें तारुण्याचा उपभोग घेत असतां पुढें येणाऱ्या म्हातारपणाबद्दल जो विचार करीत नाहीं, तो केवळ अज्ञानरूपच होय. ७६० [ इयःध्यदर्शनं ] तारुण्याचे भरांत, कोणी अंधळा अगर कुबड वांकलेला मनुष्य दिसला, तर तो त्यास वेडावून दाखवितो; परंतु पुढें आपलीही अशीच स्थिति होईल असें मनांत आणीत नाहीं; ६१ आणि मरणाची खूण जें म्हातारपण, तें जरी प्राप्त झालें, तरी जो तारुण्याची घमेंडी सोडीत नाहीं, ६२ तो पुरुष अज्ञानाचें घर आहे असें पक्कें समज. त्याचप्रमाणें, अज्ञानाचीं आणखी कांहीं ठोकळ लक्षणें सांगतों, तीं ऐक. ६३ घाघाचे रानांतून एक वेळ बैल चरून नाशिबानें सुखरूप घरी परत आला असतां विश्वासानें तो ज्याप्रमाणें त्या रानांत फिरून चरावयास जातो; ६४ अथवा ज्या घरांतील संपत्तीवर सर्प बसला आहे, त्यांतील ठेवा सर्पदंश न होतां एकादानें आणिला म्हणजे तो 'संपत्तीवर सर्प बसतो' या गोष्टीवर विश्वास ठेवीत नाहीं; ६५ त्याप्रमाणें, कांहीं कालपर्यंत आपलें शरीर निरोगी आहे एवढ्या घमेंडीवर पुढें रोग येतील हें सत्य मानीत नाहीं, ६६ आपला वैरी निजला आहे, तेव्हां आतां त्याचें व आपलें वैर संपलें असें जर कोणी मानील आणि त्या भरंवशावर स्वस्थ बसेल तर तो वैरी जागृत झाल्यावर ज्याप्रमाणें आपल्या मुलांबाळांसह जीवास मुकेल, ६७ त्याप्रमाणें, जोंपर्यंत भूक व झोंप चांगली लागत आहे, व जोंपर्यंत रोगराई वगैरे कांहीं झालें नाहीं, तोंपर्यंत, आपल्यास वृद्धापकाळीं रोग वगैरे जडतील याची जो काळजी बाळगीत नाहीं, [ दुःखादर्शनं ]
६८ आणि स्त्रीपुत्रादि व संपत्ति ही जों जों जास्त मिळूं लागतात, तों तों ज्याच्या डोळ्यांवर अधिकाधिक धूर चढून डोळे धुंद होतात, ६९ आणि स्त्रीपुत्रादिकांचा वियोग एका क्षणांत होईल व एका क्षणांत संपत्ति जाऊन विपत्ति येईल, हें पुढील दुःख जो पहात नाहीं, ७७० तो अज्ञानी होय. आणि अर्जुना, जो या मृत्युलोकीं इंद्रियांना स्वस्थ चरूं देतो, [ स्वैर वर्तन करूं देतो ] तोही केवळ अज्ञानरूपच समजावा, ७१ जो तारुण्याचे भरांत संपत्तीच्या मदानें सेव्यासेव्य वस्तूंचा विचार न करितां सरसकट त्यांचा उपभोग घेतो; ७२ जी गोष्ट करूं नये ती करतो, असंभाव्य गोष्टींची हांव धरितो, आणि ज्या गोष्टींबद्दल विचार करूं नये अशा गोष्टी नेहमीं मनांत आणितो; ७३ जेथें प्रवेश करूं नये तेथें शिरकाव करतो, जी घेऊं नये ती मागतो, आणि ज्या गोष्टी मनांत सुद्धां आणूं नयेत किंवा ज्यांस स्पर्शही करूं नये, त्या करतो; ७४ जेथें जाऊं नये तेथें जातो, पाहूं नये तें पहातो, खाऊं नये तें खातो, आणि याप्रमाणें वर्ज्य केलेल्या गोष्टी केल्यानेंच ज्याचा संतोष होतो; ७५ ज्याची संगत धरूं नये त्याची संगत धरतो, ज्या ठिकाणीं संबंध असूं नये त्या ठिकाणीं संबंध ठेवतो, आणि ज्या मार्गाचें आचरण करूं नये तो मार्ग आचरितो; ७६ जें ऐकूं नये तें ऐकतो, बोलूं नये तें बडबडतो, परंतु या गोष्टी केल्यानें आपल्या हातून दोष घडतील असें मनांतही आणीत नाहीं, ७७ आपल्या मनांत येईल व आपल्यास सुखावह होईल, तीच गोष्ट करण्याकडे लक्ष असल्यामुळें, जो बरीवाईट गोष्ट करण्याबद्दल मुळींच विचार करीत नाहीं; आणि यामुळें भलत्याच गोष्टीचें आचरण करितो; ७८ परंतु आपले हातून पाप घडेल, किंवा आपल्याला नरकयातना सोसाव्या लागतील, या पुढील गोष्टींबद्दल जो विचार करीत नाहीं, ७९ त्या धर्मभ्रष्टाच्या संगतीनें सर्व जगांत अतिशय अज्ञान पसरतें आणि तें इतकें वाढतें कीं, ज्ञानीपुरुषासही तें आपल्या बळानें मागें हटवूं शकतें. ७८०

१ निःशेष लोप होऊं लागतें. २ मस्तकप्रांतीं. ३ पांढरेपण, पांडुरता. ४ तारुण्याचा मद. ५ विस्तार. ६ नगळतें. ७ उघांचें. ८ अडाक, आंधळें. ९ कुबड आलेला. १० वेडावूं लागतो. ११ अभिमानानें, तोऱ्यानें. १२ उघां. १३ वृद्धत्व हीच मरणाची खूण. १४ भ्रम; घमेंड. १५ रानांत. १६ पेळ. १७ सर्पानें बिळांतून, घरांतून. १८ सर्प. १९ मांडणें. २० मुलांबाळांसह. २१ वाढ, उत्कर्ष, चांगुलपणा. २२ रजोगुणात्मक विषयानें. २३ तात्काळ. २४ वेव्हानें. २५ पाहिजे तशी. २६ पोषितो. २७ तारुण्याच्या. २८ उत्कर्षानें, सुखांत. २९ साह्यानें, सहवासानें. ३० सरसकट भक्षण करीत. ३१ स्पर्श करूं नये. ३२ बडबडतो. ३३ समागमानें. ३४ पसरतें.

चिन्हें आणिक । जेणें तुज सम्यक । जाणावें तें ८१ तरी जयाची प्रीति पुरी । गुंतली देखसी घरीं । नवगंधकेसरीं । भ्रमरी जैशी ८२ साकरेचिया राशीं । बैसली नुठे माशी । तैसेनि स्त्रीचित्त आवेशीं । जयाचें मन ८३ ठेला बेडूक कुंडीं । मशक गुंतला शेंबुडीं । जैसा ढोरु सबुडबुडीं । रुतला पंकीं ८४ तैसें घरींहूनि निघणें । नाहीं जीवें मनें प्राणें । जया साप होऊनि असणें । भाटीं तिये ८५ प्रियोत्तमाचिया कंठीं । प्रमदा घे आंटी । तैशी जीवेंसी कोंपटी । धरूनि ठाके ८६ मधुरसोद्देशें । मधुकर जचे जैसे । गृहसंगोपन तैसें । करी जो गा ८७ म्हातारपणीं जालें । रत्न आणिक एक उपाइलें । तयाचें कां जेतुलें । मातापितरां ८८ तेतुलेनि पाडें पार्था । घरीं जया प्रेमआस्था । आणि स्त्रीवांचूनि सर्वथा । जाणेना जो ८९ तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडोनियां सर्वभावें । कोण मी काय करावें । कांहीं नेणे ७९० महापुरुषाचें चित्त । जालिया वस्तुगत । ठाके व्यवहारजात । जयापरी ९१ हानि लाज न देखे । परापवादु नाइके । जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ९२ चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेनि छंदें नाचे । माकड गारुडियाचें । जैसें होय ९३ आपणपेंही शिणवी । इष्टमित्र दुखवी । मग कवडाचि वाढवी । लोभी जैसा ९४ तैसा दानपुण्यें खांची । गोत्रकुटुंबा वंची । परी औरी भरी स्त्रियेची । उणी हों नेदी ९५ पूजितीं दैवतें जोगावी । गुरूतें बोले झकवी । मायबापां दावी । निदारपण ९६ स्त्रियेच्या तरी विखीं । भोगसंपत्ती अनेकीं । आणी वस्तु निकी । जे जे देखे ९७ प्रेमाथिलेनि भक्तें । जैसेनि भजिजे कुळदैवतें । तैसा एकाग्रचित्तें । स्त्री जो उपासी ९८ साच आणि चोख । तें स्त्रियेसीचि अशेख । येरांविषयीं जोगावणूक । तेही नाहीं ९९ इयेतें हन कोणी देखेल । इयेसी वेखासें जाईल । तरि युगचि बुडेल ऐसें जया ८०० नायट्यांभेण । न मोडिजे नागांची आण । तैसी पाळी उणखुण । स्त्रियेची जो १ किंबहुना धनंजया । स्त्रीचि सर्वस्व जया । आणि तियेचियां जालियां । लागीं प्रेम २ आणिकही जें समस्त । तियेचें संपत्तिजात । तें जीवाहूनि आप्त । मानी जो कां ३ तो अज्ञानासी मूळ । अज्ञाना त्याचेनि बळ । हें असो केवळ । तो तेंचि रूप ४ आणि मातलिया सागरीं । मोकलिलिया तरी । लाटांच्या येरझारीं । आंदोळे जेवीं ५ तेवीं प्रिय वस्तु पावे । आणि सुखें जो उंचावे । तैसाचि अप्रियासवें । तळवटु घे ६ ऐसेनि जयाचे चित्तीं ।

पण हें असो. ज्या योगानें तुला अज्ञानाचें स्वरूप स्पष्ट समजेल अशी त्याची आणखी कांहीं लक्षणें सांगतों; तीं ऐक. ८१ [ आसक्तिः ] ज्याप्रमाणें भ्रमराचें चित्त नवीन उमललेल्या, कमळाच्या केसरावर आसक्त असतें, त्याप्रमाणें ज्याची प्रीति घरावर जडलेली असते ८२ ज्याप्रमाणें साखरेच्या राशीवरून माशी उठत नाहीं, त्याप्रमाणें ज्याचें मन स्त्रीवर आसक्त झालेलें असतें; ८३ ज्याप्रमाणें बेडूक पाण्याच्या कुंडांतून बाहेर पडत नाहीं, माशी शेंबडांत गुंतल्यावर बाहेर पडूं शकत नाहीं किंवा जनावर चिखलांत रुतल्यावर बाहेर निघूं शकत नाहीं, ८४ त्याप्रमाणें ज्याचें मन घरावरून दूर होत नाहीं, व जो मरणानंतर आपल्या घरांत साप होऊन बसतो; ८५ एकादी स्त्री आपल्या जिवलगाच्या गळ्यांत मिठी मारून बसते, त्याप्रमाणें जो आपलें खोपट जिवाशीं धरून बसतो; ८६ मधाचें संरक्षणार्थ मधमाशा जाच सोसतात, त्याप्रमाणें जो हवी तीं संकटें सोसून आपल्या घराचें संरक्षण करतो; ८७ म्हातारपणीं झालेलें, आणि त्यांतही एकुलतें एक असें मूल असलें म्हणजे त्याच्या आईबापांचें जितकें त्याच्यावर प्रेम असतें, ८८ तितकें त्याचें प्रेम घरावर असतें; [ पुत्रादिषु अभिष्वंगः ] आणि अर्जुना, ज्याला स्त्रीवांचून जगतांत दुसरी प्रिय वस्तु नाहीं; ८९ त्याचप्रमाणें, जो जिवाभावानें स्त्रीवर प्रेम करितो, आणि आपण कोण आहों, व आपलें सार्थक कशानें होईल हें कांहीं जाणत नाहीं; ७९० ज्याप्रमाणें सिद्ध पुरुषाचें चित्त ब्रह्मस्वरूपीं लीन झाल्यावर त्याचे सर्व व्यवहार थांबतात, ९१ त्याप्रमाणें ज्यानें आपलें सर्वस्व स्त्रीला विकलें आहे, तो आपली हानि, लोकलज्जा किंवा लोकांनीं केलेली निंदा इकडे लक्ष देत नाहीं. ९२ ज्याप्रमाणें माकड गारोड्याच्या ताब्यांत रहातें, त्याप्रमाणें जो मनांत स्त्रीचा ध्यास धरून तिच्याच छंदानें वागतो; ९३ आणि ज्याप्रमाणें आपण अतिशय कष्ट सोसून आप्त मंडळींना दुखवून कृपण मनुष्य द्रव्यच वाढवितो, ९४ त्याप्रमाणें दानपुण्य न करितां आपल्या कुटुंबांतील इतर मंडळींनाही फसवतो, परंतु आपल्या कुटुंबाची विषयेच्छा तृप्त करण्यांत उणेपणा होऊं देत नाहीं. ९५ —तेवढ्याकरितां कोणाला कसें फसवितो तें पहा—आपल्या आराध्यदेवतेची साधारण सेवा करतो, गुरूला थापा देतो, व आईबापांनीं पैसे मागितले तर त्यांस 'शिल्लक नाहींत' म्हणून सांगतो; ९६ पण स्त्रीविषयीं म्हटलें तर जी जी उत्तम वस्तु पाहील, ती ती तिच्या उपभोगाकरितां घेऊन येतो; ९७ ज्याप्रमाणें प्रेमळ भक्त आपल्या इष्ट देवतेस भजतो, त्याप्रमाणें जो स्त्रीची एकाग्र चित्तानें सेवा करतो; ९८ जेवढ्या उत्तम व मौल्यवान् वस्तु, तेवढ्या सर्व स्त्रीलाच देतो, आणि कुटुंबांतील बाकीच्या माणसांना निर्वाहापुरत्या सुद्धां जिनसा देत नाहीं; ९९ स्त्रीकडे जर कोणी वांकड्या नजरेनें पाहील किंवा तिच्या विरुद्ध जाईल, तर ज्याला युगाचा अंत झाल्याप्रमाणें वाईट वाटतें; ८०० नायटे होतील या भीतीनें ज्याप्रमाणें नागाचे नवस फेडितात, त्याप्रमाणें जो स्त्रीची थुंकी झेलतो; १ अर्जुना, फार काय सांगावें! ज्याला स्त्री हेंच दैवत वाटतें, व जो तिजपासून झालेल्या पुत्रादिकांवर विशेष प्रेम करितो; २ आणखी तिचे जेवढे आप्तसंबंधी असतील त्यांना आपल्या जिवापलीकडील समजतो; ३ तो अज्ञानाचें मूळ आहे, व त्याच्याचमुळें अज्ञानाची वृद्धि होते. फार काय सांगावें! तो केवळ अज्ञानरूपच होय. ४ [ असमाचित्तत्वं ] ज्याप्रमाणें खवळलेल्या समुद्रांत घातलेली नौका लाटांमुळें हेलकावे खाते, ५ त्याप्रमाणें जो आवडती वस्तु प्राप्त झाली असतां सुखाच्या शिखरावर चढतो, व नावडती वस्तु मिळाली असतां खालीं आपटतो; ६ याप्रमाणें हे महाबुद्धिमंता अर्जुना, ज्याचें चित्तांत वस्तूच्या

---

१ स्पष्ट. २ व्यापून, पोटाळून राहतें. ३ राहिलेला. ४ चिलट, माशी. ५ समूळ उद्धरणाऱ्या. ६ ओसाड जमिनींत, वस्तींत. ७ स्त्री. ८ मिठी. ९ खोपट. १० मधाच्या संरक्षणार्थ. ११ भुंगा. १२ जाच सोशी. १३ घराचें संरक्षण. १४ झालें, पुत्ररत्न. १५ कविच, बोणातिणीचें. १६ शिद्धाचें. १७ महागत. १८ निंदा. १९ मर्कटाकार वृत्तीची. २० धनच. २१ कमी करी. २२ कपट करितो. २३ थैली, मागणी. २४ फशीबरीं समजावितो. २५ दरिद्रता. २६ विषयीं. २७ आणतो. २८ चांगली. २९ प्रेमळ. ३० सांभाळ, भागवणूक, कसा तरी निर्वाह. ३१ विरुद्ध. ३२ नायटा होईल या भयानें. ३३ अनोगत, इच्छा. ३४ पुत्रादिकांवर, आप्तसंबंध. ३५ खवळलेल्या. ३६ नाव, होडी. ३७ डगमगते, हेलकावे खाते. ३८ तळ, बुड.

वैषम्यसाम्याची वारवती । वाहे तो महामती । अज्ञान गा ७ आणि माझ्या ठायीं भक्ती । फळालागीं जया आर्ती । धनोद्देशें विरक्ती । नटणें जेवीं ८ नातरी कांताच्या मानसीं । रिगोनि स्वैरिणी जैसी । राहाटे जारेंसीं । जावयालागीं ९ तैसा मातें किरीटी । भजती गा पाउटी । करूनि जो दिठी । त्रिषोसूये ८१० आणि भजिन्नलियासवें । तो विषो जरी न पावे । तरी सांडी म्हणे आघवें । टवाळ हें ११ कुणबट कुळवाडी । तैसा आन आन देव मांडी । आदिलाची परवडी । करी तया १२ तया गुरुमार्गा टेंके । जयाचा सुगरवा देखे । तरी तयाचा मंत्र शिके । येरु नेघे १३ प्राणिजातेंसीं निष्ठुरु । स्थावरीं बहु भरु । तेवींचि नाहीं एकसरु । निर्वाहो जया १४ माझी मूर्ति निफजवी । ते घराचे कोनीं बैसवी । आपण देवो देवी । यात्रे जाय १५ नित्य आराधन माझें । कौजीं कुळदेवता भजे । पर्वविशेषें कीजे । पूजा आना १६ माझें अधिष्ठान घरीं । आणि वोवसे आनाचे करी । पितृकार्यावसरीं । पितरांचा होय १७ एकादशीच्या दिवसीं । जेतला पाडु आम्हांसी । तेतुलाचि नागांसी । पंचमीच्या दिवशीं १८ चौथें मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये । चावदसी म्हणे माये । तुझाचि वो दुर्गे १९ नित्य नैमित्तिकें कर्में सांडी । मग बैसे नवचंडी । आदित्यवारीं वोढी । बहिरवा पात्रीं ८२० पाठीं सोमवार पावे । आणि बेलेंसी लिंगा धांवे । ऐसा एकलाचि आघवे । जोगावी जो २१ ऐसा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी । अवघेन गांवद्वारीं । अहेव जैसी २२ ऐसेनि जो भक्तु । देखसी सैरा धांवतु । जाण अज्ञानाचा मूर्तु । अवतार तो २३ आणि एकांतें चोखटें । तपोवनें तीर्थें तटें । देखोनि जो गा विटे । तोहि तोची २४ जया जनपदीं सुख । गजबजेचें कवतिक । वानूं आवडे लौकिक । तोहि तोची २५ आणि आत्मा गोचरु होये । ऐसी जे विद्या आहे । ते आइकोनि डौर वाहे । विद्वांसु जो २६ उपनिषदांकडे न वचे । योगशास्त्र न रुचे । अध्यात्मज्ञानीं जयाचें । मनचि नाहीं २७ आत्मचर्चा एकी आथी । ऐसिये बुद्धीची भिंती । पाडूनि जयाची मती । वोढाळ जाहली २८ कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें । ज्योतिषी तो म्हणे । तैसेंचि होय २९ शिल्पीं अति निपुण । सूपकर्मींही प्रवीण । विधि आथर्वण । हातीं आथी ८३० कोकीं नाहीं ठेलें । भारत कैरीं म्हणितलें । आगम आफाविले । मूर्त होतां ३१ नीतिजात सुझे । वैद्यकही बुझे ।

लाभालाभांपासून चिंता उत्पन्न होते, तो अज्ञानी होय.
७ [ व्यभिचारिणी भक्तिः ] आणि जो माझी भक्ति
करतो; परंतु मनांत फलांची इच्छा धरतो, आणि बाहेरून
विरक्तपणा दाखविणारा मनुष्य ज्याप्रमाणें अंतर्यामीं
धनाची इच्छा करितो, ८ किंवा व्यभिचारिणी स्त्री
आपलें जारकर्म चालविण्याकरितां पतीच्या पुढें पुढें
करून त्याची मर्जी संपादिते, ९ त्याप्रमाणें, हे किरटी,
मजवर भक्ति आहे असें दाखवून जो विषयाकडे दृष्टी
ठेवितो, ८१० आणि विषयप्राप्तीकरितां माझी भक्ति
करून विषयप्राप्ति झाली नाही तर माझी भक्ति
सोडून देऊन 'ईश्वर खोटा आहे' अशी माझी
टवाळी करितो. ११ कुणबी जशी आपली शेतकी
बदलवितो, तसा हा पुष्कळ देवांची सेवा करितो;
व पहिल्या देवाप्रमाणेंच दुसऱ्या देवांचीही परवड करितो,
१२ ज्याचे ठिकाणी विशेष थाटमाट आहे अशा गुरु-
वर भक्ति ठेवून त्याजपासून गुरुमंत्र घेतो व इतरांला
विचारीत नाही; १३ प्राणिमात्राबरोबर कठीण शब्द
बोलून त्यांचा तिरस्कार करतो, व पाषाणाच्या मूर्तीवर
विशेष प्रेम करितो; तसेंच ज्याला एकनिष्ठपणानें भक्ति
करून रहावत नाही; १४ माझी मूर्ति तयार करून तिची
घराच्या एका कोपऱ्यांत स्थापना करितो, आणि आपण
इतर देवांच्या यात्रा करीत हिंडतो; १५ रोज माझी
पूजा करितो; कार्यप्राप्तीकरितां कुळदेवतेची पूजा करितो;
आणि एकादी पर्वणी आली असतां तिसऱ्याच देवाची
पूजा करितो; १६ मी घरांत असतांना दुसऱ्या देवाला
नवस करितो, खेटया घालतो, व श्राद्धकाळीं पितरांची पूजा
करितो; १७ एकादशीच्या दिवशी जशी माझी भक्ति करि-
तो, तसाच नागपंचमीच्या दिवशी नागास भजतो; १८
चतुर्थीचे दिवशी गणपतीची पूर्ण भक्ति करितो व चतुर्द-
शीचे दिवशी देवीचें पूजन करून, 'हे अंबे, मी तुझा
आहें,' अशी तिची प्रार्थना करितो; १९ नित्यनैमित्तिक
कर्में अवश्य केली पाहिजेत तीं टाकून देऊन नवरात्रांत
नवचंडीचा पाठ एके जागीं बसून करितो; आदित्यवार
आला म्हणजे बहिरोबाच्या नांवानें खिचडा वाटतो;
८२० पुढें सोमवार आला म्हणजे बेल घेऊन शंकरास
वाहण्याकरितां जातो; व याप्रमाणें जो एकटाच सर्व देवांची
सेवा करितो; २१ ज्याप्रमाणें गांवांतील वेश्या आपली
प्रीति दाखवून सर्वांचें मन आकर्षण करून घेते,
त्याप्रमाणें जो क्षणभरही स्वस्थ न बसतां विषयप्राप्ती-
करितां सर्व देवांचें पूजन करितो, २२ याप्रमाणें जो देवांची
भक्ति करीत चोहोंकडे धांवत असतो, तो अज्ञानाचा
अवतारच होय; २३ [ अविविक्त देशसेवित्वं ]
आणि उत्तम एकांतस्थानें, तपोवनें, तीर्थें व तटें हीं
पाहून ज्यांचें मन विटतें, तोही केवळ अज्ञानरूपच होय.
२४ [ जनसंसदि अरतिः ] ज्याला शहरांत रहा-
ण्यानें सुख होतें, पुष्कळ मंडळींत बसणें आवडतें; व
लौकिकांतील गोष्टी सांगण्याची हौस वाटते; तोही केवळ
अज्ञानरूपीच होय. [ आध्यात्मज्ञाननित्यत्वाभावः ]
२५ आणि जो अशा प्रकारचा विद्वान् असतो की, ज्या
विद्येपासून आत्म्याची प्राप्ति होते, ती ऐकूं आली असतां
उपहास करून ती कानीं पडूं देत नाही. २६ उपनिष-
दांकडे जो पहात नाहीं, योगशास्त्र ज्याला आवडत नाहीं,
व अध्यात्मज्ञानाकडे ज्याचें लक्ष जात नाहीं; २७ ज्या
बुद्धीपासून आत्मानात्म निरूपण होतें, ती बुद्धि टाकून
ज्याचें मन इतर सर्व शास्त्रांकडे ओढ घेतें; २८ जो कर्म-
कांड पूर्णपणें जाणतो, ज्याला पुराणें मुखोद्गत आहेत,
आणि ज्योतिषांत तर इतका निपुण आहे की, तो
म्हणेल तसेंच व्हावयाचें ! २९ जो कलाकौशल्यशास्त्रांत
अति निष्णात आहे; पाकशास्त्रांत प्रवीण आहे आणि
जारण, मारण, उच्चाटण व वशीकरण हीं म्हणजे केवळ
ज्याच्या हातच्या मळ आहेत, ८३० कामशास्त्रांत जो पक्का
दर्दी आहे, एकादी गोष्ट ऐकली असतां तिजविषयीं
भारताप्रमाणें व्याख्यान करतो; व शास्त्रें ज्याचेपुढें
मूर्तिमंत उभीं रहातात; ३१ जो नीतिजात उत्तम
जाणतो, वैद्यशास्त्रांत जो निपुण आहे आणि काव्य.

१ लाभालाभाची. २ चिंता. ३ इच्छा. ४ व्यभिचारिणी.
५ रीत, पद्धत. ६ घालतो, ठेवितो. ७ लबाड, खोटें,
कूट. ८ प्रकार. ९ थाटमाट, डौलपण. १० पाषाणादि
प्रतिमेवर. ११ एकनिष्ठपणा. १२ कार्यापुरतें. १३ दुस-
ऱ्याची. १४ स्थापना. १५ नवस. १६ श्राद्धकाळीं.
१७ भक्ति. १८ गणेशचतुर्थी. १९ चतुर्दशीच्या दिवशीं.
२० नवरात्र, चंडीपाठादि करावयास. २१ खिचडा वाटतो.
२२ समजावितो. २३ सर्व प्रकारें. २४ अखंड सौभाग्यवती
वेश्या. २५ चोहोंकडे. २६ मनुष्यवस्तींत. २७ प्रत्यक्ष.
२८ भराड्याचें वाजविण्याचें वाद्य, तद्वत् बडबड करतो.
२९ आत्मानात्म-निरूपण. ३० मनसोक्त वागणारी. ३१
कलाकौशल्यांत. ३२ पाककर्मांत. ३३ जारण, मारण उच्चा-
टण व वशीकरण. ३४ अथर्वण वेदप्रतिपादक. ३५ काम-
शास्त्रांत. ३६ व्याख्यान करितो. ३७ शास्त्र. ३८ आपलेंसें
केलें. ३९ समजतो. ४० जाणतो.

काव्यनाटकीं दुजें। चतुर नाहीं ३२ स्मृतींची चर्चा । दंशु जाणे गारुडियाचा ।
निघंटु प्रज्ञेचा । पाईकी करी ३३ पैं व्याकरणीं चोखडा । तर्कीं अतिगाढा ।
पारि एक आत्मज्ञानीं फुंडा । जात्यंधु जो ३४ तैं एकवांचूनि आघवां शास्त्रीं ।
सिद्धांत निर्माणधात्री । पारि जळो तें मूळनक्षत्रीं । न पाहें गा ३५ मोराआंगीं
अशेषें । पिसें असती डोळसें । पारि एकली दृष्टि नसे । तैसें तें गा ३६ जरी पर-
माणूएवढें । संजीवनीमूळ जोडे । तरी बहु काय गाडे । भरणें येरें ३७ आयु-
ष्यावीण लक्षणें । सिसेंवीण अळंकरणें । वोहरेंवीण वाधावणें । तो विटंबु गा
३८ तैसें शास्त्रजात जाण । आघवेंचि अप्रमाण । पार्था अध्यात्मज्ञानेंविण ।
एकलेनी ३९ यालागीं अर्जुना पाहीं । अध्यात्मज्ञानाच्या ठायीं । जया नित्य-
बोधु नाहीं । शास्त्रमूढा ८४० तया शरीर जें जालें । तें अज्ञानाचें बीं विरू-
ढलें । तयाचें व्युत्पन्नत्व गेलें । अज्ञानवेलीं ४१ तो जें जें बोले । तें अज्ञा-
नचि फुलले । तयाचें पुण्य जें फळलें । तें अज्ञान गा ४२ आणि अध्यात्मज्ञान
कांहीं । जेणें मानिलेंचि नाहीं । तो ज्ञानार्थु न देखे काई । हें बोलावें असे ४३
ऐलीचि थडी न पवतां । पळे जो माघौता । तया पैलद्वीपींची वार्ता । काय
होय ४४ कां दारवंठांचि जयाचें । शीर रोंविलें खोंचे । तो केवीं परिवरींचें । ठे-
विलें देखे ४५ तेवीं अध्यात्मज्ञानीं जया । अनोळख धनंजया । तया ज्ञानार्थु
देखावया । विषो[21] काई ४६ म्हणोनि आतां विशेषें । तो ज्ञानाचें तत्त्व न देखे ।
हें सांगावें आंखेंलेखें । न लगे तुज ४७ जेव्हां सगर्भे वाढिलें । तेव्हांचि पोटींचें
धालें । तैसें मागिले पदें बोलिलें । तेंचि होय ४८ वांचूनियां वेगळें । रूप क-
रणें हें न मिळे । जेवीं अंवतिलें आंधळें । तें दुजेनसीं ये ४९ एवं इयें उप-
रतां । अज्ञानचिन्हें मागुती । अमानित्वादि प्रभृती । वाखाणिलीं ८५० जे ज्ञान-
पदें अठरा । केलिया येरी मोहरा । अज्ञान या आकारा । सहजें येती ५१ मागां
श्लोकाचेनि अर्धार्धें । ऐसें सांगितलें श्रीमुकुंदें । ना उफैराटीं इयें ज्ञानपदें । तेंचि
अज्ञान ५२ म्हणोनि इया वाहणीं । केली म्यां उपलवणी । वांचूनि दुधा मेळ-
ऊनि पाणी । फार कीजे ५३ तैसें जी न बडबडीं । पदाची कोर न सांडीं ।
मूळध्वनीचिये वाढी । निमित्त जाहलों ५४ तंव श्रोते म्हणती राहें । कें पारि-
हारा ठावो आहे । बिहिसीं[21] कां वायें । कविपोषका ५५ तूतें श्रीमुरारी । म्हणितलें
प्रगट करीं । जे अभिप्राय गव्हेरीं । झांकिले आम्हीं ५६ तें देवाचें मनोगत ।

नाटकांत ज्याचा हात कोणी धरूं शकत नाही; ३२ स्मृतींची जो चर्चा करितो, गारोड्यांची मंत्रविद्या जाणतो, वेदांतील शब्दांचा कोश तर जणुंकाय याचा सेवकच! ३३ आणखी, जो व्याकरणांत निपुण आहे, व न्यायशास्त्रांत ज्याची मति गहन आहे, परंतु एक आत्मज्ञानाविषयीं जो जन्मांध आहे; ३४ तो त्या एका आत्मज्ञानाशिवाय इतर सर्व शास्त्रांतील सिद्धांतांना आधारभूत असेल, पण जळो तें त्याचें ज्ञान! तें म्हणजे सर्व लक्षणांनीं संपन्न असलेल्या पण मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या मुलीप्रमाणें होय. तूं तिकडे मुळींच लक्ष देऊं नको. ३५ ज्याप्रमाणें मोराच्या सर्वांगावरील पिसाऱ्यावर डोळे असतात, परंतु त्यांस एक दृष्टि नाहीं; त्याप्रमाणें त्याची ती सर्व विद्यासंपन्नता होय. ३६ मेलेल्या मनुष्यास जिवंत करणारी मुळी जर परमाणू एवढीही सांपडली, तर मग इतर गाडाभर मुळ्या करावयाच्या आहेत काय? ३७ उत्तम लक्षणें असून अल्पायुष्य असणें, किंवा मस्तकाशिवाय अलंकार घालणें; अथवा वधूवर असल्यावांचून वरधावा काढणें ही विटंबना होय; ३८ त्याप्रमाणें, पार्था, एक अध्यात्मज्ञानावांचून इतर सर्व शास्त्रें अप्रमाण होत. ३९ म्हणून, अर्जुना, तूं हें ध्यानांत धर कीं, ज्या पढतमूर्खाला आत्मज्ञानाचा निश्चयबोध नाहीं, ८४० त्या मनुष्याचें शरीर म्हणजे अज्ञानाचें वाढलेलें बीजच होय; आणि त्याची व्युत्पन्नता म्हणजे अज्ञानाच्या वेली होत. ४१ तो जें जें बोलतो, तें अज्ञानाचें फूलच होय; व तो जें पुण्यमार्गाचें आचरण करितो, तें अज्ञानाचें फळ होय. [ तत्त्वज्ञानार्थदर्शनाभावः ] ४२ आणि ज्याची अध्यात्मज्ञानावर श्रद्धा नाहीं, त्याला ज्ञानार्थ ( तत्त्वार्थ ) प्राप्त होत नाहीं हें बोलूनच का दाखविलें पाहिजे? ४३ नदीच्या अलीकडील कांठापर्यंतही न येतां जो माघारी जातो, त्याला पलीकडच्या कांठची बातमी कशी बरें कळेल? ४४ किंवा परांत शिरतांना उंबऱ्यांतच ज्याचें मस्तक कापून खांचेंत दडपलें, तो घरांत काय ठेवलें आहे हें कसें पाहील? ४५ त्याप्रमाणें अर्जुना, अध्यात्मज्ञानाची च ज्याची ओळखही नाहीं, त्याला ज्ञानार्थ ( तत्त्वार्थ ) पहावयास कसा विषय होईल? ४६ म्हणून, अशा मनुष्यास ज्ञानाचें तत्त्व कळत नाहीं, हें तुला विशेषेंकरून सडे मोडून सांगण्याचें कारण नाहीं. ४७ गरोदर स्त्रीला वाढलें तेव्हांच तिच्या उदरांतील गर्भाची तृप्ति झाली; त्याप्रमाणें, पूर्वी जी ज्ञानाची लक्षणें सांगितलीं तद्विरुद्ध ज्या गोष्टी तेंच अज्ञान होय; ४८ आंधळ्यास जेवणाचें आमंत्रण दिल्यावर ज्याप्रमाणें त्याच्याबरोबर दुसरा मनुष्य येतोच, त्याप्रमाणें, ज्ञानाचीं लक्षणें सांगितल्यावर अज्ञानाचेंही लक्षण आपोआप होतेंच. ४९ याप्रमाणें अमानित्वादिकांच्या उलट अज्ञानाचीं लक्षणें सांगितलीं; ८५० तीं ज्ञानाचीं अठरा लक्षणें उलटपक्षीं लाविलीं असतां स्पष्ट अज्ञानाचीं लक्षणें सिद्ध होतात. ५१ मागें अकराव्या श्लोकाच्या उत्तरार्धाच्या दुसऱ्या अर्धामध्यें श्रीमुकुंदांनीं सांगितलें कीं, "हीं ज्ञानाचीं लक्षणें; आणि यांचे उलट जीं लक्षणें, तें अज्ञान होय" ५२ म्हणूनच या प्रकारानें मी अज्ञान लक्षणांचा विचार केला; एऱ्हवीं दुधांत पाणी मिळवून दुध वाढवून काय करावयाचें? ५३ त्याचप्रमाणें, एक अक्षरही न सोडतां आणि व्यर्थ बडबड न करितां, मुळांत जो अर्थ होता, तोच मी विस्तारानें सांगितला. ५४ तेव्हां श्रोते म्हणतात, "हे कविपोषका; तुला परिहार देण्यास तुम्हाकडून असा काय अन्याय झाला आहे! ५५ तुला श्रीमुरारीनेंच सांगितलें आहे कीं, 'आम्ही जे अभिप्राय गुप्त स्थळीं झांकून ठेविले आहेत, ते तूं प्रकट कर.' ५६ तें देवाचें मनोगत आम्हांला तूं स्पष्ट करून सांगितलेंस असें जरी

१ मर्म, रहस्य. २ कोश. ३ बुडीचा. ४ चाकरी. ५ न्यायशास्त्रांत. ६ पुरा. ७ खरा. ८ प्रमाणभूत. ९ मूळनक्षत्रीं जन्मलेल्याप्रमाणें. १० नेत्राकार चिन्हयुक्त. ११ अमृत संजीवनीची मुळी. १२ मस्तकावांचून. १३ वधूवराशिवाय. १४ वाजंत्री वाजविणें, वरधावा किंवा वरात काढणें. १५ त्यांचा विद्वत्ता ही जणूं अज्ञानाची वेली तिच्या ठायीं. १६ परतीराची. १७ उंबऱ्यांतच. १८ दडपलें. १९ खांचेंत. २० आंबारांतले, घरांचें. २१ विषय. २२ आंवडे मोडून. २३ तृप्त झाली. २४ आमंत्रणानें बोलाविलें. २५ आपल्या बलट रीतीनें. २६ उलटपक्षीं. २७ अशा प्रकारें. २८ विस्तार. २९ कदा, कांठ, मर्यादा. ३० निरसन करण्याला. ३१ व्यर्थ कां भितोस? ३२ गुप्त स्थळीं.

दावित आहासी तूं मूर्त । हेंहीं म्हणतां चित्त । दाटैलें तुझें ५७ म्हणौनि असो हें न बोलों । पारि साविया गा तोषलों । जे ज्ञानतरिये मेळविलों । श्रवणसुखाचिये ५८ आतां इयावरी । जें तो श्रीहरी । बोलिला तें करीं । कथन वेगां ५९ इया संतवाक्यासरिसें । म्हणितलें निवृत्तिदासें । जी अवधारा तरी ऐसें । बोलिलें देवें ८६० म्हणती तुवां पांडवा । हा चिन्हसमुच्चयो आघवा । आयकिला तो जाणावा । अज्ञानभागु ६१ इया अज्ञानविभागा । पाठी देऊनि पैं गा । ज्ञानविखीं चांगा । दृढा होइजे ६२ मग निर्वाळिलेनि ज्ञानें । ज्ञेय भेटेल मनें । तें जाणावया अर्जुनें । आस केली ६३ तंव सर्वज्ञांचा रावो । म्हणे जाणोनि तयाचा भावो । पारिसें ज्ञेयाचा अभिप्रावो । सांगों आतां ६४

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते । अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥

तरि ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तु ते येणेंचि कारणें । जें ज्ञानेंवांचूनि कवणें । उपायें नये ६५ आणि जाणितलेयावरौतें । कांहींच करणें नाहीं जेथें । जाणणेंचि तन्मयातें । आणी जयाचें ६६ जें जाणितलेयासाठीं । संसारा काढूनियां कांठीं । जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाच्या ६७ तें ज्ञेय गा ऐसें । आदि जया नसे । परब्रह्म आपैसें । नाम जया ६८ जें नाहीं म्हणों जाइजे । तंव विश्वाकारें देखिजे । आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया ६९ रूप वर्ण व्यक्ती । नाहीं दृश्य द्रष्टा स्थिती । तरि कोणें कैसें आथी । म्हणावें पां ८७० आणि साचाचि जरी नाहीं । तरि महदादि कोणें ठाईं । स्फुरंत कैचें काई । तेणेंवीण असे ७१ म्हणोनि आथी नाथी हे बोली । जें देखोनि मुकी जाहली । विचारासी मोडली । वाट जेथें ७२ जैसी भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जें वस्तु ७३

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् । सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

आघवांचि देशीं कोळीं । नव्हतां देशकाळावेगळी । जे क्रिया स्थूळास्थूळीं । तेचि हात जयाचे ७४ तयातें याकारणें । विश्वबाहु ऐसें म्हणणें । जें सर्वांचि सर्वपणें । सर्वदा करी ७५ आणि समस्तांही ठायां । एके काळीं धनंजया । आलें असें म्हणोनि जया । विश्वांघ्रिनाम ७६ पैं सवितेया आंग डोळे । नाहींत वेगळे वेगळे । तैसें सर्वद्रष्टें सकळें । स्वरूपें जें ७७ म्हणोनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूच्या ठायीं पक्षु । बोलावया दक्षु । जाहला वेदु ७८ जें सर्वांचे

आम्हीं म्हटलें, तरी तुला त्यापासून गर्हिवर येईल ! ५७ म्हणून आम्ही आतां या सर्व गोष्टी सोडून देतों; पण सभ्यां तूं श्रवणसुखाची ज्ञाननौका आम्हांस प्राप्त करून दिलीस, त्या योगानें आम्हांस फार संतोष झाला आहे. ५८ आतां यापुढें "श्रीहरी काय बोलले तें आम्हांस लवकर कथन कर." ५९ हें संतांचें वाक्य ऐकल्याबरोबर निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणाले, तर ऐका. देव असें बोलले:– ८६० काय काय बोलले ? तर ते म्हणाले, अर्जुना, हीं जी तूं सर्व लक्षणें ऐकलीस, तीं अज्ञानाचीं होत. ६१ ह्या अज्ञानमार्गाकडे दुर्लक्ष करून तूं ज्ञानप्राप्तीविषयीं आपला निश्चय दृढ कर. ६२ मग त्या शुद्ध ज्ञानाच्या योगें तुला ज्ञेयाची प्राप्ति होईल." हें ऐकतांच अर्जुनानें तें जाणण्याविषयीं मनःपूर्वक इच्छा केली. ६३ तेव्हां सर्वज्ञांचा राजा श्रीकृष्ण यानें अर्जुनाच्या मनांतील भाव जाणून त्यास म्हटलें कीं, आतां तुला ज्ञेय म्हणजे काय तें सांगतों, ऐक. ६४

**अन्वयार्थ**—(यत् ज्ञेयं)-जें ज्ञेय-(तत्)-तें-(प्रवक्ष्यामि)-मी सांगतों.-(यत् ज्ञात्वा)-जें जाणून-(अमृतं)-अमरणभावास-(अश्नुते)-प्राप्त होतो-(अनादिमत्)-जें आदिमत् नसलेलें-(परं ब्रह्म)-निरतिशय ब्रह्म तें ज्ञेय होय.-(तत्)-तें-(न सत्)-सत् म्हटलें जात नाहीं-(न असत् उच्यते)-व असत् म्हटलें जात नाहीं. १२

हें पहा, ज्ञेय म्हणजे परमात्मवस्तु-त्याला ज्ञेय म्हणण्याचें कारण इतकेंच कीं; तें ज्ञानाशिवाय इतर कोणत्याही उपायानें प्राप्त होत नाहीं; ६५ आणि तें समजल्यावर मुमुक्षूस कांहीं कर्तव्य उरत नाहीं. कारण, ज्याचें ज्ञानच मुमुक्षूला तद्रूपतेला आणतें ( तें जाणल्याबरोबर तो तद्रूप होतो. ) ६६ जें जाणलें असतां मुमुक्षूंनी संसाराचा त्याग करून नित्यानंदांत निमग्न व्हावें, ६७ तें ज्ञेय असें आहे कीं, त्याला आदि नाहीं आणि त्याला साहजिकतःच परब्रह्म हें नांव आहे. ६८ तें नाहीं म्हणावयास जावें तर विश्वरूपेंकरून दृष्टीस पडतें, आणि विश्वच परब्रह्म असें म्हणावें, तर ही माया आहे ! ६९ त्याला रूप, वर्ण, आकार हे नाहींत; तसेंच तें दृष्टीस पडणारें नाहीं, व तें कशास पहातही नाहीं; तेव्हां 'तें आहे' असें कोणी व कसें म्हणावें ? ८७० बरें, तें नाहीं असें धरून चाललें, तर हीं महत्तत्त्वादि कोठून स्फुरण पावलीं ? आणि त्यावांचून दुसरें आहे तरी काय ? ७१ म्हणून त्यासंबंधानें 'आहे' 'नाहीं' असें कांहींच बोलतां न येऊन वेदांचीही वाणी मुकी झाली; आणि त्याच्या ठिकाणीं विचाराची वाट खुंटली ! ७२ ज्याप्रमाणें मातीपासून तयार केलेले डेरे, घागरी, परळ इत्यादिकांच्या आकाराप्रमाणें पृथ्वी दिसते, [ परंतु त्यांपासून निराळी आहे, ] त्याप्रमाणें ब्रह्म आपणच सर्व जग नटलेलें असून जगांत ओतप्रोत भरलेलें आहे; [ तथापि तें त्याहून भिन्न आहे. ] ७३

**अन्वयार्थ**—(तत्)-तें ज्ञेय-(सर्वतः पाणिपादं)-सर्व बाजूंनीं ज्याला हातपाय आहेत, असें आहे.-(सर्वतः अक्षिशिरोमुखं)-सर्व बाजूंनीं ज्याला नेत्र, मस्तकें व मुखें आहेत, असें आहे,-(सर्वतःश्रुतिमत्)-ज्याला सर्व बाजूंनीं श्रवणेंद्रियें आहेत, असें आहे.-(लोके)-या प्राणिसमुदायांत-(सर्वं)-सर्वाला-(आवृत्य)-व्यापून-(तिष्ठति)-तें तत्त्व रहातें. १३

सर्व देशांत सर्व कालीं स्थूल व सूक्ष्म वस्तुंपासून जी क्रिया होते, ती त्याच्या सत्तेनें होते; कारण तें सर्वत्र व्यापक आहे, म्हणून क्रियेचे हात तेंच आहे. ७४ त्या महात्म्या या कारणामुळेंच 'विश्वबाहु' असें म्हटलें आहे; कां कीं, तें सर्वत्र सर्वप्रकारें, सर्वदा क्रिया करवीत, असतें; म्हणजे त्याच्या सत्तामात्रेंकरून क्रिया होतात. ७५ आणि अर्जुना, तें सर्व ठिकाणीं एकसमयावच्छेदेंकरून असतें, म्हणूनच त्याला 'विश्वांघ्रि' हें नांव प्राप्त झालें आहे, ७६ ज्याप्रमाणें सूर्याला अंग व डोळे हे अवयव वेगळे नाहींत, त्याप्रमाणें जें सर्व आपल्या स्वप्रकाशानें पहातें म्हणजे भासवतें, ७७ म्हणूनच त्यास डोळे नाहींत; तरी वेदानें त्याला मोठ्या शहाणपणानें 'विश्वतश्चक्षु' असें म्हटलें आहे; ७८ जें सर्वांपेक्षां उंच व सर्व प्रकारें नित्य

१ मरून, गर्हिवरून येईल. २ सर्वथा. ३ ऐकण्यास सुखकारक अशी ज्ञाननौका आम्हास प्राप्त झाली. ४ लक्षणसमुदाय. ५ शुद्ध. ६ जाणण्यास योग्य वस्तु. ७ तदाकारतेस, तद्रूपतेस. ८ जाणलें असतां. ९ संसाराला कांठावर, तीरावर ठेवून. १० भासमान झाली, भासली. ११ डेरा, घागर, परळ इत्यादिकांत १२ सदासर्वकाळ आणि सर्वत्र. १३ न होतां. १४ स्थूल सूक्ष्मीं. १५ ज्याचे पाय सर्वत्र आहेत असा. १६ सर्वाला. १७ सर्वत्र पाहणारें. १८ सर्वत्र डोळे असणारा. १९ शहाणा, समर्थ.

शरावरी। जें नित्य नांदे सर्वांपरी। ऐसिये स्थितीवरी। विश्वमूर्धा म्हणिपे ७९ पैं
ग मूर्ति तेंचि मुख। हुताशना जैसें देख। तैसें सर्वपणें अशेख। भोक्ते जें
८० यालागीं तया पार्था। विश्वतोमुख हे व्यवस्था। आली वाक्पथा। श्रुती-
सेया ८१ आणि वस्तुमात्रीं गगन। जैसें असे संलग्न। तैसे शब्दजातीं कान।
सर्वत्र जया ८२ म्हणोनि आम्ही तयातें। म्हणों सर्वत्र आइकतें। एवं जें स-
ातें। आवरूनि असे ८३ एऱ्हवीं तरी महामती। विश्वतश्चक्षु इया श्रुती।
याचिये व्याप्ती। रूप केलें ८४ वांचूनि हस्त नेत्र पाये। हे भाष तेथ कें
आहे। सर्व शून्याचा न साहे। निष्कर्षु जें ८५ पैं कल्लोळांतें कल्लोळें। ग्रसिजत
असे ऐसें कळे। परि ग्रसितें ग्रासावेगळें। असे काई ८६ तैसें साचचि जें एक।
थ के व्याप्यव्यापक। परि बोलावया नावेंकें। करावें लागे ८७ पैं शून्य
तें दावावें जाहलें। तैं बिंदुलें एक केलें। तैसें अद्वैत सांगावें बोलें। तें द्वैत
कीजे ८८ एऱ्हवीं तरी पार्था। गुरुशिष्यसंतपथा। आडेंलु पडे सर्वथा। बोल
खुंटे ८९ म्हणोनि गा श्रुती। द्वैतभावें अद्वैतीं। निरूपणाची वाहती। वाट
केली ९० तेंचि आतां अवधारीं। इयें नेत्रगोचरें आकारीं। तें ज्ञेय गा
जयापरी। व्यापक असे ९१

सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम्। असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च॥ १४॥

तरी तें गा किरीटी ऐसें। अवकाशीं आकाश जैसें। पटीं पटु होऊनि असे।
तंतु जेवीं ९२ उदक होऊनि उदकीं। रसु जैसा अवलोकीं। दीपपणें दीपकीं।
तेज जैसें ९३ कर्पूरत्वें कापुरीं। सौरभ्य असे जयापरी। शरीर होऊनि शरीरीं।
कर्म जेवीं ९४ किंबहुना जैसें पांडवा। सोनेंचि सोनयाचा रवा। तैसें जें या सर्वां।
सर्वांगीं असे ९५ परी असे रवेपणामाजिवडे। तंव रवा ऐसें आवडे। वांचूनि
सोनें सांगडें। सोनया जेवीं ९६ पैं गा वोघुचि वांकुडा। परि पाणी उजू
धुडोंडा। वन्हि आला लोखंडा। लोह नव्हे कीं ९७ घटाकारें वेंटाळें। तेथ नभ
ासे वाटोळें। मठीं तरी चौफळें। आयें दिसे ९८ परी ते अवकाशें जैसें।
नोहिजेतीचि आकाशें। जें विकार होऊनि तैसें। विकारी नोहे ९९ मन
मुख्य इंद्रियां। सत्त्वादि गुणां त्रयां। सारिखें ऐसें धनंजया। आवडे कीर
१०० पैं गुळाची गोडी। नोहे बांधेया सांगडी। तैसी गुण इंद्रियें फुडीं।
नाहीं तेथ १ अगा क्षीराचिये दशे। घृत क्षीराकारें असे। परि क्षीरचि नोहे

आहे, म्हणूनच ज्याला ' विश्वमूर्धा ' असें म्हणतात; ७९ हें पहा–अग्नीची जी मूर्ति तेंच त्याचें मुख होय; त्याचप्रमाणें; जें ब्रह्म सर्व वस्तूंचा उपभोग घेतें; ८८० गार्था; याच कारणास्तव श्रुतींनी ब्रह्माला ' विश्वतोमुख ' असें म्हटलें आहे. ८१ आणि आकाश ज्याप्रमाणें सर्व स्तूंत ओतप्रोत भरलें आहे, त्याप्रमाणें शब्दमात्रावरोबर याचे श्रवण आहेत, ८२ म्हणूनच त्या ब्रह्माला आम्ही ' सर्वत्र ऐकणारें ' असें म्हणतों; कारण, तें या गतांत सर्वांला व्यापून आहे. ८३ हे महामते अर्जुना, स्तविक विश्वतश्चक्षु इत्यादि श्रुतींनी परमात्म्याच्या गादि अवयवांचें वर्णन जें केलें आहे, तें परमात्म्याला वयव आहेत असें सिद्ध करण्याकरितां नाहीं, तर परमात्म्याचें व्यापकत्व दाखविण्याचा त्यांचा मुख्य अभिप्राय हे. ८४ वास्तविक, सर्व पदार्थांच्या अभावालाही सहन करीत नाहीं, त्याच्या ठिकाणीं नेत्र, हात, इत्यादि अवयवांची गोष्टच नको. ८५ आतां लोकां एकादी मोठी लाट लहान लाटेचा नाश करिते दिसतें, परंतु ती थोरली लाट त्या लहान लाटेपासून याच्या दृष्टीनें वेगळी आहे काय? ८६ त्याप्रमाणें, खरोच जर ब्रह्म सर्वत्र भरलेलें आहे, तर त्याचे ठिकाणीं अव्यापकभाव कोठून येणार? मग शास्त्र व्याप्यव्यापावांचें प्रतिपादन कां करितें, असें म्हणशील तर, ाला यथार्थ बोध होण्याकरितां तसें वर्णन करावें ी. ८७ ज्याप्रमाणें हिशोब लिहितांना बाकी शून्य येण्याची वेळ येते त्या वेळेस शून्याबद्दल वर्तुलाकृति ात, त्याप्रमाणें अद्वैत स्पष्ट करून सांगावयाचें म्हटलें र द्वैताचा स्वीकार करूनच स्पष्टीकरण करावें लागतें. ाहीं तर, अर्जुना, गुरुशिष्यसंप्रदाय चहूंकडे बंद आणि अद्वैताविषयीं सर्व भाषण बंद होईल. हणून श्रुतींनी द्वैताच्या रूपानें अद्वैताचें प्रतिपादन चा राजमार्ग सुरू केला. ८९० तेव्हां आतां, ा नेत्रांनी जो आकार दिसतो, त्यांत तें ब्रह्म ापक आहे, तें ऐक. ९१

**अन्वयार्थ**—( सर्वेन्द्रियगुणाभासं )–ज्याचा अवभास-प्रकाश सर्व इंद्रियांच्या गुणांनीं होतो, पण जें वस्तुतः–( सर्वेन्द्रियविवर्जितं )–सर्व इंद्रियांनीं रहित आहे, त्यामुळें–(असक्तं)–कोठेंहि आसक्त न झालेलें–(च एव)–तथापि–( सर्वभृत् )–सर्वांला धारण करणारें, सर्वांचें अधिष्ठान,–(निर्गुणं) –तें गुणरहित आहे;–(च)–पण–( गुणभोक्तृ )–गुणांचा–सुख, दुःख व मोह या कार्यांचा भोग घेणारें असें तें ज्ञेय आहे. १४;

हें पहा–अर्जुना, तें ब्रह्म म्हणजे ज्याप्रमाणें पोकळींत सर्व आकाश भरलेलें असतें, किंवा तंतु हे वस्त्रामध्यें वस्त्ररूप होऊन असतात; ९२ हें बघ, रस ज्याप्रमाणें उदकामध्यें उदकरूप होऊन असतो, तेज ज्याप्रमाणें दीपामध्यें दीपपणानें असतें; ९३ सुगंध जसा कापुराच्या रूपानें कापुरांत भरलेला असतो, व क्रिया शरीराच्या रूपानें शरीरांत दृष्टीस पडते; ९४ किंबहुना, अर्जुना, सोनें ज्याप्रमाणें सोन्याच्या सारख्या रूपानें दृष्टीस पडतें, त्याप्रमाणें जें या सर्व जगाचें आदिकारण असून सर्वांत दृष्टीस पडलें; ९५ तें सोनें ज्यावेळेस रव्याच्या रूपानें दृष्टीस पडतें, त्यावेळेस आपल्यास तो रवा आहे असें वाटतें, परंतु सोनें या दृष्टीनें पाहूं गेलें असतां तो रवा सोनेंच होय. ९६ अर्जुना, पाण्याचा ओघ वांकडा असला म्हणजे पाणी वांकडें दिसतें, परंतु तें खरोखर वांकडें नाहीं; लोखंड तापवून लाल दिसूं लागलें, तरी लोखंड हें आग नव्हे. ९७ घटाच्या आकारानें आकाश वाटोळें दिसतें, व तेंच घराचे चौकांत पाहिलें म्हणजे चौकोनी दिसतें; ९८ परंतु तेंच मठ व घट नाश पावल्यावर आकाशाचा नाश होत नाहीं, त्याप्रमाणें जें ब्रह्म मायेचें उपाधीनें विश्वमय होतें, परंतु मायेंत नसतें; ९९ अर्जुना, तें ब्रह्म मन इत्यादि इंद्रियांप्रमाणें व सत्त्वादि गुणांप्रमाणें आकारास आलें आहे असा भास होतो; ९०० परंतु ज्याप्रमाणें गुळाची गोडी ही गुळाच्या आकारांत नसते, त्याप्रमाणें इंद्रियें व गुण यांत ब्रह्म नसतें. १ हे कपिध्वजा, ज्याप्रमाणें दुधाच्या अवस्थेंत तूप दुधाच्या

र्व प्रकारें. २ सर्वांचे डोकीवर रहाणारें. ३ अग्नीला. तोंड आहेत असा. ५ बोलण्यांत. ६ ओतप्रोत चिकटलेलें. ७ ऐकणारें. ८ व्यापून. ९ सार, मथि- १० तरंगाला, लाटेला. ११ क्षणभर. १२ वर्तुळ. शिष्यसंप्रदायांत. १४ प्रतिबंध, अडथळा. १५ पोकळींत. १६ सुगंध. १७ क्रिया. १८ तुकड्यामध्यें. १९ वाटतें. २० सारखें. २१ हे सहदा, मित्रा. २२ चौकोनी, २३ पोकळीचा आकार. २४ आकाश होऊं शकत नाहीं. २५ देप, आकार. २६ सारखें.

तैसें । कपिध्वजा २ तैसें जें इये विकारीं । विकार नोहे अवधारीं । पैं आकारा ग्राम भोंवरी । येर सोनें तें सोनें ३ इया उघड मन्हाटिया । तें वेगळेंपण धनंजया । जाण गुणइंद्रियां- । पासोनियां ४ नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु । हा आकारासीच प्रवादु । वस्तूसि नाहीं ५ तें गुण नव्हे कहीं । गुणा तया संबंधु नाहीं । परि तयाच्याचि ठायीं । आभासती ६ येतुलेयासाठीं । संभ्रांताच्या पोटीं । ऐसें जाय किरीटी । जे हेंचि धरी ७ तरि तें गा धरणें ऐसें । अभ्रातें जेवीं आकाशें । कां प्रतिवदन जैसें । आरसेनी ८ नातरी सूर्य प्रतिमंडळ । जैसेंनि धरी सलिलें । कां रश्मिकरीं मृगजळ । धरिजे जेवीं ९ तैसें गा संबंधेंविण । यया सर्वातें धरी निर्गुण । परि तें वायां जाण । मिथ्यादृष्टी ९१० आणि यापरि निर्गुणें । गुणातें भोगणें । रंका राज्य करणें । स्वप्नीं जैसें ११ म्हणोनि गुणाचा संगु । अथवा गुणभोगु । हा निर्गुणीं लागु । बोलों नये १२

बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च । सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥ १५ ॥

जें चराचर भूतां- । माजीं असे पांडुसुता । नाना वन्हीं उष्णता । अभेदें जैसी १३ तैसेनि अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें । व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ १४ जें एक आंतुबाहेरी । जें एक जवळ दुरी । जें एकावांचूनि परी । दुजी नाहीं १५ क्षीरसागरींची गोडी । माजीं बहु थडिये थोडी । हें नाहीं तया परवडी । पूर्ण जें गा १६ स्वेदजप्रभृती । वेगळाल्या भूतीं । जयाचेये अनुस्यूती । खोमणें नाहीं १७ पैं श्रोते मुखटिळका । घटसहस्रा अनेकां- । माजीं बिंबोनि चंद्रिका । न भेदे जेवीं १८ नाना लवणकणाचिये राशी । क्षारता एकचि जैसी । कां कोडी एकीं ऊसीं । एकचि गोडी १९

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् । भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥१६॥

तैसें अनेकीं भूतजातीं । जे आहे एकी व्याप्ती । विश्वकार्या सुमती । कारण जें गा ९२० म्हणोनि हा भूताकारु । जेथौनि तेंचि तया आधारु । कल्लोळा सागरु । जियापरी २१ बाल्यादि तिन्हीं वयसीं । काया एकचि जैसी । तैसें आदिस्थितिग्रासीं । अखंड जें २२ सायंप्रातर्मध्यान्ह । होतां जातां दिनमान । जैसें कां गगन । पालटेना २३ अगा सृष्टिवेळे प्रियोत्तमा । जयां नांव म्हणती ब्रह्मा । व्याप्ति जें विष्णुनामा । पात्र जाहलें २४ मग आकारु हा

आकारानें असतें, परंतु तें दूध म्हणजे तूप नव्हे, २ त्याप्रमाणें जें ब्रह्म विश्वांत भरलेलें असून तें विश्व नव्हे. कारण, सुवर्णाचे अलंकार बनविल्यावर त्यांस आपण फूल, बांकी अशी नांवें देतों; बाकी सुवर्णदृष्टीनें सोनें तें सोनेंच ! ३ याप्रमाणें मी उघड मराठी भाषेंत सांगतों; अर्जुना, ब्रह्म हें गुण व इंद्रियें यांपासून वेगळें आहे. ४ नांव, रूपसंबंध, जाति, क्रिया, भेद हे सर्व प्रकार आकारासच लागू आहेत, ब्रह्माला नाहींत. ५ तें ब्रह्म गुण नाहीं, व त्याचा आणि गुणांचा संबंध नाहीं, परंतु त्याचेच ठिकाणी ते भासतात. ६ या कारणावरून अर्जुना, अज्ञान्याच्या मनांत असें येतें कीं, गुण हे ब्रह्माचेच आहेत. ७ परंतु ब्रह्माच्या ठिकाणी गुण आहेत असें मानणें; म्हणजे ज्याप्रमाणें ढग आकाशांत दृष्टीस पडतात म्हणून त्यांना आकाश धारण करतें, किंवा आरशांत पाहिलें असतां जें प्रतिबिंब दृष्टीस पडतें तें आरशाचेंच आहे, असें म्हणण्याप्रमाणें होय. ८ किंवा सूर्याचें प्रतिबिंब पाणी धारण करितें, अथवा सूर्यरश्मी मृगजळ धारण करितात, असें वास्तविक नसतांना, लोक समजतात. ९ गुणाचा व ब्रह्माचा संबंध नसतांनाही ब्रह्म गुणाला धारण करितें असा जो निश्चय, तो भ्रांतिमुळें व्यर्थ आहे. १० ज्याप्रमाणें भिकारी मनुष्य स्वप्नांत राज्याचा उपभोग घेतो हें मिथ्या होय, त्याप्रमाणें ब्रह्म स्वतः निर्गुण असतां गुणांचा भोग घेतें, हें म्हणणें व्यर्थ होय. ११ म्हणून, ब्रह्म गुणांचा संग करतें अथवा गुणांचा उपभोग घेतें, असें म्हणतां येत नाहीं. १२

अन्वयार्थ—(भूतानां)-तें सर्व प्राण्यांच्या-(बहिः)-बाहेर-(च)-व-(अन्तः)-आंत आहे; तेंच-(अचरं च चरं एव)-अचर आहे व चरहि आहे-(तत्)-तें ज्ञेय-(सूक्ष्मत्वात्)-सूक्ष्म असल्यामुळें-(अविज्ञेयं)-विशेषतः ज्ञेय होत नाहीं. त्याचें झाड, दगड यांप्रमाणें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं-(तत् च)-व तें-(दूरस्थं)-अज्ञदृष्ट्या अत्यंत दूर आहे-(च अन्तिके)-व ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें अगदीं जवळ-हृदयांत आहे. १५

हे पांडुसुता, अग्नीचे निखारे जरी पुष्कळ आकारांचे निरनिराळे असले, तरी त्यांतील उष्णता ज्याप्रमाणें एकच होय, त्याप्रमाणें चराचर भूतांमध्यें ब्रह्म व्यापक आहे. १३ याप्रमाणें, जें अविनाशी असून सूक्ष्मपणानें सर्व जगास व्यापून आहे; तें प्रस्तुतचें ज्ञेय आहे. १४ जें शरीराच्या आंत असतें व बाहेरही असतें; तसेंच जें पाहिलें असतां जवळ आहे व दूरहि आहे; व जें एक असून दुसरा प्रकारच नाहीं; १५ क्षीरसागराची गोडी काठाशी थोडी व मध्यभागीं पुष्कळ अशी नसते, त्याप्रमाणें जें सर्वत्र व्यापक असून पूर्ण आहे; १६ जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज या सर्व वेगळाल्या भूतांच्या ठिकाणी ज्याच्या अखंड व्याप्तीला हानी नाहीं, १७ हे श्रोतृशिरोमणे, हजारों घटांच्या निराळ्या आकारांत चंद्राचें बिंब निराळें दिसतें, परंतु त्याला जसा भेद नाहीं; १८ मिठाच्या पुष्कळ राशी जरी असल्या तरी सर्वांचा खारटपणा जसा एक असतो, अथवा मोळीभर ऊंस जरी असले तरी त्या सर्वांची गोडी जशी एकच असते, १९

अन्वयार्थ—(तत्)-तें ज्ञेय-(भूतेषु)-प्राण्यांमध्यें-प्रत्येक देहामध्यें-(अविभक्तं)-एक-भिन्न भिन्न नसलेलें, असें आहे. -(च)-पण-(विभक्तं इव स्थितं)-विभक्त असल्यासारखें राहिलें आहे. प्रत्येक शरीरांत, भिन्न भिन्न असल्यासारखें दिसतें -(तत् ज्ञेयं)-तें ज्ञेय-(भूतभर्तृ)-स्थितिकालीं भूतांचें भरण-धारण-पोषण करणारें आहे. तसेंच तें-(ग्रसिष्णु)-प्रलयकालीं भूतांचा ग्रास-संहार करणारें-(च प्रभविष्णु)-व सृष्टिसमयीं त्या भूतांना प्रकट करणारें आहे. १६

तशी अनेक भूतमात्रांत ज्याची एकत्वानें व्याप्ति आहे; आणि अर्जुना, विश्वाच्या रचनेंत जें आदिकारण आहे; २० म्हणून ज्याप्रमाणें लाटा समुद्रापासून उत्पन्न होऊन लाटांचा आधार समुद्रच असतो, त्याप्रमाणें प्राणिमात्राच्या उत्पत्तीला जो हेतु तोच त्याचा आधार आहे, २१ बाल्यावस्था, तारुण्यावस्था व वृद्धावस्था, यांना जसें एकच शरीर आधारभूत असतें, तसें उत्पत्ति, स्थिति व लय ह्या तिन्ही अवस्थांस जें आधारभूत आहे; २२ प्रातःकाळ, माध्यान्हकाळ व सायंकाळ हे दिवसाचे तिन्ही काळ हे जरी गेले, तरी आकाशांत जसा पालट नसतो; २३ हे प्रियोत्तमा, सृष्टीच्या उत्पत्तिकाळीं ज्याला आपण ब्रह्मदेव म्हणतों, व व्याप्तिकाळीं म्हणजे स्थितिकाळीं ज्याला विष्णु हें नांव देतों, २४ मग लय करतेवेळेस ज्याला आपण रुद्र असें म्हणतों, व हीं तिन्हीं कार्यें ज्या वेळेस लोप पावतात, त्या

१ फूल फिरकी, बुगडी, भोकर. २ संज्ञा; प्रकार, शब्द, भाषा. ३ भासतात. ४ अज्ञानाच्या. ५ मुखाचें प्रतिबिंब. ६ पाणी. ७ सूर्यकिरणांमुळें. ८ परंतु तें व्यर्थ आहे असें समज. ९ भ्रामक दृष्टीमुळें. १० संबंध. ११ प्रकार. १२ मध्यें, आंत. १३ त्या रीतीनें. १४ ग्रामापासून उत्पन्न झालेले जीव. १५ व्याप्तीस, अखंडतेला. १६ कमीपणा, न्यूनत्व. १७ श्रेष्ठ. १८ वीस वस्तु म्हणजे एक कोडी. १९ हेतु. २० भूतांच्यागाळा. २१ उत्पत्ति, स्थिति, संहार.

हारपे। तेव्हां रुद्र जें म्हणिपे। तेंही गुणत्रय जेव्हां लोपे। तैं जें शून्य २५ नभाचें शून्यत्व गिळून। गुणत्रयातें नुरऊन। तें शून्य तें महाशून्यें। श्रुतिवचनसंमत २६

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते। ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम् ॥ १७ ॥

जें अग्नीचें दीपन। जें चंद्राचें जीवन। सूर्याचे नयन। देखती जेणें २७ जयाचे उजियेडें। तारांगण उघडें। महातेज सुरवाडें। राहाटे जेणें २८ जें आदींची आदी। जें वृद्धीची वृद्धी। बुद्धीचो जें बुद्धी। जीवाचा जीवु २९ जें मनाचें मन। जें नेत्राचे नयन। कानाचे कान। वाचेची वाचा ९३० जें प्राणाचा प्राण। जें गतीचे चरण। क्रियेचें कर्तेपण। जयाचेनी ३१ आकारु जेणें आकारे। विस्तारु जेणें विस्तारे। संहारू जेणें संहारे। पांडुकुमरा ३२ जें मेदिनीची मेदिनी। जें पाणी पिऊनि असे पाणी। तेजा दिवेलावणी। जेणें तेजें ३३ जें वायूचा श्वासोश्वासु। जें गगनाचा अवकाशु। हें असो आघवाचि आभासु। आभासे जेणें ३४ किंबहुना पांडवा। जें आघवेंचि असे आघवा। जेथ नाहीं रिगावा। द्वैतभावासी ३५ जें देखिलियाचिसवें। दृश्य द्रष्टा हें आघवें। एकवाट कालवे। सामर्थ्यें ३६ मग तेंचि होय ज्ञान। ज्ञाता ज्ञेय हन। जेणें गमिजे स्थान। तेंहि तेंची ३७ जैसें सरलियां लेखं। आंख होती एक। तैसें साध्यसाधनादिक। ऐक्यासि ये ३८ अर्जुना जिये ठायीं। न सरे द्वैताची वंही। हें असो जें हृदयीं। सर्वांच्या असे ३९

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः। मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

एवं हें तुजपुढां। आदीं क्षेत्र सुहाडों। दाविलें फाडोवाडां। विवंचुनी ९४० तैसोंचि क्षेत्रापाठीं। जैसेंनि देखसी दिठी। तें ज्ञानही किरीटी। सांगितलें ४१ अज्ञानाही कौतुकें। रूप केलें निकें। जंव आयणी तुझी टेंके। पुरे म्हणे ४२ आणि आतां हें रोकडें। उपपत्तीचेनि पैंवाडे। निरूपिलें उघडें। ज्ञेय पैं गा ४३ हे आघवीच विवंचना। बुध्दी भरोनि अर्जुना। मतिसिद्धिभावना। माझिया येती ४४ देहादि परिग्रहीं। संन्यासु करूनियां जिहीं। जीवु माझ्या ठाईं। वृत्तिकु केला ४५ ते मातें किरीटी। हेंचि जाणोनियां शेवटीं। आपणपयां सोटोवाटीं। मीचि होती ४६ मीचि होती परी। हे मुख्य गा अवधारीं। सोहोपी सर्वांपरी। राचेलीं आम्हीं ४७ कडां पायरी कीजे। निरांळीं माचु बांधिजे। अर्थावीं सुइजे। तैरी जैसी ४८ एऱ्हवीं अवघेंचि आत्मा। हें सांगों

देखील जें शून्य असतें त्याला प्रकृती असें म्हणतों; २५ आणि आकाशाचें शून्यत्व गिळून गुणत्रय नाहींसें करणारें जें प्रकृतिशून्य, त्याला जें नाहींसें करतें, तें श्रुतींनी वर्णन केलेलें महाशून्य तेंच आमचें ज्ञेय होय. २६

**अन्वयार्थ**—(तत्)–तें ज्ञेय–(ज्योतिषां अपि)–सूर्य, अग्नि इत्यादि जड ज्योतींचीहि–(ज्योतिः)–ज्योति आहे. प्रकाशांनाहि प्रकाशित करणारें आहे,–(तमसः परं)–तमाच्या–अज्ञानाच्या त्याला स्पर्शहि झालेला नाहीं, असें–(उच्यते)–म्हटलें जातें.–(ज्ञानं)–अमानित्वादि ज्ञान–(ज्ञेयं)–[ १२–१७ श्लोकांत सांगितलेलें ] ज्ञेय व–(ज्ञानगम्यं)–त्याच्या ज्ञानाचें फल, असें हें त्रिविध ज्ञेय–(सर्वस्य)–सर्व प्राण्यांच्या–(हृदि)–हृदयांत–(विष्ठितं)–विशेषतः स्थित आहे, १७

जें ब्रह्म अग्नीला दीपन करण्याची शक्ति देतें; ज्या चंद्रापासून जगतांत अमृताची प्राप्ति होते, त्याला जें अमृत देतें, ज्या सूर्याचे उजेडापासून सर्व जग व्यवहार करितें त्याला ज्याच्यापासून दृष्टि प्राप्त होते; २७ ज्याचे तेजानें तारागणांस तेज प्राप्त होतें; तसेंच महातेज ज्याचे तेजानें तेजस्वी होतें; २८ जगतांत जे मूळ पदार्थ म्हणून आहेत, त्यांचेंही जें मूळ म्हणजे आदि, जें बुद्धीची बुद्धी, तसेंच बुद्धीची बुद्धी व जीवाचा जीव; २९ जें मनाचें मन, डोळ्याचा डोळा, कानाचा कान व वाचेची वाचा; ९३० जें प्राणाचें जीवन, गतीचे चरण व ज्यामुळें क्रियेस कर्तेपणा येतो; ३१ हे पांडुकुमरा, ज्याच्यामुळें आकार, विस्तार व संहार यांना आपापलें रूप प्राप्त होतें; ३२ जें पृथ्वीस धारण करणारें, जें पाण्याचें जीवन, व ज्याचे योगानें तेज प्रकाशमान होतें; ३३ वायूस वाहण्याची शक्ति देतें व ज्यांत आकाश सामावतें, फार काय सांगावें, सर्व भासमान वस्तु ज्याचे तेजानें भासल्या जातात. ३४ हे पांडवा, या सर्व जगतांत सर्व पदार्थांच्या रूपानें सर्वपणानें आहे, आणि ज्याच्या ठिकाणीं द्वैतभावाचा प्रवेशच नाहीं; ३५ ज्याचें दर्शन होण्याबरोबर द्रष्टा, दृश्य व दर्शन ही त्रिपुटी ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणी ऐक्यभावाला येते, ३६ मग तेंच ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी होऊन ज्याचे योगानें ज्ञान फळतें, तेंही तेंच होय. ३७ ज्याप्रमाणें हिशेबाचा ताळा जमल्यावर हिशेबाच्या कच्चा कागदाचें काम संपतें, त्याप्रमाणें ब्रह्मप्राप्ति झाल्यावर साध्य व साधक हे भाव नाहींतसे होतात. ३८ अर्जुना, ब्रह्माचे ठिकाणीं द्वैताचा संबंधही रहात नाहीं; आतां हें राहूं दे. तें सर्वांच्या हृदयांत वास करतें, ३९

**अन्वयार्थ**—(इति)–येणेंप्रमाणें–(क्षेत्रं)–क्षेत्र–शरीर–(ज्ञानं)–अमानित्वादि ज्ञानसाधनें,–(तथा च)–आणि त्याचप्रमाणें–(ज्ञेयं)–जाणण्यास योग्य असें परब्रह्म–(समासतः)–संक्षेपतः–(उक्तं)–सांगितलें–(मद्भक्तः)–माझ्या ठिकाणींच ज्यानें आपला सर्व भाव ठेवला आहे असा माझा परम भक्त–(एतत्)–हें सर्व–(विज्ञाय)–जाणून–(मद्भावाय)–माझ्या भावाला–स्वरूपाला–(उपपद्यते)–प्राप्त होतो. १८

याप्रमाणें, हे प्रियमित्रा, तुला क्षेत्र म्हणजे काय हें सर्व मांडून विस्तारानें कळविलें. ९४० त्याचप्रमाणें, अर्जुना, त्या क्षेत्रानंतर, तुला उघड दृष्टीनें पहातां येईल अशा रीतीनें ज्ञानही समजून सांगितलें. ४१ त्याप्रमाणेंच, तुझे बुद्धीची तृप्ति होऊन तूं पुरे म्हणेपर्यंत अज्ञानाच्याही लक्षणांचें कौतुकानें निरूपण केलें. ४२ आणि आतांच दृष्टांत देऊन तुला ज्ञेय म्हणजे काय तें स्पष्ट करून सांगितलें. ४३ अर्जुना, या सर्व गोष्टींचा विचार करून, माझ्या प्राप्तीची इच्छा धरून माझे भक्त मद्रूप होतात; ४४ देहादिक परिवाराचा त्याग करून जे माझे ठिकाणीं आपलें चित्त वतनदार करतात, ४५ हे किरीटी, ते माझे भक्त आपलें चित्त मला अर्पण करून व माझे चित्तें आपलेंकडे भरून मद्रूप होतात. ४६ अशा रीतीनें मद्रूप होण्याचा, सर्वांत सुलभ मार्ग मी मुमुक्षूंकरितां तयार करून ठेवला आहे. ४७ कड्यावर चढून जाणें झाल्यास जशा पायऱ्या कराव्या लागतात, किंवा अंतराळीं चढून जाणें असल्यास जसा पहाड बांधावा लागतो, किंवा खोल पाण्यांतून तरून जावयाचें असल्यास जशी नाव घालावी लागते; ४८ एऱ्हवीं हे वीरोत्तमा, सर्वत्र आत्मा आहे असें जर तुला वर्णन करून सांगूं लागलों,

१ प्रकृतिशून्य. २ ब्रह्म. ३ दाहकशक्ति. ४ तेजानें. ५ पृथ्वी. ६ तेज, आभास. ७ सारखेपणानें, व्यापकपणानें. ८ जाणावें, पावावें. ९ गणना. १० ठेवा; हिशेब. ११ क्षेत्र, शरीर. १२ प्रियमित्रा. १३ स्पष्टपणानें. १४ बुद्धि. १५ थके, विश्रांति पावे. १६ युक्तीच्या. १७ विस्तारानें. १८ वतनदार. १९ आपल्या ओघाळ्यानें, विनियोगानें. २० अंतराळांत, आकाशांत. २१ माळा, शिडी. २२ खोल पाण्यांत. २३ होडी.

जरी वीरोत्तमा । परी तुझिया मनोधर्मा । मिळेल ना ४९ म्हणोनि एकचि सं-चलें । चतुर्धा आम्हीं केलें । जें अदटपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ९५० पैं बाळ जैं जेवविजे । तैं घांसु विसा ठायीं कीजे । तैसें एकचि हें चतुर्व्योंजें । कथिलें आम्हीं ५१ एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान । हे भाग केले अ-वधान । जाणोनि तुझें ५२ आणि ऐसेनही पार्था । जरी हा अभिप्रावो तुज हाता । नये तरी हे व्यवस्था । एक वेळ सांगों ५३ आतां चौठायीं न करूं । एकही म्हणोनि न सरूं । आत्मानात्मया धरूं । सरिसा पाडु ५४ परि तुवां येतुलें करावें । मागों तें आम्हां देआवें । जे कानाचें नांव ठेवावें । आपण पैं गा तें ५५ या श्रीकृष्णाचिया बोला । पार्थु रोमांचितु जाहला । तेथ देवो म्हणती भला । उचंबळेना ५६ ऐसेनि तो येतां वेगु । धरूनि म्हणे श्रीरंगु । प्रकृतिपुरुषविभागु । परिसें सांगों ५७ जया मार्गातें जगीं । सांख्य म्हणती योगी । जयाचिये भाटिवेलागीं । मी कपिल जाहलों ५८ तो आईक निदोखु । प्रकृतिपुरुषविवेकु । म्हणे आदिपुरुखु । अर्जुनातें ५९

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि । विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥

तरी पुरुष अनादि आथी । आणि तैंचि लागोनि प्रकृती । संसरिसी दि-वोराती । दोनी जैसी ९६० कां रूप नोहे वांयां । परी रूपा लागली छाया । निकोणु वाढे धनंजया । कणेंसीं कोंडा ६१ तैसीं जाण जेवटें । दोन्हीं इयें एक-वटें । प्रकृतिपुरुष प्रकटें । अनादिसिद्धें ६२ पैं क्षेत्र येणें नांवें । जें सांगितलें आघवें । तेंचि एथ जाणावें । प्रकृति हे गा ६३ आणि क्षेत्रज्ञु ऐसें । जयातें म्हणितलें असे । तो पुरुष हें अनारिसें । न बोलों वेईं ६४ इयें आनानें नांवें । परि निरूप्य आन नोहे । हें लक्षण न चुकावें । पुढतपुढती ६५ तरी केवळ जे सत्ता । तो पुरुषु गा पांडुसुता । प्रकृतितें समस्ता । क्रिया नाम ६६ बुद्धि इंद्रियें अंतः-करण । इत्यादि विकारभरण । आणि ते तीन्ही गुण । सत्त्वादिक ६७ हा आघ-वाचि मेळावा । प्रकृती जाहला जाणावा । हेचि हेतु संभवा । कर्माचियें ६८

कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते । पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

तेथ इच्छा आणि बुद्धी । घडवी अहंकारेंसीं आधीं । मग तिया लाविती वेधीं[२१] । कारणाच्या ६९ तेंचि कारण ठाकोंवया । जें सूत्र धरणें उपाया । तया नांव धनंजया । कार्य पैं गा ९७० आणि इच्छा मदाच्या थावीं । लागली

तर तुला तें स्पष्ट कळणार नाहीं. ४९म्हणून, तुझी बुद्धी जड आहे असें पाहून, तें एकच ब्रह्म चार विभाग करून सांगितलें. ९५० ज्याप्रमाणें मुलाला जेऊं घालावयाचें असलें म्हणजे जो आपण एक घास घेतों तोच त्याला वीस वेळ थोडथोडा द्यावा लागतो, त्याप्रमाणें ब्रह्म हें चार प्रकारांनीं तुला मी स्पष्ट करून सांगितलें. ५१ तुझी अवधानशक्ति पाहून एक क्षेत्र, एक ज्ञान, एक ज्ञेय व एक अज्ञान असे त्या ब्रह्माचे चार भाग केले. ५२ आणि पार्था, इतकें करून जर ब्रह्म तुला नीट कळत नसलें, तर तुला दुसऱ्या रीतीनें आणखी एकदा स्पष्ट करून सांगतों. ५३ आतां त्याचे चार भाग न करितां, तसेंच तें एकही न मानतां, आत्मा व अनात्मा ( पुरुष व प्रकृति ) असे दोन भाग करून तें तुला सांगतों. ५४ परंतु तूं एक गोष्ट कर कीं, आम्ही सांगूं तें आम्हांस दे. तें काय म्हणशील, तर तूं लक्षपूर्वक कान देऊन आम्ही सांगूं तें ऐक. ५५ असें श्रीकृष्णाचें वचन ऐकून पार्थाचे अंगावर रोमांच उभे राहिले. तेव्हां देव म्हणाले कीं, याचे मनांत ही गोष्ट पूर्णपणें ठसली आहे. ५६ याप्रमाणें श्रीकृष्णालाही वेग आला; परंतु तो आवरून ते म्हणतात—अर्जुना, तुला ब्रह्माचे प्रकृति व पुरुष असे दोन भाग स्पष्ट करून सांगतों; ते ऐक. ५७ प्रकृति व पुरुष यांचें ज्यांत विवेचन आहे, त्या मार्गाला योगी लोक 'सांख्यमार्ग' असें म्हणतात; व ज्याचें पूर्णपणें वर्णन करण्याकरितां मी कपिलावतार घेतला, ५८ तो प्रकृति व पुरुष यांचेविषयीं निर्दोष विचार ऐक, असें श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनास म्हणाले. ५९

अन्वयार्थ——(प्रकृतिं)–आठ प्रकारच्या प्रकृतीला–(च एव)–आणि–(पुरुषं)–क्षेत्रज्ञाला–(उभौ अपि)–अशा दोघांनाही–(अनादी)–तूं अनादि–नित्य–(विद्धि) जाण,–(विकारान्)–बुद्धि, इंद्रियें, देह इत्यादि विकारांस–(च)–आणि–(गुणान् च एव)–सुख-दुःख-मोहरूप गुणांना तूं–( प्रकृति संभवान् )–ईश्वराच्या त्रिगुणात्मक मायाख्य प्रकृतीपासून झालेले–(विद्धि)–जाण. १९

तरी पुरुष हा अनादि आणि तेव्हांपासून त्याला लागूनच प्रकृतिही आहे. ज्याप्रमाणें दिवस व रात्र यांची जोड आहे; ९६० छाया ही रूप नव्हे, परंतु ती रूपाबरोबर असते; तसेंच, हे धनंजया, धान्य पेरल्यावर त्याचें बरोबर ज्याप्रमाणें कण व कोंडा हीं दोन्हीं उत्पन्न होतात, ६१ त्याप्रमाणें प्रकृति व पुरुष ह्यांचें अनादिसिद्ध जोडपें प्रसिद्ध आहे. ६२ तर क्षेत्र या नांवानें तुला जें सांगितलें, त्यालाच या ठिकाणी प्रकृति म्हणून समजावें; ६३ आणि क्षेत्रज्ञ म्हणून ज्याला म्हणतात तो पुरुष हें आम्ही निःसंशय सांगतों, असें समज. ६४ यांचीं जरी हीं निरनिराळीं नांवें आहेत, तरी त्यांचा अर्थ निरनिराळा नाहीं ही गोष्ट तूं वरचेवर पूर्णपणें लक्षांत ठेव. ६५ हे पांडुसुता, ज्या सत्तेला कधींही नाश नाहीं; तिला पुरुष असें समजावें व सत्तेच्या योगानें ज्या क्रिया घडतात, त्यांना प्रकृति असें म्हणावें. ६६ बुद्धि, इंद्रियें, अंतःकरण इत्यादि, ज्यांपासून, विकार उत्पन्न होतात—आणि सत्व, रज व तम हे तिन्ही गुण ६७ या सर्वांची प्रकृतीपासून उत्पत्ति होते व यांचेपासून सर्व कर्में होतात. ६८

अन्वयार्थ——(कार्यकरणकर्तृत्वे)–कार्य म्ह० शरीर व करण म्ह० सर्व इंद्रियें यांच्या कर्तृत्वाविषयीं–(प्रकृतिः)–वरील प्रकृति–( हेतुः )–निमित्त–( उच्यते )–सांगितली जाते. त्याचप्रमाणें–(सुखदुःखानां भोक्तृत्वे)–सुखदुःखांच्या भोक्तृत्वाविषयीं–(पुरुषः)–पुरुष–क्षेत्रज्ञ–जीव–(हेतुः)–निमित्त–(उच्यते)–सांगितला जातो. २०

त्या ठिकाणी इच्छा व बुद्धि यांच्यापासून अहंकार उत्पन्न होतो; व त्यामुळें ती इच्छा व बुद्धि फलप्राप्तीकरितां इंद्रियांना आपापलीं कार्यें करण्याकरितां नादीं लावतात, ६९ तेंच फल प्राप्त होण्याकरितां जो उपाय करावयाचा, त्यास, हे धनंजया, कार्य असें म्हणतात. ९७० तीच इच्छा

१ असमर्थपण, अशक्तपण. २ चार प्रकारें करून. ३ न मानूं. ४ आत्मा=पुरुष, अनात्मा=प्रकृति. ५ हालेना, भरून आला आहे कीं. ६ वर्णनासाठीं. ७ तेव्हांपासूनच. ८ भोंगळी जवळ. ९ बीज. १० दाण्याबरोबर. ११ जुळी. १२ एकत्र. १३ वेगळे. १४ न बोलतां घे. १५ निरूपण. १६ अस्तित्व, अधिकार. १७ विकारांची उत्पत्ति, पोषण. १८ समुदाय. १९ कारण. २० कर्मांच्या उत्पत्तीस. २१ नादीं. २२ प्राप्त होण्यास. २३ भोरण.

मनातें उठवी । तें इंद्रियें राहाटवी । हें कर्तृत्व पैं गा ७१ म्हणोनि तीन्ही या जाणा । कार्यकर्तृत्वकारणा । प्रकृति मूळ हें राणा । सिद्धांचा म्हणे ७२ एवं तिहींचेनि समवायें[2] । प्रकृति कर्मरूप[3] होये । पारि जया गुणा वाढे त्राये । त्याचि सारिखी ७३ जें सत्त्वगुणें अधिष्ठिजे । तें सत्कर्म म्हणिजे । रजोगुणें निपजे । मध्यम तें ७४ जें कां केवळ तमें । होती जियें कर्में । निषिद्धें अधर्में । जाण तियें ७५ ऐसेंनि संतासंतें । कर्म प्रकृतीस्तव होतें । तयापासोनि निर्वाळतें । सुखदुःख गा ७६ असतीं दुःख उपजे । सत्कर्मीं सुख निपजे । तया दोहींचा बोलिजे । भोगु पुरुषा ७७ सुखदुःखें जंववरी । निफजती साचोकारीं । तंव प्रकृती उद्यमु करी । पुरुषु भोगी ७८ प्रकृतिपुरुषांची कुळवाडी । सांगतां असंगडी । जे आंबुली[12] जोडी । आंबुला[13] खाय ७९ आंबुला आंबुलिये । संगती ना सोये । कीं आंबुली जग विये । चोजें ऐका १८०

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान् । कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥२१॥

जे अनंगु[15] तो पैंधा[16] । निकवडा दुर्बंधा । जीर्णु अतिवृध्दा- । पासोनि वृध्दु ८१ तया आडनांव पुरुषु । एऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु । किंबहुना एकु । निश्चयो नाहीं ८२ तो अचक्षु अश्रवणु । अहस्तु अचरणु । रूप ना वर्णु । नाम आथी ८३ अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं । कीं भोगणें ऐसयाही । सुखदुःखाचें ८४ तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता । पारि इया पतिव्रता । भोगविजे ८५ जियेतें अळुमाळु । रूपा गुणाचा चाळेंढाळु[20] । ते भलतैसाही खेळु । लेखें आणी ८६ इये प्रकृती तंव । गुणमयी[22] हेंचि नांव । किंबहुना सावेव । गुण तेचि हे ८७ हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आघवी । जडातेंही माजवी । इयेचा माजु ८८ नामें इयें प्रसिध्दें । स्नेहो इया स्निग्धें । इंद्रियें प्रबुध्दें[23] । इयेचेनी ८९ कायि मन हें नपुंसक । कीं तें भोगवी तिन्ही लोक । ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें १९० हें भ्रमाचें महाद्वीप । हें व्याप्तीचें रूप । विकार उमप[24] । इया केले ९१ हे कामाची मांडवी[25] । हे मोहवनांची माधवी[26] । इये प्रसिध्दाचि दैवी[27] । माया हें नाम ९२ हे वाङ्मयाची वाढी । हे साकारपणाची जोडी । प्रपंचाची घोंडी[28] । अभंग हे ९३ कळा एथूनि जालिया । विद्या इयेच्या केलिया । इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ९४ हे नादांची[30] टांकसाळ । हे चमत्काराचें वेळाउळ[31] । किंबहुना सकळ । खेळु इयेचा ९५ जे उत्पत्ति

प्रबळ होऊन मन जागृत करते, व त्याजकडून सर्व व्यवहार करविते. ७१ म्हणून कार्य, कर्तृत्व व कारण या त्रिपुटीस प्रकृति मूळ होय, असें सिद्धांचा राणा जो श्रीकृष्ण परमात्मा तो म्हणाला. ७२ याप्रमाणें तिन्ही एकत्र झाल्यावर प्रकृति क्रियारूप होते; परंतु ज्या गुणाचा विशेष जोर होईल, त्या गुणाप्रमाणें ती क्रिया घडते. ७३ जें कर्म सत्त्वगुणापासून उत्पन्न होतें, तें सत्कर्म होय. रजोगुणापासून उत्पन्न होतें, तें मध्यम, ७४ आणि जीं कर्मे केवळ तमोगुणापासून उत्पन्न होतात, तीं निषिद्ध म्हणजे धर्मविरुद्ध कर्मे होत. ७५ याप्रमाणें प्रकृतीपासून चांगली व वाईट कर्मे घडतात, व त्या कर्मांपासून सुख-दुःख प्राप्त होतें; ७६ वाईट कर्मापासून दुःख उत्पन्न होतें सत्कर्मापासून सुख उत्पन्न होतें, व त्या दोहोंचा उपभोग पुरुषास घ्यावा लागतो. ७७ जोंपर्यंत सुख व दुःख सत्यत्वानें उत्पन्न होतें, तोंपर्यंत व्यापार प्रकृतीचा व भोग पुरुषाचा. ७८ प्रकृति व पुरुष यांचा व्यापार इतका विसंगत आहे कीं, स्त्रीनें मिळवावें व नवऱ्यानें स्वस्थ बसून खावें, ७९ काय चमत्कार आहे पहा कीं, या स्त्रीपुरुषांचा कधींही संग न घडतां स्त्रीपासून जगाची उत्पत्ति होते. ९८०

**अन्वयार्थ**--(हि)-कारण-(पुरुषः)-पुरुष-(प्रकृतिस्थः)-शरीरेंद्रियांच्या रूपानें परिणत झालेल्या-शरीरेंद्रियाकार प्रकृतींत स्थित होऊन 'हेंच मी' असें मानून-(प्रकृतिजान् गुणान्)-प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सुख-दुःख-मोहात्मक गुणांस-(भुंक्ते)-भोगतो, त्यांचा अनुभव घेतो-(अस्य)-या भोक्त्याचा-(गुणसंगः)-गुणांवरील संग-आसक्ति हेंच त्याचा-(सदसद्योनिजन्मसु)-देवादि सत् योनि व पश्वादि असत् योनि, यांत जन्म होण्याचें-(कारणं)-कारण-निमित्त आहे. २१

जो पुरुष महा निराकार असून उदासिन आहे, तसेंच निर्धन असून, केवळ एकटा आहे आणि जीर्ण असून या जगांत जी अति वृद्ध वस्तु असेल, तिच्यापेक्षांही वृद्ध आहे. ८१ त्याला आडनांव पुरुष हें आहे. एऱ्हवीं तें स्त्री किंवा नपुंसक यांपैकीं निश्चयानें कोणतेंच सांगतां येत नाहीं. ८२ त्याला डोळे, कान, हात, पाय, रूप, वर्ण व नांव हें कांहींएक नाहीं. ८३ अर्जुना, ज्याला कोणतेंही अवयव नाहींत, असा हा प्रकृतीचा नवरा असून त्यालाही सुखदुःख भोगावें लागतें. ८४ तो कर्म न करणारा, उदासीन व उपभोग न घेणारा असा जरी आहे, तरी ही पतिव्रता प्रकृति त्याला उपभोग घेण्यास लावते, ८५ जी प्रकृति आपल्या गुणांच्या व रूपाच्या अनुरोधानें विलक्षण खेळ करून दाखविते, ८६ म्हणून या प्रकृतीला गुणमयी असें नांव दिलें आहे, किंबहुना ही मूर्तिमंत गुणच आहे. ८७ ही क्षणोक्षणीं नित्य नवी असून रूप व गुण यांनीं युक्त आहे; व ही जड वस्तूकडूनही आपले कर्तबगारीनें कर्म करविते. ८८ या प्रकृतीमुळें सर्व नांवें प्रसिद्ध झालीं आहेत, इच्यामुळेंच प्रीति प्रेमयुक्त झाली आहे व इंद्रियें जागृत झालीं आहेत. ८९ पांढू गेलें असतां मन हें नपुंसक असूनही तें तिन्ही लोकांत हिंडवितें, अशी इची अलौकिक करणी आहे. ९९० ही भ्रमाचें केवळ महाद्वीप, स्वयमेव व्याप्ति करणारी व अमर्याद विकार उत्पन्न करणारी अशी आहे. ९१ ही कामरूप वेलीचा मांडव असून मोहरूप वनाचा वसंत ऋतु आहे; व ही दैवी माया या नांवानें प्रसिद्ध आहे. ९२ ही शब्दमय शास्त्राची वाढी आहे. ही निराकाराला आकार देणारी आहे, व प्रपंचाची सतत धाड घालणारी आहे. ९३ सर्व कला हिच्यापासून उत्पन्न झालेल्या असून, सर्व विद्याही हिनेंच केलेल्या आहेत; आणि इच्छा, ज्ञान व क्रिया यांसही हीच व्यायली आहे. ९४ ही नादाची (छंदांची) टांकसाळ आहे; ही चमत्काराचें घर आहे फार काय सांगावें! हा सर्व खेळ हिचाच आहे. ९५ जगाची उत्पत्ति आणि प्रळय

१ जागवितें, राबविते. २ एकत्वानें, ऐक्यानें. ३ क्रियारूप. ४ बळ, जोर, आधिक्य. ५ त्या गुणासारखी. ६ निंद्य. ७ चांगलें व वाईट. ८ गाळिलें जातें, उत्पन्न होतें. ९ कुणबावा, शेतकी, व्यापार. १० संघटित. ११ स्त्री. १२ मिळविते. १३ पति. १४ नवल. १५ निराकार. १६ उदासीन. १७ दरिद्री. १८ केवळ, एकटा. १९ किंचित्. २० हालचाल. २१ गणतीस. २२ गुणांनीं भरलेली. २३ उहाणी. २४ अतिशय. २५ मंडपी. २६ वसंत ऋतु. २७ सभाग्य. २८ शब्दमय दुकानी. २९ भाट. ३० व्यालीती. ३१ घर.

ऊनि उडे । जाहलें श्वांना वरपेंडें । तरी ते विष्ठा ५ या चुके दोहीं काजा । तरी होय कृमींचा पुंजा । हा परिणामु कपिध्वजा । कश्मलु गा ६ या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्य सिद्ध ऑपैसा । अनादिपणें ७ सकळु ना निष्कळु । अक्रियु ना क्रियाशीळु । कृश ना स्थुळु । निर्गुणपणें ८ आभासु ना निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु । अल्प ना बहुवसु । अरूपपणें ९ रिता ना भरितु । रहितु ना सहितु । मूर्तु ना अमुर्तु । शून्यपणें १११० आनंदु ना निरानंदु । एकु ना विविधु । मुक्त ना बध्दु । आत्मपणें ११ येतुला ना तेतुला । आइता ना रचिला । बोलता ना उगेला । अलक्षपणें १२ सृष्टीचा होणीं न रचे । सर्वसंहारे न वेंचे । आथी नाथी या दोहींचें । पंचत्व तो १३ मवे ना वेंचे । वाढे ना खांचे । विटे ना वेंचे । अव्ययपणें १४ एवं रूप पैं आत्मा । देहीं जें म्हणती प्रियोत्तमा । तें मठाकारें व्योमा । नाम जैसें १५ तैसें तयाचिये अनुस्यूती । होती जाती देहाकृती । तो घे ना सांडी सुमती । जैसा तैसा १६ अहोरात्रें जैशीं । येती जाती आकाशीं । आत्मसत्ते तैसीं । देहें जाण १७ म्हणोनि इये शरीरीं । कांहीं करवीं ना करी । आयताही व्यापारीं । संजे न होय १८ यालागीं स्वरूपें । उणा पुरा न घेपे । हें असो तो न लिंपे । देहीं देहा १९

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते । सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥३२॥

अगा आकाश कें नाहीं । हें न रिघेचि कवणे ठायीं । परि कायिसेनी कहीं । गोंदिजेना ११२० तैसा सर्वत्र सर्व देहीं । आत्मा असेतुचि असे पाहीं । परी संगदोषें एकेंही । लिप्त नोहे २१ पुढतपुढती एथें । हेंचि लक्षण निरुतें । जे जाणावें क्षेत्रज्ञातें । क्षेत्रविहिनीं २२

यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः । क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥

संसर्गें चेष्टिजे लोहें । परि लोह भ्रामक नोहे । क्षेत्रक्षेत्रज्ञां आहे । तेतुला पाडु २३ दीपकाची अँचीं । राहाटी वाहे घरींची । परी वेगळीक कोडीची । दीपा आणि घरा २४ पैं काष्ठाच्या पोटीं । वन्हि असे किरीटी । परी काष्ठ नोहे या दृष्टी । पाहिजे हां २५ अपाडु नभा आभाळा । रवि आणि मृगजळा । तैसाचि हाही डोळां । देखसी जरी २६ हें आघवेंचि असो एकु । गगनौनि जैसा अर्कु ।

कदाचित् अग्नींत पडला, तर त्याची राख होऊन उडून जातें, व कुत्र्याच्या तावडींत सांपडला तर त्याची विष्ठा बनते. ५ हे कपिध्वजा, या दोन प्रकारांतून जर देह चुकला तर ज्या ठिकाणीं हा पडेल त्या ठिकाणीं यामध्यें किडे व आळ्या यांचे पुंजकेच्या पुंजके सांपडतात, अशा रीतीनें याचा परिणाम होतो. ६ या देहाची ही अशी दशा होते, परंतु आत्मा तर नित्य, सिद्ध व अनादित्वानें सहज आहे, ७ तो निर्गुण असल्यामुळें पूर्णही नाहीं, व अपूर्णही नाहीं; क्रिया करणारा नाहीं व क्रिया न करणाराही नाहीं; तसेंच रोडका नाहीं व लठ्ठही नाहीं; ८ तो निराकार असल्यामुळें दृश्य नाहीं व अदृश्यही नाहीं; तो प्रकाशमान नाहीं व निस्तेजही नाहीं; आणि थोडा नाहीं व पुष्कळही नाहीं. ९ तो शून्य असल्यामुळें रिकामा नाहीं व भरलेलाही नाहीं; कशाविरहित अथवा कशासहितहि नाहीं; आणि तो साकार नाहीं व निराकारही नाहीं; ३११० तो आत्मरूपानें असल्यामुळें त्याला आनंदही नाहीं व दुःखही नाहीं; तो एकही नाहीं व अनेकही नाहीं; आणि तो कशापासून मुक्त नाहीं, व कशानें बद्धही नाहीं; ११ तो लक्षणरहित असल्यामुळें एवढा किंवा तेवढा, आयता किंवा बनलेला; आणि बोलका किंवा मुका असाही नाहीं; १२ सृष्टीच्या होण्याबरोबर हा होत नाहीं, व सृष्टीचा संहार झाल्यावर लय पावत नाहीं; आणि हा असणें व नसणें या दोन्ही स्थितींचें लयस्थान होय. १३ हा अव्यय असल्यामुळें मोजतां व वर्णन करितां येत नाहीं; हा वाढत अथवा कमी होत नाहीं, आणि हा विटत नाहीं किंवा खर्च होत नाहीं. १४ हे प्रियोत्तमा, असें ज्या आत्म्याचें स्वरूप आहे तो देहांत आहे असें जे म्हणतात, त्यांचें तें म्हणणें–मठांत असलेल्या आकाशाला आकार आहे ह्या म्हणण्याप्रमाणें आहे. १५ तसेंच आत्म्याच्या व्यापक स्थितींत देहाकृति उत्पन्न होतात व जातात, देह उत्पन्न झाला म्हणून तो देह धारण करीत नाहीं, व नाश पावला असतां तो देह टाकीत नाहीं, तो आपल्या स्वरूपानें जसा आहे तसाच असतो. १६ ज्याप्रमाणें आकाशांत दिवस व रात्र येतात व जातात, त्याप्रमाणें आत्म्याला देह येतात व जातात परंतु त्यापासून तो लिप्त होत नाहीं. १७ म्हणून या शरीरांत तो कांहीं करीत नाहीं, व करवीतही नाहीं व शरीराच्या कोणत्याही व्यापारांत कर्तेपणानें तयार होत नाहीं. १८ वास्तव त्याचे स्वरूपांत कमी अगर जास्त कांहीं होत नाहीं, इतकेंच नव्हे, तर तो देहांत असूनही देहाच्या सर्व व्यापारापासून अलिप्त असतो. १९

**अन्वयार्थ**—(यथा)–ज्याप्रमाणें–(सर्वगतं आकाशं)–सर्वव्यापी आकाश–(सौक्ष्म्यात्)–सूक्ष्मत्वामुळें–(न उपलिप्यते)–कोणत्याहि लेपानें लिप्त होत नाहीं–(तथा)–त्याप्रमाणें–(देहे सर्वत्र)–देहांत सर्व ठिकाणीं–(अवस्थितः आत्मा)–अवस्थित असलेला व्यापून राहिलेला आत्मा देहधर्मांनी–(न उपलिप्यते)–संबद्ध होत नाहीं. ३२

अर्जुना, आकाश कोठें नाहीं? व त्याचा कोठें रिघाव होत नाहीं? म्हणजे हें सर्वत्र आहे; परंतु याला कशापासूनही पीडा होत नाहीं. ११२० त्याप्रमाणें सर्वत्र सर्व देहांत आत्मा जरी आहे, तरी देहाच्या कोणत्याही उपाधीपासून तो लिप्त होत नाहीं. २१ तर वारंवार शुद्ध तत्त्वाचें हेंच लक्षण तूं ध्यानांत ठेव कीं, क्षेत्र म्हणजे शरीर किंवा त्याचे धर्म, यांहून क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा अगदीं निराळा आहे. २२

**अन्वयार्थ**—(भारत)–हे अर्जुना!–(यथा)–ज्याप्रमाणें–(एकः रविः)–एक सूर्य–(कृत्स्नं इमं लोकं)–या सर्व लोकाला–(प्रकाशयति)–प्रकाशमान करतो,–(तथा)–त्याप्रमाणें–(क्षेत्री)–क्षेत्रज्ञ आत्मा–(कृत्स्नं क्षेत्रं)–सर्व क्षेत्राला–(प्रकाशयति)–प्रकाशित करतो. ३३

आत्म्याच्या संबंधानें शरीरादिकांच्या ठिकाणीं चेष्टा दिसल्या तरी देह आत्मा नव्हे. लोहचुंबकाच्या संसर्गानें लोखंड हालतें, परंतु लोखंड हें लोहचुंबक नव्हे. तीच व्यवस्था आत्मा व देह यांस लागू आहे. २३ दीपज्योतीच्या उजेडानें घरांतील सर्व व्यवहार करितां येतात, परंतु दिवा आणि घर यांत कोटिशः अंतर आहे; २४ हे किरीटी, लांकडाच्या पोटांत अग्नि आहे, परंतु तो लांकूड नव्हे अशा दृष्टीनें पहावा. २५ आकाश व अभ्र किंवा सूर्य व मृगजळ यांच्यांत ज्या मानानें अंतर आहे, त्याच मानानें देह व आत्मा यांजमधील अंतर, मागें दिलेले दृष्टांत एके बाजूला ठेवून पहाशील, तर २६

१ कुत्र्याच्या. २ प्राप्त, स्वाधीन. ३ बारीक. ४ सहज. ५ पूर्ण. ६ अपूर्ण. ७ दृश्य. ८ अदृश्य. ९ मौनी. १० होण्यानें. ११ होत नाहीं. १२ आहे व नाहीं. १३ लयस्थान. १४ मोजवत नाहीं, वर्णन करवत नाहीं. १५ कमी होत नाहीं. १६ आकाशाला. १७ व्यापानें, अखंडपणामुळें. १८ कोणत्याहि आपल्या व्यापारांत. १९ आसक्त. २० दोष विकार पावत नाहींत. २१ असूनही, २२ उपाधीनें. २३ आत्म्याला. २४ देहापासून निराळा. २५ आकर्षणानें, सान्निध्यानें. २६ लोहचुंबक. २७ ज्योतीनें. २८ व्यवहार चालतो. २९ कोटिपट. ३० पहावा. ३१ आत्मा, ३२ फार अंतर, वैलक्षण्य. ३३ सूर्य.

प्रगटवी लोकु । नांवें नांवें २७ एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा । प्रकाशकु क्षेत्राभासा । यावरुतें हें न पुसा । शंका नेघा २८

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा । भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१३॥

शब्दतत्त्वसारज्ञा । पैं देखणी तेंचि प्रज्ञा । जे क्षेत्र क्षेत्रज्ञा । अपाडु देखे २९ इयां दोहींचें अंतर । देखावया चतुर । ज्ञानियांचें द्वार । आराधिती ११३० याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती । शास्त्रांचीं दुभतीं । पोसिती घरीं ३१ योगाचिया आकाशा । वळंघिजे येवढाचि धिंवसा । याचियाचि आशा । पुरुषासि गा ३२ शरीरादि समस्त । मानिताति तृणवत । जीवें संतांचे होत । वाहणधरु ३३ ऐसैसियापरी । ज्ञानाचिया भरोवरी । करूनियां अंतरीं । निरुतें होती ३४ मग क्षेत्रक्षेत्रज्ञांचें । जें अंतर देखती साचें । ज्ञानें उन्मेख तयांचें । वोवाळूं आम्ही ३५ आणि महाभूतादिकीं । प्रभेदली अनेकीं । पसरलीसे लटिकी । प्रकृति जे हे ३६ जे शुकनळिकान्यायें । न लगती लागली आहे । हें जैसें तैसें होये । ठाउवें जयां ३७ जैसी माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां । सर्पबुद्धि टवाळा । उखी होउनी ३८ कां शुक्ति ते शुक्ती । हे साच होय प्रतीती । रुपयाची भ्रांती । जाऊनियां ३९ तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृति जे अंतःकरणें । देखती ते मी म्हणें । ब्रह्म होती ११४० जें आकाशाहूनि वाड । जें अव्यक्ताची पैल कड । जें भेटलिया अपाडा पाड । पडों नेदी ४१ आकारु जेथ सरे । जीवत्व जेथें विरे । द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ४२ तें परमतत्त्व पार्था । होती ते सर्वथा । जे आत्मानात्मव्यवस्था । राजहंसु ४३ ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा । उगाणा दिधला जीवा । जीवाचिया ४४ येरें कलशींचें येरीं । रिचविजे जयापरी आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ४५ आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण । वरी अर्जुनातें श्रीकृष्ण । हा मी म्हणे ४६ परि असो तें नाथिलें । न पुसतां कां मी बोलें । किंबहुना दिधलें । सर्वस्व देवें ४७ कीं तो पार्थु जी मनीं । अझुनी तृप्ती न मनी । अधिकाधिक उतान्ही । वाढवीतु असे ४८ स्नेहाचिया भरोवरीं । आंबुथिलीं दीपु घे थोरी । चाड अर्जुना अंतरीं । परिसतां तैसी ४९ तेथ सुगरणी आणि उदारे । रसज्ञ आणि जेवणारे । मिळती मग अवतरे ।

गगनांत सूर्य एकटा असून ज्याप्रमाणें निरनिराळ्या सर्व लोकांना प्रकाशित करितो, २७ त्याप्रमाणें आत्मा हा सर्व देहांत प्रकाश पाडणारा आहे, असें कळून येईल. यापुढें आत्मा व देह यांविषयीं पुनः शंका घेऊन विचारूं नको. २८

**अन्वयार्थ**--(ये)-जे-(एवं)-याप्रमाणें-(क्षेत्रक्षेत्रज्ञयोः)-क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्यामधील-(अन्तरं)-परस्पर विलक्षणता-फरक-(च)-व-(भूतप्रकृतिमोक्षं)-भूतांच्या प्रकृतीचा ज्ञानानें होणारा अभाव-(ज्ञानचक्षुषा)-ज्ञानदृष्टीनें-(विदुः)-जाणतात-(ते)-ते ज्ञानी-(परं)-परमात्मतत्त्वास-(यान्ति)-प्राप्त होतात. ३४

हे शब्दतत्त्वसारज्ञा, तीच बुद्धि जाणती म्हणावी कीं, जिच्या योगानें शरीर व आत्मा या दोहोंमधील अंतर समजतें. २९ या दोहोंमधील अंतर समजण्याकरितां चतुर ( मुमुक्षु ) लोक हे ज्ञानीजनांच्या घराचे उंबरठे झिजवितात; ११३० आणि अर्जुना, हेंच समजण्याकरितां शांतिरूप संपत्ति स्वाधीन करून घेऊन शास्त्ररूपी दुभत्या गाई घरीं पाळतात. ( नेहमीं शास्त्राध्ययन करितात. ) ३१ हेंच समजण्याकरितां पुरुष योगरूपआकाश चढून जाण्याची मनांत हांव धरितात; ३२ शरीर आदिकरून सर्व तृणप्राय मानतात, आणि संतांच्या पादुका आपल्या डोक्यावर घेतात. ३३ याप्रमाणें ज्ञानाची साधनें करून अंतर्यामीं खात्री करून घेतात. ३४ नंतर शरीर व आत्मा यांमधील खरें अंतर त्यांच्या दृष्टीस पडतें, तेव्हां भगवान म्हणतातः--आम्ही आपलें ज्ञान त्यांच्या ज्ञानावरून ओंवाळून टाकतों. ३५ आणि या पृथ्वीवर प्राण्यांच्या भिन्न भिन्न रूपानें जी ही लटकी माया पसरलेली आहे; ३६ जी शुकनलिकान्यायानें जीवांच्या मागें न लागतां, लागली आहे असें दिसतें, अशी ही वस्तुस्थिति ज्याला योग्यपणें माहीत आहे; ३७ ज्याप्रमाणें माळेवरील लटकी सर्पबुद्धि नष्ट झाली म्हणजे माळ ती माळच दिसावी; ३८ अथवा शिंपीच्या चकाकण्यामुळें तिजवरील रुप्याचा भास जाऊन ती केवळ शिंपीच आहे असें प्रत्ययास यावें, ३९ त्याप्रमाणें, आत्म्यापासून प्रकृति वेगळी आहे, असें जे आपल्या अंतःकरणांत पहातात, ते ब्रह्मरूप होतात असें मी म्हणतों. ११४० जें ब्रह्म आकाशाहूनही व्यापक आहे जें प्रकृतीची पैलथडी आहे, व जें प्राप्त झालें असतां आपल्यापासून दूर करीत नाहीं, ४१ ज्या ब्रह्माचे ठिकाणीं प्रकृतीच्या अनुरोधानें आलेला आकार नाहींसा होतो, जीवपणा विरून जातो, आणि द्वैतभाव नाहींसा होतो, असें जें अद्वय आहे, ४२ पार्था, असें हें परमतत्त्व तेच पुरुष स्वतः होतात, कीं जे दूध व पाणी निराळें करणाऱ्या राजहंसाप्रमाणें आत्मा व प्रकृति यांचा फाड करितात. ४३ महाराज म्हणतातः--याप्रमाणें श्रीकृष्णांनीं अर्जुनाला प्रकृति व आत्मा यांजविषयीं अनुभव आणून दिला. ४४ ज्याप्रमाणें एका भांड्यांतील पाणी दुसऱ्या भांड्यांत ओतावें, त्याप्रमाणें श्रीहरींनीं आपल्या हृदयांतील जें ज्ञान अर्जुनाच्या हृदयांत ओतलें, ४५ आणि यांत विशेष तें काय झालें! कारण; जो नर तोच नारायण असल्यामुळें ज्ञान कोणीं कोणास दिलें? तर श्रीकृष्ण अर्जुनाकडे बोट दाखवून 'हा तो मीच आहें' असें म्हणाले. ४६ परंतु ही गोष्ट मला कोणी विचारल्याशिवाय सांगण्याचें कारण नाहीं. असो! फार काय सांगावें! देवांनीं अर्जुनास आपलें सर्वस्व दिलें. ४७ परंतु भगवंतांनीं इतकें जरी सांगितलें, तरी अर्जुन आपले मनांत तृप्त न होतां त्यांनीं अधिक सांगावें अशी हांव करूं लागला. ४८ दिव्यांत जों जों तेल घालावें, तों तों अधिकाधिक प्रकाश पडतो; त्याप्रमाणें, श्रीकृष्ण जों जों जास्ती सांगूं लागले तों तों अर्जुनाचे मनांत ऐक्याविषयीं इच्छा धावत चालली! ४९ ज्याप्रमाणें एखादी सुगरण बायको असून वाढण्यांत सढळ हाताची असली व जेवणारे चतुर असून भोक्ते असले म्हणजे दोघांनाही वाढण्याची

१ आकर्षणानें, सान्निध्यानें. २ भू-आदिलोकांवर प्रकाश देतो. ३ वेगवेगळे. ४ शब्दतत्त्वाचें सार जाणणाऱ्या. ५ र अंतर, वैलक्षण्य. ६ दुभत्या गाई. ७ चढावें. ८ ...नीं. ९ पादुकाधारक. १० सामुग्री मिळवून. ११ ...न. १२ भगवान. १३ लटकी. १४ नाश. १५ शिंपी. ... मोठें. १७ प्रकृतीची. १८ साम्यासाम्य. १९ होऊं देत नाहीं. २० आत्मा व अनात्मा यांची निवड करणारे. २१ दूध व पाणी वेगळे करणारे हंस. २२ झाडा, प्रलय, अनुभव. २३ एका. २४ घागरींतील. २५ दुसऱ्यांत. २६ ओतावें. २७ व्यर्थ. २८ इच्छा, तृष्णा. २९ तेलाच्या. ३० भरवणानें. ३१ पेटविलेला. ३२ पाक करण्यांत कुशल अशी स्त्री.-

हातु जैसा ११५० तैसें जी होतसे देवा । तथा अवधानाचिया लवलेवा । पा-
हातां व्याख्यान चढलें थांवा । चौगुणें वरी ५१ सुवायें मेघु सांवरे । जैसा
चंद्रें सिंधु भरे । तैसा मातला रसु आदरें । श्रोतयांचेनी ५२ आतां आनंदमय
आघवें । विश्व कीजेल देवें । तें रायें परिसावें । संजयो म्हणे ५३ एवं जे म-
हाभारतीं । श्रीव्यासें आंप्रांतमती । भीष्मपर्वसंगतीं । म्हणितली कथा ५४ तो
श्रीकृष्णार्जुनसंवादु । नागरीं बोलीं विशदु । सांगोनि दाऊं प्रबंधु । वोवियेचा
५५ नुसंधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पंथा । जे शृंगाराच्या माथां ।
पाय ठेवी ५६ दाऊं वेल्हाळे देशी नवी । जे साहित्यातें वोजावी । अमृतातें
चुकी ठेवी । गोडसपणें ५७ बोल ओल्हावतेनि गुणें । चंद्रासि घे उमाणे ।
रसरंगीं भुलवणें । नादु लोपी ५८ खेचरींचियाही मना । आणी सात्त्विकाचा
पान्हा । श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ५९ तैसा वाग्विलास विस्तारू ।
गीतार्थेंसी विश्व भरूं । आनंदाचे आंवारूं । मांडूं जगा ११६० फिटो विवे-
काची वाणी । हो काना मनाची जिणी । देखो आंवडे तो खाणी । ब्रह्मवि-
द्येची ६१ दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोध सु-
काळा- । माजी विश्व ६२ हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें । जे
अधिष्ठिलों असें परमदेवें । श्रीनिवृत्तीं मी ६३ म्हणोनि अक्षरीं सुभेदीं । उपमा
श्लोकें कोंदीकोंदी । झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ६४ हा ठावोवरी मातें ।
पुरतंया सारस्वतें । केलें असे श्रीमंतें । श्रीगुरुरायें ६५ तेणें जी कृपासावायें ।
मी बोलें तेतुलें सामाये । आणि तुमचिये सभे लाहें । गीता म्हणों ६६ वरि
तुम्हां संतांचे पाये । आजि मी लाधलों आहें । म्हणोनि जी नोहे । अटकु कांहीं
६७ प्रभु कांश्मिरीं मुकें । नुपजे हें काय कौतुकें । नाहीं उणीं सामुद्रिकें ।
लक्ष्मीयेसी ६८ तैसी तुम्हां संतांपासीं । अज्ञानाची गोठी कायसी । यालागीं
नवरसीं । वरुषेन मी ६९ किंबहुना आतां देवा । अवसरु मज देयावा । ज्ञान-
देव म्हणे बरवा । सांगेन ग्रंथु ११७०

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ श्लोक ३४, ओंव्या ११७०.

व जेवणाची परस्पर हौस उत्पन्न होते, ११५० त्याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची चळवळ पाहून देवांची स्थिति झाली, व त्यांचें व्याख्यान चौपट वाढलें. ५१ ज्याप्रमाणें अनुकूल वाऱ्यानें मेघ सांवरून वृष्टि होते, किंवा चंद्रोदय झाला म्हणजे समुद्रास भरती येते, त्याप्रमाणें ऐकणाराच्या आदरबुद्धीनें वक्त्यास बोलण्याचें स्फुरण येतें. ५२ संजय म्हणतोः–धृतराष्ट्र राजा, याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची इच्छा पाहून, देव हे ज्या आपल्या वक्तृत्वानें सर्व विश्व आनंदभरित करितील, तें वक्तृत्व ऐकें. ५३ याप्रमाणें महाभारतांत भीष्मपर्वाच्या संगतींत श्रीव्यास मुनींनी आपल्या अमर्याद बुद्धीनें जी कथा सांगितली आहे, ५४ तो कृष्णार्जुनांचा संवाद उत्तम मराठी भाषेत ओंवी छंदानें सांगतों. ५५ मी आतां नुसती शांतिरसकथा सांगेन, पण ती शृंगारादि रसांच्या बरोबर होईल. ५६ ही देशभाषा साहित्याला शिकविणारी असून, आपल्या गोडीनें अमृतही फिकें पाडील. ५७ ज्या चंद्राचे उदयापासून चंद्रकांत मण्याला पाझर फुटतात, त्या चंद्रालाही माझे बोलापासून पाझर फुटेल. तसेंच, माझे वाक्याचे रसानें नादब्रह्म देखील लोपून जाईल. ५८ अज्ञानांच्या मनास देखील सात्विकतेचा पान्हा फुटेल, आणि जो अधिकारी आहे, त्याला तर ऐकण्याबरोबर समाधि लागेल! ५९ गीतेचा अर्थ असा सांगेन कीं, तो सर्व जगभर पसरून सर्व जगास आनंददायक होईल. ११६० त्यामुळें विचाराचें दैन्य फिटून मन आणि श्रवण हीं जगतील, फार काय सांगावें, आज येथील त्यानें ब्रह्मविद्येची खाणीच पहावी. ६१ ब्रह्म डोळ्यांनीं पाहून सुखाचा सोहळा दृष्टीस पडावा, व सर्व जगांत आनंदाचा सुकाळ व्हावा. ६२ मजवर श्रीनिवृत्तिमहाराजांचा अनुग्रह असल्यामुळें, मी आतां असें भाषण करीन कीं, या सर्व गोष्टी आपल्या अनुभवास येतील. ६३ म्हणून प्रत्येक अक्षराचे ठिकाणीं कवित्व आणि उपमा यांची गर्दी करून सोडीन, आणि ग्रंथाच्या प्रत्येक पदांतील अर्थाचा झाडा देईन; एक पदही सोडणार नाहीं.–ज्ञानेश्वरमहाराज आपल्या गर्वोक्तीचा परिहार करितात.–६४ येथपर्यंत मला आमच्या श्रीमंत अशा गुरूंनी सर्व शास्त्रांत निपुण केलें आहे, ६५ आणि मी जें भाषण करतों तें आपण मान्य करितां व आपणासारख्या संतमंडळींच्या सभेंत गीतेचा अर्थ सांगण्याची मला योग्यता आली आहे, हें तरी त्यांच्याच कृपेचें ऐश्वर्य आहे! ६६ त्यांत तुमच्यासारख्या संतांचे पाय आज माझ्या दृष्टीस पडले आहेत, म्हणून मला कसलीही अडचण पडत नाहीं. ६७ प्रभो, सरस्वती जी सर्वांस बोलण्याची शक्ति देणारी आहे, तिला मुकें मूल होणार नाहीं यांत काहीं कौतुक का आहे? लक्ष्मीच्या हातावर सामुद्रिक चिन्हांची उणीव असूं शकणार नाहीं; ६८ त्याप्रमाणें, तुम्हां संतांच्या पुढें कोणीही आला असतां तो अज्ञानी राहील अशी गोष्ट कशी होईल? तेव्हां मी आतां बोलण्यांत नवरसांची रेलचेल करून देईन. ६९ तर हे प्रभो, आतां मला थोडा वेळ द्या, म्हणजे मी उत्तम रीतीच्या कथा सांगेन, असें ज्ञानदेव म्हणाले. ११७०

१ उत्सुकता. २ भराला आलें, बळास चढलें. ३ चौपटीनें. ४ अनुकूल वाऱ्यानें. ५ स्फुरण येतें. ६ अगाध बुद्धीनें. ७ उत्तम शब्दानें. ८ स्पष्ट. ९ छंदांत. १० केवळ. ११ बोलण्यांत. १२ आवडती. १३ देशभाषा, मराठी भाषा. १४ शिकवील, राखवील. १५ शांत करणाऱ्या–भिजविणाऱ्या –आर्द्र करणाऱ्या गुणांनीं. १६ बरोबरी. १७ नादब्रह्म. १८ पिशाच्यांच्या. १९ निर्मल मनाला. २० गांवकुसूं, बांधभित. २१ दुष्काळ, दैन्य, उणीव. २२ ऐक्य, तन्मय. २३ पाहिजे तो. २४ उत्पन्न होईल. २५ अनुग्रह केला. २६ प्रत्येक. २७ कवित्व. २८ गर्दी, खिचाखिच. २९ एथपर्यंत. ३० परिपूर्ण. ३१ विधेनें. ३२ कृपेच्या सहाय्यानें. ३३ मान्य करतां. ३४ योग्यता आली आहे. ३५ सरस्वतीच्या पोटीं. ३६ सामुद्रिक लक्षणें. ३७ वेळ.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय चौदावा.

जयजय आचार्या[1] । समस्तसुरवर्या । प्रज्ञाप्रभासूर्या[2] । सुखोदया[3] १ जय जय सर्वविसांवया । सोहंभावसुहावया[4] । नाना[5] लोकें[6] हेलावया[7] । समुद्रा तूं २ आइकें गा आर्तबंधू[8] । निरंतरकारुण्यसिंधू । विशदविद्यावधू-[9] । वल्लभा[10] जी ३ तूं जयांप्रति लपसी । तयां विश्व हें दाविसी । प्रकट तें करिसी । आघवें-चि तूं ४ कीं पुढिलांची[11] दृष्टि चोरिजे[12] । हा दृष्टिबंधु[13] निर्फेजे[14] । परी नवल लाघव[15] तुझें[16] । जें आपणपें[17] चोरें ५ जी तूंचि तूं सर्वा यया । मां[18] कोणा बोधु कोणा माया । ऐसिया आपेंआप लाघवविया[19] । नमो तुज ६ जाणों जगीं आपं[20] बोलें । तें तुझिया बोला सुरस जालें । तुझेनि क्षमत्व[21] आलें । पृथ्वीयेसी ७ रविचंद्रादि शक्ती[22] । उदय करिती त्रिजगतीं । तें तुझिया[23] दीप्ती । तेज तेजां ८ जें चळवळिजे अनिळें[24] । तें दैविकेनि[25] जी निजबळें । नभ तुजमाजीं खेळे । लपिथपी[26] ९ किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस । असो वानणें[27] सायास । श्रुतीसि हे १० वेद वानूनि तंवचि चांगें[28] । जंव न दिसे तुझें आंग. । मग आम्हां तया मूगें[29] । एके पांती[30] ११ जी एकार्णवाचे[31] ठाईं । पाहतां थेंबाचा पांडु[32] नाहीं । मां[33] महानदी काई । जाणिजती १२ कां उदयलिया भा-स्वतु[34] । चंद्र जैसा खद्योतु[35] । आम्हां श्रुति[36] तुज आंतु । तो पाडु असे १३ आणि दुजया[37] थांवो[38] मोडे । जेथ परेशी[39] वैखरी बुडे । तो तूं मा कोणें तोंडें । वाना-वासी १४ यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांतीं[40] । चरणीं ठेविजे माथा । हेंचि भले १५ तरी तूं जैसा आहासि तैसिया । नमो जी श्रीगुरुराया । मज ग्रंथार्थेंसु[41] फळावया । वेव्हारीं[42] होईं १६ आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी । करीं ज्ञानपंथ[43] जोडी[44] । थोरा मातें १७ मग मी संसरेनें[45] तेणें ।

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय चौदावा.

१ हे गुरो, तुम्ही सकल देवांत श्रेष्ठ असून आनंद व बुद्धीरूप प्रभेचा उदय करणारे सूर्य आहां, तुमचा जयजयकार असो. १ तुम्ही सर्वांचे विश्रांतिस्थान असून सर्वांच्या हृदयांत अहं ब्रह्म हें तत्त्व चालणारे आहां, किंवा तुम्ही समुद्ररूपी असून तुमच्यांत चौदा लोक लाटांप्रमाणें हेलकावे खातात, तुमचा जयजयकार असो. २ तुम्ही दीनदयाळ असून निरंतर करुणेचे सागर आहां आणि ब्रह्मविद्यावधूचे वर आहां. ३ जे कोणी तुम्हांला जाणत नाहींत त्यांना हें सर्व विश्व खरें भासतें; व जे कोणी तुम्हांला जाणतात, त्यांना सर्व विश्वांत तुमच्याशिवाय कांहीं दिसत नाहीं. ४ नजरबंद खेळांत गारोडी दुसऱ्याची दृष्टि चोरतो असा दिसतो, म्हणजे त्याला स्वतःला लपवितां येत नाहीं, परंतु आपण स्वतःच लपवून राहण्याचें आपलें चातुर्य विलक्षण आहे. ५ महाराज, या सर्व जगांत तुम्ही कोणाला ज्ञानाचा बोध करतां व तुम्हीच कोणाला मायेच्या सपाट्यांत गुंतवितां, असा तुमचा आपल्याच ठिकाणीं सहज खेळ सुरू आहे, अशा तुम्हांला नमस्कार असो. ६ जगतांत ज्याला पाणी असें म्हणतात, त्याला जी गोडी आहे, ती तुमच्यामुळें आली आहे; व पृथ्वीला जी सहन करण्याची शक्ति आहे तिला तुमचीच शक्ति कारण आहे. ७ चंद्र व सूर्य हे केवळ मोठ्या शिंपल्याप्रमाणें निस्तेज आहेत; परंतु त्यांचा जो तिन्ही लोकांवर उजेड पडतो, तो तुमच्या तेजाच्या शक्तीचा प्रभाव आहे. ८ चहूंकडे फिरणारा वायु हाही तुमच्याच शक्तीमुळें फिरत असतो, व आकाश जरी मोठें दिसतें तरी त्याचा समावेश तुमच्यांत होऊन तें लपंडावाप्रमाणें तुमच्या एका कोपऱ्यांत लपतें. ९ फार काय सांगावें! सर्व माया ही तुमच्याच ठिकाणीं असून, ज्ञानही तुमच्याच शक्तीनें चहूंकडे पहातें; इतकेंच नव्हे, तर तुमच्या स्वरूपाचा पार न लागल्यामुळें तें श्रुतीला वर्णन करण्याचे श्रम झाले. १० वेद वर्णन करण्यांत चतुर खरा, परंतु जोंपर्यंत तुमचें दर्शन झालें नाहीं तोंपर्यंतच वेद तुमचें वर्णन करूं शकतात, परंतु तेंच आपलें दर्शन झाल्यावर आमची व त्यांची एकच दशा होते, व दोघांसही स्वस्थ बसावें लागतें. ११ सर्व जलमय झाल्यावर त्यांत एका थेंबाची खिसगणती नसतेच, परंतु मोठी नदी तरी ओळखतां येते काय? १२ किंवा सूर्य उगवल्यावर चंद्र जसा काजव्याप्रमाणें होतो म्हणजे सूर्यापुढें चंद्र आणि काजवा यांची किंमत एक, त्याप्रमाणें तुमच्या स्वरूपापुढें माझी आणि श्रुतींची किंमत एक. १३ आणि ज्या ठिकाणीं द्वैताचा ठाव मोडून परेसह वैखरी वाणी स्तब्ध राहाते, त्या तुमचें कोणत्या तोंडानें वर्णन करावें, म्हणजे कोणालाही वर्णन करतां येणार नाहीं. १४ म्हणून आतां तुमची स्तुति करण्याचें सोडून मुकाट्यानें तुमच्या चरणांवर मस्तक ठेवावें हाच उत्तम मार्ग होय. १५ तर, हे गुरुराया, तुम्ही जसे आहां तसेच तुम्हांला मी नमस्कार करतों. तुम्ही माझ्या गीतार्थकथनरूपी व्यापारांत मला नफा करून देण्याकरितां माझे सावकार व्हा. १६ तर आतां आपल्या कृपारूप भांडवलाच्या थैलीची गांठ सोडून माझी मतिरूप पोतडी भरा; आणि आपण थोर आहां तेव्हां मला ज्ञानपदाची (ज्ञानरूप नफ्याची) जोड करून द्या. १७ मग मी या व्यापारावर

१ गुरो. २ बुद्धिरूप प्रातःकाळच्या सूर्या. ३ सुखाच्या उदयकर्त्या. ४ मी ब्रह्म आहें असा भाव सुशोभित करणाऱ्या. ५ किंवा. ६ चौदा लोक. ७ लोकरूपी लाटांना. ८ दीनदयाळा. ९ शुद्ध ब्रह्मविद्यारूप वधूच्या. १० भर्त्या. ११ दुसऱ्याची. १२ बंद करितो. १३ नजरबंद होतो. १४ उत्पन्न. १५ कौतुक, नाटकीपणा. १६ तुझ्या मायेचें. १७ स्वतःला, आत्मस्वरूपाला, आपल्याला. १८ तर मग. १९ खेळ करणाऱ्या. २० पाणी. २१ सहनशीलता. २२ शिंपा. २३ तुझ्या दीप्तीच्या योगानें सतेज. २४ वायूनें. २५ देवांच्या. २६ लपंडाव. २७ वर्णन करणें. २८ चांगलें. २९ मौन धरणें. ३० पंक्तीस. ३१ जलमय झालें म्हणजे. ३२ थोरीव, योग्यता. ३३ तर, मग. ३४ सर्व. ३५ काजवा. ३६ वेदाला. ३७ द्वैताचें. ३८ ठाव, पत्ता, मूळ. ३९ परा नामक पहिल्या वाणीसह. ४० मुकाट्यानें. ४१ गीतार्थकथनरूप धंदा—उद्योग, प्रबंधक्रम. ४२ व्यापारी, सावकार. ४३ ज्ञानप्रधान काव्य. ४४ मात्री, फायदा, जोड. ४५ सांवरेन.

करीन संतांसी कर्णभूषणें । लेववीन सुलक्षणें । विवेकाचीं १८ जी गीतार्थ-
निधान । काढू माझें मन । सुयीं स्नेहांजन । आपलें तूं १९ हे वाक्सृष्टि
एके वेळे । देखतु माझे बुद्धीचे डोळे । तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्य बिंबें
२० माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ । तो वसंतु होय स्नेहाळ ।
शिरोमणी २१ प्रमेयें महापूरें । हे मतिगंगा ये थोरें । तैसा वरिषें उदारें । दि-
ठिवेनी २२ अगा विश्वैकधामा । तुझा प्रसाद चंद्रमा । करूं मज पूर्णिमा ।
स्फूर्तीची जी २३ जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें । वोसं-
डेल स्फूर्तीतें । रसवृत्तीचे २४ तंव संतोषोनि श्रीगुरुराजें । म्हणितलें विनति-
व्याजें । मांडिलें देखोनि दुजें । स्तवनमिषें २५ हें असो आतां वांजटा । तो
ज्ञानार्थ करूनि गोमटा । ग्रंथु दावीं उत्कंठें । भंगों नेदीं २६ हो कां जी
स्वामी । हेंचि पाहत होतों मीं । जे श्रीमुखें म्हणा तुम्ही । ग्रंथु सांग २७ स-
हजें दूर्वेचा डिरुं । आंगेंचि तंव अमरु । वरी आला पूरु । पीयूषाचा २८ तरी
आतां येणें प्रसादें । विन्यासें विदग्धें । मूळशास्त्रपदें । वाखाणीन २९ परी
जीवा आंतुलीकडे । जैसी संदेहाची डोणी बुडे । ना श्रवणीं तरी चोंडे । वाढी
दिसे ३० तैसी बोली साचारी । अवंतरो माझी माधुरी । मौलें मागूनि घरीं ।
गुरुकृपेच्या ३१ तरी मागां त्रयोदशीं । अध्यायीं गोठी ऐसी । श्रीकृष्ण अर्जु-
नेंसी । चावळले ३२ जे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें । होइजे येणें जगें । आत्मा गुणसंगें ।
संसारिया ३३ आणि हाचि प्रकृतिगतु । सुखदुःख भोगीं हेतु । अथवा गुणा-
तीतु । केवळु हा ३४ तरी कैसा पां असंगा संगु । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोगु ।
सुखदुःखादि भोगु । केवीं तया ३५ गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती ।
नातरी गुणातीतीं । चिन्हें काई ३६ एवं इया आघवेया । अर्था रूप करावया ।
विषो एथ चौदाविया । अध्यायासी ३७ तरि तो आतां ऐसा । प्रस्तुत परियेसा ।
अभिप्रायो विश्वेशा । वैकुंठाचा ३८ तो म्हणे गा अर्जुना । अवधानाची सर्व
सेना । मेळऊनि इया ज्ञाना । झोंबावें हो ३९ आम्हीं मागां तुज बहुतीं ।
दाविलें हें उपपत्तीं । तरी आझुनी अप्रतीती । कुशी न निघे ४०

श्रीभगवानुवाच:—

परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् । यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥

म्हणौनि गा पुढतीं । सांगिजेल तुजप्रती । पर म्हण म्हणोनि श्रुती । डौहा-

सांवरून संतांच्या कानांत सुंदर अशी विचाररूप कर्णभूषणें तयार करून घालीन. १८ महाराज, गीतार्थरूपी ठेवा बाहेर काढण्याविषयीं माझ्या मनांत जी इच्छा उत्पन्न झाली आहे, ती सफल करण्याकरितां तुम्ही आपलें स्नेहरूप अंजन माझ्या डोळ्यांत घाला. १९ माझ्या बुद्धिरूप डोळ्यांना एक वेळ शब्दमय सृष्टि पहातां येईल, अशा तऱ्हेचा आपल्या करुणारूप सूर्यबिंबाचा निर्मळ प्रकाश पाडा. २० माझी बुद्धिरूप वेली पुष्कळ वाढून तिला काव्यरूपी फळें येण्याकरितां वेलींना प्रफुल्लित करण्याची कृपा करण्यामध्यें श्रेष्ठ असा जो वसंत, तो तुम्ही व्हां. २१ आपल्या कृपादृष्टीचा इतको औदार्यानें वर्षाव करा की, त्यानें माझ्या बुद्धिरूप गंगेस अर्थरूपी ( सिद्धांतरूपी ) महापूर यावा. २२ हे विश्वैकधामा, आपला प्रसादचंद्रमा मला स्फूर्तीची पौर्णिमा करो. ( पूर्ण चंद्रोदयानें पौर्णिमा शोभते, त्याप्रमाणें आपल्या कृपेनें मला पूर्ण स्फूर्ति येवो. ) २३ ती पौर्णिमा मी अवलोकन केली, ( आपला कृपाप्रसाद झाला, ) म्हणजे माझ्या ज्ञानसमुद्राला भरतें येईल; आणि नवरस हे स्फूर्ति भरून सांडूं लागतील ! २४ असें ज्ञानदेवाचें भाषण ऐकून श्रीगुरु निवृत्तिनाथ महाराज संतोष पावून म्हणाले की, तूं स्तुतीच्या मिषानें द्वैत व्यर्थ वाढवितोस, २५ तर आतां ही व्यर्थ स्तुति राहूं दे; जो जाणण्याचा विषय आहे, तो चांगला तयार करून ग्रंथ सांग. उत्कंठेचा भंग होऊं देऊं नको. २६ तेव्हां महाराज म्हणालेः–प्रभो, तुम्ही आपल्या मुखानें ग्रंथ सांग, हेंच म्हणण्याची मी वाट पहात होतों. २७ अगोदरच हरळीची मुळी अमर, त्यांत तिजवर अमृताचा वर्षाव झाला, मग काय विचारतां ! २८ आतां गुरुप्रसाद झाल्यामुळें गीतेंतील मूळ शास्त्राच्या प्रत्येक पदार्चें सविस्तर व स्पष्ट वर्णन करीन, २९ की जें ऐकल्यामुळें मनांतील सर्व संशय नाहींसा होऊन श्रवणाची इच्छा दुणावेल. ३० माझ्या मधुर वाणींतून असे उत्तम शब्द निघावे ऐवढेंच गुरूंच्या पायांपाशीं माझें मागणें आहे. ३१ असो; पूर्वी तेराव्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं अर्जुनास अशी कथा सांगितली ३२ कीं, आत्मा व प्रकृति यांच्या संयोगानें हें जग निर्माण होतें; व गुणांच्या अनुरोधानें आत्मा संसारांत निमग्न होतो; ३३ मायोपाधीनें त्यालाच सुखदुःख भोगावें लागतें; व तोच गुणसंगरहित झाला म्हणजे मुक्त होतो, ३४ तर संगरहित असा जो आत्मा, त्याला प्रकृतीचा संग व्हावाच कसा ? आत्मा व प्रकृति यांचा संयोग होतो तो कोणता ? त्याला सुखदुःखादिभोग व्हावा कसा ? ३५ ते गुण कसे व किती आहेत ? त्या गुणांची बाधा कशा रीतीनें होते, आणि पुरुष गुणातीत झाला म्हणजे त्याचीं लक्षणें कोणतीं ? ३६ अशा प्रकारें या सर्व गोष्टींचें वर्णन करणें हाच विषय या चौदाव्या अध्यायांत आहे. ३७ तर आतां त्या वैकुंठनिवासी विश्वेशाचा अभिप्राय काय आहे तो, ऐका. ३८ ते म्हणालेः–अर्जुना श्रवण करण्याची सर्व सामग्री जमवून तूं या ज्ञानाला सोंव यें का ! ३९ पूर्वी तुला आम्हीं हें ज्ञान अनेक प्रकारें स्पष्ट सांगितलें, परंतु तुझें अज्ञान अजून पूर्ण नाहींसें होत नाहीं. ४०

**अन्वयार्थ**—(भूयः)–पुनरपि–(ज्ञानानां उत्तमं परं ज्ञानं)–सर्व ज्ञानांतील उत्तम व परम ज्ञान–(प्रवक्ष्यामि मी तुला सांगेन.–(यत्)–जें ज्ञान–(ज्ञात्वा)–जाणून–(सर्वे मुनयः) –सर्व मुनि–(इतः)–या शरीराच्या नाशानंतर–(परां सिद्धिं) –सर्वोत्तम सिद्धीला–(गताः)–प्राप्त झाले आहेत. १

म्हणून बाबारे, 'पर' या शब्दाचा महिमा श्रुतींनीं जो वर्णन केला आहे, तो तुला आम्ही पुनः सांगतों. ४१

---

१ धारण करवीन. २ गीतार्थरूपी ठेवा. ३ घाल. ४ स्नेहरूप अंजन. ५ शब्दसृष्टी. ६ बुद्धिरूप वेली. ७ विस्तारलेली, सुंदर. ८ सिद्धांत. ९ बुद्धिरूप गंगा. १० वृष्टि कर. ११ कृपादृष्टीनें, १२ स्फुरणाची. १३ ज्ञानसमुद्राला. १४ भरून सांडेल, येईल. १५ रसिकपणाचें. १६ विनंतीच्या व स्तुतीच्या मिषानें द्वैत मांडलेलें पाहून. १७ निष्फळ, व्यर्थ. १८ जाणावयाचा विषय. १९ आशा, उत्सुक. २० अंकुर. २१ प्रशस्तपणें, विस्तारानें. २२ स्पष्ट. २३ आंत. २४ नौका. २५ इच्छा. २६ प्रकट करो. २७ मधुर वाणी. २८ भिक्षा, खंडोबाचे माले. ( गळ्यांत नागर घालून भिक्षा मागणें. ) २९ बोलले. ३० संसारी. ३१ मायोपाधिक. ३२ कारण. ३३ मुक्त. ३४ लक्षणें. ३५ उपक्रम. ३६ विषय. ३७ लगटावें. ३८ युक्तीनें. ३९ मनांत स्थिरत नाहीं. ४० सर्वांहून निराळें. ४१ प्रसिद्ध केलें.

रिलें जें ४१ एऱ्हवीं ज्ञान हें आपुलें। परि पैर ऐसेनि जालें। जे आवडोनि घेतलें। भवस्वर्गादिक ४२ अगा याचि कारणें। हें उत्तम सर्वांपरी मी म्हणें। जे वन्हि हें तृणें। येरें ज्ञानें ४३ जियें भवस्वर्गातें जाणती। यागचि चांग म्हणती। पारखी फुडी आथी। भेदीं जया ४४ तियें आघवींचि ज्ञानें। केलीं येणें स्वप्नें। जैशा वातोर्मी गगनें। गिळिजती अंतीं ४५ कां उदितें रश्मिराजें। लोपिलीं चंद्रादि तेजें। नाना प्रळयांबुमाजें। नदी नद ४६ तैसें येणें पाहलेया। ज्ञानजात जाय लया। म्हणोनियां धनंजया। उत्तम हें ४७ अनादि जे मुक्तता। आपुली असे पंडुसुता। तो मोक्षु हातां येता। होय जेणें ४८ जयाचिया प्रतीती। विचारचीरीं समस्तीं। नेदिजेचि संसृती माथां उधऊं ४९ मनें मन घालूनि मागें। विश्रांति जालिया आंगें। ते देहीं देहाजोगे। होतीचि ना ५० मग तें देहाचें वेळें। वोलांडूनि एकेचि वेळे। सर्वंतुकी कांटोळें। माझें जालें ५१

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः। सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २ ॥

जे माझिया नित्यता। तेणें नित्य ते पंडुसुता। परिपूर्ण पूर्णता। माझियाची ५२ मी जैसा अनंतानंदु। जैसाचि सत्यसिन्धु। तैसेचि ते भेदु। उरेचि ना ५३ जें मी जेवढें जैसें। तेंचि ते जाले तैसें। घटभंगीं घटाकाशें। आकाश जेवीं ५४ नातरी दीपमूळकीं। दीपशिखा अनेकीं। मीनलियां अवलोकीं। होय जैसें ५५ अर्जुना तयापरी। सरली द्वैताची वोरी। नांदे नामार्थ एकाहारीं। मीतूंविण ५६ येणेंचि पैं कारणें। जैं पहिलें सृष्टीचें जुंपणें। तेंही तया होणें। पडेचिना ५७ सृष्टीचिये सर्वादी। जयां देहाची नाहीं बांधी। ते कैचें प्रळयावधी। निमेतील पां ५८ म्हणौनि जन्मक्षयां। अतीत ते धनंजया। मी जाले ज्ञाना इया। अनुसरोनी ५९ ऐसी ज्ञानाची वाढी। वानिली देवें आवडी। तेवींचि पार्थाही गोडी। लावावया ६० तंव तया जालें आन। सर्वांगीं निघाले कान। संपाई अवधान। आतला पां ६१ आतां देवाचिया ऐसें। जाकळीजत असे वोरसें। जे निरूपण आकाशें। वेंटाळेना ६२ मग म्हणे प्रज्ञांकांता। उजवली आजि वक्तृत्वता। जे बोलायेवढा श्रोता। जोडलासी ६३ तरि एकु मी अनेकीं। गोंविजे देहपाशकीं। त्रिगुणीं लुब्धकीं। कवणेपरी ६४ कैसा क्षेत्रयोगें। वियें इयें जगें। तें परिस सांगें। कवणेपरी ६५ पैं क्षेत्र येणें व्याजें। यालागीं हें बोलिजे। जे मत्संगबीजें। भूतीं पिके ६६

आपल्याच आत्मज्ञानास 'पर' म्हणण्याचें कारण संसार व स्वर्ग हेच आपल्या स्वरूपाप्रमाणें आवडले म्हणून झालें आहे. ४२ और, याच कारणास्तव आत्मज्ञान सर्वांपेक्षां उत्तम असें मी म्हणतों. कारण हें अग्निरूप असून इतर ज्ञानें त्याच्यापुढें तृणरूपी आहेत. ४३ कारण, ज्या ज्ञानाची मजल संसार व स्वर्ग या सुखापलीकडे नसते, ज्याला यज्ञयागादि कर्मेंच उत्तम वाटतात, व ज्याला द्वैताशिवाय दुसऱ्या कशाची ओळख नसते, ४४ तीं सर्व ज्ञानें आत्मज्ञानापुढें स्वप्नवत् भासतात. ज्याप्रमाणें गगनांत उत्पन्न झालेला वायु कितीहि मोठा असला तरी त्याचा त्यांतच लय होतो, ४५ किंवा सूर्य उगवल्यावर जसें चंद्रादि नक्षत्रांचें तेज लोपतें, अथवा प्रलयकालचें पाणी वाढल्यावर ज्याप्रमाणें नदी, नद हा भेद रहात नाही, ४६ त्याप्रमाणें आत्मज्ञानाचा उदय झाल्यावर इतर सर्व ज्ञानें लय पावतात. म्हणून अर्जुना, त्याला आम्ही 'उत्तम' असें म्हणतों. ४७ हे पांडुसुता, अनादिकालापासून आपल्याजवळ सहज असणारी जी आपली मुक्तता किंवा मोक्ष ह्या ज्ञानाच्या प्राप्तीपासून आपल्या हातास येतो. ४८ ज्याचा अनुभव आला असतां, सर्व ज्ञाते संसाराला वर डोकें कांहं देत नाहीत; ४९ आपल्या मनाची विषयांकडे जाणारी धांव मागें हटवून त्याला जागच्याजागीं बसविल्यावर, सहज विश्रांति-प्राप्त होते, असें झाल्यावर ते देहीं असूनही नसल्यासारखे होतात. ५० नंतर ते देहद्वयाचें वेळकें एकदम ओलांडून माझ्याच योग्यतेस पावतात, ५१

**अन्वयार्थ**–(इदं ज्ञानं)–या ज्ञानाचा–(उपाश्रित्य)–आश्रय करून–(मम)–माझ्या–(सांधर्म्यं)–सारूप्यास–(आगताः)–आलेले ज्ञानी–(सर्गे अपि)–सृष्टीच्या वेळीहि–(न उपजायन्ते)–उत्पन्न होत नाहीत–(च)–आणि–(प्रलये)–प्रलयाच्या वेळीं–(न व्यथन्ति)–व्यथा–नाश पावत नाहीत. २

कारण, अर्जुना, जे माझ्या नित्यतेनें नित्य आणि माझ्या परिपूर्णतेनें पूर्ण आहेत, ५२ आणि ज्याप्रमाणें मी जसा नेहमी अनंत असून महानंदरूप आहें, व सत्यसिद्ध आहें, तसेंच ते असतात; त्यांच्या व माझ्यांत भेद मुळींच रहात नाही. ५३ ज्याप्रमाणें घटाचा नाश झाल्यावर घटाकाश महाकाशरूप होतें; त्याप्रमाणें मी जसा व जेवढा आहे, तसेच ते झाले. ५४ किंवा मूळ दिव्यापासून लावलेल्या पुष्कळ वाती एकत्र केल्या म्हणजे त्यांचें तेज मूळ दिव्यांतच मिळतें, ५५ त्याप्रमाणें अर्जुना, द्वैतभाव नाहींसा होऊन मी व तूं हे भेद एकाच पंक्तीला वसून एकत्र नांदतात. ५६ याच कारणामुळें, ज्या वेळीं समूळ सृष्टीला आरंभ होतो, त्या वेळां त्याला जन्म घ्यावा लागत नाही. ५७ मग, ज्यांना सृष्टीच्या आरंभी देहाचें बंधन नाहीं. त्यांचा प्रलयकाळीं नाश कोठून होणार? ५८ म्हणून धनंजया, जे आत्मज्ञानाला अनुसरून मद्रूप झालें आहेत, ते जन्ममरणातीत आहेत: ५९ याप्रमाणें आत्मज्ञानाची प्रौढी देवांनी आपल्या आवडीनें वर्णन केली, आणि अर्जुनालाही त्या ज्ञानाविषयीं आवड उत्पन्न व्हावी अशा हेतूनें ही प्रौढी वर्णन केली. ६० तों अर्जुनाची अशी स्थिति झाली की, त्याच्या सर्वांगालाच कान फुटले, म्हणजे अर्जुन नखशिखांत अवधानरूप बनला. ६१ आपलें सांगणें आकाशासही आंवरलें जाणार नाहीं, तें अर्जुन धारण करतो आहे, असें पाहून देवांनाही प्रेमाचें भरतें आलें; त्यांची सांगण्याची हौस गगनांत मावेना. ६२ मग भगवान् म्हणालेः–अर्जुना, माझ्या वक्तृत्वरूपी कन्येस तूं बुद्धिरूप वर मिळाल्यामुळें ती आज उजवली! कारण माझ्या बोलण्याच्या हौसेप्रमाणें तूं उत्तम श्रोता मिळालास! ६३ तर आतां, मी एक असून, त्रिगुणरूपी पारधी हे देहरूपी पाश टाकून मला अनेक रूपें कशी घ्यावयास लावतात, ६४ व मायेच्या उपाधीनें माझ्यापासून हें जग कसें उत्पन्न होतें तें सांगतों, ऐक. ६५ हें पहा–माझ्या संगरूपी बीजापासून प्राणिमात्र उत्पन्न होतात, याच कारणामुळें प्रकृतीला क्षेत्र असें म्हणावयाचें. ६६

१ पलीकडे. २ कारण. ३ संसार व स्वर्गादिक. ४ अग्नि. ५ इतर. ६ पारखी=परिक्षा, ओळख. ७ भेदांमध्यें, द्वैतामध्यें. ८ वाऱ्याच्या लहरी. ९ सूर्यानें. १० जलप्रळयानें. ११ उगवल्यानें उदय झाल्यानें. १२ मोक्ष. १३ ज्ञात्यांनीं. १४ जन्ममरण फेरा, संसार. १५ डोकें वर करूं. १६ ते मुनि. १७ वेळूकें, दुगेळें. १८ समतोल. १९ वजनांत, ताजव्यांत, पारड्यांत. २० तुल्यप्रतिष्ठा. २१ मूळ ज्योतींत. २२ दिव्याच्या ज्योती. २३ मिळाल्या, मिसळल्या. २४ फेरी, येरझार. २५ नामाचा विषय. २६ मूळ सृष्टीची उत्पत्ती. २७ घडतच नाहीं. २८ बंधन. २९ नाश पावतील. ३० संपूर्ण, निखालस. ३१ नटला, झाला. ३२ व्यापित. ३३ स्नेहभरित, पान्हानें. ३४ बुद्धिपते अर्जुना. ३५ विवाहित झाली, सफलित झाली. ३६ आपापेसी. ३७ देहरूपी पाशामध्यें. ३८ पारध्यांनीं. ३९ मिषानें निमित्तानें.

मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् । संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥

एऱ्हवीं तरी महद्ब्रह्म । यालागीं हें ऐसें नाम । जे महदादिविश्राम । शालिका हें ६७ विकारां बहुवस थोरी । अर्जुना हेंचि करी । म्हणोनि अवधारीं । महद्ब्रह्म ६८ अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदंती । सांख्याचिया प्रतीतीं । प्रकृति हेचि ६९ वेदांतीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञराया । असो किती बोलों वाया । अज्ञान हें ७० आपला आपणपेयां । विसरु जो धनंजया । तेंचि रूप यया । अज्ञानासी ७१ आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे । वातीं पाहतां जैसें । आंधारें कां ७२ हालविलिया जाय । निश्चळीं तरी होय । दुधीं जैसी साय । दुधाची ते ७३ पैं जागरु ना स्वप्न । ना स्वरूप अवस्थान । ते सुषुप्ति कां घन । जैसी होय ७४ कां न वियतां वायूतें । वांझें आकाश रितें । तया ऐसें निरुतें । अज्ञान गा ७५ पैल खांब कां पुरुखु । ऐसा निश्चयो नाहीं एकु । परी काय नेणो आलोकु । दिसत असे ७६ तेवीं वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे । परी कांहीं अनारिसें । देखिजेना ७७ ना राती ना तेज । ते संधि जेवीं सांज । तेवीं विरुद्ध ना निज । अज्ञान आथी ७८ ऐसी कोण्हीं एकी दशा । तिये वादु अज्ञान ऐसा । तया गुंडलिया [12]प्रकाशा । क्षेत्रज्ञ नाम ७९ अज्ञान थोरिये[13] आणिजे । आपणपें तरी नेणिजे । तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें ८० हाचि उभय योगु । [15]बुझें बापा चांगु । [16]सत्तेचा नैसर्गु । स्वभावो हा ८१ आतां अज्ञानासारिखें । [17]वस्तु आपणपांचि देखे । परी रूपें अनेकें । नेणों कोणें ८२ जैसा रंकु भ्रमला । म्हणे जारे मी रावो आला । कां मूर्च्छितु गेला । स्वर्गलोका ८३ तेवीं [18]लचकलिया दिठी । मग देखणें जें जें उठी । तया नाम सृष्टी । मीचि वियें पैं गा ८४ जैसें कां स्वप्न[20] मोहा । तो एकाकी देखे बहुवा । तोचि पाडु आत्मया । स्मरणेंवीण असे ८५ हेंचि [21]अनिर्भ्रांती । [22]प्रमेयें [23]उपलवूं पुढती । परी तूं प्रतीती । याचि घे पां ८६ तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी । अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ८७ इये नाहीं हेंचि [24]रूपें । [25]ठाणें हें अति [26] उमप । हे [27]निद्रितां समीप । [28]चेतां दुरी ८८ पैं [29]माझेनिची आंगें । [30]पहुडल्या हे[31] जागे । आणि [32]सत्तासंभोगें । [33]गुर्विणी होय ८९ [34]महद्ब्रह्माउदरीं । प्रकृति आठै विकारीं । गर्भाची करी । पेलोवेली[35] ९० उभयसंगु पाहिलें । बुद्धितत्त्व प्रसवलें । बुद्धितत्त्वें भारैलें । होय मन ९१ तरुणी

अन्वयार्थ—(मम)-माझी-(योनिः)-त्रिगुणात्मिका प्रकृति [हें सर्व भूतांचें कारण आहे.] (महत् ब्रह्म)-ती सर्व कार्यांहून मोठी असल्यामुळें-महती-मोठी व आपल्या विकारांचें भरण-पोषण करीत असल्यामुळें ब्रह्म आहे.-(तस्मिन्)-त्या महत् ब्रह्मांत म्ह० भूतांच्या कारणांत-(अहं)-मी-(गर्भं)-सर्व भूतांच्या जन्माचें कारण-बीज-(दधामि)-स्थापितों-(हे भारत)-हे अर्जुना !-(ततः)-त्यापासून-(सर्वभूतानां)-सर्व भूतांची-(संभवः)-उत्पत्ति-(भवति)-होते. ३

ही माया महत्तत्त्वादिकांचें मूळ विश्रामस्थान म्हणजे लयस्थान आहे. अर्थात् सर्व जगापेक्षां मोठी आहे, म्हणून हिला ' महद्ब्रह्म ' असें नांव दिलें आहे. ६७ तसेंच अर्जुना, हिच्या योगानें विकार व गुण हे वृद्धि पावतात, म्हणून हिला महद्ब्रह्म असें म्हटलें आहे, ६८ अव्यक्त मतवाद्यांच्या मतें हिला अव्यक्त असें नांव आहे, व सांख्यमतवादी हिलाच " प्रकृति " असें म्हणतात, ६९ हे प्राज्ञशिरोमणे, वेदांती हिला ' माया ' असें म्हणतात. असो; उगीच फार काय बोलावें ! अज्ञान जें तें हेंच. ७० हे धनंजया, आपल्या आत्मस्वरूपाचा आपल्यास जो विसर पडतो, तेंच या अज्ञानाचें रूप. ७१ आणखी एक असें आहे कीं, ज्याप्रमाणें हातांत दिवा घेऊन अंधार शोधूं लागलें असतां तो दिसत नाहीं, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा विचार केला कीं तें दिसेनासें होतें. ७२ दूध घोंटीत बसलें म्हणजे जशी त्यावर साय येत नाहीं, व तेंच घोंटलें नाहीं म्हणजे त्यावर साय येते; ७३ किंवा मनुष्य ज्या वेळेस जागृत अवस्थेंत अथवा स्वप्नावस्थेंत नसतो, किंवा समाधिस्त नसतो, त्या वेळेस जशी गाढ झोंप लागते; ७४ किंवा वायू उत्पन्न झाला नसतां म्हणजे ज्याप्रमाणें आकाश मात्र एकटें असतें, त्याप्रमाणें इतर अवस्था, शिवाय जी निवांत निद्रावस्था, तेंच अज्ञान होय. ७५ ज्या वेळेस आपल्या समोर एकादा झाडाचा बुडखा असून तो खांब आहे, किंवा पुरुष आहे असें निश्चयानें सांगतां येत नाहीं, परंतु कांहीं तरी दिसत आहे, असा भास होतो. ७६ त्याप्रमाणें आत्म्याचें निश्चळ स्वरूप ज्या वेळेस खरोखर दिसत नाहीं, व दुसरी कांहीं वस्तु आहे, असाही निश्चय होत नाहीं, ७७ रात्र नाहीं व दिवस नाहीं या दोहोंच्या संधीला जसा सायंकाळ म्हणतात, त्याचप्रमाणें आत्मा व जगत् यांच्या ज्ञानाच्या अभावाच्या स्थितीला अज्ञान असें म्हणतात. ७८ अशी जी एक दोहोंमधील अनिर्वचनीय स्थिति तिला ' अज्ञान ' असें म्हणतात; व त्या अज्ञानानें आवरण झालेलें जें चैतन्य, त्यालाच क्षेत्रज्ञ असें म्हणतात. ७९ आपलें शुद्ध स्वरूप न जाणतां जें अज्ञान वाढतें, तें क्षेत्रज्ञाचें ( जीवात्म्याचें ) रूप होय. ८० ही माया व चैतन्य यांचा योग नीट लक्षांत आण. कारण, मूळ स्वरूपावर मायेचा स्वभावच असा आहे. ८१ याप्रमाणें मायेच्या अनुरोधानें चैतन्य आत्मस्वरूप विसरून अनेक रूपें घेतें. ८२ ज्याप्रमाणें दरिद्री मनुष्याला भ्रम झाला असतां, तो रस्त्यानें जाऊं लागला म्हणजे इतर लोकांत ' आमची राजाची स्वारी आली ' असें म्हणतो, किंवा मूर्च्छा आलेला मनुष्य ज्याप्रमाणें ' स्वर्ग पाहून आलों ' असें म्हणतो, ८३ त्याप्रमाणें एकदा दृष्टि आत्मस्वरूपावरून चळली म्हणजे, जी जी कल्पना उत्पन्न होते, तिला सृष्टि असें म्हणतात. ती माझ्यापासूनच उत्पन्न होते, ८४ मनुष्य एकटा असून स्वप्नाच्या भ्रांतीनें पुष्कळ वस्तु पहातो, तोच प्रकार चैतन्याला आत्मस्वरूपाचा विसर पडला म्हणजे होतो. ८५ हीच भ्रांति पुनः शुद्ध स्वरूपावर आलेली अन्य प्रकारानें तुला पुढें सांगूं; परंतु मूळ स्वरूपावर हें मायेचें रूप आहे ही गोष्ट तूं विसरूं नको. ८६ तर माया ही माझी स्त्री असून आद्यंतरहित, तरुण, अलौकिक व गुणवान् आहे. ८७ हिचें रूप पाहूं गेलें असतां कांहीं नाहीं हेंच हिचें रूप. हिची आकृति फार व्यापक आहे. ही अज्ञान्यांच्या सन्निध असते, व ज्ञान्यापासून दूर रहाते. ८८ परंतु ही माया माझ्या आत्मस्वरूपावर निजल्यामुळें आत्मसत्तेच्या संभोगानें गर्भ धारण करते. ८९ मग जीवभूता प्रकृतीच्या उदरीं प्राकृत अष्ट विकाररूप गर्भाची ही वृद्धि करिते. ९० आत्मा व प्रकृति यांच्या संयोगापासून प्रथम बुद्धितत्त्व उत्पन्न होतें, व तीचें बुद्धि बळवल्यावर मन होतें, ९१ मनाची स्त्री

१ मूळमाया. २ महत्तत्त्वादिकांचें विश्रांतिस्थान. ३ अव्यक्त मायांच्या मतें. ४ दिव्यानें. ५ समाधि. ६ वायु उत्पन्न होण्याचे पूर्वी. ७ आभास. ८ वेगळें. ९ अन्यथा ज्ञान, एक असून भलतेंच वाटणें. १० खरें ज्ञान, खऱ्या स्थितीचें ज्ञान. ११ गुंडाळलेल्या, १२ चैतन्याला. १३ महत्त्वाला आणणें, प्रतिष्ठा वाढविणें. १४ जीवात्म्यानें. १५ जाण. १६ मूळ स्वरूपावर मायेचा. १७ सहाजिक. १८ चैतन्य.

१९ तरळली, चंचली. २० स्वप्नभ्रांतीनें. २१ दुसरी भ्रांति. २२ तात्पर्य, सिद्धांत. २३ विस्तारानें सांगतों. २४ अभाव हेंच जिचें रूप. २५ आकृति. २६ अत्यंत मोठी. २७ अज्ञानकाळीं. २८ जागे असतां. २९ स्वरूपीं. ३० मी स्वतः निजल्यावर. ३१ ही माया. ३२ आत्मसत्ता, भोगानें. ३३ गरोदर. ३४ मूळ मायेच्या पोटांत. ३५ वृद्धि.

ममता मनाची । ते अहंकार तत्त्व रची । तेणें महाभूतांची । अभिव्यक्ति होय ९२ आणि विषयेंद्रियां गोसीं । स्वभावें तंव भूतांसी । म्हणोनि येती सरिसीं । तियेंही रूपा ९३ जालेनि विकारक्षोभें । पाठीं त्रिगुणाचें उभें । तेव्हां ये वासनागर्भें । ठायेंठावो ९४ रुखांचा आंवांका । जैसी बीजकणिका । जीवीं बांधे उदका । भेटतखेंवो ९५ तैसी माझेनि संगें । अविद्या नाना जगें । ओर घेवों लागे । अणियांची ९६ मग गर्भगोळा तया । कैसें रूप तें ये आया । तें परियेसें राया । सुजनांचिया ९७ पैं मणिजें स्वेदजें । उद्भिजें जारजें । उमटती सहज । अवयव हे ९८ व्योमवायुवशें । वाढलेनि गर्भरसें । मणिजु उससे । अवयव तो ९९ पोटीं सूनि तमरजें । आंगाळिकां तोय तेजें । उठितां निपजे । स्वेदजु गा १०० आपपृथ्वी उत्कटें । आणि तमोमात्रें निकृष्टें । स्थावरु उमटे । उद्भिजु हा १ पांचां पांचही विरजीं । होती मनबुद्ध्यादि सौजीं । हीं हेतु जारजीं । ऐसें जाण २ ऐसे चारी हे सरळ । करचरणतळ । महाप्रकृति स्थूळ । तेंचि शिर ३ प्रवृत्ति पेलैलें पोट । निवृत्ति ते पाठी नीट । सुर योनी आंगे आठ । ऊर्ध्वांचीं ४ कंठु उल्हासता स्वर्गु । मृत्युलोकु मध्यभागु । अधोदेशु चांगु । नितंबु तो ५ ऐसें लेंकरूं एक । प्रसवली हें देख । जयाचें तिन्ही लोक । बाळसें गा ६ चौऱ्यांयशी लक्ष योनी । तियें कांडीं पेरां सांदणी । वाढे प्रतिदिनीं । बाळक हें ७ नाना देह अवयवीं । नामाचीं लेणीं लेववी । मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ८ सृष्टी वेगवेगळीया । तिया करांग्रीं आंगोळियां । भिन्नाभिमान सूदलिया । मुदियों तेथें ९ हें एकोलतें चराचर । अविचारित सुंदर । प्रसवोनि थोर । थोरावली ११० पैं ब्रह्मा प्रातःकाळु । विष्णु तो मध्यान्ह वेळु । सदाशिव सायंकाळु । बाळा यया ११ महाप्रळयसेजे । खेळोनि निवांत निजे । विषमज्ञानें उमंजे । कल्पोदयीं १२ अर्जुना इयापरी । मिथ्यादृष्टीच्या घरीं । युगानुवृत्तीची करी । चोज पाउलें १३ संकल्पु जयाचा इर्टु । अहंकारु तो विर्टु । ऐसिया होय शेवटु । ज्ञानें यया १४ आतां असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली । तेथ साह्य जाली । माझी सत्ता १५

सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवन्ति याः । तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥

याकारणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता । अपत्य पंडुसुता । जगडंबरु १६ आतां शरीरें बहुतें । देखोनि न भेदें हो चित्तें । जें मनबुद्ध्यादि भूतें । एकेंचि

ममता ह्यिच्यापासून अहंकार उत्पन्न होतो व त्याच्या योगानें पंचमहाभूतांची उत्पत्ति होते; ९२ आणि विषय व इंद्रियें यांचा भूतांसह संबंध असल्यामुळें त्यांचीही यांचिबरोबर उत्पत्ति होते. ९३ विषय व इंद्रियें यांचा क्षोभ झाल्यावर पाठोपाठ सत्त्व, रज, तम हे तीन गुण असावयाचेच. त्यायोगानें वासना होईल त्याप्रमाणें जीव हा जागोजागीं जन्म घेतो. ९४ ज्याप्रमाणें बीजाची व पाण्याची गांठ पडल्याबरोबर त्यास अंकुर फुटून झाडास अवसान येतें, ९५ त्याप्रमाणें माझ्या संगानें मायेला अनेक प्रकारचे विश्वांकुर फुटूं लागतात. ९६ हे सुजनश्रेष्ठा, मग त्या गर्भाला कसें रूप येतें, तें ऐक. ९७ हें पहा—अंडज, स्वेदज, उद्भिज्ज आणि जारज असे अंकुर तिला साहजिक फुटतात. ९८ आकाश व वायु यांचा ज्यांत जास्त अंश असतो असा जो गर्भरस, त्याला अंडज असें नांव आहे; हा एक त्याचा अवयव होय. ९९ तम व रज या गुणांनीं युक्त असून ज्यांत जल व तेज यांचा अधिक अंश असतो, त्याला स्वेदज म्हणतात. १०० जल व पृथ्वी यांचा विशेष अंश असून, केवळ ज्यांत तमोगुण दृष्टीस पडतो, ते उद्भिज्ज होत. १ पंच ज्ञानेंद्रियें, व पंचकर्मेंद्रियें हीं ज्यांत समान असतात, व मन आणि बुद्धि यांची ज्याला जोड असते, ते जारज होत. २ याप्रमाणें हे—जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज असे चार देह म्हणजे दोन हात व दोन चरणतळ असून अष्टधा प्रकृति हें ज्याचें शिर आहे; ३ प्रपंच हें ज्याचें मोठें पोट असून, निवृत्ति ही ज्याची पाठ आहे; व बेंबीवरील भागांत आठ देवसर्ग आहेत; ४ व वरील स्वर्गलोक हा कंठ, मृत्युलोक हा मध्यभाग, व पाताळलोक हा कमरेखालील भाग होय; ५ असें एक लेंकरूं या मायेस झालें. तीन लोकचा विस्तार हें या मुलाचें बाळसें होय. ६ चौऱ्यांयशी लक्ष योनि म्हणजे त्याच्या बोटांचीं पेरीं व सांधे असून, हें मूल प्रतिदिनीं वृद्धिंगत होतें. ७ नाना प्रकारचे देह, अवयव व नामें हे अलंकार घालून माया ही त्या मुलाला मोहरूप स्तनपान देऊन वाढविते. ८ वेगवेगळ्या सृष्टि ह्या त्याचीं बोटें व करंगळ्या होत. आणि निरनिराळ्या प्रकारचे देह ह्या त्यांमधील आंगठ्या होत. ९ असें एकुलतें एक विश्वरूपी लेंकरूं अज्ञानरूपी प्रकृतीस जन्मल्यावर, आपण भाग्यवान् आहों, असें तिला वाटलें ११० ब्रह्मा हा या बाळाचा प्रातःकाल, विष्णु हा माध्यान्हकाल व सदाशिव हा सायंकाल म्हणजे उत्पत्ति, स्थिति व लय हे तीन काल होत; ११ आणि महाप्रलय हेंच याचें आंथरूण होय. त्यावर खेळ खेळून हें निवांत निजतें, व पुनः कल्पाचा उदय झाल्यावर विपरीत ज्ञानानें जागें होतें. १२ अर्जुना, याप्रमाणें मिथ्या ज्ञानाच्या व्यवहारांत कालगतीच्या योगानें हें लेंकरूं पाऊल टाकूं लागतें १३ ज्याचा संकल्प हा आवडता स्नेही असून अहंकार ही शोभा आहे, अशा या बालकाला आत्मज्ञान झालें म्हणजे मरण येतें. १४ असो; आतां विशेष वर्णन न करितां इतकेंच सांगतों कीं, याप्रमाणें मायेपासून तें विश्व माझ्या सत्तेच्या साह्यानें उत्पन्न झालें. १५

**अन्वयार्थ**—(कौन्तेय)-हे अर्जुना ! -(सर्वयोनिषु)-देवादि सर्व योनींमध्यें-(याः मूर्तयः)-ज्या मूर्ति-जे आकार-जीं शरीरें-(संभवन्ति)-उत्पन्न होतात-(तासां)-त्या सर्व मूर्तींचें-(महत् ब्रह्म)-माझी प्रकृति-(योनिः)-उत्पत्तिस्थान आहे व-(अहं)-मी-(बीजप्रदः)-बीज देणारा-(पिता)-जनक आहें. ४

वास्तव, अर्जुना, मी बाप, माया ही आई, व हें जग आमचें लेंकरूं आहे १६ या जगांत पुष्कळ शरीरें दृष्टीस पडल्यामुळें, जग माझें अपत्य असून माझें व त्याचें ऐक्य नाहीं अशी शंका तुझ्या मनांत येऊं देऊं नको. कारण, सर्व भूतांची उत्पत्ति, मन, बुद्धि वगैरे पंचेंद्रियांपासूनच

१ उत्पत्ति. २ परस्परसंबंध, सांखळी. ३ विकार वाढल्यानंतर. ४ वासनेप्रमाणें. ५ तत्काळ, वास्तविक. ६ वृक्षाचा. ७ आकार. ८ भेटतांच. ९ अंकुर. १० टोंक, अग्र. ११ आकारास. १२ अंड्यापासून उत्पन्न होणारें. १३ घामापासून होणारें. १४ जमिनीपासून होणारें. १५ वाऱ्यापासून होणारें. १६ जीवन पावतो, बाहेर पडतो. १७ घालून. १८ आधिक्यानें. १९ पुष्कळ अंशानें. २० इलक्या प्रतीच्या. २१ साह्य करणारीं. २२ सज्ज, सिद्ध. २३ मैथुनापासून उत्पन्न होणारीं. २४ प्रपंच. २५ पुढें झालें, वाढलें. २६ बेंबीवरील भागांत. २७ पाताळ. २८ कमरेखालील पाठीमागचा भाग. २९ बाळपणाची पुष्टता. ३० बोटें. ३१ पेरीं. ३२ सांधे. ३३ करंगळीत. ३४ अंगुली, बोटें. ३५ घातल्या. ३६ आंगठ्या. ३७ अज्ञानरूपी. ३८ प्रकृती. ३९ अभिमानानें फुगली. ४० विपरीत. ४१ जागें होतें. ४२ खरें न दिसणाऱ्या दृष्टीनें. ४३ एकापुढें एक युगरूपी पावलानें. ४४ आवडता स्नेही. ४५ शोभा, ऐश्वर्य. ४६ मरण. ४७ माया.

येथें १७ हा गा एकचि देहीं । काय अनारिसें अवयव नाहीं । तेवीं विचित्र विश्व पाहीं । एकाचि हें १८ पैं उंचा नीचा डाहाळिया । विषमा वेगळालिया । येकाचि जेवीं जालिया । बीजाचिया १९ आणि संबंधु तोही ऐसा । मृत्तिके घटु लेंकु जैसा । कां पटत्व कापुसा । नातू होय १२० नाना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा । आम्हां आणि चराचरा । संबंधु तैसा २१ म्हणोनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ । तेवीं मी गा सकळ । संबंधु वावो २२ जालें-नि जगें मी झांकें । तरी जगत्वें कोण फांके । किळेवरी माणिकें । लोपिजे काई २३ अळंकारातें आलें । तरी सोनेंपण काइ गेलें । कीं कमळ फांकलें । कमळ-त्वा मुके २४ सांग पां धनंजया । अवयवीं अवेयाविया । आच्छादिजे कीं तया । तेंचि रूप २५ कीं विरूढलिया जोंधळा । कणिसाचा निर्वाळा । वेंचला कीं आगळा । दिसतसे २६ म्हणोनि जग परौतें । सारूनि पैहिजे मातें । तैसा नोहें उंखितें । आघवें मीचि २७ हा तूं साचोकारा । निश्चयाचा खरा । गांठी बांध वीरा । जीवाचिये २८ आतां मियां मज दाविला । शरीरीं वेगळाला । गुणीं मीचि बांधिला । ऐसा ओंवडें २९ जैसें स्वप्नीं आपण । उठूनियां आत्ममरण । भोगिजे गा जाण । कपिध्वजा १३० कां कावीळातें डोळे । प्रकाशूनि पिंवळें । देखती तेही कळे । तयांसीचि ३१ नाना सूर्यप्रकाशें । प्रकटी तें अभ्र भासे । तो लोपला हेंही दिसे । सूर्येंचि कीं ३२ पैं आपणपेनि जालिया । छाया गा आपुलिया । बिहोनि बिहालिया । आन आहे ३३ तैसीं इयें नाना देहें । दाऊनि मी नाना होयें । तेथ ऐसा जो बंधु आहे । तेंही देखें ३४ बंधु कां न बंधिजे । हें जाणणें मज माझें । नेणणेनि उपजे । आपलेनि ३५ तरी कोणें गुणें कैसा । मजचि मी बंधु ऐसा । आवडे तें परियेसा । अर्जुन देवा ३६ गुण ते किती किं धर्म । कायि ययां रूपनाम । कें जालें हें वर्म । अवधारीं पां ३७

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः । निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥

तरी सत्त्वरजतम । तिघांसि हें नाम । आणि प्रकृति जन्म- । भूमिका ययां ३८ येथ सत्त्व तें उत्तम । रज तें मध्यम । तिहींमाजी तम । सांविया-धारें ३९ हें एकेचि वृत्तीच्या ठायीं । त्रिगुणत्व आवडे पाहीं । वयसात्रय देहीं । येकीं जेवीं १४० कां मीनलेनि कीडें । जंवजंव तूंक वाढे । तंवतंव सोनें हीन पडे । पांचिकीं कसीं ४१ पैं सावधपण जैसें । वाहविलें आळसें । सु-

आहे. १७ हें पहा कीं, एकाच शरीराला तिरनिराळे अवयव नाहींत का? त्याप्रमाणें या जगांत जरी पुष्कळ देह पडले, तरी सर्व एकरूप आहेत. १८ हें वघ झाडांस लांब, आखुड, जाड व वारीक अशा खांद्या एकाच बीजापासून उत्पन्न झालेल्या असतात, १९ म्हणून जगत् व मी यांचा संबंध असा आहे; ज्याप्रमाणें, मातीपासून उत्पन्न झालेला घट मातीचें लेंकरूं होय, किंवा वस्त्र हें कापसाचें नातवंड होय;—कारण, कापसाचें सूत बनल्यावर त्यापासून वस्त्र तयार होतें; १२० अथवा समुद्रावर उत्पन्न होणाऱ्या असंख्य लाटा, ज्याप्रमाणें समुद्राची संतति आहे त्याप्रमाणेंच चराचर व मी यांचा संबंध आहे. २१ म्हणून अग्नि व ज्वाला हीं दोन्ही ज्याप्रमाणें अग्निचींच स्वरूपें होत, त्याप्रमाणें मी व जगत् हीं दोन्ही एकच स्वरूपें असून मजपासून जगाची उत्पत्ति असा संबंध मानणें व्यर्थ होय. २२ जगाच्या उत्पत्तीमुळें जर माझें स्वरूप लोपतें म्हणावें तर हें जगत् कोणाच्या तेजानें प्रकट होतें? हें पहा माणकाच्या तेजानें माणीक झांकलें जातें का? २३ तसेंच सोन्याचे अलंकार बनविल्यानें त्यांतील सुवर्णत्व नाहींसें होतें का? अथवा कमल उमलल्यावर त्याचें कमलत्व नाहींसें होतें की काय? २४ अर्जुना, अवयव धारण करणारा अवयवानें झांकला जातो किंवा अवयवांसहवर्तमान असणें हेंच त्याचें रूप आहे, सांग बरें? २५ जोंधळ्याचें बीं पेरल्यावर त्याला कणीस आलें म्हणजे तो कमी झाला म्हणावा का वाढला म्हणावा? २६ म्हणून जगाला बाजूस सारून मला पाहूं म्हणशील, तर मी निराळा दिसणार नाहीं, कारण मीच सर्व जगद्रूप आहें. २७ हे वीरा, या सिद्धांताची तूं आपल्या मनांत खरोखर पूर्णपणें गांठ बांधून ठेव. २८ आतां मी जरी पुष्कळ शरीरांनीं वेगळा दृष्टीस पडलों, तरी तीं सर्व शरीरें एकाच गुणांनीं बांधलेलीं आहेत, असें समज. २९ हे कपिध्वजा, ज्याप्रमाणें मनुष्य स्वप्नामध्यें आपण मेलों आहों अशी कल्पना करतो, १३० किंवा कावीळ झालेल्या मनुष्याचे डोळे पिवळे होऊन, तो जी जी वस्तु पहातो ती ती त्यास पिवळी दिसते, ३१ अथवा सूर्याच्या प्रकाशानें जसें अभ्र दिसतें व तो अभ्राच्छादित झाला हेंही त्याच्याच तेजानें दिसतें; ३२ किंवा हें पहा-आपल्यामुळेंच पडलेली आपली छाया पाहून जो भितो, तो ज्या छायेला भ्याला त्या छायेहून निराळा आहे का? ३३ त्याचप्रमाणें जगांत जरी पुष्कळ देह दृष्टीस पडले, तरी तितक्या अनंत रूपानें मीच बनलों आहें. त्या ठिकाणीं अनेकत्वाचा जो बंध आहे त्यालाही मीच जाणतों. ३४ बंध किंवा मोक्ष हे माझ्याच ठिकाणीं मद्रूपानें जाणणें आहे. अज्ञान्याला आपलें स्वरूप न समजल्यामुळें बंध, मोक्ष त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होतात. ३५ अर्जुना, मी आपल्यालाच कोणत्या गुणानें कसा बद्ध करून घेतों, तें ऐक. ३६ आतां अगोदर गुण किती आहेत व त्यांचे धर्म काय आहेत, आणि त्यांचें स्वरूप व त्यांचीं नांवें, आणि ते कोठें झाले, त्याचें वर्म सांगतों, ऐक. ३७

**अन्वयार्थ**—(महाबाहो)-हे पराक्रमी अर्जुना!—(सत्वं)—सत्व—(रजः)—रज व—(तमः)—तम—(इति)—असे हे—(प्रकृतिसंभवाः गुणाः)—प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुण—(देहे)—देहांत—(अव्ययं देहिनं)—अव्यय देहवान् आत्म्याला—(निबध्नन्ति)—बद्ध करितात. ५

तरी सत्व, रज, तम अशीं गुणांचीं तीन नांवें आहेत व ते मायेपासून उत्पन्न झाले आहेत. ३८ त्यांत सत्वगुण हा उत्तम, रजोगुण हा मध्यम, व तमोगुण हा कनिष्ठ होय. ३९ हे तिन्ही गुण एकाच अंतःकरणवृत्तीच्या ठिकाणीं उत्पन्न होतात. त्यामुळें अंतःकरणही त्रिगुण आहे असें वाटतें. ज्याप्रमाणें एकाच देहास बाल्य, तारुण्य व वार्धक्य या तिन्ही अवस्था येतात; १४० किंवा उत्तम सोन्यांत किडाळ सोनें मिळविल्यावर जों जों त्याचें वजन वाढतें तों तों सोनें फिकें दिसून कसास कमी उतरतें; ४१ ज्याप्रमाणें आळस आल्यावर जागृति

१ पृथक्, पृथक्, वेगवेगळे. २ मुलगा. ३ व्यर्थ. ४ कांतीनें. ५ अवयव धारण करणारास. ६ पेरल्यावर. ७ निष्पन्नता, प्रत्यय, दाखला. ८ उणा झाला. ९ पाहावें. १० संपूर्ण. ११ वाटतो, दिसतो. १२ कल्पना येऊन. १३ कावीळ झालेल्या रोग्याला. १४ किंवा. १५ भ्यालास.

१६ वेगळी वेगळी. १७ कोणत्या धर्मांचे. १८ जन्मस्थान. १९ त्या दोघांत. २० कनिष्ठ. २१ बाल्य, तारुण्य, व वार्धक्य. २२ डांकानें, हिणकटानें. २३ वजन. २४ पांच नंबरचें, हलक्या प्रतीचें.

घुसि बैसे । घणावोनी ४२ तैसी अज्ञानांगीकारें । निघाली वृत्ति विखुरे[2] । ते सत्त्वरजद्वारें । तमही होये ४३ अर्जुना गा जाण । ययां नाम गुण । आतां दाखऊं खुण । बांधिती ते ४४ तरी क्षेत्रज्ञदशे । आत्मा मोटका[3] पैसे[4]। हें देह मी ऐसें । कुमुहूर्त करी ४५ आजन्ममरणांतीं । देहधर्मीं समस्तीं । ममत्वाची सूती[6] । घे ना जंव ४६ जैसी मीनाच्या तोंडीं । पडेना जंव उंडी । तंव गळ आँसुडी[7] । जळपारधी ४७

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् । सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥ ६ ॥

तेवीं सत्त्वें लुब्धकें[8] । सुखज्ञानाची पाशकें[9] । वोढिजती मग खुडके[11] । मृगु जैसा ४८ मग ज्ञानें चर्डफडी[12] । जाणिवेचे[13] खुरखोडी[14] । स्वयं सुख हें धोंडी[15] । हातींचें गा ४९ तेव्हां विद्यामानें तोखे[16] । लाभमात्रें हरिखे । मी संतुष्ट हेंही देखे । श्लाघों[17] लागे १५० म्हणे भाग्य ना माझें । आजि सुखियें नाहीं दुजें । विकारोष्टकें[18] फुंजे[19] । सात्त्विकाचेनि ५१ आणि येणेंही न सरे । लांकणें[20] लागे दुसरें । जें विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ५२ आपणचि ज्ञानस्वरूप आहे । तें गेलें हें दुःख न वाहे । कीं विषय[21]ज्ञानें होये । गगनायेवढा ५३ रावो जैसा स्वप्नीं । रंकपणें निघे धोनीं[22] । तो दों[23] दाणा मानी । इंद्रु ना मी ५४ तैसें गा देहातीता । जालेया देहवंता । हो लागे पंडुसुता । बाह्यज्ञानें ५५ प्रवृत्तिशास्त्र बुझे[24] । यज्ञविद्या उमजे । किंबहुना सुझे[25] । स्वर्ग[26]वरी ५६ आणि म्हणे आजि आन। मीवांचूनि नाहीं सज्ञान । चातुर्यचंद्रा गगन । चित्त माझें ५७ ऐसें सत्त्व सुखज्ञानी । जीवासि लावूनि कोंनी[27] । बैलाची करी वोंनी[28] । पांगुळाचीया ५८ आतां हाचि शरीरीं । रजें जियापरी । बांधिजे तें अवधारीं । सांगिजेल ५९

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवं । तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥ ७ ॥

हें रज याचि कारणें । जीवातें रंजऊं जाणे । हें अभिलाखाचें[29] तरुणें[30] । सदाचि गा १६० हें जीवीं मोटकें[31] रिगे । आणि कामाच्या मदीं लागे । मग वारयों[32] वळंघे[33] । तृष्णेचिया ६१ घृतें आंबुखूनि[34] आगिओळें[35] । वज्राग्नीचें[36] सादुकलें[37] । आतां बहु थेंकुलें[38] । आहे तेथ ६२ तैसी खवळे[39] चाड । होय दुःखासकट गोड । इंद्रश्रीहि[40] सांकडे[41] । गमों लागे ६३ तैसी तृष्णा[42] वाढनलिया । मेरुही[43] हाता

नाहींशी होऊन झोंप वाढते, ४२ त्याप्रमाणें, अज्ञानाचा स्वीकार केल्यावर जी वृत्ति वाढते तिला सत्त्व, रज, तम असें म्हणतात. ४३ अर्जुना, ज्यांच्या योगानें वृत्ति निरनिराळ्या तऱ्हेची होते, त्यांना गुण असें म्हणतात. आतां ते आत्म्याला कसें बंधन करितात, तें सांगतों. ४४ तर जीवात्मा ज्या वेळेस देहाचा अभिमान धारण करितो त्याच वेळेस त्याला वाईट शकून होतो, असें समज. ४५ वाईट शकुनाचें फल काय म्हणशील तर, देहाच्या ठिकाणीं हा देह माझा आहे, इतका अभिमान धारण केल्याबरोबर जन्मापासून मरणापर्यंत सर्व देहधर्मांचीं दुःखें भोगण्याचा प्रसंग येतो. ४६ ज्याप्रमाणें गळास लाविलेलें आमिष मासा धरतो न धरतो, इतक्यांत मासे धरणारा गळाला हिसडा मारून प्राण घेतो. ४७

**अन्वयार्थ**—(तत्र)–त्या तीन गुणांतील–(सत्त्वं)–सत्त्व हा गुण–(निर्मलत्वात्)–निर्मल–स्वच्छ असल्यामुळें–(प्रकाशकं) –प्रकाशक व–(अनामयं)–पीडारहित–उपद्रवरहित–[ अस्ति ] –आहे.–(हे अनघ)–हे निष्पाप अर्जुना !–(तत्)–तें सत्त्व–(सुखसंगेन)–सुखाच्या संगानें–आसक्तीनें–(च)–व–(ज्ञानसंगेन) –ज्ञानाच्या संगानें–(बध्नाति–[आत्म्याला] बांधतें. ६

त्याप्रमाणें सत्त्वगुण हाच कोणी पारधी सुख व ज्ञान या पाशांनीं जीवास ओढतो; व ज्याप्रमाणें मृग पारध्याच्या पाशांत सांपडल्यावर तडफडतो, ४८ त्याप्रमाणें जीव सत्त्वगुणाच्या सपाट्यांत सांपडल्यावर, मी ज्ञानी आहें अशी वल्गना करतो आणि माझ्याप्रमाणें कोणी जगांत ज्ञाता नाहीं अशी घमेंड बाळगतो, या कारणानें आत्मज्ञानापासून होणारें सुख आपल्या हातचें दवडतो. ४९ मग विद्वान् म्हणून कोणी आपला बहुमान केला असतां आनंद पावतो, व थोड्या लाभानेंही हर्ष मानतो. १५० व माझ्यासारखा या जगांत दुसरा कोणी सुखी नाहीं हें माझें केवढें भाग्य आहे, असें मानून अष्टसात्त्विक भावांनीं दाटतो. ५१ आणि एवढ्यानेंच आटोपत नाहीं, तर जगांत काय तो मी विद्वान् हें अहंकाराचें दुसरें एक लचांड त्याच्या पाठीस लागतें. ५२ आपण स्वतः ज्ञानरूपी आहों, याचें ज्ञान नाहींसें झाल्याबद्दल त्यास दुःख वाटत नाहीं, परंतु उलट विषयज्ञानाच्या भरांत तो गगनाएवढा फुगतो. ५३ ज्याप्रमाणें एकादा राजा स्वप्नांत भिकारी होऊन भिक्षा मागण्यास निघाल्यावर इतरांपेक्षां थोडी जास्त भिक्षा मिळाल्यामुळें आपण इंद्र म्हणजे मोठे भाग्यवान् आहों असें मानीत नाहीं का ? ५४ त्याप्रमाणें, अर्जुना, जीवात्म्यानें देहाचा अभिमान धरल्यावर बाह्यज्ञानानें त्याची स्थिति होते, ५५ प्रवृत्तिशास्त्रांत तो निपुण होतो, यज्ञविद्येंत तो निष्णात बनतो, किंबहुना तो स्वर्गांतीलही बातमी जाणतो. ५६ आणि माझ्याशिवाय या जगांत दुसरा कोणी ज्ञानवान् नाहीं व चातुर्यरूपी चंद्रास प्रकाश करण्यास माझें चित्त गगनरूपी आहे, असें मानतो. ५७ याप्रमाणें सत्त्व गुण हा, जीवात्म्यास सुख व ज्ञान यांच्या दोऱ्या कानास लावून पांगुळ जसा बैलास ओढतो, त्याप्रमाणें आपल्या ताब्यांत आणतो. ५८ आतां, रजोगुणही या जीवास शरीराचे ठिकाणीं कसें बंधन करतो, तीं लक्षणें ऐक. ५९

**अन्वयार्थ**—(तृष्णासंगसमुद्भवं)–विषयतृष्णा व विषयासक्ति यांचें कारण असें–(रजः)–रज–रजोगुण–(रागात्मकं)–रंजनात्मक आहे असें–(विद्धि)–जाण.–(कौन्तेय)–हे कुंतीपुत्रा ! –(तत्)–तें रज–(देहिनं)–देही आत्म्याला–(कर्मसंगेन)–कर्मांच्या आसक्तीनें–(निबध्नाति)–बद्ध करितें. ७

या गुणापासून जीवाचें नेहमीं रंजन होतें, व कामवासना सदैव जागृत रहाते, म्हणून त्यास रजोगुण असें म्हणतात. १६० जीवाच्या ठिकाणीं याचा थोडा शिरकाव होतांक्षणीं हा त्याला कामाच्या नादीं लावतो, मग मनाच्या इच्छा वाऱ्याप्रमाणें वाहूं लागतात. ६१ मग अग्निकुंडांत अग्नीवर तूप घातलें म्हणजे जसा वज्राग्नि भडकतो, व त्याला लहान व मोठी वस्तु यांचें भान न राहतां तो सर्वांचा नाश करतो, ६२ त्याप्रमाणेंच याच्या इच्छा प्रबल होऊन दुःखदायक गोष्टीही त्याला सुखदायक वाटतात, व इंद्रलोक जरी प्राप्त झाला, तरी त्याची तृप्ति होत नाहीं. ६३ अशा प्रकारें विषयवासना वाढल्यावर, मेरु पर्वतही त्याच्या हस्तगत झाला, तरी त्यापेक्षांही अधिक मोठी वस्तु प्राप्त

१ दृढ होऊन. २ पसरे, वाढते. ३ अल्प. ४ प्रवेश करतो. ५ प्रारंभ करीं. ६ अभिमान, संबंध, रिघाव. ७ हिसकतो, ओढतो. ८ कोर्डी. ९ पारध्यानें. १० फांसानें. ११ अडकतो, तडफडतो. १२ वल्गना करितो. १३ ज्ञानाची. १४ घमेंड बाळगितो. १५ घालवितो. १६ सुखावतो. १७ धन्य मानूं लागतो. १८ अष्ट सात्त्विक भावांनीं. १९ फुगतो, भरून जातो. २० बंधन, लचांड. २१ पदार्थज्ञानानें. २२ भिक्षा मागण्यास. २३ दोन दाण्यांनीं. २४ जाणतो. २५ समजे. २६ स्वर्गांतील बातमी. २७ दोरी, काढणी. २८ सारखे. २९ कामवासनेचें. ३० तरुण, मुसमुसलेलें. ३१ अल्प. ३२ वाऱ्यावर. ३३ वसे, चिकटे. ३४ शिंपडून. ३५ अग्निकुंड. ३६ प्रखर अग्नीचें, रखरखीत विस्तवाचें. ३७ पेटविलें. ३८ थोडें. ३९ क्षोभे. ४० इंद्राची संपत्ति. ४१ संकुचित, अल्प. ४२ विषयेच्छा. ४३ सुवर्णपर्वत.

घुसि बैसे । घणावोनी ४२ तैसी अज्ञानांगीकारें । निघाली वृत्ति विखुरे[2] । ते
सत्त्वरजद्वारें । तमही होये ४३ अर्जुना गा जाण । ययां नाम गुण । आतां
दाखऊं खुण । बांधिती ते ४४ तरी क्षेत्रज्ञदशे । आत्मा मोटकां[3] पैसे[4]। हें देह
मी ऐसें । कुमुहूर्त करी ४५ आजन्ममरणांतीं । देहधर्मीं समस्तीं । ममत्वाची
सू[6]ती । घे ना जंव ४६ जैसी मीनाच्या तोंडीं । पडेना जंव उंडी । तंव गळ
आँ[7]सुडी । जळपारधी ४७

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् । सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥ ६ ॥

तेवीं सत्त्वें लुब्धकें[8] । सुखज्ञानाची पाशिकें[9] । वोढिजती मग खुंडके[10] । मृगु
जैसा ४८ मग ज्ञानें चर्[12]डफडी । जाणिवेचे[13] खुरखोडी[14] । स्वयं सुख हें थोडी[15] ।
हातींचें गा ४९ तेव्हां विद्यामानें तोखे[16] । लाभमात्रें हरिखे । मी संतुष्ट हेंही
देखे । श्लाघों[17] लागे १५० म्हणे भाग्य ना माझें । आजि सुखियें नाहीं दुजें ।
विकारोष्टकें[18] [19]फुंजे । सात्त्विकाचेनि ५१ आणि येणेंही न सरे । लांकणें[20] लागे
दुसरें । जें विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ५२ आपणचि ज्ञानस्वरूप आहे । तें
गेलें हें दुःख न वाहे । कीं विषयें[21]ज्ञानें होये । गगनायेवढा ५३ रावो जैसा
स्वप्नीं । रंकपणें निघे धोनी[22] । तो दों[23] दाणा मानी । इंद्रु ना मी ५४ तैसें गा
देहातीता । जालेया देहवंता । हो लागे पंडुसुता । बाह्यज्ञानें ५५ प्रवृत्तिशास्त्र
बुझे[24] । यज्ञविद्या उमजे । किंबहुना सुझे[25] । स्वर्गावरी[26] ५६ आणि म्हणे आजि आन ।
मीवांचूनि नाहीं सज्ञान । चातुर्यचंद्रा गगन । चित्त माझें ५७ ऐसें सत्त्व
सुखज्ञानीं । जीवासि लावूनि कौनी[27] । बैलाची करी वौनी[28] । पांगुळाचीया ५८
आतां हान्चि शरीरीं । रजें जियापरी । बांधिजे तें अवधारीं । सांगिजेल ५९

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवं । तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥ ७ ॥

हें रज याचि कारणें । जीवातें रंजऊं जाणे । हें अभिलोखाचें[29] तरुणें[30] । स-
दाचि गा १६० हें जीवीं मोटकें[31] रिगे । आणि कामाच्या मदीं लागे । मग वा-
र्यों[32] वळंघे[33] । तृष्णेचिया ६१ घृतें आंबुखूनि[34] आगिओळें[35] । वज्राग्नीचें[36] सादुकलें[37] ।
आतां बहु थेंकुलें[38] । आहे तेथ ६२ तैसी खवळे[39] चाड । होय दुःखासकट गोड ।
इंद्रें[40]श्रीहि सांकडें[41] । गमों लागे ६३ तैसी तृष्णा[42] वाढनलिया । मेरूही[43] हाता

नाहींशी होऊन झोंप वाढते, ४२ त्याप्रमाणें, अज्ञानाचा स्वीकार केल्यावर जी वृत्ति वाढते तिला सत्त्व, रज, तम असें म्हणतात. ४३ अर्जुना, ज्यांच्या योगानें वृत्ति निरनिराळ्या तऱ्हेची होते, त्यांना गुण असें म्हणतात. आतां ते आत्म्याला कसें बंधन करितात, तें सांगतों. ४४ तर जीवात्मा ज्या वेळेस देहाचा अभिमान धारण करितो त्याच वेळेस त्याला वाईट शकून होतो, असें समज. ४५ वाईट शकुनाचें फल काय म्हणशील तर, देहाच्या ठिकाणीं हा देह माझा आहे, इतका अभिमान धारण केल्याबरोबर जन्मापासून मरणापर्यंत सर्व देहधर्मांचीं दुःखें भोगण्याचा प्रसंग येतो. ४६ ज्याप्रमाणें गळास लाविलेलें आमिष मासा धरतो न धरतो, इतक्यांत मासे धरणारा गळाला हिसडा मारून प्राण घेतो. ४७

**अन्वयार्थ**—(तत्र)-त्या तीन गुणांतील-(सत्त्वं)-सत्त्व हा गुण-(निर्मलत्वात्)-निर्मल-स्वच्छ असल्यामुळें-(प्रकाशकं)-प्रकाशक व-(अनामयं)-पीडारहित-उपद्रवरहित-[ अस्ति ]-आहे.-(हे अनघ)-हे निष्पाप अर्जुना !-(तत्)-तें सत्त्व-(सुखसंगेन)-सुखाच्या संगानें-आसक्तीनें-(च)-व-(ज्ञानसंगेन)-ज्ञानाच्या संगानें-(बध्नाति-[आत्म्याला] बांधतें. ६

त्याप्रमाणें सत्त्वगुण हाच कोणी पारधी सुख व ज्ञान या पाशांनीं जीवास ओढतो; व ज्याप्रमाणें मृग पारध्याच्या पाशांत सांपडल्यावर तडफडतो, ४८ त्याप्रमाणें जीव सत्त्वगुणाच्या सपाट्यांत सांपडल्यावर, मी ज्ञानी आहें अशी कल्पना करतो आणि माझ्याप्रमाणें कोणी जगांत ज्ञाता नाहीं अशी घमेंड बाळगतो, या कारणानें आत्मज्ञानापासून होणारें सुख आपल्या हातचें दवडतो. ४९ मग विद्वान् म्हणून कोणी आपला बहुमान केला असतां आनंद पावतो, व थोड्या लाभानेंही हर्ष मानतो. १५० व माझ्यासारखा या जगांत दुसरा कोणी सुखी नाहीं हें माझें केवढें भाग्य आहे, असें मानून अष्टसात्त्विक भावांनीं दाटतो. ५१ आणि एवढ्यानेंच आटोपत नाहीं, तर जगांत काय तो मी विद्वान् हें अहंकाराचें दुसरें एक लचांड त्याच्या पाठीस लागतें. ५२ आपण स्वतः ज्ञानरूपी आहों, याचें ज्ञान नाहींसें झाल्याबद्दल त्यास दुःख वाटत नाहीं, परंतु उलट विषयज्ञानाच्या भरांत तो गगनाएवढा फुगतो. ५३ ज्याप्रमाणें एखादा राजा स्वप्नांत भिकारी होऊन भिक्षा मागण्यास निघाल्यावर इतरांपेक्षां थोडी जास्त भिक्षा मिळाल्यामुळें आपण इंद्र म्हणजे मोठे भाग्यवान् आहों असें मानीत नाहीं का ? ५४ त्याप्रमाणें, अर्जुना, जीवात्म्यानें देहाचा अभिमान धरल्यावर बाह्यज्ञानानें त्याची स्थिति होते, ५५ प्रवृत्तिशास्त्रांत तो निपुण होतो, यज्ञविद्येंत तो निष्णात बनतो, किंबहुना तो स्वर्गांतीलही बातमी जाणतो. ५६ आणि माझ्याशिवाय या जगांत दुसरा कोणी ज्ञानवान् नाहीं व चातुर्यरूपी चंद्रास प्रकाश करण्यास माझें चित्त गगनरूपी आहे, असें मानतो. ५७ याप्रमाणें सत्त्व गुण हा, जीवात्म्यास सुख व ज्ञान यांच्या दोऱ्या कानास लावून पांगुळ जसा बैलास ओढतो, त्याप्रमाणें आपल्या ताब्यांत आणतो. ५८ आतां, रजोगुणही या जीवास शरीराचे ठिकाणीं कसें बंधन करतो, तीं लक्षणें ऐक. ५९

**अन्वयार्थ**—(तृष्णासंगसमुद्भवं)-विषयतृष्णा व विषयासक्ति यांचें कारण असें-(रजः)-रज-रजोगुण-(रागात्मकं)-रंजनात्मक आहे असें-(विद्धि)-जाण.-(कौन्तेय)-हे कुंतीपुत्रा !-(तत्)-तें रज-(देहिनं)-देही आत्म्याला-(कर्मसंगेन)-कर्माच्या आसक्तीनें-(निबध्नाति)-बद्ध करितें. ७

या गुणापासून जीवाचें नेहमीं रंजन होतें, व कामवासना सदैव जागृत रहाते, म्हणून त्यास रजोगुण असें म्हणतात. १६० जीवाच्या ठिकाणीं याचा थोडा शिरकाव होतांक्षणीं हा त्याला कामाच्या नादीं लावतो, मग मनाच्या इच्छा वाऱ्याप्रमाणें वाहूं लागतात. ६१ मग अग्निकुंडांत अमीवर तूप घातलें म्हणजे जसा वज्राग्नि भडकतो, व त्याला लहान व मोठी वस्तु यांचें भान न राहतां तो सर्वांचा नाश करतो, ६२ त्याप्रमाणेंच याच्या इच्छा प्रबल होऊन दुःखदायक गोष्टीही त्याला सुखदायक वाटतात, व इंद्रलोक जरी प्राप्त झाला, तरी त्याची तृप्ति होत नाहीं. ६३ अशा प्रकारें विषयवासना वाढल्यावर, मेरु पर्वतही त्याच्या हस्तगत झाला, तरी त्यापेक्षांही अधिक मोठी वस्तु प्राप्त

१ दृढ होऊन. २ पसरे, वाढते. ३ अल्प. ४ प्रवेश करतो. ५ आरंभ करी. ६ अभिमान, संबंध, रिघावा. ७ हिसकतो, ओढतो. ८ कोळी. ९ पारध्यानें. १० फांसानें. ११ अडकतो, तडफडतो. १२ कल्पना करितो. १३ ज्ञानाची. १४ घमेंड बाळगितो. १५ घालवितो. १६ सुखावतो. १७ धन्य मानूं लागतो. १८ अष्ट सात्त्विक भावांनीं. १९ फुगतो, भरून जातो. २० बंधन, लचांड. २१ पदार्थज्ञानानें. २२ भिक्षा मागण्यास. २३ दोन दाण्यांनीं. २४ जाणतो. २५ समजे. २६ स्वर्गांतील बातमी. २७ दोरी, काढणी. २८ सारखें. २९ कामवासनेचें. ३० तरुण, मुसमुसलेलें. ३१ अल्प. ३२ वाऱ्यावर. ३३ मसे, चिकटे. ३४ शिपडून. ३५ अग्निकुंड. ३६ प्रखर अग्नीचें, रखरखीत विस्तवाचें. ३७ पेटविलें. ३८ थोटें. ३९ क्षोभे. ४० इंद्राची संपत्ति. ४१ संकुचित, अल्प. ४२ विषयेच्छा. ४३ सुवर्णपर्वत.

आलिया । तऱ्ही म्हणे एखादिया । दारुणा[1] वळेघो[2] ६४ जीविताची कुरोंडी[3] ।
वोंवाळूं लागे कवेंडी[4] । मानी तृणाचिये जोडी[5] । कृतकृत्यता ६५ आजि असतें
वेंचिजेल । परी पाहे[6] काय कीजेल । ऐसा पांगीं[7] वडील[8] । व्यवसाय मांडी ६६
म्हणे स्वर्गा हन जावें । तरी काय तेथें खावें । इयालागीं धांवें । याग करूं
६७ व्रतापाठीं व्रतें । आचरे इष्टापूर्तें[9] । काम्यावांचूनि हातें । शिवणें नाहीं ६८
पैं ग्रीष्मांतींचा वारा । वीसांवो नेणे वीरा । तैसा न म्हणे व्यापारा । रात्र
दिवस ६९ काय चंचळु मासा । कामिनीकटाक्षु जैसा । लवलाहो[10] तैसा ।
विजूही नाहीं १७० तेतुलेनि गा वेगें । स्वर्गसंसारपांगें[11] । आगीमाजीं रिगे ।
क्रियांचिये ७१ ऐसा देहीं देहावेगळा । [12]ले तृष्णेचिया सांखळा । खटाटोपु
वाहे गळां । व्यापाराचा ७२ हें रजोगुणाचें दारुण । देहीं देहियासी बंधन ।
परिस आतां विदाणें[13] । तमाचें तें ७३

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् । प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

व्यवहाराचेहि डोळे । मंद जेणें पडळें[14] । मोहरात्रीचें काळें । मेहुडें[15] जें ७४
अज्ञानाचें जियालें[16] । जया एका लागलें । जेणें विश्व भुललें । नाचत असे ७५
अविवेकमहामंत्र । जें मौढ्यमैंद्याचें[17] पात्र । हें असो मोहनास्त्र । जीवांसि जें ७६
पार्था तें गा तम । रचूनि[18] ऐसें वेंम[19] । चौखुंरी[20] देहात्म । मानियांतें[21] ७७ हें एकचि
कीर शरीरीं । माजो लागे चराचरीं । आणि तेथ दुसरी । गोठी नाहीं ७८ सर्वें-
द्रिया जाड्य । मनामाजीं मौढ्य । माल्हाती[22] दोर्ढ्य[23] । आलस्याचें ७९ आंगें
आंग मोडामोडी । कार्यजातीं अनावडी नुसती परवडी[24] । जांभयांची १८०
उघडियाची दिठी । देखणें नाहीं किरीटी । नांळवितांचि[25] उठी । वो म्हणौनि
८१ पडलिये धोंडी[26] । नेणें[27] कानीं मुरडी । तयाचि परी मुरकुंडी । उकलूं नेणें
८२ पृथ्वी पाताळीं जावो । कां आकाशही वरी येवो । परी उठणें हा भावो ।
उपजों नेणें ८३ उचितानुचित आघवें । झांसुरतां[28] नाठवे जीवें । जेथींचा तेथ
लोळावें । ऐसी मेधों[29] ८४ उभऊनि करतळें । पडिघाये कंपोळें[30] । पायाचें शिरि-
यांळें[30] । मांडूं[30] लागे ८५ आणि निद्रेविषयीं चांगु । जीवीं आथि लागु[31] । झोंपीं
जातां स्वर्गु । वावो म्हणे ८६ ब्रह्मायु[32] होइजे । मा निजेलियाचि असिजे । हे
वांचूनि दुजें । व्यसन नाहीं ८७ कां वाटे जातां [33]वोघें । कल्हातांही[34] डोलों
लागे । अमृतही परी नेघे । जरी नीद आली ८८ तेवींचि आक्रोशैवळें[35] । व्या-

व्हावें असें म्हणतो. १६४ एका कवडीवरून आपलें जीवित ओंवाळून टाकण्यास तो मागेंपुढें पहात नाहीं. आणि तृणाइतकी जरी अल्प वस्तु प्राप्त झाली, तरी आपल्यास धन्य मानतो. ६५ आपल्या जवळ असलेलें द्रव्य जर आज संपविलें, तर उद्यां आपली काय वाट होणार, असें मानून तृष्णेच्या जोरावर मोठमोठे उद्योग सुरू करतो; ६६ आणि म्हणतो कीं, जर आपल्यास स्वर्गप्राप्ति झाली, तर त्या ठिकाणीं आपल्यास खावयास काय मिळणार? याकरितां यज्ञयागादि क्रिया करतो. ६७ व्रतावर व्रतें करतो; इष्टापूर्त (विहिरी, तलाव वगैरे बांधणें, यज्ञयागादि करणें ) कर्म करतो, काम्य ( कामनिक ) व्रतांवांचून इतर व्रतांचें आचरण करीत नाहीं; ६८ ज्याप्रमाणें ग्रीष्मऋतूंतील अखेरचा आषाढ महिन्यांतला वारा रात्रंदिवस सारखा वहातो, त्याप्रमाणें अर्जुना, अशा प्रकारच्या व्यापारांत हा रात्रंदिवस खपत असतो. ६९ मासा किंवा कामिनीस्त्रीचे नेत्रकटाक्ष हे चंचल आहेत, व विजेला तर अति चंचल असें म्हणतात, परंतु त्यांची रजोगुणाच्या चंचलतेशीं तुलना केली असतां ती कमी भरतील; १७० अशा अति वेगानें स्वर्ग व संसार यांच्या प्राप्तीकरितां हा कर्माच्या अग्नींतही उडी टाकतो. ७१ याप्रमाणें देहांत असून देहावेगळा जो जीव, तो तृष्णेच्या सपाळ्यांत सांपडल्यावर आपल्या गळ्यांत व्यापाराचा सांखळदंड वागवितो. ७२ अशा रीतीनें देहांत राहणारा जो जीव, त्याला रजोगुणाचें बळकट बंधन असतें. आतां तमोगुणाचें लक्षण ऐक. ७३

**अन्वयार्थ**--(तु)-परंतु-(सर्वदेहिनां मोहनं)-सर्व देहवानांना मोह पाडणारें--अविवेकी करणारें--(तम:)-तम--[म्ह० तिसरा तमोगुण ]-(अज्ञानजं)-अज्ञानापासून झालेलें आहे, असें-(विद्धि)-तूं जाण.-(हे भारत)-हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना !-(तत्)-तें तम--(प्रमादालस्यनिद्राभिः) प्रमाद, आलस्य व निद्रा यांच्यायोगानें प्राण्याला--( निबध्नाति )--बद्ध करितें. ८

ज्याच्या पडद्यानें मनुष्याची व्यवहाराकडील दृष्टि मंद होते; जें मोहरूप रात्रीचें काळेंभोर असें आभाळच; ७४ जो तमोगुण अज्ञानानें वाढतो, तो सर्व विश्वास अज्ञानांत पाडून नाचवितो. ७५ हा तमोगुण अविचाराचा महामंत्र होय, व अज्ञानरूपी मद्याचें पात्र होय. फार काय सांगावें, जीवास मोह घालणारें असें हें एक अस्त्रच होय. ७६ पार्था, ह्या लक्षणासच तमोगुण असें म्हणतात, व जे देहालाच आत्मा मानतात, त्यांना हाच ग्रासून टाकतो. ७७ हा तमोगुण एकदांच चराचराच्या अंगीं वाढूं लागला, म्हणजे त्या ठिकाणीं दुसऱ्या कोणाचाही शिरकाव होऊं देत नाहीं. ७८ हा सर्व इंद्रियांना जडत्व आणतो, मनाला मूढत्व आणतो व याच्या योगानें आळस येतो. ७९ याच्या योगानें मनुष्य नेहमीं अंग मोडतो, काम करण्याची हौस नसते, आणि जांभयांची रेलचेल होते. १८० अर्जुना त्या मनुष्याचे डोळे उघडे असूनही त्याला समोरील वस्तु दिसत नाहींत, आणि हांका मारल्याशिवाय तो मध्येंच 'ओ' म्हणून अंथरुणांतून उठतो. ८१ मोठा एकादा धोंडा खालीं पडल्यावर तो जसा एका बाजूवरून दुसऱ्या बाजूवर फिरत नाहीं; त्याप्रमाणें हा मुरकुंडी मारून एकदा निजला, म्हणजे त्या कुशीचा त्या कुशीवर होत नाहीं. ८२ पृथ्वी पाताळास जावो, अथवा आकाश तुटून पडो, परंतु याच्या मनांत उठण्याची म्हणून इच्छा उत्पन्न होत नाहीं. ८३ हा स्वस्थ निजल्यावर आपल्या आन्हिक कर्माची शुद्धां यास आठवण होत नाहीं; परंतु अंथरुणाच्या अंथरुणावरच लोळावें, अशी त्याची बळकट बुद्धि असते. ८४ हात वर करून, बोटांत बोटें अडकवून व ते डोक्यावर ठेवून हा गुडघ्यांत डोकें घालून बसतो; ८५ आणि मनांत निद्रेविषयीं पूर्ण इच्छा धरून, झोंप लागल्यावर तिच्यापुढें स्वर्ग देखील तुच्छ मानतो. ८६ मला महादेवाचें आयुष्य यावें, व मी असाच निजला रहावा, याशिवाय त्याला दुसरें व्यसन कांहीं नसतें. ८७ वाटेनें जातांना जर पाय घसरून पडला, तर त्या ठिकाणींही त्याला झोंप लागते, आणि झोंप जर आली असली, तर कोणी अमृत देऊं लागल्यास त्याचा देखील तो अव्हेर करतो. ८८ त्याचप्रमाणें, रागानें किंवा

१ साहसाला. २ प्राप्त व्हावी. ३ ओंवाळणी. ४ कवडीकारितां. ५ श्रमानें. ६ उद्यां. ७ आशेनें, गरजेनें. ८ मोठा. ९ यज्ञ, विहिरी, तलाव, कूप वगैरे कर्म. १० चपलता, चांचल्य. ११ स्वर्ग व संसार यांच्या आशेनें, गरजेनें. १२ घेतो. १३ कौतुक, कौशल्य. १४ पडद्यानें. १५ मेघ. १६ जिव्हाळा. १७ अज्ञान. १८ करून. १९ लक्षण. २० चहूंकडून ताणून बांधी. २१ देहाला आत्मा मानणाऱ्याला. २२ आश्रय पावे, अंगिकारी. २३ दृढपणा. २४ रेलचेल. २५ हांक न मारितां. २६ शिळा. २७ कोपऱ्यावर, किंवा कुशीवर वळत नाहीं. २८ स्वस्थ पडला असतां. २९ शुद्धि. ३० गालावर हात ठेवून, डोकें गुडघ्यावर ठेवूं लागतो. ३१ आवड, इच्छा. ३२ महादेवाप्रमाणें दीर्घायुषी. ३३ सहज. ३४ कलतां, लवंडतांना, आडवे होतां. ३५ बलात्कारानें.

पारें कोणे एके वेळे। निगालें तरी आंधळें। रोषें जैसें ८९ केधवां कैसें राहा-
टावें। कोणेसीं काय बोलावें। हें ठाकतें कीं नागेवें। हेंही नेणें १९० वणवा
मियां आघवा। पांखे पुसोनि घेयावा। पतंगु पां हांवा। घाली जेवीं ९१ तैसा
वळधे साहसा। अकरणींच धिवसा। किंबहुना ऐसा। प्रमादु रुचे ९२ एवं निद्रा-
लस्यप्रमादीं। तम इया त्रिबंधीं। बांधे निरुपाधी। चोखटांतें ९३ जैसा वन्ही
काष्टीं भरे। तैं दिसें काष्ठाकारें। व्योम घटे आवरे। तैं घटाकाश ९४ नाना सरो-
वर भरलें। तैं चंद्रत्व तेथें बिंबलें। तैसें गुणाभासीं बांधलें। आत्मत्व गमे ९५

सत्त्वं सुखे सञ्जयति रजः कर्मणि भारत। ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत ॥ ९ ॥
रजस्तमश्चाऽभिभूय सत्त्वं भवति भारत। रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥

पैं हरूनि कफवात। जैं देहीं आटोपे पित्त। तैं करी संतप्त। देह जेवीं ९६
कां वरिषआतपें जैसें। जिणोनि शीतेंचि दिसे। तेव्हां होय हिंव ऐसें। आकाश
हें ९७ नाना स्वप्न जागृती। लोपूनि ये सुषुप्ती। तैं क्षणु एक चित्त-
वृत्ती। तेचि होय ९८ तैसी रजतमें हारवी। जैं सत्त्व माजुं मिरवी। तैं जी-
वाकरवीं म्हणवी। सुखिया ना मी ९९ तैसेंचि सत्त्व रज। लोपूनि तमाचें
भोज। वळघे तैं सहज। प्रमादी होय २०० तयाचि गा पारिपाठीं। सत्त्व
तमातें पोटीं। घालूनि जेव्हां उठी। रजोगुण १ तेव्हां कर्मावांचूनि कांहीं।
आन गोमटें नाहीं। ऐसें मानी देहीं। देहराजु २ त्रिगुण वृद्धी निरूपण। तीं
श्लोकीं सांगितलें जाण। आतां सत्त्वादि वृद्धिलक्षण। सादर परियेसी ३

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते। ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥
लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा। रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥
अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च। तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥
यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्। तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥
रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते। तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥

पैं रजतमविजयें। सत्त्व गा देहीं इयें। वाढतां चिन्हें तियें। ऐसीं होती ४
जे प्रज्ञा आंतुलीकडे। न समाती बाहेरी वोसंडे। वसंतीं पद्मखंडें। देती जैसी
५ सर्वेंद्रियांच्या आंगणीं। विवेक करी राबणी। साचचि करचरणीं। होती

बलात्कारानें एखादा व्यापार करूं लागला, तर आंधळ्यानें जसें चालावें, त्याप्रमाणें त्याचा व्यापार ज्ञानशून्य असतो. ८९ कारण, कोणच्या वेळेस कसें वागावें, कोणाबरोबर कसें बोलावें, व ज्याच्या बरोबर देवघेव करावयाची तो घरंदाज आहे अथवा कफल्लक आहे, त्याचाही तो विचार करीत नाही. १९० ज्याप्रमाणें, वणवा लागला असतां तो मी आपले पंखांनीं स्वाधीन करून घेईन, अशी पतंगास अज्ञानमूलक इच्छा असते, ९१ त्याप्रमाणें साहस कर्म करण्यास प्रवृत्त होऊन वेदबाह्य कर्म करण्याची त्याला हौस असते; किंबहुना असले प्रमाद करणेंच त्याला गोड वाटतें, ९२ याप्रमाणें तमोगुण हा निद्रा, आळस व प्रमाद या तीन पाशांनीं उपाधिरहित अशा जीवास बंधन करतो. ९३ ज्याप्रमाणें अग्नि काष्ठास लागला असतां काष्ठाच्या आकाराप्रमाणें दिसतो, किंवा आकाश हें घटांत त्या घटाच्या आकाराप्रमाणें भासतें, ९४ अथवा भरलेल्या सरोवरांत चंद्राचें बिंब दिसतें, त्याप्रमाणें, जीव गुणपाशांनीं बद्ध झाल्यावर गुणांच्या लक्षणांसारखा दिसतो. ९५

**अन्वयार्थ**—(हे भारत)–हे अर्जुना !–(सत्त्वं)–सत्त्वगुण–(सुखे)–सुखांत–(सञ्जयति)–संसक्त–आसक्त करतो.–(रजः)–रजोगुण–(कर्मणि)–कर्मामध्यें आसक्त करतो.–(तु)–आणि–(तमः)–तमोगुण–(उत)–हि–(ज्ञानं आवृत्य)–ज्ञानाला आच्छादित करून–(प्रमादे सञ्जयति)–अनवधानांत संयुक्त करतो. (हे भारत)–हे अर्जुना !–(सत्त्वं)–सत्त्वगुण–(रजः च तमः) रजोगुण व तमोगुण यांना–(अभिभूय)–पराभूत करून–(भवति)–वाढतो.–(रजः)–रजोगुण–(सत्त्वं च तमः)–सत्त्वगुण व तमोगुण यांना–[ अभिभूय ]–पराभूत करून–[ भवति ]–उत्कर्ष पावतो–(तथा)–आणि तसेंच–(तमः)–तमोगुण–(सत्त्वं च रजः)–सत्त्वगुण व रजोगुण यांना–[ अभिभूय भवति ]–पराभूत करून स्वतः वृद्धि पावतो. ९–१०

हें पहा–कफ व वात यांस मागें सारून देहांत पित्त वाढलें असतां तें जसें शरीर तप्त करितें, ९६ किंवा उन्हाळा आणि पावसाळा निघून गेल्यावर थंडी पडूं लागली असतां, आकाश चहूंकडे थंड होऊन जातें, ९७ अथवा जागृति व स्वप्न या अवस्था नाहींतशा होऊन गाढ झोंप लागली असतां जशी क्षणभर चित्तवृत्ति होते ९८ त्याप्रमाणें रज व तम यापेक्षां जेव्हां सत्त्वगुण अधिक वाढतो, तेव्हां ' मी सुखी आहें ' असें तो या जीवास म्हणावयास लावतो. ९९ त्याप्रमाणें, सत्त्व व रज या गुणांचा लोप होऊन जेव्हां तमाचें प्राबल्य होतें तेव्हां साहजिकपणें प्रमाद घडून येतात. २०० त्याच रीतीनें सत्त्व व तम या गुणांना दाबून जेव्हां रजोगुण बळावतो, १ तेव्हां देहांत राहणारा जो देहाचा राजा जीवात्मा, त्याला कर्मांवांचून दुसरें कांहीं चांगलें दिसत नाहीं. २ याप्रमाणें तीन श्लोकांनीं तीन गुणांचें निरूपण केलें, आतां ह्या सत्त्वादि गुणांच्या वृद्धीचें लक्षण लक्षपूर्वक ऐक. ३

**अन्वयार्थ**—(यदा)–ज्यावेळीं–(अस्मिन् देहे)–या देहांत–(सर्वद्वारेषु)–श्रोत्रादि सर्व ज्ञानसाधनांच्या निमित्तानें–(प्रकाशः)–प्रकाश २०–(ज्ञानं)–ज्ञान–(उपजायते)–उत्पन्न होतें–(तदा)–त्यावेळीं–(सत्त्वं उत)–सत्त्वहि–(विवृद्धं)–वृद्धि पावलें आहे,–(इति)–असें–(विद्यात्)–जाणावें.–(हे भरतर्षभ,)–हे भरतश्रेष्ठा अर्जुना !–(रजसि विवृद्धे) [सति]–रजोगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां–(लोभः)–लोभ,–(प्रवृत्तिः)–प्रवृत्ति–(कर्मणां आरम्भः)–कर्मांचा आरंभ–(अशमः)–अशांति–(स्पृहा)–इच्छा–तृष्णा–(एतानि)–हीं चिन्हें–(जायन्ते)–उत्पन्न होतात.–(हे कुरुनंदन)–हे कुरुवंशजा !–(तमसि विवृद्धे) [ सति ]–तमोगुण विशेषें करून वाढला असतां–(अप्रकाशः)–अविवेक,अज्ञान–(च)–व–( अप्रवृत्तिः )–प्रवृत्तीचा अभाव–(प्रमादः)–अनवधान–(मोहः एव च)–व मोहच–(एतानि)–हीं चिन्हें–(जायन्ते)–होतात.–(तु)–परंतु–(यदा)–जेव्हां–(सत्त्वे प्रवृद्धे)–सत्त्वगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां–(देहभृत्)–देहधारण करणारा आत्मा–(प्रलयं याति)–प्रलयास प्राप्त होतो–मरतो–(तदा)–तेव्हां–(उत्तमविदां )–हिरण्यगर्भादिकांच्या तत्त्वाला जाणणाऱ्या लोकांच्या–(अमलान् लोकान्)–निर्मल–शुद्ध लोकांस–(प्रतिपद्यते)–तो प्राप्त होतो.–(रजसि प्रलयं गत्वा)–रजोगुणांत प्रलयाला प्राप्त होऊन २१ रजोगुण वाढला असतां जो मरतो तो–(कर्मसंगिषु जायते)–कर्मांमध्यें आसक्ति ठेवणाऱ्या मनुष्यांमध्यें उत्पन्न होतो.–( तथा )–त्याचप्रमाणें–(तमसि प्रलीनः)–तमोगुणांत प्रलीन झालेला–तमोगुण वृद्धि पावला असतां मरण पावलेला–(मूढयोनिषु)–पश्वादि मूढ योनींमध्यें–(जायते)–उत्पन्न होतो. ११–१५

हें पहा–रज व तम या गुणांना जिंकून जेव्हां सत्त्वगुण या देहांत वाढतो, तेव्हां जीं लक्षणें होतात तीं अशीं; ४ वसंत ऋतूमध्यें कमलें फुलल्यावर त्यांचा वास जसा चहूंकडे पसरतो, त्याप्रमाणें ज्ञान हें अंतर्यामी ओतप्रोत भरून बाहेर निघतें. ५ सर्व इंद्रियांमध्यें विचार असतो, व खरोखर हातापायांनाही

१ घरंदाज. २ कफल्लक. ३ पंखांनीं. ४ इच्छेनें. ५ उडी घालतो. ६ प्रवृत्त होतो. ७ न मरण्याजोग्या कामांत. ८ धैर्य. ९ तीन पाश. १० योगाभ्यासें, आत्म्यास. ११ मागें सारून. १२ वृष्टि. १३ उन्हाळा. १४ थंडी. १५ गाढ निद्रा. १६ अधिक वाढतो. १७ महत्त्व, तेज. १८ असामर्थ्य. १९ ज्ञान. २० आंत येऊन बाहेर सांडतो. २१ कमळें. २२ सुवास.

डोळे ६ राजहंसा पुढें । चांचूचें आंगडे । तोडी जेवीं झगडे । क्षीरनीराचे ७ तेवीं दोषा दोषविवेकीं । इंद्रियेंचि होती पारखीं । नियमु बारे पायिकीं । वोळगे तैं ८ नायिकणें तें कानाचि वाळी । न पहाणें तें दिठीचि गाळी । अवाच्य तें टाळी । जीभचि गा ९ वाती पुढां जैसें । पळों लागे काळवसें । निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे २१० धाराधरकाळें । महानदी उचंबळे । तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ११ अगा पुनवेच्या दिवशीं । चंद्रप्रभा धांवे आकाशीं । ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंघ १२ वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे । मानस विटे । विषयांवरी १३ एवं सत्त्व वाढे । तैं हें चिन्ह फुडें । आणि निधनही घडे । तेव्हांचि जरी १४ कां पाहालेनि सुयोगें । जालया परगुणें । पाढियंतें पाहुणें । स्वर्गींनियां १५ तरी जैसीचि घरींची संपत्ती । आणि तैसीचि औदार्यधैर्यवृत्ती । मा परत्रीं आणि कीर्ती । कां नोहावें १६ मग गोमटेया तया । जोंवळी असे धनंजया । तेवीं सत्त्वीं जाणे देहा । कें आथि गा १७ जे स्वगुणीं उद्भट । घेऊनि सत्त्व चोखट । निगे सांडूनि कोपट । भोगक्षेम हें १८ अवचटें ऐसा जो जाये । तो सत्त्वाचाचि नवा होये । किंबहुना जन्म लाहे । ज्ञानियांमाजीं १९ सांग पां धनुर्धरा । रावो रायपणें डोंगरा । गेलिया अपुरा । होय कोई २२० नातरी येथिंचा दिवा । नेलिया सेजियां गांवा । तो तेथें तरी पांडवा । दीपाचि कीं २१ तैसी ते सत्त्वशुद्धी । आगळी ज्ञानेंसी वृद्धी । तरंगींवों लागे बुद्धी । विवेकावरी २२ पैं महदादि परिपाटीं । विचारूनि शेवटीं । विचारासकट पोटीं । जिरोनि जाय २३ छत्तिसां सदतिसावें । चोविसां पंचविसावें । तिन्ही नुरोनि स्वभावें । चतुर्थ जें २४ ऐसें सर्व जें सर्वोत्तम । जालें असे जया सुगम । तयासवें निरुपम । लाहे देह २५ इयाचि परी देख । तम-सत्त्व अधोमुख । बैसोनि जैं आगळीक । धरी रज २६ आपुलिया कार्याचा । धुमाड गींवीं देहाचा । माजवीं तैं चिन्हांचा । उदयो ऐसा २७ पांजरली वाहटुळी । करी वेगळ वेंटाळी । तैसी विषयीं सैरळी । इंद्रियां होय २८ परदारादि पडे । परी विरुद्ध ऐसें नावडे । मग शेळियेचेनि तोंडें । सैंघ चारी २९ हा ठायवरी लोभु । करी स्वैरत्वांचा राबु । वेंटाळितां अलाभु । तें तें उरे २३० आणि आड पडलिया । उद्यमा जाती भलतिया । प्रवृत्ति धनंजया । हातु न काढी ३१ तेवींचि एखादा प्रासादु । कां करावा अश्वमेधु । ऐसा अचाट छंदु ।

झाले येतात-सत्कर्म कोणतें व दुष्कर्म कोणतें हें त्यांनाच समजतें; विचार करावयाची आवश्यकता नसते. ६ राजहंसापुढें दूध व पाणी मिसळून ठेवल्यावर, जसा त्याचे चोंचीच्या टोंकानें त्या दोहोंचा निवाडा होतो, ७ त्याप्रमाणें बा अर्जुना, इंद्रियेंच बऱ्यावाईट कर्मांची पारख करतात; व नियम हा त्याची सेवा करतो; ८ न ऐकण्याजोग्या गोष्टी त्याचे कानच ऐकत नाहींत; जें भाषण बोलूं नये, तें त्याची जीभच बोलत नाहीं; ९ काळोख जसा दिव्यासमोर न येतां नाहींसा होतो; त्याप्रमाणें निषिद्ध व्यवहार त्याच्या इंद्रियांसमोर येतच नाहीं. २१० पहा, नदी जशी पर्जन्यकाळीं पाण्यानें उचंबळूं लागते, त्याप्रमाणें त्याची बुद्धि सर्व शास्त्रांत वाढते. ११ ज्याप्रमाणें पौर्णिमेचे दिवशीं सर्व आकाशांतच चंद्राचा प्रकाश पसरतो, त्याप्रमाणें त्याची वृत्ति सर्व ज्ञानामध्यें फांकते. १२ त्याच्या सर्व वासना एकत्र होऊन प्रवृत्तिमार्गाकडे त्यांचें मन जातें नाहीं त्याचप्रमाणें त्याच्या मनाला विषयांचा वीट येतो. १३ याप्रमाणें सत्त्वगुण वाढून त्याचीं लक्षणें दिसत असतां जर त्याचा काळ झाला; १४ किंवा दुष्काळाचे दिवस गेल्यावर उत्तम पाऊस पडून सर्व सुबत्ता झाली, तशांत एकादा मोठा सण प्राप्त झाला, आणि त्या समयीं जसे आपले स्वर्गांतील पूर्वज पाहुणे येतात, इतक्या प्रीतीचा पाहुणा आल्यास परमानंद कां होणार नाहीं? १५ त्याचप्रमाणें घरांत पुष्कळ संपत्ति असून दानधर्म करण्याविषयीं औदार्य असतें, तर त्याला इहलोकीं कीर्ति होऊन स्वर्ग लोकाची प्राप्ति कां होणार नाहीं? १६ अर्जुना, अशा रीतीचें आचरण केलें म्हणजे मग त्याला दुसरी तोड कोठून असणार? त्याप्रमाणें सत्त्वगुण वाढला असतां मरणानंतर तो कोठें जाईल? १७ कारण, उत्तम आचरण करणारा, भोग भोगण्याचें ठिकाण जें शरीर तें टाकून शुद्ध सत्त्वगुणाला घेऊन जातो. १८ अशा रीतीनें जो देह ठेवतो, तो केवळ सत्त्वाची मूर्तीच बनून पुनः ज्ञान्यांत जन्म घेतो. १९ हे धनुर्धरा, राजा आपल्या गादीवर असतांना जर डोंगरावर जाऊन उभा राहिला, तर त्याला त्या ठिकाणींही कांहीं कमी पडतें का सांग बरें? २२० किंवा, बाबारे, एका गांवाहून दुसऱ्या गांवास नेलेल्या दिव्याचा उजेड जसा सारखाच पडतो, २१ त्याप्रमाणें सत्त्वगुणांची वृद्धि झाल्यावर ज्ञान अधिक वाढतें, व बुद्धि विचारांत तरंगूं लागते; २२ नंतर महतत्त्वादि अनात्मक पदार्थांचा विचार करून ती त्या विचारासह आत्मस्वरूपांत निमग्न होते. २३ तेराव्या अध्यायांत वर्णन केल्याप्रमाणें छत्तीस तत्त्वांहून सदतिसावें, सांख्यमताप्रमाणें चोविसांहून पंचविसावें, व तिन्हीं गुणांहून निराळें असें जें चौथें; २४ सर्वांत उत्तम ब्रह्म तें ज्यांना प्राप्त झालें आहे, त्यांच्या कुळांत सर्वोत्कृष्ट देहप्राप्ति होते. २५ याचप्रमाणें पहा कीं, तमोगुण व सत्त्वगुण यांस दाबून ज्या वेळेस रजोगुण वाढतो; २६ व या वेळीं तो शरीररूप गांवांत आपली कृति चोहोंकडे प्रकट करतो; तेव्हां त्याचीं लक्षणें अशीं असतात–२७ वावटळ सुटल्यावर ज्याप्रमाणें ती सर्व जिनसा एकत्र करून वर उडवते, त्याप्रमाणें इंद्रियें विषयांकडे मोकळीं सुटतात. २८ परस्त्री दृष्टीस पडल्यावर तिचा भोग भोगणें हें त्यास निषिद्ध न वाटतां शेळीच्या चरण्याप्रमाणें यथेच्छ भोग भोगतो. २९ लोभ इतका वाढतो कीं, जी वस्तु याच्या सपाट्यांत सांपडणार नाहीं, तेवढीच कायें ती बाजूस उरते. २३० अर्जुना, हवा तो उद्योग याच्यापुढें आला असतां तो करण्यास हा मागें घेत नाहीं. ३१ त्याचप्रमाणें, एकादें अवाढव्य देऊळ बांधणें किंवा अश्वमेध यज्ञ

१ टोंक, अग्र. २ चाकरी करण्यास. ३ दूर टाकी. ४ [illegible]. ५ पर्जन्यकाळीं. ६ भरून जातें. ७ स्वेच्छेनुरूप, [illegible]. ८ आकुंचित होई. ९ मरण. १० उदय पावल्यानें. [illegible] सुकाळ. १२ पक्वान्न, सण. १३ स्वर्गलोकसाधन. [illegible] उपमा. १५ शरीर, खोपट. १६ भोग भोगण्याला असे. १७ शेजारच्या. १८ पोहूं लागतें १९ महततत्त्वादिकांचा क्रम. २० स्वरूपांत. २१ छत्तीस तत्त्वांला. २२ देहत्रय व अवस्थादित्रय. २३ ब्रह्म. २४ वसवून. २५ धामधूम, धुमाकूळ. २६ शरीररूप गांवांत. २७ उठलीं, सुटलीं. २८ मोकळीक. २९ पाहिजे तशी चरूं देतो. ३० आपल्या इच्छेचा. ३१ सांपडत नाहीं. ३२ पुढें ३३ देवालय, मंदीर.

घेऊनि उठी ३२ नगरेंचि रचावीं । जळाशयें निर्मावीं । महावनें लावावीं । नानाविधें ३३ ऐसैसां अफाटीं कर्मीं । समारंभु उपक्रमी । आणि दृष्टादृष्टकामीं । पुरे न म्हणे ३४ सागरुही सांडीं पडे । आगी न लाहे तीन कवडे । ऐसें अभिलाषी जोडे । दुर्भरत्व ३५ स्पृहा मना पुढां पुढां । आशेचा घे दवडा । विश्व घेंपे चाडा । पायां तळीं ३६ इत्यादि वाढतां रजीं । इयें चिन्हें होती सांजीं । आणि ऐशा समाजीं । वेंचे जरी देह ३७ तरी आघवाचि इहीं । परिवारला आनी देहीं । रिघे परी योनिहीं । मानुषिची ३८ सुरवाडेंसिं भिकारी । वसो यां राजमंदिरीं । तरी काय अवधारीं । रावो होईल ३९ बैल तेथें करंबाडें । हें न चुके गा फुडें । नेइजो कां वऱ्हाडें । समर्थाचेनी २४० म्हणौनि व्यापारा हातीं । उसंतु दिहा ना राती । तैसयाचिये पांतीं । जुंपिजे तो ४१ कर्मजडाच्या ठायीं । किंबहुना होय देहीं । जो रजोवृत्तीच्या डोहीं । बुडोनि निमे ४२ मग तैसाचि पुढती । रजसत्त्ववृत्ती । गिळूनि ये उन्नती । तमोगुण ४३ तैंचि जियें लिंगें । देहींची सबाह्य सांगें । तियें परिस चांगें । श्रोत्रबळें ४४ तरी होय ऐसें मन । जैसें रविचंद्रहीन । रात्रीचें का गगन । अंवसेचिये ४५ तैसें अंतरें अँसोस । होय स्फूर्तिहीन उद्वस । विचाराची भाष । हारपे तैं ४६ बुद्धि मेचवेना धोंडी । हा ठायवरी मैंवाळें सांडी । आठवो देशधडी । जाला दिसे ४७ अविवेकाचेनि माजें । सबाह्य शरीर गाजे । एकलेनि घेपे दीजे । मौढ्य तेथ ४८ आचार-भंगाचीं हाडें । रूपती इंद्रियापुढें । मरे जरी तेणें कडे । क्रिया जाय ४९ पैं आणिकही एक दिसे । जे दुष्कृतीं चित्त उल्हासें । आंधारीं देखणें जैसें । डुडु-ळाचें २५० तैसें निषिद्धाचेनि नांवें । भलतेंही भरे हांवे । तियेविषयीं धांवें । घेती करणें ५१ मदिरें न घेतां डुले । सन्निपातेंवीण बरळे । निष्प्रेमेचि भुले । पिसें जैसें ५२ चित्त तरी गेलें आहे । पारि उन्मनी ते नोहे । ऐसें माल्हातिजे मोहें । मांजिरेनी ५३ किंबहुना ऐसैसीं । इये चिन्हें तम पोषीं । जैं वाढे आयि-तीसीं । आपुलिया ५४ आणि हेंचि होय प्रसंगें । मरणाचें जरी पडे खेंगें । तरी तेतुलेनि निगे । तमेंसीं तो ५५ राई राईपण बीजीं । सांठवूनियां अंग त्यजी । मग विरूढे तैं दुजी । गोठी आहे ५६ पैं होऊनि दीपकलिका । येरू आगी विझो कां । कां जेथ लागे तेथ असका । तोचि आहे ५७ म्हणोनि तमा-चिये लेंथें । बांधोनियां संकल्पातें । देह जाय तैं मागौतें । तमाचेचि होय ५८

करणें अशा अचाट छंदाच्या मार्गे लागतो. ३२ एकादें शहर वसवावें, किंवा मोठाले तलाव बांधावे, अथवा विस्तीर्ण अरण्यांत बागा कराव्या, ३३ याप्रमाणें अचाट कृत्यें हातीं घेतो; आणि इहपरलोकप्राप्तीची त्याची इच्छा कधीं कमी होत नाहीं. ३४ समुद्रही हार घेईल, व अग्नीला तीन कवड्या इतकी देखील किंमत येणार नाहीं, इतका याचा अभिलाष प्रबल होऊन बसतो. ३५ याच्या इच्छेची धांव मनापुढें असते, व सर्व विश्वही याला फिरण्यास पुरेसें होत नाहीं. ३६ याप्रमाणें रजोगुण वाढून लक्षणें दिसूं लागतात आणि अशा स्थितींत जर देहावसान झालें, ३७ तर दुसऱ्या देहांतही याच गुणांनीं युक्त होऊन मनुष्ययोनींत जन्म घेतो. ३८ एकादा भिकारी सर्व सुखासह जरी राजवाड्यांत बसला, तरी तो राजा होऊं शकेल का? ३९ बैल जरी श्रीमान् गृहस्थाच्या वऱ्हाडाबरोबर गेला, तरी त्याला कडबाच खावयास मिळतो. २४० म्हणून, ज्या व्यापारांत रात्रंदिवस विसावा नाहीं, त्याच्या पंक्तीला हा जाऊन बसतो. ४१ जो रजोत्पत्तीच्या डोहांत बुडून मरतो, तो काम्यकर्म करणारांच्या घराण्यांतच जन्म घेतो. ४२ त्याप्रमाणें, पुढें रज व सत्वगुण यांस नाहींतसे करून तमोगुणवृत्ति जास्त वाढते. ४३ त्या कालीं देहांत व बाह्यात्कारीं जीं चिन्हें दिसतात, तीं नीट लक्ष देऊन ऐक. ४४ मन हें अज्ञानानें इतकें भरून जातें कीं, जणूंकाय चंद्र व सूर्य दोन्ही हे नसलेल्या आमावास्येच्या रात्रीचें आकाशच. ४५ त्याचप्रमाणें, अंतःकरणपूर्वक अज्ञानभरित होऊन तेथें विचाराची गोष्टही निघत नाहीं. ४६ बुद्धि ही कठीणपणांत दगडालाही मागें सारते, आणि स्मृति देशोधडीस लावल्याप्रमाणें दिसते. ४७ त्याचे शरीरावर अंतर्बाह्य अविचार दृष्टीस पडतो, व त्याचे सर्व व्यापार मूर्खपणाचे असतात. ४८ त्याच्या इंद्रियांसमोर अनाचार उभा असू[illegible], आणि मेला असतांही जो अनाचाराच्या क्रिया करतो. ४९ ज्याप्रमाणें घुबडास अंधाऱ्या रात्रींही स्वच्छ दिसतें, त्याप्रमाणें इतर लोकांपेक्षां वाईट कर्में करण्यास त्याच्या मनाला फार हौस असते. २५० त्याचप्रमाणें, निषिद्ध कर्में करण्याची त्याला फार हांव असून त्याचे इंद्रियांची धांवही तिकडेच असते. ५१ हा मद्य न पितांच झुंगतो. सन्निपात न होतांच बरळूं लागतो, आणि प्रेमाशिवायच वेड्याप्रमाणें रडतो. ५२ त्याचें चित्त तर ताळ्यावर नसतेंच, परंतु तो कांहीं समाधि नव्हे. याप्रमाणें मोहाच्या वाढीनें ज्ञानशून्य असतो. ५३ किंबहुना, आपल्या सर्व सामुग्रीस तमोगुण वाढला म्हणजे अशीं चिन्हें दिसूं लागतात. ५४ आणि प्रसंगानुसार अशाच स्थितींत मरण आलें, तर दुसऱ्या जन्मींही तो तमोगुणांतच जन्म घेतो. ५५ मोहरीचें झाड आपलें मोहरीपण बीजांत सांठवून आपलें अंग सोडतें, आणि पुनः जेव्हां तें उगवतें तेव्हां तें दुसरेंच झाड होतें की काय? नाहीं. मोहरीचेंच होतें. ५६ त्याचप्रमाणें दिवा पेटो किंवा विझो, परंतु तो ज्या ठिकाणीं लागला असेल त्या ठिकाणीं अग्निरूपानें तोच असतो. ५७ म्हणून आपल्या संकल्पांत तमाचें गाठोडें बांधून देह ठेवल्यावर पुनः जन्म घेणें तो रजोगुणांतच घेतो ५८

१ तलाव. २ प्रारंभ करतो. ३ इहपरलोकांच्या वासनेंत. ४ पराजय, हारी पावे. ५ कवड्या, दमड्या. ६ लोभाविषयीं ७ अतृप्ति. ८ इच्छा. ९ धांव. १० घातलें जातें. ११ सिद्ध. १२ आशा इत्यादिक परिवारासह. १३ सुखानें. १४ कडबा. १५ विश्रांति, विसावा. १६ दिवसां. १७ पंक्तीला. १८ कर्माविषयीं श्रद्धाळूंच्या. १९ मरतो. २० चिन्हें. २१ लक्ष्य देऊन. २२ अंतःकरण. २३ गडद, ओसाड. २४ ज्ञान. २५ शून्य. २६ बुद्धि कठिणपणांत दगडालाहि मानीत नाहीं; गणत नाहीं. २७ मूढपण २८ घुबडाचें. २९ धांव. ३० इंद्रियें. ३१ दारू, मद्य. ३२ मनाचा लय जींत होतो ती पांचवी अवस्था. ३३ स्वाधीन होतो. ३४ माज आणणाऱ्या. ३५ सामुग्रीसहित. ३६ पणें, खळगा, बोलावणें. ३७ वाढे. ३८ सर्व. ३९ गांठोड्यांत मोटेंत.

आतां काय येणें बंव्हें । जो तमोवृद्धि मृत्यु लाहे । तो पशु कां पक्षी होये । झाड कां कृमी ५९

कर्मणः सुकृतस्याऽऽहुः सात्त्विकं निर्मलं फलम्। रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम्॥१६॥

येणेंचि पैं कारणें । जें निपजे सत्त्वगुणें । तें सुकृत ऐसें म्हणे । श्रौत समो २६० म्हणौनि तया निर्मळा । सुखज्ञानी सरळा । अपूर्व ये फळा । सात्त्विक तें ६१ मग राजसा जिया क्रिया । तया इंद्रावणी फळलिया । जें सुखें चितारूनियां । फळती दुःखें ६२ कां निंबोळियेचें पिक । वारि गोड आंत विख । तैसें तें राजस देख । क्रियाफळ ६३ तामस कर्म जितुकें । अज्ञान फळेंचि पिके । विषांकुर विखें जियापरी ६४

सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च। प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

म्हणौनि बारे अर्जुना । येथ सत्त्वचि हेतु ज्ञाना । जैसा कां दिनमाना । सूर्य हा पैं ६५ आणि तैसेंचि हें जाण । लोभासि रज कारण । आपलें विस्मरण । अद्वैता जेवीं ६६ मोह अज्ञान प्रमादा । ययां मैळेया दोषवृंदा । पुढती पुढती प्रबुद्धा । तमचि मूळ ६७ ऐसें विचाराच्या डोळां । तिन्ही गुण वेगळवेगळां । दाविले जैसा आंवळा । तळहातींचा ६८ तंव रजतमें दोन्हीं । देखिलीं प्रौढपतनीं । सत्त्वावांचूनि नाणी । ज्ञानाकडे ६९ म्हणौनि सात्त्विकवृत्ती । एक जाले गा जन्मव्रती । सर्वत्यागें चतुर्थी । भक्ति जैसी २७०

ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः । जघन्यगुणवृत्तस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥१८॥

तैसें सत्त्वाचेनि नटनाचें । असणें जाणें जयांचें । ते तनुत्यागीं स्वर्गींचे । राय होती ७१ इयाचि परी रजें । जिहीं कां जीजे[10] मरिजे । तिहीं मनुष्य होइजे । मृत्युलोकीं ७२ तेथ सुखदुःखाचें खिचटें[11] । जेविजे एकेचि तांटें[12] । जेथ इये-मरणवाटे । पडिलें नुठी ७३ आणि तयाचि[13] स्थिति तमीं । जे वाढोनि [14]निमती भोगक्षेमीं[15] । ते घेती नरकभूमी । मूळपत्र[16] ७४ एवं वस्तूचिया[17] सत्ता । त्रिगुणासी पंडुसुता । दाविली सकारणता । आघवींची ७५ पैं वस्तु वस्तुत्वें असिकें[18] । तें आपणपें[19] गुणासारिखें । देखोनि कार्यविशेखें । अनुकरे गा ७६ जैसें कां स्वप्नींचेनि राजे । जैं परचक्र देखिजे । तैं हारी जैतें[20] होइजे । आपणपांचि ७७ तैसें मध्योर्ध्व अध । हे जे गुणवृत्तिभेद । ते दृष्टीवांचूनि[21] शुद्ध । वस्तुचि असे ७८

फार काय सांगावें ! तमोगुण वाढला असतां जो मृत्यु पावतो, तो पुनः पशु किंवा पक्षी अथवा झाड किंवा किडे यांचा जन्म पावतो. ५९

**अन्वयार्थ**—(सुकृतस्य कर्मणः)-पुण्य कर्मांचें-(सात्विकं निर्मलं फलं)-सात्विक निर्मल फळ मिळतें असें-(आहुः)-सांगतात.-(तु)-पण-(रजसः)-रजोगुणाचें-(फलं)-फळ-(दुःखं)-दुःख आहे.-(तमसः फलं)-तमोगुणाचें फळ-(अज्ञानं)-अज्ञान आहे. १६

याच कारणास्तव सत्वगुणापासून जें उत्पन्न होतें, तें 'सुकृत' होय, असें श्रुतीसमुदाय म्हणतो. २६० म्हणून, सत्त्वगुणापासून सहज सुख व ज्ञान अपूर्व फलास येतें यास्तव त्याला सात्विक ( सत्कर्म ) फळ असें म्हणतात. ६१ आतां रजोगुणापासून ज्या क्रिया उत्पन्न होतात, त्या कडू वृंदावनाप्रमाणें बाहेरून दिसण्यांतच मात्र सुख असून अंतर्यामीं केवळ दुःखरूपानें फलद्रूप होतात, ६२ अथवा निंबोळ्या ज्याप्रमाणें वरून दिसण्यांत पिंवळ्या धमधमीत असून आंत विषाप्रमाणें कडू असतात, त्याप्रमाणें रजोगुणापासून होणारी फळें आहेत. ६३ ज्याप्रमाणें, विषाच्या कांद्या लागला असतां त्याला विषाचा अंकुर फुटतो, त्याप्रमाणें तमोगुणापासून होणाऱ्या क्रिया अज्ञानमयच असतात. ६४

**अन्वयार्थ**—(सत्वात्)-उत्कर्ष पावलेल्या सत्वगुणापासून -(ज्ञानं)-ज्ञान-(संजायते)-उत्पन्न होतें-(च)-आणि-(रजसः) -रजोगुणापासून-(लोभः एव)-लोभच उत्पन्न होतो.-(तमसः)-तमोगुणापासून-(प्रमादमोहौ)-प्रमाद व मोह-(भवतः)-होतात -(च)-आणि-(अज्ञानं एव)-अज्ञानच उत्पन्न होतें. १७

म्हणून बाबा अर्जुना, ज्याप्रमाणें दिवसाला सूर्य कारण आहे, त्याप्रमाणें ज्ञानास सत्त्वगुणच कारण आहे, ६५ आणि ज्याप्रमाणें अद्वैत होण्याला आपलें स्वताचें विस्मरण व्हावें लागतें, त्याप्रमाणें लोभ उत्पन्न होण्यास रजोगुण कारण होतो. ६६ हे ज्ञानवंता, मोह, अज्ञान व प्रमाद या त्रिदोषसमुदायाला तमोगुणच कारण आहे. ६७ ज्याप्रमाणें तळहातावर आंवळा घेऊन एखादे मनुष्यास प्रत्यक्ष दाखवावा, त्याप्रमाणें; विचारवंत मनुष्यास विचार करण्याकरितां तिन्ही गुण वेगवेगळाले स्पष्ट करून सांगितले. ६८ तेव्हां रज व तम हे दोन्ही गुण म्हणजे नरकाचीं मोठीं साधनें मानलीं आहेत, आणि ज्ञानाची प्राप्ति सत्वावांचून व्हावयाची नाहीं, ६९ म्हणून ज्याप्रमाणें इतर भक्तीचा त्याग करून ज्ञानी चौथ्या भक्तीचा स्वीकार करतात, त्याप्रमाणें कोणी आजन्म सात्विक वृत्ति धारण करतात. २७०

**अन्वयार्थ**—(सत्त्वस्थाः)-सत्वगुणवृत्तामध्यें स्थित असलेले सात्विक-(ऊर्ध्वं)-देवादिकांच्या लोकीं-( गच्छन्ति )-जातात.-(राजसाः)-राजसलोक-(मध्ये)-मध्यलोकीं म्ह० मनुष्यांमध्यें-(तिष्ठन्ति)-राहतात.-(जघन्यगुणवृत्तस्थाः)-शेवटच्या निकृष्ट गुणाच्या वृत्तांत स्थित असलेले-(तामसाः)-तामसवृत्ति जन-(अधः)-अधोलोकीं-(गच्छन्ति)-जातात. १८

अशा प्रकारें जे सात्विक वृत्तीचें नेहमीं आचरण करितात, ते देह ठेवल्यावर स्वर्गांत वास करतात. ७१ त्याचप्रमाणें, जे राजस वृत्तीचें आचरण करीत असतां देहत्याग करतात, ते मृत्युलोकीं मनुष्ययोनींत जन्म घेतात. ७२ त्या मृत्युलोकांत सुख व दुःख यांची खिचडी एकाच ताटांत खावी लागते, ( एकाच देहास सुखदुःख भोगावें लागतें ) व तेथें कांहीं केल्यानें मृत्यु टळत नाहीं. ७३ आणि त्याचप्रमाणें तमोगुणाचें जें आचरण करतात, ते देहांतील नरकभूमींत जाण्याची सनद मिळवितात. ७४ अर्जुना, याप्रमाणें वस्तूच्या सत्तेनें वाढणारे तिन्ही गुण त्यांच्या लक्षणांसह तुला स्पष्ट सांगितले. ७५ परंतु वस्तूच्या स्वरूपांत बदल न होतां, तीं गुणांच्या उपाधीनें आपणच गुणलक्षणांप्रमाणें कार्य करते. ७६ आपण राजे झालों आहों, व आपल्यावर परचक्र आलें आहे, जसें स्वप्नांत पाहणारा मनुष्य ज्याप्रमाणें आपला जय व अपजय आपल्याच ठिकाणीं पहातो, ७७ त्याप्रमाणें स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे गुणांच्या वृत्तीचे भेद आहेत, गुणदृष्टि बाजूस ठेवून पाहिलें असतां ते शुद्ध वस्तूच होत. ७८

१ कडू मापणारें. २ सहज. ३ कडू वृंदावनें. ४ दरदरून, रंगून. ५ द्वैत भासणारा. ६ प्रमाद-असावधपणा. ७ आजन्म व्रताचरण करणारे; ८ संन्यासभक्ति ९ विकसितपणानें वृत्तीनें, आचरणानें. १० जनात आणि मनात. ११ खिचडी. १२ देहरूपी ताटांत. १३ त्याचप्रमाणें, १४ मरतात. १५ देहीं. १६ सनद, आमंत्रणपत्र. १७ ब्रह्माच्या. १८ संपूर्ण. १९ स्वतः आपण, २० पराजय, २१ जय, २२ ठिकाणापुरतें.

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टापश्यति । गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

परी हे वोहणी[१] असो । तरी तुज आन न दिसो । परिसें तें सांगतसों । मागील गोठी ७९ तरी ऐसें जाणिजे । सामर्थ्यें तिन्ही सहजें । होती देहें[२]-व्याजें । गुणचि हे २८० इंधनाचेनि आकारें । अग्नि जैसा अवतरे[३] । कां आं-गवे तरुवरें । भूमिरसु[४] ८१ ना ना दाहिंयाचेनि मिसें । परिणमे दूधचि जैसें । कां मूर्त[५] होय उंसें । गोडी जेवीं ८२ तैसें हें स्वांतःकरण । देहेंचि[६] होती त्रि-गुण । म्हणोनि बंधासि कारण । घडे कीर ८३ परी चोजँ हें धनुर्धरा । जे एवढा हा गुंफिर्रा । मोक्षाचा संसारा । उणा[९] नोहे ८४ त्रिगुण आपुलालेनि धर्में । देहींचें[१०] माथीत साउमें[११] । चाळितांही न[१२] खोमें । गुणातीतता ८५ ऐसी मुक्ति असे सहज । ते आतां परिसऊं तुज । जे तूं ज्ञानांबुज[१३] । द्विरेफु[१३] कीं ८६ आणि गुणीं गुणाजोगें । चैतन्य नोहे मागें । बोलिलों तें खैंगें[१४] । तेवींचि हें ८७ तरी पार्था जैं ऐसें । बोधलेनि जीवें दिसे । स्वप्न कां जैसें । चेइलेनी ८८ नातरी आपण जळीं । बिंबलों तीरोनि न्याहाळी । चळण होतां कल्लोळीं[१५] । अने-कधा ८९ कां नटलेनि लाघवें[१६] । नटु जैसा न झकवे । तैसें गुणजात देखावें । न होनियां २९० पैं ऋतुत्रय आकाशें । धरूनियांही जैसें । नेदिजेचिये वोंवसें[१७] । वेगळेपणा ९१ तैसें गुणीं गुणापरौतें । जे आपणपें असे आयितें । तिये अहं बैसे अहंते[१८] । मूळकेचिये ९२ पैं तेथूनि मग पाहतां । म्हणे साक्षी मी अकर्ता । हे गुणचि क्रियाजातां[१९] । नियोजितें[२०] ९३ सत्त्वरजतमाच्या । भेदीं परसरु[२१] कर्माचा । होत असे तो गुणांचा । विकारु हा ९४ययामाजि मी ऐसा । वनीं कां वसंतु जैसा । वनलक्ष्मीविलासा[२२] । हेतुभूत[२३] ९५ कां तारागणीं लोपावें । सूर्यकांतीं[२४] उद्दीपावें[२५] । कमळीं विकासावें । जावें तमें ९६ यया कोणाचीं काजें कहीं । सविता जैसा देखत नाहीं । तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ९७ मी दाऊनि गुण देखे । गुणता हे मियां पोखे[२६] । ययाचेनि निःशेखें[२७] उरे तें मी ९८ ऐसेनि विवेकें जया । उदो होय धनंजया । ये गुणातीतत्व तया । ऊर्ध्वपंथें[२८] ९९

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् । जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणे अचुक । जे ज्ञानें केलें टीकें[२९] । तयाचिवरी ३०० किंबहुना पंडुसुता । ऐसी तो माझी[३०] सत्ता । पावे जैसी स-रिता । सिंधुत्व गा १ नळिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला । तैसा

**अन्वयार्थ**--(यदा)-ज्या वेळीं-(द्रष्टा)-विद्वान्-(गुणेभ्यः अन्यं कर्तारं)-शरीर, इंद्रियें व विषय यांच्या आकारानें परिणत झालेल्या गुणांहून दुसरा कोणी कर्ता-(न पश्यति)-पहात नाहीं,-(च)-आणि-(गुणेभ्यः)-गुणांहून-(परं)-अगदीं विलक्षण असलेल्या साक्षिभूत आत्म्याला-(वेत्ति)-जाणतो-(सः)-तेव्हां तो विद्वान्-(मद्भावं)-माझ्या ईश्वरभावाला-माझ्या स्वरूपास-(अधिगच्छति)-प्राप्त होतो. १९

पण हें बोलणें आतां बाजूस ठेवूं. मात्र तूं एवढें लक्षांत ठेव कीं, वस्तूवांचून दुसरें कांहीं नाहीं. आतां तुला मागील गोष्ट सांगतों, ती ऐक. ७९ तर तूं असें पक्कें समज कीं, वस्तूच्या सामर्थ्यानें हे तिन्ही गुण सहज देहाच्या निमित्तानें उत्पन्न होतात. २८० लाकडें पेटल्यावर जसा अग्नि त्यांच्या आकारासारखा दिसतो, किंवा भूमि व पाणी यांचा रस जसा झाडांत दृष्टीस पडतो, [ कारण, झाडांत भूमि व उदक हींच दोन तत्त्वें आहेत. ] ८१ अथवा दूध विरजलें असतां जसें दह्याच्या आकारानें दिसतें; किंवा उंसाच्या आकारानें गोडी व्यक्त होते. ८२ त्याप्रमाणें, अंतःकरणासह सूक्ष्म देहच हे तिन्ही गुण बनतो म्हणून त्यांच्या सपाट्यांत तो सांपडतो. ८३ परंतु, अर्जुना, हें केवढें आश्चर्य आहे कीं, सूक्ष्म देहाची व गुणांची ही एवढी गुंतागुंत झाली असतांही ज्ञान्यांना मोक्षाचा व्यवहार कमी पडत नाहीं. ८४ तिन्ही गुण आपापल्या धर्माप्रमाणें देहाच्या माथ्यावर संपूर्ण व्यवहार करीत असतांही गुणातीततेंत कमीपणा येत नाहीं. ८५ अशा प्रकारची सहज असणारी मुक्ती तुला आतां ऐकवूं. कारण, तूं ज्ञानकमळावरील भ्रमर आहेस, म्हणजे ऐकण्यास योग्य आहेस. ८६ आणि चैतन्य गुणांप्रमाणें न होतां त्यापासून अलिप्त असतें, असें जें तत्त्व तुला मागें सांगितलें आहे तेंच हें होय. ८७ तर पार्था, ज्ञानाचा बोध झाल्यावर गुणांपासून चैतन्य वेगळें आहे असें दिसतें. जागृत झाल्यावर जसें स्वप्न, ८८ किंवा नदीच्या कांठीं उभा राहिलेला मनुष्य आपलें प्रतिबिंब पाण्यांत पहातो, व पाणी हालविल्यावर तेंच प्रतिबिंब जसें पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतें, ८९ किंवा नटानें स्त्रीवेष घेतल्यावर ज्याप्रमाणें तो स्त्रीच्या गुणांनीं फसत नाहीं. आपण पुरुष आहों हें विसरत नाहीं. त्याप्रमाणें स्वस्वरूपीं सत्यबुद्धि कायम ठेवून गुण नुसते पहावे. २९० ज्याप्रमाणें आकाशावर तिन्ही ऋतु होतात व जातात, परंतु त्यांजपासून तें अलिप्त असतें, ९१ गुणाचे व्यवहार चालत असतांनाही गुणाहून पलीकडे आत्मरूप स्वतःसिद्ध आहे, त्या मूळ आत्मस्वरूपावरती ज्याचा अहंकार जाऊन बसतो; ९२ मग त्या ठिकाणाहून पाहूं लागला असतां म्हणतो कीं, मी कर्मकर्ता नसून फक्त साक्षीभूत आहें, आणि सर्व क्रिया गुणच उत्पन्न करणारे आहेत; ९३ सत्व, रज व तम या गुणापासून निरनिराळीं कर्में जीं होतात, तीं आपण न करितां त्याला गुणच कारण आहेत. ९४ वनशोभेला जसा वसंत ऋतु कारण असतो, परंतु अलिप्त असतो, तसा मी सर्व क्रिया करीत असूनही अलिप्त आहें. ९५ अथवा नक्षत्रांचा लोप व्हावा, सूर्यकांत मण्यानें अग्नि उत्पन्न करावा, कमळानें विकसित व्हावें, तमाचा नाश व्हावा, या सर्व गोष्टी एका सूर्योदयापासून होतात. ९६ परंतु सूर्य त्यांकडे पहात नाहीं; त्याप्रमाणें माझ्याच सत्तेनें कर्में होत असूनही मी या देहांत सत्तारूप मात्र असून अकर्ता आहें. ९७ मी दाखविल्यानें गुण दृष्टीस पडतात, माझ्याच सत्तेनें गुण वाढतात, व ते नाहींतसे झाल्यावर जें बाकी रहातें, तेंही मीच होय. ९८ धनंजया, याप्रमाणें ज्याच्या हृदयांत ज्ञानाचा उदय झाला आहे, तो अर्थात् गुणातीत होय. ९९

**अन्वयार्थ**--(देही)-देहवान् आत्मा-(देहसमुद्भवान् एतान् त्रीन् गुणान्)-देहाच्या उत्पत्तीचें बीज अशा या तीन गुणांस-(अतीत्य)-उल्लंघून-(जन्म-मृत्यु-जरा-दुःखैः)-जन्म, मृत्यु, जरा व दुःखें-यांजकडून-(विमुक्तः)-[सन्]-सोडला गेलेला असा होत्साता-(अमृतं)-अमृतभावास-(अश्नुते)-प्राप्त होतो. अमृताचा-मोक्षाचा अनुभव घेतो. २०

मग तो निर्गुण असें ब्रह्म अचुकपणें जाणतो. कारण ज्ञानाच्या योगानें त्यानें तथेंच स्थिति केलेली असते. ३०० किंबहुना अर्जुना, नदी ज्याप्रमाणें समुद्रत्व पावते, त्याप्रमाणें तो माझीच सत्ता पावतो. १ ज्याप्रमाणें नलिकेवरून उठून झाडांच्या दुसऱ्या फांदीवर बसल्यावर राघू बंधरहित होतो.

---

१ बोलणें. २ देहाच्या निमित्तानें. ३ साकार दिसतो. ४ पाणी. ५ व्यक्त. ६ सूक्ष्मदेह. ७ नवल. ८ गुंतागुंत. ९ कमी. १० देहाची मागली पुढली ( संचित क्रियमाण ) कर्मे करीत असतां. ११ पुढील, क्रियमाण. १२ उणी होत नाहीं. १३ ज्ञानकमलावरचा भ्रमर. १४ तात्पर्य, प्रमेय. १५ शहाणपणें. १६ कौशल्यानें. १७ कमीपणा, न्यूनत्व. १८ मूळ अहं मजारेम, या स्थितींत. १९ सर्व कर्मांला. २० योजितात. २१ विस्तार. २२ वनश्रीच्या शोभेला. २३ कारण. २४ सूर्यकांत मण्यानें. २५ प्रकाशावें, पेटवें. २६ पोसली जाते, वाढते. २७ नाहींसें होण्यानें, निरसानें. २८ उत्तम मार्गानें, ऊर्ध्वगतीनें. २९ भूषण, टीका. ३० मद्भाव, माझा अधिकार.

मूळअहंतें वेठिला । तो मी म्हणौनि २ अगा अज्ञानाचिया निदा । जो घोरतें
होता बदबदा । तो स्वस्वरूपीं प्रबुद्धा । चेइला कीं ३ पैं बुद्धिभेदाचा आरिसा ।
तया हातोनि पडिला वीरेशा । म्हणौनि प्रति-मुखाभासा । मुकला तो ४
देहाभिमानाचा वारा । आतां वाजो ठेला वीरा । तैं ऐक्य वीचिसागरां ।
जीवेशां हें ५ म्हणौनि मद्भावेंसीं । प्राप्ति पाविजे तेणेंसरिसी । वर्षांतीं आ-
काशीं । घनजात जेवीं ६ तेवीं मी होऊनि निरुता । मग देहींचिये असतां ।
नागवे देहसंभूतां । गुणांसि तो ७ जैसा भिंगाचेनि घरें । दीपप्रकाशु नावरे ।
कां व विझेचि सागरें । वडवानळु ८ तैसा आलिंगेला गुणांचा । बोधु[११] न[१२] मैळे
तयाचा । तो देहीं जैसा व्योमींचा[१३] । चंद्र जळीं ९ तिन्ही गुण आपुलालिये
प्रौढी । देहीं नाचविती बागेंडीं । तो पाहोंही न धाडी । अहंतेतें ३१० हा ठाय-
वरी । नेहटोनि[१५] ठेला अंतरीं । आतां काय वर्ते शरीरीं । हेंही नेणे ११ सांडूनि
आंगींची खोळी[१६] । सर्प रिगालिया पाताळीं । ते त्वचा कोण सांभाळी ।
तैसें जालें १२ कां सौरम्य[१७] जीर्णु जैसा । आमोदु मिळोनि जाय आकाशा ।
माघारा कमळकोशा । नयेचि तो १३ पैं स्वरूपसमरसें । ऐक्य गा जालें तैसें ।
तेथ किं धर्म हें कैसें । नेणे देह १४ म्हणोनि जन्मजरामरण । इत्यादि जे साही
गुण । ते देहींचि ठेले कारण । नाहीं तया १५ घटाचिया खापरिया । घट-
भंगीं फेडिलिया । महदाकाश अपैसैया । जालेंचि असे १६ तैसी देहबुद्धि
जाये । जैं आपणपां आठौ होये । तैं आन कांहीं आहे । तेंवांचुनी १७ येणें
थोर बोधलेपणें । तयासि गा देहीं असणें । म्हणूनि तो मी[२२] म्हणें । गुणातीत १८
यया देवाचिया बोला । पार्थु अतिसुखावला । मेघें संबोखिला[२३] । मोरु जैसा १९

कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो । किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥

तेणें तोषें वीर पुसे । जी कोण्ही चिन्हीं तो दिसे । जयामाजीं वसे । ऐसा बोधु
३२० तो निर्गुण काय आचरे । कैसेनि गुण निस्तरे । हें सांगिजो माहेरें ।
कृपेचेनि २१ यया अर्जुनाचिया प्रश्ना । तो षड्गुणांचा राणा । परिहारु[२५] आ-
कैर्णा[२६] । बोलतु असे २२ म्हणे पार्था तुझी नवाई[२७] । हें येतुलेंचि पुससी काई ।
तें[२८] नामचि तया पाहीं । सत्य लटिकें २३ गुणातीत जया नांवें । तो गुणाधीन
तरी नव्हे । ना होय तरी नागवे । गुणां यया २४ परी अधीन कां नागवें ।

त्याप्रमाणें गुणातीत झाला, तो गुणांच्या सपाट्यांत न सांपडतां अहंब्रह्म असें जाणतो. २ हे ज्ञानवंता, जो अज्ञानरूप निद्रेंत मोठमोठ्यानें घोरत पडलेला असतो, तो स्वस्वरूपाच्या ठिकाणी जागा होतो. ३ हे वध–अर्जुना, त्याच्या हातून बुद्धिभेदरूपी आरसा खालीं पडल्यामुळें त्यांत दिसणाऱ्या सुखदुःखरूपी प्रतिबिंबापासून तो मुक्त होतो. ४ मग हे वीरा, देहाभिमानरूपी वारा वहावयाचा बंद होऊन, त्याच्यावरून जीव व ईश एतद्रूपी लाटा आत्मस्वरूपरूपी सागरांत मिळतात. ५ म्हणून, असें होण्याबरोबर ते मद्रूप होतात. ज्याप्रमाणें वर्षाकाळाचें अखेरीस आकाशांत उत्पन्न होणारे ढग आकाशांतच लय पावतात, पर्जन्यवृष्टि करीत नाहींत, ६ त्याप्रमाणें मद्रूप झाल्यावर, तो जरी देहांत असला तरी गुणांनी लिप्त होत नाहीं. ७ ज्याप्रमाणें दिवा भिंगाच्या घरांत ठेवला म्हणजे त्याचा उजेड आंवरत नाहीं, अथवा वडवानल हा समुद्राच्या पाण्यानेंही विझत नाहीं, ८ त्याप्रमाणें गुणांच्या येण्याजाण्यानें त्याचें शुद्ध ज्ञान मलीन होत नाही; आणि आकाशांतील चंद्राचें पाण्यांत बिंब पडलें, तरी तो जसा पाण्यापासून वेगळा असतो, त्याप्रमाणें तो देहांत असूनही गुणांनी बद्ध होत नाही. ९ तिन्ही गुण त्याच्या देहांत आपापल्या इच्छेप्रमाणें जरी धुमाकूळ घालीत असले, तरी त्यांकडे तो ढुंकूनही पहात नाहीं. ३१० इतक्या स्थितीपर्यंत तो अंतर्यामी निश्चळ असतो अशा स्थितींत तें शरीर काय व्यवहार करितें, हेंही जाणत नाहीं. ११ साप आपली कात टाकून बिळांत जातो, त्या वेळेस जसें आपल्या कातीचें काय होईल इकडे लक्ष देत नाहीं, तसे ज्ञानी आपल्या शरीराविषयीं निष्काळजी असतात. १२ अथवा कमल उमलल्यावर त्याचा सुवास आकाशांत निघून गेल्यावर ज्याप्रमाणें माघारा कमलकोशांत येत नाहीं, १३ त्याप्रमाणें आत्मस्वरूपांत ऐक्य झाल्यावर मग हा देह कोणत्या धर्मानें वागतो, हें पहात नाहीं. १४ म्हणून, जन्म, जरा, मरण इत्यादि जे सहा गुण, त्यांचा संबंध देहाच्या ठिकाणीं असतो; ज्ञान्याला आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं नसतो; १५ घट फुटून त्याच्या ठिकऱ्या झाल्या म्हणजे त्यांतील आकाश ( घटाकाश ) जसें सहज महदाकाशांत मिळतें, १६ तशी देहबुद्धि नाहींशी झाल्यावर जेव्हां आत्मस्वरूपाची ओळख होते, तेव्हां अशा स्थितींत आत्मस्वरूपाशिवाय दुसऱ्या कशाची आठवण होणार ? १७ याप्रमाणें ज्याच्या अंतःकरणांत बोध झाला आहे, तो जरी देहधारी असला तरी तो गुणातीत आहे असें मी म्हणतों. १८ मेघाची गर्जना ऐकून जसा मोराला संतोष होतो, तसा या श्रीकृष्णाच्या भाषणानें पार्थास फार संतोष वाटला. १९

**अन्वयार्थ**—(हे प्रभो)-हे प्रभो–(कैः–लिंगैः)–कोणत्या लिंगांनीं–(एतान् त्रीन् गुणान्)–या तीन गुणांना–(अतीतः)–उल्लंघिलेला असा हा पुरुष–(भवति)–होतो–(किमाचारः)–याचा आचार कसा असतो ?–(च)–आणि–(एतान् त्रीन् गुणान्)–या तीन गुणांना तो–(कथं)–कोणत्या प्रकारें–(अतिवर्तते)–उल्लंघितो. २१

अशा हर्षयुक्त अंतःकरणानें तो वीर अर्जुन, श्रीकृष्णास म्हणाला, "ज्याच्या अंतःकरणांत असा बोध झाला आहे, त्याचीं लक्षणें काय असतात ? ३२० तो गुणातीत कशा रीतीनें वागतो ? व गुणांचें निवारण कसें करतो ? देवा, आपण कृपेचें माहेरघर आहां, तेव्हां हें सर्व मला स्पष्ट करून सांगा." २१ या अर्जुनाच्या प्रश्नास षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण परमात्मा काय उत्तर देतात, तें ऐका. २२ ते म्हणतात:-पार्था, हाच का तुझा प्रश्न आहे ! कारण गुणातीत हें नांव उच्चारण्याबरोबरच त्याचें आचरण काय, हा प्रश्न संभवत नाही. २३ कारण, ज्याला गुणातीत म्हणतात, तो गुणाधीन खास नसतो; अथवा गुणांत रहात असला तरी गुणांच्या सपाट्यांत सांपडत नाही. २४ पण त्याचा गुणांशीं संबंध असून तो गुणाच्या अधीन आहे, किंवा नाहीं, हें कसें

१ मूळ अहंतेचें ठिकाण ( अहंब्रह्म ). २ निद्रेंत. ३ मी आणि माझें इत्यादिरूप घोरणें. ४ जागा झाला. ५ बंद पडला. ६ तरंगाला व समुद्राला. ७ मेघसमूह. ८ खरा. ९ आवरत नाहीं. १० येण्याजाण्यानें. ११ शुद्धज्ञान. १२ मळत नाहीं. १३ आकाशांतील. १४ सोंगें. १५ निश्चयानें. १६ कांत. १७ वाकून सुगंध नाहींसा झालेल्या वस्तूंतील. १८ सुगंध. १९ स्वरूपांत मिसळल्यानें. २० आपोआप. २१ स्मरण, आठवण. २२ श्रीकृष्ण. २३ तृप्त केला, पाचारिला; बोलाविला. २४ निवारितो. २५ उत्तर. २६ ऐका. २७ नवल. २८ गुणातीत हें नांव. २९ सांपडत नाहीं. ३० गुणांच्या आधीन की स्वतंत्र.

हेंचि कैसेनि जाणावें । गुणांचिये रवरवे । माजीं असतां २५ हा संदेह जरी वाहसी । तरी सुखें पुसों लाहसी । परिस आतां तयासी । रूप करूं २६

श्रीभगवानुवाचः—

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव । न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ॥ २२ ॥

तरी रजाचेनि माजें । देहीं कर्माचें आंणोजें[2] । प्रवृत्ति जैं घेइजे । वेंटाळूनी २७ तैं मीचि कां कर्मठ । ऐसा नये श्रीमांठ[3] । कां दरिद्रेंलिये बुद्धि वीट । तोही नाहीं २८ अथवा सत्त्वेंचि अधिकें । जैं सर्वेंद्रियीं ज्ञान फांके । तैं सुवि[5]घता तोखें । उभजेही[6] ना २९ कां वाढिनलेनि तमें । न गिळेजेचि मोहभ्रमें । तैं अज्ञानत्वें न श्रमे । घेणेंही नाहीं ३३० पैं मोहाच्या अवसरीं । ज्ञानाची चाड न धरी । ज्ञानें कर्में नादरी । होतां न दुःखी ३१ सायंप्रातर्मध्यान्हा । या तिही काळांची गणना । नाहीं जेवीं तपना । तैसा असे ३२ तया वेगळाचि काय प्रकाशें । ज्ञानित्व यावें असे । कायि जळार्णव पाउसें । सांजा होय ३३ ना प्रवर्तलेनि कर्में । कर्मठत्व तया का गमे । सांगें हिमवंतु हिमें । कांपे कायी ३४ नातरी मोह आलिया । काइ पां ज्ञाना मुकिजेल तया । होमा आगीतें उन्हाळेया । जाळवत असे ३५

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते । गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ॥ २३ ॥

तैसें गुणागुणकार्य हें । आघवेंचि आपण आहे । म्हणौनि एकेका नोहे । तडांतोडी[11] ३६ येवढेया गा प्रतीती[12] । तो देहा आलासे वस्ती । वाटे जातां गुंती-[13] । मौंजीं[14] जैसा ३७ तो जिणता[15] ना हारवी[16] । तैसा गुण नव्हे ना करवी । जैसी कां श्रोणवी[17] । संग्रामींची ३८ कां शरीराआंतील प्राणु । घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु । नाना चोहटांचा स्थाणु[18] । उदासु जैसा ३९ आणि गुणाचा यावा[19]जावा । ढळे चळे ना पांडवा । मृगजळाचा हेलावा[20] । मेरु जैसा ३४० हें बहुत कायि बोलिजे । व्योम वारेनि न वीजिजे[21] । का सूर्य ना गिळिजे । अंधकारें ४१ स्वप्न गा कां जियापरी । जागतयातें न सिंतरी[22] । गुणी तैसा अवधारीं । न बंधिजे तो ४२ गुणांसि कीर नातुडे[23] । परी दुरूनि जैं पाहे कोडें । तैं गुणदोष सायिखंडें[24] । सम्यु[25] जैसा ४३ सत्कर्में सात्त्विकीं । रज तें रजोविषयकीं । तम मोहादिकीं । वर्तत असे ४४ परिस तयाचिया गा सत्ता । होती गुणक्रिया समस्ता । हें फुडें जाणे[26] सविता । लौकिकां[27] जेवीं ४५ समुद्रचि भरती । सोमकांतचि द्रवती । कुमुदें[28] विकासती । चंद्रु तो उगा ४६ कां वाराचिं वाजे विझे[29] । गगनें निश्चळ

जाणावें? २५ हीच जर तुझ्या मनांत शंका असेल, तर खुशाल विचार. त्यांची लक्षणें सांगतों, ऐक. २६

**अन्वयार्थ**—(हे पांडव)–हे अर्जुना!–(प्रकाशं)–सत्त्वगुणाचें कार्य ज्ञान व सुख–(प्रवृत्तिं)–रजो गुणाचें कार्य लोभ, दुःख वगैरे–(च मोहं एव च)–आणि तमोगुणाचें कार्य अविवेक वगैरे हीं–(संप्रवृत्तानि)–प्रवृत्त झालीं असतां त्यांचा–(न द्वेष्टि)–द्वेष करीत नाहीं व–(निवृत्तानि)–निवृत्ति–झाली असतां त्यांची–(न कांक्षति)–आकांक्षा करीत नाहीं. २२

तर, जरी रजोगुणाचा जोर होऊन देहांत कर्माचे अंकुर फुटून तो प्रवृत्तिमार्गांत गढून गेला, २७ तरी मीच कर्म करणारा आहें, असा अभिमान ज्याला उत्पन्न होत नाहीं; अथवा कर्म नाहींसें झाल्यावर त्याच्या बुद्धीस वाईटही वाटत नाहीं; २८ किंवा सत्त्वगुण वाढल्यावर ज्या वेळेस सर्व इंद्रियांत ज्ञान फांकतें; त्या वेळेस माझ्यासारखा दुसरा कोणी विद्वान् नाहीं. अशा संतोषांत जो गढून जात नाहीं, २९ अथवा तमोगुण वाढल्यावर जो मोहभ्रमानें लिप्त होत नाहीं, व अज्ञानामुळें मनांत खेदही बाळगीत नाहीं, ३३० किंवा मोह उत्पन्न झाला असतां ज्ञानाची इच्छा करीत नाहीं; त्याचप्रमाणें, ज्ञानवान झाला असतां कर्माचा आदर करीत नाहीं, व कर्म घडलें असतां दुःखही मानीत नाहीं; ३१ सकाळ, दुपार व सायंकाळ यांची सूर्याला जशी गणना नसते, तसा जो देहावर उत्पन्न होणाऱ्या गुणांकडे लक्ष देत नाहीं; ३२ असा जो ज्ञानी आहे, त्याला दुसऱ्याच्या ज्ञानानें ज्ञानी व्हायचें काय? हें पहा समुद्र पावसाच्या पाण्यानें परिपूर्ण असतो काय? ३३ अथवा कर्म करीत असतां मी करणारा आहें असा अभिमान होईल काय? हें पहा, हिमालय पर्वत आपल्यास थंडी होईल म्हणून भितो काय? ३४ अथवा मोह उत्पन्न झाला असतां त्याचें ज्ञान नष्ट होईल का? हें वघ–अग्नि उन्हाळ्यापासून जळतो का? ३५

**अन्वयार्थ**—(उदासीनवत्)–उदासीनाप्रमाणें–(आसीनः) –राहणारा–(यः)–जो–(गुणैः)–गुणांकडून–(न विचाल्यते)– विशेषेंकरून विवेकदर्शनापासून ढळविला जात नाहीं– आत्मतत्त्वापासून दूर केला जात नाहीं, तर–(यः)–जो–(गुणाः) शरीर व इंद्रियें यांच्या आकारानें परिणत झालेले गुण– (वर्तन्ते)–एकमेकांमध्यें रहातात,–(इति एव)–अशा प्रकारेंच–असें समजूनच–(अवतिष्ठति)–स्वरूपांत राहतो,–(न इङ्गते)– तत्त्वापासून चलन पावत नाहीं. २३

त्याचप्रमाणें, गुण व शरीर आपणच असल्यामुळें, तें आलें किंवा गेलें तरी त्यापासून सुख किंवा दुःख होत नाहीं. ३६ अशी ज्याची पक्की समजूत असते, तो वाटसरू वाटेनें जातांना प्रतिबंध झाला असतां मुक्कामापुरता उतरतो, त्याप्रमाणें उदासीनवृत्तीनें देहांत वास करतो. ३७ ज्याप्रमाणें रणभूमीवरील निशाण कोणाचाही जय अथवा अपजय झाला असतां तज्जन्य हर्षशोकापासून अलिप्त असतें, त्याप्रमाणें हा गुणांच्या स्वाधीन होऊन कांहीं कर्में करीत नाहीं. ३८ किंवा देहांतील प्राण हा रक्षणापुरतें मिष्ट किंवा कसलेंही अन्न घातलें असतां त्याची चव पहात नाहीं; अथवा अतिथि कांहींही जेवावयास घातलें तरी तें खातो; किंवा चवाठ्यावरील जागयावर कोणीही बसला तरी ती जशी उदासीन असते; ३९ अर्जुना, मृगजलाच्या लाटांनीं मेरु पर्वत जसा ढळत नाहीं तसा जो गुणांच्या येण्याजाण्यानें अंतर्यामीं ढळत नाहीं. ३४० फार काय सांगावें! असें पहा की, आकाशांत जरी वायु नेहमीं फिरत असतो, तरी तें कधीं वाऱ्यानें हाललें आहे का? किंवा अंधकारानें सूर्यास कधीं गिळून टाकलें आहे का? ४१ ज्याप्रमाणें जागृतावस्थेंत असलेल्या मनुष्यास स्वप्न फसवीत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानवान् पुरुष गुणविकारांनीं फसत नाहीं, ४२ गुणांनीं तो निश्चयें करून आकळला जात नाहीं; परंतु दुरून त्याचे खेळ पाहतो; त्या वेळेस ते गुण चित्रांप्रमाणें असून हा प्रेक्षकाप्रमाणें उदासीन असतो. ४३ मग सात्त्विक गुण सत्कर्मांचें आचरण करो, रजोगुण विषयांची आशा करो, किंवा तमोगुण मोहादिक अज्ञानांत घुडो, तरी त्यापासून याला बाधा होत नाहीं. ४४ पहा की, आपल्याच सत्तेनें या सर्व गुणांच्या चेष्टा होत आहेत, असें जो समजतो, तो, सूर्य जसा लोकव्यवहारास साक्षिभूत असून अलिप्त असतो, ४५ समुद्रास भरती येते, सोमकांत मण्यास पाझर सुटतो, व चंद्रविकासी कमळें उमलतात, ह्या क्रिया जरी चंद्रापासूनच होतात तरी तो जसा अलिप्त असतो; ४६ किंवा गगनांत वारा पुष्कळ वहातो अथवा पडतो तथापि गगन ज्याप्रमाणें निश्चळ

१ हालचालीमध्यें. २ मोड, अंकुर. ३ अभिमान, श्रीमद. ४ दारिद्र्यामुळें. ५ अति विद्वान अशा संतोषानें. ६ भरून–गढून जात नाहीं. ७ सूर्याला. ८ समुद्र. ९ भाजा. १० करतांना. ११ सुखदुःख. १२ अनुभवानें. १३ मुक्काम करितो. १४ अटचणींत. १५ जय पावणार. १६ हरणार. १७ भूमि. १८ खांब, खुंट. १९ येण्याजाण्यानें. २० हेलाव्यानें. २१ हालत नाहीं. २२ फसवितें, भ्रमवितें. २३ नाकळे. २४ चित्र, बाहुली. २५ पहाणार, सभासद. २६ समज, जाण. २७ लोकव्यवहाराला. २८ चंद्रविकासी कमळें. २९ पडतो, बंद होतो.

असिजे । तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना जो ४७ अर्जुना येणें लक्षणें । तो गुणातीतु जाणणें । परिस आतां आचरणें । तयाचीं जीं ४८

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः । तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥

तरी वस्त्रासि पाठीं पोटीं । नाहीं सुतावांचूनि किरीटी । ऐसें सुये[1] दिठीं[2] । चराचर मद्रूपें[3] ४९ म्हणोनि सुखदुःखासरिसें[4] । कांटाळें[5] आचरे ऐसें । रिपुभक्तां जैसें । हरीचें देणें ३५० एऱ्हवीं तरी सहजें । सुखदुःख तींचि सेविजे । देहजळीं होइजे । मासोळी जैं ५१ आतां तें[6] तंव तेणें सांडिलें । आहे स्वस्वरूपेंसींचि मांडिलें । सस्यांतीं[7] निवडिलें । बीज जैसें ५२ कां वोध सांडूनि गांग । रिघोनि समुद्राचें आंग । निस्तरली लगबग । खळाळाची[9] ५३ तेवीं आपेंणपांचि जया । वस्ती जाली गा धनंजया । तया देहीं अपैसया[11] । सुख तैसें दुःख ५४ रात्रि तैसें पोहलें[12] । हें धारणा[13] जेवीं एक जालें । आत्माराम देहीं[14] आंतलें[15] । द्वंद्व[16] तैसें ५५ पैं निद्रिताचेनि आंगेशी । सांप[17] तैशी उर्वशी[18] । तेवीं स्वरूपस्था सरिसीं । देहीं द्वंद्वें ५६ म्हणौनि तयाच्या ठायीं । शेणा सोनया विशेष नाहीं । रत्ना गुंडेयां कांहीं । नेणिजे भेदु ५७ घरा येवो पां स्वर्ग । कां वारिपेंडो[19] वाघ । परी आत्मबुद्धीसि भंग । कदा नोहे ५८ निवटलें[20] न[21] उपवडे । जळानलें न विरूढे[22] । साम्यबुद्धि न मोडे । तयापरी ५९ हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजो । कां नीच म्हणोनि निंदिजो । परीं नेणें जळों विझों । राखोंडी जैसी ३६० तैसी निंदा आणि स्तुती । नये कोण्हेचि व्यक्ती । नाहीं अंधारें कां वांती[23] । सूर्या घरीं ६१

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः । सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

ईश्वरु म्हणोनि पूजिला । कां चोरु म्हणोनि गांजिला । वृषगजीं[24] वेढिला । केला रावो ६२ कां सुहृद पासीं आलें । अथवा वैरी वरपडे[25] जाले । परी नेणे राती पोहालें[26] । तेज जेवीं ६३ साही ऋतु येतां आकाशें । लिंपिजेचि ना जैसें । तेवीं वैषम्य मानसें । जाणिजेना ६४ आणीकही एकु पाहीं । आचारु तयाच्या ठायीं । तरी व्यापारासि नाहीं । जालें दिसे ६५ सर्वारंभा उटकलें[27] । प्रवृत्तीचें तेथ मावळलें । जळती गा कर्मफळें । ते तो आगी ६६ दृष्टादृष्टाचेनि[28] नांवें । भांवाचि[29] जीवीं नुगवे । सेवी जें कां स्वभावें । पैठें[30] होय ६७ सुखे ना झिणे । पाषाणु कां जेणें[31] मानें । तैसीं सांडीमांडी[32] मनें । वर्जिली असे ६८ आतां किती हा विस्तारु । जाणे ऐसा आचारु । जयातें तोचि साचारु । गुणातीतु ६९

आहे, त्याप्रमाणें गुणांनीं जरी पुष्कळ गडबड केली तरी त्यांच्या सत्राव्यांत तो सांपडत नाही. ४७ अर्जुना, याप्रमाणें गुणातीतांची चिन्हें तुला सांगितली. आतां त्यांचें आचरण कसें असतें, तें सांगतों, ऐक. ४८

**अन्वयार्थ**—(समदुःखसुखः)-ज्याला सुख व दुःख सम आहे,-(स्वस्थः)-जो स्वात्म्यामध्यें स्थित-प्रसन्न आहे,-(समलोष्टाश्मकाञ्चनः)-मातीचें ढेंकूळ, दगड व सोनें ज्याला सम आहे,-(तुल्यप्रियाप्रियः)-ज्याला प्रिय व अप्रिय समान आहे,-(धीरः)-धीमान्-(तुल्यनिंदात्मसंस्तुतिः)-ज्याला निंदा व आत्मस्तुति तुल्य आहे. २४

अर्जुना, ज्याप्रमाणें वस्त्राच्या आंत बाहेर सुतावांचून दुसरें कांही नाही, त्याप्रमाणें जो मद्रूप झाला आहे, त्याला सर्व चराचरांत माझ्या रूपाशिवाय दुसरें कांही दिसत नाही. ४९ म्हणून, ज्याप्रमाणें ईश्वर आपल्या शत्रूंस व भक्तांस सारखीच मुक्ति देतो. त्याप्रमाणें सुख व दुःख प्राप्त झालें असतां ज्याचें मन ताजव्याप्रमाणें समतोल रहातें; ३५० बाकी देहरूप जलांत मनरूपी मासा खेळत असला म्हणजे सुख व दुःख यांची सहज बाधा होते; ५१ आतां, तो तर देहाभिमान सोडून आत्मरूप झाल्यामुळें, बीज पेरून धान्य आल्यावर त्यांत जसा बीजाचा परिपाक होतो, ५२ किंवा गंगा आपला ओघ सोडून समुद्रांत मिसळून गेल्यावर जसा तिचा खळखळाट आपोआप बंद होतो, ५३ त्याप्रमाणें, अर्जुना, जो आपल्या स्वरूपांत मिळून गेला, तो देहांत असला तरी तो सुख-दुःख समान मानतो. ५४ घराच्या खांबास ज्याप्रमाणें रात्र किंवा दिवस हीं दोन्ही सारखींच आहेत, त्याप्रमाणें देहांतील आत्म्यास सुख व दुःख दोन्ही सारखींच आहेत. कारण, तो गुणापासून अलिप्त असतो. ५५ ज्याप्रमाणें निजलेल्या मनुष्याचे एका अंगास साप व दुसऱ्या अंगास उर्वशी जरी असली, तरी त्या दोघांची सारखीच योग्यता असते, त्याप्रमाणें, जो आत्मस्वरूपी लीन झाला आहे, त्यास सुख व दुःख सारखींच असतात. ५६ म्हणून त्याच्या ठिकाणीं शेण व सोनें यांची सारखीच किंमत आहे; आणि रत्न व धोंडा यांतही तो कांही भेद जाणत नाहीं; ५७ स्वर्गसुख घरीं चालत येवो, अथवा त्यास खाण्याकरितां वाघ त्याच्यावर धांवून येवो; परंतु त्याच्या आत्मस्वरूपाच्या बुद्धीस केव्हांही भंग होत नाही. ५८ मेलेलें जसें जिवंत होत नाहीं; आणि जळालेलें पुनः उगवत नाही, त्याप्रमाणें त्याची आत्मस्वरूपाविषयीं जी साम्यबुद्धि झाली आहे, तिचा कशानेंही भंग होत नाहीं. ५९ 'हा ब्रह्मदेव आहे' म्हणून कोणी स्तुति करो, किंवा 'नीच आहे' म्हणून कोणी निंदा करो; परंतु राख झाल्यावर तिला ज्याप्रमाणें जळण्याची अगर विझण्याची भीति रहात नाहीं, ३६० त्याप्रमाणें निंदा किंवा स्तुति केली असतां त्यापासून त्याला राग अथवा लोभ उत्पन्न होत नाहीं. हें पहा-सूर्याच्या घरीं अंधार किंवा दिवा यांची गोष्टच बोलण्यास नको. कारण तो सदोदित स्वयंप्रकाशच आहे. ६१

**अन्वयार्थ**—(मानापमानयोः तुल्यः)-मान व अपमान यांविषयीं तुल्य-त्यांना सम मानणारा,-(मित्रारिपक्षयोः तुल्यः) -मित्रपक्ष व शत्रुपक्ष या दोन्ही पक्षीं समान-(सर्वारंभपरित्यागी)-सर्व कर्मांचा सर्व प्रकारें त्याग करणारा असा जो पुरुष असतो,-(सः)-तो-(गुणातीतः)-गुणातीत-(उच्यते)-म्हटला जातो. २५

ईश्वर समजून ज्यांची पूजा केली, अथवा चोर समजून मार दिला, किंवा हत्ती, घोडे, रथ वगैरेंनी वेष्टित करून त्याला राजा बनविला; ६२ अथवा आप्त जवळ येऊन बसले, किंवा वैरी जवळ येऊन बसला, तथापि त्याला सर्वच सारखें. ज्याप्रमाणें सूर्याचे तेजास रात्र व दिवस माहीत नसतात; ६३ आकाशावर सहा ऋतु जरी येऊन गेले तरी तें ज्याप्रमाणें अलिप्त असतें, त्याप्रमाणें त्याच्या बुद्धीला विषमता ही कधीं ठाऊक नसते, ६४ त्याचे ठिकाणीं आणखी असें दिसतें की, तो कोणतेही व्यापार करीत नसतो, ६५ तो कोणतीही गोष्ट आरंभीत नाहीं; प्रवृत्तिमार्गापासून दूर राहतो, व तो ज्ञानवान् असल्यामुळें त्याच्या कर्मांची फळें जळून जातात. ६६ इहलोक अथवा परलोक यांच्याविषयी ज्याच्या मनांत विचारही येत नाहींत, परंतु सहजानुसार जें जें प्राप्त होईल, तें तें तो सेवन करतो. ६७ पाषाणाप्रमाणें ज्याचें मन कठीण आहे, तो सुख झालें असतां आनंद मानीत नाहीं व दुःख झालें असतां क्षीण मानीत नाहीं; त्याचप्रमाणें जो मनानें कांहींएक व्यापार करीत नाहीं; ६८ आणखी तुला किती स्पष्ट सांगूं! तर असें ज्याचें आचरण असेल, तोच गुणातीत असें जाण. ६९

---

१ घालतो. २ इष्टि. ३ माझ्या स्वरूपानें. ४ समतोल, सारिखें. ५ वजन, माप. ६ देह. ७ धान्य मळणीचें शेवटीं. ८ बंद झाली. ९ खळखळाटाची. १० आत्मस्वरूपीं ११ आपोआप. १२ उजाडलें. १३ रत्नमाला. १४ देहांतील. १५ प्राप्त झालें. १६ सुखदुःखादि. १७ सर्प. १८ दगडाला. १९ प्राप्त होवो. २० मेलेलें. २१ आगी-जिवंत होत नाहीं. २२ उगवत-रुजत नाहीं. २३ दिवा, वर्ता. २४ बैल व हत्ती यांनीं. २५ प्राप्त झालें. २६ उजाडलें. २७ दूर झालें. २८ इहलोक व स्वर्ग. २९ हेतु, विचार, ३० प्राप्त. ३१ ज्याप्रमाणें. ३२ ग्रहण, त्याग, व्यापार.

गुणांतें अतिक्रमणें। घडे उपायें जेणें। तो आतां आईक म्हणे। श्रीकृष्णनाथु ७०

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते। स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥

तरी व्यभिचाररहित चित्तें। भक्तियोगें मातें। सेवी तो गुणातें। जाळूं शके ७१ तरी कोण मी कैसी भक्ती। अव्यभिचारा काय व्यक्ती। हे आघवीचि निरुती। होआवी लागे ७२ तरी पार्था परियेसा। मी तंव एथ ऐसा। रत्नीं किळावो जैसा। रत्नचि कीं तो ७३ कां द्रवपणाचि नीर। अवकाशचि अंबर। गोडी तेचि साखर। आन नाहीं ७४ वन्हि तेचि ज्वाळ। दळाचि नांव कमळ। रुखु तेंचि डोळ। फळादिक ७५ अगा हिम जें आकर्षलें। तेंचि हिमवंत जेवीं जालें। नाना दूध मुरालें। तेंचि दहीं ७६ तैसें विश्व येणें नांवें। हें मीचि पैं आघवें। घेईं चंद्रबिंब सोलावें। न लगे जेवीं ७७ घृताचें थिजलेंपण। न मोडितां घृतचि जाण। कां नाटितां कांकण। सोनेंचि तें ७८ न उकलितां पटु। तंतुचि असे स्पष्टु। न विरवितां घटु। मृत्तिका जेवीं ७९ म्हणोनि विश्वपण जावें। मग तैं मातें घेयावें। तैसा नव्हे आघवें। सकटचि मी ३८० ऐसेनि मातें जाणिजे। ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे। येथ भेद कांहीं देखिजे। तरी व्यभिचारु तो ८१ याकारणें भेदातें। सांडूनि अभेदें चित्तें। आपणा सकट मातें। जाणावें गा ८२ पार्था सोनयाची टिका। सोनयासी लागली देखा। तैसें आपणपें आणिकां। मानावें ना ८३ तेजाचा तेजौनि निघाला। परी तेजींचि असे लागला। तया रश्मी ऐसा भला। बोधु होआवा ८४ पैं परमाणु भूतळीं। हिमकणु हिमाचळीं। मजमाजीं न्याहाळीं। अहं तैसें ८५ हो कां तरंगु लहानु। परी सिंधूसी नाहीं भिन्नु। तैसा ईश्वरीं मी आनु। नोहेंचि मा ८६ ऐसेनि बा समरसें। दृष्टि जैं उल्हासे। ते भक्ति पैं ऐसे। आम्ही म्हणों ८७ आणि ज्ञानाचें चांगावें। इयेचि दृष्टि नांवें। योगाचेंही आघवें। सर्वस्व हें ८८ सिंधू आणि जळधरा-। माजीं लागली अखंड धारा। तैसी वृत्ति वीरा। प्रवर्ते ते ८९ कां कुहेसीं आकाशा। तोंडीं सांदा नाहीं जैसा। तो परमपुरुषीं तैसा। एकवटे गा ३९० प्रतिबिंबौनि बिंबवरी। प्रभेची जैसी उजरी। ते सोहंवृत्ती अवधारीं। तैसी होय ९१ ऐसेनि मम परस्परें। ते सोहंवृत्ति जैं अवतरे। तैं तियेहि सकट सरे। अपैसया ९२ जैसा सैंधवाचा रवा। सिंधूमाजीं पांडवा। विरालेया विरवावा। हेंही ठाके ९३ नातरी जाळूनि

श्रीकृष्ण म्हणतात–तो गुण किंवा गुणांचे धर्म यांना ज्या उपायानें ओलांडून जातो, तो उपाय सांगतों, ऐक. ७०

**अन्वयार्थ**—(च)-आणि-(यः)-जो-(मां)-मला-(अव्यभिचारेण भक्तियोगेन)-अव्यभिचारी भक्तियोगानें-(सेवते)-सेवितो-माझी सेवा करतो-(सः)-तो-(एतान् गुणान्)-या गुणांचें-(समतीत्य)-उल्लंघन करून-(ब्रह्मभूयाय)-ब्रह्मभावास-(कल्पते)-समर्थ होतो. २६

जो अभेदबुद्धीनें माझी भक्ति करितो, तो या गुणांचा नाश करूं शकतो ! ७१ तर मी कोण, माझी भक्ति कशी करावयाची, अव्यभिचार भक्ति म्हणजे काय, या सर्व गोष्टी तुला स्पष्ट करून सांगितल्या पाहिजेत. ७२ तर, अर्जुना, ऐक. मी या जगांत असा आहे कीं, रत्नाचें तेज व रत्न हें जसें एकच आहे, ७३ अथवा पातळपणा व पाणी, अवकाश व आकाश, गोडी व साखर हीं जशी भिन्न नसून एकच आहेत; ७४ विस्तव व ज्वाला हीं एकच आहेत. कमळाच्या पाकळ्या हेंच कमळ; झाड हेंच फांद्या, फळें व पानें; ७५ ज्याप्रमाणें व थंडी ज्या ठिकाणीं थंडी वास करते तो हिमालय पर्वत, हीं दोन्ही एकच आहेत, व दूध विरजलें म्हणजे ज्याप्रमाणें त्यालाच दहीं म्हणतात, ७६ त्याप्रमाणें विश्व म्हटलें म्हणजे तें सर्व मद्रूपच आहे. पहा कीं, चंद्राची कला पाहणें झाल्यास ती जशी चंद्रापासून सोलून काढावी लागत नाहीं, कां कीं, दोन्ही एकच आहेत. ७७ तूप जरी थिजलें, तरी त्या स्थितींतही तें तूपच असतें; किंवा कंकण आटवून जरी त्याची लगड केली नाहीं, तरी तें असें सोनेंच होय; ७८ वस्त्र फाडून त्यांतील तंतु जरी निराळे केले नाहींत तरी तें जसें तंतुमयच आहे, व मडकें फोडून विरवलें नाहीं; तरी ती ज्याप्रमाणें मातीच होय; ७९ त्याप्रमाणें, विश्व एका बाजूला सारून मी निराळा आहें, अशांतला प्रकार नसून, सर्व विश्वच मी आहें. ३८० अशा ऐक्यबुद्धीनें जें मला जाणणें त्यालाच माझी अव्यभिचारी म्हणजे अभेदभक्ति म्हणतात, आणि मी व विश्व ह्यांत यत्किंचितही भेदबुद्धि झाली, तर तोच व्यभिचार. ८१ याकरितां, भेद न मानतां एकनिष्ठ चित्तानें तूं आपल्या स्वरूपासुद्धां मीच आहें, असें समज; म्हणजे भक्तपणानें तूं माझ्याहून निराळा राहूं नकोस. ८२ पार्था, सोन्याची टीक करून जरी ती सोन्याच्या दागिन्यावर बसविली, तरी त्या दोहोंत ज्याप्रमाणें भेद नसतो, त्याप्रमाणें आपल्यापासून विश्व वेगळें आहे, असें समजूं नको. ८३ सूर्यापासून निघालेले किरण जसे तेजोमय असून सूर्यापासून निराळे झालेले नसतात ८४ तसा मी व विश्व यांबद्दल ऐक्यबोध व्हावा. भूमीवरील रजःकण आणि हिमालयावरील हिमकण हे ज्याप्रमाणें भूमि व हिमालय यांहून निराळे नाहींत, त्याप्रमाणें माझ्या ठिकाणीं सर्व विश्व आहे, असें जाण. ८५ लाट किती जरी लहान असली, तरी ती जशी समुद्राहून निराळी नाहीं. तसा ईश्वराहून मी निराळा नाहीं. ८६ अशा प्रकारें सर्वत्र ऐक्यता आहे, अशी जी दृष्टि फांकते तिलाच आम्ही भक्ति असें म्हणतों. ८७ आणि याच दृष्टीनें ज्ञानहि आम्ही सर्वांत उत्तम असें समजतों; व योगाचेंही सार हेंच आहे. ८८ समुद्र आणि मेघ यांच्यामध्यें पाऊस पडूं लागल्यावर ज्याप्रमाणें अखंड धारा पडत असतात, त्याप्रमाणें अर्जुना, भक्ति, भक्त व भजन या त्रिपुटींत परमात्मा भरलेला आहे. ८९ विहिरीच्या तोंडाशीं असलेल्या आकाशास जसा जोड नाहीं, तसा जो आपल्यांत व परमात्मस्वरूपांत भेद न मानतां ऐक्य आहे असें जाणतो. ३९० त्याला, सूर्याची प्रभा प्रतिबिंबापासून सूर्यापर्यंत जशी सारखी नटलेली असते, त्याप्रमाणें अहंब्रह्म अशी वृत्ति बनल्यावर ब्रह्म व विश्व यांत अंतर दिसत नाहीं. ९१ याप्रमाणें अहंब्रह्म अशी मनाची वृत्ति बनल्यावर तिही पुढें आपोआप लय पावते, ९२ हे पांडवा, ज्याप्रमाणें मिठाचा खडा समुद्रांत टाकला असतां तो विरल्यावर त्याचें विरणें आपोआपच रहातें, ९३ किंवा गवत जळल्यावर विस्तवही आपोआप विझून जातो, त्याप्रमाणें

१ उल्लंघणें. २ एकनिष्ठेनें. ३ जिंकूं, व्यापूं. ४ लक्षण. ५ निश्चय, व्याख्या. ६ तेज. ७ आकाश. ८ कमलपत्रांलाच, पानालाच, पाकळ्यांलाच. ९ वृक्ष. १० फांदी. ११ सोडून. १२ आटविलें नाहीं तरी. १३ वस्त्र. १४ मडकें. १५ आपल्यासकट. १६ विश्व. १७ मीपण. १८ फांकते. १९ ज्ञानाची अत्युच्च स्थिती. २० ह्या दृष्टीनें मानून घ्यावें. २१ सार. २२ मेघ. २३ भक्ति, भक्त व भजन या त्रिपुटींत परमात्माच आहे अशी वृत्ति. २४ विहिरीला. २५ प्रतिबिंबापासून. २६ उत्कर्ष. २७ अहंब्रह्म वृत्ति. २८ लय पावते. २९ मिठाचा. ३० कण.

तृण । वन्हिही विझे आपण । तैसें भेदु नाशूनि जाण । ज्ञानही नुरे ९४ माझें पैलपण जाये । भक्त हें ऐलपण ठाये । अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निवडे ९५ आतां गुणातें तो किरीटी । जिणे या नव्हती गोष्टी । जे एकपणाही मिठी । पडों सरली ९६ किंबहुना ऐसी दशा । तें ब्रह्मत्व गा सुदंशा । हें तो पावे जो ऐसा । मातें भजे ९७ पुढती इहीं लिंगीं । भक्तु जो माझा जगीं । हे ब्रह्मता तयालागीं । पतिव्रता ९८ जैसें गंगेचेनि वोघें । डळमळीत जळ जें निघे । सिंधुपँद तयाजोगें । आन नाहीं ९९ तैसा ज्ञानाचिया दिठी । जो मातें सेवी किरीटी । तो होय ब्रह्मतेच्या मुकुटीं । चूडारत्न ४०० यया ब्रह्मत्वासीचि पार्था । सायुज्य ऐसी व्यवस्था । याचि नांवें चौथा । पुरुषार्थु गा १ परी माझें आराधन । ब्रह्मत्वीं होय सोपान । तेथ मी हन साधन । गमेलें हो २ तरी झणी ऐसें । तुझ्या चित्तीं पैसे । पैं ब्रह्म आन नसे । मीवांचूनी ३

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च । शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥ २७ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

अगा ब्रह्म या नांवा । अभिप्रायो मी पांडवा । मीचि बोलिजे आघवा । शब्दीं इहीं ४ पैं मंडळ आणि चंद्रमा । दोनी नव्हती सुवर्मा । तैसा मज आणि ब्रह्मा । भेदु नाहीं ५ अगा नित्य जें निष्कंप । अनावृत धर्मरूप । सुख जें उमप । अद्वितीय ६ विवेकु आपलें काम । सारूनि ठाकी जें धाम । निष्कंर्षाचें निःसीम । किंबहुना मी ७ ऐसेसें हो अवधारा । तो अनन्याचा सोयरा । सांगतसे वीरा । पार्थासी पैं ८ येथ धृतराष्ट्र म्हणे । संजया हें तूतें कोणें । पुसलेनिविण वायाणें । कां बोलसी ९ माझी अवसरी ते फेडीं । विजयाची सांगें शुद्धी । येरु जीवीं म्हणे सांडीं । गोठी यिया ४१० संजयो विस्मयो मानसीं । आहा करूनी रस सैरिसी । म्हणे कैसें पां दैवेंसी । द्वंद्व यया ११ तरी तो कृपाळु तुष्टो । यया विवेकु हा घोंटो । मोहाचा फिटो । महारोगु १२ संजयो ऐसें चिंतितां । संवादु तो सांभाळितां । हरिखाचा येतु चित्ता । महापूर १३ म्हणोनि आतां येणें । उत्साहाचेनि अवतरणें । श्रीकृष्णाचें बोलणें । सांगिजेल १४ तया अक्षराआंतील भावो । पाववीन मी तुमचा ठांवो । आइका म्हणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ४१५

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥ श्लोक २७, ओंव्या ४१५.

ज्या ज्ञानापासून ब्रह्माचें ऐक्य होतें, तें ज्ञानही मागून नाहींसें होतें. ९४ मी पलीकडे फार मोठा आहें व भक्त अलीकडे दीन आहेत, हें अज्ञान नष्ट होऊन देवभक्ताचें जें अनादि स्वाभाविक ऐक्य आहे, तेंच केवळ उरतें. ९५ हे किरीटी, अशा ठिकाणीं ऐक्य आहे हें सुद्धां बोलणें संभवत नाहीं. त्या ठिकाणीं गुणांना तो जिंकतो, असें म्हणणेंच उरत नाहीं. ९६ किंबहुना हे मर्मज्ञा, याच दशेस ब्रह्मत्व असें म्हणतात; आणि जो माझी अव्यभिचार भक्ति करतो, त्यालाच ब्रह्मत्व प्राप्त होतें. ९७ अशा लक्षणांनीं या जगांत जो माझा भक्त होतो, त्याची ब्रह्मता ही पतिव्रता आहे. ९८ ज्याप्रमाणें गंगेचें पाणी वहात चालल्यावर त्याला समुद्राशिवाय गत्यंतरच नसतें, ९९ त्याप्रमाणें, अर्जुना, ज्ञानाच्या दृष्टीनें जो माझी सेवा करतो, तो ब्रह्मतेच्या मुकुटावरील मणि होतो. ४०० पार्था, या ब्रह्मप्राप्तीलाच सायुज्य मुक्ति म्हणतात व हिलाच चौथा पुरुषार्थ ( मोक्ष ) असें म्हणतात. १ परंतु ब्रह्मत्व पावण्याकरितां माझी आराधना हा जिना होय; तेव्हां तें प्राप्त झाल्यावर, मी व माझ्या प्राप्तीकरितां करावयाचें साधन हीं दोन्हीं निराळीं आहेत, असें समजशील हो ! २ तर माझ्यापासून ब्रह्म निराळें आहे, अशी तुझ्या मनांत कल्पनाही येऊं देऊं नको. ३

**अन्वयार्थ**—( हि )–कारण–( अहं )–मी–प्रत्यगात्मा–(अमृतस्य च अव्ययस्य)–अविनाशी व विकार न पावणाऱ्या–(च)–व–(शाश्वतस्य धर्मस्य)–नित्य धर्मरूप–(च)–आणि–(ऐकान्तिकस्य सुखस्य)–अव्यभिचारी–नित्य सुख अशा–(ब्रह्मणः) –ब्रह्माची–परमात्म्याची–(प्रतिष्ठा)–प्रतिष्ठा–आहे. २७

हे पांडवा, ब्रह्म म्हणून ज्याला म्हणतात, तो मीच होय; व मलाच हीं नांवें आहेत. ४ पहा कीं, चंद्र व त्याचें मंडळ हीं ज्याप्रमाणें दोन नाहींत, त्याप्रमाणें हे मर्मज्ञ अर्जुना, मी व ब्रह्म यांत भेद नाहीं, ५ तें ब्रह्म नित्य, निष्कंप, आवरण नसणारें, धर्मरूप व अपार सुख देणारें असें अद्वितीय आहे. ६ अज्ञानाचा नाश करून ज्ञान ज्या स्वरूपीं लय पावतें, तें सिद्धांतानें ठरलेलें शेवटचें स्वरूप मीच होय. ७ एकनिष्ठ भक्तांचा जो आवडता परमात्मा, तो शूर पार्थास याप्रमाणें सांगता झाला. ८ तेव्हां धृतराष्ट्र संजयास म्हणाला कीं, या गोष्टी तुला कोणी पुसल्या होत्या ? व त्या तूं मला व्यर्थ कां सांगतोस ? ९ माझ्या मुलांच्या विजयाची गोष्ट मला सांगून माझी शंका फेड. त्या तुझ्या परमार्थाच्या गोष्टी आतां राहूं देत. ४१० संजय आपल्या मनांत विस्मय पावून मोठ्या कळवळ्यानें अरेरे, याची दैवगती काय विचित्र आहे कीं याला अद्यापि विरोधच आवडतो ! ११ तरी कृपाळु भगवान् संतुष्ट होऊन याच्या मनांत विवेकरूपी औषध घालून, याचा मोहरूपी महारोग नाहींसा करो. १२ संजय अशा प्रकारें मनांत विचार करतो आहे, इतक्यांत कृष्णार्जुनांच्या संवादाकडे लक्ष जाऊन त्याच्या चित्तांत आनंदाचा महापूर आला. १३ म्हणून मनांत हर्षयुक्त होऊन, श्रीकृष्ण काय म्हणाले, तें तो सांगेल. १४ निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणालेः–त्यांच्या बोलण्याचा भाव मी तुमच्या हृदयांत ठसवीन तो ऐका. ४१५

१ नाहींसें होतें. २ जिंकणें ही भाषाच रहात नाहीं. ३ मर्मज्ञा. ४ त्यानंतर; ५ लक्षणांनीं. ६ वाहात. ७ त्यास सिंधुपदच योग्य, दुसरें योग्य नाहीं. ८ मुकुटमणी. ९ नांव. १० जिना. ११ ब्रह्मप्राप्तीचें मी केवळ साधन आहें असें वाटेल. १२ वाटेल. १३ कदाचित्. १४ कल्पना येईल.

१५ मर्मज्ञा. १६ अचळ. १७ न आवडणारें. १८ अपार. १९ सिद्धांताचें. २० शेवटचें. २१ एकनिष्ठेचा, अनन्य-भक्तीचा, अनन्य भक्ताचा. २२ व्यर्थ बडबड. २३ शंका. २४ उत्तम रस. २५ मिळला जावो. २६ हर्षाचा. २७ ठिकाण.

---

या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें गुणातीत होऊन शुद्ध झालेल्या विचाराच्या ठिकाणीं श्रीगुरूंच्या पाऊलांची स्थापना करून पूजा करण्याचें मिष करून पुढील अध्यायास श्रीज्ञानेश्वरमहाराज प्रारंभ करितात.

रिकामें तोंड । करूं गेले बडबड । कीं गीता ऐसें गोड । आतुडलें २१ होय
अदृष्ट आपैतें । तैं वाळूचि रत्नें परते । उजू आयुष्य तैं मारितें । लोभु करी
२२ आधणीं घातलिया हरळ । होती अमृताचे तांदुळ । जरी भुकेची राखे
वेळ । श्रीजगन्नाथु २३ तयापरी श्रीगुरु । करिती जैं अंगीकारु । तैं होऊनि
ठाके संसारु । मोक्षमय आघवा २४ पाहा पां काई श्रीनारायणें । तया पांडवांचें
उणें । कीजेचि ना पुराणें । विश्ववंद्यें २५ तैसें श्रीनिवृत्तिराजें । अज्ञानपण हें
माझें । आणिलें वोजें । ज्ञानाचिया २६ परि हें असो आतां । प्रेम रुळतसे
बोलतां । कें गुरुगौरव वर्णितां । उन्मेष असे २७ आतां तेणेंचि पसायें । तुम्हां
संतांचें मी पाये । वोळगेन अभिप्रायें । श्री गीतेचेनी २८ तरी तोचि प्रस्तुतीं ।
चौदाविया अध्यायाच्या अंतीं । निर्णयो कैवल्यपती । ऐसा केला २९ जें ज्ञान
जयाच्या हातीं । तोचि समर्थु मुक्ती । जैसा शतमख संपत्ती । स्वर्गीचिये ३०
कां शत एक जन्मां । जो जन्मोनि ब्रह्मकर्मा । करी तोचि ब्रह्मा । आनु नोहे
३१ नाना सूर्याचा प्रकाशु । लाहे जेवीं डोळसु । तेवीं ज्ञानेंचि सौरसु ।
मोक्षाचा तो ३२ तरी तया ज्ञानालागीं । कवणा पा योग्यता आंगीं । हें पाहतां
जगीं । देखिला एकु ३३ जें पाताळींचेंही निधान । दाविल कीर अंजन । परी
होआवे लोचन । पायाळाचे ३४ तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथ कीर नाहीं आन ।
परी तेंचि थारे ऐसें मन । शुद्ध होआवे ३५ तरी विरक्तीवांचूनि कहीं ।
ज्ञानासि तगणेंचि नाहीं । हें विचारूनि ठाईं । ठेविलें देवें ३६ आतां विरक्तीची
कवण परी । जे येऊनि मनातें वरी । हेंही सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे ३७
जे विषें रांधिली रससोयें । जैं जेवणारा ठाउवी होये । तैं तो ताटचि सांडूनि
जाये । जयापरी ३८ तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं
वैराग्य दवडितां । पाठी लागे ३९ आतां अनित्यत्व या कैसें । तेंचि वृक्षाकार-
मिषें । सांगिजत असे विश्वेशें । पंचदशीं ४० उपडिलें कवतिकें । झाड येरि-
मोहरा ठाके । तें वेगें जैसें सुके । तैसें हें नोहे ४१ यातें एकेपरी । रूपकाचिया
कुसरी । सारितसे वोरी । संसाराची ४२ करूनि संसार वावो । स्वरूपीं अहंते
ठावो । होआवया अध्यावो । पंधरावा हा ४३ आतां हेंचि आघवें । ग्रंथगर्भींचें
चांगावें । उपलविजेल जीवें । आकर्णिजे ४४ तरी महानंद समुद्र । जो पूर्ण
पूर्णिमा चंद्र । तो द्वारकेचा नरेंद्र । ऐसें म्हणे ४५ अगा पैं पंडुकुमरा । येतां

सूण ही आहे की, माझें रिकामें तोंड सहज वडवड करूं लागलें असतां, त्यांत गीतेसारखें गोड व्याख्यान सांपडलें. २१ यांत तरी विशेष आश्चर्य काय ! अहो, प्रारब्ध अनुकूल असल्यावर वाळू हातांत घेतली असतां तींच रत्नें होतात, आणि आयुष्याची दोरी बळकट असल्यावर मारणाराही लोभ करतो; २२ ज्या वेळीं ईश्वराच्याच मनांत अन्न देऊन जगवावयाचें असतें, त्या वेळीं आधणांत खडे वैरलें असतांही त्यांचे अमृततुल्य तांदूळ होतात; २३ त्याप्रमाणें, ज्याचा श्रीगुरूंनीं अंगीकार केला, त्यांचा सर्व दुःखरूप संसारच मोक्षरूप म्हणजे आनंदरूप होतो. २४ पहा कीं, पांडवांचें सर्व प्रकारें उणें असूनही श्रीकृष्णानें त्यांच्या नित्य कथेस पुराणाची योग्यता आणून ती सर्व जगास वंद्य अशी करून ठेविली नाहीं का! २५ त्याप्रमाणें, श्रीगुरुनिवृत्ति महाराजांनीं माझ्या अज्ञानासच ज्ञानाच्या योग्यतेस आणून बसविलें. २६ परंतु हें असो, अशा बोलण्यानें प्रेम अधिकच वाढत जातें. आणि श्रीगुरुमहात्म्य वर्णन करण्यास मला तरी ज्ञान आहे कोठें ! २७ म्हणून आतां गुरूंच्याच प्रसादानें व तुम्हां संतांच्या पायांच्या दर्शनानें गीतेचा अभिप्राय वर्णन करण्याकडे मी वळतों. २८ चौदाव्या अध्यायाच्या शेवटीं, मोक्षदाते असे जे भगवान् श्रीकृष्ण त्यांनीं असा निर्णय केला कीं, २९ ज्याला ब्रह्मज्ञानप्राप्ती झाली आहे, त्यालाच मोक्ष प्राप्त होतो. ज्याप्रमाणें शंभर यज्ञ करणारास स्वर्गांतील संपत्ति ( इंद्रपद प्राप्त होतें; ) ३० किंवा जो शंभर जन्म ब्रह्मकर्मांत चालवितो, तोच निःसंशय ब्रह्मदेवाचें पद मिळवितो; ३१ किंवा सूर्याचे प्रकाशाचा उपयोग एक डोळसासच होतो, त्याप्रमाणें जो ज्ञानी आहे, त्यालाच मोक्षप्राप्तीचें सुख मिळतें. ३२ तर हें ज्ञान मिळविण्याची कोणाच्या ठिकाणीं योग्यता आहे, हें पाहूं गेलें असतां जगांत एकच पुरुष दृष्टीस पडतो. ३३ ज्याप्रमाणें, भूमिगत द्रव्य अंजन घातलें असतां दृष्टीस पडतें, परंतु तें अंजन घालण्यास पायाळू मनुष्यच अधिकारी आहे, ३४ त्याप्रमाणें ज्ञान मोक्ष देईल यांत शंका नाहीं; परंतु तें ज्ञान टिकेल, अशी अंतःकरणाची भूमिका शुद्ध असली पाहिजे. ३५ ह्याचा स्पष्ट अर्थ असा आहे कीं, वैराग्याशिवाय ज्ञान रहाणारच नाहीं, असा देवांनीं विचारपूर्वक निश्चय करून ठेविला आहे. ३६ आतां वैराग्य आपण होऊन मनांत कसें शिरेल, यावद्दलही सर्वज्ञ श्रीहरींनीं विचार केला आहे. तो प्रथम दृष्टांत देऊन सांगतात—३७ ज्याप्रमाणें एखादा मनुष्य भोजनास बसल्यावर अन्नांत विष घातलें आहे, असें समजतांच ताट टाकून उठून जातो, त्यास भोजनाविषयी विरक्ती उत्पन्न होतेच; ३८ त्याप्रमाणें सर्व संसार अनित्य म्हणजे रज्जुसर्पवत् मिथ्या आहे; असा ज्या वेळेला दृढ निश्चय होईल, त्या वेळेस वैराग्य नको नको म्हणतां अंतःकरणांत बलात्कारेंकरून प्रवेश करील. ३९ आतां संसाराला मिथ्यात्व कसें आहे, तें या पंधराव्या अध्यायांत वृक्षाच्या रूपकानें भगवान् सांगत आहेत. ४० इतर झाडें स्वभावतः पडलीं असतां त्यांचीं मुळें वरतीं येऊन तीं जशीं सुकतात, त्याप्रमाणें हा संसारवृक्ष सुकणारा नाहीं. ४१ याप्रमाणें संसाराविषयीं झाडाचें कुशलतेनें रूपक करून श्रीकृष्ण भगवान् मुमुक्षूंस जन्ममरणांच्या येरझारांपासून सोडवितात. ४२ संसाराला मिथ्यात्व ठरवून ब्रह्मच मी आहें, असा निश्चय करून यावयाचा हाच या अध्यायाचा विषय आहे. ४३ हाच उत्तम विषय या गीताशास्त्रांतील या अध्यायांत आहे, तो मी उकलून सांगतों, आपण मनःपूर्वक ऐका. असें महाराज संतांना प्रार्थना करून ४४ महानंदाचा समुद्र, सिद्धांचा पूर्णचंद्र, व द्वारकेचा राजा जो श्रीकृष्ण भगवान् अर्जुनास काय म्हणाला तें सांगतातः— ४५ अरे, अर्जुना, आत्मस्वरूपाच्या घराला म्हणजे

१ सांपडलें. २ प्रारब्ध. ३ अनुकूल. ४ परिणाम पावे. ५ सबळ, सरळ, नीट. ६ मारणारें. ७ खडे. ८ दोरी. ९ अनादिपुरुषानें. १० चांगुलपणास, किमतीला. ११ भरून वहातें. १२ उल्हास, ज्ञान. १३ प्रसादानें. १४ सांगेन. १५ श्रीकृष्णानें. १६ शंभर यज्ञ करणारा. १७ गोष्टी, कारण. १८ स्थिर होईल. १९ स्थिर रहाणें. २० तयार करून ठेविलें, निश्चित केलें. २१ स्वयंपाक. २२ टाकून, माहित. २३ उलट बाजूनें. २४ चतुरार. २५ दूर करितो. २६ येरझार, फेरी. २७ मिथ्या. २८ मोक्षगामी. २९ चांगुलपण. ३० स्पष्ट केला जाईल. ३१ एकांत. ३२ पूर्णतेचा, इच्छारहिताचा. ३३ राजा.

स्वरूपाचिया घरा । करीतसे आडवारा । विश्वाभासु जो ४६ तो हा जगडंबरु । नोहे येथ संसारु । हा जाणिजे महातरु । थांवला[2] असे ४७ परी येरां रुखां-सारिखा । हा तळीं मुळें वरी शाखा । तैसा नोहे म्हणोनि लेखा । नयेचि कवणा ४८ आगी कां कुऱ्हाडी । होय रिगावा[4] जरी बुडीं । तरी हो कां भलतेवढी[5] । वारि[6]चील वाढी ४९ जे तुटलिया मुळापाशीं । उलंडेल कां शाखांशीं । परी तैशी गोठी कायशी । हा सोपा नव्हे ५० अर्जुना हें कव्तिक । सांगतां असे अलौकिक । जे वाढी अधोमुख । रुखा यया ५१ जैसा भानु उंची नेणों कें । रश्मि-जाळ तळीं फांके । संसार हें कावेंरुखें । झाड तैसें ५२ आणि आथी नाथी तितुकें । रुंधलें असे येणेंचि एकें । कल्पांतींचेनि उदकें । व्योम जैसें ५३ कां रवीच्या अस्तमानीं । आंधारेनि कोंदे रजनी । तैसा हाचि गगनीं । मांडला असे ५४ यया फळ ना चुंबितां[11] । फूल ना तुरंबितां[12] । जें कांहीं पंडुसुता । तें रुखुचि हा ५५ हा ऊर्ध्वमूळ आहे । परी उन्मूळिला[13] नोहे । येणेंचि[14] हा होये । शाड्वळु[15] गा ५६ आणि ऊर्ध्वमूळ ऐसें । निगंदिलें[16] कीर असे । परी अंधींही[17] अं-सोसें । मूळें यया ५७ प्रबळला चौमेरीं[19] । पिंवळा कां वडाचिया परी । जे पारंबियांमाझारीं । डहाळिया असती ५८ तेवींचि गा धनंजया । संसारतरु तया । अंधींचि[20] आधी खांदिया । हेंही नाहीं ५९ तरी ऊर्ध्वाहीकडे । शाखांचे मांदोडे[21] । दिसताति अपाडें । सासिन्नलें[22] ६० जालें गगनचि पालवीये । कां वारा मांडला रुखाचेनि औयें[23] । नाना अवस्थात्रयें[24] । उदयला असे ६१ ऐसा हा एकु । विश्वाकार विटंकु[25] । उदयला जाण रुखु । ऊर्ध्वमुळु ६२ आतां ऊर्ध्व या कवण । येथें मूळ तें किं लक्षण[26] । कां अधोमुखपण । शाखा कैसिया ६३ अथवा द्रुमा[27] यया । अंधीं[28] जिया मुळिया । तिया कोण कैसिया । ऊर्ध्व शाखा ६४ आणि अश्वत्थु हा ऐसी । प्रसिद्धि कायसी । आत्मविद[29]विलासीं । निर्णयो केला ६५ हें आघवेंचि बरवें । तुझिये प्रतीतीसि[30] फावे । तैसेनि सांगों सोलिवें[31] । विन्यासें गा ६६ परी ऐकें गा सुभगा[32] । हा प्रसंगु असे तुजचि जोगा । कानचि करीं हो सर्वांगा । हियें[33] आथिलिया ६७ ऐसें प्रेमरसें सुरफुरें[34] । बोलिलें जंव यादववीरें । तंव अवधान अर्जुनाकारें । मूर्त जालें ६८ देव निरुपिती तें थेंकुलें । येवढें श्रोतेपण फांकलें । जैसें आकाशा खेंवें[35] पसरिलें । दाही दिशीं ६९

स्वस्वरूप प्राप्तीला येत असतां मध्यें जो विश्वाभास म्हणजे प्रपंच आड येतो, ४६ तो हा विश्वाभास म्हणजे प्रपंच नसून मोठा वळावलेला कोणी एक वृक्षच आहे, अशी कल्पना कर. ४७ पण इतर झाडांचीं मुळें खालीं असून वर फांद्या असतात तसा हा नाहीं, म्हणून याचें कोणालाही वर्णन करितां येत नाहीं. ४८ सामान्य वृक्षाच्या मुळाशीं कुऱ्हाड घातली, किंवा अग्नि लावला, तर वृक्षाचा वरचा विस्तार केवढाही असला तरी ४९ तो वृक्ष मुळापाशीं तुटल्यावर शाखांसहवर्तमान उलथून पडतो, परंतु तशा प्रकारानें उलथून पडण्याइतका हा वृक्ष सोपा नाहीं. ५० या वृक्षाचें कौतुक काय सांगावें, कीं, ज्याचें मूळ वरच्या बाजूस असून या वृक्षाची वाढ खालच्या बाजूला आहे. ५१ ज्याप्रमाणें सूर्याची उंची किती आहे हें कळत नाहीं, पण त्याचीं किरणें खालच्या बाजूला पसरतात, त्याप्रमाणें संसाररूपी वृक्ष चमत्कारिक आहे. ५२ आणखी, या जगतांत जेवढें कांहीं आहे नाहीं, तेवढें सर्व या झाडाच्या पोटांत आहे, म्हणजे या झाडानें व्यापून टाकलें आहे. ज्याप्रमाणें कल्पांतसमयींच्या उदकानें सर्व आकाश व्यापून जातें, ५३ किंवा सूर्य अस्तास गेल्यावर ज्याप्रमाणें रात्र अंधारानें कोंदलेली असते; त्याप्रमाणें, हा वृक्ष सर्व गगनांत भरलेला आहे. ५४ याचावें म्हटलें तर याला फळ नाहीं; हुंगावें म्हटलें तर फूलही नाहीं; जें कांहीं आहे तें सर्व हा वृक्षच. ५५ याचें मूळ वर आहे, तथापि हा उपटून टाकलेला नाहीं. अर्जुना, याच कारणास्तव हा नेहमीं टवटवीत असतो. ५६ आणि याचें वर मूळ आहे असें जरी म्हटलें आहे, तरी खालींही याला पुष्कळ मुळें आहेत. ५७ हा सभोंवार विस्तारला आहे व पिंपळ किंवा वड याप्रमाणें पारंब्यामध्येंही डाहाळ्या पसरल्या आहेत; ५८ त्याप्रमाणें अर्जुना, संसाररूपी वृक्षास खालींच खांद्या आहेत, असेंही प्रकार नाहीं. ५९ तर, वरही याला अपार खांद्या असून त्या विस्तार पावलेल्या आहेत. ६० गगनच या झाडाचा वेल आहे, वाऱ्याच्या रूपानें हा वृक्षच आहे, किंवा अवस्थांचा म्हणजे जागृत स्वप्न, सुषुप्ति किंवा उत्पत्ति, स्थिति, लय यांना आश्रयरूपानें उत्पन्न झालेला आहे. ६१ याप्रमाणें हा एक विश्वाच्या आकारानें वरच्या बाजूला मूळ व खालच्या बाजूला शाखा असा विलक्षण वृक्ष उदयास आलेला आहे. ६२ आतां याचें ऊर्ध्व कोणचें, मुळाचें लक्षण काय आणि खालच्या बाजूच्या शाखा कोणच्या, ६३ अथवा या वृक्षाला खालीं ज्या मुळ्या आहेत, त्यांपासून वर खांद्या कोणत्या व कशा उत्पन्न होतात, ६४ आणि या वृक्षास 'अश्वत्थ' हें नांव कशावरून प्राप्त झालें, या सर्वांचा आत्मवेत्त्याशीं विलास करणारा भगवान् श्रीकृष्ण, यांनीं निर्णय करून, अर्जुनास म्हणतातः—६५ हें सर्व तुझ्या प्रतीतीस चांगल्या प्रकारानें येईल, असें स्वच्छ विस्तारानें सांगतों. ६६ हे भाग्यवंता, हें निरूपण ऐकण्यास अधिकारसंपन्न तूंच आहेस; एवढ्याकरितां हे धैर्यवंता, सर्व अंगाला कानच कर, म्हणजे एकाग्र चित्त होऊन ऐक. ६७ यादववीर जो श्रीकृष्ण भगवान्, तो याप्रमाणें प्रेमरसानें भरलेलें असें आपण बोलल्यावर, अर्जुनाच्या ठिकाणीं अवधान हें मूर्तिमंत दिसूं लागलें. ६८ ज्याप्रमाणें, आकाश मोठें असूनही त्यास दाही दिशांनीं आलिंगन दिलें आहे, त्याप्रमाणें अर्जुनाचा श्रोतेपणा एवढा वाढला कीं, देवानीं कितीही निरूपण केलें तरी तें थोडेंच! ६९ श्रीकृष्णाच्या

१ प्रतिबंध. २ वाढला, पसरलेला. ३ समजुतीस. ४ प्रवेश. ५ केवढीही. ६ वरील. ७ उपटेल. ८ खालीं. ९ आश्चर्यकारक. १० व्यापलें. ११ चोखण्यास. १२ वास घेण्यास. १३ उपटलेला. १४ ऊर्ध्वमूलांतच. १५ हिरवागार. १६ सांगितलें. १७ खालींही. १८ पुष्कळ. १९ सभोंवार २० खालीं. २१ डुंबाडे. २२ विस्तारलें. २३ सामर्थ्यानें. २४ तीन अवस्थांच्या योगानें. २५ मोठा, निबिड. २६ कोणत्या प्रकारचें, लक्षणाचें. २७ वृक्षास. २८. आत्मज्ञान्यांनीं. २९ अनुभवास. ३० स्पष्ट. ३१ निरूपणें करून. ३२ भाग्यवंता. ३३ अंतःकरणपूर्वक. ३४ भरपूर. ३५ आलिंगन.

श्रीकृष्णोक्तिसागरा । हा अगस्तीचि दुसरा । म्हणौनि घोंट भरों पाहे एकसरा । अवधेयाचा ७० ऐसी सोय मांडूनि खवळिली । आवडी अर्जुनीं देवें देखिली । तेथ जालेनि सुखें केली । कुरवंडी तया ७१

श्रीभगवानुवाच:—

ऊर्ध्वमूलमध:शाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् । छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥१॥

मग म्हणे धनंजया । तें ऊर्ध्व गा तरू यया । येणें रुखेंचि कां जयां । ऊर्ध्वता गमे ७२ एऱ्हवीं मध्योर्ध्व अध । हे नाहीं जेथ भेद । अद्वयासीं एकवद । जया ठायीं ७३ जो नाइकिजतां नादु । जो असौरभ्य मकरंदु । जो आंगाथिला आनंदु । सुरतेंविण ७४ जया जें औऱ्हां परौतें । जया जें पुढें मागौतें । दिसतेनविण दिसतें । अदृश्य जें ७५ उपाधीचा दुसरा । घालितां वोपसैरा । नामरूपाचा संसारा । होय जयातें ७६ ज्ञातृज्ञेयाविहीन । नुसधेंचि जें ज्ञान । सुखा भरलें गगन । गोळीव जें ७७ जें कार्य ना कारण । जया दुजें ना एकपण । आपणयां जें जाण । आपणची ७८ ऐसें वस्तु जें साचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें । तेथ औंर घेणें मूळाचें । तें ऐसें असे ७९ तरी माया ऐसी ख्याती । नसतीच यया आथी । कां वांझेची संतती । वानिणें जैशी ८० तैसी सत् ना असत् होये । जे विचाराचें नाम न साहे । ऐसेया परीची आहे । अनादि म्हणती ८१ जे नामातत्त्वांची मांदुसें । जे जगदभ्राचें आकाश । जे आकारजाताचें दुस । घडी केलें ८२ जे भवद्रुमबीजिका । जे प्रपंचचित्र भूमिका । विपरीत ज्ञानदीपिका । सांचली जे ८३ ते माया वस्तूच्या ठायीं । असे जैसेनि नाहीं । मग वस्तुप्रभा पाही । प्रगट होय ८४ जेव्हां आपणया आली निद । करी आपणपें जेवीं मुग्ध । कां काजळी आणि मंद । प्रभा दीपीं ८५ स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेववूनि वेगीं । आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकामु करी ८६ तैसी स्वरूपीं जाली माया । आणि स्वरूप नेणे धनं-

आपणरूपी समुद्रास अर्जुनाचें श्रोतेपण हाच कोणी एका आचमनांत संपविणारा दुसरा अगस्ती ऋषिच होय. म्हणून श्रीकृष्ण जें सांगतील; त्या सर्वांचा एकच घोंट करण्यास अर्जुन प्रवृत्त झाला! ७० अर्जुनाच्या ठिकाणीं ऐकण्याची अशी अमर्याद इच्छा उत्पन्न झालेली पाहून श्रीकृष्णांनीं आपल्यास झालेलें समाधान त्याच्यावरून ओंवाळून टाकलें! ७१

**अन्वयार्थ**—(ऊर्ध्वमूलं)–सर्वोत्तम ब्रह्म ज्याचें मूळ आहे,–(अधःशाखं)–ज्याच्या शाखा त्या मूळाच्या अपेक्षेनें खालीं आहेत म्ह० अगदीं निकृष्ट आहेत,–(अव्ययं)–जो कधींहि क्षय पावत नाहीं, असा–(अश्वत्थं)–वृक्ष-क्षणभंगुर संसारवृक्ष–(प्राहुः)–सांगतात.–(यस्य)–ज्या संसारवृक्षाचीं–(पर्णानि)–पानें–(छन्दांसि)–वेद आहेत.–(यः)–जो–(तं)–त्या वृक्षाला–(वेद)–जाणतो–(सः)–तो–(वेदवित्)–वेदवेत्ता–वेदाला जाणणारा आहे. १

मग श्रीकृष्ण भगवान् अर्जुनास म्हणतात:–धनंजया, ब्रह्म या वृक्षाला ऊर्ध्व आहे; [ येथें ऊर्ध्व म्हणजे उंच, उंच म्हणजे श्रेष्ठ, श्रेष्ठ म्हणजे सर्वोत्तम, सर्वोत्तम म्हणजे ब्रह्म असा ऊर्ध्व शब्दाचा मुख्य अर्थ आहे. ] आणि या वृक्षामुळेंच त्यास ऊर्ध्वता आली, असें म्हणावें लागतें. ७२ नाहीं तर ज्याच्या ठिकाणीं एकत्वही लयाला जातें त्याच्या ठिकाणीं मध्य, ऊर्ध्व व अध ( मध्यें वर व खालीं ) हे भेद कोठून असणार? ७३ व जें तंतुवाद्यापासून उत्पन्न होऊन ऐकूं येणाऱ्या नादाच्या पूर्वीचा जो मूळ नाद, तसेंच मकरंदांतून उत्पन्न होणाऱ्या सुगंधाच्या मूळाचा जो सुगंध व जो विषयसेवनाशिवाय उत्पन्न होणारा स्वरूपानंद—असें आहे; ७४ ज्याला अलीकडे व पलीकडे, पुढें व मागें अशी मर्यादा नाहीं; व जें पाहणारावांचूनच स्वयंप्रकाश असून जें अदृश्य असतें, ७५ मायारूप उपाधीचा ओपसरा (तोरमळीच्या तेजाला मदत करणारा पदार्थ) घातला असतां ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं नामरूपादि प्रपंचाचा विस्तार होतो, तें ब्रह्म ७६ ज्ञाता व ज्ञेय या दोहींहून शुद्ध ज्ञानमात्र असून सर्व जगांत निरुपाधिक सुखानें व्याप्त असणारें, ७७ तसेंच जें कोणापासून झालेलें नाहीं, व ज्याच्यापासून कांहीं होत नाहीं, जें तत्त्व ब्रह्म ज्याला दुसरेपणा नाहीं व एकपणाही नाहीं, व जें आपणच आपल्याला प्रकाशित करितें. ७८ याप्रमाणें तें या संसारतरूचें मूळ आहे. आणि त्या मूळाला अंकूर फुटणें म्हणजे काय? तर ते हें होय. ७९ याला माया अशी नसतीच ख्याति प्राप्त झाली आहे, जसें वांझेच्या संततीचें वर्णन करावें, तशींच तिचीही ख्याति आहे. ८० ( जगद्रूपी कार्याच्या संगतीकरितां मानावी लागली, [तर अनिर्वचनीय मानतात, अनिर्वचनीय म्हणजे सतासताहून विलक्षण ) त्याप्रमाणें माया विचारानें नाश पावते म्हणून सत् नाहीं. जगत्कार्यरूपानें प्रतीत होते, म्हणून असत् नाहीं, अशा प्रकारें ही सतासताहून विलक्षण असून अनादि आहे. ८१ शिवाय जी पंचभूतादि तत्त्वांची पेटी होय, जी जगद्रूप अभ्राला आधार होय, व विश्वाकाररूप वस्त्राची घडी होय, ८२ जी संसाररूप वृक्षाची बी, जी प्रपंचरूप चित्र काढण्याची भूमिका, व जी ब्रह्मज्ञानाशिवाय इतर ज्ञानाच्या प्रकाशानें भरलेली आहे; ८३ याप्रमाणें वर्णन केलेली माया, ब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं नसल्यासारखी आहे. मग जितका ज्ञानव्यवहार दिसतो, तितका परमात्मवस्तूचा प्रकाशच प्रकट होतो, असें समज. ८४ तसें ज्ञान कां होत नाहीं, असें म्हणशील तर–जागृत मनुष्यास निद्रा आली असतां तो जसा जागचे जागीं ज्ञानशून्य होतो; किंवा दिव्याच्या आश्रयानें असणारी काजळी दिव्याच्या प्रभेला मंद करिते; ८५ अथवा स्वप्नांत एखाद्या मनुष्याजवळ त्याच्याच कल्पनेनें उत्पन्न झालेली तरुण स्त्री येऊन याला निजलेला जागा करून आलिंगन दिल्यावांचून, आलिंगन देऊन पुरुषाला सकाम करिते. ८६ त्याप्रमाणें अर्जुना, ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं ही माया झाली, तिच्यामुळें तें स्वरूप आच्छादित झालें. मग स्वरूपाला न जाणणें म्हणजे स्वरूपाला विसरणें हेंच या संसारवृक्षाचें पहिलें मूळ होय. ८७

१ मर्यादा. २ ब्रह्म. ३ वृक्षानेंच. ४ ऐक्य. ५ कानाला ऐकूं न येणारा. ६ घ्राणाला, अप्राप्य. ७ स्वयमेव, मूर्तिमंत, साक्षात्. ८. स्वरूपानंद. ९ रतीशिवाय. १० अलीकडे. ११ पलीकडे. १२ मागें. १३ मिना, ओप. तोरमळीच्या तेजाला मदत करणारा पदार्थ. १४ केवळ, नुसतें. १५ सूक्ष्म. १६ ब्रह्म, परमात्मा. १७ अंकूर. १८ वर्णन करणें. १९ खरें. २० पेटी. २१ विश्वाकाराचें. २२ वस्त्र. २३ संसार वृक्षाचें बीज. २४ प्रपंचाचें चित्र काढण्याची भूमिका (जमीन). २५ मूढ. २६ जागी करून.

जया । तेंचि रुखा यया । मूळ पहिलें ८७ वस्तूसी आपुला जो अबोधु । तो ऊर्ध्वीं आदुळैजे कंदु । वेदांतीं हाचि प्रसिध्दु । बीजभावो ८८ घंन अज्ञान सुषुप्ती । तो बीजांकुरभावो म्हणती । येर स्वप्न हंन जागृती । हा फळभावो तियेचा ८९ ऐसी यया वेदांतीं । निरूपणभाषाप्रतीती । परी तें असो प्रस्तुतीं । अज्ञान मूळ ९० तें ऊर्ध्व आत्मा निर्मळें । अधोर्ध्व सूचितीं मूळें । बाळिया बांधोनि आळें । मायायोगाचें ९१ मग आधिलीं सदेहांतरें । उठती जियें अपारें । तें चौपासी घेऊनि आंगारें । खोलांवती ९२ ऐसें भवद्रुमाचें मूळ । हें ऊर्ध्वीं करी बळ । मग आणियांचें बेंचळ । अधीं दावी ९३ तेथ चिद्वृत्ती पाहिलें । महत्तत्त्व उमललें । तें पान वाल्हेंदुल्हें । एक निघे ९४ मग सत्त्वरजतमात्मकु । त्रिविध अहंकारु जो एकु । तो तिवर्णा अधोमुखु । डिरुं फुटे ९५ तो बुद्धीची घेऊनि ओंगारी । भेदाची वृद्धि करी । तेथ मनाचे ढाळ धरी । सौजेपणें ९६ ऐसा मूळाचिया गोंढिका । विकल्पैरस कोंवळिका । चित्तचतुष्टय डाहाळिका । कोंभैजेतो ९७ मग आकाश वायु द्योतकें । आप पृथ्वी हे पांच फोंकें । महाभूतांचे सैंरोख । सरळे होती ९८ तैसीं श्रोत्रादि तन्मात्रें । तियें अंगवेंसां गैभेंपत्रें । लुळेंलुळितें विचित्रें । उमळती गा ९९ तेथ शब्दांकुर वरिपडी । श्रोत्रा वाढी देंव्हडी । होता करित कांडीं । आकांक्षेचीं १०० अंगत्वचेचे वेलपल्लव । स्पर्शांकुरीं घेती धांव । तेथ बांबळें पडे अभिनव । विकारांचें १ पाठीं रूपपत्र पौलोवेलीं । चक्षु लांब तें कांडें घाली । ते वेळीं व्यामोहंता भली । पाहाळीं जाय २ आणि रसाचें आंगवसें । वाढतां वेगें बहुवसें । जिव्हे औतींची अंसोसें । निघती बेंचें ३ तैसेंचि कोंभलेनि गंधें । घ्राणाची डिरी थांवुं बांधे । तेथ तळु घे स्वानंदें । प्रलोभाचा ४ एवं महंदहंबुद्धी । मनें महाभूतसमृद्धी । इये संसाराचियां अवधी । सांसैंनिजें ५ किंबहुना इहीं आठें । आंगीं हा अधिक फांटे । परी शिंपीचि येवढें उमटे । रुपें जेवीं ६ कां समुद्राचेनि पैसारें । वरी तरंगता आंसारे । तैसें ब्रह्मचि होय वृक्षाकारें । अज्ञानमूळ ७ आतां याचा हाचि विस्तारु । हाचि यया पैसोरु । जैसा आपणपें स्वप्नीं परिवारु । येकाकिया ८ परी तें असो हें ऐसें । कौवरें झाड उसैंसे । यया महदादि आंरवसें । अधोशाखा ९ आणि अश्वत्थु ऐसें ययातें । म्हणती जे जाणते । तेंही पारिस हो येथें । सांगिजेल ११० तरी श्वा म्हणिजे उंखा । तोंवरि एकसा-

ब्रह्मवस्तूला मायेच्या आचरणानें होणारें जें विस्मरण तोच ऊर्ध्व जें ब्रह्म त्याच्या ठिकाणीं प्रथम कंद बनतो, व त्यालाच वेदान्तशास्त्रामध्यें संसाररूप वृक्षाचा बीजभाव असें म्हणतात. ८८ निबिड अज्ञान म्हणजे सुषुप्ति, ह्याला बीजांकुरभाव म्हणतात आणि तिचाच परिणाम स्वप्न व जागृति या दोन अवस्थांना फलभाव म्हणतात. ८९ अशा रीतीनें मायेचें वर्णन भिन्न भिन्न प्रकारानें वेदान्तशास्त्रांत केल्याचा अनुभव आहे. परंतु, तें असो. सध्यां संसाररूप वृक्षाचें मूळ अज्ञान आहे, असें समज. ९० निर्मळ ब्रह्मरूप आत्म्याचे ठिकाणीं सहज असणारी जी माया, तिच्या खालच्या व वरच्या बाजूस मुळें निघून त्यांना मायारूपी आळ्यांत पाणी मिळून ती मुळें बळकट होतात. ९१ मग खालच्या बाजूस अनंत देह उत्पन्न होतात. ते चार प्रकारचे अंकुर घेऊन जोरावतात. ९२ याप्रमाणें संसाररूपी झाडाचें मूळ, ब्रह्माचे ठिकाणीं बळकट होऊन नंतर लागलीच अंकुरांना जोर येतो. ९३ त्या अंकुरांत ज्ञानरूप वृत्ति अंतःकरणांत उत्पन्न होऊन तें प्रथमचें एक कोंवळें लुसलुसीत पान निघतें. ९४ नंतर सत्वरजतमात्मक जो अहंकार, तो एक तीन पानांचा अंकुर खालच्या बाजूस फुटतो. ९५ त्यालाच बुद्धिरूप दुसरी डाहाळी फुटून भेदाची वृद्धि होते; त्या योगानें मनरूपी डाहाळीस ओलावा मिळून ती टवटवीत होते. ९६ याप्रमाणें मूळ बळकट झाल्यावर, विकल्परूपीरसाच्या योगानें, त्याला चित्तचतुष्टय ह्या चार कोंवळ्या डाहाळ्या फुटतात. ९७ मग आकाश, वायु, तेज, पाणी व पृथ्वी हे पंचमहाभूतांचे पांच फोंक वेगानें सरळ निघतात. ९८ त्याचप्रमाणें, त्या फोंकाला श्रोत्रादि पंचज्ञानेंद्रियें व त्यांचे विषय ही कोंवळी विचित्र पालवी फुटते. ९९ नंतर शब्दरूपी अंकुर कानांच्या व्याप्तीयेवढा फुटून ऐकण्याची इच्छा पूर्ण करतो. १०० मग अंग व त्वचा ही वेल आणि पानें फुटून त्याला स्पर्शरूपी अंकुर येतो, आणि मग नानाप्रकारच्या विकारांचें आधिक्य होतें. १ पुढें रूप हें पान फुटून डोळा हा भ्रमानें त्याची गोडी घेण्याविषयीं धांव घेतो, २ आणि रसरूपी फांदी वेगानें फुटून जिभेस अपार इच्छा उत्पन्न होते. ३ त्याचप्रमाणें, गंधरूपी कोंब येऊन नाकाची इच्छा प्रबळ होऊन लोभ उत्पन्न होतो. ४ याप्रमाणें मन, बुद्धि, अहंकार व पंचमहाभूतें अशी जी अष्टधाप्रकृति, ती या मायेपासून प्रपंचाच्या शेवटापर्यंत तयार होते. ५ फार काय! परंतु हा वृक्ष ह्या आठ प्रकारांनीं अधिक वाढतो, पण शिंपीवर भासलेलें रुपें जसें शिंपीच्या आकाराएवढेंच भासतें, ६ किंवा समुद्रावर उत्पन्न होणाऱ्या लाटा ज्याप्रमाणें, समुद्राएवढ्या असून पोकळ असतात, त्याप्रमाणें, अज्ञानमूलक जो हा जगद्रुपी वृक्ष, तो ब्रह्मच बनतें. ७ म्हणून सर्व जग हा अज्ञानाचा विस्तार असून त्यावर त्याचा पसारा भासतो. ज्याप्रमाणें स्वप्नांत मनुष्य एकटा असून जें जें कांहीं पहातो, तें सर्व आपणच होतो; ८ परंतु या सर्व गोष्टी बाजूस ठेव. याप्रमाणें हें आश्चर्यकारक झाड वाढतें, व याला महत्तत्वादि अंकुर खालच्या बाजूस फुटतात; ९ आणि या झाडाला ज्ञाते लोक अश्वत्थ असें जें म्हणतात, त्याबद्दलही तुला सांगतों, तें ऐक. ११० तर श्वा (श्व) याचा अर्थ 'उद्या' असें म्हणे तोंपर्यंतही या प्रपंचरूपी झाडाचें एक स्वरूप रहात नाहीं, म्हणून याला 'अश्वत्थ' असें म्हणतात.

---

१ ब्रह्माचे ठिकाणीं. २ बनतो. ३ माया. ४ गाढ. ५ आणि. ६ निघतात. ७ प्रथम. ८ अंकुर. ९ चार प्रकारचे. १० अंकुर. ११ खालीं जातात. १२ संसाररूपी झाडाचें. १३ गुपचे. १४ ज्ञानरूपी वृत्ति. १५ अंतःकरण. १६ उत्पन्न झालें, फुललें. १७ अतिप्रिय, कोंवळें. १८ तीन पानां. १९ अंकुर. २० डाहाळी. २१ टवटवितपणानें. २२ दृढतेनें. २३ भेदरूपी रस. २४ बुद्धि, मन, अहंकार व चित्त. २५ अंकुर येतो. २६ तेज. २७ नीट सरळ गेलेले झाडाचे धुमारे. २८ वेगानें. २९ श्रोत्रादि इंद्रियें, व त्यांचे विषय. ३० टवटवीतपणानें. ३१ पालवी. ३२ कोंवळी, सुंदर. ३३ प्राप्त झाल्यानें. ३४ दुप्पट मोठी. ३५ इच्छेची ३६ आधिक्य. ३७ नाना प्रकारच्या. ३८ रूप हेंच कोणी पान. ३९ विस्तारली. ४० भ्रम. ४१ धांव घेतो. ४२ आवडीची. ४३ फार, अतिशय. ४४ पानांतली पानें. ४५ अंकुर, ४६ वेढ. ४७ महत्-महत्तत्व अहं-अहंकार व बुद्धि. ४८ मायेपासून. ४९ वाढतो, भरास येतो. ५० विस्तारानें. ५१ पसरतो. ५२ पसारा. ५३ भ्रमात्मक, आश्चर्यकारक. ५४ प्रगट होतें. ५५ अंकुर. ५६ उद्यां.

रिखा । नाहीं निर्वाहो यया रुखा । प्रपंचरूपा ११ जैसा न लोटत क्षणु ।
मेघु होय नानावर्णु । कां विजु नसे संपुर्णु । निमेषभरी १२ ना कांपतया पद्म-
दळा । वरीलिया बैसका[२] नाहीं जळा । कां चित्त जैसें व्याकुळा । माणुसाचें १३
तैसीचि ययाची स्थिती । नासत जाय क्षणक्षणाप्रती । म्हणौनि ययातें म्हणती ।
अश्वत्थु हा १४ आणि अश्वत्थु येणें नांवें । पिंपळु म्हणती स्वभावें ।
परी तो अभिप्राय नोहे । श्रीहरीचा १५ एऱ्हवीं पिंपळु म्हणतां विखीं[३] । मियां
गति देखिली असे निकी । परी तें असो काय लौकिकीं । हेतु काज १६
म्हणौनि हा प्रस्तुतु । अलौकिकु परियेसा ग्रंथु । तरी क्षणिकत्वेंचि अश्वत्थु ।
बोलिजे हा १७ आणीकही येकु थोरु । यया अव्ययत्वाचा डगरु । आथी परी
तो भीतरुँ । ऐसा आहे १८ जैसा मेघाचेनि तोंडें । सिंधु एके आंगें काढे ।
आणि नदी येरीकडे । भरितीच असती १९ तेथ वोहटे ना चढे । ऐसा परि-
पूर्णचि आवडे । परी ते फुली जंव नुघडे । मेघानदीची १२० ऐसें या रुखाचें
होणें जाणें । न तर्के होतेंनि वहिलेंपणें । म्हणोनि ययातें लोकु म्हणे । अव्ययु
हा २१ एऱ्हवीं दानशीळु पुरुषु । वेंचकपणेंचि[११] संचकु[१२] । तैसा व्ययेंचि हा रुखु ।
अव्ययो गमे २२ जातां वेगें बहुवसें । न वेंचे[१३] कां भूमी रुतलें असे । रथाचें
चक्र दिसे । जिया परी २३ तैसें काळातिक्रमें जे वाळे । ते भूतशाखा जेथ गळे ।
तेथ कोडवरी उमाळे[१४] । उठती आणिक २४ परी येकी केधवां गेली । शाखा-
कोडी केधवां जाली । हें नेणवे जेवीं उमललीं । आषाढअभ्रें २५ महाकल्पाच्या
शेवटीं । उदेलिया उमळती[१५] सृष्टी । तैसेंचि आणिखीचें दांगें[१६] उठी । सोसिन्नलें[१७]
२६ संहारवातें प्रचंडें । पडती प्रळयांतींचीं सालेंडें । तंव कल्पादीचीं जुंबाडें ।
पाल्हेजती २७ रिगे मन्वंतर मनूपुढें । वंशावरी[२१] वंशाचे भांडे । जैसी इक्षु-
वृद्धी कांडेनकांडें । जिके[२२] जेवीं २८ कलियुगांतीं कोरडीं । चहूं युगांचीं सालें[२३]
सांडी । तंव कृतयुगाची पेली[२४] देव्हेडी[२५] । पडे पुढती २९ वर्तते वर्ष जाये । तें
पुढिला मुळहारी[२६] होये । जैसा दिवसु जात कीं येत आहे । हें चोजवेनाँ १३०
जैशा वारियाचा झुळकां । सांदीं[२८] ठाउवो नव्हे देखा । तैसिया उडती पडती
शाखा । नेणों किती ३१ एकी देहाची डिरी[३०] तुटे । तंव देहांकुरीं वेहुवी[३१] फुटे ।
ऐसेनि अवतरु हा वाटे । अव्ययो ऐसा ३२ जैसें वाहतें पाणी जाय वेगें ।
तैसेंचि आणिक मिळे मागें । येथ असंतेंचि[३२] असिजे जगें । मानिजे संतें[३३] ३३ कां

( संस्कृतांत, क्षणभरही जो एकसारखा नसतो तो अश्वत्थ.) ११ ज्याप्रमाणें एका क्षणांत मेघाचे नानात-र्‍हेचे रंग बदलतात, किंवा वीज निमिषमात्र देखील पूर्ण-पणें टिकत नाहीं; १२ कमलाच्या हलणार्‍या पानावर जसें पाणी ठरत नाहीं, किंवा व्याकुळ झालेल्या मनुष्याचें मन ज्याप्रमाणें स्थिर नसतें, १३ त्याचप्रमाणें, या संसा-ररूपी झाडाची स्थिति असून प्रत्येक क्षणास तिचा नाश होतो, म्हणूनच याला 'अश्वत्थ' असें म्हणतात; १४ आणि व्यवहारांत 'अश्वत्थ' म्हणजे पिंपळ असें म्हणतात. परंतु श्रीहरींचा या ठिकाणीं तसा अभिप्राय नाहीं. १५ बाकी या झाडास पिंपळ म्हणावें असें लौकिकदृष्टीनें बरें, असें मला वाटतें, परंतु लौकिक अर्थ प्रतिपादन करण्याचें कारण नाहीं. १६ म्हणून सध्यां हा अलौकिक ग्रंथ ऐका. तर, संसाररूपी वृक्ष हा क्षणिक आहे, म्हणूनच याला अश्वत्थ असें म्हणतात. १७ आणखी, हा वृक्ष 'अव्यय' म्हणजे नित्य या नांवानें प्रसिद्ध आहे, परंतु त्याचा गर्भित अर्थ असा आहेः–१८ ज्याप्रमाणें समुद्र एका आंगानें मेघांच्या तोंडांनीं आटत असतो, ( मेघ त्याला वाफेच्या रूपानें शोषून घेत असतात. ) आणि दुसरीकडून तो नद्यांच्याद्वारां एकसारखा भरतच असतो. १९ समुद्र आटतही नाहीं, व वाढतही नाहीं, म्हणून परिपूर्ण असा दिसतो; परंतु जोंपर्यंत मेघाचें शोषण करणें किंवा नद्यांचें समुद्रास मिळणें या दोहोंपैकीं एकास फांटा मिळाला नाहीं, तोंपर्यंतच तो पूर्ण होय; १२० त्याप्रमाणें, या संसाररूपी झाडाची उत्पत्ति व लय हीं अतित्वरेनें होतात, म्हणून त्यांचा तर्क करितां येत नाहीं; यास्तव लोक याला 'अव्यय' असें म्हणतात. २१ एरवीं, दानशील पुरुष हा, जरी धर्म करून सर्व पैसा खर्च करून टाकतो असें दिसतें, तरी तो ज्याप्रमाणें पुढील जन्मीं आप-ल्यास ठेव जोडतो, त्याप्रमाणें हा वृक्ष अति वेगानें उत्पत्ति, स्थिति व लय पावत असल्यामुळें लोकांस नित्य असा भास होतो. २२ रथाचें चाक भूमीवर न टेंकता अति वेगानें चाललें असतां त्याची गति लोकांस न दिस-ल्यामुळें ज्याप्रमाणें तें स्थिर आहे असें भासतें, २३ त्याप्रमाणें, कालातिक्रमानें ह्या झाडाची जी प्राणिरूप शाखा गळून पडते, तींचे पुनः तीस कोटयवधि अंकुर फुटतात. २४ आषाढ साहिन्यांत अभ्रांवर अभ्रें येत असलीं म्हणजे कोणचीं आलीं व कोणचीं गेलीं हें कळत नाहीं, त्याप्रमाणें एक खांदी केव्हां गळाली व कोटयवधि फांद्या केव्हां फुटल्या, हें कळत नाहीं. २५ प्रलयकालाचे शेवटीं ह्या संसाररूपी वृक्षाच्या देहरूपी शाखा गळून पडतात, व पुनः जगदोत्पत्तीच्या वेळीं नव्या फुटतात. २६ संहारकालाच्या प्रचंड वाऱ्यानें प्रलयाच्या अंतीं शरीरें पडतात, व तीच कल्पाच्या सुरवातीस पुनः झुबक्याचे झुबके उगवतात. २७ मग एका मन्वंतरापुढें दुसरें मन्वंतर, याप्रमाणें सूर्यवंश, चंद्रवंश असा विस्तार होतो; व ऊंस ज्याप्रमाणें पेऱ्यापेऱ्यांनीं वाढत जातो, त्याप्रमाणें हें सर्व विश्व वाढतें. २८ कलियुगाच्या अंतीं चारी युगांतील शरीरें खालीं पडतात, ( झाडाच्या साली झडून तें वठतें, ) इतक्यांत कृतयुग सुरू झालें, म्हणजे त्याची पुनः उत्पत्ति होऊन तें जास्त वाढतें. २९ चालू असलेलें वर्ष संपून तें जसें पुढील वर्षास आमंत्रण देतें, किंवा ज्याप्रमाणें दिवस जातो किंवा येतो, हें त्याच्या नित्य येण्याजाण्यानें कळत नाहीं, १३० ज्याप्रमाणें वाऱ्या-च्या झुळकांवर झुळका येऊं लागल्या म्हणजे कोणची झुळक संपली व कोणची आली हें समजत नाहीं, त्याप्र-माणें किती शरीरें उत्पन्न होतात व लय पावतात, हें समजत नाहीं. ३१ एक डिरी तुटून पडली न पडली, तों दुसऱ्या शेंकडों डिऱ्या फुटतात, त्या योगानें हा भवरूपी वृक्ष नित्य आहे, असा भासतो. ३२ नदीचें वहातें पाणी वेगानें चाललें म्हणजे त्याला ज्याप्रमाणें मागून येणारें पाणी वरचेवर मिळून वहातें, त्या योगानें जसा त्याचे ठिकाणीं स्थिरतेचा भास होतो, त्याप्रमाणें हें जग नाशवंत असून त्याला स्थिर असें समजतात. ३३

१ वृक्षाला. २ बैठक, ठरणें, स्थिति. ३ विषयीं. ४ चांगलीं. ५ अविनाशित्वाचा. ६ प्रसिद्धी. ७ अंतर्गत अर्थ, मर्म, गर्भित. ८ फिरकी, धर्ती. ९ उकलत नाहीं, समजत नाहीं. १० सत्वरपणें. ११ खचितपणानें. १२ संचय करणारा. १३ वाटत नाहीं, दिसत नाहीं. १४ अंकुर. १५ उपटून पडतात. १६ अरण्य. १७ भरास आलेलें, वाढलेलें. १८ साली. १९ पालवतात. २० सूर्य व चंद्र वंश. २१ विस्तार होतो, २२ वाढतें. २३ साली, शरीरें. २४ ओली साल झरपटि. २५ दुप्पट. २६ मूळ कारण. २७ जाणवत नाहीं, कळत नाहीं. २८ जोड, सांधा. २९ माहित, ठाऊक, कळत नाहीं. ३० अंकुर. ३१ बहुत प्रकारें, पुष्कळ. ३२ मिथ्या, नाशिवंत. ३३ स्थिर, शाश्वत.

लागोनि डोळा उघडे । तंव कोडीवरी घडे मोडे । तेणतया तरगु आवडे । नित्यु ऐसा ३४ वायेसा एके बुबुळें दोहींकडे । डोळा चाळितां अपाडें । दोन्ही आथी ऐसा पडे । भ्रमु जेवीं जगा ३५ पैं भिंगोरी निधिये पडेली । ते गमे भूमीसी जैसी जडली । ऐसा वेगातिशयो भुली । हेतु होय ३६ हें बहु असो झडती । आंधारें भोवंडितां कोलती । ते दिसे जैसी आँयती । चक्राकार ३७ हा संसारवृक्षु तैसा । मोडतु मांडतु सहसा । न देखोनि लोकु पिसा । अव्ययो मानी ३८ परि ययाचा वेगु देखे । जो हा क्षणिक ऐसा वोळखे । जाणे कोडिवेळां निमिखें । होत जात ३९ नाहीं अज्ञानावांचूनि मूळ । ययाचें असिलेंपण टवाळ । ऐसें झाडचि सिनसोळ । देखिलें जेणें १४० तयातें गा पंडुसुता । मी सर्वज्ञुही म्हणें जाणता । पैं वाग्ब्रह्म सिद्धांता । वंद्यु तोची ४१ योगजातांचें जोडलें । तया एकासीचि उपयोगा गेलें । किंबहुना जियालें । ज्ञानही त्याचेनी ४२ हें असो बहु बोलणें । वानिजेलें तो कवणें । जो भवरुखु जाणे । उँखि ऐसा ४३

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥ २ ॥

मग ययाचि प्रपंचरूपा । अधोशाखिया पादपा । डाहाळिया जाती उमपा । ऊर्ध्वांही उजू ४४ आणि अँधीं फांकलीं डाळें । तियें होती मूळें । तयांही तळीं पघळे । वेल पालवु ४५ ऐसें जें आम्हीं । म्हणितलें उपक्रमीं । तेंही परिसें सुगमीं । बोलीं सांगों ४६ तरी बद्धमूळ अज्ञानें । महदादिकीं शाखनें । वेदांचीं थोरवनें । घेऊनियां ४७ पारे आधीं तंव स्वेदज । जारज उद्भिज अंडज । हे बुडौनि महाभुज । उठती चारी ४८ यया एकेकाचेनि आंगवटें । चौऱ्यांशीं लक्षधा फुटे । ते वेळीं जीवशाखीं फांटे । सैंघेंचि होती ४९ प्रसवती शाखा सरळिया । नानासृष्टि डाहाळिया । आड फुटती माळियें । जातिचिया १५० स्त्री पुरुष नपूंसकें । हे व्यक्तिभेदांचे टेंके । आंदोळती आँगिकें । विकारभारें ५१ जैसा वर्षाकाळु गगनीं । पाल्हेजे नवघनीं । तैसें आकारजात अज्ञानीं । वेली जाय ५२ मग शाखांचेनि आंगभारें । लवोनि गुंफिती परस्परें । गुणक्षोभाचे वारे । उदयजती ५३ तेथ तेणें आचाटें । गुणांचेनि झडझडाटें । तिहीं ठायीं हा फांटे । ऊर्ध्वमूळ ५४ ऐसा रजाचिया झुलुका । झडाडितां आगळिका । मनुष्यजाती शाखा । थोरावती ५५ तिया ऊर्ध्वा ना अधां । माझारींचि कों-

किंवा डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच कोट्यावधि प्राण्यांची घडामोड होते; परंतु समुद्रावर ज्या लाटांवर लाटा येतात त्या नित्य भासतात, त्याप्रमाणें अज्ञान्याला संसार नित्य भासतो, ३४ कावळा आपलें एक बुबुळ एका क्षणांत दोन्ही डोळ्यांत फिरवितो, आणि त्या योगानें त्याला एक डोळा असतांही दोन आहेत असें लोकांस भासतें, त्याप्रमाणें, जग अनित्य असून नित्य आहे, असा भ्रम होतो. ३५ किंवा भोंवरा अतिवेगानें फिरूं लागला म्हणजे फिरत असून स्थिर आहे असा भास होतो, त्याप्रमाणें या जगाचा प्रकार आहे. ३६ हे पुष्कळ दाखले राहूं दे, परंतु एकादा मनुष्य हातांत कोलती घेऊन आपले भोंवतीं फिरवूं लागला, म्हणजे ती ज्याप्रमाणें अति वेगामुळें मोठ्या चक्राच्या आकाराप्रमाणें स्थिर दिसते, ३७ त्याप्रमाणें, हा संसाररूपी वृक्ष नेहमीं नाश पावतो व उत्पन्न होतो; हें न समजल्यामुळें, लोक वेडेपणानें यास नित्य मानतात. ३८ परंतु या संसाररूपी वृक्षाचा वेग जाणून हा क्षणिक आहे व हा एका निमिषांत कोट्यावधि वेळां उत्पन्न होतो व लय पावतो; ३९ आणि ह्याला अज्ञानावांचून दुसरें कारण नाहीं. व याचें अस्तित्व खोटें आहे. याप्रमाणें जो या संसाररूपी वृक्षास मुळापासून शेवटापर्यंत पूर्णपणें जाणतो, १४० त्यालाच मी सर्वज्ञ असून जाणता असें म्हणतों, आणि वैदिक सिद्धांतालाही पूज्य तोच आहे. ४१ योगापासून मिळणारें फळही त्यालाच मिळतें. फार काय सांगावें! त्याच्याच योगानें ज्ञानालाही जीवन मिळतें. ४२ हें पुष्कळ बोलणें असो अशा प्रकारें हा संसाररूपी वृक्ष अनित्य आहे असें ज्यानें जाणलें, त्याचें कोणाच्यानेंही वर्णन करवणार नाहीं. ४३

**अन्वयार्थ**--(तस्य)-त्या संसारवृक्षाच्या-(शाखाः)-शाखा-(अधः च ऊर्ध्वं)-मनुष्यलोकाच्या खालीं व वर-(प्रसृताः)-पसरल्या आहेत.-(गुणप्रवृद्धाः)-त्या सत्त्व, रज व तम यांच्या योगानें [ ]पसरून वाढलेल्या आहेत.-(विषयप्रवालाः)-विषय हेच त्या शाखांचे कोमळ पल्लवांकुर आहेत.-(मनुष्यलोके)-या मनुष्यशरीरांत-(कर्मानुबंधीनि) कर्मांना कारण होणारीं-(मूलानि)-वासनारूप मुळें-(अधःच)-खालीं व वरहि-(अनुसन्ततानि)-परंपरेनें-संतत पसरलेलीं आहेत. २

मग या प्रपंचरूपी वृक्षास खालीं शाखा येऊन, त्या जमिनींत गेल्यावर, पुनः त्यांना शाखा उत्पन्न होऊन वरही सरळ शाखा फुटतात. ४४ व ज्या डाहाळ्या खालीं येतात, त्यांनाही मूळ फुटून, खालच्या बाजूस वेल वाढून पानें येतात. ४५ याप्रमाणें, जें आम्हीं आरंभीं म्हटलें आहे, तेंच अधिक स्पष्ट करून सांगतों, ऐक. ४६ तर मूळ अज्ञान असून, त्याच्यापासून अष्टधा प्रकृति उत्पन्न होऊन, ज्ञानरूप मोठालीं वनें उत्पन्न होतात. ४७ पण, आधीं या झाडाच्या बुडापासून स्वेदज, जरायुज, उद्भिज्ज व अंडज अशा चार मोठाल्या फांद्या फुटतात. ४८ ह्यापैकीं एक एक फांदी वाढावली म्हणजे त्याच्या चौऱ्यांयशीं लक्ष योनिरूप फांद्या फुटतात; व फांद्यास जीवरूपी फांटे फुटतात, ४९ या सरळ फांद्यापासून ज्या डहाळ्या आडव्या माळेसारख्या फुटतात, त्या निरनिराळ्या जाति होत. ५० मग स्त्री, पुरुष व नपुंसक असे व्यक्तीचे भेद उत्पन्न होऊन त्या विषयांच्या भारानें एकमेकांवर आदळतात. ५१ ज्याप्रमाणें वर्षाकालीं आकाशांत मेघ उत्पन्न होतात, त्याप्रमाणें अज्ञानामुळें पुष्कळ जातींचीं शरीरेंरूपी वेली उत्पन्न होतात. ५२ मग गुणरूपी वारे सुटल्यावर त्यांचा आपल्या भारानें रुतून एकमेकांत गुंततात. ५३ ते गुण अति वाढल्यामुळें, त्या ऊर्ध्वमूलाच्या वृक्षास खालीं, वर व मध्यें असे तीन भेद होऊन फांटे फुटतात. ५४ याप्रमाणें रजोगुणाची झुळूक सुटून ती जोरानें वाहूं लागल्यावर मनुष्यजातिरूपी शाखा थोरावते. ५५ त्या शाखेला वर किंवा खालीं शाखा

१ कोट्यवधि. २ कावळ्याला. ३ सत्वर. ४ भिंगरी, भोंवरा. ५ वेगानें फिरूं लागला, ६ दाखले. ७ संपूर्ण, अखंड. ८ खोटें. ९ संपूर्ण. १० वेदांतील. ११ सिद्धांताला. १२ जगलें. १३ वर्णवेल. १४ निर्जिव, व्यर्थ, अनित्य. १५ वृक्षाला. १६ पुष्कळ. १७ खालीं. १८ डाहाळ्या. १९ आरंभीं. २० तयार होते, भरास येते. २१ मोठीं पानें. २२ फांद्या. २३ शरीरांतून, अंगांतून. २४ बहुत. २५ आडव्या फांद्या. २६ ठसे. २७ आंगचा, स्वाभाविक. २८ युक्त होतो. २९ मेघांत. ३० सर्व आकार. ३१ विस्तार पावतो.

दाकोंदी । आड फुटती खांदी । चतुर्वर्णांच्या ५६ तेथ विधिनिषेध सपल्लव ।
वेदवाक्यांचें अभिनव । पालव डोलती बरंव । नीच नवे ५७ अर्थु कामु पसरे ।
अग्रेंवनें घेती थारे । तेथ क्षणिकें पेंदांतरें । इहभोगाचीं ५८ तेथ प्रवृत्तीचेनि
वृद्धिलोभें । खांकरेजती शुभाशुभें । नानाकर्मांचे खांबे । नेणों किती ५९ ते-
वींचि भोगक्षीणें मागिलें । पडती देहांतींचीं बुडसळें । तंव पुढां वाढी पेले ।
नवेया देहांची १६० आणि शब्दादिक सुहावे । सहज रंगें हेंवावे । विषय-
पल्लव नवे । नित्य होती ६१ ऐसे रजोवातें प्रचंडें । मनुष्यशाखांचे मांदोडे[१२] ।
वाढती तो एथ रूढे । मनुष्यलोकु ६२ तैसाचि तो रजाचा वारा । नावेक धरी
वोसरीं । मग वाजों लागे घोरीं । तमाचा तो ६३ तेधवां याचिया मनुष्य-
शाखा । नीच वासना अधीं देखा । पाल्हेजती डाहाळिका । कुकर्मांचिया ६४
अप्रवृत्तींचे खणुवोंळे । कोंभ निघती सरळे । घेत पान पालव डाळे[१९] । प्रमा-
दाचीं ६५ बोलती निषेधनियमें । जिया ऋचा यजुःसामें । तो पाला तया धुमे ।
टकेयोंवरी ६६ प्रतिपादिती अभिचार । आगम जे परमोर । तिहीं पानीं घेती
प्रसर । वासना वेली ६७ तंव तंव होती थोराडें । अकर्माचीं तळंबुडें । आणि
जन्मशाखा पुढेंपुढें । घेती धांव ६८ तेथ चांडाळादि निकृष्टा । दोषजातींचा
थोर फांटा । जोंळ पडे कर्मभ्रष्टां । भुलोनियां ६९ पशु पक्षी सूकरें । व्याघ्र
वृश्चिक विखार । हे आडशाखाप्रकार । पैसु घेती १७० परी ऐशा शाखा
पांडवा । सर्वांगींही नित्य नवा । निरयभोग यावा । फळाचा तो ७१ आणि
हिंसाविषयपुढारी । कुकर्मसंगें धुरंधरी । जन्मवरी आगारी । वाढतीचि असे ७२
ऐसे होती तरुतृण । लोह लोष्ट पाषाण । इया खांदिया तेवीं जाण । फळेंही
हेंची ७३ अर्जुना गा अवधारीं । मनुष्यालागोनि इया परी । वृद्धि स्थावरांत-
वरी । अधोशाखांची ७४ म्हणौनि जीं मनुष्यढाळें । तियें जाणावीं अधींचि
मूळें । जे एथूनि हा पेंघळे । संसारतरु ७५ एऱ्हवीं ऊर्ध्वीचें पार्था । मुद्दल
मूळ पाहतां । अधींचिया मध्यस्था । शाखा इया ७६ परी तामसी सात्त्विकी ।
सुकृतदुष्कृतात्मकी । विरूढती या शाखीं । अधोर्ध्वींचिया ७७ आणि वेद-
त्रयाचिया पाना । नये अन्यत्र लागों अर्जुना । जे मनुष्यावांचूनि विधाना ।
विषय नाहीं ७८ म्हणोनि तनु मानुषा । इया ऊर्ध्वमूळौनि जरी शाखा । तरी
कर्मवृद्धीसि देखा । इयेंचि मूळें ७९ आणि आनीं तरी झाडीं । शाखा वाढतां

न फुटतां, मध्येंच (मृत्युलोकीं) चार वर्णांच्या चार फांद्या दाटीनें फुटतात. ५६ त्या फांद्यांस विधिनिषेधरूपी पानें व वेदवाक्यें हाच कोंवळा पाला फुटतो; ५७ आणि अर्थ व काम यांचा विस्तार होऊन, इहलोकींच्या क्षणिक सुखाचे कोंब येतात. ५८ नंतर प्रवृत्तिमार्ग वाढावा, या हेतूनें शुभाशुभ कर्मांचे किती फांटे फुटतात हें समजत नाहीं. ५९ त्याचप्रमाणें, भोगांचा क्षय झाला म्हणजे मागले देह शुष्क होऊन खालीं पडतात, तों दुसरीकडे नव्या देहाचे फांटे फुटतात; १६० आणि पंचविषयांच्या साह्यानें इच्छा उत्पन्न होऊन विषयरूपी नवीं नवीं पानें नित्य येतात. ६१ याप्रमाणें रजोगुणाचा मोठा वारा सुटल्यावर मनुष्यरूपी शाखांचे समुदाय ज्या ठिकाणीं वाढतात, त्याला मनुष्यलोक म्हणतात. ६२ त्याचप्रमाणें हा रजोगुणरूपी वारा क्षणभर थांबल्यावर तमोगुणरूपी वारा मोठ्या सपाट्यानें वाहूं लागतो. ६३ मग याच मनुष्यरूपी शाखांना वाईट वासना उत्पन्न होऊन कुकर्मांच्या डाहळ्या खालीं फुटूं लागतात. ६४ अप्रवृत्तीचे (वाईट मार्गाचे) बळकट सरळ सोट निघून त्यांस प्रमादरूपी पानें व डाहळ्या फुटतात. ६५ ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांच्या ऋचांत जे नियमानें निषेध सांगितले आहेत, त्यांचा अग्रगामी पाला फुटतो. ६६ अथर्वणवेदांत जें जारणमारण सांगितलें आहे, व ज्यांत परपीडा ही मुख्य धरली आहे, अशा तीन पानांचा वासनारूपी वेल पसरतो. ६७ नंतर वाईट कर्मांची मुळें मोठीं होऊन त्यांना जन्मरूपी शाखा पुष्कळ फुटतात. ६८ त्या वाईट कर्माला भुलून गेल्यानें त्याला चांडालादि नीच योनींचा मोठा फांटा फुटून कर्मभ्रष्टाचे जातींत जन्मावें लागतें ६९ पशु, पक्षी, वाघ डुकर, विंचू, सर्प याप्रमाणें आडव्या फांद्या पुष्कळ फुटतात. १७० अर्जुना, याप्रमाणें त्या वृक्षाच्या सर्वांगावर नित्य नव्या फांद्या फुटून त्यांना नरकभोगाची प्राप्ती होते, ७१ आणि हिंसाविषय पुढें करून वाईट संगतीच्या योगानें अनेक जन्म घ्यावे लागतात. ७२ याप्रमाणें झाडें, गवत, लोखंड, माती व दगड या खांद्यांनाही तसलींच फळें येतात. ७३ अर्जुना, मनुष्यापासून स्थावरापर्यंत सगळ्या शाखांची वाढ खालींच आहे. ७४ म्हणून मनुष्यरूपी खांदीच खालीं जाणाऱ्या खांद्यांचें मूळ असून हिजपासूनच हा संसारवृक्ष वाढतो. ७५ एऱ्हवीं पार्था, वर जाणाऱ्या खांदीचें मूळ पाहूं गेलें असतां, वर व खालीं यांच्यामध्यें जी खांदी आहे, तेंच (मनुष्यजन्मच) होय. ७६ परंतु तमोगुण व सत्वगुण यांच्या दुष्कर्म व सत्कर्म यांनीं भरलेल्या शाखा या मधल्या शाखेपासून खालीं व वर जातात. ७७ अर्जुना, वेदत्रयरूपी पानें दुसऱ्या कोणाला लागू नसून त्यांतील विधि केवळ मनुष्ययोनीलाच विषय करतात. ७८ म्हणून, मनुष्यरूप खांदी ही जरी वरच्या मुळांपासून खालीं वाढली आहे, तरी कर्मवृद्धिरूप शाखा इच्यापासूनच उत्पन्न होतात. ७९ आणि दुसऱ्या झाडांची तरी हीच तऱ्हा आहे कीं, फांद्या वाढल्या म्हणजे

१ सविस्तार, विस्तारयुक्त. २ अपूर्व, नवीन. ३ शोभा, सौंदर्य, चांगुलपणा. ४ पुढचीं पानें. ५ अन्यरथानें. ६ उत्पन्न होतात. ७ शुष्क काष्ठें. ८ फांटे फुटतात. ९ पंच विषय. १० साह्यानें. ११ मोहक, आकर्षक. १२ समुदाय. १३ क्षणभर. १४ ओहट, थांबणें. १५ भयंकर. १६ खालीं. १७ कुमार्गाचें. १८ कठीण, सडबडीत, बळकट. १९ डाहाळ्या. २० असावधपणाची. २१ फुटतो. २२ अग्रगामी. २३ जारणमारण. २४ मुख्य. २५ परपीडा. २६ तीन पानांचा. २७ बुंधे. २८ जाणें. २९ डुकर. ३० सर्प. ३१ आडशाखारूपी समूह. ३२ पुढें करून. ३३ पुढें करितो. ३४ अंकुर. ३५ मातीचें ढेकूळ. ३६ डाहाळ्या. ३७ पसरतो. ३८ वरचें.

मुळें गोढीं । मूळ गाढें तंव वाढी । पैस आथी १८० तैसेंचि इया शरीरा । कर्मे तंव देहा [२]संसरा । आणि देह तंव [३]व्यापारा । ना म्हणोंचि नये ८१ म्हणोनि देहें मानुषें । इयें मूळें होती न चुके । ऐसें जगज्जनकें । बोलिलें तेणें ८२ मग तमाचें तें दारुण । स्थिरावलेया वाउँधाण । सत्त्वाची सुटे [५]सत्राण । वाहुटळी ८३ तैं याचि मनुष्याकारा । मुळीं सुवासना निघती [६]आंरा । फुटती निघती कोंवारा । सुकृतांकुरीं ८४ उकलतेनि उन्मेखें । प्रज्ञाकुशलतेंचि तिखें । डिरिया निघती निमिखें । [१०]बाबळैंजुनी ८५ मतीचे सोटें [११]वेंवे । घालिती स्फूर्तीचेनि थांवें[१२] । बुद्धिप्रकाश घे धांवे । विवेकावरी ८६ तेथ मेधारसें [१३]सगभें । [१४]अर्थांपत्रीं [१५]सैंबोंब । सरळ निघती कोंभ । सद्वृत्तीचे ८७ सदाचाराच्चिया सहसा । [१६]टकौ उठती बहुवसा । घुमघुमिती घोषा । वेद[१७]पर्यांच्या ८८ शिष्टागमविधानें । [१९]विविधयागवितानें । इयें पानावरी पानें । पाले[२०]जेंती ८९ ऐशा यमदमीं [२१]घोंसाळिया । उठती तपाचिया डाहाळिया । देती वैराग्यशाखा [२२]कोंवळियें । [२३]वेल्हाळपणें १९० विशिष्ठां व्रतांचे फोक । धीराच्या [२४]अणगटी [२५]तिखें । जन्मवेगें ऊर्ध्वमुख । उंचावती ९१ माजि वेदाचा पाला दाट । तो करी सुविद्येचा झडझडाट । जंव वाजे अचाट । सत्त्वानिळु तो ९२ तेथ [२६]धर्मडाळ [२७]बाहाळी । दिसती जन्मशाखा सरळी । तिया आड फुटती फळीं । स्वर्गादिकीं ९३ पुढां उपरति रेंगें [२९]लोहिवी । धर्ममोक्षाची शाखा पालवी । [३०]पाल्हाजत नित्य नवी । वाढतीचि असे ९४ पैं रविचंद्रादि ग्रहवर । पितृ ऋषि विद्याधर । हे आडशाखा प्रकार । [३१]पैसु घेती ९५ याहीपासून उंचवडें । [३२]गुंढले फळाचेनि बुडें । इंद्रादिक ते [३३]मांदोडे । थोर शाखांचे ९६ मग तयांही उपरी डाहाळिया । तपोज्ञानीं उंचावलिया । मरीचि कश्यपादि इया । उपरी शाखा ९७ एवं माळो[३४]वाळी उत्तरोत्तरु । ऊर्ध्वशाखांचा पैसारु । बुडीं [३५]सांना अग्रीं थोरु । फळाढ्यपणें ९८ वरी उपरिशाखाही पाठीं । येती फळभार जे किरीटी । ते [३६]ब्रह्मेशांत [३७]अणगटीं । कोंभ निघती ९९ फळाचेनि वोझेपणें । ऊर्ध्वी वोवांडें[३८] दुणें । जंव माघौतें बैसणें । मूळींचि होय २०० प्राकृताही तरी रुखा । जें फळें दाटलीं होय शाखा । ते [३९]वोवांडेली देखा । बुडासि ये १ तैसें जेथूनि हा आघवा । संसारतरूचा उठावा । तियें मूळीं टेंकती पांडवा । वाढतेनि ज्ञानें २ म्हणौनि ब्रह्मेशांपरौतें । वाढणें नाहीं जीवातें । तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं ३ परी हें असो ऐसें ।

ब्रह्मादिक ते आंगवसें । ऊर्ध्वमूळांसरिसें । न तुकती गा ४ आणीकही शाखा उपरतां । जिया सनकादिक नामें विख्याता । तिया फळीं मूळीं नाडळतां । भरलिया ब्रह्मीं ५ ऐसी मनुष्यापासूनि जाणावी । ऊर्ध्वीं ब्रह्मादिशेष पालवी । शाखांची वाढी बरवी । ऊंचावे पैं ६ पार्था ऊर्ध्वींचिया ब्रह्मादि । मनुष्यत्वचि होय आदि । म्हणौनि इयें अधीं । म्हणितलीं मूळें ७ एवं तुज अलौकिकु । हा अधोर्ध्वशाखु । सांगितला भवरुखु । ऊर्ध्वमुळु ८ आणि अधींचीं हीं मूळें । उत्पत्ती पारिसेविली सैंघिवळें । आतां परिस उन्मूळें । कैसेनि हा ९

न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा ॥ ३ ॥

परी हन तुझ्या पोटीं । ऐसें गमेल किरीटी । जे येवढें झाड उत्पाटी । ऐसे कायि असे २१० कीं ब्रह्मयोच्या शेवटवरी । ऊर्ध्व शाखांची थोरी । आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे ११ हा स्थावराही तळीं । फांकत असे अधींच्या डाळीं । माजीं धांवतसे दुजा मुळीं । मनुष्यरूपीं १२ ऐसा गोंढा आणि अफाटु । आतां कोण करी यया शेवटु । तरी झणी हा हळुवटु । धरिसी भावो १३ तरी हा उन्मूळावया दोषें । येथ सायासचि कायिसे । काय बाळा बागुल देशें । दवडावा आहे १४ गंधर्वदुर्ग कायी पाडावे । काय शशविषाण मोडावें । होआवें मग तोडावें । खपुष्प कीं १५ तैसा संसारु हा वीरा । रूख नाहीं साचोकारा । मा उन्मूळणीं दरारा । कायिसा तरी १६ आम्हीं सांगितली जे परी । मूळडाळांची उजरी । ते वांझेचीं घरभरी । लेंकुरें जैशीं १७ काय कीजती चेइलेपणीं । स्वप्नींचीं तियें बोलणीं । तैशी जाण ते काहाणी । दुंगळींचि ते १८ वांचूनि आम्हीं निरूपिलें जैसें । ययाचें अचळ मूळ असे तैसें । आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा १९ तरी कोणाचेनि संतानें । निपजती तया उन्मूळणें । काय फुंकिलिया गगनें । जाइजेल गा २२० म्हणौनि पैं धनंजया । आम्हीं वानिलें रूप तें माया । कासवींचेनि तुपें राया । वोगरिलें जैसें २१ मृगजळाचीं गा तळीं । तियें दिठी दुरूनि न्याहाळीं । वांचूनि तेणें पाणियें साळी केळी । लाविसी काई २२ मूळ अज्ञानचि तंव लटिकें । मा तयाचें कार्य हें केतुकें । म्हणोनि संसाररूख सतुकें । वावोचि गा २३ आणि अंतु यया नाहीं । ऐसें बोलिजे जें कांहीं । तेंही साचचि पाहीं । येकें परी २४

त्यांचा ऊर्ध्वमूळ जें ब्रह्म त्याची बरोबरी करूं शकत नाहींत. ४ आणखी निवृत्तिमार्गाच्या ज्या वर सनकादिकरूपी शाखा आहेत, त्यांना फळें व मुळें नसून त्या ब्रह्मरूपीच आहेत. ५ याप्रमाणें मनुष्यरूप खांदीपासून वरच्या बाजूस ज्या ब्रह्मादिरूप खांद्या आहेत, त्या फार उंच जातात. ६ पार्थ, ब्रह्मादिरूप ज्या वरच्या उंच खांद्या आहेत, त्या मनुष्यरूप खांदीपासूनच उत्पन्न झाल्या आहेत, म्हणून तिला आम्ही वरच्या खांद्यांचें मूळ असें म्हटलें आहे. ७ याप्रमाणें, जो अलौकिक संसाररूपी वृक्ष ऊर्ध्वमूळ असून, ज्याला खालीं वर अशा शाखा फुटलेल्या आहेत, त्याचें वर्णन तुला सांगितलें. ८ याप्रमाणें या झाडाला खालचीं व वरचीं मुळें असून त्यांविषयीं सर्व विवेचन तुला सांगितलें; आतां असा जो हा बळकट वृक्ष, तो कोणत्या उपायानें उपटून टाकतां येतो, तें ऐक. ९

अन्वयार्थ—(इह)-या संसारांत असलेल्या प्राण्यांना-(अस्य रूपं)-या संसारवृक्षाचें रूप-(तथा)-येथें जसें वर्णिलें आहे तसें-(न उपलभ्यते)-उपलब्ध होत नाहीं-(न अन्तः)-याचा अन्त कळत नाहीं-(च आदिः न)-आणि याचा आरंभ कोठून झाला आहे तें कळत नाहीं-(च संप्रतिष्ठा न)-याची स्थिती कळत नाहीं-(सुविरूढमूलं)-ज्याचीं मुळें फार खोल गेलीं आहेत अशा-(एनं अश्वत्थं)-या क्षणभंगुर संसारवृक्षाला-(दृढेन असंगशस्त्रेण)-अत्यंत दृढ-मजबूत अशा असंगरूप शस्त्रानें-(छित्त्वा)-तोडून, ३

परंतु, अर्जुना, तुझ्या मनांत अशी शंका येईल की, याप्रमाणें हा एवढा प्रचंड वाढलेला जो संसाररूपी वृक्ष, त्याला उपटून टाकील असें काय साधन आहे? १० कारण त्याच्या वरच्या बाजूच्या शाखांची वाढ ब्रह्मलोकापर्यंत असून ज्याचें मूळ निराकार ब्रह्माचे ठिकाणीं आहे; ११ या वृक्षाच्या खालीं येणाऱ्या फांद्या स्थावरजंगमांच्या तळांत शिरलेल्या असून, याच्या मध्यभागांत मृत्युलोक भरलेला आहे; १२ याप्रमाणें हा वृक्ष अति बळकट व अफाट असून, याचा नाश कोणाच्यानें करवेल अशी क्षुद्र भावना कदाचित् तूं आपले मनांत धरशील हो! १३ तर हें बघ, हा वृक्ष उपटून टाकण्यास श्रम ते कसले आहेत? लहान मुलाला जो बागुलबोवा दाखवितात, तो हाकून देण्यास त्याला कोठें दुसऱ्या देशांत का घालवावा लागतो? १४ आकाशांत दिसणारे किल्ले काय पाडावे लागतात? तसेंच सशाच्या शिंगास काय मोडावें लागतें? आकाशास जर पुष्प येईल, तरच तें तोडतां येईल! तें मुळीं नाहीं, मग तोडण्याचे श्रम कसले? १५ त्याचप्रमाणें अर्जुना, हा तुला सांगितलेला संसाररूपी वृक्ष खरा नाहीं. मग तो उपटून टाकण्यास कसली भीति आली आहे! १६ आम्हीं त्या झाडाचीं मुळें व डाहाळ्या यांविषयीं जो प्रकार सांगितला, तो वांझेच्या घरांत पुष्कळ मुलेंलेकरें आहेत असें सांगण्यापैकींच होय. १७ स्वप्नांत जी आपण भाषणें करतों, त्यांचा जागे झाल्यावर कांहीं खरेपणा प्रत्ययास येतो का? त्याचप्रमाणें, या संसाररूपी वृक्षाची कहाणी स्वप्नाचें भावंडच आहे. १८ नाहींतर ज्याप्रमाणें आम्हीं या झाडाचें वर्णन केलें, त्याप्रमाणें जर याचीं मुळें भक्कम असून हा विस्तार पावलेला खरा असता, १९ तर कोणाची माय व्याली होती की, त्याला उपटून टाकील? हे पहा-फुंकर घातल्यानें आकाश कोठें नाहींसें होतें काय? २२० म्हणून, हे धनंजया, ज्याप्रमाणें कासवीच्या तुपाची राजास मेजवानी करणें असंभवनीय आहे, त्याप्रमाणें आम्ही जें या संसाररूपी वृक्षाच्या स्वरूपाचें वर्णन केलें, तें सर्व मिथ्या होय. २१ बाबारे, मृगजळाचे तलाव दुरून दृष्टीनें पाहाण्यासच योग्य आहेत; बाकी त्यांच्या पाण्यावर कधीं साळी, केळी करतील काय? २२ अगोदर अज्ञान हें मिथ्या आहे, मग त्यापासून होणारें कार्य काय किमतीचें असणार? म्हणून, संसाररूपी वृक्ष हा सर्व खोटा आहे; २३ आणि या वृक्षाला अंत नाहीं, असें म्हणणें हेंही एका प्रकारानें खरें आहे. २४ तर जोंपर्यंत मनुष्य जागा

१ शरीरसामर्थ्यानें. २ ऊर्ध्वमूळ जें ब्रह्म त्याच्या बरोबरीनें. ३ गणले जात नाहींत. ४ वरच्या. ५ अटकल्यापासून, शिवस्थानांपासून. ६ सत्यलोकापर्यंत. ७ खालचा. ८ फोड, विवेचन. ९ सांगितलें. १० सविस्तर. ११ उपडेल. १२ उपटील. १३ ब्रह्मलोकापर्यंत. १४ मध्यभागांत. १५ बळकट. १६ कदाचित्. १७ हलकट, क्षुद्र. १८ उपटण्याकरितां. १९ बागुलबुवा. २० दृष्टांत दिसणारे किल्ले. २१ सशाचें शिंग. २२ आकाशाचें फूल. २३ खरा. २४ मुळांची व फांद्यांची. २५ जागेपणांत. २६ समज. २७ दुबळ. २८ कोणाच्या हिंमतीनें. २९ मेजवानी केली. ३० फोडून, फितीनें. ३१ संसारवृक्ष. ३२ खरेपणानें.

तरी प्रबोधु जंव नोहे। तंव निद्रे काय अंतु आहे। कीं रात्री न सरे तंव न पांहे। तया औरौतें २५ तैसा जंव पार्था। विवेकु नुधंवी माथा। तंव अंतु नाहीं अश्वत्था। भवरूपा या २६ वाजतें वारें निवांत। जंव न राहे जेथिंचें तेथ। तंव तरंगता अनंत। म्हणावीचि कीं २७ म्हणौनि सूर्य जैं हारपे। तैं मृगजळा भासु लोपे। कां प्रभा जाय दीपें। मालवलेनी २८ तैसें मूळ अविद्या खाये। तें ज्ञान जैं उभें होये। तैंचि यया अंतु आहे। एऱ्हवीं नाहीं २९ तेवींचि हा अनादी। ऐसी ही आथी शाब्दी। तो आळु नोहे अनुरोधी। बोलातें यया २३० जे संसारवृक्षाच्या ठायीं। साचोकार तंव नाहीं। मां नाहीं तया आदिं काई। कोण होईल ३१ जो साच जेथूनि उपजे। तयातें आदि हें साजे। आतां नाहींचि तो म्हणिजे। कोठूनियां ३२ म्हणौनि जन्मेना आहे। ऐसिया सांगों कवण मांये। यालागीं नाहींपणेंचि होये। अनादि हा ३३ वांझेचिया लेंका। कैंची जन्मपत्रिका। नभीं निळी भूमिका। कें कल्पूं पां ३४ व्योमकुसुमांचा पांडवा। कवणें देंठ तोडावा। म्हणौनि नाहीं ऐसिया भवा। आदि कैंची ३५ जैसें घटाचें नाहींपण। असतचि असे केलेंनिवीण। तैसा समूळ वृक्षु जाण। अनादि हा ३६ अर्जुना ऐसेनि पाहीं। आद्यंतु ययासि नाहीं। मार्जी स्थिती आभासे कांहीं। परी टवाळ ते[13] गा ३७ ब्रह्मगिरीहूनि न निगे। आणि समुद्रींही कीर न रिगे। मार्जी दिसे वाउगें। मृगांबु जैसें ३८ तैसा आद्यंतीं कीर नाहीं। आणि साचचि नोहे कैंहीं। परी लटिकेपणाची नवाई। पडिभासे गा ३९ नाना रंगीं गजबजे। जैसें इंद्रधनुष्य देखिजे। तैसा नेणतया आपजे। आहे ऐसा २४० ऐसेनि स्थितीचिये वेळे। भुलवी अज्ञानाचे डोळे। लाघवी[22] हरी[23] मेखळे[24]। लोकु जैसा ४१ आणि नसतीचि श्यामिका। व्योमीं दिसे तैसी दिसो कां। तरी दिसणेंही क्षणा एका। होय जाय ४२ स्वप्नींही मानिलें लटिकें। तरी निर्वाहो[26] कां एकसारिखें। तेवीं आभासु हा क्षणिकें। रितौंचि[27] गा ४३ देखतां आहे ओंवडे। घेऊं जाइजे तरी नौतुडे[28]। जैसा टिकुं[30] कीजे मार्कंडें[31]। जळांमाजीं[31] ४४ तरंगभंगु सांडी[32] पडे। विजूही न पुरे होडे[33]। आभासासि तेणें पाडें। होणें जाणें गा ४५ जैसा ग्रीष्मशेषींचा[34] वारा। नेणिजे समोर कीं पाठीमोरा। तैसी स्थिती नाहीं तरुवरा। भवरूपा यया ४६ एवं आदि ना अंतस्थिती। ना रूप ययासि आथी। आतां कायसी कुंथाकुंथी। उन्मूळणी गा ४७ आ-

झाला नाहीं, तोंपर्यंत निद्रेला शेवट आहे काय? किंवा रात्र सरली नाही, तोंपर्यंत उजाडत नाहीं. २५ त्याप्रमाणें, हे पार्था, जोंपर्यंत ब्रह्मज्ञान उत्पन्न झालें नाहीं, तोंपर्यंत या संसाररूपी अश्वत्थास अंत नाहीं. २६ जोंपर्यंत वारा वाहतांना राहिला नाही, तोंपर्यंत समुद्रावरील लाटांना शेवट नाहीं, असें म्हणावें लागतें. २७ म्हणून, ज्या वेळेस सूर्य अस्तास जातो, त्या वेळेस मृगजळाचा भास नाहींसा होतो, किंवा दिव्याचा प्रकाश दिवा मालवल्यावर नाहींसा होतो; २८ त्याप्रमाणें या संसाररूपी वृक्षाचें मूळ जें अज्ञान, तें ब्रह्मज्ञानाचा उदय झाल्याशिवाय नाहींसें होत नाहीं. २९ त्याचप्रमाणें हा अनादि आहे असें लोक म्हणतात; तर खरोखर पाहूं गेलें असतां हा त्याच्यावर आळ आलेला नसून, ही गोष्ट त्याच्या लक्षणांस अनुसरूनच आहे. २३० कारण, संसारवृक्षाचे ठिकाणी जर खरेपणाच नाहीं, मग जो मुळांत नाही, तर त्याचा आरंभ कोण होईल? ३१ जो खरोखर एकाद्या ठिकाणाहून उत्पन्न होतो, त्याला आदि आहे हें म्हणणें शोभतें, व जो वस्तुतः नाहींच त्याला आदि कोठून असणार? ३२ म्हणून, ज्याला जन्म नाही त्याची आई कोण म्हणून म्हणावी? यास्तव हा वृक्ष अभावरूपानें म्हणजे नाहींपणानेंच आहे, म्हणून याला अनादि म्हटलें आहे इतकेंच! ३३ वांझेच्या मुलाची जन्मपत्रिका कोठून असणार? त्याचप्रमाणें, आकाशाचा रंग निळा आहे अशी कल्पना कशी करतां येईल? ३४ अर्जुना, आकाशाच्या पुष्पाचा देंठ कोणास तोडतां येईल? म्हणून, ज्या संसाररूपी वृक्षास अस्तित्व नाहीं, त्याला मूलारंभ कोठून असणार? ३५ ज्याप्रमाणें घटोत्पत्तीच्या पूर्वी असणारा घटाचा अभाव, कोणी केल्यावांचून अनादीच आहे, त्याप्रमाणें संसारवृक्षाचें मूळ जी माया, तिच्यासहवर्तमान हा संसार अभावरूपानें अनादि आहे असें जाण. ३६ अर्जुना, अशा रीतीनें हा अभावरूप आहे, म्हणून याला आदि नाहीं व अंतही नाही, असें असूनही व्यवहारदर्शेत हा प्रत्यक्ष दिसतो, तथापि तें दिसणें मृगजळाप्रमाणें व्यर्थ होय. ३७ कारण, मृगजळाची एकाद्या अस्तगिरीपासून उत्पत्ति होत नाहीं, व एकाद्या समुद्राच्या ठिकाणीं लयही होत नाहीं, असें असूनही मध्यंतरी दिसतें, म्हणून त्याही वेळेला तें वास्तविक नाहींच. ३८ त्याप्रमाणें संसारवृक्ष हा आदिकालीं नाहीं, अंतींहि नाहीं, आणि मध्यें दिसला तरी नाहीं. तात्पर्य कोणच्याही कालीं त्याचें अस्तित्व नाहींच; परंतु याच्या लटकेपणाचा काय चमत्कार सांगावा की, हा नसून आहे असा भासतो. ३९ इंद्रधनुष्य ज्याप्रमाणें नानाप्रकारच्या रंगांनी भरलेलें दिसतें, त्याप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष अज्ञान्यासच आहे, असा दिसतो. २४० संसार आपल्या स्थितीच्या वेळेस अज्ञान्यांच्या डोळ्याला आपल्या सरसत्वाची भूल पाडतो. जसा बहुरूपी लोकांच्या डोळ्याला आपल्या चातुर्यानें भुलवतो. ४१ आणि आकाशाच्या ठिकाणीं नसतांना निळा रंग दिसला तर दिसो, त्यांत तरी खरेपण आहे काय? तोही क्षणांत नष्ट होऊन जातो. ४२ स्वप्नांतले पदार्थ लटके असून सत्य मानले तरी त्यांच्यापासून कायमचा निर्वाह होतो का? नाहीं. त्याप्रमाणें हा आभासमात्र संसार, वस्तुतः नाहीं; दिसला तरी तो क्षणभरही एकरूपानें रहत नाहीं. ४३ हा संसार चांगला दिसतो, म्हणून विचार करून घ्यायला गेलें असतां, कोठें आढळत नाहीं. जसें माकड चेष्टा करितें, त्याप्रमाणें जलांतही चेष्टा दिसतात, परंतु त्या खऱ्या नसतात; ४४ लाटांची एकामागून एक येण्याची त्वरा व विजेचें चमकणें यांच्यापेक्षांही या विश्वाभासरूपी झाडाचें होणें आणि जाणें अति जलद आहे. ४५ ग्रीष्म ऋतूच्या शेवटच्या वारा जसा समोरून किंवा पाठीमागून येतो हें समजत नाहीं, तशी या नसणाऱ्या संसाररूपी वृक्षाची स्थिति आहे. ४६ याप्रमाणें या वृक्षास आदि, अंत, स्थिति व रूप हीं नाहींत, म्हणून हा उपटून टाकण्यास खटाटोप कशाला पाहिजे? ४७ अर्जुना, आत्मस्वरूपाचे अज्ञा-

१ जागृति. २ प्रातःकाल. ३ अलीकडे. ४ वर न करी, उचलीत नाहीं. ५ भाषा, वार्ता. ६ आळ. ७ अनुरूप, योग्य. ८ सत्यता, खरेपणा. ९ मग. १० अ.ई. ११ आकाशपुष्पांचा. १२ मिथ्या. १३ स्थिति. १४ ब्रह्मगिरी—त्रिंबकेश्वराचा पर्वत. १५ मृगजळ. १६ खचित. १७ कधीं. १८ नवल. १९ प्रतिभासे. २० भरे. २१ उत्पन्न होईल, दिसेल. २२ सोंगाडी, बहुरूपी. २३ फसवी, हरण करी. २४ वेगानें, सोंगानें. २५ निकेपणा. २६ निर्वाह होणें. २७ निरर्थक, रिकामा. २८ वाटतो. २९ न मिळे. ३० चेष्टा. ३१ प्रतिबिंब, माकडानें. ३२ पलिकडे जाई. ३३ पेंजेला. ३४ ग्रीष्मांतीचा.

पुलिया अज्ञानासाठीं । नव्हता थांवला[१] किरीटी । तरि आतां आत्मज्ञानाच्या लोटीं । खांडेनि[२] गा ४८ वांचूनि ज्ञानेंवीण एकें । उपाय करिसी जितुके । तिहीं गुंफसि अधिकें । रुखीं इये ४९ मग किती खांदोखांदीं । यया हिंडावें ऊर्ध्वी अर्धी । म्हणौनि मूळचि अज्ञान छेदीं । सम्यक्[३]ज्ञानें २५० एऱ्हवीं दोरीचिया उरगा[४] । डांगों[५] मेळवितां पैं गा । तो शिणुचि वाउगा । केला होय ५१ तरावया मृगजळाची गंगा । डोणी[६]लागीं धांवतां दांगा[७]- । माजीं वोहळें बुडिजे पैं गा । साच जेवीं ५२ तेवीं नाथिलिया संसारा । उपांइं[८] जाचतया वीरा । आपणपें लोपे वारां[९] । विकोपीं[१०] जाय ५३ म्हणोनि स्वप्नींचेया घाया । ओखद चेवोचि[११] धनंजया । तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ५४ परि तेंचि[१२] लीला परजवे[१३] । तैसें वैराग्याचें नवें । अभंगबळ होआवें । बुद्धीसी गा ५५ उठिलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्गु[१४] ऐसा सांडणें । जैसें वमुनियां सुणें[१५] । आतांचि गेलें ५६ हा ठायवरी पांडवा । पदार्थजाती आघवा । विटवी तो होआवा । वैराग्य[१६] लाठु ५७ मग देहाहंतेचें दळें[१७] । सांडूनि ऐकेचि वेळे । प्रत्यक्[१८]बुद्धी कर[१९]तळें । हातें[२०]वसावें ५८ निसेंळें[२१] विवेकसोहणें[२२] । जे ब्रह्माहमस्मिबोधें सणोणें[२३] । मग पुरतेनि[२४] बोधें उटणें[२५] । एकलेंची ५९ परि निश्चयाचें मुष्टिबळ । पाहावें एकदोनी वेळ । मग तुळावें अति चोखाळ । मननवरी २६० पाठीं हैतियेरां[२६] आपणयां । निदिध्यासें एक जालिया[२६] । पुढें दुजें नुरेल घाया- । पुरतें गा ६१ तें आत्मज्ञानाचें खांडें[२७] । अद्वैत प्रभेचे निर्वांडें[२८] । नेदील उरों कवणेकडे । भववृक्षासी ६२ शरदागमींचा[२९] वारा । जैसा केरु फेडी अंबरा । कां उदयला रवी आंधारा । घोंटु भरी ६३ नाना उपवढ[३०] होतां खेंवो । नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो । स्वप्रतीतिधारेचा वांहो[३१] । करील तैसें ६४ तेव्हां ऊर्ध्वींचें मूळ । कां आधींचें हन शाखाजाळ । तें कांहींचि न दिसे मृगजळ । चांदिणा जेवीं ६५ ऐसेनि गा वीरनाथा । आत्मज्ञानाचिया खड्गलता । छेदुनियां भवाश्वत्था । ऊर्ध्वमूळातें ६६

तत: पदं तत्परिमार्गितव्यम्-यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

मग[३२] इदंतेसि वोळलें[३२] । जें मीपणेंवीण डोहारलें[३३] । तें रूप पांहिजे[३४] आपलें । आपणची ६७ परि दर्पणाचेनि आधारें । एकचि करून दुसरें । मुख पाहाती गव्हारें[३५] । तैसें नको हो ६८ हें पाहाणें ऐसें असे वीरा । जैसा न बोडलिया

नामुळें हा नसलेला वृक्ष वळावला आहे, तर आतां आत्मज्ञानरूप शस्त्रानें हा तोडून टाक, म्हणजे झालें. ४८ कारण, ( जें ज्याच्या अज्ञानेंकरून भासतें तें त्याच्याच ज्ञानेंकरून निवृत्त होतें, अन्य कशानेंही होत नाहीं, याकारितां ) एक ब्रह्मज्ञानाशिवाय याला छेदण्याचे जेवढे असुरी उपाय करशील, तितका तूं या वृक्षांत–संसारांत अधिकाधिकच गुंतून पडशील. ४९ मग तूं किती खांदा-घरून हिंडशील, आणि तसाच वर किंवा खाली अशा अगणित खांद्यावर जाशील याचा नेम नाहीं. म्हणून याचें मूळ जें अज्ञान, तें तूं यथार्थ छेदून टाक. २५० एऱ्हवीं, दोरीवर भासलेला सर्प मारण्याकरितां पुष्कळ काठ्या मिळविल्या म्हणजे तो जसा व्यर्थ शीण केल्या-प्रमाणें होय. ५१ मृगजलाच्या मोठ्या नदींतून तरून जाण्याकरितां नाव शोधण्याची धांवाधांव करित असतां, अरण्यांतील खऱ्या ओहोळांत जसा एकादा बुडतो, ५२ त्याप्रमाणें वीरा अर्जुना, या लटक्या संसाराच्या निवृत्तीचा मनुष्य उपाय करीत असतां श्रम पावतो; आणि आपल्या खऱ्या ज्ञानाचा लोप झाल्यामुळें त्याच्या अंगांत ' संसार सत्य ' असें जें वारें भरलेलें असतें, तें अधिकच होतें. ५३ धनंजया, स्वप्नांत लागलेल्या तरवारीचें वारास ज्या-प्रमाणें जागृति हेंच औषध, त्याप्रमाणें, ज्या संसाराची अज्ञानापासून उत्पत्ति आहे, त्याचा छेद करण्यास ज्ञानच खड्ग पाहिजे. ५४ परंतु तेंच ज्ञानखड्ग सहज धारण करतां येईल असें बुद्धीस वैराग्याचें बळ असावें लागतें. ५५ जें वैराग्य झाल्याबरोबर, कुत्र्याच्या ताज्या ओकीला पाहून जितकी किळस उत्पन्न होते, त्या प्रकारानें त्रैलोक्यांतील सर्व भोगावर त्यागबुद्धी झाली पाहिजे. ५६ अर्जुना, पदार्थमात्राबद्दल अशा तऱ्हेचा वीट उत्पन्न करणारा वैराग्याचा जोर असावा लागतो. ( म्हणजे ज्ञानखड्ग सहज धरतां येतें. ) ५७ मग देहाची अहंता हें म्यान, त्या वैराग्यरूप खड्गानें एकदम काढून, तें विचारवंत बुद्धिरूपी हातांत घ्यावें. ५८ मग तें खड्ग विवेकरूप सहाणेवर पाजवून, अहं ब्रह्म या बोधाची तीक्ष्ण धार लावावी, आणि त्यास अद्वैतरूपी पाणी द्यावें. ५९ इतकें झाल्यावर निश्चयरूपी मूठ हातांत घेऊन, व मनन करून, तें खड्ग एक दोन वेळ अजमावून पहावें. २६० नंतर ज्ञानखड्गाचें व आपलें निदिध्यासानें ऐक्य झाल्या-वर आपल्यापुढें घाव मारण्यापुरता सुद्धां तो द्वैतरूपी वृक्ष उरणारच नाहीं. ६१ तें आत्मज्ञानरूप शस्त्र अद्वैत-प्रभेच्या तेजानें भवरूपी वृक्षास कोठेंही उरूं देणार नाहीं. ६२ शरदृतूच्या सुरवातीचा वारा ज्याप्रमाणें आकाशांतील सर्व केर नाहींसा करतो, अथवा सूर्योदय झाल्यावर सर्व अंधार नाहींसा होतो; ६३ किंवा जागें होण्याबरोबर स्वप्नां-तील गोष्टी नाश पावतात, त्याप्रमाणें आत्मज्ञानानुभ-वरूपी धारेच्या तिखटपणामुळें संसाररूप तरूचा नाश होतो. ६४ त्या वेळेस ज्याप्रमाणें, चांदणें पडल्यावर मृगजल दिसत नाहीं त्याप्रमाणें संसारूपी वृक्षाची वरचीं व खालचीं मुळें अथवा खाली वाढलेला सर्व विस्तार हीं नाहींतशीं होतात. ६५ याप्रमाणें, हे वीरोत्तमा अर्जुना, आत्मज्ञानरूपी खड्गानें हा संसाररूपी अश्वत्थ वृक्ष मुळासुद्धां छेदून टाक. ६६.

**अन्वयार्थ**––(ततः)––त्यानंतर–( यस्मिन् गताः )–ज्या पदीं गेलेले–(भूयः)–पुनरपि–(न निवर्तन्ति)–निवृत्त होत नाहीत–(तत् पदं)–त्या पदाला–[शोधावें, त्याला जाणावें]–(यतः)–ज्याच्यापासून ही–(पुराणी)–अनादि–(प्रवृत्तिः–)–संसारप्रवृत्ति–(प्रसृता)–पसरली आहे–(तं एव च) त्याच–(आद्यं पुरुषं)–आद्य पुरुषाला–(प्रपद्ये)–मी शरण आहें.–[इति] –अशा भावनेनें–(परिमार्गितव्यं)–सर्व प्रकारें शोधावें, जाणावें. ४

म्हणजे इदं हें अशा सर्वनामानें जाणवलें जात नाहीं, व अहं अशा वृत्तीलाही विषय होत नाहीं, असें जें डांहा-रलेलें म्हणजे संचलेलें आत्मरूप आपणच पहावें. ६७ परंतु वेडे लोक आपलेंच मुख आरशांत प्रतिबिंबित करून म्हणजे दुसरें करून पहातात, तसें आत्म्याच्या ठिकाणीं द्वैत उत्पन्न करून पाहूं नकोस हो ! ६८ अर्जुना, आत्म-स्वरूपाचें पहाणें असें आहे कीं, ज्याप्रमाणें विहीर न

---

१ वळावला. २ शस्त्रानें, तरवारीनें. ३ यथार्थ ज्ञानानें. ४ सर्पाला. ५ काठ्या. ६ होडीसाठीं. ७ अरण्यामध्यें. ८ लटक्या. ९ उपायाचे कष्ट करणारास. १० आपलें खरें ज्ञान–आपली प्राप्ती तर होणार नाहींच, परंतु डोकें ... फिरून जाईल. ११ जागें होणें. १२ ज्ञानखड्ग. १३ धारण करतां यावें. १४ धर्म, अर्थ आणि काम, ( स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ ) १५ कुत्रें. १६ वैराग्याची दृढता, ... कटपणा. १७ तरवारीचें म्यान, वेष्टन. १८ मी अंत-र्यामी ( आत्मा ) आहें अशा बुद्धिरूपी. १९ हातांत. २० धारण करावें. २१ पाजविलेलें. २२ विवेकरूपी सहाणेवर. २३ तीक्ष्ण. २४ ऐक्याचें बोधानें. २५ पाणी देणें. २६ ज्ञानरूपी हत्यार व आपण निदिध्यासानें एक झाल्यावर. २७ तरवार, शस्त्र. २८ निर्णयानें. २९ शरदृतूच्या सुरवातीचा. ३० जागृती होतांक्षणींच. ३१ प्रवाह, तीक्ष्णता. ३२ ही अमुक वस्तु म्हणून दाखविण्याच्या प्रकारास. ३३ प्रसिद्ध झालें. ३४ पहावें. ३५ गव्हार.

कुरिजती जिये मेदिनी । तिये भेदबुद्धीची काहाणी । नाहीं जयातें ८९ सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय अपैसी । गेली देहअहंता तैसी । अविद्येसवें २९० पैं आयुष्यहीना जीवातें । शरीर सांडी जेवीं अवचितें । तेवीं निदसुरें द्वैतें । सांडिले जे ९१ लोहाचें सांकडें परिसा । न जोडे अंधारु रवि जैसा । द्वैतबुद्धीचा तैसा । सदा दुकाळ जया ९२ अगा सुखदुःखाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें । तिये जयां कां समोरें । होतीचिना ९३ स्वप्नींचें राज्य कां मरण । नोहे हर्षशोकांसि कारण । उपवढलिया जाण । जिया परी ९४ तैसें सुखदुःखरूपीं । द्वंद्वीं जे पुण्यपापीं । न घेपिजती सर्पीं । गरुड जैसे ९५ आणि अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर । चरतांति जे सविचार । राजहंसु ९६ जैसा वर्षोनि भूतळीं । आपला रसु अंशुमाळी । मागौता आणी रश्मिजाळीं । बिंबासीची ९७ तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली बारावाटीं । ते एकवटिती ज्ञानदृष्टी । अखंड जे ९८ किंबहुना आत्मयाचा । निर्धारीं विवेकु जयांचा । बुडाला बोधु गंगेचा । सिंधूमाजीं जैसा ९९ पैं आघवेंचि आपुलेंपणें । नुरेचि जया अभिलाषणें । जैसें येथूनि पैऱ्हां जाणें । आकाशा नाहीं ३०० जैसा अग्नीचा डोंगरु । नेघे कोणी बीजअंकुरु । तैसा मनीं जयां विकारु । उदैजेना १ जैसा काढिलिया मंदराचळु । राहे क्षीराब्धि निश्चळु । तैसा नुठी जयां सळू । कामोर्मींचा २ चंद्रमा कळीं धाला । न दिसे कोणें आंगीं वोसंवला । तेवीं अपेक्षेचा अवखळा । न पडे जयां ३ हें किती बोलूं असांगडें । जेवीं परमाणु नुरे वायूपुढें । तैसें विषयाचें नावडे । नांवचि जयां ४ एवं जे जे कोणी ऐसे । केले ज्ञानाग्नि हुताशें । ते तेथ मिळती जैसें । हेमीं हेम ५ तेथ म्हणिजे कवणें ठाईं । ऐसेंही पुससी कांहीं । तरी तें पद गा नाहीं । वेंचुं जया ६ दृश्यपणें देखिजे । कां ज्ञेयत्वें जाणिजे । अमुकें ऐसें म्हणिजे । तें जें नव्हे ७

न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः । यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

पैं दीपाचिया बंबाळीं । कां चंद्र हन जें उजळी । हें काय बोलों अंशुमाळी । प्रकाशी जें ८ तें आघवेंचि दिसणें । जयाचें कां न देखणें । विश्व भासतसे जेणें । लपालेनी ९ जैसें शिंपीपण हारपे । तंव तंव खरें होय रुपें । कां दोरी लोपतां सापें । फार होइजे ३१० तैसीं चंद्रसूर्यादि थोरें । इयें तेजें जियें फारें । तियें जयाचेनि आंधारें । प्रकाशती ११ ते वस्तु कीं तेजोराशी । सर्व-

फुटतात, त्या भेदबुद्धीची ज्याला गोष्ट सुद्धां माहीत नाहीं, ८९ सूर्योदय होण्याबरोबर रात्र जशी आपोआप नाहींशी होते, तसा आत्मस्वरूपाचा लाभ झाल्यावर ज्यांचा देहविषयक अभिमान अज्ञानासह नाहींसा होतो; २९० हें पहा–आयुष्यहीन जीवास ज्याप्रमाणें शरीर अवचित सोडतें, त्याप्रमाणें मोह पाडणारें द्वैत ज्यांना सोडून जातें; ९१ परिसाला जसें लोखंड दुर्मिळ आहे, किंवा सूर्याची व अंधकाराची ज्याप्रमाणें गांठ पडत नाहीं, त्याप्रमाणें द्वैतबुद्धीचा ज्यांच्यापाशीं सदोदीत तोटा असतो; ९२ अरे, या देहाचा अभिमान धरल्यावर, सुख-दुःखाकाररूपी जें द्वैत ( द्वंद्व ) दृष्टीस पडतें, तें ज्यांच्या पुढें सुद्धां येत नाहीं, ९३ ज्याप्रमाणें जागें झाल्यावर स्वप्नांत मिळालेलें राज्य अथवा प्राप्त झालेलें मरण यांज-पासून हर्ष किंवा शोक होत नाहीं. ९४ ज्याप्रमाणें, गरुडापुढें सर्प येत नाहीं; त्याप्रमाणें, सुख-दुःखरूपी पुण्य व पाप उत्पन्न करणारें जें द्वैत, तें ज्यांना जिंकीत नाहीं; ९५ आणि असद्वस्तुरूपी पाणी टाकून विचारी राजहंस ज्याप्रमाणें सद्वस्तुरूप दुधाचें सेवन करितात; ९६ ज्याप्रमाणें सूर्य पृथ्वीवर पाऊस पाडून तेंच पाणी आपल्या किरणद्वारां आपल्या ठिकाणींच शोषण करून घेतो, ९७ त्याप्रमाणें, आत्मस्वरूपाची भ्रांति पडल्यामुळें जें ब्रह्म चहूंकडे फांकलें असतें, तें ज्ञानदृष्टि झाल्यावर आपल्या स्वरूपांत नेहमीं ऐक्य पावतें. ९८ फार काय सांगावें ! ज्याप्रमाणें गंगेचा ओघ समुद्रास मिळाल्यावर नाहींसा होतो, त्याप्रमाणें आत्म-स्वरूपाचा निर्धार करणारा जो विचार, तोही त्या निर्धा-रांत म्हणजे आत्मस्वरूपांत लीन होतो. ९९ ज्याप्रमाणें आकाशाची सर्वत्र व्याप्ति असल्यामुळें त्याला एका गांवा-हून दुसरे गांवास जाणें शक्य नाहीं; त्याप्रमाणें सर्वच आपलें रूप झाल्यामुळें अमुक एका पदार्थाचा अभिलाप आहे, असें त्यास उरत नाहीं. ३०० ज्याप्रमाणें अग्नीच्या डोंगरावर कसलेंही बीं पेरलें असतां उगवत नाहीं, त्याप्र-माणें, ज्यांचे मनांत ज्ञानाचा उदय झाला आहे, तेथें कोणतेंही विकार धद्भवत नाहींत. १ समुद्रमंथनसमयीं क्षीरसमुद्रांत घातलेला मंदराचल त्यांतून काढून घेतल्यावर तो समुद्र स्थिर झाला, त्याप्रमाणें आत्मप्राप्ति झाल्यामुळें ज्याचे मनांत कामवासना उत्पन्न होत नाहीं; २ ज्याप्र-माणें चंद्र षोडस कलांनीं पूर्ण झाल्यावर कोणतेही बाजूनें कमी दिसत नाहीं; त्याप्रमाणें आत्मप्राप्ति झाल्यामुळें ज्यांचें मनांत कोणतीच इच्छा उत्पन्न होत नाहीं; ३ अशा निरुपम गोष्टी तुला किती सांगूं ! ज्याप्रमाणें वायूच्या पुढें परिमाणु टिकत नाहीं; त्याप्रमाणें विषयांचें नांवही ज्याला आवडत नाहीं ४. अशा प्रकारें, हुत भक्षण करणारा जो ज्ञानाग्नि, त्यांत ज्यांनीं सर्व विषय जाळून टाकले आहेत ते पुरुष सुवर्णांत सुवर्ण मिळाल्याप्रमाणें त्या ठिकाणीं प्राप्त होतात. ५ त्या ठिकाणी म्हणजे कोठें असें म्हणशील तर, ज्या पदाचा केव्हांही नाश होत नाहीं, अशी जी परमात्मवस्तु तेथें प्राप्त होतात. ६ दृश्य-त्वानें पहावें, किंवा ज्ञेयत्वानें जाणावें, किंवा हें अमुक आहे असें म्हणावें इत्यादि व्यवहार ज्याच्या ठिकाणीं होतात, ती वस्तु ब्रह्म नव्हे, त्याला कोणीही दाखवूं शकत नाहीं. ७

**अन्वयार्थ**–(सूर्यः)–सूर्य–(तत्)–त्या तेजोरूप पदाला–(न भासयते)–प्रकाशित करीत नाहीं.–(शशांकः न)–चंद्र त्याला प्रकाशित करीत नाहीं–(पावकः न)–अग्नि त्याला प्रकाशित करीत नाहीं–(यत्)–ज्याला–(गत्वा)–प्राप्त होऊन [ यति ] –(न निवर्तन्ते)–संसारांत परत येत नाहींत–(तत्)–तें–(मम)–माझें–(परमं)–परम श्रेष्ठ–(धाम)–पद-स्वरूप तेज आहे. ६

परंतु दिव्याच्या मोठ्या उजेडानें अथवा चंद्राच्या प्रकाशानें–फार तर काय ! परंतु ज्या सूर्यापासून सर्व जग प्रकाशित होतें, त्याच्या प्रकाशानें–८ ह्या सर्वांच्या प्रकाशानें जें दृष्टीस पडतें, तेंच काय, परंतु सर्व विश्व परमात्मस्वरूपाच्या अज्ञानांत अज्ञानामुळें दृष्टीस पडतें. ९ जसजसा शिंपीपणाचा लोप होतो तसतसा रुप्याचा भास वाढतो; किंवा दोरीचा लोप झाल्यावर सापाची प्रतीति येऊं लागते. ३१० त्याप्रमाणें, चंद्रसूर्यादिकांचें जें प्रखर तेज, तें ज्या स्वरूपाच्या अंधकारांत प्रकाशित होतें; ११ अशी जी वस्तु, ती अति तेजस्वी

१ पृथ्वी. २ मोह पाडणारें. ३ दारिद्र्य, दुष्काळ. ४ सू-र्याला. ५ प्रत्यक्ष. ६ जागें झाल्यावर. ७ पराजित केलें जात नाहींत. ८ असद्वस्तुरूप जल. ९ सद्रूपी दूध. १० सेवन करि-तात. ११ उदक. १२ सूर्य १३ किरणद्वारा. १४ पसरलें. १५ इच्छा. १६ पलीकडे. १७ उर्मी, क्षोभ, कढ. १८ सो-ळा कलांनीं तृप्त झाला. १९ न्यून असलेला. २० उकळी. २१ निरुपम. २२ हुत भक्षण करणारा जो ज्ञानाग्नि त्यांत. २३ सुवर्णांत. २४ नाश. २५ येथें. २६ उपडकोस याचे.

भूतात्मक सैरिसी । चंद्रसूर्यांच्या मानसीं । प्रकाशे जे १२ म्हणौनि चंद्रसूर्य
कडवसां[2] । पडती वस्तूच्या प्रकाशा । यालागीं तेज जें तेजसा[3] । तें वस्तूचें
आंग १३ आणि जयाच्या प्रकाशीं । जग हारपे चंद्रार्केंसीं । सचंद्र नक्षत्रें
जैसीं । दिनोदयीं १४ नातरी प्रबोधलिये[4] वेळे । ते स्वप्नींची डिंडीमा[5] मावळे ।
कां नुरेचि सांजवेळे । मृगतृष्णिका[6] १५ तैसा जिये वस्तूच्या ठायीं । कोण्हीच
कां आभासु नाहीं । तें माझें निजधाम पाहीं । पाटाचें[7] गा १६ पुढती जे तेथ
गेले । ते न घेतीच माघौतीं पाउलें । महोदधीं कां मिनले[9] । स्रोत[8] जैसे १७
कां लवणाची कुंजरी[10] । सूदलियां[11] लवणसागरीं । होयचि ना माघारी । परती
जैसी १८ नाना गेलिया अंतराळा । न येतीचि वन्हिज्वाळा । नाहीं तसैलो-[12]
हौनि जळा । निघणें जेवीं १९ तेवीं मजसीं एकवट । जे जाले ज्ञानें चोखट ।
तयां पुनरावृत्तीची वाट । मोडली गा २२० तेथ प्रज्ञापृथ्वीचा रावो । पार्थु
म्हणे जी जी पसावो[13] । परी विनंती एकी देवो । चित्त देतु २१ तरी देवेंसि
स्वयें एक होती । मग माघौते जे न येती । ते देवेंसि भिन्न आथी । कीं अभिन्न
जी २२ जरी भिन्नचि अनादिसिद्ध । तरी न येती हें असंबद्ध[14] । जे फुलां गेलें
षट्पद[15] । ते फुलेंचि होती कां २३ पैं लक्षांहुनि[16] अनारिसे[17] । बाण लक्षीं शिवोनि
जैसे । माघुते पडती तैसे । येतीचि ते २४ नातरी तूंचि ते स्वभावें । तरी कोण
कोणेंसि मिळावें । आपणयासी आपण रूपीवें । शस्त्रें केवीं २५ म्हणौनि तु-
जसी अभिन्नां जीवां । तुझा संयोगवियोगु देवा । नये बोलों अवयवां । शं-
रीरेंसीं २६ आणि सदां जे वेगळे तुजसीं । तयां मिळणीं[18] नाहीं कोणे दिवसीं ।
मा येती न येती हे कायसी । वायबुद्धि[20] २७ तरी कोण गा ते तूतें । पावोनि
न येती माघौते । हे विश्वतोमुखीं[21] मातें । बुझावीं[22] जी २८ इये आक्षेपीं अर्जु-
नाच्या । तो शिरोमणि सर्वज्ञांचा । तोषला बोध शिष्याचा । देखोनियां २९
मग म्हणे गा महामती । मातें पावोनि न येती पुढती । ते भिन्नाभिन्न रिती ।
आहाती दोनी २३० जैं विवेकें खोलें पाहिजे । तरी मी तेंचि ते सहजें ।
ना आहाचवाहाचि[23] तरी दुजे । ऐसेही गमती ३१ जैसे पाणियावरी[24] वेगळ ।
तळपतां[25] दिसती कल्लोळ[24] । एऱ्हवीं तरी निखिळ । पाणीचि तें ३२ कां सुवर्णा-
हुनि आनें । लेणीं[26] गमती भिन्नें । मग पाहिजे तंव सोनें । अघवेंचि तें ३३
तैसें ज्ञानाचिये दिठी । मजसीं अभिन्नचि ते किरीटी । येर भिन्नपण तें उठी ।

असून, सर्व भूतांना व्यापून चंद्र व सूर्य यांनाही प्रकाश देते. १२ म्हणून, या वस्तूच्या प्रकाशापुढें चंद्र व सूर्य यांच्या तेजाचा कवडसा पडतो, याकरितां, सर्व तेजस्वी वस्तूंस तेज देणारें असें या वस्तूचें (ब्रह्माचें) त्यास साह्य आहे. १३ ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर नक्षत्रांसह चंद्र निस्तेज होतो, त्याप्रमाणें या वस्तूचा (ज्ञानकालांत) प्रकाश झाला असतां चंद्रसूर्यांसह जगाचा लोप होतो. १४ किंवा जागें झाल्यावर स्वप्नांत भासलेला सर्व पसारा मावळतो अथवा संध्याकाळ झाल्यावर मृगजल आपोआप नाहींसें होतें, १५ त्याप्रमाणें, ज्या वस्तूचें ठिकाणीं कसलाच भास रहात नाहीं, तें माझें मुख्य स्थान होय. १६ त्या ठिकाणीं जे गेले, ते, ज्याप्रमाणें पाण्याचे ओघ समुद्रास मिळाल्यावर माघारे येत नाहींत, त्याप्रमाणें संसाराकडे माघारे येत नाहींत. १७ किंवा मिठाची तयार केलेली हत्तीण समुद्रांत बुडविल्यावर जशी माघारी येत नाहीं. १८ किंवा आकाशांत गेलेल्या अग्नीच्या ज्वाला जशा खालीं परतून येत नाहींत. किंवा तापलेल्या लोखंडावर टाकलेलें पाणी जसें नाहींसें होतें (माघारी येत नाहीं.), १९ तसें शुद्धज्ञान झाल्यामुळें जे माझें ऐक्य पावतात, ते पुनर्जन्मापासून मुक्त होतात. ३२० (येथपासून ३४२ ओंवीपर्यंतच्या ओंव्या पुढच्या श्लोकाचें अवतरण म्हणून महाराजांनीं दिल्या आहेत.) भगवंताचें असें बोलणें ऐकून बुद्धिरूप पृथ्वीचा राजा जो अर्जुन, तो म्हणाला, "प्रभो, आपला आज मजवर प्रसाद झाला आहे; परंतु एक माझी विनंती आहे, तिकडे लक्ष द्यावें. २१ जे देवांच्या स्वरूपांत जाऊन मिळाल्यावर माघारी येत नाहींत, ते पूर्वी देवाच्या स्वरूपापासून भिन्न होते, किंवा एकरूपच होते? २२ जर ते अनादिसिद्ध भिन्न असतील, तर ते माघारी येत नाहींत, हें म्हणणें असंभवनीय होय. कारण, असें पहा—भ्रमर फुलांतील मकरंद सेवन करण्यास गेलें असतां कधी फुलेंच होतात काय? २३ दुसरें असें पहा—लक्ष्याहून वेगळे असे जे बाण, ते सोडल्यावर ज्याप्रमाणें लक्ष्यास भेदून पुनः खालीं पडतातच, (ऐक्य पावत नाहींत,) त्याप्रमाणें ते परत येतातच, तुमच्या स्वरूपांत मिळाले असतांही माघारे येत नाहींत, हें म्हणणें शोभत नाहीं. २४ नाहीं तर, तुम्ही तेच ते असें जर वस्तुतः असेल, तर कोणी कोणास मिळावयाचें? असें पहा—शस्त्रानें शस्त्राचा (आपला स्वतांचा छेद) होतो काय? २५ म्हणून, देवा, तुमच्या स्वरूपाशीं ज्यांचें ऐक्य आहे, त्यांना तुमचा संयोग किंवा वियोग होतो, असें कसें म्हणतां येईल? अवयव आणि शरीर कधी एकमेकांपासून वेगळीं आहेत, असें म्हणतां येत नाहीं. २६ बरें, जे नेहमीं तुमच्या स्वरूपापासून भिन्न आहेत, ते केव्हांही तुमच्या स्वरूपांत ऐक्य पावावयाचे नाहींत; मग ते माघारी येतात किंवा येत नाहींत, हें व्यर्थ बोलणें तरी कशाला हवें? २७ तर, श्रीकृष्णा, ज्या तुम्हांला सर्वत्र मुखें आहेत, त्या तुमच्या स्वरूपांत मिळाल्यावर कोण माघारी येत नाहींत, ते मला नीट समजावून सांगा." २८ अर्जुनाची ही शंका ऐकून आपण सांगितलेलें त्याच्या मनांत पूर्णपणें बिंबलें, असें पाहून सर्वज्ञशिरोमणि भगवान् श्रीकृष्ण यांस संतोष वाटला. २९ मग भगवान् म्हणतातः—हे महामते अर्जुना, मला प्राप्त झाल्यानंतर जीव माघारे येत नाहींत, तेव्हां जीव माझ्याशीं भिन्न आहेत कीं अभिन्न आहेत, असा तुझा प्रश्न आहे. त्याचें उत्तर असें कीं, ते माझ्या स्वरूपाशीं अभिन्नही म्हणतां येतील व भिन्नही म्हणतां येतील. ३३० जर विचारदृष्टीनें पूर्ण लक्ष देऊन पाहिलें, तर माझें व त्यांचें स्वरूपांत स्वभावतःच ऐक्य असतें; आणि वरवर विचार करून पाहिलें तर ते माझ्यापासून भिन्न आहेत असेंही दिसतें. ३१ ज्याप्रमाणें पाणी हाललें असतां त्यावर येणाऱ्या लाटा पाण्यापासून वेगळ्या दिसतात, बाकी वस्तुतः तें निश्चळ पाणीच होय. ३२ किंवा सोन्याचे दागिने सोन्याहून भिन्न दिसतात; पण मग विचारपूर्वक पाहिलें असतां तें सर्व सोनेंच आहे; ३३ त्याप्रमाणें, हे किरीटी, ज्ञानदृष्टीनें पाहिलें

१ समान. २ कवडसा. ३ तेजवंतास. ४ जागृतीनंतर. ५ स्वारी. ६ मृगजळ. ७ मुख्य, अधिकाराचें. ८ मिळाले. ९ प्रवाह. १० हत्तीण. ११ घातली असतां. १२ तापलेल्या लोखंडापासून. १३ प्रसाद. १४ असंभवनीय. १५ भ्रमर. १६ निशाणाहून. १७ भिन्न. १८ सुपारें, भोसकावें. १९ ऐक्य. २० व्यर्थ बोलणें. २१ सर्वत्र मुखें आहेत ज्याला अशा श्रीकृष्णा. २२ समजून सांग. २३ बरवरच. २४ पाण्यावर दिसतात तेव्हां वेगळेपणा भासतो. २५ हाललें असतां. २६ अलंकार.

अज्ञानास्तव ३४ आणि साचोकारेंनि वस्तुविचारें । कैचें मज एकासि दुसरें ।
जें भिन्नाभिन्नव्यवहारें । उमसिजेल ३५ आघवेंचि आकाश सूनि पोटीं ।
बिंबाचि जैं आतें खोटी । तैं प्रतिबिंब कें उठी । कें रश्मि शिरे ३६ कां क-
ल्पांतींचिया पाणिया । काय वोतें भरिती धनंजया । म्हणौनि कैंचे अंश अ-
विक्रिया । एका मज ३७ परी ओघाचेनि मेळें । पाणी उंजू परी वांकुडें जालें ।
रवी दुजेपण आलें । तोयबगें ३८ व्योम चौफळें कीं वाटोळें । । हें ऐसें कै-
यिसयाही मिळे । परी घटमठीं वेंटोळें । तैसेंही आथी ३९ हां गा निद्रेचेनि
आधारें । काय एकलेनि जग न भरे । स्वप्नीचेनि जैं अवतरे । रायपणें ३४०
कां मिनलेनि[15] किडाळें । वानिभेदांसि ये सोळें[17] । तैसा स्वमायें वेंटाळें । शुद्ध
जैं मी ४१ तैं अज्ञान एक रूढे । तेणें कोहंविकल्पाचें मांडें । मग विवरूनि
कीजे फुडें । देहो[21] मी ऐसें ४२

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः । मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥

ऐसें शरीराचि येवढें । जैं आत्मज्ञान वेगळें पडे । तैं माझा अंशु आवडे ।
थोडेपणें ४३ समुद्र कां वायुवशें । तरंगाकार उल्हसे । तो समुद्रांशु ऐसा
दिसे । सौनिवा जेवीं ४४ तेवीं जडातें जीवविता । देह अहंता उपजविता ।
मी जीव गमें पंडुसुता । जीवलोकीं ४५ पैं जीवाचिया बोधा । गोचरु जो हा
धांदों । तो जीवलोकशब्दों । अभिप्रायो ४६ अगा उपजणें निमेणें । हें सौं-
चाचि जें कां मानणें । तो जीवलोकु मी म्हणें । संसारु हन ४७ ऐशेंविध जीव-
लोकीं । तूं मातें ऐसा अवलोकीं । जैसा चंद्रु कां उदकीं । उदकातीत ४८
पैं काश्मीरांचा रवा । कुंकुमावरी पांडवा । आणिका गमे लोहिवा । तो तरी
नव्हे ४९ तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न खंडे । परी कर्ता
भोक्ता ऐसें आवडे । ते जाण गा भ्रांती ३५० किंबहुना आत्मा चोखडु ।
होऊनि प्रकृतीसी एकवटु । बांधे प्रकृतिधर्मांचा पौटु । आपणपयां ५१ पैं
मनादि साही इंद्रियें । श्रोत्रादि प्रकृतिकार्यें । तियें माझीं म्हणौनि होये ।
व्यापारारूढ ५२ जैसें स्वप्नीं परिव्राजें । आपणपयां आपण कुटुंब होईजे ।
मग तयाचेनि धांविजे । मोहें सैरा ५३ तैसा आपलिया विस्मृती । आत्मा
आपणाचि प्रकृती- । सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ५४ मनाच्या
रथीं वळंघे । श्रवणाच्या द्वारें निघे । मग शब्दाचिया रिघे । रानामाजीं ५५

असतां ते मद्रूपच आहेत; एऱ्हवीं त्यांच्यांत व माझ्यांत जो भिन्नपणा वाटतो, तो अज्ञानामुळें; ३४ आणि वास्तविक परमात्मदृष्टीनें विचार केला तर भिन्नभिन्न प्रश्न उद्वेल इतकें द्वैत माझ्या ठिकाणीं कोठून येणार? ३५ सूर्यबिंबानें सर्व आकाश व्यापून पोटांत घातल्यावर त्याचें प्रतिबिंब कोठें दिसणार? व किरणें तरी कशावर पडतील? ३६ किंवा, अर्जुना, कल्पांतींच्या पाण्यानें सर्वच जलमय करून टाकल्यावर खाड्या भरल्या जातात असा व्यवहार होतो का? म्हणून अविक्रिय एकरस जो मी त्या मला अंश कोठून असणार? व ते भिन्न आहेत कीं, अभिन्न आहेत हा प्रश्न तरी कसा संभवणार? म्हणून जीव माझ्याशीं अभिन्नच आहेत. ३७ परंतु भिन्न दिसतात यांचें कारण, ओघाच्या अनुरोधानें जसें पाणी उजू असूनही वांकडें होतें, किंवा पाण्याच्या उपाधीनें जसा सूर्याच्या बिंबास त्याच्या प्रतिबिंबानें दुजेपणा येतो; ३८ आकाश हें चौकोनी किंवा वाटोळें आहे, हें कोणच्याही रीतीनें ठरवितां येणार नाहीं, परंतु तेंच घट व मठ यांच्या उपाधीनें तसेंही दिसतें. ३९ अरे हें पहा—निद्रेच्या उपाधीनें स्वप्नांत ज्या वेळीं मनुष्य राज्यपदावर आरूढ होतो, त्या वेळीं राजा, प्रजा इत्यादि सर्व जग त्या एकट्यानेंच व्याप्त होत नाहीं काय? ३४० किंवा सोळाच्या दराच्या उत्तम सोन्यांत किडाळ मिळविल्यावर तें कसास कमी उतरतें, त्याप्रमाणें शुद्धस्वरूप असा मी जेव्हां मायेनें परिवेष्टित होतों, तेव्हां माझे ठिकाणीं मायेच्या उपाधीनें जीव व ईश्वर हे भाव उत्पन्न होतात. ४१ त्या वेळीं एक अज्ञानच चहूंकडे रूढ होतें, आणि त्यायोगानें मी कोण असा विकल्प उत्पन्न होऊन देहच मी आहें, असा विचाराअंतींही निश्चय होतो. ४२

**अन्वयार्थ**—(जीवलोके)—या जीवलोकांत म्ह० संसारांत—(जीवभूतः)—कर्ता-भोक्ता म्हणून प्रसिद्ध असलेला—(मम एव)—माझाच—(सनातनः)—पुरातन—(अंशः)—[अस्ति]—अंश आहे.—[सः]—तो माझा जीवभूत अंश—(प्रकृतिस्थानि)—आपापल्या कर्णादि प्रकृतींत स्थित असलेल्या—(मनःषष्ठानि इंद्रियाणि)—मनासह सहा इंद्रियांना—(कर्षति)—आकर्षण करतो, ७

अशा प्रकारें आपल्या शरीरांत व्याप्त असणाऱ्या परमात्म्याच्या ठिकाणीं शरीरासहवर्तमान आत्मा आहे, असा निश्चय होतो तेव्हां जीव माझा अंश आहे, असें भासतें. ४३ वाऱ्यामुळें समुद्रावर लाटा उत्पन्न होतात, त्या जशा समुद्राचा एक लहानसा अंश असें दिसतें, ४४ त्याप्रमाणें, हे पांडुसुता, देहाचा अहंकार उत्पन्न झाल्यावर, त्या जड देहाचा जो चालक, तो या मृत्युलोकांत जीवरूपी मीच होय. ४५ त्याच जीवाच्या दृष्टीनें, जो हा अखंड व्यापार चालतो, त्याला जीवलोकसृष्टि असें म्हणतात. ४६ अरे, ज्या ठिकाणीं जन्म व मृत्यु हे खरे म्हणून मानले जातात, त्या ठिकाणाला मी जीवलोक किंवा संसार असें म्हणतों. ४७ अशा प्रकारच्या या जीवलोकांत, ज्याप्रमाणें चंद्र हा पाण्यापासून वेगळा असतांही पाण्यांत प्रतिबिंब पडल्यावर त्यांत आहे असा भासतो, त्याप्रमाणें मी आहें असें समज. ४८ अर्जुना, स्फटिकमणि कुंकुमावर ठेविला असतां तो पहाणाराला तांबडा दिसतो, तथापि तो कांहीं तांबडा नव्हे; ४९ त्याप्रमाणें, माझें अनादिपण मोडत नाहीं, आणि अक्रियत्वही भंगत नाहीं; तथापि मला कर्ता, भोक्ता असें जें म्हणतात, ती केवळ त्यांची भ्रांती आहे, असें समज. ३५० किंबहुना, शुद्ध असा हा आत्मा प्रकृतीशीं ऐक्य पावून, प्रकृतीचे उपाधीनें तिच्या धर्मओघांत आपल्याला बांधून घेतो. ५१ मग मन व श्रोत्रादि पांच इंद्रियें हीं माझीं आहेत असें म्हणून, व्यापार करावयांस लागतो. ५२ ज्याप्रमाणें स्वप्नांत संन्याशानें आपणच आपलें कुटुंब बनून संसार थाटावा; व त्याच्या मोहानें सैरावैरा धांवावें, ( संसारांतील सुखदुःख भोगावें.) ५३ त्याप्रमाणें आपली विस्मृति झाल्यावर, आत्मा हा आपलें स्वरूपही तिजसारखेंच आहे असें मानून तिच्या अनुरोधानें तिचेंच कार्य करतो; ५४ मनरूपी रथावर बसून श्रवणाच्या द्वारानें बाहेर निघून शब्दरूपी रानांत संचार करतो; ५५ तोच प्रकृतीचा लगाम हातांत

१ खरें पाहिलें असतां. २ मायेच्या उपाधीनें. ३ उद्भविेल. ४ घालून, जिरवून. ५ होतें. ६ गोळा. ७ लहान प्रवाह, ओहोटी. ८ भेदाभेद. ९ विकार न पावणाराला. १० सरळ. ११ पाण्याच्या संबंधानें, योगें. १२ चतुष्कोण. १३ कशानें. १४ उपाधियुक्त होतें. १५ हिणकट, मिश्रित झालें असतां. १६ भिन्न कसोटीस. १७ सोळांच्या दराचें सोनें, उत्तम सोनें. १८ उत्पन्न होतें. १९ उत्पन्न होतें. २० स्पष्ट. २१ देहच मी असें. २२ लहान. २३ वाटूं लागतो. २४ व्यापार. २५ सृष्टि. २६ मरणें. २७ खरें. २८ या प्रकारें. २९ स्फटिकाचा. ३० मणि. ३१ तांबडा. ३२ वाटे. ३३ आपल्या स्वतःवर प्रकृतीचा अंमल बसवून घेतो. ३४ अधिकार. ३५ प्रकृतीपाधन झालेलो. ३६ संन्याशानें, ३७ चोहोंकडे. ३८ चढतो, बसतो.

तोंचि प्रकृतीचा वागोरा[1] । करी त्वचेचिया मोहरां[2] । आणि स्पर्शाचिया घोरा। वना जाय ५६ कोणे एके अवसरीं । रिघोनि नेत्राच्या द्वारीं । मग रूपाच्या डोंगरीं । सैरा हिंडे ५७ कां रसनेचिया वाटा । निघोनि गा सुभटा । रसाचा दरकुटा[3] । भरोंचि लागे ५८ नातरी येणेंचि घ्राणें । जैं देहांशु करी निघणें। मग गंधाचीं दारुणें । आडवें लंघी ५९ ऐसेनि देहेंद्रियनायकें[6] । धरूनि मन जवळिकें । भोगिजती शब्दादिकें । विषयभरणें ३६०

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः । गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥

परी कर्ता भोक्ता ऐसें । हें जीवाचें तैंचि दिसे । जैं शरीरीं कां पैसे । येकाधिये ६१ जैसा आथिला आणि विलासिया । तैंचि वोळखों ये धनंजया । जैं राजसेव्या ठायां । वस्तीसि ये ६२ तैसा अहंकर्तृत्वाचा वांढु[11] । कां विषयेंद्रियांचा धुमोंडु[12] । हा जाणिजे तैं निवाडु[13] । जैं देह पाविजे ६३ अथवा शरीरातें सांडी । तऱ्ही इंद्रियांची तांडी[14] । हे आपणपयांसवें जोडी[15] । घेऊनि जाय ६४ जैसा अपमानिला अतिथी । ने सुकृताची संपत्ति । कां साईखडे[16] याची गती । सूत्रतंतू ६५ ना ना मावळतोनि तपनें[17] । नेइजती लोकांचीं दर्शनें । हें असो द्रुती[18] पवनें । नेईजे जैसी ६६ तेवीं मनःषष्ठां[19] ययां । इंद्रियांतें धनंजया । देहराजु[20] ने देहा- । पासूनि गेला ६७

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च । अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

मग येथ अथवा स्वर्गीं । जेथ जें देह आंपंगी[21] । तेथ तैसेंचि पुढती पांगी[22] । मनादिक ६८ जैसा मालवलिया दिवा । प्रभेसि जाय पांडवा । मग उजळिजे[23] तेथ तेधवां । तैसाचि फांके[24] ६९ तरी ऐसैसिया राहाटी । अविवेकियांचे दिठी । येतुलें हें किरीटी । गमेचि गा ३७० जे आत्मा देहासि आला । आणि विषयो येणेंचि भोगिला । अथवा देहोनि[25] गेला । हें साचचि मानिती ७१ एऱ्हवीं येणें आणि जाणें । का करणें हन भोगणें । हें प्रकृतीचें तेणें । मानियेलें ७२

उत्क्रामंतं स्थितं वाऽपि भुंजानं वा गुणान्वितम् । विमूढा नानुपश्यंति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥१०॥
यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् । यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥

परी देहाचें मोटकें[26] उभें[27] । आणि चेतना तेथ उपलभे[28] । तिये चळवळेचेनि लोभें[29] । आला म्हणती ७३ तैसेंचि तयां संगती । इंद्रियें आपलाला अर्थीं वर्तती । तया नांव सुभद्रापती । भोगणें जया ७४ पाठीं भोगक्षीण आपैसें । देह गेलिया ते[30] न दिसे । तेथें गेला गेला ऐसें । बोभाती[31] गा ७५ पैं रुखुं[32] डोलतु देखावा ।

घरून त्वचेच्या द्वारानें स्पर्शरूपी घोर वनांत जातो; ५६ एकाद्या वेळेस नेत्राच्या द्वारानें बाहेर पडून रूपविषयाच्या डोंगरावर स्वच्छंदानें हिंडतो; ५७ किंवा हे सुभटा, जिव्हेच्या द्वारानें बाहेर पडून रसाच्या गुहेंत हिंडतो; ५८ किंवा, माझा अंश जो हा जीव, तो नाकाच्या द्वारानें बाहेर पडून सुगंधाच्या अरण्यांत हिंडतो. ५९ याप्रमाणें देह व इंद्रियें यांचा नायक जें मन, तें आपलेंसें करून घेऊन, पंचेंद्रियांचे विषय जे शब्दादिक, त्यांचा उपभोग घेतो. ३६०

**अन्वयार्थ**—(यत् च अपि)–आणि ज्या वेळीं–(ईश्वरः)–तो ईश्वर–(उत्क्रामति)–शरीर सोडून जातो व–(यत्)–जेव्हां –(शरीरं)–शरीराला––(अवाप्नोति)–प्राप्त होतो–(तदा)–त्यावेळीं–(एतानि)–या मनासह सहा इंद्रियांना–(गृहीत्वा)–घेऊन–(वायुः)–वारा–(आशयात्)–पुष्पादिकांपासून–(गंधान् इव)–गंधांना घेऊन जसा जातो तसा [तो]–(संयाति)–जातो.८

पण जीवाचें कर्तृत्व किंवा भोक्तृत्व तेव्हांच दृष्टीस पडतें की, जेव्हां तो एकाद्या शरीरांत प्रवेश करितो. ६१ ज्याप्रमाणें एकाद्या संपन्न व विलासी पुरुषाचें ऐश्वर्य तेव्हांच दृष्टीस पडतें, की, जेव्हां तो एकाद्या राजवाड्यांत रहावयास येतो, ६२ त्याचप्रमाणें ज्या वेळेस जीव देह धारण करितो, त्या वेळेसच जीवाची अहंकाराची वाढ किंवा विषयेंद्रियांची धामधूम दिसण्यांत येते. ६३ अथवा शरीर जर टाकलें, तर जीव आपल्याबरोबर नेहमी असणारें मन व इंद्रियांचा तांडा ही आपली संपत्ति घेऊन जातो. ६४ ज्याप्रमाणें अतिथि भोजनास आला असतां त्याचा अपमान करून त्यास माघारा लावल्यावर तो यजमानाचें पुण्य घेऊन जातो, किंवा दोऱ्या काढून घेतल्यावर कळसूत्री बाहुल्यांची गति नाहींशी होते; ६५ अथवा सूर्य मावळला असतां तो लोकांची दृष्टि आपल्या बरोबर घेऊन जातो. फार काय सांगावें! वारा ज्याप्रमाणें आपल्या बरोबर पुष्पांतील सुवास घेऊन जातो, ६६ त्याप्रमाणें, हे धनंजया जीव देहाला सोडून गेला म्हणजे आपल्याबरोबर पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन यांना घेऊन जातो. ६७

**अन्वयार्थ**—(अयं)-हा जीव–(श्रोत्रं)–ऐकण्याचें साधन, –(चक्षुः)–पाहण्याचें साधन,–(स्पर्शनं)–स्पर्श जाणण्याचें साधन,–(रसनं)–रस चाखण्याचें साधन,–(च)–आणि––(घ्राणं एव च)–वास घेण्याचें साधन–(मनः च अधिष्ठाय)–आणि त्या पांची इंद्रियांशीं संबद्ध होणारें मन, यांचा अधिष्ठाता होऊन–(विषयान्)–शब्दादि विषयांचें–(उपसेवते)-सेवन करतो–उपभोग घेतो. ९

मग एथें अथवा स्वर्गलोकांत–ज्या ज्या ठिकाणीं जो जो देह धारण करील, त्या त्या ठिकाणीं मनादिक सहा इंद्रियांचा पुनः पसारा घालतो. ६८ अर्जुना, दिवा मालवल्यावर जसा आपल्या तेजासह नाहींसा होतो, तसाच तो फिरून लावल्यावर आपल्या तेजासह फांकतो; ६९ तर अर्जुना, अशा प्रकारच्या व्यवहारांत अज्ञान्याचे दृष्टीला पुढें सांगितल्याप्रमाणें वाटूं लागतें. ३७० आत्माच या देहामध्यें आला, आणि यानेंच विषयांचा उपभोग घेतला, अथवा तोच हा देह सोडून गेला, हेंच खरें असें मानितात. ७१ एव्हवीं जन्म घेणें अथवा मरणें, किंवा क्रिया करणें अथवा विषयांचा उपभोग घेणें, हें वास्तविक प्रकृतीचे धर्म असून त्यांनीं हें आत्म्याचे मानिले आहेत. ७२

**अन्वयार्थ**—(उत्क्रामन्तं)–देहांतून निघून जाणाऱ्या –(अपि वा)–किंवा–(स्थितं)–देहांत असलेल्या–(भुंजानं)–शब्दादि विषयांचा उपभोग घेणाऱ्या–(वा)–किंवा–(गुणान्वितं) –सुखदुःख–मोहसंज्ञक गुणांनीं युक्त असलेल्या या जीवाला–(विमूढाः)–नानाप्रकारें मूढ झालेले जन–(न अनुपश्यन्ति)–पहात नाहींत.–(ज्ञानचक्षुषः)–ज्ञानदृष्टि जन–(पश्यन्ति)–पाहतात–(यतन्तः)–यत्न करणारे–(योगिनः च)–योगी–(एनं)–याला–(आत्मनि)–बुद्धींत–(अवस्थितं)–असलेला–(पश्यन्ति)–पहातात पण–(यतन्तः अपि)–यत्न करणारेहि–(अकृतात्मानः)–असंस्कृत चित्त–(अचेतसः)–अविवेकी पुरुष–(एनं)-या आत्म्याला –(न पश्यन्ति)–पहात नाहींत.–१०–११

परंतु देह उत्पन्न होऊन त्यांत चलनवलन दिसलें कीं, त्यावरून आत्मा आला असें म्हणतात. ७३ त्याचप्रमाणें, हे सुभद्रापते, त्याच्या संगतीनें इंद्रियें आपआपले विषय सेवीत असतां जीव उपभोग घेतो असें म्हणतात. ७४ अरे, शरीर क्षीण होऊन भोग घेणें आपोआप राहिल्यावर देह पडून नाहींसा झाला म्हणजे जीव गेला असा बोभाट करतात. ७५ हे पांडवा, झाड हालत असलें म्हणजेच

१ बाहेर, लगाम. २ मार्गानें. ३ दरी, गुहा. ४ माझा अंश, जीव. ५ अरण्यें. ६ जीवानें. ७ विषयरूपी निर्वाह, साधनें. ८ प्रवेशतो. ९ संपन्न. १० स्थानीं, नगरांत. ११ आधिक्य, वृद्धि. १२ धामधूम, धुमाळी. १३ निवाडा, निकाल. १४ समुदाय. १५ संपत्ति ऐश्वर्य. १६ कळसूत्री बाहुलीची. १७ सर्वांनें. १८ सुवास. १९ मन आहे साहावें ज्याला अशा पांच ज्ञानेंद्रियांतें. २० जीव. २१ आश्रय करी, स्वीकारी. २२ विस्तारी. २३ लावावा. २४ प्रकाशे. २५ देहांतून. २६ लहान गाठोडें. २७ तयार झालेलें. २८ मिळते, उत्पन्न होतें. २९ योगानें. ३० चेतना. ३१ ओरडतात, म्हणतात. ३२ वृक्ष.

तरी वारा वाजतु मानावा । रुखु नसे तेथें पांडवा । नाहीं तो गा ७६ कां आरसा समोर ठेविजे । आणि आपणपें तेथ देखिजे । तरी तेथवांचि जालें मानिजे । काय आधीं नाहीं ७७ कां परता केलिया आरिसा । लोपु जाला तया आभासा । तरी आपणपें नाहीं ऐसा । निश्चयो करावा ७८ शब्द तरी आकाशाचा । परी कपाळीं पिटे मेघाचा । कां चंद्रीं वेगु अभ्राचा । आरोपिजे ७९ तैसें होईजे जाइजे देहें । तें आत्मसत्ते अविक्रिये । निष्टंकितीं गा मोहें । आंधळे ते ३८० येथ आत्मा आत्मयाच्या ठायीं । देखिजे देहींचा धर्मु देहीं । ऐसे देखणें ते पाहीं । आन आहाती ८१ ज्ञानें कां जयाचे डोळे । देखोनि न राहाती देहींचे खोळे । सूर्यरश्मी आणियाळे । ग्रीष्मीं जैसे ८२ तैसी विवेकाचेनि पैसें । जयांची स्फूर्ती स्वरूपीं बैसे । ते ज्ञानिये देखती ऐसें । आत्मयातें ८३ जैसें तारांगणीं भरलें । गगन समुद्रीं बिंबलें । परी तें तुटोनि नाहीं पडिलें । ऐसें निवडे ८४ गगन गगनींचि आहे । हें आभासे तें वांये । तैसा आत्मा देखती देहें । गंवसिलाही ८५ खळाळाच्या लगबेगी । फेडूंनि खळाळाच्या भोगीं । देखिजे चंद्रिका कां उगी । चंद्रीं जेवीं ८६ कां नाडेरचि भरे शोषे । सूर्यु तो जैसा तैसाचि असे । देह होतां जातां तैसें । देखती मातें ८७ घटु मठु घडले । तेचि पाठीं मोडले । परी आकाश तें संचलें । असतचि असे ८८ तैसें अखंडे आत्मसत्ते । अज्ञानदृष्टि कल्पितें । हें देहचि होतें जातें । जाणती फुडें ८९ चैतन्य चढे ना वोहटे । चेष्टवी ना चेष्टे । ऐसें आत्मज्ञानें चोखटें । जाणती ते ३९० आणि ज्ञानही आंपैतें होईल । प्रज्ञा परमाणुही उगोणा देईल । सकळ शास्त्रांचें येईल । सर्वस्व हातां ९१ परी ते व्युत्पत्ती ऐसी । जरी विरक्ती न रिगे मानसीं । तरी सर्वात्मका मजसीं । नव्हेचि भेटी ९२ पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतःकरणीं विषयांसी थारा । तरी नातुडें धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ९३ हां गा वोसणंतयाच्या ग्रंथीं । काइ तुटती संसारगुंती । कीं परिवसलिया पोथी । वाचिली होय ९४ नाना बांधोनियां डोळे । घ्राणीं लाविजती मुक्ताफळें । तरी तयांचें काय कळे । मोल मान ९५ तैसा चित्तीं अहंते ठावो । आणि जिभे सकळशास्त्रांचा सरावो । ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परी न पविजे मातें ९६ जो एक मी कां समस्तीं । व्यापकु असें भूतजातीं । ऐक तिये व्यासी । रूप करूं ९७

वारा वाहतो आहे असें समजावें, आणि ज्या ठिकाणीं वृक्षच नाहीं, त्या ठिकाणीं वारा मुळींच नाही, असें समजावें का ? ७६ किंवा आरसा समोर ठेवून आपलें रूप त्यांत दिसेल, तेव्हांच आपण आहोंत आणि त्याच्या आधीं नव्हतों का ? ७७ अथवा तो आरसा बाजूस केल्यावर आपल्या रूपाचा लोप झाला, म्हणून आपण या जगांतून नाहींसें झालों असा निश्चय करावा का ? तर, होणें जाणें हें आरशांतल्या प्रतिबिंबाचें आहे, आपलें नाहीं. ७८ आकाशांत होणारा गडगडाट हा जरी खरोखरी आकाशापासूनच होतो, तरी तो मेघांपासून होतो, असा लोक त्याच्यावर आरोप करतात; अथवा ढग वेगानें इकडून तिकडे जाऊं लागले, म्हणजे त्यांतून दिसणारा चंद्र जरी स्थिर आहे, तरी तोच वेगानें धांवतो आहे, असा लोक आरोप करतात; ७९ त्याप्रमाणें, मोहानें अंधळे झालेले ते लोक, देह उत्पन्न होतो किंवा नाहींसा होतो, म्हणजे अविक्रिय असा आत्माच उत्पन्न होतो, किंवा नाहींसा होतो, असा निश्चय करतात. ३८० या व्यवहारांत आत्मा आत्मपणानें असून, कर्तृत्व भोक्तृत्व धर्म देहाचेच आहेत, असें पहाणारे विचारवान् निराळे आहेत. ८१ देह हा जीवाची रहाण्याची पिशवी आहे, असें ज्ञानाच्या प्रकाशानें पाहून, ज्यांचे डोळे त्यांत गुंतत नाहींत; ज्याप्रमाणें ग्रीष्म ऋतूंत पुष्कळ ढग आले तरी त्यांतून सूर्याचे किरण बाहेर आल्याशिवाय रहात नाहींत, ८२ त्याप्रमाणें, ज्ञानाच्या प्रभेनें ज्यांची स्फूर्ति स्वरूपाच्या ठिकाणापर्यंत पोहोंचली आहे, ते ज्ञानी, आत्मा हा अकर्ता आहे, असें मानतात. ८३ ज्याप्रमाणें नक्षत्रांनीं भरलेलें आकाश प्रतिबिंब पडल्यावर समुद्रांत दिसलें, म्हणून तें वरून गळून खालीं पडलें नाहीं, हें खचीत आहे. ८४ आकाश आकाशाचे जागीं आहे; व जें समुद्रांत दिसतें, तें प्रतिबिंब खोटें आहे; त्याप्रमाणें, आत्मा देहांत कर्ता-भोक्ता दिसला, तरी अकर्तृत्वरूपानेंच आहे. ८५ खळाळाची लगबग खळाळाच्या ठिकाणींच ठेवून त्यासंबंधानें चंद्राच्या ठिकाणीं चांचल्य दिसलें, तरी चंद्र जसा स्थिर असतो, ८६ किंवा डबक्यांत पाणी सांचल्यावर त्यांत सूर्य दिसतो, व तेंच पाणी आटल्यावर तो दिसत नाहीं; परंतु सूर्य पाहूं गेलें असतां आपले ठिकाणींच असतो; त्याप्रमाणें, देह उत्पन्न झाल्यावर व नाहींसा झाल्यावर, मी उत्पन्न होत नाहीं, व मरतही नाहीं, मी अविनाशच आहें, अशा दृष्टीनें जे मला पहातात, ८७ मातीचे घट अथवा मठ तयार करून पुनः जरी मोडून टाकले, तरी त्या घटमठांत दिसणारें आकाश, हें जसेंच्या तसेंच कायम असतें; ८८ त्याप्रमाणें, अखंड जी आत्मसत्ता, त्या सत्तेच्या आधारावर, अज्ञानदृष्टीनें कल्पित देह होतात व जातात, असें स्पष्ट समजतात. ८९ आत्मा हा वाढत नाहीं व ओहोटीही पावत नाहीं, चेष्टा करवीतही नाहीं, वा करीतही नाहीं, हें ज्यांना यथार्थ आत्मज्ञान झालें आहे तेच जाणतात; ३९० आणि ज्ञान प्राप्त होईल, बुद्धि परमाणूंचाही झाडा घेईल व ती सकल शास्त्रांत निपुण होईल; ९१ परंतु इतका शास्त्रसंपन्न होऊनही जर त्या मनुष्याच्या मनांत वैराग्याचा लेश नसला, तर सर्वव्यापक असा जो मी, त्या माझी भेट त्याला होणार नाहीं. ९२ त्याचप्रमाणें, सर्व शास्त्रें जरी मुखोद्गत असलीं, आणि अंतःकरणांत जर विषयांचें चिंतन असलें, तर अर्जुना, खचीत खचीत त्याला माझी प्राप्ती व्हावयाची नाहीं ! ९३ अरे, असें पहा—स्वप्नांत सर्व ग्रंथ जरी मुखोद्गत झाले, तरी त्या योगानें संसारांतून मुक्त होतां येईल का ? किंवा घरांत असलेले वडिलोपार्जित ग्रंथ रक्षण करून ठेवल्यानें ते वाचले असें म्हणतां येईल का ? ९४ अथवा डोळे बांधून मोतीं जर नाकास लावलीं तर त्यांचें पाणी व किंमत कळेल का ? ९५ त्याचप्रमाणें चित्तांत अभिमान बाळगून तोंडानें सर्व शास्त्रें जरी पाठ म्हटलीं, आणि असे कोटय़वधि जन्म गेले, तरी त्यास माझी प्राप्ती होणार नाहीं. ९६ जो मी एकच असून प्राणिमात्रांत व्यापून राहिलों आहें, त्या माझी व्याप्ति कशी आहे, तें तुला स्पष्ट करून सांगतों, ऐक. ९७

१ मस्तकीं ठेवला जातो, आरोपिला जातो. २ निश्चित करतात. ३ पाहणारे. ४ पिशवींत. ५ प्रखर, तीव्र. ६ विस्तारानें, प्रकाशानें. ७ व्यर्थ. ८ असलेला, सांपडलेला. ९ वेग, गडबड. १० लपून, मार्गी मारून. ११ डबकें, थिल्लर. १२ स्पष्ट. १३ मठ. १४ यथार्थ. १५ प्राप्त. १६ झाडा. १७ स्वप्नांत बोलणाऱ्याच्या. १८ स्पर्श केल्यानें. १९ मोतीं. २० अभ्यास. २१ कोटय़वधि. २२ स्पष्ट करून.

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् । यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥

तरी सूर्यासकट आघवी । हे विश्वरचना जे दावी । ते दीप्ति माझी जा-
णावी । आद्यंतीं आहे ९८ जल शोषूनि गेलिया सविता । ओलांश पुरवीतसे
जे माघौता । ते चंद्रीं पंडुसुता ॥ ज्योत्स्ना माझी ९९ आणि दहन-पाचन-
सिद्धी । करीतसे जे निरवधी । ते हुताशीं तेजोवृद्धी । माझीचि गा ४००

गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा । पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥१३॥

मी रिगालों असें भूतळीं । म्हणौनि समुद्र महाजळीं । हे पांसूची ढेंपुळी ।
विरेचिना १ आणि भूतेंही चराचरें । हे धरितसे जिये अपारें । तियें मीचि
धरी धेंरे । रिगोनियां २ गगनीं मी पंडुसुता । चंद्राचेनि मिसें अमृता। भरला
जालों चालता । सरोवरु ३ तेथूनि फांकती रश्मिकर । ते पोंट पेलूनि अपार ।
सर्वौषधींचे आगर । भरित असें मी ४ ऐसेनि सस्यादिकां सकळां । करी धा-
न्यजाती सुकाळा । दें अन्नद्वारा जिव्हाळा । भूतजातां ५ आणि निपजविलें
अन्न । तरी तैसें कैंचें दीपन । जेणें जिरूनि समाधान । भोगिती जीव ६

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः । प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधं ॥ १४ ॥

म्हणौनि प्राणिजातांच्या घटीं । करूनि कंदांवरी आगिठी । दीप्ति जठरींही
किरीटी । मीचि जालों ७ प्राणापानाच्या जोडभातीं । फुंकफुंकोनियां अहो-
राती । आटीतसें नेणों किती । उदरामाजीं ८ शुष्कें अथवा स्निग्धें । सुपक्कें
कां विदग्धें । परी मीचि गा चतुर्विधें । अन्नें पचीं ९ एवं मीचि आघवें जन ।
जना निरवितें[14] मीचि जीवन । जीवनीं मुख्य साधन । वन्हिही मीची ४१०
आतां ऐसियाहीवरी काई । सांगों व्यापतीची नवाई । येथ दुजें नाहींचि घेईं ।
सर्वत्र मी गा ११ तरी कैसेंनि पां वेखें ।सदा सुखियें एकें। एकें तियें बहुदुःखें।
क्रांत भूतें १२ जैसी सगळिये पोंटणीं । एकेचि दीपें दिवेलावणी । जालिया
कां न[20] देखणी । उरलीं एकें १३ ऐसी हन उखिविखी[21] । करित आहासी मा-
नसीं कीं । तरी परिस तेही निकी । शंका फेडूं १४ पैं आघवा मीचि असे ।
येथ नाहीं कीर अनारिसें[22] । परी प्राणियांचिया उल्हासें[23] । बुद्धी[24] ऐसा १५ जैसें
एकचि आकाशध्वनी । वाद्यविशेषीं आनानीं । वाजावें पडे भिन्नीं । नादांतरीं
१६ कां लोकचेष्टीं वेगळाला । जो हा एकुचि भानु उदैला । तो आनानी
परी गेला । उपयोगासी १७ नाना बीजधर्मानुरूप । झाडीं उपजविलें आंप ।

**अन्वयार्थ**—(यत्)–जें–(आदित्यगतं)–आदित्यांतील–(तेजः)–तेज–(अखिलं जगत्)–सर्व जगाला–(भासयते)–प्रकाशित करतें–(यत्)–जें–(चंद्रमसि)–चंद्रामध्यें–(यत् च अग्नौ)–व जें अग्नींत तेज आहे–(तत्)–तें–(तेजः)–तेज–(मामकं)–माझें आहे असें–(विद्धि)–जाण १२

तर ज्या सूर्याच्या तेजानें सर्व विश्वरचना दृष्टीस पडते, तें तेज सूर्यासकट माझें आहे, असें जाण. ९८ हे पांडुसुता, सूर्याच्या तेजानें पाणी शोषण करून घेतल्यावर पुनः पृथ्वीस जो ओलावा येतो, तो आणणारी जी चंद्राचे ठिकाणाची प्रभा, ती माझी होय. ९९ आणि दहन करणें किंवा पाचन करणें, ही जी अग्नीचे ठिकाणी असलेली अमर्याद तेजोवृद्धि ती माझीच आहे. ४००

**अन्वयार्थ**—(अहं)–मी–(गां)–पृथ्वींत–(आविश्य)–प्रवेश करून–(ओजसा)–बलानें–स्वसामर्थ्यानें–(भूतानि)–सर्व प्राण्यांना–(धारयामि)–धारण करतों.–(च)–त्याचप्रमाणें मी–(रसात्मकः)–रसरूप–(सोमः)–चंद्र–(भूत्वा)–होऊन–(सर्वाः ओषधीः)–सर्व ओषधींना–(पुष्णामि)–पोसतों. १३

मी पृथ्वीमध्यें शिरून तिला आधारभूत झालों आहे, म्हणूनच, ही जरी रजःकणांची बनलेली मोठी ढेप आहे, तरी समुद्राच्या अपार पाण्यांत असूनही विरघळून जात नाही; १ आणि ही आपल्या पृष्ठभागावर अपरिमित चराचर भूतें धारण करते, तीं भूतेंही मीच तिच्यामध्यें शिरून धारण करतों. २ हे पांडुसुता, मी आकाशांत चंद्राच्या रूपानें जणुंकाय अमृताचें चालतें सरोवरच झालों आहे, ३ आणि तेथून चंद्राच्या किरणरूपी ओघानें सर्व वनस्पतींचें पोषणही मीच करतों. ४ अशा प्रकारें सर्व धान्यादिकांचें पोषण करून व नानाप्रकारच्या सर्व धान्यांची समृद्धि करून अन्नद्वारा प्राणिमात्राचें रक्षण मीच करतों. ५ आणि अन्न जरी उत्पन्न केलें तरी प्राणिमात्रास तें असें कसें पचेल, कीं ज्याच्या योगानें जीवास समाधान होईल. ६

**अन्वयार्थ**–(अहं)–मी–(प्राणिनां)–प्राण्यांच्या–(देहं)–देहाचा–(आश्रितः)–आश्रय केलेला–(वैश्वानरः)–जाठर अग्नि–(भूत्वा)–होऊन–(प्राणापानसमायुक्तः)–प्राण व अपान यांनीं युक्त होत्साता–(चतुर्विधं)–चार प्रकारचें–(अन्नं)–अन्न–(पचामि)–पचवितों. १४

म्हणून अर्जुना, प्राणिमात्राच्या शरीरांत नाभिकंदावर शेगडी पेटवून जठरामध्यें मीच प्रदीप्त झालों! ७ प्राण व अपान या वायूंच्या जोडभात्याच्या वाऱ्यानें रात्रंदिवस तो जठराग्नि पेटून या उदरांत किती अन्नाचा फन्ना करतो याचा पत्ता नाहीं! ८ कोरडें, स्निग्ध, शिजलेलें व कच्चें अशा चतुर्विध अन्नाचें पचनही मीच करतों. ९ अशा प्रकारें सर्व जग मी, जगाचा निर्वाह ज्यावर होतो तें धान्य मी, व जीवनाचें मुख्य साधन जो जठराग्नि तोहि मीच आहें. ४१० आतां यापेक्षां माझ्या व्यापकपणाचें नवल तुला काय सांगूं! तर तूं हें पक्कें लक्षांत ठेव कीं, या जगांत द्वैत नाहींच; सर्वत्र मीच भरलेला आहें. ११ तर मग, "या जगांत कांहीं प्राणी सर्वदा सुखी असे दिसतात; व कांहीं दुःखानें अगदीं व्याप्त झालेले दिसतात, ते कशानें?" १२ जसें एखाद्या शहरांत एकाच दिव्यानें सर्व दिवे लावले तर त्यांपैकीं कांहीं दिवे प्रकाश करतात व कांहीं करीत नाहींत, असें कसें होईल? १३ अशा प्रकारचे तर्कवितर्क जर तूं आपल्या मनांत करीत बसला असशील, तर त्यांचेंही चांगलें निवारण करतों, ऐक. १४ हें पहा–सर्वत्र मी भरलेला आहें ही गोष्ट तर अगदी निर्विवाद आहे; परंतु प्राण्यांच्या बुद्धिसारखा मी त्यांस भासतों. १५ ज्याप्रमाणें एकाच आकाशध्वनीचे निरनिराळ्या वाद्यांच्या अनुरोधानें निरनिराळे नाद ऐकूं येतात; १६ किंवा सूर्य एकच आहे, पण तो उगवल्यावर लोकांच्या व्यापारांस निरनिराळ्या प्रकारें उपयोगी पडतो, १७ अथवा पाणी एकच असून, बीजांच्या निरनिराळ्या धर्माप्रमाणें झाडांमध्यें उत्पन्न होतें, (निरनिराळें

१ प्रकाश. २ उजेड, कांति. ३ माजणें. ४ अमर्याद. ५ अग्नींत. ६ रजःकणांची ढेप, पृथ्वी. ७ पृथ्वींत, जमिनींत. ८ ओघ करून. ९ धान्यादिकाला. १० नाभिस्थानावर. ११ शेगडी. १२ पचवितो. १३ कच्चें. १४ निश्चायक. १५ व्यापकपणाची अपूर्वता. १६ वेगानें. १७ व्याप्त. १८ नगरांत. १९ एकाच दिव्यानें. २० न पाहणारी. २१ तर्कवितर्क, वादावाद. २२ वेगळें. २३ कल्पनेनें. २४ बुद्धिसारखा. २५ निरनिराळ्या, भिन्नभिन्न. २६ उदक.

तैसें परिणमलें स्वरूप । माझें जीवां १८ अगा नेणों आणि चतुरा । पुढां नि-
ळयांचा दुसरा । नेणा सर्पत्वें जाला येरा । सुखालागीं १९ हें असो स्वातीचें उदक
शुक्तीं मोतीं व्याळीं विख । तैसा सज्ञानांसी मी सुख । दुःख तों अज्ञानांसी २०

सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥

एऱ्हवीं सर्वांच्या हृदयदेशीं । मी अमुका आहें ऐसी । जे बुद्धि स्फुरे अह-
र्निशीं । ते वस्तु गा मी २१ परी संतांसवें वसतां । योगज्ञानीं पैसतां । गुरुचरण
उपासितां । वैराग्येंसीं २२ येणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे । जयांचें अहं
विश्रामे । आत्मरूपीं २३ ते आपेआप देखोनि देखीं । मियां आत्मेनि सदा
सुखी । येथें मीवांचून अवलोकीं । आन हेतु असे २४ अगा सूर्योदयो
जालिया । सूर्यें सूर्यचि पहावा धनंजया । तेवीं मातें मियां जाणावया । मीचि
हेतु २५ ना शरीरपरातें सेवितां । संसारगौरवचि ऐकतां । देहीं जयांची
हंता । बुडोनि ठेली २६ ते स्वर्गसंसारालागीं । धांवतां कर्ममार्गीं । दुःखाच्या
सेलभागीं । विभागी होती २७ परी हेंही होणें अर्जुना । मजचिस्तव तया अ-
ज्ञाना । जैसा जागताचि हेतु स्वप्ना । निद्रेतें होय २८ पैं अभ्रें दिवसु हरपला
तोहि दिवसेंचि जाणों आला । तेवीं मी नेणोनि विषयो देखिला । म
भूतीं २९ एवं निद्रा कां जागणिया । प्रबोधुचि हेतु धनंजया । तेवीं ज्ञाना
ज्ञाना जीवांचिया । मीचि मूळ ४३० जैसें सर्पत्वा कां दोरा । दोरुचि मूळ
धरा । तैसा ज्ञाना अज्ञानाचिया ससारा । मियांचि सिध्दु ३१ म्हणोनि
असें तैसया । मातें नेणोनि धनंजया । वेदु जाणों गेला तंव तया ।
शाखा ३२ तरी तिहीं शाखाभेदीं । मीचि जाणिजे त्रिशुध्दी । जैसा
नदी । समुद्रुचि ठी ३३ आणि महासिध्दांतांपासी । श्रुति हारपती
जैसिया सगंधा आकाशीं । वातलहरीं ३४ तैसें समस्तही श्रुतिजात ।
जिलें ऐसें निवांत । तें मीचि करीं यथावत । प्रकटोनियां ३५ पाठीं
हित अशेष । जग हारपे जेथ निःशेष । तें निजज्ञानही चोख । जाणत
३६ जैसें निदोलिया जागिजे । तेव्हां स्वप्नींचें कीरे नाहीं दूजें ।
देखों पाविजे । आपलेंची ३७ तैसें आपलें अद्वयपण ।

आहे. उत्पन्न होतात,) त्याप्रमाणें मी एकच असून निरनिराळ्या प्राण्यांचे ठिकाणीं माझें स्वरूप परिणाम पावलें आहे. १८ अरे, एक अज्ञान व एक चतुर अशा दोघां वाटसरांच्या दृष्टीस दोन सरांचा नीलमण्यांचा एक हार पडला, तेव्हां जो अज्ञानी होता, त्याला तो सर्प असें वाटून भीति उत्पन्न झाली, व दुसरा जो चतुर होता, त्याला तो हार आहे असें वाटून सुख झालें. १९ हें असो, स्वाती नक्षत्राचें पाणी सारखेंच असून तें शिंपल्यांत पडलें असतां त्याचीं मोत्यें होतात, व सर्पाच्या तोंडांत पडलें असतां विष उत्पन्न होतें; त्याप्रमाणें, जे ज्ञानी आहेत, त्यांना मजपासून सुख उत्पन्न होतें, व अज्ञानी आहेत, त्यांना दुःख होतें ४२०.

अन्वयार्थ—(अहं)-मी-(सर्वस्य)-सर्वाच्या-(हृदि)-बुद्धीत-(संनिविष्टः)-उत्तमप्रकारें आत्मरूपानें प्रवेश केला आहे-(च मत्तः)-आणि मज आत्म्यापासून-(स्मृतिः ज्ञानं)-स्मरण, ज्ञान-(च)-व-(अपोहनं)-त्यांची निवृत्ति होते-(च सर्वैः वेदैः)-व सर्व वेदांनीं-(अहं एव)-मीच-(वेद्यः)-जाणण्यास योग्य आहे.-(वेदान्तकृत्)-वेदान्ताच्या विषयाचा संप्रदाय करणारा-(च)-व-(वेदवित्)-वेदार्थवेत्ता-(अहं एव)-मीच आहे.१५

एऱ्हवीं सर्व प्राण्यांच्या हृदयांत, 'मी अमुक आहे' अशी जी बुद्धि ( ज्ञान ) रात्रंदिवस स्फुरण पावत असते, तीही मीच आहें. २१ परंतु साधूंच्या समागमानें, ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचे अभ्यासानें; आणि वैराग्यासहवर्तमान गुरुचरणांच्या सेवेनें—२२ म्हणजे त्याच सदाचरणानें सर्व अज्ञान नाहींसें होऊन त्याचा मीपणा आत्मस्वरूपांत लय पावतो. २३ मग आत्मस्वरूपाकडे दृष्टी गेल्यावर मज आत्म्याच्या योगानें तो नेहमीं सुखांतच असतो, अशी स्थिति होण्यास माझ्याशिवाय दुसरा कोणी कारणीभूत आहे काय? २४ हे धनंजया, सूर्य उगवल्यावर सूर्याच्या तेजानेंच सूर्य पहावा लागतो, त्याप्रमाणें, मला जाणण्यास मीच कारण आहें, २५ नाहीं तर, व्यावहारिक लोकांची सेवा करून संसाराचा चांगुलपणा ऐकतांना देहाच्या ठिकाणीच ज्यांची अहंबुद्धी गढून गेली आहे २६ ते स्वर्ग व संसार या सुखांच्या प्राप्तीकरितां कर्ममार्गाचें आचरण करतात, त्यामुळें त्यांना दुःखाचा शेलका वांटा प्राप्त होतो. २७ परंतु, अर्जुना, हीही स्थिति त्या अज्ञानी लोकांस प्राप्त होण्यास कारण मीच आहें. ज्याप्रमाणें जागा असणारा मनुष्यच स्वप्न व निद्रा या अवस्थांचें कारण असतो; २८ परंतु, दिवसा ढगांनीं आकाश व्यापलें म्हणजे उजेड कमी होतो, हेंही दिवसाच्या उजेडानेंच जसें समजतें; त्याप्रमाणें, मला न जाणून प्राणी विषयांचें सेवन करतात, हेंही माझ्याच सत्तेनें होतें. २९ याप्रमाणें हे धनंजया, निद्रेला किंवा जागृतीला जसें मूळ ज्ञानच कारण आहे, त्याप्रमाणें, या ज्ञानी व अज्ञानी अशा जीवांना मीच मूळ आहें. ४३० हे धनुर्धरा, ज्याप्रमाणें सर्पाच्या किंवा दोरीच्या भासास मूळ दोरीच कारण आहे, त्याप्रमाणें ज्ञान व अज्ञान यांच्या व्यवहारास मीच कारण आहें, हें सिद्ध आहे, ३१ म्हणून, हे धनंजया, माझें खरें स्वरूप न समजल्यामुळें वेद मला जाणण्याकरितां खटपट करूं लागला, तो त्याच्या शाखा झाल्या. ३२ तथापि त्या वेदाच्या तीनही शाखांनीं ( ऋक्, यजु व साम यांनी ) माझेंच वर्णन केलें आहे. ज्याप्रमाणें पूर्वपश्चिमवाहिनी नद्यांस समुद्रच प्राप्य स्थान होय. ३३ आणि ज्याप्रमाणें महासिद्धांजवळ ( ब्रह्माजवळ ) श्रुती शब्दासहवर्तमान लय पावतात, वाऱ्याच्या झुळका गंधासहवर्तमान आकाशांत लय पावतात. ३४ त्याप्रमाणें, सर्व श्रुति ज्या ठिकाणीं लाजून स्तब्ध रहातात, तें ब्रह्मस्वरूप मीच यथार्थ प्रकट करतों. ३५ नंतर, श्रुतीसह सर्व जग ज्या ठिकाणीं लय पावतें, तें शुद्ध आत्मज्ञान जाणणारा मीच आहें. ३६ ज्याप्रमाणें निजलेला मनुष्य जागा झाल्यावर स्वप्नांत भासलेल्या वस्तु आपणच झालों होतों असें तो समजतो, त्याप्रमाणेंच जागृदवस्थेंतही आपण एकटेच आहों हेंही तोच समजतो. ३७ त्याप्रमाणें, जे माझें आत्मस्वरूप

१ निर्माण झालें. २ अज्ञान्याला, नेणत्याला, मूढाला. ३ नीळमण्यांचा. ४ दोन सरांचा हार. ५ शिंपा, शिंपांत. ६ सर्पाचे तोंडांत. ७ अभ्यासिता. ८ नाहींसें होतें. ९ लय पावतें. १० ऐकतां वांट्यास. ११ माझ्याच सत्तेनें.

१२ मूळज्ञान. १३ खरोखर. १४ विभाग, फांद्या. १५ खरोखर. १६ पूर्वेकडे व पश्चिमेकडे वाहणाऱ्या. १७ शेवट. १८ ब्रह्माजवळ. १९ सुगंधयुक्त. २० उचित.

तयाही बोधाकारण । जाणता मीचि ३८ मग आगी लागलिया कापुरा । ना काजळी ना वैश्वानरा । उरणें नाहीं वीरा । जयापरीं ३९ तेवीं समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जैं बुडोनि जाये । तऱ्ही नाहीं कीरे नोहे । आणि न साहे असणेंही ४४० पैं विश्व घेऊनि गेला मैागेंसीं । तया चोरातें कवण कें गिंवसी । जे कोणी एकी दशा ऐसी । शुद्ध ते मी ४१ ऐसी जडाजडव्यासी । रूप करितां कैवल्यपती । ठीं केली निरुपहितीं । आपुल्या रूपीं ४२ तो आघवाचि बोधु सहसा । अर्जुनीं उमटला कैसा । व्योमींचा चंद्रोदयो जैसा । क्षीरार्णवीं ४३ कां प्रतिभिंतीं चोखटे । समोरील चित्र उमटे । तैसा अर्जुनें आणि वैकुंठें । नांदतसे बोधु ४४ तरी बाप वस्तुस्वभावो । फांवे तंव तंव गोडिये थांवो । म्हणौनि अनुभवियांचा रावो । अर्जुन म्हणे ४५ जी व्यापकपण बोलतां । निरुपाधिक जें आतां । स्वरूप प्रसंगता । बोलिले देवो ४६ तें एक वेळ अव्यंगवाणें । कीजो कां मजकारणें । तेथ द्वारकेचा नाथु म्हणे । भलें केलें ४७ पैं अर्जुना आम्हांहि वोडेंकोडें । अखंड बोलों आवडे । परी काय कीजे न जोडे । पुसतें ऐसें ४८ आजि मनारथांसि फळ । जोडलासि तूं केवळ । जे तोंड भरूनि निखेंळ । आलासि पुसों ४९ जें अद्वैतावरीही भोगिजे । तें अनुभवींच तूं विरजे[१५] । पुसोनि मज माझें । देतोसि सुख ४५० जैसा आरिसा आलिया जवळां । दिसे आपणपें आपला डोळां । तैसा संवादिया तूं निर्मळा । शिरोमणी ५१ तुवां नेणोनि पुसावें । मग आम्हीं परिसऊं बैसावें । तो गा हा पाडु नव्हे । सोयरेया ५२ ऐसें म्हणौनि आलिंगिलें । कृपादृष्टी अवलोकिलें । मग देवो काय बोलिले । अर्जुनेंसीं ५३ पैं दोहीं वोठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें । तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें ५४ एवं आम्ही तुम्ही येथें । देखावें एका अर्थातें । सांगतें पुसतें येथें । दोन्ही एक ५५ ऐसा बोलत देवो भुलला मोहें । अर्जुनातें आलिंगूनि ठाये । मग विहाळें[११] म्हणे नोहे । आवडी हे ५६ जाले इक्षुरसाचे ढाळें । तरी लवेंण देणें किडाळ । जे संवादसुखाचे रसाळ । नासेल थितें[२२] ५७ आधींच आम्हां यया कांहीं । नरनारायणासी भिन्न

त्याचा बोध होण्यास दुसऱ्यावांचून मीच कारण आहें; व त्या आत्मस्वरूपाचा जाणणारा मीच आहें; ३८ वीरा अर्जुना, ज्याप्रमाणें कापूर जळल्यावर मागें त्याची काजळी रहात नाहीं व अग्नीहीं रहात नाहीं, ३९ त्याप्रमाणें, अज्ञानाचा समूळ नाश करणारें जें ज्ञान, तेंही ज्या वेळेस लय पावतें, त्या वेळेस कांहीं नाहीं असेंही म्हणतां येत नाहीं, व आहे असेंही म्हणणें ज्या स्थितीमध्यें सहन होत नाहीं, म्हणजे ज्ञानाज्ञानाचा लय झाल्यावर जें शुद्ध स्वरूप उरतें, त्याच्या ठिकाणीं शब्दाचा साक्षात् प्रवेश होत नाहीं; म्हणून आहे किंवा नाहीं, अशा शब्दानें ती स्थिति सांगतां येत नाहीं. ४४० हें पहा-विश्वाचें कारण जें अज्ञान, त्यासहवर्तमान सर्व विश्वाचा नाश करून टाकणारा, त्याचा विश्वांतर्गत साधनांनीं कोण व कोठें पत्ता लावणार. अशा तऱ्हेची जी कांहीं विशेष स्थिति तें माझें शुद्ध स्वरूप आहे. ४१ कैवल्यपती भगवान् यांनी जडाजड पदार्थांमध्यें आपल्या व्याप्तीचें रूप करितां करितां आपल्या निरुपाधिक स्वरूपाच्या ठिकाणीं मजल पोंचविली. ४२ ज्याप्रमाणें आकाशांत चंद्रोदय झाल्यावर क्षीरसमुद्रांत त्याचें पूर्ण प्रतिबिंब दिसतें, त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं केलेला हा सर्व बोध अर्जुनाच्या मनांत प्रतिबिंबित झाला. ४३ चित्रें काढलेल्या भिंतीच्या समोरील भिंत घोटून गुळगुळीत केल्यावर, तींत ज्याप्रमाणें त्या चित्रांचें प्रतिबिंब दिसतें, त्याप्रमाणें वैकुंठनायक जो श्रीकृष्ण परमात्मा, त्याच्या मनांतील बोध अर्जुनाच्या शुद्ध अंतःकरणामध्यें प्रतिबिंबित झाला. ४४ धन्य! धन्य! परमात्म स्वभाव!!! जशी जशी त्याची प्राप्ति होईल, तशी तशी आनंदाची प्राप्ति वाढते. अशा अनुभवाचा राजा जो अर्जुन तो पुनः देवाला म्हणतो; ४५ देवा, आपल्या व्यापकपणाचें वर्णन करतांना आपण प्रसंगानुसार जें निरुपाधिक स्वरूपाचें वर्णन केलें, ४६ तें निरुपाधिक स्वरूप एक वेळ मजकरितां स्पष्ट करा. तेव्हां द्वारकानाथ म्हणाले, "चांगलें विचारलेंस." ४७ हें पहा अर्जुना, आम्हांलाही कोडकौतुकानें नेहमीं हेंच बोलावेंसें वाटतें, पण काय करावें, कोणी असें विचारणाराच भेटत नाहीं. ४८ तूं आज तोंड भरून मोठ्या आस्थेनें पुनः निरुपाधिक स्वरूप सांगा, म्हणून विचारलेंस म्हणून मला असें वाटतें, आजपर्यंत असा विचारणारा कोणी तरी भेटावा, अशी फार इच्छा होती, इच्छेचें फळ आज तूं मला प्राप्त झालास. ४९ अद्वैत अनुभवानंतर जो सुखाचा उपयोग घ्यावा, तो घेण्यास आज मला तूं साथी झाला आहेस. कारण, माझें निरुपाधिक स्वरूप मला पुनः सांगा असें विचारूनच तूं मला सुख देत आहेस. ४५० ज्याप्रमाणें आरशांत पाहिल्यावर आपलें स्वरूप आपल्या नेत्रांनीं दिसतें, त्याप्रमाणें तुझ्याबरोबर संवाद केल्यामुळें मला सुख झालें आहे, म्हणून तूं संवाद करणारांत शिरोमणि आहेस. ५१ मित्रा अर्जुना, तुला समजत नाहीं म्हणून त्वां आम्हांस विचारावें, आणि आम्हीं तुझी समजूत करून द्यावी, अशी तुझी योग्यता, नाहीं बरें!" ५२ असें म्हणून देवानें आनंदातिशयामुळें अर्जुनास आलिंगन देऊन व कृपादृष्टीनें पाहून मग, भगवान् अर्जुनाला असें म्हणाले ५३ कीं, ओंठ जरी दोन असले तरी बोलणें जसें एक, दोन पाय असले तरी चालणें जसें एक, त्याप्रमाणें तुझें पुसणें व माझें सांगणें दोन्ही एक आहेत. ५४ याप्रमाणें तुझें व माझें स्वरूप एकच आहे असें समज; आणि मी सांगणारा व तूं पुसणारा हे आपण दोघेही एकच आहों" ५५ असें बोलतां बोलतां मोहानें भुलून जाऊन अर्जुनास आलिंगन देऊन स्तब्ध झाले. इतक्यांत चकित होऊन म्हणाले; इतकें प्रेम चांगलें नाहीं! ५६ उंसाच्या रसाची गुळाची ढेप करते वेळीं त्यांत ज्याप्रमाणें हीन असा क्षार घालावा लागतो, त्याप्रमाणें आमच्या संवादरूपी सुखांत द्वैत उत्पन्न केलें नाहीं, तर आज आलेलें प्रेम नाहींसें होईल. ५७ अर्जुन नर, व मी नारायण असल्यामुळें आम्हां दोघांत आधींच भेद नाहीं. पण मला आलेलें हें प्रेमाचें भरतें आतां माझ्या ठिका-

१ अग्नि. २ खचित. ३ मागासकट, मागमुसासकट. ४ शोधूं शकतो. ५ दृश्य व अदृश्य. ६ उपाधिरहित. स्वरूपाच्या ठिकाणीं मजल पोंचविली. ७ ठसला, प्रकटला. ८ धन्य. ९ स्वरूप. १० समजेल. ११ परिपूर्ण, केवळ. १२ आवडीनें. १३ प्रश्नकरता, विचारणारे. १४ निव्वळ. १५ निर्मळ स्थान. १६ डोळ्यानें. १७ योग्यता. १८ स्वरूप. १९ प्याला. २० गुळाच्या ढेपी. २१ क्षार. २२ प्रेम.

नाहीं । परी आतां जिरो माझ्या ठाईं । वेगु हा माझा ५८ इया बुद्धी सहसा। श्रीकृष्ण म्हणे वीरेशा । पैं गा तो तुवां कैसा । प्रश्नु केला ५९ जो अर्जुन श्रीकृष्णीं विरत होता । तो परतोनियां मागुता । प्रश्नावळीची कथा । ऐकों आला ४६० तेथ सद्गदें बोलें । अर्जुनें जी जी म्हणितलें । निरुपाधिक आपुलें । रूप सांगा ६१ यया बोला तो शार्ङ्गी । तेंचि सांगावयालागीं । उपाधी दोहीं भागीं । निरूपीत असे ६२ पुसिलिया निरुपहितें । उपाधि कां सांगे येथ । हें कोण्हाही प्रस्तुत । गमे जरी ६३ तरी ताकाचें अंश फेडणें । तयाचें नांव लोणी काढणें । चोखाचिये शुद्धी तोडणें । कीडेंचि जेवीं ६४ बाबुळीचि सारावी हातें । परी पाणी तंव असे आइतें । अभ्रचि जावे गगन तें । सिद्धचि कीं ६५ वरील कोंढियाचा गुंडाळा । झाडूनि केलिया वेगळा । कणु घेतां विरंगोळा । असे काई ६६ तैसा उपाधि उपहितीं । शेवटु जेथ विचारितीं । तें कोणातेंही न पुसतां । निरुपाधिक ६७ जैसें न सांगणेवरी । बाळा पतीसी रूप करीं । बोल निमालेपणें विवरी । अंचर्चातें ६८ पैं सांगणेयाजोगें नव्हे । तेथिचें सांगणें ऐसें आहे । म्हणौनि उपाधि लक्ष्मीनाहें । बोलिजे आदी ६९ पाडिव्याची चंद्ररेखा । निरुती दावावया शाखा । दाविजे तेवीं औपाधिका । बोली इया ४७०

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च । क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥

मग तो म्हणे गा सव्यसाची । पैं इये संसारपाटणींची । वस्ती सौविया टांची[१४]। दुपुरुषीं ७१ जैसी आघवांचि गगनीं । नांदत दिवोरात्री दोन्ही । तैसे संसारराजधानीं । दोन्हीचि हे ७२ आणिकही तिजा पुरुषु आहे । परी तो या दोहींचें नाव न साहे । जो उदेला गांवेंसीं खाये । दोहींतें यया ७३ परी ते तंव गोठी असो । आधीं दोहींची हे परियेसों । जे संसारग्रामा वसों । आले असती ७४ एक आंधळा वेडा पंगु । येर सर्वांगें पुरता चांगु । परी ग्रामगुणें संगु । घडला दोघां ७५ तया एका नाम क्षरु । येरातें म्हणती अक्षरु । इहीं दोहींचि परी संसारु । कोंदला असे ७६ आतां क्षरु तो कवणु । अक्षरु तो किं लक्षणु । हा अभिप्रावो संपूर्णु । विवंचू गा ७७ तरी महदहंकारा- ।

पोंच जिरे. ५९ याप्रमाणें बुद्धि स्थिर करून श्रीकृष्ण भगवान् म्हणाले, हे वीरश्रेष्ठा, "तूं मला काय प्रश्न केलास?" ५९ इकडे अर्जुन जो श्रीकृष्णांच्या स्वरूपांत लीन होत होता, तो देहभानावर येऊन आपल्या प्रश्नाचें उत्तर ऐकण्यास तयार झाला. ४६० तेव्हां सद्गदित वाणीनें अर्जुनानें म्हटलें:-" देवा, आपलें निरुपाधिक रूप कोणतें तें सांगा." ६१ अर्जुनाचें हें भाषण ऐकून, तें निरुपाधिक स्वरूप सांगण्याकरितां, श्रीकृष्ण भगवान् अगोदर दोन प्रकारें करून उपाधीचें वर्णन करितात. ६२ आपलें निर्गुणरूप सांगा म्हणून विचारलें असतां उपाधीविषयीं भगवान् अगोदर वर्णन कां करतात, अशी जर कोणास शंका येईल; ६३ तर असें पहा कीं, कोणी लोणी मागावयास आला तर, ताक अगोदर करून त्यांतून तें त्याला काढून द्यावें लागतें किंवा शुद्ध सोनें पाहिजे असल्यास तें जसें अगोदर तावून त्यांतील वाईट धातू काढावी लागते; ६४ पाण्यावरील शेवाळच काढून टाकलें, म्हणजे मग पाणी शुद्धच आहे; अथवा अभ्र नाहींसें झाल्यावर आकाश स्वच्छच असतें; ६५ तांदुळावरील भाताचा कोंडा काढून टाकल्यावर तांदूळ हातीं येण्यास कांहीं हरकत असते काय? ६६ त्याप्रमाणें स्वरूपावरील उपाधि काढून टाकल्यावर, विचार केला तर जें बाकी रहातें, तेंच शुद्ध स्वरूप, हें कोणास विचारावयास नको. ६७ ज्याप्रमाणें लहान मुलीला तिच्या पतीचें नांव विचारल्यावर, जें नांव घेतलें असतां ती गप्प रहाते, तेंच तिच्या पतीचें नांव समजावयाचें; त्याप्रमाणें जेथें शब्दांची गति कुंठित होते, तेंच अवर्णनीय असें निरुपाधिक शुद्ध स्वरूप होय. ६८ म्हणून, ज्याचें स्वरूप शब्दानें सांगतां येत नाहीं, त्याच स्वरूपाच्या ठिकाणचें वर्णन आजुबाजूच्या गोष्टींनीच करावें लागतें, म्हणून लक्ष्मीपती भगवान् अगोदर उपाधी सांगूं लागले; ६९ सकाळीं प्रतिपदा असून तिसऱ्या प्रहरीं लागलेल्या शुक्ल द्वितियेच्या चंद्राची कोर दाखविते वेळीं ज्याप्रमाणें एकाद्या झाडाच्या खांदीच्या आधारानें ती दाखवावी लागते, त्याप्रमाणें निरुपाधिक स्वरूपाचें लक्षण सांगते वेळीं उपाधीचें स्वरूप सांगावें लागतें. ४७०

**अन्वयार्थ**--(लोके)-या संसारांत-(क्षरः)-क्षर-(च)-व-(अक्षरः एव)-अक्षरच-[इति]-असे-(इमौ द्वौ पुरुषौ)-हे दोन पुरुष आहेत.-(सर्वाणि भूतानि)-सर्व भूतें हा-(क्षरः)-क्षर पुरुष आहे-[च]-आणि-(कूटस्थः)-ईश्वराची मायाशक्ति -(अक्षरः)-अक्षर पुरुष आहे, असें-(उच्यते)-सांगितलें जातें. १६

मग श्रीकृष्ण म्हणतातः-हे सव्यसाची, या संसाररूपी नगरांत खरोखर मोजकी दोन पुरुषांची वस्ती आहे. ७१ ज्याप्रमाणें सर्व आकाशांत कायतीं दिवस व रात्र हींच नांदतात, त्याप्रमाणें संसाररूपी राजधानींत हे दोघेच राहतात, ७२ आणखीहि एक तिसरा पुरुष आहे, परंतु त्याला या दोघांचें नांव देखील सहन होत नाहीं. कारण, तो येथें आला असतां नगरासह त्या दोघांचा नाश करतो. ७३ परंतु त्या तिसऱ्याची गोष्ट सध्यां राहूं दे. अगोदर जे या संसाररूपी नगरांत वस्ती करण्याकरितां आले आहेत, त्या दोघांविषयीं सांगतों, तें ऐक. ७४ त्यांपैकीं एक अंधळा, वेडा व पंगू असा आहे आणि दुसरा सर्व अवयवांनीं परिपूर्ण आहे. परंतु हे दोघे एकाच गांवांत राहिल्यामुळें त्यांचा परस्पर स्नेह जडला. ७५ त्यांतील एकाचें नांव 'क्षर' व दुसऱ्याचें नांव 'अक्षर' या दोघांनीच हें संसाररूपी नगर व्यापून टाकिलें आहे. ७६ आतां 'क्षर' म्हणून आहे तो कोण, व 'अक्षर' म्हणतात त्याचीं लक्षणें काय हें सर्व तुला फोड करून सांगतों.--ह्या ठिकाणीं शुद्ध परमात्म्यालाच क्षराक्षराची संज्ञा केली आहे. क्षर पुरुष संज्ञा करते वेळेस मायाकार्य महत्तत्त्वापासून तृणापर्यंत जो प्रपंच तो 'क्षर' म्हणजे प्रतिक्षणीं नाश पावणारा आहे. त्याची उपाधी परमात्मा घेऊन क्षर पुरुष असें म्हटलें आहे; आणि येथून सर्व क्षर उपाधीचें वर्णन केलें आहे, हें लक्षांत घेऊन ग्रंथ वाचावा, म्हणजे समजण्यास कठीण जाणार नाहीं.--७७ तर, अर्जुना, महत्तत्त्वापासून गवताच्या

१ मकारांनीं. २ उपाधीरहित. ३ वेगळें करणें. ४ हीणकस नाहींसें करणें, जाळणें. ५ शेवाळ. ६ तांदूळ. ७ वेढ घालविण्याचें साधन, विळंब, उशीर. ८ उपाधियुक्त वस्तूतील उपाधीचा (विचारानें जेथें) शेवट होतो. ९ कुलस्त्री पतीचें नांव घेत नाहीं. १० ज्याची चर्चा करतां येत नाहीं अशाला. ११ निश्चयानें, स्पष्ट. १२ नगरींची. १३ सर्वथा, खरोखर. १४ थोडी, लहान. १५ संसाररूपी गांवांत. १६ भरलें. १७ महत्तत्त्वापासून.

अक्षरासी १ तरी अक्षरु जो दुसरा । पुरुषु पैं धनुर्धरा । तो मध्यस्थु गा गिरिवरां । मेरु जैसा २ जे तो पृथ्वी पाताळ स्वर्गीं । इहीं न भेदे तिहीं भागीं । तैसा दोहीं ज्ञानाज्ञानांगीं । पडेना जो ३ ना यथार्थज्ञानें एक होणें । ना अन्यथात्वें दुजें घेणें । ऐसें निश्चळ जें नेणणें । तेंचि तें रूप ४ पांसुता निःशेष जाये । ना घटभांडादि होये । तया मृत्पिंडा ऐसें आहे । मध्यस्थ जें ५ पैं आटोनि गेलिया सागरु । मग तरंगु ना नीरु । तया ऐशी अनाकारु । जे दशा गा ६ पार्था जागणें तरी बुडे । परी स्वप्नाचें कांहीं न मांडे । तैसिये निद्रे सौंगडें । न्याहाळणें जें ७ विश्व आघवेंचि मावळे । आणि आत्मबोधु तरी नुजळे । तिये अज्ञानदशे केवळे । अक्षरु नामें ८ सर्वां कळीं सांडिलें जैसें । चंद्रपण उरे अंवसे । रूप जाणावें तैसें । अक्षराचें ९ पैं सर्वोपाधिविनाशें । हे जीवदशा जेथ पैसे । फळपाकांत जैसें । झाड बीजीं ५१० तैसें उपाधी उपहित । थोकोनि ठोके जेथ । तयातें अव्यक्त । बोलती गा ११ घनें अज्ञान सुषुप्ती । तो बीजभावो म्हणती । येर स्वप्न हन जागृती । फळभावो तयाचा १२ जयासी कां बीजभावो । वेदान्तीं केला ऐसा आवो । तो तया पुरुषा ठावो । अक्षराचा १३ जेथुनी अन्यथा ज्ञान । फांकोनि जागृति स्वप्न । नानाबुद्धीचें ज्ञान । रिगालें असे १४ जीवत्व जेथुनी किरीटी । विश्व उठताचि उठी । ते उभय भेदांची मिठी । अक्षरु पुरुषु १५ येरु क्षरु पुरुषु कां जनीं । जिहीं खेळे जागृतीं स्वप्नीं । तिया अवस्था जो दोन्ही । वियाला गा १६ पैं अज्ञानघनसुषुप्ती । ऐसेसी जे कां ख्याती । यौ उणी एकी प्राप्ती । ब्रह्माची जे १७ साचाचि पुढती वीरा । जरी न येतां स्वप्न जागरा । तरी ब्रह्मभावो साचोकारा । म्हणों येता १८ परी प्रकृतिपुरुषें दोनी । अभ्रें जालीं जियें गगनीं । क्षेत्रक्षेत्रज्ञु स्वप्नीं । देखिला जियें १९ हें असो अधोशाखा । या संसाररूपा रुखा । मूळ तें रूप पुरुषा । अक्षराचें ५२० हा पुरुषु कां म्हणिजे । जे पूर्णपणेंचि निजे । पैं मायापुरीं पहुडिजे । तेणेंही बोलें २१ आणि विकारांची जे वोरी । ते विपरीत ज्ञानाची पैरी । नेणिजे जियें माझारीं । ते सुषुप्ती गा हा २२ म्हणौनि यया आपैसें । क्षरणें पां नसे । आणिकेंही हा न नाशे । ज्ञानाउणें २३ यालागीं हा अक्षरु । ऐसा वेदान्तीं डगरु । केला देशीं थोरु । सिद्धांताचा २४ ऐसें जीवकार्य कारण । जया मायासंगुचि लक्षण । अक्षर पुरुषु जाण । चैतन्य तें २५

वर्णन करितात, हें लक्षांत ठेवावें.—१ तर अर्जुना, दुसरा जो 'अक्षर पुरुष' तो मध्यस्थ आहे; ज्याप्रमाणें सर्व पर्वतांत मेरु पर्वत मध्यस्थ आहे, त्याप्रमाणें परमात्मा व मायाकार्य यांच्यामध्यें अक्षर पुरुषाची उपाधि जें अज्ञान तें मध्यें आहे म्हणून तद्विशिष्ट अक्षर पुरुषाला मध्यस्थ म्हटलें आहे, २ कारण तो मेरु पर्वत पृथ्वी, पाताळ व स्वर्ग या तिन्ही लोकांत सारखाच आहे; त्याप्रमाणें जो ज्ञान किंवा अज्ञानकार्य यांना समानच आहे, ३ यथार्थ ज्ञानानें ऐक्य होणें किंवा विपरीत ज्ञानानें द्वैत पावणें या दोन स्थितींमधील जी केवळ अज्ञान स्थिति तेंच ज्याचें स्वरूप होय; ४ माती भिजवून तिचा गोळा करावा, मग तिचें भांडें घडावयाचे पूर्वी तिचा मातीपणा तर गेलेला असतो, व तिला मडक्याचाही आकार नसतो; त्या गोळ्याप्रमाणें या अक्षर पुरुषाची मधली स्थिति आहे. ५ समुद्र आटल्यावर त्यांत लाटाही नसतात किंवा पाणीही नसतें; त्याप्रमाणें जी आकाररहित स्थिति; ६ पार्था, जागृदवस्था जाऊन स्वप्नावस्था ही आली नाही अशी जी निद्रावस्था, त्याप्रमाणें ज्याचें स्वरूप आहे; ७ आणि जगाचा भास नाहीसा होणें, व आत्मज्ञानाचा बोध न होणें, या दोहोंमधील जी केवळ अज्ञानदशा, तिलाच " अक्षर " असें म्हणतात. ८ अमावास्येच्या दिवशीं सर्व कला नाहीतशा होऊन जसें चंद्राचें स्वरूप असतें त्याप्रमाणें शुद्ध ज्ञान व विपरीत ज्ञान याविरहित केवल अज्ञान असें अक्षराचें रूप आहे. ९ हें पहा, सर्व उपाधींचा नाश झाल्यावर ज्या अज्ञानांत जीवात्मा लय पावतो. ज्याप्रमाणें फल आल्यावर झाड त्यांत बीजरूपानें असतें, ५१० त्याप्रमाणें उपाधि व उपाधीचा स्वीकार करणारा जेथें विश्रांति घेतो, त्या स्थानाला अव्यक्त असें म्हणतात. ११ पूर्ण अज्ञान ज्या निद्रावस्थेंत असतें, तिला 'बीजभाव' असें म्हणतात; व स्वप्न व जागृति ह्यांना 'फलभाव' असें म्हणतात. १२ वेदान्तशास्त्रांत ज्या स्थितीला 'बीजभाव' असें म्हणतात, त्या स्थितीलाच 'अक्षर पुरुष' असें म्हणतात. १३ आणखी जेथून विपरीत ज्ञान उत्पन्न होऊन जागृति व स्वप्न या रूपांनी फांकतें; आणि अनेकबुद्धितरंगरूप ज्ञान जेथून निघतें. १४ अर्जुना जीवपणा जेथून उत्पन्न होतो, तसेंच अनंत विश्वें जेथें उत्पन्न होतात, आणि त्या जीवत्वाची व विश्वाची प्रलयकालीं जेथें साम्यावस्था होते त्या उपाधींच्या ठिकाणीं म्हणजे अज्ञानाच्या ठिकाणीं असणाऱ्या चैतन्याला अक्षर पुरुष म्हणतात. १५ दुसरा क्षर पुरुष जो जागृत-स्वप्नावस्थेंत खेळतो, त्या जागृत-स्वप्न या दोन अवस्था ज्याच्यापासून उत्पन्न होतात, १६ किंवा ज्या अवस्थेला पूर्ण अज्ञानानें भरलेली अशी निद्रावस्था म्हणतात, व जिला ब्रह्मस्थिति म्हणण्याला एकच उणेपणा आहे. १७ वीरा अर्जुना, खरोखर या निद्रावस्थेपासून जर स्वप्न किंवा जागृति या अवस्था प्राप्त न होतील, तर सुषुप्तीलाच ब्रम्हस्थिति असें म्हटलें असतें. १८ पण या निद्रारूपी आकाशांत प्रकृतिपुरुषरूपी ढग येऊन क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ असें जिच्या स्वप्नांत दिसतात; १९ हें असो, खालच्या बाजूला विस्तार पावणाऱ्या संसाररूपी वृक्षाचें जें मूळ म्हणजे अज्ञान, तेंच या अक्षर पुरुषाचें रूप होय, ५२० याला पुरुष कां म्हणावयाचें? तर हा पूर्णपणें निद्रा घेतो म्हणून, व मायारूपी नगरांत शयन करतो म्हणून; २१ आणि ज्या गाढ निद्रेंत विकार अथवा विपरीत ज्ञान यांचा भास नसतो, तें याचें रूप होय. २२ म्हणून याचा स्वभावतः किंवा ज्ञानावांचून दुसऱ्या कशानेंही नाश होत नाहीं २३ म्हणून वेदान्तशास्त्राच्या सिद्धांतांत याच्यावर 'अक्षर' असा आरोप केला आहे. २४ याप्रमाणें जीवकार्य व कारण हे व्यवहार होण्यास परमात्म्याशीं मायेच्या संबंधाचीच जरूरी आहे. म्हणून त्या मायेचा संबंध असलेल्या चैतन्यालाच 'अक्षर' पुरुष म्हणतात, असें समज. २५

१ विपरीत ज्ञान. २ रजःकणत्व. ३ आकाररहित. ४ सारखे, ५ प्रदेशे. ६ फळाच्या नाश होऊन तें फळाधिष्ठांत राहतें. ७ मायायुक्त चैतन्य मायेसह ज्या ठिकाणीं थबकून राहतें. ८ उपाधींत सांपडलेलें सूक्ष्म. ९ गुप्त होऊन राहे. १० १० दृढ, दाट. ११ डौल, आकार. १२ विपरीत. १३ संयोग, लयस्थान. १४ प्रसिद्धि. १५ या एका गोष्टीपासून जी ब्रह्माचीच प्राप्ती. १६ खऱ्या रीतीनें. १७ शयन करतो. १८ यात्रा, फेरी. १९ प्रकार. २० आपोआप. २१ ज्ञानावांचून. २२ प्रसिद्धि. २३ वेदान्तांत.

चाही विश्रामु । विराला जेथें ४८ सुखासि सुख जोडिलें । जें तेज तेजासि सांपडलें । शून्यही बुडालें । महाशून्यीं जिये ४९ जो विकासाहीवरी उरता । ग्रासातेंही ग्रासूनि पुरता । जो बहुतें पाडें बहुतां- । पासूनि बहु ५५० पैं नेण-तयाप्रती । रुपेपणाची प्रतीती । रुपें न होनि शुक्ती । दावी जेवीं ५१ कां नाना अलंकारदशे । सोनें न लपत लपालें असे । विश्व न होनियां तैसें । विश्व जो धरी ५२ हें असो जलतरंगा । नाहीं सिनानेंपण जेवीं गा । तेवीं दिसता प्रकाशु जगा । आपणचि जो ५३ आपलिया संकोचविकोशा । आपणचि रूप वीरेशा । हा जळीं चंद्र हन जैसा । समग्र गा ५४ तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपीं कहीं न जाये । जैसा रात्री दिवसें नोहे । द्विधा रवि ५५ तैसा कांहींचि कोणीकडे । कायिसेनिहि वेंचीं न पडे । जयाचें सांगडें । जयासीचि ५६

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः । अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥

जो आपणपेंचि आपणया । प्रकाशीतसे धनंजया । काय बहु बोलों जया । नाहीं दुजें ५७ तो गा मी निरुपाधिकु । क्षराक्षरोत्तमु एकु । म्हणोनि म्हणे वेद लोकुं । पुरुषोत्तमु ५८

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् । स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

परी हें असो ऐसिया । मज पुरुषोत्तमातें धनंजया । जाणे जो पाहलेया । ज्ञानमित्रें ५९ चेइलिया आपुलें ज्ञान । जैसें नाहींचि होय स्वप्न । तैसें स्फुरतें त्रिभुवन । वावों जालें ५६० कां हातीं घेतलिया माळा । फिटे सर्पाभासाचा कंटाळा । तैसा माझेनि बोधें टवाळा । नागवे तो ६१ लेणें सोनेंचि जो जाणे । तो लेणेंपण तें वावो म्हणे । तेवीं मी जाणोनि जेणें । वाळिला भेदु ६२ मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिध्दु । जो आपणेनसीं भेदु । नेणोनियां जाणे ६३ तेणेंचि सर्व जाणितलें । हेंही म्हणणें थेंकुलें । जे तया सर्व उरलें । द्वैत नाहीं ६४ म्हणोनि माझिया भजना । उचितु तोचि अर्जुना । गगन जैसें आलिंगना । गगनाचिया ६५ क्षीरसागरा पर्गुणें । कीजे क्षीरसागरपणें । अमृतचि होऊनि मिळणें । अमृतीं जेवीं ६६ साडेपंधरा मिसळावें । तें साडेपंधरेंचि होआवें । तेवीं मी जालिया संभवे । भक्ति माझी ६७ हां गा सिंधुसि आनी होती । तरी गंगा कैसेनि मिळती । म्हणौनि मी न होतां भक्ती । अन्वयो आहे ६८ ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळु अनन्यु

विश्रांतीच्या विश्रांतीचें स्थान; ४८ जें सुखास सुखच जोडलें, तेजास तेज प्राप्त झालें, व शून्य महाशून्यांत लय पावलें; ४९ जो उदय झाल्यावरही त्यापासून दूर असतो, व लय झाल्यावरही त्यापलीकडे असतो. फार काय सांगावें! जो सर्वांहून दूर आहे; ५५० ज्याप्रमाणें शिंपी आपण रुपें नसून अज्ञाला रुपें नसतांना रुपें भासवितें, ५१ किंवा अलंकाराच्या रूपानें सोनें नाहींसें न होतां नाहीं असें भासतें, त्याप्रमाणें, आपण विश्व न होतां जो विश्व धारण करितो; ५२ हें असो; पाणी व लाटा यांत कांहीं वेगळेपणा आहे का? त्याप्रमाणें जग व परमात्मस्वरूप वेगळें नाहीं. ५३ हे वीरेशा, जगाच्या संकोचाला व विस्ताराला जो कारण आहे; ज्याप्रमाणें पाण्यांत पडणाऱ्या प्रतिबिंबास सर्वथैव चंद्र कारण असतो. ५४ त्याप्रमाणें, जगाची उत्पत्ती झाली असतां ज्याच्यांत फरक होत नाहीं व लय झाला असतां जो कोठें जात नाहीं; ज्याप्रमाणें रात्र व दिवस हीं आलीं असतां सूर्यांत कांहीं फरक पडत नाहीं, ५५ त्याप्रमाणें तो कोणांत नसतो, कोणाच्यानेंही नाश पावत नाहीं, आणि ज्याची तुलना करावयास तो स्वतःच योग्य आहे. ५६

**अन्वयार्थ**—(यस्मात्)—ज्याअर्थी—(अहं क्षरं अतीतः) —मी क्षरसंज्ञक पुरुषाहूनहि निराळा आहें—(अक्षरात् अपि च) —आणि अक्षरसंज्ञक पुरुषाहूनहि—(उत्तमः)—उत्तम आहें,—(अतः)—त्याअर्थी—(अहं लोके च वेदे)—लोकांत व वेदांत मी—(पुरुषोत्तमः)—पुरुषोत्तम म्हणून—(प्रथितः अस्मि)—प्रसिद्ध आहें १८

हे धनंजया, जो आपणच आपल्याला प्रकाशित ( स्वयंप्रकाश आहे ) करितो, फार काय सांगावें! ज्याचे ठिकाणीं द्वैतसंबंध नाहीं, ५७ तें माझें निरुपाधिक रूप असून क्षर व अक्षर यांच्या पलीकडचा मी आहें. म्हणून मला वेद आणि लोक हे 'पुरुषोत्तम' असें म्हणतात. ५८

**अन्वयार्थ**—(भारत)—हे अर्जुना!—(यः असंमूढः)—जो संमोहरहित असलेला पुरुष—(एवं)—वर सांगितल्याप्रमाणें—(पुरुषोत्तमं मां)—पुरुषोत्तम अशा मला—(जानाति)—जाणतो —(सः)—तो—(सर्ववित्)—सर्वज्ञ—(मां सर्वभावेन)—मला सर्व भावानें—सर्वत्र माझा भाव ठेवून—(भजति)—भजतो. १९

पण हें असो; अर्जुना, अशा मज पुरुषोत्तमाला तोच पुरुष जाणतो की, ज्याला ज्ञानरूपी सूर्याचा उजेड झाला आहे. ५९ ज्याप्रमाणें जागृत झाल्यावर आपल्यास स्वप्न भासत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानाचा उदय झाल्यावर सर्व जग ( बाधीत होऊन जातें ) व्यर्थ भासतें. ५६० किंवा माळ हातीं घेतली म्हणजे ज्याप्रमाणें तीवर झालेला सर्पाचा भास नाहींसा होतो, त्याप्रमाणें माझें स्वरूपज्ञान झाल्यानें जगाचा मिथ्याभास नाहींसा होतो. ६१ जो सोन्याच्या अलंकाराला सोन्याच्या दृष्टीनें पहातो, तो त्याचें अलंकारत्व व्यर्थ मानतो; त्याप्रमाणें, ज्याला माझें ज्ञान प्राप्त होतें, त्याला ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटी नाहींशी होते. ६२ मग म्हणतो, 'मीच एक स्वतःसिद्ध सच्चिदानंद सर्वत्र आहे.' अशा अद्वैतदृष्टीनें आपलासुद्धां भेद न ठेवतां जो मला जाणतो, ६३ त्यानेंच सर्व जाणलें हें म्हणणें देखील शोभत नाहीं. कारण, त्याला सर्व शब्दांचा विषय जें द्वैत तेंही उरलें नाहीं. ६४ म्हणून अर्जुना, तोच माझें भजन करण्यास अधिकारी होय. ज्याप्रमाणें आकाशास आलिंगन देण्यास आकाशच योग्य होय; ६५ क्षीरसागराला ज्याप्रमाणें क्षीरसागरपणानेंच मेजवानी करणें योग्य होय; अथवा ज्याप्रमाणें अमृतरूप होऊनच अमृतास मिळावें लागतें, ६६ उत्तम सोन्यांत उत्तम सोनेंच मिसळल्यावर त्याची एक किंमत लागते; त्याप्रमाणें मद्रूप झाल्यावरच माझी भक्ति करण्यास पुरुष योग्य होतो. ६७ असें पहा की, समुद्राहून गंगा जर निराळी असती, तर ती समुद्राला कशी मिळाली असती? म्हणून मद्रूप झाल्याशिवाय माझी भक्ति करणें शक्य आहे काय? ६८ ज्याप्रमाणें, समुद्रांतील लाटा जशा सर्व प्रकारें समुद्राहून भिन्न नाहींत; त्याप्रमाणें जो माझें भजन

१ विस्तारावरचा. २ उदय. ३ दूर. ४ वेगळेपणा. ५ अस्तास. ६ उदयास. ७ आकार. ८ नाश. ९ तुलना १० जन. ११ ज्ञानरूपी सूर्याचा उदय झाल्यावर. १२ जागृत झालों असतां. १३ भासतें. १४ व्यर्थ, नाहींसें.

१५ भय, त्रास. १६ मिथ्याभासाला १७ सांपडत नाहीं, फसत नाहीं. १८ टाकिला. १९ ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटी. २० अल्प. २१ पाहुणचार. २२ दुर्मिळ.

सागरीं । तैसा मातें अवधारीं । भजिन्नला जो ६९ सूर्या आणि प्रभे । एकेवंकी जेणें लोभें । तो पाडु मानूं लाभे । भजन तया ५७०

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ । एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥१५॥

एवं कथिलयोदारम्य । हें जें सर्व शास्त्रैकलभ्य । उपनिषदां सौरभ्य । कमळदळां जेवीं ७१ हें शब्दब्रह्माचें मथितें । श्रीव्यासप्रज्ञेचोनि हातें । मथूनि काढिलें आयितें । सार आम्हीं ७२ जे ज्ञानामृताची जान्हवी । जे आनंदचंद्रींची सतरावी । विचारक्षीरार्णवींची नवी । लक्ष्मी जे हे ७३ म्हणौनि आँपुलेनि पदें वर्णें । अर्थाचेनि जीवेंप्राणें । मीवांचोनिहीं नेणें । आन कांहीं ७४ क्षराक्षरत्वें समोर जालें । तयाचें पुरुषत्व वोळिलें । मग सर्वस्व मज दिधलें । पुरुषोत्तमीं ७५ म्हणौनि जगीं गीता । मिया आत्मेनि पतिव्रता । जे हे प्रस्तुत तुवां आतां । आकर्णिली ७६ साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पैं संसारु जिणें[१२] हें शस्त्र । आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरें इयें ७७ परी तुजपुढां सांगितलें । तें अर्जुना ऐसें जालें । जें गौप्यधन काढिलें । माझें आजि तुवां ७८ मज चैतन्यशंभूचां माथा । जो निक्षेपु[१५] होता पार्था । तया गौतमु जालासि आंस्था- । निधी[१६] तूं गा ७९ चोखँटिवा आपुलिया । पुढिला उर्गोणा घेयावया । तया दर्पणाचीचि परी धनंजया । केली आम्हां ६८० कां भरलें चंद्रतारांगणीं । नभ सिंधू आपणयामाजीं आणी । तैसा गीतेसीं मी अंतःकरणीं । सूंदला तुवां ८१ जे त्रिविधमळिकटा । तूं सांडिलासि सुभटा । म्हणौनि गीतेसीं मज वसौटी । जालासि गा ८२ परी हें बोलों काय गीता । जे हे माझी उन्मेषलता । जाणे तो समस्ता । मोहा मुके ८३ सेविली अमृतसरिता । रोगु दवडूनि पंडुसुता । अमरपण उचितां । देऊनि घाली ८४ तैसी गीता हे जाणितलिया । काय विस्मयो मोह जावया । परी आत्मज्ञानें आपणपयां । मिळिजे येथ ८५ जया आत्मज्ञानाच्या ठायीं । कर्म आपुलेया जीवितीं पाहीं । होऊनियां उतराई । लया जाय ८६ हरपलें दावूनि जैसा । मागें सरे वीरविलासा । ज्ञानाचि कळस वेंळघे तैसा । कर्मप्रासादाचा ८७ म्हणौनि ज्ञानिया पुरुषा । कृत्य करूं सरलें देखा । ऐसा अनाथाचा सखा । बोलिला तो ८८ तें श्रीकृष्णवचनामृत । पार्थीं भरोनि असे वोसंडेत । मग व्यासकृपा प्राप्त । संज-

करतो, त्याच्यांत व माझ्यांत द्वैत नसतें. ६९ सूर्य आणि प्रभा यांच्यांत जसें ऐक्य आहे, तसें माझें भजन केलें असतां माझ्यांत व भक्तांत अंतर रहात नाहीं. ५७०

**अन्वयार्थ**—(अनघ भारत)–हे निष्पाप अर्जुना !–इदं इति गुह्यतमं शास्त्रं)–असें हें अत्यंत गुह्य शास्त्र–(मया उक्तं)–मीं सांगितलें–(एतत्)–हें–(बुद्ध्वा)–जाणून–(बुद्धिमान्) बुद्धिमान्–(च कृतकृत्यः)–व कृतकृत्य–(स्यात्)–होतो.

याप्रमाणें पंधराव्या अध्यायांत सांगावयास, आरंभ केल्यापासून सर्व शास्त्रांनीच प्राप्त होणारा असा उपनिषद्रूपी कमलदलांतून गीतारूपी सुवास सर्व जगभर फांकला; ७१ जी गीता वेदांचें मंथन करून श्रीव्यास मुनींच्या ज्ञानरूप हातानें काढलेल्या लोण्याप्रमाणें होय; ७२ जी गीता, ज्ञानामृतानें भरलेली दुसरी भागीरथी नदीच होय; व आनंदरूपी चंद्राची सतरावी कला होय व विचाररूपी क्षीरसागराचें मंथन करून काढलेली नवीन लक्ष्मीच होय. ७३ म्हणून ही गीता, आपल्या पदानें, वर्णानें किंवा अर्थाच्या जीवप्राणानें माझ्यावांचून दुसऱ्याला मिळत नाहीं, मद्रूपच होते, ७४ हिच्यासमोर क्षर व अक्षर पुरुष प्राप्त झालें असतां त्यांचें पुरुषत्व गीतारूप लक्ष्मीला पटलें नाहीं, म्हणून त्यांना एके बाजूस सारून तिनें आपलें सर्वस्व पुरुषोत्तमाला अर्पण केलें. ७५ म्हणून, हल्लीं जी तूं गीता ऐकलीस, तिनें मलाच वरल्यामुळें जगतांत पतिव्रता हें नांव मिळविलें ७६ खरोखर, ही गीता म्हणजे बोलून वर्णन करण्याजोगें शास्त्र नाहीं; परंतु संसाराला जिंकण्याचें एक शस्त्रच आहे. गीतेचीं अक्षरें हीं आत्मभाव उत्पन्न करणारे मंत्रच होत. आत्मप्राप्ति करून देण्याची हिच्या अक्षरांत शक्ति आहे. ७७ अर्जुना, तुला जी ही गीता सांगितली, तो प्रकार कसा झाला म्हणशील, तर माझें जवळील गुप्त ठेवा तूं आज बाहेर काढलास. ७८ ज्याप्रमाणें गौतम मुनींनीं तपश्चर्या करून शंकराचे जटेंतून गंगा वर काढली, त्याप्रमाणें जो चैतन्यशंभु मी, त्या माझे जटेंतून गीतारूपी गंगा काढण्यास श्रद्धावान् तूं गौतम झालास. ७९ आपले चांगलेपणाचा अनुभव घेण्यास जसा आरसा समोर घ्यावा लागतो, तसा हे धनंजया, आत्मस्वरूप पहाण्यास तूं हा गीतारूप आरसाच केलास. ५८० ज्याप्रमाणें आकाशांतील चंद्र व नक्षत्रें हीं सर्व समुद्रांत प्रतिबिंबित होतात, त्याप्रमाणें गीतेसह मला तूं आपल्या अंतःकरणांत प्रतिबिंबित केलेंस. ८१ अर्जुना, तुझ्या ठिकाणचा त्रिविधतापरूपी मळ गेल्यामुळें तूं गीतेसह माझें रहाण्याचें ठिकाण झाला आहेस. ८२ परंतु, फार काय सांगावें ! गीता ही केवळ माझी ज्ञानवल्ली आहे; व तिला जो जाणतो, तो या संसारमोहापासून मुक्त होतो. ८३ हे पांडुसुता, ज्याप्रमाणें अमृतरूपी नदीचें पाणी प्याल्यावर रोग नाहींसा होऊन मोग्य असें अमरपण प्राप्त होतें, ८४ त्याप्रमाणें गीता पूर्णपणें समजल्यावर मोहाचा नाश होतो, यांत आश्चर्य तें काय ? परंतु आत्मज्ञानाच्या प्राप्तीनें आत्मस्वरूपाशीं ऐक्य होतें. ८५ जें आत्मज्ञान प्राप्त झालें असतां कर्मच आपोआप निष्कर्म होतें, व तें ज्ञानाचे उतराई होऊन लय पावतें; ८६ हे वीरविलासा अर्जुना, ज्याप्रमाणें हरवलेली जिन्नस सांपडल्यावर त्या जिनसेचा माग काढावा लागत नाहीं, त्याप्रमाणें कर्मरूपी देवळाचा ज्ञानच कळस होतो. ८७ म्हणून, ज्ञान प्राप्त झालेल्या पुरुषांचीं कर्में सर्व संपतात, अनाथाचा सखा जो श्रीकृष्ण भगवान् तो याप्रमाणें बोलला. ८८ असें जें श्रीकृष्णवदनांतील अमृतरूपी भाषण पार्थाचे मनांत ठसून वर उतूं आलें, तेंच व्यासांच्या कृपेनें संजयास प्राप्त झालें.

१ पेनय. २ पंधराव्या अध्यायाच्या आरंभापासून. ३ सर्व शास्त्रांतील सिद्धांताच्या एकरूपतेनें प्राप्त होणारें. ४ सुवास. ५ मंथन केलेलें. ६ लोणी. ७ गीतेच्या. ८ जीवप्राणानें ९ होऊं. १० पुढें. ११ टाकलें, नाहींसें केलें. १२ जिंकणारें. १३ प्रकट करणारें. १४ चैतन्यरूपी शंकराच्या. १५ ज्ञानगंगारूप ठेवा. १६ मढेया ठेवा. १७ शुद्धतेनें, स्वच्छपणानें. १८ ठाया, स्वरूप, अनुभव. १९ सांठवून ठेविलास. २० काम, क्रोध व लोभ हा त्रिविधतापरूपी मळ, कायिक, वाचिक व मानसिक पाप. २१ वसतिस्थान, २२ ज्ञानवल्ली. २३ आयुष्य. २४ (ज्ञानाचें) उपकारबद्ध होऊन. २५ तपास, शोध. २६ घडलें. २७ कर्मरूपी वाड्याचा. २८ सांडून.

यासी ८९ तो धृतराष्ट्र राया । सूतसे पान करावया । म्हणौनि जीवितान्त[2] तया । नोहेचि भारी ५९० एऱ्हवीं गीताश्रवण अवसरीं[3] । आंवडों[4] लागतां अनधिकारी । परी सेखीं तेचि उजरी[5] । पातला भली ९१ जेव्हां द्राक्षीं दूध घातलें । तेव्हां वायां गेलें गमलें । परी फळपाकीं[6] दुणावलें । देखिजे जेवीं ९२ तैसीं श्रीहरिवक्त्रींचीं अक्षरें । संजयें सांगितलीं आदरें । तिहीं अंधु[7] तोही[8] अवसरें । सुखिया जाला ९३ तेंचि मऱ्हाटेनि विन्यासें । मियां उन्मेषें ठसें[9]ठोंबसें । जी जाणें नेणें तैसें । निरोपिलें ९४ सेवंतीये अरिसि कांहीं । आंग पाहतां विशेषु नाहीं । परी सौरभ्य नेलें तिहीं । भ्रमरीं जाणिजे ९५ तैसें धंडतें[10] प्रमेय[11] घेइजे । उणें तें मज देइजे । जें नेणणें हेंचि सहजें । रूप कीं बाळा ९६ तरी नेणतें जऱ्ही होये । तऱ्ही देखोनि बाप कीं माये । हर्ष केंही न समाये । चोजें[12] करिती ९७ तैसें संत माहेर माझें । तुम्हीं मिनलिया[13] मी लौंडजे[14] । तेंचि ग्रंथाचेनि व्याजें[15] । जाणिजो जी ९८ आतां विश्वात्मकु हा माझा । स्वामी निवृत्तिराजा । तो अवधारु[16] वाक्यपूजा । ज्ञानदेवो म्हणे ५९९

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥ श्लोक २०, ओंव्या ५९९.

८९ तें अमृत धृतराष्ट्र राजास संजय पाजीत असतां, तें योग्यतेचें आहे असें त्याला वाटलें नाहीं. ५९० एऱ्हवीं, अनधिकारी धृतराष्ट्रास सहज गीताश्रवण झालें, तरी त्याचा शेवट गोड झाला. ९१ द्राक्षाचे वेलास पाण्याचे ऐवजीं दूध घालते वेळीं तें ज्याप्रमाणें व्यर्थ गेलेंसें वाटतें, परंतु तेंच त्या वेलास द्राक्षांचे घोंस आले, म्हणजे परिणामें गोड दिसतें. ९२ त्याप्रमाणें, श्रीहरीच्या मुखांतील अक्षरें संजयानें अति आदरानें धृतराष्ट्रास सांगितल्यावर कांहीं कालानें तोही सुखी झाला. ९३ तीच अक्षरें मी ओबडधोबड मराठी भाषेंत, ज्याप्रमाणें मला समजलीं, त्याप्रमाणें सांगितलीं. ९४ कांटे सेवतीचें अंग पाहिलें असतां त्यांत कांहीं विशेष दिसत नाहीं, परंतु त्यांतील विशेष सुगंध नेणाऱ्या भ्रमरांनाच माहिती आहे. ९५ त्याप्रमाणें, माझ्या बोलण्यांत जे योग्य सिद्धांत असतील तेच आपण घ्यावे, व उणे असतील ते टाकून द्यावे; कारण लहान बाळाला कांहीं न समजणें हेंच स्वरूप होय. ९६ परंतु नेणतें जरी बाळ असलें, तरी त्याचें तें अज्ञान पाहून, आईबापास अति हर्ष होतो व ते त्याचें कौतुक करितात. ९७ त्याचप्रमाणें; तुम्ही संत माझे आईबाप आहां, तुमची प्राप्ती झाल्याबरोबर मी जें तुमच्यापुढें कौतुकानें वागतों, तोच हा ग्रंथ आहे, असें तुम्ही समजा. ९८ महाराज म्हणतातः—आतां, विश्वव्यापक असे जे माझे गुरु श्रीनिवृत्तिनाथ, ते ही माझी वाक्यरूपी पूजा सेवन करोत. ५९९

१ देत असे. २ मरण, प्राणांत. ३ प्रसंगीं. ४ वाटूं लागतां. ५ प्रकाश, उदय, गति. ६ फळें पिकल्यावर. ७ आंधळा धृतराष्ट्र. ८ निरूपणानें. ९ ओबडधोबड. १० पटणारे, मान्य. ११ सिद्धांत. १२ कौतुक, नवल. १३ मिळाल्यामुळें, भेटल्यामुळें. १४ प्रेम उत्पन्न झालें, लडिवाळपणा करितो. १५ निमित्तानें. १६ देवो.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सोळावा.

मावळवीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु । अद्वयाब्जिनीविकाशु ।
वंदूं आतां १ जो अविद्याराती रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञानचांदणियां । जो
सुदिनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा २ जेणें विवळतिये सवळे । लाहोनि आ-
त्मज्ञानाचे डोळे । सांडिती देहाहंतेचीं अविसाळें । जीवपक्षी ३ लिंगदेहकम-
ळाचा । पोटीं वेंचु तया चिद्भ्रमराचा । बंदिमोक्षु जयाचा । उदैला होय ४
शब्दांचिया आसकडीं । भेदनदीच्या दोहीं थडीं । आरडत विरहवेडीं । बु-
द्धिबोधु ५ तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान । भोगवी जो चि-
द्गगन । भुवनदिवा ६ जेणें पाहालिये पाहांटे । भेदाची चोरवेळ फिटे ।
रिघती आत्मानुभववाटे । पांथिक योगी ७ जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मे-
खसूर्यकांत फुणगे । दीपले जाळिती दांगें । संसाराचीं ८ जयाचा रश्मिपुंजु नि-
बरु । होता स्वरूप उखरीं स्थिरु । ये महासिद्धीचा पूरु । मृगजळ तें ९ जो
प्रत्यग्बोधाचिया माथया । सोहंतेचा मध्यान्हीं आलिया । लपे आत्मभ्रांति-
छाया । आपणपां तळीं १० ते वेळीं विश्वस्वप्नासहितें । कोण अन्यथामती नि-
द्रेतें । सांभाळी नुरेचि जेथें । मायाराती ११ म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ
महानंदाची दाटणी । मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं । मंदावों लागती १२
किंबहुना ऐसैसें । मुक्तकैवल्य सुदिवसें । सदा लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनी
१३ जो निजधामयोर्मीचा रावो । उदैलाचि उदैजतखेंवो । फेडी पूर्वादि दि-
शांसि ठावो । उदोअस्तूचा १४ नें दिसणें दिसणेंनसीं मावळवी । दोहीं झां-
किलें तें सैंघ पालेंवी । काय बहु बोलों ते आघवी । उखाचि ओनी १५ तो
अहोरात्रांचा पैलकडु । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु । जो प्रकाश्येंवीण सुरवाडु ।
प्रकाशाचा १६ तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां नमो म्हणों पुढतपुढती ।
जे बाधका येइजतसे स्तुती । बोलांचिया १७ देवाचें महिमान पाहोनियां ।

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सोळावा.

श्रीसद्गुरूला सूर्याची उपमा देऊन महाराज म्हणतातः--जगाच्या भास नाहींसा करणारा व अद्वैतरूप कमलाला उमलविणारा असा चमत्कारिक सूर्योदय झाला आहे त्याला माझा नमस्कार असो. १ जो सूर्य उगवल्यामुळें अज्ञानरूप रात्रीचा नाश करून व ज्ञानाज्ञानरूपी चांदण्या नाहींतशा करून ज्ञानी लोकांस आत्मबोधाचा सुदिन करतो; २ जो सूर्य उगवल्यामुळें आत्मज्ञानाचा प्रकाश होऊन जीवरूप पक्षी देहाभिमानरूप घरटी सोडून जातात; ३ वासनात्मक सूक्ष्मदेहरूपी कमलांत जीवचैतन्यरूपी भ्रमर जो अडकलेला असतो, तो ज्या सूर्याच्या उगवण्यामुळें बाहेर पडतो; ४ शास्त्रादिकांच्या शब्दरूप अडचणीमध्यें सांपडतांच अज्ञानरूप सायंकाळ झाल्यामुळें ज्या बुद्धि व ज्ञान या चक्रवाक पक्ष्यांच्या जोड्यांची फुटाफूट होऊन ती उभयतां जीवेश्वरभेदरूप नदीच्या दोन्ही कांठावर वियोगदुःखानें ओरडत असतात, ५ त्या बुद्धिबोधरूपी चक्रवाक पक्ष्यांचें जोडपें महारूप आकाशांत त्या सूर्योदयाच्या प्रकाशामुळें एकत्र होऊन समाधान पावतें. ६ ज्या श्रीगुरुरूप सूर्याचा उदय झाल्यावर भेदरूपी चोरांची भीति नाहींशी होऊन, योगी हेच पांथस्थ आत्मानुभवरूप वाट चालावयास लागतात; ७ ज्या सूर्याच्या विवेकरूपी किरणानें ज्ञानरूपी सूर्यकांत प्रदीप्त होऊन संसाररूपी वनें जाळून टाकतो; ८ ज्या सूर्याच्या प्रखर किरणांनीं आत्मस्वरूपी माळ जमिनीवर मृगजळाप्रमाणें महासिद्धींचा पूर आलेला दिसतो; ९ जो आत्मबोधाच्या माथ्यावर सोहंरूपी माध्यान्हाच्या वेळीं आल्यामुळें देहात्मभावाची म्हणजे 'मी देह आहें' ही भ्रांतीची छाया पायाखालीं नाहींशी होते, १० त्या वेळेस मायरूपी रात्र नाहींशी झाल्यामुळें विश्वरूपी स्वप्नासह विपरीत ज्ञानरूपी निद्रेची आठवण कोठून राहणार! ११ म्हणून, अद्वयबोधरूपी नगरांत महानंदाची गर्दी होऊन आनंदानुभवाची देवघेवही मंद होऊं लागते, १२ किंबहुना याप्रमाणें मोक्षकैवल्य सुदिन नेहमीं ज्या सूर्याच्या तेजामुळें प्रकाशित होतो; १३ जो सूर्य आत्मस्वरूपी आकाशाचा राजा असून नेहमीं बोधाचा उदय करणारा आहे, तो पूर्वादि दिशांसह उदय व अस्त यांचें अस्तित्व नाहींसें करतो. १४ ज्ञानासकट अज्ञान नाहींसें करून, शेवटीं ज्ञानाचाही लोप करून आत्मज्ञानाचा उजेड करितो. फार काय सांगावें! जो उदय कांहीं निराळाच आहे. १५ ज्या सूर्याच्या तेजापुढें दिवस व रात्र यांचा भास होत नसून, जो दुसऱ्या प्रकाशाशिवाय स्वयंप्रकाशित असतो; १६ असे चैतन्यरूपी सूर्य जे निवृत्ति महाराज, त्यांना वारंवार माझा नमस्कार असो. श्रीज्ञानेश्वरमहाराज आणखी म्हणतातः--त्यांची वाणीनें स्तुति करणें शोभत नाही. १७ ज्या वेळेस स्तुति करणारा, स्तोत्र व स्तुत्य ही त्रिपुटी नाहींशी होते,

१ सूर्य. २ अद्वैतरूप कमळिनीचा विकास करणारा. ३ अज्ञानरूप रात्र दूर करून. ४ आत्मबोधाचा. ५ उजडल्या पहांटेस. ६ घेऊन, मिळवून. ७ घरटीं. ८ वासनात्मक सूक्ष्म देहरूपी कमळाच्या. ९ संगत चाललेल्या, क्षीण होणाऱ्या, मरण. १० जीवचैतन्यरूपी भ्रमराचा. ११ बंधांतून मुक्तता. १२ उदयानें. १३ बुद्धीला मोह करणाऱ्या शास्त्रादिकांच्या. १४ अडचणीच्या जाग्यांत. १५ द्वैत नदीच्या. १६ कांठीं. १७ बुद्धिरूपी चक्रवाकी आणि ज्ञानरूपी चक्रवाक पक्षी. १८ जोडपें. १९ ऐक्याचें. २० चिदाकाशरूपी घरास प्रकाशित करणारा दिवा. २१ उजाडलेल्या. २२ पान्थस्थ. २३ ज्ञानरूपी सूर्यकांत मण्यांतून निघणाऱ्या. २४ ठिणग्या. २५ अरण्यें. २६ ज्ञानसूर्याचा. २७ किरणसमूह. २८ तीव्र, प्रखर. २९ आत्मस्वरूप. ३० अज्ञानरूप माळजमिनीवर. ३१ अहंब्रह्मास्मि या बोधाच्या. ३२ मस्तकावर. ३३ देहात्मभाव. ३४ विपरित ज्ञान. ३५ अद्वैतबोधरूपी शहरांत. ३६ आनंदानुभवाची. ३७ कमी होऊं लागतात. ३८ समाधिसुखरूप. ३९ नेहमी उदय पावलेलाच आहे. ४० उगवतांक्षणींच. ४१ पूर्वादि दिशासह उदयास्त नाहींसे करतो. ४२ अज्ञानाला ज्ञानासकट नाहींसें करतो. ४३ ज्ञान व अज्ञान. ४४ आत्मज्ञान. ४५ प्रकटवी. ४६ वेगळाच (अलौकिक) उषःकाल. ४७ प्रकाशित होणाऱ्या पदार्थांवांचून. ४८ सुकाळ. ४९ चैतन्यरूपी--सूर्यास. ५० कारण, स्तुती म्हटली म्हणजे शब्दाची बाधता (उपाधि) लागते;

स्तुती तरी येइजे चांगोवया । जरी स्तव्यबुद्धीसीं लया । जाइजे कां १८ जो सर्वनोणिवां जाणिजे । मौनाचिया मिठीया वानिजे । कांहींच न होनि आणिजे। आपणपयां जो १९ तया तुझिया उद्देशासाठीं । पैश्यंती मध्यमा पोटीं । सूनि परेसींही पाठीं । वैखरी विरे २० तया तूतें मीं सेवकपणें । लेववीं बोलकेया स्तोत्राचें लेणें । हें उपसावेंही म्हणतां उणें । अद्वयानंदा २१ परी रंकें अमृताचा सागरु । देखिलिया पडे उचितांचा विसरु । मग करूं धांवें पाहुणेरु । शाकांचा तया २२ तेथ शाकुही कीर बहुत म्हणावा । तयाचा हर्षवेगुचि तो घ्यावा । उजळोनि दिव्यतेजा हींतिवा । ते भक्तीचि पाहावी २३ बाळा उचित जाणणें होये । तरी बाळपणाचि कें आहे । परी साचाचि येरी माये । म्हणोनि तोषे २४ हां गा गोवरसें भरलें । पाणी पाठीं पाय देत आलें । तें गंगा काय म्हणितलें । परतें सर २५ जी भृगूचा कैसा अपकारु । कीं तो मानूनि प्रियोपचारु । तोषेचिना शार्ङ्गधरु । गुरुत्वासीं २६ कीं आंधारें खेंतलें अंबर । झालेया दिवसनाथासमोर । तेणें तयातें पन्हा सैर । म्हणितलें काई २७ तेवीं भेदबुद्धीचिये तुळे । घालूनि सूर्यश्लेषांचे कांटोळें । तुकिलासि तें येकी वेळे । उपसाहिजो जी २८ जिहीं ध्यानाचा डोळां पाहिलासी । वेदादि वाचां वानिलासी । जें उपसाहिलें तयांसी । तें आम्हांही करीं २९ परी मी आजि तुझ्या गुणीं । लांचावलों अपराधु न गणीं । भलतें कैरीं परी अर्धधणीं । नुठीं कदा ३० मियां गीता येणें नांवें । तुझें पसायामृत सुहावें । वानूं लाधलों तें दुणेन थांवें । दैवलों दैवें ३१ माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प । तया फळावें हें महाद्वीप । पातली प्रभु ३२ पुण्यें पोशिलीं असाधारणें । तियें तुझे गुण वानणें । देवूनि मज उत्तीर्णें । जालीं आजीं ३३ जी जीवित्वांच्या आडवीं । आडुडलों होतों मरणगांवीं । ते अवदसाचि आघवी । फेडिली आजी ३४ जे गीता येणें नांवें नांवाणिगी । जे अविद्या जिणोनि दोंडुगी । ते कीर्ती तुझी आम्हांजोगी । वानावया जाली ३५ पैं निर्धना घरीं वानिवसें । महालक्ष्मी येऊनि बैसे । तयातें निर्धन ऐसें । म्हणों ये काई ३६ कां अंधकाराचिया ठाया । दैवें सूर्यु आलिया । तो अंधारुचि जगा यया । प्रकाशु नोहे ३७ जया देवाची पाहतां थोरी । विश्व परमाणुही दशा न धरी । तो भावाचिये सरोभरी । नव्हेचि काई ३८ तैसा मी गीता वाखाणीं । हे खपुष्पाची तुरंबणी । परी समर्थें तुवां

तेव्हांच देवाच्या योग्यतेचे मानानें खरी स्तुति होते. १८
सर्व वस्तूंचें ज्ञान नाहींसें होणें हेंच ज्याला जाणणें होय,
व मौन धरून कांहीएक वर्णन न करणें हेंच ज्याचें वर्णन
करणें होय, आणि जेव्हां आपलेपणाची आठवण नाहींशी
होते, त्या वेळेस ज्याची प्राप्ति होते, १९ त्या तुमची
स्तुति करण्याकरितां परेलाही पाठीमागें सारून पश्यंती
व मध्यमा यांच्या पोटीं वैखरी लय पावते. २० त्या
तुम्हांला, हे अद्वयानंदरूपी गुरो, मी सेवक या नात्यानें
स्तुतिरूप अलंकार घालतों. हें घालणें जरी आपल्या
योग्यतेच्या मानानें कमी आहे, तरी त्याचा आपण स्वी-
कार करावा. २१ एकाद्या दरिद्र्यानें अमृताचा सिंधु
पाहिल्यावर त्याच्या योग्यतेनुसार त्याचा काय पाहुण-
चार करावा, याचें भान न राहून तो जसा भाजीपा-
ल्याचीच मेजवानी करतो; २२ त्या ठिकाणीं, भाजीपाला
हेंच पक्वान्न समजून त्याची पाहुणचार करण्याची पूर्ण
इच्छा; तीच विशेष मानली पाहिजे; अथवा सूर्याला
काडवातीनें त्याच्या दिव्य तेजापुढें कोणी ओवाळूं
लागला असतां, त्या ठिकाणीं काडवातीच्या उजेडाचा
कमीपणा मनांत न आणतां, त्याची भक्तीच विशेष मानली
पाहिजे. २३ लहान बालकाला योग्य व अयोग्य, हें
जर समजलें, तर मग बाळपण तें काय? म्हणून,
त्याच्या कृत्याचेंच मातुश्री कौतुक मानून संतोष पावते.
२४ असें पहा-नाल्याच्या पाण्याचे लोट गंगेच्या पाण्या-
वर पाय देऊन आंत घुसले; तर ती त्याला नको येऊं
किंवा परत जा असें म्हणते का? २५ भृगु ऋषींनीं श्रीकृ-
ष्णांच्या हृदयावर लाथ मारली, हा खरोखर पाहूं गेलें
असतां केवढा अन्याय त्यांनीं केला? परंतु उलटा तोच
प्रेमानें अलंकार समजून श्रीकृष्णांनीं आपल्या हृदयावर गुरु-
प्रसाद म्हणून श्रीवत्सलांच्छन चिन्ह बाळगलें! २६ किंवा
अंधारानें भरलेलें जग सूर्योदय झाल्याबरोबर उजेडानें भरतें,
त्या वेळेस सूर्यानें अंधेरास 'मागें सर' म्हणून म्हटलें आहे
का? २७ त्याचप्रमाणें, तुमच्या ठिकाणीं भेदबुद्धीची तराजू
करून तुम्हांला सूर्याबरोबर पारड्यांत घालून तुलना केली,
ह्या माझे हातून घडलेल्या अपराधाची, गुरो, आपण क्षमा
करा. २८ योग्यांनीं ध्यानदृष्टीनें तुला पाहिलें व वेदांनीं
आपल्या वाचेनें तुमचें वर्णन केलें, ह्या गोष्टी जशा तुम्हीं
सहन केल्या, त्याप्रमाणें, मी जी तुमची तुलना केली,
त्याची क्षमा करा; २९ परंतु तुमचे गुणानुवाद वर्णन कर-
ण्यास मी सवकलों आहें, पण हा माझा अपराध समजूं
नका. तुम्ही वाटेल तें जरी केलें तरी मी अर्धपोटीं उठ-
णार नाहीं. ३० मी गीतारूप प्रसादामृताचें आवडीनें
वर्णन करूं लागलों, तों तुमच्या कृपेनें मला दुप्पट बळ
आलें, व मी मोठा भाग्यवान झालों. ३१ प्रभो, माझ्या
वाचेनें अनंत जन्मीं सत्यभाषणरूप तप केलें, त्याचें फळ
हें गीतानामक महाद्वीप मला मिळालें. ३२ मी आजप-
र्यंत जी बहुत पुण्याई केली, तिनें तुमचे गुणानुवाद वर्णन
करणें, हेंच फळ मला देऊन ती माझी उतराई झाली.
३३ मी देहसंबंधाच्या अरण्यांत-जेथें जन्ममरण घ्यावें
लागतें, तेथें सांपडलों होतों; ती सर्व माझी पीडा आज
दूर झाली. ३४ जी 'गीता' या नांवानें प्रसिद्ध आहे, व
अविद्येचा नाश करून बलवान् झाली आहे, ती तुमची
कीर्ति आम्हीं वर्णन करण्यासारखी आहे. ३५ दरिद्र्याचे
घरीं अकस्मात् महालक्ष्मी आली, तर मग त्याला
दरिद्री म्हणतां येईल काय? ३६ अथवा अंधाराच्या
घरीं दैवयोगानें सूर्य पाहुणा आला, तर तोच अंधकार
जगाला प्रकाशमय होत नाहीं का? ३७ ज्या ईश्व-
राच्या योग्यतेपुढें जग हें परमाणुएवढेंही दिसत
नाहीं, तो ईश्वर भक्तीनें पाहिजे तें रूप धारण करीत
नाहीं काय? ३८ त्याप्रमाणें, माझें गीतेचें व्याख्यान
म्हणजे आकाशाच्या पुष्पाचा वास घेण्यासारखी
अघटित करणी होय; परंतु आपण समर्थ असल्यामुळें

१ वर्णन करण्यासाठीं. २ स्तुतीचा विषय बुद्धीसह नाहींसा झाला तरी. ३ चार वाणींतील दुसरी. ४ चार वाणींतील तिसरी. ५ पाठीमागें घालून. ६ सहन करावें, स्वीकारावें. ७ भिकाऱ्यानें ८ योग्यायोग्यतेचा. ९ मेज-वानी. १० लावून. ११ सूर्य. १२ काडवात. १३ योग्या-योग्य. १४ नाल्याच्या पाण्यानें. १५ अन्याय. १६ गुरु-प्रसादाला. १७ भरलें. १८ आकाश. १९ पलीकडे हो. २० तराजूंत. २१ सूर्याच्या बरोबरीचें, उपमेचें. २२ वजन, माप २३ तोलण्यास. २४ ज्या योग्यांनीं. २५ सव-कलों. २६ पाहिजे तें कर. २७ अर्धवट तृप्त. २८ प्रसा-दामृत. २९ सेवावें. ३० दुप्पट बळानें. ३१ दैववान् झालों. ३२ गीतानामक द्वीप. ३३ आचरिलें. ३४ पुष्कळ. ३५ उतराई. ३६ देहसंबंधाच्या. ३७ अरण्यांत. ३८ सांपडलों. ३९ पीडा. ४० नामांकित. ४१ बलाढ्य. ४२ वर्णावया. ४३ अकस्मात्. ४४ मळीच्या, जोरावर. ४५ मरतांत. ४६ प्राप्त होत नाहीं का. ४७ आकाशपुष्पाची. ४८ वास घेणें.

शिर्याणी । फेडिली ते ३९ म्हणौनि तुझेनि प्रसादें । मी गीतापद्यें अगाधें । निरूपीन जी विशदें । ज्ञानदेवो म्हणे ४० तरी अध्यायीं पंधरावा । श्रीकृष्णें तया पांडवा । शास्त्रसिद्धांतु आंघवा । उगाणिला ४१ जे वृक्षरूपक परिभाषा । केलें उपाधिरूप अशेषा । सद्वैद्यें जैसें दोषा । अंगलीना ४२ आणि कूटस्थु जो अक्षरु । दाविला पुरुषप्रकारु । तेणें उपहितांही आकारु । चैतन्या केला ४३ पाठीं उत्तम पुरुष । शब्दाचें करूनि मिष । दाविलें चोख । आत्मतत्त्व ४४ आत्मविषयीं आंतुवट । साधन जें आंगेदट । ज्ञान हेंही स्पष्ट । चावळला ४५ म्हणौनि इये अध्यायीं । निरूप्य नुरेचि कांहीं । आतां गुरुशिष्यां दोहीं । स्नेहो लाहणा ४६ एवं इयेविषयीं कीर । जाणते बुझावले अपार । परी मुमुक्षु इतर । साकांक्ष जाले ४७ त्या मज पुरुषोत्तमा । ज्ञानें भेटे जो सुवर्मा । तो सर्वज्ञु तोचि सीमा । भक्तीचीही ४८ ऐसें हें त्रैलोक्यनायकें । बोलिलें अध्यायांत श्लोकें । तेथें ज्ञानचि बहुतेकें । वानिलें तोषें ४९ भरुनि प्रपंचाचा घोंटु । कीजे देखतांचि देखतया द्दष्टु । आनंदसाम्राज्यीं पाटु । बांधिजे जीवा ५० येवढेया लोठेपणाचा उपावो । आनु नाहींचि म्हणे देवो । हा सम्यक् ज्ञानाचा रावो । उपायांमाजीं ५१ ऐसे आत्मजिज्ञासु जे होते । तिहीं तोषलेनि चित्तें । आदरें तया ज्ञानातें । वोवाळिलें जीवें ५२ आतां आवडी जेथ पडे । तयाची अवसरीं पुढें पुढें । रिगों लागे हें घडे । प्रेम ऐसें ५३ म्हणौनि जिज्ञासूंच्या पैकीं । ज्ञानी प्रतीति होय ना जंव निकी । तंव योगें क्षेमुं ज्ञानाविखीं । स्फुरेलचि कीं ५४ म्हणोनि तेंचि सम्यक् ज्ञान । कैसेनि होय स्वाधीन । जालिया वृद्धियत्न । घडेल केवीं ५५ कां उपजोंचि जें न लाहे । जें उपजलेंही अव्हांटा सूये । तें ज्ञानीं विरुद्ध काय आहे । हें जाणावें कीं ५६ मग जाणतयां जें विरू । तयाची वाट वाहती करूं । ज्ञानहित तेंचि विचारूं । सर्वभावें ५७ ऐसा ज्ञानजिज्ञासु तुम्हीं समस्तीं । भावो जो धरिला असे चित्तीं । तो पुरवावया लक्ष्मीपती । बोलिजेल ५८ ज्ञानासि सुजन्म जोडे । आपली विश्रांतिही वरी वाढे । ते संपत्तीचे पवाडे । सांगिजेल दैवी ५९ आणि ज्ञानाचेनि कामीकारें । जे रागद्वेषांसि दे थारे । तिये आसुरियेहि घोरे । करील रूप ६० सहज इष्टानिष्टकरणी । दोघीचि इया कवतुकिणी । हे नवमाध्यायीं उभारणी । केली होती ६१ तेथ सौडमा धैर्यावयां उवावो । तंव वोडवला आन प्रस्तावो । तरी तया प्रसंगें आतां देवो ।

माझी हौस पूर्ण केली. ३९ म्हणून महाराज म्हणतात, तुमच्या प्रसादानें गीतेंतील सर्व श्लोकांचा अर्थ मी स्पष्ट सांगेन. ४० तरी पंधराव्या अध्यायांत श्रीकृष्णांनी अर्जुनास सर्व शास्त्रसिद्धांत स्पष्ट करून सांगितला. ४१ ज्याप्रमाणें अंगांत मुरलेल्या रोगाची उत्तम वैद्यानें चिकित्सा करून निदान ठरवावें, त्याप्रमाणें, ब्रह्म हें मायेच्या उपाधीनें जगद्रूप धारण करतें, त्याची वृक्षाबरोबर तुलना केली; ४२ आणि अविनाशी असा जो देहांतील जीवात्मा तो पुरुष या शब्दानें स्पष्ट करून सांगितला. त्यानें उपाधियुक्त जें चैतन्य त्याचेंही ज्ञान करून दिलें. ४३ नंतर, केवळ शुद्ध जें आत्मतत्त्व ( ब्रह्म ) त्याला उत्तम पुरुष या शब्दानें स्पष्ट केलें. ४४ आत्मप्राप्तीकरितां बळकट साधन जें ज्ञान, तेंही स्पष्ट करून सांगितलें. ४५ म्हणून या अध्यायांत निरूपण करण्याचें कांहीं उरलें नाहीं, परंतु गुरु व शिष्य यांच्या स्नेहातिशयामुळें बोललेली गोष्ट पुनः बोलण्यांत येते. ४६ याप्रमाणें, पंधराव्या अध्यायांत सांगितलेल्या सर्व गोष्टी ज्ञान्यांना पूर्ण रीतीनें समजल्या, परंतु इतर जे मुमुक्षु होते, त्यांची शंका निवारण झाली नाहीं. ४७ 'असा जो मी पुरुषोत्तम, त्याला जो मर्मज्ञ ज्ञानाची प्राप्ति करून घेऊन भेटतो, तो सर्वज्ञ, व तोच माझा खरा भक्त होय.' ४८ असें त्रैलोक्यनायक भगवान् श्रीकृष्णांनी पंधराव्या अध्यायाच्या शेवटल्या श्लोकांत परम संतोषानें ज्ञानाचें विशेष वर्णन केलें आहे. ४९ संसाराचा घोंट घेऊन ब्रह्माचें दर्शन होण्याबरोबर, पहाणारा ब्रह्मरूप होऊन जीवाला आनंदरूपी राज्याचा पट्टाभिषेक होतो. ५० असा ब्रह्मप्राप्तीचा दुसरा बलवत्तर उपाय नाहीं, व सर्व उपायांत यथार्थ ज्ञान हा राजा आहे, असें श्रीकृष्ण म्हणाले. ५१ याप्रमाणें, आत्मज्ञानप्राप्तीची इच्छा करणारे जे होते, त्यांना संतोष होऊन त्यांनी आपले प्राण ज्ञानावरून ओंवाळून टाकले. ५२ आतां, ज्याबद्दल आवड उत्पन्न होते, त्या वस्तूबद्दल अधिकाधिकच विचार उत्पन्न होतात, असें प्रेमाचें लक्षणच आहे. ५३ म्हणून, जिज्ञासूंपैकी ज्यांना केवळ ज्ञानाचा अनुभव नव्हता, त्यांना, ज्ञान प्राप्त करून घेऊन त्याचें रक्षण कसें करावें, अशी काळजी उत्पन्न होणें साहजिक आहे. ५४ म्हणून, तेंच अपरोक्ष ज्ञान आपल्यास कसें प्राप्त होईल, व पुढें कसें वृद्धिंगत होईल; ५५ किंवा जें ज्ञान प्राप्त न व्हावें, व प्राप्त झालें असतांही आडमार्गास लावावें, अशी ज्ञानास विघ्न करणारी कोणती गोष्ट आहे, ती समजावी; ५६ मग ज्ञानप्राप्तीच्या विरुद्ध अशी जी गोष्ट असेल, ती सोडून देऊन ज्ञानप्राप्तीस हितकर अशी कोणती गोष्ट आहे, ती मनोभावानें, विचारावी; ५७ याप्रमाणें, ज्ञानप्राप्तीची इच्छा करणाऱ्या, तुम्ही जी मनांत शंका आणली आहे, तिचें निवारण करण्याकरितां श्रीकृष्ण उपाय सांगतील. ५८ ज्ञानाची उत्तम वेळेवर प्राप्ति होऊन त्याचे योगानें स्वरूपाची प्राप्ति होईल, अशी जी दैवी संपत्ति तिचें वर्णन करतील; ५९ आणि ज्या आसुरी संपत्तीमुळें रागद्वेषांस थारा मिळून ज्ञानाचा नाश होतो, तिचेंही वर्णन करतील. ६० अशी दैवी व आसुरी संपत्ति, ज्यांचे योगानें इष्ट व अनिष्ट कार्यें घडतात, तें सांगण्याची नवव्या अध्यायांत सुरवात केली होती, ६१ त्या वेळेस सगळा विचार करावयाचा होता, परंतु दुसरा प्रसंग उद्भवल्यामुळें तो तसाच राहिला. म्हणून तो प्रसंग

१ आवड, हौस. २ गीतेंतील श्लोक. ३ स्पष्ट. ४ सर्व. ५ सांगितला. ६ सर्व. ७ अंगांत मुरलेल्या. ८ देहांतील जीव. ९ अविनाशी. १० उपाधियुक्त. ११ स्पष्ट केलें, आकारास आणलें. १२ अंतरंग. १३ बळकट, श्रेष्ठ. १४ बोलला. १५ न सांगण्याजोगें. १६ प्राप्त झाला. १७ समजाविलें. १८ दीक्षित. १९ मर्मज्ञ. २० पराकाष्ठा. २१ विशेषें करून. २२ जाणा. २३ पहात असतां, पाहणाऱ्याला (दृष्ट कोणें) पाहण्याचा विषय केला, पाहणाऱ्याला पाहणारा दिसला, स्वरूपबोध केला. २४ पट्टाभिषेक. २५ बलवत्तर. २६ खऱ्या, उत्तम. २७ आत्मज्ञानेच्छु. २८ प्रसंग. २९ ज्ञानेच्छूच्या. ३० अनुभव. ३१ चांगली. ३२ अप्राप्ताची प्राप्ति. ३३ प्राप्ताचें संरक्षण. ३४ जें उत्पन्न होऊं देत नाहीं. ३५ आडवाटा. ३६ मागते. ३७ विघ्न करणारें. ३८ ज्ञानाला. ३९ विरुद्ध. ४० स्वरूपाची प्राप्ति. ४१ "अभयं सत्त्वसंशुद्धिः" इत्यादि. ४२ अंकितपणानें. ४३ आसरा, ठिकाण. ४४ आसुरी संपत्ति. ४५ सांगा. ४६ घ्यावयाचा. ४७ विचार. ४८ प्राप्त झाला. ४९ दुसरा प्रसंग.

निरूपीत असे ६२ तया निरूपणाचेनि नांवें। अध्याय पद सोळावें। लावणी पाहतां जाणावें। मागिलावरी ६३ परी हें असो आतां प्रस्तुतीं। ज्ञानाच्या हिताहितीं। समर्था संपत्ती। इयाचि दोन्ही ६४ जे मुमुक्षुमार्गींची बोळावी। जे मोहरात्रीची धर्मदिवी। ते आधीं तंव दैवी। संपत्ती ऐका ६५ जेथ एक एकातें पोखी। ऐसे बहुत पदार्थ येकीं। संपादिजंती तें लोकीं। संपत्ती म्हणिजे ६६ ते दैवी सुखसंभवी। तेथ दैवगुणें येकोपजीवी। जाली म्हणौनि दैवी। संपत्ति हे ६७

श्रीभगवानुवाचः—

अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः। दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम्॥ १॥

आतां तयाचि दैवगुणां-। माजीं धुरेचा बैसणा। बैसे तया आकर्णा। अभय ऐसें ६८ तरी नें घल्लूनि महापुरीं। न घेपे बुडणयाची शियारी। कां रोगु न गणिजे घरीं। पथ्याचिया ६९ तैसा कर्माकर्माचिया मोहरीं। उठूं नेदूनि अहंकारा। संसाराचा दरारा। सांडणें येणें ७० अथवा ऐक्यभावाचेनि पैसें। दुजें मानूनि आत्मा ऐसें। भयवार्ता देशें। दवडणें जें ७१ पाणी बुडऊं ये मिठातें। तंव मीठचि पाणी आतें। तेवीं आपण जालेनि अद्वैतें। नाशे भय ७२ अगा अभय येणें नांवें। बोलिजे तें हें जाणावें। सम्यक्ज्ञानाचें आघवें। धांवणें हें ७३ आतां सत्त्वशुद्धी जे म्हणिजे। ते ऐशा चिन्हीं जाणिजे। तरी जळे ना विझे। राखोंडी जैसी ७४ कां पाडिवा वाढी न मगे। अंवसे तुटी सांडूनि मागे। माजीं अतिसूक्ष्म अंगें। चंद्रु जैसा राहे ७५ नातरी वार्षियें मांडिली। ग्रीष्में नाहीं सांडिली। माजीं निजरूपें निवडली। गंगा जैसी ७६ तैसी संकल्पविकल्पाची वोढी। सांडूनि रजतमाची कावडी। भोगितां निजधर्माची आवडी। बुद्धि उरे ७७ इंद्रियवर्गीं दाखविलिया। विरुद्धा अथवा भलीया। विस्मयो कांहीं केलिया। नुठी चित्तीं ७८ गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु। भलतेसणी हानिलाभु। न मनीं जेवीं ७९ तेवीं सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धी जें ऐसें अनन्य होणें। ते सत्त्वशुद्धी म्हणे। केशिहंतो ८० आतां आत्मलाभाविखीं। ज्ञानयोगामाजीं एकीं। जे आपुलिया ठाकीं। हांवें भरे ८१ तेथ सगळिये चित्तवृत्ती। त्यागु करणें या रीतीं। निष्कामें पूर्णाहुती। हुताशीं जैसी ८२ का सुकुळीनें आपुली। आ-

आतां देव निरूपण करतील, ६२ त्या निरूपणाच्या संबंधानें मागील पंधरा अध्याय झाले. त्याचे पुढचा हा सोळावा अध्याय होय. ६३ परंतु हें असो; या दोन संपत्ति ( दैवी व आसुरी ) ज्ञानाची प्राप्ति व हानि करून देण्यास समर्थ आहेत. ६४ जी दैवी संपत्ति मुमुक्षूला मोक्षमार्गांत सोबत करणारी व मोहरूप रात्रीं वाट चालण्यास धर्मरूप मशाल होय, तिचें आधीं वर्णन करतों; तें ऐका. ६५ ज्या ठिकाणीं एक दुसऱ्याला साह्य करितो, असे पुष्कळ पदार्थ एके ठिकाणीं जमतात त्याला संपत्ती असें म्हणतात, ६६ अशी जी दैवयोगानें एके ठिकाणीं जमलेल्या सर्वांस सुख देणारी, तिलाच दैवीसंपत्ति असें म्हणतात. ६७

**अन्वयार्थ**—(अभयं)–शास्त्रानें उपदेशिलेल्या अर्थाचें निर्भयपणें–निःशंकपणें अनुष्ठान करणें–( सत्त्वसंशुद्धिः )–चित्ताची अतिशय शुद्धि–कपटादिकांचा त्याग करून शुद्धभावानें व्यवहार करणें–(ज्ञानयोगव्यवस्थितिः)–ज्ञान व योग यांतील सन्निष्ठता,–( दानं )–यथाशक्ति–अन्नादिक वाटणें–(च दमः)–बाह्य इंद्रियांचा निग्रह,–(च यज्ञः)–व श्रौत अग्निहोत्र आणि स्मार्त देवयज्ञ,–(स्वाध्यायः)–ऋग्वेदादिकांचें पुण्यासाठीं अध्ययन–(तपः)–कायिक, वाचिक व मानसिक तप–(आर्जवं)–अंतःकरणाचा सरळपणा. १

[ **अभयं** ] आतां, त्या दैवगुणांमध्यें ज्याला प्रमुखत्व प्राप्त होतें, त्याला अभय असें म्हणतात. ६८ जो महापुरांत उडी घालीत नाहीं; त्याला बुडण्याचें भय नसतें; किंवा जो पथ्यानें वागतो, त्याला रोग उत्पन्न होत नाहींत, ६९ त्याचप्रमाणें, जो कोणतेंही कर्म करते वेळीं अहंकार उत्पन्न होऊं देत नाहीं, त्याला संसाराचें भय कोठून असणार ? ७० अथवा अद्वैतभावाच्या विस्तारानें जो सर्व जग आत्मस्वरूप आहे असें समजतो त्याला भयाची गोष्टही ऐकूं येत नाहीं. ७१ पाणी मिठास बुडविण्यास लागलें असतां जसें मिठाचेंच पाणी होतें, त्याप्रमाणें आपली अद्वैतभावना झाल्यावर भयाचा नाश होतो. ७२ अरे, अभय ज्याला म्हणतात त्याचीं हीं लक्षणें होत, व हें अभय सम्यक्ज्ञानाची इच्छा करणाराचें पाठीराखें होय. ७३ [ **सत्त्वसंशुद्धिः** ] आतां शुद्ध बुद्धि जिला म्हणतात, ती अशा चिन्हांनीं ओळखावी. ज्याप्रमाणें राखोंडी जळतही नाहीं व विझतही नाहीं, त्याप्रमाणें संकल्प व विकल्प हे दोन्ही नसतात; ७४ किंवा प्रतिपदेस सुरवात होण्याच्या पूर्वी व अमावास्या संपल्यावर मधल्या वेळांत चंद्राचें जसें अति सूक्ष्म रूप असतें; ७५ अथवा ग्रीष्म ऋतूच्या अंतीं व वर्षाऋतु सुरू होण्याच्यापूर्वी गंगेच्या पाण्याचें स्वरूप निवळ ज्याप्रमाणें असतें; ७६ त्याप्रमाणें, संकल्प व विकल्प हे दोन्ही ज्या ठिकाणीं उरले नाहींत, व रजोगुण व तमोगुण हेही ज्या ठिकाणीं नाहींतसे झाले आहेत, व ज्या बुद्धीस स्वरूपाचें ध्यान करण्याची आवड उत्पन्न झालेली आहे; ७७ इंद्रियवर्गांनीं आवडते किंवा नावडते विषय दाखविले असतांही ज्या बुद्धीच्या ठिकाणीं इच्छा उत्पन्न होत नाहीं; ७८ पतिव्रता स्त्रीचा पति गांवास गेल्यामुळें ती विरहानें विव्हळ झाली असतां, तिला पाहिजे तेवढी हानि किंवा लाभ यांची वार्ता सांगितली, तरी त्याकडे जसें तिचें मन जात नाहीं, ७९ त्याप्रमाणें स्वस्वरूपाची आवड उत्पन्न होऊन बुद्धि एकनिष्ठ होणें, याला सत्त्वशुद्धि म्हणतात, असें केशी दैत्यास मारणार श्रीकृष्ण म्हणाले. ८० [ **ज्ञानयोगव्यवस्थितिः** ] आतां, आत्मलाभाकरितां, ज्ञान किंवा योग या दोहोंपैकीं आपली बुद्धि ज्यावर स्थिर होईल, ८१ त्या ठिकाणीं आपली चित्तवृत्ति स्थिर करावी. ज्याप्रमाणें पुढें कोणतीही आहुति देणें राहिली नाहीं, म्हणजे पूर्णाहुति देतात; ८२ किंवा कुलीन मनुष्यानें आपली कन्या उत्तम कुळांत अर्पण केल्यावर जशी ती तेथेंच स्थिर होते,

१ संबंध. २ मागल्यावरून. ३ पोंचविणारी. ४ धर्मरूपी दिवटी. ५ पोसणारी. ६ एके ठिकाणीं. ७ संपादन केले जातात. ८ तिला. ९ एकच आश्रय. १० अग्रभागींचा. ११ ऐका. १२ उडी न घालतां. १३ भय, कंप. १४ मार्गास. १५ विस्तारानें. १६ सर्व जग आत्मस्वरूप आहे असें मानून. १७ होतें. १८ पाठीराखें. १९ शुद्ध बुद्धि. २० प्रतिपदा. २१ सुरवात झाली नाहीं तोंच. २२ क्षय. २३ निजरूप. २४ वर्षाऋतूनें. २५ ओद. २६ स्वस्वरूप धारणेची. २७ पति. २८ पाहिजे तेवढी. २९ केशी दैत्यास मारणारा श्रीकृष्ण. ३० स्थिर होईल. ३१ मनामध्यें. ३२ कुळवंतानें.

त्मजा सत्कुळींचि दिधली । हें असो लक्ष्मी स्थिरावली । मुकुंदीं जैसी ८३ तैसें निर्विकल्पपणें । जें योगज्ञानींच या वृत्तिके होणें । तो तिजा गुण म्हणे । कृष्णनाथु ८४ आतां देहवाचाचित्तें । यथासंपन्ने वित्तें । वैरी जालियाही आर्तीतें । न वंचणें जें कां ८५ पत्र पुष्प छाया । फळ मूळ धनंजया । वाटेचा न चुके आलिया । वृक्षु जैसा ८६ तैसें मनौनि धनधान्यवरी । विद्यमानें आल्या अवसरीं । श्रांतांचिये मनोहारीं । उपयोगा जाणें ८७ तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन । हें असो आइक चिन्ह । दमाचें तें ८८ तरी विषयेंद्रियां मिळणी । करूनि घापे वितुटणी । जैसें तोडिजे खड्गपाणी । परिकेया ८९ तैसा विषयजातांचा वारा । व्राजों नेदिजे इंद्रियद्वारां । इयें बांधोनि प्रत्याहारा । हातीं वोपी ९० आंतुला चित्ताचे अंगेंवरी । प्रवृत्ति पेलूनि माघारी । आगी सुंयिजे दाहींही द्वारीं । वैराग्याची ९१ श्वासोश्वासाहुनी बहुवसें । व्रतें आचरे खरपुसें । वोसंतितो रात्रिदिवसें । नारोणुक जया ९२ पैं दमु ऐसा म्हणिपे । तो हा जाण स्वरूपें । यागार्थु संक्षेपें । सांगों ऐक ९३ तरी ब्राह्मण करूनि धुरे । स्त्रियादिक पैल मेरे । माझारीं अधिकारें । आपुलालेनी ९४ जया जे सर्वोत्तम । भजनीय देवताधर्म । ते तेणें यथागम । विधी यजिजे ९५ जैसा द्विज षट्कर्मे करी । शूद्र तयातें नमस्कारी । कीं दोहींसही सरोभरी । निपजे यागु ९६ तैसें अधिकारपर्यालोचें । हें यज्ञ करणें सर्वांचें । परी विषयविष फळाशेचें । न घापे माजीं ९७ आणि मी कर्ता ऐसा भावो । नेदिजे देहाचेनि द्वारें जावों । नाँ वेदाज्ञेसि तरी ठावो । होइजे स्वयें ९८ अर्जुना एवं यज्ञु । सर्वत्र जाण सौज्ञु । कैवल्यमार्गींचा अभिज्ञु । सांगाती हा ९९ आतां चेंडुवें भूमी हाणिजे । हे नव्हे तो हाता आणिजे । कीं शेतीं बीं विखुरिजे । परी पिकीं लक्ष १०० नातरी ठेविलें देखावया । आदर कीजे दिविया । कां शाखा फळें यावया । सिंपिजे मूळ १ हें बहु असो आरिसा । आपणपें देखावया जैसा । पुढतपुढती बहुवसा । उटिजे प्रीती २ तैसा वेदप्रतिपाद्यु जो ईश्वरु । तो होआवयालागीं गोचरु । श्रुतीचा निरंतरु । अभ्यासु करणें ३ तेंचि द्विजांसीच ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र कां नाममंत्र । आवर्तवणें पवित्र । पावावया तत्त्व ४ पार्था गा स्वाध्यावो । बोलिजे तो हा म्हणे देवो । आतां तप शब्दाभिप्रावो । आईक सांगों ५ तरी दानें सर्वस्व देणें । वेंचणें तें व्यर्थ करणें । जैसें फळोनि

अथवा समुद्रमंथन करून लक्ष्मी वर आल्यावर ती जशी एका विष्णूचे ठिकाणीच स्थिर झाली, ८३ त्याप्रमाणें, विकल्परहित होऊन योग किंवा ज्ञान त्यांच्या ठिकाणी वर्तनदार होणें हा तिसरा ज्ञानयोग आहे, असें श्रीकृष्ण म्हणाले. ८४ [ दानं ] आतां शक्त्यनुसार कायावाचामनेंकरून आपल्यास जें दान करावयाचें, तें आपली शत्रु असून जर खरोखर अडलेला असेल, तर त्यासही द्यावें, हेंच खरें दान होय. ८५ धनंजया, वृक्ष ज्याप्रमाणें आपली फुलें, फळें, छाया, मुळ्या, पानें यांपैकी कांहीही वाटेनें जाणारापासून लपवून ठेवीत नाही, ( पाहिजे त्यास आपल्या सर्वस्वाचा उपयोग घेण्यास मनाई करीत नाही, ) ८६ त्याचप्रमाणें मनापासून संपत्तीपर्यंत प्रसंगानुसार हवें तें देऊन दमलेल्याचें त्याच्या मनोरथाप्रमाणें समाधान करणें, ८७ त्यालाच दान असें म्हणतात व तें मोक्षरूपी ठेवा दृष्टीस पडण्याचें अंजन आहे. हें असो; [ दमश्च ] आतां दमाचीं लक्षणें सांगतों, ती ऐक. ८८ ज्याप्रमाणें शस्त्र धारण करणारा शत्रूचा नाश करितो, त्याप्रमाणें विषय व इंद्रियें यांचें जें ऐक्य झालेलें असतें त्याचा जो वियोग करतो; ८९ त्याचप्रमाणें, इंद्रियद्वारांनी येणाऱ्या विषयांचा वारा देखील लागू देत नाही, व इंद्रियें प्रत्याहाराच्या ताब्यांत बांधून देतो; ९० चित्ताच्या आंत गढून गेलेली जी प्रवृत्ति ती दहा इंद्रियांच्या द्वारांनी वैराग्यरूप अग्नि आंत घालवून बाहेर काढतो. ९१ श्वासोच्छ्वास बंद करण्याहूनही योगांची जीं अति कठिण व्रतें त्यांचें उत्तम रीतीनें जो रात्रंदिवस आचरण करतो, ९२ हें दम म्हणून ज्याला म्हणतात, त्याचें लक्षण आहे. [ यज्ञश्च ] आतां यज्ञ म्हणजे काय, तें संक्षेपानें सांगतों ऐक. ९३ तर ब्राह्मण व क्षत्रियादिक यांच्यामधील सर्वांनी आपापल्या अधिकारानुरूप, ९४ ज्याला ज्या उत्तम दैवतांचें पूजन व धर्म असतील, ते यथाशास्त्र विधीनें आचरावे. ९५ ज्याप्रमाणें ब्राह्मणानें षट्कर्मांचें आचरण करावें व शूद्रानें त्यास वंदन करावें, हाच त्यांचा यज्ञ होय. आणि त्या दोघांसही त्यांच्या यज्ञाचें सारखें फल मिळतें. ९६ त्याचप्रमाणें अधिकारपरत्वें विचार करून सर्वांनी आपापले यज्ञ करावे, परंतु फलाशेचें विष त्यांत घालूं नये; ९७ आणि या यज्ञाचा मी कर्ता, असा देहाचे द्वारानें मनांत भाव उत्पन्न होऊं देऊं नये, तथापि वेदांच्या सर्व आज्ञा स्वतः पाळाव्या. ९८ अर्जुना, यालाच सशास्त्र यज्ञ म्हणतात, व हा मोक्षमार्गाचा जाणता असून सोबती होय. ९९ [ स्वाध्यायः ] आतां, चेंडू भुईवर आपटतो असें नव्हे, तर तो पुनः आपले हाताकडे आणतो किंवा शेतांत जें धान्य पेरतो तो नाश नव्हे, तें पिकाकडे लक्ष देऊन जमिनींत टाकणें आहे. १०० किंवा ठेवलेली जिन्नस दृष्टीस पडावी, या हेतूनें जसा कोणी हातांत दिवा घेतो, अथवा झाडाच्या मुळाशीं, त्याला फांद्या व फळें यावीं म्हणून जसा कोणी पाणी घालतो, १ फार काय ! परंतु आपलें स्वरूप आरशांत पहाण्याच्या हेतूनें जसा वरचेवर प्रीतीनें एकदां मनुष्य तो स्वच्छ पुसतो, २ त्याचप्रमाणें, वेदांनीं ज्या ईश्वराचें वर्णन केलें आहे, तो आपल्यास प्राप्त व्हावा म्हणून वेदांचा सतत अभ्यास करतो, ३ ब्रह्मप्राप्ती होण्याकरितां ब्राह्मणांनी वेदांतील ब्रह्मसूत्र, व इतरांनी स्तोत्र किंवा ईश्वराचें नांव, हेंच वरचेवर म्हणावें. ४ देवें म्हणतात, पार्था, ज्याला स्वाध्याय म्हणतात, तो हाच होय. असो, [ तपः ] आतां तुला तप शब्दाचा अभिप्राय सांगतों, तो ऐक. ५ तर आपलें सर्वस्व दान करणें, यालाच दान म्हणतात; द्रव्य उडविणें तें दान नसून व्यर्थ खर्च करणें होय. ज्याप्रमाणें कडू वृंदावनाचें फळ झाडास लागूनही कोणाच्या

१ वर्तनदार. २ तिसरा ज्ञानयोग. ३ विन्मुख. ४ लपवून ठेवीत नाही. ५ मनापासून. ६ प्रस्तुत. ७ प्रसंगी. ८ दमलेल्यास त्याचे मनोदयानुरूप. ९ समाधान करणें. १० मोक्षरूप ठेवा दृष्टीस पडण्याचें. ११ वियोग. १२ शस्त्रधारी. १३ इंद्रियांच्या द्वारांनी, वाटेला. १४ नियमनाच्या. १५ देतो. १६ स्थानापर्यंत. १७ घालावी. १८ भरार, कठीण. १९ आचरितो, करितो. २० अग्नयाधान, अवकाश नसणें. २१ अग्रभागीं. २२ यथाशास्त्र. २३ मजावें. २४ ( १ यजन, २ याजन, ३ अध्ययन, ४ अध्यापन, ५ दान, ६ प्रतिग्रह हीं ) षट्कर्मे. २५ सारखा, बरोबरीनें. २६ अधिकारपरत्वें. २७ येरवीं. २८ ( ज्ञाताच्या ) आज्ञेनुरूप, सशास्त्र. २९ जाणता. ३० पेरावें. ३१ वासांचा. ३२ वरचेवर म्हणणें. ३३ अध्ययन. ३४ खर्च करणें.

स्वयें सुकणें । इंद्रावणी जेवीं ६ नाना धूपाचा अग्निप्रवेशु । कनकीं तुकाचा नाशु । पितृपक्षु पोषिता ऱ्हासु । चंद्राचा जैसा ७ तैसा स्वरूपाचिया प्रसरा। लागीं प्राणेंद्रियशरीरा । आटणी करणें जे वीरा । तेंचि तप ८ अथवा अनारिसें । तपाचें रूप जरी असे । तरी जाण जेवीं दुधीं हंसें । सूंदली चांचू ९ तैसें देह-जीवाचिये मिळणीं । जो उदयेजत सूये[10] पाणी । तो विवेक अंतःकरणीं । जाग-वीजे ११० पाहतां आत्मयाकडे । बुद्धीचा पैसु सांकडे । सनिद्रें स्वप्न बुडे । जागणीं जैसें ११ तैसा आत्मपर्यालोचु । प्रवर्ते जो साचु । तपाचा हा निर्वेचु । धनुर्धरा १२ आतां बाळाच्या हितीं स्तन्य । जैसें नानाभूतीं चैतन्य । तैसें प्राणिमात्रीं सौजन्य । आर्जव तें १३

अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् । दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥२॥

आणि जगाचिये सुखोद्देशें । शरीरवाचामानसें । राहाटणें तें अहिंसे । रूप जाण १४ आतां तीख होऊनी मवाळ । जैसें जातीचें मुकुळ । कां तेज परी शीतळ । शशांकाचें १५ शके दावितांचि रोगु फेडुं । आणि जिभे तरी नव्हे कडु । तें वोखदु नाहीं मा घडुं । उपमा कैंची १६ तरी मऊपणें बुबुळें । झगडतांही परी नाडळे । एऱ्हवीं फोडी कोराळें । पाणी जैसें १७ तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह । श्रोतव्यत्वें तरी माधुर्य । पायीं बोलीं १८ ऐकों ठातां कौतुकें । कानातें निघती मुखें । जें साचारवेचोनि बिकें[27] । ब्रह्महीं भेदी १९ किंबहुना प्रियपणें । कोणातेंही झकऊं नेणे । यथार्थ तरी खुपणें । नाहीं कवणा १२० एऱ्हवीं गोरी[28] कीर काना गोड । परी साचाचा पारखाळीं कीड । आगियेचें करणें उघड । परी जळों तें साचि २१ कानीं लागतां महूर अर्थे । विभांडी जिव्हार । तें वाचा नव्हे सुंदर । लांवचि[34] पां २२ परी अहितीं कोपोनि सोपें । लाळनीं मऊ जैसें पुष्प । तिये मातेचें स्वरूप । जैसें कां होय २३ तैसें श्रवण-सुख चतुर । परिणमोनि साचार । बोलणें जें अविकार । तें सत्य येथें २४ आतां घालितांही पाणी । पाषाणीं न निघे आणी । कां मथिलिया लोणी । कांजी नेदी २५ त्वचा पायें शिरीं । हालेयांही फडे न करी । वसंतींही अंबरीं । न होती फुलें २६ नाना रंभेचेनिही रूपें । शुकीं तुटिजेचि कंदर्पें । कां भस्मीं

उपयोगास न येतां व्यर्थ सुकून जातें; पण औषधरूपानें
र्व जगाच्या उपयोगी पडतें. ६ किंवा धूप अग्नीत
ळून स्वतांचा नाश करून घेतो, पण सर्वांस सुगंध देतो,
किंवा सोनें जों जों शुद्ध करावें, तों तों तें वजनांत कमी
रतें, पण कसास जास्त चढतें; किंवा कृष्णपक्षामध्यें चंद्र
कैक कलेनें कमी होतो, पण कृष्णपक्षाचें पोषण करितो
सर्व औषधींचें पोषण करितो. ) ७ त्याप्रमाणें, हे वीरा,
ह्मस्वरूपाची प्राप्ति होण्याकरितां प्राण, इंद्रियें व शरीर
चें जें क्षिजवणें, त्यालाच तप असें म्हणतात. ८ अथवा
र जीं तपें आहेत, तीं ह्या तपाप्रमाणें शुद्ध नाहींत
णून; हंस पक्षी जसें दुधांत आपली चोंच घालून दूध
पाणी वेगळें करतो, ९ त्याप्रमाणें, देह व जीव यांचें
य मोडून टाकण्याकरितां तो जन्मतःच हात घालून
कानें निराळें करण्याचा विचार नेहमी अंतःकरणांत
ठगतो, व १० आत्मविचार झाला असतां बुद्धीचे
यांकडील मार्ग कुंठित होतात. ज्याप्रमाणें मनुष्य
ा झाला असतां निद्रा व स्वप्न हीं दोन्ही आपोआप
ातशी होतात. ११ याप्रमाणें, धनुर्धरा, आत्मप्राप्ति
न घेण्याकरितां जो अंतःकरणांत विवेक उत्पन्न होतो,
ाच तप म्हणतात. १२ [ आर्जवं ] ज्याप्रमाणें दूध
लांस हितकारक आहे, व प्राण हा जसा सर्व भूतांचें
सारखाच आहे; त्याप्रमाणें, ज्याचें प्राणिमात्राशी
त्य आहे, त्यालाच "आर्जव" असें म्हणतात. १३

**न्वयार्थ**--(अहिंसा)-प्राण्यांना पीडा न देणें-(सत्यं)-
व अनृत वर्ज्य करून खरें भाषण करणें-(अक्रोधः)-क्रोध
असतांहि त्याला शांत करणें-(त्यागः)-संन्यास-(शान्तिः)-
करणाचा उपशम-(अपैशुनं)-परक्याची गुप्त गोष्ट दुसऱ्याला
गणें-(भूतेषु दया)-दुःखी जीवांवर कृपा करणें-(अलो-
-विषय समीप असले तरी इंद्रियांचें विकाररहित,-
)-मृदुत्व-(ह्रीः)-अकार्याविषयीं लोकलज्जा,-(अचापलं)
ावांचून हात-पाय इत्यादिकांचा व्यापार न करणें. २

अहिंसा ] आणि कायावाचामनानें जगाला सुख
या हेतूनें जें वर्तन करणें, तेंच अहिंसेचें खरें लक्षण
१४ [ सत्यं ]. आतां, तीक्ष्ण असून मऊ म्हटलें
म्हणजे जसें कमळ–तें पाण्याचा भेद करून वर येतें,
परंतु मऊ असतें, किंवा चंद्राचें तेज पडतें परंतु तें शीतल
असतें; १५ जें औषध रोग्याला दाखवितांक्षणींच रोगाचा
नाश करील, आणि खाल्लें तर जिभेसही कडू लाग-
णार नाहीं, असें औषधच नाहीं, मग त्याची उपमा कशी
द्यावी? १६ तर मऊपणा म्हटला म्हणजे डोळ्यांतील
बुबुळांवर घासलें असतांही जें खुपत नाहीं, व कठोरपणा
पाहूं गेलें असतां जें पाणी पर्वताचा कडाही फोडून बाहेर
पडतें. १७ त्याप्रमाणें संशयनिवृत्ति करण्यांत जें लोखं-
डाप्रमाणें तीक्ष्ण असतें व ऐकिलें असतां माधुर्याला
लाजवितें; १८ जें ऐकलें असतां कानासही त्याचें सेवन
करावें असें वाटतें, व सत्यपणाच्या बळानें ब्रह्मापर्यंत
जाऊन ठेपतें; १९ फार काय! परंतु त्याची गोडी इतकी
असते की, कोणीही फसत नाहीं व त्यांतील अर्थ पाहूं
गेलें असतां त्यापासून कोणाच्या मनालाही धक्का बसाव-
याचा नाहीं. १२० एऱ्हवीं पारध्याचें गाणें कानास गोड
लागतें; परंतु खरेपणाच्या दृष्टीनें पाहिलें असतां तें मृगास
घातक असतें, अथवा अग्नि हा आपलें कृत्य
उघड रीतीनें करतो, परंतु ह्या त्याच्या खरेपणास आग
लागो! २१ कानास मधुर लागणारें असून अर्थ पाहूं
गेलें असतां जें काळीज भेदतें, तें भाषण नसून सुंदर
विवशीच होय. २२ परंतु रागावल्यावर अहित होण्याब-
द्दल बोलणें पोकळ असून, लालन करण्यांत पुष्पाप्रमाणें
मऊ असतें, असें आईचें जें स्वरूप, २३ त्याप्रमाणें,
ऐकलें असतां ज्यापासून सुखाची प्राप्ति होते, व परिणामीं
गोड असून कोणाचाही मर्मभेद न करणारें जें बोलणें,
त्यालाच सत्य बोलणें असें बोलतात. २४ [ **अक्रोधः** ]
आतां, दगडावर पाणी घातलें असतांही त्यास अंकूर
फुटत नाहींत, किंवा ताकाची निवळ घुसळली असतां
त्यास लोणी येत नाहीं; २५ सापाच्या कांतीच्या डोक्या-
वर पाय दिला असतां, ती फडा वर करीत नाहीं व
वसंत ऋतु प्राप्त झाला असतांही आकाशास जशीं फुलें
येत नाहींत; २६ अथवा रंभेच्या स्वरूपानें शुकास ज्या-
प्रमाणें विषयवासना झाली नाहीं, किंवा भस्मांत तूप

कड् वृंदावन. २ नजरेचा. ३ कृष्णपक्ष. ४ मातीसाठीं.
वणें, श्रम करणें. ६ वेगळें. ७ घातली. ८ ऐक्यतेंत.
तांच. १० हात घालतो; कामाला आरंभ करतो. ११
ोतो. १२ निद्रेसकट. १३ आत्मावलोकन. १४ निर्णय.
. १६ मैत्री. १७ सरळपणा. १८ मृदु. १९ बाईचा
२० चंद्राचें. २१ म्हणून. २२ खुपत नाहीं. २३
पर्वताचा कडा, २४ ऐकलें असतां. २५ लाजवितें. २६ सत्या-
च्या. २७ बळानें. २८ पारध्याचें गायन. २९ खऱ्या पक्षानें
पाहिलें असतां वाईट, घातक. ३० खरेपणा. ३१ मधुर. ३२
भेदतें. ३३ काळीज. ३४ विवशी. ३५ पोकळ. ३६ परिणामीं.
३७ गोड. ३८ मर्मभेद. ३९ अंकुर. ४० ताकाची निवळ.
४१ सर्पाची कांत. ४२ हाणता. ४३ कामवासनेनें.

वान्हि न उद्दीपे । घृतेंही जेवी २७ तेवींचि कुमारु क्रोधें भरे । तैसिया मं-
त्राचीं बीजाक्षरें । तियें निमित्तेंही अपारें । मीनालिया २८ पैं घातयाही पायां
पडतां । नुठी गतायु पंडुसुता । तैसी नुपजे उपजवितां । क्रोधोर्मी गा २९ अ-
क्रोधत्व ऐसें । नांव तें ये दशे । जाण ऐसें श्रीनिवासें । म्हणितलें तया १३०
आतां मृत्तिकात्यागें घटु । तंतुत्यागें पटु । त्यजिजे जेवीं वटु । बीजत्यागें ३१
कां त्यजूनि भिंतिमात्र । त्यजिजे आघवेंचि चित्र । कां निद्रात्यागें विचित्र ।
स्वप्नजाळ तें ३२ नाना जळत्यागें तरंग । वर्षात्यागें मेघ । त्यजिजती जैसे भोग ।
धनत्यागें ३३ तेवीं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडून पाही । सांडिजे अशेषही
संसारजात ३४ तया नांव त्यागु । म्हणे तो यज्ञांगु । हें मानूनि सुभगु ।
पार्थु पुसे ३५ आतां शांतीचें लिंग । तें व्यक्त मज सांग । देवो म्हणती चांग ।
अवधान देईं ३६ तरी गिळोनि ज्ञेयातें । ज्ञाता ज्ञानही माघौतें । हारपे नि-
रुतें । ते शांति पैं गा ३७ जैसा प्रळयांबूचा उभंडु । बुडवूनि विश्वाचा पवाडु ।
होय आपणपें निबिडु । आपणची ३८ मग उगम ओघ सिंधु । हा नुरेचि व्य-
वहार भेदु । परी जलैक्याचा बोधु । तोही कवणा ३९ तैसी ज्ञेया देतां मिठी ।
ज्ञातृत्वही पडे पोटीं । मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप १४० आतां क-
दर्थवीतें व्याधी । बळीकरणाचिया आधीं । आपपरु न शोधी । सद्वैद्यु जैसा
४१ कां चिखलीं रुतली गाये । धड[१६] भाकड न पाहे । जो तियेचिया ग्लांनी
होये । कालाभुला[१८] ४२ नाना बुडतयातें सकरुणु । न पुसे अंत्यजु कीं ब्राह्मणु ।
काढूनि राखे प्राणु । हेंचि जाणे ४३ कीं मायवेनीं[१९] पापियें । उघडी केली वि-
पायें[२०] । तें नेसविल्यावीण न पाहे । शिष्टु जैसा ४४ तैसें अज्ञानप्रमादादिकीं ।
कां प्राक्तनींही सदोखीं । निंदत्वाच्या सर्वविखीं । खिळिले[२१] जे ४५ तयां आं-
गीकें[२२] आपुलें । देऊनियां भलें । विसरविजती सलें[२३] । सलतीं[२४] तियें ४६ अगा
पुढिलाचा दोषु । करूनि आपुलिये दिठी चोखु । मग घापे अवलोकु तया-
वरी ४७ जैसा पुजूनि देवो पाहिजे । पेरूनि शेता जाइजे । तोषौनि[२५] प्रसादु[२६]
घेइजे । अतिथीचा ४८ तैसें आपलेनि गुणें । पुढिलाचें उणें । फेडूनियां पा-

घातलें असतां, जसा अग्नि पेटत नाहीं, २७ त्याप्रमाणें, ज्या अक्षरांनीं काम व क्रोध उत्पन्न होतो, त्यांचा उच्चार केला असतां, २८ किंवा हे पांडुसुता, ज्याचें आयुष्य संपलें आहे, त्याला उठविण्याकरितां ब्रह्मदेवाच्या जरी पायां पडलें, तरी तो ज्याप्रमाणें उठत नाहीं, त्याप्रमाणें, त्याच्या ठिकाणीं क्रोध आणण्याविषयीं खटपट केली असतां क्रोध येत नाहीं. २९ याच स्थितीला "अक्रोधत्व" म्हणतात, असें श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें. १३० [त्यागः] मृत्तिकेचा त्याग केला असतां जसा घटाचा त्याग आपोआप होतो, व तंतूचा त्याग केला असतां वस्त्राचा त्याग, तसेंच, बीजांचा त्याग केला असतां वृक्षाचा त्याग सहज होतो; ३१ किंवा भिंतीचा त्याग केला असतां त्यावरील सर्व चित्रांचा त्याग आपोआप होतो; अथवा झोपेचा त्याग केला असतां नाना-तऱ्हेच्या स्वप्नांचा त्याग जसा आपोआप होतो, ३२ किंवा जलाचा त्याग केला असतां लाटांचा त्याग, व वर्षाकालाचा त्याग केला असतां मेघांचा, व धनाचा त्याग केला असतां ज्याप्रमाणें विषयोपभोगांचा आपोआप त्याग होतो, ३३ त्याप्रमाणें जे ज्ञानी आहेत, ते, देहच मी अशा अहंतेचा त्याग करून सर्व संसाराचा त्याग करितात. ३४ त्यालाच त्याग म्हणतात, असें यज्ञभोक्ता श्रीकृष्ण परमात्मा यानें सांगितलेलें मनांत समजून भाग्यवान् जो पार्थ, त्यानें प्रश्न केला: ३५ "हे प्रभो, शांतीचीं लक्षणें काय आहेत, तीं मला उघड करून सांगा," तेव्हां देव म्हणाले, "तूं फार उत्तम गोष्ट विचारलीस; तर ती सांगतों, तिकडे लक्ष दे. ३६ [शांतिः] ज्ञात्यानें जी वस्तु जाणावयाची, ती पूर्णपणें जाणल्यावर मागून ज्ञाता व ज्ञान हीं ज्या ठिकाणीं लय पावतात, त्यालाच (ज्ञेयाला) शांति असें म्हणतात. ३७ ज्याप्रमाणें प्रलयकालचें उदक वाढल्यावर सर्व विश्व बुडून आपलें स्वरूपांत आपण लय पावतें. ३८ मग उगम, प्रवाह, व समुद्रास मिळणें ह्या अवस्था रहात नाहींत; व सर्वत्र जलमय आहे, याचाही बोध कोणास होत नाहीं; ३९ त्याप्रमाणें, ज्ञेयाचें ऐक्य झाल्यावर ज्ञातृत्वही आपोआप नाहींसें होतें. मग अर्जुना, बाकी जें ज्ञान उरतें, तेंच शांतीचें रूप होय. १४० [अपैशुनं] आतां रोग रोग्याला पीडा देऊं लागला असतां त्याला बरें करण्याची उत्कट चिंता लागल्यामुळें चांगला वैद्य, रोगी आपला आहे कीं परका आहे या गोष्टीचा विचार करीत नाहीं, ४१ किंवा एकादी गाय चिखलांत रुतल्यावर तिचें दुःख पाहून ज्याचें मनांत कासावीसी होते, तो ती दुभती आहे, किंवा भाकड आहे, इकडे लक्ष देत नाहीं; ४२ किंवा बुडणाऱ्या मनुष्याकडे पाहून ज्यांच्या मनांत करुणा उत्पन्न होते, तो ज्याप्रमाणें बुडणारा ब्राह्मण आहे, किंवा अंत्यज आहे, याची चौकशी न करितां त्यास बाहेर काढून त्याचें प्राण रक्षण करतो; ४३ अथवा महावनांत दुष्टांनीं एकाद्या पतिव्रता स्त्रीस लुबाडून तिला वस्त्रहीन करून सोडून दिलें आहे, अशी स्त्री एकाद्या संभावित मनुष्याच्या दृष्टीस पडल्यावर, तो जसा प्रथम तिच्या अंगावर आपलें वस्त्र टाकून नंतर तिची पुसतपास करितो, ४४ तसेंच जे अज्ञान व प्रमाद यांनीं व्याप्त आहेत, किंवा पूर्वकर्मानुरूप ज्यांस कांहीं व्याधि जडलेली आहे, व जे सर्वांच्या निंदेस पात्र झाले आहेत, ४५ त्यांना आपण स्वतः साह्य करून त्यांना ज्या व्याधीपासून दुःख होत असतें, तिचा विसर पाडतात. ४६ अरे, त्यांच्यापुढें येणाऱ्या मनुष्यांचे दोष ते आपल्या दृष्टीनें नाहींतसें करून मग त्यांचेकडे अवलोकन करतात. ४७ ज्याप्रमाणें शालिग्राममूर्तीस वस्त्रालंकार घालून व उत्तम पुष्पें वाहून मग आपलें चित्त तिच्याकडे लावावें, किंवा शेतांत धान्य पेरून उत्तम रीतीचें पीक आल्यावर, असें त्याजकडे पाहून समाधान मानावें, अथवा आपल्या घरीं अतिथि आला असतां, त्यास अन्नदान देऊन संतोषित केल्यावर ज्याप्रमाणें त्याचा आशीर्वाद घ्यावयाचा, ४८ त्याप्रमाणें, आपल्या पुढें येणाऱ्या मनुष्याचा कमी-

१ पेटतो. २ ब्रह्मदेवाच्या. ३ मेलेला. ४ घटा. ५ झाडाचें झाड. ६ लाटा. ७ यज्ञभोक्ता. ८ भाग्यवान्. ९ चिन्ह, लक्षण. १० प्रलय काळचे उदकाचा. ११ दमाळा, पूर. १२ घन-दाट. १३ उत्पत्तीचें, उगम, प्रवाह व मुख. (समुद्रास मिळणें.) १४ व्याधी-रोग-(रोग्याला) पीडा करीत असतां, १५ रोग्याला बरें करण्याची उत्कट (चिंता) असल्यामुळें. १६ दूध देणारी की न देणारी. १७ दुःखानें. १८ कासावीस. १९ कुलस्त्री, पतिव्रता, अरण्यांत. २० सदाचित. २१ पात्र झाले. २२ साह्य. २३ दुःखें. २४ सत्पात्र, सुप[illegible]. २५ संतोष करून. २६ आशीर्वाद.

हृणें । तयाकडे ४९ वांचूनि नै विंधिजे वर्मीं । नातुडविजे अकर्मीं । न बोलविजे नामीं । सदोषीं तिहीं १५० वरी कोणे एके उपायें । पडिलें तें उभे होये । तेंचि कीजे परी घांये । नेदावे वर्मीं ५१ पैं उत्तमाचियासाठीं । नीचं मानिजे किरीटी । हें वांचोनि दिठी । दोषु न घेपे ५२ अगा अपैशून्याचें लक्षण । अर्जुना हें फुडें जाण । मोक्षमार्गींचें सुखासन । मुख्य हें गा ५३ आतां दया ते ऐसी । पूर्णचंद्रिका जैसी । निववितां न कडसी । सानें थोर ५४ तैसें दुःखिताचें शिणणें । हिरतां सकणवपणें । उत्तमाधम नेणे । विवंचू गा ५५ पैं जगीं जीवनासारिखें । वस्तु अंगेंवरी उपेखें । परी जातें जीवित राखे । तृणाचेंही ५६ तैसें पुढिलाचेनि तापें । कळवळलिये कृपें । सर्वस्वेंसीं दिधलें आपणपें । थोडेंचि गमे ५७ निम्न भरलियाविणें । पाणी ढळोंचि नेणे । तेवीं श्रांत तोषौनि जाणें । सामोरें पां ५८ पैं पायीं कांटा नेहटे । तंव व्यथा जीवीं उमटे । तैसा पोळे संकटें । पुढिलांचेनी ५९ कां पांवो शीतळता लाहे । कीं ते डोळ्याचिलागीं होये । तैसें परसुखें जाये । सुखावतु १६० किंबहुना तृषितालागीं । पाणी आरायिलें असे जगीं । तैसें दुःखितांचे सेलंभागीं । जिणें जयाचें ६१ तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया । मी उदयजतांचि तया । ऋणिया लाभें ६२ आतां सूर्यासि जीवें । अनुसरलिया राजीवें । परी तें तों न शिवे । सौरभ्य जैसें ६३ कां वसंताचिया वाहणीं । आलिया वनश्रीच्या अक्षौहिणी । ते न करीतुचि घेणी । निगाला तो ६४ हें असो महासिद्धीसी । लक्ष्मीही आलिया पाशीं । परी महाविष्णु जैसी । न गणीच ते ६५ तैसें ऐहिकींचे[26] कां स्वर्गींचे । भोग पाइकजालिया इच्छेचे । परी भोगावें हें न रुचे । मनामाजीं ६६ बहुवें काय कौतुकीं । जीव नोहे विषयाभिलाखी । अलोलुप्त्वदशा ठाउकी । जाण ते हे ६७ आतां माशियां जैसें मोहळ । जळचरां जेवीं जळ । कां पक्षियां अंतराळ । मोकळें हें ६८ नातरी बाळकोद्देशें । मातेचें स्नेह जैसें । कां वसंतींच्या स्पर्शें । मऊ मलयानिलु ६९ डोळयां प्रियाची भेटी । कां पिलियां कूर्मीची दिठी । तैसी भूतमात्रीं राहटी । मवाळ ते १७० स्पर्शें अतिमृदु । मुखीं घेतां सुस्वादु । घ्राणासि सुगंधु । उजाळु आंगें ७१ तो आवडे तेवढा घेतां । विरुद्ध जरी न होतां । तरी उपमे येता । कापूर कीं ७२ परी

पणा आपल्या गुणसामर्थ्यानें दूर करून नंतर त्याजकडे दयार्द्र दृष्टीनें पहातात. ४९ इतकेंच नव्हे, तर त्याच्या वर्मावर डाग देऊं नये, अथवा त्यांच्या पापकर्मांचा उच्चार करून, त्यांस दुःख देऊं नये; व त्यांस असणाऱ्या व्याधींचें नांव घेऊन तूं व्याधिष्ट आहेस, असें म्हणूं नये. १५० परंतु ज्या उपायानें कोणीही मनुष्य वाईट स्थितींतून उत्तम स्थितींत येईल, तेच उपाय जो करतो, पण त्याच्या घर्मीं डाग देत नाही; ५१ तर, अर्जुना, उत्तम मनुष्याच्या मानानें जो दुसऱ्यास कनिष्ट मानीत नाही, व त्याचे दोष मनांत आणीत नाहीं, ५२ तेंच 'अपैशुन्याचें' खरें लक्षण होय. आणि अर्जुना, मोक्षमार्गाचें सुखावह मुख्य साधन हेंच होय. ५३ [ दयाभूतेषु ] आतां दया अशी असावी कीं, ज्याप्रमाणें पौर्णिमेचा चंद्र शांति देण्यांत लहान अथवा थोर असा पर्याय न ठेवितां सर्वांस सारखीच शांति देतो; ५४ त्याप्रमाणें, दयार्द्र अंतःकरणानें दुःखित मनुष्याचें दुःख हरण करितेवेळेस तो उत्तम आहे, किंवा अधम आहे, हें मनांत न आणतां सर्वांचें दुःख निवारण करतो. ५५ जगतांत पाण्यासारखी वस्तु दुसरी कोणती आहे कीं, गवत सुकूं लागलें असतां जें आपला स्वतः नाश करून घेऊन त्याचें आपल्या ओलाव्यानें रक्षण करितें! ५६ त्याप्रमाणें, आपल्यासमोर पीडित मनुष्य आला असतां, त्याच्या कळवळ्यानें त्यास जरी आपलें सर्वस्व दिलें, तरे आपण त्यास कांहींच दिलें नाहीं, असें जो मानतो; ५७ पाणी वाहात असतांना वाटेंत खळगा आला असतां, तो भरून टाकल्याशिवाय जसें तें पुढें जात नाहीं, तसा आपल्या समोरील श्रमलेल्या मनुष्यास संतोषित केल्याशिवाय जो पुढें जात नाहीं; ५८ ज्याप्रमाणें पायांत कांटा बोंचला असतां जीव कळवळतो, त्याप्रमाणें दुसऱ्याचें संकट पाहिलें असतां ज्याचें मन कळवळतें; ५९ किंवा पायास थंड पदार्थ चोळल्यावर डोळ्यांस जसा गारवा येतो, तसें दुसऱ्याचें सुख पाहून ज्याला सुख होतें; १६० किंबहुना, तहान लागलेल्या मनुष्याची तृषा भागण्याकरितां असें जगांत पाणी निर्माण केलें आहे, त्याप्रमाणें दुःखित मनुष्याचें दुःख हरण करण्याकरितांच जो या जगांत रहातो; ६१ अशा गुणांनीं युक्त जो पुरुष असतो, तो दयेची केवळ मूर्तीच होय; आणि हे वीरोत्तमा, त्याचा जन्मतःच मी ऋणी आहें. ६२ [ अलोलुप्त्वं ] सूर्योदय होण्यावरोबर कमळाचें फूल उमलतें, परंतु सूर्य जसा त्याच्या सुगंधाचा उपभोग घेत नाहीं; ६३ किंवा वसंतऋतूंत वनांत पुष्कळ झाडें टवटवीत होतात, तथापि त्यांतील एकाही झाडाचा उपभोग न घेतां तो जसा चालता होतो; ६४ फार काय! लक्ष्मी महासिद्धीसह जरी श्रीविष्णूजवळ प्राप्त झाली, तरी जसें त्याचें तिच्याकडे लक्ष जात नाहीं; ६५ तसें आपल्यास आवडणार इहलोकींचे किंवा परलोकींचे भोग जरी चाकर झाले, तरी त्यांच्या मनांत त्यांचा उपभोग घ्यावा असें येत नाहीं. ६६ फार काय सांगावें! कौतुकानें देखील विषयाची इच्छा करीत नाहींत. अशी जी दशा, तिला 'अलोलुपत्व' असें म्हणतात. ६७ [ मार्दवं ] मधमाशीस जसें तिचें मोहोळ सुखकारक आहे, किंवा जलचरांस जसें पाणी प्रिय आहे, किंवा पक्ष्यांना आकाश फिरण्यास मोकळें आहे; ६८ किंवा बाळकाला सुख व्हावें या दृष्टीनें आईचें जसें त्यावर प्रेम असतें अथवा वसंतऋतु सुरू झाल्यावर जसा मलय पर्वतावरील वारा मंद सुगंध वहातो, ६९ प्रिय वस्तु पाहिली असतां जसें डोळ्यांस समाधान होतें, किंवा ज्याप्रमाणें कासवी आपल्या दृष्टीनें पिलांचें पोषण करतें, त्याप्रमाणें ज्यांची दृष्टी भूतमात्राच्या ठिकाणीं प्रेमयुक्त असतें, १७० हात लावला असतां मऊ लागतो, तोंडांत घातला असतां रुचकर लागतो, नाकास ज्याचा सुगंध येतो, व रूपानें पाहिलें असतां जो पांढरा स्वच्छ आहे, ७१ असा जो कापूर तो वाटेल तितका खाल्ला असतां जर त्याजपासून बाधा झाली नसती, तर तो उपमेस पात्र झाला असता; ७२ परंतु ज्याच्या पोटांत

१ डाग देऊं नये. २ दुखवूं नये. ३ घाव. ४ बरोबरीनें. ५ नीचालाही उत्तम समजावें. ६ उणें न पहाण्याचें. ७ पाळखी. ८ न परीक्षी. ९ लहान. १० हरण करतां. ११ सदयतेनें. १२ पाण्याप्रमाणें. १३ स्वतः शरीरानें. १४ नाश पावते. १५ सखल जागा. १६ श्रमलेल्या. १७ बोंचतो. १८ पाय. १९ उत्पन्न केलें, निर्माण केलें. २० भल्यासाठीं, उत्तम भोगी. २१ कमळानें. २२ सुवास, सुगंध. २३ मार्गी. २४ वनशोभेच्या. २५ चालता होतो. २६ या लोकांचे. २७ दास. २८ कोणत्याही विषयावर आसक्त नसण्याची अवस्था. २९ मलय पर्वतावरील सुगंध वारा. ३० मृदु. ३१ रुचिकर. ३२ पांढरा स्वच्छ.

महाभूतें पोटीं वाहे । तेवींचि परमाणूमाजीं सामाये । या विश्वानुसार होये । गगन जैसें ७३ काय सांगों ऐसें जिणें । जें जगाचेनि जीवें प्राणें । तयां नांव म्हणे । मार्दव मी ७४ आतां पराजयें राजा । जैसा कदर्थिजे लाजा । कां मानिया निस्तेजा । निकृष्टास्तव ७५ नाना चांडाळमंदिराशीं । अवचटें आलिया संन्यासी । मग लाज होय जैसी । उत्तमा तया ७६ क्षात्रियां रणीं पळोनि जाणें । तें कोण साहे लाजिरवाणें । कां वैधव्यें पाचारणें । महासतियेतें ७७ रूपसा उदयलें कुष्ट । संभावितां कुटीचें बोट । तया लाजा प्राणसंकट । होय जैसें ७८ तैसें औटहातपणें । जें शव होऊनि जिणें । उपजों उपजों मरणें । नावोनावा ७९ जियें गर्भमेदमुसें । रक्तमूत्ररसें । वोतीव होऊनि असे । तें लाजिरवाणें १८० हें बहु असो देहपणें । नामरूपासि येणें । नाहीं गा लाजिरवाणें । तयाहूनी ८१ ऐसैसिया अवकळा । घेपे शरीराचा कंटाळा । ते लाज पैं निर्मळीं । निसुगा गोड ८२ आतां सूत्रतंतु तुटलिया । चेष्टाचि ठाके सायंखडिया । तैसी प्राणजयें कर्मेंद्रियां । खुंटे गती ८३ कीं मावळलिया दिनकरु । सरे किरणांचा प्रसरु । तैसा मनोजयें प्रकारु । ज्ञानेंद्रियांचा ८४ एवं मनपवननियमें । होतीं दाही इंद्रियें अक्षमें । तें अचापल्य वर्में । येणें होय ८५

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता । भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

आतां ईश्वरप्राप्तीलागीं । प्रवर्ततां ज्ञानमार्गीं । धिंवसेयाच्या आंगीं । उणीव नोहे ८६ वोखटें मरणाऐसें । तेंही आलें अग्निप्रवेशें । परी प्राणेश्वरोद्देशें । न गणीचि सती ८७ तैसें आत्मनाथाचिया ओंधीं । लांऊनि विषयविषाची बांधी । धांवों आवडे पाणधीं शून्याचिये ८८ न ठाके निषेधु आड । न पडे विधीची भीड । नुपजेची जीवीं कोर्ड । महासिद्धीचें ८९ ऐसें ईश्वराकडे निजें । धांवे आपसया सहज । तया नांव तेज । अध्यात्मिक तें १९० आतां सर्वही साहातिया गरिमा । गर्वा न ये तेचि क्षमा । जैसें देह वाहोनि रोमा । वाहणें नेणें ९१ आणि मातलिया इंद्रियांचे वेगें । कां प्राचीनें खवळले रोग । अथवा योगवियोग । प्रियाप्रियांचे ९२ यया आघवियांचाचि थोरु । एके वेळे आलिया पुरु । तरी अगस्त्य कां धरूनि धीरु । उभा ठाके ९३ आकाशीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगळिका । ते गिळी येकीं झुळुका । वारा जेवीं ९४ तैसें अधिभूताधिदैवां । अध्यात्मादि उपद्रवां । पातलेया पांडवा । गिळूनि

पंचमहाभूतांचा समावेश होतो, त्याचप्रमाणें जो परमाणूंतही सामावतो, व गगन जसें विश्वाच्या आकाराप्रमाणें आकारास येतें; ७३ फार काय सांगावें! जें जगाच्या जीवनाकरितांच वांचतात; अशी जी स्थिति तिला "मार्दव" असें मी म्हणतों. ७४ [ ऱ्हीः ] पराजित झालेला राजा जसा लज्जेनें दुःखी होतो, अथवा निकृष्ट स्थिति प्राप्त झाली असतां, मानी पुरुष जसा निस्तेज होतो; ७५ किंवा एकादा उत्तम संन्यासी अकस्मात् एकाया चांडाळाच्या घरांत गेला असतां त्यास जशी लज्जा उत्पन्न होते; ७६ क्षत्रियाला रणांतून पळून जाण्याचा प्रसंग आला असतां, तो सहन करण्यास जशी त्याला लाज वाटते; किंवा पतिव्रता स्त्रीस 'गंगाभागीरथी' या नांवानें हांक मारली असतां जसें तिला दुःख होतें; ७७ सुंदर मनुष्यास कोड उत्पन्न झाले, अथवा संभावितावर वाईट आळ आला तर त्यांना ज्याप्रमाणें लज्जेनें प्राणसंकट उत्पन्न होतें. ७८ त्याप्रमाणें साडेतीन हात शरीर धारण करून निरनिराळ्या योनींत उत्पन्न होणें व मरणें याची, ७९ आणि गर्भभेदरूपी मुशींत रक्त व मूत्र यांच्या रसांचें ओतीव शरीर धारण करण्याची ज्यांना लाज वाटते; १८० फार काय सांगावें! तर ज्यांना देह धारण करून नांवारूपास येण्यापेक्षां दुसरी कोणतीही लाजिरवाणी गोष्ट वाटत नाहीं, ८१ अशा दुश्चिन्हांनीं युक्त असें जें शरीर, तें धारण करण्याचा साधूंना कंटाळा असून लाज उत्पन्न होते; व इतर जे कोडगे लोक आहेत, त्यांना तेंच शरीर धारण करण्याची गोडी वाटते. ८२ [ अचापल ] ज्याप्रमाणें कळसूत्री बाहुल्यांच्या दोऱ्या तुटल्यावर त्यांची चेष्टा बंद होते, त्याप्रमाणें प्राणाचा जय केला असतां कर्मेंद्रियांची गति बंद होते; ८३ किंवा सूर्य मावळल्यावर त्याच्या किरणांचा प्रसार बंद होतो, त्याप्रमाणें मनाचा जय केला असतां ज्ञानेंद्रियांची मति कुंठित होते, ८४ याप्रमाणें मन व प्राण यांचा जय केला असतां दहा इंद्रियें पंगु होतात, त्यालाच 'अचापल्य' असें म्हणतात. ८५

अन्वयार्थ—(तेजः)—प्रगल्भता—विशिष्ट सामर्थ्य—धीटपणा—(क्षमा)—कोणी कांहीं अपराध केला असतांहि मनांत विकार उत्पन्न होऊं न देणें—(धृतिः)—शरीर, इंद्रियें इत्यादिकांना उत्साह देणारें धैर्य,—(शौचं)—बाह्य व आंतर शुद्धि,—(अद्रोहः)—दुसऱ्यांना मारण्याची इच्छा न करणें,—(न अतिमानिता)—अतिशय मानित्व न धारण करणें,—(हे भारत)—हे अर्जुना!—(दैवीं संपदं)—दैवी संपत्तीला—(अभिजातस्य)—अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषामध्यें हे गुण—(भवन्ति)—असतात. ३

[ तेजः ] आतां, ईश्वरप्राप्तीकरितां ज्ञानमार्गाचें मनापासून अवलंबन केलें असतां त्याला उणीव पडत नाहीं. ८६ पतिव्रता स्त्री पतीच्या मरणानंतर अग्निप्रवेश करून मरणासारखा वाईट प्रसंग आला, तरी सहगमन करण्यास मागेंपुढें पहात नाही, ८७ त्याप्रमाणें जो आत्म्याची चिंता लागल्यामुळें विषयांस विषयवत् मानून आत्मप्राप्तीकरितां सुषुम्ना नाडींतून प्राणवायु नेण्यासारख्या कठीण मार्गाचेंही अवलंबन करतो; ८८ त्याला शास्त्रांत सांगितलेल्या विधिनिषेधांची अडचण व भीड नसते; व महासिद्धि प्राप्त झाली असतां तिचेंही त्यास कौतुक वाटत नाहीं. ८९ याप्रमाणें ज्याचें मन आपण होऊन ईश्वराकडे धांव घेतें, त्याला शारीरिक तेज असें म्हणतात. १९० [ क्षमा ] आतां, ज्याप्रमाणें देह हा सर्व रोम धारण करीत असूनही त्याचा गर्व बाळगीत नाहीं; त्याप्रमाणें सर्व सहन करणारांत मी श्रेष्ठ, असा ज्याला गर्व उत्पन्न होत नाहीं; ९१ [ धृतिः ] आणि विषयसेवनाविषयीं इंद्रियांची अति प्रवृत्ति, किंवा पूर्वकर्मानें रोगाची प्राप्ति, अथवा अप्रिय वस्तूचा योग, किंवा प्रिय वस्तूचा वियोग. ९२ या सर्व गोष्टी जरी एकसमयावच्छेदेंकरून प्राप्त झाल्या तरी जो अगस्ती ऋषीप्रमाणें धीर धरून त्या सहन करतो; ९३ आकाशांत धुराचा मोठा लोट गेला, तरी ज्याप्रमाणें वाऱ्याची एक झुळुक त्यास नष्ट करते, ९४ त्याप्रमाणें, अर्जुना, आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हे उपद्रव जरी एकदम उत्पन्न झाले,

१ जगाला जगविण्याकरितांच. २ नम्रता. ३ दुःखित होतो. ४ नीचपणामुळें. ५ अकस्मात्, सहज. ६ हांक मारणें. ७ प्रतिव्रतेला. ८ रूपवंताला. ९ निंदापर, वाईट आळाचें (आरोपाचें) १० साडेतीन हात. ११ शरीर. १२ वारंवार. १३ दुश्चिन्हानें, हीनतेनें. १४ साधूला. १५ कोडग्याला. १६ बाहुलीला. १७ बंद पडते. १८ व्यवहार, हालचाल. १९ पंगु. २० स्थिरपणा. २१ धैर्याच्या. २२ न्यूनता. २३ पतीकरितां. २४ आत्मप्राप्तीची चिंता लागल्यामुळें, २५ विषयविषाचे समुदाय जाळून, दूर करून, सोडून. २६ कांटेरी अरुंद मार्गानें. २७ अंतराळीं. २८ इच्छा. २९ मन. ३० शारीरिक. ३१ सहन करणारांत. ३२ महत्त्व. ३३ गति. ३४ पूर्वकर्मानें. ३५ अतिशय. ३[illegible] मानुषी व दैवी.

घाली ९५ ऐसें चित्ताक्षोभाच्या अवसरीं । उचलूनि धैर्या जें चांगावें करी । धृती म्हणिपे अवधारीं । तियेतें गा ९६ आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगें-पीयूखें । तया कलशाचिसारिखें । शौच असे ९७ जे आंगीं निष्काम आचारु । जीवीं विवेकु साचारु । तो सबाह्य घडला आकारु । शुचित्वाचाची ९८ कां फेडित पाप ताप । पोखीत तीरींचें पादप । समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ९९ कां जगाचें आंध्य फेडितु । श्रियेचीं राउळें उघाडितु । निघे जैसा भास्वंतु । प्रदक्षिणें २०० तैसीं बांधिलीं सोडिता । बुडालीं काढिता । सांकडीं फेडिता । आर्तांचिया १ किंबहुना दिवसराती । पुढिलांचें सुख उन्नति । आणित आणित स्वार्थीं । प्रवेशिजे २ वांचूनि आपुलिया काजालागीं । प्राणिजाताच्या अहित-भागीं । संकल्पाचीही आडवंगी । न करणें जें ३ पैं अद्रोहत्व ऐशिया गोष्टी । ऐकसी जिया किरिटी । तें सांगितलें हे दिठी । पाहों ये तैसें ४ आणि गंगा शं-भूच्या माथां । पावोनि संकोचे जेवीं पार्था । तेवीं मान्यपणें सर्वथा । लाजणें जें ५ तें हें पुढत पुढती । अमानित्व जाण सुमती । मागां सांगितलेंसें किती । तेंचि तें बोलों ६ एवं इहीं सव्विसें । ब्रह्मसंपदा हे वसत असे । मोक्षचक्र-वर्तीचें जैसें । अग्रहार होय ७ नाना हे संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नीत्य नवी । निर्विण्णसगरांची दैवी । गंगाचि आली ८ कीं गुणकुसुमांची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा । वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे ९ कीं स-व्विसेंगुणज्योती । इहीं उजळूनि आरती । गीता आत्मया निजपती । नीरां-जना आली २१० उगैळितें निर्मळें । गुण इये चीं मुक्ताफळें । दैवी शुक्ति कळें । गीतार्णवींची ११ काय बहु वानूं ऐसी । अभिव्यक्ती ये अपैसी । केलें दैवी गुणराशी । संपत्तिरूप १२ आतां दुःखांची आंतुवट वेली । दोषकाट्यांची जरी भरली । तरी निजाभिधानीं घाली । असुरी ते १३ पैं त्याज्य त्यजाव-यालागीं । जाणावी जरी अनुपयोगी । तरी ऐका ते चांगी । श्रोत्रशक्ती १४ तरी नरकव्यथा थोरी । आणावया दोषींघोरीं । मेळू केला ते आसुरी । संपत्ति हे १५ नाना विषवर्गु एकवटु । तया नांव जैसा बासंटु । आसुरी संपत्ति हा खोटु । दोषांचा तैसा १६

दम्भो दर्पोऽतिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च । अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥४॥

तरी तयाचि आसुरी । दोषांमाजीं जया वीरा । चाडपणाचा डांगोरा । तो

तरी जो ते सर्व गिळून टाकतो; ९५ आणि, याप्रमाणें चित्तांत राग उत्पन्न होण्याचे वेळीं धैर्य कायम ठेवितो, त्यालाच "धृति" असें म्हणतात. ९६ [ शौचं ] आतां, सुवर्णकलश स्वच्छ करून त्यांत गंगारूपी अमृत भरलें असतां, तें जसें सर्वच शुद्ध असतें, त्याप्रमाणें 'शौच' होय. ९७ ज्या मनुष्याचें आचरण निष्काम असतें व ज्याच्या अंतर्यामीं विवेक जागृत असतो, तो अंतर्यामीं व बाहेरूनही शुचित्वाचाच पुतळा बनलेला असतो. ९८ [ अद्रोहः ] गंगेचें उदक जसें समुद्राकडे जातांना सहज तीरावरील वृक्षांचें पोषण करितें, व स्नान करणारांचेंही पाप व ताप नाहींसें करतें; ९९ किंवा ज्याप्रमाणें सूर्य आपली रोजची प्रदक्षिणा करण्यास निघाला म्हणजे अंधकाराचा नाश करतो, व जगांतील संपत्तींचीं मंदिरें उघडून व्यापार सुरू होतो, २०० त्याप्रमाणें, जे बद्ध असतील त्यांना मुक्त करून व जे संसारसागरांत बुडाले आहेत, त्यांना तारून, जे पीडित आहेत त्यांचें दुःख निवारण करतो; १ किंबहुना रात्रंदिवस स्वार्थ साधीत असतांही जो दुसऱ्याचें सुख वाढवितो; आणि २ स्वार्थ साधण्याकरितां दुसऱ्यांचा नाश करण्याविषयीं ज्याच्या अंतःकरणांत संकल्पही उत्पन्न होत नाहींत, ३ त्यालाच अर्जुना, 'अद्रोहत्व' असें म्हणतात; व तें मी तुला तुझ्या दृष्टीस उघड रीतीनें पडेल असें सांगितलें आहे. ४ [ नातिमानिता ] आणि पार्था, भगीरथानें गंगेची प्रार्थना करून तिला मृत्युलोकांत आणिते वेळीं शंकरांनीं आपले जटेंत धारण केल्यामुळें, तिला जशी लज्जा उत्पन्न झाली त्याप्रमाणें, लोकांनीं मान दिला असतां जो संकोचित होतो, ५ त्यालाच, हे सुमते अर्जुना, 'अमानित्व' असें म्हणतात; याबद्दल तुला मागें पुष्कळ वेळां सांगितलें आहे. तेंच तें पुनः किती सांगूं ! ६ याप्रमाणें दैवी संपत्ति या सव्वीस गुणांना चक्रवर्ती परमात्म्यानें शमहार करून दिली आहे. ७ किंवा ही दैवी संपत्ति या सव्वीस गुणरूपी तीर्थांनीं नित्य नवी असून वैराग्यरूपी सागराचा उद्धार करण्याकरितां जणुंकाय भगवती गंगाच प्राप्त झाली आहे. ८ किंवा ही गुणरूपी पुष्पांची माळ हातांत घेऊन मुक्तिरूप वधू निरपेक्ष वैराग्यरूप वराचा गळा शोधीत आहे; (त्याला वरण्याकरितां पहात आहे;) ९ अथवा या गुणरूपी वाती लावून, गीता आपल्या आत्मरूपी पतीस ओंवाळण्याकरितां आरती घेऊन आली आहे. २१० किंवा गीतारूप समुद्रांतील ही सगुणरूपी मोत्यें दैवी संपत्तीरूप शिंपल्यांत उत्पन्न झाली आहेत. ११ दैवी संपत्तीचीं जीं हीं लक्षणें सांगितलीं, यांपेक्षां अधिक किती म्हणून सांगूं ! १२ आतां, आसुरी संपत्ति ही दुःखरूपी वेली असून दोषरूपी कांटयांनीं जरी भरलेली आहे, तरी तूं आपले मनांत ती समजून घे. १३ कारण असें पहा–जी वस्तु त्याज्य आहे, ती आपल्या उपयोगाची नाहीं हें खरें; पण तिचा त्याग करण्याकरितांच ती फार सावधपणें ऐकून घे. १४ हें वध–जीवांना भयंकर अशी नरकप्राप्ति करून देण्याकरितां घोर दोषांनीं जी आपली जूट केली आहे, तीच ही आसुरी संपत्ति. १५ किंवा, सगळीं विषें एकत्र झालीं म्हणजे ज्याप्रमाणें त्यास कालकूट हें नांव द्यावें, त्याप्रमाणें आसुरी संपत्ति म्हणजे दोषांचा गोळाच होय. १६

**अन्वयार्थ**—(हे पार्थ)–हे अर्जुना!–(आसुरीं संपद्)–आसुरी संपत्तीला–(अभिजातस्य)–अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषाचे–(दम्भः)–धार्मिकता प्रकट करणें–(दर्पः)–गर्व,–(च)–व–(अतिमानः)–मी उत्कृष्ट आहें, असें मानणें–(क्रोधः)–कोप,–(पारुष्यं एव)–कठोर भाषण–मर्मभेदक शब्द बोलणें–(च)–व–(अज्ञानं)–मिथ्या प्रत्यय–कर्तव्य व अकर्तव्य यांविषयींचें अविवेकज्ञान,–हे गुण असतात. ४

[ दंभः ] हे वीरा, ह्या असुर दोषामध्यें जो मुख्य म्हणून प्रसिद्ध आहे तो दंभ असा आहे:—

१ प्रसंगीं. २ कायम. ३ शुद्ध, निर्मळ करून. ४ गंगोदकानें. ५ पुतळा. ६ पोषित. ७ वृक्ष. ८ शोभेची. ९ ठिकाणें, मंदिरें. १० सर्व. ११ संकटें. १२ उत्कर्षदर्शक. १३ अडपळा, कुमार्ग. १४ जटे. १५ मोक्षरूपी राज्याच्या नृपतीचें. १६ इनाम. १७ या सव्वीस गुणांची. १८ विरक्त हेच कोणी सगर राजे त्यांच्या. १९ गुणरूपी फुलांची. २० शोधित. २१ आरती ओंवाळावयास. २२ बाहेर टाकते. २३ शिंपल्यांची शकलें. २४ गीतारूप समुद्रांतून. २५ प्रकटपणा. २६ अति दुःखानें भरलेली. २७ आपल्या सांगण्याचे क्रमांत ओंवली. २८ सावधगिरीनें. २९ एकोपा. ३० कालकूट. ३१ गोळा, मेळा. ३२ मोठेपणाचा.

दंभु ऐसा १७ जैसी आपुली जननी । नग्न[1] दाविलिया जनीं । तें तीर्थचि परी
पतनीं । कारण होय १८ कां विद्या[2] गुरूपदिष्टा[3] । बोभाइलिया चोहटां[4] । तरी
इष्टदाचि[5] परी अनिष्टा । हेतु होती १९ पैं आंगें बुडतां महापूरीं । जे वेगें काढी
पैलतीरीं । ते नांवचि बांधिलिया शिरीं । बुडवी जैसी २२० कारण जें जी-
विता । तें वानिलें जरी सेवितां[6] । तरी अन्नाचि पंडुसुता । होय वीष २१ तैसा
दृष्टादृष्टाचा[7] सखा । धर्मु[8] जाला तो फोकारिजे[9] देखा । तरी तारिता तोचि
दोखा- । लागीं होय २२ म्हणौनि वाचेचा चौबारा[10] । घातलिया धर्माचा प-
सारा । धर्मुचि तो अधर्मु होय वीरा । तो दंभुं जाणे २३ आतां मूर्खाचिये
जिभे । अक्षरांचा आंबुखा[11] सुंभे[12] । आणि तो ब्रह्मसंभे[13] । न[14] रिझे जैसा २४ कां
मादुरी[15] लोकांचा घोडा । गजपतिही[16] मानी थोडा[17] । कां कांटियेवरिल्या सरडा ।
स्वर्गुही नीच २५ तृणाचेनि इंधनें । आगी धांवे गगनें । थिल्लरबळें[18] मीनें । न
गणिजे सिंधू २६ तैसा माजे स्त्रिया धनें । विद्या स्तुती बहुतें मानें । एकें दिव-
सींचेनि परान्नें । अल्पकु[19] जैसा २७ अभ्रच्छायेचिया जोडी । निदैवु घर मोडी ।
मृगांबु देखोनि फोडी । पाणियांडें[20] मूर्ख २८ किंबहुना ऐसैसें । उतणें[21] जें संप-
त्तिमिसें । तो दर्पु[22] गा अनारिसें[23] । न बोलें घेईं २९ आणि जगा वेदीं विश्वासु ।
आणि विश्वासीं पूज्य ईशु । जगीं एक तेजसु । सूर्यचि हा २३० अंग[24] स्पृहे
आस्पद । एक सार्वभौमपद । न मरणें निर्विवाद । जगा पंढियें[25] ३१ म्हणौनि
जग उत्साहें । यातें वानूं जाये । कीं तें आइकोनि मत्सरु वाहे । फुगों लागे
३२ म्हणे ईश्वरातें खायें । तया वेदा विष सूयें । गोखामाजीं[26] त्रांये[27] । भंगीत
असे ३३ पतंगा नावडे ज्योती । खद्योता[28] भानूची खंती । टिटिभेनें[29] अपांपती ।
वैरी केला ३४ तैसा अभिमानाचेनि मोहें । ईश्वराचेंही नाम न साहे । बा-
पातें म्हणे मज हे । सवती जाली ३५ ऐसा मान्यतेचा पुष्टगंडु[30] । तो अभि-
मानी परमलंडु[31] । रौरवाचा[32] रूढु[33] । मार्गुचि पैं ३६ आणि पुढिलांचें सुख । देख-
णियांचें होय मिखें[34] । चढे क्रोधाग्नीचें विख । मनोवृत्ती ३७ शीतजळाचिये भेटी ।
तातला[35] तेलीं आगी उठी । चंद्रु देखोनि जळे पोटीं । कोल्हा जैसा ३८ वि-
श्वाचें आयुष्य जेणें उजळे । तो सूर्यु उदैला देखोनि सवेळें[36] । पापिया फुटती
डोळे । डुडुळांचे[37] ३९ जगाची सुखपहांट । चोरां मरणाहूनि निकृष्ट[38] । दुधाचें
काळकूट । होय व्यालीं[39] २४० अगाधें समुद्रजळें । प्राशितां अधिक जळे ।

१७ ज्याप्रमाणें आपल्या आईची निंदा करून तिचे दोष लोकांस उघड केलें असतां ती तीर्थाप्रमाणें आपल्यास पावन करणारी असूनही आपल्या पतनास तीच कारणीभूत होते; १८ किंवा गुरूपासून संपादन केलेली ब्रह्मविद्या जर चव्हाटयावर उघड करीत बसलें, तर ती आपलें हित करणारी असूनही तिजपासून आपलें अहितच होतें. १९ हें पहा—आपण स्वतः महापुरांत बुडत असतां जी नाव वेगानें पलीकडील तीरास नेते, तीच नाव जर आपल्या डोक्यावर घेतली, तर ज्याप्रमाणें आपल्यास बुडविते; २२० हे पांडुसुता, जीवाचें रक्षण करणारें जें अन्न तेंच उत्तम म्हणून जर अधिक सेवन केलें, तर तें अन्न खरें-परंतु विषाप्रमाणें घातक होतें, २१ त्याप्रमाणें, इहपरलोकींचा सखा जो धर्म, तो जर चव्हाटयावर उघडा केला, तर तो आपल्यास तारणारा खरा—परंतु त्याजपासून दोष घडतात. २२ म्हणून हे वीरा, आपण केलेला धर्म जर चहूंकडे आपल्या वाचेनें प्रसिद्ध केला, तर तो धर्मच अधर्म होतो, आणि त्यालाच दंभ असें म्हणतात. २३ [ दर्पः ] आतां, मूर्ख मनुष्यास चार अक्षरें येण्याबरोबर तो जसा ब्रह्मदेवाचे सभेस तुच्छ मानतो, २४ किंवा शिलेदाराचा घोडा जसा ऐरावतालाही तुच्छ मानतो; अथवा कांटेरी झाडांवरील सरडा झाडाच्या वरच्या टोकावर बसला, म्हणजे तो स्वर्गालाही नीच मानतो. २५ तृण हेंच इंधन मिळालें तरी अग्नीच्या ज्वाला ज्याप्रमाणें आकाशाला जाऊन पोहोंचतात; किंवा डबक्यांतील मासा त्याच्या जोरावर समुद्र तुच्छ मानतो; २६ अथवा ज्याप्रमाणें एक दिवस परान्न मिळालें कीं, तेवढ्यानें दरिद्री उन्मत्त होतो, त्याप्रमाणें जो स्त्री, धन, विद्या, स्तुति व बहुमान यांनीं उन्मत्त होतो. २७ एकादे दिवशीं अभ्रच्छाया पडलेली पाहून आतां आपल्याला बसावयास सावली काय करावयाची आहे; अशा विचारानें दैवहीन मनुष्य ज्याप्रमाणें आपलें घर मोडून टाकतो, किंवा जसा मृगजल पाहून एकादा मूर्ख मनुष्य आपल्या घरांतील आड बुजवून टाकतो; २८ किंबहुना याप्रमाणें संपत्तीच्या योगानें जें उन्मत्त होणें, त्याला दर्प असें म्हणतात, असें तुला मी निःसंशय सांगतों. २९ [ अभिमानः ] आणि सर्व जगाचा वेदावर भरंवसा आहे; व ईश्वर सर्व जगास पूज्य आहे; आणि सर्व जगांत सूर्याप्रमाणें तेजस्वी दुसरा कोणी नाहीं; २३० सर्व जगास एका सार्वभौमपदाची इच्छा असते; व आपल्यास मरण येऊं नये, हें सर्व जगास आवडतें हें निर्विवाद आहे; ३१ म्हणून लोक मोठ्या उत्साहानें वेदाचें व ईश्वराचें वर्णन करतात; पण तें ऐकल्याबरोबर ज्याचे मनांत मत्सर उत्पन्न होऊन जो रागावतो; ३२ व म्हणतो की मी ईश्वरास खाऊन टाकीन वेदांस विष घालून ठार करीन, व जो सर्वांचें रक्षण करणारा त्याची सत्ता हरण करीन! ३३ पतंगाला दिव्याचा उजेड सहन होत नाहीं, काजव्याला सूर्याचा तिटकारा येतो, व टिटवी समुद्राशीं वैर मांडते; ३४ त्याप्रमाणें अभिमानाच्या मदानें त्याला ईश्वराचेंही नांव सहन होत नाहीं, व परमेश्वरालाही मला एक सवतच झाली आहे असें म्हणतो. ३५ याप्रमाणें ज्याचे अंगांत मनाचा अतिशय ताठा भरला आहे, तोच 'अभिमानी' होय. तो उन्मत्त पुरुष रौरव नरकाचा हमरस्ताच होय. ३६ [ क्रोधः ] आणि दुसऱ्याचें सुख पहाण्याचें निमित्त होण्याबरोबर ज्याच्या मनोवृत्तीस क्रोधरूप अग्नीचें विष चढतें; ३७ ज्याप्रमाणें तापलेल्या तेलांत थंड पाणी टाकलें असतां तें जास्त भडकतें, किंवा चंद्राला पहातांच कोल्हा आपल्या मनांत जळफळायास लागतो; ३८ ज्याच्या योगानें सर्व विश्वाचे व्यापार सुरू होतात, तोच सूर्य सकाळीं उगवलेला पाहून पापी घुबडाचे डोळे फुटतात; ३९ जी पहांट झाली म्हणजे सर्व लोकांस सुख होतें, तिच्यापासून चोरांस मरणाहूनही जास्त दुःख होतें; आणि सर्पास दूध घातलें तरी त्याचें भयंकर विषच होतें. २४० अगाध अशा समुद्रजलाचे

१ निंदा करून. २ ब्रह्मविद्या. ३ गुरूंनी उपदेशिलेली. ४ चव्हाटयावर जर उघड केली. ५ हित करणारी. ६ अन्न खात असतां कोणीं वर्णन केलें, किंवा कोणाची इच्छा गेली किंवा दृष्ट पडली तर. ७ इहपरलोकींचा. ८ बोलून दाखविला. ९ चव्हाट्यावर. १० ढोंग. ११ शिलेदार. १२ घातला, पडला. १३ तत्त्वज्ञ लोकांच्या सभेस. १४ मीत नाहीं. १५ चाबुकस्वारांचा. १६ ऐरावताला. १७ हलका. १८ डबकें. १९ दरिद्री. २० तळें, जलपात्र. २१ माजणें. २२ गर्व. २३ निराळें. २४ लोकांच्या इच्छेचें स्थान. २५ आवडतें. २६ महत्वाच्या योगानें. २७ सत्ता, मर्यादा. २८ काजव्याला. २९ टिटवीनें समुद्राशीं वैर मांडिलें. ३० मोठा ताठा. ३१ उन्मत्त. ३२ रौरव नरकाचा. ३३ प्रसिद्ध. ३४ मिष, निमित्त. ३५ तापलेल्या. ३६ प्रातःकाळीं. ३७ घुबडाचे. ३८ वाढेल. ३९ सर्पाचे ठिकाणीं.

वडवाग्नी न मिळे । शांति कहीं ४१ तैसा विद्याविनोदविभवें । देखे पुढिलांचीं[२]
दैवें । तंव तंव रोषु दुणावे । क्रोधु तो जाण ४२ आणि मन सर्पाची कुटी[३] ।
डोळे नाराचांची सुटी । बोलणें ते वृष्टी । इंगळांची ४३ येर जें क्रियाजात । तें
तिखयांचें कवेंत । ऐसें सबाह्य खसासित । जयाचें गा ४४ तो मनुष्यांत अ-
धमु जाण । पारुष्याचें अवतरण । आतां आइक खूण । अज्ञानाची ४५ तरी
शीतोष्णस्पर्शी । निवाडु नेणे पाषाणु जैसा । कां रात्री आणि दिवसा । जाँ-
त्यंधु तो ४६ आगीं उठिला आरोगणें । जैसा खाद्याखाद्य न म्हणे । कां प-
रिसा पाडु[१२] नेणे । सोनया लोहा ४७ नातरी ते नानारसीं । रिघोनि दर्वी[१३] जैसी ।
परी रसस्वादासी । चाखों नेणें ४८ कां वारा जैसा पारखी । नव्हेचि गा मा-
र्गामार्गाविखीं । तैसें कृत्याकृत्य विवेकीं । अंधपण जें ४९ हें चोख हें मैळ ।
ऐसें नेणोनियां बाळ । देखे तें केवळ । मुखींचि घाली २५० तैसें पापपुण्याचें
खिचटें । करोनि खातां बुद्धिचेष्टे । कडु मधुर न वाटे । ऐसी जे दशा ५१
तिये नाम अज्ञान । या बोला नाहीं आन । एवं साही दोषांचें चिन्ह । सांगि-
तलें ५२ इहींच साही दोषांगीं । हे आसुरी संपत्ति दाटुगी । जैसें थोर विषय
सुभगे अंगीं । अंग सानें ५३ कां तिघा[१८] वन्हींच्या पांती । पाहतां थोडे ठाय
गमती । परी विश्वही प्राणाहुती । करूं न पुरे ५४ धातयाही गेलिया शरण ।
त्रिदोषीं न चुके मरण । तया तिहींची दुणी जाण । साही दोष हे ५५ इहीं
साही दोषीं संपूर्णीं । जाली इयेचि उभारणी । म्हणौनि आसुरी उणी । संपदा
नव्हे ५६ परी क्रूरग्रहांची जैसी । मैंदी[२१] मिळे एकेचि राशी । कां येती निंद-
कापासीं । अशेष पापें ५७ मरणाराचें आंग । पडिघाती[२२] अवघेचि रोग । कां
कुमुहूर्तीं दुर्योग । एकवटती ५८ विश्वासला आतुडवीजे[२३] चोरा । शिणला सुईजे
महापुरा । तैसें दोषीं इहीं नरा । अनिष्ट कीजे ५९ कां आयुष्य जातिये वेळे ।
शेळिये सांतवेडाळि[२५] मिळे । तैसे साही दोष सगळे । जोडती तया २६० मोक्ष-
मार्गाकडे । जैं ययाचा आंबुखा[२६] पडे । तैं न निघे म्हणौनि बुडे । संसारीं जो
६१ अधमां योनींच्या पाउंटीं[२७] । उतरत जो किरीटी । स्थावरांही तळवटीं । बै-
सणें घे ६२ हें असो तयाच्या ठायीं । मिळोनि साही दोषीं इहीं । आसुरी
संपत्ति प्राही । वाढविजे ६३ ऐसिया या दोनी । संपदा प्रसिद्धा जनीं । सांगि-
तलिया चिन्हीं । वेगळाल्या ६४

प्राशन करीत असतांही वडवाग्नि उलटा अधिकच प्रदिप्त होतो, आणि त्याला शांतता म्हणून कसली ती नाहींच; ४१ त्याप्रमाणें, दुसऱ्याचें विद्याविनोदवैभव आणि सभाग्यता ही पाहून ज्याच्या अंगाचा अगदीं तीळपापड होऊन जातो; त्याला क्रोध असें म्हणतात. ४२ [ पारुष्यमेव च ] ज्याचें मन सर्पाच्या वारुळाप्रमाणें असून दृष्टि बाणांच्या अग्राप्रमाणें तीक्ष्ण असते, व ज्याचें भाषण अग्नीच्या वर्षावाप्रमाणें प्रखर असतें; ४३ आणि ज्याच्या इतर क्रिया पोलादी करवताप्रमाणें इतरांना त्रासदायक आहेत; अशा प्रकारें जो दुसऱ्याचे मनास भेद होणाऱ्या क्रियांनीं अंतर्बाह्य भरलेला आहे, ४४ तो मनुष्यांत अधम असें समज. याप्रमाणें पारुष्याचें लक्षण होय; [ अज्ञानं ] आतां अज्ञानाचीं लक्षणें सांगतों; तीं ऐक. ४५ ज्याप्रमाणें दगडास थंडी व ऊन यांच्या स्पर्शाची समज नसते, किंवा जन्मांधास रात्र व दिवस समजत नाहींत, ४६ अग्नि भडकल्यावर तो जसा कोणत्या वस्तूचा नाश करावा; किंवा कोणतीचा करूं नये, हें जाणत नाहीं; अथवा परिसास सोनें किंवा लोखंड यांत जसा भेद नसतो; ४७ किंवा पळी ज्याप्रमाणें नानातऱ्हेच्या रसांत फिरविली, तरी तिला रस किंवा स्वाद यांचा उपभोग घेतां येत नाहीं; ४८ अथवा वारा वाहूं लागला, म्हणजे हा लहान किंवा मोठा रस्ता न समजतां सर्वत्र वाहतो, त्याप्रमाणें चांगल्या किंवा वाईट कृत्यांच्या विचाराविषयीं जो अंधळा असतो; ४९ ही वस्तु चांगली किंवा वाईट हें न जाणतां, लहान मूल जसें जी वस्तु पाहील, ती तोंडांत घालतें; २५० त्याप्रमाणें पापपुण्यांची खिचडी करून त्याचें सुखदुःखरूप फल भोगतांना ज्याच्या बुद्धीस बरें किंवा वाईट कांहींच वाटत नाहीं, अशी जी दशा, ५१ तिला अज्ञान असें म्हणतात, यांत संशय नाहीं. याप्रमाणें सहाही दोषांचीं लक्षणें तुला सांगितलीं. ५२ हे सहाही दोष अंगीं असल्यामुळेंच ही आसुरी संपत्ति मोठी बलाढ्य झालेली आहे. ज्याप्रमाणें सर्पातळ स्त्रीचें शरीर बारीक खरें, परंतु तिच्या ठिकाणीं विषय अधिक असतो. ५३ किंवा प्रलयाग्नि, विद्युदग्नि व वडवाग्नि या तीन अग्नींची संख्या पाहूं गेलें असतां थोडी आहे, पण ते भडकल्यावर त्यांना प्राणाहुति करण्याला हें विश्वही पुरणार नाहीं; ५४ महादेवास शरण गेलें असतांही ज्या त्रिदोष झालेल्या मनुष्याचें मरण चुकत नाहीं, त्या तीन दोषांच्या दुप्पट हे सहा दोष आहेत, असें समज. ५५ या संपूर्ण सहा दोषांनीं या आसुरी संपत्तीची उभारणी झाली असल्यामुळें, ही कमी आहे, असें नाहीं. ५६ परंतु दुष्ट ग्रहांचा समुदाय एकादे वेळीं एकाच राशीला येतो, किंवा निंदा करणाराला जशीं सर्व पापें लागतात; ५७ मरण समीप आलेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें सर्व रोग ग्रस्त करतात, किंवा कुमुहूर्ताचे वेळीं कुयोग एकत्र होतात; ५८ दुसऱ्यावर विश्वास ठेवणारा मनुष्य चोरांच्या तावडीत सांपडावा, किंवा थकला भागलेला मनुष्य महापुरांत पडावा, म्हणजे त्याचे वाईट परिणाम होतात, त्याप्रमाणें, या दोषांनीं मनुष्याचें अतिशय अनिष्ट होतें. ५९ किंवा शेळी मरत असतांना त्याचवेळीं तिला सात नांग्यांची इंगळी चावावी, त्याप्रमाणें हे सहाही दोष त्या मनुष्यास प्राप्त होतात, २६० ज्याला मोक्षमार्गास जाण्याचें उपाय माहीत नसल्यामुळें जो संसारसागरांत बुडून रहातो बाहेर निघत नाहीं; ६१ आणि अर्जुना, अधम योनीच्या पायऱ्यांनी उतरत उतरत जो स्थावर योनीच्या तळापर्यंत येऊन ठेपतो. ६२ हें असो, त्याच्या ठिकाणीं हे सहा दोष एकत्र होऊन आसुरी संपत्ति वाढवितात. ६३ याप्रमाणें जगांत ज्या ह्या दोन संपत्ति प्रसिद्ध आहेत, त्यांचीं निरनिराळीं लक्षणें तुला सांगितलीं. ६४

१ वैभवानें, ऐश्वर्यानें. २ इतरांची. ३ घर, वारूळ. ४ बाणांचे सुदर्ण. ५ पोलादी. ६ मनास येचणाऱ्या क्रियांनीं भरलेले. ७ काठिण्याचें, कठ भाषणाचें. ८ मूर्ति. ९ भेद, विचार. १० जन्मांध. ११ खावयाला. १२ योग्यता. १३ पळी. १४ खिचडी. १५ बुद्धिव्यापारास. १६ सकाळ. १७ लहान. १८ तीन अग्नि-प्रलयाग्नि, विद्युत्ताग्नि व वडवाग्नि. १९ महादेवालाही. २० दुष्ट ग्रहांची. २१ समुदाय. २२ व्यापितो. २३ सांपडावा. २४ पाळावा. २५ सात नांग्यांची इंगळी. २६ त्रिदोष, गांवसणी. २७ पायऱ्यांनी.

दैवी संपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता । मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥

इया दोन्हींमाजीं पहिली । दैवी जे म्हणितली । ते मोक्षसूर्यें पाहेली । उखांचि जाण ६५ येरी जे दुसरी । संपत्ति कां आसुरी । ते मोहेंलोहाची खरी । सांखळी जीवां ६६ परि हें आइकोनि झणें । भय घेसी हो मनें । काय रात्रीचा दिनें । धाकु धरिजे ६७ हे आसुरी संपत्ति तया । बंधालागीं धनंजया । जो साहीं दोषां ययां । आश्रयो होय ६८ तूं तंव पांडवा । सांगितलेया दैवा । गुणनिधी बरवा । जन्मलासी ६९ म्हणोनि पार्था तूं या । दैवी संपत्ती स्वामिया । होऊनि यावें उवांया । कैवल्याचिया २७०

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च । दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥६॥

आणि दैवां आसुरां । संपत्तिवंतां नरां । अनादिसिद्ध उजगेरा । राहाटीचा आहे ७१ जैसें रात्रीच्या अवसरीं । व्यापारिजे निशाचरीं । दिवसा सुव्यवहारीं । मनुष्यादिकीं ७२ तैसिया आपुलालिया राहाटीं । वर्तती दोन्ही सृष्टी । दैवी आणि किरीटी । आसुरी येथ ७३ तेवींचि विस्तारूनि दैवी । ज्ञानेंकथनादि प्रस्तावीं । मागील ग्रंथीं बरवी । सांगितली ७४ आतां आसुरी जे सृष्टी । तेथिंची उपलेंऊं गोठी । अवधानाची दिठी । दे पां निकी ७५ तरी वाद्येंवीण नादु । नेदी कवणाही सादु । कां अपुष्पीं मकरंदु । न लभे जैसा ७६ तैसी प्रकृति हे आसुर । एकली नोहे गोचर । जंव एकाधें शरीर । माल्हातीना ७७ मग आविष्करला लांकुडें । पावकु जैसा जोडे । तैसी प्राणिदेहीं सांपडे । आटोपली हे ७८ ते वेळीं जे वाढी उंसा । तेचि आंतुला रसा । देहाकारु होय तैसा । प्राणियांचा ७९ आतां तयाचि प्राणियां । रूप करूं धनंजया । घडले जे आसुरीया । दोषवृंदीं २८०

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः । न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥७॥

तरी पुण्यालागीं प्रवृत्ती । कां पापाविषयीं निवृत्ती । या जाणणेयाची राती । तयांचें मन ८१ निगैणेया आणि प्रवेशा । चित्त नेदीतु आवेशा । कोशकिडु जैसा । जाचिन्नला पैं ८२ कां दिधलें मागुती येईल । कीं नये हें पुढील । न पाहातां दे भांडवल । मूर्ख चोरां ८३ तैसिया प्रवृत्ति निवृत्ति दोनी । नेणिजती आसुरीं जनीं । आणि शौच तें स्वप्नीं । देखती ना ते ८४ काळिमा सांडील कोळसा । वरी चोखी होईल वायसा । राक्षसही मांसा । विटों शके ८५ परी

**अन्वयार्थ**—(दैवी संपद्)–देवांची संपत्ति–(विमोक्षाय)–संसारांतून मुक्त होण्यासाठीं आहे व–(आसुरी)–[संपद्]–असुरांची संपत्ति–(निबन्धाय)–नियत बंधासाठीं आहे, असें–(मता)–मानलेलें आहे.–(पांडव)–हे अर्जुना !–(मा शुचः)–तूं शोक करूं नको. तूं–(दैवीं संपदं)–दैवी संपत्तीला–(अभिजातः असि)–अनुलक्षून उत्पन्न झाला आहेस. ५

या दोन संपत्तींपैकीं पहिली जी दैवी संपत्ति तुला सांगितली, ती म्हणजे मोक्षरूपी सूर्याच्या उदयानें झालेली पहांटच आहे, असें समज.( सूर्योदयाच्यापूर्वी जशी पहांट होते, तशी ह्या दैवी संपत्तीची प्राप्ति म्हणजे मोक्षापूर्वीची स्थिति होय. ) ६५ दुसरी जी आसुरी संपत्ति, ती जीवास मोहरूपी लोखंडाची बिडीच होय. ६६ पण हें ऐकून तूं मनांत धास्ती घेशील हो ! हें पहा–सूर्यानें रात्रीचा का धाक बाळगावा ? ६७ हे धनंजया, या आसुरी संपत्तीच्या सपाट्यांत तोच सांपडतो कीं, जो या सहा गुणांस आश्रय होतो. ६८ अर्जुना, तूं तर वर सांगितलेल्या दैवी गुणांचा उत्तम साठाच जन्माला आला आहेस; ६९ म्हणून पार्था, तूं या दैवी संपत्तीचा स्वामी होऊन मोक्षसुखास प्राप्त हो ! २७०

**अन्वयार्थ**—(अस्मिन् लोके)–या लोकीं–(दैवः च आसुरः एव)–दैव व आसुरच असे–(द्वौ भूतसर्गौ)–मनुष्यांचे दोन सर्ग आहेत. त्यांतील–(दैवः)–देवांची सृष्टि–सर्ग–(विस्तरशः)–विस्तारपूर्वक–(प्रोक्तः)–सांगितला.–(पार्थ)–हे पार्था !–(मे)–मजपासून–(आसुरं सर्गं)–असुरांचा सर्ग, तूं–(शृणु)–ऐक. ६

आणि या दैवी व आसुरी संपत्तींनी युक्त अशा लोकांच्या वागणुकीचे अनादिसिद्ध मार्ग चालत आलेले आहेत. ७१ ज्याप्रमाणें रात्रीं निशाचरांचे व्यापार चालू असतात, व दिवसा मनुष्यादिकांचे उत्तम व्यापार चालत असतात, ७२ त्याप्रमाणें अर्जुना, दैवी व आसुरी, ह्या दोन सृष्टि आपापल्या मार्गांनीं जगतांत राहाटत असतात, ७३ त्याचप्रमाणें ज्ञान सांगते वेळीं दैवी संपत्ति मागें विस्तारेंकरून सांगितली. ७४ आतां, आसुरी संपत्तींत वागणारे जे लोक, त्यांजविषयीं तुला सांगतों, तिकडे पूर्ण लक्ष असूं दे. ७५ तर नाद ज्याप्रमाणें वाद्याशिवाय कोणास ऐकूं येत नाहीं, किंवा पुष्पाशिवाय मकरंद मिळत नाहीं, ७६ त्याप्रमाणें ह्या आसुरी संपत्तीनें एकाद्या शरीराचा आश्रय केल्याशिवाय ती दृष्टीस पडत नाहीं. ७७ मग लांकडावर लांकूड घांसल्यामुळें जसा त्या ठिकाणीं अग्नि दृष्टीस पडतो, तशी मनुष्याच्या देहांत ओतप्रोत भरलेली ही दृष्टोत्पत्तीस येते. ७८ त्या वेळीं, ऊंस ज्याप्रमाणें वाढत जाईल, तसा त्यांतील रसही वाढतो; त्याप्रमाणें, जसजसा प्राण्याचा देह वाढेल, तसतशी तीही वाढते. ७९ आतां, अर्जुना, आसुरी संपत्तीच्या दोषांनीं युक्त असे जे प्राणी जन्मलेले आहेत, त्यांचीं लक्षणें तुला सांगतों. २८०

**अन्वयार्थ**—(आसुराः जनाः)–आसुरी प्रकृतीचे जन–(प्रवृत्तिं च निवृत्तिं च)–प्रवृत्ति कोठें करावी व निवृत्त कशापासून व्हावें, तें–(न विदुः)–जाणत नाहींत–(तेषु)–त्यांच्या ठिकाणीं–(शौचं न)–शुचिर्भूतपणा नसतो–(अपि च)–आणि तसाच–(आचारः)–सदाचार–(न)–नसतो व–(सत्यं न विद्यते)–सत्य नसतें. ७

[ **प्रवृत्तिंच निवृत्तिंच** ] तर, पुण्याचरणाविषयीं प्रवृत्ति किंवा पापाचरणापासून निवृत्ति या ज्ञानाचा ज्यांचे अंतःकरणांत काळोख असतो; ८१ कोशकिडा आवेशानें आपलें घरटें बांधूं लागला, म्हणजे ज्याप्रमाणें आपल्यास बाहेर निघण्याला किंवा आंत प्रवेश करण्याला वाट आहे किंवा नाहीं, इकडे लक्ष न देतां आंत कोंडला जातो; ८२ अथवा आपण दिलेलें भांडवल वसूल होईल किंवा नाहीं, हा पुढील विचार न पाहतां मूर्ख मनुष्य चोरास कर्जाऊ पैसे देतो, ८३ त्याप्रमाणें, आसुरी संपत्तीचा आश्रय करणारे जे लोक आहेत, ते प्रवृत्ति व निवृत्ति हे दोन्ही मार्ग जाणीत नाहींत; [ **न शौचं** ] आणि शुचित्व कसें तें त्यांना स्वप्नांत देखील माहीत नसतें. ८४ कोळसाही आपला काळेपणा टाकील, कावळाही पांढरा होईल, आणि राक्षसांनाही मांस खाण्याचा वीट येईल, ८५

१ उजेडविली, प्रकाशित केली. २ अरुणोदय. ३ मोहरूप लोखंडाची. ४ कदाचित्. ५ सूर्यानें. ६ बांधण्याकरितां, जखडण्याकरितां. ७ गुणांची खाण. ८ सुखप्रत. ९ मार्ग, प्रसिद्ध मार्ग. १० हिंडावे. ११ ज्ञान सांगते वेळीं. १२ प्रसंगीं. १३ सांग. १४ शब्द, ध्वनि, उत्तर. १५ पुष्परस. १६ अंगीकारीना. १७ प्रकट झाला. १८ अग्नि. १९ मावलेली. २० उपक्रम, लक्षण. २१ निघण्याला. २२ आवेशानें, त्वरेनें. २३ कोशवासी किडा. २४ कोंडला. २५ पुण्याविषयीं तत्परता व पापाविषयीं विन्मुखता. २६ पांढरेपण. २७ कावळ्याला.

आसुरां प्राणियां । शौच नाहीं धनंजया । पवित्रत्व जेवीं भांडिया । मद्याचिया
८६ वोढविती विधीची आस । कां पाहाती वडिलांची वासें । आचाराची भाष ।
नेणतीचि ते ८७ जैसें चरणें शेळियेचें । कां धांवणें वारियाचें । जाळणें आ-
गीचें । भलतेउतें ८८ तैसें पुढां सूनि स्वैरें । आचरती ते गा आसुर । सत्येंसि
कीर वैर । सदाचि तयां ८९ जरी नांगिया आपुलिया । विंचू करी गुदगु-
लिया । तरी साचा बोलीं बोलिया । बोलती ते २९० आंपनाचेनि तोंडें । जरी
सुगंधा येणें घडे । तरी सत्य तयां जोडे । आसुरांतें ९१ ऐसें ते न करितां
कांहीं । आंगेंचि वोखटें पाहीं । आतां बोलती ते नवाई । सांगिजेल ९२
एऱ्हवीं करेयांच्या ठायीं चांग । तें तयासि कैंचें नीट आंग । तैसा आसुरां-
चा प्रसंग । प्रसंगें परिस ९३ उधवणीचें जेवीं तोंड । उगळी धुंवांचे उभंड ।
हें जाणिजे तेवीं उघड । सांगों ते बोल ९४

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् । अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

तरी विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता ईश्वररावो । चावडिये न्यावो
अन्यावो । निवडी वेदु ९५ वेदीं अन्यायीं पडे । तो निरयभोगें दंडे । सन्यायी
तो सुरवाडें । स्वर्गीं जिये ९६ ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था । इयेतें
म्हणती ते वृथा । अवघेंचि हें ९७ यज्ञमूढ ठकिले यागीं । देवपिसें प्रतिमालिंगीं ।
नागवले भगवे योगी । समाधिभ्रमें ९८ येथ आपलेनि बळें । भोगिजे जें जें
वेंटाळें । हें वांचोनि वेगळें । पुण्य आहे ९९ ना अशक्तपणें आंगिकें । वेंगळवें-
टाळीं न टके । ऐसा गोंदिजेवीण विषयसुखें । तेंचि पाप ३०० प्राण घेपती सं-
पन्नांचे । तें पाप जरी साचें । तरी सर्वस्व हाता ये तयांचें । हें पुण्यफळ कीं १
बळी अबळातें खाय । हेंचि बाधित जरी होय । तरी मासेयां कां न होय ।
निसंतान २ आणि कुळें शोधूनि दोन्ही । कुमारेंचि शुभलग्नीं । मेळवीजती प्र-
जासाधनीं । हेतु जरी ३ तरी पशुपक्षादि जाती । जयां मिती नाहीं संतती ।
तयां कोणें प्रतिपत्तीं । विवाह केले ४ चोरियेचें धन आलें । तरी तें कोणासि
विष जालें । वाळंभें परद्वार केलें । कोढी कोणी होय ५ म्हणोनि देवो गो-
सांवी । तो धर्माधर्मु भोगवी । आणि परत्रींच्या गांवीं । करी तो भोगी ६ परी
परत्र ना देवो । न दिसे म्हणोनि तें वावो । आणि कर्ता निमे मा ठावो । भो-
ग्यासि कवणु ७ येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं । तैसाचि

पण, अर्जुना, ज्याप्रमाणें मद्याच्या पात्रास पवित्रपणा नसतो, त्याप्रमाणें या आसुरी प्राण्यास शुचित्व येणार नाहीं. ८६ [ नापिचाचारः ] ज्यांना शास्त्रोक्त कर्मांची इच्छा नसते, जे वडिलांच्या आज्ञेची वाट पहात नाहींत आणि आचाराची ज्यांना ओळखही नसते; ८७ ज्याप्रमाणें शेळी हवा तो पाला खाते, किंवा वारा वाटेल तिकडे वाहतो, तसाच अग्नि एकदां भडकल्यावर हवा तो पदार्थ जाळून टाकतो, ८८ त्याप्रमाणें, आपले इच्छेला पुढें करून आसुरी संपत्तीचे लोक आचरण करितात, [नसत्यं] व सत्याबरोबर त्यांचें नेहमी हाडवैर असतें. ८९ जर विंचू आपली नांगी मारून त्या योगानें लोकांस गुदगुल्या करूं शकेल, तरच त्यांच्या बोलण्यांत सत्य आढळेल! २९० गुदद्वारांतून निघणारा वारा जर सुगंधयुक्त निघेल, तरच आसुरी संपत्तीच्या लोकांजवळ सत्य सांपडेल! ९१ अशा प्रकारें कांहीं न करतांही ते स्वभावतःच वाईट असतात, समजलास! आतां, त्यांचे बोलण्याचा मासला तुला सांगतों. ९२ एऱ्हवीं, उंटाच्या ठिकाणीं पाहूं गेलें तर त्याचा कोणता अवयव नीट आहे म्हणून सांगतां येणार? त्याप्रमाणें आसुरी संपत्तीच्या लोकांची स्थिति आहे. परंतु प्रसंगानुसार सांगतों, तें ऐक. ९३ आतां, जीं आम्ही त्यांचीं भाषणें सांगणार आहों तीं म्हणजे धुराड्याच्या तोंडांतून ज्याप्रमाणें धुराचे लोट बाहेर निघतात, त्याप्रमाणें असतात, असें समज. ९४.

**अन्वयार्थ**—(ते)–आसुरी प्रकृतीचे जन–(जगत्)–हें सर्व जगत्–(असत्यं)–आम्हांप्रमाणेंच खोटें,–(अप्रतिष्ठं)–धर्माधर्मादि प्रतिष्ठारहित,–(अनीश्वरं)–ज्याचा कोणी शास्ता–ईश्वर नाहीं असें–(अपरस्परसंभूतं)–कामी स्त्री-पुरुषांपासून उत्पन्न झालेलें –(किं अन्यत्)–दुसरें काय?–(कामहैतुकं)–काम या हेतुपासूनच झालेलें आहे, असें–(आहुः)–सांगतात. ८

[ असत्यं ] तर विश्व हें अनादि चालत आलेलें आहे, व त्या ठिकाणीं ईश्वर हा सर्वांत श्रेष्ठ असून तेथील नियंता आहे, आणि तेथील चावडीवर वेद हें न्याय व अन्याय यांचा उलगडा करतात; ९५ वेद ज्याला अन्यायी ठरवितात, त्याला नरकभोगाची शिक्षा होते, व न्यायी ठरवितात तो सुखानें स्वर्गवास करतो. ९६ पार्था, अनादिकालापासून चालत आलेली जी ही विश्वाची व्यवस्था, तिला, हें सर्व खोटें आहे, असें ते म्हणतात. ९७ ज्यांना यज्ञाचें वेड लागलें आहे, ते यज्ञ करून फसतात; ज्यांना देवाची पूजा करण्याचें वेड लागलें आहे, ते मूर्तिपूजा करतात; व जे समाधियोगानें भ्रम पावले आहेत, ते हा संसार टाकून भगवीं वस्त्रें पांघरून योगी होतात. ९८ या जगांत आपल्या सामर्थ्यानें ज्याचा उपभोग घेतां येईल त्यांवांचून दुसरें पुण्य आहे काय? ९९ सर्व विषयोपभोग एकत्र करून अंगांत शक्ति नसल्यामुळें त्यांचा उपभोग ज्याला घेतां येत नाहीं, तेंच पाप होय. ३०० श्रीमान् लोकांचे प्राण हरण करणें हें जर खरोखर पाप म्हणावें, तर त्यांचें सर्व धन आपले हातांत येतें हें पुण्यफळ नाहीं का? १ जो बलवान् असतो तो अशक्ताचा नाश करतो, हें जर पाप म्हणावें तर मोठे मासे लहान माशांस खातात तर त्यांचें निसंतान कसें होत नाहीं? २ [ अप्रतिष्ठं ] आणि दोन्हीकडील कुळें शोधून प्रजा उत्पन्न करण्याच्या हेतूनें जर मुलांमुलींच्या विवाहास सुमुहूर्तच लागतो, असें जर असेल ३ तर पशुपक्ष्यादिकांस जी अनिवार संतति होते त्यांचे सुमुहूर्त पाहून पावलोपावलीं कोण लग्नें लावितो? ४ चोरून आणिलेल्या धनाचा कोणी उपभोग केला असतां, कोणास तें विषाप्रमाणें बाधलें आहे काय? किंवा आवडीनें व्यभिचार केला असतां कोणास कोड उत्पन्न झालें आहे काय? ५ [ अनीश्वरं ] म्हणून, ईश्वर जो जगाचा स्वामी आहे, तो धर्माधर्मानें वागणाऱ्या कडून सुख आणि दुःख हीं फळें भोगावितो, [ किमन्यत् ] आणि या लोकीं जो शुभाशुभ कर्में करतो तोच परलोकीं त्याचें फळ भोगतो. ६ हें शास्त्राचें म्हणणें खरें असें मानावें, परंतु परलोक व ईश्वर दिसत नाहींत, म्हणून त्यांविषयीं बोलणें व्यर्थ होय; आणि पुण्य किंवा पाप करणारा मरण पावला, तर त्याचीं फळें भोगण्यास कोण उरतो? ७ [ कामहैतुकं ] हें पहा स्वर्ग-

१ नाहींशी करतात. २ चाल, रीत. ३ पुढें करून. ४ स्वेच्छेला. ५ गुदद्वारानें. ६ वाईट. ७ अपूर्वता. ८ उंटाच्या. ९ धुराड्याचें. १० भोकी. ११ धुराचे. १२ उमाळे, लोट. १३ चालक. १४ न्याय, अन्याय. १५ नरकभोगानें. १६ न्यायानें वागणारा. १७ सुखानें. १८ मूर्ति व लिंगाच्या योगानें. १९ फसले. २० आंगस्था. २१ एकत्र करणें. २२ होत नाहीं. २३ दुःख पावतो. २४ निषिद्ध कर्म. २५ मत्स्यांचें. २६ विधिविधानानें. २७ आवडीनें. २८ व्यभिचार, कोढी=कोढी, कुष्टरोगी. २९ परलोकीं. ३० व्यर्थ. ३१ मरतो.

लोकीं ज्याप्रमाणें उर्वशीच्या उपभोगानें इंद्र सुखी असतो, त्याप्रमाणें नरकांतील किडेही त्यांतच संतोष मानतात. ८ म्हणून नरक किंवा स्वर्ग हें पापकर्माचें किंवा पुण्यकर्माचें फल नाहीं. कारण, दोन्ही ठिकाणीं कामाचाच सुखोपभोग प्राप्त होतो. ९ [ अपरस्परसंभूतं ] वास्तव कामाच्या इच्छेनें स्त्रीपुरुष एकत्र झाले असतां, सर्व जगाची उत्पत्ति होते; १० आणि आपल्या हिताकरितां जी जी इच्छा करून आपण कांहीं मिळवितों, त्याचा आपल्यास वीट आल्यावर द्वेष उत्पन्न होऊन आपली इच्छाच त्याचा नाश करिते. ११ याप्रमाणें, जगाच्या उत्पत्तीस कामावांचून दुसरें कांहीं नाहीं, असें असुर लोक म्हणतात. १२ आतां त्या निंद्य बोलण्याचा जास्ती विचार नको. कारण याविषयीं चर्चा करणें केवळ व्यर्थ होय. १३

**अन्वयार्थ**—(एतां दृष्टिं)-या दृष्टीचा-(अवष्टभ्य)-आश्रय करून-(नष्टात्मानः)-ज्यांचा स्वभाव नष्ट झाला आहे,-(अल्पबुद्धयः)-ज्यांची बुद्धि अल्प आहे,-(अहिताः)-जगाचे शत्रु-(उग्रकर्माणः)-ज्यांचीं कर्में उग्र-क्रूर आहेत असे ते-(जगतः)-जगाचा-(क्षयाय)-क्षय करण्यासाठीं-(प्रभवन्ति)-उत्पन्न होतात. ९

आणि ईश्वराचा तिरस्कार करून त्याविषयीं नुसत्या चांथी म्हणजे गप्पा सुद्धां मारीत नाहींत, त्यांच्या चित्तांत कोणत्याही प्रकारचा एक निश्चय नसतो. १४ फार काय सांगावें! उघड रीतीनें आपण नास्तिक आहोंत, असा आपल्या ठिकाणीं बाणा बाळगतो. जशी महारवाडा समजण्याची खूण हाड रोवणें ही असते, त्याप्रमाणें ज्ञानावांचून पापपुण्यासंबंधानें निर्धास्तता बाळगणें हें एक नास्तिकपणाचें द्योतच होय. १५ अशा स्थितींत स्वर्गाविषयीं श्रद्धा किंवा नरकाचें भय याविषयीं त्याचे मनांत कांहींएक वागत नाहीं. १६ मग वीरा अर्जुना, हे आसुरी लोक देहरूपी खोल्यांत सांपडून अपवित्र जलाच्या नाशवंत बुडबुड्याप्रमाणें विषयरूपी चिखलांत बुडतात. १७ ज्यावेळेस जलचरांचा मृत्यु ओढवतो, त्यावेळेस त्यांना भरण्याकरितां डोहावर कोळी लोक जमून जाळीं टाकतात; किंवा शरीरपतनाची वेळ आल्यावर रोग उद्भवतात; १८ किंवा प्रजेला पीडा व्हावयाची असली म्हणजे ज्याप्रमाणें धूमकेतु आकाशांत उगवतो, त्याप्रमाणें लोकांचा नाश होण्याची वेळ आली म्हणजे आसुरी संपत्तीच्या लोकांचा उदय होतो. १९ ज्याप्रमाणें अशुभ पेरलें असतां त्याला अशुभच कोंब येतात, त्याप्रमाणें हे पापाचे बोलते चालते कीर्तिस्तंभच आहेत. २० आणि ज्याप्रमाणें अग्नीला मागें अथवा पुढें आलेली वस्तु जाळण्याशिवाय दुसरें कर्तव्य नसतें त्याप्रमाणें त्यांच्याजवळ येणारा मनुष्य चांगला असो अथवा वाईट असो, त्याचा हे नाशच करतात. २१ परंतु ज्या समारंभानें ते आपली कृत्यें करतात, त्याचें वर्णन करतों, तें ऐक, असें श्रीनिवास पार्थास म्हणाले. २२

**अन्वयार्थ**—(दुष्पूरं कामं आश्रित्य)-ज्याची पूर्ति-तृप्ति होणें अशक्य आहे, अशा कामाचा आश्रय करून-(दम्भमानमदान्विताः)-दंभ, मान व मद यांनीं युक्त होत्साते-(मोहात्)-अविवेकामुळें-(असद् ग्राहान्)-असत् म्हणजे अशुभ निश्चय-(गृहीत्वा)-करून घेऊन-(अशुचिव्रताः)-ज्यांचीं व्रतें अशुचि आहेत, असे-(प्रवर्तन्ते)-प्रवृत्त होतात. १०

तर जाळ्यांत कधीं पाणी सांठवितां येत नाहीं व अग्नीला काष्ठें कधीं पुरीं होत नाहींत, अशा दुर्भर वस्तूंप्रमाणें जो नेहमीं बुभुक्षित असतो, २३ त्या कामाला आपल्या मनांत आश्रय देऊन, हे पांडवा, जे दंभ व मान यांची त्यांत भर घालतात; २४ माजलेल्या हत्तीस ज्याप्रमाणें दारू पाजल्यावर तो अधिक उन्मत्त होतो, त्याप्रमाणें अंगांत मदाचा ताठा भरलेले ते आसुरी संपत्तीनें युक्त असे लोक, जों जों वृद्ध होतात, तों तों आपणांस मोठे दुराचार्य असें समजतात; २५ आणि ते कोणतीही गोष्ट दुराग्रहानें तडीस नेल्याशिवाय ठेवीत नाहींत, तद्यांत मूर्खपणाची भर पडल्यावर मग निश्चयाची दाद कोठें लागणार! २६ ज्या योगानें दुसऱ्यास पीडा होईल किंवा दुसऱ्याची प्राणहानि होईल तीं कर्में करण्याविषयीं जे नेहमीं प्रवृत्त असतात; २७ आपण केलेलें कृत्य चहूंकडे प्रसिद्ध करतात व जगाला तुच्छ मानतात; आणि त्यांच्या इच्छेस धांव घेण्यास दशदिशाही पुरत नाहींत! २८ ज्याप्रमाणें गाय शेतांत मोकळी सोडल्यावर ती इची तिकडे चरते, त्याप्रमाणें अभिमानानें पापाचरणाची वृद्धि करतात. २९

१ संतोष मानितो. २ इच्छेनें, मनोरथानें. ३ मिळवितो. ४ द्वेष; निंद्य, खोटें. ५ कर्म. ६ त्रास, तिरस्कार. ७ बरवर. ८ बडबड. ९ निदानें ठिकाणीं एकही निश्चय नाहीं. १० हा महारवाडा आहे हें समजण्याकरितां, त्याठिकाणी एक हाड रोवलेलें असतें, त्याप्रमाणें. ११ भय. १२ देहरूपी खोल्यामध्यें. १३ अपवित्र जलाच्या. १४ सहसा, अर्जुना. १५ माशांचा मरण समय येतो, मृत्यु ओढवतो. १६ कोळी. १७ अपशकुनार्थ. १८ मारण्यास. १९ उगवून आलें असतां. २० समारंभानें, तयारीनें. २१ जाळें. २२ काष्ठांनीं. २३ थांत होत नाहीं. २४ बाभाशांच्या; अतृप्तांच्या. २५ अग्नभागीं. २६ जिन्हाचा. २७ समुद्र. २८ हत्तीला. २९ साहाय्य, मदत. ३० वणू. ३१ दुसऱ्यास दुःख. ३२ दुसऱ्याचा. ३३ प्रसिद्ध करितात. ३४ इच्छेचें जाळें. ३५ अभिमानानें. ३६ धंचद्वेस. ३७ देवाला सोडलेली गाय. ३८ मिळाल्या शेतांत. ३९ इकडे तिकडे जशी चरूं लागते.

चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः । कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

याचि येका आयती । तयाचिया कर्मप्रवृत्ती । आणि जिणियांही पैरौती । वाहती चिंता ३३० पाताळाहूनि निम्न । जियेचिये उंचिये साने गगन । जें पाहतां त्रिभुवन । अणुही नोहे ३१ ते योगपटाची मवणी । जीवीं अनियम चिंतवणी । जे सांडूं नेणे मरणीं । वल्लभा जैसी ३२ तैसी चिंता अपार । वाढविती निरंतर । जीवीं सूनि असार । विषयादिक ३३ स्त्रियां गाइलें आइकावें । स्त्रीरूप डोळां देखावें । सर्वेंद्रियें आलिंगावें । स्त्रियेतेंची ३४ कुरवंडी कीजे अमृतें । ऐसें सुख स्त्रियेपरौतें । नाहींचि म्हणौनि चित्तें । निश्चयो केला ३५ मग तयाचि स्त्रीभोगा- । लागीं पाताळ स्वर्गा । धांवती दिग्विभागा- । पैरौतही ३६

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः । ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

आमिषकवळु थोरी आशा । न विचारितां गिळी मासा । तैसें कीजे विषयाशा । तयांसि गा ३७ वांछित तंव न पवती । मग कोरडियेचि आशेची संतती । वाढऊं वाढऊं होती । कोशकिडे ३८ आणि पसरिला अभिलाषु । अपूर्णु होय तोचि द्वेषु । एवं कामक्रोधांहूनि अधिकु । पुरुषार्थु नाहीं ३९ दिहाँ खोलणें रात्रीं जागोवा । ठाणांतरियां जैसा पांडवा । अहोरात्रींही विसांवा । भेटेचिना ३४० तैसें उंचौनि लोटिलें कासें । नेहटती क्रोधाचिये ढेमे । तरी रागद्वेष प्रेमें । न माती केंही ४१ तेविंचि जीवींचिया हांवा । विषयवासनांचा मेळावा । केला परी तो भोगावा । अर्थे कीं ना ४२ म्हणोनि भोगावयाजोगा । पुरता अर्थु पैं गा । आणावया जगा । झोंबती सैरें ४३ एकातें सोधूनि मारिती । एकाचि सर्वस्वें हरिती । एकालागी उभारिती । अपाययंत्रें ४४ पाशिकें पोतीं वागुरा । सुणीं ससाणे चिकाटी खोंचारा । घेऊनि निघती डोंगरा । पारधी जैसे ४५ ते पोसावया पोट । मारूनि प्राणियांचे संघाट । आणिती ऐसें निकृष्ट । तेंही करिती ४६ परप्राणघातें । मेळविती वित्तें । मिळाल्या चित्तें । तोषणें कैसें ४७

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् । इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥

म्हणे आजि मियां । संपत्ति बहुतेकांचिया । आपुल्या हातीं केलिया ।

**अन्वयार्थ**—(च)-आणि ते आसुरलोक-(अपरिमेयां)-जिचें प्रमाण-इयत्ता कळत नाहीं, अशा-(प्रलयान्तां)-मरणापर्यंत टिकणाऱ्या-मरणानेंच संपणाऱ्या-(चिन्तां)-चिंतेचा -(उपाश्रिताः)-आश्रय केलेले असतात-(कामोपभोगपरमाः)-शब्दादि विषयांचा उपभोग घेण्यामध्येंच तत्पर असलेले आणि-(एतावत्)-विषयोपभोग घेणें, हाच काय तो परमपुरुषार्थ आहे-(इति निश्चिताः)-असा निश्चय केलेले असतात.

मात्र एका साधनानें ते आपलीं कर्में करतात, आणि मरण पावल्यावरही आपल्यास सुख मिळावें, म्हणून काळजी वहातात. ३३० जी चिंता पाताळाहूनही खोल व गगनाहूनही उंच, आणि जिच्याशीं तुलना केली असतां त्रिभुवन अणूएवढेंही दिसत नाहीं; ३१ संन्याशास घालून दिलेल्या नियमाप्रमाणें हे आपला किरा वळवून मनांत अनियमित चिंता धारण करतात; आणि ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्री संकटसमयींही आपल्या नवऱ्यास सोडीत नाहीं, त्याप्रमाणें ती चिंताही यांना सोडीत नाहीं. ३२ त्याचप्रमाणें, असार अशा विषयादिकांविषयीं नेहमीं मनांत लालसा बाळगून त्यांच्या प्राप्तीविषयीं अपार चिंता वहातात; ३३ स्त्रियांचें गाणें नेहमीं ऐकावें, स्त्रियांचें स्वरूप डोळ्यांनीं पहावें, सर्व इंद्रियांना स्त्रियांचेंच आलिंगन करण्यास सांपडावें; ३४ आणि स्त्रीपासून होणाऱ्या सुखावरून अमृतही ओंवाळून टाकावें; अशा प्रकारें स्त्रीपेक्षां अधिक असें दुसरें सुखच नाहीं. असा त्यांचे मनानें निश्चय केलेला असतो. ३५ मग त्याच स्त्रीभोगाकरितां स्वर्गांत, पाताळांत किंवा दिशांचे सीमेपलीकडेहि धांव घेण्यास ते तयार असतात. ३६

**अन्वयार्थ**—(आशापाशशतैः)-आशा हेच शेंकडों पाश, त्यांनीं-(बद्धाः)-बांधले गेलेले,-(कामक्रोधपरायणाः)-काम व क्रोध ज्यांचा परम आश्रय आहे, असे ते आसुर प्रकृतीचे लोक-(कामभोगार्थं)-विषयोपभोगासाठीं-(अन्यायेन)-अन्यायानें -(अर्थसंचयान्)-द्रव्यसंचय-(ईहन्ते)-करितात. १२

गळास लाविलेल्या आमिषाच्या आशेनें मासा जसा तें सावयास जाऊन मरण पावतो, तसे हे विषयांच्या आशेनें मरण पावतात. ३७ इच्छित गोष्ट प्राप्त तर होत नाहींच, पण उलट कोळ्या आशेची परंपरा वाढवितां कोशकिड्याप्रमाणें बंधन करून घेतात; ३८ आणि ज्या वस्तूंची इच्छा करावी ती जर पूर्ण झाली नाहीं, तर लागलीच द्वेष उत्पन्न होतो. याप्रमाणें नेहमीं वस्तुलाभापासून तृप्ति मानून तीच वस्तु न मिळाल्यामुळें क्रोधयुक्त होतात. एवंच कामक्रोधापेक्षां अधिक पुरुषार्थच वाटत नाहीं. ३९ अर्जुना, ज्याप्रमाणें ठाण्यांतील स्वारास दिवसा कामगिरीकरितां फिरावें लागतें, व रात्रीं गस्त घालावी लागते, म्हणून त्याला रात्रंदिवस विसांवा नसतो, ३४० त्याप्रमाणें, उंच शिखरावरून कामानें लोटून दिल्यामुळें ( ज्या वस्तूविषयीं अतिशय इच्छा धरली ती न मिळाल्यामुळें ) क्रोधाच्या टेंकडीवर आदळतात. ( क्रोधाविष्ट होतात, ) तरी त्यांचें कामक्रोधांविषयींचें प्रेम कमी होत नाहीं. ४१ त्याचप्रमाणें, मनांत उत्पन्न झालेली विषयांची इच्छा पैशाशिवाय पूर्ण कोठून होणार? ४२ म्हणून विषयवासना पूर्ण होण्यापुरतें द्रव्य मिळविण्याकरितां जगांतील लोकांस त्रास देतात, ४३ एकाद्याला आडरानांत गांठून मारतात, एकाद्याचें सर्वस्व हरण करितात, व एकाद्याचा नाश करण्याकरितां युक्ति योजितात. ४४ पारधीलोक डोंगरावर शिकारीस जातेवेळीं ज्याप्रमाणें आपल्याजवळ पाश, पोतीं, जाळी, शिकारी कुत्रे, बहिरीससाणे, चिकाटया व भाले घेतात; ४५ आणि आपलें पोट भरण्याकरितां पुष्कळ प्राण्यांचे समूह मारून आणतात, त्याप्रमाणें हेही असेंच वाईट कर्म करतात, ४६ दुसऱ्याचा प्राणघात करून द्रव्य मिळवितात; आणि तें मिळाल्यावर त्यांच्या चित्तास कसा संतोष होतो, तो ऐक. ४७

**अन्वयार्थ**—(अद्य)-आतां-(मया)-मीं-(इदं)-हें धन-(लब्धं)-संपादन केलें आहे-(इदं प्राप्स्ये)-हें मिळवीन-(मनोरथं इदं अस्ति)-मनाला संतोष देणारें हें धन आहे.-(मे इदं अपि धनं पुनः भविष्यति)-माझें हेंहि धन पुनः भविष्यत्काळीं होईल. १३

तो म्हणतो, " आज बहुतेकांची संपत्ति मी स्वाधीन करून घेतली आहे, तेव्हां मी आतां धन्य नाहीं का ?

१ साधनानें, तयारीनें. २ मेल्यानंतरचीही. ३ खोल. ४ ज्या चिंतेच्या. ५ संन्याशास घालून दिलेल्या नियमाप्रमाणें. ६ मोबणी, माप. ७ चिंता धारण करतात. ८ संकटांत. ९ पतीचें ठिकाणीं एकनिष्ठ असणारी स्त्री. १० बाळगून. ११ खोटे. १२ स्त्रियेनें. १३ ओंवाळणी. १४ दिशांच्या सीमाबाहेर. १५ मांसाचा गोळा. १६ कोशकाची किडा, कोसला. १७ दिवसा. १८ पुढें चालणें ( शिपाई दिवसा यजमानापुढें चालतो.) १९ जागा राहून पहारा करणें. २० देवडीवाल्याला. २१ आदळती. २२ टेकडीवर. २३ कामक्रोध. २४ कोठेही. २५ यथेच्छ, इतेतस. २६ संधि पाहून. २७ उभी करतात, लढवितात. २८ नाशाच्या युक्ति. २९ पाश. ३० जाळी. ३१ शिकारी कुत्रीं. ३२ चिकाट्या. ३३ भाले. ३४ समुदाय.

धन्यु ना मी ४८ ऐसा श्लाघों जंव जोये । तंव मन आणीकही वाहे । सर्वेचि म्हणे पाहे । आणिकांचेंही आणूं ४९ हें जेतुलें असे जोडिलें । तयाचेनि भांडवलें । लाभा घेईन उरलें । चराचर हें ३५० ऐसेनि धना विश्वाचिया । मीचि होईन स्वामिया । मग दिठी पडे तया । उरों नेदी ५१

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि । ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥

हे मारिले वैरी थोडे । आणीकही सोधीन गाढे । मग नांदेन पवाडें । येकलाचि मी ५२ मग माझी होतील कामारीं । तियेंवांचूनि येरें मारीं । किंबहुना चराचरीं । ईश्वरु तो मी ५३ मी भोगभूमीचा रावो । आजि सर्वसुखासी ठावो । म्हणोनि इंद्रुही वावो । मातें पाहूनि ५४ मी मनें वाचा देहें । करीं तें कैसें नोहे । कें मजवांचूनि आहे । आज्ञासिद्ध आन ५५ तंवंचि बळिया काळु । जंव न दिसें मी अतुर्बळु । सुखाचा कीर निखिळु । रासि वा मीची ५६

आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥

कुबेरु श्रीथिला होये । परी तो नेणे माझी सोये । संपत्ती मजसम नव्हे । श्रीनाथाही ५७ माझिया कुळाचा उजाळु । कां जातिगोतांचा मेळु । पाहतां ब्रह्माही हळु । उणाचि दिसे ५८ म्हणोनि सिरविती नांवें । वायां ईश्वरादि आघवें । नाहीं मजसीं सरी पावे । ऐसें कोण्ही ५९ आतां लोपला अभिचारु । त्याचा करीन मी जीर्णोद्धारु । प्रतिष्ठीन परमारु । यागवरी ३६० मातें गाती वानिती । नटनाचें रिझविती । तयां देईन मागती । तें ते वस्तु ६१ मादिरा अन्नपानीं । प्रमदांच्या आलिंगनीं । मी होईन त्रिभुवनीं । आनंदाकारु ६२ काय बहु सांगों ऐसें । ते आसुरीप्रकृती पिसें । तुरंबिती आकाशें । गगनीं झोळें तियें ६३

अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः । प्रसक्ताः कामभोगेषु [illegible] नरकेऽशुचौ ॥ १६ ॥

ज्वराचेनि आटोपें । रोगी भलतैसें [illegible] जाण ते तैसें ६४

अज्ञान आंतुलें धुळी । [illegible] । म-
नोरथांच्या ६५ [illegible] गमिती
अनेग । अखंड [illegible] ।
[illegible] कांटिया

४८ याप्रमाणें आपणच आपली प्रौढी मिरवीत आहे, तों त्याचे मनांत लागलीच इच्छा उत्पन्न होते कीं, "आणखीही पुष्कळ लोकांचें द्रव्य हरण करून आणूं. ४९ जेवढें कांहीं आज आपण मिळविलें आहे, तेवढ्या भांडवलावर, कांहीं जें आणखी चराचरांपैकीं शिल्लक असेल तेवढें मिळवीन." ( दुवाडावयाजोग्या श्रीमंतांजवळ आणखी कांहीं जो स्थावरजंगम संपत्ति शिल्लक असेल, तीही हरण करून आणीन. ) ३५० याप्रमाणें या विश्वांतील सर्व संपत्तीचा मीच मालक होईन. मग ज्याच्याकडे दृष्टि फिरवीन, त्याचा नाश करीन ! ५१

**अन्वयार्थ**—(मया)-मीं-(असौ शत्रुः)-हा शत्रु-(हतः) -मारला-(च)-आणि-(अपरान् अपि)-दुसऱ्या शत्रूंनाहि-(हनिष्ये)-मारीन-(अहं ईश्वरः)-मी ईश्वर आहें.-(अहं भोगी) -मी भोगी आहें.-(अहं सिद्धः)-मी सिद्ध आहें-(बलवान् सुखी)-बलाढ्य व सुखी आहें. १४

"हे आजपर्यंत नष्ट केलेले शत्रु थोडे आहेत, तर आणखी दुसरे जे बलाढ्य आहेत, त्यांनाही जिंकीन; आणि मग मी एकटाच मोठ्या लौकिकानें नांदेन. ५२ मग माझे जे सेवक होतील, त्यांखेरीज इतरांचा मी नाश करीन; फार काय सांगावें ! या सर्व जगाचा ईश्वर जर कोणी असला, तर तो मी. ५३ मी भोगरूपी पृथ्वीचा राजा असून सर्व सुखाच्या उपभोगाचें ठिकाणही मीच; माझें ऐश्वर्य पाहून इंद्रही लाजेल ! ५४ मी कायावाचामनेंकरून जें करीन तें सिद्धीस कसें जाणार नाहीं ? आणि माझ्यावांचून दुसरा आज्ञा करणारा कोण असणार ? ५५ महाबलवान् असा जो मी, त्या मला पाहिलें नाहीं तोंपर्यंतच काळाच्या बळाची प्रतिष्ठा आहे; आणि मी तर सुखाची केवळ रासच होय. ५६

**अन्वयार्थ**–(आढ्य!)-मी धनानें संपन्न आहें,-(अभिजनवान् अस्मि)-उत्तम कुलीन आहें-(मया सदृशः)-माझ्यासारखा-(कः अन्यः अस्ति)-दुसरा कोण आहे ?-(यक्ष्ये)-यज्ञ करीन,-(दास्यामि)-दान देईन,-(मोदिष्ये)-आनंदी होईन,-(इति)-याप्रमाणें-(अज्ञानविमोहिताः)-ते अज्ञानानें नानाप्रकारें अविवेकी होतात. १५

कुबेर संपन्न आहे खरा, परंतु त्याच्यानें माझी बरोबरी करवणार नाहीं; आणि माझ्या संपत्तीप्रमाणें श्रीविष्णूचीही संपत्ति नाहीं. ५७ माझ्या कुळाचा नांवलौकिक किंवा आप्तवर्गाचा समुदाय यांच्या मानानें सृष्टिकर्ता ब्रह्मदेवही थोडा कमीच होईल. ५८ म्हणून, लोक जो ईश्वरादिकांचा लौकिक गातात, तो व्यर्थ असून माझी बरोबरी करणारा कोणीही सांपडणार नाहीं. ५९ आतां, जारणमारणादिकांचा जो लोप झाला आहे, त्यांचा मी जीर्णोद्धार करीन, व लोकांस पीडा करणारे जे यज्ञयाग ते करीन. ३६० माझ्या ऐश्वर्याचें जे वर्णन करतील, किंवा माझी स्तुति करतील आणि नाचतमाशे करून जे मला संतोषवितील, त्यांना ते मागतील त्या वस्तु मी देईन. ६१ मादक अन्न खाऊन व मद्य वगैरे पिऊन स्त्रियांना आलिंगन देण्यांत या त्रिभुवनांत मी तल्लीन होईन. ६२ असें आणखी काय काय म्हणून सांगूं? ज्यांना आसुरी प्रकृतीचें वेड लागलें आहे, ते अशा प्रकारें आकाशपुष्पांचा अपरिमित इच्छेनें वास घेतात. ६३

**अन्वयार्थ**—(अनेकचित्तविभ्रान्ताः)—याप्रमाणें अनेक चित्तसंकल्पांनीं अतिशय भ्रान्ति पावलेले-(मोहजालसमावृताः)-अविवेकाच्या आवरणानें आच्छादित झालेले-अज्ञानरूप जाळ्यांत अडकलेले-(कामभोगेषु)-विषयभोगांमध्यें-(प्रसक्ताः)-आसक्त झालेले ते-(अशुचौ नरके)-अशुचि नरकांत -(पतन्ति)-पडतात १६

ज्याप्रमाणें सन्निपात झालेला रोगी हवें तें बरळतो, त्याप्रमाणें आसुरी संपत्तीनें वेडे झालेले लोक इच्छा त्या कल्पना तोंडानें बकतात, असें समज. ६४ अज्ञानरूपी धूळ आशारूपी बावटळींच्या सपाट्यांत सांपडल्यावर मनोरथरूपी आकाशांत झटोळी फिरत जाते. ६५ ज्याप्रमाणें आषाढाचे महिन्यांत एकावर एक असे ढग पुष्कळ येतात, किंवा समुद्रांत लाटांवर लाटा येतात, त्याप्रमाणें ते अखंड कामाची इच्छा करतात. ६६ मग मनोरथरूपी वेल मनांत पसरल्यावर, ज्याप्रमाणें कांट्यावरून कमळें ओढली असतां फाटून जातात, ६७ किंवा पाण्यां, ज्याप्रमाणें दगडांवर हंडी आपटली असतां

१ प्रौढी मिरवूं लागतो. २ मारीन. ३ बलाढ्य. ४ लौकिकानें, योग्यतेनें. ५ सेवक. ६ अन्य. ७ व्यर्थ. ८ आज्ञा करणारा. ९ महाबलवान. १० रास. ११ संपन्न. १२ बरोबरी. १३ विष्णूलाही. १४ श्रेष्ठत्व, थोरपणा. १५ किंचित्. १६ हलकाच. १७ जारणमारणादि. १८ लोकांस पीडा करणारे. १९ वर्णितात. २० संतोषवितात. २१ मद चढणाऱ्या, २१ मादक. २२ स्त्रियांच्या. २३ वास घेती. २४ अपरिमित इच्छेनें. २५ आकाशपुष्पें. २६ भरांत. २७ बडबडतो. २८ बरळतात. २९ सांपडलें, प्राप्त झालें. ३० बावटळ. ३१ इच्छितात. ३२ मनोरथच. ३३ वेलींच्या जाळ्या, ३४ ओरबडलीं.

पार्था । जीवीं तैसे सर्वथा । कुटके जाले ६८ तेव्हां चढतिये रजेनीं । तमाची होय पुरवणी । तैसा मोहो अंतःकरणीं । वाढोचि लागे ६९ आणि वाढे जंव जंव मोहो । तंव तंव विषयीं रोहो[2] । विषय तेथ ठावो । पातकासी ३७० पापें आपलेनि थांवें[3] । जंव करिती मेळावे । तंव जितांचि आघवे । येती नरकां ७१ म्हणौनि गा सुमती । जे कुमनोरथां पाळिती । ते आसुर येती वस्ती । तया ठाया ७२ जेथ असिपत्रतरुवर । खदिरांगाराचे डोंगर । तातला तेलीं सागर । उततातीं ७३ जेथ यातनांची श्रेणी । हे नित्य नवी यमजाचणी । पडती तिये दारुणीं । नरकलोकीं ७४ ऐसे नरकाचिये सेलें । भोगीं जे जे जन्मले । तेही देखों भुलले । यजिती यागीं ७५ एन्हवीं यागदिक क्रिया । आहाणतेची धनंजया । परी विफळेंती आचरोनियां । नाटकी जैसे ७६ वल्लभाचिया उंजरिया । आपणयाप्रति कुस्त्रिया[12] । जोडोनि तोषिती जैसिया । अहेवपणें[13] ७७

आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः । यजन्ते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

तैसें आपणयां आपण । मानिता महंतपण । फुगती असाधारण । गर्वें तेणें ७८ मग लवों नेणती कैसे । आटिवा[15] लोहाचे खांब जैसे । कां उर्ध्वले आकाशें । शिळाराशी ७९ तैसे आपुलिये बरवे । आपणचि रिझतां जीवें । तृणाहीहूनि आघवें । मानिती नीच ३८० वरी धनाचिया मदिरा । माजूनि धनुर्धरा । कृत्याकृत्यविचारा । सवतें[20] केलें ८१ जया आंगीं आयती ऐसी । तेथ यज्ञाची [22]गोठी कायसी । तरी काय काय पिसीं । न करिती गा ८२ म्हणौनि कोणे एके वेळे । मौढ्यमद्याचेनि बळें । यागाचींही टवाळें[23] । आदरिती ८३ ना कुंड मंडप वेदी[24] । ना उचित साधनसमृद्धी । आणि तयांसीं तंव विधी । द्वंद्वचि[25] सदा ८४ देवां ब्राह्मणांचेनि नांवें । आडवारेनहि नोहावें । ऐसें आंथी तेथ यावें । लागे कवणा ८५ पैं वासरुंवाचा भोकसा । गाईपुढें ठेवूनि जैसा । उगाणा घेती क्षीररसा । बुद्धिवंत ८६ तैसें यागाचेनि नांवें । जग चाळूनि हावें । नागविती आघवें । अहेरावारीं ८७ ऐशा कांहीं आपुलिया । होमिती जे उंजरिया । तेणें कामिती प्राणिया । सर्वनाशु ८८

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः । मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

मग पुढां भेरी[34] निशाण । लाउनी ते दीक्षितपण । जगीं फोकारिती आपण । वांवो वांवो ८९ तेव्हां महत्त्वें तेणें अधमा । गर्वा चढे महिमा । जैसे लेवें दि-

फुटते, त्याप्रमाणें त्यांच्या मनोरथांचे तुकडे तुकडे होतात ! ६८ तेव्हां, जों जों रात्र वाढेल तों तों काळोखही वाढतो, त्याप्रमाणें ( जों जों अज्ञान वाढेल तों तों ) त्यांचे अंतःकरणांत मोह वाढतो; ६९ आणि जों जों मोह वाढेल, तों तों विषयवासनेची वृद्धि होते; आणि विषय तर पातकाला कारण आहेत. ३७० पापें बळावून जों जों वाढतील, तों तों जिवंतपणींच नरकयातना भोगाव्या लागतात ! ७१ म्हणून, हे सुबुद्धिमंता, जे वाईट वासना मनांत आणतात, ते आसुर त्या ठिकाणीं वस्तीला येतात, ७२ की ज्या ठिकाणीं तरवारींच्या धारेसारख्या तीक्ष्ण पानांची झाडें असून खैराच्या निखाऱ्यांचे डोंगर आहेत, व तापलेल्या तेलाचे समुद्र उतू येतात; ७३ आणि जेथें यातनांची ओळची ओळच असून यमांची नित्य नवी जाचणी असते, अशा घोर नरकलोकांत ते पडतात. ७४ अशा नरकाच्या हेलक्या मार्गांत जे जन्म घेतात, तेही पहावे तों यज्ञयागादिक कर्मे करण्यांत निमग्न झालेले असतात. ७५ बाकी अर्जुना, त्यांच्या यज्ञादिक क्रिया जरी आहाण म्हणजे पोकळ असतात, तरी नाटकी लोकांप्रमाणें त्यांचें आचरण असल्यामुळें त्या निष्फळ होतात. ७६ वेश्या ज्याप्रमाणें आपल्या यजमानाच्या आश्रयानें आपल्यास सौभाग्यवती मानून संतोष मानतात; ७७

**अन्वयार्थ**–(ते)–आसुरलोक–(आत्मसंभाविताः)–आम्ही अनेक उत्तम गुणांनीं युक्त आहों, असें स्वतःच मानणारे –(स्तब्धाः)–अनम्रस्वभावाचे–(धनमान-मदान्विताः)–धनाविषयींचा मान व मद यांनीं युक्त असलेले असे–होत्साते (दंभेन)–दंभानें–(नामयज्ञैः)–नाममात्रयज्ञांनीं–(अविधिपूर्वकं)–अविधीनें–(यजन्ते)–यजन करितात. १७

त्याप्रमाणें, मी सर्वांत श्रेष्ठ आहें, असें आपणच आपल्यास मानून, ज्यांचे अंगांत गर्वाचा ताठा भरतो; ७८ मग, विडाचे खांब ज्याप्रमाणें वांकत नाहींत, त्याप्रमाणें हे लवत नाहींत, किंवा आकाशांत उंच गेलेले पर्वत ज्याप्रमाणें खालीं लवत नाहींत; ७९ त्याप्रमाणें, आपणच आपल्या ऐश्वर्यानें मनांत संतोष मानून, इतरांस तृणाहूनही कमी लेखितात. ३८० अर्जुना, संपत्तीच्या मदानें उन्मत्त होऊन हे योग्यायोग्य विचारास फांटा देतात. ८१ अरे, ज्यांच्या अंगांत असा ताठा भरलेला आहे, त्यांच्या ठिकाणीं यज्ञाची काय कथा आहे ? तथापि मूर्ख लोक काय करीत नाहींत ? ८२ म्हणून, एकादे वेळेस मौर्ख्यरूप मद्याच्या बळानें, आभासमात्र यज्ञही करण्यास तयार होतात ! त्या यज्ञाची तऱ्हा काय म्हणशील तर, ८३ त्यांना कुंड, मंडप, वेदी किंवा तत्संबंधीं लागणारी सर्व सामुग्री यांची जरूर नसते; आणि विधीचें कोणतेंही कर्म यथाविधि करण्याचें तर त्यांशीं सदाच वैर असतें. ८४ देवब्राह्मणांचें नांव सुसतें वाऱ्याच्या झुळकेबरोबर जरी यांच्या कानांवर पडलें, तरी तेंही त्यांना खपत नाहीं. अशी जेथें स्थिति आहे, तेथें देवब्राह्मण कशाला येतील ! ८५ परंतु ज्याप्रमाणें शहाणे लोक मेलेल्या वासराचे पोटांत पेंढा भरून तें गाईचे पुढें उभें करून तिचें दूध काढून घेतात, ८६ त्याप्रमाणें, यज्ञाच्या मिषानें सर्व लोकांस आमंत्रण करून आपल्यास कांहीं मिळेल या आशेनें ते आले असतां उलट त्यांजपासून आहेर उपटून त्यांस नागवितात ! ८७ याप्रमाणें यज्ञाचा दांभिकपणा माजवून ते प्राण्यांच्या नाशाची इच्छा करतात. ८८

**अन्वयार्थ**–(अहंकारं)–अहंकार,–(बलं)–बल,–(दर्पं)–दर्प,–(कामं)–काम,–(च)–व–(क्रोधं)–क्रोध यांचा–(संश्रिताः)–आश्रय केलेले ते आसुर लोक–(आत्मपरदेहेषु)–आपल्या व दुसऱ्यांच्या देहांमध्यें–(मां)–माझा–(प्रद्विषन्तः)–अतिशय द्वेष करणारे व–(अभ्यसूयकाः)–अतिशय असूया करणारे असतात. १८

[ अहंकार ] मग आपल्यापुढें डंकानिशाण लावून आम्ही दीक्षित आहों अशी जगांत व्यर्थ प्रसिद्धि करतात; ८९ त्या वेळीं त्या अधमांस अशा दीक्षितपणाच्या महत्त्वानें अधिकच गर्व चढतो. ज्याप्रमाणें अंधकाराला काजळाची पुटें द्यावीं, म्हणजे तो ! अधिक

१ रात्रींत. २ आरोहण, वृद्धी, वाढ. ३ मळानें. ४ तरवारीच्या धारेसारख्या, तीक्ष्ण पानांचे वृक्ष. ५ खैराच्या निखाऱ्याचे. ६ तापलेल्या. ७ पंक्ति. ८ हेलक्या मार्गांत. ९ हानिकारक. १० माजवितात. ११ आश्रयाला, प्रीतीला. १२ वेश्या. १३ सौभाग्यानें. १४ विलक्षण, अतिशय. १५ विडाचे. १६ उंचावलेले, वाढलेले. १७ पर्वत. १८ ऐश्वर्यानें. १९ संतोष मानून. २० वेगळें केलें. २१ सामग्री, तयारी. २२ गोष्ट. २३ त्वाळक्या. २४ यज्ञकुंडाचा ओटा. २५ वैमनस्य, दुष्मनी. २६ वाराही नसावा. २७ आहे. २८ वासराचा. २९ पेंढा भरून जनावराचा कृत्रिम केलेला पांजरा. ३० झाडा. ३१ वेधून, बोलावून. ३२ उत्कर्षासाठीं. ३३ इच्छा करतात. ३४ डंका. ३५ मगट करतात. ३६ व्यर्थ. ३७ लेप.

धले तमा । काजळाचे ३९० तैसें मौढ्य घणावे । औद्धत्य[2] उंचावे । अहंकारु दुणावे । अविवेकुही ९१ मग दुजयाची भाष । नुरवावया निःशेष । बळीयेपणा अधिक । होय बळ ९२ ऐसा अहंकार बळा । जालिया एकवेळा[3] । दर्पसागरु मैर्यादवेळा[4] । सांडूनि उते[5] ९३ मग ओसंडिलेनि[6] दर्पें । कामाही पित्त कुरुपे[7] । तया धर्गीं सैंघें पैळिपे[10] । क्रोधाग्नि तो ९४ तेथ उन्हाळा आगी खरमेरी[11] । तेलातुपाचिया कोठारा । लागला आणि वारा । सुटला जैसा ९५ तैसा अहंकारु बळा आला । दर्पु कामक्रोधीं गूंढला[12] । या दोहींचा मेळु जाला । जयांच्या ठायीं ९६ ते आपुलियासवेशा[13] । मग कोणी कोणी हिंसा । या प्राणियांतें वीरेशा । न साधिती गा ९७ पहिलें तंव धनुर्धरा । आपुलिया मांसरुधिरा । वेंचु[14] करिती अभिचारा[15] । लेंगोनियां ९८ तेथ जाळिती जियें देहें । यामाजीं जो मी आहें । तया आत्मया मज घाये । वाजती ते ९९ आणि अभिचारकीं[16] तिहीं । उपद्रविजे जेतुलें कांहीं । तेथ चैतन्य मी पाहीं । सीणु पावे ४०० आणि अभिचारावेगळें । विपायें[17] जें अवेंगळे । तया टाकिती ईटाळें[19] । पैशून्यांशीं[20] १ सती आणि सत्पुरुख । दानशीळ याज्ञिक । तपस्वी अलौकिक । संन्यासी जे २ कां भक्त हन महात्मे । इयें माझीं निजांचीं[21] धामें । निर्वाळलीं[22] होमधर्में । श्रौतादिकीं ३ तयां द्वेषाचेनि काळकूटें । बोंसटोनि[23] तिखटें । कुबोलांचीं सैंदटें[24] । सूंति[25] कोंडें[26] ४

तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् । क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥

ऐसे आघवाचि परी । प्रवर्तले माझ्या वैरी । तयां पापियां जें मी करीं । तें आइक पां ५ तरी मनुष्यदेहाचा तोंगा[27] । घेऊनि रुसेंती[28] जे जगा । ते पदवी हिरोनि पैं गा । ऐसे ठेवीं ६ जे क्लेशगांवींचा उकरंडा[29] । भवपुरींचा[30] पैनवडा[31] । ते तमोयोनि[32] तयां मूढां । वृत्तीचि दें ७ मग आहाराचेनि नांवें । तृणही जेथ नुगवे । ते व्याघ्र वृश्चिक आडवे[33] । तैसिये करीं ८ तेथ क्षुधादुःखें बहुतें । तोडूनि खाती आपणयातें । मरमरों मागुतें । होताचि असती ९ कां आपला गरळें[34]जाळीं । जाळिती आंगाची पेंदळी[35] । ते सर्पचि करीं बिळीं । निरुंधला[36] ४१० परी घेतला श्वांसु घापे । येतुलेनही[37] मापें । विसांवा तयां नाटोपे । दुर्जनांसी ११ ऐसेनि कल्पांचिया कोडी । गणितांही संख्या थोडी । तेतुला वेळु न काढीं । क्लेशौनि[38] तयां १२ तरी तयांसी जेथ जाणें । तेथिंचें हें पहिलें पेणें[39] । तें पावोनि येरें दारुणें । न होतीं दुःखें १३

काळा होतो. ३९० त्याप्रमाणें, त्यांचें मूर्खत्व वळावून उद्धटपणा वाढतो, व अहंकारानें अज्ञानही वाढतें. ९१ [ बलं ] मग आपल्यापेक्षां जगांत दुसरा कोणी बलवान् नाहीं, असें त्यास वाटतें, ९२ याप्रमाणें अहंकार एकदां प्रबल झाल्यावर [ दर्पं ] दर्परूपी सागर आपली मर्यादा सोडून वाहूं लागतो. ९३ मग याप्रमाणें दर्प वाढला म्हणजे [ कामं क्रोधंच ] कामाचेंही पित्त खवळतें आणि त्याच्या धगीनें क्रोधाग्नि अधिकच पेटतो ९४ मग जसा उन्हाळ्यांत प्रखर अग्नि तेलतुपाच्या कोठारास लागावा, आणि तशांत वारा सुटावा, ९५ तसा अहंकार प्रबल झाल्यावर, व दर्प कामक्रोधांत गुरफटून गेल्यावर या दोहोंचें ऐक्य ज्यांचे ठिकाणीं होतें, ९६ ते अर्जुना, आपल्या इच्छेप्रमाणें कोणत्या कोणत्या हिंसा करून प्राण्यांचा नाश करणार नाहींत ? ९७ हे धनुर्धरा, प्रथम हे दीक्षित अभिचाराकरितां म्हणजे जारणमारणांच्या नादास लागून आपल्या रक्तमांसांचा व्यय करतात; ९८ ते आपल्या देहास जो त्रास करून घेतात, त्याचे घाव त्या देहांत जो वास करणारा मी, त्या मज आत्म्याला बसतात; ९९ आणि जारणमारणादि क्रियांनीं ज्याला ज्याला म्हणून पीडा देतात, त्यांच्यांत वास करणारें जें जीवचैतन्य त्याला त्रास होतो; ४०० आणि कदाचित् त्यांच्या जारणमारण क्रियेच्या सपाट्यांतून कोणी बचावलेच, तर त्यांचीं वर्में काढून त्यांच्या मनास ते त्रास देतात. १ सती, सत्पुरुष, दानशील, यज्ञ करणारे, जे अलौकिक तप करणारे, व संन्याशी, २ किंवा भक्त, महात्मे, पुरुष किंवा ज्यांचीं घरें श्रौतादिक होमधर्मांनीं पवित्र झालीं आहेत, हीं जी माझी आवडती व रहाण्याचीं स्थळें आहेत. ३ त्यांना द्वेषरूपी काळकूट विषानें तीक्ष्ण केलेले दुःशब्दरूपी बळकट बाण मारतात ! ४

**अन्वयार्थ**—(अहं)–मी–(तान् द्विषतः क्रूरान्)–त्या माझा द्वेष करणाऱ्या क्रूरांस–(अशुभान् नराधमान्)–अशुभ नराधमांस–(संसारेषु)–संसारांतील–(आसुरीषु योनिषु एव)–आसुरी योनींतच–(अजस्रं क्षिपामि)–सतत टाकतों. १९

याप्रमाणें जे सर्व प्रकारें मजशीं वैर करण्यास प्रवृत्त होतात, त्या पाप्यांना मी कोणती शिक्षा देतों, ती ऐक, ५ तर, मनुष्यदेह धारण करून जे या जगांत आपलें कर्तव्य काय तें विसरतात, त्यांची मनुष्यदेहरूप पदवी हरण करून मी त्यांना अशा स्थितींत ठेवतों ६ की, जी क्लेशरूपी गांवाचा उकीरडा, व संसारपुरीचा पाणवठा ! अशी जी तमोयोनि, तेथील त्या मूर्खांस वतनदार करतों. ७ मग भूक लागली असतां, ज्यांना गवतही खाण्याची सोय नाहीं, अशा वाघ विंचू इत्यादि रानांत राहणाऱ्या योनींत त्यांना घालतों. ८ त्या योनींत ते भुकेनें अति ग्रस्त झाले म्हणजे आपल्या अंगाचे लचके तोडतोडून खातात, व मरतात, आणि पुनः त्याच योनींत कित्येक वेळां जन्म घेतात. ९ किंवा आपल्या विषाच्या दाहानें ज्यांच्या शरीराचा दाह होतो, असा त्याला सर्प करून बिळांत कोंडून टाकतों. ४१० परंतु आंत घेतलेला श्वास बाहेर टाकतां येईल इतका थोडा वेळही त्या दुर्जनांस मी विश्रांति मिळूं देत नाहीं. ११ याप्रमाणें, ज्याचें माप करतां येत नाहीं, असे कल्पांचे कल्प त्यांना अशा क्लेशदायक योनींत ठेवतों. १२ परंतु त्यांना ज्या ठिकाणीं जावयाचें आहे, त्या मार्गांतील हा पहिला मुक्काम होय. मग त्याठिकाणीं गेल्यावर त्यांना यांहीपेक्षां भयंकर अशीं दुःखें होणार नाहींत कां ? १३

---

१ दृढ होतें. २ उद्धटपणा. ३ ऐक्य. ४ समुद्राच्या भरतीच्या पाण्याच्या मर्यादेचा वेळ–मारवेल. ५ वाहूं लागतो. ६ अतिशय भरून वाहणाऱ्या. ७ प्रकोप पावते, क्षोभते. ८ उबाऱ्यानें ९ अनिवार. १० पेटतो. ११ प्रदीप्त झालेला. १२ गुरफटला. १३ इच्छेप्रमाणें. १४ खर्च. १५ जारणमारणादि प्रयोगासाठीं. १६ जारणमारण करणारांनीं. १७ कनिष्ठ, कदाचित्. १८ वेगळें राहतें, बचावतें. १९ दगड. २० दुर्जनतेचें, निंदेचे वर्मोचें. २१ आवडता, प्रिय. २२ पवित्र झालीं. २३ माखून. २४ बळकट. २५ टोंचतात, मारतात. २६ बाण. २७ दोरा, धागा. २८ कर्तव्यकर्म विसरतात. २९ कचऱ्याचा ढीग. ३० संसारपुरीचा. ३१ पाणवाट. ३२ मूढयोनि–वृक्षादि. ३३ अरण्यवासी. ३४ विषाग्नींत. ३५ त्वचा, पृष्ठी. ३६ कोंडून ठेवला. ३७ श्वास बाहेर टाकतां येईल इतका. ३८ हेंगांतून. ३९ मुक्काम.

आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि । मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥ २० ॥

हा ठायवरी । संपत्ति ते आसुरी । अधोगति अवधारीं । जोडिली तिहीं १४
पाठीं व्याघ्रादि तामसा । योनी तो अळुमाळु ऐसा । देहाधाराचा उसासा ।
आथी जोही १५ तोही मी वोल्हावा हिरें । मग तमचि होती एकसरें । जेथें
गेलें आंधारें । काळवंडैजे १६ जयांची पापा चिळसी । नरक घेती विवसी ।
शीणँ जाय मूर्च्छी । शिणें जेणें १७ मळु जेणें मळे । तापु जेणें पोळे । जया-
चेनि नांवें सळे । महाभय १८ पापा जयाचा कंटाळा । उपजे अमंगळ अमं-
गळा । विटाळही विटाळा । बिहे जया १९ ऐसें विश्वाचे या वोखटेयीं । अधर्म
जे, धनंजया । तें ते होती भोगूनियां । तामसा योनी ४२० अहा सांगतां वाचा
रडे । आठवितां मन खिरडे । कटारे मूर्खीं केवढे । जोडिले निरयें २१ कायि-
सया ते आसुर । संपत्ति पोषिती वोंडेर । जिया दिधलें घोर । पतन ऐसें २२
म्हणौनि तुवां धनुर्धरा । नोहावें गा तिया मोहरा । जेउता वासु आसुरा ।
संपत्तिवंता २३ आणि दंभादि दोष साही । हे संपूर्ण जयांच्या ठायीं । ते
त्यजावे हें काई । म्हणो कीरें २४

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः । कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥

परी काम क्रोध लोभ । या तिहींचेंचि थोंबें । थांवे तेथें अशुभ । पिकलें
जाण २५ सर्व दुःखां आपुलिया । देशीना धनंजया । पाढौऊ हे भलतया ।
दिधलें आहाती २६ कां पापियां नरकभोगी । सुवावेयालागीं जगीं । पातकांची
दाटुगी । सभाचि हे २७ ते रौरव गा तंवचिवरी । आइकिजती पेटांतरीं ।
जंव हे तिन्ही अंतरीं । उठती ना २८ अपाय तिहीं आसैलग । यातना इहीं
सवंग । हाणी हाणी नोहे हे तिघ । हेचि हाणी २९ काय बहु बोलों सुभटा ।
सांगितलिया निकृष्टा । नरकाचा दौरवंटा । त्रिशंकु हा ४३० या कामक्रोध
लोभां- । माजीं जीवें जो होय उभा । तो निरयेंपुरींची सभा । सन्मानु पावे
३१ म्हणौनि पुढतंपुढतीं किरीटी । हे कामादि दोष त्रिपुटी । त्यजावींचि गा
वोखटी । आघवा विषयीं ३२

एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः । आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

धर्मादिकां चौंहीआंतु । पुरुषार्थाची तैंचि मातु । करावी जैं संघांतु । सां-
डील हा ३३ हे तिन्ही जीवीं जंव जागती । तंववरी निकियेंची प्राप्ती । हे

अन्वयार्थ—(हे कौन्तेय)—हे कुंतीपुत्रा—(मूढाः)—ते मूढ जन—(जन्मनि जन्मनि)—प्रत्येक जन्मांत—(आसुरीं योनिं आपन्नाः)—आसुरी योनींतच उत्पन्न होतात व—(मां)—मला—(अप्राप्य एव)—प्राप्त न होतांच—(ततः)—त्याहूनहि—(अधमां गतिं)—अधमगतीला—(यान्ति)—प्राप्त होतात. २०

अशा प्रकारें, या आसुरी संपत्तीचा महिमा असा आहे कीं, ज्याच्या योगानें अधोगति प्राप्त होते. १४ नंतर व्याघ्रादि तामस योनींत देहाचे आधारानें जी थोडी स्वस्थता प्राप्त होते. १५ तीही स्वस्थता हिरावून घेऊन, जेथें अंधेर गेला असतांही काळवंडतो, अशा तमाच्या योनींत त्यांना मी घालतों. १६ ज्या तमाची पापालाही किळस उत्पन्न होते, नरकही ज्याला भितो, व जेथील श्रमानें श्रमही मूर्च्छित होतो; १७ ज्याच्या योगानें मल मलिन होतो, तापालाही ताप होतो, व ज्याचें नांव काढलें असतां महाभयही भीति पावतें; १८ ज्या तमाचा पापालाही कंटाळा येतो, अमंगळ वस्तूसही ज्याच्या स्पर्शानें अमंगळपणा वाटतो, व विटाळही ज्याच्या विटाळाची भीति मानतो; १९ धनंजया, अशी जी या साऱ्या जगांतील निकृष्ट अवस्था, ती भोगून, हे अधम तामस योनींत जन्म घेतात. ४२० अरे, त्या योनीचें वर्णन करतांना वाचा कष्टी होते, व त्या योनीची आठवण होण्याबरोबर मन कचरतें, अरे! अरे! त्या मूर्खांनीं काय ही नरकवासाची जोड करून घेतली! २१ ज्या आसुरी संपत्तीनें असें घोर पतन प्राप्त होतें, ती ते वाउर म्हणजे व्यर्थ कां वाढवितात? २२ अर्जुना, ज्या आसुरी संपत्तिवंतांना असा नरकवास भोगावा लागतो. त्या मार्गाकडे तूं जाऊं नको. २३ आणि ज्या आसुरी संपत्तीच्या अंगीं दंभ आदिकरून सहा दोष भरलेले असतात, तिचा त्याग कर, हें खरोखर तुला सांगावयाला का पाहिजे? २४

अन्वयार्थ—(कामः क्रोधः तथा लोभः)—काम, क्रोध व लोभ—[इति]—इदं-असें हें—(त्रिविधं)—तीन प्रकारचें—(आत्मनः नाशनं)—आत्म्याचा नाश करणारें—(नरकस्य द्वारं)—नरकाचें द्वार आहे—(तस्मात्)—म्हणून—(एतत् त्रयं)—या त्रयाचा—(त्यजेत्)—त्याग करावा. २१

परंतु काम, क्रोध व लोभ या तिघांचें बंड जेथें जोरावलें आहे, तेथें अशुभ पिकलें, असें समज. २५ हे धनंजया, आपल्यास सर्व दुःखांचा अनुभव येण्यास हे वाटेल त्याला वाटाडेच झालेले आहेत; २६ किंवा पापी लोकांस नरकभोग प्राप्त करून देण्यास पातकांची ही मोठी थोरली सभाच आहे. २७ रवरवनरक म्हणून ज्याची पुराणांतरीं आपण ख्याति ऐकतों, त्या रवरव नरकाची तोंपर्यंतच प्रतिष्ठा आहे, कीं जोंपर्यंत हे तिन्ही दोष अंतर्यामीं उठले नाहींत! २८ यांच्यामुळें अपाय फार लवकर प्राप्त होतो, यातना फार सवंग होतात, व हानि हानि म्हणून जिला म्हणतात ती हानि नसून हे तिन्ही दोषच हानिरूप होत. २९ अर्जुना, यांची जी अति नीकृष्ट अवस्था सांगितली, तिच्यापेक्षां काय अधिक वर्णन करूं! फार काय सांगावें! हा त्रिदोषसमुदाय म्हणजे नरकाच्या दरवाजांचा उंबरठाच होय. ४३० काम, क्रोध व लोभ यांना जो मनःपूर्वक अनुकूल होतो, तो नरकपुरीच्या सभेंत सन्मानास पात्र होतो. ३१ म्हणून, हे किरीटी, तुला वारंवार सांगतों कीं, काम, क्रोध व लोभ यांची, ही त्रिपुटी—जी सर्व विषयांत अति वाईट आहे, तिचा त्याग करावा. ३२

अन्वयार्थ—(कौन्तेय)—हे अर्जुना!—(एतैः त्रिभिः [illegible] द्वारैः)—या तीन तमोद्वारांनीं—(विमुक्तः)—विमुक्त [illegible]—(नरः)—पुरुष—(आत्मनः)—आपलें—(श्रेयः)—[illegible] साधन—(आचरति)—आचरितो—(ततः)—[illegible]—([illegible]) मोक्षनांवाच्या परागतीला—(याति)—प्राप्त [illegible] २२

धर्म, अर्थ, काम व मोक्ष [illegible] गोष्ट तेव्हांच काढतां येईल [illegible] क्रोध व लोभ या तिघांच्या [illegible] ३३ काम, क्रोध व लोभ हे [illegible] करीत आहेत, [illegible] होईल.

. १ थोडासा, किंचित्. २ स्वस्थता. ३ हरण करितो, हिरून नेतो. ४ काळें ठिक्कर होते. ५ कंटाळा. ६ भय. ७ ग्लानी, थकवा. ८ भितें, कापतें. ९ भितो. १० जगांतल्या. ११ निकृष्ट, अधमांतले अधम. १२ क्रूर. १३ मागें सर. १४ हायरे हाय. १५ नरक. १६ व्यर्थ, वावगी, वाईट. १७ मार्गाकडे. १८ जेथें. १९ निश्चयेंकरून. २० प्रख, प्रतिष्ठा, बड.

२१ बंड्यादन, [illegible] २२ [illegible] बोधक. २४ [illegible] २५ [illegible] पुरानांतरीं [illegible] २८ [illegible] रटा. [illegible] राहिलेका, [illegible] ३१ [illegible] ३४ [illegible]

माझे कान नाइकती । देवोही म्हणे ३४ जया आपेणपें पेढिये । आत्मनाशा जो विहे । तेणें न धरावी हे सोये । सावधु होइजे ३५ पोटीं बांधोनि पापाण। समुद्रीं बाहीं आंगवण । कां जियांवया जेवण । काळकूटाचें ३६ इहीं काम-क्रोधलोभेंसीं । कार्यसिद्धि जाण तैसी । म्हणोनि ठांवोचि पुसी । ययांचा गा ३७ जैं कहीं अवचटें । हे तिकडी सांखळ तुटे। तैं सुखें आपलिये वाटे। चालों लाभे ३८ त्रिदोपीं सांडिलें शरीर । त्रिकुटीं फिटलिया नगर । त्रिदाह निमालिया अंतर । जैसें होय ३९ तैसा कामादिकीं तिघीं । सांडिला सुख पावोनि जगीं । संगु लाहे मोक्षमार्गीं । सज्जनांचा ४४० मग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें । जन्ममृत्यूचीं निर्मोळें । निरंतरें रानें ४१ ते वेळीं आत्मानंदें आघवें । जें सदा वसतें बरवें । तें तैसेंचि पाटण पावे । गुरुकृपेचें ४२ तेथ प्रियाची परमसीमा । तो भेटे माउली आत्मा । तये खेंवीं आटे डिंडिमा । सांसारिक हे ४३ ऐसा जो कामक्रोधलोभां । झांडी करूनि ठाके उभा। तोचि येवढिया लाभा । गोसावी होय ४४

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः । न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

ना हें नावडोनी कांहीं । कामादिकांच्याचि ठायीं । दाटिली जेणें डोई । आत्मचोरें ४५ जो जगीं समान सकृपु । हिताहित दाविता दीपु । तो अमान्यु केला बापु । वेदु जेणें ४६ न धरीचि विधीची भीड । न करीचि आपली चाड । वाढवीत गेला कोड । इंद्रियांचें ४७ कामक्रोधलोभांची कास । न सोडीच पाळिली भाष । स्वैराचाराचें अंसोस । वळघेला रान ४८ तो सुटकेचिया वांहिणीं । मग पिवों न लाहे पाणी । स्वप्नींही ते काहाणी । दूरीचि तया ४९ आणि परत्र तंव जाये । हे कीर तया आहे । पारि ऐहिकही न लाहे । भोग भोगूं ४५० तरी माशालागीं भुलला । ब्राह्मण पाणबुडा रिघाला । कीं तेथेंही पावला । नास्तिकवादु ५१ तैसें विषयांचेनि कोडें । जेणें परत्रा केलें उबडें । तंव तोचि आणिकीकडे । मरणें नेला ५२ एवं परत्र ना स्वर्गु । ना ऐहिकही विषयभोगु । तेथ केउता प्रसंगु । मोक्षाचा तो ५३ म्हणौनि कामाचेनि बळें । जो विषय सेऊं पाहे सळें । तया विषयो ना स्वर्गु मिळे । ना उद्धरे तो ५४

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ । ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

हें म्हणणें, माझे कान तर ऐकत नाहींत, असें भगवान् श्रीकृष्ण सुद्धां म्हणतात ! ३४ ज्याला आपल्या कल्याणाची इच्छा आहे; किंवा आपला नाश होईल म्हणून जो भितो, त्यानें सावध होऊन या तिघांची संगत करूं नये. ३५ पोटाला दगड बांधून समुद्रांत बाहूंनी तरून जाणें, किंवा जगण्याकरितां काळकूट विषाचें सेवन करणें, ३६ त्याप्रमाणें ह्या कामक्रोधलोभांच्या संगतीनें कार्यसिद्धि होते ! म्हणून यांचा मनांतून मागमूस नाहींसा करून टाक. ३७ ज्या वेळेस सहजगत्या ही तीन कड्यांची सांखळी पायांतून तुटून जाईल, त्या वेळेस आपल्या हिताची वाट सुखानें चालतां येईल. ३८ कफ, वात व पित्त हे तिन्ही दोष जोंपर्यंत शरीरांत उत्पन्न झाले नाहींत, किंवा चहाडी, चोरी व शिंदळकी यांपासून जोंपर्यंत एकादें शहर अलिप्त आहे; आणि जोंपर्यंत आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक ह्या त्रिविध तापांपासून अंतःकरण मुक्त आहे, तोंपर्यंत जसें सुख प्राप्त होतें, ३९ तसें काम, क्रोध व लोभ हे ज्यानें सोडले आहेत, त्याला या जगतांत सुख प्राप्त होतें; आणि सज्जनांचे संगतीनें मोक्षमार्गाची प्राप्ति होते. ४४० मग तो सत्संगतीच्या बळानें व सच्छास्त्रांच्या योगानें जन्ममृत्यूंची माळरानें उल्लंघन करितो. ४१ त्या वेळेस, ज्या ठिकाणीं आत्मानंद नेहमीं वास करतो असें जें गुरुकृपेचें स्थान तें त्याला प्राप्त होतें. ४२ प्रीतीच्या पलीकडील स्थान जी आत्मरूपी माउली, तिची त्या ठिकाणीं भेट होते; व तिला आलिंगन दिल्यावर, संसाराचा ताप आपोआप नाहींसा होतो. ४३ याप्रमाणें जो काम, क्रोध व लोभ यांचा त्याग करून मोकळा होतो; तोच आत्म्याची प्राप्ति करून घेण्यास समर्थ होतो. ४४

**अन्वयार्थ**--(यः)-जो-(शास्त्रविधिं)-शास्त्राचा विधिवेदाचा विधि-(उत्सृज्य)-सोडून-वेदविधीचा त्याग करून-(कामकारतः)-कामप्रेरित होऊन-कामाकडून प्रेरणा केला गेलेला असा होत्साता-(वर्तते)-वर्तन करतो-(सः)-तो-(सिद्धिं)-पुरुषार्थांच्या योग्यतेला-(न अवाप्नोति)-प्राप्त होत नाहीं. -(न सुखं)-त्याला या लोकीं सुख होत नाहीं व-(न परां गतिं) [अवाप्नोति]-स्वर्ग व मोक्ष यांतील एकाहि उत्तम गतीला प्राप्त होत नाहीं. २३.

किंवा आत्मप्राप्तीचा लाभ न आवडून जो कामादिकांच्या ठिकाणींच डोकें देऊन रहातो, तो आत्मघात करणारा होय. ४५ या जगांत सर्वांना सारखे असून सर्वांवर सारखी कृपा करणारे, व आपलें हित किंवा अनहित दाखविणारे केवळ दीपच, जे सर्वांचे गुरु वेद, त्यांची आज्ञा जो पाळीत नाहीं; ४६ जो शास्त्रांत सांगितलेल्या विधिनिषेधांची भीड धरीत नाहीं, व आपलें हित न पाहतां इंद्रियांचे सर्व कोड पुरवितो; ४७ काम, क्रोध व लोभ यांची कास सोडीत नाहीं, आणि त्यांनीं घातलेली शपथ मोडीत नाहीं, व आपल्या इच्छेस येईल, त्याप्रमाणें विषयाच्या रानांत हिंडतो, ४८ त्याची त्यांच्यापासून क्षणभर देखील सुटका होत नाहीं; सुखाची गोष्ट तर स्वप्नांत देखील त्याजपासून दूर असते; ४९ आणि परलोकास तो अंतरतो, यांत शंका नाहीं. परंतु त्याला या लोकांचेही भोग भोगण्यास मिळत नाहींत. ५० तर एकादा ब्राह्मण नदीच्या तीरीं स्नानसंध्या करीत असतां माशावर मन जाऊन तो धरावयास गेला असतां, त्याचें कृत्य लोकांनीं पाहिल्यावर जसें त्यास ते नास्तिक असें म्हणतात; म्हणून अर्थात् त्याची माशाविषयीं इच्छाही पुरी होत नाहीं, व तो ब्राह्मणत्वासही मुकतो, ५१ त्याप्रमाणें, विषयांच्या नादाला लागून ज्यानें परलोक पाल्या घातला, व इहलोकींही पाहूं गेलें असतां जो मृत्यूच्या सपाट्यांत सापडला; ५२ याप्रमाणें त्याला इहलोक नाहीं व स्वर्गही नाहीं ! आणि ज्याला इहलोकींही विषयांचा भोग भोगवयास सांपडत नाहीं, तेथें मोक्षप्राप्तीची गोष्ट कशास बोलावयास पाहिजे ? ५३ म्हणून, कामाच्या बुद्धीनें जो विषयांचें सेवन करूं पहातो, त्याला विषय भोगावयास मिळत नाहींत; स्वर्गही प्राप्त होत नाहीं; आणि तो उद्धरूनही जात नाहीं ! ५४

**अन्वयार्थ**--(तस्मात्)-म्हणून-(कार्याकार्यव्यवस्थितौ)-कर्तव्य व अकर्तव्य यांच्या निश्चयाविषयीं-(ते)-तुला-(शास्त्रं प्रमाणं)-शास्त्र हेंच प्रमाण आहे. यास्तव-(शास्त्रविधानोक्तं ज्ञात्वा)-शास्त्रविधानानें सांगितलेलें जाणून-(इह)-या कर्माधिकारभूमींत-(कर्म)-कर्म-कर्तव्य-धर्म-(कर्तुं)-करण्यास-(अर्हसि)-तूं योग्य आहेस. २४

१ स्वतः विषयांचें प्रेम असेल. २ मार्ग, संगत. ३ बाहूंच्या बळावर समुद्रांतून तरून जाणें. ४ जगण्याकरितां. ५ मागमूस. ६ पुसून टाक. ७ कदाचित्, एकाएकी, सहज. ८ तीन कड्यांची. ९ सोडिलें. १० चहाडी, चोरी व शिंदळकी यांनीं. ११ अध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक. १२ अंतःकरण. १३ लाभे, पावतो. १४ उजाड, बरड, माळ. १५ उल्लंघन करतो. १६ नगर. १७ आवटमाती. १८ त्या आलिंगनाच्या वेळीं. १९ ताप, नगारा, घोंटाळा, गडबला. २० सोडा, त्याग. २१ धनी. २२ दिली. २३ आत्मघातक्यानें. २४ आत्मप्राप्तीची इच्छा. २५ लाड. २६ शपथ. २७ स्वेच्छ आचरणाचें. २८ अतिशयें करून, मोठें. २९ दिरसा. ३० नरोत. ३१ कोळ्याच्या जोरांत. ३२ त्या कोळ्यांच्या जातींतही त्याला असला नास्तिक आम्हाला नको म्हणून घेईनात. ३३ उपडें, पालथें. ३४ फसला, कोठल्या. ३५ बळानें.

याकारणें पैं बापा । जया आथी आपली कृपा । तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ५५ पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता । अनायासें आत्महिता । भेटेचि ते ५६ नातरी श्रीगुरुवचना । दिठी देतु जतना । शिष्य आत्मभुवना- । माजीं पैसे ५७ हें असो आपुला ठेवा । हाता आथी जरी यावा । तरी आदरें जेवीं दिवा । पुढां कीजे ५८ तैसा अशेषांही पुरुषार्थां । जो गोसावी हो म्हणे पार्था । तेणें श्रुतिस्मृति माथां । बैसणें धांपे ५९ शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें । जें घेववी तें न म्हणावें । विषही विरु ४६० ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा । तरी कें आहे अनिष्टा । भेटणें गा ६१ पैं अहितापासूनि काढिती । हित देउनी वाढविती । नाहीं गा श्रुतीपरौती । माउली जगा ६२ म्हणौनि ब्रह्मेंशीं मेळवी । तंव हे कोणें न सांडावी । अगा तुवांही ऐसीचि भजावी । विशेषेंसी ६३ जे आजि अर्जुना तूं येथें । करावया सत्य शास्त्रें साथें । जन्मलासि बळीथें । धर्माचेनीं ६४ आणि धर्मानुज हें ऐसें । ओघेंचि आलें अपैसें । म्हणौनि अनारिसें । करूं नये ६५ कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं । अकृत्य तें कुंडें लोकीं । वाळावें गा ६६ मग कृत्यपणें खरें निगे । तें तुवां आपलेनि आंगें । आचरोनि आदरें चांगें । सारावें गा ६७ जे विश्वप्रामाण्याची मुंदी । आजि तुझ्या हातीं असे सुबुद्धी । लोकसंग्रहासि त्रिशुद्धी । योग्यु होसी ६८ एवं आसुरवर्गु आघवा । सांगोनि तेथिंचा निर्गावा । तोही देवें पांडवा । निरूपिला ६९ इयावरी तो पंडूचा । कुमरु सद्भावो जीवींचा । पुसेल तो चैतन्याचा । कानीं ऐका ४७० संजयें व्यासाचिया निरोपा । तो वेळुं फेडिलौं तया नृपा । तैसा मीही निवृत्तिकृपा । सांगेन तुम्हां ७१ तुम्ही संत माझिया कडा । दिठीचा कराल वहुडा । तरी तुह्मां मानें येवढा । होईन मी ७२ म्हणौनि निजें अवधान । मज वोळंगे पसायदान । दीजो जी सनाथु होईन । ज्ञानदेवो म्हणे ४७३

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥ श्लोक २४, ओंव्या ४७३.

यास्तव, बापा अर्जुना, ज्याला आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा आहे, त्यानें वेदांत सांगितलेल्या गोष्टीची अवज्ञा करूं नये. ५५ पतीच्या मर्जीप्रमाणें पतिव्रता स्त्री वागून अनायासानें आपलें हित करून घेते; ५६ किंवा श्रीगुरूंच्या आज्ञेकडे लक्ष देऊन जो वागतो, तो शिष्य आत्मप्राप्ति करून घेतो; ५७ फार काय ! परंतु आपणच ठेवलेली ठेव हातीं घेण्याकरितां ज्याप्रमाणें दिव्याचा उजेड अगत्य पुढें करावा लागतो; ५८ त्याप्रमाणें पार्था, सर्व पुरुषार्थाचा स्वामी होण्याची ज्याला इच्छा असेल, त्यानें श्रुति व स्मृति यांना शिरसा वंद्य मानलेंच पाहिजे. ५९ जें टाकून द्यावें म्हणून शास्त्रानें सांगितलें आहे, तें राज्यही असलें तरी सोडून द्यावें, व ज्या गोष्टीचें सेवन करावें असें सांगितलें आहे, तें मारक विष जरी असलें, तरी घ्यावें. ४६० हे सुभटा, याप्रमाणें जो वेदांची एकनिष्ठपणें आज्ञा पाळतो, त्याची व अनिष्टाची गांठ कोठून पडणार ? ६१ हे पर, अहितापासून सोडविणारी; आणि हित करून वाढविणारी श्रुतीप्रमाणें जगांत दुसरी माउली नाहीं बरें. ६२ म्हणून जिच्या योगानें ब्रह्मप्राप्ति होते, त्या ह्या श्रुतीची कोणी अवज्ञा करूं नये; व तूंही विशेषेंकरून श्रुतीचीच आज्ञा पाळ. ६३ अर्जुना, मागील जन्मीं धर्माचरण केल्यामुळें या जन्मीं सच्छास्त्रें यथार्थ करण्यास तूं उत्पन्न झाला आहेस; ६४ आणि धर्मराजाचा तूं भाऊ असल्यामुळें धर्मानुज हें नांव तुला सहज प्राप्त झालें आहे. तेव्हां तूं वेदबाह्य वर्तन करूं नको. ६५ हें कार्य आहे, किंवा अकार्य आहे, ह्याची पारख शास्त्रदृष्टीनेंच करावी, शास्त्रांनीं जें अकार्य म्हणजे निषिद्ध असें ठरविलें असेल, तें वाईट म्हणून टाकून द्यावें, ६६ मग खरोखर जें उत्तम कर्तव्य आहे, तें स्वतः अगत्यपूर्वक आचरावें. ६७ हे सुबुद्धिमंता, आज तुझ्या हातांत जगानें प्रमाण मानण्याजोगा शिक्का असल्यामुळें खरोखर लोकांनी तुझे आचरणाचा कित्ता वळवावा, अशी तुझी योग्यता आहे. ६८ महाराज म्हणतात, याप्रमाणें आसुरवर्गाची सर्व लक्षणें सांगून, त्यांचा निर्णयही देवांनीं अर्जुनास सांगितला. ६९ यावर तो अर्जुन अंतर्यामी सद्भाव ठेवून जें कांहीं विचारील, तें सावधान चित्तानें ऐका. ४७० श्रीव्यासांनीं आज्ञा केल्याप्रमाणें संजयानें धृतराष्ट्र राजाचा वेळ घालविला. त्याप्रमाणें निवृत्ति महाराजांचे कृपेनें मीही तुम्हांला सांगेन. ७१ तुम्ही संत मंडळी जर माझ्यावर कृपादृष्टि कराल, तर तुम्हांला मान्य असाच मी होईन ७२ म्हणून महाराज म्हणतातः—आपलें अवधान देऊन शिष्यावर प्रसाद करावा, म्हणजे मी कृतकृत्य होईन. ४७३

१ अहेल. २ अवज्ञा, अपमान ३ प्रवेशतो, शिरतो. ४ घालवें. ५ विरुद्ध, मारक. ६ कोठें. ७ अर्थासहित, यथार्थ. ८ धर्माचे बळ तुझ्या ठायीं आहे म्हणून. ९ धर्मराजाचा धाकटा भाऊ. १० अन्यथा. ११ पराक्रम. १२ वाईट. १३ त्यागावें, वर्ज करावें. १४ उत्तम. १५ जगास प्रमाण ठेवण्यायोग्य. १६ शिक्याची आंगठी. १७ लोकांनीं कित्ता वळवावा असा. १८ निघण्याचा प्रकार, निर्णय. १९ सावधान चित्तानें २० वेळ घालविला. २१ कृपेचा वर्षाव. २२ मान्य होईल. २३ आपलें. २४ माझ्या चाकरीला. २५ प्रसाद.

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सतरावा.

विश्वविकासित मुद्रा । जया सोडी तुझी योगनिद्रा । तया नमोजी गणेंद्रा । श्रीगुरुराया १ त्रिगुणत्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गीं आडिला । तो आत्मशंभूनें सोडविला । तुझिया स्मृती २ म्हणोनि शिवेंसीं कांटाळा । गुरुत्वें तूंचि आगळा । तऱ्ही हळु मायाजळा- । माजीं तारूनी ३ जे तुझ्याविखीं मूढ । तयांलागीं तूं वक्रतुंड । ज्ञानियांसि तरी अखंड । उजूचि आहासी ४ दैविकी दिठी पाहतां सानी । तऱ्ही मीलनोन्मीलनीं । उत्पत्ति प्रळयो दोन्ही । लीलाचि करिसी ५ प्रवृत्तिकर्णाच्या चाळीं । उठिली मदगंधानिळीं । पूजीजसी नीलोत्पळीं । जीवभृंगांच्या ६ पांठीं निवृत्तिकर्णताळें । आहाळली ते पूजा विधुळे । तेव्हां मिरविसी मोकळें । आंगाचें लेणें ७ वामांगीचा लास्यविलासु । जो हा जगद्रूप आभासु । तो तांडवमिसें कैळासु । दाविसी तूं ८ हें असो विस्मो दातारा । तूं होसी जयाचा सोयरा । सोइरिकेचिया व्यवहारा । मुकेचि तो ९ फेडितां बंधनाचा ठावो । तूं जगद्बंधु ऐसा भावो । धरूं वोळगे उवावो । तुझाचि आंगीं १० तंव दुजयाचेनि नांवें तया । देहही नुरेचि पैं देवराया । जेणें तूं आपणपयां । केलासि दुजा ११ तूतें करूनि पुढें । जे उपायें घेती दवडे । तयां ठासी बहुवें पाडें । मागांचि तूं १२ जो ध्यानें सूये मानसीं । तयालागीं नाहीं तूं त्याचे देशीं । ध्यानेंही विसरे तेणेंसीं । वाल्भे तुज १३ तूतें सिद्धाचि जो नेणे । तो नांदे सर्वज्ञपणें । वेदांही येवढें बोलणें । नेघेसी कानीं १४ मौन गा तुझें राशिनांव । आतां स्तोत्रीं कें बांधों हांव । दिसती तेतुली

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय सतरावा.

अहो श्रीगुरुराया, ज्या तुमची योगरूपी माया जगद्रूपी प्रफुल्लित अशा मुद्रेला विकसित करिते, त्या तुम्हां गणपतीस माझा नमस्कार असो. १–त्रिपुरवधाच्या वेळेला शंकरांनीं पुष्कळ खटपट केली असतांना, गणपतीचें स्मरण केलें नसल्यामुळें त्यांना यश आलें नाहीं. नंतर गणपतीचें स्मरण केलें, त्या वेळेस त्रिपुरासुराचा वध झाला व आपण संकटांतून सुटले. या रूपकानें गुरूची स्तुति करितात.—त्रिगुणरूपी त्रिपुरांनीं वेढलेला, व जीवत्वरूपी किल्ल्यामध्यें आडलेला जो आत्मरूपी शंकर त्यानें, हे गणपतीरूप श्रीगुरो, तुमच्या स्मरणानें आपणास संकटापासून मुक्त करून घेतलें. २ म्हणून श्रीशंकरायरोबर तुमची तुलना केली असतांही तुमची योग्यता विशेष आहे. (तुमचें पारडें वजनानें खालीं बसतें.) तथापि मायारूप समुद्रांतून (भवसमुद्रांतून) मुमुक्षूंस तारून नेण्याविषयीं नावेप्रमाणें तुम्ही हलके आहां ३ जे तुमच्याविषयीं अजाण आहेत, त्यांना तुम्ही वक्रतुंड (वांकड्या सोंडेचे) दिसतां; व जे तुमचें स्वरूप जाणतात, त्यांना तुम्ही नित्य सरळ तोंडाचेच आहां. ४ हे गणपतीरूप श्रीगुरुराया, तुमचे डोळे पाहूं गेलें असतां लहान दिसतात, तथापि त्यांच्या उघडझांपीनें आपण जगाची उत्पत्ति व नाश लीलेनें करितां. ५ प्रवृत्तिरूप कान हालविल्यानें (संसाररूपी वृत्ति उत्पन्न होऊन.) मदाचा सुगंध वायु सुटून, त्यास लुब्ध झालेले जीवरूपी भ्रमर गंडस्थलावर बसल्यानें, नीलकमलांनीं तुमची पूजा केल्याप्रमाणें तुमचें गंडस्थळ शोभतें. ६ नंतर दुसरा निवृत्तिकर्ण हालविल्यानें अंतर्मुखवृत्ति उत्पन्न होऊन तुमची बांधलेली पूजा विसर्जन होते, त्या वेळेस आपलें शुद्ध स्वरूप फार गोंड दिसतें. ७ तुमच्या डाव्या मांडीवर बसलेल्या सरस्वतीची [शक्तीची] नृत्यक्रीडाच जगत् उत्पन्न करिते; व त्या नृत्याच्या मिषानें आपण सर्व जगताचा व्यवहार चालवितां. ८ हें असो; हे गुरुराया, आपण ज्याचे सोयरे (संबंधी) होतां, तो सोयरिकीच्या व्यवहाराला मुकतो, (त्याचा द्वैतभाव नाहींसा होऊन तो तुमच्या स्वरूपांत मिळतो.) ही केवढी विस्मयाची गोष्ट आहे! ९ तुम्ही जगाचे बंधनाचा ठावठिकाणही नाहींसा करितां; म्हणून, आपण जगद्बंधु आहां असा भाव धरून जे मोठ्या आनंदानें आपल्याला आत्मस्वरूपभावानें शरण येतात, १० त्यांचा देह सुद्धां द्वैतपणानें शिल्लक उरत नाहीं. कारण, देवराया, त्या दुसऱ्याला आपण स्वस्वरूपच करितां. त्यांचें ठिकाणचें द्वैत नष्ट केलें, मग सर्वत्र अद्वैत झाल्यावर दुजाभाव कोठून उरणार? ११ जे तुम्हांला निराळा असें समजून तुमची प्राप्ति करून घेण्याकरितां धांवत सुटतात, त्यांना तुमची प्राप्ति न होतां तुम्ही सर्व प्रकारें मागेंच रहातां. १२ जे ध्यान करण्याच्या निमित्तानें तुमची मूर्ति मनांत आणितात, त्यांना तुम्ही न सांपडतां त्यांच्या देशांतही तुम्ही वास करीत नाहीं; परंतु जे ध्यानासह तुमचेविषयीं आपला द्वैतभाव सोडतात, ते तुम्हाला अति प्रियकर आहेत. १३ तुम्ही जे सिद्ध, त्या तुम्हांला जो जाणत नाहीं, त्यालाच सर्वज्ञ असें म्हणतात वेदांनीं जें तुमचें एवढें वर्णन केलें आहे, तें तुम्ही ऐकत देखील नाहीं. १४ तुमचे राशीवरून 'मौन' असें नांव निघतें म्हणून आपली स्तुति करण्याची मीं कशाला इच्छा करावी?

१ ज्या तुमच्या योगसमार्थ्यानें प्रकटलेली जगरूप मुद्रा रूप पावते. २ जीवरूपी किल्ल्यांत. ३ कोंडला. ४ शंकराशीं. ५ तुलना. ६ योग्यता, वजन. ७ अधिक. ८ प्रभूची ज्ञानदृष्टि. ९ लहान. १० उघडझांपीनें. ११ संसारिक वृत्तिरूपी कानाच्या. १२ हालविण्यानें. १३ मदाच्या सुगंधित वायूनें. १४ जीवरूपी भ्रमर हीच कोणी नीलकमळें त्यांनीं पूजलां आहेस. १५ नंतर. १६ अंतर्मुख वृत्तिरूपी कानानें. १७ हालली असतां. १८ विसर्जन होतें. १९ शक्तीचा, मायेचा. २० नृत्यक्रीडा. २१ नृत्याच्या मिषानें. २२ कौशल्य. २३ गुरुराया. २४ आपला असें म्हणतात. २५ द्वैतभाव. २६ सेवा करतो, आश्रय करतो. २७ आनंद, उत्कर्ष. २८ तूं आपणच ज्याचे मिषानें दोन रूपांनीं झाला आहेस. २९ निराळा. ३० धाव. ३१ राहतो. ३२ अनेक प्रकार. ३३ घालतो, ३४ ध्यानासह. ३५ आवड, प्रेम. ३६ येत नाहीस. ३७ कोठें.

माव । भजों काई १५ दैविकें सेवकु हो पाहों । तरी भेदितां द्रोहोचि लाहों । म्हणोनि आतां कांहीं नोहों । तुजलागीं जी १६ जैं सर्वथा सर्वे:ी नोहिजे । तैं अद्वया तूतें लाहिजे । हें जाणें मी वर्म तुझें । आराध्य लिंगा १७ तरी नुरोनि वेगळेंपण । रैसीं भजिन्नलें लवण । तैसें नमन माझें जाण । बहु काय बोलों १८ आतां रितां कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे । कां देशीं दीपसंगें । दीपचि होय १९ तैसा तुझिया प्रणिर्तीं । मी पूर्ण जाहलों श्रीनिवृत्ती । आतां आणीन व्यँक्ती । गीतार्थु तो २० तरी षोडशाध्यायशेखीं । तिये समाप्तीच्या श्लोकीं । ो ऐसा निर्णयो निष्टंकीं । ठेविला देवें २१ जें कृत्याकृत्यव्यवस्था । अनुष्ठावया पार्था । शास्त्रचि एक सर्वथा । प्रमाण तुज २२ तेथ अर्जुन मानसें । म्हणे हें ऐसें कैसें । जे शास्त्रेंविण नसे । सुटिका कर्मा २३ तरी तक्षकाची फडे । ठाकोनि कैं तो मणि काढे । कैं नाकींचा केशु जोडे । सिंहाचिये २४ मग तेणें तो वोंविजे । तरीच लेणें पाविजे । एऱ्हवीं काय असिजे । रिक्त कंठीं २५ तैसी शास्त्रांची मोकळी । यें कैं कोण पां वेंटौळी । एकवाक्यतेच्या फळीं । पैसिजे कैं २६ जाल्याही एकवाक्यता । कां लाभे वेळु अनुष्ठितां । कचा पैसारु जीविता । येतुलालिया २७ आणि शास्त्रें अर्थें देशें काळें । या चहूंही जे एकेंफळे । तो उपावो कें मिळे । आर्थवयांसी २८ म्हणौनि शास्त्राचें घडतें । नोहे प्रकारें बहुतें । तरी मूर्खा मुमुक्षां येथें । काय गती पां २९ हा पुसावया अभिप्रावो । जो अर्जुन करी प्रस्तावो । तो सतराविया ठावो । अध्याया येथ ३० तरी सर्वविषयीं वितृष्णु । जो सकळकळीं प्रवीणु । कृष्णाही नवल कृष्णु । अर्जुनत्वें जो ३१ शौर्या जोडला आधारु । जो सोमवंशाचा शृंगारु । सुखादि उपकारु । जयाची लीला ३२ जो प्रज्ञेचा प्रियोत्तमु । ब्रह्मविद्येचा विश्रामु । सहचरु मनोधर्मु । देवाचा जो ३३

अर्जुन उवाचः—

ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः । तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥

तो अर्जुन म्हणे गा तमालश्यामा । इंद्रियां फांवलिया ब्रह्मा । तुझा बोलु आम्हां । सांकांक्षु पैं जी ३४ जें शास्त्रेंवांचूनि आणिकें । प्राणिया स्वमोक्षु न देखे । ऐसें का कैंपखें । बोलिलासी ३५ तरी न मिळेचि तो देशु । नव्हेचि काळा अवकाशु । जो करवी शास्त्राभ्यासु । तोही दुरी ३६ आणि अभ्यासीं

हें सर्व भासमान् जगत्, ही सर्व आपली माया आहे. म्हणून, तुमचें भजन कसें करतां येईल ? १५ तुमचा सेवक होईन म्हटलें, तर द्वैतरूपी द्रोह माझे पदरांत येतो; म्हणून, तुमचा कांहीं संबंध न ठेवणें म्हणजे तुमच्यांत व माझ्यांत द्वैतभाव न ठेवणें हें उत्तम होय, म्हणजे तुमचें पूजन होय. १६ जेव्हां मी सर्व प्रकारें तुमना कोणी नव्हा असें म्हणावें, तेव्हां तुमच्यांत व माझ्यांत अद्वैत आहे असें होईल; तर, हे आराध्यदेवता गुरुराया, तुमचें हें वर्म मला माहीत आहे. १७ तर, मीठ ज्याप्रमाणें पाण्यापासून वेगळें नसून त्यांत मिळविलें असतां ऐक्य पावतें, त्याप्रमाणें तुमच्यांत व माझ्यांत द्वैतभाव नसून मी तुम्हांस नमस्कार करतों. यापेक्षां विशेष काय बोलावें ? १८ हें पहा रिकामी घागर समुद्रांत बुडविली असतां ती जशी पाण्यानें उचंबळून भरून निघते, किंवा दिव्याच्या संसर्गानें वात दीपस्वरूपच होते; १९ त्याप्रमाणें हे गुरुराया निवृत्तीनाथा, तुम्हांला नमस्कार केल्यानें मी कृतकृत्य झालों. आतां गीतेचा अर्थ मी स्पष्ट करीन. २० तर सोळाव्या अध्यायाच्या शेवटल्या श्लोकांत देवांनी जो असा निश्चयपूर्वक सिद्धांत सांगितला २१ कीं, पार्था, चांगल्या अथवा वाईट गोष्टीचें आचरण करण्यास तुला शास्त्रच सर्वथैव प्रमाण मानलें पाहिजे. २२ तें ऐकून अर्जुन मनांत म्हणतो, " हें असें कसें ? कोणतेंही कर्म करण्यास शास्त्रनिर्णयावांचून सुटका नाहीं हें काय ? २३ याचा अर्थ असा कीं, सर्पाच्या जवळ जाऊन त्याच्या फणीवरील मणि काढावा कसा ? आणि सिंहाच्या नाकांतील केंस मिळवावा कसा ? २४ मग त्या केंसांत तो मणि ओंवला म्हणजेच गळ्यांत भूषण घालावें, नाहीं तर गळा मोकळाच ठेवावा कीं काय ? २५ त्याप्रमाणें, निरनिराळ्या शास्त्रांना एकत्र कोण करील ? आणि त्यांची एकवाक्यता करून त्यांचा उपयोग कोण करून घेईल ? २६ बरें, एकवाक्यताही जरी कोणी केली, तरी त्याप्रमाणें आचरण करण्यास वेळ कोठून सांपडणार ? आणि इतकें आयुष्य तरी कोणास असणार ? २७ आणि शास्त्र, अर्थ, देव व काल ह्यांची एकादास जरी प्राप्ति झाली, तरी यांची सर्वांना प्राप्ति कोठून असणार ? २८ म्हणून पुष्कळ प्रकारानें शास्त्राचें साधन या मृत्युलोकीं सर्वांना प्राप्त होणार नाहीं, तर मग मूर्ख अशा मुमुक्षूंना कोणता तरणोपाय आहे ? " २९ हा अभिप्राय पुसण्याकरितां अर्जुनानें जी प्रस्तावना केली, तो या सतरावे अध्यायाचा मूळ विषय होय. ३० तर सर्व विषयांविषयीं निरिच्छ व सकळ कलांत प्रवीण, आणि अर्जुनाच्या रूपानें श्रीकृष्णालाही आनंद देणारा असा जो कृष्ण ( अर्जुन ), ३१ जो शौर्याचा आधार, जो सोमवंशाचें भूषण आणि ज्याच्या लीलेनें देवाला फार सुख होतें; ३२ जो बुद्धीचा आवडता, जो ब्रह्मविद्येचें विश्रांतिस्थान, आणि जो सदैव श्रीकृष्णांच्या अंतःकरणांत असणारा, ३३

अन्वयार्थ —(हे कृष्ण)—हे कृष्णा !—(तु) पण—(ये)—जे ( श्रद्धया अन्विताः )—श्रद्धेनें युक्त होत्साते—( शास्त्रविधिं )—शास्त्रोक्त विधीचा—(उत्सृज्य)—त्याग करून—(यजन्ते)—देवादिकांची पूजा करितात—(तेषां)—त्यांची—(निष्ठा)—निष्ठा—(का)—कोणती—( सत्त्वं )—सात्त्विक—(आहो)— का—( रजः )—राजस—[उत]—कीं (तमः)—तामस ? १

तो अर्जुन म्हणतो " हे तमालश्यामा, सर्व इंद्रियांस प्रत्यक्ष भोगता येणाऱ्या परब्रह्मा, तुमचें भाषण मला संशययुक्त दिसतें. ३४ प्राणिमात्राला शास्त्रज्ञानावांचून मोक्षप्राप्ति होतच नाहीं, असें जें आपण एकपक्षी बोललां त्याचा हेतु काय ? ३५ तर, ज्या देशांत शास्त्राभ्यास करण्याची सोय आहे तेंही ज्यास प्राप्त होत नाहीं; तसेंच अभ्यासाला लागणाऱ्या आयुष्याचीही ज्याला अनुकूलता नाहीं; व ज्या गुरूपासून शास्त्राची माहिती मिळावयाची तेंही दूर आहे; ३६ आणि अभ्यासाला

१ तूं देव असा नात्यानें. २ हे आराध्या-मूर्ते. ३ उदकांत. ४ रिकामा. ५ वात. ६ नमस्कारें करून. ७ उघडकीस. ८ सिद्धांतीं. ९ सर्पाच्या. १० अनेकत्व, मोकळेपणा. ११ शास्त्राला. १२ एकत्र करणें. १३ उपभोग घेणें. १४ दीर्घपणा, वाढी. १५ एकत्र होण्याला. १६ सर्वांना १७ साधन. १८ निरिच्छ. १९ कृष्णाचें अंतःकरणाला आकर्षण करणारा अर्जुनरूपानें अपूर्व कृष्णच. २० बुद्धीचा. २१ आवडता. २२ विश्रांतिस्थान. २३ समागमें असणारा. २४ हे तमालपत्रासमान वर्णें नीलवर्णा, हे कृष्णा. २५ प्राप्त झालेल्या. २६ संशययुक्त. २७ कोणत्याच पक्षानें २८ गुरु.

विराजिया । होती जिया सामुग्रिया । त्याही नाहीं अँपैतिया । तिये वेळीं ३७ उँजू नोहेचि प्राचीन । नेदिचि प्रज्ञा संवाहन । ऐसें ठेलें आपादन । शास्त्राचें जया ३८ किंबहुना शास्त्रविखीं । एकही न लाहातीचि नँखी । म्हणूनि उखित्रिखी । सांडिली जिहीं ३९ परी निर्धारूनि शास्त्रें । अर्थानुष्ठानें पवित्रें । नांदताति पैरत्रें । साचारें जे ४० तयांऐसें आम्हीं होआवें । ऐसी चाँड बांधोनि जीवें । घेती तयांचे मागावे । आचरावया ४१ धडेयांचिया आखरां । तळीं बाळ लिहे दातारा । कां पुढांसूनि पडिकरा । अक्षमु चाले ४२ तैसें सर्वशास्त्रनिपुण । तयाचें जें आचरण । तेंचि करिती प्रमाण । आपलिये श्रद्धे ४३ मग शिवादिकें पूजनें । भूम्यादिकें महादानें । अग्निहोत्रादि यजनें । करिती जे श्रद्धा ४४ तयां सत्त्वरजतमां- । माजीं कोण पुरुषोत्तमा । गति होय ते आम्हां । सांगिजो जी ४५ तंव वैकुंठपिठींचें लिंग । जो निगमपद्माचा परांग । जिये जयाचेनि हें जग । अंगच्छाया ४६ काळ सावियेंचि वाढु । लोकोत्तर प्रौढु । अद्वितीय गूढु । आनंदघनु ४७ इयें श्लाघिजेंती जेणें बिकें । तें जयाचें आंगीं अँसिकें । तो श्रीकृष्ण स्वमुखें । बोलत असे ४८

श्रीभगवानुवाचः—

त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा। सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥२॥

म्हणे पार्था तुझा अँतिसो । हेंही आम्हीं जाणतसों । जे शास्त्राभ्यासाचा ओंडसो । मानितोसि कीं ४९ नुसधियाचि श्रद्धा । झोंबों पाहसी परमपदा । तरी तैसें हें प्रबुद्धा । सोहोपें नोहे ५० श्रद्धा म्हणितलियासाठीं । पातेजों नये किरीटी । काय द्विजु अंत्यजघृष्टीं । अंत्यजु नोहे ५१ गंगोदक जरी जालें । तरी मद्यभांडां आलें । तें घेऊं नये कांहीं केलें । विचारीं पां ५२ चंदनु होय शीतळु । परी अग्नीसी पावे मेळु । तैं हातीं धरितां जाळू । न शके काई ५३ कां किडांचिये आटतिये पुटीं । पडिलें सोळें किरीटी । घेतलें चोखासाठीं । नागवीना ५४ तैसें श्रद्धेचें दळवाडें । आंगें कीर चोखडें । परी प्राणियाच्या पडे । विभागीं जैं ५५ तैं प्राणिये तंव स्वभावें । अनादिमायाप्रभावें । त्रिगुणाचेचि आघवे । वळिले आहाती ५६ तेथही दोन गुण खांचेंती । मग एक धरी उन्नती । तैं तैसियाचि होती वृत्ती । जीवांचिया ५७ वृत्तीऐसें मन धरिती । मनाऐसी क्रिया करिती । केलियाऐसी वरिती । मरोनि देहें ५८ बीज मोडे झाड

साह्य करणाऱ्या ज्या सामुग्री त्याही त्यावेळी त्याजवळ नाहीं; ३७ तसेंच पूर्वकर्म अनुकूल नसल्यामुळें बुद्धीचेंही साह्य नाहीं; अशा प्रकारें ज्यांचें शास्त्रसंपादन खुंटलें आहे; ३८ किंबहुना, शास्त्रांची एकवाक्यता करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें ज्यांनीं वादविवाद करण्याचें सोडून दिलें आहे, ३९ पण शास्त्रांचा अभ्यास करून त्यांत सांगितल्याप्रमाणें यथाविधी अनुष्ठान करून परलोकीं जे आनंदानें नांदतात, ४० त्यांच्याप्रमाणें आपण व्हावें; अशी मनांत इच्छा धरून त्यांच्या मार्गाचें हें आचरण करतात, ४१ प्रभो, ज्याप्रमाणें वर काढून दिलेल्या भक्ष्याच्या अक्षरांप्रमाणें लहान मूल खालीं अक्षरें काढतें, किंवा डोळस मनुष्यास पुढें करून अंधळा मनुष्य वाट चालतो, ४२ त्याप्रमाणें, जे सर्व शास्त्रांत निपुण आहेत, त्यांचें आचरण प्रमाण मानून त्यावर जे श्रद्धा ठेवतात, ४३ आणि शंकर आदिकरून देवांचें पूजन करणें, भूमि वगैरे महादानें देणें, व अग्निहोत्रादि यज्ञ करणें, हीं कर्मे श्रद्धेनें करतात. ४४ पुरुषोत्तमा, सत्त्व, रज व तम यांपैकीं कोणती गति प्राप्त होते, तें आम्हांला सांगा. ४५ तेव्हां वैकुंठपीठाचें अधिदैवत वेदरूपी कमलांतील पराग, ज्याच्या सत्तेनें हें सर्व जग वांचतें; ४६ जो लोकोत्तर, प्रौढ व स्वभावतः मोठा असा काल, जो अद्वितीय, गूढ व आनंदघन, ४७ आणि हे सर्व गुण ज्या शक्तीच्या आधारानें वर्णनीय होतात ती शक्ति ज्याचें अंगी आहे, तो श्रीकृष्ण भगवान् स्वमुखानें बोलत आहे. ४८

**अन्वयार्थ**—(देहिनां)–देहवान् जीवांची–(सात्त्विकी राजसी च तामसी एव)–सात्त्विकी, राजसी व तामसी–(इति त्रिविधा श्रद्धा)–अशी त्रिविधा–तीन प्रकारची श्रद्धा –(भवति)–असते.–(सा)–ती तिन्ही प्रकारची श्रद्धा–(स्वभावजा)–जन्मान्तरांतील धर्मादिकांचा जो संस्कार त्या मरणसमयीं अभिव्यक्त झालेला असतो, त्यापासून ती उत्पन्न झालेली असते.–(तां)–त्या त्रिविध श्रद्धेला तूं–(शृणु)–ऐक. २

भगवान् म्हणतातः–पार्था, शास्त्राभ्यासाची अडचण आहे, असा तुझ्या मनाचा कल आहे, हेंही आम्ही जाणतों. ४९ तूं नुसत्या श्रद्धेनेंच मोक्षप्राप्ती करून घेऊं पहात आहेस; पण, हे प्रबुद्धा, तूं म्हणतोस तितकें हें काम सोपें नाहीं. ५० अर्जुना, श्रद्धेवरच नुसता विश्वास ठेवूं नये. हें पहा–अंत्यजाच्या समागमानें ब्राह्मणही अंत्यज म्हणजे भ्रष्ट होत नाहीं का? ५१ गंगेचें जरी पाणी असलें तरी तें जर मद्याच्या भांड्यांत घातलें, तर तें कांहीं केल्या घेऊं नये, याचा विचार कर. ५२ चंदन हा थंड आहे खरा; परंतु त्याचा अग्नीशी संबंध झाला, तर हात भाजूं शकणार नाहीं का? ५३ किंवा अर्जुना, हिणकट सोनें आटवीत असतां त्यांत उत्तम सोनें पडलें, आणि मग तें जर उत्तम सोन्याच्या भावानें विकत घेतलें तर तें बुडवणार नाहीं का? ५४ त्याप्रमाणें श्रद्धेचें स्वरूप जरी मुळचें शुद्ध आहे, तरी जेव्हां ती प्राण्यांच्या वांटणीला येते, ५५ तेव्हां, प्राणी तर स्वभावतःच अनादि मायेच्या शक्तीनें तीन गुणांचेच बनले आहेत; ५६ त्यांतही, दोन गुण क्षीण होऊन तिसरा ज्या वेळेस वाढतो, त्या वेळेस त्या गुणाच्या अनुरोधानें जीवांच्या वृत्ति होतात; ५७ वृत्तींच्या अनुरोधानेंच ते मन (वासना) धारण करितात, मनाप्रमाणें क्रिया करितात, आणि मेल्यावर पुनः आपल्या कर्माप्रमाणेंच देह धारण करतात; ५८ बीज नाहींसें होतें आणि झाड वाढतें,

१ साहाय्य. २ स्वाधीन, मिळण्याजोगा. ३ अनुकूल. ४ पूर्वकर्म, प्रारब्ध. ५ साह्य. ६ संपादन. ७ निश्चय. ८ विचार, वादाघाट. ९ अभ्यास करून. १० परलोकीं. ११ इच्छा. १२ मार्ग. १३ भक्ष्यांतील. १४ अक्षराच्या. १५ घालून. १६ डोळस, काठीवाला. १७ आंधळा. १८ वेदरूप कमळाचा. १९ गंध. २० वांचे. २१ सावलीनें. २२ सहज. २३ अलौकिक. २४ योग्यता पावतात. २५ शक्तीनें. २६ असे. २७ कल. २८ प्रतिबंध. २९ नुसत्या. ३० मोक्ष. ३१ शाता. ३२ विश्वासूं नये. ३३ अंत्यजाच्या समागमानें. ३४ चांडाळ. ३५ दारूच्या भांड्यांत. ३६ हिणकटाच्या. ३७ शुद्ध सोनें. ३८ चांगलें म्हणून. ३९ बुडविणार नाहीं काय? ४० समूह, स्वरूप. ४१ सुंदर. ४२ दवती. ४३ धारण करितात.

होये। झाड मोडे बीजीं सामाये। ऐसेनि कल्पकोडी जाये। परी जाति न नशे ५९ तियापरी यियें अपारें। होत जात जन्मांतरें। परी त्रिगुणत्व नै व्यभिचरे। प्राणियांचें ६० म्हणूनि प्राणियांच्या पैकीं। पडिलीं श्रद्धा अवलोकीं। ते होय गुणासारिखी तिहीं ययां ६१ विपायें वाढे सत्त्व शुद्ध। तेव्हां ज्ञानासी करी साद। परी एका दोघे वोखंद। येर आहाती ६२ सत्त्वाचेनि आंगलगें। ते श्रद्धा मोक्षफळा रिगे। तंव रज तम उगे। कां पां राहाती ६३ मोडोनि सत्त्वाची आये। रजोगुण आकाशें जाये। तेव्हां तेचि श्रद्धा होये। कर्मकेरसुणी ६४ मग तमाची उठी आगी। तेव्हां तेचि श्रद्धा भंगी। हों लागे भोगालागीं। भलतेया ६५

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत। श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः॥ ३॥

एवं सत्त्वरजतमा-। वेगळी श्रद्धा सुवर्मा। नाहीं गा जीवग्रामा-। माजीं यया ६६ म्हणोनि श्रद्धा स्वाभाविक। असे पैं त्रिगुणात्मक। रजतमसात्त्विक। भेदीं इहीं ६७ जैसें जीवनचि उदक। परी विषीं होय मारक। कां मिरयांमाजी तीख। उंशीं गोड ६८ तैसा बहुवसें तमें। जो सदाचि होय निमे। तेथ श्रद्धा परिणमे। तेंचि होऊनि ६९ मग काजळा आणि मसी। न दिसे विवंचनीं जसी। तेवीं श्रद्धा तामसी। सिनी नाहीं ७० तैसीचि राजसीं जीवीं। रजोमय जाणावी। सात्त्विकीं आघवी। सत्त्वाचीच ७१ ऐसेनि हा सकळु। जगडंबरु निखिळु। श्रद्धेचाचि केवळु। वोतला असे ७२ परी गुणत्रयवशें। त्रिविधपणाचें ठसें। श्रद्धे जें उठिलें असे। तें वोळख तूं ७३ तरी जाणिजे झाड फुलें। कां मानस जाणिजे बोलें। भोगें जाणिजे केलें। पूर्वजन्मींचें ७४ तैसीं जिहीं चिन्हीं। श्रद्धेचीं रूपें तीन्ही। देखिजती ते वानी। अवधारीं पां ७५

यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः। प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः॥ ४॥

तरी सात्त्विक श्रद्धा। जयांचा होय बांधा। तयां बहुतकरूनि मेधा। स्वर्गीं आथी ७६ ते विद्याजात पढती। यज्ञक्रिये निवडती। किंबहुना पडती। देवलोकीं ७७ आणि श्रद्धा राजसा। घडले जे वीरेशा। ते भजती राक्षसां। खेचरां हन ७८ श्रद्धा जे कां तामसी। ते मी सांगेन तुजपाशीं। जे कां केवळ पापराशी। अतिकर्कशी निर्दयत्वें ७९ जीववधें साधूनि बळी। भूतप्रेतकुळें मैळीं। स्मशानीं संध्याकाळीं। पूजिती जे ८० ते तमोगुणाचें सार। कां

व झाड नाहीसें होतें; आणि यांजांत सामावतें; याप्रमाणें कल्पाचे कल्प जरी गेले, तरी मूळ झाडाची जात कांहीं नाहींशी होत नाहीं; ५९ त्याप्रमाणें, जीवांची पुष्कळ जन्मांतरें झालीं; तरी त्यांच्यांतील तीन गुणांचा बदल होत नाहीं. ६० म्हणून, प्राण्यांच्या वांट्याला जी श्रद्धा आलेली असते, ती गुणांच्या अनुरोधानें तीन प्रकारची असते, असें समज. ६१ कदाचित् शुद्ध सत्त्वगुण वाढला तर तो ज्ञानाला हांक मारितो; ( ज्ञानाची प्राप्ति करून देतो ) परंतु त्याला रज व तम हे दोन गुण विरुद्ध आहेत. ६२ सत्त्वगुणाच्या अनुरोधानें जी श्रद्धा असते, ती मोक्षकालापर्यंत जाते; पण रज व तम हे दोन गुण स्वस्थ कसे बसतील ? ६३ सत्त्वगुणाचा आश्रय नाहींसा करून ज्यावेळेस रजोगुण वाढतो, त्या वेळेस तीच श्रद्धा कर्म करणारी होते. ६४ मग तमोगुणाचा ज्या वेळेस जोर होतो, तेव्हां त्या श्रद्धेचा भंग होऊन तीच श्रद्धा वाटेल ते भोग भोगण्यास उद्युक्त होते. ६५

अन्वयार्थ—(हे भारत)–हे अर्जुना !–(सत्त्वानुरूपा)–विशिष्ट संस्कारांनीं युक्त अशा अंतःकरणाच्या अनुरूप –(सर्वस्य)–सर्वांची–प्रत्येक मनुष्याची–(श्रद्धा)–आस्तिक्य-बुद्धि–(भवति)–असते.–(अयं पुरुषः)–हा संसारी जीव–(श्रद्धामयः)–श्रद्धाप्राय–प्रायः श्रद्धायुक्त असतो. त्यामुळें–(यः)–जो–(यच्छ्रद्धः)–ज्या श्रद्धेनें युक्त असतो–(सः एव)–त्या श्रद्धेच्या अनुरूपच–(सः)–तो जीव असतो. ३

याप्रमाणें, हे सुज्ञा, या जीवसमुदायांत सत्त्व, रज व तम यांच्याशिवाय निराळी श्रद्धा नाहीं. ६६ म्हणून सत्त्व, रज व तम या भेदांनीं अशी ही श्रद्धा स्वभावतःच त्रिगुणात्मक आहे. ६७ पाणी प्राणिमात्राचें जीवन आहे–पण तेंच ज्याप्रमाणें विषामध्यें मारक होतें, किंवा मिरच्यांमध्यें तिखट होतें, आणि उंसामध्यें गोड होतें, ६८ त्याप्रमाणें, तमोगुण वाढला असतां, जो नेहमीं जन्म पावतो व मरतो, त्या प्राण्याच्या ठिकाणीं श्रद्धा ही तमोगुणांच्याच अनुरोधानें परिणाम पावते. ६९ मग काजळ आणि मस यांत जसा फरक दिसत नाहीं तशी ही तामसी श्रद्धा त्या मनुष्याहून निराळी नसते. ७० त्याचप्रमाणें, राजस प्राण्यांच्या ठिकाणीं असलेली श्रद्धा रजोगुणमय आणि सात्त्विकांच्या ठिकाणीं असणारी सगळी सत्त्वगुणमयच असते. ७१ याप्रमाणें हे सर्व जग खरो-खर श्रद्धेचेंच ओतलेलें आहे. ७२ परंतु, त्रिगुणांच्या अधीन असल्यानें श्रद्धेचे ठिकाणीं जें तीन प्रकारचें चिन्ह प्राप्त होतें, तें तूं ओळख. ७३ तर ज्याप्रमाणें फुलावरून झाड ओळखावें, किंवा बोलावरून मन जाणावें, किंवा भोगावरून पूर्वजन्मींच्या कर्माचें अनुमान करावें, ७४ त्याप्रमाणें ज्या चिन्हांवरून श्रद्धेचीं तिन्ही रूपें ओळखतां येतील, त्यांचा प्रकार सांगतों, तो ऐक. ७५

अन्वयार्थ—(सात्त्विकाः)–सत्त्वानिष्ठ पुरुष–( देवान् )–देवांस–(यजन्ते)–पूजतात–( राजसाः )–राजस लोक–(यक्षरक्षांसि)–यक्ष व राक्षस यांस पूजतात–(अन्ये तामसाः जनाः)–दुसरे तामस जन–(प्रेतान् च भूतगणान्)–प्रेतांना व भूतगणांना पूजतात. ४

तर ज्याचें अंतःकरण सात्त्विक श्रद्धेनें बनलेलें आहे त्याची बुद्धि बहुतकरून स्वर्गप्राप्तीविषयींच होते. ७६ तें सर्व विद्या शिकतात; कोणते यज्ञ करणें योग्य आहे, त्याची वाटाघाट करतात; फार काय, ते देवलोकास पावतात. ७७ आणि हे वीरशिरोमणे, ज्याचें अंतःकरण रजोगुणात्मक श्रद्धेचें बनलेलें आहे, ते राक्षस व पिशाच यांना भजतात. ७८ ज्याचें अंतःकरण तमोगुणात्मक श्रद्धेचें बनलेलें...हे, याविषयीं मी तुला सांगतों कीं, ते केवळ पापराशी असून अति कठोर व दयाहीन असतात. ७९ ते जीवांचा वध करून बळी देतात, आणि भूतप्रेत वगैरे देवतांची अमंगळ स्मशानांत संध्याकाळीं पूजा करितात. ८० ते तमोगुणाचें सार काढून निर्माण

१ हीं. २ फेरबदल पावत नाहींत. ३ मध्यें. ४ प्राप्त झालेली. ५ कदाचित. ६ मारक औषध, वैरी. ७ अनुरोधानें. ८ आश्रय, मर्यादा. ९ कर्म करणारी. १० सुज्ञा. ११ जीवसमूहांत. १२ मिरच्यांत १३ जन्मतो व मरतो. १४ भेद. १५ वेगळी. १६ सर्व जग. १७ चिन्हानें. १८ रूप. १९ घडना, ठेवण. २० बुद्धि. २१ सकळ विद्या. २२ पिशाचांना. २३ अमंगळ.

द्रूनि निर्मिले नर । जाण तामसियेचें घर । श्रद्धेचें तें ८१ ऐसी तिहीं इहीं लिंगीं। त्रिविध श्रद्धा जगीं । पैं हें ययालागीं । सांगतु असें ८२ जे हे सात्त्विक श्रद्धा। जतन करावी प्रबुद्धा । येरी दोनी विरुद्धा । सांडाविया ८३ हे सात्त्विकमति जया । निर्वाहती होय धनंजया । बागूल नोहे तया । कैवल्य तें ८४ तो न पढो कां ब्रह्मसूत्र । ना लोढो सर्व शास्त्र । सिद्धांत न होत स्वतंत्र । तयाच्या हातीं ८५ परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊन मूर्त। अनुष्ठानें जगा देत। वडील जे हे ८६ तयांचीं आचरतीं पाउलें । पाऊनि सात्त्विकी श्रद्धा चाले । तो तेंचि फळ ठेविलें । ऐसें लाहे ८७ पैं एक दीपु लावी सायासें । आणिक तेथें लाऊं बैसे । तरी तो काय प्रकाशें ।वंचिजे गा ८८ कां येकें मोल अपार । वेंचोनि केलें धवेळार । तो सुखेंचि वस्तीकर । न भोगी काई ८९ हें असो जो तळें करी । तें तयाचीच तृषा हरी । कीं सुआरासीचि अन्न घरीं । येरां नोहे ९० बहुत काय बोलों पैं गा । येका गौतमासीचि गंगा । येरां समस्तां काय जगां । वोहोळें जाली ९१ म्हणोनि अपुलियापरी । शास्त्र अनुष्ठिती कुसरी । जाणे तयातें श्रद्धाळू जो वैरी । तो मूर्खुही तरे ९२

अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः । दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥

ना शास्त्राचेनि कीर नांवें । खांकरोंही नेणती जीवें । परी शास्त्रज्ञांही शिवें[१५] । टेंको नेदिती ९३ वडिलांचिया क्रिया । देखोनि वाती वांकुलिया । पंडितां डोंकुलिया । वाजविती ९४ आपलेनीचि आटोपें । धनित्वाचेनि दर्पें । साचाचि पाखंडाचीं तपें । आदरिती ९५ आपुलिया पुढिलांचिया । आंगीं घालूनि कातिया । रक्तमांसा प्रणीतिया । भर भरों ९६ रिचविती[२४] जळतकुंडीं । लाविती चेड्यांच्या तोंडीं । नवसियां देती उंडी[२५] । बाळकांची ९७ आग्रहाचिया उजरिया । क्षुद्र देवतां वरियीं । अन्नत्यागें सांतरिया । ठाकती एक ९८ अगा आत्मपरपीडा । बीज तमक्षेत्रीं सुहाडा । पेरिती मग पुढां । तेंचि पिकें ९९ बाहू नाहीं आपलिया । आणि नावेंतेंही धनंजया । न धरी होय तया । समुद्रीं जैसें १०० कां वैद्यातें करी सळा । रुसु सांडी पाय[३३] खोळां । तो रोगिया जेवीं विव्हळा-। सवंता होय १ नाना पडिकराचेनि सळें । काढी आपलेचि डोळे । तें वान-

केलेले पुरुष, म्हणजे तामस श्रद्धेचें आगरच होय; असें समज. ८१ याप्रमाणें सात्त्विक, राजस व तामस अशी तीन प्रकारची श्रद्धा जगांत आहे. परंतु मी हें एवढ्या-करितां सांगत आहे ८२ की, त्या तिहींपैकी जी सात्त्विक श्रद्धा तिचा स्वीकार करावा; आणि हे बुद्धिमंता, दुसऱ्या ज्या दोन्ही राजस व तामस श्रद्धा, त्यांचा त्याग करावा. ८३ धनंजया, ही सात्त्विक बुद्धि जे आचरतात, त्यांना मोक्षप्राप्तीचा मोठासा बाऊ वाटत नाही, म्हणजे कठीण नाही. ८४ तो मनुष्य वेदांचें पठण न करो, शास्त्राध्ययन न करो, अथवा शास्त्रांची एकवाक्यता करून कोणताही सिद्धांत न ठरवो; ८५ परंतु जे श्रुतिस्मृतींचें अध्ययन करून मूर्तिमंत वेद बनतात ( विद्वान् झालेले असतात, ) व आपल्या आचरणानें ते सिद्धांत जनापुढें ठेवतात; ८६ त्यांचें आचरणाचा कित्ता वळवून जो सात्त्विक श्रद्धेनें चालतो, त्याला त्यांना मिळणारें फळच प्राप्त होतें. ८७ हें पहा-एखादा मनुष्य मोठ्या प्रयासानें दिवा लावतो, आणि त्या दिव्यावरून जर दुसरा कोणी दिवा लावूं लागला तर तो दिवा त्याला फसवील काय? (त्याच्या घरी उजेड पाडणार नाही असें होईल काय?) ८८ किंवा एखाद्यानें अपार द्रव्य खर्च करून घर बांधलें, तर त्या घरांत रहाणाऱ्या दुसऱ्या मनुष्यास तें सुख भोगतां येत नाही काय? ८९ हें असो; जो तळें बांधतो, त्यांचीच का तहान त्यांतील पाण्यानें भागते? अथवा घरामध्यें स्वयंपाक करणाऱ्याचीच तेवढी त्या अन्नानें तृप्ति होते, आणि इतरांची होत नाही की काय? ९० उगीच पुष्कळ बोलून काय करावयाचें आहे! अरे, गौतम ऋषींनी दीर्घ प्रयत्नानें आणिलेली गंगा ही एक त्यासच पवित्र करते; आणि जगांतील इतर सर्व लोकांविषयीं ती ओझ्याची योग्यता पावते की काय? ९१ म्हणून, आपल्यापेक्षां जे दक्षतेनें शास्त्रांचें अनुष्ठान करितात त्यांचेप्रमाणें जो श्रद्धालु पुरुष आचरण करतो, तो मूर्ख असला तरी तरतो! ९२

अन्वयार्थ—(ये)-जे-[जनाः]-लोक-(दंभाहंकारसंयुक्ताः)-दंभ व अहंकार यांनी संयुक्त असलेले-(कामरागबलान्विताः)-काम व राग-आसक्ति व तत्प्रयुक्तबल यांनी युक्त असलेले-(अशास्त्रविहितं)-शास्त्रानें ज्याचें विधान केलेलें नाही असें-(घोरं)-प्राण्यांना पीडा देणारें-(तपः)-तप-(तप्यन्ते)-करितात.

गवयाच्या गाण्याच्या पूर्वी जसें त्याचें खाकरणें, गाण्याचा आरंभ सुचवितें; त्याप्रमाणें शास्त्रांच्या नांवानें जे मनापासून खाकरलें सुद्धां नाहीत, म्हणजे ज्यांना शास्त्र काय याची कल्पना सुद्धां नाही. हें असो; परंतु कोणी शास्त्रज्ञ आपल्या गांवीं येऊं लागलो, तर गांवाच्या शिवेलाही शिवूं देत नाहीत. म्हणजे गांवांत येऊं देत नाहीत; ९३ तसेंच वडिलांचें स्नानसंध्यादि आचरण पाहून जे त्यांस वेडावून दाखवितात, व पंडितांचा संवाद ऐकिला असतां टिमक्या वाजवितात, व त्यांचे शब्द देखील कानीं पडूं देत नाहीत,; ९४ उलट आपल्या शहाणपणानें व द्रव्याच्या मदानें आपल्याच धुंदींत असतात, ते खरोखरं पाखांड्यांच्या तपाचें आचरण करतात. ९५ आपल्या पुढें आलेल्या मनुष्याच्या अंगावर शस्त्रांचें प्रहार करून त्यांच्या रक्तमांसांनी यज्ञपात्र भरभरून ९६ प्रदीप्त अग्निकुंडांत चेटक्यांना आहुति देतात; व त्यांस नवस करून बाळकांचे बळी देतात! ९७ क्षुद्र देवतांपासून वरप्राप्ति करून घेण्याकरितां आग्रहाच्या आव्यतेनें सात सात दिवस अन्न सेवन न करितां अनुष्ठानें करतात. ९८ हे सुज्ञा, अशा प्रकारें ते आपल्यास व दुसऱ्यास पीडा करण्याचें बीज तमोरूपी जमिनींत पेरतात, आणि त्यापासून पुढें तमाचेंच पीक येतें. ९९ अर्जुना, ज्या मनुष्यास स्वतः पोहतां येत नाही, तो नावेचा आश्रय न करितां समुद्रांत गेला असतां त्याची जी स्थिति होते; १०० किंवा वैद्याचा द्वेष करून जो लाथेनें काढा लवंडून देतो, तो रोगी जसा जीवापासून वेगळा होतो, म्हणजे मरतो; १ अथवा जो डोळस मनुष्याचा कंटाळा करतो; आणि अशा प्रकारें आपलेच डोळे काढून टाकतो, त्या आंधळ्या मनुष्याची जशी त्याच्या मोजपर्यंतही

१ संरक्षक. २ बाऊ. ३ वेद. ४ चालो, पडो. ५ प्रकट, मूर्तिमंत. ६ पूर्वज, सत्पुरुष. ७ प्राप्त होतें, लाभे. ८ फसविला जाईल काय. ९ चुनेगच्ची घर. १० सुखें, स्वतंत्र, सोप. ११ स्वयंपाकघरास. १२ ओझा. १३ आपल्यापेक्षां. १४ कौशल्यानें. १५ आचरी, अनुसरतो. १६ खाकरणें, गाण्यासाठी गळा साफ करणें हा मूळ अर्थ, नंतर कार्यास प्रारंभ करूं लागणें. स्वच्छ करणें. १७ हद्दीवर. १८ वेडावून दाखवितात. १९ चुटक्या. २० शहाणपणाची. २१ मस्तीनें. २२ कोपता. २३ प्रणीता, यज्ञपात्र. २४ भोतगात, घालितात. २५ चेटुकांच्यांना. २६ बळी. २७ आर्दतेनें, उत्कंठानें. २८ इतर लहान देवतांपासून वरप्राप्ती करितां. २९ सात दिवसपर्यंत. ३० सुज्ञा. ३१ देणाला. ३२ काढा, औषध. ३३ लाथेनें. ३४ व्याकुळ. ३५ स्वतः. ३६ डोळस. ३७ देपानें. ३८ मागपरांत.

वसां आंधळें। जैसें ठाके २ तैसें तया असुरां होये। जे निंदूनि शास्त्रांची सोये। सैंघ धांवताती मोहें। आडवी जे कां ३ कामु करवी तें करिती। क्रोधु मारवी तें मारिती। किंबहुना मातें पुरिती। दुःखाचा गुंडां ४

कर्शयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः। मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान्॥ ६॥

आपुलां परांवां देहीं। दुःख देती जें जें कांहीं। मज आत्मया तेतुलाही। होय शीणु ५ पैं वाचेचेनिही पाल्वें। पापियां तया नातळावें। परी पडिलें सांगावें। त्यजावया ६ प्रेत बाहिरें घालिजे। कां अंत्यजु संभाषणीं त्यजिजे। हें असो हातें क्षाळिजे। कश्मलातें ७ येथ शुद्धिक्रिया आशा। तो लेंपु न मैनवे जैसा। तयातें सांडावया तैसा। अनुवादु हा ८ तरी अर्जुना तूं तयांतें। देखसी तैं स्मर हो मातें। जे आन प्रायश्चित्त येथें। मानेल ना ९ म्हणौनि श्रद्धा जे सात्त्विकी। पुढती तेचि पैं येकी। जतन करावी निकी। सर्वांपरी ११० तरी धरावा तैसा संगु। जेणें पोखे सात्त्विक लागु। सत्त्ववृद्धीचा भागु। अहारु घेपे ११ एऱ्हवीं तरी पाहीं। स्वभाववृद्धीच्या ठाईं। आहारावांचूनि नाहीं। बळी हेतु १२ प्रत्यक्ष पाहें पां वीरा। जो सावध घे मदिरा। तो होउनि ठाके माजिरा। तियेचि क्षणीं १३ कां जो सेविया अन्नरसु सेवी। तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावीं। काय ज्वरु जालिया निववी। पयादिक १४ नातरी अमृत जयापरी। घेतलिया मरण वारी। कीं आपुलियाऐसें करी। जैसें विष १५ तेवीं जैसा घेपे आहारु। धातु तैसाचि होय आकारु। आणि धातुऐसा अंतरु। भावो पोखे १६ जैसें भांडियाचेनि तापें। आंतुलें उदकही तापे। तैसी धातुवशें आटोपे। चित्तवृत्ती १७ म्हणोनि सात्त्विकु रसु सेविजे। तैं सत्त्वाची वाढी पाविजे। राजसा तामसा होइजे। येरीं रसीं १८ तरी सात्त्विकु कोण आहारु। राजसा तामसा कायी आकारु। हें सांगों करीं आदरु। आकर्णनीं १९

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः। यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु॥ ७॥

आणि एकैसरें आहारा। कैसेनि तिनी मोहरां। जालिया तेही वीरा। रोकडें दाऊं १२० तरी जेवणाराचिया रुची। निष्पत्ति कीं वोनियांची। आणि जेविता तंव गुणांची। दासी येथ २१ जो जीव कर्ता भोक्ता। तो गुणास्तव स्वभावता। पावोनियां त्रिविधता। चेष्टे त्रिधा २२ म्हणौनि त्रिविधु आहारु।

ति होते. २ तशी त्या असुरांची स्थिति होते ! कारण, शास्त्रांत सांगितलेल्या मार्गाची ते निंदा करतात, त्यामुळे ते मोहरूपी अरण्यांत सैरावैरा धांवतात कामाच्या अधीन होऊन त्याच्या अनुरोधानें आचरण करतात; क्रोधाच्या अधीन होऊन तो ज्याचा वध करण्यास लावील त्याचा वध करतात; किंबहुना मला दुःखाच्या दगडांत पुरतात! ४

अन्वयार्थ.—(अचेतसः) अविवेकी–(शरीरस्थं)–शरीरांत असलेल्या–(भूतग्रामं)–इंद्रियसमुदायास–(च)–आणि–(अन्तःशरीरस्थं मां एव)–शरीरांत असलेल्या मलाच–(कर्शयन्तः) कृश करणारे–(तपः) तप–(तप्यन्ते)–करितात,–(तान् असुरनिश्चयान्)–त्यांना आसुर निश्चयाचे–(विद्धि)–जाण. ६

ते आपल्या व दुसऱ्यांच्या शरीरांस जें जें दुःख देतात; त्यामुळें सर्वांच्या अंतर्यामी असणाऱ्या मज आत्म्यालाच ते होतो. ५ हे पहा–अशा पाप्यांना वाचेच्या पदरानेंही स्पर्श करूं नये.–( त्यांचें नामग्रहणही करूं नये, ) त्यांचा त्याग करण्याकरितां त्यांची लक्षणें सांगणें भाग आहे! ६ प्रेत घराबाहेर काढावें लागतें, किंवा अंत्यजाबरोबर संभाषण करूं नये तरी दोन शब्द बोलून त्याला घालवावें लागतें, फार काय, विष्ठाही हातानेंच धुऊन टाकावी लागते; ७ या ठिकाणीं फक्त शुद्धीच्या निमित्तानेंच त्यांना स्पर्श केल्यामुळें त्या स्पर्शाचा जसा दोष मानतां येत नाहीं, तसा या पापी लोकांचा त्याग करण्याकरितां त्यांची लक्षणें सांगितली. ८ तर अर्जुना, त्यांना पाहिल्यावर तूं माझें स्मरण कर, कारण, त्या पापाला माझ्यावाचून दुसरें प्रायश्चित्त कांहीं उपयोगी पडणार नाहीं. म्हणून, सात्त्विक श्रद्धा ही वरचेवर सर्व प्रकारें जतन करावी. ११० दुसरें, ज्या योगानें सात्त्विक श्रद्धा वाढेल, त्याच संग करावा आणि ज्या अन्नाच्या सेवनानें सात्त्विक बुद्धि वाढेल तेंच आहार सेवन करावा. ११ याची असें पहा कीं, स्वभाववृद्धि होण्यास आहारावांचून दुसरें कोणतेंही प्रबल साधन नाहीं. १२ वीरा अर्जुना, तूं प्रत्यक्ष असें पाहा कीं, जो धडधडीत साधन असून मद्याचें सेवन करतो, तो तत्क्षणींच उन्मत्त होऊन जातो; १३ किंवा, जो मनुष्य नेहमीं अन्न खातो, त्याला स्वभावतःच वात व कफ यांची विकृति असते. ज्वर आला असतां तो दुधादिकांपासून कमी होईल काय ? १४ अथवा, ज्याप्रमाणें अमृताचें सेवन केलें असतां मरण टळतें, किंवा विषाचें सेवन केलें असतां मृत्यु प्राप्त होतो, १५ त्याप्रमाणें, जसें अन्न भक्षण करावें तशी धातु उत्पन्न होते, आणि धातूप्रमाणें अंतर्भाव उत्पन्न होतो. १६ जसें भांडें तापल्यावर आंतलें पाणीही तापतें, तशी धातूंच्या अनुरोधानें चित्तवृत्ति होते. १७ म्हणून, सात्त्विक अन्नाचें सेवन केलें असतां सात्त्विक भावच उत्पन्न होतो, आणि राजस व तामस या भावांची उत्पत्ति त्यांच्या त्यांच्या रसांपासून होते. १८ तेव्हां सात्त्विक आहार कोणता, आणि राजस व तामस यांचे आहार कोणते, हें मी तुला सांगतों, तर त्याचें आदरानें श्रवण कर. १९

अन्वयार्थ.—(तु) आणि तसाच–(सर्वस्य)–सर्वांचा–(आहारः अपि)–आहारहि–(त्रिविधः)–तीन प्रकारचा–(प्रियः)–प्रिय (भवति)–होतो–(यज्ञः) यज्ञ,–(तपः)–तपश्चर्या–(तथा)–त्याचप्रमाणें–(दानं)–दान, त्रिविध असतें.–(तेषां)–त्यांचा–(इमं भेदं)–हा भेद–(शृणु)–ऐक. ७

आणि अर्जुना, सरसकट अन्नाचे तीन प्रकार कसे झाले, तें स्पष्ट सांगतों. १२० हे पहा–जेवणाराच्या रुचीप्रमाणें अन्न तयार करावें लागतें; आणि जेवणारा तर गुणांचा दास आहे! २१ जो जीव कर्ता व भोक्ता आहे, तो स्वभावतःच गुणांच्या अनुरोधानें तीन प्रकारच्या चित्तवृत्ति धारण करून वागतो. २२ म्हणून, आहार तीन प्रकारचा; यज्ञ, तप व दान हीं तीन प्रकारचीं; आणि

मार्ग. २ अनिवार. ३ अरण्यांत. ४ दगडांत ५ ...ल्या. ६ तेवढाही. ७ वाचेच्या पदरानेंही. ८ शिवून ९ चिखल. १० दोष. ११ मानीत नाहीं. १२ ... १३ अन्य. १४ चालणार नाहीं. १५ वाढे. १६ ... १७ मार्गे. १८ उन्मत्त. १९ सावा नामक धान्याचा. २० कफ. २१ दूध आदि. २२ ध्यावा. २३ अंतरगत, अंतःकरणांतील. २४ उत्पन्न होतो. २५ श्रवणीं. २६ एकदम. २७ तीन प्रकार झाले. २८ मकार. २९ प्रत्यक्ष, स्पष्ट. ३० अन्नाची. ३१ वागे.

यज्ञुही त्रिप्रकारु । तप दान हन व्यापारु । त्रिविधचि ते २३ पैं आहारलक्षण पहिलें । सांगों जें म्हणितलें । तें आईक गा भलें । रूप करूं २४

आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥

तरी सत्त्वगुणाकडे । जैं दैवें भोक्ता पडे । तैं मधुरीं रसीं वाढे । मेचु तया २५ आंगेंचि द्रव्यें सुरसें । जे आंगेंचि पदार्थ गोडसे। आंगेंचि स्नेहें बहुवसें। सुपक्कें जियें २६ आकारें नव्हती डगळें । स्पर्शें अति मंवाळें । जिभेलागीं स्नेहाळें । स्वादें जियें २७ रसें गाढीं वरी ढिलीं । द्रवभेत्रीं आथिलीं । ठायें ठावो सांडिलीं । अग्नितापें २८ आंगें सानें परिणामें थोरु । जैसें गुरुमुखींचें अक्षरु । तैशी अल्पीं जिहीं अपारु । तृप्ति राहे २९ आणि मुखीं जैसीं गोडें । तैसीचिहि तें आंतुलेकडे । तियें अन्नीं प्रीति वाढे । सात्त्विकांसी १३० एवं गुणलक्षण । सात्त्विक भोज्य जाण । आयुष्याचें त्राण । नीचें नवें हें ३१ येणें सात्त्विक रसें । जंव देहीं मेहो वरिषे । तंव आयुष्यनदी उसंसे । देहांचि देहा ३२ सत्त्वाचिये कीर पाळती । कारण हांचि सुमती । दिवसाचिये उन्नती । भानु जैसा ३३ आणि शरीरा हन मानसा । बळाचा पैं कुवांसा । हा आहारु तरी दशा । कैंची रोगां ३४ हा सात्त्विकु होय भोग्यु । तैंचि भोगावया आरोग्यु । शरीरासी भाग्यु । उदयलें जाणो ३५ आणि सुखाचें घेणें देणें । निकें उवाया ये जेणें । हें असो वाढे सांजणें । आनंदेंसीं ३६ ऐसा सात्त्विकु आहारु । परिणमला थोरु । करी हा उपकारु । सबाह्यासी ३७ आतां राजसासि प्रीती । जिहीं रसीं आथी । करूं तयाही व्यक्ती । प्रसंगें गा ३८

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः । आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

तरी मारें उणें काळकूट । तेणें मानें जें कडुवट । कां चुनियाहूनि दासट । आंम्ल हन ३९ कणिकीतें जैसें पाणी । तैसेंचि मीठें बांधया आंणी । तेतुलीच मेळवणी । रसांतरांची १४० ऐसें खारट अपाडें । राजसा तया आवडे । उन्हाचेनि मिषें तोंडें । आगीचि गिळी ४१ वाफेचिया सिगे । वातीही लाविल्या लागे । तैसें उन्ह मागे । राजसु तो ४२ वावदळ पाडूनि ठाये । साबळ डोहारला आहे । तैसें तीख तो खाये । जें घायेंविण रुपे ४३ आणि राखेहूनि कोरडें । आंत बाहेरी येके पाडें । तो जिव्हादंशु आवडे । बहु तया ४४ परस्परें

ठयाप्रारही तीन प्रकारचे आहेत. २३ परंतु प्रथमतः तुला जें आहाराचें लक्षण सांगूं म्हणून म्हटलें. तें स्पष्ट करून सांगतों, ऐक. २४

**अन्वयार्थ**—(आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः)—आयुष्य, मानस बल, शारीर बळ, आरोग्य, सुख व प्रीति यांना वाढविणारे–(रस्याः)–रसयुक्त,–(स्निग्धाः)–स्नेहयुक्त–(स्थिराः)-देहांत परिणामरूपानें चिरकाल राहणारे–(हृद्याः)–हृदयाला प्रिय वाटणारे असे–(आहाराः–)आहार–(सात्त्विकप्रियाः)–सात्त्विक लोकांना प्रिय असतात. ८

तर, जेव्हां दैवयोगानें जीव सत्त्वगुणाचा बनलेला असतो, तेव्हां मधुर अन्न खाण्याविषयों त्याला विशेष आवड असते. २५ जे पदार्थ स्वतःच उत्तम रसानें युक्त, जे स्वतः गोड, जे स्वतः अति स्निग्ध व पक्व झालेले असतात; २६ जे आकारानें फार मोठे नसतात, हातास मऊ लागतात, जिभेवर ठेविले असतां लवकर विरघळतात व स्वादिष्ट असतात; २७ जे रसानें पूर्ण असून रस निघण्यास कठीण नसतात, पाणीदार असून विस्तवाच्या आचीनें जागजागीं काळे झालेले नसतात, २८ श्रीगुरूंच्या मुखांतील अक्षरें जरी थोडीं असलीं, तरी त्यांचा परिणाम फार चांगला होतो, त्याप्रमाणें, जे पदार्थ थोडे खाल्ले असतांही त्यांपासून अपार तृप्ति होते; २९ आणि जे खाते वेळेस तोंडास गोड लागतें, तसें परिणामींही गोड असतें, अशा अन्नाविषयीं सात्त्विकाची विशेष प्रीति असते. १३० याप्रमाणें सात्त्विक मनुष्याला आवडणाऱ्या पदार्थांचीं गुणलक्षणें होत. अशा पदार्थांचें सेवनापासून आयुष्याचें बल नित्य वाढतें. ३१ अशा सात्त्विकरसरूप मेघांची जों जों देहावर वृष्टि होते, तों तों आयुष्यरूप नदीस दिवसानुदिवस देहांत पूर येतो. ३२ हे सुबुद्धिमंता, ज्याप्रमाणें दिवसाची उन्नति होण्यास सूर्य कारण आहे, त्याप्रमाणें सत्त्वाचें रक्षण करण्यास हा आहार योग्य आहे; ३३ आणि शरीर व मन यांचे बलाची वृद्धि ह्याच आहारापासून होते. मग त्या ठिकाणी रोगाचा शिरकाव कोठून होणार ? ३४ या सात्त्विक अन्नाचें सेवन केलें तरच शरीरास आरोग्य भोगण्यास प्राप्त होतें, असें समजावें. ३५ आणि मग त्याच्या सर्व व्यापारांचा विस्तार सुखमय होतो. फार काय, तर त्याची आनंदाबरोबर मैत्री होते. ३६ याप्रमाणें या सात्त्विक आहाराचा परिणाम थोर असून, तो शरीराला अन्तर्बाह्य सुखकर होतो. ३७ आतां राजस गुणाच्या मनुष्याची कोणत्या अन्नावर भक्ति असते तें तुला प्रसंगानुसार स्पष्ट करून सांगतों. ३८

**अन्वयार्थ**—(कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः)–कडू, आंबट, खारट, अति उष्ण, तिखट, रूक्ष–नीरस व दाहक–तोंडाची आग करणारे असे व–(दुःखशोकामयप्रदाः)–दुःख, शोक आणि रोग देणारे–(आहाराः)-आहार-(राजसस्य)–राजस प्रकृतीच्या मनुष्याला–(इष्टाः)–आवडतात.

तर मारकपणानें मात्र उणें बाकी काळकूटाच्या बरोबरीचेंच कडू किंवा चुन्याहूनही दाहक असून जें आंबट असतें, ३९ कणीक भिजण्यास जितकें पाणी लागतें, तितकेंच मीठ आणि अवांतरही खारट जिन्नस त्यांत मिसळणें, १४० याप्रमाणें अतिशय खारट पदार्थ राजस गुणाच्या मनुष्यास आवडतात; आणि ऊन ऊन इतकें खातो कीं, केवळ तोंडानें अग्नि गिळतो ! ४१ ज्या पदार्थांतून इतक्या वाफा निघतात कीं त्यावर दिव्याची वातही लावतां येईल, असे ऊन पदार्थ राजस गुणाचा मनुष्य खावयास मागतो. ४२ बावटळीला मागें सारून पहारीच्या टोंकाप्रमाणें प्रहार करणारे तिखट पदार्थ तो खातो, की ज्या योगानें जखम न पडतां शस्त्राप्रमाणें वेदना होतात; ४३ आणि राखेहून रूक्ष, व अंतर्बाह्य कोरडें असलेलें असें तोंडी लावणें त्याला फार आवडतें. ४४ जो पदार्थ खातेवेळेस दांतावर दांत आदळतात, इतकें

१ स्पष्ट करूं. २ जीव. ३ आवड, इच्छा. ४ स्वतः. ५ पदार्थ. ६ स्वादिष्ट. ७ मोठी. ८ मऊ, हलवार. ९ विरघळणारे. १० सघन, भरपूर. ११ मऊ. १२ पाणीदार. १३ कांहीं ठिकाणीं विस्तवाच्या आंचीनें द्रव्यभाव गेला आहे असी. १४ गुणानें. १५ बळ. १६ नित्य. १७ मेघवृष्टि. १८ दिवसेंदिवस, भरून, येते. १९ रक्षणार्थ. २० आहार. २१ आश्रय. २२ आकारास, विस्तारास. २३ मैत्री. २४ परिणाम पावला. २५ उघड. २६ मारकपणानें कमी. २७ त्याप्रमाणें. २८ दाहक, भाजणारें. २९ आंबट. ३० अणु मिठाचाच गोळा बनविला. ३१ इतर खारट जिनसाची. ३२ अतिशय. ३३ उष्ण. ३४ अग्नावर. ३५ दगड, वाऱ्याची बावटळ, पिकेचा आघात. ३६ मागें सारून. ३७ प्रहार, ठक्स. ३८ प्रहार करणारे. ३९ तिखट. ४० तोंडी लावणें.

दांतां । आदळु होय खातां । तो गा तोंडीं घेतां । तोषों लागे ४५ आधींच द्रव्यें चुरमुरीं । वरी परवडिजती मोहरी । जियें घेतां होती धुवारी । नाकेंतोंडें ४६ हें असो उगें आगीतें । म्हणे तैसें राइतें । पैढियें प्राणापरतें । राजसासि गा ४७ ऐसा न पुरोनि तोंडा । जिभा केला वेडा । अन्नमिषें अग्नि भडभडां । पोटीं भरी ४८ तैसाचि लवंगा सुंठे । मग भुई ना सेजे सांटे । पाणियाचें न सुटे । तोंडोनि पात्र ४९ ते आहार नव्हती घेतले । व्याधिव्याळ जे सुतेले । ते चेववावया घातलें । माजेवण पोटीं १५० तैसें एकमेकां सेळें । रोग उठती एके वेळे । ऐसा राजसु आहारु फळे । केवळ दुःखें ५१ एवं राजसा आहारा । रूप केलें धनुर्धरा । परिणामाचाही विसुरा । सांगितला ५२ आतां तया तामसा । आवडे आहारु जैसा । तेंही सांगों चिळसा । झणें तुम्ही ५३ तरी कुहिलें उष्टें खातां । न मनिजे तेणें अनहिता । जैसें कां उंपहिता । म्हसी खाय ५४

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् । उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥१०॥

निपजलें अन्न तैसें । दुपाहरीं कां येरें दिवसें । ऐतिकरें तें तामसें । घेईजे तें ५५ नातरी अर्ध उकडिलें । का निपट करपोनि गेलें । तैसेंचि खाय चुकलें । रसा जें येवों ५६ जया आंथि पूर्ण निष्पत्ती । जेथ रसु धरी व्यक्ती । तें अन्न ऐसी प्रतीती । तामसा नाहीं ५७ ऐसेनि कहीं विपायें । सदन्ना वरपडा होये । तरी घाणी सुटे तंव राहे । व्याघ्रु जैसा ५८ का बहुवे दिवशीं वोलांडिलें । स्वादपणें सांडिलें । शुष्क अथवा सडलें । गोमिणेंही हो ५९ तेंही बाळाचे हातवरी । चिवडिलें जैसी रांडी करी । का सवें बैसोनि नारी । गोतांबीलें करी १६० ऐसेनि करंभळें जें खाय । तें तया सुखभोजन ऐसें होय । परी येणेंही नें धाय । पापिया तो ६१ मग चमत्कारु देखा । निषेधाचा आंबुखा । जया का सदोखा । कुद्रव्यासी ६२ तया अपेयांच्या पानीं । अखाद्यांच्या भोजनीं । वाढाविजे उतान्ही । तामसें तेणें ६३ एवं तामस जेवणारा । ऐसैसी मेचु हे वीरा । तयाचें फल दुसरां । क्षणीं नाहीं ६४ जे जेव्हांचि हें अपवित्र । शिवे तयाचें वक्त्र । तेव्हांचि पापा पात्र । जाला तो कीं ६५ यावरतें जें जेवी । ते जेविती वोजें न म्हणावी । पोटभरती जाणावी । यातना ते ६६ शिरच्छेदें काय होये । का आगीं रिघतां कैसें आहे । हें जाणावें काई पाहें । परी साहोतुचि असे ६७ म्हणोनि तामसा अन्ना । परिणामु गा सिनाना । न सांगोंचि गा अर्जुना । देवो

कर्डाण पदार्थ खातेवेळेस त्याला आनंद होतो. ४५ अगोदरच क्षणक्षणीत पदार्थ, त्यांत त्यांना आणखी मोहरी लावावयाची; मग काय विचारतां! त्यांचें सेवन केलें असतां नाकातोंडांतून झिणझिण्या येतात! ४६ हें तर राहूंच द्या, पण जें अग्नीला मागें सारतें, असें रायतें राजस गुणाच्या मनुष्यास प्राणापेक्षांही विशेष आवडतें. ४७ अशा प्रकारें, कांहीं खाल्ल्यानें ज्याची तृप्ति होत नाहीं, तो तोंड हातांत धरलेला मनुष्य अन्नाच्या निमित्तानें पेटलेला अग्निच पोटांत घालतो. ४८ त्याचप्रमाणें, लवंगा व सुंठ खाऊन त्यामुळें भुईवर गडबडां लोळतो, व तोंडचे पाण्याचें भांडें एकीकडे ठेवीत नाहीं; ४९ तर हें अन्न नसून, निजलेले व्याधिरूप सर्प जागे करण्याकरितां पोटांत केफच घालणें आहे. १५० त्याबरोबर एकमेकांच्या स्पर्धेनें रोग एकदम उठतात, याप्रमाणें राजस अन्नापासून केवळ दुःख हें फळ मिळतें. ५१ हे धनुर्धरा, याप्रमाणें राजस अन्नाचें वर्णन केलें, व त्याच्या परिणामाचाही विचार तुला सांगितला. ५२ आतां, तमोगुणाच्या मनुष्यास जो आहार आवडतो, तोही तुला सांगतों, पण तूं त्याची किळस करशील हो! ५३ तर कुजलेलें व उष्टें अन्न खातांना यापासून अहित होईल; असें त्याच्या मनांतही येत नाहीं! ज्याप्रमाणें म्हैस आंबोण खाते, ५४

**अन्वयार्थ**—(यातयामं)-अर्धें शिजलेलें-(गतरसं)-रसरहित,-(पूति)-दुर्गंधयुक्त,-(पर्युषितं)-शिळें,-(च यत् उच्छिष्टं)-आणि जें उच्छिष्ट-(अपि च)-त्याचप्रमाणें-(अमेध्यं)-यज्ञाला अयोग्य--(भोजनं)--भोजन-अन्न-(तामसप्रियं)-तें तामस लोकांना प्रिय असतें. १०

त्याप्रमाणें, सकाळीं शिजविलेलें अन्न दुपारीं किंवा दुसरे दिवशीं खाण्याची तामस मनुष्यास अति प्रीति असते. ५५ किंवा अर्धे कच्चें अथवा केवळ राखुंडी झालेलें तसेंच ज्यांच्यांतून रस निघून गेला आहे, असें अन्न तो खातो, ५६ जें अन्न पूर्ण पक्व झालेलें व रसभरीत असतें त्याला तामस मनुष्य अन्न असें मुळींच मानीत नाहीं. ५७ असें उत्तम अन्न कदाचित् खाण्याचा प्रसंग आला, तर वाघाप्रमाणें तें अन्न ठेवून त्यास वास येईपर्यंत तो खात नाहीं; ५८ किंवा ज्या अन्नाला बहुत दिवस झाले आहेत असें, रुचि नाहींसें झालेलें, कोरडें झालेलें, किंवा सडलेलें अथवा बुर्शी पडलेलें, ५९ आणि तेंही मुलांनी हातांनी चिखलाप्रमाणें चिवडलेलें असलें, म्हणजे बायको व इतर मंडळी घेऊन गोतावीळ करतो, म्हणजे सर्व मिळून खातो. १६० अशा प्रकारचें पाणेरडें अन्न जेव्हां तो खातो, तेव्हां त्याला सुखाचें भोजन केलेंसें वाटतें. परंतु एवढ्यानेंच त्या पाप्याची तृप्ति होत नाहीं! ६१ चमत्कार पहा की, ज्या वाईट पदार्थावर शास्त्रनिषेधाचा शितोडा पडून ते त्याज्य ठरले आहेत, ६२ त्या अपेयाचें पान करण्याची त्या मनुष्यास अतिशय इच्छा होते. ६३ वीरा अर्जुना, अशा प्रकारें त्या तामस मनुष्याची असले पदार्थ खाण्याची जी आवड असते, त्या आवडीचें फल त्यास तत्क्षणींच मिळतें! ६४ कारण, ज्या वेळीं तो अपवित्र पदार्थांचें सेवन करतो, त्या वेळेसच तो पापास पात्र होतो; ६५ मग जें जेवणें, तें खरोखर जेवण नव्हे, तर पोटांत यातनांची भरच करावयाची असें समजावें. ६६ शिरच्छेद केल्यापासून काय होतें, किंवा अग्नींत उडी घातल्यापासून काय परिणाम होतो, या गोष्टीचा प्रत्यक्ष का अनुभव घ्यावा लागतो? पण पहा—तसलेही परिणाम, तो सहन करतो! ६७ म्हणून, श्रीकृष्ण म्हणतातः—अर्जुना, तामस अन्नाचा

१ क्षणक्षणीत. २ लावतात. ३ वेदना, धार. ४ आवडतें. ५ जिभेनें. ६ दाह. ७ मावत नाहीं. ८ व्याधिरूपी सर्प. ९ निजले. १० जागृत करण्याकरितां. ११ कैफ. १२ स्पर्धेनें. १३ निरूपण. १४ अभिप्राय, विस्तार. १५ किळस. १६ येऊं नका. १७ कुजलेलें. १८ आंबवणाला. १९ दोन प्रहरचें. २० आदले दिवसाचें. २१ प्रीतीनें. २२ निःशेष. २३ पक्व झालेलें, शिजलेलें. २४ अनुभव. २५ कदाचित्. २६ उत्तम अन्नाला. २७ प्राप्त झाला, लाभला. २८ पुष्कळ दिवस झालेले. २९ बुरशी फुगलेलें. ३० हातानें. ३१ चिखल. ३२ एका ताटांत बसून सर्वांनीं जेवणें. ३३ घाणेरेपणानें. ३४ तृप्त होत नाहीं. ३५ शितोडा, सिंचन. ३६ पिण्यास अयोग्य अशा पदार्थांच्या. ३७ इच्छा. ३८ आवड. ३९ तत्क्षणींच मिळते. ४० रीति. ४१ सहन करतो. ४२ वेगळाला.

म्हणे ६८ आतां यावरी । आहाराचिया परी । यज्ञुही अवधारीं । त्रिधा असे ६९ तरी तिहीमाजी प्रथम । सात्त्विक यज्ञाचें वर्म । आईक पां सुमहिम-। शिरोमणी ७०

अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते । यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥११॥

तरी एकु प्रियोत्तमु- । वांचोनि वाढों नेदी कामु । जैसा का मनोधर्मु । पतिव्रतेचा ७१ नाना सिंधूतें ठोकोनि गंगा । पुढारां न करीचि रिगा । का आत्मा देखोनि उगा । वेदु ठेला ७२ तैसें जे आपुल्या स्वहितीं । वेंचूनियां चित्तवृत्ती । नुरवितीचि अहंकृती । फळालागीं ७३ पातलेया झाडाचें मूळ । मागुतें सरों नेणेंचि जळ । जिरालें कां केवळ । तयाच्याचि आंगीं ७४ तैसें मनें देहीं । यजननिश्चयाच्या ठाईं । हारेपोनि जे कांहीं । वांछितीना ७५ तिहीं फळवांच्छात्यागीं । स्वधर्मावांचूनि विरागीं । कीजे जो यज्ञु सवांगीं । अळंकृतु ७६ परी आरिसा आर्पणपें । डोळां जैसे घेपें । कां तळहातींचें दीपें । रत्न पाहिजे ७७ नाना उदितें दिवांकरें । गमावा मार्गु दिठी[12] भरे । तैसा वेदु निर्धारें । देखोनियां ७८ तियें कुंडें मंडप वेदी । आणीकही संभारसमृद्धी । ते मेळवणी जैसी विधी[14] । आर्पणपां केली ७९ सकळावयव उचितें । लेणीं[15] पातलीं जैसीं आंगातें । तैसे पदार्थ जेथिंचे तेथें । विनियोगुनी १८० काय वानूं बहुतीं बोलीं । जैसी सर्वाभरणीं भरली । ते यज्ञविद्याचि रूपा आली । यजनमिषें ८१ तैसा सांगोपांगु । निपजे जो यागु । नुठऊनियां लॅंगु । महत्त्वाचा ८२ प्रतिपाळु तरी पार्टीचा । झाडीं कीजे तुळसीचा । परी फळा फुला छायेचा । आश्रयो नाहीं ८३ किंबहुना फळाशेवीण । ऐसेया निगुती निर्माण । होय तो यागु जाण । सात्त्विकु गा ८४

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् । इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥

आतां यज्ञु कीर वीरेशा । करी पैं यासिऐसा । परी श्राद्धालागीं जैसा । अवंतिला रावो ८५ जरी राजा घरासि ये । तरी बहुत उपेगा जाये । आणि कीर्तीही होये । श्राद्ध न टके ८६ तैसा धरूनि औवांका । म्हणे स्वर्गु जोडेल असिकौ । दीक्षितु होईन मान्यु लोकां । घडेल यागु ८७ ऐसी केवळ फळालागीं । महत्त्व फोकारावया जगीं । पार्था निष्पत्ति जे यागीं । राजस पैं ते ८८

विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणं । श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

आणि पशुपक्षिविवाहीं । जोशी[24] कामापरौता नाहीं । तैसा तामसा यज्ञा

परिणाम निराळा सांगण्याचें कारण नाही. ६८ आतां यापुढें, आहाराप्रमाणें यज्ञ तीन प्रकारचा आहे असें तूं समज. ६९ तर अर्जुना, त्या तीहींमधील सात्विक यज्ञाचें लक्षण प्रथम सांगतों तें ऐक. १७०

**अन्वयार्थ**-(अफलाकांक्षिभिः)-फलाची आकांक्षा न करणाऱ्या लोकांकडून-(यः विधिदृष्टः यज्ञः)-जो शास्त्राच्या विधीनें प्राप्त झालेला यज्ञ-(यष्टव्यं एव इति)-मला अवश्य यज्ञ करावयास पाहिजे असें-(मनः समाधाय)-मनाचें समाधान करून-(इज्यते)-केला जातो-(सः सात्त्विकः) तो सात्त्विक यज्ञ आहे. ११

तर, ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्रीचा मनोधर्म प्रिय पतीवांचून अन्याविषयीं काम वाढूं देत नाहीं; ७१ किंवा गंगा नदी समुद्रास मिळाल्यावर पुढें जाण्याचा प्रयत्न करीत नाहीं, अथवा आत्मस्वरूपाचें दर्शन होतांच वेद स्तब्ध रहातात, ७२ त्याप्रमाणें, आपल्या हिताकरितां चित्ताची वृत्ति अर्पण करून जे फळाच्या आशेनें अहंकार बाळगीत नाहीत. ७३ जसें पाणी झाडाचे मुळाजवळ गेल्यावर मागें परतत नाहीं, पण त्यास मिळून त्याचें पोषण करतें, ७४ तसें जे मनानें व देहानें निश्चय करून यज्ञ करण्यांत निमग्न होतात, परंतु त्यापासून कसल्याही फलाची इच्छा करीत नाहींत. ७५ फलाची इच्छा सोडून, स्वधर्मावांचून इतर गोष्टींविषयी विरक्त होऊन जो सर्वांग परिपूर्ण यज्ञ करतात; ७६ परंतु आपल्या हातांत आरसा घेतल्यावर आपलें स्वरूप जसें डोळ्यांनीं पहातां येतें, किंवा तळहातावरील रत्न दिव्याच्या उजेडानें जसें स्वच्छ दिसतें, ७७ अथवा दिवस उगवल्यावर मार्ग जसा स्पष्ट दिसतो, तसा वेदांत सांगितलेल्या मार्गावर विश्वास ठेवून जे आचरण करतात; ७८ ते कुंड मंडप, वेदी वगैरे यज्ञाची सर्व सामुग्री अशा रीतीनें तयार करतात की, जणुंकाय वेदांनीच स्वतः येऊन तयारी केली आहे. ७९ सर्व अवयवांत जेथल्या तेथें दागिने घातले असतां ते जसें शोभतात, तसे यज्ञाचें सर्व पदार्थ जागचे जागीं नीट व्यवस्थेनें मांडतात; १८० आणखी त्याचें शब्दांनीं किती वर्णन करूं? तर तो यज्ञमंडप पाहिला असतां असें वाटतें की, मूर्तिमंत यज्ञविद्या ही यज्ञाच्या मिषानें या ठिकाणीं आली आहे! ८१ अशा प्रकारें जो यज्ञ सांगोपांग होतो, आणि ज्यांत कसल्याही फलाची इच्छा नसते; ८२ तुळशीच्या झाडापासून फल, पुष्प, छाया यांची प्राप्ती नाहीं, तरी लोक पाटांतील पाण्यानेंही त्याचा प्रतिपाळ करतात. ८३ फार सांगून काय करावयाचें आहे! तर फलाशेशिवाय अशा युक्तीनें जो यथासांग यज्ञ होतो, त्यालाच सात्त्विक यज्ञ असें म्हणतात. ८४

**अन्वयार्थ**--(हे भरतश्रेष्ठ)-हे भरतकुलश्रेष्ठा!-(तु)-पण-(फलं अभिसंधाय)-फलाची इच्छा ठेवून-(च दंभार्थं अपि एव-)-व केवल दंभासाठींहि-(यत्)-जे-(इज्यते)-यजन केलें जातें,-(तं यज्ञं)-त्या यज्ञाला-(राजसं)-राजस यज्ञ-(विद्धि) जाण. १२

आता, हे वीरश्रेष्ठा, दुसऱ्या प्रकारचा जो राजस यज्ञ, तोही याच्या सारखाच करितात; पण श्राद्धतिथीचे दिवशीं सहज राजासही मेजवानीला बोलवावें त्याप्रमाणें! ८५ कारण, जर राजा आपले घरीं भोजनास आला, तर त्यापासून आपल्यास पुष्कळ उपयोग होऊन आपला जगांत लौकिक होईल आणि श्राद्धही थांबवणार नाही. तें पार पडलेंच, एवंच, कामांत काम होऊन जाईल! ८६ त्याप्रमाणें, फलाशा धरून मनांत म्हणतो की, आपल्यास आयतीच स्वर्गप्राप्ति होईल, लोक दीक्षित म्हणून आपल्यास बहुमान देतील, व आपल्या हातून यज्ञासारखें महत्कार्य घडेल! ८७ अशा प्रकारें केवळ फळाची आशा धरून व जगांत कीर्ति व्हावी म्हणून जे यज्ञ होतात, ते अर्जुना, राजस यज्ञ होत. ८८

**अन्वयार्थ**--(विधिहीनं)-शास्त्रोक्त विधीवांचून-(असृष्टान्नं)-ज्यांत अन्नदान केलेलें नाहीं,-(मंत्रहीनं)-मंत्ररहित-(अदक्षिणं)-दक्षिणारहित-(श्रद्धाविरहितं)-श्रद्धाशून्य-(यज्ञं)-यज्ञाला-(तामसं)-तामस यज्ञ-(परिचक्षते)-सांगतात. १३

आणि पशुपक्ष्यांच्या विवाहास कामावांचून जसा दुसरा जोशी लागत नाही, तसा तामस यज्ञाला

१ सुकीर्तिश्रेष्ठा, कीर्तिमानांत वरिष्ठ अशा. २ अर्जुना. ३ येऊन, पोंचून. ४ अर्पण करून. ५ निमग्न होऊन ६ वैराग्यपूर्वक. ७ आरशामध्यें. ८ डोळ्यांनीं आपलें स्वरूप असें पाहिलें जातें. ९ उगवलेल्या. १० दिवस. ११ आण्याचा, पाहिजे तो. १२ दिसतो. १३ यज्ञाची सामग्री. १४ स्वतः विधीनेंच. १५ अलंकार. १६ व्यवस्था करून. १७ इच्छा. १८ उत्तम प्रकारचा. १९ युक्तीनें. २० आमंत्रण देऊन आणला, बोलावला. २१ अवसान, हेतु. २२ आयती. २३ असिद्धयर्थ. २४ उत्पत्ति; सटपट. २५ कामावांचून दुसरा लग्न लावणारा जोशी नाहीं.

म्हणे ६८ आतां यावरी। आहाराचिया परी। यज्ञुही अवधारीं। त्रिधा असे ६९ तरी तिहीमाजी प्रथम। सात्त्विक यज्ञाचें वर्म। आईक पां सुमहिम-। शिरोमणी७०

अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते। यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥११॥

तरी एकु प्रियोत्तमु-। वांचोनि वाढों नेदी कामु। जैसा का मनोधर्मु। पतिव्रतेचा ७१ नाना सिंधूतें ठाकोनि गंगा। पुढारां न करीचि रिगा। का आत्मा देखोनि उगा। वेदु ठेला ७२ तैसें जे आपुल्या स्वहितीं। वेंचूनियां चित्तवृत्ती। नुरवितीचि अहंकृती। फळालागीं ७३ पातलेया झाडाचें मूळ। मागुतें सरों नेणेंचि जळ। जिरालें कां केवळ। तयाऱ्याचि आंगीं ७४ तैसें मनें देहीं। यजननिश्चयाच्या ठाईं। हारपोनि जे कांहीं। वांछितीना ७५ तिहीं फळवांच्छात्यागीं। स्वधर्मावांचूनि विरागीं। कीजे जो यज्ञु सर्वांगीं। अळंकृतु ७६ परी आरिसा आपणपें। डोळां जैसे घेपे। कां तळहातींचें दीपें। रत्न पाहिजे ७७ नाना उदितें दिवाकरें। गमावा मार्गु दिठी[१२] भरे। तैसा वेदु निर्धारें। देखोनियां ७८ तियें कुंडें मंडप वेदी। आणीकही संभारसमृद्धी। ते मेळवणी जैसी विधी[१४]। आपणपां केली ७९ सकळावयव उचितें। लेणीं[१५] पातलीं जैसीं आंगातें। तैसे पदार्थ जेथिंचे तेथें। विनियोगुनी १८० काय वानूं बहुतीं बोलीं। जैसी सर्वाभरणीं भरली। ते यज्ञविद्याचि रूपा आली। यजनमिषें ८१ तैसा सांगोपांगु। निपजे जो यागु। नुठऊनियां लोगु। महत्त्वाचा ८२ प्रतिपाळु तरी पाटीचा। झाडीं कीजे तुळसीचा। परी फळा फुला छायेचा। आश्रयो नाहीं ८३ किंबहुना फळाशेवीण। ऐसेया निगुती निर्माण। होय तो यागु जाण। सात्त्विकु गा ८४

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत्। इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम्॥ १२॥

आतां यज्ञु कीर वीरेशा। करी पैं याचिऐसा। परी श्राद्धालागीं जैसा। अवंतिला रावो ८५ जरी राजा घरासि ये। तरी बहुत उपेगा जाये। आणि कीर्तीही होये। श्राद्ध न टके ८६ तैसा धरूनि ओवांका। म्हणे स्वर्गु जोडेल असिका। दीक्षितु होईन मान्यु लोकां। घडेल यागु ८७ ऐसी केवळ फळालागीं। महत्त्व फोकारावया जगीं। पार्था निष्पत्ति जे यागीं। राजस पैं ते ८८

विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणं। श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते॥ १३॥

आणि पशुपक्षिविवाहीं। जोशी[२५] कामापरौता नाहीं। तैसा तामसा

परिणाम निराळा सांगण्याचें कारण नाहीं. ६८ आतां यापुढें, आहाराप्रमाणें यज्ञ तीन प्रकारचा आहे असें तूं समज. ६९ तर अर्जुना, त्या तीहींमधील सात्त्विक यज्ञाचें लक्षण प्रथम सांगतों तें ऐक. १७०

**अन्वयार्थ**-(अफलाकांक्षिभिः)-फलाची आकांक्षा न करणाऱ्या लोकांकडून-(यः विधिदृष्टः यज्ञः)-जो शास्त्राच्या विधीनें प्राप्त झालेला यज्ञ-(यष्टव्यं एव इति)-मला अवश्य यज्ञ करावयास पाहिजे असें-(मनः समाधाय)-मनाचें समाधान करून-(इज्यते)-केला जातो-(सः सात्त्विकः) तो सात्त्विक यज्ञ आहे. ११

तर, ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्रीचा मनोधर्म प्रिय पतीवांचून अन्यविषयीं काम वाढूं देत नाहीं; ७१ किंवा गंगा नदी समुद्रास मिळाल्यावर पुढें जाण्याचा प्रयत्न करीत नाहीं, अथवा आत्मस्वरूपाचें दर्शन होतांच वेद स्तब्ध रहातो; ७२ त्याप्रमाणें; आपल्या हिताकरितां चित्ताची वृत्ति अर्पण करून जे फळाच्या आशेनें अहंकार बाळगीत नाहींत. ७३ जसें पाणी झाडाचे मुळाजवळ गेल्यावर मागें परतत नाहीं, पण त्यास मिळून त्याचें पोषण करतें, ७४ तसें जे मनानें व देहानें निश्चय करून यज्ञ करण्यांत निमग्न होतात, परंतु त्यापासून कसल्याही फळाची इच्छा करीत नाहींत. ७५ फळाची इच्छा सोडून, स्वधर्माशिवाय इतर गोष्टींविषयीं विरक्त होऊन जो सर्वांग परिपूर्ण यज्ञ करतात; ७६ परंतु आपल्या हातांत आरसा घेतल्यावर आपलें स्वरूप जसें डोळ्यांनी पहातां येतें, किंवा तळहातावरील रत्न दिव्याच्या उजेडानें जसें स्वच्छ दिसतें, ७७ अथवा दिवस उगवल्यावर मार्ग जसा स्पष्ट दिसतो, तसा वेदांत सांगितलेल्या मार्गावर विश्वास ठेवून जे आचरण करतात; ७८ ते कुंड मंडप, वेदी वगैरे यज्ञाची सर्व सामुग्री अशा रीतीनें तयार करतात की, जणुंकाय वेदांनीच स्वतः येऊन तयारी केली आहे. ७९ सर्व अवयवांत जेथल्या तेथें दागिने घातले असतां ते जसे शोभतात, तसे यज्ञाचे सर्व पदार्थ जागचे जागीं नीट व्यवस्थेनें मांडतात; १८० आणखी त्याचें शब्दांनी किती वर्णन करूं ? तर तो यज्ञमंडप पाहिला असतां असें वाटतें की, मूर्तिमंत यज्ञविद्या ही यज्ञाच्या मिषानें या ठिकाणीं आली आहे ! ८१ अशा प्रकारें जो यज्ञ सांगोपांग होतो, आणि ज्यांत कसल्याही फलाची इच्छा नसते; ८२ तुळशीच्या झाडापासून फल, पुष्प, छाया यांची प्राप्ती नाही, तरी लोक पाटांतील पाण्यानेंही त्याचा प्रतिपाळ करतात. ८३ फार सांगून काय करावयाचें आहे ! तर फलाशेशिवाय अशा युक्तीनें जो यथासांग यज्ञ होतो, त्यालाच सात्त्विक यज्ञ असें म्हणतात. ८४

**अन्वयार्थ**--(हे भरतश्रेष्ठ)-हे भरतकुलश्रेष्ठा !-(तु)-पण-(फलं अभिसंधाय)-फलाची इच्छा ठेवून-(च दंभार्थं अपि एव-)-व केवल दंभासाठींहि-(यत्)-जें-(इज्यते)-यजन केलें जातें,-(तं यज्ञं)-त्या यज्ञाला-(राजसं)-राजस यज्ञ-(विद्धि) जाण. १२

आता, हे वीरश्रेष्ठा, दुसऱ्या प्रकारचा जो राजस यज्ञ, तोही याच्या सारखाच करितात; पण श्राद्धतिथीचे दिवशीं सहज राजासही मेजवानीला बोलवावें त्याप्रमाणें ! ८५ कारण, जर राजा आपले घरीं भोजनास आला, तर त्यापासून आपल्यास पुष्कळ उपयोग होऊन आपला जगांत लौकिक होईल आणि श्राद्धही थांबवणार नाहीं. तें पार पडलेंच, एवंच, कामांत काम होऊन जाईल ! ८६ त्याप्रमाणें, फलाशा धरून मनांत म्हणतो की, आपल्यास आयतीच स्वर्गप्राप्ति होईल, लोक दीक्षित म्हणून आपल्यास बहुमान देतील, व आपल्या हातून यज्ञासारखें महत्कार्य घडेल ! ८७ अशा प्रकारें केवळ फळाची आशा धरून व जगांत कीर्ति व्हावी म्हणून जे यज्ञ होतात, ते अर्जुना, राजस यज्ञ होत. ८८

**अन्वयार्थ**--(विधिहीनं)-शास्त्रोक्त विधीवांचून-(असृष्टान्नं)-ज्यांत अन्नदान केलेलें नाहीं,-(मंत्रहीनं)-मंत्ररहित-(अदक्षिणं)-दक्षिणारहित-(श्रद्धाविरहितं)-श्रद्धाशून्य-(यज्ञं)-यज्ञाला-(तामसं)-तामस यज्ञ-(परिचक्षते)-सांगतात. १३

आणि पशुपक्ष्यांच्या विवाहास कामावांचून जसा दुसरा जोशी लागत नाहीं, तसा तामस यज्ञाला

१ सुकीर्तिश्रेष्ठा; कीर्तिमानांत वरिष्ठ अशा. २ अर्जुना. ३ येऊन, पोंचून. ४ अर्पण करून. ५ निमग्न होऊन ६ वैराग्यपूर्वक. ७ आरशामध्यें. ८ डोळ्यांनीं आपलें स्वरूप जसें पाहिलें जातें. ९ उगवल्या. १० दिवस. ११ आपल्याचा, पाहिजे तो. १२ दिसतो. १३ यज्ञाची सामग्री. १४ स्वतः विधीनेंच. १५ अलंकार. १६ व्यवस्था करून. १७ इच्छा. १८ उत्तम प्रकारचा. १९ युक्तीनें. २० आमंत्रण देऊन आणला, बोलावला. २१ अवसान, हेतु. २२ आयता. २३ प्रसिद्धयर्थ. २४ उघड, स्पष्ट. २५ कामावांचून दुसरा लग्न लावणारा जोशी नाहीं.

किंबहुना सांडावे । छेद भेद १२ ऐसैसी जैं शरीरीं । राहाटीची पडे उजरी । तैं शारीर तप घुमेरी[2] । आलें जाण १३ पार्थां समस्तही हें करणें । देहाचेनि प्रधानपणें[3] । म्हणौनि ययातें मी म्हणें । शारीर तप १४ एवं शारीर जें तप । तयाचें दाविलें रूप । आतां आईक निष्पाप । वाङ्मय तें १५

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् । स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥१५॥

तरी लोहाचें आंग तुकें । न तोडितांचि कनक । केलें जैसें देख । परिसें तेणें १६ तैसें न दुखवितां सेजे । जांवलिया सुख निपजे । ऐसें साधुत्व का देखिजे । बोलणां जिये १७ पाणी मुदल झाडा जाये । तृण ते प्रसंगेंचि जिये । तैसें एका बोलिलें होये । सर्वांहि हित १८ जोडे अमृताची सुरसरी । तैं प्राणांतें अमर करी । स्नानें पाप ताप वारी । गोडीही दे १९ तैसा अविवेकुही फिटे । आपुलें अनादित्व भेटे । आइकतां रुचि न विटे । पीयुषीं जैसी २० जरी कोणी करी पुसणें । तरी होआवें ऐसें बोलणें । नातरी आंवर्तणें । निगमु का नाम २१ ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठीजती वाग्भुवनीं । केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा २२ नातरी एकाधें नांव । तेंचि शैव का वैष्णव । वाचे वसे तें वाग्भव । तप जाणावें २३ आतां तप जें मानसिक । तेंही सांगों आइक । म्हणे लोकनाथनायक । नायकु तो २४

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः । भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

तरी सरोवर तरंगीं । सांडिलें आकाश मेघीं । कां चंदनाचें उरगीं । उद्यान जैसें २५ नाना कळावैषम्यें चंद्रु । कां सांडिला आंधीं नरेंद्रु । नातरी क्षीरसमुद्र । मंदराचळें २६ तैसीं नाना विकल्पजाळें । सांडूनि गेलिया सकळें । मन राहे कां केवळें । स्वरूपें जें २७ तपनेंवीण प्रकाशु । जाड्येंवीण रसीं रसु । पोकळीवीण अवकाशु । होय जैसा २८ तैसी आपली सोयें देखे । आणि आपलिया स्वभावा मुके । हिंवली जैसी आंगिकें । हिंवों नेदी २९ मग नव्हलतें कळंकेंवीण । शशिबिंब जैसें परिपूर्ण । तैसें चोखी शृंगारपण । मनाचें जें ३० बुजाली वैराग्याची वोरपें । जिराली मनाची धांप कांप । तेथ केवळ जाली वाफ । निजबोधाची ३१ म्हणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र । तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरी ३२ तें स्वलाभ लाभलेपणें । मन मनपणाही धरूं नेणें । शिवतिलें जैसें लवणें । आपुलें निजें ३३ तेथ कें

घेत नाहीं; फार काय, परंतु जो कोणालाही टाकून किंवा वर्मी लागेल असें बोलत नाहीं; १२ अशा प्रकारें शरीरानें व्यापार करण्याची ज्या वेळेस संवय होते, त्या वेळेस त्याचे अंगांत शारीर तप पूर्णपणें ठसलें आहे, असें समज. १३ पार्था, या सर्व गोष्टी देहाच्या प्राधान्यानें घडून येतात, म्हणून मी यास शारीर ( कायिक ) तप असें म्हणतों. १४ याप्रमाणें शारीरतप ज्यास म्हणतात, त्याचीं लक्षणें तुला सांगितलीं. आतां, निष्पाप असें जें वाचिक तप, त्याचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. १५

**अन्वयार्थ**—(यत्)—जें—(अनुद्वेगकरं)—प्राण्यांच्या मनांत दुःख उत्पन्न न करणारें,—(सत्यं)—खरें,—(च प्रियहितं)—व प्रिय आणि हितकर—(वाक्यं)—वाक्य—(च)—व—(स्वाध्यायाभ्यसनं एव)—यथाविधि वेदशास्त्राध्ययन—(वाङ्मयं तपः)—हें वाङ्मय तप—(उच्यते)—सांगितलें जातें. १५

तर, असें पहा कीं, परिस लोखंडाचा आकार व वजन हीं कमी न करतां ज्याप्रमाणें त्याचें सोनें करितो, १६ त्याप्रमाणें ज्याशीं बोलावयाचें, त्याचेजवळ असणाऱ्या दुसऱ्या मनुष्यास दुःख न होतां सहज सुख व्हावें, अशी ज्या बोलण्याची शक्ति आहे; १७ वस्तुतः पाणी झाडास दिलें जातें, पण त्यायोगें त्याच्याजवळ असणारें गवत सहज वाढतें, तसें एकास बोलतेवेळीं त्या बोलण्यापासून सर्वांचें हित होतें; १८ अमृताची गंगा प्राप्त झाली असतां ती प्राण्यास जशी प्राशनानें अमर करते, स्नानानें पाप नाहींसें करून संसारतापापासून मुक्त करते, व गोडीही देते, १९ त्याप्रमाणें, अज्ञान नाहींसें होऊन आत्मस्वरूपाची भेट होते, व पुष्कळ वेळ ऐकल्यानें अमृताप्रमाणें ज्याची रुचि विघडत नाहीं; २२० जर कोणी प्रश्न केला तर अशा प्रकारें भाषण करतात; नाहीं तर वेदाचें अध्ययन अथवा हरिस्मरण करतात. २१ ऋग्वेदादि तिन्ही वेदांची वाचारूप मंदिरांत प्राणप्रतिष्ठा करून जे आपल्या वदनाची वेदशाळाच करतात; २२ किंवा शिव अथवा विष्णु यांपैकीं एकाचें नामस्मरण करणें, हेंच वाचेपासून उत्पन्न झालेलें वाचिक तप असें जाणावें. २३ आतां मानसिक तपाचीं लक्षणें सांगतों तीं ऐक, असें लोकनाथांचा नायक जो श्रीकृष्ण परमात्मा तो म्हणाला. २४

**अन्वयार्थ**—(मनःप्रसादः)—मनाची अत्यंत शांति प्रसन्नता,—(सौम्यत्वं)—सौम्यता,—(मौनं)—न बोलण्याविषयीं मनाचा संयम,—(आत्मविनिग्रहः)—सामान्यतः सर्व बाजूंनीं मनाचा निरोध करणें,—(भावसंशुद्धिः)—मनाचा निष्कपटपणा—(इति एतत् तपः)—हें अशा प्रकारचें तप—(मानसं)—मानस तप—(उच्यते)—म्हटलें जातें. १६

तर, लाटांशिवाय सरोवर, किंवा अभ्रांशिवाय स्वच्छ असलेलें आकाश, किंवा सर्पांनीं सोडलेली चंदनाची बाग, २५ अथवा पूर्णचंद्र, चिंतारहित राजा, अथवा जसा मंदराचलाशिवाय असलेला क्षीरसमुद्र. २६ तसे अनेक कल्पनातरंग अगदीं निःशेष नाहींतसे झाल्यावर, मन जें शुद्धस्वरूपीं निमग्न होऊन रहातें; २७ अथवा उष्णतेवांचून प्रकाश, आच्यावांचून अन्न, आणि पोकळीशिवाय असलेली वस्तु; २८ तसेंच आपलें स्वरूप जाणून जो आपला स्वभाव टाकतो; थंडीनें थंडीचें अंग कांकडल्यावर ज्याप्रमाणें थंडीची बाधा होत नाहीं; २९ मग, अचल आणि कलंकरहित असें चंद्राचें बिंब जसें पूर्ण असतें तसें आत्मस्वरूपीं जें मन स्थिर झालेलें असतें, २३० वैराग्याची इच्छा नाहींशी झाली आहे, आणि मनाची धाव व भीति जेथें कमी झाली आहे, तेथें बोधस्वरूपी मन होतें. ३१ म्हणून, शास्त्राचा विचार करण्यास ज्या मुखास शीण यावयाचा, ( ज्या मुखानें शास्त्राध्ययन करावयाचें, ) तें मुख वाचेचें सूतही हातीं धरीत नाहीं, ( भाषणविरहित मौनसंपन्न असतें. ) ३२ त्या मनाला आत्मस्वरूपाचा लाभ झाल्यामुळें ज्याप्रमाणें मीठ आपलें मूळ स्वरूप जें पाणी, त्यांत घातलें असतां तद्रूप होतें, त्याप्रमाणें तें संकल्पविकल्प सोडून देतें. ३३ अशा वेळेस त्या मनांत

१ संवय. २ पिकाच्या भरास. ३ द्वारें. ४ वाचिक. ५ आकार, वजन. ६ जवळच्या, दुसऱ्याला. ७ सरळपणा. ८ सुरसरित्-गंगा. ९ अज्ञान. १० आत्मस्वरूप. ११ अमृत घेतांना. १२ अध्ययन. १३ वेद. १४ वाचारूपी मंदिरांत. १५ वेदशाळा. १६ शिव. १७ विष्णु. १८ वाचेपासून झालेलें, वाचिक. १९ इंद्रादिक लोकनायकांचा धनी—कृष्ण. २० लाटांनीं. २१ सापांनीं. २२ बाग. २३ कमजास्त कल्पांनीं. २४ चिंतेनें, मनस्तापानें. २५ राजा. २६ उष्णतेवांचून. २७ वस्तु. २८ स्वरूप. २९ जाणून. ३० शरीरावयव. ३१ आत्मस्वरूपी. ३२ स्थिरपणा. ३३ इच्छा. ३४ धडपडणें. ३५ कंप. ३६ रूपमय. ३७ संकल्पविकल्प. ३८ मनाचें ठिकाणीं मनपण रहात नाहीं, उन्मन होणें. ३९ स्पर्शिलें, ४० आपली मूळप्रकृति—स्वरूप—पाणी.

उठिती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव । घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे ते ३४ म्हणौनि तिये मानसीं । भावशुद्धिचि असे अपैसी । रोमशुचि जैसी । तळहातासी ३५ काय बहु बोलों अर्जुना । जैं हे दशा ये मना । तैं मनस्तपोभिधाना । पात्र होय ती ३६ परी तें असो हें जाण । मानस तपाचें लक्षण । देवो म्हणे संपूर्ण । सांगितलें ३७ एवं देहवाचाचित्तें । जें पातलें त्रिविधत्वातें । तें सामान्य तप तूतें । परिसविलें गा ३८ आतां गुणत्रयसंगें । हेंचि विशेषीं त्रिविधीं रिगें । तेंही आइक चांगें । प्रज्ञाबळें ३९

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः । अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

तरी हेंचि तप त्रिविधा । जें दाविलें तुज प्रबुद्धा । तेंचि करीं पूर्णश्रद्धा । सांडूनि फळ २४० जैं पुरंतिया सत्त्वशुद्धी । आचरिजे आस्तिक्यबुद्धी । तैं तयातेंचि गा प्रबुद्धी । सात्त्विक म्हणिपे ४१

सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् । क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

नातरी तपस्थापनेलागीं । दुजेपण मांडूनि जगीं । महत्त्वाद्रीच्या शृंगीं । बैसावया ४२ त्रिभुवनींचिया सन्माना । न वचावें ठाया आना । धुरेचिया आसना । भोजनालागीं ४३ विश्वाचिया स्तोत्रा । आपण होआवया पात्रा । विश्वें आपलिया यात्रा । कराविया यावें ४४ लोकांचिया विविधा पूजा । आश्रयो न धरावया दुजा । भोग भोगावे वोजां । महत्त्वाचिया ४५ अंगें वोल माखूनि तपें । विकावया ओपणपें । अंगेंहीन पडपे । जियापरी । ४६ हें असो धनमानीं आस । वाढउनी तप कीजे सायास । तैं तेंचि तप राजस । बोलिजे गा ४७ परी पहुरणी जें दुहिलें । तैं तें गुरूं न दुभेचि व्यालें । का उभें शेत चारिलें । पिकावया नुरे ४८ तैसें फोकारितां तप । कीजे जें साक्षेप । तें फळीं तंव सोपें । निःशेष जाय ४९ ऐसें निर्फळ देखोनि करितां । माझारीं सांडी पंडुसुता । म्हणौनि नाहीं स्थिरता । तपा तया २५० एऱ्हवी तरी आकाश मांडी । जो गर्जोनि ब्रह्मांड फोडी । तो अवकाळु मेघु काय घडी । राहात आहे ५१ तैसें राजस तप जें होये । तें फळीं कीर वांझ जाये । परी आचरणींही नोहे । निर्वाहतें गा ५२ आतां तेंचि तप पुढती । तामसाचियें रीतीं । पैं परत्रा आणि कीर्ती । मुकोनि कीजे ५३

मूढग्राहेणाऽऽत्मनो यत्पीडया क्रियते तपः । परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥

पाउलें जैसीं ४९ हारपलें न देखिजे । तंव तयाचा मागु न सांडिजे । का तृप्त न होतां न लोटिजे । भाणें जेवीं १५० नाव थडी न पवतां । न खांडिजे केळी न फळतां । का ठेविलें न दिसतां । दीपु जैसा ५१ तैसी आत्मज्ञानविखीं । जंव निश्चिती नाहीं निकी । तंव नोहावें यागादिकीं । उदासीन ५२ तरी स्वाधिकारानुरूपें । तियें यज्ञदानें तपें । अनुष्ठावींचि सांक्षेपें । अधिकेंवर ५३ जें चालणें वेगांवत जाये । तो वेगु बैसावयाचि होये । तैसा कर्मातिशयो आहे । नैष्कर्म्यालागीं । ५४ अधिकें जंव जंव औषधी । सेवनेंचि मांडी बांधी । तंव तंव मुकिजे व्याधी । तयाचिये ५५ तैसीं कर्में हातोपातीं । जें कीजती यथानिगुती । तैं रजतमें झडती । झाडा देऊनी ५६ का पाठोवाटीं पुटें । भांगारा खारु देणें घटे । तैं कीडें झडकरी तुटे । निर्व्याजु होय ५७ तैसे निष्ठा केलें कर्म । तें झाडी करूनि रजतम । सत्त्वशुद्धीचें धाम । डोळां दावी ५८ म्हणोनियां धनंजया । सत्त्वशुद्धी गिंवसितया । तीर्थांचिया सावाया । आलीं कर्मे ५९ तीर्थे बाह्यमळु क्षाळे । कर्में अभ्यंतर उजळे । एवं तीर्थें जाण निर्मळें । सत्कर्मेंची १६० तृषार्तां मरुदेशीं । झंळे अमृतें वोळेलीं जैसीं । कीं अंधालागीं डोळयांसीं । सूर्यु आला ६१ बुडतया नदीच धाविन्नली । पडतया पृथ्वीच कळवळिली । निमतेया मृत्यूनें दिधली । आयुष्यवृद्धी ६२ तैसें कर्में कर्मबद्धता । मुमुक्षु सोडविले पंडुसुता । जैसा रसेंरीति मरतां । राखिला विषें ६३ तैसीं एके हातवटिया । कर्में कीजती धनंजया । बंधकेंचि सोडवावया । मुख्यें होती ६४ आतां तेंचि हातवटी । तुज सांगों गोमटी । जया कर्मातें किरीटी । कर्मेचि रुसे ६५

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च । कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥६॥

तरी महायागप्रमुखें । कर्में निफजतांही अचुकें । कर्तेपणाचें न ठाके । फुंजणें आंगीं ६६ जो मोलें तीर्था जाये । तया मी यात्रा करितु आहें । ऐसिये श्लाघ्यतेचा नोहे । तोषु जेवीं ६७ का मुद्रा समर्थाचिया । जो एकवेंटु झोंबे राया । तो मी जिणेता ऐसिया । नयेची गर्वा ६८ जो कांसे लागोनि तरे । तया पोंहती उर्मी नुरे । पुरोहितु नाविष्करे । दातेपणें ६९ तैसें कर्तृत्व अहंकारें । नेघोनि यथा अवसरें । कृत्यजातांचे मोहरें सारीजेंती १७० केल्या कर्मा पांडवा । जो आथी फळाचा यावा । तया मोहरा हों नेदावा । मनोरथु ७१ आधींचि फळीं आस तुटिया । कर्में आरंभावीं धनंजया । परावें बाळ धायां ।

मयेत. ४९ हारवलेला जिन्नस सांपडेपर्यंत जसा त्याचा मार्ग सोडतां येत नाहीं; अथवा पोट भरल्याशिवाय जसें आपल्या पुढील पान दूर सारतां येत नाहीं. १५० किंवा नाव नदीचे कांठास पोहोंचल्याखेरीज मध्येंच सोडतां येत नाहीं, अथवा केळीं आल्याशिवाय केळीचें झाड कापतां येत नाहींत; किंवा ज्याप्रमाणें ठेवलेली वस्तु सांपडल्याशिवाय दिवा मालवितां येत नाहीं, ५१ त्याप्रमाणें, आत्मज्ञानाविषयीं दृढ निश्चय झाला नाहीं, तोंपर्यंत यागादिक कर्में करण्याविषयीं उदासीन होऊं नये. ५ तर आपल्या अधिकाराप्रमाणें यज्ञ, दान व तप यांचें यथाविधि बरचेवर आचरण केलेंच पाहिजे. ५३ जो चालण्याची त्वरा करतो, त्याला तीच त्वरा विसांवा घेण्यास उपयोगी पडते; तसें कर्माचें अधिक आचरण करणें हें कर्मत्यागास उपयोगी पडतें. ५४ एकादा रोगी औषध घेण्याविषयीं जों जों अधिकाधिक तयार होतो, तों तों तो रोगापासून मुक्त होत जातो; ५५ त्याप्रमाणें, जों जों कर्में विधिपूर्वक लवकर लवकर करावीं, तों तों रज व तम हे गुण समूळ नाहींतसें होतात, ५६ अथवा, सोन्यास एकामागून एक, जेव्हां खाराचीं पुटें द्यावीं, तेव्हां त्याचा हिणकटपणा जाऊन तें शुद्ध होतें; ५७ तसें निष्ठेनें कर्माचें आचरण केलें असतां, तें रज व तम यांचा नाश करून सत्वशुद्धीचें दर्शन करून देतें. ५८ म्हणून अर्जुना, सत्त्वशुद्धि प्राप्त होण्यास सत्कर्मे हींच तीर्थांची योग्यता पावतात. ५९ तीर्थांनीं बाह्य मलाचें क्षालन होतें, आणि कर्मांच्या योगें अंतर्मल नाहींसा होतो. एवंच, सत्कर्में हींच चित्तशुद्धीस तीर्थे होत. १६० तहान लागलेल्या मनुष्यास मारवाड देशांत जसा एकादा अमृताचा-पाण्याचा झरा सांपडावा, किंवा अंधळ्याच्या डोळ्यांत सूर्याचें तेज यावें; ६१ बुडणाऱ्यास तारण्याकरितां नदीनेंच धांवावें, पडणाराला जसें पृथ्वीनेंच झेलावें अथवा मरणारास मृत्यूनेंच आयुष्यवृद्धि द्यावी; ६२ त्याप्रमाणें कर्मांपासून मुमुक्षूस होणारी पीडा कर्मांनींच दूर करावी. अथवा हे अर्जुना, रसायन करण्याची ज्यास युक्ति माहीत आहे, तो वैद्य, ज्याप्रमाणें विष शुद्ध करून त्याचें अमृत करून मरणाराचें रक्षण करतो, ६३ त्याप्रमाणें, धनंजया, युक्तीनें कर्मे केलीं असतां तीं बाधक असूनही मुक्त करण्यास कारणीभूत होतात. ६४ तर अर्जुना, जिच्यायोगें कर्मांपासूनच कर्मांचा नाश होतो, ती युक्ति कोणती ती तुला उत्तम रीतीनें सांगतों. ६५

**अन्वयार्थ**--(तु)-पण-(हे पार्थ)-हे अर्जुना !-(एतानि कर्माणि अपि)-हीं कर्में सुद्धां-(संगं च फलानि त्यक्त्वा)-कर्तृत्वाभिमान व फलें टाकून-(कर्तव्यानि)-करावीं-(इति)-असें-(मे)-माझें-(निश्चितं उत्तमं मतं)-निश्चित उत्तम मत आहे. ६

तर पंचमहायज्ञादि प्रमुख कर्में यथाविधि घडत असतां जो कर्तृत्वाचा अभिमान बाळगीत नाहीं; ६६ जो मोलानें ( दुसऱ्याजवळून पैसे घेऊन ) तीर्थयात्रा करतो, त्याला मी यात्रा करीत आहें, असा, मोठेपणाचा हर्ष होत नाहीं; ६७ किंवा राजशिक्क्याच्या बळावर जो एकटा राजासही पकडून आणतो त्याला मी या राजास जिंकलें, असा गर्व होत नाहीं; ६८ जो, दुसऱ्याच्या कांसेस लागून नदी उतरून पलीकडे जातो, त्याला मी पोहणारा आहें, असा गर्व होत नाहीं; किंवा ज्याप्रमाणें राजाचे उपाध्यायास राजाकरितां दुसऱ्यास आपल्या हातानें दिलेल्या दानाबद्दल अभिमान वाटत नाहीं ६९ त्याप्रमाणें कर्तृत्वाचा अभिमान न बाळगितां, ज्या ज्या वेळीं जीं जीं कर्मे करावयाचीं, तीं तीं यथाविधि जो करितो; १७० हे पांडवा, केलेल्या कर्माची जी फलप्राप्ति व्हावयाची तिच्याविषयीं जो आपले मनांत इच्छा उत्पन्न होऊं देत नाहीं; ७१ हे धनंजया, प्रथम फळाची आशा सोडून निष्काम कर्मास आरंभ करावा; ज्याप्रमाणें दुसऱ्याचें लेंकरूं पाहून त्याचे ठिकाणीं प्रीति

१ शोध. २ भोजनताट. ३ कडेस. ४ चांगली. ५ यथाविधि. ६ बरचेवर. ७ वाढत. ८ कमर बांधतो, अवसान धरतो. ९ लवकर, वारंवार. १० विधिपूर्वक. ११ एका मागें एक. १२ सोन्याला. १३ हीण. १४ निर्दोष, शुद्ध. १५ स्थान. १६ सत्त्वशुद्धीची इच्छा करणाऱ्या. १७ बरोबरीस, सादृश्यास. १८ शरीरावरचा मळ. १९ मारवाड देशांत. २० झरे. २१ उदकानें. २२ झेलती. २३ मरणारास. २४ रसायनक्रियेच्या गुणामुळें. २५ हातोटीनें. २६ दूर करी. २७ पंचमहायज्ञ. २८ गर्व, अहंकार. २९ स्तुतीचा, प्रतिष्ठेचा. ३० शिक्का. ३१ एकटा. ३२ जिंकणारा. ३३ पोहण्याचा अभिमान. ३४ राजोपाध्याय. ३५ आवेश बाळगीत नाहीं. ३६ न घेऊन. ३७ बुद्धीबळांतील मोहऱ्याप्रमाणें प्रसंग. ३८ पूर्ण करतो. ३९ प्राप्ति. ४० मार्गी. ४१ आशा. ४२ दुसऱ्याचें. ४३ संतोषास्तव.

का बुडोनि प्राण गेले । ते अधोदकीं निमाले । हें म्हणों नये जाहलें । दुर्मरणचि ९४ तैसें देहाचेचि लोभें । जेणें कर्मा पाणी सुंभे । तेणें सांच न लभे । त्यागाचें फळ ९५ किंबहुना आपुलें । जैं ज्ञान होय उदया आलें । तैं नक्षत्रातें पाहलें । गिळी जैसें ९६ तैसा सकारण क्रिया । हारपती धनंजया । तो कर्मत्यागु ये जया । मोक्षफळासी ९७ तें मोक्षफळ अज्ञाना । त्यागिया नाहीं अर्जुना । म्हणोनि तो त्यागु न माना । राजसु तो ९८ तरी कोणे पां एथ त्यागें । तें मोक्षफळ घर रिघे । हेंही आइक प्रसंगें । बोलिजेल ९९

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन । सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्विको मतः ॥९॥

तरी स्वाधिकाराचेनि नांवें । जें वांटिया आलें स्वभावें । तें आचरे विधिगौरवें । शृंगारोनि २०० परी हें मी करितु असें । ऐसा आठवु त्यजी मानसें । तैसेचि पाणी दे आशे । फळाचिये १ पैं अवज्ञा आणि कामना । मातेच्या ठायीं अर्जुना । केलिया दोनी पतना । हेतु होती । २ तरी दोनीं यें त्यजावीं । मग मातांचि ते भजावी । वांचूनि मुखालागीं बाळावी । गायचि सगळी ३ आवडतियेही फळीं । असारें साली ओंठोळी । त्यासाठीं अवंगळी । फळातें कोण्ही ४ तैसा कर्तृत्वाचा मेंदु । आणि कर्मफळाचा आस्वादु । या दोहींचें नांव बंधु । कर्माचा कीं ५ तरी या दोहींच्या विखीं । जैसा बापु नातळे लेंकीं । तैसा हों न शके दुःखी । विहिता क्रिया ६ हा तो त्याग तरुवरु । जो गा मोक्षफळें ये थोरु । सात्त्विक ऐसा डंगरु । यासींचि जगीं ७ आतां जाळूनि बीज जैसें । झाडा कीजे निर्वंशें । फळ त्यागूनि कर्म तैसें । त्यजिलें जेणें ८ लोह लागतखेंवो परिसीं । धातूची गंधिकालिमा जैसी । जाती रजतमें तैसीं । तुटलीं दोन्ही ९ मग सत्त्वें चोखाळें । उघडती आत्मबोधाचे डोळे । तेथ मृगांबु सांजवेळे । होय जैसें २१० तैसा बुद्ध्यादिकांपुढां । असतु विश्वाभासु हा येवढा । तो न देखे कवणीकडां । आकाश जैसें ११

न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते । त्यागी सत्त्वसमाविष्टो मधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥

म्हणोनि प्राचीनाचेनि बळें । आलीं कृत्यें कुशलाकुशलें । तियें व्योमीं आंगीं आभाळें । विरालीं जैसीं १२ तैसीं तयाचिये दिठी । कर्में चोखाळलीं किरीटी । म्हणोनि सुखदुःखीं उठी । पडेना तो १३ तेणें शुभकर्म जाणावें । मग तें हर्षें करावें । का अशुभालागीं होआवें । द्वेषिया ना १४ तरी इयाविषयींचा कांहीं ।

किंवा एकाद्याचा पाण्यांत बुडून प्राण गेला असतां त्यानें जलसमाध घेतली असें म्हणतां येत नाहीं, तर त्याचें तें अपघातांचेंच मरण असें म्हटलें पाहिजे. ९४ त्याप्रमाणें देहावर प्रीति ठेवून ज्यानें कर्मावर पाणी सोडलें, त्याला कर्मत्यागाचें फल खास मिळत नाहीं. ९५ किंबहुना, ज्याला आत्मज्ञानाची प्राप्ति झाली आहे, त्याला सूर्योदय झाल्यावर ज्याप्रमाणें नक्षत्राचें तेज लोपतें, ९६ त्याप्रमाणें, अर्जुना, ज्या कर्मत्यागापासून अज्ञानासह क्रियांचा लोप होतो, त्यापासून मोक्षप्राप्ति होते. ९७ अर्जुना, ती मोक्षप्राप्ति अज्ञानानें कर्माचा त्याग केला असतां होत नाहीं, म्हणून तो खरा कर्मत्याग नसून राजस त्याग होय. ९८ तर कोणत्या त्यागापासून मोक्षप्राप्ति आपल्या घरीं चालत येते, तेंही प्रसंगानुरोधानें तुला सांगतों, तें ऐक. ९९

**अन्वयार्थ**—(अर्जुन)-हे अर्जुना !-(यत् नियतं कर्म) जें नित्य कर्म-(कार्यं इति एव)-हें मला अवश्य करावयास पाहिजे असें समजूनच-(संगं च फलं त्यक्त्वा एव)-आसक्ति व फल सोडूनच-(क्रियते)-केलें जातें-(सः त्यागः)-तो त्याग -(सात्त्विकः मतः)-सात्त्विक मानलेला आहे. ९

तर आपल्या अधिकारानुरूप जें सहज आपल्या वांट्यास आलेलें कर्म, तें साहिल्यासह गौरवानें यथाविधि आचरण करितो; २०० परंतु हें कर्म मी करीत आहें, अशी मनांत आठवणही होऊं देत नाहीं; तसेंच फळाच्या आशेवरही पाणी सोडतो; १ अर्जुना, असें पहा कीं, मातेची अवज्ञा केली व तिच्याविषयीं मनांत कामवासना उत्पन्न होऊं दिली, तर या दोन्ही गोष्टी नरकप्राप्तीस कारण होतात; २ तर त्या दोन्ही वर्ज करून मातेची सेवा करावी, गाईचें तोंड अपवित्र असेल म्हणून गाईच्या सर्वांगाचा त्याग करावयाचा कीं काय ? ३ आपल्यास आवडतें जें फळ ( आंबा ) त्याची साल व कोय यांमध्यें रस नाहीं, हे दोन दुर्गुण त्याचे ठिकाणीं आहेत, म्हणून तो आंबा कोणी टाकून देईल काय ? ४ त्याप्रमाणें, कर्म केल्याचा अभिमान आणि कर्मफलाची इच्छा या दोहोंसच बंध असें नांव आहे. ५ म्हणून बाप ज्याप्रमाणें आपल्या कन्येविषयीं, इच्छा बाळगीत नाहीं, त्याप्रमाणें विहित कर्माचें आचरण करून जो या दोहोंविषयीं इच्छा करीत नाहीं, त्याला दुःख होऊं शकत नाहीं. ६ हा त्यागरूप वृक्ष सर्व वृक्षांत श्रेष्ठ असून, याला च्या मोक्षरूप मोठाली फळें येतात म्हणून सर्व जगांत हा सात्त्विक त्याग अशी प्रसिद्धी आहे. ७ आतां, झाडाचें बीज जाळून झाडांस जसें निर्वंश करावें तसें फलाचा त्याग करून जो कर्माचा त्याग करतो; ८ ज्याप्रमाणें परिसाचा स्पर्श होतांक्षणींच लोखंडाचा कलंक व रंगही बदलतात, त्याप्रमाणें कर्मकर्तृत्वाचा अभिमान आणि कर्मफलाची इच्छा या दोन गोष्टींचा त्याग केल्यावर रज व तम हे दोन्ही त्याग नाहींतसे होतात ९ मग शुद्ध सत्त्वानें आत्मबोधाचा उजेड होऊन जसें संध्याकाळीं मृगजळ आपोआप नाहींसें होतें, २१० किंवा आकाश ( पोकळी ) जसें कोणीकडे दिसत नाहीं; तसा ज्ञानाच्यापुढें जगाचा मोठा मिथ्याभास दिसत नाहीं. ११

**अन्वयार्थ**—(अकुशलं कर्म)-संसाराला कारण होणाऱ्या काम्यादि कर्मांचा-(न द्वेष्टि)-द्वेष करीत नाहीं.-(कुशलें न अनुषज्जते)-चित्तशुद्धीच्या द्वारा मोक्षाला कारण होणाऱ्या नित्यकर्मांमध्य आसक्त होत नाहीं तर तो-(त्यागी)-संग व फल यांचा त्याग करून नित्यकर्मांचें अनुष्ठान करितो. -(सत्त्वसमाविष्टः)-आत्मानात्मविवेकाला कारण होणाऱ्या सत्त्वानें संयुक्त होतो.-(मेधावी)-तो आत्मज्ञानरूप प्रज्ञेनें संयुक्त होतो-(छिन्नसंशयः)-[भवति] त्यामुळेंच त्याचे सर्व संशय तुटलेले असतात. १०

म्हणून, पूर्वकर्मानुरोधानें जीं बरीं वाईट कर्में प्राप्त होतील, तीं, आकाशांत जसे ढग उत्पन्न होऊन मावळतात, १२ तशीं अर्जुना, त्याच्या दृष्टीनें सर्व कर्में निर्दोष असतात म्हणून त्यांपासून होणाऱ्या सुखदुःखांची उठाठेव तो करीत नाहीं. १३ हें शुद्ध कर्म असें समजून तो तें हर्षानें करीत नाहीं. किंवा हें अशुभ म्हणून त्याचा द्वेष करीत नाहीं. १४ ज्याप्रमाणें जागृत झाल्यावर स्वप्नांत पाहिलेल्या गोष्टींचें कोणी सुखदुःख मानीत नाहीं,

१ जलसमाधीसारख्या पुण्यरूप मरणानें मेलें. २ पाणी सोडलें. ३ खरें, खास. ४ प्रातःकाळ ५ अज्ञानासह. ६ पाणी सोडतो, तिलांजली देतो. ७ नरकपातास. ८ त्यजावी. ९ बी. १० त्यागी. ११ अभिमान, गर्व. १२ प्रसिद्धि. १३ वृक्षाला. १४ स्पर्शतांच. १५ परिसास. १६ अमंगळ, काळिमा, कलंक. १७ स्वच्छ, शुद्ध. १८ मृगजळ. १९ आरब्धाच्या, पूर्वसंचिताच्या. २० बरीं वाईट. २१ आकाशांत. २१ उठाठेव.

तया एकुही संदेहो नाहीं। जैसा स्वप्नाच्या ठायीं। जागिन्नलिया १५ म्हणऊनि कर्म आणि कर्ता। या द्वैतभावाची वार्ता। नेणे तो पांडुसुता। सात्त्विक त्यागु १६ ऐसेनि कर्में पार्था। त्यजिलीं त्यजिती सर्वथा। अधिकें बांधिती अन्यथा। सांडिली तरी १७

न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः। यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥११॥

आणि हां गा सव्यसाची। मूर्ति लाहोनि देहाची। खंती करिती कर्माची। ते गांवढे गा १८ मृत्तिकेचा वीटु। घेऊनि काय करील घटु। केउता ताथु पटु। सांडील तो १९ तेवींचि वन्हित्व ओंगीं। आणि उबे उबगणें आगी। कीं तो दीपु प्रभेलागीं। द्वेषु करील काई २० हिंगु त्रासिला घाणी। तरी कैंचें सुगंधत्व आणी। द्रवपण सांडूनि पाणी। कें राहे तें २१ तैसा शरीराचेनि आभासें। नांदतु जंव असे। तंव कर्मत्यागाचें पिसें। काइसें तरी २२ आपण लाविजे टिळा। म्हणोनि पुसों ये वेळवेळा। मा घाली फेडी निडळा। कां करूं ये गा २३ तैसें विहितें स्वयें आदरिलें। म्हणोनि त्यजूं ये त्यजिलें। परी कर्मचि देह आंतलें। तें कां सांडील गा २४ जें श्वासोच्छ्वासवरी। होत निजेलियाही वरी। कांहीं न करणेंचि पैरी। होतीं जयाची २५ या शरीराचेनि मिसेंकें। कर्मचि लागलें असिकें। जिता मेलया न ठाके। इया रीती २६ यया कर्मातें सांडिती परी। एकीचि ते अवधारीं। जे करितां न जाइजे हारीं। फळाशेचिये २७ कर्मफळ ईश्वरीं अर्पे। तत्प्रसादें बोधु उद्दिपे। तेथ रज्जुज्ञानें लोपे। व्याळशंका २८ तेणें आत्मबोधें तैसें। अविद्येसीं कर्म नाशे। पार्था त्यजिजे जैं ऐसें। तैं त्यजिलें होय २९ म्हणोनि इयापरी जगीं। कर्मं करितां मानू त्यागी। येर मूर्च्छने नांव रोगीं। विसांवा जैसा ३० तैसा कर्मीं शिणे एकीं। तो विसांवों पाहे आणिकीं। दांडियाचे घाय बुकीं। धोंडणें जैसें ३१ परी हें असो पुढती। तोचि त्यागी त्रिजगतीं। जेणें फळत्यागें निष्कृती। नेलें कर्म ३२

अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम्। भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥१२॥

एऱ्हवीं तरी धनंजया। त्रिविधा कर्मफळा गा यया [illegible] ते कीं भोगावया। जे न सांडितीचि आशा [illegible] २१ । कीं नें मम म्हणे पिता। तो सुटे कीं [illegible] विषाचे आ- २४ वाहती। ते विकितां सर्वें [illegible]

त्याप्रमाणें शुभ किंवा अशुभ यांविषयीं त्याचे मनांत शंकाच येत नाहीं. १५ म्हणून, अर्जुना, हें कर्म आणि कर्ता या द्वैतभावाची वार्ता तो जाणतही नाहीं, त्याला सात्विक त्याग असें म्हणतात. १६ पार्था, अशा प्रकारें कर्माचा त्याग केला तरच कर्माचा त्याग होतो. पण जर या व्यतिरिक्त अन्यप्रकारें कर्माचा त्याग केला, तर तीं उलटीं अधिकच बंधनांत पाडतात. १७

अन्वयार्थ—(देहभृता)–देहच आत्मा असा अभिमान धरणाऱ्या पुरुषाकडून–(कर्माणि)–कर्मे–(अशेषतः)–निःशेष–(त्यक्तुं)–टाकलीं जाणें–(न हि शक्यं)–शक्य नाहीं.–(तु)–पण–(यः कर्मफलत्यागी)–जो कर्मफलाचा त्याग करणारा–(सः त्यागी)–तो त्यागी–(इति अभिधीयते)–असें म्हटलें जातें. ११

आणि अर्जुना, जे देह प्राप्त झाला असतां कर्म करण्याचा कंटाळा करितात; ते मूर्ख होत. १८ मातीचा कंटाळा करून घट काय करील? आणि वस्त्राला तंतूचा संबंध कसा तोडतां येईल? १९ तसेंच अग्नित्व ज्याचें असलेल्या अग्नीला उष्णतेचा कंटाळा करितां येईल कां? किंवा दिवा आपल्या प्रभेचा द्वेष करील काय? २२० हिंगाला जरी आपल्या घाणीचा त्रास आला, तरी त्यानें चांगला वास कोठून आणावा? किंवा पातळपणा टाकून पाणी कोठें रहाणार? २१ त्याप्रमाणें, शरीराचे अवस्थेमध्यें जोंपर्यंत मनुष्य नांदत आहे, तोंपर्यंत कर्मत्यागाचें वेड काय उपयोगी पडेल? २२ आपण लावलेलें गंध वांकडें लागलें, तर तें वरचेवर पुसतां येतें, परंतु कपाळच जर वांकडें असेल, तर तें कसें नीट करितां येईल? २३ त्याप्रमाणें, ज्या विहितकर्माचा आपणच स्वतः आदर केला आहे, त्याचा त्याग करावयाचा म्हटलें तर करतां येईल; पण त्यायोगें कांहीं कर्मत्याग होणार नाहीं. कारण; शरीर हें कर्मरूपच असल्यामुळें कर्म कसें टाकतां येणार? २४ कां कीं, मनुष्य निजला असला तरी श्वासोच्छ्वासरूपानें कर्म हें घडतेंच, अर्थात् आपण कांहींएक न करितां त्याची उभारणी होते. २५ या शरीराच्या निमित्तानें कर्म हें पाठीस लागलें आहेच; आणि यांप्रमाणें तें जिवंत आहे तोंपर्यंत थांबत नाहीं. रहात नाहीं. २६ हें बघ–या कर्माचा त्याग करण्याचा एकच प्रकार आहे. तो असा कीं, कर्म करीत असतां फलेच्छेच्या आधीन होऊं नये. २७ कर्माचें फळ ईश्वरास अर्पण केलें, म्हणजे त्याच्या प्रसादानें ज्ञान प्रकट होतें; आणि मग दोरीचें यथार्थ ज्ञान प्राप्त झाल्यावर जशी सर्पाची शंका दूर होते, २८ तसा या आत्मबोधानें अज्ञानासह कर्माचा नाश होतो. पार्था, जेव्हां कर्माचा अशा रीतीनें त्याग करावा, तेव्हांच तो खरा त्याग होय. २९ म्हणून जगामध्यें सात्विक त्यागाच्या हातोटीनें कर्म करितो, त्यालाच आम्ही कर्मत्यागी असें मानूं. एऱ्हवीं, रोग्याला मूर्च्छा आली असतां ज्याप्रमाणें त्याला विश्रांति मिळाली असें लोक समजतात; २३० त्याप्रमाणें जो एक कर्म करतांना कंटाळतो, तो विसांवा घ्यावा म्हणून दुसरें कर्म सुरू करतो. तें असें कीं, ज्याप्रमाणें दांड्याच्या घावाच्या वेदना बुक्क्यांनीं कमी करावयाच्या तसाच हा प्रकार आहे. ३१ परंतु हें असो; ज्यानें फलत्याग करून कर्माला निष्कर्मत्व आणलें तोच या त्रिभुवनांत त्यागी होय. ३२

अन्वयार्थ—(अनिष्टं)–पश्वादि योनि प्राप्त होणें हें अनिष्ट,–(इष्टं)–देवादि योनि प्राप्त होणें हें इष्ट (च)–व–(मिश्रं)–मनुष्यादि योनिप्राप्ति हें मिश्र असें–(कर्मणः)–कर्माचें–(त्रिविधं फलं)–तीन प्रकारचें फल–(अत्यागिनां)–त्याग न करणारांना–(प्रेत्य)–मेल्यावर–(भवति)–प्राप्त होतें.–(तु)–पण–(संन्यासिनां)–संन्याशांना–(क्वचित्)–केव्हांहि तें–(न)–मिळत नाहीं. १२

एऱ्हवीं तरी अर्जुना, जे कर्मफलाची आशा सोडीत नाहींत तेच या तीन प्रकारच्या कर्मफलाचा भोग घेण्यास समर्थ असतात. ३३ आपण कन्येस जन्म दिला असूनहि 'ती माझी नाहीं' असें म्हणून पिता जेव्हां कन्यादानाचें उदक सोडतो, तेव्हां त्याची तिजवरील माया सुटून पाणिग्रहण करणारा जांवई तिचे मायापाशांत पडतो. ३४ जे विषाच्या ( वचनाग ) वगैरेंच्या बागा किंवा व्यापार करितात, तें त्याची विक्री करून त्याजवर नफा मिळवून

१ त्यागिलीं तीं त्यजिलीं जातात. २ बांधतात. ३ धारण करून. ४ अडाणी. ५ मातीला कंटाळून. ६ कसें. ७ कंटाळणें. ८ मग. ९ कपाळ. १० योग्य, बरें. ११ झालें. १२ प्रकार. १३ उभारणी होते. १४ निमित्तानें. १५ सर्व. १६ ज्ञान प्रगटे. १७ सर्पभ्रांति. १८ मूर्च्छेस, निश्चेष्टतेला. १९ सोसणें. २० निष्कर्मस्थितीस. २१ कन्या. २२ माझी नाहीं. २३ दान देणारा. २४ बाग. २५ जिवंत. २६ मेले.

नि मोलें ३५ तैसें कर्ता कर्म करू । अकर्ता फळाशा न धरू । एथ न शके
आवरू । दोहींतें कर्म ३६ वाटे पिकलिया [१]रुखाचें । फळ अपेक्षी[२] तयाचें । तेवीं[३]
साधारण कर्माचें । फळ घेतया ३७ परी करूनि फळ नेघे । तो जगाच्या कोर्मी
न रिघे । जे त्रिविध जग अवघें । कर्मफळ हें ३८ देव मनुष्य स्थावर । यया
नांव जगडंबर । आणि हे तंव तिन्ही प्रकार । कर्मफळाचे ३९ तेंचि एक गा
अनिष्ट । एक तें केवळ इष्ट । आणि एक इष्टानिष्ट । त्रिविध ऐसें २४० परी
विषयमंतीं बुद्धी । आंगीं सूनि अविधी । प्रवर्तती जे निषिद्धीं । कुव्यापारीं
४१ तेथ कृमि कीट लोष्ट । हे देह लाहती निकृष्ट । तया नाम तें अनिष्ट
कर्मफळ ४२ का स्वधर्मामानु देतां । स्वाधिकारु पुढां सूतां । सुकृत कीजे
पुसतां । आम्नायातें ४३ तैं इंद्रादिक देवांचीं । देहें लाहिजती सव्यसाची ।
तया कर्मफळा इष्टाची । प्रसिद्धि गा ४४ आणि गोड आंबट मिळे । तेथ रसां-
तर फरसाळें । उठी दोहीं वेगळें । दोहीं जिणतें ४५ रेचकुचि योगवशें । होय
स्तंभावेयादोषें । तेवीं सत्यासत्य समरसें । सत्यासत्यचि जिणिजे ४६ म्हणो-
नि समभागें शुभाशुभें । मिळोनि अनुष्ठानाचें उभें । तेणें मनुष्यत्व लाभे । तें
मिश्र फळ ४७ ऐसें त्रिविध यया भागीं । कर्मफळ मांडलेंसे जगीं । हें न सांडी
तयां भोगीं । जें सूदले आंशा ४८ जेथ जिव्हेचा होतु फांटे । तंव जेवितां
वाटे गोमटें । मग परिणामीं शेवटें । अवश्य मरण ४९ संवचोर मैत्री चांग ।
जंव न पविजे तें दांगें । सामान्यो भलीं आंग । न शिवे तंव २५० तैसीं कर्में
करितां शरीरीं । लाहती महत्त्वाची फैरारी । पाठीं निधनीं एकसरी । पावती
फळें ५१ जैसा समर्थु आणि ऋणिया । मागों आला बोइणिया । न लोटे तैसा
प्राणिया । पडे तो भोगु ५२ मग कैणिसौनि कणु झडे । तो विरूढला कणि-
सा चढे । पुढती भूमी पडे । पुढती उठी ५३ तैसें भोगीं जें फळ होय । तें
फळांतरें वीर्ते जाय । चालतां पावो पाय । जिणिजे जैसा ५४ उताराचिये सां-
गडी । ठाके ते ऐलीच थडी । तेवीं न मुकिजती वोढी । भोग्याचिये ५५ पैं
साध्य साधन प्रकारें । फळभोगु तो पसरे । एवं गोंविले संसारें । अत्यागी ते ५६
एऱ्हवीं जाईचियां फुलां फांकेणें । त्याचि नाम जैसें सुकणें । तैसें कर्ममिषें न
करणें । केलें जिहीं ५७ बीजचि वैरोसि वेंचे । तेथ वाढती कुळवाडी खांचे ।
तेवीं फळत्यागें कर्माचें । सारिलें काम ५८ ते सत्त्वशुद्धी साहाकारें । गुरुकृपा-

सुखानें प्रपंच करितात, पण जे त्याचें सेवन करितात, ते द्रव्य खर्चूनही मरण पावतात ! ३५ त्याप्रमाणें, कर्तेपणाचा अभिमान धरून कर्म करो, किंवा मी कर्ता नाही, असें समजून फळाची आशा सोडून कर्म करो, तरी दोघांनाही कर्म करणें चुकत नाहीं. ३६ वाटेवरील वृक्षाच्या पिकलेल्या फळाची जो इच्छा करितो. त्यासच ती बाधक होते; तसें कर्माच्या फळाची इच्छा करणारास तें बाधक होतें. ३७ परंतु कर्म करून जो फलाची आशा धरीत नाही. तो जन्ममृत्यूंच्या सपाट्यांत सांपडत नाहीं. कारण, हें तीन प्रकारचें जग कर्माचें फल आहे. ३८ देव, मनुष्य व स्थावर ह्यालाच जग असें म्हणतात; आणि हे तिन्ही प्रकार तर कर्मफळाचेच आहेत. ३९ तेंच कर्म एक अनिष्ट ( प्रतिकूल, ) एक केवळ इष्ट ( अनुकूल, ) आणि एक इष्टानिष्ट ( मिश्र ) असें तीन प्रकारचें आहे. २४० परंतु जे विषयासक्त आहेत, ते अविधीचा अंगीकार करून निषिद्ध अशा कर्माचे ठिकाणीं प्रवृत्त होतात; ४१ आणि त्यायोगें कृमि, कीटक अथवा माती असे वाईट देह पावतात. त्याला अनिष्ट कर्मफळ असें म्हणतात. ४२ किंवा स्वधर्माला मान देऊन आपल्या अधिकारानुरूप वेदांत सांगितल्याप्रमाणें जेव्हां सुकृत करतात, ४३ तेव्हां अर्जुना, त्यांना इंद्रादिक देवतांचे देह प्राप्त होतात; त्या कर्मफलाला पुण्यकर्म असें म्हणतात; ४४ आणि गोड व आंबट हीं एकत्र केलीं असतां ज्याप्रमाणें या दोहोंहून वरचढ असा निराळ्या रुचीचा मधुर रस उत्पन्न होतो; ४५ किंवा प्राणवायु योगाभ्यासानें कुंभक होतो; त्याप्रमाणें सत्य व असत्य यांचे ऐक्य झाल्यावर तें त्या दोहोंनाही जिंकण्यास कारण होतें. ४६ म्हणून, शुभ व अशुभ कर्मे समभाग मिळून जें कर्म घडतें, त्याचें मनुष्यदेहाचा लाभ हेंच मिश्रफल होय. ४७ असें या जगांत तीन प्रकारचें कर्मफल आहे; जे या कर्मफलाची आशा टाकीत नाहींत. ते जन्ममरणांचे फेऱ्यांत पडतात. ४८ ज्या जेवणाऱ्याला जिभेला सहन न होईल इतके मिष्ट पदार्थ खाऊन समाधान होतें, त्याला त्यायोगें परिणामी अवश्य मरण प्राप्त होतें; ४९ जोंपर्यंत अरण्य लागलें नाहीं, तोंपर्यंतच सवचोराची मैत्री बरी, किंवा वेश्येचा जोंपर्यंत स्पर्श झाला नाहीं, तोंपर्यंतच ती बरी आहे, २५० त्याप्रमाणें, देहांत आहेत तोंपर्यंत कर्मे करीत असतां कर्तेपणाचा गर्व वाहतात, परंतु शेवटीं मरणानंतर एकसारखी त्यांना फळें भोगावींच लागतात. ५१ जसा समर्थ असून त्याचेजवळ ऋण काढलें आणि तो वायद्याच्या मुदतीस मागणी करूं लागला, तर त्याला जसें नाही म्हणवत नाहीं, त्याप्रमाणें, प्राणिमात्राला कर्माचें फल भोगणें भाग पडतें. ( कर्मफल चुकत नाहीं. ) ५२ मग कणसांतून दाणा खालीं पडल्यावर तो उगवला म्हणजे पुनः त्याला कणीस येतें, व त्याचे दाणे भूमीवर पडले म्हणजे दाण्याचें कणीस व कणसाचे दाणे असा क्रम सुरू होतो, ५३ त्याप्रमाणें; उपभोगाचें फल जें शरीर तें फलाच्या शेवटीं जन्म घेतें जसा वाट चालणारा मनुष्य एकेक पाऊल टाकून वाट जिंकितो; ५४ होडी एक तीराहून दुसरे तीरास गेली असतां, तिला प्रत्येक तीर अलीकडलाच होय, कारण प्रत्येक तीरास तिला पलीकडेपणा आहेच म्हणून वाहून न्यावें लागतें, तसा फलाच्या उपभोगाला शेवट नाहीं. ५५ हें बध्य-साध्य व साधन अशा क्रमानें फल व फलाचा भोग वाढतात; व फलेच्छेचा त्याग न करणारे याप्रमाणें संसारांत गोंविले जातात. ५६ एऱ्हवीं, जाईचें फूल ज्याप्रमाणें प्रफुल्लित होतांक्षणीं सुकतें, त्याप्रमाणें कर्माचा आरंभ करूनही फक्त अभिमान सोडून तें न केल्याप्रमाणें जें फलापासून अलिप्त असतात; ५७ बीजाकारितां ठेवलेलें धान्य जर दररोजच्या खर्चास खाऊन टाकलें, तर मग पुढें पेरण्याचा प्रकार जसा बंद होतो तसें फलाच्या त्यागानें कर्मापासून प्राप्त होणारे जन्ममृत्यु बाजूस रहातात. ५८ शुद्ध सत्त्वाच्या साह्यानें गुरुकृपारूपी अमृताच्या तुषारानें सिद्ध झालेला जो आत्मबोध,

१ वृक्षानें. २ इच्छितो. ३ उपयोगांत. ४ वाईट. ५ चांगलें. ६ विषयप्रिय. ७ शिरवून. ८ कुकर्मी. ९ मातीचें ढेकूळ. १० पावतात. ११ ठेवितां, पाळितां. १२ वेदाला. १३ मिळतात. १४ मधुर. १५ भिन्न रुचीचें. १६ जिंकून. १७ मूळच्या दोहीं रसांस जिंकणारें. १८ बाहेर सोडण्याचा प्राणवायु. १९ कुंभक होण्यास कारण होतो. २० ऐक्यान. २१ जिंकावें. २२ कर्म घडतें. २३ उभारणी. २४ परस्परांत मिसळविलें. २५ आशेंत सांपडले. २६ रुचि येईं वाढे. २७ ठक, सावचोर, सोवळ्याचें ढोंग करणारा चोर. २८ अरण्य. २९ वेश्या. ३० गिरकी, जोर. ३१ मरणकाळीं. ३२ वायद्याच्या मुदतीस. ३३ कणिसांतून. ३४ उगवला असतां. ३५ शरीर. ३६ प्रसवत. ३७ जिंकावा. ३८ उतारांची सांगड-होडी वगैरे. ३९ चुकत नाहींत. ४० गुंतले, गुंडाळले. ४१ त्याग न करणारे. ४२ प्रफुल्लित होणें. ४३ पोटगीस. ४४ शेतकी. ४५ बंद पडे. ४६ सहाय्यानें.

मृततुषारें । सासिन्नलेनि बोधें वोसरे । द्वैतदैन्य ५९ तेव्हां जगदाभासमिषें ।
स्फुरे तें त्रिविध फळ नाशे । येथ भोक्ता भोग्य आपैसें[२] । निमालें हें २६० घडे
ज्ञानप्रधानु हा ऐसा । संन्यासु जयां वीरेशा । तेंचि फळभोग सोसा[३] । मुकले
गा ६१ आणि येणें कीर संन्यासें । जैं आत्मरूपीं दिठी[४] पैसे[५] । तैं कर्म एक
ऐसें । देखणें आहे ६२ पडोनि गेलिया भिंती । चित्रांची केवळ होय माती ।
कां पाहालेया[६] राती । आंधारें उरे ६३ जैं रूपचि नाहीं उभें । तैं सांउली[७] का-
ह्याची शोभे । दर्पणेंवीण बिंबे । वदन कें[९] पां ६४ फिटलिया[१०] निद्रेचा ठावो ।
कैंचा स्वप्नासि प्रस्तावो[११] । मग साच का वावो[१२] । कोण म्हणे ६५ तैसें गा सं-
न्यासें येणें । मूळ अविद्येसीचि[१३] नाहीं जिणे । मा तियेचें कार्य कोणें । घेपे[१४] दीजे
६६ म्हणोनि संन्यासियें पाहीं । कर्मांची गोठी[१५] कीजेल काई । परी अविद्या[१६] आ-
पुला देहीं । आहे जैं कां ६७ जैं कर्तेपणाचेनि थांवें[१७] । आत्मा शुभाशुभीं धांवें ।
दृष्टि भेदाचिये रांणिवे[१८] । रचलीसे जैं ६८ तैं तरी गा सुवर्मा । बिजावळी[१९] आ-
त्मया कर्मा । अपाडें[२०] जैसी पश्चिमा । पूर्वेसि कां ६९ नातरी आकाशा का आ-
भाळा । सूर्या आणि मृगजळा । बिजावळी भूतळा । वायूसि जैसी २७० पां-
घरोनि नैईचें[२१] उदक । असे नयींमाजि खडक । परी जाणिजे का वेगळिक ।
कोडीची[२२] ते ७१ हो कां उदकाजवळी । परी सीनानीचि[२३] ते बोंबुळी[२४] । काय सं-
गास्तव काजळी । दीपु म्हणों ये ७२ जरी चंद्रीं जाला कलंकु । तरी चंद्रेंसीं
नव्हे एकु । आहे दृष्टी डोळ्यां विवेकु । अपाडु[२५] तेतुला ७३ नाना वाटा वाटे[२६]
जातिया । वोघा वोघीं वाहतया । आरसा आरसां पाहतया । अपाडु[२८] जेतुला ७४
पार्था गा तेतुलेनि मानें । आत्मेनिसीं कर्म सिनें[२७] । परी घेवविजे अज्ञानें । तें
कीर ऐसें ७५ विकाशें रवीतें उपजवी । द्रुती[२९] अलीकरवी[३०] भोगवी । ते सरोवरीं
कां बरवी । अब्जिनी[३१] जैसी ७६ पुढतपुढती आत्मक्रिया[३२] । अन्यकारणकाचि[३३]
तैशिया । करूं पांचांही तयां । कारणां रूप ७७

पञ्चैमानि महाबाहो कारणानि निबोध मे । सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥

आणि पांचही कारणें तियें । तूंही जाणसील विर्पायें[३४] । जे शास्त्रें उभऊनी बांहे[३५] ।
बोलती जयांतें ७८ वेदरायाचिया राजधानीं । सांख्यवेदांतांच्या भुवनीं । नि-
रूपणाच्या निशाणध्वनीं । गर्जती जियें ७९ जे सर्वकर्मसिद्धीलागीं । इयेंचि
मुद्दलें[३६] हो जगीं । तेथ न[३७] सुवावा अभंगीं[३८] । आत्मराजु २८० ह्या बोलाचे डांगु[३९]

त्यानें द्वैताचें दैन्य नाहीसें होतें. ५९ मग, ज्या तीन प्रकारच्या फलापासून सर्व जग उत्पन्न होतें, तें आपो-आप नाश पावून भोक्ता व भोग्य वस्तु याही आपोआप क्षयास जातात. २६० हे वीरेशा, ज्यांच्या हातून अशा प्रकारच्या कर्मांचा ज्ञानप्रधान संन्यास होतो, त्यांनाच फलाच्या भोगापासून होणारें दुःख होत नाहीं. ६१ आणि या संन्यासानें खरोखर जेव्हां आत्मस्वरूपीं दृष्टि पोहों-चते, तेव्हां कर्म निराळें आहे असें दिसतें काय? ६२ चित्रें काढलेली भिंत पडल्यावर चित्रें मातीस मिळतात अथवा उजाडल्यावर रात्रीचा अंधार दिसतो काय? ६३ जर आकृतीच नसली, तर सावली कशाची पडणार? आरसाच नसेल तर आपल्या मुखाचें प्रतिबिंब कोठें पडेल? ६४ झोंप पुरी झाल्यावर स्वप्न कोठून पडणार? आणि मग त्याला खरें अथवा खोटें कोण म्हणेल? ६५ त्याप्रमाणें कर्मफलाचा संन्यास केला असतां मूळच्या अविद्येलाच थारा मिळत नाहीं; मग तिच्यापासून होणारें जें फल, त्याचा कोण उपभोग घेणार व देणार? ६६ म्हणून, संन्यास केल्यावर कर्मांची गोष्ट कोठून बोलतां येणार? परंतु जर आपल्या देहांत अज्ञान वास करीत असेल; ६७ जेव्हां कर्तेपणाच्या बळानें आत्मा चांगली व वाईट कर्में करण्यास प्रवृत्त होतो, व दृष्टीही भेदाच्या ऐश्वर्यानें जेव्हां युक्त असते, ६८ तेव्हां, हे सुवर्मा अर्जुना, आत्मा व कर्म यांचे ठिकाणी पूर्व व पश्चिम याप्रमाणें द्वैतविशेष असतें. ६९ आकाश व आभाळ, सूर्य आणि मृगजळ व पृथ्वी आणि वायु यांच्यांत संबंध जरी दिसला, तरी त्यांमध्यें दुजेपण आहे. २७० नदीचें पाणी पांघरून नदींत खडक असतो, परंतु त्या दोहोंत जसें कोटपट अंतर असतें; ७१ पाण्यावर असलेलें शेवाळें हें पाण्यापासून वेगळें असतें; काजळाचा दिव्याशीं संबंध आहे, म्हणून त्या काजळाला दीप म्हणतां येईल काय? ७२ जरी चंद्राला कलंक लागला आहे, तरी त्याचें चंद्राशीं ऐक्य नाहीं; तसेंच दृष्टि व डोळे यांमध्यें जितका भेद आहे; ७३ अथवा वाट व तिजवरून चालणारा वाटसरू, ओघ व ओघांत वाहणारें पाणी, आणि आरसा व आरशांत पहाणारा मनुष्य यांच्यांत जितका भेद आहे ७४ तितक्याच मानानें आत्म्यापासून कर्म भिन्न आहे; परंतु अर्जुना, अज्ञानामुळें तीं दोन्ही एकच आहेत, असें वाटतें. ७५ जशीं सरोवरांतील कमलें आपल्या फुलण्यानें रवीचा उदय झाला असें कळवितात, व आपल्यांतील मकरंदाचा भ्रमरांकडून उपभोग घेववितात; ७६ तशीं आत्म्याच्या ठिकाणीं असलेलीं कर्में अन्य कारणानें वारं-वार उत्पन्न होतात. तीं कारणें पांच आहेत, त्यांचीं लक्षणें तुला सांगतों. ७७

**अन्वयार्थ**—(महाबाहो)–हे महापराक्रमी अर्जुना!–(सर्वकर्मणां सिद्धये)–सर्व कर्मांच्या सिद्धीसाठीं—(सांख्ये कृतांते)–कर्मांची ज्यांत परिसमाप्ति होते त्या वेदान्तांत–(प्रोक्तानि)–सांगितलेलीं–(इमानि पंच कारणानि)–हीं पांच कारणें–(मे निबोध)–तूं माझ्यापासून समजून घे. १३

तीं पांच कारणें तूंही कदाचित् जाणत असशील, कारण ज्याविषयीं शास्त्रांनीं उंच हात करून वर्णन केलेलें आहे; ७८ तीं वेदराज्याच्या राजधानींत सांख्य वेदांतरूप मंदि-रांत निरूपणरूपी नौबदीनें प्रसिद्ध आहेत. ७९ कारण, सर्व कर्मांची सिद्धी होण्याकरितां या जगांत हीच मुख्य आवश्य आहेत, तर त्यांचे ठिकाणीं आत्म्यास कारणी-भूत मानूं नको. २८० अर्जुना अशी दौंडी पिटल्यानें

१ फोफावल्यानें. २ आपोआप. ३ हांवेला, दुःखाला. ४ दृष्टि. ५ पोंचते. ६ उजाडल्यावर. ७ सावली. ८ कशाची. ९ कोठें. १० संपल्यावर. ११ प्रसंग. १२ मिथ्या. १३ अज्ञानाला. १४ धावें व पावें. १५ वासा. १६ अज्ञान. १७ बळानें. १८ ऐश्वर्यानें. १९ दुजेपण. २० पुष्कळ, अर्थन. २१ नदीनें. २२ कोटपटीनें. २३ निराळेंच. २४ शेवाळ. २५ विलक्षण अंतर. २६ वाटसरूला. २७ भिन्न. २८ प्रफुल्लितपणानें. २९ मकरंद. ३० भ्रमराकडून. ३१ कमळिणी. ३२ आत्म्याच्या ठिकाणीं असलेलीं कर्में. ३३ पूर्वीच्या ओवींत जशी कमळ क्रिया अन्यकारण आहे तशी. ३४ कदाचित्. ३५ नाहू. ३६ मांडवलें. ३७ न घाटावा. ३८ मध्यें. ३९ दौंडीनें.

रटी । तियें प्रसिद्धी आलीं किरीटी । म्हणोनि तुझ्या हन कर्णपुटीं । वसों हें
काज ८१ आणि मुखांतरीं आइकिजे । तैसें कायसें हें ओझें । मी चिद्रत्ने[2]
तुझे । असतां हातीं ८२ [3]दर्पणु पुढां मांडलेया । कां लोकांचियां डोळयां । मानु[4]
घाया पहावया । आपुलें निकें ८३ भक्त जैसोनि जेथ पाहे । तेथ तें तेंचि होत
जाये । तो मी तुझें जाहालों आहें । खेळणें आजी ८४ ऐसें हें [5]प्रीतीचेनि वेगें।
देवो बोलतां से[6] नेघे । तंव आनंदामाजीं आंगें । [7]विरतँसे येरु ८५ चांदिणि-
याचा पडिभरु । होतां सोमकांताचा डोंगरु । [9]विघेरोनि सरोवरु । हों पाहे जैसा ८६
तैसें सुख आणि [10]अनुभूती । या भावांची मोडूनि भिंती । [11]ओतलें अर्जुनाकृती।
सुखचि जेथ ८७ तेथ समर्थु म्हणोनि देवा । अवकाशु जाहला आठवा । मग बुडत-
याचा धांवा । जीवें केला ८८ अर्जुना येसणें[12] धेंडें[13] । [14]प्रज्ञॉपसरेंसीं वुडे । आलें भरतें
एवढें । तें काढूनि पुढती ८९ देवो म्हणे हां गा पार्था । तूं आपणपें देख सर्वथा ।
तंव [15]श्वासूनि येरें माथा । [16]तुकियेलें २९० म्हणे जाणसी दातारा । मी तुजशीं
[17]व्यक्तिशेजारा । [18]उबगेला आदीं [19]एकाहारा । येवों पाहें ९१ तयाही हा ऐसा ।
लोभें [20]देतँसां जरी [21]लौलसा । तरी कां जी घालीतसां । [22]आड आड जीवा ९२ तेथ
श्रीकृष्ण म्हणती निकें[23] । अद्यापि नाहीं मा ठाउकें । वेड्या चंद्रा आणि [24]चंद्रिके।
न मिळणें आहे ९३ आणि हाही बोलोनि भावो । तुज दाऊं आम्ही भिवों[25] । जें
रुसतां बांधे [26]थांवो । तें प्रेम गा हें ९४ एथ एकमेकांचिये [27]खुणे । विसंवादु[28] तं-
वचि जिणें[29] । म्हणोनि असो हें बोलणें । इयेविषयींचें ९५ मग कैशी कैशी तें
आतां । बोलत होतों पंडूसुता । सर्व कर्मां भिन्नता । आत्मेनिसीं ९६ तंव अर्जुन
म्हणे देवें । माझिये मनींचेंचि स्वभावें । [30]प्रस्ताविलें बरवें । [31]प्रमेय तें जी ९७
जें सकळ कर्मांचें बीज । कारणपंचक तुज । सांगेन ऐसी पंज । घेतली कां ९८
आणि आत्मया एथ कांहीं । सर्वथा [32]लागु नाहीं । हें [33]पुढारेलासि तें देईं । [34]लौ-
हाणें माझें ९९ यया बोला विश्वेशें । म्हणितलें तोषें बहुवसे । इयेविषयीं धरणें
बैसे । ऐसें [35]कें जोडे २०० तरी अर्जुना निरूपिजेल । तें कीर [36]भाषेआंतुल। परी
[37]मेचुं ये होइजेल । ऋणिया तुज १ तंव अर्जुन म्हणे देवो । काई विसरले मा-
गील भावो । इये गोठी कीं राखत आहों । मीतूंपण जी २ एथ श्रीकृष्ण
म्हणती हो का । आतां अवधानाचा पसरु निका । करूनियां आइका । [38]पुढा-
रलों तें ३ तरी सत्याचि गा धनुर्धरा । सर्व कर्मांचा उभारा । होतसे [39]बाहिरवा-

त्यांची चहूंकडे प्रसिद्धि झालेली आहे, म्हणून तुलाही ठाऊक असूं दे, उपयोग होईल; ८१ आणि मी ज्ञानरूपी रत्न तुझे हातीं असल्यावर, दुसऱ्याचे तोंडांतून तूं ही गोष्ट ऐकावीस, इतकी अडचण तुला कशास पाहिजे? ८२ आपल्यासमोर आरसा असल्यावर, आपलें रूप पहाण्यास लोकांना माझें रूप कसें दिसतें तें मला सांग, अशी विनंति कां करावी? ८३ भक्त ज्या स्थितींत जिकडे पाहील, त्या ठिकाणीं ती वस्तु मी त्याच्या दृष्टीस पाडतों तो मी आज तुझें खेळणें झालों आहें. ( हस्तगत झालों आहें. ) ८४ असें प्रेमाच्या भरांत देव बोलत असतां त्यांना आठवण राहिली नाहीं, तों इकडे पार्थ आनंदांत निमग्न होऊन गेला. ८५ पौर्णिमेच्या चांदण्यांत सोमकांत मण्याचा डोंगर जरी असला; तरी तो पाझरून त्याचें सरोवर बनावें, ८६ त्याप्रमाणें सुख व त्याचा अनुभव त्या भावांचा पडदा नाहींसा होऊन सुखच अर्जुनाच्या आकृतीचें दिसूं लागलें. ८७ तेव्हां देव समर्थ असल्यामुळें त्यांस आठवण होऊन त्यांनीं सुखाचे समुद्रांत बुडणाऱ्या अर्जुनास वर काढलें. ८८ अर्जुनासारखा थोर असूनही तो बुद्धीच्या प्रसारासह बुडूं लागला, एवढें प्रेमाचें भरतें आलें असून तें बाजूला सारून, ८९ देव म्हणाले पार्था, "तूं आपलें स्वरूप पाहून शुद्धीवर ये." तेव्हां उसासा टाकून अर्जुनानें मान डोलवली; २९० आणि तो म्हणाला कीं, "हे प्रभो, जो मी तुमच्या सांनिध्यास (द्वैतभावास) त्रासून आज तुमच्या ऐक्यास येऊं पहात आहें, ९१ त्या माझें तुम्ही जर प्रेमानें कौतुक करीत असाल, तर मला जीवदशेस कां आणतां?" ९२ तेव्हां श्रीकृष्ण म्हणतात कीं, "अरे वेड्या, खरोखर तुला अजून कसें माहीत नाहीं, कीं चंद्र आणि चांदणें यांचा कधीं वियोग घडतो का? ९३ आणि असेंच बोलून तुला जी आम्ही भीति दाखवितों, तिनें तूं रुसलास म्हणजे आमच्या प्रीतीस जास्ती बळ येतें, अशी ही प्रीति होय. ९४ या ठिकाणीं एकमेकांचें खुणेनें परस्परास जें बोलणें, तेंच आपल्या बांचण्यास कारण होय, म्हणून यांविषयीं वादविवाद पुरे. ९५ मग अर्जुना, आपण काय बरें बोलत होतों कीं सर्व कर्में आत्म्यापासून भिन्न आहेत, असेंच ना? ९६ तेव्हां अर्जुन म्हणाला देवा, माझे मनांतील तात्पर्यच सांगण्यास तुम्ही होऊन आरंभ केला. ९७ सर्व कर्मांस कारणीभूत अशीं पांच कारणें तुला सांगेन, अशी जी तुम्ही प्रतिज्ञा केली, ९८ आणि आत्म्याचा कर्माशीं कांहीं संबंध नाहीं असें जें तुम्ही बोललां होतां, तें माझें आवडतें मला या; ९९ हें बोलणें ऐकून भगवान् अतिसंतोषानें म्हणाले, याविषयीं तूं धरणें घेऊन बसलास, असा विचारणारा आम्हांला कोठें मिळतो आहे? ३०० तर अर्जुना, तुला खरोखर सिद्धांत सांगतों. कारण, मी तुझा ऋणी असल्यामुळें तुला मोठा नमून आहें. १ तेव्हां अर्जुन म्हणाला, हे देवा, तुम्ही मागील गोष्टीचा अभिप्राय विसरलां काय? आणि मी व तूं हें द्वैत आपल्या भाषणांत कां आणतां? २ तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले, बरें तर, आतां मी जी गोष्ट तुला सांगण्यास सुरवात केली होती, ती सांगतों, सावधान चित्तानें ऐक. ३ तर हे धनुर्धरा, खरोखर सर्व कर्मांची

१ दुसऱ्याचे तोंडून. २ ज्ञानरस. ३ आरसा. ४ रूप. ५ प्रेमाच्या. ६ आठवण. ७ विरघळला, निमग्न झाला. ८ भर. ९ पाझरून. १० अनुभव. ११ दिसूं लागले, व्यापलें, झालें. १२ येवढें. १३ धीर. १४ बुद्धीच्या प्रसारासह. १५ उसासा टाकून. १६ डोलविला. १७ वेगळ्या व्यक्त. सांनिध्याला. १८ त्रासून. १९ एकत्वास. २० देतां. २१ लाड, कौतुक. २२ अतिबंध. २३ खरें. २४ प्रभेस. २५ भितों. २६ बळ, ठिकाण. २७ वर्म. २८ विरोध. २९ वांचणें. ३० सांगण्यास आरंभ केला. ३१ अर्थ, तात्पर्य. ३२ संबंध. ३३ बोललास. ३४ ऐवज, देणें. ३५ कोठें. ३६ शब्दाचें वर्म, सिद्धांत. ३७ प्रीति, आवड. ३८ बोललों. ३९ परमोर, बाहेरच्या बाहेर.

हिरा । करणीं पांचें ४ आणि पांच कारण दळवाडें[2] । जिहीं कर्माकारु मांडे । ते हेतुस्तव घडे । पांच आथी ५ येर आत्मतत्त्व उदासीन । तें ना हेतु[3] ना उपादान । ना तें अंगें करी संवाहन । कर्मसिद्धीचें ६ तेथ शुभाशुभीं अंशीं । निफजती कर्में ऐसीं । रातीं दिवो[6] आकाशीं । जियापरी ७ तोय[8] तेज धूमु । ययां वायूसीं संगमु । जालिया होय अभ्रांगमु । व्योमें[11] तें नेणे ८ नाना काष्ठीं नाव मिळे । ते नावाडेनि चेंळे[12] । चालविजे अनिळें । उदक तें साक्षी ९ कां कवणे एके पिंडें[13] । वेंचितां अवंतरे[14] भांडें । मग भवंडीजे दंडें । भ्रमें चक्र ३१० आणि कर्तृत्व कुलालाचें[15] । तेथ काय तें पृथ्वीयेचें । आधारावांचूनि वेंचे । विचारीं पां ११ हेंही असो लोकांचिया । राहाटी[16] होतां आघविया । कोण काम सँवितया । आंगा आलें १२ तैसें पांचहेतुमिळणीं । पांचेंचि इहीं कारणीं । कीजे कर्मलतांची लावणी । आत्मा सिनी १३ आतां तेंचि वेगळालीं । पांचही विवंचूं[20] गा भलीं । तुकोनि[21] घेतलीं । मोतियें जैसीं १४

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् । विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥१४॥

तैसीं यथा लक्षणें । आइकें कर्म-कारणें । तरी देह हें मी म्हणें । पहिलें एथ १५ ययातें अधिष्ठान[22] ऐसें । म्हणिजे तें याचि उद्देशें । जे स्वभोग्येंसीं वसे । भोक्ता येथ १६ इंद्रियांच्या दाहें[23] हातीं । जोंचोनियां दिवोरांती । सुखदुःखें प्रेकृती । जोडीजती जियें १७ तियें भोगावया पुरुखा । आन ठावोचि नाहीं देखा । म्हणोनि अधिष्ठानें भाखा । बोलिजे देह १८ हें चोविसांही तत्त्वांचें । कुटुंबघरवस्तीचें । तुटे बंधमोक्षाचें । गुंथाडें एथ १९ किंबहुना अवस्थात्रया । हें अधिष्ठान धनंजया । म्हणोनि देहा यया । हेंचि नाम ३२० आणि कर्ता हें दुजें । कर्माचें कारण जाणिजे । प्रतिबिंब म्हणिजे । चैतन्याचें जें २१ आकाशाचि वर्षे नीर । तें तळवटीं बांधे नोंडर[31] । मग बिंबोनि तदाकार । होय जेवीं २२ कां निद्राभरें बहुवें । राया आपणपें ठाउवें[32] नव्हे । मग स्वप्नीचिये सामावे । रंकपणीं २३ तैसें आपुलेनि विसरें । चैतन्यचि देहाकारें । आभासोनि आविष्करें । देहपणें जें २४ जया विसराच्या देशीं । प्रसिद्धि गा जीवु ऐसी । जेणें भाष[34] केली देहेंसीं । आघवाविषयीं २५ प्रकृति करी कर्में । तो म्यां केलीं म्हणे भ्रमें । येथ कर्ता येणें नामें । बोलिजे जीवु २६ मग पातेयांच्या केशीं । एकीच उठी दिठी जैसी । मोकळीच वरी ऐसी । चिरीवें[36] गमे २७ कां घराआंतुल एकु ।

उभारणी या पांच कारणांनी परभारें होते ४ आणि, ज्या या पांच कारणांच्या योगानें जो कर्माचा पसारा होतो, तीच पांच कारणें त्या कर्मास हेतु असतात. ५ दुसरा जो आत्मा, तो उदासीन असून कर्माला निमित्त कारण किंवा उपादान कारण नसतो, अथवा तो स्वतः कर्माला साह्य करीत नाहीं. ६ त्याचे ठिकाणी शुभ किंवा अशुभ कर्में अशा रीतीनें होतात कीं, रात्र व दिवस आकाशांत उत्पन्न झाली तरी आकाश त्याहून जसें वेगळें असतें; ७ पाणी व तेज यांपासून उत्पन्न होणाऱ्या वाफेचा वायूशी संबंध झाला, म्हणजे ती आकाशांत जाऊन तिचे ढग बनतात, परंतु आकाशास जशी ही गोष्ट माहीत नसते; ८ पुष्कळ लांकडें एकत्र जोडून तयार केलेली नाव वाऱ्याच्या जोरानें नावाडी पाण्यावर चालवितो; परंतु त्या ठिकाणी उदक जसें कांहींएक न करितां साक्षिभूत असतें; ९ किंवा मातीचा गोळा घेऊन चाकावर ठेवून दांड्यानें चाक हालविल्यावर त्याचें मातीपण जाऊन भांडें तयार होतें; ३१० तर या ठिकाणी कुंभाराच्या कसबा-शिवाय भांड्यास आधारायांचून पृथ्वीचें दुसरें कोणतें साह्य मिळतें, याचा विचार कर. ११ हेंही असो; परंतु जगांत लोकांचे सर्व व्यापार सूर्यप्रकाशानें चालत असतां सूर्य ज्याप्रमाणें त्यांपासून अलिप्त असतो, १२ त्याच-प्रमाणें पांच कारणें मिळाल्यानें सर्व कर्मरूप वेलाची लावणी होते, व आत्मा हा वेगळाच असतो. १३ आतां तीच पांच कारणें चांगल्या प्रकारें वेगवेगळाली वर्णन करून सांगतों. मोत्यें ज्याप्रमाणें वजन करून घ्यावीं लागतात. १४

अन्वयार्थ--(अधिष्ठानं)-शरीर-(तथा कर्ता)-तसाच कर्ता-'मी' असें म्हणणारा,-(च पृथग्विधं करणं)-आणि नाना प्रकारचें श्रोत्रादिक इंद्रियजात,-(च विविधाः पृथक् चेष्टाः)-आणि नाना-पृथक् पृथक् प्राणादिकांच्या चेष्टा-(च)-आणि -(अत्र)-या चार कारणांत-(दैवं एव पंचमं)-इंद्रियांवर अनु-ग्रह करणारें आदित्यादि दैवत हें पांचवें. १४

त्याप्रमाणें, कर्माच्या कारणांचीं सर्व यथार्थ लक्षणें तुला सांगतों, तीं ऐक. तर देह पहिलें कारण होय. असें मी म्हणतों. १५ या देहाला अधिष्ठान म्हणण्याचें प्रयो-जन इतकेंच कीं, भोग्य जे विषय, त्यांसहवर्तमान भोक्ता या ठिकाणीं रहातो. १६ इंद्रियांच्या दहा हातांनीं रात्रं-दिवस कष्ट सोसून प्रकृतीच्या योगानें जीं सुखें व दुःखें उत्पन्न होतात, १७ तीं भोगण्याकरितां मनुष्यास दुसरें ठिकाणच नाहीं. म्हणून देहाला अधिष्ठान असें म्हणतात. १८ हें चोवीस तत्त्वांचें वसतिस्थान असून बंध व मोक्ष यांचा उलगडा या ठिकाणीं होतो. १९ फार काय! परंतु जागृति, स्वप्न व सुषुप्ति यांचें हें मुख्य ठिकाण होय. म्हणून हे धनंजया, या देहाला अधिष्ठान हेंच नांव योग्य आहे. ३२० आणि कर्माचें दुसरें कारण कर्ता हें होय. आणि त्यालाच चैतन्याचें प्रतिबिंब म्हणजे जीव असें म्हणतात. २१ आकाशांतून पाऊस पडल्यावर त्याचें पृथ्वीवर डबकें होतें; आणि मग त्यांत आकाशाचेंच प्रतिबिंब पडल्यावर ज्याप्रमाणें तें प्रतिबिंब त्याचेंच आकाराचें होतें; २२ किंवा निद्रेच्या भरांत राजा आपलें ऐश्वर्य विसरून स्वप्नांत आपण भिकारी झालों आहों, असें समजतो, २३ तसेंच चैतन्य आपलें स्वरूप विसरून देहच मी असें मानून देहरूपानें प्रकट होतें. २४ ज्या देहांत आत्मस्वरूपाचा विसर पडतो, तेथें चैतन्य 'जीव' या नांवानें प्रसिद्ध आहे; व त्या जीवानें देहाला मी तुझा अभिमान कधींही सोडणार नाहीं, असें वचन दिलें आहे. २५ देहाकडून जीं जीं कर्में होतात, तीं मीच केलीं असें भ्रमानें म्हणतो, म्हणून जीवाला कर्माचा कर्ता आहे, असें म्हणतात. २६ मग दृष्टि ही एकच असून ज्या-प्रमाणें पापण्यांच्या केसांमुळें चवरीच्या केसांप्रमाणें चिर-ल्यासारखी दिसते; २७ अथवा घरांत असलेला एकच दिवा

१ पांच साधनांनीं. २ स्वरूप. ३ निमित्त, कारण. ४ निमित्त. ५ सहाय्य. ६ दिवस. ७ पाणी. ८ मूर्त. ९ वाफ. १० ढग. ११ आकाश. १२ चालतें. १३ मातीच्या गोळ्यानें. १४ आकारास येतें. १५ कुंभाराचें. १६ व्यापार, वागणुकी. १७ सूर्याच्या. १८ पांच कारणें मिळाल्यानें. १९ वेगळा, साक्षी. २० सांग. २१ वजन करून.

२२ आधार. २३ दहा हातांनीं. २४ कष्ट सोसून. २५ दिवस व रात्र. २६ प्रकृतीच्या योगानें. २७ अधिष्ठान शब्दानें. २८ जागृति, स्वप्न व सुषुप्ति. २९ जीव. ३० ज्ञानाचें. ३१ डबकें. ३२ ठाकणें. ३३ प्रकटे. ३४ प्रतिज्ञाबद्ध देणें. ३५ पापण्यांच्या. ३६ चिरल्याप्रमाणें.

दीपाचा तो अवलोकु । गवाक्षभेदें अनेकु । आवडे जेवीं २८ कां एकचि पु
रुषु जैसा । अनुसरत नवां रसां । नवविधु ऐसा । आवडों लागे २९ तेवीं बु
द्धिचें एक जाणणें । श्रोत्रादिभेदें येणें । बाहेरी इंद्रियपणें । फांके जें कां२३०
तें पृथक्विध करण । कर्माचें इया कारण । तिसरें गा जाण। नृपनंदना ३१
आणि पूर्वपश्चिमवाहणीं । निघालिया वोघांचिया मिळणी । होय नदी नद पाणी ।
एकचि जेवीं ३२ तैसी क्रियाशक्ति पवनीं । असे जे अनपायिनी । ते पडि
ली नानास्थानीं । नाना होय ३३ जैं वाचे करी येणें । तैं तेंचि होय बोलणें ।
हाता आली तरी घेणें । देणें होय ३४ अगा चरणाच्या ठायीं । तरी गति तेचि
पाहीं । अधोद्वारीं दोहीं । क्षरणें तेची ३५ कंदौनि हृदयेंवरी । प्रणवाची उज
री । करितां तेचि शरीरीं । प्राणु म्हणिजे ३६ मग ऊर्ध्वींचिया रिगौनिगा ।
पुढती तेचि शक्ति पैं गा । उदानु ऐसिया लिंगा । पात्र जाहली ३७ अधो
रंध्राचेनि वाहें । अपानु हें नाम लाहे । व्यापकपणें होये । व्यानु तेची ३८
आरोगिलेनि रसें । शरीर भरी सारिसें । आणि न सांडितां असे। सर्वसंधी३९
ऐसिया इया राहटीं । मग तेचि क्रिया पाठीं । समान ऐसी किरीटी । बोलि
जे गा ३४० आणि जांभई शिंक ढेंकर । ऐसैसा होतसे व्यापार । नाग कूर्म
कृकर । इत्यादि होय ४१ एवं वायूची हे चेष्टा । एकीचि परी सुभटा । वर्त
नास्तव पालटा । येतसे जे ४२ ते भेदली वृत्तिपंथें । वायुशक्ति गा एथें ।
कर्मकारण चौथें । ऐसें जाण ४३ आणि ऋतु बरवा शारदु । शारदीं पुढती
चांदु । चंद्रीं जैसा संबंधु । पूर्णिमेचा ४४ कां वसंतीं बरवा आरामु। आरामींही
प्रियासंगमु । संगमीं आगमु । उपचारांचा ४५ नाना कमळीं पांडवा । वि
कासु जैसा बरवा । विकासींही यावा । परागाचा तो ४६ वाचे बरवें कवित्व।
कवित्वीं बरवें रसिकत्व । रसिकत्वीं परतत्त्व । स्पर्शु जैसा ४७ तैसी सर्व
वृत्तिवैभवीं । बुद्धिचि एकली बरवी । बुद्धीही बरव नवी । इंद्रियप्रौढी ४८
इंद्रियप्रौढीमंडळा । शृंगारु एकचि निर्मळा । जैं अधिष्ठात्रियां कां मेळा । दे
वतांचा जो ४९ म्हणूनि चक्षुरादिकीं दाहें। इंद्रियां पाठीं स्वानुग्रहें । सूर्या
दिकां कां आहे । सुरांचें वृंद ३५० तें देववृंद बरवें । कर्मकारण पांचवें । अ
र्जुना एथ जाणावें । देवो म्हणे ५१ एवं मानें तुझिये आयणी । तैसी कर्म

पाहिला असतां, जसे त्याचे पुष्कळ दिवे दिसतात; ३२८ किंवा एकच पुरुष शृंगार, वीर, करुणा इत्यादि नवरसाचे अविर्भाव दाखवूं लागला, म्हणजे तो जसा नऊ प्रकारचा वाटूं लागतो; २९ तसें बुद्धीचें एकच ज्ञान असून तें नेत्रादि इंद्रियांच्या निराळेपणानें बाहेर येऊं लागतें ३३० हें, नृपनंदना, तीं निरनिराळीं इंद्रियें हें कर्माचें तिसरें कारण होय, असें समज. ३१ आणि पूर्व पश्चिमवाहिनी नद्या वहात वहात समुद्रास मिळाल्यावर त्या जशा पाण्याच्या रूपानें एकत्र होतात, ३२ तशी रजोगुणाची कर्तृत्वशक्ति–जी संपादन केल्याशिवाय प्राणवायूंत मूळचीच आहे, ती निरनिराळ्या अवयवांत निरनिराळी भासते. ३३ जेव्हां ती वाचाद्वारें बाहेर पडते, तेव्हां तिला बोलणें असें आपण म्हणतों व हस्तद्वारें बाहेर पडल्यावर घेण्यादेण्याचा व्यापार असें म्हणतात. ३४ अरे, जी पायांत आली असतां गति असें म्हणतात, व मलमूत्रद्वारें आली असतां क्षालन असें म्हणतात. ३५ नाभीपासून हृदयापर्यंत ॐकाराची शरीरांत वृद्धि करते, तिलाच प्राण असें म्हणतात. ३६ मग वर जो श्वासोच्छ्वास जातो, त्याच शक्तीला उदान ( कंठस्थ वायु ) असें नांव प्राप्त होतें; ३७ व गुदद्वारानें बाहेर येऊं लागली म्हणजे अपान ( गुदस्थ वायु ) हें नांव प्राप्त होतें; आणि सर्व शरीरास व्यापक झाली असतां व्यान ( शरीरस्थ वायु ) असें म्हणतात. ३८ खाल्लेल्या अन्नाचा रस सर्व शरीरांत पसरून जी सर्व सांध्यांत भरलेली असते; ३९ अर्जुना अशा सर्व क्रिया होत असून या शक्तीस नंतर समान म्हणजे नाभिस्थ वायू असें म्हणतात. ३४० आणि जांभई, शिंक, ढेंकर वगैरे जे वायूचे व्यापार होतात ते नाग, कूर्म, कृकर इत्यादि उपप्राणांचे होत. ४१ हे सुभटा, याप्रमाणें सर्व वायूचे खेळ असून त्यांच्या त्यांच्या वर्तनाप्रमाणें नांवांत बदल होतो. ४२ अशी जी आपआपल्या व्यापारानें वायूची शक्ति निरनिराळी होते, तें कर्माचें चौथें कारण होय, असें समज. ४३ आणि शरदृतूसारखा उत्तम ऋतु असून त्यांत चंद्रोदय व्हावा, व तशांत पौर्णिमेचा योग असावा; ४४ अथवा, वसंत ऋतु असून त्यांत उत्तम बाग असावी, व बागेंत, प्रिय स्त्री संनिध असावी आणि तशा अवस्थेंत इतर सर्व उपचारांची अनुकूलता असावी. ४५ अथवा अर्जुना, कमल असून तें उमलावें, व मग त्यांत परागांचा उद्भव व्हावा; ४६ एकाद्याचे वाणींत कवित्व असावें, त्या कवितेंत रसिकता असावी, आणि त्या रसिकतेंत आत्मतत्त्वाची भर पडावी; ४७ तसेंच, सर्व वृत्तींच्या ऐश्वर्यानें युक्त जी बुद्धि, ती उत्तम प्रकारची असून तशांत सर्व इंद्रियेंहि तिला अनुकूल असावीं, ४८ आणि सर्व इंद्रियांना भूषण देणारा त्या त्या इंद्रियांच्या देवतांचा मेळा तोही त्यांत अनुकूल असावा; ४९ म्हणून चक्षुरादि दहा इंद्रियांच्या ठिकाणी सूर्यादि देवांच्या समुदायाचा अनुग्रह ३५० तेंच दैव म्हणजे देवांचा समुदाय हें या कर्माचें पांचवें कारण आहे. देव म्हणतातः–समजलास अर्जुना! ५१ याप्रमाणें, तुझ्या बुद्धीस कळेल अशा रीतीनें कर्माची

---

१ अवलोकन. २ झरोका इत्यादिकांच्या योगानें. ३ वाटे. ४ निरनिराळीं इंद्रियें. ५ पूर्व पश्चिम मार्गानें. ६ रजोगुणाची कर्तृत्वशक्ति. ७ प्राणवायूंत. ८ अविनाशी. ९ मलमूत्रद्वारीं. १० टाकणें. ११ नाभीपासून हृदयापर्यंत. १२ ओंकाराची वृद्धि. १३ वरल्या रिघण्या निघण्यास. १४ कंठस्थ वायू. १५ निश्वास, उच्छ्वास. १६ गुदद्वारानें. १७ गुदस्थ वायु. १८ व्यापक शरीरस्थ वायु. १९ भक्षिलेल्या, खाल्लेल्या रसानें. २० नाभिस्थ वायु. २१ नागादि उपप्राण. २२ नाग, कूर्म, कृकर, देवदत्त व धनंजय हे उपप्राण ह्यांची जांभई, शिंक, ढेंकर, उचकी व शरीर फुगवणें हीं लक्षणें. २३ निराळेपणाला. २४ शरदृतु. २५ बाग. २६ सुकुचंदनादिकांचा. २७ उद्भव, आगमन. २८ पुष्परजाचा. २९ गोडी. ३० आत्मतत्त्व. ३१ सर्व वृत्तींच्या ऐश्वर्यानें. ३२ शोभा. ३३ आश्रय करून राहणाऱ्या. ३४ ठायीं. ३५ सकृपेनें. ३६ समुदाय. ३७ अशा प्रकारें. ३८ कळेल. ३९ बुद्धि.

जातांचि हे खाणी । पंचविध आकर्णी । निरूपिली ५२ आतां हेचि खाणी वाढे । मग कर्माची सृष्टि घडे । जिहीं ते हेतुही उघडे । दाऊं पांचै ५३

शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः । न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥

तरी अवसांत आली माधवी । ते हेतु होय नवपल्लवीं । पल्लव पुष्पपुंज दावी । पुष्प फळातें ५४ कां वोर्षिये आणिजे मेघु । मेघें वृष्टिप्रसंगु । वृष्टीस्तव भोगु । सस्यसुखाचा ५५ नातरी प्राची अरुणातें विये । अरुणें सूर्योदयो होये । सूर्यें सगळा पाहे । दिवो जैसा ५६ तैसें मन हेतु पांडवा । होय कर्मसंकल्पभावा । तो संकल्पु लावी दिवा । वाचेचा गा ५७ मग वाचेचा तो दिवटा । दावी कृत्यजातांचिया वाटा । तेव्हां कर्ता रिगे कामठां । कर्तृत्वाच्या ५८ तेथ शरीरादिक दळेंवाडें । शरीरादिकां हेतुचि घडे । लोहकाम लोखंडें । निर्वाळिजे जैसें ५९ कां तांथुवांचा ताणा । तांथु घालितां वैरणा । तो तंतुचि विचक्षणा । होय पटु ३६० तैसें मनवाचादेहाचें । कर्म मनादि हेतुचि रचे । रत्नीं घडे रत्नाचें । दळेंवाडें जेवीं ६१ एथ शरीदिकें कारणें । तेचि हेतु केवीं हें कोणें । अपेक्षिजे तरी तेणें । अवधारिजो ६२ आइका सूर्याचिया प्रकाशा । हेतु कारण सूर्युचि जैसा । कां उंसाचें कांडें उंसा । वाढी हेतु ६३ नाना वाग्देवता वानावी । तैं वाचाचि लागे कामवावी । कां वेदां वेदेंचि बोलावी । प्रतिष्ठा जेवीं ६४ तैसें कर्म शरीरादिकें । कारण हें कीर ठाउकें । परी हेंचि हेतु न चुके । हेंही एथ ६५ आणि देहादिकीं कारणीं । देहादि हेतु मिळणीं । होय जया उभारणी । कर्मजातां ६६ तें शास्त्रार्थें मानिलेया । मार्गा अनुसरे धनंजया । तरी न्याय तो न्याया । हेतु होय ६७ जैसा पर्जन्योदकाचा लोटु । विपायें धरी साळींचा पाटु । तो जिरे परी अचाटु । उपयोगु आथी ६८ कां रोषें निघालें अवचटें । पडिलें द्वारकेचिया वाटे । तें शिणे परी सुनाटें । न वचिती पेंदें ६९ तैसें हेतुकारणमेळें । उठी कर्म जें आंधळें । तें शास्त्राचे लाहे डोळे । तैं न्याय म्हणिपे ३७० ना दूध वाढितां ठावो पावे । तंव उतोनि जाय स्वभावें । तोही वेंचु परी नव्हे । वेंचिलें तें ७१ तैसें शास्त्रसाह्येंवीण । केलें नोहे जरी अकारण । तरी लागो कां नागवण । दानलेखीं ७२ अगा बावन्ना वर्णापरता । कोण मंत्रु आहे पंडुसुता । कां बावन्नही नुच्चारितां । जीवु आथी ७३ परी मंत्राची कडसणी । जंव नेणिजे कोदंडपाणी । तंव उच्चारफळवाणी । न पवे जेवीं ७४ तेवीं का-

पांच प्रकारची कारणें तुला सांगितली तीं ऐकिलीसना? ५२ आतां ज्या हेतूंच्या योगें हीं कर्मे घडतात, ते पांच हेतु तुला उघड करून सांगतों. ५३

**अन्वयार्थ**—( नरः )–पुरुष–( शरीर-वाङ्-मनोभिः )–शरीर, वाणी व मन यांनीं–(यत्)–जें–(न्याय्यं वा विपरीतं वा कर्म)–शास्त्रीय–धर्मकार्य किंवा त्याच्या उलट अधर्मकार्य–(प्रारभते)–आरंभितो–(तस्य)–त्याचे–(एते पंच)–हे पांच–(हेतवः)–हेतु आहेत. १५

तर अकस्मात् वसंतऋतु प्राप्त झाला असतां त्याच्या योगानें झाडास नवी पालवी फुटते. पालवी फुटल्यावर फुलांचे घोस येतात, आणि फुलांपासून फळें निर्माण होतात; ५४ अथवा पावसाळ्यांत मेघ उत्पन्न होतात, मेघांपासून पर्जन्यवृष्टी होते आणि पर्जन्यवृष्टीपासून धान्य उत्पन्न होतें; ५५ किंवा पूर्वेस अरुणोदय होतो, अरुणोदय झाल्यावर सूर्य उगवतो, आणि सूर्याचा पूर्ण प्रकाश झाला म्हणजे दिवस होतो; ५६. त्याप्रमाणें अर्जुना, मन हें कर्माचा संकल्प होण्यास कारण आहे; आणि तोच संकल्प झाला म्हणजे वाचेनें बाहेर पडतो, ५७ मग वाणीच्या उजेडानें कर्माची वाट स्पष्ट दिसूं लागते, तेव्हां कर्ता कर्म करण्यास लागतो, ५८ तेव्हां शरीरादिक सर्व इंद्रियें कर्माला कारण होतात. लोखंडाचा एकादा जिन्नस तयार करणें झाल्यास ज्याप्रमाणें तो लोखंडाच्या हत्यारांनीच तयार करावा लागतो, ५९ अथवा तंतूंच्या मागांत तंतूंच आडवे घातले म्हणजे त्या तंतूंचें वस्त्र होतें. ३६० जसें हिऱ्याला पैलू पाडावयाचे ते हिऱ्यानेंच पाडावे लागतात, तसें मन, वाचा व देह यांच्या कर्मास मनच कारण आहे. ६१ या ठिकाणीं, कर्माची शरीरादिक कारणें, तींच त्यांना हेतु कशीं होतील; अशी जर कोणी शंका घेईल, तर सांगतों, ऐक. ६२ हें पहा–सूर्याच्या प्रकाशास जसा सूर्यच हेतु व कारण आहे, किंवा उंसाचें कांडें हेंच उंसाच्या वाढीस हेतु आहे; ६३ अथवा सरस्वतीची स्तुति करणें असल्यास जसें वाणीलाच श्रम करावे लागतात, किंवा वेदांची थोरवी वर्णन करावयाची असल्यास ती वेदांनींच करावी लागते. ६४ तसें कर्माला शरीरादि हींच कारणें होत. हें सर्वांस माहीत आहे. परंतु या ठिकाणीं शरीरादिकच कर्मास हेतुही आहेत, यांत शंका नाही. ६५ आणि देहादिक अधिष्ठानाला देहादिकच हेतु आहेत; व ज्याच्यामुळें सर्व कर्मांची उभारणी होते, ६६ तें कर्म शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें जर केलें, तर हे धनंजया, तें पुण्यकर्म होय, व त्यालाच न्यायकर्म म्हणतात; आणि त्याचा हेतुही न्यायच होय. ६७ जसें पर्जन्याचें पाणी अवचित साळीला लावलें, तर तें जमिनींत जिरतें, परंतु त्यापासून पुष्कळ उपयोग होतो; ६८ अथवा कोणी एकादा मनुष्य रागावून घरांतून निघाला व सहज द्वारकेच्या वाटेस लागला, तर त्याला चालण्याचे श्रम होतील खरे, परंतु त्याचें एक पाऊलही व्यर्थ जाणार नाहीं; ६९ तसें हेतु व कारण यांच्या योगानें जें आंधळें कर्म घडतें, तेंच जर सशास्त्र होईल, तर त्यालाच पुण्यकर्म म्हणावें. ३७० अथवा एका भांड्यांतील दूध ब्राह्मणांस वांटून संपलें, आणि दुसऱ्या पात्रांतील दूध आपोआप उतूं जाऊन संपलें, तर त्या दोन्ही पात्रांतील दूध खर्च झालें खरें, तथापि उतूं गेलेलें दूध खर्च झालें, ( कारणी लागलें ) असें म्हणतां येत नाहीं; ७१ तरी शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कर्म न केलें तर तें जर व्यर्थ होणार नाही, तर दरवड्यांत गेलेलें द्रव्य दान केलें असें कां समजूं नये? ७२ अर्जुना, बावन वर्णांविरहित कोणचा मंत्र आहे? अथवा बावन वर्णांपैकीं एकाचा तरी उच्चार न करणारा असा कोण प्राणी सांपडेल? ७३ परंतु अर्जुना, जोंपर्यंत मंत्राची युक्ति समजली नाहीं, तोंपर्यंत त्या बावन अक्षरांच्या उच्चारास मंत्रोच्चाराची फलप्राप्ति होणार नाहीं; ७४ त्याप्रमाणें, 'कारण

१ अकस्मात्. २ वसंतशोभा. ३ कारण. ४ फुलांचे झुबके. ५ पावसाळ्यांत. ६ धान्यलाभाचा. ७ पूर्वदिशा. ८ उजेडे. ९ मशाल. १० सर्व कृत्यांच्या. ११ व्यापारांत. १२ पैलू पाडणें. १३ कर्माला. १४ स्वच्छ घडावें, निर्मळ करावें. १५ तंतूंचा. १६ थोडें थोडें तंतू घालतां, "जसें जात्यांत वगैरे थोडें थोडें धान्य घालतात." १७ जाणण्याची इच्छा असेल. १८ वाढण्यास. १९ सरस्वती. २० वर्णावी. २१ श्रमवावी. २२ अधिष्ठानी. २३ अंगीकार करून. २४ कदाचित्. २५ विलक्षण. २६ व्यर्थ. २७ जात नाहींत. २८ पाउलें. २९ हेतु व कारण यांच्या योगानें. ३० मिळवी. ३१ न्यायास अनुसरून, पुण्यकर्म. ३२ वर वर येतां. ३३ कांठाला पोंचून. ३४ खर्चे. ३५ व्यर्थ. ३६ गणना होत नाहीं. ३७ छत्तीस व्यंजनें आणि सोळा स्वर यांशिवाय. ३८ युक्ति, विवेचन. ३९ वाणीला मंत्रोच्चाराचें फळ मिळत नाहीं.

रणहेतुयोगें । जें विसांट कर्म निगे । तें शास्त्राचिये न लगे । कांसे जंव ७५ क्रर्म होतचि असे तेव्हांही । परी तें होणें नव्हे पाहीं । तो अन्यायो गा अन्यायीं । हेतु होय ७६

तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः । पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥

एवं पंचकारणा कर्मा । पांचही हेतु हे सुमहिमा । आतां एथें पाहें पां आत्मा । सांपडला असे ७७ भानु न होनि रूपें जैसीं । चक्षुरूपातें प्रकाशी । आत्मा न होनि कर्मे तैसीं । प्रकटित असे गा ७८ पैं प्रतिबिंब आरिसा । दोन्ही न होनि वीरेशा । दोहींतें प्रकाशी जैसा । न्याहाळिता तो ७९ कां अहोरात्र सविता । न होनि करी पांडुसुता । तैसा आत्मा कर्मकर्ता । न होनी दावी ३८० परी देहाहं अमानभुली । जयाची बुद्धि देहींच आतली । तया आत्मविषयीं जाली । मध्यरात्री गा ८१ जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा । देहचि केलें परमसीमा । तया आत्मा कर्ता हे प्रमा । अलोट उपजे ८२ आत्माचि कर्मकर्ता । हाही निश्चयो नाहीं तत्त्वतां । देहोचि मी कर्मकर्ता । मानितो साच ८३ जे आत्मा मी कर्मातीतु । सर्वकर्मसाक्षिभूतु । हे आपली कहीं मातु । नायकेचि कानीं ८४ म्हणोनि उमपा आत्मया तें । देहेंचिवरी मविजे एथें । विचित्र काई रात्रि दिवसातें । डुडुळ न करी ८५ पैं जेणें आकाशींचा कहीं । सत्य सूर्यु देखिला नाहीं । तो थिल्लरींचें बिंब काई । मानूं न लाहे ८६ थिल्लराचेनि जालेपणें । सूर्यासि आणी होणें । त्याच्या नाशीं नाशणें । कंपें कंपु ८७ आणि निद्रिस्ता चेवो नये । तंव स्वप्न साच हों लाहे । रज्जु नेणत सापा बिहे । विस्मो कवण ८८ जंव कावळ आथि डोळां । तंव चंद्रु देखावा कीं पिंवळा । काय मृगींही मृगजळा । भाळावें नाहीं ८९ तैसा शास्त्रागुरूचेनि नांवें । जो वाराही टेंकों नेदी सिवें । केवळ मौढ्याचेनिचि जीवें । जियाला जो ३९० तेणें देहात्मदृष्टीमुळें । आत्मया वोंपे देहाचें जाळें । जैसा अभ्राचा वेगु कोल्हें । चंद्री मानीं ९१ मग तया मानणयासाठीं । देहबंदिशाळे किरीटी । कर्माच्या वज्रगांठीं । कैळासे तो ९२ पाहें पां बद्ध भावना दृढा । नळियेवरी तो बापुडा । काय मोकळे पायाचाही चंवडा । न ठेकेचि पूसा ९३ म्हणोनि निर्मळे आत्मस्वरूपीं । जो प्रकृतीचें केलें आरोपी । तो कल्पकोडीच्या मापीं । मवीचि कर्मे ९४ आतां कर्मामाजीं असे । परी तयातें कर्म न स्पर्शे । वडवावळातें जैसें । समुद्रोदक ९५

व हेतु यांच्या योगानें जें सामन्य कर्म घडतें; तें जर्‍हां यथाशास्त्र घडत नाहीं, ७५ तेव्हांही कर्म हें घडतच असतें; पण वावरें ! तें घडणें नव्हे; तें पापकर्म असून पापकर्मालाच हेतु आहे. ७६

**अन्वयार्थ**--(तु)-परंतु-(तत्र एवं सति)-प्रत्येक कर्माचीं अशीं पांच कारणें असतांना-(यः)-जो मनुष्य-(अकृतबुद्धित्वात्)-शास्त्रीय उपदेशादिकांनीं बुद्धि संस्कृत झालेली नसल्यामुळें-(केवलं-आत्मानं)-एकट्या आत्म्यालाच-(कर्तारं)-कर्ता-(पश्यति)-पहातो-(सः दुर्मतिः)-तो दुर्बुद्धि पुरुष-(न पश्यति)-बरोबर पहात नाहीं, त्याला आत्म्याचें यथार्थ ज्ञान नसतें. १६

अशा प्रकारें, हे सुमहिमा, कर्मांच्या पांच कारणांस पांच हेतु आहेत. तर आतां या ठिकाणीं आत्मा हा कर्मास कारण आहे काय, सांग बरें ? ७७ ज्याप्रमाणें सूर्य हा स्वतः विषय न होतां नेत्रादि पांच इंद्रियांचे विषय प्रकट करतो, त्याप्रमाणें, आत्मा कर्म न होतो करणाराकडून तीं तीं प्रकाशित करितो; ७८ हें बघ-अर्जुना, आरसा व प्रतिबिंब हीं दोन्ही आपण न होतां पहाणारा जसा दोहींला प्रकाशित करितो; ७९ किंवा हे पांडुसुता, सूर्य हा दिवस व रात्र यांस कारणीभूत असून ज्याप्रमाणें त्यांपासून अलिप्त असतो, त्याप्रमाणें आत्म्याच्या अधिष्ठानावर जरी कर्म होतें, तरी तो कर्मकर्ता नाहीं असें दाखवितो. ३८० परंतु मीपणाच्या भ्रमानें ज्याची बुद्धि देह हाच मी अशी पक्की झाली आहे, त्याला आपल्या स्वरूपाची मध्यरात्रच झाली आहे. ८१ ज्यानें चैतन्य, ईश्वर व ब्रह्म हें सर्व देहालाच मानलें आहे, त्याला आत्मा कर्ता आहे अशी बुद्धि होणें अगदीं साहाजिक आहे. ८२ आत्मा हाच कर्मकर्ता आहे असाही पक्का निश्चय जो करीत नाहीं, तो खरोखर देहालाच कर्मकर्ता असें मानतो. ८३ कारण, मी आत्मा कर्मातीत असून सर्व कर्मांना साक्षिभूत आहें, अशी स्वस्वरूपाची गोष्ट तो कानानेंही कधीं ऐकत नाहीं; ८४ म्हणून, सर्वव्यापक असा जो आत्मा, तो देहच होय असें तो मानतो. काय चमत्कार पहा, की घुबड हें आपले डोळे झांकून घेऊन दिवसालाच रात्र म्हणत नाहीं काय ? ८५ हें पहा-ज्यानें आकाशांतील खर्‍या सूर्यास कधीं पाहिले नाहीं, तो डबक्यांतील पाण्यांत पडलेल्या प्रतिबिंबास सूर्य समजत नाहीं काय ? ८६ डबक्यांत पाणी सांचलें म्हणजे सूर्य जन्मास आला असें म्हणतो, तेंच पाणी वार्‍यानें हालले म्हणजे सूर्यास कंप सुटला असें म्हणतो, आणि डबकें कोरडें पडलें म्हणजे सूर्याचा नाश झाला असें समजतो; ८७ आणि निजलेला मनुष्य जोंपर्यंत जागा होत नाहीं, तोंपर्यंत त्याला स्वप्न खरें भासतें; ज्याला ही दोरी आहे हें कळत नाहीं, तो तिला साप समजून भितो, यांत नवल तें कोणतें ? ८८ जोंपर्यंत कावीळ झालेली आहे, तोंपर्यंत चंद्राचा रंग पिवळा दिसतो. अरे, मृगांनीं मृगजलाला भुलू नये, तर मग कोणी भुलावें ? ८९ त्याप्रमाणें शास्त्र व गुरु यांच्या नांवाचा नुसता वाराही आपल्याला लागूं देत नाहीं. कारण, तो मूर्खपणाच्याच जोरावर वांचलेला असतो. ३९० अभ्रें चालत असली म्हणजे ज्याप्रमाणें कोल्हे हे चंद्र चालतो असा त्याचेवर आरोप करतात, त्याप्रमाणें, त्यानें देहच आत्मा आहे, अशा दृष्टीनें आत्म्याला देहरूप जाळें घातलें आहे. ९१ मग अर्जुना, त्याच्या या समजुतीनें देहरूपी बंदीशाळेंत कर्माच्या बळकट गांठीनें तो बंदिवान होतो, ९२ अरे, हें पहा-बिचारा राघू नळीवर बसलेला असतो, तो मी बांधला गेलों आहें, अशा दृढ कल्पनेनें आपल्या मोकळ्या पायाचा पंजा मोकळा असूनही ती नळी सोडीत नाहीं; ९३ म्हणून, निर्मळ अशा आत्मस्वरूपावर जो देहानें केलेल्या कर्मांचा आरोप करतो, तो कल्पकोटीपर्यंत कर्मांतच गुंडाळला जातो. येथून पुढच्या श्लोकास अवतरण देतात.--९४ आतां कर्म करीत असूनही ज्याला कर्माचा स्पर्श होत नाहीं. जसा वडवानल हा समुद्रांत असूनही त्याला समुद्र स्पर्श करीत नाहीं. ९५ तसें जो अलिप्तपणानें कर्म

१ अनियमित. २ पहाणारा. ३ अडकून राहिली, थबकली, व्यापली. ४ आत्मस्वरूपाची. ५ ज्ञानरूप अशा. ६ ज्ञान, प्रमाण. ७ अपरिहार्य, बिनतोड. ८ कधीं ९ अपरिमित, अमर्याद. १० देहाएवढा. ११ मोजावा. १२ घुबड. १३ डबक्यांतील. १४ जागृति. १५ खरें. १६ भितो. १७ नवल, १८ कावीळ नांवाचा रोग. १९ भुलावें.

२० हवेस. २१ अज्ञानाच्या, मूर्खपणाच्या. २२ वांचला. २३ देहच आत्मा अशा दृष्टीमुळें. २४ घातलें. २५ बळकट गांठींत. २६ बांधला जातो. २७ कांठीवर, फुंकणीवर, नळीवर. २८ मोकळ्या पायांनीहि, पाय सुटे असतांही २९ सोडीत नाहीं. ३० राघू. ३१ मोजतो.

तैसेनि वेगळेपणें । जयाचें कर्मीं असणें । तो कीर वोळखावा कवणें । तरी सांगों ९६ जे मुक्ततें निर्धारितां[1] । लाभे आपलीच मुक्तता । जैसी दीपें दिसे पाहतां । आपली वस्तु ९७ नातरी दर्पणु जंव उटिजे[2] । तंव आपणपयां आपण भेटिजे । कां तोयें[3] पावतां तोय होइजे । लवणें जेवीं ९८ हें असो परतोनि मागुतें । प्रतिबिंब पाहे बिंबातें । तंव पाहणें जाउनी आयितें । बिंबचि होय ९९ तैसें हारपलें आपणपें पावे । तैं संतांतें पाहातां गिवसावें[4] । म्हणोनि वा[5]नावे ऐकावे । तेचि सदा ४०० परी कर्मीं असोनि कर्में । जो नांवरे[6] समेंविषमें[7] । चर्मचक्षूंचेनि चामें[8] । दृष्टि जैसी १ तैसा सोडवला जो आहे । तयाचें रूप आतां पाहे । उपपत्तीची[9] बांहे[10] । उभऊनि सांगों २

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबद्धयते ॥१७॥

तरी अविद्येचिया निद्रां[11] । विश्वस्वप्नाचा हा धांदां[12] । भोगीत होता प्रबुद्धा । अनादि जो ३ तो महावाक्याचेनि[13] नांवें[14] । गुरुकृपेचेनि थांवें[15] । माथां हातु ठेविला नव्हे । थापटिला जैसा ४ तैसा विश्वस्वप्नेंसीं मांया[16] । नीद सांडूनि धनंजया । सहसा चेइला[17] अद्वया-[18] । नंदपणें जो ५ तेव्हां मृगजळाचे पूर । दिसते एक निरंतर । हारपती कां चंद्रकर[19] । फांकतां जैसे ६ कां बाळत्व निघोनि जाय । तैं बागुला नाहीं त्रांय[20] । पैं जळालिया इंधन न होय । इंधन[21] जेवीं ७ नाना चेवो[22] आलिया पाठीं । तैं स्वप्न न दिसे दिठी । तैसी अहं ममता किरीटी । नुरेचि तया ८ मग सूर्य आंधारालागीं । रिघो कां भलते सुरंगी[23] । परी तो तयाच्या भागीं । नाहींचि जैसा ९ तैसा आत्मत्वें वेष्टिला होये । तो जया तया दृश्यातें पाहे । तें दृश्य द्रष्टेपणेंसीं होत जाये । तयाचेंचि रूप ४१० जैसा वन्हि जया लागे । तें वन्हिचि जालिया आंगें । दाह्य[24]दाहकविभागें । सांडिजे तें ११ तैसा कर्माकारा दुजेया[25] । तो कर्तेपणाचा आत्मया । आलु आला तो गेलिया । कांहीं[26] बाहीं जें उरे १२ तिये आत्मस्थितीचा जो रावो । मग तो देहीं इये जाणेल ठावो । काय प्रलयांबूचा[27] उन्नाहो[28] । वोघु मानी १३ तैसी ते पूर्ण अहंता[29] । काई देहपणें पंडुसुता । आवरे काई सविता । बिंबें धरिला १४ पैं मथूनि लोणी घेपे[30] । तें मागुती ताकीं घापे । तरी तें अलिप्तपणें सिंपे[31] । तेणेंसीं काई १५ नाना कोष्ठौनि[32] वीरेशा । वेगळाविलिया[33] हुताशा[34] । राहे काष्ठाचिया मांदुसा[35] । कोंडलेपणें १६ कां रात्रीचिया उदराआंतु । रिगाला जो हा

करीत असतो, तो खरोखर कसा ओळखावा, तें सांगतों, ९६ मुक्ताच्या स्वरूपाविषयीं विचार करूं लागलें असतां आपली स्वाभाविक असणारी मुक्तता आपल्यास प्राप्त होते. जसें दिव्याच्या उजेडानें पाहूं लागल्यावर आपली वस्तु आपल्याला दिसते; ९७ अथवा आरसा स्वच्छ करूं लागलें असतां आपलें स्वरूप त्यांत आपल्यास दिसतें; किंवा मीठ पाण्यांत घातलें असतां जसें त्याचें पाणी होतें; ९८ फार काय, प्रतिबिंब मागें परतून आपल्या बिंबाला जो पाहूं लागतें तों त्याचें पाहणेपणही जाऊन तें सहज बिंबच बनतें. ९९ तसें संतांच्या स्थितीचा विचार केला असतां आपलें हारवलेलें स्वरूप आपल्यास मिळतें. म्हणून संतांचेंच नेहमी वर्णन करावें. ४०० परंतु कर्म करीत असून जो कर्माच्या वाईट अथवा चांगल्या परिणामानें लिप्त होत नाहीं; जशी चर्मचक्षूंच्या चर्मानें खरी दृष्टी लोपत नाहीं; १ तसा जो कर्मातीत झाला आहे, त्याचीं लक्षणें तुला युक्तीचे बाहु उभारून सांगतों. २

**अन्वयार्थ**—(यस्य)–ज्याला–(अहंकृतः भावः)–मी कर्ता आहें, असा भाव–अशी भावना–प्रत्यय–(न)–नसतो व–(यस्य) –ज्याची–(बुद्धिः)–मति–अन्तःकरण–(न लिप्यते)–मी हें केलें याच्या योगानें मी नरकास जाईन, अशा अनुतापानें लिप्त होत नाहीं–(सः)–तो–(इमान् लोकान्)–या लोकांना–या सर्व–प्राण्यांना–(हत्वा अपि)–मारूनहि–(न हन्ति)–मारीत नाहीं व–(न निबध्यते)–त्या कर्माच्या फलानें बद्ध होत नाहीं. १७

तर, हे प्रबुद्धा अर्जुना, जो अज्ञानाच्या निद्रेंत विश्वरूपी स्वप्नाचा अनुभव पुष्कळ वर्षे घेत होता, ३ तो तत्वमसि हें महावाक्य कानीं पडून गुरुकृपेच्या बलानें मस्तकावर नुसता हात ठेवणें नव्हे, तर जसा थापटून जागा केला आहे; ४ तसा अर्जुना, जगद्रूपी स्वप्न व अज्ञानरूपी निद्रा टाकून सहज निजस्वरूपाचें दर्शनानें जागा झाला, ५ तेव्हां चंद्र उगवल्यावर मृगजलाचे दिसणारे पूर आपोआप जसें नाहींतसे होतात; ६ किंवा बाल्यदशा निघून गेल्यावर बागुलबुवाला जसें कोणी भीत नाहीं, किंवा लाकूड जळल्यावर त्यांत जसा लांकुडपणा रहात नाहीं; ७ अथवा जागृत झाल्यावर स्वप्न जसें दृष्टीस पडत नाहीं, तसा अर्जुना, त्याला मी व माझें हा अभिमान रहात नाहीं. ८ मग, अंधार पहाण्याकरितां जरी सूर्य वारेल त्या भुयारांत शिरला, तरी तेथें जसा अंधार रहात नाहीं, ९ तसा मी आत्मा आहें, अशी ज्याची पूर्ण समजूत झाली, तो ज्या वस्तूकडे पाहील तीं वस्तु व त्याची दृष्टि हीं त्याला आत्मरूपींच दिसतील. ४१० अग्नि ज्या पदार्थास लागतो तो पदार्थ जसा अग्निरूपच होतो; व मग जसा दाह्य व दाहक हा भेद शिल्लक रहात नाहीं, ११ तसें कर्माचे ठिकाणीं द्वैत मानून तें कर्म करण्याचा आत्म्यावर आळ आलेला नाहींसा झाल्यावर जें कांहीं उरतें, १२ प्रलयकालीं जळाची वृद्धि होऊन सर्व जलमय झाल्यावर त्यांत लहान लहान ओघांचा पत्ताही लागत नाहीं, त्याप्रमाणें त्या आत्मस्थितीचा जो स्वामी झाला त्याला देहाचें भान कसें राहणार? १३ अर्जुना, सूर्याचें प्रतिबिंब धरल्यानें सूर्य का आपल्या हातीं लागणार आहे? नाहीं. त्याचप्रमाणें देहाला मी म्हटल्यानें ती ब्रह्माची पूर्ण अहंता का प्राप्त होणार आहे? १४ ताक घुसळून लोणी काढल्यावर तें पुनः ताकांत घातलें तर तें पूर्वीप्रमाणें ताकाशीं एकरूप होईल का? १५ अथवा हे वीरेशा, लांकडांत स्वभावतःच गुप्त असलेला अग्नि घर्षणादि उपायानें प्रगट केल्यास तो लांकडाच्या पेटींत कोंडून ठेवल्यावर राहील कां? १६ किंवा रात्रीच्या उदरांतून जो सूर्य बाहेर निघाला

१ निश्चय करितां. २ स्वच्छ करावा. ३ पाणी. ४ सत्पुरुषांचें दर्शन घेऊन त्यांचेकडून शोधून घ्यावें. ५ वर्णावें. ६ लिप्त होत नाहीं. ७ चांगल्या अथवा वाईट परिणामानें. ८ कातड्यानें. ९ युक्तीची. १० बाहु. ११ निद्रेंत, झोंपेंत. १२ धंदा. १३ तत्वमसि या महावाक्याच्या उपदेशानें. १४ योगानें. १५ बळानें. १६ अज्ञान. १७ जागा झाला. १८ निजस्वरूपाच्या दर्शनानें. १९ चंद्रकिरण. २० सत्ता, अस्तित्व. २१ पाकक्रिया, स्वयंपाक. २२ जागृति. २३ भुयारांत. २४ दाह्य–काष्टें आदि व दाहक–अग्नि ह्या दोन प्रकारच्या विभागानें. २५ द्वैत. २६ कांहीं अवशेष. २७ प्रलय काळच्या जळाचा. २८ वृद्धि. २९ अहंब्रह्म. ३० घेतलें जातें, काढलें असतां. ३१ स्पर्शे, मिसळेल. ३२ लांकडांतून. ३३ वेगळा केला असतां. ३४ अग्नि. ३५ पेटींत.

[1]भास्वतु । तो रात्री ऐसी मातु । ऐके कायी १७ तैसें वेद्य वेदक[2]पणेंसीं । पडि-
लें कां जयाचे ग्रासीं । तया देह मी ऐसी । अहंता कैंची १८ आणि आका-
शें जेथें जेथुनी । जाइजे तेथ असे भरोनी । म्हणोनि ठेलें [3]कोंदोनी । [4]आपें-
आप १९ तैसें जें तेणें करावें । तो तेंचि आहे स्वभावें । मा कोणें कर्मी वे-
ष्टावें । कर्तेपणें ४२० नुरेचि गगनावीण ठावो । नोहेचि समुद्रा प्रवाहो । [5]नु-
ठीचि ध्रुवा जांवों । तैसें जाहालें २१ ऐसेनि अहंकृतिभावो । जयाचा बोधीं जा-
हला [6]वावो । तऱ्ही देहा जंव [9]निर्वाहो । तंव [7]आथी [8]कर्में २२ वारा जरी वा-
जोनि वोसरे । तरी तो डोलेरुखीं उरे । कां सेंदें[10] [11]द्रुति राहे कापुरें । [12]वेंचलेनी
२३ कां सरलेया गीताचा समारंभु । न वचे राहवले[13]पणाचा [14]क्षोभु । भूमी
लोळोनि गेलिया अंबु । वोल थारे २४ अगा मावळलेनि [15]अर्कें । [16]संध्येचिये
[17]भूमिके । ज्योतिर्दीप्ती[18] कौतुकें । दिसे जैसी २५ पैं [19]लक्ष भेदिलियाहीवरी । बाण
धांवेचि तंववरी । जंव भरली आथी [20]उरी । बळाची तया २६ नाना चक्रीं
भांडें जालें । तें [21]कुलालें परतें नेलें । परी भ्रमेंचि तें[22] मागिले । भोंवडिले[23]पणें
२७ तैसा देहाभिमानु गेलिया । देह जेणें स्वभावें धनंजया । जालें तें [24]अपै-
सया । चेष्टवीच तें २८ संकल्पेंवीण स्वप्न । न लावितां [25]दोंगीचें बन । न
रचितां गंधर्वभुवन । उठी जैसें २९ आत्मयाचेनि [26]उद्यमेंवीण । तैसें देहादिपं-
चकारण । होय आपणयां आपण । क्रियाजात ४३० पैं [27]प्राचीनसंस्कारवशें ।
पांचही कारणें सहेतुकें । [28]कर्मव्रजती गा अनेकें । कर्माकारें ३१ तया कर्मां-
माजीं मग । संहरो आघवें जग । अथवा नवें चांग । [29]अनुकरो ३२ परी [30]कुं-
मुद कैसेनि सुके । तें कमळ कैसें फांके । हीं दोन्हीं रवी न देखे । जयापरी
३३ कां वीजु[31] वर्षोनि आभाळ । ठिकरिया [32]ओतो [33]भूतळ । अथवा करू [34]शों-
द्वळ । प्रसन्नावृष्टी ३४ तरी तया दोहींतें जैसें । नेणिजेचि कां आकाशें । तैसा
देहींच जो असे । [35]विदेहदृष्टी ३५ तो देहादिकीं चेष्टीं । घडतां मोडतां हे सृष्टी ।
न देखे स्वप्न दृष्टी । [36]चेइला जैसा ३६ एऱ्हवीं [37]चामाचे [38]डोळेवरी । जे देखती
देहचिवरी । ते कीर तो व्यापारी । ऐसेंचि मानिती ३७ कां तणाचा बाहुला ।
जो [39]आंगरामेरें ठेविला । तो साचाचि [40]रांखता कोल्हा । मानिजे ना ३८ [41]पिसें
नेसलें कां नागवें । हें [42]लोकीं येऊनि जाणावें । [43]ठोणोरियांचे [44]मैवावे । आणिकीं
घाय ३९ का महासतीचे भोग । देखे कीर सकळ जग । परी ते आगी ना आंग ।

आहे, तो 'रात्र' अशी गोष्ट कानांनी ऐकेल तरी कां! १७ त्याप्रमाणें, जाणण्याची वस्तु व जाणणारा हीं ज्याचे बोधांत नाहींशीं झालीं आहेत, त्याला मी देह आहें, अथवा देहच आत्मा आहे, असा गर्व कोठून असणार? १८ आणि आकाशानें जेथून ज्या ठिकाणीं जावें, त्या ठिकाणी तें भरलेलें असल्यामुळें सहजच तें सर्वत्र ठिकाणीं व्याप्त आहे; १९ तसें तो जें जें करितो, तें आत्मस्वरूपच आहे; मग कोणत्या कर्मानें तो आपलेकडे कर्तेपणा घेईल? ४२० गगनाशिवाय कोणतेंही ठिकाण नाहीं, समुद्राला प्रवाह नाहीं, व ध्रुव नक्षत्राला कोठेंही जातां येत नाहीं तशी त्या मनुष्याची स्थिति झाली आहे. २१ अशा प्रकारें ज्याला आत्मज्ञानाच्या योगें कर्माच्या कर्तेपणाचा अभिमान बाधीत म्हणजे मिथ्या आहे, तथापि त्याचा देह आहे, तोंपर्यंत त्याच्याकडून कर्म होणारच; २२ वारा वाहण्याचा जरी बंद झाला, तरी झाडाचें हालणें बंद होत नाहीं, अथवा कापूर जरी संपला, तरी करंड्यांत वास शिल्लक असतो; २३ अथवा गाण्याचा समारंभ संपला, तरी गाणें ऐकून मनास झालेल्या आनंदाचा भर जसा कमी होत नाहीं, किंवा पाण्यानें जमीन ओली होऊन पाणी कमी झालें असतां जशी त्याची ओल मागें रहातें; २४ अरे, सूर्य मावळल्यावर संध्याकाळीं पश्चिमेकडे आकाशांत सूर्याच्या ज्योतीचें तेज (संधिप्रकाश) जसें दिसतें; २५ तसेंच निशाण मारल्यावरही बाण जसा त्यांतील शक्ति कमी होईपर्यंत पुढेंच जातो; २६ अथवा, कुंभाराच्या चाकावर तयार झालेलें भांडें कुंभारानें काढून घेतल्यावरही पूर्वी दिलेल्या गतीनें चाक फिरतच असतें, २७ तसा हे धनंजया, देहाचा अभिमान नाहींसा झाल्यावरही, ज्या कर्मांनी देह उत्पन्न झाला आहे, तें कर्म त्या देहाकडून चेष्टा करवीलच. त्या चेष्टा याच्या इच्छेवर अवलंबून नसतात. २८ संकल्पाशिवाय स्वप्न दिसतें, न लावितां जशी अरण्यांत झाडें उत्पन्न होतात, व रचना केल्याशिवाय आकाशांत जशीं गंधर्वनगरें दृष्टीस पडतात, २९ तशीं आत्म्याच्या संकल्पाशिवाय देहादि पांच कारणें मागें सांगितलीं, तीं क्रिया करण्यास कारणीभूत होतात. ४३० परंतु पूर्वजन्मींच्या संस्कारानें पांचही कारणें व हेतु अनेक क्रिया करवितात. ३१ त्या कर्मांत मग सर्व जगाचा संहार होवो, अथवा नवें जग उत्पन्न होवो; ३२ परंतु कुमुद कसें सुकतें, व कमलांची प्रभा कशी फांकते, हे आपल्यापासून होणारे दोन्ही परिणाम सूर्यास माहीत नसतात; ३३ किंवा आकाशांतून वीज पडून जमिनीच्या जरी ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या किंवा पाऊस पडून जरी जमीन हिरवीगार झाली, ३४ तरी या दोहींलाही जसें आकाश जाणत नाहीं; तसा तो देहाभिमानरहित देहांतच वास करतो, ३५ तो जसा स्वप्नांतून जागा झालेला मनुष्य स्वप्न पहात नाहीं, तसा देहादिकांपासून सृष्टीचा उद्भव झाला किंवा लय झाला, तरी जागत नाहीं. ३६ एऱ्हवीं, हा देही आहे असें जे चर्मचक्षूंनीं पहातात, ते त्यालाच कर्म करणारा असें मानतात. ३७ अथवा गवताचें बुजगावणें करून तें शेताच्या कडेस उभें केलें, म्हणजे कोल्हा त्यालाच खरा रखवालदार समजत नाहीं काय? ३८ वेडा मनुष्य वस्त्र नेसलेला आहे, किंवा नागवा आहे हें जसें लोकांनीं जाणावें लागतें; किंवा रणांत पडलेल्या मनुष्याच्या अंगावरचे घाव जसे दुसऱ्यांनीं मोजावे लागतात, ३९ अथवा एखादी महासती सती जाते वेळेस न्हाणें, माखणें मळवट भरणें इत्यादि सौभाग्यशृंगार जरी करीत आहे असें लोकांस दिसलें तरी तिला अग्नि दिसत नाहीं, स्वतःच्या शरीराचें तिला भान नसतें, किंवा लोकांकडेही तिचें लक्ष नसतें तर ती पतिस्व-

१ सूर्य. २ जाणणाऱ्या सकट, वेद्य–ज्ञानविषय वस्तु. ३ मरून. ४ आपल्या स्वरूपांत. ५ ध्रुव नक्षत्राला चलनवलन (गति) प्राप्त होत नाहीं. ६ व्यर्थ. ७ आहेत. ८ नाहींसा होतो. ९ झाडाचें ठिकाणीं. १० करंड्यांत. ११ गंध. १२ संपून गेला तरी. १३ गढून गेल्याचा. १४ ओल. १५ सूर्यानें. १६ संध्याकाळच्या. १७ आकाशांत. १८ तेज. १९ निशाण. २० शिल्लक, अवशेष. २१ कुंभाराचें. २२ चाक. २३ गतीनें. २४ आपोआप. २५ अरण्यांतलें. २६ संकल्पाशिवाय. २७ पूर्व जन्मींच्या संस्कारानें. २८ क्रिया करविती. २९ रचो, उत्पन्न करो. ३० चंद्रविकासी कमल. ३१ वीज पडून. ३२ तुकडे तुकडे होवो. ३३ जमीन. ३४ हिरव्या गार गवतावर प्रसाद करणारी, शाद्वलानुकूल. ३५ देहाभिमानरहित, देहातीत स्थितींत. ३६ झालेला ३७ चामड्याचे. ३८ टोळ्यांनीं. ३९ शेताच्या कडेस. ४० संरक्षक. ४१ अभिष्ट, वेडें. ४२ लोकांनीं. ४३ युद्धांत मेलेल्यानें ४४ मोजावे.

ना लोकु देखे ४४० तैसा स्वस्वरूपें उठिला । जो दृश्येंसीं द्रष्टा आला । तो नेणे काय राहटला । इंद्रियग्रामु ४१ अगा थोरीं कल्लोळीं कल्लोळ साने । लोपतां तिरींचेनि जनें । एकीं एक गिळिलें हें मनें । मानिजे जन्हीं ४२ तन्हीं उदकाप्रति पाहीं । कोण ग्रसितसे काई । तैसें पूर्णा दुजें नाहीं । जें तो मारी ४३ सुवर्णाचिया चंडिका । सुवर्णशूळेंचि देखा । सुवर्णाचिया महिखा । नाशु केला ४४ तो देवलर्वसिया कडा । व्यवहारु गमला फुडा । वांचूनि शूळ महिष चामुंडा । सुवर्णचि तें ४५ पैं चित्रींचें जळ हुताशुं । तो दृष्टीचाचि आभासु । पटीं आगी बोलाशुं । दोन्ही नाहीं ४६ मुक्ताचें देह तैसें । हालत संस्कारवशें । तें देखोनि लोक पिसे । कर्ता म्हणती ४७ आणि तयां करणेयाआंतु । घडो तिहीं लोकां घातु । परी तेणें केला हे मातु । बोलों नये ४८ अगा अंधारुचि देखावा तेजें । मग तो फेडिजे[१४] हें के बोलिजे । तैसें ज्ञानिया नाहीं दुजें । जें तो मारील ४९ म्हणोनि तयाची बुद्धी । नेणे पापपुण्याची गंधी । गंगा मीनलिया नदी । विटाळु जैसा ४५० आगीसी आगी झगडलिया । काय पोळे धनंजया । कीं शस्त्र रुपे आपणया । आपणची ५१ तैसें आपणपयापरतें । जो नेणे क्रियाजातातें । तेथ कैंचि लिंपवी बुद्धीतें । तयाचिये ५२ म्हणोनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहालें जया । नाहीं शरीरादिकीं तया । कर्मबंधु ५३ जे कर्ता जीव त्रिदोणीं । काढूनि पांचही खाणी । घडित आहे करणीं । आउतीं दाहें ५४ तेथ न्यावो आणि अन्यावो । हा द्विविधु साधूनि आंवो । उभवितां न लवी खेंवो । कर्मभुवनें ५५ या थोरांडा कीर कामा । विरंजा नोहे आत्मा । परी म्हणसी हन उपक्रमा । हातु लावी ५६ तो साक्षी चिद्रूपु । कर्मप्रवृत्तीचा संकल्पु । उठी तो कां निरोपु । आपणचि दे ५७ तरी कर्मप्रवृत्तीहीलागीं । तया आयासु नाहीं आंगीं । जे प्रवृत्तीचिही उलिगीं । लोकुचि आथी ५८ म्हणोनि आत्मयाचें केवळ । जो रूपचि जाहला निखिळ । तया नाहीं बंदिशाळ । कर्माची हे ५९ परी अज्ञानाच्या पटीं । अन्यथा ज्ञानाचें चित्र उठी । तेथ चितारणी हे त्रिपुटी । प्रसिद्ध जे कां ४६०

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना । करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

जें ज्ञान ज्ञाता ज्ञेय । हें जगाचें बीज त्रय । तें कर्माची निःसंदेह । प्रवृत्ति जाण ६१ आतां ययाचि गा त्रया । व्यक्ती वेगळालिया । आइकें धनंजया ।

रूपीं तल्लीन झालेली असते, ४४० त्याप्रमाणें आत्मस्वरूप-प्राप्तीच्या योगें जो द्रष्टा दृश्याग्रह नष्ट झाला, (पहाणारा व पहाण्याची वस्तु हा भाव नाहींसा झाला,) तो इंद्रियसमुदायानें काय कर्म केलें हें जाणत नाहीं. ४१ अरे समुद्राचे तीरावर असलेल्या लोकांस जरी असें वाटलें की थोरल्या लाटेनें भोवरूपा लाटांस एकदम गिळून टाकलें आहे, ४२ तरी उदकाच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां कोणती लाट कोणत्या लाटेस खाऊन टाकते? त्याप्रमाणें जो आत्मस्वरूपास मिळाला, त्यास कर्म टाकावें असें कर्माविषयीं द्वैत रहात नाहीं. ४३ पहा-सोन्याच्या देवानें, सोन्याच्या त्रिशुलानें, सोन्याच्याच महिषासुराचा नाश केला, ४४ हा सर्व प्रकार भक्तांच्या दृष्टीनें खरा असा भासतो, परंतु सोन्याच्या दृष्टीनें त्रिशूल महिषासूर व देवी हें सर्व सोनेंच आहे; ४५ तसेंच, भिंतीवर काढलेल्या चित्रांत एक तलाव व एक अग्निपुंज हा फक्त दृष्टीचाच भेद आहे; परंतु त्या दोहोंस वस्त्र लावलें असतां तें भिजत नाहीं; व जळतही नाहीं; ४६ त्याप्रमाणें, जो ज्ञाता आहे, त्याच्या देहाचा व्यवहार पूर्वकर्मानुसार होत असतो; परंतु हें न समजतां वेडे लोक त्यालाच कर्मकर्ता असें म्हणतात. ४७ आणि तो कर्म करीत असतां जरी त्यायोगें त्रैलोक्याचा घात झाला, तरी तो त्यानें केला असें म्हणूं नये. ४८ अरे, सूर्यानें अंधार पहावा, आणि मग त्याला दूर करावा असें म्हणावें, त्याप्रमाणें, ज्ञान्याला अशी कांहीं दुसरी वस्तुच नाहीं, कीं जिचा तो नाश करील. त्याचे ठिकाणचा द्वैतभाव जाऊन, सर्व जग त्याला स्वस्वरूप झालेलें असतें. ४९ म्हणून त्याच्या बुद्धीला पाप व पुण्य यांचा गंधही नसतो. जशी एखादी नदी गंगेस मिळाली असतां तिचा अपवित्रपणा नाहींसा होतो. ४५० अर्जुना, अग्नीवर जर अग्नि पडला तर तो भाजतो का? किंवा शस्त्र आपणच आपल्याला कधीं रुपेल काय? ५१ त्याप्रमाणें, आपल्या स्वरूपाहून कोणतेंही कर्म भिन्न नाहीं असें जो समजतो, तेथें कोणत्या पदार्थानें त्याची बुद्धि लिप्त होईल? ५२ म्हणून जो कार्य, कर्ता व क्रिया ही त्रिपुटी आपणच झाला आहे, तो शरीरादिकांपासून होणाऱ्या कर्मापासून बद्ध होत नाहीं. ५३ कारण, जीवात्मा हा मोठेपणानें आपल्यास कर्ता समजून दहा इंद्रियांच्या साधनानें पांच हेतु धारण करितो; ५४ आणि त्या ठिकाणीं न्याय किंवा अन्याय अशीं दोन प्रकारचीं कर्में करून एका क्षणांत कर्माचीं भुवनें तयार करतो. ५५ पण या मोठ्या कृत्यास आत्मा हा साक्षकर्ता नाहीं, व तो आरंभ करतो असेंही म्हणूं नको. ५६ तो साक्षिभूत व ज्ञानस्वरूप आहे; तेव्हां कर्मप्रवृत्तीचा जो संकल्प उत्पन्न होतो, त्याला तो का आज्ञा देईल? ५७ तर जीं जीं कर्में करण्याकरितां सर्व लोक श्रम करीत असतात, तीं तीं कर्में करण्याविषयीं त्याच्या शरीरास आयास पडत नाहींत. ५८ म्हणून, जो केवळ शुद्ध आत्मस्वरूपी झाला आहे, त्याला ही कर्माची बंदिशाळा नाहीं. ५९ परंतु अज्ञानाच्या पडद्यावर जें विपरीत ज्ञानाचें चित्र उमटतें, तें चित्र काढणारी ही प्रसिद्ध त्रिपुटी आहे, ४६०

**अन्वयार्थ**—(ज्ञानं)—ज्यानें सर्व विषयांचें ज्ञान होतें तें ज्ञान—(ज्ञेयं)—सर्व प्रकारचें ज्ञेय—विषय (परिज्ञाता)—त्यांना जाणणारा भोक्ता—(त्रिविधा कर्मचोदना)—अशी ही तीन प्रकारची कर्मचोदना आहे. कर्मांत प्रवृत्त करणारी सामग्री आहे.—(करणं)—बाह्य व आंतर इंद्रियें,—(कर्म)—कर्त्याला अत्यंत इष्ट असलेलें कर्म,—(कर्ता)—करणांकडून व्यापार करविणारा—(इति)—असा—(त्रिविधः)—तीन प्रकारचा—(कर्मसंग्रहः)—कर्मसंग्रह आहे. १८

कारण ज्ञान, ज्ञाता व ज्ञेय ही त्रिपुटी जगास कारणीभूत असून, इच्यापासूनच कर्माची निःसंशय प्रवृत्ति होते असें समज. ६१ हे धनंजया, आतां त्याच त्रिपुटींचा निरनिराळीं स्वरूपें उघड करून सांगतो.

१ जागृत झाला. २ लय पावला, नाहींसा झाला. ३ व्यवहारला. ४ इंद्रियसमुदाय. ५ तरंग, लाटा. ६ देवीनें. ७ महिषासुराला. ८ पुरवाला. ९ खरा. १० अग्नि. ११ भ्रांति. १२ द्रवत्व, ओलेपणा. १३ पूर्वकर्मानें. १४ दूर करावा. १५ वार्ता, गंध. १६ मिळाली असतां. १७ अपवित्रपणा. १८ भेटला असतां. १९ भाजतो. २० कोणता पदार्थ. २१ कार्य करणारा व करणें. २२ मोठेपणानें. २३ हेतु. २४ इंद्रियरूप दहा नांगरांनीं. २५ न्याय. २६ आकार. २७ क्षणही. २८ मोठ्या. २९ साक्षकर्ता. ३० आरंभास. ३१ ज्ञानस्वरूप. ३२ विपरीत. ३३ द्वैताचें. ३४ चित्र काढणारी, चित्र व पट ही त्रिपुटी. ३५ आकार.

करूं रूप ६२ तरी जीवसूर्यबिंबाचे । रश्मी श्रोत्रादिकें पांचें । धांवोनि विषय-पद्माचे । फोडिती मढ ६३ कीं जीवनृपाचे वारु उपलाणें । घेऊनि इंद्रियांचीं कैंकाणें । विषयदेशींचें नागवणें । आणीत जे ६४ हें असो इहीं इंद्रियीं राहाटे । जें सुखदुःखेंसीं जीवा भेटे । तें सुषुप्तिकालीं वोहटे । जेथ ज्ञान ६५ तया जीवा नांव ज्ञाता । आणि जें हें सांगितलें आतां । तेंचि एथ पंडुसुता । ज्ञान जाण ६६ जें अविद्येचिये पोटीं । उपजतखेंवो किरीटी । आपणयातें वांटी । तिहीं ठायीं ६७ आपुलिये धांवे पुढां । घालूनि ज्ञेयाचा गुडां । उभारी मागिलीकडां । ज्ञातृत्वातें ६८ मग ज्ञातया ज्ञेया दोघां । तो नांदणुकेचा वेगा । मार्जी जालेनि पैंगा । वाहे जेणें ६९ ठाकूनि ज्ञेयाची शिंव । पुरे जयाची धांव । सकळ पदार्थां नांव । सूतसे जें ४७० तें गा सामान्य ज्ञान । या बोला नाहीं आन । ज्ञेयाचेंही चिन्ह । आइक आतां ७१ तरी शब्द स्पर्शु । रूप गंध रसु । हा पंचविध आभासु । ज्ञेयाचा तो ७२ जैसें एकेचि चूतफळें । इंद्रियां वेगळवेगळें । रसें वर्णें परिमळें । भेटिजे स्पर्शें ७३ तैसें ज्ञेय तरी एकसरें । परी ज्ञान इंद्रियद्वारें । घे म्हणोनि प्रकारें । पांचें जालें ७४ आणि समुद्रीं वोघाचें जाणें । सरे लौणीपासीं धांवणें । कां फळीं सरे वाढणें । सस्याचें जेवीं ७५ तैसें इंद्रियांच्या वोहवटीं । धांवतया ज्ञाना जेथ ठी । होय तें गा किरीटी । विषय ज्ञेय ७६ एवं ज्ञातया ज्ञाना ज्ञेया । तिहीं रूप केलें धनंजया । हें त्रिविध सर्व क्रिया- । प्रवृत्ति जाण ७७ जे शब्दादि विषय । हें पंचविध जें ज्ञेय । तेंचि प्रिय कां अप्रिय । एकेपरीचें ७८ ज्ञान मोटकें ज्ञातया । दावी ना जंव धनंजया । तंव स्वीकारा कीं त्यजावया । प्रवर्तेचि तो ७९ परी मीनातें देखोनि बकु । जैसा निधानातें रंकु । कां स्त्री देखोनि कामुकु । प्रवृत्ति धरी ४८० जैसें खालौरा धांवें पाणी । भ्रमर पुष्पाचिये घाणीं । नाना सुटला सांजवणीं । वत्सुचि पां ८१ अगा स्वर्गींची उर्वशी । ऐकोनि जेवीं माणुसीं । वरैता लावीजती आकाशीं । यागांचिया ८२ पैं पारिवा जैसा किरीटी । चढला नभाचिये पोटीं । पारवी देखोनि लोटी । आंगचि सगळें ८३ हें ना घनगर्जनासरिसा । मयूर वोवांडे आकाशा । ज्ञाता ज्ञेय देखोनि तैसा । धांवचि घे ८४ म्हणोनि ज्ञान ज्ञेय ज्ञाता । हे त्रिविध गा पांडुसुता । होयचि कर्मा समस्तां । प्रवृत्ति येथ ८५ परी तेंचि ज्ञेय विपायें । जरी ज्ञातयातें प्रिय होये । तरी भो-

ती ऐक. ६२ तर चिद्रूपी सूर्यबिंबाचे ज्ञानेंद्रियादि पंचेंद्रियरूपी किरण विषयरूपी कमळाचे कळीवर पडून तीं उमलवितात; ६३ अथवा जीवरूपी राजा, हा शरीररूपी उपलाणी म्हणजे खोगराशिवाय घोड्यावर बसून हातांत इंद्रियरूपी भाले घेऊन विषयरूपी देशांतून लूट आणतात; ६४ फार काय! जें या इंद्रियांत वागत असून जीवाला सुख व दुःख देतें, व जें ज्ञान गाढ झोंपेंत जेथें नाहींसें होतें, ६५ त्या जीवाला अर्जुना, ज्ञाता असें म्हणतात; आणि जें आतां सांगितलें त्यालाच ज्ञान असें म्हणतात असें तूं समज. ६६ अर्जुना, जें अज्ञानाच्या पोटांत उपजतांक्षणी आपल्यास तीन ठिकाणी वांटून घेतें, ६७ आपल्या वृत्तीपुढें जाणावयाचा विषयरूप ज्ञेयाचा दगड घालून आपल्या मागचे बाजूस ज्ञात्याला उभें करतें; ६८ मग ज्ञाता व ज्ञेय या दोघांच्या मधील व्यवहार होत असतांना जें ज्ञान मध्यें रहातें; ६९ ज्ञेयाला जाऊन पोहोंचल्यावर ज्याची धांव खुंटते, व जें सर्व पदार्थाला नांव ठेवितें. ४७० त्याला सामान्य ज्ञान असें म्हणतात, यांत संशय नाहीं. आतां ज्ञेयाचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. ७१ तर शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे ज्ञेयाचे पांच प्रकारचे धर्म आहेत. ७२ जसा एकच आंबा दृष्टीस पडल्यावर पांच इंद्रियांना निरनिराळ्या प्रकारानें भासतो, म्हणजे आंबा या शब्दानें कानास समजतो, रसानें जिभेस समजतो, रंगानें डोळ्यास समजतो, वासानें नाकास समजतो, आणि स्पर्शानें त्वचेस समजतो, ७३ तसें ज्ञेय तर एकच आहे परंतु आपल्या इंद्रियांच्या द्वारानें त्याजविषयी निरनिराळें ज्ञान उत्पन्न होतें, म्हणून तें पांच प्रकारचें झालें आहे. ७४ समुद्रास मिळाल्यावर नदीचा ओघ संपतो, मुक्कामास गेल्यावर चालणें संपतें, अथवा फळ आल्यावर ज्याप्रमाणें धान्याची वाढ खुंटते, ७५ त्याप्रमाणें अर्जुना, इंद्रियांच्या मार्गांत धांवत असलेल्या ज्ञानाचा जेथें शेवट होतो, त्या विषयालाच ज्ञेय असें म्हणतात. ७६ याप्रमाणें धनंजया, ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय यांचीं लक्षणें तुला सांगितलीं. ही त्रिपुटी तीन प्रकारच्या सर्व कर्मांस कारणीभूत आहे. ७७ कारण शब्दादि पांच विषय हेंच ज्ञेय होय आणि तेंच प्रिय किंवा अप्रिय यांपैकीं कोणतें तरी एक असतें. ७८ हे धनंजया, ज्ञान हें ज्ञात्याला ज्ञेय पदार्थ किंचित् दाखवीत आहे, तोंच त्याचा स्वीकार किंवा त्याग करण्याविषयीं ज्ञाता उद्युक्त होतो. ७९ परंतु माशाला पहातांच जसा बगळा त्यास धरावयास धांवतो, अथवा द्रव्याचा ठेवा पहातांक्षणी तो घेण्यास दरिद्री धांवतो, किंवा स्त्री पहातांच जसा कामुक पुरुष तिची प्राप्ति करून घेण्याविषयीं प्रवृत्त होतो; ४८० जसें पाणी उतरत्या जमिनीकडे धांवतें; भ्रमर पुष्पांचा वास घेण्यास जातो; अथवा धार काढण्याचे वेळीं वासरूं सोडल्यावर तें गाईकडे धांवत जातें; ८१ अरे, स्वर्गांतील उर्वशी नामक अप्सरेचें वर्णन ऐकून ती उपभोगास मिळावी, म्हणून असे लोक आकाशांत यज्ञरूपी शिड्या लावतात; ८२ अथवा अर्जुना, पारवा आकाशांत फिरत असतां पारवीस पहातांच एकदम सगळें आंग टाकून तिजजवळ येतो; ८३ इतकेंच नव्हे, तर मेघांची गर्जना होतांक्षणींच मोर जसा आपल्यास आकाशावरून ओंवाळून टाकतो, तसा ज्ञाता हा ज्ञेयास ( विषयास ) पाहून उडी घालतो. ८४ म्हणून हे पांडुसुता; ज्ञान ज्ञेय, व ज्ञाता ही त्रिपुटी सर्व कर्में करण्यास कारणीभूत होते. ८५ आणि कदाचित् तोच विषय जर ज्ञात्यास आवडता असला, तर मग तो भोगण्याविषयीं

१ स्पष्टीकरण. २ किरण. ३ कळी. ४ घोडे. ५ पाठीवर खोगीर नसलेले, उघड्या पाठीचे. ६ हत्यारें. ७ दुःख भोगरूपी लूट. ८ गाढ झोंपेंत. ९ नाहींसें होतें. १० अज्ञानाच्या. ११ उपजतांच. १२ वृत्तीस. १३ जाणावयाचा विषयरूप दगड. १४ मागचे बाजूस ज्ञात्याला तयार करतें. १५ मार्ग, संबंध. १६ त्या ज्ञानानें. १७ हद्द. १८ ठेवीतसें, घालीतसे. १९ दुसरें. २० आमर्फळानें. २१ रंगानें. २२ वासानें. २३ शेवटापाशीं. २४ चालणें. २५ धान्याचें. २६ मार्गी. २७ शेवट. २८ निरूपण. २९ अल्प, थोडे. ३० माशाला. ३१ बगळा. ३२ द्रव्याला, ठेव्याला. ३३ विषयी. ३४ उतरणीकडे. ३५ वासाला. ३६ संध्याकाळीं, धार काढण्याच्या वेळेस. ३७ शिड्या. ३८ पारवा पक्षी. ३९ ओंवाळून टाकतो. ४० कदाचित्.

गावया न साहे। क्षणही विलंबु ८६ नातरी अवचटें। तेंचि विरुद्ध होऊनि भेटे। तरी युगांत वाटे। सांडावयां ८७ व्याळा कां हारा। वरपडा जालेया नरा। हरिखु आणि दरारा। सरसाचि उठी ८८ तैसें ज्ञेय प्रियाप्रियें। देखिलेनि ज्ञातया होये। मग त्याग स्वीकारीं वाहे। व्यापारातें ८९ तेथ रांगी प्रतिमल्लाचा। गोसांवी सर्वदळाचा। रथु सांडूनि पायांचा। होय जैसा ४९० तैसें ज्ञातेपणें जें असे। तें ये कर्ता ऐसिये दशे। जेवितें बैसलें जैसें। रंधन करूं ९१ कां भंवरेंचि केला मळा। वरकलुचि झाला अंकसळा। नाना देवो रिगाला देउळा-। चिया कामा ९२ तैसा ज्ञेयाचिया हांवा। ज्ञाता इंद्रियांचा मेळावा। राहाटवी तेथ पांडवा। कर्ता होय ९३ आणि आपण होउनी कर्ता। ज्ञाना आणि करणेंता। तेथें ज्ञेयेंचि स्वभावतां। कार्य होय ९४ ऐसा ज्ञानाचिये त्रिजगती। पालटु पडे गा सुमती। डोळयाची शोभा रातीं। पालटे जैसी ९५ कां अदृष्ट जालिया उदासु। पालटे श्रीमंताचा विलासु। पुणिवेपाठीं शीतांशु। पालटे जैसा ९६ तैसा चाळितां करणें। ज्ञाता वेष्टिजे कर्तेपणें। तेथिचीं तियें लक्षणें। ऐक आतां ९७ तरी बुद्धि आणि मन। चित्त अहंकार हन। हें चतुर्विध चिन्ह। अंतःकरणाचें ९८ बाह्य त्वचा श्रवण। चक्षु रसना घ्राण। हें पंचविध जाण। इंद्रियें गा ९९ तेथ आंतुलें तंव करणें। कर्ता कर्तव्या घे उभाणें। मग तें जरी जाणे। सुखा येतें ५०० तरी बाहेरिलें तियेंही। चक्षुरादिकें दाहाही उठौनि लवलाहीं। व्यापारा सूये १ मग तो इंद्रियेंकदंबु। करविजे तंव रांबु। जंव कर्तव्याचा लाभु। हातासि ये २ ना तें कर्तव्य जरीं दुःखें। फळेल ऐसें देखे। तो लावी त्यागमुखें। तियें दाहाही ३ मग फिटे दुःखाचा ठावो। तंव राहाटवी रात्रिदिवो। विकर्णवातें कां रावो। जयापरी ४ तसेनि त्यागस्वीकारी। वाहातां इंद्रियांची धुरी। ज्ञातयातें अवधारीं। कर्ता म्हणिपे ५ आणि कर्तयाच्या सर्व कर्मीं। औउतांचिया परी क्षमी। म्हणोनि इंद्रियांतें आम्ही। करणें म्हणों ६ आणि हेचि करणेंवरी। कर्ता क्रिया ज्या उभारी। तिया व्यापे तें अवधारीं। कर्म एथ ७ सोनाराचिया बुद्धी लेणें। व्यापे चंद्रकरीं चांदिणें। कां व्यापे वेल्हाळेपणें। वेली जैसी ८ नाना प्रभा व्यापे प्रकाशु। गोडिया इक्षुरसु। हें असो अवकाशु। आकाशीं जैसा ९ तैसें कर्तव्याचिया क्रिया। व्या-

त्याला एका क्षणाचाही विलंब खपत नाहीं. ८६ अथवा
क्वचित तोच विषय जर नावडता असला, तर त्याचा
त्याग करण्याविषयीं एकेक क्षण त्याला युगाप्रमाणें भासतो.
८७ सर्प असून नीळ मण्यांचा हार आहे, या भावनेनें हर्ष
होतो व त्यास हात लावतांक्षणींच सर्प आहे असें लक्षांत
येऊन लागलीच भीति उत्पन्न होते; ८८ त्याप्रमाणें प्रिय
किंवा अप्रिय विषय पाहिल्यावर ज्ञात्याची स्थिति होते;
आणि मग त्याचा त्याग किंवा स्वीकार करण्याबद्दल कर्म
उत्पन्न होतें. ८९ जो कुस्तीचा शोकी आहे, त्यानें दुसरा
मल्ल समोर पाहिल्यावर, तो जरी सर्व सैन्याचा अधिपति
असला तरी रथ सोडून पादचारी होतो, ४९० तसा जो
ज्ञाता म्हणून असतो, तो विषयासक्त झाला म्हणजे आप-
ल्यास कर्ता असें म्हणवितो, तें त्याचें कर्तेपणास येणें,
ज्याप्रमाणें पानावर बसून आयतें जेवणाऱ्या मनुष्यानें तें
सुख सोडून स्वयंपाकाचे कष्ट करण्यास तयार व्हावें; ९१
किंवा, आपल्यास पुष्परेणु खाण्यास मिळावे म्हणून भ्रम-
रानें जशी बाग लावण्याची खटपट करावी अथवा कसो-
टीनें आपलें ऐश्वर्य तुच्छ मानून धातु व्हावें; किंवा
देवांनी देवळांत स्वस्थ बसण्याचें सोडून देऊळ बांधण्यास
प्रवृत्त व्हावें, ९२ तसें विषयांच्या इच्छेनें ज्ञाता जेथें
इंद्रियांचें लाड पुरवितो, तेथें अर्जुना, त्याला कर्ता असें
नांव प्राप्त होतें. ९३ आणि आपण जो ज्ञाता, तो कर्ता
होऊन ज्ञानाला कारण (साधन) करतो, मग तेथें ज्ञेय
हें सहज कार्य होतें. ९४ हे सुमते, ज्ञानाच्या त्रिपुटीस
अशा रीतीनें पालट पडतो. जसें नेत्रांचें तेज रात्रीं उपयोगी
पडत नाहीं; ९५ किंवा दैव प्रतिकूल झाल्यावर श्रीमंताचे
विलास बदलतात; अथवा पौर्णिमा झाल्यावर ज्याप्रमाणें
चंद्र एकेक कलेनें कमी होत जातो, ९६ त्याप्रमाणें इंद्रियांचे
लाड पुरवीत असतां ज्ञाता हा कर्तेपणाच्या अभिमानांत
गुंततो, त्या वेळचीं त्याचीं लक्षणें आतां तुला सांगतों,
तीं ऐक. ९७ तर बुद्धि, मन, चित्त व अहंकार हें या
अंतःकरणाचें चतुर्विध चिन्ह आहे; (अंतःकरणाच्या
ह्या चार वृत्ति आहेत;) ९८ आणि त्वचा, कान, डोळे,
जिव्हा व नाक अशीं पांच प्रकारचीं इंद्रियें आहेत. ९९
त्या ठिकाणीं अंतःकरणाच्या वृत्तींच्या योगें जीवास कर्म
करण्याविषयीं स्फुरण येतें; मग या कर्मापासून सुखप्राप्ति
होईल असें वाटूं लागलें, ५०० तर नेत्रादि दहाही बाह्ये-
न्द्रियांना उठवून त्यांना तो व्यापार करावयास लावितो;
१ नंतर त्या इंद्रियसमुदायाला तोंपर्यंत राबवितो,
कीं जोंपर्यंत कर्माचें फल हातीं आलें नाहीं. २ किंवा
जर त्या कर्मापासून दुःख होईल असें दिसलें, तर त्या
कर्माचा त्याग करण्याकरितां त्या दहाही इंद्रियांची योजना
करतो. ३ मग जसा एकादा राजा वसूल करण्याकरितां
आपल्या सेवकांना रात्रंदिवस राबवितो, तसा तो तें
दुःख नाहींसें होईपर्यंत रात्रंदिवस खटपट करितो. ४
अशा प्रकारें कर्माचा त्याग अथवा स्वीकार करण्याकरितां
इंद्रियांचें पुढारीपण ज्यानें घेतलें; म्हणजे त्यालाच
कर्ता असें म्हणतात; ५ आणि कर्ता हा कर्म करण्याकरितां
आवडीप्रमाणें सर्व इंद्रियांना खपवितो, म्हणून आम्ही
त्यांस करणें म्हणजे क्रियेचीं साधनें असें म्हणतों;
६ आणि हें करण्याकरितां कर्ता ज्या ज्या क्रिया उत्पन्न
करितो, त्यांनीं जें व्यापिलें जातें त्यास कर्म असें म्हणतों.
७ सोनाराच्या बुद्धीनें जसे दागिने व्यापले जातात,
चंद्राच्या किरणांनीं जसें चांदणें व्यापलें जातें, किंवा विस्ता-
रानें जसा वेल व्यापला जातो, ८ अथवा सूर्याच्या प्रभेनें
जसा सूर्यप्रकाश व्यापला जातो व गोडीनें जसा उंसाचा रस
व्यापला जातो, हें असो; अवकाशानें जसें आकाश व्यापलें
जातें; ९ तसें अर्जुना, कार्याच्या क्रियांनीं जें व्यापिलें जातें

१ एकापकीं कदाचित्. २ अल्पकाल. ३ प्राप्त. ४ प्रेमी, दुसरा बरोबरीचा मल्ल पाहून त्याच्याशीं कुस्ति खेळण्याचें प्रेम येतें अशाला. ५ सर्व सैन्याचा. ६ पायीं चालत जातो. ७ जेवणारे. ८ स्वयंपाक. ९ भ्रमरानें. १० कसोटी. ११ धातु कसोटीला लावून त्याची परीक्षा करणारा. १२ विषयेच्छेनें. १३ विषयः १४ इंद्रियस्वरूप. १५ विषय. १६ दैव. १७ प्रतिकूल. १८ ऐश्वर्य. १९ चंद्र. २० इंद्रियें. २१ मनादि क्रियासाधनें. २२ जीव. २३ स्फुरण. २४ घालतो, लावतो. २५ इंद्रियसमुदाय. २६ राबणूक, व्यापार. २७ वसूल करण्याकरितां. २८ प्रवृत्ति, पुढारीपण. २९ नांगरादिकांच्या. ३० खपवतो. ३१ क्रियासाधनें. ३२ विस्तारानें. ३३ अथवा.

पलें जें धनंजया । तें कर्म गा बोलावया । आन नाहीं ५१० एवं कर्ता कर्म करण । या तिहींचेंही लक्षण । सांगितलें तुज विचक्षण । शिरोमणी ११ एथ ज्ञाता ज्ञान ज्ञेय । हें कर्माचें प्रवृत्तित्रय । तैसेंचि कर्ता करण कार्य । हा कर्मसंचयो १२ वन्हीं ठेविला असे धूमु । आथी बीजीं जेवीं द्रुमु । कां मनीं जोडे कामु । सदा जैसा १३ तैसा कर्ता क्रिया करणीं । कर्माचें आहे जितवणीं । सोनें जैसें खाणी । सुवर्णाचिये १४ म्हणोनि हें कार्य मी कर्ता । ऐसें आथि जेथ पांडुसुता । तेथ आत्मा दूरी समस्तां- । क्रियांपासीं १५ यालागीं पुढतपुढती । आत्मा वेगळाचि सुमती । आतां असो हे किती । जाणतासि तूं १६

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः । प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

परी सांगितलें जें ज्ञान । कर्म कर्ता हन । ते तीन्ही तिहीं ठायीं भिन्न । गुणीं आहाती १७ म्हणोनि ज्ञाना कर्मा कर्तया । पैंतेजों नये धनंजया । जे दोनी बांधती सोडावया । एकचि प्रौढे १८ तें सात्त्विक ठाउवें होये । तो गुणभेदु सांगों पाहें । जो सांख्यशास्त्रीं आहे । उवाइला १९ जें विचारक्षीरसमुद्र । स्वबोधकुमुदिनीचंद्र । ज्ञानडोळसां नरेंद्र । शास्त्रांचा जें ५२० कीं प्रकृतिपुरुष दोनी । मिसळली दिवोरजनीं । तियें निवाडितां त्रिभुवनीं । मार्तंडु जें २१ जेथ अपारा मोहराशी । तत्त्वाच्या मापीं चोविसीं । उभाणां घेऊनि परेशीं । सुरवाडिजे २२ अर्जुना तें सांख्यशास्त्र । पढे जयाचें स्तोत्र । तें गुणभेदचरित्र । ऐसें आहे २३ जे आपुलेनि आंगिकें । त्रिविधपणाचेनि अंकें । दृश्यजात तितुकें । अंकित केलें २४ एवं सत्त्वरजतमा । तिहींची एवढी असे महिमा । जे त्रैविध्य आदी ब्रह्मा । अंतीं कृमी २५ परी विश्वाची आघवी भांदी । जेणें भेदलेनि गुणभेदीं । पडिली तें तंव आदी । ज्ञान सांगों २६ जे दिठी जरी चोख कीजे । तरी भलतेंही चोख सुजे । तैसें ज्ञानें शुद्धें लाहिजे । सर्वही शुद्ध २७ म्हणोनि तें सात्त्विक ज्ञान । आतां सांगों दे अवधान । कैवल्यगुणनिधान । श्रीकृष्ण म्हणे २८

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते । अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥

तरी अर्जुना गा तें फुडें । सात्त्विक ज्ञान चोखडें । जयाच्या उदयीं ज्ञेय बुडे । ज्ञातेनिसीं २९ जैसा सूर्य न देखे अंधारें । सरिता नेणिजती सागरें । कां कवळिलिया न धरे । आत्मच्छाया ५३० तयापरी जया ज्ञाना । शिवादि

तें कर्म होय, यांत शंका नाही. ५१० याप्रमाणें अर्जुना, तुला कर्म, कर्ता व करण या तिघांची लक्षणें सांगितली. ११ तर ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी कर्मप्रवृत्तिकारक आहे. तसेंच कर्ता, करण व कार्य ही त्रिपुटी हा कर्म-संचय आहे. १२ विस्तवांत जसा धूर ठेवलेलाच असतो, बीजांत जसा वृक्ष असतो. अथवा मनांत जशी नेहमी इच्छा असते, १३ आणि सोनें जसें सुवर्णाच्या खाणीत सांपडतें, तसा कर्ता, क्रिया व करणें (इंद्रियें) ही त्रिपुटी कर्माचा जिव्हाळाच (उत्पत्तिस्थानच) आहे म्हणून, १४ हे पांडुसुता, अमुक कार्याचा मी कर्ता, असा जीवानें कर्तेपणा धारण केला, म्हणजे सर्व क्रिया जवळ येतात, व आत्मा त्या सर्व क्रियापासून दूर असतो. १५ वास्तव हे सुमते, कर्मापासून आत्मा वेगळाच आहे, हें तुला वारंवार काय सांगावें ? कारण हें तूं जाणतच आहेस. १६

**अन्वयार्थ**—(गुणसंख्याने)-गुणांची गणना ज्यांत केली आहे त्या कपिलाच्या सांख्यशास्त्रांत-(ज्ञाने)-ज्ञान-(कर्म)-क्रिया-(च)-व-(कर्ता च)-क्रियांचा कर्ता-(गुणभेदतः)-सत्त्वादि गुणांच्या भेदानें-(त्रिधा एव)-तीन प्रकारचाच-(प्रोच्यते)-सांगितला जातो.-(तानि अपि)-तीं ज्ञानादिकही-(यथावत्)-यथाशास्त्र-(शृणु)-ऐक. १९

पण तुला जें ज्ञान, कर्म व कर्ता म्हणून सांगितलें, तीं तिन्ही तीन गुणांनीं निरनिराळीं आहेत. १७ म्हणून अर्जुना, ज्ञान, कर्म व कर्ता यांच्यावर विश्वास ठेवूं नको. कारण यांतील रज व तम या दोन गुणांपासून मनुष्य बद्ध होतो; व फक्त सत्त्वगुणच सुटका करण्यास समर्थ आहे. १८ तो सात्त्विक गुणाचा भेद-ज्याविषयी सांख्य-शास्त्रांत विवेचन केलेलें आहे,-तो तुला समजेल असा सांगतों. १९ जें सांख्यशास्त्र विचाररूपी क्षीरसमुद्रच आहे, आत्मबोधरूपी कमलास प्रफुल्लित करणारा चंद्रच आहे, व ज्ञान उत्पन्न करणाऱ्या शास्त्रांत श्रेष्ठ आहे; ५२० किंवा प्रकृति व पुरुष हीं दोन्ही दिवस व रात्र याप्रमाणें अहर्निश एकमेकांत मिसळली आहेत. त्यांना पृथक करून दाखविणारा या त्रिभुवनांत सांख्यशास्त्र सूर्यच आहे. २१ जे अपार अशा मोहाचीं चोवीस तत्त्वांनीं ठाव घेऊन परतत्त्वाची प्राप्ति करून, देऊन सुख भोगावयास लावतें; २२ अर्जुना, असें जें सांख्यशास्त्र, तें ज्या गुणांचें स्तवन करितें, त्या तीन गुणांचें वर्णन असें आहे. २३ ज्या गुणांनीं आपल्या बळानें तीन प्रकारचे शिक्के देऊन सर्व दृश्य पदार्थ स्वाधीन करून घेतले आहेत. २४ याप्रमाणें सत्त्व, रज व तम या तीन गुणांचें एवढें सामर्थ्य आहे कीं, त्यांनीं ब्रह्मदेवापासून कीटकापर्यंत तीन भेद केले आहेत. २५ परंतु हें सर्व विश्व ज्याच्या योगानें या तीन गुणांच्या सपाट्यांत सांपडलें, तें ज्ञान तुला अगोदर सांगतों. २६ कारण, दृष्टि शुद्ध झाली म्हणजे पाहिजे त्या पदार्थांचें स्वरूप समजतें; त्याप्रमाणें शुद्ध ज्ञान प्राप्त झालें असतां सर्व पदार्थांचें शुद्ध स्वरूप कळतें. २७ म्हणून सात्त्विक ज्ञान आतां तुला सांगतों, लक्ष दे, असें कैवल्यगुणनिधान भगवान् श्रीकृष्ण म्हणाले. २८

**अन्वयार्थ**—(येन)-ज्या ज्ञानानें-(विभक्तेषु सर्वभूतेषु)-अगदीं भिन्न भिन्न असलेल्या सर्वभूतांमध्यें-(एकं अविभक्तं अव्ययं भावं)-एक अभिन्न अव्यय भाव-आत्मवस्तु-(ईक्षते)-पाहतो-(तत् ज्ञानं)-तें ज्ञान-(सात्त्विकं)-सात्त्विक आहे, असें-(विद्धि)-जाण. २०

तर अर्जुना, तेंच खरोखर शुद्ध सात्त्विक ज्ञान होय कीं, ज्याचा उदय झाल्याबरोबर त्यामध्यें ज्ञेय हें ज्ञात्यासह लीन होतें. २९ ज्याप्रमाणें सूर्य अंधाराला पाहूं शकत नाही, किंवा समुद्राला नद्यांची ओळखही नसते, अथवा आपल्या पडछायेस धरूं लागलें असतां ती सांपडत नाहीं, ५३० त्याप्रमाणें, ज्या ज्ञानाला शिवापासून गवता-

१ इंद्रियें. २ ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय, कर्ता, कार्य (कर्म), करण (इंद्रियें). ३ जाणण्याची वस्तु. ४ कर्माचें साहित्य. ५ वृक्ष. ६ इच्छा. ७ जिव्हाळा. ८ वारंवार. ९ विश्वास. १० रज व तम. ११ एकटा सत्त्व गुणच. १२ समर्थ होतो. १३ स्पष्ट केला. १४ आत्मबोध कमलास प्रफुल्लित कर्ता चंद्र. १५ ज्ञान उत्पन्न करणाऱ्या. १६ शा... ९५ दिवसरात्रीप्रमाणें. १७ सूर्य. १८ माप. १९ परतत्त्वाशीं. २० सुखी व्हावें—सुखी करतें. २१ स्तवन. २२ आंगच्या बळानें. २३ आकारानें, चिन्हानें, छापानें. २४ तिहेरीपणा, त्रिविधपणा. २५ मेळा, समुदाय. २६ कळतें, समजतें. २७ मिळवावें. २८ लक्ष्य. २९ मोक्षप्राप्तीचा ठेवा. ३० शुद्ध. ३१ नद्या. ३२ सापडे.

तृणावसाना । इया भूतव्यक्ति भिन्ना । नाडळती ३१ जैसें हातें चित्र पाहातां ।
होय पाणियें मीठ धुतां । कां चेवोनि स्वप्ना येतां । जैसें होय ३२ तैसें ज्ञानें
जेणें । करितां ज्ञातव्यातें पाहाणें । जाणता ना जाणणें । ज्ञाणावें उरे ३३ पैं
सोनें आटूनि लेणीं । न काढिती आपुलिया आयणी । कां तरंग न घेपती
पाणी । गाळूनि जैसें ३४ तैसी जया ज्ञानाचिया हाता । न लगेचि दृश्यपथा ।
तें ज्ञान जाण सर्वथा । सात्त्विक गा ३५ आरिसा पाहों जातां कोडें । जैसें
पाहातेंचि कां रिगे पुढें । तैसें ज्ञेय लोटोनि पडे । ज्ञाताचि जें ३६ पुढतीं तेंचि
सात्त्विक ज्ञान । जें मोक्षलक्ष्मीचें भुवन । हें असो ऐक चिन्ह । राजसाचें ३७

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् । वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥२१॥

तरी पार्था परियेस । तें ज्ञान गा राजस । जे भेदाची कांस । धरूनि चाले
३८ विचित्रता भूतांचिया । आपण आंतोनि ठिकरिया । बहु चेकें ज्ञातया ।
आणिली जेणें ३९ जैसें साचा रूपाआड । घालूनि विसरीचें कवाड । मग
स्वप्नाचें कावाड । ओपी निद्रा ५४० तैसें स्वज्ञानाचिये पौळी । बाहेरि मिथ्या
मोहाचे खळी । तिहीं अवस्थांचिया वह्योळी । दावी जे जीवा ४१ अलंकारपणें
झांकलें । बाळा सोनें कां वायां गेलें । तैसें नामीं रूपीं दुरावलें । अद्वैत जयां
४२ अवतरली गाडग्यां घेडां । पृथ्वी अनोळख जाली मूढां । वन्हि जाला कां-
नडा । दीपत्वासाठीं ४३ कां वस्त्रपणाचेनि आरोपें । मूर्खाप्रति तंतु हारपे । ना-
ना मुग्धा पेटु लोपे । दाऊनि चित्र ४४ तैशी जया ज्ञाना । जाणोनि भूतव्यक्ती
भिन्ना । ऐक्यबोधाची भावना । निमोनि गेली ४५ मग इंधनीं भेदला अनळु ।
फुलावरी परिमळु । कां जळभेदें शकलु । चंद्र जैसा ४६ तैसे पदार्थभेद बहु-
वस । जाणोनि लहान थोर वेष । आंतलें तें राजस । ज्ञान येथ ४७ आतां ताम-
साचेंहि लिंग । सांगेन तें वोळख चांग । डावलावया मातंग- । सदन जैसें ४८

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् । अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

तरी किरीटी जें ज्ञान । हिंडे विधीचेनि वस्त्रेंहीन । श्रुति पाठमोरी नग्न ।
म्हणौनि तया ४९ येरीही शास्त्रें बटिकरीं । जें निंदेचे विटाळवरी । बोळवि-
लेंसे डोंगरीं । म्लेच्छधर्माच्या ५५० जें गा ज्ञान ऐसें । गुणग्रहें तामसें । घेतलें
भोंवे पिसें । होऊनियां ५१ जें सोयरिकें बांधु नेणे । पदार्थीं निषेधु न म्हणे ।
निरोपिलें जैसें सुणें । शून्यग्रामीं ५२ तया तोंडीं जें नांडळे । कां खातां जेणें

पर्यंत सर्व व्यक्तींत भिन्नपणा दिसत नाहीं; ३१ भिंतीवरील चित्र सारवून पाहिलें असतां, किंवा मीठ धुतलें असतां जसें होतें अथवा जागृत झाल्यावर स्वप्नाची जशी स्थिति होते; ३२ तसें ज्या ज्ञानाच्या प्रकाशानें ज्ञेय पाहूं गेलें असतां, ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ही त्रिपुटी नाहींशी होते; ३३ परंतु ज्ञास जसें सोन्याची परीक्षा करण्याकरितां आपल्या बुद्धीनें दागिने आटवून त्यांतील सोनें काढावें लागत नाहीं, किंवा पाणी घ्यावयाचें असल्यास त्यावरील लाटा गाळून तें घेत नाहीं, ३४ तसा सर्व दृश्य वस्तूंचे ठिकाणीं ज्या ज्ञानाला भेद दिसत नाहीं, त्याच ज्ञानाला सात्त्विक ज्ञान असें म्हणतात. ३५ आरसा पाहूं गेलें असतां जसें पहाणाराचेंच प्रतिबिंब त्यांत दिसतें, तसें ज्ञेय लोटून प्रत्येक वस्तूचे ठिकाणीं ज्ञाता आपलें स्वरूपच पहातो. ३६ हेंच सात्त्विक ज्ञान मोक्ष लक्ष्मीचें मंदिर होय. हें असो; आतां तुला 'राजस' ज्ञानाचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक. ३७

**अन्वयार्थ**--(तु)-परंतु-(यत् ज्ञानं)-जें ज्ञान-(सर्वेषु भूतेषु)-सर्व प्राण्यांमध्यें-(पृथक्त्वेन)-प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न रूपानें-(नानाभावान् पृथग्विधान्)-भिन्न भिन्न लक्षणाचे निरनिराळे पदार्थ-(वेत्ति)-जाणतें--(तत् ज्ञानं)--तें ज्ञान -(राजसं)-राजस आहे, असें-(विद्धि)-जाण. २१

तर पार्था, तेंच ज्ञान राजस होय, की जें भूतमात्राचे ठिकाणीं भेदभाव मानून चालतें. समजलास. ३८ ज्या ज्ञानानें भूतमात्राचे ठिकाणीं अनेकत्व मानून आपल्या ठिकऱ्या (वेगळेपणा) करून घेतल्या आहेत; व ज्यानें ज्ञानाला चकवून सोडलें आहे; ३९ ज्याप्रमाणें निद्रा ही स्वस्वरूपाचे आड अज्ञानाचा पडदा घालून मग स्वप्नांतील कष्टमय स्थिति आणते ५४० त्याप्रमाणें आत्मज्ञानाच्या मंदिराभोंवताली मायेचा पसारा घालून जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांच्या थापा मारून जें जीवास फसवितें. ४१ अज्ञ मनुष्याला दागिन्यांच्या रूपानें सोनें दाखविलें असतां सोन्याची ओळख नसते तसें नामरूपाच्या भेदामुळें ज्या ज्ञानाला अद्वैत दुरावतें; ४२ अज्ञान मनुष्याला मातीपासून केलेलीं मडकीं व घागरी हीं दाखविलीं असतां त्यास जशी मूळ मातीची ओळख नसते; अथवा दिवा पाहिला असतां अग्नीची ओळख नसते, ४३ किंवा मूर्ख मनुष्याला वस्त्र दाखविलें असतां तंतूची ओळख पटत नाहीं; अथवा त्यास पडद्यावरील चित्रें दाखविलीं असतां पडद्याची ओळख नसते, ४४ तसें भूतमात्र भिन्न भिन्न आहे, या समजुतीनें ज्या ज्ञानाची ऐक्यबोधाची भावना नाश पावली आहे; ४५ मग लांकडें पेटल्यावर त्यांचे आकाराप्रमाणें अग्नि निरनिराळा आहे, अथवा फुलांवरून वास निरनिराळे आहेत, अथवा चंद्राचा प्रकाश पाण्यांत पडल्यामुळें तें हालल्यावर चंद्राचे तुकडे झाले आहेत, ४६ तसा नानाप्रकारच्या पदार्थांत पुष्कळ भिन्नपणा आहे, अथवा वेपावरून लहान व मोठा हा भेद आहे, या समजुतीनें जें भरलेलें ज्ञान, तें राजस ज्ञान होय. ४७ आतां, गांवाबाहेर असणाऱ्या मांगाचें घर टाळण्याकरितां जसें वाटसरास बजावून सांगावें लागतें, तशीं तामस ज्ञानाचीं लक्षणें तुला सांगतों, तीं पूर्ण ध्यानांत ठेव. ४८

**अन्वयार्थ**--(तु)-पण-(यत्)-[ज्ञानं]-जें ज्ञान-(एकस्मिन् कार्ये)-एका कार्यांत म्ह० शरीरांत किंवा बाहेर प्रतिमादिकांत-(कृत्स्नवत्)-परिपूर्ण असल्याप्रमाणें-(सक्तं)- जीव किंवा ईश्वर हा एवढाच, यापेक्षां अधिक नाहीं अशा अभिनिवेशानें युक्त असलेलें,-(अहैतुकं)-युक्तिशून्य-(अतत्त्वार्थवत् च) -तत्त्वार्थरहित व त्यामुळेंच-(अल्पं)-अगदीं अल्प असतें-(तत् तामसं)-तें तामस ज्ञान म्हणून-(उदाहृतं)-म्हटलेलें आहे.

तर अर्जुना, जें ज्ञान विधिरूपी वस्त्र पांघरल्याशिवाय संचार करितें, आणि म्हणूनच तें नग्न असल्यामुळें, सर्व शास्त्रांची 'माता' जी श्रुति ती त्याला पाठमोरी असते; ४९ इतर शास्त्रांनीही त्या ज्ञानास बट्टा लावून त्याची निंदा केली असतां आपल्यास विटाळ होईल, म्हणून म्लेच्छधर्मरूपी डोंगराकडे ज्याची योळवण केली; ५५० जें ज्ञान तमोगुणरूपी ब्रह्मराक्षसाचा संचार झाल्यामुळें वेड्याप्रमाणें फिरतें; ५१ जें शरीरसंबंधाची अडचण बाळगीत नाहीं, व पदार्थांचे ठिकाणीं निषेधपणा ओळखीत नाहीं; जसें ओसाड गांवांत सोडलेलें कुत्रें स्वेच्छेनें वागतें, ५२ त्याच्या

१ गवतापर्यंत. २ न दिसती. ३ हातानें स्पर्श करून. ४ जागे होऊन. ५ डेयाला, विषयांना. ६ दृष्टीनें, बुद्धीनें. ७ लाटा, ८ आवडीनें. ९ मंदिर १० व्यापून. ११ वेगळेपणा, ठिकऱ्या. १२ चकविणें, भ्रम. १३ अज्ञानाचें. १४ पडदा. १५ कष्टमय स्थिति. १६ मंदिरासभोंवतीं. १७ मायेच्या. १८ जागृति, स्वप्न व सुषुप्ति. १९ क्रीडा. २० नामरूपाच्या भेदानें. २१ घागरीमध्यें. २२ अपरिचित. २३ मूर्खास. २४ पडदा. २५ नाश पावली. २६ काष्ठांनीं. २७ प्रतिबिंबाच्या भेदानें. २८ तुकडे झालेला. २९ व्यापलें. ३० टाकण्यासाठीं. ३१ मांगाचें घर. ३२ शास्त्र विरुद्धाचरणानें, बट्टा लावून. ३३ निंदा करून विटाळून टाकलें. ३४ तमोगुणरूप नक्रानें. ३५ संचरलें. ३६ पिशाच, भ्रमिष्ट. ३७ शरीरसंबंधाविषयीं. ३८ अडचण. ३९ सोडिलें. ४० कुत्रें. ४१ ओसाडगांवीं. ४२ प्राप्त होत नाहीं.

पोळे । तेंचि एक [१]वाळे । येर घेणेची ५३ पैं सोनें चोरितां उंदिरु । न म्हणे [२]थेरु-विथरु । नेणें [३]मांसखाइरु । काळें गोरे ५४ नाना वनामाजीं [५]बोहेंरी । कडसणी जेवीं न करी । कां जीत मेलें न विचारी । बैसतां माशी ५५ अगा [६]वांता कां वाढिलेया । साजुक कां सडलिया । विवेकु कावळिया । नाहीं जैसा ५६ तैसें निषिद्ध सांडूनि जावें । कां [९]विहितें आदरें घ्यावें । हें विषयांचेनि नांवें । नेणोचि जें ५७ जेतुलें [१०]आड पडे दिठी । तेतुलें घेचि विषयासाठीं । मग तें द्रव्य वाटी । शिश्नोदरां ५८ तीर्थातीर्थ हे [११]भोंव । उदकीं नाहीं [१२]सनोळख । तृषा [१३]बोळे तेंचि सुख । वांचूनियां ५९ तयाचिपरी [१४]खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिंद्य । तोंडा आवडे तें [१५]मेध्य । ऐसाचि [१६]बोधु ५६० आणि स्त्रीजात तितुकें । [१७]त्वचेंद्रियेंचि वोळखे । तियेविषयीं सोयरिके । सादरचि बहु ६१ पैं [१९]स्वार्थी जें उपकरे । तयाचि नाम सोयिरें । देहसंबंधु न [२०]सरे । जिये ज्ञानी ६२ मृत्यूचें आघवेंचि अन्न । आघवेंचि आगी [२१]इंधन । तैसें जगाचि आपलें धन । तामसज्ञाना ६३ ऐसेनि विश्व सकळ । जेणें विषयोचि [२२]मानिलें केवळ । तया एक जाण [२३]फळ । [२४]देहभरण ६४ आकाशपतिता नीरा । जैसा सिंधूचि येक थारा । तैसें कृत्यजात उदरा । लागींचि [२५]बुझे ६५ वांचूनि स्वर्गु नरकु आथी । तया हेतु प्रवृत्ति निवृत्ती । इये आघवियेचि राती । [२६]जाणिवेचि जें ६६ जें [२७]देहखंडा नाम आत्मा । ईश्वर पाषाण-प्रतिमा । ययापरौती [२८]प्रेमा । ढळों नेणें ६७ म्हणे पडिलेनि शरीरें । [२९]केलेनिसीं आत्मा [३०]सरे । मा भोगावया उरे । कोण वेषें ६८ ना ईश्वरु पाहतां आहे । तो भोगवी हें जरी होये । तरी देवचि खाये । विकूनियां ६९ गांवींचे देवळेश्वर । [३१]नियामकाचि होती साचार । तरी देशींचे डोंगर । उगे कां असती ५७० ऐसा [३२]विपायें देवो मानिजे । तरी पाषाणमात्रचि जाणिजे । आणि आत्मा तंव म्हणिजे । देहातेंची ७१ येरें पापपुण्यादिकें । तें आघवेंचि करोनि लटिकें । हित मानी अग्निमुखें । [३३]चरणें जें कां ७२ जे [३४]चार्मांचे डोळे दाविती । जें इंद्रियें गोडी लाविती । तेंचि साच हे [३५]प्रतीती । [३६]फुंडी जया ७३ किंबहुना ऐसी [३७]प्रथा । वाढती देखसी पार्था । धूमाची वेली वृथा । आकाशीं जैसी ७४ कोरडा ना वोला । उपेगा आथी गेला । तो वाढोनि मोडला । [३८]भेंडु जैसा ७५ नाना उंसांची क-

तोंडांत सांपडत नाहीं अथवा जें खालीं असतां तोंड भाजतें, तीच वस्तु तें टाकतें, बाकी सर्व वस्तु त्याजपाशीं खप-तात. ५३ उंदीर सोन्यासारखे पदार्थ नाश करीत असतां चांगले अथवा वाईट हें तो जाणत नाहीं, अथवा मांस खाणारा हा मांसाचे ठिकाणीं काळें व गोरें हा भेद जाणत नाहीं; ५४ किंवा रानास वणवा लागल्यावर त्याला जसा कसलाच विचार रहात नाहीं, अथवा प्राणी जिवंत किंवा मेलेला याचा विचार न करितां माशी वाटेल त्यावर बसते. ५५ अरे, कावळ्यास जसा अन्न ओकलेलें किंवा वाढलेलें साजुक किंवा सडलेलें हा विचार नसतो, ५६ तसें अप-वित्र वस्तूचा त्याग करावा, अथवा शास्त्रांत सांगितलेल्या गोष्टींचा आदरानें स्वीकार करावा, हें विषयांचे भरांत जें ज्ञान जाणत नाहीं. ५७ जी जी वस्तु दृष्टीस पडेल, त्या त्या वस्तूचा उपभोग घेतें; आणि मग स्त्री असल्यास देशास व द्रव्य असल्यास उदरास वांटून देतें; ५८ उद-काचे ठिकाणीं हें तीर्थ किंवा हें अपवित्र ही ज्यास ओळख नसते; परंतु त्यापासून तहान भागते एवढेंच सुख जें मानतें, ५९ त्याचप्रमाणें, भक्ष्याभक्ष्य व निंद्यानिंद्य यांचा जें विचार करीत नाहीं, परंतु आपल्यास जें आव-डेल तेंच पवित्र आहे, असा ज्याचा निश्चय झालेला असतो, ५६० आणि स्त्रीजात म्हणून जेवढी आहे तिजवि-षयीं भोग्य विषय एवढीच ज्याची ओळख आहे, व तिचे ठिकाणीं आप्तपणा करण्याविषयीं जें तत्पर असतें; ६१ हें पहा–आपल्या जे उपयोगी पडतील तेच आपले सोयरे आहेत व देहसंबंध ज्यांच्याशीं झालेले आहेत, ते सोयरे आहेत, असा बोध नाहीं, अशी ज्या ज्ञानाची समजूत असते, ६२ मृत्यूला सगळेंच आपलें खाद्य आहे असें वाटतें; अग्नीला सगळेंच इंधन वाटतें तसें या तामस ज्ञानाला सर्व जगत् हें आपलेंच धन आहे असें वाटतें. ६३ याप्रमाणें सर्व जग हें उपभोगाकारितांच निर्माण केलें आहे, अशी ज्या ज्ञानाची समजूत झालेली आहे, त्यास देहभरणाशिवाय दुसरा पुरुषार्थच नसतो; ६४ आका-शांतून पडलेल्या पाण्यास समुद्र हाच एक जसा थारा आहे, त्याप्रमाणें जें ज्ञान कोणतेंही कृत्य केलें तरी तें पोटासाठींच आहे असें समजतें. ६५ स्वर्ग किंवा नरक यांच्या प्राप्तीकरितां विहित व निषिद्ध आचरण हेंच कारण होय, या जाणिवेची ज्या ज्ञानाला मुळींच ओळख नसते; ६६ देहाच्या तुकड्यासच आत्मा हें नांव आहे, व ईश्वर ही दगडाचीच मूर्ति आहे या पलीकडे ज्याच्या बुद्धीची धांव नसते, ६७ आणि तें असें म्हणतें कीं, हें शरीर पडल्यावर आत्मा केलेल्या कर्मासह नाश पावतो; मग कर्मांचीं फळें भोगावयास या मृत्यूलोकीं कोणत्या रूपानें आत्मा राहतो? ६८ किंवा पाहूं गेल्यास ईश्वर आहे असें दिसत नाहीं, तथापि तो कर्माचीं फळें भोगवितो म्हणून जर म्हणावें तर एखादा देवाच्या सोन्यारुप्याच्या मूर्ति विकून खातो, त्याची काय वाट! ६९ गांवांतील प्रमुख देव जर कर्माबद्दल शासन करतील म्हणावें, तर त्या मूर्ति ज्या डोंगरांतील दगडांच्या तयार केलेल्या असतात, ते डोंगर स्वस्थ कां बसतात, ? ५७०. याप्रमाणें कदाचित् देव आहे असें मानलें, तरी तो दगडाची मूर्ति आहे असें समजतें, आणि आत्मा म्हणजे देहच असें समजतें. ७१ याशिवाय, पाप किंवा पुण्य हीं सर्व लटकीं आहेत व अग्नि पेटल्यावर पुढें येणाऱ्या सर्व जिनसांचें भक्षण करतो, त्याप्रमाणें, जी जी गोष्ट भोगण्यास मिळेल, तिचा भोग घेण्यांतच हित आहे असें जें समजतें; ७२ चर्मचक्षूंनी जे जे पदार्थ दृष्टीस पडतील, व इंद्रियें ज्या विषयांची गोडी लावतील, त्याच गोष्टी खऱ्या आहेत असा ज्याचा पक्का अनुभव आहे, ७३ किंबहुना पार्था, आकाशांत धुराचे लोट व्यर्थ जातात, त्याप्रमाणें ज्याची बुद्धि अशा रीतीनें वाढत जाते; ७४ धत्तूरांतील भेंड जसें कोरडें किंवा ओलें असलें तरी मोठें वाढल्यावरही कशाच्याच उपयोगास येत नाहीं, ७५ अथवा ऊंसास

१ टाकिलें जातें. २ बरेंवाईट. ३ मांस खाणारे. ४ अग्नि, वणवा. ५ विचार. ६ ओकलेल्या. ७ कुजलेल्या. ८ अपवित्र. ९ शास्त्रप्रतिपादित. १० समोर येईल, दिसेल. ११ बोली. १२ ओळखीची. १३ हरे. १४ भक्ष्याभक्ष्य. १५ पवित्र. १६ निश्चय. १७ भोग्य विषय. १८ आपल्या हेतूला. १९ कामास येतें. २० योग्य होत नाहीं. २१ काष्ठ. २२ विषयच सर्व जग असें मानलें. २३ पुरुषार्थ. २४ देहपोषण. २५ समजे. २६ ज्ञानाची. २७ परि-च्छिन्न देहाला, लहानशा देहाला. २८ बुद्धि. २९ कर्मा-सह. ३० नाश. ३१ नियामक, शासनकर्ते. ३२ कचित्. ३३ सेवन करणें, भोगणें. ३४ चामड्याचें. ३५ अनुभव. ३६ खरी. ३७ स्थिति, ख्याति. ३८ धत्तूरांतील गुरकुंड.

णसें । कां नपूंसकें माणुसें । वन लागलें जैसें । सांबरीचें ७६ नातरी बाळ-
काचें मन । कां चोराघरींचें धन । अथवा गळस्तन । शेळियेचे ७७ तैसें जें
वायांणें[2] । वोसाळ[3] दिसे जाणणें । तयातें मी म्हणे । तामसज्ञान ७८ तेंही ज्ञान
इया[4] भाषा । बोलिजे तो भावो ऐसा । जात्यंधाचा कां जैसा । डोळा वाडु[5] ७९
कां बधिराचे नीट कान । अपेया नाम पान । तैसें आडनांव ज्ञान । तामसा तया
५८० हें असो किती बोलावें । तरी ऐसें जें देखावें । तें ज्ञान नोहे जाणावें ।
डोळस[6] तम ८१ एवं तिहीं गुणीं । भेदलें यथालक्षणीं । ज्ञान श्रोतेशिरोमणी ।
दाविलें तुज ८२ आतां याचि त्रिप्रकारा । ज्ञानाचेनि धनुर्धरा । प्रकाशें होती
गोचरा । कर्तयांच्या क्रिया ८३ म्हणौनि कर्म पैं गा । अनुसरे तिहीं भागां ।
मोहरे जालिया वोघा । तोय जैसें ८४ तेंचि ज्ञानत्रयवशें । त्रिविध कर्म जें
असें । तेथ सात्त्विक तंव ऐसें । परिस आधीं ८५

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् । अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥

तरी स्वाधिकाराचेनि मार्गें । आलें जें मानिलें आंगें । पतिव्रतेचेनि परी-
ष्वंगें[11] । प्रियातें जैसें ८६ सांवळेया[12] आंगा चंदन । प्रमदालोचनीं[13] अंजन । तैसें
अधिकारासी मंडण[14] । नित्यपणें जें[15] ८७ तें नित्य कर्म भलें । होय नैमित्तिकीं
सांवाइलें[16] । सोनयासि जोडलें । सौरभ्य[17] जैसें ८८ आणि आंगा जीवाची सं-
पत्ती । वेंचूनि[18] बाळाची करी पोळती[19] । परी जीवें उबगणें हें स्थिती । न पाहे
माय ८९ तैसें सर्वस्वें कर्म अनुष्ठी । परी फळें[20] न सूये दिठी[21] । उखिती[22] क्रिया
पैठी[23] । ब्रह्मींचि करी ५९० आणि प्रियें आलिया स्वभावें[24] । शंबळ[25] उरे वेचें ठा-
उवें न०्हे । तैसें सत्प्रसंगें करावें । पारुषे[27] जरी ९१ तरी अकरणाचेनि[28] खेदें ।
द्वेषातें जिवीं न बांधे । जालियाचेनि आनंदें । फुंजों[29] नेणें ९२ ऐसऐसिया हा-
तवटिया । कर्म निफजे जें धनंजया । जाण सात्त्विक हें तया । गुणनाम गा ९३ य-
यावरी राजसांचें[30] । लक्षण सांगिजेल साचें । न करी अवधानाचें । वाणेपण[31] ९४

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः । क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

तरी घरीं मातापितरां । धड बोली नाहीं संसारा । येर विश्व भरी आदरा ।
मूर्ख जैसा ९५ कां तुळशीचिया झाडा । दुरूनि न धांपे[32] सिंतोडा । द्राक्षी-
चिया तरी बुडा । दूधचि लाविजे ९६ तैसीं नित्यनैमित्तिकें । कर्में जियें आ-
वश्यकें । तयांचेविषीं न शके । बैसला उठूं ९७ येरां काम्याचेनि तरी नांवें ।

आलेलीं कणसें किंवा नपुंसक मनुष्य अथवा निवडुंगाचें वन, हीं सर्व जशीं निरुपयोगी आहेत; ७६ अथवा बालकाचें मन किंवा चोरानें चोरून आणलेलें धन अथवा शेळीचे गळ्यास असणारे स्तन जसे निरुपयोगी असतात, ७७ तसें जें निरर्थक व ओशाळलेलें ज्ञान, त्याला मी तामस ज्ञान असें म्हणतों. ७८ त्यालाही ज्ञान अशा शब्दानें वर्णन करण्याचा आभिप्राय हाच कीं, मनुष्य जन्मांध असला तरी त्याच्या डोळ्याचें वर्णन करूं लागलें असतां त्याचे डोळे मोठे आहेत, असें विरुद्ध अर्थानें म्हणतों. ७९ किंवा बहिऱ्याचे कान फार मोठे आहेत, असें त्यास ऐकूं येत नसतांही वाखाणतों अथवा न पिण्याच्या अपवित्र वस्तूस आपण पान ( पिण्याची वस्तु ) असें म्हणतों, तसें या तामस ज्ञानाला ज्ञान हें लाडनांव होय ! ५८० हें असो; आणखी किती वर्णन करावें ! तर असें जें ज्ञान त्यास ज्ञान न समजतां प्रत्यक्ष तमच-अज्ञानच समजावें. ८१ याप्रमाणें, हे धीवृश्रेष्ठा, तीन गुणांनीं भेद पावलेलें जें ज्ञान, त्याची यथार्थ लक्षणें तुला सांगितलीं. ८२ हे धनुर्धरा, आतां याच तीन प्रकारच्या ज्ञानाच्या प्रकाशानें कर्त्याच्या क्रिया उघड दिसतात. ८३ म्हणून पाण्याला जिकडे लावावें तिकडे जसें तें जातें, तसें कर्म हें ज्ञानाच्या तीन भागांनीं निरनिराळें घडतें, ८४ तेंच ज्ञानाच्या अनुरोधानें जें तीन प्रकारचें कर्म होतें, त्यांपैकीं सात्त्विक कर्माचीं लक्षणें प्रथम ऐक. ८५

**अन्वयार्थ**--(यत्)-जें (अफलप्रेप्सुना)-फलाच्या प्राप्तीची इच्छा न करणाऱ्या कर्त्याकडून-(अरागद्वेषतः कृतं)-राग-द्वेषावांचून केलेलें-(नियतं संगरहितं कर्म)-नित्य आसक्तिरहित कर्म-(तत् सात्त्विकं उच्यते)-त्याला सात्त्विक कर्म म्हटलें जातें. २३

तर, पतिव्रता स्त्री आपल्या प्रिय पतीस जसें आलिंगन देते, तसें आपल्या अधिकारानुरूप आपल्यास उक्त असेल, तें कर्म जो आचरण करितो; ८६ सांवळ्या रंगाच्या शरीरास जसें चंदन शोभतें व स्त्रियांच्या नेत्रांस जसें अंजन शोभा देतें, तसें जें अधिकारानुरूप नित्य आचरण केलें असतां भूषण होय, ८७ तें नित्यकर्म करीत असून त्यांत नैमित्तिक कर्मांची भर पडली असतां, सोन्याच्या दागिन्यास सुगंधानें शोभा येते, त्याप्रमाणें होय. ८८ जरी शरीरानें, जीवानें व संपत्तीनें माता आपल्या बालकाचें रक्षण करिते, तरी तिला कंटाळा आला असें कधीं वाटत नाहीं, ८९ तसें सर्वपरी कर्माचें अनुष्ठान फलाची इच्छा न धरितां करितो व तें सर्व कर्म ब्रह्मार्पण करितो; ५९० आणि आपला प्रियपति घरीं आल्यावर त्याच्या भोजनाचे समयीं आपल्यास जिन्नस उरेल किंवा संपेल हें जसें पतिव्रतेच्या लक्षांत सुद्धां येत नाहीं, तसें, कर्म करीत असतां साधुजन घरीं आल्यावर त्यांचें आदरातिथ्य करण्यांत वेळ मोडून जरी कर्म राहिलें, ९१ तरी जो कर्म करण्याचें राहिलें, असा खेद मनास होऊं देत नाहीं व रागावत नाहीं व तें कर्म शेवटास गेलें असतां जो आनंदानें गर्व मानीत नाहीं; ९२ या युक्तीनें जें कर्म होतें, त्याला अर्जुना, सात्त्विक कर्म म्हणतात, हें नांव त्यांच्या गुणामुळें त्यास प्राप्त होतें असें समज. ९३ यापुढें राजस कर्माचें खरें स्वरूप तुला सांगतों, तें ऐकण्यास हयगय करूं नको. ९४

**अन्वयार्थ**--(तु)-पण-(यत्)-जें-(कर्म)-कर्म-(कामेप्सुना)-फलप्राप्तीची इच्छा करणाराकडून-(वा पुनः)-किंवा-(साहंकारेण)-अहंकारानें युक्त झालेल्या पुरुषाकडून-(बहुलायासं)-पुष्कळ आयासानें-(क्रियते)-केलें जातें-(तत्)-तें-राजसं उदाहृतं)-राजस कर्म म्हटलेलें आहे. २४

तर घरीं मातापितरें असून त्यांच्याशीं जो संसारांत गोड भाषणही करीत नाहीं, परंतु मूर्खाप्रमाणें जगांतील सर्व लोकांचें आदरातिथ्य करितो; ९५ किंवा तुळसीचें झाडास दुरून पाण्याचा शितोडा पडूं देत नाहीं, कारण त्यापासून फल किंवा पुष्प यांची प्राप्ति नाहीं; परंतु द्राक्षाच्या झाडास दुधाचा रतीब लावतो; ९६ त्याप्रमाणें, आवश्यक अशीं जीं नित्यनैमित्तिक कर्में, त्यांचें आचरण करण्याविषयीं जो बसल्या जागेवरून उठत सुद्धां नाहीं; ९७ एऱ्हवीं काम्यकर्माविषयीं सर्व देह जरी झिजला, तरी त्यास

१ निवडुंगाचे. २ निरर्थक. ३ शून्य, ओशाळलेलें, वाईट. ४ या मार्गानें. ५ मोठा. ६ प्रत्यक्ष अंधार. ७ सर्व लक्षणांनीं युक्त. ८ प्रत्यक्ष. ९ मागास लागलेलें. १० उक्त. ११ आलिंगनानें. १२ श्यामवर्ण, निमगोऱ्या. १३ स्त्रीच्या नेत्रांनीं. १४ भूषण, शोभा. १५ कर्म. १६ साहाय्य झालें. १७ सुगंध. १८ खर्चून. १९ रक्षण. २० कंटाळणें. त्रासणें. २१ फळ दृष्टीनें पाहत नाहीं. २२ अवघी. २३ अर्पण, अविष्ट. २४ आवडतें. २५ सहज. २६ सामग्री शिदोरी, भक्ष्य पदार्थ. २७ राहे. २८ न केलें याविषयींच्या. २९ गर्वास चढत नाहीं. ३० रजोगुण युक्ताचें. ३१ कमताई. ३२ न घालावा, घालीत नाहीं, पडूं देत नाहीं.

देह सर्वस्व आघवें । वेंचितांही न [1] मनवे । वहु ऐसें ९८ अगा देवढी [2] वाढी लाहिजे । तेथ मोल देतां न [3] धाइजे । पेरितां पुरें न म्हणिजे । बीज जेवीं ९९ कां परिसु जालिया हातीं । लोहालागीं सर्वसंपत्ती । वेंचितां ये उन्नती [4] । साधकु जैसा ६०० तैसीं फळें देखोनि पुढें । काम्यकर्में दुवांडें [5] । करी परी तें थोकडें । केलेंही मानी १ तेणें फळकामुकें । यथाविधि नेटके [6] । काम्य कीजे तितुकें । क्रियाजात २ आणि तयाही केलियाचें । तोंडीं लावी दौंडीचें [7] । कर्मी [8] या नांव [9] पाटाचे । वाणें [10] सारी ३ तैसा भरे कर्माहंकारु । मग पिता अथवा गुरु । ते न मनी काळज्वरु । औषध जैसें ४ तैसेनि साहंकारें । फळाभिलाषियें नरें । कीजे गा आदरें । जें जें कांहीं ५ परी तेंही करणें बहुवसा । वळें [11] घेोनि करी सायांसा [12] । जीवनोपावो कां जैसा । कोल्हाटियांचा [13] ६ एका कणालागीं उंदिरु । आघवा उपसे डोंगरु । कां शेवाळोदेशें [14] दर्दुरु । समुद्रु डहुळी [15] ७ पैं भिकेपरतें न लाहे । तऱ्ही गारुडी सापु वाहे । काय कीजे शीणुचि होये । गोडु येकां ८ हें असो परमाणूचेनि लाभें । पाताळ लंघिती वोळंबे [16] । तैसें स्वर्गसुखलोभें । विचंबणें [17] जें ९ तें काम्य कर्म सक्लेश । जाणावें येथ राजस । आतां चिन्ह परिस । तामसाचें १०

अनुवन्धं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् । मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

तरी तें गा तामस कर्म । जें निंदेचें काळें धाम [18] । निषेधीं [19] चें जन्म । सौंच [20] जेणें ११ जें निपजविल्यापाठीं । कांहींच न दिसे दिठी । रेघ काढिलिया पोटीं । तोयाचें जेवीं १२ कां कौंजी [21] घुसळालिया । कां राखोंडी फुंकलिया । कांहीं न दिसे गाळिलिया । वाळुघाणा [22] १३ नाना उपणिलिया [23] भूंस । कां विंधिलियें [24] आकाश । नाना मांडिलिया पाश । वारयासी १४ हें अवघेंचि जैसें । वांझें [25] होऊनि नासे । जें केलिया पाठीं तैसें । वायांचि जाय १५ एऱ्हवीं नरदेहाही येवढें । घन आटणीये [26] पडे । तें कर्म निफजवितां मोडे । जगाचें सुख १६ जैसा कमळवनीं फांसु [27] । काढिलिया कांटेसु [28] । आपण झिजे [29] नाशु । कमळां करी १७ कां आपण आंगें जळे । आणि नौगवी [30] जगाचे डोळे । पतंगु जैसा सैंळें [31] । दीपाचेनी १८ तैसें सर्वस्व वायां जावो । वरी देहाही होय घांवो [32] । परी पुढीलां [33] आपावो । निफजविजे जेणें १९ मासी आपणयातें गिळवी । परी पुढीला वांती शिणवी । तैं कश्मळ [34] आंठवी [35] । आचरण जें ६२० तेंही करावया दोषें । मज सामर्थ्य असे

क्षीण येत नाहीं. ( थोडकेंच केलें असें मानतो. ) ९८ अरे वाडीदिडीच्या व्यापारांत पैसे खर्च करण्यास ज्याची तृप्ति होत नाहीं, व जमिनींत धान्य पेरूं लागल्यावर कितीही पेरलें तरी त्याला पुरेसें वाटत नाहीं; ९९ किंवा परीस हातीं आल्यावर जो, लोखंडाचें सोनें करण्याकरितां तयार केलेलें सोनें विकून लोखंडच खरेदी करतो, ६०० त्याप्रमाणें फलावर आशा ठेवून कठीण अशीं काम्यकर्मं पुष्कळ करतो, परंतु तीं थोडींच केलीं असें मानतो. १ याप्रमाणें फलाची इच्छा धरून, काम्यकर्मं जितकीं असतील, तितकीं यथाविधि करतो, २ आणि केलेल्या कर्मांची आपल्या तोंडानें वाखाणणी करितो, व 'मी मोठा कर्मठ आहें' या नांवाची ख्याति चोहोंकडे पसरवितो. ३ त्या पुरुषामध्यें असा कर्माहंकार भरतो कीं, काळज्वर जसा कोणत्याच औषधाला जुमानीत नाहीं, तसा तो पिता किंवा गुरु यांचीही पर्वा करीत नाहीं. ४ तशा कर्माभिमानी व फलाभिलाषी पुरुषाकडून जें जें कांहीं कर्म मोठ्या आदरानें केलें जातें, ५ तें तें पुष्कळ आयासानेंही केलेलें कर्म कोल्हाट्याच्या उपजीविकेसाठीं केलेल्या कर्माप्रमाणें नुसतें कष्टालाच कारण होतें. ६ एक कणाकरितां उंदीर जसा डोंगर पोखरतो, अथवा शेवाळाच्या प्राप्तिकरितां बेडुक समुद्र ढवळतो; ७ भिक्षेशिवाय दुसरी कांहीं प्राप्ती न होतां गारुडी जसें सापाचें ओझें वाहतो; काय करावें! या 'लोकांना खटपटच प्रिय आहे. ८ हें असो; एक कणाच्या आशेकरितां वाळवी ही पाताळापर्यंत खोल खणते, त्याप्रमाणें, स्वर्गसुखाचे प्राप्तिकरितां जे श्रम करणें, ९ तेंच क्लेशयुक्त काम्यकर्म राजस आहे, असें जाणावें. आतां तामस कर्माचें लक्षण सांगतों, तें ऐक. ६१०

**अन्वयार्थ**—(यत् कर्म)-जें कर्म-(अनुबंधं)-मागून होणारा परिणाम-(क्षयं)-शक्तीचा व धनाचा क्षय,-(हिंसां)-प्राण्यांचा पीडा-(च पौरुषं)-आणि आपलें सामर्थ्य यांस-(अनपेक्ष्य)-न पाहून-(मोहात्)- मोहानें-(आरभ्यते)-आरंभिलें जातें-(तत् तामसं उच्यते)-त्याला तामस कर्म म्हटलें जातें २५

जे निंदेचें काळें (पापमय) घरच होय; आणि ज्याच्या योगें निषेधाच्या जन्माचें सार्थक झालें आहे; तें तामस कर्म होय. ११ जशी पाण्यावर काढलेली रेघ दुसऱ्याच क्षणीं दिसत नाहीं, त्याप्रमाणें जें कर्म केल्यानंतर उत्तरक्षणीं त्याचें कांहींच स्वरूप दिसत नाहीं. १२ किंवा ताकाची निवळ घुसळली असतां जसें लोणी निघत नाहीं; किंवा सोनाराच्या घरांतल्या राखेशिवाय इतर ठिकाणची राख फुंकीत बसलें असतां जसे सोन्याचे कण वगैरे कांहीं सांपडत नाहीं; अथवा वाळू घाण्यांत घातली असतां जसें तिजपासून तेल किंवा पेंड कांहींच उत्पन्न होत नाहीं; १३ अथवा भूस उफणणें किंवा आकाशांत बाण मारीत बसणें अथवा वाऱ्यास धरण्याकरितां फांस टाकणें, १४ या गोष्टी ज्याप्रमाणें करून निष्फळ आहेत, त्याप्रमाणें ज्या कर्माचें आचरण करूनही व्यर्थ होतें; १५ एव्हढी नरदेह एवढेंही अमूल्य धन खर्ची पडून जें कर्म होतें, त्याच्यायोगानें जगाला सुख न होतां दुःख मात्र होतें; १६ ज्याप्रमाणें कमळें काढण्याकरितां त्यांवर कांट्यांचा फांस टाकून ओढला असतां आपल्यास श्रम होऊन कमलाचाही नाश होतो; १७ किंवा पतंग ज्याप्रमाणें दिव्याचा हेवा करून त्यावर झडप घालतो, आणि स्वतः नाश पावून जगालाही अंधार करतो; १८ त्याप्रमाणें, आपलें सर्वस्व वायां जाऊन देहाला श्रम जरी झाले, तरी दुसऱ्यास ज्या कर्मापासून अपाय होतो, १९ माशी ही स्वतःला गिळविते, ( पोटांत जाऊन स्वतः मरते, ) पण दुसऱ्याला वांती करून शिणविते, अशा प्रकारचें जें आचरण तें सदोष आहे असें तूं लक्षांत ठेव. ६२० बरें, तेंही कर्म करण्याचें आपल्यांत सामर्थ्य आहे किंवा नाहीं, हा पुढील विचार तर करावा!

१ मानवत नाहीं. २ दिढीनें वाढे. ३ तृप्त होत नाहीं. ४ उत्साहास, उत्कर्षास. ५ कठीण. ६ चांगल्या प्रकारें. ७ प्रसिद्धीच्या. ८ कर्मठ. ९ अधिकाराचें नांव. सुखाचें, पदनांव, १० मायनें वाढतो, पुकारा करतो. ११ आश्रय करून. १२ कष्टास. १३ डोंबाऱ्याच्या. १४ शेवाळीकरितां. १५ ढवळतो. १६ वाळवी. १७ श्रम करणें. १८ घर. १९ अपवित्रतेचें, मनाईचें. २० सर्व. २१ पेज. २२ घाण्यांत वाळू घालून रगडिली तरी. २३ वारवले असतां. २४ बाण मारले असतां. २५ निष्फळ. २६ खर्ची. २७ कांट्या तोडून चोपून रचलेला ढीग. २८ कांट्यांचा. २९ श्रमी होय. ३० हिरावून घेतो, अंधार करतो. ३१ संतापानें. ३२ श्रम. ३३ दुसऱ्यांना. ३४ सदोष, घाणेरडें. ३५ आठवण करून देते.

कीं नसे । हेंही पुढील तैसें । न पाहतां करी २१ केवढा माझा उपावो । क-
रितां कोण प्रस्तावो[1] । केलियाही[2] आवो । काय येथ २२ इये जाणिवेची सोये ।
अविवेकाचेनि पायें । पुसोनियां होये । साटोप[3] कर्मीं २३ आपुला वसौटा
जाळुनी । बिसाटे[5] जैसा वन्ही । कां स्वमर्यादा गिळोनी । सिंधु उठी २४ मग
नेणें बहु थोडें । न पाहे मागें पुढें । मार्गामार्ग येकवढें[6] । करीत चाले २५ तैसें
कृत्याकृत्य सरँकटित[7] । आपपर नुरवित । कर्म होय तें निश्चित । तामस जाण
२६ ऐसी गुणत्रयभिन्ना । कर्माची गा अर्जुना । हे केली विवंचना[8] । उपपत्तीसीं[9]
२७ आतां ययाचि कर्मा भजतां । कर्माभिमानिया कर्ता । तो जीवुही त्रिविध-
ता । पातला[10] असे २८ चतुराश्रमवशें । एकु पुरुषु चतुर्धा[11] दिसे । कर्तया[12] त्रैवि-
ध्य तैसें । कर्मभेदें २९ परी तयां तिहींआंतु । सात्त्विक तंव प्रस्तुतु । सांगेन
दत्तचित्तु[13] । आकर्णीं[14] तूं ६३०

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः । सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥२६॥

तरी फळोद्देशें[15] सांडिलिया । वाढती जेवीं सरळिया[16] । शाखा कां चंदना-
चिया । बावन्निया[17] ३१ कां न फळतांही सार्थका । जैसिया नागलतिका । तै-
सिया करी नित्यादिकां । क्रिया जो कां ३२ परी फलशून्यता । नाहीं तया
विफळता । पैं फळासीचि पांडुसुता । फळें कायिसी ३३ आणि आदरें करी ब-
हुवसें । परी कर्ता मी हें नुमसे । वर्षाकाळींचें जैसें । मेघवृंद ३४ तेवींचि पर-
मात्मलिंगा । समर्पावयाजोगा । कर्मकलांपु[18] पैं गा । निपजावया[19] ३५ तया का-
ळातें नुलंघणें । देहशुद्धिही साधणें । कां शास्त्रांच्या[22] वाती पाहणें । क्रिया-
निर्णयो ३६ वृत्ती[23] करणें येकवेळां[24] । चित्त जावों न देणें फळा । नियमांचिया
सांखळा[25] । वाहणें सदा ३७ हा निरोधु[26] साहावयालागीं । धैर्याचिया चांगचांगीं ।
चिंतवणी[27] जिती[28] आंगीं । वाहे जो कां ३८ आणि आत्मयाचिये आवडी । कर्में
करितां वरपडी[29] । देहसुखाचिये परवडी[30] । येवों न लाहे ३९ आळस निद्रा दु-
ऱ्हावें । क्षुधा न[31] बाणवे । । सुरवाडु[32] न पावे । आंगाचा ठावो ६४० तंव अधि-
काधिक । उत्साहो धरी आगळीक[33] । सोनें जैसें पुटीं तुक[34] । तुटलिया कसीं ४१ जरी
आवडी आथी सांच[35] । तरी जीवितही सलंच[36] । आगीं घालितां रोमांच । दे-
खिजती सतिये ४२ मा आत्मयायेवढीया प्रिया । वाळभेला[37] जो धनंजया । दे-
हही सिदंतां[38] तया । काय खेदु होईल ४३ म्हणौनि विषय[39] सुरवाडु तुटे । जंव

पण तसें ९हीं न करतां कर्म घडूं लागतो; २१ माझा केवढा प्रयत्न, व त्याचा मी केवढा पसारा मांडिला आहे, आणि तो केल्यापासून मला काय प्राप्ति होणार, २२ या विचाराला अविवेकाच्या पायांखालीं तुडवून टाकतो; आणि त्या कर्माबद्दल अभिमान बाळगतो; २३ अग्नि ज्या वेळूपासून उत्पन्न होतो ती आपली रहाण्याची जागा (वेळूंचें बेट) जाळून पसरतो, अथवा आपली मर्यादा सोडून समुद्र वाढला २४ म्हणजे मग लहान किंवा मोठी वस्तु यांचा विचार न करितां व मागेंपुढें न पहातां मार्ग व अमार्ग यांना एकत्र करीत चालतो, २५ तसें योग्यायोग्य एके ठिकाणीं रगडून आपलें व दुसऱ्याचें हा भेद जें उरूं देत नाहीं, तें तामस कर्म असें समज. २६ याप्रमाणें अर्जुना, गुणांच्या भिन्नपणानें कर्म तीन प्रकारचें कसें झालें, तें तुला दाखल्यासह स्पष्ट करून सांगितलें. २७ आतां, या कर्माचा अभिमान बाळगून त्याचें आचरण करणारा जो जीव, तो याचे योगानें तीन प्रकारचा झाला आहे. २८ ज्याप्रमाणें, एकाच पुरुषावर ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या चार आश्रमांच्या योगें चार अवस्था दिसतात; त्याचप्रमाणें, कर्माच्या भेदानें कर्त्याला तीन अवस्था येतात. २९ तर त्या तिहींपैकीं सात्त्विक अवस्थेचें प्रथम वर्णन करितों, तें पूर्ण लक्ष देऊन ऐक. ६३०

अन्वयार्थ—(मुक्तसंगः)–ज्यानें संग सोडला आहे,–(अनहंवादी)–'मी मी' असें म्हणण्याचें ज्याचें शील नाहीं,–(धृत्युत्साहसमन्वितः)–धृति व उत्साह यांनीं जो युक्त आहे,–(सिद्ध्यसिद्ध्योः निर्विकारः)–सिद्धि व असिद्धि यांतील कांहीं झालें तरी चित्तांत निर्विकार असणारा–(कर्ता)–कर्ता–(सात्त्विकः)–सात्त्विक–(उच्यते)–म्हटला जातो. २६

ज्याप्रमाणें, मलय पर्वतावरील चंदनाच्या फांद्या फळाची इच्छा न धरितां सरळ वाढतात, तथापि त्या झाडाच्या सर्व भागास उत्तम सुवासच असतो. ३१ किंवा नागवेल न फळतांही सार्थकी लागतो, नागवेलीला जरी फळ येत नाहीं तरी तिचीं पानेंच उपयोगी पडतात; त्याप्रमाणें जो सर्वतोपरी उत्तम आहे, त्या नित्यनैमित्तिक कर्मांच्या फळांची इच्छा न धरितां जो त्यांचें आचरण करितो, ३२ पण त्याला फलशून्य असें म्हणूं नये; कारण, त्या कर्माला विफलता नाहींच. म्हणून अर्जुना, फळाला फळें कोठून येणार? ३३ आणि तो कर्म आदरानें करितो, पण कर्तृत्वाचा अभिमान बाळगीत नाहीं; ज्याप्रमाणें पावसाळ्यांतील मेघसमुदाय कांहीं गर्जना न करितां वृष्टि करितात, ३४ त्याप्रमाणें परमात्म्याला अर्पण करण्यास योग्य होतील अशीं कर्में करण्याकरितां ३५ कालाची मर्यादा न सोडतां, देहशुद्धि साधून कर्माच्या योग्यायोग्यतेचा निर्णय शास्त्ररूप दिव्यानें पहातो–कर्माच्या योग्यायोग्यतेचा निर्णय शास्त्रानुरोधें करितो. ३६ इंद्रियें व वृत्ति यांचें ऐक्य करून फलाकडे चित्तास जाऊं न देतां, जो नियमाची बेडी पायांत बाळगितो; ३७ ही अड सहन करण्याकरितां उत्तम प्रकारचें धैर्य आपल्या अंगीं असावें, अशाविषयीं जो आपले मनांत जिवंत चिंता वाहतो, (अहोरात्र त्याजविषयींच विचार करीत असतो,) ३८ आणि आरंभ्याचे प्राप्तीविषयीं कर्म करीत असतां देहसुखाच्या नाशाची पर्वा करीत नाहीं; ३९ तो आळस व झोंप टाकून देतो, व त्याला भुकेचीही आठवण होत नाहीं; आणि त्या योगें जों जों सुखावस्था दूर दूर पळते, ६४० तों तों सोनें ज्याप्रमाणें थांचींत घातल्यावर वजनास कमी भरलें तरी कसास जास्त लागतें, त्याप्रमाणें कर्म करण्याविषयीं नानाप्रकारें अधिकाधिक उत्साह धरतो. ४१ जेथें खरोखर प्रीति आहे, तेथें जीवितही तुच्छ असतें. सहगमन करतांना अग्नींत उडी टाकतेसमयींही पतिप्रेमामुळें पतिव्रता स्त्रीच्या अंगावर रोमांच उभे रहातात! ४२ मग अर्जुना, आत्मप्राप्तीसारखी प्रिय वस्तु प्राप्त होण्याविषयीं ज्याला इच्छा झाली आहे, त्याचे शरीरास जरी कष्ट झाले, तरी त्यास खेद होईल काय? ४३ म्हणून विषयसुखेच्छा नाहींशी होऊन जों जों देहाविषयीं अभिमान कमी होतो,

१ प्रसार. २ प्राप्ति. ३ अहंतायुक्त. ४ वसतिस्थान. ५ पसरतो. ६ एकत्र. ७ रगडीत. ८ विवरण. ९ दाखल्यासह. १० ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ, व संन्यास या चार आश्रमांच्या योगें. ११ चार प्रकारचा. १२ सात्त्विक, राजस, व तामस, असा त्रिविधपणा. १३ पूर्ण लक्ष देऊन. १४ श्रवण कर, ऐक. १५ फलेच्छेनें. १६ सरळ. १७ मलयगिरी चंदनाच्या. १८ नागवेली. १९ अभिमान वहात नाहीं. २० कर्मसमुदाय. २१ उपभोगिण्यासाठीं, करण्याकरितां. २२ शास्त्ररूप दिव्यांनीं. २३ इंद्रियें, इंद्रियें व मनोवृत्ति यांचा. २४ ऐक्यता. २५ प्रतिबंध, बेड्या. २६ अटक. २७ चिंतन, स्मरण. २८ जिवंत. २९ प्राप्त झालेली. ३० देहसुखाची परवा करीत नाहीं, परवडी–प्रतिबंध. ३१ आठवण होत नाहीं. ३२ सुखावस्था. ३३ आधिक्य, वाढ. ३४ वजन. ३५ सरी. ३६ तुच्छ, दुःखरूप. ३७ आवडीनें युक्त झालेला. ३८ कष्टता. ३९ विषयाची आवड.

जंव देहबुद्धि आटे । तंव तंव आनंदु दुणवटे । कर्मी जया ४४ ऐसेनि जो कर्म करी । आणि कोणे एके अवसरीं । तें ठाके[1] ऐसी सैरी[2] । वाहे जरी ४५ तरी कडोर्डी[3] लोटला गाडा । तो आपणपें न मनीं अवघडा । तैसा ठाकले- निहीं थोर्डो[4] । नोहे जो कां ४६ नातरी आदरिलें । अव्यंग सिद्धी गेलें । तरी तेंही जिंतिलें । मिरवूं नेणे ४७ इया खुणा कर्म करितां । देखिजे जो पंडुसुता । तयातें म्हणिपे तत्त्वता । सात्त्विकु कर्ता ४८ आतां राजसा कर्तेया । वोळखणें हें धनंजया । जे अभिलाषा जगाचिया । वसौटा[5] तो ४९

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः । हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥२७॥

जैसा गांवींचिया कश्मळा[6] । उकरडा होय येकवळा[7] । कां स्मशानीं अमंगळा । आघवयांची ६५० तयापरी जो अशेषा[8] । विश्वाचिया अभिलाषा[9] । पायपौंखाळणिया[10] दोषां । घरटा[11] जाला ५१ म्हणोनि फळाचा लागु[12] । देखे जिये असलगु[13] । तिये कर्मी चांगु । रोहो[14] मांडी ५२ आणि आपण जालिये[15] जोडी । उपखों[16] नेदी कवडी । क्षणक्षणा कुरोंडी । जीवाची करी ५३ कृपणु चित्तीं ठेवा आपुला । तैसा दक्षु पराविया[17] माला । बकु जैसा खुतला[18] । मासेयासी ५४ आणि गोंवी[19] गोलिया जवळी । झगटलिया[20] अंग फौळी[21] । फळें तरी आंतु पोकळीं । बोरांटी[22] जैसी ५५ तैसें मनें वाचा कायें । भलतया दुःख देतु जाये । स्वार्थु साधितां न पाहे । पराचें हित ५६ तेवींचि आंगें कर्मी । आचरणें नोहे क्षमी । न निघे मनोधर्मीं । अरोचकु[23] ५७ कनकाचिया[24] फळा । आंत मांज[25] बाहेरी मौळी[26] । तैसा सबाह्य दुबळा[27] । शुचित्वें जो ५८ आणि कर्मजात केलिया । फळ लाहे जरी धनंजया । तरी हरिखें[28] जगा यया । वांकुलिया[29] वाये ५९ अथवा जें आदरिलें । हीनफळ[30] होय केलें । तरी शोकें[31] तेणें जिंतिलें । धिक्कारों लागे ६६० कर्मी राहाटी ऐसी । जयातें होती देखसी । तोचि जाण त्रिशुद्धीसी[32] । राजस कर्ता ६१ आतां यया पाठीं येरु[33] । जो कुकर्माचा आगरु[34] । तोही करूं गोचरु[35] । तामस कर्ता ६२

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैकृतिकोऽलसः । विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥२८॥

तरी मियां लागलिया कैसें । पुढील जळत असे । हें नेणिजे हुताशें[36] । जियापरी ६३ पैं शस्त्रें मियां तिखटें । नेणिजे कैसेनि निवटे । कां नेणिजे काळकूटें । आपलें केलें ६४ तैसा पुढीलया आपुलिया । घातु करीत धनंजया ।

तों तों कर्म करण्याविषयीं त्याला दुप्पट आनंद होतो. ४४ याप्रमाणें कर्म करीत असतां एखादे वेळीं तें कर्म जरी बंद पडलें, तरी ४५ गाडा डोंगरावरून आपोआप खालीं पडून त्याचे तुकडे झाले तरी जसें त्याला त्याजबद्दल अवघड वाटत नाहीं, तसें कर्म राहिलें असतां तो यत्किंचितही खेद मानीत नाहीं ४६ अथवा आरंभिलेलें कर्म पूर्णपणें सिद्धीस गेलें असतांही त्याजबद्दल प्रतिष्ठा कशी मिळवावी हें त्याला कळत नाहीं. ४७ अर्जुना, कर्माचें आचरण करीत असतां, हीं लक्षणें ज्याचे ठिकाणीं आढळतील, त्याला निश्चयानें सात्त्विक कर्ता म्हणावें. ४८ हे धनंजया, आतां राजस कर्त्याचीं चिन्हें तुला सांगतों; कारण, जगांतील सर्व अभिमानांचें हें माहेरघरच होय. ४९

**अन्वयार्थ**—(रागी)—ज्याला राग विषयासक्ति आहे असा रागी,—(कर्मफलप्रेप्सुः)—कर्मफलाची इच्छा करणारा,—(लुब्धः)—परद्रव्याचा लोभ धरणारा—(हिंसात्मकः)—दुसऱ्याला पीडा देण्याचें ज्याचें शील आहे असा,—(अशुचिः)—बाह्य व अन्तःशुद्धि न ठेवणारा,—(हर्षशोकान्वितः)—हर्ष व शोक यांनी युक्त—(कर्ता)—असा कर्ता—(राजसः परिकीर्तितः)—राजस कर्ता सांगितलेला आहे. २७

ज्याप्रमाणें गांवांतील सर्व पाणेरडे पदार्थ टाकण्याचें उकिरडा हें ठिकाण असतें, अथवा सर्व अमंगळ पदार्थ जसे स्मशानांत टाकतात, ६५० त्यांप्रमाणें वस्तुतः पाहिलें असतां ही जगांतील सर्व कामाची पायधुण्याची जागाच होय. ५१ म्हणून, ज्या कर्मापासून इच्छित फलप्राप्ति होईल तें कर्म करण्याकडे रोख ठेवतो, ५२ आणि आपण संपादन केलेल्या पदार्थांपैकीं एक कवडीही खर्च करीत नाहीं, व क्षणोक्षणीं त्या पदार्थांवरून आपला जीव ओंवाळून टाकतो. ५३ कृपण मनुष्य आपल्या ठेवीवर जसें नेहमीं लक्ष ठेवतो, तसा हा दुसऱ्याचे पदार्थ मिळविण्याविषयीं दक्ष असतो; जसा बगळा मासा धरण्याविषयीं मोठा तत्पर असतो, ५४ आणि बोरीचें झाड जसें जवळ गेलें असतां वस्त्र अडकून गुंतवितें, दांडगाईनें काढूं लागल्यावर अंगास ओरखाडतें; व तिचीं फळें पाहूं गेलें असतां त्यांत कांहीं सार नाहीं. ५५ तसें कायावाचामनेंकरून जो दुसऱ्यास दुःख देतो, व आपलें हित साधण्याकरितां दुसऱ्याचे हिताकडे लक्ष देत नाहीं; ५६ तसेंच, स्वतः जें कर्म आरंभिलें तें निरंतर चालविण्यास समर्थ नसतो, व त्या कर्माविषयीं ज्याचें मनाला कंटाळा येत नाहीं, ५७ धोत्र्याचे फळास जशी आंतून भूल व बाहेरून कांटे असतात, तसा जो शुचित्वाविषयीं अंतर्बाह्य दरिद्री असतो; ५८ आणि अर्जुना, केलेल्या कर्माची फलप्राप्ती झाली असतां त्या आनंदाचे भरांत दुसऱ्यास वेडावून दाखवितो, ५९ अथवा आरंभिलेलें कर्म फलद्रूप न झालें म्हणजे शोकानें त्या कर्माचा धिक्कार करतो; ६६० अशा रीतीनें कर्माविषयीं ज्याची वागणूक दृष्टीस पडेल तो राजस कर्ता होय, असें खचित खचित समज. ६१ आतां, यानंतर वाईट कर्माची खाणच असा जो तामस कर्ता, त्याचीं लक्षणें तुला कळतील, अशीं सांगतों. ६२

**अन्वयार्थ**—(अयुक्तः)—ज्याचें चित्त समाहित नसतें—(प्राकृतः)—जो अत्यंत असंस्कृत—मूर्खासारखा असतो,—(स्तब्धः)—कोणापुढेंहि नम्र न होणारा असतो,—(शठः)—मोठा मायावी,—(नैष्कृतिकः)—दुसऱ्याच्या वृत्तीचा छेद करणारा,—(अलसः)—आळशी,—(विषादी)—नेहमीं खेद करणारा,—(च दीर्घसूत्री)—व चेंगट—(कर्ता)—कर्ता असतो, त्याला—(तामसः)—तामस कर्ता—(उच्यते)—म्हटलें जातें. १८

आपल्या स्पर्शामुळें समोर येणारे जिन्नस कसे जळतात, हें जसें अग्नीस समजत नाहीं, ६३ अथवा आपल्या धारेनें दुसऱ्याचा जीव कसा जातो, हें जसें शस्त्राला समजत नाहीं; किंवा आपल्यायोगें दुसऱ्याचा नाश कसा होतो, हें काळकूट विषाला समजत नाहीं; ६४ तसा हे धनंजया ज्या क्रियेनें आपला व दुसऱ्याचा नाश होईल, अशा वाईट

१ बंद पडतें, होत नाहीं. २ प्रकार, योग. ३ डोंगराच्या अवघड ठिकाणीं. ४ म्लान, दुःखित. ५ वसतीचें स्थान. ६ मळाला, केरकचऱ्याला. ७ एक ठिकाण. ८ संपूर्ण. ९ इच्छेला. १० पाय धुण्याचा. ११ स्थान, न्हाणीघर. १२ संबंध. १३ सोपा. १४ रोख. १५ जोडलेल्या, मिळविलेल्या. १६ न खर्ची. १७ दुसऱ्याच्या वस्तूला. (हिरावून नेण्यासाठीं) १८ ध्यान धरून बसला, वाट पहात राहिला. १९ अटकली. २० दांडगाई केली असतां. २१ फाडी. २२ बोरीचें झुडूप. २३ कंटाळा. २४ धोतऱ्याच्या. २५ कैफ. २६ कांटवण. २७ दरिद्री. २८ हर्षानें. २९ वेडावी. ३० निष्फळ. ३१ शोकाकुळ होऊन. ३२ खचित. ३३ इतर, तामस. ३४ मुख्य स्थान. ३५ स्पष्ट, ओळखण्याजोगा. ३६ अग्नीनें. ३७ मरे.

आदरी वोखटिया । क्रिया जो कां ६५ तिया करितांही वेळीं । काय जालें हें न सांभाळी । चळला वायू वाहटुळी । चेष्टे तैसा ६६ पैं करणिया आणि जया । मेळु नाहीं धनंजया । तो पाहुनी पिसेंया । कैंची त्रायें ६७ आणि इंद्रियांचें वोगरिलें । चरोनि राखे जो जियालें । बैलातळीं लागलें । गोचिड जैसें ६८ हांसयां रुदना वेळु । नेणता आदरी बाळु । राहटे उंच्छृंखळु । तयापरी ६९ जो प्रकृती आंतलेपणें । कृत्याकृत्यस्वादु नेणे । फुगे केरें धालेपणें । उकरडा जैसा ६७० म्हणौनि मान्याचेनि नांवें । ईश्वराही परी न खालवे । स्तब्धपणें न मनवे । डोंगरासी ७१ आणि मन जयाचें विषकल्लोळीं । राहाटी फुंडी चोरिली । दिठी कीर ते वोली । पण्यांगनेची ७२ किंबहुना कपटाचें । देहचि वळिलें तयाचें । तें जिणें कीं जुवारांचें । टिटेघर ७३ नोहे तयाचा प्रादुर्भावो । तो साभिलाष भिल्लांचा गांवो । म्हणोनि नये येवों जावों । तया वाटा ७४ आणि आणिकांचें निकें केलें । विरु होय जया आलें । जैसें अपेय पैंया मिनलें । लवण करी ७५ कां हींवें ऐसा पदार्थु । घातलिया आगीआंतु । तेचि क्षणीं धडौंडितु । अग्नि होय ७६ नाना सुद्रव्यें गोमटीं । जालिया शरीरीं पैठीं । होऊनि ठाती किरीटी । मळुचि जेवीं ७७ तैसें पुढिलांचें बरवें । जयाच्या भींतरीं पावे । आणि विरुद्धचि आघवें । होऊनि निगे ७८ जो गुण घे दे दोष । अमृताचें करी विष । दूध पाजिलिया देख । व्याळु जैसा ७९ आणि ऐहिकीं जियावें । जेणें परत्रा साच यावें । तें उचित कृत्य पावे । अवसरीं जिये ६८० तेव्हां जया आपैसी । निद्रा ये ठेविली ऐसी । दुर्व्यवहारीं जैसी । विटाळें लोटे ८१ पैं द्राक्षरसा आम्ररसा । वेळे तोंड सडे वायसा । कां डोळे फुटती दिवसा । डुडुळाचे ८२ तैसा कल्याण काळु पाहे । तैं तयातें आळसु खाये । ना प्रमादीं तरी होये । तो म्हणे तैसें ८३ जेवींचि सागराच्या पोटीं । जळे अखंड आगिठी । तैसा विषादु वाहे गांठीं । जिवाचिये जो ८४ लेंडोरीआगी धूमावधि । कां अपानां आंगीं दुर्गंधि । तैसा जो जीवितावधि । विषादें केला ८५ आणि कल्पांताचिया पैंरा । वेगळेंही जो वीरा । सूत्र धरी व्यापारा । साभिलाषा ८६ अगा जगाही परौती । शुंचा वाहे पैं चित्तीं । करितां विषीं हातीं । तृणही न लगे ८७ ऐसा जो लोकाआंतु । पापपुंजु मूर्तु । देखसी तो अव्याहतु । तामसु कर्ता ८८ एवं कर्म कर्ता ज्ञान । या तिहींचें त्रिधा चिन्ह । दाविलें तुज सुजन । चक्रवर्ती ८९

क्रिया करण्यास जो प्रवृत्त होतो; ९६५ ज्याप्रमाणें वावटळ सुटल्यावर वायु हवातसा वाहतो, त्याप्रमाणें ती कर्मे करते वेळीं, यांत काय लाभ झाला याची जो काळजी बाळगीत नाहीं, ९६६ हे बघ अर्जुना, ज्याच्या कृतीला व इच्छेला कांहीं मेळ नसतो, असल्या तामस कर्त्याला पाहून त्याचे पुढें वेड्याची काय किंमत आहे ? ९६७ आणि बैलाचे कांसेस जसे गोचीड अगदीं चिकटून राहतात, तसें इंद्रियांनीं दिलेले भोग भोगून जो आपलें जीवित रक्षण करतो. ९६८ ज्याप्रमाणें लहान मुलास हसण्यास व रडण्यास वेळ लागत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या कृतीत कांहीं मेळ नसतो; ९६९ प्रकृतीचे स्वाधीन असल्यामुळें, काय करावें, व काय न करावें याविषयीं ज्याला ज्ञान नसतें, व केरानें जसा उकिरडा फुगतो, तसा जो कुकर्मांच्या तृप्तीनें फुगलेला असतो; ९७० म्हणून गर्वाच्या भरांत ईश्वरासही नम्र होत नाहीं व ताठ्यानें डोंगरालाही तुच्छ करतो; ७१ आणि ज्याचें मन म्हणजे केवळ विषयांच्या लाटा होत; ज्याचें आचरण नेहमी चोरटें घरकांत दिसण्यांत चांगलें पण अंतर्यामीं दुसऱ्याचा घात करणारें, आणि दृष्टि केवळ वेश्यांच्या मालिकेप्रमाणें दिसण्यांत गोड पण दुसऱ्याचें सर्वस्व हरण करणारी होय. ७२ किंबहुना, ज्याचा सर्व देह कपटाचाच बनलेला आहे, व ज्याचें आयुष्य जुगाराचें वाईट कुलाचें माहेरघरच होय; ७३ त्याची प्रसन्नता म्हणजे केवळ अभिलापरूप भिल्लाचें गांवच होय म्हणून त्या वाटेनें कोणीही जाऊं नये. ७४ आणि दुसऱ्याचें चांगलें झालेलें पाहून ज्यास वैर उत्पन्न होतें. ज्याप्रमाणें दुधांत मीठ मिळालें असतां ते पिण्यास अयोग्य होतें; ७५ अथवा कितीही थंड पदार्थ जर अग्नींत घातला तर तो अग्नी उलट त्याचक्षणीं धडाडतो, ७६ किंवा अर्जुना, कितीही उत्तम उत्तम पदार्थ असले तरी ज्याप्रमाणें ते पोटांत गेले म्हणजे त्यांचा मलच होतो, ७७ त्याप्रमाणें, दुसऱ्याचें चांगलें झालेलें यानें ऐकलें किंवा पाहिलें तर तें याला सहन न होऊन तो उलट निंदा करूं लागतो. (त्याला वाईट वाटतें) ७८ सर्पास दूध पाजलें तरी ज्याप्रमाणें त्याचें विषच होतें. त्याप्रमाणें दुसऱ्याचे गुण ऐकल्याबरोबर जो त्यांस दुर्गुण मानतो; ७९ आणि इहलोकीं कीर्ति होऊन ज्याचे योगानें परलोकही मिळेल असें कृत्य ज्यावेळेस प्राप्त होईल, ९८० त्या वेळेस ज्याला हटकून झोंप ठेवल्याप्रमाणें येते; आणि वाईट कर्माच्या वेळेस तीच झोंप विटाळशीसारखी दूर रहाते. ८१ हे पहा-द्राक्षांच्या किंवा आंब्याच्या दिवसांत ज्याप्रमाणें कावळ्यास मुखरोग होतो, किंवा घुबडाचे डोळे ज्याप्रमाणें दिवसास फुटतात, ८२ त्याप्रमाणें कल्याण होण्याची वेळ आली असतां म्हणजे सत्संगती किंवा सत्शास्त्र श्रवणाची वेळ आली असतां, त्याच्यावर आळस लोटतो, आणि अन्यायाचें कर्म करण्याचे वेळीं तोच आळस त्याचे हुकुमांत वागतो. ८३ जसा समुद्राचे पोटांत अग्नि ( वडवानळ ) अखंड जळत असतो, तसा याच्या अंतःकरणांत दुसऱ्याचा उत्कर्ष सहन होत नाहीं, असा विषाद असतो. ८४ लेंड्यांचे विस्तवांत जसा धूरच असतो किंवा अपानद्वारानें निघणारा वायु जसा दुर्गंधयुक्तच असतो, तशी जन्मभर विषादाची गांठ ज्याच्या जिवाशीं असते, ( विषाद मनांत बाळगतो; ) ८५ आणि अर्जुना, जो कल्पांताच्याही पलीकडे लाभ होईल, अशा कल्पनेनें व्यापाराला आरंभ करतो, ८६ अरे, जगांतील जे लोक व्यापार करीत नाहींत, ते करण्याविषयीं मनांत इच्छा धरून कर्म करतो. परंतु ज्यापासून तृणाचाही लाभ त्यास होत नाहीं; ८७ असा जो लोकांमध्यें मूर्तिमंत पापाची राशीच होय, तो निःसंशय तामस कर्ता असें जाण. ८८ याप्रमाणें, अर्जुना तुला कर्म, कर्ता व ज्ञान या तिहींचीं त्रिविध लक्षणें सांगितलीं. ८९

१ वाईट. २ वावटळ. ३ फिरतो, वाहतो. ४ वेड्याला, मूर्खाला. ५ सत्ता, नांव, मर्यादा. ६ इंद्रियांनीं दिलेले भोग. ७ जीवित. ८ हसण्यास व रडण्यास. ९ आरंभीं. १० यथेच्छ. ११ व्यापलेपणें, अधीनतेनें. १२ कर्माकर्मांची रुचि. १३ तृप्तपणानें. १४ गर्वाच्या भरांत. १५ न लवे. १६ ताठ्यानें. १७ कपटी, साभिलाष. १८ आचरण. १९ खरी. २० वेश्येची. २१ चोरी, चाहाडी व शिंदळकी या तिठ्यावरचें जुगाऱ्याचें घर. २२ संबंध, भंगटपण. २३ त्याचा, ठग. २४ विरुद्धपणा, वैर. २५ दुधाला. २६ अगदीं थंड. २७ प्रज्वलित, पेटलेला. २८ प्रविष्ट. २९ राहती. ३० दुसऱ्याचें. ३१ सर्प. ३२ या लोकीं वांचावें. ३३ परलोकीं. ३४ वाईट कर्माचे वेळीं. ३५ निद्रा विटाळशीप्रमाणें दूर राहते. ३६ कावळ्यांचे. ३७ घुबडाचे. ३८ दीपकाळीं. ३९ त्याचें म्हणण्याप्रमाणें होतें. ४० अग्नि, वडवानळ. ४१ दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणें, असंतुष्टपणा. ४२ लेंड्यांच्या विस्तवांत. ४३ गुदद्वाराच्या ठिकाणीं. ४४ पलीकडे. ४५ आरंभ करणें. ४६ इच्छा. ४७ करण्याविषयीं म्हटलें तर. ४८ पापांचा ढीग. ४९ सर्वथैव.

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु । प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥

आतां अविद्येचिया गांवीं । मोहाची वेढूनि मदेवी । संदेहाचीं आघवीं । लेऊनि लेणीं ६९० आत्मनिश्चयाची बरंव । जया आरिसां पाहे सावेयव । तिये बुद्धीचीही धांव । त्रिधा असे ९१ अगा सत्त्वादि गुणीं इहीं । काइ एक तिहीं ठायीं । न कीजेचि येथ पाहीं । जगामाजीं ९२ आगी न वसतां पोटीं । कवण काष्ठ असे सृष्टी । तैसें तें कैचें दृश्यकोटी । त्रिविध जें नोहे ९३ म्हणौनि तिहीं गुणीं । बुद्धी केली त्रिगुणी । धृतीसिही वांटणी । तैसीचि असे ९४ तेंचि येक वेगळालें । येथ चिन्हीं अळंकारलें । सांगिजेल उपाइलें । भेदलेपणें ९५ परी बुद्धि धृति इयां । दोहीं भागांमाजीं धनंजया । आधीं रूप बुद्धीचिया । भेदासि करूं ९६ तरी उत्तमा मध्यमा निकृष्टा । संसारासि गा सुभटा । प्राणियां येतिया वाटा । तिनी आथी ९७ जे अकरणीय काम्य निषिद्ध । ते हे मार्ग तिन्ही प्रसिद्ध । संसारभयें सबाध । जिवा ययां ९८

प्रवृत्तिं च निवृत्तिंच कार्याकार्ये भयाभये । बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥

म्हणौनि अधिकारें मानिलें । जें विधीचेनि बोधें आलें । तें येकचि येथ भलें । नित्य कर्म ९९ तेंचि आत्मप्राप्ति फळ । दिठी सूनि केवळ । कीजे जैसें कां जळ । सेविजे ताहनें ७०० येतुलेनि तें कर्म । सांडी जन्मभय विषम । करूनि दे सुगम । मोक्षसिद्धि १ ऐसें करी तो भला । संसारभयें सांडिला । करणीयत्वें आला । मुमुक्षुभागा २ तेथ जे बुद्धि ऐसा । बळिया बांधे भरंवसा । मोक्षु ठेविला ऐसा । जोडेल येथ ३ म्हणौनि निवृत्तीचि मांडिली । सूनि प्रवृत्तितळीं । इये कर्मी बुडकुळी । द्यावी कीं ना ४ तृषार्ती उदकें जिणें । कां पुरीं पडलिया पोहणें । अंधकूपीं गति किरणें । सूर्याचेनी ५ नाना पथ्येंसीं औषध लाहे । तरी रोगें दाटलाही जिये । कां मीनां जिव्हाळा होये । जळाचा जरी ६ तरी तयाच्या जीविता । नाहीं जेवीं अन्यथा । तैसें कर्मी इये वर्ततां । जोडेचि मोक्षु ७ हें करणीयाचिया कडे । जें ज्ञान आंथी चोखडें । आणि अकरणीय हें फुडें । ऐसें जाण ८ जीं तियें काम्यादिकें । संसारभयदायकें । अकृत्यपणाचें आंवुखें । पडिलें जयां ९ तिये कर्मी अकार्यी । जन्ममरणसभयीं । प्रवृत्ति पळवी पायीं । मागिलींचि ७१० पैं आगीमाजीं न रिघवे । अथांवीं न घलवे । धगधगीत नागवे । शूळ जेवीं ११ कां काळियानाग धुंधुवांतु । देखोनि न

**अन्वयार्थ**–(धनंजय)–हे पार्था !–(बुद्धेः)–बुद्धीच्या–(च एव)–आणि–(धृतेः)–धृतीच्या–(गुणतः)–गुणांमुळे होणाऱ्या–(त्रिविधं भेदं)–तीन प्रकारच्या भेदाला–(अशेषेण)–कांहा बाकी न ठेवितां–(प्रोच्यमानं)–माझ्याकडून सांगितल्या जाणाऱ्या [भेदाला]–(पृथक्त्वेन)–विवेकतः तूं–(शृणु)–ऐक. २९

आतां अज्ञानरूपी गांवांत मोहरूपी वस्त्र नेसून संशयरूपी सर्व अलंकार घालून, ६९० आत्मनिश्चयाचा चांगलेपणा ज्या बुद्धिरूप आरशांत स्पष्ट दिसतो, त्या बुद्धीचे तीन प्रकार आहेत. ९१ अर्जुना, अरे ! या सत्त्वरजतमोगुणांनी जगांतील कोणत्या वस्तूचे तीन प्रकार केले नाहीत ? ९२ पोटांत अग्नि नाहीं असें या सृष्टींत कोणतें लांकूड आहे ? त्याप्रमाणें, जिचे तीन प्रकार नाहीत, अशी दृश्य वस्तूंत कोणती वस्तु आहे ? ९३ म्हणून, या तीन गुणांनी बुद्धीचे तीन प्रकार केले आहेत. तसेंच धृतीचेंही तीन गुणांनी तीन झालेले आहेत. ९४ तेच निरनिराळे भेद त्यांच्या चिन्हांसहवर्तमान विस्तारपूर्वक सांगतों. ९५ परंतु हे धनंजया, बुद्धि व धृति या दोहोंपैकीं अगोदर बुद्धीच्या भेदाची लक्षणें सांगतों. ९६ तर, हे सुभटा, मनुष्याला या संसारांत येण्यास उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन मार्ग आहेत. ९७ ते तीन मार्ग म्हणजे अकरणीय, काम्य व निषिद्ध कर्मे हे प्रसिद्ध आहेत; आणि प्राणिमात्राला यांच्यापासून संसारभय प्राप्त होत असतें. ९८

**अन्वयार्थ**–(पार्थ)–हे अर्जुना !–(या बुद्धिः)–जी बुद्धि (प्रवृत्तिं)–कर्ममार्गाला–(च)–व (निवृत्तिं)–मोक्षमार्गाला–(कार्याकार्ये)–विहित कर्तव्य व निषिद्ध अकर्तव्य; यांना–(भयाभये)–भयाचें कारण व अभयाचें कारण, यांस–(बन्धं च मोक्षं)–बंध व मोक्ष यांना–(वेत्ति)–जाणते–(सा)–ती (सात्त्विकी बुद्धिः)–सात्त्विकी बुद्धि होय. ३०

याकरितां, या लोकीं अधिकारसंमत व विधीच्या ओघानें प्राप्त झालेलें जें कर्म, तें नित्यकर्मच एक उत्तम होय. ९९ तेंच नित्यकर्म आत्मप्राप्तिरूप फलावर दृष्टि ठेवून, तृषाक्रांत मनुष्य जसें अत्यंत आदरानें पाणी पितो तसें करावें. ७०० अशा युक्तीनें नित्य कर्म केलें असतां, तें दुस्तर अशा जन्मभयापासून सोडवितें, आणि मोक्षप्राप्ति सुलभ करून देतें. १ अशा रीतीनें जो सूज्ञ पुरुष कर्म करितो, तो संसारभयापासून मुक्त होतो; व या आचरणानें मुमुक्षुत्वाच्या पायरीला येऊन पोंचतो. ( मोक्षमार्गास लागतो. ) २ या नित्य कर्मावर भरंवसा ठेवून जी बुद्धि त्याच्या आचरणाविषयीं निश्चय करिते, तेथें मोक्षप्राप्ति ठेवलेलीच आहे. ३ म्हणून ज्याची, निवृत्तीचे पायावर प्रवृत्तीची उभारणी आहे अशा या कर्मीत बुडी कां न मारावी ? ४ तहान लागलेल्या मनुष्यास पाणी असल्यावर, पुरांत पडलेल्यास पोहतां येत असतांना, अंधकारांत सूर्याच्या प्रकाशाचें साह्य असल्यावर, ५ अथवा पथ्यासह औषध घेतलें असतां जसा रोगानें ग्रस्त झालेला मनुष्य वांचतो, किंवा माशाला जर पाण्याचा आश्रय असला, ६ तर त्याच्या जीवास जसें भय नाहीं, तसें त्या नित्यकर्माचें आचरण केलें असतां मोक्षप्राप्ति होतेच होते. ७ हें नित्यकर्म करण्याकडे ज्या ज्ञानाची प्रवृत्ति असते; आणि हें बच खरोखर आचरण्यास योग्य नव्हत ८ अशी जी काम्यादिक कर्मे–जी संसारभय उत्पन्न करतात, व ज्यांच्यावर निषिद्धपणाचा शिक्का आहे, ९ त्या अनाचरणीय व जन्ममरणदायक अशा वाईट कर्मांपासून जी आपली प्रवृत्ति मागल्या पायींच पळविते; ७१० अग्नींत जसा प्रवेश करवत नाहीं, खोल पाण्यांत जशी उडी घालवत नाहीं, व तापून लाल झालेला सूळ जसा हातांत धरवत नाहीं, ११ अथवा फुसकार टाकीत असलेला काळा नाग दिसत असला म्हणजे त्यास हात

१ वस्त्र. २ चांगुलपण. ३ मूर्तिमान. ४ दृश्यवर्गात. ५ धैर्यास. ६ विस्तारानें. ७ कनिष्ठ. ८ विहित, निष्काम कर्मे. ९ फलेच्छायुक्त कर्म. १० तहान भागविण्यासाठीं. ११ दुस्तर. १२ मुक्तिलाभ. १३ प्रवृत्तीला खालीं दडपून निवृत्ति धारण केली. १४ पाया घालून. १५ बुडी मारणें. १६ पोहणें. १७ व्यापला असतांही वांचतो. १८ माशाला. १९ आहे. २० स्पष्ट, खरें. २१ आवरण, शिक्का. २२ जन्म-मरणाचें भय उत्पन्न करणारी. २३ शिरवे. २४ खोल पाण्यांत. २५ प्रखर. २६ धरतां येत नाहीं. २७ फूत्कार टाकणारा.

घालवे हातु । न वचवे खोपेआंतु । वाघाचिये १२ तैसें कर्म अकरणीय । दे-
खोनि महाभय । उपजे निःसंदेह । बुद्धी जिये १३ वाढिलें रांधूनि विखें। तेथे
जाणिजे मृत्यु न चुके । तेवीं निषेधीं कां देखे । बंधातें जे १४ मग बंधभय-
भरितीं । तियें निषिद्धीं प्राप्तीं । विनियोगु जाणे निवृत्ती। कर्मांचिये १५ ऐसेनि
कार्याकार्यविवेकी । जे प्रवृत्ति निवृत्ति मापकीं । खरा कुडा पारखी । जिया
परी १६ तैसी कृत्याकृत्यशुद्धी । बुझे जे निरवधी । सात्त्विक म्हणिपे बुद्धी ।
तेचि तूं जाण १७

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च । अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥

आणि बकाच्या गांवीं । घेपे क्षीरनीर सकळवी । कां अहोरात्रींची गोंवी।
आंधळें नेणे १८ जया फुलाचा मकरंदु फावे । तो काष्ठें कोरूं धांवे । परी भ्र-
मरपणा नव्हे । अव्हांटा जेवीं १९ तैसीं इयें कार्याकार्यें । धर्माधर्मरूपें जियें।
तियें न चोजवितां जाये । जाणती जे कां ७२० अगा डोळांवीण मोतियें ।
घेतां पांडु मिळे विपायें । न मिळणें तें आहे । ठेविलें तेथें २१ तैसें अकर-
णीय अवचटें । नोडवे तरीच लोटे। एऱ्हवीं जाणें एकवटें। दोन्ही जे कां २२ ते-
गा बुद्धि चोखेविषीं। जाण येथ राजसी । अक्षत टाकिली जैसी । मांदियेवरी २३

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसाऽवृता । सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥३२॥

आणि राजा जिया वाटा जाये । ते चोरांसि आडव होये । कां राक्षसां
दिवो पाहे । राति होऊनि २४ नाना निधानचि निदैवां । होये कोळसयाचा
उडवा । पैं असतें आपणपें जीवा । नाहीं जालें २५ तैसें धर्मजात तितुकें ।
जिये बुद्धीसी पातकें । साच तें लटिकें । ऐसेंचि बुझे २६ ते आघवेचि अर्थ।
करूनि घाली अनर्थ । गुण ते ते व्यवस्थित । दोषचि मानी २७ किंबहुना
श्रुतिजातें । अधिष्ठूनि केलें सरतें । तेतुलेंही उपरतें । जाणे जे बुद्धी २८
कोणातेंही न पुसतां । तामसी जाणावी पांडुसुता। रात्री काय धर्मार्था। सांच
करावी २९ एवं बुद्धीचे भेद । तिन्ही तुज विशद । सांगितले स्वबोध-
कुमुदचंद्रा ७३० आतां ययाची बुद्धिवृत्ती । निष्टंकिलां कर्मजातीं। खांदु
मांडिजे धृती । त्रिविधा जया ३१ तिये धृतीचेही विभाग । तिन्ही यथा-
लिंग । सांगिजती चांग । अवधान देईं ३२

धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः । योगेनाऽव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३॥

फळत नाहीं, व ज्याप्रमाणें वाघाचे जाळींत कोणी मार्ग धरीत नाहीं, १२ त्याप्रमाणें निषिद्ध कर्म पाहून ज्या बुद्धींत निश्चयेंकरून भय उत्पन्न होतें, १३ विष घालून तयार केलेलें अन्न खाल्लें असतां मरण चुकत नाहीं, तसें निषिद्ध कर्माचें आचरण केलें असतां जन्ममृत्यु चुकत नाहींत. १४ मग, निषिद्ध कर्मांचें आचरण केलें असतां जन्ममृत्यूचें भय प्राप्त होतें, असें समजून जी बुद्धि त्यांचा त्याग करिते; १५ रत्नपारखी जसा खऱ्याखोट्याचा निर्णय करतो, तसा कार्य व अकार्य यांविषयीं प्रवृत्तिनिवृत्तिरूप मापानें जी निर्णय करते; १६ तसेंच, ज्या बुद्धीला चांगलें व वाईट हें स्पष्ट समजतें, ती सात्विक बुद्धि होय, असें समज. १७

अन्वयार्थ—(पार्थ)-हे अर्जुना !-(यया)-ज्या बुद्धीच्या योगानें-(धर्मं च अधर्मं च)-धर्म व अधर्म यांस-(कार्यं च अकार्यं एव च)-कर्तव्य व अकर्तव्य यांस-(अयथावत्)-सर्व प्रकारें निर्णयरूपानें नव्हे, तर अनिर्णयरूपानें मनुष्य-(प्रजानाति)-जाणतो-(सा राजसी बुद्धिः)-ती राजसी बुद्धि होय. ३१

आणि बगळ्यांच्या गांवांत जसें दूध व पाणी एकत्र घेतलें जातें; किंवा अंधळा ज्याप्रमाणें दिवस व रात्र यांच्यामधील भेद जाणत नाहीं; १८ ज्या भ्रमराला अतिशय कोमल असा फुलांचा मकरंद सेवन करितां येतो तोच लांकूडही कोरण्यास प्रवृत्त होतो, परंतु त्याचा भ्रमरपणा काहीं नष्ट होत नाहीं; १९ त्याप्रमाणें धर्माधर्मरूपानें असणारी जी कार्याकार्यें, त्यांची निवड न करितां जी बुद्धि त्यांचें आचरण करिते, ७२० अरे, परीक्षेशिवाय मोतीं घेतलीं असतां क्वचित् चांगलीं मिळतील, नाहीं असें नाहीं, पण चांगलीं मिळणार नाहींत ही गोष्ट मात्र निश्चित आहे. २१ तसें, निषिद्ध कर्म साहजिकपणें प्राप्त न झालें तरच राहतें, एऱ्हवीं जेथें चांगलें व वाईट हीं दोन्हीं कर्में सरसकटच मानली जातात. २२ जसें सर्व समाजास योग्य व अयोग्य यांचा विचार न करितां आमंत्रण यावें; तसें चांगल्या व वाईट कर्मांविषयीं जी अंधबुद्धि ती राजस बुद्धि होय. २३

अन्वयार्थ—(या तमसा आवृता बुद्धिः)-जी अविवेकानें वेष्टित झालेली बुद्धि-(अधर्मं धर्मं इति)-अधर्माला धर्म असें-(च सर्वार्थान् विपरीतान्)-व सर्व ज्ञेय पदार्थांना विपरीत-(मन्यते)-समजते-(सा तामसी बुद्धिः)-ती तामसी बुद्धि होय. ३२

आणि राजा ज्या मार्गानें जातो, ते चोरास जसे आडमार्ग होत, ( राजमार्ग जसे चोराच्या उपयोगी नाहींत. ) किंवा राक्षसाला रात्री जसें उजाडतें; २४ अथवा धनाचा ठेवा असून भाग्यहीनाला जशी ती कोळशांचीच रास दिसते; म्हणून धन जवळ असतांना त्याला नाहींसारखें होतें; २५ तसें, शास्त्रांत सांगितलेल्या सर्व मार्गांचें आचरण करणें हें ज्या बुद्धीला घातक वाटतें, व खऱ्या गोष्टी खोट्या भासतात; २६ जी शास्त्रांचा खरा अर्थ टाकून उलट अर्थ करिते, व जे गुण म्हणून आहेत, त्या सर्वांस दोष मानते; २७ किंबहुना, श्रुतीस मान्य असलेल्या ज्या गोष्टी, त्याही सर्व बुद्धीला विपरित भासतात; २८ त्या बुद्धीला अर्जुना, कोणालाही न विचारतां बेलाशक तामसी म्हणावें. हें पहा-दानधर्माला रात्र उचित आहे काय ? २९ याप्रमाणें आत्मज्ञानरूप कमलाला विकसित करणाऱ्या चंद्रा अर्जुना, तुला बुद्धीचे तीन भेद स्पष्ट करून सांगितले. ७३० आतां, याच बुद्धीचा कर्म करण्याविषयीं जेव्हां निश्चय होतो, तेव्हां तिला धृति अशी संज्ञा प्राप्त होते, व तिचेही तीन प्रकार आहेत. ३१ त्या धृतीच्याही तीन प्रकारांचीं लक्षणें तुला स्पष्टपणें सांगतों तिकडे लक्ष दे. ३२

अन्वयार्थ—(योगेन)-समाधियोगाशीं-(अव्यभिचारिण्या)-अव्यभिचारिणी अशा-(यया धृत्या)-ज्या धृतीच्या योगानें-(मनःप्राणेंद्रियक्रियाः)-मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रिया मनुष्य-(धारयते)-धारण करितो-(पार्थ)-हे अर्जुना !-(सा सात्त्विकी धृतिः)-ती सात्त्विकी धृति होय. ३३

---

१ शुद्धत. २ निषिद्ध. ३ व्यवस्था. ४ सुटका. ५ प्रपंच परमार्थाचें माप घेणारी, ओळखणारी. ६ खोटा. ७ समजे. ८ इष्ट. ९ बगळ्यांच्या. १० दूध व पाणी. ११ एकत्र मिश्र, सरसकट. १२ ठावा, भेद. १३ मिळे. १४ आडमार्गी होत नाहीं, नष्ट होत नाहीं. १५ समजून न घेतां. १६ बुद्धि. १७ परीक्षेशिवाय. १८ योग्य, उत्तम. १९ क्वचित्. २० अकस्मात्. २१ प्राप्त न होय. २२ इंद्रियविषयीं. २३ आमंत्रण केलें. २४ जनसमुदायाला. २५ आडमार्ग. २६ दिवस उजाडतो. २७ ठेवा. २८ भाग्यहीनाला. २९ रास, ढीग. ३० वाटे. ३१ स्थापून. ३२ मान्य. ३३ उलटें, विपरीत. ३४ उचित. ३५ स्पष्ट. ३६ ज्ञानरूप कमळाला प्रफुल्लित करणाऱ्या चंद्रा-अर्जुना. ३७ निश्चित, ठाम झालेल्या. ३८ उपक्रम. ३९ संज्ञा प्राप्त होते. ४० धैर्य. ४१ त्या संज्ञेचे आहेत तसे.

तरी उदेलिया दिनकरु । चोरीसिं थोके अंधारु । कां राजाज्ञा अन्यवहारु । कुंठवी जेवीं ३३ नाना पवनाचा सोटु । वोंजीनलिया नीटु । आंगेंसीं बोभांटु । सांडिती मेघ ३४ कां आगस्तीचेनि दर्शनें । सिंधु घेऊनी ठाती मौनें । चंद्रोदयीं कमळवनें । मिठी देती ३५ हें असो पांवो उचलिला । मैंदमुख न ठेविती खालां । गर्जोनि पुढां जाला । सिंहु जरी ३६ तैसा जो धीरु । उठालिया अंतरु । मनादिकें व्यापारु । सांडिती उभीं ३७ इंद्रियां विषयांचिया गांठी । अपैसयां सुटती किरीटी । मन मायेच्या पोटीं । रिगती दोंही ३८ अधोर्ध्व गुढें कोंढी । प्राण नवांची पेंडी । बांधोनि घाली उडी । मध्यमेमाजीं ३९ संकल्पविकल्पांचें लुगडें । सांडूनि मन उघडें । बुद्धि मागिलेकडे । उगीचि बैसे ७४० ऐसी धैर्यराजें जेणें । मन प्राण करणें । स्वचेष्टांचीं संभाषणें । सांडविजती ४१ मग आधवींचि सेंडीं । ध्यानांच्या आंतुल्या मेंढीं । कोंडिजती निरेवडी । योगाचिये ४२ परी परमात्मया चक्रवर्ती । उगाणिती जंव होती । तंव लांचु न घेतां धृती । धरिजती जिया ४३ ते गा धृती येथें । सात्त्विक हें निरुतें । आइक अर्जुनातें ॥ श्रीकांतु म्हणे ४४

यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन । प्रसङ्गेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥३४॥

आणि होऊनियां शरीरीं । स्वर्गसंसाराच्या दोहीं घरीं । नांदे जो पोटभरी । त्रिवर्गोपायें ४५ तो मनोरथांच्या सागरीं । धर्मार्थकामांच्या तारुवांवरी । जेणें धैर्यबळें करी । क्रियां वणिज्य ४६ जें कर्म भांडवला सूये । तयाचो चौगुणी येती पाहे । येवढें सायास साहे । जया धृती ४७ ते गा धृती राजस । पार्था येथ परियेस । आतां आइक तामस । तिसरी जे कां ४८

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च । न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा तामसी मता ॥ ३५ ॥

तरी सर्वाधमें गुणें । जयाचें कां रूपा येणें । कोळसा काळेपणें । घडला जैसा ४९ अहो प्राकृत आणि हीनु । तयाही कीं गुणत्वाचा मानु । परी न म्हणिजे पुण्यजनु । राक्षसु काई ७५० पैं ग्रहांमाजीं इंगुळु । तयातें म्हणिजे मंगळु । तैसा तमीं धसाळु । गुणशब्दु हा ५१ जे सर्वदोषांचा धसौटा । तमचि कामऊनि सुभटा । उभारिला आंगवेंठा । जया नराचा ५२ तो आळसु सूंनि असे कांखे । म्हणौनि निद्रे कहीं न मुके । पापें पोषितां दुःखें । न सांडिजे जेवीं ५३ आणि देहधनाचिया आवडी । सदा भय तयातें न सांडी ।

सूर्योदय होतांच जसा चौर्यकर्मासह अंधकार नाहीसा होतो, किंवा राजाज्ञा झाली असतां कुव्यवहार बंद पडतो; ३३ किंवा वारा एकसारखा सपाट्यानें वाहूं लागला म्हणजे मेघ हे आपल्या गर्जनासह नाहीतसे होतात, ३४ अथवा अगस्ति ऋषीच्या दर्शनानें समुद्राच्या गर्जना बंद पडतात, किंवा चंद्रोदय झाल्यावर सूर्यविकासिनी कमलें आपोआप मिटतात; ३५ फार काय सांगावें! गर्जना करून सिंह पुढें आला तर मदोन्मत्त हत्तीला देखील उचललेला पाय खाली ठेवण्याचें सुचत नाहीं; ३६ तसें, सात्त्विक धैर्य उत्पन्न झालें असतां मन, प्राण व इंद्रियें यांचे व्यापार जागचे जागीं बंद पडतात. ३७ अर्जुना, इंद्रियें व विषय यांचा स्नेह आपोआप सुटतो, आणि तीं धावून आपली आई जें मन त्याच्या पोटांत शिरतात. ३८ प्राणाचे जे नऊ प्रकारचे भेद आहेत, ते सर्व मोडून व एकत्र करून त्यांस सुषुम्ना नाडीच्या कोठडींत अडकवून टाकितें; ३९ मनाचें संकल्पविकल्परूपी वस्त्र सोडून उघडें झालेलें मन बुद्धीच्या पाठीमागें जाऊन उगीच बसतें; ७४० याप्रमाणें जो धैर्यराज मन, प्राण व इंद्रियें यांच्या स्वकीय चेष्टांची भापणें बंद पाडितो; ४१ मग सर्वांचा झाडा घेऊन त्यांस ध्यानाच्या आंतल्या कोठडींत युक्तीनें कोंडून टाकतो; ४२ परंतु चक्रवर्ती जो परमात्मा, त्याच्या ताब्यांत त्यांस देईपर्यंत त्यांजपासून लांच न घेतां त्यांना तो धैर्यराज सोडीत नाहीं. ४३ लक्ष्मीपति भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतातः-असें जें धैर्य, तें केवळ सात्त्विक धैर्य होय, असें समज. ४४

**अन्वयार्थ**—(तु)-परंतु-(अर्जुन)-हे अर्जुना! पुरुष-(यया धृत्या)-ज्या धैर्यानें-(धर्म-अर्थ-कामान्)-धर्म, काम व अर्थ या तीन पुरुषार्थांना-(धारयते)-धारण करतो व-(प्रसंगेन)-त्यांतील आसक्तीच्या धारणेच्या वेळीं-(फलाकांक्षी)-फल.ची आकांक्षा करतो (पार्थ)-हे पार्था,-(सा)-ती-(राजसी-धृतिः)-राजसी धृति होय. ३४

आणि, शरीरामध्यें असून स्वर्ग व संसार या दोन्ही घरीं धर्म, अर्थ व काम या तीन उपयांनीं आनंदानें वास करतो; ४५ तो मनोरथसागरांत धर्मार्थकामरूपी नौकेवर ज्या धैर्यबळानें कर्माचा व्यापार करितो, ४६ जें कर्मरूपी भांडवल घातलें असतां त्याचा चौपट फायदा देतो असें म्हणून ज्या धैर्यानें साहस कर्म करितो, ४७ या धैर्यास अर्जुना, राजस धैर्य असें म्हणतात. आतां तिसऱ्या तामस धैर्याचीं लक्षणें सांगतों तीं ऐक. ४८

**अन्वयार्थ**—(यया) ज्या धृतीच्या योगानें-(दुर्मेधाः)-दुर्बुद्धि पुरुष-(स्वप्नं)-निद्रेला,-(भयं)-भयाला-(शोकं)-शोकाला-(विषादं)-खेदाला-(च मदं एव)-आणि मदाला-(न विमुंचति)-सोडीत नाहीं-(सा धृतिः)-ती धृति-(तामसी मता)-तामसी मानलेली आहे. ३५

जसा कोळसा हा काळेपणानें घडलेला असतो; त्याप्रमाणें ज्याचें स्वरूप सर्व अधम गुणांनीं भरलेलें असतें. ४९ अहो, प्राकृत (जड) आणि हीन असा असूनही त्याला गुण हें मोठें नांव देण्याचें प्रयोजन काय? अशी शंका येईल, तर असें पहा कीं, राक्षसांनाही पुण्यजन म्हणत नाहींत काय? ७५० सर्व ग्रहांत जो इंगळ (निखाऱ्याप्रमाणें ताप देणारा), त्यालाही मंगळ (शुभ) म्हणत नाहींत काय? तसा तमाला गुण हा ढसाळ (साधारण) शब्द आहे. ५१ हे सुभटा अर्जुना, सर्व दोषांचें वसतिस्थान जो तमोगुण, तो कमवून ज्या नराची मूर्ति बनलेली आहे; ५२ ज्याप्रमाणें पापाचें पोषण केलें असतां दुःख सोडीत नाहीं, त्याप्रमाणें तो त्यांकेंत आळस बाळगून असतो, म्हणून निद्रा त्याला कधीं सोडीत नाहीं. ५३ आणि ज्याप्रमाणें दगडापासून कठीणपणा कधीं दूर होत नाहीं, त्याप्रमाणें देह-

---

१ अंधकारासह चोरी. २ मग. ३ वेग. ४ जोरानें घातला असतां. ५ गर्जनासह. ६ गर्जना. ७ राहाती. ८ मिटती. ९ पाय. १० मदोन्मत्त हत्ती. ११ अंतःकरणांत. १२ सहज, आपोआप. १३ दहा इंद्रियें. १४ घाळचे वरचे मार्ग, नादासि करून (प्राणाचा ऊर्ध्व मार्ग, अपानाचा खालचा मार्ग). १५ गांठोडें. १६ सुषुम्नेंत. १७ वस्त्र. १८ इंद्रियें. १९ एकटी. २० हृदयकमलांत. २१ कुशलतेनें, युक्तीनें. २२ ताब्यांत दिलीं जातात. २३ धर्म अर्थ, व काम या तीन उपयांनीं. २४ गलबतावर. २५ कर्मांचा व्यापार. २६ घाली. २७ व्हावी असें. २८ धैर्यानें. २९ रजो-गुणात्मक. ३० प्रतिवास. ३१ राक्षसाला जसें पुण्यजन म्हणतात, सत्पुरुष. ३२ आग, निखारा. ३३ मंगळ नांवाचा ग्रह. ३४ तमोगुणी. ३५ स्थूल दृष्टीचा, अयुक्त, अनुचित, साधारण. ३६ वसतिस्थान. ३७ सिद्ध करून, तयार करून. ३८ आकार, मूर्ति. ३९ धादन.

विसंवूं न सके धोंडीं । काठिण्य जैसें ५४ आणि पदार्थजातीं स्नेहो । बांधे म्हणोनि तो शोकें ठावो । केला न शके पाप जावों । कृतघ्नौनि जैसें ५५ आणि असंतोष जीवेंसीं । धरूनि ठेला अहर्निशीं । म्हणौनि मैत्री तेणेंसीं । विषादें केली ५६ लसणातें न सांडी गंधी । कां अपथ्यशीळातें व्याधी । तैसी केली मरणावधी । विषादें तया ५७ आणि वयेंसा वित्तकामु । ययांचा वाढवी संभ्रमु । म्हणौनि मदें आश्रमु । तोचि केला ५८ आगीतें न सांडी तापु । सैंळातें जातीचा सापु । कां जगाचा वैरी वापु । अखंडु जैसा ५९ नातरी शरीरातें काळु । न विसंबे कवणे वेळु । तैसा आथी अढळु । तामसीं मदु ७६० एवं पांचही हे निद्रादिक । तामसाच्या ठाईं दोख । जिया धृती देख । धरिलें आहाती ६१ तिये गा धृती नांवें । तामसी येथ हें जाणावें । म्हणितलें तेणें देवें । जगाचेनी ६२ एवं त्रिविध जे बुद्धि । कीजे कर्मनिश्चयो आधि । तो धृती या सिद्धि । नेइजो येथ ६३ सूर्यें मार्गु गोचरु होये । आणि तो चालती कीर पाये । परी चालणें तें आहे । धैर्यें जेवीं ६४ तैसी बुद्धि कर्मातें दावी । ते करणसामग्री निफजवी । परी निफजावया होआवी । धीरता जे ६५ ते हे गा तुजप्रति । सांगितली त्रिविध धृती । यया कर्मत्रया निष्पत्ति । जालिया मग ६६ येथ फळ जें एक निफजे । सुख जयातें म्हणिजे । तेंही त्रिविध जाणिजे । कर्मवशें ६७ तरी फळरूप तें सुख । त्रिगुणीं भेदलें देख । विवंचूं आतां चोख । चोखीं बोलीं ६८ परी चोखी ते कैसी सांगे । पैं घेवों जातां बोलेंबगें । कानींचियेही लागे । हातींचा मळु ६९ म्हणौनि जयांचेनि अव्हेरें । अवधानही होय बाहिरें । तेणें आइक हो अंतरें । जिवाचेनी ७७० ऐसें म्हणौनि देवो । त्रिविधा सुखाचा प्रस्तावो । मांडला तो निर्वाहो । निरूपित असे ७१

सुखं त्विदानीं त्रिविधं श्रृणु मे भरतर्षभ । अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥ ३६ ॥

म्हणे सुखत्रयसंज्ञा । सांगों म्हणौनि प्रतिज्ञा । बोलिलों तें प्राज्ञा । ऐक आतां ७२ तरी सुख तें गा किरीटी । दाविजेल तुज दिठी । जें आत्मयाचिये भेटी । जीवासि होय ७३ परी मात्रेचेनि मापें । दिव्यौषध जैसें घेपे । कां कथिलाचें कीजे रूपें । रसभांवनीं ७४ नाना लवणाचें जळु । होआवया दोनि चार वेळु । देऊनि सांडिजती ढाळु । तोयाचे जेवीं ७५ तेवीं जालेनि सुखलेशें । जीवु भाविलिया अभ्यासें । जीवपणाचें नासे । दुःख जेथें ७६ तें येथ

रूप धनावर त्याची नेहमीं अत्यंत प्रीति असल्यामुळें त्याला भय सोडीत नाहीं; ५४ आणि कृतघ्न मनुष्याचें पाप जाण्याविषयीं कितीही खटपट केली असतां जसें तें जात नाहीं; तसें पदार्थमात्राचे ठिकाणीं प्रीति ठेवल्यामुळें तो शोकाचें राहण्याचें ठिकाण होतो; ५५ आणि रात्रंदिवस असंतोष आपल्या जीवाशीं बांधून ठेविला असल्यामुळें विषादानें ज्याच्याशीं मैत्री केली आहे; ५६ लसुणाची घाण जशी त्याजपासून दूर होत नाहीं, किंवा कुपथ्य करणाऱ्या मनुष्याला व्याधि सोडीत नाहीं, त्याप्रमाणें, विषादानें त्याजबरोबर आजन्म मैत्री केलेली असते; ५७ आणखी तारुण्य, वित्त व काम यांचा जो गर्व वहातो, म्हणून त्याचे ठिकाणीं मदही वास करतो; ५८ अग्नीला जशी तप्तता सोडीत नाहीं; जातिवंत साप जसा आपला डाव धरण्याचा स्वभाव सोडीत नाहीं अथवा भय हें जसें सर्व जगाचें वैरी असून त्याला सोडीत नाहीं; ५९ अथवा काळ हा शरीराला कधीही विसरत नाहीं, तसा तमोगुणाच्या ठिकाणीं मद अखंड असतो. ७६० याप्रमाणें निद्रा, भय, शोक, विषाद व मद हे पांच तमाचे दोष ज्या धैर्यानें धारण केले आहेत, ६१ त्या धैर्याला तामस धैर्य असें म्हणतात, असें जगन्नायक भगवान् श्रीकृष्ण बोलले. ६२ याप्रमाणें, तीन प्रकारच्या बुद्धीनें जो कर्माचा निश्चय केला, तो, धैर्य शेवटास नेतें. ६३ सूर्य उगवल्यावर मार्ग दिसूं लागून त्यावरून मनुष्य पायांनीं चालतो, परंतु चालणारानें धैर्य धारण केल्याशिवाय चालणें होत नाहीं; ६४ त्याप्रमाणें, बुद्धि ही कर्माला दाखविते तें कर्म इंद्रियें उत्पन्न करितात, परंतु उत्पन्न होण्याला जें धैर्य लागतें, ६५ तें धैर्य तुला तीन प्रकारांनीं सांगितलें; आणि त्याच धैर्यामुळें तीन प्रकारचें कर्म उत्पन्न झालें. ६६ मग त्याला जें फळ येतें, व ज्याला सुख अशी संज्ञा आहे, तेंही कर्माप्रमाणें तीन प्रकारचें आहे. ६७ तर फळरूप जें सुख, तें तीन गुणांनीं निरानिराळें केलेलें आहे. त्याचा आतां स्पष्ट आपणांनीं विचार करूं. ६८ तें स्पष्ट कसें सांगेन म्हणशील, तर शब्दाच्या मार्गानें सांगण्यास गेलें असतां शब्दाचा मळ त्याला लागतो. व कर्णद्वारां श्रवण केलें असतां, कर्णरूप हाताचा मळ त्याला लागतो. ६९ म्हणून शब्दाचा व अवधानाचा अव्हेर करून तें केवळ अंतःकरणानें श्रवण कर. ७७० असें योजून देवांनीं त्रिविध सुखाचें वर्णन करण्याविषयीं प्रस्तावना केली तीच व्यवस्था मी सांगतों. ७१

**अन्वयार्थ**––(भरतर्षभ)–हे भरतश्रेष्ठा,–(तु इदानीं)–पण आतां–(यत्र)–ज्या सुखानुभवांत–(अभ्यासात्)–अभ्यासामुळें–परिचयामुळें–(रमते)–प्राणी रममाण होतो–(च दुःखान्तं)–दुःखाच्या शांतीला–(निगच्छति)–निश्चयानें प्राप्त होतो–[तत्]–(त्रिविधं सुखं)–तें तीन प्रकारचें सुख–(मे शृणु)–मी सांगतों, तें ऐक. ३६.

भगवान् म्हणतातः–हे बुद्धिमंता अर्जुना, सुखाचीं तीन रूपें गुणांच्या योगानें आहेत म्हणून तुला जें म्हटलें होतें, तीं सांगतों, ऐक. ७२ हे किरीटी, जीवाला आत्म्याची भेट होते त्यावेळेस जो आनंद होतो, त्याला सुख असें म्हणावें. तें सुख तुला समजेल असें सांगतों. ७३ जसें उत्तम औषध मात्रेच्या प्रमाणानें सेवन करावें, अथवा रसाची पुटें देऊन जसें कथलाचें रुपें करावें, ७४ किंवा मिठाचें पाणी करणें असल्यास ज्याप्रमाणें त्याजवर दोनचार वेळ पाणी घालावें लागतें, ७५ त्याप्रमाणें, सुखाचा यत्किंचित् लाभ झाला असतां तोच अभ्यास पुढें वाढवून जीवदशेचें दुःख जेथें नाहींसें होतें, ७६ तें आत्मसुखही गुणांच्या योगानें

१ द्रव्य. २ प्रीति. ३ ठेविती. ४ अनुभवाच्यायोगानें. ५ राहिला. ६ दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होऊन. ७ दुःख. ८ पथ्य न करणारास. ९ वय, तारुण्य. १० मोठेपण. ११ दाबा धरणें. १२ जातिवंत, अस्सल. १३ सर्वांशीं विरुद्ध. १४ भय. १५ प्रत्यक्ष, दिसणारा. १६ साधनसामुग्री. १७ उत्पन्न करतें. १८ धैर्य. १९ कर्माप्रमाणें, कर्मानुसार. २० विस्तारूं, सांगूं. २१ उत्तम शब्दांनीं. २२ शब्दाच्या मार्गानें. २३ कर्णरूपी हाताचा मळ लागेल. २४ ज्याचे अव्हेरें–(ज्याचा त्याग केला असतां) अवधान देखील बाहेर जाईल. २५ विवरण. २६ व्यवस्था. २७ बुद्धिमंता. २८ भेटीनें. २९ प्रमाणानें. ३० क्रियेच्या शर्तीनें, रसाचीं पुटें देऊन. ३१ पूर. ३२ पाण्याचे. [redacted] भेदमावाचें.

आत्मसुख । जालें असे त्रिगुणात्मक । तेंही सांगों एकैक । रूप आतां ७७

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् । तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७॥

आतां चंदनाचें बुड । सर्पी जैसें दुवाड । कां निधानाचें तोंड । विवसिया जेवीं ७८ अगा स्वर्गीचें गोमटें । आडव यागसंकटें । कां बाळपण दासटें । त्रासकाळें ७९ हें असो दीपाचिये सिद्धी । अवघड धूम आधीं । नातरी तो औषधीं । जिभेचा ठावो ७८० तयापरी पांडवा । जया सुखाचा रिगावा । विषम तेथ मेळावा । यमदमांचा ८१ देंत सर्वस्नेहा मिठी । आंगीं ऐसें वैराग्य उठी । स्वर्गसंसारा कांटी । काढितेंची ८२ विवेकश्रवणें खरपुसें । जेथ व्रताचरणें कर्कशें । करितां जाती भोकसे । बुद्ध्यादिकांचे ८३ सुषुम्नेचेनि तोंडें । गिळिजे प्राणापानाचे लोंढे । वोहणियेसींचि येवढें । भारी जेथ ८४ जें सारसांही विघडतां । होय वोहँानि वत्स काढितां । ना भणंगु दवडितां । भाणेयावरुनी ८५ पैं सांयेपुढोनि बाळक । काळें नेतां एकुलतें एक । होय कां उदक । तुटतां मीना ८६ तैसें विषयांचें घर । इंद्रियां सांडितां थोर । युगांतु होय तें वीर । विरोग साहाती ८७ ऐसा जया सुखाचा आरंभु । दावी काठिण्याचा क्षोभु । मग क्षीराब्धीं लाभु । अमृताचा जैसा ८८ पहिलया वैराग्यगरळा । धैर्यशंभु वोडँवी गळा । तरी ज्ञानामृतें सोहळा । पाहे जेथें ८९ पैं कोलितेंही कोपे ऐसें । द्राक्षांचें हिरवेपण असे । तें परिपाकीं कां जैसें । माधुर्य आंते ७९० तें वैराग्यादिक तैसें । पिकालिया आत्मप्रकाशें । मग वैराग्येंसींही नाशे । अविद्याजात ९१ तेव्हां सागरीं गंगा जैसी । आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी । अद्वयानंदाची आपैसी । खाणी उघडे ९२ ऐसें स्वानुभवविश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे । तें सात्त्विक येणें नामें । बोलिजे सुख ९३

विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् । परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

आणि विषयेंद्रियां । मेळु होतां धनंजया । जें सुख जाय थडियां । सांडूनि दोन्ही ९४ अधिकारिया रिगतां गांवो । होय जैसा उत्साहो । कां रिणावरी विवाहो । विस्तारिला ९५ नाना रोगिया जिभेपासीं । केळें गोड साखरेसीं । कां वचनागाची जैसी । मधुरता पहिली ९६ पहिलें संवचोराचें मैत्र । हाटभेटीचें कलत्र । कां लाघवियाचें विचित्र । विनोदें ते ९७ तैसें विषयेंद्रियदोखीं । जें सुख जिवातें पोखी । मग उपडिला खडकीं । हंसु जैसा ९८ तैसी जोडी आ-

तीन प्रकारचें झालें आहे, त्या एकेकाचीं लक्षणें तुला सांगतों. ७७

अन्वयार्थ—(यत्)-जें-(तत्)-सुख-(अग्रे)-आरंभीं-(विषं इव)-विषासारखें क्लेशकर पण-(परिणामे)-परिणामीं-(अमृतोपमम्)-अमृतासारखें-(तत् आत्मबुद्धिप्रसादजं सुखं)-तें आत्मविषयक बुद्धीच्या प्रसादापासून झालेलें सुख-(सात्त्विकं प्रोक्तं)-सात्त्विक म्हटलेलें आहे. ३७

आतां, चंदनाचें बुड सर्पामुळें जसें भयंकर झालेलें असतें अथवा द्रव्याच्या ठेव्यावर जसा ब्रह्मराक्षसादिकांचा प्रतिबंध असतो. ७८ अरे, स्वर्गीचे उत्तम भोग मिळविण्यास प्रथम जसें यज्ञाचें महत्संकट आहे, किंवा बाल्यदशेमध्यें मुलांचा सर्वस्वी त्रास सहन करावा लागतो; ७९ हें राहो; पण दिवा लावणें झाल्यास प्रथम विस्तव पेटविण्यास जसा धुराचा त्रास सोसावा लागतो, किंवा औषधाचा कडुवटपणा जिभेस सोसावा लागतो. ७८० त्याप्रमाणें अर्जुना आत्मसुखाची प्राप्ति करून घेण्याकरितां यमदमादिक साधनांचें दुःख सोसावें लागतें. ८१ देहादिकांवरील प्रीतीचा ग्रास करणारें असें अग्नीप्रमाणें तीव्र वैराग्य जेव्हां उत्पन्न होईल, तेव्हां तें स्वर्ग व संसार यांचें कुंपण उपटून टाकतें. ८२ तीव्र अशा ज्ञानाचें श्रवण व कठोर व्रताचरण करतांना जेथें बुद्धि इत्यादिकांचे बाभाडे निघतात, ८३ सुषुम्ना नाडीच्या तोंडानें प्राण व अपान या वायूचा रोध करावा लागतो, याप्रमाणें सुरवातीस जेथें महत्कष्ट आहेत; ८४ चक्रवाक पक्ष्यांच्या जोड्याची ताटातूट केली असतां अथवा गाईला पान्हा फुटल्यावर कांसेपासून वांसरास माघारी ओढलें असतां, किंवा क्षुधितास पानावरून उठवून लाविलें असतां, ८५ अथवा आईपुढून एकुलतें एक लेंकरूं काळानें ओढून नेलें असतां, किंवा माशास पाण्यांतून काढलें असतां जसें दुःख होतें, ८६ तसें विषयांचें घर सोडते वेळेस इंद्रियांना युगांत ओढवल्याप्रमाणें दुःख होतें; परंतु वैराग्यसंपन्न शूर तेंही दुःख सहन करतात. ८७ असा ज्या सुखाचा आरंभ कष्टमय आहे, तो जो सहन करील, त्याला जसा क्षीराब्धीचें मंथन करिते वेळेस ज्यांनीं दुःख सहन केलें त्यांना अमृताचा लाभ झाला, तसा परमसुखाचा लाभ होतो. ८८ प्रथम वैराग्यरूप गरळ ज्यांत निघेल तें प्राशन करण्यास सात्त्विकधैर्यरूपी शंभु जेव्हां आ करील, तेव्हां परिणामी ज्ञानरूप अमृताचा सोहळा भोगावयास सांपडतो. ८९ हें पहा—द्राक्षांचा आंबटपणा कच्चेपणीं कोलितासही मागें सारतो, परंतु तीच पिकल्यावर मधुर लागतात; ७९० तसें वैराग्य आत्मप्रकाशानें पूर्णतेस आल्यावर मग तेथें वैराग्यादिक सर्व दुःखांचा नाश होतो. ९१ समुद्रास गंगा मिळाल्यावर जशी सुखरूप होते, तशी बुद्धि आत्म्याचे ठिकाणीं मिळाली असतां तिला अद्वयानंदरूपी सुखाची खाण उघडते. ९२ याप्रमाणें ज्या सुखास वैराग्य हें मूळ असून आत्मानंदप्राप्ति हा ज्याचा परिणाम होय, त्या सुखाला सात्त्विक सुख असें म्हणतात. ९३

अन्वयार्थ—(यत्)-जें-(विषयेंद्रियसंयोगात्)-विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून उत्पन्न होतें-(अग्रे)-आरंभीं-(अमृतोपमं)-अमृतासारखें व-(परिणामे)-परिणामीं-(विषं इव)-विषासारखें-(तत् सुखं)-तें सुख-(राजसं स्मृतम्)-राजस म्हटलें आहे. ३८

आणि अर्जुना, विषय व इंद्रियें यांचा संबंध झाला म्हणजे दुथड्या भरून जो सुखाचा पूर येतो; ९४ अधिकारी आपल्या अधिकाराच्या गांवीं गेला असतां जसा उत्सव होतो; किंवा ऋण काढून लग्नाचा जसा समारंभ करावा; ९५ अथवा रोग्याला साखर, केळीं हीं कुपथ्यें असूनही जशीं गोड लागतात; किंवा बचनाग खातेवेळेस जसा गोड लागतो; ९६ संवचोराची मैत्री जशी प्रथम गोड असते किंवा बाजारांतील स्त्रियांचें ( वेश्यादिकांचें ) आचरण प्रथम सुखकर वाटतें; किंवा नटाचे अविर्भाव जसे आल्हादकारक वाटतात, ९७ तसें विषय व इंद्रियें यांच्या संबंधानें जीवाला जें सुख होतें तें परिणामी दुःखदायक असतें. खडकावर सांचलेल्या पाण्यांत शुक्रादि चांदण्यांचें प्रतिबिंब पडलेलें पाहून तीं रत्नें आहेत, अशा भ्रमानें हंसानें त्यावर उडी घातली असतां, रत्नप्राप्ति न होतां जसा तो प्राणास मुकतो, ९८ तशी ज्या-

१ भयंकर. २ विघ्नदेवतेमुळें, समंधामुळें. ३ कठीण मार्ग. ४ यज्ञरूप क्लेश. ५ पीडाकारक. ६ औषधास. ७ विपरीत. ८ सर्व स्नेह गिळून टाकणारें. ९ कुंपण. १० दूर सारीत, काढून ठेवीत. ११ तीव्र. १२ कठोर. १३ खोबारे, बाभाडे. १४ मध्यनाडीच्या. १५ प्रथमारंभीं, सुरुवातीस. १६ चक्रवाकांच्या जोडप्याला. १७ गाईच्या कांसेपासून. १८ भिकारी. १९ पानावरून. २० आईच्या पुढ्यांतून. २१ विरक्त. २२ वैराग्यरूपी विषाला. २३ पुढें करी. २४ तक्षकास. २५ व्यापतें, होतें. २६ अज्ञानसमूह. २७ मिळाली असतां. २८ सहज. २९ तीरें. ३० अधिकारी. ३१ शिरतां. ३२ कर्जानें. ३३ सभ्यपणा दाखविणाऱ्या चोराचे. ३४ बाजारांतील स्त्री. ३५ नटाचे. ३६ अविर्भाव. ३७ विषयेंद्रिय संयोगामुळें. ३८ उडी घातली असतां. ३९ संपादिलेलें.

घवी आटे । जीविताचा ठाय फिटे । सुकृताचियाही सुटे । धनाची गांठी ९९ आणिक भोगिलें जें कांहीं । तें स्वप्न तैसें होय नाहीं। मग हानीच्याचि घोंई। लोळावें उरे ८०० ऐसें आपत्ती जें सुख । ऐहिकीं परिणमे देख । परत्रीं कीर विख । होऊनि परते १ जे इंद्रियजाता लळा । दिधलिया धर्माचा मळा। जाळूनि भोगिजे सोहळा । विषयांचा जेथ २ तेथ पातकें बांधिती थावो । तियें नरकीं देती ठावो । जेणें सुखें हा अपावो। परत्रीं ऐसा ३ पैं नामें विष मधुरें। परी मारूनि अंतीं खरें । तैसें आदि जें गोडिरें । अंतीं कडू ४ पार्था तें सुख साचें । वेंटिलें आहे रजाचें । म्हणौनि न शिवें तयाचें। आंग कहीं ५

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः । निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

आणि अपेयाचेनि पानें । अखाद्याचेनि भोजनें । स्वैरस्त्रीसंनिधानें । होय जें सुख ६ कां पुढीलांचेनि मारें । नातरी परस्वापहारें । जें सुख अवतरे। भाटाच्या बोलीं ७ जें आलस्यावरी पोखिजे । निद्रेमाजीं जें देखिजे । जयाच्या आद्यंतीं भुलिजे । आपुली वाट ८ तें गा सुख पार्था । तामस जाण सर्वथा । हें बहु न सांगोंचि जे कथा । असंभाव्य हे ९ ऐसें कर्मभेदें मुदलें। फळसुखही त्रिधा जालें । तें हें यथागमें केलें । गोचर तुज ८१० तें कर्ता कर्म कर्मफळ । ये त्रिपुटी येकी केवळ । वांचूनि कांहींचि नसे स्थूळ-। सूक्ष्मीं इयें ११ आणि हे तंव त्रिपुटी । तिहीं गुणीं इहीं किरीटी । गुंफिली असे पटीं। तांतुवीं जैसी १२

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः। सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥४०॥

म्हणौनि प्रकृतीच्या अवलोकीं । न बंधिजे इहीं सत्त्वादिकीं । तैसी स्वर्गीं ना मृत्युलोकीं । आथी वस्तु १३ कैंचा लोंवेवीण कांबळा । मातियेवीण भोंदळा । कां जळेवीण कल्लोळा । होणें आहे १४ तैसें न होनि गुणाचें । सृष्टीची रचना रचे । ऐसें नाहींच गा साचें । प्राणिजात १५ यालागीं हें सकळ । तिहीं गुणांचेंचि केवळ । घडलें आहे निखिळ । ऐसें जाण १६ गुणीं देवां त्रयी लाविली । गुणीं लोकीं त्रिपुटी पाडिली । चतुर्वर्णा घातली । सिनानीं उंळिगे १७

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप । कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥

तेचि चारी वर्ण । पुससी जरी कोण कोण । तरी जयां मुख्य ब्राह्मण । कां १८ येर क्षत्रिय वैश्य दोन्ही । तेही ब्राह्मणाच्याचि मानिजे मानीं ।

योगें सुकृतानें मिळविलेल्या सुखाची जोड नाहींशी होते, व जीवांचाही नाश होतो; आणि विषयसुख मिळण्याकरितां संपादिलेल्या सर्व पुण्यरूपी धनाचाही नाश होतो; ९९आणि भोगलेले जे विषय तेही स्वप्नाप्रमाणें नाहींतसे होतात. मग दुःखाच्या राशींत लोळणें, हेंच त्याच्या वांट्यास रहातें. ८०० इहलोकीं प्राप्त झालेलें जें सुख, त्याचा हा असा प्रकारचा परिणाम होतो; आणि तें परलोकींही खरोखर विषरूपानेंच फलप्रद होतें. १ जे इंद्रियांचे लाड पुरविण्याकरितां धर्मरूपी मळा त्यांचे स्वाधीन करतात, तें धर्म जाळून इंद्रियांकडून विषयाचा सोहळा भोगवितात. २ मग पातकांस थारा मिळून तीं बलवान् होतात, व नरकप्राप्ति करून देतात. ज्या इहलोकच्या सुखानें परलोकीं हा असा घात होतो; ३ हें पहा–जसें विष हें शब्दानें मात्र मधुर; परंतु परिणामीं प्राणनाश करणारें आहे तसें इहलोकींचें सुख आरंभीं गोड असून परिणामीं कडू आहे. ४ पार्था, हें सुख केवळ रजोगुणाचेंच बनलेलें (राजस) आहे, म्हणून त्याला तूं कधींही स्पर्श करूं नको. ५

अन्वयार्थ—(यत् सुखं)–जें सुख–(अग्रे च अनुबंधे च)–आरंभीं व अंतीं–(आत्मनः मोहनं)–आत्म्याला मोह पाडणारें व (निद्रा-आलस्य-प्रमाद-उत्थं)–झोंप–आळस–बेसावधपणा यांपासून उत्पन्न झालेलें–(तत् तामसं उदाहृतं)–तें तामस सुख म्हटलें आहे. ३९

आणि अपेय पानानें, अभक्ष्य भक्षणानें व स्वैरिणींच्या संयोगानें उत्पन्न होणारें जें सुख, ६ किंवा दुसऱ्याचा घात करून अथवा दुसऱ्याचें सर्वस्व हरण करून किंवा भाटाच्या स्तुतिपाठानें जें सुख होतें; ७ जें आळसानें किंवा निद्रेनें वाटतें; आणि ज्या सुखाच्या आरंभीं व शेवटीं आपल्या कल्याणाची शुद्धि नसते, ८ तें सुख, अर्जुना, तामस असें जाण. ही कथा मी विस्तारानें सांगत बसत नाहीं. कारण, ती असंभाव्य आहे. ९

अशा प्रकारें मूळ कर्माच्या भेदानें फलरूप सुख हें तीन प्रकारचें झालें आहे, तें तुला यथाशास्त्र सांगितलें. ८१० सर्व जगतांत लहान व मोठ्या वस्तु ज्या आहेत, त्यांत एकही वस्तु कर्ता, कर्म व फल या त्रिपुटीशिवाय सांपडणार नाहीं. ११ आणि अर्जुना, पट जसा तंतूंनीं तयार केला आहे, तशी ही त्रिपुटी पाहूं गेलें असतां तीन गुणांनीं भरलेली आहे. १२

अन्वयार्थ–(यत्)–जें–(एभिः त्रिभिः प्रकृतिजैः गुणैः)–या तीन प्रकृतिजन्य गुणांनीं–(मुक्तं)–सोडलेलें–(स्यात्)–असेल असें–(तत् सत्त्वं)–तें सत्त्व-असा प्राणी–(पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः)–पृथ्वींत किंवा स्वर्गांतील देवांत–(न अस्ति)–नाहीं. ४०

म्हणून, तूं हें लक्षांत ठेव कीं, प्रकृतीच्या गुणांनीं बद्ध झालेली अशी कोणतीही वस्तु या लोकीं अथवा स्वर्गलोकीं नाहीं. १३ लोंकरीवांचून कांबळा व मातीवांचून गोळा कसा होणार? अथवा पाण्यावांचून लाटा कशा होतील? १४ त्याप्रमाणें, जीवमात्र गुणांच्या रचनेवांचून या सृष्टींत मोकळे नाहींत. १५ वास्तव, हे सर्व जगांतील पदार्थ तीन गुणांनीच केवळ रचलेले आहेत, असें समज. १६ या तीन गुणांची शक्ति इतकी अचाट आहे कीं, त्यांनीं एका देवाचे तीन देव केले आणि लोकांचे तीन लोक (स्वर्ग, मृत्यु व पाताळ) गुणांनीच केले आहेत आणि चार वर्ण व त्यांचीं कर्में निराळीं आहेत. १७

अन्वयार्थ––(परंतप)–हे अर्जुना !–(ब्राह्मण-क्षत्रिय-विशां)–ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचीं–(च शूद्राणां)–व शूद्रांचीं–(कर्माणि)–कर्में–(स्वभावप्रभवैः गुणैः)–(मायेपासून उत्पन्न झालेल्या सत्त्वादि गुणांनीं–(प्रविभक्तानि)–अत्यंत विभागलेलीं आहेत. ४१

ते चार वर्ण कोणते असें जर पुसशील, तर त्यांत अग्रभागीं ब्राह्मण आहेत. १८ दुसरे क्षत्रिय व वैश्य हे दोन वर्ण वैदिक कर्में करण्याचे

१ पुण्यरूप धनाची. २ पापानें. ३ विषयांत. ४ स्वप्नांत. ५ परिणाम पावतें. ६ लाड. ७ बळावतात. ८ ... ९ अशाच. १० मधुर हें नांवाचें विष. ११ मधुर. १२ बनविलें. १३ व्यभिचारिणींच्या संसर्गानें. १४ परद्रव्य हरणानें. १५ उत्पन्न होतें. १६ पुष्ट होतें. १७ स्वधर्म.

१८ कारण कीं. १९ त्याज्य, निंद्य. २० यथाशास्त्र. २१ तंतूंनीं. २२ मायेच्या आभासांत, जगांत. २३ लोंकरीवांचून. २४ मातीचें ढेकूळ. २५ ब्रह्मा, विष्णु व महेश किंवा यक्ष, गंधर्व देव. २६ स्वर्ग लोक, मृत्यु लोक व नरक लोक. २७ कार्यें. २८ अग्रभागींचे.

जे ते वैदिक[1]विधानीं । योग्य म्हणौनि १९ चौथा शूद्रु जो धनंजया । वेदीं लागु कीर नाहीं तया । तऱ्ही वृत्ति[2] वर्णत्रया- । अधीन तयाची ८२० तियें वृत्तीचिया[3] जवळिका[3] । वर्णत्रया ब्राम्हणादिकां । शूद्र कींही देखा । चौथा जाला २१ जैसा फुलाचेनि सांगातें । तांतु[4] तुरंबिजे श्रीमंतें । तैसें द्विजसंगें शूद्रातें । स्वीकारी श्रुती २२ ऐसेसी गा पार्था । हे चतुर्वर्ण्यव्यवस्था । करूं आतां कर्म[5]- पथा । यांचिया[6] रूपा २३ जिहीं गुणीं ते वर्ण चारी । जन्ममृत्यूंचिये कांतरी । चुकोनियां ईश्वरीं । पैठे[7] होती २४ जियें आत्मप्रकृतीचे इहीं । गुणीं सत्त्वा- दिकीं तिहीं । कर्में चौघां चहूं ठाईं । वांटिलीं वर्णां २५ जैसें बापें जोडिलें लेंका । वांटिलें सूर्यें मार्ग पांथिकां । नाना व्यापार सेवकां । स्वामीनें जैसे २६ तैसी प्रकृतीच्या गुणीं । जया कर्मांची वेल्हांवणी । केली आहे वर्णीं । चहूं इहीं २७ तेथ सत्त्वें आपल्या आंगीं । सैंमीनानिमीन भागीं । दोघे केले[12] नियोगी । ब्रा- ह्मण क्षत्रिय २८ आणि रज परी सात्त्विक । तेथ ठेविले वैश्य लोक । रजचि तमें[13]भेसक । तेथ शूद्र ते गा २९ ऐसा येकाचि प्राणिवृंदा । भेदु चतुर्वर्णधा । गुणींचि इहीं प्रबुद्धा । केला जाण ८३० मग आपलें ठेविलें जैसें । आइतेंचि दीपें दिसे । गुणभिन्न कर्म तैसें । शास्त्र दावी ३१ तेंचि आतां कोण कोण । वर्णवि- हिताचें लक्षण । हें सांगों ऐक श्रवण । सौभाग्यनिधी ३२

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च । ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥

तरी सर्वेंद्रियांचिया वृत्ती । घेऊनि आपल्या हातीं । बुद्धि आत्मया मिळे येकांतीं । प्रिया जैसी ३३ ऐसा बुद्धीचा उपरमु[16] । तया नाम म्हणिपे शमु[15] । तो गुण गा उपक्रमु[18] । जया कर्मांचा ३४ आणि बाह्येंद्रियांचें[19] धेंडें[20] । पिटूनि विधीचेनि दंडें । नेदिजे अधर्माकडे । कहींचि जावों ३५ तो पैं गा शमा[21] वि- रजा । दम[22] गुण जेथ दुजा । आणि स्वधर्मांचिया वोजा[23] । जिणें[24] जें कां ३६ सटवीचिये[25] रातीं । न विसंबिजे जेवीं वाती[26] । तैसा ईश्वरनिर्णयो चित्तीं । वा- हणें सदा ३७ तया नाम तप । तें तिजया गुणाचें रूप । आणि शौच[27]ही नि- ष्पाप । द्विविध जेथ ३८ मन भावशुद्धी[28] भरलें । आंग क्रिया[29] अळंकारिलें । ऐसें सबाह्य जियालें[30] । साजिरें जें कां ३९ तया नाम शौच पार्था । तो कर्मीं गुण जये चौथा । आणि पृथ्वीचिया परी सर्वथा । सर्व जें साहाणें ८४० ते गा क्षमा पांडवा । गुण जेथ पांचवा । स्वरामाजीं सुहावा[31] । पंचमु[32] जैसा ४१

अधिकारी असल्यामुळें ते ब्राह्मणांच्याच बरोबरीचें मानावे. १९ हे धनंजया, चौथा जो शूद्रवर्ण, त्याला वेदाचा अधिकार नाहीं; तर त्याची सेवावृत्ति तीन वर्णांच्या अधीन आहे. ८२० त्या ब्राह्मणादि तीन वर्णांच्या सेवावृत्तीच्या सान्निध्यानें शूद्रालाही चौथ्या वर्णांत गणिलें. २१ जसा फुलांच्या संगतीनें असलेल्या दोऱ्यालाही श्रीमंत धारण करितात, तशी श्रुति द्विजांच्या संगतीनें शूद्रांचा स्वीकार करते. २२ पार्था, आतां अशा चार प्रकारांनीं या चार वर्णांची व्यवस्था झालेली आहे. तर त्या त्या वर्णांचीं कर्मे कोणतीं, ते भेद तुला सांगतों. २३ ज्या गुणांनीं ते चारी वर्ण जन्ममृत्यूचें संकट चुकवून ईश्वराप्रत प्राप्त होतात. २४ आत्म्याची जी प्रकृति, तिच्या सत्त्वादि गुणांनीं चार वर्णांला चार ठिकाणीं कर्में वांटून दिलीं आहेत, २५ ज्याप्रमाणें बापानें मिळविलेली संपत्ति मुलांना वांटून देतात, किंवा सूर्य वाटसरूंस त्यांचे त्यांचे मार्ग दाखवून देतो, अथवा स्वामी सेवकांस भिन्न भिन्न व्यवहार सांगतो, २६ त्याप्रमाणें, प्रकृतीचे जे गुण, त्यांनीं कर्मांचा विस्तार करून त्यांचीं चार वर्णांचे ठिकाणीं वांटणी केली. २७ त्या ठिकाणीं सत्त्वगुणानें आपल्या समविषम भागानें ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन वर्ण उत्पन्न केले; २८ आणि रजोगुण व सत्त्वगुण यांच्या मिश्रणानें वैश्य वर्ण उत्पन्न झाला व रज आणि तम यांच्या मिश्रणानें शूद्र वर्ण उत्पन्न झाला. २९ अशा प्रकारें, हे प्रबुद्धा, एकरूपच असा प्राणिमात्राचा गुणांनीं चार प्रकारचा भेद केला आहे, असें समज. मग आपली ठेवलेली वस्तु जशी दिव्याच्या ८३० उजेडानें सहज दिसते, तसें गुणांनीं वेगळें झालेलें कर्म शास्त्रांत स्पष्ट सांगितलें आहे. ३१ हे भाग्यवंता, कोणत्या वर्णाला कोणतें विहित कर्म तेंच तुला आतां सांगतों, ऐक. ३२

अन्वयार्थ—(शमः)- अंतःकरणाची शांति,–(दमः)–व बाह्य इंद्रियांचा निग्रह–(तपः)–[ सतराव्या अध्यायांत सांगितलेलें ] त्रिविध तप,–(शौचं)–अंतःशुद्धि व बहिःशुद्धि,–(क्षांतिः)–क्षमा–(आर्जवं एव च)–सरळपणा, (ज्ञानं)–आत्मादि पदार्थांचें ज्ञान,–(विज्ञानं)–शास्त्रार्थाचा अनुभव–(आस्तिक्यं)–श्रद्धाळूपणा हें–(ब्रह्मकर्म स्वभावजं,–ब्राह्मण जातीचें स्वभावजन्य कर्म आहे. ४२.

[ शमः ] प्रिया ज्याप्रमाणें आपले पतीशीं एकांतीं भेटते, त्याप्रमाणें सर्व इंद्रियांच्या वृत्ति आपल्या हातांत घेऊन जी बुद्धि आत्मस्वरूपीं मिळते; ३३ असा जो बुद्धीचा लीनपणा, त्याला 'शम' असें म्हणतात, तो सर्व गुणांमध्यें प्रथम असून, त्याजपासून सर्व कर्मांचा आरंभ होतो. ३४ [ दमः ] आणि जो बाह्य इंद्रियांना विधीचा दंड करून अधर्माच्या मार्गाला कधींही जाऊं देत नाहीं, ३५ तो शमाला साह्यकर्ता असा दुसरा, 'दम' गुण होय, तो इंद्रियांना स्वधर्मानें चालवितो. ३६ [तपः] जसें षष्ठीपूजनाचे रात्रीं दिव्याला विसंबत नाहींत, तसें सर्वकाळ चित्तांत ईश्वरस्वरूपाचा विचार करणें, ३७ त्याला 'तप' असें म्हणतात; आणि हा ब्राह्मण कर्माचा तिसरा गुण आहे. [ शौचं ] आणखी शौच म्हणजे पवित्रपणा हा निष्पाप असून दोन प्रकारचा आहे. ३८ मन हें शुद्ध भावानें भरलेलें असून सर्व शरीर सत्कर्मानें सुशोभित आहे, तसा अंतर्बाह्य शुचिपणा भरलेला आहे, ३९ त्याला पार्था, 'शौच' असें म्हणतात; व तो ब्रह्मकर्मांपैकीं चौथा गुण होय. [ क्षांतिः ] आणि पृथ्वीप्रमाणें नेहमीं सर्व दुःखें सहन करणें, ८४० त्याला अर्जुना, 'क्षमा' असें म्हणतात, व सप्तस्वरांत पंचमस्वर जसा अति मधुर आहे, तसा, ब्राह्मणकर्मांतील हा पांचवा गुण होय, ४१ [ आर्जवं ] आणि गंगेचा ओघ जरी वांकडा

१ वैदिक कर्म करण्याचे अधिकारी. २ जीवनोपाय, सेवावृत्ति. ३ सेवावृत्तीच्या सान्निध्यानें. ४ दोरा धारण करतात. ५ या चारी वर्णांच्या कर्ममार्गांचें स्पष्टीकरण. ६ कातरीस, संकटास. ७ प्राप्त, प्रविष्ट. ८ वाटसरू लोकांस; ९ अथवा. १० विस्तार. ११ समविषम. १२ उत्पन्न. १३ तमोमिश्र. १४ वर्णपरत्वें. १५ हे भाग्यवंता. १६ लीनपणा. १७ चित्ताचें नियमन. १८ आरंभ. १९ कर्मेंद्रियांचे समुदाय. २० स्वारी. २१ साहाय्यकर्ता. २२ बाह्येंद्रियांचें नियमन. २३ रीतानें. २४ षष्ठीस, जीवितें. २५ जन्मल्याच्या सहाव्या रात्रीं. २६ दिवा. २७ शुद्धि, शुचिर्भूतता. २८ विचारानें, श्रद्धेनें. २९ सत्कर्माचरणानें भूषित केलें. ३० जिणें. ३१ मधुर, गोड. ३२ पंचम नांवाचा स्वर.

गुण देख । आणि जुंझ अलौकिक । तो पांचवा गुण ६४ आदित्याचीं झाडें । सदा सन्मुख सूर्याकडे । तेवीं समोर शत्रूपुढें । होणें जें कां ६५ माहेवणी प्रयत्नेंसीं । चुकविजे सेजे जैसी । रिपू पाठी नेदिजे तैसी । समरांगणीं ६६ हा क्षत्रियाचेया आचारीं । पांचवा गुणेंद्रु अवधारीं । चहूं पुरुषार्थां शिरीं । भक्ति जैसी ६७ आणि जालेंनि फुलें फळें । शौखिया जैसी मोकळे । कां उदार पारिमळें । पद्मांकरु ६८ नाना आवडीचेनि मापें । चांदिणें भलतेणें घेपे । पुढिलांचेनि संकल्पें । तैसें जें देणें ६९ तें उमप गा दान । जेथ सहावें गुणरत्न । आणि आज्ञे एकायतन । होणें जें कां ८७० पोषूनि अवयव आपुले । करविजती मानविले । तेवीं पालणें लोभविलें । जग जें भोगणें ७१ तया नाम ईश्वरभावो । जो सर्वसामर्थ्याचा ठावो । तो गुणांमाजीं रावो । सातवा जेथ ७२ ऐसें जें शौर्यादिकीं । इहीं सात गुणविशेखीं । अळंकृत सप्तऋखीं । आकाश जैसें ७३ तैसें सप्तगुणीं विचित्र । कर्म जें जगीं पवित्र । तें सहज जाण क्षात्र । क्षत्रियाचें ७४ नाना क्षत्रिय नव्हे नरु । तो सत्वसोनयाचा मेरु । म्हणौनि गुण स्वर्गा आधारु । सातां इयां ७५ नातरी सप्तगुणार्णवीं । परिवारली बरवी । हे क्रिया नव्हे पृथ्वी । भोगीतसे तो ७६ कां गुणांचे सातांही ओघीं । हे क्रिया ते गंगा जगीं । तया महोदधीचिया आंगीं । विलसे जैसी ७७ परी हें बहु असो देख । शौर्यादि गुणात्मक । कर्म गा नैसर्गिक । क्षत्रजातीसी ७८ आतां वैश्याचिये जाती । उचित जे महामती । तें ऐकें गा निरुती । क्रिया सांगों ७९

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् । परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

तरी भूमि बीज नांगरु । यया भांडवलाचा आधारु । घेऊनि लाभु अपारु । मेळवणें जें ८८० किंबहुना कृषी[13] जिणें । गोधनें राखोनि वर्तणें । कां सॅमर्घांची विकणें । मॅहर्घीं वस्तु ८१ केतुलाचि पांडवा । वैश्यातें कर्माचा मेळावा । हा वैश्यजातिस्वभावा- । आंतुला जाण ८२ आणि वैश्य क्षत्रिय ब्राह्मण । हे [16] द्विजन्मे तीन्ही वर्ण । ययांचें जें शुश्रूषण । तें शूद्रकर्म ८३ पैं द्विजसेवेपरौतें । धांवणें नाहीं शूद्रातें । एवं चतुर्वर्णोचितें । दाविलीं कर्में ८४

स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः । स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥४५॥

आतां इयेचि विचक्षणा । वेगळालिया वर्णा । उचित जैसें करणां । शब्दादिक ८५ नातरी जळदेच्युता । पाणिया उचित सरितां । सरितेसी पांडुसुता ।

होय. [ युद्धे अपलायनं ] आणि 'अलौकिक युद्धपराक्रम' हा त्याच प्रकृतीचा पांचवा गुण होय. ६४ सूर्यकमळें जशीं नेहमीं सूर्याच्या सन्मुख असतात, तसें शत्रूच्या समोर नेहमीं असणें, ६५ गरोदर स्त्री पतिसमागमास जशी प्रयत्नेंकरून चकविते तसें शत्रूला रणांगणांत पाठ दाखविण्याचें तो चुकवितो. ६६ चार पुरुषार्थांत 'भक्ति' हा पुरुषार्थ जसा श्रेष्ठ आहे, तसा क्षात्र प्रकृतीच्या गुणांमध्यें हा पांचवा गुण इंद्राप्रमाणें श्रेष्ठ आहे, असें समज. ६७ [ दानं ] आणि वृक्ष आपलीं पानें, फुलें व फळें हीं जशीं याचकास अर्पण करण्यास तयार असतो, अथवा परिमळाविषयीं कमल जसें उदार असतें; ६८ अथवा ज्याला जितकी आवड असेल तितकें त्यानें चांदण्याचें सुख घ्यावें; तसें याचकास त्याचे इच्छेप्रमाणें देणें, ६९ याला 'अमर्याद दान' असें म्हणतात. तें क्षात्र प्रकृतीचें सहावें गुणरत्न होय. [ ईश्वरभावः ] आणि आज्ञेचें रहाण्याचें एक स्थान क्षत्रिय होय. ८७० आपल्या हस्तपादादिक अवयवांचें चांगलें पोषण केलें असतां त्यांजकडून वाटेल तें काम करून घेतां येतें त्याप्रमाणें प्रजेचें प्रेमानें पालन केलें असतां प्रजेचा उपभोग राजाला वाटेल तसा घेतां येतो. ७१ जो सर्व सामर्थ्याचा आधार त्यालाच 'ईश्वरभाव' असें म्हणतात. तो या क्षात्र प्रकृतीच्या सर्व गुणांचा राजा असा सातवा गुण होय. ७२ अशा शौर्य आदिकरून सात गुणांनीं जो पुरुष विशेष अलंकृत आहे, तो सप्तर्षींच्या सात चांदण्यांनीं जसें आकाश शोभतें, त्याप्रमाणें शोभतो. ७३ अशा प्रकारें, या सात पवित्र गुणांनीं या जगांत जें कर्म पवित्र झालेलें असतें, तें क्षात्र प्रकृतीचें स्वाभाविक कर्म आहे, ७४ अथवा असा जो पुरुष तो क्षत्रिय नसून सत्वरूप सोन्याचा मेरूच होय, म्हणून तो सप्तगुणरूपी समुद्रांनी स्वर्गाला धारण करतो, ७५ किंवा सप्तगुणरूपी समुद्रांनीं वेष्टित केलेली ही क्षात्रप्रकृतिरूप पृथ्वी होय. ७६ अथवा सप्तगुणरूपी ओघांनीं क्षात्रक्रियारूपी गंगा ही क्षात्र प्रकृति धारण करणाऱ्या त्या महोदधीला मिळून शोभते. ७७ या सर्व गोष्टी राहूं दे. क्षात्र प्रकृतीचीं शौर्यादि गुणात्मक कर्में हीं स्वाभाविक आहेत. ७८ आतां हे महामते, वैश्य जातीला जें योग्य कर्म आहे तें तुला सांगतों, ऐक. ७९

१ गरोदर. २ मुख्य गुण. ३ टाळण्या. ४ देई. ५ कमलसरोवर. ६ विपुल, मोठें. ७ वेदाज्ञेस एकनिष्ठ, राहण्याचें स्थान. ८ सप्तर्षीनीं. ९ वेष्टिलेली. १० शोभते. ११ स्वाभाविक. १२ यथार्थ. १३ शेतकीचा. विवाह करणें. १४ स्वस्त दरानें घेतलेली वस्तु. १५ महाग.



अन्वयार्थ—(कृषि-गौरक्ष्य-वाणिज्यं)—शेत नांगरणें, पशूंचें पालन करणें व देवघेव वगैरे व्यापार करणें, हें—(स्वभावजं वैश्यकर्म) वैश्याचें स्वभावजन्य कर्म आहे.—(परिचर्यात्मकं कर्म)—शुश्रूषा-सेवारूप कर्म—(शूद्रस्य अपि)—शूद्राचेंहि—(स्वभावजं)—स्वाभाविक आहे. ४४

[ कृषि ] शेत, बीज, नांगर इत्यादि साहित्य मिळवून त्यांच्यायोगें पुष्कळ नफा मिळविणें, ८८०, किंबहुना कृषिकर्म करून अथवा [ गोरक्ष्य ] गाईचें संरक्षण करून किंवा [ वाणिज्यं ] स्वस्त वस्तु घेऊन महाग दरानें विकणें ८१ अर्जुना, वैश्य जातीनें ह्या तीन प्रकारें कर्म करून निर्वाह करणें, हाच त्यांचा स्वाभाविक धर्म होय, ८२ आणि वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण या तिन्ही वर्णांस द्विज हें नांव आहे व यांची सेवा करणें हाच शूद्र वर्णाचा स्वाभाविक धर्म आहे. ८३ परंतु, द्विजांच्या सेवेवांचून शूद्रांना दुसरें कर्मच नाहीं. या प्रकारें करून चारी वर्णांचीं कर्में तुला सांगितलीं. ८४

अन्वयार्थ—(स्वे स्वे कर्मणि)—वर सांगितलेल्या आपापल्या कर्मामध्यें—(अभिरतः नरः)—अत्यंत निमग्न असलेला पुरुष—(संसिद्धिं)—शरीरेंद्रियांची शुद्धि होऊन ज्ञानाची योग्यता प्राप्त होणें या उत्तम सिद्धीला—(लभते)—प्राप्त होतो. आतां—(स्वकर्मनिरतः)—आपल्या कर्मात अत्यंत रत असलेला पुरुष (यथा)—ज्या प्रकारें—(सिद्धिं)—सिद्धीला—(विंदति)—प्राप्त होतो—(तत् शृणु)—तें ऐक. ४५

आतां, या चार वर्णांचीं निरनिराळीं उचित कर्में तुला स्पष्ट करून सांगतों. ज्याप्रमाणें कर्मादि इंद्रियांना शब्दादिक विषयच उचित होत, ८५ अथवा मेघापासून पडलेल्या उदकास योग्य स्थान नदीच

१६ दोन वेळ जन्मलेले पहिलें सर्व सामान्य शौच नांवाचें जन्म व दुसरें उपनयनांत सावित्रीमंत्रोपदेशानें सावित्र नांवाचें जन्म हीं ज्यास आहेत ते. ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ) १७ सेवा. १८ स्पष्ट करून १९ मेघापासून पडलेल्या. २० नदी.

सिंधु उचितु ८६ तैसें वर्णाश्रमवशें । जें करणीय आलें असे । गोरेया आंगा जैसें । गोरेपण ८७ तया स्वभावविहिता कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा । प्रवर्तावयालागीं प्रमा । अढळ कीजे ८८ पैं आपुलेनि रत्न थितें । वेपे पारखियाचेनि हातें । तैसें स्वकर्म औपैतें । शास्त्रें करावीं ८९ जैसी दिठी असे आंगुलिया ठायीं । परी दीपेंविण भोग नाहीं । मार्गु न लाहतां कांहीं । पाय असतां होय ८९० म्हणौनि ज्ञातिवशें साचारु । सहज असे जो अधिकारु । तो आपुलालिया शास्त्रें गोचरु । आपण कीजे ९१ मग घरींचाचि ठेवा । जेवीं डोळयां दावी दिवा । तरी घेतां काय पांडवा । आडंळु असे ९२ तैसें स्वभावें भागा आलें । वरी शास्त्रें खरें केलें । तें विहित जो आपुलें । आचरे गा ९३ परी आळसु सांडुनी । फळकाम दवडुनी । आंगें जीवें मांडुनी । तेथेंचि भरु ९४ वोघीं पडिलें पाणी । नेणे आनानी वाहणी । तैसा जाय आचरणीं । व्यवस्थौनी ९५ अर्जुना जो यापरी । तें विहित कर्म स्वयें करी । तो मोक्षाच्या ऐलद्वारीं । पैठा होय ९६ जे अकरणा आणि निषिद्धा । न वचेचि कांहीं संबंधा । म्हणौनि भवा विरुद्धा । मुकला तो ९७ आणि काम्यकर्माकडे । न परतेचि जेथ कोडें । तेथ चंदनाचेही खोडें । नलेचि तो ९८ येर नित्य कर्म तंव । फलत्यागें वेंचिलें सर्व । म्हणौनि मोक्षाची शिंव । ठाकूं लाहे ९९ ऐसोनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं । वैराग्यमोक्षद्वारीं । उभा ठाके ९०० जें सकळ भाग्याची सीमा । मोक्षलाभाची जें प्रमा । नाना कर्ममार्गश्रमा । शेवटु जेथ १ मोक्षफळें दिधली वोल । जें सुकृततरूचें फूल । तयें वैराग्यीं ठेवी पाऊल । भंवरु जैसा २ पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा । वाधावा सांगतया अरुणाचा । उदयो त्या वैराग्याचा । ठावो पावे ३ किंबहुना आत्मज्ञान । जेणें हाता ये निधान । तें वैराग्य दिव्यांजन । जीवें ले तो ४ ऐसी मोक्षाची योग्यता । सिद्धी जाय तया पांडुसुता । अनुसरोनि विहिता । कर्मा यया ५ हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य वोलावा । आणि हेंचि परम सेवा । मज सर्वात्मकाची ६ पैं आघवाचि भोगेंसीं । पतिव्रता क्रीडे प्रियेंसीं । कीं तयाचीं नामें जैसीं । तयें तियां केलीं ७ कां बाळका एकी माये । वांचोनि जिणें काय आहे । म्हणौनि सेविजे कीं तो होये । पाटांचा धर्मु ८ नाना पाणी म्हणौनि मासा । गंगा न सांडितां जैसा । सर्व तीर्थे सहवासा । वरपेंडा जाला ९ तैसें आपुलिया विहिता ।

होय; आणि अर्जुना, नदीस उचित स्थान समुद्र, ८६ तसें वर्णाश्रमधर्माप्रमाणें जें अवश्यक कर्म, तें केलें असतां, गोर अंगास जसें गोरेपण शोभा देतें, तशी त्या वर्णाला अत्यंत शोभा येते. ८७ हे वीरोत्तमा, त्या स्वभावजन्य कर्माचें शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें आचरण करण्याविषयीं आपली बुद्धि निश्चित करावी. ८८ परंतु आपल्या जवळ असलेलें रत्न जसें रत्नपारख्याच्या हातून पारखून घ्यावें लागतें, तसें आपलें स्वकर्म शास्त्राच्या आधारानें समजून घ्यावें. ८९ जशी आपले जवळ दृष्टि असूनही दिव्यावांचून तिचा उपयोग होत नाही, आणि मार्ग न सांपडला तर पाय असतांही त्यांचा काय उपयोग? ८९० म्हणून, जातीप्रमाणें जो जो योग्य अधिकार असेल, तो आपण आपल्या शास्त्राप्रमाणें समजून घ्यावा. ९१ मग अर्जुना, दिवा जसा आपल्या घरांतील ठेवा आपल्या डोळ्यांस दाखवितो, तेव्हां तो घेण्याविषयीं प्रतिबंध असतो काय? ९२ तसें स्वभावतः आपल्या वांट्यास आलेलें, व शास्त्रानें खरें केलेलें असें जें विहित कर्म, त्याचें जो आचरण करतो; ९३ पण, आळस सोडून व फलेच्छा टाकून, मोठ्या हौसेनें शरीरानें जीव लावून त्या ठिकाणीं जो आपला सर्व काळ घालवितो; ९४ पाणी ओघांत पडल्यावर जसें भलतीकडे जात नाहीं, तसें ज्याचें आचरण यथाशास्त्र होतें; ९५ अर्जुना, याप्रमाणें जो विहित कर्माचें स्वतः आचरण करतो, तो पुरुष मोक्षाच्या अलीकडलें जें द्वार वैराग्य तेथें प्राप्त होतो. ९६ जो अकरण व निषिद्ध या कर्मांचा संबंध होऊं देत नाहीं, म्हणून आत्मप्राप्तिविरुद्ध जो संसार, त्याच्या भयापासून मुक्त होतो; ९७ तसेंच, चंदनाचाही खोडा पायांत घालण्यास आणिला तरी पाय अडकवून घेत नाहीं, तसें काम्यकर्माकडे जो कौतुकानेंही पहात नाहीं; ९८ आणि दुसरें जें नित्य कर्म, त्याचा फलत्याग केल्यामुळें तेंही तो संपवितो; त्यामुळें तो मोक्षाच्या शिवेजवळ प्राप्त होतो. ९९ अशा युक्तीनें कर्माचें निरसन करून, शुभाशुभ संसारापासून तो सुटतो, व मोक्षाचें द्वार जें वैराग्य तेथें येऊन उभा रहातो. ९०० जें वैराग्य सकळ भाग्याची सीमा होय, व मोक्षलाभाचा निश्चय अथवा कर्ममार्गाचे श्रम परिहार होण्याचें स्थान होय; १ ज्याला मोक्षफल जामीन झालेलें आहे किंवा जें सत्कर्मरूप वृक्षाचें फूलच होय, त्या वैराग्याचे ठिकाणीं साधक पुरुष भ्रमराप्रमाणें पाऊल ठेवतो, २ हें पहा सूर्योदयाची वार्ता सांगणारा जसा अरुणोदय आहे, त्याप्रमाणें या आत्मज्ञानरूप सुदिनाचा उदय सुचविणारें हें वैराग्य आहे. ३ किंबहुना, आत्मज्ञानरूप जें निधान, तें ज्या वैराग्यरूप दिव्यांजनानें हातास येतें, तें जो जिवेंभावेंकरून बुद्धिरूप डोळ्यांत घालतो; ४ अर्जुना, अशा प्रकारें विहित कर्माला अनुसरून आचरण केलें असतां, त्याला मोक्षप्राप्तीची योग्यता प्राप्त होते. ५ हे पांडवा, विहित कर्म हा आपल्या कल्याणाचा जिव्हाळा होय, त्याचेंच आचरण करणें हीच मज सर्वात्मक ईश्वराची परम सेवा होय. ६ संपूर्ण भोगेंकरून पतिव्रता स्त्री आपल्या प्रियपतीबरोबर क्रीडा करते, त्याच तिच्या आचरणास 'तप' असें म्हणावें. ७ किंवा, बाळाला आईवांचून जगायाला दुसरें साधनच नाहीं, म्हणून तिची सेवा केली असतां त्याचें कल्याण होतें; त्याप्रमाणें, स्वधर्माचें आचरण करणें हाच मुख्य धर्म होय. ८ अथवा केवळ पाणी समजून गंगेंत राहिलेल्या माशाला तेथें राहिल्यानें जसा सर्व तीर्थांचा सहज लाभ होतो, ९ तसें आपल्या विहित कर्माचें आचरण केल्यावांचून दुसरा उपायच नाहीं व अशा निश्चयानें त्याचें आराधन केलें म्हणजे

१ बुद्धि. २ जसलेलें. ३ आपलेलें, ओळखीचें. ४ दृष्टि. ५ योग्य. ६ प्रत्यक्ष. ७ अडथळा. ८ सर्व वेळ घालविलें. ९ निरनिराळा प्रवाह, मार्ग. १० प्राप्त. ११ मुळींच कर्म न करण्याला. १२ होऊं देत नाहीं. १३ संसारास. १४ आवडीनें, कौतुकानें. १५ खोडा, प्रतिबंध. १६ स्वीकारीत नाहीं. १७ हद्द. १८ प्राप्त करून घेतो. १९ वैराग्यरूपी मोक्षाच्या द्वारांत. २० निर्णय. २१ तारण. २२ भ्रमर. २३ वार्ता, उदय. २४ घाली. २५ अंकच. २६ जिव्हाळा. २७ ईश्वराची. २८ पतीशीं. २९ त्याचेच ठायीं. ३० मेघराचा. ३१ प्राप्त.

उपायो असे न विसंबितां। ऐसा कीजे कीं जगन्नाथा। आभारु पडे ९१० अगा जया जें विहित। तें ईश्वराचें मनोगत। म्हणौनि केलिया निभ्रांत। सांपडेचि तो ११ पैं जीवाचे कैसीं उतरली। ते दासी कीं गोसांवीण जाली। सिसे वेंचि तया मैविली। वेंही जेवीं १२ तैसें स्वामीचिया मनोभावा। न चुकिजे हेचि परमसेवा। येर तें गा पांडवा। वाणिज्य करणें १३

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्। स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः॥ ४६॥

म्हणौनि विहित क्रिया केली। नव्हे तयाची खूण पाळिली। जयापासूनि कां आलीं। आकारा भूतें १४ जो अविद्येचिया चिंधिया। गुंडूनि जीव बाहुलिया। खेळवीतसे तिगुणिया। अहंकाररज्जू १५ जेणें जग हें समस्त। आंत बाहेरी पूर्ण भरित। जालें आहे दीपजात। तेजें जैसें १६ तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमांची वीरा। पूजा केली होय अपारा। तोषालागीं १७ म्हणौनि तिये पूजे। रिझलेनि आत्मराजें। वैराग्यसिद्धि देईजे। पसाय तया १८ जिये वैराग्यदशे। ईश्वराचेनि वेधवेशें। हें सर्वही नावडे जैसें। वांत होय १९ प्राणनाथाचिया आधीं। विरहिणीतें जिणेंही बाधी। तैसें सुखजात त्रिशुद्धी। दुःखचि लागे ९२० सम्यक्ज्ञान नुदैजतां। वेधेंचि तन्मयता। उपजे ऐसी योग्यता। बोधाचि लाहे २१ म्हणौनि मोक्षलाभालागीं। जो व्रतें वाहतसे आंगीं। तेणें स्वधर्मु आस्था चांगी। अनुष्ठावा २२

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥ ४७॥

अगा आपुला हा स्वधर्मु। आचरणीं जरी विषमु। तरी पाहावा तो परिणामु। फळेल जेणें २३ जैं सुखालागीं आपणपयां। निंबचि आथी धनंजया। तैं कडुवटपणा तयाचिया। उबगिजेना २४ फळणया ऐलीकडे। केळीतें पाहतां ओंस मोडे। ऐसी त्यजिली तरी जोडे। तैसें कें गोमटें २५ तेवीं स्वधर्मु सांकडु। देखोनि केला जरी कडु। तरी मोक्षसुरवाडु। अंतरला कीं २६ आणि आपुली माये। कुब्ज जरी आहे। तरी जीये तें नोहे। स्नेह कुन्हें कीं २७ येरी जिया पैराविया। रंभेहूनि बरविया। तिया काय कराविया। बाळकें तेणें २८ अगा पाणियाहूनि बहुवें। तुपीं गुण कीर आहे। परी मीना काय होये। असणें तेथ २९ पैं आघविया जगा जें विख। तें विखकीडिया पीयूख। आणि जगा गुळ तें देख। मरण तया ९३० म्हणौनि जे विहित जया जेणें। फिटे

जगन्नाथ जो ईश्वर त्यावर आपलें ओझें पडतें. ९१० अरे, ज्याचें जें विहित कर्म नेमलेलें आहे, तें त्यानें करणें हेंच ईश्वराचें मनोगत आहे, म्हणूनच तें कर्म केलें असतां निःसंशय ईश्वर प्राप्त होतो. ११ दासी असूनही जर राजाच्या कसोटीस उतरली, तर तीच सर्वांची स्वामिणी होते; किंवा स्वामीकार्यार्थ जो आपलें डोकें देणारा त्याला स्वामी जसा इनामपत्र करून देऊन आपले दप्तरीं दाखला ठेवितो, १२ तसें ईश्वराच्या मनोभावाप्रमाणें वागणें हीच त्याची परम सेवा होय; व यावांचून जें दुसरें कृत्य करणें, तें अर्जुना, वाणिज्य कर्माप्रमाणें आहे. १३

अन्वयार्थ—(यतः)–ज्याच्यापासून–(भूतानां)–भूतांची –प्राण्यांची–(प्रवृत्तिः)–उत्पत्ति किंवा चेष्टा होते–(येन)–ज्यानें –(इदं सर्वं)–हें सर्व–(ततं)–व्यापलें आहे–(तं)–त्याला–स्व-कर्मणा)–आपल्या कर्मानें–(अभ्यर्च्य)–पुजून–(मानवः)–मनुष्य-(सिद्धिं)–सिद्धीला–(विंदति)–प्राप्त होतो. ४६

म्हणून, विहित कर्म केलें म्हणजे तें कर्म केलें असें नव्हे, तर ज्या परमात्म्यापासून सर्व भूतें उत्पन्न झालीं आहेत, त्याचें मनोगतच आपण पाळिलें! १४ जो परमात्मा अज्ञानरूपी चिंध्या गुंडाळून जीवरूपी बाहुल्या तयार करतो, आणि सत्त्व, रज व तम अशा तीन पदरी अहंकाररूप सूत्रानें त्यांना खेळवितो. १५ दिवा जसा तेजानें अंतर्बाह्य भरलेला असतो, तसें ज्या परमात्म्यानें हें सर्व जग अंतर्बाह्य ओतप्रोत भरलेलें आहे. १६ वीरा अर्जुना, त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरूपी पुष्पांनीं पूजा केली असतां, ती पूजा त्याला परमसंतोषकारक होते. १७ म्हणून त्या पूजेच्या योगानें आत्मराज प्रसन्न होऊन भक्ताला वैराग्य उत्पन्न करतो. हाच त्याचा भक्तावर खरोखर प्रसाद!! १८ जी वैराग्यदशा प्राप्त झाली असतां ईश्वराचा छंद लागून हा सर्व संसार वमनप्राय भासतो; १९ ज्याप्रमाणें आपल्या प्रिय पतीच्या वियोगानें विरहिणी स्त्रीस जिवंत रहाणें देखील नकोसें होतें, त्याप्रमाणें संसारांतील सर्व सुखें त्याला खरोखर दुःखवत् भासतात. ९२० ईश्वराचें अपरोक्ष ज्ञान उत्पन्न होण्याचे पूर्वी त्याच्या ध्यासानें तन्मयता प्राप्त होते; अशी बोधाची योग्यता आहे. २१ यास्तव, ज्याच्या मनांत मोक्ष प्राप्त व्हावा, अशी इच्छा असेल, त्यानें स्वधर्माचें परम आस्थेनें आचरण करावें. २२

अन्वयार्थ—(स्वनुष्ठितात् परधर्मात्)–उत्तम प्रकारें अनुष्ठिलेल्या परधर्माहून–(विगुणः स्वधर्मः)–गुणहीन स्वधर्म –(श्रेयान्)–अधिक श्रेयस्कर आहे.–(स्वभावनियतं कर्म कुर्वन्) –(स्वभावानें नियत केलेलें कर्म करणारा–(किल्बिषं)–पापाला –(न आप्नोति)–प्राप्त होत नाही. ४७

अरे, आपला धर्म जरी आचरण करण्यास कठीण असला, तरी त्यापासून परिणामीं जें फल प्राप्त होणार, त्यावर लक्ष ठेविलें पाहिजे. २३ हे धनंजया, कडुलिंबाचें सेवन केलें असतां जर आपल्याला सुख होत असेल, तर त्याच्या कडुपणास कंटाळूं नये. २४ केळ विण्याचे पूर्वी तिच्याकडे पाहून निराशा होते; आणि तशा स्थितीतच जर ती तोडून टाकिली, तर तिजपासून उत्तम फळें कोठून प्राप्त होणार? २५ त्याप्रमाणें, स्वधर्म आचरण्यास कठीण आहे असें म्हणून जर त्याचा त्याग केला, तर तो मोक्षसुखाला अंतरलाच की! २६ आणि आपली आई जरी कुरूप असली, तरी ज्या तिच्या प्रेमामुळें आपण जगतों; तें तिचें प्रेम कांहीं वांकडें नाहीं. २७ एऱ्हवीं दुसऱ्या स्त्रिया जरी रंभेहून सुस्वरूप असल्या, तरी बालकाला त्या काय करावयाच्या आहेत? २८ अरे पाण्यापेक्षां तुपांत पुष्कळ गुण आहेत हें खरें? पण माशाला तुपांत ठेवलें असतां तो जगेल का? २९ हें पहा, जो वचनाग सर्व जगाला विष आहे, तोच त्यांतील किड्याला अमृत आहे; आणि गूळ–जो साऱ्या जगाला गोड आहे, तोच त्या किड्याला मृत्यु आहे! ९३० म्हणून, ज्याला जें विहित कर्म सांगितलें आहे, की ज्याच्या आचरणानें संसाराचें

१ भार. २ कसोटीस. ३ स्वामिणी. ४ वीर. ५ आपली, लावली. ६ रुमांत बक्षिसावर गादीच्याचा उतरंडी असतात त्या. (सेवेच्या योगानें देवभक्तांचें लग्न लागलें)–इनामपत्र ७ मनोगत. ८ पुष्पांची. ९ संतुष्ट झाल्यानें. १० प्रसाद. ११ छंदानें. १२ वमन. १३ मनोध्यायीनें, चित्तेनें. १४ बांधणें. १५ कष्टप्रद होतें. १६ अपरोक्ष ज्ञान. १७ न उपजतां. १८ ध्यासानें. १९ चांगल्या आस्थेनें. २० कठीण. २१ त्रासूं नये, कंटाळूं नये. २२ विण्याचें पूर्वी. २३ आशा. २४ उत्तम फळ. २५ सुख. २६ कुरूप. २७ ज्याच्या योगानें वाचावें. २८ वांकडें. २९ इतर स्त्रिया. ३० गोड.

वाटा । आणि आपुली उत्कंठा । भव स्वर्ग काळकूटा । ऐसें दावी ५२ जियें वैराग्य येणें बोलें । मागां संसिद्धि रूप केलें । किंबहुना तें आपुलें । मेळवी खांगें ५४ मग जिंतिलिया हे भाये । पुरुष सर्वत्र जैसा होये । कां जालाही जें लाहे । तें आतां सांगों ५५

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः । नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥४९॥

तरी देहादिक हें संसारें । सर्वही मांडलेंसे जें गुंफिरें । तेथ नातुडे तो वागुरें । वारा जैसा ५६ पैं परिपाकाचिये वेळे । फळ देठें ना देठु फळे । न धरे तैसें स्नेह खुळें । सर्वत्र होय ५७ पुत्र वित्त कलत्र । हे जालियाही स्वतंत्र । माझें न म्हणे पात्र । विषाचें जैसें ५८ हें असो विषयजाती । बुद्धी पोळली ऐसी मावौती । पाउलें घेऊनि एकांतीं । हृदयाच्या रिगे ५९ ऐसया अंतःकरण । बाह्य येतां तयाची आण । न मोडी समर्था भेणें । दासी जैसी ९६० तैसें ऐक्याचिये मुठी । माजिवडें चित्त किरीटी । करूनि वेधीं नेहटी । आत्मयाच्या ६१ तेव्हां दृष्टादृष्ट स्पृहे । निमणें जालेंचि आहे । आगी दडपलिया धुंयें । राहिजे जैसें ६२ म्हणौनि निर्येमिलिया मानसीं । स्पृहा नासोनि जाय आपैसी । किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ६३ पैं अन्यथा बोधु आघवा । मावळोनि तया पांडवा । बोधमात्रींचि जीवा । ठावो होय ६४ धरेवणी वेंचें सरे । तैसें भोगें प्राचीन पुरे । नवें तंव नुपकरे । कांहींचि करूं ६५ ऐशी कर्मे साम्यदशा । होय तेथ वीरेशा । मग श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ६६ रात्रीची चौपाहरी । वेंचलिया अवधारीं । डोळ्यां तैमारी । मिळे जैसा ६७ का येऊनि फळाचा घडु । पारुषवी केळीचा वाढु । श्रीगुरु भेटोनि करी पाँडु । बुभुत्सु तैसा ६८ मग आलिंगिला पूर्णिमा । जैसा उणीव सांडी चंद्रमा । तैसें होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ६९ तेव्हां अबोधुमात्र असे । तो तंव तया कृपा नासे । तेथ निशीसवें जैसें । आंधारें जाय ९७० तैसी अबोधाचिये कुशी । कर्म कर्ता कार्य ऐशी । त्रिपुटी असे ते जैसी । गाभिणी मारिली ७१ तैसेंची अबोधनाशासवें । नाशे क्रियाजात आघवें । ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ७२ येणें मूळज्ञानसंन्यासें । दृश्याचा जेथ ठावो पुसे । तेथ बुझावें तें आपैसें । तोचि आहे ७३ चेइलियावरी पाहीं । स्वप्नींचिया तिये डोहीं । आपणयातें काई । काढूं जाइजे ७४ तैं मी नेणें आतां जाणेन । हें सरलें तया दुःस्वप्न । जाला

आणि संसार व स्वर्ग हे काळकूट विषाप्रमाणें आहेत, असें वाटावयास लाविते. नंतर ५३ पूर्वी वैराग्य या शब्दानें संसिद्धि या शब्दाचें जें वर्णन केलें, तें आलें वैराग्यरूप स्थान तो मिळवितो. ५४ मग ही वैराग्यभूमिका जिंकल्यावर जी त्याची योग्यता होते, किंवा पूर्णत्वास पावलेल्या त्या पुरुषाला कशाचा लाभ होतो, तें आतां सांगतों. ५५

अन्वयार्थ—(सर्वत्र)–पुत्र, स्त्री, धन, इत्यादि सर्वांमध्ये–(असक्तबुद्धिः)–ज्याचें अन्तःकरण आसक्त झालेलें नसतें,–(जितात्मा)–ज्यानें आपल्या अन्तःकरणाला जिंकिलें आहे,–(विगतस्पृहः)–ज्याची देह, जीवित, भोग यांविषयींचीहि इच्छा नाहींशी झालेली आहे असा आत्मज्ञ–(संन्यासेन)–यथार्थदर्शनरूप संन्यासानें किंवा ज्ञानपूर्वक सर्वकर्मसंन्यासानें–(परमां नैष्कर्म्यसिद्धिं)–सर्वोत्कृष्ट निष्क्रिय आत्मस्वरूपावस्थानरूप सिद्धीला–(अधिगच्छति)–प्राप्त होतो. ४९

वारा जसा पारध्याच्या जाळ्यांत इकडून तिकडे जातांना अडकत नाही, तसा देह आदिकरून जे संसारपाश, त्यांत तो असूनही सांपडत नाही. ५६ हें पहा, पिकलेलें फळ जसें देठाला धरीत नाही, किंवा देठही त्याला धरीत नाही, तसें संसारादिकांवरील सर्व प्रेम निर्जीव होतें. (ढिलें पडतें). ५७ ज्याप्रमाणें विषाचें पात्र माझें आहे असें कोणी म्हणत नाही, त्याप्रमाणें पुत्र, वित्त व स्त्री हीं जरी आपल्या इच्छेप्रमाणें वागत असलीं तरी हीं माझी आहेत असें म्हणत नाही. ५८ फार काय सांगावें, जळत पदार्थांच्या दोन्ही हाताला चटका बसतांच जसा मनुष्य हात मागें घेतो, तशी त्याची बुद्धि विषयांपासून मागें परतून आत्मविचाराकडे लागते. ५९ ज्याप्रमाणें दासी स्वामीच्या भीतीनें त्याची आज्ञा मोडीत नाही त्याप्रमाणें अंतःकरण विषयांकडे बाहेर येऊन आत्म्याची शपथ मोडीत नाही. ९६० तसें, अर्जुना, ऐक्याच्या मुठीमध्यें चित्त धरून त्याला आत्म्याच्या छंदास लावतो; ६१ त्या वेळेस जसा अग्नि राखेंत पुरला म्हणजे धूर आपोआप राहतो; तशी इहपर विषयांची इच्छा सहजच नष्ट होते. ६२ म्हणून, मनाचा निग्रह झाला म्हणजे इच्छा आपोआप नाहींशी होते. फार सांगून काय करावयाचें आहे! अशी भूमिका साधकाला प्राप्त होते. ६३ हें पहा अर्जुना, विपरीत बोध सगळा मावळून त्याला खरा बोधच प्राप्त होतो. ६४ जसें सांचविलेलें पाणी रोज खर्च केलें म्हणजे तें सरतें, तसें प्रारब्धकर्म हें भोगांतीं सरतें आणि अहंकर्तृत्वभावना नसल्यामुळें नवीन कर्म उत्पन्न होत नाहीं. ६५ अर्जुना, अशा प्रकारें सर्व कर्मांची क्षीणदशा झाली म्हणजे मग श्रीगुरूंची आपोआप भेट होते. ६६ हें पहा–रात्रीचे चार प्रहर संपले म्हणजे अंधकाराचा नाश करणारा जो सूर्य दृष्टीस पडतो; ६७ अथवा फळाशा–घड घेऊन तो ज्याप्रमाणें केळीची वाढ खुंटवितो, त्याप्रमाणें, श्रीगुरु हे भेटून जिज्ञासूची कर्मकर्तृत्वाची खटपट बंद करतात; ६८ मग, पौर्णिमा प्राप्त झाली म्हणजे ज्याप्रमाणें चंद्राचे ठिकाणी मुळींच रहात नाही, त्याप्रमाणें, हे श्रेष्ठ वीरा, गुरुकृपा झाली म्हणजे जिज्ञासूला कोणतीही उणीव रहात नाही. ६९ त्या वेळीं, अज्ञान म्हणून जेवढें असतें, तेवढें तर त्याच्या कृपेनेंच नष्ट होतें; आणि रात्र गेल्यावर अंधार नाहींसा होतो; ९७० याप्रमाणें, अज्ञानाचा नाश झाला, म्हणजे त्याच्या पोटांत जी कर्ता, कर्म आणि कार्य ही त्रिपुटी आहे तीही नाश पावते. जशी गर्भिणी मारली म्हणजे पोटांतला गर्भ निराळा मारावा लागत नाही–तो आपोआपच मरतो. ७१ तसा अज्ञानाचा नाश झाला म्हणजे सर्व कर्मांचा नाश होतो. अशा प्रकारें सर्व कर्मांचा समूळ नाश होणें, यालाच संन्यास म्हणतात, तोच त्याला प्राप्त होतो. ७२ त्यामुळें ज्ञानाच्या त्यागानें सर्व दृश्य पदार्थ नष्ट झाले म्हणजे मग जाणावयाचें जें तें तो आपण स्वतःच आहे. ७३ असें पहा–मनुष्य झोपेंतून जागा झाल्यानंतर, आपण डोहांत बुडत असल्याचा जो त्याला स्वप्नांत भ्रम झाला होता, तो सत्य मानून त्यांतून आपल्याला काढण्याविषयीं तो खटपट करील काय? ७४ त्याप्रमाणें, मला कळत नाही, मी आतां समजून घेईन, हें त्याचें दुःस्वप्न नष्ट होतें, आणि ज्ञेय, ज्ञाता हे

१ इहपर संबंधी भोग. २ म. गी. 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं,' इत्यादिकांनी सांगितलेलें. ३ ठिकाण. ४ भूमिका. ५ पूर्ण झालेला. ६ जाळें, गुंतांडें. ७ न सांपडे. ८ जाळ्यांत. ९ ढिलें, निर्जीव. १० स्त्री. ११ भयानें. १२ मध्यें. १३ छंदानें. १४ लावतो. १५ इहपर भोगेच्छेला. १६ अंत. १७ धूर. १८ हुकुमांत असलेल्या. १९ इच्छा. ९६०

२० विपरीत ज्ञान. २१ सांचवणी पाणी. २२ पूर्वसंचित. २३ संपतें. २४ उत्पन्न होत नाहीं. २५ सूर्य. २६ थांबवितो. २७ प्रकार, योग्यता. २८ अज्ञान. २९ गर्भिणी. ३० अज्ञानाच्या नाशासह. ३१ कर्मत्याग. ३२ जाणावें. ३३ आपल्यावर.

ज्ञातृज्ञेयाविहीन । चिदाकाश ७५ मुखाभासेंसीं आरिसा । परौता नेलिया वी-
रेशा । पाहातेपणेंवीण जैसा । पाहाता ठाके ७६ तैसें नेणणें जें गेलें। तेणें जा-
णणेंही नेलें । मग निष्क्रिय उरलें । चिन्मात्रची ७७ तेथ स्वभावें धनंजया।
नाहीं कोणीचि क्रिया । म्हणौनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा ७८ तें आपुलें
आपणपें । असताचि होऊनि हारपे । तरंगु कां वायुलोपें । समुद्रु जैसा ७९
तैसें न होणें निपजे । तें नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे । सर्वसिद्धींत सहजें । परम
हेंची ९८० देउळाचिया कामा कळसु । उपरम गंगेसी सिंधु प्रवेशु । कां सुव-
र्णशुद्धी कसु । सोळीवा जैसा ८१ तैसें आपुलें नेणणें । फेडिजे का जाणणें।
तेंही गिळूनि असणें। ऐसी जे दशा ८२ तियेपरतें कांहीं । निपजणें आन
नाहीं । म्हणौनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ८३

सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाऽप्नोति निबोध मे । समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥५०॥

परी हेचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि । श्रीगुरुकृपालब्धि-। काळीं
पावे ८४ उदयजतांचि दिनकरु । प्रकाशुचि आंते आंधारु । कां दीपसंगें का-
पुरु । दीपुचि होय ८५ तया लवणाची कणिका । मिळेतखेंवो उदका। उद-
कचि होऊनि देखा । ठाके जेवीं ८६ कां निद्रित चेवविलिया । स्वप्नेंसि निदे
वायां । जाऊनि आपणपयां । मिळे जैसा ८७ तैसें जया कोण्हासि दैवें । गुरु-
वाक्य श्रवणाचि सवें । द्वैत गिळोनि विसंवे । आपणया वृत्ती ८८ तयासी मग
कर्म करणें । हें बोलिजैलचि कवणें । आकाश येणें जाणें । आहे काई ८९ म्ह-
णौनि तयासि कांहीं । त्रिशुद्धि करणें नाहीं । परी ऐसें जरी हें कांहीं । नव्हे
जया ९९० कानीवचनाचिये भेटी-। सरिसेंचि पैं किरीटी । वस्तु होऊनि
उठी । कवणि एकु जो ९१ एऱ्हवीं स्वकर्माचेनि वन्हीं । काम्यनिषिध्दाचिया
इंधनीं । रजतमें कीर दोन्ही । जाळिलीं आधीं ९२ पुत्र वित्त परलोकु । यया
तिहींचा अभिलाखु । घरीं होय पाइकु । हेंही जालें ९३ इंद्रियें सैरा पदार्थीं ।
रिगतां विटाळलीं होतीं । तियें प्रत्याहार तीर्थीं । न्हाणिलीं कीर ९४ आणि
स्वधर्माचें फळ। ईश्वरीं अर्पूनि सकळ । घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद ९५
ऐसी आत्मसाक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उजरी । ते सामुग्री कीर पुरी । मेळ-
विली ९६ आणि तेचि समयीं । सद्गुरु भेटले पाहीं । तेवींचि तिहीं कांहीं ।
वंचिजेना ९७ परी वोखद घेत खेंवो । काय लाभे आपुला ठावो । का उदयज-

जैसा ८३ किंबहुना तंतूंसीं पटु। कां मृत्तिकेसी घटु। तैसा तो एकवटु। मजसीं माझा ८४ इया अनन्यसिद्धा भक्ती। या आघवाचि दृश्यजातीं। मज आपणपेंया सुमती। द्रष्टयातें जाणें ८५ तिन्ही अवस्थांचेनि द्वारें। उपाध्युपहिताकारें। भावाभावरूप स्फुरे। दृश्य जें हें ८६ तें हें आघवेंचि मी द्रष्टा। ऐसिया बोधाचा माजिवटा। अनुभवाचा सुभटा। धेंडा तो नाचे ८७ रज्जु जालिया गोचरु। आभासतां तो व्याळाकारु। रज्जुच ऐसा निर्धारु। होय जेवीं ८८ भांगारापरतें कांहीं। लेणें गुंजहीभरी नाहीं। हें आटुनियां ठायीं। कीजे जसें ८९ उदका येकापरतें। तरंग नाहींचि हें निरुतें। जाणोनि तया आकारातें। न घेपे जेवीं ११९० नातरी स्वप्नविकारां समस्तां। चेऊनियां उमाणें घेतां। तो आपणयापरौता। न दिसे जैसा ९१ तैसें जें कांहीं आथी नाथी। तेणें होय ज्ञेयस्फूर्ती। तें ज्ञाताचि मी हे प्रतीती। होऊनि भोगी ९२ जाणे अजु मी अजरु। अक्षयो मी अक्षरु। अपूर्वु मी अपारु। आनंदु मी ९३ अचळु मी अच्युतु। अनंतु मी अद्वैतु। आद्यु मी अव्यक्तु। व्यक्तुही मी ९४ ईश्य मी ईश्वरु। अनादि मी अमरु। अभय मी आधारु। आधेय मी ९५ स्वामी मी सदोदितु। सहजु मी सततु। सर्व मी सर्वगतु। सर्वातीतु मी ९६ नवा मी पुराणु। शून्यु मी संपूर्णु। स्थूलु मी अणु। जें कांहीं तें मी ९७ अक्रियु मी येकु। असंगु मी अशोकु। व्याप्यु व्यापकु। पुरुषोत्तमु मी ९८ अशब्दु मी अश्रोत्रु। अरूपु मी अगोत्रु। समु मी स्वतंत्रु। ब्रह्म मी परु ९९ ऐसें आत्मत्वें मज एकातें। इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें। आणि याही बोधा जाणतें। तेंही मीचि जाणें १२०० पैं चेइलें यानंतरें। आपुलें एकपण उरे। तेंहीं तोंवरी स्फुरे। तयासींचि जैसें १ कां प्रकाशतां अर्कु। तोचि होय प्रकाशकु। तयाही अभेदा द्योतकु। तोचि जैसा २ तैसा वेद्यांच्या विलयीं। केवळ वेदकु उरे पाहीं। तेणें जाणवे तया तेंही। हेंही जो जाणे ३ तया अद्वयपण आपुलिया। जाणती स्फूर्ती जे धनंजया ते ईश्वरचि मी हे तया। बोधासि ये ४ मग द्वैताद्वैतातीत। मीचि आत्मा एकु निभ्रांत। हें जाणोनि जाणणें जेथ। अनुभवी रिघे ५ तेथ चेइलयां येकपण। दिसे जे आपुलया आपण। तेंही जातां नेणों कोण। होइजे जेवीं ६ कां डोळां देखतये क्षणीं। सुवर्णपण सुवर्णीं। नाटितां होय आटणी। अळंकाराचीही ७ नाना लवण तोयीं होये। मग क्षारता तो-

व रत्नाचे ठिकाणीं तेज, जसें भिन्न नाहीं, ८३ फार काय ? जसा तंतूंशीं पट, किंवा मृत्तिकेशीं जसा घट यांनीं ऐक्य असतें, तसा तो माझा भक्त माझ्याशीं ऐक्य पावतो. ८४ अर्जुना, ही जी एकनिष्ठ भक्ति, त्या भक्तीच्या योगानें, दृश्यमात्राचे ठिकाणी, मी आत्मा जो द्रष्टा त्या मला तो जाणतो. ८५ जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांच्या योगानें आणि शरीर व शरीराचा चालक यांच्या योगानें, व्यक्त व अव्यक्त एतद्रूपानें सर्व दृश्य पदार्थांचें स्फुरण होतें. ८६ हे सुमते अर्जुना, तें सर्व दृश्य मीच आहें, अशा बोधाच्या भरांत अनुभवाचा झेंडा नाचतो. ८७ दोर दृष्टीस पडल्यावर त्यावर झालेला सर्पाचा भास नाहींसा होऊन दोरच आहे असा जेव्हां निश्चय होतो; ८८ सोन्यावेगळे गुंजभरसुद्धां अलंकार नाहींत, असा दृढ निश्चय होण्यानें सर्व अलंकारांची आटणी होते; ८९ पाण्यावर येणारे तरंग उदकाविरहित नाहींत; असें पक्कें समजून त्यांच्या आकाराला जो भुलत नाहीं; ११९० अथवा स्वप्नांतील पाहिलेले सर्व विकार जागे झाल्यावर पाहूं गेले असतां आपलेविरहित दुसरें कांहीं नाहीं, असें जसें दिसतें, ९१ तसें जें कांहीं आहे व नाहीं, त्याच्यायोगें हें जाणण्याची स्फूर्ति होते, व ते सर्व पदार्थ मीच आहें, अशा अनुभवाचा तो उपभोग घेतो. ९२ मी उत्पन्न न होणारा, जरारहित, नाशरहित आणि अव्यय, ज्याच्या पूर्वी कांहीं नाहीं असा, ज्याला अंत नाहीं असा, व नेहमी आनंदमय असा आहें असें तो समजतो. ९३ चलन न पावणारा, स्वभावापासून च्युत न होणारा, व पतित न होणारा, अंतरहित, अद्वैत सर्वांचा मूळ, निराकार व साकारही मीच आहें. ९४ ज्याचें नियमन करावयाचें तें, सर्वांचा ईश, अनादि, अमर, अभय, आधार व त्यावरील आधेय तें सर्व असा मी आहें.

९५ सर्वांचा अधिपति व नेहमीं असणारा, सहज व सतत सर्वव्यापि, व सर्वत्र भरून असणारा, आणि सर्वांच्या पलीकडला असा मी आहें. ९६ सर्वांत नवा व जुना, अभावरूप व संपूर्ण, सर्वांहून मोठा व अणुरेणूहून लहान जें कांहीं आहे तें मी आहें. ९७ क्रियारहित व एक, संगरहित व शोकरहित सर्व वस्तूंत मी असून, माझ्यांत सर्व वस्तु आहेत, असा सर्वांत उत्तम पुरुष मी आहें. ९८ शब्दातीत व कर्णरहित, रूपरहित आणि गोत्ररहित, सर्वत्र सारखा व स्वतंत्र ब्रह्म व परब्रह्म मी आहें. ९९ असें आत्मस्वरूपीं ऐक्य पावून माझी खरोखर अद्वयभक्ति करून मला जाणतो; व याही बोधाला जाणणारा जो मी परमात्मा, तोही आपण आहों असें तो समजतो. १२०० जसें जागें झाल्यावर आपलें एकत्व उरतें, व हेंही जसें ज्याचें त्यालाच समजतें; १ सूर्य स्वतः प्रकाशरूप असून तोच स्वतःचा प्रकाशक होतो, आणि प्रकाशक व प्रकाश्य या दोहोंमधील अभेदही तोच जाणतो; २ तसा, जाणण्यास योग्य अशा पदार्थांच्या नाशानंतर केवळ जाणणारा उरतो, हेंही ज्याला समजतें असा जो तोही मीच आहें असें जो समजतो, ३ त्याला अर्जुना, आपल्या अभेदपणास जाणणारी ज्ञानकला तीही मी ईश्वरच आहें, तोही मीच आहें असें तो समजतो, ४ मग द्वैत व अद्वैत या पलीकडील जो आत्मा, तोच निःसंशय मी आहें असें समजून जें ज्ञानही जेथें मुरून जातें. ५ तेव्हां जागे झाल्यावर जें आपल्याला आपलें स्वरूप दिसतें, तेंही नाहींसें होऊन कोणती स्थिति प्राप्त होते तेंही जसें सांगतां येत नाहीं; ६ किंवा सोन्याचें सोनेंपण दृष्टीनें पाहतांक्षणीं अलंकाराची आटणी न करतां आटणी केल्याप्रमाणेच होते; ७ अथवा मिठाचें पाणी होतें, परंतु त्या पाण्यांत खारटपणा रहातो, तोही जिरून गेल्यावर जसा मीठपणा

१ या अद्वैती भक्तीनें. २ जागृति, स्वप्न व सुषुप्ति. ३ उपाधि व उपाधियुक्त, क्षेत्र व क्षेत्रज्ञ या रूपांनीं, शरीर व शरीराचा चालक यांच्या योगानें. ४ व्यक्त व अव्यक्त एतद्रूप. ५ सोहळा, झेंडा. ६ दोर. ७ सोन्याहून. ८ पक्कें करावें. ९ सरें. १० उठून, जागे होऊन. ११ माप. १२ आहे व नाहीं अशा स्थितीनें. १३ जाणावयाच्या पदार्थांचें स्फुरण. १४ उत्पन्न न होणारा. १५ जरारहित. १६ नाशरहित. १७ अविनाशी. १८ ज्याच्यापूर्वी कांहीं नाहीं असा. १९ चलन न पावणारा. २० च्युत न होणारा. २१ अंतरहित. २२ पहिला. २३ निराकार, अस्पष्ट. २४ नियम्यवस्तु. २५ नियामक शक्ति. २६ ज्या आधारावर सर्व ठेविलें जातें तें. २७ अधिपति. २८ चेतनाचेतनांत भरून असणारा. २९ सर्वांच्या पलीकडचा. ३० जुना. ३१ अभावरूप. ३२ सर्वांहून मोठा. ३३ अणुरेणूहून लहान. ३४ क्रियारहित. ३५ शब्दातीत. ३६ स्वतंत्रें. ३७ जागृतीनंतर. ३८ सूर्यच स्वतःला प्रकाशक व प्रकाशित. ३९ दर्शक. ४० जाणण्यायोग्य पदार्थांच्या नाशानंतर. ४१ जाणणारा. ४२ ज्ञानकला. ४३ दोहोंच्याही पलीकडे. ४४ जागे झाल्यावर. ४५ आटविल्यावांचून. ४६ मीठ पाणी होऊन जातें.

यत्वें राहे । तेही जिरतां जेवीं जाये । जालेपण तें ८ तैसा मी तो हें जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें । कालवूनियां प्रवेशे । मजचिमाजीं ९ आणि तो हे भोष जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे । ऐसा मी ना तो तिये सामाये । माझ्याचि रूपीं १२१० जेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नाम अग्नि पुरे । मग उभयतातीत उरे । आकाश जेवीं ११ कां धाडलिया एका एकु । वाढे तो शून्य विशेखु । तैसा आहे नाहींचा शेखु । मीचि मग आथी १२ तेथ ब्रह्म आत्मा ईशु । यया बोला मोडे सौरसु । न बोलणें याही पैसु । नाहीं तेथ १३ न बोलणेंही न बोलोनी । तें बोलिजे तोंड भरुनी । जाणिव नेणिव नेणोनी । जाणिजे तें १४ तेथ बुझिजे बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें । सुखवरी सुखें । सुखचि भोगिजे १५ तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा । विस्मयो बुडाला उभा । विस्मयामाजीं १६ शमु तेथ सामावला । विश्रामु विश्रांती आला । अनुभवु वेडावला । अनुभूतिपणें १७ किंबहुना ऐसें निखळ । मीपणा जोडे तया फळ । सेवूनि वेली वेल्हाळ । कर्मयोगाची ते १८ पैं कर्मयोगिया किरीटी । चक्रवर्तीच्या मुकुटीं । मी चिद्रत्न ते सांटोवाटीं । होय तो माझा १९ कीं कर्मयोगप्रासादाचा । कळसु जो हा मोक्षाचा । तयावरील अवकाशाचा । उवावो जाला तो १२२० नाना संसारआडवीं । कर्मयोग वाट बरवी । जोडिली ते मदैक्यगांवीं । पैठी जालीसे २१ हें असो कर्मयोगबोधें । तेणें भक्तिचिद्रांगें । मी स्वानंदोदधी वेगें । ठाकिला कीं गा २२ हा ठायवरी सुवर्मा । कर्मयोगीं आहे महिमा । म्हणौनि वेळोवेळां तुम्हां । सांगतों आम्ही २३ पैं देशें काळें पदार्थे । साधूनि घेइजे मातें । तैसा नव्हे मी आयतें । सर्वांचें सर्वही २४ म्हणौनि माझ्या ठायीं । जोंचावें न लगे कांहीं । मी लाभें ईयें उपायीं । साचचि गा २५ एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु । तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावया २६ अगा वसुंधेच्या पोटीं । निधान सिद्ध किरीटी । वन्हि सिद्ध काष्ठीं । वोहीं दूध २७ परी लाभे तें असतें । तया कीजे उपायातें । येर सिद्धचि तैसा तेथें । उपायीं मी २८ हा फळवरी उपावो । कां पां प्रस्तावीतसे देवो । हें पुसतां तरी अभिप्रावो । येथिंचा ऐसा । २९ जे गीतार्थांचें चांगावें । मोक्षोपायपर आघवें । आन शास्त्रोपाय कीं नव्हे । प्रमाणसिद्ध १२३० वारा आभाळाचि फेडी । वांचूनि सूर्यातें न घडी । कां हातु बाबुळी

नाहींसा होतो, ८ तसा मी व तो हा भेद असतो, तोही पूर्ण आनंदाचे भरांत एकत्र होऊन मद्रूपीं लय पावतो. ९ आणि तोही ( दुसरा ) भास जेथें नाहींसा होतो, तेथें 'मी' हा शब्द कोठें उरणार ? असा मी नाहीं व तोही नाहीं असें जें माझें रूप, त्या ठिकाणीं तो ऐक्य पावतो. १२१० कापूर जळतांक्षणींच जसें अग्नीचेंही नांव नाहींसें होतें, व मग कापूर व अग्नि याहून भिन्न जें आकाश तेंच उरतें, ११ किंवा एकांत एक वजा केला असतां बाकी जसें शून्य उरतें, तसा आहे व नाहीं यांची वजाबाकी केली असतां बाकी मीच उरतों. १२ त्या ठिकाणीं ब्रह्म, आत्मा, ईश या बोलण्यालाही जागा रहात नाहीं, व कांहीं न बोलणें यालाही तेथें ठाव नाहीं. १३ न बोलणें हें न बोलून मग तोंडभर बोललें जातें, तसें ज्ञान, व अज्ञान टाकून जें जाणलें जातें, १४ तशा स्थितींत बोध बोधानें जाणून आनंदानें आनंद भोगून सुखानें सुखाचाच अनुभव घेतो. १५ मग लाभांत लाभाची भर रहून प्रकाशानें प्रकाशास आलिंगन देऊन आश्चर्य आश्चर्यांत उभेंचें उभेंच बुडून जातें. १६ शम विश्रांति पावून विश्रामही विश्रांतीस येतो; व अनुभव अनुभवानेंच संकोच पावतो. १७ फार काय सांगावें ! कर्मयोगाच्या सुंदर वेलीचें सेवन केल्यामुळें त्याला मद्रूप प्राप्तीचें सुंदर फळ मिळतें. १८ हे किरीटी, कर्मयोगरूपी चक्रवर्तीच्या मुकुटावरील ज्ञानरूप रत्न मी होतों, व माझे मुकुटावर तें रत्न शोभतें. १९ किंवा कर्मयोगरूपी देवळाच्या मोक्षरूपी कळसावरील अवकाशाचा असार तो होतो. १२२० अथवा संसाररूपी अरण्यांतील कर्मयोगरूपी राजमार्गानें माझ्या ऐक्यरूपी गांवांत प्रविष्ट होतो. २१ फार काय सांगावें ! कर्मयोगाच्या ओघानें भक्तिज्ञानरूपी गंगा ही आनंदरूपी समुद्र जो मी त्याला येऊन मिळते. २२ हे मर्मज्ञ अर्जुना, असा या कर्मयोगाचा महिमा आहे, म्हणून मी वारंवार त्याचें वर्णन तुझ्याजवळ करितों. २३ परंतु, देश, काल, पदार्थ यांच्या अनुकूलतेनें मला साध्य करून घ्यावे, असा मी नाहीं. मीच सर्वांचा आत्मा असल्यामुळें सर्वांना सहजच प्राप्त आहें. २४ म्हणून, माझ्या प्राप्तीकरितां शीण न घेतां मी या कर्मयोग उपायानें खरोखर सहज प्राप्त होतों. २५ माझ्या प्राप्तीचा उपाय समजण्याकरितां गुरु व शिष्य हा संप्रदाय खरोखर अनादिसिद्ध आहे, २६ अरे अर्जुना, पृथ्वीच्या पोटांत द्रव्य सिद्ध आहे, तशाच काष्ठांत अग्नि व कांसेंत दूध याही गोष्टी सिद्ध आहेत. २७ परंतु या गोष्टी सिद्ध आहेत तरी त्यांचा लाभ होण्याकरितां उपाय करावे लागतात. पण माझी गोष्ट विचारशील तर मी स्वतःसिद्ध असून, माझ्या आड येणारे पदार्थ दूर करण्यास उपाय केले पाहिजेत. २८ ही फलप्राप्ति झाल्यावर पुनः उपायांची प्रस्तावना देवांनीं केली, अशी जर कोणी शंका घेईल तर देवांचे बोलण्याचा असा अभिप्राय आहे कीं, २९ गीतार्थाचें सामर्थ्य मोक्षाचें साधन प्राप्त करून देण्याचें आहे, हा त्यांत चांगुलपणा आहे. दुसरीं शास्त्रें प्रमाणसिद्ध मोक्षोपाय नाहींत. १२३० वाऱ्यानें सूर्याचे आड आलेले ढग दूर होतात, परंतु त्याच्यानें सूर्य उत्पन्न करवत नाहीं; किंवा हातानें पाण्यावरील गोंडाळ दूर करतां येतें, पाणी करितां येत नाहीं,

१ निजानंदाचे भरांत एकत्र होऊन. २ शब्द, बोली. ३ नाहींसा होतो. ४ दोहोंहून भिन्न. ५ गोडी, प्रेम, अभिप्राय. ६ अवकाश. ७ जाणावा. ८ सुखावर सुख लोळतें. ९ प्रभेनें, प्रकाशानें. १० नवल, आश्चर्य. ११ विश्रांति पावला. १२ गोंधळला, भ्रमला, संकल्प पावला. १३ अनुभवानें. १४ चैतन्य-ज्ञानरूपरत्न. १५ अदलाबदलीनें, मोबदल्यानें. १६ अवकाश, विस्तार. १७ अरण्यांत. १८ माझ्याशीं जें ऐक्य तद्रूप गांवांत. १९ प्रविष्ट. २० भक्तिरूपचिद्गंगेनें. २१ निजानंदरूप समुद्र. २२ एथपर्यंत. २३ मर्मज्ञ अर्जुना. २४ आपलासा करून. २५ शिणावें लागत नाहीं. २६ ह्या कर्मयोगानें. २७ पृथ्वीच्या. २८ कांसेंत. २९ फलप्राप्तीपर्यंत. ३० सामर्थ्य. ३१ मोक्षप्राप्ति विषयक. ३२ शेवाळ, गोंडाळ.

घाडी । तोय न करी २१ तैसा आत्मदर्शनीं आडळु । असे अविद्येचा जो मळु ।
तो शास्त्र नाशी येरु निर्मळु । मी प्रकाशें स्वयें २२ म्हणोनि आघवींचि शास्त्रें ।
अविद्याविनाशाचीं पात्रें । वांचोनि न होतीं स्वतंत्रें । आत्मबोधीं २३ तयां
अध्यात्मशास्त्रांसीं । जैं साचेपणाची ये पुसी । तैं येइजे जया ठायासी । ते हे गीता
२४ भानुभूषिता प्राचिया । सतेजा दिशा आघविया । तैसी शास्त्रेश्वरा गीता या ।
सनाथें शास्त्रें २५ हें असो येणें शास्त्रेश्वरें । मागां उपाय बहुत्वे विस्तारें । सां-
गितला जैसा करें । घेवों ये आत्मा २६ परी प्रथमश्रवणासवें । अर्जुना वि-
पायें हें फावे । हा भावो सकणवे । धरूनि श्रीहरी २७ तेंचि प्रमेयें एक वेळ ।
शिष्यीं होआवया अढळ । सांगतसे मुकुळ । मुद्रा आतां २८ आणि प्रसंगें
गीता । ठावोही हा संपता । म्हणौनि दावी आद्यंता । एकार्थत्व २९ जे ग्रंथा-
च्या मध्यभागीं । नाना अधिकारप्रसंगीं । निरूपण अनेगीं । सिद्धांतीं केलें
१२४० तरी तेतुलेही सिद्धांत । इये शास्त्रीं प्रस्तुत । हें पूर्वापार नेणत । कोण्ही
जैं मानी ४१ तैं महासिद्धांताचा आवांका । सिद्धांतकक्षा अनेका । भिडऊनि
आरंभु देखा । संपवितु असे ४२ एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान
फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ४३ हें इतुलेंचि नानापरी । निरूपिलें
ग्रंथविस्तारीं । तें आतां दोहीं अक्षरीं । अनुवादावें ४४ म्हणौनि उपेयेंही हातीं ।
जालेंया उपायस्थिती । देव प्रवर्तले तें पुढती । येणेंचि भावें ४५

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः । मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

मग म्हणे गा सुभटा । तो कर्मयोगिया निष्ठा । मी होउनी होय पैठा ।
माझ्या रूपीं ४६ स्वकर्मांच्या चोखौळीं । मज पूजा करूनि भली । तेणें प्रसादें
आकली । ज्ञाननिष्ठेतें ४७ ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी
उल्हासे । तियें भजन समरसें । सुखिया होय ४८ आणि विश्वप्रकाशितया ।
आत्मया मज आपुलिया । अनुसरे जो करूनियां । सर्वत्रता हे ४९ सांडूनि
आपला आडेंळ । लवण आश्रयी जळ । का हिंडोनि राहे निश्चळ । वायु
व्योमीं १२५० तैसा बुद्धी वाचा कायें । जो मातें आश्रऊनि ठाये । तो निषि-
द्धेंही विपायें । कर्में करूं ५१ परी गंगेच्या संबंधीं । विदी आणि महानदी ।
ऐक्य तेवीं माझ्या बोधीं । शुभाशुभांसी ५२ का बावनें आणि धुरें । हा नि-
वाडु तंवचि सरे । जंव न घेपती वैश्वानरें । कवळूनि दोन्ही ५३ नाना पा-

तें स्वतःसिद्धच आहे. ३१ त्याप्रमाणें, आत्मदर्शनाचे आड आलेला जो अज्ञानाचा मळ तो इतर शास्त्रांनीं नाहींसा होतो, त्यांच्यानें निर्मळ असें जें माझें आत्मस्वरूप तें करवत नाहीं. तें स्वतःसिद्धच आहे. ३२ म्हणून सर्व शास्त्रें अज्ञानाचा नाश करण्यास मात्र योग्य आहेत. एऱ्हवीं त्यांच्यानें स्वतःसिद्ध आत्मस्वरूपाचा बोध करवत नाहीं. ३३ त्या अध्यात्म शास्त्रांना त्यांच्या सत्यत्वाविषयीं दरडावून विचारलें तर ते आपला खरेपणा दाखविण्याकरितां ज्याच्याकडे जातात तें हें गीताशास्त्र होय. ३४ सूर्यानें पूर्व दिशा अलंकृत केली म्हणजे सर्व दिशा प्रकाशित होतात. त्याप्रमाणें, सर्व शास्त्रांना आधारभूत जी शास्त्रश्रेष्ठ गीता तिच्या योगानें सर्व शास्त्रें सनाथ झालीं आहेत. ३५ फार काय ! परंतु या गीतारूपी श्रेष्ठ शास्त्रानें मागील अध्यायांत पुष्कळ उपाय सांगितले आहेत कीं, ज्या योगानें आत्मा आपले हस्तगत होईल ३६ परंतु प्रथम एकदांच ऐकल्यानें अर्जुनाला हें कळेल किंवा नाहीं हा भाव कळकळीनें श्रीहरींनी मनांत धरून, ३७ तोच अर्थ शिष्याच्या ठिकाणीं दृढ होण्याकरितां मोकळ्या मनानें एक वेळ पुनः सांगतात. ३८ आणखी गीता समाप्त होण्याचा प्रसंग आलेला आहे, म्हणून आरंभापासून शेवटपर्यंत एकच अर्थ प्रतिपादन केला आहे, असें दाखवितात. ३९ किंवा ग्रंथाच्या मध्यंतरी नानाअधिकार प्रसंगानें अनेक सिद्धांत सांगितलेले आहेत. १२४० तरी पूर्वापार संबंध मनांत न आणून गीतेमध्यें अनेक सिद्धांत आहेत असें जर कोणी मानील, तर ४१ महासिद्धांताचें एकंदर ऐक्य करून त्याच्या पोटीं अनेक सिद्धांत कशा ( युक्ति ) मिळून आरंभिलेली गीता संपवितात. ४२ या गीताशास्त्रांत अविद्येचा नाश, ही मुख्य भूमि, व मोक्षाचा लाभ हें तिचें फळ या दोन गोष्टी होण्याला ज्ञान हेंच एक साधन आहे. ४३ तेंच ज्ञान नानाप्रकारें ग्रंथांत सांगून ग्रंथाचा विस्तार झाला आहे. तें ज्ञान आतां थोडक्यांत सांगावें ४४ म्हणून उपायानें मिळणारी वस्तु हातांत आली असतांही, केवळ अनुवाद करण्याकरितांच देव प्रवृत्त झाले. ४५

**अन्वयार्थ**—(मद्व्यपाश्रयः)–माझ्या ठिकाणीं ज्यानें आपली सर्व वृत्ति अर्पिली आहे, ज्यानें केवल माझाच आश्रय केला आहे, असा ज्ञानी–(सर्वकर्माणि)–सर्व विहित–निषिद्ध कर्में,–(सदा कुर्वाणः अपि)–नेहमीं करीत असला तरी–(मत्प्रसादात्)–माझ्या प्रसादामुळें–(शाश्वतं अव्ययं पदं)–नित्य अक्षय पदाला,–(अवाप्नोति)–प्राप्त होतो. ५६

मग देव म्हणतात–हे महायोद्धया, तो कर्मयोगी अशा निष्ठेनें मद्रूप होऊन माझ्या स्वरूपीं मिळतो. ४६ स्वकर्मानुष्ठानरूपी सुंदर पुष्पांनीं माझी चांगली पूजा केल्यावर मला प्रसन्न करून घेऊन ज्ञाननिष्ठेचा प्रसाद तो मिळवितो. ४७ ती ज्ञाननिष्ठा ज्याचे हातांत आली आहे, तेथें माझी परमभक्ति उल्हसित होते; आणि त्या भक्तीच्या भजनेंकरून माझ्याशीं ऐक्य पावून तो सुख भोगतो. ४८ आणि विश्वाला प्रकाशित करणारा मी जो आत्मा त्याप्रत जो सर्वभावेंकरून अनुसरला; ४९ मिठानें आपला लोभ सोडून पाण्याचा आश्रय केला म्हणजे जसें तें जलरूपच होतें, किंवा आकाशामध्यें वायु फिरून पुनः आकाशांतच ऐक्य पावतो, १२५० तसा बुद्धीनें व कायावाचामनानें जो माझा आश्रय करून रहातो. त्याच्या हातून एकादे वेळीं कदाचित् निषिद्धही कर्म घडेल; ५१ परंतु महानदी, किंवा रस्त्यांतील घाणेरडें पाणी, यांना गंगेचा संबंध झाला म्हणजे जशीं तीं गंगारूप होतात, तसा माझा आश्रय करणाऱ्या भक्ताला शुभ किंवा अशुभ कर्मानें दोष लागत नाहीं. ५२ अथवा मैलागिरी चंदन आणि दुसरें रायवळ लांकूड हा भेद, जोंपावेतों त्याचा अग्नीशीं संबंध झाला नाहीं, तोंपावेतोंच असतो, ५३ किंवा जोंपर्यंत

१ प्रतिबंध, २ अज्ञानाचा. ३ अज्ञान हरणारीं पात्रें, योग्य स्थळें. ४ आत्मानात्मप्रतिपादक वेदांत शास्त्रांशीं. ५ खरेपणाशी. ६ प्रसंग. ७ पूर्व. ८ प्रकाशमय. ९ शास्त्रांत श्रेष्ठ अशा या गीतेनें सर्व शास्त्रें सनाथ–समर्थ–कृतार्थ होतात. १० बहुत. ११ हातानें. १२ एक वेळ ऐकल्यानें. १३ कदाचित्. १४ प्राप्त होईल. १५ अभिप्राय. १६ दयेनें. १७ तात्पर्य, सार १८ स्पष्ट करून. १९ आरंभापासून शेवटापर्यंत. २० अनेक सिद्धांतांनीं. २१ तेवढेही, सर्व. २२ पूर्वापार संगतीनें. २३ बरें, ऐक्य. २४ सिद्धांतांच्या युक्ति. २५ मिळवून. २६ मोक्षसंपादन. २७ संक्षेपानें. २८ पुनः बोलावें. २९ उपाय साध्य, उपायानें साध्य होणारें. ३० प्राप्त झालें असतां. ३१ पुनः ३२ भावनेनें. ३३ प्रविष्ट. ३४ चोख पुष्पांनीं. ३५ हस्तगत होते. ३६ भक्तीनें. ३७ ऐक्यानें. ३८ सर्वभावानें. ३९ लोभ. ४० आकाशांत. ४१ कायावाचामनेंकरून ४२ कदाचित्. ४३ नाला. ४४ मैलागिरी चंदन. ४५ सामान्य काष्ठ. ४६ हीनभिन्न सोनें.

चिक्कें आणि सोळें[2] । हें सोनया तंवचि ओळें[3] । जंव परिसु आंगमेळें । एकवटीना ५४ तैसें शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे[4] । जंव येकु न प्रकाशें । सर्वत्र मी ५५ अगा रात्री आणि दिवो । हा तंवचि द्वैतभावो । जंव न रिगिजे गांवो । गभस्तीचा[5] ५६ म्हणौनि माझिया भेटी । तयाचीं सर्वं कर्में किरीटी । जाऊनि बैसे तो घांटीं[6] । सायुज्याच्या[7] ५७ देशें काळें स्वभावें । वेंचु[8] जया न संभवे । तें पद माझें पावे । अविनाश तो ५८ किंबहुना पांडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता । लाहे तेणें न पविजतां । लाभु[9] कवणु असे ५९

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः । बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

याकारणें गा तुवां इया । सर्व कर्मां आपुलिया । माझ्या स्वरूपीं धनंजया । संन्यासु[10] कीजे १२६० परी तोचि संन्यासु वीरा । करणीयेचा[11] झणें करा । आत्मविवेकीं धरा[12] । चित्तवृत्ति हे ६१ मग तेणें विवेकबळें । आपणपें कर्मावेगळें । माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखिजेल सर्व ६२ आणि कर्माची जन्मभोये[13] । प्रकृति जे का आहे । ते आपणयाहूनि[14] बहुवे । देखसी दूरी ६३ तेथ प्रकृति[15] आपणयां-[16] । वेगळी नुरे धनंजया । रूपेंविण का छाया । जयापरी ६४ ऐसेनि प्रकृतिनाशु । जालया कर्मसंन्यासु । निफजेल अनायासु । सकारणु[17] ६५ मग कर्मजात[18] गेलया । मी आत्मा उरें आपणपयां । तेथ बुद्धि धांपे[19] करूनियां । पतिव्रता ६६ बुद्धि अनन्य[20] येणें योगें । मजमाजीं जैं रिगे । तैं चित्त चैत्यत्यागें । मातेंचि भजे ६७ ऐसें चैत्यजातें[21] सांडिलें । चित्त माझ्या ठायीं जडलें । ठाके तैसें [22]वहिलें । सर्वदा करी ६८

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि । अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥५८॥

मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेधवां । माझा प्रसादु जाण तेधवां । संपूर्ण जाहला ६९ तेथ सकळ दुःखधामें[23] । भुंजीजैती[24] जियें मृत्युजन्में । तियें दुर्गमेंचि[25] सुगमें । होती तुज १२७० सूर्याचेनि सांवायें[26] । डोळा सावाइला[27] होये । तैं आंधाराचा आहे । पाडु[28] तया ७१ तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु[29] जयाचा उपमर्दें । तो संसाराचेनि बांधे[30] । बागुलें[31] केवीं ७२ म्हणौनि धनंजया । तूं संसारदुर्गती यया । तरसील माझिया । प्रसादास्तव ७३ अथवा हन अहंभावें[32] । माझें बोलणें हें आघवें । कानामनाचिये [33]शिवे । नेदिसी टेंको ७४ तरी नित्य मुक्त अव्ययो । तूं आहासि तें होऊनि वावो । देहसंबं-

परिसाशीं संबंध झाला नाहीं तोंपर्यंतच हिणकट व सोळा रुपये दराचें सोनें हा भेद सोन्यांत असतो. ५४ त्याप्रमाणें शुभ व अशुभ हा भेद तोंपर्यंतच असतो कीं, जोंपर्यंत सर्वत्र माझा प्रकाश झाला नाहीं ! ५५ अरे, जोंपर्यंत सूर्याचा गांवांत प्रवेश झाला नाहीं, तोंपर्यंतच रात्र व दिवस हा भेद आहे. ५६ म्हणून अर्जुना, माझी भेट झाली म्हणजे त्यांची सर्व कर्में नाहींतशीं होऊन तो सायुज्य पदावर बसतो. ५७ ज्या पदाचा देशानें, कालानें व स्वभावानें कधीं नाश होत नाहीं तें माझें अविनाशपद त्याला प्राप्त होतें. ५८ फार काय सांगावें ! अर्जुना, मी जो आत्मा, त्या माझी प्रसन्नता ज्याला प्राप्त झाली आहे, त्यापेक्षां मोठा लाभ जगतांत कोणता आहे ? ५९

**अन्वयार्थ**—(सर्वकर्माणि)—सर्व कर्में—(चेतसा)—विवेकबुद्धीनें—(मयि)—मज ईश्वराच्या ठिकाणीं—(संन्यस्य)—अर्पण करून—(मत्परः)—मी ज्याला श्रेष्ठ आहें असा होऊन—(बुद्धियोगं)—बुद्धियोगाचा—(उपाश्रित्य)—आश्रय करून—(मच्चित्तः)—माझ्या ठिकाणीं ज्याचें चित्त आहे असा—(सततं)—नेहमीं—(भव)—तूं हो. ५७

वास्तव धनंजया, तूं आपलीं सर्व कर्में माझे ठिकाणीं समर्पण कर. ( असा संन्यास कर. ) ६० परंतु हे वीरा, तोच कर्माचा संन्यास वरकांती न करतां, विचाराचे ठिकाणीं चित्तवृत्ति ठेवून मनापासून कर. ६१ मग त्या विचाराच्या बळानें, आपलें कर्माहून वेगळें असें निर्मळ स्वरूप माझ्या स्वरूपांत पहाशील; ६२ आणि सर्व कर्मांची जन्मभूमि जें अज्ञान (माया) तें आपल्याहून फार दूर आहे, असें तुझ्या दृष्टीस पडेल. ६३ मग अर्जुना, जशी रूपावाचून छाया दृष्टीस पडत नाहीं तसें अज्ञान हें आपल्याहून निराळें नाहीं, असें तुझ्या दृष्टीस पडेल. ६४ अशा ज्ञानानें अज्ञानाचा नाश झाला, म्हणजे समूळ कर्माचा संन्यास अनायासानें झाला, असें होईल. ६५ मग आत्म्यावर जो भ्रमानें कर्माचा भास दिसतो आहे, तो विचारानें गेला म्हणजे मी आत्माच स्वरूपानें राहतो. त्या आत्म्याचे ठिकाणीं बुद्धीला पतिव्रता करून स्थापित कर. ( आत्म्यामध्यें स्थिर कर ) ६६ अशा अनन्ययोगेंकरून ज्या वेळेस बुद्धि माझ्या ठिकाणीं प्रवेश करिते, त्या वेळेस चित्त हें चिंतन करण्याच्या पदार्थांचा त्याग करून माझेंच भजन करतें. ६७ याप्रमाणें चिंतन करण्याचे विषय टाकून सर्वकाल चित्त माझे ठिकाणीं जडून नेहमीं राहील, असें त्वरित कर. ६८

**अन्वयार्थ**—(मच्चित्तः)—माझ्याच ठिकाणीं ज्यानें चित्त लावलें आहे असा तूं—(मत्प्रसादात्)—माझ्या कृपेमुळें—(सर्वदुर्गाणि)—संसाराला कारण होणाऱ्या अज्ञानादि सर्व निमित्तांना—(तरिष्यसि)—तरशील, त्यांचें उल्लंघन करून जाशील—(अथ) (चेत्)—पण जर—(त्वं)—तूं—(अहंकारात्)—अभिमानामुळें—(न श्रोष्यसि)—माझें ऐकणार नाहींस तर—(विनंक्ष्यसि)—विनाश पावशील. ५८

मग याप्रमाणें अभेदरूपी सेवेनें जेव्हां तुझें चित्त मद्रूप होईल, तेव्हां माझा तुझ्यावर पूर्ण प्रसाद होईल, असें समज. ६९ मग जे जन्ममृत्यु सर्व दुःखांचीं घरें जीवमात्र भोगतो व जीं अति दुर्घट आहेत, तींच तुला सुखकारक होतील. १२७० सूर्यप्रकाशाची डोळ्याला साह्यता मिळाल्यावर मग अंधाराची किंमत आहे काय ? ७१ त्याप्रमाणें, माझ्या प्रसादानें ज्याचा जीवपणा नष्ट झालेला आहे, तो संसाररूपी बागुलाच्या भयानें भिईल की काय ? ७२ म्हणून हे धनंजया, माझ्या प्रसादेंकरून या संसारदुर्गतीपासून तूं तरशील, ७३ अथवा, अभिमानाच्या योगानें माझें हें सर्व भाषण कानानें न ऐकशील, किंवा त्याचा मनांत विचारही न घेशील, ७४ तर तूं जरी नित्यमुक्त अव्यय आहेस, तरी तें व्यर्थ हो-

१ सोळांच्या दरानें. २ आळ, अपवाद. ३ भासतें, वाटतें. ४ दिवस. ५ सूर्याचा. ६ पदावर. ७ नाशस्वरूपाच्या. ८ नाश. ९ न पावण्याजोगा, अप्राप्य असा कोणता लाभ आहे. १० त्याग. ११ वरकांती. १२ ठेवा. १३ जन्मभूमि. १४ स्वस्वरूपाहून, आपल्याहून. १५ अज्ञान. १६ आत्मस्वरूपापासून वेगळी. १७ कारणासहित, मूळासहित. १८ सर्व कर्मसमुदाय. १९ घालावी, ठेवावी. २० एकनिष्ठ. २१ चिंतन करण्याचे विषयांचा त्याग करून. २२ सत्वर. २३ दुःखाचीं स्थानें. २४ भोगिली जातात. २५ अवघड. २६ मदतीनें, साहाय्यानें. २७ सांभाळलेला, मदत मिळालेला. २८ पर्वा, किंमत. २९ ज्याचा जीवकण—जीवांश उपमर्द—नाश किंवा नष्ट होतो. ३० पीडा पावेल. ३१ बुझवण्यानें. ३२ अहंकारानें. ३३ हदीस. ३४ व्यर्थ.

चिकें आणि सोळें । हें सोनया तंवचि ओळें । जंव परिसु आंगमेळें । एकवटीना ५४ तैसें शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे । जंव येकु न प्रकाशें । सर्वत्र मी ५५ अगा रात्री आणि दिवो । हा तंवचि द्वैतभावो । जंव न रिगिजे गांवो । गभस्तीचा ५६ म्हणौनि माझिया भेटी । तयाचीं सर्व कर्में किरीटी । जाऊनि बैसे तो पाटीं । सायुज्याच्या ५७ देशें काळें स्वभावें । वेंचु जया न संभवे । तें पद माझें पावे । अविनाश तो ५८ किंबहुना पांडुसुता । मज आत्मयाची प्रसन्नता । लाहे तेणें न पाविजतां । लाभु कवणु असे ५९

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः । बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

याकारणें गा तुवां इया । सर्व कर्मा आपुलिया । माझ्या स्वरूपीं धनंजया । संन्यासु कीजे १२६० परी तोचि संन्यासु वीरा । कैरणीयेचा झणें करा । आत्मविवेकीं धरा । चित्तवृत्ति हे ६१ मग तेणें विवेकबळें । आपणपें कर्मावेगळें । माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखिजेल सर्व ६२ आणि कर्मांची जन्मभोये । प्रकृति जे का आहे । ते आपणयाहूनि बहुवे । देखसी दूरी ६३ तेथ प्रकृति आपणयां- । वेगळी नुरे धनंजया । रूपेंविण का छाया । जयापरी ६४ ऐसेनि प्रकृतिनाशु । जालया कर्मसंन्यासु । निफजेल अनायासु । सकारणु ६५ मग कर्मजात गेलया । मी आत्मा उरें आपणपयां । तेथ बुद्धि धांपे करूनियां । पतिव्रता ६६ बुद्धि अनन्य येणें योगें । मजमाजीं जैं रिगे । तैं चित्त चैत्यत्यागें । मातेंचि भजे ६७ ऐसें चैत्यजातें सांडिलें । चित्त माझ्या ठायीं जडलें । ठाके तैसें वहिलें । सर्वदा करीं ६८

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि । अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥५८॥

मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेधवां । माझा प्रसादु जाण तेधवां । संपूर्ण जाहला ६९ तेथ सकळ दुःखधामें- । भुंजीजैती जियें मृत्युजन्में । तियें दुर्गमेंचि सुगमें । होती तुज १२७० सूर्याचेनि सावायें । डोळा सावाइला होये । तैं आंधाराचा आहे । पाडु तया ७१ तैसा माझेनि प्रसादें । जीवकणु जयाचा उपमर्दे । तो संसाराचेनि बाधें । बागुलें केवीं ७२ म्हणौनि धनंजया । तूं संसारदुर्गती यया । तरसील माझिया । प्रसादास्तव ७३ अथवा हन अहंभावें । माझें बोलणें हें आघवें । कानामनाचिये शिवे । नेदिसी टेंकों ७४ तरी नित्य मुक्त अव्ययो । तूं आहासि तें होऊनि वावो । देहसंबं-

परिसाशीं संबंध झाला नाहीं तोंपर्यंतच हिणकट व सोळा रुपये दराचें सोनें हा भेद सोन्यांत असतो. ५४ त्याप्रमाणें शुभ व अशुभ हा भेद तोंपर्यंतच असतो कीं, जोंपर्यंत सर्वत्र माझा प्रकाश झाला नाहीं! ५५ अरे, जोंपर्यंत सूर्याचा गांवांत प्रवेश झाला नाहीं, तोंपर्यंतच रात्र व दिवस हा भेद आहे. ५६ म्हणून अर्जुना, माझी भेट झाली म्हणजे त्यांचीं सर्व कर्में नाहींतशीं होऊन तो सायुज्य पदावर बसतो. ५७ ज्या पदाचा देशानें, कालानें व स्वभावानें कधीं नाश होत नाहीं तें माझें अविनाशपद त्याला प्राप्त होतें. ५८ फार काय सांगावें! अर्जुना, मी जो आत्मा, त्या माझी प्रसन्नता ज्याला प्राप्त झाली आहे, त्यापेक्षां मोठा लाभ जगतांत कोणता आहे? ५९

**अन्वयार्थ**—(सर्वकर्माणि)—सर्व कर्में-(चेतसा)—विवेकबुद्धीनें-(मयि)—मज, ईश्वराच्या ठिकाणीं-(संन्यस्य)—अर्पण करून-(मत्परः)—मी ज्याला श्रेष्ठ आहें असा होऊन-(बुद्धियोगं)—बुद्धियोगाचा-(उपाश्रित्य)—आश्रय करून-(मच्चित्तः)—माझ्या ठिकाणीं ज्याचें चित्त आहे असा-(सततं)—नेहमीं-(भव)-तूं हो. ५७

यास्तव धनंजया, तूं आपलीं सर्व कर्में माझे ठिकाणीं समर्पण कर. (असा संन्यास कर.) ६० परंतु हे वीरा, तोच कर्मांचा संन्यास वरकांतीं न करतां, विचाराचे ठिकाणीं चित्तवृत्ति ठेवून मनापासून कर. ६१ मग त्या विचाराच्या बळानें, आपलें कर्मांहून वेगळें असें निर्मळ स्वरूप माझ्या स्वरूपांत पहाशील; ६२ आणि सर्व कर्मांची जन्मभूमि जें अज्ञान (माया) तें आपल्याहून फार दूर आहे, असें तुझ्या दृष्टीस पडेल. ६३ मग अर्जुना, जशी रूपावाचून छाया दृष्टीस पडत नाहीं तसें अज्ञान हें आपल्याहून निराळें नाहीं, असें तुझ्या दृष्टीस पडेल. ६४ अशा ज्ञानानें अज्ञानाचा नाश झाला, म्हणजे समूळ कर्मांचा संन्यास अनायासानें झाला, असें होईल. ६५ मग आत्म्यावर जो भ्रमानें कर्मांचा भास दिसतो आहे, तो विचारानें गेला म्हणजे मी आत्माच स्वरूपानें राहतों. त्या आत्म्याचे ठिकाणीं बुद्धीला पतिव्रता करून स्थापित कर. (आत्म्यामध्यें स्थिर कर) ६६ अशा अनन्ययोगेंकरून ज्या वेळेस बुद्धि माझ्या ठिकाणीं प्रवेश करिते, त्या वेळेस चित्त हें चिंतन करण्याच्या पदार्थांचा त्याग करून माझेंच भजन करतें. ६७ याप्रमाणें चिंतन करण्याचे विषय टाकून सर्वकाल चित्त माझे ठिकाणीं जडून नेहमीं राहील, असें त्वरित कर. ६८

**अन्वयार्थ**—(मच्चित्तः)—माझ्याच ठिकाणीं ज्यानें चित्त लावलें आहे असा तूं-(मत्प्रसादात्)—माझ्या कृपेमुळें-(सर्वदुर्गाणि)—संसाराला कारण होणाऱ्या अज्ञानादि सर्व निमित्तांना-(तरिष्यसि)—तरशील, त्यांचें उल्लंघन करून जाशील-(अथ) (चेत्)—पण जर-(त्वं)—तूं-(अहंकारात्)—अभिमानामुळें-(न श्रोष्यसि)—माझें ऐकणार नाहींस तर-(विनंक्ष्यसि)-विनाश पावशील. ५८

मग याप्रमाणें अभेदरूपी सेवेनें जेव्हां तुझें चित्त मद्रूप होईल, तेव्हां माझा तुझ्यावर पूर्ण प्रसाद होईल, असें समज. ६९ मग जे जन्ममृत्यु सर्व दुःखांचीं घरें जीवमात्र भोगतो व जीं अति दुर्घट आहेत, तींच तुला सुखकारक होतील. १२७० सूर्यप्रकाशाची डोळ्यांला साह्यता मिळाल्यावर मग अंधाराची किंमत आहे काय? ७१ त्याप्रमाणें, माझ्या प्रसादानें ज्याचा जीवपणा नष्ट झालेला आहे, तो संसाररूपी बागुलाच्या भयानें भिईल की काय? ७२ म्हणून हे धनंजया, माझ्या प्रसादेंकरून या संसारदुर्गतीपासून तूं तरशील, ७३ अथवा, अभिमानाच्या योगानें माझें हें सर्व भाषण कानानें न ऐकशील, किंवा त्याचा मनांत विचारही न घेशील, ७४ तर तूं जरी नित्यमुक्त अव्यय आहेस, तरी तें व्यर्थ हो-

१ सोळांच्या दराचें. २ भाळ, अपवाद. ३ भासतें, वाटतें. ४ दिवस. ५ सूर्याचा. ६ पदावर. ७ मत्स्वरूपाच्या. ८ नाश. ९ न पावण्याजोगा, अप्राप्य असा कोणता लाभ आहे. १० त्याग. ११ वरकांतीं. १२ ठेवा. १३ जन्मभूमि. १४ स्वस्वरूपाहून, आपल्याहून. १५ अज्ञान. १६ आत्मस्वरूपापासून वेगळी. १७ कारणासहित, मूळासहित. १८ सर्व कर्मसमुदाय. १९ पाळावी, ठेवावी. २० एकनिष्ठ. २१ चिंतन करण्याचे विषयांचा त्याग करून. २२ सत्वर. २३ दुःखाचीं स्थानें. २४ भोगिली आतान. २५ अवघड. २६ मदतीनें, साहाय्यानें. २७ सांभाळलेला, मदत मिळालेला. २८ पर्वा, किंमत. २९ ज्याचा जीवपण—जीवांश उपमर्द—नासे किंवा नष्ट होतो. ३० पोरा पावेल. ३१ बुद्धवचनानें. ३२ अहंकारानें. ३३ हरील. ३४ व्यर्थ.

धाचा घावो । वाजेल आंगीं ७५ जया देह संबंधाआंतु। प्रतिपदीं आत्मघातु। भुंजतां उसंतु । कहींचि नाहीं ७६ येवढेनि दोंदणें । निमेणेनवीण निमणें । पडेल जरी बोलणें । नेघसी माझें ७७

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे । मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९॥

पथ्यद्वेषिया पोषी ज्वरु । कां दीपद्वेषिया अंधकारु । विवेकद्वेषें अहंकारु। पोषूनि तैसा ७८ स्वदेहा नाम अर्जुनु । परदेहा नाम स्वजनु । संग्रामा नाम मलिनु । पापाचारु ७९ इया मती आपुलिया। तिघां तीन नामें ययां । ठेऊनियां धनंजया । न झुंजें ऐसा १२८० जीवामाजीं निष्टंकु । करिसी जो आत्यंतिकु । तो वायां धाडील नैसर्गिकु । स्वभावोचि तुझा ८१ आणि मी अर्जुनु हे आत्मिक । ययां वधु करणें हें पातक । हें मायावांचूनि तात्त्विकें । कांहीं आहे ८२ आधीं झुंझार तुवां होआवें । मग झुंझावया शस्त्र घेयावें । कां न झुंझावया करावें । देवांगेंण ८३ म्हणौनि न झुंजणें । म्हणसी तें वायांणें । ना मानूं लोकपणें । लोकदृष्टीही ८४ तऱ्ही न झुंजें ऐसें । निष्टंकिसी जें मानसें । तें प्रकृति अनारिसें । करवीलचि ८५

स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा । कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥६०॥

पैं पूर्वे वाहतां पाणी । पोहिजे पश्चिमेचें वोहणीं । तरी आग्रहोचि उरे तें आणी । आपुलिया लेखें ८६ का साळीचा कैणु म्हणे । मी नुगवें साळीपणें। तरी आहे आन करणें । स्वभावासी ८७ तैसा क्षात्रसंस्कारसिद्धा । प्रकृती घडिलासी प्रबुद्धा । आतां नुठीं म्हणसी हा धांदो । परी उठविजसीचि तूं ८८ पैं शौर्य तेज दक्षता। एवमादिक पंडुसुता । गुण दिधले जन्मतां । प्रकृती तुज ८९ तरी तयाचिया समवाया- । अनुरूप धनंजया । न करितां उगेलियां । नयेल असों १२९० म्हणौनियां तिहीं गुणीं । बांधलासि तूं कोदंडपाणी । त्रिशुद्धी निघसी वोहणीं । क्षात्राचिया ९१ ना हें आपुलें जन्ममूळ । न विचारीतचि केवळ । न झुंजें ऐसें अढळ । व्रत जरी घेसी ९२ तरी बांधोनि हात पाये । जो रथीं घातला होये । तो न चले तरी जाये । दिगंता जेवीं ९३ तैसा तूं आपुलियाकडुनी । मी कांहींच न करीं म्हणौनी। ठासी परी भरंवसेनी । तूंचि करिसी ९४ उत्तरु वैराटींचा राजा । पळतां तूं कां निघालासि झुंजा । हा क्षात्रस्वभावो तुझा । झुंजवील तुज ९५ महावीर अकरा

ऊन देहसंबंधाचे घात तुला सोसावे लागतील! ७५ जेथें देहसंबंधाचे ठिकाणीं पदोपदीं आपला घात आहे, तो भोगतांना कधींही विश्रांति मिळावयाची नाहीं! ७६ जर माझें बोलणें न ऐकशील, तर एवढा भयंकर मृत्यु वास्तविक न मरतां तुला सोसावा लागेल! ७७

अन्वयार्थ—(अहंकारं आश्रित्य)–अहंकाराचा आश्रय करून–(न योत्स्ये)–मी लढणार नाहीं–(इति यत्)–असें जें–(मन्यसे)–तूं समजतोस, तूं म्हणत आहेस–(एषः)–हा (ते)–तुझा–(मिथ्या व्यवसायः)–खोटा निश्चय आहे–(प्रकृतिः)–तुझा क्षत्रियस्वभाव–(त्वाम्)–तुला–(नियोक्ष्यति)–युद्ध करावयास लावील. ५९

पथ्याच्या द्वेषानें जसा ज्वर वाढतो, अथवा दिव्याच्या द्वेषानें जसा अंधकार वाढतो, तसा विवेकाचे द्वेषानें अहंकार वाढेल. ७८ मग, आपल्या देहाला अर्जुन, दुसऱ्याचे देहाला माझे आप्त, व यांच्याशीं संग्राम करणें हेंच पातक; ७९ याप्रमाणें आपल्या बुद्धीनें तिघांना आणि तीन नावें ठेवून अर्जुना, मी युद्ध करणार नाहीं असा १२८० आपले अंतःकरणांत पूर्ण निश्चय केलास, तरी तुझा जो नैसर्गिक स्वभाव आहे, तो तुझा निश्चय टिकूं देणार नाहीं. ८१ वास्तविक विचार करून पाहिलें असतां, मी अर्जुन, व हे माझे आप्त, व यांचा वध करणें हें पातक, ह्या सर्व कल्पना मनिवांचून खऱ्या आहेत काय? ८२ अरे, अगोदर तूं युद्धास तयार झालास, व युद्धाकरितां शस्त्रही घेतलेंस, आणि आतां युद्ध न करण्याची शपथ घेतोस, हें योग्य आहे का? ८३ याकरितां, मी युद्ध करणार नाहीं हें तुझें म्हणणें व्यर्थ होय. शिवाय लोकदृष्टीनेंही तुझें म्हणणें कोणी मान्य करणार नाहीं ८४ तर मी युद्ध करणार नाहीं, असा जो आपले मनानें निश्चय करीत आहेस, तो व्यर्थ होऊन, तुझी स्वकीय क्षात्रप्रकृति आहे ती तुझ्या निश्चयाचे उलट तुझ्याकडून युद्ध करवीलच करवील! ८५

अन्वयार्थ—(कौन्तेय)–हे अर्जुना!–(स्वभावजेन स्वेन कर्मणा)–स्वभावजन्य अशा आपल्या कर्मानें–स्वकर्मानें –(निबद्धः)–अत्यंत बद्ध झालेला तूं–(मोहात्)–अविवेकामुळें,–(यत् कर्तुं न इच्छसि)–जें करण्याची इच्छा करीत नाहींस,–(तत्)–तें युद्ध (अवशः अपि)–स्वभाववश होऊनहि–(करिष्यसि)–करशील. ६०

हें पहा—पूर्वेकडे पाण्याचा ओघ चाललेला असून, पोहणारा जर म्हणेल की, 'मी पश्चिमेकडे जाईन,' तर त्याचें म्हणणें व्यर्थ होऊन तें पाणी त्याला ओघाकडेच (पूर्वेकडेच) ओढून नेईल. ८६ किंवा साळीचा कण जर असें म्हणेल की, मी साळीपणानें उगवणार नाहीं, तर तें त्याचें म्हणणें व्यर्थ होय. कारण, त्याला त्याच्या स्वभावाच्या उलट जातां येईल काय? ८७ त्याप्रमाणें हे प्रबुद्धा, तुझी प्रकृति क्षात्रगुणानें घडलेली असल्यामुळें मी युद्ध करण्यास उठणार नाहीं, असें म्हणशील तर तें व्यर्थ होय. तुझा क्षात्रधर्मच तुला युद्ध करण्यास उठवील. ८८ हें पहा अर्जुना, तुझ्या क्षात्रप्रकृतीनें शौर्य, तेज, दक्षता इत्यादि गुण जन्मतःच तुला दिले आहेत. ८९ तर हे धनंजया, त्या प्रकृतीच्या गुणानुरोधानें, युद्ध न करतां स्वस्थ बसणें होणार नाहीं. १२९० म्हणून हे कोदंडपाणी, त्या क्षात्रगुणांनीं तूं बद्ध झाल्यामुळें तुला तुझ्या स्वभावाच्या विरुद्ध खरोखर जातां येणार नाहीं, ९१ अथवा आपल्या जन्माच्या मूळाचा विचार न करतां, मी युद्ध करणार नाहीं असेंच अढळ मत धारण केलेंस, ९२ तर हातपाय बांधून रथावर घातलेला मनुष्य मी चालणार नाहीं असें जरी म्हणेल, तरी तो जसा रथाबरोबर दिगंतराला जातो, ९३ तसा तूं आपल्याकडून मी कांहीं करणार नाहीं, असें म्हणून जरी स्वस्थ बसशील, तरी खास तूंच युद्ध करशील, यांत संशय नाहीं. ९४ उत्तरगोग्रहणाचे वेळीं विराट राजाचा पुत्र उत्तर, हा युद्धांतून माघारी पळत असतांना तूं बृहन्नडेचें सोंग घेतलें असूनही त्याचा सारथि होऊन युद्ध कां केलेंस? तर तोच तुझा क्षत्रियस्वभाव उगीच न बसतां तुझ्याकडून युद्ध करवीलच करवील! ९५ अर्जुना, त्या युद्धांत अकरा अक्षौहिणी महावीर तूं

१ अहंकार. २ पथ्याच्या द्वेषानें ३ विश्रांति. ४ भयंकर. ५ न मरतां ६ न ऐकशील. ७ वाढतो. वाढवितो. ८ सिद्धांत, निश्चय. ९ अविवेक. १० तुझा नैसर्गिक भाव-क्षात्रधर्म. ११ आप्त. १२ याकरितां, लोकदृष्टीनें. खोटेपणानें. १३ युद्धकर्ता. १४ शपथ, प्रतिज्ञा. १५ व्यर्थ. १६ निसर्गतः. १७ निराळे, विरुद्ध. १८ पोहणारे. १९ मार्गानें, दिशेस. २० हिंदोळत, मागेंच. २१ दाणा. २२ उगवणार नाहीं. २३ प्रकृतिधर्मास. २४ व्यर्थ गडबड, निष्फळ व्यापार. २५ इत्यादिक. २६ गुणानुरोधानुरूप, योग्यतेनुरूप. २७ स्वस्थ, शांत. २८ खरोखर. २९ अवलंबून. ३० क्षत्रियस्वभावाच्या. ३१ बांधून नसला तरी. ३२ स्वस्थ राहसी.

धांचा घावो । वाजेल आंगीं ७५ जया देह संबंधाआंतु । प्रतिपदीं आत्मघातु । भुंजतां उसंतु । कहींचि नाहीं ७६ येवढेनि दोहणें । निमणेनवीण निमणें । पडेल जरी बोलणें । नेघसी माझें ७७

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे । मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९॥

पथ्यद्वेषिया पोषी ज्वरु । कां दीपद्वेषिया अंधकारु । विवेकद्वेषें अहंकारु । पोपूनि तैसा ७८ स्वदेहा नाम अर्जुनु । परदेहा नाम स्वजनु । संग्रामा नाम मलिनु । पापाचारु ७९ इया मती आपुलिया । तिन्हीं तीन नामें ययां । ठेऊनियां धनंजया । न झुंजें ऐसा १२८० जीवामाजीं निष्टंकु । करिसी जो आत्यंतिकु । तो वायां धाडील नैसर्गिकु । स्वभावोचि तुझा ८१ आणि मी अर्जुनु हे आत्मिक । ययां वधु करणें हें पातक । हें मायावांचूनि तात्त्विकें । कांहीं आहे ८२ आधीं झुंझार तुवां होआवें । मग झुंझावया शस्त्र घेयावें । कां न झुंझावया करावें । देवांगण ८३ म्हणौनि न झुंजणें । म्हणसी तें वायाणें । ना मानूं लोकपणें । लोकदृष्टीही ८४ तऱ्ही न झुंजें ऐसें । निष्टंकिसी जें मानसें । तें प्रकृति अनारिसें । करवीलची ८५

स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा । कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥६०॥

पैं पूर्वे वाहतां पाणी । पोहिजे पश्चिमेचें वोहणीं । तरी आग्रहोचि उरे तें आणी । आपुलिया लेखीं ८६ का साळीचा कणु म्हणे । मी नुगवें साळीपणें । तरी आहे आन करणें । स्वभावासी ८७ तैसा क्षात्रसंस्कारसिद्धा । प्रकृती घडिलासी प्रबुद्धा । आतां नुठीं म्हणसी हा धांदों । परी उठविजसीचि तूं ८८ पैं शौर्य तेज दक्षता । एवमादिक पंडुसुता । गुण दिधले जन्मतां । प्रकृती तुज ८९ तरी तयाचिया समवाया- । अनुरूप धनंजया । न करितां उगेलियां । नयेल असों १२९० म्हणौनियां तिहीं गुणीं । बांधलासि तूं कोदंडपाणी । त्रिशुंडी निघसी वोहणीं । क्षात्राचिया ९१ ना हें आपुलें जन्ममूळ । न विचारीतचि केवळ । न झुंजें ऐसें अढळ । व्रत जरी घेसी ९२ तरी बांधोनि हात पाये । जो रथीं घातला होये । तो न चले तरी जाये । दिगंता जेवीं ९३ तैसा तूं आपुलियाकडुनी । मी कांहींच न करीं म्हणौनी । ठांसी परी भरंवसेनी । तूंचि करिसी ९४ उत्तरु वैराटींचा राजा । पळतां तूं कां निघालासि झुंजा । हा क्षात्रस्वभावो तुझा । झुंजवील तुज ९५ महावीर अकरा

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत । तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥

तयां[१] अहं[२] वाचा चित्त आंगें । देऊनियां शरण रिग । महोदधी का गांगें[३] । रिगालें जैसें १९ मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदे । कांतु होऊनियां स्वानंदें । स्वरूपींच रमसी १३२० संभूति जेणें संभवे[६] । विश्रांति जेथें विसंवे । अनुभूतिही[७] अनुभवे । अनुभवा जया २१ तिये निजात्मपदींचा रावो । होऊनि ठाकसी अव्ययो । म्हणे लक्ष्मीनाहो । पार्था तूं गा २२

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया । विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

हें गीतानाम विख्यात । सर्ववाङ्मयाचें[१०] मथितें[११] । आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय २३ ज्ञान ऐसिया रूढी[१२] । वेदांतीं जयाची प्रौढी । वानितां[१३] कीर्ति चोखंडी[१४] । पातली जगीं २४ बुद्ध्यादिकें डोळसें । हें जयाचें का कडवसें[१५] । मी सर्वद्रष्टाही दिसें । पाहलों[१६] जया २५ तें हें गा आत्मज्ञान । मज गोप्याचेंही गुप्त धन । परी तूं म्हणूनि आन । केवीं करूं २६ याकारणें गा पांडवा । आम्हीं आपला हा गुप्त ठेवा । तुज दिधला कणवा[१७] । आकळिलेपणें २७ जैसी भुलली वोरसें[१९] । मांय बोले बाळा दोषें । प्रीति ही परी तैसें । न करूंचि हो २८ येथ आकाश आणि गाळिजे । अमृताही सालि फेडिजे । का दिव्याकरवीं करविजे । दिव्य जैसें २९ जयाचेनि अंगप्रकाशें । पाताळींचा परमाणु दिसे । तया सूर्याहि का जैसें । अंजन[२०] सूदलें १३३० तैसें सर्वज्ञेंही मियां । सर्वही निर्धारूनियां । निकें होय तें धनंजया । सांगितलें तुज ३१ आतां तूं ययावरी । निकें हें निर्धारीं । निर्धारूनि करीं । आवडे तैसें ३२ यया देवाचिया बोला । अर्जुनु उगाचि ठेला । तेथ देवो म्हणती भला । अवंचकु[२१] होसी ३३ वाढितया पुढें भुकेला । उपरोधें[२२] म्हणे मी धाला[२३] । तैं तोचि पीडे[२४] आपुला । आणि दोषुही तया ३४ तैसा सर्वज्ञु श्रीगुरु । भेटलिया आत्मनिर्धारु । न पुसिजे जँ आभारु[२५] । धरूनियां ३५ तैं आपणपेंचि[२६] वंचे । आणि पापही वंचनाचें[२७] । आपणयाचि सांचे । चुकविलें तेणें ३६ पैं उगेपणा तुझिया । हा अभिप्रावो कीं धनंजया । जें एकवेळ ओवांकुनियां । सांगावें ज्ञान ३७ तेथ पार्थु म्हणे दातारा । भलें जाणसी माझिया अंतरा । हें म्हणों तरी दुसरा । जाणता असे काई ३८ येर ज्ञेयं[३०] हें जी आघवें । तूं ज्ञाता एकचि स्वभावें । मा सूर्यु म्हणौनि वानावें । सूर्यातें काई ३९ या बोला श्रीकृष्णें । म्हणितलें काय येणें । हेंचि थोडें गा वानणें । जें बुझतसि[३१] तूं १३४०

**अन्वयार्थ**—(भारत)-हे अर्जुना !-(तं एव)-त्याच ईश्वराला-(सर्वभावेन)-सर्व प्रकारें-(शरणं गच्छ)-शरण जा -(तत्प्रसादात्)-त्याच्या प्रसादामुळें-(परां शान्तिं)-सर्वोत्कृष्ट शांतीला-(च)-आणि-(शाश्वतं स्थानं)-नित्य स्थानाला-(प्राप्स्यसि)-प्राप्त होशील. ६२

त्या ईश्वराला जसें गंगेचें उदक समुद्राला शरण जाऊन तद्रूप होतें, तसा अहंकार, वाचा, चित्त व शरीर हीं सर्वस्वी अर्पण करून शरण जा. १९ मग त्या ईश्वराचे प्रसादानें सर्वत्र शांतिरूपी स्त्रीचा तूं पति होऊन आनंदानें आत्मस्वरूपीं रममाण होशील. १३२० जें पद उत्पत्तीचें कारण, विश्रांतीचें विश्रांतिस्थान व अनुभूति ज्याचा अनुभव घेते, २१ त्या आपल्या आत्मपदाचा तूं राजा होऊन अक्षय्य सुख भोगशील घरें बांचा ! ! असें लक्ष्मीपति श्रीकृष्ण पार्थास बोलले. २२

**अन्वयार्थ**—(इति)-याप्रमाणें-(मया)-मीं-(ते)-तुला-(गुह्यात् गुह्यतरं ज्ञानं)-गुह्याहून अति गुह्य ज्ञान-(आख्यातं)-सांगितलें-(एतत्)-याचा पूर्णपणें-(विमृश्य)-विचार करून मग-(यथा इच्छसि)-जसें तुला वाटेल-(तथा कुरु)-तसें कर.

हें ज्ञान गीता या नांवानें प्रसिद्ध आहे, व जें सर्व वेदाचें सार आहे, व ज्या ज्ञानानें आत्मरूपरत्न स्वाधीन होतें. १३ वेदांतशास्त्रांत ज्ञान या नांवानें जें प्रसिद्ध आहे, व ज्याचें वर्णन करून जगांतील सर्व शास्त्रांना कीर्ति प्राप्त झाली; २४ बुद्ध्यादिक ज्ञानें ज्या ज्ञानापुढें नुसतें काजवे आहेत, व ज्या ज्ञानाचा उदय झाल्यानें मी सर्व द्रष्टाही दिसतो, २५ तें हें आत्मज्ञान, सर्वांमध्यें जो मी गुप्त त्या माझेंही गुप्त धन आहे; व हें ज्ञान जरी इतकें योग्यतेचें आहे, तरी तूं माझा परमभक्त असल्यामुळें, तुला न सांगतां गुप्त कसें ठेववेल ? २६ याकरितां हे पांडवा, तुझ्या प्रेमभरानें संतुष्ट होऊन आम्हीं आपला गुप्त ठेवा तुला दिला. २७ ज्याप्रमाणें मुलाच्या प्रेमानें आई भुलून जाते, आणि त्याच्या उद्देशानें प्रेमभरित भाषण करते, त्याप्रमाणें आमचें तुझ्यावरील प्रेम तसें कसें करून देणार नाहीं ! २८ आकाश सर्वांहून सूक्ष्म असूनही तें जसें गाळून घ्यावें, अमृत आंत बाहेर गोड असूनही त्याची जरी साल काढावी; अथवा दिव्याकडून जसें दिव्य करवावें; २९ ज्या सूर्याच्या अंगप्रकाशानें पाताळांतील परमाणूही दिसतो, त्या सूर्याचे डोळ्यांतही अंजन घालावें, १३३० तसें मी सर्वज्ञ असूनही सर्वांचा विचार करून जें योग्य वाटलें, तें हें ज्ञान धनंजया तुला सांगितलें. ३१ आतां तूं पुढें या ज्ञानाचा नीट विचार करून निश्चय कर; आणि निश्चय झाल्यावर तुला वाटेल तें कर. ३२ हें देवाचें भाषण ऐकल्यावर देवांनीं मला शेवटचा निरोप सांगितला; आतां श्रवणसुखाला आपण आंचवलों, म्हणून वाईट वाटून अर्जुन कांहीं ऐकावें अशा इच्छेनें उगीच बसला. हें पाहून देव म्हणाले—अर्जुना, तूं सांगितलेल्या ज्ञानाची वंचना करणारा नाहींस, तथापि तुझ्या या स्वस्थ बसण्यानें असें दिसतें कीं, आणखी कांहीं तरी ऐकावें; ३३ वाढणारा वाढीत असतांना भुकेलेला मनुष्य जर लाजून पुरे पुरे म्हणेल, तर क्षुधेची पीडा आपण सोसून वंचकपणाचा म्हणजे संकोच केल्याचा दोषही त्याजवर येतो. ३४ त्याप्रमाणें, सर्वज्ञ असा श्रीगुरु भेटल्यावर भीड धरून आत्मस्वरूपाचा निर्णय जर न विचारील, ३५ तर आपला लाभ गमावून आपणच वंचना केल्याचें पातक त्याला लागतें, व तो आपल्या खरोखर लाभास अंतरतो. ३६ परंतु अर्जुना, तुझा स्वस्थ रहाण्याचा असा अभिप्राय आहे कीं, तुला आणखी एक वेळ ज्ञान पूर्णपणें सांगावें. ३७ तेव्हां पार्थ म्हणाला, "हे प्रभो, आपण माझे मनांतील गोष्ट खरोखर जाणली; हें म्हणावयास कशास पाहिजे ? कारण, तुमच्यावांचून दुसरा कोणी जाणता आहे काय ? ३८ तुमच्यावांचून सर्व जग तुमचें ज्ञेय ( जाणण्याजी वस्तु ) असून त्या सर्वांना जाणणारे एकटेच तुम्हीच आहां. मग सूर्याला सूर्य म्हणून त्याची वाखाणणी काय करावी !" ३९ हें अर्जुनाचें बोलणें ऐकून भगवान् श्रीकृष्ण म्हणतातः—या तुझ्या बोलण्यानें माझें वर्णन थोडेंच झालें असें समजतोस कीं काय ? असो. १३४०

१ त्या हृदयस्थाला. २ मी हें स्फुरण, शरीर, वाचा व मन. ३ गंगोदक. ४ सर्वांचा लय ज्या स्थितींत आहे अशा स्थितीरूपी स्त्रीचा. ५ प्रिय पति. ६ उत्पत्ति. ७ अनुभव. ८ राहसी. ९ लक्ष्मीपति. १० वेदांचें. ११ सार. १२ प्रसिद्धि. १३ वर्णितां. १४ उत्कृष्ट. १५ तेजानें अल्पांश. १६ उदय झाल्यानें. १७ कृपेनें. १८ प्रेम झाल्यामुळें. १९ प्रेमानें, पान्ह्यानें. २० काजळ. २१ न फसणारा. २२ भिडेनें. २३ तृप्त झालों. २४ क्षुधेनें पीडा पावतो. २५ मीडस्तपणा. २६ लाभ गमावी. २७ आपल्यास फसविणें. २८ खरोखर. २९ पूर्णपणें. ३० जाणावयाचे विषय. ३१ तुला समजत होते तर.

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः । इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

तरी अवधान पघळ । करूनियां आणिक एक वेळ । वाक्य माझें निर्मळ । अवधारीं पां ४१ हें वाच्य म्हणौनि बोलिजे । का श्राव्य मग आयिकिजे । तैसें नव्हे परी तुझें । भाग्य बरवें ४२ कूर्मीचिया पिलियां । दिठी पान्हा ये धनंजया । का आकाश वाहे बापिया । घरींचें पाणी ४३ जो व्यवहारु जेथ न घडे । तयाचें फळचि तेथ जोडे । काय दैवें न सांपडे । सानुकूळें ४४ एऱ्हवीं द्वैताची वारी । सारूनि ऐक्याच्या परिवरीं । भोगिजे तें अवधारीं । रहस्य हें ४५ आणि निरुपचारा प्रेमा । विषय होय जें प्रियोत्तमा । तें दुजें नव्हे कीं आत्मा । ऐसेंचि जाणावें ४६ आरिसाचिया देखिलया । गोमटें कीजे धनंजया । तें तया नोहे आपणयां- । लागीं जैसें ४७ तैसें पार्था तुझेनि मिषें । मी बोलें आपणयाचि उद्देशें । माझ्या तुझ्या ठाईं असे । मीतूंपण गा ४८ म्हणौनि जिव्हारींचें गुज । सांगतसें जीवासीं तुज । हें अनन्यगतीचें मज । आथी व्यसन ४९ पैं जळा आपणपें देतां । लवण भुललें पंडुसुता । कीं आघवें तयाचें होतां । न लजेचि तें १३५० तैसा तूं माझ्या ठाईं । राखों नेणसीचि कांहीं । तरी आतां तुज काई । गोप्य मी करूं ५१ म्हणौनि आधवींचि गूढें । जें पाऊनि अति उघडें । तें गोप्य माझें चोखडें । वाक्य आइक ५२

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु । मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥

तरी बाह्य आणि अंतरा । आपुलिया सर्व व्यापारा । मज व्यापकातें वीरा । विषयो करीं ५३ आधवां आंगीं जैसा । वायु मिळोनि आहे आकाशा । तूं सर्व कर्मीं तैसा । मजसींचि आस ५४ किंबहुना आपुलें मन । करीं माझें एकायतन । माझेनि श्रवणें कान । भरूनि घालीं ५५ आत्मज्ञानें चोखडीं । संत जें माझीं रूपडीं । तेथ दृष्टि पडो आवडी । कामिनी जैसी ५६ मी सर्व वस्तीचें वसौटें । माझीं नामें जियें चोखटें । तियें जियावया वाटे । वाचेचिये लावीं ५७ हाताचें करणें । का पायांचें चालणें । तें होय मजकारणें । तैसें करीं ५८ आपुला अथवा परावा । ठायीं उपकरसी पांडवा । तेणें यज्ञें होईं बरवा । याज्ञिकु माझा ५९ हें एकैक शिकऊं काई । पैं सेवकें आपुल्या ठाईं । उरूनि येर सेवेंही । मी सेव्यचि करीं १३६० तेथ जाऊनिया भूतद्वेषु । सर्वत्र नमवैन मीचि एकु । ऐसेनि आश्रयो आत्यंतिकु । लाहसी तूं माझा ६१ मग

अन्वयार्थ—(भूयः)-पुनरपि (मे)-माझें-(सर्वगुह्यतमं)-सर्व गुह्यांतील अतिशय गुह्य-(परमं वचः)-परम वचन-(शृणु)-ऐक-(मे)-मला तूं-(दृढं इष्टः)-अत्यंत प्रिय-(असि)-आहेस-(इति ततः)-म्हणून त्या कारणानें-(ते हितं)-तुझें हित-(वक्ष्यामि)-मी सांगतों. ६४

आणखी एक वेळ अवधान चांगलें विस्तीर्ण करून माझें निर्मळ वचन ऐक. ४१ हें वचन वाच्य आहे म्हणून बोलावें किंवा श्राव्य म्हणून ऐकावें, असें नसून हें केवळ ब्रह्मस्वरूपच आहे. परंतु तूं भाग्यवान् असल्यामुळें तुला हें प्राप्त झालें आहे. ४२ हे धनंजया, कासवीच्या दृष्टीला पिलें पाहतांक्षणींच पान्हा फुटतो, आणि तीं तृप्त होतात; किंवा आकाश हें चातक पक्ष्यांकरितां सर्वकाळ पाणी पोटांत सांठवितें; ४३ म्हणून जो व्यवहार जेथें घडत नाहीं, त्याचें फळ तेथेंच प्राप्त होतें. याचें कारण काय म्हणून विचारशील तर, अनुकूल दैव असल्यावर कोणता लाभ होणार नाहीं? ४४ पार्था हें रहस्य किती दुर्लभ आहे, तें सांगतां येत नाहीं. कारण, द्वैताचा भाव टाकून ऐक्याचें परामध्यें भोगण्यासारखें हें रहस्य आहे. ४५ हे प्रियोत्तमा, उपचाररहित जें आमचें प्रेम, त्या प्रेमाला जो तूं विषय झाला आहेस, तो तूं दुसरा कोणी नसून माझा आत्माच आहेस, असें समज. ४६ अर्जुना, आरशाला वारंवार स्वच्छ करून पुसावयाचें, तें आरशाकरितां नसून, स्वस्वरूपसौख्य भोगण्याकरितां आपण करितों. ४७ त्याप्रमाणें पार्था, तुझें उगीच निमित्त करून मी आपल्याच करितां बोलतों; तुझ्या व आमच्या मध्यें कांहीं दुजेपण आहे काय? ४८ याकरितां, आमच्या अगदी जीवींचें गुह्य जीवरूप असें तुला मी सांगतों. कारण, एकनिष्ठ भक्तांना मला नादच लागला आहे. ४९ हे पांडुसुता, जसें मीठ जलाला आपलेपणा सर्वस्वी देतें व तत्स्वरूप होण्यास लाजत नाहीं, ५० त्याप्रकारें तूं माझ्याशीं भेद ठेवीत नाहींस, तर मी तरी तुजपासून चोरून गुप्त गोष्ट कशी ठेवूं? ५१ म्हणून जेवढीं गुह्यें म्हणून आहेत, तेवढीं सर्व ज्या आमच्या गुह्य वचनापुढें उघडीं पडतात, तें माझें निर्मळ गुह्य वचन ऐक. ५२

अन्वयार्थ—(मन्मनाः भव)-तूं माझ्याच मध्यें ज्याचें मन आहे असा हो-(मद्भक्तः भव)-माझाच भक्त हो-(मद्याजी भव)-माझेंच यजन-पूजन करणारा हो-(मां नमस्कुरु)-मलाच नमस्कार कर-(ते सत्यं प्रतिजाने) मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगतों-(मां एव एष्यसि)-तूं मलाच येऊन पोंचशील-(मे प्रियः असि)-कारण तूं मला प्रिय आहेस. ६५

[मन्मना भव] वीरा अर्जुना, तुझे मानसिक व शारीरिक असे जे जे सर्व व्यापार होतील त्यांचा विषय मज सर्वव्यापकाला कर. ५३ वायु ज्याप्रमाणें सर्व बाजूंनीं आकाशास मिळालेला असतो, त्याप्रमाणें, तूं जीं सर्व कर्में करशील, तीं माझ्या प्रीत्यर्थच कर. ५४ फार काय सांगावें! तूं आपलें मन माझें रहाण्याचें स्थान कर, आणि तूं आपल्या कानानें माझ्या गुणांचें श्रवण कर. ५५ आत्मज्ञानानें युक्त असे जे संत ते माझीच रूपें आहेत, त्यांचे ठिकाणीं तुझी दृष्टि, कामिनीवर जशी लुब्ध असते, तशी ठेव. ५६ वस्तुमात्राचें वसतिस्थान जो मी, माझीं जीं निर्मळ नामें तीं जपण्याकरितां तूं आपल्या वाणीच्या वाटेला लाव. ५७ हातांनीं जीं जीं कृत्यें करशील, किंवा पायानें जिकडे जाशील, त्या सर्व क्रिया माझ्याचकरितां कर. ५८ [ मद्याजी ] आपल्या किंवा दुसऱ्याच्या उपयोगीं पडणाऱ्या ज्या ज्या क्रिया करशील, त्या अर्जुना, माझ्या ठिकाणीं अर्पण करून माझा याज्ञिक हो. ५९ [ मद्भक्तः ] आतां, एक एक अशा किती गोष्टी शिकवूं! तर आपलें ठिकाणीं सेवकभाव मानून जें सर्वत्र तुला दृष्टीस पडेल, तें सर्व मद्रूप आहे, असें समजून त्याची सेवा कर १३६०. [ मां नमस्कुरु ] मग प्राणिमात्राच्या ठिकाणचा द्वैतभाव नाहींसा होऊन सर्वत्र ठिकाणीं मीच आहें, असें तुझ्या अनुभवास येऊन सर्वत्र नम्र होऊन वंदन कर. एवढ्यानें माझा अत्यंत आश्रय तुला प्राप्त होईल. ६१ मग, सर्व जगांत तिसरे-

१ विस्तारलेलें असें. २ बोलण्यासारखें. ३ ऐकण्याचा विषय. ४ दृष्टीनेंच. ५ चातकाला. ६ येरझार, रहदारी. ७ घरीं. ८ गुह्य, तात्पर्य. ९ आदरयुक्त. १० चांगलें, स्वच्छ. ११ निमित्तानें. १२ आपल्याच उद्देशानें. १३ अंतर्गत. १४ एकनिष्ठतेचें. १५ घटक. १६ गुप्त ठेवूं. १७ ज्याचे प्राप्तीनंतर सर्व गुह्य उकलतात. १८ एक स्थान. १९ वसतिस्थान. २० दुसऱ्याला. २१ उपयुक्त होणी. २२ सेवकपणा मात्र आपले ठिकाणीं ठेऊन बाकी सर्व. २३ प्राणिमात्रांविषयीं द्वैष. २४ सर्वत्र जो मीच आहें, त्या मला तूं नमन करशील. २५ आतिशय.

भरलेया जगाआंतु । जाऊनि तिजयाची मातु। होऊनि ठायील एकांतु। आम्हां तुम्हां ६२ तेव्हां भलतिये आवस्थे । मी तूंतें तूं मातें । भोगिसी ऐसें आइतें । वाढेल सुख ६३ आणि तिजें आडळ करितें। निमालें अर्जुना जेथें । तें मीचि म्हणौनि तूं मातें । पावसी शेखीं ६४ जैसी जळींची प्रतिभा। जळनाशीं बिंबा। येतां गाभांगोभा । कांहीं आहे ६५ पैं पवनु अंबरा। कां कल्लोळु सागरा। मिळतां आडवारा । कोणाचा गा ६६ म्हणौनि तूं आणि आम्हीं । हें दिसताहे देहधर्मीं । मग ययाच्या विरामीं । मीचि होसी ६७ यया बोलामाझारीं । होय नव्हे झणें करीं । येथ ओनि आथी तैरी । तुझीच आण ६८ पैं तुझी आण वाहणें । हें आत्मलिंगातें शिवणें । प्रीतीची जाति लाजणें । आठवों नेदी ६९ एऱ्हवीं वेद्यु निष्प्रपंचु। जेणें विश्वाभासु हा साचु। आज्ञेचा नटनाचु। काळातें जिणें १३७० तो देवो मी सत्यसंकल्पु। आणि जगाच्या हितीं बापु। मी आणेचा आक्षेपु। कां करावा ७१ परी अर्जुना तुझेनि वेधें। मियां देवपणाचीं बिरुदें। सांडिलीं गा मी औधें। सगळेनि तुवां ७२ पैं काजा आपुलिया। रावो आपुली आपणया। आण वाहे धनंजया। तैसें हें कीं ७३ तेथ अर्जुनु म्हणे देवें। अचोट हें न बोलावें। जे आमचें काज नांवें। तुझेनि एके ७४ यावरी सांगों बैससी । कां सांगतां भेषही देसी । या तुझिया विनोदासी। पारु आहे जी ७५ कमळवना विकाशु। करी रवीचा एक अंशु। तेथ आघवाचि प्रकाशु । नित्य देतो ७६ पृथ्वी निवऊनि सागर। भरीजती येवढें थोर। वर्षे तेथ मिषांतरें। चातकु कीं ७७ म्हणौनि औदार्या तुझेया । मज निमित्त ना म्हणावया । प्राप्ति असे दानीराया। कृपानिधी ७८ तंव देवो म्हणती राहें। या बोलाचा प्रस्तावो नोहे । पैं मातें पावसी उपायें। साचचि येणें ७९ सैंधव सिंधू पडलिया। जो क्षणु धनंजया। तेणें विरेचि कीं उरावया। कारण कायी १३८० तैसें सर्वत्र मातें भजतां । सर्व मी होतां अहंता। निःशेष जाऊनि तत्त्वता। मीचि होसी ८१ एवं माझिये प्राप्तीवरी। कर्मालागोनि अवधारीं। दाविली तुज उजरी। उपायांची ८२ जे आधीं तंव पांडुसुता। सर्व कर्में मज अर्पितां। सर्वत्र प्रसन्नता। लाहिजे माझी ८३ पाठीं माझ्या इये प्रसादीं। माझें ज्ञान जाय सिद्धी। तेणें मिसळिजे त्रिशुद्धी। स्वरूपीं माझ्या ८४ मग पार्था तिये ठायीं। साध्य साधन होय नाहीं। किंबहुना

पणा नाहींसा होऊन देव भक्ताचा (माझा व तुझा) एकांत झालेला पहाशील. ६२ मग वाटेल त्या स्थितींत पाहिजे त्या वेळेस मी तुला व तूं मला भोगशील, असें अर्सेंत व सहज सुख वाढेल. ६३ आणि अर्जुना, तिसरेपणा (जगभाव) आडवा येतो, तो नाहींसा झाला म्हणजे तूं माझाच आहेस, म्हणून मला प्राप्त होशील. ६४ जलाचा नाश झाल्यावर जलांतील प्रतिबिंबाला मूळबिंबास येऊन मिळण्यास कांहीं हरकत होते काय? ६५ तसेंच, वारा आकाशास किंवा लाटा समुद्रास मिळण्यास कोणाची अडचण असते काय? ६६ म्हणून देहभेदामुळें तूं आणि मी हा जो भेद दिसतो आहे, तो भेद नाहींसा झाल्यावर तूं मद्रूप होशील. ६७ या माझ्या बोलण्याविषयीं खरें किंवा खोटें अशी शंका घेऊं नको; यांत जर कांहीं फरक पडला तर तुझीच शपथ. ६८ परंतु अशी कल्पना करशील कीं, तुझी आण वाहिली म्हणजे मी मोकळाच राहून परिणाम तुझ्यावर होईल, तर असें नाहीं. तुझी शपथ वाहणें म्हणजे केवळ आपल्या आत्मलिंगास हात लावणेंच होय. परंतु भीतीची जातच अशी आहे कीं, मनुष्यास कसलीही लाज वाटत नाहीं. ६९ ज्याचे बोलण्याचा कोणीच विश्वास मानीत नाहीं, त्यांनाच शपथ वाहण्याचा प्रसंग येतो. परंतु भगवान् असे आहेत कीं, ज्यांना सर्व वेद जाणतात, व जे निर्भेद आहेत, व ज्यांच्या सत्तेनें हा सर्व जगदाभास दिसतो, व ज्यांच्या आज्ञेची अशी शक्ति आहे कीं, ती काळालाही जिंकिते, १२७० तो मी देव, सत्यसंकल्प असून जगाच्या हिताविषयीं बापाप्रमाणें कळकळ बाळगणारा आहे, त्या मी शपथ वाहण्याची खटपट कां करावी? ७१ परंतु अर्जुना, तुझा जो मला अतिशय छंद लागला आहे, त्यायोगानें मी आपलें देवपणाचें ब्रीद टाकून भक्त झाल्यामुळें अर्धा आहे व तुला माझा छंद लागून तूं मद्रूप झाल्यामुळें तूं सगळा आहेस. ७२ हे धनंजया, राजाही आपल्या कार्याकरितां जशी प्रधानादि आपले पदरचे मंडळीबरोबर त्यांचा आपल्यावर विश्वास बसण्याकरितां आपली शपथ आपण वाहतो, तसा हा प्रकार होय. ७३ त्या वेळेस अर्जुन म्हणाला कीं, हे देवा, हें आचाट बोलणें बोलावयाचें प्रयोजन नाहीं. केवळ तुमच्या नामस्मरणानेंच आमचीं सर्व कार्यें सिद्धीस जातात, ७४ असें असतां यावर आपण सांगतां आणि त्यामध्यें शपथही वाहतां, या आपल्या विनोदाला कांहीं पार आहे काय? ७५ कमलवनाला सूर्याचा यत्किंचित् प्रकाश जरी प्राप्त झाला, तरी तें एकदम विकसित होतें; पण सूर्य इतका उदार आहे कीं, त्याला विकसित करण्यासाठीं नित्य सर्वच प्रकाश देतो. ७६ चातकांच्या तृषा तृप्त करण्याकरितां म्हणून मेघ वृष्टी करतो, परंतु त्यामध्यें पृथ्वी संपूर्ण जलानें परिपूर्ण करून जलाच्या ओघानें समुद्राचीही भरती होते, एवढें त्याच्या औदार्याचें सामर्थ्य आहे. ७७ म्हणून हे कृपानिधे, तुमच्या औदार्याला सीमा नाहीं; परंतु मला निमित्तमात्र करून जगदोद्धार होण्याकरितां आपण हें एवढें ज्ञान सांगितलें. ७८ तेव्हां देव म्हणाले कीं, आतां ही तुझी स्तुति पुरे कर. परंतु तुला जो उपाय सांगितला, या उपायानें तूं खरोखर मद्रूप होशील. ७९ हे धनंजया, मीठ समुद्रांत पडल्यावर जो जो क्षण जाईल, तो तो तें विरेल, परंतु उरण्याचें कांहीं कारण आहे काय? ११८० तसें सर्वप्रकारें सर्वत्र माझें भजन केलें असतां सर्वत्र मीच आहें, अशी तुझी बुद्धि झाली म्हणजे अहंकार समूळ नाहींसा होऊन तूं मद्रूप होशील. ८१ या प्रकारें, कर्मापासून ज्ञानानें माझी प्राप्ति होईपर्यंतच उपायांचे प्रकार स्पष्टपणें तुला सांगितले. ८२ हे पांडुसुता, अगोदर सर्व कर्में ईश्वरार्पण करावीं, म्हणजे सर्व ठिकाणीं माझी प्रसन्नता प्राप्त होते. ८३ मग माझ्या प्रसादानें माझें ज्ञान त्यास प्राप्त होतें व त्या ज्ञानानें माझ्या शुद्ध स्वरूपामध्यें सत्य सत्य तो मिळून जातो. ८४ मग पार्था,

१ भ्रम. २ जगभाव. ३ प्रतिबंध. ४ गेलें. ५ शेवटीं. ६ प्रतिबिंब. ७ प्रतिबंध. ८ आकाशास. ९ लाटा. १० अडचण. ११ निरनिराळ्या शरीरांनीं. १२ अभाव समयीं. १३ करूं नको. १४ दुसरें असेल तर. १५ आत्मस्वरूपाला. १६ लज्जा. १७ निर्भेद. १८ जगदाभास, हें सर्व दृश्य जग १९ सत्तेचा प्रताप. २० जिंकतो. २१ सफलसंकल्पी. २२ कल्याणाविषयीं समर्थ. २३ तर मग, त्यापेक्षां २४ शंका २५ छंदानें. २६ चिन्हें. २७ अर्धा. २८ मळलेंच. २९ वचन, शपथ. ३० मौजेस, कौतुकास. ३१ किरण. ३२ निमित्त. ३३ उदारपणाला. ३४ धर्मात्मराजा, महात्म्या. ३५ प्रसंग. ३६ मीठ. ३७ प्राप्तीपर्यंत. ३८ सोज्वल प्रकार, ३९ नंतर.

संगती । सोनें जालया पुढती । न शिविजे मळें ८ हें असो काष्ठापासोनी । म-
थूनि घेतलिया वन्ही । मग काष्ठेंही कोंडोनी । न ठके जैसा ९ अर्जुना काय
दिनकरु । देखत आहे अंधारु । कीं प्रबोधीं होय गोचरु । स्वप्नभ्रमु १४१०
तैसें मजसीं एकवटलेया । मी सर्वरूप वांचूनियां । आन कांहीं उरावया ।
कारण असे ११ म्हणौनि तयाचें कांहीं । चिंतीना आपुल्या ठाईं । तुझें पाप
पुण्य पाहीं । मीचि होईन १२ तेथ सर्वबंधलक्षणें । पापें उरावें दुजेपणें । तें
माझ्या बोधीं वांयाणें । होऊनि जाईल १३ जळीं पडिलिया लवणा । सर्वही
जळ होय विचक्षणा । तुज मी अनन्यशरणा । होईन तैसा १४ येतुलेनि
आपैसया । सुटलाचि आहासी धनंजया । घेईं मज प्रकाशोनियां । सोडवीन
तूतें १५ याकारणें पुढती । हे आंधी न वाहे चित्तीं । मज एकासि ये सुमती ।
जाणोनि शरण १६ ऐसें सर्वरूपेंरूपसें । सर्वदृष्टिडोळसें । सर्वदेशनिवासें । बो-
लिलें श्रीकृष्णें १७ मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु । आलिंगिला
स्वशरणु । भक्तराजु तो १८ न पवतां जयातें । काखे सूनि बुद्धीतें । बोलणें
मागौतें । वोसरलें १९ ऐसें जें कांहीं येक । बोला बुद्धीसिही अटक । तें द्या-
वया मिष । खेवांचें केलें १४२० हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें ते हृ-
दयीं घातलें । द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना २१ दीपें दीपु ला-
विला । तैसा परिष्वंगु तो जाला । द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु २२
तेव्हां सुखाचा मग तया । पूरु आला जो धनंजया । तेथ वाडु तन्ही बुडो-
नियां । ठेला देवो २३ सिंधु सिंधूतें पावों जाये । तें पावणें ठाके दुणा होये ।
वरी रिगे पुरवणिये । आकाशही २४ तैसें तयां दोघांचें मिळणें । दोघां नावरे
जाणावें कवणें । किंबहुना श्रीनारायणें । विश्व कोंदलें २५ एवं वेदाचें मूळसूत्र ।
सर्वाधिकारैकपवित्र । श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें २६ येथ गीता मूळ
वेदां । ऐसें केवीं पां आलें बोधा । हें म्हणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति सांगों २७
तरी जयाच्या निश्वासीं । जन्म झाले वेदराशी । तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं । बो-
लिला स्वमुखें २८ म्हणौनि वेदां मूळभूत । गीता म्हणों हें होय उचित । आ-
णिकही येकी येथ । उपपत्ति असे २९ जें न नशतु स्वरूपें । जयाचा विस्तारु
जेथ लपे । तें तयाचें म्हणिपे । बीज जगीं १४३० तरी कांडत्रयात्मकु । श-
ब्दराशी अशेखु । गीतेमाजीं असे रेखु । बीजीं जैसा ३१ म्हणोनि वेदांचें बीज ।

स्पर्शानें सोनें झाल्यावर पुनः मातींत पुरून ठेविलें तरी त्याला तांबे चढत नाहीं. ८ फार काय! काष्ठमथून काढिलेला अग्नि पुनः जरी लांकडाचे पेटींत कोंडून ठेवला तरी तींत जसा रहात नाहीं; ९ अर्जुना; सूर्याला जरी अंधार भेटत नाहीं, किंवा जागे झाल्यावर स्वप्न दृष्टीस पडत नाहीं, १४१० तसें माझ्याशीं ऐक्य पावल्यावर सर्वरूप असा जो मी, त्या माझ्यावांचून दुसरें कांहीं उरव्यास कारण आहे काय? ११ याकरितां, पापपुण्यांची किंवा धर्माधर्माची चिंता करूं नको. तुझें पाप व पुण्य मीच होईन, समजलास! १२ सर्व बंध देणारें असें जें पाप, त्याचें हेंच लक्षण होय की, माझ्याहून भिन्नपणानें उरणें, तें पाप माझ्या ज्ञानानें नाश पावेल. १३ हे विचारशीला अर्जुना, उदकांत मीठ पडलें म्हणजे आपण नाहींसें होऊन सर्व जलरूप होतें, त्याप्रमाणें तूं अनन्यभावानें मला शरण आलास म्हणजे मद्रूपच होशील. १४ हे धनंजया, या योगानें तूं आपोआप सर्व बंधांपासून सुटशील, याकरितां मला जाणून तूं माझी प्राप्ति करून घे म्हणजे मग मी सर्व बंधांपासून तुला मुक्त करीन. १५ म्हणून हे सुमते, धर्माधर्माची चिंता मनांत ठेवूं नको. एक अद्वितीय जो मी, त्या मला जाणून शरण ये, म्हणजे झालें. १६ याप्रमाणें, सर्व रूपांचें रूप, सर्व दृष्टींची दृष्टि व सर्व देशांचें वसतिस्थान असे जे श्रीकृष्ण भगवान्, ते बोलले. १७ मग श्यामसुंदर मूर्ति जे श्रीकृष्ण भगवान्, त्यांनी आपला भूषणयुक्त उजवा हात पुढें करून, आपल्यास शरण आलेला जो भक्तराज अर्जुन, त्याला आलिंगन दिलें. १८ ज्या स्वरूपाला प्राप्त न होतां शब्द व बुद्धि कांस मागें ओढून बोलणें माघारी फिरलें, १९ असें जें बुद्धीला व शब्दाला आकलन न होणारें स्वरूप तें स्वरूप देण्याकरितां देवांनी आलिंगनाचें निमित्त केलें.

१४२० अर्जुनाचें व आपलें हृदय देवांनी मिळवून आपलें हृदयांतील ज्ञान त्याचें हृदयांत घातलें, आणि देवभक्तांचें द्वैत न मोडतां अर्जुनास आत्मरूप केलें. २१ एका दिव्यानें दुसरा दिवा लावल्यावर जसें द्वैत कायम राहून ऐक्य मोडत नाहीं, तसा प्रकार या आलिंगनाचा होऊन द्वैत न मोडतां पार्थाला आपलेपणा दिला. २२ मग; त्या वेळेस अर्जुनाला त्या आनंदाचे सुखाचा जो पूर आला, त्या पुरांत भगवान सर्वव्यापक आहेत, तरी तेही बुडून गेले! २३ समुद्रास समुद्र मिळाल्यावर पाणी दुप्पट वाढून पुरवणीला आकाश घ्यावें लागतें, २४ तसें श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या आलिंगनाचें प्रेम दोघांनाही आंवरेना, तें कोणी जाणावें! फार काय सांगावें! सर्व विश्व नारायणरूप होऊन गेलें. २५ याप्रमाणें, वेदांचें मूळसूत्र आणि ज्याच्या श्रवणपठणाचा सर्वांना अधिकार आहे, असें पवित्र हें गीताशास्त्र श्रीकृष्णांनी प्रगट केलें. २६ या ठिकाणीं गीताशास्त्र हें वेदांचें मूळ आहे, असें कसें तुमचे बोधास आलें असें म्हणाल, तर ज्या कारणानें आमचे बोधास आलें तें प्रसिद्ध कारण सांगतों, असें महाराज म्हणाले. २७ तर, ज्या ईश्वराच्या श्वासोच्छ्वासापासून वेद निघाले, तो सत्यप्रतिज्ञ ईश्वर स्वमुखानें प्रतिज्ञा करून गीताशास्त्र बोलला. २८ या कारणास्तव गीताशास्त्र हें वेदांचें मूळ आहे, हें म्हणणें योग्य आहे; व याविषयीं आणखीही एक कारण आहे; २९ जें वृक्षरूपानें नसून त्याचा विस्तार जेथें अंतर्गत असतो, तें त्या झाडांचें बीज अशी जगांत म्हण आहे. १४३० जसा वृक्ष बीजामध्यें गुप्तरूपानें असतो; तसा त्रिकांडवेद (कर्म, उपासना व ज्ञान) गीतेमध्यें गुप्तरूपानें आहे, ३१ म्हणून, वेदांचें बीज गीता आहे असें मला वाटतें;

१ पुनः. २ न राहे. ३ जागृतींत. ४ प्रलय. ५ चिंता नको. ६ सर्वथैव बंधाला कारण असा. ७ व्यर्थ. ८ हे सुज्ञा. ९ स्पष्ट करून, जाणून. १० मनोव्यथा. ११ सर्व रूपें ज्याच्या योगानें रूपवान होतात असा. १२ पुढें केलेला. १३ उजवा. १४ केवळ आपल्यालाच शरण आलेला. १५ ज्या वस्तूची प्राप्ति न होतां बोलणें, बुद्धीला कांसेस मारून मागेंते-मागें हटतें अशी जी, वस्तु.

१६ मागें हटलें. १७ प्राप्त न होणारें. १८ आलिंगनाचें निमित्त केलें. १९ देवांचे देह तसेंच असतां. २० आलिंगन. २१ मोठा. २२ पूर्तता करण्यास, साहाय्यास. २३ भरलें. २४ अति गुह्य असून सर्वांना जेथें अधिकार आहे असें. २५ सयुक्तिक कारण. २६ श्वासोच्छ्वासांपासून. २७ प्रतिज्ञेवर. २८ कारण. २८ नाश न होतां. २९ कर्म-उपासना-ज्ञानरूप. ३० वेद. ३१ झाड.

श्रीगीता होय हें मज। गमे आणि सहज। दिसतही आहे ३२ जे वेदांचे तिन्ही भाग। गीते उमटले असती चांग। भूषणरत्नीं सर्वांग। शोभलें जैसें ३३ तियेंचि कर्मादिकें तीन्हीं। कांडें कोणकोणे स्थानीं। गीते आहाति तें नयनीं। दाखऊं आईक ३४ तरी पहिला जो अध्यावो। तो शास्त्रप्रवृत्तिप्रस्तावो। द्वितीयीं सांख्यसद्भावो। प्रकाशिला ३५ मोक्षदानीं स्वतंत्र। ज्ञानप्रधान हें शास्त्र। येतुलालें दुजीं सूत्र। उभारिलें ३६ मग अज्ञानें बांधलेयां। मोक्षपदीं बैसावया। साधनारंभु तो तृतीया-। ध्यायीं बोलिला ३७ जे देहाभिमानबंधें। सांडूनि काम्यनिषिद्धें। विहित परी अप्रमादें। अनुष्ठावें ३८ ऐसेनि सद्भावें कर्म करावें। हा तिजा अध्यावो जो देवें। निर्णय केला तें जाणावें। कर्मकांड येथ ३९ आणि तेंचि नित्यादिक। अज्ञानाचे आवश्यक। आचरतां मोचक। केवीं होय पां १४४० ऐसी अपेक्षा जालिया। बद्ध मुमुक्षुते आलिया। देवें ब्रह्मार्पणत्वें क्रिया। सांगीतली ४१ जे देहवाचामानसें। विहित निपजे जें जैसें। तें एक ईश्वरोद्देशें। कीजे म्हणीतलें ४२ हेंचि ईश्वरीं कर्मयोगें। भजनकथनाचें खाँगें। आदरिलें शेषभागें। चतुर्थाचेनी ४३ तें विश्वरूप अकरावा। अध्यायो संपे जंव आघवा। तंव कर्मे ईशु भजावा। हें जें बोलिलें ४४ तें अष्टाध्यायीं उघड। जाण येथें देवताकांड। शास्त्र सांगतसे आंड। मोडूनि बोले ४५ आणि तेणेंचि ईशप्रसादें। श्रीगुरुसंप्रदायलब्धें। सौच ज्ञान उद्बोधें। कोंवळें जें ४६ तें अद्वेष्टादिप्रभृतिकीं। अथवा अमानित्वादिकीं। वाढविजे म्हणोनि लेखीं[14]। बारावा गणूं ४७ तो बारावा अध्याय आदी। आणि पंधरावा अवधी। ज्ञानफळपाकसिद्धी। निरूपणासी ४८ म्हणौनि चहूंही इहीं। ऊर्ध्वमूळांतीं अध्यायीं। ज्ञानकांड ये ठायीं। निरूपिजे ४९ एवं कांडत्रयनिरूपणीं। श्रुतीचि हे कोडिसवाणी। गीतापद्यरत्नांचीं लेणीं। लेयिली आहे १४५० हें असो कांडत्रयात्मक। श्रुति मोक्षरूप फळ येक। बोभावे जें आवश्यक। ठाकावें म्हणौनि ५१ तयाचेनि साधन ज्ञानेंसीं। वैर करी जो प्रतिदिवशीं। तो अज्ञानवर्ग षोडशीं। प्रतिपादिजे ५२ तोचि शास्त्राचा बोळावा। घेवोनि वैरी जिणावा। हा निरोपु तो सतरावा। अध्याय येथ ५३ ऐसा प्रथमालागोनी। सतरावा लौणी करूनी। आत्मनिश्वास विवरूनि। दाविला देवें ५४ तया अर्थजातां अशेषां। केला तात्पर्याचा

व उघड दिसतही आहे. ३२ जसें अंग रत्नांनीं सुशोभित दिसतें, तशीं वेदांचीं तीन कांडें गीतेमध्यें स्पष्ट केलीं आहेत. ३३ तीं वेदांचीं कर्मादिक तीन कांडें गीतेमध्यें कोणकोणते ठिकाणीं वर्णिलीं आहेत, तीं डोळ्यांनीं दिसतील अशीं दाखवितों, तीं ऐका; ३४ पहिला अध्याय गीताशास्त्र केव्हां व कां प्रवृत्त झालें याच्या प्रस्तावनेकरितां आहे. दुसऱ्या अध्यायांत सांख्यविचार म्हणजे ज्ञानविचार प्रकट केला. ३५ जें ज्ञान मोक्ष प्राप्त करून देण्याविषयीं दुसऱ्याची म्हणजे कर्मादिकांची अपेक्षा न करितां स्वतंत्र आहे; इतक्याच गोष्टीचा द्वितीय अध्यायांत सूत्ररूपानें आरंभ केला आहे. ३६ मग स्वस्वरूप अज्ञानाच्या योगानें बंधांत सांपडलेला पुरुष, त्याला मोक्षपदावर बसण्यासाठीं जो धर्मरूपी साधनांचा आरंभ तो तिसऱ्या अध्यायांत सांगितला आहे. ३७ जे देहाभिमानानें बद्ध झाले आहेत, त्यांनीं निषिद्ध व काम्य कर्में टाकून विहित कर्में निरभिमानबुद्धीनें करावीं. ३८ अशा रीतीनें सद्भावानें कर्मांचें आचरण करावें, असा देवांनीं तिसरे अध्यायांत निर्णय केला आहे. म्हणून या अध्यायाला कर्मकांड असें म्हणावें. ३९ त्या नित्यनैमित्तिक कर्मांचें आचरण केलें असतां, तीं अज्ञानाचा कसा नाश करतील, १४४० अशी इच्छा होऊन बद्ध हा मुमुक्षुत्वाच्या पायरीला आला, तर त्याच्याकरितां, तींच सर्व कर्में ब्रह्मार्पणबुद्धीनें करावीं, असें देवांनीं सांगितलें. ४१ जीं जीं विहितकर्में (कायिक, वाचिक व मानसिक) करशील, तीं सर्व कर्में ईश्वरप्रसन्नतेकरतांच करून ईश्वरार्पण कर, असें सांगितलें. ४२ ईश्वराचे ठायीं कर्मयोगानें भजन व कथन करण्याचा प्रकार चौथ्या अध्यायाचे शेवटीं सांगण्याचा आरंभ केला आहे. ४३ तो प्रकार, अकरावा विश्वरूपाध्याय संपेपर्यंत, कर्में ईश्वरास अर्पून ईश्वराचें भजन कसें करावें, हें सांगितलें आहे. ४४ तेंच चौथ्या अध्यायापासून अकराव्या अध्यायांपर्यंत आठ अध्यायांत उपासनाकांड (देवताकांड) सर्व अडचणी दूर करून येथें सांगितलें आहे. ४५ आणि ईश्वरप्रसादानें व श्रीगुरुसंप्रदायानें कोमल असें खरें ज्ञान उत्पन्न होतें, ४६ तें ज्ञान बाराव्या अध्यायामध्यें "अद्वेष्टा सर्वभूतानां" या श्लोकापासून अथवा तेराव्या अध्यायांतील "अमानित्वम्" इत्यादि श्लोकापासून विस्तारानें सांगितलें आहे. म्हणून बारावा अध्याय हा ज्ञानकांडांतच धरिला आहे. ४७ त्या बाराव्या अध्यायाचे आरंभापासून पंधराव्या अध्यायाचे अखेरपर्यंत चार अध्यायांत ज्ञानफल आणि त्याची सिद्धि यांचें निरूपण झालेलें आहे. ४८ म्हणून, पंधराव्या अध्यायाच्या शेवटापर्यंत या चार अध्यायांनीं येथें ज्ञानकांड सांगितलें आहे. ४९ अशा प्रकारें, कर्म, उपासना व ज्ञान या कांडत्रयाचें निरूपण करणारी ही गीता, गीता नसून एक लहानशी गोजिरवाणी श्रुतीची मूर्तीच आहे; आणि ती गीतापदरूप रत्नांचीं लेणीं ल्यालीं आहे. १४५० हें असो; अशी जी ही कांडत्रयात्मक श्रुति, ती मोक्षरूप एकच फळ अवश्य द्या, असा डांगोरा पिटीत आहे. ५१ त्या ज्ञानाच्या साधनांचा सदैव वैर करणारा जो अज्ञानवर्ग, तो सोळाव्या अध्यायांत सांगितला आहे. ५२ त्याच शत्रूला शास्त्राचे साह्यानें जिंकावा, अशी आज्ञा ज्या अध्यायांत केली आहे, तो सतरावा अध्याय होय. ५३ अशा प्रकारें पहिल्या अध्यायापासून सतराव्या अध्यायाचे अखेरपर्यंत, आपले श्वासापासून झालेल्या वेदाचें देवांनीं निरूपण केलें आहे. ५४ त्या सर्व अध्यायांचा तात्पर्यार्थ ज्या अठराव्यांत आहे, तो हा शेवटील अध्याय सर्व

१ वाटे. २ अशा प्रकारें. ३ निरभिमान बुद्धीनें. ४ सोडविणारें. ५ प्रश्न, आशंका. ६ मोक्षेच्छु स्थितीला. ७ ठिकाण. ८ आठ अध्यायांत. ९ उपासनाकांड. १० प्रतिबंध निवारून. ११ प्राशीनें. १२ खरें. १३ प्रकाशे. १४ गणनेंत. १५ पंधराव्या. १६ लहानशी. १७ गर्जून सांगते. १८ सोवती. १९ जिंकावा. २० शेवट. २१ वेद, वेद हे प्रभूच्या निःश्वासापासून झाले.

ओवांका । तो हा अठरावा देखा । कळशाध्यायो ५५ एवं सकळसांख्यसिंधु । श्रीभगवद्गीताप्रबंधु । हा औदार्यें आगळा वेदु । मूर्तु जाण ५६ वेदु संपन्नु होय ठाईं । परी कृपणु ऐसा आनु नाहीं । जे कानीं लागला तिन्हीं । वर्णांच्यांची ५७ येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । अनवसरू मांडूनियां । राहिला आहे ५८ तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेदु वेठला भलतेणें । सेव्य होआवया ५९ ना हें अर्थु रिगोनि मनीं । श्रवणें लागोनि कानीं । जपमिषें वदनीं । वसोनियां १४६० ये गीतेचा पाठु जो जाणे । तयाचेनि सांगातीपणें । गीता लिहोनि वाहाणें । पुस्तकमिषें ६१ ऐसैसा मिसकैटा । संसाराचा चोहटां । गवादी घालीत चोखटा । मोक्षसुखाची ६२ परी आकाशीं वसावया । पृथ्वीवरी बैसावया । रविदीप्ती राहाटावया । आवारु नभ ६३ तेवीं उत्तम मध्यम ऐसें । सेवितां कवणातेंही न पुसे । कैवल्यदानें सरिसें । निववीत जगा ६४ यालागीं मागिली कुटी । भ्याला वेदु गीतेच्या पोटीं । रिगाला आतां गोमटी । कीर्ति पातला ६५ म्हणौनि वेदाची सुसेव्यता । ते हे मूर्त जाण श्रीगीता । श्रीकृष्णें पांडुसुता । उपदेशिली ६६ परी वत्साचेनि वोरसें । दुभतें होय घरोदेशें । जालें पांडवाचेनि मिषें । जगदुद्धरण ६७ चातकाचिये कणवे । मेघु पाणियेसि धांवे । तेथ चराचर आघवें । निवालें जेवीं ६८ कां अनन्यगतीकमळा- । लागीं सूर्य ये वेळोवेळां । कीं सुखिया होइजे डोळां । त्रिभुवनींचा ६९ तैसें अर्जुनाचेनि व्याजें । गीता प्रकाशूनि श्रीराजें । संसारायेवढें थोर ओझें । फेडिलें जगाचें १४७० सर्वशास्त्ररत्नदीप्ती । उजळिता हा त्रिजगतीं । सूर्यु नव्हे लक्ष्मीपती । वक्त्रांकाशींचा ७१ बाप कुळ तें पवित्र । जेथिंचा पार्थु या ज्ञाना पात्र । जेणें गीता केलें शास्त्र । आवारु जगा ७२ हें असो मग तेणें । सद्गुरु श्रीकृष्णें । पार्थाचें मिसळणें । आणिलें द्वैतां ७३ पाठीं म्हणतसे पांडवा । शास्त्र हें मानलें कीं जीवा । तेथ येरु म्हणे देवा । आपुलिया कृपा ७४ तरी निधान जोडावया । भाग्य घडे गा धनंजया । परी जोडिलें भोगावया । विपायें होय ७५ पैं क्षीरसागरायेवढें । अविरजी दुधाचें भांडें । सुरां असुरां केवढें । मथितां जालें ७६ तें सायासही फळा आलें । जें अमृतही डोळां देखिलें । परी वरिचिली चुकलें । जतनेतें ७७ तेथ अमरत्वा वोगरिलें । तें मरणाचिलागीं जालें । भोगों नेणतां जोडलें । ऐसें आहे ७८ नहुषु स्वर्गाधिपति जाहला ।

अध्यायांचा कळस आहे. ५५ अशा प्रकारें, सातशें श्लोकांच्या संख्येनें सिद्ध झालेला हा श्रीमद्भगवद्गीताप्रबंध मूर्तिमंत वेद असून औदार्यानें वेदाहीपेक्षां श्रेष्ट आहे. ५६ वेद संपन्न खरा, परंतु त्याच्यासारखा कृपण दुसरा कोणी नाहीं. कारण तो ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांच्याच कानीं लागला. (त्यांनाच आपलें हृद्गत कानांत सांगतो.) ५७ यांशिवाय जे स्त्रीशूद्रादिक जीव संसारव्यथेनें पीडित झालेले आहेत, त्यांचा विचार होण्याला सवडच नाहीं असें म्हणून तो स्वस्थ बसला आहे. ५८ तर महाराज म्हणतातः—मला असें दिसतें की, तो आपला मागील उणेपणा जाऊन, आपल्यास सत्कीर्ति मिळावी या हेतूनें, वाटेल त्यानें, आपलें सेवन करावें, म्हणून हा वेदच गीतारूपानें प्रकट झाला आहे. ५९ कारण असें पहा–वेद सुलभ झाला नाहीं का? हां कीं तो अर्थानें मनांत प्रवेश करितो, श्रवणमिषानें कानांत शिरतो व जपमिषानें मुखांत राहतो. १४६० किंवा या गीतेचा जो नित्य पाठ करणाराच्या संगतीनें असतो, अथवा पुस्तकांच्या मिषानें गीता लिहून लोकांस देतो; ६१ अशा प्रकारें प्राणिमात्रास सरसकट संसारबाजारांत मोक्षसुखाचें सदावर्त घालतो; ६२ आकाशांत वास करण्याकरितां, पृथ्वीवर बसण्याकरितां अथवा सूर्याचे दीप्तीचा व्यवहार होण्याकरितां ज्याप्रमाणें आकाश सर्वांना आधार आहे. ६३ त्याप्रमाणें, गीतेचें सेवन करणारांस उत्तम; अधम ही निवड न करितां सरसकट त्या सर्वांना मोक्षपद देऊन सर्व जगाला ती सुखी करिते. ६४ एवढ्याकरितां, आपल्या मागल्या निंदेला भ्यालेला वेद गीतेच्या पोटांत शिरल्यामुळें उत्तम कीर्तीला पात्र झाला. ६५ म्हणून वेदांचेंही सुसेवन करण्यास योग्य अशी ही मूर्तिमान गीता स्वतः श्रीकृष्णांनीं पांडुसुत अर्जुन याला सांगितली. ६६ परंतु वांसराचे प्रीतीकरितां सर्व घरादाराला गाईच्या दुधाचें सुख मिळतें, त्याप्रमाणें अर्जुनाच्या निमित्तानें सर्व जगाचा उद्धार झाला. ६७ चातकाची कळकळ मनांत वाळगून मेघ पाण्याची वृष्टि करितो, त्या वृष्टीनें सहज सर्व जगाचें जसें सांत्वन होतें; ६८ अथवा एकनिष्ट जें कमल, त्याला प्रफुल्लित करण्याकरितां वारंवार सूर्य उदयास येतो. परंतु तेवढ्यानें त्रिभुवनांतील सर्व प्राण्यांचे डोळ्यांना प्रकाश मिळाल्यामुळें सुख होतें. ६९ या न्यायानें श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या मिषानें गीता प्रकाशून जगाचें संसाराएवढें मोठें ओझें हलकें केलें. १४७० सर्वशास्त्ररूपी रत्नाचें तेज या तीन लोकांत प्रगट करणारा लक्ष्मीपती जो श्रीकृष्ण, त्याचें मुख हेंच कोणी आकाश–त्या आकाशामध्यें गीताशास्त्र हा सूर्य उगवला नाहीं काय? ७१ ज्या कुलांत अर्जुनानें जन्म घेतला, व जो या गीताज्ञानाला पात्र होऊन सर्व जगाला ज्यानें गीताशास्त्राचें आधार घातलें, तें कुल धन्य होय. ७२ हें असो; मग सद्गुरु श्रीकृष्णांनीं, पार्थ आपल्या स्वरूपामध्यें मिसळून गेला होता, तो द्वैतभानावर आणिला. ७३ त्यावर अर्जुनास भगवान् म्हणतात कीं, "तुला जें आम्ही गीताशास्त्र सांगितलें, तें तुझ्या मनाला पटलें का, म्हणजे यथार्थ समजलें कां?" तेव्हां अर्जुन म्हणाला हे देवा, "आपल्या कृपेनें समजलें." ७४ भगवान् म्हणतातः–हे धनंजया, भाग्यानें कदाचित् ऐश्वर्याची जोड होते; परंतु जोडलेल्या ऐश्वर्याचा उपभोग कसा घ्यावा हें एकाद्यासच समजतें. ७५ जोडलेलें ऐश्वर्य प्राप्त होऊन कसें नाहींसें होतें, याविषयीं भगवान् उपपत्ति सांगतात की, जसें क्षीरसागराएवढें निर्मळ दुधाचें भांडें मंथन करण्याला देवदैत्यांना किती श्रम पडले! ७६ त्या श्रमाचें फळ जें अमृत, तेंही प्राप्त झालें; परंतु तें जतन करण्याची त्यांची हातोटी चुकली. ७७ अमर व्हावें म्हणून अमृत प्राप्त करून घेतलें, तों तेंच राहू दैत्यास मरणास कारण झालें; तर भोग कसा घ्यावा ही युक्ति जर कळली नाहीं, तर जोडलेल्याचा असा परिणाम होतो. ७८ नहुष राजा यज्ञादिक कष्टमय आचरण करून

१ विचार. २ शिखररूप. ३ प्रकृति पुरुषांचें विवेचन ज्यानें केलें तो सांख्यसिद्ध. ४ श्रीभगवद्गीता ग्रंथ. ५ समक्ष. ६ समर्थ. ७ अनुदार. ८ पीडित झालेले. ९ वर्णें. १० मला (ज्ञानदेवाला) असें वाटतें कीं. ११ आकाराला. १२ वाटेल त्यानें. १३ नव्हे काय? १४ मंत्रसहित. १५ चवाठ्यावर. १६ सत्र. १७ फिरण्याला. १८ अवकाश. १९ मोक्षदानानें. २० मागल्या निंदेला भ्याला. २१ सेवन करण्यास योग्य. २२ पान्हावून, ममतेनें. २३ दयेनें. २४ पाण्यासहित. २५ शांत झाले. २६ एकनिष्ट अशा कमळासाठीं. २७ दूर केलें. २८ तेज. २९ मुखरूप आकाशांचा ३० मोंवतालची भिंत. ३१ स्वरूपामध्यें मिळून जाणें. ३२ भेददशा. ३३ गुप्तधन. ३४ क्वचित्. ३५ न विरजलेलें. ३६ धाडस. ३७ हातोटी, युक्ति. ३८ व्यवस्थेला. ३९ वाढिलें. ४० नहुष राजाला कांहीं दिवस स्वर्गाचें आधिपत्य मिळालें.

परी राहाटी भांबावला । तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी ७९ म्हणौनि बहुत पुण्य तुवां । केलें तेणें धनंजया । आजि शास्त्रराजा इया । जालासि विषयो १४८० तरी ययाचि शास्त्राचेनी । संप्रदायें पांघुरौनी । शास्त्रार्थु हा निकेनी । अनुष्ठीं हो ८१ एऱ्हवीं अमृतमथना- । सारिखें होईल अर्जुना । जरी रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ८२ गाय धड जोडे गोमटी । ते तैंचि पिवों ये किरीटी । जैं जाणिजे हातवटी । सांजवणीची ८३ तैसा श्रीगुरु प्रसन्नु होये । शिष्य विद्याही कीर लाहे । परी ते फळे संप्रदायें । उपासिलिया ८४ म्हणौनि शास्त्रीं जो इये । उचितु संप्रदायो आहे । तो ऐक आतां बहुवें । आँदरेंसीं ८५

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन । न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

तरी तुवां हें जें पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था । तें तपोहीना सर्वथा । सांगावें ना हो ८६ अथवा तापसुही जाला । परी गुरुभक्तीं जो ढिला । तो वेदीं अंत्यजु वोंळिला । तैसा वोंळी ८७ नातरी पुरोडाशु जैसा । न घापे वृद्ध तरी वायसा । गीता नेदी तैसी तापसा । गुरुभक्तिहीना ८८ का तपही जोडे देहीं । भजे गुरुदेवांच्या ठायीं । परी आंकर्णनीं नाहीं । चाँड जरी ८९ तरी मागील दोहीं आंगीं । उत्तम होय कीर जगीं । परी या श्रवणालागीं । योग्यु नोहे । १४९० मुक्ताफळ भलतैसें । हो परी मुख नसे । तंव गुंण प्रवेशे । तेथ कायी ९१ सागरु गंभीरु होये । हें कोण ना म्हणत आहे । परी वृष्टि वायां जाये । जाली तेथ ९२ धाँलिया दिव्यान्न सुवावें । मग जें वायां धाडावें । तें आर्ती कां न करावें । उदारपण ९३ म्हणौनि योग्य भलतैसें । होतु परी चाड नसे । तरी झेंणें वोंनिवसें । देसी हें तयां ९४ रूपाचा सुजाणु डोळा । वोढवूं ये कायि परिमळा । जेथ जें माने तें फळा । तेथचि ये गा ९५ म्हणौनि तपी भक्ति । पाहावे ते सुभद्रापती । परी शास्त्रश्रवणीं अनासक्ती । वाळावेचि ते ९६ नातरी तपभक्ती । होऊनि श्रवणीं आर्ती । आथी ऐसीही आँयती । देखसी जरी ९७ तरी गीताशास्त्रनिर्मिता । जो मी सकळलोकशास्ता । तया मातें सामान्यता । बोलेल जो ९८ माझ्या सज्जनेंसि मातें । पैशून्यांचेनि आंव्हातें । येकें आहाती तयांतें । योग्य न म्हण ९९ तयांची येर आघवी । सामग्री ऐसी जाणावी । दीपेंवीण । ठाणदिवी । रात्रीची जैसी १५०० अंग गोरें आणि तरुणें । वरी लेयिलें आहे लेणें । परी येकलेनि प्राणें । सांडिलें जेवीं १ सोनयाचें

स्वर्गाचा अधिपति ( इंद्र ) झाला परंतु तेथील वागणुकीची पद्धत न समजल्यामुळें भांबावून जाऊन सर्पयोनींत गेला हें तुला माहित नाहीं काय ? ७९ यास्तव हे धनंजया, तूं बहुत पुण्य केल्यामुळें, सर्व शास्त्रांचा राजा जें गीताशास्त्र, तें सांगण्यास कारण झालास. १४८० तर या शास्त्राचा जो वागण्याचा संप्रदाय आहे, तो समजून घेऊन मग शास्त्रप्रमाणें त्याचें अनुष्ठान कर हो. ८१ एऱ्हवीं अर्जुना, संप्रदाय सोडून जर त्याचें अनुष्ठान करावयास लागशील, तर अमृतमंथनाप्रमाणें परिणाम होईल. ८२ हे किरीटी, गाय उत्तम मिळाली, तरी तिचें दूध काढण्याची हातोटी माहीत असली, तरच ती दूध देईल; ८३ तसें सद्गुरुही प्रसन्न होतील, व त्यांच्यापासून शिष्याला विद्याही प्राप्त होईल; परंतु संप्रदायानें गुरुसेवा केली तरच ती फळास येईल; ८४ म्हणून हे गीताशास्त्र प्राप्त करून घेण्याचा जो योग्य संप्रदाय आहे, तो मी सांगतों, तो आदरानें ऐक. ८५

**अन्वयार्थ**—(इदं)-हें ज्ञान-(ते)-तूं-(अतपस्काय)-तपश्चर्या न करणाराला-(न वाच्यं)-सांगूं नयेस-( अभक्ताय )-तसेंच जो माझा भक्त नसेल त्याला-(कदाचन)-केव्हांहि-(न) [वाच्यं]-सांगूं नयेस आणि-(अशुश्रूषवे)-जो गुरु, ईश्वर यांची शुश्रुषा करणारा नसेल, त्याला सांगूं नयेस-(च) -आणि-(यः)-जो-(मां)-माझी-( अभ्यसूयति )-अवज्ञा करतो त्याला-(न च) [वाच्यं]-सांगूं नयेस. ६७

हे पार्था, तुला या गीताशास्त्राची आस्थापूर्वक प्राप्ति झाली आहे, तें तपोहीन मनुष्यास कधींही सांगूं नको हो. ८६ अथवा, तापसीही मनुष्य असला, परंतु तो गुरुभक्ति करीत नसेल, तर वेदांनीं जसा अंत्यजाला आपलेंपासून दूर केला आहे, तसा त्याला तूं दूर ठेव. ८७ अथवा; यज्ञाचा अवशिष्ट भाग ( पुरोडास ) जसा कावळा वृद्ध असला, तरी त्यास घालीत नाहीत, तसें हें गीताशास्त्र गुरुभक्ति न करणाऱ्या तापसासही सांगूं नको. ८८ किंवा शरीरानें तपही करीत असून गुरु व देव यांचीही भक्ति जो करितो, परंतु श्रवणाची ज्याला इच्छा नाहीं; ८९ तप व गुरुभक्ति ह्या दोन अंगांनीं जरी तो योग्य आहे, तरी श्रवणाची इच्छा नसल्यामुळें तो गीताशास्त्र ऐकण्यास योग्य नाहीं. १४९० उत्तम मोती असून जर त्यास वेज पाडलें नसेल, तर त्यांत सोन्याचें सूत घालून दागिना करतां येईल कां ? ९१ समुद्र गंभीर आहे, हें कोण नाहीं म्हणेल ? परंतु त्याच्यावर पाऊस पडला असतां तो जसा व्यर्थ जातो; ९२ तृप्त झालेल्या मनुष्याचे पानांत पक्वान्नें वाढून तीं वायां दवडावीं, त्यापेक्षां तींच पक्वान्नें क्षुधित मनुष्यास घालून आपलें औदार्य कां न प्रगट करावें ? ९३ म्हणून, सर्व रीतीनें योग्य असून जर श्रवणाची इच्छा नसेल तर हें गीताशास्त्र मागील दोन गुण पाहून अकस्मात त्यास सांगशील हो. ९४ रूप जाणण्याविषयीं शाहाणा जो डोळा, तो फुलाचा वास घेण्यास योग्य होईल काय ? ज्याची जी योग्यता असेल तेथेंच त्याचा उपयोग होईल. ९५ म्हणून हे सुभद्रापते, तपस्वी, गुरु व देव यांची भक्ति करणारा असूनही जर शास्त्रश्रवणाविषयीं त्यास आवड नसेल, तर त्याचा त्याग करावा, ९६ अथवा तपस्वी व गुरु आणि देव यांची भक्ति करणारा असून शास्त्रश्रवणाची इच्छा आहे, असा मनुष्य सर्व प्रकारें युक्त असलेला जरी तुला आढळला, ९७ तरी सकळ लोकांचें शासन करणारा जो मी, त्या मला साधारण मनुष्याप्रमाणें जो समजेल; ९८ तसेंच, माझी व माझ्या सज्जनांची छिद्रें बाहेर काढून निंदा करतात, तेही हें शास्त्र ऐकण्यास योग्य नाहींत, असें समज. ९९ त्यांची इतर सर्व सामुग्री कशी आहे म्हणशील, तर रात्री दिव्याचे ज्योतीशिवाय तेलवातीनें भरलेली ठाणवई जशी व्यर्थ होय; १५०० ज्याप्रमाणें एकादा तरुण मनुष्य गोरापान असून व त्याचे अंगावर दागिनेही घातलेले असून जर त्यांत जीव नसेल, १ सोन्याचे

१ वतर्णुकीच्या पद्धतींत चुकला. २ या गीतेला. ३ धारण करून. ४ चांगल्या रीतीनें ५ दूध देतें. ६ दोहण्याची. ७ आस्थापूर्वक. ८ ईशभक्ति विहिताला. ९ कधीं. १० दूर केला. ११ टाक. १२ यज्ञाचा अवशेष चरू. १३ श्रवणीं. १४ इच्छा १५ तप व गुरुभक्ति या दोन्ही अंगांनीं. १६ मोतीं. १७ दोरा. १८ तृप्तीला. १९ वाढावें. २० दवडावें. २१ क्षुधिताला. २२ देऊं नको. २३ कौतुकानें. २४ पुढें करूं येईल. २५ आवड नसलेलें २६ त्यागावे, वगळावे. २७ सामुग्री. २८ सर्व लोकांना शासन करणारा. २९ साधारण मनुष्याप्रमाणें. ३० दुष्टपणानें, निंदेनें. ३१ बोलणारे. ३२ कित्येक.

सुंदर । निर्[1]वोळिलें होय घर । परी सर्[2]पांगना द्वार । रुं[3]धलें आहे २ निपजे दिव्यान्न चोखट । परी माजीं काळकूट । असो मैत्री कपॅट- । गर्भिणी जैसी ३ तैसी तप[5]भक्तिमेधा । तयाची जाण प्रबुद्धा । जो माझयांची का निंदा । माझीचि करी ४ याकारणें धनंजया । तो भक्तु मे[6]धावी तपिया । तरी नको बापा इया । शास्त्रा आँतळों देव्हों ५ काय बहु बोलों निंदका । योग्य स्रष्टयाहीसारिखा । गीता हे कवतिका । लागींही नेदी ६ म्हणौनि तपाचा धनुर्धरा । तळीं दाटोनि गोंडोरा । वरी गुरुभक्तीचा पुरा । प्रासादु जो जाला ७ आणि श्रवणेच्छेचा पुढां । दारवंटा सदा उघडा । वरी कळ[12]शु चोखडा । अनिंदारत्नांचा ८

य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति । भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

ऐशा भक्ता[13]लयीं चोखटीं । गीतारत्नेश्वरु हा प्र[14]तिष्ठीं । मग माझिया संव[15]सौटी । तु[16]केसी जगीं ९ का जे एकाक्ष[17]रपणेंसीं । त्रिमा[18]त्रिकेचिये कुशीं । प्रण[19]वु होतां गर्भवासीं । सांक[20]डला १५१० तो गीतेचिया बां[21]हाळीं । वेद[22]बीज गेलें[23] पां[24]हाळीं । कीं गायत्री फुलींफळीं । श्लोकांच्या आली ११ ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्ता । अन[25]न्यजीवना माता । बाळका जैसी १२ तैसी भक्तां गीतेसीं । भेटी करी जो आदरेंसीं । तो देहापाठीं मजसीं । येकचि होय १३

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः । भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥६९॥

आणि देहाचेंही लेणें । लेऊनि वेगळेपणें । असे तंव जीवेंप्राणें । तोचि प[26]ढिये १४ ज्ञानियां कर्मठां तापसां । यया खुणेचिया माणुसां- । माजीं तो येकु गा जैसा । प[27]ढिये मज १५ तैसा भूतळीं आघवा । आन न देखें पांडवा । जो गीता सांगे मेळांवा । भक्तजनांचा १६ मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां अ[28]क्षोभें । जो मं[29]डेन होय सभे । संतांचिये १७ नवपल्लवीं रोमांचितु । मंदा[30]निळें कांपवितु । आ[31]मोदजळें वो[32]लवितु । फुलांचे डोळे १८ कोकिळा कल[33]रवाचेनि मिषें । सद्गद बोलवीत जैसें । वसंत का प्रवेशे । मद्भ[34]क्तआरामीं १९ का जन्माचें फळ चकोरां । होत जैं चंद्र ये अं[35]बरा । नाना नव[36]घन मयूरां । वो देत पावे १५२० तैसा सज्जनांच्या मे[37]ळांपीं । गीतापद्यरत्नीं उ[38]मपीं । वर्षे जो माझ्या रूपीं । हेतु ठेऊनी २१ मग तयाचेनि पाडें । प[39]ढियंतें मज फुडें । नाहींचि गा मागेंपुढें । न्याहाळितां २२ अर्जुना हा ठायवरी । मी तयातें सूयें जि[40]व्हारीं । जो गीतार्थाचें करी । पैरगुणें संतां २३

सुंदर व प्रकाशित घर असून जर त्याचे दारांत नागीण बसलेली असेल; २ उत्तम अन्न तयार केलेलें असून जर त्यांत विष मिळविलेलें असेल; अथवा कपटानें भरलेली मैत्री जर असेल, तर ती जशी व्यर्थ; ३ त्याप्रमाणें हे बुद्धिमान अर्जुना, जो माझी व माझ्या भक्तांची निंदा करतो, त्याचें तप, भक्ति व बुद्धि हीं व्यर्थ आहेत, असें समज. ४ यास्तव हे धनंजया, तो भक्त बुद्धिमान असून तपस्वीही असला, पण जर माझी व माझ्या भक्तांची निंदा करील, तरी बापा, त्याला या गीताशास्त्रांचा स्पर्श होऊं देऊं नको. ५ निंदकाविषयीं आणखी जास्ती काय तुला सांगूं ? तो जरी ब्रह्मदेवाप्रमाणें प्रतिसृष्टी करणारा असला, तरी त्याला कौतुकानेंही गीताशास्त्र सांगूं नको. ६ म्हणून हे धनुर्धरा, ज्यानें तपरूपी दगडाचा खालीं पाया घालून वर गुरुभक्तिरूपी देवालय बांधलें आहे; ७ आणि श्रवणेच्छारूपी पुढील दरवाजा नेहमी उघडा ठेवून वर अनिंदारूप रत्नांचा उत्तम कळस लावला आहे; ८

**अन्वयार्थ**—(यः)—जो—(इदं परमं गुह्यं)—हें परम गुह्य ज्ञान,—(मद्भक्तेषु)—माझ्या भक्तांच्या ठिकाणीं—(अभिधास्यति)—सांगेल तो,—(मयि)—माझ्या ठिकाणीं;—(परां भक्तिं कृत्वा)—ज्ञानरूप श्रेष्ठ भक्ति करून,—(मां एव)—मलाच,—(एष्यति)—प्राप्त होईल,—(असंशयः)—याविषयीं मुळींच संशय ठेवूं नको. ६८

अशा उत्तम भक्तरूपी देवालयांत गीतारूपरत्नेश्वराची स्थापना केल्यावर तुला माझी योग्यता या जगांत प्राप्त होईल. ९ कारण, एका अक्षरपणानें अकार, उकार व मकार या तीन मात्रांच्या कुशींत जो ओंकार गर्भवासांत अडकलेला होता, १५१० तो वेदांचें बीज जो ओंकार तो गीतारूपी वृक्षाचा विस्तार पावून, त्यांतील श्लोक हे गायत्रीरूप फुलें व फळें झाले. ११ अशी ही मंत्रयुक्त गीता, जो माझे भक्तांस सांगतो, मातेच्या स्तनावांचून ज्याला जीवनास अन्य साधन नाहीं अशा बालकास जशी माता भेटवावी, १२ तशी माझ्या भक्ताची जो आदरानें गीतेशीं भेट करून देतो, तो मरणानंतर मद्रूपच होतो. १३

**अन्वयार्थ**—(च मनुष्येषु)—व मनुष्यांमध्यें—(कश्चित्)—कोणी—(तस्मात्)—त्या शास्त्रसंप्रदाय चालविणाऱ्या मनुष्याहून,—(मे)—माझें—(प्रियकृत्तमः)—अधिक प्रिय करणारा,—(न) [अस्ति] —नाहीं.—(च)—आणि—(भुवि)—या भूलोकीं,—(तस्मात् अन्यः) त्याहून दुसरा कोणी,—(मे)—मला—(प्रियतरः)—अधिक प्रिय,—(न भविता)—होणारहि नाहीं. ६९

आणि देह धारण करूनही जो जीवानें व प्राणानें देहभावापासून अलिप्त असतो, तोच मला अत्यंत प्रिय आहे. १४ ज्ञानी, व कर्मठ तपस्वी हे जरी मला जाणतात, तरी त्या सर्वांत गीतार्थ जाणणारा मला अत्यंत प्रिय आहे. १५ हे पांडवा, जो माझ्या भक्तजनांच्या समुदायाला गीताशास्त्र सांगतो, त्याच्याप्रमाणें या पृथ्वीतलावर मला दुसरा कोणी प्रिय नाहीं. १६ माझ्या प्रीतीनेंच आपलें मन स्थिर करून जो गीताशास्त्र माझ्या भक्तांस सांगतो, तो संतजनांचा मुकुटमणिच होय. १७ मला असें वाटतें कीं, मद्भक्तरूपी बागेंत गीतार्थ प्रतिपादन करणारा भक्त, तो वसंतच होय की काय ? म्हणून श्रोतेमंडळीचे अंगावर नवपल्लवरूपी रोमांच उभे रहातात; व मंद वाऱ्यानें जसें वृक्ष हालतात, तसें त्यांचें अंग आनंदाचे भरांत डोलत असतें; व नेत्ररूपी पुष्पांतून जे आनंदाश्रु पडतात, ते मधुस्रावाप्रमाणें शोभतात; व त्या बागेंत कोकिळ पक्षी जसे मधुर स्वरानें गायन करतात, तशी ही श्रोतेमंडळी सद्गदित अंतःकरणानें भगवन्नामाचा जयघोष करितात. १८-१९ किंवा चंद्र गगनांत उगवल्यावरच चकोरपक्ष्यांच्या जन्माचें सार्थक्य होतें; अथवा नवीन मेघ मोराला ओ देतच येतात की काय ! १५२० तसा माझे प्राप्तीवर नजर ठेवून जो संतांच्या समुदायांत गीतापद्यरूपी रत्नांचा वर्षाव करितो; २१ मग अशा योग्यतेचा आवडता भक्त पाहूं गेलें असतां मागें मिळाला नाहीं व पुढेंही मिळणार नाहीं ! २२ अर्जुना, याप्रमाणें जो गीतेच्या अर्थाची संतजनांस मेजवानी करितो, त्याला मी आपले हृदयांत धारण करितों. २३

१ सुंदर बांधिलें. २ नागिणीनें. ३ कोंडलें. ४ कपट आहे गर्भांत जिच्या—कापट्यरूप. ५ तप गुरुभक्ति, व सद्बुद्धि. ६ बुद्धिमान. ७ स्पर्श. ८ महादेवासारखा. ९ दगडाचा पाया. १० देवालय. ११ दरवाजा. १२ कळस. १३ भक्तिरूपी देवालयांत. १४ स्थापन कर. १५ बरोबरीस, साम्यतेस. १६ योग्य होशील. १७ ॐ या एका अक्षरानें. १८ अकार, उकार व मकार या तीन मात्रांच्या. १९ ओंकार. २० अडकला, संकुचित होऊन राहिला. २१ शाखांनीं. २२ ओंकार. २३ विस्तारिलें. २४ वृक्षरूपानें उंच गेलें. २५ मातेच्या स्तन्यावांचून अन्य जीविकेला साधन नाहीं अशा. २६ अत्यंत प्रिय. २७ समुदायाला. २८ स्थिर चित्तानें. २९ भूषणरूप. ३० मंद वाऱ्यानें. ३१ सुगंधोदकानें. ३२ बाहेर पडतात, स्रवतात. ३३ मधुर स्वराच्या. ३४ माझ्या भक्तरूपी बगिच्यांत. ३५ गगनीं. ३६ नूतन मेघ. ३७ समुदायांत. ३८ पुष्कळ. ३९ आवडतें. ४० खरोखर. ४१ हृदयांत. ४२ पाहुणे, मेजवानी.

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः । ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

पैं माझिया तुझिया मिळणीं[१] । वाढीनली जे हे कहाणी । मोक्षधर्म का जिर्णी[२] । आलासे जेथें २४ तो हा सकळार्थप्रबोधु । आम्हां दोघांचा संवादु । नें[३] करितां पदभेदु । पाठेंचि जो पढे २५ तेणें ज्ञानानळीं[४] प्रदीप्तीं । मूळ[५] अविद्येचिया आहुतीं । तोषविला होय सुमती । परमात्मा मी २६ घेऊनि गीतार्थ उगाणा[६] । ज्ञानिये जें विचक्षणा[७] । ठाकिती ते गाणांवाणा । गीतेचा तो लाहे २७ गीता पाठकासि असे । फळ अर्थज्ञाचि सरिसें । गीता माउलियेसि नसे । जाणें[९] तान्हें २८

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः । सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥७१॥

आणि सर्वमार्गीं निंदा । सांडूनि आस्था पैं शुद्धा । गीताश्रवणीं श्रद्धा । उभारी जो २९ तयाच्या श्रवणपुटीं । गीतेचीं अक्षरें जंव पैठीं[१०] । होतीना तंव उठाउठी । पळेचि पाप १५३० ऐटावियेमाजीं[११] जैसा । वन्हि रिघतां सहसा । लंघिती का दिशा । वनौकें[१२] तियें ३१ का उदयाचळकुळीं । झळकतां अंशुमाळी[१३] । तिमिरें[१४] अंतराळीं । हारपती ३२ तैसा कानाच्या महाद्वारीं । गीता गजर जेथ करी । तेथ सृष्टीचिये आदीवरी[१५] । जायचि पाप ३३ ऐसी जन्मवेली[१६] धुवट । होय पुण्यरूप चोखट । याहीवरी अचोंट[१७] । लाहे फळ ३४ जे इये गीतेचीं अक्षरें । जेतुलीं का कर्णद्वारें । रिघती तेतुले होती पुरे । अश्वमेध कीं ३५ म्हणौनि श्रवणें पापें जाती । आणि धर्म धरी उन्नती । तेणें स्वर्गराज संपत्ती । लाहेचि शेखीं[१९] ३६ तो पैं मज यावयालागीं । पहिलें पेणें[२०] करी स्वर्गीं । मग आवडे तंव भोगी । पाठीं मजचि मिळे ३७ ऐसी गीता धनंजया । एकतया आणि पढतया । फळे महानंदें मियां । बहु काय बोलों ३८ याकारणें हें असो । परी जयालागीं शास्त्रातिसो[२१] । केला तें तंव तुज पुसों । काज तुझें ३९

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा । कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

तरी सांग पां पांडवा । हा शास्त्रसिद्धांतु आघवा । तुज एकचित्तें फावा[२२] । गेला आहे १५४० आम्हीं जैसें जया रीती । उगाणिलें[२३] कानांच्या हातीं । येरीं तैसेंचि तुझ्या चित्तीं । पैठें केलें कीं ४१ अथवा माझारीं । गेलें सांडिविखुरी[२४] । किंवा उपेक्षेवरी[२५] । वाळूनि[२६] सांडिलें ४२ जैसें आम्हीं सांगितलें । तैसेंचि हृदयीं फावलें[२७] । तरी सांग पां वहिलें[२८] । पुसेन तें मी ४३ तरी स्वाज्ञानजनितें[२९] । मा-

**अन्वयार्थ**—(च यः)-आणि जो-(आवयोः इमं धर्म्यं संवादं)-आम्हा दोघांच्या या धर्मरूप संवादाला,-(अध्येष्यते) -पठन करील, म्हणजे त्याचें अध्ययन करील,-(तेन)-त्याच्याकडून,-(ज्ञानयज्ञेन)-ज्ञानयज्ञानें,-(अहं इष्टः)-मी पूजिलेला असा,-(स्याम्)-होईन.-(इति मे मतिः)-असा माझा निश्चय आहे. ७०

माझ्या व तुझ्या समागमांत जो हा संवाद झाला, तो या पृथ्वीवर मोक्ष जिंकण्यासच आला आहे. २४ तो सकल अर्थ प्राप्त करून देणारा आपला दोघांचा संवाद त्यांतील पदांचा विचार न करितां जो केवळ पठण करतो, २५ त्यानें ज्ञानरूपी प्रज्वलित अग्नींत अज्ञानाची आहुति देऊन, मी जो परमात्मा, त्याला हे सुमतें अर्जुना, संतोषित केल्याप्रमाणें होतें. २६ गीतेच्या अर्थाचा अनुभव घेऊन, जे शोधक ज्ञानी आहेत, ते जी योग्यता पावतात, तीच योग्यता गीतेचें गायन करणारे व वर्णन करणारे यांनाही प्राप्त होते. २७ गीतेचा पाठ करणाऱ्यास गीतेचा अर्थ जाणणाऱ्याप्रमाणेंच फलप्राप्ति होते. कारण, गीतामाउलीजवळ जाणतें व नेणतें मूल असा भेद नाहीं. २८

**अन्वयार्थ**—(यः)-जो-(श्रद्धावान्)-श्रद्धाळु-(अनसूयः)-असूया न करणारा-(नरः)-मनुष्य, [हा आमचा संवाद] -(शृणुयात् अपि)-नुसता ऐकेलहि-(सः अपि)-तोहि-(मुक्तः) -पापांपासून मुक्त होऊन,-(पुण्यकर्मणां)-पुण्यवानांच्या-(शुभान् लोकान्)-शुभ लोकांना-(प्राप्नुयात्)-प्राप्त होईल. ७१

आणि सर्व मार्गांविषयींची निंदा सोडून शुद्ध आस्थेनें जो गीतेच्या श्रवणावर श्रद्धा ठेवतो, २९ त्याच्या कानांत गीतेची अक्षरें पडल्याबरोबर हालोहाल पातकें पळून जातात. १५३० जसा अरण्यांत अग्नि सहज शिरला म्हणजे तेथील वनचरें व पशुपक्ष्यादिक दाही दिशांस पळून जातात ३१ अथवा उदयाचलावर सूर्य उगवला म्हणजे जसा आकाशांत अंधकार नाहींसा होतो, ३२ तसा गीतेचा घोष कानाच्या महाद्वारानें अंतःकरणांत गेल्यावर सृष्टि उत्पन्न होण्याच्या अगोदरचीं हीं पापें नाहींतशीं होतात. ३३ अशा रीतीनें सर्व कुल पवित्र होऊन तो पुरुष केवळ पुण्यरूपच होतो. याप्रमाणें त्याला अलभ्य लाभ होतो. ३४ या गीतेचीं जितकीं जितकीं अक्षरें कर्णद्वारानें अंतःकरणांत प्रवेश करतील, तितके अश्वमेध केल्याचें पुण्य लाभतें. ३५ म्हणून, गीतेच्या श्रवणानें पापें नाशींतशीं होऊन धर्माची वृद्धि होते, व त्या योगानें शेवटीं स्वर्गाचें राज्य उपभोगास मिळतें. ३६ असा जो पुरुष तो माझ्या प्राप्तीचा पहिला मुक्काम स्वर्गलोकीं करून, तेथें वाटेल तोंपर्यंत सुख भोगून नंतर मलाच येऊन मिळतो. ३७ हे धनंजया, गीता ऐकणारास व गीतेचा पाठ करणारास फार काय सांगावें ! पण आनंदस्वरूपी जो मी, तें मद्रूप फल गीता त्याला प्राप्त करून देतें. १८ यास्तव या गोष्टी असूं दे. परंतु ज्या कारणाकरितां हें गीताशास्त्र सांगण्यास मीं आरंभ केला, तें तुझें काम झालें काय? ३९

**अन्वयार्थ**—(पार्थ)-हे अर्जुना!-(त्वया)-तूं-(एतत्)-हें मी सांगितलेलें,-(एकाग्रेण चेतसा)-एकाग्र चित्तानें-(श्रुतं कच्चित्)-ऐकलेंस का?-(धनंजय)-हे धनंजया!-(ते)-तुझा, -(अज्ञानसंमोहः)-अज्ञानामुळें झालेला अविवेक-(प्रनष्टः कच्चित्)-सर्वथा नाहींसा झाला का? ७२

तर पांडवा, सांग बरें, त्या गीताशास्त्रांतील सर्व सिद्धांत तुझ्या मनांत पूर्णपणें ठसले आहेत काय? १५४० आम्हीं जसें व ज्या रीतीनें हे सिद्धांत कानाच्या स्वाधीन केले तसे त्यांनी तुझ्या चित्ताचे स्वाधीन केले ना? ४१ अथवा मधल्यामध्येंच लक्ष नसल्यामुळें फुकट गेले कीं काय? किंवा तूं चालढकल करून झुगारून दिलेस? ४२ जसें आम्हीं ते सांगितले, तसेंच जर तुझ्या हृदयांत त्यांनी पोंचते केले असतील, तर जें मी तुला आतां पुसेन, तें सत्वर सांग पाहूं? ४३ अरे, तुझ्या अज्ञानापासून मागें उत्पन्न झालेला व ज्यानें तुला भूल पाडली तो मोह

१ समागमांत. २ जिंकणें. ३ पदांचा अर्थ न लावतां. ४ प्रज्वलित ज्ञानाग्नींत. ५ अज्ञानाच्या. ६ अनुभव. ७ शोधक. ८ गाणारा व वर्णन करणारा. ९ जाणतें व नेणतें. १० प्रविष्ट. ११ दाट अरण्यांत. १२ वनचरें, पशुपक्ष्यादि. १३ सूर्य. १४ अंधकार. १५ अगोदरचें. १६ जन्माची परंपरारूप भेळ. १७ मोठें. १८ वाढ, उत्कर्ष. १९ शेवटीं. २० मुक्काम. २१ शास्त्रविस्तार. २२ समजुतीस आला का? २३ पदरीं घातलें. २४ सांडण्यालवंडण्याचारी. २५ चालढकलीवर. २६ झुगारून दिलें. २७ प्रविष्ट झालें. २८ सत्वर. २९ स्वकीय अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या.

गिलें मोहें तूतें । भुलविलें तो येथें । असें कीं नाहीं ४४ हें बहु पुसों काई । सांगें तूं आपुल्या ठाईं । कर्माकर्म कांहीं । देखतासी ४५ पार्थु स्वानंदैकरसें । विरेल ऐसा भेददशे । आणिला येणें मिषें । प्रश्नाचेनि । ४६ पूर्ण ब्रह्म जाला पार्थु । तरी पुढील साधावया कार्यार्थु । मर्यादा श्रीकृष्णनाथु । उल्लंघों नेदी ४७ एऱ्हवीं आपुलें करणें । सर्वज्ञ काय तो नेणें । परी केलें पुसणें । याचिलागीं ४८ एवं करोनियां प्रश्न । नसतेंचि अर्जुनपण । आणूनियां जालें पूर्णपण । तें बोलवी स्वयें ४९ मग क्षीराब्धीतें सांडितु । गगनीं पुंजु मंडितु । निवडे जैसा न निवडितु । पूर्णचंद्र १५५० तैसा ब्रह्म मी हें विसरें । तेथ जगाचि ब्रह्मत्वें भरे । हेंही सांडी तरी विरे । ब्रह्मपणही ५१ ऐसा मोडतु मांडतु ब्रह्में । तो दुःखें देहाचिये सीमे । मी अर्जुन जेणें नामें । उभा ठेला ५२ मग कांपतां करतळीं । दडपूनि रोमावळी । पुलिका स्वेदजळीं । जिरऊनियां ५३ प्राण क्षोभे डोलतया । अंगा आंगाचि टेंकैया । सूनि स्तंभु चाळया । भुलौनियां ५४ नेत्रयुगुळाचेनि वोतें । आनंदामृताचें भारितें । वोसंडतें तें मागुतें । काढूनियां ५५ विविधा औत्सुक्यांची दाटी । चीपें दाटेत होती कंठीं । ते करूनियां पैठी । हृदयामाजीं ५६ वाचेचें वितुळणें । सांवरूनि प्राणें । अक्रमाचें श्वसणें । ठेऊनि ठायीं ५७

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत । स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥७३॥

मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आंवडे मोहो । तरी तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपला ५८ पैसीं येऊनि दिनकरें । डोळयातें आंधारें । पुसिजे हें कायि सरे । कोणे गांवीं ५९ तैसा तूं श्रीकृष्णराया । आमुचिया डोळयां । गोचर हेंचि कायिसैया । न पुरे तवं १५६० वरी लोभें मायेपासूनी । तें सांगसी तोंड भरूनी । जें कांयिसेनिही करूनी । जाणूं नये ६१ आतां मोह असे कीं नाहीं । हें ऐसें जी पुससी काई । कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझेपणें ६२ गुंतलों होतों अर्जुनगुणें । तो मुक्त जालों तुझेपणें । आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ६३ मी तुझेनि प्रसादें । लाधलेनि आत्मबोधें । मोहाचे तया कांदे । नेदीच उरों ६४ आतां करणें का न करणें । हें जेणें उठी दुजेपणें । तें तूं वांचूनि नेणें । सर्वत्र गा ६५ येविषयीं माझ्या ठायीं । संदेहाचें नुरेचि कांहीं । त्रिशुद्धी कर्म जेथ नाहीं । तें मी जालों ६६ तुझेनि मज मी पावोनी । कर्तव्य गेलें

तुझ्याजवळ अजूनही आहे, किंवा नाहींसा झाला? ४४ फार किती विचारीत बसूं! तूं आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं कांहीं पापपुण्य जाणतो आहेस काय, एवढें सांग म्हणजे झालें. ४५ पार्थ निजानंदैक्यरूपांत निमग्न होऊन जाईल, म्हणून या प्रश्नांच्या निमित्तानें भेदबुद्धीवर आणला. ४६ पार्थ पूर्णब्रह्मरूपी झाला तर आपलें पुढील कार्य साधणार नाहीं, म्हणून श्रीकृष्णनाथांनीं त्याला भेददशेची मर्यादा उल्लंघूं दिली नाहीं, ४७ एऱ्हवीं, सर्वज्ञ जो श्रीकृष्ण, त्याला आपलें करणें समजलें नव्हतें काय? परंतु या कारणाकरितांच त्यानें अर्जुनास प्रश्न केला. ४८ याप्रमाणें प्रश्न करून नाहींसें झालेलें अर्जुनपण आणून, अर्जुन पूर्णदशेस आला, हें त्याचेकडूनच देवांनीं बोलविलें. ४९ मग पूर्णचंद्र हा क्षीराब्धीला सोडून, आकाशांतील तारकापुंजास सुशोभित करीत आहे असें दिसलें, तरी तो जसा क्षीराब्धीपासून वेगळा नाहीं, १५५० तसा मी ब्रह्म झालों होतों हें विसरून, मग सर्व जग ब्रह्मरूपी आहे, हेंही विसरून ब्रह्मपण आपोआप विरघळलें. ५१ अशा रीतीनें ब्रह्माची स्मृति ठेवून वागणारा व ब्रह्माच्या विस्मृतीनें ब्रह्मरूपीच असणारा तो अति कष्टानें मी अर्जुन आहें, असें समजून देहस्थितीवर येऊन उभा राहिला, ५२ मग हातपाय कांपावयास लागून अंगावरील उभे राहिलेले रोमांच दडपून, घामाचे बिंदु जिरवून, ५३ प्राणवायूच्या वाढण्यानें डोलत असलेल्या अंगास अंगाचाच टेंका देऊन व कंठ सद्गदित झाला होता, तो हे सर्व विकार त्यानें आंत जिरवून टाकले. ५४ दोन्ही नेत्रांतून प्रेमाश्रुधारा चाललेल्या आंवरून मग पुसून टाकल्या. ५५ नानाप्रकारच्या उत्कंठांच्या भरानें कंठ दाटत होता, त्या उत्कंठा हृदयांत दाबून, ५६ व वाचा जी वितळली होती, ती सांवरून, प्राणक्षोभ झाला होता तोही सांवरला; आणि श्वासोच्छ्वासाची गति विपरीत झाली होती, ती पूर्ववत् सांवरली. ५७

**अन्वयार्थ**-(अच्युत)-हे श्रीकृष्णा!-(मोहः नष्टः)-माझा मोह पार नाहींसा झाला.-(त्वत्प्रसादात्)-तुझ्या कृपेमुळें,-(मया)-मी-(स्मृतिः)-आत्मतत्त्वाविषयींची आठवण-(लब्धा)-मिळविली.-(गतसंदेहः स्थितः अस्मि)-मी सर्व संदेहांनीं रहित होऊन आतां राहिलों आहे.-(तव वचनं करिष्ये)-तुझें म्हणणें मी मानीन म्हणजे तुझ्या म्हणण्याप्रमाणें मी वागेन. ७३

मग अर्जुन देवास म्हणाला कीं, तुम्हीं मला 'मोहाची अजून आवड आहे की काय' असें विचारलें, तर तो आपल्या कुटुंबासह ठावठिकाण सोडून गेला! ५८ सूर्य जवळ आल्यावर डोळ्याला अंधार दृष्टीस पडतो की काय हें म्हणणें कोणत्या गांवीं शोभेल? ५९ तसें हे श्रीकृष्णराया, तुम्हीं आमच्या डोळ्यांस प्रत्यक्ष दर्शन दिल्यावर तें मोहाच्या नाशास पुरे होणार नाहीं काय? १५६० तशांत, तुम्ही आईपेक्षांही अति प्रेमानें, जें कोणत्याही प्रयासानें दुसरे कोणापासून समजणार नाहीं, तें ज्ञान विस्तारानें सांगितलें. ६१ आतां मोह अद्याप आहे किंवा नाहींसा झाला असें तुम्हीं काय विचारतां, तर तुमच्या स्वरूपास मिळून मी आज कृतार्थ झालों आहें. ६२ मी अर्जुन आहें अशा अभिमानानें मोहांत गुंतलों होतों, तो तुमच्या रूपाशीं ऐक्य पावल्यामुळें मुक्त झालों, म्हणून, आतां पुसणें किंवा सांगणें, या दोन्ही गोष्टी आपोआप नाहींतशा झाल्या. ६३ तुमच्या प्रसादानें आत्मबोधाची प्राप्ति झाल्यामुळें माझा मोह समूळ नाहींसा झाला, ६४ आतां, ज्या द्वैतामुळें क्रिया करणें अथवा न करणें हे भाव उत्पन्न होत होते, तें द्वैत मी जाणत नसून या जगांत तुम्हांशिवाय दुसरें कांहीं जाणत नाहीं. ६५ याविषयीं माझ्या ठिकाणीं संशय बिलकूल राहिला नाहीं; तर खरोखर जेथें कर्म उरत नाहीं ती ब्रह्मस्थिति मी पावलों आहें. ६६ तुमच्या योगानें मला माझें स्वरूप प्राप्त होऊन माझें कर्तव्य समूळ नाहींसें झालें. परंतु हे प्रभो, तु-

१ पुण्य व पाप. २ निजानंदरूप सामरस्यानें. ३ मोलांडूं देत नाहीं. ४ झालेलें पूर्णपण. ५ सोडीत. ६ प्रकाशाचा गोळा. ७ वेगळा वाटतो. ८ जणुं वेगळा न होतो ( कारण चंद्राची व क्षीरसागराची कांति एकच आहे. ) ९ विरघळे, नाहींसें होई. १० कांपऱ्या तळहातानें. ११ रोमांच. १२ बिंदु. १३ घामाचे. १४ प्राणाच्या वाढीनें, गडबडीनें. १५ आंगास आंगाचा टेंका देऊन. १६ स्तब्ध राहून. १७ प्राण हालचाल करण्याचें विसरून. १८ अश्रुप्रवाहानें. १९ उत्कंठा. २० दडपून, आवेशानें. २१ स्वरभंग होत होता. २२ प्रविष्ट. २३ अनियमित. २४ प्रिय वाटतो. २५ समीप. २६ चालेल कां. २७ हेंच कोणत्या गोष्टीला पुरणार नाहीं, सर्व इतक्यानेंच होईल. २८ कळवळ्यानें, ममतापूर्वक. २९ कशाही प्रयासानें. ३० तुझें रूप होऊन. ३१ प्राप्त झालेल्या. ३२ गड्ढे,-मुळ्या. ३३ खरेपणानें. ३४ तुझ्या योगानें मी माझ्या स्वरूपीं मिळून.

निपटूनी । परी आज्ञा तुझी वांचोनी। आन नाहीं प्रभो ६७ का जें दृश्य दृश्यातें
नाशी । जें दुजें द्वैतातें ग्रासी । जें एक परी सर्वदेशीं । वसवी सदा ६८ जया-
चेनि संबंधें बंधु फिटे । जयाचिया आशा आस[3] तुटे । जें भेटलया सर्व भेटे ।
आपणपांचि ६९ तें तूं[4] गुरुलिंग जी माझें । जें येकलेपणींचें विरजें । जयालागीं
वोलांडिजे । अद्वैतबोधु १५७० आपणचि होऊनि ब्रह्म । सारिजे कृत्याकृत्यांचें
काम । मग कीजे का निःसीम । सेवा जयाची ७१ गंगा सिंधु सेवूं गेली। पा-
वतांचि समुद्र जाली । तेवीं भक्तां सेंल[6] दिधली । निजपदाची ७२ तो तूं
माझा जी निरुपचारु । श्रीकृष्णा सेव्य सद्गुरु । मा ब्रह्मतेचा उपकारु । हाचि
मानी ७३ जें मज तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड । तें फेडोनि केलें गोड ।
सेवासुख ७४ तरी आतां तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा । करीन देईं अ-
नुज्ञा । भलतियेविषयीं ७५ यया अर्जुनाचिया बोला । देवो नाचे सुखें भुलला ।
म्हणे विश्वफळा जाला । फळ हा मज ७६ उणेनि उमचला सुधांकरु । देखुनी
आपला कुमरु । मर्यादा क्षीरसागरु । विसरेचि ना ७७ ऐसें संवादाचा बहुलां ।
लग्न दोघांचिचा आंतुला[12] । लागलें देखोनि जाला । निर्भरु[13] संजयो ७८ तेणें
उचंबळलेपणें[14]। संजय धृतराष्ट्रातें म्हणे । जी कैसें बादरायणें । रक्षिलों दोघे
७९ आजि तुमतें अवधारा । नाहीं चर्मचक्षूही[15] संसारा । कीं ज्ञानदृष्टिव्यवहारा ।
आणिलेती १५८० आणि रथींचिये राहाटी । घेई जो घोडेयासाठीं । तया आम्हां
या गोष्टी । गोचरा होती ८१ वरी झुंझाचें[17] निर्वाण । मांडलें असे दारुण[18] ।
दोहीं[19] हारीं आपण । हारपिजे जैसें ८२ येवढा जिये सांकडां । कैसा अनुग्रहो
पैं गाढा । जे ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ८३ ऐसें संजय बोलिला । परी न
द्रवे येरू[21] उगला[22] । चंद्रकिरणीं शिवतला । पाषाणु जैसा ८४ हें देखोनि तया-
ची दशा । मग करीचि ना सरिसां[23] । परी सुखें जाला पिसा । बोलतसे ८५ भुल-
त्रिला हर्षवेगें । म्हणौनि धृतराष्ट्रा सांगें । एऱ्हवीं नव्हे तयाजोगें । हें कीर जाणे ८६

इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः । संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥

मग म्हणे पैं कुरुराजा । ऐसा बंधुपुत्र[24] तो तुझा । बोलिला तें अधोक्षजा ।
गोड जालें ८७ अगा पूर्वापर[25] सागर । यया नामासीचि सिनार[26] । येर आघवें
तें नीर । एक जैसें ८८ तैसा श्रीकृष्ण पार्थ ऐसें । हें आंगाचिपासीं[27] दिसे ।

मच्या आज्ञेशिवाय मला कांहींही दुसरें करावयाचें नाहीं. ६७ कारण, जें दृश्य प्राप्त झालें असतां दृश्यभावाचा नाश होतो; जें द्वैत गुरुशिष्यभाव नाहींसा करतें; जें एक असून सर्व देश व्यापून रहातें; ६८ ज्याचा संबंध झाला असतां सर्व बंध नाहींतसे होतात; ज्याच्या आशेनें आशा कुंठित होते व ज्याची भेट झाली असतां सर्वत्र आत्मस्वरूपच दिसतें, ६९ ते तुम्ही माझी सद्गुरुमूर्ति आहां; कीं जी एकत्वाचे भावाला साह्य करते व जिच्यावरून अद्वैताचा बोधही ओंवाळून टाकावा; १५७० आणि जे, आपणच ब्रह्म होऊन चांगलें व वाईट काम नाहींसें करतां; आणि मग ज्याची निःसीम सेवा करावी; ७१ गंगा समुद्राची सेवा करावयास गेली असतां समुद्राची व तिची गांठ पडल्यावर ती समुद्ररूपच झाली, त्याप्रमाणें ज्यांनीं आपल्या भक्तांना आत्मपदाचा आपला शेलका वांटा दिला. ७२ ते तुम्ही, हे श्रीकृष्णा, भेदरहित व सेवा करण्यास योग्य असे माझे सद्गुरु आहां, म्हणून हाच ब्रह्ममय होण्याचा मजवर आपला उपकार आहे असें समजा. ७३ जें तुमच्या व माझ्या एकरूपतेच्या आडभेदाचें प्रतिबंधक कवाड होतें, तें तुम्ही नाहींसें करून उत्तम अशी सेवासुखाची जोड करून दिली. ७४ तर सर्व देवांचे राजे जे तुम्ही, ते मला जी आज्ञा कराल ती मी पाळीन. फार काय! वाटेल त्याविषयीं मला आज्ञा करा. ७५ हें अर्जुनाचें भाषण ऐकून देव सुखानें अति हर्ष पावून प्रेमानें नाचूं लागले आणि म्हणाले कीं, या विश्वरूप फळाला मला अर्जुन हें एक फळच उत्पन्न झालें! ७६ पूर्णकलेनें युक्त असा आपला मुलगा जो चंद्र, त्याला पाहून क्षीरसागर मर्यादा विसरत नाहीं काय? म्हणजे भरती येत नाहीं काय? ७७ असें संवादरूपी बोहल्यावर हृदयस्थ सुखेनें श्रीकृष्ण भगवान व अर्जुन या दोघांचें लग्न लागलेलें पाहून संजय तल्लीन झाला. ७८ अशा रीतीनें प्रेमाचा गहिंवर आल्यामुळें संजय धृतराष्ट्र राजास म्हणाला कीं. हे राजन्! केवढें आपलें दोघांचें नशीब थोर आहे कीं, श्रीव्यासांनीं आपलें असा समयास रक्षण केलें. ७९ आज पहा कीं, तुम्हांला व्यावहारिक दृष्टीही नसून ज्ञानदृष्टि आपल्यास सहज प्राप्त झाली; १५८० आणि रथ चालविण्याकरितां व त्यांच्या घोड्यांची परिक्षा करण्याकरितां मला ठेवलेले असून, मला कृष्ण व अर्जुन यांचा संवाद ऐकण्याचा प्रसंग झाला! ८१ युद्धाचा घोर प्रसंग सुरू असून, दोन्ही पक्षांकडील योद्धे आपणच होऊन जय व अपजय कोणाचाही झाला, तरी तो आपलाच होय; ८२ एवढ्या संकटसमयीं केवढा महान अनुग्रह, कीं ज्याच्या योगानें ब्रह्मानंदाचा उघड उघड उपभोग घ्यावयास सांपडतो! ८३ हें संजयाचें भाषण ऐकून, दगडावर चंद्राचे किरण पडले, तरी जसा त्याला पाझर फुटत नाहीं, तसा धृतराष्ट्र राजाच्या अंतःकरणाला मुळींच द्रव आला नाहीं, तो स्वस्थ बसला. ८४ अशी राजाची स्थिति पाहून संजयानें त्याच्याशीं भाषण करण्याचें टाकलें; परंतु तो सुखाचे भरानें वेडा होऊन बोलूं लागला. ८५ हर्षाच्या भरानें भुलून गेल्यामुळें धृतराष्ट्राशीं संजयानें भाषण केलें; एऱ्हवीं तें ऐकण्याची राजाची योग्यता नाहीं, असें तो जाणत होता. ८६

**अन्वयार्थ**—(इति)–याप्रमाणें-(अहं)-मी–(वासुदेवस्य)–वासुदेवाच्या–(च)–आणि–(महात्मनः पार्थस्य)–महात्म्या अर्जुनाच्या–(इमं अद्भुतं रोमहर्षणं संवादं)–या आश्चर्यकारक अंगावर रोमांच उभे करणाऱ्या संवादाला–(अश्रौषम्)–ऐकलं. ७४

मग म्हणाला कीं, हे धृतराष्ट्र राजा, तुझा पुतण्या जो अर्जुन, तो असें बोलल्यावर श्रीकृष्णास परम आनंद झाला. ८७ राजा, पूर्वसमुद्र व पश्चिमसमुद्र हीं नांवें मात्र वेगळीं आहेत; परंतु उदकाचे दृष्टीनें ते दोन्ही जसे एकच आहेत, ८८ तसे श्रीकृष्ण व अर्जुन हे देहाच्या दृष्टीनें भिन्न

१ जें दृश्य, (गुरुमूर्ति.) २ दुसरें. (गुरुरूप) ३ आशा नाहींशी होते. ४ गुरुमूर्ति. ५ साह्य. ६ शेलका वांटा. ७ निरुपाधिक. ८ प्रतिबंध. ९ कर्मांपणा गेला, पूर्ण झाला. १० चंद्र. ११ वहुल्यावर. १२ हृद्गत सुखेनें. १३ तल्लीन. १४ आनंदित होऊन, सद्गदीत होऊन. १५ श्रीव्यासांनीं. १६ व्यावहारिक दृष्टी. १७ युद्धाचा आणिबाणीचा प्रसंग. १८ घोर. १९ उभय पक्षांत. २० संकटांत. २१ धृतराष्ट्र. २२ स्वस्थ बसला. २३ संबंध, उपक्रम. २४ पुतण्या (अर्जुन.) २५ पूर्वपश्चिम. २६ वेगळेपण. २७ देहभिन्नतेच्या दृष्टीनें.

मग संवादीं जी नसे । कांहींचि भेदु ८९ पैं दर्पणाहूनि चोखें । दोन्ही होती
सन्मुखें । तेथ येरीं येर देखे । आपणपें जैसें १५९० तैसा देवेसीं पंडुसुतु । आ-
पणपें देवीं देखतु । पांडवेंसीं देखे अनंतु । आपणपें पार्थीं ९१ देवदेवो भक्ता-
लागीं । जिये विवरूनि देखे आंगीं । येरु तियेचेही भागीं । दोन्ही देखे ९२
आणिक कांहींच नाहीं । म्हणौनि करिती काई । दोघे येकपणें पाहीं । नांद-
ताती ९३ आतां भेदु जरी मोडे । तरी प्रश्नोत्तर का घडे । ना भेदुचि तरी
जोडे । संवादसुख कां ९४ ऐसें बोलतां दुजेपणें । संवादीं द्वैत गिळणें । तें
ऐकिलें बोलणें । दोघांचें मियां ९५ उटूनि दोन्ही आरसे । वोडविलीया[6] सारिसे ।
कोण कोणा पाहातसे । कल्पावें पां ९६ कां दीपासन्मुखु । ठेविलया दीपकु ।
कोण कोणा अर्थिकु । कोण जाणें ९७ नाना अर्कापुढें अर्कु । उदयलिया
आणिकु । कोण म्हणे प्रकाशकु । प्रकाश्य कवण ९८ हें निर्धारूं जातां फुडें ।
निर्धारासि ठर्क पडे । । ते दोघे जाले ऐवढे । संवादें सरिसे ९९ जी मिळतां
दोन्ही उदकें । माजी लवण वारूं ठाके । कीं तयासींहि निमिखें[10] । तेंचि होय
१६०० तैसे श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं । धरितां मजही वानी[11] ।
तेचि होतसे १ ऐसें म्हणे[12] ना मोटकें । तंव हिरोनि सौत्त्विकें[13] । आठव नेला
नेणों कें । संजयपणाचा २ रोमांच जंव फेरके[14] । तंव तंव आंग सुरके[15] । स्तंभें[16]
स्वेदातें जिंके । एकला कंपु ३ अद्वयानंदस्पर्शें । दिठी रसमय[17] जाली असे । ते
अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वचि ४ नेणो काय न माय पोटीं । काय नेणों[19] गुंफे
कंठीं । वांगर्था[20] पडत मिठी । उससांचिया[21] ५ किंबहुना सात्त्विकां[22] आठां ।
चाचैरु[23] मांडतां उमेठा[24] । संजयो जालासे चोहटा । संवादसुखाचा ६ तया सुखा-
चीं ऐसी जाती । जे आपणचि धरी शांती । मग पुढती देहस्मृती । लाधली तेणें ७

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् । योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

तेव्हां बैसतेनि आनंदें । म्हणे जी जें उपनिषदें । नेणती तें व्यासप्रसादें ।
ऐकिलें मियां ८ ऐकतांचि ते गोठी[25] । ब्रह्मत्वाची पडिली मिठी । मीतूंपणेंसीं
दिठी । विरोनि[26] गेली ९ हे आवघेचि का योग । जया ठाया येती मार्ग । त-
याचें वाक्य सवंग । केलें मज व्यासें १६१० अहो अर्जुनाचेनि मिषें । आ-
पणपेंचि दुजें ऐसें । नटोनि आपणया उद्देशें । बोलिले जें देव ११ तेथ कीं
माझें श्रोत्र । पैंटाचें जाले जी पात्र । काय वानूं स्वतंत्रें । सामर्थ्य श्रीगुरूचें १२

आहेत; परंतु त्यांच्या झालेल्या भाषणांत तो भेद उरला नाहीं. ८९ दोन आरसे स्वच्छ करून समोरासमोर ठेवल्यावर जसें एकमेकांत एकमेकांचें रूप दिसतें, १५९० तसा देवांसह अर्जुन, देव आपले स्वरूपांत पाहूं लागले, व अर्जुनासह देव, अर्जुन आपले स्वरूपांत पाहूं लागला. ९१ तो देवांचा देव हा भक्तांकरितां विचार करून आपल्या स्वरूपाकडे पाहूं लागला, तों त्यांत भक्तांचेंही स्वरूप दिसूं लागलें. ९२ द्वैतभाव मुळींच उरला नाहीं म्हणून श्रीकृष्ण भगवान् व अर्जुन ऐक्याचे भरांत निमग्न झाले. ९३ आतां दोघांमधील भेद जर नाहींसा झाला, तर दोघांचीं प्रश्न व उत्तरें होणार नाहींत; व तोच जर भेद नाहींसा होणार नाहीं, तर संवादाचें सुख कोठून मिळणार? ९४ असें द्वैतपणाचें भाषण चाललें असतां त्यांत द्वैत नाहींसें झालें; तें श्रीकृष्ण भगवान् व अर्जुन यांचें भाषण मी ऐकलें. ९५ दोन आरसे स्वच्छ करून समोरासमोर ठेवले असतां कोण कोणाला पहातो याची कल्पना कशी करावी? ९६ अथवा, दिव्यासमोर दुसरा दिवा ठेविला असतां कोणता प्रकाशक व कोणता प्रकाश्य (ज्यावर उजेड पडावयाचा ती वस्तु) हें कोणीं जाणावें? ९७ किंवा सूर्यासमोर दुसरा सूर्य उगवला असतां अमुक प्रकाशक व अमुक प्रकाश्य असें कोण म्हणेल? ९८ श्रीकृष्ण व अर्जुन हे संवादाच्या भरांत इतक्या ऐक्यास पावले कीं, त्याचा विचार करूं लागलें असतां तो जागचे जागीं बंद रहातो. ९९ दोन नद्यांचे प्रवाह मिळत असतां, त्या दोहोंस बाजूस करण्याकरितां मीठ मध्यें ठेवलें तर त्या मिठास एके क्षणांत जसें पाणीच व्हावें लागतें, १६०० तसें श्रीकृष्ण व अर्जुन यांचें जें भाषण झालें, तें ध्यानांत धरतांना माझीही स्थिति तशीच झाली. १ इतकें संजय भाषण करीत आहे, तोंच अष्टसात्त्विक भावांनीं त्याचा संजयपणा हिरावून नेला; २ अंगावर जों जों रोमांच उभे राहूं लागले, तों तों सुरकुत्या पडल्या; स्तब्धपणा येऊन घाम सुटून त्याहीपेक्षां कंप विशेष वाढला. ३ अद्वयानंदाच्या भरानें दृष्टि महानंदमय होऊन प्रेमाश्रु वाहूं लागले; जणुंकाय पाझरच सुटले आहेत! ४ त्याचे पोटांत कांहींएक मावेनासें होऊन कंठ दाटून आला; व श्वासोच्छ्वासामुळें तोंडांतून शब्द बाहेर पडेना. ५ फार काय! अष्टसात्त्विक भावानें संजयाची अतिशय बोबडी वळली; आणि श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादसुखाचा संजय हा वण्हाटाच झाला. ६ त्यासुखाची अशी जात आहे कीं, त्याच्या योगानें आपोआप शांति उत्पन्न होते; म्हणून संजय पुढें सहज देहभानावर आला. ७

**अन्वयार्थ**---(अहं)–मी–(एतं परं गुह्यं योगं)–या अत्यंत गुह्य योगाला–(व्यासप्रसादात्)–भगवान् व्यासांच्या कृपेनें–(कथयतः योगेश्वरात् कृष्णात्)–सांगत असलेल्या योगेश्वर कृष्णाच्या तोंडून–(स्वयं साक्षात्)–स्वतः आपल्या कानांनीं–(श्रुतवान्)–ऐकिलें. ७५

तेव्हां संजयाचे आनंदाचें भरतें कमी झाल्यावर तो असें म्हणाला कीं, उपनिषदांनाही जें गुह्य ठाऊक नाहीं, तें श्रीव्यासांच्या प्रसादानें मला ऐकण्यास मिळालें. ८ तें गुह्य ऐकल्याबरोबर ब्रह्मभावाची मिठी पडून मी व तूं या भावासहवर्तमान दृष्टि बुडून गेली. ९ हे सर्व योगमार्ग ज्या ठिकाणीं येऊन मिळतात, असा जो श्रीकृष्ण भगवान्, त्याचें वाक्य श्रीव्यासांचे कृपेनें मला स्वस्त झालें. १६१० अहो, अर्जुनाच्या निमित्तानें श्रीकृष्ण भगवान् आपणच अर्जुनरूप होऊन आपल्यालाच उद्देशून बोलले, ११ तें बोलणें ऐकण्यास माझे कान योग्य झाले; तर श्रीगुरूंच्या अद्भुत सामर्थ्याचें काय वर्णन करावें! १२

१ देवांचा देव. २ विचार करून. ३ संजय. ४ ऐक्यसुख. ५ एकरूपतेंत. ६ समोरासमोर ठेविलें असतां. ७ प्रकाशक. ८ स्तब्धता. ९ निवारण करण्यास, बाजूस करण्यास. १० क्षणांत. ११ तऱ्हा, प्रकार. १२ थोडें बोलतो न बोलतो तों. १३ अष्टसात्त्विक भावांनीं. १४ उभारे. १५ संकोच पावे. १६ स्तब्धता व घाम यांस. १७ महानंदमय. १८ पाझरच. १९ गुंतलें, अडकलें. २० शब्दार्थाला. २१ श्वासोच्छ्वासांची. २२ आठ सात्त्विक भावांनीं २३ बोबडी वळली असतां. २४ अतिशय. २५ संभाषण उपनिषद्रसा-रसंवाद. २६ हरपली. २७ योग्यतेचें, अधिकाराचें. २८ अद्भुत.

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् । केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

राया हें बोलतां विस्मित होये । तेणेंचि मोडावला[1] ठाये । रत्नीं कीं रत्न-किळा[2] ये । झांकोळित जैसी १३ हिमवंतींचीं सरोवरें । चंद्रोदयीं होतीं कारमीरें[3] । मग सूर्यागमीं माघारें । द्रवत्व ये १४ तैसा शरीराचिया स्मृती । तो संवादु संजय चित्तीं । धरी आणि पुढती । तेंचि होय १५

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः । विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७॥

मग उठोनि म्हणे नृपा । श्रीहरीचिया विश्वरूपा । देखिलया उगा कां पां । असों लाहसी १६ न देखणेनि जें दिसे । नाहींपणेंचि जें असे । विसरें आठवे तें कैसें । चुकऊं आतां १७ देखोनि चमत्कारु । कीजे तो नाहीं पैसारु । मजेंही-सकेंट[4] महापुरु । नेत आहे १८ ऐसा श्रीकृष्णार्जुन- । संवादसंगमीं स्नान । करूनि देतसे तिळदान । अहंतेचें १९ तेथ असंवरें आनंदें । अलौकिकही कांहीं स्फुंदे । श्रीकृष्ण म्हणे सद्गदें । वेळोवेळां १६२० या अवस्थांची कांहीं । कौरवातें परी नाहीं । म्हणौनि रायें तें कांहीं । कल्पावें जंव २१ तंव जाला सुखलाभु । आपणपां करूनि स्वयंभु । वुझाविला अंवष्टंभु । संजयें तेणें २२ तेथ कोणी येकी अवसरी । होआवी ते करूनि दुरी । रावो म्हणे संजया परी[12] । कैशी तुझी गा २३ तेणें तूंतें येथें व्यासें । बैसाविलें कासया[3] उद्देशें । अप्रसंगें/माजीं ऐसें । बोलसी काई २४ रानींचें राऊळा नेलिया । दाही दिशा मानी सुनियां । कां रात्रीं होय पाहलेया[5] । निशाचरां २५ जो जेथिंचें गौरव नेणें । तयासि तें भिगुळवाणें[6] । म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो २६ मग म्हणे सांगें प्रस्तुत । उदयलेसें जें उत्कळित । तें कोणासि बा रे जैतें । देईल शेखीं २७ एऱ्हवीं विशेषें बहुतेक । आमुचें ऐसें मानसिक । जे दुर्योधनाचे अधिक । प्रताप सदा २८ आणि येरांचेनि[20] पाडें । दळही[21] याचें देव्हडें[22] । म्हणौनि जैत फुडें । आणील ना तें २९ आम्हां तंव गमे ऐसें । मा तुझें जोतीष[23] कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां १६३०

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगोनाम अष्टादशोऽध्यायः ॥१८॥

यया बोला संजयो म्हणे । जी येरयेरांचें[24] मी नेणें । परी आयुष्य तेथें जिणें । हें फुडें कीं गा ३१ चंद्र तेथें चंद्रिका[25] । शंभु तेथें अंबिका[26] । संत तेथें विवेका । असणें कीं जी ३२ रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोइरिक ।

अन्वयार्थ—(राजन्)-हे राजा धृतराष्ट्र !-(केशवार्जुनयोः)-कृष्ण व अर्जुन यांच्या-(इमं अद्भुतं पुण्यं संवादं) -या अद्भुत व पुण्यप्रद संवादाला-(संस्मृत्य संस्मृत्य च) -पुनः पुनः आठवून-(मुहुः मुहुः)-मी पुनः पुनः-(हृष्यामि)-आनंदित होतों. ७६

ज्याप्रमाणें रत्नाची प्रभा प्रकाशांत रत्नामध्येंच लीन होते, त्याप्रमाणें संजय, धृतराष्ट्र राजास हें बोलत असतां तो विस्मित झाला व त्यामुळें तो आपल्या स्वरूपांतच लीन होऊन राहिला. १३ पण हिमालय पर्वतावरील सरोवरें चंद्रोदय होतांच गोठून तीं जशीं स्फटिक मण्यासारखीं दिसतात व सूर्योदय झाला म्हणजे विरघळून त्यांना पूर्वीप्रमाणें द्रवत्व येतें; १४ त्याप्रमाणें संजय पुन देहभानावर आल्यावर श्रीकृष्णार्जुनांचे संवादाचें त्याचे चित्तांत आठवण होऊन तो त्याच सुखांत निमग्न झाला. १५

अन्वयार्थ—(च)-आणि-(हे राजन्)-हे धृतराष्ट्रा !-(तत् हरेः अत्यद्भुतं रूपं)-तें हरीचें अतिशय अद्भुत रूप -(संस्मृत्य संस्मृत्य)-पुनः पुनः आठवून-(मे महान् विस्मयः) मला मोठा विस्मय वाटतो-(च पुनः पुनः हृष्यामि)-आणि वारंवार मी हृष्ट-संतुष्ट होतों. ७७

मग त्या आनंदाचे भरांत उभा राहून संजय धृतराष्ट्रास म्हणाला कीं, हे राजा, श्रीहरीचें विश्वरूप पाहून देखील तुला आनंद न होतां तूं स्वस्थ कां बसलास ? १६ जें विश्वरूप न पहातांही दिसतें, जें नाहीं म्हटलें तरी ज्याचें अस्तित्व बुडत नाहीं, व जें विसरूं म्हटलें तरी आठवतें, तें चुकवितां कसें येईल ? १७ या आनंदाचा पूर जो आला तो पाहून, काय चमत्कार आहे, असें म्हणण्याला देखील अवकाश उरला नाहीं. तो आनंदाचा महापूर मागेपणाचा आठवही घेऊन जात आहे, १८ या प्रकारेंकरून श्रीकृष्णार्जुनसंवादरूपी संगमांत त्यानें स्नान करून अहंतेला तिलांजली देऊन तिचा संबंध तोडला. १९ त्या अनिवार आनंदांत मोठा श्वासोच्छ्वास टाकून सद्गदित कंठ होऊन वारंवार, "हे कृष्णा, हे कृष्णा," असें संजय म्हणूं लागला ! १६२०. ही संजयाची अवस्था पाहून, त्यांतील एकेही गोष्टीचा गंध धृतराष्ट्र राजाचे ठिकाणीं नव्हता, म्हणून त्या आनंदाची कल्पनाही राजास येईना, २१ इतक्यांत झालेला जो सुखाचा लाभ, तो आपले ठिकाणीं दावून संजय देहभानावर आला. २२ त्या वेळेस धृतराष्ट्र राजा म्हणतोः— संजया, माझा वेळ जावा म्हणून, तुला येथें श्रीव्यासांनीं बसविलें असून, ती गोष्ट न करतां हा तूं काय प्रकार मांडला आहेस ? २३ त्या व्यासमुनींनीं तुला कोणते उद्देशानें बसविलें ? आणि येथें हीं भलतीं भाषणें काय बोलतोस ? २४ ह्या धृतराष्ट्राच्या बोलण्याचा चमत्कार वाटून ज्ञानेश्वरमहाराज म्हणतातः—अहो, रानटी मनुष्यास एकादे मोठे महालांत नेल्यावर त्याला जशा दाही दिशा उदास दिसतात; किंवा उजाडलें म्हणजे जशी निशाचरांस रात्र होते; २५ ज्याला ज्या गोष्टीचा अनुभव नाहीं, त्यानें ती गोष्ट भयंकर मानणें हें योग्यच आहे. म्हणून चांगल्या गोष्टीस वाईट गोष्ट म्हणणें हेंही योग्यच होय. २६ मग धृतराष्ट्र राजा म्हणाला कीं, हल्लीं जो हा कलह उत्पन्न झाला आहे, यामध्यें दोहटीं या संजया, कोणाला जय मिळेल ? २७ एऱ्हवीं बहुतकरून आमची अशी मनोदेवता धांवते कीं, दुर्योधनाचाच प्रताप सर्वदा जास्ती आहे, २८ आणि पांडवांचे मानानें पाहिलें असतां आमचें सैन्यही दिढीनें जास्त आहे, म्हणून खरोखर दुर्योधनालाच जय मिळेल; २९ आम्हांला तर असें वाटतें. मग तुला कसें काय वाटत असेल तें असो. परंतु संजया, तुझें भाकीत काय आहे, तें आम्हांला सांग. १६३०

अन्वयार्थ-(यत्र)-ज्या पक्षामध्यें-(योगेश्वरः कृष्णः)-योगेश्वर कृष्ण आहे-(च)-व-(यत्र)-ज्या पक्षामध्यें-(धनुर्धरः पार्थः)-धनुर्धर पार्थ आहे-(तत्र)-तेथें-त्या पक्षामध्यें -(श्रीः) -संपत्ति-(विजयः)-विजय-(भूतिः)-ऐश्वर्य-(च)-आणि-ध्रुवा नीतिः)-नित्य न्याय आहेत-(इति मम मतिः)-अशी माझी दृढ भावना आहे. ७८

हें राजानें भाषण ऐकून संजय म्हणाला कीं, तुम्हां दोघांपैकीं कोणाला जय येईल, हें मला सांगवत नाहीं, परंतु जेथें आयुष्य आहे, तेथें जगणें हें खास आहे. ३१ चंद्र तेथें चांदणें, शंकर तेथें पार्वती, संत तेथें ज्ञान या गोष्टी निश्चित असावयाच्याच. ३२ राजा तेथें सैन्य, सौजन्य तेथें मैत्री,

१ लीन होऊं लागे. २ रत्नकांति, रत्नदीप्ति. ३ स्फटिकाप्रमाणें. ४ अवकाश. ५ मागेपणाच्या आठवासह. ६ न सावरणाऱ्या. ७ हुंदका येऊन, उमासा टाकी. ८ गंध, किंमत. ९ जिरविला. १० सात्त्विकाहंकार. ११ उपक्रम, विचार १२ प्रकार. १३ कोणत्या. १४ प्रसंग नसतां. १५ उदास. १६ उजाडलें असतां. १७ भयंकर. १८ युद्ध,कलह. १९ विजय. २० पांडवांच्या मानानें, २१ सैन्य. २२ दीडपट. २३ गणित, माकीत. २४ परस्परांचें. २५ चांदणें. २६ पार्वती. २७ विचाराला. २८ सैन्य.

न्हि तेथें दाहकें । सामर्थ्य कीं ३३ दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु ।
ुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ३४ वसंत तेथें वनें । वन तेथें सुमनें । सुमनीं
ालिंगनें । सारंगांचीं ३५ गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं
माधान । आथी जैसें ३६ भाग्य तेथ विलासु । सुख तेथें उल्लासु । हें असो
थ प्रकाशु । सूर्य जेथें ३७ तैसें सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी का सनाथ ।
ो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ३८ आणि आपुलेनि कांतेंसीं । ते जग-
्बा जयापासीं । अणिमादिकीं काय दासी । नव्हती तयातें ३९ कृष्ण विज-
स्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तैं जयो लागवेगें । तेथेंचि
आहे १६४० विजयी नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु । [११] श्रि-
ेसीं विजय निश्चितु । तेथेंचि असे ४१ तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पत-
रूतें होडी[१२] । न जिणावें कां येवढीं । मायबापें असतां ४२ ते पाषाणही आघवे ।
चिंतारत्नें कां नोहावें । तिये भूमिकें कां न यावें । सुवर्णत्व ४३ तयाचिया गांवींचिया ।
नदी अमृतें वहाविया । नवल कायि राया । विचारी पां ४४ तयाचे बिसाट
शब्द । सुखें म्हणों येती वेद । सदेह सच्चिदानंद । कां नोहावे ते ४५ पैं स्वर्गाप-
वर्ग दोन्ही । इयें पदें तया आधीनीं । जे श्रीकृष्ण बाप जननी । कमळा जया
४६ म्हणौनि जिया आंहीं उभा । तो लक्ष्मीयेचा वल्लभा । तेथ सर्वसिद्धी स्व-
यंभा । येर मी नेणें ४७ आणि समुद्राचा मेघु । उपयोगें तयाहूनि चांगु ।
तैसा पार्थी आजी लागु । आहे तये ४८ कनकत्वेंदीक्षागुरू । लोहो परिसु
होय किरू । परी जगा पोसिता व्यवहारू । तेंचि जाणें ४९ येथ गुरुत्वा ये-
तसे उणें । ऐसें झणें कोण्ही म्हणे । वन्हि प्रकाश दीपपणें । प्रकाशी आपुला
१६५० तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवासीचि बहुती । पैं मानें इये स्तुती ।
गौरव असे ५१ आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा शिराणी । तरी
ते शार्ङ्गपाणी । फळा आली ५२ किंबहुना ऐसा नृपा । पार्थु जालासे कृष्णकृपा ।
तो[३०] जयाकडे साक्षेपा । रीती आहे ५३ तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज
कोण संदेहो । तेथ नये तरी वांवो । विजयोचि होय ५४ म्हणौनि जेथ श्री तेथें
श्रीमंतु । जेथ तो पांडूचा सुतु । तेथ विजय समस्तु । अभ्युदयो तेथ ५५ जरी
व्यासाचेनि साचें । धिरे[३४] मन तुमचें । तरी या बोलाचें । ध्रुवेंचि माना ५६ जेथ
तो श्रीवल्लभु । जेथ भक्तकदंबु । तेथ सुख आणि लाभु । मंगळांचा ५७ य

अग्नि तेथें दाहकतेचें सामर्थ्य, ३३ दया तेथें धर्म, धर्म तेथें सुखाचें स्थान, व जेथें सुख आहे तेथें पुरुषोत्तम या गोष्टी असावयाच्याच. ३४ वसंत तेथें वन, वन तेथें फुलें, आणि फुलांचे ठिकाणीं भ्रमरांचे समुदाय; ३५ गुरु तेथें ज्ञान, ज्ञानाचे ठिकाणीं आत्मानुभव आणि आत्मानुभव झाल्यावर समाधान हें असावयाचेंच. ३६ भाग्य तेथें विलास, सुख तेथें उल्हास, फार काय सांगावें! जेथें सूर्य तेथें प्रकाश, हा असावयाचाच. ३७ त्याप्रमाणें चार पुरुषार्थ (धर्म, अर्थ, काम व मोक्ष) ज्याच्या योगानें सनाथ झाले आहेत, तो श्रीकृष्ण भगवान् जेथें आहे, तेथें लक्ष्मी असावयाचीच; ३८ आणि आपल्या पतीसह ज्याजवळ जगदंबा आहे, त्याच्याजवळ जगदंबेच्या दासी अष्टसिद्धि ह्या असणार नाहींत काय? ३९ विजयस्वरूप जो श्रीकृष्ण, तो ज्यापक्षाकडे स्वतः उभा राहिला आहे, तिकडेच जय असावयाचा. १६४० जो अर्जुन विजय नांवानें प्रख्यात आहे, आणि विजयस्वरूप श्रीकृष्ण भगवान हा लक्ष्मीसह जिकडे आहे, तिकडेच जय खास ठेवला आहे. ४१ ज्या भक्ताला श्रीकृष्ण भगवान् व लक्ष्मी हीं बाप व आई आहेत, त्याच्या देशांतील झाडांनीं कल्पतरूंची बरोबरी कां न करावी? ४२ तेथील सर्व दगड चिंतामणि कां न होतील? व तेथील जमिनी सुवर्णाच्या कां न होतील? ४३ त्याच्या गांवच्या नद्या अमृतानें कां न वाहतील? यांत नवल तें काय? राजा, याचा तूं विचार कर. ४४ त्याच्या तोंडांतून निघणारे जे शब्द, त्यांना सुखानें वेदवाक्य म्हणतां येईल. देह असतांना ते सच्चिदानंद स्वरूप कां न होतील? ४५ म्हणून स्वर्ग व मोक्ष हीं दोन्ही पदें ज्याच्या सत्तेंत आहेत, असा, श्रीकृष्ण भगवान् व कमला (लक्ष्मी) हीं ज्याला बाप व आई प्राप्त झालीं आहेत, ४६ म्हणून, ज्यापक्षाकडे लक्ष्मीपति श्रीकृष्ण भगवान् उभे आहेत तिकडे स्वयमेव सर्व सिद्धी असावयाच्याच. याशिवाय मी दुसरें कांहीं जाणीत नाहीं. ४७ आणि समुद्रापासून उत्पन्न होणारा जो मेघ, त्याचा समुद्राहूनही जगतास विशेष उपयोग होतो; तसें श्रीकृष्णापेक्षां पार्थाचें भाग्य आज विशेष आहे. ४८ लोखंडाला कनकाची दीक्षा देणारा परिस हा गुरु खरा, परंतु जगाला व्यवहारांत ज्याचा (सोन्याचा) उपयोग होतो, त्याचीच योग्यता विशेष मानली जाते. ४९ या उक्तीनें गुरुत्वाला उणेपणा येतो असें कदाचित् कोणी म्हणेल, तर अग्नीचा प्रकाश जो दीप, त्याची प्रशंसा केली असतां ती जशी अग्नीचीच होते, १६५० तशी देवांच्याच प्रसादानें पार्थाची शक्ति देवांहून विशेष आहे. परंतु पार्थाचीच स्तुति केली असतां त्याचा देवाला विशेष गौरव वाटतो. ५१ आणि पुत्रानें मला सर्व गुणांनीं जिंकावें अशी बापास जी इच्छा असते, तीच श्रीकृष्णाची इच्छा परिपूर्ण झाली आहे. ५२ राजा, फार काय सांगूं! कृष्णकृपेनें युक्त जो पार्थ तो ज्या बाजूला आहे, ५३ तेंच विजयाचें ठिकाण. याविषयीं तुला संशय कशास पाहिजे? तेथें जर विजय नाहीं आला, तर विजयाचें विजयपण व्यर्थ होईल. ५४ याकरितां, जेथें लक्ष्मी तेथें तिचा पति श्रीकृष्ण भगवान्, व जेथें पंडुपुत्र अर्जुन तेथें विजय असून भाग्योदयही तेथेंच आहे. ५५ जर श्रीव्यासांचे बोलण्यावर तुमचा भरंवसा असेल, तर मी जें आतां बोललों तें खचीत आहे, असें समजा. ५६ जेथें लक्ष्मीचा पति श्रीकृष्ण व भक्तकदंब अर्जुन हे आहेत, तेथें मंगलाचा लाभ आणि

१ अग्नि. २ उष्णता. ३ सुखाचें स्थान. ४ पुष्पें. ५ समुदाय. ६ भ्रमरांचा ७ आत्मानुभव. ८ सुखोपभोग. ९ पतीसह. १० अष्टमहासिद्धि. ११ लक्ष्मीसह. १२ पैजेनें. १३ जिंकावें. १४ चिंतामणी. १५ भलते, अव्यवस्थित. १६ स्वर्ग, व मोक्ष. १७ स्वाधीन. १८ लक्ष्मी. १९ ज्या ज्या पक्षाकडे ज्या मार्गी २० पति. २१ भाग्य. २२ सुवर्णपणा देण्याची दीक्षा देणारा गुरु. २३ लोखंडाला. २४ सुवर्णच. २५ कदाचित्. २६ देवापेक्षां. २७ परंतु. २८ मानितो. २९ इच्छा. ३० ज्या बाजूला त्याची मदत आहे, साक्षेप=उद्योग, यत्न. ३१ विजयाचें विजयत्व व्यर्थ होईल. ३२ उत्कर्ष. भरभराट. ३३ खरेपणानें. ३४ विश्वासें. ३५ भडभडवच, खरेपणा. ३६ लक्ष्मीपति. ३७ भक्तश्रेष्ठ, भक्तशिरोमणी अर्जुन. ३८ कल्याणाचा.

[1]वन्हि तेथें दाहकें । सामर्थ्य कीं ३३ दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु[3] ।
सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ३४ वसंत तेथें वनें । वन तेथें सुमनें[4] । सुमनीं
पालिंगनें[5] । सारंगांचीं[6] ३५ गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन[7] । दर्शनीं
समाधान । आथी जैसें ३६ भाग्य तेथ विलासु । सुख तेथें उल्लासु । हें असो
तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ३७ तैसें सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी का सनाथ ।
तो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ३८ आणि आपुलेनि कांतेंसीं । ते जग-
दंबा जयापासीं । अणिमादिकी[10] काय दासी । नव्हती तयातें ३९ कृष्ण विज-
यस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तैं जयो लागवेगें । तेथेंचि
आहे १६४० विजयी नामें अर्जुन विख्यातु । विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु । [11]श्रि-
येसीं विजय निश्चितु । तेथेंचि असे ४१ तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पत-
रूतें होडी[12] । न जिणावें[13] कां येवढीं । मायबापें असतां ४२ ते पाषाणही आघवें ।
चिंतीरत्नें[14] कां नोहावें । तियें भूमिकें कां न यावें । सुवर्णत्व ४३ तयाचिया गांवींचिया ।
नदी अमृतें वहाविया । नवल कायि राया । विचारी पां ४४ तयाचे बिसाट[15]
शब्द । सुखें म्हणों येती वेद । सदेह सच्चिदानंद । कां नोहावे ते ४५ पैं स्वर्गाप[16]-
वर्ग दोन्ही । इयें पदें तया अधीनीं[17] । जे श्रीकृष्ण बाप जननी । कमळा[18] जया
४६ म्हणौनि जिया आंहीं[19] उभा । तो लक्ष्मीयेचा वल्लभा[20] । तेथ सर्वसिद्धी स्व-
यंभा । येर मी नेणें ४७ आणि समुद्राचा मेघु । उपयोगें तयाहूनि चांगु ।
तैसा पार्थीं आजी लागु[21] । आहे तये ४८ कनकत्वें[22]दीक्षागुरू । लोहीं[23] परिसु
होय किरू । परी जगा पोसिता व्यवहारू । तेंचि[24] जाणें ४९ येथ गुरुत्वा ये-
तसे उणें । ऐसें झणें[25] कोण्ही म्हणे । वन्हि प्रकाश दीपपणें । प्रकाशी आपुला
१६५० तैसा देवाचिया शक्ती । पार्थु देवांसीचि[26] बहुती । पैंरी[27] मानें[28] इये स्तुती ।
गौरव असे ५१ आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा शिरोणी[29] । तरी
ते शार्ङ्गपाणी । फळा आली ५२ किंबहुना ऐसा नृपा । पार्थु जालासे कृष्णकृपा ।
तो [20] जयाकडे साक्षेपा । रीती आंहे[30] ५३ तोचि गा विजयासि ठावो । येथ तुज
कोण संदेहो । तेथ नये तरी वावो[31] । विजयोचि होय ५४ म्हणौनि जेथ श्री तेथें
श्रीमंतु । जेथ तो पांडूचा सुतु । तेथ विजय समस्तु । अभ्युदयो[32] तेथ ५५ जरी
व्यासाचेनि सांचें[33] । धिरे[34] मन तुमचें । तरी या बोलाचें । ध्रुवेंचि[35] माना ५६ जेथ
तो श्रीवल्लभु[36] । जेथ भक्तकदंबु[37] । तेथ सुख आणि लाभु । मंगळांचा[38] ५७ य

अग्नि तेथें दाहकतेचें सामर्थ्य, ३३ दया तेथें धर्म, धर्म तेथें सुखाचें स्थान, व जेथें सुख आहे तेथें पुरुषोत्तम या गोष्टी असावयाच्याच. ३४ वसंत तेथें वन, वन तेथें फुलें, आणि फुलांचे ठिकाणी भ्रमरांचे समुदाय; ३५ गुरु तेथें ज्ञान, ज्ञानाचे ठिकाणी आत्मानुभव आणि आत्मानुभव झाल्यावर समाधान हें असावयाचेंच. ३६ भाग्य तेथें विलास, सुख तेथें उल्हास, फार काय सांगावें! जेथें सूर्य तेथें प्रकाश, हा असावयाचाच. ३७ त्याप्रमाणें चार पुरुषार्थ (धर्म, अर्थ, काम व मोक्ष) ज्याच्या योगानें सनाथ झाले आहेत, तो श्रीकृष्ण भगवान् जेथें आहे, तेथें लक्ष्मी असावयाचीच; ३८ आणि आपल्या पतीसह ज्याजवळ जगदंबा आहे, त्याच्याजवळ जगदंबेच्या दासी अष्टसिद्धि ह्या असणार नाहींत काय? ३९ विजयस्वरूप जो श्रीकृष्ण, तो ज्यापक्षाकडे स्वतः उभा राहिला आहे, तिकडेच जय असावयाचा. १६४० जो अर्जुन विजय नांवानें प्रख्यात आहे, आणि विजयस्वरूप श्रीकृष्ण भगवान हा लक्ष्मीसह जिकडे आहे, तिकडेच जय खास ठेवला आहे. ४१ ज्या भक्ताला श्रीकृष्ण भगवान् व लक्ष्मी हीं बाप व आई आहेत, त्याच्या देशांतील झाडांनी कल्पतरूंची बरोबरी कां न करावी? ४२ तेथील सर्व दगड चिंतामणि कां न होतील? व तेथील जमिनी सुवर्णाच्या कां न होतील? ४३ त्याच्या गांवच्या नद्या अमृतानें कां न वाहतील? यांत नवल तें काय? राजा, याचा तूं विचार कर. ४४ त्याच्या तोंडांतून निघणारे जे शब्द, त्यांना सुखानें वेदवाक्य म्हणतां येईल. देह असतांना ते सच्चिदानंद स्वरूप कां न होतील? ४५ म्हणून स्वर्ग व मोक्ष हीं दोन्ही पदें ज्याच्या सत्तेंत आहेत, असा, श्रीकृष्ण भगवान् व कमला (लक्ष्मी) हीं ज्याला बाप व आई प्राप्त झाली आहेत, ४६ म्हणून, ज्यापक्षाकडे लक्ष्मीपति श्रीकृष्ण भगवान् उभे आहेत तिकडे स्वयमेव सर्व सिद्धी असावयाच्याच. याशिवाय मी दुसरें कांहीं जाणीत नाहीं. ४७ आणि समुद्रापासून उत्पन्न होणारा जो मेघ, त्याचा समुद्राहूनही जगतास विशेष उपयोग होतो; तसें श्रीकृष्णापेक्षां पार्थाचें भाग्य आज विशेष आहे. ४८ लोखंडाला कनकाची दीक्षा देणारा परिस हा गुरु खरा, परंतु जगाला व्यवहारांत ज्याचा (सोन्याचा) उपयोग होतो, त्याचीच योग्यता विशेष मानली जाते. ४९ या उक्तीनें गुरुत्वाला उणेपणा येतो असें कदाचित् कोणी म्हणेल, तर अग्नीचा प्रकाश जो दीप, त्याची प्रशंसा केली असतां ती जशी अग्नीचीच होते, १६५० तशी देवांच्याच प्रसादानें पार्थाची शक्ति देवांहून विशेष आहे. परंतु पार्थाचीच स्तुति केली असतां त्याचा देवाला विशेष गौरव वाटतो. ५१ आणि पुत्रानें मला सर्व गुणांनी जिंकावें अशी बापास जी इच्छा असते, तीच श्रीकृष्णाची इच्छा परिपूर्ण झाली आहे. ५२ राजा, फार काय सांगूं! कृष्णकृपेनें युक्त जो पार्थ तो ज्या बाजूला आहे, ५३ तेंच विजयाचें ठिकाण. याविषयीं तुला संशय कशास पाहिजे? तेथें जर विजय नाहीं आला, तर विजयाचें विजयपण व्यर्थ होईल. ५४ याकरितां, जेथें लक्ष्मी तेथें तिचा पति श्रीकृष्ण भगवान्, व जेथें पंडुपुत्र अर्जुन तेथें विजय असून भाग्योदयही तेथेंच आहे. ५५ जर श्रीव्यासांचे बोलण्यावर तुमचा भरंवसा असेल, तर मी जें आतां बोललों तें खचीत आहे, असें समजा. ५६ जेथें लक्ष्मीचा पति श्रीकृष्ण व भक्तकदंब अर्जुन हे आहेत, तेथें मंगलाचा लाभ आणि

१ अग्नि. २ उष्णता. ३ सुखाचें स्थान. ४ पुष्पें. ५ समुदाय. ६ भ्रमरांचा. ७ आत्मानुभव. ८ सुखोपभोग. ९ पतीसह. १० अष्टमहासिद्धि. ११ लक्ष्मीसह. १२ पैजेनें. १३ जिंकावें. १४ चिंतामणी. १५ मस्ते, सव्यवस्थित. १६ स्वर्ग, व मोक्ष. १७ स्वाधीन. १८ लक्ष्मी. १९ ज्या ज्या पक्षाकडे ज्या मार्गी २० पति. २१ भाग्य. २२ सुवर्णपणा येण्याची दीक्षा देणारा गुरु. २३ लोखंडाला. २४ सुवर्णच. २५ कदाचित्. २६ देवापेक्षां. २७ परंतु. २८ मानितो. २९ इच्छा. ३० ज्या बाजूला त्याची मदत आहे, साक्षेप=खटपट, यत्न. ३१ विजयाचें विजयत्व व्यर्थ होईल. ३२ उत्कर्ष, भरभराट. ३३ खरेपणानें. ३४ विश्वासें. ३५ अढळत्वच, खरेपणा. ३६ लक्ष्मीपति. ३७ भक्तश्रेष्ठ, भक्तशिरोमणी अर्जुन. ३८ कल्याणाचा.

बोला आन होये । तरी व्यासाचा अंकु[1] न वाहे । ऐसें गौजोनि बाहें । उभिली तेणें[2] ५८ एवं भारताचा ओंवांका[3] । आणूनि श्लोका येका[4] । संजयें कुरुनायका । दिधला हातीं ५९ जैसा नेणों केवढा वन्ही । परी गुणाग्रीं ठेऊनी । आणिजे सूर्यांची हांनी । निस्तरांवया १६६० तैसें शब्दब्रह्म अनंत । जाले सवालक्ष भारत । भारताचें शतें सात । सर्वस्व गीता ६१ तयाही सातां शतांचा । इत्यर्थु हा श्लोक शेषींचा । व्यासशिष्य संजयाचा । पूर्णोद्धारु जो ६२ येणें येकेंचि श्लोकें । राहे तेणें असकें । अविद्याजाताचें निकें । जितलें होय ६३ ऐसें श्लोक शतें सात । गीतेचीं पदें आंगें वाहत । पदें म्हणों कीं परमामृत । गीतांकाशिंचें ६४ कीं आत्मराजाचिये सभे । गीते वोडवले हे खांबे । मज श्लोक प्रतिभे[12] । ऐसे येत ६५ कीं गीता हे रुप्तशती । मंत्रप्रतिपाद्य भगवती । मोहेंमहिषा मुक्ती[13] । आनंदली असे ६६ म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवक होईल इयेचा । तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती करी ६७ कीं अविद्यांतिमिररोखे । श्लोक सूर्याते पैजा जिंके । ऐसे प्रकाशिले गीताभिखे । रायें श्रीकृष्णें ६८ कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली आहे गीता । संसारपथश्रांता । विसंवावया ६९ कीं सभाग्यसंतीं भ्रमरीं । सेविले ते श्लोककल्हारी[15] । श्रीकृष्णाख्यसरोवरीं । सासिन्नली हे १६७० कीं श्लोक नव्हती आन । गमे गीतेचें महिमान । वाखाणिते वंदिजन । उदंड जैसे ७१ कीं श्लोकांचिया आवारा । सात शतें करूनि सुंदरा । सर्वागम गीतापुरा । वसों आले ७२ कीं निजकांता आत्मया । आवडी गीता मिळावया । श्लोक नव्हती बाह्या । पसरु का जो ७३ कीं गीताकमळीचे भृंगें । कीं हे गीतासागरतरंग । कीं हरीचे हे तुरंगें । गीतारथींचे ७४ कीं श्लोक सर्वतीर्थसंघातु । आला श्रीगीतेगंगेआंतु । जे अर्जुन नर सिंहस्थु । जाला म्हणौनि ७५ कीं नोहे हे श्लोकश्रेणी । अचिंतचित्तचिंतामणी । कीं निर्विकल्पां लावणी । कल्पतरूंची ७६ ऐसिया शतें सात श्लोकां । परी आगळा येकयेका । आतां कोण वेगळिका । वानोंवा पां ७७ तान्ही आणि पारंठी[25] । इया कामधेनूतें दिठी[26] । सूनि जैसिया गोठी । कीजतीना ७८ दीपा आगिलु मागिलु । सूर्यु धाकुटा वडीलु । अमृतसिंधु खोलु । उथळु कायसा ७९ तैसें पहिले सेरते । श्लोक न म्हणावे गीते । जुनीं नवीं पारिजातें । आहाती कांई १६८० आणि श्लोका पाडु[30] नाहीं । हें कीर समर्थु काई । येथ वाच्य

सौख्य आहे. ५७ हें माझें बोलणें जर असत्य होईल, तर मी व्यासांचा शिष्य म्हणविणार नाहीं, असें हात उभारून मोठ्यानें गर्जना करून तो बोलला. ५८ याप्रमाणें सर्व भारताचा सारांश संजयानें गीतेच्या अठराव्या अध्यायांतील एका अनुष्टुपवृत्ताच्या श्लोकांत आणून, कुरुनायक जो धृतराष्ट्र राजा त्याचे हातांत दिला. ५९ अग्नि किती मोठा आहे! परंतु वातीच्या शेवटाला लावला असतां, त्याच्या उजेडानें सूर्य मावळल्यावर जो अंधार पडतो, त्याचें निवारण होतें; १६६० त्याप्रमाणें, वेद अनंत असून त्यांचें सार व्यासांनी भारत केलें व त्या भारताचा सारांश गीतेच्या सातशें श्लोकांत आणिला. ६१ त्याही सातशें श्लोकांतील हा शेवटला श्लोक सारभूत असून तो व्यासशिष्य जो संजय, त्याचा पूर्ण उद्गार आहे. ६२ या एकाच श्लोकानें अज्ञानाचें मूळ समूळ जिंकून टाकलें ६३ असे गीतेचे सातशें श्लोक हीं गीतेचीं पदें (पाउलें) असून गीतेला घेऊन जात आहेत; किंवा हीं पदें नसून, हे श्लोक हीं गीताकाशांची अमृतवृष्टीच आहे की काय? ६४ किंवा हे श्लोक नव्हेत, तर आत्मराजाची सभा जी गीता, त्या गीतारूप सभेचे हे सातशें श्लोकरूप खांबच आहेत, असें मला वाटतें. ६५ किंवा, गीता ही सातशें श्लोकांनीं प्रतिपादन केलेली साक्षात् भगवती देवीच आहे. या देवीनें मोहरूप महिषासुरास मारून ही आनंदाप्रत पावली आहे. ६६ म्हणून, या गीतारूप देवीचा जो कायावाचामनेंकरून सेवक होईल, तो आनंदरूपी साम्राज्यपदाचा सार्वभौम राजाच होईल. ६७ किंवा अज्ञानरूप जो अंधकार, त्याला प्रतिज्ञेनें जिंकणारे हे सातशें श्लोक नसून हे सातशें सूर्यच श्रीकृष्णांनी गीतेच्या रूपानें प्रकाशित केले आहेत. ६८ किंवा संसारमार्गानें चालणारांना जे श्रम झाले आहेत, त्यांचा परिहार होऊन विसांवा घेण्याकरितां सातशें श्लोक हे द्राक्षांचे वेलच असून ते गीतारूप मांडवावर पसरलेले आहेत. ६९ किंवा, श्रीकृष्णाख्यानरूपी गीतासरोवरांत सातशें श्लोक हीं कमळें असून, त्यांचा गंध घेणारे भाग्यवान् संत हे भ्रमरच होत. १६७० किंवा हे श्लोक नव्हेत, तर गीतेचा महिमा वर्णन करणारे हे सातशें स्तुतिपाठकच आहेत. ७१ किंवा गीतारूप शहराला भोंवतालून सातशें श्लोकांचा कोटच आहे, म्हणून सर्व शास्त्रें गीतापुरांत वास करण्यास आलीं आहेत. ७२ किंवा, आपला पति जो आत्मा-त्याला प्रेमानें आलिंगन देण्याकरितां गीता ही श्लोकरूपी बाहु पसरून आली आहे असें वाटतें. ७३ किंवा गीतारूप कमलाचा गंध घेणारे हे श्लोक नसून भ्रमरच आहेत; अथवा हे श्लोक गीतारूप सागराच्या लाटाच आहेत; किंवा श्रीहरीचा गीतारूप रथ ओढणारे हे घोडेच आहेत. ७४ किंवा गीता ही गंगा असून इचे ठायीं सर्व श्लोकरूपी तीर्थें नरावतार अर्जुनरूपी सिंहस्थ पर्वणी आल्यामुळें मिळावयास आलीं आहेत. ७५ किंवा हे श्लोक पंक्ति नसून चित्ताला अचिंत्य जें ब्रह्म, त्याची प्राप्ति करून देणारे चिंतामणिच आहेत; अथवा कल्पनातीत जे ब्रह्म, तें प्राप्त करून देणारे हे कल्पतरूच आहेत. ७६ असे हे सातशें श्लोक एकापेक्षां एक वरचढ आहेत. तर यांत लहानमोठे अशा वेगळेपणानें कोणत्या श्लोकांचें वर्णन करावें? ७७ कामधेनूकडे पाहिलें म्हणजे जशी ती दुभती व आटलेली या गोष्टी संभवत नाहींत; ७८ दिव्यांमध्यें अगोदरचा व मागचा कोणता, व सूर्याकडे पाहिलें म्हणजे धाकटा किंवा मोठा हें समजत नाहीं; आणि अमृतसमुद्राला खोल किंवा उथळ हें म्हणतां येईल काय? कारण, सर्वांचीं फळें एकच आहेत. ७९ त्याप्रमाणें, गीतेच्या सातशें श्लोकांत पहिला व शेवटला हें म्हणतां येत नाहीं. पहा की, सुवर्णपारिजातकाच्या पुष्पांत ताजें व शिळें असा भेद करतां येईल काय? १६८० आणि श्लोकांत कमजास्तपणा नाहीं याविषयीं काय सिद्ध करूं? परंतु या गीताशास्त्रामध्यें सांगणारा व ऐकणारा या दोघांत भेद नसून ते एकस्वरूपच.

१ अखिलपण, शिष्यत्व. २ असें मोठ्यानें बोलून हात उभारला. ३ मतलब, सार. ४ 'यत्र योगेश्वरो' या शेवटच्या श्लोकांत. ५ वातीच्या अग्रभागीं. ६ अभाव भरून काढण्यास. ७ वेद. ८ संपूर्ण. ९ पाय. १० गीतारूपी आकाशांतील. ११ वर्षविले. १२ मनाला वाटतात. १३ मोहरूपी महिषासुराला मुक्ति देऊन. १४ अज्ञानांधकारावर रोष धरून, अज्ञान नाहींसें करून. १५ श्लोकरूपी कमळांनी युक्त. १६ कृष्णगीतारूपी पुष्करिणी सिद्ध झाली. १७ स्तुतिपाठक. १८ सर्व वेद शास्त्रें. १९ भ्रमर २० घोडे. २१ श्लोकपंक्ति २२ अचिंत्य=विरक्त यांच्या चित्ताला चिंतामणी, ब्रह्म. २३ कल्पनातीत ब्रह्म. २४ वर्णावा. २५ पाहतांना. २६ दृष्टी देऊन. २७ अगोदरचा व पाठीमागचा. २८ शेवटले. २९ पारिजात जुना असो अथवा नवा असो, पुष्पांचा परिमळ सारखाच. ३० कमजास्तीपणा.

वाचकही । भागु न धरी ८१ जे इये शास्त्री येकु । श्रीकृष्णाचि वाच्य वा-
चकु । हें प्रसिद्ध जाणे लोकु । भलताही ८२ येथें अर्थें तोंचि पाठें । जोडे
येवढेनि धेंटें । वाच्यवाचक येकवटें । साधितें शास्त्र ८३ म्हणौनि मज कां-
हीं । समर्थनीं आतां विषय नाहीं । गीता जाणा हे वाङ्मयी । श्रीमूर्ती प्र-
भूची ८४ शास्त्र वाच्यें अर्थें फळे । मग आपण मावळे । तैसें नव्हे हें सग-
ळें । परब्रह्माचि ८५ कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा । अर्जु-
नव्याजें रूपा । आणिला देवें ८६ चकोराचेनि मिसिचें । तिन्ही भुवनें सं-
तप्तें । निवविलीं कळावंतें । चंद्रें जेवीं ८७ कां गौतमाचेनि मिषें । कळि-
काळज्वरितोद्देशें । पाणिढाळु गिरीशें । गंगेचा केला ८८ तैसें गीतेचें हें दुभ-
तें । वत्स करूनि पार्थातें । दुभीनली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ८९ येथें
जीवें जरी नाहाल । तरी हेंचि कीर होआल । नातरी पाठमिषें तिंबाल ।
जीभाचि जरी १६९० तरी लोह एके अंशें । झगटलिया परिसें । येरीकडे
अपैसें । सुवर्ण होय ९१ तैसी पाठाची ते वाटी । श्लोकपाद लावा ना जंव
वोठीं । तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल आंगा ९२ ना येणेसीं मुख वांकडें ।
करूनि ठाकाल कानंवडें । तरी कानींहि घेतां पडे । तोचि लेखें ९३ जें हे
श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षाआंरौतें । जैसा समर्थ दाता कोण्हातें ।
नास्ति न म्हणे ९४ म्हणौनि जाणतेया सवां । गीताचि येकी सेवा । काय
कराल आंघवां । शास्त्रीं येरीं ९५ आणि कृष्णार्जुनीं मोकळी । गोठीं चावं-
ळिली जे निराळीं । तें श्रीव्यासें केली करतळीं । घेवों ये ऐसी ९६ बाळ-
कातें वोरसें । माय जैं जेवऊं बैसे । तैं तयीं ठाकती तैसें । घांस करी ९७
कां अफाटा समिरणा । आंपैतेंपण शहाणा । केलें जैसें विंजणा । निमूनि-
यां ९८ तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनियां अनुष्टुभें । स्त्रीशूद्रादि प्रतिभे ।
सामाविलें ९९ स्वातीचेनि पाणियें । न होती जरी मोतियें । तरी अंगीं
सुंदरांचिये । का शोभती तियें १७०० नादु वाद्या न येतां । तरी कां गो-
चरु होता । फुलें न होतां घेपता । आमोदु केंवि १ गोडी न होती पक्वान्नें ।
तरी कां फावती रसनें । दर्पणावीण नयनें । नयनु कां दिसे २ द्रष्टा श्री-
गुरुमूर्ती । नें रिगता दृश्यपंथीं । तरी कोंह्या उपास्ती । आकळता तो ३
तैसें वस्तु जें असंख्यात । तया संख्या शतें सात । न होती तरी कोणा

आहेत. ८१ कारण, या गीताशास्त्रांत श्रीकृष्ण सांगणारे व अर्जुन हा श्रीकृष्णरूपच ऐकणारा या गोष्टी सर्वांना ठाऊक आहेत. ८२ या गीतेंत अर्थानें जें फल, तेंच पाठ करण्यानें धट लावून मिळतें, म्हणून वाच्य व वाचक या दोघांनाही सारखीच योग्यता देणारें हें शास्त्र आहे. ८३ म्हणून, त्या गीतेविषयीं जास्त समर्थन करण्यास कांहीं विषयच उरला नाहीं. कारण, गीता ही भगवंताची शब्दमय मूर्तिच आहे. ८४ इतर शास्त्रांचें वाचन करून अर्थ समजल्यावर फलप्राप्ति झाली म्हणजे तें शास्त्र नाहींसें होतें, तसें हें गीताशास्त्र नसून हें ओतप्रोत परब्रह्मस्वरूपच आहे. ८५ काय सांगावें ? अर्जुनाचें निमित्त करून सर्व जगावर कृपा करण्याकरितां श्रीकृष्णांनीं दुर्लभ असा ब्रह्मानंद सुलभ करून ठेवला आहे, ८६ जसा पूर्णकळायुक्त चंद्र चकोराच्या निमित्तानें प्रकाशित होऊन तिन्ही लोकांच्या तापाची निवृत्ति करितो; ८७ अथवा गौतमाच्या निमित्तानें, कलिकालरूपी ज्वरानें पीडित झालेल्या जीवांच्या दोषांची निवृत्ति होण्याकरितां श्रीशंकरांनी गंगा या मृत्युलोकीं पाठवून दिली, ८८ त्याप्रमाणें, पार्थरूपी वत्साचें निमित्त करून श्रीकृष्णरूपी गाईनें हें गीतारूप दूध देऊन सर्व जगाला संतोषित केलें. ८९ या गीताशास्त्राचे ठिकाणीं जिवाभावानें बुडी घाल, तर गीतारूपच व्हाल, अथवा पाठरूपानें जिभेला जर श्रम द्याल, तर गीतारूपच व्हाल. १६९० परिसाचें सामर्थ्य असें आहे कीं तो लोखंडाचे एके बाजूस लागला असतां सर्व लोखंड आपोआप सुवर्णमय होतें, ९१ तशी गीतापाठरूपी वाटींतील एक श्लोकाचें पद मुखाला लावाल न लावाल, तोंच ब्रह्मत्वाची पुष्टि अंगांत येईल. ९२ अथवा गीता पाठ करण्याविषयीं तोंड वांकडें करून जर कुशीवर वळाल, तर ती अक्षरें कानांत जरी पडलीं, तरी त्यांचेंही फल तेंच येईल. ९३ गीतेचें औदार्य काय सांगावें कीं जी आपल्या श्रवणानें, पाठानें व अर्थानें मोक्षाशिवाय दुसरें फळच देत नाहीं. जसा समर्थ दाता कोणालाही विमुख लावीत नाहीं तशी. ९४ म्हणून, जितके शहाणे आहेत, त्यांनीं एक गीतेचें सेवन करावें, यावांचून इतर शास्त्राचें सेवन करून काय प्राप्त होणार आहे ? ९५ आणि श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं जें नुसतें संभाषण केलें, तें श्रीव्यासांनीं हातांत घेतां येईल, तितकें सुलभ केलें. ९६ मुलाला आई प्रेमानें जेवूं घालण्यास बसली म्हणजे त्याला जसे गिळतां येतील तसेच लहान घांस करिते; ९७ किंवा अफाट जो वायु तो आपल्या हातांत यावा, म्हणून शहाण्यांनीं जशी पंख्याची योजना केली. ९८ तसें शब्दानें जें कळावयाचें नाहीं, त्याचें अनुष्टुभ छंद करून, स्त्री, शूद्र आदिकरून सर्वांच्या बुद्धीला तें सुलभ करून ठेवलें. ९९ स्वाती नक्षत्राच्या पाण्यापासून जर मोतीं उत्पन्न झालीं नसतीं तर स्त्रियांचीं अंगें कशानें शोभिवंत झालीं असतीं. १७०० नादब्रह्म जर वाद्यांत आलें नसतें, तर नाद आपल्यास कसा कळला असता ? फुलें जर नसती, तर वास कसा घेतां आला असता ? १ पक्वान्नांत जर गोडी नसती, तर ती जिभेला कशी प्राप्त झाली असती ? आरसा जर नसता, तर डोळ्यांला आपलें रूप कसें पहातां आलें असतें ? २ निराकार श्रीगुरु जर आकारास आले नसते, तर उपासकांना कशी सेवा करतां आली असती ? ३ तसें अगणित जें ब्रह्म तें गीतेच्या सातशें श्लोकांच्या रूपानें जर प्रकट झालें नसतें, तर कोणाला तरी जाणतां आलें असतें

१ बोलणारा व ऐकणारा. २ निश्चयानें. ३ वाणीरूप. ४ जगाची दया वाटल्यामुळें, विश्वाच्या कळवळ्यानें. ५ अर्जुनाच्या निमित्तानें. ६ प्रत्यक्षतेस. ७ कलिरूपी काळज्वरानें पीडित झाल्यामुळें. ८ पाण्याचा प्रवाह. ९ शंकरानें. १० भिजताल, लेपन कराल. ११ एका अंगावर, मुख भाजूला होऊन कान पुढें येईल तर. १२ फळ. १३ शिवाय. १४ नाहीं. १५ जाणत्या समंजस. १६ स्वच्छंद. स्वैर, आधळपधळ. १७ मोलिली. १८ आकाशांत. १९ पान्हा दाटून आल्यानें, अति ममतेनें. २० त्याला सोयीस पडतील तसे. २१ वाऱ्याला. २२ आधीनपण, वश्यता. २३ पंखा. २४ ३२ अक्षरांचा छंद=अनुष्टुभछंद. २५ स्त्रीशूद्रादिकांच्या अंतःकरणांत. २६ सुगंध. २७ पाहणारा, साक्षी. २८ साकार, दृश्य झाला नसता. २९ कसा. ३० उपासनेला. ३१ ब्रह्म.

येथ । फावों[1] शकतें ४ मेघ सिंधूचें पाणी वाहे । तरी जग तयातेंचि पाहे । कां जें उमपें[2] तें नोहें[3] । ठांकतें कोण्हा ५ आणि वाचा जे न पवे । तें हे श्लोक होते न बरवे । तरी कानें मुखें फावे । ऐसें कां होतें ६ म्हणोनि श्रीव्यासाचा हा थोरु । विश्वासि जाला उपकारु । जे श्रीकृष्ण उक्ती आकारु । ग्रंथाचा केला ७ आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पाहतां पाहतां । आणिला श्रवणपथा । मऱ्हाटिया ८ व्यासादिकांचे उन्मेखें । राहाटती जेथ सांशंक । तेथ मीही रंक एक । चावळी करीं ९ परी गीता ईश्वरु भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाळा । तरी माझिया दूर्वांदळा । ना न म्हणे कीं १७१० आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघंटा । तेथ काय मुरकुटा । वारिजतें असे ११ पांखें फुटे पाखिरूं । नुडे तरी नभींच स्थिरूं । गगन आक्रमी सत्वरू । तो गरुडही तेथ १२ राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया शाहाणें । आणिकें काय कोणें । चालावेचिना १३ जीआपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कैलशें । चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे १४ दिवटीच्या आंगीं थोरी । तरी ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परी । आणीच कीं ना १५ जी समुद्राचेनि पैसें[14] । समुद्रीं आकाश आभासे । थिल्लरीं थिल्लराएसें । बिंबेचि पैं १६ तेवीं व्यासादिक महामती । वावरों[16] येती इये ग्रंथीं । मा आम्ही ठाकों हे युक्ती । न मिळे कीर १७ जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें । तेथ देखोनि शफरें येरें । पोहों न लाहती १८ अरुण आंगाजवळिके । म्हणोनि सूर्यातें देखे । मा भूतळींची न देखे । मुंगी काई १९ यालागीं आम्हां प्राकृतां । देशिकारें बंधें गीता । म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे १७२० आणि बापु पुढां जाये । ते घेत पाउलाची[23] सोये[24] । बाळ ये तरी न लाहे । पांवों कायी २१ तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु । अयोग्यही मी न[27] पवतु । कें[28] जाईन २२ आणि पृथ्वी जयाचिया क्षमा । नुबगे स्थावरजंगमा । जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग २३ जयाचें आंगिकें असिकें । तेज लाहोनि अर्कें । आंधाराचें सावाइकें । लोटिजेत आहे २४ समुद्रा जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य । माधुर्या सौंदर्य । जयाचेनी २५ पवना जयाचें बळ । आकाश जेणें पघळ । ज्ञान जेणें उज्वळ । चक्रवर्ती २६ वेद जेणें सुभाँस । सुख जेणें सोल्लास । हें

काय ? ४ मेघ समुद्राचेंच पाणी वर घेऊन वृष्टि करून सर्वांचा उपयोग करतो, तरी लोक मेघांचीच आशा करतात. कारण, अमर्याद जो समुद्र, त्याचा कोणालाच उपयोग होत नाहीं. ५ म्हणून, जें वाणीला देखील प्राप्त होत नाहीं तें व्यासांनीं जर हे उत्तम श्लोक केले नसते, तर ऐकावयाला किंवा मुखानें तरी वर्णन करावयाला कसें आलें असतें ? ६ याकरितां, श्रीकृष्णाची जी उक्ति ( संभाषण ) तिची गीतेच्या रूपानें व्यासांनीं रचना केली, म्हणून सर्व जगतावर त्यांचा मोठा उपकार झाला आहे.– त्या व्यासांच्या गीतेवर व्याख्यान केल्याबद्दलच्या अभिमानाचा महाराज परिहार देतात:–७ आणि आतां तोच गीतार्थ मी व्यासांचीं पदें पाहून पाहून शुद्ध मराठी भाषेंत ऐकण्याजोगा केला. ८ ज्या गीतार्थाचें यथार्थ वर्णन करण्याविषयीं व्यासादिकांचें देखील ज्ञान साशंक होतें, त्या गीतेचें मी हें गरीबानें व्याख्यान केलें आहे. ९ परंतु गीतारूप ईश्वर हा अत्यंत भोळा आहे, म्हणून व्यासांच्या भाषणरूपी पुष्पमाला धारण करितो; व आमचे गरीबाचे दुर्वांकुरांसही नाहीं म्हणत नाहीं १७१० आणि क्षीरसमुद्राचे कांठाला हत्तीचे समुदाय पाणी पिण्यास येतात, तेथें त्यांना तेवढी परवानगी असून, मुरकुटांना तो माघारी लावतो काय ? ११ पंख फुटतात न फुटतात अशा पांखराला जरी उडतां आलें नाहीं, तरी तें आकाशांतच रहातें, व सर्व गगनाचें आक्रमण करणारा गरुडही त्या आकाशांतच रहातो. १२ राजहंसाची मंद गति सर्व जगतांत उत्तम असली, म्हणून दुसऱ्या कोणी चालूं नये की काय ? १३ कलशांत पुष्कळ सांठवण असल्यामुळें पुष्कळ पाणी मावतें; पण चूळ लहान असली तरी तिच्या मानानें तींत पाणी येत नाहीं काय ? १४ मशाल मोठी असल्यामुळें तिचें तेज मोठें पडतें; पण वात जरी लहान असली, तरी तिच्या मानानें तिचें तेज पडतें की नाहीं ? १५ समुद्राच्या विस्ताराप्रमाणें त्यांत आकाशाचें प्रतिबिंब मोठें दिसतें; पण तें डबक्यांतही डबक्याचे मानानें दिसतेंच; १६ त्याप्रमाणें, व्यासादिकांच्या महामतींनीं या ग्रंथाविषयीं विचार करावा, व आम्ही स्वस्थ बसावें, ही गोष्ट युक्तीला जुळत नाहीं. १७ ज्या समुद्रामध्यें मंदराचलासारखे महान् महान् जलचर वास करतात, त्यांचें वैभव पाहून लहान लहान माशांनीं तेथें राहूंच नये की काय ? १८ अरुण हा सूर्याचे सन्निध आहे, म्हणून तो सूर्यास पहातो, आणि पृथ्वीवर जी लहान मुंगी आहे ती त्याकडे पहात नाहीं की काय ? १९ यास्तव, आम्ही प्राकृत जनांनीं गीतेचें देशभाषेंत वर्णन केलें, ही गोष्ट अयोग्य आहे, असें म्हणण्याचें कारण नाहीं. १७२० आणि बाप पुढें चालला आहे व मुलगा त्याच्या मागून त्याच मार्गानें पुढें चालूं लागला तर ज्या स्थानाला बाप गेला त्या स्थानाला तो पोहोंचूं शकणार नाहीं काय ? २१ तसा मी व्यासांचा माग घेत आणि भाष्यकारांला वाट विचारीत चाललों असतां, मी जरी अयोग्य आहें, तरी व्यास ज्या ठिकाणीं गेले, त्या ठिकाणाला पावणार नाहीं तर कोठें जाईन ? २२ आणि ज्या परमेश्वराच्या क्षमेनें पृथ्वी स्थावरजंगम विश्वाचा उपद्रव सहन करते, व ज्या परमेश्वराच्या अमृतानें चंद्र सर्व जगाच्या तापाची निवृत्ति करून शांत करितो; २३ ज्या परमेश्वराच्या अंगच्या तेजानें सूर्याला तेज प्राप्त झालें आहे, म्हणून तो सर्व जगाला अंधारापासून प्राप्त होणारें संकट दूर करतो; २४ ज्या परमेश्वराच्या सत्तेनें समुद्राला उदक मिळालें आहे; व पाण्याला माधुर्य व माधुर्याला सौंदर्य प्राप्त झालें आहे; २५ ज्या परमेश्वराच्या सत्तेनें वाऱ्याला गतिरूप बल, आकाशाला विस्तार, व ज्ञानाला उज्वल सार्वभौमत्व प्राप्त झालें आहे; २६ ज्याच्या सत्तेनें वेदाला बोलण्याची शक्ति, सुखाला आनंदितपणा, हें असो; परंतु

---

१ मिळूं शकतें. २ अगणित. ३ आकळितां येत नाहीं. ४ ज्ञान, वाग्विस्तार. ५ अनिर्वारित, शंकित. ६ बडबड. ७ व्यासोक्तिरूप फुलांची माळा. ८ गजसमुदाय. ९ चिलटाला. १० परतवितो. ११ पंख, दमलेलें पांखरूं न उडतां आकाशांतच विश्रांति करितां स्थिर रहातें. १२ सुंदर. १३ घागरीनें. १४ विस्तार. १५ डबक्यांत. १६ विचार करावा. १७ मंदराचलाएवढा. १८ लहान मासे. १९ सूर्याचा सारथि. २० अरुण–सूर्याच्या अगदी जवळ राहणारा सारथि. २१ देशभाषेच्या, मराठी. २२ अयोग्यपणाला. २३ पावलट. २४ वाट. २५ पोहचूं. २६ माग. २७ न पावतां. २८ कोणीकडे. २९ सहनशीलतेमुळें ३० कंटाळत नाहीं. ३१ अंगचें. ३२ सर्व ऐहिक, सर्व कामगिरी, सर्वपरिणाम. ३३ दूर करीत आहे. ३४ विस्तृत, मोठें. ३५ चांगलें दोटणारें. ३६ आनंदित.

असो रूपें[1]स । विश्व जेणें २७ तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजहीआंतु । रिघोनियां २८ आतां आयती गीता जगीं । मी सांगे मऱ्हाटिया[2] भंगीं । येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे २९ श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती । तेणें[3] कोळिये त्रिजगतीं । येकवद केली १७३० चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें । वसिष्ठें मांडली कीं भांडे । भानूसीं शेटी ३१ मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दांदुला । जो दिठीवेनि आपुला । बैसवी पदीं ३२ आधींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी । तैं न दिसे ऐसी गोठी । कैंही आहे ३३ म्हणोनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे । श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ३४ याकारणें मियां । श्रीगीतार्थ मऱ्हाटिया । केला लोकां यया । दिठीचा विषो ३५ परी मऱ्हाठे[12] बोलरंगें । कैवळितां पैं गीतांगें[14] । तैं गातयाचेनि [15]पांगें । येकांचिता नोहे ३६ म्हणौनि गीता गावों म्हणे । तैं गाणिवें होती लेणें । ना मोकळे तरी उणें । गीतांही आणित ३७ सुंदर आंगीं लेणें न सूये तैं तो मोकळा शृंगारु होये । ना लेइलें तरी आहे । तैसें कें उचित ३८ कां मोतियांची जैसी जाती । सोनयाही मान देती । नातरी मानवती । अंगेंचि सेंडीं ३९ नाना गुंफिलीं कां मोकळीं । उणीं न होतीं परिमळीं । वसंतागमींचीं वाटोळीं । मोगरीं जैसीं १७४० तैसा गाणिवेनें मिरवी । गीतेवीणेंही रंगु दावी । तो लोभाचा प्रबंधु ओंवीं । केला मियां ४१ तेणें आबाल[22]सुबोधें । वोवीयेचेनि प्रबंधें । ब्रह्मरससुस्वादें । अक्षरें गुंथिलीं ४२ आतां चंदनाच्या तरुवरीं । परिमळालागीं[24] फुलवरी । पारूखणें जियापरी । लागेना कीं ४३ तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागेतखेंवो समाधि आणी । ऐकिलियाही वाखाणी । काय व्यसन न लवी ४४ पाठ करितां व्याजें । पांडित्यें येती वेषेंजे । तैं अमृतातें नेणिजे । फौवलिया ४५ तैसेनि आइतेपणें । कवित्वा जालें हें उंपेणें । मनन निदिध्यास श्रवणें । जिंतिलें आतां ४६ हे स्वानंदभोगाची सेलें । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रियां पोषवील । श्रवणाकरवीं ४७ चंद्रातें आंगेंवणें । भोगूनि चकोर शाहाणे । परी फौवे जैसें चांदिणें । भलतयाही ४८ तैसें अध्यात्मशास्त्रीं यिये । अंतरंगाचि अधिकारिये । परी लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ४९ ऐसें श्रीनिवृत्तिना-

ज्याच्या योगानें सर्व विश्वाला रूप प्राप्त झालें आहे, २७ तो वस्तुमात्रावर उपकार करणारा समर्थ सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथ माझे अंतःकरणांत शिरून वास करात आहे. २८ तेव्हां आतां आयती तयार जी गीता, ती मी जगताला मराठी भाषेनें सांगण्यास समर्थ झालों आहें, यांत आश्चर्य तें काय! २९ श्रीगुरूंच्या नांवानें डोंगरावर मातीची द्रोणाचार्यांची मूर्ति स्थापून त्याची सेवा करून एकलव्य कोळ्यानें आपले विद्येची कीर्ति त्रिजगतांत सर्वमान्य करून घेतली; १७३० चंदनाचे आसपास असलेले वृक्ष त्याच्या अंगच्या सुगंधानें सर्व चंदन होतात; व वसिष्ठांनीं स्वीकारिलेली छाटी आपले तेजानें सूर्याबरोबर भांडूं लागली, ३१ मग मी तर गीताव्याख्यान करण्याविषयीं उत्सुक, त्यावर जो दृष्टीनें अवलोकन केल्याबरोबर आपलें स्वरूप देतो असा सद्गुरु साह्य करणारा आहे; ३२ अगोदरच उत्तम दृष्टि आहे, त्यांत सूर्य पाठिराखा झाला, मग दिसणार नाहीं अशी कोणती गोष्ट आहे! ३३ म्हणून, श्रीज्ञानदेवमहाराज म्हणतात कीं, माझे तोंडांतून निघणारे नवे श्वासोच्छ्वास देखील प्रबंध होतील, कारण श्रीगुरूंच्या कृपेनें काय एक होणार नाहीं? ३४ याकरितां मी गीतेचा अर्थ मराठींत अशा रीतीनें सोपा केला कीं, तो लोकांच्या नजरेनें पहाण्यास योग्य होईल. ३५ परंतु मराठी भाषेंत गीतेचा अर्थ स्पष्ट केला आहे, तो जरी कोणी वक्ता नसला तरी नुसती वाक्येंच वाचलीं असतां उदासीन न दिसतां स्पष्टपणें समजतो. ३६ म्हणून, गीतेचें वक्तृत्व करणाराच्या बोलण्याला माझा अर्थ भूषणेंच होतात; व गाणारा नसला तरी नुसती वाचली असतां, वक्ता जरी नसला तरी उणेपणा दिसत नाहीं. ३७ सुंदर आंगावर एखादा अलंकार घातला, तर तो फार शोभिवंत दिसतो, परंतु तो घातला नाहीं तरी त्या अलंकाराची शोभा कमी का होते? ३८ किंवा मोत्यांची जात अशी आहे कीं, तीं सोन्याला अनुकूल होऊन शोभा देतात, कदाचित् सोनें नसलें तरी तीं नुसतीं सुद्धां शोभा देतात; ३९ अथवा वसंतऋतूंतील वाटोळीं मोगऱ्याचीं फुलें जशीं गुंफून गजरा केला अथवा मोकळीं घेतलीं, तरी त्यांचे वासांत कमीपणा नसतो, १७४० तसा गाणारा भेटला तरी त्याला शोभा देतो, व गाणारा नसला तरी त्याचें तेज पडतें, असा सर्वलाभदायक मी हा ओंवीप्रबंधानें ग्रंथ केला आहे. ४१ या ग्रंथांत आबालवृद्धांस समजण्याजोग्या ओंवीच्या प्रबंधानें सर्व ब्रह्मरसानें भरलेल्या अशा अक्षरांची योजना केली आहे. ४२ चंदनाच्या झाडाजवळ गेल्यावर वास घेण्यास त्याला फुलें नाहींत म्हणून खिन्न होण्याचें कारण नाहीं; कां कीं, त्याचें सर्वांग सुगंधमयच आहे. ४३ तसा हा माझा ग्रंथ श्रवणांत (कानांत) पडतांक्षणींच समाधि आणितो; मग त्याचें व्याख्यान ऐकल्यावर तो पुनः ऐकण्याविषयीं नाद लावणार नाहीं काय? ४४ या माझे ग्रंथाचा पाठ करीत असतां जर वक्तृत्व केलें, तर त्यापासून उत्पन्न होणारी गोडी अमृतालाही मागें टाकते. ४५ तसें हें अमृताहून सुरस आयतें कवित्व श्रीगुरुप्रसादानें उत्पन्न झालेलें, याच्या श्रवणानें मनन व निदिध्यास यांस जिंकिलें आहे. ४६ हें वाटेल त्यास आत्मरूपाच्या आनंदाचा शेलका वाटा घेववील, व श्रवणाकडून सर्व इंद्रियांची तृप्ति करवील. ४७ आपल्या शक्तीनें चतुर चकोर पक्षी चंद्राचे अमृताचा जसा उपभोग घेतात, तसा सर्वांना उपभोग घेतां येत नाहीं; तरी चांदण्याचा उपभोग सर्वांस होतो. ४८ तसा या अध्यात्मशास्त्रापासून जितेंद्रिय पुरुष जे अधिकारी आहेत त्यांनाच खरा आनंद प्राप्त होतो; परंतु इतर लोकांना वाणीच्या सौंदर्यापासून सुख होतें. ४९ अशा प्रकारचें श्रीगुरु निवृत्तिनाथांचें खरें ऐश्वर्य आहे, म्हणून हा माझा ग्रंथ न-

१ रूपाला आलेलें, देखणें. २ मराठी भाषेनें. ३ एकलव्य नांवाच्या कोळ्यानें. ४ भांडूं लागली. ५ छाटी. ६ सचेतन. ७ धनी. ८ दृष्टिमात्रानें. ९ पाठीराखा होतो. १० काव्यग्रंथ. ११ दृष्टीचा, पाहण्याचा. १२ भाषेंत. १३ स्पष्ट केला. १४ गीतेचा अर्थ. १५ अधीनपणानें. १६ एकदेशित्व, अपूर्ण. १७ वक्तृत्वाला. १८ गाणाराला. १९ साधी, नुसतीं. २० वसंतऋतूंतील. २१ गाण्यावांचून. २२ आबालवृद्धांस सुगम. २३ गुंफिली. २४ सुवासासाठीं फूल येण्यापर्यंत. २५ लागण्याबरोबर. २६ व्याख्यानरूपानें. २७ दुःख, तळमळ, चटका. २८ प्रकाशित होती, शोभेला येती. २९ रसस्वाद प्राप्त झाल्यास. ३० विश्रांतिस्थान. ३१ शेलका वांटा, उत्तम भाग. ३२ आपल्या शक्तीनें. ३३ प्राप्त होय. ३४ या आत्मानात्मविचारशास्त्रीं. ३५ जितेंद्रिय.

सून त्यांच्या कृपेचें वैभवच होय. १७५० क्षीरसिंधूच्या तीरावर पार्वतीचे कानांत श्रीशंकरांनीं जें ज्ञान सांगितलें पण तें केव्हां सांगितलें तें माहीत नाहीं.—५१ तें ज्ञान क्षीरसमुद्रामध्यें माशाचे पोटांत जे मत्स्येंद्रनाथ गुप्तरूपानें होते त्यांना प्राप्त झालें. ५२ ते मत्स्येंद्रनाथ सहज संचार करितां करितां सप्तशृंगावर आले. तेथें ज्याचे अवयव भंगलेले होते, असे चौरंगीनाथ, हे मत्स्येंद्रनाथाचें दर्शन होण्याबरोबर सर्व अवयवांनीं परिपूर्ण झाले. ५३ मग, त्या अचल समाधीचा उपभोग घ्यावा या इच्छेनें तें आपलें ऐश्वर्य मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथांस दिलें. ५४ त्या मत्स्येंद्रनाथांनीं योगरूप कमलिणी धारण करणारें सरोवर व विषयविध्वंस करण्याविषयीं महाशूर असे जे गोरक्षनाथ, त्यांजला आपले योगैश्वर्याचे पदावर बसवून राज्याभिषेक केला. ५५ त्यानंतर, शंकरापासून परंपरेनें आलेलें जें अद्वयानंदसुख, तें गहिनीनाथ यांनीं गोरक्षनाथांपासून संपूर्ण संपादन केलें. ५६ मग, कलीनें सर्व भूतांचा ग्रास केलेला आहे असें पाहून गहिनीनाथांनीं श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा केली ५७ कीं, आदिगुरु शंकरापासून शिष्यपरंपरेनें जें हें बोधाचें ऐश्वर्य आमचे कुलांत प्राप्त झालें आहे, ५८ तें तूं घेऊन कलीनें ग्रस्त केलेल्या जीवांना दुःखापासून सर्व प्रकारें मुक्त कर. ५९ अगोदर श्रीनिवृत्तिनाथ कृपाळु त्यांत श्रीगुरूंची आज्ञा झाली, मग काय विचारतां? मेघाच्या क्षोभाला जसा वर्षाकाल कारण होतो, त्याप्रमाणें गुरूंचा बोल त्यांच्या कृपेच्या क्षोभाला कारण झाला. १७६० मग, पीडीत झालेल्या जनाला दुःखापासून सोडवावें या कळकळीनें गीतेचा अर्थ करण्याचे मिषानें ब्रह्मरसाचा जो त्यांनीं वर्षाव केला, तो हा ग्रंथ होय. ६१ तेथें मी चातकासारखा गुरूंचा प्रसाद प्राप्त व्हावा, अशी इच्छा करून बसलेला अनन्य शिष्य पाहून मजवर त्यांनीं कृपा केली, म्हणून मी या यशास प्राप्त झालों. ६२ अशा प्रकारें करून गुरुपरंपरेनें प्राप्त झालेलें समाधिधन एके ठिकाणीं बांधून श्रीनिवृत्तिनाथांनीं मजला दिलें. ६३ एऱ्हवीं, अध्ययन केलें नाहीं व कांहीं ऐकलेंही नाहीं; तसेंच स्वामींची सेवा करण्याचेंही मला ज्ञान नाहीं; मग ग्रंथ करण्याची योग्यता कोठून येणार? ६४ परंतु वास्तविक पाहिलें असतां श्रीगुरूंनीं माझें निमित्त करून जो ग्रंथ केला, त्या योगानें सर्व जगाचें संरक्षण झालें आहे. ६५ याजकरितां, मी पुरोहिताप्रमाणें जें कांहीं न्यूनाधिक बोललों असेन, तें तुम्ही आईप्रमाणें सहन करा ६६ शब्दाची रचना कशी करावी व त्याचा अर्थ कसा चढता असावा, व अलंकार कशाला म्हणतात, हें मला माहीतही नाहीं ६७ कळसूत्री बाहुली जसे सूत्रधारानें हालविल्याप्रमाणें हालते, तसें माझ्या गुरूंनीं जें जें अंतःकरणांत प्रकाशित केलें तें मी बोललों; ६८ म्हणून, माझ्या ग्रंथांतील गुणदोष सहन करा, असें मी म्हणत नाहीं; कारण माझ्या गुरूंनीं मजजवळ ठेविलेला जांगड ग्रंथ मीं आपल्यापुढें मांडला आहे. ६९ आणि तुम्हां संतजनांच्या सभेत एकाद्या गोष्टीचा उणेपणा नाहींसा न होईल, तर लडिवाळपणें मी तुमच्यावर रागवेन. १७७० लोखंडाचा कमीपणा परिसाच्या स्पर्शानें जर सहज नाहींसा होणार नाहीं, तर त्याचा दोष कोणाकडे येईल? ७१ ओहोळानें इतकेंच करावें कीं, गंगेस जाऊन मिळावें; मग जर त्याला ती आपल्यांत स्वीकार करून न घेईल (पवित्र न करील),

१ पलीकडे. २ पार्वतीच्या कानांत ३ शंकरानें. ४ क्षीरसमुद्राच्या लाटामध्यें. ५ माशाच्या पोटांत. ६ प्राप्त. ७ मत्स्येंद्रनाथ. ८ हातपाय तुटलेल्या. ९ चौरंगीनाथ. १० निर्विघ्न, उपाधिरहित. ११ या वासनेनें, इच्छेनें १२ पानमुद्रा. १३ मत्स्येंद्रनाथांनीं. १४ योगरूप कमलिनीचें सरोवर. १५ विषयांचा नाश करणारा महाशूर. १६ शंकरापासून मिळालेलें अद्वयानंद सुख. १७ मुळापासून संपूर्ण. १८ सर्व भूतांना कलिकाळ कवळीत येत आहे. १९ त्वरा. २० ऐश्वर्य, विस्तार. २१ धावून रक्षणें. २२ पीडीताच्या पान्ह्यासाठीं. २३ गीतेचा अर्थ करण्याच्या निमित्तानें. २४ चातक. २५ गुरुपरंपरेनें. २६ परस्वाधीनपणानें. २७ क्षमा करा. २८ सिद्धांतांत कसें शिरावें. २९ कळसूत्री बाहुली. ३० ग्रंथयुक्त बोललों. ३१ कोपूं लागेन. ३२ स्पर्शलेल्या. ३३ वारंदे रिघतीला. ३४ लोखंडानें. ३५ ओढ्यानें.

थाचें । गौरव आहे जी साचें । ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तिये १७५० क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तीच्या कर्णकुहरीं । नेणों कैं श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ५१ तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरीं गुप्त । होता तयाचा हातु । पैठें जालें ५२ तो मत्स्येंद्र सप्तशृंगी । भग्नावयवा चौरंगीं । भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ५३ मग समाधि अव्युत्थया । भोगावी वासना यया । ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ५४ तेणें योगाब्जिनीसरोवरु । विषयविध्वंसैकवीरु । तिये पदीं कां सर्वेश्वरु । अभिषेकिले ५५ मग तिहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव । संपादिलें सप्रभव । श्रीगहिनीनाथा ५६ तेणें कळिकळितु भूतां । आला देखोनि निरुता । ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ५७ ना आदिगुरु शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा संसरा । जाला जो आमुतें ५८ तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जीवां । सर्व प्रकारीं धांवें । करीं पां वेगीं ५९ आधींच तंव तो कृपाळू । वरी गुरुआज्ञेचा बोलू । जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघां १७६० मग आर्तांचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ६१ तेथ पुढां मी चातकिया । मांडला आर्ती आपुलिया । कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ६२ एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ६३ वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामीची । ऐशिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ६४ परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ६५ तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोलिलों पुरें उणें । तें तुम्हीं माउलीपणें । उपसाहिजो जी ६६ शब्द कैसा घडिजे । प्रमेयीं कैसें पां चढिजे । अळंकारु म्हणिजे । काय तें नेणें ६७ सायिखडेयाचें वाहुलें । चालवित्या सूत्राचेनि चाले । तैसा मातें दावीत बोलें । स्वामी तो माझा ६८ यालागीं मी गुणदोष- । विषीं क्षमाविना विशेष । जे मी संजात ग्रंथलों देख । आचार्यें कीं ६९ आणि तुम्हां संतांचिये सभे । जें उणिवेसी ठाके उभें । तें पूर्ण नोहे तैं लोभें । तुम्हांसीचि कोपें १७७० सिवतलियाही परिसें । लोहत्वाचिये अवदसे । न मूकिजे औयसें । तें कवणा बोलु ७१ वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें । मगही गंगा जरी नोहावें । तें तो काय

सून त्यांच्या कृपेचें वैभवच होय. १७५० क्षीरसिंधूच्या तीरावर पार्वतीचे कानांत श्रीशंकरांनी जें ज्ञान सांगितलें पण तें केव्हां सांगितलें तें माहीत नाही.—५१ तें ज्ञान क्षीरसमुद्रामध्यें माशाचे पोटांत जे मत्स्येंद्रनाथ गुप्तरूपानें होते त्यांना प्राप्त झालें. ५२ ते मत्स्येंद्रनाथ सहज संचार करितां करितां सप्तशृंगावर आले. तेथें ज्यांचे अवयव भंगलेले होते, असे चौरंगीनाथ, हे मत्स्येंद्रनाथांचें दर्शन होण्याबरोबर सर्व अवयवांनी परिपूर्ण झाले. ५३ मग, त्या अचल समाधीचा उपभोग घ्यावा या इच्छेनें तें आपलें ऐश्वर्य मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथांस दिलें. ५४ त्या मत्स्येंद्रनाथांनीं योगरूप कमलिणी धारण करणारें सरोवर व विषयविध्वंस करण्याविषयीं महाशूर असे जे गोरक्षनाथ, त्यांजला आपले योगैश्वर्याचें पदावर बसवून राज्याभिषेक केला. ५५ त्यानंतर, शंकरापासून परंपरेनें आलेलें जें अद्वयानंदसुख, तें गहिनीनाथांनीं गोरक्षनाथांपासून संपूर्ण संपादन केलें. ५६ मग, कलीनें सर्व भूतांचा ग्रास केलेला आहे असें पाहून गहिनीनाथांनीं श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा केली ५७ कीं, आदिगुरु शंकरापासून शिष्यपरंपरेनें जे हें बोधाचें ऐश्वर्य आमचे कुलांत प्राप्त झालें आहे, ५८ तें तूं घेऊन कलीनें ग्रस्त केलेल्या जीवांना दुःखापासून सर्व प्रकारें मुक्त कर. ५९ अगोदर श्रीनिवृत्तिनाथ कृपाळु त्यांत श्रीगुरूंची आज्ञा झाली, मग काय विचारतां; मेघाच्या क्षोभाला जसा वर्षाकाल कारण होतो, त्याप्रमाणें गुरूंचा बोल त्यांच्या कृपेच्या क्षोभाला कारण झाला. १७६० मग, पीडीत झालेल्या जनाला दुःखापासून सोडवावें या कळकळीनें गीतेचा अर्थ करण्याचे मिषानें ब्रह्मरसाचा जो त्यांनी वर्षाव केला, तो हा ग्रंथ होय. ६१ तेथें मी चातकासारखा गुरूंचा प्रसाद प्राप्त व्हावा, अशी इच्छा करून बसलेला अनन्य शिष्य पाहून मजवर त्यांनीं कृपा केली, म्हणून मी या यशास प्राप्त झालों. ६२ अशा प्रकारें करून गुरुपरंपरेनें प्राप्त झालेलें समाधिधन एके ठिकाणी बांधून श्रीनिवृत्तिनाथांनीं मजला दिलें. ६३ एरव्हीं, अध्ययन केलें नाहीं व कांहीं ऐकलेंही नाहीं; तसेंच स्वामींची सेवा करण्याचेंही मला ज्ञान नाहीं; मग ग्रंथ करण्याची योग्यता कोठून येणार? ६४ परंतु वास्तविक पाहिलें असतां श्रीगुरूंनीं माझें निमित्त करून जो ग्रंथ केला, त्या योगानें सर्व जगाचें संरक्षण झालें आहे. ६५ याजकरितां, मी पुरोहिताप्रमाणें जें कांहीं न्यूनाधिक बोललों असेन, तें तुम्ही आईप्रमाणें सहन करा ६६ शब्दाची रचना कशी करावी व त्याचा अर्थ कसा चढता असावा, व अलंकार कशाला म्हणतात, हें मला माहीतही नाही ६७ कळसूत्री बाहुली जसे सूत्रधारानें हालविल्याप्रमाणें हालते, तसें माझ्या गुरूंनीं जें जें अंतःकरणांत प्रकाशित केलें तें मी बोललों; ६८ म्हणून, माझ्या ग्रंथांतील गुणदोष सहन करा, असें मी म्हणत नाही; कारण माझ्या गुरूंनीं मजजवळ ठेविलेला जांगड ग्रंथ मी आपल्यापुढें मांडला आहे. ६९ आणि तुम्हां संतजनांच्या सभेत एकाद्या गोष्टीचा उणेपणा नाहींसा न होईल, तर लडिवाळपणें मी तुमच्यावर रागावेन. १७७० लोखंडाचा कमीपणा परिसाच्या स्पर्शानें जर सहज नाहींसा होणार नाहीं, तर त्याचा दोष कोणाकडे येईल? ७१ ओहोळानें इतकेंच करावें कीं, गंगेस जाऊन मिळावें; मग जर त्याला ती आपल्यांत स्वीकार करून न घेईल (पवित्र न करील),

१ पलीकडे. २ पार्वतीच्या कानांत ३ शंकरानें. ४ क्षीरसमुद्राच्या लाटामध्यें. ५ माशाच्या पोटांत. ६ प्राप्त. ७ मत्स्येंद्रनाथ. ८ हातपाय तुटलेल्या. ९ चौरंगीनाथ. १० निर्विघ्न, उपाधिरहित. ११ या वासनेनें, इच्छेने १२ ज्ञानमुद्रा. १३ मत्स्येंद्रनाथांनीं. १४ योगरूप कमलिनीचें सरोवर. १५ विषयांचा नाश करणारा महाशूर. १६ शंकरापासून मिळालेलें अद्वयानंद सुख. १७ क्रमागत संपूर्ण. १८ सर्व भूतांना कलिकाळ कवळीत येत आहे. १९ त्वरा. २० ऐश्वर्य, विस्तार. २१ धावून रक्षणें. २२ पीडीताच्या पारणासाठीं. २३ गीतेचा अर्थ करण्याच्या निमित्तानें. २४ चातक. २५ गुरुपरंपरेनें. २६ परस्वाधीनपणानें. २७ क्षमा करा. २८ सिद्धांतांत कसें शिरावें. २९ कळसूत्री बाहुली. ३० ग्रंथयुक्त बोललों. ३१ कोपूं लागेन. ३२ स्पर्शलेल्या. ३३ माईद स्थितीला. ३४ ओसंडानें. ३५ ओढ्यानें.

करी ७२ म्हणौनि भाग्ययोगें बहुवें । तुम्हां संतांचे मी पाये । पातलों आतां कें लाहे । उणें जगीं ७३ अहो जी माझेनि स्वामी । मज संत जोडूनि तुम्हीं । दिधलेति तेणें सर्वकामीं । परिपूर्ण जालों ७४ पाहा पां मातें तुम्हांसांगडें । माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें आळियाडें । सिद्धी गेलें ७५ जी कनकाचें निखेंळ । वोतूं येईल भूमंडळ । चिंतारत्नीं कुळाचळ । निमूं येती ७६ सातांही हो सागरातें । सोपें भरितां अमृतें । दुर्वाड नोहे तारांतें । चंद्र करितां ७७ कल्पतरूचे आराम । लावितां नाहीं विषम । परी गीतार्थाचें वर्म । निवडूं न ये ७८ तो मी येकु सर्व मुका । बोलोनि मऱ्हाटिया भाखा । करीं डोळेवरी लोकां । घेवों ये ऐसें जें ७९ हा ग्रंथसागरु येव्हढा । उतरोनि पैलीकडा । कीर्तिविजयाचा धेंडा । नाचे जो का १७८० गीतार्थाचा आवांरु । कळशेंसीं मेहामेरु । रचूनि माजीं श्रीगुरु- । लिंग जें पूजीं ८१ गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें वाय । ते मायपूता भेटी होय । हा धर्म तुमचा ८२ तुम्हां सज्जनांचें केलें । आकळुनी जी मी बोलें । ज्ञानदेव म्हणे थेंकुलें । तैसें नोहे ८३ काय बहु बोलों सकळां । मेळविलों जन्मफळा । ग्रंथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ८४ मियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा । ते पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ८५ मजलागीं ग्रंथाची स्वामी । दुजी सृष्टी जे हे केली तुम्हीं । तें पाहोनि हांसों आम्ही । विश्वामित्रातेंही ८६ जे असोनि त्रिशंकुदोषें । धातयाही आणावें वोसें । तें नासतें कीजे कीं ऐसें । निर्मावें नाहीं ८७ शंभू उपमन्यूचेनि मोहें । क्षीरसागरूही केला आहे । येथ तोही उपमेसरी नोहे । जे विषगर्भ कीं ८८ अंधकारु निशाचरां । गिळितां सूर्यें चराचरां । धांवा केला तरी खरा । ताउनी कीं तो ८९ तातलियाही जगाकारणें । चंद्रें वेंचिलें चांदणें । तया सदोषा केवीं म्हणे । सारखें हें १७९० म्हणोनि तुम्हीं मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं । उपयोग केला तो पुढती । निरूपम जी ९१ किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें । येथ माझें जी उरलें । पाईकपण ९२ आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ९३ जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ९४ दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें

तर त्याच्याकडे काय दोष आहे? ७२ म्हणून महद्भाग्याच्या योगानें मी तुम्हां संतजनांच्या पायांजवळ आलों आहें; तर आतां या जगांत मला काय कमी आहे; ७३ अहो, काय सांगावें! माझ्या गुरूंनी तुम्हां संतजनांची भेट करून दिली, त्या योगानें माझ्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या आहेत. ७४ पहा की, तुमचेसारखे अनुकूल माहेरघर मला मिळालें म्हणून हा ग्रंथ करण्याचा माझा छंद सिद्धीस गेला ७५ एऱ्हवी सर्व पृथ्वी निखळ सोन्याची करतां येईल, व कुलपर्वत चिंतामणींचे करितां येतील; ७६ सात समुद्र अमृतानेंही भरण्याचें सोपें आहे; तान्यांना चंद्र करणें हेंही कठीण नाहीं, ७७ कल्पतरूंचे बाग लावण्यांत कांहीं कठीण नाहीं; या सांगितलेल्या सर्व गोष्टी तपाच्या बळानें करतां येतील, परंतु गीतेच्या अर्थाचें वर्म गुरुप्रसादाशिवाय समजावयाचें नाहीं, ७८ तो मी सर्व प्रकारें मुका असून, गुरूंच्या कृपेनें गीतेचा अर्थ मराठींत अशा रीतीनें केला आहे की, सर्व लोकांना प्रत्यक्ष डोळ्यांनीं दिसावा; ७९ व त्यांच्याच कृपेनें एवढा ग्रंथरूपी सागर तरून पलीकडे कीर्तिरूप विजयाचा झेंडा नाचविला. १७८० गीतेचें अर्थरूप देवालय अठरावे अध्यायरूपी कळसासुद्धां रचून त्यांत श्रीगुरूंचें लिंग स्थापन करून त्यांची पुजा केली. ८१ गीता ही निष्कपट आई असून, मुमुक्षु ही जी तिचीं लहान पोरें, त्यांची व तिची चुकामूक पडून जीं ती सैरावैरा हिंडतात. त्या मायलेकरांची गांठ पाडणें, हा तुम्हां संतजनांचा धर्म आहे. ८२ महाराज म्हणतात कीं, तुह्मी संतजनांनीं जी कृपा केली, त्यामुळें मी जें बोललों, तें अल्प नव्हे. ८३ फार काय सांगूं! हा ग्रंथ शेवटास गेल्यामुळें मला माझ्या सर्व पूर्वजन्मांचें फळ तुम्हीं प्राप्त करून दिलें आहे. ८४ मी तुमच्यावर भरंवसा ठेवून जी जी इच्छा केली तो सर्व तुम्हीं पुरवून मला सुखी केलें. ८५ हे गुरो, तुम्ही माझ्याकरितां जी गीतार्थरूपी ग्रंथाची नवी सृष्टी केली, ती पाहून आम्हीं विश्वामित्राच्या सृष्टीला हंसतों. ८६ कारण, ती नाशवंत सृष्टी त्रिशंकु राजाचे उद्देशानें ब्रह्मदेवास कमीपणा आणावा; या हेतूनें विश्वामित्रांनीं उत्पन्न केली, तशी ही आपण केलेली सृष्टी नाशवंत नसून शाश्वत आहे. ८७ शंकरांनीं आपला भक्त उपमन्यु याच्या ममतेनें त्याच्याकरितां क्षीरसागरही उत्पन्न केला, तो जर या ग्रंथाच्या बरोबर आहे म्हणावें, तर तो विषगर्भ आहे, म्हणजे त्यांत विष आहे. ८८ प्राणिमात्राला अंधकार व निशाचर यांची पीडा होऊं नये म्हणून त्यानीं धांवा केला असतां, सूर्यानें त्यांच्या दुःखाचा आपले तेजानें परिहार केला खरा, परंतु त्याच्या तेजाचे उष्णतेनें जीवमात्राला त्रास होतो, हा त्याच्यांत कमीपणा आहे. ८९ तप्त झालेल्या जगास चंद्रानें आपल्या चांदण्यानें शांत केलें, तो चंद्र कलंकानें युक्त आहे; म्हणून त्या दोषयुक्त चंद्रासारखा हा ग्रंथ आहे, असें कसें म्हणावें! १७९० याकरितां, तुम्हीं संतजनांनीं माझ्याकडून त्रैलोक्याला उपयोग व्हावा ह्मणून जो ग्रंथ करविला तो अनुपम आहे. ९१ फार काय सांगावें! तुमच्या कृपेनें धर्मरूप कीर्तन शेवटास गेलें; तर माझें आतां इतकेंच काम राहिलें आहे कीं, आपली सेवा करावी. ९२ आतां यावर, विश्वस्वरूपच सद्गुरु यांनीं माझ्या वाग्यज्ञेंकरून संतुष्ट होऊन मजला हा प्रसाद द्यावा ९३ कीं, दुष्टांचा कुटिलपणा जाऊन त्यांना सत्कर्माची प्रीति उत्पन्न होवो; व जीवमात्रांची एकमेकांवर मैत्री वाढो. ९४ या सर्व विश्वामधील पापरूपी अंधकार नाहींसा होऊन स्वधर्मरूपी सूर्य उगवून त्याचा प्रकाश होवो, आणि प्राणिमात्राच्या ज्या ज्या इच्छा असतील त्या त्या पूर्ण होवोत.

१ तुमच्यासारखें. २ अनुकूलतेनें. ३ हट्ट. ४ शुद्ध केवळ. ५ पर्वत. ६ काठिण. ७ बाग. ८ कठिण. ९ प्रत्यक्ष डोळ्यानें. १० आकार. ११ कळस. १२ शिखर. १३ व्यर्थ. १४ मातापुत्रांची १५ त्रिशंकुराजाच्या हेतूनें. १६ उणें १७ योग्य, बरोबर. १८ तप्त झालेल्या. १९ सेवकत्व, चाकरपणा. २० ग्रंथरूप यज्ञानें. २१ प्रसाद. २२ वक्रदृष्टि. २३ प्रीति. २४ पातकांचें.

वांछील तो तें लाहो । प्राणिजात ९५ वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूमंडळी । भेटो तयां भूतां ९६ चलां कल्पतरूंचे आरव । चेतना चिंतामणीचें गांव । बोलते जे अर्णव । पीयूषांचे ९७ चंद्रमे जे अ-लांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ९८ किंबहुना सर्व सुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भाजिजो आदिपुरुखीं । अखंडित ९९ आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी १८०० येथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला १ ऐसें युगीं परी कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीच्या कूलीं । दक्षिणलिंगीं २ त्रिभुवनैकपवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र । जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ३ तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ४ तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें । केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ५ एवं भारताच्या गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णार्जुनीं बरवी । गोठी जे केली ६ जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सेविजे जें ७ तिये गीतेचा कळसु । संपूर्ण हा अष्टादशु । म्हणें निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ८ पुढती पुढती । पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ती । सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होईजे ९ शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला १८१०

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ श्लोक ७८, ओंव्या १८१०

*श्रीएकनाथ महाराजांनीं ज्ञानेश्वरी ग्रंथ संशोधन केल्यानंतर ज्ञानेश्वरीसंबंधानें केलेल्या ओंव्या.*

श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं । एकाजनार्दनें अत्यादरीं । गीता-ज्ञानेश्वरी प्रतिशुद्ध केली १ ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनिया एवंविध । प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी २ नमो ज्ञानेश्वरा विष्कलंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ३ बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रपदमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठी संपूर्ण जाहली ४ ज्ञानेश्वरीपाठीं जो ओंवी करील मऱ्हाटी । तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥ ५ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

१९५ या भूतलावर आखिल मंगलाचा वर्षाव करणाऱ्या भगवतभक्तांच्या समुदायांची सर्व भूतांना, सद्भावेंकरून सदोदित भेट होवो. ९६ ते भक्तजन कसे आहेत, तर चालतेबोलते कल्पतरूंचे बाग, जिवंत चिंतामणींचे गांव, किंवा अमृताचे चालतेबोलते समुद्रच होत, ९७ जे कलंकरहित प्रतिचंद्र, संसाररूपी अंधकार दूर करून शांतिसुख देणारे प्रतिसूर्य असे भगवद्भक्त, ते सकल जीवांना प्रिय होवोत. ९८ फार काय मागावें! सर्व त्रैलोक्य सुखानें परिपूर्ण होऊन प्राणिमात्राला हरीचें अखंड भजन करण्याची इच्छा होवो. ९९ आणि या ग्रंथावरच ज्यांचें उपजीवन आहे, त्यांना इहलोकचें व परलोकचें सुख प्राप्त होवो. १८०० तेव्हां सद्गुरु प्रसन्न होऊन म्हणाले कीं, तुझ्या म्हणण्याप्रमाणें सर्व होईल असें वरप्रदान मिळाल्यानें महाराज फार संतोषित झाले. १ याप्रमाणें कलियुगामध्यें, महाराष्ट्र देशांत, श्रीगोदावरीच्या दक्षिण तीरास, २ त्रैलोक्यांत पवित्र व अनादि पंचक्रोश क्षेत्र (नेवासें,) ज्या ठिकाणी सर्व जगताचें जीवनसूत्र श्रीमोहनीराज आहे, ३ त्या क्षेत्रांत, सकल कलांनीं संपूर्ण पृथ्वीचा धनी व न्यायानें प्रजेचें पालन करणारा यदुकुलास भूषण देणारा रामराजा राज्य करीत होता, ४ त्या वेळेस ज्या श्रीनिवृत्तिनाथ महाराजांची परंपरा श्रीशंकरापासून आहे, त्यांचे शिष्य ज्ञानदेव यांनीं श्रीमद्भगवद्गीतेस मराठी भाषेचें लेणें केलें. ५ याप्रमाणें भारतांतील प्रसिद्ध भीष्मपर्वांत श्रीकृष्णार्जुनांचा जो उत्तम संवाद झाला; ६ जें उपनिषदांचें सार असून सर्व शास्त्रांचें मोहर व परमहंस साधूंचें क्रीडा करण्याचें सरोवरच होय; ७ त्या गीतेचा अठरावा अध्याय हा कळस आहे, असें श्रीनिवृत्तिमहाराजांचें शिष्य ज्ञानदेव म्हणतात. ८ उत्तरोत्तर या ग्रंथाच्या पुण्यरूप संपत्तीनें जीवमात्राला सर्व सुखाचा पूर्ण लाभ होवो. ९ शके १२१२ मध्यें ही टीका ज्ञानेश्वरमहाराजांनीं करून सच्चिदानंदबाबांनीं अति आदरानें लिहिली. १८१०

१ भगवज्जनांची. २ समुदाय. ३ सर्वकाळ. ४ चालता. ५ कोटी, अंकुर. ६ जीवंत. ७ समुद्र. ८ अमृताचें. ९ लांछनरहित. १० सूर्य. ११ प्रिय. १२ इहपरलोकीं. १३ श्रीगुरु. १४ दानप्रसाद. १५ कलियुगांत. १६ दक्षिण भागाच्या तीरीं. १७ पांच कोश विस्तृत, पंचक्रोशींत. १८ मोहनीराज. १९ यदु=माधव. २० आदिनाथ परंपरासंभूत, शिवसंप्रदायिक. २१ निवृत्तिनाथांच्या शिष्यानें. २२ मराठी भाषालंकार. २३ कळस. २४ उत्तरोत्तर. २५ ज्ञानेश्वरीच्या पाठांत.

## श्रीएकनाथ महाराजांनीं ज्ञानेश्वरी संशोधन केलेल्यानंतर ज्ञानेश्वरीसंबंधानें केलेल्या ओंव्या.

शके १५०६ तारण नाम संवत्सरांत जनार्दनमहाराजांचे शिष्य एकनाथस्वामी यांनीं गीता–ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. १ ग्रंथ मूळचाच अति शुद्ध होता, परंतु लोकांच्या पाठभेदानें कोठें कोठें अबद्ध झाला होता, तो पाहून ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. २ ज्यांची गीतेवरील टीका वाचली असतां, भाविक वाचणाराला गीतेचें संपूर्ण ज्ञान होतें, त्या निष्कलंक ज्ञानेश्वरमहाराजांस नमस्कार असो. ३ पुष्कळ काळानें प्राप्त होणारा जो उत्तम कपिलाषष्ठीचा योग भाद्रपद वद्य षष्ठी त्या दिवशीं गोदेच्या तीरीं पैठण क्षेत्रांत ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करण्याचें काम समाप्त झालें. ४ ज्ञानेश्वरीचे पाठांत जो महाराष्ट्र भाषेंत ओंवी करून घालील, त्यानें अमृताचे ताटांत नरोटी ठेवल्याप्रमाणें होईल असें समजावें. ॥ ५ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## ज्ञानेश्वरीपाठफल.

भाव धरूनियां वाची ज्ञानेश्वरी । कृपा करी हरी तयावरी ॥ १ ॥
स्वमुखें आपण सांगे तो श्रीविष्णु । श्री गीता हा प्रश्नु अर्जुनेंसी ॥ २ ॥
तेंचि ज्ञानेश्वरी वाचे वदतां साचें । भय कळिकाळाचें नाहीं तया ॥३॥
एका जनार्दनीं संशय सांडोनी । दृढ धरी मनीं ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥

---

## आरती.

होतां कृपा तुझी पशु बोले वेद । निर्जिव चाले भिंति महिमा अगाध ॥
भगवद्गीता टीका ज्ञानेश्वरी शुद्ध । करुनी भाविक लोकां केला निजबोध ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय ज्ञानसिंधु । नामस्मरणें तुमच्या तुटे भवबंधु ॥ ध्रु० ॥
चौदाशें वरुषांचे तप्तीतीरवासी । येऊनी चांगदेव लागती चरणांसी ॥
करुनी कृपा देवें अनुग्रहिलें त्यासी । देऊनी आत्मज्ञान केलें सहवासी ॥ २ ॥
समाधि समयीं सकल समुदाय । घेऊनी सुरवर आले श्रीपंढरीराय ॥
द्वारीं अजानुवृक्ष सुवर्ण पिंपळ अनुमाये । जाणुनि महिमा निळा चरणातळीं राहे ३

---

## आरती.

आरती ज्ञानराजा । महा कैवल्य तेजा ।
सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ १ ॥ आ० ॥
लोपलें ज्ञान जगीं । विश्व नेणती कोणी ।
अवतार पांडुरंग । नांव ठेविलें ज्ञानी ॥ २ ॥ आ० ॥
प्रगट गुह्य बोलें विश्व ब्रह्मचि केलें ।
रामा जनार्दनीं । पायीं । ठकचि ठेलें ॥ ३ ॥ आ० ॥

पुंडलीक वरदा हरि विठ्ठल ! श्रीज्ञानदेव तुकाराम ! तुकाराम ! तुकाराम ! !

ह. भ. प. विनायकबोवा साखरेकृत

# विचारसागररहस्य

किंमत अडीच रुपये, ट. ध्या. र. ८८

केसरीचा अभिप्रायः—ता. ११।११।१९२४. महाराष्ट्रांत वेदान्ती अनेक आहेत, पण वेदान्ताची सोपपत्तिक प्रक्रिया समजून देणारा ग्रंथ बाबा गर्दे यांच्याखेरीज आजवर कोणीं लिहिलेला दिसत नाहीं. ही उणीव भरून काढण्याकरितां विनायकबुवा साखरे यांनीं हा 'विचारसागररहस्य' ग्रंथ मराठींत तयार करून तो प्रसिद्ध केला आहे. दादूपंथाचे दिल्ली शहरांतील एक महंत निश्चलदासजी यांनीं इ. सन १८४९ त 'विचारसागर' नांवाचा ग्रंथ हिंदी भाषेंत लिहिला. त्याचाच हा मराठींत अनुवाद आहे. निश्चलदासजींनीं काशीक्षेत्रांत स्वामी विशुद्धानंद, काकारामजी, दामोदरशास्त्री इत्यादि विख्यात गुरूंजवळ षट्शास्त्रांचें सांगोपांग अध्ययन केलें होतें; त्यांत वेदान्तशास्त्रावर त्यांचा विशेष भर असल्यानें त्या शास्त्राची प्रक्रिया सुलभ रीतीनें सर्वांस समजून देण्याकरितां त्यांनीं 'विचारसागर' व 'वृत्तिप्रभाकर' असे दोन अमोलिक ग्रंथ लिहिले. वेदान्तावर संस्कृतांत भामती, चित्सुखी, अद्वैतसिद्धि आणि मराठींतहि पंचदशी, वेदान्ताचें युक्लिड इत्यादि ग्रंथ आहेत. परंतु सामान्य वाचकांस सहज समजण्याइतके ते सुबोध नाहींत. कै. हरभरे यांनीं 'विचारसागरा'चें मराठींत एक भाषान्तर केलें आहे, पण तेंहि दुर्बोधच असल्यानें विनायकबुवा साखरे यांनीं हा प्रयत्न केला आहे आणि तो फारच चांगला साधला साधला आहे.

या 'विचारसागररहस्या'चे सात तरंग असून पहिल्यांत व दुसऱ्यांत अधिकारविचार व तिसऱ्यांत सद्गुरुलक्षण वगैरे भाग आहेत. चौथ्या तरंगापासून अद्वैतशास्त्राच्या मूलतत्त्वांच्या प्रतिपादनास प्रारंभ होऊन त्यांत विवर्तवादाचें आणि जीवब्रह्मैक्यसिद्धीचें उत्कृष्ट विवेचन आहे. पांचव्या तरंगांत मायावाद आणि पंचकोश यांचें स्पष्टीकरण आहे. सहाव्यांत सांख्य, न्याय, वैशेषिक इत्यादि मतांचें खंडन असून त्यांतच अधिकारभेदानें कर्तव्यविचार केलेला आहे. शेवटच्या तरंगांत जीवन्मुक्ति व विदेहमुक्ति यांचें वर्णन देऊन सहा शास्त्रांतील विरोधाचा विचार केला आहे आणि अंत्यजादि मनुष्यमात्रांस तत्त्वज्ञानाचा आणि भक्तीचा अधिकार आहे असें सिद्ध केलें आहे. पृ. २५७ मध्यें समुच्चयवादाचें खंडन केलें आहे; तरी पण ज्ञानी मनुष्य जो व्यवहार करतो त्यास आभासरूप कर्म असें म्हणतात व त्याचा ज्ञानाशीं विरोध नाहीं; भाष्यकारांनींहि ज्ञानाचा आभासरूप कर्म-उपासनेशीं विरोध सांगितला नाहीं असें सांगून आणि विद्वानांची प्रवृत्ति व निवृत्ति प्रारब्धाधीन आहे असें प्रतिपादन करून ज्ञानोत्तर निष्कामकर्मयोगाचा मार्ग मोकळा ठेवला आहे.

एकंदरींत हा ग्रंथ म्हणजे वेदान्ती लोकांस एक अपूर्व मेवाच आहे. हरिदासपुराणिक वगैरेंना वेदान्ताचें सयुक्तिक प्रतिपादन करण्यास हा ग्रंथ आधारभूत होईल, सामान्य जिज्ञासूंना तो मार्गदर्शक होईल आणि परमतखंडनेच्छु विवादकांना हें एक सुलभ साधन हातीं आलेलें पाहून आनंद वाटेल. विनायकबुवा साखरे यांनीं हा ग्रंथ प्रसिद्ध करून धर्मजिज्ञासु वाचकांना ऋणी करून ठेविलें आहे. पुस्तकाची छपाई 'इंदिरा'-प्रेसची अतएव सुबक व ठळक असून बांधणीहि मजबूत आहे. ग्रंथकारांनीं पुस्तकाच्या विक्रीची व्यवस्था इंदिरा छापखान्याचे मालक श्रीयुत त्र्यं. ह. आवटे यांजकडे सोंपविली असल्यानें ग्राहकांनीं त्यांच्याकडे मागणी करावी.

त्र्यंबक हरी आवटे—मालक इंदिरा प्रेस पुणें सिटी.

# वारकरी नित्यपाठ

## ज्ञानेश्वरी

## अध्याय—नववा व बारावा—सार्थ

## हरीपाठ आणि मदालसा यांसह.

किंमत आठ आणे.

---

## सार्थ चांगदेवपांसष्टी.

किंमत चार आणे.

---

## सोपानदेवी.

किंमत चार आणे.

---

निळोबारायकृत.

## सार्थ—गौळणी.

किंमत सहा आणे.

---

## प्रवृत्ति व निवृत्ति

किंमत चार आणे.

---

अन्वयांक

## मणिरत्नमाला.

किंमत दोन आणे.